

शंख

(सर्व छायाचित्रे : डॉ. प्रकाश परांजपे)

# वधी रले

होऊन परिणाम हृदयात शूल होत असल्यास शौक्तिक भस्माचा चांगला उपयोग होतो.

**मौक्तिक :** मौक्तिक म्हणजे मोती. इंग्रजीत त्याला पर्ल (Pearl) व लॅटिनमध्ये मार्गोरिटा पर्ल/ (Margorita) म्हणतात. शिंपल्यामध्ये एक विशिष्ट प्रकारचा कीटक असतो. त्याला 'पर्ल ऑयस्टर' (Pearl Oyster)असे म्हणतात. हा अत्यंत मऊ, लिबलिबित असा प्राणी असतो.



शिंप

प्रवाळाप्रमाणेच रासायनिकदृष्ट्या शिंपेत कॅल्शियम कार्बोनेट असते. शिवाय काही सेंद्रिय रासायनिक द्रव्येही असतात.

शिंपेची शुद्धी, कांजी, लिंबू स्वरस इत्यादी आम्ल द्राव दोलायंत्रात ठेवून स्वेदन केले



**गुणधर्म :** — ... दृष्टिरोगनाशक, शुक्र व बलवर्धक असून पुष्टिदायक आहे. क्षय, श्वास, कास व अग्निमांद्यनाशक आहे. प्रामुख्याने पित्तशामक असल्याने दाहनाशक असतो. हे कार्य डोळे, मेंदू व त्वचा या अवयवांवर विशेष घडून येते.

नाजूक प्रकृतीच्या पित्त प्रकृतीच्या व्यक्तीला थोड्याशा जागरणाने उन्हाने, मनःसंतापाने शरीराची आग होणे, डोके दुखणे, डोळ्यांची आग होणे अशा लक्षणात मौक्तिक पिष्टी उत्तम कार्य करते. याशिवाय उन्माद, अपस्मार तसेच रक्तातिसार, रक्तार्श, हृद्रवात, शुक्रमेह, मूत्रकृच्छ्र इत्यादी अनेक रोगांत मौक्तिक हे उपयुक्त पडते.

**कल्प :** मौक्तिपिष्टी, बृहत्वातचिंतामणी, प्रवाळपंचामृत इत्यादी.

नवग्रहांपैकी दुसऱ्या ग्रहाला म्हणजे चंद्राला प्रिय असणाऱ्या मौक्तिकाची रत्नांमध्ये गणना केली जाते.

**कवडी :** कपर्दिका, वराटिका म्हणजे कवडी हादेखील प्राणिज पदार्थ असून ती समुद्रात सापडते. लॅटिन भाषेत तिला 'याप्रिया मोनेटा' असे म्हणतात. कवडी ही लंबगोलाकार असून तिचा पृष्ठभाग वहिर्गोल असतो. तिच्या तळाच्या बाजूस उभी चीर असून ती आतून पोकळ असते. कवडी म्हणजे एका प्राण्याचे घरच असते. अनेक रंगाच्या, छोट्या मोठ्या आकाराच्या कवड्या समुद्रात आढळतात. जी कवडी पिवळसर रंगाची, पाठीवर गाठी असलेली व लांबटगोल आकाराची असते, ती औषधाकरिता

जातात. सह्याद्रीची डोंगर रांग, त्याच पूर्व व पश्चिम उतार आणि कोकण या परिसरात अशा वन्य खाद्य वनस्पतींचा वापर जास्त प्रमाणात केला जातो.

शेवाळं, करटुली, तेरं, कारांदा, टाकळा, भुईफोड, काही भूछत्रे, कौला किंवा बरका, केनी अशा असंख्य रानटी खाद्य वनस्पती आहेत. काही गावांच्या आठवडेबाजारात त्या योग्य हंगामात विकतही मिळतात. या वन्य वनस्पतींची पद्धतशीर लागवड करीत नाहीत. जंगलात हिंडून त्या गोळा करायच्या अन्

# वाटेवरचं वैभव

**प्रा. प्र. के. घाणेकर**
पुणे.

खायच्या एवढंच. या रानभाज्यांचे पोषणमूल्यही फारसं कोणी अभ्यासलं नसावं. स्थानिक मंडळींनाच या वनस्पतींच्या भाज्या वा अन्य पदार्थ करणं माहिती असतं आणि परंपरेनुसार हंगामात एक-दोन वेळा त्या भाज्या केल्या जातात.

भारंगी ही त्यामानाने बऱ्याच विस्तृत प्रदेशात आढळणारी अन् वापरली जाणारी वनस्पती.

मागे एकदा राजगडास अचानक



पडून इजरच्या ... केले. गल्या ...
अधिकाऱ्यांनी जाहीर केले. ... पडून मृत्यू पावले
आहेत. या सर्व खेळाडूंमध्ये एक साधर्म्य
होते, ते म्हणजे स्पर्धेपूर्वी काही दिवस
... गोदर या खे...ंनी एरिथ्रोपॉयटिनची
... घेतली ... या मृत्यूचे कारण ... हेच

रचना असलेले द्रव्य असते. ... झाकणाचा भाग गुळगुळीत, ... पांढऱ्या रंगाचा असतो. बाह्यपृष्ठ ... विविधरंगी, काही विशिष्ट रचना व थोडासा खडबडीत असतो.



कटुरसाची, स्निग्ध, दीपन, शूलनाशक, पाचक व बलदायक असते. शौक्तिक भस्म कोष्ठगत वातविकारात, पित्तप्रधान विकारात, अतिसार, ग्रहणी, आम्लपित्त अधिक असता उपयोगी पडते. अपचनामुळे वातसंचय

पाणीदार व सुंदर दिसतो.

अशा प्रकारे नैसर्गिकरीत्या मोती तयार होण्यास खूप मोठा कालवधी लागतो. त्यामुळे कृत्रिरीतीने मोती तयार केले जातात. त्यांना 'कल्चर्ड' मोती असे म्हणतात. या पद्धतीत मुक्ताशुक्ती अगोदरच उघडून त्यामध्ये रजःकण ठेवला जातो. त्या शिंपल्यातील कीटक या रजःकणावर आपले स्राव पसरतो व मोती तयार होतो. या पद्धतीत मोती बनण्यासाठी कालवधी कमी लागतो. हे मोती गुणानेही चांगले असतात.

मोत्याची शुद्धी लिंबाच्या रसात करतात व प्रवाळाप्रमाणेच भस्म करतात. मौक्तिकाचे भस्म करून वापरण्यापेक्षा त्याची ...

# खाण्यायोग्य वनस...

# भारंगी

पाऊस पडला की विविध प्रकारच्या वनस्पती अवध्या सह्याद्रीत दिसू लागतात. यासुंगधी, सुपुष्पी वनस्पतींपैकी काही खाण्याजोग्या ... पण खाद्य ...

चाटून-पुसून ... कडसर चव ... चविष्ट लागण... भारंगी. भारं... एक-दोनदा ...

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

# ज्ञानेश्वरी सिद्धयोग दर्शन

-: लेखक :-

डॉ. केशव रामचंद्र जोशी

एम्. ए. पीएच्. डी.

प्रकाशक : ©
व्यवस्थापक, सिद्धयोग प्रकाशन,
२६/२०२ लक्ष्मीनगर, पुणे ९.

मुद्रक :
रा. शं. नेलेकर
श्रीनाथ प्रिंटिंग प्रेस,
३३५ शनिवार पेठ, पुणे ३०.

प्रकाशनकाल :
मार्गशीर्ष वद्य त्रयोदशी, शके १९००,
(श्रीसंत गुळवणीमहाराज जयंती) दि. २८।१२।१९७८

चित्रछपाई :
के. जोशी, अँण्ड को.
ब्लॉक मेकर्स अँण्ड आर्ट प्रिण्टर्स,
भिकारदास मारुती मंदिराजवळ, पुणे ३०.

ग्रंथगौरव :
पुणे विद्यापीठाकडून पीएच्. डी.
पदवीची प्राप्ती

ग्रंथप्रसिद्धी :
पुणे विद्यापीठाच्या सौजन्यपूर्ण अनुज्ञेने

मूल्य १५० रुपये

## –कुण्डलिनीस्तवः–

जन्मोद्धारनिरीक्षिणीह तरुणी वेदादिबीजादिमा
नित्यं चेतसि भाव्यते भुवि कदा सद्वाक्यसञ्चारिणी।
मां सा तु प्रियदासभावकपदं सङ्घातये श्रीधरे!
धात्रि! त्वं स्वयमादिदेववनिता दीनातिदीनं पशुम् ॥१॥

रक्ताभामृतचन्द्रिका लिपिमयी सर्पाकृतिर्निद्रिता
जाग्रत्कूर्मसमाश्रिता भगवती त्वं मां समालोकय।
मांसोद्गन्धकुगन्धदोषजडितं वेदादिकार्य्यान्वितं
स्वल्पान्यामलचन्द्रकोटिकिरणे नित्यं शरीरं कुरु ॥२॥

सिद्धार्थी निजदोषवित्स्थलगतिर्व्यायीयते विद्यया
कुण्डल्या कुलमार्गमुक्तनगरीमायाकुमार्गाश्रिया।
यद्येवं भजति प्रभातसमये मध्याह्नकालेऽथवा
नित्यं यः कुलकुण्डलीजपपदाम्भोजं स सिद्धो भवेत् ॥३॥

वाय्वाकाशचतुर्दलेऽतिविमले वाञ्छाफलान्यालके
नित्यं सम्प्रति नित्यदेहघटिता साङ्केतिता भाविता।
विद्या कुण्डलमानिनी स्वजननी माया क्रिया भाव्यते
यैस्तैः सिद्धकुलोद्भवैः प्रणतिभिः सत्स्तोत्रकैः शम्भुभिः ॥४॥

वाताशङ्कविमोहिनीति बलवच्छायापटोद्गामिनी
संसारादिमहासुखप्रहनने! तत्र स्थिता योगिनी।
सर्वग्रन्थिविभेदिनी स्वभुजगा सूक्ष्मातिसूक्ष्मा परा
ब्रह्मज्ञानविनोदिनी कुलकुटीराघातनी भाव्यते ॥५॥

वन्दे श्रीकुलकुण्डलीं त्रिवलिभिः साङ्गैः स्वयम्भूप्रियां
प्रावेष्टयाम्बरचित्तमध्यचपला बालाबलानिष्कला।
या देवी परिभाति वेदवदना सम्भावनी तापिनी
इष्टानां शिरसि स्वयम्भूवनिता सम्भावयामि क्रियाम् ॥६॥

वाणीकोटिमृदङ्गनादमदनानिश्रेणिकोटिध्वनिः
प्राणेशी प्रियतामसूलकमनोल्लासैकपूर्णानना।
आषाढोद्भवमेघराजिजनितध्वान्ताननास्थायिनी
माता सा परिपातु सूक्ष्मपथगे! मां योगिनां शङ्करी ॥७॥

त्वामाश्रित्य नरा व्रजन्ति सहसा वैकुण्ठकैलासयो–
रानन्दैकविलासिनीं शशिशतानन्दाननां कारणम्।
मातः श्रीकुलकुण्डली प्रियकले! काली कलोद्दीपने!
तत्स्थानं प्रणमामि भद्रवनिते! मामुद्धर त्वं पथे ॥८॥

कुण्डलीशक्तिमार्गस्थं स्तोत्राष्टकमहाफलम्।
यः पठेत् प्रातरुत्थाय स योगी भवति ध्रुवम् ॥९॥

क्षणादेव हि पाठेन कविनाथो भवेदिह।
पवित्रो कुण्डली योगी ब्राह्मणी नो भवेन्महान् ॥१०॥

इति ते कथितं नाथ! कुण्डलीकोमलं स्तवम् ॥११॥

एतत् स्तोत्रप्रसादेन देवेषु गुरुगीष्पतिः।
सर्वे देवाः सिद्धियुता अस्याः स्तोत्रप्रसादतः ॥१२॥

( रुद्रयामले – षष्ठ पटलः )

## – श्रीसद्गुरुमहिमा –

विश्वविकासित मुद्रा । जया सोडी तुझी योगनिद्रा ।
तया नमोजी गणेंद्रा । श्रीगुरुराया ।।१७.१।।

आत्मरूप गणेशु केलिया स्मरण । सकळ विद्यांचें अधिकरण ।
तेचि वंदूं श्रीचरण । श्रीगुरूंचे ।।१३.१।।

जयांचेनि आठवें । शब्दसृष्टि आंगवें ।
सारस्वत आघवें । जिव्हेसि ये ।।१३.२।।

वक्तृत्वा गोडपणें । अमृतातें पारुखें म्हणे ।
रस होती वोळंगणें । अक्षरांसीं ।।१३.३।।

भावाचें अवतरण । अवतरविती खूण ।
हाता चढे संपूर्ण । तत्त्वभेद ।।१३.४।।

श्रीगुरूंचे पाय । जैं हृदय गिंवसूनि ठाय ।
तैं येवढे भाग्य होय । उन्मेखासी ।।१३.५।।

जय जय आचार्या । समस्तसुरवर्या ।
प्रज्ञाप्रभासूर्या । सुखोदया ।।१४.१।।

जयजय देव श्रीगुरो । अकल्पनाख्यकल्पतरो ।
स्वसंविद्द्रुमबीजप्ररो– । हणावनी ।।१८.१०।।

जय जय सर्व विसांवया । सोऽहंभावसुहावया ।
नाना लोक हेलावया । समुद्रा तूं ।।१४.२।।

आइकें गा आर्तबंधू । निरंतरकारुण्यसिंधू ।
विशदविद्यावधू– । वल्लभा जी ।।१४.३।।

तूं जयांप्रति लपसी । तया विश्व हें दाविसी ।
प्रकट तैं करिसी । आघवेंचि तूं ।।१४.४।।

कां जे ळळेयांचे ळळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती ।
जरी माहेरें श्रीमंतें होती । तुम्हां ऐसीं ।।९.३।।

तुमचे या दिठिवेयाचिये वोलें । सासिन्नलें प्रसन्नतेचे मळे ।
ते साउली देखोनि लोळें । श्रांतु जी मी ।।९.४।।

प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो ।
म्हणौनि आम्हीं आपुलिया स्वेच्छा वोलावो लाहों ।
येथही जरी सलगी करूं बिहों । तरी निवों कें पां ? ।।९.५।।

कां जैं दिठिवा तुमचा वरुषे । तैं सकळार्थ सिद्धि मती पिके ।
एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके । जरी उदास तुम्ही ।।९.२५।।

हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्करु माथां पारुखे ।
तो जीवचि परि तुके । महेशेंसीं ।।१०.९।।

अहो सद्गुरुचिये कृपादृष्टीं । तुझें कारुण्य जयातें आधिष्ठी ।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ।।१२.९।।

चंदनाते कायसेनि चर्चावें । अमृतातें केउते रांधावें ।
गगनावरी उभवावें । घडे केवीं ? ।।१०.१२।।

तैसें श्रीगुरुंचे महिमान । आकळितें कें असें साधन ? ।
हें जाणोनि मियां नमन । निवांत केलें ।।१०.१३।।

यालांगी आतां । स्तुति सांडूनि निवांता ।
चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ।।१४.१५।।

कां साडेपंधरया रजतवणी । तैशी स्तुतींचीं बोलणीं ।
उगियाची माथा ठेविजे चरणीं । हेंचि भलें ।। १०. १५ ।।

(सकलसंतशिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराज)

## अर्पण पत्रिका

अनन्तकोटी ब्रह्माण्डनायक भक्तवत्सल भक्ताभिमानी भक्तहृदय-निवासी राजराजेश्वर दत्तस्वरूप संतश्रेष्ठ महायोगी श्रीयुक्त श्रीसमर्थ सद्‌गुरुनाथ श्रीवामन दत्तात्रेय गुळवणीमहाराज यांच्या चरणी प्रेमपूर्वक सादर समर्पण.

योगीराज सद्गुरु श्रीसंत श्रीवामनरावजी गुळवणी महाराज



शक्तिपाताचा महामेरू । बहुत जनांसी आधारू ।
ब्रह्मस्थितीचा निर्धारू । श्रीमंतयोगी ।।

॥ श्रीगुरुःशरणम् ॥

## सद्भावाञ्जली :-

वचनाचा अनुभव हातीं । बोलविती गुरु मज ।
परि हे न कळे असाधकां । जडलोकां जीवांसी ।
अनुश्रुत हे प्रासादिक । कृपा भीक स्वामीची ।
तुका म्हणे वरचेवरी । जातों तरी सांगत ॥

–श्रीसंततुकाराममहाराज

शक्तिपाताचार्य महासिद्धयोगी संतश्रेष्ठ श्रीसमर्थ वामनरावजी गुळवणी-महाराज या माझ्या सद्गुरुनाथांच्या असीम व अपार कृपाबलाने, "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" ही कलाकृती "कृपा भीक स्वामीची" या वर उद्धृत केलेल्या श्रीसंततुकाराममहाराज यांच्या उक्तिप्रमाणे, त्यांनी जी कृपेची म्हणजे दीक्षेची भिक्षा मला घातली, त्यामुळे "वचनाचा अनुभव हातीं" येऊन "बोलविती गुरु मज" या न्यायाने त्यांना अपेक्षित होती त्याप्रमाणे त्यांनी आपल्या इच्छामात्रेकरून प्रबंधाच्या रूपाने माझ्याकडून साकार करवून घेऊन परिपूर्ण केली. "ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही" हा त्यांनी उद्घाटित व प्रवर्तित केलेला अलौकिक, अपूर्व व एकमेवाद्वितीय असा महासिद्धान्त "परी साचचि गुरुनाथें। निमित्त करूनि मातें ॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या न्यायाने, मला निमित्त करून प्रस्थापित केला असला; तरी "तो सर्वोपकारी समर्थु। सद्गुरु श्रीवामननाथु। राहाटत असे मजही आंतु। रिघोनिया ॥" हीच वास्तविक स्थिती असल्यामुळे हा प्रबंध म्हणजे "ही सिद्धान्तमूर्ती। श्रीसद्गुरु वामननाथाची ॥" किंवा "प्रबंधव्याजें येथें। श्रीगुरूचि विलसत असे ॥" हेच आदिअंती सत्य व सिद्ध आहे, यात तिलप्राय शंका नाही. अर्थात् "द्रष्टा श्रीगुरुमूर्ती" ही या प्रबंधातील महासिद्धान्ताच्या प्रस्फुटीकरणाची स्वाभाविक अवस्था असल्यामुळे "अनुश्रुत हे प्रासादिक" असेच त्याचे स्वरूप झाले आहे. ज्ञानेश्वरी म्हणजे सिद्धयोग दर्शन होय अर्थात् ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही, हे सर्व अनुश्रुतच आहे. हा आजतागायत कोणीही प्रस्थापित न केलेला सिद्धान्त "म्हणौनि माझे नित्य नवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे। श्रीगुरुकृपा काय आहे ॥" या न्यायाने लिहिला गेला असल्यामुळे प्रासादिक न झाला; तर नवलच म्हणावे लागेल. श्रीगुरुचरणांच्या द्वारा उद्भासित होऊन साकार झालेले हे ज्ञानेश्वरीच्या सिद्धान्ताचे यथार्थ स्वरूप वाचकांना

आत्मसात झाले की, प्रबंधाचे सर्व सारच वाचकांच्या हाती येऊन वरील अभंगात श्रीसंततुकाराममहाराज यांनी सांगितलेल्या सर्व गोष्टींची प्रतीती प्रबंधाचे आलोडन केले म्हणजे त्यांना आल्याशिवाय राहणार नाही.

" ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही " म्हणजे " ज्ञानेश्वरी हे सिद्धयोगाचे दर्शन आहे " हा जो श्रीगुरुमहाराजांनी नव्याने प्रवर्तित केलेला महासिद्धान्त आहे, त्याच्यातच ज्ञानेश्वरीकडे पाहण्याची एक नूतन दृष्टी अनुस्यूत आहे. आजपर्यन्त ज्ञानेश्वरीकडे पाहण्याच्या दृष्टीचा जो ऊहापोह झालेला आहे तो पाहिला आणि नानाविध लेखकांनी ज्ञानेश्वरीचा सूक्ष्म अभ्यास करून त्यावर जे निबंध, लेख, परीक्षणे. ग्रंथ इत्यादि लिहिले आहेत त्यांचे समालोचन केले; म्हणजे हे स्पष्ट होते की, अशा प्रकारच्या नूतन दृष्टीचे उद्घाटन सहसा कोणी केलेले नाही. असे प्रतिपादन करण्याचे कारण हे आहे की, ज्ञानेश्वरीतील सहाव्या अध्यायात कुंडलिनीयोगाचा विषय स्पष्टपणे आलेला असल्यामुळे अभ्यासकांनी हा विषय त्या अध्याया पुरताच मर्यादित आहे असे दाखविले आहे; परंतु संपूर्ण ज्ञानेश्वरीच शक्तिपाताचे म्हणजे गुरुकृपेचे रूप घेऊन साकार झाली आहे अर्थात् शक्तिपातयोगाचा किंवा सिद्धयोगाचा विषय ज्ञानेश्वरीशी समव्याप्त आहे, असे आजतागायत कोणीही म्हटले नव्हते. शक्तिपाताचा हा विषय फक्त ६ व्या अध्याया पुरताच मर्यादित आहे असे काही विद्वान् मंडळींनी, अभ्यासू संशोधकांनी, पंडितांनी, शास्त्री लोकांनी व सांप्रदायिकांनीही आग्रहाने प्रतिपादन केले असल्यामुळे सामान्य लोकांचा गैरसमज होऊन दिशाभूल झाली आहे. परंतु प्रस्तुत प्रबंध वाचला म्हणजे सिद्धयोगाचा विषय सहाव्या अध्यायासकट संपूर्ण ज्ञानेश्वरीला कसा व्यापून राहिला आहे हे स्पष्ट होऊन, वाचकांना ज्ञानेश्वरीत सर्वत्र पसरलेल्या योगरत्नांच्या दालनांचे दर्शन होऊन, निरतिशय समाधान व आनंद प्राप्त होईल. माझे सद्गुरू महायोगी श्रीसमर्थ वामनरावजी गुळवणीमहाराज यांनी ही जी नूतन दृष्टी साधक-वाचकांना व ज्ञानेश्वरीच्या अभ्यासू सेवकांना उपलब्ध करून दिली आहे, तिचा लाभ त्यांना झाल्याशिवाय राहणार नाही, असा विश्वास आहे. पृष्ठ ४३ वरील " एक नवी दृष्टी " या मुद्यात केलेले विवेचन पाहिले म्हणजे हे म्हणणे अधिक स्पष्ट होईल. या नूतन दृष्टीचा आविष्कार सर्व ज्ञानेश्वरीच्या अंगोपांगात समरस व समव्याप्त झालेला असल्यामुळ आणि काव्याच्या मुलायम पडद्याखाली हा आविष्कार झाकून गेलेला असल्यामुळ शक्तिपातयोगाच्या किंवा सिद्धयोगाच्या विविध अंगांनी ज्ञानेश्वरी कशी सजली आहे, हे स्पष्टपणे व सहजतेने दृग्गोचर होणे मोठे कठीण होऊन बसले आहे. या करिता वाचकांना ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाचे सम्यक् दर्शन अत्यंत सहजतेने घेता यावे व त्यातील शक्तिपातयोगाची अनर्घ्य रत्ने अप्रयासाने प्राप्त व्हावीत म्हणून या प्रबंधाची बारा प्रकरणे करून

सिद्धयोगाची सर्व अंगोपांगे ज्ञानेश्वरीत कशी अवतरली आहेत, हे शास्त्रीय व्याख्यांसहित व विविध ग्रंथांमधील आधार उद्धृत करून पृथक्करणद्वारा उलडून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. जरी या नूतन दृष्टीचा आविष्कार करताना या प्रबंधाची पृष्ठसंख्या जवळ जवळ १५०० इतकी झाली असली; तरीही ज्ञानेश्वरीत सिद्धयोगशास्त्राचे जे काही गहन उपसिद्धान्त आले आहेत, त्यांना पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे फक्त स्पर्श करून, त्यांचा निर्देश करण्याच्या पलीकडे माझी मजल जाऊ शकली नाही, हे अगदी खरे आहे. असे असले; तरी या प्रबंधाच्या द्वारा ज्ञानेश्वरीकडे पाहण्याची एक नूतन दृष्टी समाजात उपस्थित होऊन त्या दृष्टीचा मागोवा घेण्याचा अभ्यासक व साधन-वाचक प्रयत्न करतील असा विश्वास वाटतो. ज्ञानेश्वरी ही कृतार्थसंपन्न जीवन प्राप्त करून देणाऱ्या सिद्धयोगाची किंवा शक्तिपातयोगाची गुरुकिल्ली आहे, हा विचार समाजात दृढमूल झाला की, या प्रबंधाचा एक अपेक्षित हेतू किंवा कार्य पूर्ण होईल.

"ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही" हा महासिद्धान्त अशा प्रकारे प्रबंध लिहून प्रस्तुत करण्याचे दुसरेही एक कारण व हेतू आहे. महायोगी श्रीसमर्थ सद्गुरू गुळवणीमहाराज यांनी आसेतुहिमाचल पसरलेल्या भारतवर्षातील हजारो साधकांना शक्तिपातयोगाची किंवा सिद्धयोगाची दीक्षा देऊन सिद्धयोगसाधनगंगेचा प्रवाह प्रवाहित केला. ही सिद्धयोगसाधनगंगा श्रीसद्गुरुमहाराजांपर्यंत प. प. श्रीगंगाधरतीर्थस्वामीमहाराज, प. प. श्रीनारायणतीर्थस्वामीमहाराज, प. प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराज आणि प. प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज यांच्यापासून संप्रदायक्रमाने व परंपरेने वाहत आली. या प्रवाहाचे उत्तरदायित्व स्वीकारणारे पहिले चारही महापुरुष हे बंगाली असल्यामुळे शक्तिपात ही काही तरी परस्थ, तांत्रिक व बंगाली भानगड आहे अशी समजूत होण्याचा संभव आहे. हा अपसमज राहू नये व दैवी शक्तीच्या संक्रमणाने अर्थात् शक्तिपातयोगदीक्षाद्वारा सिद्ध होणारी ही वेदोपनिषदकालापासून चालत आलेली अशी अनादिसिद्ध असलेली आणि भारतीय साधनजीवनातील एक अपरिहार्य अंग म्हणून सिद्ध झालेली साधनप्रणाली आहे, हे सिद्ध व्हावे आणि या वेदोपनिषदसिद्ध साधनप्रणालीचाच एक अत्यंत मुलायम व काव्यमय आविष्कार ज्ञानेश्वरीच्या रूपाने आविर्भूत झाला आहे हे स्पष्ट व्हावे, म्हणून या प्रबंधांचा प्रपंच केला. वास्तविक रीतीने पाहिले; तर सर्व संप्रदायांना व सर्व धर्मांना हा विषय व्यापून आहे. इतकेच नव्हे; तर कै. प. पू. श्री. माधव सदाशिव गोळवलकर, गुरुजी यांनी म्हटल्याप्रमाणे "सर्व मार्गांच्या साधकांना शक्तिपाताशिवाय गत्यंतर नाही असा जिव्हाळ्याचा व महत्त्वाचा आहे." मात्र या विषयाबद्दलची प्रत्येक संप्रदायाची व धर्माची किंवा त्यातील संतांची, महात्म्यांची, प्रेषितांची अगर प्रणेत्यांची भाषा वेगळी असते असे दृष्टीस

पडते. त्या दृष्टीने ज्ञानेश्वरी ही मराठी भाषेचे रूप किंवा पेहराव घेऊन आविष्कृत झाली एवढाच तिचा वेगळेपणा आहे. बाकी तिच्यातील साधनगंगेचा प्रवाह भारतीय; नव्हे जागतिक आहे. तो विश्वव्यापी आहे असे म्हणणेच अधिक शोभून दिसेल. असे असल्यामुळे श्रीगुरुमहाराजांनी प्रवाहित केलेली सिद्धयोगगंगा व ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगगंगा एकच आहे हे सिद्ध केले म्हणजे भारतवर्षातील साधनजगताचा एक अतुट धागा सिद्ध होईल. हा हेतू पूर्ण झाला; तर आपण सर्वच भारतीय किती संपन्न साधनाचे धनी आहोत याची जाणीव होईल. परंतु या जाणिवेबरोबरच "स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥४.२॥" असे जे श्रीगोपालकृष्णनाथांनी श्रीमद्‌भगवद्‌गीतेत म्हटले आहे, त्याची समाजजीवनातील साक्ष पाहिली, म्हणजे काही संप्रदायातच ही शक्तिसंक्रमणाची विद्या किंवा शक्तिपाताचे सामर्थ्य परंपरेने शिल्लक राहिले आहे, हे स्पष्टपणे दिसून येते. या दृष्टीने परमपूजनीय श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी महायोगी श्रीसमर्थ सद्‌गुरू गुळवणीमहाराज यांना दि. १४–३–१९५७ रोजी जे पत्र हृषिकेशहून पाठविले आहे त्यातील काही भाग पाहिला म्हणजे श्रीगुरुमहाराजांनी प्रवाहित केलेल्या सिद्धयोग साधनगंगेचा महिमा प्रतीत होऊन त्याच्या आलोकात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत कथन केलेले साधनही हेच आहे, हे लक्षात येऊन मन आनंदाने भरून येते. ते म्हणतात, "जिस साधनको हम करते हैं और करवाते हैं; ऐसा सहजयोग साधन हमारे योगीगुरुकी परंपरा हमारे विना और किसीके भी पास नहीं है।...... इस दिव्य शक्तिसे होनेवाला योगसाधन कितना सहज और सुखसाध्य है, हमारे सभी शिष्य जानते हैं। इससे शारीरिक, मानसिक और आध्यात्मिक जो लाभ होता है, हुवा है, उसका अनुभव प्रत्यक्ष करनेवाले हमारे सैंकडो शिष्य हैं।......यदि विचार करके देखा जाय तो वर्तमानमें हमारे योगसाधनके सदृश प्रत्यक्ष फलप्रदर्शन करनेवाला योगसाधन और किसीके पास कहीं नहीं है।" या दृष्टीने सिद्धयोगाचे हे सहजसाधन समाजात पुन्हा दृढमूल होऊन ज्ञानेश्वरी ही त्या दृष्टीने पथप्रदर्शक बनावी व अध्यात्मसंपन्न भारताचे चित्र साकार व्हावे हा ही हेतू या प्रबंधाच्या मागे आहे. तो सफल व्हावा अशी श्रीगुरुचरणी प्रार्थना आहे.

प्रबंधाचा पायाभूत सिद्धान्त, त्याचे स्वरूप आणि त्याचा हेतू स्पष्ट झाल्यावर "तैं महासिद्धान्ताचा आवांका। सिद्धान्तकक्षा अनेका ॥ १८. १२४२ ॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या न्यायाप्रमाणे "ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही" हा महासिद्धान्त प्रस्थापित होत असताना जे नानाविध उपसिद्धान्त किंवा अनेक सिद्धान्तकक्षा प्रकट झाल्या आहेत, त्यातील काही महत्त्वाच्या उपसिद्धान्तांचा उल्लेख करणे आवश्यक आहे.

या प्रबंधातील पहिला उपसिद्धान्त असा आहे की, ज्ञानेवरी हा सिद्धयोगाचा साधनग्रंथ आहे. याचा अर्थ असा आहे की, ज्ञानेश्वरी म्हणजे कृतियोग्यशास्त्र किंवा

साधनशास्त्र म्हणजेच अनुभूती घेण्याचे शास्त्र अर्थात् Practical Science आहे. असे म्हणून ही सिद्धान्तकक्षा प्रकट करताना ज्ञानेश्वरी हे सिद्धशास्त्र किंवा साध्य-शास्त्र नाही किंवा त्यात ह्याची चर्चा आलेली नाही अगर ज्ञानेश्वरी हा सिद्धग्रंथ नाही असे दूरान्वयानेही सूचित करण्याचा हेतू नाही; कारण सिद्धयोगाचे अंतिम साध्य जे सामरस्य, त्याची चर्चा होऊ शकत नसल्याने, ते सर्व अवस्थांच्या, द्वंद्वांच्या व शब्दमर्यादेच्या पलीकडे असल्यामुळे आणि साधनचं शेवटी साध्यात परिणत होत असल्याने साध्याचा निर्देश करून म्हणजे 'नेति नेति' या प्रमाणे शब्दसंहितेत ते पकडण्याचा प्रयत्न करून त्याचे यावच्छक्य उद्‌घाटन करीत इतर सर्व चर्चा साधनाचीच करावी लागते. अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे ही चर्चा या पद्धतीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांकडून ज्ञानेश्वरीत अवतरित झाली आहे. 'साध्य साधनाची एकरूपता' या मुद्याचे पृष्ठ ३७५ वरील विवेचन पाहिले म्हणजे हे म्हणणे अधिक स्पष्टपणे लक्षात येईल.

ज्ञानेश्वरी हा साधनग्रंथ आहे असे म्हणताना ज्ञानेश्वरी हा अनुभूती घ्याव-यास शिकविणारा मार्गदर्शक असा ग्रंथराज आहे, हे विशेषत्वाने कथन करावयाचे आहे, हे लक्षात घेणे आवश्यक आहे. या गोष्टीकडे मुद्दाम लक्ष वेधण्याचे कारण असे आहे की, सिद्धयोग साधनमार्गात चर्चा, वादविवाद, विवेचन, प्रवचन इत्यादि गोष्टींना काहीच महत्त्व नाही; कारण कोरडे ज्ञान किंवा अनुभूतीशून्य वेदान्ताची चर्चा ही निरुपयोगी ठरते. ज्ञानेश्वरीची अनुभूती घेतली की, साधकांना हे पटू लागते. शब्द म्हणजे शक्तीचा शिवात लय झाल्याखेरीज अंतिम सामरस्यात्मक अवस्था कदापीही प्राप्त होत नसल्याने ज्ञानेश्वरीवर नुसते प्रवचन करावयाचे नाही किंवा तिची फक्त चर्चाच करावयाची नाही; तर तिची अनुभूती घ्यावयाची आहे, हे लक्षात येते. या दृष्टीने गुरुकृपेचे म्हणजे शक्तिपाताचे माहात्म्य व सिद्ध-योगमार्गाच्या प्राप्तीचे महत्त्व किती अपार आहे, हे स्पष्ट होईल. हे सर्व "स्वात्माराम-योगीन्द्र" यांनी "हठयोगप्रदीपिकेच्या" शेवटच्या श्लोकात कथन केले असून तोच ज्ञानेश्वरीचा म्हणजे पर्यायाने "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शनाचा" आदिअंतीचा एकमात्र महत्त्वाचा सिद्धान्त आहे, असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती होणार नाही. ते म्हणतात—

**यावन्नैव प्रविशति चरन्मारुतो मध्यमार्गे**
**यावद्विन्दुर्न भवति दृढप्राणवातप्रबंधात् ।**
**यावद्ध्याने सहजसदृशं जायते नैव तत्त्वं**
**तावज्ज्ञानं वदति तदिदं दंभमिथ्याप्रलापः ॥ ४. ११४ ॥**

दुसरा महत्त्वाचा उपसिद्धान्त म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अशा गुरुस्वरूप जागृत कुंडलिनी शक्तिरूपी महामाया जगदंबेशी

संपूर्णपणे समरस किंवा समव्याप्त होऊन ज्ञानेश्वरी ही या भूतलावरील एक अजरामर अशी सिद्धयोगशास्त्राची अर्थात् सिद्धयोगाचे दर्शन घडविणारी कलाकृती साकार केली असल्यामुळे, या ग्रंथाचे कर्तृत्व हे संवित् शक्तिस्वरूप सद्‌गुरूचे असून, तिच्या अद्‌भुत इच्छेने ती स्वतःच गुरू व शिष्य या रूपाने विभक्त झाल्याने, गुरु-शिष्यसंबंधाने म्हणजे शिवपार्वती संवादात्मक रूपाने गीतातत्त्वाचे अलौकिक व लोकोत्तर साधनस्वरूप प्रस्फुटित करीत, ज्ञानेश्वरी या नावाने अवतीर्ण झाली आहे. याचा अर्थच असा आहे की, संवित् चिच्छक्तीच गुरू व शिष्य म्हणजेच शिव व पार्वती किंवा श्रीगोपाळकृष्णनाथ व अर्जुन अशी उभयविध होऊन ज्ञानेश्वरीच्या रूपाने साकार झाली आहे. प्रस्तुत ग्रंथातील पृष्ठ ४१२ व ६३१ वरील विवेचन पाहिले म्हणजे हे स्पष्ट होईल. हा उपसिद्धान्त "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" या ग्रंथालाही सर्वस्वी लागू आहे, असे म्हटले; तर त्यात कसलीही अतिशयोक्ती होणार नाही; कारण महासिद्धयोगी श्रीवामननाथमहाराज व केशव हे या प्रबंधाचे गुरुशिष्य स्वरूप असून या गुरुशिष्यसंबंधाचाच हा आविष्कार आहे.

तिसरा महत्त्वाचा उपसिद्धान्त असा आहे की, संवित् चिच्छक्तीच ज्ञानेश्वरीची भाष्यकार आहे. वास्तविक पाहता वर कथन केलेल्या उपसिद्धान्तातच हा उपसिद्धान्त समाविष्ट झालेला आहे. असे असले; तरीही आजपर्यंत अनेक संशोधकांनी, पंडितांनी व विचारवंतांनी या विषयासंबंधी शेकडोशे पृष्ठात हा विचार मांडला असल्यामुळे व त्यांच्यापैकी कोणाचेही मत प्रस्तुत ग्रंथकारास मान्य नसल्यामुळे येथे त्याचा स्वतंत्र उल्लेख केला आहे. संवित् चिच्छक्ती म्हणजे आदिमाया कुंडलिनी जगदंबा शक्ती हीच श्रीनिवृत्तिनाथ ह्या बाह्य स्थूलात्मक गुरुविग्रहाचे अंतरंग सूक्ष्म स्वरूप असून तीच ज्ञानेश्वरीची भाष्यकार आहे, हे या प्रबंधात पृष्ठ ११८ ते १२१, ३६७, ४४७,४५० व ९७६ वर दाखवून देऊन तत्संबंधी सांगोपांग विवेचन केले आहे. पूर्वग्रह सोडून अभ्यासकांनी व पारंपरिक लोकांनी या विषयाकडे पाहावे म्हणणे हा उपसिद्धान्त त्यांना अंतरंग होईल, एवढेच येथे सूचित करतो.

चवथा महत्त्वाचा उपसिद्धान्त असा आहे की, नाथसंप्रदाय म्हणजे शक्तिपातयोगमार्ग किंवा सिद्धयोगमार्ग आहे हा होय. नाथसंप्रदायाबद्दल अनेकांनी अनेक प्रकारे चर्चा केली असली; तरी नाथसंप्रदाय म्हणजे शक्तिपातयोगसंपन्न सिद्धयोगमार्गच आहे, हे "ज्ञानेश्वरीतील नाथसंकेतीचा दंश" या चवथ्या प्रकरणात स्पष्ट केले आहे. नाथसंकेतीच्या दंशाचे हे स्पष्टीकरण नाथसंप्रदायाबद्दलच्या वाचकांच्या मनातील अनेक भ्रान्त कल्पना व चुकीच्या समजुती समूळ नाहीशा करील असा विश्वास वाटतो.

पाचवा महत्त्वाचा उपसिद्धान्त हा आहे की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतार्थाला सोडून कोणत्याही प्रकारे ज्ञानेश्वरीत स्वतंत्र भाष्य केलेले नाही. काही

विचारवंतांचे व संशोधकांचे असे मत आहे की, श्रीमद्भगद्गीतेच्या सहाव्या अध्यायातील "ब्रह्मचारिव्रते स्थितः ॥१४॥" या पदावर भाष्य करताना "गीतेत नसलेल्या कुंडलिनी योगाचा विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी येथे नाथपंथाचे रहस्य म्हणून प्रस्तुत केला आहे." परंतु हा आक्षेप अनर्थकारक कसा आहे, हे पृष्ठ १२०३ ते १२०९ पर्यन्त विस्ताराने कथन करून श्रीगोपालकृष्णनाथांच्या मनातील भावार्थच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसा स्पष्ट केला आहे, हे दाखवून दिले आहे.

सहावा महत्त्वाचा उपसिद्धान्त असा आहे की, कर्म, भक्ती व ज्ञान हे मोक्षप्राप्तीचे स्वतंत्र मार्ग नसून हे तिन्ही मार्ग म्हणजे सिद्धयोगाच्या अनवच्छेद्य अवस्था असून संपूर्ण गीता अगर ज्ञानेश्वरी ही कर्म, भक्ती व ज्ञान या वेदांगभूत कांडत्रयाचे अभिन्न स्वरूप असलेल्या अशा सिद्धयोगाच्या महासिद्धान्ताने एकरस झालेली श्रीप्रभूची वाङ्मयमूर्ती आहे. पृ. २८,३५, १०६४ ते १०६८ यांवर या विषयासंबंधीचे विवेचन केले असून ते वाचले म्हणजे "गीता ही विविध योगांनी व निष्ठांनी भरलेली खिचडी आहे," "गीता ही सलग, सुसंगत व एकहाती नसलीच पाहिजे" आणि "ज्ञानेश्वरी ही कापूस, रेशीम व जर यांच्या चिंध्या शिवून तयार केलेली गोधडी आहे." इत्यादि मान्यवर संशोधकांच्या आक्षेपांचा निरास झाल्याशिवाय राहणार नाही. शक्तिपातयोगाची दीक्षा मिळाल्यावर जागृत कुंडलिनी शक्तीमुळे सिद्धयोगसाधनाची सुरुवात झाल्यावर कर्मयोग, भक्तियोग व ज्ञानयोग हे तिन्हीही योग देहामध्ये क्रमाक्रमाने अगर अक्रमाने म्हणजे एकसमयावच्छेदेकरून कसे कसे व कोठे कोठे उपस्थित होतात, या संबंधीचे जे विवेचन पृ.१०६७ वर व अन्यत्र आलेले आहे, ते वाचकांनी पाहिले म्हणजे उपरोक्त उपसिद्धान्ताशी ते निःशंकपणे समरस होतील.

सातवा महत्त्वाचा उपसिद्धान्त असा आहे की, गुरू, शिष्य, शिव, शक्ती, कर्म, भक्ती, ज्ञान, बुद्धी, प्राण, मन, विवेक इत्यादि नानाविध शब्द किंवा त्यांचे अर्थ हे यौगिकदृष्टया एकरूप किंवा एकरस आहेत. हा उपसिद्धान्त मोठा विलक्षण असून अपार अभ्यास व प्रगाढ अनुभूती यांच्या शिवाय तो अंतरंग होणे कधीही शक्य नाही; कारण वरवर विभिन्न दिसणारे शब्द व त्यांचे अर्थ एकमेकांशी समरस आहेत, ह्याची बौद्धिक प्रतीती व प्रत्यक्षानुभूती ही गुरुकृपेने म्हणजे तीव्रातितीव्र शक्तिपाताने जागृत झालेल्या चिच्छक्ती कुंडलिनीच्या विश्वात्मक व विश्वोतीर्ण अशा अपार जागृतीशिवाय इतर कितीही प्रयत्न केले; तरी प्रत्यक्षात येऊ शकत नसल्यामुळे ती केवळ ख-पुष्पासारखी अद्भुत गोष्ट आहे असे वाटू लागते. बुद्धी म्हणजे प्राण होय, हे पृष्ठ २९८ वरील विवेचन या दृष्टीन बोलके आहे. शिव व शक्ती हे एकरूप आहेत, गुरू व शिष्य यांचे ऐक्यच आहे, कर्म, भक्ती व ज्ञान ह्या गोष्टी एकमेकाशी समरस आहेत. किंवा अन्यान्य पद्धतीने या सर्वच गोष्टी एकरूप

कशा असतात याचे प्रबंधात वारंवार जे विवेचन केले आहे, त्यावरून हा उपसिद्धान्त स्पष्ट होईल.

येथपर्यंत काही महत्त्वाच्या उपसिद्धान्तांचा निर्देश केल्यावर हे सांगणे आवश्यक आहे की, या प्रबंधात गीतेतील व ज्ञानेश्वरीतील कितीतरी संज्ञांचे अर्थ यौगिकदृष्टचा स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. पृष्ठ ३४९ ते ३५८ पर्यंत कर्मयोगाचे जे विवेचन केले आहे ते या दृष्टीने वाचकांनी अवश्य पाहावे. संज्ञांचे यौगिक अर्थ स्पष्ट झाल्यामुळे ओव्यांचे अर्थही स्पष्ट झाले आहेत. "निगिज पूर्वीलिया मोहरा। कीं येइज पश्चिमेचिया घरा। निश्चळपणें धनुर्धरा। चालणें एथिचें ॥६.१५९॥" "तेवीं पिंडाचेनि मिषें। पदीं पद प्रवेशे। तें एकत्व होय तैसें। पंडुकुमरा ॥६.३०८॥" या ओव्यांचे पृष्ठ १६७ वरील "पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे रहस्य" या मुद्यात केलेले स्पष्टीकरण पाहिले आणि या दृष्टीनेच इतर अनेक ओव्यांचे केलेले अर्थ वाचले म्हणजे आजपर्यंत ज्या ओव्या गूढतेच्या किंवा अनर्थाच्या अवगुंठनात पडून राहिल्या होत्या, त्यांचे यथार्थ दर्शन, या अर्थांमुळे त्यांच्यावरील आच्छादन दूर होऊन, वाचकांना होईल व अभ्यासकांना एका अननुभूत प्रत्यय येऊन त्यांचे मन आनंदाने भरून जाईल यात तिलप्राय शंका नाही.

यानंतर आता काही माननीय परीक्षकांनी दाखविलेल्या विरोधाचा परिहार समन्वयाने करून दाखविणे इष्ट ठरेल. त्यांचे पहिले म्हणणे असे आहे की, "प्रबंधात एका बाजूला सिद्धयोग हा वैदिक मार्ग आहे असे म्हटले असून दुसऱ्या बाजूला प्रमाण म्हणून उद्धृत केलेल्या वचनांमध्ये मात्र वेदांना कमी लेखले आहे व पर्यायाने त्यांचा अवमान किंवा निंदा केली आहे. पृष्ठ ३९ वर "वैदिक मार्ग" या मुद्यात व पुढे सर्व ग्रंथात सिद्धयोग हा वेदसिद्ध मार्ग आहे असे विविध प्रमाणांनी सिद्ध करून स्पष्ट केलेले आह. मात्र पृष्ठ ३१ वर "ज्ञानसंकलिनीतंत्रातील" वेदशास्त्रपुराणानि सामान्यगणिका इव। या पुनः शांभवी विद्या गुप्ता कुलवधूरिव॥" आणि पृष्ठ ९३२ वर "हठयोगप्रदीपिकेतील" "वेदशास्त्र पुराणानि सामान्यगणिका इव। एकैव शांभवी मुद्रा गुप्ता कुलवधूरिव॥" अशी दोन वचने सिद्धयोगाचा महिमा कथन करताना उद्धृत केलेली आहेत. यामुळे प्रतिपादित सिद्धान्त व उपरोक्त ग्रंथातील वचने यात विरोध दिसून येतो," असे त्यांचे म्हणणे आहे. या संदर्भात पहिली गोष्ट वाचकांनी अशी लक्षात घतली पाहिज की, येथे उपरोक्त ग्रंथातील उद्धृत वचनांच्याद्वारा वेदांना कमी लेखून त्यांचा अवमान किंवा निंदा करण्याचा हेतू नसून शांभवी विद्या किंवा शांभवी मुद्रा म्हणजे दीक्षा ही कुलवधूप्रमाणे श्रेष्ठ आहे, एवढेच विशेषत्वाने सूचित करून सिद्धयोगाचे माहात्म्य स्पष्ट करण्याचा हेतू आहे. पृ. ३१ वर "ज्ञानसंकलिनीतंत्रातील" वचनाचा शब्दशः अर्थ दिला असल्यामुळे दिशाभूल होण्याचा जो संभव आहे, तो पृ. ९३२ वर "हठयोग

प्रदीपिकेतील" वचनाचा कंसात दिलेला अर्थ पाहिला म्हणजे निश्चित नाहीसा होईल. तेथे लिहिल्याप्रमाणे "वेदशास्त्रपुराणानि सामान्यगणिका इव ॥" या वचनाचा अर्थ "वेदशास्त्राचे अनेक पुरुष ज्ञाते असतात व या गोष्टी ते सहजपणे वापरू शकतात" असाच अभिप्रेत असून एवढ्या मर्यादित अर्थानेच या विधानाकडे पाहणे इष्ट ठरेल. विषयाच्या अनुरोधाने व माहात्म्याप्रमाणे उद्धृत संदर्भांचे अर्थ श्रेष्ठ-गौणत्वाने घ्यावयाचे असतात. उपमा व दृष्टान्त हे एकदेशीय असतात असा जो शास्त्रकारांचा न्याय आहे तोच येथे लागू करावयास हवा. श्रीव्यास महर्षींनी विष्णुपुराणात विष्णू, शिवपुराणात शिव आणि इतर पुराणात प्रतिपाद्य देवता या श्रेष्ठ आहेत असे दाखवून इतर देवतांना गौणत्व दिले आहे म्हणून ज्याप्रमाणे अवमानाचा किंवा निंदेचा प्रश्न उपस्थित होत नाही त्याप्रमाणेच सिद्धयोगाचा महिमा सांगताना अन्य ग्रंथकारांची जी प्रमाणे ग्रंथात घेतली आहेत त्यातील विरोधाचा परिहार विषय माहात्म्यासंबंधीचे श्रेष्ठ-गौणत्व व विषय विवेचनाचे पौर्वापर्य ध्यानात घेऊन करावा म्हणजे त्यांचा समन्वय वाचकांना प्रतीत होईल.

या दृष्टीने येथे आणखी एका गोष्टीकडे वाचकांचे लक्ष वेधले; तर ते खचितच अनाठायी होणार नाही. "पैं अहितापासूनि काढिती। हित देऊनि वाढविती। नाहीं गा श्रुतिपरौती। माउली जगा ॥ १६. ४६२॥" असे म्हणून वेदांची स्तुती करणारे श्रीज्ञानेश्वरमहाराजच "वेदु संपन्नु होय ठाईं। परी कृपणु ऐसा आनु नाहीं। जे कानीं लागला तिहीं। वर्णांच्याचि ॥ १८. १४५७॥" हे कथन करून वेद कृपण आहेत असे जेव्हा म्हणतात तेव्हा या दोन ओव्यातून दृग्गोचर होणाऱ्या विरोधाचा परिहार करून त्याचा समन्वय करणेच इष्ट ठरते. जीवाला अर्थात् मानवमात्राला अहितापासून वर काढण्यासाठी व त्याला शिवस्वरूप करण्यासाठी वेद त्याला सिद्धयोगमार्गासारखे सूक्ष्म व अंतरंग साधनरूप अमृत देऊन त्याच्यावर आईप्रमाणे माया करून वाढवितात. यामुळेच ते संपन्न व श्रेष्ठ आहेत. मात्र ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांनीच वेद ऐकावेत असे शास्त्र असल्याने ते त्यांच्या ताब्यात आहेत हे स्पष्ट होऊन ते स्थूलात्मक पद्धतीने कृपण आहेत असे दिसते. याचा अर्थ असा की, वेदांचे कृपणत्व हे वरवर दिसणारे, स्थूलात्मक व सामान्य स्वरूपाचे असून, अंतरतः वेद हे सूक्ष्मपणे सिद्धयोगाचे साधन सर्वांना मुक्तपणे प्रदान करीत असल्याने ते आईप्रमाणे उदार आहेत. अशा पद्धतीने अर्थ करून उपरोक्त ओव्यांमधील विरोधाचा परिहार केला म्हणजे जो समन्वय उपस्थित होतो त्यानेच मनाला निरतिशय आनंद होतो. त्याचप्रमाण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वेदांना कृपण म्हणणे व तंत्रकारांनी त्यांना सामान्यगणिका म्हणणे यात शब्द भेदापलीकडे कोणताच भेद नाही; कारण रावसाहेब घोड्या-

वरून पडले, रावसाहेब घोड्यावरून खाली आले आणि रावसाहेबांच्या मांडीखालून घोडा निघून गेला या सर्व वाक्यांचा लक्ष्यार्थ एकच आहे. वेदांना कृपण म्हणण हे रावसाहेबांच्या मांडी खालून घोडा निघून गेला या उच्च भाषेशी जुळणारे असले; तर वेदांना सामान्य गणिका असे म्हणणे हे रावसाहेब घोड्यावरून खाली आले या निम्नतर भाषेशी साम्य असणारे आहे इतकेच. ज्या वेदांना श्रीज्ञानेश्वरमहाराज कृपण म्हणतात, त्यातीलच "नान्यः पन्था विद्यतेयनाय" याप्रमाणे विद्यमान असणारे साधन "अर्जुना हा अवधारी। पंथराजु ॥ ६. १५२ ॥" असे म्हणून ते सांगत आहेत. त्याचप्रमाणे वेदाना गणिका म्हणणारे तंत्रग्रंथही वेदैकसिद्ध शांभवी विद्याच कथन करीत आहेत. एवंच ज्याप्रमाणे "नाहीं गा श्रुतिपरौती। माउली जगा ॥" हेच जसे खरे; कारण वेदमाउली ही सिद्धयोगाचे साधन सांगून साधकाला सिद्ध करते, त्याचप्रमाणे "शांभवी विद्या गुप्ता कुलवधूरिव।" हेही खरे आहे. सारांश, महायोगी गोरक्षनाथ यांनी "सिद्धसिद्धान्तपद्धति" या ग्रंथात "एवं सर्वसिद्धान्तदर्शनानां पृथक् पृथक् भूतानामपि ब्रह्मणि समन्वयसूचनशीलोपदेशकर्ताऽवधूत एव सद्गुरु प्रशस्यते ॥ ६. ७२ ॥" या सूत्रातून प्रकट केलेल्या समन्वयाचा अवलंब केल्याशिवाय कोणत्याही ग्रंथातील विरोधाचा परिहार होणे शक्य नाही आणि "आह्माच बोलाची वालीफ फेडिजे ॥ ६. २५ ॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कथन केलेल्या साधनश्रेष्ठतेच्या न्यायाने या विषयाकडे पाहिल्याशिवाय "तरीच हे उपेगा जाईल ॥ ६. २६ ॥" असे घडून येणार नाही.

मान्यवर परीक्षकांनी दाखविलेला दुसरा विरोधाभासात्मक मुद्दा असा आहे. "पृष्ठ ४६५ वर 'संभोगातून समाधीकडे जाण्याचा हा खरा सर्वतंत्र स्वतंत्र असा एकमेव सिद्धयोगाचाच मार्ग आहे,' असे जे विधान केले आहे, त्यामुळ प्रबंधात कथन केलेला सिद्धयोगमार्ग व सध्या समाजजीवनात काही मान्यवर व्यक्तींनी उपस्थित केलेल्या विपरीत गोष्टी एकच आहेत असे वाटून साधक-वाचकांचा बुद्धिभेद होईल." "जो श्रद्धेचेनि संभोगें। सुखिया जाहला ॥ ४. १८७ ॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कथन केलेल्या प्रक्रियेचा उलगडा पृष्ठ ४६२ ते ४६५ पर्यंत केल्यानंतर या प्रक्रियेच्या विवेचनाचा समारोप करताना वरील वाक्य आले आहे. या वाक्यामुळे उपस्थित होणाऱ्या विरोधाचा परिहार असा आहे की, शुद्ध साधनात्मक बुद्धीचा आश्रय घेऊन व ज्या ऐश्वर्यसंपन्न परंपरेतून हे साधन प्रवाहित होत आले आहे त्याचा विचार करून, सध्या समाजजीवनात या साधनासारख्या दिसणाऱ्या साधनामुळे उपस्थित झालेल्या कोणत्याही विपरीत गोष्टींच्या संदर्भात हे वाक्य वाचकांनी न वाचता, विषयाचे सूत्र व पौर्वापर्य संबंध ध्यानात घेऊन विषयविवेचनाच्या ओघातील हे समारोपात्मक वाक्य (Concluding Statement) आहे. हे लक्षात घेऊन त्यातील विरोध नाहीसा करून त्याचा समन्वय करावा अशी प्रार्थना आहे.

येथपर्यन्त प्रवंधाचा पायाभूत सिद्धान्त, त्याचे हेतू व त्यातील उपसिद्धान्त यांचे स्वरूप स्पष्ट करून माननीय परीक्षकांनी दाखविलेल्या विरोधांचा परिहार समन्वयाने कसा होतो हे पाहिले. यापुढे हा प्रबंध साकार कसा झाला याचा इतिहास निवेदन करणे हे इष्ट ठरेल. "ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही" या एका वाक्याच्या पायाभूत सिद्धान्तावर सिद्धयोग दर्शनाचा प्रासाद उभा करून माझे सद्गुरू श्रीसमर्थ महायोगी गुळवणीमहाराज यांनी प्रवाहित केलेल्या सिद्धयोग संप्रदायाला एक भरभक्कम आधार उपस्थित करणे आवश्यक आहे, हा विचार ज्यावेळी माझ्या मनात दृढमूल झाला, त्यावेळीच ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाची ही नूतन दृष्टी विद्यापीठाची मान्यता मिळवून तरुण विद्यार्थ्यांपुढे, अभ्यासकांपुढे व पर्यायाने शेवटी समाजापुढे यावी हाही विचार पक्का झाला. या दृष्टीनेच पुणे विद्यापीठाच्या पीएच्. डी. पदवीसाठी हा प्रबंध सादर करावा असा विचार मी श्रीगुरुचरणी प्रस्तुत केला. त्यांनी या विचाराला मान्यता दिल्यावर, पुणे विद्यापीठाकडे अर्ज करून, प्रा. डॉ. रामचंद्र शंकर वाळिंबे, एम्. ए. पीएच्. डी., यांच्या मार्गदर्शनाखाली प्रबंधाचे काम सुरू केले. प्रथम या प्रबंधाला नाव कोणते द्यावे याची चर्चा गुरुवर्य डॉ. वाळिंबे यांच्याशी केली. त्यांनी सर्व विषयाला समव्याप्त करील असे शीर्षक असावे असे सुचवून त्या दृष्टीने दोन-तीन नावेही सुचविली. त्यांच्या सूचनेचा व नावांचा साकल्याने विचार करून "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" हे नाव निवडले व ते त्यांना पसंतही पडले. त्या नंतर प्रबंधाची रूपरेषा तयार करून प्रथम ती श्रीगुरुमहाराजांच्या नजरेखाली घातली आणि मग ती गुरुवर्य डॉ. वाळिंबे यांना दाखवून विद्यापीठास सादर केली. विद्यापीठाने विषय व रूपरेषेस मान्यता दिल्यावर प्रबंध लिखाणास सुरुवात करावयाची असे ठरविले.

विद्यापीठाने दि. १।८।१९७३ रोजी माझे नाव नोंदवून उपरोक्त विषयाला मान्यता दिली असली; तरी अनेक आपत्तींमुळे व अडचणींमुळे मी १९७५ अखेर लिखाणास सुरुवात करू शकलो नाही. सर्वांत मोठी व पहिली आपत्ती श्रीगुरुचरणांच्या वियोगाचीच कोसळली. दि. १५।१।१९७४ रोजी माझे सद्गुरू संतश्रेष्ठ महायोगी श्रीसमर्थ वामनरावजी गुळवणीमहाराज आपल्या सर्व भक्तमंडळींना चिच्छक्तीच्या हाती सुपूर्त करून स्वतःच्या मूळ शिवस्वरूपात विलीन झाले. श्रीगुरुचरणवियोगाची ही घटना पुढील इतर अनेक आपत्तींची जननी ठरून त्यामुळे सर्व जीवनप्रवाहच विस्कळीत झाला. असे असले; तरी अंतरात सतत जागृत स्वरूपाने उपस्थित असलेल्या चैतन्यशक्तिस्वरूप श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी माझी ध्येयावरील दृष्टी ढळू दिली नाही. दि. २९।६।१९७४ रोजी तीर्थराज प्रयाग येथील त्रिवेणी संगमामध्ये श्रीगुरुदेवांच्या अस्थी विसर्जनाचा कार्यक्रम झाल्यावर मी माझे मित्र श्री. अरविंदराव लळीत व त्यांची कुटुंबीय मंडळी यांच्याबरोबर काशी,

हरिद्वार व ऋषिकेश येथे गेलो. या यात्रेतच प्रबंधाच्या विषयाला अनुकूल अशी पुस्तके मिळविण्यात मला यश आले. हरिद्वारला गोरक्षनाथ मंदिरात महायोगी गोरक्षनाथ विरचित "सिद्धसिद्धान्तपद्धति" हे अत्यंत महत्त्वाचे पुस्तक विकत मिळाले. पुस्तक मिळविण्यासाठी या मंदिरात दोन दिवस हेलपाटे घातल्यावर आणि शेवटी तेथील विद्यमान महंतांना साष्टांग नमस्कार करून प्रार्थना केल्यावर, हा खरा जिज्ञासू आहे असे पाहून, त्यांनी तो ग्रंथ मला विकत दिला. इतरही अनेक ग्रंथांचा संग्रह करण्यात दोन वर्षे निघून गेली. बहुतेक जुन्या ग्रंथांच्या अत्यल्प छापील किमतीसाठी खूपच मूल्य द्यावे लागले. परंतु श्रीगुरुकृपेने मी याही अडचणीतून पार पडलो. अर्थात् "प्राणतोषिणीतंत्र" या ग्रंथासारखे शक्तिपातयोग किंवा सिद्धयोग या विषयाला वाहिलेले कित्येक ग्रंथ पैशा अभावी मी खरेदी करू शकलो नाही. असे असले; तरी आवश्यक त्या ग्रंथांचा संग्रह मी १९७५ अखेरपर्यंत केला. या कामी माझे गुरुबंधू डॉ. श्री. शं. वि. तत्त्ववादी, रीडर, फार्मसी विभाग, काशी हिंदू विश्वविद्यालय, यांनी अत्यंत मोलाची मदत केली, हे कृतज्ञतापूर्वक नमूद करणे आवश्यक आहे. त्यांनी वेळोवेळी मी मागविलेले ग्रंथ, काशीत हिंडून, गोळा करून, मला पाठविले. माझे दुसरे एक गुरुबंधू श्री. पन्हाळे, पुणे, यांनीही मला कितीतरी जुने संदर्भग्रंथ मिळवून दिले. त्याबद्दलही मी त्यांचा कृतज्ञ आहे. ग्रंथ स्वतःचा असला म्हणजे संदर्भासाठी कोणत्याही क्षणी त्याचा उपयोग होतो, त्यावर आवश्यक त्या खुणा करता येतात आणि इतर ग्रंथातील संदर्भांशी त्याची तुलना करणे सहज शक्य होते, हीच ग्रंथ जमविण्यामागची भूमिका होती व आहे. मात्र जे ग्रंथ दुर्मिळ व अनुपलब्ध होते त्यासाठी "जयकर ग्रंथालय – पुणे विद्यापीठ," "भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, पुणे," "डेक्कन कॉलेज ग्रंथालय, पुणे" व "कैवल्यधाम ग्रंथालय, लोणावळा" या ग्रंथालयांचा आश्रय घेतला. या ग्रंथालयातील ग्रंथपालांनी जी मदत केली ती अनुपमेय आहे, हेच म्हणणे इष्ट ठरेल.

वर ज्या "सिद्धसिद्धान्तपद्धति" या महायोगी गोरक्षनाथांच्या ग्रंथाचा आवर्जून उल्लेख केला आहे, त्याचा ज्ञानेश्वरीत प्रसुप्त असलेल्या सिद्धयोगाच्या अभ्यासाच्या दृष्टीने असलेला अपूर्व महिमा, ग्रंथासंबंधीचे विवेचन व चर्चा करताना कथन करणे अत्यावश्यक आहे. ज्ञानेश्वरीत शक्तिपातयोगाचे अर्थात् सिद्धयोगाचे अवतरण कसे झाले आहे, शब्दांचे वास्तविक अर्थ म्हणजे परार्थ काय आहेत आणि शक्तिपाताची शास्त्रीय प्रक्रिया कशी घडते याची चर्चा श्रीगुरुमहाराज विषयानुरोधाने किंवा आकस्मिकपणे मधून मधून सवडीने करीत असत. ही चर्चा कशी चालत असे याचे दिग्दर्शन मी पृष्ठ ४९ ते ५२ वर केले आहे. एक दिवस मी लोणावळ्याच्या कैवल्यधाम ग्रंथालयातून वरील ग्रंथ आणून श्रीगुरुमहाराजांना दाखविला, तेव्हा त्यांना अपरिमित आनंद झाला. दोन–तीन दिवस ते स्वतःच ग्रंथ

वाचीत होते. त्या नंतर एके दिवशी ते मला म्हणाले, " ज्ञानेश्वरीतील कोणत्याही ओवीचा आपल्या साधनाच्या दृष्टीने (म्हणजे सिद्धयोगाच्या दृष्टीने) अर्थ लावताना काहीही अडचण आली किंवा शंका उपस्थित झाली; तर पुढे तुला त्या संबंधी कोण सांगील ?" या प्रश्नाने मी अवाक् होऊन त्यांच्यापुढे स्तब्ध उभा राहिलो. मी काही बोलत नाही असे पाहून ते मला म्हणाले की, " ज्ञानेश्वरीच्या ओव्यांची कुलुपे उघडण्याची 'मास्टर की' (Master Key) (गुरुकिल्ली) तुला देऊन ठेवतो. त्यामुळे तुला पुढे प्रबंध लिहिताना कसलीही अडचण आली; तरी ती दूर करता येईल." असे म्हणून त्यांनी माझ्या हातात " सिद्धसिद्धान्तपद्धति " हा ग्रंथ ठेवला आणि ते मला पुढे आणखी म्हणाले की, " या ग्रंथात ज्ञानेश्वरीसंबंधी तुला अडलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरे सापडतील." श्रीगुरुमहाराज लवकरच अंतर्धान पावणार असून, ते आपली पुढील अनुपस्थिती दूर करून, सिद्धान्त प्रस्थापित करताना पुढे येणाऱ्या अडचणी सोडविणे मला सहज शक्य व्हावे याची व्यवस्था करीत आहेत, ही कल्पना मला त्यावेळी आली नाही. श्रीगुरुमहाराज भविष्यात डोकावून सर्व व्यवस्था करीत होते आणि माझी दृष्टी त्यांच्या चरणी गुंतून गेली होती. ज्या अभ्यासकांना ज्ञानेश्वरीचा सिद्धयोगाच्या दृष्टीने अभ्यास करावयाचा आहे किंवा ज्यांना ज्ञानेश्वरीतील समाधिधनाचा ठेवा हस्तगत व्हावा अशी तीव्र इच्छा आहे, त्या सर्वांना ' सिद्धसिद्धान्तपद्धति " या ग्रंथाचा आश्रय घेण्यावाचून गत्यंतर नाही, हे निभ्रान्त सत्य आहे, असे श्रीगुरुमहाराजांच्या उपरोक्त कथनावरून सिद्ध होते.

" सिद्धसिद्धान्तपद्धति " हा ग्रंथ ज्ञानेश्वरीची 'मास्टर की' आहे, या श्रीगुरुमहाराजांच्या म्हणण्याची प्रचीती मला वडगाव-धायरी या गावी प्रबंधाचे लिखाण करताना आली. एक दिवस लिखाण चालू असताना 'आज्ञा' या शब्दाचा अर्थ अडला. बराच विचार केला; तरी शब्दाच्या परार्थाचा उलगडा होईना. भोवताली पसरलेल्या डोंगराकडे व निसर्गाकडे खुर्चीत बसून पाहत पाहत या शब्दाच्या अंतरंगात घुसण्याचे केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ ठरले. या विचारात दोन दिवस निघून गेले. मन अस्वस्थ झाले. शब्दार्थाचा उलगडा झाल्याशिवाय लिखाणाची अडलेली गाडी पुढे जाणे शक्यच नव्हते. त्यामुळे काय करावे ते सुचेना. अशा स्थितीत तिसऱ्या दिवशी सकाळी खुर्चीवर बसल्यावर असे दृश्य समोर दिसू लागले की; श्रीगुरुमहाराज समोर उभे राहून सांगत आहेत आणि आपण त्यांच्या पुढे उभे राहून असे ऐकत आहोत की, " ज्ञानेश्वरीच्या ओव्यांची कुलुपे उघडण्याची 'मास्टर की' तुला देऊन ठेवतो." श्रीगुरुमहाराजांनीच पुन्हा सांगितलेले हे वाक्य मी ऐकले मात्र; लगेच " सिद्धसिद्धान्तपद्धति " हा ग्रंथ प्रथमपासून वाचण्यास सुरुवात केली. ज्यावेळी ग्रंथाच्या चतुर्थोपदेशात " अपरंपराशक्तिराज्ञावती प्रसिद्धा " किंवा

"अपराशक्तिराज्ञावती प्रसिद्धा ।।४. १०।।" हें सूत्र मिळाले त्यावेळी आज्ञा म्हणजे अपरंपरायुक्त किंवा अपरा अशी कुंडलिनी शक्ती आहे हे समजून सर्व कोडे उलगडले आणि निरतिशय आनंद झाला. एवढेच नव्हे; तर परा, सत्ता, अहन्ता, स्फुरत्ता व पराकला हे शब्दही कुंडलिनी शक्तीचेच द्योतक आहेत हे समजून अनेक ओव्यांची कुलुपे उघडण्याच्या किल्याच हाती आल्या. हा सर्व प्रसंग येथे मुद्दाम कथन करण्याचा हेतू एवढाच आहे की, ज्ञानेश्वरीतील कूट ओव्यांचा उलगडा होण्यासाठी "सिद्धसिद्धान्तपद्धति" या ग्रंथाचा किती अपार उपयोग आहे याची वाचकांना व अभ्यासकांना कल्पना यावी एवढाच आहे.

येथे प्रसंगाने आणखी एका गोष्टीचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. ज्या प्रमाणे "सिद्धसिद्धान्तपद्धति" हा महायोगी गोरक्षनाथांचा ग्रंथ ज्ञानेश्वरीतील ओव्यांच्या अर्थान्तरात प्रवेश करण्यास म्हणजे शब्दांचे परार्थ प्राप्त होऊन सिद्धयोगाच्या दृष्टीने ओव्यांचे प्रस्फुटीकरण होण्यासाठी उपयुक्त आहे त्याप्रमाणेच त्यांचे महार्थमंजरी, विवेकमार्तण्ड, गोरक्षसिद्धान्तसंग्रह, कामकलाविलास, गोरक्ष शतक, योगबीज इत्यादि सर्वच ग्रंथ अभ्यासकांनी या दृष्टीने अवश्य अभ्यासिले पाहिजेत; कारण त्याशिवाय उपरोक्त हेतूची पूर्ती होऊन अभ्यासकाला श्रीज्ञानेश्वरमहाराजांना अपेक्षित असलेल्या अर्थाशी समरस होता येणे शक्य नाही असे वाटते. त्याचप्रमाणे सर्व सांप्रदायिक अभ्यासकांनी आपल्या एकान्तिक अभिनिवेशाचा त्याग करून आणि विचार, परंपरा, संस्कार, रूढी इत्यादींच्या स्वतःभोवती उभ्या केलेल्या पोलादी चौकटी वितळवून टाकल्याशिवाय श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्या विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अशा परात्पर जागृत चित्शक्तीशी एकरूप होऊन सिद्धयोगाचे हे तत्त्वज्ञानात्मक व शास्त्रीय महाकाव्य साकार केले आहे त्यातील गर्भित परार्थापर्यंन्त ते कदापीही पोहोचू शकणार नाहीत, यात तिलप्राय शंका नाही. माझे हे म्हणणे किती सत्य आहे, हे स्पष्ट होण्यासाठी सांप्रदायिक अभ्यासकांच्या दृष्टीने नमूना म्हणून मी अमृतानुभवातील एका ओवीचे उदाहरण येथे प्रस्तुत करतो. श्रीगुरुचरणांच्या सेवेत असताना ज्या ज्या वेळी काही व्यक्तींनी त्यांना "अमृतानुभव" ग्रंथ भट म्हणून आणून दिला व "तो जरूर वाचून पाहा, त्यातील अर्थ जुन्या सांप्रदायिक पद्धतीने लिहिला आहे किंवा ओव्यांवर अशा प्रकारची टीका केली आहे" असे आग्रहाने सांगितले, त्या त्या वेळी 'केशव' अशी हाक मारून मला बोलवून घेऊन ते म्हणत; "अरे ! हा बघ नवीन अमृतानुभवाचा ग्रंथ आला आहे. तो वाचून पाहण्याचा त्या गृहस्थांचा आग्रह आहे. त्यातील ६ व्या अध्यायातील ४९ वी ओवी काढ आणि त्याचा अर्थ वाच." त्यांना त्या ओवीचा अर्थ वाचून दाखविला की, "पुस्तक कपाटात ठेवून दे," असे ते म्हणत. आपल्याला कोणाचाच अर्थ पसंत नाही हे कोणावरही टीका न करण्याच्या

त्यांच्या नेहमीच्या स्वभावानुसार वरील वाक्यातून ते मौनाने सूचित करीत. मी त्यांना याचे कारण विचारले तेव्हा ते मला म्हणाले की, " अमृतानुभव या ग्रंथावर श्रीनिरंजन रघुनाथ यांनी त्यांच्या टीकेत केलेला अर्थ पाहा म्हणजे त्यांचा अर्थच कसा योग्य व बरोबर आहे याचा उलगडा होईल. " अमृतानुभवातील ती ओवी व त्या ओवीवर " अनुभवामृत–पद–बोधिनी " या आपल्या टीकेत श्रीनिरंजन रघुनाथ यांनी केलेला अर्थ पाहिला व त्याची इतरांनी केलेल्या अर्थाशी तुलना केली म्हणजे श्रीगुरुचरणांनी परार्थ–दृष्टी आत्मसात करण्याची शिकवण कशी दिली असेल याचा प्रत्यय येईल व त्या दृष्टीने प्रत्ययात्मक अनुभूतीच्या टीकेला किंवा अर्थाला अधिक प्रामाण्य कसे आहे, हे सांप्रदायिक अभ्यासकांच्या व समस्त साधक–वाचकांच्या लक्षात यईल. ती ओवी व त्यावर केलेली श्रीनिरंजन रघुनाथ यांची टीका अशी आहे–

> **जांभई वांटुनि रसु । तेणें काढावा बहुवसु ।**
> **कालौनि आलसु । मोदला पाजावा ।।६.४९।।**

अहो कनिष्ठ अधिकारी जो येणें मनोनाश-वासना-क्षयार्थ योगाभ्यासही केला; परंतु संकल्परहित मन होत नाहीं, तेणें काय करावें? यासि योगशास्त्र-प्रकरणीं वनस्पतिकल्प आहे तो सांगतात– जांभई म्हणजे जांभूलवर्ण आहेत बोंड जे तें जीचीं असी जे गोरखमुंडी ती वांटून बहुवसु, पुष्कळ रस काढावा, आणि आळस, आळशी, आणि जवस म्हणताहेत ज्यास त्याचें पिष्ट त्या रसांत कालवून मातीचे मोधळचासारखा हा पार्थिव देह जो त्यातें पाजावा, म्हणजे मन जें तें संकल्परहित होईल.

परार्थाची प्राप्ती कशी झाली हे सांगताना आणखीही एका विलक्षण व अद्भुत घटनेचा उल्लेख करणे अपरिहार्य आहे. इ. स. १९७५ मध्ये मी ठाण्या-जवळील कळवा येथे माझे मित्र श्री. अरविंदराव लळीत यांच्या घरी राहत होतो. एके दिवशी काही कामानिमित्त मी लोकल गाडीने ठाण्याहून दादरला जाण्यास निघालो. तेथील दोन नंबरच्या प्लॅटफॉर्मवर उभ्या असलेल्या गाडीच्या डब्यात बसलो. गाडी उशिरा सुटणार असल्यामुळे डबा जवळ जवळ रिकामाच होता. इतक्यात एक गृहस्थ सर्व डबा मोकळा असूनही माझ्या शेजारीच येऊन बसले आणि एक क्षणभर थांबून मला म्हणाले की, " आपण पीएच्. डी. साठी ज्ञाने-श्वरीवर प्रबंध लिहीत आहात ना? " त्यांचा हा अनपेक्षित प्रश्न ऐकून मी आश्चर्यचकित होऊन त्यांना " होय " असे उत्तर दिले. हे गृहस्थ आपल्या परि-चयाचे नसताना त्यांना आपण प्रबंध लिहितो आहे हे कसे कळले याचे मला राहून राहून नवल वाटले. ते गृहस्थ मुंबईत असलेल्या असंख्य गुरुबंधूंपैकी कोणीही नाहीत याचीही मी मनाने त्याचवेळी निश्चिती केली. परंतु वास्तविक पाहता त्यांच्या

प्रश्नाने मी इतका दिङ्मूढ झालो होतो की, आपण कोण ? माझी आपणास काय माहिती ? मी पीएच्. डी. साठी ज्ञानेश्वरीवर प्रबंध लिहितो आहे हे आपणास कसे समजले ? इत्यादि त्यांना काहीही विचारण्याचे भानच मला राहिले नाही. एवढ्यात ते मला असे म्हणाले की, "तुम्हाला एक गंमत सांगू का ?" त्यांना मी "होय" असे म्हटले. त्याबरोबर ते मला म्हणाले की, "श्रीमद्भगवद्गीतेत शेवटच्या श्लोकात "यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।" असे आले आहे. यातील योगेश्वर कृष्ण म्हणजे गुरू व धनुर्धर पार्थ म्हणजे शिष्य होय. हे गुरु-शिष्य संबंधाचे प्रकरण कळले की, गीता, ज्ञानेश्वरी यांच्यासारख्या समस्त ग्रंथांच्या अवतरणाची कल्पना येऊन ग्रंथार्थाचा उलगडा होईल." इतके म्हणून ते गृहस्थ माझ्या शेजारून उठून गाडीतून खाली प्लॅटफॉर्मवर उतरले. त्यांना उठून उतरून जाताना मी पाहत होतो; तरी त्यांच्या शब्दाने व विचारसूत्राने मी इतका भारावून गेलो होतो की, त्यापुढील एक-दोन मिनिटे मला काहीच भान राहिले नाही. परंतु त्यांनी सुचविलेल्या नूतन सूत्राच्या विचारावर्तनातून मी भानावर आल्याबरोबर झटकन् उठलो व त्या गृहस्थांचे नाव व पत्ता काय आहे, ते कोण आहेत, हे आपण विचारावे या उद्देशान त्यांच्या मागोमाग गाडीतून खाली उतरलो. प्लॅटफॉर्मवर विशेष गर्दी नव्हती; तरीही ते गृहस्थ मला दिसले नाहीत. शेवटी गाडीचा नाद सोडून मी त्यांना इतस्ततः खूप शोधले; पण त्यांचा पत्ता मला लागला नाही. या गृहस्थांनी सांगितलेले गुरु-शिष्यसंबंधाचे सूत्र व विचारांना दिलेली दिशा अगर चालना यामुळे ज्ञानेश्वरीच्या अवतरणाची किंवा प्रकटीकरणाची व ज्ञानेश्वरीचा खरा भाष्यकार कोण यांसारख्या व तदंगभूत विचारांची दिशाच बदलून गेली. पुढे "तंत्रालोक" व "स्वच्छंदतंत्र" हे ग्रंथ वाचताना उपरोक्त सूत्राचा पूर्णपणे उलगडा होऊन ज्ञानेश्वरी हा ग्रंथ गुरु-शिष्य म्हणजे शिव-पार्वती संवादात्मक पद्धतीनेच अवतरित झाला आहे हे स्पष्ट होऊन, संविद् कुंडलिनी शक्तीच सर्व काही आहे हे ज्ञात होऊन, तीच ज्ञानेश्वरीची गुरुरूपाने भाष्यकार आहे, हा सिद्धांत प्रस्थापित करणे सहज शक्य झाले. आग्रही दृष्टीच्या जाड पटलांचा त्याग केला म्हणजे हे म्हणणे अंतरंग होऊ शकेल.

येथपर्यंन्त परार्थ प्राप्तीसाठी आग्रही, संकुचित व सांप्रदायिक दृष्टीचा त्याग करण्याचे वारंवार जे आवाहन केले आहे त्याचे कारण असे आहे की, "ज्ञानेश्वरी सिद्धयोग दर्शन" हा प्रबंध ज्या शक्तिपात म्हणजे गुरुकृपा या शास्त्रीय प्रक्रियेचे रूप घेऊन साकार झाला आहे, ती प्रक्रिया भारतातील सर्व संप्रदायांना व्यापून राहिलेली असून, ती कोणत्याही संप्रदायविशेषाची मिरासदारी नाही आणि आम्हीही कोणत्या एखाद्या संप्रदायाचे किंवा दैवताच्या उपासनेचे आग्रही नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्याप्रमाणे सर्व संप्रदायांच्या पलीकडे जाऊन ज्ञानेश्वरी चे

प्रकटीकरण केले त्याप्रमाणेंच अभ्यासकाला संप्रदायापलीकडे जाऊन जेव्हा ज्ञानेश्वरीकडे पाहण्याची दृष्टी येईल त्यावेळी त्याला गुरुकृपाबलाने ज्ञानेश्वरीच्या अर्थान्तरात प्रवेश करता येईल. श्रीयोगानंद विज्ञानी यांनी दि. २०।१०।१९४६ रोजी ऋषिकेशहून परमाराध्य सद्गुरू श्रीसमर्थ महायोगी गुळवणीमहाराज यांना जे पत्र लिहिले आहे त्यातील काही भाग या दृष्टीने अत्यंत मननीय असा आहे. ते आपल्या पत्रात लिहितात की, "हमारे परम आराध्य पूज्यपाद योगी गुरु नारायण तीर्थदेव आचार्य का कोई स्वतंत्र संप्रदाय नहीं है। न हम किसी संप्रदाय विशेषके अनुयायी हैं। परन्तु उनके प्रदत्त सिद्धशक्ति सामर्थ्यके प्रकाशक हैं। ........ श्रीमहश्वरके अनुग्रह से परंपरागत दैवी शक्तिके धारक एवं वाहक हैं। श्रीमन्नारायणतीर्थदेव योगाचार्यकी कृपासे यह परमा शक्ति हमें प्राप्त होती आई है। इसीलिये इसको प्राप्त हम सभी उन्हीं योगी गुरुदेव की संतान हैं।....... श्रीगुरुजीने अपना कोई स्वतंत्र संप्रदाय नहीं बनाया और नहीं वे किसी भी संप्रदायके पक्षपाती थे। केवल उदार वृत्तिसे अधिकारी को दीक्षाद्वारा शक्तिपात करके जिनपर वह परम कृपा करते थे उन्हें अपने तुल्य दिव्य स्पर्शमणी बना देते थे।"

ज्ञानेश्वरीच्या अर्थान्तरात माझा प्रवेश होऊन परार्थाच्या प्राप्तीने त्यातील सिद्धयोगाच्या रहस्याचे उद्घाटन व्हावे म्हणून श्रीगुरुमहाराज जसे सतर्क, जागृत व प्रयत्नशील होते त्याप्रमाणेंच त्यातील सिद्धयोगाचे शास्त्रीय स्वरूप म्हणजे शक्तिपाताची शास्त्रीय प्रक्रिया मला स्थूलात्मक शब्ददृष्टीने व परंपराप्राप्त सूक्ष्म पद्धतीने हस्तगत व्हावी म्हणून ते अत्यंत उत्सुक असत. यामुळेच एके दिवशी सकाळी त्यांनी स्वतः २० नारायण पेठ, या आपल्या जुन्या राहण्याच्या जागेत असलेल्या कपाटातून श्री. प. प. विद्यारण्यस्वामी यांचा "जीवन्मुक्तिविवेक" हा आनंदाश्रम, पुणे, येथून मूळ व श्री. अच्युतराय मोडक विरचित पूर्णानन्देन्दुकौमुदी व्याख्येसहित प्रसिद्ध झालेला ग्रंथ मला आणून दिला आणि ते मला म्हणाले की, "श्री. अच्युतराय मोडक हे मोठे सिद्ध पुरुष होते. त्यांनी या ग्रंथात शक्तिपाताची शास्त्रीय प्रक्रिया फारच उत्तम मांडली आहे. ती जरूर वाच म्हणजे तुला सर्व उलगडा होईल." या प्रबंधातील "ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची शास्त्रीय प्रक्रिया" हे आठवे प्रकरण वाचले म्हणजे श्रीगुरुमहाराजांनी ज्या प्रेमाने या प्रबंधाच्या उभारणीची काळजी घेतली ती लक्षात येऊन गुरु-शिष्य संबंध व प्रेम कसे असते याची प्रतीती येईल. सद्गुरूंच्या अपार सेवेने शक्तिपाताची परंपराप्राप्त सूक्ष्म पद्धत हस्तगत होत असली; तरी स्थूलात्मक शब्ददृष्टीची प्राप्ती व्हावी म्हणून ग्रंथाध्ययनाच्या आलंबनाचाही सद्गुरुनाथ शिष्याच्यासाठी उपयोग करीत असतात हे येथे स्पष्ट होते आणि प. प. श्रीमत् वासुदेवानंद-

सरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांनी आपल्या वृद्धशिक्षा या प्रकरण ग्रंथात "विशारदं ब्रह्मनिष्ठं श्रोत्रियं गुरुमाश्रयेत् ॥६॥" असे जे कथन केले आहे तेच सद्‌गुरूंचे खरे स्वरूप होय, हे लक्षात येते. पृष्ठ ९१ व ७४३ वर आलेले या संबंधीचे विवेचन वाचले म्हणजे हे स्पष्ट होईल.

प्रबंध लिखाणाचा इतिहास कथन करताना वर सुरुवातीलाच ज्या अनेक अडचणी आल्या म्हणून सांगितले त्यातील जागेची अडचण ही सर्वात मोठी होती. प्रथम मी श्रीवासुदेव निवास, पुणे, येथे श्रीगुरुचरणांची सेवा घडावी म्हणून ८–९ वर्षे राहिलो होतो; परंतु ते अंतर्धान पावल्यावर मी पूर्ववत् स्वतंत्रपणे राहणे आवश्यक ठरले. माझी ही अडचण जाणून प्रथम पुण्यातील प्रख्यात डॉक्टर पिता–पुत्र श्री. वि. मा. बहुळकर व श्री. हे. वि. बहुळकर यांनी आपल्या घरी जागा देऊन माझी अडचण दूर केली. माझे गुरुबंधू डॉ. श्री. हेमन्तराव उर्फ बाबासाहेब बहुळकर यांच्या मातोश्री सौ. वहिनी बहुळकर यांनी तर स्वतःच्या मुलाप्रमाणे माझी काळजी घेऊन मी श्री. बाबासाहेब यांचा बंधू आहे हे त्यांचे स्वतःचे म्हणणे सार्थ केले. या तिघांनी केलेले हे सहकार्य अतुलनीय असून आजतागायत ते दाखवीत असलेली सहानुभूती शब्दातीत आहे. काही काळानन्तर प्रबंध लिखाणाची व तदनुषंगिक इतर कार्याची सोय व्हावी म्हणून माझे मित्र व गुरुबंधू श्री. अरविंद कृष्णाजी ळळीत यांनी ठाण्याजवळील कळवा येथे त्यांच्या घरी राहण्याची माझी सोय केली. त्यांच्या पत्नी चि. सौ. अंजली अरविंद ळळीत यांनीही अत्यंत सौहार्दाने माझी सर्व व्यवस्था केली. माझ्यासारख्या एका गुरुचरणसेवकाला आश्रय देऊन या उभयतांनी आपले जे निर्व्याज प्रेम प्रकट केले व आता पावेतो करीत आहेत त्याला क्वचित्‌च तोड सापडेल; इतके ते अनुपमेय आहे. येथेच कळव्याला जून १९७६ च्या सुमारास प्रबंध लिखाणास सुरुवात केली. प्रथम मी या प्रबंधाचे नववे प्रकरण लिहून पूर्ण केले; कारण सिद्धयोगाच्या दृष्टीने ज्ञानेश्वरीची विषयाध्यायसंगती लावणे ही एक अत्यंत महत्त्वाची व अपूर्व अशी गोष्ट होती. या नंतरची एक ते तीन प्रकरणे कळव्यासाच लिहून पूर्ण केली. परंतु पुढे काही अपरिहार्य कारणांमुळे मला पुण्याला परत यावे लागले. येथे परत आल्यावर मी वडगाव–धायरी येथे भाड्याने जागा घेऊन राहिलो. तेथे चार ते आठ प्रकरणे लिहून पूर्ण झाल्यावर १९७६ च्या जानेवारी महिन्यात श्रीगुरुमहाराजांच्या पुण्यतिथी उत्सवानिमित्त महायोग मंडळाच्या कार्यक्रमासाठी मुंबईला गेलो असताना, कार्यक्रमानंतर तेथे मी खूप आजारी पडलो. त्यावेळी श्री. द. सा. मांजरेकर, श्री. वि. न. गोगटे, श्री. कृ. शि. आठवले, श्री. वा. द. तुळपुळे प्रभृती गुरुबंधूंनी मला खूप मदत केली. या आजारात मुंबईच्या के. ई. एम्. हॉस्पिटलमध्ये २१ दिवस राहावे लागले. त्यावेळी तेथील सिक्युरिटी ऑफीसर श्री. नारायण भीमराव नाईकसाहेब यांनी माझ्याकडे जातीने लक्ष

पुरवून, माझी सर्व व्यवस्था उत्तम करून व सकाळ-संध्याकाळी येऊन प्रेमाने विचारपूस करून ज्या आपलेपणाने मला साहाय्य केले त्याचे विस्मरण होणे कधीही शक्य नाही. त्याचप्रमाणे माझे मित्र व गुरुबंधू श्री. अरविंदराव ळळीत व श्री. गोपाळराव अष्टपुत्रे यांनी अक्षरशः रात्रंदिवस माझ्या प्रकृतीची अपार प्रेमाने देखभाल करून मला त्या आजारातून बाहेर काढले. या दोघांप्रमाणेच माझे गुरुबंधू श्री. जयंतराव महाजनी व श्री. अजितराव महाजनी यांनीही खूप सेवा करून माझ्या मनाला दिलासा दिला. चि. कु. मीनल रघुनाथ मयेकर हिनेही या आजारात दररोज येऊन खूपच सेवा केली. तिची ही सेवा श्रीगुरुचरणी रुजू होईल. हॉस्पिटल-मधून परत आल्यावर मी दादरला श्री. अरविंदराव ळळीत यांच्या मातोश्री श्रीमती राधाबाई ळळीत यांच्या घरी राहिलो. त्यांनी मला अत्यंत आग्रहाने घरी ठेवून घेऊन माझी पुत्रवत् देखभाल करून मला पूर्वस्थितीवर आणण्याठी अतोनात परिश्रम घेतले. यानंतर १ मार्च १९७६ ला मी पुण्याला परत येऊन माझे धाकटे बंधू चि. हरिहर रामचंद्र जोशी यांच्याकडे राहिलो. तेथे ३–४ महिने पूर्ण विश्रांती घेतल्यावर मला चालता येऊ लागले. या काळात माझ्या ती. मातोश्री श्रीमती लक्ष्मीबाई व माझी भावजय चि. सौ. रमा यांनी माझ्या प्रकृतीची काळजी घेऊन मला पुन्हा प्रबंध लिखाणास योग्य केले.

माझी प्रकृती साधारण बरी झाल्यावर मी वडगाव-धायरीची जागा सोडून पुणे-सातारा रस्त्यावरील श्री. तावरे यांच्या कॉलनीत राहावयास गेलो. तेथे प्रबंध लिखाणास पुन्हा सुरुवात केली; परंतु या आजारात मी मृत्यूच्या दरवाजातून परत आल्याने खूप अशक्तता आली होती व टेट्रासायक्लिनच्या गोळ्या औषध म्हणून घेतल्याने स्मृतिशैथिल्य उपस्थित झाले होते. अशा रीतीने विषयाचे संदर्भच स्मृतिबाह्य झाल्यामुळे लिखाणाची गाडी अडली व त्यामुळे मन फारच उद्विग्न झाले. त्यातच विषयांच्या संदर्भांचे टाचण कागदावर केलेले नव्हते; तर ते सर्व मनातच तयार होते. त्यामुळे लिखाणाला गती प्राप्त होण्याचा मार्गच खुंटला. शेवटी असे वाटू लागले की, प्रबंध काही पूर्ण होत नाही. मग एके दिवशी रात्री श्रीगुरुचरणी कळवळून अशी प्रार्थना केली की, " हे आपले काम जर आपण माझ्याकडून पूर्ण करून घेणार असाल; तर आपण मला स्मृती द्या. आपण नेहमी " मत्तः स्मृतिः " हे भगवन्ताचे वचन ऐकवून स्मृती ही भगवन्ताच्या ताब्यात आहे असे म्हणत होता; पण माझ्या लेखी माझी स्मृती आपल्याच ताब्यात आहे व आपणच माझी स्मृती आहात. तरी आपण माझ्यावर कृपा करा व माझे स्मृतिशैथिल्य नाहीसे करा." ही प्रार्थना करून मी झोपलो. दुसऱ्या दिवशी सकाळी जेव्हा लिखाणास बसलो तेव्हा सूर्यकिरणांच्या प्रकाशाने धुक्याचा पडदा जसा विरत जाऊन तो नाहीसा व्हावा व स्वच्छ प्रकाशाने सर्व अवनीतल उजळून निघावे त्याप्रमाणे माझ्या बुद्धीवरील

विस्मृतीचा पडदा दूर होऊन आपणास सर्व काही स्मरते आहे व स्मरेल असा विश्वास वाटू लागला. या प्रत्यक्षानुभूतीने मी अगदी दिङ्मूढ व कातर झालो. श्रीगुरु-चरणांच्या स्मरणाने व त्यांनी केलेल्या कृपेमुळे माझ्या डोळ्यातून अश्रू पाझरू लागले. "पुढां स्नेह पाझरे। माघां चालती अक्षरें। शब्द पाठीं अवतरे। कृपा आधीं ॥१३.२६३॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या न्यायाचा प्रत्यय येऊन प्रबंधाचे लिखाण पुन्हा सुरू झाले. मात्र या प्रसंगाने श्रीगुरुप्रेमाचा व कृपेचा माझ्यावर जो वर्षाव झाला त्याचे माझ्या हृदयपुष्करणीवर उठलेल्या तरंगांचे वर्णन करता येणे मला शक्य नाही. "इये शरीरींची माती। मेळवीन तिये क्षितीं। जेथ श्रीचरण उभे ठाती। श्रीगुरूंचे ॥ १३.४३२ ॥" अशी धारणा बिंबवून जो त्यांचा अनुचर झाला त्याच्या बाबतीत "जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती। चालविसी हातीं धरूनिया ॥ १ ॥ चालों वाटे आम्ही तुझाचि आधार। चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥ बोलों जातां वरळ करिसी तें नीट। जालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ३ ॥" हेच एक मात्र सत्य असते याचा प्रत्यय येऊन श्रीगुरुप्रेमाच्या वर्षावाने मन अगदी भारावून गेले.

अशा रीतीने श्रीगुरुकृपेने प्रबंध लिहून व छापून पूर्ण झाल्यावर तो गुरुवर्य डॉ. रा. शं. वाळिंबे यांना ऑगस्ट १९७७ मध्ये नेऊन दाखविला. त्यांनी संदर्भग्रंथ-सूची व ग्रंथ, ग्रंथकार, विशिष्ट शब्द यांची बृहत् सूची ग्रंथात समाविष्ट केल्यावरच प्रबंध विद्यापीठास सादर करणे योग्य होईल असे सांगितल्यामुळे पुन्हा सहा महिने खर्चून या दोन्ही गोष्टी सिद्ध करून छापून घेतल्या व २० फेब्रुवारी १९७८ मध्ये प्रबंध पुणे विद्यापीठास पीएच्. डी. पदवीसाठी सादर केला. दि. ६।१०।७८ पर्यंत प्रबंधाच्या दोन्ही परीक्षकांचा अनुकूल निर्णय आल्यावर दि. २३।१०।७८ला तोंडी परीक्षा झाली व दि. २६।१०।७८ ला निर्णय जाहीर होऊन प्रबंधास पीएच्. डी. पदवी मिळाली. असा या प्रबंधाला इतिहास आहे.

येथे पुढील कार्याचा उल्लेख केला; तर तो अनाठायी होणार नाही. "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" या प्रबंधाच्या रूपाने ज्ञानेश्वरीचे सिद्धयोगाच्या दृष्टीने तात्त्विक विवेचन पूर्ण झाले. त्यामुळे ज्ञानेश्वरीकडे पाहण्याची दृष्टीच बदलेल असा विश्वास वाटतो. ही दृष्टी दृढमूल व्हावी म्हणून या ग्रंथाला खंड एक असे संबोधून दुसऱ्या खंडामध्ये ज्ञानेश्वरीतील प्रत्येक ओवीचा सिद्धयोगाच्या दृष्टीने क्रमशः अर्थ लिहून "सिद्धयोग–ज्ञानेश्वरी" छापावी असे ठरविले आहे. अर्थ लिहिण्याचे हे कार्य फार बृहत् असे असून त्यासाठी कित्येक वर्षे खर्ची टाकावी लागतील. याशिवाय या कार्यासाठी लागणाऱ्या अपार द्रव्यराशीचा व इतरही अनेक गोष्टींचा विचार करावा लागेल. वास्तविकपणे हे कार्य सिद्ध व्हावे म्हणून आजपर्यन्त "योगबीज," "स्पंदशास्त्र अर्थात् सिद्धयोग साधन पद्धती," "ज्ञान-संकलिनीतंत्र," "श्रीललितासहस्रनामस्तोत्र," "सिद्धसिद्धान्तसंग्रह" व "शिव-

संहिता" ही सहा पुस्तके मूळ संस्कृत श्लोक व सुबोध मराठी भाषान्तरयुक्त विवरणासह प्रसिद्ध केली. त्याचप्रमाणे मूळ मराठी ओवीबद्ध "गोरक्षगीता" ही प्रसिद्ध केली. याशिवाय "शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र" हा सिद्धयोग साधनाचे सार कथन करणारा ग्रंथ स्वतंत्रपणे लिहून प्रकाशित केला. सिद्धयोगाचे हे साधन इतरही संतमंडळींच्या वाङ्मयात आविष्कृत झालेले आहे, हे प्रकट व्हावे म्हणून "शक्तिपातयोगाने दिव्य चक्षूंचे उन्मीलन" हे पुस्तक लिहून त्यात श्रीसंत नामदेवमहाराजांच्या अभंगातून हे कसे दृग्गोचर होते हे दाखविले. अशा रीतीने या कार्याची वाटचाल बरीच वर्षे चालू आहे. श्रीगुरुकृपेने समाजाला, अभ्यासकांना व साधक–वाचकांना अत्यंत उपयुक्त असे हे कार्य पूर्ण व्हावे अशी श्रीगुरुचरणी प्रार्थना आहे.

आता ज्यांचे या प्रबंधास साहाय्य झाले त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे हे माझे कर्तव्य आहे. माझे मार्गदर्शक गुरुवर्य डॉ. रामचंद्र शंकर वाळिंबे यांनी या प्रबंधाच्या उभारणीसाठी अव्वलपासून अखेरपर्यन्त जे साहाय्य केले ते शब्दातीत आहे. ज्ञानेश्वरी हा शक्तिपातयोगाचे किंवा सिद्धयोगाचे दर्शन घडविणारा ग्रंथराज आहे, ही नूतन दृष्टी प्रस्तुत करणाऱ्या विषयाला मान्यता देण्यापासून तो तहत माझी तोंडी परीक्षा होईपर्यन्त त्यांनी मला सर्वतोपरी साहाय्य केले. या प्रबंधाचे शीर्षक ही त्यांचीच देणगी आहे. त्याचप्रमाणे माझ्या विनंतीला मान देऊन त्यांनी या प्रबंधाला जी विवेचक, औचित्यपूर्ण व योग्य न्याय देणारी प्रस्तावना लिहिली आहे, त्याबद्दल मी अत्यंत कृतज्ञ व धन्य आहे. त्यांच्या प्रस्तावनेमुळे या ग्रंथाचे यथार्थ स्वरूप वाचकांपुढे उभे राहून तो आकलन करणे सहज सुलभ होईल यात शंका नाही. डॉ. वाळिंबे यांनी वेळोवेळी मार्गदर्शन करून मला जे साहाय्य दिले त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

प्रबंध उभारणीच्या साहाय्यकारी व्यक्तींमध्ये पंडित श्री. परशुराम रेणुकादास बोधनकरशास्त्री यांचीही प्रामुख्याने गणना करावी लागेल. त्यांनी काही संस्कृत ग्रंथांचे अनुवाद व काही शास्त्रीय व्याख्या तयार करून देऊन माझे काम खूपच सुलभ केले. त्यांनी मला आपलेपणाने जी ही मदत केली व आजतागायत करीत आहेत त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी, कृतज्ञ व ऋणी आहे.

या प्रबंधाचा इतिहास कथन करताना वर काही प्रेमी मंडळींचा उल्लेख आलेला आहेच. त्या सर्वांबद्दल मी जसा अंतःकरणापासून कृतज्ञ आहे त्याचप्रमाणे पुढे उल्लेख केलेल्या गुरुबंधू व गुरुभगिनींबद्दलही मी मनापासून कृतज्ञ आहे.

श्री. श्रीधर दिनकर उर्फ दादा खांडेकर, श्री. श्रीराम गोपाळ खांडेकर, श्री. अच्युत पांडुरंग गोखले, श्री. दत्तात्रेय पांडुरंग गोखले, श्री. भा. वि. पुरोहित, श्री. करुणाशंकर शुक्ल, श्री. श्रीकांत दिनकर उर्फ वंडू खांडेकर, श्री. अरविंद कृष्णाजी ळळीत, श्री. हरिभाऊ नारायण कुलकर्णी, श्री. सूर्यकान्त काशीनाथ भावे, श्री. बळीराम श्रीधर पुरव, श्री. नाना पाध्ये, श्री. शरद सीताराम अत्रे, श्री. अजय कमलाकर भवाळकर, श्री. किशोर गोराडे, श्री. पोपट वासुदेव जोशी, सौ. विजयाताई आनंदराव माटेगावकर, श्रीमती लक्ष्मीताई कोटक इत्यादि सर्वांनी मला सर्वतोपरी साहाय्य केले. या सर्वांच्या साहाय्याविना हा प्रबंध छापून पूर्ण झाला नसता. अर्थात् या सर्वांचे साहाय्य हे इतके निरपेक्ष आहे की, त्यांचा यथे केलेला उल्लेख त्यांना आवडणार नाही. मी एवढेच म्हणेन की, त्यांनी केलेली ही सेवा श्रीगुरुचरणी रुजू राहील.

या ग्रन्थातील श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे रंगीत चित्र नेर्लेकर बुक डेपोचे मालक श्री. राजाराम महादेव नेर्लेकर यांनी उपलब्ध करून देऊन ते ग्रन्थात छापून समाविष्ट करण्यास अनुमती दिली याबद्दल मी त्यांचाही कृतज्ञ आहे. त्याचप्रमाणे माझे गुरुबंधू श्री. अण्णासाहेब जोशी (के. जोशी ब्लॉक मेकर्स) यांनी श्रीगुरुमहाराजांच्या व श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या चित्रांची छपाई उत्कृष्ट रीतीने करून दिली याबद्दल मी त्यांना अंतःकरणपूर्वक धन्यवाद देतो.

या ग्रंथाची छपाई श्रीगुरुमहाराजांचे प्रेमी भक्त श्री. रामचंद्र शंकर उर्फ तात्यासाहेब नेर्लेकर यांनी आपले स्वतःचे काम आहे असे समजून केली. याबद्दल मी जेवढी कृतज्ञता व्यक्त करीन व त्यांना धन्यवाद देईन तेवढे थोडेच आहेत. सतत ७ महिने (१९–१२–१९७६ ते ३०–७–१९७७) चाललेल्या या प्रबंधाच्या छपाईकडे त्यांनी जातीने लक्ष दिल्यामुळे मुद्रण दोषांचे प्रमाण अत्यल्प राहू शकले. त्याचप्रमाणे श्री. जाधव, श्री. पवार, श्री. मुळीक, श्री. कुंभार, श्री. भोसले, श्री. गोपीनाथ, श्री. थोरात, श्री. नाचरे आदि छपाई करणाऱ्या सर्वांचे अपरिमित साहाय्य झाले हे नमूद करणे माझे कर्तव्य आहे. या सर्व कर्मचारी बंधूंना माझे हार्दिक धन्यवाद आहेत.

या शिवायही कित्येकांचा या प्रबंधाच्या कार्यासाठी हातभार लागला आहे. असे जे नामोल्लेखरहित गुरुबंधू, भगिनी व अन्य लोक आहेत त्यांचाही मी अंतःकरणपूर्वक आभारी आहे. त्यांच्या अनुल्लेखाबद्दल त्यांनी मला क्षमा करावी.

इत्यलम् । श्रीगुरुचरणी अगत्य असू द्यावे ही प्रार्थना. श्रीगुरुचरण विश्वात्मक व विश्वोत्तीर्णरूपाने स्थिरावले असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात ही सद्भावांजली माझे परमाराध्य सद्गुरू श्रीसमर्थ योगिराज संतश्रेष्ठ महायोगी गुळवणीमहाराज यांच्या चरणी अर्पण करतो.

भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोंवियाफुलें मोकळीं ।
अर्पिलीं अंध्रियुगलीं । विश्वरूपाच्या ॥११.७०८॥

केशव रामचंद्र जोशी

## सकलसंतशिरोमणी महासिद्धयोगी श्रीज्ञानेश्वर महाराज




सिद्धयोगाचा उद्गाता । समाधिधनाचा दाता ।
कुंडलिनी जगदंबेचा त्राता । शांभव योगी ।।

# प्रस्तावना

डॉ. रामचंद्र शंकर वाळिंबे

एम्.ए.,पीएच्.डी.

मानवी जीवनाचें अंतिम उद्दिष्ट मोक्ष हेंच असून या उद्दिष्टाची प्राप्ति करून घेणे हेंच भारतीय वैदिक तत्त्वज्ञानाचें ध्येय आहे. संसार हा मोक्षाचा प्रतिपक्षी असल्यामुळे त्याचा त्याग करणें अर्थातच आवश्यक आहे. मिथ्याज्ञान हें संसाराचें निमित्त असून तत्त्वज्ञान मिथ्याज्ञानाचा निरास करण्याचें साधन आहे; अज्ञानाचा निरास झाल्यानंतर साक्षात्काराच्या योगानेच मोक्षाची प्राप्ति होते असा काश्मीर प्रत्यभिज्ञा-दर्शनाचा सिद्धान्त आहे. अज्ञान हें संसाराचें कारण असून ज्ञान हें मोक्षाचें एकमेव कारण आहे असें अभिनवगुप्त म्हणतात. अज्ञान म्हणजे ज्ञानाचा अभाव नसून अपूर्ण ज्ञान होय. या अपूर्ण ज्ञानाची परिपूर्ण शुद्ध ज्ञानांत परिणति करणें हेंच तत्त्वज्ञानाचें फळ होय. पूर्ण ज्ञान प्रकाशानन्दघन आत्म्याचें तात्त्विक रूप असून या तात्त्विक रूपाचें प्रथन म्हणजे आविष्करण हाच मोक्ष होय. स्वरूपप्रथन हाच मोक्ष, आणि आत्म्याची संवित् म्हणजेच स्वरूप. द्वैतप्रथा हें अज्ञान, आणि पूर्णप्रथा हा मोक्ष. थोडक्यांत, आत्मज्ञान म्हणजेच मोक्ष. याच आशयाने 'ज्ञानमेव विमोक्षाय युक्तं चैतदुदाहृतम् ।' असें अभिनवगुप्तांनी म्हटलें आहे. 'मोक्षो हि नैवान्यः स्वरूपप्रथनं हि सः ।' असें अभिनवगुप्तांचें आणखी एक वचन आहे. "स्वस्य आत्मनो रूपं संविच्चैतन्यं, तस्य प्रथनं यथातत्त्वं ज्ञानं, स एव मोक्षः" असें राजानक जयरथांनी याचें स्पष्टीकरण केलें आहे. मोक्ष हें मानवी जीवनाचें अंतिम उद्दिष्ट आहे या बाबतींत शास्त्रांची एकवाक्यता असली तरी मोक्षाच्या स्वरूपाच्या बाबतींत व त्याच्या प्राप्तीच्या उपायांच्या बाबतींत मात्र शास्त्रांमध्ये मतभेद आहे. 'परप्रकृतिसायुज्यं मोक्षः' असें वैष्णवशास्त्राचें मत आहे; 'आनन्द-रूपता मोक्षः' असें ब्रह्मवादी म्हणतात; 'विशुद्धचित्तमात्रं मोक्षः' असें विज्ञान-वादी बौद्ध म्हणतात; 'दीपवत् संततिक्षयो मोक्षः' असें वैभाषिक बौद्ध मानतात.

शैवशास्त्रें अभेदप्रधान असल्यामुळे शिव आणि शक्ति यांचें परिपूर्ण सामरस्य हें त्यांच्या विचारसरणीप्रमाणें योगी साधकाचें अंतिम साध्य आहे. सामरस्यालाच 'समावेश' अशी संज्ञा आहे. समावेश म्हणजे परिपूर्णता. पूर्णतास्पर्श या ठिकाणीं अभिप्रेत नसून पूर्णतावेश अभिप्रेत आहे. पूर्णतास्पर्श या शब्दांतील 'स्पर्श' या घटकाने उन्मुखता दर्शविली जाते, 'आवेश' दर्शित होत नाही असें जयरथांनी म्हटलें आहे. (हाच ज्ञानेश्वरांचा 'परतत्त्वस्पर्श' होय.)

पूर्णतास्पर्श म्हणजे अनुभवाचा उदय. अनुभव म्हणजेच अनुभूति. शिवशक्तींचें सामरस्य ही साक्षात्काराची म्हणजे तन्मयतेची अवस्था होय. ही तन्मयता प्राप्त करून घेण्यासाठी जे उपाय आहेत ते भिन्न शास्त्रांप्रमाणें भिन्न असणें स्वाभाविक आहे. 'यस्य यत्र निष्ठा तस्य तत्प्राप्तिर्भवति' हा न्याय येथे ध्यानांत ठेवला पाहिजे. "यो यदात्मकतानिष्ठस्तद्भावं स प्रपद्यते ।" असें आभिनवगुप्तांचें वचन आहे. तद्रूपता, तादात्म्य, आवेश हे पर्यायशब्द आहेत.

प्रकाशात्मक शिव हें ज्ञेयाचें परतत्त्व आहे. या परतत्त्वाशीं तन्मयीभवन होणें हें ज्ञानेश्वरांच्या दृष्टीने जीविताचें श्रेष्ठ साध्य आहे. आणि हें साध्य कसें प्राप्त करून घ्यावें हें स्पष्ट करण्यासाठीच ज्ञानेश्वरीची निर्मिति झाली आहे हें सिद्ध करण्यासाठीच डॉ. केशवराव जोशी यांनी 'ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन' हा चौदाशे पृष्ठांचा महान् ग्रंथ लिहिला आहे.

ज्ञानेश्वरी हें सिद्धयोगाने आत्मसाक्षात्काराचा मार्ग दाखवणारें 'दर्शन' आहे; गुरुकृपाप्राप्त सिद्धयोगरूप ज्ञानसाधन हा ज्ञानेश्वरीचा महासिद्धान्त आहे; ज्ञानेश्वरींत अथपासून इतिपर्यंत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही; ज्ञानेश्वरी म्हणजे सिद्धप्रज्ञेच्या जोरावर प्रणीत केलेलें सिद्धयोग दर्शन होय; शिवशक्तींचें मीलन ही परमोच्च अद्वयस्थिति असून या अद्वयस्थितीची प्राप्ति करून घेण्यासाठी समर्थ साधन साधकाला उपलब्ध करून देणे हा ज्ञानेश्वरांचा प्रमुख उद्देश आहे; ज्ञानेश्वरांचा अद्वैतसिद्धान्त पूर्णपणें अनुभूतीच्या व प्रतीतीच्या पायावर उभारलेला आहे; ज्ञानेश्वरी ही शक्तियोगाचें शास्त्र सांगणारी गीताटीका आहे, इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष भगवद्गीता देखील सिद्धयोगाच्या महासिद्धान्ताशी एकरस झालेली प्रभूची वाङ्मयी मूर्ति आहे– हें डॉ. जोशी यांच्या ग्रंथांतील प्रमुख प्रतिपाद्य आहे.

गुरुकृपाप्राप्त सिद्धयोगरूप ज्ञानसाधनाचें प्रतिपादन करणें हाच ज्ञानेश्वरीचा महासिद्धान्त आहे हें सप्रमाण सिद्ध करण्यासाठीच डॉ. जोशी यांच्या ग्रंथाचा अवतार आहे. स्वाभाविकच ग्रंथांतील सारें विवेचन सिद्धयोगाच्या प्रतिष्ठापनेसाठीच झालें आहे.

सिद्धयोगाच्या स्वरूपाचें आणि त्याच्या गुंतागुंतीच्या प्रक्रियेचें विवरण सप्रमाण व्हावें यासाठी डॉ. जोशी यांनी अक्षरशः अपार सामग्री गोळा केली आहे. प्राचीन वैदिक वाङ्मय, उपनिषदें, पुराणें, काश्मीर प्रत्यभिज्ञाशास्त्राचे ग्रंथ, तंत्र-शास्त्रावरील ग्रंथ, नाथसंप्रदायांतील सर्व प्रमुख ग्रंथ, कुंडलिनी-विद्येची चर्चा कर-णारे अनेक संस्कृत, हिंदी, आणि इंग्रजी ग्रंथ— अशा या विपुल सामग्रीचें समर्थ अधिष्ठान डॉ. जोशी यांच्या ग्रंथाला लाभलें आहे. या असंख्य ग्रंथांचा डॉ. जोशी यांनी अतिशय सूक्ष्म अभ्यास केला आहे याची प्रतीति प्रत्येक पानांत कोणालाही आल्यावाचून राहणार नाही. आपलें सर्व विवेचन प्रमाणाधिष्ठित व्हावें यासाठी डॉ. जोशी यांनी प्रत्येक महत्त्वाच्या विधानाला समर्पक आधार दिलेला आहे. शेकडो अवतरणांनी प्रस्तुत ग्रंथ अगदी खचून भरलेला आहे. हीं अवतरणें पांडि-त्याच्या प्रदर्शनासाठी नसून विवेचनाच्या ओघांत आलीं आहेत. अर्थपरिशीलन हा त्यांचा हेतु आहे. अर्थात् सारा प्रपंच सिद्धयोगशास्त्रांतील महत्त्वाचे सिद्धान्त सांगून ज्ञानेश्वरींत सर्वत्र सिद्धयोगाचेंच प्रतिपादन आहे अन्य काहीही नाही, हें सिद्ध करण्यासाठीच आहे.

या दृष्टीने पाहतां प्रस्तुत ग्रंथांतील सर्वंच विवेचन आग्रही स्वरूपाचें झालें आहे असें म्हटल्यास अत्युक्ति होणार नाही. असें असलें तरी एका अगदी अपूर्व अशा दृष्टिकोनांतून झालेला ज्ञानेश्वरीचा हा सूक्ष्म अभ्यास ज्ञानेश्वरीच्या चिकित्सक व प्रौढ अभ्यासकांना अतिशय उपयुक्त वाटेल यांत मला कसलीही शंका वाटत नाही. काश्मीर प्रत्यभिज्ञा आणि गोरक्ष-नाथांचा नाथसंप्रदाय यांचा केवढा व्यापक प्रभाव ज्ञानेश्वरीवर झाला आहे हें ज्याला समजावून घ्यावयाचें असेल त्याने डॉ. जोशी यांच्या या अभिनव ग्रंथाचें काळजीपूर्वक सूक्ष्म परिशीलन करणें आवश्यक आहे. आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी की, काश्मीर शैवागमांतील आणि नाथसंप्रदायांतील पारिभाषिक शास्त्रीय संज्ञांचा नेमका अर्थ माहीत नसल्यामुळे आजवर झालेल्या ज्ञानेश्वरीच्या विविध अनुवादांमध्ये ज्या त्रुटि राहून गेल्या, जे प्रमाद राहून गेले, त्यांचेंही उत्कृष्ट परिमार्जन करण्यासाठी प्रस्तुत ग्रंथाचा फार मोठा उपयोग होईल. अज्ञानामुळे किंवा अर्धवट ज्ञानामुळे आजपर्यंत ज्ञानेश्वरींतील असंख्य ओव्यांचा विपर्यस्त अर्थ अनेकांनी केला हें कटु सत्य आहे. सुमारें वीस वर्षांपूर्वी 'श्रीज्ञानेश्वरीचा अभ्यास,' आणि 'ज्ञानेशीय वाङ्मयाची करुण कहाणी' या दोन पुस्तिका लिहून रा. सा. पांडुरंग ज्ञानेश्वर कुलकर्णी (पं. पांडुरंग शर्मा) यांनी ज्ञानेश्वरींतील ओव्यांच्या विपर्यस्त अर्थांची अनेक उदाहरणें अभ्यासकांच्या निदर्शनास आणण्याची फार मोलाची कामगिरी केली होती. परंतु खेदाची गोष्ट अशी की, रा. सा. कुलकर्णी यांच्या या संशोधनाचा उपयोग जितका करून घ्यावयास हवा होता तितका अभ्यासकांनी

करून घेतला नाही. किंबहुना या दोन्ही पुस्तिका बहुतांशीं उपेक्षितच राहिल्या असें म्हटलें तरी चालेल. काश्मीरी शैवागमाचा व नाथसंप्रदायाचा फार मोठा प्रभाव ज्ञानेश्वरीवर पडलेला आहे हें कै. बाळाचार्य खुपेरकर आणि कै. पांडुरंग शर्मा यांनी सप्रमाण दाखवून दिलें. या योगाने ज्ञानेश्वरींतील अनेक कूट ओव्यांचा वास्तव अर्थ स्पष्ट करणें शक्य झालें हें खरें आहे. तथापि डॉ. केशवराव जोशी यांच्या प्रस्तुत ग्रंथामध्ये काश्मीर शैवागमांत, तंत्रग्रंथांत, आणि नाथसंप्रदायांतील ग्रंथांत ज्या शास्त्रीय पारिभाषिक संज्ञा आल्या आहेत त्यांचा उत्कृष्ट उलगडा झालेला असल्यामुळे योगशास्त्रीय प्रणालीची आणि विशेषेंकरून कुंडलिनीयोगाची जी चर्चा ज्ञानेश्वरींत आलेली आहे तिचा खुद्द ज्ञानेश्वरांना अभिप्रेत असलेला आशय यथातथ्यपणें समजावून घेणें आता शक्य झालें आहे. ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांवर डॉ. जोशी यांनी अशा प्रकारें फार मोठे उपकार करून ठेवले आहेत असें निभ्रांतपणें म्हणता येईल.

काश्मीरी शैवागमांत आणि नाथसंप्रदायांत रूढ असलेल्या सांकेतिक पारिभाषिक संज्ञांचा नेमका अर्थ माहीत नसल्यामुळे झालेल्या अर्थविपर्यासाची निष्कृति आता तरी होणें आवश्यक आहे. काश्मीर प्रत्यभिज्ञाशास्त्र काय, किंवा नाथसंप्रदायाचें वाङ्मय काय, गुरूकडून शिष्याला, आणि शिष्याकडून प्रशिष्याला, या क्रमाने प्रवर्तित झाल्यामुळे अनेक शब्दांचा गूढार्थ संप्रदायाबाहेर अज्ञातच राहिला. हे दोन्ही गुरुमार्ग आहेत. ‘ शास्त्रमस्मद्गृहे संप्रदायक्रमात् स्थितम् । ’ असें एक वचन जयरथांनी ‘ तंत्रालोका’वरील टीकेमध्ये उद्‌धृत केलें आहे. रहस्य किंवा वर्म, किंवा गूढार्थ पुस्तकांच्या द्वारें प्राप्त होणें शक्य नसून तो गुरुमुखांतूनच प्राप्त होतो असा या दोन्ही संप्रदायांचा अभिनिवेश त्यांच्या ग्रंथांमधून ठिकठिकाणीं प्रकट झाला आहे. ‘ पुस्तकाधीतविद्या ’ (म्हणजे पुस्तकी विद्या, गुरुमुखांतून प्राप्त न झालेली विद्या) कामाची नाही असें अभिनवगुप्तांनी म्हटलें आहे. आणि त्यांच्या वचनावर भाष्य करतांना जयरथांनी पुढील श्लोक उद्‌धृत केला आहे.

कथितं गोपितं तेभ्यस्तस्माल्लेख्यं न पुस्तके ।
गुरुवक्त्रात्तु लभ्येत अन्यथा न कदाचन ॥

संप्रदायांतील रहस्य किंवा वर्म संप्रदायाबाहेर इतरांना कळूं नये एवढ्यासाठीच गूढ सांकेतिक परिभाषा वापरण्याचा प्रघात असे. ‘ स्वमंत्ररक्षणं यत्नात् सर्वदा कारयेत् सुधीः ’ या उक्तीचें हेंच तात्पर्य आहे. पुस्तकांत लिहिलेले मंत्र ‘ निर्वीर्य ’ असतात, पुस्तकांतून अध्ययन करणाऱ्या लोकांना सिद्धि मिळत नाही, केवळ क्लेश तेवढे त्यांच्या पदरांत पडतात, म्हणून ‘ पुस्तकान्मंत्रा नाध्येयाः ’ असा स्पष्ट इषारा जयरथांनी दिला आहे. इतकेंच नव्हे तर ‘ तंत्रालोकां’तील अनेक गूढ

वचनांचें खोलांत जाऊन स्पष्टीकरण करण्याचें त्यांनी अनेक ठिकाणीं कटोक्षाने टाळलें आहे. ' हें फार रहस्य असल्यामुळे अधिक स्पष्ट करून सांगणें शक्य नाही; गुरुमुखांतूनच तें समजावून घेतलें पाहिजे ' अशा आशयाचा शेरा जयरथांनी अनेक ठिकाणीं मारला आहे. 'आचार्यशिष्यपरंपरया यदुपदेशप्रदानं स संप्रदायः' अशी संप्रदायाची व्याख्या शार्ंगदेवाने ' संगीतरत्नाकरां'त दिली आहे. आचार्योपदेश परंपरेचें असें हें विलक्षण माहात्म्य असल्यामुळे गूढ सांकेतिक पारिभाषिक संज्ञांचा अर्थ समजावून घेण्याचा एकच एक मार्ग गुरुमुख हा होय. नाथसंप्रदायांतील किती तरी गूढ पारिभाषिक संज्ञा ज्ञानेश्वरींत इतस्ततः विखुरलेल्या आहेत. त्यांचा नेमका अर्थ संप्रदायांतील आचार्याकडून जर समजला नाही तर त्यांचा विपरीत अर्थ होणें अगदी स्वाभाविक आहे. वेदशास्त्रपुराणें सामान्य गणिकेप्रमाणें असून शांभवी विद्या मात्र अवगुंठनवती कुलवधूप्रमाणें आहे अशा अर्थाचें ' ज्ञानसंकलिनीतंत्रां'तील जें वचन डॉ. जोशी यांनी पृ. ३१ वर उद्धृत केलें आहे त्यांतील ( गणिकेच्या उल्लेखाकड दुर्लक्ष केलें तर ) आशय हाच आहे. शांभवी विद्या रहस्य आहे, गूढ आहे, कोणालाही सहज समजण्यासारखी नाही हेंच त्याचें तात्पर्य आह.

काश्मीर शैवागमांतील आणि नाथसंप्रदायांतील गूढ पारिभाषिक संज्ञांचा अर्थ प्रयत्नपूर्वक समजावून घेऊन (म्हणजे गुरुमुखांतून, शास्त्राच्या परिशीलनाच्या द्वारें, आणि स्वतःच्या प्रज्ञेने समजावून घेऊन ) डॉ. जोशी यांनी ज्ञानेश्वरींतील असंख्य गूढ ओव्यांमधील वर्माचें किंवा रहस्याचें उत्कृष्ट उद्घाटन केलें आहे. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांतील कुंडलिनीयोगाचें विवरण यासाठी उदाहरण म्हणून देतां येईल. कुंडलिनीयोगांतील विविध प्रक्रियांचें इतकें तपशीलवार आणि अतिसूक्ष्म विवेचन आजपर्यंत झालें नव्हतें—निदान मराठींत तरी झालें नव्हतें. संज्ञांचें स्पष्टीकरण अगदी साधार करून डॉ. जोशी यांनी ज्ञानेश्वरांच्या मनांतील ध्वनित अर्थाचें प्रकटीकरण यशस्वीपणाने केलें आहे. नाथसंप्रदायांतील रहस्यमय सांकेतिक पारिभाषिक संज्ञा उलगडून दाखविण्यासाठी आवश्यक असलेला सखोल व्यासंग आणि परिणत प्रज्ञा यांची त्यांना जोड मिळालेली असल्यामुळच हें शक्य झालें आहे.

सिद्धयोग हें दर्शन म्हणजे शास्त्र आहे हें डॉ. जोशी यांनी पुन्हा पुन्हा आवर्जून सांगितलें आहे. या शास्त्रांत केवळ तात्त्विक चर्चा नाही, पोकळ बडबड नाही, त्यांत कोठेंही संदेहाला म्हणजे संशयाला अवसर नाही, यावरही त्यांनी भर दिला आहे. त्यांच्या दृष्टीने सिद्धयोगाचे सारे सिद्धान्त ' त्रिकालाबाधित ' आहेत. ' संशयात्मा विनश्यति ' हें या शास्त्रांतील मुख्य सूत्र आहे. स्वाभाविकच गुरुवचनावर आत्यंतिक श्रद्धा ओघप्राप्त आहे. आपल्या अल्पबुद्धीने माणसांनी मंत्रांची मीमांसा करूं नये अथवा त्यांची चर्चा करू नये; आगमाला ( म्हणजे शास्त्राला ) प्रमाण

मानून आगमांतील वचनांवर श्रद्धा ठेवावी असाच या शास्त्राचा दंडक आहे. " न मीमांस्या विचार्या वा मंत्राः स्वल्पधिया नरैः। प्रमाणमागमं कृत्वा श्रद्धातव्या विचक्षणैः ॥ " असें एक वचन जयरथांनी 'तंत्रालोक' टीकेंत उद्धृत केलें आहे. 'शास्त्र हें निर्णयात्मकच असतें' हें या संप्रदायांतील महावाक्य होय. संशयित अर्थाचा निर्णय उद्देश, लक्षण, परीक्षा यांच्या आधारानें शास्त्र करीत असतें. म्हणून शास्त्रनिर्णयाचें प्रामाण्य संशयातीत असतें असें तात्पर्य आहे. निर्णय म्हणजे तत्त्वाववोध.

हें सिद्धदर्शन आहे. शिवशक्तिसामरस्य हें या शास्त्रांतील अंतिम साध्य ही 'अतींद्रिय वस्तु' आहे. आणि अतींद्रिय वस्तूच्या आकलनाच्या बाबतींत अनुभव किंवा अनुभूति याशिवाय अन्य कोणतेंही प्रमाण असणें शक्य नाही, अशी या शास्त्राची भूमिका आहे. 'अतीन्द्रियं च यद्वस्तु तत्राप्यनुभवो न किम् ? ॥' म्हणजे हा मानस अनुभव आहे. यालाच शास्त्रीय परिभाषेंत 'मानसप्रत्यक्ष' म्हणतात. हा 'अनुभवोदय' आहे. यामुळेच डॉ. जोशी म्हणतात– " .... सिद्धमहात्म्यांनी पाहिलेल्या व त्यांना ज्याचा साक्षात्कार झाला आहे अशा सत्याचे जे प्रतिपादन करते ते दर्शन होय. यामुळ भारतवर्षात ज्याला दर्शन म्हणतात त्या वस्तूचा केंद्र विंदु संदेह हा नसून योगद्वारा समाहित झालेल्या चित्ताने अनुभविलेले व पाहिलेले ते सत्य आहे." (पृ. ३) "दर्शन ही अनुभूती आहे. पाश्च्यात्यांप्रमाणे केवळ तात्त्विक चर्चा किंवा पोकळ वडवड नाही" असें जेव्हा डॉ. जोशी म्हणतात तेव्हा त्यांचा सारा रोख तर्कपद्धतीवर आहे हें उघड आहे. अन्यत्र ते म्हणतात– " नुसत्या विचारांचे किंवा तर्काचे हे काम नव्हे. त्यासाठी सद्गुरुकृपेने आत्मसत्तारूपी कुंड-लिनी शक्ती जागृत होऊन ब्रह्म हे सत्तास्वरूपानेच आहे याची अनुभूती घ्यावी लागते. ही अनुभूती घेणे हेच शास्त्र किंवा दर्शन होय." (पृ. ७११) असें असल्यामुळे 'अनुभावियांचा रावो' असें ज्ञानेश्वरांनी अर्जुनाचें वर्णन केलें आहे. (१५.४४५) " जें अद्वैताहीवरी भोगिजे। तें अनुभवीच तूं विरजे' (१५.४५०). खुद्द डॉ. जोशी यांनी सुद्धा आपलें सारें विवेचन स्वानुभूतीवर आधारलेलें आहें अशी ग्वाही दिली आहे. " ......... महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांच्या कृपेने प्राप्त झालेल्या शक्तिपातयोगदीक्षेच्या सामर्थ्याने मीही हे ज्ञानेश्वरीचे सिद्धयोगदर्शन स्वानुभूतिपूर्वक लिहीत आहे." (पृ. ४०८) "अनुभूति देण्याचा अनुग्रह हा सिद्धयोगाचा 'मूर्धन्य विशेष' आहे" असे ते अन्यत्र म्हणतात (पृ.१०९) "अनुभव हे 'वलवत्तर' प्रमाण आहे"(पृ. १२२) आणि "ज्ञानेश्वरीतील अद्वैत सिद्धांताचे स्वरूप पूर्णपणे अनुभूतीच्या व प्रचीतीच्या पायावर उभारलेले आहे." (पृ. १२४) असा निर्वाळा त्यांनी दिला आहे.

अशा प्रकारें अनुभव हें बलवत्तर (किंवा सर्वश्रेष्ठ) प्रमाण मानल्यामुळे तर्काला डॉ. जोशी यांच्या दृष्टीने कसलेंही स्थान नाही. पण अभिनवगुप्तांनी

तर तर्क हे 'उत्तम योगांग' मानले आहे. 'एवं योगाङ्गमियति तर्क एव न चापरम्।' 'तर्को योगाङ्गमुत्तमम्' असें अन्यत्र त्यांनी म्हटलें आहे. 'षडङ्गयोग' म्हणून जो प्रत्यभिज्ञादर्शनांत मानला आहे त्याचें एक अंग 'तर्क' आहे. 'प्राणायामस्तथा ध्यानं प्रत्याहारोऽथ धारणा। तर्कश्चैव समाधिश्च षडङ्गो योग उच्यते ।।'. 'अमुक त्याज्य, अमुक ग्राह्य' हा विवेक तर्काच्या आधाराने करता येत असल्यामुळे तर्क 'उत्तम योगाङ्ग' आहे असें जयरथांनी विवरण केलें आहे. 'असद्युक्ति' म्हणजे हेत्वाभास, आणि शुष्कतर्क यांवर आक्षेप आहे. सत्तर्कावर आक्षेप नाही. भेदरूपी दुर्भेद वृक्षाचें मूळ तोडणारी कुन्हाड असें अभिनवगुप्तांनी 'सत्तर्क' या शब्दाचें वर्णन केलें आहे. 'धारारूढेन सत्तर्ककुठारेणेति निश्चयः।'. "साक्षात्तत्त्वनिष्ठः, अत एव तर्कान्तर-विलक्षणो योऽसौ परां कोटिं प्राप्तस्तर्कः, शुद्धविद्यांशस्पर्शपवित्रिताया बुद्धेरुदीय-मानः स्वात्मप्रत्यभिज्ञापनपररूपः..." असें जयरथांचें विवरण आहे. "सोऽपि सत्तर्कयोगेन नीयते सद्गुरुं प्रति। सत्तर्कः शुद्धविद्यैव सा चेच्छा परमेशितुः ।।" असें अभिनवगुप्तांनी अन्यत्र म्हटलें आहे. तात्पर्य असें की, सत्तर्क ही निश्चयाने शुद्धविद्या असून त्याज्य जर काही असेल तर असद्युक्ति आणि शुष्कतर्क. शुष्कतर्क हा वस्तुनिर्णयशून्य असतो, तो केवळ वाक्छल असतो, वितंडवाद असतो; आणि असद्युक्ति हेत्वाभासात्मक असते. तर्क दोन प्रकारचा असतो. वस्तुनिर्णयशून्य वाक्छलाच्या स्वरूपाचा एक तर्क; आणि ग्राह्याग्राह्यतेचा विवेक करून वाक्छलाचा पूर्ण त्याग करून वस्तुनिर्णय प्राप्त करून देणारा दुसरा तर्क. पहिल्या तर्कांत वस्तुनिर्णयाचा अभाव असल्यामुळे तो गर्हणीय असतो; पण त्याज्याचा त्याग करून ग्राह्याचा स्वीकार करावयास सांगणारा तर्क स्पृहणीय असून तो योगाचें उत्तम अंग होय असा यांतील विवेक आहे. म्हणूनच "वस्तुनिर्णयशून्याभिर्बोधिताभि परस्परम्। अभिमानैकसाराभिर्जिह्मीमस्तर्कबुद्धिभिः ।।" असे सार्थ वचन आहे. असत्तर्काची निंदा करणारीं पुढील वचनें पाहावीं.

> "गुरुदेवाग्निशास्त्रस्य ये न भक्ता नराधमाः।
> असद्युक्तिविचारज्ञाः शुष्कतर्कावलम्बिनः ।।
> भ्रमयत्येव तान्माया ह्यमोक्षे मोक्षलिप्सया।"
> "हेतुशास्त्रं च यल्लोके नित्यानित्यविडम्बकम्।
> वादजल्पवितण्डाभिर्विवदन्ते ह्यनिश्चिताः ।।
> हेतुनिष्ठानि वाक्यानि वस्तुशून्यानि सुव्रते।
> ज्ञानयोगविहीनानि देवतारहितानि तु ।।
> धर्मार्थकाममोक्षेषु निश्चयो नैव जायते।
> अज्ञानेन निबद्धानि त्वधर्मेण निमित्ततः ।।
> निरयं ते प्रयच्छन्ति ये तत्राभिरता जनाः।"

ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायांतील गणेशस्तवनांत 'तरी तर्कु तोचि परशु' असें वचन आलें आहे. या वचनांतील 'तर्क' म्हणजे 'सत्तर्क' हें उघड आहे. शुष्कतर्काची निंदा स्वत: ज्ञानेश्वरांनी तेराव्या अध्यायांत केली आहे. 'तर्की अतिगाढा । परि एक आत्मज्ञानीं फुडा । जात्यंधु जो ॥' (१३. ८३४) तेराव्या अध्यायांत अहिंसेच्या प्रकरणांत वाचेचे अवगुण ज्ञानेश्वरांनी सांगितले आहेत. 'विरोधु वादुबळु । प्राणितापढाळु । उपहासु छळु । वर्मस्पर्शु ॥ आटु वेगु विंदाणु । आशा शंका प्रतारणु ।' (१३.२७१-२) (राजवाडे प्रतींतील पाठ- 'उरोधु वाडुवलु । प्राणुपापता ढालु । उपहासु चालु । वर्मस्पर्शु ॥ आंवु वेगु विंदाण । आश शंका प्रतारण । १३. २७०-१). या ठिकाणीं ज्ञानेश्वरांना असत्तर्क अभिप्रेत आहे. "केवळ उपदेशामुळे, व्याख्यानबाजीने, वाक्जालाने किंवा प्रवचनांच्या अवडंबरामुळे आत्मसाक्षात्काराचा साक्षात् अनुभव कदापीही येऊ शकत नाही" (पृ. ३३) असें जेव्हा डॉ. जोशी म्हणतात, किंवा शास्त्राध्ययनाचा व 'विकल्प उत्पन्न करणाऱ्या बडबडी'चा अधिक्षेप करतात, तेव्हा शुष्कतर्काचाच अधिक्षेप करण्याची त्यांची इच्छा असली पाहिजे असें मी धरून चालतो.

डॉ. जोशी यांचा कोरडचा 'वैचारिक ज्ञाना'वर मोठा आक्षेप आहे. "नुसत्या वैचारिक ज्ञानाचा मनोजयासाठी काहीही उपयोग होत नाही. यासाठी प्राणजय करणे हाच मनोजयाचा एकमात्र उपाय आहे" असें ते म्हणतात. (पृ. २१), आणि प्राणजय साधावयाचा असेल तर सिद्धयोगाची दीक्षा हाच एक प्रभावी उपाय आहे असें त्यांना वाटतें. "सिद्धांच्या उपायाशिवाय म्हणजे सिद्धयोगाच्या दीक्षेशिवाय केवळ तर्क, बडबड, अनेक शास्त्रे, विविध युक्ती, मंत्र, औषधे इत्यादींपैकी कशानेही प्राण ताब्यात येऊ शकत नाहीत." (पृ. २१) सिद्धमार्गाशिवाय अन्य कोणत्याही प्रणालींत प्राणजयाचा उपाय समर्थपणें सांगितलेला नाही असें ते म्हणतात. (पृ. २२) ज्ञानाचें महत्त्व फार थोर असलें तरी योगाशिवाय केवळ ज्ञानानें मोक्ष मिळत नाही; सिद्धयोगमार्गांत योग आणि ज्ञान अभिन्न आहेत; योगाने एकाच जन्मांत ज्ञानाचा उदय होतो-विचारमार्गांत हें अशक्य आहे; ज्याने आपोआप ज्ञान उत्पन्न होत नाही असा कोणताही योगमार्ग मोक्ष देण्यास समर्थ नाही; केवळ वैचारिक ज्ञानाने मुक्ति नाही, कारण ज्ञानी मनुष्य वासनेंत गुरफटतो, त्याच्यांत व सामान्य माणसांत कसलाच भेद उरत नाही; खरी ज्ञानप्राप्ति एका सिद्धयोगानेच होते; सांख्य मार्गाने ज्ञानप्राप्ति होत असली तरी प्रारब्ध कर्माचा छेद होत नाही; हा प्रारब्धक्षय सिद्धयोगानेच शक्य आहे, म्हणून सिद्धयोग नुसत्या ज्ञानापेक्षा श्रेष्ठ आहे; ज्ञानमार्गांत देह परिपक्व होत नाही, म्हणून प्रारब्धक्षय होत नाही; योगाग्नीमुळे देह संस्कृत होतो, आणि म्हणून तो प्रारब्धाधीन राहत नाही; केवळ तत्त्वज्ञानाने प्रारब्धाचा क्षय होत नाही; म्हणून सिद्ध

योग श्रेष्ठ आहे, सिद्धयोगी प्रारब्धकर्माच्या अतीत असतो, समाधि सिद्धयोग्याच्या घराची चवकशी करीत येते; म्हणून ज्ञानेश्वरांना जो योग अभिप्रेत आहे तो ज्ञान-शक्तियुक्त, वस्तुसामर्थ्यशक्तियुक्त सिद्धयोगच होय, असें डॉ. जोशी यांच्या प्रतिपादनाचें सार आहे.

डॉ. जोशी यांनी प्रस्तुत ग्रंथाच्या चौथ्या प्रकरणाच्या सुरवातीला (पृ. १८३) नाथसंप्रदायाचीं एकूण बावीस नांवें दिलीं आहेत. यांपैकी 'सिद्धयोग' हें एक नांव आहे. आणि तेंच त्यांनी आपल्या ग्रंथाच्या शीर्षकांत गोवलें आहे. श्रुत, चिन्तामय; आणि भावनामय असे ज्ञानाचे तीन प्रकार अभिनवगुप्तांनी सांगितले आहेत. शास्त्रार्थाचें परिज्ञान हें श्रुतज्ञान. सर्व शास्त्रार्थाचें आलोचन करून आनुपूर्वीने त्याची योग्य व्यवस्था लावणें हें चिन्तामय ज्ञान. चिन्तामय ज्ञानाचे मन्द आणि स्वभ्यस्त असे दोन भेद आहेत. चिन्तामय ज्ञान परिष्कृत झालें म्हणजे त्याची भावनामय ज्ञानांत परिणति होते. अशा त्रिविध ज्ञानाची प्राप्ति झाली म्हणजे योगाची प्राप्ति होते आणि योग्याला योगाचें फळ प्राप्त होते. त्रिविध ज्ञानांत भावनामय ज्ञान सर्वश्रेष्ठ आहे. कारण तेंच मोक्षाचें कारण होय. ज्ञानी पुरुष आणि योगी पुरुष हे दोघेच 'मोक्षद' म्हणजे मोक्षप्राप्ति करून देणारे असतात असें एक वचन आहे. 'द्वावेव मोक्षदौ प्रोक्तौ ज्ञानी योगी च...।' असें असतां केवळ भावनामय ज्ञान हेंच मोक्षाचें एकमेव कारण होय या विधानाशीं त्याचा मेळ कसा घालावयाचा ? याचें उत्तर असें की, योग्याला तत्त्वसिद्धि प्राप्त झाली तरी स्वभ्यस्त ज्ञानाच्या योगानेच तो सर्वोच्च पदावर आरूढ होतो. पण केवळ योगबलानेच योगी तत्त्वसिद्धि प्राप्त करून घेत असल्यामुळे त्याला स्वभ्यस्त ज्ञानाची जरूरच काय ? याचें उत्तर असें की, योग्याला जी तत्त्वसिद्धि प्राप्त होते ती अधर ( म्हणजे अवर, खालच्या प्रतीच्या) तत्त्वांच्या बावतींत असते, ऊर्ध्व म्हणजे सर्वश्रेष्ठ तत्त्वांच्या बाबतींत नसते. ऊर्ध्व तत्त्वांच्या बावतींतील सिद्धि स्वभ्यस्त ज्ञानाच्या योगानेच होते. म्हणून ज्ञानी व योगी मोक्षद होत असें म्हटले आहे. ज्ञानाच्या योगानेच योगी 'योजक' होतो.

वर त्रिविध ज्ञानाचा उल्लेख केला आहे. चिन्तामय ज्ञानाचे मन्द आणि स्वभ्यस्त असे पोटभेद जमेस धरले तर ज्ञानाचे एकून चार भेद होतात. ज्ञानी पुरुषाचे जसे चार प्रकार तसेच योगी पुरुषाचेही चार प्रकार आहेत. संप्राप्त योगी, घटमान योगी, सिद्धयोग योगी, अणि सुसिद्ध योगी. ज्याला योगाचा केवळ उपदेश प्राप्त झाला आहे तो संप्राप्त योगी. प्राप्त झालेल्या उपदेशाचा केवळ अभ्यास करणारा तो घटमान योगी. हे दोघेही स्वतःच योगाच्या किंवा ज्ञानाच्या क्षेत्रांत प्ररूढ म्हणजे प्रतिष्ठित नसल्यामुळे इतरांच्या बाबतीत ते काय करणार ? सिद्धयोग योग्याच्या बाबतींत स्वभ्यस्त ज्ञानाचीही जोड असते. या स्वभ्यस्तज्ञानाच्या प्राप्ती-

मुळेच तो योजक होतो, आणि म्हणूनच तो मोक्षदायक होतो. " योगी तु स्वभ्यस्त-ज्ञानित्वादेव उत्तमे पदे योजकः । "

ज्ञानी आणि योगी यांच्यामध्ये सिध्दयोगवेत्ता योगी श्रेष्ठ असतो; कारण त्याच्या ठायीं ज्ञान देखील असतें. पण केवळ ज्ञानी पुरुषाला योगाची जोड नसल्यामुळे तो योगफलापासून वंचित असतो असें एक वचन मालिनीतंत्रांत आहे.

**ज्ञानिनां योगिनां चैव सिद्धयोगविदुत्तमः ।**
**यतोऽस्य ज्ञानमप्यस्ति, पूर्वो योगफलोज्झितः ।।**

' सुसिद्ध ' योगी हा सर्वश्रेष्ठ असून तो प्रत्यक्ष शिव होय, सदैव अस्खलित-स्वरूप शिवच होय. स्वतः शिव असल्यामुळे तो मर्त्यांना साक्षात् मोक्ष देत नाही, तर परंपरेने मोक्ष देतो.

तात्पर्य, ज्ञान आणि योग यांचा विचार केला असतां स्वभ्यस्तज्ञानवान् सिद्धयोगी हाच मोक्षप्रद होय. म्हणून स्वभ्यस्तविज्ञानता हेंच एक गुरुलक्षण आहे.

सिद्धयोगासंबंधी वरील सर्व विवेचन मी ' तंत्रालोका'च्या आधाराने केलें आहे.

" मोक्षाचा उपाय म्हणून ज्ञान व योग या दोहोंची गणना होत असली तरी योगाचे प्राधान्य स्वीकारणेच भाग पडते " असें डॉ. जोशी म्हणतात. ( पृ. २१ ) त्यांच्या मतें सिद्धमार्ग हा कैवल्य प्राप्तीचा एकच एक मार्ग असून देहसिद्धि, आत्मज्ञान, आणि मोक्षप्राप्ति होण्यासाठी कुंडलिनी शक्ति जागृत होण अत्यंत आवश्यक आहे; योगाचा मूळस्तंभ कुंडलिनीचें उत्थान हा आहे, आणि सिद्ध-योग्यांचें सर्व साधन कुंडलिनीच्या आश्रयानेंच झाले आहे. (पृ. २२) शक्तिपात होतांच साधकाची चिच्छक्ति कुंडलिनी जागृत होते व त्याचें प्रारब्धकर्म लोपून त्याला तत्काळ मोक्षप्राप्ति होते. सिद्धयोग म्हणजच सिद्धमार्ग, नाथमार्ग. सिद्धयोग हा शांभव मार्ग आहे. या मार्गानेच अद्वयानन्दाचें वैभव प्राप्त होतें. शांभव तत्त्वाची शिष्याला अनुभूति आणून देण्याच्या सामर्थ्याला कृपा किंवा अनुग्रह म्हणतात. शक्तिपात म्हणजेच भगवत्कृपा, भगवदनुग्रह. शक्तिपातासाठी सद्गुरूची आवश्यकता असते. गुरूचा कृपाकटाक्ष म्हणजे जीवाच्या उत्थानदशचा उदय. दैव अनुकूल असेल तर सद्गुरु भेटून शक्तिपातदीक्षेने जीव कृतार्थ होतो. सद्गुरु नुसत्या स्मरणाने शिष्याची आत्मशक्ति जागृत करून त्याचें आध्यात्मिक जीवन संपन्न करतात. हीच वेधदीक्षा होय. या सिद्धयोग साधनमार्गाचा एकमात्र आधार म्हणजे चिच्छक्ति कुंडलिनी.

सिद्धयोग हा संपूर्णपणें वैदिक मार्ग असून योगसाधन पद्धतीही सर्वस्वी उपनिषदांवरच आधारलेली आहे; शक्तिपातयोग ही देखील वैदिकी विद्या आहे हें डॉ. जोशी यांनी पुन्हा पुन्हा आवर्जून स्पष्ट केलें आहे. हें त्यांनी अगदी योग्य असेंच केलें आहे. कारण प्रस्तुत ग्रंथाच्या ३१ व्या पृष्ठावर ज्ञानसंकलिनीतंत्रांतील जें वचन त्यांनी उद्‌धृत केलें आहे त्यांत वेदशास्त्रपुराणांची सामान्य गणिकांशीं तुलना केली आहे. ही तुलना आक्षेपार्ह आहे यांत मुळीच शंका नाही. ज्ञानसंकालिनीतंत्रांतील उपर्युक्त वचन किंचित् फरकाने हठयोगप्रदीपिकेंत आलें आहे. हें वचन डॉ. जोशी यांनी पृ. ९३२ वर उद्‌धृत केलें आहे. वेदशास्त्रपुराणें सामान्य गणिकांप्रमाणें होत या विधानाने शांभवी विद्या अवैदिक आहे असा कोणाचाही ग्रह होईल. म्हणून सिद्धयोग हा पूर्णपणें वैदिक मार्ग आहे हें निश्चयपूर्वक सांगणें आवश्यक आहे. ‘सर्वश्रेष्ठ’ महायोग वेदाधीन असून त्याच्या अधीन कुंडलिनी शक्ती’ आहे असें डॉ. जोशी म्हणतात. (पृ. २९५) पृ. ३६५ वर त्यांनी गोरक्षनाथांचें जें वचन उद्‌धृत केलें आहे त्यांत ‘श्रुतिकल्पतरु’ असा शब्द आहे. श्रुतिकल्पतरु म्हणजे सिद्धयोगरूपी कल्पवृक्ष असें डॉ. जोशी यांनी स्पष्टीकरण केलें आहे.

एखादा आगम (शास्त्र) वेदबाह्य म्हणजे अवैदिक असतो हें खरें असलें तरी ती वंचनाच होय; कारण सामान्यतः सर्व लोक वेदमार्गाचाच अवलंब करणारे असतात अशा आशयाचें एक वचन जयरथांनी ‘तंत्रालोक’टीकेंत उद्‌धृत केलें आहे.

**वेदवर्त्मानुवर्ती च प्रायेण सकलो जनः ।**
**वेदबाह्यस्तु यः कश्चिदागमो वंचनैव सा ॥**

असें असल्यामुळेच कुंडलिनीयोग हाही पूर्णपणें वैदिक आहे हें सिद्ध करणें डॉ. जोशी यांच्या दृष्टीने क्रमप्राप्तच होतें.

कुंडलिनी शक्ति ही चिच्छक्ति होय. ही परतत्त्वाची स्वरूपभूत शक्ति म्हणजे निजशक्ति होय. ‘स्वातंत्र्य’ हें या शक्तीचें स्वरूप होय. ‘स्वातंत्र्य’ ही पारिभाषिक संज्ञा आहे. ‘परमैश्वर्यस्वभावं स्वातंत्र्यमुच्यते’ असें जयरथांनी या संज्ञेचें स्पष्टीकरण केलें आहे. स्वातंत्र्य म्हणजे परमैश्वर्य. ‘स्वातंत्र्यमेतन्मुख्यं तदैश्वर्यं परमात्मनः’ असें एक वचन जयरथांनी उद्‌धृत केलें आहे. चिच्छक्तिरूप कुंडलिनीचा विचार हें साधनमार्गांतील एक ‘गंभीर रहस्य’ आहे असें डॉ. जोशी यांनी म्हटलें आहे. (पृ. ४०)

संविच्छक्ति भगवती कुंडलिनीच ब्रह्मवस्तूची प्राप्ति करून देणारी मार्गदर्शिका आहे. मूलाधारांत निद्रित असलेली कुंडलिनी शक्ति जागृत होत नाही तोंवर जीवाची ऊर्ध्वगति होत नाही. कुंडलिनी जागृत झाल्यावर चिच्छक्ति स्वतःच

आपल्या संविद्रूपांत आत्मप्रकाश करते. ही जागृत शक्ति प्रदीप्त अग्नीप्रमाणे असते. ही शक्ति मुख्यत: सद्‌गुरूच्या कृपाप्रसादानेच जागृत होते. सत्, चित्, आनंद, किंवा इच्छा, ज्ञान, क्रिया इत्यादि विविध रूपांनी शक्ति प्रकट होते. तरी मूळ शक्ति ही चिच्छक्ति, आधारशक्ति किंवा आत्मशक्ति कुंडलिनीच होय. ती चैतन्यचक्रवर्तीची, परब्रह्माची, किंवा शिवाची शोभा होय. वस्तुसामर्थ्यशक्ति, आत्मप्रभा, आरंभरंभा, स्फूर्ति, ज्ञानेश्वरी हे ज्ञानेश्वरांनी कुंडलिनीसाठी वापरलेले पर्याय होत. कुंडलिनी-योगाचा विशेष सांगताना डॉ. जोशी म्हणतात– " ... परिश्रम न करतांही सर्व योगांची आधाररूप मूलाधारस्थ कुंडलिनी शक्ति जागृत झाली की योगशास्त्रोक्त आसन, मुद्रा व प्राणायामादि कशाचेही अस्वाभाविकपणे साधकाला अनुष्ठान करावे लागत नाही. केवळ गुरुशक्तीच्या प्रभावानेच कुंडलिनी शक्तीचे जागरण होऊन स्वाभाविक रीतीने योगपथाचा लाभ होतो .... " ( पृ. ५६ ) " स्वतः होणारा सिद्धयोग म्हणजे स्वप्रयत्नशून्य साधन आहे. अभ्यासानेच आपल्याला साधकाकडून स्वतःला करविणे, सहज ऐक्य प्राप्त होणे, अनुभव आपोआप येणे व समाधी सहजसाध्य होणे हीच या योगाची वैशिष्ट्ये आहेत. हाच या योगाचा आत्मा आहे " असेंही अन्यत्र ते म्हणतात. (पृ. ५७)

शक्तिपाताने कुंडलिनी जागृत झाल्याशिवाय ब्रह्मप्राप्तीच्या वाटचालीला सुरवात होत नाही. म्हणून कुंडलिनी जागृत होणें हा जीवनाचा प्रमुख हेतु होय. कारण शक्तिजागृतीशिवाय ब्रह्मप्राप्तीचें द्वार उडत नाही, आणि सुषुम्नामार्ग मोकळा होत नाही. शक्ति जागृत होतांच साधक निरामय सिद्धयोग साधनानें 'स्वसंवेद्य आत्मरूप' होतो. हेंच मानवी जीवनाचें ईप्सित.

सद्‌गुरूंची कृपा हा सिद्धयोगाचा पाया आहे. ज्ञानशक्ति कुंडलिनीच्या जागृतीनेच योगसाधनेचा श्रीगणशा होतो. कुंडलिनी म्हणजेच वस्तुसामर्थ्यशक्ति. वस्तु म्हणजे परब्रह्म. वस्तु आणि वस्तूची शक्ति यांचें तादात्म्य असतें. किंबहुना, परमेश्वर, परमेश्वराची शक्ति, आणि सद्‌गुरु या तिघांचें ऐक्य असतें. तात्पर्य, कुंडलिनी म्हणजे ब्रह्मविद्या. ब्रह्मविद्येच्या प्राप्तीसाठी कर्मकांडी लोक बाह्य अनुष्ठान करतात. पण या बाह्य अनुष्ठानाचा कुंडलिनी जागृतीसाठी कसलाही उपयोग नाही. कुंडलिनीचें ऊर्ध्वगमन होतें तें अंतर्यागानेच. अंतर्याग म्हणजे कुंडलिनीचें ध्यान करून मन निश्चल करणें. मनाची पूर्ण निश्चलता होतांच सहजानन्दाची प्राप्ति होते. यांतून स्वयंप्रज्ञात आणि असंप्रज्ञात अशी द्विविध समाधि प्राप्त होते. शक्तीच्या आधिक्याने स्वयंप्रज्ञात समाधीची प्राप्ती होते आणि शिवाच्या आधिक्याने असंप्रज्ञात समाधीचा लाभ होतो. स्वयंप्रज्ञात समाधि तीव्र आणि तीव्रतर असून असंप्रज्ञात समाधि मन्द आणि मन्दतर असते. अन्तर्यागाचें हें निरूपण मी 'ज्ञानार्णवतंत्रा'च्या तिसऱ्या आणि सोळाव्या पटलांच्या आधारान केलें आहे. ज्यांना तीव्रतीव्र शक्ति-

पाताचा लाभ झाला आहे अशा योग्यांच्या बाबतींत तत्त्वपरिज्ञान हीच मुख्य गोष्ट असून बाह्य यागादि गोष्टी गौण होत असें अभिनवगुप्तांनी 'तंत्रालोकां'त म्हटलें आहे. ( २.४०-१ ) जयरथांनी पुढील श्लोक उद्धृत केला आहे.

नास्य मण्डलकुण्डादि किंचिदप्युपयुज्यते ।
न च न्यासादिकं पूर्वं स्नानादि च यथेच्छया ।।

तीव्रतीव्र शक्तिपाताच्या योगाने ज्यांची संवित् निर्मल झाली आहे अशा सिद्धयोग्यांना 'निरुपाय समावेशा'चा ( उपायरहित सामरस्याचा ) लाभ होत असल्यामुळे त्यांना 'परदर्शना'ची म्हणजे सर्वश्रेष्ठ ज्ञानाची विनासायास प्राप्ति होते. या सर्वोत्कृष्ट ज्ञानाने योगी देखील ईश्वर होतो ( म्हणजे ईश्वराशी त्याचें ऐक्य होतें ) असें अभिनवगुप्तांनी म्हटलें आहे. ध्यानापेक्षा ध्येय श्रेष्ठ, ध्येयापेक्षा धारणा श्रेष्ठ, धारणेपेक्षा योगजरूप श्रेष्ठ, आणि योगजरूपापेक्षाही ज्ञान श्रेष्ठ; कारण ज्ञानाच्या योगाने महासिद्ध योगीश्वर होतो असे अभिनवगुप्तांचें विवेचन आहे. यावर टीका करतांना जयरथ म्हणतात—" ज्ञानेन हि योगिनामपीश्वरः स्यादित्यर्थः, अत एव तदुपोद्वलनार्थं महच्छब्देश्वरशब्दयोरपि प्रयोगः । "

अविद्येचा अंधार नष्ट करण्यासाठी भगवती कुंडलिनी ज्ञानरूपी सूर्याला उद्दीपित करते, म्हणजे अधोमुखी सूर्यशक्ति जागृत होऊन ऊर्ध्वमुख्य झाल्यावर ती सूर्यमंडलांत अमृताचा स्राव करूं लागते; आणि बाह्य विषयांकडे धावणाऱ्या वासना आपोआप शांत होतात, असें विवेचन 'सौन्दर्यलहरी'च्या आधाराने डॉ. जोशी यांनी केलें आहे. ( पृ. ६२ )

" सिद्धयोग हा एकमात्र सरळ, सिद्ध किंवा मध्यमार्ग आहे " असें डॉ. जोशी म्हणतात. ( पृ· ६७ ) मध्यमार्ग म्हणजे सुषुम्ना नाडी. हिला तंत्रग्रंथात 'मध्य-शक्ति' म्हणतात. 'स्थितिः कार्या तु तत्त्वस्था मध्यशक्तिप्रभान्विता ।' हृदयामध्ये, सर्व देहामध्ये, आणि स्वभावामध्ये जीं सूक्ष्म तत्त्वें असतात त्या सूक्ष्म तत्त्वांच्या समूहाला 'ग्राम' म्हणतात. आत्म्याला 'धर्म' म्हणतात. तत्त्वसमूह आणि आत्मा म्हणजे 'ग्रामधर्म.' आपापल्या ठिकाणीं वर्तणें याला 'वृत्ति' म्हणतात. प्राण आणि अपान यांची गति कुंठित करून ग्रामधर्मवृत्तीचा मध्यधामामध्ये ( म्हणजे सुषुम्ना नाडीमध्ये ) अनुप्रवेश करवून परशक्तीशीं सामरस्य झालें म्हणजे सर्व बाह्य आणि आभ्यन्तर प्रकर्षानें शिवमय होतें. प्राण ऊर्ध्ववाही असतो, आणि अपान अधोवाही असतो. त्यांची गति रोधून ग्रामधर्मवृत्ति मध्यनाडीमध्ये ( सुषुम्नेमध्ये ) प्रवेश करते. मध्यनाडीचाही जो मध्य, त्यामध्ये कमलनालांतील बिसतंतूप्रमाणें असणारी जी शक्ति, तिच्यामध्ये ग्रामधर्मवृत्तीचा प्रवेश अभिप्रेत आहे. या शक्तीशीं एकतानता होणें ही मुख्य गोष्ट आहे. हेंच परशक्तिसामरस्य. बुद्धि निश्चल करून

परमध्येय अथवा परमकारण जो शिव त्याचें ध्यान करणें, म्हणजे त्याच्याशीं तन्मय होणें, म्हणजेच शिव होणें. नाक धरून व डोळे मिटून बसणें म्हणजे ध्यान नसून बुद्धि प्रकर्षाने निश्चल करणें हेंच खरें ध्यान. अशी निश्चल बुद्धि निराकार असते, निराश्रय असते.

ध्यानं या निश्चला बुद्धिर्निराकारा निराश्रया ।
न तु ध्यानं शरीरस्य मुखहस्तादिकल्पना ।।

याच न्यायाने कौल दर्शनांत जटाभस्मादिकांचा त्याग सांगितला आहे. 'कौले कुलदर्शने पुनः अस्य जटाभस्मादेः त्यागो निषेधः विहितः' असें म्हणून जयरथांनी पुढील वचन उद्‌धृत केलें आहे.

जटाभस्मादिचिन्हं च ध्वजं कापालिकं व्रतम् ।
शूलं खट्वांगमत्युग्रं धारयेद्यस्तु भूतले ।।
न तस्य संगमं कुर्यात्कर्मणा मनसा गिरा ।

कुंडलिनी ही प्राणशक्ति होय. विश्वोत्तीर्ण परसंवित् ही जशी अग्निरूप तशीच प्राणशक्तीही अग्निरूप. 'शक्तिवह्नि' असा अभिनवगुप्तांनी तिचा उल्लेख केला आहे. संवित् म्हणजेच परतत्त्व. 'संविदं याति' या अभिनवगुप्तांच्या वचनाचें स्पष्टीकरण 'परतत्त्वान्तरनुप्रविशेत्' असें जयरथांनी केलें आहे. 'मंत्रभूमि' ही परतत्त्वापलीकडची भूमि आहे. मध्यनाडीने म्हणजे सुषुम्नानाडीने प्राणशक्तीचें जें ऊर्ध्वगमन, त्यालाच मंत्रभूमिप्रवेशन म्हणतात. मंत्रभूमिप्रवेशनाने निरावरणत्व, निर्विकल्पकत्व, इत्यादि धर्मांची प्राप्ति होते. 'सा काष्ठा सा परा गतिः ।' हीच योग्याच्या आध्यात्मिक जीवनाची परिसीमा, हीच परमगति.

कुंडलिनीशक्तीचें 'गंभीर रहस्य' शास्त्र न पढलेल्या चिकित्सक प्रौढ अभ्यासकला उलगडून सांगणें हा हेतु मनांत धरून डॉ. जोशी यांनी प्रस्तुत ग्रंथांत सिद्धयोगाचा साद्यन्त विचार अतिशय विस्ताराने व कमालीच्या सूक्ष्मपणाने मांडला आहे. त्यांचें यश निर्विवाद आहे. या शास्त्राची एवढी सूक्ष्म चिकित्सा सर्वांगपूर्ण रीतीने आजवर मराठींत झाली नव्हती. डॉ. जोशी यांचा व्यासंग फार खोल आहे. या शास्त्रांतला एकही महत्त्वाचा ग्रंथ त्यांच्या अवलोकनांतून सुटलेला नाही. व्यापक व्यासंगाच्या जोडीला तीक्ष्ण बुद्धीची आणि विवेचन कौशल्याची जोड त्यांना लाभली आहे. यामुळेच सिद्धयोगासारख्या अत्यंत गहन व गुंतागुंतीच्या विषयाचें प्रतिपादन ज्ञानेश्वरीच्या आधाराने करण्याचें बिकट काम त्यांना यशस्वीपणाने तडीला नेणें जमलें. आत्यन्तिक तन्मयतेशिवाय आणि प्रबळ इच्छाशक्तीशिवाय हें शक्य झालें नसतें. अतिशय खडतर भौतिक परिस्थितीवर मात करून त्यांनी हा निष्काम कर्मयोग आचरून दाखविला आहे. गुरुकृपेच्या अधिष्ठानामुळेच हातीं

घेतलेलें कार्य सिद्धीला गेलें असें ते म्हणतील. त्यांची ती श्रद्धा आहे, त्यांचा तो जिव्हाळा आहे. सिद्धयोगांत कोणत्याही पौरुष प्रयत्नांची अपेक्षा नाही असें ते तत्त्वतः मानीत असले (पृ. ९८) तरी शास्त्राध्ययनासाठी, आणि बाह्ययोगसाधनें-साठी (म्हणजे मंत्र, हठ, लय, आणि राज या योगांसाठी), पौरुष प्रयत्नांची आवश्यकता त्यांनाही अमान्य नाही. सिद्धयोगासाठी आवश्यक असलेल्या साधनसंपत्तीचा अतिशय विस्तृत विचार त्यांनी दहाव्या प्रकरणांत केला आहे. सिद्धयोगसाधन-शास्त्र सर्वांना खुलें आहे व त्यांत पात्रापात्रतेचा मुळीच विचार नाही असें पृ. ७०६ वर ते म्हणतात, आणि लगेच 'आधिकारानुसार ही साधना आपोआप निश्चित होते' असें पृ. ७०९ वर म्हणून अधिकाराचें किंवा पात्रतेचें महत्त्व मान्य करतात. साधनसंपत्ति डॉ. जोशी मान्य करतात याचाच अर्थ त्यांना अधिकार किंवा पात्रता हें तत्त्व मान्य करावें लागेल. 'दीक्षा' या तत्त्वाला सिद्धयोगांत मानाचें स्थान आहे. दीक्षित या शब्दाने अधिकार किंवा पात्रता सूचित होत नाही काय? 'न हि अकृतदीक्षस्य शास्त्रश्रवणेऽप्यधिकारः' असें म्हणून 'अदीक्षितानां पुरतो नोच्चरेच्छिवपद्धतिम्' हे वचन जयरथांनी उद्घृत केलें आहे. दीक्षा हें अधिकाराचेंच निदर्शन आहे. आणि 'ज्ञानवान् गुरुरुत्तमः' या उक्तीप्रमाणें गुरूचाही अधिकार अपेक्षित नाही काय? 'अधिगतशास्त्रार्थस्यैव हि गुरोर्दीक्षायामधिकारः' असें म्हणून 'शास्त्रहीने न सिद्धिः स्याद्दीक्षायां वीरवन्दिते' हें वचन जयरथांनी उद्धृत केलें आहे. गुरूला जर शास्त्राध्ययनाची आवश्यकता असेल तर शिष्यालाही ती असलीच पाहिजे हें क्रमप्राप्तच नाही काय?

# विषयानुक्रमणिका

## प्रकरण पहिले



## प्रकरण दुसरे



## प्रकरण तिसरे

## प्रकरण चवथे



## प्रकरण पाचवे



## प्रकरण सहावे



## प्रकरण सातवे

## प्रकरण बारावे

।। श्रीगुरुःशरणम् ।।

।। सा हि श्रीरमृता सताम् ।।

# ज्ञानेश्वरी सिद्धयोग दर्शन

## प्रकरण पहिले

## विषयप्रवेश

### भूमिका:-

अगा योगी जो म्हणिजे । तो देवांचा देवो जाणिजे ।
आणि सुख सर्वस्व माझें । चैतन्य तो ।। ६.४८२ ।।
याकारणें पंडुसुता । तुवां होआवें योगयुक्ता ।
येतुलेनि सर्वकाळीं साम्यता । आपैसया होईल ।। ८.२५६ ।।

सकलसंतशिरोमणी श्रीज्ञानेश्वर महाराज यांनी उपनिषदातील ब्रह्मविद्येपैकी योगशास्त्राची गूढ व पवित्र तत्त्वे थोडक्यात सांगून भगवत्साक्षात्कारमार्गाची मुख्य व उच्चतम शिकवण देणाऱ्या अनन्यतमश्रेष्ठ अशा श्रीमद्‌भगवद्‌गीतेवर 'ज्ञानेश्वरी' या नावाने मराठीतील पहिली ओवीबद्ध टीका लिहून आदिनाथ शंकरांनी प्रवर्तित केलेल्या व गुरुपरंपरेने प्राप्त झालेल्या सिद्धयोगाचे म्हणजे शांभवाद्वयानंदाचे परमामृत कलीने त्रस्त झालेल्या व दुःखाने होरपळणाऱ्या आर्त जीवाना स्वानंदभोगाचा शेलका वाटा व बोधाचे ऐश्वर्य सरसकट प्राप्त व्हावे म्हणून श्रीनिवृत्तीनाथ महाराजांनी कृपावर्षाव केल्यावर भावार्थदीपिकेच्या रूपाने प्रकट केले. " एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ।। १८.१७६४ ।। " अशा प्रकारे बोधाच्या रूपाने प्राप्त झालेल्या सिद्धयोगाच्या धनाचे म्हणजेच ज्ञानदानाच्या किंवा शक्तिपाताच्या अगर कृपेच्या

ऐश्वर्याचे श्रीसंत ज्ञानेश्वरमहाराजांनी "सर्व गीतादर्शनाचा । पाढाऊं जो ॥१८.३०॥" असे सिद्धयोगाने आत्मसाक्षात्काराचा मार्ग दाखविणारे दर्शनच ज्ञानेश्वरीच्या रूपाने लिहिले आहे. "पिंडे पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतीचा दंशु । परि दाऊनि गेला उद्देशु । श्रीमहाविष्णु ॥ ६.२९१ ॥ तया ध्वनिताचें केणें सोडुनी । यथार्थाची घडी झाडुनी । उपलविली म्यां जाणुनी । ग्राहीक श्रोते ॥ ६.२९२ ॥" ही दृष्टी उपरोक्त विचारानेच त्यांनी ज्ञानेश्वरीत भावार्थाच्या रूपाने आद्योपांत राबविली आहे व "एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥ १८.१२४३ ॥" असे म्हणून जीवाच्या अविद्येचा नाश होऊन मोक्ष प्राप्तीने तो स्वानंदसाम्राज्याचा चक्रवर्ती राजा व्हावा म्हणून "हें इतुलेचि नानापरी । निरूपिलें ग्रंथ विस्तारीं ॥ १८.१२४४ ॥" असे धोरण ठेवून हे सिद्धयोग ज्ञानसाधन ज्ञानेश्वरीमध्ये नानाप्रकारे सांगितले आहे. अशा रीतीने "गुरुकृपाप्राप्त सिद्धयोगरूप ज्ञानसाधन" हा ज्ञानेश्वरीचा महासिद्धांत आहे असे प्रतिपादन करून या सिद्धांताशी इतर सर्व उपसिद्धांतांचे ऐक्य करून दाखवून "एऱ्हवीं द्वैताची वारी । सारूनि ऐक्याच्या परिवरीं । भोगिजे ते अवधारी । रहस्य हें ॥१८.१३४५॥" असे सिद्धयोगाचे रहस्य कथन केले आहे. अशा प्रकारे सिद्धयोगाचे प्रतिपादन करून ज्ञानेश्वरीत जे रहस्योद्घाटन केले आहे त्याच्या चिकित्सक अभ्यासाचे सांगोपांग विवेचन यापुढे करावयाचे आहे. ज्या भूमिकेच्या पृष्ठभूमीवर हे विवेचन करावयाचे आहे ती भूमिका प्रथमतः स्पष्ट होणे आवश्यक आहे. ज्ञानेश्वरी हे सिद्धयोगाचे दर्शन कसे आहे ?, मुळात योगशास्त्राची श्रेष्ठता कोणती आहे ?, सिद्धयोग हाच साधकांना सिद्ध होण्याचा एकमेव मार्ग कसा आहे ?, प्रारब्धक्षयाच्या सामर्थ्यामुळे सिद्धयोग ज्ञानापेक्षा कसा श्रेष्ठ आहे ?, सिद्धयोग हाच गीतेचा व पर्यायाने ज्ञानेश्वरीचा प्रतिपाद्य विषय कसा आहे ?, सिद्धयोग हा वैदिक मार्ग कसा आहे ? व सिद्धयोग साधनमार्गाचा एकमात्र आधार सद्गुरुकृपेने जागृत होणारी चित्शक्ती कुंडलिनी कशी आहे ? या सर्व प्रश्नांची उत्तरे मिळाली म्हणजे या प्रबंधाच्या विवेचनाची भूमिका स्पष्ट होऊन तिची दिशा लक्षात येईल. यासाठी वरील सर्व प्रश्नांचा आपण क्रमशः विचार करू.

**ज्ञानेश्वरी : सिद्धयोगदर्शन :—**

ज्ञानेश्वरी हे सिद्धयोगाचे दर्शन आहे. दर्शन शब्दाचा अर्थच पाहाणे, स्वस्वरूपाचा आविष्कार किंवा आत्मसाक्षात्कार असा आहे. आपण जे पाहिले व अनुभविले ते दर्शन होय. श्रीज्ञानेश्वरमहाराजांना श्रीनिवृत्तीनाथमहाराजांनी सिद्धयोगाची दीक्षा, बोध किंवा मुद्रा देऊन कृतार्थ केले होते. त्यामुळे परतत्त्वाचा स्पर्श झालेले सिद्धयोगाचे शास्त्र त्यांनी स्वानुभूतीने कथन केले. किंबहुना गीतार्थ निधान आपल्या दिव्य दृष्टीला दिसावे म्हणून स्नेहांजन घालण्याची म्हणजे

शक्तिपाताची दीक्षा देण्याची प्रार्थना त्यांनी श्रीनिवृत्तीनाथमहाराजांकडे केली होती. यासंबंधी ते म्हणतात —

जी गीतार्थ निधान। काढू माझें मन।
सुयीं स्नेहांजन। आपुलें तूं ॥ १४.१९ ॥
हे वाक्सृष्टि एके वेळे। देखतु माझे बुद्धीचे डोळे।
तैसा उदैजो जी निर्मळें। कारुण्यबिंबें ॥२०॥

असे हे दिव्य स्नेहांजन मिळाले की साधकाला सहजस्थिती प्राप्त होते. ही सहजस्थिती प्राप्त होणे हेच खरे ईश्वराचे दर्शन आहे व ते सिद्धयोगाने प्राप्त होते असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे.

मग देखिजे ना न देखिजे। ऐसी जे दशा निपजे।
ते तें दर्शन माझें। साचोकारें ॥१८.११६३॥
तें भलतयाही किरीटी। पदार्थाचिया भेटी।
द्रष्टृदृश्यातीता दृष्टी। भोगितो सदा ॥ १८.११६४ ॥

मग पाहाणे नाही व न पाहाणेही नाही अशी जी सहजस्थिती प्राप्त होते तेच माझे परमात्म्याचे खरोखर दर्शन होय. मग वाटेल त्या पदार्थाच्या भेटीत तो सिद्धयोगाचे साधन करणारा साधक द्रष्टा व दृश्य या सापेक्षभावरहित अशा स्वस्वरूपाला नेहमी अनुभवितो.

दर्शन ही अनुभूती आहे. पाश्चात्यांप्रमाणे केवळ तात्त्विक चर्चा किंवा पोकळ वडवड नाही. यासंबंधी श्री. हजारीप्रसाद द्विवेदी हे आपल्या "सहज साधना" या पुस्तकातील "साधना केंद्र" या प्रकरणात म्हणतात, "भारतवर्षातील दर्शनांचा मूळ प्रतिपाद्य विषय धर्मच आहे; परंतु पाश्चात्य ज्याला 'थियॉलॉजी' म्हणतात तो हा धर्म नव्हे हे सत्य आहे. दर्शन शब्दाचा अर्थ पाहाणे असा आहे. यातील गर्भितार्थ हा आहे की सिद्धमहात्म्यांनी पाहिलेल्या व त्यांना ज्याचा साक्षात्कार झाला आहे अशा सत्याचे जे प्रतिपादन करते ते दर्शन होय. यामुळे भारतवर्षात ज्याला दर्शन म्हणतात त्या वस्तूचा केंद्रबिंदू संदेह हा नसून योगद्वारा समाहित झालेल्या चित्ताने अनुभविलेले व पाहिलेले ते सत्य आहे. या सत्याच्या प्रकाशात साधक जगताच्या व आत्म्याच्या मूळ स्वरूपाचे विवेचन करतो व आत्यंतिक दुःखनिवृत्तीचा मार्ग शोधतो." प्रा. उमाशंकर ऋषी यांनी 'सर्वदर्शनसंग्रहाला" जी प्रस्तावना लिहिली आहे त्यातही ते म्हणतात, "या जगतातील आत्यंतिक दुःखाची निवृत्ती होऊन सर्वोच्च सुखप्राप्तीचा उपाय सांगणे हेच दर्शनांचे लक्ष्य आहे. सांसारिक दुःखांच्या बंधनांच्या निवृत्तीला दार्शनिक भाषेत मोक्ष म्हटले आहे. हे बंधन व मोक्ष हाच भारतीय दर्शनांचा मुख्य प्रश्न आहे. प्रत्येक दर्शनाचे उपायांच्या बाबतीत मतभेद आहेत. कारण प्रत्येकाने आपापल्या दृष्टीने ज्ञानप्राप्तीचे साधन सांगितले आहे."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आत्मस्वरूपाच्या प्राप्तीचे गुरुपरंपराप्राप्त सिद्धयोग हेच एकमेव साधन आहे असे ज्ञानेश्वरीत प्रतिपादन करून ज्ञानेश्वरी हे सिद्धयोगाचे दर्शन आहे हे अनुभूतीला आणून दिले आहे. अध्यात्मप्राप्तीचा हाच एकमेव मार्ग असल्याने भूमिकेच्या सुरवातीला ज्या दोन ओव्या उधृत केल्या आहेत त्याचा गर्भितार्थ स्पष्ट होतो. भगवंत अर्जुनाला "योगी होईं अंतःकरणें ।। ६.४८१ ।।" असे जे सांगत आहेत त्याचा अर्थही अंतरंग योगाची उपस्थिती ज्यात होते असा सिद्धयोगाचा अभ्यासक हो असाच आहे. यासाठी मुळात योगशास्त्राची श्रेष्ठता कोणती आहे हे पाहाणे आवश्यक आहे.

**योगशास्त्राची श्रेष्ठता :–**

योग शब्द युज् म्हणजे जोडणे या धातूपासून झालेला असला तरी हाच या शब्दाचा एकमात्र अर्थ नाही. प्राचीन भारतीय साहित्यात योग शब्द नाना-प्रकारच्या व्यापक अर्थांनी वापरात आलेला आहे. असे असले तरी त्याचा जो आध्यात्मिक अर्थ आहे त्यात प्रकारांतराने भेद असले तरी काही अंशांनी या अर्थात सामंजस्य दिसून येते. जीवात्मा व परमात्म्याचा संयोग, प्राण व अपानाचे ऐक्य, चंद्र व सूर्याचे मीलन, शिव व शक्तीचे सामरस्य, चित्तवृत्तीचा निरोध किंवा इतर कोणत्याही प्रकाराने त्याचे लक्षण केले तरी मूळ अर्थात काहीही विशेष फरक पडणार नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "सांडूनि दक्षिण वाम । प्राणापानसम ।। ५.१५३ ।।," "पैं जीवपरमात्मसंगमा ।। ६.४८० ।।," "अपानु प्राणीं अर्पिती ।। ४.१४५ ।।" इत्यादि ओव्यातून वरील अर्थ स्पष्ट केले आहेत. अर्जुनाला स्वस्वरूपाच्या प्राप्तीसाठी योगमार्गच सांगावयाचा असल्याने पाचव्या अध्यायापर्यंत श्रीकृष्णांनी त्यास देहधारी असतानाच काही लोक ब्रह्मभावास पावले असे जे मी तुला आतापर्यंत सांगितले ते या योगामार्गामुळेच होय (५.१५८) असा स्पष्ट अभिप्राय व्यक्त केल्यामुळे "जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूप पटु फाटे ।। ५.१५६ ।।" ही स्थिती आपल्याला या मार्गाशिवाय प्राप्त होणार नाही अशी त्याची पक्की खात्री होऊन "ऐसा योगयुक्तीचा उद्देशु । जेथ बोलिला हृषीकेशु । तेथ अर्जुनु सदंशु । म्हणौनि चमत्कारला ।। ५.१६१ ।।" अशी त्याची आश्चर्यचकित अवस्था झाली. आपल्यासाठी हाच मार्ग योग्य असल्याने तो श्रीकृष्णांना म्हणाला–

> **एऱ्हवीं तरी अवधारा । जो दाविला तुम्हीं अनुसारा ।**
> **तो पव्हण्याहूनि पायउतारा । सोहपा जैसा ।। ५.१६५ ।।**
> **तैसा सांख्याहूनि प्रांजळा । आम्हांसारिखियां अभोळां ।**
> **एथ आहाति परि कांहीं काळा । तो साहों ये वर ।। १६६ ।**

अशा प्रकारे पायउताराने जाण्यासारखा सोपा व अधिकार दुर्बळांना पेलणाऱ्या योगाविषयी आवड उत्पन्न झाल्याने हाच योग विस्ताराने साद्यंत सांगण्याचा आग्रह

त्याने श्रीकृष्णांना केला. त्यावेळी श्रीकृष्ण म्हणाले, असे का ? तुला हा योगमार्ग चांगला आवडला असेल तर मग सांगायला आमचे काय बिघडते ? आम्ही आनंदाने सांगू. तू खुशाल ऐक. " अर्जुना तूं परिससी । परिसोनि अनुष्ठिसी । तरी आम्हांसीचि वानी कायसी । सांगावयाची ? ।। ५.१६९ ।।" असे म्हणून श्रीकृष्णांनी

**अर्जुना जेणें जेणें भेदें । तुझें कां चित्त बोधे ।**
**तैसें तैसें विनोदें । निरूपिजेल ।। ५.१७६ ।।**
**तो काइसया नाम योगु । तयाचा कवण उपेगु ।**
**अथवा अधिकार प्रसंगु । कवणा येथ ।। १७७ ।।**
**ऐसे जें जें कांहीं । उक्त असे इये ठाईं ।**
**ते आघवेंचि पाहीं । सांगेन आतां ।।१७८।।**

या प्रकारे आपण जो योग सांगणार आहोत त्याचे नाव काय, उपयोग कोणता, अधिकारी कोण इत्यादि सर्व अर्जुनाला कथन केले आहे.

श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही गीताभाष्यात " साक्षाच्छोकमोहादिसंसारहेतुदोषनिवृत्तिकारणम् योगे तु तत्प्राप्त्युपाये " असे म्हणून शोक, मोह इत्यादि अनर्थ हाच संसार असून आत्म्याचे अज्ञान हा त्याचा हेतुभूत दोष आहे व तो दोष घालविण्याचे साक्षात् साधन आत्मज्ञान हेच असून त्या आत्मज्ञानाच्या प्राप्तीचा उपाय योग हाच आहे, " असे गीतेच्या दुसऱ्या अध्यायातील ३९ व्या श्लोकावर भाष्य करताना स्पष्टच म्हटले आहे. इतकेच नव्हे तर " निःसंगतया द्वंद्वप्रहाणपूर्वकं ईश्वराराधनार्थे कर्मयोगे कर्मानुष्ठाने समाधियोगे " असे म्हणून फलाची आसक्ती न ठेवता सुख-दुःखादि द्वंद्वत्यागपूर्वक ईश्वराच्या आराधनेसाठी केलेला जो कर्मयोग म्हणजे कर्मानुष्ठानरूप समाधियोग अशी योगाची व्याख्याही केली आहे. योगच कर्मातील कुशलता आहे (गीता २.५०) असे भगवंतांनी गीतेत म्हटले आहे. मात्र कर्मयोग म्हणजे क्रियाशक्तियोग होय हे अकाटय सत्य असून ते आपण पुढे पाचव्या प्रकरणातील नवव्या मुद्यात पाहाणार आहोत.

सारांश महायोगी गोरक्षनाथांनी " गोरक्ष पद्धति " व " विवेक मार्तंड " या ग्रंथात म्हटल्याप्रमाणे " योगशास्त्रं पेठन्नित्यं किमन्यैः शास्त्रविस्तरैः " व आदिनाथांनी म्हटल्याप्रमाणे " योगमार्गात् परो मार्गो नास्ति नास्ति श्रुतौ स्मृतौ " हेच खरे आहे. शिवसंहितेच्या पहिल्या पटलात या अर्थानेच असे म्हटले आहे की–

**आलोक्य सर्वशास्त्राणि विचार्य च पुनः पुनः ।**
**इदमेकं सुनिष्पन्नं योगशास्त्रं परं मतम् ।। १.१७ ।।**
**यस्मिन् ज्ञाते सर्वमिदं ज्ञातं भवति निश्चितम् ।**
**तस्मिन् परिश्रमः कार्यः किमन्यत् शास्त्रभाषितम् ।।१८।।**

सर्व शास्त्रांचे अवलोकन व पुनःपुन्हा विचार केल्यावर हे निश्चित होते की

योगशास्त्रच सर्वात श्रेष्ठ आहे; कारण हे शास्त्र जाणल्यामुळे निश्चितच सर्व गोष्टींचे ज्ञान होते. यासाठी या योगशास्त्राच्या अध्ययनाकरिताच परिश्रम करणे उचित आहे. इतर सर्व शास्त्रे निरर्थक असल्यामुळे त्यांचे ज्ञान प्राप्त करून घेण्याचे प्रयोजनच काय ?

स्वामी ब्रह्मानंदांनीही आपल्या " श्रीयोगकल्पद्रुम " या ग्रंथात " सर्वार्थदो जयति योगसुरद्रुमोयम् ।।२।। " असे म्हटले आहे. योग हा एक कल्पवृक्ष आहे. ज्याप्रमाणे पृथ्वीवरील कल्पवृक्ष मागेल ती गोष्ट देण्यास तयार असतो त्याचप्रमाणे योगरूप कल्पवृक्ष चित्तरूपी पृथ्वीला सर्व प्रकारच्या गोष्टी देण्यास सिद्ध असतो. योगवासिष्ठाच्या उपशम प्रकरणामध्ये महर्षी वसिष्ठांनीही असे म्हटले आहे की–

**जन्मांतरचिराभ्यस्ता राम संसारसंस्थितिः ।**
**सा चिराभ्यासयोगेन विना न क्षीयते क्वचित् ।।**

हे रामचंद्रा ! जन्मजन्मांतरामध्ये दीर्घकालापासून संसाराच्या वासनेचा जो अभ्यास झाला आहे किंवा होत आहे तो दीर्घकालपर्यंत योगाभ्यास केल्याशिवाय अन्य दुसऱ्या कोणत्याही उपायाने क्षीण होणे शक्य नाही.

अशा प्रकारे " स तु दीर्घकालनैरंतर्य्यसत्कारासेवितो दृढभूमिः ।। समाधीपाद १.२६ ।।" या महर्षी पतंजलींच्या योगसूत्राप्रमाणे, जो योगाभ्यास दीर्घकाल, निरंतर व आदरपूर्वक केला जातो तोच दृढावस्थेला प्राप्त होतो, हे निश्चित असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पंथराजाचे साधन कथन केल्यावर असे म्हटले आहे की –

**आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरीं जिहीं केलें ।**
**ते आमुचेनि पाडें आले । निर्वाळलेया ।। ६.३२६ ।।**
**इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येतीं ।। ३३० ।।**

सौभाग्यलक्ष्म्युपनिषदात तर योगशास्त्राची श्रेष्ठता सांगताना असे म्हटले आहे की –

**योगेन योगो ज्ञातव्यो योगो योगात्प्रवर्धते ।**
**योऽप्रमत्तस्तु योगेन स योगी रमते चिरम् ।।१।।**

योगानेच योगाची वृद्धी होत असल्यामुळे योगाच्या द्वारेच योग जाणला पाहिजे. जो साधकयोगी योगाभ्यासामध्ये नेहमी दत्तचित्त असतो तो चिरकाल सुख भोगतो.

सारांश श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे जो योगयुक्त होऊन अभ्यास-साधन करतो त्यालाच निजरूपाची प्राप्ती होते हे त्रिकालाबधित सत्य आहे.

**येणें बोधें जो योगी होये । तयासीचि या बोधाचें नीटपण आहे ।**
**कां जे भोगातें पेलूनीं पायें । निजरूपा ये ।। ८.२५९ ।।**

अशा प्रकारची स्वस्वरूपावस्था योगाशिवाय प्राप्त होणे कधीही शक्य नाही.

जोपर्यंत जीवाची गती योगशास्त्राकडे वळत नाही तोपर्यंत आत्मसाक्षात्काराचा उपाय त्याला प्राप्त होत नाही. तथाकथित सर्व साधारण गुरूच्या मुखातून बाहेर पडणारा उपदेश किंवा शास्त्रचर्चा ही बोधामृतानुभूतीशून्य असल्याने केवळ नाना-तऱ्हेचे विकल्प उत्पन्न करणारे एक जाळेच ठरते. कोरडा उपदेश जीवाला बंधनां-पासून मुक्त करण्यास कणभरही मदत करू शकत नाही. अशा वेळी निर्विकल्प अशा परमपदापर्यंत जाऊन पोहोचावयाचे असेल तर इतर अनेक विकल्पांप्रमाणेच शास्त्राध्ययनरूपी विकल्पाचाही " म्हणौनि थोरपण पऱ्हां सांडिजे। व्युत्पत्ती आघवी विसरिजे। जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ।। ९.३७८ ।।" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेल्या न्यायाने पूर्णपणे त्याग करणे आवश्यक ठरते. केवळ बाह्य इंद्रियांनाच जाणवतील असे शब्द ऐकून कोणीही मनुष्य इंद्रियातीत अशा निष्कंप किंवा चिन्मय स्वरूपात कधीही स्थिर होऊ शकत नाही. जीवनातील जो वेळ शास्त्राध्ययन किंवा निरनिराळे विकल्प ज्यामुळे उत्पन्न होतील अशा वडवडण्यामध्ये खर्च केला जातो तो अक्षरशः वाया जातो. जीव विकल्पामध्ये पडल्याने "विकारांचें उद्यान" व "विकल्पांचें वोतिव" (८.१४३,१४५) असे त्याचे शरीर बनून आपले नित्यसिद्धरूप तो विसरून जातो. अविद्येच्या प्रभावामुळे असत्याला सत्य मानून तो तृषित हृदयाने वाळवंटात भटकणाऱ्या वाटसरुप्रमाणे किंवा हरिणाप्रमाणे "नातरी मृगें तृषापीडितें। संभ्रमें विसरोनि जळांतें। मग तोयबुद्धी बरडीतें। ठाकूनि येती ।। ५.१११ ।।" याप्रमाणे मृगजळरूपी विषयांमागे धावत जातो. महायोगी गोरक्षनाथांनी व सिद्ध पुरुषांनी म्हटल्याप्रमाणे अगदी अनादि कालापासून वाहाणारा भ्रांतीचा प्रवाह थांबल्याशिवाय व विकल्पाची शांती झाल्याशिवाय कोणत्याही उपायाने जीवाचे परमकल्याण होऊ शकत नाही. यासाठी योगाच्या आधाराने चित्ताला परमपुरुषाची मोहोर लावून निर्विकल्प पदावर आरूढ झाले पाहिजे. योगाचे हे सामर्थ्य असल्यामुळेच योगशिखोपनिषदात असे म्हटले आहे की –

> योगात् परतरं पुण्यं योगात् परतरं शिवम्।
> योगात् परतरं सूक्ष्मं योगात् परतरं न हि।।१.६७।।
> योऽपानप्राणयोरैक्यं रजसो रेतसस्तथा।
> सूर्याचंद्रमसोर्योगो जीवात्मपरमात्मनो:।।६८।।
> एवं हि द्वंद्वजालस्य संयोगो योग उच्यते।।६९।।

योगासारखी श्रेष्ठ, पुण्यकारक, मंगलकारक, सूक्ष्म व अत्युत्तम अशी दुसरी कोणतीही गोष्ट या त्रिभुवनात नाही हे सत्य आहे. योग म्हणजे प्राणापानांचे, शुक्रशोणितांचे, चंद्रसूर्यांचे व जीवशिवाचे ऐक्य किंवा एकरूपत्व होय. अशा प्रका-रच्या द्वंद्वांच्या जाळ्याच्या संयोगाला योग म्हणतात. या संयोगालाच श्रीज्ञानेश्वर-

महाराजांनी समदृष्टी, साम्य किंवा सामरस्य म्हणून संबोधिले आहे. त्यांच्या दृष्टीने अध्यात्माची, साधनमार्गाची व योगाची श्रेष्ठता या एकाच अंतिम लक्ष्यात सामावलेली असून ती स्पष्ट करताना ते म्हणतात—

> **म्हणौनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपणचि विश्व होईजे ।**
> **ऐसें साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ।।६.४०९।।**
> **हें तूंतें बहुतीं प्रसंगीं । आम्ही म्हणों याचिलागीं ।**
> **जे साम्यापरौती जगीं । प्राप्ति नाहीं ।।४१०।।**

अशी ही सामरस्याच्या अवस्थेची श्रेष्ठता असल्याने "या लागीं भेदू सांडूनि सरिसें । साम्यें भज ।।१०.३१७।। " असा जो भगवंतांनी अर्जुनाला उपदेश केला आहे त्यातच योगशास्त्राची श्रेष्ठता निर्विवादपणे स्पष्ट झाली आहे. अर्थात् भगवंतांनी श्रीमद्भगवद्गीतेत कथन केलेला योग हा दुसरा तिसरा कोणताही योग नसून तो सिद्धयोगच आहे हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत सिद्धांतरूपाने मांडल्याचे दिसून येते. जीवाचे ब्रह्मरूपत्व, शक्तीचे शिवरूपत्व व साधकाचे सिद्धरूपत्व या सिद्धयोग मार्गानेच प्रकट होत असल्याने त्यांनी "साधकांचे सिद्ध जाहाले येणेंचि पंथें।। ६.१५६ ।। "असे म्हणून हे कसे स्पष्ट केले आहे हे पाहाण्यासारखे आहे.

## साधकांचे सिद्ध जाहाले येणेंचि पंथें :—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जीवरूपी साधकाचे सिद्धात रूपांतर होण्यासाठी, तो शिवस्वरूप होऊन स्वानंदसाम्राज्याचा चक्रवर्ती राजा होण्यासाठी व त्याला आत्मानंदाची दिवाळी अहोरात्र भोगता यावी यासाठी "अर्जुना हा अवधारी । पंथराजु ।।६.१५२।।" असे म्हणून सिद्धयोगाचा योगमार्ग कथन केला आहे. याशिवाय साधकाला सिद्ध होण्याचा व आत्मवेत्त्यांना श्रेष्ठत्वास पोहोचण्याचा दुसरा मार्गच नाही. "पाठीं महर्षी येणें आले। साधकांचे सिद्ध जाहाले। आत्मविद थोरावले। येणेंचि पंथें ।।६.१५६।। "अशी या सिद्धयोगाची महती असल्याने "तमेव विदित्वाति मृत्युमेति नान्यः पंथा विद्यतेऽयनाय ।।६.१५।। " असे श्वेताश्वतरोपनिषदात म्हटल्याप्रमाणे त्या परमात्म्याला जाणल्यावरच मृत्यूच्या पलीकडे जाता येते. त्याच्याशिवाय मोक्षप्राप्तीचा दुसरा कोणताही मार्ग नाही. परमात्म्याशी एकरूप होण्याच्या या मार्गालाच सिद्धयोग असे म्हणतात. सद्गुरुकृपेने हा मार्ग मिळाला की साधकाच्या ठिकाणी भक्ती उत्पन्न होते व भक्तीमुळे परमात्म्याचे तत्त्वतः ज्ञान होते. यारीतीने स्वसंवेद्य आत्मरूप तत्त्वतः जाणल्यावर ब्रह्मवित् ब्रह्मस्वरूप होतात.

अशाप्रकारे सिद्धयोगमार्ग हेच एकमात्र साधन आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी निभ्रांतपणे सांगून शेवटी मात्र "अविद्यानाशु हें स्थळ। तेणें मोक्षोपादान फळ। या दोहीं केवळ। साधन ज्ञान ।। १८.५२४३।।" असे म्हटले आहे. त्यामुळे हे ज्ञानसाधन निराळे व वरील पंथराजाचे किंवा सिद्धयोगाचे साधन निराळे असून ते

सहाव्या अध्यायापुरतेंच मर्यादित स्वरूपात सांगितलेले साधन असून इतर अध्यायातील विषयाशी त्याचा सुतराम संबंध नाही असा बहुतेकांनी आपला ग्रह करून घेतला आहे. प्रथमतः हा विरोध नाहीसा केला नाही तर " हें इतुलेंचि नानापरी। निरूपिलें ग्रंथविस्तारीं ॥१८.१२४४॥ " याबद्दल निश्चिती होणार नाही.

श्रीमदाद्यशंकराचार्यांनी गीतेच्या चवथ्या अध्यायातील तिसऱ्या श्लोकावर भाष्य करताना असे म्हटले आहे की, " रहस्यं हि यस्मादेतदुत्तमं योगो ज्ञानमित्यर्थः॥ " याचा अर्थ स्पष्ट आहे की योग म्हणजे ज्ञान हेच सर्वश्रेष्ठ रहस्य आहे. भगवान अर्जुनाला क्षत्रियांना परंपरेने प्राप्त होणारा परंतु मध्ये पुष्कळ काळ गेल्यामुळे संप्रदायरहित होऊन नष्ट झालेला असा प्राचीन योग सांगत आहेत व या योगालाच ते उत्तम रहस्य म्हणत आहेत. श्रीज्ञानेश्वरमहाराज " हें जीविचें निजगुज ४.२८॥ " म्हणून योगच सांगत आहेत. योग आणि ज्ञान हे एकार्थी शब्द आहेत हे लक्षात घेतले म्हणजे वरील विरोध नाहीसा होईल.

त्याचप्रमाणे योग हे ज्ञानप्राप्तीचे साधन असल्याने व ज्ञानप्राप्तीने प्रारब्धक्षय होत नसल्याने योग हा बलवत्तर ठरून वरील विरोधही नाहीसा होतो ज्ञानाशिवाय दुसऱ्या कशानेही मोक्ष मिळत नाही. " ऋते ज्ञानान्न मुक्तिः " असे शास्त्रकारांनी आवर्जून सांगितले असले तरी ज्ञानप्राप्ती योगामुळेच होत असल्याने योग हा कसा श्रेष्ठ ठरतो हे आपण प्रथम पाहू. त्यानंतर ज्ञानप्राप्तीने प्रारब्धक्षय न होता तो योगानेच कसा होतो व तसे होत असल्याने योग ज्ञानापेक्षा कसा श्रेष्ठ आहे ते पाहू.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " ते द्रव्यादियागु कीर होती। परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती। जैशी तारातेजसंपत्ती। दिनकरापाशीं॥४.१५८॥ " असे म्हणून सूर्यापुढे नक्षत्रांचे तेज लोपून जाते त्याप्रमाणे आधी सांगितलेल्या बारा यज्ञांना ज्ञानयज्ञाची सर येत नाही, असे सांगून ज्ञानाचे मूर्धन्यत्व प्रकट केले आहे. त्याचप्रमाणे ज्ञान हे आरंभिलेल्या क्रियाशक्तीरूप सिद्धयोगाचे शेवटचे प्राप्य स्थान आहे, प्राणांचे सुषुम्नेत चालून झाल्याने प्राप्त होणाऱ्या नैष्कर्म्यसिद्धीची किंवा ब्रह्मावबोधाची हे ज्ञान खाण आहे व आत्मसुखप्राप्तीकरिता भुकेलेल्या साधकांच्या साधनांचे तृप्तीचे स्थान आहे. ज्यावेळी शक्ती जागृत होऊन सुषुम्नेत प्रवेश करते तेव्हाच साधकाला खरे ज्ञान होते. त्यामुळे कर्माची प्रवृत्ती थांबते, तर्काची दृष्टी जाते व इंद्रिये विषय सेवन करण्याचे विसरतात. ज्यावेळी सुषुम्नेत प्रविष्ट झालेली प्राणशक्ती ब्रह्मरंध्रात प्रवेश करते त्यावेळी मनाचे मनपण जाते, शब्दांची धाव किंवा वडबड खुंटते आणि ज्ञेय म्हणजे जाणावयाची वस्तू ब्रह्म सहस्रारात प्रत्यक्ष व्यापलेली दिसते.या सहस्रारातच वैराग्याची कष्टप्रद स्थिती नाहीशी होते, विचारांचीही हाव संपते आणि पाहाण्याच्या श्रमावाचून आपोआपच आपल्या आत्मस्वरूपाचे दर्शन होते ॥४.१५७ते१६३॥

अशी ही ज्ञानाची महत्ता असली तरी त्याच्या प्राप्तीसाठी सिद्धयोगाची कास धरणे, गुरूला शरण जाणे व त्यांच्याकडून शक्तीच्या उन्मेषासाठी अंजन घालून घेणे म्हणजे दीक्षा घेणे कसे आवश्यक आहे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

देखें परमात्मसुखनिधान। साधावया योगीजन।
जे न विसंबती अंजन। उन्मेषनेत्रीं ॥४.१५९॥
तें ज्ञान पैं गा बरवें। जरी मनीं आथि आणावें।
तरी संतां या भजावें। सर्वस्वेंसीं ॥१६४॥
जे ज्ञानाचा कुरुठा। तेथ सेवा हा दारवंठा।
तो स्वाधीन करी सुभटा। वोळगोनी ॥१६५॥
तरी तनुमनुजीवें। चरणांसीं लागावें।
आणि अगर्वता करावें। दास्य सकळ ॥१६६॥
मग अपेक्षित जें आपुलें। तेंही सांगती पुसिलें।
जेणें अंतःकरण बोधलें। संकल्पा नये ॥१६७॥
जयाचेनि वाक्य उजिवडें। जाहलें चित्त निधडें।
ब्रह्माचेनि पाडें। निःशंकु होय ॥१६८॥
तें वेळीं आपणपेयां सहितें। इयें अशेषेंही भूतें।
माझ्या स्वरूपीं अखंडितें। देखसी तूं ॥१६९॥
ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकारु जाईल।
जैं गुरुकृपा होईल। पार्था गा ॥१७०॥

वरील ओव्यातून अव्वलपासून अखेरपर्यंत सिद्धयोगाची प्रक्रिया मांडून साधक ज्ञानप्रकाशाच्या साध्यापर्यंत कसा पोहोचतो हे स्पष्ट केले आहे. परमात्मरूपी सुखनिधानाच्या प्राप्तीसाठी साधकयोगी आपले उन्मेषनेत्र म्हणजे स्वतःच्या स्वरूपाचा विकास करण्यासाठी अर्थात् स्वस्वरूपाच्या जागृतीसाठी जगाचा प्रलय म्हणजे संहारणी करणारे नेत्र अर्थात् कुंडलिनी शक्ती, तिला अंजनाने म्हणजे दीक्षेने जागृत करून साधन करण्यात तत्पर असतात. "अंजन उन्मेषनेत्रीं" या दोन शब्दांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाचे सर्व सारच मांडले आहे असे म्हटले तर ते अतिशयोक्तीचे होणार नाही. अंजन या शब्दाचा अर्थ कृपा म्हणजे शक्तिपात असा आहे. श्रीगुरुगीतेत या अर्थानेच हा शब्द वापरला आहे.

अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया।
चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥३४॥

अज्ञानरूपी तिमिराने अंध झालेल्या व्यक्तींचे नेत्र ज्ञानरूपी अंजनशलाकेच्या द्वारा जो उघडतो तोच खरा गुरू होय. अशा गुरुदेवांना नमस्कार असो-अशा गुरूंकडून मिळणाऱ्या ज्ञानचक्षूंमुळेच मनुष्य मुक्त होतो. मात्र हे ज्ञानचक्षू

शक्तिपाताशिवाय अन्य कशानेही प्राप्त होत नाहीत असे सूतसंहितेत म्हटले आहे.

**शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदान्तवाक्यजा ।**
**यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः ।।४.३४.२६।।**

वेदान्ताने प्राप्त होणारी विद्या जेव्हा शक्तिपाताच्या संयोगाने मिळते तेव्हा मनुष्य तत्क्षणीच मुक्त होतो यात काहीच संशय नाही. सूतसंहितार्गत सूतगीतेतील "सर्ववेदान्तसंग्रह" या नावाच्या आठव्या अध्यायातही असे म्हटले आहे की–

**तत्त्वज्ञानेन मायाया बाधो नान्येन कर्मणा ।।६।।**
**ज्ञानं वेदान्तवाक्योत्थं ब्रह्मात्मैकत्वगोचरम् ।**
**तच्च देवप्रसादेन गुरोः साक्षान्निरीक्षणात् ।**
**जायते शक्तिपातेन वाक्यादेवाधिकारिणाम् ।।७।।**

तत्त्वज्ञानानेच मायेचा निरास होतो. दुसऱ्या कोणत्याही कर्माने किंवा मार्गाने मायेचा नाश होत नाही. मात्र वेदान्तशास्त्राला समंत असलेल्या महावाक्या-मुळे उत्पन्न होणारे जीव व ब्रह्माचे ऐक्य करणारे असे ज्ञान देवाच्या प्रसादामुळे गुरूकडून प्रत्यक्ष दृष्टिक्षेप झाल्यामुळे शक्तिपात होऊन अधिकारी शिष्याला नुसत्या वाक्योच्चाराबरोबर अनुभवाला येते.

यावरून ज्ञानप्राप्तीसाठी अंजनाची म्हणजे शक्तिपाताची अगर सिद्धयोगाची किती नितांत आवश्यकता आहे हे सिद्ध होते.

"उन्मेषनेत्री" या शब्दातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी, उपरोक्त प्रकारचा शक्तिपात झाल्यावर, जीवशिवैक्याची क्रिया अशी घडते हे सूचित केले आहे. जोपर्यंत मूलाधारात शक्ती निद्रिस्त असते तोपर्यंतच जगाची उभारणी झाली आहे असा भास होत असतो. परंतु या नेत्ररूपी शक्तीच्या जागृतीबरोबर ज्ञान होऊन हा भास नाहीसा होतो. घेरंड संहितेच्या तिसऱ्या अध्यायात व योगशिखोपनिषदाच्या सहाव्या अध्यायात असे म्हटले आहे की–

**मूलाधारे आत्मशक्तिः कुंडलिनी परदेवता ।**
**शयिता भुजगाकारा सार्धत्रयवलयान्विता ।।३.४९।।घे. सं।।**
**यावत्सा निद्रिता देहे तावज्जीवः पशुर्यथा ।**
**ज्ञानं न जायते तावत् कोटियोगविधेरपि ।।५०।। घे. सं. ।।**
**आधार शक्ति निद्रायां विश्वं भवति निद्रया ।।६.२३।।यो.शि.।।**
**तस्यां शक्तिप्रबोधेन त्रैलोक्यं प्रतिबुध्यते ।।२४।। यो. शि. ।।**

मूलाधारात साडेतीन वेढे घालून सर्पाच्या आकाराची कुंडलिनी नावाची आत्मशक्ती निद्रा घेत असते. जोपर्यंत ही शक्ती झोपलेली असते तोपर्यंत एखाद्या पशुप्रमाणे जीव अज्ञानात राहातो. कितीही योगाभ्यास केला तरी जोपर्यंत कुंडलिनी शक्ती जागृत होत नाही तोपर्यंत जीवाला ज्ञान होत नाही, कारण ही आधारशक्ती

झोपली की सर्व विश्वही झोपेच्या अधीन होते. ज्यावेळी ही जागृत होते त्यावेळी सर्व त्रैलोक्य जागृत होते. यामुळे कुंडलिनी शक्तीच्या जागृतीशिवाय ज्ञानाची सर्व साधने निष्फल ठरतात.

यावरून आत्मशक्ती कुंडलिनीला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी 'उन्मेषनेत्री' का म्हटले आहे ते स्पष्ट होते. नेत्र झाकले की स्वस्वरूपाच्या विस्मरणाने जगाची उभारणी होऊन शिवच संकोचाने जीव होतो व नेत्र उघडले की स्वस्वरूपाच्या स्मरणाने जगाची संहारणी होऊन जीव विभुत्वाने शिव होतो. या प्राप्तीसाठी, शक्तिजागृतीसाठी श्रीज्ञानेश्वरमहाराज सद्‌गुरूच्या चरणांची तनमनधनपूर्वक सेवा करण्यास सांगत आहेत. सिद्धयोगाच्या मूर्धन्य रहस्याचे उद्‌घाटन त्यांनी येथे केले आहे सिद्धयोग हा गुरुकृपेचा मार्ग आहे. "गुरोः कृपैव केवलम्" किंवा "श्रीगुरुः-शरणम्" हाच या मार्गाचा आरंभीचा व अखेरचा सिद्धांत आहे. स्कंदपुराणांतर्गत उत्तरखंडातील गुरुगीतेत व महायोगी गोरक्षनाथ विरचित सिद्धसिद्धांतपद्धतीत उपरोक्त सिद्धांतच उद्‌घोषित केला आहे. ते म्हणतात—

**न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकम् ।**
**शिवशासनतः शिवशासनतः शिवशासनतः शिवशासनतः ॥ ९६ ॥ गु. गी.**
**॥५.६६॥ सि. स. प.**

मोक्षाचे द्वार उघडण्यासाठी गुरूपेक्षा दुसरा श्रेष्ठ व सोपा उपाय नाही त्याच्यामुळेच चिदात्मशक्ती जागृत होते. त्यामुळेच ज्ञान होते व त्याच्यामुळेच मोक्ष मिळतो. हेच शिवाचे शासन, आदेश, आज्ञा किंवा निर्णयपूर्वक सांगणे आहे. चौऱ्याऐंशी लक्ष योनीतून मुक्त करून व लाखो संस्कारांना भस्म करून शक्तिपात-दीक्षेने ज्ञानप्राप्ती करून देऊन अज्ञानाच्या समूलोच्छेदाने श्रीगुरूच जीवाला कृतकृत्यता प्राप्त करून देत असल्याने "मज हृदयीं सद्‌गुरू। जेणें तारिलों हा संसारपूरू ॥ १.२२ ॥" असा पहिल्या अध्यायापासून ते "श्रीगुरुकृपा काय नोहे ॥१८.१७३५॥" असे म्हणन अठाराव्या अध्यायापर्यंत "गुरुरुपायः ॥ २.६ ॥" या शिवसूत्राचा अक्षरशः पावलोपावली श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उद्‌घोष करून सडा शिंपला आहे.

वरील सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, ज्ञानाशिवाय मोक्षप्राप्ती नाही व योगाशिवाय ज्ञानप्राप्ती नाही. श्वेताश्वतर उपनिषदामध्ये "यदा चर्मवदाकाशं वेष्टयिष्यंति मानवा. । तदा देवमविज्ञाय दुःखस्यान्तो भविष्यति ॥ ६.२० ॥" असे म्हणून ज्या वेळी मनुष्य आकाशाला चामड्याप्रमाणे लपेटून घेईल त्या वेळी ब्रह्म-ज्ञानाशिवायही जन्ममरणरूप संसारदुःखाची निवृत्ती होईल असे म्हटले आहे. अर्थात् ज्याप्रमाणे मनुष्य आकाशाला केव्हाही झाकून किंवा लपेटून टाकणे शक्य नाही त्याप्रमाणे ब्रह्मज्ञानाशिवाय संसारदुःखाची निवृत्ती होणे केव्हाही शक्य नाही, हे

स्पष्टच आहे. त्याचप्रमाणे अन्य स्मृतीमध्येही असे म्हटले आहे की, "ज्ञानादेव तु कैवल्यं प्राप्यते येन मुच्यते ।।" म्हणजे ब्रह्मज्ञानानेच कैवल्याची अगर मोक्षाची प्राप्ती होते. त्यामुळे मुमुक्षू पुरुष सर्व बंधनांपासून मुक्त होतो. विवेकचूडामणीमध्ये या विषयी श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, "नान्योस्ति पंथा भवबंध-मुक्तेर्विना स्वतत्त्वावगमं मुमुक्षोः ।। २२४।।" मुमुक्षू पुरुषाला आत्मतत्त्वाच्या बोधा-शिवाय मोक्षप्राप्तीचा दुसरा कोणताही मार्ग नाही. गीतेच्या चवथ्या अध्यायात याविषयी भगवंतानी असे म्हटले आहे की, "न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।।४.३८।। सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ।। ४.३३।।" हे अर्जुना ! या जगात ब्रह्मज्ञानासारखा दुसरा कोणताही पदार्थ पवित्र नाही. त्या सर्व कर्माचा ज्ञानातच शेवट होतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही ज्ञानाची ही महती मुक्त कंठाने गायिली आहे. ते म्हणतात—

**तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें ।**
**ऐसें सामर्थ्य असें चोखडें । ज्ञानीं इये ।। ४.१७२ ।।**
**म्हणौनि असो हें न घडे । ते विचारताचि असंगडें ।**
**पुढती ज्ञानाचेनि पाडें । पवित्र न दिसे ।। ४.१७७ ।।**
**एथ ज्ञान हें उत्तम होये । आणिकही एक तैसें कें आहे ।**
**जैसें चैतन्य कां नोहे । दुसरें गा ।। १७८ ।।**
**म्हणौनि बहुतीं परी पाहतां । पुढतीपुढती निर्धारितां ।**
**हें ज्ञानाचि पवित्रता । ज्ञानींचि आथी ।। १८१ ।।**
**जैसी अमृताची चवो निवडिजे । तरी अमृताचिसारिखी म्हणिजे ।**
**तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसींची ।। १८२ ।।**

अशा प्रकारे उत्तरोत्तर ज्ञानबीजाचा विस्तार कितीही सांगितला तरी तो अपार आहे. संशय, अज्ञान, शोक, मोह, माया इत्यादि सर्व गोष्टींच्या निवृत्तीसाठी "तरीं उपायें एकें आंगवे । जरी हातीं होय बरवे । ज्ञानखड्ग ।। ४.२०६ ।।" हेच वरील सर्वाचे सार आहे. खरा प्रश्न ज्ञानाच्या उपायाबद्दलच्या संशयाचा किंवा श्रेष्ठतेचा नसून हे ' बरवे ज्ञानखड्ग " किंवा " तिखट ज्ञानशास्त्र " कोणत्या उपायाने प्राप्त होते हाच आहे. येथूनच सर्व शास्त्रकारांच्या मतभेदाला सुरुवात झाली आहे. त्यामुळे ज्याला जसे दर्शन झाले तसा त्याने ज्ञानप्राप्तीच्या उपायाचा मार्ग सांगितला आहे. पंथ, मतमतांतरे, मार्ग यांचा गलबला यामुळेच आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मात्र आपल्याला गुरुपरंपरेने प्राप्त झालेला सिद्धयोग निःसंदिग्धपणे ज्ञानेश्वरीत कथन केला आहे. त्यांच्या दृष्टीने हाच गीतेचा भावार्थ आहे. त्यामुळेच ते " ज्ञानशक्तिचेनि पाडें " म्हणतात. त्यांचे ज्ञान हे सशक्तिक आहे. त्याशक्तीतच सर्व सामर्थ्य एकवटले आहे. ती जागृत होणे हाच ज्ञानप्राप्तीचा, ज्ञानाच्या भेटीचा,

आत्मबोधाचा व आत्मसुखाचा एकमात्र उपाय आहे. किंबहुना अनेकानेक धर्माचार्यांनी, शास्त्रकारांकनी, मार्गप्रवर्तकांनी आजपर्यंत जितक्या म्हणून मंत्र, यंत्र, पूजा, ध्यान, धारणा, धर्म कर्म, उपासना, यम, नियम इत्यादि ज्या ज्या गोष्टींचा अवलंब जीवाला करावयास सांगितला आहे त्या सर्वांची परिणती शक्तिजागृतीत व्हावी हाच त्यांचा उद्देश आहे. त्यांच्या मनात असो अगर नसो परंतु त्याशिवाय "पुरती उपायांचे धावे" (अमृ. २.८) हे घडूनच येत नाही. या दृष्टीने म. म. श्री. गोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृती और साधना" या ग्रंथाच्या पहिल्या खंडात "कुंडलिनी तत्त्व" या लेखात मोठे उद्‌बोधक विचार मांडले आहेत. ते म्हणतात–

"कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय जीवाची ऊर्ध्वगती कधीही सुरू होत नाही ज्याप्रमाणे अरणीमंथन करून सुप्त असलेला अग्नी प्रज्वलित केला जातो म्हणजे अरणीमध्ये सुप्त असलेला अग्नी घर्षण करून उद्दीप्त केला जातो त्याप्रमाणे साधनप्रणालीच्याद्वारा झोपलेल्या कुंडलिनी शक्तीला जागृत करणे आवश्यक ठरते. ज्याप्रमाणे अग्नी प्रकट झाल्यावर तो काष्ठादि इंधन संपूर्णपणे जाळून टाकतो त्याप्रमाणे कुंडलिनी चैतन्यमयी झाल्यावर सर्व साधना आपोआप संपुष्टात येते. विचार, भक्ती, हठ, मंत्रयोग इत्यादि सर्व बाह्य साधना व संपूर्ण उपासना ही, ती करणाऱ्या साधकावर अवलंबून असून त्यामध्ये आपण अमुक प्रकारची साधना करतो असा कर्तृत्वाचा अभिमान असतो. हा जो कर्तृत्वाचा अभिमान, अहंकार किंवा जाणीव आहे ती कुंडलिनी शक्ती चैतन्यमयी झाल्यावर क्रमाक्रमाने लोपून जाते आणि जसजसा कर्तृत्वाचा अहंकार लुप्त होत जातो तसतशी शक्तीची जागृती अधिकाधिक होत जाते. एकदा का ही कुंडलिनी शक्ती जागृत होऊ लागली की अगदी स्वाभाविक नियमाप्रमाणे सर्व कार्य स्वत: आपोआप होऊ लागते. ज्याप्रमाणे नदीच्या अनुकूल प्रवाहात नौका सोडल्यावर ती समुद्रात पोहोचण्यासाठी अन्य कोणतेही प्रयत्न करण्याची आवश्यकता राहात नाही, त्याचप्रमाणे कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर व तिच्या प्रवाहात मन किंवा प्राण सोडून दिल्यावर जीवाला ब्रह्मावस्था प्राप्त करण्यासाठी निराळा उपाय करण्याची कोणतीही आवश्यकता राहात नाही. संचारित शक्ती कमीअधिक झाल्याने व संचित वासनादिकांची दृढता निरनिराळी दिसून येत असल्याने या शक्तिपातयोगप्रवाहातून वाहात जाणाऱ्या प्रत्येक साधकाची अवस्था निरनिराळ्या प्रकारची झालेली दिसून येते. असे असले तरी संकोचशक्तीच्या किंवा ऊर्ध्वबिंदूमध्ये असलेल्या आकर्षण शक्तीच्या प्रभावामुळे ( जीवाची, मनाची, अगर शक्तीची ) अंतर्मुखगती क्रमाक्रमाने वाढत जाते आणि शेवटी साम्यावस्था प्राप्त होते." (पृ. ३१०,३११)

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी यासाठीच " सांगेन ज्ञानाचियें भेटी। उपाय तुज ।। ४.१८६ ।। " असे म्हणून उपरोक्त शक्तिजागृतीने सामरस्याच्या राउळात महासुखाची दिवाळी करणारे सिद्धयोगाचे साधन सांगितले आहे. हे सर्व सांगण्याचे खरे कारण असे आहे की उपायप्राप्तीशिवाय ज्ञानाची भेटच होत नाही. त्यामुळे जरी ब्रह्मज्ञानच मोक्षप्राप्तीचे एकमात्र कारण असून त्यासाठी दुसरे कोणतेही साधन नाही हे उपरोक्त केलेल्या सर्व विवेचनावरून सिद्ध होत असले तरी चित्ताची एकग्रता केल्याशिवाय केवळ वेदान्ताच्या श्रवणाने ज्ञानाची प्राप्ती होत नाही. ज्याप्रमाणे वाऱ्यामुळे हलणाऱ्या पाण्यात आपल्या चेहऱ्याचे प्रतिबिंब स्पष्टपणे दिसत नाही त्याचप्रमाणे संकल्पविकल्परूपी वायूने बुद्धिरूपी पाणी हलू लागले किंवा चंचल झाले की संशय व विपरीत भावनेमुळे आत्मरूपी मुखाचे स्पष्टपणे दर्शन व बोध होत नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " मग संशयीं जरी पडिला । तरि निभ्रांत जाणें नासला । तो ऐहिक परत्रा मुकला । सुखासि गा ।। ४.१९८ ।। म्हणौनि संशयाहूनि थोर । आणिक नाहीं पाप घोर । हा विनाशाची वागुर । प्राणियांसी ।। ४.२०२ ।।" असे म्हणून संशय हा या मार्गातील एक मोठा अडथळा आहे हे स्पष्ट केले आहे. यासाठी सर्व दोष जाऊन कठोपनिषदात सांगितल्याप्रमाणे " दृश्यते त्वग्रयया बुद्धया सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ।। १.३.१५ ।। " आत्मा हा सूक्ष्मदर्शी विद्वान पुरुषांना सूक्ष्मबुद्धीच्या अग्रभागानेच दिसू शकतो. स्थूल बुद्धीने दिसू शकत नाही. सुईच्या नेढ्यातून लहान दोराच जाणे शक्य असते, जाड दोरी त्यातून जाऊ शकत नाही. त्याचप्रमाणे रेशमी किंवा मऊ वस्त्रे शिवण्यासाठी लहान टोकदार सुईच उपयोगी पडते त्या ठिकाणीं नांगराचा फाळ उपयोगी पडत नाही. वरील उदाहरणांप्रमाणेच आत्मतत्त्वाचे प्रतिबिंब ग्रहण करण्यास सूक्ष्मबुद्धीच समर्थ असते. स्थूल नाही. नाना प्रकारच्या संकल्पविकल्पांनी युक्त असलेल्या चंचलबुद्धीला स्थूलबुद्धी म्हटले जाते व जी बद्धी एकाग्र असते तिला सूक्ष्मबुद्धी म्हणतात. योगाभ्यासाशिवाय बुद्धीची चंचलता कधीही दूर होत नाही, ही गोष्ट पंचदशी ग्रंथात श्रीमाधवारण्यांनी सांगितली आहे." योगो मुख्यस्ततस्तेषां धीदर्पस्तेन नश्यति ।। ध्यानदीप ९ ३२ ।। " ज्या मुमुक्षु पुरुषाचे चित्त नानाप्रकारच्या संकल्पविकल्पांनी चंचल झालेले असते त्यांना चित्ताची एकाग्रता करण्यासाठी योगाभ्यास हेच एकमात्र साधन आहे कारण योगाभ्यास केल्यानेच बुद्धीची चंचलता नष्ट होते.

सूक्ष्मबद्धीचे खरे रहस्य हे आहे की जोपर्यंत जीव स्थूल तत्त्वाच्या आवरणाखालीं दबलेला असतो तोपर्यंत जड बुद्धीमुळे तो सुषुम्नेच्या सूक्ष्ममार्गात प्रवेश करू शकत नाही. पूर्वसंस्कार किंवा वासना, अभिमान किंवा कर्तृत्वबोध व फलाकांक्षा किंवा भोगाभिलाषा या तीन आवरणांमुळे मूलाधारात शक्तीच्या संकुचितत्त्वाच्या रूपाने निद्रिस्त झालेला शिवरूप जीव आपल्या घरी सहस्रारांत

जाऊ शकत नाही. "काम एष क्रोध एष" (गीता ३.३७) व "आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा" (गीता ३.३९) असे म्हणून भगवंतांनी गीतेत याची मीमांसा केली आहे व "तैसें ज्ञान तरी शुद्ध । परी इहीं असे प्ररुद्ध । म्हणौनि तें अगाध । होऊनि ठेलें ।। ३.२६३ ।। या रीतीने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याचे मर्म प्रकट करून "आधीं यांतें जिणावें । मग तें ज्ञान पावावें ।। ३.२६४ ।।" म्हणून सांगितले आहे. मात्र हठयोगादि सर्व उपाय येथे निरर्थक असून एकमात्र सिद्धयोगच उपयोगी आहे हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी निभ्रांतपणे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात –

**तैसे उपाय कीजती जे जे । ते यांसीचि होती विरजे ।**
**म्हणौनि हटियांतें जिणिजे । इहींचि जगीं ।। ३ २६६ ।।**
**ऐसियांही सांकडा बोला । एक उपाय आहे भला ।**
**तो करितां जरी आंगवला । तरी सांगेन तुज ।। २६७।।**

यावरून हे स्पष्ट होते की श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्या उपायाचे, मार्गाचे किंवा योगाचे कथन केले आहे तो हठयोग नसून "जैं गुरुकृपा होईल ।।४.१७० ।।" असा गुरुकृपायुक्त, "ज्ञानशक्तियुक्त" किंवा "वस्तुसामर्थ्यशक्तियुक्त" असा सिद्धयोग आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. एरवी निद्रेचे सुख मोडू न देता पालखीतून जाण्यासारखा किंवा पायउतारासारखा सोपा, सहस्रारापर्यंत घेऊन जाणारा, निश्चित फळ देणारा व सांख्यमार्गाहूनही प्रांजळ असा सिद्धयोगासारखा दुसरा कोणताही मार्ग नाही. यासाठीच महायोगी गोरक्षनाथांनी "योगबीजात" व श्रुतींनी "योगशिखोपनिषदात" पुढीलप्रमाणे उद्‌घोष केला आहे.

**नानामार्गैस्तु दुष्प्रापं कैवल्यं परमं पदम् ।**
**सिद्धमार्गेण लभते नान्यथा शिवभाषितम् ।। योगबीज ८ ।। ।। यो. शि. १.३.४**

जीव युगयुगांतरामध्ये व कल्पकल्पांतरामध्ये भटकतो परंतु त्याच्या आकांक्षांची तृप्ती होत नाही. याचे कारण एकच आहे की तो आपल्या वासना, कर्तृत्व, अभिमान, अहंकार, अज्ञान, माया इत्यादि काहीही न सोडता वाट चालत असतो. जोपर्यंत एक क्षणभर किंवा पळभर सुद्धा वासना सुटत नाहीत तोपर्यंत सुषुम्नेमध्ये प्रवेश करण्याचा मार्गच मोकळा होत नाही. याचे कारण जोपर्यंत वरील गोष्टींमुळे प्राण स्थूल रूपात असतात तोपर्यंत सूक्ष्ममार्गात ते कधीही प्रविष्ट होऊ शकत नाहीत हे नितांत सत्य आहे. सिद्धयोगात शक्तिपातामुळे सद्‌गुरू हे कार्य अविलंब करीत असल्याने वरील उद्‌घोष सार्थ ठरतो. तो कधीच कोणी नाकारू शकणार नाही जरी जप, तप, यज्ञ, उपवास, उपासना इत्यादि अन्य उपायांनी देहशुद्धिद्वारा बुद्धीची एकाग्रता करणे शक्य असले तरी ज्याप्रकारे सिद्धयोगाच्या अभ्यासाने बुद्धीची एकाग्रता लवकर होते तशी दुसऱ्या अन्य कोणत्याही उपायांनी होत नसल्याने

"यांतें साधावयालागीं। जे बळ आणिजे आंगीं। ते इंधनें जैसीं आगी। सावावो होय ।।३.२६५।।" व "ते कामक्रोधादिकांनाच साहाय्यकारी होतात" म्हणून त्यांची वोळवण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केली आहे. त्याचप्रमाणे "ताहानें ताहानचि पियावी। भुकेलिया भूकचि खावी ।। १२.६३।। " असा जो नित्य नवा अग्निप्रवेश असलेला, मरणाशी झुंज खेळणारा व डोंगर गिळताना मुख फाटणारा योग आहे तो सिद्धयोग नसून अनेक साधनमार्गांपैकी अघोर योग आहे. हठयोगातही एवढी अघोरता सांगितलेली नाही हे लक्षात ठेविले पाहिजे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या प्रमाणे बाराव्या व अन्य अध्यायात जेथे जेथे "वांचूनि योगाचेनि बळें। अधिक कांहीं मिळे। ऐसें नाहीं आगळें। कष्टचि तयां ।। १२.५९ ।। " असे म्हणून योग मार्गाची अश्रेष्ठता दाखविली आहे ती सिद्धयोगाची नव्हे हे निखलास सत्य आहे. कारण मग ज्या सिद्धयोगामुळे भक्ती उद्‌भूत होते हे आपण (प्रकरण आठ, मुद्दा सहा) पुढे पाहाणार आहोत त्याचा पाया ढासळेल व "भक्तियोगु समस्त –। योगरूप ।। १२.२२८ ।। " हा श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा सिद्धांत खोटा ठरेल. तेव्हा सिद्धयोग हा हठादि किंवा तंत्रादि समस्त योगांहून निराळा असा सहज सोपा गुरुकृपाप्रसादाने प्राप्त होणारा कीर प्रांजळ मार्ग आहे.

अथर्वशिखोपनिषदामध्येही असे सागितले आहे की, "क्षणमेकमास्थाय ऋतुशतस्यापि फलमवाप्नोति ।।२।। " एक क्षणभरही साधकयोगी समाधीमध्ये स्थिर झाला तर त्याला शंभर अश्वमेध यज्ञाचे फल प्राप्त होते. अत्रीसंहितेतही असे म्हटले आहे की –

**योगात्संप्राप्यते ज्ञानं योगाद्धर्मस्य लक्षणम् ।**
**योगः परंतपो ज्ञेयःस्तस्माद्युक्तः समभ्यसेत् ।।**
**न च तीव्रेण तपसा न स्वाध्यायैर्न चेज्यया ।**
**गतिं गंतुं द्विजाः शक्ता योगात्संप्राप्नुवंति याम् ।।**

योगानेच ज्ञानाची व योगानेच धर्माची प्राप्ती होते. योग हेच परम तप आहे. यासाठी नेहमी योगाचाच अभ्यास करणे योग्य आहे. योगाभ्यासाने जी गती प्राप्त होते तशी गती तीव्र तपाने, मंत्र जपाने व यज्ञाच्या अनुष्ठानानेही प्राप्त करण्यास द्विज लोक समर्थ होऊ शकत नाहीत. "परी तेंचि कर्म आचरिजे। तरीच हा योगु पाविजे। जें कर्मशेष सहजे। योगास्थिती ।। २.२७५।। समाधिसुखीं केवळ। जैं बुद्धि होईल निश्चळ। तैं पावसी तूं सकळ। योगस्थिती ।। २.२८४ ।। येरा योगस्थिति जया सांडे। तो वायांचि गा हव्यासीं पडे। परि प्राप्ति कहीं न घडे। संन्यासाची ।। ५.३३ ।। " असे जे ज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे त्याचा अर्थ उपरोक्त निश्चल म्हणजे सूक्ष्मबुद्धी झाल्याशिवाय तिचा सुषुम्नेत प्रवेश होत नाही

ज्ञा....२

व त्याशिवाय संन्यासाची प्राप्तीही होत नाही असाच आहे. सुषुम्नेत मनःप्राणांचे एकवटणे व सहस्रारात शक्तीचे शिवाशी ऐक्य होणे म्हणजे खरा संन्यास व खरे नैष्कर्म्य होय. त्याशिवाय हे दोन्ही शब्द अर्थशून्य ठरतात कारण त्या ठिकाणीच त्यांची अनुभूती येते. इतरत्र कोठेही या शब्दार्थाची अनुभूती येत नाही.

याज्ञवल्क्यसंहितेमध्येही योगाचा महिमा सांगताना असे म्हटले आहे की–

**इज्याचारदमाहिंसातपः स्वाध्यायकर्मणाम् ।**
**अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ।।११.३४।।**

इज्या, आचार, इंद्रियांचे दमन, अहिंसा, तप, वेदाध्ययन इत्यादि सर्व कर्मे करण्यापेक्षा योगाभ्यासाने आत्मसाक्षात्कार करून घेणे हाच परमधर्म आहे. कारण योगाभ्यास न करता केवळ वेदान्तवाक्य श्रवण केल्याने ज्ञानाची प्राप्ती होऊ शकत नाही. ही गोष्ट दक्षस्मृतीतही सांगितली आहे.

**स्वसंवेद्यंहि तद्ब्रह्म कुमारीस्त्रीसुखं तथा ।**
**अयोगी नव जानाति जात्यंधो हि घटं यथा ।। ७.२५ ।।**

ज्याप्रमाणे यौवनावस्था प्राप्त झालेली तरुण स्त्री पतीचे संभोगजन्य सुख आपले आपणच अनुभविते त्याप्रमाणेच योगीलोक (ब्रह्मानंदाचा) स्वतःच अनुभव घेतात. ज्याप्रमाणे जन्मांध माणसाला घड्याच्या स्वरूपाचे ज्ञान असत नाही त्याप्रमाणे जे साधक योगाचा अभ्यास करीत नाहीत ते कधीही ब्रह्मस्वरूप जाणू शकत नाहीत. या बाबतीत कपिलदेवांनी सांख्यसूत्रात असे म्हटले आहे की " नोपदेश-श्रवणेऽपि कृतकृत्यता परामर्षादृते विरोचनवत् ।।४.१७।। " अभ्यास न करता केवळ उपदेशश्रवणाने कृतकृत्यता प्राप्त होत नाही. दैत्यांचा पती विरोचन याने ब्रह्मदेवा-पासून उपदेश श्रवण करून सुद्धा त्याला ज्ञानाची प्राप्ती झाली नाही. याबद्दल श्रुतीमध्येही असे म्हटले आहे की–

**अथ तद्दर्शनाभ्युपायो योगः ।।**
**अध्यात्मयोगाधिगमेन देवं मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ।।कठ.उ.२ १२।।**

त्या आत्म्याच्या साक्षात्काराचा एकमात्र उपाय योगच आहे. योगाशिवाय आत्मसाक्षात्काराचा दुसरा कोणताही उपाय नाही. या योगाभ्यासाच्या द्वारेच त्या आत्मदेवाला जाणून धीरपुरुष हर्षशोकांनी युक्त असलेल्या जन्ममरणरूप संसाराचा परित्याग करतात. एवढेच नव्हे तर ज्ञानाचे फळ म्हणून ज्या मोक्षाची प्राप्ती होते तो मोक्षही योगाभ्यास केल्याशिवाय प्राप्त होत नाही. मात्र योगाभ्यासानेच ज्ञानाची व मोक्षाची प्राप्ती होते. ही गोष्ट श्वेताश्वतर उपनिषदामध्ये सांगताना असे म्हटले आहे की–

**त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं हृदीन्द्रियाणि मनसा सन्निवेश्य ।**
**ब्रह्मोडुपेन प्रतरेत विद्वान स्रोतांसि सर्वाणि भयावहानि ।।२.८।।**

डोके, मान व कंवर या तीन गोष्टी स्थिर करून व शरीर अचलपणें धारण करून मनाने इद्रियांना हृदयात सन्निविष्ट करून ॐकाररूप नौकेच्याद्वारा योगीपुरुष हर्ष, शोक, जन्म, मरण इत्यादि सर्व भयावह संसारप्रवाहातून तरून पलीकडे जातो. स्कंदपुराणातही यावद्दल असे म्हटले आहे की–

**आत्मज्ञानेन मुक्तिः स्यात्तच्च योगादृते नहि ।**
**स च योगश्चिरं कालमभ्यासादेव सिद्धयति ।।**

जरी आत्मज्ञानानेच मोक्षप्राप्ती होते हे सत्य असले तरी ते आत्मज्ञान योगाशिवाय उत्पन्न होत नाही. इतकेच नव्हे तर त्या योगाचा चिरकालपर्यंत अभ्यास केल्यानेच सिद्धी प्राप्त होते. कूर्मपुराणात महादेवांनीही असे म्हटले आहे की–

**योगाग्निर्दहति क्षिप्रमशेषं पापपंजरम् ।**
**प्रसन्नं जायते ज्ञानं ज्ञानान्निर्वाणमृच्छति ।।**

प्रथम योगरूप अग्नी सर्व पापांच्या समूहाला जाळून भस्म करतो. त्यामुळे शुद्ध झालेल्या अंतःकरणात ज्ञानाची उत्पत्ती होते व कैवल्याची प्राप्ती होते. योगवासिष्ठातही यावद्दल असे म्हटले आहे की–

**दुःसहा राम संसारविषवेग विषूचिका ।**
**योगगारुडमंत्रेण पावनेनोपशाम्यति ।।**

हे रामचंद्रा ! या संसाररूपी विषविषूचिकेचा वेग सहन करणें अत्यंत कठीण आहे. योगरूपी गारुडमंत्रानेच तो शांत होणे किंवा थांवणे शक्य आहे. अन्यथा हे कोणत्याही उपायाने शक्य नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही उपरोक्त विचार पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहेत. ते म्हणतात –

**कीं मज पाहतां उर्मी नोहे । हें अनारिसें गमत आहे ।**
**तो ग्रासिला महामोहें । काळसर्पें ।।२.७०।।**
**हें जाणोनि ऐसी प्रौढी । जो दृष्टिसवेंचि विष फेडी ।**
**तो धांवया श्रीहरी गारुडी । पातला कीं ।।२.७२।।**

महामोहरूपी काळसर्पाने ग्रासलेल्या जीवाचे विष श्रीहरीरूप गारुडी सिद्धयोगाच्या अमृतासारख्या दिव्य औषधीची उपाययोजना करूनच उतरवितात असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

**ना तरी असाध्य देखोनि व्याधि । अमृतासम दिव्य औषधि ।**
**वैद्य सूचि निरवधि । निदानीची ।।२.८६।।**

या अमृतासारख्या दिव्य औषधीचा गरुडपुराणात पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे. " भवतापेन तप्तानां योगो हि परमौषधम् " जन्ममरणरूप संसाराच्या तापाने तप्त झालेल्या पुरुषांना योगाभ्यास हेच एकमेव श्रेष्ठ औषध आहे. विवेकचूडामणीमध्येही श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की–

समाहिता ये प्रविलाप्य बाह्यं श्रोत्रादि चेतस्त्वमहं चिदात्मनि ।
त एव मुक्ता भवपाशबंधनैर्नान्ये तु पारोक्षकथाभिधायिनः ।।३५७।।

जो पुरुष घटपटादिक बाह्यप्रपंच व श्रोत्रादिक इंद्रिये, चित्त, तू, मी इत्यादि आंतर प्रपंच, चिदात्मारूप साक्षीमध्ये विलीन करून समाधिस्थ होतो, तोच पुरुष जन्ममरणरूप संसार बंधनापासून मुक्त होऊन मोक्षाला प्राप्त होतो. मात्र जो केवळ परोक्ष आत्मतत्त्वाचा वक्ता व श्रोता आहे तो मोक्ष प्राप्त करू शकत नाही.

या प्रसंगावर महायोगी गोरक्षनाथांनी रचिलेल्या योगबीज नावाच्या ग्रंथात महादेव व पार्वतीचा जो संवाद आला आहे तो पाहाण्यासारखा आहे. देवी पार्वती शंकरांना म्हणाली, "हे ईश्वरा ! सर्व ज्ञानी लोक असे नेहमी सांगत आले आहेत की ज्ञानानेच मोक्षप्राप्ती होते. दुसऱ्या कोणत्याही साधनाने मोक्षप्राप्ती होत नाही. अशा वेळी सिद्धयोगानेच मोक्षप्राप्ती होते असे आपण कशावरून म्हणता ?" असा प्रश्न पार्वतीने शंकरांना विचारल्यावर त्यांनी या प्रश्नाचे उत्तर देताना तिला सांगितले की, "हे देवी पार्वती ! ज्ञानानेच मोक्ष होतो हे ज्ञानी लोकांचे म्हणणे अगदी खरे आहे. या बाबतीत एक गोष्ट नितांत सत्य आहे की युद्ध केल्याशिवाय व पराक्रम गाजविल्याशिवाय योद्धयाला युद्धात कधीही जय मिळत नाही. त्याचप्रमाणे योगाशिवाय नुसत्या ज्ञानाने साधकाला मोक्ष कदापीही मिळू शकत नाही. ज्ञान खड्ग आहे, योग युद्ध व वीर्यरूप आहे व मोक्ष विजयलाभ आहे. खड्गाने विजयाची प्राप्ती होते यात तिळमात्र संदेह नाही. परंतु युद्ध व वीर्य यांच्याशिवाय केवळ खड्गाने विजयाची आशा करणे ही केवळ दुराशा आहे असे म्हटले पाहिजे. ज्ञानप्राप्तीशिवाय योग कदापीही सिद्ध होत नाही कारण योगाचे अंतिम लक्ष्य ज्ञानप्राप्ती हेच आहे. यामुळे या सिद्धयोगमार्गामध्ये योग व ज्ञान यात भेद नाही. सिद्धयोग हे साधन व ज्ञान हे साध्य आहे. साध्यसाधनाची एकता हा या मार्गाचा विशेष आहे म्हणून ज्ञान व योग हें एकच होत. जन्मजन्मांतरी केलेल्या ज्ञानप्राप्तीच्या नानाविध साधनांमुळे जे ज्ञान प्राप्त होते त्याच्या पुण्याईने सिद्धयोग मार्गाची साधकाला प्राप्ती होते. सिद्धयोग प्राप्त झाल्यावर एकाच जन्मात साधकाला ज्ञानप्राप्ती होते. यामुळे सिद्धयोगाशिवाय मोक्षप्राप्तीचा दुसरा कोणताही श्रेष्ठ मार्ग नाही." शंकरांनी इतके सांगितल्यावर देवी पार्वती म्हणाली, "अनेक जन्मातील ज्ञानामुळे सिद्धयोग कसा प्राप्त होतो ? आणि एकाच जन्मात प्राप्त झालेल्या सिद्धयोगामुळे ज्ञानप्राप्ती कशी होते ?" या प्रश्नांना उत्तर देताना शिव म्हणाले, "चिरकालपर्यंत पुनःपुन्हा प्रकर्षत्वाने विचार करून ज्ञानाच्या जोरावर मी मुक्त आहे असे जो मानतो तो नुसत्या मननमात्रेकरून तत्क्षणीच केव्हाही मुक्त होत नाही. शेकडोशे जन्मजन्मांतरामधील ज्ञानप्राप्तीनंतरही सिद्धयोगामुळेच साधक मुक्त होतो. नुसते वैचारिक ज्ञान प्राप्त झालेला साधक वारंवार जन्म-

मृत्यूच्या चक्रात सापडतो. मात्र सिद्धयोगामुळे तो या अनर्थकारक परंपरेत सापडत नाही. नानाप्रकाराने तत्त्वमस्यादि महावाक्यांचा कितीही विचार केला तरी मन ताब्यात येऊ शकत नाही; म्हणजे नुसत्या वैचारिकज्ञानाचा मनोजयासाठी काहीही उपयोग होत नाही. यासाठी प्राणजय करणे हाच मनोजयाचा एकमात्र उपाय आहे. अन्य दुसऱ्या कोणत्याही उपायाने मन ताब्यात येऊ शकत नाही. सिद्धांच्या उपायाशिवाय म्हणजे सिद्धयोगाच्या दीक्षेशिवाय केवळ तर्क, बडबड, अनेक शास्त्रे, विविध युक्ती, मंत्र, औषधे इत्यादींपैकी कशानेही प्राण ताब्यात येऊ शकत नाहीत."

वरील सर्व विचारावरून हे सिद्ध होते की, मोक्षाचा उपाय म्हणून ज्ञान व योग या दोहोंची गणना होत असली तरी योगाचे प्राधान्य स्वीकारणेच भाग पडते. ज्ञानमार्गात दीर्घकालव्यापी विचार केल्यावर त्याचे फळ म्हणून "मी मुक्त झालो आहे," अशा प्रकारचा एक बोध आतून जागृत होतो. परंतु ही खरी मुक्ती नव्हे; तर हा केवळ मुक्तीचा अभिमान आहे. अशा प्रकारे पुष्कळ जन्मांच्या नंतर योग-लाभ होऊन मुक्ती होते. त्यावेळी तो अभिमान राहात नाही. परंतु योगपथाचा साधनक्रम निराळा आहे. या मार्गात प्राण व अपानाच्या संयोगाने देहातील चंद्र व सूर्याचे ऐक्य केले जाते. या एकीकरणाच्या प्रभावामुळे शरीरात एका तीव्र अग्नीचा विकास होतो. याचेच शास्त्रीय परिभाषेत 'योगाग्नी' या नावाने वर्णन केले जाते. हा चिन्मय अग्नी देहात प्रदीप्त झाला की मुळातील सप्तधातुमय पिंड दग्ध होतो व अभिनव चिद्देह साधकाला प्राप्त होतो. यालाच सिद्धदेह म्हणतात. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी ही सर्व प्रक्रिया पुढीलप्रमाणे वर्णन केली आहे.

> तो अग्नि आंतूनि निघे । परी सबाह्य निववूंचि लागे ।
> ते वेळीं कसु बांधितो आंगें । सांडिला पुढती ।।६.२४२।।
> मार्ग मोडितो नाडीचे । नवविधपण वायूचें ।
> जाय म्हणौनि शरीराचे । धर्मु नाहीं ।।२४३।।
> इडा पिंगळा एकवटती । गांठी तिन्ही सुटती ।
> साही पदर फुटती । चक्रांचे हे ।।२४४।।
> मग शशी आणि भानु । ऐसा कल्पिजे जो अनुमानु ।
> तो वातीवरी पवनु । गिंवसितां न दिसे ।।२४५।।
> बुद्धीची पुळिका विरे । परिमळु घ्राणीं उरे ।
> तोही शक्तिसवें संचरे । मध्यमेमाजीं ।।२४६।।
> तव वरिलेकडोनि ढाळें । चंद्रामृताचें तळें ।
> कानवडोनी मिळे । शक्तिमुखीं ।।२४७।।
> तेणें नाळकें रस भरे । तो सर्वांगामाजीं संचरे ।
> जेथिंचा तेथ मुरे । प्राणपवनु ।।२४८।।

तातलिये मुसें। मेण निघोनि जाय जैसें।
मग कोंदली राहे रसें। वोतलेनी ।।२४९।।
तैसें पिंडाचेनि आकारें। ते कळाची कां अवतरे।
वरी त्वचेचेनि पदरें। पांघुरली असे ।।२५०।।
जैशी आभाळाची बुंथी। करूनि राहे गभस्ती।
मग फिटलिया दीप्ती। धरूनि ये ।।२५१।।
तैसा आहाचवरी कोरडा। त्वचेचा असे पातोडा।
तो झडोनी जाय कोंडा। जैसा होय ।।२५२।।

अशी स्थिती झाली म्हणजे योगीसाधकाच्या देहाला व्याधी, विकार, जरा, मृत्यू या गोष्टी स्पर्श करू शकत नाहीत. यामुळे योगमार्गावरून चालणाऱ्या साधकाला जन्ममृत्यूच्या परंपरेत सापडण्याची भीती उरत नाही. योगाच्या प्रभावामुळे एकाच जन्मात ज्ञानाचा उदय होऊ शकतो; परंतु विचारमार्गात ही गोष्ट शक्य होत नाही. चित्त व प्राण हे परस्पर संवद्ध आहेत. त्यामुळे चित्ताचा जय करावयाचा असेल तर त्याला प्राणजय करणे हाच एकमात्र उपाय आहे. विचार हा त्यासाठी उपाय नाही आणि सिद्धमार्गाशिवाय दुसऱ्या कोणत्याही मार्गात प्राणजयाची प्रणाली उत्तम प्रकारे सांगितलेली नाही व त्याची आलोचनाही केलेली नाही. प्राणजय केल्याशिवाय योगसिद्धी होऊ शकत नाही. त्यामुळे योगप्रधान सिद्धमार्गाशिवाय चित्तजयाचा मार्ग दुसरीकडे कोठेही श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे किंवा अन्य रीतीने दिग्दर्शित झालेला नसल्याने सिद्धमार्ग हा कैवल्यप्राप्तीचा एकमेव मार्ग आहे असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती होणार नाही. चित्तजय व विशुद्धीचा अर्थ एकच आहे. विशुद्ध चित्तामध्ये अपरोक्षानुभूतीच्या रूपाने आत्मज्ञान आपोआप उदित होते.

उपरोक्त सर्व गोष्टी घडून येण्यासाठी म्हणजे देहसिद्धी, आत्मज्ञान व मोक्षप्राप्ती होण्यासाठी कुंडलिनी शक्ती जागृत होणे नितांत आवश्यक आहे; कारण त्याशिवाय उपरोक्त गोष्टींच्या प्राप्तीची आशा करणें अगदी व्यर्थ आहे. सिद्धयोगी असे म्हणतात की वेदान्तश्रवणामुळे किंवा विचाराने देहदोष दूर होत नाहीत. देहशोधनासाठी योगाभ्यास करणेच आवश्यक आहे. योगाचा मूळस्तंभ कुंडलिनीचे उत्थान हा आहे. यासाठी सिद्धयोग्यांचे सर्व साधन कुंडलिनीच्या आश्रयानेच प्रवर्तित झालेले आहे. या विचारांमुळेच योगवीजग्रंथात पुढे असे म्हटले आहे की–

ज्ञाननिष्ठो विरक्तो वा धर्मज्ञोपि जितेंद्रियः ।।३१।।
विनायोगेन देवोऽपि न मोक्षं लभते प्रिये ।।३२।।

"हे प्रिये, पार्वती ! साधक ज्ञाननिष्ठ, विरक्त, सर्व धर्मांचे ज्ञान असलेला व जितेंद्रिय असला तरी योगाशिवाय त्यालाच काय परंतु देवालाही मोक्षप्राप्ती होऊ

शकत नाही. विशुद्ध परमात्माच संकोचून लहान झाल्यामुळे त्याला जीव असे नाव पडते. त्यामुळे काम, क्रोध, भय, चिंता, लोभ, मोह, मद, रोग, म्हातारपण, मृत्यू, कृपणता, शोक, निद्रा, भूक, तहान, द्वेष, लज्जा, सुख, दुःख, खेद, आनंद, जागृती, स्वप्न, सुषुप्ती, शंका व गर्व या सर्व दोषांनी तो युक्त झालेला दिसतो. या सर्व दोषांपासून जीव मुक्त झाला की तो शिवच होतो. हे दोष जाण्यासाठी ज्ञान हा एकमात्र उपाय आहे असे कोणी कोणी म्हणतात; परंतु केवळ ज्ञानाने मोक्षसिद्धी होऊ शकत नाही. योगाशिवाय नुसते ज्ञान मोक्ष देण्यास समर्थ ठरत नाही आणि ज्याने आपोआप ज्ञान उत्पन्न होत नाही असा कोणताही योगमार्ग मोक्ष देण्यास योग्य नाही. अज्ञानामुळेच जीवाला संसार भासत असतो. त्याला ज्ञान झाले की हा भास दूर होऊन तो मुक्त होतो. अशा स्थितीत योगाची आवश्यकताच काय? या प्रश्नाचे उत्तर असे आहे की, केवळ विचाराने स्वतःच्या अत्यंत श्रेष्ठ अशा कैवल्य-रूपाला मी जाणले आहे असे जे म्हणतात तें काम, क्रोध, भय इत्यादि दोषांपासून थोडेच मुक्त झालेले असतात? अशा प्रकारे केवळ विचाराने ज्यांना ज्ञान झालेले असते ते लोक मुक्त होणे शक्य नाही. कारण अशा जीवांच्या ठिकाणी सर्व दोष जसेच्या तसेच वास करीत असलेले दिसतात. अशा प्रकारे दोषांनी आवृत असलेला जीव केवळ वैचारिक ज्ञानाने मुक्त होणे कसे शक्य आहे? नुसते वैचारिक ज्ञान हे संसारमोहापुढे टिकू शकत नाही; कारण निष्कल, निर्मल व ज्ञानयुक्त अशा आकाशा-प्रमाणे असलेल्या आपल्या साक्षात् आत्मस्वरूपाचा मोहामुळे त्याग करून जीवात्मा पुनःपुन्हा संसारसागरात निमग्न होतो. सुखदुःखादींमुळे ज्याप्रमाणे सांसा-रिक माणसाची स्थिती होते त्याप्रमाणेच ज्ञानी माणूस वासनेमध्ये गुरफटून गेला की त्याची स्थिती होते. त्यामुळे त्याच्यामध्ये व सांसारिक माणसामध्ये कोणताही भेद राहात नाही; कारण संसाराची भावना दोघांमध्ये सारखीच असते." त्यामुळे इतर कोणत्याही उपायांची मात्रा येथे चालत नाही हे सांगतांना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात.

तैसे उपाय कीजती जे जे । ते ते यांसीचि होती विरजे ।
म्हणौनि हटियातें जिणिजे । इहींचि जगीं ॥३.२६६॥
येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो ।
तो तो अपाव । होय तें ऐक ॥७.८२॥

मात्र इतर कोणत्याही उपायांची मात्रा ज्ञानप्राप्तीसाठी चालत नसली तरी एकमात्र सिद्धयोगानेच त्याची सिद्धी होत असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ऐसिया बोधाचेनि सुरवाडें । मार्गामार्गाचे सांकडें ।
तया सोऽहंसिद्धां न पडे । योगियांसी ॥८.२५५॥
याकारणे पंडुसुता । तुवां होआवे योगयुक्ता ।

**येतुलेनि सर्वकाळीं साम्यता । आपैसया होईल ॥२५६॥**

सारांश सिद्धयोगसाधनेशी युक्त राहिल्याने साधक साम्यज्ञानाच्या प्राप्तीने प्रारब्धछेद होऊन मुक्त होतो. मात्र सांख्यमार्गाने ज्ञानप्राप्ती होत असली तरी प्रारब्धछेद होत नसल्याने सिद्धयोग हा या दृष्टीने कसा श्रेष्ठ आहे याचेही विवेचन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे केले आहे ते पाहाण्यासारखे आहे.

**प्रारब्धक्षयाच्या सामर्थ्यामुळे सिद्धयोगाची ज्ञानापेक्षा श्रेष्ठता :–**

ज्ञानप्राप्तीने प्रारब्धक्षय न होता तो सिद्धयोगानेच होत असल्यामुळे सिद्धयोग ज्ञानापेक्षा कसा श्रेष्ठ आहे ते आता पाहावयाचे आहे. "पिंडे पिंडाचा ग्रासु" ॥ ६.२९१ ॥" व "तेवीं पिंडाचेनि मिषें। पदीं पद प्रवेशे ॥ ६.३०८ ॥" हे सिद्धयोगमार्गाच्या साधनाचे असाधारणत्व व अलौकिक वैशिष्टच आहे. शुष्क अशा ज्ञानमार्गापेक्षा योगमार्ग हा या दृष्टीने सर्वस्वी निराळा आहे. ज्ञानमार्गात देह परिपक्व होत नसल्यामुळे प्रारब्धजय होऊ शकत नाही. परंतु योगाग्नीमुळे संस्कृत झालेला देह प्रारब्धाधीन राहात नाही. शास्त्रामध्ये असे लिहिले आहे की, जन्म किंवा स्थूलदेहसंबंध, आयुष्य किंवा जीवनकाल आणि भोग किंवा सुखदु:खबोध ही सर्व प्रारब्धकर्माची फले आहेत. प्रारब्धकर्माचे खंडन होऊ शकत नसल्यामुळे जात, जन्म, आयुष्य व भोग यांच्यात बदल होऊ शकत नाही. इतकेच काय परंतु ज्ञानाचा उदय झाल्यावर जेव्हा संचित कर्मे जाळून जातात व क्रियमाण कर्मे शिल्लक राहात नाहीत तेव्हा प्रारब्ध मात्र शिल्लक राहते. प्रारब्ध कर्माचा क्षय केवळ भोगामुळेच होऊ शकतो. प्रारब्ध शिल्लक राहात असल्यामुळेच ज्ञानाचा उदय झाला तरी साधकाला मृत्यू येत नाही. जीवन्मुक्तीत व विदेहमुक्तीत जो फरक आहे त्याचे खरे कारण हेच आहे. यामुळे जीवन्मुक्त पुरुषही प्रारब्धरहित होत नाहीत. सौभरीमुनी, चंद्र, मांडव्यमुनी, शिखिध्वज, कवी, हरी, नारद, ध्रुव, वामदेव, ऋषभदेव, अगस्ती इत्यादि सर्व लोकांच्या चरित्राकडे पाहिले म्हणजे हे लक्षात येते की, तत्त्वज्ञानाने प्रारब्धाचा क्षय होत नाही. यामुळे श्रीविद्यारण्यस्वामींनी जीवन्मुक्तीविवेकात योगप्राबल्याचा विचार मांडताना असे म्हटले आहे की –

"प्रारब्धं कर्म यथा तत्त्वज्ञानात् प्रबलं तथा तस्मादपि कर्मणो योगाभ्यास: प्रबलोऽस्तु । तथा च योगिनामुद्दालकवीतहव्यप्रभृतीनां स्वेच्छया देहपरित्याग उपपद्यते।" प्रारब्धकर्म हे तत्त्वज्ञानापेक्षा प्रबल आहे व प्रबल प्रारब्धकर्मापेक्षा योगाभ्यास प्रबल आहे. अशा प्रकारे योगाभ्यास श्रेष्ठ आहे असे स्वीकारले म्हणजे उद्दालक व वीतहव्यप्रभृती योग्यांनी स्वेच्छेने देहपरित्याग केला हे जुळते. नाही तर देहपरित्यागाकरिता त्यांना प्रारब्धाधीन राहावे लागले असते. परतु असे घडत नाही. कारण श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, "ज्याला सिद्धयोगाची प्राप्ती झाली आहे तो प्रारब्धादि सर्व कर्मे ओलांडून पलीकडे जातो, समाधीच त्याच्या मनाचे

घर विचारीत येते व 'उपजतखेंवो' म्हणजे दीक्षेमुळे त्याचा नवीन जन्म झाल्याक्षणीच तो मुक्त होतो. सिद्धयोगाच्या अलौकिक सामर्थ्याने हे सर्व एकाच जन्मात कसे घडून येते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**आणि मागील जे सद्बुद्धि । जेथ जिवित्वा जाहाली होती अवधि ॥**
**मग तेचि पुढती निरवधि । नवी लाहे ।। ६.४५७ ।।**
**तेथ सदैव आणि पायाळा । वरि दिव्यांजन होय डोळां ।**
**मग देखे जैसी अवलीळा । पाताळधनें ।। ४५८ ।।**
**तैसें दुर्भेद जे अभिप्राय । कां गुरुगम्य हन ठाय ।**
**तेथ सौरसेंवीण जाय । बुद्धि तयाची ।। ४५९ ।।**
**बळियें इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना ।**
**पवने सहजें गगना । मिळोंचि लागे ।। ४६० ।।**
**ऐसें नेणों काय अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें ।**
**समाधि घर पुसे । मानसाचें ।। ४६१ ।।**

असे हे सहज आपणहूनच योगाभ्यास होण्याचे व समाधी साधकाच्या मनाचे घर विचारीत येण्याचे भाग्य एकमात्र सिद्धयोगातच सामावलेले आहे; कारण जागृत शक्तीशिवाय हा अंतरंग अभ्यास आपणहून दुसरी कोणतीही शक्ती करू शकत नाही व प्रारब्धकर्माचा दीक्षासमकालीच क्षयही करू शकत नाही. यामुळे हे सामर्थ्य एकमात्र शक्तिपातयोगदीक्षेतच सामावलेले आहे असे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**जे वर्षशतांचिया कोडी । जन्मसहस्रांचिया आडी ॥**
**लंघितां पातला थडी । आत्मसिद्धीची ।। ६.४६५ ।।**
**म्हणोनि साधनजात आघवें । अनुसरे तया स्वभावें ।।**
**मग आयतिये बैसे राणिवे । विवेकाचिय ।। ४६६ ।।**
**तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं । विक्षेपांचीं पाणिवळें झाडिलीं ।।**
**म्हणौनि उपजतखेंवो बुडाली । लग्नघटिका ।। ४७१ ।।**
**आणि तद्रूपतेसीं लग्न । लागोनि ठेलें अभिन्न ।**
**जैसें लोपलें अभ्र गगन । होऊनि ठाके ।। ४७२ ।।**
**तैसें विश्व जेथ होये । मागौतें जेथ लया जाये ।**
**तें विद्यमानेंचि देहें । जाहला तो गा ।। ४७३ ।।**

साधक कोटयवधी शत वर्षे व हजारो जन्मांचे प्रतिबंध ज्ञानाने उल्लंघून आत्मसिद्धीच्या किनाऱ्याला येऊन पोहोचलेला असतो; म्हणून योगाभ्यासाची सर्व साधने त्याच्या मागोमाग आपोआपच येतात किंवा ती स्वभावतःच त्याच्या ठिकाणी प्रकट होतात व मग सहजच तो आतून जागृत झालेल्या विवेकाच्या राज्यावर

बसतो. विचाराने, विवेकाने किंवा तत्त्वज्ञानाने मागील अनेक जन्मात प्रारब्धकर्मामुळे प्राप्त झालेले सर्व विक्षेप दूर होऊन या जन्मात सद्‌गुरूची गाठ पडून शक्तिपातयोगदीक्षा झाल्याबरोबर त्याची चित्‌शक्ती कुंडलिनी जागृत होऊन त्याचे उरलेसुरले सर्व प्रारब्ध ती भक्षण करून तत्काळ मोक्षप्राप्ती करून देते. अशा रीतीने तो आत्मस्वरूपाशी एकरूप होतो. हेच खरे ऐक्य व लग्न होय. अभ्रे नाहीशी झाली म्हणजे ती ज्याप्रमाणे आकाशरूप होऊन राहातात त्याप्रमाणे सिद्धयोग साधनाने जन्म, जात आयुष्य, भोग, दिशा, काल व अवस्था ही प्रारब्धकर्मरूप अभ्रे नाहीशी होऊन विश्वाची उभारणी व संहारणी करणाऱ्या आत्मस्वरूपाशी विद्यमान देहातच ऐक्य पावून साधक जीवन्मुक्त होतो.

यावरून हे सिद्ध होते की, तत्त्वज्ञानाच्याद्वारा प्रारब्धाचा क्षय होत नाही. यामुळेच सिद्धयोगाचा महिमा एवढा मोठा आहे. सर्वसिद्धांतसंग्रहात श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे स्पष्टपणे म्हटले आहे की, "केवळ ज्ञानानेच साधकाला मुक्ती मिळत नाही. विद्या व योग ही दोन्ही मुक्तीची साधने आहेत. सद्‌गुरूंच्या उपदेशाने, दीक्षेने विद्यालाभ होतो व त्यामुळे अविद्येची निवृत्ती होते. परंतु देहशुद्धी झाल्याशिवाय देहरूपी आरशाचे दोष नाहीसे होत नाहीत. योगाभ्यास हाच देहशुद्धीचा एकमात्र उपाय आहे. यामुळे ज्या लोकांना ज्ञानप्राप्ती झालेली असते त्यांच्या ठिकाणीही कधी कधी दैहिक दोषांच्या प्रबलतेमुळे भ्रांतीचा उदय होतो. यासाठी ज्ञान व वैराग्य प्राप्त झाल्यावरही दोषक्षयासाठी साधकाने योगमार्गाचा अवलंब करणे अपरिहार्य ठरते. गुळाची किंवा अन्य पदार्थांची चव माहीत असूनही तापामुळे रोग्याला त्या पदार्थांच्या चवीचा अनुभव येत नाही; त्याप्रमाणे आत्म्याचे सम्यक् ज्ञान झाले तरी योगाशिवाय त्याची अपरोक्ष म्हणजे प्रत्यक्ष अनुभूती येत नाही. विद्येचा संचार झाला की अविद्या नाहीशी होते. त्याबरोबरच अस्मिता, राग द्वेष व अभिनिवेशही दूर होऊन क्लेश न राहिल्यामुळे भोगेच्छाही शिल्लक राहात नाही. अशी अवस्था प्राप्त झाल्यावर मुक्तीसाठी योगाभ्यास करणे आवश्यक ठरते. दीर्घकालपर्यंत असा योगाभ्यास केला म्हणजे सर्व चित्तवृत्तींचा निरोध होऊन साधकाला आत्म्याची स्वरूपावस्थिती प्राप्त होते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "तरी देवा हें ऐसें कैसें । जे ज्ञानियांही स्थिती भ्रंशे । मार्गु सांडुनि अनारिसे । चालत देखों ।। ३. २३२ ।।" असे म्हणून ज्ञानीही प्रारब्धामुळे. ग्राह्याग्राह्य व त्याज्यात्याज्य माहीत असूनही स्वधर्म सोडून परधर्माचे आचरण कोणत्या कारणामुळे करतात असा प्रश्न अर्जुनाच्या मुखी घालून "तैसें ज्ञान तरी शुद्ध । परी इहीं असे प्ररुद्ध । म्हणौनि तें अगाध । होऊनि ठेलें ।।३.२६३।।" हे सांगून ज्ञान हे स्वभावतः जरी शुद्ध असले तरी कामक्रोधांनी म्हणजे जीवाच्या प्रारब्धादि दोषांनी आच्छादित असते म्हणून ते प्राप्त होण्यास अवघड होऊन बसले आहे असे म्हटले आहे. यावरून हे स्पष्ट

होते की ज्ञानच प्रारब्धाने आच्छादित झालेले आहे, त्यामुळे ते प्रारब्धाचा छेद करू शकत नाही. म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात की, "आधीं यांतें जिणावें। मग तें ज्ञान पावावें ।।३.२६४।।" या कामक्रोधरूप प्रारब्धाला जिंकण्यासाठीच "हें जीवींचें निजगुज ।।४.२८।।" तुला मी सांगतो असे म्हणून श्रीकृष्णांनी अर्जुनाला, "एक उपायो आहे भला। तो करितां जरी आंगवला। तरी सांगेन तुज ।।३.२६७।।" असे म्हणून हा सिद्धयोगाचा उपाय सांगितला आहे. मात्र वर विवेचन केल्याप्रमाणे योगाभ्यास दोषक्षयासाठी व आत्मप्राप्तीसाठी निरंतर केलाच पाहिजे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

**जंववरी अर्जुना। तो बोधु भेटेना मना।**
**तंवचि यया साधना। भजावें लागे ।।३.१४९।।**

अशी ही योगाची श्रेष्ठता आहे. महाभारताच्या मोक्षपर्वात पितामह भीष्मांनी यासंबंधी युधिष्ठिराला असे सांगितले की—

**यथा चानिमिषाः स्थूला जालं भित्वा पुनर्जलम् ।**
**प्रविशंति यथा योगस्तत्पदं वीतकल्मषाः ।।**
**यथैव वागुरां छित्वा बलवंतो यथा मृगाः ।।**
**प्राप्नुयुर्विमलं मार्गं विमुक्ताः सर्वबंधनैः ।।**
**अबलाच्च मृगा राजन् वागुरासु तथा परे ।**
**विनश्यंति न संदेहस्तद्वद्योगबलादृते ।।**

हे युधिष्ठिरा ! ज्या प्रकाराने जाडी मगर किंवा मासा आपल्या बळाने जाळे तोडून पुन्हा पाण्यात शिरून आपल्या निवासस्थानी जातात त्याप्रमाणे योगी लोक योगरूपी बळाने प्रारब्धकर्मरूपी जाळे तोडून सर्व पापांपासून मुक्त होऊन आपल्या मूळच्या ब्रह्मस्थानाशी एकरूप होऊन जातात. त्याचप्रमाणे बलवान मृग जाळे तोडून सर्व बंधनातून मुक्त होऊन आपल्या मूळच्या स्वच्छंदमार्गाला लागतो. मात्र जो निर्बल मृग असतो तो जाळे तोडू शकत नसल्याने बंधनात पडून मृत्यू पावतो. त्याप्रमाणे जो पुरुष योगरूपी बलाने युक्त असतो तो प्रारब्धकर्मरूपी जाळे तोडून देहादिक सर्व बंधनांपासून मोकळा होऊन ब्रह्मभावरूप विमलमार्गाने मोक्ष-प्राप्त करतो. मात्र ज्या पुरुषाजवळ योगरूपी बळ नसते तो कर्मरूपी जाळयामध्ये सापडून नाना प्रकारच्या योनींमध्ये जन्म घेत या जन्ममृत्यूच्या भ्रमणरूप संसारात अडकून पडतो.

ज्ञानापेक्षा प्रारब्धकर्म बलवत्तर असल्यामुळे "तैसें इहींवीण एकलें। आम्ही ज्ञान नाहीं देखिलें। जैसें कोंडेनि पां गुंतलें। बीज निपजे ।।३.२६२।।" याप्रमाणे बीज जसे कोंडयाने आच्छादिलेलेच उत्पन्न होते त्याप्रमाणे कामक्रोधाशिवाय एकटे असलेले शुद्धज्ञान आपल्या दृष्टीस कधीच पडत नाही. असे असले तरी त्याच्यापेक्षाही

योगाभ्यास प्रबल आहे; कारण योगाभ्यास केल्याने प्रारब्धकर्माचा निरोध होतो. ही गोष्ट विष्णुधर्माबद्दलही सांगितली आहे.

**स्वदेहारंभकस्यापि कर्मणः संक्षयावरः ।।**

**यो योगः पृथिवीपाल शृणु तस्यापि लक्षणम् ।।**

हे राजा ! आपल्या शरीराला आरभ करणारे जे प्रारब्धकर्म असते त्याचा क्षय करणारा जो योग आहे त्याचे लक्षण तू ऐक. त्याचप्रमाणे गीतेच्या आरंभीच टीका करताना श्रीमधुसूदनसरस्वतींनी हेच सांगितले आहे. "सा बलवती सर्वतः संयमे-नोपशाम्यति ।" जरी प्रारब्धकर्माची वासना सर्वात प्रबल आहे हे खरे असले तरी योगाने प्राप्त होणारा जो संयम आहे त्यामुळेच मनुष्याला शांती प्राप्त होते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही कामक्रोधादि दोषयुक्त प्रारब्धकर्म संपून "हे अंतरींहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले । जैसे रश्मीवीण उरलें । मृगजळ नाहीं ।।३.२७०।। तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें । मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ।।२७१।।" हे व्हावे म्हणून गुरुशिष्याची गोष्ट म्हणजे सिद्ध योगाची कथा 'ऐसी परंपरा विस्तारिली । आद्य हे गा ।। ४.१८ ।।' म्हणून-सांगितली आहे.

## ऐसी परंपरा विस्तारिली । आद्य हे गा ।

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत जो योग कथन केला आहे तो सिद्धयोग असून त्याचेच दर्शन त्यांनी आद्योपांत घडविले आहे. याबद्दल अनेक विद्वानांची मते भिन्न आहेत. ह. भ प. शं. वा. दांडेकर यांनी ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेत असे म्हटलें आहे की, "या विषयासंबंधी सुशिक्षित व अशिक्षित यांच्यामध्ये सारखाच गैरसमज आहे. ज्ञानराजांनी इतके स्वच्छ लिहिले असूनसुद्धा मोठमोठे लेखक ज्ञानराजांनी या पंथास 'पंथराज' म्हटले, येवढ्यावरूनच ज्ञानराजांच्या मते गीतेतला प्रतिपाद्य विषय तोच आहे. असे म्हणण्याचा अडाणीपणा करतात." (पृ. ५८) "ज्ञानदेव आणि नामदेव" या ग्रंथाच्या 'ज्ञानेशांचा राजयोगांतर्गत कुंडलिनीयोग' या सहाव्या प्रकरणाच्या शेवटी श्री. शं. दा. पेंडसे यांनीही असे म्हटले आहे की, "गीतेत व ज्ञानेश्वरीत काहीतरी गूढ आहे व केवळ गुरुगम्य असा कुंडलिनी योगच त्यात प्रमुख निष्ठा आहे हे म्हणणे निराधार आहे." वरील दोघांचा मतभेद संपूर्ण प्रति-पाद्य विषय व प्रमुख निष्ठा यापुरताच मर्यादित आहे हे स्पष्ट आहे. या मतभेदाचे निराकरण केले म्हणजे प्रत्येक अध्यायात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीताध्यायाप्रमाणे विषादयोग, सांख्ययोग, ध्यानयोग इत्यादि निरनिराळ्या योगांचे किंवा कर्म, ज्ञान व भक्ती या तीन प्रमुख योगांचे, मार्गांचे किंवा निष्ठांचे वर्णन केले आहे ही भ्रामक व भ्रांत समजूत दूर होऊन गीता ही सिद्धयोगाच्या महासिद्धांताने एकरस झालेली श्रीप्रभूची वाङ्मयमूर्ती आहे हे सिद्ध होऊन ज्ञानेश्वरीत हाच भावार्थ कसा अवतरला

आहे हे स्पष्ट होईल. मूलतः प्रतिपाद्य विषय एकच आहे हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात –

**आणि प्रसंगें गीता । ठावोही हा संपता ।**
**म्हणौनि दावी आद्यंता । एकार्थत्व ।।१८.१२३९।।**
**जे ग्रंथाच्या मध्यभागीं । नाना अधिकार प्रसंगीं ।**
**निरूपण अनेगीं । सिद्धांतीं केलें ।।१२४०।।**
**तरी तेतुलेही सिद्धांत । इथे शास्त्रीं प्रस्तुत ।**
**हें पूर्वापर नेणत । कोण्ही जें मानी ।।१२४१।।**
**तैं महासिद्धांताचा आवांका । सिद्धांतकक्षा अनेका ।**
**भिडऊनि आरंभु देखा । संपवितु असे ।।१२४२।।**

गीता समाप्त होण्याचा प्रसंग ओघानेच आला म्हणून गीतेच्या आरंभापासून शेवटपर्यंत एकाच अर्थाचे प्रतिपादन कसे केले आहे हे सांगणे आवश्यक आहे. हे जर सांगितले नाही तर ग्रंथाच्या मध्यभागी निरनिराळ्या अधिकार प्रसंगाने भिन्न भिन्न अनेक सिद्धांत मांडून त्यांचे स्वतंत्र प्रतिपादन केले आहे असे वाटेल. परंतु पूर्वापार संबंध विचाराने न जाणून गीतेमध्ये तितकेही सिद्धांत सांगितले आहेत असे जर कोणी मानील तर ते चुकीचे आहे; कारण महासिद्धांतापाशी सर्व उपसिद्धांताचे ऐक्य करून दाखविणे म्हणजे मुख्य महासिद्धांताच्या सिद्धीकरिता बाकीचे अनंत सिद्धांत या कक्षा म्हणजे उपसिद्धांत, भाग किंवा बाजू आहेत असे दाखवून जो मुख्य सिद्धात आरंभी सांगितला तोच सिद्धांत सांगून भगवंतांनी गीताग्रंथ संपविला आहे.

गुरुकृपाप्राप्त सिद्धयोगरूप ज्ञानसाधन कथन करणे हाच ज्ञानेश्वरीचा महासिद्धांत आहे; कारण आरंभापासून शेवटपर्यंत त्यांनी सिद्धयोगच कथन केला आहे. सिद्धयोगाच्या दृष्टीने ज्ञानेश्वरीची विषयाध्यायसंगती कशी लागते हे नवव्या प्रकरणात सविस्तर मांडले आहेच. सिद्धयोगाचा महासिद्धांत मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेंणें मोक्षोपादान फळ ।**
**या दोहीं केवळ । साधन ज्ञान ।।१८.१२४३।।**

अविद्यानाशाचे व मोक्षप्राप्तीचे साधन ज्ञान आहे. हा सिद्धयोगाचा महासिद्धांत आहे. परंतु ज्ञान हा योगरूप कसा आहे हे पूर्वी आपण पाहिले असल्याने व "सांगेन ज्ञानाचिये भेटी । उपावो तुज ।। ४.१८५ ।।" असे म्हणून "अर्जुना तूं परिससी । परिसोनि अनुष्ठिसी । तरी आम्हांसीचि वानी कायसी । सांगावयाची ? ।।५.१६९।। अर्जुना जेणें जेणें भेदें । तुझें कां चित्त बोधे । तैसें तैसें विनोदें । निरूपिजेल ।।५.१७६।।" या रीतीने ज्या योगसाधनाचे निरूपण केले आहे तो

सिद्धयोग आहे हे निभ्रांत सत्य आहे. अर्जुन सिद्धयोग ऐकण्यास व आचरण्यास तयार असल्यामुळे ज्या ज्या प्रकाराने त्याच्या चित्ताला बोध होईल त्या त्या प्रकाराने, कौतुकाने श्रीकृष्णांनी तो विविधतेने कथन केला आहे इतकेच. "हें इतुलेंचि नानापरी। निरूपिलें ग्रंथविस्तारीं ॥ १८.१२४४॥" याचा अर्थ, ते ज्ञान म्हणजे सिद्धयोगाचे साधनच ज्ञानेश्वरीत आद्यंत नानाप्रकाराने सांगून मध्यभागी त्याचा विस्तार झाला, एवढाच आहे.

ज्ञानेश्वरीत सिद्धयोगाचेच निभ्रांतपणे कथन केले आहे व तोच ज्ञानेश्वरीचा महासिद्धांत आहे असे म्हणण्याचे महत्त्वाचे कारण असे आहे की, "शांभवाद्वयानंदवैभवाच्या बोधाचे ऐश्वर्य गुरुक्रमाने समाधीधन" म्हणून श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांना उपलब्ध करून दिले. वरील वाक्यातील प्रत्येक शब्द महत्त्वाचा आहे. त्याच्या अर्थांतरात प्रवेश केला म्हणजे आदिनाथ शंकरांनी प्रवर्तित केलेल्या सिद्धयोगाच्या अलौकिकत्वाचा साक्षात्कार झाल्याशिवाय राहाणार नाही. 'जो सिद्धांचा मस्तकमणी। महातापसी शूळपाणि ॥ अंतर्भाव ४ ३ ॥" व "जो सिद्धांचाही सिद्ध । ज्ञानवैराग्यप्रसिद्ध । सामर्थ्यसिंधु अगाध । कैलासराणा ॥ पंचसमासी ३ १७॥" असे म्हणून ज्या शंकराचे श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी वर्णन केले आहे, त्याच्यापासून हा मार्ग प्रवर्तित झाला असल्यामुळे त्याला सिद्धयोग, सिद्धमार्ग किंवा नाथमार्ग असे नाव पडले. हा योग शंकरांनी मुळातच सिद्ध करून ठेवलेला असल्याने "जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहुसाल सांडे । तैसें सोहोकासन सांगडें । सोहपें होय ॥५.८॥" असा पालखीतून जाण्यासारखा हा सिद्धयोग सोपा आहे. या सिद्धयोगाला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शांभव हे मोठें अर्थपूर्ण नाव दिले आहे. त्याचा अर्थ शंकरांपासून उत्पन्न झालेला, प्रवर्तित झालेला किंवा प्रसृत झालेला मार्ग किंवा विद्या असा आहे. या मार्गामुळेच अद्वयानंदाचे वैभव प्राप्त होत असल्याने महायोगी गोरक्षनाथांनी लिहिलेल्या "सिद्धसिद्धांतपद्धती" या ग्रंथात असे म्हटले आहे की—

> **वाङ्मात्र'द्वाथदृक्पाताद्यः करोति च तत्क्षणात् ।**
> **प्रस्फुटं शांभवं वेद्यं स्वसंवेद्यं परं पदम् ॥ ५ ६७ ॥**

आपल्या शब्दाने, वाणीने अगर मधुर उपदेशाने किंवा करुणादृष्टी टाकून शिष्याच्या ठिकाणी स्वसंवेद्य व परमश्रेष्ठ असे शांभवतत्त्व एका क्षणात प्रस्फुटित म्हणजे व्यक्त करून जो त्या तत्त्वाची शिष्याला अनुभूती देतो तो खरा गुरू होय. अशा तऱ्हेने शांभवतत्त्वाची शिष्याला अनुभूती आणून देण्याच्या सामर्थ्याला कृपा म्हणतात. तांत्रिक आचार्यांच्या व सिद्धयोगमार्ग प्रवर्तकांच्या परिभाषेत या भगवद् अनुग्रहाला, कृपेला किंवा उपायाला शक्तिपात म्हटले जाते. या शांभवी विद्येची, तत्त्वाची म्हणजेच सिद्धयोगाची महती अशी अलौकिक व अनन्यसाधारण असल्याने

ज्ञानसंकलिनी तंत्रात असे म्हटले आहे की –

**वेदशास्त्रपुराणानि सामान्यगणिका इव ।**
**या पुनः शांभवी विद्या गुप्ता कुलवधूरिव ।।७।।**

वेदशास्त्रपुराणे ही सामान्य स्त्रीप्रमाणे किंवा वेश्येप्रमाणे समजावीत. शांभवी विद्या मात्र कुलीन स्त्रीप्रमाणे गुप्त व रक्षणीय आहे. योगवासिष्ठात भरद्वाज ऋषींनी वाल्मीकींना जेव्हा असा प्रश्न केला की, "वसिष्ठांनी एवढे तत्त्वज्ञान सांगूनही रामाचे समाधान झाले नाही व त्याचा मोह दूर होऊन त्याला आत्मशांती मिळाली नाही असे दिसते. मग त्याला पूर्ण बोध कशाने झाला व त्याचे सर्व संशय व व्यामोह दूर होऊन तो अखंड आत्मानंदात कोणत्या उपायाने राहू शकला? ते मला सांगा." त्यावेळी वालिमकी म्हणाले–

**शक्तिपातवशोन्मेषप्रकटामलचिद्घनः ।**
**मुहूर्तमासीदुद्बुद्धश्चैतन्यानंदसागरः ।।**

रामाची अविद्या शक्तिपातयोगानेच दूर झाली. शक्तिपातामुळे रामाला उन्मेष प्राप्त होऊन त्याचे शुद्धस्वरूप प्रकट झाले. स्वस्वरूपाचा विकास होऊन त्यात त्याची पूर्ण जागृती झाली. तो चैतन्यानंद सागरच झाला. अशा प्रकारे शक्तिपाताने रामाचे चित्त ब्रह्माकार होऊन तो आपल्या स्वरूपात रममाण झाल्याचे पाहून विश्वामित्र ऋषिश्रेष्ठ वसिष्ठांची व शक्तिपाताची स्तुती करताना म्हणाले–

**हे वसिष्ठ महाभाग ब्रह्मपुत्र महानसि ।**
**गुरुत्वं शक्तिपातेन तत्क्षणादेव दर्शितम् ।।**
**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके ।**
**जनयेद्यः समावेशं शांभवं स हि देशिकः ।। यो. वा. नि. प्र. पू. १२८.६१ ।।**

हे महाभाग ब्रह्मपुत्र वसिष्ठा! तू फार थोर आहेस. वर सांगितल्याप्रमाणे अनुग्रहयुक्त दृष्टी टाकून शक्तिपाताने शिष्याला ब्रह्मरूप करून तू आपले गुरुत्व, शिष्योद्धारसामर्थ्य, आत्ताच्या आत्ताच आम्हाला दाखविले आहेस. दर्शन, स्पर्श, शब्द किंवा केवळ कृपादृष्टी यांच्या योगाने जो शिष्याच्या देहात शांभवी तत्त्वाचा, विद्येचा समावेश करतो व शिष्याची कुंडलिनी शक्ती जागृत करून जीवशिवैक्य करतो तोच खरा गुरू होय.

बोधाचे ऐश्वर्य म्हणजे दीक्षेचे सामर्थ्य होय. "ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ।। १८.१७५५ ।।" असे म्हणून मत्स्येंद्रनाथांनी गोरक्षनाथांना मुद्रा म्हणजे दीक्षा दिली असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्टच म्हटले आहे. शास्त्रकारांनी दीक्षेची व्याख्या करताना योगिनीतंत्रात असे म्हटले आहे की–

**दीयते ज्ञानसद्भावः क्षीयते पशुवासना ।**
**दानक्षपणसंयुक्ता दीक्षा तनेह कीर्तिता ।।**

जिच्या द्वारा ज्ञान दिले जाते व पशुवासनेचा क्षय होतो अशा दान व क्षपणयुक्त क्रियेला दीक्षा म्हणतात. ज्ञानेश्वरीत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मोठ्या काव्यमय भाषेत स्वतःच्या दीक्षेचे वर्णन करताना असे म्हटले आहे की –

**ज्ञानदव म्हणे मी चाडें । सद्‌गुरूंनीं केलें कोडें ।**
**माथां हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ।। ६.४९२ ।।**

अर्जुनाला श्रीकृष्णांनी दिलेल्या शक्तिपात दीक्षेचेही श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे वर्णन करून सिद्धयोगाचे उपरोक्त व्याख्येतील सामर्थ्य प्रकट केले आहे. ते म्हणतात–

**येर कलशींचें येरीं । रिचविजे जयापरी ।**
**आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ।। १३.११४५ ।।**
**हृदया हृदय एक जाले । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें ।**
**द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ।। १८.१४२१ ।।**
**दींपें दीप लाविला । तैसा परिष्वंगु तो जाला ।**
**द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु ।। १४२२ ।।**

असे हे शक्तिपाताचे म्हणजे कृपेचे सामर्थ्य आहे. एका कळशीतील पाणी दुसऱ्या कळशीत ओतावे त्याप्रमाणे सद्‌गुरुस्वरूप श्रीकृष्णांनी शिष्यवर अर्जुनाच्या हृदयात शक्तिसंक्रमण करून आपल्या हृदयातील ज्ञान ओतले. एवढेच नव्हे तर अर्जुनाला आलिंगन देऊन एका दिव्याने दुसरा दिवा लावावा त्याप्रमाणे त्यांनी त्याच्या ठिकाणी शक्ती जागृत करून ज्ञानज्योत पेटविली व त्याला आपल्यासारखे केले. श्रीसंत तुकाराममहाराजांनी अगदी हाच भाव पुढील शब्दात व्यक्त केला आहे.

**आपणासारिखे करिती तात्काळ ।**
**नाही काळवेळ तयालागी ।।**

सिद्धयोग हा गुरुक्रमाने म्हणजे गुरुपरंपरेनच प्राप्त होणारा आहे. याचा अधिक खुलासेवार विचार दुसऱ्या प्रकरणाच्या "महेशान्वयसंभूत गुरुक्रमप्राप्त समाधिधनरूप गीतानिधान" या दुसऱ्या मुद्यात केला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "मज हृदयीं सद्‌गुरु । जेणें तारिलों हा संसारपुरु ।। १.२२ ।।" अशी पहिल्या अध्यायापासून सुरवात करून "श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ।।१८.१७३५।।" याप्रमाणे अठराव्या अध्यायापर्यंत अखंड गुरुस्तवन करून पावलापावलावर "हें जाणती सुवर्म ! गुरुगम्य जें ।। ५.६३ ।।" ही ग्यानबाची मेख मारून सिद्धयोगाचा महिमा सांगितला आहे. या दृष्टीनेच श्री. म. म. गोपीनाथ कविराज यांनी आपल्या "भारतीय संस्कृति और साधना," खंड दोन, यातील "सहजयान और सिद्धमार्ग" या लेखात असे म्हटले आहे की, "योगाशिवाय श्रेष्ठ अवस्था प्राप्त होणे कधीही शक्य नाही. आदिनाथांनी असे म्हटले आहे की "योगमार्गात् परो मार्गो नास्ति नास्ति

श्रुतौ स्मृतौ ।" विवेकमार्तंड ग्रंथातसुद्धा शब्दात बदल करून हाच भाव व्यक्त केला आहे. "योगशास्त्रं पठेन्नित्यं किमन्यैः शास्त्रविस्तरैः ।" सर्वसाधारण सटरफटर गुरूच्या मुखातून बाहेर पडणारा उपदेश किंवा शास्त्रचर्चा, हे केवळ नाना तऱ्हेचे विकल्प उत्पन्न करणारे एक जाळेच आहे असे म्हटले पाहिजे; कारण अशा प्रकारचा उपदेश किंवा शास्त्रचर्चा जीवाला बंधनापासून लेशमात्रसुद्धा मुक्त करू शकत नाही अगर त्यादृष्टीने काही साहाय्यही करू शकत नाही. निर्विकल्प अशा परमपदापर्यंत जाऊन पोहोचावयाचे असेल तर इतर अनेक विकल्पांप्रमाणेच शास्त्राध्ययनरूपी विकल्पाचाही पूर्णपणे त्याग करणे आवश्यक ठरते. केवळ बाह्य इंद्रियांनाच जाणवतील असे शब्द ऐकून कोणीही मनुष्य इंद्रियातीत अशा निष्कंप किंवा चिन्मय स्वरूपात कधीही स्थिर होऊ शकत नाही. जीवनातील जो वेळ शास्त्राध्ययन किंवा निरनिराळे विकल्प उत्पन्न करणाऱ्या बडबडीमध्ये खर्च केला जातो तो अक्षरशः वाया जातो. जीव विकल्पामध्ये पडल्याने आपले नित्यसिद्धरूप विसरून गेला आहे व अविद्येच्या प्रभावामुळे असत्याला सत्य मानून तो तृषित हृदयाने वाळवंटात भटकणाऱ्या वाटसरुप्रमाणे मृगजळाच्या मागे धावत जातो. सिद्धयोग्यांच्या म्हणण्याप्रमाणे विकल्पांची शांती व अगदी अनादि कालापासून वाहाणारा भ्रांतीचा प्रवाह थांबल्याशिवाय कोणत्याही उपायाने जीवाचे परम कल्याण होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे एक आंधळा मनुष्य दुसऱ्या आंधळ्याला मार्ग दाखवून वाटचाल करू शकत नाही त्याप्रमाणे विकल्पांनी वेढलेला जीव केवळ विकल्पांच्या साहाय्याने निर्विकल्प पदावर आरूढ होऊ शकत नाही.

याकरिताच सद्गुरूची नितांत आवश्यकता असते. गुरुकृपेशिवाय अगर गुरुदत्त शक्तीचा आधार घेतल्याशिवाय जीवाला मोहातून तरून जाण्याचा दुसरा कोणताही मार्ग उपलब्ध नाही. जलप्रवाहामध्ये तरंगणाऱ्या गवताच्या काडीप्रमाणे जीव संसार–सागरात सतत खालीवर हेलकावे खात असतो. अशा असहाय्य जीवाला आपल्याला परंपरेने प्राप्त झालेला व स्वतः आचरलेला सन्मार्ग दाखवून त्याची भ्रांती दूर करून आत्मसामर्थ्य संपादनाच्या कार्यास मदत करण्यास ते समर्थ असतात. अशा प्रकारे जे महात्मे जीवाला आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देऊन अखंड विश्रांतीचा लाभ करून देतात त्यांनाच सद्गुरू म्हणणे योग्य ठरते. असे सद्गुरू जो मार्ग दाखवितात त्या मार्गावरून चालल्याने स्वसंवेद्य अशा आत्मवस्तूचे दर्शन होऊन त्याची हमखास प्राप्ती होते. याशिवाय आत्मसाक्षात्काराचा दुसरा कोणताही उपाय नाही. केवळ उपदेशामुळे, व्याख्यानबाजीने, वाक्जालाने किंवा प्रवचनांच्या अवडंबरामुळे आत्मस्वरूपाचा साक्षात् अनुभव कदापीही येऊ शकत नाही किंवा त्यांच्या आधारावर असा अनुभव कोणीही देऊ शकत नाही. याचे कारण असे आहे

की आत्मस्वरूप हे मन, वचन व इंद्रियादि सर्व गोष्टींच्या पलीकडचे असून स्वयंप्रकाश आहे. याकरिताच " गुरोस्तु मौनं व्याख्यानम् " आहे. जठर संहितेमध्ये असे म्हटले आहे की–

**परंपराप्राप्तसन्मार्गदर्शने यस्य योग्यता ।**
**स गुरुर्भवति श्रीमानात्मविश्रांतिकारणम् ।।**
**तेन संदर्शिते मार्गे स्वसंवेद्यस्य दर्शनम् ।**
**भवतीति गुरुं देवभावेन परिचिंतयेत् ।।**

परंपरेने प्राप्त असलेल्या सन्मार्गाचे ज्ञान देण्याची योग्यता जेथे असेल तोच गुरुपदवीस योग्य होय; कारण जडजीवाला विश्रांती प्राप्त करून देण्याची क्षमता त्याच्या ठिकाणीच असते. अशा गुरुमाउलीने दाखविलेल्या मार्गानेच स्वसंवेद्याचा साक्षात्कार, ज्ञान किंवा दशन होते म्हणून त्या गु माउलीचे देवभावाने नेहमी चिंतन करावे."

सारांश " जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें । मग आत्मस्वरूपीं घातलें । हारौनियां ।। ५.३४ ।। " असे साधकाने केले तरच म्हणजे एकमेव श्रीगुरूच्या कृपाकटाक्षाच्या दृष्टिक्षेपानेच जीवाच्या उत्थानदशेचा उदय होत असतो. या उत्थानदशेमुळेच जीवाला आत्मसंवेद्य अवस्था प्राप्त होऊन " तैसें होय तियें मेळीं । मग सामरस्याचिया राउळीं । महासुखाची दिवाळी । जगेंसि दिसे ।। ६ ३८९ ।। " या न्यायाने तो परमपदाशी समरस होऊन जातो. या आवेशामुळे किंवा या आत्मस्मृतीमुळे एका निरतिशय अशा महान आनंदमय अवस्थेचे स्फुरण होऊ लागते. यामुळे ज्या प्रकाशाचा आविर्भाव किंवा उद्दीपन होते त्याची अनुभूती आल्याने सर्व भेद नाहीसे होऊन जातात.

समाधीधन म्हणजे सिद्धयोगाचे धन होय. " योगः समाधिः " अशी भगवान् वेदव्यासांनी पातंजल योगसूत्राच्या भाष्यारंभीच व्याख्या करून समाधीलाच योग असे म्हणतात, असे स्पष्ट केले आहे. घेरंड संहितेतही समाधी म्हणजे सर्वश्रेष्ठ योग असून भाग्य उदायाला आले व गुरुभक्ती केली म्हणजे तो गुरुकृपेनेच प्राप्त होतो असे म्हटले आहे.

**समाधिश्च परंयोगं बहुभाग्येन लभ्यते ।**
**गुरोः कृपाप्रसादेन प्राप्यते गुरुभक्तितः ।।७ १।।**

उपरोक्त पद्धतीने अर्थांतरात प्रवेश केला नाही तर " परी लोकु वाक्चातुर्यें होईल सुखिया ।। १८.१७५० ।। " या पंक्तीत आपल्याला बसावयास लागून आपण वरवरच तरंगत राहून " अंतरंगचि अधिकारिये ।। १८.१७५० ।। " ही स्थिती आपल्याला कधीही प्राप्त होणार नाही. इतकेच नव्हे तर " एऱ्हवीं आघवी गोठी होईल । मुकिया बहिरयाची " ।। ६.२६ ।।" असे होऊन " जैसा वायसीं चंद्र

नोळखिजे । तैसा प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे ।। ६.२९ ।।" अशी आपली स्थिती झाल्याशिवाय राहाणार नाही. ज्यावेळी "ऐसा श्रीकृष्णार्जुन-। संवादसंगमीं स्नान। करूनि देतसे तिळदान। अहंतेचें ।। १८.१६२० ।। तेथ अवसरें आनंदें। अलौकिकही कांहीं स्फुंदें। श्रीकृष्ण म्हणे सद्गदें। वेळोवेळां ।। १६२१ ।।" अशी संजयाची स्थिती झाली त्यावेळी ही अष्टसात्त्विक भावांची अवस्था शरीरात आपोआप कशी उपस्थित होते व "तत्रैतत्प्रथमं चिन्हं रुद्रे भक्ति सुनिश्चला ।।" या मालिनी-विजयोत्तरतंत्रामध्यें सांगितलेल्या सूत्राप्रमाणे शक्तिपात झाल्यावर भगवद्भक्तीचा उन्मेष कसा होतो यातील कोणत्याही गोष्टीचा गंध धृतराष्ट्रास नव्हता. त्यामुळे धृतराष्ट्र संजयास म्हणाला, "व्यासमुनींनी तुला येथे कोणत्या उद्देशाने वसविले? आणि मध्येच प्रसंग नसताना असे उद्गार काय म्हणून काढतोस?" अशी धृतराष्ट्रापणे सिद्धयोगाकडे पाहाण्याची दृष्टी अंध असल्याने किंवा या विषयाची माहितीच नसल्यामुळे टीकाकारांनी सुरुवातीस उधृत केल्याप्रमाणे व अन्य प्रकारेही टीका केल्या आहेत. या सर्वांची वासलात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील शब्दात लाविली आहे. ते म्हणतात-

रानींचें राउळा नेलिया। दाही दिशा भानी सुनिया।
कां रात्री होय पाहलया। निशाचरां ।। १८.१६२६।।
जो जेथिंचें गौरव नेणे। तयासि तें भिंगुळवाणें।
म्हणौनि अप्रसंगु तेणें। म्हणावा कीं तो ।। १६२७।।

अशी अप्रसंगु म्हणण्याची पाळी आपल्यावर येऊ नये व "तेथ येर प्राकृत हेंदरें। केवीं जाणों लाहे ।। ९.३८० ।।" अशी अज्ञानी व सामान्य लोकांसारखी आपली स्थिती होऊ न देता "आणि तो हिमांशुचि जेविं खाजें। चकोराचें ।। ६.२९ ।। तैसा सज्ञानासी तरी हा ठावो। आणि अज्ञानासी आन गांवो ।। ६ ३० ।।" अशी स्थिती प्राप्त व्हावी असे वाटत असेल तर "जे समूळ बुडाले। तेचि साचार तरले। जे बुडतबुडता वाचले। ते बुडाले कल्पकोटी ।। एकवीस समासी १.१७ ।।', या श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या म्हणण्याप्रमाणे शब्दाच्या अंतरगात बुडी मारलीच पाहिजे. अशी बुडी मारल्याशिवाय ज्ञानेश्वरीच्या रूपाने अवतरलेल्या सिद्धयोगाच्या महासागरातील सिद्धयोगसाधनाची अनर्घ्य रत्ने व मौक्तिके हाताला लागणे शक्य नाही. ज्ञानेश्वरीच्या शब्दार्थांतरात शिरण्याची ही नवी दृष्टी मला कशी लाभली व त्यामुळे सिद्धयोगःचे दर्शन कसे घडले ते आपण पुढे पाहाणारच आहोत.

वरील सर्व विवेचनावरून ह. भ. प. शं. वा. दांडेकर व श्री. शं. दा. पेंडसे यांच्या टीकेचा निरास होऊन त्याबरोबरच गीता ही विविध योगांनी व निष्ठांनी भरलेली खिचडी नसून किंवा श्री. ग. श्री. खैर आदि विद्वान संशोधकांनी म्हटल्याप्रमाणे "गीता ही सलग, सुसंगत व एकहाती नसलीच पाहिजे," इत्यादि नानाविध

आपेक्षेपांचा निरास झाल्याशिवाय राहाणार नाही. येथे एक गोष्ट अत्यंत नम्रपणे व अभिमानाने सांगावीशी वाटते की महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांच्या शक्तिपातयोगकृपाप्रसादाने ज्ञानेश्वरीकडे पाहाण्याची ही दृष्टी मला लाभली. एरवी हे जन्मजन्मांतरी शक्य नव्हते. त्यांनी शक्तिपातयोगाची दीक्षा देऊन जशी कृतार्थता प्राप्त करून दिली तशी वेळोवेळी चर्चा करून ज्ञानेश्वरीतील शक्तिपाताचे किंवा सिद्धयोगाचे रहस्यही समजावून सांगितले. नाहीतर अंतरंग साधनाचे भाग्य न लाभता प्राकृत हेंदरेपणाने व भिगुळवाणेपणाने सिद्धयोगाचा गौरव न जाणता त्याला अप्रसंगु म्हणण्याचा प्रसंग आला असता. परंतु ईश्वराच्या व श्रीज्ञानेश्वर-महाराजांच्या कृपेने सद्गुरुकृपा होऊन हे ज्ञानेश्वरीचे रहस्य उलगडले व त्यातील खऱ्या ठेव्याचा पत्ता लागला. असे जोपर्यंत घडत नाही तोपर्यंत सामरस्य, एकरसता, सुसंगतता, सलगपणा व अवैविध्य या गोष्टी शेकडोशे मैल दूर राहून सम्यक्दृष्टी-पासून साधक अगर विद्वान संशोधक वंचित राहातो हे नितांत सत्य आहे. येथे कोणाचेही खंडन करण्याचा हेतू नाही; परंतु इतर मार्गात सुलभ नसणारा व कधीही दृष्टीस न पडणारा सर्वांगसुंदर सामंजस्याचा जो आदर्श सिद्धयोगात किंवा नाथमार्गात दृष्टीस पडतो त्याच्याकडे दुर्लक्ष करून टीकाकार, विद्वान किंवा संशोधक अभिनिवेशाला वळी पडल्याने खरा अर्थ जाणू शकत नाहीत याची खंत वाटते. परंतु त्याला इलाज नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीच अत्यंत मुलायम अशा काव्यमय भाषेचा अवलंब करून सिद्धयोगाची रहस्ये अवगुंठित केली आहेत. याचे खरे कारण म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना" या पुस्तकाच्या पहिल्या खंडातील "ईश्वरमें विश्वास" या लेखात लिहिल्याप्रमाणे हेच असावे की, "साधन जगत् का जो निगूढ रहस्य है, जिसकी प्राप्ति के लिये दीर्घकाल तक सत्यस्वरूप सद्गुरुकी कृपा का अवलंबन कर तीव्र पुरुषार्थ का प्रयोग करना पडता है, तार्किक प्रकृति-विशिष्ट तथा साधनहीन पुरुषके सामने उस रहस्य की आलोचना करना उचित नहीं है। वहाँ इस आलोचना का यथार्थ फल उत्पन्न नहीं हो सकता।" याहीपेक्षा "एन्हवीं द्वैताची वारी। सारूनि ऐक्याच्या परिवरीं। भोगिजे तें अवधारीं। रहस्य हें॥ १८.१३४५॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जीवाची किंवा शक्तीची मूलाधारापासून सहस्रारापर्यंतची द्वैताची वारी किंवा येरझार संपून जीवशिवाचे किंवा शिवशक्तीचे ऐक्याच्या परिवारात म्हणजे सहस्रारात जे मीलन घडते तीच खरी गुह्य गोष्ट आहे व तिचीच खरी अनुभूती घ्यावयाची आहे, असे म्हणून जे रहस्य प्रकट केले आहे त्याचे खरे मूळ उपरोक्त ओवीच्या मागील दोन ओव्यात दडलेले आहे. ते प्रकट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

> कूर्मीचिया पिलियां। दिठी पान्हा ये धनंजया।
> का आकाश वाहे बापिया। घरींचें पाणी॥ १८.१३४३॥

**जो व्यवहारु जेथ न घडे । तयाचें फळचि तेथ जोडें ।**
**काय दैवें न सांपडें । सानुकूळें ? ।। १३४४ ।।**

कासवी आपल्या पिलांना नुसत्या दृष्टीनेच पान्हा पाजून वाढविते व आकाशातील पाणी पाहून चातक पक्षी संतुष्ट होतो. या दोन्ही ठिकाणी प्रत्यक्ष व्यवहार घडत नाही; परंतु कासवीची पिले वाढतात व चातकाची तहान भागते. अशा प्रकारे दैव अनुकूल असेल तर सद्‌गुरू भेटून शक्तिपातदीक्षेने जीव कृतार्थ होतो. कुलवर्णव तंत्रामध्ये दृग्दीक्षेचे वर्णन करताना हाच दृष्टांत वापरून असे म्हटले आहे की–

**यथा कूर्मः स्वतनयान् ध्यानमात्रेण पोषयेत् ।**
**वेधदीक्षोपदेशश्च मानसः स्यात् तथाविधः ।। १४.३७ ।।**

कासवी जशी स्मरणाने आपल्या अपत्यांना वाढविते व त्यांचे पोषण करते त्याप्रमाणे सद्‌गुरू नुसत्या मानसिक स्मरणाने शिष्याची आत्मशक्ती जागृत करून त्याचे अध्यात्मिक जीवन संपन्न करतात. यालाच वेधदीक्षा म्हणतात. येथे प्रत्यक्ष व्यवहार न घडताही शक्तिपातदीक्षेच्या फळामुळे शिष्य कृतार्थ होत असल्याचे स्पष्ट केले आहे. हेच खरे द्वैताची वारी दूर सारण्याचे व एक्याच्या घरात जाऊन राहाण्याचे रहस्य आहे पण हे रहस्य "हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पारुखे । तो जीवचि परि तुके । महेशेंसीं ।। १०.९ ।।" हे झाल्याशिवाय कालत्रयीही अवगत होणे शक्य नाही असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आवर्जून सांगितले आहे. आचार्य अभिनवगुप्तांनी या बाबतीत असे म्हटले आहे की–

**एष यागविधिः कोऽपि कस्यापि हृदि वर्तते ।**
**यस्य प्रसीदेच्चिचक्रं द्रागपश्चिमजन्मनः ।।**

ज्यांचा हा शेवटचा जन्म आहे व ज्यांच्यावर चित्‌शक्ती कुंडलिनी सुप्रसन्न आहे अशा एकमात्र विरळचा महात्म्यांच्या हृदयातच सिद्धयोगाच्या किंवा शक्तिपातयोगाच्या रहस्यमय यज्ञाचे स्वरूप प्रतिफलित होते. सामान्य व साधारण लोकांसाठी ही गोष्ट बुद्धिगम्य नाही हेच खरे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ऐसें हळुवारपण जरी येईल । तरीच हें उपेगा जाईल ।। ६.२६ ।। " असे म्हणून उपरोक्त अभिप्रायच स्पष्टपणे प्रकट केला आहे. मनाला किंवा चित्ताला सूक्ष्मपणा आल्याशिवाय ते सुषुम्नेत प्रविष्ट होत नाही व तत्त्वप्राप्ती दूर राहाते हे पुढे स्पष्ट केले आहे. अशा रीतीने माझ्या सद्‌गुरुनाथमहाराजांच्या चरणकृपेनेच ज्ञानेश्वरी हा ग्रंथ सिद्धयोगशास्त्राचे एक महान दर्शन आहे हे सिद्ध होईल.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून आता हे स्पष्ट होईल की श्रीकृष्णांनी गीतेच्या चवथ्या अध्यायात लुप्तप्राय झालेल्या योगाची जी परंपरा "आद्य हे गा विस्तारिली" म्हणून सांगितली आहे ती दुसऱ्या तिसऱ्या कोणत्याही योगाची नसून

सिद्धयोगाचीच आहे. श्रीकृष्ण हे " सकळ सिद्धांचा रावो ।।३.२७३।। ९.५३५।। " " सिद्धांचा राणा ।।१३.९७२ ।। " व " जो आपण सर्वज्ञनाथु ।।३.३७५।।" आहेत असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेले आहे ते आपण केव्हाही विसरून चालणार नाही. अशा या सिद्धांच्या राजाने विवस्वान सूर्याला जो योग सांगितला तो सिद्धयोगाशिवाय दुसरा कोणता असणे शक्य आहे ? प्रेमाचा पुतळा, भक्तीचा जिव्हाळा व मैत्रीचा चित्कळा असलेल्या धनुर्धर अर्जुनाला आपल्या जीवीचे निजगुज सांगताना स्वत:सिद्ध श्रीकृष्णांच्या मुखातून जो उपदेश निसृत झाला तो सिद्धच असणार हे त्रिकालाबाधित सत्य आहे. वस्तूचे सामर्थ्य जसे वस्तूशी समव्याप्त असते तसेच सिद्धाचा उपदेश हा सिद्धाशी समव्याप्त असल्याने तो सिद्ध असाच असतो म्हणून त्यांनी प्रवर्तित केलेल्या या उपदेशाला सिद्धमार्ग किंवा सिद्धयोग असे म्हणतात.

त्याचप्रमाणें श्रीआदिनाथ शंकर, जगन्माता पार्वती, श्रीमत्स्येंद्रनाथ, श्रीगोरक्षनाथ, श्रीगहिनीनाथ व श्रीनिवृत्तिनाथ या महासिद्धांकडून हा योग गुरुक्रमाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांना प्राप्त झालेला असल्यामुळे व या योगामुळे साधकांचे सिद्ध होत असल्यामुळेही याला सिद्धयोग असे नामाभिधान प्राप्त झाले आहे. ज्ञानेश्वरीच्या शेवटी जी गुरुपरंपरा दिली आहे तिच्यातच सिद्धयोग नामाभिधानाचे हे तत्त्व अनुस्यूत असून पुढील ओव्यांतून ते अधिक प्रस्फुटित झाल्याचे दृष्टीस पडते. या दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**ना आदिगुरु शंकरा-। लागोनि शिष्यपरंपरा ।**
**बोधाचा हा संसरा । जाला जो आमुते ।।१८.१७५९।।**
**एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें ।**
**तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ।।१७६४।।**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीने आत्मा हा नित्यसिद्ध किंवा अनादिसिद्ध असल्यामुळे हा मार्ग किंवा हा योग सिद्ध असा योग आहे " आणि आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्य सिद्ध आपैसा । अनादिपणें ।।१३.११०७।। तेंचि तो आपण । स्वयें जाहला निर्वाण । जें साधकांचें कारण । सिद्ध तत्त्व ।।६.४७८।।" या ओव्यांतून ब्रह्म ही सिद्ध वस्तू आहे हे स्पष्ट केले आहे. सिद्ध वस्तूला जाणावयास सिद्ध असेच साधन हवे; कारण त्याशिवाय " साधकांचे सिद्ध जाहाले ।।६.१५६।।" ही स्थिती साधकाला कधीही प्राप्त होणार नाही. वस्तूच्या पात्रतेप्रमाणे वस्तुप्राप्तीचे साधन हवे हे सिद्धच आहे. यामुळे सिद्ध तत्त्वाच्या प्राप्तीसाठीं सिद्धयोगच हवा. अन्य साधनाचे येथे काम चालणार नाही. यामुळेच आचार्य अभिनव गुप्तांनी तंत्रालोक या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथात असा महान सिद्धांत मांडला आहे की " ब्रह्म हे कल्पनातीत असे सिद्धतत्त्व आहे. त्याची प्राप्ती कल्पनांतर्गत साधनांनी होणे अशक्य

आहे वास्तविक पाहाता कल्पनेच्या कक्षेपलीकडे कोणतेही साधन नाही. परंतु सिद्धयोगात गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत झाली की कल्पनातीत शक्ती जागृत होते. ती जागृत शक्ती स्वतः ज्या क्रिया करविते त्याची कल्पना कोणताही साधक करू शकत नाही."

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून श्रीमद्‌भगवद्‌गीतेत भगवंतांनी व तिचा भावार्थ प्रकट करणाऱ्या ज्ञानेश्वरीत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अशी ही सिद्धयोगाची परंपरा मुळापासून चालत आली आहे" हे कसे सिद्ध केले आहे ते स्पष्ट होते. सिद्धयोगाच्या या अनादित्वातच तो वैदिक मार्ग असल्याचे रहस्य दडलेले आहे हे स्पष्ट आहे.

### वैदिक मार्गः–

सिद्धयोग हा पूर्णपणे वैदिक मार्ग असून सिद्धयोगांतर्गत योगसाधनपद्धतीही संपूर्णपणे औपनिषदीयच आहे. शक्तिपात, शक्ती, कुंडलिनी, वेधदीक्षा इत्यादि शब्द ऐकले की हे काही तरी तांत्रिक कंत्राट आहे व ते त्याज्य आहे अशीच सर्वसाधारण माणसाची समजूत झालेली आहे. परंतु हठयोग व तंत्रयोग यापेक्षा सिद्धयोग ही सर्वस्वी भिन्न अशी साधनपद्धती असून ती गुरुकृपेने प्राप्त होणारी सोपी अशी योगसाधना आहे हे लोकांच्या ध्यानात येत नाही. श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी " इति श्रीमद्‌भगवद्‌गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे" असा निर्देश केलेला असल्यामुळे गीता ही भगवान् श्रीकृष्णांनी सांगितलेल्या ब्रह्मविद्येपैकी योगशास्त्रावरील उपनिषदच आहे हे सिद्ध होते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसी सरोवर । सविजे जें ॥१८.१८०८॥" असेच श्रीमद्‌भगवद्‌गीतेबद्दल म्हटले आहे. शिवाय "सर्वोपानिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः । पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥" असे गीता माहात्म्यात स्पष्ट म्हटलेले असल्यामुळे उपनिषद्‌रूपी गायींपासून पार्थरूपी जीवासाठी गोपालनंदनांनी दोहून केलेले गीतारूपी अमृत म्हणजे दुसरे तिसरे काही नसून योगशास्त्र आहे. मुळात सर्व उपनिषदे ही जीवाचे जीवपण जाऊन तो ब्रह्मरूप व्हावा म्हणून योगसाधन सांगण्यासाठी प्रवृत्त झाली आहेत. त्यामुळे भगवंतांनी गीतेच्या रूपाने योगशास्त्र, योगमार्ग किंवा योगसाधन कथन केले आहे. त्यामुळे गीता हे वेदांचे मथून काढलेले सार झाले आहे व त्यातील साधनमार्ग हा पूर्णपणे वैदिक किंवा औपनिषदीय असा झाला आहे. त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेला पंथराज किंवा सिद्धयोगमार्ग हाही पूर्णपणे वैदिक व औपनिषदीय मार्ग आहे हे सिद्ध होते. सूतसंहितेत सूतांनी सिद्धयोगास किंवा शक्तिपातयोगास "वैदिकी विद्या" असे स्वच्छ म्हटले आहे.

**तस्मात् संवत्सरं शिष्यं परीक्ष्याकृत्रिमं पुनः ।**
**प्रदद्याद् वैदिकीं विद्यां गुर्वविद्याभिवृद्धये ॥३५.१७॥**

एक वर्षभर शिष्याची योग्य प्रकाराने परीक्षा करून व तो निष्कपट किंवा निर्मलचित्त असल्याची खात्री करून विद्येच्या प्रसारासाठी गुरूने ही वैदिक विद्या त्याला द्यावी. अशी ही वैदिक विद्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांना गुरुपरंपरेने मिळाली व तीच त्यांनी गीतेचा भावार्थ लिहिताना ज्ञानेश्वरीच्या रूपाने प्रकट केली आहे. ज्ञानेश्वरी म्हणजे ज्ञानाची ईश्वरी अशी अनादि आत्मसत्ता किंवा चितिशक्ती कुंडलिनी असल्याने सिद्धयोगाच्या अर्थात् ज्ञानेश्वरीच्या सर्व विवेचनात सरस्वती नदीप्रमाणे हिचा प्रवाह गुप्तपणे सतत अनुस्यूत असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते.

**चित्शक्तीचा आधार:-**

सिद्धयोग साधनमार्गाचा एकमात्र आधार चित्शक्ती कुंडलिनी हाच आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तिचा मोठ्या गौरवाने पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे.

**ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा ।**
**जया विश्वबीचाचिया कोंभा । साउली केली ॥६.२७२॥**

कुंडलिनी शक्ती ही जगदंबा आहे. ती चैतन्यचक्रवर्तीची म्हणजे अनादिसिद्ध वस्तूची, परब्रह्माची किंवा शिवाची शोभा आहे. तीच जीवाला सावली करते. अशा या अपूर्व शक्तीचे साहाय्य जीवाला ब्रह्मरूप होताना कसे होते याचे वस्तुसामर्थ्यशक्ती, आत्मप्रभा, आरभरंभा, स्फूर्ती, ज्ञानेश्वरी इत्यादि विविध नावांनी श्रीज्ञानेश्वर महाराजांनी जे वर्णन केले आहे ते पुढे आपण "ज्ञानेश्वरीतील कुंडलिनी शक्तीचे स्वरूप" या सातव्या प्रकरणात पाहाणारच आहोत. येथे आपण चित्शक्ती कुंडलिनी हीच सिद्धयोग साधनाचा एकमात्र आधार का व कसा आहे याचा थोडक्यात विचार करणार आहोत. ज्या गुरुपरंपरेने हे शक्तितत्त्व श्रीज्ञानेश्वरमहाराजांपर्यंत प्रवाहित होत आले आहे त्या नाथसंप्रदायात परतत्त्वाला परब्रह्म, अव्यक्त, अनाम व अनादिनिधान असे म्हटले आहे. त्याची एक स्वरूपभूत शक्ती म्हणजे निजशक्ती आहे. ती त्याच्याशी सर्वप्रकारे अभिन्न व एकरूप असते. साधारणपणे इच्छेच्या रूपाने या शक्तीचे ज्ञान होते. स्वातंत्र्य हे या शक्तीचे स्वरूप आहे. मनुष्य देहामध्ये ही कुंडलिनी कुलशक्ती सुप्तरूपाने मूलाधारात विद्यमान असते. हीच अकुलस्वरूप आदिभूत कुलशक्ती असून-कुंडलिनी या नावाने शास्त्रात प्रसिद्ध आहे. या चित्शक्तीचा विचार किंवा विषय हे साधनजगतातील एक गंभीर रहस्य आहे. श्रीतात्पर्याचार्यदेव यांनी "संविदेव हि भगवती वस्तूपगमे नः शरणम् ।" असे म्हणून संवित्शक्ती भगवती कुंडलिनीच ब्रह्मवस्तूची प्राप्ती करून देणारी मार्गदर्शिका आहे असे सांगितले आहे. मूलाधारात निद्रिस्त असलेली ही शक्ती जोपर्यंत जागृत होत नाही तोपर्यंत जीवाची ऊर्ध्वगती होत नाही. कुंडलिनी जागृत झाल्यावर चित्शक्ती

स्वतःच आपल्या संविद्रूपात आत्मप्रकाश करते. ही जागृतशक्ती अत्यंत प्रदीप्त अशा अग्नीसारखी असते. तिलाच चिदग्नी असे म्हणतात. सद्गुरुकृपेने, ईश्वरकृपेने कालपरिपाकाच्या प्रभावाने, तीव्रतम सवेगाने किंवा अन्य दुसऱ्याही कारणांनी शक्तीचे जागरण होऊ शकते. परंतु " मुख्यतस्तु महत्कृपयैव ।। ३८ ।। ' असे महर्षी नारदांनी भक्तिसूत्रात सांगितल्याप्रमाणे संतमहात्म्यांच्या म्हणजे सद्गुरूच्या कृपाप्रसादानेच ती मुख्यतः जागृत होते. पूर्णत्वाच्या प्राप्तीसाठी या परमश्रेष्ठ अशा अपरिच्छिन्न शक्तीचा नित्यसंयोग होणे नितांत आवश्यक आहे. सत्, चित्, आनंद, इच्छा, ज्ञान, क्रिया इत्यादि विविध रूपाने या शक्तीचे रूप दृष्टीस पडत असले तरी मूळ शक्ती चित्शक्ती आधारशक्ती किंवा आत्मशक्ती कुंडलिनी आहे हे लक्षात ठेविले पाहिजे

म. म. गोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना" खंड एक मधील "कुंडलिनी तत्त्व" या लेखात कुंडलिनी संबंधाचे नाथपंथीयांचे विचार मांडताना असे म्हटले आहे की, " मत्स्येंद्रनाथ, गोरक्षनाथ प्रभृति हठयोग-प्रवर्तक नाथ–आचार्यगण एवं आगम–विद्गण कहते हैं कि मूलाधारमें प्रसुप्ता कुंडलिनी शक्तीको उद्‌बुद्ध किये विना कर्म, ज्ञान किंवा भक्ति आदि अन्य कोई भी साधन मुक्ति वा अनर्थ-निवृत्ति के उपाय-रूपमें परिणत नहीं हो सकता । जो कर्म, ज्ञान वा भक्ति कुंडलिनी-शक्तिके जागरणमें सहायता करें, वे ही यथार्थ में कर्म, ज्ञान और भक्ति तथा कर्मयोग, ज्ञानयोग और भक्तियोग पदके वाच्य हैं । उनसे भिन्न कर्मादि व्यर्थ प्रयास के कारण होते हैं । वे किसी समय में सिद्धिदायक नहीं होते । कुंडलिनी की निद्रा भंग हुए विना आत्मा अथवा परमात्मामें स्थिति नहीं हो सकती । " हठयोग प्रदीपिकेच्या तिसऱ्या अध्यायात या दृष्टीनेच असे म्हटले आहे की–

**सशैलवनधात्रीणां यथाधारोऽहिनायकः ।**
**सर्वेषां योगतंत्राणां तथाधारो हि कुंडली ।। ३.१ ।।**
**सुप्ता गुरुप्रसादेन यदा जागर्ति कुंडली ।**
**तदा सर्वाणि पद्मानि भिद्यंते ग्रंथयोऽपि च ।। २ ।।**

ज्याप्रमाणे सर्व पर्वतवनासहित जी भूमी आहे तिचा आधार सर्पांचा नायक शेष आहे त्याचप्रमाणे सर्व योगप्रणालींचा आधार व आश्रय कुंडलिनी शक्ती आहे. (कारण साधकाने कोणत्याही पद्धतीने योगसाधना केली तरी कुंडलिनी जागृत झाल्याशिवाय त्याला सिद्धी म्हणजे आत्मस्वरूपाची प्राप्ती होत नाही.) ज्यावेळी गुरुप्रसादाने म्हणजे शक्तिपाताने निद्रिस्त कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा सर्व चक्रांचा व ग्रंथींचा भेद होतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही " तैशी ते कुंडलिनी । मोटकी औट वळणी । अधोमुख सर्पिणी । निदेली असे ।। ६.२२३ ।। " अशी निद्रिस्त शक्ती " तेथ नक्षत्र जैसें उलंडलें । कीं सूर्याचें आसन मोडलें । तेजाचें बीज विरूढलें । अंकुरेशीं

॥ ६.२२६ ॥ " अशा पद्धतीने सद्‌गुरुकृपेने जेव्हा जागृत होते तेव्हा सामरस्याच्या राउळात महासुखाची दिवाळी साधकाला कशी प्राप्त होते याचे अलौकिक वर्णन केले आहे. हाच सर्व विवेचनाचा आधार आहे. उपरोक्त वर्णन फक्त सहाव्या अध्यायातील पंथराजाच्या मार्गापुरते मर्यादित नसून सर्व ज्ञानेश्वरीत या शक्तीच्या विलासाचे कर्म, भक्ती, ज्ञान, विभूती, क्षेत्रक्षेत्रज्ञ, पुरुषोत्तम इत्यादि नानाविध नावांच्या द्वारा अठराही अध्यायात हे वर्णन कसे केले आहे त्याचा पडताळा घ्यावयाचा आहे.

सारांश, सिद्धयोगाच्या सर्वांगीण दर्शनाने ज्ञानेश्वरी पुलकित व रोमांचित झालेली असून महासिद्धयोगी भगवान् श्रीकृष्ण यांनी परंपराप्राप्त असे जे साधन विवस्वान सूर्याला सांगितले, तेच आपल्याला प्राप्त झालेल्या नाथसंप्रदायीन गुरुपरंपरेचे रहस्य असल्याने; तोच गीतेचा भावार्थ म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगून या साधनाशिवाय जीवाचे अज्ञान दूर करण्याचा दुसरा मार्ग नसल्याने " नान्यः पंथा विद्यतेऽयनाय ।" असे वेदांप्रमाणे म्हणून " तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ॥६.३५॥" या एकमात्र कृपेच्या जोरावर तेजाची शिदोरी अर्पण करणाऱ्या परमेश्वरी कुंडलिनीच्या आधाराने सारगर्भित झालेले साधन ज्ञानेश्वरीत कथन करून स्वानंदभोगाच्या शेलक्या वाट्याची प्राप्ती सर्वसामान्य जीवाला करून दिली आहे. श्री. श्रीकृष्ण प्रेम यांनी " The yoga of the Bhagavat Gita " या पुस्तकाच्या प्रस्तावनेत गीता हा अंतर्योगाच्या साधनाचे रहस्य सांगणारा ग्रंथ आहे ही श्रीज्ञानेश्वरमहाराजांचीच दृष्टी स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, " The point of view from which this book has been written is that the Gita is a textbook of yoga, a guide to the treading of the Path. By yoga is here meant not any special system called by that name, not Jnana yoga, nor karma yoga, hor Bhakti yoga, nor the eightfold yoga of Patanjali, but just the Path by which man unities his finite self with Infinite being. It is inner Path of which all these separate yogas are so many one-sided aspects. It is not so much a syntheis of these separate teachings as the prior and undivided whole of which they represent partial formulations." गीता हे योगशास्त्राचे अधिकृत पुस्तक व योगव्यापारमार्गाचे अचूक दर्शन आहे. या दृष्टीनेच हे पुस्तक लिहिले आहे. ज्या मार्गात संकुचित जीव अनंत आत्मतत्त्वाशी एकरूप होतो असा मार्ग म्हणजेच योग असून ज्ञान, कर्म, भक्ती किंवा पतंजलींचा अष्टांगयोग यांपैकी कोणतीही पद्धत येथे अभिप्रेत धरलेली नाही. येथे अभिप्रेत असलेला योग हा आतील मार्ग असून वर वर्णन केलेले सर्व योग ही त्याचीच अंगे किंवा भाग आहेत. या संपूर्ण व अविभाज्य

योगाचे ही अंगे जरी दर्शन घडवीत असली तरी त्यांच्या भिन्न-भिन्न शिकवणुकीचे हे संकलन आहे असे मात्र नाही."

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून ज्या चिकित्सक भूमिकेचा किंवा धारणांचा अवलंब करून हा प्रबंध लिहिला आहे त्याचे स्वरूप स्पष्ट होईल. श्रीमद्‌भगवद्‌-गीतेकडे व ज्ञानेश्वरीकडे पाहाण्याची ही भूमिका लक्षात आली म्हणजे ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाची एक नवी दृष्टी आत्मसात झाल्याशिवाय राहाणार नाही.

**एक नवी दृष्टी :–**

सिद्धयोगाच्या दृष्टिकोनातून ज्ञानेश्वरीचे दर्शन घेणे ही अगदी नवी दृष्टी आहे. सिद्धयोग ही ब्रह्मविद्या, पराविद्या किंवा अध्यात्मविद्या आहे ही विद्या वाणीचा लेखणीचा व पुस्तकांचा विषय होत नाही किंवा प्रवचने, व्याख्याने व लेख यांच्या द्वाराही ही प्राप्त होऊ शकत नाही. सिद्धयोग हा गुरुकृपेने प्राप्त होणारा व आत्मा-नुभवाने जाणण्याचा विषय आहे. सिद्धयोगाची ही विद्या महासिद्धांच्या, ऋषींच्या, महात्म्यांच्या परमकृपेने अनन्तकालापासून अनवच्छिन्नपणे प्रकट अथवा गुप्त रूपाने प्रवाहित झालेली दिसून येते. ज्यावेळी सद्‌गुरू आत्मबलाने ही विद्या शिष्याच्या ठिकाणी संचारित करतात त्यावेळी शिष्य कृतार्थ होतो म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज मी जी सिद्धयोगाची कथा सांगत आहे ती " तियापरी श्रोतां। अनुभवावी हे कथा ।। १.५७ ।। " व " मग संवादु श्रीहरिपार्थाचा । भोगावा बापा ।। ३.२७६ ।। " असे सांगत आहेत "करूनि सद्‌गुरुस्मरण । अनुभविजे ।। ६.१८६ ।।," " ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे ।। ६.१९० ।। ", " या सोपिया योगिस्थिती । उकलु देखिला गा बहुतीं ।। ६.३८७ ।। " या ओव्यांमधून व पुढे अनेक ठिकाणी सिद्धयोग ही अनुभूतीची गोष्ट आहे हे त्यांनी स्पष्ट केले आहे. अनुभूतीचा हा पाया पक्का असल्याशिवाय " आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे । मन सुखेंसी सुरवाडिजे । सुखाचि माजीं ।। ६.२५ ।। " या न्यायाने शब्दरूपी टरफले टाकून अनुभूतीच्या गाभ्याला भिडण्याची व सुखस्वरूप होण्याची पात्रता येणार नाही. सिद्धयोग व अनुभूती अशा प्रकारे एकरूप आहेत. या दृष्टीने ज्ञानेश्वरी-कडे पाहावयाचे आहे.

श्रीसंत नामदेवमहाराजांनी ज्ञानेश्वरीकडे या दृष्टीनेच पाहिले आहे. आपल्या अभंगात ते म्हणतात–

**ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणे निगमवल्ली प्रकट केली ।। १ ।।**
**गीतालंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंद लहरी प्रगट केली ।। २ ।।**
**अध्यात्मविद्येचे दाविलेसे रूप । चैतन्याचा दीप उजळला ।। ३ ।।**
**छपन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवी नाव उभारिली ।। ४ ।।**
**श्रवणाचे मिसे बैसावे येउनी । साम्राज्यभुवनी सुखी नांदे ।। ५ ।।**

**नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी ।। ६ ।।**

या अभंगामध्ये अनुभूती हे ज्ञानेश्वरीचे खरे रहस्य आहे हे श्रीसंतनामदेव-महाराजांनी अगदी निःसंदिग्धपणे स्पष्ट केले आहे. एरवी वाचणे हे क्रियापद नामदेवांना माहीत नव्हते असे नाही; परंतु " एक तरी ओवी अनुभवावी ।। " असे लिहून ज्ञानेश्वरीकडे अनुभूतीच्या दृष्टिकोनातून पाहाण्याची दृष्टी त्यांनी आपल्याला दिली आहे. अनुभूतीशिवाय सर्व व्यर्थ आहे याची जाणीव नामदेवांना अगदी पक्की होती नामदेवांना अनुभूती प्राप्त व्हावी म्हणूनच पांडुरंगाने स्वतः त्यांना सिद्ध-संप्रदायी व सिद्धयोगी अशा विसोबा खेचरांकडे पाठविले होते. " श्रवणी सांगितली मात मस्तकीं ठेवियेला हात । पदपिंडा विवर्जित केला नामा ।।१।।" या प्रकारे श्रीसंतविसोवा खेचरांकडून आपल्याला सिद्धयोगाची शक्तिपातदीक्षा कशी प्राप्त झाली व आपल्याला अनुभूती कशी प्राप्त झाली हे नामदेवांनी स्पष्ट लिहिले आहे. विसोबा खेचरांनी प्रथम नामदेवांना कानामध्ये ' तत्त्वमसि ' म्हणजे ' ते ब्रह्म तूच आहेस ' या महावाक्याचा उपदेश केला व या तत्त्वाची अनुभूती यावी म्हणून त्यांनी नामदेवांच्या डोक्यावर हात ठेवून त्यांच्या ठिकाणी शक्तिसंक्रमण करून त्यांना शक्तिपातयोगदीक्षा दिली. पद म्हणजे ब्रह्म व पिंड म्हणजे जीवस्वरूप कुंडलिनी शक्ती यांचे सामरस्य घडवून आणून त्यांना स्वस्वरूपाची प्राप्ती करून दिली.

आपल्यावर आपल्या सद्गुरुमहाराजांनी जी शक्तिसंक्रमणपूर्वक अपूर्व कृपा केली त्याचे माहात्म्य नामदेवांच्या लेखी फार मोठे होते. त्यामुळे उपरोक्त दीक्षा-विधीचे वर्णन केल्यावर ते पुढे म्हणतात –

**खेचरू विसा प्रेमाचा पिसा ।**
**तेणे नामा कैसा उपदेशिला ।। २ ।।**
**सांगितलें गुज दाखविले निज ।**
**आतां पाल्हाळीं तुज काय चाड ।। ३ ।।**
**खेचरू म्हणे मज ज्ञानराज हेचि गुरू ।**
**तेणे अगोचर केला नामा ।। ४ ।।**

सद्गुरुनाथ विसोबा खेचर यांनी सिद्धयोगानुग्रहाने नामदेवांना विदेहस्थिती प्राप्त करून देऊन कैवल्य पदावर बसविले. नामदेवांना दीक्षा देत असताना विसोबा खेचर प्रेमानें अगदी धुंद झाले होते. या अद्भुत अवस्थेतच शक्तीचे संक्रमण नामदेवांच्या ठिकाणी घडून आले. सिद्ध किंवा नाथपरंपरेने प्राप्त झालेल्या ज्ञानाचे दान अशा प्रकारे विसोबांनी केले. त्यांनी नामदेवांना प्रथम गुह्यज्ञान मौखिक पद्धतीने कथन केले व नंतर शक्तिपातयोगाच्या प्रभावाने निजस्वरूपाचा प्रत्ययही आणून दिला. इतकेच नव्हे तर सिद्धयोग हे सर्वंकष साधन असल्यामुळे तुला अन्य साधनांची खटपट करण्याची यापुढे काहीही आवश्यकता नाही व अंतर्योगाचे हे एकमात्र

साधनच तुला पुरेसे आहे असे आग्रहाने सांगितले.

ज्या साधनाने आपल्याला कृतार्थता व धन्यता प्राप्त झाली त्या साधनाचे माहात्म्य नामदेवांनी वर उधृत केलेल्या अभंगात सांगितले आहे. निगमवल्ली, ब्रह्मानंद लहरी, चैतन्याचा दीप व भवार्णवी नाव या शब्दातून त्यांनी सिद्धयोग-साधनाचा व पर्यायाने हे साधन सांगणाऱ्या ज्ञानेश्वरीचा महिमा वर्णन केला आहे. त्याचप्रमाणे स्वस्वरूपाच्या साम्राज्यभुवनात सुखाची नांदणूक जीवाला प्राप्त होते ही या साधनाची अनुभूतियुक्त फलप्राप्तीही नामदेवांनी सांगितली आहे.

नामदेवांनी ज्ञानेश्वरीचे खरे साररूप रहस्य ज्या शब्दातून उपरोक्त पद्धतीने व्यक्त केले आहे त्यातील वल्ली, लहरी, दीप व नाव हे शब्द साधन निदर्शक असून त्यामध्येच अनुभूतीचे सार साठविलेले हे लक्षात घेतले पाहिजे; कारण खुद्द श्रीज्ञानेश्वर-महाराजांनीच ज्ञानेश्वरीत हे शब्द त्या अर्थाने वापरले आहेत. "गीतावल्लीचे ठाणें ॥६.१२॥," "अमृतलहरी ॥१२.२६॥," ठाणदिवी ॥६.२३॥ व "तेथ नावेतें त्यजावें ॥३.४७॥" अशा रीतीने या व अन्य खूप ठिकाणी हे शब्द ज्ञानेश्वरीत आले आहेत. योग्यांची माउली असलेल्या ज्ञानराजांनी अशी कोणती वल्ली ज्ञानेश्वरीत सांगितली आहे की जी साधकाच्या हातामध्ये वेदांचे सार देणार आहे? त्यांनी अशी कोणती अद्भुत लहरी ज्ञानेश्वरीत कथन केली आहे की त्यामुळे ज्ञानेश्वरी ही गीतेचा एक महान अलंकार ठरली? असा कोणता दीप श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत उजळून दाखविला आहे की ज्याच्या प्रकाशात साधक अध्यात्मविद्येचे खरे रूप पाहू शकेल? आणि अशी कोणती नाव ज्ञानेश्वरीत उभारली आहे म्हणून ज्ञानराजांनी सांगितले की ज्यात बसून साधक सहजासहजी पैलतीराला जाऊ शकेल?

उपरोक्त दृष्टिकोनातून ज्ञानेश्वरीकडे पाहावयाचे आहे. ही दृष्टी अगदी नवी आहे. ज्ञानेश्वरीच्या काही भागातच ही दृष्टी व हा विषय आहे असे नसून सर्व ज्ञानेश्वरी अंगोपांगाने या विषयानेच सजलीधजली आहे. जीवाचे जीवपण जाऊन तो शिवरूप किंवा ब्रह्मरूप व्हावा व तशी प्रत्यक्षानुभूती त्याला प्राप्त व्हावी म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जी अपूर्व वल्ली, अद्भुत लहरी, असामान्य दीप व अलौकिक नाव यांचे वर्णन केले आहे. त्या सर्वांचे स्वरूप सिद्धयोगसाधन हेच आहे. ज्यावेळी आपण ही दृष्टी आत्मसात करू त्या वेळी ज्ञानेश्वरीचे खरे रहस्य हाती आल्याचा अनुभव येऊन मन निरतिशय आनंदाने भरून जाईल.

ईश्वराचा साक्षात्कार, ब्रह्मप्राप्ती किंवा आत्मानंदप्राप्ती हे साधकाचे ध्येय आहे. ब्रह्म किंवा आनंद हे वस्तुतः जीवाचे स्वरूपच आहे; परंतु त्याचे विस्मरण झाल्याने त्याला जीवपण प्राप्त झालेले असते. देह तादात्म्य व तज्जन्य वासना हे आपल्या प्रत्ययाला येणारे जीवपणाचे स्वरूप आहे. ही अवस्था मूळ स्वरूपाच्या

म्हणजे ब्रह्मत्वाच्या विस्मरणाचेच स्वरूप आहे. आपल्या स्वरूपाचे आत्यंतिक विस्मरण हे मरणासारखेच असते. ही स्थिती नाहीशी होऊन अमृतत्त्वाची प्राप्ती व्हावी म्हणून साधन करावयाचे असते. देहतादात्म्य व वासना या दृढ, मध्यम व विरळ असतात. यातूनच राग, द्वेष, कर्म, कामक्रोधादि विकार व सुखदुःख जन्माला येतात. यालाच जीवभाव म्हणतात. जीवभावातून दूर होऊन ईश्वरत्व मिळविणे हे साधकाचे ध्येय आहे नुसता जीवभाव टाकण्याचा प्रयत्न करून ईश्वरत्व किंवा शिवभाव लाभत नाही. यासाठी गुरुकृपा व्हावी लागते. या कृपेलाच शास्त्रीय परिभाषेत शक्तिपात असे म्हणतात. शिष्यावर जेव्हा सद्‌गुरू कृपा करतात तेव्हा ते शक्तिपातच करीत असतात. अशा प्रकारे जेव्हा शक्तिपात होतो तेव्हा सद्‌गुरूंच्या ठिकाणी असलेल्या दिव्यशक्तीचे शिष्याच्या ठिकाणी संक्रमण होऊन मलपाशादि आवरणांनी झाकलेली शिष्याची अनादि आत्मसत्ता जागृत होऊन ती स्वत: साधकाला आपल्या मूळ स्वरूपाकडे घेऊन जाण्यास उद्युक्त होते. श्रीगुरुकृपेने असे अंतरंग साधन साधकाला मिळाले म्हणजे मग त्याला स्वतःला दुसरा कोणताही पौरुष प्रयत्न करावा लागत नाही. या दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "जैसें निद्रेचें सुख न मोडे। आणि मार्गु तरी बहुसाल सांडे। तैसें सोहोकासन सांगडें। सोहपें होय ।।५.८।।" असे म्हटले आहे. श्रीसद्‌गुरूंची भेट झाली की त्यांच्या कृपेने सिद्ध-योगाच्या अंतरंग म्हणजे आतून आपोआप चालणाऱ्या व पालखीसारख्या वाहनात बसून जाता यावे इतक्या सोप्या साधनाची दीक्षा मिळते. त्यामुळे ब्रह्मप्राप्तीचा मार्ग सुलभ होतो. हे कसे घडते याचे श्रीमदाद्यशंकराचार्यांच्याबद्दल जे वर्णन उपलब्ध आहे त्यावरून स्पष्ट होते. या दृष्टीनेच श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्राच्या प्रारंभी असे म्हटले आहे की—

**चित्रं वटतरोर्मूले वृद्धाः शिष्या गुरुर्युवा ।**
**गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु छिन्नसंशयाः ।।३।।**

खरोखर काय आश्चर्य आहे ! वटवृक्षाच्या खाली वृद्ध वृद्ध शिष्य बसले आहेत व त्यांचे गुरू तरुण आहेत. गुरूचे व्याख्यान मौन आहे व शिष्यांचे संशय छिन्न झाले आहेत.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं "हें असोतु या बोलांचीं ताटें भलीं। वरी कैवल्यरसें वोगरिलीं। ही प्रतिपत्ति मियां केली। निष्कामासी ।।६.२२।।" असे म्हणून कैवल्य-रस निष्काम साधकांसाठी उपलब्ध करून दिला असला व "तेणें कारणें मी बोलेन। बोलीं अरूपाचें रूप दावीन। अतींद्रिय परी भोगवीन। इद्रियांकरवीं।।६.३६।।' अशी प्रतिज्ञा करून परतत्त्वाला स्पर्श करणारे सिद्धयोगाचे दर्शन ज्ञानेश्वरीच्या रूपाने घडविले असले तरी "परि अमृतातेंही पैजां जिंके। ऐसीं अक्षरे रसिकें। मेळवीन ।।६.१४।।" या पद्धतीने हे दर्शन घडविले असल्यामुळे "परी लोकु वाक्‌चातुर्यें।

होईल सुखिया ॥१८.१७५०॥" एवढेच घडून "आह्मच बोलाची वालीफ फेडिजे। आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे। मग सुखेंसी सुखाडिजे। सुखाचि माजीं ॥६.२५॥" अशा प्रकारचे भाग्य प्राप्त होण्याचे दूर राहिले. हे भाग्य प्राप्त व्हावे असे वाटत असेल तर "बोलाची वालीफ फेडली" पाहिजे. ही प्रक्रिया दोन प्रकाराने घडते. पहिली प्रक्रिया शब्दाचा स्थूल, सूक्ष्म व पर अर्थ शास्त्रदृष्टया काय होतो हे लक्षात घेतले की "जैसें विंब तरी बचकें एवढें। परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें। शब्दाची व्याप्ति तेणें पाडें। अनुभवावी ॥४.२१४॥" व "तैसें शब्दाचें व्यापकपण। देखिजे असाधारण। पाहातयां भावज्ञा फावती गुण। चिंतामणीचे ॥६.२१॥" असे कसे घडते हे बुद्धीने, मनाने किंवा विचाराने कळते. दुसरी प्रक्रिया अनुभूतीची आहे.

प्रथम पहिल्या प्रक्रियेचा विचार करू. वैदिक मंत्रांचे अर्थ करण्याच्यावेळी ऋषी, छंद, देवता व पदपाठावर लक्ष ठेवणे ज्याप्रमाणे आवश्यक मानलेले आहे त्याप्रमाणेच प्रत्येक वैदिक मंत्राचे अधिभूत, अध्यात्म व अधिदैवत या भेदाने तीन–तीन अर्थ होतात या नियमाकडेही लक्ष ठेवणे आवश्यक मानलेले आहे. वैदिक ब्राह्मण ग्रंथांमध्ये याचे पावला–पावलावर दर्शन होते. काही ठिकाणी तर सहा-सात अर्थ केलेले पाहावयास मिळतात. यातील अधिभूत अर्थामध्ये मंत्रातील पद व आधिभौतिक स्थूल पदार्थाचे प्रतिपादन असते. अध्यात्म अर्थामध्ये शरीरातील इंद्रिये, मन, बुद्धी व आत्मा इत्यादींचे प्रतिपादन येते व अधिदैवत अर्थामध्ये ब्रह्मांडातील सूक्ष्मातिसूक्ष्म शक्तींचे प्रतिपादन केलेले असते. उपरोक्त तीन अर्थांनाच स्थूल, सूक्ष्म व पर अशी नावे आहेत.

या स्थूल, सूक्ष्म व पर अर्थांचे पृथक्–पृथक् लक्षणही आगमशास्त्रात उपलब्ध आहे. "अहिर्बुध्न्य संहितेवर" आधारित असलेल्या "रहस्यत्रयसार" या ग्रथात श्रीवेदान्तदेशिक यांनी तिन्ही अर्थांची लक्षणे सांगितली आहेत. स्थूल अर्थाचे लक्षण करताना ते म्हणतात, "अत्र स्थूलोऽर्थो नाम–व्याकरणानुबद्धयास्फुटव्युत्पत्त्या प्रतीयमानोऽर्थः।" जो व्याकरणाशी संबधित असून व्युत्पत्तीने व्यक्त होतो त्या अर्थाला स्थूल अर्थ म्हणतात. याचाच अर्थ असा की क्रियाकारक संसर्गाने व्यक्त होणारा अर्थ हा स्थूल अर्थ होय. सूक्ष्म अर्थाचे लक्षण करताना ते म्हणतात, "सूक्ष्मो नाम–वर्ण साम्यादीनवलम्ब्य प्रवर्तमानस्य निरुक्तस्य बलेन प्रतीयमानोऽर्थः।" वर्णाची समता इत्यादींचे अवलंबन करून निरुक्तबलाने जो अर्थ प्रतीत होतो त्याला सूक्ष्म अर्थ म्हणतात. म्हणजे शब्दाच्या स्वरूपाच्या आलोचनाने जो अर्थ प्रतीत होतो तो सूक्ष्म अर्थ होय. पर अर्थाचे लक्षण करताना ते म्हणतात, "परो नाम-रहस्यशास्त्रप्रतिपादिताक्षरनिघण्टुप्रक्रियया प्रतीयमानोऽर्थः।" रहस्य अर्थात् तंत्रशास्त्रात प्रतिपादित केलेल्या अक्षरांच्या अर्थांमुळे प्रतीत होणाऱ्या अर्थाला पर अर्थ म्हणतात. वर्णकोश, बीजकोश व मंत्रकोश इत्यादि ग्रंथांमध्ये प्रत्येक अक्षराच्या

अनेक अर्थांचे प्रतिपादन आहे.

ज्ञानेश्वरी ही वेदांइतकीच पवित्र अशी मंत्रसंहिता आहे. यामुळेच नुसत्या वेदपठणामुळे जसे फळ मिळते तसे ज्ञानेश्वरी पठणामुळेही मिळते. खुद्द श्रीज्ञानेश्वर-महाराजांनीच "तैसा प्रबंधु हा श्रवणीं। लागतखेंवो समाधि आणी। ऐकिलियाही वाखाणी। काय व्यसन न लवी ? ।।१८.१७४५।। पाठ करिता व्याजें। पांडित्यें येती वेषजे। तैं अमृतातें नेणिजे। फात्रलिया ।।१७४६।।" असे म्हणून ज्ञानेश्वरी ऐकल्याचे व ज्ञानेश्वरीचा पाठ केल्याने हे फळ मिळते म्हणून सांगितले आहे. ज्ञानेश्वरी ही वेदांइतकीच पवित्र व श्रेष्ठ अशी मंत्रसंहिता असण्याचे दुसरे कारण असे की वेद हे ईश्वराची निःश्वसिते असून ते ऋषींना जसे ध्यानात दिसले तसे त्यांनी सांगितले. त्यांनी स्वतः वेदाची रचना केली नाही तर जे पाहिले ते त्यांच्या मुखातून बाहेर पडले. असे ध्यानात पाहून ज्याचे वर्णन करतात त्याला दर्शन, शास्त्र किंवा वेद म्हणतात. याबाबत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपली स्पष्ट धारणा पुढीलप्रमाणे व्यक्त केली आहे. ते म्हणतात—

**काय धड्यावरी सारस्वतें। पढों सिकिजे ।।९.८।।**
**कां जैं दिठिवा तुमचा वरुषे। तैं सकळार्थ सिद्धि मती पिके।**
**एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके। जरी उदास तुम्ही ।।२५।।**
**म्हणोनि साधकां तूं माउली। पिके सारस्वत तुझिया पाउलीं।**
**या कारणें मी साउली। न संडीं तुझी ।।१२.८।।**
**अहो सद्‌गुरुचिये कृपादृष्टी। तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी।**
**तो सकळ विद्यांचिये सृष्टीं। धात्रा होय ।।९।।**

सारस्वताचा स्रोत धडे शिकून कधीही उद्‌भूत होत नसतो. त्यासाठी सद्‌गुरु-माउलीच्या दृष्टीचा कृपाप्रसाद व्हावा लागतो. या कृपाप्रसादालाच शक्तिपात म्हणतात. यामुळे कुंडलिनी शक्तीचा सुप्त उन्मेष जागृत होऊन इडा पिंगलेची गती थांबून मन व प्राण सुषुम्नेत प्रविष्ट झाल्यावर नित्यसिद्ध अशा सारस्वतस्रोताची अनुभूती येते. अशा प्रकारे सद्‌गुरूकडून शंभूचा प्रसाद, कृपा किंवा शक्तिपात झाल्यावरोबर "अनधीतस्य शास्त्रस्य स्वत एव प्रकाशनम्।" (सूतसंहिता--ब्रह्म गीता ४.१२३) याप्रमाणे न शिकलेली व वाचलेली शास्त्रे स्वतःच प्रकट होतात म्हणून सूतसंहितेत व्यासांनी व "य इमां वैखरीं शक्तिं योगी स्वात्मनि पश्यति। स वाक्‌सिद्धिमवाप्नोति सरस्वत्याः प्रसादतः ।।३.१०।। वेदशास्त्रपुराणानां स्वयं कर्ता भविष्यति ।।३.११।।" म्हणजे शक्तिपातामुळे शक्ती जागृत झाली की ती सरस्वती वेगवेगळ्या पदवाक्यादि रूपात प्रकट होते. योगी या वैखरी वाणीला शक्तीला स्वतःमध्ये म्हणजे आत्मरूपात पाहातो. त्याला सरस्वतीच्या कृपाप्रसादाने

वाक्‌सिद्धी प्राप्त होते व तो वेदशास्त्रपुराणांचा कर्ता होतो म्हणून योगशिखोपनिषदात ऋषींनी सांगितले आहे ते अक्षरशः खरे आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे आपल्या बाबतीतच कसे घडले हे मोठ्या खुबीने सांगताना असे म्हटले आहे की—

मःटकी देहाकृति उमटे। आणि निजज्ञानाची पाहांट फुटे।
सूर्यापुढें प्रगटे। प्रकाशु जैसा ॥६.४५२॥
तैसी दशेची बाट न पाहतां। वयसेचिया गांवा न येतां।
बाळपणींच सर्वज्ञता। वरी तयातें ॥४५३॥
तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें। मनचि सारस्वतें दुभे।
मग सकळ शास्त्रें स्वयंभें। निघती मुखें ॥४५४॥

अशी ही ज्ञानेश्वरीकडे पाहाण्याची दृष्टी व धारणा असल्यामुळे जसे वेद मंत्रांचे वर सांगितल्याप्रमाणे तीन अर्थ होतात त्याप्रमाणे ज्ञानेश्वरीच्या ओव्यांचे व त्यातील शब्दांचेही अर्थ होतात. या प्रबंधात सर्वत्र रहस्य शास्त्रात प्रतिपादित केलेल्या पर अर्थाचा स्वीकार करूनच ज्ञानेश्वरीकडे पाहिले आहे. स्थूल व सूक्ष्म अर्थाचा विचार येथे अभिप्रेत नाही, हे उघड आहे. ज्यांना त्या अर्थानि ज्ञानेश्वरीकडे पाहावयाचे असेल त्यांनी ज्ञानेश्वरीच्या वाक्‌चातुर्यानि सुखी होण्यासाठी खुशाल पाहावे; मात्र पर दृष्टी स्वीकारली म्हणजे सिद्धप्रज्ञेच्या जोरावर कथन केलेल्या सिद्धयोग दर्शनाची प्रतिकृती असलेल्या ज्ञानेश्वरीच्या दर्शनाचा हा आगळा सोहळा या प्रबंधाच्या रूपाने साजरा होत असल्याचे पाहून कोणाचाही त्याबद्दल मतभेद होणार नाही असे वाटते व "बहुतांच्या आम्ही न मिळो मतासी। कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥१॥ विचार करिता वाया जाय काळ। लटिकेचि मूळ फजितीचे ॥२॥ तुका म्हणे तुम्ही करा घटपटा। नका जाऊ वाटा आमुचिया ॥३॥" असे श्रीसंत तुकाराममहाराजांच्याप्रमाणे म्हणण्याची आणि काल अनंत आहे व पृथ्वी विपुल आहे; मला माझ्या जातीचा कोणीतरी भेटेल असे महाकवी भवभूतिप्रमाणे उद्‌गार काढण्याची पाळी येणार नाही असा विश्वास वाटतो.

ज्ञानेश्वरीकडे पर अर्थाने पाहाण्याची दृष्टी मला माझे परमपूज्य सद्‌गुरू महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांच्याकडून शास्त्र व अनुभूती या दोन्हा दृष्टीने प्राप्त झाली. श्री. प. प. श्रीगगाधरतीर्थस्वामीमहाराज, श्री. प. प. श्रीनारायणतीर्थ-स्वामीमहाराज. श्री. प. प श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराज व श्री. प प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज या सर्व बंगाली सत्पुरुषांच्या कृपाप्रसादाने शक्तिपात-योगाची किंवा सिद्धयोगाची अनादिसिद्ध धारा अक्षुण्ण रीतीने क्रमशः प्रवाहित होत महायोगी श्रीसद्‌गुरू गुळवणीमहाराजांपर्यंत आली व त्यांनी या प्रवाहात आसे-तुहिमाचल अनेक साधकांना मुक्तपणे स्नान करू देऊन कृतार्थ केले. सद्‌गुरुचरणांच्या

अपार कृपेमुळे मलाही या गंगेत स्नान करण्याचे भाग्य लाभले. अशा प्रकारे अनुभूतीच्या प्राप्तीबरोबर अठरा वर्षे त्यांचा सहवास घडल्यामुळे, १९५९ साली एम्. ए. ला ज्ञानेश्वरीचा ६ वा अध्याय परीक्षेला होता; तेव्हापासून ज्ञानेश्वरीच्या पर अर्थाच्या प्राप्तीचा लाभही वेळोवेळी झालेल्या चर्चेतून घडत गेला. स्थूल व सूक्ष्म अर्थ टाकून ज्ञानेश्वरीच्या पर अर्थाकडे कसे पाहावे याचे त्यांच्याशी झालेल्या चर्चेचे अल्पसे दिग्दर्शन पुढे केले आहे. त्यावरूनही ही नवी दृष्टी स्पष्ट होईल.

महायोगी सद्‌गुरू श्रीगुळवणीमहाराज मला नेहमी म्हणत असत की, "**ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही**" त्यांचे हे वाक्य ऐकले की मनात विचारांची खूप खळबळ उडे व त्या वाक्यानुरोधाने ज्ञानेश्वरीचे दर्शन आपल्याला घडावे म्हणून तळमळ लागून राही. या तळमळीपोटी मी त्यांना ज्ञानेश्वरीतील काही ओव्यांचे अर्थ विचारले, तेव्हा त्यांनी ज्या दृष्टीने त्या ओव्यांचे स्पष्टीकरण केले, त्यामुळे ज्ञानेश्वरीकडे पाहाण्याची माझी जुनी दृष्टी बदलून मला एक नवी दृष्टी प्राप्त झाली. "पिंडे पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतीचा दंशु । परि दाऊनि गेला उद्देशु । श्रीमहाविष्णु ।।६.२९१।।" या ओवीचा अर्थ विचारताना मी त्यांना म्हटले की, "पिंडाने पिंडाचा म्हणजे शरीराने शरीराचा ग्रास होणे शक्य नाही; कारण जडाने जडाचा ग्रास कधीही होऊ शकणार नाही." माझ्या प्रश्नाला उत्तर देताना ते म्हणाले, "पिण्डं कुडलिनीशक्तिः पदं हंसः प्रकीर्त्तितः । रूपं विदुरिति ज्ञेयं रूपातीतं निरंजनम् ।।" असे गुरुगीतेत व सूतसंहितेत सांगितले आहे. या सूत्रात पिंड म्हणजे कुंडलिनी शक्ती होय असे स्पष्ट म्हटले आहे. या सूत्राचा वापर केल्याशिवाय या ओवीचा अर्थच स्पष्ट होणार नाही. कुंडलिनी शक्ती ही चैतन्यमय असून मूलाधारात ती निद्रिस्त असते. ती जागृत झाली की पिंडाचा म्हणजे पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश या पंचभूतांचा किंवा तत्त्वांचा क्रमशः ग्रास करते व सुषुम्नामार्गाने ऊर्ध्व-गतीने वरवर जात जात शेवटी तिचे शिवाशी मिलन होते. हेच नाथसंप्रदायाचे रहस्य, मर्म किंवा गूढ आहे. "जिये मार्गींचा कापडी । महेशु आझुनी ।।६.१५३।।" या ओवीबद्दल मी श्रीगुरुमहाराजांना विचारले की, "सिद्धयोग मार्गाचे प्रवर्तक शंकरच जर प्रवासी आहेत तर मग इतर साधकांची कथाच विचारावयास नको आणि जर प्रवर्तकच मुक्कामाला पोहोचलेला नाही तर इतर साधक तेथे कसे जाणार?" माझ्या प्रश्नाला उत्तर देताना ते म्हणाले, "तू म्हणतोस तसा व इतरांनी ज्ञानेश्वरीचा अर्थ लिहिताना जो अर्थ केला आहे तसा या ओवीचा अर्थ नाही. हा अगदी स्थूल अर्थ झाला. महेश हे तर केव्हांच मुक्कामाला पोहोचलेले आहेत. त्यांच्या प्रवासाचा प्रश्नच नाही; परंतु साधकांना दीक्षा देऊन त्यांना अंतरंग साधन उपलब्ध करून देऊन आपल्याकडे येण्याच्या मार्गावर आरूढ करण्यासाठी ते सद्‌गुरूच्या रूपाने बाह्य जगात अवतरतात व प्रवास करतात. पण

हा अर्थही सूक्ष्म असा झाला. या ओवीचा खरा (पर) अर्थ असा आहे की महेशच जागृतशक्तीच्या रूपाने मूलाधारापासून सहस्त्रारापर्यंत प्रवास करीत असतात. आपण स्वतःच संकुचित होऊन घेतलेल्या शक्तिरूप जीवाचे विभुरूप शिव व्हावे म्हणून ते कापडी म्हणजे प्रवासी आहेत. या अंतरंग सद्‌गुरूबरोबर, अनंत युगीच्या आत्मारावरोबर, आपणा सर्वांना जावयाचे आहे. सहस्त्रदलकमलापर्यंतचा प्रवास करावयाचा आहे. कोणी कोणत्याही मार्गाचा असला व कसलीही उपासना करीत असला तरी शेवटी या सिद्धयोगाच्या मार्गानेच त्याला यावे लागणार आहे. सर्वांचे गंतव्य स्थान एकच आहे. त्याला नाव निराळे दिले म्हणजे मार्ग निराळा होत नाही व स्थान बदलत नाही. षट्‌चक्रनिरूपणात असे सांगितले आहे की–

"शिवस्थानं शैवा परमपुरुषं वैष्णवगणः ।
लपंतीति प्रायो हरिहरपदं केचिदपरे ॥
पदं देव्या देवीचरणयुगलानन्दरसिका ।
मुनीन्द्रा अप्यन्ये प्रकृतिपुरुषस्थानममलम् ॥४४॥

या स्थानालाच शैवगण शिवस्थान, वैष्णवगण परमपुरुष किंवा हरिस्थान, दुसरे काही जण हरिहरपद व देवीच्या चरणकमलांचे भक्तगण देवीपद अगर शक्तिस्थान म्हणतात. कोणी कोणी मुनिश्रेष्ठ या निर्मलस्थानाला प्रकृतिपुरुषस्थान असेही नाव देतात. "हें असो दिठी जयावरी झळके। कीं हा पद्‌मकरू माथा पारुखे। तो जीवचि परि तुके। महेशेंसीं ॥१०.९॥" या ओवीचा अर्थ विचारल्यावर ते म्हणाले, "या ओवीच्या अर्थासाठी शिवसंहितेच्या वायवीय संहितेतील शांभवी दीक्षेचे व योगवासिष्ठाच्या निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धातील शक्तिसंचार करणाऱ्या गुरूचे वर्णन करणाऱ्या सूत्रात्मक श्लोकांचा आधार अत्यावश्यक आहे." "गुरोरालोकमात्रेण स्पर्शात्संभाषणादपि। सद्यः संज्ञा भवेज्जंतोर्दीक्षा सा शांभवी मता ॥" या श्लोकात गुरूची दृष्टी, स्पर्श किंवा वाक्याद्वारे तत्काल ज्ञानाचा अनुभव साधकाला येतो त्याला शांभवी दीक्षा असे म्हणतात, हे स्पष्ट केले आहे. शिष्यावर गुरूची दृष्टी झळकल्याने शिष्य शिवरूप कसा होतो हे "गुरोरालोकमात्रेण सद्यः संज्ञा भवेत्" या उपरोक्त सूत्रानेच स्पष्ट होते. त्याचप्रमाणे "दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके। जनयेद्यः समावेशं शांभवं स हि देशिकः ॥" या योगवासिष्ठातील सूत्राचाही उपरोक्त ओवीच्या अर्थासाठी आधार घ्यावा लागेल. जो दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने किंवा कृपेने शिष्याच्या देहात शक्तिसंक्रमण करून शांभवी तत्त्वाचा ज्ञानाचा किंवा शक्तीचा समावेश करून त्याची आत्मसत्ता जागृत करून त्याला मंगलमय अनुभूती देऊन शिवरूप करतो तोच सद्‌गुरू होय गुरूचा पद्मकर शिष्याच्या मस्तकावर स्थिर झाल्यावर तो शिवरूप होतो हा अर्थ "स्पर्शनात् जनयेद्यः समावेशं शांभवं" या सूत्रानेच अधिक स्पष्ट होतो. शिवाय "ब्रह्मप्रपंच-

संयुक्तः शिवेनाधिष्ठतः शिवः । पाशच्छेदकरः क्षेमी शिवहस्तः प्रकीर्तितः ॥ या सूत्रानेच पद्मकरू या शब्दाचा अर्थलाभ अधिक होतो.

सारांश, अशी ही ज्ञानेश्वरीकडे पाहाण्याची नवी दृष्टी आहे. ही दृष्टी सर्वांनी स्वीकारलीच पाहिजे असा आग्रह नाही; कारण आधाराच्या धारणेनुसार शब्दार्थाचा भेद होऊन लक्ष्यार्थापर्यंत दृष्टी पोहोचत असल्याने व सद्‌गुरुकृपेशिवाय तशी प्रतीती येत नसल्याने परम सौभाग्य उदित झाल्याशिवाय कोणत्याही साधकाची सिद्धयोग-साधनाच्या रूपाने उपस्थित होणाऱ्या खऱ्या अंतरंग यज्ञाकडे किंवा परम इप्सित-रूपाने असणाऱ्या महान् लक्ष्याकडे नुसती दृष्टीही जात नाही; मग त्याचे अनुष्ठान करणे ही खूप दूरची गोष्ट आहे. यामुळेच भट्ट श्रीवीरवामनक याने असे म्हटले आहे की–

**यत्रैन्धनं द्वैतवनं मृत्युरेव महापशुः ।**

**अलौकिकेन यज्ञेन तेन नित्यं यजामहे ॥**

द्वैतवन हे ज्याच्यात इंधन आहे व मृत्यू हा ज्यात महापशू आहे असा अलौकिक यज्ञ साधकाने नित्य केला पाहिजे. मात्र जोपर्यंत कुंडलिनी जागृत होत नाही तोपर्यंत हे घडून येऊ शकत नाही. दि. २९।१०।१९७४ च्या मुंबईच्या नवशक्ती दैनिकाने "योगो भवति दुःखहा" या शीर्षकाखाली लिहिलेल्या अग्रलेखात, दिल्लीत शरीरविज्ञानविपयक शास्त्रज्ञांच्या सव्विसाव्या आंतरराष्ट्रीय परिषदेच्या निमित्ताने जे संशोधनात्मक निबंध वाचले गेले त्यात कुंडलिनी शक्तीकडे शास्त्रज्ञ नव्या दृष्टीने पाहाण्याचा आग्रह कसा धरीत आहेत हे सांगताना "त्यांचे आक्रंदन" या उपशीर्षकाखाली असे म्हटले आहे की, "दिल्लीच्या आंतरराष्ट्रीय परिषदेत दोन भारतीय शास्त्रज्ञांनी योगासंबंधी जो निबंध वाचला त्यात व्यक्त केलेली मते चिंतनीय आहेत. डॉ. एस्. के. अंचंडा आणि डॉ. एन्. एच्. केसवानी अशी त्या शास्त्रज्ञांची नावे आहेत. हे शास्त्रज्ञ म्हणतात, "कुंडलिनी शक्ती या विषयाला बुद्धिवादी आणि शास्त्रीय आधार देऊन तो नव्याने मांडणे आवश्यक आहे. रशिया, अमेरिका आणि अन्य युरोपीय देश या विषयांच्या संशोधनावर पैसा आणि प्रयत्न फार मोठ्या प्रमाणावर खर्च करीत आहेत. गेल्या काही वर्षात त्यांनी या विषयावर संशोधनात्मक शंभर निबंध प्रसिद्ध केले आहेत. भारतात मात्र याबाबतीत काहीच प्रगती दिसत नाही. याचे कारण असे प्रयत्नही कोण करीत नाही आणि त्या प्रयत्नांना आर्थिक पाठबळही लाभत नाही. या विषयात संशोधनासाठी सरकारने खास संस्था निर्माण केल्या असल्या तरीही भारतीय शास्त्रज्ञांनी अलीकडच्या काळात नाव घेण्यासारखे काहीही संशोधन केलेले नाही. आपण भारतीय जर या विषयाच्या संशोधनात मागे पडलो आणि इतर राष्ट्रेच हे संशोधन करीत पुढे गेली तर ती आपल्या राष्ट्रीय

शास्त्रविषयक धोरणाला लाजिरवाणी अशी गोष्ट ठरेल. कुंडलिनी शक्तीचे ज्ञान हे भारताचे वैशिष्टच आहे आणि आपल्या सांस्कृतिक वारशातील ही एक वैभवशाली अशी गोष्ट आहे. पण भारतीय शास्त्रज्ञांचे पूर्वग्रह आणि परंपरावादी लोकांनी पसरविलेल्या आख्यायिका आणि वढाया यांच्या कर्दमात या विद्येचे ज्ञान नष्ट होऊ पाहात आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचा विकास कसा होत गेला हे पाहिले तर भारतीय जनतेच्या अस्मितेचा योग हा अमर असा भाग आहे असे दिसून येईल. म्हणून योगाचे संशोधन हा आपल्या राष्ट्रीय ध्येयाचा घटक झाला पाहिजे." दोन प्रमुख भारतीय शास्त्रज्ञांनी हे विचार मांडलेले असल्यामुळे त्यांना विशेष महत्त्व आहे." अशा प्रकारची ही नवी दृष्टी आत्मसात झाली म्हणजे ज्ञानेश्वरी हा सिद्धयोग-साधनेचा ग्रंथ कसा आहे याची प्रतीती येणे सुलभ झाल्याशिवाय राहाणार नाही.

## ज्ञानेश्वरी : सिद्धयोग साधनग्रंथ:—

ज्ञानेश्वरी हा सिद्धयोगाचा साधनग्रंथ असून त्यात सिद्धयोग किंवा पंथराज या एकमेवाद्वितीय अशा ब्रह्मप्राप्तीच्या साधनमार्गाचे वर्णन केले आहे. केवळ पुस्तके वाचल्याने, निष्काम कर्मयोग किंवा ज्ञानयोग जाणून घेतल्याने, भक्तियोग समजल्याने व विचार करणे आवश्यक आहे असे मानल्याने भगवत्प्राप्ती होत नाही. पोहण्याची पुस्तके वाचून कोणीही पोहू शकत नाही. नुसती समयसारिणी पाहून कोणीही मनुष्य रस्ता पार करून मुक्कामाला पोहोचत नाही. पोहण्यासाठी माणसाला पाण्यात उतरावे लागते व मुक्कामाला पोहचण्यासाठी चालावे लागते अगर वाहनात बसून जावे लागते. अगदी याचप्रमाणे अध्यात्ममार्गात उन्नतीसाठी साधन करावे लागते. यासाठीच साधनाचा इतका महिमा आहे. वेद हे सर्व ईश्वरप्राप्तीचे साधनग्रंथच आहेत. उपनिषदे हे वेदांचे सार असल्याने त्यात तर सर्वत्र साधनचर्चाच दृष्टीस पडते. गीता हे उपनिषदांचे सार असल्याने त्यात निखळ साधनदृष्टीच राबविलेली स्पष्ट दिसते. कल्याण मासिकाच्या साधनांकात पृ. ५७४ वर आलेल्या "गीताकी साधना" या लेखात डॉ. एस. के. मैत्र म्हणतात, "श्रीमद्‌भगवद्‌गीता वस्तुत: साधनाका ग्रंथ है। यह न ज्ञानपरक है न कर्मपरक और न भक्तिपरक ही है, यद्यपि इन सबका विचार आत्मसाक्षात्कारकी दृष्टिसे इसमें अवश्य हुआ है। भगवद्‌गीता वास्तवमें योगशास्त्र है जिसके द्वारा मनुष्य अपने परिच्छिन्न व्यष्टिस्वरूपको अनंत अपरिच्छिन्न परमात्माके साथ युक्त कर देता है।" त्याहीपेक्षा गीता हा नुसता योगाचा ग्रंथ नसून सिद्धयोगाचा ग्रंथ आहे हे कल्याण मासिकाच्या योगांक विशेषांकाच्या पृ. १४० वर आलेल्या श्रीमतिलाल राय यांच्या "गीताका योग" या लेखात स्पष्ट झाले आहे. ते म्हणतात, "इसी मार्गसे महात्मागण यात्रा करते हैं। श्रीकृष्णचंद्रने इसी श्रेयपथका अर्जुनको उपदेश दिया। तब फिर बंधन – सृष्टिके उपायस्वरूप कर्म की प्रशंसा क्यों की ? अर्जुनके मनमें

प्राचीन संस्कार दृढ होनेके कारण यह प्रश्न उनके लिए अत्यंत स्वाभाविक था। समूची गीतामें इसी प्रश्नके उत्तर के बहाने श्रीकृष्णने एक सिद्धयोगकी घोषणा की है। यह सिद्धयोगही आत्मसमर्पण है।....हमलोगोंको स्मरण रखना चाहिए कि आर्य योद्धा श्रीकृष्ण एक बहुत बडे वैदान्तिक थे। उन्होंने वेदान्त और उपनिषद के आधारपरही भावी भारतके सामने सनातनधर्मका विराट्स्वरूप खडा किया है। हम आज इस राजमार्गका अनुसरण करके अबाध गतिसे अभीष्ट लक्ष्यकी ओर यात्रा कर सकते हैं। समय थोडा है, इसीलिये हम यदि केवल साधनकी त्रिधाराको धारण करकेही भागवत संयोग प्राप्त करके धन्य हो सकते हैं तब हमें सुदीर्घ तत्त्वोंका विश्लेशण करनेकी क्या आवश्यता है? कर्म, ज्ञान और भक्ति–त्रिमार्ग–योगके द्वारा जो साध्यस्वरूप आत्मसमर्पण योग है, वही श्रीकृष्णकथित गीताके योगके रूपमें प्रचारित है। योगभूमि भारतके जातीय जीवनमें यह महायोग प्रतिष्ठित हो!"

गीतेकडे पाहाण्याची ही पृष्ठभूमी पक्की मनात दृढ झाली म्हणजे मग श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जो दृष्टिकोन गीतेचा भावार्थ लिहिताना ज्ञानेश्वरीत रावविला आहे तो आपल्याला तत्काळ आत्मसात होईल. या दृष्टीने ते म्हणतात.–

म्हणौनि माझ्या ठायीं। जाचावें न लगे कांहीं।
मी लाभें इयें उपायीं। साचचि गा॥ १८. १२२५॥
एक शिष्य एक गुरु। हा रुढला साच व्यवहारु।
तो मत्प्राप्तिप्रकारु। जाणावया॥ १२२६॥
अगा वसुधेच्या पोटीं। निधान सिद्ध किरीटी
वन्ही सिद्ध काष्ठीं। वोहां दूध॥ १२२७॥
परी लाभें तें असतें। तया कीजे उपायातें।
येर सिद्धचि तैसा तेथें। उपायीं मी॥१२२८॥
हा फळहीवरी उपावो। कां पां प्रस्तावीतसे देवो।
हे पुसतां परी अभिप्रावो। येथिचा ऐसा॥ १२२९॥
जे गीतार्थाचें चांगावें। मोक्षोपायपर आघवें।
आन शास्त्रोपाय कीं नव्हे। प्रमाणसिद्ध॥१२३०॥
वारा आभाळाचि फेडी। वांचूनि सूर्याते न घडी।
कां हातु बाबुळी धाडी। तोय न करी॥ १२३१॥
तैसा आत्मदर्शनीं आडळु। असे अविद्येचा जो मळु।
तो शास्त्र नाशी येरु निर्मळु। मी प्रकाशें स्वयें॥ १२३२॥
म्हणौनि आघवींचि शास्त्रें। अविद्याविनाशाचीं पात्रें।
वांचोनि न होतीं स्वतंत्रें। आत्मबोधीं॥ १२३३॥

यावरून हे स्पष्ट होईल की सिद्धयोग हाच सिद्धवस्तूच्या लाभाचा एकमात्र उपाय असून तो गुरुशिष्य संप्रदायाच्या अनादि परंपरेने निश्चित प्राप्त होतो. गीताशास्त्राने सिद्धयोगाचे जसे प्रमाणसिद्ध साधन सांगितले आहे तसे प्रमाणसिद्ध साधन सांगणारे एकही शास्त्र जगात नाही. त्यामुळे दुसरी अनेक शास्त्रे असली व तिच्यामुळे अविद्येचा नाश होत असला तरी ती स्वतःसिद्ध आत्मस्वरूपाचा बोध करून देण्यास सिद्धयोगासारखी स्वतंत्र नाहीत इतका सिद्धयोगाचा महिमा आहे.

"दिव्यामृतधारा" खंड २ व ३ यामध्ये श्री. दादामहाराज आर्वीकर यांनी ज्ञानेश्वरीच्या १२ व्या अध्यायावर जी विस्तृत टीका लिहिली आहे त्यात ४५ व्या ओवीवर टीका करताना ज्ञानेश्वरीत सिद्धयोग किंवा कृपायोगच सांगितला असून त्याला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पंथराज असे म्हटले असून तोच साधनमार्ग ब्रह्मप्राप्तीसाठी त्यांना अभिप्रेत आहे असे त्यांनी अगदी स्पष्टपणे नमूद केले आहे. ते म्हणतात "प्रत्यहारादि आंगी । योगे आंग टेकिले योगी । तो जाला ये मार्गी । दिहाचा चांदु ।। अमृतानुभव ९.२६ ।।" या स्वसंवेद्यरूपाच्या अवस्थेप्रत नेणाऱ्या मार्गावर अष्टांगयोग म्हणजे दिवसा असलेल्या चंद्राप्रमाणे असतो. येथे स्वसंवेद्य मार्ग म्हणण्याचे एकच कारण की पंथराजु जो योग तो याच पदास नेतो. शक्ति-सामरस्य असे परमाद्वैत जो योग सिद्ध करतो, अनुभवास आणून देतो तोच पंथराज. हाच योग सहाव्या, बाराव्या व खरे म्हणजे गीतेत जेथे जेथे योगाचा उल्लेख आहे, तेथे तेथे याच योगचा विचार पाहावयास मिळतो. हा सहजयोग आहे.... ज्ञानेशप्रणीत योग अष्टांग पातंजल योग नव्हे, एवढेच येथे सांगावयाचे आहे. त्यांचा योग कर्मयोग ( हठ–राज–भक्ती ) होय. अर्थात् सर्व योगांचा पंथराज हाच होय.

**ते पद विचारे हातां चढे । ते अष्टांगयोगधारणा नातुडे ।**
**पूर्णबोधाचेनि सुरवाडें । सुख भोगिजे ।।उत्तरगीता १.१२०।।**
**येथें योग अभ्यासणे । कीं धारणा अखंड धरणे ।**
**हे कांहीं न लगे करणे । गुरुकृपें सहजस्थिती ।।उत्तरगीता १.१२२।।**

नाना उपासना जीवांना केवळ संभ्रमात टाकून यथार्थ ज्ञानास झाकीत असतात. अशा प्रकारच्या उपासनांमध्ये जीवाला ब्रह्मपदास नेण्याचे सामर्थ्य नाही. हे सामर्थ्य ज्ञानेशांच्या पंथराजात आहे. हा कृपायोगच आहे. गुरुप्रसादाने हा योगाभ्यास सुरू होतो."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत जेथे जेथे स्वधर्म व सहज कर्माचा किंवा स्वकर्माचा उल्लेख केला आहे तेथे तेथे त्याचा अर्थ सिद्धयोगसाधन असाच आहे; कारण 'सिद्धसिद्धांतपद्धति" या ग्रंथात महायोगी गोरक्षनाथांनी "तत्स्वधर्मइति प्रोक्तो योगमार्गे विशेषतः ।।५.२०।।" विशेषेकरून स्वधर्म म्हणजे योगच होय असे

सूत्र सांगितले आहे. या दृष्टिकोनातून पुढील ओव्या पाहिल्या म्हणजे ज्ञानेश्वरी हा सर्वार्थाने सिद्धयोगाचा ग्रंथ कसा आहे हे निखलास सिद्ध होईल.

**याकारणें किरीटी । स्वधर्माचिये राहाटी ।**
**न विसंबिजे संकटीं । सिद्धमंत्र जैसा ॥१८.९५०॥**
**कां नाव जैसी उदधीं । महारोगीं दिव्यौषधी ।**
**न विसंबिजे तया बुद्धी । स्वकर्म येथ ॥९५१॥**

ज्याप्रमाणे संकटसमयी सिद्धमंत्रास विसरू नये त्याप्रमाणे स्वधर्माचे म्हणजे श्रीगुरूंनी दिलेल्या सिद्धयोगाचे विस्मरण होऊ न देता त्याचे आचरण करावे. किंवा समुद्रातून तरून जाण्यासाठी नावेचा उपयोग होतो व महारोगातून मुक्त होण्यासाठी दिव्यौषधीच उपयोगी ठरते त्याप्रमाणे स्वकर्माचे म्हणजे सिद्धयोगाचे साधन करावे; कारण तो " म्हणौनि करावा स्वधर्मु । जो करिता हिरोनि घे श्रमु । उचित देईल परमु । पुरुषार्थराजु ॥१८ ९४९॥ " असा आहे त्यामुळे परमपुरुषार्थरूप मोक्षाची प्राप्ती साधकाला होते. या " सहज कर्माचे " म्हणजे सिद्धयोगाचे विवेचन करताना " योगवाणी या सिद्धयोगोपदेश " या पुस्तकात श्रीस्वामी शंकरपुरुषोत्तमतीर्थजी-महाराज पहिल्याच प्रकरणात म्हणतात, " ज्या मार्गात कष्ट भोगल्याशिवाय योगाची प्राप्ती होते त्याला सिद्धमार्ग म्हणतात. योगरूप सिद्धिप्राप्तीचा मार्ग सुषुम्ना नाडी हाच आहे. या नाडीत प्रवेश करून प्राणवायू जेंव्हा ब्रह्मरंध्रात स्थिर होतो तेंव्हा साधकाला जीव-ब्रह्माच्या एकतेचे ज्ञान करून देणाऱ्या योगाची प्राप्ती होते. सुरुवातीला गुरुद्वारा शक्तिसंचार झाल्यावरोबर कुंडलिनी शक्ती जागृत होऊन त्यानंतर क्रमाने उन्नती होऊन या योगाची प्राप्ती होते भांडी, तांदूळ, लाकडे, पाणी व अग्नी इत्यादि गोष्टींचा संग्रह करण्याचे कोणतेही परिश्रम न करता दात्याच्या कृपेने त्याच्या घरी शिजविलेले अन्न मिळाले की भूकेची तृप्ती होते त्याप्रमाणे परिश्रम न करताही सर्व योगांची आधाररूप मूलाधारस्थ कुंडलिनी शक्ती जागृत झाली की योगशास्त्रोक्त आसन, मुद्रा व प्राणायामादि कशाचेही अस्वाभाविकपणे साधकाला अनुष्ठान करावे लागत नाही. केवळ गुरुशक्तीच्या प्रभावानेच कुंडलिनी शक्तीचे जागरण होऊन स्वाभाविक रीतीने योगपथाचा लाभ होतो. हेच गीतेमध्ये सांगितलेले " सहज कर्म " आहे.

वायू, पित्त व कफ बिघडल्यामुळे वैद्याकडे जाऊन औषध घेतल्यावर प्रकृतीतील दोष दूर होऊन शरीर निरोगी होते. त्याचप्रमाणे सद्‌गुरुकृपेने शक्ति-संचारद्वारा सिद्धमार्गाची प्राप्ती झाल्यावर एकमात्र गुरूपदिष्ट मंत्राच्या जपाने अगर नुसत्या ध्यानाने स्वभावतःच आपोआप आसन मुद्रा, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा व ध्यान इत्यादि योगांगे अनायास सिद्ध होतात. यासाठी विशेष कष्ट व प्रयत्न करावे लागत नाहीत व गुरूकडून आसन, मुद्रा, प्राणायाम इत्यादि सर्वांचा

स्वतंत्र उपदेश घेण्याची आवश्यकता राहात नाही. या मार्गात साधक क्रमाक्रमाने पुढे सरकत सरकत त्वरित योगसिद्धी प्राप्त करून कृतार्थ व धन्य होतो. या उपायाने अत्यंत स्वाभाविकपणे योगांगादि साधनक्रमाने जीव व ब्रह्माच्या एकतेचे ज्ञान आणि अखंड चैतन्यानुभूतीची प्राप्ती होते. यालाच सिद्धमार्ग किंवा सिद्धयोग म्हणतात."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त पद्धतीने आपोआप होणाऱ्या सिद्धयोगाचेच वर्णन केले आहे. तोच नाथपरंपरेने त्यांना मिळालेला ठेवा आहे. ते म्हणतात–

**अभ्यासुचि आपणयातें करी। हृदयातें अनुभवु वरी।**
**ऐसी रम्यपणाची थोरी। अखंड जेथ॥६.१६६॥**
**विषयांचा विसरु पडे। इंद्रियांची कसमस मोडे।**
**मनाची घडी घडे। हृदयामाजीं॥१८८॥**
**ऐसें ऐक्य हें सहजें। फांवें तंव राहिजे।**
**मग तेणेंचि बोधें बैसिजे। आसनावरी॥१८९॥**
**आतां आंगातें आंग वरी। पवनातें पवनु धरी।**
**ऐसी अनुभवाची उजरी। होंचि लागे॥१९०॥**
**प्रवृत्ति माघौति मोहरे। समाधि ऐलाडी उतरे।**
**आघवें अभ्यासु सरे। बैसतखेंवो॥१९१॥**

असा हा स्वतः होणारा सिद्धयोग म्हणजे स्वप्रयत्नशून्य साधन आहे. अभ्यासानेच आपल्याला साधकाकडून स्वतःला करविणे, सहज ऐक्य प्राप्त होणे, अनुभव आपोआप येणे व समाधी सहजसाध्य होणे हीच या योगाची वैशिष्टचे आहेत. हाच या योगाचा आत्मा आहे. ज्ञानेश्वरीत सारार्थाने, मुख्यार्थाने, भावार्थाने, गौणार्थाने, ध्वन्यर्थाने, लक्ष्यार्थाने व स्पष्टार्थाने एकमात्र हाच म्हणजे सिद्धयोगच सांगितला आहे; म्हणून ज्ञानेश्वरी हा सिद्धयोग साधनाचा ग्रंथ आहे असे निभ्रांतपणे म्हणता येते. या निभ्रांत सिद्धांताच्या प्रतिपादनातच साधकाच्या जीवनाच्या हेतू स्पष्ट होतो; कारण साध्यसाधनाची एकरूपता हा सिद्धयोगाचा विशेष असल्याने ज्ञानेश्वरी हा साधनग्रंथ आहे असे म्हणताना तो सिद्धग्रंथ आहे हे स्पष्टच आहे व यातच "साधकांचे सिद्ध जाहाले ॥६.१५६॥" हे जीवनाचे अंतिम लक्ष्य किंवा हेतू अंतर्निहित झाला आहे.

## जीवनाचा हेतू :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "मग आर्तांचेनि वोरसें। गीतार्थग्रंथनमिसें। वर्षला शांतरसें। तो हा ग्रंथु ॥१८ १७६२॥" असे म्हणून गीतार्थाच्या निमित्ताने जगाच्या रक्षणार्थ व जीवाच्या कल्याणार्थ ज्ञानेश्वरीच्या रूपाने गीतेचा भावार्थ लिहून आपल्याला परंपरेने प्राप्त झालेला जीवनाचा हेतू स्पष्ट केला आहे. श्रीमद्भगवद्गीता हा सिद्धयोगशास्त्राचा एक अलौकिक व महान् ग्रंथ असल्याने

त्यातील रहस्ये सर्वांना सरळपणे उपलब्ध व्हावीत म्हणून त्यांनी ज्ञानेश्वरीच्या रूपाने गीताकाशीचे परमामृत सर्वांना आकंठ प्राशन करण्यासाठी दिले आहे. " म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवकु होईल इयेचा । तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती करी ॥१८.१६६८॥" असे जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात तेव्हा जो सिद्धयोगसाधनेचा कायावाचामनेकरून सेवक होईल त्यास हे सिद्धयोगशास्त्र स्वानंदरूपी साम्राज्याचा चक्रवर्ती राजाच करील ही त्यांची धारणा आहे. अशी प्राप्ती जीवाला व्हावी हे त्यांना स्पष्ट करावयाचे आहे. यातच त्यांचा जीवनाचा हेतू स्पष्ट झाला आहे; कारण जीवनाचा हेतू हे सर्व तत्त्वज्ञानाचे व उपासनेचे सार आहे. या पायावरच सर्व अध्यात्मशास्त्राची व उपासनामार्गाची इमारत उभी असते. मात्र जीवाच्या धारणाभेदानुसार उपासनेचा मार्ग बदलतो.

गीताशास्त्र हे जीवनाचा हेतू सांगणारे व प्राप्त करून देणारे शास्त्र असल्याने श्रीमदाद्यशंकराचार्यांनी गीताभाष्याच्या आरंभीच असे म्हटले आहे की, " तस्यास्य गीताशास्त्रस्य संक्षेपतः प्रयोजनं परं निःश्रेयसं सहेतुकस्य संसारस्यात्यंतोपरमलक्षणम् । तच्च सर्वकर्मसंन्यासपूर्वकात् आत्मज्ञाननिष्ठारूपात् धर्मात् भवति ।" थोडक्यात सांगावयाचे झाल्यास कारणासह संसाराचा नाश होणे हे ज्याचे स्वरूप आहे असे कैवल्य किंवा मोक्ष हे त्या या गीताशास्त्राचे परमप्रयोजन आहे. ते सर्वकर्मसंन्यास-पूर्वक आत्मज्ञाननिष्ठारूप धर्मापासून सिद्ध होते." मोक्ष किंवा कैवल्य हे गीताशास्त्राचे परमप्रयोजन व 'सर्वकर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञाननिष्ठा' हा त्या परमप्रयोजन-सिद्धीचा मार्ग, साधन किंवा उपासना पद्धती होय. या दृष्टीने सर्व गीताभाष्य आचार्यांनी लिहिले आहे. यालाच सांख्यमार्ग किंवा ज्ञानयोग म्हणतात.

" फिटो विवेकाची वाणी । हो कानामनाची जिणी । देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥१३.११६१॥ दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा । रिघो महाबोध सुकाळा–। माजीं विश्व ॥११६२॥" अशा प्रकारे ब्रह्मविद्येची म्हणजे सिद्धयोगाची खाण वाटेल त्यास प्राप्त होऊन परतत्त्व डोळ्यांना दिसावे, सुखाचा सोहोळा व्हावा व महाबोधाच्या सुकाळामध्ये विश्व बुडून जावे असे श्रीज्ञानेश्वर-महाराजांना वाटते. जीवाला निःश्रेय सुखाची, कैवल्याची किंवा मोक्षाची प्राप्ती व्हावी, त्याला परतत्त्व डोळ्याला दिसून तो स्वानंदसाम्राज्याचा चक्रवर्ती राजा व्हावा, त्रिपुटीचा भेदव्यवहार नाहीसा होऊन गुणातीत अवस्था यावी, मनोरूप पट फाटून जावा, महाभूतांची जवनिका फिटावी व सामरस्याच्या राउळात जीवाला महासुखाची दिवाळी प्राप्ती व्हावी हाच जीवनाचा हेतू असून तो सिद्ध-योगाने कसा पूर्ण होतो याचा विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत शब्दभेदाने अनेक वेळा परंपराप्राप्त नाथसंप्रदायाधाराने स्पष्ट केला आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी " जीवनाचा हेतू " स्पष्ट करण्याला अपरंपार

महत्त्व आहे; कारण हा हेतू स्पष्ट झाल्याशिवाय ही "गुरुशिष्याची गोठी ।।३.२६७।।" म्हणजे सिद्धयोगाची कथाच पुरी होणं शक्य नाही. श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात—

तोचि हा आजि आतां । तुजप्रती कुंतीसुता ।
सांगितला आम्हीं तत्त्वतां । भ्रांति न करीं ।।४.२७।।
हे जीवींचें निजगुज । परी केवीं राखों तुज ।
जे पढियेसि तूं मज । म्हणौनियां ।।२८।।
तूं प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा ।
मैत्रियेचि चित्कळा । धनुर्धरा ।।२९।।
तूं अनुसंगाचा ठावो । आता तुज काय वंचू जावों ? ।
जऱ्ही संग्रामारूढ आहों । जाहलों आम्ही ।।३०।।
तरी नावेक हें सहावें । गाजाबज्यही न धरावें ।
परी तुझें अज्ञानत्व हरावें । लागी आधीं ।।३१।।
पाहा पां नवल कैसें चोज । कें उपदेशु केउतें झुंज ।
परी पुढें वालभाचें भोज । नाचत असे ।।६.१२३।।

इतक्या भयानक युद्धाच्या प्रसंगीही "जीवीचे निजगुज" असे सिद्धयोगाचे साधन कथन करून अर्जुनाचे अज्ञानत्व हरण करणे हे आद्यकर्तव्य आहे याची जाणीव श्रीकृष्णांच्या हृदयात तेवत आहे; कारण जीविताचा हा हेतू स्पष्ट झाल्याशिवाय सर्व व्यर्थ आहे असे अर्जुनाने जे उद्गार काढले आहेत त्यावरून स्पष्ट होते. तो म्हणतो—

आम्हां काय उचित । तें पाहतां न स्फुरे एथ ।
जें मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ।।२.५५।।
तिमिराविरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे ।
मग पासींच असता न दिसे । वस्तुजात ।।५६।।
देवा तैसें मज जाहलें । जें मन हें भ्रांती ग्रासिलें ।
आतां काय हित आपुलें । तेंहि नेणें ।।५७।।
तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें । निकें तें आम्हां सांगावें ।
जे सखा सर्वस्व आघवें । आम्हांसि तूं ।।५८।।
हें सकळ कुळ देखोनि । जो शोकु उपनलासे मनीं ।
तो तुझिया वाक्यांवाचुनी । न जाय आणिकें ।।६४।।
एथ पृथ्वीतळ आपु होईल । हे महेंद्रपदही पाविजेल ।
परी मोह हा न फिटेल । मानसींचा ।।६५।।
जैसीं बीजें सर्वथा आहाळलीं । तीं सुक्षेत्रीं जऱ्ही पेरिलीं ।
तरी न विरूढती सिंचिलीं । आवडे तैसीं ।।६३।।

ना तरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें कांहीं नोहे ।
एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ।।६७।।
तैंसे राज्यभोगसमृद्धि । उज्जीवन नोहे जीव बुद्धि ।
एथ जिव्हाळा कृपानिधि । कारुण्य तुझें ।।६८।।

जीवाची गती किंवा त्याचे स्वरूप सांगताना ज्ञानेश्वरीत जागोजागी शब्द-भेदाने व परंपराप्राप्त नाथसंप्रदायाधाराने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्याला अपेक्षित असलेला जीवनाचा हेतू स्पष्ट केला आहे. ते म्हणतात—

पैं व्यामोहाचिये शेजे । बळिया अविद्या निद्रितु होईजे ।
ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूंचा ।।६.६८।।
पाठीं अवसांत ये चेवो । तैं तें अवघेंचि होय वावो ।
ऐसा उपजे नित्य सद्भावो । तोहि आपणपांचि ।।६९।।

मनुष्य भ्रांतीरूप शय्येवर प्रबळ अज्ञानामुळे जेव्हा गाढ झोपलेला असतो त्यावेळी जन्ममरण परंपरेची दुष्ट स्वप्ने तो वारंवार भोगीत असतो. नंतर जेव्हा तो अकस्मात जागा होतो तेव्हा ही जन्ममरणाची सर्वच स्वप्ने व्यर्थ होतात. मग आपणच नित्य, निरंतर, निरंजन असे अमृतस्वरूप आहोत असा सद्भाव त्याला स्वतःला स्वतःच्या ठिकाणीच जाणवू लागतो. परंतु मिथ्या देहाभिमानामुळे जीवाला खरा मार्ग सापडत नाही. देहच मी आहे असे वाटत राहिल्याने जीव स्वतःचा घात करून घेतो.

जीवाच्या स्वस्वरूप विस्मरणामुळे तो भवनदीत गटांगळचा कशा खातो व आपले ध्येय कसे विसरून जातो याचे ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायात वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, " गाईच्या कासेमध्ये अत्यंत पवित्र व गोड असे दूध असते. परंतु कासेच्या त्वचेच्या पडद्याच्या आड दडलेले हे दूध सेवन न करता गोचीड रक्ताचेच सेवन करीत असतो. कमळाचा कांदा व बेडूक एकाच तळयात असले तरी बेडूक कधीही कमलकंदातील परागांचे सेवन करीत नाही; परंतु भ्रमर मात्र परागांचेच सेवन करतो आणि बेडूक चिखलातच लोळतो. दुर्दैवी पुरुषाच्या घरी हजारो मोहरा पुरलेल्या असल्या तरी त्याला त्यांचे नक्की ठिकाण माहीत नसल्यामुळे तो दारिद्र्यात दिवस काढून उपाशी राहातो. अगदी याचप्रमाणे मनुष्याला खऱ्या सुखाचा ठेवा माहीत नसल्यामुळे तो विषयसुखाच्या इच्छेने जन्ममरणपरंपरा भोगीत असतो. वास्तविक सर्व सुखाचा ठेवा असलेला परमात्मा त्याच्या हृदयामध्ये निरंतर वास करीत असतो. परंतु त्याचे या ठेव्याकडे लक्षच जात नाही. अहंममतावृत्ती जीवाच्या ठिकाणी अखंड उठत राहात असल्याने जीव तेथेच तद्रूप होतो. त्यामुळे अंतर्यामी असलेल्या स्वसंवेद्य सुखाला तो आचवतो. ही निद्राच त्याला खऱ्या आनंदापासून वंचित करते."

"आता ब्रह्मज्ञानाची किल्ली। सांगेन ऐक्याची बोली। जयांची कल्पना निमाली। ते प्राप्त पुरुष ॥ स्वात्मसुख ॥४२१॥" असे श्रीसंत एकनाथमहाराजांनी स्वात्मसुख प्रकरणात म्हणून जीवनाचा जो हेतू स्पष्ट केला आहे तो सर्वश्रेष्ठ आहे; कारण कल्पना संपली की साधक आपोआप स्वसंवेद्य आत्मस्वरूपी स्थिर होतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही कल्पना सांडून आत्मरूप आनंदात निमग्न होणे हेच जीविताचे ध्येय आहे हे स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

आमुचा प्रकृतीपैलीकडील भावो। जरी कल्पनेवीण लागसी पाहों।
तरी मजमाजीं भूतें हेंही वावो। जें मी सर्व म्हणौनी ॥९.७१॥
एऱ्हवीं संकल्पाचिये सांजवेळे। नावेक तिमिरेजती बुद्धीचे डोळे।
म्हणौनि अखंडितचि परि झांवळे। भूतभिन्न ऐसें देखे ॥७२॥
तेचि संकल्पाची सांज जें लोपे। तें अखडितचि आहे स्वरूपें।
जैसें शंका जातखेंवो लोपे। सापपण माळेचें ॥७३॥
तैसी इये निर्मळे माझ्या स्वरूपीं। जो भूतभावना आरोपी।
तयासी तयाच्या संकल्पीं। भूताभासु असे ॥७९॥
तेचि कल्पिती प्रकृती पुरे। तरि भूताभासु आधींचि सरे।
मग स्वरूप उरे एकसरें। निखळ माझें ॥८०॥
हें असो आंगी भरलिया भवंडी। जैशा भोंवत दिसतीं अरडीदरडीं।
तैशी आपुलिया कल्पना अखंडीं। गमती भूतें ॥८१॥
तेचि कल्पना सांडूनि पाहीं। तरि मी भूतीं भूतें माझिया ठायीं।
हें स्वप्नींही परि नाहीं। कल्पावयाजोगें ॥ ८२ ॥

अशा प्रकारे कल्पना संपली की जीव, जगत् व ईश्वरादिपर्यंतची सर्व भूतमात्रे लयाला जाऊन एक परमात्मतत्त्वच खाली उरते व तेच आपण आहोत, ही जाणीव होते. मात्र त्यासाठी आपल्याभोवती फिरणे थांबविले पाहिजे. फिरणे थांबले की भोंवंड थांबते व त्यामुळे वस्तू फिरण्याचेही थांबते. हे फिरणे थांबण्यासाठी म्हणजे पर्यायाने कल्पना संपण्यासाठीच साधन करावयाचे.

सारांश आत्म्याची स्वस्वरूपावस्थिती किंवा मोक्षप्राप्ती हा मानवी जीवनाचा स्वाभाविक हेतू आहे किंवा आत्मा हा स्वयंसिद्ध, स्वसंवेद्य व नित्यसिद्ध असल्याने त्याच्या प्राप्तीचा उपाय हाच जीवनाचा अंतिम हेतू ठरतो. अज्ञानाची निवृत्ती व भ्रमाचा निरास होऊन जोपर्यंत ज्ञानप्राप्ती होत नाही तोपर्यंत हा हेतू सिद्ध होत नाही. याकरिता मूळ अज्ञान निवृत्तीसाठीच प्रयत्न करणे आवश्यक ठरते. हे अज्ञान नुसत्या कर्माने, ज्ञानाने किंवा भक्तीनेही दूर होत नाही; कारण या सर्वांची उपायाच्या दृष्टीने श्रेष्ठता असली तरी हे सर्व बुद्धीचे व्यापार आहेत. अज्ञान हे बुद्धीच्या आधीच उत्पन्न झालेले आहे. ते दूर करण्याची पात्रता वरील-

पैकी एकाही मार्गात नाही. त्यामुळे मनुष्याच्या आत्म्याला संकुचित करणारे मूळ अज्ञान नाहीसे झाल्याशिवाय मनुष्य जीवनाच्या सर्वश्रेष्ठ हेतूची व आदर्शाची सिद्धी व प्राप्ती प्रत्यक्षतः होत नाही. आत्म्याने स्वच्छेनेच आत्मसंकोच करून स्वतःला जे जीवरूप प्राप्त करून घेतलेले असते त्यालाच मूळ अज्ञान म्हणतात. इतर कोणतेही उपाय या मूळ अज्ञानाचा विध्वंस, उच्छेद अगर नाश तर करू शकत नाहीत हे तर नितांत सत्य आहे. एवढेच नव्हे तर मूळ अज्ञानाला कोणताही उपाय नुसता स्पर्शसुद्धा करू शकत नाही. मग त्याचा नाश होणे ही गोष्ट तर दूरच राहिली. मात्र भगवंताच्या सद्‌गुरुद्वारा संचारित कृपाशक्तीच्या योगानेच मूळ अज्ञान नाहीसे होते. असा हा जीवितहेतूच्या सिद्धीचा मार्ग आहे. यालाच सिद्धयोग म्हणतात. शक्तिपात होऊन कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय ब्रह्मप्राप्तीच्या महान मार्गाच्या वाटचालीला सुरुवातही होत नाही व ब्रह्मरूपाची प्रचीती घेणे कदापीही शक्य होत नाही. मग परम लक्ष्याची, ब्रह्मज्ञानाची किंवा जीवनहेतूच्या प्राप्तीची गोष्ट फार दूरची आहे. श्रीसंत एकनाथमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे हीच ब्रह्मज्ञानाची किल्ली आहे. आपली निद्रिस्त भगवत्ता जोपर्यंत पूर्णपणे जागृत होत नाही तोपर्यंत कल्पनेचे निमणे नाही, आंगी भरलिया भवंडीमुळे फिरणाऱ्या अरडीदरडी थांबणे नाही, मोह, भ्रांती, व्यामोहादि दूर होणे नाही किंवा काहीच नाही. नुसते जगणे हे जगणेच नव्हे. यासाठी कुंडलिनी शक्ती जागृत होण्याला जीवनहेतूत अग्रस्थान द्यावे लागते; कारण त्याशिवाय ब्रह्मप्राप्तीचे द्वार खुले होत नाही व सुषुम्ना मार्ग मोकळा होऊन वाट सुकर होत नाही. एकदा शक्ती जागृत झाली की साधक निरायम पद्धतीने अर्थात् सिद्धयोग साधनाने "स्वसंवेद्य आत्मस्वरूप" होतो. जीवनाचा हा हेतू स्पष्ट झाला की श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी परंपराप्राप्त सिद्धयोगमार्गाचेच ज्ञानेश्वरीत प्रतिपादन का केले आहे ते स्पष्ट होते.

**सिद्धयोग मार्गच का ?:–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुरुकृपाप्राप्त सिद्धयोग हाच ब्रह्मवस्तू जाणण्याचा एकमात्र उजू मार्ग आहे असे ज्ञानेश्वरीत निभ्रांतपणे सांगितले आहे. "पाठीं महर्षी येणें आले । साधकांचे सिद्ध जाहाले । आत्मविद थोरावले । येणेंचि पंथें ॥६.१५६॥ तें वेळीं आपणपेयां सहितें । इयें अशेषेंही भूतें । माझ्या स्वरूपी अखंडितें । देखसी तूं ॥४.१६९॥ ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेला । तैं मोहांधकारू जाईल । जैं गुरुकृपा होईल । पार्था गा ॥१७०॥" व "मग म्हणतसे किरीटी । आतां चित्त देईं इयें गोठी । सांगेन ज्ञानाचिये भेटी । उपावो तुज ॥४.१८५॥" असे म्हणून ज्ञानेश्वरीत सिद्धयोगमार्गच कसा कथन केला आहे याची कारणमीमांसा आता कथन करावयाची आहे.

स्वकर्म म्हणजे सिद्धयोगच कसा उचित आहे हे सांगताना गीतेतच अर्जुनाला भगवंत असे सांगत आहेत की, वेद हे त्रैगुण्याने भरलेले असल्यामुळे त्यांचा विषय संसार हाच आहे. उपनिषदे मात्र सत्त्वगुणयुक्त व ज्ञानप्रधान आहेत. तेव्हा " तूं गुणत्रयातें अव्हेरीं । मी माझें हें न करीं । एक आत्मसुख अंतरीं । विसंब झणीं ।।२.२५९।।" असे म्हणून गुणत्रयात्मक वेदाचा अव्हेर करून उपनिषदात्मक स्वधर्माचा, साधनमार्गाचा किंवा सिद्धयोगाचा अर्थात् स्वकर्माचा आश्रय कर असे स्पष्ट केले आहे. या दृष्टीनेच भगवंतांनी गीतेत असे म्हटले आहे की–

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**
**निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ।।२.४५।।**
**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ।।४६।।**

हे अर्जुना ! सर्व वेद हे तीन गुणांचे म्हणजे संसाराचेच वर्णन करतात. तू निष्काम, द्वंद्वरहित, सत्त्वगुणी, योगक्षेमाची चिंता न करणारा व आत्मस्वरूपाविषयी सावधान हो. सर्वत्र जलमय झाले असतानाही पिण्यासाठी वगैरे जितके पाणी लागते तितक्याच पाण्याचा ज्याप्रमाणे आपण उपयोग करून घेतो त्याप्रमाणे जाणत्या ब्राह्मणाने सर्व वेदांमधून त्याच्या उपयोगाचा मार्गच काढून घेणे योग्य असते. या श्लोकांचा भावार्थ सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले ।**
**तऱ्ही आपण हित आपुलें । तेंचि घेपें ।।२.२६०।।**
**जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती ।**
**तरी तेतुलेही काय चालिजती । सांगैं मज ।।२६१।।**
**कां उदकमय सकळ । जऱ्ही जाहले असे महीतळ ।**
**तरी आपण घेपें केवळ । आर्तिचिजोगें ।।२६२।।**
**तैसें ज्ञानीये जे होती । ते वेदार्थातें विवरिती ।**
**मग अपेक्षित तें स्वीकारिती । शाश्वत जें ।।२६३।।**
**म्हणोनि आईकें पार्था । याचिपरी पाहतां ।**
**तुज उचित होय आतां । स्वकर्म हें ।।२६४।।**

अशा प्रकारे वेदाने मनुष्यमात्राचे कल्याण व्हावे व त्याला ब्रह्मप्राप्ती व्हावी म्हणून विविध मार्ग सुचविले असले तरी सर्व मार्गांचा नीट विचार करून उपनिषदांनी सांगितलेला स्वकर्माचा म्हणजे सिद्धयोगाचा ज्ञानी लोकांनी प्रशंसिलेला शाश्वत ब्रह्मप्राप्तीचा मार्गच स्वीकारला पाहिजे.

याबद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे मत इतके ठाम आहे की इतर मार्गांचे खंडन करून सिद्धयोगमार्गच का याचे त्यांनी मंडन केले आहे. ते म्हणतात–

ऐसेसे हे उपाये । बहुवस एथें पाहें ।
जाणावया होये । एकी वस्तु ॥१३.१०४७॥
आतां पुरे हे बहुत । पैं सर्वार्थाचें मथित ।
सिद्धांतनवनीत । देऊं तुज ॥१०४८॥
येतुलेनि पंडुसुता । अनुभव लाहाणा आयिता ।
येर तंव तुज होतां । सायास नाहीं ॥१०४९॥
म्हणौनि ते बुद्धि रचूं । मतवाद हे खांचूं ।
सोलीव निर्वचूं । फलितार्थुंची ॥१०५०॥

अशा रीतीने सिद्धांतनवनीताच्या रूपाने ज्ञानेश्वरीत सिद्धयोगाचे कथन करून सहज अनुभूती देणारा व ब्रह्मरूप होण्यास श्रम पडणार नाहीत असा मार्ग श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितला आहे. "जेणें अंत:करण वोधलें । संकल्पा नये ॥४.१६७॥" व "जयाचेनि वाक्य उजिवडें । जाहले चित्त निधडें । ब्रह्माचेनि पाडें । निःशंकु होय ॥४.१६८॥" असे हे साधन असल्याने त्याचाच पुरस्कार त्यांनी केला आहे. "ज्ञानशक्तिचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें ॥४.१७२॥" ही या सिद्धयोगाची पृष्ठभूमी आहे; कारण ज्ञानशक्ती कुंडलिनीच्या जागरणानेच योग-साधनेचा श्रीगणेशा होत असतो व क्रमाक्रमाने विकास होत ही शक्ती सुषुम्नामार्गाने वर उधवली की पिंडब्रह्मांडाचा ग्रास करून शिवरूप होते.

अशा प्रकारे उपनिषदात्मक साधनमार्गाचे किंवा सिद्धयोगाचे अगर जागृत शक्तीने होणारे अंतरंग साधन कथन करण्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जे धोरण स्वीकारले आहे त्याचा उद्‌गम त्यांच्या परंपराप्राप्त नाथसंप्रदायात असून तो केनोपनिषदात आलेल्या कथेतही पाहावयास सापडतो. ब्रह्मविद्येचा गुरुरूपाने अवतार कसा झाला ते या उपनिषदात सांगितले आहे. एकदा देव व असुर यांचे युद्ध झाले. त्यात देवांचा जय झाला. त्यामुळे त्यांना अभिमान झाला. त्यावेळी त्यांना सर्व जगच्चालक आत्मवस्तूची जाणीव करून देऊन, झालेला अभिमान घालविण्याच्या दृष्टीने भगवंतांनी आपल्या शुद्धसत्त्वात्मक मायाशक्तीने अत्यंत विस्मयकारक स्वरूप धारण केले व ते देवांसमोर आले. देवांना ते कोण आहेत हे समजेना. इंद्रादि देवांनी प्रथम ते कोण आहेत हे समजून घेण्याकरिता अग्नी व वायू यांना क्रमाने भगवंताकडे पाठविले. ते आल्यावर भगवंतांनी त्या प्रत्येकाला तू कोण म्हणून विचारले. त्या प्रत्येकाने आपले नाव सांगून आपल्या पराक्रमाचे वर्णन केले. तेव्हा भगवंतांनी त्यांच्यापुढे एक गवताची काडी टाकून अग्नीला ती जाळण्याला व वायूला ती उडवून द्यावयाला सांगितले. पण अग्नीला ती काडी जाळता आली नाही किंवा वायूला ती उडविता आली नाही. तेव्हा अग्नी व वायू लज्जित होऊन इंद्राकडे परत आले व तूच जाऊन ते कोण आहेत हे जाण असे ते म्हणाले.

त्यामुळे स्वतः इंद्र भगवंताकडे आला पण भगवान् तेथेच अंतर्धान पावले. अग्नी व वायू यांना दर्शन झाले व बोलण्यासही मिळाले पण आपल्याला मात्र दर्शन देखील झाले नाही असे मनात येऊन इंद्राला फार वाईट वाटले. इंद्र अशा रीतीने शोकाकुल झाला असता त्याला भगवंताचे ज्ञान करून देण्याकरिता, भगवान् शंकरांची विद्याशक्ती उमा अतिसुंदर स्वरूप धारण करून प्रकट झाली. तेव्हा इंद्राने तिला विचारले, " अति विस्मयजनक अशा स्वरूपाने इतक्यात कोण आले होते ? " तेव्हा ती म्हणाली, " ते ब्रह्म होते. तुम्हाला जो विजय प्राप्त झाला तो परब्रह्मामुळे होय. तुम्ही तेथं निमित्तमात्र झाला. " या कथेवरून हेच सिद्ध होते की, परमेश्वराला विसरलेल्या जीवाला त्या परमेश्वराचे ज्ञान करून देण्याकरिता भगवंताची विद्याशक्तीच गुरुरूपाने प्रकट होऊन जीवाला उपदेश करीत असते. " ब्रह्मैव गुरुरूपेणावतिष्ठते " ब्रह्मच गुरूरूपाने प्रगट होते अशी स्मृतीही आहे.

चैतन्यचक्रवर्तीची शोभा असलेली व विश्वबीजाच्या कोंभाला साउली करणारी कुंडलिनी शक्ती, आरंभरंभा, आत्मप्रभा, आत्मसत्ता अगर सर्वोपशांतिप्रमदा ही सिद्धयोगसाधनाचा केंद्रबिंदू असून " तैसीच गुरुकृपा उखा उजळली ॥ ७.१३१ ॥, गुरुकृपा साच ॥ १०.१६८ ॥, जैं सानुकूल श्रीगुरु, ॥ १०. १७२॥ मज हृदयीं सद्‌गुरु ॥ १.२२ ॥, श्रीगुरुकृपा काय नोहे ॥ १८.१७३५ ॥ " याप्रमाणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अनेक वेळा म्हटल्याप्रमाणे श्रीसद्‌गुरू व त्यांची कृपा हा सिद्धयोगाचा पाया आहे. या दोन्ही गोष्टींमुळे " ज्ञानाची वोतपली पडली । तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥ ७.१३१ ॥ " हे घडते. वस्तुसामर्थ्य-शक्तीच्या म्हणजे कुंडलिनीच्या नवलाईचे ज्ञानेश्वरी हे फळ असल्याचे सांगून " जयातें कामधेनू माय । तयासी अप्राप्य कांहीं आहे ॥ १.७९ ॥" असे म्हणून त्या शक्तीची अपूर्वाई त्यांनी वर्णन केली आहे. घंटेचा नाद घंटेत व पायाची शक्ती पायात जशी सग्मावलेली असते त्याप्रमाणे परब्रह्म व त्याची शक्ती कुंडलिनी ही एकरूप, अभिन्न किंवा समव्याप्त असते. वस्तू व वस्तूची शक्ती म्हणजे एक वस्तू व दोन नावे असा अर्थ आहे. परमात्मा सच्चिदानंदरूप असून त्याची शक्तीही सच्चिदानंदरूपच आहे. किंबहुना ब्रह्म सच्चिदानंदरूप आहे असे म्हणणे म्हणजे त्याच्या शक्तीचाच उल्लेख करणे होय. म्हणून परमेश्वर, त्याची शक्ती व गुरू या तिघांचे अत्यंत ऐक्य असते. याप्रमाणे गुरूचे व ब्रह्मविद्येचे म्हणजे कुंडलिनी शक्तीचे ऐक्य असल्यामुळे जितकी जितकी प्रेमाने गुरूची कीर्ती गावी तितका तितकः आपल्या ठिकाणी ब्रह्मविद्येचा, आत्मज्ञानाचा, आत्मशक्तीचा म्हणजे अर्थातच कुंडलिनी शक्तीचा उत्कर्ष व विकास होत जातो. जीवाच्या ठिकाणी जेवढी अविद्या किंवा मल असतो त्याच्या अपेक्षेनें म्हणजे आधारभेदाने परमेश्वराच्या ठिकाणी

स्फुरणारी अहंब्रह्मास्मिरूप ब्रह्मविद्या शक्तिपातामुळे पुढे गुरूपरंपरेने शिष्याच्या ठिकाणी प्रगट होते. भगवान् शंकरांनी अदिनाथरूपाने गुरुत्व धारण करून पुढे मत्स्येंद्रनाथादि शिष्यपरंपरेने आपल्या ठिकाणी स्फुरणारी चितशक्तिरूप विद्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांपर्यंत पोहोचविली. म्हणून या ब्रह्मविद्येला किंवा सिद्धयोगाला " शांकरी " असे अमृतानुभवात व " शांभवी " असे ज्ञानेश्वरीत म्हटले आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ब्रह्मविद्या ही चित्शक्तिरूप आहे हे सकलसंतांच्या साक्षीने स्वीकारले आहे. ते म्हणतात–

**या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।**
**तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ।। २.१२६ ।।**

जगामध्ये सर्वव्यापक असे जे एक गूढ आत्मचैतन्य आहे, चैतन्ययुक्त तत्त्व किंवा शक्तियुक्त तत्त्व आहे त्याचाच तत्त्वज्ञ संत सदैव स्वीकार करतात. अशा प्रकारे मनुष्य देहामध्ये " तेवीं जडातें जीवविता । देहअहंता उपजविता । मी जीव गमें पंडुसुता । जीवलोकीं ।। १५. ३४५ ।। " असा जो चेतनप्रकाश आहे तो त्या परमात्म्याच्या सुप्त शक्तीचा अंशात्मक विकासच आहे. ज्यावेळी शक्ती जागृत होते त्यावेळी ब्रह्मभाव जागृत होऊन तो उत्तरोत्तर विकसित होत होत आपली चरम व परम सीमा गाठतो. या बाबत " सौंदर्यलहरीच्या " तिसऱ्या श्लोकावर टीका करताना " सौंदर्यलहरीका हिंदी अनुवाद " या ग्रंथात प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज म्हणतात, " ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन सुषुम्नेच्या मार्गातील सहाही चक्रांचा वेध करीत करीत शिवसायुज्यपदावर आरूढ होण्यासाठी मार्गस्थ होते त्यावेळी ती प्रतिप्रसवक्रमाने सर्व इंद्रियांना अंतर्मुख करते. तिची गती ऊर्ध्व झाली की ती मनाचे सर्व पडदे फाडून टाकते. बुध्दीच्या जगतासंबंधीच्या वाह्य चिंतनाला ती विश्रांती देते. तिच्या वाटचालीमुळे अंतरात्म्यरूपी सूर्याला झाकून टाकणारे ढग एकएक या क्रमाने आपोआप विलीन होऊ लागतात. हृदयाकाश निर्मल व स्वच्छ होते. ज्ञानाचा प्रकाश अंतरात्म्यामध्ये पूर्णतेजाने भरून जाऊन चमकू लागतो. अविद्येचा दाट अंधःकार दूर होतो. त्यामुळे अंधारात वास करणारी वासनेची गिधाडे किंवा कामक्रोधादि घुवडे यांना राहावयास स्थानच शिल्लक उरत नाही. इतकेच नव्हे तर ते वसल्यावसल्याच ज्ञानरूपी सूर्याच्या तेजाने नाहीसे होऊन जातात. या अर्थानेच भगवत् पूज्यपाद श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की भगवती कुंडलिनी शक्ती अविद्येचा अंधःकार नाहीसा करण्यासाठी ज्ञानरूपी सूर्याला उद्दीपित करते. याचा दुसरा अर्थ असा आहे की, अधोमुखी सूर्यशक्ती जागृत होऊन उन्मुख झाल्यावर ती सूर्यमंडलात अमृताचा स्राव करू लागते. याचा परिणाम म्हणून बर्हिर्विषयांकडे धावणाऱ्या वासना आपोआप शांत होतात. याचे फल असे मिळते की कर्मानुष्ठानांमध्ये निमग्न असलेल्या व अविद्येच्या अंधारामध्ये

बुडून गेलेल्या कर्मकांडी लोकांना बाह्यानुष्ठानाचा तिरस्कार वाटू लागून ते अंतर्यागामध्ये निमग्न होतात. भगवती माँ कुंडलिनी शक्तीच्या चिन्मयी वाटिकेतील पुष्पांतून प्रवाहित झालेल्या मधुर मकरंदाच्या स्रोताचे झरे जड लोकांच्या जडतेला-सुद्धा द्रविभूत करण्यास समर्थ असतात. भगवतीची चिन्मयी सत्ता नानाप्रकारच्या भेदरूपी सृष्टीची स्थूल व सूक्ष्म जगताच्या रूपाने कल्पना करून उभारणी करते व संहारणीच्या वेळी सर्व नामरूपांना आपल्यामध्ये विलीन करून ती शिवाच्या निष्कल रूपाला सायुज्यतेचे आलिंगन देऊन स्वतः शिवस्वरूप होऊन जाते. जीवाचे जडत्व पाणी पाणी होऊन वाहू लागते व जीव चैतन्यगंगेमध्ये आनंदाने स्नान करू लागतो. अशा प्रकारे कुंडलिनी शक्ती जागृत होऊन जेव्हा पाची तत्त्वांचा व मनाचा वेध करून जड चेतनांच्या गाठी उकलून टाकते तेव्हा साधकाचा देहाध्यास शिथिल होतो व आत्मस्थितीच्या उच्च भूमिकांचा अनुभव घेतो. त्यावेळी त्याच्या नाडीनाडीमध्ये आनंदाच्या लहरी प्रवाहित होतात."

सिद्धयोग हा एकमात्र सरळ, सिद्ध किंवा मध्यमार्ग आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी ज्ञानेश्वरीत त्याचे जे वर्णन केले आहे ते पाहिले म्हणजे गौतमबुद्धापासून शंकराचार्यांपर्यंत व अभिनवगुप्तांपासून गोरक्षनाथापर्यंत सर्वांनी जी एक साधन-प्रणाली आपापल्या ग्रंथांमधून प्रकट केली आहे तिचे सार आपल्या हाती आल्याचे समाधान वाटते. या मार्गामुळे जेथे संसारचित्र उमटते तो मनोरूपी पट जसा फाटतो व सरोवर आटल्यावर प्रतिबिंब जसे नाहीसे होते तसे मन आपोआप कसे नाहीसे होते हे वर्णन करताना ते म्हणतात—

तरी वैराग्याचेनि आधारे । जिहीं विषय दवडूनि बाहिरें ।
शरीरीं एकंदरें । केलें मन ॥५ १५१॥
सहजें तिहीं संधी भेटी । जेथ भ्रूपल्लवा पडे गाठी ।
तेथ पाठ मोरी विठी । पारखोनियां ॥१५२॥
सांडूनि दक्षिण वाम । प्राणापानसम ।
चित्तेसीं व्योम– । गामियें करिती ॥१५३॥
तेथ जैसीं रथ्योदकें सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे ।
मग एकेकु वेगळें । निवडूं नये ॥१५४॥
तैसी वासनांतराची विवंचना । मग आपैसी पारखे अर्जुना ।
जे वेळीं गगनीं लयो मना । पवनें कीजे ॥१५५॥
जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूप पटु फाटे ।
जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा नाहीं ॥१५६॥
तैसें मन एथ मुद्दल जाय । मग अहंभावादिक कें आहे ।
म्हणोनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥१५७॥

हे सर्व सहजे व आपैसे होते. रस्त्यावरून वाहणारे सर्व प्रकारचे पाणी घेऊन गंगा समुद्रास जाऊन मिळते तेव्हा रस्त्यावरील पाणी व गंगेचे पाणी यांची वेगवेगळी निवड करता येत नाही; त्याप्रमाणे सामान्य जीवाचेही इडापिंगलेतील प्राण चित्तासहित चिदाकाशात गमन करीत असल्याने तो सशरीर ब्रह्मरूप होतो. अशा प्रकारे जीवाला शिवरूप करण्याचे सामर्थ्य एकमात्र सिद्धयोगातच आहे; कारण साधारण जगतात ज्याला साधना म्हटले जाते ती वास्तविक साधना असतच नाही. स्थूल देहाचा अभिनिवेश किंवा त्याच्याशी असणाऱ्या तादात्म्याची जाणीव जोपर्यंत असते तोपर्यंत कोणतीही साधना केली तरी ती वरीलप्रमाणे जोपर्यंत अकृत्रिम, स्वाभाविक व सहज साधनाच्या रूपात परिणत होत नाही तोपर्यंत सर्व व्यर्थ जाते.

ज्यावेळी प्राणापान सम होतात त्यावेळीच वायूची वक्रगती म्हणजे इडापिंगलेतून वाहण्याची गती थांबते. जोपर्यंत चंद्रसूर्याचा, दक्षिणवामाचा, उजूअव्हांटयाचा किंवा इडापिंगलेचा संयोग होत नाही तोपर्यंत वायूचे आवागमन चालू राहाते व शक्ती वक्रमार्गात संचार करीत राहते. यालाच प्रचलित भाषेत संसार म्हणतात. शक्तीचे सरळमार्गाने संचालन करणे व त्याची वक्रता दूर करणे हाच साधनाचा उद्देश आहे. तो सिद्धयोगानेच साध्य होत असल्यामुळे त्याचा इतका आग्रह आहे. या साधनाच्या प्रभावानेच शक्तिप्रवाहाचा मार्ग सरळ झाल्यावर सुषुम्नेतून प्राणप्रवाह सुरू होतो व मार्गही सुरू होतो. या सुषुम्ना मार्गालाच मध्यमार्ग, शून्यपदवी, ब्रह्मरंध्र, महापथ, स्मशान, शांभवी, सरलपथ, ऋजुमार्ग किंवा उजुवाट म्हणतात. दक्षिण व वाम हे वक्रमार्ग आहेत. यासाठी दक्षिणवाम सांडून मध्यमार्ग पकडण्याचा उपदेश श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "आकळलेनि योगें। मध्यमा मध्यमार्गे। अग्निस्थानौनि निगे। ब्रह्मरंध्रा ॥८.९४॥", "कुंडलिनी जागवूनि। मध्यमा विकाशूनि। आधारादि भेदूनि। आज्ञावरी ॥१८.१०३८॥" असे म्हणून केला आहे.

प्राचीन बौद्ध योगीलोक वरील क्रियेलाच "स्रोत–आपन्न" असे म्हणतात. बुद्धदेव शक्तिसंचारपूर्वक सुषुम्नेच्या ऊर्ध्वस्रोतामध्ये साधकाला स्थापित करीत असत. या स्रोतामध्ये जो जीव सापडतो किंवा ज्याला गुरुकृपेने हा स्रोत प्राप्त होतो त्याला अपायाचे किंवा पतनाचे भय राहात नाही; कारण यामुळे सत्कायदृष्टी, विचिकित्सा व शीलव्रतपरामर्श नावाची जीवाची तिन्ही बंधने किंवा संयोजने छिन्नभिन्न होतात असे बौद्धांचे मत आहे. संचारित शक्तीची न्यूनाधिकता व संचित वासनांची दृढता यांच्या कमीअधिकपणामुळे दीक्षित किंवा 'स्रोत–आपन्न' साधकाची अवस्था जरी निरनिराळया प्रकारची होत असली तरी दक्षिणवामरूपी संसाराचा वक्रमार्ग सोडून ब्रह्मपद प्राप्तीचा सरळमार्ग धरावा म्हणून योगी सरहपादांनी सांगितले आहे. ते म्हणतात –

उजुरे उजु छाँडि मा लेहु रे बंक।

सिद्धाचार्य शांतिपादांनीही असे म्हटले आहे की —

**सअ सम्वेअण सरुअ अलक्ख लक्खन न जाइ ।**

**जे जे उजवाटे गेला अनावाटा भइला सोइ ।।**

याचा अर्थ असा की, स्वरूपाचा विचार इत्यादिद्वारा अलक्ष्य वस्तूचे लक्षण करणे शक्य नाही. जे अलक्ष्य आहे त्याचा काहीच विचार होऊ शकत नाही. यासाठी विचार करून अलक्ष्याची प्राप्ती करण्याचा प्रयत्न करणे निरुपयोगी आहे. अलक्ष्याची प्राप्ती करण्याचा एकच सरळमार्ग आहे. त्याचा अवलंब केला की मग पुन्हा शास्त्रविचार इत्यादींची आवश्यकता उरत नाही. जो कोणी या मार्गाने गेला आहे तो महासुखचक्राला प्राप्त झाला आहे. त्याला निर्वाणपदाचा लाभ झाला आहे. या पदप्राप्तीमुळे तेथून पुन्हा संसारात परत यावे लागत नाही. यासाठी —

**बाम दहिन दो वाटो छाडीं ।**

**शांति वुगथेउ संकेलिउ ।।**

म्हणजे वाम व दक्षिण मार्ग सोडून देऊन मध्यमार्ग स्वीकारला पाहिजे. या मार्गाशिवाय महासुखप्राप्तीचा दुसरा मार्गच नाही. यामुळेच शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की—

**एतद् विरमानंदोपायमार्गं विहाय नान्यमार्गसंसारोऽभिमुखोऽस्ति ।**

तेव्हा सिद्धयोग हाच एकमेव मार्ग होय. चंद्रसूर्याचे किंवा दक्षिणवामाचे एकीकरण झाल्याशिवाय म्हणजे प्रकृतिपुरुषाचे मीलन झाल्याशिवाय हा मध्यमार्ग मोकळा होत नाही. त्यामुळेच अज्ञानाची निवृत्ती होते. इतर कोणत्याही उपायात हे सामर्थ्य नाही. म. म. गोपीनाथ कविराज " भारतीय संस्कृति और साधना " खंड दोनमधील " सहजयान और सिद्धमार्ग " या लेखात यासाठीच असे म्हणतात की, " मूलाधारातील कुंडलिनी शक्ती ज्यावेळी इडा व पिंगला या दोन नाड्यांच्या संघर्षणजन्य समीकरणाने जागृत होऊन अग्नीच्या ज्वाळेप्रमाणे वरती उठते त्यावेळी स्वभावतःच ती ऊर्ध्वमुख होऊन सुषुम्नेच्या मार्गाने सरळ धावू लागते. या उत्थान कालात इतस्ततः विखुरलेल्या विविध शक्ती चारही बाजूंनी एकत्रित येऊन वरील धारेत मिसळून जातात. या विविध शक्तींच्या द्वाराच भिन्नभिन्न स्तरावर जगतातील नानाविध पदार्थांची निर्मिती होते व जीवाला त्यांची अनुभूती येते. ज्यावेळी या सर्व शक्ती सुषुम्नेत लीन होत जातात त्यावेळी त्यांच्या बरोबरच त्यांनी रचलेले व प्रकाशित केलेले जगज्जाल इंद्रजालाप्रमाणे नाहीसे होते. त्यावेळी सर्वत्र महाशून्यावस्था येते. अशा प्रकारे क्रमशः लोकलोकांतरांना आपल्या संहाराग्नीमध्ये जाळून व भस्मीभूत करून नादरूप महाशक्ती कुंडलिनी सिंहनाद करीत करीत सुषुम्नेतून वरवर चालत राहते. त्यामुळे सर्व भूतमात्रे व चित्त नाहीसे होते. षट्चक्रांचा भेद होतो व साधकाची आज्ञाचक्राच्यावर स्थिती होते. त्यानंतर अत्यंत

सूक्ष्म अशा मार्गाचा अवलंब करीत चैतन्यशक्तीच्या रूपात प्रकाशमान कुंडलिनी चैतन्यसमुद्रात परमशिवाशी एकरूप होण्यासाठी धावू लागते. या शक्तीचा आश्रित जीव तिच्या ऊर्ध्वाकर्षणामुळे तिच्याबरोबरच वाटचाल करू लागतो. या एकरूपते-मुळे स्वत:चे व दुसऱ्याचे असे साधकाचे काहीच राहात नाही. तो कुंडलिनी शक्तीचा आश्रित व शरणागत बनून सर्व अडथळे ओलांडून मातृ-अंकावर विराजमान होतो. ज्यावेळी सहस्रारस्थ परमशिवाशी कुंडलिनी शक्ती एकरूप होते त्यावेळी त्या आलिंगनामुळे विचित्र आनंदाचा उदय होतो. जीव त्याचा आस्वाद घेतो. शिव-शक्तीच्या मिलनाशिवाय खऱ्या आनंदाची अभिव्यक्ती होऊ शकत नाही. हीच परमोच्च अद्वय किंवा अद्वैत स्थिती आहे. एकमात्र गुरूपदेशच या अवस्थेच्या प्राप्तीचा उपाय आहे. यासाठी दुसरा कोणताही उपाय नाही. मौनमुद्रा हाच गुरूंचा उपदेश आहे. यालाच शक्तिपात म्हणतात. जीव संसारावस्थेत दक्षिण व वाम मार्गामध्ये रात्रंदिवस भ्रमण करीत असतो. अत्यंत सूक्ष्म व दुर्गम अशा मध्यमार्गाने चालण्याचे साहस त्याला होत नाही व त्या मार्गाने चालण्याचे त्याचे सामर्थ्यही असत नाही. खरे पाहता पुरुषार्थाच्याद्वारा मध्यमार्गाचा आश्रय प्राप्त करणे ही एक असंभव कोटीतील गोष्ट आहे. या मार्गात प्रवेश मिळविण्यासाठी गुरुकृपा हाच एकमात्र उपाय आहे. ज्यावेळी या मार्गाने चालता चालता चंद्र व सूर्य एकमेकाशी समरस होत होत क्रमाक्रमाने आपले स्वरूप व धर्म नाहीसे करून घेतात तेव्हा चंद्र पुन्हा चंद्र राहात नाही व सूर्य सूर्यही राहात नाही. ते दोन्ही एकरस व एकाकार होतात. ही नि:स्वभाव व नैरात्म्य अवस्थाच शून्यावस्था आहे. हेच यथार्थ साम्य आहे."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात सिद्धयोगच का याचे उत्तर द्यावयाचे झाले तर असे सांगता येईल की—

**मग तया मार्गाची धांव । पुरेल प्रवृत्तीची हांव ।**
**जेथ साध्यसाधना खेंव । समरसें होय ।।६.५९।।**

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून या प्रबंधाची भूमिका सर्वार्थाने स्पष्ट होऊन ज्या पायावर पुढील विवेचनाची उभारणी केली आहे त्याचे स्वरूप लक्षात येईल. प्रबंधाच्या या भूमिकेत किंवा पायातच श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या श्रीमद्भगवद्गीते-कडे पाहण्याच्या दृष्टीचे बीज सामाविष्ट झाले आहे. त्यांच्या या दृष्टीचेच दर्शन आता आपणास साकल्याने घ्यावयाचे आहे.

# प्रकरण दुसरे

# श्रीज्ञानेश्वरमहाराजांची श्रीमद्भगवद्गीतेकडे पाहण्याची दृष्टी

**प्रास्ताविक :–**

सिद्धयोगाच्या दृष्टीने ज्ञानेश्वरीचे रहस्य उकलताना ज्या पायावर ज्ञानेश्वरी आधारलेली आहे तो पाया कसा आहे हे पाहणे अत्यंत आवश्यक आहे. हा पाया पाहणे म्हणजे श्रीमद्भगवद्गीतेवर श्रीज्ञानेश्वरमहाराजांकडून ज्ञानेश्वरीच्या रूपाने भावार्थ टीका कशी लिहिली गेली हे पाहणे होय. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " हे अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें । गगन मुठीं सुवावें । मशकें केवीं? ॥१.७४॥" असा प्रश्न उपस्थित करून लगेच " परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोले मी सधरु । जे सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥१.७५॥" असे त्याचे उत्तरही दिले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या या उत्तरातच एक विशेष प्रकारचा दृष्टिकोन सामाविलेला आहे. तो त्यांना गुरुपरंपरेने प्राप्त होऊन त्यांच्याकडून ही ज्ञानेश्वरीची वाङ्मयमूर्ती साकारली गेली आहे. हा दृष्टिकोन पाहिला म्हणजे सिद्धयोगशास्त्राचे बीज त्यात कसे सामाविलेले आहे हे लक्षात येईल व त्यांची श्रीमद्भगवद्गीतेकडे पाहण्याची दृष्टी स्पष्ट होईल.

श्रीगुरुकृपेनेच गीतार्थाचा ठेवा बाहेर काढणे शक्य आहे याची जाणीव श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या अंतःकरणात पूर्णपणे ठसलेली असल्याने त्यांनी त्याप्रमाणेंच आपल्या सद्गुरुनाथांची प्रार्थना केली आहे. ते म्हणतात–

**जी गीतार्थ निधान । काढू माझें मन ।**
**सुयीं स्नेहांजन । आपुलें तूं ॥१४.१९॥**
**हे वाक्सृष्टि एके वेळे । देखतु माझे बुद्धीचे डोळे ।**
**तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्यबिंबें ॥२०॥**
**माझीं प्रज्ञावेली वेल्हाळ । काव्यें होय सफळ ।**
**तो वसंतु होई स्नेहाळ– । शिरोमणी ॥२१॥**
**प्रमेय महापूरें । हे मतिगंगा ये थोरें ।**
**तैसा वरिष उदारें । दिठीवेनी ॥२२॥**
**अगा विश्वैकधामा । तुझा प्रसाद चंद्रमा ।**
**करूं मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी ॥२३॥**

जी अवलोकिलिया मातें । उन्मेषसागरीं भरितें ।
वोसंडेल स्फूर्तीतें । रसवृत्तीचें ॥२४॥
हें असो आतां वांजटा । तो ज्ञानार्थ करूनि गोमटा ।
ग्रंथु दावीं उत्कंठा । भंगों नेदीं ॥२६॥
हो कां जी स्वामी । हेंचि पाहत होतों मी ।
जे श्रीमुखें म्हणा तुम्ही । ग्रंथु सांग ॥२७॥
सहजें दुर्वेचा डिरु । आंगेंचि तंव अमरु ।
वरी आला पूरु । पीयूषाचा ॥२८॥
तरी आतां येणें प्रसादें । विन्यासें विदग्धें ।
मूळशास्त्रापदें । वाखाणीन ॥२९॥

गीतार्थाचा ठेवा बाहेर काढण्यासाठी स्नेहरूपी अंजन सद्‌गुरूने आपल्या डोळचात घालावे म्हणजे शक्तिपात दीक्षेने कुंडलिनी शक्ती जागृत करून आपल्या वुद्धिरूपी डोळयांना हा अर्थ दिसावा म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सद्‌गुरुनाथांची प्रार्थना केली आहे. ही प्रार्थना श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी मान्य करून ग्रंथ कथन कर म्हणताच श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रज्ञावेलीला काव्यरूपी फळे आली, बुद्धिरूप गंगेस अर्थरूप महापूर आला, बुद्धीला स्फूर्तीची पौर्णिमा झाली व उन्मेषसागराला भरती आली. या सर्व गोष्टी सद्‌गुरूंच्या स्नेहांजनाने, कृपादृष्टीच्या वर्षावाने, मुखातून नुसती अक्षरे निघाल्याने किंवा पीयूषाच्या पुराने म्हणजे शक्तिपातानेच होतात. यालाच प्रसाद म्हणतात. अशा प्रकारचा प्रसाद प्राप्त होणे ही असामान्य गोष्ट असल्याने " श्रीमत्सूतसंहितेतील ब्रह्मगीतेत " महर्षी वेदव्यासांनी असे म्हटले आहे की–

प्रसादस्य तु सिद्धयर्थं खलु सर्वं सुरर्षभाः ।
प्रसादेन विना वेदं ये जानन्ति सुरर्षभाः ।
ते जनन्ति विना घ्राणं गंधं हस्तेन केवलम् ॥४.११७॥
प्रसादो नाम रुद्रस्य कर्मसाम्ये तु देहिनाम् ॥११८॥
देशिकालोकनाज्जातो विशिष्टातिशयः सुराः ।
प्रसादस्य स्वरूपं तु मया नारायणेन च ॥११९॥
रुद्रेणापि सुरा वक्तुं न शक्यं कल्पकोटिभिः ।
केवलं लिंगगम्यं तु न प्रत्यक्षं शिवस्य च ॥१२०॥
शिवायाश्च हरेः साक्षान्नच चान्यस्य चाऽऽस्तिकाः ।
प्रहर्षः स्वरनेत्रांगविक्रिया कंपनं तथा ॥१२१॥
स्तोभः शरीरपातश्च भ्रमणं चोद्गतिस्तथा ।
आकाशेऽवस्थितिर्देवाः शरीरांतरसंस्थितिः ॥१२२॥

**अदर्शनं च देहस्य प्रकाशत्वेन भासनम् ।**
**अनधीतस्य शास्त्रास्य स्वत एव प्रकाशनम् ॥१२३॥**

प्रसादप्राप्तीसाठीच सर्व बाह्यसाधनांचा खटाटोप करावा लागतो. प्रसादाशिवाय स्वबलाने जे परमात्म्याला जाणण्याची इच्छा करतात त्यांना घ्राणेंद्रियावाचून हाताने गंधज्ञान होणे जसे अशक्य आहे तसेच गुरुकडून शक्तिपात होऊन कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय परमतत्त्वाची प्राप्ती होणे अशक्य आहे. धर्माधर्मरूपकर्मसाम्य झाले की श्रीगुरूंची कृपा होते. या कृपेला किंवा शक्तिपातालाच प्रसाद म्हणतात. अशा प्रकारच्या प्रसादाचे यथार्थ स्वरूप मी (ब्रह्मदेव), विष्णू व रुद्रही हजारो कल्पांचा कालावधी गेला तरी जाणू शकत नाही. थोडेसे सामान्य लक्षण म्हणून समजू शकेल. मला, पार्वतीला व विष्णूला त्यातील जे थोडेसे कळते त्याची लक्षणे पुढीलप्रमाणे आहेत. शक्तिपात होऊन शक्ती जागृत झाली की साधकाला अत्यंत आनंद होतो. स्वर, नेत्र व अंग ही सर्व विशेष क्रियेने बदलून जातात आणि शरीरात उन्मेष, रोमांच व कंपन सुरू होते. जडत्व, देह पृथ्वीवर पडणे, भ्रमण, आकाशात व अंतरिक्षात संचार व स्थिती आणि इतर शरीरात प्रवेश करणे व राहणे हेही यामुळे घडून येते. न झालेली दर्शने होणे, प्रकाशादि दर्शने होणे व कधीही पूर्वी न शिकलेली शास्त्रे स्वतःहून साधकासमोर प्रकट किंवा प्रकाशित होणे ही शक्तिपाताची लक्षणे आहेत.

प्रसादाचा हा महिमा पाहिला म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराज "तुझा प्रसाद चंद्रमा मला स्फूर्तीची पौर्णिमा करो" असे का म्हणतात ते स्पष्ट होईल व त्याचे महत्त्वही कळेल. "काय घडयावरी सारस्वतें । पढों सिकिजे ॥९.८॥" हा त्यांचा सर्वात महान सिद्धांत आहे आणि तो नितांत सत्य आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज स्वतः कोठेही शिक्षण घेण्यास गेल्याचा किंवा पाठशाळेत गेल्याचा त्यांच्या कोणत्याही चरित्रात उल्लेख नाही. अशावेळी वयाच्या केवळ पंधराव्या वर्षीच ज्ञानेश्वरीसारखा अपूर्व व अलौकिक ग्रंथ त्यांनी कसा लिहिला ? या प्रश्नाचे उत्तर त्यांनी स्वतःच दिले आहे. ते म्हणतात—

**लोहाचें कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे ।**
**कीं मृतही जीवित लाहे । अमृतसिद्धी ॥१.७७॥**
**जरी प्रकटे सिद्धसरस्वती । तरी मुकयाहि आथी भारती ।**
**एथ वस्तुसामर्थ्यशक्ती । नवल कायी ॥७८॥**
**जयातें कामधेनु माये । तयासी अप्राप्य कांहीं आहे ।**
**म्हणौनि मी प्रवर्तों लाहें । ग्रंथीं इये ॥७९॥**

वस्तुसामर्थ्यशक्ती म्हणजे कुंडलिनी शक्ती होय. ती जेव्हा जागृत होते तेव्हा कामधेनुप्रमाणे असणारी ही सिद्धसरस्वतीरूप माता मुक्यालाही महान् कवी

बनविते. हे कसे घडते हे सांगताना "योगशिखोपनिषदात" असे म्हटले आहे की–

सर्वे वाक्यात्मका मंत्रा वेदशास्त्राणि कृत्स्नशः ।
पुराणानि च काव्यानि भाषाश्च विविधा अपि ।। ३.७ ।।
सप्तस्वराश्च गाथाश्च सर्वे नादसमुद्भवाः ।
एषा सरस्वती देवी सर्वभूतगुहाश्रया ।। ८ ।।
य इमां वैखरीं शक्ति योगी स्वात्मनि पश्यति ।
स वाक्सिद्धिमवाप्नोति सरस्वत्याः प्रसादतः ।।१०।।
वेदशास्त्रपुराणानां स्वयं कर्ता भविष्यति ।। ११ ।।

(मूलाधारस्थ विंदुरूपिणी कुंडलिनी शक्तीच आत्म्याचा आधार आहे. ही शक्ती जागृत झाली की या सूक्ष्म प्राणशक्तीपासून नादाची उत्पत्ती होते.) या नादापासूनच सर्व मंत्र, वेद, शास्त्र, पुराणे, काव्ये, विविधभाषा, सात स्वर व गाथा उत्पन्न होतात. हीं कुंडलिनी नावाची नादरूपी सरस्वतीदेवी मूलाधाररूपी गुहेचा आश्रय घेऊन सर्व प्राण्यांच्या ठिकाणी राहते. ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होते त्यावेळी तिचे नादात्मक स्वरूप वैखरीचे रूप घेऊन शरीरात उपस्थित होते. या वैखरी शक्तीला योगी साधक स्वतः पाहतो व या कुंडलिनी देवी सरस्वतीच्या प्रसादाने त्याला वाक्‌सिद्धी प्राप्त होते. या प्रसादामुळेच योगी स्वतः वेद, शास्त्र व पुराणांचा कर्ता होतो.

श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "सौंदर्यलहरीमध्ये" ही अनादि शक्ती जागृत झाल्यावर साधक काव्यरचना कशी करतो हे सांगितले आहे. ते वाचले म्हणजे हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांना पूर्णांशाने कसे लागू पडते हे स्पष्ट होऊन ज्ञानेश्वरीसारख्या अलौकिक ग्रंथ रचनेचा उलगडा होतो. आचार्य म्हणतात–

सावित्रीभिर्वाचां शशिमणिशिलाभंगरुचिभि–
र्वशिन्याद्याभिस्त्वां सह जननि संचिंतयति यः ।
स कर्ता काव्यानां भवति महतां भंगिरुचिभि–
र्वचोभिर्वाग्देवीवदन कमलामोदमधुरैः ।।१७।।

हे जननी! कुंडलिनी शक्ती! चंद्रकांत रत्नाच्या खडयासारख्या सुंदर असणाऱ्या कामेश्वरी इत्यादि अष्टशक्तिसहित जो तुझे चिंतन करतो ( त्याच्यावर तुझा प्रसाद होतो व त्यामुळे तो ) उच्च कोटीची मनोहर काव्यरचना करतो. त्याचे काव्य सरस्वतीच्या मुखकमलाच्या सुगंधाप्रमाणे मधुर असे रचिले जाते.

गुरुकृपेने शक्ती जागृत झाल्यावर तिच्यापासून वर्णमालेची सृष्टी कशी तयार होते याचे वर्णन "शारदा तिलकतंत्राच्या" प्रथम पटलामध्ये पुढीलप्रमाणे केले आहे.

यदा भवति सा संवित् द्विगुणो कृतविग्रहा ।
हंसवर्णौ परात्मानौ शब्दार्थौ वासरक्षये ।।१.६१।।

सा प्रसूते कुंडलिनी शब्दब्रह्ममयी विभुः।
शक्ति ततो ध्वनिस्तमात् नादस्तस्मन्निबोधिका ॥११॥
ततोऽर्धेन्दुस्ततो बिंदुस्तस्मादासीत्परा ततः।
पश्यंती मध्यमा वाणी वैखरी शब्दजन्मभूः ॥११२॥
इच्छाज्ञानक्रियात्मासौ तेजोरूपा गुणात्मिका।
क्रमेणानेन सृजति कुंडली वर्णमालिकाम् ॥११३॥

ज्यावेळी गुरू दीक्षा देतात त्यावेळी साधकाच्या ठिकाणी निद्रिस्त असलेली संवित् व स्वप्रकाशिका अशी ज्ञानशक्ती कुंडलिनी देवी साधकाला आपल्या स्वरूपाचे ज्ञान करून देण्यासाठी विशेष गुणयुक्त होऊन क्रियाशील झालेली दिसते. त्यावेळी ती आपल्या ब्रह्ममयी शक्तीने अनेकानेक गुणवती शक्तीचे चमत्कार करते. ही शक्ती ध्वनी, नाद, निबोधिका, अर्धेंदू, परा, पश्यंती, मध्यमा व वर्णमालेला प्रकाशित करणारी वैखरीवाणी उत्पन्न करते. ही कुंडलिनी शक्ती तेजोरूप होऊन, गुणांचा आश्रय करून आणि इच्छा, ज्ञान व क्रिया या तीन रूपांनी प्रकाशित होऊन वर वर्णन केल्याप्रमाणे वाणी व वर्णमालेची सृष्टी करते.

याचेच अधिक स्पष्टीकरण करतांना " मंत्र और मातृओंका रहस्य " या पुस्तकात डॉ. शिवशंकर अवस्थीशास्त्री यांनी प्रथम अध्यायाच्या शेवटी असे म्हटले आहे की, " ये समस्त वर्ण उसी एकाक्षर रविरूप अव्याकृत वाक् से क्षरित होते हैं। यह अव्याकृत वाक् पराची अपर प्रणवरूप है। यह गतिशील जीवन स्पंदन है। इससे परे पर प्रणवरूप पर शब्दात्मक कुंडलिनी की स्थिर घनावस्था है जो जीवनका मूल है। वर्णरश्मियों के सहारे अपर प्रणवात्मक परावाग्वर्ती अव्याकृत वाक् में निमग्न होकर—रवि मंडल को भेद कर— साधकगण पर शब्दरूप कुलकुंडलिनी शक्ति की महामंजूषा को उद्घाटित करके धन्य हो जाते हैं। " (पृ. २१,२२)

असा अनुग्रह, असा प्रसाद व अशी कृपा ही ज्ञानेश्वरीच्या निर्मितीला कारण असल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांना अभिप्रेत आहे. श्रीगुरूच्या अपरंपार कृपेने ही कुंडलिनीरूप वाक्सृष्टी उद्भूत होऊन साधक मुका असला तरीही ग्रंथ करण्याच्या बाबतीत बृहस्पतीशी पैज मारू शकतो असा श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा सिद्धांतच आहे. या दृष्टीनेच ते असे म्हणतात की—

तुमचा अनुग्रहो गणेशु। ज दे आपुला सौरसु।
तें सारस्वतीं प्रवेशु। बाळकाही आथी ॥१०.६॥
जी दैविकीं उदार वाचा। जें उद्देशु दे नांभीकाराचा।
तें नवरससुधाब्धीचा। थावो लाभे ॥७॥
जी आपुलिया स्नेहाची वागीश्वरी। जरी मुकयातें अंगिकारी।
तो वाचस्पतीशीं करी। प्रबंधुहोडा ॥८॥

असे हे सामर्थ्य श्रीगुरूंच्या अनुग्रहात, सौरसात किंवा स्नेहात सामावलेले आहे. यालाच शास्त्रकार दीक्षा म्हणतात. अशी स्पर्श दीक्षा झाल्याबरोबर ध्रुवासारखा अज्ञबालक वेदांचीही बुद्धी कुंठित होईल असे स्तवन करू लागल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. ते म्हणतात–

**ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें । जैसें कपोळ शंखें शिवतलें ।**
**आणि वेदांचियेही मतीं ठेलें । तें लागला बोलों ॥११.१८४॥**

महर्षी वेदव्यासप्रणीत "श्रीमद्भागवत् महापुराणातील "चतुर्थ स्कंधाच्या नवव्या अध्यायात हा प्रसंग मुळात आला आहे. ध्रुवाला विष्णूचे दर्शन झाल्यावर त्याला त्यांची स्तुती करण्याची इच्छा झाली. परंतु त्याला काहीही येत नव्हते. त्यावेळी विष्णूने त्याच्या गालाला आपल्या शंखाचा स्पर्श केला. त्याबरोबर त्याच्या ठिकाणचा शक्तिस्वरूप सरस्वतीचा स्रोत अद्भूत होऊन तो स्तुती करू लागला. व्यास महर्षी म्हणतात–

**स तं विवक्षन्तमतद्विदं हरिर्ज्ञात्वस्य सर्वस्य च हृद्यवस्थितः ।**
**कृतांजलिं ब्रह्ममयेन कंबुना पस्पर्श बालं कृपया कपोले ॥४-९-४॥**
**स वै तदैव प्रतिपादितां गिरं दैवीं परिज्ञातपरात्मनिर्णयः ।**
**तं भक्तिभावोऽभ्यगृणादसत्वरं परिश्रुतोरुश्रवसं ध्रुवक्षितिः ॥५॥**

**ध्रुव उवाच—**

**योऽन्तः प्रविश्य मम वाचमिमां प्रसुप्तां**
**संजीवयत्यखिलशक्तिधरः स्वधाम्ना ।**
**अन्यांश्च हस्तचरणश्रवणत्वगादीन्**
**प्राणान्नमो भगवते पुरुषाय तुभ्यं ॥६॥**

ध्रुव हात जोडून भगवंतासमोर उभा होता.त्याला त्यांची स्तुती करण्याची इच्छा होती; परंतु स्तुती कोणत्या प्रकारे करावी याचे त्याला ज्ञान नव्हते. सर्वांतर्यामी हरीने त्याच्या मानातील ही गोष्ट जाणून अत्यंत कृपापूर्वक त्यांनी आपल्या वेदमय शंखाचा त्याच्या गालाला स्पर्श केला. गालाला शंखाचा स्पर्श झाल्याबरोबर त्याला वेदमय दिव्यवाणी प्राप्त झाली व जीव-ब्रह्माच्या स्वरूपाचा निश्चयही प्राप्त झाला. त्यामुळे तो अत्यंत भक्तिभावाने धैर्यपूर्वक विश्वविख्यात कीर्तिमान श्रीहरीची स्तुती करू लागला. ध्रुव म्हणाला, प्रभो ! आपण सर्वशक्तिसंपन्न आहात. आपणच माझ्या अंत.करणात प्रवेश करून आपल्या तेजाने माझ्या निद्रिस्त वाणीला जागृत करीत आहात. त्याचप्रमाणे हात, पाय, कान व त्वचा इत्यादि सर्व इंद्रियांना व प्राणांना चेतना देत आहात. मी आपल्याला नमस्कार करतो.

अशा प्रकारे दीक्षेने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती अनायास सर्व सारस्वत साधकाला प्राप्त करून देत असल्याने " बिंदुयोग " या ग्रंथात असे म्हटले आहे की,

" तत्पीठमध्येऽग्निशिखाकारैका मूर्तिवर्त्तते । तस्याः मूर्तेर्ध्यानकारणात् सकलशास्त्र काव्यनाटकादि सकलवाङ्मयं विनाभ्यासेन पुरुषस्य मनोमध्ये स्फुरति ॥" त्या शिखेच्या मध्यभागी अग्नीच्या ज्वाळेसारखी प्रकाशमान असलेली कुंडलिनी शक्तीची मूर्ती आहे. त्या मूर्तीचे ध्यान केले असता विनासायास सर्व वाङ्मय, शास्त्र, काव्य, नाटक इत्यादि पुरुषाच्या मनामध्ये आपोआप स्फुरण पावते. यासाठी इतर कोणत्याही अभ्यासाची गरज पडत नाही. इडापिंगलांची गती थांबून मन व प्राण सुषुम्नेत प्रविष्ट झालें की साधकाला नित्य सारस्वतस्रोताची अनुभूती येते. सुषुम्नेत प्रविष्ट झालले प्राण नादमय होऊन शेवटी शब्दमय होतात. हा शब्दमय-भाव साधकाला प्राप्त झाला की त्याचा सर्व वाङ्मयावर अधिकार प्राप्त होतो व " तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें दुभे । मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥ ६.४५४ ॥ " अशी स्थिती होते. मात्र या सर्वाला श्रीसद्‌गुरुचरण, त्यांची कृपा व शक्तिजागृती ही त्रयी कारण असल्याने आपल्या हृदयात म्हणजे आज्ञाचक्रात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीगुरूच्या पादुकांची पूजा करण्यास सांगितले आहे. ही पूजा करताच जो उन्मेख होतो म्हणजे शक्तीचे जागरण होते. त्यामुळे काय घडते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ब्रह्मींचें विसवणेंवरी । उन्मेख लाहे उजरी ।
जें वाचेते इयें करी । सुधासिंधु ॥१५.१०॥
पूर्णचंद्राचिया कोडी । वक्तृत्वा घापें कुरोंडी ।
तैसी आणी गोडी । अक्षरांतें ॥११॥
सूर्यें अधिष्ठिली प्राची । जगा राणीव दे प्रकाशाची ।
तैसी वाचा श्रोतयां ज्ञानाची । दिवाळी करी ॥१२॥
नादब्रह्म खुजें । कैवल्यही तैसें न सजे ।
ऐसा बोलु देखिजे । जेणें दैवें ॥१३॥
श्रवणसुखाच्या मांडवीं । विश्व भोगी माधवीं ।
तैसी सासिन्नली बरवी । वाचावल्ली ॥१४॥
ठावो न पवता जयाचा । मनेंसी मुरडली वाचा ।
तो देवो होय शब्दाचा । चमत्कारु ॥१५॥
जे ज्ञानासि न चोजवे । ध्यानासिही जें नागवे ।
तें अगोचर फावे । गोठीमाजीं ॥१६॥
येवढें एक सौभग । वळघे वाचेचें आंग ।
श्रीगुरुपादपद्‌मराग । लाहे जैं कां ॥१७॥
तरी बहु बोलूं काई । आजि तें आनी ठाई ।
मातेवांचूनि नाहीं । ज्ञानदेवो म्हणे ॥१८॥

जे तान्हेनि मियां अपत्यें । आणि माझे गुरु एकलौतें ।
म्हणौनि कृपेसि एकहातें । जालें तिये ।।१९।।
पाहा पां भरोवरी आघवी । मेघचातकांसी रिचवी ।
मजलागीं गोसावी । तैंसें केलें ।।२०।।
म्हणौनि रिकामें तोंड । करूं गेलें बडबड ।
कीं गीता ऐसें गोड । आतुडलें ।।२१।।

चातकपक्षावर मेघ जशी पाण्याची वृष्टी करतो त्याप्रमाणें श्रीगुरूंनी माझ्या एकटयावरच सर्व कृपा केल्याने 'उन्मेख लाहे उजरी' म्हणजे शक्ती जागृत होऊन श्रोत्यांना ज्ञानाची दिवाळी करणारे असे ज्ञानेश्वरीचे गोड व्याख्यान माझ्यासारख्या अज्ञ माणसाकडून झाले असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. "निजशक्त्य-भिव्यक्तेः स्वतः प्रामाण्यम् ।।५.५१।।" असे कपिल महर्षीचे "सांख्यसूत्र" आहे. आत्मशक्तीकडून अभिव्यक्त होत असल्यामुळे वेदांना स्वतःप्रामाण्य आहे असे ते म्हणतात. ज्ञानेश्वरीची रचनाही अशी परंपराप्राप्त आत्मशक्तीकडून झाल्याने तिचे सर्व कर्तृत्व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तिच्याच चरणी म्हणजे श्रीगुरुचरणी अर्पण केले आहे; कारण जागृतशक्ती व गुरू हे एकरूप आहेत असे शास्त्रकारांनी मान्य केले आहे. "हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड । तरी आतां अवधानामृतें वाड । सिंपोनि कीजे ।।११.१९।।" ही प्रार्थनाही या धारणेपोटीच त्यांच्या मुखातून बाहेर पडली आहे. ऐतरेय ब्राह्मणाचा रचयिता कुमार महीदास याच्या अंतःकरणात भगवतीनें वरप्रसाद दिल्यामुळे "अग्निर्वै देवानामवमः" येथपासून "स्तृणुते स्तृणुते" येथपर्यंत चाळीस अध्यायांनी घटित असा ब्राह्मणग्रंथ स्फूर्तिरूपाने प्रकट झाल्याच्या कथेचा अर्थही हाच आहे.

सारांश ज्ञानेश्वरीचे स्वरूप "कीं प्रथम वयसाकाळीं । लावण्याची न्व्हाळी । प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ।।१.४२।। ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथे वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासौनि अपाडें । जियापरी ।।४३।। नानाघनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अलंकारीं बरवेपण । निवाडु दावी ।।४४।।" याप्रमाणे झाले आहे. तारुण्याच्या प्रथमदशेत स्त्रियांच्या अंगी सौंदर्याची शोभा ज्याप्रमाणे विशेषरूपाने प्रकट झालेली दिसते त्याप्रमाणेच वाक्चातुर्याच्या अत्यंत सुंदर व मुलायम शालीखाली, ज्यांना शक्तिजागृतीचे अंतरंग साधन मिळाले आहे अशा अधिकारी लोकांसाठी किंवा ज्यांना असे साधन मिळून कृतकृत्यता प्राप्ती व्हावी अशी तळमळ असेल त्यांच्यासाठी हे अपूर्व असे अध्यात्मशास्त्र श्रीज्ञानेश्वर-महाराजांकडून प्रकट झाले आहे. ज्यावेळी वसंत ऋतूची कृपा होते त्यावेळी बागेतील सर्व लहान–मोठे वृक्ष पानाफळाफुलांनी समृद्ध होऊन सौंदर्याची खाणच प्रकट झाली आहे असे वाटते. त्याप्रमाणेच ज्ञानेश्वरी हे सद्गुरूंच्या कृपेचे वैभव व सामर्थ्य

असल्याने "ऐसें श्रीनिवृत्तिनाथांचें । गौरव आहे जी साचें । ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तिये ॥१८.१७५१॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. सोन्याच्या लगडी पाहिल्या असता त्या अगदी साधारण दिसतात. परंतु त्या लगडींचे दागिने तयार केले की त्याच सोन्याचे सौंदर्य काही निराळ्या रूपानेच प्रकट झालेले दिसते. अगदी याप्रमाणेच ही सोनाराची किमया आपल्या हातून कशी घडली व गीतारूपी लगडींच्या सोन्याचे आपल्या मनातील भावार्थाच्या अपूर्व सौंदर्याने नटलेले ज्ञानेश्वरीचे अमोलिक लेणे कसे तयार झाले हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु ।
राहाटत असे मजही आंतु । रिघोनिया ॥१८.१७२९॥
आतां आयती गीता जगीं । मी सांगें म्हाठिया भंगीं ।
येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ॥१७३०॥

असे ज्ञानेश्वरी हे कृपेचे लेणे आहे यात विस्मय वाटण्याचे काहीही कारण नाही. ज्यावेळी श्रीनिवृत्तिनाथांना वाटले की, आपल्याला गुरुपरंपरेने मिळालेले समाधीचे म्हणजे योगाचे धन सर्वांना मुक्तहस्ताने वाटून टाकावे, त्यावेळी त्यांनी हे धन दीक्षा देऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या हाती दिले व आपण स्वत: "बोधौनि दिधलेल्या" धनावर संस्करण करून त्याची अपूर्व वस्तू निर्माण करण्यासाठी नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञेच्यारूपाने अर्थात् जागृत चैतन्यशक्तीच्यारूपाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या अंत:करणात प्रवेश केला. त्यामुळे सर्व सारस्वत त्यांच्या जिव्हाग्रावर वसून ज्ञानेश्वरी तयार झाली. यादृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

आत्मरूप गणेशु केलिया स्मरण । सकळ विद्यांचे अधिकरण ।
तेचि वंदूं श्रीचरण । श्रीगुरूंचे ॥१३.१॥
जयांचेनि आठवें । शब्दसृष्टि आंगवें ।
सारस्वत आघवें । जिव्हेसि ये ॥२॥
वक्तृत्वा गोडपणें । अमृतातें पारुखें म्हणे ।
रस होती वोळंगणें । अक्षरांसीं ॥३॥
भावाचें अवतरण । अवतरविती खूण ।
हाता चढे संपूर्ण । तत्त्वभेद ॥४॥
श्रीगुरूचे पाय । जें हृदय गिवसूनि ठाय ।
तें येवढें भाग्य होय । उन्मेखासी ॥५॥

हे ज्ञानेश्वरीच्या रचनेचे रहस्य आहे. श्रीगुरूंचे पाय, त्यांची कृपा व उन्मेख म्हणजे शक्तीचे जागरण या त्रयींच्या गर्भितार्थात ते दडले आहे. हा ज्ञानेश्वरीचा पाया आहे व सिद्धयोगशास्त्राचे बीज यात सामावलेले आहे. यांतच त्यांच्या

सामरस्याचे व समन्वयतेचे तत्त्व दडलेले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज अमुकच भाष्य-कराला वाट पुसत गेले, त्यांनी अमुकच तत्त्वाचा पुरस्कार केला किंवा त्यांनी एका विशिष्टच वादाचा अंगिकार केला अशा एकांतिक मताने प्रवृत्त होऊन ज्यांनी ज्यांनी ज्ञानेश्वरीकडे पाहिले त्यांची त्यांची आंधळे व हत्ती यांच्यासारखी स्थिती झाली आहे. म्हणजे त्यांचे म्हणणे सत्य आहे पण तेच सर्व सत्य आहे असे मात्र नाही. सिद्धयोगामध्ये सर्व वाद, मते व मार्ग यांचा समन्वय असून सर्व संप्रदायांना, वादांना मतांना व मार्गांना सिद्धयोगाशिवाय गती नाही. बाह्यांगे व बाह्य उपासना यांची सिद्धयोगाच्या लेखी "येर पत्र पुष्प फळ। हें भजावया मिस केवळ ॥९.३९६॥" इतकीच किंमत आहे. जोपर्यंत सुषुम्णामार्गामध्ये प्राणवायूचा संचार होऊन सहस्रारात तो स्थिर होत नाही व आतील अज्ञानाची पुटे गळून तत्त्वज्ञान आपोआप उत्पन्न होत नाही तोपर्यंत "वांचूनि आमुचा लाग निष्कळ। भक्तितत्त्व ॥९.३९६॥" याची प्रचीती, प्रतीती अगर अनुभूती न आल्याने शब्दज्ञान हे दांभिक व खोटे ठरते. अनुभूती हवी. नुसती चर्चा काय करावयाची आहे? सिद्धशक्तीच्या सामर्थ्याचा प्रकाश हवा आहे. हा प्रकाश ज्ञानेश्वरीत लाभतो. ज्ञानेश्वरी ही सिद्धशक्तीच्या सामर्थ्याचा प्रकाश करणारी एक अमृतवल्ली आहे व तिचे प्रकाशन त्यांनी गुरुकृपेने केले आहे. ही दृष्टी एकदा आत्मसात झाली म्हणजे भेद, मतमतांतरे, वाद, खंडन, मंडन, हेत्वाभास इत्यादि कशालाही अवसर न राहता आपल्या डोळ्यांना ज्ञानेश्वरीचे सिद्धयोगाच्या रूपात दर्शन होईल व शक्तिपातयोगाचे शास्त्र कथन करणारी ज्ञानेश्वरी ही सर्वश्रेष्ठ गीताटीका कशी आहे याचा उलगडा होत जाईल. श्रीमद्भगवद्गीतेवर आजपर्यंत अनेकांनी टीका लिहिल्या असून त्या आपापल्या परीने श्रेष्ठच आहेत. श्रीमद् आद्य शंकराचार्यादि वेदांती, दासोपंत व वामन पंडित यांच्यासारखे मराठी कवी, लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांसारखे राजकारणी पुरुष, श्री. अरविंदांच्यासारखे सत्पुरुष, डॉ. भांडारकरांसारखे अर्वाचीन पंडित, हॉल्ट्झमन, ओल्डन्बर्ग, श्रायडर, गार्बे व ऑटे यांच्यासारखे पाश्चात्य चिकित्सक, लॉरिंझर, वेबर व लासेन यांसारखे ख्रिश्चन धर्माचे अभिमानी, ॲनी बेझंटसारख्या थिऑसफिस्ट व डॉ. राधाकृष्णन्सारखे तत्त्वज्ञ यांप्रमाणे अनेक विद्वानांनी गीतेवर लहानमोठे निबंध, काव्ये व भाष्ये लिहून गीतेचा अर्थ स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. वरील सर्व साहित्याचे सूक्ष्मपणे अवलोकन करून गीतेवर आजपर्यंत झालेल्या सर्व टीकात ज्ञानेश्वरी ही सर्वश्रेष्ठ टीका होय असा अभिप्राय श्रीगुरुदेव रानडे यांनी आपल्या "**The Bhagavadgita as a philosophy of God-realisation**" अर्थात् "श्रीमद्भगवद्गीता म्हणजे साक्षात्कराचे तत्त्वज्ञान" या गीतेवरील ग्रंथात दिला आहे. ते म्हणतात. "आमच्या मते ईश्वराचा साक्षात्कार हीच गीतेची मुख्य व उच्चतम शिकवण आहे. ज्ञानेश्वरांनी केलेला गीतेचा तात्पर्यार्थ पूर्णपणे साक्षात्कारपर आहे.

तो एका दृष्टीने आचार्यांच्या वेदांतपर अर्थाच्या पलीकडचा व वरचा आहे. ज्ञानेश्वर हे महाराष्ट्रातील केवळ संतश्रेष्ठच होते असे नव्हे; तर ते गीतेवरील एक श्रेष्ठ भाष्यकारही होते. त्यांच्या ठिकाणी तत्त्वज्ञान, काव्य व आत्मानुभूती यांचा एक अद्भुत त्रिवेणी संगम झाला होता व हेच त्यांच्या भाष्याचे महनीय वैशिष्टच होय. त्यांचे तत्त्वज्ञान निःसंशय उच्च दर्जाचे आहे; पण त्यांची काव्यप्रतिभा त्यापेक्षाःही श्रेष्ठ आहे. तत्त्वज्ञानाचे मर्म जाणणारी त्यांची सखोल बुद्धी व काव्याची प्रतिभा यांना आत्मानुभूतीच्या वैभवाची जोड मिळाली. असा अद्भुत त्रिवेणी संगम झाल्यामुळे त्यांच्या गीतेवरील भाष्याला परमश्रेष्ठ स्थान मिळाले आहे."

हे आत्मानुभूतीचे वैभव जीवाला केवळ गीतेमुळेच प्राप्त होणार आहे अशी श्रीज्ञानेश्वरमहाराजांची नितांत धारणा आहे; कारण गुरुकृपेच्या रूपाने जेव्हा गीतेच्या परमामृताचा साधकावर वर्षाव होतो तेव्हा साधकाला अनिर्वचनीय स्वरूपाची प्राप्ती होते. या दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, "म्हणौनि मनें कायें वाचा। जो सेवकु होईल इयेचा। तो स्वानंदसाम्राज्याचा। चक्रवर्ती करी ॥१८.१६६८॥" खरोखरच जो साधक या गीतारूपी देवीचा अर्थात् सद्गुरुकृपेने जागृत झालेल्या अनादि आत्मसत्तारूपी म्हणजे कुंडलिनीशक्तिरूपी ज्ञानशक्तीचा कायावाचामनेकरून सेवक होतो त्यास ही गीता स्वानंदरूप साम्राज्याचा चक्रवर्ती राजाच करते.

येथपर्यंतच्या सर्व विवेचनावरून श्रीमद्भगवद्गीतेकडे पाहण्याची श्रीज्ञानेश्वर-महाराजांची दृष्टी कोणत्या पायावर आधारलेली आहे व त्या दृष्टीने त्यांच्याकडून भावार्थ कसा स्पष्ट झाला आहे हे लक्षात येईल. त्यामुळे सद्गुरुकृपेनें जागृत झालेल्या अनादि आत्मसत्तेच्या अपार सामर्थ्यामुळे प्राप्त झालेल्या विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण प्रातिभ ज्ञानाच्या जोरावर गीतातत्त्व हे शंभूशी अभेद्य असलेल्या भवानीरूपी चैतन्यशक्तीचे नित्यनूतन रूप असल्याचा त्यांनी जो अपूर्व सिद्धांत प्रस्थापित केला आहे प्रचीती घेणे सोपे होईल.

### गीतातत्त्व म्हणजे कुंडलिनी शक्तिस्वरूप भवानीचे नित्यनूतन रूप :—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तेथ हरु म्हणे नेणिजे। देवी जैसी कां स्वरूप तुझें। तैसें हें नित्यनूतन देखिजे। गीतातत्त्व ॥ १.७१ ॥" असे म्हणून गीतातत्त्व म्हणजे भवानीचे नित्यनूतन रूप आहे असा सिद्धांत मांडला आहे. भवानीचे नित्यनूतन रूप हे कुंडलिनी शक्तिरूप असल्याचा निर्वाळा शास्त्रकारांनी कसा दिला आहे हे पाहिले म्हणजे गीतातत्त्व हे कुंडलिनी शक्तिस्वरूप भवानीचे नित्यनूतन रूप असल्याचा प्रत्यय येऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गीतेकडे पाहण्याची दृष्टी अधिक स्पष्ट होईल. गीतेमध्ये साधकाला स्वानंदसाम्राज्याचा चक्रवर्ती राजा करण्याचे सामर्थ्य असल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धांतपूर्वक कथन केल्याचे आपण

पाहिले. गीतेमध्ये हे सामर्थ्य आले तरी कसे ? ही गीता खरोखरी आहे तरी कोण ? वास्तविक पाहाता जीवाला स्वानंदसाम्राज्याचा चक्रवर्ती राजा करण्याचे अर्थात् शिवस्वरूप करण्याचे सामर्थ्य एकमात्र जागृत कुंडलिनी शक्तीत आहे असे निस्संदिग्धपणे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा ।**
**जया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ॥ ६.२७२ ॥**

ही कुंडलिनी शक्ती जगदंबा आहे. चैतन्यरूप सार्वभौम आत्मरूपाची ती शोभा आहे. ज्यावेळी सद्‌गुरू कृपा करून शक्तिपातानुग्रह करतात त्याचवेळी संसारतापाने पोळलेला म्हणजे निद्रिस्त शक्तीमुळे बहिर्मुख होऊन जन्मांमजन्तरे भटकणारा जीव त्यातून सुटून जागृत शक्तीच्या सावलीत विसावा घेऊ लागतो. तोपर्यंत जीवाला कधी खरी विश्रांतीच मिळत नाही. जेव्हा परम शरणागती पत्करून जीव ईश्वरस्वरूप सद्‌गुरूला शरण जातो त्यावेळी तो " निजात्मपदीचा राव " कसा होतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**तया अहं वाचा चित्त अंग । देऊनियां शरण रिग ।**
**महोदधी का गांग । रिगालें जैसें ॥ १८.१३१९ ॥**
**मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदे ।**
**कांतु होऊनियां स्वानंदें । स्वरूपींचि रमसी ॥ १३२० ॥**
**संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथें विसंवे ।**
**अनुभूतिही अनुभवे । अनुभवा जया ॥ १३२१ ॥**
**तिथे निजात्मपदींचा रावो । होऊनि ठाकसी अव्ययो ।**
**म्हणे लक्ष्मीनाहो । पार्था तूं गा ॥ १३२२ ॥**

ज्याप्रमाणे गंगेचे पाणी सर्वार्थाने, सर्वांगाने व संपूर्णपणे मिळून जाऊन सागराशी तद्रूप होते त्याप्रमाणे अहंकार, वाचा, चित्त व शरीर ही त्या ईश्वराला सर्वस्वी अर्पण करून साधकाने शरण गेले पाहिजे. अशी नितांत शरणागती पत्करली म्हणजे त्याच्या कृपाप्रसादाने सद्‌गुरूंची प्राप्ती होते. सद्‌गुरूंची प्राप्ती झाली म्हणजे ते आपल्या शक्तीचा संचार शिष्यामध्ये करून त्याला शक्तिपाताचा दिव्य प्रसाद देतात. या प्रसादाने साधकाची अनादी कालापासून निद्रिस्त असलेली आत्मसत्तारूप कुंडलिनी प्रमदा जागृत होते. जोपर्यंत ती झोपलेली असते तोपर्यंत नानाप्रकारच्या कामनांनी, भावनांनी, वासनांनी परिप्लुत झालेला जीव अनंत दुःखे भोगीत संसारचक्रामध्ये अनंत काळपर्यंत नानाप्रकारच्या योनीतून भ्रमण करीत फिरत असतो. परंतु ज्यावेळी सद्‌गुरूंकडून कृपेचा त्रिभुवनैकदुर्लभ प्रसाद मिळून प्रमदास्वरूप स्वशक्तीचे बहिर्मुख, अंतर्मुख होते त्यावेळी अनंत काळपर्यंत चाललेल्या सर्व कामनांच्या खेळाला खिळ पडून ती अनंत जन्मात पसरलेल्या आपल्या

अनंत कामनांचा पसारा गोळा करून शांत होत जाते. तिला सुषुम्नेचा नवा मार्ग मिळतो. मग ती आपल्या पतीला भटण्यासाठी उत्सुक होऊन तीव्र गतीने मार्गक्रमण करू लागते. असे घडले म्हणजे इतके दिवस आपले पतिस्वरूप म्हणजे शिवस्वरूप विसरलेली जीवरूपी शक्ती आपण शिवस्वरूप आह्रोत हा अनुभव घेऊन स्वस्वरूपीच रममाण होते. या आत्मस्वरूपावरच त्याच्या निजांगभूत शक्तिमुळेच उत्पत्ती व स्थिती होत असते. यालाच उभारणी किंवा प्रसवक्रम म्हणतात. ज्यावेळी शक्ती जागृत होते तेव्हा प्रतिप्रसवक्रमाने लय किंवा संहारणी होऊन जीव आत्मस्वरूपात विश्रांती घेतो. हेच जीवाच्या विश्रांतीच्या विसाव्याचे खरे ठिकाण असते. शक्ती जागृत झाल्याशिवाय खरी अनुभूती साधकाला कधीही येत नाही; कारण " आधारशक्ति-निद्रायां विश्वं भवति निद्रया। तस्यां शक्तीप्रवोधेन त्रैलोक्यं प्रतिबुध्यते ।।६.२३।। " असे " योगशिखोपनिषदात " म्हटले आहे. आधार म्हणजे कुंडलिनी शक्तीं झोपली की सर्व विश्वही निद्राधीन होते. ज्यावेळी ती जागृत होते त्यावेळी त्रैलोक्य जागे होते. ही शक्ती जागृत झाली की खऱ्या अनुभूतीला सुरवात होते. ती आत्मस्वरूपोन्मुख झाल्यावरोबर स्वस्वरूपाचा अनुभव अनुभवू लागते. असे घडले म्हणजे साधक आपल्या मूळच्या आत्मस्थितीचा राजा होतो आणि अक्षय्य सुख भोगतो.

असे हे आत्मानुभूतीरूप अक्षय्य सुख जीवाला देऊन स्वानंदसाम्राज्याचा चक्रवर्ती राजा करण्याचे सामर्थ्य सर्वोपशांतिप्रमदास्वरूप कुंडलिनी शक्तीमध्येच आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी याच अर्थाने या शक्तीला तरुण सूर्याची कांती धारण करणारी असे म्हणून "सौंदर्यलहरीत" गौरविले आहे. "तनूच्छायाभिस्ते तरुणतरणि-श्रीसरणिभिर्दिवं सर्वामुर्वीमरुणिमनिमग्नां स्मरति यः ।।१८।।" तरुण सूर्याची कांती धारण करणाऱ्या या शक्तीच्या शरीराची छाया आकाश व सर्व पृथ्वीला आपल्या अरुण रंगाने रंगविते. तिचे जो स्मरण करतो.... अशी ही प्रमदाशक्ती कुंडलिनी युवती असून ती सर्वांच्या ठिकाणी वास करते म्हणून "ऋग्वेदातही" सांगितले आहे. ऋषी म्हणतात—

**प्रयुञ्जती दिव एति ब्रुवाणा मही माता दुहितुर्बोधयन्ती ।**
**आविवासन्तीं युवतिर्मनीषा पितृभ्य आ सदने जोहुवाना ।। (मं.५अ.४सू.४७)**

दिव्यलोकातील ही शक्ती साधकाला प्रवृत्त करणारी असून ती युवती सर्वां-मध्ये विशेषरूपाने वास करते. हिलाच चित्‌शक्ती किंवा प्राण म्हणतात.

असे या शक्तीचे अपार सामर्थ्य आहे. "शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुं । नचेदेवं देवो न खलु कुशलः स्पंदितुमपि ।।१।।" असे "सौदर्य-लहरीच्या" पहिल्या श्लोकात श्रीमदाद्यशंकराचार्यांनी वर्णन करून या शक्तीचा महिमा गायिला आहे. भगवान् शिव हे जर शक्तीने युक्त असतील तरच ते सर्व

कार्य करण्यास समर्थ होतात. तें शक्तियुक्त नसतील तर त्यांच्या ठिकाणी खरोखर स्पंदन करण्याचेही सामर्थ्य असू शकत नाही. अशा या शक्तीलाच 'भवानी' सेअ संबोधून श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "सौंदर्यलहरीत" तिची पुढीलप्रमाणे अपूर्व स्तुती करताना व गुरुकृपेनेच ही भवानी जागृत झाल्यावर जीवाला सायुज्य पदवी मिळते असा तिचा अपार महिमा सांगताना असे म्हटले आहे की–

**भवानि त्वं दासे मयि वितर दृष्टिं सकरुणा–**
**मिति स्तोतुं वांछन् कथयति भवानि त्वमिति यः ।**
**तदैव त्वं तस्मै दिशसि निजसायुज्यपदवीं**
**मुकुंद–ब्रह्मेंद्र-स्फुट-मुकुट-नीराजित-पदाम् ॥२२॥**

हे भवानी ! मी तुझा दास आहे. तू माझ्यावर आपली करुणायुक्त दृष्टी टाक. तू माझ्याकडे कृपापूर्ण दृष्टीने पाहा. याप्रमाणे तुझी स्तुती करण्याची मनात इच्छा ठेवून 'भवानि त्वं' एवढी अक्षरे उच्चारताक्षणीच तू त्याला आपले सायुज्य-पदही देतेस. ब्रह्मा, विष्णू, महेश, इंद्र, वरुण, कुबेर इत्यादि मोठमोठे देवही रत्न-जडित मुकुट घालून तुझ्या चरणी नम्र होत असताना जणू काही ते आपल्या मुकुटांच्या प्रकाशाने स्पष्टपणे तुझ्या चरणकमलांना ओवाळीत आहेत असे वाटते.

या शक्तीलाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी भवानी असे म्हटले आहे. या भवानीनेच गीतातत्त्वाबद्दल शंकरांना प्रश्न विचारून गीतातत्त्व व आपण एकरूप कसे आहोत हे शंकरांच्या मुखातून जगाला सांगून संशयनिवृत्ती केली आहे. ती स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी ।**
**जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारौनि ॥१.७०॥**
**तेथ हरु म्हणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरूप तुझें ।**
**तैसें हें नित्यनूतन देखिजे । गीतातत्त्व ॥७१॥**

गीतार्थाची थोरवी भगवान् शंकर कथन करीत असताना देवी भवानीला अति-शय आश्चर्य वाटले; कारण भगवान् शंकर हे सिद्धांचे सिद्ध असल्यामुळे त्यांनी स्वतः प्रवर्तित केलेल्या सिद्धयोगाने म्हणजेच शांभवयोगाने सप्रभव गीतातत्त्व कसे संपा-दिता येते हे ते तिला सांगत होते. या सिद्धयोगाच्या तत्त्वज्ञानाधारे कथन केलेला अर्थ ऐकून तिला निरतिशय चमत्कार वाटला. या आश्चर्याच्या पोटीच तिने 'गीतार्थ कसा आहे ?' म्हणून शंकरांना प्रश्न केला. या तिच्या प्रश्नाला शंकरांनी मोठे अपूर्व उत्तर दिले. ते म्हणाले, "हे भवानी ! हे शक्ती ! तुझे स्वरूप नित्यनूतन असल्यामुळे जसा त्या स्वरूपाचा पार लागत नाही त्याप्रमाणे हे गीतातत्त्व जेव्हा पाहावे तेव्हा नवीनच आहे असे वाटते." श्रीमद्याशंकराचार्य आपल्या "सौंदर्यलहरी" या ग्रंथात भवानिस्वरूप कुंडलिनी शक्तीचे स्वरूप कल्पनातीत आहे हे सांगून तिचे

नित्यनूतनत्व स्पष्ट करताना असे म्हणतात की –

**त्वदीयं सौंदर्यं तुहिनगिरिकन्ये तुलयितुं**
**कवींद्रा कल्पंते कथमपि विरिंचिप्रभृतयः।**
**यदालोकौत्सुक्यादमरललना यांति मनसा**
**तपोभिर्दुष्प्रापामपि गिरिशसायुज्यपदवीम् ॥१२॥**

हे हिमगिरिसुते ! आई कुंडलिनी !! तुझ्या सौंदर्याची तुलना करण्याकरिता अर्थात् त्याला उपमा देऊन त्याचे वर्णन करण्याकरिता ब्रह्मदेव, विष्णू, इंद्र व बृहस्पती यांच्यासारखे मोठेमोठे कवी म्हणजे श्रेष्ठ विद्वान् असलेले प्रत्यक्ष देवदेखील मोठे प्रयास करून सुद्धा समर्थ होत नाहीत. देवांच्या स्त्रिया, देवता व अप्सरा वगैरे सुद्धा तुझे सौंदर्य पाहून ध्यानस्थ होतात. त्यामुळे योग, याग, तपश्चर्या इत्यादि साधनांनीही मिळण्यास कठीण असलेली शिवसायुज्यपदवी तुझ्या कृपेमुळे त्यांना सहज प्राप्त करता येते.

"सौंदर्यलहरीतच" पुढे श्रीमदाद्यशंकराचार्यांनी आई भवानी कुंडलिनी शक्तीचे परमानंदाची व परमाल्हादाची लहर म्हणून वर्णन करून तिचे नित्यनूतन स्वरूपच अधिक प्रकट करताना असे म्हटले आहे की–

**तडिल्लेखातन्वीं तपनशशिवैश्वानरमयीम्**
**निषण्णां षण्णामप्युपरि कमलानां तव कलाम् ।**
**महापद्माटव्यां मृदितमलमायेन मनसा ।**
**महान्तः पश्यंतो दधति (परमानंदलहरीम्) परमाल्हादलहरीम् ॥२१॥**

हे भवानी कुंडलिनी ! तू विद्युलतेप्रमाणे दीर्घ, सूक्ष्म, कुटिलाकार व प्रकाशमय आहेस. सूर्य, चंद्र, व अग्नी यांच्या तेजाने युक्त असे तुझे स्वरूप आहे. शरीरातील सहाही चक्रांच्या म्हणजे कमलांच्या वर तुझी कला म्हणजे मूर्ती विराजमान झालेली असते. अविद्या, अहंकार, अभिनिवेश, कामक्रोध इत्यादि मनातील सर्व मलांचा निरास करून आपल्या मनाला निर्मल केलेले तुझे मोठमोठे अनन्य भक्त असलेले साधक, योगीश्वर सहस्रदलकमलामध्ये विराजमान झालेल्या तुझ्या स्वरूपाचा साक्षात्कार करून घेतात. असा साक्षात्कार झाल्यावर ते नित्य आणि निरतिशय आनंदाच्या लहरीत निमग्न होतात.

ही कला म्हणजे शक्ती नित्यनूतन असल्याने साधकाला परमानंद व परमाल्हाद प्राप्त होतो. ही कला म्हणजे कुंडलिनी शक्ती सकलतत्त्वातीत, सर्वाधारभूत, शुद्ध सच्चिदानंदरूप आदिशक्ती आहे. ती तंत्रशास्त्रात सांगितलेल्या पंचवीस, छत्तीस अथवा एक्कावन्न तत्त्वांच्याही पलीकडील आहे. तिला शास्त्रात 'सादकला' असे म्हटलेले आहे. ती सर्वांपेक्षा श्रेष्ठ असल्यामुळे तिला परा, परात्परा अथवा परमेश्वरी असेही म्हटलेले आहे. साद म्हणजे चरम गती किंवा परम अधिष्ठान होय. कशा

या सादकलेचा किंवा साकलेचा साक्षात्कार झाल्यावर साधक नित्य व नूतन अशा निरतिशय आनंदाल्हादाच्या लहरीत निमग्न होतात. या नित्यनूतनत्वामुळे त्यांचा आनंदाल्हाद कधीही क्षीण होत नाही. अतृप्तीचा लेशही त्यांच्या मनाला स्पर्श करीत नाही. या अवस्थेलाच शास्त्रकारांनी अपरा भक्ती म्हटले आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी "ज्ञानी इयेतें स्वसंवित्ती। शैव म्हणती शक्ती। आम्ही परमभक्ती। आपुली म्हणो ।।१८.११३३।।" असे म्हणून आत्मसंवित्, शक्ती व परमभक्ती यांचा अपूर्व मेळ घातला आहे.

सद्‌गुरुकृपेने शक्तिपात होताक्षणीच कुंडलिनीच्या उत्थापनाने गीतातत्त्वाची आनंदाल्हादयुक्त जाणीवेची जीवाच्या पात्रापात्रतेनुसार कमीअधिक प्रमाणात जी प्रत्यक्षानुभूती येते ती शेवटपर्यंत कायम राहाते. यातच या शक्तीचे नित्यनूतनत्व असते. नव्या वस्तूचे प्रथमक्षणी प्रेम वाटते; पण ती वस्तू जशी जशी जुनी होते किंवा भोगली जाते तसे तसे तिचे प्रेम क्षीण होत जाते. म्हणून विषयांचे प्रेम असे क्षीण होत असल्यामुळे त्या विषयप्रेमाला नित्यनूतन प्रेम म्हणता यावयाचे नाही आणि विषयही नित्यनूतन म्हटला जात नाही. सारखेच टिकून राहाणारे जे प्रेम असते त्यालाच परमप्रेम म्हणतात किंवा परमप्रेमस्वरूप वस्तूच नित्यनूतन असते. देवी भगवती भवानी कुंडलिनी शक्तीचे स्वरूप नित्यनूतन म्हणजे परमप्रेमस्वरूप आहे. या परमप्रेमालाच भक्ती म्हणतात. शक्तिजागृतीमुळे भगवंताविषयीच्या नित्य-नूतन प्रेमाची अविरल व अविरत धारा उपस्थित होत असल्याने परमप्रेमस्वरूप हेच गीतेचे तत्त्व ठरते. "विष्णुपुराणातही" या शक्तीचे तीन प्रकारांनी युक्त असलेले स्वरूप सांगून त्यातच तिचे नित्यनूतनत्व स्पष्ट केले आहे. महर्षी व्यास म्हणतात—

**ल्हादिनी संधिनी संवित् त्वय्येका सर्वसंश्रये ।**
**ल्हादतापकरी मिश्रा त्वयि नो गुणवर्जिते ॥**

परमेश्वर संसारातील सर्व वस्तूंचे आश्रयस्थान आहे. त्याच्या ठिकाणी वास करीत असलेली शक्ती आनंद अंशाने आल्हादिनी, सत् अंशाने संधिनी व चित् अंशानें संवित् होते. अर्थात् ही शक्ती आनंददायिनी, सत्तादायिनी व प्रकाश म्हणजे बोध-कारिणी अशा त्रिविधरूपाने विद्यमान असते. प्राकृत सुख व दुःख देणारी सत्व, रज व तमोगुणयुक्त ही अपरा किंवा बहिरंग शक्ती असून तिचा कोणताही प्रभाव भगवंतावर पडत नाही; कारण तो कोणत्याही प्रकारच्या प्राकृत गुणांपासून मुक्त असतो.

सारांश अशा प्रकारे कुंडलिनी शक्तिस्वरूप भवानीच्या नित्यनूतन स्वरूपानें गीतातत्त्व विलसत असल्याने तेच " क्षीरसिंधु परिसरीं। शक्तीच्या कर्णकुहरीं। नेणों कैं श्रीत्रिपुरारीं। सांगितलें जें।। १८.१७५२।। " हे होय असे श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी म्हटले आहे. भवानीने चमत्कारौनि केलेल्या प्रश्नाला शक्तीच्या

कर्णकुहरात त्रिपुरारी शंकरांनी उत्तर दिले की, "गतिस्त्वं गतिस्त्वं त्वमेका भवानि।" हे भवानी! तूच आमचे ध्येय व तूच आमचे एकमेव साध्य आहेस. हे भवानी! तूच ते गीतातत्त्व आहेस. तूच साधन आहेस व तूच साध्य आहेस. श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गीतेकडे पाहण्याची दृष्टी अशी ही अपूर्व आहे. महाकवी मोरोपंतही ही दृष्टी ठेवूनच ज्ञानेश्वरीची स्तुती करताना म्हणतात की—

**ज्ञानेशा त्वत्कृतिते करिती ज्ञाते समस्तही प्रणती।**
**ज्ञानेश्वरी भवानी होय महामोहमहिष हे म्हणती।।**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतातत्त्व म्हणजे कुंडलिनी शक्तिस्वरूप भवानीचे नित्यनूतन रूप आहे, हा जो सिद्धांत बीजरूपाने प्रस्थापित केला आहे, त्याचीच अधिक अंकुरित किंवा प्रस्फुटित दशा महेशांनी प्रवर्तित केलेल्या व गुरुक्रमाने प्रवाहित होऊन प्राप्त होणाऱ्या समाधिधनाच्या रूपाने साकार झालेल्या गीतानिधानाच्या दृष्टीत सामाविलेली कशी दिसते याचा आपण विचार करू.

## महेशान्वयसंभूत गुरुक्रमप्राप्त समाधिधनरूप गीतानिधान :—

आदिनाथ शंकरांनी प्रवर्तित केलेल्या व गुरुसंप्रदायक्रमाने प्राप्त होणाऱ्या सिद्धयोगरूप धनाचे गीता हे निधान म्हणजे ठेवा आहे, ही श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गीतेकडे पाहण्याची मूलभूत दृष्टी व धारणा आहे. गीतेकडे पाहण्याच्या या अपूर्व दृष्टीमुळेच अत्यंत प्रभावयुक्त असलेल्या शांभवाद्वैयानंदाच्या म्हणजेच सिद्धयोगाच्या वैभवाची उधळण त्यांनी ज्ञानेश्वरीत अथपासून इतिपर्यंत केली आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराजांच्या गीतेकडे पाहण्याच्या या दृष्टीतच त्यांनी ज्ञानेश्वरीमध्ये गीतेचा भावार्थ कोणत्या पद्धतीने प्रवाहित केला असेल याचा मागोवा घेता येतो.

मुळातच गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे" असा निर्देश येतो. भगवंतांनी सांगितलेल्या उपनिषदातील ब्रह्मविद्येपैकी हे योगशास्त्र आहे असा त्याचा स्पष्ट अर्थ आहे. योग म्हणजे उपाय किंवा साधन होय. उपनिषद् म्हणजे वेदरहस्य, उपासना व ब्रह्मविद्या होय. भगवंतांनी निरनिराळ्या अवतारात व निरनिराळ्या प्रसंगी अनेक वेदरहस्ये सांगितलेली आहेत. त्यातील ब्रह्मविद्या हे महान् रहस्य आहे. हे रहस्य म्हणजे योगशास्त्र असून ते गीतेच्या रूपाने भगवंतांनी सांगितले आहे. ब्रह्मविद्या साध्यरूप व साधनरूप अशी दोन प्रकारची आहे. ही साध्यसाधनांची एकता सिद्धयोगात प्रकर्षत्वाने सामावलेली असल्याने व श्रीज्ञानेश्वरमहाराजांना ही योगशास्त्राची विद्या महेश्वरांच्यापासून सिद्धयोग या नावाने प्रवर्तित होऊन परंपरेने प्राप्त झालेली असल्याने त्यांनी गीतेतील ब्रह्मविद्यांतर्गत योगशास्त्र म्हणजे गुरुकृपांकित सिद्धयोग शास्त्रच होय हे पुनःपुन्हा आवर्जून कथन केले आहे. हे स्पष्ट करताना ते म्हणतात—

**तैसें जया कोण्हासि दैवें । गुरुवाक्यश्रवणाचि सवें ।**
**द्वैत गिळोनि विसंवे । आपणया वृत्ती ।।१८.९८८।।**
**कानावचनाचिये भेटी— । सरिसाचि पैं किरीटी ।**
**वस्तु होऊनि उठी । कवणि एकु जो ।।१८.९९१ ।।**

ज्यावेळी दैवयोगाने सद्‌गुरूंची प्राप्ती होऊन ते साधकाला "तू ब्रह्मच आहेस" अशा महावाक्योपदेशाने शब्ददीक्षा देऊन शक्तिपात करतात त्यावेळी या गुरुवाक्यश्रवणावरोबर अखिल भेदांचा सर्वार्थाने नाश होऊन तो साधक आपल्या स्वरूपाच्या ठिकाणी स्थिर होतो. जो साधक तीव्र अधिकारी असतो त्याला शब्द-दीक्षा होताक्षणीच म्हणजे श्रीगुरूंच्या उपदेशरूप वचनाची व त्याच्या कानाची गाठ पडताक्षणीच शक्तिपात होऊन तो ब्रह्मरूप होतो. अशा प्रकारच्या साध्यसाधनांची एकता केवळ एकमात्र शक्तिपातातच आहे, हा त्रिकालाबाधित सिद्धांत आहे. "जीवन-मुक्तिविवेकातील" "कदाचिच्छक्तीनाम्" या पदावर भाष्य करताना श्रीअच्युत-राय मोडक यांनी "पूर्णानंदेन्दुकौमुदी व्याख्येत" शक्तिपातयोगाची ही महती अगदी स्पष्टपणे दिग्दर्शित केली आहे. गुरुप्रसाद अथवा ईश्वरप्रसाद सत्‌शिष्याला शक्तिपाताने प्राप्त होतो आणि शक्तिपातावरोबर महावाक्याचा किंवा गुरुमंत्राचा उपदेश झाल्यामुळे शिष्य कृतकृत्य होतो हे सांगताना ते शास्त्रकारांचे वचन देऊन म्हणतात की—

**शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदांतवाक्यजा ।**
**यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः ।।**

वेदांताने प्राप्त होणारी विद्या जेव्हा शक्तिपाताच्या संयोगाने मिळते तेव्हा मनुष्य तत्क्षणीच मुक्त होतो यात काहीच संशय नाही. याचा अर्थच असा आहे की शक्तिपातात साध्यसाधनाची अलौकिक एकरूपता असल्याने गुरू हा श्रोत्रीय व ब्रह्मनिष्ठ असूनसुद्धा जर शक्तिपात करण्याचे सामर्थ्य त्याच्यात नसेल तर शिष्याला त्याचक्षणी साक्षात्कार होऊ शकत नाही.

"सूतसंहितेतील सूतगीतेमध्येही" वेदांत—तत्त्वज्ञान हे शक्तिपाताच्या हातात हात घालून आल्यावरच उपयुक्त ठरते हे निक्षून सांगताना असे म्हटले आहे की—

**तत्त्वज्ञानेन मायाया बाधो नान्येन कर्मणा ।।८.६।।**
**ज्ञानं वेदांतवाक्योत्थं ब्रह्मात्मैकत्वगोचरम् ।**
**तच्च देवप्रसादेन गुरोः साक्षान्निरीक्षणात् ।**
**जायते शक्तिपातेन वाक्यादेवाधिकारिणाम् ।।७।।**

तत्त्वज्ञानानेच मायेचा निरास होतो. दुसऱ्या कोणत्याही कर्माने होत नाही. महावाक्यामुळे उत्पन्न होणारे जीव व ब्रह्माचे ऐक्य करणारे असे ज्ञानच वेदांत-शास्त्राला संमत आहे. हे ज्ञान देवाच्या प्रसादामुळे गुरूकडून प्रत्यक्ष दृष्टिक्षेप

झाल्यामुळे शक्तिपात होऊन अधिकारी शिष्याला नुसत्या वाक्योच्चाराबरोबर अनुभवाला येते. अशा प्रकारे साध्यसाधनांच्या एकतानिदर्शक शक्तिपातयोगाला किंवा सिद्धयोगाला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतानुषंगाने प्रकट होणाऱ्या भावार्थात ओवीओवीगणिक कसे स्थान दिले आहे हे पाहिले म्हणजे गीतेकडे पाहण्याची त्यांची दृष्टी अधिकाअधिक स्पष्ट होत जाते.

शक्तिपातयोगाला अत्यंत गुह्ययोग म्हणून संजयानेही गीतेतील या ब्रह्मविद्यांतर्गत योगशास्त्राला योग असे म्हटले आहे.

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतं गुह्यमहं परम् ।**
**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ।।१८.७५।।**

योगेश्वर कृष्ण स्वतःच्या मुखातून हा अत्यंत गुह्य योग स्वतः सांगत असताना भगवान् व्यासांच्या कृपेने तो मी आपल्या स्वतःच्या कानांनी ऐकला. यात संजयाने सिद्धयोगाला अत्यंत गुह्ययोग म्हटले असून आपण हा योग कर्णोपकर्णी ऐकला नसून भगवान् आपल्या नित्य ज्ञानैश्वर्यादिसंपन्नरूपाने सांगत असताना ऐकला याची ग्वाही दिली आहे. या श्लोकावरील श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा भावार्थ पाहिला म्हणजे त्यांनी कोणता हेतू मनात वाळगून गीतेवर टीका लिहिली याची प्रतीती येते. ते म्हणतात–

**तेव्हां बैसतेनि आनंदें । म्हणें जी जें उपनिषदें ।**
**नेणती तें व्यासप्रसादें । ऐकिलें मियां ।। १८.१६०९ ।।**
**ऐकतांचि ते गोठी । ब्रह्मत्वाची पडिली मिठी ।**
**मीतूंपणेंसीं दृष्टी । विरोनि गेली ।। १८.१६१० ।।**
**हे आघवेचि का योग । जया ठाया येती मार्ग ।**
**तयाचे वाक्य सवंग । केलें मज व्यासें ।।१६११ ।।**
**तेथ कीं माझें श्रोत्र । पाटाचें जालें जी पात्र ।**
**काय वानूं स्वतंत्र । सामर्थ्य श्रीगुरूचें ।। १६१३ ।।**

श्रीकृष्णार्जुनांचा संवाद ऐकून संजयाला अष्टसात्त्विकभाव प्राप्त झाले होते. ते जेव्हा थोडे ओसरले व त्याचे अंतःकरण जेव्हा स्थिर झाले तेव्हा संजय म्हणाला की, उपनिषदनांही जे गुह्य ठाऊक नाही ते श्रीव्यासांच्या प्रसादाने मी आज ऐकले. ज्यावेळी मी श्रीकृष्णांच्या मुखातून ते उपनिषत्साररूप योगरहस्य ऐकले त्याचक्षणी माझे जीवपण नाहीसे होऊन मला ब्रह्मभाव प्राप्त झाला. माझे शिवरूपाशी ऐक्य झाले. त्यामुळे मी व तू ही माझी द्वैतदृष्टी किंवा अज्ञानदृष्टी पूर्णतया मावळून गेली. गुरुकृपेने प्राप्त होणाऱ्या सिद्धयोगातच सर्व मार्गांची परिणती होत असते श्रीव्यासांच्या कृपेने मला भगवान् श्रीकृष्णांच्या मुखातून गीतेच्यारूपाने शब्ददीक्षेची प्राप्ती होऊन वरील सोपा व सहज मार्ग मिळाला.

ही शब्ददीक्षा स्वीकारण्यास ज्या श्रीगुरूंनी मला कानामनावाचादेहाने योग्य केले त्या श्रीगुरूंच्या स्वतंत्र अद्‌भुत सामर्थ्याचे वर्णन करणे मला अशक्य आहे.

वर उधृत केलेल्या गीतेच्या श्लोकावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही संजय ह्या व्यासांकडून व श्रीकृष्णांकडून उभयविधपणे कृपासागरात कसा बुडाला हे सांगताना असे म्हटले आहे की, "व्यासप्रसादात्ततो दिव्य चक्षुर्लाभाच्छ्रुतवानेतं संवादं गुह्यमहं परं योगं योगार्थत्वात्संवादमिमं योगमेव वा योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयं न परंपरातः।।" व्यासांच्या प्रसादाने म्हणजे त्यांच्यापासून दिव्यदृष्टीचा लाभ झाल्यामुळे ह्या गुह्य असा योगशास्त्राचा संवाद संजयाने ऐकला. हा सर्व संवाद योगासंबधीच होता व चित्तवृत्तींचा आपोआप निरोध घडून येण्याचे विशेषत्व या गुह्ययोगात सामाविलेले असल्यामुळे या गीताशास्त्राला योग म्हटले आहे आणि योग्यांचा ईश्वर जो कृष्ण त्याच्या मुखातून मला हे गुह्यशास्त्र स्वतःला प्रत्यक्ष ऐकावयास मिळाले म्हणून संजयाने ग्वाही दिली आहे. या दृष्टीने "श्रीगुरुगीतेत" असे म्हटले आहे की, "अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजन शलाकया। चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरुवे नमः।। ३४ ।।" म्हणजे अज्ञानरूपी तिमिराने अंध झालेल्या व्यक्तीचे नेत्र ज्ञानरूपी अंजनशलाकेच्या द्वारे जो उघडतो तोच खरा गुरू होय. संजयाच्या बाबतीत व्यास व श्रीकृष्ण यांच्याकडून ही गोष्ट घडून आली. ज्ञानांजनशलाका म्हणजे ज्ञानरूपी अजंन शिष्याच्या डोळ्यात घालणारे साधन होय. हे साधन किंवा ही शलाका म्हणजेच शक्तिपात होय. वेदांत-ज्ञान अनुभवगम्य होण्यासाठी शक्तिपाताशिवाय दुसरा मार्ग नाही. शक्तिपाताने सद्‌गुरू शिष्याला ज्ञानचक्षू प्राप्त करून देतात. ही गोष्ट भगवंतांनीच गीतेत स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ।। १३.३४ ।।**

जड, विकारी, क्षणिक व नाशवंत गोष्टीला क्षेत्र म्हणतात. नित्य, चेतन, अविकारी, व अविनाशी गोष्टीला क्षेत्रज्ञ म्हणतात. या दोन गोष्टींमधील भेद व अंतर लक्षात आले पाहिजे. यासाठी भूतमात्रांची मूळ प्रकृती जी अविद्या तिच्यापासून सुटण्याचा मार्ग जाणला पाहिजे. जड व चैतन्य यातील अंतर ज्ञानचक्षूमुळेच प्राप्त होऊन मुक्तीचा उपाय मिळतो. या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी हे ज्ञानचक्षू शक्तिपात करून श्रीकृष्णांनी अर्जुनाला कसे दिले याचे अपूर्व रहस्य प्रकट केले आहे. ते म्हणतात–

**ऐसा हा जी आघवा। श्रीकृष्णें तया पांडवा।**
**उगाणा दिधला जीवा। जीवाचिया ।।१३.११४४।।**

**येर कलशींचें येरीं । रिचविजे जयापरी ।**
**आपणपें तया श्रीहरीं । दिधलें तैसें ।।११४५।**
**आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण ।**
**वरी अर्जुनातें श्रीकृष्ण । हा मी म्हणे ।।११४६।।**

आपल्या जीवाचे जीवन असलेल्या अर्जुनाला श्रीकृष्णांनी जड व चैतन्य यांतील फरकाचे ज्ञान नानाप्रकारे सांगून पाहिले तरीसुद्धा त्याची संशयनिवृत्ती होईना; तेव्हा या तत्त्वज्ञानाची प्रत्यक्षानुभूतीच त्यांनी अर्जुनाच्या ठिकाणी शक्ति-संक्रमण करून आणून दिली. ज्याप्रमाणे एका घागरीतील पाणी दुसऱ्या घागरीत ओतावे त्याप्रमाणे श्रीहरींनी आपल्या हृदयातील ज्ञान शक्तिपातयोगदीक्षेच्या साहाय्याने अर्जुनाच्या हृदयात ओतले. खरे म्हणजे हे ज्ञान देतो कोण आणि घेतो कोण ? अर्जुन हा जीवस्वरूप नर व श्रीकृष्ण हे शिवस्वरूप नारायण अशी स्थिती होती. अशावेळी श्रीकृष्णांनी अर्जुनाचे जीवत्व नाहीसे करण्यासाठी "हा अर्जुन मीच आहे" अशा शब्दोच्चारांनी शक्तिपात करून त्याच्या ठिकाणची मलकर्मादि पाशबद्धता जाळून टाकून त्याचे स्वस्वरूप असलेले स्वसंवेद्य आत्मस्वरूप प्रकट केले.

गीता हे योगशास्त्र आहे असे प्रत्यक्ष गीतेतच म्हटले आहे. मुख्यत: योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध, चित्तसमाधान व चितैकाग्र्य असून वेदांतशास्त्राचे ते अंतरंग साधन आहे. त्याचे वेदांताला वावडे नाही. योग ज्ञानासाठीही पाहिजे व ज्ञानानंतर जीवनमुक्तीसाठीही पाहिजे. मात्र वेदांतशास्त्र अनुभवगम्य होण्यासाठी गुरूने शक्तिपात हा केलाच पाहिजे. साक्षात् दत्तावतारस्वरूपी महान् संन्यासी व योगी प. प. श्रीमत्-वासुदेवानंदसरस्वतीटेंबेस्वामीमहाराजांचीही अशीच धारणा होती. यादृष्टीनेच त्यांनी आपल्या "वृद्धशिक्षा" या वेदांत ग्रंथात "विशारदं ब्रह्मनिष्ठं श्रोत्रिय गुरुमाश्रयेत ।।६।।" असे सांगितले असून त्यावर स्वतःच टीका करताना त्यांनी असे म्हटले आहे की, "श्रोत्रियम् अर्थात् शब्दब्रह्मनिष्णातम्, ब्रह्मनिष्ठम्-संजाता परोक्षसाक्षात्कारम्, विशारदं-लौकिकादि दृष्टांतो-पपत्यादिना शक्तिपातेन च वाक्यार्थग्राहयितारं गुरुं आश्रयेत।" यावरून हे स्पष्ट होते की गुरू श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ असूनसुद्धा जर शक्तिपात करण्याचे सामर्थ्य त्याच्यात नसेल तर शिष्याला त्याचक्षणी साक्षात्कार होऊ शकत नाही व अंतरंग साधनही मिळत नाही.

अशा प्रकारे महेशांनी प्रवर्तित केलेल्या व गुरुपरंपरेने प्राप्त झालेल्या सिद्ध-योगाचे धन हाच गीतेचा ठेवा आहे हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या परंपरेतील श्रीनिळोबामहाराज, श्रीचोखामेळा इत्यादि संतमहात्म्यांनी आपल्या अभंगातून ग्वाही देऊन सांगितले आहे. श्रीनिळोबामहाराज तर ज्ञानेश्वरी हा नाथसंप्रदायाची थोरवी प्रकट करणारा ग्रंथराज आहे हे सांगताना म्हणतात--

**शिवशक्ति निमित्त दाऊन । उपदेशिले निजगुह्यज्ञान ।।१।।**

तेणें देवोदेवीं सुखसंपन्न । पावला मीन तो लाभ ।।२।।
तेणें गोरक्ष उपदेशिला । निजात्मज्ञानी प्रबोधिला ।।३।।
त्रैलोक्यामाजीं गौरविला । योग दाविला विशदार्थ ।।४।।
गुह्यागुह्यज्ञानाज्ञान कथन । तेणें गहिनीतें उपदेशून ।।५।।
उद्धरावया दीन जन । तेणें निवृत्ति शिक्षापिला ।।६।।
तेचि हातवटी ज्ञानेश्वरा । दीधली आदि परंपरा ।।७।।
सोपान मुक्ताई वटेश्वरा । चांगया प्रसाद दीधला ।।८।।
निळा म्हणे ऐसियापरी । नाथसंप्रदायाची थोरी ।।९।।
प्रकट केली ज्ञानेश्वरी । भगवद्गीता उकलुनी ।। १०।। सकलसंत गाथा १५६७।।

या अभंगात श्रीनिळोबांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांची परंपरा देऊन निजगुह्यज्ञान शक्तिपातयोगाने कसे द्यावयाचे ही नाथसंप्रदायाची थोरवी प्रकट करणारा व गुह्यागुह्यज्ञानाज्ञानाची अनुभूती आणून देणाऱ्या सिद्धयोगाच्या द्वारा भगवद्गीतेचा भावार्थ उकलून दाखविणारा ज्ञानेश्वरी हा एक अपूर्व ग्रंथ आहे हे आवर्जून सांगितले आहे.

श्रीचोखामेळा यांनीही श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरी लिहून निगमवल्ली प्रकट केली आहे असे सांगितले आहे. ही वल्ली काय आहे यासंबंधीचा सर्व विचार विषयप्रवेशामध्ये केलाच आहे. अशी ही दृष्टी ठेवूनच ते म्हणतात—

तो हा महाराज ज्ञानेश्वर माउली । जेणें निगमवल्ली प्रकट केली ।। १ ।।
संसारीं आसक्त मायामोहें रत । ऐसे जे पतीत तारावया ।। २ ।।
चोखा म्हणे श्रेष्ठ ज्ञानदेवी ग्रंथ । वाचता सनाथ जीव होतो ।। ३ ।।
उघडोनि वेदार्थाचा ठेवा । केला तरणोपाय जीवा ।। ४ ।।
ऐसा समर्थ ज्ञानदेव । तया चरणीं ठेवा भाव ।। ५ ।।

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्याला परंपरेने मिळालेला वेदार्थाचा ठेवा उलगडून दाखवून जीवांना सनाथ केले व त्यांना या दुस्तर भवसागरातून तरून जाण्याचा मार्ग दाखविला म्हणून श्रीचोखोबा सांगतात. मात्र श्रीनिळोबा व श्रीचोखोबा यांच्या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जे गुह्यज्ञान सांगितले, जो योग विशद करून स्पष्ट केला, निगमवल्ली म्हणून जे प्रकट केले व वेदार्थाचा ठेवा म्हणून भगवद्गीता उकलून दाखविली ती सर्व नाथसंप्रदायाच्या आधारानेच दाखविली याला विशेष महत्त्व आहे. त्यात श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गीतेकडे पाहण्याची दृष्टी अंतर्निहित झाली आहे. पुढे आपल्याला "ज्ञानेश्वरीतील नाथसंकेतीचा दंश" या चवथ्या प्रकरणात या संप्रदायाचे सर्व रहस्य उलगडून पाहवयास मिळणारच आहे. येथे मूलतः संप्रदायाची थोरवी काय आहे व श्रीज्ञानेश्वरमहाराज गीतेच्या भावार्थासाठी संप्रदायाला किती महत्त्व देतात एवढेच पाहवयाचे आहे.

"ज्ञानादेव तु कैवल्यं" म्हणजे ज्ञानानेच मोक्ष होतो या विषयी श्रीशंकराचार्य, श्रीनिंबाकाचार्यादि कोणाचाच वाद नाही. मात्र ज्ञानाचे मुख्य साधन कोणते याविषयी वरील सांप्रदायिक लोकांनी आपापल्या संप्रदायाप्रमाणे निर्णय केला आहे. श्रीशंकराचार्य निष्काम कर्म, ध्यानयोग, आश्रमसंन्यास, भक्ती, क्षराक्षरादि विचार इत्यादि सर्व किंवा यातील प्रत्येक ज्ञानाचे साधन आहे असे म्हणतात. वैष्णव भक्तीलाच ज्ञानाचे साधन समजतात. त्याचप्रमाणे श्रीज्ञानेश्वरमहाराज नाथसंप्रदाय-परंपरेने आलेले पंथराज म्हणजे शक्तिपातयोग किंवा सिद्धयोग हेच ज्ञानाचे साधन आहे असे म्हणतात. अर्थात् हे साधन सांगत असताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या नाथपरंपरेचा म्हणजे संप्रदायाचा आवर्जून उल्लेख केला आहे.

संप्रदायाची ही थीरवी सर्व शास्त्रकारांनी, आचार्यांनी, पंडितांनी व संतमहात्म्यांनी सांगितली आहे. श्रीशंकराचार्यांनी "केनोपनिषदातील" "इति शुश्रुम पूर्वेषां ये नस्तद्व्याचचक्षिरे ॥ १.३ ॥" या मंत्रावर पदभाष्य करताना "इत्येवं सर्वात्मनः सर्वविशेषरहितस्य चिन्मात्रज्योतिषो ब्रह्मत्वप्रतिपादकस्य वाक्यार्थस्य आचार्योपदेशपरंपरया प्राप्तत्वमाह– इति शुश्रुमेत्यादि। ब्रह्म च एवमाचार्योपदेश-परंपरया एवाधिगंतव्यं न तर्कतः– प्रवचनमेधाबहुश्रुततपोयज्ञादिभ्यश्च, इति एवं शुश्रुम श्रुतवंतो वयं पूर्वेषाम् आचार्याणां वचनम्; ये आचार्या नः अस्मभ्यं ब्रह्म व्याचचक्षिरे व्याख्यातवन्तः विस्पष्टं कथितवंतः, तेषाम् इत्यार्थः ॥" असे म्हटले आहे. याचा अर्थ असा आहे की, सर्वविशेषशून्य चिन्मात्रज्योती सर्वात्म्याचे ब्रह्मत्व प्रतिपादन करणारे जे पूर्व वाक्य त्याचा अर्थ याप्रमाणे आचार्यांच्या उपदेशाच्या परंपरेने प्राप्त झाला आहे, असे 'इति शुश्रुम' इत्यादि वाक्य सांगते. अशा प्रकारे हे ब्रह्म आचार्यांच्या उपदेश परंपरेनेच प्राप्त होते. ते तर्काने, प्रवचनाने, बुद्धीने, बहुश्रुततेमुळे, तपाने किंवा यज्ञादि गोष्टींमुळे प्राप्त होत नाही; असे सर्व पूर्वाचार्यांचे वचन आम्ही ऐकले आहे. ज्या आचार्यांनी आम्हाला ब्रह्माचे जे व्याख्यान स्पष्ट कथन केले, त्यांच्या म्हणण्याचे हे तात्पर्य आहे. "केनोपनिषदाच्या" वाक्यभाष्यातही वरील श्रुतिवचनाचे व्याख्यान करताना भाष्यकार म्हणतात, "ये नस्तद्ब्रह्मोक्त-वंतस्ते नित्यमेवागमं ब्रह्मप्रतिपादकं व्याख्यातवंतो न पुनः स्वबुद्धिप्रभवेण तर्केण उक्तवंत इत्यागमपारंपर्याविच्छेदं दर्शयति विद्यास्तुतये। तर्कस्त्वनवस्थितो भ्रांतोऽपि भवतीति ॥" म्हणजे ज्यांनी आम्हाला ते ब्रह्म सांगितले त्यांनी सुद्धा ब्रह्मप्रतिपादक नित्य आगमाचेच व्याख्यान केले. आपल्या बुद्धीने उत्पन्न केलेल्या तर्काने काही एक सांगितले नाही, असे सांगून ह्या श्रुतीने आगमपरंपरा अविच्छेद आहे, हे विद्येच्या स्तुतीकरिता दाखविले आहे; कारण तर्क तर कदाचित् भ्रांतिजन्य व प्रायः अनवस्थित असतो.

"मुंडकोपनिषद्भाष्याच्या" अगदी आरंभीच "अस्याश्च विद्यासंप्रदायय-

कर्तृपारंपर्यलक्षणसंबंधमादावेवाह स्वयमेव स्तुत्यर्थम् । " म्हणजे या उपनिषदाच्या स्तुतीकरिता विद्येचा संप्रदाय– आचार्योपदेशपरंपरा– चालविणाऱ्या पुरुषांचा परस्परसंबंध स्वतः श्रुतीच आरंभीच सांगत आहे, असे म्हणून ब्रह्मा, अथर्वा, अंगी, भारद्वाज, सत्यवाह, शौनक अशी शिष्याचार्यपरंपरा सांगितली आहे.

"बृहदारण्यकाच्या" दुसऱ्या अध्यायाच्या शेवटी जो वंशब्राह्मण आहे त्यातील "वंश" या शब्दाचे व्याख्यान करताना "आचार्यपरंपराक्रमः" असे आचार्यांनी म्हटले आहे. तसेच त्या भाष्याच्या अगदी आरंभी त्याच वंशऋषींना "ॐ नमो ब्रह्मादिभ्यो ब्रह्मविद्यासंप्रदायकर्तृभ्यो वंशऋषिभ्यो नमो गुरुभ्यः । " ब्रह्मविद्या–संप्रदायाचे प्रवर्तक, गुरुपरंपरागत ब्रह्मादि वंशऋषी व गुरुदेवांना नमस्कार असो, असे म्हणून नमन केले आहे.

संप्रदायाला सोडून शास्त्रार्थाचा निश्चय करणाराला उद्देशून श्रीमदाद्यशंकराचार्यांनी श्रीमद्भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायाच्या "क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि" या दुसऱ्या श्लोकावरील भाष्यात असे उद्गार काढले आहेत की, "आत्महा स्वयं मूढोऽन्यांश्च व्यामोहयति शास्त्रार्थसंप्रदायरहितत्वाच्छ्रुतहानिमश्रुतकल्पनां च कुर्वन् । तस्मादसंप्रदायवित्सर्वशास्त्रविदपि मूर्खवदेवोपेक्षणियः ।। " म्हणजे आत्म्याविषयी अन्यथा कल्पना करणारा माणूस स्वतःचाच घात करणारा असतो. तो शास्त्रसंप्रदायरहित असल्यामुळे श्रुत अर्थाचा त्याग व अश्रुत अर्थाची कल्पना करतो. यामुळे तो स्वतः मूढ व आत्मघातकी होऊन दुसऱ्यांनाही अत्यंत मोहित करतो. म्हणून सर्वशास्त्रवेत्ता असूनही जर एखादा संप्रदायविरहित असेल तर त्याची मूर्खाप्रमाणेच उपेक्षा करावी.

वरील सर्व विवेचनावरून श्रीमदाद्यशंकराचार्य संप्रदायाला किती महत्त्व देत होते हे दिसून येते. संप्रदाय म्हणजे गुरूने आपल्या गुरूकडून मिळविलेले ज्ञान आपल्या शिष्यांना द्यावयाचे. संप्रदायात विद्येचे संप्रदान असते. उपनयनाचे वेळी तर पिता आपल्याला परंपरेने प्राप्त झालेल्या गायत्रीमंत्राची दीक्षाच आपल्या मुलाला देत असतो. ही दीक्षा झाल्यावर पिता बटूच्या हृदयाच्या उजव्या बाजूवर हात ठेवून "जी शक्ती आमच्या मनोवृत्तींना प्रेरणा करीत असते, त्या सृष्टिकर्त्या, दैदिप्यमान व जगदाधारभूत शक्तीच्या तेजोमय स्वरूपाचे आम्ही ध्यान करतो," ही जी शब्ददीक्षा आधीच दिलेली असते, तीच जणू काही स्पर्शदीक्षेने हृदयात अधिक तीव्रतेने संक्रांत करीत असतो. त्यावेळी तो म्हणतो, "ॐ मम व्रते ते हृदयं दधामि मम चित्तमनुचित्तं ते अस्तु । मम वाचमेकमना जुषस्व बृहस्पतिष्ट्वा नियुनक्तु मह्यम् ।।" म्हणजे हे शिष्या ! तुझ्या हृदयाला मी माझ्या अधीन करतो व इतक्या दिवस जे व्रत मी केले व जे मला परंपरेने प्राप्त झाले ते मी तुझ्या हृदयात स्थापन करतो. तुझे हृदय-चित्त-मन माझ्या हृदय-चित्त-मनाशी सदैव

अनुकल राहो. तू माझी वाणी एकाग्र चित्ताने श्रवण करीत जा. तिच्या अर्थाचे सेवन कर व आजपासून तुझ्या प्रतिज्ञेप्रमाणे बृहस्पती परमात्मा तुला माझ्याशी युक्त करो.

सायणाचार्यांनीही " ऋग्वेदभाष्य भूमिकेत " संप्रदायाच्या आधाराशिवाय वेदार्थ सांगणे अशक्य असल्याने असे म्हटले आहे की–

**एतस्मिन् प्रथमोध्याय: श्रोतव्य: संप्रदायत: ।**
**व्युत्पन्नस्तावता सर्वं बोध्दुं शक्नोति बुद्धिमान ।। ६ ।।**

ऋग्वेदार्थाचा– व्याख्येचा– प्रथम अध्याय संप्रदायाच्या आधारावरच ऐकणे योग्य आहे; कारण संप्रदाय परंपरेने प्राप्त झालेल्या ज्ञानामुळेच संपन्न झालेली बुद्धिमान व्यक्ती सर्व काही जाणण्यास समर्थ होते.

" श्रीललितासहस्रनामामध्ये " कुंडलिनी शक्तीचे एक नावच "संप्रदायेश्वरी ।। ७१० ।।" असे दिले आहे. या नावावर टीका करतांना श्रीभास्करराय मखी यांनी असे म्हटले आहे कीं, " ललिता म्हणजे कुंडलिनी शक्ती ही परंपराप्राप्त ज्ञानाचा झरा आहे. पवित्र परंपरेची व पवित्र संप्रदायाची ती रक्षणकर्त्री आहे. जे ज्ञान नियमितपणे व अखंडपणे गुरूकडून शिष्यांना देण्यात येते त्या पद्धतीस संप्रदाय परंपरा असे म्हणतात. कुंडलिनी शक्ती ही असा संप्रदाय चालविणारी किंवा अशी परंपरा चालू ठेवणारी व संप्रदाय पद्धतीचे समर्थन करणारी असल्याने तिला संप्रदायेश्वरी असे म्हटले आहे. तर्काने व संप्रदायाने ज्ञान माहीत होत असते. ब्रह्म हे निर्गुण व निरुपाधिक असूनही आकाश आदि धर्म त्याच्यावर कल्पितात आणि आकाशावर पुन्हा शब्द, द्रव्य आदि गुण कल्पितात. या दृष्टीने एकच पदार्थ गुणही असतो व गुण धारण करणाराही असतो. या न्यायाने पाहता शिव हा धर्मी गुणी असून शक्ती हा त्याचा धर्म व गुण आहे. हे कसे ते संप्रदाय परंपरेनेच जाणावयाचे असते. त्यामुळे सांप्रदायिक परंपरेचे लोक ब्रह्मच शक्ती आहे असे म्हणतात."

महायोगी गोरक्षनाथांनी गुरुपरंपरा अथवा संप्रदाय परंपरा किती महत्त्वाची आहे हे सांगताना " गोरखबानी "मध्ये असे म्हटले आहे की–

**अवधू ईश्वर हमारै चेला भणीजै मछींद्र बोलिये नाती ।**
**निगुरी पिरथी परलै जाती तार्थं हम उल्टी तापना थापी ।। १४४ ।।**

हे अवधूत ! शिव हा माझा चेला आहे. मत्स्येंद्रनाथ हा नात–चेला म्हणजे चेल्याचा चेला आहे. ( मला स्वतःला गुरू करण्याची आवश्यकता नव्हती; कारण मी साक्षात् परमात्मा आहे. परंतु माझे अनुकरण करून अज्ञानी लोक गुरुशिवाय आपण योगी असल्याचा बहाणा करू लागले. त्यामुळे मला मत्स्येंद्रनाथांना गुरू करावे लागले.) वास्तविक ही उलटी स्थापना किंवा क्रम आहे. जर मी असे केले नसते तर गुरुहीन पृथ्वी नष्ट झाली असती.

असा संप्रदायाचा व परंपरेचा महिमा आहे. जेव्हा संप्रदाय प्रवर्तित होतो तेव्हाच त्या संप्रदायात प्रवर्तकाची शक्ती अंतर्निहित होऊन तीच परंपरने ज्ञानदानाचे व ज्ञानस्रोत अखंड ठेवण्याचे काम करीत असते. या दृष्टिकोनातूनच श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी आपल्या नाथपरंपरेकडे व संप्रदायाकडे पाहिले आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात, "तेथ महेशान्वयसंभूतें। श्रीनिवृत्तिनाथसुतें। केलें ज्ञानदेवें गीतें। देशीकार लेणें ।। १८.१८०६ ।।" आदिनाथ शंकरापासून प्रवर्तित झालेल्या सिद्धयोगाच्या परंपरेतील श्रीनिवृत्तिनाथमहाराजांच्या ज्ञानदेव सुताने-शिष्याने श्रीमद्भगवद्गीतेला मराठी भाषेचा अलंकार केला. हा अलंकार ज्या परंपरेमुळे व परंपराप्राप्त सिद्धयोगांतर्गत योगधनामुळे आपण करू शकलो त्याबद्दल श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी जे गौरवोद्गार काढले आहेत ते पाहिले म्हणजे त्यांना आपल्या संप्रदायाबद्दल किती अभिमान वाटत असला पाहिजे हे सहज लक्षात येते. ज्ञानेश्वरी म्हणजे गुरुक्रमाने लाभलेले योगधन आहे व माझ्या गुरुनाथांनी माझ्याकडून हे लिहून घेतले आहे हे त्यांचे म्हणणे लक्षात घेतले म्हणजे गीतेकडे श्रीज्ञानेश्वरमहाराजांची पाहण्याची दृष्टी अगदी पूर्णपणे आत्मसात होते.

श्रीमद्भगवद्गीतेकडे पाहण्याची आपली ही दृष्टी सर्वांच्या अंतःकरणात पूर्णपणे बिंबावी म्हणून आपली परंपरादि कथन करताना ते म्हणतात—

क्षीरसिंधु परिसरीं ।- शक्तीच्या कर्णकुहरीं ।
नेणों कें श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जें ।। १८.१७५२ ।।
तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरीं गुप्तु ।
होता तयाचा हातु । पैठें जालें ।। १७५३ ।।
तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं । भग्नावया चौरंगी ।
भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ।। १७५४ ।।
मग समाधि अव्युत्थया । भोगावी वासना यया ।
ते मुद्रा श्रीगोरक्षराया । दिधली मीनीं ।। १७५५ ।।
तेणें योगाब्जिनीसरोवरु । विषयविध्वंसैकवीरु ।
तियें पदीं का सर्वेश्वरु । अभिषेकिला ।।१७५६।।
मग तिहीं तें शांभव । अद्वयानंदवैभव ।
संपादिले सप्रभव । श्रीगहिनीनाथा ।।१७५७।।
तेणें कळिकळितु भूतां । आला देखोनि निरुता ।
ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ।।१७५८।।
ना आदिगुरु शंकरा—। लागोनी शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा संसरा । जाला जो आमुतें ।।१७५९।।
तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जिवां ।

सर्व प्रकारीं धांवा । करीं पां वेगीं ॥१७६०॥
आधींच तंव तो कृपाळू । वरी गुरुआज्ञेचा बोलू ।
जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघां ॥१७६१॥
मग आर्ताचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें ।
वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥१७६२॥
तेथ पुढा मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया ।
कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥१७६३॥
एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें ।
तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ॥१७६४॥

क्षीरसिंधूच्या तीरावर शंकरांनी प्रत्यक्ष कुंडलिनी शक्तिस्वरूप असलेल्या भवानीला सिद्धयोगाची शब्द दीक्षा देऊन कृतार्थ केले. हे केव्हा घडले ते माहीत नसले तरी त्या वेळेपासून हा सिद्धयोग प्रवर्तित झाला. पुढे क्षीरसमुद्राच्या लाटां-मध्ये विहरणाऱ्या माशाच्या पोटातील मत्स्येंद्रनाथांना हे ज्ञानसाधन गुप्तरूपाने मिळाले. हे मत्सेंद्रनाथ सहज संचार करीत करीत सप्तशृंगी पर्वतावर गेले. तेथे त्यांना हस्तपादादि सर्व अवयव भग्न झालेले चौरंगीनाथ भेटले. मत्स्येंद्रनाथांची अमृतदृष्टी चौरंगीनाथांवर पडताक्षणीच त्यांचे सर्व अवयव उत्तम स्थितीत परिपूर्ण झाले. (सिद्धमहात्म्यांच्या दृष्टिपाताचा महिमा असाच अत्यंत अद्‌भुत असतो. श्रीसरस्वती गंगाधरांनी "श्रीगुरुचरित्र" या ग्रंथांत पाचव्या अध्यायात श्रीपादश्रीवल्लभ यांचे चरित्र वर्णन केले आहे. त्यात ते जेव्हा जगदुद्धारार्थ घराबाहेर जाण्याकरिता निघतात त्यावेळी त्यांच्या आईने विचारलेल्या प्रश्नांचे त्यांनी सकृतिक उत्तर दिले. ते सिद्धामृत दृष्टिपाताचे अलौकिक उदाहरण आहे. आई म्हणते, "पुत्र असती आपणा दोन । पाय पांगुळा अक्षहीन । त्यांतें पोसावें आतां कवणें । आमुतें कोण रक्षील ? ॥५.६५॥" त्यावर श्रीपादश्रीवल्लभ कृतीने उत्तर देतात, "एकोनि जननीचें वचन । अवलोकीतसे अमृतनयनें । पुत्र दोघे जाहले सगुण । आलीं दृष्टि-चरणादिक ॥६६॥ जैसा चिंतामणि–स्पर्शें । लोखंड होय सुवर्णासरिसें । तैसें महात्मदृष्टिवर्षे । योग्यता आली तत्काळी ॥६७॥ वेदशास्त्रादि व्याकरण । सर्व म्हणती तत्क्षण । दोघे येऊनि लागती चरणा । कृतार्थ झालो म्हणोनिया ॥६८॥") मग आपण ज्याप्रमाणे अचल व अखंड समाधीचा उपभोग घेतो त्याप्रमाणे गोरक्ष-नाथांनीही उपभोग घ्यावा म्हणून मत्स्येंद्रनाथांनी त्यांना सिद्धयोग साधनाची दीक्षा दिली. ज्याप्रमाणे राजमान्यतेसाठी राजमुद्रा उमटवावी लागते कारण त्याशिवाय सर्व गोष्टी व्यर्थ ठरतात त्याप्रमाणे सिद्धयोगाच्या मुद्रेशिवाय परमेश्वरप्राप्तीच्या खऱ्या प्रवासाला सुरवातच होत नाही. ज्ञान, भक्ती, उपासना, कर्म आदि गोष्टींचे साधका-

वर कितीही शिक्कामोर्तब झाले तरी या गोष्टींना राजमुद्रेची योग्यता खचितच येत नाही. सिद्धयोग ही साधनराज्यातील राजमुद्रा आहे. ही परंपरेने साधकाला मिळाली की तो अंतरंग साधनाचा अधिकारी होतो. मग राजमुद्रेमुळे " राजा बोले दळ हाले " याप्रमाणे जशी सर्व कामे आपोआप होतात त्याप्रमाणे या सिद्धयोगा-मुळे आपोआप सर्व घडून येते. त्यासाठी स्वतंत्र कोणताही पौरुष प्रयत्न करण्याचे कारण पडत नाही. या सिद्धयोगाच्या मुद्रेमुळे जेव्हा शक्ती जागृत होते त्यावेळी ती स्वःतच साधकाला आपल्या मूळ स्वरूपाला नेऊन मिळविते. असे या मुद्रेचे अपूर्व सामर्थ्य आहे सर्वेश्वर मत्स्येंद्रनाथांनी ही सिद्धयोगाची दीक्षा गोरक्षनाथांना देऊन योगरूपी कमलिनी ज्या सरोवरात आहे अशा विषयविध्वंसक सर्वेश्वर पदावर त्यांची स्थापना केली. ज्या पदावर बसल्यावर सर्व योगैश्वर्याचा राज्याभिषेक होतो व जे पद एखाद्या वीराप्रमाणे सर्व विषयांचा विध्वंस करते असे अत्युच्च पद मत्स्येंद्रनाथांनी गोरक्षनाथांना दिले. या पदालाच शास्त्रकारांनी सहस्रदल कमलाचे स्थान म्हणून त्याचा गौरव केला आहे. "शिवसंहितेत" या पदाचे वर्णन करताना असे म्हटले आहे की–

**अतऊर्ध्वं दिव्यरूपं सहस्रारं सरोरुहम् ।**
**ब्रह्मांडाख्यस्य देहस्य बाह्ये तिष्ठति मुक्तिदम् ।।५.१८६।।**
**कैलासो नाम तस्यैव महेशो यत्र तिष्ठति ।**
**अकुलाख्योऽविनाशी च क्षयवृद्धिविवर्जितः ।।१८७।।**
**यस्य स्मरणमात्रेण ब्रह्मज्ञत्वं प्रजायते ।**
**पापक्षयश्च भवति न भूयः पुरुषो भवेत् ।।१८८।।**

शरीरातील सर्वात अत्युच्च स्थानी असणाऱ्या मस्तकातील सहस्रारामध्ये सहस्रदल कमल विद्यमान असते. बाहेर जशी ब्रह्मांडाची रचना असते तशीच या देहामध्ये सुद्धा असते. शरीरातील हे स्थान प्रत्यक्ष जीवनमुक्ती देणारे आहे. हे स्थान कैलास नावाने प्रसिद्ध असून त्याठिकाणी भोग, ऐश्वर्य व मुक्ती देणारे साक्षात् श्रीमहेश्वर विराजमान झालेले असतात. मूलाधारस्थ भूलोकापासून पाहता हे सत्यलोक नावाचे सातवे स्थान ठरते. वेदाचे असे सांगणे आहे की, या ठिकाणी पोहोचल्यावर मनुष्य जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडत नाही. त्याठिकाणी नित्यविलासी क्षयवृद्धिरहित व अखंड आनंदस्वरूप असलेले नकुल किंवा अकुल नावाचे सिद्धनाथ श्रीमहेश्वर यांचा निवास असतो. या सातव्या स्थानात अत्यंत तेजोमय, देदीप्यमान व दिव्य ज्योतिस्वरूप गुरू देवाधिदेव महादेव सहस्रदलकमलावर विराजमान असतात. " नास्ति तत्त्वं गुरोः परम् " या तत्त्वाप्रमाणे हे पद गुरुतत्त्वाचे आहे येथे अमृतमय अशा आनंदाचा सागर पूर्णपणे भरलेला असतो. त्यामुळे या गुरुतत्त्व-

पदाच्या पलीकडे आणखी पद नाही. या पदामुळे ब्रह्मज्ञान होऊन सर्व पाप व विषयविध्वंस होऊन साधकाला पुन्हा जन्म येत नाही.

"षट्‌चक्र निरूपण" या ग्रंथात या पदाचे पुढीलप्रमाणे वर्णन करून त्याचे अद्वितीयत्व सिद्ध केले आहे.

तदूर्ध्वे शंखिन्या निवसति शिखरे शून्यदेशप्रकाशं
विसर्गाधः पद्मं दशशतदलं पूर्णपूर्णेंदु शुभ्रम् ।।
अधोवक्त्रं कांतं तरुणरविकलाकांत–किंजल्कपुंजं
ललाटाद्यैर्वर्णैः प्रविलसिततनुं केवलानंदरूपम् ।।१।।
समास्ते तत्रांतः शशिपरिरहितः शुद्धसंपूर्णचंद्रः
स्फुरज्ज्योत्स्नाजालः परमरसचयस्निग्धसंतानहासः।।
त्रिकोणं तस्यांतः स्फुरति च सततं विद्युदाकाररूपं
तदंतः शून्यंतत् सकलसुरगुरु चिंतयेच्चातिगुह्यम् ।।२।।
सुगोप्यं तद्यत्नावतिशयपरमामोदसंतानराशेः
परं कंदं सूक्ष्मं शशिसकलकला शुद्धरूपप्रकाशम् ।।
इहस्थाने देवः परमशिव समाख्यानसिद्धप्रसिद्धिः
स्वरूपी सर्वात्मा रसविसरमितोऽज्ञानमोहांधहंसः ।।३।।
सुधाधारासारं निरवधि विमुंचन्नतितरां
यतेरात्मज्ञानं दिशतिभगवान्निर्मलमतेः ।।
समास्ते सर्वेशः सकलसुखसंतानलहरी–
परीवाहो हंसः परमइति नाम्ना परिचितः ।।४।।
शिवस्थानं शैवाः परमपुरुषं वैष्णवगणा
लपंतीति प्रायो हरिहरपदं केचिदपरे ।।
पदं देव्या देवीचरणयुगलानंदरसिका
मुनींद्रा अप्यन्ये प्रकृतिपुरुषस्थानममलम् ।।५।।
इहस्थानं ज्ञात्वा नियतनिजचित्तो नरवरो
न भूयात् संसारे क्वचिदपि च बद्धस्त्रिभुवने ।।
समग्राशक्तिः स्यान्नियममनसस्तस्य कृतिनः
सदा कर्त्तुं हर्त्तुं खगतिरपि वाणी सुविमला ।।६।।
अत्रास्ते शिशुसूर्यसोदरकला चंद्रस्य सा षोडशी
शुद्धा नीरजसूक्ष्मतंतुशतधाभागैकरूपा परा ।।
विद्युद्दामसमानकोमलतनुर्नित्योदिताधोमुखी
पूर्णानंदपरंपरातिविगलत्पीयूषधाराधरा ।।७।।
निर्वाणाख्यकला परात्परतरा सास्ते तदंतर्गता

केशाग्रस्य सहस्रधाविभजितस्यैकांशरूपा सती ॥
भूतानामधिदैवतं भगवती नित्यप्रबोधोदया
चंद्रार्द्धांगसमानभंगुरवती सर्वार्कतुल्यप्रभा ॥८॥
एतस्या मध्यदेशे विलसति परमाऽपूर्वानिर्वाणशक्तिः
कोटयादित्य प्रकाशां त्रिभुवनजननी कोटिभागैकरूपा ॥
केशाग्रस्यातिगुह्या निरवधि विलसत् प्रेमधाराधरा सा
सर्वेषां जीवभूता मुनिमनसि मुदा तत्त्वबोधं वहंति ॥९॥
तस्या मध्यांतराले शिवपदममलं शाश्वतं योगिगम्यं
नित्यानंदाभिधानं परमपदकुलं शुद्धबोधप्रकाशम् ॥
केचिद्ब्रह्माभिधानं परमतिसुधियो वैष्णवास्तल्लपंति
केचिद्धंसाख्यमेतत् किमपि सुकृतिनो मोक्षवर्त्मप्रकाशम् ॥१०॥

आज्ञाचक्राच्या वर शंखिनी नावाची नाडी आहे. तिच्या अगदी टोकावर शून्य प्रदेशात असलेले म्हणजे सर्व ब्रह्मांडामध्ये पसरलेले विसर्ग नावाच्या शक्तीच्या खाली पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे अत्यंत सुंदर, प्रकाशमान व शुभ्र असे एक सहस्रदल-कमल आहे. ते अधोमुख असून त्याच्यातील रक्तवर्णाचे केसर प्रातःकालीन बालरवीच्या किरणांप्रमाणे अत्यंत प्रकाशमान व शोभायमान दिसत असतात. या कमळाच्या पाकळ्यांवर अ पासून क्ष पर्यंतची वर्णमालेची सर्व अक्षरे असून हे कमल नित्यानंदस्वरूप आहे. या सहस्रदलकमलामध्ये अमृतमय व सुखकारक किरणांनी सुशोभित असा पूर्णचंद्र दशदिशांमध्ये आपला सुंदर प्रकाश पसरवीत विलास करीत असतो. या चंद्रमंडलामध्ये विजेप्रमाणें चमकणारे त्रिकोणी यंत्र आहे. या यंत्राच्या मधोमध सर्व देवतांचे गुरुदेव असलेल्या शून्य ब्रह्माचे अत्यंत गोपनीय असे रूप आहे. त्याचेच नेहमी चिंतन केले पाहिजे. अत्यंत सूक्ष्म, निरतिशय परमानंदाचा केवळ साठा असलेले, सर्वात श्रेष्ठ व सोळा कलांनी सुशोभित असलेल्या पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे प्रकाशमान असलेल्या उपरोक्त शून्य ब्रह्माला अत्यंत प्रयत्नाने गुप्त राखले पाहिजे. सिद्धांमध्ये परम प्रसिद्ध, नेहमी अमृतधारेची वृष्टी करणारा, शिव-शक्तियोगानंदरसमय, सर्वांतरात्मा व शुद्ध बुद्धीच्या योग्यांना आत्मज्ञानाचे दान करीत आकाशरूपी परमशिव नावाचा परमात्मा त्या स्थानी वास करीत असतो. या शून्यस्थानालाच शैवलोक शिवस्थान, वैष्णवलोक विष्णुस्थान, अनेक भक्तजन हरिहरस्थान, देवीचे उपासक शक्तिस्थान व अनेक मुनिगण हे प्रकृति–पुरुषाचे निर्मलस्थान आहे असे मानतात. सारांश, सर्व उपासकांचे हेच गंतव्यस्थान असून ते, हेच आपल्या इष्ट व उपास्य देवतेचे स्थान आहे, असे मानतात. जो पुण्यात्मा साधक या सहस्रदलामध्ये आपल्या इष्टदेवतेचा निवास आहे असे समजून निश्चयाने प्रयत्नपूर्वक साधन करून तेथेच स्थिरचित्त व तेथील ब्रह्मरूपात ध्यानमग्न होतो, तो

श्रेष्ठ योगी स्वर्ग, मृत्यू व पाताळ यांपैकी कोणत्याही लोकात बद्ध होत नाही. तो जन्ममरण परंपरेच्या बंधनातून कायमचा निसटतो. तो सृष्टीचे पालन व संहार करण्यामध्ये ब्रह्मादि देवांप्रमाणे नेहमीच समर्थ ठरतो. त्याला सहस्रदलकमलरूपी आकाशात गमन करण्याची शक्ती प्राप्त होते. त्याची खेचरी मुद्रा सिद्ध होते व तो गद्यपद्ययुक्त उत्तम काव्य करू शकतो. या स्थानातील–पदातील उपरोक्त त्रिकोणामध्ये प्रात:कालीन बालसूर्याच्या रक्तवर्ण किरणांप्रमाणे चमकणारी, अत्यंत निर्मल; कमलाच्या तंतूच्या शंभराव्या भागातील एका भागाप्रमाणे कृश, अत्यंत श्रेष्ठ, नित्य प्रकाशमान, अधोमुख असलेली, परमानंद देणारी, पूर्ण चंद्राच्या सोळाव्या कलेप्रमाणे अत्यंत सूक्ष्म व अमृतधारा धारण केलेली "अमा" नावाची शक्ती विद्यमान असते. या अमा नावाच्या शक्तिमध्ये बारा सूर्यांच्याप्रमाणे प्रकाशमान असलेली, परात्पर म्हणजे अत्यंत श्रेष्ठ, नित्य ज्ञानदान करणारी भगवती, केसाच्या सहस्रांशातील एका अंशाप्रमाणे अतिशय सूक्ष्म, सर्व प्राण्यांची इष्टदेवतारूप, षडैश्वर्ययुक्त व कुटिलाकार अशी निर्वाण नावाची एक कला निवास करते. या निर्वाण कलेच्यामध्ये कोटी सूर्याप्रमाणे प्रकाशमान असलेली, तीन भुवनांची रचना करणारी, केसाग्राच्या कोटीभागाच्या एका भागाप्रमाणे अत्यंत सूक्ष्म, अत्यंत गुप्त, सतत व अखंड प्रेमधारा धारण केलेली, सर्व प्राण्यांचे प्राणरूप असलेली, मुनींना आनंद देणारी व नित्य तत्त्वज्ञानाची प्राप्ती करून देणारी निर्वाणशक्ती निवास करते. या निर्वाणशक्तीच्या मध्यभागी निर्मल शिवपद आहे. जे साधकयोगी नित्यसाधनाभ्यास करतात त्यांना या स्थानाची प्राप्ती होते. हे स्थान शुद्ध ज्ञानाचा प्रकाश देणारे, सर्व शक्तींनी भरलेले, नित्य आनंद देणारे व परमशक्तियुक्त असे शिवस्थान किंवा तुरीयपद आहे. याच स्थानाला कोणी कोणी बुद्धिमान वैष्णव परम ज्योतिस्थान किंवा ब्रह्मस्थान, कोणी हंसस्थान किंवा कोणी पुण्यात्मा मोक्षद्वार म्हणतो.

त्यानंतर गोरक्षनाथांनी शंकरांपासून प्रवर्तित झालेल्या सिद्धयोगाच्या परंपरेने आलेले अद्वयानंदाचे ऐश्वर्य म्हणजे ज्ञानाचे सुख गहिनीनाथांना संपूर्ण सामर्थ्यासह दिले. अशा प्रकारे ज्ञानदानाचे सामर्थ्य एकमात्र सिद्धयोगातच आहे. "शिवपुराणातील" "वायवीय संहितेत" या अर्थानेच असे म्हटले आहे की–

वृथा परिश्रमस्तस्य निरयवैव केवलम् ।
शक्तिपात समायोगादृतें तत्त्वानि तत्त्वतः ।।
तद्व्याप्तिस्तद्विशुद्धिश्च ज्ञातुमेव न शक्यते ।। २९.८७ ।।

जोपर्यंत शक्तिपात होत नाही तोपर्यंत शिष्य किंवा साधक ज्या ज्या उपासना करतो व परमेश्वर प्राप्तीसाठी जे जे परिश्रम करतो ते ते सर्व केवळ वृथा ठरतात. त्याचे सर्व प्रयत्न शून्यवत असतात. याचे खरे कारण असे आहे की शक्तिपाताशिवाय पाचही तत्त्वांची शुद्धी होऊन परब्रह्माच्या व्यापकतेचे अनुभवगम्य

ज्ञान व तत्त्वांचे सम्यक् ज्ञान प्राप्त करणे कधीही शक्य होत नाही.

उपरोक्त शांभव तत्त्वाच्या किंवा ज्ञानाच्या अद्वैयानंद वैभवाची प्राप्ती एकमात्र गुरुकृपेने म्हणजे शक्तिपातानेच होते हे सांगताना "सिद्धसिद्धांतपद्धतीत" महायोगी गोरक्षनाथांनी असे म्हटले आहे की–

कथनाच्छक्तिपाताद्वा पादुकाद्यवलोकनात् ।
प्रसादात्स्वगुरोः सम्यक् प्राप्यते परमं पदम् ।। ५.६५ ।।
न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकम् ।
शिवशासनतः शिवशासनतः शिवशासनतः शिवशासनतः ।। ६६ ।।
वाङ्मात्राद्वाथ दृक्पाताद्यः करोति च तत्क्षणात् ।
प्रस्फुटं शांभवं वेद्यं स्वसंवेद्यं परं पदम् ।। ६७ ।।

उपदेशाने, शक्तिपाताने व गुरुपादुकांच्या अवलोकनाने किंवा सेवेने ज्यावेळी सद्गुरूंचा सम्यक् प्रसाद प्राप्त होतो, त्यावेळी परमपदाची प्राप्ती होते. यासाठीच शंकरांचे एकमात्र सांगणे आहे की, गुरूपेक्षा काहीही श्रेष्ठ नाही; कारण श्रेष्ठ असे सद्गुरू केवळ वाणीने किंवा केवळ दृष्टीने एका क्षणात परमश्रेष्ठ व स्वसंवेद्य अशा शांभव ज्ञानाला प्रकर्षात्वाने प्रकट करून त्याची अनुभूती आणून देतात.

शांभव म्हणजे शंकरांपासून प्रवर्तित झालेले, उत्पन्न झालेले व प्रवाहित झालेलें तत्त्व किंवा ज्ञान होय.या ज्ञानाचा शिष्याच्या देहामध्ये समावेश करण्याच्या प्रक्रियेचे सर्वात मोठे महत्त्व आहे हे श्रीज्ञानेश्वरमहाराज ओवीओवीगणिक सांगत आहेत. "सप्रभव संपादिले" हे शब्द या प्रक्रियेचे द्योतक आहेत. अशा प्रक्रियेने जो ज्ञान देऊ शकतो तोच गुरू होय. हे योगवासिष्ठाच्या निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धात पुढीलप्रमाणे गुरूची व्याख्या करून स्पष्ट केले आहे.

दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके ।
जनयेद्यः समावेशं शांभवं सहि देशिकः ।। १२८.६१ ।।

जे दर्शनाने, स्पर्शाने व शब्दाने कृपापूर्वक शिष्याच्या देहामध्ये शिवभावाची मंगलामय अनुभूती किंवा शांभव तत्त्वाचे संक्रमण करू शकतात त्यांनाच गुरू म्हणतात. अशा प्रकारची तत्त्वज्ञान देण्याची अपूर्व परंपरा सिद्धयोगाच्या द्वारा आदिनाथांनी सुरू केली. ह्या परंपरेचा वारसा पुढे चालावा म्हणून व कली हा सर्व प्राण्यांचा खरोखर ग्रास करीत आलेला आहे हे पाहून गहिनीनाथांनी श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा दिली की आदिगुरू शंकरांपासून गुरुशिष्यपरंपरेने हा जो बोध देण्याच्या ऐश्वर्याचा लाभ आम्हाला प्राप्त झाला आहे तो हा सर्व घेऊन तू कलीने ग्रस्त झालेल्या व गिळल्या जाणाऱ्या जीवानां सिद्धयोगाच्या द्वारे देऊन त्यांना सर्व प्रकारच्या दुःखांपासून सत्वर मुक्त कर. मेघांना वर्षाकाळाची जोड मिळाली

म्हणजे ते जशी जोराची वृष्टी करतात त्याप्रमाणे मुळातच स्वभावतः अत्यंत कृपाळू असलेल्या श्रीनिवृत्तिनाथांना श्रीगुरूंच्या आज्ञेची जोड मिळाल्यावर ते सर्वत्र कृपेचा वर्षाव करू लागले. मग पीडित झालेल्या लोकांना दुःखापासून सोडवावे या कळकळीने गीतेचा समन्वयात्मक अर्थ करण्याच्या मिषाने शांतरसाचा जो वर्षाव श्रीनिवृत्तिनाथांनी केला तोच हा ग्रंथ होय. त्यावेळी मी चातकपक्षासारखा श्रीगुरूंचा प्रसाद प्राप्त व्हावा म्हणून इच्छा करून पुढे येऊन बसलेला होतोच. मी अनन्य शिष्य आहे असे पाहून त्यांनी माझ्यावर कृपा म्हणजे शक्तिपात केला. त्यामुळेच मला हे ग्रंथकर्तृत्वाचे यश प्राप्त झाले. अशा प्रकारे गुरुपरंपरेने प्राप्त झालेल्या आपल्या समाधिधनाचा बोध करून माझ्या श्रीनिवृत्तिनाथांनी ते ग्रंथरूपाने रचना करून मला दिले.

अशा रीतीने एकमात्र सिद्धयोग–संप्रदाय–परंपरेनेच ज्ञानप्राप्ती होत असल्याने व हाच ईश्वरप्राप्तीचा उपाय असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**म्हणौनि माझ्या ठायीं । जाचावें न लगे कांहीं ।**
**मी लाभे इयें उपायीं । साचचि गा ॥१८.१२२५॥**
**एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु ।**
**तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावया ॥१२२६॥**

हे अर्जुना ! सिद्धयोगाच्या उपायाने मी खरोखरच निश्चितपणे प्राप्त होत असल्याने माझ्या प्राप्तीकरिता दुसऱ्या उपायांची कास धरून शिणावे लागत नाही. एक गुरू व एक शिष्य या परंपरेने शक्तिसंक्रमणाने ज्ञानदानाची अखंड परंपरा चालू ठेवण्याचा जो अनादि व्यवहार रूढ झाला आहे तो माझ्या प्राप्तीचा उचित उपाय समजण्याकरिताच होय. एका दिव्याने दुसरा दिवा लावावा त्याप्रमाणे ज्ञानाची ही अखंड परंपरा गुरुशिष्यरूपाने चालू असते. ईश्वराच्या प्रसादाने श्रीगुरूची प्राप्ती व श्रीगुरुद्वारा होणाऱ्या कृपेमुळे ज्ञानप्राप्ती होते, हा सकलशास्त्राचा सिद्धांत आहे. तोच सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**आणि तेणेंचि ईशप्रसादें । श्रीगुरुसंप्रदायलब्धें ।**
**साच ज्ञान उद्बोधें । कोंवळें जें ॥ १८.१४४६ ॥**

ही गुरुशिष्य परंपरा कशी चालते व सामरस्य कसे उत्पन्न होते हे सांगताना म. म. श्री. गोपीनाथ कविराज यांनी " तान्त्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि " या पुस्तकातील " सामरस्य या महामिलन " या लेखात असे म्हटले आहे की, " शिव आणि शक्तीच्या सामरस्याइतकेच गुरू व शिष्य यांचे सामरस्य महत्त्वाचे व आवश्यक आहे. प्रभुदेवांनी आपल्या वचनामृतात असे म्हटले आहे की, शिष्य ज्या प्रकाराने गुरुस्वरूपात विश्रांती प्राप्त करून घेतो त्याचप्रमाणे गुरुसुद्धा शिष्यरूपात विश्रांती प्राप्त करून घेतात. ज्याप्रमाणे शिष्य आपले सर्वस्व गुरूला

अर्पण करून किंवा आत्मार्पण करून आपल्या स्वतःला हरवून बसतो अगर गुरूमध्ये राहण्याच्या स्थितीचा लाभ करून घेतो त्याचप्रमाणे गुरुसुद्धा शिष्याला आत्मसमर्पण करतात. त्यांच्या या कृतीमुळेच शिष्य गुरुस्वरूपाला प्राप्त होऊ शकतो. गुरूने जर अशा प्रकारे आपल्या स्वतःचा त्याग केला नाही किंवा स्वतःला समर्पित केले नाही तर शिष्याला खरा गुरू प्राप्त होऊ शकत नाही आणि शिष्यानेही आपणा स्वतःला सर्वार्थाने सद्गुरूला समर्पित केले नाही तर गुरूला खरा शिष्य प्राप्त होऊ शकत नाही. शिष्याच्या हृदयसिंहासनावर जसे गुरू विराजमान झालेले असतात त्याचप्रमाणे गुरूच्या हृदयातसुद्धा शिष्य विराजमान असतो. ऐक्यतेच्या म्हणजे समरसतेच्या बोधाची अवस्था प्राप्त होण्याचा हा एकमेव मार्ग आहे."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही ही गोष्ट अत्यंत आग्रहानेच ज्ञानेश्वरीत प्रतिपादन केली आहे. संप्रदायाच्या आश्रयाशिवाय दुसरा पर्यायच नसल्याने ते म्हणतात—

**तरी ययाचि शास्त्राचेनि । संप्रदायें पांघुरौनि ।**
**शास्त्रार्थु हा निकेनि । अनुष्ठीं हो ! ।। १८.१४८१ ।।**
**एऱ्हवीं अमृतमंथना— । सारिखें होईल अर्जुना ।**
**जरी रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ।। १४८२ ।।**
**गाय धड जोडे गोमटी । तें तंचि पिवों ये किरीटी ।**
**जें जाणिजे हातवटी । सांजवणीची ।। १४८३ ।।**
**तैसा श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर लाहे ।**
**परी ते फळे संप्रदायें । उपासिलिया ।। १४८४ ।।**

सारांश, असा हा संप्रदायाचा महिमा आहे. त्याच्या आधाराने व दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी महेशान्वयसंभूत गुरुक्रमप्राप्त समाधिधनरूप गीतानिधानाचे म्हणजे सिद्धयोगाचे दर्शन ज्ञानेश्वरीच्यारूपाने सर्वांना घडविले आहे.

## सिद्धयोग महासिद्धांतयुक्त गीताशास्त्रेश्वर :—

सिद्धयोगाचा महासिद्धांत गीतेत भगवंतांनी स्पष्टपणे मांडला आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत दाखवून देऊन सिद्धयोग साधनानेच ब्रह्मप्राप्ती होते, इतर दुसरी कितीही शास्त्रे असली तरी ती प्रमाणसिद्ध मोक्षोपाय सांगणारी नाहीत, असेच गीतेत सांगितले असल्यामुळे गीता ही सर्व शास्त्रांचा राजा झाली आहे असा सिद्धांत त्यांनी प्रस्थापित केला आहे. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**जें गीतार्थाचें चांगावें । मोक्षोपायपर आघवें ।**
**आन शास्त्रोपाय कीं नव्हे । प्रमाणसिद्ध ।। १८.१२३० ।।**

फक्त संपूर्ण गीताशास्त्राचेच सामर्थ्य असे आहे की ते मोक्षप्राप्तीचे सिद्ध-योगरूपी साधन प्राप्त करून देते. हा गीतार्थातील महत्त्वपूर्ण चांगुलपणा आहे.

दुसरी कितीही शास्त्रे असली तरी ती सिद्धयोगाप्रमाणे प्रमाणसिद्ध मोक्षोपाय सांगणारी नाहीत. इतर सर्वच शास्त्रे ही अविद्येचा नाश करण्यास साहाय्यकारी होतात पण सिद्धयोगाप्रमाणे ही शास्त्रे आत्मस्वरूपाचा बोध करून देण्यास स्वतंत्र व स्वत:सिद्ध असत नाहीत; कारण इतर शास्त्रांमध्ये आत्मशक्ती जागृत करण्याचे व तिच्या द्वारा जीवाला आत्मस्वरूपाशी एकरूप करण्याचे सामर्थ्य असत नाही. उलट इतर सर्व शास्त्रे प्रमाण म्हणून गीतेकडेच बोट दाखवितात; कारण सूर्याने पूर्वदिशा अलंकृत झाली म्हणजे इतर सर्व दिशा जशा प्रकाशमय होतात, त्याप्रमाणे इतर सर्व शास्त्रे ही गीताशास्त्रामुळेच म्हणजे सिद्धयोगामुळेच सनाथ व प्रकाशित होतात.

गीता हे आत्मा हस्तगत करण्याचे रत्न आहे. रत्न म्हणजे साधन होय. या साधनालाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पहिल्या अध्यायात चिंतामणी म्हटले आहे. असे हे चिंतामणिरत्नरूप साधनशास्त्र गीता या नावाने प्रसिद्ध असल्याचे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**हें गीतानाम विख्यात । सर्ववाङ्मयाचें मथित ।**
**आत्मा जेणें हस्तगत । रत्न होय ॥१८.१३२३॥**

हे गीताशास्त्र सर्व वाङ्मयाचे, वेदांचे व शास्त्रांचे मंथन करून काढलेले विख्यात असे शास्त्र आहे. ज्यामुळे आत्माच हस्तगत होतो असे हे सिद्धयोगाचे शास्त्र किंवा रत्नच आहे. सिद्धयोगशास्त्राची महती व आवश्यकता सांगताना " स्पंदशास्त्राच्या " सुरुवातीलाच श्री. भट्ट कल्लट याने टीका करताना असे म्हटले आहे की, ' सिद्धयोगसाधन हा चिंतामणी आहे; कारण साधकाला तत्काल स्वानुभूती प्राप्त करून देणाऱ्या या साधना इतके श्रेष्ठ असे दुसरे साधन या भूतलावर नाही असा शास्त्रकारांनी उद्‌घोष केला आहे. या दृष्टीने " पौष्कर संहितेत " असे म्हटले आहे की–

**चिंतामणौ स्वरूपेण न किंचिदुपलभ्यते ।**
**अथ चाभिमतं सूते ब्रह्मैवं सर्वशक्तिकम् ॥**

चिंतामणी प्राप्त झाल्यावर खरे पाहता कोणत्याही वस्तूची प्राप्ती होत नाही; परंतु आपण जी इच्छा करू त्याची प्राप्ती चिंतामणी करून देत असतो. हा चिंतामणी सर्वशक्तिमय ब्रह्मच आहे.

सिद्धयोगाचे साधन हे असेच चिंतामणिस्वरूप असल्याने त्या साधनामुळे साधकाच्या सर्व इच्छा पूर्ण होतात व हे साधन सर्वशक्तिमय असे साध्यरूप असल्याने साधकाला परब्रह्माचीही प्राप्ती होते "परमार्थसार" या ग्रंथातही साधक भावनेने जे जे साधन करतो ते ते शेवटी सिद्धयोग साधनरूप अंतरंग

चिंतामणीत परिणत होऊन त्याची प्रगती कशी होते हे सांगताना असे म्हटले आहे की–

सर्वाकारो भगवानुपास्यते येन येन भावेन ।
तं तं भावं भूत्वा चिंतामणीरिव समभ्येति ।।

परमेश्वर तर सर्व काही आहे; परंतु ज्या ज्या भावनेने त्याची उपासना केली जाते ती ती शेवटी सिद्धयोगाचे अंतरंग साधन परिपुष्ट, समर्थ, वृद्धिगत व विकसित होण्यास साहाय्यक होऊन चिंतामणिप्रमाणे जी जी इच्छा करावी ती ती या साधनापासून फलीभूत होते."

चिंतामणिस्वरूप गीता हा उपनिषदांचा सुवास, अनादिसिद्ध सार, ज्ञानामृत व विचाररूप लक्ष्मी असून ती या सर्व गुणांनी नटलेले संसाराला जिंकण्याचे सिद्धयोगरूपी शस्त्र आहे हा विचार मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

एवं कथिलयादारभ्य । हें जें सर्व शास्त्रैकलभ्य ।
उपनिषदां सौरभ्य । कमळदळां जेवीं ।। १५.५७१ ।।
हे शब्दब्रह्माचें मथितें । श्रीव्यासप्रज्ञेचेनि हातें ।
मिथूनि काढिलें आयितें । सार आम्हीं ।। ५७२ ।।
जे ज्ञानामृताचि जान्हवी । जे आनंदचंद्रींची सतरावी ।
विचारक्षीरार्णवींचो नवी । लक्ष्मी जे हे ।। ५७३ ।।
म्हणौनि आपुलेनि पदें वर्णें । अर्थाचेनि जीवेंप्राणें ।
मीवांचोनि हो नेणें । आन कांहीं ।। ५७४ ।।
क्षराक्षरत्वें समोर जालें । तयांचें पुरुषत्व वाळिलें ।
मग सर्वस्व मज दिधलें । पुरुषोत्तमीं । ५७५ ।।
म्हणौनि जगीं गीता । मियां आत्मेनि पतिव्रता ।
जे हे प्रस्तुत तुवां आतां । आकर्णिली ।। ५७६ ।।
साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पैं संसारु जिणतें हें शस्त्र ।
आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरें इयें ।। ५७७ ।।
परी तुजपुढां सांगितलें । तें अर्जुना ऐसें जालें ।
जें गौप्यधन काढिलें । माझें आजि ।। ५७८ ।।
मज चैतन्यशंभूचा माथां । जो निक्षेपु होता पार्था ।।
तया गौतमु जालासि आस्था- । निधी तूं गा ।। ५७९ ।।
परी हें बोलों काय गीता । जे हे माझी उन्मेषलता ।
जाणे तो समस्ता । मोहा मुके ।। ५८३ ।।
सेविली अमृतसरिता । रोगु दवडूनि पंडुसुता ।
अमरपण उचितां । देऊनि घाली ।। ५८४ ।।

तैसी गीता हे जाणितलिया । काय विस्मयो मोह जावया ।
परी आत्मज्ञाने आपणपयां । मिळिजे येथ ।। ५८५ ।।

नाना प्रकारची विशेषणे वापरून वरील ओव्यातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतारूपी सिद्धयोगाचे आयते सार जगाला कसे मिळाले ते स्पष्ट केले आहे. त्यांच्या दृष्टीने गीता ही खरोखर शब्दपांडित्याची, वडबडण्याची, चर्चेची किंवा प्रवचनाची गोष्ट नसूत ही गीता म्हणजे संसाराला जिंकण्याचे एक शस्त्रच आहे. शिवाय गीतेची अक्षरे ही आत्मभाव प्रकट करणारे मंत्रच आहेत.ज्ञान हे खड्ग किंवा शस्त्र असून सिद्धयोगाच्याद्वाराच त्याचे चालन करून अज्ञानाविरुद्धच्या युद्धात जय मिळवून मोक्षप्राप्ती करता येते असे योगबीजात महायोगी गोरक्षनाथांनी म्हटल्याचे आपण मागील प्रकरणात पाहिलेच आहे. येथे आणखी एक गोष्ट स्पष्ट झाली आहे की, श्रीकृष्ण हे चैतन्य शंभूच आहेत म्हणजे शक्तियुक्त शिवच आहेत. गौतमांनी शंकरांच्या जटेतून गुप्त गंगा बाहेर काढली त्याप्रमाणे अर्जुनाने श्रीकृष्णांच्या म्हणजे शंकरांच्या अंतःकरणातून सिद्धयोगशास्त्राची गंगा प्रवर्तित करण्यास भाग पाडले. सिद्धयोग ही अमृताची नदी आहे. तिचे पाणी प्यायले की मोहाचा नाश होऊन जीव आत्मज्ञानाने आत्मस्वरूपाशी एकरूप होतो.

श्रीगुरुनाथांच्या प्रसादामुळे आपल्याला जे सिद्धयोगाचे साधन प्राप्त झाले आहे त्याच्या जोरावर मी गीतेचा भावार्थ वर्णन करीन असे स्पष्ट करीत असताना गीतारूपी ईश्वराचा सिद्धयोग हा महासिद्धांत आहे व त्याचेच उद्घाटन अधिक स्पष्टपणे करावयाचे आहे ही धारणा श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ठिकाणी सतत झळकत असल्याचे स्पष्ट दिसते. ते म्हणतात—

आता तेणेंचि पसायें । तुम्हा संतांचे मी पायें ।
वोळगेन अभिप्रायें । गीतेचेनि ।। १५.२८ ।।
नाना सूर्याचा प्रकाशु । लाहे जेवीं डोळसु ।
तेवीं ज्ञानेंचि सौरसु । मोक्षाचा तो ।। ३२ ।।
तरी तया ज्ञानालागीं । कवणा पां योग्यता आंगीं ।
हें पाहतां जगीं । देखिला एकु ।। ३३ ।।
जें पाताळींचेंही निधान । दावील कीर अंजन ।
परी होआवे लोचन । पायाळाचे ।। ३४ ।।
तैसें मोक्ष देईल ज्ञान । येथे कीर नाहीं आन ।।
परि तेंचि थारे ऐसें मन । शुद्ध होआवें ।। ३५ ।।
तरी विरक्तीवांचूनि कहीं । ज्ञानासि तगणेंचि नाहीं ।
हें विचारूनि ठाइं । ठेविले देवें ।। ३६ ।।

आतां विरक्तीची कवण परी । जे येऊनि मनातें वरी ।
हेंही सर्वज्ञें श्रीहरी । देखिलें असे ॥ ३७ ॥

या ओव्यातून ज्ञानप्राप्तीच्या साधनाचे जे प्रकटीकरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे त्यातून हे स्पष्ट दिसते की आधी गुरुकृपा होऊन साधन प्राप्त झाले की, मन शुद्ध होत जाऊन साधकाच्या ठिकाणी विरक्ती उत्पन्न होऊन मगच ज्ञानाचा प्रकाश सर्वत्र फाकतो. सूर्यप्रकाशाचा उपयोग जसा एकमात्र डोळस माणसालाच होतो त्याप्रमाणे सिद्धयोगाचे साधन ज्याला प्राप्त झाले आहे त्यालाच ज्ञानाने मोक्षप्राप्तीचे सुख व गोडी मिळते. अशा प्रकारचे ज्ञान मिळविण्याची योग्यता कोणत्या मार्गात आहे हे पाहिले असता फक्त सिद्धयोग हा एकच मार्ग दृष्टीस पडतो. ज्याप्रमाणे पायाळू मनुष्याच्या डोळचात अंजन घातले म्हणजे त्याला भूमिगत द्रव्याचा साठा दिसतो त्याप्रमाणे ज्ञानाने मोक्ष प्राप्त होतो यात काहीच शंका नाही; परंतु त्यासाठी ज्ञान टिकेल अशी अतं:करणाची शुद्ध शास्त्रीय भूमिका तयार होण्यासाठी सद्‌गुरुंकडून जेव्हा सिद्धयोगाची दीक्षा मिळते तेव्हा चित्‌शक्ती कुंडलिनीच्या जागृतीने क्षराक्षर विवेकाने विरक्ती उत्पन्न होऊन ज्ञानप्राप्ती होते. अशा प्रकारे वैराग्य आपण होऊन येऊन साधकाच्या मनाला माळ घालून वरील असा कोणता साधनप्रकार आहे यावद्दल सर्वज्ञ श्रीहरींनी विचार करून गीताशास्त्र म्हणून सिद्धयोगाचे कथन केले आहे. श्रीगुरुप्रसादाने प्राप्त होणाऱ्या या सिद्धयोग साधनाधारानेच आपण गीतेवर टीका करणार आहोत असेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणत आहेत. "तरी आतां येणें प्रसादें । विन्यासें विदग्धें । मूळशास्त्रपदें । वाखाणीन ॥ १४.२९॥" यातील प्रसादाचा अर्थ आपण पहिल्या प्रकरणात पाहिला आहे. त्या प्रसादाच्या सामर्थ्याच्या जोरावरच गीतार्थ प्रकट होणार असल्याची ही ग्वाहीच आहे. इतकेच नव्हे तर श्रीनिवृत्तिनाथांच्या कृपाप्रसादाने पुढील गोष्टींची अनुभूती आपणा सर्व साधकांना येईल असे आश्वासन देताना त्यांनी गीतेच्य रूपाने उद्‌घाटित झालेल्या सिद्धयोगाचा अपार महिमाच गायिला आहे.ते म्हणतात—

तैसा वाग्विलास विस्तारू । गीतार्थेंसी विश्व भरूं ।
आनंदाचें आवारूं । मांडूं जगा ॥ १३ ११६० ॥
फिटो विवेकाची वाणी । हो कानामनाची जिणी ।
देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ११६१ ॥
दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोध सुकाळा— । माजीं विश्व ॥ ११६२ ॥
हें निफजेल आतां आघवें । ऐसें बोलिजेल बरवें ।
जें अधिष्ठिला असें परमदेवें । श्रीनिवृत्तीं मी ॥ ११६३ ॥

आनंदाचे आवार जगाला घालण्याचे, मूलाधारात शक्तीच्या जागृतीमुळे उपस्थित झालेली विवेकाची भाषा आज्ञाचक्राच्या वर गेल्यावर समाप्त करण्याचे, परतत्त्व अंतर्दृष्टीने पाहण्याच्या सुखाचा सोहळा साजरा करण्याचे व ब्रह्मात्मैक्य-ज्ञानाचा सुकाळ जगामध्ये करण्याचे सामर्थ्य कशात आहे ? ते एकमात्र श्रीनिवृत्ति-नाथांच्या कृपेत, अनुग्रहात किंवा दीक्षेत आहे. अशा प्रकारची अनुभूती देण्याचा अनुग्रह हा सिद्धयोगाचा मूर्धन्य विशेष असून तो गीतेचा आत्मा आहे असे श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात.

सिद्धयोग हे प्रसादामृत कसे आहे हे आपण पहिल्या प्रकरणातच पाहिले आहे. ते गीतारूपाने आपल्याला कसे प्राप्त झाले हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**मियां गीता येणें नांवें । तुझें पसायामृत सुहावें ।**
**वानूं लाधलों तें दुणेन थावें । दैवलों दैवें ।। १६.३१ ।।**
**माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प ।**
**तया फळाचें हें महाद्वीप । पातली प्रभु ।। ३२ ।।**
**पुण्यें पोशिलीं असाधारणें । तियें तुझें गुण वानणें ।**
**देऊनि मन उत्तीर्णें । जालीं आजी ।। ३३ ।।**
**जी जीवित्वाच्या आडवीं । आतुडलों होतों मरणगावीं ।**
**ते अवदसाचि आघवी । फेडिली आजी ।। ३४ ।।**
**जे गीता येणें नांवे नावाणिगी । जे अविद्या जिणोनी दाटुगी ।**
**ते कीर्ती तुझी आम्हांजोगी । वानावया जाली ।। ३५ ।।**
**तैसा मी गीता वाखाणी । हे खपुष्पाची तुरंबणी ।**
**परी समर्थें तुवां शिरयाणी । फेडिली ते ।। ३९ ।।**
**म्हणौनि तुझेनि प्रसादें । मी गीतापद्यें अगाधें ।**
**निरूपीन जीं विशदें । ज्ञानदेवो म्हणे ।। ४० ।।**

आपण अनंत कल्पपर्यंत सत्यभाषणाचे तप केल्यामुळे आपल्यावर शक्तिपात-रूपी गुरुप्रसाद होऊन त्याच्या जोरावरच आपण गीतेचा भावार्थ सांगू शकतो असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मते गीतेचा प्रतिपाद्य अर्थ व तत्त्व सिद्धयोग हे एकच असून ती त्या दृष्टीने एकरस आहे.एवढेच नव्हे तर गीता हे एक सिद्धयोगाचे मंदिर असून ती प्रभूची म्हणजे सिद्धाची वाङ्‌मयी मूर्तीच आहे; असा गीतेच्या अखंड-त्वाचा अमर सिद्धांत त्यांनी मांडला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**कां गंगायमुना उदक । वोघबगें वेगळिक ।**
**दावी होऊनि एक । पाणीपणें ।। १८.१ ।।**

न मोडतां दोन्ही आकार । घडिलें एक शरीर ।
हें अर्धनारी नटेश्वर– । रूपीं दिसें ।। ५२ ।।
नाना वाढिली दिवसें । कळा बिंबीं पैसे ।
परी सिनानें लेवे जैसें । चंद्रीं नाहीं ।। ५३ ।।
तैसीं सिनानीं चारी पदें । श्लोक तो श्लोकावच्छेदें ।
अध्यावो अध्यायभेदें । गमे कीर ।। ५४ ।।
परी प्रमेयाची उजरी । आनान रूप न धरी ।
नाना रत्नमणीं दोरी । एकचि जैसी ।। ५६ ।।
मोतियें मिळोनि बहुवें । एकावळीचा पाडु आहे ।
परी शोभे रूप होयें । एकचि तेथ ।। ५६ ।।
फुलांफुलसरां लेख चढे । द्रुतीं दुजी अंगुळी न पडे ।
श्लोक अध्याय तेणे पाडें । जाणावे हे ।। ५७ ।।
सात शतें श्लोक । अध्यायां अठरांचे लेख ।
परी देवो बोलिले एक । जें दुजें नाहीं ।। ५८ ।।
आणि म्यांही न सांडूनि ते सोये । ग्रंथ व्यक्ती केली आहे ।
प्रस्तुत तेणें निर्वाहे । निरूपण आइका ।। ५९ ।।

अशा प्रकारे गीतेत सिद्धयोगाचाच सुगंध आहे. प्रसंगोपात्त कर्म,भक्ती, ज्ञान, जगदुत्पत्ती इत्यादिकांचे वर्णन केले असले तरी या सर्वांची परिणती सिद्धयोग-साधनाने प्राप्त होणाऱ्या अद्वितीय अखंडैकरस अशा ब्रह्मतत्त्वात होत असल्याने इतर विषयांना स्वतःस स्वतंत्र असे काही एक फल नसल्याने ते तात्पर्याचे विषय नाहीत गूळ, साखर किंवा ढेपा या निरनिराळ्या दिसल्या तरी त्या एकाच रसाच्या तयार केलेल्या असतात. त्यांच्या गोडीचा स्वाद निरनिराळा असतो एवढेच. त्याप्रमाणेच अध्याय निरनिराळे दिसले तरी सिद्धयोग या एकाच योगाचे ते आविष्कार आहेत हे निश्चित आहे कारण श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जे ग्रंथाच्या मध्यभागीं । नाना अधिकारप्रसंगीं ।
निरूपण अनेगीं । सिद्धांतीं केलें ।। १८.१२४० ।।
तरी तेतुलेही सिद्धांत । इये शास्त्रीं प्रस्तुत ।
हें पूर्वापर नेणत । कोण्ही जैं मानी ।। १२४१ ।।
तैं महासिद्धांताचा आवांका । सिद्धांतकक्षा अनेका ।
भिडऊनि आरंभु देखा । संपवितु असे ।। १२४२ ।।
एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ ।
या दोहीं केवळ । साधन ज्ञान ।। १२४३ ।।
हें इतुलेचि नानापरी । निरूपलें ग्रंथ विस्तारीं ।। १२४४ ।।

अशा प्रकारे ग्रंथाच्या मध्यभागी निरनिराळया अधिकार प्रसंगाने भिन्न भिन्न अनेक सिद्धांत मांडून प्रतिपादन केले असले तरी पूर्वापार संबंधाचा विचार न जाणता गीतेमध्ये तितकेही सिद्धांत सांगितले आहेत असे जर कोणी मानील तर ते चूक ठरेल. सिद्धयोग हा महासिद्धांत असून त्याच्यापाशी सर्व उपसिद्धांतांचे ऐक्य करून दाखविले की बाकीचे अनंत सिद्धांत या कक्षा, बाजू, भाग किंवा उपसिद्धांत आहेत हे स्पष्ट होते. अविद्येचा नाश व मोक्षफळाची प्राप्ती या दोन्ही गोष्टीला यथार्थ ज्ञान हेच साधन आहे. आता ज्ञान म्हणजे योग कसा व ज्ञान हे शस्त्र योगामुळेच कसे चालविले जाते हे आपण पूर्वीच पाहिले आहे.

सारांश, गीता हा एक रत्नप्रासाद आहे. तो वैष्णवप्रासाद आहे. ती श्रीप्रभूची वाङ्मयी मूर्ती आहे. त्यात भिन्नत्व असूच शकत नाही. सिद्धयोग महासिद्धांतयोगयुक्त गीताशास्त्रेश्वराचे अभिन्नैकरससिद्धस्वरूप हे असे आहे.

## गीतार्थ निधानासाठी वस्तुसामर्थ्यशक्तीच्या स्नेहांजनाची आवश्यकता:-

गीतेच्या खऱ्या भावार्थाचा ठेवा कळण्यासाठी वस्तुसामर्थ्यशक्तीच्या स्नेहांजनाची म्हणजे सद्गुरूंकडून शक्तिपात होऊन कुंडलिनी शक्ती जागृत होण्याची किती नितांत आवश्यकता आहे हे "जी गीतार्थ निधान। काढू माझें मन। सुयीं स्नेहांजन। आपलें तूं ॥१४.१९॥" या खुद्द श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या सद्गुरुचरणी केलेल्या प्रार्थनेवरून कसे स्पष्ट होते ते या प्रकरणाच्या प्रास्ताविकामध्ये आपण पाहिलेच आहे. त्याचाच थोडा अधिक सूक्ष्म विचार आता करावयाचा आहे. गीतार्थ निधान बाहेर येण्यासाठी सरस्वतीच्या नित्यस्रोतात्रे आपल्या ठिकाणी उद्घाटन व प्रकटीकरण व्हावे म्हणून त्यांनी या शक्तीच्या उद्घाटक गुरूंची स्तुती व प्रार्थना करून जो आत्मविश्वास प्रकट केला आहे तो पाहिला म्हणजे स्नेहांजनाच्या अर्थात् शक्तिपाताच्या आवश्यकतेचे एक कारण हाती येते. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-

**तैसी बोली साचारी। अवतरो माझी माधुरी।**
**माले मागूनि घरीं। गुरुकृपेच्या॥१४ ३१॥**
**म्हणौनि माझे नित्य नवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे।**
**श्रीगुरुकृपा काय नोहे। ज्ञानदेवो म्हणे ॥१८.१७३५॥**
**तरी न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें।**
**करूनि घेयावें हें तुमतें। विनवितु असे ॥१.८०॥**
**आतां देईजो अवधान। तुम्हीं बोलविल्या मी बोलेन।**
**जैसे चेष्टे सूत्राधीन। दारुयंत्र ॥८१॥**
**तैसा मी अनुग्रहीतु। साधूंचा निरूपितु।**
**तें आपुलियापरी। अलंकारितु। भलतयापरी ॥८२॥**

हें निफजेल आता आघवें। ऐसें बोलिजेल बरवें।
जें अधिष्ठिला असें परमदेवें। श्रीनिवृत्तीं मी ॥१३.११६३॥
म्हणौनि अक्षरीं सुभेदीं। उपमा श्लोक कोंदाकोंदी।
झाडा देईन प्रतिपदीं। ग्रंथार्थासी ॥६४॥
हा ठावोवरी मातें। पुरतया सारस्वतें।
केलें असे श्रीमंतें। श्रीगुरुरायें ॥६५॥
तेणें जी कृपासावायें। मी बोलें तेतुलें सामाये।
आणि मी तुमचिये सभे लाहें। गीता म्हणों ॥६६॥
प्रभु काश्मिरीं मुकें। नुपजें हें काय कौतुकें।
नाहीं उणीं सामुद्रिकें। लक्ष्मीयेसी ॥६८॥

श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी आपल्याला दीक्षा देऊन, शब्दब्रह्मस्वरूपिणी कुंडलिनी शक्ती जागृत करून, तिच्याद्वाराने आपल्या वाणीतून अमृतमधुर व सत्य शब्दसंहिता ज्ञानेश्वरीच्या रूपाने प्रकट करावी म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुरुकृपेच्या घरी भिक्षा मागून विनंती केली आहे. गुरुकृपेने शक्ती जागृत झाली की, श्वासोच्छ्वासही प्रबंध होण्यास काहीच प्रत्यवाय नाही; कारण श्वासप्रच्छ्वास शक्तिजागृतीपूर्वी इडापिंगलेतून वाहत असल्याने ते हे कार्य करण्यास समर्थ असत नाहीत. परंतु ज्यावेळी प्राण व मनाची इडापिंगलेतून वाहणारी गती थांबून ते सुषुम्नेत प्रविष्ट होतात त्यावेळी नित्य सारस्वतस्रोताची अनुभूती येऊन वाग्देवी कशी प्रकट होते हे सांगताना "शिवसंहितेत" असे म्हटले आहे की—

सुप्ता नागोपमा ह्येषा स्फुरंती प्रभया स्वया।
अहिवत् संधिसंस्थाना वाग्देवी बीजसंज्ञिका ॥५.७७॥
वपुषः कांतिरुत्कृष्टा जठराग्निविवर्धनम्।
आरोग्यं च पटुत्वं च सर्वज्ञत्वं च जायते ॥८७॥
भूतं भव्यं भविष्यच्च वेत्ति सर्वं सकारणम्।
अश्रुतान्यपि शास्त्राणि सरहस्यं वदेद् ध्रुवम् ॥८८॥
वक्त्रे सरस्वती देवी सदा नृत्यति निर्भरम् ॥८९॥

कुंडलिनी शक्ती सर्पाप्रमाणे मूलाधारात निद्रा घेते. ती आपल्या स्वतःच्या प्रकाशानेच प्रकाशित होते. ती इडापिंगलेच्या मध्यस्थानी असलेल्या सुषुम्नेच्या मुखापाशी सर्पाप्रमाणे राहते. ही कुंडलिनी शक्तीच वाग्देवी आहे. तिच्यापासूनच अ ते ह पर्यंतचे सर्व वर्ण व पुढे क्रमाने अक्षरे, पदे व वाक्ये उत्पन्न होतात. ह्यामुळेच सृष्टी उत्पन्न होते. म्हणूनच ही शक्ती संसाराचे बीज किंवा मूळ आहे. या शक्तीच्या ध्यानाने शरीराची कांती उत्तम होते व जठराग्नी प्रदीप्त होतो. शरीर निरोगी राहते. सर्व शास्त्रांमध्ये पटुत्व प्राप्त होते व सर्वज्ञता प्राप्त होते. भूत, भविष्य व

वर्तमान अशा तिन्ही कालांचे व सर्व वस्तूंच्या कारणाचे ज्ञान होते. जी शास्त्रे कधी ऐकली, वाचली किंवा शिकलेली नाहीत त्या सर्व शास्त्रांची रहस्यासहित व्याख्या करण्याची शक्ती उत्पन्न होते. इतकेच नव्हे तर जो योगी शक्तिजागृतीने संपन्न असतो त्याच्या मुखात सरस्वतीदेवी निरंतर नृत्य करीत असते.

असे हे या शक्तीचे सामर्थ्य असल्याने व ही शक्ती गुरुकृपेने जागृत होत असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतार्थाच्या ठेव्यासाठी ती उद्‌बुद्ध होणे आवश्यक आहे असे प्रतिपादन केले आहे. अशा प्रकारच्या स्नेहांजनाची आवश्यकता श्रीराम-चरिताच्या निर्मितीसाठी गोस्वामी श्रीतुलसीदासजींनी " रामचरितमानसाच्या " सुरुवातीलाच गुरुवंदना करताना केली आहे. ते म्हणतात–

वंदऊँ गुरुपद कंज, कृपासिंधु नररूप हर।
महामोहतमपुंज, जासु बचन रबिकरनिकर ॥१.५॥
श्रीगुरु पद नख मनिगन जोती। सुमिरत दिव्य दृष्टि हियँ होती।
दलन मोह तम सो सप्रकासू। बडे भाग उर आवई जासू।
उघरहिं बिमल बिलोचन हि के। मिटहिं दोष दुख भव रजनी के।
सूझहिं रामचरित मनि मानिक। गुपुत प्रगट जहँ जो जेहि खनिक।
जथा सुअंजन अंजा दृग। साधक सिद्ध सुजान।
कौतुक देखहिं सैल बन। भूतल भूरि निधान।
गुरुपद रज मृदु मंजुल अंजन। नयन अमियदृग दोष बिभंजन।
तेहिं करि बिमल बिवेक बिलोचन। बरनऊँ रामचरित भवमोचन॥

मी श्रीगुरुमहाराजांच्या चरणकमलांना वंदन करतो.ते कृपेचे सागर व नररूपाने साक्षात् शंकरच आहेत. ज्याप्रमाणे सूर्यकिरणांचा समूह अंधःकाराचा नाश करतो त्याप्रमाणे शक्तिपातयुक्त असे ज्ञानांजनशलाकारूप श्रीगुरूचे वचन महामोहरूपी दाट अंधःकार दूर करते. श्रीगुरुचरणांच्या नखांची प्रभा ही रत्नप्रकाशासारखी दिव्य आहे. त्यांच्या चरणांचे स्मरण करताच हृदयामध्ये दिव्य दृष्टी उत्पन्न होते. त्या दिव्य प्रकाशाने किंवा तेजाने अज्ञानांधःकाराचा पूर्ण नाश होतो. ज्याच्या हृदयात शक्तिसंक्रमण होऊन असा प्रकाश उत्पन्न होतो त्याचे भाग्य अत्यंत मोठे असते. याचे कारण असे की एकदा अंतःकरणात ह्या शक्तीचा प्रकाश पडला की हृदयाचे सर्व निर्मलनेत्र उघडतात. ससाररूपी रात्रीची सर्व दुःखे व दोष नाश पावतात आणि रामचरित्ररूपी खाणीतील गुप्त किंवा प्रकट असणारे सर्व हिरे व रत्ने अगर मणी– माणके– स्पष्ट दिसू लागतात. सिद्धांजन डोळ्यात घातल्यावर जसा साधक सिद्ध व सुजाण होतो आणि त्याला सहज लीलेने वनात, पर्वतावर किंवा जमिनीत गुप्त धनाचे ठेवे दिसतात. त्याप्रमाणेच श्रीगुरुमहाराजांच्या चरणांची धूळ अत्यंत

कोमल व सुंदर अशा नयनामृत अंजनासारखी आहे. त्या अंजनाने माझे विवेकनेत्र स्वच्छ करून मी संसारदुःख नष्ट करणाऱ्या श्रीरामचरित्राचे वर्णन करीन.

ही सर्व वस्तुसामर्थ्यशक्तीची, स्नेहांजनाची म्हणजे शक्तिपाताची किमया आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ही किमया आपल्या बाबतीत कशी घडली ते स्पष्ट केल्याचे आपण मागे पाहिलेच आहे.त्यामुळे त्यांच्या मुखातून जी वाणी बाहेर पडली ती संहितारूप ज्ञानेश्वरीच झाली. मूळ शक्तीशी अभिन्नता प्राप्त झाली की 'अ' कारा पासून 'ह' कारापर्यंत सर्व वर्णांवर ताबा येऊन त्यांची अक्षरे व वाक्ये होऊन ती आपोआप उमटू लागतात. यासाठी काहीही प्रयास व आयास पडत नाहीत. हे अगदी सहज होते. हे घडविणाऱ्या शक्तीला नमस्कार करताना "सूतसंहितेच्या" "यज्ञवैभव खंडात" असे म्हटले आहे की—

ईदृशी परमा विद्या शांकरी भवनाशिनी ।
प्रसादादेव जंतूनां शक्तेरेव हि जायते ।। ४७.५८ ।।
वागुद्भूता परा शक्तिर्या चिद्रूपा पराभिधा।
वंदे तामनिशं भक्त्या श्रीकंठार्धशरीरिणीम् ।। ५९ ।।
अकारादिक्षकारांतैर्वर्णैरत्यंतनिर्मलैः ।
अशेषशब्दैर्या भाति तामानंदप्रदां नुमः ।। ६५ ।।
लक्ष्मीवागादिरूपेण नर्तकीव विभाति या ।
तामाद्यन्तविनिर्मुक्तामहं वंदे वराननाम् ।।६६।।
गुरुमूर्तिधरां गुह्यांगुह्यविज्ञानदायिनिम् ।
गुह्यभक्तजनप्रीतां गुहायां निहितां नुमः ।।६६ ।।

ही संसारभयाचा नाश करणारी श्रीशिवाची परमश्रेष्ठ अशी सिद्धयोगाची विद्या प्राणिमात्रांना श्रीशक्ती कुंडलिनीच्या प्रसन्नतेमुळेच प्राप्त होते. वाणीतून उत्पन्न होणाऱ्या, चिद्रूप असणाऱ्या व श्रीशिवाच्या अर्धांगाची स्वामिनी असणाऱ्या परमशक्तीला मी सतत वंदन करतो. 'अ' पासून 'क्ष' पर्यंतच्या निर्मल वर्णांनी व सर्व शब्दरूपाने जी भासते त्या आनंददायिनी कुंडलिनी देवतेला आम्ही वंदन करतो. लक्ष्मी सरस्वती प्रभृती विविधरूपाने नटणारी आद्यंतरहित श्रेष्ठ व सुंदर अशा चित्शक्तीला मी वंदन करतो गुरुरूपिणी, रहस्य सांगणारी, गूढरूपिणी, गूढ-रहस्यमय ब्रह्मतत्त्व प्रकाशदात्री व हृदयगुहेत राहणाऱ्या अशा त्या कुंडलिनी देवतेला आम्ही नमस्कार करतो.

या सर्व श्लोकांवर श्रीविद्यारण्यस्वामींनी "तात्पर्यदीपिकेच्या" रूपाने जी टीका केली आहे ती पाहण्यासारखी आहे. विस्तारभयास्तव येथे फक्त ६५ व्या श्लोकावरील टीका उद्धृत करतो म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांची "परि अमृतातेंही

पैजा जिंके । ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ ६.१४ ॥ " ही प्रतिज्ञा कशी सार्थ ठरते हे स्पष्ट होईल.

" आधारादिषट्‌कमलदलेषु पतिता द्वादशांतस्थितचंद्रमंडलात्सता अमृतबिंदवो ऽकारादिक्षकारान्तवर्णात्मना परिणताः । उक्त ह्याचार्ये–

मूलाधारास्फुरिततडिदाभाप्रभा सूक्ष्मरूपो–
द्‌गच्छन्त्यामस्तकमणुतरा तेजसां मूलभूता ।
सौषुम्णाध्वाचरणनिपुणा सा सवित्राऽनुबद्धा
ध्याता सद्योऽमृतमथ रवेः स्रावयेत्‌ सार्धसोमात्‌ ॥
शिरसि निपतिता या बिंदुधारा सुधारा
भवति लिपिमयी सा ताभिरंगं मुखाद्यम्‌ ॥

याचा अर्थ असा की द्वादश कमलामध्ये असलेल्या चंद्रमंडलातून आधारादि षट्‌कमल दलामध्ये टिपकणाऱ्या अमृताच्या बिंदूंचीच 'अ' कारापासून 'क्ष' कारापर्यंतच्या सर्व वर्णांच्या स्वरूपात परिणीती होते म्हणजे ते अमृतच त्या अक्षरांचे रूप धारण करते. आचार्यांनी म्हटले आहे कीं, मूलाधारात स्फुरण पावणारी, विद्युतप्रकाशाप्रमाणे प्रभाव असणारी, सूक्ष्मरूपापासून उत्पन्न झालेली, मस्तकापासून अणुपर्यंत तेजाची मूलभूत स्वामिनी, सुषुम्नामार्गात संचार करण्यात निपुण असणारी व सूर्याशी संबंधित अशी कुंडलिनी शक्ती जेव्हा जागृत होते म्हणजेच तिचे ध्यान केले जाते, त्यावेळी ती सहस्रारस्थ चंद्रमंडलातील सरोवरातून अमृताचा वर्षाव करते. ज्यावेळी या अमृताची धारा मस्तकात स्रवू लागते त्यावेळीच ती लिपिमय होते व मुखादि अंगेही तो तृप्त करते.

" तंत्रालोक विवेकामध्येही " अभिनवगुप्ताचार्यांनी असे म्हटले आहे की–

तदेवं पारमेश्वरी कौलिकी–आदिशब्दव्यपदेश्या ।
विसर्गशक्तिरेव तत्तदामर्शात्मना स्फुरतीति तात्पर्यार्थः ॥

ही पारमेश्वरी कौलिकी आदि शब्दांद्वारा व्यक्त होणारी विसर्गशक्ती त्या त्या आदर्शाच्या रूपात स्फुरित होत असते. हिलाच जीवभूत चिदात्मिका कुंडलिनी शक्ती म्हणतात. तिच्यापासूनच अ, उ, म हे उत्पन्न होतात. अशी ही शब्दब्रह्ममयी व आदिबीजरूप आहे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तिला सुरुवातीलाच पुढील प्रमाणे वंदन केले आहे. ते म्हणतात–

अकार चरणयुगल । उकार उदर विशाल ।
मकार महामंडल । मस्तकाकारें ॥ १.१९॥
हे तीन्ही एकवटले । तंव शब्दब्रह्म कवळलें ।
तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥ २० ॥

आतां अभिनव वाग्विलासिनी । जे चातुर्यार्थकलाकामिनी ।
ते शारदा विश्वमोहिनी । नमिली मियां ।। २१ ।।

अशा ह्या 'अ' 'उ' 'म' कार युक्त, शब्दब्रह्मरूपी, आदिबीजात्मक, अपूर्व अशा वाणीचा विलास करणारी, चातुर्य, अर्थ व कलांची स्वामिनी अशी विश्वाला मोहित करणारी शारदारूपी कुंडलिनी सरस्वतीला मी नमस्कार करतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतार्थ निधानासाठीं आदिशक्ती कुंडलिनीच्या जागृतीची जी नितांत आवश्यकता प्रदिपादिली आहे ती वरील विवेचनावरून जशी हृदयंगम होते त्याप्रमाणेच त्यांच्या पुढील उदगारावरूनही गीतार्थासाठी श्रीगुरुकृपेने शक्ती जागृत होणे कसे आवश्यक आहे हे दृग्गोचर होते. ते म्हणतात–

आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे ।
कां दर्शी दीपसंगें । दीपुचि होय ।। १७.१९ ।।
तैसा तुझिया प्रणितीं । मी पूर्ण जाहलों श्रीनिवृत्ती ।
आतां आणीन व्यक्तीं । गीतार्थु तो ।। २० ।।
अहो सद्गुरुचियें कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ।।१२.९ ।।
म्हणौनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलतें ।
आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं ।। १० ।।
तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सदैवें ।
तरीं आतांचि हें आघवें । निर्मीन माये ।। १७ ।।

सारांश येथपर्यंत केलेल्या सर्व विवेचनावरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गीताशास्त्राकडे पाहण्याची दृष्टी स्पष्ट होऊन गुरुपरंपराप्राप्त सिद्धयोगाचा किंवा समाधिधनाचा हे शास्त्र अमोल असा ठेवा कसा आहे हे सर्वांगांनी दृष्टिगोचर झाल्याशिवाय राहणार नाही.

## प्रकरण तिसरे

# ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या तत्त्वज्ञानाचे सर्वंकष स्वरूप

**प्रास्ताविक—**

सिद्धयोगाच्या तत्त्वज्ञानाचे सर्वंकष स्वरूप ज्ञानेश्वरीत कसे प्रकट झाले आहे ते या प्रकरणात पाहवयाचे आहे. जगातील सर्व दार्शनिकांनी कोणत्या ना कोणत्या रूपात संसाराच्या मूळ पदार्थावर विचार केला आहे. भारतीय दर्शनात या पदार्थाचे 'तत्त्व' म्हणून सर्व दार्शनिकांनी वर्णन केले आहे. मूळ तत्त्व जाणले की मोक्ष प्राप्ती होते व मूळतत्त्वाच्या विकृत रूपात गुंतल्यामुळे प्राणी बंधनात पडतो. हे बंधन दूर होणे हेच खरे तत्त्वज्ञानाचे स्वरूप आहे. तत्त्व म्हणजे पद, ब्रह्म, पुरुष किंवा शिव होय व ज्ञान म्हणजे शक्ती, कुंडलिनी, सत्ता किंवा माया होय. ज्ञान झाले की तत्त्वाची प्राप्ती होते. "अतोऽत्यन्तप्रसिद्धं ज्ञानं ज्ञाताऽप्यत एव प्रसिद्ध इति। तस्माज्ज्ञाने यत्नो न कर्तव्यः किं त्वनात्मबुद्धिनिवृत्तावेव तस्माज्ज्ञाननिष्ठा सुसंपाद्या।" असे श्रीमदाद्यशंकराचार्यांनी गीतेच्या अठराव्या अध्यायातील पन्नासाव्या श्लोकावर भाष्य करताना म्हटले आहे. याचा अर्थ असा की, ज्ञान अत्यंत प्रसिद्ध आहे; कारण ज्ञात्यावाचून केवळ ज्ञानाची सिद्धीच होणे शक्य नाही. (याप्रमाणे ज्ञान सर्वथा सिद्धच असल्यामुळे त्याविषयी भावना, उपाय, मार्ग इत्यादि विधी नाही.) म्हणून ज्ञानाविषयी यत्न करावयास नको; तर अनात्मबुद्धी निवृत्त करण्यासाठीच साधना करावयास पाहिजे. म्हणून ज्ञाननिष्ठा अनायासाने संपादन करता येण्यासारखी आहे. ही ज्ञाननिष्ठा संपादन करण्याची जी साधने आहेत तीही ज्ञानरूपच आहेत असे "अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ॥१३.११॥" या गीतेवरील श्लोकावर टीका करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी, "तत्त्वज्ञानाचा अर्थ मोक्ष असून सर्व संसाराचा उपशम, त्याचें आलोचन करणे, हे तत्त्वज्ञानार्थदर्शन होय व तत्त्वज्ञानासाठी सांगितलेले साधनजातही ज्ञानच होय. कारण ते ज्ञानासाठी आहे." असे म्हटले आहे.

अशा या तत्त्वज्ञानाची प्राप्ती झाली की जीवाला मोक्षप्राप्ती होते; कारण "तत्त्वज्ञानान्निश्रेयसाधिगमः।" असे शास्त्रवचन आहे. जीव हा मूळचा ब्रह्मस्वरूप आहे; पण त्याला आपल्या स्वरूपाचे स्वसंकोचामुळे अज्ञान झाल्याने तो जीवभावास

प्राप्त होऊन बद्ध झाला आहे. त्या अज्ञानाची निवृत्ती स्वस्वरूपाचे अपरोक्षज्ञान झाल्याशिवाय इतर कोणत्याही उपायांनी होत नाही. अज्ञान हे तमोरूप असल्याने प्रकाशाशिवाय अंधःकाराचा विनाश ज्याप्रमाणे इतर कोणत्याही साधनांनी होत नाही, त्याप्रमाणे तत्त्वज्ञानाशिवाय अज्ञानाची निवृत्ती होत नाही. अज्ञानाच्या व पुनर्जन्माच्या फेऱ्यातून मुक्त होण्याकरिता जीवाला तत्त्वज्ञानप्राप्ती हा एकच उपाय आहे व हे सर्व जग परमात्मस्वरूप आहे अशी जाणीव होणे हेच त्या तत्त्वज्ञानाचे स्वरूप आहे.

जीव, जगत् आणि ईश्वर यांचे खरे स्वरूप काय आहे हे कळून येणे याला तत्त्वज्ञान म्हणतात. ज्यावेळी " तरी गुरु दाविलिया वाटा । येऊनि विवेकतीर्थतटा । धुऊनियां मळकटा । बुद्धीचा तेणे ।।१८.१०११।। " याप्रमाणे श्रीगुरूंनी दाखविलेल्या सिद्धयोगमार्गाच्या वाटेने जाऊन साधक शुद्ध होतो; त्यावेळी त्याला तत्त्वज्ञानाची प्राप्ती होते. ह्या प्राप्तीमुळे जीव, जगत् व ईश्वर ही भिन्न नसून एकरस व परिपूर्ण आहेत असा बोध होऊन द्वैत प्रपंचाचा वाध होतो. असे झाले म्हणजे ब्रह्म सत्य आहे, जगत् मिथ्या आहे व जीव आणि परमात्मा एकच आहेत असा अनुभव येऊन वेदान्ताचा परम सिद्धांत सिद्ध होतो. शेवटी एक अद्वितीय, निष्प्रपंच व सच्चिदानंद अशी जी परब्रह्म वस्तू तीच शिल्लक राहाते. यालाच अद्वैतावस्था म्हणतात.

या अद्वैतावस्थेची सिद्धी कशी होते हे सांगताना ज्या तत्त्वज्ञानाचा श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी आविष्कार केला आहे त्याचा आधार कथन करताना ते म्हणतात–

**तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु ।**
**अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ? ।।१८.१७२३।।**

यातील ' भाष्यकार ' या शब्दाने अनेक प्रश्न उत्पन्न करून पंडितांना वादास प्रवृत्त केले आहे. " श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्यांच्यापूर्वी झालेल्या शंकराचार्य किंवा रामानुजाचार्य यांना वाट पुसत भाष्य लिहिले काय ?" असा वादाचा प्रश्न आहे. परंतु ज्या पद्धतीने पंडितांनी व विचारवंतांनी या प्रश्नावर रणे माजविली आहेत ती योग्य वाटत नाहीत; कारण या भाष्यकाराचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरील ओवीच्या पुढेच अत्यंत अपूर्व पद्धतीने केले आहे. ते ध्यानात घेतले व मागील अध्यायातील गीतार्थ निधानाबद्दलची त्यांची दृष्टी लक्षात घेतली म्हणजे हे भाष्यकार दुसरे तिसरे कोणी नसून त्यांचे गुरूच त्यांच्या अंतःकरणात बसून भावार्थ सांगत आहेत हे स्पष्ट होते. ते म्हणतात–

**आणि पृथ्वी जयाचिया क्षमा । नुबगे स्थावर जंगमा ।**
**जयाचेनि अमृतें चंद्रमा । निववी जग ।। १८.१७२४ ।।**
**जयाचें आंगिक असिकें । तेज लाहोनि अर्कें ।**
**आंधाराचें सावाइकें । लोटिजत आहे ।। १७२५ ।।**

समुद्रा जयाचें तोय । तोया जयाचें माधुर्य ।
माधुर्या सौंदर्य । जयाचेनि ।। १७२६ ।।
पवना जयाचें बळ । आकाश जेणें पघळ ।
ज्ञान जेणें उज्ज्वळ । चक्रवर्ती ।। १७२७ ।।
वेद जेणें सुभाष । सुख जेणें सोल्लास ।
हें असो रूपस । विश्व जेणें ।। १७२८ ।।
तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु ।
राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ।। १७२९ ।।
आतां आयती गीता जगीं । मी सांगे मऱ्हाठिया भंगीं ।
येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ।। १७३० ।।
श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं होती ।
तेणें कोळियें त्रिजगतीं । येकवद केली ।। १७३१ ।।
चंदनें वेधलीं झाडें । जाली चंदनाचेनि पाडें ।
वसिष्ठें मानिली कीं भांडें । भानूसीं शाटी ।। १७३२ ।।
मा मी तव चित्तथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।
जो निठीवेनि आपुला । बैसवी पदीं ।। १७३३ ।।
आगींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी ।
तें न दिसें ऐसी गोठी । केंहीं आहे? ।। १७३४ ।।
म्हणौनि माझें नित्य नवे । श्वासोछ्वासही प्रबंध होआवे ।
श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ।। १७३५ ।।

असे हे श्रीगुरुकृपेचे सामर्थ्य आहे. ज्यांच्या सत्तेने वेद जेथे चांगले बोलतात तेथे ज्ञानेश्वरी सांगण्याला इतरांच्या तोंडाकडे पाहण्याचे कारणच नाही. ज्या श्रीगुरुमहाराजांच्या सामर्थ्याने ज्ञानाला उज्ज्वल सामर्थ्य प्राप्त होते तेथे त्यांच्या सामर्थ्याने गीतार्थ उलगडणार नाही असे कसे होईल ? जागृत शक्तीच्या रूपाने सद्‌गुरू शिष्याच्या अंतःकरणात अखंड विराजमान होऊन आपल्या इच्छेप्रमाणे कार्ये करून घेतात. श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनीही माझ्या ठिकाणी अशा प्रकारे जागृत शक्तीच्या रूपाने राहून ज्ञानेश्वरी प्रस्फुटित केली. एकलव्याला गुरुकृपेनेच ज्ञान झाले व वसिष्ठांची छाटी त्यांच्या सामर्थ्यानेच समर्थ बनली. त्याप्रमाणे मी सद्‌गुरुकृपेने सचेतन, जागृतशक्तिसपन्न असा झालो आहे. श्रीगुरू हे माझे मार्गदर्शक व भाष्यकार आहेत. त्यांनी "वाङ्‌मात्राद्वाथदृक्‌पातात् यः करोति च तत्क्षणात् । प्रस्फुटं शाभवं वेद्यं स्वसंवेद्यं परं पदम् ।। सि. स. प. ५·६७ ।।" या न्यायाने माझ्यावर दृष्टी टाकून, शक्तिपात करून मला स्वस्वरूपपदावर बसविले आहे. असा समर्थ सद्‌गुरू साहाय्यकर्ता किंवा भाष्यकार असल्यावर प्रत्येक श्वासोच्छ्वास

प्रबंध होतील यात नवल ते काय ? श्रीगुरूंच्या कृपेने काय वाटेल ते घडून येईल अशी श्रीज्ञानेश्वरमहाराजांची नितांत निष्ठा व धारणा आहे. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीमध्ये" म्हटलेल्या "कथनाच्छक्तिपाताद्वा यद्वापादावलोकनात्। प्रसादात्स्वगुरोः सम्यक् प्राप्यते परमपदम् ॥ ५·६५ ॥" या निष्ठेत, धारणेत व अनुभूतीत संपन्न झालेली महायोगी श्रीज्ञानेश्वरमहाराजांची, वयाच्या सोळाव्या वर्षी जी अलौकिक प्रतिभा श्रीज्ञानेश्वरीच्या रूपाने उन्मीलित झाली, त्यांना दुसऱ्या कोण्या भाष्यकाराची आवश्यकता होती हे सुतराम शक्य वाटत नाही. अन्यथा मागील प्रकरणात वर्णन केल्याप्रमाणे श्रीगुरुकृपेचा व जागृतशक्तीच्या आधारे मी गीतार्थ वर्णन करतो असे जे प्रतिज्ञेवर श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे त्याला अर्थ उरणार नाही. पूर्वग्रह सोडून या विषयाकडे व अशा प्रकारे उद्भूत होणाऱ्या सामर्थ्याकडे पाहिले म्हणजे ज्ञानेश्वरीचा खरा अर्थ ध्यानात येईल. एरवी हे शक्य नाही. महाभारताच्या आदिपर्वात आरुणी, वेद व उपमन्यू यांना धौम्यमुनींनी आलिंगन देऊन सकलशास्त्र व वेदविद्यासंपन्न केल्याचे जे वर्णन आले आहे किंवा श्रीगुरुचरित्र ग्रंथात श्रीपादश्रीवल्लभ यांनी आपल्या बंधूंना व श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांनी आपल्या आईला ज्या पद्धतीने ज्ञान दिले आहे त्याचा या संदर्भात विचार केला म्हणजे मलपाशादि आवरणांनी युक्त अशा जीवावरील पूर्वसंस्कार एका क्षणात शक्तिपाताने जाळून भस्म करता येतात व शरीरांतर्गत ज्ञान उदभूत करता येते हे लक्षात येईल. एरवी ही मुक्या-बहिऱ्याची गोष्ट होईल.

डॉ. शं. दा. पेंडसे यांनी "श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी १४६ ठिकाणी श्रीमदाद्यशंकराचार्यांना अनुसरून टीका केली आहे," असे म्हणून भाष्यकार म्हणजे श्रीमदाद्यशंकराचार्यच होत असा निर्वाळा देऊन शांकर भाष्याचेच ज्ञानेश्वरीला अधिष्ठान प्राप्त झाले आहे असे मत "श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान" या ग्रंथात पृष्ठ १६६ वर मांडले आहे; तर श्रीबाळाचार्य खुपेरकरशास्त्री यांनी शैवसंप्रदायाच्या तत्त्वज्ञानाचाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत पुरस्कार केला आहे असा निर्वाळा "शैवागम आणि श्रीज्ञानेश्वर" या ग्रंथात दिला आहे. श्रीज्ञानदेवोपासक उर्फ श्री. ढवळे यांनी गोरक्षनाथांच्या महार्थमंजरीच्या आधाराने ज्ञानेश्वरीच्या तत्त्वज्ञानाचा उलगडा करण्याचा प्रयत्न "नाथसंप्रदाय आणि ज्ञानेश्वर" या ग्रंथात केला आहे. डॉ. पेंडसे यांनी तर "श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान" या ग्रंथात याबद्दल शेवटी असे म्हटले आहे की, "सूक्ष्मपणे पाहिले तर असे दिसते की उपनिषदे, गीता, गौडपादकारिका, योगवासिष्ठ, शांकरमत, काश्मिरी शैवसंप्रदाय आणि गुरुपरंपरेने आलेले नाथपंथीय तत्त्वज्ञान अशा सप्तसिंधूचे ओघ ज्ञानेश्वरीच्या अद्वैत-ज्ञानसागराला येऊन मिळालेले दिसतात." "श्रीज्ञानेश्वर

दर्शन" खंड २ मध्ये, श्री. वा. रा. निसाळशास्त्री यांनी बिंबप्रतिबिंबवाद, आभासवाद, अवच्छेदवाद, दृष्टिसृष्टिवाद, कल्पनावाद, स्फूर्तिवाद, चिद्‌विलासवाद आणि अजातवाद हे अद्वैत वेदान्तविचारास किंवा तत्त्वज्ञानसिद्धीस उपयोगी पडणारे व निरनिराळचा संप्रदायाचार्यांनी अवलंबिलेले वाद ज्ञानेश्वरीत कसे अवतरले आहेत हे दाखविले आहे. उपरोक्त कोणत्याही टीकाकारांच्या टीकेबद्दल किंवा मताबद्दल विरोध असण्याचे कारण नाही; कारण ज्ञानेश्वरीत ह्या सर्व गोष्टी आल्या आहेत हे खरे आहे. मात्र अमुकच भाष्यकाराला त्यांनी अनुसरले, अमुक एकच संकुचित तत्त्वज्ञान त्यांनी स्वीकारले, अमुक पुस्तकांचा त्यांनी अभ्यास केला व त्याचा त्यांच्यावर जो परिणाम झाला त्याचे हे ज्ञानेश्वरीत उमटलेले चित्र आहे हे म्हणणे पटण्यासारखे नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे "तैसी दशेची वाट न पाहतां। वयसेचिया गांवा न येतां। बाळपणींच सर्वज्ञता। वरी तयातें ॥६.४५३॥ तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें। मनचि सारस्वतें दुभें। मग सकळ शास्त्रें स्वयंभें। निघती मुखें ॥ ४५४ ॥" या कोटीतील महासिद्ध पुरुष असल्याने व श्रीगुरुकृपेने ज्ञानेश्वरी माझ्याकडून लिहिली गेली म्हणून ते सांगत असताना आपले तर्क त्यांच्यावर लादणे केव्हाही योग्य ठरणार नाही. जागृत शक्तीच्या प्रतिभेत सर्व तत्वांच्या व सांप्रदायिकांच्या लहरी उमटत असतात. आपण मागे पाहिल्याप्रमाणे ही शक्ती सर्व ज्ञानाची जननी असल्याने तिला काहीही अशक्य नाही. जागृत शक्तीला पूर्वी उमटलेला, आता उमटत असलेला व पुढे उमटणारा कोणताही स्पंद अज्ञात असत नाही. या सर्व ज्ञानस्पंदांचे श्रीगुरुकृपेने एक अलौकिक समरसी-करण होऊन ते ज्ञानेश्वरीच्या रूपाने प्रकट झाले. ही निरंतरच्या साम्याची उजरी आहे. यात कोठेही उसनवारी नाही, पण पूर्वसूरींनी अद्वैतसिद्धीसाठी वापरलेल्या सर्व गोष्टींचा समावेश वस्तुसामर्थ्यशक्तीमुळे त्यात आपोआप झाला आहे. या दृष्टीने ज्ञानेश्वरीकडे पाहिले म्हणजे सिद्धयोगाच्या तत्त्वज्ञानाचे स्वरूप सर्वंकष कसे झाले आहे याचा उलगडा होईल.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रतिपादलेल्या सिद्धयोगाच्या तत्त्वज्ञानाचे स्वरूप श्रीगुरुकृपा व शक्तिजागृती या कारणांमुळे जसे सर्वंकष झाले आहे त्याप्रमाणेच "अनुभव लाहाणा आयिता ॥ १३.१०४९ ॥" हे कारणही तत्त्वज्ञान सर्वस्पर्शी होण्याला कारणीभूत झाले आहे. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, आगम, अर्थापत्ती आणि अनुपलब्धी ही सहाही प्रमाणे ब्रह्माचे ज्ञान करून द्यावयास समर्थ नाहीत व एकमात्र ब्रह्मानुभव किंवा ब्रह्मसाक्षात्कार हेच मोठे किंवा बलवत्तर प्रमाण आहे हे पुढे नवव्या प्रकरणात सविस्तरपणे आपण पाहणारच आहोत. ब्रह्म ही सिद्ध वस्तू आहे. ती अशी नाही किंवा ती अशी आहे असे विकल्प तिच्याविषयी करता येत नाहीत; कारण वस्तूविषयी आहे किंवा नाही असे विकल्प पुरुषाच्या बुद्धीच्या

अपेक्षेने होतात; परंतु वस्तूच्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान पुरुषाच्या बुद्धीवर अवलंबून नसते, तर ते वस्तूच्या अधीन असते. एखादा खांब हा खांब आहे का पुरुष आहे का आणखी काही आहे, अशा प्रकारचे विकल्प हे तत्त्वज्ञान होत नाही. "पैल खांबु कां पुरुखु। ऐसा निश्चयो नाहीं एकु। परी काय नेणों आलोकु। दिसत असे। १४.७६ ॥ तेवीं वस्तु जैसी असे। तैसी कीर न दिसे। परी कांहीं अनारिसे। देखिजेना ॥ ७७ ॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे विकल्पज्ञान हे मिथ्याज्ञान होय. 'हा खांबच आहे' असे निश्चित ज्ञान होणे हे तत्त्वज्ञान होय. हा खांबाविषयीचा न्याय ब्रह्मालाही लागू पडतो. ब्रह्म ही सिद्धवस्तू आहे. त्यामुळे ब्रह्मज्ञान हे वस्तुतंत्र आहे; पुरुषतंत्र म्हणजे पुरुषाच्या बुद्धिप्रमाणे होणारे नाही. यावरून ब्रह्मज्ञान अनुभवगम्य आहे व अनुभव हे एक बलवत्तर प्रमाण असल्याने सिद्धयोगाचे सिद्धांतरूप तत्त्वज्ञानाचे नवनीत तुला देतो असे भगवंतांनी अर्जुनाला सांगितले आहे. त्यासंबंधी श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात--

> **ऐसेसे हे उपाये। बहुवस एथें पाहें।**
> **जाणावया होये। एकी वस्तु ॥ १३.१०४७ ॥**
> **आतां पुरे हे बहुत। पैं सर्वार्थाचें मथित।**
> **सिद्धांतनवनीत। देऊं तुज ॥ १०४८ ॥**
> **येतुलेनि पंडुसुता। अनुभव लाहाणा आयिता।**
> **येर तंव तुज आतां। सायास नाहीं ॥ १०४९ ॥**
> **म्हणौनि ते बुद्धि रचूं। मतवाद हे खांचूं।**
> **सोलीव निर्वचूं। फलितार्थुची ॥ १०५० ॥**

एकमेव ब्रह्मवस्तू जाणण्याचे या मृत्युलोकी पुष्कळ मार्ग आहेत; पण या सर्व मार्गांचे मंथन करून मी सिद्धयोगाचे सिद्धांतरूप तत्त्वज्ञान तुझ्या हातात देतो. यामुळे तुला सहज आयता अनुभव येईल व तुला ब्रह्मरूप होण्यास श्रम पडणार नाहीत यासाठी इतर मतवाद्यांचे खंडन करून व सिद्धयोगाच्या तत्त्वज्ञानाचे मंडन करून तुला त्या तत्त्वज्ञानाचे गाळीव रहस्य फलासह सांगतो.

यावरून तत्त्वज्ञान हा नुसत्या बोलण्याचालण्याचा, चर्चेचा, तर्काचा, बडबडण्याचा किंवा प्रवचनाचा विषय नसून तो अनुभूतीचा विषय आहे हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. त्यांच्या मते तत्त्वज्ञानाची अनुभूती देणे हेच सिद्धयोगाचे गाळीव रहस्य आहे व ते शक्तिपातात सामावलेले आहे. हे रहस्य सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> **तें परम तत्त्व पार्था। होती ते सर्वथा।**
> **जे आत्मनात्मव्यवस्था। राजहंसु ॥ १३.११४३ ॥**

ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा ।
उगाणा दिधला जीवा । जीवाचिया ।। ११४४ ।।
थेर कलशींचें थेरीं । रिचविजे जयापरी ।
आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ।। ११४५ ।।

ज्यावेळी सद्‌गुरू शक्तिपात करतात त्यावेळीच अनादि कालापासून निद्रिस्त असलेली व बहिर्मुख होऊन अनंतकालपर्यंत संसारचक्रात घुमविणारी आत्मसत्तास्वरूप कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ती जीवाचेच जडत्व हरणाचे कार्य करू लागते. राजहंस ज्याप्रमाणे दूध व पाणी निराळे करतो त्याप्रमाणे जागृत शक्तीच्या आधाराने आत्मा व प्रकृती यांचा भेद करून साधकयोगी ते परमतत्त्व ब्रह्म स्वत: होतात. जसजसे जडत्व हरण होत जाते तसतसे जीवाचे चैतन्य, शिवत्व किंवा तत्त्वज्ञान प्रकट होत जाते. जड व चेतन यांच्या भेदप्रक्रियेलाच सिद्धयोग किंवा तत्त्वज्ञान म्हणतात. श्रीकृष्णांनी अत्यंत प्रिय अशा अर्जुनाला शक्तिपातयोगाची दीक्षा देऊन आत्मा व प्रकृती यांच्या भेदप्रक्रियेची प्रक्रिया घडवून आणून त्याविषयीचा प्रत्यक्ष अनुभव आणून दिला. ज्याप्रमाणे एका घागरीतील सर्व पाणी दुसऱ्या घागरीत ओतावे त्याप्रमाणे शक्तिपाताने श्रीकृष्णांनी आपल्या हृदयातील ज्ञान अर्जुनाच्या हृदयात ओतले. हीच गोष्ट पाश्चात्य तत्त्वज्ञ E. Roer याने पुढील शब्दात सांगितली आहे. It is nevertheless certain that no true knowledge of soul is possible without first drawing a most divided line of demarkation between the phenomena of matter and that of the soul." याचा अर्थ असा की, प्रकृतीला व आत्मतत्त्वाला विभक्त करणारी एक निश्चित रेषा काढल्याशिवाय आत्म्याचे खरे ज्ञान होणे कधीही शक्य नाही हे अगदी नितांत सत्य आहे. जडचेतनभेदप्रक्रियारूप शक्तिपातयोगाचे हे रहस्य श्रीमद्‌भगवद्‌गीतेत " क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा । भूतिप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ।।१३.३४।।" या श्लोकात व्यक्त झाले आहे. क्षेत्र म्हणजे जड परिणामी शरीर व क्षेत्रज्ञ म्हणजे कूटस्थ चैतन्यात्मा होय. ज्यावेळी सद्‌गुरुकृपेने प्राणशक्ती कुंडलिनी जागृत होऊन तिचा सुषुम्नेत प्रवेश होतो; त्यावेळी पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश यांचा एकमेकात क्रमश: लय होऊन भूतमात्रांच्या प्रकृतीचा लय होतो. यामुळे साधकाच्या दिव्यचक्षूंचें उन्मीलन होऊन त्याला ज्ञान प्राप्त होते. या अनुभूतीमुळे साधक परमतत्त्वाप्रत जातो. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी वरील श्लोकावरील आपल्या भाष्यात हाच अर्थ व्यक्त केला आहे. ते म्हणतात, " शास्त्राचार्योपदेशजनितमात्मप्रत्ययिकज्ञानं चक्षुस्तेन ज्ञानचक्षुषा भूतप्रकृतिमोक्षं च भूतानां प्रकृतिरविद्यालक्षणाऽव्यक्ताख्या तस्या भूतप्रकृतेर्मोक्षणमभावगमनं च ये विदुर्विजानन्ति यान्ति गच्छन्ति ते परं परमार्थतत्त्वं ब्रह्म न पुनर्देहमाददत इत्यर्थः ।। " म्हणजे

शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाने उत्पन्न झालेले आत्मसाक्षात्काररूप ज्ञान ह्याच ज्ञानरूपी चक्षू होय. या ज्ञानरूपी चक्षूंनी जे भूतप्रकृतीच्या मोक्षाला म्हणजे अभावगमानाला अर्थात् अभाव होण्याला विशेष करून जाणतात ते परब्रह्माला जाऊन पोहोचतात व तद्रूपतेमुळे ते पुनरपि देह धारण करीत नाहीत.

वरील सर्व विवेचनावरून ज्ञानेश्वरीतील तत्त्वज्ञानाची उभारणी कोणत्या पायावर होऊन ते सर्वंकष झाले आहे याचा उलगडा होईल.

**अद्वैत सिद्धांताचे स्वरूपः—**

ज्ञानेश्वरीतील अद्वैत सिद्धांताचे स्वरूप पूर्णपणे अनुभूतीच्या व प्रचीतीच्या पायावर उभारलेले आहे. श्रीगुरुकृपेने जागृत झालेली शक्ती शिवाशी समरस होऊन साधकयोग्याला, जग, संकल्प, मन, कल्पना इत्यादि सर्व गोष्टी नाहीशा झाल्याची अनुभूती येऊन, तो स्वतः स्वसंवेद्य आत्मस्वरूप होऊन जातो असे वर्णन करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अद्वैत सिद्धांताचे स्वरूप स्पष्ट केले आहे. अद्वैत स्थिती ही एक अमूर्त किंवा कल्पनेपलीकडील स्थिती आहे. ही स्थिती सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या साधकाला प्राप्त होऊन अद्वैत समूर्त होऊन कसे उठते हे "तेणें कारणें मी बोलेन। बोलीं अरूपाचें रूप दावीन। अतींद्रिय परी भोगवीन। इंद्रियाकरवीं ॥६.३६॥" अशी प्रतिज्ञा करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ती अभिनववाग्विलासिनी व चातुर्यार्थकलाकामिनीच्या जोरावर पूर्ण करून दाखविली आहे. नुसत्या शास्त्रीय परिभाषेत अद्वैत सिद्धांताचे स्वरूप सांगून त्याची चर्चा करण्यापेक्षा परंपराप्राप्त समाधिधनाच्या आधाराने अमूर्त वस्तू समूर्त करून दाखविण्याचे त्यांचे कौशल्य जगातील कोणत्याही तत्त्ववेत्याने दाखविले नाही असे म्हटले तर ते खचितच अत्युक्तिपूर्ण होणार नाही. "ऐका रसाळपणाचिया लोभा। कीं श्रवणींचि होती जिभा ॥६.१६॥" असे अद्वैत तत्त्व सांगण्याचे लोकोत्तर कार्य त्यांनी केल्यामुळे वाळूवरून वाहणाऱ्या फल्गु नदीप्रमाणे ते निरुपयोगी न ठरता काशीतील बांधीव घाटावर हजारो मुमुक्षूंनी गंगेत सहजतेने स्नान करून कृतार्थ व्हावे; त्याप्रमाणे सर्वसामान्य जनांना उपयोगी ठरले आहे. मात्र "परी लोकु वाक्‌चातुर्यें। होईल सुखिया ॥१८.१७५०॥" अशा रीतीने या गंगेत स्नान न करिता "अध्यात्मशास्त्रीं यिये।, अंतरंगचि अधिकारिये ॥१८.१७५०॥" असे स्नान केले पाहिजे. असे केले म्हणजे अद्वैत सिद्धांताच्या स्वरूपाचे अनर्घ्य रत्न हाती आल्याशिवाय राहणार नाही.

अद्वैत म्हणजे ऐक्य होय. अद्वैत हा आत्माच आहे. अद्वैताची विस्मृती म्हणजे आत्मविस्मृती होय. ब्रह्मरूपी एका पदार्थालाच फक्त खरे अस्तित्व आहे. दुसऱ्या कोणत्याही पदार्थाला खरे अस्तित्व नाही. छांदोग्य उपनिषदामध्ये ,"सृष्टीच्या पूर्वी सत् तेवढे होते, दुसरे काही नव्हते ॥ छां. ६ । २ । १ ॥" असे स्पष्ट सांगितले आहे. ह्या सर्व जगाचा ब्रह्मावरच भास होत असतो. ("मावळवीत विश्वाभासु

॥ १६·१ ॥"). ब्रह्म हे निर्गुण आहे म्हणून त्याचे कोणत्याही शब्दाने प्रतिपादन करता येत नाही. ते नित्यशुद्धबुद्धमुक्तसर्वज्ञसर्वशक्तियुक्त असे आहे. ते चिन्मात्र व स्वयंप्रभ आहे. आत्मा किंवा ब्रह्म हे नित्य ज्ञानदृष्टिस्वरूप आहे. अशा प्रकारे सर्वत्र भरून राहिलेल्या चैतन्यालाच आत्मा किंवा ब्रह्म असे म्हणतात. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी "स्वसंवेद्या। आत्मरूपा ॥ १·१ ॥" असे म्हणून त्याचे थोडक्यात सकलसाररूपाने वर्णन केले आहे.

हे आत्मरूपच उपाधीच्या योगाने, अविद्येने, मायेने किंवा स्वशक्तीने संकोचून लहान होते तेव्हा ते जीव, जगत् व ईश्वररूपाने दृष्टिगोचर होते. उपरोक्त उपाधी, अज्ञान, माया अगर शक्तिसंकोच दूर झाला की आपल्या मूळ स्वरूपात ब्रह्म झळकू लागते. अशा प्रकारे पिंडब्रह्मांडाची उभारणी व संहारणी होते. या उभारणी-संहारणीतच सर्व वादांचे बीज आहे. वर उल्लेखिल्याप्रमाणे श्री. निसाळशास्त्री यांनी जे जे वाद सांगितले आहेत; त्यामुळे पिंडब्रह्मांडाची अमुकच प्रकारे उभारणी झाली म्हणून अनेक शास्त्रकारांनी आपल्या मतांचे मंडन व इतरांचे खंडन केले आहे, तर अमुकच मार्गाने गेल्यास अद्वैतसिद्धी होते असे आग्रहाचे प्रतिपादन केल्याने अनेक मार्ग व संप्रदाय निर्माण झाले; परंतु एकाच वस्तूला किंवा व्यक्तीला भिन्न भिन्न नावे दिल्याने ती व्यक्ती किंवा वस्तू जशी निराळी होऊ शकत नाही, एकच गणित निरनिराळ्या पद्धतीने सोडविले म्हणून त्याचे उत्तर निराळे असत नाही आणि एकाच जागी निरनिराळ्या मार्गांनी गेले म्हणून ती जागा जशी निराळी होऊ शकत नाही, त्याप्रमाणे उपरोक्त उभारणी संहारणीच्या खेळाचे सूत्र पकडून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अद्वैतसिद्धांताच्या स्वरूपाची मांडणी ज्ञानेश्वरीत केली आहे. या दृष्टीनेच "गोरक्षसिद्धांतसंग्रहात" "अमनस्कयोग," "अवधूतगीता" व "सिद्धासिद्धांतपद्धतीतील" पुढील वचने उद्धृत केली आहेत.

भावाभावविनिर्मुक्तं नाशोत्पत्तीविवर्जितम् ।
सर्वसंकल्पनातीतं परं ब्रह्म तदुच्यते ॥ (अम. १।१२)
अद्वैतं केचिदिच्छंति द्वैतमिच्छंति चापरे ।
समं तत्त्वं न विंदंति द्वैताद्वैतविलक्षणम् ॥ (अ. गी. १।१६)
यदि सर्वगतो देवः स्थिरः पूर्णो निरंतरः ।
अहो माया महामोहो द्वैताद्वैतविकल्पना ॥ (अ. गी. १।६१)
न ब्रह्मा विष्णुरुद्रौ न सुरपतिसुरा नैव पृथ्वी न चापो ।
नैवाग्निर्नापि वायुर्न च गगनतलं नो दिशो नैव कालः ॥ (सि. स. प. १.२)
नो वेदा नैव यज्ञा न च रविशशिनौ नो विधिर्नैव कल्पाः ।
स्वं ज्योतिः सत्यमेकं जयति तव पदं सच्चिदानंदमूर्ते ॥ १.३ ॥

"अमनस्कयोगामध्ये" असे म्हटले आहे की, भाव व अभाव यांपासून मुक्त

असलेले, नाश व उत्पत्तिरहित असे आणि सर्व कल्पनांच्या पलीकडे असलेल्या तत्त्वाला परब्रह्म म्हटले जाते. "अवधूतगीतेमध्ये" असे म्हटले आहे की, कोणी अद्वैताची व कोणी द्वैताची इच्छा करतात; परंतु त्यातील कोणीही द्वैताद्वैताहून निराळे असलेले सम-तत्त्व प्राप्त करू शकत नाही. वास्तविक पाहता परब्रह्म सर्वत्र, स्थिर, अभेदयुक्त-पूर्ण व सर्वव्यापक आहे. परंतु सर्वात आश्चर्याची गोष्ट अशी आहे की, माया-मोहात गुंतून जाऊन लोक परब्रह्मामध्येही द्वैताद्वैताची कल्पना करतात. श्रीगोरक्ष नाथकृत "सिद्धसिद्धांतपद्धतीमध्ये" असे म्हटले आहे की, हे सच्चिदानंद स्वयं-प्रकाश भगवान् ! आपल्या अद्वितीय स्वरूपाचा जयजयकार असो. ब्रह्मा, विष्णू रुद्र, इंद्र व देवगण त्या स्वरूपात नाहीत. पृथ्वी, जल, अग्नी, वायू, आकाश, दिशा, काल, वेद, यज्ञ, चंद्र, सूर्य, विधि, कल्प इत्यादि कोणतीही गोष्ट अव्यक्त सच्चिदानंद नाथरूपामध्ये असत नाही. अशा परमात्मस्वरूपात लीन होणे हीच मुक्ती होय."

वरील विवेचन झाल्यावर "सिद्धसिद्धांतपद्धतीमध्ये" पुढे असे म्हटले आहे की, "ज्याप्रमाणे अनेक दिवे सूर्याला प्रकाशित करू शकत नाहीत त्याप्रमाणे शास्त्र त्या ब्रह्मपदाला प्रकाशित करू शकत नाही. ते तत्त्व हे महासिद्ध योग्यांच्या प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे; हे सिद्ध आहे. हाच अद्वैत सिद्धांत आहे. इतर सर्व मता-भिमानी किंवा मतवादी लोक त्या परमपदाला न जाणताच आपल्या अभिप्रायानुसार ते जाणून घेऊन ते पद असे आहे असे सांगून नानाप्रकारे वादविवाद करून, आपल्या मताने भाराक्रांत होऊन, दुःखित होतात. त्यामुळे त्यांना शांती मिळत नाही. वेदान्ती अर्थात् उत्तर मीमांसावादी अद्वैतवस्तूवर अर्थात् शुद्धब्रह्मामध्ये अध्यारोपाने व अपवादाने द्वैताची कल्पना करून आपल्या तर्ककठोर बुद्धीने परमतत्त्व मायारहित असूनसुद्धा त्याला मायेने दूषित करतात. भट्टमतवादी पूर्वमीमांसक अनीश्वर वादाने शास्त्राला कलंकित करून कर्मफलामध्येच व्याकुळ होऊन अगदी बुद्धिहीन होतात. वैशेषिक शास्त्रवादीसुद्धा अद्वैतामध्ये द्वैताची कल्पना करून आपल्या बुद्धीला तीलां-जली देतात. शिवाय इतर मतवादी भेदवादाच्या झगडयामध्ये अडकून पडल्याने कारणतत्त्वापासून वंचित होतात. ते मूळ तत्त्व जाणू शकत नाहीत. यासाठी बुद्धिमान जिज्ञासूंनी महासिद्धांचे स्वाभाविक व खरे मतच ग्रहण केले पाहिजे. तेच कल्याणकारक आहे हे निश्चित आहे प्रकृतीला जगताचे कारण मानणारे सांख्यवादी कपिल मतानुयायी, वैष्णव पांचरात्र मताचे नानावाक्य विशारद, वैदिक, संन्यासी, तापस, वीरपूजक, सूर्योपासक आणि प्रपंच रचनेमध्ये मग्न असलेले बौद्ध, जिन व श्रावक हे सर्व असत्य मार्गाचा अवलंब केल्याने व्यर्थ कष्टी होऊन सत्य तत्त्वापासून वंचित राहतात. यासाठी धीर व बुद्धिमान साधकाने सिद्धमतच आत्मसात करून त्याचा अवलंब केला पाहिजे मंत्रांची व्याख्या करणारे पुष्कळसे दीक्षित आचार्य

लोक अग्नीमध्ये आहुती देण्यातच मग्न होऊन राहतात. त्यांना तत्त्वज्ञानाची प्राप्ती होत नाही. पुष्कळसे नग्नव्रतधारी, तापसी, नाना तीर्थांना भेटी देऊन उपासना करणारे, मृगचर्म व वल्कलधारी आणि मौनी हे सर्वजण दुःखाच्या भाराखाली दडपल्यामळे कारणतत्त्वापासून वंचित राहतात. यासाठी सिद्धमतच श्रेष्ठ व मंगलदायक आहे."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरीलप्रमाणेच सिद्धयोगाचा साधक द्वैताद्वैतविवर्जित अशा अद्वैत स्वरूपाचीच स्वतः अनुभूती घेतो हे सांगताना असे म्हटले आहे की–

> यालागीं तो क्रमयोगी । मी जालाचि मातें भोगी ।
> तारुण्य का तरुणांगीं । जियापरी ॥ १८.११४७ ॥
> तैसा वेद्यांच्या विलयीं । केवळ वेदकु उरे पाहीं ।
> तेणें जाणवें तया तेंहीं । हेंही जो जाणे ॥१८.१२०३॥
> तया अद्वयपण आपुलिया । जाणती ज्ञप्ती जे धनंजया ।
> ते ईश्वरचि मी हे तया । बोधासि ये ॥१२०४॥
> मग द्वैताद्वैतातीत । मीचि आत्मा एकु निभ्रांत ।
> हें जाणोनि जाणणें जेथ । अनुभवीं रिघे ॥१२०५॥

तरुण स्त्री ज्याप्रमाणे आपण घेतलेला उपभोग आपणच जाणू शकते व अनुभवू शकते त्याप्रमाणे सिद्धयोगाचा साधक वेद्यवेदकाचा साधनाने लय झाल्यामुळे द्वैताद्वैतविवर्जित तत्त्व स्वतः होऊन त्याची अनुभूती घेतो. या अर्थाने व अगदी तसेच दक्षस्मृतीमध्ये" असे म्हटले आहे की–

> स्वसंवेद्य च तद्ब्रह्म कुमारीमैथुनं यथा ।
> अयोगी नैव जानाति जात्यंधो हि यथा घटम ॥ ७.२५ ॥

अशा प्रकारे अद्वैत ही भोक्तेपण विसरून भोगण्याची अशी अपूर्व वस्तू असून तेथे कोणी साक्षीही राहत नाही, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> जयांतें बाह्याची भाष । नेणिजेचि निःशेष ।
> अंतरीं सुख । एक आथि । ५ १३० ॥
> परि तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे ।
> तैसें नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥ १३१ ॥
> भोगी अवस्था एक उठी । ते अहंकाराचा अंचळु लोटी ।
> मग सुखेंसि घे आंटी । गाढेपणें ॥ १३२ ॥
> तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप कवळी ।
> तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥१३३॥
> कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे ।
> तैसे सुखचि उरे स्वरूपें । सुरतीं तिये ॥१३४॥

**ऐसी द्वैताची भाष जाय । मग म्हणों जरी एक होय ।**
**तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणतें जें ।। १३५ ।।**

अशा प्रकारे द्वैताची भाषा नाहीशी झाली की एकत्व प्राप्त होऊन एक असाक्षी अशी विलक्षण अवस्था साधकाला प्राप्त होते. ही अद्वैत स्थिती अनुभवाशिवाय शब्दात पकडता येत नाही; पण ही अमूर्त गोष्ट साधकांच्या ठिकाणी महाबोधाच्या रूपाने वसतिस्थान किंवा क्रीडास्थान करून राहिल्याने ते ब्रह्मात्मैक्य भावाचे ओतलेले निखळ पुतळेच असतात. असे हे अद्वैतस्वरूप समूर्त कसे होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**म्हणौनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें ।**
**ते खुणाचि पावले स्वभावें । आत्माराम ।।५.१३६।।**
**जे ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण गुंतले ।**
**ते मी जाणें निखळ वोतले । सामरस्याचे ।।१३७।।**
**ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर ।**
**कीं महाबोधें विहार । केले जैसे ।।१३८।।**

अशा साधकाची "होय साम्याची उजरीं । निरंतर ।।६.९७।। " व " पुढती अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतदिवसें । मग आपणपांचि आपणु असे । अखंडित ।।६.१०५।। अशी निरंतर स्थिती सिद्धयोगाच्या प्राप्तीमुळे होते. शक्ती जागृत झाली की साधक आपोआप आत्मस्वरूपाजवळ जातो व "तयातें देखोनि आंगा घडेल । तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल । आणि ऐक्यतेजें उघडेल । त्रैलोक्य हें ।।६.३८४।। " असे अद्वैतस्वरूपामध्ये द्वैत पार बुडून जाते.

ही अद्वैतस्थिती म्हणजेच खरे सामरस्य होय. चंद्र—सूर्य, इडा—पिंगला, प्राण-अपान, शिव—शक्ती, पिंड—ब्रह्मांड, व्यष्टी—समष्टी, प्रकृति—पुरुष, क्षर—अक्षर, जड-चेतन, नित्य—अनित्य इत्यादि सर्व द्वद्वांचे समरसीकरण व एकीकरण म्हणजे नित्यसिद्ध अशी अद्वैत स्वरूपावस्था आहे. श्रीगुरुकृपेने आत्मशक्ती जागृत करून ही साम्याची उजरी अनुभविणे हाच सिद्धांत असल्याचे महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" स्वच्छ म्हटले आहे. "तस्माद् गुरुकटाक्षपातात् स्वसंवेद्यतया च महासिद्धयोगिभिः स्वकीयंपिंडंनिरुत्थानानुभवेन समरसं क्रियत इति सिद्धांतः ।।५.७।।" स्वसंवेद्य आत्मस्वरूप हे एकमात्र श्रीगुरूच्या करुणादृष्टीने केलेल्या शक्तिपातानेच जाणणे शक्य व योग्य आहे. अन्य कोणत्याही उपायाने हे शक्य नाही यासाठी महासिद्ध योगीजन आत्मशक्ती कुंडलिनीच्या जागृतीने स्वपिंडाचे म्हणजे जीवाचे परपिंडाबरोबर म्हणजे शिवाबरोबर स्वतःच्या अनुभूतीने समरसीकरण करतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अगदी हेच आपल्या शब्दात सांगताना असे म्हटले आहे की—

**तैसें होय तिये मेळीं । मग सामरस्याचिया राउळीं ।**
**महासुखाची दिवाळी । जगेंसि दिसे ।।६.३८९।।**
**तंव महाभूतांची जवनिका फिटे । मग दोहींसि होय झटे ।**
**तेथ गगनासकट आटे । समरसीं तिये ।।६.३०६।।**
**तेवीं पिंडाचेनि मिषें । पदो पदं प्रवेशे ।**
**तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ।।३०८।।**
**तिये ओळखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे ।**
**मग आपणपां समरसे । विरोनि जाय ।।३६७।**
**तेंचि तो आपण । स्वयें जाहला निर्वाण ।**
**जें साधकांचें कारण । सिद्ध तत्त्व ।।४७८।।**
**पैं जीवपरमात्मसंगमा । जयाचें येणें जाहलें मनोधर्मा ।**
**तो शरीरिचि परि महिमा । ऐशी पावे ।।४८०।।**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी सामरस्याच्यारूपाने असलेला हा अद्वैत-सिद्धांताच्या स्वरूपाचा महिमा त्यांना श्रीगुरुपरंपरेने प्राप्त झालेल्या दीक्षाप्रसादा-मुळेच होय हे अगदी निःसंशयपणे दिसून येते. अशा प्रकारे श्रीगुरुकृपेने होणाऱ्या अद्वैतावस्थेच्या किंवा सामरस्याच्या प्राप्तीचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अगदी मुक्तपणे वारंवार केले आहे. त्यांच्या दृष्टीनें यापलीकडे प्राप्तीची दुसरी गोष्ट नाही. त्यामुळे ते म्हणतात—

**किंबहुना पांडवा । जें अवघेंचि असे आघवा ।**
**जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी ।।१३.९३५।।**
**जें देखलियाचिसवें । दृष्य द्रष्टा हें आघवें ।**
**एकवट कालवे । सामरस्यें ।।९३६।।**
**मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन ।**
**ज्ञानें गमिजे स्थान । तेंहि तेंची ।।९३७।।**
**जैसे सरलियां लेख । आंख होती एक ।**
**तैसे साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ।।९३८।।**
**अर्जुना जिये ठायीं । न सरे द्वैताची वही ।**
**हें असो जें हृदयी । सर्वांच्या असे ।।९३९।।**

असे हे ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान किंवा द्रष्टा, दृश्य व दर्शन अगर साध्य, साधक व साधन, या सर्वांचे स्वतंत्र भाव हिशोबाच्या ताळ्याप्रमाणे एकरूप होऊन शेवटी सर्व काही अद्वैतात कालवून जाते. मात्र हे अखंड एकरसपरिपूर्ण तत्त्व सर्वांच्या

हृदयात असले तरी श्रीगुरुकृपेशिवाय त्याची प्रतीती येत नाही व भयही दूर होत नाही. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

अथवा ऐक्यभावाचेनि पैसें । दुजें मानूनि आत्मा ऐसें ।
भयवार्ता देशें । दवडणे जें ।।१६.७१।।
पाणी बुडऊं ये मिठातें । तंव मीठचि पाणी आतें ।
तेवीं आपण जालेनि अद्वैतें । नाशे भय ।।७२।।

अशा प्रकारे अद्वैत सिद्धांताचे सामरस्य हे मूर्धन्य स्वरूप आहे. याच्या पोटातच संकल्पलोप येतो. "संकल्पजाते गलिते स्वरूपमवशिष्यते ।।४.५३।।" असे "महोपनिषदात" म्हटल्याप्रमाणे अद्वैतसिद्धीत संकल्पलोप होऊन स्वरूप शिल्लक राहत असल्याने त्याचे महत्त्व स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगती पुसिलें ।
जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा नये ।।४.१६७।।
जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये ।
तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ।।६.८२।।
जेथ संन्यासिला संकल्पु तुटे । तेथचि योगाचें सार भेटे ।
ऐसें हें अनुभवाचेनि धटें । साचें जया ।। ६.५३।।

उपरोक्त प्रकाराने संकल्पलोप होऊन सामरस्याच्या द्वारा अद्वैत सिध्दांताचे स्वरूप स्पष्ट होत असले तरी श्रीगुरुकृपेशिवाय द्वैतदैन्य दूर होत नाही हा आपला अमर सिद्धां[त] श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडून "अत एव महासिद्धयोगिभिः सम्यक् उक्तं गुरुप्रसादंलब्ध्वावधानवलैक्यं भजमानैस्तत्क्षणात् परमं पदमेवानुभूयते ।। सि.स.प. ।।५.९।।" महायोग्यांच्या सम्यक् गुरुकृपाप्राप्तीमुळे प्राप्त झालेल्या साधनाच्या बळामुळे साधकाला त्याचक्षणी अद्वैत स्वरुपाची प्राप्ती होते, हा "सिद्धसिद्धांतपद्धतीत" मांडलेला महायोगी गोरक्षनाथांचा सिद्धांतच अधिक स्पष्ट केला आहे. ते म्हणतात–

ते सत्त्वशुद्धी साह्याकारें । गुरुकृपामृततुषारें ।
सासिन्नलेनि बोधें वोलरे । द्वैतदैन्य ।।१८.२५९।।

द्वैतदैन्य जाऊन स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीसाठी श्रीगुरुकृपामृत तुषारांचा वर्षाव म्हणजे शक्तिपात होणे नितांत आवश्यक आहे. तो झाला की, जागृत शक्तीमुळे बोध अभिव्यक्त होऊन द्वैतरूपी दैन्य पार नाहीसे होते.

येथपर्यंत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाचे दर्शन घडावे म्हणून अद्वैत सिद्धांताचे जे स्वरूप ज्ञानेश्वरीत मांडले आहे ते आपण पाहिले. आता या आत्मस्वरूपाची अर्थात अद्वैत सिद्धांताची प्राप्ती व अनुभूती साधकाला कोठे येते ते पाहू. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मग ब्रह्मरंध्रींस्थिर होनी । सोऽहंभावाचिया बाह्या पसरूनी ।
परमात्मलिंगा धांवोनी । आंगा घडे ।। ६.३०५।।

ज्यावेळी आत्मशक्ती कुंडलिनी सुषुम्नेच्या मार्गाने मस्तकाच्या सहस्त्रदल कमलातील ब्रह्मरंध्रात स्थिर होऊन "सोऽहम्" भावनेचे बाहू पसरून परब्रह्म लिंगाला भिठी मारून स्वस्वरूपाशी ऐक्य पावते; त्यावेळी पंचमहाभूतांचा पडदा नाहीसा होऊन शिवशक्तींचे मीलन घडते. अशा प्रकारे साधकाला स्वतःच्या शरीरातच ब्रह्मांडस्थ सहस्रारात अद्वैत स्वरूपाची प्राप्ती व अनुभूती येते. तत्त्वज्ञान मांडण्याचे स्वरूप काहीही असले व मार्गांची भिन्नता कशीही असली तरी सर्वांना शेवटी येथेच यावे लागते. त्याला नावे निराळी दिली म्हणून अद्वैततत्त्वाचें मूळ स्वरूप व त्याच्या प्राप्तीचे स्थान बदलू शकत नाही हे नितांत सत्य आहे. यामुळेच षट्चक्र निरूपणामध्ये असे म्हटले आहे की–

शिवस्थानं शैवाः परमपुरुष वैष्णवगणा
लपंतीति प्रायो हरिहरपदं केचिदपरे ।
पदं देव्या देवीचरणयुगलानंदरसिका
मुनींद्रा अप्यन्ये प्रकृतिपुरुषस्थानममलम् ।।४४।।

सहस्रारातील या अद्वैत स्वरूपप्राप्तीच्या स्थानालाच शैवगण शिवस्थान वैष्णवगण परमपुरुष हरीचे स्थान, दुसरे काहीजण हरिहरपद व देवीच्या चरणकमलांचे भक्तगण देवीपद किंवा शक्तिस्थान असे म्हणतात. काही काही मुनिश्रेष्ठांनी हे प्रकृतिपुरुषाचे निर्मलस्थान आहे असे म्हटले आहे. हे स्थान म्हणजे सहस्रदल कमलातील ब्रह्मरंध्रच असून तेथेच या तत्त्वाची उपलब्धी होऊ शकते. यामुळेच योगी, शाक्त, शैव, वैष्णव अशा प्रकारच्या ज्ञात व अज्ञात मार्गाने जाणाऱ्यांचे उपास्य तत्त्व किंवा दैवत हेच आहे हे त्रिकालाबाधित सत्य आहे.

**समन्वयात्मक दृष्टिकोन :–**

श्रीमद्भगवद्गीतेत अध्यात्ममार्गांच्या सकलशास्त्राचा जसा समन्वय श्रीकृष्णांनी घातला आहे तसाच समन्वय श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत घातला आहे "सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः ।" या गीतामाहात्म्यातच हे समन्वयाचे सूत्र किंवा दृष्टिकोन समाविष्ट झाला आहे "जें उपनिषदांचे सार। सर्व शास्त्रांचें माहेर। परमहंसीं सरोवर। सेविजे जें ।। १८·१८०८ ।।" असे म्हणून हा समन्वयात्मक दृष्टिकोन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केला आहे. श्रीमद्भगवद्गीतेतील समन्वयात्मक दृष्टिकोन स्पष्ट करताना योगी श्रीअरविंद यांनी "गीतेवरील निबंध", खंड एक, या पुस्तकातील "गीतेपासून आम्हाला काय हवे, आम्ही काय मागतो" या पहिल्याच प्रकरणात असे म्हटले आहे की, "गीता हा महान् समन्वयी पंथांपैकी एक श्रेष्ठ पंथ आहे. एकदेशी किंवा एकमार्गी

पंथ एका साधनमार्गावर सर्व लक्ष केंद्रित करून हा मार्ग ज्या आत्यंतिक अंतिम स्थानाला पोहोचवील तेथपर्यंत संशोधन करीत वाटचाल करतात. गीता हा समन्वयी सर्वदेशी पंथ असल्याने तो मार्गामार्गात भिंती उभ्या करीत नाही तर उलटपक्षी सर्व मार्गात सुसंगती निर्माण करतो व सर्व मार्गात ऐक्य प्रस्थापित करतो.

गीतेचा विचारमार्ग हा केवलाद्वैत नव्हे, तथापि सर्व विश्वाचे अस्तित्व केवल अक्षर सनातन आत्म्याच्या पायावर उभारलेले आहे हे गीता मान्य करते. गीता मायावादी नव्हे तथापि ती सृष्ट विश्वात प्राकृतिक त्रिगुणी माया सर्वत्र भरलेली आहे असे प्रतिपादते. गीता विशिष्टाद्वैती नव्हे तथापि ती एकमेव ब्रह्मात त्याची जीवनरूपाने व्यक्त झालेली पराप्रकृती प्रस्थापित करते आणि आध्यात्मिक जाणिवेची सर्वश्रेष्ठ अवस्था ब्रह्मनिर्वाण नसून सृष्टिचालक ईश्वरात निवास करणे ही आहे, असे आग्रहाने सांगते. गीता म्हणजे सांख्यशास्त्र नव्हे तथापि ती पुरुष आणि प्रकृती ही दोन तत्त्वे सृष्टीच्या मुळाशी आहेत असे व्याख्यान करते. गीता वैष्णवपंथी नव्हे तथापि पौराणिक प्रतिपादनानुसार विष्णूचा अवतार जो कृष्ण तो सर्वश्रेष्ठ देव आहे असे सांगते आणि हा सर्व भूतांचा स्वामी सर्वलोकमहेश्वर सर्वांचा सुहृद मित्र असणारा कृष्णदेव, अप्रमेय व अनिर्वचनीय ब्रह्माहून मुळीच कमी अधिकाराचा नसून तत्त्वत: अभिन्न आहे असा उद्घोष करते. पूर्वी उपनिषदात आध्यात्मिक समन्वयाचा मार्ग स्वीकारलेला दिसतो. गीतेचा समन्वयमार्ग त्या औपनिषदिक मार्गाप्रमाणे आहे. गीतेचा समन्वय केवळ आध्यात्मिक नसून बौद्धिक पण आहे. समन्वयी उपनिषदांप्रमाणे गीता आपल्या सर्वसमावेशक स्वरूपाची हानी ज्याने होईल असा कठोर एकदेशीपणा स्वभावत:च टाळते. .... मानवाचा वाढता आत्मा आणि विश्वमय देवांचे नित्य पूर्णत्व एकमेकांना पूर्ण भेट देऊन आत्मतृप्त होण्याचे स्थान म्हणजे या दोहोंच्या पलीकडे असलेले, वेदकालीन ऋषींनी अनुभवलेले सर्वातीत आनंदमय एकमेव दिव्य तत्त्व होय. या प्राचीन वैदिक समन्वयी दर्शनातील ऋषींचा उच्चतम अनुभव, दिव्य एकतत्त्वाचा अनुभव उपनिषदांनी त्यांच्या उच्च सखोल आध्यात्मिक ज्ञानाच्या समन्वयासाठी पाया म्हणून स्वीकारला .... या समन्वयातील सारभूत कल्पनांच्या पायावर गीता आपल्या सुसंवादी संकलनाची व समन्वयाची इमारत उभी करते. गीतेने उपरिनिर्दिष्ट पायावर प्रेम म्हणजे भक्ती, ज्ञान आणि कर्म या तीन शक्तिमान साधनांचा समन्वय साधला आहे."

श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही आपल्या गीताभाष्यात "तत् इदं समस्तवेदार्थसारसंग्रहभूतं ।" ते हे अशा प्रकारचे गीतशास्त्र सर्व वेदार्थाच्या साराचा ज्यात संग्रह केला आहे असे आहे, असेच म्हटले आहे. "तत्तु समन्वयात् ॥ १.१.४ ॥" असे ब्रह्मसूत्र असून सर्व वेदांतवाक्याचे तात्पर्य शास्त्रगम्य ब्रह्म हेच आहे असा

त्याचा अर्थ आहे. गीतेमध्ये हे सूत्र पूर्णपणे फलीभूत झालेले दृष्टीस पडते. गुरुदेव डॉ. रा. द. रानडे यांनी " भगवद्गीता : साक्षात्कार दर्शन " या पुस्तकातील " परतत्त्वज्ञानातील विरोधाभासाचा समन्वय " या पंधराव्या प्रकरणात समन्वयात्मक तत्त्वज्ञानाची गुरुकिल्ली सांगताना असे म्हटले आहे की, " अभिमन्यूला योग्य मार्ग सापडला असता तर तो चक्रव्यूहातून बाहेर पडू शकला असता. त्याचप्रमाणे गीतेचा साक्षात्कारपर तात्पर्यार्थं लागला म्हणजे गीतार्थाच्या चक्रव्यूहातून बाहेर पडता येईल. ईश्वर सगुण की निर्गुण याचा समन्वय तो गुणातीत आहे असे सांगून, ईश्वर द्रष्टा की कर्ता याचा समन्वय तो मूळ प्रेरक आहे असे सांगून, ईश्वर अंतर्यामी की सर्वातीत यांचा समन्वय तो दोन्हीही आहे असे सांगून, जग सत्य का असत्य याचा समन्वय ते क्षणभंगुर आहे असे सांगून व विदेहमुक्ती की क्रममुक्ती याचा समन्वय जीवन्मुक्ती आहे असे सांगून गीतेत घातला आहे.... ईश्वराचा साक्षात्कार म्हणजेच जीवनाचे एकमेव ध्येय व सार्थक असे दाखविणाऱ्या परतत्त्वाच्या किंवा ईश्वराच्या स्वरूपाच्या आधारानेच वरील सर्व विरोधाभासांचा समन्वय करता येईल. साक्षात्काराच्या भूमिकेवरून निश्चित केलेले परतत्त्वाचे स्वरूपच जगातील सर्व तत्त्वज्ञानांच्या सांप्रदायात गोंधळ माजविणाऱ्या अशा आग्रही बौद्धिक मतांचा समन्वय करू शकेल; त्याशिवाय असा समन्वय करता येणार नाही. मानवी स्वसंवित् हेच विश्वातील सारभूत तत्त्व व अंतिम सत्यतत्त्व आहे असे तत्त्वज्ञानी सांगत आले आहेत. बर्कलेपासून पुढील सर्व विज्ञानवादी (Idealist) तत्त्वज्ञान्यांनी स्वसंवित् हेच विश्वाचे केंद्र किंवा नाभी होय असे मानले आहे .... ईश्वरी स्वसंवित् हेच तत्त्वज्ञानाचे व विश्वाचे आधारभूत मूलतत्त्व आहे व त्यांचे शिखरही आहे. तिच्यापेक्षा श्रेष्ठ काहीही नाही. "

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या स्वसंवितेचाच वस्तुसामर्थ्यशक्ती, जगदंबा कुंडलिनी, आरंभरंभा, सर्वोपशांतिप्रमदा, अभिनववाग्विलासिनी, चातुर्यार्थकलाकामिनी आत्मप्रभा, स्वयंज्योती इत्यादि नानाविध पद्धतीने उल्लेख करून श्रीगुरुकृपेने जेव्हा ही शक्ती जागृत होते व तिचा सुषुम्नेत प्रवेश होतो तेव्हा सकल भेद मावळून जाऊन एका महान् समन्वयतेचा उदय मानवी देहात होतो व सामरस्यांच्या राउळात जीव महासुखाची दिवाळी भोगतो असे म्हटले आहे. स्वसंवित् आत्मशक्ती कुंडलिनी शक्तीचा प्रकाश जितका अधिक, तिचा विकास जितका विस्तारलेला, या शक्तीच्या उन्नतीची पातळी जितकी उंच व स्वस्वरूपाशी जितके तिचे अभिन्नत्व तितकी तिची वेदनशीलता, विस्तार, प्रकाश, विकास किंवा पातळी उंच व विस्तृत राहून तितक्या प्रमाणात तिचे समरसत्व किंवा समन्वयत्व दृष्टिगोचर होत असते. समन्वय म्हणजे सर्व तत्त्वांची खिचडी नव्हे तर महासिद्धांतापाशी सर्व उपसिद्धांताचे ऐक्य करून दाखवून मुख्य महासिद्धांताच्या सिद्धीकरिता बाकीचे अनंत

सिद्धांत या कक्षा, भाग किंवा बाजू आहेत असे दाखविणे होय. माळेतील फुले व फुलांच्या हारांचे पदरही मोजता येतील; पण सुगंध संख्येनें मोजता येत नाही. त्याचप्रमाणे गीतेतील पदे, श्लोक व अध्याय हे जरी पुष्कळ असले तरी त्यातील प्रतिपाद्य अर्थ व तत्त्व एकच आहे असे जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात तेव्हा ते आपल्यापुढे समन्वयात्मक दृष्टिकोनच मांडीत आहेत हे स्पष्ट होते.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांना या समन्वयात्मक दृष्टिकोनाची प्राप्ती श्रीगुरुकृपेने जे समाधिधन नाथपरंपरेने उपलब्ध झाले होते तेथून झाली असल्याचे स्पष्ट आहे. म. म. गोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड दोन, मधील "सहजयान और सिद्धमार्ग" या लेखात नाथपंथात हा समन्वयात्मक किंवा सामंजस्यात्मक दृष्टिकोन कसा अनुस्यूत झाला आहे याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की "कोई कोई मानते हैं कि सिद्धगण अद्वैतवादी थे किंतु सिद्धगणों के जो पद अथवा वचनावलियाँ मिलती हैं उनका विशेषरूपसे अनुशीलन करके देखने पर मालूम पडता है की सिद्धगणोंने द्वैतवाद अथवा अद्वैतवाद किसी पक्षका अवलंबन नहीं किया। वहुत स्थलोंपर उन्होंने अपने मतका द्वैताद्वैतविलक्षण कहकर वर्णन किया है। जालंधरनाथ सिद्धसंप्रदायके एक अतिप्रसिद्ध और शक्तिशाली आचार्य थे। उन्होंने अपनी "सिद्धांतवाक्य" नामक पदावलीमें नाथसिद्धांतके संबंधमें स्पष्ट अक्षरोंमें कहा है –

**द्वैतं वाद्वैतरूपं द्वयत उत परं योगिनं शंकरं वा।**

नाथसूत्र नामक ग्रंथमें भी यही सिद्धांत स्पष्टरूपसे प्रतिपादित हुआ है उन्होंने द्वैत अथवा अद्वैत मतको जैसे पूर्ण सत्यरूप नहीं माना है वैसेही किसीका भ्रांति कहकर परिहारभी नहीं किया। वे कहते हैं द्वैत अथवा अद्वैत दोनोंका सामरस्य न होने तक पूर्ण सत्यका साक्षात्कार होनेकी संभावना नहीं हैं। इसी कारण नाथमतमें ऐसा एक सर्वांगसुंदर सामंजस्यका आदर्श दिखाई पडता है जो अन्यत्र सुलभ नहीं है। जो लोग जड और चेतनके मध्य विरोध है यह कल्पना कर दोनोंमेंसे अन्यतर पक्षका समर्थन करते हैं, नाथसिद्धांतकी ओरसे देखनेपर उन्हें भ्रांत मानना होगा। जिस कार्यसिद्धिके व्यापारका नाथगण प्रचार कर गये हैं एवं जो भारतीय साधनाका एक महान गौरवका विषय है वह वस्तुत इस सामरस्यभावके अनुकूल है।"

परमार्थ तत्त्व द्वैतही आहे व अद्वैतही आहें आणि खरे पाहिले तर ते द्वैताद्वैत विकल्पाच्या पलीकडे आहे. "तुज सगुण म्हणो की निर्गुण रे। सगुण निर्गुण एकु गोविंदु रे।" या संतवचनाप्रमाणे ते समन्वयात्मक आहे हेच खरे. या समन्वयात जीवभाव, ईश्वरभाव, नानात्व, अभेद किंवा एकत्वही नाही. "प्रत्यभिज्ञा दर्शनातही" ज्ञान व भक्तीचा समन्वय फारच उत्तम रीतीने घातला आहे. हा मार्ग शुष्क ज्ञानमार्ग किंवा ज्ञानहीन भक्तिमार्ग नसून ज्ञान व भक्ती या दोहोंचा

या मार्गात समन्वय आहे. "स्पंदशास्त्रकारांनीही" या समन्वयाचे उद्घाटन पुढीलप्रमाणे केले आहे. ते म्हणतात–

इति वा यस्य संवित्तिः क्रीडात्वेनाखिलं जगत् ।
स पश्यन् सततं युक्तो जीवन्मुक्तो न संशयः ।।३.३।।

जीवमुक्त सर्व जगच आत्मक्रीडा म्हणजे आत्मशक्तीचा विलास आहे असे पाहत असतो. त्याची योगावस्था कधीही भग्न होत नाही. भेद किंवा अभेद, व्युत्थान किंवा निरोध या दोहोत साम्यदर्शन झाल्यावर आणखी कोणतीही शंका त्याला उरत नाही; कारण या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. यालाच शिव-शक्तीचे सामरस्य किंवा चिदानंदस्वरूपाची प्राप्ती होणे असे म्हणतात. "त्रिकदर्शन" तर अत्यंत कट्टर अद्वैतवादी आहे. या अद्वैतवादापुढे ब्रह्माद्वैतसिद्धांत अगदी फिका पडतो असे शास्त्रज्ञ म्हणतात. परंतु याही दर्शनात ज्ञान व भक्ती, चित् व आनंद यांचा समन्वय साधला आहे. यालाच त्यांनी शिवशक्तीचे सामरस्य म्हटले आहे. उपरोक्त व अन्य ज्या ज्या दर्शनात समन्वयाचा दृष्टिकोन दृष्टीस पडतो त्या त्या ठिकाणी अनुभूती हे प्रमाण बलवत्तर आहे हे विसरता येणार नाही.

त्यामुळे योगी श्रीअरविंद यांनी म्हटल्याप्रमाणे अनुभूती हाच समन्वयाचा सर्वश्रेष्ठ पाया आहे. जीव, जगत् व ईश्वर यांच्या उभारणीसाठी जे वाद व तत्त्व-ज्ञान श्रेष्ठ ऋषींनी, महान् आचार्यांनी व सकलशास्त्रसंपन्न पंडितांनी आपापल्या-परीने मांडले आणि उपरोक्त उभारणीची संहारणी होऊन जीव आपल्या मूळ स्वरूपाप्रत परत जावा म्हणून संत, महंत, आचार्य, संप्रदायप्रवर्तक, योगी इत्यादि सर्वांनी जे मार्ग, पंथ प्रवर्तित केले त्या सर्वांचे सार समन्वयात्मक पद्धतीने अनु-भूतीच्या पायावर विषद करून त्यांचा सर्वांगसुंदर मेळ घालणे व खरा समन्वय म्हणजे काय, तो कोठे व कसा होतो हे सांगणे म्हणजे समन्वयात्मक दृष्टिकोन ठेवणे होय. भगवान् श्रीकृष्णांनी यासाठीच परंपरेने चालत आलेल्या व मध्येच कालौघात लुप्तप्राय झालेल्या महायोगाचे उद्घाटन करून समन्वयाची ध्वजा उभा-रली. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "हें जीवींचें निज गुज ।। ४.२८ ।।" म्हणून त्याचे विशदीकरण व स्पष्टीकरण केले आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत तत्त्वज्ञानाच्या उभारणीत समन्वयवादाचा अंगीकार कसा केला हे त्यांनी बिंबप्रतिबिंबवाद, आभासवाद, अवच्छेदवाद, दृष्टि-सृष्टिवाद, कल्पनावाद, स्फूर्तिवाद, चिद्विलासवाद, अजातवाद किंवा अध्यास-माया-विवर्त-जगन्मिथ्यात्व-अनिर्वचनीयवाद व परिणापवाद या सर्व जीवब्रह्मैक्य प्रतिपादक वादांचा स्वीकार केल्यावरून स्पष्ट दिसून येते. बिंबप्रतिबिंबवादाचा उल्लेख करताना ते म्हणतात.–

तरी अवधारीं गा धनंजया । हे महदादिक माझी माया ।
जैसी प्रतिबिंबे छाया । निजांगाची ॥७.१५॥

आभासवादाचा उल्लेख ज्ञानेश्वरीत पुढीलप्रमाणे आला आहे.

मग इंदतेसि वाळलें । जें मीपणेंवीण डाहारलें ।
तें रूप पाहिजे आपलें । आपणचि ॥१५.२६७॥
परी दर्पणाचेनि आधारें । एकचि करूनि दुसरें ।
मुख पाहाती गव्हरें । तैसें नको हो ! ॥१५.२६८॥

अवच्छेदवाद सांगताना ते म्हणतात–

व्योम चौफळें कीं वाटोळें । हें ऐसें कायिसयाही मिळे ।
परीं घटीमठीं वेंटाळें । तैसेंही आथी ॥१५.३३९॥
घटु मठु घडले । तेचि पाठीं मोडले ।
परी आकाश तें संचलें । असतचि असे ॥१५.३८८॥
तैसें अखंडें आत्मसत्तें । अज्ञानदृष्टि कल्पितें ।
हें देहचि होतें जातें । जाणती फुडें ॥१५.३८९॥

दृष्टिसृष्टिवादाचा उल्लेख त्यांनी पुढीलप्रमाणे केला आहे.

तैसी इये निर्मळे माझ्या स्वरूपीं । जो भूतभावना आरोपी ।
तयासी तयाच्या संकल्पी । भूताभासु असे ॥९.७९॥
म्हणोनि नाहीं आणि असे । हें कल्पनेचेनि सौरसें ।
जें कल्पनालोपें भ्रंशे । आणि कल्पनेसवें होय ॥९१॥
या जाणणेयाचा चेवो । तुज आला ना ? म्हणती देवो ।
तरी आतां द्वैत स्वप्न वावो । जालें कीं ना ॥९४॥

कल्पनावाद मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

वस्तूसी आपुला जो अबोधु । तो ऊर्ध्वीं आठुळें जे कंदु ।
वेदांतीं हाचि प्रसिद्धु । बीजभावो ॥१५.८८॥
कां मीनलेनि किडाळें । वानिभेदासि ये सोळें ।
तैसा स्वमायें वेंटाळें । शुद्ध जें मी ॥१५.३४१॥
अर्जुना गा यापरी । साकार कल्पूनि पुरीं ।
आत्मा विस्मृतीचि करी । निद्रा येथ ॥१५.४८९॥

स्फूर्तिवाद प्रकट करताना ते म्हणतात–

तिन्ही अवस्थांचेनि द्वारें । उपाध्युपहिताकारें ।
भावाभावरूप स्फुरे । दृश्य जें हें ॥१८.११८६॥

चिद्‌विलासवाद मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**जालेंनि जगें मी झांकें। तरी जगत्वें कोण फांके ?।**
**किळेवरी माणिकें। लोपिजे काई ? ।।१४.१२३।।**
**अळंकारातें आलें। तरी सोनेंपण काइ गेलें ?।**
**कीं कमळ फाकलें। कमळत्वा मुके ? ।।१२४।।**
**म्हणोनि जग परौतें। सारूनि पाहिजे मातें।**
**तैसा नोहे उखितें। आघवे मीचि ।।१२७।।**

अजातवाद कथन करताना ते म्हणतात—

**मग तया काष्ठाच्या ठायीं। सांग पां बीजपण असे काई ?।**
**तैसा मी विकारीं नाहीं। जरी विकारला दिसे ।।७.५६।।**
**पैं गगनीं उपजे आभाळ। परी तेथ गगन नाहीं केवळ।**
**अथवा आभाळीं होय सलिल। तेथ अभ्र नाहीं।।५७।।**
**मग तया उदकाचेनि आवेशें। प्रगटलें तेज जें लखलखित दिसे।**
**तिये विजूमाजी असे। सलिल कायी ?।।५८।।**
**सांगे अग्नीस्तव धूम होये। तिये धूमीं काय अग्नि आहे?।**
**तैसा विकारु हा मी नोहें। जरी विकारला असे ।।५९।।**

परिणामवाद सांगताना ते म्हणतात—

**तेथ समविषम न दिसे कांहीं। म्हणौनि भूतें ही भाष नाहीं।**
**जेंवि दूधचि जाहालिया दहीं। नामरूप जाय।।८.१७०।।**
**पाहे पां तरंग तरी होत जात। परि तेथ उदक तें अखंड असत।**
**तेवीं भूताभावीं न नाशत। अविनाश जें ।।१७७।।**
**नातरी आटतिये अळंकारीं। नाटतें कनक असे जयापरी।**
**तेवीं मरतिये जीवाकारीं। अमर जें आहे ।।८.१७८।।**

अशा प्रकारे जीव, जगत् व ईश्वराच्या रूपाने उत्पन्न झालेल्या पिंडब्रह्मांडाच्या उभारणीतील सर्व वादांचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वीकार करून समन्वयाचा दृष्टिकोन स्पष्ट केला आहे. उभारणीप्रमाणेच पिंडब्रह्मांडाची संहारणी करणाऱ्या मार्गांचा, पंथाचा किंवा तत्त्वाचा समन्वयही श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे साधला आहे.

कर्मयोग म्हणजे सिद्धयोगच होय असे प्रतिपादून कर्मयोगाचा समन्वय श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे. ते म्हणतात—

**तरी जाणां नेणां सकळां। हा कर्मयोगु कीर प्रोजळा।**
**जैसी नाव स्त्रियां बाळां। तोयतरणी ।।५.१६।।**

तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे ।
येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥१७॥

कर्मयोग म्हणजे क्रियात्मक सिद्धयोग किंवा आतून शक्ती जागृत झाल्यावर अनायास होणारा सोपा योग होय हे आपण पहिल्या प्रकरणात पाहिलेच आहे. "समत्वं योग उच्यते ॥२.४८॥" म्हणजे समन्वय हाच योग आहे असे गीतेतच भगवंतांनी म्हटले आहे. "अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाणें योगाचें । जेथ मन आणि बुद्धीचे । ऐक्य आथी ॥२.२७३॥" येथे ज्या मनाचे व बुद्धीचे ऐक्य सांगितले आहे ते व "समाधिसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ । तैं पावसी तूं सकळ । योगस्थिति ॥२८४॥" यात योगस्थितीसाठी बुद्धीची जी स्थिरता सांगितली आहे ती आत्मशक्तीचीच सहस्रारातील स्थिरता आहे; कारण बुद्धी म्हणजे शक्ती होय असा आगमशास्त्रकारांचा सिद्धांत आहे. अशा प्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराज शब्दा-शब्दातून व वाक्यावाक्यातून प्रत्येक विषयाचा योगाशी समन्वय साधीत गेले आहेत.

भगवंतांनी गीतेत सांख्य अर्थात् ज्ञानयोग व योगमार्ग या दोन मार्गांची "एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥५.५॥" असे म्हणून सांगड घातली आहे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या दोन मार्गांचा समन्वय सांगताना असे म्हटले आहे की–

एकु ज्ञानयोगु म्हणिजे । जो सांख्यीं अनुष्ठिज ।
जेथ ओळखीसवें पाविजे । तद्रूपता ॥३.३६॥
एकु कर्मयोगु जाण । जेथ साधकजन निपुण ।
होऊनियां निर्वाण । पावती वेळे ॥३७॥
हे मार्गु तरी दोनी । परी एकवटत्तीं निदानीं ।
जैसी सिध्यसाध्य भोजनीं । तृप्ती एक ॥३८॥
आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे ।
म्हणौनि ऐक्य दोहींतें सहजें । इयापरी ॥५.२९॥

श्रीगुरुकृपेने साधकाच्या ठिकाणी ज्ञान, भक्ती व अनुभूती एकरस होऊन त्याला शब्दाशब्दातीत व द्वैताद्वैतातीत अशी समन्वयात्मक स्थिती कशी प्राप्त होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तैसीच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली ।
तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥७.१३१॥
ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे ।
अथवा निवांत जरी राहे । तऱ्ही मीचि तया ॥१३२॥
हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं ।
जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥१३३॥

तैसा तो मजभीतरीं । मी तया आंतुबाहेरी ।
हें सांगिजेल बोलवरी । तैसें नव्हे ।।१३४।।
म्हणौनि असो हें इयापरी । तो देखे ज्ञानाची वाखारी ।
तेणें संचरलेनि करी । आपु विश्व ।।१३५।।
हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो ।
म्हणौनि भक्तांमाजीं रावो । आणि ज्ञानिया तोचि ।।१३६।।

सिद्धयोगाच्या समाधिसुखामुळे सहस्रारात जे सामरस्य व एकरसता साधकाला प्राप्त होते तेच खरे गहन भजन आहे असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी योग व भक्तीची जशी समरता दाखविली आहे तशीच ज्ञानयज्ञामुळेही साधकाकडून न करताही भजन होते असे सांगून ज्ञानाची व भक्तीची एकरूपता दाखविली आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओव्यातून हा समन्वय मोठ्या अपूर्वतेने व्यक्त केला आहे. ते म्हणतात–

पाठी समाधिश्रियेचा अशेखा । आत्मानुभव राज्यसुखा ।
पट्टाभिषेकु देखा । समरसें जाहला ।।९.२१८।।
ऐसें हें गहन । अर्जुना माझें भजन ।।२१९।।
अर्जुना हे गुरवी भक्ती । सांगितली तुजप्रती ।।२२८।।
अगा तयांचिया ज्ञाना । पाठी पोट नाहीं अर्जुना ।
वायु जैसा गगना । सर्वांगीं असे ।।२६०।।
तैसा मी जेतुला आघवा । तेंचि तुक तयांचिया सद्भावा ।
तरी न करितां पांडवा । भजन जहालें ।।२६१।।

सिद्धयोग हा सर्वांकरिता खुला आहे. "युवा वृद्धोऽतिवृद्धो वा व्याधितो दुर्बलोऽपि वा । अभ्यासात्सिद्धिमाप्नोति सर्वयोगेष्वतंद्रितः ।। १.६४ ।।" असे श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनी "हठयोगप्रदीपिकेत" म्हटले आहे. तरुण, वृद्ध, अतिवृद्ध, रोगी, दुर्बल इत्यादि प्रकारच्या जगातील सर्व स्त्रीपुरुषांना हा मार्ग मोकळा आहे. भगवद्गीतेतही भगवंतांना "मां हि पार्थ व्यपाश्रित्य ये ऽ पि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ।। ९ ३२ ।।" असे म्हणून स्त्री, वैश्य व शूद्रादि सर्व पापजातीतील लोकांना सिद्धयोगमार्ग मोकळा आहे असे स्पष्ट केले आहे.श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या श्लोकाचा जो भावार्थ व्यक्त केला आहे तो इतका अपूर्व आहे की, समन्वयाच्या अलौकिक दृष्टिकोनाने संपन्न झालेल्या त्यांच्या प्रतिभेने जी भरारी मारली आहे ती सर्व समाजाने या सिद्धयोगाच्या मार्गाने जाऊन पुनित व्हावे या करुणेपोटीच साकारली असल्याचा प्रत्यय येतो. एरवी त्यांनी वेदांवर टीका केली नसती. "नाहीं गा श्रुतिपरौती । माउली जगा ।। १६.४६२ ।।" अशी दृष्टी बाळगणारे श्रीज्ञानेश्वरमहाराज "वेदु संपन्नु होय ठाईं । परी कृपणु ऐसा

आनु नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥ १८.१४५७ ॥ येरां भव-व्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां । अनवसरू मांडूनियां । राहिला आहे ॥ १४५८ ॥ तरी मज पाहतां तें मागील उणे । फेडावया गीतापणें । वेदु वेठला भलतेणें । सेव्य होआवया ॥ १८. १४५९ ॥" असे जेव्हा म्हणतात तेव्हा समन्वयात्मक दृष्टिकोनाचा अभाव दुरुस्त करण्यासाठी वेदच गीतारूपाने अर्थात् सिद्धयोग शास्त्राच्या रूपाने प्रकट झाला असे आपले मत व्यक्त करतात. एरवी सिद्धयोग सर्वांसाठी खुला आहे हे सांगताना ते म्हणतात –

**म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण ।**
**एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ।।९.४५६।।**
**तेंचि भलतेणें भावें । मन मज आंतु येतें होआवें ।**
**आलें तरी आघवें । मागील वावो ।।४५७।।**

श्रीमद्भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायात भक्तियोगाचे विवेचन आहे; परंतु भगवद्भक्तीचा खरा उन्मेष शक्तिपाताशिवाय प्रकट होत नाही असे शास्त्रकारांनी स्पष्ट म्हटले आहे. जोपर्यंत शक्तिपात होऊन शक्ती जागृत होत नाही तोपर्यंत जी भक्ती साधक करतो ती एक बाह्य क्रिया किंवा नुसता बुद्धीचा व्यापार ठरतो. भक्तियोग हा सिद्धयोगाचेच एक अंग असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात की –

**जो हा अर्जुना सांग्रंत । सांगितला प्रस्तुत ।**
**भक्तियोगु समस्त । योगरूप ।।१२.२२८।।**

याप्रमाणे बाह्य भेदांच्या समन्वयाचे स्वरूप श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रतिभेतून सहजच आकार घेऊन बाहेर पडले आहे; परंतु शक्ती जागृत झाल्यावर तिचे सुषुम्नेत चालन होऊन जेव्हा अंतर्योग सुरू होतो तेव्हा आंतरप्रतितिधर्माने जी अनेकानेक रहस्ये साधकाला अनुभूतीला येत असतात त्यात सर्व गोष्टी या एकमेकाशी अखंड समरस असून भेद हा कल्पित आहे व या गोष्टी दृश्यपथातीत आहेत याची प्रकर्षत्वाने जाणीव होते. 'ऐसा हा सहज माझा । प्रकाशु जो कपिध्वजा । तो भक्ति या वोजा । बोलिजे गा ।।१८ १११७ ॥" असे जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात तेव्हा "प्रकाश हे ईश्वराचे रूप आहे व अनाहत नाद हे ईश्वराचे नाम आहे," या उपनिषद्रहस्याचेच ते उद्घाटन करीत असल्याचे प्रतीत होते. जोपर्यंत सद्गुरुकृपेने शक्तीचे उन्मीलन होत नाही तोपर्यंत "म्हणौनि दृश्यपथा–। अतीतु माझा पार्था । भक्तियोगु चवथा । म्हणितला गा ।।१८.११२९।। " हे अनुभूतीला येत नाही व सर्व मुक्या-बहिऱ्याची गोष्ट होते. ज्ञान, भक्ती व शक्ती किंवा कर्म, भक्ती व ज्ञान या सर्व गोष्टी एकच आहेत हा आपला समन्वयाचा मूर्धन्य सिद्धांत मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांना अनुभूतीची जी कक्षा प्रकट केली आहे, ती

पाहिली म्हणजे शेकडोशे शास्त्रांना व एकदेशीय पंडितांना अभिमानामुळे जे सांगता आले नाही ते त्यांनी अनुभूतीच्या अत्युच्च भूमिकेवरून सहज कथन केले आहे हे स्पष्ट दिसून येते. ते म्हणतात–

> ज्ञानी इयेतें स्वसंवित्ती । शैव म्हणती शक्ती ।
> आम्ही परमभक्ती । आपुली म्हणों ॥१८.११३३॥
> तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे ।
> हे अनुभवाचिजोगें नव्हे । बोलाऐसें ॥११५१॥

येथपर्यंत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विशद केलेल्या आंतरबाह्य समन्वयाचे स्वरूप पाहिले. आता हा समन्वय कोठे व कसा होतो किंवा ही समन्वयात्मक दृष्टी कोठे उपस्थित होते व विकास कशी पावते आणि "हें विश्वचि माझें घर। ऐसी मती जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपण जाहला ॥१२.२१३॥" असे रूप ती कसे धारण करते हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे स्पष्ट केले आहे ते पाहिले म्हणजे कर्म, भक्ती, ज्ञान, सांख्यबुद्धी, संन्यास, नैष्कर्म्यसिद्धी आदि सर्व गोष्टी; मन व प्राण हे एकवटून सुषुम्नेत शिरले की कशा लीन होतात व त्यांचे अस्तित्वच नाहीसे होऊन एकरस अशी अपूर्व समन्वयात्मक साम्यावस्था कशी उपस्थित होते, हे स्पष्ट होते. हे घडावे म्हणूनच "तियापरी श्रोतां। अनुभवावी हे कथा। अति हळुवारपण चित्ता। आणूनियां ॥१.५७॥" असे जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात; तेव्हा हे लक्षात घेतले पाहिजे की इडा-पिंगलांचे संसारावर्तन प्रकट करणारे बाह्य स्रोत जेव्हा सद्गुरुकृपेने गतिहीन व अंतर्मुख होऊन सुषुम्नेच्या सूक्ष्म मार्गात प्रवेश करतात तेव्हा जीव शिवस्वरूप होण्याच्या मार्गाला लागून परम साम्यावस्थेची त्याला प्राप्ती होते. हे घडणे म्हणजेच चित्ताचा हळुवारपणा होय. जडवस्तूचा सुषुम्नेत प्रवेश होऊ शकत नाही. प्राण व मन सूक्ष्म झाले की ते सुषुम्नेत सहज प्रवेश करू शकतात. यासाठी उपरोक्त दोहोंची जडता, आवरण, मल, संस्कार ह्या सर्व गोष्टी क्षीण झाल्या पाहिजेत. हे सर्व शक्तिपाताने घडते. श्रीज्ञानेश्वरमहाराज या प्रक्रियेचे वर्णन करताना म्हणतात–

> साही पदर फुटती । चक्रांचे हे ॥६.२४४॥
> मग शशी आणि भानु । ऐसा कल्पिजे जो अनुमानु ।
> तो वातीवरी पवनु । गिंवसितां न दिसे ॥२४५॥
> बुद्धीची पुळिका विरे । परिमळु घ्राणीं उरे ।
> तोही शक्तीसवें संचरे । मध्यमेमाजीं ॥२४६॥

अशा प्रकारे अप्रत्यक्ष व प्रत्यक्ष उल्लेख करून सर्व गोष्टी विरून जाण्याचे व सर्व गोष्टींचा किंवा तत्त्वांचा व मार्गांचा समन्वय होण्याचे सुषुम्ना हेच एकमेव महातीर्थ आहे असे अगदी निभ्रांतपणे सिद्ध होते. शरीरातील ७२ हजार नाड्या

जरी तीर्थरूप असल्या तरी सुषुम्ना नाडी ही महातीर्थ आहे. "योगशिखोपनिषदाच्या" सहाव्या अध्यायात ह्या नाडीचे महत्त्व सांगितले आहे. ऋषी म्हणतात, "इडेच्या व पिंगलेच्यामध्ये अत्यंत सूक्ष्म व पोकळ अशी सूर्यासारखी तेजस्वी सुषुम्ना नाडी आहे. या नाडीत सर्व काही आहे. चंद्र, सूर्य, अग्नी, परमेश्वर, प्राणी, दिशा, देश, समुद्र, पर्वत, भूभाग, नद्या, वेद, शास्त्र, विद्या, कला, अक्षरे, स्वर, मंत्र, पुराण, सत्त्वादिगुण, बीज, क्षेत्रज्ञ, बीजात्मक जीव, प्राणादि वायू इत्यादि सर्व काही सुषुम्नेत आहे. सुषुम्नेच्या अंतरात सर्व विश्व आहे." ह्या नाडीला शांभवी, शून्य-पदवी, ब्रह्मरंध्र, महापथ, स्मशान किंवा मध्यमार्ग या नावांनी "हठयोगप्रदीपिका-कारांनी" संबोधिले आहे. या नाडीच्या आधारानेच परमेश्वराची प्राप्ती होते. सर्व संशय व विकल्प येथेच मिटतात. सर्व प्राणांची आहुती येथेच पडते व सर्व उपप्राण येथेच एकवटतात. श्रीगुरुकृपेने या नाडीच्या दरवाजावर मूलाधारात अनादि कालापासून निद्रिस्त असलेली शक्ती जेव्हा जागृत होते; तेव्हा इडा-पिंगला, प्राण-अपान, शिव-शक्ती, प्रकृति-पुरुष, क्षर-अक्षर, संकल्प-विकल्प, सुख-दुःख, सार-असार, तर्क-वितर्क, चंद्र-सूर्य, पिंड-ब्रह्मांड ज्ञान-विज्ञान, रज-वीर्य, ज्ञान-अज्ञान, योग-वियोग, भक्ति-ज्ञान-कर्म इत्यादि जेवढे म्हणून द्वंद्वजाल आहे तेवढे सर्व महा-, योगी गोरक्षनाथांनी "योगबीजात" सांगितल्याप्रमाणे "एवं तु द्वंद्वजालस्य संयोगो योग उच्यते ।। ८९ ।।" असे घडते. त्यावेळी समन्वयाची अपूर्व अवस्था उत्पन्न होऊन सर्व भेदाभेद, द्वंद्वाद्वंद्व व द्वैताद्वैत मावळून जाऊन त्यापलीकडील एक अपूर्व स्थिती साधकाला प्राप्त होते. मात्र त्यासाठी सिद्धयोगाच्या समन्वयाचे खरे रहस्य समजले पाहिजे; नाहीतर "हा दंशु जंव नये हातां । तंव माझे साचोकारपण पार्था । न संपडे गा सर्वथा । जेंवि तुषीं कणु ।। ९. १३६ ।।" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे झाल्याशिवाय राहणार नाही.

**जीवाचे किंवा पिंडाचे स्वरूपः—**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जीवाचे किंवा पिंडाचे जे स्वरूप ज्ञानेश्वरीत वर्णन केले आहे ते महायोगी गोरक्षनाथांनी "योगबीजात" व ऋषींनी "योगशिखोपनिष-दात" सुरुवातीलाच वर्णन केल्याप्रमाणे "सर्वे जीवाः सुखदुःखैर्मायाजालेन वेष्टिताः।।" या प्रकारचे आहे. जीवाला अशा प्रकारे सुखदुःखरूप मायाजाळाच्यामध्ये पूर्णपणे गुरफटण्याचे कारण वस्तुसामर्थ्यशक्तीच्या रूपाने विलसणारी आरंभारंभा ही विश्वबीजाच्या कोंभाला म्हणजे जीवाला साउली करणारी जगदंबा कुंडलिनी शक्ती आहे हे "ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा । जया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ।।६.२७२।।" या त्यांच्या चैतन्यच संकुचित होऊन जीवरूपाने प्रकट झाले, असे म्हणण्याने स्पष्ट झाले आहे. "प्रत्यभिज्ञाहृदयात" "चितिसंको-चात्मा चेतनोऽपि संकुचितविश्वमयः ।।४।।" असे म्हणून उपरोक्त सिद्धांतच मांडला

आहे. चिती म्हणजे चैतन्यशक्ती कुंडलिनी होय. ही शक्ती म्हणजे संकुचित झालेला आत्माच आहे. ती चेतन अर्थात् प्रकाशमय असूनही संकुचित अवस्थेमध्ये विश्वस्वरूप व जीवस्वरूप धारण करते. श्रीसंत तुकाराममहाराजांनीही "संकोचोनी काय झालासी लहान।" असे म्हणून जो प्रश्न जीवाला विचारला आहे त्यात वरील विचारांचे सर्व सार आले आहे.

चैतन्य म्हणून सर्व ठिकाणी एकच आहे. या चैतन्याला आत्मा असे म्हणतात. शिवसूत्रात "चैतन्यमात्मा ॥१.१॥" असे म्हटले असून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा। देहचि केलें परमसीमा ॥१८.३८२॥" व "एवं जीवचैतन्य आघवें। हें क्षर पुरुष जाणावें ॥१५.५०१॥" असे सांगून जीवाचे मूळ आत्मस्वरूप चैतन्यरूप आहे असे म्हटले आहे. हा आत्माच उपाधी, प्रतिबिंब, माया, संकल्प, कल्पना, स्फूर्ती, आभास किंवा अन्य पद्धतीने संकोचरूप धारण करून जीव होत असतो. जेव्हा चैतन्याला पूर्व संस्कार चिकटतात, तेव्हा त्यास जीव म्हणतात. चैतन्य हे व्यापक असल्यामुळे जीवही व्यापक असतो; परंतु अज्ञानामुळे, कल्पनेमुळे किंवा संकोचामुळे अगर मागे मांडलेल्या उभारणीच्या तत्त्वज्ञानातील कोणत्याही प्रक्रियेमुळे आपण व्यापक आहोत हे जीव विसरून जातो. "स एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत ॥१.३.१२॥" असे ऐतरेय उपनिषदात म्हटले आहे. ईश्वरच या शरीरात मस्तकातील छिद्रातून प्रवेश करून जीव बनतो. "श्रीमद्भागवताच्या" एकादश स्कंधातही आत्माच जीव बनतो हे सांगताना असे म्हटले आहे की—

> स एष जीवो विवरप्रसूतिः प्राणेन घोषेण गुहां प्रविष्टः।
> मनोमयं सूक्ष्ममुपेत्य रूपं मात्रा स्वरो वर्ण इति स्थविष्ठः ॥११.१२.१७॥

परमात्माच जीवरूपाने आधारादि चक्रांमध्ये अभिव्यक्त होतो. त्यामुळे तो अपरोक्ष होतो. सर्व जीवांना जीवन देत असल्यामुळे जीव या संज्ञेस प्राप्त झालेला परमेश्वर परासंज्ञक नादयुक्त प्राणासह आधारचक्रामध्ये, 'पश्यंती' वाणीच्या रूपाने मणिपूरचक्रात, 'मध्यमा' वाणीच्या मनोमय सूक्ष्मरूपाने विशुद्ध चक्रात व 'वैखरी' वाणीच्या रूपाने मुखात प्रविष्ट होऊन मात्रा, स्वर व वर्ण इत्यादींच्या रूपाने अत्यंत स्थूल होतो. या श्लोकावरील श्रीसंत एकनाथमहाराजांची "एकनाथी भागवतातील" टीका पाहिली म्हणजे जीवाचे स्वरूप अधिक स्पष्ट होईल. ते म्हणतात, "परमेश्वराच्या स्वातंत्र्यशक्तीनेच स्वतःला संकुचित करून घेऊन जीवरूप धारण केलेले आहे. ही मूळ बीजशक्ती अविद्यात्मक आहे. तिला अव्यक्त ही संज्ञा आहे. परमेश्वर हा तिचा आश्रय आहे. माया हे या शक्तीचे स्वरूप आहे. तिच्यामध्ये सर्व संसारी जीव आपले खरे स्वरूप काय आहे हे न समजता स्वस्थपणे घोरत पडतात. अशी ही महानिद्रा आहे." महायोगी गोरक्षनाथांनी "ततो वेदनशीला कुंडलिनी

शक्तिरुद्गाता ॥ १.९॥ " म्हणून जिचे " सिद्धसिद्धांतपद्धतीत " वर्णन केले आहे; ती शक्तीच आत्मविस्मृत जीवांना बंधनाला व योगाभ्यासाद्वारा ती जागृत करणाऱ्यांना मोक्षदायक आहे; असे म्हटले आहे. ही शक्ती वेदनशीला आहे. आरंभरंभा आहे. ज्यावेळी ही शक्ती आपल्या मूळ स्वरूपापासून संकुचित होते तेव्हा जीवदशेला आरंभ होतो व ज्यावेळी सद्गुरुकृपेने ती जागृत होते तेव्हा शिवदशेला आरंभ होतो. श्री. प. प. विष्णुतीर्थस्वामीमहाराजांनी " आत्म–प्रवोध " या ग्रंथात यासंबंधी असे म्हटले आहे की, " ब्रह्म नित्य है, ज्ञानस्वरूप है और आनंदस्वरूप है। परंतु संकल्पात्मिक कुंडलोंके चक्रोंसे उसका ज्ञान और आनंद तिरोहित होकर नष्टसा होता प्रतीत होता है। वह अपने अस्तित्वसे भय खाता है, अज्ञानीके सदृश भ्रममें पडता है और आनंदकी खोजमें बहिर्मुख भटकता है । राग, द्वेष और भयके तूफान उठने लगते हैं और अपने स्वरूपको भूलकर अंधतममें पडा हुआ अपनेको जीव समझता है। "

अर्जुन हा जीवाचे प्रतीक आहे. तो मुळातच मानसिक दौर्बल्याने व हृदयाच्या संकुचितपणामुळे " कार्पण्यदोषोपहतस्वभावः " व " धर्मसंमूढचेताः " ॥२.७॥ " असा गीतेच्या आरंभी आपल्यापुढे उभा राहतो अशा स्थितीत जेव्हा तो आपल्या सद्गुरुस्वरूप श्रीकृष्णांची " यच्छ्रेयःस्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ २. ७ ॥ " असे म्हणून प्रार्थना करतो त्यावेळी महामोहाने ग्रस्त झालेला जीव आपल्या उन्नतीसाठी कसा व्याकुळ होतो हे स्पष्ट होते. महायोगी गोरक्षनाथांनी "योगबीजात" व ऋषींनी "योगशिखोपनिषादात" पार्वतीने शंकरांना अशीच प्रार्थना जीवाच्या कल्याणासाठी मार्ग प्राप्त व्हावा म्हणून केली असल्याचे सांगताना असे म्हटले आहे की –

**तेषां मुक्तिः कथं देव कृपया वद शंकर ॥ १ ॥**
**सर्व सिद्धिकरं मार्गं मायाजालनिकृंतनम् ।**
**जन्ममृत्युजराव्याधिनाशनं सुखदं वद ॥ २ ॥**

या प्रार्थनेत जीवाला सुखदुःखातून सुटण्यासाठी मार्ग मागितला आहे. हा मार्ग दिसावा व जीव सिद्ध होऊन मायेचे जाळे तुटावे आणि जन्म, मृत्यू, जरा, व्याधी इत्यादि सर्व गोष्टींचा नाश व्हावा म्हणून जशी येथे प्रार्थना केली आहे त्याप्रमाणेच महामोहात व महानिद्रेत गढलेला जीव जागृत व्हावा म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्या अर्थाने जीवाच्या स्वरूपाचे वर्णन केले आहे असे प्रत्ययास येते. त्यामुळे शास्त्रकारांनी ईश्वर जीवभावास कसा प्राप्त झाला याचे जे पंचीकरणादि प्रक्रियांचे अगर अन्यतम सूक्ष्म विवेचन केले आहे त्याला त्यांनी फाटा दिला आहे. त्यामुळे जीवभाव व त्यापासून सुटण्यासाठी अपेक्षित अशी गुरुकृपा यांच्या संमिश्र स्वरूपात अर्जुनरूपी

जीवाचे स्वरूप त्याच्या मुखातूनच श्रीज्ञानेश्वरीत व्यक्त झाल्याचे दिसून येते. या दृष्टीने ते म्हणतात –

आम्हां काय उचित। तें पाहतां न स्फुरे एथ।
जें मोहें येणें चित्त। व्याकुळ माझें ॥२.५५॥
तिमिराविरुद्ध जैसें। दृष्टीचें तेज भ्रंशे।
मग पासींच असतां न दिसे। वस्तुजात ॥५६॥
देवा तैसें मज जाहलें। जें मन हें भ्रांती ग्रासिले।
आतां काय हित आपुलें। तेंही नेणें॥५७॥
हें सकळ कुळ देखोनि। जो शोकु उपनलासे मनीं।
तो तुझिया वाक्यावांचुनी। न जाय आणिकें ॥६४॥

जीवाचे स्वरूप असेच मोहयुक्त, व्याकुळचित्त, भ्रांतिग्रसित व शोकभरित असून जोपर्यंत सद्‌गुरूंची कृपा होत नाही तोपर्यंत यातील काहीही दूर होत नाही. मायेच्या बंधनातील जीवाला त्याने स्वतःच ओढवून घेतलेला हा खेळ कधी कधी अत्यंत क्लेशदायक होतो; कारण श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जैसा भ्रमर भेदी कोडें। भलतैसें काष्ठ कोरडें।
परि कलिकेमाजी सांपडे। कोंवळिये ॥१.२०१॥
तेथ उत्तीर्ण होईल प्राणें। परि तें कमळदळ चिरूं नेणें।
तैसें कठिण कोवळेपणें। स्नेह देखा॥२०२॥
हे आदिपुरुषाची माया। ब्रह्मेयाही नयेचि आया।
म्हणौनि भुलविला ऐकें राया। संजयो म्हणे ॥२०३॥

व्यामोह, अविद्या व देहाभिमान यामुळे जीव जन्ममृत्यूंचे दुःखस्वप्न कसे भोगतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

पैं व्यामोहाचिये शेजे। बळिया अविद्या निद्रितु होईजे।
ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे। जन्ममृत्यूंचा ॥६.६८॥
पाठीं अवसांत ये चेवो। तैं तें अवघेंचि होय वावो।
ऐसा उपजे नित्य सद्‌भावो। तोहि आपणपांचि ॥६९॥

जीव भ्रांतिरूप शय्येवर ज्यावेळी प्रबळ अज्ञानामुळे गाढ झोपलेला असतो त्यावेळी जन्ममरण परंपरेची दुष्ट स्वप्ने तो वारंवार भोगीत असतो. नंतर जेव्हा तो अकस्मात जागा होतो तेव्हा ही जन्ममरणाची स्वप्ने व्यर्थ होतात. जीवाच्या या अपरिहार्य गतीचे व अंतिम ध्येयाचे अगदी असेच वर्णन म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड दोन, मधील "मनुष्यत्व" या लेखात करताना असे म्हटले आहे की, "आत्माच अभावाच्या रूपाने संकुचित

होऊन जीवाच्या रूपाने मनुष्यदेह धारण करून जन्म घेतो. मग भोग घेता घेता भोगाकांक्षा वृद्धिगत होत होत क्रमशः वाढत जाते. अशा प्रकारे अनेक जन्म गेल्यावर एकवेळ अशी येते की, ज्यावेळी भोगाकांक्षा हळूहळू शिथिल होत जाते. याचे खरे कारण असे आहे की, ज्यावेळी माणसाच्या हे लक्षात येते की अनेकानेक प्रकारच्या भोग्यवस्तूंचा अनंत प्रकारे उपभोग घेऊनसुद्धा भोगाची इच्छा काही शमत नाही, तेव्हा मनामध्ये एक प्रकारची ग्लानी उत्पन्न होऊन अत्यंत अल्प प्रमाणात निर्वेद व वैराग्याचा भाव जागृत होतो. त्यावेळी प्रवृत्तीच्या गतीचा वेग हळूहळू कमी होऊ लागतो. मग चित्त निवृत्तिभावाचा आश्रय घेऊन क्रमाक्रमाने अंतर्मुख होण्याची इच्छा करू लागते. कोणत्या जीवाला ही अवस्था केव्हा प्राप्त होईल हे सांगणे कठीण असले, तरी ज्यावेळी ही अवस्था जीवाला प्राप्त होईल त्यावेळेपासून त्याच्या अभिनव जीवनाचा आरंभ होईल यात शंका नाही. असा सूत्रपात झाला की, विश्वाच्या आतबाहेर एका महाशक्तीचे प्रचंड कार्य चालू आहे याची जाणीव जीवाला होऊ लागते. त्या शक्तीलाच प्रकृती म्हणतात. या प्रकृतीमुळेच जगातील सर्व कार्ये घडून येतात. प्रकृतीच्या जाळचात सापडल्यामुळे अविवेकाने आपणच या कार्याचे कर्ते आहोत असे जीव समजू लागतो. मात्र त्यामुळे त्याला संसारी बनून नाना प्रकारची सुखदुःखे भोगावी लागतात. या सर्व गोष्टींचे ज्ञान कोणाकोणाला वैराग्यावरोबर आतूनच जागृती आल्याने आभासरूपाने होते. त्यावेळी जीवाला पक्की जाणीव व खात्री होते की,या विराट विश्वाच्या अफाट चक्रामध्ये जन्मजन्मांतरी आपण आनंदाचा शोध घेत भटकत आहोत. मात्र उपरोक्त आनंद कोणत्याही काळी, कोणत्याही देहात व कोणत्याही लोकलोकांतरामध्ये आपणास मिळणार नाही. अशी माणसाची पक्की खात्री झाली की, बाहेर फिरून दमून जाण्याची त्याची इच्छा नाहीशी होते. परंतु हा आनंद खरोखरच कोठे आहे याचा ठावठिकाणा मात्र त्याला माहीत नसतो. उपरोक्त विचारांमुळे कालांतराने अत्यंत पुसटपणे या आनंदाचा संवाद त्याच्या हृदयात होऊ लागतो. अशा प्रकारे आनंद स्वतःमध्येच आहे याची जाणीव झाली तरी त्याच्या प्राप्तीकरिता कोणता मार्ग स्वीकारावा व पुढे कसे जावे हे त्याला कळत नाही. त्यामुळे प्रत्येक दिवशी त्याची व्याकुळता वाढत जाते व वैराग्यही तीव्र होते. त्याबरोबरच या अखंड विश्वामध्ये आपले स्थान किती शुल्लक आहे याचाही त्याला अनुभव येतो. इतके झाले तरी जोपर्यंत मार्गाची उपलब्धी होत नाही तोपर्यंत जीव कोणत्याही प्रकारे पुढे सरकू शकत नाही."

या स्थितीमुळेच अर्जुनाने श्रीकृष्णांना विनविले आहे की —

**मीं अत्यंत जड असें । परी ऐसाही निकें परियेसें ।**
**श्रीकृष्णा बोलावें तुवा तैसें । एकनिष्ठ ॥३.१८॥**

अशा प्रकारे जीव जडच असतो; कारण "एऱ्हवीं कोशकीटकाचिया परी। तो आपणया आपण वैरी । जो आत्मबुद्धि शरीरीं । चारुस्थळीं ॥ ६.७२ ॥" अशा प्रकारे तो स्वतःच्या देहालाच आत्मा समजत असतो. एखाद्या पोपटाने त्याला धरण्याकरिता टांगलेल्या नळीला धरल्यावर आपण पडू व आपण बांधले गेलो आहोत असे भ्रांतपणें समजून ती नळी सोडू नये त्याप्रमाणे जीव मुळात मुक्त असतानाही तो भ्रांतीने बांधला जातो. ( ६.७६ ते ७९ ) तशा भ्रांतिप्रमाणेच अहंकारही जीवाच्या बंधनाला कारण होत असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जे बहुतां एकां अव्हांतरु । अहंकाराचा भूतसंचारु ।
जाहला म्हणौनि विसरु । आत्मबोधाचा ॥७.१०३॥
ते वेळीं नियमाचें वस्त्र नाठवे । पुढील अधोगतीची लाज नेणवे ।
आणि करिताती जें न करावें । वेदु म्हणे ॥१०४॥
पाहें पां शरीराचिया गांवा । जयालागीं आले पांडवा ।
तो कार्यार्थु आघवा । सांडूनियां ॥१०५॥
इंद्रियग्रामींचें राजबिदीं । अहंममतेचिया जल्पवादी ।
विकारांतरांचि मांदीं । मेळवूनियां ॥१०६॥
दुःखशोकांच्या घाईं । मारिलियाची सेचि नाहीं ।
हें सांगावया कारण काई । जे ग्रासिले माया ॥१०७॥

मायेने ग्रासल्यामुळेच जीवाला स्वस्वरूपाचे विस्मरण होते व तो भवनदीत गटांगळ्या खात आपले ध्येय विसरून जातो. जीवाच्या या स्वरूपाचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, "गाईच्या कासेमध्ये अत्यंत पवित्र व गोड असे दूध असते; परंतु कासेच्या त्वचेच्या पडद्याच्या आड दडलेले हे दूध सेवन न करता गोचीड फक्त रक्ताचेच सेवन करीत असतो. कमलाचा कांदा व बेडूक एकाच तळ्यात असले तरी बेडूक कधीही कमलकंदातील परागांचे सेवन करीत नाही; परंतु भ्रमर मात्र परागांचेच सेवन करतो आणि बेडूक चिखलातच लोळतो. दुर्दैवी पुरुषाच्या घरी हजारो मोहरा पुरलेल्या असल्या तरी त्याला त्यांचें नक्की ठिकाण माहीत नसल्यामुळे तो दारिद्र्यात दिवस काढून उपाशी राहतो. अगदी याचप्रमाणे मनुष्याला खऱ्या सुखाचा ठेवा माहीत नसल्यामुळे तो विषयसुखाच्या इच्छेने जन्ममरण परंपरा भोगीत असतो. वास्तविक सर्व सुखाचा ठेवा असलेला परमात्मा त्याच्या हृदयामध्ये निरंतर वास करीत असतो; परंतु त्याचे या ठेव्याकडे लक्षच जात नाही. अहंममतावृत्ती जीवाच्या ठिकाणी अखंड उठत राहत असल्याने जीव तेथेच तद्रूप होतो. त्यामुळे अंतर्यामी असलेल्या स्वसंवेद्य सुखाला तो आचवतो. ही निद्रा त्याला खऱ्या आनंदा पासून वंचित करते." देहयोगाद्वासोऽपि ॥३–२–६॥"

या ब्रह्मसूत्रावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, "जीव मुळात ब्रह्मस्वरूप म्हणजे ज्ञानऐश्वर्यादि संपन्न आहे; पण देह व इंद्रियादिकांच्या ठिकाणी अत्यंत अहंकार व ममता असल्यामुळे त्याची ब्रह्मरूपता झाकली जाते."

श्रीमद्भगवद्गीतेत भगवंतांनी "ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातन ॥ १५.७ ॥" असे म्हणून जीव हा आपला अंशच आहे असे स्वच्छच म्हटले आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

**ऐसें शरीराचि येवढें । जें आत्मज्ञान वेगळें पडे ।**
**तें माझा अंशु आवडे । थोडेपणें ॥१५.३४३॥**
**समुद्र कां वायुवशें । तरंगाकार उल्लसें ।**
**तो समुद्रांशु ऐसा दिसे । सानिवा जेवीं ॥३४४॥**
**तेवीं जडातें जीवविता । देहअहंता उपजविता ।**
**मी जीव गमें पंडुसुता । जीवलोकीं ॥३४५॥**
**पैं जीवाचिया बोधा । गोचरु जो हा धांदा ।**
**तो जीवलोकशब्दा । अभिप्रावो ॥३४६॥**

"अशा प्रकारे आत्मा स्वरूपतः पूर्णप्रकाशात्मक, परमेश्वररूप, स्वतंत्र व भोक्त असूनही स्वेच्छापूर्वक जीवभाव ग्रहण करतो. त्यामुळे त्याचे स्वातंत्र्य व भोक्तृभाव लुप्त होऊन जातात. वास्तविक आत्म्यामध्ये सर्व शक्तींचा समावेश व समन्वय आहे. त्यामुळे आत्म्याचा पूर्ण अहंभाव स्वभावसिद्ध आहे. 'अ' पासून 'ह' पर्यंत सर्व वर्ण व कला एकमेकाशी व आत्म्यावरोवर अभिन्नरूपाने व अखंडभावाने स्फुरित होणे ही आत्म्याची पूर्ण अहंता आहे. चैतन्य, विमर्श, स्वातंत्र्य किंवा ऐश्वर्य ही त्याचीच दुसरी नावे आहेत. या सर्व अकारादि वर्णांचे वाच्य अनुत्तरादि विमर्श आत्माच असून तो आपल्या विमर्शाचेही स्वरूप आहे. अखंड स्थितीत हे सर्व एक व अभिन्न रूपाने प्रकाशित होतात; परंतु आत्मा जेव्हा स्वेच्छापूर्वक सृष्ट्युत्पत्तीला उद्युक्त होतो त्यावेळी त्याच्या स्वरूपाश्रित असणारे सर्व अकारादि वर्ण उद्भूत होतात. अद्वैत स्थितीमध्ये सर्व कला अभिन्न भावाने आंतर शब्द किंवा स्वभावरूपात राहतात. या सर्व कला तत्स्वरूपात अक्षुण्ण राहिल्यावरही सृष्टीच्या उन्मेश दशेत जणू काही अंशतः विभक्तरूपाने क्रमशः ब्राह्मी-प्रभृती अष्ट-वर्गशक्तींच्या व अ, आ इत्यादि पन्नास रुद्र शक्तींच्या रूपात अवतीर्ण होतात. त्यानंतर या सर्व शक्तींपासून पद-वाक्याच्या समूहरूपाने असंख्य क्षुद्र शक्ती आविर्भूत होतात. अकारादि वर्ण आत्म्याशी स्वतःशी विमर्शरूप व एकरूप असूनही अज्ञानावस्थेमध्ये आत्म्यापासून भिन्नरूपात प्रतीत होतात. या स्थितीत त्या कला किंवा अंश या नावाने संवोधिल्या जातात. हीच मातृकाशक्ती होय. श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी 'श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रात' 'महाविभूती' म्हणून ज्यांचा उल्लेख केला आहे त्यांच्या

द्वाराच आत्म्याचे ऐश्वर्य किंवा वैभव लुप्त होते. कला आत्मस्वरूपापासून उत्पन्न होऊन आत्म्याचा ऐक्य भाव झाकून टाकते. त्यामुळे शिवरूपी आत्मा जीव किंवा पशुरूपात उत्पन्न होतो. हाच आत्म्याचा स्वरूपसंकोच किंवा अणुभावाची प्राप्ती आहे. मग हा अणुरूपी प्रमाता किंवा जीव पूर्वी वर्णन केलेल्या अष्टवर्गीय ब्राह्मी आदि शक्ती, अकरादि रुद्रशक्ती व त्यापासून उत्पन्न झालेल्या पदवाक्यादिमय असंख्य क्षुद्रशक्तींच्या खेळाची वस्तू बनतो. मातृका अणुजीवाच्या प्रत्येक संवेदनेमध्ये अंतःपरामर्शनाच्या द्वारा स्थूल अगर सूक्ष्म असा शब्दानुवेध करतात आणि वर्गवर्गी इत्यादि देवतांच्या अधिष्ठानाच्या द्वारा चित्तामध्ये काम, क्रोध, लोभ, मोह, राग, द्वेषादि भाव किंवा वृत्ति-समूह उत्पन्न करतात. अशा प्रकारे आत्म्याचे असंकुचित स्वातंत्र्यमय चिद्घनरूप झाकून जाते व देहात्मभाव, पारतंत्र्य आणि पाशबंधनाचा सूत्रपात होतो." श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "देहअहंता उपजविता" असे जे म्हटले आहे त्याचा खरा अर्थ म. म. श्रीगोपिनाथ कविराज यांनी भारतीय संस्कृति और साधना," खंड एक मधील "जपसाधना" या लेखात वर वर्णन केल्याप्रमाणे आहे, हे लक्षात घेतल्याशिवाय सिद्धयोगाच्या द्वारा जीवभाव नाहीसा होणार म्हणजे प्रतिप्रसवक्रमाने कसा विलीन होणार हे कळणार नाही.

वर वर्णन केलेला अहंभाव, अहंकार किंवा अनात्मबुद्धी हीच जीवभावास कारण होऊन जीव सुखदुःखे भोगतो हे साररूपाने सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**परी देहाहंमान भुली। जयाचि बुद्धि देहींचि आतली।**
**तया आत्मविषयीं जाली। मध्यरात्री गा ॥१८.३८१॥**
**आत्माचि कर्मकर्ता। हाही निश्चयो नाहीं तत्त्वता।**
**देहोचि मी कर्मकर्ता। मानितो साचे ॥३८३॥**
**जे आत्मा मी कर्मातीतु। सर्वकर्मसाक्षिभूतु।**
**हे आपली कहीं मातु। नायकेचि कानीं ॥३८४॥**
**म्हणौनि उपमा आत्मयातें। देहचिवरी मविजे एथें।**
**विचित्र काई रात्रि दिवसातें। डुडुळ न करी ?॥३८५॥**
**पैं जेणें आकाशींचा कहीं। सत्य सूर्यु देखिला नाहीं।**
**तो थिल्लरींचें बिंब काई। मानूं न लोहे ? ॥३८६॥**
**थिल्लराचेनि जालेपणें। सूर्यासि आणी होणें।**
**त्याच्या नाशीं नाशणें। कंपे कंपू ॥३८७॥**
**आणि निद्रिस्ता चेवो नये। तंव स्वप्न साच हों लाहे।**
**रज्जु नेणतां सापा बिहे। विस्मो कवण ? ॥३८८॥**
**जंव कवळ आथि डोळां। तव चंद्रु देखावा कीं पिंवळा।**
**काय मृगींहीं मृगजळा। भाळावें नाहीं ? ॥३८९॥**

**तैसा शास्त्रगुरूचेंनि नांवें। जो वाराही टेंकों नेदी सिवें।**
**केवळ मौढ्याचेनिचि जीवें। जियाला जो ॥३९०॥**
**तेणें देहात्मदृष्टीमुळे। आत्मया घापे देहाचें जाळे।**
**जैसा अभ्राचा वेगु फोल्हें। चंद्रीं मानीं ॥३९१॥**

सारांश, "श्रीमद्‌भागवताच्या दशमस्कंधामध्ये" वर्णन केलेले जीवाचे स्वरूप हे वरील सर्व वर्णनाचे थोडक्यात सार आहे. श्रीशुकाचार्य म्हणतात.

**किं किं न विस्मरन्तीह मायामोहितचेतस:।**
**यन्मोहित जगत् सर्वमभीक्ष्णं विस्मृतात्मकम् ॥१०.१४.४४॥**

शास्त्राने व आचार्यांनी वारंवार समजावून देखील जगातील सर्व जीव मायाशक्तीने मोहित होऊन आपले आत्मस्वरूप कायमचे विसरून गेले आहेत. त्या मायेची शक्ती ही अशीच आहे. खरोखर तिला मोहित होऊन जीव येथे काय काय म्हणून विसरत नाही? श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही जीवाचे किंवा पिंडाचे स्वरूप साररूपाने प्रकट करताना असेच म्हटले आहे की–

**मग तया मानणयासाठीं। देहबंदिशाळे किरीटी।**
**कर्माच्या वज्रगांठी। कळासे तो ॥१८.३९२॥**

## विश्वाचे किंवा ब्रह्मांडाचे स्वरूप:–

"मावळवीत विश्वभासु ॥ १६.१ ॥, म्हणौनि परियेसी गा प्रियोत्तमा। यापरी मी विश्वेंसीं विश्वात्मा। जो इया लटकिया भूतग्रामा। भाव्यु सदा ॥ ९.८४ ॥ रश्मिचेनि आधारें जैसें। नव्हे तेंचि मृगजळ आभासे। माझ्या ठायीं भूतजात तैसें। आणि मातेंहीं भावी ॥ ९.८५ ॥" अशा रीतीने विश्व किंवा ब्रह्मांड हे मृगजळाप्रमाणे अभासात्मक किंवा मिथ्या असल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाजांनी निभ्रांतपणे सांगितले असल्यामुळे त्यांच्या लेखी त्याचे स्वरूप काय आहे हे अगदी स्पष्ट होते. अशा प्रकारे न झालेल्या विश्वाचे स्वरूप, त्याची उत्पत्ती, त्याची तत्त्वे इत्यादींचे कथन श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या आधाराने श्रीज्ञानेश्वरमहाजांनी केले आहे; कारण उपनिषदांप्रमाणेच हे कथन करण्याचा हेतू सृष्टीचा क्रम साधकाला समजाविणे हा नसून मुमुक्षू साधकाच्या ब्रह्मजिज्ञासेचे समाधान व्हावे व सिद्धयोगसाधनाची प्राप्ती होऊन त्याला स्वरूपोपलब्धी व्हावी हाच आहे. त्यामुळेच त्यांनी सर्व विश्व व ब्रह्मांड ईश्वराशी एकरूप असून विश्वस्वरूप हा आत्मस्वरूपाचा ऐश्वर्ययोग अ हे असा सिद्धांत मांडला आहे. या दृष्टीने ते म्हणतात:–

**मी ये परीचा भूतभावनु। परि सर्व भूतांसि अभिन्नु।**
**जैसी प्रभा आणि भानु। एकचि से ॥९.८६॥**
**हा आमुचा ऐश्वर्ययोगु। तुवां देखिला कीं चांगु ?।**
**आतां सांगें कांहीं एथ लागु। भूतभेदाचा असे ? ॥८७॥**

**यालागीं मजपासूनि भूतें । आनें नव्हती हें निरुतें ।**
**आणि भूतांवेगळिया मातें । कहींच न मनीं हो ! ॥८८॥**

यावरून हे स्पष्ट होते की, विश्वाचे किंवा ब्रह्मांडाचे स्वरूप स्पष्ट करताना हे स्वरूप स्वस्वरूपाशी एकरूप आहे हे साधकाला समजावे व त्याचे अज्ञान, भ्रांती, भ्रम, कल्पना, संकल्प इत्यादि दूर व्हावेत एवढाच उद्देश आहे. असा हेतू असल्यामुळे कोणत्या वादाच्या आधारे विश्वाची उत्पत्ती झाली व त्याची तत्त्वे किती आहेत याचे महत्त्व त्यांच्या दृष्टीने शून्यवतच आहे. याचे कारण असे की, तेराव्या अध्यायात पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश ही पाच महाभूते; अहंकार, बुद्धी, अव्यक्त प्रकृती; श्रवण, नयन, त्वचा, घ्राण व रसना ही पाच ज्ञानेंद्रिये; वाणी, कर, चरण, अधोद्वार व अपायु ही पाच कर्मेंद्रिये; मन, सुख, दुःख, द्वेष, संघात, इच्छा चेतना, धृती; शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे ज्ञानेंद्रियांचे विषय व वर्णोच्चार, स्वीकार व त्याग, फिरणे, मलोत्सर्ग व मूत्रोत्सर्ग हे कर्मेंदियांचे विषय अशी एकदर ३६ तत्त्वे त्यांनी " एवं छत्तीसही भेद । सांगितलें तुज विशद । यया येतुलियातें प्रसिद्ध । क्षेत्र म्हणिजे ॥ १३.१५० ॥" असे म्हणून मांडली आहेत. ही छत्तीस तत्त्वे क्षेत्राची मानीत असल्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ईश्वराला अकराव्या अध्यायात सदतीसावा पुरुष म्हटले आहे. " तूं धर्माचा ओलावा । अनादिसिद्ध तूं नित्य नवा । जाणे मी सदतिसावा । पुरुष विशेष तूं ॥११.३०९॥" असे असल्यामुळे " शंकर-रामानुजांपेक्षा स्वतंत्र रीतीने ही तत्त्वसंख्या ज्ञानेशांनी निश्चित केली आहे," असे मत डॉ. शं. दा. पेंडसे यांनी " श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान " या ग्रंथात मांडले आहे. (पृ. ११८) परंतु पाच महाभूते, अहंकार, बुद्धी, अव्यक्त, दहा ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रियें मन आणि पाच विषय मिळून श्रीमद्भगद्गीतेत सांगितलेली व श्रीमदाद्यशंकराचार्यांनी आणि श्रीरामानुजाचार्यांनी मानलेली २४ तत्त्वेही त्यांना मान्य आहेत असे " हें चोविसांही तत्त्वांचें । कुटुंबघर वस्तीचें । तुटे बंधमोक्षाचें । गुंथाडे एथ ॥ १८.३१९॥" यावरून स्पष्ट दिसते. याचा अर्थ असा की, विश्वोपत्तीच्या प्रक्रियेत तत्त्वसंख्येचा आग्रह अपेक्षित नसून बंधमोक्षाच्या गुंतागुंतीचा उलगडा देहातच होत असतो व तो साधनाने करावयाचा असल्याने विश्वाभासाचे स्वरूप मांडावयाचे असे त्यांचे निश्चित मत आहे हे स्पष्ट दिसते.

श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधाच्या बावीसाव्या अध्यायात उद्धवाने श्रीकृष्णांना ऋषींनी तत्त्वसंख्या भिन्नभिन्न का सांगितल्या आहेत व खरी तत्त्वे किती आहेत? असा प्रश्न केला. तेव्हा त्याला उत्तर देताना श्रीकृष्ण म्हणाले, " उद्धवा ! ऋषी जे काही सांगतात ते सयुक्तिकच आहे. प्रतिपाद्य विषयांच्या भिन्नत्वाप्रमाणे ते भिन्न भिन्न संख्या सांगतात ह्यात वावगे ते काय आहे ? तत्त्वगणनेचा मुख्य विषय कोणता असतो इकडे लक्ष पुरव. मायामय सृष्टीचा विचार करताना तत्त्वांची भिन्न

भिन्न संख्या मानली जाणे स्वाभाविकच आहे. अरे, माया ही केवळ मृगजलाप्रमाणे मिथ्या व भासमान ! मग तीत कितीही तत्त्वे स्वीकारली तरी त्यात विरोध तो कोठून येणार ? उद्धवा ! मायिक सृष्टीच्या घटनेबद्दल वादविवाद उत्पन्न झाला असता, पूर्वपक्ष व उत्तरपक्ष चालून भवती न भवती व्हावी हा तरी माझ्या अगाध मायेचाच परिणाम होय. अंतःकरणात असणाऱ्या सत्त्वादि गुणवृत्ती क्षुब्ध झाल्या म्हणजे असले वाद उत्पन्न होतात व त्या शांत होऊन शमदमांचे प्राबल्य झाले म्हणजे हे नष्ट होतात. तत्त्वसंख्येच्या भेदाचे कारण वक्त्याची विवक्षा म्हणजे विषयानिरूपणाकरिता स्वीकारलेला दृष्टिभेद हे होय. तत्त्वांची स्थिती अशी आहे की, कार्यकारणरूपाने किंवा व्याप्यव्यापकरूपाने त्यांचा एकमेकात अंतर्भाव करता येतो " या सर्व विवेचनावरून श्रीज्ञानेश्वरमहाराज वाद व तत्त्वसमन्वयाच्या महाभूमिकेवर महासिद्धयोगाच्या आधाराने आरूढ होऊन सिद्धयोग दर्शनाचे विवेचन करीत आहेत याची जाणीव होते. " द्वैताद्वैत कुंभ सरिसेपणें एकवटत ।। १.१७ ।। " अशा धारणाबलावर ज्या सिद्धयोगाच्या तत्त्वज्ञानाचे ते विवेचन करीत आहेत ते ध्यानात घेतले म्हणजे विश्वाच्या स्वरूपोपत्तीचे त्यांनी प्रकट केलेले मर्म आपल्या ध्यानात येईल.

ज्याप्रमाणे तत्त्वसंख्येचा आग्रह श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या सिद्धयोग्याच्या भूमिकेमुळे वितळून गेलेला दृष्टीस पडतो त्याप्रमाणेच विश्वोत्पत्तीच्या ज्या प्रक्रिया उपनिषदे, वेदान्त, ब्रह्मसूत्रे, शैव, शाक्त, त्रिक, प्रत्यभिज्ञा, तंत्र, वैष्णव, शिव, नाथ इत्यादि सर्व दर्शनातून किंवा शास्त्रातून ऋषी, मुनी, आचार्य, पंडित व योगी मार्गदर्शकांनी मांडल्या आहेत त्या सर्वांना आपल्या अलौकिक प्रातिभ शक्तीच्या मुशीत घालून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अशा रीतीने बाहेर काढल्या आहेत की, त्यांच्या एकरूपतेच्या दर्शनाने स्तिमित व्हावे. सद्‌गुरुकृपेने जेव्हा शक्ती जागृत होते व ती श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या रूपाने चक्रनेमिक्रमात जेव्हा विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अशा अलौकिक प्रतिभेच्या रूपाने साकार होते; तेव्हाच श्वासोच्छवास प्रबंध होतात व वस्तुसामर्थ्यशक्तीमुळे तयार झालेले ज्ञानेश्वरीसारखे लेणे पाहवयास मिळते. वस्तूची म्हणजे ब्रह्माची किंवा शिवाची त्याच्याशी अभिन्न अगर एकरूप असलेली सामर्थ्य व स्वातंत्र्यशक्ती कुंडलिनी ही सर्व तत्त्वे, वाद, सीमा, कक्षा, सिद्धांत, उपसिद्धांत धारण करणारी जगज्जननी, विश्वचालिनी व ब्रह्मांडपालिनी असल्याने तिच्यापासूनच विश्वाची उभारणी झाली असल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी निभ्रांतपणं सांगितले आहे. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तरी अवधारीं गा धनंजया । हे महादादिक माझी माया ।**
**जैसीं प्रतिबिंबे छाया । निजांगाची ।।७.१५।।**

**आणि इयेतें प्रकृति म्हणिजे । जे अष्टधा भिन्न जाणिजे ।**
**लोकत्रय निपजे । इयेस्तव ।।१६।।**
**हे अष्टधा भिन्न कैसी । ऐसा ध्वनि धरिसी जरी मानसीं ।**
**तरी तेचि गा आतां परियेसीं । विवंचना ।।१७।।**
**आप तेज गगन । मही मारुत मन ।**
**बुद्धि अहंकारु हे भिन्न । आठै भाग ।।१८।।**
**या आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था ।**
**तिये नाम व्यवस्था । जीवु ऐसी ।।१९।।**
**जे जडातें जीववी । चेतनेतें चेतवी ।**
**मना करवीं मानवी । शोक मोहो ।।२०।।**
**पैं बुद्धीच्या अंगी जाणणें । तें जिये जवळिकेचें करणें ।**
**जिया अहंकाराचेनि विदाणें । जगचि धरिजे ।।२१।।**
**ते सूक्ष्म प्रकृति कोडें । जैं स्थूळाचिया आंगा घडे ।**
**तैं भूतसृष्टीची पडे । टांकसाळ ।।२२।।**

परब्रह्म हे निष्कल, निष्क्रिय, शांत, निरंजन, अव्यय, अक्षर व स्पंदरहित आहे; परंतु धुराने आकाश आच्छादून गेल्यामुळे ज्याप्रमाणे मलीन दिसू लागते, त्याप्रमाणे निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी सृष्टीच्या प्रारंभी मायेच्या तमोमयी मलीनतेचा प्रादुर्भाव होतो. या मायेलाच सत्चित्आनंदशक्ती, अविद्याशक्ती किंवा प्रकृती असे म्हणतात. या शक्तीमुळे अंगाच्या छायेप्रमाणे विश्व प्रतिबिंबत झाले आहे असे जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, तेव्हा त्यांनी विंवप्रतिाबबवादाने विश्वाची उत्पत्ती झाल्याचे दार्खविले आहे. " स्वेच्छया स्वभित्तौ विश्वमुन्मीलयती ।। २ ।।" असे " प्रत्यभिज्ञाहृदयात " श्रीक्षेमराजांचेही सूत्र आहे. चितो शक्ती ही आपल्या स्वतःच्या इच्छेनेच स्वात्मरूप भिंतीवर किंवा पटावर विश्वाचे उन्मीलन करते. चिती शक्ती स्वतंत्र आहे. त्यामुळे ती आपल्या इच्छेने आपल्यामध्येच विश्व प्रकट करते. ही चिती शक्ती हे जगत् अत्यंत स्वच्छेने उत्पन्न करते. एखाद्या आरशात ज्याप्रमाणे आरशापुढे उभी राहिलेली गोष्ट प्रतिबिंबित व्हावी त्याप्रमाणे चिती शक्ती आत्मरूप पटावर विश्वाची निर्मिती प्रतिबिंबित करते. या शक्तीलाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी माया व प्रकृती म्हणून वर संबोधिले आहे व ती या भूतसृष्टीची टांकसाळ पाडते असे सांगून परिणामवादाचाही अंगीकार केला आहे.

अजातवादाचा आश्रय करून सृष्टीच्या स्वरूपाचा विचार करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.—

**येथें भूतें जियें अतीतलीं । तियें मीचि होऊनि ठेलीं ।**
**आणि वर्तत आहाति जेतुलीं । तींही मीचि ।।७.१६१।।**

कां भविष्यमाणें जियें हीं । तींही मजवेगळीं नाहीं ।
हा बोलचि एऱ्हवीं कांहीं । होय ना जाय ।।१६२।।
तये ब्रह्मभुवनी दिवसें पाहे । ते वेळीं गणना केहीं न समाये ।
ऐसें अव्यक्ताचें होये । व्यक्त विश्व ।।८.१६०।।

श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही "तदधीनत्वादर्थवत् ॥" १.४३॥" या ब्रह्मसूत्रावर भाष्य करून सृष्टयुत्पत्तीचा विचार मांडून मायावाद किंवा अजातवादच स्पष्ट केला आहे. ते म्हणतात, "या अनादी अविद्येचे स्वरूप मोठे विलक्षण आहे. ज्याप्रमाणे मायावी लोक आपल्या मायेच्या योगाने विचित्र वस्तू उत्पन्न करतात त्याप्रमाणे या अज्ञानरूप शक्तीच्या योगाने परमेश्वर हे विचित्र जग उत्पन्न करतो म्हणून या शक्तीला माया असे म्हटले आहे. ही शक्ती ब्रह्मरूपच आहे; कारण कोणत्याही वस्तूची शक्ती त्या वस्तूहून निराळी आहे असे दृष्टोत्पत्तीस येत नाही. तिच्यावाचून परमेश्वराच्या ठिकाणी जगाचे कर्तृत्व सिद्ध होत नाही; कारण त्याच्या अंगी जग उत्पन्न करण्याची शक्ती असल्यावाचून तो ते जग उत्पन्न करण्याविषयी प्रवृत्त होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे पृथ्वीचा उदकामध्ये लय होतो त्याप्रमाणे या मायेचा किंवा अव्यक्त व अक्षर चित्शक्तीचा ब्रह्मामध्ये लय होतो. अक्षर या शब्दाचा अविनाशी असा अर्थ आहे. या अज्ञानशक्तीचाही ज्ञान होईपर्यंत नाश होत नाही, म्हणून या शक्तीला अक्षर असे म्हणतात. अक्षर म्हणजे अज्ञानरूपी बीजशक्ती होय. ती आकाश वगैरे सर्व प्रपंचाचे कारण असल्यामुळे ती आकाश वगैरेहून पर आहे तिच्याहून परमात्मा पर आहे; कारण ती परमात्म्याच्या अधीन आहे. ही बीजशक्ती अविद्यात्मक आहे. तिला अव्यक्त ही संज्ञा आहे. परमेश्वर हा तिचा आश्रय आहे. माया हे तिचे स्वरूप आहे. तिच्यामध्ये सर्व संसारी जीव आपले खरे स्वरूप काय आहे हे न समजता स्वस्थपणे घोरत पडतात. अशी ही महानिद्रा आहे."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही या अव्यक्त व अक्षर अशा बीजशक्तीपासून संकल्पाच्या साहाय्याने त्रिभुवनाएवढी बाग तयार होते असे सांगितले आहे. ते म्हणतात–

शून्यसेजेशालिये । सुलीनतेचिये तुळिये ।
निद्रा केली होती बळियें । संकल्पें येणें ।।१३.४२।।
तो अवसांत चेइला । उद्यमीं सदैव भला ।
म्हणौनि ठेवा जोडला । इच्छावशें ।।४३।।
निरालंबीची वाडी । होती त्रिभुवनायेवढी ।
हे तयाचिये जोडी । रूपा आली ।।४४।।

संकल्पाच्या निर्गुण परब्रह्म स्वरूपाच्या केवळ सत्तास्फूर्तीच्या आधाराने

त्रिभुवनाएवढी वागही त्याच्याच साहाय्यामुळे उत्पन्न होते. अशी ही विश्व स्फुरविणारी शक्ती निरनिराळ्या नावाची असली तरी ती एकरूपच आहे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

एऱ्हवीं तरी महद्ब्रह्म । यालागी हें ऐसें नाम ।
जे महदादिविश्राम । शालिका हें ।।१४.६७।।
अव्यक्तवादमतीं । अव्यक्त ऐसी ववंती ।
सांख्याचिया प्रतीती । प्रकृति हेचि ।।६९।।
वेदांती इयेतें माया । ऐसें म्हणिजे प्राज्ञ राया ।
असो किती बोलो वायां । अज्ञान हें ।।७०।।

ही शक्ती गुणमयी असून तिलाच दैवी माया असे म्हणतात हे " मा इयें प्रकृती तंव । गुणमयी हेचि नांव । किंबहुना सावेव । गुण तेचि हे ।।१६.९८७।। इयें प्रसिद्धचि दैवी । माया हें नाम ।।१३.९९२।।" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. हिचे वर्णन करताना ते म्हणतात–

हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आघवी ।
जडातेंही माजवी । इयेचा माजु ।। १३.९८८।।
नामें इयें प्रसिद्धें । स्नेहो इया स्निग्धें ।
इंद्रियें प्रबुद्धें । इयेचेनि ।।९८९।।
कायि मन हें नपुंसक । कीं ते भोगवी तिन्ही लोक ।
ऐसें ऐसें अलौकिक । करणें इयेचें ।।९९०।।
हे भ्रमाचे महाद्वीप । हे व्याप्तीचें रूप ।
विकार उमप । इया केले ।।९९१।।
हे कामाची मांडवी । हे मोहवनीचीं माधवी ।
इये प्रसिद्धचि दैवी । माया हें नाम ९९२।।
हे वाङ्मयाची वाढी । हे साकारपणाची जोडी ।
प्रपंचाची धाडी । अभंग हे ।।९९३।।
कळा एथूनि जालिया । विद्या इयेंच्या केलिया ।
इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ।।९९४।।
हे नादाची टांकसाळ । हे चमत्काराचे वेळाउळ ।
किंबहुना सकळ । खेळु इयेचा ।।९९५।।
जे उत्पत्ति प्रलयो होत । ते इयेचे सायंप्रात ।
हें असो अद्भुत । मोहन हे ।।९९६।।
हे अद्वयाचें दुसरें । हे निःसंगाचे सोयरे ।
हे निरार्ळेसि घरें । नांदत असे ।।९९७।।

इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्याप्तीची थोरी ।
म्हणौनि तया आवरी । अनावरातें ॥९९८॥
तयाच्या तंव ठायीं । निपटूनि कांहींचि नाहीं ।
कीं तया आघवेंही । आपणचि होय ॥९९९॥
तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ती ।
आपण होय स्थिती । ठावो तया ॥१०००॥

असा हा चित्‌शक्तीचा सर्व खेळ आहे. विश्वाच्या स्वरूपाचे हे खरे रहस्य आहे. या पलीकडे सांगण्यासारखी गोष्ट नाही. या खेळाचे पृथक्करण शास्त्रकारांनी आपापल्या परीने केले आहे. या सर्वांचे संकलन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरील-प्रमाणे व त्यापुढेही करून एकसमयावच्छेदेकरून प्रकृति-पुरुषाच्या रूपाने मूळ गीतेतील शब्दांचे अनुसरण करीत शिवशक्तीच्या सामरस्याने युक्त असलेल्या अनादि परब्रह्मावर "जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचे सरोसरी । चारुस्थळीं एकाहारी एकांशाची ॥१-२॥" असे "अमृतानुभवात" म्हटल्याप्रमाणे ही शक्ती जगत्पसारा कसा उत्पन्न करते हे सांगितले आहे. "स एकाकी न रमते ॥ महोपनिषत् १.१॥" "सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् । तदैक्षत बहुस्यां प्रजायेयेति ॥ छांदोग्य उप. ६ १ २॥," "सोकामयत । बहुः स्यां प्रजायेय भूमानं गच्छेयमिति ॥ जैमि. उप. १.४६ ॥" "आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत् नान्यत्किंचनमिषत् । स ईक्षत् लोकान्नु सृजा इति ॥ ऐतरेय उप. १–१–१ ॥" या व अन्य अशा पद्धतींनी उपनिषदांनी सांगितलेल्या सृष्टयुत्पत्तीच्या विचारांचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त पद्धतीने जो समन्वय घातला आहे व सर्व तत्त्ववेत्यांच्या निगूढ रहस्याचे सार काढून कथन केले आहे ते पाहिले म्हणजे मन स्तिमित होते "चिति। स्वतंत्रा विश्वासिद्धीहेतुः ॥ १ ॥" चिती शक्ती स्वतंत्र आहे. ती विश्वाच्या उभारणीचे व संहारणीचे कारण आहे. हे "प्रत्यभिज्ञाहृदयातील" सूत्र जसे येथे लागू पडते तसेच "तदधीनत्वादर्थवत् ॥ १.४.३ ॥" हे ब्रह्मसूत्रही येथे लागू पडते. ज्यावेळी श्रीज्ञानेश्वरमहाराज "तया अनार्ताची आर्ती । तया पूर्णाची. तृप्ती । तया अकुळाची जाती – । गोत होय ॥१३.१००१॥ तया निराकाराचा आकारु । तया निर्व्यापाराचा व्यापारु । निरहंकाराचा अहंकारु । होऊनि ठाके ॥१००३ ॥ तया अनामाचें नाम । तया अजाचें जन्म । आपण होय कर्म– । क्रिया तया ॥ १००४ ॥" अशा तऱ्हेने त्या अनादि आत्मसत्तेचे वर्णन करतात, त्यावेळी "ते ध्यानयोगानुगता अपश्यन् देवात्मशक्ति स्वगुणैर्निगूढाम् । यः कारणानि निखिलानि तानि कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः ॥ १.३ ॥" ही "श्वेताश्वर उपनिषदातील" वाणी आठवते. सृष्टीचे कारण काय आहे ? आम्ही कोणत्या आधारावर आहोत ? इत्यादि ब्रह्मवाद्यांच्या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी ऋषींनी ध्यानयोगाचा मार्ग

अवलंबिला तेव्हा त्यांना आपल्या गुणांनी आच्छादित झालेल्या परमात्म्याच्या शक्तीचा साक्षात्कार झाला. त्यामुळेच त्यांनी सर्व प्रश्नांचे एकच उत्तर दिले की, देवात्मशक्ती हेच सर्वांचे कारण आहे व हाच सर्वांचा आधार आहे. याच उपनिषदात पुढे " य एकोऽवर्णो बहुधा शक्तियोगात् वर्णाननेकान्निहितार्थो दधाति ॥ ४.१ ॥ " या प्रमाणे सृष्टीच्या आरंभी तो एक व निर्विशेष असूनही आपल्या शक्तीच्या द्वारा परमात्मा कोणत्याही प्रकारचा हेतू नसताना अनेक वर्ण, रूपे इत्यादि धारण करतो असे म्हटले आहे. यावरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केलेली गुणमयी किंवा दैवी मायायुक्त शक्ती देवात्मशक्तीहून कोणत्याही प्रकारे निराळी नसून अगदी एकच आहे हे लक्षात येते. " उपनिषदांकडे न वचे ॥१३.८२७॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेले अज्ञानाचे लक्षण आहे, हे लक्षात घेऊन व गीतेतील उपनिषदांचे सार ते ज्ञानेश्वरीच्या रूपाने सांगत आहेत याची पक्की जाणीव ठेऊन या विषयाकडे पाहिले म्हणजे त्यांनी सृष्टीचे जे स्वरूप वर्णिले आहे त्याची पृष्ठभूमी कोणती आहे याचा उलगडा झाल्याशिवाय राहणार नाही. "परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रियाच ॥६.८॥ " असे जे श्वेताश्वतरोपनिषदामध्ये सांगितले आहे ते ध्यानात घेतले म्हणजे स्वाभाविक, ज्ञानक्रिया व बलक्रिया यांनी युक्त अशी परम आत्म्याची शक्ती अनेक प्रकारची असून तीच विश्वाची रचना करते हे " ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्व व्याप्ती । तया अविकारातें विकृती । माजीं कीजे ॥ १३.१००७॥ " अशा प्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मुखातून प्रकट झालेले वचन वाचल्यावर अधिक उत्तम पटते.

शक्ती ही " वाङ्मयाची वाढी ॥ १३.९९३ ॥ " आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. त्यातही सृष्टीच्या स्वरूपाचे उन्मीलनात्मक किंवा उभारणीचे रहस्य दडलेले आहे. शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की—

अकारः सर्ववर्णाग्र्यः प्रकाशः परमः शिवः ।
हकारोऽन्त्यकलारूपो विमर्शः कथितः प्रिये ॥

याचा अर्थ असा आहे की, 'अ' प्रकाशात्मक आहे व 'ह' विमर्शात्मक असल्या कारणाने 'अ' व 'ह' हे दोन वर्ण सर्व वर्णमालेचे द्योतक आहेत. ही सर्व वर्णमाला भगवंताच्या प्रकाश किरणांचे किंवा शक्तींचे प्रतीक आहे. 'ह' हा प्राणवाचक आहे. चित्शक्ती प्राणशक्तीच्या रूपात रूपांतरित होऊन पुन्हा विलोमक्रमाने मूळ स्थानात परत येते. त्यावेळी पुन्हा क्रियेचा अविर्भाव होऊन 'अ' किंवा अनुत्तराबरोबर ती युक्त होते. याचेच नाव 'अहं' आहे. यातूनच पुढे 'इदं' भावाची उत्पत्ती होते म्हणजे सृष्टीची रचना होते. यादृष्टीने पाहिले म्हणजे सर्व विश्व हे शब्दापासूनच उत्पन्न होणारे व शब्दातच राहणारे आहे. " शब्देष्वेवाश्रिता शक्तिर्विश्वस्यास्य निबंधनी, " " वागेव विश्वा भुवनानि यज्ञे वाच इत् सर्वममृतं यच्च

मर्त्यम् " इत्यादि शास्त्रवचनानुसार हे स्पष्ट होते की शब्दच जगत्सृष्टीचें मूळ आहे व सृष्टीच्या बाहेर जाण्यासाठी शब्दच एकमात्र उपाय आहे. ज्ञानेश्वरीच्या शब्दाशब्दातून व ओवीओवीतून ही रहस्ये श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुंफून ठेवली आहेत. ज्यावेळी ही रहस्ये उलगडतील त्यावेळी श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रतिभेने म्हणजे जागृत शक्तीने धारण केलेले ब्रह्मांडव्यापी रूप ध्यानात येऊन सर्व क्षुद्र वादविवाद गळून जातील.

सारांश, विश्वाचे किंवा ब्रह्मांडाचे स्वरूप हे " स्वमायेचें आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र । बाहेरी नटी छायाचित्र । चौऱ्याशीं लक्ष ॥१८.१३०३॥" असे असून " भ्रामकाचेनि संगे । जैसें लोहो वेढा रिगे । तैसीं ईश्वर सत्तायोगें । चेष्टती भूतें ॥ १८. १३११ ॥ " हे त्या स्वरूपाचे स्वरूप आहे व " स्वसंकोचें प्रिया । रूढविली जेणे ॥ १.३२ ॥ " असे " अमृतानुभवात " म्हटल्याप्रमाणे त्या प्रिय पतीने म्हणजे शिवाने आपला संकोच करून आपल्या प्रिय पत्नीला प्रकट केले म्हणजे जगदाभासाच्या रूपाने शक्तीला व्यक्त दशेस आणले हे त्या सर्वाचे सार आहे. महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांतपद्धतीत " " किमुक्तम्भवति परापरविमर्शरूपिणी संविन्नानाशक्तिरूपेण निखिलपिंडाधारत्वेन वर्तत इति सिद्धसिद्धांतः ॥ ४.२९ ॥" असे म्हणून व्यष्टिसमष्टीभूत भौतिक वस्तूंना प्रकट करणारी व ब्रह्मासह असणारी संवित्शक्ती नानाशक्तींच्या रूपाने सकल पिंडांचा आधार आहे, असे या साराचे अधिक सूक्ष्मतेने केले वर्णन आहे. उपरोक्त सर्व विवेचनाचे व साराचे सार " अमृतानुभवातील " श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात असे सांगता येईल की–

**जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचिये सरोभरी ।**
**चारुस्थळीं एकाहारी । एकांशाची ॥१.२॥**

**ईश्वराचे स्वरूप :–**

" ॐ नमो श्रीआद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥१.१॥" असे वेदांनी प्रतिपादित केलेले स्वसंवेद्य आत्मस्वरूप असून तेच जीवाचे प्रातव्य, मूळ स्वरूप व गंतव्य स्थान आहे असा निर्वाळा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी दिला आहे. या आत्मरूपाशिवाय म्हणजे ब्रह्माशिवाय काहीही सत्य नाही. ईश्वरही ब्रह्मच आहे; परंतु सृष्टीच्या कार्यासाठी मायाशक्तीचे किंवा चित्शक्तीचे आवरण घेतलेले ब्रह्माचे रूप ईश्वर या नावाने कार्यरत होते. महायोगी गोरक्षनाथांनी परमपद स्वसंवेद्य आहे असेच " सिद्धसिद्धांतपद्धतीत " सांगितले आहे. ते म्हणतात –

**परमपदमिति स्वसंवेद्यमत्यंतभसाभासकमयम ॥५.२॥**
**यत्र बुद्धिर्मनो नास्ति तत्त्वविज्ञापरा कला ।**

**ऊहापोहौ न कर्तव्यौ वाणी तत्र करोति किम् ।।५.३।।**
**वाग्मिना गुरुणा सम्यक् कथं तत्पदमीर्यते।**
**तस्मादुक्तंशिवेनैव स्वसंवेद्यंपरंपदम् ।।५.४।।**

आपल्या महिम्यातच प्रतिष्ठित असलेल्या आत्म्याची अनुभूती केवळ योगसमाधीच्या द्वाराच साधकाला येते. हे आत्मस्वरूप सिद्धस्वचेतन प्रकाशाने नित्य प्रकाशित आहे. ह्याला परमपद म्हणतात. शिवशक्तीच्या सामरस्यामुळेच हे पद स्वसंवेद्य झाले आहे. हे पद भासात्मक व आभासात्मक आहे. हे परमपद मनाचा व वाणीचा विषय नाही; कारण त्यांची पोहोच तेथपर्यंत जाऊ शकत नाही व तेथे या दोन्ही गोष्टी नाहीतही. जीवात्म्याला आपल्या स्वरूपात स्थिर करणारी पराकला म्हणजे कुंडलिनी किंवा आदि चित्‌शक्ती त्या परब्रह्म स्वरूपाशी एकाकार होऊन राहते. या स्वरूपाशी एकरूप असलेली शक्ती स्वरूपापेक्षा व्यापक किंवा परिच्छिन्न असत नाही. या स्वरूपाच्या ठिकाणी खंडनमंडनात्मक तर्कवितर्कांचा प्रवेश होऊ शकत नाही; मग वाणी तेथे काय करू शकेल ? " यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसा सह ।। तैत्ति. उप. ।।२.९।। " असे हे परमपद आहे. हे पद मनाचा व वाणीचा विषय होऊ शकत नसल्याने त्या परमपदाची व्याख्या शास्त्रवेत्ते गुरुजन तरी कशी करू शकतील ? यामुळेच महेश्वरांनी असे म्हटले आहे की, त्या परमपदाला केवळ योगसमाधिजन्य अनुभवाच्या द्वाराच साधक जाणू शकतात. "

परमपदाची ही अनुभूतियुक्त शिवशक्तिसामरस्याची महास्थिती श्रीज्ञानेश्वरमहाराजांना परंपरेने प्राप्त झालेली असल्याने त्यांनी या अवस्थेचे किंवा स्थितीचे जे वर्णन केले आहे ते इतके अपूर्व आहे की, ते स्वतः " तो गांवो आपणचि होईजे ।। ६.१६० ।। " असे होऊन परत येऊन महेशाच्या रूपाने ह्या सिद्धयोगमार्गाचे, साधकांच्या उद्धारार्थ कापडी बनून " बोलीं अरूपाचे रूप दावीन । अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियाकरवीं ।। ६.३६ ।। " म्हणून वर्णन करीत असल्याची जाणीव ज्ञानेश्वरीत पदोपदी येते. परमपदाच्या गावाचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केलेले वर्णन श्रीगुरुकृपेने प्राप्त झालेल्या अनुभूतीने संपन्न झालेले आहे हे पुढील ओव्यांवरून स्पष्ट दिसते. परमपद हे अमूर्त असल्याने जे साधकयोगीजन त्या पदाशी समरस झाले आहेत त्यांच्या रूपाने ते समूर्त झाले आहे. अशा रीतीने त्यांनी काही काही ठिकाणी वर्णन केले आहे व काही काही ठिकाणी शुद्ध तात्त्विक स्वरूपाने त्या पदाचे वर्णन केले आहे. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात —

**मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनीं । सोऽहंभावाच्या बाह्या पसरूनी ।**
**परमात्मलिंगा धांवोनी । आंगा घडे ।।६.३०५।।**
**तंव महाभूतांचीं जवनिका फिटे । मग दोहींसि होय झटें ।**
**तेथ गगनासकट आटे । समरसों तिये ।।३०६।।**

पैं मेघाचेनि मुखीं निवडला। समुद्र कां वोघीं पडिला।
तो मागुता जैसा आला। आपणपयां ॥३०७॥
तेवीं पिंडाचेनि मिषें। पदीं पद प्रवेशे।
तें एकत्व होय तैसें। पंडुकुमरा ॥३०८॥
आतां दुजें हन होतें। कीं एकचि हें आइतें।
ऐशिये विवंचनेपुरतें। उरेचिना ॥३०९॥
गगनी गगन लया जाये। ऐसें जें कांहीं आहे।
तें अनुभवें जो होये। तो होऊनि ठाके ॥३१०॥
म्हणौनि तेथिंची मातु। न चढेचि बोलाचा हातु।
जेणें संवादाचिया गांवाआंतु। पैठी कीजे ॥३११॥
अर्जुना एऱ्हवीं तरी। इया अभिप्रायाचा जे गर्व धरी।
ते पाहें पां वैखरी। दुरी ठेली ॥३१२॥

ज्यावेळी चित्त म्हणजे चेतन शक्ती कुंडलिनी श्रीगुरुकृपेने जागृत होऊन सुषुम्नेत प्रवेश करते त्यावेळी ईश्वराची अर्थात् स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती साधकाला होऊन तो ब्रह्मरूप कसा होतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

एऱ्हवीं तरी येणें योगें। जें इंद्रिया विंदाण लागे।
तें चित्त भेटों रिगे। आपणपेयां ॥६.३६५॥
परतोनि पाठिमोरें ठाके। आणि आपणियांतें आपण देखे।
देखतखेंवो वोळखे। म्हणे तत्त्व हें मी ॥३६६॥
तिये ओळखीचिसरिसें। सुखाचिया साम्राज्यीं बैसे।
मग आपणपां समरसें। विरोनि जाय ॥३६७॥
जयापरतें आणिक नाहीं। जयातें इंद्रियें नेणतीं कहीं।
तें आपणचि आपुलिया ठायीं। होऊनि ठाके ॥३६८॥

चित्त म्हणजे चेतन शक्ती कुंडालिनी होय; कारण "चितिरेव चेतनपदाद वरूढा चेत्यसंकोचिनी चित्तम् ॥ ५ ॥" असे "प्रत्यभिज्ञाहृदयात" सूत्र आहे. कुंडलिनी चिती शक्ती जेव्हा चेतन पदापासून खाली उतरून चैतन्याचा संकोच करते तेव्हा ती चित्त या नावाने ओळखली जाते. अशी ही शक्ती जागृत झाल्याशिवाय पुन्हा प्रतिप्रसवक्रमाने चित्ताचे चैतन्य होऊ शकत नाही म्हणून ज्यावेळी सिद्धयोग साधनाच्या अवलंबनाने ती जागृत होते त्यावेळी इंद्रियांचा निग्रह आपोआप होतो व शक्तीचे सुषुम्नेत चालन होऊन ती आपल्या सहस्रारातील आत्मस्वरूपाची भेट घेण्यास निघते. जी सहस्रारातून मूलाधारात आलेली असते ती पुन्हा परतून पाठीमागे सहस्रारात जावयास निघते व तेथे ती आपल्या आत्मस्वरूपाला पाहते. त्याचवेळी तिला हे शिवस्वरूप आत्मतत्त्वच मी आहे अशी ओळख पटते. त्या

ओळखीबरोबर ही शक्ती सुखाच्या साम्राज्यावर बसते आणि मग आत्मानंदात किंवा आत्मस्वरूपात ती समरस होऊन लय पावते. असे हे आत्मस्वरूप आहे. यापेक्षा दुसरे अधिक काही नाही. या स्वरूपाला जड इंद्रिये कधीच जाणू शकत नाहीत. अशा स्वरूपाला केवळ एकमात्र चेतन शक्तीच जाणू शकते व ती आपण आपल्या ठिकाणी आपले स्वरूप होऊन राहते. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धासिद्धांतपद्धतीत" श्रीज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणेच परमपद शिवशक्तियुक्त असल्याचे वर्णन केले आहे. ते म्हणतात—

> शिवस्याभ्यंतरे शक्तिः शक्तेरभ्यंतरे शिवः ।
> अंतरं नैव जानीयाच्चंद्रचंद्रिकयोरिव ।।४.२६।।

शिवात शक्ती व शक्तीत शिव सामावलेले असून ते एकरूप झालेले आहेत. ज्याप्रमाणे चंद्र व चांदणे या गोष्टी दोन नसतात त्याप्रमाणेच शिव व शक्तीत अंतर नसते. एकाच अद्वितीय तत्त्वास दृष्टिभेदानुसार शिव किंवा शक्ती ही संज्ञा प्राप्त होते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केल्याप्रमाणे पारमार्थिक सत्ता आत्यंतिक साम्यावस्थास्वरूप आहे. उपनिषदांनीही "परमं साम्यम् ।। मुंड.उप.३.३।।" व "एकमेवाद्वितीयम् ।। छां. उप. २ १ ।।" असे म्हणूनच या पदाचे वर्णन केले आहे. मूळ वस्तूमध्ये नामरूपाची कल्पना करता येत नाही व त्याचे वर्णनही होऊ शकत नाही. "पाहें पां वैखरी दुरी ठेली ।।६. ३१२ ।।" हेच खरे आहे; कारण परमपद हे अवाङ्मनसगोचर आहे. नाम, रूपादि संसारातील सर्व गोष्टींचे हेच मूळ उपादन आहे. यालाच तत्त्व किंवा शिव म्हणतात व ज्ञानाला शक्ती म्हणतात. म्हणून तत्त्वज्ञान हे तत्त्वरूप अर्थात् शिवशक्तिरूप किंवा तत्त्वातीत आहे असे म्हटलं जाते.

परमद अगदी उदासीन आहे. ते तटस्थ, निमित्तमात्र व साक्षीभूत आहे. याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> एऱ्हवीं इयें प्रकृतिविकारीं । एकु मीचि असे अवधारीं ।
> परि उदासीनाचिया परी । करीं ना करवीं ।।९.१२७।।
> जैसा दीपु ठेविला परिवरीं । कवणातें नियमी ना निवारी ।
> आणि कवण कवणिये व्यापारीं । राहाटे तेंहि नेणें ।।१२८।।
> तो जैसा का साक्षीभूतु । गृहव्यापारप्रवृत्तिहेतु ।
> तैसा भूतकर्मीं अनासक्तु । मी भूतीं असें ।।१२९।।
> जे लोकचेष्टां समस्तां । जैसा निमित्तमात्र कां सविता ।
> तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता । हेतु मी जाणें ।।१३१।।

"भूतमहेश्वरं मम परं भावं ।। गी. ९.११।।" असे स्वतः भगवंतांनीच आपल्या स्वरूपाचे वर्णन केले आहे. याचा भावार्थ व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज

म्हणतात, "ज्याप्रमाणे स्वप्नातील अमृताने कोणी अमर होत नाही त्याप्रमाणे जे मला स्थूल दृष्टीने म्हणजे आकाराच्या दृष्टीने पाहतात ते खरोखर मला न पाहणेच आहे प्रपंचात साकार दिसणारा देहधारी परिच्छिन्न असा मी आहे असे जे कृतनिश्चयाने समजतात ते चंद्राच्या ऐवजी त्याचे पाण्यात पडलेले प्रतिबिंब धरण्याकरिता प्रयत्न करणाऱ्यांप्रमाणे फसतात. मी नामरहित, क्रियारहित, देहरहित, निराकार, निरुपाधिक, विधिनिषेधातीत, जातिरहित, गुणातीत, चरणरहित, हस्तरहित, परिणामातीत, अपरिच्छिन्न, सर्वव्यापक, निरिच्छ, नित्यतृप्त, अनावृत, भूषणातीत, सकल कारणांचा कारण, सहज, अनादि नित्य, सदाच नित्यसिद्ध स्वयंभू, निरंतर, एकरूप, अखंडैकरस, निराकारसिद्ध, अद्वैतरूप, अकर्ता, अभोक्ता, अकुल, नित्य, सर्वांतर्यामी, अरिमित्र विवर्जित, निजानंदात निमग्न असणारा, सर्वत्र सम व आत्मरूप आहे. ।। ९.१५६ ते १६८ ।।" परमपद असे असून स्थूल दृष्टीचे लोक नेमके याच्या उलट ते आहे असे समजतात असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे पद अवाङ्मनसगोचर कसे आहे ते स्पष्ट केले आहे. ते म्हणतात–

एथ वेद मुके जाहाले । मन पवन पांगुळले ।
रातीविण मावळले । रविशशी जेथ ।।१०.६४।।
अगा उदरींचा गर्भु जैसा । न देखें आपुलिये मातेची वयसा ।
मी आघवेया देवां तैसा । नेणवे कांहीं ।।६५।।
आणि जळचरां उदधीचें मान । मशका नोलांडवेचि गगन ।
तेवीं महर्षीचें ज्ञान । न देखेचि मातें ।।६६।।
मी कवण पां केतुला । कवणाचा कैं जाहला ।
या निरुती करितां बोला । कल्प गेले ।।६७।।
कां जे महर्षी आणि या देवां । येरां भूतजातां सर्वां ।
मी आदि म्हणौनि पांडवा । अवघड जाणतां ।।६८।।

परमपद जाणण्यास असे कठीण असले तरी ते एकमात्र श्रीगुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताच्या रूपानेच साधकाच्या भेटीस येते. जो इतर सर्व मार्ग सोडून सिद्धयोगमार्गाने जातो त्यालाच ते परमपद सहजतेने कसे प्राप्त होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी ऐकें गा सुवर्म । वाक्य माझें परम ।
जें अक्षरें लेऊनी परब्रह्म । तुज खेंवासि आले ।।१०.६२।।
ऐसाही जरी विपायें । सांडूनि पुढील पाये ।
सर्वेंद्रियांसि होये । पाठिमोरा जो ।।७२।।
प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडूनि मागलीकडे ।
महाभूतांचिया चढे । माथयावरी ।।७३।।

**तेथ राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखें ।**
**अजत्व माझें देखे । आपुलिया डोळा ।।७४।।**
**मी आदींसी परु । सकळलोकमहेश्वरु ।।७५।।**

अशा प्रकारे जेव्हा अक्षर लेऊन परब्रह्म खेवास येते तेव्हा शिष्या " तूं स्वयेंचि ब्रह्म आहेसी " असे सद्‌गुरुंनी वाक्य उच्चारल्याबरोबर शक्तिपात होऊन अनादि अविद्या, तम, मल, विक्षेप, आवरण, दोष, संस्कारादि सर्व गोष्टी जळून जाऊन साधक ब्रह्मरूप होतो. पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश या सुषुम्नांतर्गत चक्रस्थ भूतांना खाऊन टाकून जेव्हा शक्ती सहस्रारात जाते तेव्हा महाभूतांच्या माथ्यावर चढून साधक स्वयंप्रकाश अशा विशुद्ध आत्मप्रकाशाने युक्त होऊन ज्ञानचक्षूने उत्पत्तिरहित असे माझे रूप पाहतो. उपरोक्त पद्धतीने शब्ददीक्षेने जसे परमपद प्रस्फुटित होते त्याप्रमाणेच " आजीं आनंदसरोवरींचीं कमळें । तैसे हे तुझे डोळे । आपुलिया प्रसादाचीं राउळें । जयालागीं करिती ।। ११.६५ ।। " या न्यायाने नुसत्या श्रीगुरूच्या कृपावलोकनानेही या स्थितीची प्राप्ती होते असे श्रीज्ञानेश्वर-महाराज सांगतात.

" उपनिषदें जें गाती । योगियें हृदयीं रिगोनि पाहाती । तयातें सनकादिक-आहाती । पोटाळुनियां ।। ११.८५ ।। ऐसें अगाध जे तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे । तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ।। ८६ ।। " असे म्हणून अर्जुनाने परमपद पाहण्याची इच्छा केली; परंतु जोपर्यंत आत्मशक्ती जागृत होऊन दिव्यचक्षू प्रकटला नव्हता तोपर्यंत अर्जुन ते ऐश्वर्यसंपन्न रूप पाहू शकला नाही. परंतु ज्यावेळी श्रीकृष्णांची अर्जुनावर कृपा झाली त्यावेळी ते परमपद तो पाहू शकला. श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात –

**ऐसी श्रीमुखौनि अक्षरें । निघति ना जंव एकसरें ।**
**तंव अविद्येचे आंधारें । जावोंचि लागे ।।११.१७७।।**
**तीं अक्षरें नव्हतीं देखा । ब्रह्मसाम्राज्यदीपिका ।**
**अर्जुनालागीं चित्कळिका । उजळलिया श्रीकृष्णें ।।१७८।।**
**मग दिव्यचक्षुप्रकाशु प्रगटला । तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला ।**
**ययापरी दाविता जाहला । ऐश्वर्य आपुलें ।।१७९।।**

अशा प्रकारे ईश्वर किंवा परमपद हे साधनानुभवगम्य आहे हे सत्य आहे. हे परमपदच ज्ञेय व परब्रह्म आहे असे सांगून त्याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

**जें नाहीं म्हणों जाईजे । तंव विश्वाकारें देखिजे ।**
**आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया ।।१३.८६९।।**

रूप वर्ण व्यक्ती । नाहीं दृश्य दृष्टा स्थिती ।
तरि कोणें कैसें आथी ! म्हणावें पां ॥८७०॥
आणि साचचि जरी नाहीं । तरि महदादि कोणें ठाईं ।
स्फुरत कैचें काई । तेणेंवीण असे ? ॥८७१॥
म्हणौनि आथी नाथी हे बोली । जें देखोनि मुकी जाहली ।
विचारेंसी मोडली । वाट जेथें ॥८७२॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी परमपदाचे केलेले हे वर्णन " ऋग्वेदातील नासदीय सूक्ताशी " पूर्णपणे जुळणारे आहे. ऋषी म्हणतात—

नासदासीन्नोसदासीत्तदानीं, नासीद्रजोनो व्योमा परायेत् ।
किमावरीवः कुहः कस्य शर्मन्नम्भः. किमासीद्गहनं गंभीरम् ॥८.७.१०.१२९॥
न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अन्ह आसीत्प्रकेतः ।
आनीदवातं स्वधयातदेकं तस्माद्धान्यन्न परः किंचनाऽऽस ॥२॥
तम आसीत्तमसा गूळ्हमग्रेऽप्रकेतमसलिलं सर्वमा इदम् ।
तुच्छयेनाभ्वपिहितं यदासीत्तपसस्तन्महिनाऽ जायतेकम् ॥३॥

सर्वात प्रथम म्हणजे सृष्टी उत्पत्तीच्या पूर्वी अर्थात् प्रलयावस्थेत जगाचे मूल कारण जे असत् ते नव्हते. त्याचप्रमाणे सत् म्हणजे जगाचे आत्मतत्त्व तेही नव्हते. त्या वेळेला कोणतेच लोक नव्हते, अतरिक्षही नव्हते व त्यापलीकडील द्युलोकही नव्हता. अशा स्थितीत कोणत्या आवरक तत्त्वाने भूतजाताला आवरण घातले व ते कुठे होते ? कोणते तत्त्व प्रधान होते ? हे सर्व कोणाच्या सुखासाठी होते ? पाणी होते म्हणावे ? तर काय होते ? सर्वत्र गहन गंभीर होते. त्यावेळी मृत्यूही नव्हता आणि अमृतत्त्वही पण नव्हते. रात्र व दिवस ओळखण्याचे काही चिन्हच नव्हते. ते वायूशिवाय प्राण घेत होते. ते तत्त्व एकटेच आपल्या ऐश्वर्याने व महिम्याने परिपूर्ण होते. त्या ब्रह्माशिवाय व त्याच्यापलीकडे दुसरे असे निराळे काहीच नव्हते. काहीच नव्हते अशा स्थितीत प्रथम तम म्हणजे माया किंवा पराशक्ती प्रकट झाली. सृष्टीच्या पूर्वी म्हणजे प्रलयावस्थेत हे भूतभौतिक जग सगळे त्या चित्शक्तीत गुरफटून गेले होते. तेथे भेदाभेद समजण्याला काहीच साधन नव्हते. हे सर्व दृश्यमान जग त्यावेळी मूळ कारणापासून अविभक्त होते आणि सर्व बाजूंनी ते अज्ञानरूपी मायाशक्तीने गुरफटलेले होते. त्यावेळी जे काय होते ते एकच एक असून पुढे तपाच्या योगाने त्यापासूनच ही सृष्टी निर्माण झाली.

अशा प्रकारे ईश्वराचे किंवा परब्रह्माचे स्वरूप शिवशक्तियुक्त असल्याचे वेदोपनिषदांनी प्रकट केलेले असल्यामुळे भगवद्गीतेत ते तसेच अवतरले व श्रीज्ञानेश्वर-महाराजांच्या सर्वंकष जाणिवेने ते तत्स्वरूपयुक्त म्हणूनच ग्राह्य केल्याचे त्यांच्या सर्व वाङ्मयात दृष्टीस पडते. " सार्धं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः । ज्ञातुं न शक्यते

लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ॥ २ ॥" हे "अमृतानुभवाच्या" सुरवातीचे नमन परब्रह्म वस्तूच्या स्वरूपाचेच द्योतक आहे. "आघवांचि देशीं काळीं। नव्हतां देशकाळां-वेगळी। जे क्रिया स्थूळास्थूळीं। तेचि हात जयाचे ॥ १३.८७४ ॥" असे जेव्हा ते म्हणतात, त्यावेळी सत्तास्फूर्तिरूपाने युक्त असलेले ज्ञेयच सामान्यरूपाने सर्व जगात व्याप्त असते व सर्व देशात, सर्व काली, स्थूल व सूक्ष्म वस्तूंपासून जी क्रिया होते ती त्याच्याच सत्तेने होते. असे हे ईश्वराचे शिवशक्त्यात्मक स्वरूप असल्याने त्याला विश्वांघ्री, विश्वतश्चक्षू, विश्वमूर्धा, विश्वतोमुख व सर्वत्र ऐकणारे असे म्हणतात. वास्तविक ब्रह्म हे सर्व शून्यपणाचा शेवट व निषेधावधीभूत आहे. ते एकमेवाद्वितीय असून सर्वत्र घनदाट भरलेले आहे. ॥ १३.८७४ ते ८८७ ॥ परब्रह्माच्या शिवशक्तियुक्त स्वरूपाचे अप्रतिम व अलौकिक वर्णन पुढील ओव्यातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी करून सर्व वेदोपनिषदादि तत्त्वज्ञानाचे व स्वरूपप्राप्तीच्या सिद्धयोगमार्गाचे सार प्रकट केले आहे. ते म्हणतात—

**तरीं तें गा किरीटी ऐसें। अवकाशीं आकाश जैसें।**
**पटीं पटु होऊनि असे। तंतु जवीं ॥१३.८९२॥**
**उदक होऊनि उदकीं। रसु जैसा अवलोकीं।**
**दीपपणें दीपकीं। तेज जैसें ॥८९३॥**
**कर्पूरत्वें कापुरी। सौरभ्य असे जयापरी।**
**शरीर होऊनि शरीरीं। कर्म जेवीं ॥८९४॥**
**किंबहुना पांडवा। सोनेंचि सोनयाचा रवा।**
**तैसें जे या सर्वा। सर्वांगीं असें ॥८९५॥**

"अहिर्बुध्न्यसंहितेत" या दृष्टीनेच असे वर्णन केले आहे की, "आत्मभूता हि या शक्तिः परस्य ब्रह्मणो हरेः ॥ ५.४ ॥" हा परमात्मा आपल्या शक्तीने सर्वत्र स्वतंत्रपणे लीलायमान आहे. परमात्म्याच्या अनेकविध गुणांना भिन्न नावे प्राप्त आहेत. त्याच्या स्वयं स्वसंवेद्य धर्मातच ह्या सकल गुणशक्ती कर्तृत्ववान् होतात. सत्, चित्, आनंद, ज्ञान, इच्छा, क्रिया, भूत इत्यादि जो जो म्हणून शक्तीचा विलास आपल्या दृष्टीस पडतो तो तो त्याचाच लीलामय भाग आहे. ही लीला परमात्मा गुणांच्या म्हणजे शक्तीच्या आश्रयाने कशी करतो व मूळची गुणातीत अवस्था साधकाला शक्तिजागृतीच्या बोधाने कशी प्राप्त होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**आणि गुणीं गुणाजोगें। चैतन्य नोहे सागें।**
**बोलिलों तें खागें। तेंवींचि हें ॥१४.२८७॥**
**तरी पार्था जें ऐसें। बोधलेनि जीवें दिसें।**
**स्वप्न कां जैसें। चेइलेनी ॥२८८॥**

नातरी आपण जळीं । बिंबलीं तीरोनी न्याहळी ।
चळण होतां कल्लोळी । अनेकधा ।।२८९।।
कां नटलेनि लाघवें । नटु जैसा न झकवे ।
तैसे गुणजात देखावें । न होनियां ।।२९०।।
पैं ऋतुत्रय आकाशें । धरूनियांहि जैसें ।
नेदिजेचि यंवों वोसें । वेगळेपणा ।।२९१।।
तैसें गुणी गुणापरौतें । जें आपणपें असे आयितें ।
तिये अहं बैसे अहंते । मूळकेचियें ।।२९२।।
पैं तेथूनि मग पाहतां । म्हणे साक्षी मी अकर्ता ।
हे गुणचि क्रियाजाता । नियोजित ।।२९३।।
सत्त्वरजतमांचा । भेदीं पसरु कर्माचा ।
होत असे तो गुणांचा । विकारु हा ।।२९४।।
ययामाजीं मी ऐसा । वनीं कां वसंतु जैसा ।
वनलक्ष्मीविलासा । हेतुभूत ।।२९५।।
कां तारांगणी लोपावें । सूर्यकांतीं उद्दीपावें ।
कमळीं विकासावें । जावें तमें ।।२९६।।
ये कोणाचीं काजें कहीं । सवितिया जैसी नाहीं ।
तैसा अकर्ता मी देहीं । सत्तारूप ।।२९७।।
मी दाऊनि गुण देखे । गुणता हे मियां पोखे ।
ययाचेनि निःशेखें । उरे तें मी ।।२८९।।
ऐसेनि विवेकें जया । उदो होय धनंजया ।
ये गुणातीतत्त्व तया । अर्थपंथें ।।२९९।।

परमात्म्याच्या गुणातीत अवस्थेच्या प्राप्तीसाठी शक्तिजागृतीने गुणगुणीभेदाची प्रक्रिया घडून येऊन विवेक जागृती होणे अत्यंत आवश्यक आहे. ते अर्थपंथाने म्हणजे सिद्धयोगानेच घडते. अर्थपंथ म्हणजे सिद्धयोग होय हे पुढे पाचव्या प्रकरणात स्पष्ट केले आहे. ज्या अनादि स्फूर्तिशक्तीने गुणाभास उत्पन्न केला; तिचा सुषुम्नेत प्रवेश झाला की गुणगुणीभेदाची सिद्धी होते. अन्यथा हा नीरक्षिरविवेक करोडो उपयांनीही सिद्ध होत नाही.

सारांश, अशा प्रकारे नाना रीतीने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ईश्वराची किंवा अनादिसिद्धरूपाची सिद्धी सिद्धयोगाच्या द्वारा कशी होते, त्याचे स्वरूप काय, लक्षणें कोणती इत्यादि शब्दभेदाने पुनःपुन्हा वर्णन करून सांगितले आहे. त्यांच्याच शब्दात हे सर्व साररूपाने सांगावयाचे झाल्यास असे सांगता येईल की—

अगा ब्रह्म या नांवा । अभिप्रायो मी पांडवा ।
मीचि बोलिजे आघवा । शब्दीं इहीं ॥१४.४०४॥
पै मंडळ आणि चंद्रमा । दोन्ही नव्हती सुवर्मा ।
तैसा मज आणि ब्रह्मा । भेदु नाहीं ॥४०५॥
अगा नित्य जें निष्कंप । अनावृत धर्मरूप ।
सुख जें उपम । अद्वितीय ॥४०६॥
विवेकु आपलें काम । सारूनि ठाकी जें धाम ।
निष्कर्षाचें नि:सीम । किंबहुना मी ॥४०६॥
जयाचे आकारावीण असणें । जया जन्म ना निमणें ।
जें आघवेंचि आघवेंपणें । देखत असे ॥८.८६॥
जें गगनाहूनि जुनें । परमाणुहूनि सानें ।
जयाचेनि सन्निधानें । विश्व चळे ॥८७॥
जें सर्वांतें ययां विये । विश्व सर्व जेणें जिये ।
हेतु जया बिहे । अचिंत्य जें ॥८८॥

## पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे रहस्य :-

" तेवीं पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशे । तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ॥ ६.३०८ ॥ " हे पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे रहस्य श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सर्व ज्ञानेश्वरीत नानाविध शब्दांच्या अवगुंठनात गुंफून मांडले आहे. श्रीगुरुकृपेने पिंड म्हणजे कुंडलिनी शक्ती उद्‌बोधित होऊन विकासोन्मुख क्रमाने आपले पदस्वरूप म्हणजे शिवस्वरूप हळूहळू धारण करीत करीत जेव्हा पूर्णतया शिवरूप होते, तेव्हा जे एकत्व होते, त्यावेळी प्रतिप्रसवक्रम किंवा संहारणी पूर्ण होते व जीव शिवरूप होऊन पिंडाबरोबर ब्रह्मांडाचाही लय होतो. महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांतपद्धतीत " हा विषय पंचमोपदेशात मांडताना सुरवातीलाच असे म्हटले आहे की, " अथ पिंडपदयो: समरसकरणं कथ्यते— महासिद्धयोगिभि: पूर्वोक्तक्रमेण परपिंडादिस्वपिंडांतं ज्ञात्वा परमपदे समरसं कुर्यात् ॥ ५.१ ॥ " आता पिंडाचे म्हणजे कुंडलिनी शक्तीचे व पदाचे म्हणजे शिवाचे समरसीकरण कसे होते हे सांगतो. महायोगी साधकांनी पूर्वी सांगितलेल्या क्रमाने शक्तीच्या द्वारा मूलाधारापासून आज्ञाचक्रापर्यंतची पिंडाची म्हणजे कुंडलिनी शक्तीची व आज्ञाचक्रापासून सहस्रारापर्यंत परमपिंडाची म्हणजे महाशक्तीची गती आहे असे जाणून या दोन्ही शक्तींचे समरसीकरण परमदात करावे. अशी सुरवात करून ते पुढ म्हणतात, " तस्माद्‌गुरुकटाक्षपातात् स्वसंवेद्यतया च महासिद्धयोगिभि: स्वकीयं पिंडं निरुत्थानानुभवेन समरसं क्रियते इति सिद्धांत: ॥ ५.७ ॥ " श्रीगुरू आपली करुणादृष्टी टाकून जेव्हा शक्तिपात करतात

तेव्हा आत्मशक्ती जागृत होऊन स्वसंवेद्य पद जाणले जाते. अशा प्रकारे महासिद्ध योगीसाधक मूलाधारस्थ शक्तिजागृतीच्या अनुभवाने आपली आत्मशक्ती क्रमशः विकसित करीत तिचें महाशक्तीत रूपांतर करतात व शिवस्वरूप होतात. समरसीकरण करणे हा सिद्धांचा सिद्धांत आहे. हा एकच एक सिद्धांत आपल्या परम लालित्यपूर्ण भाषशैलीने विभूषित करून त्याच्या सर्व अंगोपांगांसह, कक्षाउपकक्षांसह, पैलूंसह व त्यातील सर्व सूक्ष्म खाचाखोचांसह श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केलेला पाहिला म्हणजे त्यांच्या अलौकिक प्रातिभज्ञानाने सकलशास्त्रांचे मंथन केल्याप्रमाणे सिद्धयोगाचे सारामृत त्यांनी सहजतेने सर्वांना उपलब्ध करून देऊन मार्गस्थ केले आहे हे लक्षात येते.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अमृतानुभवात" या संहारणीचे रहस्य प्रकट करताना असे म्हटले आहे की–

**समग्र दीप्ति घेतां । जेंवि दीपुचि ये हातां ।**
**तेंवि जे निर्धारितां । शिवुचि लाभे ॥१.२३॥**

या ओवीवरील श्रीनिरंजन रघुनाथांची टीका पाहिली की अर्थासह सहारणीचे रहस्य ध्यानात येईल. ते म्हणतात, "संपूर्ण दीप्ती, प्रभा घेतली असता जेंवि दीपचि हातास येतो, तेंवि प्रकृति-माया अदि करून संपूर्ण जगद्रूपे चिच्छक्तिच प्रकाशित झाली आहे, ऐसें निर्धारिलें असतां शिव परमात्मा जो त्याचा लाभ होतो, कारण जे शक्तिही शिवचि झाला आहे म्हणून." चित्‌शक्तीचा प्रकाशच म्हणजे जागरणच संहारणीसाठी म्हणजे स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीसाठी अगर पूर्णत्वाच्या लाभासाठी आवश्यक आहे; कारण त्याशिवाय व्यक्ताव्यक्त, गुणागुण, जडाजड, भूताभूत, क्षेत्रक्षत्रज्ञ द्वैताद्वैत, प्रकृतिपुरुष, नामानाम, आत्मानात्म, शब्दाशब्द, कर्माकर्म, ज्ञानाज्ञान, बीजावीज, जीवचैतन्य इत्यादि नानाविध नावांनी प्रसिद्ध असलेली जडचेतन म्हणजे शरीर व चैतन्यरूपी आत्मा एकरूप झाल्याची जी प्रक्रिया भासमान होत असते ती दूर होत नाही. शक्ती जागृत झाली की उभारणीच्या वेळी तिने आपल्याच संकोचाने एकरूप केलेले जडचेतन वेगळे होतात व ती सर्व जडत्व गिळून टाकून पुन्हा चैतन्यरूप होते. देह व चैतन्यरूपी आत्मा किंवा संवित् जरी स्वरूपतः भिन्न असले तरी अनादि कालापासून जन्मजन्मांतरी 'मी देहच आहे' असा अध्यास दृढ झाल्यामुळे त्यांची भिन्नरूपाने जीवाला प्रतीती होत नाही. जीवाने उराशी बाळगलेल्या कल्पनेचा किंवा हृचा संकल्पाचा त्याचा अभ्यास किती जन्मापासून आहे हे सांगता येणे शक्य नाही. परंतु अनंत जन्मापासून चैतन्याच्या बरोबर जे देहतादातम किंवा एकताभिनिवेश झालेला आहे; तो दूर व्हावा, तुटावा व संहारणी घडून यावी; म्हणूनच सर्व शास्त्रे, मार्ग, पंथ, उपासना, अनुग्रह, दीक्षादि सर्व व्यापार उद्‌भूत व प्रवृत्त झाला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

शब्दतत्त्वसारज्ञा । पैं देखणे तेंचि प्रज्ञा ।
जे क्षेत्र क्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥१३.११२९॥
इया दोहींचें अंतर । देखावया चतुर ।
ज्ञानियांचे द्वार । आराधिती ॥११३०॥
याचिलागीं सुमती । जोडिती शांतिसंपत्ती ।
शास्त्रांचीं दुभतीं । पोसिती घरीं ॥११३१॥
योगाचिया आकाशा । वळघिजे एवढाचि धिंवसा ।
याचियाचि आशा । पुरुषासि गा ॥११३२॥
शरीरादि समस्त । मानिताति तृणवत ।
जीवें संतांचे होत । वाहणधरु ॥११३३॥
ऐसैसियापरी । ज्ञानाचिया भरोवरी ।
करूनियां अंतरीं । निरुतें होती ॥११३४॥
मग क्षेत्रक्षेत्रज्ञांचे । जें अंतर देखती साचें ।
ज्ञानें उन्मेख तयांचें । ओवाळूं आम्ही ॥११३५॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त ओव्यातून क्षेत्रक्षेत्रज्ञ, जडचेतन किंवा आत्मानात्मभेदप्रक्रियेचे महत्त्व अगदी स्पष्ट शब्दात सांगितले आहे. परंतु ही भेदप्रक्रिया कशी घडून येते, हा अध्यास, कल्पना, भ्रम, भास किंवा संकल्प कसा दूर होतो व जीव आपल्या मूळ आत्मस्वरूपी कसा पोहोचतो हा खरा प्रश्न आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. सिद्धयोगाच्या एकमात्र उपायनेच हा प्रश्न सहजी सुटू शकतो; कारण—

तें परमतत्त्व पार्था । होती ते सर्वथा ।
जे आत्मनात्मव्यवस्था । राजहंसु ॥१३.११४३॥
निगिजे पूर्वीलिया मोहरा । कीं येइजें पश्चिमेचिया घरा ।
निश्चळपणें धनुर्धरा । चालणें एथिचें ॥६.१५९॥

दूध व पाणी निराळे करणाऱ्या राजहंसाप्रमाणे चैतन्यरूप आत्मा व जड प्रकृती यांचा श्रीगुरुकृपेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीच्या आधाराने भेद करून साधकयोगी परमतत्त्व ब्रह्म स्वतःच होतात. यासाठी पूर्वेकडे म्हणजे प्रवृत्तीकडे किंवा बहिर्मुखवृत्तीकडे असणारी जीवाची किंवा प्राणशक्तीची गती पश्चिमेकडे म्हणजे निवृत्तीकडे किंवा अंतर्मुखवृत्तीकडे येणे आवश्यक असते. ज्याप्रमाणे द्विमुखी सर्पाला एक अंतर्मुख व एक बहिर्मुख असते त्याप्रमाणे कुंडलिनी शक्तीला दोन मुखे आहेत असे शास्त्रकारांनी सांगितले आहे. "द्विवक्त्रा कुंडलिन्यभिधा नित्यानंदस्वरूपा परमा कला प्रकृति वर्तते ।" कुंडलिनी नावाची नित्यानंदस्वरूपाची परम प्रकृती असून तिला दोन तोंडे आहेत. ही दोन मुखांची व साडेतीन वलयांच्या आकाराची

कुंडलिनी शक्ती पश्चिमेच्या मुखाकडून सुषुम्नारंध्राला म्हणजे ब्रह्मद्वाराला किंवा ब्रह्मविवराला अडवून झोपलेली असते. "तैशी ते कुंडलिनी । मोटकी औट वळणी । अधोमुख सर्पिणी । निदेली असे ॥६.२२३॥" असेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तिचे प्रसुप्त स्वरूप वर्णिले आहे. मात्र पूर्वमुखाच्याद्वारे ही शक्ती मनुष्य शरीरात श्वास-प्रश्वासाचे कार्य करीत असते. जीवाच्या जागृतीचे हे महत्त्वाचे चिन्ह आहे. श्वास-निश्वासाच्याद्वारे मनुष्याच्या बाह्य जागृतीचे कार्य ती सतत करीत असते. या पूर्वमुखाने ही शक्ती कायम जागृत असल्याने जीवाला बाह्य ज्ञान किंवा चेतना अगदी उत्तम तऱ्हेने होते. या बाह्य जागृतीमुळेच जीवाला द्वैताची म्हणजे भिन्नतेची जाणीव किंवा बोध होतो; मात्र ऐक्यतेचा, अद्वैताचा म्हणजे स्वस्वरूपाचा बोध कधीही होत नाही. या शक्तीचे अंतर्मुख किंवा पश्चिममुख नेहमीच सुप्त किंवा बद्ध असल्यामुळे जीवाला आपल्या स्वसंवेद्य आत्मस्वरूपाचे ज्ञान म्हणजेच आत्मज्ञान किंवा ब्रह्मज्ञान होत नाही. त्याचा जन्मजन्मांतरी निरंतर अभावच राहतो. "हठयोगप्रदीपिकेत" याचे कारण सांगताना असे म्हटले आहे की, "येन मार्गेण गंतव्यं ब्रह्मस्थानं निरामयम्। मुखेनाच्छाद्य तद्द्वारं प्रसुप्ता परमेश्वरी ॥३.१०६॥" सुषुम्णा मार्गाचा म्हणजे पश्चिम मार्गाचा अवलंब करूनच साधक सहस्रारातील निरामय ब्रह्मस्थानी पोहोचू शकतो. जोपर्यंत हे ब्रह्मद्वार उघडत नाही तोपर्यंत साधक ब्रह्म किंवा आत्मसाक्षात्काराच्या प्राप्तीपासून वंचित राहतो. हे ब्रह्मद्वार न उघडण्याचे खरे कारण असे आहे की, या ब्रह्मप्राप्तीच्या द्वाराला अडवून किंवा झाकूनच ही कुंडलिनी शक्ती झोपलेली असते. ही सुप्तशक्ती श्रीसद्गुरुकृपेने जोपर्यंत जागृत होत नाही व ती सुषुम्नेमध्ये प्रवेश करीत नाही तोपर्यंत जडचेतनभेदप्रक्रिया, व्यक्ताव्यक्तभेदप्रक्रिया किंवा आत्मानात्मभेदप्रक्रिया घडून येऊन देहात्मध्यास दूर होऊन मोक्षप्राप्ती होऊ शकत नाही. या अर्थानेच "योगशिखोपनिषदात" असे म्हटले आहे की, " नाक्तं मोक्षमार्गं स्यात् प्रसिद्धं पश्चिम विना ॥ १.१४५ ॥" पश्चिम-मार्ग म्हणजे पाठीतील सुषुम्नामार्ग मोकळा झाल्याशिवाय मोक्षमार्गात साधकाची कधीही गती होत नाही. महायोगी गोरक्षनाथांनी " योगबीजात" या दृष्टीनेच असे स्पष्ट सांगितले आहे की–

> **ततः पुण्यवशात्सिद्धिर्गुरुणा सह संगतिः ।**
> **पश्चिमद्वारमार्गेण जायते त्वरितं फलम् ॥१५७॥**

पूर्वजन्माच्या पुण्याईने सद्गुरूंची संगती प्राप्त होते. त्यांच्याकडून सिद्धयोग-मार्गातील शक्तिपातयोगाची दीक्षा मिळून पश्चिमद्वार किंवा सुषुम्नाद्वार शक्ती जागृत झाल्यामुळे मोकळे होते व शक्तीच्या ऊर्ध्व चालनामुळे साधकाला त्वरित मोक्ष-सिद्धीचे फल प्राप्त होते. शरीरातील पुढील भागातील गुह्यस्थान, बेंबी, हृदय, कंठ व नाकाच्याद्वारा जो प्राणप्रवाह वाहत असतो त्याला पूर्वपथ म्हणतात आणि मूला-

धारापासून सहस्रारापर्यंत जो विस्तीर्ण सुषुम्नापथ आहे त्यालाच पश्चिमपथ ही संज्ञा असून तो चिद्‌वस्तूने म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तीनेच सिद्ध होतो. पूर्वपथाची प्राणगती वहिर्मुख असल्याने या मुखातून होणाऱ्या श्वासप्रश्वासाच्या क्रियेमुळे जीवाची वृत्तीही सतत बहिर्मुख राहते. अंतर्मुखी गती मूलाधारात कपाटातील वस्तुप्रमाणे वंद आहे. हे वंद कपाट उघडणे, ब्रह्मद्वार मोकळे करणे व गुरुशक्तीच्या प्रभावाने प्राणशक्ती सुषुम्नेतून ऊर्ध्वमुखाने प्रवाहित होणे यालाच कुंडलिनी शक्तीची जागृती म्हणतात व हाच वर वर्णन केलेल्या जडचेतनादि नानाविध नावांच्या परंतु तत्त्वत: एकच असलेल्या प्रक्रियांच्या भेदाचा पाया आहे. याशिवाय दुसरा मार्ग नाही.

"अद्वयतारकोपनिषदातही" पूर्वमार्गाचे पूर्वतारक किंवा मूर्तितारक व पश्चिममार्गाचे अमनस्क किंवा अमूर्तितारक म्हणून वर्णन केले आहे. यादृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ओवीकडे पाहिले तर "निगिजे पूर्वीलिया मोहरा" याचा अर्थ असा होतो की, मूलाधारातील कुंडलिनी शक्ती मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत व विशुद्ध चक्रे ओलांडून आज्ञाचक्रापर्यंत येते तेव्हा या नेत्रेंद्रिय सीमांतापाशी तिचा पूर्वमार्ग संपतो. मात्र येथपर्यंत साधन इंद्रियपर्यवसायीच असते; कारण तोपर्यंत इंद्रियांचा संबंध तुटत नाही असे "यदिंद्रियात् तन्मूर्तिमत्" म्हणून "अद्वयतारकोपनिषदात" स्पष्ट केले आहे. या पूर्वेच्या मोहऱ्यावरून म्हणजे भिवयां-मधील आज्ञाचक्रातून निघून "येइजे पश्चिमेचिया घरा" हे घडणे आवश्यक आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. आज्ञाचक्र हा मोहरा आहे. या मोहऱ्यावरून साधक पुढे गेला की त्याची "यद्‌भ्रूयुगातीतं तदमूर्तिमत्" अशी भिवयांपलीकडील पश्चिममार्गाची साधनाची गती सुरू होते असे "अद्वयतारकोपनिषदात" म्हटले आहे. ही गती सुरू झाली, की, इंद्रियांचा संबंध सुटून जातो. जोपर्यंत साधकाचे प्राण आज्ञाचक्र ओलांडून जात नाहीत तोपर्यंत त्याची इंद्रिये एक प्रकारे बहिर्मुखच असतात; कारण ती वाह्य विषयांचे ग्रहण करू शकतात; परंतु जेव्हा प्राण आज्ञाचक्राच्या वर जातात तेव्हा इंद्रियांचा संबंध तुटल्याने अंतर्गती सुरू होऊन विषयांचे ग्रहण बंद होते. "मग तेथ आपण। एकाग्र अंत:करण। करूनि सद्‌गुरुस्मरण। अनुभविजे ॥६.१८६॥" येथपासून "मग जालंधर सांडी। ककारांत फोडी। गगनाचिये पहाडीं। पैठी होय ॥६.३०२॥' येथपर्यंत साधकाचा सुषुम्नेतील पूर्वमार्गाचा प्रवास वर्णन करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढे "जें आकाराचा प्रांतु। जें मोक्षाचा एकांतु। जेथ आदि आणि अंतु। विरोनी गेले ॥ ६.३२२ ॥" येथपर्यंत पश्चिममार्गाचा प्रवास वर्णन केला आहे. हा पश्चिममार्ग आक्रमित असताना त्रिकूट, श्रीहाट, गोल्हाट, औटपीठ, भ्रमरगुंफा या चक्रांना ओलांडून साधक ब्रह्मरंध्रात जातो. या स्थानांचेच वर्णन बिंदू, अर्धेंदू किंवा अर्धचंद्रिका, निरोधिका, नाद, महानाद अथवा नादांत, शक्ती,

व्यापिका, समनी व उन्मनी या नावांनीही शास्त्रकारांनी केले आहे. प्रश्न पृथक्करणाचा आहे. त्यामुळे नावे बदलली एवढेच. त्याचे संकलीकरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे केले आहे ते पाहू व त्याचे विशदीकरण करू.

साधक श्रीसद्गुरुस्मरण करून साधनाला बसला की शक्ती जागृत होऊन साधन आपोआप होऊ लागते. विषयांचा विसर पडू लागून इंद्रियांची कसमस मोडते. मनाची हृदयात घडी होते व प्राणांची ऊर्ध्व गती 'पवनाते पवन धरी' अशी होऊ लागते. मग मूळबंध होतो व अपनवायू आतल्या बाजूने म्हणजे सुषुम्नेच्या मार्गाने वर जाऊ लागतो. त्यावेळी शक्ती दंडरूप धारण करते व जालंधरबंध लागतो. मन, क्षुधा, निद्रा व कल्पना हरपून जातात व शरीराची आटणी होते. नाड्या मोकळ्या होऊन गात्रे ढिली होतात. इडा व पिंगला एकवटून ब्रह्म, रुद्र व विष्णुग्रंथींचे पदर सुटून सहा चक्रांचे पदर फुटतात. ही समान वायूची क्रिया आहे. येथपर्यंत पूर्वमार्ग समाप्त होतो. येथून पुढे उदान वायूची क्रिया सुरू होते. त्यावेळी ॐकारही मागे पडतो व व्यानवायूच्या क्रियेने शेवटी साधक ब्रह्मरंध्रात स्थिर होतो त्यावेळी "तंव महाभूतांची जवनिका फिटे। मग दोहींसि होय झटें। तेथ गगनासकट आटे। समरसीं तिये ॥६.३०६॥" अशी संहारणी पूर्ण होऊन साधक शिवस्वरूप होतो. म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक मधील "शक्ति का जागरण" या लेखात याबद्दल असे म्हटले आहे की, "कुंडलिनी प्रवुद्ध होनेपर चित्-शक्ति स्वयं निज संविद्रूपमें आत्मप्रकाश करती है। शक्ति जागरणके मूलमें प्राण और अपान शक्तियोंका साम्य स्थापन होता है, यह जानना चाहिये। प्राण और अपान इन दो शब्दोंके द्वारा यावत् विरुद्ध शक्तियोंका संग्रह समझना चाहिये। विरुद्ध शक्तियोंमें साम्य होना, यही समानवायुकी क्रियाका फल है। षट्चक्रभेदके वाद भ्रूमध्यके निम्नदेशसे यावत् विकल्प तिरोहित होने लगते हैं। उस समय कुंडलिनी शक्ति कुंडलभावको त्यागकर दंडरूप धारण करती है और अंतमे महाबिंदुमें परम-शिवके साथ सामरस्य-लाभ करती है। इस मिलनसे जो अमृतधाराका क्षरण होता है, उस सुशीतल धारामें मन और प्राण अभिषिक्त हो जाते हैं और ऊर्ध्वमुख होकर उस धाराका पान करने लगते हैं। समान वायुकी क्रियाके वाद उदान-वायुकी क्रियामें कुंडलिनीकी ऊर्ध्व-गति निष्पन्न होती है। यह ऊर्ध्व-गति वस्तुतः सहस्रारमें परिसमाप्त न होकर ब्रह्मरंध्रपर्यंत अग्रसर होती है। उसके वाद और ऊर्ध्वगति नहीं रहती। उस समय व्यान-शक्तिके प्रभावसे अपनी खंडसत्ता अनंत व्यापक रूप धारण करती है। संक्षेपमें यही आत्मा का नित्यस्वरूपमें लौट आनेका इतिहास है।"

"तेवीं पिंडाचेनी मिषे। पदीं पद प्रवेशे ॥ ६.३०८ ॥" हे संहारणीचे कार्य "निगिजे पूर्वीलिया मोहरा। कीं येइजे पश्चिमेचिया घरा ॥६. १५९॥"

यामळे कसे घडून येते हे आपण पाहिले. पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे रहस्य उलगड-ताना आणखी एक विशेष गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, मूलाधारापासून आज्ञा-चक्रापर्यंतच्या भागाला पिंड व आज्ञाचक्रापासून ब्रह्मरंध्रापर्यंतच्या भागाला ब्रह्मांड म्हणतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पूर्वमार्गाने पिंडाची संहारणी कशी होते हे सांग-ताना असे म्हटले आहे की—

**अर्जुना एऱ्हवीं तरी । इया अभिप्रायाचा जे गर्व धरी ।**
**ते पाहें पां वैखरी । दुरी ठेली ।।६.३१२।।**
**भ्रूलता मागिलीकडे । तेथ मकाराचेंचि आंग न मांडे ।**
**सडेया प्राणा सांकडें । गगना येतां ।।३१३।।**

मूलाधारापासून शक्ती ऊर्ध्वगतीने वर येऊ लागली की वैखरी वाणी आपो-आपच लोप पावते; कारण वैखरीचे मूलाधार हेच स्थान आहे. भ्रूलतासीमांतापर्यंतच ॐ कारातील 'म' या तिसऱ्या मात्रेचे स्थान आहे. या मकाराचा भेद करून पुढे जाणे हे प्राणशक्ती कुंडलिनीला कठीण जाते. आज्ञाचक्रमाचा भेद करून प्राण गगनाकाशात गेले की, शुद्ध ज्ञानाचा उदय होत असल्याने प्राणाला साकडे पडते हे खरे आहे. हीच क्रिया "ते ॐ काराचिये पाठी । पाय देत उठाउठी । पश्यंतिचिये पाउटी । मागां घाली ।।६.३०३।।" या ओवीतून त्यांनी व्यक्त केली आहे. अ, उ व म या ॐकाराच्या तीन मात्रा वैखरी, मध्यमा व पश्यंती वाणीच्या द्योतक आहेत. शक्ती जागृत होऊन पूर्वमार्गाने वर येऊ लागली की, पिंडाची संहारणी होऊन वरील तिन्ही वाणी ती आपल्यात समाविष्ट करते. अशा प्रकारे ॐकाराच्या 'अ' व 'उ' या मात्रांवर पाय देत देत शक्ती जेव्हा 'म' काराच्या म्हणजे पश्यंतीच्या पायरीवरून पुढे जाते तेव्हा ब्रह्मांडाच्या संहारणीला सुरवात होते. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**पुढें तन्मात्रा अर्धवेरी । आकाशाच्या अंतरीं ।**
**भरती गमे सागरीं । सरिता जैवीं ।।६.३०४।।**
**पाठीं तेथेंचि तो भेसळला । तैं शब्दाचा दिवो मावळला ।**
**मग तयाहि वरी आटु भाविन्नला । आकाशाचा ।।३१४।।**

शक्तीचे चालन आज्ञाचक्राच्या पुढे झाले की ॐकाराची फक्त अर्धी मात्रा राहते. ही मात्राही सूक्ष्म होत होत शेवटी साधक अमात्रक स्थितीपर्यंत जातो. हेच त्याचे "महोदधी का गांग । रिगाले जैसे ।।१८.१३१९।।" या रीतीने गंगानदी सागराला मिळते त्याप्रमाणे मस्तकातील आकाशाच्या अंतरात, ब्रह्मरंध्रात किंवा सहस्रारात विलीन होणे असते. या ठिकाणी प्राणशक्ती शिवाशी पूर्ण एकाकार होऊन उभारणीच्या वेळी शब्दरूपाने स्फोटित झालेली तिची स्थिती "शब्दाचा दिवो मावळला ।।६.३१४।।" अशी होऊन ती एकाकार होते. इतकेच नव्हे तर आकाश तत्त्वाचीही आटणी होते. ही खरी उन्मनी अवस्था होय. या अवस्थेत मन,

मात्रा, काल, देश, अवस्था, देवता, प्रपंच वगैरे काही काही नाही. हीच एकमात्र शुद्ध चैतन्यावस्था आहे. हेच साधकाचे परम–लक्ष्य आहे. त्याचे वर्णनच करता येत नाही, म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**म्हणोनि आखरामाजीं सांपडे । कीं कानवरी जोडे ।**

**हें तैसें नव्हे फुडें । त्रिशुद्धी गा ।।६.३१६।।**

याच रीतीने पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे वर्णन म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड दोन, मधील "विहंगम-योग और महापथ" या लेखात पुढीलप्रमाणे केले आहे. ते म्हणतात, "मूलाधारमें कुंडलिनी शक्ति सुप्त सर्प के तुल्य स्वयंभूलिंगको वेष्टित कर विद्यमान रहती हैं। यदि कुंडलिनीको भली–भाँति जाग्रत् न किया जा सके, तो आध्यात्मिक साधनाका ठीक-ठीक सूत्रपातही नहीं होता। कुंडलिनीके उद्‌बुद्ध होनेके बाद देहस्थ सब चक्रोंका भेदन आवश्यक होता हैं। चक्रभेद करनेका उद्देश्य है पिंड और ब्रह्मांडके संधिस्थानमें पहुँचना। जीव देहात्मबोधसे आवृत होकर अपनेको भूल गया है एवं इडा और पिंगला मार्गमें श्वास–प्रश्वास के साथ निरंतर संचार कर रहा हैं। कुंडलिनीके उद्‌बुद्ध हुए बिना जीवकी यह आत्मविस्मृति हट नहीं सकती।.... पिंड और ब्रह्मांडके संधिस्थानपर्यंत पूर्व दिशाका पथ विस्तृत हैं। उक्त संधिका भेद होनेके साथ–साथ ज्ञानका प्रकाश होता हैं और ब्रह्मांडमें प्रवेश हो जाता है। षट्‌चक्रके भेदनेके साथ–ही–साथ सामनेके मार्गकी यात्रा समाप्त हो जाती है। फलत: योगीका तृतीय नेत्र खुलनेतकही पूर्वमार्गकी साधना जाननी चाहिए।

ब्रह्मांडमें प्रविष्ट होकर महाशून्यपर्यंत गति पश्चिममार्गका अवलंबन करके होती हैं। पूर्वमार्गके अंतमें जैसे बिंदुका प्रकाश दिखाई देता है, वैसे पश्चिममार्गके अंतमें महाशून्यके सिवा और कुछ भी दिखाई नहीं देता। यदि पूर्वपथ शुक्लपक्षके सदृश माना जाय तो पश्चिमपथको कृष्णपक्षके सदृश मानना युक्तियुक्त प्रतीत होता हैं।"

श्रीगुलाबरावमहाराज यांनी "योगरहस्य" या ग्रंथातील "ध्यानयोगदिवाकर" या प्रकरणात पूर्व व पश्चिम मार्गांचा उलगडा करून पिंडब्रह्मांडाची संहारणी कशी होते हे सांगताना असे म्हटले आहे की–

**शक्ति सहायें प्राण। सुषुम्नेमाजीं अनुगमन।**

**करोनी षट्चक्रस्थान। लक्षिजे पैं ।।३ ९।।**

**परी सुषुम्ना नाडींतून। पाहोनिया तेथें स्थान।**

**तेथ तेथ अंत:करण। नेयावे पैं ।।१६।।**

**गणेशं च विधिं विष्णुं शिवं जीवं गुरुं तथा ।**

**व्यापकं च परं ब्रह्म क्रमाच्चक्रेषु चिंतयेत् ।।१।।**

परी आधार स्वाधिष्ठान। अकारार्थसी कीजे चिंतन।
अनायास समन्वयून। मातृका घ्याव्या तेथींच्या ॥१७॥
उकारार्थेसी चिंतावे। मणिपूर अनाहत भावे।
विशुद्ध आज्ञाचक्रासी चिंतावे। मकारार्थेसी ॥१८॥
चक्रावरील मातृका सकळ। तियांचा अनायास जपी मेळ।
करोनिया कोल्हाळ। सहस्रदल साधिजे ॥१९॥
हे अनुच्चार्य बिंदूचे स्थान। शाश्वत सच्चिदानंदघन।
पूर्वमार्ग संपूर्ण। बोलिती याते ॥२०॥
आता पश्चिम मार्गाची भरोवरी। जया ब्रह्मांड अजपा म्हणती कुसरी।
तीहि रीति अवधारी। जैसी असे ॥२१॥
सुषुम्ना मार्गाचा वळसा। येऊनि गुरुवचनरसा।
कुंडलिनी सहाय ठसा। घेउनीं चालावे ॥२२॥
त्रिकुटं श्रीहठं स्थानं गोल्हाटं चौटपीठकं।
पुण्याद्रि भ्रामरी गुंफा ब्रह्मरंध्राण्यनुक्रमात् ॥२॥
पूर्व वा पश्चिममार्गी। कुंडलिनीसहाय योगी।
चितोनिया चौरंगी। बैसती इया ॥२३॥
त्रिकुटापासोनी ब्रह्मरंध्रावरी। पश्चिममार्गीही प्रणवकुसरी।
अनायास जपाची परी। तैसीचि आहे ॥२४॥
अथवा पिंडस्थ देवतानुग्रहेकरून। पूर्वमार्गे घडे गमन।
आणि ब्रह्माण्ड देवतानुग्रहेकरून। पश्चिममार्गी गमन होतसे ॥२५॥
चौदा चक्रां चया शिखरीं। जेथ हंस प्रणव अनुच्चारी।
अनायास जपाची कुसरी। येथचि पावे ॥२६॥
पुढे परब्रह्मपूर्ण। येथ तातवचनही प्रमाण।
ऐकावे चित्त देऊन। सज्जनश्रोती ॥२७॥
तैसें ॐ हें स्मरों सरे। आणि तेथेंचि प्राण पुरे।
मग प्रणवातीत उरे। पूर्णघन जें ॥ ज्ञा ८.११७॥
मात्राभावे सायास प्रणव। तो तेथेंचि पुरला सावेव।
आणि सोऽहंशब्दे प्राणगौरव। येथेंचि आले ॥२८॥
महाशक्तीचा खटाटोप। येथेंचि सरला संकल्प।
व्युत्थानी तरीं साक्षेप। सोनियाची तनु ॥२९॥
नातरी हे जाहले। येथ ज्ञानाविण वहिले।
विधिलोकांतराये पावले। मुक्तियोगे ॥३०॥
अशा प्रकारे शक्ती जागृत होऊन तिची सुषुम्नांतर्गत वाटचाल सुरू झाली

की पिंडब्रह्मांडाची संहारणी करणारे व जडचेतनभेदप्राक्रियेला प्रारंभ करणारे खरे अंतरंग साधन सुरू होते. याचेच गीतेत भगवंतांनी " जिज्ञासुरपि योगस्य शब्द-ब्रह्मातिवर्तते ॥६.४४॥" म्हणून वर्णन केले आहे. गीतेत भगवंतांनी "शब्दब्रह्माति-वर्तते" म्हणून ज्या अपूर्व साधनरहस्याचे उद्घाटन केले आहे त्यातील शब्दब्रह्म म्हणजे काय व त्याचे उल्लंघन करावयाचे म्हणजे काय करावयाचे ? किंवा काय केले असता शब्दब्रह्माचे उल्लंघन होते ? हे पाहिले म्हणजे गीतोक्त साधनरहस्याचे मर्म लक्षात येईल व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनेचा आग्रह का धरला आहे हे स्पष्ट होईल. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**हें असो ते कुंडलिनी बाळी । हृदयाआंतु आली ।**
**अनुहताची बोली । चावळे तें ॥६.२७४॥**
**शक्तोचिया आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें ।**
**तें तेणें आइकिलें । अळुमाळु ॥२७५॥**
**घोषाच्या कुंडी । नादचित्रांची रूपडी ।**
**प्रणवाचिया मोडी । रेखलीं ऐसीं ॥२७६॥**
**हेंचि कल्पावें तरी जाणिजे । परी कल्पितें कैंचें आणिजे ।**
**तरी नेणों काय गाजे । तिये ठायीं ॥२७७॥**
**विसरोनि गेलो अर्जुना । जंव नाशु नाहीं पवना ।**
**तंव वाचा आथी गगना । म्हणौनि घुमे ॥२७८॥**
**तया अनाहताचेनि मेघें । आकाश दुमदुमों लागे ।**
**तव ब्रह्मस्थानींचें बेगें । सहज फिटे ॥२७९॥**

कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर ती सुषुम्नामार्गाने हृदयापर्यंत म्हणजे अनाहतचक्रापर्यंत आली की अनाहत ध्वनी सुरू होतो. शक्तीबरोबर येथपर्यंत आलेल्या जड बुद्धीचे चैतन्यात रूपांतर होऊन ती हा ध्वनी हळूहळू ऐकू लागते. त्यावेळी नाडीशुद्धी होऊन संबंध शरीरच घोषाचे कुंड बनते व घंटा, वेणू, वीणा, भृंगे, समुद्र, मेघ, नगारा, धबधबे, झांजा, पखवाज, मृदंग अशी विविध नादांची चित्रे ॐकाराच्या आकाराने रेखलेली साधकाच्या अंतःचक्षूपुढे साधनात दिसू लागतात. जोपर्यंत प्राण, अपान व समान आज्ञाचक्र ओलांडून गगनात जात नाहीत तोपर्यंत हा नाद स्थूलरूपाने घुमतच असतो. जेव्हा या नादाच्या गर्जनेने ब्रह्मस्थानाला जावयाची आज्ञाचक्राची खिडकी उघडते तेव्हा तो सूक्ष्म होत जातो.

या अनाहत नादालाच शब्दब्रह्म म्हणतात. "शिवपुरणांतर्गत उमासंहितेत" "अनाहतमनुच्चार्यं शब्दब्रह्म परं शिवम् ।" असे म्हटले आहे. कोणत्याही आघाता-शिवाय व उच्चाराशिवाय जो शब्द किंवा आवाज शरीरात स्वतःला ऐकू येतो त्याला मंगलदायक शब्दब्रह्म म्हणतात. "परापरिमलोल्लासग्रंथामध्ये" अनाहतचक्र हेच

शब्दब्रह्माचे म्हणजे ॐकाराचे स्थान आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

**शब्दब्रह्मेति तं प्राह साक्षाद्देवः सदाशिवः ।**
**अनाहतेषु चक्रेषु स शब्दः परिकीर्त्यते ॥**

ज्याला शब्दब्रह्म म्हणतात तो साक्षात् सदाशिव देवच आहे. हे शब्दब्रह्म अनाहतचक्रामध्ये आहे. या शब्दब्रह्माचे स्वरूप जाणून त्याचे अतिक्रमण करणे हे मुमुक्षूचे एकमात्र लक्ष्य आहे. याचे अतिक्रमण केल्याशिवाय पिंडब्रह्मांडाची संहारणी होऊन विशुद्ध परमतत्त्वरूप चैतन्याचा साक्षात्कार होणे कधीही संभव नाही ही अनाहत नादसाधना म्हणजेच "सहजं कर्म कौंतेय ॥१८.४८॥" ही गीतोक्त साधना होय. "तरी आत्मा दृष्ट नोहे । तंव कर्म करणें कां ठाये ? ॥ १८.९३५॥" असा प्रश्न जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज करतात तेव्हा जोपर्यंत जीवाला आत्मप्राप्ती होत नाही तोपर्यंत अनाहत ध्वनीरूपी सहज कर्म थांबत नाही असेच ते सुचवितात. भगवंतांनी गीतेत "पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ॥८ २२॥, भक्त्या त्वनन्यया शक्य ॥११ ५४॥, अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥१२.६॥, अनन्याश्चिंतयंतो मां ॥९.२२॥, भक्त्या मामभिजानाति ॥१८.५५॥, मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥१८.६५॥, सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥१८ ६६॥" या सर्वांतून जे भक्तीचे साधन सुचविले आहे त्याचा अर्थ हाच आहे. ज्यावेळी "ऐसा हा सहज माझा । प्रकाशु जो कपिध्वजा । तो भक्ति या वोजा । बोलिजे गा ॥१८.११७॥ म्हणौनि दृश्यपथा–। अतीतु माझा पार्था । भक्तियोगु चवथा । म्हणितला गा ॥१८.११२९॥" असे सांगून सहजप्रकाश म्हणजे उत्तम भक्ती होय अशी श्रीज्ञानेश्वरमहाराज व्याख्या करतात व हा भक्तियोग दृश्यमार्गाच्या पलीकडे आहे किंवा त्यापासून भिन्न आहे असे जेव्हा ते सांगतात तेव्हा सुषुम्नामार्गाने प्राप्त होणाऱ्या नादानुसंधानाच्या दृश्यपथातीत मार्गाचाच ते उल्लेख करीत आहेत हे निःसंशय होय. त्यांच्या दृष्टीने नादानुसंधान हेच खरे भजन असून ते आत्मनिवेदन तरांडे आहे असे सांगताना ते म्हणतात–

**येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।**
**तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥७.९७॥**
**जयां सद्गुरुतारूं फुडें । जे अनुभवाचे कांसे गाढे ।**
**जयां आत्मनिवेदनतरांडें । आकळलें ॥९८॥**
**जे अहंभावाचें वोझें सांडुनी । विकल्पाचिया झुळका चुकाउनी ।**
**अनुरागाचा निरुता होऊनी । पाणिढाळु ॥९९॥**
**जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडला तारा ।**
**मग निवृत्तीचिया पैलतीरा । झेंपावले जे ॥१००॥**

ते उपरतीच्या वावीं सेलत । सोऽहंभावाचेनि थावें पेलत ।
मग निघाले अनकळित । निवृत्तितटीं ॥१०१॥
येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले ।
परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥१०२॥

जेव्हा साधकावर गुरुकृपा होते तेव्हा आत्मशक्ती जागृत होऊन तिचा सुषुम्नाप्रवेश होतो व जगत्लीला, संसारलीला किंवा जीवलीला संपुष्टात येते. सुषुम्नेतील प्राणांच्या चालनामुळेच नादानुसंधानाचे आत्मनिवेदनरूपी साधन घडून येऊन ऐल थडीच मायाजळ नाहीसे होते; म्हणजे मूलाधारस्थ ब्रह्मरंध्राचे द्वार मोकळे होऊन साधक कृतकृत्य होण्याच्या मार्गाला लागून मायास्पर्शापासून दूर असलेल्या मार्गाने तो वाटचाल करू लागतो. असे हे सिद्धयोगांतर्गत नादानुसंधानाचे साधन केवळ गुरुकृपेनेच प्राप्त होते सोऽहंभावाचे साधन म्हणजे हेच नादानुसंधान होय; कारण त्यामुळेच साधकाच्या ठिकाणी हा भाव जागृत होतो. भगवंतांनी "ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म ॥ ८.१३ ॥ ॐ तत्सदिति निर्देशो ॥ १७.२३ ॥" म्हणून गीतेत ज्या ॐकार साधनाचा उल्लेख केला आहे ते साधन म्हणजे हेच नादानुसंधान होय; कारण "प्रकर्षेण नूयते स्यूयतेऽनेनेति नौति, स्तौतीति वा प्रणव ॐ कारः ।" ज्याच्या द्वारा अत्यत नम्रतापूर्वक स्तुती केली जाते किंवा ज्याच्या आधाराने भक्त ईश्वराची उत्तम स्तुती करतो त्याला प्रणव किंवा ॐकार म्हणतात. प्रणव किंवा ॐकार हा सर्व मंत्राचा सेतू म्हणजे राजाच आहे असे "मंत्रणां प्रणवः सेतुः ।" असे सांगून शास्त्रकारांनी त्याचे माहात्म्य स्पष्ट केले आहे. यामुळेच "अथर्वशिखापनिषदात" प्रणवाचा महिमा सांगताना असे म्हटले आहे की, "प्राणान् सर्वान् परमात्मनि प्रणामयतीति एतस्मात् प्रणवः ॥ २ ॥" म्हणजे ॐकाराला प्रणव एवढ्यासाठीच म्हटले जाते की तो सर्व प्राणांसकट परमात्म्याला प्रणाम करतो. तो प्राणशक्ती परमात्म्यात विलीन करून टाकतो. प्रणव हा "तस्य वाचकः प्रणवः ॥ १.२७ ॥" असे महर्षी पतंजलींनी "योगसूत्रात" म्हटल्याप्रमाणे परमात्म्याचा वाचक किंवा निदर्शक असल्यामुळे किंबहुना तो तत्स्वरूप असल्याने प्राणांना परमात्म्याकडे खेचून नेतो. हे सर्व खरे असले तरी हे जाणणारे व अशी भक्ती करणारे "भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥ ७.१०२ ॥" हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे म्हणणेच खरे आहे. "सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः । नमस्यंतश्च मां भक्त्यानित्ययुक्ता उपासते ॥ ९.१४ ॥" असे भगवंतांनी गीतेत कथन करून जे नामस्मरणाचे साधन सांगितले आहे त्याचा अर्थही नादानुसंधान हाच आहे; कारण त्याच्याशिवाय "नामघोषगौरवें । धवळलें विश्व ॥९.२०३॥" व "जयांचें वाचेपुढां भोजें । नाम नाचत असे माझें ॥ ९.२०६ ॥" हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे घडणे कसे शक्य आहे? नादानुसंधान म्हणजे गहन भजन व गुरुवी

भक्ती आहे हे नितांत सत्य होय कर्म आणि भक्ती किंवा नामस्मरण या प्रमाणेच नादानुसंधान ही ज्ञानाचीही पृष्ठभूमी आहे; कारण " सांगेन ज्ञानाचिये भेटी। उपावो तुज ।। ४.८५ ।। " असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाचे साधनच कथन केले आहे हे आपण मागे पाहिलेच आहे.

महायोगी गोरक्षनाथांनी " गोरखबानीमध्ये" नादानुसंधानरूपी शब्दब्रह्माच्या म्हणजेच प्रणवरूपी ॐकाराच्या अंतर्गत नामस्मरणाच्या आधाराने " शब्दब्रह्मणि निष्णातः परं ब्रह्माधिगच्छति ।।१७।।" या "अमृतबिंदू" व इतरही उपनिषदोक्त आणि वर सांगितलेल्या " जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।।६.४४।।" या गीतोक्त साधनाचा पुढीलप्रमाणे उल्लेख करून " तेथ मनाचें मेहुडें विरे। पवनाचें पवनपण सरे । आपणपां आपण मुरे । आकाशही ।।६.४६८।। प्रणवाचा माथा वुडे। येतुलेनि अनिर्वाच्य सुख जोडे ।।४६९।।" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे कसे घडते ते सांगितले आहे. ते म्हणतात—

**बेद कतेब न षांणीं बांणीं । सब ढंकी तलि आंणीं ।**
**गगनि सिषर महि सबद प्रकास्या । तहं बूझै अलष बिनांणीं ।।४।।**
**सारमसारं गहर गंभीरं गगन उछलिया नादं ।**
**मानिक पाया फेरि लुंकाया झूठा बाद—बिबादं ।।१२।।**

परब्रह्माचे योग्य असे वर्णन किंवा विवेचन वेद, धार्मिक ग्रंथ व परा-पश्यंती-मध्यमा आणि वैखरी या चतुर्विध वाणींपैकी कोणीच करू शकले नाही. उलट या सर्वांनी मुळातच आच्छादित असलेल्या या तत्त्वाला आणखीनच झाकून टाकून खाली आणले आहे. त्यांनी सत्य प्रकट करण्याऐवजी उलट परब्रह्मतत्त्वावर अधिकच आवरण घातले आहे हे साधका ! जर तुला ब्रह्मतत्त्वाच्या यथार्थ स्वरूपाचे ज्ञान व्हावे असे वाटत असेल व तेच तुला अभीष्ट असेल तर गगन शिखरात म्हणजे ब्रह्मरंध्रात योगामुळे जो ध्वनी किंवा शब्द प्रकाशित होतो त्याचे अनुसंधान करून व मन तेथे लीन करून अलक्ष्य ज्ञानाची म्हणजे परब्रह्मतत्त्वाची प्राप्ती करून घे. साधन करता करता जेव्हा प्राणवायू किंवा प्राणशक्ती कुंडलिनी ब्रह्मरंध्रात पोहोचून अनाहत नाद ऐकू येतो तेव्हा ही गोष्ट साराचेही सार व गंभीराहून गंभीर आहे असे निश्चित समजावे. यामुळे ब्रह्मानुभूतिरूपी माणिक हाती लागते. परंतु या साधनाने प्राप्त होणारे हे माणिक जगाच्या दृष्टीने लपूनच राहिले आहे. सर्व सामान्य लोकांना याची महती कळत नाही. एखादा विरळाच भाग्यवंत " प्रणव वाचक श्वासोच्छ्वास। नोचि तारक उपदेश। परि हे गुरुकृपेचे देणे। विराळा भाग्यवंत जाणे ।। " हे जाणतो. ब्रह्म हे स्वसंवेद्य आहे. ते शब्दांनी कोणाला वर्णन करून सांगता येत नाही. साधकाला ही अनुभूती एकदा आली की, त्याच्या लक्षात येते की, सर्व वादविवाद खोटा आहे. फक्त अनुभूतीच खरी आहे असा हा नादनुसंधानाचा

म्हणजे शब्दब्रह्मात निष्णात होऊन परब्रह्माशी एकरूप होण्याच्या मार्गाचा महिमा आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "योगतारावली" या प्रकरण ग्रंथात पिंडब्रह्मांडाच्या संहारणीमुळे मन व प्राण विष्णुपदी कसे लीन होतात हे नादनुसंधानाचा म्हणजे अनाहतनादाचा अर्थात् ॐकाररूपी शब्दब्रह्माचा अपरंपार महिमा ग्रंथाच्या सुरुवातीलाच कथन करून स्पष्ट केले आहे. या दृष्टीनेच ते म्हणतात–

सदाशिवोक्तानि सपादलक्ष लयावधानानि वसन्ति लोके।
नादानुसंधानसमाधिमेकं मन्यामहे मान्यतमं लयानाम् ॥२॥
नादानुसंधान नमोस्तु तुभ्यं त्वां साधनं तत्त्वपदस्य मन्ये।
भवत्प्रसादात् पवनेन साकं विलीयते विष्णुपदे मनो मे ॥४॥

मनोलय घडवून आणणारी शंकरांनी सांगितलेली सव्वालक्ष प्रकारची साधने जगात आहेत. त्या सर्वांत अनाहतनादाच्या अनुसंधानाने प्राप्त होणारी समाधी किंवा लय हाच मला अत्यंत योग्य किंवा श्रेष्ठ वाटतो. हे नादानुसंधानाच्या साधना ! तुला माझा नमस्कार असो. 'ते ब्रह्म तूच आहेस' असा ब्रह्मात्वभावाचा अनुभव प्राप्त करून घेण्याचे तूच साधन आहेस असे मी समजतो. तुझ्या प्रसादाने माझे मन प्राणासमवेत विष्णुपदी लीन होते.

"योगशिखोपनिषदाच्या" दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायात अनाहतनादाच्या साधनाचा महिमा, शरीरातील त्याच्या उत्पत्तीचे ठिकाण व त्याचे फळ याचे सुंदर वर्णन आले आहे. त्याचे सार असे आहे की–

नास्ति नादात् परो मंत्रो न देवः स्वात्मनः परः ॥२–२०॥
नानुसंधेः परा पूजा न हि तृप्तेः परं सुखम् ॥२१॥

नादासारखा श्रेष्ठ मंत्र नाही. आत्म्यासारखा श्रेष्ठ देव ( प्रकाशक ) नाही. नादानुसंधानासारखी दुसरी श्रेष्ठ पूजा नाही व या साधनाने तृप्त होण्यापलीकडे दुसरे सुख नाही.

अत्यंत श्रेष्ठ अशा अनाहत नादालाच चित् किंवा चैतन्य अशी संज्ञा आहे. तो सर्व सिद्धी देणारा आहे. त्यालाच नमस्कार करणे योग्य आहे. या नादाच्या किंवा ध्वनीच्या केवळ ज्ञानानेच मनुष्यप्राणी जन्मबंधनापासून मुक्त होतो. हा नाद अक्षर म्हणजे नाश न पावणारा आहे. त्यालाच शब्दब्रह्म असे म्हणतात. मूलाधाराच्या ठिकाणी बिंदुरूपिणी अशी स्वतःचाच स्वतःला आधार असलेली म्हणजे दुसऱ्या कुणाचाही जिला आधार नाही, अशी कुंडलिनी शक्ती आहे. सूक्ष्म बीजापासून जशी अंकुरोत्पत्ती होते, त्याप्रमाणे तिच्या ठिकाणी नाद उत्पन्न होतो. योगीलोकात त्याला "पश्यंती" या नावाने ओळखतात. योगीलोक या नादाच्या द्वारा नादाच्या विश्व अवस्थेचे किंवा नादापासून उत्पन्न होणाऱ्या विश्वाचे दर्शन घेतात. जो नाद हृदयात व्यक्त होतो व गर्जना करणाऱ्या मेघासारखा अगर पर्जन्यासारखा असतो, त्या

नादाच्या हृदयस्थ अवस्थेला " मध्यमा " असे म्हणतात. प्राणवायूमुळे कंठातून जो ध्वनी उत्पन्न होतो, त्याला " वैखरी " अशी संज्ञा आहे. मूलाधारस्थ बिंदुरूपिणी पराशक्ती कुंडलिनी हिला " परावाणी " म्हणतात. हीच परानादाची तुरीयावस्था होय.

म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी " भारतीय संस्कृती और साधना, " खंड एक, मधील "ॐकार–साधन " या लेखात शब्दब्रह्म म्हणजे काय, त्याचे अतिक्रमण करणे किती आवश्यक आहे व ते कसे होते हे सांगताना असे म्हटले आहे की, " ब्रह्म एक, अखंड व अद्वैतरूप असूनही परब्रह्म व शब्दब्रह्म या दोन विभागात ते कल्पित केले जाते असे शास्त्रावरून कळून येते. शब्दब्रह्माला उत्तमप्रकारे जाणल्यामुळेच परब्रह्माची प्राप्ती होते. या अर्थानेच " शब्दब्रह्मणि निष्णातः परं ब्रह्माधिगच्छति ॥" असे शास्त्रकारांनी म्हटले आहे. शब्दब्रह्माचे स्वरूप जाणणे व ते जाणून त्याचे अतिक्रमण करणे हे मुमुक्षूचे एकमात्र लक्ष्य आहे. याचे अतिक्रमण केल्याशिवाय विशुद्ध परमतत्त्वरूप चैतन्याचा साक्षात्कार होणे कधीही संभव नाही. प्रणवाला किंवा ॐकारालाच शब्दब्रह्म म्हणतात. प्रणव हा परब्रह्माशी एकरूप असून तोच परब्रह्म प्राप्तीचा एकमात्र उपाय आहे. ॐकारात मात्रा आहेत व त्याचे अमात्रक म्हणजे मात्राहीन असे शुद्धरूपही आहे. त्याचे मात्रायुक्त अवस्थेचे एक शुद्ध व एक अशुद्ध असे दोन भेद आहेत. त्याच्या मात्रायुक्त शुद्धरूपाचा परिचय योग्यांनाच होतो. ॐकाराची अमात्रक अवस्था अप्रमेय व अखंड आहे. त्याच्या आदि-अंताचा निर्णय होऊ शकत नाही.

शब्दब्रह्माचे, भेददृष्टीचे म्हणजे विकल्पमयी पिंडब्रह्मांडरूपी सृष्टीचे उल्लंघन करून शुद्ध बोधात्मक स्वात्मस्थितीमध्ये प्रवेश करणे हे योग्यांचे सर्वश्रेष्ठ ध्येय आहे यासाठी उपाय पुष्कळ आहेत; परंतु सर्वात सरळ व सोपा उपाय नादानुसंधान हाच मानला जातो. सर्व वर्णांच्या समष्टी भावापत्तीनंतर व अष्टवर्गीय शक्तींच्या एकीकरणानंतर जे अभिन्नरूपाने स्फुरण होते तोच वस्तुतः नाद आहे. मंत्रशास्त्रात ज्याला मंत्रचैतन्य म्हणतात तोही वस्तुतः या प्राणमय नादशक्तीचा आविर्भावच आहे. ज्यावेळी सद्‌गुरू शिष्यावर शक्तिपात करतात त्यावेळी अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत होऊन नाडीशुद्धी झाली की, आतूनच नाद प्रस्फुटित होऊन साधकाचे नादानुसंधानाचे साधन सुरू होते. ( हेच आत्मनिवेदन तरांडे आकळणे होय. ) शास्त्रात असे म्हटले आहे की, सर्व मंत्रांची परमा प्रकृती प्रणव किंवा ॐकार आहे. या प्रणवात अकार, उकार, मकार, बिंदू, अर्धचंद्र, निरोधिका, नाद, नादान्त, शक्ती, व्यापिनी, समना व उन्मना एवढे अंश आहेत. जोपर्यंत उन्मनी पदाची प्राप्ती होत नाही तोपर्यंत मनाचे मेहुडे विरत नाही. त्याचे राज्य चालूच असते. हे मनाचे राज्य शक्ती जागृत होऊन अनाहतनाद सुरू झाला की

त्यात विरून जाते. . . सारांश हेच खरे आहे की मुळात परमेश्वराच्या अनुग्रहरूप चित्‌शक्तीचा केवळ व्यापारच आहे; कारण शक्तिपाताशिवाय शब्दब्रह्माच्या लंघनाचे कार्य कधीही पूर्ण होऊ शकत नाही."

अशा प्रकारे श्रीगुरुकृपेने पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे कार्य सिद्धयोग साधनाने आपोआप होऊन समाधीच साधकाचे घर विचारीत येते हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात—

**तेथ सदैवा आणि पायाळा । वरि दिव्यांजन होय डोळां ।**
**मग देखे जैसी अवलीळा । पाताळधनें ।।६.४५८।।**
**तैसें दुर्भेद जे अभिप्राय । कां गुरुगम्य हन ठाय ।**
**तेथ सौरसेंवीण जाय । बुद्धी तयाची ।।४५९।।**
**बळियें इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना ।**
**पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ।।४६०।।**
**ऐसें नेणों काय अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें ।**
**समाधि घर पुसे । मानसाचें ।।४६१।।**

अशी ही सिद्धयोगसाधनाची महत्ता आहे. सर्व काही परिश्रमावाचून, आयासा-शिवाय, आपोआप, स्वतःहून अगदी सहजतेने घडते. हे सर्व सहजच कसे काय होते हे काही सांगता येत नाही व समजत नाही. अशा स्थितीत समाधीच साधकयोग्याचे घर विचारीत आपणहून आली तर त्यात नवल नाही.

वरील सर्व विवेचनाचे सार श्रीसंत तुकाराममहाराजांनी पुढील अभंगात सांगितले आहे ते म्हणतात —

**अनुहातीं गुंतला नेणें बाह्यरंग । वृत्ति येतां मग बळ लागे ।।१।।**
**मद्यें मातें तया नाहीं देहभाव । आपुले अवयव आवरितां ।।२।।**
**आणिकांची वाणी वदे तेणें मुखें । उपचारदुःखें नाठवती ।।३।।**
**तें सुख बोलतां आश्चर्य या जना । विपरीत मना भासतसे ।।४।।**
**तुका म्हणे बाह्यरंग ते विटले । अंतर निवालें ब्रह्मरसें ।।५।।**

सारांश, पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे हे रहस्य ध्यानात आले म्हणजे सिद्धांगभूत अशा विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण प्रातिभज्ञानोद्भवाच्या सामर्थ्याने श्रीज्ञानेश्वरमहा-राजांनी सिद्धयोगाच्या तत्त्वज्ञानाचे सर्वंकष स्वरूप ज्ञानेश्वरीत कसे विशद केले आहे याची पूर्णांशाने कल्पना येईल.

# प्रकरण चौथे

# ज्ञानेश्वरीतील नाथसंकेतींचा दंश

## प्रास्ताविक :-

भारताच्या आध्यात्मिक साधनाची व संस्कृतीची जी अनेक वैशिष्टये आहेत त्यात सिद्धयोगाचे स्थान अनुपमेय आहे; कारण आध्यात्म्याच्या वाटचालीत सर्व मार्गांचे मूर्धन्यस्थान या मार्गाला लाभले आहे. या अपूर्वतेमुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या नाथपरंपराप्राप्त सिद्धयोगमार्गाला पंथराज म्हटले आहे. या मार्गात परंपराप्राप्त दिव्य अशा परमेश्वरी किंवा शांभवी शक्तीचा ब्रह्मप्राप्तीसाठी सद्‌गुरू शिष्यावर अनुग्रह किंवा कृपा म्हणजे शक्तिपात करतात. भगवद्‌स्वरूप सद्‌गुरूच्या अनुग्रहाशिवाय म्हणजेच शक्तिपात होऊन कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय आध्यात्मजीवनाची खरी वाटचाल सुरू होऊ शकत नाही अगर या महापथावरून साधक चालूही शकत नाही, मग परमलक्ष्याची प्राप्ती होणे ही खूप दूरची गोष्ट आहे. सुप्त भगवत्‌शक्ती जोपर्यंत पूर्णपणे जागृत होत नाही तोपर्यंत मनुष्य जीवनाचे खरे सार्थकही होत नाही. याकरिता वेदकालापासून तो आजपर्यंत अवतारी पुरुष, ऋषी, मुनी, संत, महंत, साधू, महात्मे, मार्गदर्शक, सद्‌गुरू इत्यादि सर्वांनी या मार्गाची कास धरलेली दिसून येते. या सर्वांनी आपल्याला परंपरेनी प्राप्त झालेल्या या शक्तिपात किंवा सिद्धयोग विद्येचा साधकांवर अनुग्रह करून त्यांना परमेश्वर प्राप्तीसाठी मार्गस्थ केले. परंपरा व पद्धत कोणतीही असली तरी साधकात शक्तिसंक्रमण घडून येणे व त्याची अनादि निद्रिस्त आत्मसत्ता जागृत होऊन ती सुषुम्नापथाने "येणें मार्गें जया ठाया जाइजे। तो गांवो आपणचि होइजे ॥ ६.१६० ॥" यासाठी ऊर्ध्वगामी होणे हे खरे मूळ तत्त्व होय. भक्ती, कर्म, ज्ञान, उपासना, जप, तप, नेम, यंत्र, मंत्र, तंत्र इत्यादि मूळ तत्त्वाचा तपशील होय. तपशीलात न शिरता सिद्धयोगाचा किंवा नाथपंथाचा प्रवाह युगानुयुगे कशा रीतीने वाहत आला व त्याने देव, ऋषी, मुनी, संत, महंत, साधू, तापसी, संन्यासी व शेकडोशे साधकांना कसे धन्य केले हे पाहिले म्हणजे सर्व मार्गांच्या साधकांना सिद्धयोगाशिवाय किंवा शक्तिपाताशिवाय गत्यंतर नसल्याने नाथपरंपरेने भारताला प्राप्त झालेल्या आध्यात्मिक संपन्नतेची कल्पना येऊन मन कृतार्थ होते.

## नाथसंप्रदाय :-

नाथसंप्रदाय हा शक्तिपातयोग, सिद्धयोग, सिद्धमार्ग, महायोग, सहजयोग, भक्तियोग, क्रियायोग, श्रीगुरुदत्तयोग, पंथराज, आदिनाथयोग, शिवयोग, शिवसंप्र-

दाय, आदिनाथसंप्रदाय, आदिसंप्रदाय, योगीसंप्रदाय, अमरसंप्रदाय, विहंगमपथ' योगमार्ग, नाथमार्ग, शिवमार्ग, माहेश्वरमार्ग, वज्रयान इत्यादि नानाविध नावांनी प्रसिद्ध आहे; असे जे योगी नरहरीनाथांनी "विवेकमार्तंडाच्या" प्रस्तावनेत लिहिले आहे ते अक्षरशः सत्य आहे. याचे कारण देताना ते म्हणतात, "आदिनाथादि-योगोऽयं मीननाथगोरक्षनाथनवनाथ द्वादशनाथाष्टादशनाथनारदादिसनकादिसिद्धचतुष्टयीचतुरशीतिसिद्धानन्त सिद्धसिद्धांतपद्धत्यानेकजन्मनामन्ते जगति जीवा लभन्ते भवसागरे योगनौकाम् ।" एवढे सांगून गीतेतील चवथ्या अध्यायातील विवस्वान, मनू व इक्ष्वाकू ही परंपरा कथन करून पुढे ते म्हणतात, "एवमादिशतसहस्र संख्यानि सन्ति निदर्शनानि । योगी याज्ञवल्क्यो, योगिराजो जनको, योगिराजः कार्तवीर्यः, सांख्ययोगाचार्यः कपिलो, योगिराजो रघुः, योगिराजो रत्नपरीक्षको, योगिराजो भर्तृहरिः, योगिराजो गोपीचंद्रो, योगिराजः पूर्णमल्लस्तथान्ये वहवः शिवयोगपथे प्रथिताः । सम्यक् प्रदीयते शिवजीवयोगमार्गोपदेशो येन यत्र वासौ शिवयोगसंप्रदयः । " शिवाचे व जीवाचे सामरस्य व्हावे म्हणून ॐ, सोऽहं किंवा अन्य नाममंत्राचा किंवा हठ, लय अगर ध्यानाचा आश्रय वा आलंबन घेऊन अगर आलंबनरहित पद्धतीने शक्तिपातपूर्वक सम्यक् उपदेश जेथे जेथे देतात तेथे तेथे हा शिवयोगसंप्रदाय आहे हे निश्चित होय. त्यामुळे सर्व उपासनामार्गांना व्यापून असलेला व सर्व उपासना मार्गांचे अंतिम आश्रयस्थान असलेला असा हा नाथसंप्रदाय किंवा सिद्धयोग आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अपार पावले सिद्धपंथे" व "पावले ते ज्ञानी सिद्धपंथे ।।" असे म्हणून अभंगांमध्ये या मार्गाचा जसा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे तसाच किंवा त्याहीपेक्षा या मार्गाचा अधिक महिमा त्यांनी ज्ञानेश्वरीत गायिला आहे. ते म्हणतात –

पैल योगवृंदें वहिलीं । आडवीं आकाशीं निघालीं ।
कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं । धोरणु पडिला ।।६.१५४।।
तिहीं आतमबोधाचेनि उजूकारें । धांव घेतली एकसरें ।
कीं येर सकळमार्ग निवसुरे । सांडूनियां ।।१५५।।
पाठीं महर्षी येणें आले । साधकांचे सिद्ध जाहाले ।
आत्मविद थोरावले । येणेंचि पंथें ।।१५६।।
हा मार्गु जें देखिजे । तें तहान भूक विसरिजे ।
रात्रिदिवसु नेणिजे । वाटे इये ।।१५७।।
चालतां पाऊल जेथ पडे । तेथ अपवर्गाची खाणी उघडे ।
आव्हांटलिया तरी जोडे । स्वर्गसुख ।।१५८।।

असा हा साधकांना सिद्ध करणारा मार्ग आहे. एवढेच नव्हे तर श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मते "तेंचि तो आपण । स्वयें जाहला निर्वाण । जें साधकांचें कारण।

सिद्धतत्त्व ॥६.४७८॥'' साधक एकमेव स्वत:सिद्धतत्त्व परब्रह्मच स्वत: होतो. मूळात "मी सर्वदा स्वत:सिद्धु ॥ ९.१६४ ॥ " व " आणि आत्मा तो एथ ऐसा। पैं नित्य सिद्ध आपैसा। अनादिपणें॥ १३.११०७॥ " या न्यायानें आत्मा हा नित्यसिद्ध व अनादि अशा स्वरूपाने सहजसिद्ध आहे. अशा सिद्धवस्तूची प्राप्ती होण्यासाठी सिद्धयोगासारख्या अंतर्योगसाधनाचीच नितांत आवश्यकता असते; कारण इतर सर्व साधने येथे निष्प्रभ, अप्रमाण व अशास्त्रीय ठरतात. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> म्हणौनि माझ्या ठायीं। जाचावें न लगे कांहीं।
> मी लाभे इयें उपायीं। साचचि गा ॥१८.१२२५॥
> एक शिष्य एक गुरु। हा रूढला साच व्यवहारु।
> तो मत्प्राप्तिप्रकारु। जाणावया॥१२२६॥
> अगा वसुधेच्या पोटीं। निधान सिद्ध किरीटी।
> वन्हि सिद्ध काष्ठीं। वोहां दूध॥१ २७॥
> परी लाभे तें असते। तया कीजे उपायाते।
> येर सिद्धचि तैसा तेथें। उपायीं मी॥१२२८॥
> जें गीतार्थाचें चांगावें। मोक्षोपायपर आघवें।
> आन शास्त्रोपाय कीं नव्हे। प्रमाणसिद्ध॥१२३०॥

तेव्हा सहजपणे व निश्चतपणे परमात्मप्राप्तीचा सिद्धयोग हाच एकमात्र उपाय आहे. नाथसंप्रदाय असे नाव दिल्याने तो कोणत्याही प्रकारे सीमित, परिमित किंवा संकुचित होऊ शकत नाही. उपास्य दैवत कोणतेही असो, मंत्र कोणताही असो व पद्धती कोणतीही असो, एक सद्‌गुरू व एक शिष्य हाच स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीचा उपाय आहे. ज्यावेळी श्रीसद्‌गुरू शिष्यावर अहेतुक कृपा करतात त्यावेळी साधकाच्या ठिकाणी मूलाधारात निद्रिस्त असलेली चित्‌शक्ती जागृत होऊन सिद्धयोगाचे साधन आतूनच चालू होते. मग पृथ्वीच्या पोटातील द्रव्यसाठा, काष्ठातील अग्नी व कासेतील दूध हे त्या त्या प्रयत्नाने जसे प्राप्त होते, तसे या चित्‌स्वरूपजागृतीच्या सिद्धोपायाने सिद्धस्वरूपाची प्राप्ती होते. हाच खरा अंतर्योग आहे. त्यामुळे प्राणांची गती उर्ध्व होऊन खरा अंतर्यागही घडतो. मात्र सद्‌गुरूंच्या कृपेनंतरही जर पुण्यसंचय कमी पडला, आधार दुर्बल असला, जडता अधिक असली व पूर्वजन्मींचे संस्कार आड येत असले तर सद्‌गुरू मंत्र, हठ, लय व राज म्हणजे ध्यान यांपैकी एखाद्या बाह्ययोगसाधनेचा साधकाला अवलंब करावयास लावून, उपरोक्त दोष दूर करून, त्याची शक्ती जागृत करण्याचा प्रयत्न करतात. एकदा शक्ती जागृत झाली की, बाह्य गुरूंचे कार्य संपते व जागृत शक्तीच्या रूपाने असलेल्या आंतरगुरूचे कार्य सुरू होते. यालाच महर्षी पतंजलींनी " स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनाऽनव-

च्छेदात् ।। समाधिपाद १.२६ ।।" असे "योगसूत्रात" म्हटले आहे. हा आतून जागृत शक्तीच्या रूपाने प्रकट झालेला ईश्वर पूर्वी होऊन गेलेल्या सर्व गुरूंचाही गुरू आहे; कारण या गुरूला काळाचे बंधन नाही. असे हे नाथसंप्रदायाचे किंवा सिद्धयोगाचे महिमान असून ते सिद्धयोगदीक्षासंपन्न श्रीनिळोबाराय यांनी " श्रीसंतज्ञानेश्वरमहाराजांनीं श्रीमद्भगवद्गीता उकलून ज्ञानेश्वरीच्या रूपाने नाथसप्रदायाची थोरवी प्रकट केली, " असे आपल्या अभंगात श्रीज्ञानेश्वरमहाराजांची गुरुपरंपरा व नाथसंप्रदायाचे रहस्य सांगताना स्पष्ट केल्याचे आपण दुसऱ्या प्रकरणात पाहिलेच आहे. श्रीनिळोबाराय यांनी असे म्हटल्यामुळे व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ' ना आदिगुरु शंकरा –।। लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा ससरा। जाला जो आगुतें ।। १८.१७५९ ।। " असे ज्ञानेश्वरीत म्हटलेले असल्यामुळे नाथसंप्रदाय हा अनादिसिद्ध असून श्रीमद्भगवद्गीता हा या संप्रदायाचा मूळ ग्रंथच आहे हे स्पष्ट होते. श्रीमद्भगवद्गीता तर उपनिषदांचे सार व सर्व शास्त्रांचे माहेर असल्यामुळे हा संप्रदाय सर्व संप्रदायांना व्यापून राहिला असून तो सर्वांचा आधार ठरतो. वसिष्ठ ऋषींकडून श्रीरामचंद्रांना झालेल्या दीक्षेचे वर्णन " शक्तिपातवशोन्मेषप्रकटामलचिद्घनः । " या शब्दात जेव्हा "योगवासिष्ठात" वाचावयास मिळते, " कृतांजलिं ब्रह्ममयेन कंबुना पस्पर्श बालं कृपया कपोले । स वै तदैव प्रतिपादितां गिरं दैवी परिज्ञातपरात्मनिर्णयः । " असे शंखस्पर्शद्वारा ध्रुवाला महाविष्णूंकडून शक्तिपातदीक्षेने प्राप्त झालेल्या दिव्य वाणीचे वर्णन " ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें। जैसें कपोल शंखें शिवतलें। आणि वेदांचियेही मती ठेलें । तें लागला बोलों ।। ११.१८४ ।। " या प्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात अवतरलेले दिसते, तामीळ महाकवी कंबन यांनी "रामाने उभ्या आयुष्यात सीतेशिवाय कुणालाही आलिंगन दिले नव्हते, ऋषींनासुद्धा हे भाग्य लाभले नाही, हनुमंताला ते मिळाले. रामाच्या आलिंगनाने शक्तिपात होऊन हनुमंत कृतार्थ झाला. " अशा प्रकारे " कंबन रामायणात " केलेले व " इत्युक्त्वा प्रीतिहृष्टांगो रामस्तं परिषस्वजे । हनूमंतं कृतात्मानं कृतकार्यमुपागतम् ।।" असे महर्षी वाल्मीकींनीं "रामायणात" केलेले वर्णन पाहिले, " तो अवधूत जाण दत्तात्रेया । तेणे आलिंगुनि यदुराया । निजरूपाचा बोधु तया । अनुभवावया दीधला ।। " हे " श्रीनाथभागवतील " यदु-अवधूत संवादातील श्रीदत्तात्रेयांनीं यदुराजाला व ।। हर्षें देतां आलिंगन । कृष्ण विसरला कृष्णपण । उद्धव स्वानंदनिमग्न । उद्धवपण विसरला ।। " असे उद्धवाला श्रीकृष्णांनी आलिंगन देऊन स्पर्शदीक्षा दिल्याचे वर्णन पाहिले, " तद्धैतद्घोर अंगिरसः कृष्णाय देवकीपुत्रायोक्त्वोवाचापिपास एव स बभूव । " हे " छांदोग्य उपनिषदातील " अंगिरसऋषींच्या श्रीकृष्णांवरील कृपेचे वर्णन लक्षात घेतले, " तुकयाचा उत्तम अधिकार । पाहुनि मस्तकीं ठेविला कर । रामकृष्णहरि हा मंत्र । तयालागी सांगितला ।। " हे

श्रीनिरंजन रघुनाथ यांनी लिहिलेल्या " केशवचैतन्यकथातरूमधील " संतश्रेष्ठ श्रीतुकाराममहाराजांच्या दीक्षेचे वर्णन डोळयाखाली घातले, श्रीप्रभुदत्त ब्रह्मचारी यांनी "श्रीचैतन्य चरितावली खंड एकमध्ये " श्रीचैतन्यमहाप्रभूंना त्यांचे गुरू श्रीपुरीजीमहाराज यांनी शक्तिपात दीक्षा दिल्यामुळे भक्तीचा उन्मेष कसा प्राप्त झाला हे "पुरी महाशयने इनके कानमें-गोपीजनवल्लभायनमः – इस दशाक्षर मंत्रका उपदेश कर दिया। मंत्रके श्रवणमात्रसेही ये मूर्च्छित होकर पृथ्वीपर गिर पडे और इन्हें अपने शरीरका बिल्कुल होश नहीं रहा।," वर्णन वाचले, "श्रीगोंदवलेकरमहाराज चरित्र व वाङ्मय " यां ग्रंथात प्रा. के वि. वेलसरे यांनी तुकामाईकडून श्रीगोंदवलेकर महाराजांना शक्तिपाताने ब्रह्मचैतन्यप्राप्ती कशी झाली याचे, " एका अशोकवृक्षाखाली तुकामाईंनी श्रीमहाराजांना हात धरून आपल्यासमोर बसविले आणि बोलले, मी तुला आजपर्यंत फार कष्ट दिले, पण पूर्वी वसिष्ठांनी रामचंद्राला जे दिले ते मी तुला आज या क्षणी देतो! असे सांगून त्यांनी श्रीमहाराजांच्या डोक्यावर हात ठेवला. " हे केलेले वर्णन वाचले व " मग सावळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु । आलिंगला स्वशरणु । भक्तराजु तो ।। १८ १४१८ ।। न पवतां जयाते । काखे सूनि बुद्धीतें । बोलणें मागौतें । वोसरलें ।। १४१९।। ऐसें जें कांहीं येक । बोला बुद्धीसिही अटक । तें द्यावया मिष । खेंवाचें केलें ।। १४२० ।। हृदया हृदय एक जाले । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें । द्वैत न मोडतां केले । आपणाऐसें अर्जुना ।। १४२१ ।। " हा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केलेला श्रीकृष्णाकडून अर्जुनाला प्राप्त झालेल्या दीक्षेचा प्रसंग वाचला म्हणजे " इये आनाने नावें । परि निरूप्य आन नोहे ।। १३. ९६५ ।। " असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले त्याची प्रतीती येऊन सर्व संप्रदायात शक्तिजागृतीच्या निगूढ रहस्याने भरलेले हे आदि नाथांचे, वेदांचे, उपनिषदांचे व सर्व संप्रदायांचे तत्त्व एकच आहे; हे जेव्हा लक्षात येते, तेव्हा सर्व वाद, झगडे व आग्रह दूर होतात. ज्ञानेश्वरीत शांकर किंवा शांभव तत्त्वज्ञानच सांगितले आहे असा आग्रह जेव्हा धरलेला दिसतो तेव्हा " तैसें देख पा विहंगममतें । अधिष्ठूनि ज्ञानातें । सांख्य सद्य मोक्षातें । आकळिती ।। ३.४३ ।। " येर योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें । पूर्णता अवसरे । पावतें होती ।।४४।।" हा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं सांगितलेला साधनमार्गातील पात्रापात्रतेचा किंवा आधारभेदाचा मुद्दा ते विसरून जातात हे निश्चित आहे. एरवी श्रीमदाद्यशंकराचार्यांनी केलेले गीताभाष्य हे विहंगम गतीने जाणाऱ्या साधकांकरिता असून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीचा जो भावार्थ सांगितला आहे तो मुंगीच्या पावलाने जाणाऱ्या मंद साधकांकरिता आहे एवढाच फरक आहे. येथे शांकर का शांभव हा प्रश्नच नाही. सिद्धयोगाचेच हे दोन स्थरावरील दर्शन आहे एवढेच. बाकी " आपणासारिखे करिती तात्काळ । नाही काळवेळ तयालागी ।। " असे.

श्रीसंत तुकाराममहाराजांनी म्हटल्याप्रमाणे किंवा " तद्ब्रह्मैवाहस्मीत्यनुभव उदितो यस्य कस्यापि चेद्वै । पुंसः श्रीसद्गुरुणाम्तुलितकरुणापूर्णपीयूषदृष्टचा ।। ९१ ।। " म्हणजे श्रीसद्गुरूंच्या अतुलनीय अशा करुणामय अमृतदृष्टीमुळे शक्तीपात होऊन जर कोणाला मी ब्रह्म आहे ज्ञान उद्भवले तर त्याचे मन भ्रमरहित होते, असे श्रीमदाद्यशंकराचार्यांनी " शतश्लोकीमध्ये " म्हटलेलेच सर्वांचे सार आहे त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाची थोरवी नाथसंकेतीच्या दंशाच्या रूपाने ज्ञानेश्वरीत सांगोपांग प्रकट केली आहे. महायोगी गोरक्षनाथांनी यासाठीच पुढीलप्रमाणे " सिद्धसिद्धांतपद्धतीमध्ये " सिद्धयोगाचा किंवा सिद्धमताचा आग्रह तीव्र शब्दात स्पष्ट केला आहे. ते म्हणतात–

> वेदान्ती बहुतर्ककर्कशमतिर्ग्रस्तः परं मायया
> भाट्टाः कर्मफलाकुल हतधियो द्वैतेन वैशेषिका ।
> अन्ये भेदरता विवादविकलाः सत्तत्त्वतो वंचिता–
> स्तस्मात्सिद्धमतं स्वभावसमयं धीरः सदा संश्रयेत ।। ६.७३।।
> सांख्या वैष्णववैदिका विधिपराः संन्यासिनस्तापसाः
> सौरा वीरपराः प्रपंचनिरता बौद्धा जिनश्रावकाः ।
> एते कष्टरता वृथा पथगताः सत्तत्त्वतो वंचिता–
> स्तस्मात्सिद्धमतं स्वभावसमयं धीरः सदा संश्रयेत ।।७४।।
> आचार्या बहुदीक्षिता हुतिरता नग्नव्रत'स्तापसाः
> नानातीर्थनिषेवका जपपरा मौनेस्थिता नित्यशः ।
> एते ते खलु दुःखभारनिरताः सत्तत्त्वतो वंचिता–
> स्तस्मामित्सद्धतं स्वभावयसमयं धीर सदा संश्रयेत ।।७५।।

सिद्धमताची ही सर्वव्यापक, सर्वाश्रयी, सर्वसमन्वयात्मक, द्वैताद्वैतविवर्जित, अनुभूतियुक्त व सामरस्यात्मक ध्येयाची बैठक स्वीकारून " वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो ।। १५.१५ ।। " या गीतेतील सर्व साधनरहस्याच्या अंतिम रहस्याचा उलगडा करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जो भावार्थ प्रकट केला आहे तो सर्व वेदपरंपरादि व ज्ञानोपासनादि साधनक्रमाचा सर्वसारात्मक आविष्कार आहे हे नितांत सत्य आहे. या दृष्टीने ते म्हणतात –

> एऱ्हवीं सर्वांच्या हृदयदेशीं । मी अमुका आहें ऐसी ।
> जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं । ते वस्तु गा मी ।।१५.४२१।।
> परी संतांसवें वसतां । योगज्ञानीं पैसतां ।
> गुरुचरण उपासितां । वैराग्येंसी ।।४२२।।
> यणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे ।
> जयांचें अह विश्रामे । आत्मरूपीं ।।४२३।।

या ओव्यांतून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी नाथसंप्रदायाची सर्व साधनपद्धती त्याच्या पैलूंसह कशी प्रकट केली आहे हे पाहिले म्हणजे ज्ञानेश्वरीतील नाथसंकेतीचा दंश स्पष्ट होईल. शिवशक्तिऐक्य, श्रीगुरुकृपा म्हणजे शक्तिपातयोगदीक्षा व सहजसाधनप्राप्तीने उपलब्ध होणारी सामरस्यात्मक आत्मस्वरूपाची प्राप्ती हे नाथसंप्रदायाचे पैलू किंवा विशेष आहेत. आपण त्यांचा क्रमाने विचार करू.

पहिल्या ओवीत श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, अरे अर्जुना ! तात्त्विक विचार करून पाहिले तर सर्व प्राण्यांच्या हृदयात मी अमुक आहे अशी जी बुद्धी म्हणजे शक्ती रात्रंदिवस स्फुरण पावत असते ती स्फुरण पावणारी वस्तू म्हणजे शक्तीच मी आहे. स्फुरणाऱ्या बुद्धीला शक्ती म्हणण्याचे कारण "महार्थमंजरीत" महायोगी श्रीगोरक्षनाथांनी सांगताना असे म्हटले आहे की–

**भवंत्यस्येव पर्याय: शक्तिरैश्वर्यमुद्यमः ।**
**स्पंद: स्वतंत्रता स्फूर्तिरूर्मिरोज: कलेत्यपि ॥**

परब्रह्माच्या एकरस ज्ञातृत्व–कर्तृत्वाचा त्याच्या तीव्र झालेल्या इच्छेने स्फोट होण्याचा जो स्वभाव त्याचेच शक्ती, ऐश्वर्य, उद्यम, स्पंद, स्वतंत्रता, स्फूर्ती, उर्मी, ओज व कला हे पर्यायवाचक शब्द आहेत. त्यामुळे स्फुरणारी बुद्धी म्हणजेच शक्ती होय व ती वस्तूच मी आहे असे श्रीकृष्णनाथ स्वतः श्रीज्ञाननाथांच्या मुखातून सांगून शिवशक्तीचे ऐक्य प्रगट करीत आहेत. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धासिद्धांतपद्धतीत" शिवशक्तीचे हे ऐक्य पुढीलप्रमाणे प्रकट केले आहे. सुरुवातीलाच ते म्हणतात–

**आदिनाथं नमस्कृत्य शक्तियुक्तं जगद्‌गुरुम् ।**
**वक्ष्ये गोरक्षनाथोऽहं सिद्धसिद्धांतपद्धतिम् ॥**

शक्तियुक्त आदिनाथांना किंवा शिवांना नमस्कार करूनच गोरक्षनाथ सिद्धयोगामुळे प्राप्त होणाऱ्या सिद्धांताच्या पद्धतीचे किंवा मार्गाचे निरूपण करीत आहेत. शक्तियुक्त शिव हेच अंतिम सत्य आहे. ही वस्तू स्वयंप्रकाश, स्वसंवेद्य, अनंत, अविनाशी, व्यक्ताव्यक्तविवर्जित, द्वैताद्वैतविलक्षण व शिवशक्तियुक्त आहे. तीच विश्वाच्या उत्पत्ती, स्थिती व लयाला कारणीभूत आहे. असे असले तरी शिवातील शंकार हा शक्तिवाचक असून शक्तिविना शिव हा केवळ शव आहे असे "देवीभागवतात" म्हटले आहे.

**शिवोऽपि शवतां याति कुंडलिन्या विवर्जितः ।**

शिवातील इकार हीच कुंडलिनी शक्ती आहे. तिच्याशिवाय तो शववत् होत असल्याने त्यांचा अखंड अभेद आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ॥ १८.१६३३ ॥ " असे म्हणून हे शिवशक्तीचे ऐक्य जसे ज्ञानेश्वरीत प्रकट केले आहे त्याप्रमाणेच अमृतानुभवात ते पुढील श्लोकातून व ओव्यातून प्रकट झाले आहे.

साधं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ।
ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ।।३।
जो प्रियचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचे सरोभरी ।
चारुस्थळी एकाहारी। एकांगाचा ।।१.१।।
जयां एकसत्तेचें बैंसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणें ।
जे अनादि एकपणें । नांवती दोघें ।।१.८।।

महायोगी गोरक्षनाथांनी ' सिद्धासिद्धांतपद्धतीत " हेच विचार अगदी असेच प्रकट केले आहेत. ते म्हणतात–

अलुप्तशक्तिमान्नित्यं सर्वाकारतयास्फुरन् ।
पुनः स्वेनैव रूपेण एकएवावशिष्यते ।।४.१२।।
शिवोऽपि शक्तिरहितः कर्तुं शक्तो न किंचन ।
स्वशक्त्या सहितः सोऽपि सर्वस्याभासको भवेत् ।।१३।।
शिवस्याभ्यंतरे शक्तिः शक्तेरभ्यन्तरे शिवः ।।
अंतरं नैव जानीयात् चंद्रचंद्रिकयोरिव ।।२६।।

ज्याची शक्ती कधीही कमी होत नाही असा परमात्मा नित्य सर्वशक्तिमान आहे. तो जडचेतनस्थावरजंगमादि सर्व ससाराच्या रूपाने समुद्रावरील फेस किंवा तरंगांच्याप्रमाणे व्यावहारिक प्रपंचावस्थेमध्ये भासमान होतो. परंतु खरे तर तो आपल्या स्वतःच्या शिवशक्त्यात्मकरूपाने एकटाच शिल्लक राहतो. शक्तियुक्त परमेश्वरच सर्व काम करण्यास समर्थ आहे. एकटा नाही. शक्तिरहित परमेश्वर काहीही करू शकत नाही. यासाठी आपल्या स्वतःच्या शक्तीने संपन्न असलेला शिवच सर्व संसाराचा साक्षी म्हटला जातो. शिवात शक्ती व शक्तीत शिव सामावलेले असून ते एकरूप झालेले असतात. ज्याप्रमाणे चंद्र व चांदणे या गोष्टी दोन नसतात त्याप्रमाणेच शिवशक्तीत अंतर नसते. एकाच अद्वितीय परमतत्त्वास दृष्टिभेदानुसार शिव किंवा शक्ती ही संज्ञा प्राप्त होते. "तैसी क्रियाशक्ति पवनीं । असे जे अनपायिनी । ते पडिली नानास्थानीं । नाना होय ।। १८.३३३ ।।" अशी शक्तीच निरनिराळ्या रूपाने भासते एवढेच. एरवी हा सर्व शिवशक्तीच्या संकोचविकासाचा खेळ आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

हें असो जलतरंगा । नाहीं सिनानेपण जेवीं गा ।
तेवीं दिसता प्रकाशु जगा । आपणचि जो ।।१५.५५३।।
आपलिया संकोचविकाशा । आपणचि रूप वीरेशा ।
हा जळी चंद्र हन जैसा । समग्र गा ।।५५४।।

पाणी व तरंगात ज्याप्रमाणे काही वेगळेपणा नसतो त्याप्रमाणे प्रकाश म्हणजे शक्तीत व आपणात म्हणजे शिवात काहीही फरक नसतो. पाण्यात दिसणाऱ्या

प्रतिबिंबास ज्याप्रमाणे चंद्रच सर्वस्वी कारण असतो त्याप्रमाणे शिवशक्तीचा संकोच-विकास हेच विश्वाच्या उभारणी संहारणीचे कारण आहे. या दृष्टीनेच शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की–

**न शिवेन विना शक्तिर्न शक्तिरहितः शिवः ।**
**अन्योन्यं च प्रवर्तंते अग्निधूमौ यथा प्रिये ।**
**न वृक्षरहिता छाया नच्छाया रहितो द्रुमः ।। कौलज्ञाननिर्णय ।।१७.८.९।।**
**प्रसरं भासते शक्तिः संकोचं भासते शिवः ।**
**तयो संयोगकर्ता यः स भवद्योगिराट् ।। सिद्धसिद्धांतपद्धती ।।४ २६।।**

ज्याप्रमाणे वृक्षाशिवाय छाया राहू शकत नाही व अग्नीशिवाय धूर असू शकत नाही त्याप्रमाणे शिवाशिवाय शक्ती व शक्तीशिवाय शिव राहू शकत नाहीत. ते अवच्छेद्य आहेत. एकाशिवाय दुसऱ्याची कल्पनाच होऊ शकत नाही इतके ते एकरूप आहेत. विस्तार, प्रसार किंवा उभारणीत शक्ती भासमान होते व संकोच, लय किंवा साम्यवस्थेत शिव भासमान होतो. अशा शिवशक्तीचे ऐक्य करणाराच योगिश्रेष्ठ होतो. असे समरसीकरण साधणे हेच नाथयोगाचे परमध्येय आहे.

हे शिवशक्तीचे ऐक्य वेदोपनिषदोक्तच आहे. "अथर्ववेदाच्या दहाव्या कांडातील आठव्या सूक्तात" ऋषी म्हणतात–

**एष सनत्नी सनमेव जातैषा पुराणी परि सर्वं बभूव ।**
**मही देव्युषसो विभाती सैकेनंकेन मिषता विचष्टे ।।**

ही शक्ती सनातन आहे. सनातन काळापासून ती विद्यमान आहे. तीच फार प्राचीन शक्ती परमात्म्याशी अभेदरूपाने असल्याने सर्व काही होऊन राहते. हीच महान् शक्तिदेवी साधकाच्या ठिकाणी जागृत होऊन उषःकाल करते.

"तैत्तिरीय उपनिषदात" जगदोत्पत्तीचे वर्णन करताना सुकृत किंवा रस म्हणजे शक्ती ही शिवाशी अभिन्न असून तिच्या प्राप्तीने साधक आनंदी होतो म्हणून वर्णन केले आहे "असद्वा इदमग्र आसीत् । ततो वै सदजायत।तदात्मानंस्वयमकुरुत। तस्मात्तत्सुकृत-मुच्यत इति । यद्वै तत्सुकृतं रसो वै सः। रसंह्येवायं लब्ध्वानंदी भवति ।। २.७. १।। पूर्वी एक शिवशक्तियुक्त अव्याकृत ब्रह्मच होते. यातील शिवाने आपल्या शक्तीच्या साहाय्याने आपल्यालाच नामरूपात्मक जगताच्या रूपाने रचले. स्वतःच स्वतः रचले म्हणून याला सुकृत म्हणतात. हे जे सुकृत आहे तोच रस म्हणजे शक्ती होय व तोच शिव होय. हा रस प्राप्त झाला की मनुष्य आनंदी होतो.

"केनोपनिषदातही" विद्योमारूपिणी प्रादुरभूत् स्त्रीरूपा ।।३.१२।।" व "सा ब्रह्मेति होवाच ।। ४.२६ ।।" असे म्हटले आहे. शंकराची शक्ती स्त्रीरूप उमा विद्यारूप म्हणजे चैतन्यरूपच आहे; कारण देवांपुढे प्रकट झाल्यावर ती स्वतः म्हणाली की मीच ते ब्रह्म आहे." अशा प्रकारेचे शिवशक्तीचे अनादि ऐक्य "सूतसंहितेतही,"

प्रकट करताना महर्षी व्यासांनी असे म्हटले आहे की—

**सदाकारा परानंदा संसारोच्छेदकारिणी ।**
**सा शिवा परमादेवी शिवाभिन्ना शिवंकरी ।।**
**एषा सा साक्षिणी शक्तिः शंकरस्यापि शंकरी ।**
**शिवाभिन्ना तयाहीन. शिवः साक्षात् निरर्थकः ।।**

शिवाची शक्ती शिवा परमदेवी, सतस्वरूप, परानंदरूप, संसाराचा उच्छेद करणारी, शिवाशी एकरूप असणारी व आत्यंतिक कल्याण करणारी आहे. ही साक्षात् शंकराची साक्षीरूपाने असणारी शांकरी शक्ती असून ती शिवाहून अभिन्न आहे. तिच्याशिवाय शिव अगदी निरर्थक असतो या श्लोकांवरील आपल्या टीकेत श्रीविद्यारण्यस्वामी म्हणतात, "तथाच शिवशक्त्योर्भेदावभास एव मिथ्या न तु प्रपच्च-वत्स्वरूपमपीत्यर्थः।" शिव व शक्ती हे दोन भिन्न आहेत असे मानणे हेच खोटे आहे शिवशक्तीचे स्वरूप जडविनाशी प्रपंचाप्रमाणे खोटे नाही." जैसी समीरेसकट गति। का सोनियासकट कांति । तेंवि शिवेंसी शक्ति। आघविचि जे ।। अमृ १.४१।। असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अमृतानुभवात म्हटल्याप्रमाणेच ते आहे.

सारांश प्रकृतिपुरुष, क्षराक्षर, जीवचैतन्य, मायाब्रह्म, जडाजड इत्यादि नावांनी ज्ञानेश्वरीत आलेले विवेचन शिवशक्तीच्या अनादि ऐक्याचे, एकरूपतेचे व एकरसतेचेच द्योतक असून " इये आनानें नावें । परी निरूप्य आन नोहे । हें लक्षण न चुकावें। पुढतपुढती ।। १३.९६१ ।।" असा स्पष्ट इषारा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तरी केवळ जे सत्ता । तो पुरुषु गा पंडुसुता । प्रकृतीतें समस्ता । क्रिया नाम ।।१३. ९६६।।" असे वर्णन करताना दिला आहे.

नाथसंप्रदायाचे दुसरे परमरहस्य प्रकट करताना वर उधृत केलेल्या दुसऱ्या ओवीत श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, शिवशक्तीचे ऐक्य समजले व तसा बुद्धीचा निश्चय झाला तरी त्याची अनुभूती येण्यासाठी संतांकडे, गुरूकडे गेले पाहिजे. त्यांच्या चरणांची सेवा केली पाहिजे; कारण त्यांनी कृपा केल्याशिवाय, दीक्षा दिल्याशिवाय व शक्तिसंक्रमण केल्याशिवाय योगाने प्राप्त होणाऱ्या ज्ञानात प्रवेशच होऊ शकत नाही. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तें ज्ञान पैं गा बरवें । जरी मनीं आथि आणावें ।**
**तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंसीं ।।४.१६४।**
**जे ज्ञानाचा कुरुठा । तेथ सेवा हा दारवंठा ।**
**तो स्वाधीन करी सुभटा । वोळगोनी ।।१६५।।**
**तरी तनुमनुजीवें । चरणांसीं लागावें ।**
**आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ।।१६६।।**
**मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगती पुसिलें ।**

**जेणें अंतःकरण बोधलें। संकल्पा नये ॥१६७॥**
**जयाचेनि वाक्य उजिवडें। जाहलें चित्त निधडें।**
**ब्रह्माचेनि पाडें। निःशंकु होय ॥१६८॥**
**तें वेळीं आपणपेयां सहितें। इयें अशेषेंही भूतें।**
**माझ्या स्वरूपीं अखंडितें। देखसी तूं ॥१६९॥**
**ऐसे ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकारु जाईल।**
**जैं गुरुकृपा होईल। पार्था गा ॥१७०॥**

ज्यावेळी साधक सद्‌गुरूंची तनमनपूर्वक सेवा करतो त्यावेळी ते एका शब्दाने, स्पर्शाने, दृष्टिपाताने व नुसत्या संकल्पपूर्वक कृपेने शिष्याचे चित्त म्हणजे चैतन्यशक्ती कुंडलिनी निधडी करून म्हणजे निद्रिस्त अवस्थेतून मोकळी, मुक्त व उर्ध्वगामी करून त्याचे अंतःकरण आत्मानुभूतीच्या ऐश्वर्याने संपन्न करून संकल्पविकल्परहित करतात. त्यावेळी साधकाच्या ठिकाणी ज्ञानप्रकाशाचा उदय होऊन त्याचा मोहांधकार नाहीसा होतो व "सर्वं खलु इदं ब्रह्म" या आत्मप्रत्ययाने तो कृतकृत्य होतो. पण हे सर्व केव्हा घडते? जेव्हा गुरुकृपा होईल तेव्हाच! हेच नाथसंप्रदायाचे सार आहे. हेच रहस्य होय आणि हाच दंश होय. श्रीज्ञानेश्वरमहाराजांना ज्ञानेश्वरीत जे सर्व काही साराचे सार, रहस्याचे रहस्य व मनाच्या अंतरीचे अखेरचे गूज म्हणून काही सांगावयाचे असेल तर ते "गुरोः कृपैव केवलम्" एवढेच आहे. या पलीकडे अक्षरशः काही नाही; कारण ज्ञानाच्या भेटीच्या उपायापासून तो नैष्कर्म्यसिद्धीपर्यंत ते आपल्या विवेचनाचे सूत्र गुरुकृपेच्या केंद्रबिंदूला आणून भिडवितात व सर्व प्रश्नांची उत्तरे "जैं गुरुकृपा होईल ॥ ४.१७० ॥, तैसी गुरुकृपा होये। तरी करितां काय आपु नोहे ॥ ६ ३५ ॥ व आधारु सानुकूळ श्रीगुरु ॥ १७'१ ॥" अशीच देतात. "गोरक्षसिद्धांतसंग्रहाच्या" सुरवातीलाच "अस्मिनमार्गे सर्वश्रेयोमूलभूतो गुरुरेव।" असा जो महासिद्धांत महायोगी गोरक्षनाथांनी मांडला आहे तो या मार्गाच्या दृढमूल धारणेचा द्योतक असून "सिद्धसिद्धांतपद्धतीत" उपरोक्त महासिद्धांताचा विस्तार करताना श्रीगुरुकृपा हाच एकमेव उपाय व सिद्धयोग हाच एकमेव मार्ग होय असे निभ्रांतपणे कथन करताना ते म्हणतात की—

**तज्ज्ञेयं सद्‌गुरोर्वक्त्रान्नान्यथा शास्त्रकोटिभिः।**
**न तर्कशब्दविज्ञानान्नाचाराद्वेदपारगात् ॥५.३१॥**
**वेदान्तश्रवणान्नैव तत्त्वमस्यादिबोधनात्।**
**न हंसोच्चारणाज्जीवब्रह्मणोरैक्यभावनात् ॥३२॥**

**न ध्यानान्नजपाल्लीन: सर्वज्ञ: सिद्धिपारग: ।**
**स्वेच्छो योगी स्वयं कर्ता लीलया चाजरामर: ।।३३।।**
**अवध्योदेववंत्यानां क्रीडति भैरवो यथा ।**
**इत्येवं निश्चलो योऽसौ क्रमेणाप्नोति लीलया ।।३४।।**
**असाध्या: सिद्धय: सर्वा: सद्‌गुरु: करुणांविना ।**
**अतस्तु गुरुरासेव्य: सत्यमीश्वरभाषितम् ।।३५।।**

जोपर्यंत सद्‌गुरूंच्या मुखातून उपदेशावली निसृत होऊन शक्तिपात होत नाही तोपर्यंत कोटी कोटी शास्त्रे वाचून आमतस्वरूपाची प्राप्ती होत नाही. शुष्क तर्काने, विज्ञानाने, आचाराने, वेद पारगत होण्याने, वेदान्त श्रवणाने, तत्त्वमसि इत्यादि महावाक्य जाणल्याने, सोऽहं मंत्रोच्चाराने, जीव व ब्रह्माबद्दल अभेद भावना केल्याने, ध्यानाने, जपात लीन झाल्याने किंवा इतर कशानेही साधक सर्वज्ञ व सिद्ध होऊ शकत नाही. ज्यावेळी सद्‌गुरू कृपा करतात त्यावेळी सर्व काही सिद्ध होते. यासाठी श्रीगुरूची सेवा व आश्रय आवश्यक आहे. यामुळे सद्‌गुरूची व्याख्या करताना ते म्हणतात " अतएव महासिद्धानां मते प्रोक्तं वाङ्मात्रेण वा दृक्पातमात्रेण वा सम्यगवलोकनेन वा तत्क्षणान्मुहुर्विश्रांतियुक्तं करोतीति य: स सद्‌गुरुर्भवति ।।५.७२।।" महासिद्धांचे असे मत आहे की, जो आपल्या शब्दाने दष्टिपाताने किंवा कृपादृष्टीने व सम्यक् अवलोकनाने म्हणजे दर्शनाने शिष्याच्या ठिकाणी शक्तिपाताने शक्तिसंक्रमण करून एकाक्षणात त्याला विश्रांती प्राप्त करून देतात त्यालाच सद्‌गुरू म्हणतात. श्रीसद्‌गुरुशिवाय अशी विश्रांती त्रिभुवनात कोणी देऊ शकत नाही; कारण शक्तिपात करणारे सद्‌गुरू भूलोकी दुर्लभ असतात. त्यांची दीक्षा होणे, कृपा होणे किंवा अनुग्रह होणे दुर्लभ असते आणि अशा सद्‌गुरूंची सेवा करण्याचे महद्‌भाग्य लाभणे हे त्याहून दुर्लभ असते. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, शतकोटी जन्म मी पुण्याई केली म्हणून असे सद्‌गुरू मला मिळाले व त्यांच्या कृपेने मी ज्ञानेश्वरी लिहू शकलो. गुरुकृपेची ही अनन्यसाधारण धारणा ज्ञानेश्वरीत पावला-पावलावर आपले अस्तित्व प्रकट करताना पाहिली म्हणजे नाथसंप्रदायाचे रहस्य समजल्याचा आनंद होतो व श्रीगुरुकृपा म्हणजे नाथसंप्रदाय होय हे समीकरण मनात रुजून वेदकालापासून आजपर्यंत जेथे जेथे अशा अलौकिक गुरुकृपेचा आविष्कार झाला आहे तेथे तेथे नाथसंप्रदाय आहे हे मनाला पटून क्षुद्र वादविवाद, संकुचित दृष्टी व मताभिमानादि अहंकार गळून पडतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अव्वलपासून अखेरपर्यंत श्रीगुरुकृपेचा जो उद्‌घोष केला आहे, त्याचा पुढे काही ओव्या उद्‌धृत करून आस्वाद घेऊ.

**मज हृदयीं सद्‌गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।।१.२२।।**
**म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होईजे ।**

जैसें मूळींसिचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥१.२५॥
तैसा पुढतपुढता तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि ।
जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ॥१.२७॥
परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोले मी सधरु ।
जे सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥१.७५॥
तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।
म्हणोनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥६.३५॥
तैसीच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली ।
तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥७.१३१॥
म्हणोनि भाग्य जैं सानुकूळ । जालिया केले उद्यम सदां सफळ ।
तैसे श्रुताधीत सकळ । गुरुकृपा साच ॥१०.१६८॥
श्रीगुरूंचे पाय । जैं हृदय गिंवसूनि ठाय ।
तैं येवढें भाग्य होय । उन्मेखासी ॥१३.५॥
तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु ।
राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ॥१८.१७२९॥
म्हणोनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्वासही प्रबंध होआवे ।
श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥१८.१७३५॥
ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें ।
ग्रंथु नोहें हें कृपेचें । वैभव तिये ॥१८.१७५१॥

अशा प्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीगुरू व त्यांच्या कृपेचे वर्णन करून संप्रदाय परंपरेचे मर्म कथन केले आहे. "गुरुमूलमिदं सर्वं शास्त्रज्ञानं सुरेश्वरि ।" हा सकल आगमनिगमांचा मूर्धन्य सिद्धांत त्यांनी उपरोक्त ओव्यातून व तेराव्या अध्यायातील " आचार्योपासनं ॥७॥ " या पदाचा भावार्थ लिहिताना प्रकर्षत्वाने मांडला आहे. " ज्ञानसंकलिनीतंत्रात " या दृष्टीनेच असे म्हटले आहे की—

देहस्था सर्वविद्याश्च देहस्थाः सर्वदेवताः ।
देहस्थाः सर्वतीर्थानि गुरुवाक्येन लभ्यते ॥८॥
न मित्रं न च पुत्राश्च न पिता न च बांधवाः ।
न स्वामि च गुरोस्तुल्यं यद्‌दृष्टं परमं पदम् ॥९२॥
न च विद्या गुरोस्तुल्यं न तीर्थं न च देवताः ।
गुरोस्तुल्यं न वै कोऽपि यद्‌दृष्टं परमं पदम् ॥९३॥

इतर सर्व तंत्रादि ग्रंथाचे हेच सार आहे व सकल संतमहात्म्यांचे शब्दभेदाने हेच सांगणे आहे. म. म. श्रीगोपीनाथ कविराज " भारतीय संस्कृति और साधना," खंड दोन, मधील " मनुष्यत्व " या लेखात उपरोक्त विचारांचे उद्‌घाटन करताना

म्हणतात, " सद्‌गुरुकी कृपाके बिना पूर्णत्वका पथ उन्मुक्त नहीं होता। गुरुकी कृपासे जब वह मार्ग प्राप्त हो जाता है, तब जीवका जीवभाव अर्थात् प्राकृत भाव कट जाता है तथा दिव्य और अप्राकृत भावका उदय होता है। उस समय क्रमशः चैतन्यशक्तिकी अभिव्यक्ति होती हैं। सद्‌गुरु वस्तुतः श्रीभगवान् हैं। उनकी अनुग्रहशक्तिही गुरुपद वाच्य हैं। वे उपेय हैं अर्थात् उपायके सहयोगसे प्राप्त होते हैं और उपाय भी वे ही स्वयं हैं। वे अपना मार्ग स्वयं न दिखावे तो कौन उनको खोज निकाल सकता है। वे ही पथ हैं तथा वे ही पथके गंतव्य स्थान हैं। यह पथ छोटा है या बडा–इस को भी एकमात्र वे ही जानते हैं। उनका अनुग्रह शिथिल होनेपर लघु पथ भी दीर्घरूपमे परिवर्तित हो जाता है और महान् अनुग्रहके समय क्षणभरमेंही पथ अदृश्य भी हो जाता है। एकमात्र स्वयंप्रकाश वे ही अखंड भावसे विराजमान हो जाते हैं।"

सारांश, " किमत्र बहुनोक्तेन शास्त्रकोटिशतेन च। दुर्लभा चित्तविश्रांतिर्विना गुरुकृपां पराम् ॥५.७८॥" असे जे महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांतपद्धतीत" म्हटले आहे व " दुर्लभो विषयत्यागो दुर्लभं तत्त्वदर्शनम्। दुर्लभा सहजावस्था सद्‌गुरोः करुणां विना॥ ४.९ ॥" असे जे " हठयोगप्रदीपिकेत " म्हटले आहे तेच सर्वांचे सार आहे. असे हे श्रीसद्‌गुरुकृपेशिवाय सर्व गोष्टी तुषकंडनवत् व्यर्थ असल्याचे सार निपटनिरंजनांनी पुढीलप्रमाणे मांडले आहे. ते म्हणतात–

**जोगजुगत कर देखे। ध्यानकू कर देखे।**<br>
**करमकू कर देखे। कुचभी भयो नहीं॥१॥**<br>
**स्नानसंध्या कर देखे। देवपूजा कर देखे।**<br>
**पवन शीस चढा देखे। बालभी उखाडो नहीं॥२॥**<br>
**काशी रामेसर फिर देखे। द्वारका जगन्नाथ देखे।**<br>
**अजोध्या मथुरा देखे। देव तो मिला नहीं॥३॥**<br>
**तनमो खाक चढाई। जटादाढीभी बढाई।**<br>
**नींबकी पात खाई। झ्यांट भी भयो नहीं॥४॥**<br>
**कहे निपटनिरंजननाथ। मिले जब सद्‌गुरु दयाल।**<br>
**तब एक पलखमो उजाल। सब खलकभर अलख दिखायो॥५॥**

श्रीगुरुकृपा म्हणजेच शक्तिपात दीक्षा होय. पुढे आठव्या प्रकरणात याची अधिक विस्ताराने चर्चा केली आहे. " दीक्षामात्रेण मुक्तिः स्याद्भक्तिमात्राद् गुरोः सदा॥" हे स्वच्छंदतंत्रातील या बाबतीतील रहस्य ध्यानात ठेवले म्हणजे विवेचनाचे सूत्र स्पष्ट होईल.

" तिसऱ्या ओवीत श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, अशा प्रकारे श्रीसद्‌गुरूंच्या दीक्षाप्राप्तीने शक्ती सुषुम्नेतून ऊर्ध्वगामी होऊन शिवस्वरूपी मिळू लागली म्हणजेच

सर्व अज्ञान नाहीसे होते व आत्मस्वरूपात 'अहं'पणा चिरविश्राम पावतो. 'अहं' म्हणजे पिंडब्रह्मांडात्मक विस्तार पावलेली समग्र शिवशक्ती होय. शास्त्रात असे म्हटले आहे की—

अकारः सर्ववर्णाग्र्यः प्रकाशः परमः शिवः।
हकारोऽन्त्यकलारूपो विमर्शः कथितः प्रिये ।।

" 'अ' कार हा सर्व वर्णांच्या सुरुवातीला असून तोच प्रकाशात्मक परमशिव आहे. 'ह' कार हा सर्व वर्णांच्या शेवटी असून तो कलारूप म्हणजे शक्तिरूप व विमर्शात्मक म्हणजे विश्वाची उभारणी व संहारणी करणारा आहे. ("विमर्शोनाम विश्वाकारेण विश्वप्रकाशेन विश्वसंहारेण वा अकृत्रिमोऽहमिति स्फुरणम्।।") असे हे 'अहं' चे स्वरूप ध्यानात घेतले म्हणजे 'अ' व 'ह' हे जे विभक्त झाल्यासारखे वाटतात त्यांचे एकीकरण होणे होय. हे झाले की साधकाला आत्मस्वरूपात विश्रांती मिळते व त्याचे सर्व अज्ञान आपोआप नाहीसे होते. हे आपोआप किंवा सहज होणे म्हणजे साधनाने स्वतःहून होऊन साधकाला ब्रह्मप्राप्ती होणें होय. हा नाथसंकेतीचा अपूर्व दंश आहे. हे रहस्य जोपर्यंत अनुभूत्यात्मकरीतीने आत्मसात होणार नाही तोपर्यंत नाथसंप्रदायाची सर्व चर्चा " जितके अनुमानाचे बोलणे । तितुके वमनप्राये त्यागणे ।।" या समर्थोक्तिप्रमाणे त्याज्य आहे असे समजावे लागते; कारण "एऱ्हवीं सोपें योगासारिखें । कांहीं आहे ?।।६.३६३।।, तरि तोचि योगु बापा। एके परी आहे सोपा ।।६.३७५।।, ऐसी प्राप्ति सुखोपायें ।। आहे येणें ।।६.३८६।। व या सोपिया योगास्थिति । उकलु देखिला गा बहुतीं ।।३.३८७।।" अशा प्रकारे हा योग-मार्ग सोपा आहे असे सांगणारे श्रीज्ञानेश्वरमहाराजच " वांचूनि योगाचेनि बळें। अधिक कांहीं मिळें । ऐसें नाहीं आगळें । कष्टचि तयां ।।१२.५९।।" व " म्हणौनि योगाचियां वाटा । जे निगाले गा सुभटा । तयां दुःखाचाची शेलवांटा । भागा आला ।।१२.६९।।" असे सांगून जेव्हा योगमार्ग हा दुःखकारक आहे असे म्हणू लागतात तेव्हा हे लक्षात येते की, श्रीगुरुकृपेने परंपराप्राप्त असा सहजसिद्धयोग सोपा असून इतर हठादि योग हे दुःखकारक आहेत असेच त्यांना सांगावयाचे आहे. एरवी या विरोधाचा परिहार होणार नाही.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत " जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहुसाल सांडे । तैसे सोहोकासन सांगडें । सोहपें होय ।। ५.८।। " व " तो पव्हण्याहूनि पायउतारा । सोहपा होय ।। ५.१६५ ।। " असे जे ज्ञानप्राप्तीचे साधन सांगितले आहे ते " हेंचि कवणें एकें मिसें । चित्त माझे ठायीं प्रवेशें । येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे।। ९.४६३ ।। " या सिद्धांताप्रमाणे श्रीगुरुकृपेने, ईश्वराच्या कृपेने, कालपरिपाकाच्या प्रभावाने, तीव्रतम संवेगाने, अव्यावृत भजनाने किंवा अन्य कोणत्याही कारणाने किंवा निमित्ताने चित्त म्हणजे चैतन्यशक्ती

माझ्या ठायी म्हणजे सुषुम्नेत प्रविष्ट झाली म्हणजे ती शनैः शनैः ऊर्ध्वमुख होऊन आपण होऊन साधकाचे सर्व जडत्व हरण करून शेवटी आपली आपणच शिवरूप होते, असे आहे. येथे साधकाला स्वतःला काहीही प्रयत्न करावा लागत नाही. असा हा स्वतः होणारा योग आहे. मुख्यतः श्रीगुरुकृपेने किंवा प्रसंग विशेषी अन्य तऱ्हेने आत्मशक्ती जागृत झाल्यावर शिष्य स्वतःच या योगमार्गाची वाट चालू लागतो. जगदंबा कुंडलिनी शक्ती हा योग प्रत्येक साधकाच्या धारणेनुसार स्वतःच करीत असल्याने साधकाला बाहेरून कोणाचेही मार्गदर्शन घेण्याचे कारण पडत नाही. यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण ।**
**करूनि सद्‌गुरुस्मरण । अनुभविजे ।।६.१८६।।**
**जेथ स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे ।**
**जंव काठिण्य विरे । अहंभावाचें ।।१८७।।**
**विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे ।**
**मनाची घडी घडे । हृदयामाजीं ।।१८८।।**
**ऐसे ऐक्य हें सहजें । फावें तंव राहिजे ।**
**मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ।।१८९।।**
**आतां आंगातें आंग वरी । पवनातें पवनु धरी ।**
**ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागे ।।१९०।।**
**प्रवृत्ति माघौति मोहरे । समाधि ऐलाडी उतरें ।**
**आघवे अभ्यासु सरे । बैसतखेंवो ।।१९१।।**

सद्‌गुरुस्मरण करून आसनावर डोळे मिटून स्वस्थ बसले की या योगाचा अभ्यास आतून आपोआप सुरू होतो. अनुभूती येऊ लागते. नुसत्या सद्‌गुरुस्मरणाचे सामर्थ्य इतके अलौकिक असते की, आदरपूर्वक केलेल्या श्रीगुरुस्मरणाने अहंभावाचा कठीणपणा नाहीसा होऊन ऊर्ध्वमुखाने शक्तीचे चालन सुषुम्नेत होऊ लागते. अष्ट-सात्त्विकभावांनी साधक अंतर्बाह्य व्याप्त होतो. हीच शक्तिपातयोगदीक्षेमुळे प्राप्त होणारी भक्तिसंपन्नता होय. अशा प्रकारे भगवद्‌भक्तीचा उन्मेष होणे हे शक्ति-पाताचे मुख्य लक्षण आहे. " मालिनीविजयोत्तरतंत्रामध्ये " शक्तिपात झाल्यावर कोणकोणती फले मिळतात हे सांगताना अगदी प्रथम पुढील लक्षण सांगितले आहे.

**सति तस्मिश्च चिन्हानि तस्यैतानि विलक्षयेत् ।**
**तत्रैतत्प्रथमं चिन्हं रुद्रे भक्ति सुनिश्चला ।।**

गुरूकडून तीव्र शक्तिपात झाल्यावर कोणताही प्रयत्न न करता अकस्मात शिष्यामध्ये अनेक उत्तम लक्षणे प्रकाशित होतात. श्रीमहेश्वराच्या ठिकाणी आपो-आप अत्यंत दृढ भक्ती होणे हे अगदी पहिले लक्षण साधकामध्ये दिसून येते.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " सबाह्य सात्त्विकें भरे " म्हणून त्याचाच पहिला उल्लेख केला आहे. या क्रमानेच या साधनामुळे साधकाला विषयांचा आपोआप विसर पडतो इंद्रियांच्या वहिर्मुख वृत्तीने विषयांकडे धावण्याची प्रवृत्ती थांवून अनायासाने त्यांची कामावीस होण्याची प्रथा मोडून जाते. मनाची हृदयात घडी घडते म्हणजे जागृत शक्तीवरोबर मनाचेही सुषुम्नेत चालन होऊन ते आज्ञाचक्रात लीन होते. अशा रीतीने ऐक्याची सहज प्राप्ती होते. या बोधाने युक्त होऊनच साधकाने आसनावर वसून राहावे. त्यावेळी अंगच अंग सावरीत आहे, वायूच वायूला आवरीत आहे असा अनुभव येऊन, सर्व प्रवृत्ती मागे फिरून समाधी अलीकडील तीराला येते म्हणजे ती सहज साध्य होते आणि आसनावर बसताक्षणीच सर्व अभ्यास आपोआप पूर्ण होतो. पुढेही हा सिद्धयोग सहज व आपोआप कसा होतो हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. यादृष्टीने " हठयोगप्रदीपिकेत " असे म्हटले आहे की –

> **उत्पन्नशक्तिबोधस्य त्यक्तनिःशेषकर्मणः ।**
> **योगिनः सहजावस्था स्वयमेव प्रजायते ॥४.११॥**
> **सुषुम्नावाहिनी प्राणे शून्ये विशति मानसे ।**
> **तदा सर्वाणि कर्माणि निर्मूलयति योगवित् ॥१२॥**

ज्यावेळी शक्तीचा बोध उत्पन्न होतो म्हणजे ती जागृत होते त्यावेळी सर्व कर्मांचा आपोआप त्याग घडतो व साधकयोग्याला सहजावस्था प्राप्त होते. प्राणवायू जेव्हा सुषुम्नेतून ऊर्ध्वमुखाने वाहू लागतो त्यावेळी मन, देश, काल, अवस्था व वस्तुपरिच्छेद टाकून शक्ती शून्य ब्रह्मामध्ये प्रविष्ट होते आणि त्यामुळे साधकयोग्याचे प्रारब्धासहित सर्व कर्म जळून जाते.

असे हे सहजयोगाचे किंवा पंथराजाचे सामर्थ्य आहे. त्यामुळे हा योग सोपा असून तदितर योग हे अवघड आहेत, असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कथन केले आहे. श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी " महायोग विज्ञान " या ग्रंथात " सप्तम प्रकाशात " असे म्हटले आहे की, "शक्ति जागरणसे महायोग स्वतः होगा । जब कुंडलिनी शक्ति जागकर क्रियाशील होती है तब जो जो लक्षण होते हैं वे शत–शत लोगोंके प्रत्यक्ष अनुभवका परिदर्शन करके लिखे जाते हैं । इस विषयमें शंका निरर्थक है, क्योंकि योग प्रत्यक्ष फलप्रद है । योगीके उपयुक्त सामर्थ्यवान् गुरुके शक्तिपातसे, शक्तिसंचारसे, शक्ति उद्बोधन या उद्घाटनसे जब कुंडलिनी शक्ती जागकर क्रिया करने लगेगी तब तुममें निम्नलिखित अनेक लक्षण प्रतीत होंगे ।" इतके सांगून ग्रंथकाराने योगशिखोपनिषदाच्या आधारे या योगाची लक्षणे व अनुभव कथन केले आहेत.

दीक्षा झाल्याबरोबर साधकाचे शरीर, मन, बुद्धी व वासना यांचे शुद्धीकरण सुरू होते. त्यावेळी साधकाला आपापल्या संस्काराप्रमाणे अनुभव येऊ लागतात.

या अनुभवांचे सविस्तर वर्णन " कौलज्ञाननिर्णयात व " कुलार्णवतंत्राच्या चौदाव्या पटलामध्ये " सविस्तरपणे केले आहे. ते आपण पुढे आठव्या प्रकरणात पाहणारच आहोत. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओव्यातून हे साधन आपोआप कसे होते याचे दिग्दर्शन केले आहे. ते म्हणतात–

निश्चळपणें धनुर्धरा। चालणें एथिचें ॥६.१५९॥
आतां दिशांची भेटी घ्यावी। कां रूपाची बास पहावी।
हे चाड सरे आघवी। आपैसया ॥२०६॥
कल्पना निमे। प्रवृत्ती शमे।
आंग मन विरंमे। सावियाचि ॥२१२॥
एऱ्हवीं तरी येणें योगें। जैं इंद्रिया विंदाण लागे।
तैं चित्त भेटो रिगे। आपणपेयां ॥३६५॥

अशी ही आपोआप व स्वतः होणाऱ्या योगाची महती आहे. स्वतः निश्चळपणे डोळे मिटून वसल्यावर श्रीगुरुकृपेने जागृत शक्तीकडून येथे आपोआप चालणे घडते. असे हे कल्पना, संकल्प, प्रवृत्ती व इंद्रिये यांना मागे टाकून द्वैताद्वैतविवर्जित सामरस्यपद प्राप्त करून देणारे अपूर्व साधन आहे. ते शक्तिपाताशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपायाने प्राप्त होत नसल्याने महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांत पद्धतीत" असे म्हटले आहे की–

न विधिर्नैव वर्णश्च न वर्ज्यावर्ज्यकल्पना।
न भेदो निधनं किंचिन्नाशौचं नोदकक्रिया ॥५.५७॥
योगीश्वरेश्वरस्यैवं नित्यतृप्तस्य योगिन।
चित्स्वात्मसुखविश्रांतिभावलब्धस्य पुण्यतः ॥५८॥
सम्यक् स्वभावविज्ञानात् क्रमाभ्यासान्न चासनात्।
न वैराग्यान्ननैराश्यान्नाहारात्प्राणधारणात् ॥५९॥
न मुद्राधारणाद्योगान्मौनकर्मसमाश्रयात्।
न विरक्तौ वृथायासान्नकायक्लेशधारणात् ॥६०॥
न देवार्चनाश्रयाद्भक्त्यानाश्रमाणांच पालनात्।
न षड्दर्शनकेशादिधारणान्न च मुंडनात् ॥६१॥
न जपान्नतपोध्यानान्नयज्ञतीर्थंसेवनात्।
नानन्तोपाययत्नेभ्यः प्राप्यते परमंपदम् ॥६२॥

केवळ विधी, वर्णाभिमान, वर्ज्यावर्ज्यकल्पना, भेद, शुचिता, सम्यक् स्वभाव, विज्ञान, क्रमिक अभ्यास, आसन, वैराग्य, नैराश्य, आहार, प्राणधारण, मुद्राधारण, मौन, विरक्ती, वृथा आयास, कायक्लेश, धारणा, जप, तप, ज्ञान, ध्यान, यज्ञ, तीर्थसेवन, देवार्चन, भक्ती, आश्रमपालन, षड्दर्शनाभ्यास, केशादि धारण अगर

मुंडन किंवा दुसऱ्या अनंत उपायांनी परमपद प्राप्त होत नाही. याचे कारण सांगताना ते म्हणतात—

**एतानि साधनानि सर्वाणि दैहिकानि परित्यज्य ।**

**परमपदेऽदैहिके स्थीयते सिद्धपुरुषैरिति ।। सि. स. प. ५.६३।।**

वरील सर्व साधने ही देहासंबंधीची नसून ते केवळ बुद्धीचा व्यापार असल्याने कैवल्यपदासाठी अगदी निरर्थक ठरतात. तथाकथित गुरुमुखाने शिष्याने कितीही उपदेश ऐकला, शास्त्रे वाचली व उपरोक्त साधने केली तरी या सर्व गोष्टी केवळ विकल्पाचे जाळेच ठरतात. जीवाला सर्व बंधनांपासून मुक्त होण्यासाठी या गोष्टींचा लेशमात्रसुद्धा उपयोग होत नाही. निर्विकल्प व सिद्ध अशा परमपदाची प्राप्ती करून घ्यावयाची असेल तर इतर सर्व साधने, मार्ग व विकल्प सोडून देऊन सिद्ध पुरुष ज्या परमपदात आत्मनिष्ठ होऊन स्थित होतात अशा सिद्ध गुरूंना शरण गेले पाहिजे. याचे कारण काय? महायोगी गोरक्षनाथ म्हणतात—

**गुरुदृक्पातनात् प्रायो दृढानां सत्यवादिनां सा स्थितिर्जायते ।।सि.स.प ५.६४।।**

**कथनाच्छक्तिपाताद्वा यद्वापादावलोकनात् ।**

**प्रसादात्स्वगुरोः सम्यक् प्राप्यते परमं पदम् ।। सि स.प.५.६५।।**

सत्यवादी व दृढ योगीसाधकाला गुरूच्या केवळ करुणादृष्टीने शक्तिसंचार होऊन स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती होते शब्दाने, गुरुचरणावलोकनाने, प्रसादाने व शक्तिपाताने अनादि आत्मसत्ता जागृत होऊन सम्यक् अशा परमपदाची प्राप्ती होते.

सारांश, 'न गुरोरधिकं" हे नाथसंप्रदायाचे रहस्य असून "शिवशासनतः" हे परमरहस्य आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " पिंडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथ-संकेतीचा दंशु । परि दाऊनि गेला उद्देशु । श्रीमहाविष्णु ।। ६.२९१ ।।" असे सांगून ते प्रकट केले आहे. त्याचा सविस्तर विचार आपण या प्रकरणात करणार आहोत.

### पिंडें पिंडाचा ग्रासुः—

अनादिसिद्ध अशा नाथसंप्रदायाचे रहस्य " तया ध्वनिताचें केणें सोडुनी । यथार्थाची घडी झाडुनी । उपलविली म्यां जाणुनी। ग्राहीक श्रोते।। ६ २९२।।"असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट कसे केले आहे ते आता विस्तारपूर्वक पाहवयाचे आहे. हे रहस्य म्हणजे साधनपद्धती आहे. " एकं ज्ञातं सर्वं विज्ञातं भवति " याप्रमाणे हे रहस्य एकदा उलगडले म्हणजे सर्व रहस्ये उलगडतील व या एकाच रहस्यात इतर सर्व रहस्ये समाविष्ट असल्याचे स्पष्ट होईल. त्याचप्रमाणे " गीतेत किंवा ज्ञानेश्वरीत कर्ममार्ग, भक्तिमार्ग, ज्ञानमार्ग, योगमार्ग इत्यादि विविधमार्ग मोक्षप्राप्तीसाठी किंवा कैवल्यप्राप्तीसाठी सांगितले असून पदपिंडाच्या ऐक्यापासून नैष्कर्म्यसिद्धीपर्यंतची

विविध फले त्यामुळे प्राप्त होतात", असा मोठमोठ्या विद्वानांनी, संशोधकांनी अभ्यासकांनी जो भ्रम वर्षानुवर्षे आपापल्या लिखाणातून रुजविला आहे तो दूर होऊन कर्म, ज्ञान व भक्ती या कुंडलिनी शक्तीच्या जागरणाच्या भिन्न भिन्न क्रमिक अवस्था असून "इये आनानें नावें । परि निरूप्य आन नोहे ॥ १३.९६५ ॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या म्हणण्याप्रमाणे त्यापासून होणारी त्याची फलनिष्पत्तीही एकच आहे हे ध्यानात येईल. साधनरहस्याच्या प्रकटीकरणामुळेच गीता किंवा ज्ञानेश्वरी ही एकरस आहे हे प्रतीत होत असल्यामुळे त्याचे विवेचन श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी कसे केले आहे ते पाहू.

सिद्धयोग साधनाच्या अभ्यासाकरिता "अभ्यासुचि आपणायातें करी। हृदयातें अनुभवु वरी। ऐसी रम्यपणाची थोरी। अखंड जेथ ॥ ६.१६६ ॥" असे स्थान पाहून साधकाने साधन सुरू करावे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सुचवून पुढे लगेच पिंडाने पिंडाचा ग्रास करणारी जडचेतनभेदाची प्रक्रिया सांगण्यास सुरुवात केली आहे. ते म्हणतात, "साधकाने आसनावर बसून सुरुवातीला एकाग्र अंतःकरणाने सद्‌गुरुस्मरण करावे. या स्मरणाबरोबर पूर्वीच दीक्षेमुळे जागृत झालेली कुंडलिनी शक्ती आतून कार्यरत होऊन साधकाला अनुभव येऊ लागतो. साधकाने अत्यंत आदरपूर्वक केलेल्या श्रीगुरुस्मरणामुळे स्तंभ म्हणजे खांबाप्रमाणे देहाची जडवत् स्थिती, घाम, रोमांच, स्वरभेद म्हणजे कंठस्वराची नानाप्रकारची विकृती, कंप, शरीर पांढरट होणे, अश्रू व निद्रा हे आठ भक्तीचे भाव उसळून येऊन त्याचे शरीर व अंतःकरण यांमुळे व्याप्त होते. त्यामुळे 'अ' म्हणजे शिवभाव व 'हं' म्हणजे शक्तिभाव यामुळे प्राप्त झालेला जडचेतनाच्या एकत्रीकरणाचा कठीणपणा विरघळू लागतो. जसजसे शक्तीचे सुषुम्नेत चालन होते म्हणजे जितक्या प्रमाणात शक्ती सुषुम्नेत प्रविष्ट होते तितक्या प्रमाणात विषयांचा विसर पडतो. अर्थात् यामुळे मूलतःच बहिर्मुख असलेल्या इंद्रियांचे सामर्थ्य लुळे पडून त्यांचीही कासाविशी व तळमळ कमी कमी होत जाते. शक्तीबरोबर म्हणजे प्राणांबरोबर सुषुम्नेत मनाचेही चालन होत असल्याने तेही हळूहळू हृदयात म्हणजे आज्ञाचक्रात लीन होऊ लागते. अशा रीतीने विषय, इंद्रिये व मन नाहीसे होत चालले की, प्राणशक्ती कुंडलिनीचे शनैः शनैः सहस्रारात शिवाशी मीलन किंवा ऐक्य सहजच होऊ लागते. असा बोध गुरु-कृपेने तत्काळ आला तरी साधकाने आसनावरून न उठता तेथेच बसून राहावे; कारण अंशात्मक शक्तिजागृतीचाच हा अनुभव असतो. श्रीगुरुकृपेने जागृत झालेली शक्ती सर्वांशाने एकदम सुषुम्नेत प्रवेश करू शकत नाही; कारण सुषुम्नापथ हा जन्मजन्मतांराच्या अनंत वासनांनी व नानाविध संस्कारांनी भरून गेलेला असतो. यालाच जडता म्हणतात. त्यामुळेच प्राणशक्ती कुंडलिनीला सहस्रारात पोहोचण्यास अडथळे येतात; परंतु जागृत शक्ती स्वतःच साधनतत्पर झाल्याने ती वरील अडथळे

दूर करू लागते. त्यावेळी मूलाधारात वायू रोखला जाऊन शक्तीच्या ऊर्ध्वगमनाच्या प्रयत्नामुळे स्पंदने, गात्रकंप, नृत्य, घूर्णा म्हणजे शरीर गोलाकार फिरणे, मागेपुढे डोलणे, तोंडातून नानातऱ्हेचे शब्दोच्चार होणे, हसणे, रडणे. निद्रा येणे, शरीर कंप पावणे, मूर्च्छा येणे, शरीर मागे अथवा पुढे पडणे. घाम येणे, रोमांच येणे, निरनिराळ्या तऱ्हेची आसने, बंध व मुद्रा होणे इत्यादि विविध क्रिया होतात; परंतु या सर्व क्रियात शक्तीच अंगाला सावरून धरते व सांभाळते. एवढंच नव्हे तर पवन म्हणजे शक्तीच शक्तीला धारण करते आहे असा साधकाला साधनाभ्यासाच्यावेळी अनुभव येतो व तो उत्तरोत्तर वाढतच जातो. अशा प्रकारे साधक रोज साधन करू लागला की, अधोमुखाने प्रवृत्त झालेली जीवाची गती थांबून ती सुषुम्नेच्या मार्गाने माघारी वळून तिचा ऊर्ध्वगतीने विकास होत होत ती सहस्रारात आपल्या मूळ शिवस्वरूपाशी एकरूप होऊन समाधी सहजसाध्य होते. अशा रीतीने साधकाचा सर्व योगाभ्यास श्रीगुरुकृपेने जागृत झालेल्या शक्तीकडून बसताक्षणीच पूर्ण होतो." ( ६.१८६ ते १९१)

"साधकाने गुदद्वार व शिश्न यांच्यामध्ये जी चार बोटे जागा आहे त्यात दीड बोट वर व दीड बोट खाली जागा सोडून मध्ये जी एक बोट जागा राहते तेथे उजव्या टाच पायाची रोवून ठेवावी व टाचेच्या वरच्या भागाने वृषणापासून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा मध्ये दाबावी. नंतर उजव्या पायावर डावा पाय बसवून उजव्या टाचेवर शरीर तोलून धरावे. शरीर उचलले आहे की नाही हे समजू न देता पाठीच्या कण्याचा शेवटला खालचा भाग उचलावा आणि त्याच प्रमाणात दोन्ही पायाचे घोटे उचलून धरावेत. मग हा सर्व शरीराचा आकार जसा काही अगदी खालच्या पायाच्या टाचेचा वरचा स्वयंभू भागच आहे असा होऊन जातो. हे मूळ बंधाचे लक्षण असून यालाच वज्रासन किंवा सिद्धासन असे म्हणतात. अशा प्रकारे आधारचक्रावर मूळबंध उत्तम लागला म्हणजे जन्मजन्मांतरी अभ्यस्त असलेला बहिर्गतीचा व प्रवृत्तीचा मार्ग आपोआप मोडून बंद पडून अपानवायू म्हणजे अपान नावाची शक्ती आतल्या बाजूने वर येऊ लागते. येथून पुढे सर्व साधन अत्यंत सहजतेने घडते. हठ, मंत्र, लय व राज या महायोगाच्या चारही भागांच्या क्रिया आपोआप यथाक्रम अगर अक्रमतेनेही घडून येऊन साधक पूर्णावस्थेला जातो.

नंतर द्रोणाकार झालेली हस्तांजली सहजच डाव्या पावलावर बसते. त्यामुळे दोन्ही खांदे वर चढलेले दिसतात. त्या वर चढलेल्या खांद्यात मान खाली ओढली जात असल्यामुळे मस्तक घट्ट राहते व डोळ्यांच्या पापण्या आपोआप झाकावयास लागतात. वरच्या पापण्या आपोआप खाली पडतात व खालच्या पापण्या खालीच पसरतात. त्यावेळी अर्धोन्मीलित अशी दृष्टी सहजच होते. अशा रीतीने दृष्टी आतल्या आतच राहते. जर सहज बाहेर आलीच तर ती नेमकी नाकाच्या शेंड्या-

वर पडते. अशी तेथल्या तेथेच दृष्टी कायम राहते. ती पुन्हा बाहेर येत नाही; म्हणून अर्धोन्मीलिन दृष्टी आतमध्येच कायम स्थिर होते. त्यामुळे इतर दिशांकडे पाहावे, चोहोकडे दृष्टी टाकावी व नाना रूपे पाहावीत ही सर्व इच्छा आपोआप नाहीशी होते. मग गळा आकुंचित होऊन गळयाखालच्या खळगीत हनुवटी अडकून बसते व छातीच्या वरच्या बाजूला दृढ होऊन दाबून रोवून राहते. नतर कंठमणी दिसेनासा होतो. असा जो बंध पडतो त्यास जालंधरबंध असे म्हणतात. हा बंध बरोबर बेंबीच्या आतल्या भागी लागतो त्यामुळे पोट खपाटीला जाते व हृदयकमल अंतर्यामी प्रफुल्लित होते. स्वाधिष्ठानचक्राच्या वरच्या भागावर व बेंबीच्या खालच्या ओटीपोटाच्या भागामध्ये जो बंध पडतो त्यास वाढियाण किंवा उड्डियानबंध असे म्हणतात.

यात्रमाणे ज्यावेळी शरीराच्या वरील भागावर अभ्यासाची लक्षणे उमटतात त्यावेळी आत मनाच्या चंचलतादि सर्व धर्मांचे बळ नाहीसे होते. कल्पना नाहीशी होते. मनाची बाह्य विषयांकडील धाव थांबून प्रवृत्तीचे शमन होते. शरीर व मन सहजच शांत होते. भूक काय झाली व झोप कोणीकडे गेली ह्यांची आठवणही नाहीशी होऊन त्यांचा पत्ता देखील लागत नाही. मूळबंधाने कोंडलेला अपानवायू ऊर्ध्वगतीने माघारी फिरला म्हणजे सहजतेने वर जाऊ न शकल्यामुळे फुगवटा धरतो. त्यावेळी तो आपनवायू खवळून बलवत्तर होतो व अडकलेल्या जागी गर्जना करीत राहून नाभिस्थानीय मणीपूरचक्राला धक्के देत झुंजत राहतो. मग अशा रीतीने अपानवायूची वळावलेली वावटळ सर्व शरीर ढवळून शुद्ध करू लागते व लहानपणापासून साचलेली शरीरातील सर्व कुजकी घाण ती बाहेर टाकते. त्या अपानवायूला आत वळण्याला कोठे जागा नसल्यामुळे तो कोठयात प्रवेश करतो आणि कफपित्ताचा थारा राहू देत नाही. तो शरीरातील रस, रक्त, मांस, मेद, अस्थी मज्जा व वीर्य या सप्तधातूंचे समुद्र प्राशन करतो. मेदाचे डोंगर फोडतो आणि हाडातील दोषही बाहेर काढतो. मृतवत् नाडया जागृत करून त्यातील शक्ती सुषुम्नापथापर्यंत येण्यास वायूचा मार्ग मोकळा करतो. अवयव शिथिल करतो व साधकाला भीती दाखवितो; परंतु त्याने भिऊ नये. तो शरीरातील जुने रोग कायमचे घालविण्यासाठी पुन्हा उत्पन्न करतो व ते लगेच नाहीसेही करतो. आप व पृथ्वी या पंचमहाभूतांपैकी दोन तत्त्वांचा तरल अंश व कठीण अंश हा वायू एकत्र कालवितो म्हणजे खाऊन टाकतो. अपानवायूचे हे कार्य चालू असतानाच सिद्धासनाच्या उष्णतेमुळे कुंडलिनी शक्ती जागृत होते. केशराने न्हालेले नागिणीचे पिलू वेढे घेऊन जसे निजावे त्याप्रमाणे नेमके साडेतीन वेढे घेऊन ही कुंडलिनीरूपी नागीण खाली तोंड करून मूलाधारात निजलेली असते. ही शक्ती विजेच्या कंकणाप्रमाणे, अग्निज्वाळेच्या घडीप्रमाणे व जणू काही घोटून चकचकित केलेल्या शुद्ध सोन्याच्या वेढयाप्रमाणे दिसते. ती

स्वतःच व्यवस्थितपणे आपल्या शिवस्वरूपास आटून संकुचित किंवा लहान होऊन नभिस्थानाजवळच्या संकुचित जागी दाटून बसलेली असते. ती जेव्हा वज्रासनाच्या चिमटयाने चेपल्यामुळे जागी होते. त्यावेळी एखादे नक्षत्र तुटून पडावे, सूर्याचे आसन मोडावे, किंवा तेजाच्या बीजाला अंकुर फुटावा अशी विलक्षण अनुभूती येते. कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, आपले वेढे सोडते व कौतुकाने अंग मोडते. त्यावेळी ही शक्ती नाभिस्थानाखालील कंदावर उभी राहिलेली दिसते. आधीच तिला पुष्कळ दिवसांची स्वस्वरूपप्राप्तीची व तन्मूलक पिंडब्रह्मांडाच्या संहारणीची भूक लागलेली असते व तशात तिला जागे केल्याचे निमित्त होते. मग ती आवेशाने आपले तोंड सरळ असे वरती उघडते. त्यावेळी हृदयकमळाच्याखाली जो वायू किंवा जी शक्ती असते त्या सगळयाला ती कवटाळून खाऊन टाकते. पिंडाच्या उभारणीच्या वेळी आपण शतशः अंशात्मक बनलेली ही शक्ती संहारणीच्या वेळी पुन्हा त्या सर्व अंशांना आपल्यात समाविष्ट करीत मूळ शिवस्वरूपाप्रत जाते. हाच महायोग किंवा सिद्धयोग होय. ज्यावेळी ही शक्ती जागृत होते त्यावेळी खरा अग्नी जागृत होऊन यज्ञाला सुरुवात होते. या शक्तीच्या मुखातील ज्वाळा शरीरात खालीवर व्यापून मांसाचे घास खाऊ लागतात म्हणजे जडांश नाहीसा करू लागतात. ( या एकमात्र उपायाशिवाय चेतनामध्ये मिसळलेला जडपणा दूर होण्याचा दुसरा कोणताही मार्ग नाही किंबहुना याशिवाय जडचेतन भेदप्रक्रिया सिद्धच होऊ शकत नाही. ) शरीरात ज्या ज्या ठिकाणी मांस असेल त्याचा ही शक्ती वरच्यावर सहज घास घेते आणि हृदयाजवळील मांसमय भागाचेही एकदोन घास घेते. मग तळहात व तळपाय यातील जडांश प्राशन करून त्यावरील सर्व अंगांचाही भाग शुद्ध करून हरेक अंगप्रत्यंगाचा ही शक्ती झाडा घेते. मूलाधारात शक्तीचे अनंत भांडार असल्यामुळे ती तेथील आपले स्थान न सोडता तेथूनच नखांचे देखील सत्त्व काढून घेते व त्वचा शुद्ध करून त्या त्वचेला शरीरातील हाडांच्या सापळयास चिकटवून ठवते म्हणजे साधकाचे शरीर अत्यंत कृश होते. शक्ती अस्थींच्या नळयातील रस निरपून घेते व शिरान् शिरा ओरपून मोकळया करते. त्यावेळी बाहेरील केसांच्या बीजांची वाढ करपून जाते. मग तहानेने पीडित झालेली ती शक्ती सप्तधातूंचा समुद्र एका घोटात पिऊन टाकते आणि सर्व शरीर अगदी शुष्क करून टाकते, दोन्ही नाकपुडयातून बारा बोटे खाली वाहणाऱ्या श्वासोच्छ्वासात्मक प्राणवायूला गच्च धरून ही कुंडलिनी साधकाची बहिर्वृत्ती नाहीशी करण्याकरिता त्याला आत खेचून घेते. त्यावेळी खालचा अपानवायू वरती आकुंचित होतो आणि वरचा प्राणवायू खाली दाब देत असतो. सुषुम्नेमध्ये चाललेल्या या प्राणापानांच्या खेचाखेचीमध्ये षट्चक्रांचे पदर तेवढे उरतात. त्यामुळे प्राणापानांचे मीलन होत नाही. एऱ्हवी प्राण व अपान या दोहोंचा मिलाफ तेव्हाच झाला असता; परतु कुंडलिनी शक्ती

तेथे क्षणभर क्षोभलेल्या व्यग्र अवस्थेत असल्याने "तुम्ही येथे कोण ? तुम्ही निघून जा," असे त्यांना म्हणते. या स्थितीपर्यंत साधकाची गती होईपर्यंत कुंडलिनी शक्तीने शरीरातील पृथ्वीचा सर्व जडांश खाऊन टाकून काहीएक शिल्लक ठेवलेले नसते व आपाचा सर्व रसांश पिऊन, चाटून पुसून फस्त केलेला असतो. अशा रीतीने पंचमहाभूतांपैकी पृथ्वी व आप ही भूते जेव्हा कुंडलिनी शक्ती खाऊन टाकते तेव्हाच तिची संपूर्ण तृप्ती होते. मग ती शांत होऊन स्वस्थपणे सुषुम्नानाडीच्या मुखापाशी राहते. यावेळी शक्ती मूलाधारातील सुषुम्नेच्या खालच्या मुखापाशी म्हणजे ब्रह्मद्वारापाशी जशी असते त्याचप्रमाणे अंशात्मक रीतीने ती सुषुम्नेच्या दुसऱ्या मुखापाशी असलेल्या निरामय ब्रह्मस्थानातही असते.तेथे तृप्तीच्या संतोषाने ती आपल्या मुखातून जे गरळ ओकते त्या गरळरूपी अमृताच्या योगाने प्राण जगतो. त्याचप्रमाणे या जागृत शक्तीच्या मुखातून जो अग्नी यावेळी आतून प्रदीप्त होतो तो शरीरास अंतर्बाह्यच निववितो. त्यावेळी सर्व अंगातील पूर्वी गेलेले सामर्थ्य पुन्हा येऊ लागते. सर्व नाड्यांतील शक्ती मूलाधारात खेचली जात असल्यामुळे नाड्यांचे वाहणे बंद पडते व अपान, समान, उदान, व्यान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय हे वायूंचे नऊ प्रकारही जातात म्हणजे या वायूंच्या रूपाने असलेल्या शक्ती कुंडलिनी शक्तीत समाविष्ट होतात. त्यामुळे शरीराचे धर्म राहत नाहीत. इडा व पिंगला या नाड्या एक होतात म्हणजे इडापिंगलारूपी मार्गाने श्वासप्रश्वसरूपात संचार करणारा जीव कालचक्राच्या भ्रमणातून सुटतो व सुषु-म्नामार्गात प्रविष्ट होऊन आपल्या मूळस्वरूपात प्रतिष्ठित होतो. ब्रह्मग्रंथी, विष्णु-ग्रंथी व रुद्रग्रंथी या तिन्ही गाठी सुटतात आणि मूलाधार, स्वधिष्ठान, मणिपूर अनाहात, विशुद्ध व आज्ञा या सहाही चक्रांचा भेद करून शक्ती सहस्रारात पोहो-चते. अशा प्रकारे साधकाला आपोआप साधणाऱ्या केवल कुंभकाच्या दशेची प्राप्ती होते. त्यामुळे चंद्र आणि सूर्यरूपी वायू म्हणजे डाव्या व उजव्या नाकपुडीतून वायू वाहतो आहे अशी साधकाची जी कल्पना किंवा जो तर्क असतो तोही नाहीसा होतो. अशा वेळी साधकाच्या नाकापुढे कापसाची वात धरून पाहिले तरी तो वायू दिसत नाही. यावेळी बुद्धीचे स्फुरणही शक्तीत विलीन पावते व नाकामध्ये राहिलेली गंध घेण्याची शक्तीही कुंडलिनी शक्तीत समाविष्ट होऊन मध्यमेत म्हणजे सुषुम्नेत प्रवेश करते. त्यावेळी सहस्रारात जे चंद्रामृताचे तळे आहे ते हळूहळू एका अंगावर कलंडून त्यातील अमृत कुंडलिनीच्या मुखात पडू लागते. त्यामुळे सर्व सुषुम्नानाडी ह्या चंद्रामृताच्या रसाने भरून जाते व तो रस सर्वांगात संचरू लागतो. प्राण-वायूही यामुळे जेथल्या तेथेच मुरून जातो.

अशी स्थिती साधकाला प्राप्त झाली म्हणजे मग तापलेल्या मुशीतील मेण निघून जाऊन ती मूस जशी ओतलेल्या रसानेच नुसती गच्च भरून राहते त्याप्रमाणे

शरीराच्या आकाराने जणू काही वर त्वचेचा पदर पांघरलेले मूर्तिमंत तेजच साधकाच्या रूपाने अवतरले आहे असे दिसते. सूर्यावर ढगांचे आवरण आले असता त्याचे तेज झाकलेले असते. पण ते ढगांचे आवरण निघून गेल्यावर मग त्याचे तेज जसे आवरून धरता येत नाही त्याप्रमाणे साधकाच्या शरीरावर वरवर असणारा त्वचेचा जो कोरडा पापुद्रा तो कोंडयाप्रमाणे निघून जातो. मग मूर्तिमंत स्फटिकासारखी किंवा रत्नरूप बीजाला निघालेल्या कोंबासारखी केशरी वर्णाची साधकाच्या अवयवाची कांती दिसते. नाहीतर संध्याकाळी आकाशात दिसणारे नानाविध रंग एकत्र करून त्याने त्या साधकाचे अंग बनविले आहे असे वाटते किंवा आत्मचैतन्याच्या शुद्ध लिंगासारखी, कुंकवाने अगर केशराने पूर्ण भरलेली आणि सिद्ध किंवा अमृतरूपी चैतन्यरसाने ओतलेली अशी केशरीवर्णाची साधकाची शरीराकृती दिसते. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, मला तर तो साधक म्हणजे मूर्तिमंत शांतीच आहे असे त्याला पाहताना वाटते. ते साधकयोग्याचे शरीर आनंदरूपी चित्राचा रंग, परब्रह्म सुखाची प्रत्यक्ष मूर्ती किंवा संतोषरूपी वृक्षाचे बळावलेले जणू काही रोपच आहे असे भासते. तो साधक सोनचाफ्याचा गुच्छ, अमृताचा पुतळा किंवा नाजुकपणाचा भराला आलेला मळाच आहे असे वाटते. शरदऋतूच्या ओलाव्याने सुशोभित झालेले पौर्णिमेचे चंद्रबिंब उगविले आहे किंवा मूर्तिमंत तेजच आसनावर बसले आहे असे त्या साधकाकडे पाहिले की दिसते. ज्यावेळी कुंडलिनी चंद्रामृत पिते त्यावेळी साधकाचे शरीर असे होते. मग त्या साधकाच्या देहाकृतीला पाहून साक्षात काळ देखील घाबरतो. त्यावेळी म्हातारपण मागे फिरते, तारुण्यही मागे पडते आणि गेलेली बाल्यावस्था पुन्हा प्राप्त होते. साधन करताना त्याचे वय जरी कितीही असले म्हणजे त्याचे जितके वय आहे तितकेच राहत असले तरी तो आपल्या बळार्थाने म्हणजे आत्मबलाने; बळ म्हणजे शिव व अर्थ म्हणजे शक्ती यांचे ऐक्य करतो. या त्याच्या धैर्याची थोरवी अगदी अनुपम असते. असे धैर्य अंगी आले नाही तर साधक गंतव्यस्थानापर्यंत पोहोचण्या-पूर्वीच साधन सोडून देतो.

या साधनामुळे सोन्याच्या झाडाला पालवी फुटून रत्नाच्या नित्य नव्या कळ्या याव्यात त्याप्रमाणे साधकाच्या तेजस्वी शरीराला नवी तेजस्वी नखे येतात दातही दुसरे नवे येतात; पण ते अत्यंत अपूर्व व फार लहान असतात. जणू काही दोन्ही बाजूंना हिऱ्याच्या दोन पंक्तीच मांडल्या आहेत असे साधकाचे दात दिसतात. सर्व अंगावर अणुएवढ्या माणकांच्या कणिकांप्रमाणे लहान व सतेज अशी केसांची अग्रं सहजच उद्भवतात त्याच्या हातापायांचे तळवे तांबड्या कमळाप्रमाणे लाल दिसतात व डोळे अत्यंत स्वच्छ होतात. शिंपल्यामध्ये परिपक्वदशेला आलेले मोती फुगल्याकारणाने त्या शिंपल्यात मावत नाहीत. त्यामुळे शिंपल्यांच्या दोन शकलांचा सांधा ज्याप्रमाणे उकलतो त्याप्रमाणे साधकयोग्याची दृष्टी पापण्यांच्या कवळीत न

मावता त्या कवळीस व्यापून पापण्यांमधून बाहेर येऊ पाहते. ही दृष्टी पूर्वीचीच असते; परंतु ती सर्व आकाश व्यापणारी होते. अशा साधकाचा देह हा सोन्यासारख्या कांतीचा होतो एवढेच नव्हे तर त्यास वायुसारखा हलकेपणा येतो; कारण त्याच्या शरीरात आप व पृथ्वी यांचा रसांश व जडांश थोडाही उरलेला नसतो. मग तो समुद्रापलीकडील वस्तू पाहतो, स्वर्गातील नाद किंवा विचार एकतो व मुंगीच्याही मनातील भाव ओळखतो. तो वायुरूप घोड्यावर स्वार होतो व पाण्यावरही चालतो; परंतु त्याचे पाय पाण्याला लागत नाहीत. अशा अनेक सिद्धी त्याला प्रसंगानुरूप प्राप्त होतात.

अशा रीतीने प्राणवायूचा हात धरून त्याला आपल्यात समाविष्ट करून आकाशाची पायरी करून म्हणजे निरालंब अवस्थेप्रत येऊन ही शक्ती मणिपूरचक्र ओलांडून सुषुम्ना नाडीच्या जिन्यावरून हृदयाकाशापर्यंत येते. ही कुंडलिनी शक्ती जगदंबा आहे. ती चैतन्यचक्रवर्तीची म्हणजे शिवाची शोभा आहे तीच विश्वबीजाच्या कोंबाला म्हणजे जीवाला सावली करते व त्याला सांभाळते. ही निराकार आत्म-स्वरूपाची साकारमूर्तीच आहे. ती परब्रह्मरूपी शिवाची संवळी असून ॐकाराची उद्गाती आहे. तिच्यापासूनच प्रथम प्रणव प्रस्फुटित होतो. ज्यावेळी ही कुंडलिनी शक्ती हृदयाकाशात अनाहतचक्रापाशी येतें त्यावेळी अनाहताच्या ध्वनीने ती बोलते म्हणजे साधकाला आत आपोआप उत्पन्न होणारा नाद ऐकू येऊ लागतो. ही शक्ती स्वभावःच ज्ञानस्वरूप व बुद्धिस्वरूप असली तरी या स्थानी आल्यावरच जड-बुद्धी चेतनस्वरूप होते व ती हा नाद प्रथम किंचित् किंचित ऐकू लागते. हा नाद ऐकणे म्हणजेच परमात्म्याचे खरे नामस्मरण करणे होय. हा नाद हळूहळू वृद्धिंगत होत होत संबंध शरीरच या नादाचे कुंड बनते व ध्यानात आतून उत्पन्न होणाऱ्या या नानाविध नादांची चित्रे ॐकाराच्या आकारासारखी रेखलेली दिसतात हे पर-मात्म्याचे खरे रूप पाहणे होय. या अनाहत नादरूपी नामाला व प्रकाशात्मक ॐकाररूपी रूपाला ओलांडून जेव्हा साधक पुढे जातो तेव्हाच खरा तो या संसार व कालचक्रातून मुक्त होतो. हे नामरूप नुसत्या कल्पनेने जाणावे असे म्हटले तरी अनुभूतीशिवाय कल्पित मनाला आपल्या कल्पनेने ही अनुभूती कशी प्राप्त करून घेता येईल ? नुसत्या कल्पनेने हे कधीही साध्य होणे शक्य नाही. अशावेळी त्या हृदयाकाशात कसली कसली गर्जना होते हे समजत नाही; पण त्याची अनुभूती मात्र येते जोपर्यंत प्राणापानादि वायूचा नाश होत नाही तोपर्यंत हृदयाकाशात शब्द असतो व म्हणूनच तेथे अनाहतध्वनी घुमत असतो. या अनाहतनादरूपी मेघाच्या गर्जनेने हृदयाकाश दुमदुमायला लागते व कुंडलिनी शक्ती अनाहत व विशुद्धचक्र ओलांडून जेव्हा आज्ञाचक्रापाशी येते तेव्हा ती ब्रह्मस्थानाला जाण्याची आज्ञाचक्ररूपी खिडकी सहजच उघडते. आज्ञाचक्राच्यावर मस्तकात टोकाला सहस्रार-चक्र असून ते कमळाच्या पोकळीतील आकाराप्रमाणे आहे. यालाच दुसरे महदाकाश

म्हणतात. तेथेच चैतन्य अर्धातुर अवस्थेत शक्तीच्या मीलनाची वाट पाहत निरालंब-पणे वास करीत असते.

ज्यावेळी हृदयाच्या ठिकाणी म्हणजे आज्ञाचक्रात ही परमेश्वरी कुंडलिनी शक्ती आपल्या तेजाची शिदारीही अर्पण करते व बुद्धिरूप भाजीसह हातात वाढून घेतलेला नैवेद्य दाखविते त्यावेळी तिचे सर्व जडत्वच ती अर्पण करून पुन्हा द्वैत दिसणार नाही अशी अवस्था स्वत:ला प्राप्त करून घेते. अशा प्रकारे कुंडलिनी शक्तीने तेजरूप कांती अर्पण केल्यावर ती केवळ प्राणरूप किंवा प्राणवायुरूप होऊन राहते. येथे पूर्वमार्ग किंवा जडत्वरूपी मनाचा योग संपून येथून पुढे अजडत्वरूपी असा पश्चिममार्ग किंवा अमनस्क योग सुरू होतो. या वेळी एखाद्या वाऱ्याच्या पुतळीने पितांबरासारखे पांघरलेले जरतारी वस्त्र फेडून बाजूला ठेवावे त्याप्रमाणे ज्या शक्तीचे सर्व जडत्व दूर झाले आहे अशी ती कुंडलिनी भासते. वाऱ्याची झुळूक लागून दिव्याची ज्योत नाहीशी व्हावी किंवा आकाशात वीज चमकून अदृश्य-लुप्त व्हावी त्याप्रमाणे हृदयकमळापर्यंत म्हणजे आज्ञाचक्रापर्यंत जणू काही एखाद्या सोन्याच्या सतेज सरीप्रमाणे किंवा एखादा प्रकाशजळाचा झरा वाहत यावा त्याप्रमाणे वाहत येऊन आज्ञाचक्राच्या पोकळीत ती शक्ती जिरून जाते. येथे कुंडलिनी शक्तीचे रूप शक्तीतच मावळते म्हणजे तिचे सर्व जडत्व पूर्णपणे संपुष्टात येते. अशी स्थिती झाली तरी हिला शक्तीच म्हणतात; पण वास्तविक ती केवळ प्राणवायुरूपच असते हे जाणले पाहिजे. या अवस्थेत नाद, बिंदू, कला व ज्योती या जडत्व निदर्शक गोष्टींपासून शक्ती मुक्त असते.नंतर मनाचा निग्रह करणे, प्राणवायूचा निरोध करणे किंवा ध्यान करणे हेही प्रकार तेथे राहत नाहीत. त्याचप्रमाणे ही कल्पना घे व ती कल्पना टाक हेही प्रकार तेथे संभवत नाहीत. अशा प्रकारे श्रीगुरुकृपेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीमुळे पंचमहाभूतांची आटणी होऊन जडापासून चेतनतत्त्व पूर्णपणे निराळे होते. हीच जडचेतनभेदप्रक्रियेची सिद्धी होय. यालाच पिंडाने म्हणजे अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्तीने पिंडाचा म्हणजे जडाचा ग्रास करणे म्हणतात. हेच आदिनाथ शंकरांनी प्रवर्तित केलेल्या सिद्धयोगाचे रहस्य होय. हा गूढ अभिप्राय किंवा मर्म श्रीमहाविष्णूंनी म्हणजे मत्स्येंद्रनाथांनी स्पष्ट करून प्रवाहित केले. (६.१९२ ते २९१)

येथपर्यंत सविस्तरपणे वर्णन केलेली प्रक्रिया " पृथ्वी आपाते विरवी ।। ६.२९९ ।। " या ओवीपासून पुन्हा सुरू करून " इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती ।। ६ ३३० ।। " या ओवीपर्यंत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुन्हा थोडक्यात वर्णन करून " तेवीं पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशे । तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ।। ६.३०८ ।। " हे सांगून शक्तिजागृतीच्या निमित्तानेच

केवळ ब्रह्मप्राप्ती होते हा नाथसंप्रदायाचा महान् सिद्धांत प्रस्थापित केला आहे.

**स्वसंवेद्य तत्त्वः—**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत जो नाथसंकेतीचा दंश प्रकट केला आहे त्याच्या अनुरोधाने स्वसंवेद्य तत्त्वाची चिकित्सा आता करावयाची आहे. यातील स्वसंवेद्य म्हणजे काय ? या प्रश्नाचा प्रथम विचार करणे आवश्यक आहे. "पिंडें पिंडाचा ग्रासु ॥ ६.२९१ ॥" या प्रक्रियेतून नाथ संकेतीचा दंश श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसा प्रकट केला ते आपण पाहिले. आता ॐ नमो श्रीआद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ १.१ ॥ " या ज्ञानेश्वरीच्या मंगलचरणातील " स्वसंवेद्या " या शब्दातून हे रहस्य कसे प्रस्फुटित झाले आहे याचा विचार करावयाचा आहे. या विवेचनामुळे कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने सिद्धयोगसाधनद्वारा आत्मरूप हे स्वसंवेद्य तत्त्व कसे झाले याचा उलगडा होईल स्वसंवेद्या हे आत्मरूपाचे विशेषण आहे. या विशेषणाने आत्मरूपा या विशेष्याचे म्हणजे आत्म्याचे व रूपाचे म्हणजे शक्तीचे विशेषत्व प्रकट केले आहे. आत्मरूपा हा शब्द शिवशक्तियुक्त कसा आहे याचे विवेचन पुढे नवव्या प्रकरणाच्या " सिद्धयोगसाधनेच्या द्वारा अध्यायसंगती " या नावाने लिहिलेल्या तिसऱ्या मुद्यात अधिक विस्ताराने केले आहे. स्वसंवेद्या या शब्दाचा अर्थ स्वतःला स्वतः जाणण्यास योग्य असा, आपले आपण जाणणारा किंवा स्वतःस स्वतःच जाणणारा असा आहे. " अवेद्यत्वे सति अपरोक्षत्वम् स्वसंवेद्यम् । " म्हणजे जी वस्तू कोणाकडूनही वेद्य होत नाही; पण आपल्या ठिकाणीच जी स्वयंप्रकाश ज्ञप्तिस्वरूप असते तिला स्वसंवेद्य म्हणतात. जगातील यच्चयावत् जड पदार्थांना प्रकाशित करण्याकरिता प्रकाशाची जरूरी लागते; परंतु ज्ञानरूप ब्रह्म म्हणजे आत्मा स्वयंप्रकाश असल्यामुळे त्याचे स्वतःचे प्रकाशन हे दुसऱ्या कोणत्याही प्रमाणावर अवलंबून नाही. आत्मा हा कोणत्याही प्रमाणाचा विषय होत नाही. " इंद्रियसन्निकर्षज्ञानं प्रत्यक्षम् । " म्हणजे सामान्यत इंद्रियांच्या योगाने जे ज्ञान होते त्याला प्रत्यक्ष म्हणतात; परंतु ब्रह्म दृश्य किंवा ज्ञेय नसल्यामुळे प्रत्यक्ष प्रमाणाचा त्याच्या ठिकाणी उपयोग होत नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> **दृश्यपणें देखिजे । कां ज्ञयत्वें जाणिजे ।**
> **अमुकें ऐसें म्हणिजे । तें जें नव्हे ॥१५.३०७॥**

मर्यादित वस्तूच प्रत्यक्षादि प्रमाणाने जाणली जाते व बोटाने दाखविता येते. ब्रह्म अमर्याद असल्यामुळे व प्रमाणाच्याही आधी स्वयंसिद्ध व सूक्ष्म असल्यामुळे ते प्रमाणाने जाणले जाऊ शकत नाही व बोटाने दाखविता येत नाही. अनुमान प्रमाणाला व्याप्तिज्ञानाची जरूरी लागते. ब्रह्माच्या ठिकाणी व्याप्तिज्ञान संभवत नाही, म्हणून अनुमान प्रमाणाला ब्रह्म विषय होत नाही. उपमान प्रमाणाला सादृश्यता

लागते. ब्रह्मासारखी दुसरी कोणतीही वस्तू नसल्यामुळे उपमान प्रमाणाचाही येथे उपयोग होत नाही. यादृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**जिहीं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तुझें ॥१८.१२॥**

अर्थापत्ती हे प्रमाण व्यतिरेक अनुमानात येते व अनुपलब्धी हे प्रमाण प्रत्यक्षावलंबी असते, म्हणून या दोन्ही प्रमाणांचाही उपयोग ब्रह्माचे ज्ञान करून देण्याच्या बाबतीत होत नाही. शब्दप्रमाणाचीही डाळ येथे शिजत नाही. लौकिक शब्द हा केवळ अर्थाचे म्हणजे पदार्थाचे वर्णन करू शकतो; परंतु ब्रह्म हे कोणत्याही अर्थात पडत नाही म्हणून लौकिक शब्दाचाही लाग तेथे लागत नाही. अलौकिक शब्द म्हणजे वेद हा ब्रह्माचे वर्णन विधिमुखाने करू शकत नाही. याबद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतत—

**ऐसें शब्दजात माघौतें सरे ॥६.३१९॥**
**वेद वानूनि तंवचि चांग । जंव न दिसे तुझें आंग ।**
**मग आम्हां तया मूग । एके पांती ॥१४.११॥**
**आणि दुजया थांवो मोडे । जथ परेशीं वैखरीं बुडे ।**
**तो तूं मा कोणें तोंडें । वानावासी ॥१४.१४॥**
**मौन गा तुझें राशिनांव ॥१७.१५॥**

सारांश, ब्रह्म हे सहाही प्रमाणांना विषय होत नाही. "प्रमेय परिच्छेदें । प्रमाणत्व नांदे । ते काई स्वतःसिद्धें । वस्तुच्या ठाईं ॥ अमृ. ५.१७ ॥" असे "अमृतानुभावात" म्हटल्याप्रमाणे ब्रह्म आपल्याच ठिकाणी आपण ज्ञानमात्रपणाने स्वयंसिद्ध स्वयंप्रकाश व नित्यअपरोक्ष असल्यामुळे त्याचे प्रकाशन प्रमाणे करू शकत नाहीत. मात्र शब्द व अनुभव ही ब्रह्मज्ञानाची, ब्रह्माची नव्हे, अपूर्व प्रमाणे कशी आहेत याचे विवेचन पुढे नवव्या प्रकरणात "सिद्धयोगसाधनेच्याद्वारा अध्यायसंगती" या तिसऱ्या मुद्यात सविस्तर केले आहे.

प्रमाणांनी जाणण्यास योग्य जी वस्तू असते तिला 'संवेद्य' अथवा 'ज्ञेय' असे म्हणतात ब्रह्मालाही ज्ञेय म्हटले आहे. याचे कारण ते ज्ञानाखेरीज दुसऱ्या कोणत्याही उपायाने जाणले जात नाही. "ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ॥ गीता. १३.१२ ॥" या गीतेवरील श्लोकाचा भावार्थ लिहिताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तरि ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तूतें येणेंचि कारणें ।**
**जें ज्ञानेंवांचूनि कवणें । उपायें नये ॥ १३.८६५॥**

नाहीतर ब्रह्माला ज्ञेय म्हणजे ज्ञानाचा विषय असे म्हटले असता ते इतर पदार्थांप्रमाणे जड, मिथ्या अतएव अनात्म ठरेल. ब्रह्म ज्ञानाचा विषय आहे ह्याचा अर्थ ते फलव्याप्तीने ज्ञेय नसून केवळ वृत्तिव्याप्तीने ज्ञेय आहे, असा आहे. यथार्थ

शास्त्र व सद्गुरूंनी शक्तिपातपूर्वक उपदेशिलेल्या महावाक्यामुळे उत्पन्न झालेली जी 'अहं ब्रह्मास्मि' वृत्ती ती फक्त अज्ञानाच्या आवरणाचा नाश करते व ब्रह्म हे त्याच्याच प्रकाशाने ज्ञात होते.

अज्ञानाच्या आवरणाचा नाश करण्याकरिताच सकल शास्त्रे साधनमार्ग सांगून प्रवृत्त झाली आहेत. ब्रह्मतत्त्व हे स्वसंवेद्य आहे असे शब्दाने नुसते सांगणे निराळे व त्याची अनुभूती येणे या दोन गोष्टीत जमीनअस्मानाचे अंतर आहे. ही अनुभूती कशी येते व जीव स्वतःच स्वतःला आपण ब्रह्मरूप आहोत हे कसे जाणतो याची प्रक्रिया गीतेतील पुढील श्लोकातून स्पष्ट झाली आहे.

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।
निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥२.४५॥
एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥३.४३॥
ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥५.१६॥
उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥६.५॥
बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥६.६॥
ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मनमात्मना।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥१३.२४॥

वरील सर्व श्लोकात अर्जुनाला उपदेश करताना भगवंतांनी आत्मस्वरूपाविषयी सावधान हो, आत्म्याने आत्म्याचे उत्तम प्रकारे स्तंभन करून..., आत्म्याविषयीचे अज्ञान आत्म्याच्या ज्ञानाने नष्ट केले आहे...., आत्म्याने, आत्म्यास उद्धरावे, स्वतः आत्माच आत्म्याचा बंधू व हितकर्ता आहे, योगी प्रत्यगात्म्याला आत्म्याने पाहतात .. असे सांगितले आहे. भगवंताच्या या सर्व सांगण्याचा भावार्थ असा आहे की, आत्म्यानेच आत्म्याला जाणावयाचे आहे. हे कसे हे पाहिले की स्वसंवेद्य तत्त्वाचा उलगडा होईल.

येथपर्यंत आपण स्वसंवेद्य म्हणजे काय व आत्मा हे स्वसंवेद्य तत्त्व कसे आहे याचा विचार केला. आता या स्वसंवेद्य तत्त्वाचे म्हणजे आत्म्याचे किंवा ब्रह्माचे स्वरूप कसे आहे याचा विचार करावयाचा आहे.

आत्मा हा सच्चिदानंदस्वरूप आहे म्हणजे तो सत्स्वरूप, चित्स्वरूप व आनंदस्वरूप आहे. या तिहींपैकी आत्म्याने आत्म्याला स्वतः जाणण्याची क्रिया त्याच्या चित्स्वरूपामुळेच घडून येते. चैतन्य हा धर्म ब्रह्माच्या ठिकाणी नसता तर

सृष्टीमध्ये होत असलेले स्पंदन, हालचाल, ज्ञान, प्रकाश इत्यादि गोष्टी आपल्याला कळल्या नसत्या; परंतु त्या सर्वांची प्रतीती येत असल्यामुळे 'इदं' शब्दाने वाच्य होत असलेल्या जड जगताच्या पाठीमागे त्याला चेतना देणारा, प्रकाश देणारा, प्रज्ञानघन, विज्ञानमय असा कोणता तरी चैतन्याचा साठा असला पाहिजे असे अनुमान करता येते. 'त्याने विचार केला', 'त्याने इच्छा केली', 'त्याने जीवभावाने प्रवेश केला,' 'त्याने स्वतःच स्वतःला जाणले,' असे श्रुतिस्मृतीत म्हटले असल्यामुळे इच्छा करणे, विचार करणे, प्रवेश करणे किंवा जाणणे या गोष्टी चैतन्यावाचून होणे शक्य नाही. कठोपनिषदाच्या "तमात्मस्थं ॥ २-२-१२॥" ह्यावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "तमात्मस्थं स्वशरीरहृदयाकाशो बुद्धो चैतन्याकारेणाभिव्यक्तम् ॥" म्हणजे आपल्या शरीरस्थ हृदयाकाशात म्हणजे बुद्धीत चैतन्याकाराने अभिव्यक्त झालेल्या आत्म्यास, असे म्हटले आहे. कठोपनिषदात "नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानाम् ॥ २-२-१३ ॥" असे आत्म्याचे वर्णन केले आहे. तो आत्मा नाश पावणाऱ्या पदार्थातील अविनाशरूप आहे. त्याचप्रमाणे तो ब्रह्मादि चेतनातील चेतन आहे, असा याचा अर्थ आहे. यावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्य म्हणतात, "किंच नित्योऽविनाश्यनित्यानां विनाशिनाम् । चेतनश्चेतनानां चेतयितॄणां ब्रह्मादीनां प्राणिनां अग्निनिमित्तमिव दाहकत्वं अनग्नीनामुदकादीनामात्मचैतन्यनिमित्तमेव चेतयितृत्वमन्येषाम्" तो आत्मा विनाश पावणाऱ्या पदार्थातील अविनाशरूप आहे. त्याचप्रमाणे चेतयित्या बुद्धिमान् ब्रह्मा, इंद्र इत्यादि प्राण्यांची जी चेतना ती त्यासाठीच आहे म्हणजे त्यांची चेतना ब्रह्मचैतन्याच्या अधीन आहे. गरम पाणी अग्निरूप असत नाही; पण अग्नीमुळेच त्याच्या ठिकाणी दाहकत्व येते, त्याप्रमाणे सर्व जीवांचे चेतयितृत्व आत्मचैतन्याच्या निमित्तानेच असते. त्याचप्रमाणे "न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो भांति कुतोऽयमग्निः । तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥" असे कठोपनिषद (२-२-१५), मुंडकोपनिषद (२-२-१०) व श्वेताश्वतरोपनिषद (६-१४) यांमध्ये म्हटले आहे. त्या स्वात्मभूत ब्रह्माच्या ठिकाणी सर्वांना प्रकाशित करणारा सूर्य भासत नाही; म्हणजे तो त्या ब्रह्माला प्रकाशित करीत नाही. त्याचप्रमाणे चंद्र, नक्षत्रे, विजा व लौकिक अग्नी त्याला प्रकाशित करू शकत नाहीत. वास्तविक हे सर्व स्वयं प्रकाशमान होणाऱ्या त्या परमेश्वराच्याच मागून प्रकाशमान होते. त्याच्या प्रकाशाने हे सर्व प्रकाशमान होते. यावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, "कार्यगतेन विविधेन भासा तस्य ब्रह्मणो भारूपत्वं स्वतोऽवगम्यते । न हि स्वतोऽविद्यमानं भासनं अन्यस्य कर्तुं शक्यम् । घटादीनामन्यावभासकत्वादर्शनात् भासनरूपाणां चादित्यादीनां तद्दर्शनात् ।" कार्यातील निरनिराळ्या तेजांच्या योगाने ब्रह्माचे स्वयंप्रकाशत्व स्पष्ट कळते. तेजाने

रहित असलेले घटादि पदार्थ दुसऱ्या पदार्थांना प्रकाशयुक्त करीत नाहीत; पण सूर्य मात्र इतर पदार्थांना प्रकाशित करतो. हाच न्याय ब्रह्माला लागू आहे. " मुंडकोपनिषदात " ब्रह्माचे वर्णन करताना असे म्हटले आहे की–

हिरण्मये परे कोशे विरजं ब्रह्म निष्कलम् ।
तच्छुभ्रं ज्योतिषां ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः ॥२.२.९॥

ज्योतिर्मय श्रेष्ठ कोशात अविद्यादोषरहित व निरवयव ब्रह्म आहे. ते शुभ्र, शुद्ध व सर्व ज्योतींची ज्योत किंवा तेजांचे तेज आहे. त्याला आत्मानुभवी जाणतात. यावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, " सर्व पदार्थांना प्रकाशित करणाऱ्या अशा ज्या आदित्यादि ज्योती आहेत त्या सर्व ज्योतींनाही प्रकाशित करणारी ही आत्मज्योती आहे. अग्नी इत्यादिकांचे प्रकाशरूपत्व त्यात असलेल्या ब्रह्मात्मचैतन्य ज्योतीच्या निमित्तानेच आहे. इतर कोणत्याही बाह्य ज्योतीने न भासणारे असे ते आत्मचैतन्य स्वयंप्रकाश आहे. अन्य प्रकाशरूप पदार्थांकडून प्रकाशित न होणारी जी आत्मज्योती तीच परज्योती होय. त्याप्रमाणेच " ज्योतिर्मयो हि शुभ्रः ॥ ३–१–५ ॥ " असे " मुंडकोपनिषदात " म्हणून ब्रह्म ज्योतिर्मय व निर्मल आहे असा उल्लेख केला आहे. " छांदोग्यउपनिषदात " " सकृद्विभातः ॥ ८–४–२ ॥ " असा आत्म्याचा निर्देश केला आहे. याचा अर्थ आत्मा हा सदोदित प्रकाशित असलेला असा आहे. जो गुण ज्या पदार्थात नेहमी राहणारा असतो तो त्याच्या स्वरूपभूत ठरतो. असा न्याय असल्यामुळे ब्रह्मात नेहमी असणारा प्रकाश ब्रह्माचे स्वरूप दाखविण्यास समर्थ आहे. त्यामुळे हे आत्मतत्त्व स्वसंवेद्य कसे होते म्हणजे स्वतःसच स्वतः जाणण्यास अर्थात् आत्म्याने आत्म्याला जाणण्यास कसे समर्थ होते हे सांगताना "छांदोग्यउपनिषदात" म्हटले आहे, " अथ य एष संप्रसादोऽस्माच्छरीरात् समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यत एष आत्मेति ॥ छा. ८–३–४ व ८–१२–३ ॥ " आता हा विद्वान् शरीरापासून उत्थान पावून शरीरच मी असा अभिमान टाकून देऊन परमात्मलक्षण ज्योतीस प्राप्त होऊन आपल्या स्वरूपाने अभिनिष्पन्न होतो. म्हणजे साधक स्वरूपसंपत्तीच्यापूर्वी देहालाच आत्मा समजत होता; पण सद्‌गुरुकृपेने आत्मशक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर हळूहळू त्याचा देहाभिमान कमी कमी होत जाऊन परमात्मालक्षण ज्ञानस्वरूप ज्योतीला तो प्राप्त होतो.

बृहदारण्यकाच्या चवथ्या अध्यायातील तिसऱ्या ब्राह्मणाला ज्योतिर्ब्राह्मण असे म्हणतात. त्यात आत्मा हा ज्योति–प्रकाशरूप असून तो स्वतःच स्वतःला जाणतो असे म्हटले आहे. " अयमात्मा स्वयं ज्योतिः कार्यकरणविलक्षणः ॥ ४–३–१८ ॥ ", " अयं पुरुषः स्वयं ज्योतिर्भवति " व " स एव स्वयं ज्योतिः पुरुषः ॥ ४–३–१५ ॥, " " अत्रायं पुरुषः स्वयंज्योतिर्भवति, " " स्वयंज्योतिरा-

त्माऽस्ति, ॥ ४–३–१४ व ४–३–९ ॥ ” असे श्रीमदाद्यशंकराचार्यांनी “ बृहदारण्यकोपनिषदाच्या ” भाष्यात म्हटले आहे. आत्मा हा स्वयं ज्योतिस्वरूप आहे व तो चैतन्यज्योतीने स्वतःला व सर्वांना प्रकाशित करतो हाच सिद्धांत प्रत्येक ठिकाणी आचार्यांनी ठळकपणे मांडला आहे.

ब्रह्म किंवा आत्मा हा चेतन असून तो स्वतःच स्वतःला जाणतो हे येथपर्यंत पाहिल्यावर त्याचे चेतनत्व म्हणजे काय आहे हे पाहणे इष्ट ठरेल; कारण या चेतनत्वामुळेच स्वतःला स्वतः जाणण्याची प्रक्रिया घडत असते. “ श्वेताश्वतर उपनिषदामध्ये ” आत्म्याचे हे चेतनत्व आत्मशक्तीमुळे आहे असे स्पष्टच म्हटले आहे.

**ते ध्यानयोगानुगता अपश्यन् देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम् ।**
**यः कारणानि निखिलानि तानि कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः ॥१.३॥**

ऋषींनी सिद्धयोगस्वरूप ध्यानयोगात स्थिर होऊन आपल्या स्वतःच्या गुणांनी झाकलेल्या परमात्म्याच्या स्वरूपभूत अशा अचिंत्य आत्मशक्तीला पाहिले. त्यांना तिचा साक्षात्कार झाला. या आत्मशक्तीच्या साहाय्यानेच तो एकटाच परमात्मा कालापासून आत्म्यापर्यंत अशा सर्व कारणांवर देखरेख करतो. यावरून हे स्पष्ट होते की, ब्रह्म हे परिपूर्ण असून त्याची शक्तीही परिपूर्ण आहे. उपनिषदातील पुढील शांतीतून हाच अर्थ स्पष्ट झाला आहे.

**ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्ण मुदच्यते ।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥**

ते परब्रह्म पूर्ण आहे व हे कार्य किंवा शक्तिब्रह्मही पूर्ण आहे. त्याचप्रमाणे पूर्ण कार्यब्रह्माचे पूर्णत्व घेऊन ते आपल्यामध्ये लीन करून पूर्ण परब्रह्मच शेवटी शिल्लक राहते. परब्रह्म शिवस्वरूप असून कार्यब्रह्म शक्तिस्वरूप आहे. परब्रह्मामुळेच शक्तीच्या साहाय्याने पिंडब्रह्मांडाची रचना होते. मात्र ज्यावेळी सद्‌गुरुकृपेने शक्ती जागृत होते त्यावेळी ती पिंडब्रह्मांडाची रचना गिळून टाकून आपल्या पूर्णरूपाने परब्रह्मात लीन होते. हेच आत्म्याने आत्म्याला जाणणे, पाहणे किंवा अनुभवणे होय. यालाच श्रीज्ञानेश्वरमहाराज स्वसंवेद्य म्हणतात. या स्वसंवेद्यतेसाठी शक्तीने परिपूर्ण असलेल्या आत्म्याला दुसऱ्या कशाचीही आवश्यकता असत नाही. या दृष्टीनेच “ श्वेताश्वतर उपनिषदात ” असे म्हटले आहे की–

**न तस्य कार्यं करणं च विद्यते तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते ।**
**पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रियाच ॥६.८॥**

या विषयी म्हणजे स्वतःच स्वतःला जाणण्यासाठी त्या ईश्वराला कार्य व साधन नाही. तो म्हणजे त्याची स्वतःची शक्तीच कार्य व साधन आहे. त्याच्या बरोबरीचा किंवा त्याच्यापेक्षा अधिक असा कोणीही नाही. त्या परमेश्वराची ज्ञान, बल व क्रियारूप अशी अनादिसिद्ध स्वाभाविक दिव्य शक्ती नानाप्रकारची आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अमृतानुभवाच्या" मंगलाचरणात उपरोक्त आत्म्याचे व त्याच्या दिव्य शक्तीचे ऐक्य; शिवशक्तीचे अनादि ऐक्य व त्यांची अद्वैत क्रीडा सांगून स्पष्ट केले आहे. आत्म्याने आत्म्याला आत्म्यात जाणावे असे श्रीमद्‌भगवद्‌गीतेत भगवान् गोपालकृष्ण अर्जुनाला जागोजाग सांगतात व त्या सर्व सांगण्याचा श्रीज्ञानेश्वरमहाराज स्वसंवेद्य या एका शब्दात निर्देश करतात; पण जोपर्यंत शव-शक्तीचे अनादि ऐक्य लक्षात येणार नाही तोपर्यंत ही स्वतःच स्वतःला जाणण्याची प्रक्रिया उलगडणार नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**सार्धं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ।**
**ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ।।३।।**
**अद्वैतमात्मनस्तत्वं दर्शयन्तौ मिथस्तराम्**
**तौ वन्दे जगतामाद्यौ तयोस्तत्वाभिपत्तये ।।४।।**
**मूलाग्राय मध्याय मूलमध्याग्रमूर्तये ।**
**क्षीणाग्रमूलमध्याय नमः पूर्णाय शंभवे ।।५।।**

द्वैताच्या मिषाने वारंवार भिन्न असल्यासारखे भासणारे पण एकाच सच्चिदानंद रूपात असणारे ब्रह्म व माया किंवा शिव व शक्ती यात कोणाच्या योगाने कोण अर्ध्यासह आहे, कोण कोणाचा अर्ध आहे व कोणाशी कोण संलग्न, जडलेले, मिसळलेले किंवा एकरूप आहे; हे दोघेही पूर्ण एकरूप असल्यामुळे कोणी जाणू शकत नाही. आपले एकात एक मिसळलेले व एकरूप असलेले द्वैतरहित मूळ स्वरूप म्हणजे अद्वैततत्त्वच हे एकमेकांच्या साहचर्याने शिवशक्ती प्रत्ययास आणून देत असतात. अशा त्या जगताच्या आद्य शिवशक्तीला त्यांच्या तात्त्विक अशा मूळ स्वरूपाच्या यथार्थ प्राप्तीसाठी किंवा त्यांचे ज्ञान होण्याकरिता मी वंदन करतो. जो जगाचे मूळ, मध्य व अंत असून मूळ, मध्य व अंत या मर्यादांनी जो साकार झाला आहे आणि ज्याच्या ठिकाणी मूळ, मध्य व अंत हे भाव नसून शिवशक्ति-स्वरूपातही जो पूर्णच आहे, अशा शंभूला नमस्कार असो.

एकच परब्रह्म आपल्या शुद्धसत्त्वात्मक मायाशक्तीने स्फुरण पावते. ते तसे स्फुरण पावले की, ते साहजिकच शिवशक्ती किंवा ज्ञाताज्ञेय किंवा भोक्ताभोग्य या द्वैतभावाला प्राप्त होते. अशा रीतीने द्वैतभावाला प्राप्त झाले तरी ते एकमेका-पासून अलग पडत नाहीत किंवा त्या दोघात संधी राहत नाही. ते परस्परात व्याप्त असतात. शक्तिस्फुरणात शिव असतो व शिवावरच शक्तीचे स्फुरण होते. शिवशक्ती परस्पराहून अलग होत नाहीत. याचाच अर्थ एका परब्रह्माचे शिव व शक्ती असे अर्धे दोन भाग होत नाहीत; कारण परब्रह्म वस्तू कधी न फुटणारी अशी अद्वैतरूप आहे. म्हणून शिव हा अर्धा भाग व शक्ती हा अर्धा भाग असून ते एकमेकांच्या अर्ध्या भागासह पूर्ण होतात असेहीं म्हणता येणार नाही. ते दोन दिसतात खरे पण

त्यांचे ऐक्य नाहीसे होत नाही. म्हणजे अद्वैत परब्रह्माच्या ठिकाणी द्वैत किंवा शिव-शक्तिरूप दोनपणा खरा नसून भासमात्र आहे. शिवशक्तीचे द्वैत भासते पण त्या द्वैतात अद्वैताचाच अनुभव येतो. शिवशक्तीचे खरे द्वैत असते तर शिवाचे अस्तित्व निराळे व शक्तीचे अस्तित्व निराळे दिसले असते. त्याचप्रमाणे दोघांची निरनिराळी लक्षणे दिसली असती. परब्रह्म वस्तू शिवशक्तिरूपाने दुभंग झाली असती तर तिच्या झालेल्या दोन भागांचे ऐक्य किंवा मीलन दिसून आले असते; पण परब्रह्माचे शिवशक्तिरूपाने दोनपणाला येणे व त्या दोघांचे पुन्हा एकपणाला येणे ह्या दोन्ही गोष्टी भासमात्रच असतात. म्हणूनच शिवशक्तीचे लग्न म्हणजे ऐक्य दिसत नाही. शिवाय शिवशक्तीचा दोनपणा भासल्यावर, तो दोनपणा तसाच काही काळ राहून त्या दोघांचे नंतर ऐक्य झाले असते तरी ते दिसून आले असते; पण शिवशक्तीचे दोनपणाला येणे व पुन्हा दोघांचेही ऐक्य किंवा मीलन होणे हे वारंवार म्हणजे क्षणोक्षणी होत असल्यामुळे, त्यात संधी किंवा अवकाशच राहत नाही. त्यांचे ऐक्य मूळचेच आहे. त्याचप्रमाणे शिव व शक्ती हे दोघेही दोनपणामुळे अपूर्ण न होता पूर्णच राहतात. त्यांच्या मूळचा पूर्णपणा व मूळचे सच्चिदानंदत्व शिवशक्ती या दोघातही सारखेच कायम राहते. त्यामुळे ते अर्धे अर्धे होत नाहीत व त्यांचे ऐक्यही होत नाही. त्यांचे अनादि ऐक्यच असते. ते केव्हाच फुटत नाही म्हणून त्यांचे ऐक्य झाले असेही अनुभवाला येत नाही.

शिवशक्ती म्हणजे वस्तू किंवा परमात्मतत्त्व व त्या वस्तूची शक्ती होय. ही नावे दोन असली तरी तत्त्व एकच आहे, म्हणून वस्तू व वस्तूची शक्ती यांचे नेहमी अद्वैतच असते. जोपर्यंत वस्तूची शक्ती स्फुरण पावत नाही तोपर्यंत वस्तू व शक्ती अत्यंत एकरूप असतात, यात शंकाच नाही. पण शक्तीचे स्फुरण झाल्यावरही, ते शक्तीचे स्फुरण वस्तूवरच होत असून त्या स्फुरणात मूळ वस्तूच स्फुरत असल्यामुळे वरकरणी वस्तू व शक्ती असा दोनपणा दिसत असला तरी, वस्तू व शक्ती या दोन निराळया वस्तू होऊन, त्या परस्पराहून भिन्न होत नाहीत. शक्तिस्फुरण झाले की, वस्तू व वस्तूची शक्ती याचे अव्यक्त असलेले द्वैत व्यक्त होते. व्यक्तदशेत दोघांना दोन नावे प्राप्त होतात; पण वस्तू एकच राहते. स्फुरणापूर्वी जी एक वस्तू होती ती स्फुरणदशेतही एकच राहते. म्हणून वस्तू व वस्तूची शक्ती यांचे द्वैत कधीही उत्पन्न होत नाही. अशा रीतीने वस्तू व शक्ती ही परस्परात मिळून राहून आपले अद्वैतत्त्व सारखे दाखवीत असतात. शिवशक्तीही याच नियमानुसार एकरूपच असतात व एकरूपानेच स्फुरतात.

"बृहदारण्यकोपनिषदात" असे म्हटले आहे की, "स वै नैव रेमे तस्मादेकाकी न रमते स द्वितीयमैच्छत्.. सर्वमसृजत् ॥ १-४-३.४ ॥" या श्रुतीने एक अद्वैत परमात्मा आपण स्वत:च एकाकी रममाण होऊ न शकल्यामुळे दोनपणाला आला

असे सांगितले आहे. याचा अर्थ शिवशक्ती या दोघांचे अस्तित्व एक आहे व दोघा-तही एकच वस्तू चैतन्य आहे म्हणजे एका चैतन्याच्या अस्तित्वावरच शक्ती भासते या दृष्टीनेच "अमृतानुभवात" "जयां एका सत्तेवें बैसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणे ।। १–८ ।।" असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणत आहेत. श्रीमदाद्यशंकराचार्यंही परब्रह्माच्या अस्तित्वावरच नामरूपात्मक मायेचा पसारा उभारला जातो असेच म्हणतात. हे शिवशक्ती एकमेकावाचून राहत नाहीत; कारण ते एकरस आहेत. पण शिवशक्तीचे ऐक्य जीवाच्या प्रत्ययाला येत नाही म्हणजे तो स्वतःचे स्वसंवेद्यत्व विसरतो. शिव निराळा व शक्तिरूपाने संकुचित झालेला जीव निराळा व त्यांची सत्ता भिन्न आहे असे त्याच्या प्रत्ययाला येते. शिवशक्ती एकरूप असताना भिन्न सत्तेचे आहेत असे कसे अनुभवाला येते हे सांगण्याकरिता "बृहदारण्यकोपनिषदात" श्रुतीने व त्यावरील भाष्यात श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही एकच पुरुष स्वप्नात स्त्रीच्या इच्छेने स्त्रीरूप होतो व पुरुषाच्या सत्तेहून स्त्रीची सत्ता निराळी असते तसे शिव-शक्ती भिन्न सत्तेचे भासतात असे सांगितले आहे. "अमृतानुभवाच्या" पहिल्याच अध्यायात परमात्माच प्राणेश्वरी म्हणजे देवी कसा झाला हे सांगताना श्रीज्ञाने-श्वरमहाराज म्हणतात–

> **जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचिये सरोभरी ।**
> **चारुस्थळीं एकाहारी । एकांशाची ।।१.२।।**
> **जयां एक सत्तेचें बैसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणें ।**
> **जे अनादि एकपणें । नांदति दोघें ।।८।।**
> **आंगाचिया आटणिया । कांतु उवाया आणिला जिया ।**
> **स्वसंकोचें प्रिया । रूढविली जेणें ।।३२।।**
> **जैसी कां समीरेसकट गती । कीं सोनयासकट कांती ।**
> **तैसी शिवेंसी शक्ती । आधवीचि जे ।।४१।।**
> **कां कस्तुरीसकट परिमळु । कां उष्मेसकट अनळु ।**
> **तैसा शक्तीसी केवळु । शिवुचि जो ।।४२।।**

आपल्या एकपणाचा विघाड होऊ न देता आनंदमय शिव, परमात्मा स्वेच्छेच्या प्रेमभरात आपल्या सुंदर स्वरूपावर अर्धनारीनटेश्वराप्रमाणे एकरूपातील एका अंगाने आपणाशीच सदृश असा शक्तिरूप बनतो. या शिवशक्तीला एकाच सत्तेचे आसन आहे म्हणजे त्यांचे एकाच अधिष्ठानावर वास्तव्य आहे. ती दोघे एकाच प्रकाशाने प्रकाशमान आहेत; कारण ती दोघे अनादि कालापासून एकपणाने नांदत आहेत. स्वतःच्या अंगाची आटणी करून शक्ती शिवाला प्रकट करते व आपण संकोचून लहान होऊन शिव शक्तीला प्रकट करतो. ज्याप्रमाणे वायूसहच वायूची गती असते व सोन्यासहच सोन्याची कांती असते त्याप्रमाणे शक्ती ही

शिवासहच असते. शिवाला वगळून शक्ती असत नाही. कस्तुरीशी सुगंध हा एकरूप असतो व अग्नीशी त्याची उष्णता एकरूप असते, त्याप्रमाणे शक्ती म्हणजे केवळ शिवच आहे.

अमृतानुभवात ज्याप्रमाणे स्वसंवेद्य आत्मरूप शिवशक्तियुक्त आहे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केले त्याप्रमाणेच ज्ञानेश्वरीत नाना तऱ्हेचे दृष्टांत देऊन आत्मरूपाचे शिवशक्तियुक्तत्व त्यांनी स्पष्ट केले आहे ते म्हणतात–

तरी तें गा किरीटी ऐसें । अवकाशीं आकाश जैसें ।
पटीं पटु होऊनि असे । तंतु जेवीं ॥१३.८९२॥
उदक होऊनि उदकीं । रसु जैसा अवलोकीं ।
दीपपणें दीपकीं । तेज जैसें ॥८९३॥
कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य असे जयापरी ।
शरीर होऊनि शरीरीं । कर्म जेवीं ॥८९४॥
किंबहुना पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा ।
तैसें जें या सर्वां । सर्वांगीं असे ॥८९५॥
परी रवेपणामाजिवडे । तंव रवा ऐसें आवडे ।
वांचूनि सोनें सांगडे । सोनया जेवीं ॥८९६॥
पैं गा वोघुचि वांकुडा । परि पाणी उजू सुहाडा ।
वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे कीं ॥८९७॥
घटाकारें वेटाळें । तेथ नभ गमे वाटोळें ।
मठीं तरीं चौफळें । आये दिसे ॥८९८॥
तरी ते अवकाश जैसें । नोहिजतीचि कां आकाशें ।
जें विकार होऊनि तैसें । विकारी नोहे ॥८९९॥

'आकाशाच्या पोकळीत जसे आकाश व्यापून असते किंवा वस्त्रामध्ये तंतू जसे वस्त्ररूप होऊन असतात त्याप्रमणे ब्रह्म आहे. रस ज्याप्रमाणे पाण्यामध्ये पाणी होऊन असतो अथवा दिव्यामध्ये दिवा होऊन जसे तेज राहते त्याप्रमाणे ब्रह्म शिवशक्तिरूप आहे. ज्याप्रमाणे कापरामध्ये सुगंध कापूर होऊन असतो व क्रिया शरीराच्या रूपाने शरीरात दृष्टीस पडते त्याप्रमाणे शिवशक्तिरूप ब्रह्म एकरूप असते. ज्याप्रमाणे सोन्याचा तुकडा सोन्याच्याच रूपाने दृष्टीस पडतो त्याप्रमाणें शिवशक्तिरूप ब्रह्म सर्वात सर्वरूपाने दृष्टीस पडते. ज्यावेळेस तुकड्याच्या रूपाने सोने दृष्टीस पडते त्यावेळेस आपल्याला तो तुकडा आहे असे वाटते; परंतु सोने या दृष्टीने पाहिले असता तो तुकडा सोनेच होय. पाण्याचा ओघ जरी वाकडा असला तरी पाणी जसे सरळच असते व अग्नीमुळे तापून लोखंड लाल झाले तरी ते अग्नी नसून लोखंडच असते. घटाच्या आकारातील आकाश वाटोळे दिसते व

मठामध्ये सापडलेले आकाश हे चौकोनी आकाराचे दिसते; परंतु मठ व घट नाश पावल्यावर त्यातील आकाशाचा नाश होत नाही किंवा त्यांच्यामुळे आकाश वाटोळे अगर चौकोनी होत नाही; त्याचप्रमाणे शक्तीच्या उपाधीने ब्रह्म विश्वमय होते; परंतु ब्रह्ममात्र विकारी नसते, ते शिवशक्तिमय असे एकरसपरिपूर्ण असते.

स्वसंवेद्य आत्मरूप हे शिवशक्तिमय असून एकरूप कसे आहे हे अधिक स्पष्ट करून सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**म्हणौनि वन्हि आणि ज्वाळ। दोन्ही वन्हीचि केवळ।**
**तेवीं मी गा सकळ। संबंधु वावो ॥१४.१२२॥**
**जालेंनि जगें मी झांकें। तरी जगत्वें कोण फांके ?।**
**किळेवरी माणकें। लोपजे काई ? ॥१२३॥**
**अळंकारातें आलें। तरी सोनेंपण काइ गेलें ?।**
**कीं कमळ फांकलें। कमळत्वा मुके ? ॥१२४॥**
**सांग पां धनंजया। अवयवीं अवयविया।**
**आच्छादिजे कीं तया। तेंचि रूप ? ॥१२५॥**
**कीं विरूढलिया जोंधळा। कणिसाचा निर्वाळा।**
**वेंचला कीं आगळा। दिसतसे ॥१२६॥**
**म्हणौनि जग परौतें। सारूनि पाहिजे मातें।**
**तैसा नोहें उखितें। आघवें मीचि ॥१२७॥**

अग्नी व ज्वाळा हे दोन्ही जसे अग्नीच आहेत त्याप्रमाणे शिवशक्तिरूपाने मीच सर्व आहे. मी शिव म्हणून कोणी निराळा व शक्ती म्हणून कोणी निराळा आहे असा संबंध लावणे व्यर्थ आहे. शक्तीच्यामुळे झालेल्या जगाच्या उत्पत्तीमुळे जर माझे स्वरूपच लोपले असते, तर हे स्वत: जड असलेले जगत् कोणाच्या तेजाने प्रकाशित होते ? माणकाच्या तेजाने माणिक झाकले जाते काय ? तसेच सोन्याचे अलंकार बनविल्याने त्यातील सुवर्णत्व नाहीसे होते काय ? अथवा कमल उमलल्यावर त्याचे कमलत्व नाहीसे होते काय ? अवयवी म्हणजे अवयव धारण करणारा हा आपल्या अवयवाने झाकला जातो किंवा अवयवांसहवर्तमान असणे हेच त्या अवयवीचे रूप आहे. या भावानेच शिवशक्तिरूप परब्रह्म एकरूप आहे. पेरलेला जोंधळा कणसाच्या रूपाने अनेकत्वाने वाढला असताना तो नाहीसा न होता अनेक रूपाने दिसत असतो, म्हणून जग बाजूला सारून मला पाहण्याची आवश्यकता नाही. संपूर्ण विश्वासह मीच आहे असे पाहावे. शिव निराळा व शक्तीमुळे भासमान होत असलेले विश्व निराळे असे पाहू नये.

"तंत्रालोक" या प्रसिद्ध ग्रंथात अभिनवगुप्तांनी उपरोक्त सिद्धांतच पुढीलप्रमाणे मांडला आहे. ते म्हणतात—

शक्तिश्च शक्तिमद्रूपाद् व्यतिरेकं न वाञ्छति ।
तादात्म्यमनयोर्नित्यं वन्हिदाहकयोरिव ॥

ज्याप्रमाणे वन्ही व त्याची दाहकता ही एकरूप असतात, त्यात कधीही भेद होत नाही त्याप्रमाणे शक्ती व शक्तिमान एकरूप असून त्यांच्यामध्ये कधीही भेद असत नाही.

या दृष्टीनेच ज्यांच्यापासून "बोधाचा हा संसारा। जाला जो आमुते ॥ १८.१७५९ ॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. त्यांच्या परंपरेतील महायोगी गोरक्षनाथांनी "गोरक्षोपनिषद्" या नावाने प्रसिद्ध असलेल्या आपल्या "सिद्धसिद्धांतपद्धती" याग्रंथात स्वसंवेद्य अशा आत्मस्वरूपाच्या तत्त्वाचे विवेचन करताना असे म्हटले आहे की –

परमपदमिति स्वसंवेद्यमत्यंतभासाभासकमयम् ॥५.२॥
यत्र बुद्धिर्मनो नास्ति तत्त्वविन्नापराकला ।
ऊहापोहौ न कर्तव्यौ वाचा तत्र करोति किम् ॥३॥
वाग्मिना गुरुणा सम्यक् कथं तत्पदमीर्यते ।
तस्मादुक्तं शिवेनैव स्वसंवेद्यं परंपदम् ॥४॥
अतएव नानाविधविचारचातुर्यवचसां विस्मयांगत्वात्
गुरुचरणकृपातत्त्वमात्रेण निरुपाधिकत्वेन निर्णेतुं
शक्यत्वात् स्वसंवेद्यमेव परमपदं प्रसिद्धमिति सिद्धान्तः ॥४॥

परमपद स्वसंवेद्य आहे म्हणजे ते आपल्या महिमेतच प्रतिष्ठित आहे. ते केवळ योगसमाधिद्वारा आत्म्याच्या अनुभवानेच जाणण्यास योग्य आहे. त्याचप्रमाणे ते स्वतः सिद्ध व स्वचेतन प्रकाशाने नित्य प्रकाशित आहे. यामुळेच त्याला स्वसंवेद्य म्हणतात. हे परमपद अत्यंत भासाभासकमय आहे; कारण चंद्र, सूर्य, अग्नी व वीज या जड गोष्टींना हे पद जसे प्रकाशित करते तसे ते आपले आपणही प्रकाशित होते. म्हणजे चेतन प्रकाशाच्या सत्तेपासून जड सत्तेला प्रकाशित करणारे हे देदीप्यमान पद आहे. या परमपदरूप आत्म्याला आपल्या वृत्तीचा विषय करण्यात निश्चयात्मक बुद्धी व संकल्पात्मक मनाची धाव पोहोचू शकत नाही. त्याचप्रमाणे जीवात्म्याला आपल्या स्वरूपामध्ये स्थिर करणारी पराकलासुद्धा ब्रह्मामध्ये एकरूप होऊन राहते. व्यापक किंवा परिच्छिन्न होऊनही पराकलेची या तत्त्वात गती होऊ शकत नाही. या परमपदाच्या ठिकाणी खंडनमंडनात्मक ऊहापोहाचा किंवा तर्कवितर्काचा काहीही उपयोग होत नाही. मग वाणी तेथे काय करणार? जर हे परमपद मन अगर वाणीचा विषय होऊ शकत नसेल व ते त्याच्या पलीकडे असेल तर नुसते शास्त्र जाणणारे गुरू त्याचे वर्णन कसे करू शकतील? यासाठी शिवाने असे म्हटले आहे की, ते पद स्वसंवेद्य आहे म्हणजे केवळ योगसमाधिजन्य म्हणजे आपल्या अनुभवानेच ते

जाणले जाऊ शकते. त्यामुळे त्या परमपदाचे वर्णन करताना नानाप्रकारच्या सूक्ष्म विचारांमध्ये निपुण असलेले विद्वानही अगदी हैराण होऊन जातात. हे पद रूप आणि धर्मांनी विवर्जित आहे. यासाठी या निरुपाधिक परमपदाचे ज्ञान व अनुभूती परमपद-निष्ठ गुरुदेवांची कृपा झाल्यावरच अत्यंत उत्तमरीतीने व निर्भयपणे साधक जाणू शकतो. याचा भावार्थ असा की, ते व्यापक, अखंड, शुद्ध, स्वयंज्योतिरूप, व्यक्ताव्यक्तातीत, पिंडब्रह्मांडातीत, संगनि:संगातीत, अवस्थातीत आणि सर्वांहून अलिप्त असे परमपद श्रीगुरुंनी शक्तिपातपूर्वक कृपा केल्यावर स्वचैतन्य जागृतीमुळेच समाधिजन्य स्वसंवेद्य साक्षात्काराने बोधरूप व बोधगम्य आहे. हा सिद्धान्त वेदादि शास्त्रात व सिद्धांमध्ये प्रसिद्ध आहे.

अशा प्रकारे शिवशक्ती एकरूप असले तरी अज्ञानी माणसाला आपण संकोचून लहान झालेले जीव आहोत असे वाटत राहते व तसे भासमान होते. शिवच संकोचून शक्तिरूप होतो म्हणजे जीवरूप होतो असे वर म्हटलेच आहे. असे झाले की, स्वत:चे स्वत:ला जाणणे नाहीसे होते व स्वसंवेद्यत्व संपते. आपण आत्मरूप आहोत याची जाणीव नाहीशी होते. ही जाणीव नाहीशी होऊन स्वसंवेद्यत्व कसे विसरते ते आता सविस्तर पाहावयाचे आहे.

जेव्हा शिव जीव होतो तेव्हा तो स्वत:च स्वत:स जाणण्याचे विसरतो. "वृत्त्यवच्छिन्नं चैतन्यं जीव: ।" असे जे वेदान्तात जीवाचे लक्षण केले आहे त्याचा अर्थ असा आहे की, परमेश्वर शक्तिरूपाने म्हणजे वृत्त्यवच्छिन्न चैतन्यरूपाने अहं किंवा मी म्हणून स्फुरतो. वृत्त्यवच्छिन्न स्फुरण परमेश्वराचेच खरे; पण या मीपणाने होणाऱ्या स्फुरणाच्या ठिकाणी, ज्या मूळ सच्चिदानंदस्वरूपावर ते स्फुरण होते किंवा जे मूळचे सच्चिदानंद परमेश्वस्वरूपच त्या रूपाने स्फुरते त्या स्वरूपाला विसरून किंवा त्या स्वरूपाकडे दृष्टी न राहून मी म्हणजे वृत्तिस्फुरणापुरता असा भ्रम जीवाला झाला आहे. या अशा भ्रमालाच जीवदशा किंवा अविद्या ही नावे आहेत. आत्म्याची जाणीव जाऊन विषयाची जाणीव जीवाच्या ठिकाणी दृढ झाली आहे. या जाणीवेने ज्ञाताज्ञेय हे जगद्रूप द्वैत भासते. त्याचप्रमाणे जीवाची अंत:करण-वृत्ती विषयाच्या प्रेमाने विषय भोगून लगेच विषय सुखाच्या भोगाची जाणीव धारण करते तेव्हा ती, विषय भोग्य व आपण भोक्ता, असे भोक्ताभोग्यरूप द्वैत भासविते यावरून हे उघड आहे की, या वृत्तिरूप जागिवेमुळे जगद्रूप द्वैताचा भास होतो असा भास झाला की, आत्मा स्वत:ला विसरून जातो म्हणजे आपण आत्मरूप आहोत हे त्याचे स्वसंवेद्यत्व नाहीसे होते. जीवाचे हे स्वसंवेद्यत्व कसे नाहीसे होते हे दृष्टांतपूर्वक सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**पाहें पां बद्ध भावना दृढा । नळियेवरी तो बापुडा ।**
**काय मोकळेयाही पायाचा चवडा । न ठकेचि पुंसा ।।१८.३९३।।**

**म्हणौनि निर्मळा आत्मस्वरूपीं । तो प्रकृतीचें केलें आरोपी ।**
**तो कल्पकोडीच्या मापीं । मविजे कर्में ।।३९४।।**

जीव शरीराला सुंदर समजून, मोहित होऊन, मी शरीर आहे अशी बुद्धी धारण करतो व कोश-किडयाप्रमाणे या देहबुद्धीत गुरफटून जाऊन आपला आपणच वैरी होतो. यामुळेच तो आपल्या आत्मस्थितीचा नाश करून घेतो. ऐन लाभाची वेळ आली असता करंटया कपाळाच्या मनुष्याला आंधळे व्हावे अशी इच्छा होऊन तो आपले चांगले उघडे असलेले डोळे आपणच झाकून घेतो व वस्तुलाभाला अतरतो किंवा एखादा मनुष्य भ्रम झाल्यामुळे पूर्वी जो मी, तो मी आता नाही, मी चोरला गेलो, मी हरवलो असे म्हणतो आणि आपल्या अंतःकरणात असा नसताच समज करू बसतो, त्याप्रमाणे अज्ञानाने भ्रांत झालेल्या जीवाची अवस्था होते तो भवनदीत गटांगळचा खातो व आपले स्वसंवेद्य स्वरूप विसरून जातो. एरवी वास्तविक विचार करून पाहिले तर हल्ली तो जो असतो तो पूर्वीचाच असतो. पण काय करावे? त्याच्या बुद्धीला तसे वाटत नाही. खरोखर हे लक्षात घेण्यासारखे आहे की, स्वप्नातील तरवारीच्या वाराने कोणी खरोखरीच मरतो काय? पोपटाला धरण्याकरिता टांगलेल्या नळीवर पोपट बसल्यामुळे त्याच्या अंगाच्या भारामुळे ती नळी उलट बाजूला फिरते. त्यावेळी वास्तविक पाहता त्याने उडून जावे; पण आपण ही नळी सोडली तर पडू व मरू अशी त्याच्या मनातील शंका जात नाही. मग तो निष्कारण मानेला आळेपिळे देऊन इकडेतिकडे हलवितो आणि छाती संकुचित किंवा घट्ट करून पायाच्या चवडयात नळी धरून ठेऊन मनात म्हणतो की, मी खरोखरच बांधला गेलो आहे. अशा भ्रांत कल्पनेच्या खोडयात सापडून मोकळा असलेला आपल्या पायांचा चवडा, तो नळी अधिकच बळकट धरून गुंतवितो. याप्रमाणे विनाकारण अडकलेल्या त्या पोपटाला कोणी बांधले आहे काय? जशा स्थितीत त्याल अर्धा तोडून जरी नेला तरी तो काही केल्या नळी सोडत नाही. (६.७२ ते ७९) त्या नळीवर बसलेल्या पोपटाचे पंजे मोकळे असतानाही 'आपण बांधले गेलो आहोत,' या दृढ भावनेमुळे किंवा कल्पनेमुळे पंजाने धरलेली नळी न सोडल्यामुळे तो फसत नाही का? म्हणून निर्मळ अशा आत्मस्वरूपावर जो प्रकृतीने किंवा देहाने केलेल्या कर्माचा आरोप करतो तो कोटी कल्पापर्यंत कर्मातच गुंडाळला जातो. (१८.३९३,३९४)

सारांश, नित्य शुद्ध, बुद्ध, अखंड व सच्चिदानंदपरिपूर्ण अशी जी आत्मवस्तू उपनिषदातून सांगितली आहे तेच जीवाचे मूळ स्वरूप होय. आपले मूळचे स्वरूप विसरल्यामुळे म्हणजे संकुचितत्वामुळे स्वसवेद्यत्वाची जीवाची शक्ती आत्मविस्मृत झाल्यामुळे जगद्रूपो द्वैताची सत्य कल्पना करून दृढ संकल्पाने अहंकार, मन इंद्रिये व देह इत्यादि आपल्याहून निराळया तत्त्वाशी जीव एकरूप झाल्यासारखा

भासतो. हा सर्व त्याचा भ्रम असल्यामुळे, वस्तुत: जगत् म्हणून काही एक उत्पन्न होत नाही. म्हणूनच तो अहंकारादिकांशी एकरूप झालेला असला आणि देहादिक सत्य वाटत असले तरी त्याला एकदा हा सर्व भ्रम आहे असे निश्चित कळले म्हणजे पुन्हा तो आपल्या मूळच्या स्वरूपाला ओळखतो.

"प्रसरं भासते शक्तिः संकोचं भासते शिवः ॥" या न्यायाने जेव्हा स्वतःच्या शक्तीच्या विस्तार, प्रसार किंवा उभारणीने शिव संकोचून जीव होतो व या संसार-चक्रात स्वतःच भ्रमण करतो, तेव्हा संकोचामुळे तो आपले स्वसंवेद्यत्व विसरतो. हे कसे घडते याचे वर्णन ब्रह्मसूत्र भाष्याच्या आरंभी श्रीमदाद्यशंकराचार्यांनी पुढीलप्रमाणे केले आहे. "तमेतमविद्याख्यमात्मानात्मनोरितरेतरध्यासं पुरस्कृत्य सर्वे प्रमाणप्रमेयव्यवहारा लौकिका वैदिकाश्च प्रवृत्ताः। सर्वाणि च शास्त्राणि विधिप्रतिषेध-पराणि मोक्षपराणि । अयमनादिरनंतो नैसर्गिकोऽध्यासो मिथ्याप्रत्ययरूपः कर्तृत्व-भोक्तृत्वप्रवर्तकः सर्वलोकप्रत्यक्षः। अस्यानर्थहेतोः प्रहाणाय आत्मैकत्वविद्याप्रतिपत्तये सर्वे वेदान्ता आरभ्यते" आत्मा, अनात्मा व त्यांचा परस्पराशी एक्यतेचा व्यवहार प्रत्यक्षादि प्रमाणे व त्यांच्या योगाने कळणारे पदार्थ, सर्व प्रकारचे विधिशास्त्र, निषेधशास्त्र व मोक्षशास्त्र, इत्यादि जीवाला येणाऱ्या सर्व प्रकारच्या द्वैत प्रत्ययाला भ्रम कारण असून त्या भ्रमालाच अविद्या किंवा मायाशक्ती म्हणतात. ही अविद्या किंवा भ्रम अनादि असून स्वाभाविक व अनंत असा भासतो. जगात खोटेच भासवि-णारे जसे मायिक किंवा ऐंद्रजालिक प्रत्यय असतात, तसाच हाही भ्रम नसतेच द्वैत भासवितो. याच्याच योगाने शिव आपले स्वसंवेद्य आत्मरूप विसरून जीव बनून आपल्याच ठिकाणी लटकेच कर्तृत्वभोक्तृत्व ओढून घेतो. जीवाच्या ठिकाणी भ्रम असतो हे त्याच्या द्वैत प्रत्ययावरूनच सिद्ध होते. हा द्वैतप्रत्ययच जीवाच्या सर्व दुःखपरंपरेस कारणीभूत असल्यामुळे, त्याचा नाश करून जीवाला त्याची मूळची अद्वैतस्थिती प्राप्त करून देण्याकरिता वेदान्ताचा आरंभ आहे. वेदान्त म्हणजे गुरूने शक्तिपातद्वारा केलेला तत्त्वमस्यादि महावाक्याचा उपदेश होय हे कधीही विसरता कामा नये; कारण सर्व शास्त्रकारांनी शैवदर्शनातील आचार्यांची व्याख्या मान्य केली आहे. शास्त्रकार म्हणतात—

**परिपक्वमलायेतानुत्सादनहेतुशक्तिपातेन ।**
**योजयति परे तत्त्वे स दीक्षाचार्यमूर्तिस्थः ॥**

ज्यांचे कामक्रोधादि मल परिपक्व झाले आहेत त्यांच्या सर्व अनर्थाचा नाश करण्यासाठी शक्तिपात करून म्हणजे साधकाच्या ठिकाणी दिव्य शक्तीचे संक्रमण करून त्याची अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत करून दीक्षेच्या योगाने आचार्यांच्या म्हणजे श्रीगुरूंच्या मूर्तीमध्ये स्थित असलेला तो महेश्वर साधकाला परतत्त्वामध्ये नेऊन पोहोचवितो.

जीव हा मुळातच अत्यंत शुद्ध, परिपूर्ण व सच्चिदानंदरूप आहे; पण त्याचे मूळचे स्वरूप तो भ्रमाने विसरला असून मुळात आपल्या ठिकाणी नसलेल्या अशा विपरीत देहादि अनात्म पदार्थांची व त्यांच्या धर्मांची भ्रमानेच कल्पना करून व त्या पदार्थांशी व त्यांच्या धर्मांशी ऐक्य करून ते देहादि अनात्म पदार्थच माझे स्वरूप आहेत व त्यांचे धर्म ते माझे धर्म आहेत असे समजून त्यात बद्ध झाला आहे. त्यामुळे पूर्ण असून मी अपूर्ण, सुखरूप असून मी दुःखी, कर्ता भोक्ता नसून कर्ता भोक्ता, त्याच्यावाचून दुसरा पदार्थ नसून मी अमुक व बाकीचे अमुक माझे संबंधी, अशा अनेक विपरीत खोटया समजुती करून घेऊन जीव या संसारात सारखा दुःखाने तडफडत असतो. या सर्व अनर्थाला कारण स्वसंवेद्यत्व विसरल्याने झालेला भ्रम आहे. किंबहुना जीवभाव म्हणजेच भ्रमाचे रूप म्हणता येईल. हा जीवभाव किंवा हे द्वैत हा भ्रम आहे. याला त्याचा तोच जीव प्रत्यक्ष दाखला आहे. जीव म्हटला की मी देहरूप, मी कर्ता, मी सुखी, मी दुःखी, मी संसारी, मी अपूर्ण असेच विपरीत ओरडताना दिसतो. म्हणून जीवाचा हा विपरीत समज नाहीसा करून त्याला त्याच्या यथार्थ अशा स्वसंवेद्य स्थितीचा अनुभव आणून देण्याकरिता श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आत्मरूप हे स्वसंवेद्य तत्त्व असून सिद्धयोगशास्त्राचा उपक्रम " स्वसंवेद्य " या एकाच शब्दाच्या द्वारा केला आहे. स्वसंवेद्य तत्त्वाच्या प्राप्तीचा हा उपक्रम किंवा ही प्रक्रिया सिद्धयोगसाधनद्वारा कशी घडते याचा आपण यापुढे सांगोपांग विचार करू.

एथपर्यंत आपण शिव स्वतःच संसारसमुद्रातील जीव होऊन " आशापाशशतेन पाशितपदः । " म्हणजे आशादिकांच्या हजारो पाशांनी आपल्याला बांधून घेऊन व स्वसंवेद्यत्व विसरून भ्रमाने कसा राहतो हे पाहिले. हे स्वसंवेद्यत्व विसरल्यामुळे अनादि कालापासून संसारचक्रात सापडून एखाद्या धुळीच्या कणाप्रमाणे अणुरूपाने नानाविध शरीरे धारण करीत जीव कालचक्रामध्ये फिरत असतो. ही गती थांबून ज्याप्रमाणे नदी सागराला मिळाल्यावर कृतार्थ होते त्याप्रमाणे या अविरत प्रवाहात वाहत असताना जीवाची सुटका होऊन त्याला आपले मूळचे स्वसंवेद्य व चैतन्ययुक्त आत्मस्वरूप प्राप्त होऊन चिरकाल आत्मशांती केव्हा व कशी प्राप्त होईल याचा विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनशास्त्र ज्ञानेश्वरीत सांगून केला आहे. जीवाला आपले स्वसंवेद्यत्व प्राप्त व्हावे म्हणूनच सर्व साधने व शास्त्रे प्रवृत्त झाली आहेत. वरवर पाहता ती जरी निरनिराळी दिसली व त्यात काही तात्त्विक मतभेद दिसले तरी अंततः ही सर्व साधने शक्ती जागृतीसाठीच आहेत हे लक्षात येते. यासाठी कर्मयोग, भक्तियोग, ज्ञानयोग, संन्यासयोग, विभूतियोग, विश्वरूपदर्शन-योग, क्षेत्रक्षेत्रज्ञयोग इत्यादि सर्व योगांची सिद्धी सिद्धयोगाने म्हणजे गुरुकृपेने कशी

होते हे ज्ञानेश्वरीत सांगून त्यांनी उपरोक्त सर्व योगांचा समन्वय केला आहे. अनादि आत्मसत्तास्वरूप निद्रिस्त कुंडलिनी शक्ती गुरुकृपेने जागृत होऊन तिने जीवाला साउली केल्याशिवाय तो जीव परब्रह्म होऊ शकत नाही व आपले स्वसंवेद्य आत्मरूप पुन्हा प्राप्त करून घेऊ शकत नाही, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी नि:संदिग्धपणे उद्घोषित केले आहे. हा सिद्धांत स्पष्ट करताना ते म्हणतात—

**ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा ।**
**जया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ।।६.२७२।।**

शिवाची शक्ती कुंडलिनी ही साक्षात् जगदंबा आहे. ती चैतन्यचक्रवर्तीची म्हणजे चैतन्यरूप आत्म्याची चितिरूपाने शोभाच आहे. तीच संकोचून लहान झालेल्या शिवरूप जीवास साउली करीत असते; कारण शिवशक्ती एकरूप आहेत. शक्तीने अशी जागृती धारण केल्याशिवाय जीव कधीही स्वसंवेद्य अवस्थेस पोहोचू शकत नाही, हे त्रिकालाबाधित सत्य आहे. साधनाच्या जगातील हा एक अत्यंत गंभीर व रहस्यमय विषय आहे. भाषेने तो वाच्य करता येणे कठीण आहे. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तें बुद्धीही आकळतां सांकडें । म्हणौनि बोली विपायें सांपडे ।**
**परी श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखैन मी ।।६.३२।।**
**जें दिठीही न पविजे । तें दिठीविण देखिजे ।**
**जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ।।३३।।**
**ना तरी जें धातुवादाही न जोडे । तें लोहींचि पंधरें सांपडे ।**
**जरी दैवयोगें चढे । परिसु हातां ।।३४।।**
**तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।**
**म्हणौनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ।।३५।।**
**तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।**
**अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ।।३६।।**

गीताशास्त्रातील साधनाचे रहस्य बुद्धीला आकलन करण्यास कठीण आहे, म्हणून शब्दांमध्ये ते व्यक्त करणे जवळ जवळ अशक्य आहे. खरे म्हणजे शब्दांनी ते क्वचितच् सांगता येईल, परंतु श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी माझ्यावर कृपा म्हणजे शक्तिपात करून माझ्या ठिकाणी कुंडलिनी शक्तीचा जो दीप प्रज्ज्वलित केला आहे त्या दिव्याच्या उजेडात ते स्वसंवेद्य आत्मरूप तत्त्व मी पाहीन. या सिद्धयोगामुळे म्हणजे गुरूने केलेल्या कृपारूपी शक्तिपातामुळेच अज्ञान, भ्रमादि आपोआप निवृत्त होऊन अतींद्रिय शक्तीच्या जागृतीचे ज्ञानबळ प्राप्त झाले तर जेथे दृष्टीही पोहोचू शकत नाही ते इंद्रियातीत असे परब्रह्म दृष्टीशिवाय अंत:चक्षूंनी पाहता येते. जर दैवयोगाने परीस हाती लागला तर किमयागारालाही न मिळणारे

उत्तम सोने लोखंडाला परिसाचा स्पर्श करताच लोखंडातच मिळेल. त्याप्रमाणे जर सद्‌गुरूंची कृपा होईल म्हणजे ते जर साधकावर शक्तिपात करतील व त्यांनी दिलेल्या साधनाचा साधक अभ्यास किंवा प्रयत्न करील तर त्याला कोणती गोष्ट प्राप्त होणार नाही ? म्हणून ज्ञानदेव म्हणतात, अशा प्रकारची अपार कृपा म्हणजे तीव्र-तीव्रतम शक्तिपात श्रीसद्‌गुरुनाथांनी माझ्यावर केला आहे. त्या सद्‌गुरुकृपेच्या आधारावर मी हे साधनरहस्य सांगेन. माझ्या विवेचनात, बोलण्यात, व्याख्यानात किंवा शब्दात मी अरूप व निराकार आत्मरूपाचे स्वरूप सर्वांना दाखवीन आणि ते परब्रह्म इंद्रियांना गोचर होण्याच्या पलीकडचे आहे, तरी त्याचाही अनुभव इंद्रियांना येईल, असे मी करीन.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त दृष्टी ठेवूनच गीतेच्या आधारे सिद्धयोग-साधनरहस्य प्रकट केले आहे. एरवी आत्मरूप स्वसंवेद्य होण्याला दुसरा मार्गच नाही. एक हजार वर्षांपूर्वी काश्मीर देशामध्ये बोधचक्षू श्रीतात्पर्याचार्यदेवांनी "संविदेव हि भगवती वस्तूपगमे नः शरणाम् ।" इत्यादि वाक्यांनी ज्या साधनरहस्याची घोषणा केली ती अगदी यथार्थ आहे, असे ज्ञानेश्वरी वाचल्यावर वाटू लागते. भगवती संविद्देवी कुंडलिनी शक्तीच वस्तूचा म्हणजे आत्मरूपाचा निर्देश करणारी व जीवाला स्वसंवेद्य आत्मरूप प्राप्त करून देणारी पथप्रदर्शिका आहे हे त्यांनी निस्संदिग्धरीत्या स्पष्ट केले आहे. "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, यामधील ' कुंडलिनी तत्त्व " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराजांनी याबद्दल नाथाचार्यांचा दाखला देऊन असे म्हटले आहे की, " मत्स्येंद्रनाथ गोरक्षनाथ प्रभृति हठयोग प्रवर्तक नाथ–आचार्यगण एवं आगम विद्‌गण कहते हैं कि मूलाधारमें प्रसुप्ता कुंडलिनी शक्ति को उद्‌बुद्ध किये बिना कर्म, ज्ञान किंवा भक्ति आदि अन्य कोई भी साधन मुक्ति वा अनर्थ-निवृत्ति के उपाय–रूप में परिणाम नहीं हो सकता । कर्म, ज्ञान वा भक्ति कुंडलिनी शक्ति के जागरण में सहायता करें, वे ही यथार्थ में कर्म, ज्ञान और भक्ति, तथा कर्मयोग, ज्ञानयोग और भक्तियोग पदके वाच्य हैं । उनसे भिन्न कर्मादि व्यर्थ-प्रयास के कारण होते हैं । कुंडलिनी की निद्रा भंग हुए बिना आत्मा अथवा परमात्मा में स्थिति नहीं हो सकती ।" याचा अर्थ असा की प्रत्येक मनुष्याच्या अंतरंगात शक्तीच्या रूपाने निद्रिस्त अवस्थेत असलेल्या अंतरंग गुरूला कार्यरत करून स्वसंवेद्य अशा आत्मस्वरूपाची प्राप्ती करणे हाच आहे. महर्षी पतंजलींनीही "स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनाऽनवच्छेदात ।। समाधिपाद ।।१.२६।। " या योगसूत्रात असे म्हटले आहे की, हा आतून शक्तीच्या रूपाने प्रकट झालेला ईश्वर म्हणजे शिव पूर्वी होऊन गेलेल्या गुरूंचाही गुरू आहे. अशाप्रकारे शिव व शक्ती ही गुरुरूप असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमाहाराजांनी या दोघांपैकी कोणीही एक जण जागे झाले तरी आत्मरूपाची प्राप्ती होते असे " अमृतानुभवात" सांगितले आहे. ते म्हणतात–

तयां दोघांमाजी एखादें । विपायें उमजलें दोय निदे ।
तरी घरवाते गिळोनि नुसधें । कांहीं ना करी ॥१.१४॥

शिवशक्ती या दोघांमध्ये जर एकाची जागृती झाली तर प्रपंच गिळला जाऊन साधक ब्रह्मरूप होतो. एखादे म्हणजे जर व विपाये म्हणजे कदाचित् असा अर्थ आहे. मी म्हणजे वृत्तिरूपशक्तिस्फुरणाने आपले शुद्ध ज्ञानरूप ओळखून आधारभूत शुद्ध ज्ञानस्वरूप शिवाशी ऐक्य करणे हे शक्तीचे जागणे होय. ही कुंडलिनी शक्ती जागी झाली की, शिवाशी तिचे ऐक्य होते. तेव्हा "अहंब्रह्मास्मि" हा ऐक्यानुभव येतो. शिवाचे जागपण म्हणजे "ब्रह्मैवेदं सर्वं" आपले सर्वात्मत्व ओळखणे होय किंवा शिवाने शक्तीच्या सर्वरूप आविष्काराशी ऐक्य करणे ही शिवाची जागृती होय. असे दोघेही जण जागे झाले असता सर्व प्रपंचच गिळला जातो.

ही जी प्रपंच गिळण्याची अर्थात् स्वसंवेद्य तत्त्वप्राप्तीची प्रक्रिया घडून येते त्यात सद्गुरूंचे स्थान कोणते ? हे प्रथम पाहणे इष्ट ठरेल; कारण ही शिवशक्तीच्या जागृतीची प्रक्रिया सद्गुरुकृपेने घडत असल्यामुळे "जाणावें गुरुमुखें ॥ १.४४ ॥" असे "अमृतानुभवात" श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्यातील इंगित स्पष्ट केले आहे. गुरूने एकदा शक्तिपात केला की शिवशक्तीचे मीलन होऊन स्वसंवेद्यत्व कसे प्रस्फुटित होते हे सांगताना स्वतःचा दाखला देताना ते "अमृतानुभवात" म्हणतात—

जया दोघांच्या आलिंगनीं । विरोनि गेली दोन्ही ।
आघवियाचि रजनी । दिठीचि जे ॥१.४८॥
सांडूनि मीठपणाचा लोभु । मिठें सिंधुत्वाचा घेतला लाभु ।
तेवि अहं देऊनि शंभु । शांभवी झालों ॥६३॥
शिवशक्ति समावेशें । नमन केले म्यां ऐसें ।
रंभागर्भ आकाशें । रिघाला जैसा ॥६४॥

शिवशक्तीच्या आलिंगनात त्यांचे दोनपण समूळ नाहीसे होते. ज्याप्रमाणे सूर्यप्रकाशात अंधार व उजेड हा भेद राहत नाही, फक्त एक प्रकाशच राहतो, त्याप्रमाणे शिवशक्तीच्या आलिंगनात एक स्वसंवेद्य तत्त्व राहते. मीठाने मीठपणाचा अभिमान सोडून ते सागराशी मिळाले की, जसे सागरच होते त्याप्रमाणे शंभूला मीपणा देऊन मी शांभवी शक्ती झालो. केळीची सोपटे सोलल्यावर तिच्यातील पोकळी जशी महाकाशाशी सहज एकरूप होते त्याप्रमाणे शिवशक्तीच्या समरसतेने मी शिवशक्तीला म्हणजे स्वसंवेद्य आत्मरूपाला नमन केले आहे.

स्वसंवेद्य म्हणजे आत्म्याने आत्म्याला पाहवयाचे किंवा जाणावयाचे होय. हे आपण गीतेच्या श्लोकाच्या आधारे प्रथम पाहिलेच आहे. या श्लोकाचा भावार्थ लिहिताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वसंवेद्य तत्त्वाच्या प्राप्तीची जी प्रक्रिया स्पष्ट

केली आहे ती पाहिली म्हणजे शक्तीच्या जागरणाची आवश्यकता त्यांनी कशी प्रतिपादिली हे स्पष्ट होऊन, श्रीगुरुकृपेने शक्ती जागृत होऊन साधकाला स्वसंवेद्य आत्मस्वरूप कसे प्राप्त होते हेही कळेल. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**ते गुरुशिष्याची गोठी। पदपिंडाची गांठी।**
**तेथ स्थिर राहोनि नुठी। कवणे काळीं ॥३.२७२॥**

आत्म्याने आत्म्याला पाहणे किंवा जाणणे ही गुरुशिष्यांची गुह्य गोष्ट आहे. गुरू शिष्याला सांगतात की, ज्यावेळी पद म्हणजे ब्रह्म किंवा शिव व पिंड म्हणजे कुंडलिनी शक्ती यांची गाठ पडते, तेच ते स्वसंवेद्य पद किंवा तत्त्व आहे. तेथेच स्थिर राहा. तू आता त्या तत्त्वापासून कधीही हलू नकोस. "नवचक्रेश्वरतंत्र, स्वच्छंद-तंत्र व योगिनीहृदय" या ग्रंथांमध्ये पदपिंडाचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे केले आहे.

**पिंडं कुंडलिनीशक्तिः पदं हंसः प्रकीर्तितः।**
**रूपं बिंदुरिति ज्ञेयं रूपातीतं निरंजनम् ॥**

यावरून हे स्पष्ट होते की पिंड म्हणजे कुंडलिनी शक्ती होय व पद म्हणजे हंसस्वरूप आत्मरूप होय. रूप म्हणजे बिंदू होय व या सर्वांचे जेथे ऐक्य होते ते रूपातीत निरंजन पद होय. "गुरुगीतेमध्येसुद्धा" पार्वतीने शंकरांना पिंड, पद व रूप म्हणजे काय असा प्रश्न विचारल्यावर त्याला शंकरांनी जे उत्तर दिले त्यावरूही श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेल्या " पदपिंडाच्या गाठीचा " उलगडा होतो.

**पार्वती उवाच–**
**पिंडं किंतु महादेव, पदं किं समुदाहृतम्।**
**रूपातीतं च रूपं किं एतदाख्याहि शंकर ॥**
**श्रीमहादेव उवाच–**
**पिण्डं कुंडलिनीशक्तिः, पदं हंसमुदाहृतम्।**
**रूपं बिंदुरिति ज्ञेयं, रूपातीतं निरंजनम् ॥**
**पिण्डे मुक्ता, पदे मुक्ता, रूपे मुक्ता वरानने।**
**रूपातीतं तु ये मुक्तास्ते मुक्ता नात्र संशयः ॥**
**गुरुध्यानं तथा कृत्वा, स्वयंब्रह्ममयो भवेत्।**
**पिंडे, पदे तथा रूपे, मुक्तोऽसौ नात्र संशयः ॥**

मधुराद्वैताचार्य श्रीगुलाबरावमहाराज यांनी "ध्यानयोगदिवाकर" या "योग-रहस्यातील " प्रकरण ग्रंथात पद व पिंडाच्या ध्यानाचा "समुल्लास २ व ३" मध्ये पुढीलप्रमाणे उल्लेख केला आहे. त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वरील ओवीचा उलगडा होईल. श्रीगुलाबरावमहाराज स्वतःला ज्ञानेश्वरकन्यका म्हणवून घेत असत व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्याला मांडीवर घेऊन उपदेश दिला असे त्यांनी आपल्या आत्मचरित्रात लिहून ठेविले आहे. त्यामुळे पदपिंडाचे त्यांचे कथन किती

मूलग्राही व प्रमाणयुक्त असेल हे सांगण्याचे कारण नाही. शिवाय अंध असूनही ते सकलशास्त्रवेत्ते होते हे सर्वविश्रुतच आहे. ते म्हणतात. —

तेचि आतां कवणे रीति । पदस्थ ध्यानाची संगती ।
योगबीजीं निरूती । बोलिली आहे ॥२.३२॥

हंकारेण बहिर्याति सकारेण पुनर्विशेत् ।
हंसहंसेति मंत्रोयं जीवो जपति सर्वदा ॥१॥

हंकार लक्ष्य शिवतत्त्व । सकार लक्ष्य शक्तितत्त्व ।
हे सिद्धसंकेतसत्त्व । वेदान्ताचें ॥५२॥
एक एकातें गिळितां । एकातें उगाळितां ।
समावेश सर्वथा । न मोडे हा ॥५३॥
ज्ञाने शिवशक्तिसमावेशनुती । बोलिली अनुभवामृती ।
ध्याने शिवशक्तिसमावेशनुती । तातोक्ति उत्तर गीता टीकेंत ॥५४॥

गुरोर्वाक्याच्छुषुम्नायां विपरीतो भवेज्जपः ।
सोहं सोहमिती प्राप्तो मंत्रयोगः स उच्यते ॥२॥

तेथ शक्तितेजाचेनि दीपें । धैर्यबळें सत्संकल्पें ।
गुरुवाक्य होय सोपें । सद्गुरुकृपेकरूनी ॥५८॥
तेव्हा शिवस्थानीं ये शक्ती । आणि शक्तिस्थानी पशुपती ।
समरस होय लयोत्पत्ती । अखंड चिति प्रकाशे ॥५९॥

हे पदध्यान सांगून पुढे त्यांनी पिंडध्यान कथन करताना असे म्हटले आहे की—

सुषुम्ना मार्गाचा वळसा । येऊनि गुरुवचनरसा ।
कुंडलिनी सहाय ठसा । घेऊनी चालावे ॥३.२२॥

तैसें ॐ हें स्मरों सरे । आणि येथेंचि प्राण पुरे ।
मग प्रणवातीत उरे । पूर्णघन जें ॥ज्ञा.८.११७॥

मात्राभावे सायास प्रणव । तो येथेचि पुरला सावेव ।
आणि सोहंशब्दे प्राणगौरव । येथेचि आले ॥२८॥
महाशक्तीचा खटाटोप । येथेचि सरला संकल्प ।
व्युत्थानी तरी साक्षेप । सोनियाची तनु ॥२९॥

पदपिंडाची गाठ पडणे म्हणजे शिवशक्तीचे सामरस्य होऊन बिंदूचा म्हणजे रूपाचा भेद होऊन रूपातीत अशी निरंजन अवस्था साधकाला प्राप्त होणे होय. ही गोष्ट एकमात्र सद्गुरुकृपेने म्हणजेच श्रीगुरूंनी परमकारुणिकतेने साधकावर केलेल्या शक्तिपातानेच सिद्ध होते यात शंका नाही; कारण स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय होत नाही.

वरील सिद्धांत नितांत सत्य असला तरी तो जाणतेपणाने अगर नेणतेपणाने

न मानणारे असंख्य पंडित, तत्त्ववेत्ते व सांप्रदायिक असल्याने ते भक्ती, कर्म किंवा ज्ञान यांपैकी एखाद्या मार्गाने अंतिम सिद्धीची प्राप्ती होते असे सांगताना आढळतात. सर जॉन वुड्रॉफ यांनी आपल्या " The Serpent Power " या प्रख्यात ग्रंथात उपरोक्त विचारनिदर्शक तत्त्वनिर्देश करताना असे म्हटले आहे की, " But whereas the Jnana yogi attains svarupa Jnana by his mental efforts without rousing Kundalini, the Hatha yogi gets the Jnana through Kundalini Herself. " परंतु ज्याप्रमाणे ज्ञानयोगी श्रवण, मननादि उपायांनी कुंडलिनी उत्थापनाशिवाय स्वरूपज्ञानाची प्राप्ती करतात; त्याप्रमाणेच हठयोगी प्रत्यक्ष कुंडलिनीकडूनच ज्ञानप्राप्ती करवून घेतात. परंतु सर जॉन वुड्रॉफ यांचे व या विचारांप्रमाणे मत मांडणाऱ्यांचे म्हणणे बरोबर नाही; कारण म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी त्यावर " भारतीय संस्कृति और साधना, " खंड एक, या ग्रंथातील " कुंडलिनी तत्त्व " या लेखात या मताचा उल्लेख करून त्यावर टीका करताना असे म्हटले आहे की, " कोई यह भी कहते हैं कि कुंडलिनी योग मुक्तिका उपाय-विशेष है। इस योगके अवलंबन के बिना भी उपायांतर से मोक्षलाभ हो सकता हैं। इसी प्रकार नाना रूपसे संशय की अवतरणा होती है। यहाँ यह कहना पडता है कि उक्त सकल संशयो का मूल कुंडलिनी-तत्त्व के संबंधमें यथार्थ ज्ञान का न होना है। ज्ञान-योगी श्रवण, मननादि किसीभी उपायका आश्रय करे, किंतु कुंडलिनीको जागृत किये बिना स्वरूपज्ञान प्राप्त नहीं कर सकता यह निर्विवाद सिद्ध है। " श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुरुशिष्याच्या गोठीशिवाय ब्रह्मीचे स्वराज्य हाती येत नाही व आपले आपणालाच सुखही उपभोगता येत नाही असे स्पष्ट म्हटले आहे. ही गुरुशिष्याची गोष्ट कशी घडते व स्वसंवेद्य पद कसे प्रस्फुटित होते हे महायोगी गोरक्षनाथांनी आपल्या " सिद्धसिद्धांतपद्धती " या ग्रंथात पुढील प्रमाणे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात—

गुरुरत्र सम्यक्सन्मार्गदर्शनशीलो भवति, सन्मार्गश्च योगमार्गः ॥५.५॥
यस्मिन् दर्शिते सति तत्क्षणात् स्वसंवेद्यसाक्षात्कारः
समुत्पद्यते। ततो गुरुरेवात्र कारणमुच्यते ॥५.६॥
तस्माद् गुरुकटाक्षपातात् स्वसंवेद्यतया च महासिद्धयोगिभिः
स्वकीयं पिंडं निरुत्थानुभवेन समरसं क्रियते इति सिद्धान्तः ॥५.७॥
तद्यथा निरुत्थानदशा प्राप्त्युपायस्तावत्कथ्यते।
महासिद्धयोगिनः स्वस्वरूपतयानुसंधानेन निजावेशो भवति।
निजावेशान्निपीडितनिरुत्थानदशामहोदयः कश्चिज्जायते।
ततः सच्चिदानंदचमत्कारादद्भुताकार प्रकाशप्रबोधो जायते।
प्रबोधादखिलमेतद् द्वयाद्वयप्रकटतया चैतन्यभासाभासकं
परात्परं परमपदमेव प्रस्फुटं भवतीति सत्यम् ॥८॥

अत एव महासिद्धयोगिभिः सम्यक् गुरप्रसादंलब्ध्वावधान-
बलेनैक्यं भजमानैस्तत्क्षणात् परमंपदमेवानुभूयते ॥९॥
ततकथङ्. गुरुदृक्पातनात् प्रायो
दृढानां सत्यवादिनां सा स्थितिर्जायते ॥६४॥
कथनाच्छक्तिपाताद्वा पादुकाद्यवलोकनात् ।
प्रसादात्स्वगुरोः सम्यक् प्राप्यते परमं पदम् ॥६५॥
वाङ्.मात्राद्वाथ दृक्पाताद्यः करोति च तत्क्षणात् ।
प्रस्फुटं शांभवं वेद्यं स्वसवेद्यं परं पदम् ॥६७॥
करुणाऽखंडपातेन च्छित्वा पाशाष्टकं शिशोः ।
सम्यगानंदजनकः सद्गुरुः सोऽभिधीयते ॥६८॥
निमिषार्धार्धपाताद्वा यद्वा पादावलोकनात् ।
स्वात्मानं स्थिरमाधत्ते तस्मै श्रीगुरवे नमः ॥६९॥

सिद्धांनी सांगितलेल्या या साधनपद्धतीमध्ये परमपदाची प्राप्ती साधकाला व्हावी म्हणून सम्यक् मार्ग जाणणारा व सत्पथ दाखविणारा म्हणजे शक्तिपात करणारा गुरू असला पाहिजे; कारण हे कार्य सद्गुरूच करू शकतात. येथे सन्मार्ग म्हणजे योगमार्ग होय; कारण योगसमाधीनेच खरोखर आत्म्याचे अखंड, व्यापक व स्वसंवेद्य स्वरूपाचे भान होते. योगमार्गाशिवाय अन्य मार्गांनी आत्म्याच्या खऱ्या स्वरूपाचा साक्षात्कार होत नाही. ज्यावेळी सिद्धगुरू साधकाला परमपदाच्या प्राप्तीचा उपाय म्हणून योगमार्ग दाखविताना शक्तिपात करून व्यापक आत्म्याचा बोध करतात त्या क्षणी सिद्धगुरूंच्या कृपेमुळे शिष्याला आपल्या अनुभवाने जाणण्यास योग्य अशा अखंडव्यापक आत्म्याचा साक्षात्कार होऊन त्याला सर्व सिद्धी प्राप्त होतात. याचा अर्थ शिष्याला उपदेश देण्याला व त्याला साक्षात्कार करून देण्याला एकमात्र सद्गुरूच श्रेष्ठ कारण आहेत हे सिद्ध होते. याचे तात्पर्य असे आहे की, उपदेश देणे, करुणावलोकन करणे व शक्तिपात करणे या तीन प्रकाराने शिष्याला शिक्षण देता येते. यातील पहिल्या दोन प्रकारचे शिक्षण प्रत्येक विद्वान देऊ शकेल; परंतु शेवटच्या प्रकारचे शिक्षण देण्याची शक्ती सिद्ध व ईश्वराव्यतिरिक्त कोणातही असत नाही. यासाठी ज्यावेळी सद्गुरू आत्यंतिक करुणेने शिष्यावर आपली दृष्टी टाकतात त्यावेळी अनादिसिद्ध चेतनशक्ती जागृत होऊन त्या दृष्टीमुळेच ते परमपद जाणण्यास योग्य होते. यासाठी महासिद्ध योगीजन आपल्या देहाला परपिंडावरोबर शुद्ध चैतन्याच्या अभेदानुभवाच्या रीतीने समरस करतात. हा सिद्धांचा सिद्धांत आहे.

यानंतर योगाच्या द्वारा ज्या निरुत्थान दशेची म्हणजे स्वपरपिंडादि अभेदरूपाने परमपदाची प्राप्ती होते त्याचा उपाय सांगतात. त्या अभेदरूप परमपदाची

इच्छा करणारे महासिद्धयोगाचे योगीसाधक ज्यावेळी सद्‌गुरूने सांगितलेल्याप्रमाणे साधन करू लागतात त्यावेळी स्वपरपिंडाच्या अभेद पद्धतीमुळे म्हणजे आतून जागृत झालेल्या चैतन्यशक्ती कुंडलिनीने स्वसामर्थ्याने पृथ्वी, तेज, आप, वायू व आकाश या पंचतत्त्वांचा क्रमश: ग्रास केल्यामुळे, चराचरासहित परमेश्वराचे योगध्यान म्हणजे स्वस्वरूपाचे अनुसंधान आपोआप घडून येऊन त्यांना त्या महाशक्तीचा आवेश प्राप्त होतो. यालाच निजावेश म्हणतात. या निजावेशाने निपीडित होऊन साधकाच्या ठिकाणी निरुत्थान दशेचा काही विलक्षण असा महान् उदय होतो; म्हणजे हठयोग, मंत्रयोग, लययोग व राजयोगाच्या क्रिया जागृत शक्तीमुळे आपोआप घडून येऊन तिच्या सत्, चित् व आनंद स्वरूपाचे नानाविध अद्‌भुत अनुभव साधकाला येतात. यामुळे आत्मस्वरूपाच्या प्रकाशाचा बोध त्याला होतो. असा निजानंदाचा आवेश प्राप्त झाला की, तो गातो, नाचतो, टाळ्या वाजवितो, जमिनीवर पडतो, रडतो, नानातऱ्हेचे शब्दोच्चार करतो व ॐकाराचा दीर्घ जप करतो. या आवेशात त्याचे शरीर मागे-पुढे डोलू लागते, कंप - स्वेद - रोमांच - अश्रु - वैवर्ण्यादि अष्ट सात्त्विक भाव त्याच्या ठिकाणी जागृत होतात. त्याला निरनिराळ्या तऱ्हेची आसने, बंध व मुद्रा होतात. निजावेश प्राप्त झालेल्या साधकाला कधी मूर्च्छा येते तर कधी प्रकाश दिसतो तर कधी निरनिराळ्या देवतांची व दृश्यांची दर्शने होतात. पुढे नाडीशुद्धी झाल्यावर आतूनच अनाहत नाद प्रकट होतो व त्यात साधकाचे चित्त लय पावते. या व साधकाच्या पूर्व जन्मजन्मांतरीच्या संस्कारांमुळे होणाऱ्या अकथनीय अशा हजारो क्रियांमुळे शरीर निर्मल होऊन जीवरूप साधक शिवरूप होतो. अभेद अनुभवाने अभेद ध्यान होऊन सर्वेश्वराच्या शरीराशी साधक एकरूप होतो. यामुळे त्याला स्वत:च्या शरीराप्रमाणे सर्वेश्वराचे शरीरही आपणच आहोत असा अभिमान वाटू लागतो. त्याचप्रमाणे व्यष्टिसूक्ष्मशरीराबरोबर समष्टिसूक्ष्मशरीराची व जीवचैतन्याची शिवचैतन्याशी दृढ एकतेची भावना होऊन परमात्म्यातच स्वकीय अभिमान होतो. अशा साधकाला व्यष्टिशरीराच्या संचालनाच्या सामर्थ्याप्रमाणेच समष्टिशरीराच्या संचालनाचे सामर्थ्यही प्राप्त होते. अशा प्रकारे योगीसाधकाला दृढ असा निश्चल भाव प्राप्त झाल्यावर अखंड आत्म्याच्या स्वसंवेद्य अनुभवाच्या चमत्काराने अद्‌भुत प्रकाशस्वरूप आत्म्याचा बोध होतो. "अहं ब्रह्मास्मि, शिवोऽहम्" इत्यादि प्रकाराने साधक सर्वत्र व्यापक आत्माच पाहतो. त्या निर्बाध, अखंड व पूर्ण आत्म्याच्या बोधामुळे सर्व द्वैताद्वैतरूपी मुळाचे चैतनस्वरूप हातावरील आवळ्याप्रमाणे प्रत्यक्ष प्रतीत होते. असे हे सूर्याला प्रकाशित करणारे आत्मरूप सर्वाधिष्ठान स्वरूप असून समस्त जगताच्या कार्याच्या पलीकडे जो अव्याकृत माया आहे तिच्याही पलीकडे आहे. ते व्यापक चेतनरूप परमपद प्रत्यक्षरूपाने प्रस्फुटित होते हे नितांत सत्य आहे.

यासाठी महासिद्ध योग्यांच्या सम्यक् गुरुकृपेमुळे प्राप्त झालेल्या साधनाच्या बळाने एकतेचे भजन आपोआप घडून येऊन त्याचक्षणी परमपदाचा अनुभव साधकाला येतो. यासाठी वर सांगितलेल्या सिद्धयोगसाधनेच्या द्वाराने महा-सिद्धीची म्हणजे स्वसंवेद्यपदाची इच्छा करणाऱ्या योगी साधकाने अत्यंत उत्तम रीतीने गुरुदेवांना प्रणाम करून व त्यांची सेवा करून त्यांना प्रसन्न करावे; कारण योगसिद्धीमध्ये मुख्य कारण गुरूची प्रसन्नताच आहे. त्यानंतर गुरुने सांगितलेल्या मंत्राचा जप इत्यादि करून योगीसाधक जेव्हा साधन करीत स्वपिंडापासून पर-पिंडपर्यंत एकतेच्या भावनेने दृढ होतो त्यावेळी त्याचक्षणी त्याला ब्रह्मरूप परम-पदाचा अनुभव येतो व 'मी शिव आहे' आणि 'शिव आहे तो मीच आहे' असा व सर्वोपाधिविनिर्मुक्त केवळ स्वयंज्योतिस्वरूप अखंड व्यापक आत्मरूप मी आहे असा अनुभव येतो.

ज्या आत्मनिष्ठेमध्ये सिद्धयोगी स्थिर राहतात ती आत्मनिष्ठा साधक-योग्याला कशी प्राप्त होतें ते पाहण्यासारखे आहे. जो शिष्य भक्त, श्रद्धाळू, धीर व सत्यवादी आहे; त्याच्यावर श्रीगुरूंनी आपला कृपाकटाक्ष टाकला की शक्तिपात होऊन त्या शिष्याच्या ठिकाणी अनादि आत्मसत्तेचे संक्रमण होऊन त्याला ती स्वसंवेद्य आत्मावस्था प्राप्त होते. "हे शिष्या तूच ब्रह्म आहेस" असे सद्‌गुरूंनी सांगि-तल्याने, प्रत्यक्ष स्पर्शादि करून शक्तिपात केल्याने, श्रीगुरूंच्या पादुकाचे नुसते दर्शन घेतल्याने अगर त्यांची सेवा केल्याने व गुरूच्या प्रसादाने मल-पाश-संस्कार-जडता-मायादि आवरणे दूर होऊन अनादि कालापासून निद्रिस्त असलेली व जन्मांतरी भोगाकांक्षायुक्त जीवाला संसारचक्रात फिरविणारी निद्रिस्त महाशक्ती कुलकुंडलिनी जागृत होऊन साधकाला सम्यक् अशा परमपदाची प्राप्ती होते. शिष्य आपल्याला शरण आल्यावर त्याला त्याचक्षणी कृतार्थ करण्यासाठी सिद्धयोगीराजगुरू त्याच्या-वर आपल्या अलौकिक योगाच्या शक्तीचा पात करतात. त्यावेळी तो शिष्य गुरुप्रमाणेच समर्थ व त्रिकालदर्शी होतो. महासिद्ध योगी व ईश्वर यांच्याशिवाय अशा प्रकारे शक्तिपातयोगदीक्षा देण्याचे सामर्थ्य कोणातही नसते.

जो आपल्या वाणीने किंवा शब्दाने व करुणादृष्टीने शक्तिपात करून आपल्या अनुभवानेच जाणण्यास योग्य असे स्वसंवेद्य आत्मरूप, परमपद किंवा शांभव तत्त्व शिष्याच्या ठिकाणी एका क्षणात प्रस्फुटित म्हणजे अभिव्यक्त करून त्याला अनुभूती देतो तोच खरा गुरू होय. त्याचप्रमाणे जो आपल्या शिष्यावर दयारूपी करुणेचा कृपा-दृष्टीने अखंड वर्षाव करून शिष्याच्या जरा, मरण, काम, क्रोध, लोभ, मोह, अहं-कार व अविद्या या आठही बंधनांचा नाश करतो व त्याला आत्मज्ञान देऊन आत्मानंद प्राप्त करून देतो त्यालाच सद्‌गुरू म्हटले जाते.

ज्याच्या पायाचे अवलोकन केले असता म्हणजे ज्याला शिष्यभावाने शरण

गेले असता जो गुरू शिष्याने आपल्या चरणकमलांच ध्यान केले म्हणून प्रसन्न होऊन एका निमिषाच्या चतुर्थांश दृष्टिपाताने शिष्याला स्वतःच्या आत्मानंदामध्ये किंवा स्वसंवेद्य अवस्थेत स्थिर करतो त्या सद्गुरूला नमस्कार असो.

वरील सर्व विवेचनावरून गुरुशिष्याची गोष्ट कशी घडते, पदपिंडाची गाठ कशी पडते व स्वसंवेद्य पदात स्थिर राहून तेथून न हलण्यास श्रीज्ञानेश्वरमहाराज का सांगतात याचा उलगडा झाला. उपरोक्त प्रक्रियेचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत जागोजाग वापर करून आत्म्याने आत्म्याला आत्म्यात कसे पाहवयाचे ?, आत्मस्वरूपाविषयी सावधान व्हावयाचे म्हणजे काय करावयाचे ?, नैस्त्रैगुण्य व्हावयाचे म्हणजे नेमके काय घडावयाचे ?, आत्माच आत्म्याचा बंधू, हितकर्ता व उद्धारक कसा आहे ? इत्यादि प्रश्नांची उत्तरे देऊन स्पष्ट केलें आहे.

पुढील ओव्या उपरोक्त विवेचनाला कशी पुष्टी देतात हे पाहण्यासारखे आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

एऱ्हवीं सर्वांच्या हृदयदेशीं । मी अमुका आहें ऐसी ।
जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं । ते वस्तु गा मी ॥१५.४५१॥
परी संतांसवें वसतां । योगज्ञानी पैंसतां ।
गुरुचरण उपासितां । वैराग्येंसी ॥४५२॥
येणेंचि सत्कर्मे । अशेषही अज्ञान विरमे ।
जयांचें अहं विश्रामे । आत्मरूपीं ॥४५३॥
ते आपेआप देखोनि देखीं । मियां आत्मेनि सदा सुखी ।
येथें मीवांचून अवलोकीं । आन हेतु असे? ॥४५४॥
अगा सूर्योदयो जालिया । सूर्यें सूर्यचि पहावा धनंजया ।
तेवीं माते मियां जाणावया । मीचि हेतु ॥४५२॥

हे अर्जुना ! तात्त्विक दृष्टीने वास्तविक विचार करून पाहिले तर सर्व प्राण्यांच्या हृदयात " मी अमुक आहे, " अशी जी बुद्धी म्हणजे आत्मशक्ती (" या देवी सर्वभूतेषु बुद्धिरूपेण संस्थिता ॥८.२२॥" सप्तशती—उत्तम चरित्र ) रात्रंदिवस स्फुरण पावते ती स्फुरण पावणारी शक्ती म्हणजे ब्रह्मच किंवा आत्मरूपच मी आहे. (" अहं ब्रह्मस्वरूपिणी ॥२॥" श्रीदेवी अथर्वशीर्ष) अशा प्रकारच्या ह्या शिवशक्तियुक्त आत्मस्वरूपाच्या स्वसंवेद्यावस्थेच्या प्राप्तीसाठी संतांच्या संगतीत राहून श्रीगुरुचरणांची सेवा करून दृढवैराग्यपूर्वक योगाने प्राप्त होणाऱ्या ज्ञानाच्या मार्गाने म्हणजे सुषुम्नापथाने गेले असता याच पुण्यकर्माच्या योगाने म्हणजे सिद्धयोगाने साधकाचे अज्ञान निःशेष नाहीसे होते व त्याचा अहं ( अ म्हणजे शिव व हम् म्हणजे शक्ती होय. श्रीपुण्यानंदनाथ विरचित कामकलाविलास ) म्हणजे शिवशक्ती आत्मरूपात एकरूप होतात व चिर विश्राम पावतात. हे साधक शिवशक्तिरूपाने आपणच आपल्याला पाहतात व जाणतात. त्यांचे ते

आत्मस्वरूप मीच असल्याने ते नेहमी आनंदात असतात. असा साक्षात्कार होण्यास शिवशक्तिस्वरूप आत्मरूपाशिवाय दुसरा कोणी कारणीभूत आहे काय ? अर्जुना ! ज्याप्रमाणे सूर्योदय झाल्यावर सूर्याच्या तेजानेच सूर्य पाहवा लागतो त्याप्रमाणे मला म्हणजे शिवशक्तिस्वरूप आत्म्याला जाणावयास शिवशक्तिस्वरूप आत्मरूपाने असणारा मीच कारण आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त ओव्यांमधून नाथसंप्रदायाच्या परमऐश्वर्यसंपन्न परंपरेमुळे प्राप्त झालेले सिद्धयोगाचे गूढ रहस्य प्रकट केलेले दृष्टोत्पत्तीस आल्यामुळे जो आनंद होतो तसाच आनंद त्याला पुष्टिदायक व त्याचे अधिक विवेचन करणारे त्यांच्याच संप्रदायातील योगींद्र पुण्यानंदनाथांनी लिहिलेल्या "श्रीकामकलाविलास" या ग्रंथातील श्रीनटनानंदांनी रचलेल्या टीकेसहीत विवेचन वाचल्यानेही होतो. ते म्हणतात.

**सा जयति शक्तिराद्या निजसुखमयनिरुपमाकारा ।**
**भाविचराचरबीजं शिवरूपविमर्शनिर्मलादर्शः ॥२॥**
**स्फुटशिवशक्तिसमागमबीजांकुररूपिणी पराशक्तिः ।**
**अणुतररूपानुत्तरविमर्शलिपिलक्ष्यविग्रहा भाति ॥३॥**

ती शक्ती आद्या आहे. ती स्वतःच सुखमय आहे. तिच्या स्वरूपाला उपमा देता येणार नाही अशी ती आहे; कारण ती नित्यनिरुपम आकार धारण करणारी आहे. ती भावी चर व अचर जगाची बीजरूपा आहे. ती शिवाच्या रूपाचा विमर्श (विमर्षोनाम विश्वाकारेण विश्वप्रकाशेन विश्व संहारेण वा अकृत्रिमोहऽमिति स्फुरणम् ॥ म्हणजे विश्वाकार होणारे आणि विश्वाला प्रकाशित व विश्वाचा संहार करणारे जे आदिकारण म्हणजे अकृत्रिम अहंकार आहे त्याच्या स्फुरणाला विमर्श म्हणतात.) करणारी निर्मल आरशासारखी आहे. अशा शक्तीचा जयजयकार असो. ही पराशक्ती शिवशक्तीच्या समागम म्हणजे सामरस्यजन्य बीजाची स्फुट अंकुररूपिणी आहे. त्याचप्रमाणे ही पराशक्ती अणूहून लहान व सूक्ष्माहून सूक्ष्म आहे. ती अनुत्तर अशा शिवतत्त्वाच्या विमर्शमय लिपीचा लक्ष्यरूप श्रीविग्रह म्हणजे रूप किंवा मूर्तिरूपाने सुशोभित दिसते.

यावर टीका करताना श्रीनटनानंद म्हणतात, "सिंहासनारूढ झालेला एखादा अत्यंत सुंदर राजा स्वतःच्या समोर ठेवलेल्या आरशात स्वतःचे प्रतिबिंब सम्यक्‌रीतीने पाहून असे म्हणतो की, या आरशात अशा प्रकारे मीच प्रतिबिंबित होत आहे. याप्रमाणेच परमेश्वरही आपल्या स्वाधीनभूत शक्तीमध्ये 'स्व' ला 'परिपूर्णोऽहम्' च्या रूपाने पाहून स्वतःला जाणतो. 'अ' म्हणजे शिव होय व 'हम्' म्हणजे शक्ती होय. ह्यामुळे 'अहं' हा शिवशक्तिवाचक शब्द आहे व शिवशक्तीचा तो संधी आहे.

तिसऱ्या श्लोकावर स्मृतीचा उल्लेख करीत टीका करताना ते म्हणतात —

हृद्यकारं द्वादशान्ते हकारं स्थविरा विदुः ।
अहमात्मैकमद्वैतं यत्प्रकाशात्मविश्रमः ।।
अकारः सर्ववर्णाग्र्यः प्रकाशः परमशिवः ।
हकारोऽन्त्यः कलारूपो विमर्शाख्यः प्रकीर्तितः ।।
उभयोः सामरस्यं यत्परस्मिन्नहमि स्फुटम् ।

हृदयात अकार आहे व द्वादशारचक्रात म्हणजे शिरस्थानी अर्थात् सहस्रारात हकार आहे. असा 'अहम्' हा आत्मा असून तो एक अर्थात् द्वैतसंबंधरहित आहे. या आत्म्याचा प्रकाश म्हणजे त्याचे ज्ञान हेच आम्याला विश्रांती देणारे आहे. असा जो 'अ' कार आहे त्याला प्रकाशरूप परमशिव असे नाव असून सर्वात शेवटी असलेला 'ह'कार हा कलारूपी असून त्याला विमर्श तसे नाव आहे या दोघांची म्हणजे 'अहं' ची अर्थात् प्रकाश व विमर्श यांची समरसता म्हणजे एकरूपता श्रेष्ठ अशा 'अहं' शब्दात स्पष्ट प्रत्ययाला येते.

येथपर्यंत आपण स्वसंवेद्य तत्त्वप्राप्तीच्या प्रक्रियेतील गुरूच्या स्थानाचा विचार केला. आता या प्रक्रियेतील विवेकाचे स्थान कोणते? याचा विचार करू. गीतेतील पाचव्या अध्यायातील सोळाव्या श्लोकात आपण वर पाहिल्याप्रमाणे आत्म्याविषयीचे अज्ञान आत्म्याच्या ज्ञानाने नष्ट होते असे म्हटले आहे. याचा भावार्थ सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तें अज्ञान जैं समूळ तुटे । तैं भ्रांतीचें मसैरें फिटे ।
मग अकर्तृत्व प्रगटे । मज ईश्वराचें ।।५.८३।।
एथ ईश्वरु एकु अकर्ता । ऐसें मानलें जरी चित्ता ।
तरी तोचि मी हें स्वभावता । आदीचि आहे ।।८४।।
ऐसेनि विवेकें उदो चित्तीं । तयासी भेदु कैंचा त्रिजगतीं ।
देखें आपुलिया प्रतीती । जगचि मुक्त ।।८५।।
जैशी पूर्वदिशेच्या राउळीं । उदया येतांचि सूर्य दिवाळी ।
कीं येरीही दिशा तियेचि काळीं । काळिमा नाहीं ।।८६।।

ज्यावेळी सद्गुरुकृपेने अज्ञान समूळ नाहीसे होते त्यावेळी भ्रांतिरूप काळोखी दूर होते आणि मग ईश्वराचे अकर्तेपण स्पष्ट समजून येते. अशा प्रकारे शिव हा जसा अकर्ता आहे त्याप्रमाणेच मी चित्तरूप जीवही अकर्ता आहे असे जर पटले तर तो व मी पूर्वीपासून एकच आहोत हे सहजच सिद्ध होते. याप्रमाणे विवेकाचा ज्यांच्या चित्तात म्हणजे संकोचून लहान झालेल्या शक्तिरूप शिवात उदय झालेला असतो त्याला या तिन्ही लोकात भेद कोठला? आपल्या स्वतःच्या अनुभवाने सर्व जगच मुक्त आहे असे तो साधक पाहतो. ज्यावेळी पूर्व दिशेच्या घरी सूर्य उगवतो

त्यावेळी सर्वत्र प्रकाशाची दिवाळी होते व इतरही सर्व दिशा उजळून निघून कोठेही काळोख शिल्लक राहत नाही.

येथे तीन प्रश्न उपस्थित होतात. चित्त म्हणजे काय ?, चित्ताला आपले अकर्तेपण कसे पटते ? व चित्तात विवेकाचा उदय झाल्याने भेदज्ञान नाहीसे होऊन स्वसंवेद्य आत्मस्वरूप प्रकट होऊन सर्वत्र प्रकाशाची दिवाळी कशी होते ?

" प्रत्यभिज्ञाहृदयात " महामाहेश्वराचार्य राजानक श्रीक्षेमराजांनी चित्ताची व्याख्या पुढील प्रमाणे केली आहे. त्यामुळे चित्त म्हणजे काय हे स्पष्ट होईल. " चितिरेव चेतनपदादवरूढा चेत्यसंकोचिनी चित्तम् ॥ ५ ॥ " म्हणजे कुंडलिनी चितिशक्ती जेव्हा चेतन पदापासून खाली उतरून चैतन्याचा संकोच करते तेव्हा ती चित्त या नावाने ओळखली जाते. वास्तविक पाहता चित्त नावाची दुसरी कोणतीही वस्तू नाही. भगवती कुंडलिनी शक्तीच जेव्हा विषयांच्या द्वारा संकुचित झालेली दिसते किंवा जेव्हा ती आपले मूळ चैतन्य अगर शिवस्वरूप लपवून संकोच ग्रहण करते तेव्हा तिला चित्त म्हटले जाते. जसजशी ही शिवाची स्वातंत्र्य शक्ती संकुचित होत जाते तसतशी ती अधिकाधिक जडावस्थेला प्राप्त होते. मात्र जेथे जडावस्था कमी असून चेतनावस्था जास्त प्रमाणात दिसते तेथे संकुचित्वाचे प्रमाण कमी असते व जेथे जडावस्था जास्त असून चेतनावस्था कमी प्रमाणात दिसते तेथे संकुचित्वाचे प्रमाण जास्त असते. या प्रमाणावरच साधकाच्या ठिकाणी प्रस्फुटित होणाऱ्या आत्मतत्त्वाच्या प्रकटीकरणाची गती म्हणजे लवकर किंवा उशिरापण व प्रमाण म्हणजे कमी किंवा जास्तपणा अवलंबून असतो हे निश्चित आहे. या संकुचित अवस्थेत तिला दोन प्रकारच्या गती प्राप्त होतात. पहिल्या प्रकारात उल्लसित किंवा प्रकट झालेल्या संकोचाला गौण स्थान देऊन व चित्प्राधान्याला विशेष स्थान देऊन ती स्फुरित होते. या अवस्थेत कुंडलिनी शक्तीचे चेतनत्व जास्त व जडत्व कमी असते. दुसऱ्या प्रकारात ती संकोचालाच प्रधान किंवा श्रेष्ठ स्थान देऊन स्फुरित होते. या अवस्थेत कुंडलिनी शक्तीचे जडत्व जास्त व चेतनत्व कमी असते. याचा अर्थ असा की, कुंडलिनी शक्तीच्या संकोचात प्रधानता व गौणता या दोन कारणांनी दोन प्रकारचे स्फुरण होते. येथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, जसजशी शक्ती संकुचित होत जाते तसतसा विश्वाचा विस्तार होत जातो व जसजसा संकुचितपणा कमी होत जातो तसतसा विश्वाचा विस्तार कमी होत जातो श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कुंडलिनी शक्तीला " आरंभरंभा ॥६.४६२॥" असे संबोधून वरील दोन्ही कार्यांची व्याप्ती फारच सुंदरपणे प्रकट केली आहे. चेतनाच्या चित्तत्वाला व चित्ताच्या चेतनत्वाला ही शक्तीच आरंभ करते. मात्र पहिल्या आरंभाला शिव व दुसऱ्या आरंभाला शिवस्वरूप सद्गुरू कारण असतात.

आता चित्ताला आपले अकर्तेपण कसे पटते व प्राप्त होते हे पाहू. हे पाहिले

की, स्वसंवेद्य तत्त्वाचे प्रकटीकरण कसे होते, हे आपोआपच स्पष्ट होईल. ज्यावेळी शिव आपल्याशी एकरूप असलेल्या स्वतःच संकुचित होऊन जीवरूप किंवा चित्तरूप होतो त्यावेळी त्याच्या मूळच्या संकोचरहित व अपरिमित अशा स्वसंवेद्य स्वरूपाची त्याला प्राप्ती व्हावी म्हणून सद्‌गुरू शक्तिपात करतात. शक्तिपाताने जडरूपाला किंवा संकोचाला प्राप्त झालेली शक्ती आपण स्वतःहून स्वीकारलेले चित्तस्वरूप सोडून देऊन शिवरूप होण्याचा प्रयत्न करते व शेवटी सर्व संकोच क्षीण होऊन तिला अनाश्रित शिवरूपता प्राप्त होते. यावेळी संकुचित ग्राहकरूपता धारण करून चेतन पदावरून चित्त किंवा जीव होऊन खाली उतरलेली कुंडलिनी शक्ती आपली ग्राहकता व विषयांचे ग्रहण करणे सोडून देऊन शिवरूप होते.

हीच गोष्ट श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओव्यांनी ज्ञानेश्वरीत स्पष्ट केली आहे. ते म्हणतात–

एऱ्हवीं तरी येणें योगें । जैं इंद्रिया विदाण लागे ।
तैं चित्त भेटो रिगे । आयणपेयां ।६.३६५।।
परतोनि पाठीमोरें ठाके । आणि आपणियांतें आपण देखे ।
देखतखेंवो वोळखे । म्हणे तत्त्व हें मी ।।३६६।।
तिये ओळखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यों बैसे ।
मग आपणपां समरसें । विरोनि जाय ।।६६७।।
जयापरतें आणिक नाहीं । जयातें इंद्रियें नेणती कहीं ।
तें आपणचि आपुलिया ठायीं । होऊनि ठाके ।।३६८।।
मग मेरूपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें ।
दाटिजो पां पडिभरें । चित्त न दटे ।।६६९।।
कां शस्त्रें वरी तोडिलिया । देह अग्निमाजीं पडलिया ।
चित्त महासुखीं पहुडलिया । चेंवोचि नये ।।६७०।।
ऐसें आपणापां रिगोनी ठाये । मग देहाची वासु न पाहे ।
आणिकचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ।।३७१।।
येणेंचि अभ्यासेंसी योगु । चित्तासि करी पां चांगु ।
अगा उपायबळें पंगु । पहाड ठाकी ।।८-८१।।
तेंवि सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर ।
लावीं मग शरीर । राहो अथवा जावो ।।८२।।
जें नाना गतातें पावबितें । तें चित्त वरील आत्मयातें ।
मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे? ।।८३।।
पैं सरितेचेनी ओघें । सिंधुजळा मीनले घोघें ।
तें काय वतंत आहे मागें । म्हणौनि पाहों येती? ।।८४।।

ना ते समुद्रचि होऊन ठेलें । तेंवि चित्ताचें चैतन्य जाहालें ।
जेथ यातायात निमालें । घनानंद जें ।।८५।।
बुद्धि अनन्य येणे योगें । मजमाजीं जें रिगे ।
तें चित्त चैत्यत्यागें । मातेंचि भजे ।।१८ १२६७।।
ऐसें चैत्यजाते सांडिलें । चित्त माझ्या ठायीं जडलें ।
ठाके तैसें वहिलें । सर्वदा करी ।।१५६८।।
मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांची भरेल जेधवां ।
माझा प्रसादु जाण तेधवां । संपूर्ण जाहला ।।१२६९।।

यासाठी या सिद्धयोगसाधनेमुळे जेव्हा इंद्रियांचा निग्रह होतो तेव्हा आपण होऊनच चित्त म्हणजे जागृत शक्ती आपल्या आत्मस्वरूप शिवाची भेट घेण्याकरिता निघते. त्यावेळी चैतन्यशक्तीची स्वाभाविक असलेली बहिर्मुख गती संपून सुषुम्ना-मार्गाने तिची अंतर्मुखगती किंवा ऊर्ध्वगती सुरू होते. ज्यावेळी मूलाधारातील आपले जडस्वरूप सोडून देऊन ती चेतन होत होत सहस्रारातील आपल्या आत्म-स्वरूपास पाहते त्यावेळी तिला " हे आत्मतत्त्वच मी आहे, मी शिव आहे," अशी ओळख पटते. त्या ओळखीबरोबर ती आत्मशक्ती सुखाच्या साम्राज्यावर बसते आणि मग आत्मानंदातच शिवाशी समरसतेने लय पावते. ज्या चेतनपदापासून खाली उतरून चैतन्याचा संकोच करून ती शक्ती चित्त झालेली असते त्याच्यावरोबर उलट प्रक्रिया होऊन ती पुन्हा चैतन्यरूप होते. ज्याला इंद्रिये जाणत नाहीत व ज्याच्यापेक्षा दुसरे अधिक काही नाही असे ते स्वसंवेद्य आत्मरूप म्हणजे ब्रह्मरूप ते चित्त म्हणजे शक्तिरूपाने संकुचित झालेला आपला जीव आपल्या ठिकाणीच होऊन राहतो. अशी स्वसंवेद्य समरसपूर्ण आत्मस्थिती जीवाला प्राप्त झाली की, मग मेरुपर्वतापेक्षा मोठ्या दुःखाच्या डोंगराने देह दडपला तरीही त्याच्या भाराने साधकाचे चित्त म्हणजे जीव किंवा संकुचित झालेली चितिशक्ती शिवस्वरूप झाल्याने तत्त्वतः दडपली जात नाही. अशा साधकाचा देह शस्त्राने तोडला किंवा त्याचा देह अग्नीत पडला तरीही निरतिशय महासुखात निमग्न झालेल्या त्याच्या चित्ताचे म्हणजे सहस्रारात शिवाशी लीन झाल्याने परमानंदात निमग्न झालेल्या शक्तीचे उत्थान होत होत नाही. (महासुखाचे स्थान सहस्रारच आहे. इतरत्र कोठेही हे महासुख उपलब्ध होत नाही; कारण सहस्राराशिवाय इतरत्र कोठेही शिवशक्तीचे सामरस्य परिपूर्णावस्थेत असत नाही. ) याप्रमाणे सहस्रारात शक्ती शिवरूप बनून आपल्या आत्मस्वरूपात प्रवेश करून राहिल्यावर साधक आपल्या देहाची आठवणही विसरतो आणि अनिर्वाच्य ब्रह्मसुखच बनल्यामुळे त्याला इतर सर्व गोष्टींचा विसर पडतो.

चित्तरूप चिती शक्तीचे जडत्व जाऊन म्हणजे शिवाने धारण केलेले जीवाचे संकुचितत्व जाऊन तो पुन्हा विभुरूप शिव व्हावा म्हणून सिद्धयोगाचा निरंतर

अभ्यास करून सद्गुरुकृपेने जागृत झालेल्या आतील शक्तीच्या विकासाला साधकाने वाव दिला पाहिजे. ज्याप्रमाणे पांगळा मनुष्यही प्रयत्नबळाने पर्वतही चढू शकतो त्याप्रमाणे जागृत चितिशक्तीच्या जोरावर जडत्वास आलेला, संकुचितत्व पावलेला व भोगाकांक्षाने युक्त असलेला जीव नित्य अभ्यास करून मूलाधार ते सहस्रारा-पर्यंतचा पर्वत सुषुम्नापथाने लीलया व सहजतेने चढू शकतो. अशा प्रकारे सिद्धयोगाचा निरंतर अभ्यास करून चित्तरूप चितिशक्ती कुंडलिनीला सहस्रारातील आपल्या मूळ स्वरूपाच्या म्हणजे शिवस्वरूपाच्या मार्गाकडे उद्युक्त केले पाहिजे. मग हा आतून आपोआप होणारा अभ्यास करताना शरीर राहो अगर जावो. त्याची पर्वा करण्याचे कारण नाही. ही चैतन्य शक्ती जेव्हा चेतन पदावरून खाली उतरते तेव्हा ती भिन्नभिन्न रीतीने, भिन्नभिन्न स्तरात अनेक गतींनी परिणाम पावलेली दिसून येते; ("किमुक्तम्भवति परापरविमर्शरूपिणी संविन्नानाशक्तिरूपेण निखिलपिंडा-धारत्वेन वर्त्तते इति सिद्धान्तः ॥४.२९॥" सिद्धसिद्धांतपद्धती) परतु आत्म्याच्या मीलनासाठी ज्यावेळी ती ऊर्ध्वमुख होऊन धावू लागते त्यावेळी देह गेला की आहे याची आठवण साधकाला कशी राहील ? जागृत शक्ती सर्व नाड्यांमधील प्राण खेचून घेऊन ते आपल्यात लीन करून सुषुम्नेत प्रवेश करीत असल्याने व साधकाच्या देहात हे कार्य अव्याहत चालू असल्याने सर्व इंद्रियांचे सामर्थ्य आपोआप खेचून घेतले गेल्यामुळे बहिर्मुख इंद्रिये स्वभावतःच अंतर्मुख होऊन साधक देहभानावर असत नाही. ज्यावेळी नदीच्या ओघाने घो घो करीत वाहणारे पाणी समुद्रात जाऊन मिळते त्यावेळी ते पाणी मागे काय चालले आहे हे पाहण्याकरिता परतते काय ? हे पाणी कधी मागे पाहतही नाही व परततही नाही. ते समुद्रास मिळाल्यावर समुद्रच होऊन राहते. त्याप्रमाणे चित्तरूप चितिशक्ती अनादि निद्रेतून जागृत होऊन सुषुम्नामार्गाने वाटचाल करू लागली की, कोणत्याही अडथळ्यांना न जुमानता व विपेक्षेपांना न मानता आणि जडता, संशय, प्रमाद, आलस्य, संस्कार इत्यादींनी माघारी न वळता या सर्वांना जाळून पोळून भस्म करते. त्यामुळे साधक—जीव-सहस्रारातील नित्य निरतिशय आनंदघन चैतन्यरूपी शिवाशी समरसून जाऊन त्याची जन्ममरणाच्या यातायातीतून कायमची मुक्तता होते.

अशा प्रकारे सिद्धयोगाच्या अभ्यासाने ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन सुषुम्नेच्या मार्गाने जाऊ लागते, त्यावेळी मन व बुद्धी या गोष्टीही तिच्या मागोमाग जाऊ लागतात. ("मनो यत्र विलीयेत पवनस्तत्र लीयते। पवनो लीयते यत्र मनस्तत्र विलीयते ॥४ २३॥" हठयोगप्रदीपिका ॥) याचा अर्थ असा की, अनन्य योगाने म्हणजे एकमात्र सिद्धयोगानेच बुद्धी अनन्य होते. या योगानेच बुद्धीचे प्राणशक्ती कुंडलिनीबरोबर सुषुम्नेत चालन होऊन तिला शिवस्वरूपाचे ध्यान लागते व मी

ब्रह्म आहे हा बोध आतूनच उत्पन्न होतो. ("उत्पन्नशक्तिबोधस्य त्यक्तनि:शेषकर्मण:। योगिन: सहजावस्था स्वयमेव प्रजायते ।।४.११।।" हठयोगप्रदीपिका ।।) चित्‌शक्ती कुंडलिनी बाहेरील सर्व अनात्म विषयांकडे धावणारी आपली गती सोडून देऊन सुषुम्नापथाने ती सर्वकाल ईश्वराच्या ठिकाणी नेहमी जडून राहील असे साधकाने त्वरित केले पाहिजे. मग जेव्हा या अभेदरूपी सेवेने म्हणजे सिद्धयोगसाधनेने सुषुम्नापथात कुंडलिनी चितिशक्तीचे चालन होईल, तेव्हा साधकाचे चित्त शिव-रूपानेच भरून जाते. ("भ्रुवोर्मध्ये शिवस्थानं मनस्तत्र विलीयते । ज्ञातव्यं तत्पदं तुर्यं तत्र कालो न विद्यते ।।४.४८।।" हठयोगप्रदीपिका ।।) अनन्य शरणागती व अभेद किंवा अभिन्न सेवा ह्या दोन्ही गोष्टी सुषुम्नेच्या मार्गाने शक्ती जाऊ लागली म्हणजेच होतात. अन्यथा ही गोष्ट शक्य नाही. जे लोक नुसत्या ज्ञानाने चर्चेने, प्रवचनाने, कर्माने, भक्तीने अगर अन्य दुसऱ्या कोणत्याही मार्गाने वरील दोन्ही गोष्टी घडतात म्हणून सांगतात त्यात काही तथ्य नाही; कारण या अर्थानेच हठयोगप्रदीपिकेत असे म्हटले आहे की–

> **यावन्नैव प्रविशति चरन्मारुतो मध्यमार्गे ।**
> **यावद्बिंदुर्न भवति दृढप्राणवातप्रबंधात् ।।**
> **यावद्ध्याने सहजसदृशं जायते नैव तत्त्वं ।**
> **तावज्ज्ञानं वदति तदिदं दंभमिथ्याप्रलाप: ।।४.११४।।**

जोपर्यंत सुषुम्नामार्गामध्ये प्राणवायूचा संचार होऊन सहस्रारामध्ये असलेल्या ब्रह्मरंध्रामध्ये तो प्रवेश करीत नाही, जोपर्यंत केवलकुंभकसाधन आपोआप घडून येऊन बिंदू म्हणजे वीर्य स्थिरभाव धारण करीत नाही व जोपर्यंत सहजासहजी चित्तवृत्ती ध्येयाकार व निर्विषय होऊन तत्त्वज्ञान उत्पन्न होत नाही; तोपर्यंत शब्दांमुळे झालेले व शास्त्रवचनाने कळलेले शब्दिक ज्ञान हे अक्षरश: दांभिक व खोटे प्रलाप आहेत हेच खरे. अशी स्थिती प्राप्त झाली म्हणजे साधकावर आत्म्याचा पूर्ण प्रसाद झाला असे समजावे.

असे घडले म्हणजे चित्ताला आपले अकर्तेपण पटते. आता चित्तात विवेकाचा उदय झाल्याने भेदज्ञान नाहीसे होऊन स्वसंवेद्य आत्मस्वरूप प्रकट झाल्याने सर्वत्र प्रकाशाची दिवाळी कशी होते ? हे पाहवयाचे आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वसंवेद्यतत्त्वप्राप्तीच्या प्रक्रियेतील विवेकाचे स्थान ज्या ओव्यातून व्यक्त केले आहे त्या ओव्या पाहिल्या की वरील प्रश्नाचे उत्तर आपोआप मिळेल.

> **मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।**
> **म्हणौनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ।।१.२२।।**
> **आधींचि विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी ।**
> **आणि भक्तराजु किरिटी । परिसत असे ।।४.२।।**

तैसी वैराग्याची शिव न देखती । जे विवेकाची भाष नेणती? ।
ते मूर्ख केंवी पावती । मज ईश्वरातें? ॥२५॥
मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं ।
तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥५४॥
एकीं ययापरी पार्था । दोषु क्षाळिले सर्वथा ।
आणिकीं हृदयारणीं मथा । विवेकु केला ॥१३०॥
जेथ वैराग्याचा पांगु फिटे । विवेकाचाही सोसु तुटे ।
जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ॥१६३॥
ऐसेनि विवेके उदो चित्तीं । तयासी भेदु कैंचा त्रिजगतीं ।
देखें आपुलिया प्रतीती । जगचि मुक्त ॥५.८५॥
परी दैव जैसे कवतिकें । कहींचि दैन्य न देखे ।
कां विवेकु हा नोळखे । भ्रांतीतें जेवीं ॥९०॥
म्हणोनि साधनजात आघवें । अनुसरे तया स्वभावें ।
मग आय तये बैसे राणिवे । विवेकाचिये ॥६.४६६॥
पाठीं विचारितया वेगां । तो विवेकुही ठाके मागां ।
मग अ वचारणीय तें आंगा । घडोनि जाय ॥४६७॥
तो प्रतीतीचेनि पात्रें । विवेक महामंत्रें ।
ज्ञानाग्नि होत्रें । भेदु नाशी ॥९.२४३॥
तैसी ते सत्त्वशुद्धी । आगळी ज्ञानेंसी वृद्धी ।
तरंगावों लागे बुद्धी । विवेकावरी ॥१४.२२२॥
ऐसेंनि विवेकें जया । उदो होय धनंजया ।
ये गुणातीतत्व तया । अर्थपंथें ॥२९९॥
तैसा जंव पार्था । विवेकु नुधवी माथा ।
तंव अंतु नाहीं अश्वत्था । भवरूपा या ॥१५.२२६॥
निसळें विवेकसाहणें । जें ब्रह्माहमस्मिबोधें ससाणें ।
मग पुरतेनि बोधे उटणे । एकलेंचि ॥२५९॥
तैसे विवेकाचेनि पैसें । जयांची स्फूर्ती स्वरूपीं बैसे ।
ते ज्ञानिये देखती ऐसें । आत्मयातें ॥३८३॥
तैसें देहजीवाचिये मिळणीं । जो उदयजत सूये पाणी ।
तो विवेक अंतकरणीं । जागवीजे ॥१६.११०॥
तैसा वैराग्य लाभु जाला । वरी सद्गुरूही भेटला ।
जोवीं अंकुरु फुटला । विवेकाचा ॥१८.१००१॥
तरी गुरु दाविलिया वाटा । येऊनि विवेकतीर्थतटा ।

धुऊनियां मळकटा । बुद्धीचा तेणें ॥१०११॥
वरी आड पडिलें दिठी । सानें थोर निवटी ।
तें बळीं विवेकमुष्टीं । ध्यानाचें खांडें ॥१०४८॥

वरील सर्व ओव्यातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी देहजीवांची झालेली मिळणी तोडण्याकरीता व अविचारणीय अंगस्वरूप परब्रह्मप्राप्तीकरिता विवेकांचा दीप उजळावा, विवेकाचा मंथा करावा, विवेकाच्या महामंत्राचा आधार घ्यावा, विवेकाची सहाण करावी व विवेकाच्या तीर्थावर मळकट बुद्धी धुवावी म्हणून सांगितले आहे; कारण या विवेकाचा उदय प्राण जेव्हा अर्थपंथाने म्हणजे सुषुम्नामार्गाने जाऊ लागतात तेव्हाच होतो. ही प्रक्रिया घडली म्हणजे विवेकामुळे प्रातिभज्ञान उत्पन्न होऊन आत्मप्रतीतीने साधक कृतकृत्य होतो व त्याला सुखाची निरंतर दिवाळी होते. " एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । या दोन्हीं केवळ । साधन ज्ञान ॥ १८.१२४३ ॥ " असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे त्याचा अर्थ हाच आहे; परंतु विवेकाने होणाऱ्या ज्ञानोत्पत्तीसाठी प्रथम शक्तिपात दीक्षा होऊन साधकाची चित्‌शक्ती जागृत होणे नितांत आवश्यक असते. ज्यावेळी सद्‌गुरू साधकाचे अज्ञान किंवा मायापाश दीक्षारूपी अस्त्राने छेदून टाकतात व ज्यावेळी साधकाच्या ठिकाणी झालेल्या शक्तिसंचारामुळे तो देहातादात्म्य संबंधीच्या भावनांपासून सुषुम्नागत प्राणसंचलनाने दूर होतो; त्यावेळी वस्तुतः विवेक उत्पन्न होऊन त्यापासून प्रातिभतत्त्व विकसित होते. शास्त्रात असे म्हटले आहे की—

तदागमवशात् साध्यं गुरुवक्त्रान्महाधिया ।
शिवशक्तिकरावेशाद्‌गुरुः शिष्यप्रबोधकः ॥

ते ज्ञान आगम व गुरुमुखानेच प्राप्त होऊ शकते. गुरूच्या चैतन्यशक्तिमय करस्पर्शाने म्हणजे भगवंताच्या शक्तिरूप किरणांच्या द्वारा गुरू शिष्यावर शक्तिपात करून ते ज्ञान प्रबोधित करतात.

यासंबंधी " भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, मधील " शक्तिपात-रहस्य " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, " ज्याप्रमाणे भस्माखाली झाकलेला अग्नी मुखाने किंवा फुंकणीने फुंकल्यावर त्या वायूमुळे पुन्हा प्रज्ज्वलित होतो किंवा ज्याप्रमाणे योग्यवेळी पेरलेले व पाणी दिलेले बी अंकुरित होऊन त्याला पाने फुले येऊन ते विकसित व व्यक्त होते त्याप्रमाणे गुरूपदिष्ट क्रियांच्या द्वारा प्रातिभज्ञान व्यक्त होते. हे अनुत्तर महाज्ञान शास्त्रज्ञानापेक्षा श्रेष्ठ आहे; कारण ते विवेकामुळे उत्पन्न होते. अतींद्रिय व अप्रमेय चैतन्य-तत्त्व ज्यावेळी विचाराच्या भूमीवर अवतीर्ण होऊन आत्मबोधाचे रूप धारण करते, त्यावेळी त्याला विवेक म्हणतात. त्या अवस्थेत जीव, ईश्वर, मायादि पाशांचे ज्ञान आपले-आपणच जागृत होते. हेच प्रातिभज्ञान होय. हे ज्ञान सर्वार्थाने भ्रमापासून मुक्त

असल्याने यालाच सम्यग्ज्ञान किंवा महाज्ञान म्हटले जाते. असे महाज्ञान झाले की, सर्व प्रकारचे परिच्छिन्न ज्ञान म्हणजे इंद्रियगोचर व अंतःकरणगोचर असे सर्व खंडज्ञान दुसऱ्या गोष्टींचा आश्रय सोडून त्या महाप्रकाशात स्थिर होते म्हणजे लीन होऊन जाते. ज्याप्रमाणे सूर्याच्या किरणात दिव्यांचा प्रकाश फिक्का पडतो त्याप्रमाणे प्रातिभज्ञानाचा उदय झाल्यावर खंडज्ञानाची दशा तशीच होते.

विवेक उत्पन्न झाल्यावर इंद्रिय-संबंधित अशा शब्दादि विषयांमध्ये दूर-श्रवणादि विचित्र ज्ञानाची उत्पत्ती होते. त्यावेळी देश, काल, आकारगत व्यवधान व सूक्ष्मता इत्यादि प्रतिबंध राहिले तरीही ज्ञानाच्या उत्पत्तीमध्ये या गोष्टी आडव्या येत नाहीत व त्यांचा काहीही प्रभाव पडत नाही. योगशास्त्रात जितक्या विभूतींचे वर्णन आले आहे त्या सर्व विभूती विवेकवान् साधकाला प्राप्त होतात; अर्थात् शक्तिज्ञानाचे सामर्थ्य इतके आहे की, तंत्रोक्त क्रियाकर्म, षट्चक्र, स्वर-साधन, मंत्रवेध, परकाया-प्रवेश या सर्वांवर त्याचे स्वामित्व प्रस्थापित होते. एका क्षणात वरील सर्व गोष्टी अशा साधकाच्या ताब्यात येतात. विवेकाची वाढ जितकी अधिक होते तितके चित्तात सर्व भावांबद्दल वैराग्य उत्पन्न होते व शेवटी त्याचा परम चिद्भावामध्ये शेवट होतो. यामुळे सिद्धींबद्दलही साधकयोग्याला प्रेम राहत नाही. मुलांचा खेळ, स्वप्न किंवा इंद्रजालासारख्या त्या सर्व सिद्धी आहेत असे त्याला वाटू लागते. ज्याप्रमाणे आरशात आपले प्रतिबिंब आपल्याला दिसते त्याप्रमाणे प्रातिभज्ञानाच्या प्रकाशाने एकावेळी आतबाहेर सर्वत्र परमेश्वराची सत्ता प्रत्यक्ष प्रतीत होऊ लागते. सर्व विश्वच त्याच्या घनीभूत रूपासारखे भासू लागते. या अवस्थेत हेयोपादेय बोध न राहिल्याकारणामुळे साधकाच्या सामान्य व परिच्छिन्न सिद्धींना आश्रयभूत असलेले त्या त्या प्रकारचे निर्दिष्ट ध्यान सुटून जाते व एकमेव परमवस्तूची भावनाच कायमची जागृत राहते. विवेकाच्या वाढीमुळे शाप व अनुग्रहाच्या कार्यात सामर्थ्य प्राप्त होते. यामुळे विवेकी स्वतः मुक्त होऊन दुसऱ्यांनाही मुक्त करू शकतो.

बद्ध जीव-रूपी अणू पंचभूतांनी झाकले जाऊन इंद्रियाधीन राहतात. त्यामुळे त्यांना एक देह सुटल्यावर दुसरा देह धारण करणे भाग पडते; परंतु विवेकाचा उदय झाल्यावर प्रतिभेचा योग झाल्यामुळे असे जीव शक्तितत्त्वरूपात गणले जातात. ह्या जीवांना शुद्ध विद्येची अवस्था प्राप्त होऊन ते निग्रहानुग्रहामध्ये समर्थ होतात व यामध्ये क्रमशः उन्नत होऊन म्हणजे शक्तिपाताच्या क्रमिक आवेशाने संसार समुद्रातून पलीकडे जातात आणि उत्तरोत्तर ब्रह्मा, विष्णू, रुद्र, ईश्वर, सदाशिव व शिव या सहा प्रकारच्या कारणांचे निवारण करीत शेवटी परमात्म्याबरोबर सायुज्य प्राप्त करतात. यासाठी शिव, शक्ती म्हणजे जीव ही खरोखर प्रातिभविज्ञानरूपात प्रादुर्भूत होतात."

" पातंजल योगदर्शनात, " " प्रातिभाद् वा सर्वम् ॥ ३.३३ ॥ " व " तारकं सर्वविषयं सर्वथाविषयमक्रमं चेति विवेकजं ज्ञानम् ॥ ३.४ ॥ " या दोन सूत्रात विवेकामुळे उत्पन्न होणाऱ्या प्रातिभज्ञानाचे वर्णन केले आहे. प्रतिभेच्या ज्ञानाने योगी सर्वज्ञाता होतो म्हणजे सर्व काही जाणतो आणि जे संसार समुद्रातून तारणारे आहे, सर्व जाणणारे आहे, सर्व प्रकाराने जाणणारे आहे व जे क्रमहीन अनौपदेशिक आहे ते विवेकजनित ज्ञान आहे. अशा प्रकारचे ज्ञान शुकदेवांना जन्मतःच झाले असे "महोपनिषदाच्या दुसऱ्या अध्यायात" सांगितले आहे. ऋषी म्हणतात–

**शुको नाम महातेजाः स्वरूपानंदतत्परः ।**
**जातमात्रेण मुनिराड् यत्सत्यं तद्वाप्तवान् ॥२–१॥**
**तेनासौ स्वविवेकेन स्वयमेव महामनाः ।**
**प्रविचार्य चिरं साधु स्वात्मनिश्चयमाप्तवान् ॥२॥**

आत्म्याच्या परमानंदाचे निरंतर आस्वादन करणारे शुक नावाचे एक अत्यंत तेजस्वी मुनीश्वर होते. जन्म घेताक्षणीच त्यांना सत्याची व तत्त्वज्ञानाची प्राप्ती झाली होती. त्यांनी कोणाच्याही साहाय्याशिवाय पुष्कळ काळपर्यंत विचार केल्यानंतर स्वतःच्या विवेकाच्या जोरावर आत्मस्वरूप काय आहे याविषयी निश्चित धारणा केली.

या ज्ञानामुळे त्यांना गुरूच्या उपदेशाशिवायच परमार्थतत्त्वाचा अनुभव आला होता व त्यांची भोगवासनांची निवृत्तीही झाली होती; परंतु त्यांचे ज्ञान दृढ नसल्याने त्यांचे मन शांत झाले नव्हते. त्यामुळे त्यांचा आपल्याला झालेल्या ज्ञानावर विश्वास बसला नाही. यासाठी त्यांना त्यांच्या वडिलांच्या म्हणजे श्रीव्यासदेवांच्या आदेशाप्रमाणे विदेहराज जनकाकडे जाणे भाग पडले. तेथे गेल्यावर सद्गुरुवचनामुळेच म्हणजे कृपेमुळेच त्यांचे मन शांत झाले. हेच सिद्धयोगाच्या स्वसंवेद्य तत्त्वाचे खरे रहस्य आहे. येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून स्वसंवेद्य तत्त्वप्राप्तीच्या प्रक्रियेतील विवेकाचे स्थान कोणते आहे ते स्पष्ट होईल. शेवटी स्वसंवेद्य तत्त्वप्राप्तीच्या प्रक्रियेतील शक्तीचे स्थान कोणते आहे ? या प्रश्नाचा विचार केला म्हणजे या विवेचनाला पूर्णता येईल.

या प्रक्रियेतील शक्तीचे स्थान पाहत असताना स्वसंवेद्य तत्त्व कोठे आहे?, या तत्त्वप्राप्तीत शक्तीचे स्थान काय आहे ? व स्वसंवेद्यतत्त्वप्राप्तीची प्रक्रिया कशी घडते ? या प्रश्नांची उत्तरे पाहिली पाहिजेत.

प्रथम स्वसंवेद्य तत्त्व कोठे आहे याचा विचार करावयाचा आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओव्यात स्वसंवेद्य तत्त्व कोठे आहे हे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात–

**मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी । सोऽहंभावाच्या बाह्या पसरूनी ।**
**परमात्मलिंगा धांवोनी । आंगा घडे ॥६.३०५॥**
**जयजय देव श्रीगुरो । अकल्पनाख्यकल्पतरो ।**
**स्वसंविद्द्रुमबीजप्ररो- । हणावनी ॥१८.१०॥**

या दोन्ही ओव्यांवरून हे स्पष्ट होते की, ब्रह्मरंध्र हेच स्वसंवेद्य तत्त्वाचे खरे स्थान आहे; कारण ब्रह्मरंध्रापासून निघून मूलाधारात येऊन स्वस्थ झोपी गेलेली आत्मशक्ती सद्गुरुकृपेने जागृत झाल्यावर ब्रह्मरंध्रात किंवा आत्मज्ञानरूप बीजाच्या उत्पत्तिस्थानात विलीन होते. या स्वसंवेद्य आत्मस्थानावर मत्स्येंद्रनाथांनी गोरक्षनाथांना "तेणें योगाब्जिनीसरोवरु । अभिषेकिला ॥१८.१७५६॥" असे नेले म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्टच सांगितले आहे. हा स्वसंवेद्य तत्त्वाच्या साक्षात्काराचा मार्ग म्हणजे सुषुम्ना मार्गच होय; कारण "येन मार्गेण गंतव्यं ब्रह्मस्थानं निरामयम् ॥३ १०६॥" असे "हठयोगप्रदीपिकेत" म्हटले आहे. या मार्गानेच जाऊन सहस्रारातील निरायम अशा ब्रह्मस्थानात पोहोचून साधक ब्रह्म किंवा आत्मसाक्षात्काररूप स्वसंवेद्य तत्त्वाची प्राप्ती करतो. महायोगी गोरक्षनाथांनी "गोरखबानी" या ग्रंथात पुढील श्लोकात स्वसंवेद्य तत्त्व सहस्रारात सुषुम्नामार्गानेच जाऊन प्राप्त होते म्हणून सांगताना असे म्हटले आहे की—

**ससंमवेद सोहं प्रकासं, धरती गगन न आदं**
**गंग जमुन बिच षेलै गोरष, गुरू मछिंद्र प्रसादं ॥ पद ॥५.१८॥**
**पंथ बिन चलिबा अगनि बिन जलिबा, अनिल तृषा जहटिया ।**
**ससंबेद श्री(गुरु) गोरष (नाथ) कहिया बूझिल्यो पंडित पढिया ॥२२॥**
**गगन मंडल मैं ऊंधा कूबा तहां अंमृत का बासा ।**
**सगुरा होइ सु भरि भरि पीवै निगुरा जाइ पियासा ॥२३॥**

हे स्वसंवेद्य तत्त्व स्वयंप्रकाश सोहंभाव आहे. हे तत्त्व पृथ्वीवर, आकाशात किंवा पाण्यात नाही. श्रीसद्गुरू मत्स्येंद्रनाथांच्या कृपाप्रसादामुळे गोरक्षनाथ गंगा म्हणजे इडा व जमुना म्हणजे पिंगला यांच्यामधील सुषुम्नामार्गाने जाऊन समाधिस्थ होऊन आत्मसाक्षात्कार करून घेऊन सहस्रारात स्वसंवेद्य स्वरूपात आनंदाने खेळत आहेत. जो या सुषुम्नामार्गाने जातो त्याला मार्गाशिवाय चालणे, अग्निशिवाय जळणे व वायूने तहान भागविणे हे सर्व अनुभवाने कळू लागते. हे सर्व स्वसंवेद्य आहे. गोरक्षनाथाने हे सर्व अनुभवाने सांगितले आहे. हे पढिक पंडितांनो ! सहस्रारातील या स्वसंवेद्य तत्त्वाचे ज्ञान समजून घ्या. आकाश मंडलात म्हणजे ब्रह्मरंध्रात अमृताने भरलेली एक अधोमुखी विहीर आहे. जो योग्य गुरूची शरणगती पत्करतो तोच त्यातून यथेच्छ अमृतरसपान करू शकतो; कारण शक्तिपाताने आत्मसत्ता जागृत करून हे अमृतपान करण्याचा उपाय एकमात्र सद्गुरूच सांगू शकतात.

ज्याने अशा गुरूची प्राप्ती केलेली नाही तो हे अमृत प्राशन करू शकत नाही. उलट तो याबाबत तहानलेलाच राहतो.

अशा या स्वसंवेद्य तत्त्वाच्या प्राप्तीत शक्तीचे स्थान काय आहे हे आता पाहवयाचे आहे. " शक्तिशक्तिमतयोरभेदः।, " " देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम्।। श्वेताश्वतर उप. १.३ ।। ", " परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते ।। श्वेताश्वतर उप. ६.८ ।।, " " एषात्मशक्तिः " ।। देवी अथर्वशीर्ष १५ ।।, " " सैषा परा शक्तिः। सैषा शांभवी विद्या.... सैव पुरत्रयं शरीरत्रयं व्याप्य बहिरन्तरवभासयन्ती....... महात्रिपुरसुंदरी वै प्रत्यक् चितिः। सैवात्मा। ततोऽन्यदसत्यमनात्मा ।। बृह्वृचोपनिषद ।। " या सर्व वचनांवरून व स्वसंवेद्य तत्त्वाचे स्वरूप पाहताना स्वसंवेद्य तत्त्व हे शिवशक्तियुक्त कसे आहे हे स्पष्टच झालेच आहे. मात्र स्वसंवेद्य तत्त्वाच्या प्राप्तीत शक्तीचे स्थान अनुपमेय आहे हे ज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओव्यातून स्पष्ट केले आहे. ते म्हणतात–

**जाणिजे योगपीठाचा भैरवु। काय आरंभरंभेचा गौरवु।**
**कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु। रूपा आला ।।६.४६२।।**
**मग तयाचेनि प्रसादें। सर्वोपशांतिप्रमदे।**
**कांतु होऊनियां स्वानंदें। स्वरूपींचि रमसी ।।१८.१३२०।।**

सिद्धयोगाचे साधन करणारा साधक हा योगपीठाचा भैरव असतो. योग म्हणजे सिद्धयोग होय. " क्रियाशक्तिः पीठम्। " म्हणजे क्रियाशक्ती हे आसन आहे, असे " भावनोपनिषदात " म्हटले आहे. " उद्यमो भैरवः ।। १.५ ।।" म्हणजे या सिद्धयोगाचे साधन करणारा साधक हा भैरव आहे असे " शिवसूत्र " आहे. वरील सर्व सूत्रांचा एकत्रित विचार केला म्हणजे वरील पहिल्या ओवीचा अर्थ स्पष्ट होईल. श्रीगुरुकृपेने दीक्षा मिळून जो क्रियाशील शक्तीच्या आसनावर बसलेला आहे म्हणजे ज्याच्या ठिकाणी जागृत शक्तीकडून आपोआप क्रिया होऊन जो सिद्धयोगाचे साधन करतो तो साधक होय. अशा साधकाच्या ठिकाणी आरंभरंभेचा गौरव प्रकट होतो. आरंभ म्हणजे सुरुवात व रंभा म्हणजे श्रीशक्ती कुंडलिनी होय. ज्यावेळी ही आरंभरंभा श्रीशक्ती कुंडलिनी जागृत होते तेव्हा तिचा गौरव म्हणजे तिचे सर्व वैभव साधकाच्या ठिकाणी प्रकट होते. " कुंडलिनी ज्ञानशक्तिर्गृहम् ।। " असे " भावनोपनिषदात " व " एषा सरस्वती देवी सर्वभूतगुहाश्रया ।। ३.८ ।। " असे " योगशिखोपनिषदात " म्हटले आहे. त्याचप्रमाणे " तटित्कोटिसमा मृणालतन्तुसूक्ष्मा कुंडलिनी ।। ३.६ ।। " असे " मंडलब्राह्मणोपनिषदात " व " परा शक्तिः स्वयं ज्योतिरात्मिका ।। असे " योगचूडामण्युपनिषदात " म्हटले आहे. त्याचप्रमाणे " जगदंबा कुंडलिनी ही चैतन्य चक्रवर्तीची शोभा आहे," असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. वरील सर्व सूत्रे ध्यानात घेतली म्हणजे अशी शक्ती

गुरुकृपेने जागृत झाली की, ती आपल्या सर्व वैभवाची उधळण साधकावर करते हे स्पष्ट होते यामुळे अशा साधकाला वैराग्य ही सर्वश्रेष्ठ सिद्धी प्राप्त होते. अशावेळी तो साधक ह्याच वैराग्यरुपी सिद्धीचा मूर्तिमंत अनुभवच प्रकट झाला आहे असे वाटते.

ईश्वराला नितांत शरण गेले म्हणजे त्याच्या कृपाप्रसादाने सद्‌गुरुंची प्राप्ती होते. मग ते आपला शक्तिपातयोगरूप प्रसाद साधकावर करतात. त्यामुळे सर्व प्रकारे व सर्वार्थाने साधकाला शांत करणारी शंभूची पत्नी शक्ती जागृत होते. मग शिवही जागृत होतो. असे झाले म्हणजे साधकाला आपले मूळ शिवरूप-कांतरूप प्राप्त होऊन तो स्वस्वरूपामध्ये शक्तीसह आनंदाने रममाण होतो.

हेच खरे स्वतःच स्वतःला जाणणे होय. शक्तीने जागृत होऊन स्वतःच्या मूळ स्वरूपाशी एकरूप होऊन जाणे म्हणजे शिवाने शिवरूप, शक्तीने शक्तिरूप, शक्तीने शिवरूप अगर शिवाने शक्तीरूप होणे होय. या अर्थानेच आचार्य बलभद्रांनी " सिद्ध सिद्धांतसंग्रहात असे म्हटले आहे की –

**शिवस्याभ्यंतरे शक्तिः शक्तेरभ्यंतरे शिवः ।**
**अंतरं नैव पश्यामि चंद्रचंद्रिकयोरिव ॥**

शिवात शक्ती व शक्तीत शिव अगदी एकरूप झालेले असतात. ज्याप्रमाणे चंद्र व चांदणे या गोष्टी दोन नसतात त्याप्रमाणेच शिव व शक्तीत अंतर नसते. एकच अद्वितीय परमतत्त्वास दृष्टिभेदानुसार शिव किंवा शक्ती ही संज्ञा प्राप्त होते. " प्रपंचसारतंत्रामध्ये " श्रीमदाद्यशंकराचार्यांनी प्रथम पटलामध्येच शक्तीच स्वतःला जाणते असे म्हटले आहे. " सैव स्वां वेत्ति परमा तस्या नान्योऽस्ति वेदिता ॥१.२८॥" त्या परम शक्तीला जाणणारा कोणी नाही. ती स्वतःच स्वतःला जाणते. कांत व कांता ही दोन्ही पदे ती स्वतःच आहे. परब्रह्मप्राप्तीमध्ये किंवा स्वस्वरूप-प्राप्तीमध्ये शक्तीचे स्थान असे अनुपमेय असल्याने एकदा श्रीशिवांना श्रीरामचंद्रांचे पररूप जाणण्याची इच्छा झाल्यावर श्रीराम श्रीशिवांना काय म्हणाले याचे विवेचन " अगस्त्यसंहितेत " पुढीलप्रमाणे केले आहे.

**द्रष्टुमिच्छसि यद्रूपं मदीयं भावनास्पदम् ।**
**आल्हादिनीं परां शक्तिं स्तुयाः सात्वतसम्मताम् ॥**
**तदाराध्यस्तदारामस्तदधीनस्तया विना ।**
**तिष्ठामि न क्षणं शंभो जीवनं परमं मम ॥**

श्रीराम म्हणाले, हे शिवा ! जर तुला माझे भावनायुक्त रूप पाहण्याची इच्छा असेल तर भक्तजनांना संमत अशा माझ्या आल्हादिनी पराशक्तीची तू स्तुती कर. मी तिच्या सहितच आराध्य किंवा उपासनीय आहे. मी तिच्याशिवाय एक क्षणभरही राहू शकत नाही; कारण ही शक्तीच माझे अत्यंत श्रेष्ठ असे जीवन आहे.

" अगस्त्यसंहितेच्या " वरील अवतरणावरून हे स्पष्ट होते की, महाशक्तीच

सर्वोपरी आहे व ब्रह्म हे शक्तीच्या सहितच आराध्य आहे. ज्याप्रमाणे फुलापासून त्याचा सुगंध वेगळा करता येत नाही; कारण तो फुलाशी एकरूप व अभिन्न असतो, त्याप्रमाणे ब्रह्म व शक्ती ह्या दोन गोष्टी सांगण्यापुरत्याच दोन किंवा वेगळ्या आहेत. तात्त्विक दृष्टीने या दोन्ही गोष्टी एकच आहेत. ज्याप्रमाणे सुगंध दशदिशात दरवळून फुलाचा विशेष परिचय सर्वांना करून देतो त्याप्रमाणे चित्‌शक्तीच ब्रह्मतत्त्वाचा परिचय व साक्षात्कार साधकाला करवून देते.

स्वसंवेद्यतत्त्वप्राप्तीच्या प्रक्रियेतील शक्तीच्या स्थानाचे व पर्यायाने सिद्धयोगाच्या मार्गाचे अपरिहार्यत्व महायोगी श्रीगोरक्षनाथांनी "महार्थमंजरीत" पुढील श्लोकात व त्यावरील स्वतःच्या टीकेत व्यक्त केले आहे. ते म्हणतात–

**आस्तामन्या विद्या चतुःस्रोतसामपि सागराणामिव ।**
**एनमेवामृतमयं मथ्नाति मन्थानभैरवो देवः ।।६८।।**

फुलात गंध, तिळात तेल, देहात जीव व पाण्यात रस ज्याप्रमाणे एकरूप असतो त्याप्रमाणे सर्व शास्त्रांमध्ये कुल किंवा कौलिकशास्त्राची म्हणजे सिद्धयोगाची प्रतिष्ठा आहे, असे श्रीतंत्रालोकाचे वचन आहे. या प्रमाणानुसार परमेश्वरच, सर्वानुग्राहकतेने श्रुतिस्मृत्यादि बाह्यविद्यांपेक्षा सिद्धयोगानेच साधक स्वसंवेद्य आत्मरूप जाणत असल्याने त्याने ही विद्याच हस्तगत करावी म्हणून, श्रीगुरूला त्याच्या जवळ व शरण आलेल्या शिष्याला ती देण्यासाठी प्रवृत्त करतो हेच खरे आहे. याचे खरे कारण असे आहे की, हे महार्थरूप स्फुरणतत्त्व सर्व दर्शनांचे सार असून सर्व स्रोतोतिशायी व अत्यंत प्रशंसनीय आहे. मिथ्या कल्पनांचा नाश करावयाचा असल्यास आमची प्रक्रियाच मानली पाहिजे. म्हणून ज्यांना कोठेही थारा नाही त्यांच्यासाठी अलौकिक शक्तीचे हे तत्त्व आश्रयस्थान होईल व आहेही. "सर्वोपायपरिक्षीणास्ते महार्थार्थिनः किल ।" व "अस्ति नान्या गतिस्तेषांविकल्पग्राससाहसात् ।।" ही दोन वचने उपरोक्त विवेचनाला प्रणाम व आधार आहेत. सर्व प्रयत्न करून भागलेले लोक या प्रक्रियेचे पायीक होतात व विकल्पांनी ज्यांचे साहस खलास केले आहे त्यांना सिद्धयोगाशिवाय दुसरा मार्ग वा गती नाही."

आता शेवटी स्वसंवेद्यतत्त्वप्राप्तीची प्रक्रिया कशी घडते हे पाहवयाचे आहे– श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथें विसंवे ।**
**अनुभूतिही अनुभवे । अनुभवा जया ।।१८.१३२१।।**
**तिये निजात्मपदींचा रावो । होऊनि ठाकसी अव्ययो ।**
**म्हणे लक्ष्मीनाहो । पार्था तूं गा ।।१३२२।।**
**तेचि अविद्येची जवनिका फिटे । आणि भेदभावाची अवधी तुटे ।**
**मग म्हणों एक होऊनि जरी आटे । तरी काय दोनी होती? ।।८.४१.।**

पैं केशांचा गुंडाळा । वरि ठेविली स्फटिकशिळा ।
ते वरी पाहिजे डोळां । तंव भेदली गमती ।।४२।।
पाठीं केश परौते नेले । आणि भेदलेपण काय नेणों जाहालें ।
तरी डांक देऊनि सांदिलें । शिळेतें काई? ।।४३।।
ना ते अखंडचि आयती । परि संगे भिन्न गमली होती ।
ते सारिलिया मागौती । जैसी कां तैसी ।।४४।।
तेवींचि अहंभावो जाये । तरी ऐक्य ते आधींचि आहे ।
हेंचि साचें जेथ होये । तो अधियज्ञु मी ।।४५।।

आत्मस्वरूपावर त्याच्या निजांगभूत शक्तीमुळेच उत्पत्ती व स्थिती होत असते. हीच उभारणी व हाच प्रसवक्रम होय. मात्र ज्यावेळी शक्ती जागृत होते तेव्हा प्रतिप्रसवक्रमाने लय किंवा संहारणी होऊन जीव आत्मस्वरूपात विश्रांती घेतो. हेच जीवरूप चित्शक्तीच्या विसाव्याचे खरेखुरे ठिकाण होय. शक्ती जागृत झाल्याशिवाय प्राण सुषुम्नेत प्रवेश करीत नसल्याने खऱ्या अनुभूतीला सुरुवात होत नाही. ती आत्मस्वरूपोन्मुख झाल्याबरोबर स्वस्वरूपाचा अनुभव अनुभवू लागते. असे घडले म्हणजे साधक आपल्या मूळच्या आत्मस्थितीचा राजा होतो आणि अक्षय्य सुख भोगतो. "हठयोगप्रदीपिकेत" हीच गोष्ट पुढील दोन श्लोकांनी स्पष्ट केली आहे.

उत्पन्नशक्तिबोधस्य त्यक्तनि:शेषकर्मणः ।
योगिनः सहजावस्था स्वयमेव प्रजायते ।।४.११।।
सुषुम्नावाहिनी प्राणे शून्ये विशति मानसे ।
तदा सर्वाणि कर्माणि निर्मूलयति योगवित् ।।१२।।

ज्या साधक-योग्याची कुंडलिनी शक्ती जागृत झाली आहे व ज्याने सर्व कर्मांचा संपूर्णपणे त्याग केला आहे त्याला स्वतःला सहजावस्था आतूनच आपोआप प्राप्त होते. जेव्हा प्राणवायू सुषुम्नेतून वाहू लागतो तेव्हा देश, काल व वस्तु-परिच्छेदरहित होऊन मन शून्य ब्रह्मामध्ये प्रविष्ट होऊन त्यावेळी चित्तवृत्तीच्या निरोधाचा ज्ञाता असलेला योगीसाधक प्रारब्धासहित संपूर्ण कर्मांना नष्ट किंवा निर्मूल करतो.

अशा योगीसाधकाच्या अज्ञानाचा पडदा गेल्यामुळे भेदभावाची मर्यादाच नष्ट होते. मग जीव व शिव किंवा शक्ती व शिव एकरूप होऊन तद्रूप झाले असे जर म्हणावे, तर प्रथम शिवशक्ती काय दोन होते ? केसांच्या गुंडाळ्यावर स्फटिकाची शिळा ठेवली व ती वरून डोळ्याने पाहिली असता भेगाळलेली किंवा फुटलेली दिसते. नंतर ते केस त्या स्फटिकाच्या शिळेखालून काढून टाकले तर तिचा फुटकेपणा कोठें गेला ते कळत नाही. तर मग त्या शिळेला डाग देऊन जोडले काय?

असे काहीच नाही. ती मूळची अखंडित होती तशीच आहे; परंतु केसांच्या संगतीने भंगलेली भासत होती. ते केस दूर केल्यावर, ती मूळची जशी अखंडित होती तशीच पुन्हा दिसते. त्याप्रमाणे अहं म्हणजे शिवशक्तिरूप द्वैत नाहीसे झाले म्हणजे ऐक्य हे मूळचेच आहे व हे ऐक्य जेथे प्रत्ययास येते तो अधियज्ञ म्हणजे साधन मी परमात्माच आहे असे श्रीकृष्ण म्हणतात.

सद्‌गुरूंचे कार्य केसांचा गुंडाळा काढून टाकावयाचा एवढेच आहे. मग जीव आपोआप शिवरूप होतो. केसांच्या गुंडाळ्याच्या रूपाने असलेले अनादि अज्ञान माया, दोष, जडत्व इत्यादि दूर केले की, जीवाला स्वसंवेद्य तत्त्व प्राप्त होते. या सर्व प्रक्रियेला शक्तिपात असे म्हणतात. हा झाल्याशिवाय विषयत्याग, तत्त्वदर्शन व सहजावस्था म्हणजेच स्वसंवेद्यता प्रात होत नाही. "वराहोपनिषदात" या दृष्टीनेच असे म्हटले आहे की–

सलिले सैंधवं यद्वत् साम्यं भजति योगतः ।
तथात्ममनसोरैक्यं समाधिरिति कथ्यते ।।२.७५।।
दुर्लभो विषयत्यागो दुर्लभं तत्त्वदर्शनम् ।
दुर्लभा सहजावस्था सद्‌गुरोः करुणां विना ।।७६।।
उत्पन्नशक्तिबोधस्य त्यक्तनिःशेषकर्ममणः ।
योगिनः सहजावस्था स्वयमेव प्रकाशते ।।७७।।

पाणी व मीठ यांच्या संयोगात मीठ हे जलरूप होते तसेच आत्मा व मन यांच्या ऐक्याला समाधी अशी संज्ञा आहे. सद्‌गुरूंनी करुणापूर्वक कृपेने शक्तिपात केल्याशिवाय विषयत्याग, तत्त्वदर्शन व सहजावस्था ह्या तीनही गोष्टी जीवाला दुर्लभच राहतात अर्थात् प्राप्त होत नाहीत. सर्व कर्मांचा त्याग करणारा व ज्यांची कुंडलिनी शक्ती जागृत झाली आहे अशा भाग्यवान् साधकाला ही समाधिरूप सहजावस्था सहज प्राप्त होते.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जसे वरील ओव्यातून स्फटिकाच्या दृष्टांताने आपले म्हणणे स्पष्ट केले आहे त्याप्रमाणे महायोगी गोरक्षनाथांनी तोच दृष्टांत वापरून "गोरक्षशतक," "गोरक्षपद्धती" व "विवेकमार्तंड" या तिन्हीं ग्रंथात पुढील श्लोकांतून स्वसंवेद्यतत्त्वाच्या प्राप्तीची प्रक्रिया स्पष्ट केली आहे. ते म्हणतात–

उपाधिश्च तथा तत्त्वं द्वयमेवमुदाहृतम् ।
उपाधिः प्रोच्यते वर्णस्तत्त्वमात्माभिधीयते ।।
उपाधिरन्यथा ज्ञानं तत्त्वं संस्थितमन्यथा ।
समस्तोपाधिविध्वंसि सदाभ्यासेन योगिनाम् ।।
आत्मवर्णेन भेदेन दृश्यते स्फटिको मणिः ।
मुक्तो यः शक्तिभेदेन सोऽयमात्मा प्रकाशते ।।

उपाधी व तत्त्व या दोन गोष्टींचे वर्णन केले आहे. वर्णाला उपाधी म्हटले जाते व आत्म्याला तत्त्व म्हटले जाते. उपाधी हे निराळे ज्ञान आहे व तत्त्वात स्थिर राहणे ही निराळी गोष्ट आहे. जो साधकयोगी नेहमी सिद्धयोगाचा अभ्यास करतो त्याच्या सर्व उपाधींचा नाश होतो. स्फटिकाप्रमाणे स्वच्छ असलेला आत्मा वर्णसंयोगामुळे काही निराळाच दिसतो; परंतु ज्यावेळी आत्मशक्ती कुंडलिनी जागृत होते त्यावेळी वर्णसंयोग दूर होऊन ज्याप्रमाणे पैलू पाडलेले रत्न आपल्या मूळच्या खऱ्या तेजाने चमकून उठते त्याप्रमाणे आत्मा स्वतः प्रकाशमान् होतो.

स्वसंवेद्य तत्त्वाच्या वरील सर्व विवेचाने सार महायोगी गोरक्षनाथ व श्रीज्ञानेश्वरमहाराज यांच्या शब्दात सांगावयाचे झाले तर असे म्हणता येईल की —

**अलेष लेषंत अदेष देषंत, अरस परस ते दरस जांणीं ।**
**सुंनि गरजंत बाजंत नाद अलेष लेषंत ते निज प्रवांणीं ॥ गोरखबानी ९१॥**
**मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी । सोऽहंभावाच्या बाह्या पसरूनी ।**
**परमात्मलिंगा धांवोनी । आंगा घडे ॥ ६.३०५॥**

ज्याचे वर्णन लिहिले जाऊ शकत नाही असे परब्रह्म स्वतः पाहून त्याचे वर्णन लिहिणारे, जे पाहिले जाऊ शकत नाही असे आत्मतत्त्व स्वतः पाहणारे, ब्रह्माला स्पर्श करून त्याचे साक्षात् दर्शन करणारे, ब्रह्मरंध्र अनाहत नादाने गर्जना करून दुमदुमविणारे असे योगी साधक स्वतःच्या प्रमाणानेच आपल्या स्वतःच्या अनुभवाने ब्रह्म जाणतात. ज्यावेळी आत्मशक्ती सहस्रारात जाऊन मीच शिव आहे अशा भावाने बाहू पसरून शिवाला आलिंगन देते त्यावेळी ती आपल्या स्वस्वरूपाशी एकरूप होते. मग एक स्वसंवेद्य तत्त्वच राहते.

सारांश, वरील सर्व विवेचनावरून स्वसंवेद्य तत्त्वप्राप्तीत कुंडलिनी शक्तीचे स्थान सर्वांत वरच्या दर्जाचे कसे आहे ते स्पष्ट होऊन " स्वसंवेद्य तत्त्वात " नाथसंकेतीचा दंश कसा दडलेला आहे हे स्पष्ट होईल.

**ज्ञानाग्नीची सिद्धी :—**

अविद्येचा नाश होऊन मोक्षप्राप्ती होण्यासाठी ज्ञानाग्नी सिद्ध होणे नितांत आवश्यक आहे असा नाथसंप्रदायाचा परम सिद्धांत अथवा दंश आहे; कारण ज्ञानाग्नीची सिद्धी झाल्याशिवाय साधक परमधामापर्यंत पोहोचण्याचे आपले उद्दिष्ट दुसऱ्या कोणत्याही उपायाने गाठू शकत नाही. याचा अर्थ असा की, ज्ञानाग्नाची सिद्धी हे आदिनाथप्रवर्तित सिद्धयोगाचे साधन असून त्याशिवाय लक्ष्यप्राप्तीसाठी केलेले अन्य सर्व उपाय निरुपयोगी ठरतात. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अज्ञाननिवृत्तिपूर्वक मोक्षोपलब्धीसाठी ज्ञानाग्निसिद्धीची अपरिहार्य आवश्यकता स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

**वांचूनि ज्ञानेंवीण एकें । उपाय करिसी जितुके ।**
**तिहीं गुंफसि अधिकें । रुखीं इये ॥१५.२४९॥**

म्हणौनि स्वप्नींचिया घाया । ओखद चेवोचि धनंजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ।।२५४।।
तें आत्मज्ञानाचें खांडे । अद्वैत प्रभेंचेनि वाडें ।
नेदील उरों कवणेकडे । भववृक्षासी ।।२६२।।
ऐसा जरी थोरावें । तरी उपायें एकें आंगवे ।
जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग ।।४.२०६।।
तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें । निखळु हा निवटे ।
मग निःशेष खता फिटे । मानसीचा ।।२०७।।
येवढेया लाठेपणाचा उपावो । आनु नाहींचि म्हणे देवो ।
हा सम्यक् ज्ञानाचा रावो । उपायांमाजीं ।।१६.५११।।

ज्ञानखड्ग किंवा ज्ञानशस्त्र म्हणजे ज्ञानाग्नी हाच ब्रह्मप्राप्तीच्या सर्व उपायातील किंवा मार्गातील वलवत्तर उपाय आहे. दुसरा उपाय नाहीच म्हणून सर्व उपायात ज्ञानाग्नीची सिद्धी किंवा यथार्थ ज्ञान हाच उपायांचा राजा आहे. अशी स्थिती असल्यामुळे " एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ।।१८.१२४३ ।। हें इतुलेंचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारी ।।१८.१२४४।।" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानाग्नीच्या सिद्धीची ज्ञानेश्वरींत सविस्तर मांडणी केली आहे. ही मांडणी कशी केली आहे हे पाहताना ज्ञानाग्नी म्हणजे काय?, त्याची सिद्धी कशी होते ?, ज्ञानयज्ञाचे स्वरूप कोणते ?, ज्ञानाची चिन्हे कोणती ?, ज्ञानाची श्रेष्ठता व सामर्थ्य काय आहे ? व ज्ञानाचे फल कोणते ? इतक्या प्रश्नांचा थोडक्यात विचार करावयाचा आहे. तो आपण क्रमशः करू.

ज्ञानाग्नी म्हणजे ज्ञान हाच अग्नी होय. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी गीतेच्या चवथ्या अध्यायातील तिसऱ्या श्लोकातील योग शब्दावर भाष्य करताना " रहस्यं हि यस्मादेतदुत्तमं योग ज्ञानमित्यर्थः।" असे म्हटले आहे. योग म्हणजे ज्ञान हे उत्तम रहस्य आहे हे सांगून ज्ञान व योग हे पर्यायवाची शब्द आहेत हे त्यांनी स्पष्ट केले आहे. त्यामुळे ज्ञानाग्नी म्हणजे योगाग्नी होय हे स्पष्ट होय. अग्नी म्हणजे कुंडलिनी शक्ती होय; कारण महायोगी गोरक्षनाथांनीं " सिद्धसिद्धांतपद्धतीच्या " चतुर्थ उपदेशाच्या सुरुवातीलाच असे म्हटले आहे की " अस्ति काचिदपरम्परा संवित्स्वरूपा सर्वपिंडाधारत्वेन नित्यप्रबुद्धा निजाशक्तिः प्रसिद्धा। अत्यंतनिजप्रकाशस्वसंवेद्यानुभवैकगम्यमान शास्त्रलौकिकसाक्षात्कारसाक्षिणी सा परा चिद्रूपिणी शक्तिर्गीयते ।।४.१।।" येथे शक्तीला नित्यप्रबुद्ध व निजप्रकाशरूप म्हटले आहे. यावरून ती अग्निस्वरूप आहे हे स्पष्टच होते. त्याचप्रमाणे " चितिवन्हिरवरोहपदेच्छन्नोऽपि मात्रया मेयेन्धनं प्लुष्यति ।।१४।।" असे श्रीक्षेमराजांनी " प्रत्यभिज्ञाहृदयांत "स्पष्टच म्हटले आहे. चितिशक्ती कुंडलिनी ही संसाराचा ग्रास करीत असल्यामुळे तिला अग्नी म्हटले जाते असे त्यांनी आवर्जून सांगितले आहे. यावरून ज्ञानाग्नी म्हणजे योगाग्नी

होय व ज्ञानाची किंवा योगाची सिद्धी ही अग्नीमुळे म्हणजे शक्तीमुळे होत असते हे सिद्ध झाले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ज्ञानासी अग्नि मूळ ॥ ८.२१९ ॥" असे जे म्हटले आहे त्याचा अर्थ ज्ञानप्राप्तीसाठी ज्ञानमयी अर्थात् अग्निमयी शक्तीची जागृती हेच मूळ आहे असा स्प्ट होतो. बोधार्क (१३.३८८), ज्ञानदीप (१३.३८९), प्रदीप्त ज्ञानानल (४.१३६,१८.१५२६), ज्ञानप्रकाश (४.१७०) ज्ञानमित्र (१५.५५९), ज्ञानमार्तंड (१६.१६), ज्ञानाग्नीचे उज्जीवन (४.१३२) असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असंख्य वेळा म्हटले आहे. या सर्व ठिकाणी सूर्य, मित्र, मार्तंड, दीप, तेज, प्रकाश इत्यादि शब्दांनी त्यांनी ज्ञानासाठी शक्तीच्या जागृत अवस्थेची कल्पनाच स्पष्ट केली आहे; कारण उपरोक्त सर्व विशेषणे ग्रंथग्रंथांतरी कुंडलिनी शक्तीला लावलेली आढळतात अगर त्या नामांनीच तिचे वर्णन केले जाते. सारांश, ज्ञानाग्नी म्हणजे ज्ञानशक्ती कुंडलिनी होय व तिच्या जागृतीमुळेच साधकाला विश्वभ्रम नाहीसा करणारे सामर्थ्यसंपन्न ज्ञान होते. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

> तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें ।
> ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानीं इये ॥४.१७२॥

या अर्थानेच "सौंदर्यलहरीच्या" टीकेच्या प्रास्ताविकात श्रीस्वामी विष्णुतीर्थमहाराजांनी, "शक्ति ज्ञानाग्निका रूप है जो सब शुभाशुभ कर्मोंको भस्म करके, सब तत्त्वको अपने कारणमें लीन करती हुई, साधकको सर्वकारणभूत परब्रह्ममें लीन कर देती है।" (पृ.२८) असे म्हटले आहे "भावनोपनिषदातही" "कुंडलिनी ज्ञानशक्तिर्गृहम् ।" असे जे म्हटले आहे त्यावरून ज्ञानशक्ती कुंडलिनी हे साधकाचे खरे घर कसे आहे हे स्पष्ट होते व वरील ओवीचा उलगडा होतो. "भारतीय संस्कृति और साधना" या ग्रंथाच्या पहिल्या खंडातील "शक्तिका जागरण" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी यासंबंधी असे म्हटले आहे की, "कुंडलिनी प्रबुद्ध होने पर चित्-शक्ति स्वयं निज-संविद्-रूपमें आत्म-प्रकाश करती है। यह अतिप्रबल अग्निके बराबर है । इसे चिदग्नि कहा जाता है।" यावरून ज्ञानाग्नी म्हणजे कुंडलिनी शक्ती होय व तिची जागृती ज्ञानाग्नीच्या सिद्धीसाठी आवश्यक आहे हे स्पष्ट होते. ही ज्ञानाग्नीची सिद्धी कशी होते हेच आता पाहवयाचे आहे

"सांगेन ज्ञानाचिये भेटी। उपावो तुज ॥४.१८५॥" येथपासून "साधन ज्ञान नानापरी निरूपिलें ॥ १८.१२४३,४४ ॥" येथपर्यंत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या ज्ञानाग्नीच्या सिद्धीचाच म्हणजे सिद्धयोगसाधनांतर्गत कुंडलिनी शक्तीच्या जागृतीचाच "इये आनानें नांवें । परि निरूप्य आन नोहे ॥ १३.९६५ ॥" असे म्हणून प्रपंच केला आहे, हे निभ्रांत सत्य आहे. यादृष्टीने "जें दिठीही न पविजे। तें दिठीविण देखिजे । जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥ ६.३३ ॥" याचा उल-

गडा " पिंडे पिंडाचा ग्रासु " या मुद्यात पाहिला.या ओवीत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी 'जरी अतींद्रिय लाहिजे ज्ञानबळ ' असे शब्द वापरले आहेत. त्याचा अर्थ 'कल्पनातीत शक्ती जागृत झाली तरच ' असा आहे; कारण श्रीक्षेमराजांनी "प्रत्यभिज्ञाहृदयात" " बललाभे विश्वमात्मसात् करोति ।। १५ ।। " असे सूत्रात्मक सांगून त्यावर "चितिरेव देहप्राणाद्याच्छादननिमज्जनेन स्वरूपं उन्मग्नत्वेन स्फारयंति बलम् । एवं च बललाभे उन्मग्नस्वरूपाश्रयणे,क्षित्यादिसदाशिवान्तं विश्वम् आत्मसात् करोति स्वस्वरूपाभेदेन निर्भासयति । यथा वन्हिरुद्बोधितो दाह्यं दहति तथा विषयपाशान् भक्षयेत । " अशी टीका केली आहे.ज्यावेळी साधकाला बळाची प्राप्ती होते त्यावेळी तो समस्त संसार आपल्या स्वस्वरूपाशी एकरूप, एकरस किंवा अभिन्नस्वरूप करतो. चितिशक्ति कुंडलिनी देह, प्राण इत्यादि आवरणांचा नाश करून स्वरूप प्रकट करीत असल्याने तिलाच बळ असे म्हटले जाते. अशा प्रकारे बलप्राप्ती म्हणजे जागृतशक्तीचा आश्रय ग्रहण करूनच साधकयोगी पृथ्वीपासून सदाशिवतत्त्वापर्यंत पसरलेल्या सर्व विश्वाला आत्मसात करतो. म्हणजे ही सर्व तत्त्वे आपल्या स्वरूपाशी अभिन्नरूपाने तो प्रकाशित करतो. ज्याप्रमाणे अग्नी प्रदीप्त झाल्यावर जाळण्यास योग्य असे सर्व पदार्थ जाळतो त्याप्रमाणे जागृतशक्तीच्या आधाराने साधकाने सर्व विषयरूपी पाश जाळून भस्म केले पाहिजेत.

" मुंडकोपनिषदात " तर " नायमात्मा बलहिनेन लभ्य: । " असे म्हणून एकमात्र शक्ती जागृत झाली तरच आतमलाभ होतो, इतर कशानेही होत नाही हे सांगताना असे म्हटले आहे की–

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ।**
**यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम् ।।३.२.३।।**
**नायमात्मा बलहीनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाऽप्यलिंगात् ।**
**एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्मधाम ।।३.२.४।।**

याचा अर्थ प्रवचनाने, वेदशास्त्राध्ययनाने, धारणाशक्तीने, बुद्धीने, पुष्कळ श्रवणाने, बलहीनत्वाने व लिंगरहित तपाने आत्मा प्राप्त होत नाही. हे सर्व उपाय-निरर्थक ठरतात. यासाठी बल व लिंग म्हणजे जागृत शक्तीचीच आवश्यकता आहे. ज्याची शक्ती जागृत झाली आहे त्या साधकाच्या ठिकाणी आत्मा आपले स्वरूप प्रकट करतो. अशी ज्ञानाग्नीच्या सिद्धीची म्हणजे शक्तिजागृतीची आवश्यकता असल्यामुळे ती कशी होते ते पाहू.

श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात की, ज्ञानाग्नीची सिद्धी गुरुकृपेनेच होते. ज्यावेळी सद्गुरू कृपा करतात त्याचवेळी ज्ञानप्रकाशाचा म्हणजे ज्ञानाग्नीचा अर्थात् कुंडलिनी शक्तीचा उदय होऊ साधकाचा मोहांधकार नष्ट होतो.

ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तैं मोहांधकारु जाईल ।
जैं गुरुकृपा होईल । पार्था गा ।।४.१७०।।
ते आतां वाक्यसूर्यकर तुझे फांकले । आणि ॠषीं मार्ग होते जे कथिले ।
तयां आघवियांचेचि फिटलें । अनोळखपण ।।१०.१६३।।
जीं ज्ञानाचें बीज तयांचे बोल । माझीं हृदयभूमिके पडिले सखोल ।
वरि इये कृपेची जाहाली वोल । म्हणौनि संवाद फळेंशीं उठले ।।१६४।।

ज्ञानप्रकाशाचा उदय होण्यासाठी व ज्ञानाचे बीज प्राप्त होण्यासाठी एकमात्र गुरुकृपेची वोलच हवी. हे काम वाक्यसूर्यकराने म्हणजे शब्दद्वारा होणाऱ्या शक्तिपातदीक्षेनें होते. ज्ञान हे कोठून बाहेरून प्राप्त व्हावयाचे नसते. ज्ञानाची देवता कुंडलिनी शक्ती मूलाधारात निद्रिस्त असल्यामुळे " ज्ञानप्रकाशें पाहेल" हे घडून येत नाही. ही ज्ञानशक्ती कुंडलिनी श्रीगुरुकृपेने जागृत झाली की, साधकाच्या ठिकाणी मीच ब्रह्म आहे या ज्ञानाचे स्फुरण होते व तो मुक्त होतो. ज्यावेळी सद्गुरू शक्तिपातयोगाची दीक्षा देऊन शिष्यावर कृपा करतात तेव्हा ज्ञानाग्नी सिद्ध होतो. या दृष्टीनेंच कुलार्णवतंत्रात असे म्हटले आहे की–

उपासना शतेनापि यां विना नैव सिद्धयति ।
तां दीक्षामाश्रयेद् यत्नात् श्रीगुरोर्मंत्रसिद्धये ।।१४.८८।।
रसेंद्रेण यथा विद्धमयः सुवर्णतां व्रजेत् ।
दीक्षाविद्धस्तथा ह्यात्मा शिवत्वं लभते प्रिये ।।८९।।
दीक्षाग्निदग्धकर्मासौ मायाविच्छिन्नबंधनः ।
गतः परां ज्ञानकाष्ठां निर्बीजस्तु शिवो भवेत् ।।९०।।

साधकाने शेकडोशे प्रकारच्या उपासना केल्या तरी त्या दीक्षेशिवाय म्हणजे श्रीगुरुकृपेशिवाय सिद्ध किंवा फलित होत नाहीत. याकरिता गुरुमंत्राच्या सिद्धीसाठी साधकाने प्रयत्नपूर्वक शक्तिपातयोगदीक्षा घ्यावी. रासायनिक क्रियेच्या संयोगाने पारा ज्याप्रमाणे लोखंडासारख्या निकृष्ट धातूवर परिणाम करून त्याचे सुवर्ण करतो त्याप्रमाणे साधक निकृष्ट असला तरी त्याच्यावर दीक्षासंस्कार झाल्यावर तो शिवरूप होतो. या शक्तिपातयोगदीक्षेनेच खरा ज्ञानाग्नी प्रदीप्त होतो व तो सर्व कर्मसमूह दग्ध करून टाकतो. कर्मबीज जळून गेल्याने मायेचे बंधनहीं तुटून जाते. त्यामुळे साधकाला ज्ञानाची पराकाष्ठा म्हणजे निर्बीज समाधी प्राप्त होऊन तो शिवरूप होतो. " योगशिखोनिषदातही " ह्या शक्तीपासूनच ज्ञानाग्नी उत्पन्न होतो हे सांगताना असे म्हटले आहे की–

यत्र कुंडलिनी नाम पराशक्तिः प्रतिष्ठिता ।
यस्मादुत्पद्यते वायुर्यस्माद्वन्हिः प्रवर्तते ।।५.६।।

मूलाधारात कुंडलिनी नावाची पराशक्ती प्रतिष्ठित आहे. तिच्यापासूनच प्राणवायू व अग्नी उत्पन्न होतात. अशा प्रकारे ही शक्ती चैतन्ययुक्त व ज्ञानस्वरूप असल्याने ती जागृत झाल्याबरोबर ज्ञानाग्नी सिद्ध होतो. यासाठी शक्ती जागृत होणे नितांत आवश्यक आहे. " घेरंडसंहितेच्या तृतीय उपदेशात " व " योगशिखोपनिषदात " असे म्हटले आहे की—

**मूलाधारे आत्मशक्तिः कुंडलिनी परदेवता ।**
**शयिता भुजगाकारा सार्धं त्रिवलयान्विता: ।।३.४९।। घे.सं.।।**
**यावत् सा निद्रिता देहे तावज्जीवः पशुर्यथा ।**
**ज्ञानं न जायते तावत् कोटियोगं समभ्यसेत् ।।५०।।**
**आधार शक्ति निद्रायां विश्वं भवति निद्रया ।।६.२३।।यो.शि ।।**
**तस्यां शक्तिप्रबोधेन त्रैलोक्यं प्रतिबुध्यते ।।२४।।**

मूलाधारामध्ये आत्मशक्तिस्वरूप कुंडलिनी नावाची सर्वश्रेष्ठ देवता साडेतीन वेढे घालून एखाद्या सापाने वेटोळे घालून झोपावे त्याप्रमाणे झोपलेली आहे. जोपर्यंत ही शक्ती निद्रिस्त असते तोपर्यंत सर्व जीव पशुप्रमाणे अज्ञानामध्ये गुरफटून गेलेले असतात. त्यामुळे साधकाने कर्म, ज्ञान, भक्ती, यंत्र, मंत्र, तंत्र इत्यादि कोटी कोटी योगांचा कसाही व कितीही अभ्यास केला तरी जोपर्यंत कुंडलिनी शक्ती जागृत होत नाही तोपर्यंत त्याला ज्ञान होऊ शकत नाही. याचे खरे कारण असे आहे की, ही आधाररूपी ज्ञानशक्ती झोपली की, सर्व ब्रह्मांड झोपल्यासारखेच असते. मात्र ही ज्ञानशक्ती जेव्हा जागृत होते तेव्हा सर्व त्रैलोक्य जागृत होते. यासाठी कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय म्हणजे ज्ञानाग्नी सिद्ध झाल्याशिवाय खरे ज्ञान होऊ शकत नाही. त्यामुळे ज्ञानप्राप्तीसाठी इतर कोणतेही प्रयत्न केले व नानाविध साधनांचा अवलंब केला तरी तो सर्व खटाटोप व्यर्थ व निष्फल ठरतो. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी हाच भावार्थ " परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् । यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ।। १४.१ ।। " या गीताश्लोकावरील आपल्या विवेचनात स्पष्ट केला आहे. ते म्हणतात—

**अगा याचि कारणें । हें उत्तम सर्वांपरी मी म्हणें ।**
**जे वन्हि हें तृणें । येरें ज्ञानें ।।१४.४३।।**
**कां उदितें रश्मिराजें । लोपिलीं चंद्रादि तेजें ।**
**नाना प्रळयांबुमाजें । नदी नद ।।४६।।**
**तेंसें येणें पाहलेया । ज्ञानजात जाय लया ।**
**म्हणौनियां धनंजया । उत्तम हें ।।४७।।**

जे ज्ञान वन्हीयुक्त आहे किंवा जे स्वतः अग्नीच आहे अशा ब्रह्मज्ञानापुढे तर ज्ञाने ही तृणासारखी तुच्छ असल्याने ज्ञानाग्नीचे म्हणजे जागृतशक्तीचेच

साधन सर्वात उत्तम व श्रेष्ठ होय. सूर्य उगवल्यावर ज्याप्रमाणे चंद्रादि नक्षत्रांचे तेज लोपून जाते किंवा प्रलयकाळाचे पाणी वाढल्यावर नदी–नद हा भेद उरत नाही त्याप्रमाणे ज्ञानाग्नीचा म्हणजे आत्मशक्ती कुंडलिनीचा उदय झाला असता इतर सर्व ज्ञाने म्हणजे साधनमार्ग लय पावतात, म्हणून ज्ञानाग्नीची सिद्ध ही सर्वोत्तम सिद्धी होय. या अर्थानेच " जो भेटलियासवें । पुरती उपायांचे धावे । प्रवृत्तिगंगा स्थिरावे । सागरीं जिये ।। २.८ ।। " असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अमृतानुभवात" म्हटले आहे.

सारांश, " तें ज्ञान पैं गा बरवें । जरी मनीं आथि आणावें । तरी संता या भजावें । सर्वस्वेंसीं ।। ४.१६४ ।। " व " तैसीच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली । तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ।। ७.१३१ ।।" हाच ज्ञानाग्नीच्या सिद्धीचा महासिद्धांत आहे.

अशा प्रकारे ज्ञानाग्नीची सिद्धी झाल्यावर ज्ञानयज्ञ कसा घडतो किंवा या ज्ञानयज्ञाचे स्वरूप काय आहे हे आता पाहवयाचे आहे. गीतेच्या चवथ्या अध्यायात चोवीसाव्या श्लोकापासून एकतीसाव्या श्लोकापर्यंत द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, वाग्यज्ञ, ज्ञानयज्ञ, प्राणायामयज्ञ, प्राणाप्राणयज्ञ, कर्मयज्ञ, दैवयज्ञ, निग्रहयज्ञ, विचारयज्ञ, मंत्रयज्ञ इत्यादि अनेक यज्ञ वेदाने बऱ्याच विस्तारानें चांगले वर्णन करून सांगितलेले आहेत असे भगवंतानी सांगून " सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ।। ४.३३ ।। " असे म्हटले आहे. ज्ञानाग्निशिवाय सर्व कर्मे सहजतेने निःशेषपणे जाळण्याचे सामर्थ्य इतर कोणातही असत नाही; मात्र जागृत शक्तीमुळे हे कार्य सहजतेने व आपोआप होत असल्याने त्याचे हे अनन्यसाधारण स्वरूप वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

ते द्रव्यादियागु कीर होती । परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती ।
जैशी तारातेजसंपत्ती । दिनकरापाशीं ।।४.१५८।।
देखैं परमात्मसुखनिधान । साधावया योगीजन ।
जे न विसंबिती अंजन । उन्मेषनेत्रीं ।।१५९।।
जें धांवतया कर्माची लाणी । नैष्कर्म्यबोधाची खाणी ।
जें भुकेलिया धणी । साधनाची ।।१६०।।
जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली । तर्काची दिठी गेली ।
जेणे इंद्रियें विसरलीं । विषयसंगु ।।१६१।।
मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचें बोलकेंपण ठेलें ।
जयामाजि सांपडलें । ज्ञेय दिसे ।।१६२।।
जेथ वैराग्याचा पांगु फिटे । विवेकाचाही सोसु तुटे ।
जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ।।१६३।।

असे हे ज्ञानाग्नीच्या यज्ञाचे सहजस्वरूप आहे. हा यज्ञ साधावा व परमात्म-रूपी सुखाचा ठेवा प्राप्त व्हावा म्हणन साधक योगी सद्‌गुरूंकडून शक्तिपातयोगदीक्षा प्राप्त करून शक्तिसंक्रमणाने आपली चित्‌शक्तिस्वरूप आत्मसत्ता जागृत करतात. "जे न विसंविती अंजन । उन्मेषनेत्रीं ॥" याचा अर्थ हाच आहे हे आपण मागे पाहिलेच आहे. एकदा शक्ती जागृत झाली की, या यज्ञाला सुरुवात होते. मग प्रवृत्ती पांगुळ होणे, तर्क संपणे, इंद्रिये विषयसेवन करण्याचे विसरणे, मनाचे मनपण जाणे, शब्दाची धाव संपणे, वैराग्याची उणीव नाहीशी होणे, विचारांची हाव संपणे आणि पाहण्याच्या श्रमावाचून आपल्या आत्मस्वरूपाची सहज भेट होणे या सर्व क्रिया आपोआप जागृत शक्तीकडून घडतात. साधकाला स्वतःला यात कसलेही श्रम पडत नाहीत. असा हा सहजयज्ञ आहे. या यज्ञानालाच अधियज्ञ असे नाव आहे, असे सांगून तो कसा घडतो हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतेच्या आठव्या अध्यायातील "अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥८.४॥" या श्लोकाचा भावार्थ सांगताना स्पष्ट केले आहे. ते म्हणतात—

तेवींचि अहंभावो जाये । तरी ऐक्य तें आधींचि आहे ।
हेंचि साचें जेथ होये । तो अधियज्ञु मी ॥८.४५॥
पैं गा आम्हीं तुज । सकळ यज्ञ कर्मज ।
सांगितलें कां जें काज । मनीं धरूनि ॥४६॥
तो हा सकळ जीवांचा विसांवा । नैष्कर्म्य सुखाचा ठेवा ।
परि उघड करूनि पांडवा । दाविजत असे ॥४७॥
पहिलिया वैराग्यइंधन परिपूर्तीं । इंद्रियानळीं प्रदीप्तीं ।
विषयद्रव्यांचिया आहुती । देऊनियां ॥४८॥
मग वज्रासन तेच उर्वी । शोधूनि आधारमुद्रा बरवी ।
वेदिका रचे मांडवीं । शरीराच्या ॥४९॥
तेथ संयमाग्नीचीं कुंडें । इंद्रियद्रव्याचेनि पवाडें ।
यजिजति उदंडे । युक्तिघोषें ॥५०॥
मग मनप्राणसंयमु । हाचि हवनसंपदेचा संभ्रमु ।
येणें संतोषविजे निर्धूमु । ज्ञानानळु ॥५१॥
ऐसेनि हें सकळ ज्ञानीं समर्पे । मग ज्ञान तें ज्ञेयीं हारपे ।
पाठीं ज्ञेयचि स्वरूपें । निखिल उरे ॥५२॥

असे हे श्रीगुरुकृपेने जागृत होणाऱ्या निर्धूम ज्ञानाग्नीच्या यज्ञाचे अपूर्व स्वरूप आहे. जन्मजन्मांतरीच्या तपश्चर्येने जेव्हा " वेधदीक्षाकरो लोके श्रीगुरुर्दुर्लभः प्रिये । शिष्योऽपि दुर्लभस्तादृक् पुण्ययोगेन लभ्यते १४.६५॥" अशी "कुलार्णव-तंत्रात" म्हटल्याप्रमाणे शिष्याची गुरूशी गाठ पडते तेव्हा हा यज्ञ प्रतिफलित होऊन

अनुभवगम्य होतो. एरवी ही गोष्ट रहस्य किंवा दंशाच्या अवगुंठनात लपून राहते. मुकिया बहिरयाची गोष्ट होते. " जैसा वायसीं चंद्र नोळखिजे । तैसा प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे ।। ६.२९ ।। " असेच घडते. " परि लोकु दाक्‌चातुर्यें । होईल सुखिया ।।१८.१७५०।।" असे होऊन विद्वान् लोक अनुभूतिशून्य चर्चेत लोकांना भुलवून वडवून टाकतात. या दृष्टीने "भारतीय संस्कृति और साधना" या ग्रंथाच्या पहिल्या खंडातील " यज्ञ का रहस्य" या लेखातील पुढील मजकूर वाचला म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्ञानानळूच्या प्रदीप्तिद्वारा जो नाथसंकेतीचा दंश ज्ञानेश्वरीत सांगण्यास गुर्वाज्ञेने बद्धपरिकर झाले आहेत त्याचा उलगडा होईल. उपरोक्त ग्रंथात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, "सकाम कर्मकांडियो और साधारण जनताको यज्ञके स्वरूप और उद्देश्यके संबंधमे चाहे जो भी धारणा हो, निष्कामभावसे अनुष्ठित यज्ञका तात्पर्य उससे अधिक गंभीर है । " सर्वं वेद्यं हव्यम्, इंद्रियाणि स्रुचः, शक्तयो ज्वालाः, स्वात्मा शिवः पावकः, स्वयमेव होता ।" ( परशुरामकल्पसूत्र १।२६ ) इस विश्वहोमका या सर्वत्यागका वर्णनही आगेके पद्यमें किसी एक महापुरुषने किया है–

**अंतः प्रभास्वति निरंतरमेधमाने मोहांधकारपरिपंथिनि संविदग्नौ ।**
**कस्मिंश्चिदद्‌भुतमरीचिविकासभूम्नि विश्वं जुहोमि वसुधादिशिवावसानम् ।।**

अर्थात्, पृथ्वी तत्त्वसे शिवतत्त्वपर्यंत ३६ तत्त्व और उनसे विरचित संपूर्ण विश्वकी मैं संविद्-अग्निमें-विशुद्ध महाचैतन्यरूप अग्निमें-आहुति देता हूँ । महांधकारका विनाश करनेवाले और अलौकिक किरणोंको फैलानेवाले ये अग्निदेव निरंतर हृदयमें प्रदीप्त हो रहे हैं । जो महान् अग्निदेव शिवतत्त्वको निगल सकते हैं, वे तत्त्वातीत अखंड प्रकाश हैं, इसमे संदेहही क्या है ?

पंचकोशभेदकी दृष्टिसे अथवा सुषुम्णाकी अंतर्वाहिनी ऊर्ध्वंगतिकी दृष्टिसे एकही अद्वितीय लक्ष्य अध्यात्ममार्गके भाग्यवान् पथिकके सामने प्रकट होता है । निष्काम कर्मरूप यज्ञका गूढतम आदर्श आत्मत्याग है । आत्मसाक्षात्कारके साथ-साथ स्वस्वरूपमें स्थितिही आत्मयागका चरम फल है । यज्ञके आदर्शभूत उत्कर्षका इस परम लाभकी ( यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । ) दृष्टिसेही सुधी लोगोंने निर्णय किया है ।

**यत्रेंधनं द्वैतवनं मृत्युरेव महापशुः ।।**
**अलौकिकेन यज्ञेन तेन नित्यं यजामहे ।।** (भट्ट श्रीवीरवामनक)

किंतु, जबतक परम सौभाग्य उदित नहीं होता, तबतक किसीकी भी यज्ञके इस महान् लक्ष्यकी ओर दृष्टि नहीं पडती । जो इस दृष्टिको प्राप्त होकर यज्ञका अनुष्ठान करते हैं, वे कहते हैं–

द्वैतवन जिसमें इंधन है, मृत्युही जिसमें महापशु है, ऐसे अलौकिक यज्ञको, जो अति उच्च आदर्श है, समझनेमें क्लेश नहीं होता । आचार्य अभिनवगुप्तने कहा

हैं की जिनका यही अंतिम जन्म हों और जिनके ऊपर चित्-शक्ति सुप्रसन्न हों, एकमात्र ऐसे विरले महात्माके हृदयमेंही ऐसे रहस्यमय यज्ञका स्वरूप प्रतिफलित होता है। वह जन-साधारणका बुद्धिगम्य नहीं है—

एष यागविधि: कोऽपि कस्यापि हृदि वर्तते।
यस्य प्रसीदेच्चिच्चक्रं द्रागपश्चिमजन्मन: ॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांना ज्ञानयज्ञाचे हेच अलौकिक, दिव्य व असाधारण स्वरूप अभिप्रेत आहे असे त्यांनी "ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते। एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥९.१५॥" या गीतेच्या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना दाखविले आहे. ते म्हणतात—

तरी ज्ञानयज्ञु तो एवं रूपु। जेथ आदिसंकल्पु हा यूपु।
महाभूतें मंडपु। भेदु तो पशु ॥९.२३९॥
मग पांचांचे जे विशेष गुण। अथवा इंद्रियें आणि प्राण।
हेचि यज्ञोपचारभरण। अज्ञान घृत ॥२४०॥
तेथ मनबुद्धिचिया कुंडा—। आंतु ज्ञानाग्नि धडफुडा।
साम्य तेचि सुहाडा। वेदिका जाणें ॥२४१॥
सविवेकमतिपाटव। तेचि मंत्रविद्यागौरव।
शांति स्रुक्स्रुव। जीवु यज्वा ॥२४२॥
तो प्रतीतीचेनि पात्रें। विवेक महामंत्रें।
ज्ञानाग्निहोत्रें। भेदु नाशी ॥२४३॥
तेथ अज्ञान सरोनि जाये। आणि यजिता यजन हें ठाये।
आत्मसमरसीं न्हाये। अवभृथीं जेव्हां ॥२४४॥
तेव्हां भूतें विषय करणें। हें वेगळालें कांहीं न म्हणे।
आघवें एकचि ऐसें जाणें। आत्मबुद्धि ॥२४५॥
जैसा चेइला तो अर्जुना। म्हणे स्वप्नींची हे विचित्र सेना।
मीचि जाहालों होतों ना। निद्रावशें ? ॥२४६॥
आतां सेना ते सेना नव्हे। हें मीचि एक आघवें।
ऐसें एकत्वें मानवें। विश्व तयां ॥२४७॥
मग तो जीवु हे भाव सरे। आब्रह्मपरमात्मबोधें भरे।
ऐसी भजती ज्ञानाध्वरें। एकत्वें येणें ॥२४८॥

ज्ञानयज्ञाचे हेच खरे स्वरूप आहे. या यज्ञात जीवाचे जीवपण संपून तो शिवरूप होतो. जेव्हा प्राण सहस्रारात जाऊन शिवशक्तीचे मीलन होते तेव्हाच हा यज्ञ समाप्त होतो. हेच जीवाचे आत्मसमरसी अवभृती न्हाणे होय. एवढेच नव्हे तर अशा प्रकारचा ज्ञानयज्ञ हेच खरे भजन होय. जीवाला परमात्मबोधाने आब्रह्म भरून

जाण्यासाठी अशा प्रकारच्या ज्ञानाध्वरद्वारा भजन करण्याशिवाय दुसरा उपाय नाही. हा सर्व विचार ध्यानात घेतला म्हणजे "यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात् कुरुतेऽर्जुन । ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ॥४.३७॥" या गीतेच्या वचनाचा उलगडा होईल. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी व्यतिरेक पद्धतीने उपरोक्त गीताश्लोकाचा दोनच ओव्यात जो भावार्थ स्पष्ट केला आहे तो अन्वयात्मक पद्धतीने जाणला म्हणजे त्यात उपरोक्त सर्व विवेचनाचे सार साठविले आहे हे लक्षात येईल व "तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें । ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानीं इये ॥४.१७२॥" याची अनुभूती येईल. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

सांगै भुवनत्रयाची काजळी । जे गगनामाजि उधवली ।
तिये प्रळयींचे वाहटुळी । काय अभ्र पुरे ? ॥४.१७५॥
कीं पवनाचेनि कोपें । पाणियेंचि जो पळिपे ।
तो प्रळयानळु दडपे । तृणें काष्ठें काई ?॥१७६॥

"कूर्मपुराणात" सिद्धयोग साधनप्राप्त ज्ञानाग्नीच्या सिद्धीची स्तुती करताना अगदी असेच म्हटले आहे.

योगाग्निर्दहते क्षिप्रमशेषं पापपंजरम् ।
प्रसन्नं जायते ज्ञानं साक्षान्निर्वाण सिद्धिदम् ॥उत्तरार्ध. अ.११॥

सिद्धयोगाने प्रदीप्त झालेल्या जागृत शक्तीच्या अग्नीत लवकरात लवकर सर्व पापांचा समूह जळून नाश पावतो व त्यामुळे मोक्ष प्राप्त करून देणारे निर्मल ज्ञान प्रकट होते.

अशा प्रकारे ज्ञानयज्ञाची सिद्धी झाल्यावर जी ज्ञानाची लक्षणे साधकाच्या ठिकाणी प्रकट होतात त्यांचे गीतेच्या आधाराने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तेराव्या अध्यायात अमानित्व, अदंभित्व, अहिंसा, शांती, आर्जव, गुरुभक्ती, शुचित्व, स्थैर्य, अंतःकरणनिग्रह, वैराग्य, अनंहकार, जन्ममृत्युजराव्याधी, दुःख व दोष यांचे अनुदर्शन, आसक्ती, समचित्तत्व, अव्यभिचारी भक्ती, एकांतप्रियता, अध्यात्मज्ञाननित्यत्व व तत्त्वज्ञानार्थदर्शन यांचा भावार्थ सविस्तारपणे सांगून स्पष्टीकरण केले आहे. मात्र ही सर्व लक्षणे एकमात्र राजपंथामुळे किंवा पंथराजामुळे साधकाच्या ठिकाणी प्रकट होतात हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात—

भंगलिये वाटे । शोधूनियां अव्हांटे ।
निघिजे जेवीं नीटें । राजपंथें ॥१३.६१९॥
तैसें ज्ञानजातां करी । आघवेचि एकीकडे सारी ।
मग मन बुद्धि मोहरी । अध्यात्मज्ञानीं ॥६२०॥
तयाचिया ठायीं ज्ञान । या बोला नाहीं आन ।
जें ज्ञानीं बैसलें मन । तेव्हांचि तें तो मी ॥६२३॥

शेवटी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानाग्नीचे सामर्थ्य व श्रेष्ठताही ज्ञानेश्वरीत अनेकवेळा कशी व्यक्त केली आहे ते पाहू. या दृष्टीने ते म्हणतात–

जरी कल्मषाचा आगरु। तूं भ्रांतीचा सागरु।
व्यामोहाचा डोंगरु। होऊनी अससी ॥४.१७१॥
तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें। हें आघवेंचि गा थोकडें।
ऐसे सामर्थ्य असे चोखडें। ज्ञानीं इये ॥१७२॥
देखें विश्वभ्रमाऐसा। जो अमूर्ताचा कडवसा।
तो जयाचिया प्रकाशा। पुरेचिना ॥१७३॥
तया कायसे हे मनोमळु। हें बोलतांचि अति किडाळु।
नाहीं येणें पाडें ढिसाळु। दुजें जगीं ॥१७४॥

जागृत शक्ती सर्व पाप खाऊन टाकते. साधक जरी पातकांचे आगर, भ्रांतीचा सागर किंवा भ्रमाचा पर्वत असला तरी ज्ञानाग्नीपुढे म्हणजे जागृतशक्तीच्या सामर्थ्यापुढे या सर्व गोष्टी अगदी किरकोळ व तुच्छ ठरतात. विश्वभ्रम व मनोमल यांनाही ही शक्ती अशी खाऊन टाकून साधकाच्या अज्ञानाची निवृत्ती करते. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तें अज्ञान जें समूळ तुटे। तैं भ्रांतींचें मसैरें फिटे।
मग अकर्तृत्व प्रकटे। मज ईश्वराचें ॥५.८३॥
नाना सूर्याचा प्रकाशु। लाहे जेवीं डोळसु।
तेवीं ज्ञानेंचि सौरसु। मोक्षाचा तो ॥१५.३२॥
चेइलिया आपुलें ज्ञान। जैसें नाहींची होय स्वप्न।
तैसें स्फुरतें त्रिभुवन। वावो जालें ॥१५.५६०॥

हे भ्रांतीचे मसैरे फिटून 'स्फुरतें त्रिभुवन चेइलिया ज्ञाने' म्हणजे जागृत शक्तीच्या अग्नीने वावो होते, हे कसे घडते हे सांगताना "तांत्रिक वाङ्मयमें शाक्त-दृष्टि" या पुस्तकातील "देह और कर्म" या निबंधात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, "यह जो ज्ञान प्रदानकी बात कही गई है, इसके साथ कुंडलिनी शक्तिके प्रबोधनका घनिष्ठ संबंध है। सद्गुरु साधकमें शक्तिपातके समय ठीक उतनी मात्रामें शक्तिका संचार करते हैं, जिससे उसकी कुंडलिनी शक्ति उद्बुद्ध होकर ऊर्ध्वगतिका अवलंबन करती हुई अग्रसर होनेमें समर्थ हो। जो अशुद्ध वासनाएँ साधकके अंदर निहित ज्ञानशक्तिको आच्छन्न कर रखती हैं वे गुरुकृपासे कुंडलिनीके जागरणके साथ-साथ जल जाती है। इससे साधककी अंतरात्मा शुद्ध होकर गुरुदत्त चिन्मय शक्तिस्वरूप इष्टका आकार धारण करती है। यह क्रमसे होता है। इससे साधककी दीक्षाके उपरान्त उसके यथाविधि किये गये निजकर्मोंके प्रभावसे प्रबुद्ध कुंडलिनी शक्ति बढ़कर क्रमशः चैतन्यरूपमें अपना विस्तार करती है एवं धीरे-धीरे

समस्त देह, इंद्रिय, मन आदिको चिन्मयत्व प्रदान करती हैं। अशुद्ध वासनाओंको हटानाही चित्‌शक्तिका काम है। इस कार्यके संपन्न हाते-होते अपने साथ अभिन्न-रूपसे इष्टस्वरूप क्रमशः अभिव्यक्त होता रहता हैं। किंतु वह साधकके दृष्टिगोचर नहीं होता। क्योंकि अशुद्ध वासनाका कुछ भी अवशेष विद्यमान रहनेतक शुद्ध वस्तुका साक्षात्कार नहीं हो सकता। पक्षांतरमें यह भी सत्य है कि अशुद्ध सत्ता यदि किंचित्‌मात्रामें न रहे तो देह इंद्रिय आदिको अपने रूपमें सुरक्षित रखना असंभव है। इस शोधनकार्यके पूर्ण होनेपर मलिन वासनाएँ क्षीण हो जाती हैं। तदुपरान्त वह एकदम नहीं रहती। तभी निर्विकल्प ज्ञानका उदय होता है एवं साथ ही साथ देहपात हो जाता है। निर्विकल्प ज्ञानके उदयका तात्पर्य यह है कि साधक तव वासनानिर्मुक्त होकर अपने इष्टके साथ अभिन्नरूपमें देखता है। यही एक प्रकारसे उसका इष्ट दर्शन है एवं अन्य पहलूसे देखा जाय तो यही उसका आत्मदर्शन है।''

असे हे " ज्ञानवन्ही प्रकटे। तेणें दृश्य केर आटे। तदाकारें मूळ तुटे। भिन्नत्वाचें ॥ ५.६.५० ॥ असे श्रीसमर्थांनी "दासबोधात" म्हटल्याप्रमाणे ज्ञानाग्नीचे अद्‌भुत सामर्थ्य आहे. त्या सामर्थ्यातच ज्ञानाग्नीचे फल समाविष्ट आहे. पुढे अकराव्या प्रकरणात नैष्कर्म्यसिद्धीपासून अज्ञाननिवृत्तिपर्यंतच्या सर्वच फलांची सविस्तर चर्चा केलेली असल्यामुळे येथे त्याची पुनरुक्ती करीत नाही.

सारांश, नाथसंप्रदायाच्या दंशातील ज्ञानाग्नीच्या सिद्धीचे स्वरूप असे आहे. श्रीकृष्णनाथांनी ते दंशात्मक पद्धतीने मुळात गीतेतच सांगितलेले असून त्याचा कळीकाळाने ग्रासणाऱ्या जीवांना परमानंदासाठी लाभ व्हावा म्हणून श्रीगुर्वाज्ञेने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उलगडा केला आहे. श्रीज्ञाननाथ हे श्रीकृष्णनाथच असल्या-मुळे हा उलगडा झाला आहे हे नितांत सत्य होय.

### दानप्रक्रियेचे अलौकिकत्व :–

" सर्वेषां एव दानानां ब्रह्मदानं विशिष्यते ॥" असे म्हणून ज्या ज्ञानदानाची महती शास्त्रकारांनी गायिली आहे ती ज्ञानदानप्रक्रिया नाथसंप्रदायाच्या दंशाचा दंश असल्याने ज्ञानेश्वरीत तिचे अवतरण कसे झाले आहे हे आता पाहवयाचे आहे. ज्ञानदानाची प्रत्यक्ष प्रक्रिया कशी घडते याचे सविस्तर वर्णन पुढे आठव्या प्रकरणात केले आहे. येथे फक्त या प्रक्रियेच्या अलौकिकत्वाचा, अपूर्वतेचा व श्रेष्ठतेचा विचार मांडला आहे. या दृष्टीने ज्ञानदान म्हणजे काय ? आणि पात्रापात्रविचार, अनुभूती व शरणागती यांमध्ये या ज्ञानदानाचे अलौकिकत्व कसे साठविले आहे अगर या गोष्टींमुळेच ज्ञानदान हे अलौकिक कसे ठरले आहे ? याचा विचार करावयाचा आहे.

" तया नांव जाण दान। जें मोक्षनिधानाचें अंजन ॥१६.८८॥" असे म्हणून श्रीसद्‌गुरू मोक्षाचा ठेवा उपलब्ध करून देणारे जे अंजन म्हणजे शक्तिपातयोगदीक्षा शिष्याला देतात त्यालाच दान असे म्हणतात असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट

म्हटले आहे. "ऋते ज्ञानान्न मुक्तिः।" असा सिद्धांत असल्यामुळे मोक्षप्राप्तीसाठी श्रीसद्गुरूंकडून ज्ञानदान हे झालेच पाहिजे. सामान्य माणसाला असे वाटते की, ज्ञान ही काही एखादी वस्तू थोडीच आहे की ती काढून देता येईल? अशी सार्वत्रिक समजूत असल्यामुळे जे नुसता वाचेने वेदान्त सांगतात ते "शक्तिपातेनसंयुक्ता विद्या वेदान्तवाक्यजा। यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः ॥४.३५.२६॥" ही "सूतसंहिताकारांनी" सांगितलेली खरी युक्ती कधीच जाणत नाहीत. त्यामुळे एखादा मंत्र कानात फुंकला व "तू ब्रह्म आहेस," असे नुसते वाचेने शिष्याला सांगितले म्हणजे आपले व शिष्याचे काम झाले असे सामान्य गुरूला वाटते. वास्तविक "कुलार्णवतंत्रात" म्हटल्याप्रमाणे "गुरोर्यस्यैव संस्पर्शात परानंदोऽभिजायते। गुरुं तमेव वृणुयान्नापरं मतिमान्नरः ॥१३.११०॥" या न्यायाने आपल्या नुसत्या स्पर्शाने जो शिष्याच्या देहात ज्ञान संक्रांत करून परमानंदाची अनुभूती देऊ शकतो तोच सद्गुरू होय. याशिवाय जे होत ते गुरूच नव्हेत. ते नुसते वाचीवीर होत; कारण अशांना परंपरेने ज्ञानाचे दान मिळालेले नसते व त्यामुळे ते देण्याचेही सामर्थ्य त्यांच्यापाशी नसते. असा अपरंपरायुक्त म्हणजे शक्तिपाताने ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य नसलेला गुरू शिष्याच्या कानीकपाळी वेदान्त व त्यातील महावाक्ये शेकडोशेवेळा जरी रात्रंदिवस ओरडला तरी त्याचा काहीही उपयोग कालत्रयीही होत नाही. याचा अर्थच असा आहे की, नुसत्या व्याख्यानबाजीने बडबडण्याने, प्रवचनाने अगर मनाला येईल तसे वाटेल ते अर्थ करून लेख लिहिण्याने काहीही होणार नाही. साखर गोड असते असे लक्षावधी वेळा नुसते सांगितले तरी जोपर्यंत सांगणारा ती ऐकणाऱ्याला प्रत्यक्ष खावयास देऊन गोडीची अनुभूती देत नाही तोपर्यंत सांगण्याचा सर्व खटाटोप व्यर्थ जातो. अगदी तसेच येथे आहे. ज्ञान नुसते सांगून होत नाही. त्यासाठी ज्ञानदानाची प्रक्रियाच घडून येणे आवश्यक असते. ही प्रक्रिया केवळ एकमात्र शक्तिपातयोगदीक्षेनेच घडून येते. अन्य कशानेही ज्ञानदान होऊ शकत नाही. यादृष्टीनेच "महायोग विज्ञान" या ग्रंथातील "अष्टम प्रकाशात" श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी असे म्हटले आहे की, "तुम लोग समझते होंगे कि ज्ञान देनेकी चीज नही है, कहनेहीसे होता है जैसा कि वर्तमान समयमें वाचिक वैदान्तिक लोग कहते है, परंतु तुम्हें समझना चाहिये कि जहाँ कहनेसे न हो सके वहाँ देनेसे तो अवश्य होता है। इसी तरह यह दीक्षाका विषयज्ञान भी कहनेसे नहीं होता, वरन् देनेसेही होता है। इसलिये जिन्हें यह प्राप्त नहीं है वह तुम्हें क्या दे सकेंगे? अतएव तुम निश्चयपूर्वक जान लो कि दीक्षा एवं ज्ञान कहनेका विषय नहीं है, देनेकी चीज है, इसलिए कहनेसे नहीं होगा, देनेसेही होगा। जिसने इसको दिया है और जिसने लिया है वही जानते हैं, इसलिए यह कहने सुननेकी बात नहीं है, लेने और देनेकी है।"

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "आणि तेणेंचि ईशप्रसादें। श्रीगुरुसंप्रदायलब्धें।

साच ज्ञान उद्बोधें। कोंवळें जें ”॥ १८.१४४६ ॥” अशा प्रकारे श्रीगुरुकृपेनेच खरे ज्ञानदान प्राप्त होते म्हणजे शिष्याच्या ठिकाणी स्वभावतःच असलेले ज्ञान श्रीगुरुकृपेने उद्‌बुद्ध होते हा सिद्धांत सांगून अशा प्रकारची कृपादीक्षा आपल्याला कशी प्राप्त झाली, श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी समाधिधनाचे दान आपणास बांधून अगर बोध करून कसे दिले व त्यामुळे हे गीतेवरील ज्ञानेश्वरीचे गोड व्याख्यान कसे तयार झाले हे स्पष्ट सांगताना असे म्हटले आहे की-

ज्ञानदेव म्हणे मी चाडें। सद्‌गुरूंनीं केलें कोडें।
माथां हात ठेविला तें फुडें। बीजचि बाइलें॥६.४९२॥
एवं गुरुक्रमें लाधलें। समाधिधन जें आपुलें।
तें ग्रंथें बोधौनि दिधलें। गोसावी मज॥१८.१७६४॥
पाहा पां भरोवरी आघवी। मेघ चातकांसी रिचवी।
मजलागीं गोसावी। तैसें केलें॥१५.२०॥
म्हणौनि रिकामे तोंड। करूं गेलें बडबड।
कीं गीता ऐसें गोड। आतुडलें॥२१॥

वरील ओव्यातील बीजचि वाइले, बोधौनि दिधले, चातकासी रिचवी हे शब्द-प्रयोग ज्ञानदानाचे श्रेष्ठत्व व अलौकिकत्वच सूचित करतात. असे ज्ञानदान फक्त सद्‌गुरूच व एकमात्र सद्‌गुरूच करू शकतात. तेच कृपालब्ध ज्ञानदानाचे एकमात्र आलंबन असतात; कारण श्रीसद्‌गुरूंनी असे काही कोडे केल्याशिवाय, माथ्यावर हात ठेवल्याशिवाय व शक्तिपाताने शिष्यांतकरणात ज्ञानाचे बीज दानाने रुजविल्याशिवाय काही म्हणून काहीही घडत नाही. असे कोडे जोपर्यंत आयुष्यात घडत नाही तोपर्यंत सर्व व्यर्थ जाते. “त्रिपादविभूतिमहानारायणोपनिषदामध्येही” अगदी असेच म्हटले आहे. “यथा जात्यन्धस्य रूपज्ञानं न विद्यते, तथा गुरूपदेशेन विनाकल्पकोटिभिः तत्त्वज्ञानं न विद्यते। तस्मात् सद्‌गुरुकटाक्षलेशविशेषेणाचिरादेव तत्त्वज्ञानं भवति। यदा सद्‌गुरुकटाक्षो भवति तदा भगवत्कथा श्रवणध्यानादौ श्रद्धा जायते। तस्मात् हृदयस्थितानादि दुर्वासनाग्रंथिविनाशो भवति। ततो हृदयस्थितः कामाः सर्वे विनश्यंति। तस्मात् हृदयपुंडरीक-कर्णिकायां परमात्माविर्भावो भवति॥” जन्मांध मनुष्याला जसे रूपाचे ज्ञान असत नाही, तसेच गुरूपदेशाशिवाय म्हणजे त्यांनी ज्ञानदान केल्याशिवाय कोटी कल्पामध्ये तत्त्वज्ञानप्राप्ती होत नाही. त्यामुळे ज्यावेळी सद्‌गुरू कृपादृष्टीने शक्तिपात करून शिष्य देहात शक्तिसंचार करतात तेव्हा ज्ञानस्वरूप चित्‌शक्ती कुंडलिनीच्या जागृतीने ज्ञानदानाची क्रिया घडून येते व तेव्हाच तत्त्वज्ञानाची प्राप्ती होते. यामुळेच भगवत् कथाश्रवण, ध्यान, दुर्वासनानाश व कामनासमाप्ती आपोआप घडून येऊन शेवटी साधकाला परमात्म्याची प्राप्ती होते.

हे ज्ञानाचे दान कसे होते व असे ज्ञानदान करणारालाच गुरू म्हणतात हे सांगताना "योगवासिष्ठात" ब्रह्मर्षी वसिष्ठ म्हणतात–

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके ।**
**जनयेद्यः समावेशं शांभवं सहि देशिकः ।।नि.प्र.पृ.१२८.६१।।**

जो दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व कृपेने शिष्याच्या ठिकाणी शक्तिपाताने आपल्या ज्ञानाचा समावेश करतो किंवा त्याला ज्ञानदान करतो त्यालाच सद्गुरू म्हणतात.

हे ज्ञानदान उपरीनिर्दिष्ट प्रकाराने करण्यास अर्जुनच योग्य आहे व आपल्या हृदयातील अत्यंत गुह्य गोष्ट म्हणजे तत्त्वज्ञान त्याच्या हृदयात पडून ते उदय पावावे असे अर्जुनाचे सद्गुरू श्रीकृष्णनाथ यांना वाटत असल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे कथन केले आहे.ते म्हणतात–

**दिठीचि पाहतां निवविजे । कां तोंड भरोनि बोलिजे ।**
**नातरीं दाटून खेंव दीजे । ऐसें कवण आहे ? ।।६.११७।।**
**म्हणौनि गूढपण आपुलें मोडो । वरि न बोलणेंही बोलावें घडो ।**
**परि आमुचिये जीवींचें पडो । तुझ्या जीवीं ।।९.३७।।**

दृष्टीने पाहताच, बोलताच किंवा आलिंगन देताच सर्व वृत्तींचा उपरम होऊन त्या शांत होण्याचे व तत्त्वज्ञान शिष्याच्या हृदयात पडून उदय पावण्याचे सामर्थ्य दीक्षेत असल्यामुळे " रुद्रयामल व योगिनी " तंत्रात दीक्षेची व्याख्या कथन करताना असे म्हटले आहे की –

**दिव्यं ज्ञानं यतो दद्यात् कुर्यात्पापक्षयं ततः ।**
**तस्मात् दीक्षेति सा प्रोक्ता सर्व तंत्रस्य सम्मता ।।१।।**
**दीयते ज्ञानमत्यर्थं क्षीयते पाशबंधनम् ।**
**अतो दीक्षेति देवेशि कथिता तत्त्वचिंतकैः ।।१।।**
**मनसा कर्मणा वाचा यत्पापं समुपार्जितम् ।**
**तेषां विशेषा करणी परमज्ञानदायतः ।।२।।**

जी दिव्य ज्ञान देते व सर्व पापांचा क्षय करते तिला दीक्षा असे म्हणतात. ही दीक्षा सर्व तंत्रांना मान्य आहे. ब्रह्मज्ञान देणारी व कर्मपाशबंधनांचा नाश करणारी जी (सद्गुरुकृपा आहे तिला) तत्त्वचिंतन करणाऱ्या ज्ञानी लोकांनी दीक्षा म्हटले आहे. मनाने, वाणीने व कर्माने जो पापसंचय जीवाकडून होतो, त्या सर्वाला समूळ नष्ट करणारी व परमज्ञानाचे दान करणारी जी गोष्ट आहे तिला शास्त्रवेत्त्यांनी दीक्षा म्हटले आहे.

ज्ञानदानात अशा प्रकारच्या योगदीक्षेची आवश्यकता आदिनाथ प्रवर्तित सिद्धयोगात म्हणजे नाथपरंपरेत अनिवार्य असल्याने व श्रीज्ञानेश्वरमहाराजच या परंपरेत दीक्षासंपन्न, योगाधिकारी, सद्गुरुपदावर गुर्वाज्ञेने आरूढ झालेले, अलौकिक

व लोकोत्तर महापुरुष असल्याने त्यांनी जीवाच्या कल्याणार्थ या योगदीक्षेद्वारा जीवाचे जीवपण जाऊन तो शिवरूप कसा होतो हे ज्ञानेश्वरीत जागोजाग वर्णन केले आहे. त्याचे सांगोपांग विवेचन आपण पुढे आठव्या प्रकरणात पाहणारच आहोत त्यातील काही नमुने विषयानुरोधाने येथे पाहू. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> तरी अविद्येचिया निदा। विश्वस्वप्नाचा हा धांदा।
> भोगीत होता प्रबुद्धा। अनादि जो ॥१८.४०३॥
> तो महावाक्याचेनि नांवें। गुरुकृपेचेनि थावें।
> माथां हातु ठेविला नव्हे। थापटिला जैसा ॥४०४॥
> तैसा विश्वस्वप्नेंसीं माया। नीद सांडूनि धनंजया।
> सहसा चेइला अद्वया–। नंदपणें जो ॥४०५॥

जीव अविद्यारूपी निद्रेत विश्वरूपी स्वप्नव्यवहाराचा अनुभव अनादि काळापासून घेत असतो. ज्यावेळी त्याला सद्‌गुरू भेटतात तेव्हा ते उत्तम अधिकारी शिष्याला "तत्त्वमसि" म्हणजे ते ब्रह्मच तू आहेस असे सांगतात. सद्‌गुरूंनी शब्दांनी हे सांगता क्षणीच तीव्र तीव्र शक्तिपात होऊन साधकाला तत्काल ज्ञान प्राप्ती होते व तो मुक्त होतो. ज्यावेळी शिष्य मध्यम अधिकारी असतो त्यावेळी बळकट अशा कृपेने सद्‌गुरू शिष्याच्या ठिकाणी शक्तिसंचार करून त्याची अविद्या व मलपाशक्लेशकर्मादि सर्व बंधने छिन्नभिन्न करून त्यास स्वसंवेद्य आत्मतत्त्वाची प्राप्ती करून देतात. मात्र साधक जर कनिष्ठ किंवा मंदाधिकारी असेल तर सद्‌गुरू शिष्याच्या मस्तकावर आपला पाशच्छेद करणारा क्षेमयुक्त शिवहस्त किंवा पद्मकर ठेवून त्याची निद्रिस्त ज्ञानशक्ती थापटी मारून जागृत करून त्याला ज्ञानदान करतात, अशाप्रकारे शब्ददीक्षेने, कृपादीक्षेने किंवा स्पर्शदीक्षेने ज्ञानदान घडले की, माया म्हणजे अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जगद्‌रूपी स्वप्नासह अज्ञानरूपी निद्रा टाकून देते. ही ज्ञानदानाची म्हणजे शक्तीच्या जागृतीची प्रक्रिया सदगुरुंकडून घडली की जीव त्या शक्तीच्या सामर्थ्याने आपण स्वतःच अद्वयानंद असा शिवरूप होतो.

यासाठी ज्ञानदान करणाऱ्या प्रसादाची म्हणजे दीक्षेची अनिवार्यता किती आहे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. "हे अर्जुना ! माझा दीक्षाप्रसाद जेव्हा तुला प्राप्त होईल तेव्हा अभेदरूपी सेवेने तुझे चित्त भरून जाईल म्हणजे तुझी चैतन्यशक्ती उन्मीलित होऊन ती पूर्ण विकासाने माझ्याशी एकरूप होईल. असे झाले म्हणजेच तुझ्यावर माझा पूर्ण प्रसाद झाला असे समज. जन्म व मृत्यू ही तर सर्व दुःखांची निवासस्थाने असून ती जीवमात्रांकडून भोगली जातात. त्यांचा नाश होणे अति दुर्घट असते; परंतु माझ्याकडून सिद्धयोगाने प्राप्त होणाऱ्या शक्तिपात-योगदीक्षासुलभ ज्ञानदानप्रसादप्राप्तीमुळे तुला ही दुःखे सुखकारक व सोपी होतील.

जेव्हा सूर्यप्रकाशाची साहाय्यता डोळ्याला मिळते तेव्हा त्यांना अंधाराची किंमत वाटत नाही. त्याचप्रमाणे श्रीसद्‌गुरूंच्या साहाय्याने माझ्या हा शांभवीविद्येचा प्रसाद मिळून ज्याची जीवपणाची हीन दशा जाऊन, ज्याला विभुदशा म्हणजे ब्रह्मप्राप्ती होते तो संसाररूपी बागुलबोवाच्या भीतीने घाबरणे कधीही शक्य नाही. म्हणून हे धनंजया ! माझा योगदीक्षाप्रसादच ज्ञानोपलब्धी झाल्याने या संसाररूपी दुर्गतीपासून तुला तारून नेईल. मात्र अशा प्रकारच्या ज्ञानदानाच्या दीक्षाप्रसादाची तू अवहेलना करशील व यामुळेच जीव संसारसागर तरून जातो हे तू नुसते आपल्या कानामनाला स्पर्शही करू देणार नसशील तर वस्तुतः जरी तू नित्यमुक्त व अव्यय असलास तरी अशी दीक्षा न मिळाल्याने ते सर्व व्यर्थ होईल. देहतादात्म्यसंबंधाचे घाव तुझ्या अंगावर आदळून ते तुला सोसावेच लागतील; कारण शक्ती जागृत झाल्याशिवाय ज्ञानाचा उदय घडून येत नाही व देहतादात्म्यसंबंधाचा विच्छेदही होत नाही. तो व्हावा हाच या साधनाचा खरा हेतू आहे. ( ज्ञा. १८.१२६९ ते १२७५)

असे हे ज्ञानदान आहे. " श्रीमद्‌भागवतमहापुराणात " ब्रह्मर्षी नारदांनी आपले पूर्वचरित्र सांगून शेवटी ईश्वरापासून आपणास आत्मज्ञान, ऐश्वर्य व भक्तीचे दान कसे मिळाले हे सांगताना असे म्हटले आहे की—

**इमं स्वनिगमं ब्रह्मन्नवेत्य मदनुष्ठितम् ।**
**अदान्मे ज्ञानमैश्वर्यं स्वस्मिन् भावं च केशवः ।।१.५.३९।।**

ज्यावेळी मी अशा प्रकारे भगवंताच्या आज्ञेचे पालन केले त्यावेळी ही गोष्ट जाणून भगवान् श्रीकृष्णांनी मला आत्मज्ञान, ऐश्वर्य व भावरूप प्रेमभक्तीचे दान दिले.

एकनाथांनीही श्रीगुरुकृपेने आपणांस ब्रह्मप्राप्तीचे दान कसे मिळाले हे सांगताना प्रथम श्रीदत्तात्रेयांकडून श्रीजनार्दनस्वामींना " देवो भावाचा भोक्ता । दृढ जाणोनी अवस्था । येणें झालें श्रीदत्ता । तेणें हातु माथां ठेविला ।।९.४३२।। हातु ठेवितांचि तत्काळ । बोधू आकळिला सकळ । मिथ्या प्रपंचाचे मूळ । स्वरूप केवळ स्वबोधें ।। ४३३ ।। " असे ज्ञानदान मिळाले म्हणून "एकनाथी भागवतात" वर्णन करून " आदिनाथ ठेवणें सिद्ध परंपरा । जनार्दनी वेव्हारा एकनाथी ।। " असे अभंगात सांगितले आहे. श्रीदत्तात्रेयांकडून आदिनाथांचे ठेवणे म्हणजे शक्तिपातयोग किंवा सिद्धयोगदीक्षा ही सिद्ध परंपरेने श्रीजनार्दनस्वामींना प्राप्त झाली व तीच शक्तिदीक्षा एकनाथांना आपले सद्‌गुरू श्रीजनार्दनस्वामींकडून मिळाली. आपणास हे ज्ञानदान कसे मिळाले हे त्यांनी पुढील अभंगात स्पष्ट केले आहे. ते म्हणतात—

**जनार्दन गुरु । स्वामी दत्तात्रेय दातारु ।।१।।**
**त्यांनी उपकार केला । स्वानंदाचा बोध दिला ।।२।।**
**सच्चित सुखाचा अनुभव । दाखविला स्वयमेव ।।३।।**
**एका जनार्दनी दत्त । वसो माझ्या हृदयांत ।।४।।**

सारांश, श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी ज्ञान ही दानाचीच वस्तू असल्याने श्रीकृष्णनाथांनी अर्जुनाला ती दीक्षादानाने कशी दिली हे सांगताना त्यांनी असे म्हटले आहे की–

**येर कलशींचें येरीं । रिचविजे जयापरी ।**
**आपणपें तया श्रीहरी । दिधलें तंसें ॥१३.११४५॥**
**मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।**
**आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥१८.१४१८॥**
**न पवतां जयातें । काखे सूनि बुद्धीतें ।**
**बोलणें मागौतें । वोसरलें ॥१४१९॥**
**ऐसें जें कांहीं येक । बोला बुद्धीसिही अटक ।**
**तें द्यावया मिष । खेंवाचें केलें ॥१४२०॥**
**हृदया हृदय एक जालें । ये हृदयींचे ते हृदयीं घातलें ।**
**द्वैत न मोडितां केलें । आपणाऐसें अर्जुना ॥१४२१॥**

ज्याप्रमाणे एका घागरीतील सर्व पाणी दुसऱ्या घागरीत ओतावे त्याप्रमाणे श्रीहरींनी आपल्या हृदयातील ज्ञान शक्तिपातयोगदीक्षेच्या साहाय्याने अर्जुनाच्या हृदयात ओतले. कंकणांनी युक्त असलेला आपला श्यामवर्णाचा उजवा हात पुढे करून आपल्यास शरण आलेल्या भक्तराज अर्जुनाला, बुद्धीला व शब्दाला आकलन न होण्याच्या पलीकडे असलेले, आपले स्वरूपज्ञान देण्याकरिता श्रीकृष्णांनी आलिंगनाचे निमित्त केले. श्रीकृष्णांचे व अर्जुनाचे हृदय एकमेकांना भिडल्यावर श्रीकृष्णांनी आपल्या हृदयातील ज्ञान अर्जुनाच्या हृदयात घातले व देवभक्तांचे द्वैत मोडू न देता अर्जुनाला आपल्यासारखे करून सोडले.

येथपर्यंत ज्ञानदान म्हणजे काय हे आपण पाहिले. आता ज्ञानदानाच्या अलौकिकत्वाचा अर्थात् कारणांचा विचार करू.

ज्ञानदानाच्या अलौकिकत्वाचे पहिले कारण पात्रापात्रविचार हे आहे. सिद्धयोगसाधनेत जे ज्ञानदान घडून येते त्यात पात्रापात्रतेचा, जातींचा, स्त्री-पुरुषभेदाचा किंवा वयाचा कोणताही अडसर असत नाही. त्यामुळेच ते अलौकिक ठरले आहे. गीताशास्त्राचा म्हणजेच सिद्धयोगशास्त्राचा हा महान् विशेष श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुनःपुन्हा ज्ञानेश्वरीत आवर्जून मांडला आहे. सिद्धयोगसाधन सर्वांना कैवल्यदान करून शांती प्रदान करते हे सांगताना ते म्हणतात–

**तेवीं उत्तम अधम ऐसें । सेवितां कवणातेंही न पुसे ।**
**कैवल्यदानें सरिसें । निववीत जगा ॥१८.१४६४॥**

अगदी असाच विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अमृतानुभवातही" मांडला आहे शक्तिपातदीक्षेच्यावेळी म्हणजे ज्ञानदानसमयी श्रीगुरू शिष्याच्या योग्यायोग्यतेचा विचार करीत नाहीत हे सांगताना ते म्हणतात–

**कैवल्यकनकाचेया दाना । न कडसी थोर साना ।**
**द्रष्टेयाचेया दर्शना । पाढाउ जो ॥२.५॥**

या ओवीवर टीका करून श्रीनिरंजन रघुनाथांनी त्यातील गर्भितार्थाचे अत्यंत सुंदर स्पष्टीकरण " अनुभवामृतपद-बोधिनी " या टीकेत पुढीलप्रमाणे केले आहे. " कैवल्य, मोक्ष, तल्लक्षण हेचि कोण्ही एक सुवर्ण. त्याचें दान करण्याविषयीं साधनचतुष्टयसंपन्न अथवा अनधिकारी आहे, हें कडसणी म्हणजे शोध करीत नाही. जो शरण येईल त्यास श्रीगुरू मोक्ष देतो. कारण जे, गुरु जो तो परमात्मा होय. तो जें करील तें होईल म्हणून. आतां श्रीगुरु जो तो शून्यरूपा माया जे तिचा पार दाखविणारा होय ऐसें वर्णितात. जैसे बद्रिनारायणाचे दर्शनास पहाडी लोक जे ते यात्रेकरास शिक्यांत बसवून दुर्लंघ्य दरीपार करून देतात तैसे स्वशरण ब्रह्मजिज्ञासु जे त्यांस शून्यरूपा माया हेचि कोण्ही एक सखोल दरी, तिजमध्ये न पडू देतां शक्तिपातसामर्थ्यप्रभावें द्रष्टा जो त्याचें वास्तविक स्वरूप निर्विशेष ब्रह्म जें त्याचें चरम वृत्तीनें दर्शन करून देतो, म्हणून गुरु जो तो पाढाऊ होय, अलाग ब्रह्मी पावविण्याविषयी तेथील माहितगार होय. "

ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या योग्यायोग्यतेचा फारच सुंदर विचार केला आहे. सिद्धयोगसाधनमार्गाची सर्व माहिती सांगून झाल्यावर अर्जुनाने श्रीकृष्णांना असे विचारले की—

**आतां कृष्णा तुवां सांगितला योगु । तो मना तरी आला चांगु ।**
**परि न शके करूं पांगु । योग्यतेचा ॥६.६३३॥**
**सहजें आंगिक जेतुलें आहे । तेतुलयाची जरी सिद्धि जाये ।**
**तरी हाचि मार्गु सुखोपायें । अभ्यासीन ॥३३४॥**
**नातरी देवो जैसें सांगतील । तैसें आपणपें जरी न ठकेल ।**
**तरी योग्यतेवीण होईल । तेंचि पुसों ॥३३५॥**
**हां हो जी अवधारिलें । जे हें साधन तुम्हीं निरूपिलें ।**
**ते आवडतयाहि अभ्यासिलें । फावों शके ? ॥३३७॥**
**कीं योग्यतेवीण नाहीं । ऐसें हन आहे कांहीं ॥३३८॥**

अर्जुन म्हणाला कृष्णा ! आता तुम्ही जो योग मला सांगितला तो माझ्या मनाला फार आवडला; परंतु माझी योग्यता कमी असल्याकारणाने माझ्या हातून काही तो होणार नाही. माझ्या अंगात जेवढी योग्यता आहे तेवढ्यानेच जर हा अभ्यास शेवटास जाणार असेल तर मी मोठ्या समाधानाने या सिद्धयोगमार्गाचा अभ्यास करीन. किंवा हे श्रीकृष्णा ! आपण जसे सांगितले तसे माझ्याकडून होण्याजोगे नसेल तर योग्यतेची आवश्यकता नाही असेच एखादे साधन मी आपणास विचारीन. तुम्ही हे जे योगसाधन सांगितले ते माझ्या पूर्ण लक्षात आले; परंतु

वाटेल त्याने याचा अभ्यास केला तर या योगाची प्राप्ती होईल काय ? किंवा हे योग्यतेशिवाय होणारच नाही असे आहे की काय ?

अर्जुनाने हा योग्यायोग्यतेचा प्रश्न उत्पन्न केल्यावर त्याला श्रीकृष्णांनी जे उत्तर दिले त्यातच ज्ञानदानाच्या या मार्गाचे अपूर्वत्व साठविलेले आहे.

**तेथ श्रीकृष्ण म्हणती काई। धनुर्धरा ॥६.३३८॥**
**हें काज कीर निर्वाण। परि आणिकही जें कांहीं साधारण।**
**तेंही अधिकाराचे बोडवेविण। काय सिद्धि जाय ? ॥३३९॥**
**पैं योग्यता जे म्हणिजे। ते प्राप्तीची अधीन जाणिजे।**
**कां जे योग्य होऊनि कीजे। ते आरंभिलें फळे ॥३४०॥**
**तरी तैसी एथ कांहीं। सावियाची केणी नाहीं।**
**आणि योग्यतेची काई। खाणी असे ? ॥३४१॥**

तेव्हा श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना ! हे तू काय विचारतोस ? हा सिद्धयोगाभ्यास ज्ञानदानाने मोक्ष देणारा आहे. हे अंतिम अशा ब्रह्मप्राप्तीचे श्रेष्ठ साधन आहे; पण याशिवाय दुसरी साधारण जरी गोष्ट असली तरी ती सुद्धा अधिकाराच्या योग्यतेशिवाय सिद्धीस जाईल काय ? ज्याला योग्यता म्हणतात ती त्या साधनाच्या साध्यप्राप्तीवरूनच जाणली जाते. म्हणून आपण योग्य होऊन साधनाभ्यासाला आरंभ केला की तो सिद्ध होतोच. परंतु या सिद्धयोगमार्गात खरोखर तसा काही एक प्रकार नाही. योग्यता ही काही सहजासहजी बाजारात मिळणारी वस्तू नाही आणि योग्यतेची एखादी खाण असते की काय ?

अशा प्रकारे ज्ञानदानाच्या वेळी म्हणजे शक्तिपातसमयी पात्रापात्रतेचा विचार होत नसल्याने महामाहेश्वराचार्य उत्पलदेव भगवंताची स्तुती करताना म्हणतात—

**शक्तिपातसमये विचारणं प्राप्तमीश न करोषि कर्हिचित् ।**
**अद्य मां प्रति किमागतं यतः स्वप्रकाशनविधौ विलंबसे ॥**

हे भगवन्! शक्तिपाताच्यावेळी म्हणजे जीवावर कृपा करण्याच्यावेळी योग्यायोग्यतेचा विचार करणे न्यायतः खरे असले तरी आपण हा पात्रापात्रतेचा विचार कधीही करीत नाही. मग आजच माझ्या बाबतीत अशी कोणती नवी गोष्ट आड आली आहे की, जी मला आत्मप्रकाशाची प्राप्ती होण्यास विलंब करीत आहे? या प्रार्थनेतील 'प्राप्तम्' व कर्हिचित्' या दोन शब्दप्रयोगांवरून हे स्पष्टपणे प्रतीत होते की शक्तिपात म्हणजे ज्ञानदान हे अनपेक्ष, दुर्लभ व रागादि प्रसंगांपासून पूर्णपणे मुक्त आहे. "मतंगागमाचे" टीकाकार श्री.अनिरुद्ध यांनीही शक्तिपाताच्या म्हणजे ज्ञानदानाच्या विषयातील निरपेक्षता-सिद्धांत अर्थात् पात्रापात्रविचाराराहित्यच स्वीकृत केले आहे. ते म्हणतात—

ज्ञा....१८

**स्थावरान्तमपि देवस्य स्वरूपोन्मीलनात्मिका ।**
**शक्तिः पतंति सापेक्षा न क्वापि ....।।**

ब्रह्मदेवापासून गवताच्या काडीपर्यंत देवाच्या स्वरूपाला प्रकट करणारी शक्ती शिष्याच्या ठिकाणी संक्रमित होताना कसलीही अपेक्षा करीत नाही; कारण ती निरपेक्ष आहे. यातील "स्थावरान्त" पदाने हे सूचित होते की, अत्यंत अयोग्य साधकाच्या ठिकाणीही शक्तिपात म्हणजे ज्ञानदान होऊ शकते.

योग्य शिष्याचा उद्धार करणे व अयोग्य शिष्याला योग्य करून तारणे हे श्रीसद्गुरूंचे कार्य असते. "बोधसार" ग्रंथात श्रीनरहरी यांनी असे म्हटले आहे की–

**तत्तद्विवेकवैराग्ययुक्तवेदान्तयुक्तिभिः ।**
**श्रीगुरुः प्रापयत्येव न पद्मपि पद्मताम् ।**
**प्राप्य पद्मतामेनं प्रबोधयति तत्क्षणात् ।।**

श्रीगुरू विवेकवैराग्ययुक्त वेदान्तयुक्तीच्या योगाने अयोग्य शिष्याला योग्यता प्राप्त करून देतात आणि नंतर त्याच्यावर शक्तिपातानुग्रह करून त्याला त्याचक्षणी जागृत करतात. "श्रीललितासहस्रनामाच्या भाष्यात" देखील श्रीभास्करराय यांनी असे स्पष्ट म्हटले आहे की, "अयोग्येऽपि योग्यतामापाद्य श्रीगुरुसूर्यो बोधयति ।" म्हणजे श्रीगुरुरूपी सूर्य अयोग्य शिष्याला योग्य करून प्रबुद्ध करतात.

उपरोक्त सर्व विचार ध्यानात घेऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या पुढील ओव्या वाचल्या म्हणजे अर्थसाम्याच्या बोधप्रतीतीने मन आनंदून जाते. ते म्हणतात–

**ते पाहांटेंविण पाहावित । अमृतेंवीण जीववित ।**
**योगेंवीण दावित । कैवल्य डोळां ।।९.२०१।।**
**परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं ।**
**एकसरें आनंदाचें आवारू । होत जगा ।।२०२।।**

ते साधू जीवांची पहाट होण्याची वेळ झाली नाही तरीही त्यांच्या योग्यायोग्यतेचा विचार न करता त्यांच्यावर शक्तिपात करून म्हणजे प्रकाश देऊन आत्मज्ञानाची पहाट करून देतात. अशा प्रकारे या शक्तिपातयोगदीक्षेच्या अलौकिक सामर्थ्याच्या जोरावर ते अमृताशिवाय जीवांना अमृतत्त्व प्राप्त करून देतात व हठयोगादि दुर्घट साधनांशिवाय जीवांना प्रत्यक्ष कैवल्यप्राप्ती करून देतात म्हणजे ज्ञानचक्षूद्वारा आत्मतत्त्वाच्या दानाने ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार करून देतात. त्यावेळी हा राजा आहे व हा रंक आहे असे अंतर किंवा योग्यताभेद ते मानीत नाहीत किंवा हा लहान आहे व हा मोठा आहे अशी निवड करण्याचेही त्यांच्या मनात येत नाही. अशा प्रकारे जगाला ते सरकटपणे आनंदाचे आवार घालतात.

इतकेच नव्हे तर या ज्ञानदान करणाऱ्या सिद्धयोगापुढे जाती, कुळ, वर्ण इत्यादि सर्व गोष्टी महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" सांगितल्याप्रमाणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी निष्फळ मानल्या आहेत. फक्त चित्ताचा म्हणजे चितिशक्ती कुंडलीनीचा परमेश्वरप्राप्तीच्या मार्गात म्हणजे सुषुम्नेत जागृत होऊन प्रवेश घडला की, जीव आपोआप भगवत्स्वरूप होतो हा महासिद्धांत त्यांनी मांडिला आहे. ते म्हणतात—

**म्हणौनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण।**
**एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक ॥९.४५६॥**
**म्हणौनि भलतेणें एथ सद्‌भावें नाहावें। प्रयागमाधव विश्वरूप पहावें।**
**येतुलेनि संसारासि द्यावें। तिळोदक ॥११.१०॥**
**हेंचि कवणे एके मिसें। चित्त माझे ठायीं प्रवेशे।**
**येतुलें हो मग आपैसें। मीचि होणें असे ॥९.४६३॥**

अशी वास्तविक स्थिती असल्याने म्हणजे शक्तिपात किंवा ज्ञानदान हे सर्वथा मायानिरपेक्ष व भगवंताच्या स्वतंत्रतेने घडून येत असल्याने श्रीकृष्णांची स्तुती करताना अर्जुन म्हणतो—

**तुझें औदार्य जाणों स्वतंत्र। देतां न म्हणसी पात्रापात्र।**
**पैं कैवल्या ऐसें पवित्र। जें वैरियांही दिधलें ॥११.९८॥**

या अर्थानेच म्हणजे सिद्धयोग साधनेत साधकाच्या पात्रापात्रतेचा विचार केला जात नसल्याने "भारतीय संस्कृति और साधना," या ग्रंथातील पहिल्या खंडातील "शक्तिपात रहस्य" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी सिद्धयोग अर्थात् शक्तिपातयोगमार्गाचे हे वैशिष्टच सांगताना असे म्हटले आहे की— "अतएव, कर्मादि निरपेक्ष भावसे केवल भगवान्‌की इच्छासेही अनुग्रह होता है, यही वास्तविक सिद्धांत है। अर्थात् शक्तिपात कर्मसाम्य, मलपाक आदिके अधीन नहीं है, किंतु निरपेक्ष तथा स्वतंत्र है।.... यहाँतक जो कुछ कहा गया है, उससे स्पष्ट जान पडता है कि शक्तिपात अथवा श्रीभगवान्‌की कृपाके विना कोई जीव पूर्णत्व—लाभ नहीं कर सकता—यहाँतक कि पूर्णत्वके मार्गमें भी प्रवेश नहीं कर सकता। शक्तिपातका तारतम्य जीवके आधारके (धारण—शक्तिके) भेदसे होता है। परंतु यह भी सत्य है कि जीव चाहे कितनेही निम्न अधिकारका हो और कितनाही भोगाकांक्षा युक्त हो, एक बार शक्तिपात होनेपर वह कभी—न—कभी परमपदमें अवश्य पहुँच जायगा। भोगाकांक्षादि अंतराय रहनेसे उसकी गतिमें विलंब होगा, नहीं तो शीघ्रातिशीघ्र—यहाँतक कि क्षणमात्रमें भी (जैसे तीव्र—तीव्रकी तीव्र मात्रामें) हो सकता है। शक्तिपातके समय योग्यताका विचार नहीं होता, परंतु स्वभावतः योग्यताके अनुसारही शक्तिपातकी मात्रा निर्दिष्ट होती है। परंतु,

मात्रा कुछ भी हो, भगवत्शक्तिकी ऐसीही महिमा है कि इसका एक बार पात होनेपर यह जीवको भगवद्धाममें पहुँचाये विना शांत नहीं होती, इसमें कोई संदेह नहीं।"

ज्ञानदान अलौकिक, अपूर्व व श्रेष्ठ असण्याचे दुसरे बलवत्तर कारण अनुभूती हे आहे. सिद्धयोगसाधनोपदिष्ट शक्तिपातदीक्षेमुळे साधकाला तत्काल प्रचीती व अनुभूती येत असल्यामुळे व अशा प्रकारचे अनुभूतियुक्त ज्ञानदान करून तत्काल प्रचीती देण्याचे सामर्थ्य इतर कोणत्याही साधनमार्गात नसल्यामुळे सिद्धयोगसाधनेचा महिमा केवळ अश्रुतपूर्व आहे हे निःसंशय होय. त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**ऐसिया प्रतितिबोधसागरीं। तूं आपणेयातें कल्लोळु एक करीं।**
**मग जंव पाहासी चराचरीं। तंव तूंचि आहासी ॥९.९३॥**
**हा दंशु जंव नये हातां। तंव माझें साचोकारपण पार्था।**
**न संपडे गा सर्वथा। जेंवि तुषीं कणु ॥९.१३६॥**
**एऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें। आवडे फीर कळलें ऐसें।**
**परि मृगजळाचेनि वोलांशें। काय भूमि तिमे ? ॥१३७॥**
**जें जाळ जळीं पांगिलें। तेथ चंद्रबिंब दिसे आंतुडलें।**
**परि थडिये काढूनि झाडिलें। तेव्हां बिंब कें सांगें ? ॥१३८॥**
**तैसें बोलवरी वाचाबळें। वायांचि झकविजती प्रतीतीचें डोळे।**
**मग साचोकारें बोधावेळे। आथि ना होईजे ॥१३९॥**

अनुभूतीच श्रेष्ठ आहे म्हणून श्रीकृष्ण अर्जुनाला, तू या अनुभवरूपी समुद्रात एक लाट होऊन राहा म्हणजे मग या सर्व चराचरात सर्वत्र तूच भरला आहेस असे तुझ्या दृष्टीस पडेल, असे सांगत आहेत. अनुभूती हेच रहस्य होय. ही अनुभूती जोपर्यंत साधकाला प्राप्त होत नाही तोपर्यंत नुसत्या कोंड्यात जसे दाणे सापडत नाहीत त्याप्रमाणे ते आत्मस्वरूप साधकाला कधीही प्राप्त होत नाही. अनुमानाच्या किंवा तर्काच्या जोरावर जीवांना यथार्थ आत्मज्ञान आपल्याला झाले आहे असे वाटते; परंतु मृगजळाच्या ओलाव्याने जशी जमीन भिजत नाही त्याप्रमाणे अनुभूतिशून्य ज्ञान भ्रमात्मक व अयथार्थ असते. माशाला धरण्याकरिता पाण्यात पसरलेल्या जाळ्यात चंद्रबिंब सापडल्यासारखे दिसते तरी ते जाळे पाण्यातून काढून नदीच्या काठावर झाडले म्हणजे त्यात चंद्रबिंब नाही हे स्पष्ट होते. त्याचप्रमाणे शाब्दिक अवडंबराच्या साहाय्याने व वाक्चातुर्याच्या बळाने आपल्याला अनुभव आला आहे असे कितीतरी लोक वरकरणी दाखवितात; पण खऱ्या यथार्थ बोधाच्या परीक्षेची वेळ आली म्हणणे खरा प्रतीतीबोध त्यांना नसल्याचे स्पष्ट होते आणि

त्यांना असलेले वाचाळ ज्ञान कोणासही यथार्थ बोध, अनुभूती किंवा प्रचीती देण्यास निरुपयोगी असल्याचे सिद्ध होते.

यादृष्टीनेच श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज म्हणतात, " उपासना ही अनुभूती देणारीच पाहिजे. मला सद्गुरुकृपेने प्राप्त झालेली उपासना ही नुसती अनुमानाने जाणण्यासारखी नाही. माझी उपासना ही प्रत्यक्ष अनुभव देणारी दिव्य उपासना आहे. " श्रीसमर्थांनी हे अगदी आग्रहपूर्वक व निक्षून सांगितले आहे; कारण त्यांच्या लेखी अनुमानाला काहीही महत्त्व नाही. " जितुकें अनुमानाचें बोलणें। तितुकें वमनप्राय त्यागणें । निश्चयात्मक तेचि बोलणें । प्रत्ययाचें ।। ९.५.३९ ।। " असे " दासबोधात " त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. जी अनुभूतियुक्त परब्रह्मप्राप्ती करून देत नाही, ती उपासनाच नव्हे; कारण नुसत्या अनुमानाला, बोलण्याला किंवा तर्काला शून्य किंमत आहे असे ते म्हणतात. एवढेच नव्हे तर अनुमानाचे बोलणे खोटे व फोलकटाप्रमाणे त्याज्य असून प्रत्यय हाच खरा आहे; कारण त्याशिवाय सर्व व्यर्थ ठरते हे सांगताना " दासबोधात " ते म्हणतात–

**उगीच बोलणें अनुमानाचें । अनुमानाचें कोण्या कामाचें ।**
**येथें सगट विचाराचें । काम नाहीं ।।२०.७.२९।।**
**प्रचीतीवीण जें ज्ञान । तें अवघेंचि अनुमान ।**
**तेथें कैंचें परत्रसाधन । प्राणियांसी ।।१४.७.१८।।**
**जें प्रचीतीस आलें खरें । तेंचि घ्यावें अत्यादरें ।**
**अनुभवाविण जीं उत्तरें । तीं फलकटे जाणावीं ।।१८.५.२१।।**
**प्रचीतीवीण जें केलें । तें अवघें व्यर्थ गेलें ।**
**प्राणी कष्टकष्टोंचि मेलें । कर्मकचाटे ।।१८.८.२०।।**
**अवघी भ्रांतीची ठकाठकी । प्रचीतीवीण गोष्टी लटकी ।**
**वेड लागलें जे बटकी । तो भलतेचि बोले ।।१७.४.२९।।**
**प्रत्ययें ज्ञाता सावधान । याचें ऐकावें निरूपण ।**
**आत्मसाक्षात्काराची खूण । तात्काळ बाणे ।।१७.४.३०।।**

अशा रीतीने साधन देऊन प्रत्ययद्वारा आत्मसाक्षात्कार घडविणारा सद्गुरु हवा असा श्रीसमर्थांचा आग्रह आहे. त्यामुळे शक्तिपाताने कुंडलिनी शक्ती जागृत करून प्राणांची गती ऊर्ध्व करणारा महायोगी शोधून काढून त्याच्याकडून साधन प्राप्त करून घेऊन साधकाने आत्मज्ञानाचे दान घेतले पाहिजे असे श्रीसमर्थ "दासबोधात" अगदी कळकळीने सांगताना म्हणतात की–

**अधोमुखें भेद वाढतो । ऊर्ध्वमुखें भेद तुटतो ।**
**निःसंगपणें निर्गुणीं तो । महायोगी ।।२०.३.२२।।**
**म्हणोन संसार सांडावा । मग साधचा शोध घ्यावा ।**

**फिरफिरों ठायीं पाडावा । साधुजन ॥२०.३.२६॥**
**उदंड हुडकावे संत । सांपडे प्रचीतीचा महंत ।**
**प्रचीतीवीण स्वहित । होणार नाहीं ॥२०.३.२७॥**

असा महायोगी जेव्हा साधकाला भेटतो तेव्हा तो ज्ञाननदानाची अलौकिक अशी शक्तिपातयोगदीक्षा देऊन त्याला कसे कृतार्थ करतो हे सांगताना श्रीसमर्थ म्हणतात—

**अज्ञानशक्ति निरसली । ज्ञानशक्ति मावळली ।**
**वृत्तिशून्य कैशी झाली । स्थिति पाहा ॥१५.१०.१२॥**
**मुख्य शक्तिपात तो ऐसा । नाहीं चंचळाचा वळसा ।**
**निवांती निवांत कैसा । निर्विकारी ॥१५.१०.१३॥**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शक्तिपाताने प्राप्त होणाऱ्या ज्ञानादानात्मक अनुभूतीचे व प्रचीतीचे सूत्रच ज्ञानेश्वरीत आद्योपांत राबविले आहे. "साधु दिसती वेगळाले। परी ते स्वरूपीं मिळाले । अवघे मिळोनि एकचि झाले । देहातीत वस्तु ॥७.२.३१॥" असे श्रीसमर्थांनी "दासबोधात" जे महान सूत्र सांगितले आहे, ते पाहिले म्हणजे भाषा व अभिव्यक्ती वेगळी असली तरी संतमहात्म्यांचे, आध्यात्माचे किंवा परमार्थाचे सूत्र एकमात्र अनुभूतीच आहे हे ध्यानात येते. यामुळेच श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "विवेकचूडामणीमध्ये" असे म्हटले आहे की—

**न गच्छति विना पानं व्याधिरौषधः शब्दतः ।**
**विनाऽपरोक्षानुभवं ब्रह्मशब्दैर्न मुच्यते ॥६४॥**
**अकृत्वा दृश्यविलयमज्ञात्वा तत्त्वमात्मनः ।**
**बाह्यशब्दैः कुतो मुक्तिरुक्तिमात्र फलैर्नृणाम् ॥६५॥**

ज्याप्रमाणे प्रत्यक्ष औषध घेतल्याशिवाय नुसता औषध हा शब्द ऐकून कोणाचाही रोग दूर होत नाही त्याचप्रमाणे प्रत्यक्ष अपरोक्षानुभव प्राप्त झाल्याशिवाय नुसते ब्रह्मज्ञान ऐकून कोणालाही मोक्ष प्राप्ती होत नाही. दृश्याचा विलय केल्याशिवाय व आत्मतत्त्वानुभूती घेतल्याशिवाय साधकाला बाह्यशब्द ऐकून मोक्ष प्राप्ती होणे कसे शक्य आहे ?

असा हा ज्ञानदानाने प्राप्त होणाऱ्या अनुभूतीचा महिमा असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी दुर्निग्रह मनाचा निरोध करण्यासाठी जीवाला त्याचे मानसशास्त्र जाणूनच जो उपदेश केला आहे तो तर केवळ अपूर्वच आहे. ते म्हणतात—

**कां जें यया मनाचें एक निकें । जें देखिलें गोडीचिया ठाया सोके ।**
**म्हणौनि अनुभवसुखचि कवतिकें । दावीत जाइजे ॥६.४२०॥**

या मनाच्या ठिकाणी एक महत्त्वपूर्ण चांगला गुण आहे. त्याला एकदा

अनुभवलेल्या सुखाची गोडी लागली की, त्याच ठिकाणी राहावयास ते सोकावते म्हणून त्याला कौतुकाने आत्मानुभव सुखच दाखवीत जावे.

इतके जर या आत्मानुभवाचे श्रेष्ठत्व आहे तर हा अनुभव म्हणजे आहे तरी काय ? व्यास महर्षी "श्रीमद्‌भागवतात" म्हणतात–

नमः परायावितथानुभूतये गुणत्रयाभासनिमित्तबंधवे ।
अदृष्टधाम्ने गुणतत्वबुद्धिभिर्निवृत्तमानाय दधे स्वयंभुवे ।।६.४.२३।।
विदितोऽसि भवान् साक्षात् पुरुषः प्रकृतेः परः ।
केवलानुभवानन्दस्वरूपः सर्वबुद्धिदृक् ।।१०.३.१३।।

हे प्रभो ! आपली अनुभूती म्हणजे आपली चित्‌शक्तीच आहे. ती अमोघ आहे. आपण जीव व प्रकृतीच्या पलीकडे असून त्यांचे नियंता व त्यांना सत्तास्फूर्ती देणारे आहात. जे जीव त्रिगुणमयी सृष्टीलाच वास्तविक सत्य समजून चालले आहेत ते आपल्या स्वरूपाचा साक्षात्कार प्राप्त करू शकत नाहीत; कारण आपल्याला एका अनुभूतीशिवाय इतर कोणत्याही प्रमाणांनी जाणता येत नाही. आपण सीमा, अवधिरहित, स्वयंप्रकाश व परात्पर आहात. मी आपल्याला नमस्कार करतो. आपण साक्षात् प्रकृतीपलीकडील एकमेवाद्वितीय पुरुष असून केवळ अनुभव व केवळ आनंद हेच आपले स्वरूप आहे.

अशा प्रकारे अनुभूती म्हणजे चित्‌शक्ती कुंडलिनी होय, सत्तास्फूर्ती होय किंवा या शक्तीने युक्त असा परमात्मा होय हे एकदा ध्यानात घेतले म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराज पुढील ओव्यातून कोणता भाव व्यक्त करीत आहेत हे स्पष्ट होईल.

तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा ।
अतिहळुवारपण चित्ता । आणूनियां ।।१.५७।।
या सोपिया योगस्थिती । उकलु देखिला गा बहुतीं ।
संकल्पाचिया संपत्ती । रुसोनियां ।।६.३८७।।
जयां सद्‌गुरुतारूं फुडें । जे अनुभवाचे कांसे गाढे ।
जयां आत्मनिवेदनतरांडें । आकळलें ।।७.९८।।
तैसें शरीरीं हन कर्में । तो भक्तु ऐसा गमे ।
परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाहला ।।७ ११६।।
हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो ।
म्हणोनि भक्तांमाजीं रावो । आणि ज्ञानिया तोचि ।।७.१३६।।
जयाचिये प्रतीतीचा वाखरां । पवाडु होय चराचरा ।
तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभु आथी ।।७.१३७।।
जिहीं साधिभूता मातें । प्रतीतीचेनि हातें ।

धरूनि अधिदैवातें । शिवतले गा ॥७.१८०॥
जया जाणिवेचेनि वेगें । मी अधियज्ञुही दृष्टी रिगें ।
ते तनूचेनि वियोगें । विन्हये नव्हती ॥७.१८१॥
चित्तें मीचि जाहाले । मियांचि प्राणें धाले ।
जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ॥१०.११९॥
मग तया बोधाचेनि माजे । नाचती संवादसुखाचीं भोजें ।
आता एकमेकां घेपे दीजे । बोधचि वरी ॥१०.१२०॥
जयाचिया प्रतीती । विचारवीरीं समस्तीं ।
नेदिजेचि संसृती । माथा उधऊं ॥१४.४९॥

सारांश, अमृतासारखा श्रेष्ठ व ठेव्यासारखा अमोलिक अनुभव हा दानप्रक्रियेच्या अलौकिकत्वाने प्राप्त होत असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

अमृत जैसें ये चुळा । कां निधान देखिजे डोळां ।
तेंतुला जिव्हाळा । मानावा हा ॥१३.१०९०॥
संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथे विसंवे ।
अनुभूतिही अनुभवे । अनुभवा जया ॥१८.१३२१॥

ज्ञानदानप्रक्रिया अलौकिक असण्याचे तिसरे महत्त्वाचे कारण शरणागती हें आहे. शरणागती हे ज्ञानदानाच्या प्रक्रियेचे एकमात्र आलंबन असून आगमापासून निगमापर्यंत सर्वांनी त्याचा एकमुखाने स्वीकार केला आहे. " मुंडकोपनिषदात " "तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥१.२.१२॥" असे म्हणून शिष्याने नित्य वस्तूच्या म्हणजे सत्चिदानंदनस्वरूप ब्रह्माच्या अगर स्वसंवेद्य आत्मरूपाच्या साक्षात् ज्ञानप्राप्तीसाठी म्हणजे ज्ञानाच्या अनुभूतीसाठी हातात समिधा घेऊन श्रोत्रिय म्हणजे शब्दनिष्णात व ब्रह्मनिष्ठ म्हणजे शक्तिपाताने परतत्त्वाचा साक्षात्कार करण्यात निष्णात अशा सद्गुरूस शरण जावे असेच सांगितले आहे. शरणागतीचा महिमा अपूर्व असल्याने " शास्त्रज्ञोऽपि स्वातंत्र्येण ब्रह्मज्ञानान्वेषणं न कुर्यात् " असा स्पष्ट इशारा श्रीमदाद्यशंकराचार्यांनी उपरोक्त मंत्रावर भाष्य करताना दिला आहे. शास्त्रज्ञाने स्वतःच स्वतंत्रपणे ब्रह्मान्वेषण करू नये असे सांगताना शुकमहामुनींप्रमाणे स्वतोत्पन्न ज्ञानाची अनिश्चिती व अपरंपरेमुळे जागृत शक्तीचे ज्ञानोपवलक आधाररहित्य या गोष्टी निश्चित असल्याने श्रीगुरूंना शरण जाणे यासारखा सोपा मार्ग नाही. "कुलार्णवतंत्रातही" श्रीगुरूंना शरण गेल्याशिवाय जीव संसारचक्रातून मुक्त होत नाही व लोभमोहादिकांपासून त्याला पीडा होते हे सांगताना असे म्हटले आहे की—

तावदार्तिर्भयं शोको लोभमोहभ्रमादयः ।
यावन्नायाति शरणं श्रीगुरुं भक्तवत्सलम् ॥१२.१५॥

तावद् भ्रमंति संसारे सर्वदुःखमनीषया।
न भवेत सद्गुरौ भक्तिर्यावद्देवेशि देहिनाम् ॥१६॥

जीव जोपर्यंत भक्तवत्सल श्रीगुरूंना शरण जात नाही तोपर्यंत त्याला मनोव्याधी, चिंता, भीती, लोभ, मोह, भ्रम इत्यादींकापासून पीडा होते. जोपर्यंत अशा प्रकारे शरणागतीमुळे जीवाच्या ठिकाणी श्रीसद्गुरुभक्ती उत्पन्न होत नाही तोपर्यंत नानाविध व्याधींनी व तापत्रयादि दुःखांनी पीडित जीव या जन्ममृत्युरूप संसारचक्रात भ्रमण करीत असतात.

येथे एक गोष्ट विशेषत्वाने लक्षात घेतली पाहिजे की, "तू सर्व धर्म टाकून मला एकटयालाच शरण ये. मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन. तू शोक करू नको; (गीता.१८.३६) कारण अशा प्रकारे जे मला अनन्य होऊन शरण येतात त्यांचा योगक्षेम मी वाहतो," (गीता. ९.२२) असे श्रीकृष्णनाथांनी या शरणागतीचे परमसिद्धांयुक्त जे तत्त्व अर्जुनाला सांगितले आहे, त्याचाच भावार्थ शिष्याने सर्वार्थाने सद्गुरूला शरण गेले पाहिजे असा आहे; कारण सिद्धयोगाचा हा मार्ग मुख्यतः समर्पणाचा मार्ग असून; पुरुषार्थाचा, प्रयत्नाचा किंवा स्वबलोपायाचा हा मार्ग नाही, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी नाथसंप्रदायाचा दंश म्हणून प्रकट करून, ज्ञानदानक्रियेच्या अलौकिकत्वाचे अलौकिकत्व शरणागतीत समाविष्ट झाल्याचे स्पष्ट केले आहे. त्यामुळे शरणागती म्हणजे काय हे सांगून अर्जुनरूपी जीव-साधकाला ते, सद्गुरूला तू शरण जा, म्हणूनच सांगतात.

पैं आपुलेनि भेदेंविण। माझें जाणिजें जें एकपण।
तयाचि नांव शरण। मज येणें गा ॥१८.१३९८॥
जैसे घटाचेनि नाशें। गगनीं गगन प्रवेशे।
मज शरण येणें तैसें। ऐक्य करी॥१३९९॥
सुवर्णमणि सोनया। ये कल्लोळु जैसा पाणिया।
तैसा मज धनंजया। शरण ये तूं ॥१४००॥

अशा प्रकारे श्रीकृष्णांनी अर्जुनाला इतक्या आग्रहाने शरण येण्यास सांगितले आहे; कारण त्यामुळे त्याची अहंबुद्धी जाऊन तो अनुग्रहास योग्य व्हावा. "तदर्पिताखिलाचारिता ॥ १९ ॥" असे महर्षी नारदांनी "भक्तिसूत्रात," "अनन्यभावें शरण ॥ ५–३–१९ ॥" असे श्रीसमर्थांनी "दासबोधात" व "शरीरमर्थं प्राणांश्च सद्गुरुभ्यो निवेद्य यः। गुरुभ्यः शिक्षते योगं शिष्य इत्यभिधीयते ॥१३.१५ ॥ असे "कुलार्णवतंत्रात" महेशाने पार्वतीला सांगितल्याप्रमाणे पापपुण्य, धर्माधर्म इत्यादि द्वंद्वातून बाहेर पडून श्रीगुरूंची अनुग्रहात्मक शक्ती स्वीकारण्यासाठी योग्य होण्यास शिष्याला श्रीसद्गुरूस शरण जाण्यासारखा दुसरा मार्ग नाही. हे अर्जुनाच्या मनावर बिंबावे म्हणून श्रीकृष्ण म्हणतात, "मंथन करून ताकातून

वेगळे काढलेले लोणी पुन्हा ताकात घातले तरी ते जसे काही केल्याने पुन्हा त्या ताकात मिसळत नाही, त्याप्रमाणे अद्वितीय बोधाने म्हणजे सद्‌गुरुकृपेने शक्तीचे चालन होऊन तिचा सुषुम्नेत प्रवेश झाला म्हणजे तू मला शरण आला असे होऊन तुला धर्माधर्माचा स्पर्श होणार नाही. धर्माधर्माचा, पापपुण्याचा, कर्माकर्माचा किंवा कसलाही स्पर्श न होण्याचे सुषुम्ना हेच एकमात्र स्थान आहे; कारण सुषुम्नाप्रविष्ट शक्ती निरालंब अवस्थेत असते. यालाच श्रीज्ञानेश्वरमहाराज 'अंतरप्रतीतिधर्म' असे म्हणतात. शक्त्युत्बोधनाने सुषुम्नेत म्हणजे अंतरात चालन होऊन जो अनुभूती येते तीच खरी शरणागती होय. शक्तीचा विकास जसजसा होत जातो तसतशी ही शरणागती वाढत जाते व शेवटी " जळीं पडिलीया लवणा । सर्वहि जळ होय विचक्षणा । तुज मी अनन्यशरणा । होईन तैसा ॥१८.१४१४॥" अशी स्थिती होते म्हणजे जीव-शिव किंवा गुरु-शिष्य एक होतात. ही शरणागतीची पराकाष्ठा आहे. प्रथम जीव गुरूला शरण जातो व त्यामुळे प्रसन्न होऊन ते दीक्षा देऊन शिष्याला शक्तिजागृतीने कृतार्थ करतात. ही बाह्य शरणागती होय. पुढे सुषुम्नेत शक्ती चालन होऊन क्रमविकास होत राहतो. ही अंतरशरणागती होय.शेवटी जीवाशिवाचे ऐक्य, सामरस्य किंवा महामीलन होते. ही अंतीम व सर्वश्रेष्ठ शरणागती होय." शरणागतीचे हे रहस्य एकदा आत्मसात झाले म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या पुढील ओव्यातील खरे मर्म लक्षात येईल.

**येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।**
**तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥७.९७॥**
**पैं सर्वभावेंसीं उखितें । जे वोपिलें मज चित्तें ।**
**जैसा गर्भगोळु उदरमातें । कोणाही नेणें ॥९.३३५॥**
**ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांतें मातें ।**
**जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ॥९.३३७॥**
**म्हणौनि थोरपण पर्‍हां सांडिजे । एथ व्युत्पत्ती आघवी विसरिजे ।**
**जैं जगा धाकुटें होईजे । तैं जवळीक माझी ॥९.३७८॥**
**तैसें सर्वभावसंभारें । न धरत प्रेम एकसरें ।**
**मजमाजीं संचरें । मीचि होऊनि ॥११.६८८॥**
**तैसे सर्वेंद्रियांसहित । मजमाजीं सूनि चित्त ।**
**जे रात्रीदिवस न म्हणत । उपासिती ॥१२.३८॥**
**तया अहं वाचा चित्त आंग । देऊनियां शरण रिग ।**
**महोदधी का गांग । रिगालें जैसें ॥१८.१३१९॥**

सारांश " जेणे सप्रपंच अज्ञान जाये । एकु मी गोचरु होयें । तें उपपत्तीचेनि उपायें । गीतारूप हें ॥ १८.१३८८ ॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगून श्रीगुरु-

शरणागतीचा उपाय हेच गीतारूपाने प्रकट झालेले ज्ञान असून त्यामुळे प्रपंचभेदासह तुझे सर्व अज्ञान लयाला जाऊन म्हणजे शक्ती शिवात लीन होऊन एक शिवच सर्वत्र प्रकाशमान होईल असा ज्ञानदानप्रक्रियेच्या अलौकिकत्वाचा सिद्धांत प्रस्थापित केला आहे.

सारांश, येथपर्यंत केलेल्या सर्व विवेचनावरून नाथसकेतीचा दंश म्हणजे गूढ अभिप्राय, मर्म किंवा रहस्य खरोखरी काय आहे याचा साकल्याने उलगडा होईल. श्री. हजारीप्रसाद द्विवेदी यांनी "नाथसंप्रदाय" या पुस्तकातील उपसंहार या पंधराव्या प्रकरणात नाथसंकेतीचा दंश कशात आहे हे स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, "गोरक्षनाथ स्वयं पंडित थे। पर यह अच्छी तरह जानते थे कि पुस्तक लक्ष्य नहीं, साधन है। उन्होंने किसीसे भी समझौता नहीं किया, लोकसे भी नहीं, वेदसे भी नहीं, परंतु फिरभी उन्होंने समस्त प्रचलित साधना मार्गसे उचित भाव ग्रहण किया।.... परंतु उनका तत्त्वज्ञान केवल बुद्धि-विलास नहीं है, वह साधनाका विषय है। दीर्घ आयासके बाद उसे प्राप्त किया जाता है। उसमें शुद्ध गुरुकी आवश्यकता होती है। इस साधनमार्गमें निगुरेको कोई स्थान नहीं है।" यावरून हे स्पष्ट होईल की नाथसंकेतीचा दंश हा सिद्धयोगसाधनेत व सद्‌गुरूंच्या शक्तिपातसामर्थ्यात समाविष्ट झालेला असल्याने हा दंश सर्व संप्रदायांना व्यापून राहिला आहे. यामुळच त्याची उंची अतुलनीय आहे. "इदं तु ते गुह्यतमं ॥ ९.१ ॥" म्हणून ज्याचा उल्लेख भगवंतांनी गीतेत केला आहे ते हे साधनरहस्य किंवा नाथसंकेताचा दंशच असून "नातरि अर्जुना हें बीज। पुढती सांगिजेल तुज। जें हें अंतकरणीचें गुज। जिवाचिये ॥९.३४॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे अंतःकरणातील गुज "जीवाचें हिये फोडावें ॥ ९.३५ ॥" म्हणून प्रकट केले आहे.

## प्रकरण पाचवे

# ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या विविध नावांचे रहस्य

**प्रस्तावना :–**

ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या विविध नावांचे रहस्य काय आहे हे आता पाहवयाचे आहे. हे रहस्य त्या त्या नावांच्या सम्यक् अर्थामध्ये, त्या नावानुरोधाने चालणाऱ्या साधनपद्धतीत किंवा वैशिष्टयात व त्यांच्या महिम्यात साठविलेले असते. नावांचे हे त्रिविधरूप उलगडले की, रहस्याचा उलगडा होईल. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनपद्धतीने चालणाऱ्या साधनाला पंथराज, क्रमयोग, महायोग, अनन्ययोग, अभ्यासयोग, भक्तियोग, राजविद्याराजगुह्ययोग सहजयोग, कर्मयोग, क्रियायोग व अर्थपंथ अशी गीताविषयानुरोधाने भावार्थ स्पष्ट करताना विविध नावे दिली आहेत. त्या त्या नावांचे साधनपद्धतीच्या दृष्टीने महत्त्व असले तरी " इये आनानें नांवें । परि निरूप्य आन नोहे । हें लक्षण न चुकावे । पुढतपुढती ।। १३.९६५ ।। " असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्टपणे सांगितले असल्यामुळे नावे निरनिराळी दिसत असली तरी त्या नावांनी सिद्धयोग या एकाच साधनपद्धतीचे त्यांनी निरूपण करून भावार्थ स्पष्ट केला आहे. सिद्धयोग हा शक्तिपातयोग, कुंडलिनीयोग, सिद्धमार्ग, महायोग, सहजयोग, भक्तियोग, क्रियायोग, श्रीगुरुदत्तयोग, आदिनाथयोग, शिवयोग, शिवसंप्रदाय, आदिनाथसंप्रदाय, आदिसंप्रदाय, योगीसंप्रदाय, नाथसंप्रदाय, अमरसंप्रदाय, विहंगमपथ, अमनस्कयोग, तारकयोग, योगमार्ग, नाथमार्ग, शिवमार्ग, माहेश्वरमार्ग, पाशुपतयोग, वज्रयान, सहजयान इत्यादि नानाविध नावांनी संप्रदायांतरात प्रसिद्ध आहे. या प्रत्येक नावात त्या त्या संप्रदायांची वैशिष्टचे मिसळलेली असली तरी " शिवसूत्रात " म्हटल्याप्रमाणे " गुरुरुपाय: ॥२.९॥, " " सिद्धसिद्धांतपद्धतीत" महायोगी गोरक्षनाथांनी म्हटल्याप्रमाणे " अतएवमहासिद्धयोगिभि: सम्यक् गुरुप्रसादं ( शक्तिपातम् ) लब्ध्वावधानबलैक्यं भजमानैस्तत्क्षणात् परमं पदमेवानुभूयते ।। ५.९ ।।, " " प्रत्यभिज्ञाहृदयात " श्रीराजानक क्षेमराजांनी म्हटल्याप्रमाणे " सर्वत्रैव भगवती चितिशक्ति....तदस्फुरणे कस्यापि अस्फुरणात ।। टीका २० ।। " " मध्यविकासात् चिदानंदलाभ: ।। १७ ।। " व " कुलार्णवतंत्रामध्ये " म्हटल्याप्रमाणे " शक्तिपातानुसारेण शिष्योऽनुग्रहमर्हति । यत्र शक्तिर्नपतति तत्र सिद्धिर्न जायते ।। १४.३८।। " हे सर्व संप्रदायांचे सार आहे. श्रीसद्गुरू हाच या सर्व साधनमार्गात एकमेव उपाय आहे. शिष्याने त्याला शरण गेले

पाहिजे. अशा शरण आलेल्या शिष्यावर श्रीगुरू कृपा म्हणजे शक्तिपात करतात. त्यामुळे सुषुम्नेत प्राणांचे संचारण होऊन शक्ती ऊर्ध्वमुखाने चलित होऊन जीवाला चिदानंद लाभ म्हणजे परमसिद्धी प्राप्त होते. हे सर्व साराचे सार आहे. बाकी सर्व " शेषो न्यायश्च विस्तारः ॥५॥ " असे " अमृतबिंदूपनिषदात " म्हटल्याप्रमाणे आहे. ह्या दृष्टिकोनातून आपण ज्ञानेश्वरीतील एकेक नावाचे रहस्य उलगडून पाहू.

**पंथराज :–**

" कलीयुगामध्ये हठयोगादि इतर कोणत्याही साधनाने शक्ती जागृत करण्याला आवश्यक असे शरीर दृष्टीस पडत नाही," असे महान् दत्तावतारी सत्पुरुष प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज म्हणत असत. अशावेळी सर्वांना करता येण्यासारखे सहज, सोपे व दिव्य असे साधन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " पंथराज " या नावाने सांगितले आहे. पंथराज म्हणजे सर्व आध्यात्मिक साधनांच्या पंथाचा राजा होय.. " नान्यः पंथा विद्यतेऽयनाय ॥ श्वेताश्वतरोपनिषद ६.१५ ॥" असे जेंव्हा वेद गर्जून सांगतात तेंव्हा मृत्यूला ओलांडून पलीकडे मोक्षाप्रत जाण्याचा पंथराजासारखा मार्ग नाही, हेच ते सुचवीत असतात. आत्यंतिक दुःखनिवृत्तीचा उपाय मानवाला कळावा या इच्छेने ब्रह्मदेवांनी एकदा महादेवांना असा प्रश्न केला की, "हे शंकरा! सर्व जीव सुखदुःखाच्या मायाजालात गुरफटून गेले आहेत. त्यापासून त्यांची मुक्ती कशी होईल हे कृपा करून सांगा. ज्या मार्गाने सर्व सिद्धी प्राप्त होतील, मायाजाल तुटून जाईल, जन्म, मृत्यू, जरा, व्याधी इत्यादि सर्वांचा नाश होईल व ज्यापासून मोठे सुख प्राप्त होईल असा मार्ग दाखवा. " त्यावेळी शंकरांनी ब्रह्मदेवांना सांगितले की–

**नानामार्गैस्तु दुष्प्रापं कैवल्यं परमं पदम् ।**
**सिद्धिमार्गेण लभते नान्यथा शिवभाषितम् ॥योगशिखोपनिषत् १.३,४॥**

इतर अनेक प्रकारच्या मार्गांनी श्रेष्ठ अशी कैवल्यपदाची प्राप्ती होणे जवळ जवळ कठीणच आहे; परंतु सिद्धमार्गामुळे ही प्राप्ती अगदी सहजासहजी होते. असा या मार्गाबद्दलचा माझा-शिवाचा सिद्धांत आहे. तो कधीही खोटा ठरणार नाही. " योगशिखोपनिषदात " ऋषींनी व "योगबीजात"महायोगी गोरक्षनाथांनी हे जे सिद्धयोगमार्गाबद्दल सांगितले आहे तेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याला पंथराज हे नाव देऊन सांगितले आहे.

पंथराजाचे हे साधन चालते कसे हे आपण मागे चवथ्या प्रकरणात " पिंडें पिंडाचा ग्रासु " या मुद्यात सविस्तरपणे पाहिले आहे व " निगिजे पूर्वीलिया मोहरा । कीं येइजे पश्चिमेचिया घरा । निश्चळपणें धनुर्धरा । चालणें एथिचें ॥ ६.१५९ ॥ " अशा प्रकारे या साधनमार्गाचे जे रहस्य श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कथन केले आहे

त्याचा उलगडा तिसऱ्या प्रकरणातील "पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे रहस्य" या मुद्यात केला आहे. येथे त्याच्या अधिक विस्ताराचे कारण नाही.

पंथराजाचा महिमा सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ऐसें विवरोनियां श्रीहरी । म्हणितलें तिये अवसरीं ।
अर्जुना हा अवधारी । पंथराजु ॥६.१५२॥
तेथ प्रवृत्तितरूच्या बुडीं । दिसती निवृत्तिफळाचिया कोडी ।
जिये मार्गीचा कापडी । महेशु आझुनी ॥१५३॥
पैल योगवृंदें वहिलीं । आडवीं आकाशीं निघालीं ।
कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं । धोरणु पडला ॥१५४॥
तिहीं आत्मबोधाचेनि उजुकारें । धांव घेतली एकसरें ।
कीं येर सकळ मार्ग निदसुरे । सांडूनियां ॥१५५॥
पाठीं महर्षी येणें आले । साधकांचे सिद्ध जाहाले ।
आत्मविद थोरावले । येणेंचि पथें ॥१५६॥
हा मार्गु जैं देखिजे । तैं तहान भूक विसरिजे ।
रात्रीदिवसु नेणिजे । वाटे इये ॥१५७॥
चालतां पाऊल जेथ पडे । तेथ अपवर्गाची खाणी उघडे ।
आव्हांटलिया तरी जोडे । स्वर्गसुख ॥१५८॥
येणें मार्गें जया ठाया जाइजे । तो गांवो आपणचि होइजे ।
हें सांगों काय सहजें । जाणसी तूं ॥१५०॥

"मी ब्रह्मरूप व्हावे अशी माझी इच्छा आहे. ब्रह्मस्थिती प्राप्त होण्याकरिता जे काही केले पाहिजे ते आपण मला सांगा. मी त्याचा अभ्यास करीन," अशी अर्जुनाने शरणागत होऊन विनम्रभावाने श्रीकृष्णांना प्रार्थना केल्यावर ते पंथराजाची वरील प्रकारे महती सांगताना म्हणाले, अर्जुना ! आम्ही जो योगमार्ग तुला सांगणार आहोत तो सर्व मार्गांचा राजा आहे. या राजमार्गाचे माहात्म्य किती मोठे आहे ते मी तुला सांगतो. तू ते श्रवण कर. साधक या योगमार्गाने जाऊ लागला की, त्याला प्रवृत्तितरूच्या बुडाशी म्हणजे मूलाधारातच जागृत शक्तीमुळे निवृत्तीची फळे म्हणजे कोट्यवधी चिन्हे नानाविध अनुभूतींमुळे दिसू लागतात. मूलाधारापासून सहस्रारापर्यंत जो विस्तीर्ण सुषुम्नापथ आहे त्या पथावरून जागृतशक्तियुक्त आंतर-गुरूच्या रूपाने जीवांना आपल्या हाताशी धरून परमधामात घेऊन जाण्यासाठी श्रीशंकर हे अद्यापपावेतो सतत यात्रा करीत आहेत. योगीजन प्रथम सुषुम्नेचा योग्यमार्ग न मिळाल्यामुळे इतर आडव्या तिडव्या मार्गाने आकाशात म्हणजे सहस्रारात जाण्यासाठी स्वप्रयत्नाने चालले होते; परंतु आपण कितीही प्रयत्न केले तरी आपली शक्ती जागृत होत नाही व आपणास ऊर्ध्वमार्ग मिळत नाही असा जेव्हा

त्यांना अनुभव आला, तेव्हा पुढे महेशांच्या कृपेने त्यांना श्रीगुरुकृपाप्राप्त पंथराजाचे साधन मिळून ते सुषुम्नामार्गाला लागले. महेशांनी हा मार्ग आधीच सिद्ध करून ठेविला आहे. हे योगीजन जागृतशक्तीमुळे प्राप्त होणाऱ्या आत्मबोधाच्या सरळ मार्गावरून गेल्याने त्यांना सहजतेने त्वरित गती प्राप्त होऊन ते ब्रह्मस्वरूपापर्यंत जाऊन पोहोचले. एकदा हे सोपे व सहज साधन मिळाल्यावर ते दुसरे अज्ञानाचे सर्व आडमार्ग सोडून देऊन निःसंशयपणे आत्मबोध करून देणाऱ्या पंथराजाच्या सरळ मार्गाने वाट चालत गेले. खरे पाहता त्यांनी या मार्गाने अक्षरशः धावच घेतली. नंतर त्यांच्या मागून आलेले ऋषी, मुनी व महर्षी हेही या पंथराजाच्याच मार्गाने ब्रह्मस्वरूप झाले. या मार्गाच्या आधारानेच साधकांचे सिद्ध झाले व आत्मज्ञानी पुरुष हे देखील याच पंथाने श्रेष्ठत्वास चढले.

पंथराजाचा हा मार्ग जेव्हा श्रीगुरुकृपेने साधकाला प्राप्त होतो तेव्हा त्याची तहान व भूक हरपून जाते. या मार्गाची वाट चालत असताना म्हणजे साधन करताना प्राणांचे चालन सुषुम्नेत होत असल्यामुळे साधकाला मनोन्मनी अवस्था प्राप्त झाल्याने दिवस व रात्र यांची आठवण होत नाही. या दृष्टीनेच "हठयोग-प्रदीपिकेत" असे म्हटले आहे की—

**सूर्याचंद्रमसौ धत्तः कालं रात्रिंदिवात्मकम् ।**
**भोक्त्री सुषुम्ना कालस्य गुह्यमेतदुदाहृतम् ।।४.१७।।**
**सुषुम्नावाहिनि प्राणे सिद्ध्यत्येव मनोन्मनी ।**
**अन्यथा त्वितराभ्यासाः प्रयासायैव योगिनाम् ।।४.२०।।**

सूर्य व चंद्र म्हणजे इडा व पिंगला यातून जेव्हा प्राण वाहत असतात तेव्हा रात्र व दिवस हे ज्याचे स्वरूप आहे असा काल किंवा संसार उत्पन्न होतो. ज्यावेळी सद्गुरुकृपेने प्राणशक्ती कुंडलिनी जागृत होऊन प्राणांचे सुषुम्नेत संचालन होते तेव्हा ही सुषुम्नानाडी काल म्हणजे संसार भक्षण करून टाकते. त्यामुळे दिवस व रात्र नाहीशी होतात. हेच सर्वोत्तम असे गुह्य रहस्य आहे. ज्यावेळी प्राण सुषुम्नेतून वाहू लागतात त्यावेळी उपरोक्त स्थितीमुळ मनोन्मनी अवस्था साधकाला प्राप्त होते. प्राण सुषुम्नावाही न होणारे, असे सुषुम्नेच्या अभ्यासाशिवाय जितके निरनिराळे अभ्यास योगीसाधक करतात ते सर्व वृथा ठरतात; कारण इतर सर्व अभ्यास जीवाच्या संसारचक्रपरिभ्रमणाचेच जनक असल्याने त्या साधनमार्गापासून कोणताही अर्थ सिद्ध होत नाही.

या साधनमार्गाने जाताना साधकाचे पाऊल जसजसे पुढेपुढे पडत जाते तसतसे त्याला मोक्षसुख अनुभवावयास मिळते. हीच गोष्ट "प्रत्यभिज्ञाहृदयात" श्रीराजानक क्षेमराज यांनी "समाधिसंस्कारवति व्युत्थाने भूयो भूयः चिदैक्यामर्शात् नित्योदित-समाधिलाभः ।।१९।।" या सूत्राने स्पष्ट केली आहे. समाधीच्या संस्काराने युक्त

असलेल्या साधकयोग्याला व्युत्थान दशेतही चितिशक्ती कुंडलिनीशी ऐक्य किंवा तादात्म्याच्या परिशीलनामुळे नित्योदित समाधीची प्राप्ती होते. हीच अपवर्गाची खाण होय. यदाकदाचित भोगाकांक्षेमध्ये लिप्त होऊन साधकाच्या साधनगतीत अडथळा आला तर त्याला स्वर्गसुख भोगायला मिळते.

सारांश, मूलाधारापासून निघून सहस्रारापर्यंत म्हणजे संसारादि अनादि वासनांपासून मुक्त करून मोक्षापर्यंत निश्चित पोहोचविणारा असा हा सर्व पंथाचा राजा आहे. अत्यंत दृढ श्रद्धा ठेवल्याशिवाय हा साधनमार्ग आक्रमिला जात नाही. या मार्गावरून चालणे याचा अर्थच दृढ श्रद्धा ठेवून साधन करणे असा आहे. या मार्गाने साधक ज्या गावाला म्हणजे सहस्रारात शिवरूपापाशी जातो तेथेच तो एकरूप होतो म्हणजे ते गावच तो आपण होतो. हेच शिवशक्तीचे मीलन होय. हे साधन इतके सोपे आहे की, साधन करता करता साधक ब्रह्मरूप होऊन जातो. हे अर्जुना ! ही ब्रह्मप्राप्ती पंथराजाच्या या मार्गाने अगदी अनायास होते हे सांगितले तर तुला नवल वाटेल; परंतु तू अभ्यासाला लागलास की, तुला हे आपोआप कळून येईल.

वरील सर्व विवेचनाचे सार प्रकट करताना व पंथराजरूपी सिद्धयोगाचा महिमा सांगताना श्रीसंततुकाराममहाराज म्हणतात–

**मारगी बहुत । याचि गेले साधुसंत ।।१।।**
**नका जाऊं आडरानें । ऐसीं गर्जतीं पुराणें ।।२।।**
**चोखाळल्या वाटा । न लगे पुसाव्या धोपटा ।।३।।**
**झळकवी पताका । गरुडटके म्हणे तुका ।।४।। ३०७१।।**

**क्रमयोग :–**

सिद्धयोगालाच क्रमयोग हे नाव देऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याचे वर्णन केले आहे. क्रमयोग म्हणजे क्रमाक्रमाने होणारा योग होय. रुची, प्राक्तन-संस्कार, अधिकार-संपत्ती इत्यादि गोष्टींमुळे भगवत्प्राप्तीच्या क्रमात विविधता व वैचित्र्य दिसून येते. यामुळेच शिवसूत्रकारांनी उत्तम अधिकारी साधकांकरिता शांभवोपाय, मध्यम अधिकारी साधकांकरिता शाक्तोपाय व कनिष्ठ अधिकारी साधकांकरिता आणवोपाय सूचित केला आहे. जे साधक उत्कृष्ट अधिकारी असतात म्हणजे परमेश्वराच्या तीव्रतम अनुग्रहशक्तीचा संचार ज्यांच्यामध्ये झाला आहे ते केवळ एकदाच गुरुमुखाने आत्मस्वरूपाचा उपदेश ऐकून त्यात स्थिरता प्राप्त करतात. लौकिक किंवा अलौकिक अशा कोणत्याही उपायाने शिवरूपी नित्यसिद्ध स्वप्रकाश-आत्म्याचा प्रकाश होऊ शकत नाही हे ते उत्तम रीतीने जाणतात. अशा प्रकारच्या साधकांना मंत्र, पूजा, ध्यान, चर्या इत्यादि बंधनांची आवश्यकता असत नाही. जे मध्यम अधिकारी आहेत त्यांना अखंडमंडलस्वरूप महाप्रकाशमय आत्मस्वरूपाच्या

प्राप्तीसाठी थोडचाशा साहाय्याची अपेक्षा असते. हे साधक सद्गुरुकृपेने जागृत झालेल्या शक्तीच्या साहाय्याने अंतःस्थित राहून यथाक्रम ज्ञान प्राप्त करतात. जे अधम अधिकारी आहेत त्यांची शक्ती जागृत झाली तरी तिचे स्वरूप अत्यंत सूक्ष्म असल्याने व त्यांच्या ठिकाणी होणारी चित्शक्तीची अभिव्यक्ती अगदी मंद व अल्प असल्याने हठ, मंत्र, जप, ध्यान, पूजा, चर्या इत्यादि बाह्य साधनांचा अवलंब करून जागृत शक्तीला अधिक चालना देणे आवश्यक ठरते. यासाठी त्यांना आणवोपाय उपयोगी होतो. यावरून हे स्पष्ट दिसते की, जे उत्तम अधिकारी साधक आहेत त्यांच्या स्वरूपज्ञानप्राप्तीत क्रम असत नाही. यांचाच उल्लेख " ज्ञानयोगेन सांख्यानाम् ।। ३.३ ।। " असे म्हणून भगवंतानी गीतेत केला असून त्याचा उपरोक्त पद्धतीने भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**एक ज्ञानयोगु म्हणिजे । जो सांख्यीं अनुष्ठिजे ।**
**जेथ ओळखीसवें पाविजें । तद्रूपता ।।३.३६।।**
**देखैं उत्प्लवनासरिसां । पक्षी फळासी झोंबे जैसा ।।४१।।**

पक्षी एका उड्डाणाबरोबर झाडाचे फळ प्राप्त करून घेतो त्याप्रमाणे सद्गुरूंनी सांगताक्षणीच उत्तम अधिकारी साधकाला आत्मस्वरूपाची ओळख होऊन तो तेथेच तद्रूप होतो. यांनाच सांख्य म्हणतात; परंतु असे उत्तम अधिकारसंपन्न योग्यतेचे साधक विरळ असतात हे जाणून व सर्वसामान्य जीवाबद्दल आत्यंतिक करुणा मनामध्ये असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " सांगैं नरू केवीं तैसा । पावे वेगा ? ।। ३.४१ ।। " असा प्रश्न विचारून गुरुपरंपराप्राप्त कर्मयोगाच्या साधनाचे ज्ञानेश्वरीत निवेदन केले आहे. या दृष्टीने " भारतीय संस्कृति और साधना, " या ग्रंथातील दुसऱ्या खंडातील, " सिद्धपुरुष " व " भक्तिरहस्य " आणि पहिल्या खंडातील " सूर्यविज्ञान " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी जे विचार मांडले आहेत ते पाहण्यासारखे आहेत. ते म्हणतात, " अनादि कालसे यह जो क्रमविकास का खेल चल रहा है यह एक खेलही हैं । यह भाषाका विकास है, इसमें कुछ भी वास्तविकता नहीं है । यह आत्मविस्मृत जीवका अपने स्वरूपको पुनः पानेके लिए कौशलमात्र है । क्रमविकाससे अपनी परमसत्ता अभिव्यक्त होती है । जब माया और द्वैत प्रपंचसे आत्मा छुटकारा पाती है तब वह एकीभावको प्राप्त होती है। इसलिए उस समय मूल अद्वय सत्ताका आकर्षण जाग उठता है । इस मार्गमें प्रेमकी प्रेरणा विशेषरूपसे उल्लेख योग्य है ।" (सिद्धपुरुष–पृष्ठ ५२–५३)

" शक्तिके उद्बुद्ध होनेसे भावमें प्रवेशके साथ–साथ अभावके जागृतसे

ज्योतिर्मय भावजगत्‌में प्रविष्ट होनेपर अपना एक विशिष्ट स्थान प्राप्त हो जाता है। तब उसी स्थानसे इष्ट वस्तुका अन्वेषण चलने लगता है। इस प्रकार अंतर्जगतमें क्रमशः अधिकतर गुहचस्थान प्राप्त होते-होते चरम अवस्थामें अंतरतम विंदुमें प्रवेश प्राप्त होता है। तब इष्टका स्वरूप उन्मुक्त हो जाता है और भक्तको भगवत्साक्षात्कार सिद्ध होता है। अंतर्जगत्‌में प्रवेशके पश्चात् जगत्‌के अंतिम विंदुतक अनवच्छिन्न भावसे अग्रसर होना पडता है। इसीका नाम है साधनाका क्रमविकास। आवर्त्तक्रमसे वृत्तके मध्यविंदुमें स्थिति प्राप्त करनेपर वहिर्जगत् और अंतर्जगतका भेद दूर हो जाता है। तब साधनाकी परिसमाप्ति हो जाती है। इसीका नाम रसका उदय है" (भक्ति रहस्य–पृ. ६९–७०)

"परमेश्वरही तो आदर्श योगी हैं; उनके सिवा महाशक्तिका पूरा पता और किसीको प्राप्त नहीं है, न प्राप्त हो ही सकता है। जो निर्मल होकर परमेश्वरकी शक्तिके साथ जितना युक्त हो सकते हैं, उनमें उतनीही ऐसी शक्तिकी स्फूर्ति होती है। यह युक्त होना एक दिनमें नहीं होता, क्रमशः होता है। इसीलिये शुद्धिके तारतम्यके अनुसार शक्तिका स्फुरणभी न्यूनाधिक होता है। शुद्धि या पवित्रता जब सम्यक् प्रकारसे सिद्ध हो जाती है, तब ईश्वर सायुज्यकी प्राप्ती होती है।" (सूर्यविज्ञान–पृ. ४२२)

क्रमयोगाचा हा अर्थ ध्यानात आला म्हणजे त्याच्या पार्श्वभूमीवर क्रमयोगाचे साधन कसे चालते हे ध्यानात येईल व " तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति॥ गीता ४.३८॥", अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्॥ गीता ६.४५॥" व " बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते॥ गीता ७.१९॥ " या भगवंताच्या गीतेतील कथनाचा अर्थ स्पष्ट होऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याचा केलेला भावार्थ अंतरंग होईल. ते म्हणतात–

**जे तो विषयांची दाट झाडी–। माजीं कामक्रोधांचीं सांकडीं।**
**चुकावूनि आला पाडीं। सद्‌वासनेचिया॥७.१२७॥**
**मग साधुसंगें सुभटा। उजू सत्कर्माचिया वाटा।**
**अप्रवृत्तीचा अव्हांटा। डावलूनी॥१२८॥**
**आणि शतजन्मांचा वाहतवणा। तेंविची आशेचिया न लेचि वाहणा।**
**तेथ फलहेतूचा उगाणा। कवणु चाळी॥१२९॥**
**ऐसा शरीरसंयोगाचियें राती–। माजीं धांवतां सडिया आयती।**
**तंव कर्मक्षयाची पाहाती। पाहांट जाली॥१३०॥**
**तैसीच गुरुकृपा उखा उजळली। ज्ञानाची वोतपली पडली।**
**तेथ साम्याची ऋद्धि उघडली। तयाचिये दिठी॥१३१॥**

ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे ।
अथवा निवांत जरी राहे । तरी मीचि तया ॥१३२॥
हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं ।
जैसें सभाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥१३३॥
तैसा तो मजभीतरीं । मी तया आंतुबाहेरी ।
हें सांगिजेल बोलवरी । तैसें नव्हे ॥१३४॥

अशा प्रकारे साधक शतशतजन्म वाहतवणा होऊन जेव्हा फलहेतुरहित वाटचाल करतो तेव्हा सहज कर्मक्षय होऊन ज्ञानोदयाची पहाट होते. त्यावेळी श्रीगुरुकृपेची उषा उजळते म्हणजे शक्तिपातदीक्षा मिळून अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत होते. यालाच ज्ञानाची वोतपली पडणे म्हणतात. मग क्रमविकासाने साधकाला साम्याची ऋद्धी प्राप्त होते. पुढे "ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥ १८.५५ ॥ " या गीता श्लोकाचा भावार्थ सांगताना "हे मज मिळतिये वेळे । तयां क्रमयोगियां फळे। मग समस्तही निखळें । मियांचि भरे ॥१८.११३४॥" असे म्हणून अशा क्रमयोगाचीच वाट ज्ञानी, कर्मी व भक्त यांना पकडावी लागते असे त्यांनी स्पष्ट केले आहे. क्रमयोगाचे साधन होते तरी कसे हे अधिक स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, "जेव्हा शक्ती जागृत होऊन सुषुम्नेत प्रवेश करते तेव्हा वैराग्य विवेकासह नाहीसे होते. बंध मोक्षासह नाहीसा होतो. सर्व चित्तवृत्ती पुन्हा आवृत्त न होता तेथे नाहीशा होतात. जागृत शक्ती पृथ्वी, आप तेज व वायू या चारही भूतांना गिळून शेवटी सहस्रारातील आकाशात हरपून जाते. त्यामुळे अलीकडीलपण म्हणजे जीवत्व व पलीकडीलपण म्हणजे शिवत्व हे हरपून एकरस अशी समरस अवस्था उत्पन्न होते. गंगा सिंधुरूप होते त्याप्रमाणे जीव सुषुम्नामार्गाने जाऊन ब्रह्मरूप होतो. दोन आरसे एकमेकांसमोर ठेवल्यावर तेथे पाहणारा व पाहिले जाणारे हे दोघे द्रष्टे जसे एकरूपच असतात त्याप्रमाणे या साधनात शक्तीसमोर शिव ठेविला जातो. पाहणाऱ्याच्या मुखासमोरून आरसा बाजूला नेला असता पाहणारा जसा एकटाच उरतो त्याप्रमाणे ' स्वेच्छया स्वभित्तौ विश्वमुन्मीलयति ॥ २॥" असे "प्रत्यभिज्ञाहृदयात" म्हटल्याप्रमाणे चितिशक्ती ही आपल्या स्वतःच्या इच्छेनेच आत्मरूपपटावर किंवा आरशावर विश्वाचे उन्मीलन करते. ही स्थिती ही शक्तीच नाहीशी करते; कारण ती शिवरूप होते. अशी ही जागृतीची अवस्था या क्रमयोगाने प्राप्त होऊन विश्वरूप स्वप्न साधकाला नाहीसे होते आणि " यालागी तो क्रमयोगी। मी जालाचि मातें भोगी। तारुण्य कां तरुणांगी । जियापरी ॥ १८.११४७॥" अशी अनुभूती घेऊन क्रमयोगी ईश्वरस्वरूप होतो. ( १८.११३५ ते ११४७) पुढेही अधिक दृष्टांत देऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे क्रमयोगाचे साधन कसे चालते हे स्पष्ट केले आहे. त्याचे सार सांगताना ते म्हणतात –

तैसें जें कांहीं आथी नाथी । येणें होय ज्ञेयस्फूर्ती ।
तें ज्ञाताचि मी हे प्रतीती । होऊनि भोगी ।।१८.११९२।।

सर्व काही आहे व नाही असे जे वाटते ते सर्व ज्ञेयस्फूर्ती म्हणजे शिवाच्या चित्शक्ती कुंडलिनीमुळेच होते. ही शक्तीच मी ज्ञाता आहे, मीच सर्व काही आहे अशी प्रत्यक्षानुभूती घेऊन, ती शक्ती भक्तसाधकाच्या रूपाने त्याचा उपभोग घेते. "सर्वं शक्तिमयं जगत्" किंवा "त्वमेव सर्वशक्तिः ।" असा "त्रिपादविभूतिमहानारायणोपनिषदातील" सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी येथे प्रस्थापित करून क्रमयोगातील कुंडलिनी शक्तीच्या जागृतीचे अनन्यसाधारणत्व प्रकट केले आहे. हे त्यांच्या नाथपरंपराप्राप्त समाधिधनाचे फलच आहे असे म्हटले तर किंचितही अत्युक्ती होणार नाही; कारण "सिद्धसिद्धांतपद्धतीत" महायोगी श्रीगोरक्षनाथांनीही हाच सिद्धांत प्रस्थापित केला आहे. ते म्हणतात, "किमुक्तं भवति परापर विमर्शरूपिणी संविन्नानाशक्तिरूपेण निखिलपिंडाधारत्वेन वर्तते इति सिद्धांतः ।। ४.२९ ।। " सर्व विचार केल्यावर हे निश्चित होते की, व्यष्टिसमष्टिभूत चित्शक्ती कुंडलिनीच नाना शक्तिरूपाने सर्व पिंडांचा आधार होऊन राहते. हा सिद्धांचा सिद्धांत आहे.

क्रमयोग साधनाच्या बळावर साधकयोगी कशा रीतीने देह ठेवून निजस्वरूपी एकरूप होतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तया अव्यंगवाणेया ब्रह्मातें । प्रयाणकालें प्राप्ते ।
जो स्थिरावलेनि चित्तें । जाणोनि स्मरे ।।८.९१।।
बाहेरीं पद्मासन रचुनी । उत्तराभिमुख बैसोनी ।
जीवीं सुख सूनी । क्रमयोगाचें ।।९२।।
आंतु मीनलेनि मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें ।
आपेआप संभ्रमें । मिळावया ।।९३।।
आकळलेनि योगें । मध्यमा मध्यमार्गें ।
अग्निस्थानौनि निगे । ब्रह्मरंध्रा ।।९४।।
तेथ अचेत चित्ताचा सांगातु । आहाचवाणा दिसे मांडतु ।
जेथ प्राण गगनाआंतु । संचरे कां ।।९५।।
परि मनाचेनि स्थैर्यें धरिला । भक्तीचिया भावना भरला ।
योगबळें आवरला । सज्ज होऊनि ।।९६।।
तो जडाजडातें विरवितु । भ्रूलतामाजीं संचरतु ।
जैसा घंटानाद लयस्तु । घंटेसीच होय ।।९७।।
कां झांकलिया घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हां ।
या रीतीं जो पांडवा । देह ठेवी ।।९८।।

तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम ।
तें माझें निजधाम । होऊनि ठाके ॥९९॥

यापेक्षा क्रमयोगाचे सुंदर वर्णन कोणते असू शकेल? सिद्धयोगाच्या सर्व अंगोपांगासह व त्याच्या माहात्म्यासह ते येथे प्रकट झाले आहे. चित्त म्हणजे जागृत शक्तीच्या साहाय्याने अग्निस्थानापासून म्हणजे मूलधारातून निघून मध्यमा मध्यमार्गे म्हणजे सुषुम्नापथाने घंटेच्या नादाप्रमाणे शिवाशी एकरूप असलेली शक्ती शिवाशी मिळून जाऊन साधक ब्रह्मरूप होतो. हेंच क्रमयोगाच्या साधनाचे सार आहे.

अशा या अपूर्व क्रमयोगसाधनाचे माहात्म्य सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तेथ बुझिजे बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें ।
सुखावरी नुसधें । सुखचि भोगिजे ॥१८.१२१५॥
तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा ।
विस्मयो बुडाला उभा । विस्मयामाजीं ॥१२१६॥
शमु तेथ सामावला । विश्रामु विश्रांति आला ।
अनुभवु वेडावला । अनुभूतिपणें ॥१२१७॥
किंबहुना ऐसें निखळ । मीपण जोडे तया फळ ।
सेवूनि वेली वेल्हाळ । क्रमयोगाची ते ॥१२१८॥
पैं क्रमयोगिया किरीटी । चक्रवर्तीच्या मुकुटीं ।
मी चिद्रत्न तें साटोवाटीं । होय तो माझा ॥१२१९॥
कीं क्रमयोगप्रासादाचा । कळसु जो हा मोक्षाचा ।
तयावरील अवकाशाचा । उवावो जाला तो ॥१२२०॥
नाना संसार आडवीं । क्रमयोग वाट बरवी ।
जोडिली ते मदैक्यगांवीं । पैंठी जालीसे ॥१२२१॥
हें असो क्रमयोगबोधें । तेणें भक्तिचिद्गांगें ।
मी स्वानंदोदधि वेगें । ठाकिला कीं गा ॥१२२२॥

सारांश, भक्तिरूप असलेली चैतन्यरूपी कुंडलिनीगंगा हीच स्वानंदरूपी समुद्राला म्हणजे स्वरूप शिव व आनंदरूप शक्ती असलेल्या शिवशक्तिरूपाप्रत साधकाला नेऊन पोहचविते. हा परम सिद्धांत आहे. इतके सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी क्रमयोगादि भिन्नभिन्न नावांनी आपण एकाच सिद्धयोगाचा महिमा वारंवार सांगत आहोत असे निभ्रांतपणे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात–

हा ठायवरी सुवर्मा । क्रमयोगीं आहे महिमा ।
म्हणौनि वेळोवेळां तुम्हां । सांगतों आम्ही ॥१८१२२३॥

सारांश, " क्रमसिद्धिनामक " ग्रंथामध्ये हाच महिमा सांगताना असे म्हटले

आहे की, "गुर्वायत्तं क्रमज्ञानमाज्ञासिद्धिकरं परम् । क्रमज्ञानान्महादेवि त्रैलोक्यं कवली-कृतम् ।।" क्रमज्ञान सद्गुरूच्या अनुग्रहावर अवलंबून आहे. हा क्रमयोग साधकयोग्याला परम आज्ञासिद्धी प्राप्त करून देतो. हे महादेवी ! क्रमयोगाची प्राप्ती करून घेत-ल्यावर त्रैलोक्य वश होते हे निःशंशय आहे.

**महायोग :–**

सिद्धयोगाचे महायोग असे तिसरे नाव ज्ञानेश्वरीत आले आहे. महायोग म्हणजे सर्वात मोठा, महान व श्रेष्ठ असा योग होय. "योगशिखोपनिषदात" याचे वर्णन आले असून स्वाभाविक योग एकच असून अनेक नाहीत असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. हा स्वाभाविक योगच महायोग या नावाने साधकात प्रसिद्ध असून तो श्रीगुरु-कृपेने शक्ती जागृत झाली की, त्याच्या अवस्थाभेदानुसार मंत्रयोग, हठयोग, लययोग व राजयोग या चार प्रकाराने प्रकाशित होत असतो हे सांगताना ऋषी म्हणतात–

**मंत्रो लयो हठो राजयोगोन्तर्भूमिकाः क्रमात् ।**
**एक एव चतुर्धायं महायोगोऽभिधीयते ।।१.१२९।।**

मंत्रयोग, लययोग, हठयोग व राजयोग या एकाच योगाच्या चार अंतरर्भूमिका मात्र आहेत. जरी जागृत शक्ती, साधक ज्या अवस्थेत असेल तेथून त्याला पुढे नेण्याकरिता, जो योग आवश्यक आहे तो आतून प्रकट करीत असली व त्यामुळे हा योग चार भागात विभक्त झालेला दिसत असला तरी तो एकच योग आहे. त्यालाच सिद्धयोग म्हणतात व या सिद्धयोगात उपरोक्त चारही योगांचा समावेश होत असल्याने त्याला महायोग असे म्हटले जाते.

शास्त्रकारांनी योग दोन प्रकारचा सांगितला आहे. एक अभावयोग व दुसरा भावयोग होय. ज्या योगात शून्य व वेदान्ताने सांगितलेल्या सर्व प्रकारच्या निराभास स्वरूपाचे चिंतन केले जाते म्हणजे ज्या योगाने आत्म्याला निर्गुण शून्य मानून ध्यानाने त्याचा साक्षात्कार होतो त्याला अभावयोग म्हणतात. श्रीगौडपादा-चार्यांनी अजातिवादाच्या नावाने हाच अभावयोग "मांडुक्योपनिषदात" कथन केला आहे. हा अत्यंत दुर्घट असल्याने सामान्य जनाच्या आवाक्यापलीकडे आहे. त्यामुळे "तैसें सोहोकासन सांगडें । सोहपें होय ।। ५.८ ।।" असा सोपा महायोग श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी कथन केला आहे महायोग हा वास्तविक भावयोग असून तो सर्व योगातील उत्तम योग आहे. हे सांगताना "कूर्मपुराणाच्या उत्तरार्धात" असे म्हटले आहे की–

**योगस्तु द्विविधोज्ञेयो ह्यभावः प्रथमो मतः ।**
**अपरस्तु महायोगः सर्व योगोत्तमोत्तमः ।।५।।**

**यत्र पश्यति चात्मनं नित्यानंदं निरंजनम् ।**
**मय्यैक्यं स महायोगो भाषितः परमः स्वयम् ।।७।।**

योग दोन प्रकारचा आहे पहिला अभावयोग असून दुसरा सर्व योगातील व उत्तमातील उत्तम असा सर्वश्रेष्ठ महायोग आहे. ज्याच्या योगाने नित्य आनंददायक निरंजन अशा आत्म्याशी किंवा परमात्म्याशी जीवाचे मीलन किंवा ऐक्य प्रतीतीस येते त्याला महायोग म्हणतात.

असा हा महायोग वेदाधीन असून त्याच्या अधीन कुंडलिनी शक्ती व मन असल्याने महायोगाच्या प्राप्तीसाठी शक्ती जागृत होणे नितांत आवश्यक आहे हे सांगताना " रुद्रयामलतंत्रात " असे म्हटले आहे की–

**वेदाधीनं महायोगं योगाधीना च कुंडली ।**
**कुंडल्यधीनं चित्तं तु चित्ताधीनं चराचरम् ।।१।।**
**मनसः सिद्धिमात्रेण शक्तिसिद्धिर्भवेद् ध्रुवम् ।**
**यदि शक्तिवशीभूता त्रैलोक्यं स्यात्तदा वशेत् ।।२।।पटल२१।।**

महायोग हा वेदाच्या अधीन असून महायोगाच्या अधीन कुंडलिनी शक्ती आहे. कुंडलिनी शक्तीच्या अधीन चित्त असून चित्ताच्या अधीन सर्व चराचर आहे. यामुळे मनाची सिद्धी झाली की, शक्तीची सिद्धी निश्चितपणे होते. जर शक्ती वश झाली तर सर्व त्रैलोक्य वश होते. यासाठी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन महायोग स्वयमेव घडल्याशिवाय सर्व व्यर्थ होय हे नितांत सत्य आहे.

अशा ह्या महायोगाचे साधन कसे घडते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**म्हणौनि निःशकें येणें महायोगें । मज मीनला मनाचेनि आंगें ।**
**एथ संशय करणें न लगे । तो निशुद्धी जाहला ।।१०.१०८।।**

ज्या साधकाकडून वर सांगितल्याप्रमाणे मनाच्या साहाय्याने शक्ती जागृतीने आतून स्वयमेव घडणारे सिद्धयोगाचे म्हणजे महायोगाचे साधन होते तो निःशंकपणे परमात्मस्वरूप होतो. याबद्दल कसलाही संशय घेण्याचे कारण नाही; कारण या साधनामुळे सत्त्व, रज व तम यांची शुद्धी होऊन साधक आपोआपच ब्रह्मरूप होत असतो. अर्थात् हे साधन घडण्यास " हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्‌करु माथा पारुखे । तो जीवचि परि तुके । महेशेंसीं ।।१०.९।। तरी ऐकें गा सुवर्म । वाक्य माझें परम । जें अक्षरें लेऊन परब्रह्म तुज । खेंवासि आलें ।।१०.६२।।" अशा प्रकारे सद्‌गुरूंकडून प्राप्त होणारी शक्तिपात योगदीक्षाच एकमेव कारण असून " ऐसें जाणे जो साचें । तया चेइरे जाहालें ज्ञानाचें । म्हणौनि उत्तमाधम भेदाचें । दुःस्वप्न न देखे ।।१०.१०६।। " अशी ज्ञानाच्या चेइरे होण्याची म्हणजे शक्ती जागृत होऊन महायोगाचे साधन घडण्याची मूलभूत भूमीही त्यांनी स्पष्ट केली आहे.

महायोग हा भावरूप म्हणजे भक्तिरूप आहे हे आपण वर पाहिलेच आहे. अशा स्थितीत त्याचा महिमाही या अंगभूत गुणाला प्रकट करणाराच असणार हे ओघाने आले. श्रीज्ञानेश्वरमहाराज महायोगाचा महिमा सांगताना म्हणतात–

**कां जे ऐसें किरीटी । मातें भजे जो अभेदा दिठी ।**
**तयाचिये भजनाचे नाटीं । सूती मज ।।१०.१०९।।**
**म्हणौनि अभेदें जो भक्तियोगु । तेथ शंका नाहीं नये खंगु ।**
**करितां ठेला तरी चांगु । तें सांगितलें षष्ठी ।।११०।।**

अशा प्रकारे महायोगाचा महिमा सांगून महायोग हाच भक्तियोग होय व तोच पंथराज या नावाने सहाव्या अध्यायात सांगितला आहे असे सांगून पुढे लगेच "तोचि अभेदु कैसा । हें जाणावया मानसा । साद जाली तरी परियेसा । बोलिजेल ।। १०.१११ ।। " तोच अभेदभक्तियोग कसा आहे ते सांगतो असे म्हटले आहे. याचा अर्थ असा की, महायोग भक्तियोग, पंथराज, अभेदभक्तियोग इत्यादि विविध नावांनी एकाच सिद्धयो ाचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केले आहे हे निखलास सत्य होय. गीतेत अनेक योग सांगितले आहेत व अनेक मार्गांचे त्यात वर्णन केले आहे या भ्रांत समजुतीला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अशा प्रकारे एकरूपत्व दाखवून, पूर्ण टाळा लावला आहे.

### अनन्ययोगः–

सिद्धयोगाचेच अनन्ययोग या नावाने भगवान् श्रीगोपाळकृष्णनाथांनी श्रीमद्भगवद्गीतेत पुढील तीन श्लोकात स्पष्टार्थाने वर्णन केले आहे. ते म्हणतात–

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ।।८.१४।।**
**अनन्याश्चितयंतो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तां योगक्षेमं वहाम्यहम् ।।९.२२।।**
**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ।।१२.६।।**

वरील श्लोकांव्यतिरिक्तही सूचितार्थाने किंवा लक्ष्यार्थाने भगवंतांनी गीतेत अनेक वेळा अनन्ययोगरूप सिद्धयोग लक्षित केला आहे. त्यामुळे उपरोक्त तीन श्लोकांचा भावार्थ कथन करताना व जेथे जेथे तसा सूचित भाव आहे तेथे तेथे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अनन्ययोगाचा अर्थ स्पष्ट केला आहे. अनन्ययोग म्हणजे काय हे सांगताना ते म्हणतात –

**पैं सर्वभावेंसीं उखितें । जे वोपिलें मज चित्तें ।**
**जैसा गर्भगोळु उद्यमातें । कोणाही नेणें ।।९.३३५।।**
**तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं ।**

**मजचि नाम पाहीं । जिणेंया ठेविलें ।।९३६।।**
**ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसांतें मातें ।**
**जे उपासिती तयांतें । मीचि सेवीं ।।९३७।।**

जेव्हा साधक सर्वभाव सोडून देऊन चित्त परमात्म्याला वोपतो तेव्हाच तो अनन्यगतिक होतो. येथे " चितिरेव चेतनपदादवरूढा चेत्यसंकोचिनी चित्तम् ।।५।।" या " प्रत्यभिज्ञाहृदयातील " श्रीराजानक क्षेमराज यांच्या व्याख्येप्रमाणे कुंडलिनी चितिशक्ती जेव्हा चेतनपदापासून खाली उतरून चैतन्याचा संकोच करते तेव्हा ती चित्त या नावाने ओळखली जाते हे सूत्र ध्यानात घेऊन जेव्हा हे चित्त म्हणजे कुंडलिनी शक्ती "गुरुरुपाय: ।।२.६।।" या श्रीअभिनवगुप्त विरचित "शिवसूत्राच्या" न्यायाने श्रीगुरुकृपेने म्हणजे एकमात्र श्रीगुरूंनी केलेल्या शक्तिपाताने जागृत होते तेव्हा " सुषुम्नावाहिनी प्राणे सिद्धयत्येव मनोन्मनी ।। ४.२० ।। " या " हठयोग-प्रदीपिकेतील " सूत्राप्रमाणे प्राण सुषुम्नेमध्ये उर्ध्वगतीने वाहू लागतात व मनोन्म-नीची म्हणजे अनन्ययोगाची अवश्य सिद्धी होते. अशी सिद्धी प्राप्त होणे म्हणजेच मीवाचून आणीक काही गोमटे नाही असे होणे होय; कारण या अनन्ययोगाच्या अभ्यासाशिवाय दुसऱ्या कशानेही आपल्या जीविताचे सार्थक होणार नाही याची साधकाला पक्की खात्री असते. यामुळेच "अन्यथा त्वितराभ्यासा: प्रयासायैव योगिनाम् ।।४.२०।। " असे "हठयोगप्रदीपिकाकार" श्रीस्वात्मारामयोगींद्रांनी म्हटले आहे. जोपर्यंत प्राण सुषुम्नावाही होत नाहीत तोपर्यंत सुषुम्नेच्या अभ्यासाव्यतिरिक्त जितके अन्य अभ्यास योगीसाधक करतात ते सर्व वृथा व परिश्रमालाच कारण होतात; कारण त्यापासून कोणताही अर्थ केव्हाही सिद्ध होत नाही. ही अनन्ययोगाची व्याख्याच पुढे बाराव्या अध्यायातील गीतेच्या " अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ।। १२.६ ।। " याचा भावार्थ सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अधिक स्पष्ट केली आहे. ते म्हणतात —

**आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानासिक भाव ।**
**तयां मीवांचूनि धांव । आनौती नाहीं ।।१२.७९।।**
**ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर ।**
**ध्यानमिषें घर । माझें झालें ।।८०।।**
**ऐसे अनन्ययोगें । विकलें जीवें मनें आंगें ।**
**तयांचें कायि एक सांगें । जें सर्व मी करी ।।८२।।**

या अनन्ययोगाच्या मार्गाला साधक एकदा लागला की, तो ध्यानाच्या निमि-त्ताने आपोआप आत्मस्वरूप होतो. त्याला कोणताही प्रयत्न स्वत:ला करावा लागत नाही; कारण जागृतशक्तीच्या रूपाने जे सर्व मी करी असे परमात्माच आतून सर्व साधन करीत असतो व साधकाला साध्यरूप म्हणजे स्वस्वरूप करीत असतो.

" चालविसी हातीं धरूनिया " असे म्हणून श्रीसंततुकाराममहाराजांनी जे वर्णन केले आहे त्याचा अर्थही हाच आहे.

अनन्ययोगाचे साधन साधकाकडून आपोआप कसे होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

**बुद्धि अनन्य येणें योगें । मजमाजीं जैं रिगे ।**
**तैं चित्त चैत्यत्यागें । मातेंचि भजे ॥ १८.१२६७॥**
**ऐसें चैत्यजातें सांडिलें । चित्त माझ्या ठायीं जडलें ।**
**टाके तैसें वहिलें । सर्वदा करी ॥१२६८॥**
**मग अभिन्ना इया सेवा । चित्त मियांचि भरेल जेधवां ।**
**माझा प्रसादु जाण तेधवां । संपूर्ण जाहला ॥१२६९॥**

बुद्धी म्हणजे प्राण होय. कारण " स एष प्राण एव प्रज्ञा " ॥ ३.८ ॥ असे " कौषीतकीब्राह्मणोपनिषदात " म्हटले आहे. अशी बुद्धी म्हणजे प्राण जेव्हा अनन्ययोगाने म्हणजे ज्यांना सुषुम्नेशिवाय दुसरी गती नाही अशा मार्गाने सहस्रारात परमात्म्याशी एकरूप होण्याकरिता निघतात तेव्हा चित्त म्हणजे कुंडलिनी शक्ती चैत्यत्यागे म्हणजे " तदा प्रकाशान्दसारमहामंत्रवीर्यात्मकपूर्णाहन्तावेशात् सदा सर्वसर्गसंहारकारिनिजसंविद्देवताचक्रेश्वरप्राप्तिर्भवतीति शिवम् ॥२०॥ " या श्रीक्षेमराजकृत " प्रत्यभिज्ञाहृदयातील " सूत्राप्रमाणे चिदानंदैकघन महामंत्रवीर्यस्वरूप अशा पूर्ण शिवस्वरूपात प्रवेश केल्यामुळे सर्व वस्तुजाताचा संहार करून त्याच्याशीच एकरूप होते. अशा प्रकारे प्राणशक्तीचे उर्ध्वगमन झाले की, सर्व अनात्म विषय आपोआपच गळून जातात; कारण शक्तीचे आकर्षण सतत शिवाकडेच होत राहते. हेच चित्त माझ्या ठायी जडणे होय. असे होण्यासाठी साधकाने नियमित साधन केले पाहिजे. अशा प्रकारे साधन करून शक्तीच्या सुषुम्नेतील विकासाला नित्याभ्यासाने वाव देणे हीच अभिन्न सेवा होय. ही सेवा केली की, शक्ती आपले शक्तीपण सोडून देऊन आपल्या मूळ शिवस्वरूपाला प्रकट करते. हेच चित्त मियाची भरणे होय. मग जेव्हा शिवशक्तीच्या मिलनाने एक अभेद स्वसंवेद्य आत्मस्थिती उरेल तेव्हा शक्तिपातयोगस्वरूप अनन्ययोग पूर्ण होतो. हाच संपूर्ण प्रसाद होणे होय.

असे हे अनन्ययोगाचे साधन चालते. महायोगी गोरक्षनाथांनी "अमनस्कयोग" या ग्रंथात अमनस्कयोग या नावाने हेच अनन्ययोगाचे साधन प्रकट केले आहे. ते म्हणतात, " मन आणि वायू व दूध आणि पाणी एकमेकात मिसळल्यासारखी आहेत. या दोघांची क्रियासुद्धा सारखीच आहे. या दोहींमध्ये जोपर्यंत मन राहते तोपर्यंत वायूची प्रवृत्ती असते व जोपर्यंत वायू असतो तोपर्यंत मनाची प्रवृत्ती टिकून राहते. या दोहोंमध्ये जेव्हा एकाचा विनाश होतो तेव्हा दुसऱ्याचाही विनाश होतो आणि एकाच्या प्रवृत्तीबरोबर दुसऱ्याची प्रवृत्तीही सुरू होते. या दोन्हींची प्रवृत्ती झाल्यावर

इंद्रियवर्गाची वृद्धी होते आणि त्यांचा नाश झाला म्हणजे मुक्ती प्राप्त होते. या दोन्हींमध्ये षडंगयोग वगैरेंचे कुशलतापूर्वक सेवन केल्याने वायूचा नाश साध्य होतो आणि मनाचा विनाश तर श्रीगुरूंच्या शक्तिपाताने एका पळभरातसुद्धा सुसाध्य होऊ शकतो. म्हणून ज्याच्या मनाचा किंवा चित्ताचा विनाश उपरोक्त पद्धतीने झाला आहे त्यास अमनस्क म्हणजे अनन्ययोगाची प्राप्ती होते. मनाचा नाश होण्यापूर्वी वायूचा नाश होतो. वायू आणि मन यांचा विनाश झाल्याने बुद्धी, इंद्रिये आणि देह यांचा विनाश होतो व त्यायोगे सहजत्वाने अमनस्क योगाच्या ठिकाणी अद्वैतबुद्धी निर्माण होते. ( २–२८ ते ३१ ) मात्र चिंतामणिस्वरूप अशा एकमात्र श्रीगुरूंच्या शक्तिपातयोगानुग्रहाखेरीज वेदान्तामध्ये प्रतिपादन केलेल्या महावाक्यांच्या उपदेशाने, तर्कशास्त्रामध्ये प्रतिपादन केलेल्या निरनिराळ्या युक्ति-साधनांच्या विवेचनाने, आगमांच्या अध्ययनाने, विविध प्रकारांच्या आणखी काही शास्त्रांमधील ज्ञानार्जनाने किंवा ध्यानादि उत्तम साधनांच्या साहाय्याने आपल्या अभीष्ट अशा ध्येयस्थानाची प्राप्ती एका अमनस्क किंवा अनन्ययोगाशिवाय होणे संभवनीय नाही. " ( २.४२ )

" यावरून ही गोष्ट अगदी स्पष्ट आहे की, सर्व विषय निष्कल अशा अध्यात्मयोगसाधनेने नष्ट होतात. आत्मयोगानेच वायू नष्ट केला जातो. वायू नष्ट झाल्यावर मन नष्ट होते आणि मन नष्ट झाल्यावर मोक्षप्राप्ती होते. सहज, निर्मल, निर्विकार अशा आत्मतत्त्वाचे ज्ञान प्राप्त करून घेण्याने असा परिणाम घडून येतो म्हणून अमनस्क अर्थात् अनन्य म्हणजेच सिद्धयोगप्राप्तीसाठी साधकाने प्रयत्न केला पाहिजे. अनेक व्याधी उत्पन्न करणाऱ्या, करावयास अत्यंत कठीण, क्लेश-कारक, दुर्जय व तांत्रिक उपाधींनी युक्त अशा शेकडोशे प्राणायामांचा दीर्घकालपर्यंत अभ्यास केल्याने काय फायदा आहे ? जी आत्मशक्ती कुंडलिनी शरीरात जागृत झाल्याबरोबर बलवान् असा वायू आपोआप तत्क्षणातच नष्ट होतो अशा सहज व स्वभावभूत अमनस्क किंवा अनन्ययोगाच्या प्राप्तीकरिता एकमात्र सद्‌गुरूंचीच निरंतर सेवा केली पाहिजे. गुरूंची योग्यप्रकारे उपासना केल्यावर ते सहजतत्त्व, सहजयोग किंवा अनन्ययोग गुरूंकडून अनायसे प्राप्त होतो. तो प्राप्त झाल्यावर शिष्याने निरंतर आत्माभ्यास करावयास पाहिजे " ( २.४३ व ४९ ) अशा प्रकारे महायोगी गोरक्षनाथांनी ज्या अमनस्कयोगाचे वर्णन केले आहे त्या योगाचेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अनन्ययोग म्हणून वर्णन करून परंपराप्राप्त नाथयोग प्रकट केला आहे.

अनन्ययोगाची महत्ता, श्रेष्ठता व अनन्यसाधारणत्व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे. ते म्हणतात –

ऐसें निरंतर एकवटले । जे अंतःकरणीं मजशीं लिगटले ।
मीचि होऊनि आटले । उपासिती ॥८.१२६॥
तयां देहावसान जैं पावे । तैं तिहीं मातें स्मरावें ।
मग म्यां जरी पावावें । तरि उपास्ति ते कायसी ? ॥२७॥
ऐसे जे नित्ययुक्त । तयांसी सुलभ मी सतत ।
म्हणौनि देहांतीं निश्चित । मीचि होती ॥१३९॥
आणि मींवांचूनि कांहीं । आणिक गोमटें नाहीं ।
ऐसा निश्चियोचि तिहीं । जयाचा केला ॥१३.६०४॥
शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश ।
एक मीवांचूनि वास । न पाहती आन ॥६०५॥
किंबहुना निकट निज । जयाचें जाहलें मज ।
तेणें आपणयां आम्हां सेज । एकी केली ॥६०६॥
रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जींवीं सांकडें ।
तियें कांतेचेनि पाडे । एकसरला जो ॥६०७॥
मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें ।
मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥६०८॥
जो अनन्यु यापरी । मी जाहलाही मातें वरी ।
तोचि तो मूर्तधारी । ज्ञान पैं गा ॥६११॥

इतके सांगून झाल्यावर आपल्यालाच अनन्ययोगानें प्राप्त होणाऱ्या अनन्यगतीचे व्यसन आहे असे सांगून भगवंतांनी सिद्धयोग हे आपल्या हृदयीचे निजगुज आहे हे साररूपाने सांगताना असे म्हटले आहे की—

म्हणौनि जिव्हारींचें गुज । सांगतसे जीवासी तुज ।
हें अनन्यगतीचें मज । आथी व्यसन ॥१८.१३४९॥

**अभ्यासयोग :—**

अभ्यासयोग म्हणजे सिद्धयोगच होय. जे साधक निम्नतम अधिकारी आहेत त्यांच्यासाठी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अभ्यासयोगाच्या नावाने सिद्धयोगाचेच वर्णन केले आहे. हा अभ्यासयोग म्हणजे काय हे सांगताना ते म्हणतात—

अथवा हें चित्त । मनबुद्धिसहित ।
माझ्या हातीं अचुंबित । न शकसी देवों ॥१२.१०४॥
तरी गा ऐसें करीं । यया आठां पाहारांमाझारीं ।
मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥१०५॥
मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख ।
तेतुले अरोचक । विषयीं घेईल ॥१०६॥

जैसा शरत्कालु रिगे । आणि सरिता वोहटूं लागे ।
तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनि ।।१०७।।
मग पुनवेहूनि जैसें । शशिबिंब दिसेंदिसें ।
हारपत अंवसे । नाहींचि होय ।।१०८।।
तैसे भोगाआंतूनि निगतां । चित्त मजमाजीं रिगतां ।
हळूहळू पंडुसुता । मीचि होईल ।।१०९।।
अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे ।
येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ।।११०।।

ज्या साधकांची भोगाकांक्षेमुळे, जडतेमुळे व आधारदुर्बलतेमुळे अचुंबितपणे चित्ताची गती सुषुम्नेत मनबुद्धीसहित होत नाही त्यांच्यासाठी सिद्धयोगाचेच औषध शर्करावगुंठित करून अभ्यासयोग या नावाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी दिले आहे व अभ्यासयोगाला काहीही अशक्य नाही असा सिद्धांत मांडला आहे. महर्षी पतंजलींनी "योगसूत्रात" "तत्र स्थितो यत्नोऽभ्यासः ।।१.१३।।" अशी अभ्यासाची व्याख्या केली आहे. वृत्तींना पूर्णपणे कह्यात ठेवण्यासाठी सतत झटण्यालाच अभ्यास म्हणतात असे सांगून " अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः ।।१.१२।।" व " स तु दीर्घ-कालनैरन्तर्य्यसत्कारासेवितो दृढभूमिः ।।१.१४।।" या सूत्रांनी वारंवार अभ्यासाची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. अभ्यास म्हणजे पुनःपुन्हा प्रयत्न व वैराग्य होय. यांनी वृत्तींचा निरोध होतो. ( परमपदप्राप्तीसाठी ) सतत, दीर्घकाल व अत्यंत श्रद्धाभक्तिपूर्वक प्रयत्न करीत गेल्याने हा अभ्यास दृढ होतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओव्यातून उपरोक्त सूत्रांतील भावच अधिक स्पष्ट करून मांडला आहे. ते म्हणतात –

तरी अभ्यासाचेनि बळें । प्रत्याहारीं निराळें ।
नखीं लागेल ढाळें ढाळें । वैराग्याचीं ।।६.५७।।
परि वैराग्याचेनि आधारें । जरी लाविलें अभ्यासाचिये मोहरें ।
तरी केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल ।।६.४१९।।
एऱ्हवीं अभ्यासाचा उल्लचता । पाउलीं जरीं चालता ।
तरी दिवसाआधीं ठाकिता । सोऽहंसिद्धीतें ।।६.४३९।।

सिद्धयोगसाधनाभ्यास कसा करावा हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

येणेंचि अभ्यासेसी योगु । चित्तासी करी पां चांगु ।
अगा उपायबळें पंगु । पहाड ठाकी ।।८.८१।।
तेंवि सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर ।
लावीं मग शरीर । राहो अथवा जावो ।।८२।।

जें नानागतीतें पाववितें । तें चित्त वरील आत्मयातें ।
मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे ?॥८३॥
पैं सरितेचेनि ओघें । सिंधुजळा मीनलें घोघें ।
तें काय वर्तत आहे मागें । म्हणौनि पाहों येतो ?॥८४॥
ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेंवि चित्ताचें चैतन्य जाहालें ।
जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥८५॥

चित्त म्हणजे कुंडलिनी शक्ती श्रीसद्गुरुकृपेने जागृत झाली तरी चित्ताचे चैतन्य होण्यासाठी म्हणजे शक्तीचे शिवाशी एकरूपत्व होण्यासाठी नित्य साधनाभ्यास केला पाहिजे व या सदभ्यासाने शक्तीच्या सुषुम्नेतील विकासाला वाव दिला पाहिजे . साधकाची सर्व शक्ती एकदम कधीच जागृत होत नाही व सद्गुरूही ती एकदम जागृत करीत नाहीत; कारण जीव दुर्बल असतो व शक्ती अमोघ असते. त्यामुळे आधारदुर्बल जीवावर जर महापुरुषांनी दीक्षा देताना एकदम आपल्या सामर्थ्याने शिष्याची सर्व शक्ती प्रकट केली तर त्या जीवाचे हृदय फाटून गेल्याशिवाय राहणार नाही यासाठी अभ्यासयोगाने शनैः शनैः शक्तीचे सुषुम्नेत चालन होऊन म्हणजे चित्ताला परमपुरुषाची मोहोर लावून तिचे जडत्व हरण होऊन क्रमविकासाने ती शिवरूप होणे इष्ट ठरते. जसजसा अभ्यास होत जातो तसतसे शरीर अधिकाधिक शुद्ध होत जाऊन म्हणजे नाडीशुद्धी होऊन सुषुम्ना अधिक शक्ती धारण करू शकते. शेवटी संपूर्ण जागृतीनंतर नदी समुद्राला मिळाल्यावर जशी एकरूप होते तशी शक्ती शिवरूप होते. तेथे सर्व यातायाती सहजच संपतात व एक निरतिशय आनंदघन स्वसंवेद्य आत्मरूपच राहते. महर्षी पतंजलींनी " तीव्रसंवेगानामासन्नः ॥१.२१ ॥ " असे सूत्र लिहून जो फार प्रयत्नशील असतो त्याला या योगात लवकर यश मिळते, असे स्पष्ट केले आहे. "मग शरीर राहो अथवा जावो" असे जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात तेव्हा ते साधनाभ्यासाच्या बाबतीत उपरोक्त विचारांचेच पक्षपाती आहेत असे स्पष्ट दिसते व "तत्प्रतिषेधार्थमेकत्त्वाभ्यासः ॥ १.३२॥" या न्यायाने साधनाभ्यासातील अडथळे दूर होण्यासाठी एकाच तत्त्वाचा म्हणजे सिद्धयोगसाधनेचाच अभ्यास केला पाहिजे अशी त्यांची स्पष्ट धारणा दृष्टीस पडते; कारण त्यांनी जे प्रश्न या दृष्टीने भगवंतांच्या मुखात अर्जुनासाठी घातले आहेत ते त्याचेच द्योतक आहेत. या दृष्टीनेच ते म्हणतात –

तूं प्राप्तीची चाड वाहसी । परी अभ्यासीं दक्षु नव्हसी ।
तें सांग पां काय बिहसी । दुवाडपण ?॥६.३६०॥
तरीं योगसाधन जितुकें । तें अवघेंचि काय लटिकें ? ।
परि आपणया अभ्यासूं न ठाके । हेंचि म्हण ॥६.४२५॥

हेंचि कायिसया वरी होये । ऐसा जरी संदेहो वर्ततु आहे ।
तरी अभ्यासूनि आदीं पाहें । मग नव्हे तरी कोपें ॥८.८०॥

अशा प्रकारे हा अभ्यासयोग साधकाला निःसंदेहपणे आत्मप्राप्ती करून देणारा असल्याने त्याचे महत्त्व वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

आम्हीं मागां हन सांगितलें । जे देहींची ब्रह्मत्व पावले ।
ते येणें मार्गें आले । म्हणौनियां ॥५.१५८॥
आणि यमनियमांचे डोंगर । अभ्यासाचे सागर ।
क्रमोनि हे पार । पातले ते ॥१५९॥
तिहीं आपणपें करूनि निर्लेप । प्रपंचाचें घेतलें माप ।
मग साचाचेंचि रूप । होऊनि ठेले ॥१६०॥
तेवीं जालेनि सुखलेशें । जीवु भावलिया अभ्यासें
जीवपणाचें नासे । दुःख जेथें ॥१८.७७६॥

या अभ्यासयोगाबद्दल इतकी नितांत खात्री असल्यामुळे म्हणजे हा सिद्ध-योगसाधनाभ्यास स्वतःच स्वतःला करवून घेऊन साधकाला आत्मस्वरूप करीत असल्यामुळे " एऱ्हवीं विरक्ति जयांसी नाही । जे अभ्यासीं न रिघती कहीं । तयां नाकळे हें आम्हीही । न मनूं कायी ॥ ६.४२१ ॥ " असे अभ्यासयोगाचे माहात्म्य भगवंताच्या मुखातून स्पष्ट करून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

अभ्यासुचि आपणयातें करी । हृदयातें अनुभवु वरी ।
ऐसी रम्यपणाची थोरी । अखंड जेथ ॥६.१६६॥
प्रवृत्ति साधौति मोहरे । समाधि ऐलाडी उतरे ।
आघवें अभ्यासु सरे । बैसतखेंवो ॥१९१॥
आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरीं जिहीं केलें ।
ते आमुचेनि पाडें आले । निर्वाळलेया ॥३२६॥
इयें अभ्यासीं जे दृढ होती । ते भरवंसेनि ब्रह्मत्वा येती ।
हें सांगतियाची रीती । कळलें मज ॥३३०॥
तैसा युक्तिमंतु कौतुकें । अभ्यासाचिया मोहरा ठाके ।
आणि आत्मसिद्धीचि पिके । अनुभवु तयाचा ॥३५५॥
बळिरें इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना ।
पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ॥४६०॥
ऐसें नेणों काय अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें ।
समाधि घर पुसे । मानसाचें ॥४६१॥

अशा रीतीने अभ्यासच साधकाच्या समाधीचे घर विचारीत विचारीत आपला आपणच येतो व आत्मरूप होऊन जातो. या स्थितीत अभ्यासयोगाची समाप्ती होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

देखोनि ठाकिता ठावो । धांवता थिरावे पावो ।
तैसा ब्रह्मसामीप्यें थावो । अभ्यासु सांडी ॥१८.१०८०॥
घडतां महोदधीसी । गंगा वेगु सांडी जैसी ।
का कामिनी कांतापासीं । स्थिर होय ॥१०८१॥
नाना फळतियें वेळे । केळीची वाढीं मांटुळे ।
कां गांवापुढें वळे । मार्गु जैसा ॥१०८२॥
तैसा आत्मसाक्षात्कारु । होईल देखोनी गोचरु ।
ऐसा साधनहातियेरु । हळूचि ठेवी ॥१०८३॥
म्हणौनि ब्रह्मेंसीं यया । ऐक्याचा समो धनंजया ।
होतसे तैं उपाया । वोहटु पडे ॥१०८४॥
मग वैराग्याची गोंधळुक । जे ज्ञानाभ्यासाचे वार्धक्य ।
योगफळाचाही परिपाक । दशा जे कां ॥१०८५॥
ते शांती पैं गा सुभगा । संपूर्ण ये तयाचिया आंगा ।
तैं ब्रह्म होआवयाजोगा । होय तो पुरुषु ॥१०८६॥

सारांश, "सा काष्ठा सा परागतिः ॥ कठ.उ. ३.११ ॥" म्हणून ज्याचे वर्णन वेदांनी केले आहे तीच ही अभ्यासयोगरूप सिद्धयोगाने प्राप्त होणारी स्थिती आहे. यापेक्षा सिद्धयोगाचा महिमा अधिक काय असणार? व सिद्धयोगरूपी अनन्ययोगाच्या नावाचे रहस्यही यापेक्षा दुसरे कोणते असू शकणार?

## भक्तियोगः –

"भक्तियागु समस्त । योगरूप ॥ १२.२२८ ॥" असे म्हणून संपूर्ण भक्तियोग हा सिद्धयोगरूप आहे असे स्पष्ट सांगून त्याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे. भक्तीची व्याख्या करताना ते म्हणतात –

ऐसेनि मातें जाणिजे । ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे ।
येथ भेद कांहीं देखिजे । तरी व्यभिचारु तो ॥१४.३८१॥
याकारणें भेदातें । सांडूनि अभेदें चित्तें ।
आपणा सकट मातें । जाणावें गा ॥३८२॥
पार्था सोनियाची टिका । सोनियासी लागली देखा ।
तैसें आपणपें आणिका । मानावें ना ॥३८३॥
तेजाचा तेजौनि निघाला । परी तेजीचि असे लागला ।
तया रश्मी ऐसा मला । बोधु होआवा ॥३८४॥
पैं परमाणु भूतळीं । हिमकणु हिमाचळीं
मजमाजीं न्याहाळीं । अहं तैसें ॥३८५॥

हो का तरंगु लहानु । परी सिंधूसी नाहीं भिन्नु ।
तैसा ईश्वरीं मी आनु । नोहेचि मा ॥३८६॥
एसेनि बा समरसें । दृष्टि जे उल्हासे ।
ते भक्ति पैं ऐसे । आम्ही म्हणों ॥३८७॥

अद्वैत हीच भक्ती होय. त्यालाच अव्यभिचारी भक्ती म्हणतात. चित्त म्हणज कुंडलिनी शक्ती जेव्हा सर्व भेदांना सांडून सुषुम्नानाडीत प्रवेश करते तेव्हाच साधक जीवशिवऐक्य जाणतो. हाच एकमेव अहं मजमाजी न्याहाळण्याचा मार्ग आहे. या अर्थानेच "कैवल्योपनिषदात" "स एव सर्वं यद्भूतं यच्च भव्यं सनातनम् । ज्ञात्वा तं मृत्युमत्येति नान्य: पंथा विमुक्तये ॥ १.९॥ " असे म्हटले आहे. यामुळेच साम्यरस्याची दृष्टी उद्भूत होऊन साधक उपरोक्त सोने व सोन्याची टिकली, सूर्य व किरण, रज:कण व पृथ्वी, हिमकण व हिमालय आणि तरंग व सूर्य यांच्याप्रमाणे शिवशक्तिरूप अद्वैतस्थितीस प्राप्त होतो. यालाच भक्ती म्हणतात. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी असे भक्तीचे अपूर्व स्वरूप सांगून भक्तियोगाचे स्वरूपही तसेच आहे हे सांगताना ते म्हणतात –

तरी मीचि एक सर्वां । या जगा जन्म पांडवा ।
आणि मजचिपासूनि आघवा । निर्वाहो यांचा ॥ १०.११२॥
कल्लोळमाळा अनेगा । जन्म जळींचि पैं गा ।
आणि तया जळचि आश्रयो तरंगा । जीवनही जळ ॥११३॥
ऐसें आघवाचि ठायीं । तया जळचि जेवीं पाहीं ।
तैसा मीवांचूनि नाहीं । विश्वीं इये ॥११४॥
ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजति भलतेथें ।
परि साचोकारें उदितें । प्रेमभावें ॥ ११५॥
देश काळ वर्तमान । आघवें मजसीं करूनि अभिन्न ।
जैसा वायु होऊन गगन । गगनींचि विचरे ॥११६॥
ऐसेनि जे निजज्ञानी । खेळत सुखें त्रिभुवनीं ।
जगद्रूपा मनीं । सांठऊनि मातें ॥११७॥
जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ।
हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥११८॥

अभेदता, एकरसता व सामरस्य म्हणजेच भक्तियोग होय. "तोचि अभेदु कैसा । हें जाणावया मानसा । साद जाली तरी परियेसा । बोलिजेल ॥१०.१११॥" असे अभेदत्व जाणण्यासाठीच वरील भक्तियोग कथन केला आहे. त्यासाठी उदित प्रेमभाव हाच एकमात्र उपाय आहे. ज्यावेळी श्रीसद्गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत

होते तेव्हाच साधकाच्या ठिकाणी खऱ्या भक्तीचा उदय होत असतो; कारण भगवद्भक्तीचा उन्मेश हे शक्तिपाताचे सर्वात महत्त्वाचे व मुख्य लक्षण आहे असे सर्व आगमनिगममथित शास्त्राचे साररूप सांगणे आहे. " मालिनीविजयोत्तरतंत्रा-मध्ये " शक्तिपात झाल्यावर साधकाच्या ठिकाणी कोणकोणती लक्षणे उमटतात हे सांगताना अगदी प्रथम भक्ती उपस्थित होते असे म्हटले आहे.

**सति तस्मिश्च चिन्हानि तस्यैतानि विलक्षयेत् ।**
**तत्रैतत्प्रथमं चिन्हं रुद्रे भक्तिः सुनिश्चला ।।१।।**

सद्‌गुरूंकडून तीव्र शक्तिपात झाल्यावर कोणताही प्रयत्न न करता शिष्याच्या ठिकाणी अकस्मात अनेक उत्तम लक्षणे प्रकाशित होतात. श्रीमहेश्वराच्या ठिकाणी दृढ भक्ती होणे हे अगदी पहिले लक्षण साधकामध्ये दिसून येते. " कुलार्णवतंत्रा-मध्ये " चौदाव्या उल्लासात शक्तिपाताने होणाऱ्या भक्त्युद्‌बोधनलक्षणावरून शिष्यही उत्तम, मध्यम व अधम अधिकारी कसे असतात हे सांगताना असे म्हटले आहे की–

**आदौ भक्तिर्भवेद्देवि दीक्षार्थं समुदंति ये ।**
**पुनर्विव्हल हृष्टास्ते आदि योग्या इतिरिता ।।१४.२८।।**
**दीक्षासमयसम्प्राप्ता ज्ञानाज्ञानविर्जिताः ।**
**भक्त्या प्रध्वस्त सुधियो मध्ययोग्याश्च ते स्मृताः ।।२९।।**
**आदौ भक्तिविहीना ये मध्यभक्तास्तु ये नराः ।**
**अन्तप्रवृद्धभक्ताश्च अन्तयोग्या भवंति ते ।।३०।।**

श्रीशंभूच्या परंपरागत शक्तीचे सामर्थ्य एकसमान असले तरी शिष्याच्या उत्तम, मध्यम व अधम अधिकारामुळे शक्तिपाताच्या विकासाची तीन प्रकारची लक्षणे दृग्गोचर होतात. ज्यांच्या ठिकाणी प्रथमच भक्ती असते, जे दीक्षाग्रहणार्थ प्रसन्न व उत्सुक असतात आणि दीक्षेनंतर भक्तिप्रेमोद्‌भवाने जे विव्हल होतात ते उत्तम शिष्य होत. जे दीक्षाग्रहणसमयापर्यंत ज्ञानाज्ञानविरहित असून दीक्षाप्राप्ती-नंतर ज्यांच्या ठिकाणी भक्तीचा उदय होऊन बुद्धी व मन निर्मल होते ते मध्यम साधक होत. ज्यांच्या ठिकाणी प्रथम भक्ती नसते परंतु दीक्षेनंतर भक्ती उत्पन्न होऊन शेवटी जे एकनिष्ठ भक्त होतात ते कनिष्ठ साधक होत.

सारांश, शक्तिपाताने ज्यांच्या ठिकाणी कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने प्रेमभाव उदित झाला आहे त्यांनी भगवान् वेदव्यासांनी "योगसूत्रभाष्यात" सांगितल्याप्रमाणे " यत्रैकाग्रता तत्राविशेषात् ।। " या न्यायाने जागा कशीही असली तरी जेथे मन एकाग्र होईल तेथे साधन करावे; कारण, " न स्थाननियमश्चित्तप्रसादात् ।।६.३१।।" या कपिल महर्षींच्या "सांख्यसूत्राप्रमाणे" समाधिलाभ होण्यात स्थानाचा नियम अर्थात् स्थानाचे महत्त्व नाही; कारण समाधी ही चित्तप्रसादाने प्राप्त होते. याप्रमाणे देश-काळ वर्तमान आघवे मजसी म्हणजे सुषुम्नेतील प्राणचालनाने अभिन्न करून भलतेथे भजन म्हणजे साधन केले तरी ते भगवद्‌रूप होऊन त्यांना " सर्वं खल्विदं ब्रह्म" ही

आत्मानुभूती येते. यालाच भक्तियोग म्हणतात. या दृष्टीनेच "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, या ग्रंथातील "कुंडलिनी तत्त्व" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, "कुंडलिनीका जागरण और 'सर्वं खल्विदं ब्रह्म' इस श्रुतिनिष्ठ सर्वत्र ब्रह्मसाक्षात्कार या चैतन्यमयताके अनुभवकी साधना सुतरां एकही वस्तु है। यह जागरण क्रमसे होता है। कुंडलिनीके जागरणकीभी कर्म, ज्ञान, भक्ति प्रभृति भिन्न-भिन्न क्रमिक अवस्थाएँ हैं।" श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "आणि ज्ञानाचें चांगावें। इयेचि दृष्टि नांवें। योगाचेंही आघवें। सर्वस्व हें ॥ १४. ३८८ ॥" असे भक्तीच्या व्याख्येनंतर सांगून ज्ञान, भक्ती, योग ह्या सर्व गोष्टी एकरूप आहेत व त्या एकाच सिद्धयोगाच्या अवस्थामात्र आहेत हे स्पष्ट केले आहे. "म्हणौनि भक्तु एकु पाहीं। ज्ञानिया जो ॥ ७.१११ ॥," "पार्था गा जगीं। तेचि भक्त तेचि योगी। उत्कंठा तयांलागी। अखंड मज ॥ १२.२३४ ॥," "त्या मज पुरुषोत्तमा। ज्ञानें भेटे जो सुवर्मा। तो सर्वज्ञु तोचि सीमा। भक्तीचीही ॥" १६.४८ ॥" व "ज्ञानी इयेतें स्वसंवित्ती। शैव म्हणती शक्ती। आम्ही परमभक्ती। आपुली म्हणों ॥ १८.११३३ ॥" असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वेळोवेळी म्हटलें आहे ते उपरोक्त एकरूपतेला पुष्टीच देते.

भक्तियोगाचे साधन कसे चालते ते आता पाहवयाचे आहे. सर्वसामान्यपणे ज्या रीतीने भक्ती करण्याची आपली कल्पना आहे त्यापेक्षा श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी भक्ती करण्याची व भक्तियोग आचरण्याची कल्पना सर्वस्वी भिन्न आहे; कारण सर्व माणसे ही स्वभावतः भजनशील असली तरी ज्ञानयुक्त भक्ती म्हणजे जागृतशक्तीमुळे प्राप्त होणारी भक्ती ते जाणत नाहीत. त्यामुळे ते संभ्रमात पडतात. हे सांगताना ते म्हणतात—

**देखें मनुष्यजात सकळ। हे स्वभावता भजनशीळ।**
**जाहलें असे केवळ। माझ्याचि ठायीं ॥४.६७॥**
**परी ज्ञानेंवीण नाशले। जे बुद्धिभेदासी आलें।**
**तेणेंचि त्या कल्पिलें। अनेकत्व ॥६८॥**
**म्हणौनि अभेदीं भेदु देखती। यया अनाम्या नामें ठेविती।**
**देवी देवो म्हणती। अचर्चातें ॥६९॥**
**जे सर्वत्र सदा सम। तेथ विभाग अधमोत्तम।**
**मतिवशें संभ्रम। विवंचिती ॥७०॥**

अशा प्रकारची भक्ती श्रीज्ञानेश्वरमहाराजांना मान्य नसल्याने ते म्हणतात—

**ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे। तेथ भक्ति माझी उल्लासे।**
**तिया भजन समरसें। सुखिया होय ॥१८.१२४८॥**
**पैं भक्ति एकी मी जाणें। तेथ सानें थोर न म्हणें।**
**आम्ही भावाचे पाहुणे। भलतेया ॥९.३९५॥**

येर पत्र पुष्प फळ । हें भजावया मिस केवळ ।
वांचूनि आमुचा लाग निष्कळ । भक्तितत्त्व ।।३९६।।
म्हणौनि अर्जुना अवधारीं । तूं बुद्धी एकी सोपारी करीं ।
तरी सहजें आपुलिया मनोमंदिरीं । न विसंबे माते ।।३९७।।

जेव्हा ज्ञाननिष्ठा म्हणजे जागृत शक्ती हस्तगत होते तेव्हाच परमभक्ती सहज उल्लसित व अभिव्यक्त होऊन साधकाचे खरे भजन होते व तो ईश्वराशी समरस होऊन सुखी होतो. यासाठी ब्रह्मप्राप्तीच्या मार्गात भावाचा म्हणजे शक्तीचा पाहुणचार म्हणजे संचार झालाच पाहिजे. इतर गोष्टी निमित्तमात्र आहेत. बुद्धी म्हणजे प्राणशक्ती सद्गुरुकृपेने स्वाधीन अर्थात् जागृत करणे हाच ईश्वराच्या मनोमंदिरात सहजतेने जाण्याचा मार्ग आहे; कारण यामुळे साधक आत्मस्वरूपाला कधीच विसरत नाही.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीने भक्तियोगाचे साधन अशा प्रकारे सर्वस्वी निराळे असल्यामुळे " यालागीं भेदू सांडूनि सरिसें । साम्यें भज ।।१०.३१७।।" असाच ते उपदेश करीत आहेत. सुषुम्नेत कुंडलिनी शक्तीचे चालन झाल्याशिवाय असे अभेद किंवा समरस भजन कधी घडेल काय ? व " तेथ भजता भजन भजावें । हें भक्तिसाधन जें आघवें । ते मीचि जाहलों अनुभवें । अखंडित ।।६.४८३।।" अशी साधकाला कधीतरी अनुभूती येईल काय ? यामुळेच " म्हणौनि भक्ति गा एथ सरे ।।९.४५२।।" हा भक्तियोगाचा एकमात्र उपाय सांगताना जातिकुळादि, शत्रुमित्रादि सर्व अप्रमाण आहे हे अनेक दृष्टांतांनी व उदाहरणांनी सांगून " हेंचि कवणें एकें मिसें । चित्त माझे ठायीं प्रवेशे । येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे ।।९.४६३।।" असा कोणत्याही उपायाने चित्ताने म्हणजे कुंडलिनी शक्तीने माझ्या ठायी म्हणजे ब्रह्मप्राप्तीच्या सुषुम्नामार्गात प्रवेश केला की, मग साधक आपोआप, अटळपणे आत्मरूप होतो, हा भक्तियोगसाधनेचा परमसिद्धांत त्यांनी प्रस्थापित केला आहे. एरवी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जी भक्तियोगसाधनाची स्थिती प्रकट केली आहे तिचा अन्वय लागणे व अनुभूती येणे कधीतरी शक्य आहे काय ? ते म्हणतात—

एऱ्हवीं तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती ।
पैं माझिये सहजस्थिती । भक्ति नाम ।।१८.१११३।।
जे नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनि ।
सर्वही सर्वीं भजौनि । बुझावीतसे जे ।।१११४।।
जो जेथ जैसें पाहों बैसे । तया तेथ तैसेंचि असे ।
हें उजियेडें कां दिसे । अखंडें जेणें ।।१११५।।
स्वप्नाचें दिसणें न दिसणें । जैसें आपलेनि असलेपणें ।
विश्वाचें आहें नाहीं जेणें । प्रकाशें तैसें ।।१११६।।

ऐसा हा सहज माझा। प्रकाशु जो कपिध्वजा।
तो भक्ति या वोजा। बोलिजे गा ॥१११७॥
एवं घेऊनि अज्ञानातें। माझी भक्ति जे हे वर्ते।
ते दावी मज द्रष्टयातें। दृश्य करूनि ॥११२१॥
तैसा सर्वत्र मीच मियां। घेपतसें भक्ति इया।
परी दृश्यत्व हें वायां। अज्ञानवशें ॥११२४॥
तैसा मीचि ज्ञानद्वारें। दिसें परी हस्तांतरें।
मग द्रष्टृत्व तें सरे। मियांचि मी लाभें ॥११२८॥
म्हणौनि दृश्यपथा–। अतीतु माझा पार्था।
भक्तियोगु चवथा। म्हणितला गा ॥११२९॥

सहजस्थिती हीच खरी भक्ती होय. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांत-पद्धतीत" सहजस्थितीचे म्हणजे सहजज्ञानाचे किंवा सहजभक्तीचे वर्णन करताना असे म्हटले आहे की, "तत्र सहजमिति विश्वातीतं परमेश्वरं विश्वरूपेणावभासमानं ज्ञात्वा एकमेवास्तीति स्वस्वभावेन यज्ज्ञानं तत्सहजमिति प्रसिद्धं ॥५.२६॥" विश्वातीत परमेश्वर आपल्या शक्तीच्याद्वारा नाना जीवादि संसाररूपाने अज्ञानी जनांना प्रतीत होतो; परंतु तत्त्वदृष्टीने तो एक आहे. असे स्वस्वभावाने म्हणजे जागृत शक्तीच्यामुळे जीवशिवाचे आपोआप ऐक्य घडून येऊन जे ज्ञान किंवा जी भक्ती होते तिला सहज म्हणतात. इतके सांगून लगेच "सहजं स्वात्मसंवित्तिः।" असे त्यांनी म्हटले आहे. याचा अर्थ जीवात्मा व परमात्मा यांचें अभेदत्व घडवून आणणारी आत्मसंवित् म्हणजे कुंडलिनी शक्ती हीच सहजस्थिती, सहजज्ञान किंवा सहजभक्ती होय. या शक्तीचा जितका प्रकाश जितक्या प्रमाणात साधकात प्रकट होतो तितकीच त्याच्या कल्पनेची व बुद्धीची झेप जाऊन त्याला अनुभूती येत असते. असा जो ईश्वराचा सहजप्रकाश म्हणजे ईश्वराची ज्ञानरूप जागृत शक्ती असते तिलाच सर्वश्रेष्ठ किंवा सर्वोत्तम भक्ती असे म्हणतात. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" "अतएव परापरा निराभासावभासकान् प्रकाशस्वरूपा या सा परा ॥ ४.४॥" असे म्हणून परा व अपरा अशी ही स्वयमेव प्रकाशित असलेली म्हणजे सूर्यादि जड पदार्थांकडून प्रकाशित न होणारी व सूर्यादि वस्तूंनाच प्रकाशित करणारी अशी सर्व सत्तायुक्त कुंडलिनी शक्ती आहे, असे सांगितले आहे. अशा प्रकारे हा जागृत शक्तीने म्हणजे प्रकाशाने युक्त असा भक्तियोग असल्याने तो दृश्य मार्गाहून निःसंशय भिन्न आहे; कारण अशा रीतीने भक्तियोगाचे आचरण करणारा साधक "तेणे भक्तिचिद्-गांगें। मी स्वानंदोदधी वेगें। ठाकिला कीं गा॥ १८.१२२२॥" अशी स्थिती प्राप्त करून घेतो. तेव्हा "एक शिष्य एक गुरु। हा रूढला साच व्यवहारु। तो मत्प्राप्तिप्रकारु। जाणावया॥१८.१२२६॥" या न्यायाने सद्गुरूंनी अशा साधकाला

शक्तिपातयोगदीक्षा देऊन कृतार्थ केलेलेच असते हे नितांत सत्य आहे. एरवी "दुर्लभा सहजवस्था सद्‌गुरोः करुणां विना ।। ४.९ ।।" हा श्रीस्वात्मरामयोगींनी "हठयोगप्रदीपिकेत" व "किमत्र बहुनोक्तेन शास्त्रकोटीशतेन च । दुर्लभा चित्त-विश्रांतिर्विना गुरुकृपां पराम् ।।५.८१।।" ह्या महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्ध-सिद्धांतपद्धतीत" मांडलेल्या सिद्धान्ताला अर्थ उरणार नाही.

अशा प्रकारच्या भक्तियोगाचे गहन भजन म्हणजे साधन कसे होते हे सांग-ताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात —

> बाहेरी यमनियमांची कांटी लाविली । आंतु वज्रासनाची पौळी पन्नासिली ।
> वरी प्राणायामाचीं मांडिलीं । वाह्यातीं यंत्रें ।।९.२१३।।
> येथ उल्हाट शक्तिचेनि उजिवडें । मनपवनाचेनि सुरवाडें ।
> सतरावियाचें पाणियाडें । बळियाविलें ।।२१४।।
> तेव्हां प्रत्याहारें ख्याती केली । विकारांची सपिली बोहलीं ।
> इंद्रियें बांधोनि आणिली । हृदयाआंतु ।।२१५।।
> तंव धारणावारु दाटिन्नले । महाभूतांते एकवटिलें ।
> मग चतुरंग सैन्य निवटिले । संकल्पाचें ।।२१६।।
> तयावरी जैत रे जैत । म्हणौनि ध्यानाचें निशाण वाजत ।
> दिसे तन्मयाचें झळकत । एकछत्र ।।२१७।।
> पाठी समाधिश्रियेचा अशेखा । आत्मनुभव राज्यसुखा ।
> पट्टाभिषेकु देखा । समरसें जाहला ।।२१८।।
> ऐसें हें गहन । अर्जुना माझें भजन ।।२१९।।

सिद्धयोगस्वरूप भक्तियोगाचे साधन घडावे म्हणून साधक अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह हे पाच यम आणि पवित्रता, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्राणिधान हे पाच नियम यांचे जाती, देश, काल व समय यांच्या संबंधाचा विचार न करता एकसारखे महाव्रत म्हणून चालवितो.तो वज्रासन म्हणजे सिद्धासन घालून बसतो.त्यामुळे आतून आपोआप होणाऱ्या प्राणायामरूपी यंत्राच्या साहाय्याने त्याची कुंडलिनी शक्ती सहज जागृत होते व तिचे सुषुम्नामार्गाने चालन होते. येथून पुढे सर्व गोष्टी आपोआप होत जातात. शक्ती उर्ध्वमुखाने सुषुम्नेतून जाऊ लागली की, तिच्या मागोमाग मन आणि प्राणही जाऊ लागतात व शेवटी सहस्रारातील चंद्रामृताचे म्हणजे सतराव्या जीवनकलेचे तळे साधकाला सहजी प्राप्त होते. हे साधन चालू असताना "स्वविषयसंप्रयोगे चित्तस्य स्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहारः ।। २.५४ ।।" असे महर्षी पतंजलींनी "योगसूत्रात" म्हटल्याप्रमाणे इंद्रिये आपापल्या विषयांचा परित्याग करून चित्तस्वरूपाचे म्हणजे कुंडलिनी शक्तीचे अनुकरण करतात व प्रत्याहार घडून येतो. त्यामुळे सर्व विकार नाहीसे

होतात व ही शक्तीच प्राण व मनामुळे बहिर्मुख झालेली इन्द्रिये हृदयात म्हणजे आज्ञाचक्रात बांधून आणते म्हणजे लीन करते. " योगसूत्रकारांनीही " " ततः परमा वश्यतेन्द्रियाणाम् ।। २.५५ ।।" असे सूत्र सांगून प्रत्याहार सिद्ध झाल्याने इंद्रिये फारच चांगल्या रीतीने स्वाधीन होतात असे म्हटले आहे. मग "देशबंधचित्तस्य धारणा ।। ३.१।।" या " योगसूत्राच्या " न्यायाने जागृत शक्तीमुळे सुषुम्नेमध्ये धारणारूप घोडे आपोआप स्थिर होते. त्यामुळे पंचमहाभूते क्रमशः एकमेकात विलीन होऊन एकरूप होतात व संकल्पाचे चतुरंग सैन्य नाहीसे होते. त्यावेळी " तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ।। ३.२ ।।" या " योगसूत्राप्रमाणे " चित्ताची सुषुम्नेत एकाग्रता होऊन ध्यान सिद्ध होते व जिंकले रे जिंकले असे म्हणून ध्यानाचे निशाण फडकू लागते. ज्यावेळी जागृत शक्ती मनःप्राणासह आज्ञाचक्र ओलांडून जाते त्यावेळी शिवाशी एकरूप होणाऱ्या शक्तीच्या एकरूपतेचे व तन्मयतेचे एकछत्र झळकू लागते. मग ज्यात समाधीचे संपूर्ण ऐश्वर्य आहे असे शिवशक्तीचे सामरस्य होऊन साधकाला आत्मानुभवाच्या राज्यसुखाचा पट्टाभिषेक होतो.

सारांश, साम्य, समरसता किंवा साम्यरस्य हेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीनें गहन भजन व गुरुवी भक्ती असून हाच त्यांचा सिद्धसाध्यसाधनाचा परंपराप्राप्त परमसिद्धांत आहे. महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांतपद्धतीत " हा महासिद्धांत मांडताना असे म्हटले आहे की --

**एवं कुलाकुलरूपा सामरस्यप्रकाशभूमिकास्फुटीकरण एकैवसमर्था ।।४.१०।।**
**सैव योगिनां तत्तद्विलसितविकाराणां निवारणोद्यमस्वरूपा कुंडलिनी**
**उर्ध्वगामिनी सुप्रसिद्धा भवति ।।४.१४।।**
**तस्माद् गुरुकटाक्षपातात् स्वसंवेद्यतया च**
**महासिद्धयोगिभिः स्वकीयं पिंडं निरुत्थानानुभवेन समरसं क्रियते**
**इति सिद्धान्तः ।।५.७।।**

कुंडलिनी शक्ती ही कुल म्हणजे शक्ती व अकुल म्हणजे शिव अशी (कुलं शक्तिरितिप्रोक्तं अकुलं शिव उच्चते । सौभाग्यभास्कर) शिवशक्तिरूप असून एकमात्र तीच शक्ती सामरस्याच्या प्रकाशयुक्त भूमिकेचे किंवा अवस्थेचे प्रकटीकरण करण्यास समर्थ आहे. श्रीगुरुकृपेने जेव्हा ही कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा ती सहजतेने सहस्रदलकमलापर्यंत साधकाला नेऊन जन्ममरणदुःखरूप कर्मफलाचा विलास व सर्व संस्कारसंकल्पविकल्पादि मनोविकारांचे निरावरण करून स्वतःच सुषुम्नेतून उर्ध्वगामी होण्यास समर्थ असते. असे हे या शक्तीचे सामर्थ्य असल्याने ती सुप्रसिद्ध आहे. सद्गुरुकृपेने जेव्हा शक्तिपात होऊन ही चित्शक्ती जागृत होते तेव्हा स्वसंवेद्य परमपद साधकाला प्राप्त होते. यासाठी महासिद्धयोगी स्वतःची आत्मशक्ती जागृत करून शुद्धचैतन्याशी समरस होतात. हेच, ज्ञान, हेच कर्म व हीच भक्ती होय. हा सिद्धांचा महासिद्धांत आहे.

वरील सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, भक्तियोगाचे, पराभक्तीचे, गरुवी भक्तीचे, गहन भजनाचे, सामरस्याचे किंवा प्रकाशभक्तीचे जे साधन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे ते अद्वैत भक्तीचे साधन असून ज्यांची कुंडलिनी शक्ती सद्‌गुरुकृपेने जागृत झाली आहे त्यांनाच ते अनुभविण्याजोगे आहे व कळण्यासारखे आहे. येरा नुसते टकमक होय हेच खरे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे अद्वैतभक्तियोगसाधन कसे घडते हे सांगताना असे म्हटले आहे की–

अर्जुना हा ठावोवरी । जो सोऽहंभावो सरोभरी ।
द्वैताच्या पैलतीरीं । निगों सरला ।।१२.१८५।।
कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोहीं भागीं ।
वांटूनियां आंगीं । सेवकै बाणे ।।१८६।।
जीवु परामात्मा दोन्ही । बैसऊनि ऐक्यासनीं ।
जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ।।१२.१५३।।
ऐसा योगसमृद्धी । होऊनि जो निरवधी ।
अर्पी मनोबुद्धी । माझ्या ठायीं ।।१५४।।
आंतु बाहेरि योगु । निर्वाळलेयाहि चांगु ।
तरी माझा अनुरागु । सप्रेम जया ।।१५५।।
अर्जुना तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु ।
तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये ।।१५६।।
तरंग सर्वांगीं तोय चुंबी । प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं ।
नाना अवकाश नभीं । लुंठतु जैसा ।।१८.११४८।।
तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे ।
अलंकारु का सहजें । सोनयातें जेवीं ।।११४९।।
का चंदनाची द्रुती जैसी । चंदनीं भजे अपैसी ।
का अकृत्रिम शशीं । चंद्रिका ते ।।११५०।।
तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे ।
हे अनुभवाचिजोगें नव्हे । बोलाऐसें ।।११५१।।

अद्वैतस्थिती साधनाने प्राप्त झाल्यावर मग साधकच देव व भक्त अशी कल्पना करून, आपल्या स्वतःलाच दोन भागात वाटून, वल्लभा आणि कांत होऊन लाटा पाण्याशी, बिंब प्रभेशी, पोकळी आकाशाशी, अलंकार सोन्याशी, द्रुती म्हणजे द्रवरूपातील चंदन चंदनाशी व चंद्राची प्रभा चंद्राशी एकरूप होऊन दोनपणे राहतात त्याप्रमाणे या अद्वैत स्थितीत म्हणजे शिवशक्तिसामरस्यात कोणतीही क्रिया न घडता आपोआप भक्ती होते. हे सर्व स्वतःच्या अनुभवानेच कळण्यासारखे व पटण्यासारखे असून बोलून दाखविता येण्यासारखे नाही.

अशी ही भक्तियोगातील अत्यंत गूढतम गोष्ट श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उकलून दाखविली आहे "भारतीय संस्कृति और साधना " खंड एक, या ग्रंथातील " काश्मीरीय शैव दर्शन "या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी या अद्वैत भक्तीवर जो प्रकाश टाकला आहे तो या दृष्टीने पाहण्यासारखा आहे. ते म्हणतात, " इस अद्वैयवादमें एक और विशेषता यह है कि यह न तो शुष्क ज्ञानमार्ग है और न ज्ञानहीन भक्तिमार्ग ही, इसमें ज्ञान और भक्ति दोनोंका सामंजस्य है। साधारणतः जिसे हम मोक्ष कहते हैं, वह वस्तुतः इस नित्यसिद्ध ज्ञानभक्तिकाही आवरणभंगजनित समुन्मेष मात्र है। चिदंश ज्ञानभाव है और आनंदांश भक्ति है। कहा जाता है कि षट्पंजरिकास्तोत्र श्रीशंकराचार्यका रचा हुआ है। उसमें है –

सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम्।
सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः ॥

श्रीशंकराचार्य इस श्लोकसे अद्वैतभक्तिका प्रचार करते हैं। ' सत्यपि भेदापगमे ' इस वाक्यांशकी योजनाके द्वारा समझा जा सकता है कि उनका अभिप्राय, भेद दूर हो जानेपर भी ' मैं तुम्हारा हूँ, ' यह कहनेका का है। सुतरां अभेद अवस्थामें भी ' मैं तुम्हारा हूँ,' यह भाव रह सकता है। कहनेकी आवश्यकता नहीं कि यह दास्यात्मक भक्तिभावही है। यद्यपि ज्ञानके द्वारा 'तुम और मैं' का वास्तविक भेद मिट जाता है, तथापि पराभक्तिके प्रभावसे उस अद्वैतसमुद्रमें भी कल्पित भाव-द्वैतकी लहरी उठती है। यह द्वैत वस्तुतः द्वैत नहीं है, इसलिये इस अवस्थाकी भक्तिको अद्वैतभक्ति कहना असंगत नहीं है। यही नित्यभाव है। ज्ञानके अनंतर भक्ति उदित हो या न हो, अंतमें ज्ञान और भक्ति एकाकार होही जाते हैं। जिसे पूर्णाहन्ता या स्वात्मचमत्कार कहा जाता है, वही ज्ञान की सीमा और वही प्रेमकी भी पराकाष्ठा है। इसीलिए यह समन्वय भूमि है। यहींसे दोनो स्रोत प्रवाहित होते हैं। त्रिकदर्शन अत्यंत कट्टर अद्वैतवादी होते हुए भी दास्यात्मक भक्तिको मानकर भक्तिके मूलतत्त्वकोही मान लेता है। परंतु याद रखना चाहिये कि यह भक्ति अज्ञानमूलक द्वैतभावसे उत्पन्न नहीं है। यह परिस्फुटित अद्वैतकी अवस्था है, यही विशेषता है। इसीलिये, यहाँ एकही साथ ज्ञान और भक्तिका, चित् और आनंदका समावेश दिखलाई पडता है। इसीका नाम शिवशक्तिका सामरस्य है। भक्तिके मूलमें दास्यभाव रहेगाही। साहित्यसारकर्ता अच्युतरायने दिखलाया है कि गीताके " अद्वेष्टा सर्वभूतानाम् " से " यो मद्भक्तः स मे प्रियः " पर्यंतके वाक्योंसे जाना जाता है कि मुख्य भक्ति जीवनमुक्तिकाही नामांतर है। जीवनमुक्तिविवेकमें विद्यारण्यस्वामीभी यही बात कहते हैं – " जीवन्मुक्तः स्थितप्रज्ञो विष्णुभक्तश्च कथ्यते। "

पराभक्तिकी यही विशेषता है कि इस अवस्थामें दूसरेके न होते हुए भी दूसरा रहता है। जो समझते हैं कि दो होनेसेही मिथ्या हो जाएगा, उन्होंने पूर्ण

सत्यके केवल एकदेश-मात्राको देखा हैं। अज्ञानके नष्ट हो जानेपर भी, ऐक्यस्फुरण होनेपर भी, उस ऐक्यकी गोदमें दो रह सकते हैं, यद्यपि वें दोनोंही एककाही शुद्ध भावमें आत्मप्रसारण है।

**नाथ वेद्यक्षये केन न दृश्योऽस्येकक: स्थित: ।**
**वेद्यवेदकसंक्षोभेऽप्यसि भक्तै: सुदर्शन: ।।**

अंतर्मुखावस्थामें कुछ भी जानने योग्य न रह जानेपरभी एकके रूपमें जिसका स्फुरण होता है, ज्ञेय और ज्ञाताके इस संक्षोभमें-इस वैचित्र्यमें भी भक्तगण समावेशकी अधिकताके कारण उसीको देखते हैं। जो विश्वातीत है, यही तो विश्वात्मक भी है और दोनों समकालमेंही हैं इसीलिए ज्ञान और भक्ति जहाँ समरस हैं, वहाँ विश्वातीत और विश्वात्मक समभावमेंही प्रकाशमान हैं। यही द्वैताद्वैतका सामंजस्य होता है।"

उपरोक्त सर्व विवेचनाचे सार ज्ञानेश्वरमहाराजांच्या पुढील ओव्यात व्यक्त झाले आहे. ते म्हणतात–

**जैसें कनकेंसीं कांकणें । असिजे अनन्यपणें ।**
**तो भक्तियोगें येणें । मजसीं तैसा ।।१८.११८२।।**
**उदकीं कल्लोळु । कापुरीं परिमळु ।**
**रत्नीं उजाळु । अनन्यु जैसा ।।१८८३।।**
**किबहुना तंतूंसीं पटु । का मृत्तिकेसीं घटु ।**
**तैसा तो एकवटु । मजसी माझा ।।११८४।।**
**इया अनन्यसिद्धा भक्ती । या आघवाचि दृश्यजातीं ।**
**मज आपणपेंया सुमती । द्रष्टृयाते जाण ।।११८५।।**
**तैसें जें कांहीं आथी नाथी । जेणें होय ज्ञेयस्फूर्ती ।**
**तें ज्ञाताचि मी हे प्रतीती । होऊनि भोगी ।।११९२।।**

ज्ञेयस्फूर्तीनि म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तीच्या आधाराने ज्ञाता साधक अशाप्रकारे भक्तियोगाचे सुख भोगतो; कारण हा भक्तियोग म्हणजे पंथराज किंवा सिद्धयोग असल्याने त्याबद्दल शंका बाळगण्याचे कारण नाही. गुरुकृपेने जागृत झालेली शक्ती विझत नसल्याने तिला खंग नाही; कारण जागृत झालेली शक्ती साधकाला आपल्या परमधामापर्यंत पोहोचविल्याशिवाय जन्मजन्मांतरी शांत होत नाही. हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतत—

**म्हणौनि अभेदें जो भक्तियोगु । तेंथ शंका नाहीं नये खंगु ।**
**करितां ठेला तरी चांगु । ते सांगितले षष्ठी ।।१०.११०।।**

भक्तियोगाचे साधन सर्वसामान्य माणसांपर्यंत सर्वांना सुलभतेने करता यावे म्हणून एका अत्यंत सुलभ आलंबनाचा मार्ग वेदांनीच सांगितला आहे.या आलंबनालाच

नामस्मरण म्हणतात. " यज्ञानां जपयज्ञोऽस्मि ॥ १०.२५ ॥ " असे म्हणून इतर सर्व यज्ञांपेक्षा जपयज्ञ अत्यंत श्रेष्ठ आहे असे भगवंतांनी श्रीमद्भगवद्गीतेत स्पष्टच म्हटले आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**समस्तांही यज्ञांच्या पंक्तीं । जपयज्ञु मी ये लोकीं ।**
**जो कर्मत्यागे प्रणवादिकीं । निफजविजे ॥१०.२३२॥**
**नामजपयज्ञु तो परम । बाधूं न शके स्नानादि कर्म ।**
**नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थें ।।१०.२३३।।**

नामस्मरण किंवा जपयज्ञ हा सर्व यज्ञात श्रेष्ठ असून तोच साधकाचा खरा कर्मत्याग घडवितो व आतून ॐकाराचे स्वत:सिद्ध साधन प्रकट करतो. असा आंतरजपयज्ञ एकदा सुरू झाला की, स्नानादि सामान्य कर्मे त्याला बाधू शकत नाहीत. अशा प्रकारच्या नामस्मरणानेच साधक धर्माधर्मातीत होतो. असे नामस्मरण होणे हेच वेदार्थाच्या दृष्टीने परब्रह्मरूप आहे.

उपरोक्त ओव्यातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनरूप भक्तियोगातील एका अपूर्व रहस्याचे उद्घाटन केले आहे. तिसऱ्या प्रकरणात " पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे रहस्य " या मुद्यात या संबंधीचे थोडेसे विवेचन आलेच आहे. येथे त्याचा थोडा अधिक व सूक्ष्म विचार करू. गीतेमध्ये " जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।। ६.४४ ।। " असे सांगितले आहे. जर शब्दब्रह्माच्या पलीकडे जावयाचे असेल तर " शब्दब्रह्मणि निष्णात: परं ब्रह्माधिगच्छति ।। १७ ।। " याप्रमाणे " अमृतबिंदु उपनिषदात " सांगितल्याप्रमाणे ॐकाररूपी शब्दब्रह्माकडून ॐकारातीत अक्षरब्रह्माकडे जाण्यासाठी शब्दब्रह्मामध्ये निष्णात होणे आवश्यक आहे. साधक एकदा शब्दब्रह्मात पारंगत झाला की, तो सहजतेने परब्रह्मस्वरूप होतो. याकरिता शब्दातीत परमपदाचा साक्षात्कार करण्यासाठी शब्दाचाच आश्रय घेऊन शब्दराज्याचा भेद करणे आवश्यक ठरते. सर्व विश्व शब्दापासूनच निर्माण होते व शब्दातच राहते. " शब्दष्वेवाश्रिता शक्तिर्विश्वस्यास्य निबंधनी," " वागेव विश्वा भुवनानि यज्ञे वाच इत् सर्वममृतं यच्च मर्त्यम् ।। " इत्यादि शास्त्रवचनांवरून हे स्पष्ट होते की, शब्द हेच जगत्सृष्टीचे मूळ असून सृष्टीच्या बाहेर जाण्यासाठी शब्दच एकमात्र आलंबन आहे. यासाठीच भक्तियोगांतर्गत जपसाधनेत शब्दाला पकडून शब्दातीत परब्रह्म प्राप्तीचा उपदेश केला आहे. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तें कीर अनाम अजाती । परी अविद्यावर्गाचिये राती-।**
**माजीं वोळखावया श्रुती । खूण केली ।।१७.३२९।।**
**उपजलिया बाळकासी । नांव नाहीं तयापासीं ।**
**ठेविलेनि नांवेंसीं । ओ देत उठी ।।३३०।।**

कष्टले संसारशिणें । जे देवों येती गाऱ्हाणें ।
तयां ओ दे नांवें जेणें । तो संकेतु हा ।।३३१।।
ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतत्त्वें तो भेटावा ।
ऐसा मंत्रु देखिला कणवा । वेदें बापें ।।३३२।।
मग दाविलेनि जेणें एकें । ब्रह्म आळविलें कवतिकें ।
मागां असत ठाके । पुढां उभें ।।३३३।।
परी निगमाचळशिखरीं । उपनिषदार्थनगरीं ।
आहाति जे ब्रह्माच्या येकाहारीं । तयांसीच कळे ।।३३५।।
तैसें आदरिजेल सत्कर्म । उच्चारिजेल ब्रह्मनाम ।
परी नेणिजेल जरी वर्म । विनियोगाचें ।।३४६।।
तैसें तोंडीं ब्रह्मनाम । हातीं तें सात्त्विक कर्म ।
विनियोगेंवीण काम । विफळ होय ।।३४९।।

संसारतापाने शिणलेल्या व जन्ममरणदु:खपरंपरा सोसणाऱ्या जीवासाठी वेदाने कृपावंत होऊन नाममंत्राचे साधन उपलब्ध करून दिले आहे. एका दृष्टीने पाहिले तर हे अत्यंत सरळ, स्वाभाविक व सहज साधन आहे. यापेक्षा दुसरे कोणतेही साधन अधिक सोपे व सरळ असूच शकणार नाही. परंतु समजण्यास अत्यंत सोपे व सरळ असे हे साधन असले तरी ते अत्यंत गुप्त आहे. ते खऱ्या अर्थाने जाणणे महादुर्घट व अति कठीण आहे. जे तंत्रशास्त्राच्या शिखरावर आहेत व ज्यांनी उपनिषदांच्या अर्थगर्भात उत्तम रीतीने प्रवेश केला आहे त्यांनाच या साधन-रहस्याचा पत्ता लागणे शक्य आहे. एरवी नामस्मरणाच्या विनियोगाचे वर्म जाणले नाही तर सर्व साधन निष्फळ व व्यर्थ होते.

ह्या नामस्मरणाच्या वाग्यज्ञाच्या किंवा जपयज्ञाच्या विनियोगाचे वर्म "शब्दीं शब्दु यजिजे । तो वाग्यज्ञु जाणिजे ।।४.१४१ ।।" व "नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं । सजूनियां संसारीं । तारू जाहलों ।। १२.९० ।।" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "सोऽहं मंत्र दीक्षितीं ।। ४.१३६ ।। कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध ।।९.२१०।।" किंवा "सर्व मंत्राचा राजा। तो प्रणवु ।। १७.३४२।।" या नामांच्या आश्रयाने प्रकट केले आहे.त्याचप्रमाणे गीताशास्त्ररूप सिद्धयोगाचे अंतिम फल प्राप्त होण्यासाठी संत, ज्ञानी व महात्मे सुद्धा या साधनाचा आश्रय घेतात हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं ।
सोऽहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ।।१.५३।।
तें अक्षर जी अव्यक्त । निर्देश देशरहित ।
सोऽहंभावें उपासित । ज्ञानिये जें ।।१२.३२।।

तेणें ध्यानें प्रकटें। प्रणवोच्चारें स्पष्टें।
लागती मग वाटे। क्रियांचिये ॥१७.३५८॥
तरी सच्छब्दें येणें। आटूनि असताचें नाणें।
दाविजे अव्यंगवाणें। सत्तेचें रूप ॥१७.३८०॥
जें सत् तेंचि काळें देशें। होऊं नेणेचि अनारिसे।
आपणपां आपण असे। अखंडित ॥३८१॥
हें दिसतें जेतुलें आहे। तें असतपणें जें नोहे।
देखतां रूपीं सोयें। लाभे जयाची ॥३८२॥

साधक, संत, महात्मे, ज्ञानी इत्यादि सर्वजण सोऽहं भावाने म्हणजे सोऽहं मंत्राने अव्यक्त व देशरहित ब्रह्मतत्त्वाची उपासना करतात. या मंत्राच्या उपासनेने मंत्र, हठ, लय व राजयोग युक्त चार अंगांनी संपन्न असलेला महायोग किंवा सिद्धयोग कसा घडून येतो हे सांगताना "योगबीज" ग्रंथात महायोगी गोरक्षनाथ म्हणतात–

हंकारेण बहिर्याति सःकारेण विशेत्पुनः।
हंसहंसेति मंत्रोयं सर्वजीवा जपंति तम् ॥१४४॥
गुरुवाक्यात् सुषुम्णायां विपरीतोऽभवेज्जपः।
सोऽहं सोऽहम् इति प्राप्तो मंत्रयोगः स उच्यते ॥१४५॥

'हम्' असा ध्वनी करीत जो श्वास बाहेर जातो त्याला प्रश्वास म्हणतात व 'सः' असा ध्वनी करीत जो श्वास आत येतो त्याला निःश्वास म्हणतात. 'हंसः हंसः' या अजपा गायत्री मंत्राचा जप सर्व जीव नेहमी करीत असतात. ज्यावेळी गुरुकृपा होऊन शक्ती जागृत होते तेव्हा 'हंसः' हा मंत्र जप 'सोऽहं सोऽहं' असा उलट होऊन सुषुम्नेमध्ये त्याचा जप होऊ लागतो. यालाच सिद्धयोगांतर्गत मंत्रयोग म्हणतात. अशा प्रकारचेच वर्णन "योगचूडामणी उपनिषदात" आले असून "अजपानाम गायत्री योगिनां मोक्षदा सदा ॥ १.३३ ॥" असा सोऽहं मंत्राचा महिमा त्यांनी सांगितला आहे. वास्तविक पाहता शास्त्रकारांनी "मननात् त्रायते यस्मात् तस्मात् मंत्रः प्रकीर्तितः।" असे म्हटले आहे. ज्याचे मनन केले असता किंवा घडले असता साधकाचे रक्षण होते तो मंत्र होय. 'सोऽहं' मंत्राचा उपरोक्त पद्धतीने जप केला की, प्राणरूप कुंडलिनी शक्तीचे सुषुम्नेत चालन होऊन सकार व हकार लोप पावतात व ॐकार शिल्लक राहून त्याचाच स्पष्ट उच्चार ऐकू येऊ लागतो. "प्राणांचा प्रणवुचि करावा ॥ ८.११४ ॥" याचा अर्थही हाच आहे. असा ॐकाराचा जप आतून होऊ लागला की, असताचे नाणे आटून जाते व सत्तेचे रूप अव्यंगपणे प्रकट होते म्हणजें कुंडलिनी शक्ती जागृत होते. एकदा ही मंत्ररूप आत्मसत्ता जागृत झाली की, तिचे स्वरूप देशकालाने बदलत नाही व ती स्वतः

आतल्या आत अनारिसे म्हणजे आपल्या मूळ नादमय स्वरूपापासून भिन्नरूप न होता अखंडपणे अनाहत नादाच्या रूपाने जप करीत राहते. हे घडले की, सर्व असत् लोपून या सत्तेच्या आश्रयाने साधक ब्रह्मरूप होतो. अशी ही निगमाचळ-शिखरावरील व उपनिषदार्थनगरातील नाममंत्रस्मरणाची खरी कथा आहे. परंतु नेणिजेल जरी वर्म विनियोगाचे अशी सर्वसाधारणजनाची गोष्ट असल्याने 'विफळ होय' असे होते. यामुळेच शास्त्रकारांनी मंत्राची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

ब्रह्मादितृणपर्यन्तम् प्राणिनां प्राणवर्धनम् ।
निःश्वासोच्छ्वासरूपेण मंत्रोऽयं वर्तते प्रिये ॥
संनियम्येंद्रियग्रामं प्रोच्चरेत् नादमांतरम् ।
एष एव जपः प्रोक्तो न तु बाह्यजपो जपः ॥

ब्रह्मापासून गवतापर्यंत प्राण्यांचे प्राणवर्धन करणारा श्वासोच्छ्वासच मंत्र होय व आपल्या विषयांपासून इंद्रिये निवृत्त करून आभ्यंतर नादाचे उच्चारण होणे हाच जप होय. नुसता बाह्यजप हा जपच नव्हे. यामुळेच 'सोऽहं' हा जप " अयं महावाक्यात्मको महामंत्रः । " म्हणजे अहं ब्रह्मास्मि, प्रज्ञानं ब्रह्म, तत्त्वमसि व अयमात्मा ब्रह्म या चार महावाक्यातील साररूप महामंत्र आहे, अशा प्रतिष्ठेला प्राप्त झाला. या सर्व विवेचनाचे सार शास्त्रकारांनी पुढीलप्रमाणे प्रकट केले आहे. ते म्हणतात—

कुंडलिन्यां समुद्भूता गायत्री प्राणधारिणी ।
प्राणविद्या महाविद्या यस्तां वेत्ति स वेदवित् ॥१.३५॥ योगचूडामणि उप.॥
मूलपद्मे कुंडलिनी यावन्निद्रायिता प्रभो ।
तावत् किंचिन्न सिध्येत् मंत्रयंत्रार्चनादिकम् ॥
जागर्ति यदि सा देवी बहुभिः पुण्यसंचयैः ।
तदा प्रसादमायाति मंत्रयंत्रार्चनादिकम् ॥ गौतमीयतंत्र ॥
मंत्रार्थं मंत्रचैतन्यं यो न जानाति साधकः ।
शतलक्षं प्रजप्तोऽपि तस्य मंत्रो न सिध्यति ॥ महानिर्वाणतंत्र ॥

कुंडलिनी ही प्राणशक्तिमयी असून तीच 'सोऽहं' या अजपा गायत्रीचे उत्पत्तिस्थान आहे. ही गायत्रीच प्राणविद्यारूप महाविद्या आहे. जो या विद्येला जाणतो तोच खरा वेद जाणणारा आहे. जोपर्यंत कुंडलिनी शक्ती मूलाधारात निद्रिस्त आहे तोपर्यंत मंत्र, यंत्र व उपासनादि सिद्ध होत नाही. जेव्हा खूप पुण्यसंचयाच्या प्रभावाने कुंडलिनी शक्ती जागृत होईल तेव्हा तिच्या कृपेनेच मंत्र, यंत्र व अर्चनादि सिद्ध होतील. जोपर्यंत साधक मंत्रार्थ व मंत्रचैतन्य म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तीचा महिमा जाणत नाही तोपर्यंत शतलक्ष पुरश्चरणे किंवा जप

किंवा नामस्मरण केले तरी तद्वारा त्याला सिद्धीचा म्हणजे स्वसंवेद्य आत्मरूपाचा लाभ होत नाही. यासाठीच "शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेच्या एकोणतीसाव्या अध्यायात" या कुंडलिनी शक्तीला " सर्ववेदमयीं देवी सर्वमंत्रस्वरूपिणी। सर्वमंत्रात्मिका विद्या वेदविद्याप्रकाशिनी ॥ " असे म्हटले आहे. अव्यंगवाणे सत्तेच्या रूपाने म्हणजे शब्दब्रह्माच्या आश्रयाने शब्दातीत आत्मरूपाची सोय लाभते ती अशी. हे खरे नामस्मरण व खरे अंतरंग साधन होय. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, " असे हे परमरहस्यात्मक अंतरंग साधन आहे. ते श्रीरंगांनीच स्पष्ट केले आहे "

ऐसा हा अंतरंगु । सच्छब्दाचा विनियोगु ।
जाणा म्हणे श्रीरंगु । मी ना म्हणें हो ॥१७.३८५॥

असे हे अंतरंग साधन आहे. "कठोपनिषदाच्या अध्याय एक वल्ली दोनमध्ये" या साधनाचा महिमा सांगताना असे म्हटले आहे की, " ॐकाराचा म्हणजे नामस्मरणाचा, जपाचा किंवा मंत्राचा महिमा इतका मोठा आहे की, सर्व वेदांनी केवळ या एकाच पदाचे वर्णन केले आहे. जन्मजन्मांतरी केलेले तप सद्गुरुकृपेने शक्तिपात होऊन आत्मशक्ती कुंडलिनी जागृत होण्याने व तद्द्वारा ॐकाराची प्राप्ती होण्यानेच सफल होते. हे ॐकाराचे साधन आतून स्वतःसिद्ध व्हावे म्हणून मुमुक्षुजन ब्रह्मचर्याचे पालन करतात. ॐ हे अक्षरच परब्रह्म आहे. हे अक्षरच सर्वांच्या पलीकडची स्थिती आहे. ज्याला सद्गुरुकृपेने ॐकाराचे अंतरंग साधन मिळते तो कृतकृत्य होऊन ब्रह्मरूप होतो. अशा प्रकारे प्राप्त होणारे ॐकाररूप साधन हेच श्रेष्ठ व अत्युत्तम आलंबन आहे. ज्या साधकाला पूर्णपुण्याईने व गुरुकृपेने हे आलंबन प्राप्त होते तो परब्रह्मरूप होऊन जातो. " " योगशिखोपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायातही " या ॐकारसाधनेचा महिमा पुढीलप्रमाणे कथन केला आंहे. " ॐकार चिद्रूप आहे. तो नमस्करणीय आहे. हा ॐकारच सर्व सिद्धींचे कारण आहे. या ॐकाराच्या केवळ ज्ञानानेच मनुष्यप्राणी जन्ममरणाच्या बंधनापासून मुक्त होतो. ॐ हे अक्षर म्हणजे क्षर न पावणारे आहे. तो परमश्रेष्ठ ध्वनी आहे. त्यालाच शब्दब्रह्म म्हणतात. मूलाधारामध्ये बिंदुरूपी अशी स्वतःचाच स्वतःला आधार असलेली म्हणजे जिला दुसऱ्या कुणाचाही आधार नाही अशी कुंडलिनी शक्ती आहे. तिच्यापासून ध्वनिरूप ॐ प्रकट होतो. " अशा प्रकारे ॐकाराच्या म्हणजे शब्दब्रह्मरूप कुंडलिनी शक्तीच्या आधारानेच साधक सर्वात्मक ब्रह्मरूप होऊन साम्यावस्थेला प्राप्त होतो " श्रीज्ञानेश्वरमहाराज " ऐसे जे नित्ययुक्त । तयांसी सुलभ मी ॥ ८.१३९ ॥, ऐसें हें गहन । अर्जुना माझें भजन ॥ ९.२१९ ॥, हे गुरुवी भक्ती ॥ ९.२२८ ॥, साम्यें भज ॥ १०.३१७ ॥, आपणपें केलें । भक्तांचें घर ॥ १३.३७४ ॥, ऐसेनि वा समरसें । दृष्टि जे उल्लासे । तें भक्ति पैं ऐसे ॥ १४.३८७ ॥, तेणें भक्तिचिद्गागें । मी स्वानंदोदधी वेगें ।

ठाकिला कीं गा ॥ १८.१२२२ ॥ " असे जेव्हा जेव्हा भक्त, भक्ती, भजन व भज्य यांविषयी जे जे काही म्हणतात तेव्हा तेव्हा त्याचा अर्थ उपरोक्त विचारांशी एकरूप असतो हे निश्चित आहे.

या सर्व विवेचनाचा अर्थ असा आहे की, सिद्धयोगरूप भक्तियोगाचे साधन नामस्मरणात्मक आहे. आगम, निगम म्हणजे तंत्रशास्त्र साधू, संत, महात्मे, वैदिक संप्रदाय, वैष्णव, शैव, शाक्त, ईसाई, सूफी एवढेच नव्हे तर बौद्ध व जैन इत्यादि सर्व संप्रदायांनी कोणत्या ना कोणत्या रूपात श्वासप्रश्वासात्मक नामस्मरणाने अर्थात् बाह्य साधनाच्या आलंबनाने उपस्थित होणाऱ्या " नास्ति नादात् परो मंत्रः ।" या नादानुसंधानात्मक अंतरंग साधनाचा स्वीकार केला आहे. ज्याला शक्तिपातयोगसंपन्न कनकदीक्षादाता सद्गुरू प्राप्त होऊन नामस्मरण मिळालेले असते त्याच्या बाबतीत संस्कारयुक्त नाम म्हणजे शोधित नाम जागृत-शक्तिस्वरूपाने विलसतच राहते; परंतु ज्याला अशा सद्गुरूची प्राप्ती झाली नाही, त्याने " कृष्ण विष्णु हरि गोविंद या नामाच्या निखळ प्रबंधातील ।।९.२१० ।। " एक नाम निवडून त्याचा श्वासप्रश्वासाबरोबर म्हणजे श्वास आत घेताना एकदा मानसिक उच्चार करून व श्वास बाहेर सोडताना एकदा मानसिक उच्चार करून जप केला तरी कालेकरून ते नाम चेतन होते म्हणजे त्या साधकाची अंतःसुप्तशक्ती जागृत होऊन तो अंतरंग साधनाचा अधिकारी होतो. अशा प्रकारे भगवंताचे नामस्मरण करण्यात एक अशी सुप्त शक्ती आहे की, जी शेवटी कुंडलिनी जागृत केल्याशिवाय थांबत नाही. भगवान् गौतम बुद्धाने " आनापानसती " या नावाने ज्या साधनाचा आपल्या अंतरंग भक्तांमध्ये प्रचार केला होता ते अजपा-साधनाचेच अंग होते. अजपा गायत्री हा आत्ममंत्र आहे. हाच अंतिम संस्कार आहे. ज्यावेळी हा संस्कार होतो त्यावेळी सद्गुरूची अतर्क्य अशी अशी महान् कृपा प्रकट होते व साधकाच्या अंधकारावृत हृदयात शांती व आनंद यांच्या उज्ज्वल ज्योतीच्या प्रवाहाचा स्रोत प्रकट होतो. मग या स्रोतरूपी प्रवाहामुळे घडून येणाऱ्या भजनाने साधक दिशा, काल व अवस्थारहित होऊन नित्य ब्रह्मानंदात म्हणजे भक्तीत मग्न होऊन जातो. हीच अद्वैत भक्ती होय व साधकाच्या सिद्धावस्थेची पराकाष्ठा होय.

अशा या भक्तियोग साधनेचा महिमा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हा अमूर्त सिद्धयोग समूर्त कसा होतो, हे भक्तांच्या ठिकाणी त्याची जी लक्षणे उमटून दिसतात, ती सांगून स्पष्ट केला आहे. मुळात भगवंतानीच गीतेत "अद्वेष्टा सर्वभूतानां" या तेराव्या श्लोकापासून " भक्तास्तेऽतीव मे प्रियाः । " या विसाव्या श्लोकापर्यंत ही लक्षणे सांगितली आहेत. त्यांचा भावार्थ सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेंचि कहीं ।
आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ॥१२.१४४॥
जीवु परमात्मा दोन्ही । बैसऊनि ऐक्यासनीं ।
जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ॥१५३॥
ऐसा योगसमृद्धी । होऊनि जो निरवधी ।
अर्पी मनोबुद्धी । माझ्या ठायीं ॥१५४॥
आंतु बाहेरि योगु । निर्वाळलेयाहि चांगु ।
तरी माझा अनुरागु । सप्रेम जया ॥१५५॥
जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींचि न देखे ।
म्हणौनि भोगविशेखें । हरिखेजेना ॥१९०॥
हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥२१३॥
जे पुरुषार्थसिद्धी चौथी । घेऊनि आपुलिया हातीं ।
रिगाला भक्तिपंथी । जगा देतु ॥२१९॥

असा भक्तियोगाचा म्हणजे सिद्धयोगाचा महिमा आहे. या भक्तियोगाच्या महिम्यातच भक्तीचे व योगाचे सार आहे. जे भक्त असतात तेच योगी असतात व जे योगी असतात तेच भक्त असतात. त्यांची उत्कंठा देवालाही असते; परंतु असे भक्त फार थोडे, क्वचित् व विरळ असतात. "कबीर कबीर क्या कर रहे हैं जा जमुनाके तीर । एक गोपीके प्रेममें बह गये कोटि कबीर ।।" असे एका भक्ताला कबीरांनी दिलेले उत्तर व " यथा व्रजगोपिकानाम् ॥२१॥" असे ब्रह्मर्षी नारदांनी " भक्तिसूत्रात " घातलेले उदाहरण पाहिले म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे पुढील म्हणणे आत्मसात होते. ते म्हणतात –

येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥७.९७॥
जयां सद्गुरुतारूं फुडें । जे अनुभवाचे कांसे गाढे ।
जयां आत्मनिवेदन तरांडें । आकळलें ॥९८॥
जें अहंभावाचें वोझें सांडुनी । विकल्पाचिया झुळका चुकाउनी ।
अनुरागाचा निरुता होउनि । पाणिढाळु ॥९९॥
जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडला तारा ।
मग निवृत्तीचिया पैलतीरा । झेंपावले जे ॥१००॥
ते उपरतीच्या वांवीं सेलत । सोऽहंभावाचेनि थावें पेलत ।
मग निघाले अनकळित । निवृत्तितटीं ॥१०१॥

**येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले ।**
**परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ।।१०२।।**

सद्‌गुरुकृपा, जागृत शक्ती, अंतरंग साधन, सोऽहं नामस्मरण, आत्मनिवेदन हे सर्व खरोखरी काय आहे हे ज्यांना कळले तेच माया तरून जातात. पण असे भक्त थोडे असतात. फार नसतात. ही विरळ गोष्ट आहे. ज्यांनी जाणले त्यांनी जाणले. त्यामुळेच भगवंत अर्जुनाला सांगतात –

**तरि झडझडोनि वाहिला निघ । इये भक्तीचिये वाटे लाग ।**
**जिया पावसी अव्यंग । निजधाम माझें ।।९.५१६।।**
**मग तो जीवु हे भाष्य सरे । आब्रह्म परमात्मबोधें भरे ।**
**ऐसे भजतो ज्ञानाध्वरें । एकत्वें येणें ।।९.२४८।।**
**तैसा मी जेतुला आघवा । तेंचि तुक तयांचिया सद्‌भावा ।**
**तरी न करितां पांडवा । भजन जहालें ।।९.२६१।।**

सारांश, भक्तियोगाचे नाव घेऊन ज्ञानेश्वरीत उपस्थित झालेल्या सिद्धयोगाचे रहस्य त्या नावातून कसे स्पष्ट होते हे वरील विवेचनावरून लक्षात येते.

## राजविद्याराजगुह्ययोगः–

सिद्धयोगसाधनाने ज्या साध्याची म्हणजे ज्ञानाची प्राप्ती होऊन साधक मुक्त होतो त्याचे भगवंतांनीच गीतेत " राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् । प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ।। ९.२ ।। " म्हणून वर्णन केले आहे. सिद्धयोगसाधनाने प्राप्त होणारे ज्ञान अत्यंत पावन व उत्तम आहे; कारण ते सर्व विद्यांचा व गुह्यांचा राजा आहे. या साधनामुळे ज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव येतो. हे ज्ञान धर्माला म्हणजे योगाला धरून आहे. सिद्धयोगसाधनानेच ते संपादन करण्यास सुलभ असून या साधनद्वारा ते प्रकट झाले म्हणजे कायम राहणारे म्हणजे कधीही क्षीण होणारे नाही. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी राजविद्या, राजगुह्यं व प्रत्यक्षावगमं या शब्दांवर भाष्य करताना असे म्हटले आहे की, " राजविद्या विद्यानां राजा दीप्त्यतिशयत्वात् । दीप्यते हीयमतिशयेन ब्रह्मविद्या सर्व विद्यानाम् । तथा राजगुह्यं गुह्यानां राजा । किंच प्रत्यक्षावगमं प्रत्यक्षेण सुखादेरिवावगमो यस्य तत्प्रत्यक्षावगमम् । " राजविद्या म्हणजे सर्व विद्यांचा राजा होय; कारण तिच्यामध्ये दीप्तीचे आधिक्य आहे. ही ब्रह्मविद्या सर्व विद्यांमध्ये फारच देदिप्यमान आहे. तसेच सुखादिकांचा ज्याप्रमाणे प्रत्यक्ष अनुभव येतो त्याप्रमाणे या ज्ञानाच्या सुखाचा अनुभव येतो. अशा या ज्ञानाच्या धर्मामुळे म्हणजे योगामुळे हा अनुभव येतो. महायोगी गोरक्षनाथांनी " तत्स्वधर्म इति प्रोक्तो योगमार्गे विशेषतः ।।५.२०।। " अशी धर्माची व्याख्याच " सिद्धसिद्धांतपद्धतीत " केली आहे. वास्तविकपणे विशेषरूपाने सिद्धयोगालाच धर्म म्हणतात असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. योगी

याज्ञवल्क्यांनीही " अयं तु परमो धर्मो यद् योगेनात्मदर्शनम् " अशी व्याख्या करून ज्या योगाच्या द्वारे स्वस्वरूपाचे दर्शन होते त्याला धर्म म्हणावे, असे स्पष्ट केले आहे. अर्थात् सिद्धयोगसाधन सहज, सुलभ व अक्षय्य असल्याने त्याचे साध्य जे ज्ञान तेही सहज सुलभ व अक्षय्य असते हे सिद्धसाध्यएकरूपतेच्या किंवा अंगअंगी-भावाच्या न्यायाने सिद्धच होते.

अशा या राजविद्या राजगुह्ययोगाला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ऐश्वर्ययोग" असे संबोधिले असून " तरी अवधान एकलें दीजे । मग सर्व सुखासि पात्र होईजे । हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड ऐका ॥ ९.१ ॥ " या प्रमाणे अवधान म्हणजे चित्त म्हणजे आत्मरूप शक्ती एकदा जागृत होऊन द्या मग साधक सर्व सुखाला पात्र झाल्या-शिवाय राहणार नाही हे त्रिकालाबाधित सत्य आहे, असा त्यांनी निर्वाळा दिला आहे. ऐश्वर्ययोग म्हणजे काय हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रतिज्ञोत्त-रावर दिलेला हा निर्वाळा आपल्या अधिकच प्रत्ययास येतो. ते म्हणतात—

म्हणौनि नाहीं आणि असे । हें कल्पनेचेनि सौरसें ।
जे कल्पनालोपें भ्रंशे । आणि कल्पनेसवें होय ॥९.९१॥
तेंचि कल्पितें मुद्दल जाये । तैं असें नाहीं हें कें आहे ?।
म्हणौनि पुढती तं पाहे । हा ऐश्वर्ययोगु ॥९२॥
ऐसिया प्रतीतिबोधसागरीं । तूं आपणपेयातें कल्लोळु एक करीं ।
मग जंव पाहासी चराचरीं । तंव तूंचि आहासी ॥९३॥
या जाणणेयाचा चेवो । तुज आला ना ? म्हणती देवो ।
तरी आतां द्वैत स्वप्न वावो । जालें कीं ना ॥९४॥
आतां येणें उजिवडें निरुतें । न्याहाळीं पा ऐश्वर्ययोगातें ।
जे माझ्या ठायीं भूतें । परी भूतीं मी नसें ॥१३३॥
मग तिया दृष्टी पांडवा । आमुचा ऐश्वर्ययोगु आघवा ।
देखोनियां अनुभवा । माजिवडा करीं ॥११.१६३॥

'येणे उजिवडे निरुते' झाल्याशिवाय व जाणणेयाचा चेवो' आल्याशिवाय कल्पना लोपून प्रतीतिबोधसागरी आपल्याला एक कल्लोळ करण्याचा व द्वैतस्वप्न नाहीसे होण्याचा अनुभव माजिवडा होईल काय ? कधीच हे शक्य नाही. उजिवडे निरुते झालेच पाहिजे व जाणणेयाचा चेवो आलाच पाहिजे; कारण " हा दंशु जंव नये हातां । तंव माझे साचोकारपण पार्था । न संपडे गा सर्वथा । जेंवि तुषीं कणु ॥ ९.१३६ ॥ " हा त्यांचा परम सिद्धांत आहे. हे या ऐश्वर्ययोगाचे म्हणजे सिद्धयोगाचे वर्म, रहस्य किंवा दंश आहे. हे रहस्य जोपर्यंत साधकाच्या हाती लागत नाही तोपर्यंत साधकाची परमात्म्याच्या मार्गात गती होत नाही; मग त्या मार्गाची वाटचाल व परमपदाची प्राप्ती ह्या गोष्टी खूप दूरच्या ठरतात. कोंडचात

कधी दाण्याचा कणही सापडत नाही तशीच उपरोक्त जागृतीशिवाय साधकाची दशा होते.

ऐश्वर्ययोग न्याहाळण्यासाठी व प्रतीतिबोधसागराचा कल्लोळ होण्यासाठी ज्या जाणणेयाच्या चेवाचा व निरुत्या उजिवडयाचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आग्रह धरला आहे ती दंशात्मक गोष्ट आहे तरी काय ? हे रहस्य दुसरे तिसरे काही नसून गीतेत म्हटल्याप्रमाणे " दैवीं प्रकृतिमाश्रिताः भजंत्यनन्यमनसो ॥९.१३॥" असे महात्म्यांनी दैवी प्रकृतीच्या आश्रयाने अनन्यभजन कसे केले त्याचे इंगित आहे. " प्रपंचसारतंत्रामध्ये " श्रीमदाद्यशंकराचार्यांनी प्रकृती म्हणजे काय हे सांगताना असे म्हटले आहे की, " प्रकृतिः निश्चला परावाग्रूपिणी परप्रणवात्मिका कुंडलिनी शक्तिः । " प्रकृती ही निश्चल, परावाणीच्या व परप्रणवाच्या स्वरूपातील कुंडलिनी शक्ती आहे. या प्रकृतीलाच " दैवी ह्येषा गुणमयी मम माया ॥ ७.१४ ॥ " असे गीतेत संबोधिले आहे. " स्पंदशास्त्राच्या दुसऱ्या प्रवाहातील" तिसऱ्या व चौथ्या श्लोकावर टीका करताना भट्ट कल्लटाने या दैवी प्रकृतीचा किंवा मायेचा उलगडा केला आहे. ते म्हणतात, " परमेश्वराशी अभिन्न असणाऱ्या पराशक्ती कुंडलिनीला श्रेष्ठ असे शास्त्रवेत्ते लोक तत्त्व म्हणतात. " मतंग पारमेश्वर " या ग्रंथात असे म्हटले आहे की, शिवापासून म्हणजे सहस्रारापासून पृथ्वीपर्यंत म्हणजे मूलाधारापर्यंत हा जो विस्तीर्ण सुषुम्नामार्ग आहे तो चिद्वस्तूनेच म्हणजे कुंडलिनी शक्तिनेच सिद्ध होतो व त्या शक्तीमुळेच जाणला जातो. गीतेमध्ये मायेला ' दैवी ' म्हणण्याचा अभिप्राय हाच आहे. परमेश्वराच्या मुख्य शक्तीच्या म्हणजे परमेश्वराशी ऐक्यतेने असणाऱ्या निर्विकल्प शक्तीच्या जागृतीमुळे किंवा ऊर्ध्वमुखतेमुळे सुखदुःखादि परस्पर भिन्न भासणाऱ्या संस्काररूप विशेष स्पंदांपासून साधक परावृत्त होतो. हाच महात्म्यांनी केलेल्या दैवी प्रकृतीचा म्हणजे जागृत कुंडलिनीचा आश्रय होय. या आश्रयामुळेच अनन्य भजन आपोआप घडून येते. " "तरी न करितां पांडवा । भजन जहालें ॥९.२६१॥" असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात त्याचा अर्थही हाच आहे. सांख्यांनीही प्रकृतीला ब्रह्मस्वरूप सनातन शक्तीच म्हटले आहे. ही गोष्ट या संदर्भात लक्षात ठेवण्यासारखी आहे. ते म्हणतात—

**प्रकृतौ विद्यमानायां विकृतिर्न बलीयसी ।**
**प्रकृतिः परमाशक्तिर्विकृति प्रतिबिंबता ॥**
**स च ब्रह्मस्वरूपा च नित्या सा च सनातनी ।**
**यथात्मा च तथा शक्तिर्यथाऽग्नौ दाहिका स्थिता ॥**

ज्यावेळी प्रकृती म्हणजे कुंडलिनी शक्ती जागृत होते त्यावेळी विकृतीचे बळ राहत नाही. प्रकृती ही परमश्रेष्ठ शक्ती असून विकृती म्हणजे जीवसंसारादि भास किंवा पिंडब्रह्मांडादि रचना ही तिची छाया आहे. ही शक्ती ब्रह्मस्वरूप, नित्य व

सनातन आहे ज्याप्रमाणे अग्नीमध्ये अग्नीची दाहकशक्ती अंतर्निहित असतें त्याप्रमाणें आत्म्यामध्ये आत्म्याची शक्ती अनुस्यूत व एकरूप असते. जसा आत्मा तशीच त्याची शक्ती होय.

"देवीभागवतात" ही शक्तीच सर्व काही असून तीच श्रीकृष्णादि रूपे घेऊन भक्तांवर अनुग्रह करते व आपल्या जागृतीच्या द्वारा साधकाच्या शरीरात महान् यज्ञ घडवून आणते हे यमधर्माने सावित्रीला सांगताना असे म्हटले आहे की—

सर्वात्मा सर्ववान्सर्वभगवान्सर्वकारणः ।
सर्वेश्वरश्च सर्वाद्यः सर्ववित्परिपालकः ॥९.३८.२५॥
नित्यरूपी नित्यदेही नित्यानंदो निराकृतिः ।
निरंकुशो निराशंको निर्गुणश्च निरामयः ॥२६॥
निर्लिप्तः सर्व साक्षी च सर्वाधरः परात्परः ।
मायाविशिष्ट प्रकृतिः तद्‌विकाराश्च प्राकृताः ॥२७॥
स्वयं पुमांश्च प्रकृतिस्ताबभिन्नौ परस्परम् ।
यथा वन्हेस्तस्य शक्तिर्न भिन्नाऽस्त्येव कुत्रचित् ॥२८॥
सेयं शक्तिर्महामाया सच्चिदानंदरूपिणी ।
रूपं बिभर्त्यरूपा च भक्तानुग्रहहेतवे ॥२९॥
गोपालसुंदरीरूपं प्रथमं सा ससर्ज ह ।
अतीवकमनीयं च सुंदरं सुमनोहरम् ॥३०॥

ही शक्ती सर्वांचा आत्मा, सर्वांचा नियंता, सर्व कारणांचे कारण, सर्वांचा ईश्वर; सर्वांच्या अगोदर असणारी, सर्वज्ञ व सर्वांचे परिपालन करणारी आहे. अशी हीं शक्ती नित्यरूपी, नित्यदेहवान, नित्यानंदरूप, निराकार, निरंकुश, आशंकारहित, निर्गुण, निरामय, लेपशून्य, सर्वांची साक्षी, सर्वांचा आधार, पराहून पर, मायायुक्त व प्रकृतिमय असून तिच्या विकारांना प्राकृत असे म्हणतात. स्वतः आत्माच प्रकृतीच्या संबंधामुळे प्रकृतिसंज्ञक होतो. ज्याप्रमाणे अग्नीची शक्ती अग्नीहून कधीच भिन्न नसते त्याप्रमाणे आत्मा व शक्ती ही दोघे परस्पर अभिन्न असतात. अशी ही शक्तीं सत्, चित् व आनंदरूपी महामायाच आहे. ती रूपरहित असूनही भक्तांवर अनुग्रह करण्याकरिता रूप धारण करते. प्रथमतः तिने गोपालसुंदरीरूप उत्पन्न केले. ते अत्यंत सुंदर, मनोहर व रमणीय आहे.

ज्यावेळी भगवान् गोपालकृष्ण त्यांच्या रूपानेच असलेली ही प्रकृती अगर ही दैवीमाया भक्तांवर अनुग्रह करण्यासाठी तिचेच रूप धारण केलेल्या सद्‌गुरूंच्या द्वारा साधकाच्या ठिकाणी जागृत करतात त्यावेळीच 'निरुते उजविडे होते' व 'जाणणेयाचा चेवो' येतो. अशा जागृत शक्तीमुळे जो यज्ञ घडतो तो खरा यज्ञ होय व त्यालाच ऐश्वर्ययोग म्हणतात. उपरोक्त विचारांच्या पार्श्वभूमीवर ज्या

यज्ञाचे श्रीज्ञानेश्वरमहाराज वर्णन करतात त्या यज्ञाचे स्वरूप किती भिन्न व अपूर्व आहे याची कल्पना येईल. ते म्हणतात–

तोचि जाणिवेचा जरी उदयो होये । तरी मुद्दल वेदु मीचि आहें ।
आणि तो विधानातें जया विये । तो क्रतुही मीचि ।।९.२६५।।
मग तया कर्मापासूनि बरवा । जो सांगोपांगु आघवा ।
यज्ञु प्रकटे पांडवा । तोही मी गा ।।२६६।।
स्वाहा मी स्वधा । सोमादि औषधी विविधा ।
आज्य मी समिधा । मंत्रु मी हवि ।।२६७।।
होता मी हवन कीजे । तेथ अग्नी तो स्वरूप माझें ।
आणि हुतक वस्तु जें जें । तेही मीचि ।।२६८।।

जाणिवेचा उदय झाला म्हणजे आद्याशक्ती कुंडलिनी जागृत झाली म्हणजे खऱ्या कर्माला म्हणजे बरव्या यज्ञाला सुरवात होते. या यज्ञात वेद, विधान, स्वाहा, सोमादि औषधी, समिधा, मंत्र, हवी, होता इत्यादि सर्व ईश्वराच्यारूपाने असलेली जागृत शक्तीच असते. ही जागृत शक्ती योगाग्निस्वरूप, कोटिसौदामिनीभासयुक्त, मूलाधारस्थ वन्हयात्मतेजयुक्त, चिदग्निकुंडसंभूता, विद्युत्पुंजसमप्रभा व चैतन्यचक्रवर्तीची शोभा असल्याने 'अग्नी तो स्वरूप माझें' असे म्हटले आहे. या अग्निद्वारा सिद्धयोगसाधनेचा यज्ञ घडून येऊन ऐश्वर्ययोग संपन्न होत असल्याने बाकी यच्चयावत् सर्व गोष्टी व्यर्थ आहेत असे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

म्हणौनि मद्याजी जे जाहाले । ते माझियाचि सायुज्या आले ।
जिहीं उपचारमिषें दिधलें । आपणपें मज ।।९.३६६।।
पैं अर्जुना माझे ठायीं । आपणपेंवीण सौरसु नाहीं ।
मी उपचारें कवणाही । नाकळें गा ।।३६७।।
येथ जाणीव करी तोचि नेणें । आथिलेंपण मिरवें तेंचि उणें ।
आम्ही जाहलों ऐसें जो म्हणे । तो कांहींचि नव्हे ।।३६८।।
अथवा यज्ञदानादि किरीटी । कां तपें हन जे हुटहुटी ।
ते तृणा एकासाठीं । न सरे एथ ।।३६९।।
अगा सहस्रकिरणांचिये दिठी । पुढां चंद्रही लोपे किरीटी ।
तेथ खद्योत कां हुटहुटी । आपुलेनि तेजें ? ।।३७०।।
तैसे लक्ष्मीयेचें थोरपण न सरे । जेथ शंभूचेंही तप न पुरे ।
तेथ येर प्राकृत हेंदरें । केवीं जाणों लाहे ?।।३७१।।

एका सिद्धयोगसाधनस्वरूप ऐश्वर्ययोगाच्याशिवाय जीव आपले स्वसंवेद्य आत्मस्वरूप यज्ञदानतप इत्यादि कशानेहीं जाणू शकत नाही. हे सिद्धयोगसाधन सहस्रकिरणांनी युक्त अशा सूर्यासारखे तेजस्वी असून त्याच्या पुढे जेथे चंद्राचेही तेज

लोपते तेथे काजव्यासारख्या इतर साधनांचा काय डौल आहे ? एका सिद्धयोग-साधनामुळे प्राप्त होणाऱ्या जागृतशक्तीच्या ऐश्वर्ययुक्त अशा सहजतेने घडणाऱ्या कर्मज्ञानभक्तिसंपन्न यज्ञाशिवाय लक्ष्मीच्या ऐश्वर्याचा किंवा शंभूच्या तपाचाही आत्मस्वरूप प्राप्तीसाठी उपयोग होत नाही. मग अज्ञानी व सामान्य लोक ईश्वराला कसे जाणणार ? इतर सर्व साधने तृणवत् असून सिद्धयोगरूप ज्ञानसाधनाशिवाय जे काही जाणणे आहे व मी जाणतो, मला समजले, मी ब्रह्मरूप झालो इत्यादि सर्व म्हणणे व्यर्थ आहे. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" तर्क, जप, ध्यान, मंत्र, वेदान्तश्रवणादि सर्व व्यर्थ असून "तज्ज्ञेयं सद्गुरोर्वक्त्रान्नान्यथा शास्त्रकोटिभिः ॥५.३१॥" असा परमसिद्धांत मांडून जे स्पष्ट केले आहे, "शक्तियज्ञः प्रधानश्च सर्वयज्ञेषु सुंदरी । नानेन सदृशो यज्ञस्त्रिषु लोकेषु विद्यते ॥९.३०.१२०॥" असे "देवीभागवतात" म्हणून जागृत शक्तिद्वारा साधकदेहात उपस्थित होणारा जो महायज्ञ सूचित केला आहे व "क्रमसूत्रात" म्हटल्याप्रमाणे "यथा वन्हीरुद्बोधितो दाह्यं दहति तथा विषयपाशान् भक्षयेत् ।" म्हणजे प्रदीप्त अग्नी ज्याप्रमाणे इंधन जाळून टाकतो त्याप्रमाणे जागृत शक्ती विषयपाश गिळून टाकते, तेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उलगडून दाखविले आहे.

असे हे ऐश्वर्ययोगाचे साधन साधकाला कसे प्राप्त होते व ते कसे चालते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे ।**
**प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपैसयाचि ॥९.४९॥**
**तेवींचि गा सुखाच्या पाउटीं । चढतां येइजे जयाच्या भेटी ।**
**मग भेटल्या कीर मिठी । भोगणेंयाही पडे ॥५०॥**
**परि भोगाचिये ऐलीकडिलिये मेरे । चित्त उभें ठेलें सुखा भरे ।**
**ऐसें सुलभ आणि सोपारें । वरि परब्रह्म ॥५१॥**

ज्यावेळी सद्गुरू तत्त्वमसी इत्यादि महावाक्यांच्या किंवा सोऽहं, ॐ अगर हरि–गोविंद इत्यादि नामांच्या द्वारा साधकाला शब्ददीक्षा देऊन शक्तिसंक्रमण करतात तेव्हा साधकाच्या हृदयात नित्यसिद्ध असलेली निद्रिस्त अशी ज्ञानस्वरूप कुंडलिनी शक्ती जागृत होऊन सुषुम्नेच्या मार्गाने ऊर्ध्वगतीने वाटचाल करू लागते. त्यामुळे साधकाला ज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव आपोआप येऊ लागतो. सुषुम्नेच्या जिन्याने एकएक पायरीवर चढत चढत शक्तीचा जसजसा क्रमविकास होत जातो तसतशी ती आपले शक्तिस्वरूप टाकून देऊन शिवस्वरूप होऊ लागते व शेवटी शिवाशी तिचे पूर्ण मीलन झाले की, मग ज्ञान, भोगणे, अनुभूती ही संपून एक अखंड सामरस्याची स्थिती प्राप्त होते. ही तर शेवटची स्थिती झाली; परंतु भोगाच्या अलीकडील टोकावर किंवा काठावर म्हणजे मूलाधारात जेव्हा चित्त

म्हणजे ही कुंडलिनी शक्ती उभी ठाकते म्हणजे सद्‌गुरुकृपेने जागृत होते तेव्हा तिचा सुषुम्नेत होणाऱ्या सूक्ष्म संचारानेही साधक ज्ञानजागृतीच्या सुखानुभवाने भरून जातो. असे हे सिद्धयोगरूप ऐश्वर्ययोगाचे गुरुकृपेने प्राप्त होणारे सुलभ व सोपे साधन आहे. या साधनाने साधक निरामय ब्रह्मरूपता सहज प्राप्त करतो; नव्हे ते ब्रह्मरूपच त्याला वरते. या अर्थानेच, "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की–

**येन मार्गेण गतव्यं ब्रह्मस्थानं निरामयम् ।**
**मुखेनाच्छाद्य तद्द्वारं प्रसुप्ता परमेश्वरी ॥३.१०६॥**

सुषुम्नेच्या मार्गाने सहस्रारातील निरामय अशा ब्रह्मस्थानी पोहोचून साधक ब्रह्मस्थिती किंवा आत्मसाक्षात्कार प्राप्त करतो. (हेच खरे ज्ञान होय. यालाच 'सुखाच्या पाउटी चढता येइजे जयाच्या भेटी' असे म्हणतात.) मूलाधारात ही परमेश्वरी शक्ती सुषुम्नेचें द्वार रोखून म्हणजे ऐलीकडील मेरेवर झोपलेली असते. जोपर्यंत ती झोपलेली असते तोपर्यंत "कठोपनिषदात" म्हटल्याप्रमाणे "परांचि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्परांपश्यति नांतरात्मन् ॥२.१.१॥" अशीच जीवाची स्थिती असते. या शक्तीच्या द्वारा स्वयंभू परमात्म्याने इंद्रियांची गती बहिर्मुख केलेली असते. त्यामुळे जीव बाह्य विषयांचा उपभोग घेत राहतो. अंतरात्म्याच्या सुखाची त्याला जाणीवच होत नाही. यालाच श्रीज्ञानेश्वरमहाराज भोगाचियें ऐलीकडील मेर म्हणून संबोधत आहेत; परंतु एकदा मोटके गुरुमुखे उदैजत झाले, एकदा शक्तिपात झाला की, हे चित्त म्हणजे ही शक्ती उभी ठाकली म्हणजे जागृत झाली की, "कठोपनिषदातच्या" उपरोक्त मंत्राच्या उत्तरार्धात म्हटल्याप्रमाणे "कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ॥२.१.१॥" या न्यायाने ज्या साधकाची शक्ती गुरुकृपेने जागृत होऊन जो साधन करतो, अशा एखाद्या विरळच्या धीर पुरुषाला अमृतत्व प्राप्तीची इच्छा असल्याने, तो प्रत्यगात्म्याची अनुभूती घेतो व त्याला पाहतो. हेच भेटल्या कीर मिठी पडणे होय. या सुखाची अनुभूती म्हणजेच भोगणेयाही पडे व सुखे भरे होय. अशा भोगाची, सुखाची व अनुभूतीची प्राप्ती करून देणाऱ्या सिद्धयोगसाधनेलाच श्रीज्ञानेश्वरमहाराज "म्हणौनि ये निद्रेची वाट मोडे । निखळ उद्‌बोधाचेंचि आपणपें घडे । ऐसें वर्म जें आहे फुडें । तें दावों आतां ॥ ९.९६ ॥" असे म्हणतात. अनादि निद्रेची वाट मोडणारी चित्‌शक्ती कुंडलिनीचे उद्‌बोधन निखळपणे सद्‌गुरुकृपेने झाले की, सर्व साधन आपलेआपणच घडून येते, हे ऐश्वर्ययोगाचे वर्म आहे. पुनःपुन्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज हा ऐश्वर्ययोग किंवा सिद्धयोग आपोआप घडतो म्हणून सांगतात व हेच या योगाचे वर्म आहे असे म्हणतात. हे ध्यानात घेतले म्हणजे हे साधन कसे चालते हे लक्षात येऊन सिद्धयोगसाधनाच्या अनुग्रहाची अपूर्वता ध्यानात येईल. यामुळे ऐश्वर्ययोगाच्या अनुग्रहाचे व तद्द्वारा प्राप्त होणाऱ्या ऐश्वर्यतेजाचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें । जैसें कपोल शंखें शिवतलें ।
आणि वेदांचियेही मतीं ठेलें । तें लागला बोलों ॥११.१८४॥
तैसा अनुग्रहो पैं राया । श्रीहरी केला धनंजया ।
आतां कवणे कडेही माया । ऐसी भाष नेणेंचि तो ॥१८५॥
एकसरे ऐश्वर्यतेजें पाहलें । तया चमत्काराचें एकार्णव जाहलें ।
चित्त समाजीं बुडोनि ठेलें । विस्मयाचिया ॥१८६॥
नाना सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारांगण जैसें लोपे ।
तैसीं गिळिलीं विश्वरूपें । प्रपंचरचना ॥१९०॥

ध्रुवाला जशी विष्णूने स्पर्शदीक्षा दिल्यावर तो "योगशिखोपनिषदात" म्हटल्याप्रमाणे "वेदशास्त्रपुराणानां स्वयं कर्ता भविष्यति ॥ ३.११ ॥" होऊन वेदांच्याही पलीकडे जाऊन परमात्म्याची स्तुती करू लागला त्याप्रमाणे अर्जुनाला भगवंतांनी अनुग्रह म्हणजे शक्तिपातदीक्षा दिल्याबरोबर त्याला ऐश्वर्ययुक्त तेजाचे दर्शन झाले. "सूर्यगीता व शिवपुराणांतर्गत उमासंहितेच्या सत्ताविसाव्या अध्यायात" सद्गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, ऐश्वर्यतेजाची पहाट कशी होते याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की—

यदा कुंडलिनी शक्तिराविर्भवति साधके ।
तदा स पंचकोशे मत्तेजोऽनुभवति ध्रुवम् ॥सूर्यगीता १.४८॥
ततस्तु तमसि ध्यानी पश्यति ज्योतिरैश्वरम् ।
श्वेतं रक्तं तथा पीतं कृष्णमिन्द्रायुधप्रभम् ॥शि. पु. उ. सं. २७.१९॥
भ्रुवोर्मध्ये ललाटस्थं बालार्क सम तेजसम् ।
दर्शनं नाम दिव्यानां दर्शनं चाप्रयत्नतः ॥२०॥

ज्यावेळी कुंडलिनी शक्ती साधकाच्या ठिकाणी जागृत होऊन क्रियारूपाने प्रकाशित होते तेव्हा साधकाला अन्नमय, प्राणमय, आनंदमय व विज्ञानमय या पाचकोशात परमात्म्याच्या सूर्यरूप ज्योतिर्मय तेजाचा निश्चित अनुभव येतो. ध्यानाच्या वेळी साधक अंधकारमय अंतराकाशामध्ये ज्योतिरूप ईश्वराचे दर्शन घेतो. ही ज्योत पांढरी, लाल, पिवळी, काळी व इंद्रधनुष्याच्या रंगाप्रमाणे नानाप्रकारच्या रंगांची असते. प्रातःकाळी उगवलेल्या सूर्याप्रमाणे ही ज्योत साधकाला ध्यानात भ्रूमध्यात व ललाटप्रदेशात दृष्टीस पडते. याचेच नाव दिव्य व ऐश्वर्ययुक्त दर्शन असून असे दर्शन गुरुकृपेने जागृत झालेल्या शक्तीमुळे कोणत्याही प्रयत्नाशिवाय स्वतः होते.

असा हा ऐश्वर्ययोगाचा म्हणजे सिद्धयोगाचा अनुग्रह आहे. या अनुग्रहामुळे ध्रुवाच्या ठिकाणी वेदांच्याही मतीला अगोचर असे स्तुतिरूप काव्य स्फुरले तर अर्जुनाला ज्योतिरूप तेजब्रह्माचे दर्शन झाले. असा फरक का पडला? "शारदातिलक"

या तंत्र ग्रंथात शक्तिपात दीक्षा एकच असली तरी कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर ती जी लक्षणे प्रकट करते ती भिन्न भिन्न अशा चार स्वरूपाची दिसून येतात म्हणून क्रियावती, कलावती, वर्णमयी व वेधमयी अशी चार प्रकारची दीक्षा होते असे म्हटले आहे.

**चतुर्विधा सा दीक्षा ब्रह्मणा भाषिता पुरा ।**
**क्रियावती कलावती वर्ण वेधमयी पुनः ।।४.३।।**

ध्रुवाचा अनुभव वर्णमयीच्या रूपाने व अर्जुनाचा अनुभव कलावतीच्या अंगाने प्रकट झाला. त्यामुळे त्यांच्या अनुभवात फरक पडला इतकेच. संजयाला तर कृष्णार्जुन संवादानेच जागृत शक्तीचे भरते येऊन त्याच्या ठिकाणी उमटलेल्या लक्षणांचे जे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे ते सर्व क्रियावती दीक्षेचे असून स्वेद, कंप, रोमांचादि भक्तिभाव त्याला कसे प्राप्त झाले ते त्यांनी सांगितले आहेत. हा सर्वच विषय पुढे आठव्या प्रकरणाच्या "साधनातील क्रिया व अनुभव" या दहाव्या मुद्यात सविस्तरपणे वर्णन केला असल्यामुळे त्याची येथे अधिक चर्चा करीत नाही.

याप्रमाणे ऐश्वर्ययोगाच्या ऐश्वर्याचे ऐश्वर्य आहे. अकराव्या अध्यायात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीकृष्णांनी अर्जुनाला शक्तिपातानुग्रह दिल्यावर अर्जुनाला जी अनुभूती आली तिचे समग्र वर्णन करून ऐश्वर्य योगाचे दिव्यत्व प्रकट केले आहे. साधन सुलभ व सोपारे आहे हे निश्चितच आहे; परंतु जागृत शक्तीमुळे येणारे अनुभव इतके विलक्षण, अपूर्व, अद्भुत, भयानक व कल्पनेच्या पलीकडील असतात की, त्यामुळे जीव घाबरून जातो. त्याला वाटते हे साधन नको आणि तो अनुग्रह नको. अर्जुनच यामुळे घाबरून गेला व त्याने सद्गुरुनाथ श्रीकृष्णांना प्रार्थना केली की—

**अहा भाग्या विपरीता । विघ्न उठिलें शांत करितां ।**
**कटकटा विश्व गेलें आतां । तूं लागलासी ग्रासूं ।।११.३९०।।**
**कटकटा धातया । कैसें जाहलें अनुग्रहा यया ।**
**मियां प्रार्थूनि जगा बापुडिया । आणिलें मरण ।।४००।।**
**यालागीं जी देवा । एथिचें भय उपजतसे जीवा ।**
**म्हणौनि येतुला लळा पाळावा । जे पुरे हें आतां ।।५९३।।**

अशा प्रकारे अर्जुनाने भगवंतांना प्रार्थना केल्यावर त्याला त्यांनी जे उत्तर दिले आहे त्यातच या ऐश्वर्ययोगाच्या तेजाचे माहात्म्य किंवा श्रेष्ठत्व स्पष्ट झाले आहे. हे श्रेष्ठत्व स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**म्हणौनि विश्वरूपलाभें श्लाघ । एथिचे भय नेघ नेघ ।**
**हें वांचूनि अन्य चांग । न मनीं कांहीं ।।११.६२३।।**

हां गा समुद्र अमृताचा भरला । आणि अवसांत वरपडा जाहला ।
मग कोणींही आथि वोसंडिला । बुडिजैल म्हणौनि ? ।।६२४।।
नातरी सोनयाचा डोंगरु । येसणा न चले हा थोरु ।
ऐसें म्हणौनि अव्हेरु । करणें घडे ? ।।६२५।।
दैवें चिंतामणी लेईजे । कीं हें ओझें म्हणौनि सांडिजे ? ।
कामधेनु दवडिजे । न पोसावे म्हणौनि ? ।।६२६।।
चंद्रमा आलिया घरा । म्हणे निगे करितोसि उबारा ।
पडिसायि पाडितोसि दिनकरा । परता सर ।।६२७।।
तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज ।
कीं एथ तुज गजबज । होआवी कां ? ।।६२८।।
परि नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया ।
आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा ? ।।६२९।।
हें नव्हे जो मी साचें । एथ मन करूनिया काचें ।
प्रेम धरिसी अवगणियेचें । चतुर्भुज जे ।।६३०।।
तरी अझुनिवरी पार्था । सांडीं सांडीं हे व्यवस्था ।
इयेविषयीं आस्था । करिसी झणें ।।६३१।।
हें रूप जरी घोर । विकृती आणि थोर ।
तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं ।।६३२।।

सिद्धयोगसाधनाने प्राप्त होणारे विश्वरूपात्मक अनुभूतीचे ज्ञान हे अमृत, सोन्याचा डोंगर, चिंतामणी, कामधेनू, चंद्र व सूर्य याप्रमाणे असून बाकी सर्व छायेप्रमाणे त्याज्य आहे. यासाठी इतर सर्व साधनांविषयीचे प्रेम सोडून देऊन एवढेच नव्हे तर चतुर्भुज रूपाचे प्रेमही टाकून देऊन सुषुम्नामार्गाने जाताना कुंडलिनी शक्तीचे जे भयंकर व अवाढव्य रूप अनुभूतीला येते तेच एकमेव ग्राह्य मानून व तोच एक स्वस्वरूपप्राप्तीचा मार्ग आहे असा मनाने कृतनिश्चय करून सिद्धयोगसाधनरूप ऐश्वर्ययोगाचे महातेज सहज हाती आले असताना साधकाने गावंढळपणाने त्याचा त्याग करू नये. हाच सिद्धयोगस्वरूप राजविद्याराजगुह्य-योगाच्या नावाच्या रहस्याचा उलगडा आहे.

**सहजयोगः—**

सिद्धयोगालाच साधू, संत, महात्मे व योगप्रवर्तकांनी सहजयोग असे नाव देऊन सिद्धयोगाचे साधन हे अत्यंत सहज असे सोपे व सरळ साधन आहे असे सुचवून त्याच्या द्वारा होणारी ज्ञानप्राप्तीची म्हणजे मोक्षाची सिद्धी ही सहज आहे असे सांगून या साधनाचा महिमा स्पष्ट केला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सहजयोग म्हणजे काय आहे हे सांगताना असे म्हटले आहे की—

बाहेर युक्तीची मुद्रा पडे । तव आंत आंत सुख वाढे ।
तेथें सहजेचि योगु घडे । नाभ्यासितां ।।६.३५३।।
जैसें भाग्याचिया भडसें । उद्यमाचेनि मिसें ।
मग समृद्धिजात आपैसें । घर रिघे ।।३५४।।
तरी पवित्र आणि रम्य । तेवींचि सुखोपायें गम्य ।
आणि स्वसुख परम धर्म्य । वरि आपणपां जोडे ।।९.५५।।

ज्यावेळी बाहेर युक्तीची मुद्रा पडते म्हणजे साधकाला सिद्धयोगसाधनेची शक्तिपात दीक्षा मिळून जागृत शक्तीचे साधन प्राप्त होते त्यावेळी कुंडलिनी शक्ती सुषुम्नेत प्रवेश करू लागल्यामुळे हा योग अत्यंत सहजतेने घडतो. यासाठी दुसरा कोणताही बाह्य अभ्यास करावा लागत नाही. "सिद्धयोगसिद्धांतपद्धतीत" मुद्रा शब्दाची व्याख्या करताना महायोगी गोरक्षनाथांनी असे म्हटले आहे की–

मुद मोद तु रादाने जीवात्मपरमात्मनो ।
उभयोरेकसंवित्तिर्मुद्रेति परिकीर्तिता ।।६.३०।।
मोदन्ते देवसंघाश्च द्रवन्ते सुरराशयः ।
मुद्रेति कथिता साक्षात् सदा भद्रार्थदायिनी ।।३१।।

'मुद्' याचा अर्थ प्रसन्नता आहे. प्रसन्नतेचा अभिलाषी जीवात्मा आहे. 'रा' चा अर्थ देणे असा आहे.जीवात्मा व परमात्मा यांचा संयोग करणारे जे साधन सद्गुरू शक्तिपात करून देतात त्या साधनाला मुद्रा असे म्हणतात. या साधनामुळे देवगण प्रसन्न होतात म्हणजे साधकाच्या शरीरात अंतर्मुखतेमुळे सात्त्विक गुणांचा प्रादुर्भाव होऊन राक्षस दूर पळतात म्हणजे कामक्रोधादि दुर्गुणांमुळे प्राप्त झालेली बहिर्मुखता नाहीशी होते. यामुळे अभेदज्ञानसिद्धीच्या या ज्ञानप्राप्तीच्या साधनाला मुद्रा असे म्हटले असून ही मुद्रा नेहमीच साक्षात् सर्व कल्याण देणारीच असते.

ही मुद्रा म्हणजे शक्तिपातयोगदीक्षा साधकाला एकदा प्राप्त झाली की, भाग्योदयाच्या प्रबलतेमुळे व उद्योगाच्या निमित्ताने सर्व संपत्ती जशी माणसाला मिळते त्याप्रमाणे साधकाला सर्व योगाचे सार आपोआप प्राप्त होते. सद्गुरुकृपेने अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत होणे हाच साधकाचा प्रबल भाग्योदय असून नित्य साधन करणे हे निमित्त आहे. ज्ञान हे अत्यंत पवित्र असून ते केवळ या सहजयोगाच्या सुखकारक उपायानेच प्राप्त होणारे आहे. एवढेच नव्हे तर अत्यंत श्रेष्ठ असे स्वसुख हेही या सहजयोगानेच साधकाला आपोआप प्राप्त होते.

मुळात परमात्माच सहज, स्वयंभू, निरंतर, अव्यक्त व स्वतःसिद्ध आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराज " तैं तया नांव सहज अव्यक्त ।। ८.१७२ ।।, मज सहजातें करिती । स्वयंभातें प्रतिष्ठिती । निरंतरातें आव्हानिती ।। ९.१६३।।, मी सर्वदा स्वतःसिद्धु ।। ९.१६४ ।।, परब्रह्म आपैसें । नाम जया ।। १३.८६८।। " व " आणि

आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्यसिद्ध आपैसा । अनादिपणें ॥१३.११०७॥" असे म्हणून स्वसंवेद्य आत्मरूप हे सहज आहे असे सांगत आहेत. जी वस्तू जशी व ज्या तोलामोलाची आहे त्या वस्तूच्या प्राप्तीचे साधनही तसेच त्या दर्जाचे व किंमतीचे असणे नितांत आवश्यक असते. परब्रह्मवस्तू ही सहज व स्वतःसिद्ध असल्याने त्याच्याशी अभेदरूपाने असणाऱ्या त्याच्या नित्य स्वातंत्र्यमय आत्मशक्तीच्या साधनानेच त्याला प्राप्त करून घेणे आवश्यक ठरते. इतर सर्व उपाय येथे फिके व लटके ठरतात; कारण " यांतें साधावयालागीं । जें बळ आणिजें आंगीं । तें इंधनें जैसीं आगी । सावावो होय ॥ ३.२६५ ॥ " व " तैसें उपाय कीजती जे जे । ते ते यांसीच होती विरजे ॥ ३. २६६ ॥ " अशीच इतर सर्व उपायांच्या बाबतीत स्थिती होते असे श्रीज्ञानेश्वरमहाराज स्पष्ट सांगतात. मग " ऐशिया आपुलियाची सहज स्थिती । जया ब्रह्माची नित्यता असती । तया नाम सुभद्रापती । अध्यात्म गा ॥ ८.१९ ॥ " असे म्हणून ज्या आपल्या सहजस्थितीचे अध्यात्म म्हणून भगवंतानी स्वमुखाने वर्णन केले आहे त्या सहजस्थितीची, नित्यब्रह्माची म्हणजे अध्यात्माची प्राप्ती साधकाला कोणत्या उपायाने होणार ? याला सहजयोग हे एकच उत्तर श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे दिले आहे. ते म्हणतात–

**जो परिणामींचा निर्वाळा । अचुंबितु ये फळा ।**
**आणि अनुष्ठितां प्रांजळा । सावियाचि ॥२.७॥**
**जैसें निद्रेचें सुख न मोडे । आणि मार्गु तरी बहुसाल सांडे ।**
**तैसें सोहोकासन सांगडें । सोहपें होय ॥८॥**

सहजयोग शिवशक्तीच्या ऐक्याच्या प्राप्तीचा परिणाम निश्चित घडवून आणतो व स्वसंवेद्य आत्मस्वरूपाचे फळ निश्चित देतो; कारण ह्या सहजयोगाचे अनुष्ठान करणे अत्यंत सोपे व सुलभ आहे. हा सहजयोग साधकाच्या झोपेचे सुख मोडू न देता म्हणजे सर्व इच्छा पूर्ण करून मूलाधारापासून सहस्रारापर्यंतचा बहुसाल मार्ग म्हणजे विस्तीर्ण पथ एखाद्या सहजयानामध्ये बसविल्याप्रमाणे साधकाला बसवून पार पाडतो. असे हे सोपे, सुलभ व सहज साधन आहे. महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांतपद्धतीत " " सैव शक्तिर्यदा सहजेन स्वस्मिन्नुन्मिलिन्यां निरुत्थानदशायां वर्तते तदा शिवः स एव भवति ॥४.१॥' असे म्हणून जागृत शक्तीचा सहजयान म्हणून उल्लेख केला आहे.ही आदिनाथ परमेश्वराची चिद्रूपशक्ती जेव्हा सद्‌गुरुकृपेने जागृत होते तेव्हा ती आपल्याशी अभिन्न असलेल्या जीवरूप साधकाच्या म्हणजेच स्वतःच्या शुद्धरूपाचा अत्यंत सहजतेने विकास करीत करीत शिवरूप होते. डॉ. मोहनसिंग यांनी " Gorkhanath and Medieval Hindu Mysticism " या पुस्तकात "The Doctrine of Gorkha" म्हणून महायोगी गोरक्षनाथांच्या नाथसंप्रदायाच्या मार्गाचे जे सार म्हणून सांगितले आहे

ऱ्यात त्यांनी नाथयोग किंवा सिद्धयोग हा सहजयोगाचा मार्ग असून तो सर्वांना करता येण्यासारखा आहे हे सांगताना असे म्हटले आहे की, "The goal of human life is to eternalize real life and to understand the real self; this can be done by transcending the lower self, which consists of the vital essence-the sexual power, the vital air and the mind. Each of the three must help to transcend Itself by Itself. Yet, the control of the second gives the control of the first and of the third, of the first two. The mind is controlled through contemplation, through the stoppage of its going-out Manas, through intellectual analytic perception through recitation, through the reversal of its normal activity, till it transcends Itself, reaches the state of Unmani, Self-transcendence. This control is to be effected in the most natural manner, with inborn facility or sahaja. By such control we shall rise into a Supramental state which is void of the working of these three but which is a positive state wherein the three higher powers which are the essence of the higher Self, Atma, reside, namely, Divine Music, Divine Joy and Divine Consciousness, Sat, Ananda and chit which are also called Word or Shabda, Union or Rasa and Amrita and light or Jyoti. This is really the fourth state above those three states, wherein the vital breath, the sex and the the mind work, each predominent in one or other of the the three stages. By simple natural method of kaivalya Kumbhaka (Prolongation of the period before intake of breath), physical, moral or mental, the vital air is controlled; by simple natural method of trying to repeat the word given by the Guru and to listen to the inner word ( japa japa) the sex is controlled; and by simple natural method of the stoppage or negation or emptying out of mental activity aided by physical, moral and spiritual contemplation ( not meditation ) the mind is controlled. When the mind sees and resides in the mind, when the the mind and Manasa, mental activity or desire, is absorbed in the mind, when we arise above the

pairs of opposites, psysically, morally and intellectually and have samadrishti, equal-eyedness, then come the Asampragyata Samadhi and kaivalya Moksha, the absorption of the self in the self, beyond all dualism; the Sahaja-Samadhi, the natural trans or easy inborn equilibrium; the Turyatita stage, the fourth, supra-mental state; the Atita Shunya, the supreme void which is not void. It is the Yoga of making the surata, attention, rise through the magnetic aid of the Shabda-inparted by the teacher and heard within-and unite with, merge itself in, the supreme Self, Atma. It is Atma Jog Atma Yoga, as Charpet calls it. It is the internalistic Yoga, the Yoga of the mind, wherein the mental and the moral equivalent of outer, external ceremonies, postures and practices are to be found and observed. It is thus Siddhanta Yoga, as Kumbhari Bava calls it, the yoga of the metaphysical, essential truth. To practise it, the control of sex is necessary; but such a mental yoga can be carried on even married life by suitable and requisite abstinence. Mendicancy and monastic life are not indespensable. There is no demand in this for rigorous Hatha exercises, or Tantrika sensualities, or Buddhistic selfdenials. It is the kind, of Raja-Yoga of the Upanishads, open to all classes, requiring a mental and moral detachment. The true Guru's air (Word) is indespensable for achieving what the followers of other paths achieve through difficult practices,followed by constant self-abuegation and profound contemplation. The powers to work miracles,nine siddhis and twelve siddhis, which accure to a Jogi are mere temptations on the way. He must pass beyond the stage of a siddha, who according to Alberuni did not desire liberation. The goal of Alchemy(Rasa), Tantrism and Hatha is not the goal of Gorkha, who seeks to acquire the immortality of the spirit, not of the body,who drinks of the wine of the word(shabda) and enjoys the spiritual union of Shiva and Shakti, who discards the mere cauterization of body, the temple of the spirit." "खऱ्या जीवनात प्रवेश करणे व स्वतःच्या

खऱ्या स्वरूपाला जाणणे हेच मानवी जीवनाचे ध्येय आहे. लैंगिक कामशक्ती, मुख्यप्राण व मन ह्या जीवात्म्याच्य। निम्नतम महत्त्वाच्या स्वरूपाला मागे टाकून पलीकडे गेल्याशिवाय हे ध्येय सिद्ध होत नाही. पलीकडे जाण्यासाठी या तिघांपैकी प्रत्यकाने स्वतःच स्वतःला मदत करणे आवश्यक असते. असे असले तरी प्राणाच्या संयमामुळे लैंगिक शक्ती ताब्यात येते व मन ताब्यात आले की,लैंगिक शक्ती व प्राण ताब्यात येतात. ध्यानाच्या उपायाने मनावर संयम प्राप्त होतो. त्याचप्रमाणे मनाच्या बहिर्मुखवृत्तीला थांबविणे, बौद्धिक पृथक्करणात्मक ज्ञानाची आवृत्ती करणे व मनाला त्याच्या सर्वसाधारण गतीपासून मागे फिरविल्यानेही ते ऊर्ध्वगामी होऊन पलीकडे अर्थात् अनंताकडे झेपावते. मात्र जोपर्यंत ते स्वतःच पलीकडे जात नाही किंवा उर्ध्वगामी होत नाही, तोपर्यंत उन्मनी अवस्था प्राप्त होत नाही. हा संयम अत्यंत नैसर्गिक रीतीने, जन्मजात सुलभतेने किंवा सहजमार्गानेच जीवनात उतरविला पाहिजे. या सहजमार्गाने आपण अमनीभावाच्या अवस्थेपर्यंत पोहोचू शकतो या ठिकाणी कामादि त्रयीची कार्यशक्ती शून्यवत असते; मात्र ही स्थिती अभावात्मक किंवा शून्य नसून ती भावात्मक व सशक्तिक असते; कारण उप-रोक्त तीन महान् शक्ती उच्चतम आत्म्यात साररूपाने विलसत असतात. या स्थिती, लाच शब्द,सामरस्य किंवा रस,अमृत व प्रकाश किंवा ज्योती असे म्हणतात. ही तीन अवस्थांच्या पलीकडील चौथी अवस्था आहे. खालच्या तीन अवस्थांमध्ये मुख्यप्राण कामशक्ती व मन या गोष्टी एखाद्या किंवा तीनही अवस्थांमध्ये प्रबळ असतात. केवल-कुंभकाच्या साध्या अशा नैसर्गिक पद्धतीने म्हणजे श्वास आत घेण्याच्या वेळेत वाढ करून, शारीरिक, नैतिक व मानसिक गोष्टींवर प्राणजयाने संयम मिळविता येतो. सद्गुरूंनी सांगितलेल्या मंत्राचा श्वासोच्छ्वासाबरोबर अत्यंत साध्या नैसर्गिक पद्धतीने वारंवार जप केला व त्यामुळे आत उत्पन्न होणारा अजपाजप किंवा अनाहतध्वनी ऐकला की, काम आवरला जातो. सोप्या नैसर्गिक पद्धतीने शारीरिक नैतिक व आध्यात्मिक चिंतनाच्या मदतीने ( ध्यानाने नव्हे ) मन थांबविल्याने, ते म्हणेल ते करण्यास नकार दिल्याने किंवा मानसिक क्रियांना मनातून काढून टाकल्याने मन ताब्यात येते. जेव्हा आपले मनच मनाला पाहते, ते मनातच समरसू लागते, मनाच्या सर्व क्रिया व इच्छा मनातच लय पावतात, आपण शारीरिक नैतिक व बौद्धिक अशा सर्व द्वंद्वांच्या पलीकडे जातो, आपल्याला समदृष्टी येते तेव्हा स्वतःतच स्वतः समरसून जाण्याची, द्वंद्वातीत, स्वभावतःच पलीकडे असलेली किंवा जन्मजात सोपी साम्यावस्था प्राप्त होते. यालाच असंप्रज्ञातसमाधी, कैवल्य, मोक्ष, सहजसमाधी, तूर्यावस्था, चौथी अमनीभावावस्था, अतीतशून्य, महाशून्य अशी निरनिराळी नावे आहेत. मात्र ही स्थिती निरर्थक किंवा पोकळ नसून सार्थ व सशक्तिक आहे. हाच सुरत करण्याचा, दक्ष राहण्याचा, सद्गुरूंकडून प्राप्त झालेल्या

शब्दाच्या आकर्षणात्मक मदतीने ऊर्ध्वगमन करण्याचा,अनाहतध्वनी ऐकून त्याच्याशी ऐक्य पावण्याचा व त्यात समरस होऊन महान् आत्मा होण्याचा योग होय. चार्पेट यालाच आत्मजोग किंवा आत्मयोग म्हणतो.हा आत्मयोग म्हणजेच अंतर्योग,अंतर्मार्ग किंवा मनोयोग होय.या योगात मानसिक व बाह्य नैतिक समानार्थक गोष्टी, क्रिया, आसने व अभ्यास आढळतो व तो केला जातो.कुंभारीबावा ज्याला सिद्धांत योग म्हणतात तो हाच होय.यालाच आध्यात्मविद्यायोग किंवा अपरिहार्य सत्य म्हणतात.या योगाला ब्रह्मचर्याची आवश्यकता आहे हे खरे; परंतु योग्य व आवश्यक संयम पाळून हा मानसिकयोग गृहस्थाश्रमातही करता येतो. या योगात भिक्षुवृत्ती व संन्यासी जीवन अपरिहार्य नाही. त्याचप्रमाणे यात हठयोगाच्या कडक क्रिया, तांत्रिकांची भोगासक्ती व बौद्धांसारखी आत्मपीडा नाही. गोरक्षनाथांनी सांगितलेला हा सहज-मार्ग म्हणजे उपनिषदांनी सांगितलेला एक प्रकारचा राजयोगच आहे. हा योग सर्व लोकांना मुक्त आहे अर्थात् याचा सर्वांना अधिकार आहे. या योगाच्या साधकास नीतियुक्त आचार व मानसिक वैराग्य यांची गरज आहे. इतर मार्गातील साधकांना अत्यंत अवघड अभ्यासानेही जे मिळविणे कठीण आहे, सतत स्वतःच्या मनाला आवरीत जाण्याच्या मार्गानेही जे प्राप्त करणे दुष्कर आहे व गहन ध्यानानेही जे मिळविणे मुष्किल आहे ते या सहजयोगमार्गात गुरूच्या शब्दाने म्हणजे शक्तिपाताने होते. त्यामुळे या योगमार्गात शब्ददीक्षा म्हणजे शब्दद्वारा होणारा शक्तिपात अर्थात् शक्तिसंक्रमण हे अपरिहार्य आहे. चमत्कार करण्याच्या शक्ती प्राप्त होणे आणि नऊ किंवा बारा सिद्धी योग्याला मिळणे ही या मार्गातील फक्त मोहिनी, विलोभन किंवा विघ्न आहे. अल्बेरूनीच्या म्हणण्याप्रमाणे या मार्गातील साधकाने सिद्धावस्थाही ओलांडून पलीकडे गेले पाहिजे व त्याने मुक्तीचीही इच्छा करता कामा नये. रसशास्त्र, तंत्रशास्त्र व हठयोग यांचे जे ध्येय आहे ते गोरक्षनाथांच्या सहजयोगाचे ध्येय नाही. गोरक्षनाथांचा पंथ हा आत्म्याचे अमरत्व शोधून मिळविणारा मार्ग आहे. तो शरीर अमर करण्याचा मार्ग नाही. शब्दाची अर्थात् शब्ददीक्षेची, शक्तिसंक्रमणाची अगर शक्तिपाताची मदिरा प्राशन करून शिव-शक्तीच्या सामरस्याचा आनंद उपभोगणारा हा मार्ग असून आत्म्याचे मंदिर असलेल्या शरीराचे शोषण करणे हे या मार्गात त्याज्य मानले आहे."

वरील विवेचनावरून " एऱ्हवीं सोपें योगासारिखें। कांहीं आहे ? ॥६.३६॥" व " म्हणौनि अग्निसेवा न सांडितां । कर्माची रेखा नोलांडिता । आहे योगसुख स्वभावता । आपणपांचि ॥ ६.५१ ॥ " असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे त्याचे मर्म ध्यानात येईल. त्याचप्रमाणे सहजयोग हा "पव्हण्याहूनि पायउतारा। सोहपा जैसा ॥ ५.१६५ ॥ " असा आहे असे जेव्हा ते सांगतात तेव्हा या सहज

योगाने " तेथ तुम्हीं जें करू म्हणाल । तें आपैसें सिद्धि जाईल। वांछितही पुरेल। मानसींचें ॥ ३.९८ ॥ " असे घडेल असेच त्यांना सांगावयाचे आहे. एवढेच नव्हे तर " हेंचि कवणें एकें मिसें । चित्त माझे ठायीं प्रवेशे । येतुलें हो मग आपैसें । मीचि होणें असे ॥ ९.४६३ ॥, जयाचि गोठीचि ऐकतखेंवो । आघवा संसारु होय वावो । बळिया नित्यता लागे येवों । आपणपेंया ॥ १०.१९७ ॥, ऐसी मुक्ति असे सहज ॥ १४.२८६ ॥, ऐसेनि मग परस्परें । ते सोऽहंवृत्ती जें अवतरे । तें तियेंहि सकट सरे । अपैसया ॥ १४.३९२ ॥, नाना इंधनांशु सरलेया । वन्हि परते जेवीं आपणपयां । तैसें आपेंआप धनंजया । न्याहळणें जें गा ॥ १५. २७१ ॥, पार्था तें वस्तु पहिलें । आपणपें आपुलें । पाहिजे जैसें हिंवलें । हिंव हिंवें ॥१५. २८२॥, तेव्हा सागरीं गंगा जैसी । आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी । अद्वयानंदाची आपैसी । खाणी उघडे ॥ १८.७९२ ॥ " व " म्हणौनि नियमिलिया मानसीं ।, स्पृहा नासौनि जाय आपैसीं । किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ॥ १८.९६३ ॥ ' असे हे सहजयोगाने सर्व काही आपोआप, आपलेआपण, सहजस्वभावात: व स्वत:हून घडते. " शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेत " ज्याला सद्‌गुरुकृपेने शक्तिपातयोगाचे सहजसाधन मिळाले आहे त्याला इतर दुसऱ्या कोणत्याही साधनाची आवश्यकता कशी नसते व हे सहजसाधन आपोआप कसे चालते हे सांगताना असे म्हटले आहे की–

**गुरोरालोकनादेव स्पर्शात् संभाषणादपि ।**
**यस्य संजायते ह्याज्ञा तस्य नास्ति पराक्रिया ।।१२.७२।।**
**मनसा यस्तु संस्कार: क्रियते योगवर्त्मना ।**
**स नेह कथ्यते गुह्यो गुरुवक्त्रैक गोचर: ।।७३।।**

या दोन श्लोकावर अर्थात्मक टीका करताना श्रीयोगानद विज्ञानी यांनी आपल्या " महायोग विज्ञान " या ग्रंथात असे म्हटले आहे की, " जिस दीक्षाद्वारा गुरु शिष्यमें शक्तिसंचार करते हैं. जिससे सब प्रकारके योगकी साधना होती है, वह सूक्ष्म महाशक्ति चैतन्यरूपी शैवी शक्ति है । जो गुरुपरंपरासे शिष्यमें आती है और स्पष्ट चैतन्यरूपसे प्रकाश पाती है, तब वह शक्ति आज्ञा नाम धारण करती है. जैसे भृत्यको स्वामी आज्ञा देता है और भृत्य भी स्वमीकी आज्ञानुसार आवश्यकीय कामकाज करता है, तैसेही शिष्य भी गुरुकी संचारित शक्तिका संकेत या आज्ञा पाकर आत्मज्ञानके लिए आवश्यकीय कर्मक्रियायें करने लग जाता है । गुरुकी दृष्टिद्वारा, स्पर्शद्वारा, वाक्यसे अथवा मनसे जिस शिष्यको सद्‌गुरुकी आज्ञाशक्ति प्राप्त होती है, उसको अपनी ओरसे कल्याणके लिए जप, तप, प्राणायाम, धारणा, ध्यान आदि कुछभी करनेकी आवश्यकता नहीं है । जैसे स्वामी भृत्यको अपनी आज्ञानुसार काम करनेको कहते है, भृत्यकी इच्छानुसार नहीं, भृत्य भी

स्वामीकी इच्छानुसार सब काम करता है तैसेही शिष्य भी गुरुकी आज्ञानुसार उनकी शक्तिसे सब काम करने लगता है, अपनी इच्छासे नहीं वर्तता। गुरुकी आज्ञाशक्तिसे बढकर शिष्यके लिए और कोई क्रिया कर्म नहीं है यही पाशुपत महायोगका सिद्धांत है। अतएव महायोग साधन करनेवाले साधकोंको गुरुकी आज्ञा बिना और कोई भी साधन करनेकी आवश्यकता नहीं है। जिन गुरुकी आज्ञाशक्ति सभी कुछ करा रही है उसमें अपनी बुद्धि चलानेसे अथवा अपनी इच्छासे और और साधन करनेसे अनर्थ होता है। इसीलिये जिन भाग्यवान् साधकोंको ऐसे समर्थ गुरुओंसे दीक्षाद्वारा गुरुकी आज्ञाशक्ति प्राप्त हुई है, उन्हें समझ लेना चाहिए कि गुरुकी आज्ञा सर्वोपरी है, उनको न मानना ही अपना अनिष्ट करना है। श्रीगुरुकी योगशक्तिसे अथवा उनके मनसे शिष्यको निराधारा आंतरदीक्षा होती है, जिससे साधकलोग आश्चर्य महान् आश्चर्यमय घटनायें देखते सुनते हैं और कहते हैं, उन सबका भेद तो श्रीगुरुही जानते हैं,ये बातें गुप्त हैं,कहने योग्य नहीं हैं,अतएव शास्त्रमें गुप्त रखी हैं।" (पृष्ठ २८५,२८६)

असे हे सहजयोगाचे साधन आहे. उपरोक्त सिद्धांताच्या विचारानुरोधाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या पुढील ओव्या पाहिल्या म्हणजे पंथराज, क्रमयोग, महायोग, अनन्ययोग, अभ्यासयोग, भक्तियोग, राजविद्याराजगुह्ययोग, कर्मयोग व क्रियायोगादि सर्व योग ही सर्व एकाच योगाची नावे असून श्रीगुरुकृपेने जागृत झालेल्या आंतरशक्तीमुळे चालणारा हा सिद्धयोग किंवा सहज योग आहे हे लक्षात येईल. ते म्हणतात—

देखैं असतेनि देहधर्में। एथ तोचि एकु न लिंपे कर्में।
जो अखंडित रमे। आपणपांचि ॥३.१४६॥
जे तो आत्मबोधें तोषला। तरी कृतकार्यु देखैं जाहला।
म्हणौनि सहजें सांडवला। कर्मसंगु ॥१४७॥
मग निरामयभरित। पावती पद अच्युत।
ते बुद्धियोगयुक्त। धनुर्धरा ॥२.२७९॥
तूं ऐसा तैं होसी। जैं मोहातें यया सांडिसी।
आणि वैराग मानसीं। संचरैल ॥२८०॥
मग निष्कळंक गहन। उपजेल आत्मज्ञान।
तेणे निचाडें होईल मन। अपैसें तुझें ॥२८१॥
तुम्हां वर्णविशेषवशें। आम्हीं हा स्वधर्मुचि विहिला असे।
यातें उपासा मग आपैसें। पुरती काम ॥३.८८॥
पाठीं जें निषिद्ध म्हणिपे। तेंही बुझावें स्वरूपें।
येतुलेनि कांहीं न गुंफे। आपैसेंचि ॥४.९१॥

पैं आपुलिया एकी सत्ता । सर्वही कवळूनिया पंडुसुता ।
कहीं न लगती ममता । धाडिली तेणें ॥१८.१०७५॥
ऐसा जिंतिलिया रिपुवर्गु । अपमानिलिया हें जगु ।
अपैसा योगतुरंगु । स्थिर जाला ॥१०७६॥
मग अज्ञान निमालिया । मीचि एकु असे अपैसया ।
सनिद्र स्वप्न गेलया । आपणपें जैसें ॥१८.१३९६॥
तैसा मी एकवांचूनि कांहीं । मग भिन्नाभिन्न आन नाहीं ।
सोऽहंबोधें तयाच्या ठायीं । अनन्यु होय ॥१३९७॥

अशा प्रकारे सहजयोग म्हणजे काय हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. या सहजयोगाचे साधन कसे चालते हे सांगताना ते म्हणतात –

मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे ।
प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपैसयाचि ॥९.४९॥
ऐसी श्रीमुखौनि अक्षरें । निघती ना जंव एकसरें ।
तंव अविद्येचें आंधारें । जावोंचि लागे ॥११.१७७॥
ते सत्त्वशुद्धी साहाकारें । गुरुकृपामृततुषारें ।
सासिन्नलेनि बोधें वोसरे । द्वैतदैन्य ॥१८.२५९॥

एकदा सद्गुरुकृपा होऊन म्हणजे श्रीएकनाथ महाराजांनी "एकनाथी भागवतात" म्हटल्याप्रमाणे "पाठी थापटावयामिसें जाण। करीत स्वशक्तिसंचरण । तेणें अद्वयबोधलक्षण । उद्धवासी जाण प्रकाशी ११.१२८ ॥" अशी स्वशक्तिसंचाराची शक्तिपातदीक्षा मिळाली की, हे सहज साधन सुरू होते. श्रीएकनाथमहाराज म्हणतात, अशा प्रकारची दीक्षा ही अतिगुह्याची गुह्यगोष्ट असून ती श्रीकृष्णांनी उद्धवावर कृपा करावी म्हणून प्रकट केली. " यालागीं कृष्ण जगजेठी । उद्धवाची पाठी थापटी । अतिगुह्याची गुह्य गोष्टी । तुझे कृपेसाठी बोलतों ॥ ११.१२७॥" अशी ही गुह्यातिगुह्य गोष्ट साधकाला प्राप्त झाली की, मग त्याला काहीही करावे न लागता सर्व साधन जागृत कुंडलिनी शक्ती स्वत: करून ती साधकाला ब्रह्मरूप कसे करते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय ववडूनि बाहिरें ।
शरीरीं एकंदरें । केलें मन ॥५.१५१॥
सहजें तिही संधी भेटी । जेथ भ्रूपल्लवा पडे गांठी ।
तेथ पाठीमोरी दिठी । पारखोनियां ॥१५२॥
सांडूनि दक्षिण वाम । प्राणापानसम ।
चित्तेसीं व्योम–। गमिये करिती ॥१५३॥

तेथ जैसीं रथ्योदकें सकळें । घेऊनि गंगा समुद्रीं मिळे ।
मग एकेकु वेगळें । निवडूं नये ॥१५४॥
तैसी वासनांतराची विवंचना । मग आपैसी पारुखे अर्जुना ।
जे वेळीं गगनीं लयो मना । पवनें कीजे ॥१५५॥
जेथ हें संसाराचित्र उमटे । तो मनोरूप पटु फाटे ।
जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा नाहीं ॥१५६॥
तेंसें मन एथ मुद्दल जाय । मग अहंभावादिक कें आहे ।
म्हणौनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥१५७॥

ज्यावेळी साधक वैराग्याच्या आधाराने विषय बाहेर घालवून मन एकाग्र करण्यासाठी आसनावर बसतो त्यावेळी आधीच सद्‌गुरुकृपेने जागृत झालेले चित्त म्हणजे जागृत कुंडलिनी शक्ती, प्राण व अपान आपोआप सम झाल्याने, नेहमीचा इडापिंगलेचा मार्ग सोडून देऊन म्हणजे बहिर्मुख संसाराच्या गतीचा त्याग करून सुषुम्नेच्या मार्गाने पाठमोरी दृष्टी करून म्हणजे अंतर्मुख होऊन ज्या भ्रूपल्लवाच्या म्हणजे आज्ञाचक्राच्या ठिकाणी इडा, पिंगला व सुषुम्ना एकत्रित होतात तिकड ऊर्ध्वमार्गाने जाऊ लागते. मग रस्त्यावरून वाहणारे सर्व प्रकारचे बरे वाईट पाणी आपल्यात सामावून घेऊन गंगा ज्याप्रमाणे समुद्रास मिळते त्याप्रमाणे नाना तऱ्हेच्या वासनांच्या रूपाने असणाऱ्या शरीरातील सर्व शक्तींना ही कुंडलिनी शक्ती आपल्यात सामावून घेऊन त्यांना आपोआप नाहीसे करते. ज्यावेळी जागृतशक्तीच्या आधाराने मन व प्राण सहस्रारात लीन होऊन शिवशक्तीचे अनादि ऐक्य उपस्थित होते तेव्हा सरोवर आटल्यावर जसे त्यात प्रतिबिंब पडू शकत नाही त्याप्रमाणे ज्या मनोरूप पटावर हे संसारचित्र उमटत असते तोच फाटून गेल्याने साधक ब्रह्मरूप होतो.एकदा मुद्दल मनच नाहीसे झाल्यावर 'अ' म्हणजे शिव व 'हं' म्हणजे शक्ती यांचा स्वतंत्रभावच राहू शकत नाही. तो प्रतिबिंबवत् भाव नाहीसा होतो व साधक याची देही याची डोळा ब्रह्मरूप होऊन आपल्या स्वसंवेद्य आत्मरूपाचा अनुभव घेतो.

असे हे सहजयोगाचे साधन सहजतेने घडते. पुढील ओव्यांमधूनही श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे साधन आपैसे, सहज, व आपणपेया आपण असे स्वभावतःच कसे होते हे सांगितले आहे. ते म्हणतात —

माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांतचि गेलें ।
तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥१२.१२०॥
म्हणौनि प्रवृत्ति आणि निवृत्ती । इयें वोझीं नेघे मती ।
अखंड चित्तवृत्ती । माझ्या ठायीं ॥१२१॥
एऱ्हवीं तरी सुभटा । उजू का अव्हांटा ।

रथु काई खटपटा । करीतु असे? ॥१२२॥
आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हाणिजे ।
निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥१२३॥
ऐसिया सद्भावना । तनुत्यागीं अर्जुना ।
तूं सायुज्य सदना । माझिया येसी ॥१२४॥

माळी जसे पाण्याला जिकडे नेतो तिकडे ते निवांतपणे व विनतक्रार जाते त्याप्रमाणे सहजयोगाचे साधन करताना एकदा साधकाने स्वत:ला जागृत शक्तीच्या आधीन केल्यावर ती त्याला जिकडे जशी नेईल व आतून ज्या क्रिया घडतील त्या होऊ देणे योग्य असते. अशाप्रकारे चित्तवृत्ती म्हणजे जागृतशक्ती सुषुम्नेतील मार्गाने जाऊ लागली की, ती स्वत:च परमात्म्याच्या ठिकाणी आकर्षिली जात असल्याने प्रवृत्ती किंवा निवृत्तीचे ओझे साधकाची बुद्धी आपल्यावर घेत नाही, उलट ते टाकून देते. वाट सरळ आहे का वाकडी आहे याचा विचार जसा रथ करीत नाही, सारथी करतो, त्याप्रमाणे या सहजयोगात साधकाला मार्गाचा कसलाच विचार करावा लागत नाही; कारण जागृत शक्ती हा सारथी त्याची सर्व चिंता अखंडपणे करून साधकाला मुक्कामाला घेऊन जातो. फक्त साधकाने कर्म म्हणजे क्रियाशक्तिकडून जे जे होईल ते साक्षी होऊन पाहवयाचे. त्यात थोडे फार काही न म्हणता साधन करावयाचे. असे केले म्हणजे तो स्वभावत:च परमात्म्याच्या सायुज्यसदनाला जाऊन पोहचतो. " कुलार्णवतंत्रामध्ये " अशाप्रकारे सद्गुरुकृपेने दीक्षा होऊन कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर जे जे शभाशुभादि कर्म किंवा ज्या ज्या क्रिया घडतात ते ते सर्व कर्म व क्रिया हाच सहजयोग होय हे वर्णन करताना असे म्हटले आहे की–

तदारूढेषु वीरेषु कायाकार्यं न विद्यते ।
इच्छैव शास्त्रसंपत्तिरित्याज्ञा परमेश्वरि ॥८.५७॥
यत्र यद् यत् कृतं कर्म शुभं वा यदि वाऽशुभम् ।
तत्सर्वं देवताप्रीत्यै जायते सुरसुंदरि ॥५८॥
संमोद: परमानंद: पतनं ज्ञानवर्द्धनम् ।
वेणुवीणादिवाद्यंच कवितारचनादीकम् ॥६३॥
रोदनं भाषणं पातः समुत्थानं विजृंभनम् ।
गमनं विक्रिया देवी योग इत्यभिधीयते ॥६४॥
उन्मना: पतनोत्थाने मूर्च्छना च मुहुर्मुहुः ॥८१॥
देहेन्द्रियाणामवश: समवस्था निगद्यते ॥८३॥
अंतर्लक्ष्यो बहिर्दृष्टिर्निमेषोन्मेषवर्जिता ।
एषा तु शांभवी मुद्रा सर्व तंत्रेषु गोपिता ॥८५॥
एषा तु खेचरी मुद्रा शिवस्य समबोधिनी ।

सर्वोत्तीर्णा सदाऽहन्ता सामरस्यसमाकृतिः ॥८६॥
न किंचदपि जानति स्वात्मध्यानपरायणाः ।
तदा यत्परमं सौख्यं मनोवाचामगोचरम् ॥८७॥
स्वयमेवानुभूयन्ते शर्करा क्षीरपानवत् ।
कीदृशं तादृशं सौख्यमिति वक्तुं न शक्यते ॥८८॥
दृश्यते पुलकाद्यैर्यत्तद् ब्रह्मध्यानमुच्यते ।
यत्सुखं विद्यते ध्याने देहावेशकरं परम् ॥
कथितुं नैव शक्नोति प्रबुद्धस्तत्समाहितः ॥८९॥
ब्रह्मध्यानपरानंदपराः सुकृतिनो नराः ।
क्षणेऽप्यन्तर्हिते तस्मिन् शोचयंत्यासंहता इव ॥९०॥

या सर्व श्लोकांवर अर्थासह भाष्य करताना श्रीयोगानंद विज्ञानी यांनी "महायोग विज्ञान" या ग्रंथातील सहजयोगाचा पुढील प्रमाणे उलगडा केला आहे. ते म्हणतात, "श्रीमहेश्वर कहते हैं, देवि ! अब तुम्हे वास्तविक योग कहता हूँ । गुरुके शक्तिसंपातसे शिष्यकी अंतरशक्ति कुंडलिनी देवी जाग जाती है और क्रियायें करने लग जाती हैं तब शिष्यके मन, प्राण और शरीरमें नानाप्रकारकी बाह्य और आभ्यंतर कंपनादि क्रियायें होने लगती हैं । शिष्यके कोटि कोटि जन्मके संस्कार छिन्नभिन्न होकर नानाप्रकारके रूप धारण करते हैं, जिससे साधकको जन्मजमांतरकी अस्पष्ट स्मृती होती है अथवा नानाप्रकारकी योनिओंके अपने सुख-दुःखका भान होता है और जिसके कारण वह पशुपक्षी आदिके शब्दके सदृश- भयसूचक शब्द करता है अथवा आल्हादित होकर हंसता है, रोता है, एवं भावपूर्ण आवेशमें आकर महा आनंदित होकर परम प्रसन्नता लाभ करता है, और उस आनंद आवेशमें भूमिमें गिर जाता है, लोटपोट हो जाता है और आनंदोल्लासमें आकर गाने लगता है, एवं बंसी, वीणा, मृदंग आदि वाद्य मुखसे शब्द करके बजाता है एवं साथ ही साथ गान कवितादिकी रचना करता है । कभी रोने लगता है अथवा अपने आप अकेलाही भाषण देने लग जाता है । नानाप्रकारकी भाषा बोलता है । आसनसे उठ जाता है; जंभाई लेने लगता है, घरमें चलने-फिरने लग जाता है । इसी प्रकार गुरुकृपासे कुंडलिनी शक्ति जागनेके कारण ऐसी मनप्राणकी विक्रिया होकर जो साधन होता है वही वास्तविक योग कहलाता है । इस योगमें होनेवाली क्रियाओंकी संख्या और उनके स्वरूपका वर्णन करना मनुष्य बुद्धिकी परेकी बात है; तथापि इस महायोग अर्थात् सहजयोगका विज्ञान साधक केवल श्रद्धासेही समझ लेता है और साधक आनंदोल्लासमें आकर इतने विचित्र व्यापार, आसन प्राणायाम, बंध, मुद्रादि ऐसी ऐसी विचित्र और नाना-प्रकारकी योगक्रियायें कितनीही संख्यामें कर जाते हैं तथापि उनका मन पराधीन व

ज्ञानशून्य नहीं होता। साधकका ज्ञान पूर्ववत् बना रहता है। आनंदमदसे उत्साहित साधकका मन जब अंतर शक्तिकी प्रेरणासे क्रियायें करता है उस अवस्था मेंभी उनपर कोई बलात्कार नहीं होता। साधककी बुद्धि निश्चल रहती है। संकल्प-मात्रसें वह सब कार्यसे तुरंतही निवृत्ति लेकर पूर्ववत् अपनी अवस्थामें आ जाता है। इस तरह जब मन उल्लास ( याने जागृतशक्तिको ) प्राप्त होकर सब कार्य करता है और विकृत नहीं होता है तब साधक-योगी दिव्यभावको प्राप्त होता है।

इन क्रियाओंका आवेशमात्र दीक्षाके समयही होता है ऐसा नहीं है; परंतु दीक्षाके पश्चात् भी जबतक शिवशक्तिका संमेलन नहीं होगा तबतक यावज्जीवन अथवा जबतक मुक्ति नहीं होगी तबतक जन्मांतरमेंभी बना रहेगा। इसलिये साधकको कोई खास नियमबद्ध रहनेकी वा प्रतिज्ञा लेनेकी आवश्यकता नहीं होती; परंतु नित्य प्रति गुरुके आदेशानुसार प्रातः और सायंकाल बैठकर साधना करनी पडती है। इसीसेही दिन प्रति दिन नई नई क्रियायें और साथही नानाप्रकारके अनुभव अपने आप होते रहेंगे। श्रीमहेश्वर कहते हैं कि, इसी तरह योग-साधना करनेवालोंको भूमिमें पतन और उत्थान अर्थात् नानाप्रकारके बैठकर या लेटकर आसनोंको करना, एवं बार बार प्राणायाम या श्वासप्रश्वास लेने छोडनेकी क्रिया करनेसे उन्मनी अवस्था आती है कि, जिससे शरीर और इंद्रिया अवश हो जाती है, प्राणस्पंदन लय हो जाता है, मन एकाग्र और निरुद्ध हो जाता है। इसी तरह शरीर, मन, प्राण, इंद्रिया अवश और विवश हो जानेसे समअवस्था समाधि होती है। इस समाधिके पूर्व साधकको और भी बहुतसी क्रियायें होती हैं। जैसे आसन, प्राणायाम, बंध, मुद्रा, नाडीशुद्धि आदि। इन सब क्रियाओंसे समाधि होती है और समाधि हो जानेपर आवश्यकतानुसार ये क्रियायें होती रहती हैं। जितनी जितनी ये क्रियायें आयतत्त्व और दृढ होती हैं उतनेही कालतक समअवस्था आती जाती रहती है। इसीलिये साधकको और और क्रियाओंके साथ शांभवीमुद्रा हो जाती है जिससे अंतरमें लक्ष्य और बाहरमें दृष्टि होती है, ऐसी निमेष-उन्मेष वर्जित शांभवी मुद्रा हो जाती है। यह शांभवीमुद्रा सब तंत्रोमें गुप्त है जिसको साधक बिना प्रयासकेही स्वयं कर लेता है। ऐसेही साधकको खेचरी मुद्रा भी हो जाती है। जिव्हा तालमें उलट लगकर लग जाती है और रसपान होता है। यह भी अपने आप होती है। श्रीशिवाजीके स्थानमें अमृतका बोध करानेवाली खेचरीमुद्रा तथा शंभुके स्वरूपको दर्शानेवाली शांभवीमुद्रा साधकको अपने आपही हो जाती है जिनके प्रभावसे साधकमें आत्मतत्त्वका प्रकाश होता है और साधक अपने आपको विभुत्वभावसे बोध करता है।

इस प्रकार जब साधकको शांभवी और खेचरी मुद्रा हो जाती हैं तब शारीरिक, मानसिक और-और क्रियायें कम हो जाती हैं और मात्र प्राणकीही क्रियायें

होकर रह जाती हैं। प्राण सुषुम्ना विवरमें प्रवेश कर जाता है एवं शांभवी तथा खेचरीमुद्रा दृढतासे लगी रहती है। इससे साधकको आत्माको जो ध्यान होता है वह अवर्णनीय है। उस अवस्थामें साधक योगी कुछ नहीं जानता। उसका ब्रह्मज्ञान लुप्त हो जाता है। वह आत्मतत्त्वमें तन्मय हो जाता है। इसीलिये आत्माके विना और कुछ नहीं जानता। उस ध्यानमें जो परमसुख होता है वह वाणी और मनसे अगोचर है। उसको ध्यान करनेवाला स्वयंही अनुभव कर सकता है। किंतु अन्य किसीको कह नहीं सकता। अतएव सहजयोग साधनसे स्वयं ध्यान करनेवाले साधकोंको ध्यानसे जिस प्रकारका सुख और आनंद होता है वह किसीभी प्रकारसे कहा नहीं जा सकता है। तथापि उनके वाह्य लक्षणोंसे अंतरके आनंदका थोडा वहुत परिचय होता हैं।

जो लोक गुरुप्रदत्त योगसाधन करते हैं; जिनकी कुंडलिनी शक्ति क्रिया-शिला हो गई हैं, जिनका ध्यान संकल्पमात्रसे ध्येयमें स्वाभाविकही लग जाता हैं उनके अंतरके लक्षण तो वही जानते हैं; परंतु उनमें बाहरके लक्षण भी थोडे बहुत प्रकाश पाते ह। उनके मन, प्राण और शरीरकी चेष्टायें सात्विकता धारण करती हैं। इसीलिये उनकी इंद्रिया शांत, स्वच्छ और प्रकाशमान हो जाती हैं। वे सर्वदा आनंदोल्लाससे प्रसन्न और प्रफुल्ल रहते हैं। ध्यानके स्मृतिमात्रसे उनकी दृष्टि अंतर्मुख होने लगती है, इसीलिये उनके नेत्र मदोन्मत्त हो जाते हैं। वाणी कोमल और गद्गद् हो जाती है। अंतरात्माके सुखसे शरीरमें भावपूर्ण रोमांच होकर कंपन आदि होने लगते हैं, एवं श्वासप्रश्वास बंद हो जाते हैं। यह ब्रह्मध्यानका लक्षण देखनेमें आवे तो समझना कि ध्यान ठीक होता है; क्योंकि कुंडलिनी शक्ति जागनेसे मन, प्राण, शरीर आवेशपूर्ण हो जाते हैं। उस परम देहावेशमें जो सुख ध्यानमें मिलता है उसको ध्यान करनेवाले साधक ध्यानसे जागकरभी प्रकाश नहीं कर सकते। जो भाग्यवान् साधक इसी तरह ब्रह्मका ध्यान करते हैं वे क्षणमात्रभी यदि उस ध्यानसे परम आनंदसे च्युत हो जायें तो आघातप्राप्त व्यक्तिकी तरह दुःख प्राप्त करते हैं। वे ऐसे परमध्यानके सुखका वियोग क्षणमात्रभी नहीं चाहते।" (पृ. २८९ ते २९५)

असे हे सहजयोगसाधनाचे व पर्यायाने "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शनाचे" म्हणजे या ग्रंथाचे सार आहे. उत्तमा किंवा दुर्लभा सहजावस्था म्हणून शास्त्रकारांनी या साराचे वारंवार वर्णन केले आहे. या दृष्टीने "कुलार्णवतंत्रातील" नवव्या उल्लासात असे म्हटले आहे की —

**उत्तमा सहजावस्था मध्यमा ध्यानधारणा।**
**जपस्तुतिः स्यादधमा होमपूजाऽधमाधमा ।।९.३४।।**

उत्तमाऽभिन्नचिंता स्याज्जपचिंता तु मध्यमा ।
शास्त्रचिंताऽधमा ज्ञेया लोकचिंताऽधमाधमा ॥९.३५॥

श्रीज्ञानेश्वरमहाराज "पैं माझिये सहजस्थिती । भक्ति नाम ॥ १८.१११३ ॥ " व " ऐसा हा सहज माझा । प्रकाशु जो कपिध्वजा । तो भक्ति या बोजा । बोलिजे गा ॥ १८.१११७ ॥ " असे म्हणून जेव्हा या सहजयोगसाधनेचा व साधनरूप साध्याचा गौरव करतात तेव्हा हे सर्व वर श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी वर्णन केलेले सहजयोगाचे सारच ते सांगत आहेत याची प्रतीती आपणास आली नाही तर " जो जेथिंचे गौरव नेणें । तयासि तें भिगुळवाणें । म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ॥ १८.१६२७ ॥ " असे त्यांच्याच शब्दात याबद्दलचे मत प्रकट करणे भाग पडते. वर वर्णन केलेले सहजयोगसाधनाचे वर्णन वाचले म्हणजे ही साधना कशी चालते हे लक्षात येऊन त्या पार्श्वभूमीवर पुढील ओव्यांचे आकलन उत्तम होते. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जळीं पडिलिया लवणा । सर्वही जळ होईल विचक्षणा ।
तुज मी अनन्यशरणा । होईन तैसा ॥१८.१४१४॥
येतुलेनि आपैसया । सुटलाचि आहासी धनंजया ।
घेईं मज प्रकाशोनियां । सोडवीन तूंतें ॥१४१५॥
तैसा जो धीरु । उठलिया अंतरु ।
मनादिकें व्यापारु । सांडिती उभीं ॥१८.७३७॥
इंद्रिया विषयांचिया गांठी । अपैसया सुटती किरीटी ।
मन मायेच्या पोटीं । रिगती दाही ॥७३८॥
अधोर्ध्व गूढें काढी । प्राण नवांची पेंडी ।
बांधोनि घाली उडी । मध्यमेमाजीं ॥७३९॥
संकल्पविकल्पांचें लुगडें । सांडूनि मन उघडें ।
बुद्धि मागिलेकडे । उगीचि बैसे ॥७४०॥

संजयाला स्वतःलाच या सहजयोग साधनामुळे कोणता अनुभव आला व त्याची स्थिती कशी झाली हे त्याच्याच मुखातून व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात–

जी मिळतां दोन्ही उदकें–। माजीं लवण वारूं ठाके ।
कीं तयासींही निमिखें । तेंचि होय ॥१८.१६०१॥
तैसें श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं ।
धरितां मजही वानी । तेंचि होतसे ॥१६०२॥
ऐसें म्हणे ना मोटकें । तंव हिरोनि सात्त्विकें ।
आठव नेला नेणों कें । संजयपणाचा ॥१६०३॥

**रोमांच जंव फरके। तंव तंव आंग सुरके।**
**स्तंभ स्वेदाते जिंके। एकला कंपु ॥१६०४॥**
**अद्वयानंदस्पर्शें। दिठी रसमय जाली असे।**
**ते अश्रु नव्हती जैसें। द्रवत्वचि ॥१६०५॥**
**नेणों काय न माय पोटीं। नेणों काय गुंफे कंठीं।**
**वागर्था पडत मिठी। उससांचिया ॥१६०६॥**
**किंबहुना सात्त्विकां आठां। चाचरु मांडतां उमेठा।**
**संजयो जालासे चोहटां। संवादसुखाचा ॥१६०७॥**
**तया सुखाची ऐसी जाती। जे आपणचि धरी शांती।**
**मग पुढती देहस्मृती। लाधली तेणें ॥१६०८॥**

श्रीकृष्णनाथ व अर्जुन यांचा नुसता संवाद ऐकून शक्तिपाताची दीक्षा संजयाला प्राप्त झाली व वरील सर्व लक्षणे त्याच्या ठिकाणी प्रकट झाली. "कुलार्णवतंत्रात" व "सूतसंहितेतेतील टीकेत" या दृष्टीनेच असे म्हटले आहे की—

**आनंदश्चैव कंपश्चोद्भवो घूर्णा कुलेश्वरि।**
**निद्रा मूर्च्छा च वेधस्य षडवस्था प्रकीर्तिता ॥१४.६४॥ कुलार्णवतंत्र ॥**
**देहपातस्तथा कंपः परमानंदहर्षणे।**
**स्वेदो रोमांच इत्येतत् शक्तिपातस्य लक्षणम् ॥४.३५.२१॥ सूतसंहिता टीका**

शिष्याला वेधदीक्षा प्राप्त झाली की, त्याच्या ठिकाणी क्रमशः आनंद, कंप, आसनावरून उत्थान, घूर्णा म्हणजे डोलणे, निद्रा व मूर्छा ही सहा लक्षणे प्रकट होतात. त्याचप्रमाणे शरीर जमिनीवर पुढे किंवा मागे पडते. कंप होतो. मनाला अत्यंत प्रसन्नता येऊन परमानंद व हर्ष होतो. शरीला घाम येतो व रोमांच उभे राहतात. ही सर्व शक्तिपाताची लक्षणे आहेत.

असे हे सहजयोगाचे सहजसाधन आहे. या पलीकडे श्रेष्ठ व स्वाभाविक मार्ग कोणता असू शकेल? "तेंचि तो आपण! स्वयें जाहला निर्वाण। जें साधकांचें कारण। सिद्ध तत्त्व ॥६.४७८॥" म्हणून ज्या आपोआप होणाऱ्या साधनाचा श्रीज्ञानेश्वरमहाराज गौरव करतात ते कसे सर्वांगसुंदर असेल याची अनुभूती "ते मीचि जाहलों अनुभवें। अखंडित ॥६.४८३॥" असे झाले तरच येणार! "तैसें चित्त लया जाये। आणि चैतन्यचि आघवें होये। ऐसीं प्राप्ति सुखोपायें। आहे येणें ॥६.३८६॥, या सोपिया योगस्थिती। उकलु देखिला गा बहुतीं ॥६ ३८७॥" व "तें सुखाचेनि सांगातें। आलें परब्रह्म आतौतें ॥६.३८८॥" असे म्हणून ज्या साधनाचा श्रीज्ञानेश्वरमहाराज वारंवार उल्लेख करतात त्या साधनाचे रहस्य प्रकट करताना प. प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराज यांनी आपल्या "सिद्धयोगोपदेश या योगवाणी" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "जिस मार्गमें

कष्ट भोगे बिनाही योग प्राप्त होता है, उसको सिद्धमार्ग करते है। योगरूप सिद्धि प्राप्तिका मार्ग सुषुम्णा नाडीही है। इसी नाडीमें प्रवेश करके प्राणवायुके ब्रह्मरंध्रस्थ होनेपर साधकको जीव-ब्रह्मकी एकताका ज्ञान करानेवाला योग प्राप्त होता है। आरंभमें गुरुद्वारा शक्तिसंचार होने मात्रसेही कुंडलिनी शक्तिके जागृत होनेपर तत्पश्चात् क्रमशः उन्नति होकर योग प्राप्त होता है। जैसे हांडी, चावल, काष्ठ, जल और अग्नि आदिके संग्रह करनेका कोईभी परिश्रम किये विनाही, दाताकी कृपासे उसके घरमें रधे पक्वान्नसे क्षुधाकी निवृत्ति होती है, उसी प्रकार विना परिश्रम कियेही सर्व योगकी आधाररूपा मूलाधारस्था कुंडलिनी शक्तिका उद्‌बोधन (जागरण) होनेसे योगशास्त्रोक्त आसन, मुद्रा और प्राणायामादि किसीकाभी अस्वाभाविक रीतिसे साधकको अनुष्ठान नहीं करना पडता। केवल गुरुशक्तिके प्रभावसेही कुंडलिनी शक्तिका जागरण होकर स्वाभाविक रीतिसे योगपथका लाभ होता है। यही गीतामें कहा हुआ—" सहज कर्म "—है।

स्वाभाविक रीतिसे जो हो, वही वास्तविक सहज कहा जा सकता है। योगपथ दो प्रकारका है— स्वाभाविक और अस्वाभाविक। अस्वाभाविक उपाय अत्यंत कष्टसाध्य और विघ्नयुक्त है। स्वाभाविकका विपरितही तो अस्वाभाविक होता है। जो स्वाभाविक अर्थात् स्वभावसेही है, वह अनायास साध्य एवं सुखकर होता है और उसमें किसी विपदकी संभावनाभी नहीं होती।" (प्रथम अध्याय पृ. ३)

अशा प्रकारच्या या सहजयोगरूप सिद्धयोगाची श्रेष्ठता किंवा माहात्म्य सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**पुढती अस्तवेना ऐसें। जया पाहलें अद्वैतदिवसें।**
**मग आपणपांचि आपणु असे। अखंडित ॥६.१०५॥**
**तिये ओळखीचिसरिसें। सुखाचिया साम्राज्यीं बैसे।**
**मग आपणपां समरसें। विरोनि जाय ॥६.३६७॥**
**तेव्हां जगदाभासमिषें। स्फुरे तें त्रिविध फळ नाशे।**
**तेथ भोक्ता भोग्य आपैसें। निमालें हें ॥१८.२६०॥**

असा हा सहजयोगसाधनेचा महिमा व श्रेष्ठत्व आहे. येथे साधक अद्वैतरूपी सूर्याच्या उजेडातच अखंड राहणार शिवशक्तीच्या मिलनाने तो सुखाच्या साम्राज्यावरच वसणार व आपणच आपल्यात समरमून विरून जाणार. जगदाभास दाखविणारे हे स्फुरणात्मक शक्तितत्त्व जेव्हा गुरुकृपेने जागृत होते तेव्हा भोक्ता व भोग्य हे आपोआपच नाहीसे होऊन एक अखंड अद्वयानंदस्वरूप स्वसंवेद्य आत्मरूप होऊनच साधक राहतो. यापेक्षा सहजयोगाचा महिमा कोण सांगू शकेल ?

या दृष्टीनेच महायोगी गोरक्षनाथांनी आपल्या " अमरौघशासन " या ग्रंथात सहजयोगमार्गाचा महिमा कथन करताना सहजसमाधीच्याच एकमात्र मार्गानेच

साधकाला मोक्ष मिळतो, अन्य कशानेही मिळत नाही, हे सांगताना असे म्हटले आहे की, " अहो मूर्खता लोकस्य । केचिद् वदन्ति शुभाशुभकर्मविच्छेदनं मोक्षः । केचिद् वदन्ति वेदपाठाश्रितो मोक्षः । केचिद् वदन्ति ध्यानकलाकरणसंवद्धप्रयोगसंभवेन रूपबिंदूनादचैतन्यपिण्डाकाशलक्षणो मोक्षः । केचिद् वदन्ति पूजापूजकमद्यमांसादि-सुरतप्रसंगाननूलक्षणो मोक्षः । केचिद् वदन्ति मूलकरोल्लसितकुंडलोसंचारलक्षणो मोक्षः । केचिद् वदन्ति सुसमदषिनिपातलक्षणो मोक्षः । इत्यंविविधः भावनाश्रितः लक्षणे मोक्षो न भवति । अथ मोक्षपदं कथ्यते यत्र सहजसमाधिक्रमेण मनसा मनः समालोक्यते स एव मोक्षः । "

सारांश, सहजयोग हे सिद्धयोगाचेच पर्यायी नाव असून या नावाने जे विवेचन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे ते सर्व श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या रूपाने साकारलेल्या सिद्धयोगशास्त्राचेच विवेचन आहे, हे त्रिकालाबाधित सत्य आहे, हेच खरे.

**कर्मयोगः—**

" परी योगामाजीं योगु । धुरेचा हा ॥ १२.१३४ ॥ " असे म्हणून ज्या फलत्यागयुक्त कर्मयोगाचे महिमान श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केले आहे, तो सिद्धयोगरूप असून " परी संतांसवें वसतां । योगज्ञानीं पैसतां । गुरुचरण उपासितां । वैराग्येंसी ॥ १५.४२२ ॥ येणेंचि सत्कर्में । अशेषही अज्ञान विरमे । जयांचें अहं विश्रामे । आत्मरूपीं ॥ ४२३ ॥ " असे म्हणून श्रीगुरुचरण कृपेनेच तो कर्मयोग प्राप्त होतो व या कर्मामुळेच साधकाचे अशेष अज्ञान विराम पावून आत्मरूपात त्याचा अहं लीन होतो असा सिद्धांत मांडला आहे. मुळात भगवंतांनीच " किं कर्म ॥ ४.१६,८.१ ॥, योगस्थः कुरु कर्माणि ॥ २.४८ ॥, कर्मण्येवाधिकारस्ते, मा कर्मफलहेतुर्भूः ॥ २.४७ ॥, दूरेण ह्यवरं कर्म ॥ २.४९ ॥, योगः कर्मसु कौशलम् ॥ २.५० ॥, कर्मयोगेण योगिनाम् ॥ ३.३ ॥, नियतं कुरु कर्मत्वं ॥ ३.८ ॥, तदर्थं कर्म कौंतेय ॥ ३.९ ॥, कर्म ब्रह्मोद्‌भवं विद्धि ॥ ३.१५ ॥, कार्यं कर्म समाचार ॥ ३.१९ ॥, जन्म कर्म च मे दिव्यं ॥ ४.९ ॥, कुरु कर्मैव तस्मात् त्वं ॥ ४.१५ ॥, गहना कर्मणो गतिः ॥४.१७॥, शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ॥९.२८॥, ये तु सर्वाणि कर्माणि मायि संन्यस्य मत्पराः ॥ १२.६ ॥, कर्मयोगेण चापरे ॥ १३.२४ ॥, प्रशस्ते कर्मणि तथा ॥ १७.२६ ॥, कर्म चैव तदर्थीयं ॥१७.२७॥, यज्ञदानतपः कर्म ॥ १८.२॥, कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि ॥ १८.६ ॥, सहजं कर्म कौंतेय ॥ १८.४८॥, स्वकर्मणा तमभ्यर्च्य ॥ १८.४६ ॥, स्वभावनियतं कर्म कुर्वन् ॥१८.४७॥, सर्व कर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यापाश्रयः ॥१८.५६॥," व ' चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ॥ १८.५७ ॥ " इत्यादि सर्व ठिकाणी कर्म-योगाचा उल्लेख केलेला असल्यामुळे त्याचा तदनुषंगाने विस्तृत भावार्थ श्रीज्ञानेश्वर

महाराजांनी स्पष्ट केला आहे. कर्म, विकर्म व अकर्म यांचा ऊहापोह भगवंतांनीच गीतेत अनेकवेळा केलेला असल्याने " गहना कर्मणो गतिः ।। गीता ४.१७।। " व "किं कर्म किमकर्मेति कवयोप्यत्र मोहिताः ।।४.१६ ।। या न्यायाने हा विषय अत्यंत जटिल, कठीण व दुरूह झाला आहे. असे असले तरी कर्मयोगाची सिद्धी नैष्कर्म्यसिद्धीत होत असल्याने व " तैसें न होणें निफजे । ते नैष्कर्म्यसिद्धि जाणिज । सर्वसिद्धींत सहजें । परम हेचि ।। १८.९८० ।। " याप्रमाणे स्वसंवेद्य आत्मरूपाची सहजस्थिती प्राप्त होणे हीच नैष्कर्मसिद्धी असून ती सर्व सिद्धीत मुख्य व श्रेष्ठ आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले असल्यामुळे वर उलेखिल्याप्रमाणे सत्कर्म म्हणजे सिद्धयोगरूप कर्मयोगाचे स्वरूप कसे आहे, कर्मयोगाचे साधन कसे चालते व त्याचे माहात्म्य, श्रेष्ठता अगर फल काय आहे हे पाहिले म्हणजे कर्मयोग हा सिद्धयोग-रूप असल्याचे स्पष्टपणे प्रतीत होऊन सर्व विषय साररूपाने दृग्गोचर होईल.

सहजकर्म म्हणजे सिद्धयोगसाधन होय हे आपण मागे सहजयोगाच्या चर्चेत सिद्ध केलेच आहे. त्या दृष्टीनेच कर्मयोगाचे स्वरूप स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

**तरी कर्म म्हणजे स्वभावें । जेणें विश्वाकारु संभवे ।**
**तें सम्यक् आधीं जाणावें । लागे एथ ।।४.८९।।**
**ऐसा करितेनविण गोचरु । अव्यक्तीं हा आकारु ।**
**निपजे जो व्यापारु । तया नाम कर्म ।।८.२९।।**
**ते बुद्धी धुरे करुनी । कर्म करिती चित्त देऊनी ।**
**परी ते नैष्कर्म्यापासुनी । मुक्त दिसती ।।५.६१।।**
**जें बुद्धीचिये ठावूनि देही । तयां अहंकाराची सेचि नाहीं ।**
**म्हणोनि कर्म करितां पाहीं । चोखाळले ।।५.६२।।**
**अगा करितेनवीण कर्म । तेंचि तें नैष्कर्म्य ।**
**हें जाणती सुवर्म । गुरुगम्य जे ।।५.६३।।**
**म्हणोनि ब्रह्म तेचि कर्म । ऐसें बोधा आले जया सम ।**
**तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा ।।४.१२१।।**
**म्हणोनि करावा स्वधर्मु । जो करितां हिरोनि घे श्रमु ।**
**उचित देईल परमु । पुरुषार्थराजु ।।१८.९४९।।**

कर्म म्हणजे स्वभाव होय स्व म्हणजे शिव व भाव म्हणजे शक्ती होय. यामुळच " जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचे सरोभरी । चारुस्थळीं एकाहारी । एकांशाची ।।१.२।। " असे "अमृतानुभवात" स्पष्ट केल्याप्रमाणे हे शिवशक्ती विश्वाका-राने संभविलेले दिसतात. परमप्रिय आत्मा हाच प्राणेश्वरी, चित्शक्ती, आत्मशक्ती किंवा आत्मसत्ता असल्याने तोच म्हणजे हे शिवशक्तीच खरे कर्म होत. हे सम्यक्पणे

जाणले पाहिजे. "स्पंदशास्त्राच्या" प्रथम प्रवाहातील पहिल्या श्लोकावर टीका करताना श्रीभट्ट कल्लटाने हा विषय स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, "परमेश्वर हा स्वस्वभावाप्रमाणे वागतो. स्व म्हणजे आत्मीय. स्वस्य म्हणजे आत्म्याचे भाव म्हणजे स्वरूप. याचा अर्थ परमेश्वर हा स्वतःच्या चित्शक्तीने किंवा इच्छाशक्तीने जगाची उत्पत्ती व लय करतो. स्थिती अवस्थेमध्ये हे जगत् त्याच्या शक्तीचे वैभवच असते. याचा अर्थ असा की, जे जे काही दिसते ती ती शक्तीच आहे. जगत् असे मुळी नाहीच."

अशाप्रकारे अव्यक्ताच्या ठिकाणी काहीही न करता जो पिंडब्रह्मांडादि आकार गोचर होतो त्या व्यापारालाच कर्म म्हणतात. याचा अर्थ चित्शक्तिरूपाने युक्त असलेला परमात्मा ज्या चित्शक्तीने जगत्रूपाने नटतो ती चित्शक्तीच कर्म होय असा सिद्धांत झाला. "अमृतानुभवात" हा सिद्धांत स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात —

> **सर्व शून्याचा निष्कर्षु । जिया बाईला केला पुरुषु ।**
> **जिये दादुलेनि सत्ताविशेषु । शक्तीचा जाला ।।१.२६।।**
> **जिये प्राणेश्वरीवीण । शिवींही शिवपण ।**
> **थारों न शके ते आपण । शिवें घडली ।।२७।।**
> **ऐश्वर्येंसी ईश्वरा । जियेतें अंग पसारा ।**
> **आपलाही उभारा । आपणचि जे ।।२८।।**

सर्व शून्याचा निष्कर्ष असलेला शिव हा शक्तीचा पती असून तिनेच त्याला प्रकट केले. या प्राणेश्वरी चित्शक्तीशिवाय शिवाला शिवपण येऊ शकत नाही. ही प्राणेश्वरी शक्ती शिवाचीच बनली आहे. सर्व ऐश्वर्यासह ईश्वरपणा हा जिचा अंगपसारा आहे, अशी ही चित्शक्ती आपणच आपली सर्व उभारणी करते. हा व्यापार हेच कर्म होय. याचा अर्थ कर्म हे चिच्छक्तिस्वरूप असून तद्भिन्न काहीही नाही.

ज्यावेळी साधक बुद्धी म्हणजे प्राणाला पुढे करून चित्त म्हणजे कुंडलिनी शक्ती सुषुम्नेतून ऊर्ध्वगामी करतात तेव्हा नैष्कर्म्यसिद्धीलाही ओलांडून पलीकडे जातात. अशाप्रकारे शरीरात प्राणशक्तीचा संचार झाला की, साधकाला अहंकाराची आठवणच राहत नाही. या कर्मयोगरूप सिद्धयोगसाधनेमुळें तो अगदी शुद्ध होतो. असा हा योग चिच्छक्ती स्वतः करीत असल्यामुळे हेच न केलेले कर्म व हीच नैष्कर्म्यसिद्धी होय. हे रहस्य ज्या साधकांना शक्तिपातयोगदीक्षा मिळाली आहे तेच जाणतात; कारण हे गुरु केल्यामुळेच कळणारे तत्त्व आहे. महायोगी गोरक्षनाथांनी यामुळेच "महार्थमंजिरीत" असे म्हटले आहे की " गुरुमत्तैव नः शास्त्रे परमं फलमुच्यते ।। पृ. १७० ।। " गुरू करणे हेच आमच्या या शास्त्रातील सर्वात श्रेष्ठ फल, तत्त्व किंवा रहस्य आहे. म्हणून ब्रह्मतत्त्व जाणणे हेच कर्म होय. अशी

सामरस्यावस्था ज्याला अनुभूतीला आली त्याचे कर्तव्यकर्म हे नैष्कर्म्यच होय. होय. अशाप्रकारे जे स्वधर्म म्हणजे सिद्धयोगाचे किंवा कर्मयोगाचे आचरण करतात त्यांचे सर्व श्रम ते साधन हिरून घेते व परमपुरुषार्थाच्या राजासारखे असलेले स्वसंवेद्य आतमरूप त्यांना प्राप्त करून देते.

या सर्व विवेचनाचा इत्यर्थ असा की, श्रीगुरुकृपेने कर्मयोगरूप सिद्धयोग-साधन प्राप्त करून घेणे हेच खरे कर्म होय असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. महायोगी गोरक्षनाथांनीही " सिद्धसिद्धांतपद्धतीत " कर्माची हीच व्याख्या केली आहे. ते म्हणतात –

**आत्मेति परमात्मेति जीवात्मेति पुनः स्वयम् ।**
**अस्तितत्त्वं परं साक्षात् शिवरुद्रादि संज्ञितम् ॥६.२४॥**
**शरीरपद्मकुहरे यत्सर्वेषामवस्थितम् ।**
**तदवश्यं महापाशाच्छेदितव्यं मुमुक्षुभिः ॥२५॥**
**ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च सोऽक्षरः परमः स्वराट् ।**
**स एव इंद्रः स च प्राणः स कालाग्निः स चंद्रमाः ॥२६॥**
**स एव सूर्यः स शिवः स एव परमः शिवः ।**
**स एव योगगम्यश्च सांख्यशास्त्रपरायणैः ॥२७॥**
**स एव कर्म इत्युक्तः कर्ममीमांसकैरपि ।**
**सर्वत्र सत्परानंद इत्युक्तो वैदिकैरपि ॥२८॥**
**व्यवहारैरयं भेदस्तस्मादेकस्य नान्यथा ॥२९॥**

आत्मा, परमात्मा, जीवात्मा, स्वयं, शिव, रुद्र इत्यादि संज्ञानी किंवा नावांनी ज्या परमतत्त्व किंवा आत्मतत्त्वाचा उल्लेख केला जातो ते तत्त्व सर्वांच्या शरीरात सहस्रारात स्थित आहे. मुमुक्षू साधकाने सिद्धयोगसाधनद्वारा महापाशाचा छेद करून ते तत्त्व अवश्य जाणले पाहिजे. या तत्त्वालाच ब्रह्मा, विष्णू रुद्र अक्षर, परम, स्वराट्, इंद्र, प्राण, कालाग्नी चंद्र, सूर्य व परमशिव असे म्हणतत. परमतत्त्व स्वसंवेद्य करणे हे योगाभ्यासी साधकाचे जे ध्येय असते ते हेच होय. सांख्यशास्त्रज्ञ असंग पुरुषरूप आत्मतत्त्वाच्या प्राप्तीचे जे ध्येय सांगतात तेही हेच होय व वेदांती लोक सच्चिदानंद प्राप्तीचे जे ध्येय सांगतात तेही हेच होय. एवढेच नव्हे तर कर्ममीमांसक लोक या आत्मतत्त्वप्राप्तीलाच कर्म म्हणतात. खरे पाहता वास्तविकरीत्या आत्मतत्त्व एकच आहे. त्याला व्यवहारभेदाने निरनिराळी नावे दिली तरी त्याचा अर्थ निराळा होत नाही. सारांश, श्रीसद्‌गुरुकृपेद्वारा चिच्छक्तीकडून जे स्वतः साधन घडते ते खरे कर्म होय व तोच कर्मयोग होय. अशा या कर्मयोगाचे स्वरूप अधिक स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

**एकु कर्मयोगु जाण । जेथ साधकजन निपुण ।**
**होऊनियां निर्वाण । पावती वेळे ॥३.३७॥**

येर योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें ।
पूर्णता अवसरें । पावतें होती ॥४४॥
वांचोनि कर्मारंभ उचित । न करिता सिद्धवत ।
कर्महीना निश्चित । होईजेना ॥४५॥
कीं प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नष्कर्म्य होईजे ।
हे अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥४६॥
सांगें पैलतीरा जावें । ऐसे व्यसन कां जेथ पावे ।
तेथ नावेतें त्यजावें । घडे केवीं ? ॥४७॥
म्हणौनि आईकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था ।
तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥५०॥

ज्याला पैलतीराला जाण्याची इच्छा आहे त्याला ज्याप्रमाणे नावेचा त्याग करून चालत नाही त्याप्रमाणे नैष्कर्म्यसिद्धीसाठी साधकाने सिद्धयोगरूप कर्मयोग केलाच पाहिजे जो कर्मयोगसाधनाची खंत करतो तो गावंढळ आहे असे सांगून "जंववरी अर्जुना । तो वोधु भेटेना मना । तंवचि यथा साधना । भजावें लागे ॥ ३.१४९ ॥ " असा स्पष्ट इशाराही त्यांनी दिला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मते कर्मयोगसाधन हेच भाराक्रांत मेदिनी म्हणजे मूलाधारस्थ ( मूलाधार हे पृथ्वीतत्त्वाचे स्थान आहे. ) निद्रिस्त शक्तीमुळे जीवाला प्राप्त झालेला संसार सोडविण्याचे व तत्प्रीत्यर्थ चित्त म्हणजे शक्ती जागृत करून संग्राम करणे आहे. ज्यावेळी सद्गुरुकृपेने शक्ती जागृत होते तेव्हाच जडचेतनभेदाचा अमर संग्राम जन्मजन्मांतरीच्या अपार पुण्याईने उपस्थित होतो. जीवाच्या कल्याणासाठी म्हणजे भोग व मोक्ष हे दोन्ही प्राप्त होण्यासाठी हा आवश्यक असल्याचे निभ्रांत मत मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

तरी उचितें कर्में आघवीं । तुवा आचरोनि मज अर्पावीं ।
परि चित्तवृत्ति न्यासावी । आत्मरूपीं ॥३.१८६॥
आणि हें कर्म मी कर्ता । कां आचरैन या अर्था ।
ऐसा अभिमानु झणें चित्ता । रिगों देसी ॥१८७॥
तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें ।
मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ॥१८८॥
आतां कोदंड घेऊनि हातीं । आरूढ पां इयें रथीं ।
देई आलिंगन वीरवृत्ती । समाधानें ॥१८९॥
जगीं कीर्ति रूढवी । स्वधर्माचा मानु वाढवीं ।
इया भारापासोनि सोडवीं । मेदिनी हे ॥१९०॥

**आतां पार्था निःशंकु होईं। या संग्रामा चित्त देईं।**
**एथ हें वांचूनि कांहीं। बोलों नये ।।१९१।।**
**हें अनुपरोध मत माझें। जिहीं परमादरें स्वीकारिजे।**
**श्रद्धापूर्वक अनुष्ठिजे। धनुर्धरा ।।१९२।।**
**तेही सकळ कर्मीं वर्ततु। जाण पां कर्मरहितु।**
**म्हणौनि हें निश्चितु। करणीय गा ।।१९३।।**

साधकाने आत्मशक्ती कुंडलिनीचा सुषुम्नेत न्यास करून म्हणजेच हे असंग करणारे कोदंड हाती घेऊन रथावर म्हणजे सुषुम्नेत आरूढ व्हावे व निःशंकपणे साधनसंग्राम करावा. विषयांना जिंकणे हा जीवाच्या जीवनातील महान संग्राम आहे. या विषयांमुळे, अज्ञानामुळे, बहिर्मुखतेमुळे, द्वैतामुळे, कल्पनेमुळे किंवा संकल्पामुळे कुंडलिनी शक्ती मूलाधारात अनादि निद्रा घेत पहुडली असल्याने मूलाधारस्थ मेदिनी भाराक्रांत होऊन जीव जन्ममरणपरंपरा भोगीत असतो. ही जन्ममरण-परंपरा चुकविण्यासाठी असा संग्राम आवश्यकच आहे. बहुतेकांना महापुरुषसंश्रय न झाल्याने शक्तिपातयोगदीक्षा मिळत नाही व त्यांच्या जीवनात असा संग्रामच उपस्थित होत नाही. " म्हणौनि बहुत पुण्य तुवां। केलें तेणें धनंजया। आजि शास्त्रराजा इया। जालासी विषयो ।। १८.१४८० ।। " असे म्हणून श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी अर्जुनाचे जे कौतुक केले आहे, त्याचे कारण हेच आहे की, अशा प्रकारचा संग्राम त्याच्या जीवनात उपस्थित झाला. एकदा एवढे घडले की, साधक-भोग व मोक्ष या दोहोंचाही अधिकार होतो. " भोगं च मोक्षं च करस्थ एव " म्हणून याचे शास्त्रकारांनी वर्णन केले आहे यासाठी साधकाने कर्मयोगाचे आचरण करावे हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे अनुपरोध व निश्चित मत आहे; कारण त्यांना परंपरेने प्राप्त झालेले समाधियोगाचे धन हे सिद्धयोगरूप कर्मयोगाचेच आहे; कारण " वांचूनि मूर्खांची गोठी कायसी। एथ मोहले गा क्रांतदर्शी। म्हणौनि आतां तेंचि परियेसीं। सांगेन तुज ।।४.८८।। " असे म्हणून त्यांनी अविमोहित चित्ताने, गुरुकृपाप्रसादलब्धभावाने, स्वतःच क्रांतदर्शी बनून अत्यंत सहजतेने व सोप्या रीतीने कर्मयोगरूप सिद्धयोगसाधनाचे पुढीलप्रमाणे उद्‌घाटन केले आहे. ते म्हणतात–

**तरी जाणां नेणां सकळां। हा कर्मयोगु कीर प्रांजळा।**
**जैसी नाव स्त्रियां बाळां। तोयतरणी ।।५.१६।।**
**तैसें सारासार पाहिजे। तरी सोहपा हाचि देखिजे।**
**येणे संन्यासफळ लाहिजे। अनायासें ।।१७।।**

कर्मयोग हा स्त्रियांना व बालकांना नावेतून जाण्यासारखा सोपा व प्रांजळ योग असून त्यामुळेच संन्यासफल प्राप्त होते. कर्मयोगाचे मोठमोठ्या लोकांनी जे अर्थ लाविले आहेत ते सर्व स्थूलार्थ व क्वचित् प्रसंगी सूक्ष्मार्थ असले तरी श्रीज्ञानेश्वर-

महाराजांनी "जिहीं आत्मबोधाचिया आवडी। केली स्वर्गसंसाराची कुरोंडी। तेवांचूनि एथींची गोडी। नेणती अणिक ॥६.२८॥ जैसा वायसीं चंद्र नोळखिजे। तैसा प्राकृती हा ग्रंथु नेणिजे। आणि तो हिमांशुचि जेवि खाजें। चकोराचें ॥ ६.२९ ॥" असे निभ्रांतपणे सांगून "तेणें कारणें मी बोलेन। बोलीं अरूपाचें रूप दावीन। अतींद्रिय परी भोगवीन। इंद्रियांकरवीं ॥६.३६॥" अशी प्रतिज्ञा केलेली असल्यामुळे या प्रबंधात परार्थाचाच म्हणजे सिद्धयोगाचा, सिद्धतत्त्वाचा व सिद्धसाराचाच स्वीकार करून सर्व अर्थ स्पष्ट करीत असल्याचे विषयप्रवेशात सांगितले आहेच. कर्मयोगाचा जागृतशक्तिसाधन हा अर्थ जर लक्षात घेतला नाही, तर सिद्धयोग-साधनातील गोडी ज्यांना कळणार नाही, अशा कावळचासारख्या चंद्र न ओळखणाऱ्या प्राकृत माणसांच्या सदरात आपली गणना झाल्याशिवाय राहणार नाही. या दृष्टीने म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना" खंड दोन, या ग्रंथातील "श्रीगुरुचरणोंके प्रथम दर्शन" या लेखात असे म्हटले आहे की, "साधन-जीवनमें कर्मही प्रधान है। पुस्तकका ज्ञान शुष्कज्ञान–मात्र है। वास्तविक ज्ञान और वास्तविक भक्ति महत्त्वपूर्ण वस्तु हैं। उनका विकास कर्मसे अपने आपही होता रहता है। केवल कृपा के उपर निर्भर रहना सुविवेका कार्य नहीं है। कृपा अत्यंत पवित्र वस्तु है। वह निरंतरही उस महाशक्तिसे टपक रही है। उसके सिवा जीवकी ऊर्ध्वगतिका दूसरा कोई उपाय नहीं है, किंतु कर्मके विना उसको धारण नहीं किया जा सकता। इसलिए कर्मही प्रधान है। कर्मसे असाध्य साधन होता है। कर्म माने क्रियाशक्ति (कुंडलिनी), यह स्मरण रखना चाहिए।" याच लेखकाने उपरोक्त ग्रंथातील प्रथम खंडातील "सूर्यविज्ञान" या लेखात असे म्हटले आहे की, "यथार्थ ज्ञानका उद्भव चित्तशुद्धि हुए बिना नहीं होता और चित्तशुद्धि कर्मसाक्षेप है। अतएव यथाविधि सद्गुरुके आदेशको सिर चढाकर उनके दिखलाए हुए मार्गसे निष्ठा, संयम और श्रद्धाके साथ अपने चरित्रबलको पवित्र बनाये रखते हुए जो अग्रसर हो सकता है, उसको अवश्यही असली ज्ञान प्राप्त होता है। इस कर्मकोही योगिगण योग कहते है। इसके विपरीत अन्य कर्मोंको योग नही कहा जाता और वे चित्तशुद्धिमें सहायक भी नहीं होते।"

अशा प्रकारे कर्मयोग म्हणजे काय हे सुस्पष्ट झाल्यावर या योगाची साधना कशी चालते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी अविद्येचिया निदा। विश्वस्वप्नाचा हा धांदा।
भोगीत होता प्रबुद्धा। अनादि जो ॥१८.४०३॥
तो महावाक्याचेनि नांवें। गुरुकृपेचेनि थांवें।
माथां हातु ठेविला नव्हे। थापटिला जैसा ॥४०४॥

तैसा विश्वस्वप्नेंसीं माया । नीद सांडूनि धनंजया ।
सहसा चेइला अद्वया-। नंदपणें जो ॥४०५॥
तेव्हां मृगजळाचे पूर । दिसते एक निरंतर ।
हारपती कां चंद्रकर । फांकतां जैसे ॥४०६॥
कां बाळत्व निघोनि जाय । तैं बागुला नाहीं त्राय ।
पैं जळालिया इंधन न होय । इंधन जेवीं ॥४०७॥
नाना चेवो आलिया पाठीं । तैं स्वप्न न दिसे दिठी ।
तैसी अहं ममता किरीटी । नुरेचि तया ॥४०८॥
मग सूर्यु आंधारालागीं । रिघो कां भलतें सुरंगीं ।
परी तो तयाच्या भागीं । नाहींचि जैसा ॥४०९॥
तैसा आत्मत्वें वेष्टिला होये । तो जया तया दृश्यातें पाहें ॥
तें दृश्य द्रष्टेपणेंसीं होत जाये । तयाचेंचि रूप ॥४१०॥
जैसा वन्ही जया लागे । ते वन्हीची जालिया आंगें ।
दाह्यदाहकविभागें । सांडिजे तें ॥४११॥
तैसा कर्माकारा दुजेया । तो कर्तेपणाचा आत्मया ।
आळु आला तो गेलिया । कांहीं बाहीं जें उरे ॥४१२॥

मूलाधारात कुंडलिनी शक्ती अनादि कालापासून निद्रेत घोरत पडल्यामुळे जीव मूलतः प्रवुद्ध म्हणजे शिवरूप असूनही विश्वरूपी स्वप्नाच्या व्यवहाराचा म्हणजे जन्ममरणरूप संसारचक्राचा सतत अनुभव घेत असतो. परंतु ज्यावेळी महावाक्याद्वारा शव्दाने, कृपेच्या वर्षावाद्वारा संकल्पाने किंवा हात डोक्यावर ठेऊन स्पर्शाने थापटून सद्‌गुरू शिष्याला शक्तिपात दीक्षा देतात त्यावेळी विश्वस्वप्नाने मूलाधारात निजलेली माया म्हणजे चित्‌शक्ती कुंडलिनी आपली अनादि निद्रा सोडून देऊन सहज जागृत होऊन साधक अद्वयानंदाच्या उपभोगासाठी सुषुम्नामार्गाने गमन करू लागतो आणि शेवटी ज्या कर्माद्वारा म्हणजे चित्‌शक्तिद्वारा आत्म्याने विश्वाभासाचा दुजेपणा किंवा कर्तेपणा अगर आळ घेतलेला असतो तो, ती शक्ती आत्मरूपी शिवस्वरूपात विलीन झाली की, दुजेपणा, कर्तेपणा अगर आळ निघून जाऊन काहीच्या बाही असलेल्या अशा आपल्या स्वसंवेद्य आत्मरूपाने उरतो.

हेच कर्मयोगरूप सिद्धयोगाचे साधन आहे. "तांत्रिक वाङ्‌मयमें शाक्तदृष्टि" या ग्रंथातील "देह और कर्म" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी जे विवेचन केले आहे ते पाहिले म्हणजे उपरोक्त कर्मयोगसाधनाचे मर्म अधिक स्पष्ट होईल. ते म्हणतात, "मनुष्य देहही कर्मानुसारिणी गतिका सूत्र है। यहाँसे ऊपर भी जा सकता है, नीचे भी जाया जा सकता है। विश्वके सब स्थानोंमें जानेका पथ इसीमें पाया जाता है। फिर यदि भाग्य रहे तो यहाँसेही कर्मके प्रभावसे ऐसा पथ

प्राप्त हो जाता है जिसका अवलंबन करनेपर आत्मज्ञानका विकास होनेसे पूर्णत्वमें स्थिति-लाभ हो जाता है ।.... वास्तविक दिव्यदेह मनुष्यदेहकाही विकासमात्र है। मानवदेहही पूर्णता प्राप्त होने पर भगवद्देहके रूपमें परिणत होती है। इस परिणतिके लिए जो उपाय काममें लाये जाते हैं उन्हींका नाम कर्म है।.... चित् और अचित्के मिलनसेही सृष्टि होती है। योगी या कर्मी जब अपने कर्ममें प्रवृत्त होते हैं तब उनके क्रियमाण कर्मके प्रभावसे यह संघात नष्ट हो जाता है। परंतु उसका विनाश क्रमशः होता है, जिससे चैतन्यांश मुक्त होता है और जड अंश उससे पृथक् हो जाता है। यह पृथक्करण विवेककी क्रिया है। ("मज हृदयीं सद्‌गुरु। जेणें तारिलों हा संसारपूरु। म्हणौनि विशेषें अत्यादरु। विवेकावरी ॥१.२२॥") विवेकमूलक ज्ञानका उदय होनाही कर्मका उद्देश्य है। श्रीगुरुकृपासे उद्‌भूत तेज या कुंडलिनी शक्ति स्थूलदेहके भीतर स्थित अपंचीकृत भूत तथा अन्यान्य तत्त्वोंके अंदर प्रविष्ट होकर उन्हें गलाती हैं और स्थायी आकारमें परिणत करती हैं।

यहाँपर आत्मकर्मही कर्मशब्दका लक्ष्य है, यह कहना आवश्यक है। यदि वह आत्मकर्म न होकर अन्यकर्म हो तो सुखदुःख भोगके लिए पुनः जन्मांतरकी आशंका बनी रहेगी। आत्मकर्म चलतेही रहते हैं एवं कारणसत्ता या मूल प्रकृतिमें निहित गुप्त चैतन्य पृथक् होने लगता है। जब प्रकृतिरूप कारणसत्तासे चित्‌शक्ति पृथक् होती है तब योगीको एक अनिर्वाचनीय स्थितिके सम्मुख होना पडता है।

यह जो साधनाका क्रम कहा गया है यह इष्टसाधनाकाही क्रम है। क्योंकि साधकका इष्ट देवता कुंडलिनी शक्तिके सिवा दूसरा कोई नहीं है। साधक चाहे जिस नाम अथवा रूपकोही ग्रहण क्यों न करे एकमात्र कुंडलिनीही उसका इष्टदेव है।.... योगी यदि कर्महीन अथवा कर्ममें उदासीन रहे तो गुरुप्रदर्शित लक्ष्य उसे प्राप्त नहीं हो सकता। यह जो ज्ञानप्रदानकी बात कही गई है, इसके साथ कुंडलिनी शक्तिके प्रबोधनका घनिष्ठ संबंध है। सद्‌गुरु साधकमें शक्तिपातके समय ठीक उतनी मात्रामें शक्तिका संचार करते हैं, जिससे उसकी कुंडलिनी शक्ति उद्‌बुद्ध होकर ऊर्ध्व गतिका अवलंबन करती हुई अग्रसर होनेमें समर्थ हैं। जो अशुद्ध वासनाएँ साधकके अंदर निहित ज्ञानशक्तिको आच्छन्न कर रखती है वे गुरुकृपासे कुंडलिनी जागरणके साथ-साथ जल जाती है। इससे साधककी अंतरात्मा शुद्ध होकर गुरुदत्त चिन्मय शक्तिस्वरूप इष्टका आकार धारण करती है। यह क्रमसे होता है। यही वास्तविक कर्म है।"

अशा प्रकारे कर्मयोगाची साधना चालते. ही साधनधारा स्पष्टपणे हृदयगोचर झाली म्हणजे या साधनाची जी श्रेष्ठता, माहात्म्य व अपूर्वता श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शब्दांकित केली आहे त्याचे वैशिष्ट्य लक्षात येईल. ते म्हणतात–

जो सकळकर्मीं वर्ततां। देखें आपुली नैष्कर्म्यता।
कर्मसंगें निराशता। फळाचिया ॥४.९३॥
तो मनुष्यासारिखा तरी आवडे। परी मनुष्यत्व तया न घडे।
जैसें जळामाजीं न बुडे। भानुबिंब ॥१००॥
तेणें न पाहतां विश्व देखिलें। न करितां सर्व केलें।
न भोगितां भोगिलें। भोग्यजात ॥१०१॥
एकेचि ठायीं बैसला। परि सर्वत्र तोचि गेला।
हें असो विश्व जाहला। आंगेंचि तो ॥१०२॥
आतां अधिष्ठानसंगती। अशेषाही इंद्रियवृत्ती।
आपुलालिया अर्थी। वर्तत आहाती ॥५.४८॥
दीपाचेनि प्रकाशें। गृहींचे व्यापार जैसे।
देहीं कर्मजात तैसे। योगयुक्ता ॥४९॥
तो कर्मे करी सकळें। परी कर्मबंधा नाकळे।
जैसें न सिंपे जळीं जळें। पद्मपत्र ॥५०॥
तो जयाकडे वासु पाहे। तेउती सुखाची सृष्टि होये।
तो म्हणे तेथ राहे। महाबोधु ॥७४॥

असा हा सिद्धयोगसाधनारूप कर्मयोगाचा महिमा आहे. त्यामुळे कर्मयोगाचे उत्तम रीतीने, चांगले व खूप सुंदर आचरण करावे म्हणून सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

जें चालणें वेगवात जाये। तो वेगु बैसावयाचि होये।
तैसा कर्मातिशयो आहे। नैष्कर्म्यालागीं ॥१८.१५४॥
म्हणौनि फळीं लागु। सांडोनि देहसंगु।
कर्मे करावीं हा चांगु। निरोपु माझा ॥१७६॥
जो जीवबंधें शिणला। सुटके जाचे आपला।
तेणें पुढतीपुढतीं या बोला। आन न कीजे ॥१७७॥

याप्रमाणे सर्वसिद्धीतील सर्वश्रेष्ठ सिद्धी ही एकमात्र कर्मयोगाने म्हणजे सिद्धयोगाने प्राप्त होत असल्याने तोच अधिकाधिक करणे श्रेयस्कर आहे. कर्मयोगाची श्रेष्ठता यापेक्षा अधिक कोण सांगणार ?

सारांश, असे हे ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या विविध नावांचे रहस्य आहे. ज्यांच्यावर सद्गुरुकृपा होऊन ज्यांची कुंडलिनी शक्ती जागृत झाली आहे त्यांना हा विषय व त्यातील रहस्य हृदयंगम होईल. ज्ञानेश्वरी ही सिद्धयोगसाधनेचा अपूर्व ग्रंथ असल्याने त्यातील सर्व विवेचन हे त्या विषयानुरोधानेच झालेले आहे; परंतु श्रीगुरुकृपा म्हणजे खरोखरीच काय आहे, जगदंबा कुंडलिनी ही चैतन्यचक्र-

वर्तीची शोभा असून तीच जागृत जीवाचे खरे अंतरंग साधन कसे बनते व साधक मध्यमेमध्ये उडी घालतो म्हणजे सुषुम्नामार्गाने वाटचाल करतो म्हणजे काय करतो हे जोपर्यंत अंशात्मक रीतीनेही कळणार नाही तोपर्यंत या विषयातील खरे रहस्य हाती लागणार नाही. याबाबतीत "भारतीय संस्कृति और साधना" खंड एक, या ग्रंथातील "ईश्वरमें विश्वास" या लेखात म. म. गोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, "साधन–जगत्का जो निगूढ रहस्य है, जिसकी प्राप्तिके लिये दीर्घकालतक सत्यस्वरूप सद्गुरुकी कृपाका अवलंबन कर तीव्र पुरुषार्थका प्रयोग करना पडता है। तार्किक प्रकृति–विशिष्ट तथा साधनहीन पुरुषके सामने उस रहस्यकी आलोचना करना उचित नहीं है। वहाँ इस आलोचनाका यथार्थ फल उत्पन्न नहीं हो सकता।" श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "परी लोकु वाक्चातुर्यें। होईल सुखिया ॥१८.१७५०॥" असे सांगून "प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे ॥६.२९॥" म्हणून स्पष्टच सांगितले आहे. "आहाच बोलाची वालीफ फेडिजे। आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे। मन सुखेंसी सुरवाडिजे। सुखाचि माजीं ॥६.२५॥ ऐसें हळुवारपण जरी येईल। तरीच हें उपेगा जाईल। एऱ्हवीं आघवी गोठी होईल। मुकिया बहिरयाची ॥६.२६॥" हा त्यांचा ग्रंथ कळण्याचा परम सिद्धांत आहे. तो आत्मसात केला की, ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या विविध नावांचे वर उलगडून दाखविलेले रहस्य आत्मसात होईल.

# प्रकरण सहावे

# ज्ञानेश्वरीतील सिद्धयोग साधनेचा महिमा

**प्रास्ताविकः–**

सकलसंतशिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराज यांनी सकलसिद्धांच्या राजाने अर्थात् भगवान् श्रीगोपालकृष्णनाथमहाराजांनी श्रीमद्भगवद्गीतेत कथन केलेल्या सकल-सिद्धांतस्वरूप अशा स्वसंवेद्य आत्मस्वरूपोपलब्धीसाठी गुरुक्रमाने लाधलेल्या व बोधाचा संसरा म्हणून प्राप्त झालेल्या ज्या सकलसिद्धांतयुक्त सिद्धयोगसाधनरूप समाधिधनाचे गुर्वाज्ञेनेच कृपाळूपणे ज्ञानेश्वरीत जे उद्घाटन केले आहे, त्याचा महिमा त्यांनी कसा गायिला आहे हे आता पाहवयाचे आहे. श्रीमद्भगवद्गीता व ज्ञानेश्वरी हे साधनग्रंथ आहेत हे आपण पहिल्या प्रकरणात पाहिलेच आहे. त्याच्या अनुरोधानेच सिद्धयोग साधनेच्या महिम्याचा विचार करावयाचा आहे. या विचारा-मुळे सिद्धयोग साधनाच्या भिन्न भिन्न वैशिष्टयाने नटलेल्या तेजस्वी पैलूंचे दर्शन होऊन सिद्धयोग साधन हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे चिंतामणिस्वरूप कसे आहे व शक्तिपाताने कुंडलिनी शक्ती जागृत करणारे सद्गुरू हे "चेतन चिंतामणीचें गांव ॥१८.१७९८॥" कसे आहेत ते स्पष्ट होईल.

**साधनाची अपूर्वताः–**

मुळात भगवंतांनीच श्रीमद्भगवद्गीतेत "वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्त-कृद्वेदविदेव चाहम् ॥१५.१५॥" असे म्हणून सर्व वेदांनी व वेदांताच्या विषयाचा संप्रदाय करणाऱ्या उपनिषदांनी वेदांचा यथार्थ अर्थ जाणणारा मीच असल्याने मीच जाणण्यास योग्य आहे, असे सांगून साधनरहस्याचे उद्घाटन केले आहे. त्यामुळे गीता हे भवानीच्या स्वरूपासारखे नित्यनूतन तत्त्व असून ते वेदार्थाचा सागर आहे हा सिद्धांत मांडून झाल्याबरोबर "हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें । गगन मुठीं सुवावें । मशकें केवीं ? ॥१.७४॥" असा प्रश्न जीवरूपाने उपस्थित करून तत्त्वप्राप्तीच्या उपायाचा जो प्रपंच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केला आहे तो उपायरूप ग्रंथ म्हणजेच ज्ञानेश्वरी होय. तत्त्वाची, वस्तूची, स्वसंवेद्य आत्मरूपाची किंवा शिवशक्तियुक्त ब्रह्माची चर्चा होऊ शकत नाही व ते मन, वाणी' चर्चा, तर्क, बुद्धी यांच्यापलीकडे असल्याने त्याची व्याख्या होऊ शकत नाही त्यामुळे "नेति नेति" म्हणून हे इतकेच आहे असे नाही व हे एवढेच आहे असेही नाही; तर त्या पलीकडे आणखीही आहे असे म्हणून वेदांनीच त्या तत्त्वाची व्याख्या करताना

स्वतःचे असामर्थ्य प्रकट केले आहे. "जेथ वेडावती वेद।। १.७३ ।।" म्हणून जे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात त्याचा भावार्थ हाच आहे. मात्र तत्त्व हे व्याख्येचा विषय नसले तरी ते जाणण्याचा विषय आहे, अनुभूतीचा विषय आहे किंवा प्राप्तीचा विषय आहे असे "अहमेव वेद्यो" म्हणून भगवंतच सांगत असल्याने या उपेयस्वरूपाच्या प्राप्तीचा उपाय म्हणजे साधन सांगताना "परी एथ असे एकु आधारु। जे सानुकूळ श्रीगुरु ।। १.७५ ।।" असा शिवसूत्रातील "गुरुरुपायः ।। २.६ ।।" हा परंपराप्राप्त महासिद्धांत सांगून " जरी प्रकटे सिद्धसरस्वती। तरी मुकयाहि आथी भारती। एथ वस्तुसामर्थ्यशक्ती। नवल कायी ।।१.७८।।" असे म्हणून वस्तुसामर्थ्यशक्तीचे प्रकटीकरण होणे हाच शिवसूत्रोक्त "गुरुरुपायः ।। २.६ ।।" आहे, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. श्रीभट्टभास्करांनी याचे स्पष्टीकरण करताना "शिवसूत्रवार्तिकात" असे म्हटले आहे की –

**प्राप्तावत्र गुरु शक्तिरुपायः परमः स्मृतः।**
**यतः सा शाम्भवी शक्तिरनुग्रहकरी सदा ।।२.२३।।**
**उत्पाताद्रक्षितो जंतुः क्रियते भवनिस्पृहः।**
**तदधिष्ठितदेहोऽसौ नीयते सद्गुरुं प्रति ।।२४।।**
**वक्तृत्वात्तात्त्विकार्थानामुपेयपदलंभनात्।**
**गुरुरौन्मनसे धाम्नि विश्रांतिपथदर्शकः ।।२५।।**

स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीच्या बाबतीत कुंडलिनी शक्ती हीच सर्वश्रेष्ठ साधन आहे; कारण ही शांभवी म्हणजे शंभूशी एकरूप असलेली शक्ती परम अनुग्रह किंवा कृपा करणारी आहे. ज्यावेळी या शक्तीचा पात साधकावर होतो त्यावेळी ही शक्ती सर्व उत्पातांपासून त्याचे रक्षण करते व अनुग्रहीत साधकाला संसारापासून विरक्त बनविते. शक्तिपाताने शुद्ध झालेला साधक जेव्हा सद्गुरूंपुढे नेला जातो तेव्हा ते त्याला तत्त्वार्थ सांगून हवे असेल ते मिळवून देतात. या सर्व गोष्टींमुळे उन्मनी अवस्थेच्या घरापर्यंतच्या विश्रांतीचा मार्ग दाखविणारी अशी ही शक्तीच गुरू होय. श्रीवरदराजांनी आपल्या "शिवसूत्रवार्तिकात" याचा साररूप अर्थ सांगताना असे स्पष्ट केले आहे की –

**यद्वा गुरुः परा शक्तिरीश्वरानुग्रहात्मिका।**
**अवकाशप्रदानेन सैव यायादुपेयताम् ।।२.२६।।**

ईश्वरानुग्रहरूप परम शक्ती म्हणजेच गुरू होय. ती शक्तीच अवकाशदानाने म्हणजे आपले स्वतःचे पिंडब्रह्मांडाच्या रूपाने नटलेले स्वरूप सोडून देऊन शेवटी उपेयस्वरूप अर्थात् प्राप्तव्य वस्तू म्हणजे शिवस्वरूप होते.

हेच वस्तुसामर्थ्यशक्तीच्या प्रकटीकरणाचे सार आहे. वेदांनी हे सार मंत्ररूपाने प्रकट करताना असे म्हटले आहे की, " स घा नो योग आ भुवत् स राये स

पुरंध्याम् । गमद् वाजेभिरा स नः ।। ऋग्वेद १।५।३।। यस्मादृते न सिध्यति यज्ञो विपश्चितश्चन। स धीनां योगमिन्वति ।।ऋग्वेद १.१८.७।।" तो परमात्माच आम्हाला योग प्राप्त होण्यासाठी साहाय्य करो. त्याच्या कृपेने आम्हाला साधन किंवा समाधिधनाचा लाभ होवो. आपल्या सर्व सिद्धींच्या सामर्थ्यासह तो इकडे येवो. शक्तीच्या रूपाने मूलाधारात निद्रिस्त असलेला हा परमात्मा जागृत झाल्याशिवाय योग सिद्ध होत नाही व या योगाग्नीच्या साहाय्यावाचून ज्ञानी मनुष्याचाही अंतर्याग सिद्धीस जात नाही. हा सदसस्पती देव अर्थात् शक्तीच्या रूपाने जागृत झालेला परमात्मा साधकाच्या कर्मानुष्ठानाची म्हणजे साधनयज्ञाची पूर्णता घडवून आणतो. योगाशिवाय अंतर्यागाची म्हणजे शक्तिरूप अग्नी प्रदीप्त झाल्याशिवाय साधनयज्ञाची सिद्धी होऊ शकत नाही. हे सूत्र पकडून उपनिषदकारांनी "सर्वसिद्धिकरं मार्गं सुखदं वद ।। योग. शि. उ.।।१.२।।" अशी सर्व सिद्धींची व परम सुखाची प्राप्ती करून देणारा मार्ग आम्हाला सांगा म्हणून ब्रह्मदेवाच्या किंवा भवानीच्या मुखातून शंकरांना मागणी केली आहे. त्यावेळी शंकरांनी त्याचे उत्तर देताना असे म्हटले आहे की –

**नानामार्गैस्तु दुष्प्रापं कैवल्यं परमं पदम् ।।१.३।।**
**सिद्धिमार्गेण लभते नान्यथा पद्मसंभव ।।४।। योगशिखोपनिषत् ।।**

नाना प्रकारचे साधनमार्ग आहेत. त्यांपैकी कोणत्याही साधनमार्गाने परमश्रेष्ठ अशा कैवल्यपदाची प्राप्ती होऊ शकत नाही. हे ब्रह्मदेवा ! सिद्धिमार्गाने म्हणजे सिद्धयोगाच्या शास्त्रोक्त उपायानेच ते कैवल्यपद मिळू शकते. "ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत ।। छां. उ. १.१ ।।" म्हणजे उद्गीथाची अर्थात् ॐ या अक्षराची किंवा शब्दब्रह्माची उपासना करावी, "अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः प्रपंचोपशमः शिवोऽद्वैत एवमोंकार आत्मैव संविशत्यात्मनात्मानं य एवं वेद य एवं वेद।। मां. उ.१२।।" म्हणजे ॐकाराचा किंवा शब्दब्रह्माचा मात्राशून्यता हा चौथा पाद आहे. ही अमात्रक स्थिती व्यवहार्य नाही. हा पाद प्रपंचाचा उपशम करणारा असल्यामुळे या स्थितीत साधक निवृत्त होतो. ही स्थिती शिवरूप व अद्वैतरूप आहे. याप्रमाणे ॐकार आत्मा आहे, असे ज्याला ज्ञान होते, तो ओंकाररूपी आत्मा आत्मसाहाय्याने आत्मस्वरूपात प्रवेश करतो व "शतं चैका च हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका। तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्ङन्या उत्क्रमणो भवंति ।।कठ.उ. २.३.१६।। म्हणजे हृदयापासून निघून शरीरभर पसरणाऱ्या एकशेएक नाड्या किंवा शिरा आहेत. त्यातील सुषुम्ना नावाची नाडी मस्तकाचा भेद करून जाणारी आहे. तिच्या साहाय्याने वर जाणारा जीव अमृतत्त्व प्राप्त करून घेतो; पण इतर नानामार्गांनी जाणाऱ्या ज्या इतर शंभर नाड्या आहेत त्यांचे साहाय्य घेणारे जीव जन्ममरणाच्या चक्रात सापडतात. हे यमाने नचिकेताला दिलेले उत्तर म्हणजे उपासना किंवा

साधनरहस्याचे सार असून "तपोब्रह्मेति ।। तैत्तिरीय उप. ३.२.१ ।।" हे वरुणाने भृगूला दिलेले उत्तर व त्याचप्रमाणे " तपोऽतप्यत ।। ३.२.१।। " म्हणून भृगूने केलेली साधना हाच उपनिषदांचा अखेरचा सिद्धांत असून " तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व ।। ३.५.१।।" म्हणजे साधनाने ब्रह्म जाण हेच त्यांचे वारंवार सांगणे आहे. उपनिषदातील हे साधनाचे व योगाचे सूत्र स्पष्ट करताना डॉ. राधाकृष्णन् यांनी " भारतीय दर्शन, " खंड एक, मधील " उपनिषदोंका दर्शन " या प्रकरणात असे म्हटले आहे की, " उपनिषदोंके अनुसार एक उच्चतर शक्ति है जो हमें इस केंद्रिय आध्यात्मिक सत्ताको ग्रहण करने योग्य बनाती है। आत्मिक दृष्टिका विवेचन आध्यात्मिक दृष्टिसेही होना चाहिए। योगकी प्रक्रिया एक क्रियात्मक अनुशासन है जो इसकी प्राप्तीकी ओर निर्देश करती है। मनुष्यके अंदर दैवीय अंतर्दृष्टिकी योग्यता है, जिसे यौगिक अंतर्दृष्टि कहते है, जिसके द्वारा वह बुद्धिगत भेदोंसे उपर उठकर तर्ककी पहेलीको बुझा लेता है। विशिष्ट आत्मएं विचारके उच्च शिखरतक पहुंचकर आभ्यंतर निरीक्षणद्वारा परमार्थसत्ताको पा लेती है। इस आध्यात्मिक सिद्धिके द्वारा " जो निरीक्षण गोचर नहीं था वह श्रवणगोचर हो जाता है, जो अप्रत्यक्ष था वह प्रत्यक्ष हो जाता है और जो अज्ञात था वह ज्ञानकोटिमें आ जाता हे। " ( छांदोग्य ६.१३, बृहदारण्यक २–४–५ ) जिस क्षण हम तर्कसे ऊपर उठकर धार्मिक जीवन व्यतीत करना प्रारंभ करते हैं, बुद्धिकी सब समस्याएं स्वयं अपने समाधान आपसे कर लेती हैं ( मुंडक ३–१,८ ) इसीलिए उपनिषदें हमें आदेश देती हैं कि हमें बुद्धि एवं आत्मचेतनासंबंधी अपने गर्वको एक ओर रखकर एक शिशुके समान नवीन एवं निरुपाधिक दृष्टिकोणसे सत्यको प्राप्त करना चाहिए। " ब्राह्मणको विद्याको छोडकर एक बच्चेकी भांति शुद्धचित्त बन जाना चाहिए। " (बृहदारण्यक ३:५,१ ) बिना पहले एक छोटे बच्चेका रूप धारण किए कोई मनुष्य ईश्वरके राज्यमें प्रवेश नहीं पा सकेगा। निश्चल और शुद्धचेता बडेसे बडे सत्यको प्राप्त कर लेते हैं जिन्हें व्यवहारकुशल बुद्धि सिद्ध नहीं कर सकती। " बहुत शब्दो (वाग्जाल ) के पीछे नहीं पडना चाहिए; क्योंकि उससे व्यर्थमें वाणीको श्रम करना पडता है। " ( बृहदारण्यक ४.४.२१ ) " अध्ययनसे आत्माकी प्राप्ती नहीं होती, मेधासेभी नहीं और पुस्तकोंके बहुत अधिक ज्ञानसेभी नहीं। " ( कठो. ५-२३ ) इसे योगी लोग आभ्यंतर ज्योतिके प्रकाशके क्षणोंमें प्राप्त करते हैं। यह अव्यवहित ज्ञान अथवा निकटतम तात्कालिक अंतर्दृष्टि है। योगी लोगोंके अनुभवमें आत्मा अपनेको सर्वोपरि सत्ताके सान्निध्यमें उपस्थित पाती है। यह अभिज्ञता, चिंतन और परमसत्ताके सुखमें मग्न हो जाती है। उसके समीप पहुँचकर यह अपने अस्तित्वको भी भूल जाती है। इससे ऊंचा और कुछ नहीं है और सब वस्तुएं इसके अंदर सन्निविष्ट है।" (पृ.१६१,१६२)

उपनिषदांचे हे साधनसूत्र पकडून शैव संप्रदाय, त्रिकदर्शन, प्रत्यभिज्ञादर्शन स्पंदशास्त्र इत्यादि सर्व कट्टर अद्वैतवेदांती दर्शनांनी शिवशक्तियुक्त अद्वैततत्त्वाचा स्वीकार करून गुरुकृपेने होणाऱ्या शक्तिपाताने आत्मशक्ती कुंडलिनी जागृत करून तिचे सुषुम्नामार्गाने होणाऱ्या ऊर्ध्वचालनाचा व तद्द्वारा शिवशक्तीच्या ऐक्याचा विचार प्रसृत केला. "प्रत्याभिज्ञाहृदयाच्या" आरंभी श्रीक्षेमराजांनी साधनाचाच विचार मांडताना असे म्हटले आहे की, "या जगात जे जीव, भक्त किंवा साधक अपरिपक्व बुद्धीचे आहेत, ज्यांनी तीक्ष्ण तर्कशास्त्राचा अभ्यास केला नाही; परंतु जे परमेश्वरस्वरूप गुरुकृपेने होणाऱ्या शक्तिपातदीक्षेने किंवा अनुग्रहाने उत्पन्न होणारे शिवैक्य किंवा परमेश्वराशी होणाऱ्या सामरस्याची इच्छा करतात अशा भक्तांना ईश्वराचे प्रत्यभिज्ञान म्हणजे पुन: जाणीव किंवा प्राप्ती करून देणाऱ्या उपदेशावर म्हणजे साधनावर प्रकाश टाकण्यासाठी मी हे शास्त्र प्रकट करीत आहे." आणि उपरोक्त ग्रंथाच्या शेवटीही ते म्हणतात, "ज्यांना शांकर शक्तिपात झाला आहे म्हणजे ज्यांच्या ठिकाणी भगवान् शंकराच्या अनुग्रह शक्तीचे अवतरण होऊन ज्यांची कुंडलिनी शक्ती जागृत झाली आहे; परंतु जे लोक, साधक किंवा जीव अनभ्यासामुळे तीक्ष्ण तर्काचा अवलंब करण्यास असमर्थ असतात व त्यामुळे जे ईश्वराचे प्रत्याभिज्ञान म्हणजे जाणीवपूर्वक किंवा अनुभूती-पूर्वक प्राप्ती करू शकत नाहीत, त्यांच्यासाठी हा प्रत्यभिज्ञा साधनाचा किंवा तत्त्वाचा उपदेश मी केला आहे."

"स्पंदशास्त्रावर" टीका लिहिताना श्रीभट्टकल्लटाने सिद्धयोगसाधनाची महती व आवश्यकता सांगताना उपरोक्त सूत्राचाच अवलंब करून असे म्हटले आहे की, "सात मजली महालावर जाण्यासाठी ज्याप्रमाणे जिन्याची किंवा नदी पार करून जाण्यासाठी नावेची नितांत अवश्यकता असते त्याचप्रमाणे भगवंताच्या प्राप्ती-साठी सिद्धयोगसाधनाची अर्थात् शक्तिपाताची नितांत आवश्यकता आहे. त्यामुळेच सिद्ध व साधारण पुरुषांमध्ये एक विलक्षण संबंध प्रस्थापित होतो. या संबंधाशिवाय साधारण पुरुषाला यथार्थ तत्त्वाची अनुभूती कदापीही होऊ शकत नाही. हे तत्त्व केवळ श्रद्धागम्य, दृष्टीच्या पलीकडे असलेले किंवा अदृश्य असे परोक्ष तत्त्व नसून स्वत:ला अनुभवाला येणारे असे प्रमाणभूत तत्त्व आहे. हाच शक्तितत्त्वाचा परमेश्वर म्हणजे आत्म-चिंतामणी आहे. हे तत्त्वच जाणावयाचे असल्याने त्यासंबंधी विचार, मनन व त्याच्या प्राप्तीच्या साधनाची चर्चा करणे आवश्यक आहे. सिद्धयोग साधन हा चिंतामणी आहे; कारण साधकाला तत्काल स्वानुभूती प्राप्त करून देणाऱ्या या साधनाइतके श्रेष्ठ असे दुसरे साधन या भूतलावर नाही, असा शास्त्रकारांनी उद्घोष केला आहे. यादृष्टीने "पौष्कर संहितेत" असे म्हटले आहे की–

**चिंतामणौ स्वरूपेण न किंचिदुपलभ्यते ।**
**अथ चाभिमतं सूते ब्रह्मैवं सर्वशक्तिकम् ।।**

चिंतामणी प्राप्त झाल्यावर खरे पाहता कोणत्याही वस्तूची प्राप्ती होत नाही; परंतु आपण जी इच्छा करू त्याची प्राप्ती चिंतामणी करून देत असतो. हा चिंतामणी सर्व शक्तिमय ब्रह्मच आहे.

सिद्धयोगाचे साधन हे असेच चिंतामणिस्वरूप असल्याने त्या साधनामुळे साधकाच्या सर्व इच्छा पूर्ण होतात व हे साधन सर्वशक्तिमय असे साध्यरूप असल्याने साधकाला परब्रह्माचीही प्राप्ती होते. "परमार्थसार" या ग्रंथातही साधक भावनेने जे जे साधन करतो ते ते शेवटी सिद्धयोगसाधनरूप अंतरंग चिंतामणीत परिणत होऊन त्याची प्रगती कशी होते हे सांगताना असे म्हटले आहे की–

**सर्वाकारो भगवानुपास्यते येन येन भावेन ।**
**तं तं भावं भूत्वा चिंतामणिरिव समभ्येति ।।**

महायोगी गोरक्षनाथांनी वेद, उपनिषदे व शैव सांप्रदायिक ग्रंथांप्रमाणेच योगबीज, योगमार्तंड, अमनस्कयोग, सिद्धसिद्धांतपद्धती, गोरक्षपद्धती, गोरक्षशतक, महार्थमंजिरी इत्यादि आपल्या प्रसिद्ध ग्रंथात पोकळ शास्त्रचर्चा निरर्थक मानून श्रीगुरुकृपालब्ध शक्तिपाताने होणाऱ्या आत्मसाक्षात्काराचे अलौकिक वर्णन केले आहे. "योगमार्तंड, गोरक्षपद्धती व गोरक्षशतक" या तीन ग्रंथांच्या सुरुवतीलाच पुढील दोन श्लोक लिहून सिद्धयोगाचा महिमा त्यांनी कथन केला आहे. ते म्हणतात—

**एतद् विमुक्तिसोपानमेतत्कालस्य वंचनम् ।**
**यद् व्यावृतं मनो मोहादासक्तं परमात्मनि ।।४।।**
**द्विजसेवितशाखस्य श्रुतिकल्पतरोः फलम् ।**
**शमनं भवतापस्य योगं भजति सज्जनः ।।५।।**

सिद्धयोग हा मुक्तीचा जिना आहे. त्यामुळे साधक मृत्यूला ओलांडून पलीकडे जातो. या साधनामुळेच मन मोहापासून मुक्त होऊन परमात्मस्वरूप होते. हे साधन म्हणजे वेदांचे फल आहे. ज्यांचा साधनप्राप्तीमुळे दुसरा जन्म झाला आहे ते या सिद्धयोगरूप कल्पवृक्षाच्या शाखांवर बसल्यामुळे त्यांच्या भवरोगाची शांती होते म्हणजे ते जन्ममरण परंपरेतून सुटतात. "सिद्धसिद्धांतपद्धतीत" "कथनात् शक्तिपातात् वा ।।५.६५।।" म्हणून स्पष्टच साधनाचा निर्देश करून सिद्धयोगसाधनाचा महिमा सांगताना त्यांनी असे म्हटले आहे की–

**एतत् शास्त्रं महादिव्यं रहस्यं पारमेश्वरम् ।**
**सिद्धांतं सर्वसारस्य नानासंकेतनिर्णयम् ।।६.९७।।**

**सिद्धांना प्रकटं सिद्धं सद्यः प्रत्ययकारकम् ।**
**आत्मानंदकरं नित्यं सर्वसंदेहनाशनम् ।।९८।।**

स्वरचित "महार्थमंजिराच्या" पहिल्या श्लोकावर टीका करताना महायोगी गोरक्षनाथांनी सिद्धयोगसाधनाच्या सकलसाररूप विषयाचे उद्घाटन करताना असे म्हटले आहे की–

**सा स्फुरत्ता महासत्ता देशकालाविशेषिणी ।**
**सैषा सारतया चोक्ता हृदयं परमेष्ठिनः ।।**

महासत्ता कुंडलिनी ही देशकालाने अपरिच्छिन्न असे स्वस्वरूपाचे सद्रूप स्फुरण आहे. ही सत्ता हेच सर्वांचे सार असून परमेष्ठी ब्रह्मदेवाचे हृदयसर्वस्व-रहस्य आहे. हे स्फुरण गुरुरूपच जाणावे; कारण ते सर्वांवर अनुग्रह करते. असा प्रकाशक नसता तर सर्व सृष्टी अर्थात् जीव अंधत्व व बधिरत्व पावले असते. "श्रीशिवसूत्रात" 'गुरू हा उपाय म्हणजे श्रेष्ठ साधन आहे,' असे म्हटले आहे. त्याच्या चरणामुळे म्हणजे जागृत शक्तीमुळे साधकाला ज्ञानक्रियाशक्तिरूप स्वातंत्र्य मिळते. असे म्हणून या सिद्धयोगमार्गाला नमस्कार करताना ते म्हणतात–

**सर्वशंकाशनिं सर्वालक्ष्मीकालानलं तथा ।**
**सर्वमंगल्य कल्पांतं मार्गं माहेश्वरं नुमः ।।**

या माहेश्वरपंथाला नमस्कार असो. हा मार्ग सर्व शंकारूपी पर्वताला वज्रा-सारखा, सर्व अनैश्वर्य–निःश्रीक गोष्टींना अग्नीसारखा व सर्व अमंगल गोष्टींना प्रलयकालासारखा नाहीसा करतो.

इतके सांगून महायोगी गोरक्षनाथ म्हणतात, "आमच्या रूपात समाविष्ट अशा आत्म व अनात्म वस्तूंच्या निवारणासाठी श्रीशिवाने स्वशक्तीचा उपयोग करावा व जगन्मंगल करावे. मला अनवच्छिन्न प्रकाशानंद परमार्थस्वातंत्र्यलक्षणाची स्थिती सद्गुरूच्या कृपेने शक्तिपात झाल्यामुळे प्राप्त झाली. या दीक्षेमुळे माझ्या चित्तातील सर्व मल नष्ट होऊन मी महामंगलाभिषेकाने युक्त झालो व उपनिषदादि सर्व शास्त्रात प्रवीण झालो....तंत्रालोकात म्हटल्याप्रमाणे जे लोक सिद्धयोगशास्त्र सोडून अन्य उपायाने आत्मरूप जाणण्याची इच्छा करतात ते सूर्याला पाहण्यासाठी काजव्याकडे धावणाऱ्या अज्ञानीजनांप्रमाणे समजावेत व श्रीकुलकमलात म्हटल्या-प्रमाणे शाक्ततेजोरहित मार्गाचा अवलंब करणारे लोक म्हणजे अग्निरहित कुंडात हवन करणाऱ्या याज्ञिकांसारखेच होत" अशा प्रकारे सिद्धयोग साधनेचा महिमा सांगून त्याच ग्रंथात या साधनाची सर्वतोपरी अपरिहार्यता प्रकट करताना ते म्हणतात–

**सर्वोपायपरिक्षीणास्ते महार्थार्थिनः किल ।**
**अस्ति नान्यां गतिस्तेषां विकल्पग्राससाहसात् ।।**

सर्व प्रयत्न करून भागलेले लोक या प्रक्रियेचे पायिक होतात. तसेच विकल्पांनी ज्यांचे साहस खलास झाले किंवा केले आहे त्यांना सिद्धयोगाशिवाय किंवा शक्तिपाताशिवाय दुसरा मार्ग किंवा गती नाही.

येथपर्यंत सिद्धयोगसाधनाची महती व अपरिहार्यता स्पष्ट करण्याचे कारण, ज्या "भाष्यकारांते वाट पुसतु ॥१८.१७२३॥" म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज गेले आहेत; ते आपण मागे पाहिल्याप्रमाणे त्यांचे गुरू श्रीनिवृत्तिनाथमहाराज व ज्यांचा त्यांनी विषयविध्वंसैकवीरू म्हणून उल्लेख केला ते महायोगी गोरक्षनाथ असून "एक शिष्य एक गुरु। हा रूढला साच व्यवहारु ॥१८.१२२६॥" या न्यायाने त्यांना जे परंपराप्राप्त ज्ञानसाधन मिळाले किंवा समाधिधन प्राप्त झाले त्याचाच उद्‌घोष त्यांनी ज्ञानेश्वरीत सांगोपांग, आद्योपांत व सर्वार्थाने केला आहे, हे स्पष्ट व्हावे हेच आहे. त्याचप्रमाणे श्रीशंकराचार्यांचेच तत्त्वज्ञान व तेही गीताभाष्यापुरतेच मर्यादित होऊन महाराष्ट्रातील बहुतेक सर्व विद्वानांनी व वारकरी संप्रदायातील थोर भक्तांनी स्वीकारून ज्ञानेश्वरीचा जो अर्थ स्पष्ट केला आहे व त्यातील तत्त्वज्ञानाचा ऊहापोह केला आहे, त्याच्याकडे पाहण्याची दृष्टी बदलावी हाही या विवेचनाचा हेतू आहे. एरवी श्रीशंकराचार्यांनी गीताभाष्यात ज्या सांख्यनिष्ठेचा किंवा ज्ञानयोगसाधनेचा अवलंब करून आपली टीका लिहिली आहे त्याचे साधक वर "प्रत्यभिज्ञाहृदयात" म्हटल्याप्रमाणे तीव्र तर्ककुशलतेचा अवलंब करणारे महान् बुद्धिमान व "एकु ज्ञानयोगु म्हाणिजे। जो सांख्यीं अनुष्ठिजे। जेथ ओळखीसवें पाविजें। तद्रूपता ॥३.३६॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे जन्मजन्मांतरी केलेल्या साधनाने ज्यांचा आधार पक्का आहे म्हणजे ते शुद्धचित्त, शुद्धदेही व शुद्धबुद्धियुक्त असे विरळ साधक आहेत, हे लक्षात घेतले पाहिजे. असे हे विरळ साधन विरळ साधकांकरिता कथन केलेले असल्यामुळे व श्रीज्ञानेश्वरमहाराजांची दृष्टी कळीकाळाने गिळणाऱ्या जीवांची निकृष्टतम स्थिती पाहून गुर्वाज्ञेने त्यांना त्यापासून वर काढण्यासाठी करुणेने, दयार्द्रतेने व कृपेने आप्लवित झाल्याने "तैसा सांख्याहूनि प्रांजळा। आम्हांसारिखियां अभोळां। एथ आहाती परि कांहीं काळा। तो साहों ये वर ॥५.१६६॥" असे अर्जुनाच्या मुखात शब्द घालून व "तरी जाणां नेणां सकळा। हा कर्मयोगु कीर प्रांजळा। जैसी नाव स्त्रियां बाळा। तोयतरणी ॥५ १६॥" असे म्हणून सिद्धयोगाचा अत्यंत सोपा मार्ग त्यांनी कथन केला आहे. यावरून हे स्पष्ट होते की, श्रीशंकराचार्यांच्या गीताभाष्याप्रमाणे ज्ञानयोगाची सांख्यदृष्टी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतेचा भावार्थ स्पष्ट करताना राबविली नसून ती उपरोक्त विवेचनाप्रमाणे वेदोपनिषदोक्त परात्पर गुर्वोक्त व "ज्ञानदेव म्हणे मी चाडें। सद्‌गुरूंनी केलें कोडें। माथां हात ठेविला तें फुडें। बीजचि वाइलें ॥६.४९२॥" अशा महायोगी गोरक्षनाथांप्रमाणेच सद्‌गुरूंकडून

स्वतःला शक्तिपातयोगदीक्षाप्रसादाने प्राप्त झालेल्या ज्ञानसंपन्नतेने विशाल बनलेल्या व आत्मसंवितेच्या अलौकिक स्फुरणाने निखिल आगमनिगम–शास्त्रांच्या ज्ञानप्रवाह-स्पदांना आपल्या प्रातिभज्ञानात समाविष्ट करून सिद्धयोगाचे दर्शन ज्ञानेश्वरीच्या रूपाने सहजतेने उभवून सामरस्याच्या राउळात महासुखाची दिवाळी सर्व जगाला करता यावी अशी सोय करून देणाऱ्या साधन-कथनाची दृष्टी राबविली आहे.

अशा प्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत सिद्धयोगाचेच सर्वतोपरी दर्शन घडविले आहे. हा सिद्धांत प्रस्थापित करण्यामध्ये आपली दृष्टी बलत्काराने त्या ग्रंथावर आपल्याला काही एक वाटते म्हणून लादून, त्यातून पाहिजे तो निष्कर्ष आपल्या बुद्धीने काढून, तो लोकांपुढे मांडण्याचा नसून, माझे परम सद्‌गुरू महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांनी आसेतुहिमाचल पसरलेल्या भारतवर्षातील शत शत लोकांना शक्तिपातदीक्षा देऊन कृतार्थ कसे केले हे प्रत्यक्ष पाहून व स्वतः अनुभवून, त्यांनी दिलेल्या दृष्टीचा हा परिपाक म्हणून हे कथन केले आहे. हा सिद्धांत प्रस्थापित करताना वर मांडलेल्या तत्त्वज्ञानाच्या व मार्गांच्या मतभेदाचे निराकरण जसे आवश्यक आहे, तसे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "दात व नखे नवी येऊन बाळदशा पुन्हा प्रकट होणे, डोळे तेजस्वी होणे, देह सुवर्ण कांतीचा होणे, साधकाला दूरश्रवणादि सिद्धी प्राप्त होणे" इत्यादि जी लक्षणे या साधनामुळे दिसतात ती सगळ्या साधकांना अनुभवाला येत नाहीत म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे साधन काही निराळे होते, ते सध्याच्या शक्तिपातसाधनासारखे नव्हते किंबहुना सहाव्या अध्यायापुरतेच मर्यादित असे त्यांनी हे साधन कथन केले आहे, असे जे आक्षेप कै. अप्रबुद्धांपासून तो तहत आजपर्यंत अनेकांनी घेतले आहेत ते दूर करणेही आवश्यक आहे. कै. अनंतदास रामदासीकृत "दासबोध प्रबोध" या ग्रंथाला लिहिलेल्या प्रस्तावनेत कै. अप्रबुद्ध यांनी असे म्हटले आहे की, "कुंडलिनी जागृत झाल्यावरोबर श्रीज्ञानेश्वरांनी म्हटल्याप्रमाणे शारीरिक परिणामांचे अनुभव आले पाहिजेत." या आक्षेपाचे उत्तर असे आहे की, सिद्धयोगाचे किंवा शक्तिपातयोगाचे साधन करणाऱ्या साधकांना आपल्या शरीरात बदल झाल्याचे, शरीर शुद्ध झाल्याचे, नाडीशुद्धी झाल्याचे, ॐकाराचा जप आतून आपोआप होत असल्याचे व नाना तऱ्हेच्या देवदेवतांची दर्शने होत असल्याचे अनुभव सरसकट येतात; परंतु आधार, संस्कार इत्यादि भेदांमुळे सर्वच अनुभव सर्व साधकांना येत नाहीत. या अर्थानेच महर्षी नारदांनी आपल्या भक्तिसूत्रात "प्रकाश्यते क्वापि पात्रे ॥५३॥" असे अत्यंत महत्त्वाचे सूत्र ग्रंथित केले आहे. याचा अर्थ असा की, भगवंताची कृपा गुरुरूपाने जेव्हा शक्तिपात होऊन शिष्याच्या ठिकाणी संक्रमित होते तेव्हा शिष्याच्या पात्रतेनुसार व अधिकारभेदानुसार निद्रा, मूर्च्छा, घूर्णादि सर्वसामान्य लक्षणे प्रकट होऊन पुढे त्यांचा क्रमशः विकास होतो. मात्र सर्वच्या सर्व लक्षणे क्वचितच एखादा महान् पुरुषाच्या ठिकाणी प्रकट झालेली

दिसतात. औषध दिल्याबरोबर शास्त्रात सांगितल्याप्रमाणे रोग्याला गुण आला नाही किंवा अल्पप्रमाणात आला अगर ज्योतिषाने ग्रहमान पाहून काही अनुष्ठान सांगितल्यावर त्याचे फल तत्काल मिळाले नाही किंवा अंशत: मिळाले तर ज्याप्रमाणे ही शास्त्रे व त्या शास्त्रांचा वापर करणारे खोटे व त्याज्य ठरत नाहीत; त्याप्रमाणेच शक्तिपातयोगाचे साधन मिळाल्यावर नुसती भस्त्रिका झाली, आसने झाली, घूर्णा झाली, निद्रा आली, देवदेवतांची दर्शने झाली अशी सामान्य लक्षणेच प्रकट झाली व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेली असामान्य लक्षणे लगेच प्रकट झाली नाहीत म्हणून हे शास्त्र खोटे ठरत नाही. असे जर मानले नाही तर सर्व शास्त्रे खोटी ठरतील व निरपवाद फले दृष्टीस न पडल्याने त्यांचा वापर करणारे मूर्ख ठरतील. अनुभूतीने व चिरकाल अभ्यासाने ज्या गोष्टीची सिद्धी व्हावयाची ती केवळ विचारांच्या अगर बुद्धीच्या निकषावर घासून पाहिली की, अशा प्रकारच्या आक्षेपांचा वर्षाव होतो; परंतु या सर्व आक्षेपकांना "जैसा वायसी चंद्र नोळखिजे। तैसा प्राकृती हा ग्रंथु नेणिजे।।६.२९।।"म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीच उत्तर दिले आहे. त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरीत सांगितलेली शक्तिपाताची सर्व लक्षणे साधकांच्या ठिकाणी एकसमयावच्छेदेकरून प्रकट झाली पाहिजेत असा आग्रह धरला तर "इये अभ्यासीं जे दृढ होती। ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती ।।६.३३०।। आम्हीं साधन हें जें सांगितलें। तेंचि शरीरीं जिहीं केलें। ते आमुचेनि पाडें आले। निर्वाळलेया! ।। ६.३२६ ।। येऱ्हवीं अभ्यासाचा उचलता। पाउलीं जरी चालता। तरी दिवसाआधीं ठाकिता। सोऽहंसिद्धीतें।। ६.४३९ ।।" व " जें चालणें वेगावत जाये। तो वेगु बैसावयाचि होये ।।१८.१५४।।" हे सांगण्याचे व "परी वोखद घेतखेंवो। काय लाभे आपुला ठावो?। कां उदयतांचि दिवो। मध्यान्ह होय?।।१८.९९८।। सुक्षेत्रीं आणि वोलटें। बीजही पेरिलें गोमटें। तरी अलोट फळ भेटे। परी वेळें कीं गा ।।९९९।। जोडला मार्ग प्रांजळु। मीनला सुसंगाचाही मेळु। तरी पाविजे वांचूनि वेळु। लागेचि कीं ।।१०००।।"असे म्हणण्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांना कारण पडले नसते. पण ज्या अर्थी ते हे सांगतात त्या अर्थी "भक्तिसूत्रात" "प्रतिक्षणवर्धमानमविच्छिन्नं सूक्ष्मतरमनुभवरूपम् ।।५४।। ' असे महर्षी नारदांनी सांगितल्याप्रमाणे प्रतिक्षणाला वाढणारे, अखंड, सूक्ष्मातील सूक्ष्म व अनुभवगम्य असे सिद्धयोगोपलब्ध भक्तियोगसाधनाचे स्वरूपच खरे आहे हे नि:संशयपणे सिद्ध होते.

वरील सर्व विवेचनावरून उपरोक्त आक्षेपांचे वैय्यर्थ सिद्ध होते. येथे एक गोष्ट स्पष्ट करावीशी वाटते की, श्रीमदाद्यशंकराचार्यांचे सौंदर्यलहरी, शतश्लोकी इत्यादि ग्रंथ पाहिले म्हणजे त्यांनीही शक्तिपातयोगसाधनच सामान्य जनांकरित कसे प्रकट केले आहे हे लक्षात येते. "सौंदर्यलहरीवरील" प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामी-

महाराज यांनी केलेली विस्तृत टीका व "शक्तिपाताने आत्मसाक्षात्कार अर्थात्-दैवी शक्तीचे संक्रमण" या लेखात महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांनी शत-श्लोकीच्या श्लोकातील स्पष्ट केलेला भावार्थ पाहिला म्हणजे हे स्पष्ट होईल. विस्तारभयास्तव त्याचे येथे अधिक विवेचन करीत नाही. गीताभाष्यातही "तत्त्वज्ञानेन मायाया बाधो नान्येन कर्मणा।" हे सूत्र प्रतिपादित चाललेले श्रीशंकराचार्य "जायते शक्तिपातेन वाक्यादेवाधिकारिणाम् ।।" हे "सूतसंहितेतील" वचन अंतर्निहित करण्यास विसरलेले नाहीत हे त्यांचे भाष्य सूक्ष्मपणे वाचलेल्यांना प्रतीत होईल. "ततो वक्ष्यामि ते हितम् ।।१८.६४।। गीता ।।" यावर भाष्य करताना "ततस्तेन कारणेन वक्ष्यामि कथयिष्यामि ते हितं परं ज्ञानप्राप्तिसाधनम्। तद्धि सर्वहितानां हिततमम् ।।" असेच त्यांनी स्पष्ट केले आहे. त्या कारणाने मी तुला हित म्हणजे सर्वश्रेष्ठ ज्ञानप्राप्तीचे साधन सांगेन; कारण ते ज्ञानप्राप्तीचे साधन सर्व हितकर साधनांमध्ये हितकर आहे. असा जेव्हा ते खुलासा करतात तेव्हाच त्याना काय सांगावयाचे आहे ते स्पष्ट होते. सारांश, उपरोक्त सर्व विवेचनाची विचारधारा लक्षात घेतली म्हणजे तात्त्विक, नैतिक किंवा कर्म, ज्ञान भक्ती इत्यादि भिन्नभिन्न साधनांची खिचडी असलेला एक ग्रंथ म्हणजे ज्ञानेश्वरी होय ही समाजात बद्धमूल झालेली दृष्टी नाहीशी होऊन हा ग्रंथराज म्हणजे सिद्धयोगसाधनाच्या अंगोपागांनी सजलेला व सर्व आगमनिगमकल्पतरूंचे जणू काही फल असलेला एकरसपूर्ण सहजसुंदर आविष्कार आहे असे सिद्ध होईल.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांना ज्ञानेश्वरीत सिद्धयोग साधनाचेच कथन करावयाचे असल्यामुळे त्यांनी या साधनाला चिंतामणी संबोधून त्याचा सर्वश्रेष्ठ गौरव केला आहे. ते म्हणतात—

> कां चिंतामणी जालियां हातीं। सदा विजयवृत्ति मनोरथीं।
> तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ती। ज्ञानदेवो म्हणे ।।१.२४।।
> तैसें शब्दाचें व्यापकपण। देखिजे असाधारण।
> पाहातयां भावज्ञां फावती गुण। चिंतामणीचे ।।६.२१।।
> परि तो अंधारी चिंतामणि देखिला। जेवीं नव्हे या बुद्धी उपेक्षिला।
> पाठीं दिनोदयीं वोळखिला। होय म्हणौनि ।।१०.१६१।।
> चिंतामणीची खाणी लागली। तेणें करें वोढाळें वोल्हांडिली।
> तैसी तुझी अवळिक धाडिली। सांगातीपणें ।।११.५४०।।
> जिया अमृतलेशालागीं सायास। तयाचा पाऊस केला चारी मास।
> पृथ्वी वाहून चासेचास। चिंतामणी पेरिले ।।११.५८२।।
> दैवें चिंतामणी लेईजे। कीं हें ओझें म्हणोनि सांडिजे ?।
> कामधेनु दवडिजे। न पोसवे म्हणौनि ? ।।११.६२६।।

आणि मुखांतरीं आडकिजे । तैसें कायसें हें ओझें ।
मी चिद्रत्न तुझें । असतां हातीं ॥१८.२८२॥

चिंतामणी हाती आल्यावर जसे सर्व मनोरथ पूर्ण होतात त्याप्रमाणे श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी सिद्धयोगाची शक्तिपात दीक्षा देऊन कृपा केल्यामुळे माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत. अर्जुनही श्रीकृष्णांना चिंतामणी म्हणतो व श्रीकृष्णही अर्जुनाला मी चिद्रत्न आहे असेच सांगतात. याचा अर्थ असा की, "गुरुरुपायः ॥ शिवसूत्र २.६ ॥" व "श्रीगुरुनाथस्य सर्वं कारणकारणम् ॥ काश्यपसूत्र १५ ॥" ही दृष्टीच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुरू हाच उपाय व तोच सर्व कारणांचे कारणस्वरूप चिंतामणी म्हणजे सिद्धयोगसाधनरूप होय, हे सांगून स्पष्ट केली आहे. सिद्धयोगसाधन हे चिंतामणिस्वरूप आहे एवढे सांगून समाधान न झाल्याने अपूर्ववल्ली, अद्‌भुतलहरी, असामान्यदीप, अलौकिक नाव, अमृतासम दिव्य औषधी, अमृताचा समुद्र, सोन्याचा डोंगर, चंद्र, कल्पतरू, कामधेनू इत्यादि विविध उपमानांच्या आधाराने त्यांनी ज्ञानेश्वरीत या साधनाच्या महिम्याचा सडा शिंपला आहे आणि ज्यावेळी गीतेतील प्रत्येक श्लोकातील भावार्थ सिद्धयोगाच्या दृष्टीने उपरोक्त पद्धतीने वर्णन करताना त्याची परिसीमा गाठली गेली आहे तेव्हा हे सिद्धयोगसाधन साध्यात कसे परिणत होते याची प्रक्रिया वर्णन केल्याशिवाय त्यांना राहविले नाही. "वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो ॥१५.१५॥ गीता ॥" याचा भावार्थ स्पष्ट करता करता शक्तिपातामुळे अर्जुनाच्या ठिकाणी बोध एकाएकी कसा प्रकट झाला हे सांगताना ते म्हणतात—

ऐसी जडाजडव्याप्ती । रूप करितां कैवल्यपती ।
ठी केली निरूपहितीं । आपुल्या रूपीं ॥१५.४४२॥
तो आघवाचि बोधु सहसा । अर्जुनीं उमटला कैसा ।
व्योमींचा चंद्रोदयो जैसा । क्षीरर्णवीं ॥४४३॥
कां प्रतिभितीं चोखटे । समोरील चित्र उमटे ।
तैसा अर्जुनें आणि वैकुंठें । नांदतसे ॥४४४॥

आकाशातील चंद्राचे क्षीरसमुद्रात प्रतिबिंब पडावे व एका भिंतीवरील चित्राचे दुसऱ्या भिंतीवर एकदम प्रतिबिंब उमटावे त्याप्रमाणे श्रीकृष्णांनी जडचेतनरूप अर्जुनरूपी जीवावर शक्तिपात करून जडचेतनभेद एका क्षणात उपस्थित करून सर्व बोध एकदम त्याच्या ठिकाणी प्रकट केला. हाच सिद्धयोग साधनेचा महिमा आहे हीच या साधनाची अपूर्वता आहे. "सहजें ब्रह्मरसाचें पारणें । केलें अर्जुनालागीं नारायणें ॥६.२॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विविधरूपाने हा महिमा व ही अपूर्वता कशी प्रकट केली आहे ते यापुढे पाहवयाचे आहे.

**कल्पनातीत साधनः—**

सिद्धयोगाचे साधन हे कल्पनातीत साधन आहे; कारण साधनामुळे प्राप्त होणारे साध्य हे ज्या पातळीचे, लायकीचे, किंमतीचे किंवा उंचीचे असते त्याप्रमाणे त्याचे साधन असणे आवश्यक असते. साध्यप्राप्तीच्या दर्जाचे साधन नसेल तर साध्याची प्राप्ती असंभव होते व अपेक्षित फलनिष्पत्ती न होता निराशा पदरी येते. स्वसंवेद्य आत्मरूप किंवा शिवशक्तियुक्त ब्रह्म हे कल्पनातील तत्त्व असून ते इतर कोणत्याही उपायांनी प्राप्त होणे शक्य नाही हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

मज अकुळाचें कुळ वानिती । मज नित्याचेनि निधनें शिणती ।
मज सर्वांतरातें कल्पिती । अरि मित्र गा ॥९.१६६॥
मी स्वानंदाभिरामु । तया मज अनेक सुखांचा कामु ।
आघवाचि मी असे समु । कीं म्हणती एकदेशी ॥१६७॥
मी आत्मा एक चराचरीं । म्हणती एकाचा कैपक्ष करीं ।
आणि कोपोनि एकातें मारीं । हेंचि वाढविती ॥१६८॥
किंबहुना ऐसें समस्त । जे हे मानुषधर्म प्राकृत ।
तयाचि नांव मी ऐसें विपरीत । ज्ञान तयांचें ॥१६९॥
तेवीं मी म्हणौनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची ।
तिहीं चंद्रासाठीं जेवीं जळींची । प्रतिमा धरिली ॥२.१५०॥
तैसा कृतनिश्चयो वायां गेला । जैसा कोण्ही एकु कांजी प्याला ।
मग परिणाम पाहों लागला । अमृताचा ॥१५१॥
तैसें स्थूलाकारीं नाशवंतें । भरंवसा बांधोनि चित्तें ।
पाहती मज अविनाशातें । तरी कैंचा दिसें ? ॥१५२॥
अगा काई पश्चिमसमुद्राचिया तटा । निघिजत आहे पूर्वीलिया वाटा ।
कां कोंडा कांडतां सुभटा । कणु आतुडे ? ॥१५३॥

परमात्मा कल्पनेच्या पलीकडे असून तो इतर कोणत्याही उपयांनी जाणणे म्हणजे कांजी पिऊन अमृताचा परिणाम पाहण्यासारखे, पश्चिमसमुद्राच्या तटाला पोहोचण्यासाठी पूर्वेकडे निघण्यासारखे व कोंड्यात अन्नाचे कण शोधण्यासारखे निष्फल आहे. यासाठी कल्पनातीत साधनाचीच आवश्यकता आहे; कारण ब्रह्म हे कल्पनातीत तत्त्व असल्यामुळे कल्पनांतर्गत येणाऱ्या साधनांनी ब्रह्मप्राप्ती होणे केवळ अशक्य आहे. अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाचे कल्पनातीत साधन देणाऱ्या सद्‌गुरूंची स्तुती व जयजयकार करताना असे म्हटले आहे की—

जयजय देव श्रीगुरो। अकल्पनाख्यकल्पतरो।
स्वसंवित्द्रुमबीजप्ररो–। हणावनी ॥१८.१०॥

हे देवा श्रीगुरुराया! कल्पनातीत म्हणून प्रसिद्ध असलेली ब्रह्मवस्तू आपण कल्पनातीत साधनाने देऊन जीवाला कृतार्थ करता म्हणून आपण कल्पवृक्षच आहात. अशा प्रकारे आत्मशक्ती कुंडलिनी जागृत करून आपण जीवाला ब्रह्मरूप करीत असल्यामुळे आत्मज्ञानरूप वृक्षाचे आपणच उत्पत्तिस्थान आहात. तुमचा जयजयकार असो. याचा अर्थ असा की, सद्‌गुरुकृपेने शक्ती जागृत होऊन अंतरंग साधन स्वयं उपस्थित होणे हेच कल्पनातीत साधन आहे. हाच अर्थ श्रीअभिनवगुप्तांनी "तंत्रालोक" ग्रंथात स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, "ब्रह्म कल्पनातीत तत्त्व आहे. त्याची प्राप्ती कल्पनांतर्गत साधनांनी होणे केवळ अशक्य आहे. वास्तविक पाहता कल्पनेच्या कक्षेपलीकडे कोणतेही साधन नाही; परंतु केवळ सद्‌गुरूने केलेल्या शक्तिपातामुळेच कल्पनातीत शक्ती जागृत होते. ती स्वतः ज्या क्रिया करविते त्याची कल्पना कोणताही साधक करू शकत नाही. ही कुंडलिनी शक्ती सर्व शक्तिमान शक्तीतील ज्ञानयुक्त अशी श्रेष्ठ शक्ती आहे. कोणत्या साधकाला कोणत्या पद्धतीने पुढे नेणे आवश्यक आहे हे ती पूर्णपणे जाणते. त्यामुळेच "श्वेताश्वतरउपनिषदात" "परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते। स्वाभाविकी ज्ञान बल क्रिया च ॥६.८॥" असे म्हटले आहे. परमेश्वराची शक्ती नाना प्रकारची आहे. ती स्वभावतःच ज्ञानक्रिया व बलक्रिया या रूपाने दिसून येते."

चित्ताशी तादात्म्य झाल्याने म्हणजे शिव स्वतःच शक्तीच्या रूपाने संकुचित बनून चेतनपदावरून खाली उतरून चैतन्याचा संकोच करीत चित्त बनत असल्याने जीवाचे जीवत्व मिथ्या ठरते. असे असले तरी आत्मतत्त्वाचे कशाशीही तादात्म्य न होता "मी सर्वदा स्वतःसिद्ध ॥ ९.६४ ॥" असेच ते राहते. त्यामुळे स्वतःसिद्ध तत्त्वप्राप्तीसाठी त्याच्याशी अभिन्न असणाऱ्या स्वतःसिद्ध शक्तीचाच आश्रय घेणे भाग पडते. जीव कर्तृत्वाभिमानाच्या अधीन असल्याने सर्व साधने प्रयत्नसाध्य ठरतात. त्यामुळे कष्टसाध्य सर्व साधनांना सूक्ष्म अशा चित्तशुद्धीच्या उपायांतर्गत मानले गेले आहे व तेथपर्यंतच इतर सर्व साधनांची मर्यादा आहे. त्यापलीकडे ही साधने जाऊ शकत नाहीत. त्यामुळे हठयोगप्रदीपिका, घेरंडसंहिता, शिवसंहिता, योगबीज, योगमार्तंड इत्यादि सर्व योगग्रंथांत कष्टसाध्य साधने शक्तीच्या जागृतीसाठीच करण्यास सांगितल्याचे स्पष्ट दिसून येते; परंतु जेव्हा अंतर्शक्ती कुंडलिनी जागृत होते तेव्हा पुढील नादानुसंसधानादि अंतरंग साधने या शक्तीच्या कृपेमुळे कशी सहजतेने घडून येतात हे उपरोक्त व इतरही सर्व योगग्रंथात वर्णन केले आहे. परंतु श्रीज्ञानेश्वरमहाराज हे श्रीगुरुकृपाप्राप्त अशा सिद्धयोगाचे वाहक असल्याने त्यांच्या लेखी कष्टसाध्य साधनांची आवश्यकता नाही. ते

एकमात्र श्रीगुरुकृपेनेच सर्व काही होते असे वारंवार सांगतात. त्यांच्या दृष्टीने शक्ती निद्रिस्त असल्यामुळेच जीवाला कल्पनेची झोप येते व त्याचा अभेदबोध नाहीसा होतो. जोपर्यंत शक्ती मूलाधारात निद्रिस्त असते तोपर्यंत ती साधकाला बहिर्मुख ठेवून जन्ममरणरूप संसाराच्या कल्पनेचा खेळ खेळावयास लावते. म्हणजे सर्व जगद्रूप कल्पना ही शक्तीच होय व ती जेव्हा सद्‌गुरुकृपेने जागृत होते तेव्हा सर्वोपशांतिप्रमदा बनून विश्वाभासाची कल्पना मावळून टाकते. हे काम या शक्तीशिवाय दुसरे कोण करू शकणार ? ज्या शक्तीने कल्पनातीत वस्तूच्या आश्रयाने स्वात्मरूपावर स्वतःच्याच आश्रयाने विश्वाची कल्पना करून स्वसंकोचाने तिचे उन्मीलन भासविलेले असते ती शक्तीच जेव्हा सद्‌गुरुचरणाश्रित झालेल्या जीवाच्या ठिकाणी त्यांच्या परमकारुणिकतेने केलेल्या शक्तिपाताने उद्‌भासित, उद्‌बुद्ध किंवा उद्‌घाटित होते तेव्हा ती आपल्या कल्पनेचे रूप आपणच गिळून टाकून पुन्हा स्वस्वरूप होऊन राहते. हे कार्य करण्याचे सामर्थ्य इतर दुसऱ्या कोणत्याही साधनात नसल्यामुळे जागृत कुंडलिनीच्या अंतरंग, अंतर्योग व अंतर्यागरूप शक्तिसाधनाच्या आश्रयानेच साधकाला कल्पनातीत वस्तूकडे झेपावत जाणे भाग पडते.त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "या जाणणेयाचा चेवो तुज आला ना ? ॥९.९४॥ " असा प्रश्न अर्जनरूपी साधकाला विचारून लगेच "आतां द्वैत स्वप्न वावो । जालें कीं ना ? ॥९.९४॥ " असा दुसरा प्रश्न विचारला आहे. जाणण्याचा चेव म्हणजे शक्तीची जागृती झाल्याशिवाय अर्जुनाचे द्वैत जाणार नाही ही पक्की खूणगाठ श्रीपती बांधून आहेत; कारण "तरी पुढती जरी विपायें । बुद्धीसी कल्पनेची झोंप ये । तरी अभेद बोधु जाये । जैं स्वप्नीं पडिजे ॥९.९५॥" हे त्यांना पक्के माहीत आहे. कल्पनेला झोप आली की, जीवाचा अभेदबोध गेलाच गेला. मग सर्व स्वप्नच. पण अर्जुनरूपी जीवाला घोर अशा संसाररूपी स्वप्नात ठेवण्यास सद्‌गुरुनाथ श्रीकृष्णमहाराज तयार नाहीत. ते म्हणतात "म्हणौनि ये निद्रेची वाट मोडे । निखळ उद्‌बोधाचेंचि आपणपें घडे । ऐसें वर्म जें आहे फुडें । तें दावों आतां ॥९.९६॥" असे शक्तिजागृतीचे म्हणजे निखळ उद्‌बोधाचे वर्म आहे; कारण त्याच्याशिवाय कल्पनातीत वस्तूची प्राप्ती होणे शक्य नाही. जशी वस्तूची पात्रता तशी त्याच्या प्राप्तीच्या साधनाची पात्रता पाहिजे. शिवाशी अभिन्न असणाऱ्या शक्तीतच एवढे सामर्थ्य आहे. त्यामुळेच " कल्पना निमे ॥ ६.२१२॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराज या साधनाचे फल कथन करताना निभ्रांतपणे सांगतात व "हे कल्पना घे सांडी । तें नाहीं इये परवडी ॥६.२९०॥" असे म्हणून कल्पनातीत श्रेष्ठत्व वर्णन करतात.

सारांश, सिद्धयोग हे कल्पनातीत स्वसंवेद्य आत्मरूपाच्या प्राप्तीचे सद्‌गुरुकृपाप्राप्त असे या भूतलावरील एकमात्र साधन असून त्यापलीकडे दुसरे साधन नाही हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

आमुचा प्रकृतीपैलीकडील भावो। जरी कल्पनेवीण लागसी पाहों।
तरी मजमाजीं भूतें हेंही वावो। जें मी सर्व म्हणौनी ॥९.७१॥
तेचि कल्पितो प्रकृती पुरे। तरी भूताभासु आधींचि सरे।
मग स्वरूप उरे एकसरें। निखळ माझें ॥८०॥
तेचि कल्पना सांडूनि पाहीं। तरी मी भूतीं भूतें माझिया ठायीं।
हें स्वप्नींही परि नाहीं। कल्पवयाजोगें ॥८२॥
तैसें भूतजात माझ्या ठायीं। कल्पिजे तरी आभासे कांहीं।
निर्विकल्पीं तरी नाहीं। तेथ मीच मी आघवें ॥९०॥

अर्जुना ! एकमात्र कल्पनातीत साधनानेच मला पाहा म्हणजे तुझे कल्पनातीत निखळ स्वरूप उरेल. एरवी हे शक्य नाही; कारण "दृश्यपथाअतीतु माझा भक्तियोगु ॥१८.११२९॥" असे सिद्धयोग हेच एकमेव साधन आहे.

**साध्यसाधनाची एकरूपताः–**

सिद्धयोग साधन हे साध्यरूपच आहे असा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या साधनाचा महिमा सांगितला आहे. वाह्यतः केली जाणारी इतर सर्व साधनांची मजल चित्तशुद्धीच्या पुढे जाऊ शकत नसल्यामुळे त्यांची मर्यादा आपोआप स्पष्ट होऊन साध्यप्राप्तीच्या दृष्टीने ती निरुपयोगी ठरतात; मग ती साध्यरूप असणे ही गोष्ट तर शक्यच नाही. मात्र सद्गुरुकृपेने जागृत होणारी साधनरूप चित्शक्ती ही स्वयं साध्यरूप शिवच असल्याने सिद्धयोग हा साध्यसाधनाची एकरूपता असणारा अपूर्व योग आहे असे प्रतीतीस येते. "मुख्यतस्तु महत्कृपयैव ॥ ३८॥" असे म्हणून महर्षी नारदांनी महात्म्यांच्या कृपेने म्हणजे शक्तिपाताने भक्तीचे खरे अंतरंग साधन उद्भासित होते म्हणून "भक्तिसूत्रात" सांगितले आहे.त्यांनीच "फलरूपत्वात्॥२६॥" म्हणजे भक्ती हेच भक्तीचे फळ होय असे सांगून व "स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारः ॥३०॥" असे म्हणून भक्ती हेच साधन व भक्ती हेच साध्य होय असा सिद्धयोगाचा साध्यसाधनरूप एकतेचा महान सिद्धांत प्रस्थापित केला आहे. त्याचप्रमाणे "श्रीमद्-भागवतात" "नमः परमकल्याण नमः परममंगल ॥ १०.१०.३६ ॥" असे म्हणून श्रीशुकब्रह्ममुनींनी "वासुदेवाय शांताय यदूनां पतये नमः ॥" याप्रमाणे नमन केले आहे. त्यातही परमकल्याण म्हणजे साध्यरूप व परममंगल म्हणजे साधनरूप अशा साध्यसाधनरूपाने एकवटलेल्या परमात्म्यालाच संबोधिले आहे व महर्षी व्यासांनी याच ग्रंथात ग्रंथाचे माहात्म्य कथन करताना "मी वेदवेदांताचा घोष व गीतापाठ करून बाह्य साधनांनी भक्ती, ज्ञान व वैराग्य जागृत करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; परंतु ते जागृत झाले नाहीत ॥२.६४॥," असे ब्रह्मर्षी नारदांच्या मुखात वचन घालून सनकादि ऋषींकडून त्याचे पुढील उत्तर दिले आहे. ते म्हणतात, "ऋषींनी संसारात अनेक मार्ग प्रकट केले आहेत; परंतु ते सर्व कष्टसाध्य आहेत

व सर्वसाधारणपणे हे सर्व मार्ग स्वर्गाची प्राप्ती करून देणारेच आहेत. अद्यापपर्यंत भगवंतांची प्राप्ती करून देणारा मार्ग गुप्तच राहिला आहे. या गुप्त मार्गाचा उपदेश करणारा पुरुष साधकाला क्वचितच् भाग्याने प्राप्त होतो. ज्याप्रमाणे दुधात तूप असते; परंतु त्यावेळी त्याचा निराळा स्वाद प्राप्त होत नाही; परंतु ज्यावेळी तूप दुधापासून निराळे निघते तेव्हा देवतांनाही ते स्वादवर्धक होते. साखर उसात सर्वत्र व्याप्त असते पण ती निराळी झाल्यावर तिची गोडी कळते, त्याप्रमाणे महापुरुषांची कृपा झाली की, साधनातच समव्याप्त झालेले सिद्धतत्त्व साधकाच्या अनुभूतीला येते व तो कृतार्थ होतो. याचा अर्थ स्पष्ट आहे की, साधनच साध्यरूप असून "जैसा घंटानाद लयस्तु। घंटेसीच होय ॥८.९७॥" व "कां झांकलिया घटींचा दिवा। नेणिजे काय जाहला केव्हां ॥ ८.९८॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणेच हे घडते. साधन हे साध्यरूप कसे आहे किंवा होते हे सांगताना ते म्हणतात–

जैसें रसौषध खरें। आपुलें काज करोनि पुरें।
आपणही नुरे। तैसें होतसे ॥१८.१०७९॥
देखोनि ठाकिता ठावो। धांवता थिरावे पावो।
तैसा ब्रह्मसामीप्यें थावो। अभ्यासु सांडी ॥१०८०॥
घडतां महोदधीसी। गंगा वेगु सांडी जैसी।
कां कामिनी कांतापासीं। स्थिर होय ॥१०८१॥
नाना फळतिये वेळे। केळीची वाढी मांटुळे।
कां गांवापुढे वळे। मार्गु जैसा ॥१०८२॥
तैसा आत्मसाक्षात्कारु। होईल देखोनि गोचरु।
ऐसा साधनहतियेरु। हळूचि ठेवी ॥१०८३॥
म्हणोनि ब्रह्मेंसीं तया। ऐक्याचा समो धनंजया।
होतसे तैं उपाया। वोहटु पडे ॥१०८४॥

साधन करता करता अशा प्रकारे साधकाला ब्रह्मसाक्षात्कार होऊन त्याचे साधन साध्यात विलीन होते. तो अभ्यास सांडतो, साधनरूपी हत्यार हळूच खाली ठेवतो व साधन साध्याशी समरस होऊन आटून जाते. इतके सांगून श्रीज्ञानेश्वर-महाराज थांबत नाहीत; तर तो सिद्धयोगसाधक साध्यसाधनाच्याही पलीकडे जातो म्हणून सांगताना ते म्हणतात की–

मग पार्था तिये ठायीं। साध्य साधन होय नाहीं।
किंबहुना तुज कांहीं। उरेचि ना ॥१८.१३८५॥
घेऊनि ऐलपणातें। परत्व हारपे जेथें।
गिळूनि चाऱ्हीं भूतें। आकाश जैसें ॥१८.११३६॥

**तयापरी थडथाद । साध्यसाधनातीत शुद्ध ।**
**ते मी होऊनि एकवद । भोगितो मातें ॥१८.११३७॥**

ही जी स्थिती श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केली आहे ती समरसतेची आहे. मुळात महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" ती पुढीलप्रमाणे मांडली आहे. ते म्हणतात–

**यस्मिन् दर्शिते सति तत्क्षणात् स्वसंवेद्य साक्षात्कार: समुत्पद्यते ।**
**ततो गुरुरेवात्र कारण मुच्यते ॥५.६॥**
**संवित्क्रियाविकरणोदयचिद्विलासो विश्रांतिमेव भजतां स्वयमेव भाति ।**
**ग्रस्ते स्ववेगनिचये पदपिंडमैक्यं सत्यं भवेत्समरसं गुरुवत्सलानाम् ॥५.८४॥**

ज्याक्षणी सद्गुरू शिष्यावर शक्तिपात करतात त्याक्षणी शिष्याला स्वसंवेद्य आत्मरूपाचा साक्षात्कार होतो. त्यामुळे अशा प्रकारचे साधन देऊन ते एका क्षणात साध्यात परिणत करणारे म्हणजे साध्यसाधन एकरूप करून त्याही पलीकडे शिष्याला किंवा साधकाला पोहोचविणारे एकमात्र श्रीसद्गुरूच कारण असतात. ज्यावेळी सद्गुरुकृपेने सम्यक्रीतीने जागृत झालेल्या शक्तीच्या द्वारा साधकाकडून भजन होते तेव्हा शक्तीच आपला बहिर्मुख वेग आपल्याच ठिकाणी जिरवून अतंर्मुख होऊन पदपिंडाचे ऐक्य करून जीवाला परमात्म्याच्या ठिकाणी साध्य-साधनातीत करून समरस करते. अशी ही साध्यसाधनाच्या एकरूपतेची किंवा समरसतेची प्रक्रिया श्रीज्ञानेश्वरमहाराजांना परंपरेने प्राप्त झालेली असल्यामुळे त्यांनी ती आपल्या शब्दात त्याच भावार्थाने मांडली आहे. ते म्हणतात–

**कानावचनाचिये भेटी–। सरिसाचि पैं किरिटी ।**
**वस्तु होऊनि उठी । कवणि एकु जो ॥१८.९९१॥**
**जें देखलियाचिसवें । दृश्य द्रष्टा हें आघवें ।**
**एकवाट कालवे । सामरस्यें ॥१३.९३६॥**
**मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन ।**
**ज्ञानें गमिजे स्थान । तेंहि तेंची ॥९३७॥**
**जैसे सरलियां लेख । आंख होती एक ।**
**तैसें साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ॥९३८॥**
**मग तया मार्गाची धांव । पुरेल प्रवृत्तीची हांव ।**
**जेथ साध्यसाधना खेंव । समरसें होय ॥६.५९॥**

श्रीसद्गुरुंच्या नुसत्या वचनाची कानाला भेट झाली की, एका क्षणात शक्ति-पातामुळे शिष्य साधनसंपन्न होऊन तत्काळ साध्यसंपन्नही होतो. मग इतर मार्गाकडे धावण्याची प्रवृत्तीच राहत नाही; कारण श्रीगुरुरूपातच शिष्य समरस झालेला

असतो. हाच भाव श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अमृतानुभवातील पुढील ओव्यात व्यक्त करताना असे म्हटले आहे की–

सांडूनि मीठपणाचा लोभू । मिठें सिंधूचा घेतला लाभू ।
तैसा अहं देऊनि मी शंभू । शांभवी झालों ।।१.६३।।
शिवशक्तिसमावेशें । मियां नमन केलें ऐसें ।
रंभागर्भ आकाशें । रिगाला जैसा ।।१.६४।।
जो भेटलियासवें । पुरती उपायांचे धावे ।
प्रवृत्ति गंगा स्थिरावे । सागरीं जियें ।।२.८।।

यापेक्षा सिद्धयोग साधनाच्या साध्यसाधनरूप एकतेचे अलौकिक वर्णन दुसरे कोण करू शकेल ?

## अमृतासम दिव्य औषधीः–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोग साधनेचा " अमृतासम दिव्य औषधी ॥ २.८६ ॥ " म्हणून गौरव केला आहे. या एकमात्र अमृतासारख्या दिव्य औषधीचा वापर केल्याशिवाय जीवाचा मोह, भ्रांती, कल्पना, संभ्रम, अज्ञान, विश्वाभास, जाणीव, मन इत्यादि कशाचा म्हणून कशाचाही नाश होत नसल्याने " शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ गीता ।।२.७ ॥ " म्हणून शरण आलेल्या अर्जुनाच्या रोगाचे निदान करून भगवान् गोपाळकृष्णरूपी मेहामेघाने अत्यंत सहजतेने कृपामृताचा वर्षाव करून व रोग असाध्य आहे असे पाहताच वैद्य जसा निर्वाणीच्या अमृततुल्य अशा दिव्य औषधीची तत्काळ योजना करतो, त्याप्रमाणे त्यांनी सिद्धयोगाच्या परमामृतरूप औषधाची योजना करून त्याला मुक्त केले. त्यामुळेच " नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत । स्थिमोऽस्मि गतसंदेहः ।। १८.७३ ।। " असे शेवटी अर्जुनाच्या मुखातून दिव्यौषधीच्या सेवनाने जो दिव्य परिणाम घडून आला त्याचे निदर्शक उद्‌गार बाहेर पडले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीकृष्णांनी अर्जुनाला जी दिव्यौषधी पाजून भवरोगमुक्त केले त्याचे " येवढा जियें सांकडां । कैसा अनुग्रहो पैं गाढा । जे ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ।।१८.१५८४।।" असे म्हणून ही अमृतासारखी दिव्य औषधी म्हणजे दुसरे तिसरे काहीही नसून उघडपणे ब्रह्मानंद भोगविणारा सिद्धयोगाचा गाढा म्हणजे तीव्र अनुग्रह आहे, शक्तिपातयोगदीक्षा आहे किंवा शक्तिसंक्रमण आहे हे स्पष्ट केले आहे.

जीव मुळातच " पैं व्यामोहाचिये शेजे । बळिया अविद्या निद्रितु होईजे ।। ६.६८ ।। " अशा स्थितीत असल्यामुळे " तें वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूंचा ।। ६.६८ ।। " याप्रमाणे जन्ममृत्यूंचे दुःस्वप्न वारंवार भोगीत असतो असे भगवंतांनी स्वतःच सांगितले आहे व अर्जुनही स्वमुमुखाने आपली हीच स्थिती वर्णन करीत आहे. तो म्हणतो–

आम्हां काय उचित । तें पाहतां न स्फुरे एथ ।
जें मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥२.५५॥
तिमिरा विरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे ।
मग पासींच असतां न दिसे । वस्तुजात ॥५६॥
देवा तैसें मज जाहलें । जें मन हें भ्रांती ग्रासिलें ।
आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ॥५७॥

मोहाने व भ्रांतीने ग्रस्त झाल्यामुळे मी माझे हित जाणू शकत नाही. माझे चित्त व्याकुळ झाल्यामुळे मला काही सुचत नाही.याकरिता अशा स्थितीत " जैसा शिष्यांतें गुरु । सर्वथा नेणें अव्हेरू । कीं सरितांतें सागरू । त्यजीं केवीं ? ॥ २. ६० ॥ " याप्रमाणे आपण हा न्याय अंगिकारून परमामृतासारख्या दिव्य-औषधीची योजना माझ्यासाठी करा अशी अर्जुनच श्रीकृष्णाकडे मागणी करीत आहे. सामान्य औषधांचा म्हणजे इतर कोणत्याही सीमित किंवा कष्टसाध्यसाधनांचा परिमित सामर्थ्यामुळे उपयोग नसल्यामुळे परमामृतासारख्या असलेल्या सिद्धयोग-साधनांचीच मागणी " स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥ मुंडकोपनिषद २.१.१२॥ " या उपनिषद न्यायाने अर्जुनाने शब्दब्रह्म व परब्रह्म यात निष्णात असलेल्या सद्गुरुनाथ श्रीकृष्णमहाराजांना मोठ्या काकुळतीने शरणागत होऊन केली आहे. तो म्हणतो—

ना तरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें कांहीं नोहे ।
एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ॥२.६७॥
तैसे राज्ययोगसमृद्धि । उज्जीवन नोहे जीवबुद्धि ।
एथ जिव्हाळा कृपानिधि । कारुण्य तुझें ॥६८॥

हे भगवंता ! हे कृपानिधे ! ज्यावेळी माझ्यासारख्या सामान्य जीवाचे शोकमोहभ्रांतिममतादींमुळे आयुष्य संपल्यासारखे असते त्यावेळी इतर कोणत्याही सामान्य औषधीचा म्हणजे साधनाचा काहीही उपयोग होत नाही. राज्यभोग-समृद्धी व संपत्ती याने कधीतरी जीवाची जीवबुद्धी नाहीशी होऊन त्याचे जीवदशे-पासून सुटणारे उज्जीवन होणे शक्य आहे काय ? येथे फक्त तुझा जिव्हाळा व तुझी कृपाच उपयोगी पडेल. महायोगी गोरक्षनाथांनीही " सिद्धसिद्धांतपद्धतीत ' " किमत्र बहुनोक्तेन शास्त्रकोटिशतेन च । दुर्लभा चित्तविश्रांतिर्विना गुरुकृपां पराम् ॥ ५.७८ ॥ "असे म्हणून कोटीकोटी शास्त्रेही चित्तविश्रांती प्राप्त करून देण्यास असमर्थ असून एकमात्र गुरुकृपाच म्हणजे शक्तिपातयोगदीक्षाच ही गोष्ट देण्यास समर्थ आहे, असा अमर सिद्धांत मांडला आहे. " कुलार्णवतंत्रात " कौलयोगरूपी सिद्धयोग हेच संसाररूपी महाव्याधिविनाशाचे एकमात्र औषध आहे, हे देवी पार्वतीला सांगताना शंकरांनी असे म्हटले आहे की—

कुलधर्मेण देवत्वं देवाः संप्रतिपेदिरे ।
मुनियोगीश्वराद्याश्च सुसिद्धिं परमां गताः ॥२.१००॥
पशुव्रतादिनिरताः सुलभा दांभिका भुवि ।
ये कौलमेव सेवंते ते महांतोऽति दुर्लभाः ॥१०१॥
मानवा बहवः संति मिथ्यातत्त्वार्थवेदिनः ।
दुर्लभोऽयं महेशनि कुलतत्त्व विशारदः ॥१०२॥
यथा रोगातुराः केचिन्मानवाः कुलनायिके ।
दिव्यौषधं न सेवंते महाव्याधिविनाशनम् ॥१०३॥
तद्व्याधिवर्धनापथ्यं कुर्वंति हि कुभेषजम् ।
तथैव जन्ममरणकृतं सांसारिकीं क्रियाम् ॥१०४॥
समाचरंति सततं त्वत्कारुण्यविवर्जिताः ।
न भजंते कुलं धर्मं भवबंधविमोचनम् ॥१०५॥
यथा चारण्यजातांस्तु मरीचादीन् वणिग्जनान् ।
मोहतो मानवाः प्रीत्या याचंते कुलनायिके ॥१०६॥
अनर्घ्याणि च रत्नानि न याचंते हि केचन ।
तथैव पशुशास्त्राणि कर्मपाशफलानि च ॥१०७॥
इति पृच्छंति मूर्खास्ते तव मायाविमोहिताः ।
कुलधर्मं न पृच्छंति भुक्तिमुक्तिफलप्रदम् ॥१०८॥

या कुलधर्मामुळे म्हणजे कुल अर्थात् शक्ती कुंडलिनी हीच ज्या साधनात प्रमुख धर्म आहे अशा सिद्धयोगसाधनेमुळे देवांना देवत्व आले व मुनियोगीश्वरादिकांना परमसिद्धाचा लाभ झाला. पशुव्रतादि करणारे दांभिक लोक पुष्कळ सापडतील; पण कौलमार्गाश्रयी अर्थात सिद्धयोगसाधनरत थोर लोक मात्र अगदी क्वचित् आहेत. खोटचा तत्त्वार्थाचे ज्ञाते लोक पुष्कळ आहेत; पण हे पार्वती ! कुलतत्त्व विशारद अर्थात् सिद्धयोग साधनाचे जाणकार मात्र क्वचितच् नव्हे तर दुर्लभच आहेत. हे कुलनायिके ! ज्याप्रमाणे बरेच रोगी लोक आपल्याला झालेल्या महाव्याधीचा नाश करणाऱ्या दिव्यऔषधीचे सेवन न करता उलट त्या व्याधीला वाढविणारे कुपथ्य करतात व भलतेच औषध घेतात त्याप्रमाणे जन्ममरणपरंपरेची महाव्याधी झालेले जीव जन्ममरणात्मक दुःखात लोटणारी संसारिक क्रियाच करीत राहतात. तुझ्या दयेला अपात्र असलेले जीव भवबंधमोचक अशा कुलधर्माचे म्हणजे सिद्धयोगाचे सेवन करीत नाहीत. ज्याप्रमाणे रानटी लोक व्यापारी लोकांना मीठ, मिरची वगैरे अतिशय हलके जिन्नस मागतात व किंमती रत्नादि वस्तू मागत नाहीत त्याप्रमाणे मूढ लोक तुझ्या मायेने मोहित होऊन कर्मपाशात टाकणाऱ्या पशुशास्त्राचीच मागणी करतात. हे लोक भोग व मोक्ष देणाऱ्या कुलधर्माबद्दल

अर्थात् सिद्धयोगशास्त्राबद्दल एक अक्षरही बोलत नाहीत. इतके सांगून शेवटी शंकरांनी पार्वतीला असे सांगितले आहे की, " जीवन्मुक्तिसुखोपाय कुलशास्त्रेषु गोपितम् ॥ २.१३७ ॥ " म्हणजे कुलशास्त्रात अर्थात् सिद्धयोगशास्त्रात जीवन्मुक्तीचा सुखकारक उपाय गुप्तरीतीने अंतर्निहित झालेला आहे. हा गुप्त उपाय म्हणजेच अमृतासम दिव्यौषधियुक्त शक्तिपातयोग असून तो सद्गुरुकृपेने जीवाला प्राप्त होत असतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त अमर सिद्धांताची प्रक्रिया मांडून म्हणजे या अमृतासम दिव्य औषधीचे पान सद्गुरू जीवाला कसे करवितात हे सांगून तो अधिक स्पष्ट केला आहे. ते म्हणतात—

**हें जाणोनि ऐसी प्रौढी । जो दृष्टिसवेंचि विष फेडी ।**
**तो धांवया श्रीहरी गारुडी । पातला कीं ॥२.७२॥**
**विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताठी ।**
**ते तुझिये गुरुकृपादृष्टी । निर्विष होय ॥१२.२॥**

गुरूच्या नुसत्या दृष्टिपाताने विषयरूपी सर्पांचे जन्मजन्मांतरी भिनलेले विष दूर होऊन शिष्य निर्विष होऊन जातो. त्याशिवाय दुसरा उपाय नाही; कारण सर्व विषयांना जाळण्याचे सामर्थ्य एकमात्र जागृत कुंडलिनीशिवाय इतर कोणातही नाही व सद्गुरूंच्या दृष्टिपाताने जोपर्यंत हे शक्तीचे औषध संक्रमित होत नाही तोपर्यंत विषयव्याळे मिठी दिधालिया नुठी ताठी ही जीवाची स्थिती काही दूर होत नाही.ज्या प्रकारचा रोग झाला आहे त्या प्रकारचे, त्या श्रेष्ठतेचे, दर्जाचे, पात्रतेचे,अचूक परिणामकारक व समूळ रोगनिवारक औषध रोग्याला दिल्याशिवाय त्याचा रोग दूर होत नाही. सिद्धयोग हेच संसारभ्रांतिनाशक औषध असल्यामुळे "दुःसहा राम संसारवेगविषूचिका । योगगारुडमंत्रेण पावनेनोपशाम्यति ॥ " असा उपदेश महर्षी वसिष्ठांनी प्रभू रामचंद्रांना " योगवासिष्ठात " केला आहे. त्यामुळे हे औषध अनुपमेय आहे असे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**कीं औषधाचिया कडुवटपणीं । जैसी अमृताचीं पुरवणी ।**
**ते आहाच न दिसे परी गुणीं । प्रकट होय ॥२.८९॥**

सिद्धयोगाचे हे औषध वरवर पाहता तुम्हास कडू वाटेल; परंतु समूळ रोगनाशक असे हे औषध अत्यंत दिव्य व अनुपमेय आहे; कारण वरवर पाहणाऱ्याला अनुभूती नसल्यामुळे या सिद्धयोगरूप दिव्य औषधीचा अमृतासारखा होणारा परिणाम कसा कळणार? परंतु ज्याला हे औषध सद्गुरूंकडून प्राप्त झाले आहे तोच अनुभूतिसंपन्नतेमुळे त्यातील गुण जाणू शकतो. सिद्धयोगरूप अमृतासम दिव्य औषधीच्या वरवर दिसणाऱ्या कडवटपणाला भिऊन गेल्यामुळे त्याच्या प्रात्यर्थ जेव्हा अर्जुन सद्गुरुनाथ श्रीकृष्णांना शरण गेला तेव्हा त्याने मागणी करताना औषध

द्या; पण ते मधुर व रुचकर द्या, असे म्हटले आहे. अर्जुनाची ही मागणी सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

देखें रोगातें जिणावें। औषध तरी देयावें।
परी तें अति रुच्य व्हावें। मधुर जैसें ॥३.१९॥
आधींच साखर आवडे। तेचि जरी ओखदां जोडे।
तरी सेवावी ना कां कोडें। नावानावा ४.२१८॥

अर्जुनाची अशी मागणी असली तरी " या विषयांवांचूनि कांहीं। आणीक सर्वथा रम्य नाहीं। ऐसा स्वभावोचि पाहीं। इंद्रियांचा ॥ २.१२० ॥ " अशी जीवाची वास्तविक गती असल्यामुळें व " हे चिखलेंवीण रोंविती। पाशिकेंवीण गोंविती। हे कवणाजोगें न होती। आंतौटेपणें ॥ ३.२५९ ॥ असा जीव विषयात गुंतत असल्यामुळे त्याला बाह्य विषयच गोड वाटतात. " कां कमलकंदा आणि दर्दुरीं। नांदणूक एकेचि घरीं। परि परागु सेविजे भ्रमरीं। येरां चिखलुचि उरे ॥ ९.५८ ॥ " व " तैसा हृदयामध्यें मी रामु। असतां सर्वसुखाचा आरामु। कीं भ्रांतासी कामु। विषयावरी ॥ ९.६० ॥ " अशी स्थिती असल्याने अगदी अमृता-सारखी दिव्य औषधी असली तरी जीवाला रुचत नाही, पटत नाही व घेववत नाही. एवढेच नव्हे तर ते औषध कडू आहे असेच त्याला वाटते. भोगातून निवृत्त होताना त्रासच होणार व कडवटपणा जाणवणारच; कारण अंतर्मुख होताना इंद्रियांना "तैसें विषयांचे घर। इंद्रिया सांडिता थोर। युगांतु होय ॥१८.७८७॥" या न्यायाने अतीव दुःख होते.जरी सिद्धयोग सोपा, सहज व सरळ असला व परिणामी तो अमृतासारखा असला तरी हे औषध रोग्याला नको वाटते.म्हणूनच श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

पाहे पां आयुष्यातें अढळ करी। जें सरितें जीवित वारी।
तया औषधातें वैरी। काय जिव्हा न म्हणे ?॥६.३६२॥
ऐसें हितासि जें जें निके। तें सदाचि यां इंद्रियां दुःखें।
एऱ्हवीं सोपे योगासारिखें। कांहीं आहे ? ३६३॥

त्यामुळे " शके दावितांचि रोगु फेडूं। आणि जिभे तरी नव्हे कडू। तें ओखदु नाहीं मा घडू। उपमा कैंची ? ॥ १६.११६ ॥ ". असे म्हणून नुसत्या औषध दाखविण्याने अगर पाहण्याने रोगाचा नाश करू शकेल आणि खाल्ले तर जिभेसही कडू लागणार नाही, असे औषधच नाही; मग तसल्या औषधास उपमा तरी कोणती द्यावी ? असा निर्वाळा देऊन सिद्धयोगसाधनरूप योग्य अशा औषधाची अनिवार्यता स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जें औषध व्याधी अनोळख। तें घेतलिया परतें विख।
का अन्न न मानितां भूक। मारी ना काय ? ॥१८.१३२॥

रोगाची चिकित्सा न करता भलतेच घेतलेले औषध रोग्यास बरे न करता उलट विषासारखे मारक होते व भुकेच्या वेळी अन्न सेवन केले नाही तर भूक त्या मनुष्यास मारणार नाही काय ? त्याप्रमाणे भवव्याधी निवारणार्थ सिद्धयोगाचेच औषध अचूक असून तेच नियमितपणे अधिकाधिक घेतले पाहिजे म्हणजे " स तु दीर्घकालनैरंतर्य्यसत्कारासेवितो दृढभूमिः । समाधिपाद ॥ १.१४ ॥ " असे महर्षी पतंजलींनी " " योगसूत्रात " म्हटल्याप्रमाणे सतत, दीर्घकाल व अत्यंत श्रद्धा-भक्तिपूर्वक सिद्धयोगसाधनाभ्यास करीत राहून तो दृढ केला पाहिजे. ही भूमिकाच स्पष्ट करावयाची असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**अधिकें जंव जंव औषधी । सेवनेचि मांडी बांधी ।**
**तंव तंव मुकिजे व्याधी । तयाचिये ॥१८ १५५॥**
**नाना पथ्येंसीं औषध लाहे । तरी रोगें दाटलाही जिये ।**
**कां मीना जिव्हाळा होये । जळाचा जरी ॥१८.७०६॥**
**तरी तयाच्या जीविता । नाही जेवीं अन्यथा ।**
**तैसें कर्मीं इये वर्ततां । जोडेचि मोक्षु ७०७॥**

मात्र या जागृत शक्तीच्या द्वारा सहजतेने, आपोआप व स्वतः होणारे साधन हे " परी उपास्ति ते योग्यते–। आधीन असे ॥ ३.४० ॥" असे जीवाच्या धारणा-भेदानुसार चालणारे असल्यामुळे ते मात्रेच्या मापानेच घेतले जाते व साधकाची अंतःशक्तीही अभ्यासाच्या प्रमाणात क्रमविकासन्यायाने आपले संकुचितत्व सोडून देऊन शिवरूप होत जाते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**परी मात्रेचेनि मापें । दिव्यौषध जैसें घेपे ।**
**कां कथिलाचें कीजे रुपें । रसभावनीं ॥१८.७७४॥**
**नाना लवणाचें जळु । होआवया दोनि चार वेळु ।**
**देऊनि सांडिजती ढाळु । तोयाचें जेवीं ॥७७५॥**
**तेवीं जालेनि सुखलेशें । जीवु भाविलिया अभ्यासें ।**
**जीवपणाचें नासे । दुःख जेथें ॥७७६॥**
**परी वोखद घेतखेवों । काय लाभे आपुला ठावो ?।**
**का उदयतांचि दिवो । मध्यान्ह होय ? ॥९९८॥**

असा क्रमाक्रमाने सिद्धयोगरूप साधनौषधीचा साधकावर परिणाम होतो. तूप खाल्ले की लगेच रूप येत नाही व औषध घेताक्षणीच आत्मप्राप्तीचा लाभही होत नाहीं. सूर्योदयानंतर दुपार क्रमानेच येते. त्या न्यायानेच येथे सर्व घडते. मात्र " जीवु न वचतां औषधा । धांविजे ज़ेवीं ॥१३.५४८॥" हे साधकाने सतत ध्यानात ठेवावे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. व्याधीने प्राण जाण्यापूर्वीच धावाधाव करून औषधाची योजना करणे इष्ट ठरते त्याप्रमाणे " हे सकळ कुळ

देखोनी । जो शोकु उपनलासे मनीं । ते तुझिया वाक्यावांचुनी । न जाय आणिकें ।। २.६४ ।। " अशी अर्जुनाप्रमाणे सद्‌गुरुचरणी पदर पसरून शक्तिपात दीक्षेची मागणी करणे इष्ट ठरते. ज्याला खरी ज्ञानप्राप्तीची तळमळ आहे, त्याने अशी दीक्षा आपल्याला कोठे मिळेल त्याच्या शोधात असले पाहिजे. अशी दीक्षा देणारे सद्‌गुरू हे साक्षात् चिंतामणी,कल्पवृक्ष व सोन्याचे डोंगर असल्यामुळे ते बाजारहाटात किंवा रस्त्यात सापडत नाहीत. असे महात्मे फार विरळ असतात. चिंतामणीची खाण नसते आणि कल्पवृक्षांचा बगीचाही असत नाही. ही चीज फार दुर्मिळ आहे. हे औषध " बहुभाग्येन लभ्यते " असेच आहे. यासाठी इतर शेकडोशे साधनांचा, मार्गांचा, उपासनांचा त्याग करून व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे "यालागीं शरीर सांडोवा कीजे । सकळ गुणांचें लोण उतरिजे । संपत्तिमदु सांडिजे । कुरवंडी करुनी ॥९.३८१॥ म्हणौनि थोरपण पऱ्हां सांडिजे । एथ व्युत्पत्ती आघवी विसरिजे । जैं जगा धाकुटें होईजे ॥ ९.३७८ ॥" असे अत्यंत शरणागत होऊन श्रीगुरुचरणी दीक्षेसाठी प्रार्थना केली म्हणजे " मग अपेक्षित जें आपुलें । तेंही सांगती पुसिलें । जेणें अंतःकरण बोधले । संकल्पा न ये ॥ ४.१६७ ॥" अशी स्थिती प्राप्त होऊन " तैं जवळीक माझी ॥९.३७८॥" मध्ये साधकाच्या साधनाचा शेवट होतो. हा शेवट हेच सामरस्य होय. हे कसे घडते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात --

**जैसें रसौषध खरें । आपुलें काज करोनि पुरें ।**
**आपणही नुरे । तैसें होतसे ॥१८.१०८९॥**

असे हे सिद्धयोगाचे जीवशिवाचे सामरस्य घडवून आणणारे व संसारवेग नाहीसा करणारे अमृतासारखे दिव्य औषध असल्यामुळे " कां नाव जैसी उदधीं । महारोगी दिव्यौषधी । न विसंबिजे तया बुद्धी । स्वकर्म येथ ॥ १८.९५१ ॥ " असा इशारा देऊन " म्हणौनि स्वप्नींचिया घाया । ओखद चेवोचि धनंजया । तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥१५.२५४ ॥" या रीतीचे श्रीगुरुकृपेने जागृत होणाऱ्या कुंडलिनी शक्तिस्वरूप ज्ञानाचे खड्‌गच जगद्रूपी स्वप्नातील तलवारीचे घाव निवारण करणारे एकमेव शस्त्र असून तेच सिद्धयोगरूप असें अमृतासम दिव्य औषध आहे असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोग साधनाच्या महिम्यावर कळस चढविला आहे.

### सहज सोपे साधनः–

श्रीज्ञानेश्वरमराजांनी सिद्धयोगाचे साधन हे अत्यंत सोपे, सहज व सुलभ आहे असे म्हणून त्यांचा विशेष गौरव केला आहे. हा गौरव किंवा हे श्रेष्ठत्व ज्ञानेश्वरीत विशेष कोठे दृग्गोचर होते याचा आपण मागोवा घेऊ लागलो म्हणजे सर्व ज्ञानेश्वरीच ह्या गौरवाचे रूप घेऊन उभी राहिल्याचे दिसते; कारण सांख्य, कर्म, ज्ञानकर्मसंन्यास, कर्मसंन्यास, ध्यान, ज्ञानविज्ञान, अक्षर, राजविद्या राजगुह्य,

विभूती, विश्वरूप दर्शन, भक्ती, क्षेत्रक्षेत्रज्ञ, गुणत्रयविभाग, पुरुषोत्तम, दैवासुर-संपद्विभाग, श्रद्धात्रय व मोक्षसंन्यास अशी निरनिराळी नावे गीतेच्या सतरा अध्यायांना असली तरी "अहो गूळासाखरे मालयाचे। हे बांधे तरी एकाचि रसाचे ॥१०.३३॥" व "इये आनानें नांवें। परि निरूप्य आन नोहे ॥१३.९६५॥" याप्रमाणे त्यातील सर्व विवेचन हे एकाच सिद्धयोगाचे आहे, हे आपण मागील प्रकरणात पाहिलेच आहे. शिवाय सहजयोगाचे विवेचन करताना या साधनाचा महिमाही विचारात घेतला आहे. येथे या साधनाच्या महिम्याचे कथन ज्या विशेष पद्धतीने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे त्याचा विचार करावयाचा आहे.

साधन हे साध्यात परिणत होत असल्याने व सिद्धयोगात त्यांची एकरूपता असल्याने ज्यावेळी साधकातील निद्रिस्त कुंडलिनी शक्ती अमूर्त अवस्थेतून अनुभूतीच्या रूपाने समूर्तावस्था धारण करते त्यावेळी साधकाच्या ठिकाणी साध्याची लक्षणे उमटू लागून सर्व अमूर्त गुण समूर्त झालेले दिसतात. सुख:दुखातील, लाभालाभातील, जयाजयातील, मानापमानातील, शीतोष्णातील किंवा सर्वच द्वंद्वातील समानवृत्ती, अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांती, दया, मार्दव, तेज, संतुष्टता इत्यादि नानाविध गुण हे अमूर्त असल्यामुळे दाखविता येणे शक्य नसते; परंतु हे अमूर्त गुण जेव्हा साधकाच्या ठिकाणी शक्ती प्रगट करते तेव्हा साधकाच्या ठिकाणी सिद्धाची चिन्हे झळकू लागतात. ही चिन्हे म्हणजे सिद्ध पुरुषाला ओळखण्याच्या कसोटयाच होत. अशा सिद्धपुरुषाची लक्षणे भगवंतांनी गीतेतील दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञ (गीता २–५४ ते ७२), सहाव्या अध्यायात योगी (गीता ६–२२ ते ३२), बाराव्या अध्यायात भक्त (गीता १२–१३ ते २०), तेराव्या अध्यायात ज्ञानी (गीता १३–७ ते ११) व चौदाव्या अध्यायात गुणातीत (गीता १४–२२ ते २७) अशी विशेषणे देऊन प्रकट केली आहेत. जरी उपरोक्त ठिकाणी ती विशेषत्वाने प्रकट झालेली दिसत असली तरी इतर सर्वही अध्यायात विषयानुरोधाने या लक्षणांनी त्या त्या ठिकाणी आपले रूप धारण केल्याचे दिसून येते. त्यामुळे त्यांचा भावार्थ स्पष्ट होताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रतिभेने जे भव्योत्कट रूप धारण केले आहे ते पाहिले म्हणजे मन स्तिमित होऊन जाते. सहजसाधनाच्या वैभवाचे वर्णन करणारी भगवंताची वाणी व तिचे संप्रदाय परंपरेने खरे रहस्य प्रकट करणारी विश्वोत्तीर्ण अशी काव्यरसपरिप्लुत असलेली श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अलौकिक प्रज्ञा यांची सांगड पडल्याने "बोलीं अरूपाचें रूप दावीन। अतींद्रिय परी भोगवीन। इंद्रियांकरवीं ॥ ६.३६ ॥" या प्रतिज्ञेची सिद्धी झालेली प्रतीतीस येते.

वरील सर्व विवेचनाचे मर्म श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील शब्दात प्रकट केले आहे ते म्हणतात –

तें अनिरूप्य कीं निरूपिजे । ऐकतां बुद्धी आणिजे ।
वांचूनि डोळां देखिजे । ऐसें नाहीं ॥१३.१७७॥
मग तेचि इये शरीरीं । जैं आपुला प्रभावो करी ।
तैं इंद्रियांचिया व्यापारीं । डोळांहि दिसे ॥१७८॥
पै वसंताचें रिगवणें । झाडांचेनि साजेपणें ।
जाणिजे तेवीं करणें । सांगती ज्ञान ॥१७९॥
अगा वृक्षासि पाताळीं । जळ सापडे मुळीं ।
तें शाखांचिये बाहाळीं । बाहेर दिसे ॥१८०॥
कां भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव ।
नाना आचारगौरव । सुकुलीनाचें ॥१८१॥
अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेहो जैसा ये व्यक्तीं ।
कां दर्शनाचियें प्रशस्तीं । पुण्यपुरुष ॥१८२॥
नातरी केळीं कापूर जाहला । जेवीं परिमळें जाणों आला ।
कीं भिंगारीं दीपु ठेविला । बाहेरि फांके ॥१८३॥
तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जिये देहीं उमटती चिन्हें ।
तिये सांगों आतां अवधानें । चांगें आइक ॥१८४॥

गीतेमध्ये व ज्ञानेश्वरीत स्थितप्रज्ञ, भक्त, गुणातीत इत्यादि विविध नावांनी जी लक्षणे प्रकट करून सिद्धयोगाच्या सहजसाधनाचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गौरव केला आहे ती सर्व एकाच अवस्थेची लक्षणे आहेत हे लक्षात ठेविले पाहिजे. सहजयोगाचे विविध लक्षणांनी प्रकट झालेले हे श्रेष्ठत्व अगदी साररूपानेच सांगावयाचे झाले तर "जे साम्यापरौती जगीं । प्राप्ति नाहीं ॥६.४१०॥" या शब्दातच सांगावे लागेल. सामरस्य हेच सहजयोगाचे अंतिम श्रेष्ठत्व आहे. त्याच्या पलीकडे काहीही नाही. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" "नो चेन्निजविश्रांतिं विना पिंडपदयोःसमरसकरणं न भवतीति सिद्धांतः ॥५.६९॥" व "सत्यं भवेत् समरसं गुरुवत्सलानाम् ॥ ५.८१॥" असे म्हणून श्रीगुरूने शक्तिपात केल्याशिवाय पदपिंडाचे व शिवशक्तीचे सामरस्य कधीही होत नाही व निजविश्रांतीही शिष्याला कधी प्राप्त होत नाही, असा सिद्धांत प्रस्थापित केला आहे. एकदा साधकाच्या ठिकाणी शिवशक्तीचे ऐक्य प्रस्थापित झाले की, तो सिद्धयोगी बनून त्याच्या ठिकाणी पुढील लक्षणे उमटतात म्हणून उपरोक्त ग्रंथात स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

प्रसरं भासते शक्तिः संकोचं भासते शिवः ।
तयोर्योगस्य कर्ता यः स भवेत् सिद्धयोगिराट् ॥६.६३॥
विश्वातीतं यथा विश्वमेकं विराजते ।
संयोगेन सदा यस्तु सिद्धयोगी भवेत्तु सः ॥६४॥

सर्वासां निजवृत्तीनां प्रसृतिर्भजते लयम् ।
स भवेत् सिद्धसिद्धांते सिद्धयोगी महाबलः ॥६५॥
उदासीनः सदा शांतः स्वस्थोन्तर्निजभासकः ।
महानंदमयो धीरः स भवेत् सिद्धयोगिराट् ॥६६॥
परिपूर्णः प्रसन्नात्मा सर्वासर्वपदोदितः ।
विशुद्धो निर्भरानंदः स भवेत् सिद्धयोगिराट् ॥६७॥
गते न शोकं विभवे न वांछा प्राप्ते न हर्षं न करोति योगी ।
आनंदपूर्णो निजबोधलीनो न बाध्यते कालपथेन नित्यम् ॥६८॥

विस्तार, प्रसार किंवा उभारणीत शक्ती भासमान होते व संकोच, लय किंवा साम्यावस्थेत शिव भासमान होतो. अशा शिवशक्तीचे ऐक्य करणाराच योगिश्रेष्ठ होतो. जो शिवशक्तीच्या संयोगाने संसाराच्या अतीत होऊन संसारातील व्यापक परमेश्वराशी समाधीच्या द्वारा अभिन्नता प्राप्त करतो तो सिद्धयोगी होतो. जो आपल्या सर्व इंद्रियवृत्ती लीन करतो तो सिद्धांच्या सिद्धांताप्रमाणे महाबलशाली असा सिद्धयोगी होतो. जो संसारापासून नेहमी विरक्त असतो, ज्याच्या ठिकाणी शांती अखंड वास करीत असते, ज्याचे अंतःकरण नेहमी स्वस्थ अर्थात् विक्षेपरहित असते, जो स्वस्वरूप प्रकाशित करून त्यातच निमग्न असतो, जो नेहमी महान् आनंदात निमग्न असतो व जो अत्यंत धैर्यशाली असतो त्याला सिद्धयोगिराज म्हणतात. जो परिपूर्ण, प्रसन्नात्मा, जातिगुणक्रियादिरहित शब्दद्वारा अकथनीय शून्यस्वरूपाकार, अत्यंत शुद्ध व आनंदनिर्भर असतो त्याला सिद्धयोगिराट् म्हणतात. असा योगी कोणतीही गोष्ट नष्ट झाली तरी शोक करीत नाही. त्याला वैभवाची इच्छा नसते. कशाचीही प्राप्ती झाली तरी त्याला हर्ष होत नाही. तो नेहमी आनंदाने परिपूर्ण असतो व निजबोधामध्ये लीन राहतो. तो मृत्यूने किंवा काळाने बाधित होत नाही, अर्थात् अमर होतो.

सिद्धयोगसाधनामुळे प्राप्त होणाऱ्या या सहजस्थितीचे वैभव शिवसूत्रकारांनी पुढील सूत्रातून प्रकट केले आहे. "शिवतुल्यो जायते ॥३.२५॥, शरीर वृत्तिर्व्रतम् ॥२६॥, कथा जपः ॥२७॥, दानमात्मज्ञानम्॥२८॥, योऽविपस्थो ज्ञहेतुश्च ॥२९॥, स्वशक्ति प्रचयोस्य विश्वम् ॥३०॥' व "स्थितिलयौ ॥३१॥" सिद्धयोगाच्या सहज साधनामुळे साधक शिवतुल्य होतो. त्याच्या सर्व क्रिया ह्या व्रतरूप होतात. त्याचे सर्व बोलणे जपरूपच असते. आत्मज्ञान हे त्याचे दान होय. तो नेहमीच विक्षेप-रहित आनंदावस्थेत व ज्ञानावस्थेत असतो. जागृत शक्तीच्या रूपाने तो शिवतुल्य होऊन विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अवस्थेत राहतो. तो स्थितीत व लयात स्थितप्रज्ञ असतो. हेच माहात्म्य आपल्या शब्दात सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ते पाषणही आघवें। चिंतारत्नें कां नोहावें ?।
तिये भूमिके कां न यावें। सुवर्णत्व ॥१८.१६४४॥
तयाचिया गांवींचिया। नदी अमृतें वाहाविया।
नवल कायि राया। विचारीं पां ॥१६४५॥
तयाचे बिसाट शब्द। सुखें म्हणों येती वेद।
सदेह सच्चिदानंद। कां न व्हावे ते ?॥१६४६॥

सहज योगाचा हा महिमा "विजयो नामें अर्जुन विख्यातु। विजयस्वरूप श्रीकृष्णनाथु ॥१८.१६४२॥ अशी गुरुशिष्यांची जोडी एकत्र आली की उद्‌भूत झाल्याशिवाय राहत नाही. मात्र हे सर्व "आपैसे असे ॥३.७९॥, होंचि लागे ॥६.१९०॥, सहजें फावें ॥६.१८९॥" व "आपणपां समरसें ॥६.३६७॥" या सदरातील आहे. हे सर्व माहात्म्य ज्या क्रियापदांनी वर्णिले आहे ती सर्व विध्यर्थी आहेत. कोठेही आज्ञार्थी क्रियापदांचा वापर झालेला दिसत नाही. त्यामुळे या आपोआप चालणाऱ्या साधनाचा महिमा स्वतःसिद्ध पद्धतीनेच प्रकट झालेला दिसतो.

स्थितप्रज्ञ पुरुषांमध्ये सांख्ययोगरूप सहजयोगाचे हे श्रेष्ठत्व कसे प्रकट होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात

तो कामु सर्वथा जाये। जयाचें आत्मतोषीं मन राहे।
तोचि स्थितप्रज्ञु होये। पुरुष जाणें ॥२.२९३॥
नाना दुःखीं प्राप्तीं। जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं।
आणि सुखाचिया आर्ती। अडपेंजेना ॥२९४॥
अर्जुना तयाच्या ठायीं। कामक्रोधु सहजें नाहीं।
आणि भयातें नेणें कहीं। परिपूर्णु तो ॥२९५॥

कर्मयोगरूप सहजयोगाचे माहात्म्य वर्णन करताना ते म्हणतात—

देहीं असतेनि देहधर्में। एथ तोचि एकु न लिंपे कर्में।
जो अखंडित रमे। आपणपांचि ॥३.१४६॥
जे तो आत्मबोधें तोषला। तरी कृतकार्यु देहीं जाहला।
म्हणौनि सहजें सांडवला। कर्मसंगु ॥१४७॥

आत्मयज्ञयोगरूप सहजयोगाचे श्रेष्ठत्व वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

म्हणौनि अवसरें जें जें पावे। कीं तेणेंचि तो सुखावे।
जया आपुलें आणि परावें। दोन्ही नाहीं ॥४.१०९॥
तो दिठी जें पाहे। तें आपणचि होऊनि जाये।
आईके तें आहें। तोचि जाहला ॥११०॥
चरणीं हन चाले। मुखें जें जें बोले।
ऐसें चेष्टाजात तेतुलें। आपणचि जो ॥१११॥

संन्यासयोगरूप सहजयोगाचे अलौकिकत्व सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तो जयाकडे वासु पाहे । तेउती सुखाची सृष्टि होये ।
तो म्हणे तेथ राहे । महाबोधु ॥५.७४॥
तैसें नाम रूप तयाचें । एऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें ।
मन साम्या आलें जयाचें । सर्वत्र गा ॥१०१॥
तरी मृगजळाचेनि पूरें । जैसें न लोटिजे कां गिरिवरें ।
तैसा शुभाशुभीं न विकरे । पातलिया जो ॥ १०३॥
तोचि तो निरुता । समदृष्टी तत्त्वतां ।
हरि म्हणे पंडुसुता । तोचि ब्रह्म ॥१०४॥
जया आपणपें सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं ।
तो विषय न सेवी हें काई । विचित्र येथ ॥१०५॥
सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडलेनि अंतरें ।
रचिला म्हणौनि बाहिरें । पाउल न घाली ॥१०६॥
सांगैं कमुददळाचेनि ताटें । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें ।
तो चकोरु काई वाळुवंटें । चुंबितु असे ? ॥१०७॥
तैसें आत्मसुख उपाइलें । तयासि आपणपेंचि फावलें ।
तया विषयो सहजें सांडवले । म्हणो काई ? ॥१०८॥
जे ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण गुंतले ।
ते मी जाणें निखळ वोतले । सामरस्याचे ॥१३७॥

पंथराजरूप किंवा ध्यानयोगरूप सहजयोगाचे अपूर्वत्व सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा । नाहीं विषयांचिया येरझारा ।
जो आत्मबोधाचिया वोवरां । पहुडला असे ॥६.६२॥
जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो नेघे ।
विषय पासींही आलियां से न रिगे । हें काय म्हणौनि ॥६३॥
देखैं मेघौनि सुटती धारा । तिया न रुपती जैसिया सागरा ।
तैशीं शुभाशुभें योगीश्वरा । नव्हती आनें ॥८७॥
ते जैशी निर्वाण वर्णुचि करी । तैशी जयाची बुद्धी चराचरीं ।
होय साम्याची उजरी । निरंतर ॥९७॥
ऐसें जाणणें जें बरवें । तें फावलें तया आधवें ।
म्हणौनि आहाचवाहाच न झकवें । येणें आकारचित्रें ॥९९॥
पुढतीं अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतदिवसें ।
मग आपणपांचि आपणु असे । अखंडित ॥१०५॥

ऐसिया दृष्टी जो विवेकी । पार्था तो एकाकी ।
सहजें अपरिग्रही जो तिहीं लोकीं । तोचि म्हणौनि ॥१०६॥
मग मेरूपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें ।
दाटिजो पां पडिभरें । चित्त न दटे ॥३६९॥
ऐसें आपणपां रिगोनि ठाये । मग देहाचि वासु न पाहे ।
आणिकचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ॥३७१॥

ज्ञानविज्ञानयोगरूप सहजयोगाचे महिमान सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया ऐकु आहे ।
अथवा निवांत जरी राहे । तऱ्ही मीचि तया ॥७.१३२॥
हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवांचूनि नाहीं ।
जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडालिया घटा ॥१३३॥
हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतितिरसाचा वोतला भावो ।
म्हणौनि भक्तांमाजीं रावो । आणि ज्ञानिया तोचि ॥३६॥

अक्षरब्रह्मयोगरूप सहजयोगाचे लोकोत्तरत्व स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात—

हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तमु । ऐसा साच जयाचा मनोधर्मु ।
तया आस्तिकाचा आश्रमु । पांडवा गा ॥८.१९३॥
जें निगर्वाचें गौरव । जें निर्गुणाचि जाणिव ।
जें सुखाची राणिव । निराशांसी ॥१९४॥
जें संतोषियां वाढिलें ताट । जें अचिंता अनाथांचें मायपोट ।
भक्तीसी उजू वाट । जया गांवा ॥१९५॥
हें एकेक सांगोनि वायां । काय फार करूं धनंजया ।
पैं गेलिया जया ठाया । तो ठावोचि होईजे ॥१९६॥

राजविद्याराजगुह्ययोगरूप सहजयोगाचे ऐश्वर्य प्रकट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात—

जयाचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा ।
जयाचें मन ओलावा । विवेकासी ॥९.१८९॥
जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले ।
जे शांतीसी आले । पालव नवे ॥९.१९०॥
जें परिणामा निघाले कोंभ । जें धैर्यमंडपाचे स्तंभ ।
जें आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरिले ॥१९१॥

विभूतियोगरूप सहजयोगाचा महिमा कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

चित्तें मीचि जाहाले । मियांचि प्राणें धाले ।
जीवों मरों विसरले । बोधाचिया भुली ॥१०.११९॥
मग तया बोधाचेनि माजे । नाचती संवादसुखाचीं भोजें ।
आतां एकमेकां घेपे दीजे । बोधचि वरी ॥१२०॥
जैशीं जवळिकेंचीं सरोवरें । उचंबळलिया कालवती परस्परें ।
मग तरंगासि धवळारें । तरंगचि होती ॥१२१॥
तैसी येरयेरांचिये मिळणी । पडत आनंदकल्लोळांची वेणी ।
तेथ बोध बोधाचीं लेणीं । बोधेंचि मिरवी ॥१२२॥
जैसें सूर्यें सूर्यातें वोंवाळिलें । कीं चंद्रें चंद्रम्या क्षेम दिधलें ।
ना तरी सरिसेनि पाडें मीनले । दोनी वोघ ॥१२३॥
तैसें प्रयाग होत सामरस्याचें । वरी वोसाण तरत सात्त्विकाचें ।
ते संवादचतुष्पथींचे । गणेश जाहले ॥१२४॥

विश्वरूपदर्शनयोगरूप सहजयोगाचे अनन्यसाधरणत्व कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तैसें माझिये साक्षात्कारीं । सरे अहंकाराची वारी ।
अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय ॥११.६९४॥
मग मी तो हें आघवें । एक मीचि आथी स्वभावें ।
किंबहुना सामावे । समरसें तो ॥६९५॥
मग भूतें हें भाष विसरला । जे दिठी मीचि आहें सूदला ।
म्हणौनि निर्वैर जाहला । सर्वत्र भजे ॥६९८॥

भक्तियोगरूप सहजयोगाचे अमृतधारेप्रमाणे धर्मास अनुकूल असलेले महिमान सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेंचि कहीं ।
आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ॥१२.१४४॥
उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ।
हें कांहींच नेणिजे । वसुधा जेवीं ॥१४५॥
आणि मी हे भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे ।
सुख दुःख जाणणें । नाहीं जया ॥१४९॥
जीवु परमात्मा दोन्ही । बैसवुनि ऐक्यासनीं ।
जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ॥१५३॥
जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींचि न देखे ।
म्हणौनि भोगविशेखें । हरिखेजेना ॥१९०॥
आपणचि विश्व जाहला । तरी भेदभावो सहजचि गेला ।
म्हणौनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ॥१९१॥

माधुर्ये चंद्रिका । सरिसी राया रंका ।
तैसा जो सकळिकां । भूतां समु ॥२०४॥
हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाचि स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥२१३॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोगरूप सहजयोगाचे वैभव कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी कवणेही विषयींचें । साम्य होणें न रुचे ।
संभावितपणाचें । वोझें जया ॥१३.१८५॥
आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां ।
योग्यतेचें येतां । रूप आंगा ॥१८६॥
तैं गजबजो लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा ।
कां बाहीं तरतां वळसा । दाटला जेवीं ॥१८७॥
इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षितीं ।
जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूंचे ॥४३२॥

गुणत्रयविभागयोगरूप सहजयोगाचे असामान्यत्व वर्णन करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

तरी वस्त्रासि पाठीं पोटीं । नाहीं सुतावांचूनि किरीटी ।
ऐसें सुये दिठी । चराचर मद्रूपें ॥१४.३४९॥
रात्रि तैसें पाहलें । हें धारणा जेवीं एक जालें ।
आत्माराम देहीं आतलें । द्वंद्व तैसें ॥३५५॥
पैं निद्रिताचेनि आंगेशीं । साप तैशी उर्वशी ।
तेवीं स्वरूपस्था सरिशीं । देहीं द्वंद्वें ॥३५६॥
म्हणौनि तयाच्या ठायीं । शेणा सोनया विशेष नाहीं ।
रत्ना गुंडेया कांहीं । नेणिजे भेदु ॥३५७॥
घरा येवो पां स्वर्ग । कां वरिपडो वाघ ।
परी आत्मबुद्धीसि भंग । कदा नोहे ॥३५८॥
निवटलें न उपवडे । जळिनलें न विरूढे ।
साम्यबुद्धि न मोडे । तयापरी ॥३५९॥
हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजो । का नीच म्हणौनि निंदिजो ।
परी नेणें जळों विझों । राखोंडी जैसी ॥३६०॥
तैसी निंदा आणि स्तुती । नये कोण्हेचि व्यक्ती ।
नाहीं अंधारें कां वाती । सूर्या घरीं ॥३६१॥

पुरुषोत्तमयोगरूप सहजयोगाचे पुरुषोत्तमत्व दाखविताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**जया पुरुषांचें कां मन । सांडोनि गेलें मोह मान ।**
**वर्षांती जैसें घन । आकाशातें ॥१५.२८५॥**

**आणि अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर ।**
**चरताति जे सविचार । राजहंसु ॥२९६॥**

**पैं आघवेंचि आपुलेंपणें । नुरेचि जया अभिलाषणें ।**
**जैसें येथूनि पऱ्हां जाणें । आकाशा नाहीं ॥३००॥**

दैवासुरसंपद्‌विभागयोगरूप सहजयोगाची संपन्नता दाखविताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

**कां फेडित पाप ताप । पोखीत तीरींचें पादप ।**
**समुद्रा जाय आप । गंगेचें जैसें ॥१६.१९९॥**

**कां जगाचें आंध्य फेडितु । श्रियेचीं राऊळें उघडितु ।**
**निघे जैसा भास्वतु । प्रदक्षिणे ॥२००॥**

**तैसी बांधिलीं सोडिता । बुडालीं काढिता ।**
**सांकडीं फेडिता । आर्तांचिया ॥२०१॥**

**किंबहुना दिवसराती । पुढिलांचें सुख उन्नती ।**
**आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे ॥२०२॥**

श्रद्धात्रयविभागयोगरूप सहजयोगाचे महिमान सांगताना श्रीज्ञानेश्वरमहा-राज म्हणतात–

**म्हणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र ।**
**तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरी ॥१७.२३२॥**

**तें स्वलाभ लाभलेपणें । मन मनपणहीं धरुं नेणें ।**
**शिवतलें जैसें लवणें । आपुलें निज ॥२३३॥**

**तेथ कें उठती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव ।**
**घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे ते ॥२३४॥**

मोक्षसंन्यासयोगरूप सहजयोगाचे श्रेष्ठत्व वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**ते ब्रह्मभावयोग्यता । पुरुषु तो पंडुसुता ।**
**आत्मबोधप्रसन्नता–। पदीं बैसे ॥१८.१०९१॥**

**तेथ चेइलियां येकपण । दिसे जें आपुलया आपण ।**
**तेंही जातां नेणों कोण । होइजे जेवीं ॥१२०६॥**

**चलां कल्पतरूंचे अरव । चेतना चिंतामणीचें गांव ।**
**बोलते जे अर्णव । पीयूषाचे ।।१७९८।।**

सारांश, असा हा सिद्धयोगाच्या सहज साधनाचा महिमा आहे. श्रीसंत तुकाराममहाराजांनी "तुका म्हणे साधन सुलभ गोमटे" म्हणून त्याचा गौरव केला आहे; तर संत कबीरांनी "साधो सहज समाधी भली । गुरु प्रताप जा दिन तै उपजी, दिन दिन अधिक चली ।।" म्हणून त्याचे अपूर्वत्व प्रकट केले आहे आणि स्वामी ब्रह्मानंदांनी आपल्या प्रसिद्ध पदात असे म्हटले आहे की–

**नारायण जिनके हिरदेमें । सो कछु कर्म करे न करे रे ।।टेक।।**
**नाव मिलो जिसको जलअंदर । बाहुसे नीर तरे न तरे रे ।।१।।**
**पारसमणि जिनके घरमाही । सो धन संच धरे न धरे रे ।।२।।**
**सूरज को परकाश भयो जब । दीपकी ज्योत जरे न जरे रे।।३।।**
**ब्रह्मानंद रूप जिन जानो । काशीमें जाय मरे न मरे रे ।।४।।**

**जीवींचे निजगुज :–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " हें जीवींचें निजगुज ।।४.२८।।, हें संपूर्ण जाणे वर्म ।। ५.९६ ।।, तो हा नाथसंकेतीचा दंशु ।। ६.२९१ ।। ऐसें वर्म जें गूढ । तें कीजेल वाक्यारूढ ।। ७.९ ।।, हें सर्वस्व आमुचे गूढ । परि दाविलें तुज उघड ।।९.१५५।।" व "भोगिजे तें अवधारीं । रहस्य हे ।। १८.१३४५ ।। " असे म्हणून सिद्धयोगाचे श्रेष्ठत्व, महिमान, अलौकिकत्व व अपूर्वत्व प्रकट केले आहे. मुळात गीतेतच " इदं ते गुह्यतमं ।।९.१।।, राजविद्या राजगुह्यं ।।९ २।।, मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।।११.१।।, इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।।१५.२०।।, सर्वं गुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।।१८.६४।।" व " य इमं परमं गुह्यं ।।१६.६८।।" असे म्हणून सिद्धयोग हा परम गुह्यातील गुह्य व अत्यंत श्रेष्ठ अशा रहस्यातील श्रेष्ठ आध्यात्मिक रहस्य आहे असे सकळ गुह्यांचा गोसावी असलेल्या श्रीकृष्णनाथांनी स्वमुखानेच कथन केले आहे. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं सिद्धयोगाला वर्म, गूज, गुह्य, गुपित, दंश, रहस्य व गूढ म्हणून संबोधून " ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्गुरूंनीं केलें कोडें । माथां हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ।। ६.४९२।। " अशा प्रकारे सद्गुरू श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी शक्तिपातदीक्षा देऊन आपणास कृतार्थ कसे केले हे सांगून " म्हणौनि येणें मुखें जें जें निगे । तें संतांच्या हृदयीं साचचि लागे ।। ६.४९३ ।। " असे म्हणून सिद्धयोगाने प्राप्त होणाऱ्या कोडयाचा उलगडा केला आहे व " हे स्वहितातें निववितीं । परिणामाते जीववितीं । सुखाची वाहविती । लाखोली जीवां ।। ६.४९६।।" असा निर्वाळा दिला आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असा निर्वाळा दिला असल्यामुळे एकमात्र सद्गुरु-कृपेशिवाय म्हणजे शक्तिपात झाल्याशिवाय गीतेचे रहस्य उलगडणे हे कालांतीही

शक्य नाही, हे त्रिकालाबाधित सत्य आहे, हे सिद्ध होते. भगवंतांनी गीतेत " मौनं चैवास्मि गुह्यानां ।।१०.३८।।" असे गुह्यातील मौन मी आहे असे सांगितले आहे. म्हणजे "आघवियाचि गूढां- । माजीं मौन तें मी सुहाडा । म्हणौनि न बोलतयां पुढां । स्त्रष्टाही नेण होय ।। १०.२९८।।" असे ब्रह्मदेवालाही न जाणविणारे परमात्म्याचे मौनरूप गूढ आहे अशा मौनरूपाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांपुढे श्रीनिवृत्तिनाथमहाराज सद्‌गुरुरूपाने उभे असल्याने त्यांनी आपल्या सद्‌गुरूंच्या मौनाचे रहस्य जाणून त्यांना नमन करताना असे म्हटले आहे की—

**मौन गा तुझें राशीनांव । आतां स्तोत्रीं कें बांधों हांव ।**
**दिसती तेतुली माव । भजों काई ।।१७.१५।।**
**दैविकें सेवकु हों पाहों । तरी भेदिता द्रोहोचि लाहों ।**
**म्हणौनि आतां कांहीं नोहों । तुजलागों जी ।।१६।।**
**जें सर्वथा सर्वही नोहिजे । तें अद्वया तूतें लाहिजे ।**
**हें जाणें मी वर्म तुझें । आराध्य लिंगा ।।१७।।**
**तरी नुरोनि वेगळेंपण । रसीं भजिन्नलें लवण ।**
**तैसें नमन माझें जाण । बहु काय बोलों ।।१८।।**

सद्‌गुरूच्या मौनाचा हा विशेष अर्थ प्रकट करताना " भारतीय संस्कृति और साधना ', खंड दोन, या ग्रंथातील " संत परिचय " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, " जिन्होंने सत्यको उपलब्ध किया है, वे समर्थ होनेपर और आवश्यक समझनेपर दूसरेकोभी उपदेश देते हैं। यह उपदेश श्रेष्ठ अधिकारीको प्रातिभ ज्ञानके रूपमें दिया जाता है। यह प्रातिभ ज्ञान अपने आपही हृदयमें उत्पन्न हुआ करता है। यह अनौपदेशिक ज्ञान होनेपर भी एक प्रकारसे उपदेशरूप है। बाह्यशब्दका आश्रय लेकर इसको अन्यत्र संचारित नहीं करना पडता। इस प्रकारके विशुद्ध ज्ञानके द्वाराही हृदयका संशय सम्यक् प्रकारसे मिट जाता है। "गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यः संछिन्नसंशयः।" इस कथनका यही तात्पर्य है।" त्याचप्रमाणे उपरोक्त ग्रंथातच " सहजयान और सिद्धमार्ग " या लेखात लेखकाने गुह्य मौनाचा गूढतम अर्थ नाथसंप्रदायाधारे काय आहे हे प्रकट करताना असे म्हटले आहे की, "एकमात्र गुरूपदेशही इस अवस्थाकी प्राप्तिका उपाय है। इसके लिये दूसरा कोई उपाय नहीं है। किंतु गुरुका स्वरूप क्या है ?। सहजिया लोग कहते हैं, श्रीगुरु ' युगनद्धरूप ' मिथुनाकार हैं। ये शून्यता और करुणाकी मिलित मूर्ति हैं — उपाय और प्रज्ञाके समरस विग्रह हैं। यह युगलरूपही परमार्थरूप और महासुखका आलय है। इसका अवलंबन किये बिना केवल संसारसे उत्तीर्ण होनाही नही संसार और निर्वाणमें समान दृष्टि प्राप्त करना भी असंभव है। सहजिया मतमें मौनमुद्राही श्रीगुरुका उपदेश है । वाक्यद्वारा सहज -या अनुत्तर

ज्ञानका संवाद नहीं दिया जा सकता । जो कुछ मन और इन्द्रियोंको गोचर है, मन और इंद्रिया जितनी दूरतक जा सकती हैं, वह सभी विकल्पके अंतर्गत है। जो मन और इन्द्रियोंके पथपर निरंतर भ्रमण करते रहते हैं उनको पृथग्जन कहा जाता है। उनके देह, वाक्य और चित्त सहजतत्त्वका ग्रहण नहीं कर सकते । सहजियोंके मतमें महासुख अथवा सहजानंदमय श्रीगुरुदेवही 'जिनरत्न' शब्दसे अभिहित हुये हैं । वे आनंद अथवा रतिके प्रभावसे शिष्यके अंदर महासुखका विस्तार करते हैं, इसीलिये उनका इतना अधिक गौरव है–" सद्गुरुः शिष्ये रतिस्वभावेन महासुखं तनोति ।" मौखिक उपदेशसे किसी स्थायी फलका लाभ नहीं होता । "

उपरोक्त विवेचनाच्या आधाराने चालत गेले तरच श्रीकृष्णनाथांनी अर्जुनासाठी जे सिद्धयोगाचे गीतारहस्य प्रकट केले आहे व त्याचा जो भावार्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उलगडून दाखविला आहे त्याच्या अंतरंगात प्रवेश होऊन गुह्यतिगुह्य दंश पकडला जाऊन तो अनुभूतीच्या प्रांतात आणणे शक्य होईल. " एऱ्हवीं आघवी गोठी होईल । मुकिया बहिरयाची ॥६.२६ ॥ " हेच खरे आहे. " पाहा पां नवल कैसें चोज । कें उपदेशु केउतें झुंज । परी पुढें वालभाचें भोज । नाचत असे ॥६.१२३॥" असे म्हणून श्रीकृष्ण सद्गुरूंनी आपल्या सुवर्म शिष्याला जो उपदेश केला आहे त्याचे इंगित उपरोक्त प्रकारच्या सद्गुरूंच्या स्वभावात आहे हे निश्चित आहे. याच दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात –

> ऐसी काय नेणों तुझिये आवडी । जाहली प्रसन्नता आमुची वेडी ।
> म्हणौनि गौप्याचीही गुढी । उभविली जगीं ॥११.६१३॥
> परी तुजपुढां सांगितलें । तें अर्जुना ऐसें जालें ।
> जें गोप्यधन काढिलें । माझें आजि ॥१५.५७८॥
> पैं जळां आपणपें देतां । लवण भुललें पंडुसुता ।
> कीं आघवें तयाचें होतां । न लजेचि तें ॥१८.१३५०॥
> तैसा तूं माझ्या ठाईं । राखो नेणसीचि कांही ।
> तरी आतां तुज काई । गोप्य मी करूं ? ॥१३५१॥
> म्हणौनि आघवींचि गूढें । जें पाऊनि अति उघडें ।
> तें गोप्य माझें चोखडें । वाक्य आइक ॥१३५२॥

असे हे सिद्धयोगाचे गूढ मर्म एकमात्र सद्गुरुकृपेनेच समजणे व संक्रांत करता येणे शक्य आहे असा स्वतःचाच निर्वाळ देऊन सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> जी कनकाचें निखळ । वोतूं येईल भूमंडळ ।
> चिंतारत्नीं कुळाचळ । निमूं येती ॥१८.१७७७॥
> सातांही हो सागरातें । सोपें भरितां अमृतें ।

दुवाड नोहे तारांतें। चंद्र करितां ॥१७७८॥
कल्पतरूचे आराम। लावितां नाहीं विषम।
परी गीतार्थाचें वर्म। निवडू न ये ॥१७७९॥

गीतार्थाचे हे रहस्य गूढ होण्याचे कारण स्वतः परमात्माच आपल्या अचित्य आत्मशक्तीमुळे गूढ बनलेला असतो असे श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगताना म्हणतात—

तंव वैकुंठपिठींचें लिंग। जो निगमपद्माचा पराग।
जिये जयाचेनि हें जग। अंगच्छाया ॥१७.४६॥
काळ सावियाचि वाढु। लोकोत्तर प्रौढु।
अद्वितीय गूढु। आनंदघनु ॥४७॥
इथे श्लाघिजती जेणें बिकें। तें जयाचें आंगीं असिकें।
तो श्रीकृष्ण स्वमुखें। बोलत असे ॥४८॥

ज्या आत्मशक्तीमुळे परमात्मा गूढ बनतो ती शक्ती जेव्हा सद्गुरुकृपेने जागृत होते तेव्हा त्याचे गूढत्व फिटून तो स्वसंवेद्य होतो, हे सिद्धयोगाचे रहस्य, मर्म किंवा सार आहे. हा साररूप महिमा प्रकट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

या उपाधीमाजीं गुप्त। चैतन्य असे सर्वगत।
तें तत्त्वज्ञ संत। स्वीकारिती ॥२.१२६॥
सलीलीं पय जैसें। एक होऊनि मीनलें असे।
परी निवडूनि राजहंसें। वेगळें कीजे ॥१२७॥
कीं अग्निमुखें किडाळ। तोडोनियां चोखाळ।
निवडिती केवळ। बुद्धिमंत ॥१२८॥
ना तरी जाणिवेच्या आयणी। करितां दधिकडसणी।
मग नवनीत निर्वाणीं। दिसे जैसें ॥१२९॥
कीं भूस बीज एकवट। उपणितां राहे घनवट।
तेथ उडे तें फलकट। जाणों आलें ॥१३०॥
तैसे विचारितां निरसिलें। तें प्रपंचु सहजें सांडवलें।
मग तत्त्वता तत्त्व उरलें। ज्ञानियांसि ॥१३१॥

याप्रमाणे जडचेतन एकत्र मिसळून जे गूढ तयार झालेले असते ते राजहंस, पाणी व दूध निराळे करतो, अग्नी हीन व सोने निराळे करतो, दही घुसळल्यामुळे लोणी व ताक निराळे होते आणि उपणल्यामुळे कोंडा व धान्य निराळे होते त्या प्रमाणे सद्गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत होऊन जडचेतनभेदप्रक्रिया घडून येऊन प्रपंच सांडतो व साधक तत्त्वरूप होतो. हेच सिद्धयोगाचे 'जीवींचें निजगुज,' आहे व हेच एकमात्र त्याचे महिमान आहे. यापलीकडे काही नसल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुनःपुन्हा याचा उल्लेख करताना असे म्हटले आहे की —

पिडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतींचा दंशु ।।६.२९१।।

ऐसें वर्म जें गूढ । तें कीजेल वाक्यारूढ ।
जेणें थोडन पुरे कोड । बहुत मनींचें ।।७.९।।

हें सर्वस्व आमुचें गूढ । परि दाविलें तुज उघड ।
आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ।।९.१३५।।

हा दंशु जंव नये हातां । तंव माझें साचोकारपण पार्था ।
न संपडे गा सर्वथा । जेंवि तुषीं कणु ।।९.१३६।।

तरी ऐकें गा सुवर्म । वाक्य माझें परम ।
जें अक्षरें लेऊनी परब्रह्म । तुज खेंवासी आलें ।।१०.६२।।

जो येणें क्रमें ब्रह्म । होणें करी गा सुगम ।
तया क्रमाचें आतां वर्म । आईक सांगों १८.१०१०।।

तरी गुरु दाविलियां वाटा । येऊनि विवेकतीर्थतटा ।
धुऊनियां मळकटा । बुद्धीचा तेणें ।।१८.१०११।।

हे जे वर्म, गूढ किंवा दंश आहे त्यालाच गुरुकृपा हे नाव असून शास्त्रीय परिभाषेत शास्त्रकारांनी शक्तिपातदीक्षा म्हणून त्याचा उल्लेख केला आहे. पिंडाने पिंडाचा ग्रास होणे, वाक्य अक्षरे लेऊन खेवास येणे व गुरु दाविलिया वाटा जाणे या सर्वांचा अर्थ एकच आहे. अर्जुनाला 'जीवींचें निजगुज' प्रकट करताना ते विषयानुरोधाने भिन्न शब्दांनी प्रकट झाले आहे एवढेच. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरवर भिन्नभिन्न भासणाऱ्या परंतु स्वरूपतः एकरूप असणाऱ्या गीतेतील सर्व मार्गाचें, "म्हणौनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म । हें संपूर्ण जाणे वर्म । समदृष्टीचें ।।५ ९६।।" या सिद्धयोगरहस्याच्या वर्मदृष्टीचा अवलंब करून, समरसीकरण केले आहे. त्यामुळे वर्म म्हणजे अपुनरावृत्ती, वर्म म्हणजे नामस्मरण, वर्म म्हणजे शक्तीकडून होणारी सृष्टीची उभारणी व संहारणी, वर्म म्हणजे यज्ञ, वर्म म्हणजे कर्म, वर्म म्हणजे क्रमयोग, वर्म म्हणजे स्वस्वरूपप्राप्ती, वर्म म्हणजे अनुभूती, वर्म म्हणजे निद्रेची वाट मोडणारे शक्तीचे निखळ उद्‌बोधन, वर्म म्हणजे द्वैत वारी सरणे व वर्म म्हणजे साम्याने भजणे असे त्यांनी स्पष्ट करून सिद्धयोगाच्या केंद्रबिंदूमध्ये ही सर्व वर्मे गुंफून टाकली आहेत. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" "सिद्धयोग हे नानासंकेतांचे खरे सारभूतरहस्य प्रकट करणारे दिव्यशास्त्र आहे," असे म्हणून जो गौरव केला आहे त्याचे अत्यंत विशाल, श्रेष्ठ, उच्च, दिव्य, अलौकिक, अपूर्व व अनन्यसाधारण असे भव्योत्कट स्वरूप सकलसाररूपसिद्धांताच्या रूपाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या महान् प्रतिभेने आकळून ते ज्ञानेश्वरीच्या सिद्धयोग दर्शनात प्रकट होण्यात दिसून येते. महायोगी गोरक्षनाथ "सिद्धासिद्धांतपद्धतीत म्हणतात—

**एतच्छास्त्रं महादिव्यं रहस्यं पारमेश्वरम् ।**
**सिद्धांतं सर्वसारस्य नानासंकेतनिर्णयम् ।।६.९७।।**
**सिद्धानां प्रकटं सिद्धं सद्यः प्रत्ययकारकम् ।**
**आत्मानंदकरं नित्यं सर्वसंदेहनाशनम् ।।९८।।**

सिद्धयोग हे महादिव्य असे शास्त्र आहे. हे परमेश्वर प्राप्तीचे साधनरहस्य सांगणारे शास्त्र असून हे रहस्य महेश्वरांनीच स्वतः उद्भासित, उद्घाटित व प्रकट केले आहे; कारण या साधन रहस्याचे प्रवर्तक ते स्वतःच आहेत. हे सिद्धयोगशास्त्र सर्व सारभूत सिद्धांताचे सार असून नाना तऱ्हेचे साधनरहस्यातील संकेत हे सिद्धयोगाशी कसे एकरूप आहेत हे ते दाखविते व त्याचा अंतिम निर्णय देते. सिद्धयोगशास्त्र हे सिद्धांचे अत्यंत गोपनीय सिद्धांत प्रकट करणारे असे सिद्धांमध्ये प्रसिद्ध असलेले सिद्धशास्त्र आहे. सिद्धयोगासारखे तत्काल प्रचीती देणारे शास्त्र या भूतलावर नाही. हे शास्त्र साधकाच्या सर्व संशयांचा नाश करून नित्य अशा आत्मनंदाची प्राप्ती करून देते.

सिद्धयोगाचे हे रहस्य श्रीज्ञानेश्वरमहाराजांना परंपरेने प्राप्त झालेले असल्यामुळे त्यांनी " एवं तु सर्वसिद्धांतदर्शनानां पृथक् पृथक् भूतानामपि ब्रह्मणि समन्वयसूचनशीलोपदेशकर्ताऽवधूत एव कर्ता सद्‌गुरुः प्रशस्यते । एषामुपदेशानां पृथक् पृथक् सूचितानां जायते तत्र विश्रांतिः सा विश्रांतिर्विधीयते ।।६.६९।। " हा महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" कथन केलेला सिद्धयोगशास्त्रसंप्रदायवैशिष्टचसूचक महासिद्धांत ज्ञानेश्वरीत आद्योपांत राबविल्याचे स्पष्टपणे दृग्गोचर होते. जो पृथक् पृथक् असलेल्या सर्व सिद्धांताच्या दर्शनांचा सच्चिदानंद ब्रह्मात किंवा ब्रह्मप्राप्तीच्या शास्त्रात समन्वय करून तसा उपदेश करतो तोच अवधूत, सिद्धयोगी व सद्‌गुरू होय. अशा प्रकारे नानाप्रकारचे पृथक् उपदेश ज्या शास्त्रात, योगात, पद्धतीत, मार्गात किंवा पथात ते एकरस आहेत असे दाखविलेले असते तेथेच साधकाला खरी विश्रांती प्राप्त होते व तिलाच खरी विश्रांती म्हणतात. जेथे भिन्न भासणारे मतप्रवाह एक होत नाहीत ते शास्त्रच नव्हे. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतेचा भावार्थ प्रकट करताना " तैं महासिद्धांताचा आवांका। सिद्धांतकक्षा अनेका भिडऊनि ।।१८.१२४२।। " याप्रमाणे ज्ञानेश्वरीतील सर्व सिद्धांत सिद्धयोगाशी एकरूप कसे आहेत हे स्पष्ट केले आहे. वर उल्लेखिलेल्या वर्माच्या किंवा रहस्याच्या त्यांनी केलेल्या व्याख्या पाहिल्या की, ज्ञानेश्वरीचे गूढ उकलल्याशिवाय व सकलसिद्धांत आकळून ते संप्रदायपरंपरानिविष्ट तत्त्वाशी अभिन्न राखून आपल्या सर्वस्पर्शी भावाने सिद्धयोगदर्शनात त्याची परिणिती कशी होते हे दाखविणाऱ्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ऋतंभरा प्रज्ञेचे दर्शन झाल्याशिवाय राहत नाही. या प्रज्ञेच्या प्रकाशातच त्यांच्याकडून गीतेचे वर्म, रहस्य, गूढ किंवा गूज आकळिले जाऊन ते " ज्ञानेश्वरीः सिद्धयोग दर्शनाच्या " रूपाने उपरोक्त भिन्नांगां-

सह त्यांचा महिमा उद्‌भासित करीत कसे प्रकट झाले आहे याचे त्यांच्याच शब्दात दर्शन घेणे विलोभनीय ठरेल.

वर्म म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तीमुळे जडचेतनभेदप्रक्रियारूप संहारणी घडून येऊन साधकाला अपुनरावृत्तीची प्राप्ती होणे होय हे सांगताना ते म्हणतात–

तैसा संसारु जया गांवा। गेला सांता पांडवा।
होऊनि ठाके आघवा। मोक्षाचाची ॥८.१९८॥
तरी अग्नीमाजीं आलें। जैसें इंधनचि अग्नि जहालें।
पाठीं न निवडेचि कांहीं केलें। काष्ठपण ॥१९९॥
नातरी साखरेचा माघौता। बुद्धिमंतपणेंही करितां।
परि ऊंस नव्हे पंडुसुता। जियापरी ॥२००॥
लोहाचें कनक जाहलें। हें एकें परिसेंचि केलें।
आतां आणिक कंचें तें गेलें। लोहत्व आणी ॥२०१॥
म्हणौनि तूप होऊनि माघौतें। जेवीं दूधपण न येचि निरुतें।
तेवीं पावोनियां जयातें। पुनरावृत्ति नाहीं ॥२०२॥
तें माझें परम। साचोकारें निजधाम।
हें आंतुवट तुज वर्म। दाविजत असे ॥२०३॥

सिद्धयोग हाच सर्व गुह्यांचा स्वामी आहे हे वर्म स्पष्ट करताना ते म्हणतात–

जे जाणणेया आघवेयांच्या गांवीं। गुरुत्वाची आचार्य पदवी।
जें सकळ गुह्यांचा गोसावी। पवित्रां रावो ॥९.४७॥
आणि धर्माचें निजधाम। तेवींची उत्तमाचें उत्तम।
पैं जया येतां नाहीं काम। जन्मांतराचें ॥४८॥

सिद्धयोग हा निद्रेची वाट मोडणारा, शक्तीच्या निखळ उद्‌बोधनाने द्वैताची वारी संपवून आपला आपणच स्वसंवेद्य आत्मरूप अशा अद्वैताची प्राप्ती करणारा आहे व हेंच खरे वर्म आहे हे स्पष्ट करताना ते म्हणतात–

म्हणौनि ये निद्रेची वाट मोडे। निखिळ उद्‌बोधाचेंचि आपणपें घडे।
ऐसें वर्म जें आहे फुडें। तें दावों आतां ॥९.९६॥
एऱ्हवीं द्वैताची वारी। सारूनि ऐक्याच्या परिवरीं।
भोगिजे तें अवधारीं। रहस्य हें ॥१८.१३४५॥

वर्म म्हणजे आत्मशक्तीपासून पिंडब्रह्मांडाची होणारी उभारणी होय हें सांगताना ते म्हणतात–

यालागीं एकिहेळां तुज। दाऊं आतां वर्म निज।
तरी सव भूतांकुरें बीज। विरूढत असे तें मी ॥१०.३०४॥
गुण ते किती किंधर्म। कायी यया रूपनाम।
कें जालें हें वर्म। अवधारीं पां ॥१४.१३७॥

**तरी सत्त्वरजतम । तिघांसि हें नाम ।**
**आणि प्रकृति जन्म–। भूमिका ययां ॥१३८॥**

वर्म म्हणजे अनाहतनादयुक्त नाम, कर्मनिच कर्म दूर करण्याची युक्ती, आत्मरूप सात्त्विक यज्ञ व क्रमयोगाचा महिमा आहे हे सांगताना ते म्हणतात–

**घेऊनि येथिंचे वर्म । जैं विचारिसी हें नाम ।**
**तैं केवळ हेंचि ब्रह्म । जाणसी तूं ॥१७.४००॥**
**तैसा कर्माचा बाधु कर्में । निस्तरिजे करितेनि वर्में ।**
**हे तामसु नेणें भ्रमें । माजविला ॥१८.१८२॥**
**तरी तिहींमाजीं प्रथम । सात्त्विक यज्ञाचें वर्म ।**
**आईक पां सुमहिम–। शिरोमणी ॥१७.१७०॥**
**हा ठायवरी सुवर्मा । क्रमयोगी आहे महिमा ।**
**म्हणौनि वेळोवेळां तुम्हां । सांगतों आम्ही ॥१८.१२२३॥**

वर्म म्हणजे सिद्धयोगशास्त्रातील शक्तिपातदीक्षेमुळे प्राप्त होणारी विश्वरूपाची अनुभूती असल्यामुळे तिच्या प्राप्तीचा प्रस्ताव सद्‌गुरुनाथ श्रीकृष्णांपुढे कसा करावा असा प्रश्न अर्जुनाच्या मनाला पडला. त्याच्या मनातील हे विचार मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**हे जिवाआंतुली चाड । परी देवासि सांगता सांकड ।**
**कां जें विश्वरूप गूढ । कैसेनि पुसावें ? ॥११.३०॥**
**हा ठायवरी गुज । याचिये अंतरीचें हें निज ।**
**केवीं उराउरी मज । पुसों ये पां ? ॥३६॥**

सारांश, "गीता सरस्वती गुप्त ॥ ११.७ ॥" असे हे संपूर्ण गीताशास्त्ररूप सिद्धयोगाचे शास्त्र आत्मज्ञानाचे गुप्त साधनधन असले तरी ते अर्जुनासारख्या भक्तांसाठी श्रीकृष्णांना प्रकट करणे भाग पडले. "ऐसा अहंकारादि रूढ । एकदेशी मूढ । तया हा परमार्थ गूढ । प्रगटावा ना ॥ ३.२७९ ॥, तरी तुवां हें जें पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था । तें तपोहीना सर्वथा । सांगावें ना हो ! ॥१८.१४८६॥" व "अथवा तापसुही जाला । परी गुरुभक्तीं जो ढिला । तो वेदीं अत्यंजु वाळिला । तैसा वाळीं ॥ १४८७ ॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "गीता नेदी तैसी तापसा । गुरुभक्तिहीना ॥१४८८ ॥" असे अर्जुनाला पुनःपुन्हा बजावून सांगून सिद्धमहायोगशास्त्ररूप गूढ रहस्य हे गुरुभक्तांकरिता व अधिकारी पुरुषांकरिताच आहे हें स्पष्ट केले आहे. हे पाहिले म्हणजे त्यांनी सिद्धयोगशास्त्राच्या भाष्यकारांना म्हणजे महायोगी गोरक्षनाथांनी लिहिलेल्या सिद्धयोगशास्त्राला वाट पुसत व "तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजही आंतु । रिघोनिया

॥ १८.१७२९ ॥ " अशा जागृत शक्तीच्या रूपाने शिष्याच्या अंतःकरणात सदा उदित असलेल्या अंतःस्थ सद्‌गुरूंना वाट पुसत हे लिहिले आहे हे स्पष्ट होते. महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांतपद्धतीत " सिद्धयोगशास्त्र " न देयं परशिष्येभ्यो ॥ ६.९९ ॥ " असे म्हणून कोणाकोणाला देऊ नये हे सांगताना स्वस्य कार्ये परानिष्ठा गुरुकार्येषु निस्पृहाः ॥ ६.१०६ ॥ " म्हणून' उल्लेख केला आहे व " गोपनीयं प्रयत्नेन ॥ ६.१११ ॥ " असे बजावून सांगितले आहे. असे असले तरी " सत्यवंतो दयाचित्ताः दृढभक्ताः सदाचलाः । निस्तरंगाः महाशांताः सदाज्ञान-प्रबोधकाः ॥ ६.१०३ ॥ " अशी त्यांची आज्ञा असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

हें जीवींचें निज गुज । परी केवीं राखों तुज ।
जे पढियेसि तूं मज । म्हणौनियां ॥४.२८॥
नातरि अर्जुना हें बीज । पुढती सांगिजेल तुज ।
जें हें अंतःकरणींचें गुज । जिवाचिये ॥९.३४॥
येणें मानें जीवाचें हिये फोडावें । मग गुज कां पां मज सांगावें? ।
ऐसें कांहीं स्वमात्रें । कल्पिशी जरी ॥३५॥
तरी परियेसी गा प्राज्ञा । तूं आस्थेचीच संज्ञा ।
बोलिलिये गोष्टीची अवज्ञा । नेणसी करूं ॥३६॥
म्हणौनि गूढपण आपुलें मोडो । वरि न बोलणेंही बोलावें घडो ।
परि आमुचिये जीवींचें पडो । तुझ्या जीवीं ॥३७॥
यालागीं समनु आणि शुद्धमती । जो अनिंदकु अनन्यगती ।
पैं गा गौप्यही परी तयाप्रती । चावळिजे सुखें ॥४०॥
तरि प्रस्तुत आतां गुणीं इहीं । तूं वांचून आणिक नाहीं ।
म्हणौनि गुज तरी तुझ्या ठायीं । लपऊं नये ॥४१॥

हे सिद्धयोगाच्या साधनाचे म्हणजे जीवींच्या निजगुजाचे महिमान आहे. तेथे बोलणे नाही. फक्त मौन आणि त्यानेंच होणारे संक्रमण. केवळ शक्तीचे. हेच जीवींचे पडो तुझ्या जीवीचे खरे रहस्य. हे रहस्य ज्याला उमगले व सद्‌गुरुकृपेने प्राप्त झाले तो खरा भाग्यवान् पुरुष होय !

## विपरीत अनुग्रह :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगांतर्गत शक्तिपातयोगदीक्षेला विपरीत अनुग्रह संबोधून सिद्धयोगसाधनपरंपरेचा गौरव केला आहे. वास्तविक पाहता " येवढा जिये सांकडां । कैसा अनुग्रहो पैं गाढा । जें ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ॥ १८.१५८४ ॥ " असे म्हणून संजयाने अर्जुनाच्या ज्या दीक्षेची स्वतः मोठ्या उल्हासाने स्तुती केली आहे, तोच अर्जुन प्रत्यक्ष अनुग्रह होऊन जेव्हा त्याच्यापुढे विश्वरूपाची दिव्य व

भयावह अनुभूती प्रत्यक्ष उभी ठाकली त्यावेळी मात्र "कटकटा धातया। कैसें जाहलें अनुग्रहा यया। मियां प्रार्थूनि जगा वापुडिया। आणिलें मरण ॥११.४००॥ असे म्हणून "यालागीं जी देवा। एथिंचें भय उपजतसे जीवा। म्हणौनि येतुला लळा पाळावा। जे पुरे हें आतां ॥११.५९३॥" अशी प्रार्थना करू लागल्याचे जेव्हा दृष्टीस येते तेव्हा या अनुग्रहाचे विपरीत महिमान लक्षात येते. सिद्धयोगाचे साधन सदगुरुकृपेने सहज प्राप्त होणारे असून ते अत्यंत सोपेपणाने व सुलभतेने चालून अचुंबितपणे फलप्राप्ती करून देणारे आहे, असे सांगणारे श्रीज्ञानेश्वरमहाराज जेव्हा त्याचा विपरीत म्हणून उल्लेख करतात; तेव्हा "यत्तदग्रे विषमिव परिणामे अमृतोपमम् ॥गीता. १८.३७॥ असे म्हणून भगवंतांनीच आत्मबुद्धी उत्पन्न करणाऱ्या सद्गुरूंच्या शक्तिपातरूप प्रसादाने प्राप्त होणाऱ्या सात्त्विक सुखाचे "तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तं आत्मबुद्धिप्रसादजम् ॥ गीता १८.३७ ॥" या प्रकारे वर्णन केलेले असल्यामुळे आरंभी विषासारखा क्लेशकर पण परिणामी अमृतासारखा सुखकर असाच हा अनुग्रह असणार हे निश्चित होय असे प्रतीत होते. ही प्रतीती खरीच असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हा अनुग्रह विपरीत कसा आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

आतां चंदनाचें बुड। सर्पीं जैसें दुवाड।
कां निधानाचे तोंड। विवसिया जेवीं ॥१८.७७८॥
अगा स्वर्गींचें गोमटें। आडव यागसंकटें।
कां बाळपण दाटे। त्रासकाळें ७७९॥
हें असो दीपाचिये सिद्धी। अवघड धू आधीं।
नातरी तो औषधीं। जिभेचा ठावो ॥७८०॥
तयापरी पांडवा। जया सुखाचा रिगावा।
विषय तेथ मेळावा। यमदमांचा ॥७८१॥
देत सर्वस्नेहा मिठी। आगीं ऐसें वैराग्य उठी।
स्वर्ग संसारा कांटी। काढितचि ॥७८२॥
विवेकश्रवणें खरपुसें। जेथ व्रताचरणें कर्कशें।
करितां जातीं भोकसे। बुद्धयादिकांचे ॥७८३॥
सुषुम्नेचेनि तोंडें। गिळिजे प्राणापानाचे लोंढे।
वोहणियेसीचि येवढें। भारी जेथ ॥७८४॥
जें सारसांही विघडतां। होय वोहाहूनि वत्स काढितां।
ना भणंगु दवडितां। भाणयावरुनी ॥७८५॥
यैं मायेपुढौनि बाळक। काळें नेतां एकुलतें एक।
होय कां उदक। तुटतां मीना ॥७८६॥

तैसे विषयांचें घर। इंद्रियां सांडितां थोर।
युगांतु होय तें वीर। विराग साहाती ॥७८७॥
ऐसा जया सुखाचा आरंभु। दावी काठिण्याचा क्षोभु।
मग क्षीराब्धी लाभु। अमृताचा जैसा ॥७८८॥
पहिलया वैराग्यगरळा। धैर्यशंभु वोडवी गळा।
तरी ज्ञानामृतें सोहळा। पाहे जेथें। ॥७८९॥
पैं कोलिताही कोपे ऐसें। द्राक्षांचें हिरवेपण असे।
तें परिपाकीं कां जैसें। माधुर्य आते ॥७९०॥
तें वैराग्यादिक तैसें। पिकलिया आत्मप्रकाशें।
मग वैराग्येंसींही नाशे। अविद्याजात ॥७९१॥
तेव्हां सागरीं गंगा जैसी। आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी।
अद्वयानंदाची आपैसी। खाणी उघडे ॥७९२॥

जेव्हा सद्‌गुरुकृपेने आत्मशक्ती कुंडलिनी जागृत होते तेव्हा ती अनादि निद्रा मोडल्याने आपले वेढे सोडून कौतुकाने आंग मोडते तेव्हा "तेथ नक्षत्र जैसें उलंडलें। कीं सूर्याचें आसन मोडलें ॥६.२२६॥" अशी स्थिती होऊन साधक अगदी गलितमात्र होऊन जातो. त्याला ही नसती कटकट वाटू लागते. चंदनाच्या झाडाच्या बुडाशी सर्प वेढून बसल्यामुळे किंवा द्रव्याच्या भूमिगत ठेव्यावर ब्रह्मराक्षसादिकांचा प्रतिबंध असल्यामुळे चंदनाची व द्रव्याची प्राप्ती जशी दुर्लभ होते त्याप्रमाणेच " येन मार्गेण गंतव्यं ब्रह्मस्थानं निरामयम्। मुखेनाच्छाद्य तद्द्वारं प्रसुप्ता परमेश्वरी ॥३.१०६॥" असे "हठयोगप्रदीपिकेत" म्हटल्याप्रमाणे ज्या सुषुम्नामार्गाने निरामय ब्रह्मस्थानाला जाता येते, त्या मार्गाचे दार अडवूनच ही परमेश्वरी कुंडलिनी शक्ती झोपलेली असल्यामुळे ब्रह्मप्राप्ती दुर्लभ होते. ती सद्‌गुरुकृपेने जागृत झाली की, तिची बहिर्मुख गती बदलून अंतर्मुख ऊर्ध्वगती होत असल्यामुळे यज्ञ, धूर, औषध, बालक, मासा इत्यादि दृष्टांताप्रमाणे साधकाला क्लेश होतात. हे सर्व या शक्तीच्या विपरीत गतीमुळेच होते. इडा व पिंगलेतून वाहणारे नित्याचे प्राणापान जेव्हा सुषुम्नेतील सूक्ष्म मार्गात संचार करू लागतात तेव्हा मल, वासना, इच्छा, कल्पना व जन्म-जन्मांतरींच्या संस्काराने भरलेला सुषुम्नामार्ग मोकळा होत असल्याने असाच त्रास होतो. त्यातच सुषुम्नेत प्राणांच्या होणाऱ्या शनैः शनैः संचारामुळे विषय, विकार व वासना ज्यावेळी सुटत जातात त्यावेळी साधकाला अपार दुःख होते. हे सर्व क्रमविकासाने होत असल्याने एका बाजूने म्हणजे अधोमुखाने जन्मजन्मांतरी भोगलेल्या वासनांमुळे त्यांच्याशी परिचित असलेल्या जीवाला त्या सोडवत नाहीत व दुसऱ्या बाजूने प्राण ऊर्ध्वमुख झाल्याने ते जीवाला आपल्या बरोबर घेऊन जात असल्याने विषय हळहळू सुटतच जातात व वैराग्य उत्पन्न होतच जाते. अशी ही साधनकालात साधकाच्या

मनाची रस्सीखेच होत राहते. कधी भोगासक्ती तर कधी वैराग्यासक्ती होते. हे एक प्रकारचे क्षीराब्धीचे मंथन आहे. येथे सुरुवातीला कठीणपणाचा त्रास सोसावाच लागतो. कच्ची द्राक्षे पिकेतोपर्यंत आंबटच असतात व समुद्राला मिळेपर्यंत गंगेला वाहवेच लागते. मात्र ज्यावेळी क्षीराब्धीचे मंथन पूर्ण होते तेव्हा अमृताचा लाभ होतो, द्राक्षे पिकली म्हणजे माधर्ययुक्त होतात व गंगा सागराला मिळाल्यावर सागररूप होते त्याप्रमाणे ही आत्मशक्ती सुषुम्नामार्गाने जाऊन शिवाशी एकरूप होते तेव्हा वैराग्यासह अविद्या जाते व अद्वयानंदाची खाण साधकाला प्राप्त होते. मूलाधारापासून सहस्रारापर्यंतचा साधकाचा प्रवास हा असा विविध कष्टांचा असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज त्याला विपरीत अनुग्रह म्हणून संबोधित आहेत; परंतु अशी विपरीतता यात असली तरी त्यातही साधकाला अनुपमेय सुख मिळत असते. वरवर पाहणाऱ्याला मात्र त्यात दुःख आहे असे वाटते. अर्जुनाचीही स्थिती अशीच झाली होती. सद्गुरुनाथ श्रीकृष्णनाथांनी शक्तिपाताने त्याची शक्ती जागृत करून विश्वरूपदर्शनाची दिव्य व भव्य अनुभूती त्याला प्राप्त करून दिल्यामुळे एका बाजूला त्याला आनंद वाटत होता व दुसऱ्या बाजूने त्या अननुभूत भव्योत्कट अनुभूतीने तो घाबरून गेला होता. त्यामुळे तो म्हणतो–

तरी देवेंसी सलगी केली । जे विश्वरूपाची आळी घेतली ।
तें मायबापें पुरविली । स्नेहाळाचेनि ।।११.५७९।।
ऐसा कृतकृत्य केला स्वामी । बहुवे ळळा पाळिला तुम्हीं ।
दाविलें जें हरब्रह्मीं । नायकिजे कानीं ।।५८३।।
मा देखावयाची केउती गोठी । जयाची उपनिषदां नाहीं भेटी ।
ते जिव्हारींची गांठी । मजलागीं सोडिली ।।५८४।।
तें हें विश्वरूप आपुलें । तुम्हीं मज डोळां दाविलें ।
तरी माझें मन झालें । हृष्ट देवा ।।५८९।।
परि आतां ऐसी चाड जीवीं । जे तुजसीं गोठी करावी ।
जवळीक हे भोगावी । आलिंगावासी ।।५९०।।
ते याची रूपीं करूं म्हणिजे । तरी कोणे एके मुखेसि चावळिजे ।
आणि कवणा खेंव देईजे । तुज लेख नाहीं ।।५९१।।
म्हणौनि वारियासवें धांवणें । न ठके गगना खेंव देणें ।
जळकेली खेळणें । समुद्रीं केउतें ? ।।५९२।।
यालागीं जी देवा । ऐंथिचें भय उपजपतसे जीवा ।
म्हणौनि येतुला ळळा पाळावा । जे पुरे हें आतां ।।५९३।।

सिद्धयोगाच्या साधकाची साधन करताना अशीच स्थिती होते. या भयंकर अनुभूतीपेक्षा बाह्य पूजानामस्मरणादि त्याला बरे वाटते; परंतु " येर पत्र पुष्प

फळ । हे भजावया मिस केवळ ।।९.३९६।।" हे त्याच्या ध्यानात येत नाही. त्याला वाह्यतः दिसणारे चतुर्भुज रूपच बरे वाटते व तो " ऐसी तेथिंची जीवा आवडी । म्हणौनि तेंचि देखावया लवडसवडी । वर्तत असें ते सांकडी । फेडिजे वेगीं ।। ११.५९८।।" व "आम्हां भोगमोक्षाचिया ठायीं । श्रीमूर्तीवांचूनि नाहीं । म्हणनि तैसाचि साकारु होई । हें सांवरी आतां ।।११.६०८।।" अशीच अर्जुनाप्रमाणे प्रार्थना करतो. परंतु सद्गुरुनाथ श्रीकृष्ण अर्जुनरूप साधकाला म्हणतात की, "तुझ्या प्रेमाने प्रसन्न होऊन या विपरीत अनुग्रहरूपी गीप्याची गुढी आम्ही उभारली तीच खरी आहे. तू गावंढळ असल्यामुळे तुला हे कळत नाही. माझे चतुर्भुजरूप खोटे आहे. त्याची आस्था तू सोड. तुझी वाह्य भजनपूजनाची गोडी खरी नाही. हा विपरीत अनुग्रहच खरा व त्यामुळे येणारी अनुभूतीच श्रेष्ठ असून हेच सर्व साराचेही सार आहे, हे तू विसरू नकोस." हा अर्थच दृष्टांताने स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> हें रूप जरी घोर । विकृती आणि थोर ।
> तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करीं ।।११.६३२।।
> कृपण चित्तवृत्ति जैसी । रोंवोनि घालीं ठेवयापासीं ।
> मग नुसधेनि देहेंसी । आपण असे ।।६३३।।
> कां अजातपक्षिया जवळा । जीव बैसवूनि अविसाळां ।
> पक्षिणी अंतराळां—। माजीं जाय ।।६३४।।
> नाना गाय चरे डोंगरीं । परि चित्त बांधिलें वत्सें घरीं ।
> प्रेम एथिंचे करीं । स्थानपती ।।६३५।।
> येरें वरिचिलेनि चित्तें । बाह्य सख्य सुखापुरतें ।
> भोगिजो कां श्रीमूर्तीतें । चतुर्भुज ।।६३६।।
> परी पुढतपुढती पांडवा । हा एक बोलु न विसरावा ।
> जे इये रूपींहूनी सद्भावा । नेदावें निघों ।।६३७।।
> हें कहीं नव्हतेंचि देखिलें । म्हणौनि भय जें तुज उपजलें ।
> तें सांडी येथ संचलें । असों दे प्रेम ।।६३८।।

हा सिद्धयोगाचा अनुग्रह विपरीत, घोर व विकृत असला तरी आकाशात फिरणाऱ्या पक्षिणीचे आपल्या पिलाकडे व डोंगरात चरणाऱ्या गाईचे आपल्या वासराकडे जसे चित्त असते तसे साधकाने या विपरीत अनुग्रहरूपाने प्राप्त होणाऱ्या साधनावर प्रेम केले पाहिजे. वाह्य सख्यभक्तीच्या सुखाकरिता वरवरच्या चित्ताने किंवा मनाने साधकाने भजनपूजनादि व चतुर्भुज मूर्तीचे ध्यान करावे; परंतु त्याने या साधनापासून आपला सद्भाव दुसरीकडे कोठे जाऊ देऊ नये. हे साधन करण्याचे त्याने कधीही सोडू नये. पूर्वी कधीही पाहिले व अनुभवले नसल्यामुळे साधकाला या साधनात येणाऱ्या अनुभूतींमुळे भीती वाटणे साहजिक आहे; परंतु ही भीती

त्याने सोडली पाहिजे व या साधनावर त्याने नितांत प्रेम केले पाहिजे. विपरीत अनुग्रहाचा हा महिमा सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराज साधकाला अत्यंत कळकळीने जो उपदेश करीत आहेत व आपल्या अंतरीचे निजगूज स्पष्ट करीत आहेत हे पाहिले म्हणजे प्रत्यक् आत्मानुभूतीमुळे मन भरून येते. या उपदेशाला दुसरी उपमा नाही. " परि हें असो एथ ऐसें। राम रावण झुंजिन्नलें कैसे। राम रावण जैसे। मीनले समरीं ।। १०.३८।। " असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दातच त्याचे वर्णन करावे लागेल.

मधुवनात तपश्चर्या करणाऱ्या ध्रुवाच्या गालाला स्पर्श करून श्रीविष्णूंनी शक्तिपात दीक्षा दिल्यावर तो ज्या प्रमाणे ऋतंभरा प्रज्ञेची जागृती होऊन वेदांचीही बुद्धी कुंठित होईल अशी स्तुती करू लागला त्याप्रमाणे " तैसा अनुग्रहो पैं राया। श्रीहरी केला धनंजय। आतां कवणेकडेही माया। ऐसी भाष नेणेंचि तो ।।११.१८५।।" अशी शक्तिसंक्रमणाने अर्जुनाची स्थिती होऊन त्याला जी भयावह अनुभूती डोळे मिटल्यावर आली त्याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**अहो पाहातां कीर प्रतिभासे। एथ नवलावो काय असे ?।**
**परि न पाहतांही दिसे। चोज आइका ।।११.२२९।।**
**कैसें अनुग्रहाचें करणें। पार्थाचें पाहणें आणि न पाहणें।**
**तयाही सकट नारायणे। व्यापूनि घेतलें ।।२३०।।**
**म्हणौनि आश्चर्याच्या पुरीं एकीं। पडिला ठायेंठाव थडीं ठाकी।**
**तव चमत्काराचिया आणिकीं। महार्णवीं पडे ।।२३१।।**
**तैसा अर्जुनु असाधारणें। आपुलिया दर्शनाचेनि विंदाणे।**
**कवळूनि घेतला तेणें। अनंतरूपें ।।२३२।।**

साधक जेव्हा डोळे मिटून बसतो अगर नित्याच्या जीवनात मग्न राहतो तेव्हा सद्गुरूंनी केलेल्या अनुग्रहाचे सामर्थ्य एवढे बलवत्तर असते की, जागृत शक्ती कार्यरत होऊन एकामागून एक असे अनंत आश्चर्यकारक व चमत्कारिक अनुभव त्याला समुद्रात पडल्याप्रमाणे व्यापक रूपात येऊ लागतात. या अनुभवांच्या दर्शनाची आतील ओढ एवढी जबरदस्त असते की, सर्व नद्या, नाले, ओढे व ओहळ यांना आपल्यात समाविष्ट करीत आलेली गंगा जशी समुद्रास मिळते त्याप्रमाणे शरीरातील प्राणांच्या रूपातील समस्त शक्ती, मन, इंद्रिये, वासना, कल्पना इत्यादि सर्वांना अत्यंत सहजतेने आपल्यात समाविष्ट करून कुंडलिनी शक्ती सहस्रारातील आपले घर गाठते. हे घर गाठणे काही सोपे आहे काय ? खचित नाही. येथे शक्तीच्या जागृतीमुळे उपस्थित झालेल्या महान संग्रामाला, इंद्रियांच्या विंदाणाला, विषयांचे घर सोडताना होणाऱ्या युगांताला, योगाग्नीमुळे सुरू झालेल्या आत्म-

यज्ञाला तोंड द्यावे लागते व त्यामुळे उपस्थित झालेल्या अनुभूतीला पचवावे लागते. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मग तेथ सैंघ देखे वदनें। जैसी रमानायकाचीं राजभुवनें।
नाना प्रकटलीं निधानें। लावण्यश्रियेचीं ॥११.१९७॥
तंव नानावर्णें कमळवनें। विकासलीं तैसें अर्जुनें।
नेत्र देखिले पालिंगनें। आदित्यांचीं ॥२०३॥
जियो प्रभेचिये झळाळा। उजाळु चंद्रादित्यमंडळा।
जे महातेजाचा जिव्हाळा। जेणें विश्व प्रकटे ॥२१२॥
जयाचिया किरणांचे निखरपणें। नक्षत्रांचे होत फुटाणे।
तेजें खिरडला वन्हि म्हणे। समुद्रीं रिघों ॥२१६॥
मग काळकूटकल्लोळीं कवळिलें। नाना महाविजूंचें दांग उमटले।
तैसे अपार कर देखिले। उदितायुधीं ॥२१७॥
तैसे ते दिव्यसूर्य सहस्रवरी। जरी उदयजती कां एकेचि अवसरीं।
तऱ्ही तया तेजाची थोरी। उपमूं नये ॥२३८॥
हो कां महाकल्पाचिया अंतीं। तवकलेनि यमें जेउततेंउतीं।
प्रळयाग्नीचीं उजितीं। आंबुखिलीं जैसीं ॥३४२॥
ना तरी संहारत्रिपुरारीचीं यंत्रें। कीं प्रळयभैरवाचीं क्षेत्रें।
नाना युगांतशक्तीचीं पात्रें। भूतखिचा वोढविलीं ॥३४३॥
तैसीं जियेतियेकडे। तुझीं वक्त्रें जीं प्रचंडें।
न समाती दरीमाजीं सिंव्हाडे। तैसे दशन दिसती रागीट ॥३४४॥
मग म्हणे हें काई। जन्मलयां आन मोहरचि नाहीं।
जग आपैसेंचि वदनडोहीं। संचरताहे ॥४१९॥
यया आपेंआप आघविया सृष्टी। लागलिया आहाति वदनाचिया वाटीं।
आणि हा जेथिंचिया तेथ मिठी। देतसे उगला ॥४२०॥
जैसे महानदीचे वोघ। वहिले ठाकिती समुद्राचें आंग।
तैसें आघवाचिकडूनि जग। प्रवेशत मुखीं ॥४२३॥

असे अर्जुनाला आलेले शेकडोशे अनुभव "बोधाचा हा संसरा। जाला जो आमुते ॥ १८.१७५९ ॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी त्यांना दिलेल्या शक्तिपातयोगदीक्षेच्या आधारे स्वतःला अनुभविण्यास मिळाले आहेत असे सांगून आपण हे सर्व स्वानुभूतिपूर्वक वर्णन, करीत असल्याचा जो निर्वाळा दिला आहे, तो पाहिला म्हणजे महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांच्या कृपेने प्राप्त झालेल्या शक्तिपातयोगदीक्षेच्या सामर्थ्याने मीही हे ज्ञानेश्वरीचे सिद्धयोग दर्शन स्वानुभूतिपूर्वक लिहीत आहे व "तैसा मी अनुग्रहीतु। साधूंचा निरो-

पितु ।।१.८२।। " असे म्हणून ज्ञानेश्वरीचे रहस्य उलगडण्याचा प्रयत्न करीत आहे, असे येथे नम्रपणे सूचित केले तर ते माझ्या परमप्रिय सद्‌गुरुनाथांचे स्तवन करून त्यांच्या चरणकमलांना वंदन केल्यासारखेच होईल. अशा शतशत अनुभवांनी प्रकट झालेला हा विपरीत अनुग्रहरूप सिद्धयोग असल्यामुळे " भरोनि सद्‌भावाची अंजुळी मियां वोंवियाफुलें मोकळीं । अर्पिलीं अंघ्रियुगलीं । विश्वरूपाच्या ।।११.७०८।।" या रीतीने मोकळी फुलेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं विश्वरूपाच्या चरणी अर्पण केली आहेत. ती गुंफणार तरी कशी ? येथे सद्‌भावाची अंजुळी असले म्हणजे पुरे. त्यात सर्व आले. मग बाकी कशाचीही जरूरी नाही. उपरोक्त अनुभूतींची वेदात, उपनिषदात, तंत्रग्रंथात व सिद्धयोगपरंपरेच्या ग्रंथात अनेक वर्णने आली आहेत. श्रीयोगेंद्र विज्ञानी लिखित " महायोग विज्ञान " या ग्रंथात बहुश: अनेक प्रमाणवचनांद्वारा उपरोक्त अनुभूतींचा उलगडा केलेला पाहवयास मिळतो त्याची सांगड उपरोक्त सर्व अनुभूतींशी घालून दाखवावयाची ठरविल्यास महाभारत तयार होईल. म्हणून येथे फक्त सूचितार्थाने मुग्धता स्वीकारतो.

अशाच प्रकारचे विश्वरूपदर्शन प. प. श्रीनरसिंहसरस्वतीस्वामीमहाराज यांनी त्यांचा परमभक्त त्रिविक्रमभारती यास दिल्याचे "श्रीगुरुचरित्राच्या" आरतीत श्रीगुरुचरित्राचे लेखक श्रीसरस्वती गंगाधर यांनी " विश्वरूपें तया दिधलें दर्शन" असे म्हणून केले आहे व " श्रीगुरुचरित्र " ग्रंथाच्या चोविसाव्या प्रकरणात त्याचे सविस्तर वर्णन केले आहे. " विवेकसिंधू " या ग्रंथात शिष्य सद्‌गुरूला अनन्यभावाने शरण गेल्यावर शक्तिपातदीक्षा देऊन श्रीगुरू त्याला विश्वरूपात्मकदर्शनाची दिव्य अनुभूती देऊन कृतार्थ कसे करतात याचे वर्णन करताना श्रीमुकुंदराय म्हणतात—

तंव बोलिला श्रीगुरुराजा । बारे तूं शिणलासी कवणीये काजा ।
कैसें बंधन तोडिजैल वोजा । हें चोज पाहीं रोकडेंचि ।।१.९५।।
ऐसी प्रतिज्ञा स्वीकारोनि । शिष्यातें सन्मुख बैसवोनि ।
ज्ञान समावेश करौनि । गुरुसंप्रदायक्रमें ।।९६ ।।
तेथें ज्ञानशक्तीचा प्रवेशु । अज्ञानशक्तीचा निरासु ।
बोध उठिला स्वयंप्रकाशु । शिष्यचैतन्यीं ।।९७।।
ते वेळीं कंपस्वेदादिक । उठले भाव सात्त्विक ।
जैसें साम्राज्य पावे रंक । तैसें वर्तते जाले ।।९८।।
या नांव शक्तिपातु बोलिजे । जेथें स्वानुभवुचि अनुभविजे ।
निःशेष तेही विसरिजे । स्मरण सांसारिक ।।९९।।

इतके शक्तिपाताचे वर्णन करून आपले आजेगुरू श्रीहरिनाथ यांना प्रत्यक्ष शंकराकडून शक्तिपातदीक्षा मिळाल्यावर जी विश्वरूपाची अद्‌भुत अनुभूती आली त्याचे वर्णन "तो देखिला स्वयंज्योती ।।१८.५९।।, जंसा जालेया विद्युत्पातु ।।१८.६२।।"

असे म्हणून नानाविधप्रकारे केले आहे. महान् दत्तोपासक व स्वप्रयत्नाने श्रीदत्तात्रेयांचे गिरनार पर्वतावर प्रत्यक्ष दर्शन घेतलेल्या श्रीनिरंजन अवधूत यांनी श्रीरघुनाथ स्वामींकडून शक्तिपातदीक्षा झाल्यावर जे विश्वरूपात्मक अनुभव आले त्याचे वर्णन "स्वात्मप्रचीती" या आपल्या आत्मचरित्रात "शरीरामाजीं आकाश भरलें। वाटें मस्तक भेदूनी गेले। ब्रह्मकटाहामाजीं मीनलें। स्वरूप माझें सर्वही ।।४.४७।।" असे म्हणून विविध प्रकारे केले आहे, ते मुळातूनच पाहण्यासारखे आहे.

सिद्धयोगाचा अनुग्रह झाला की, साधक पुन्हा माघारी फिरू शकत नाही, बहिर्मुख होऊ शकत नाही, संसारात रमू शकत नाही व वासनाभोगाकांक्षेत लिप्त होत नाही. हे सर्व जरी साधकांच्या आधारभेदानुसार म्हणजे अधिकारपात्रतेनुसार कमीअधिक प्रमाणात व वेळात घडत असले तरी हे घडतेच घडते हे सत्य आहे. त्यामुळेच हा विपरीत अनुग्रह आहे व हेच सिद्धयोगाचे माहात्म्य आहे. सद्गुरूंकडे जाऊन दीक्षा घेण्यापूर्वीच साधकाने याचा विचार केला पाहिजे की, हा विपरीत अनुग्रह आहे. या प्रवाहात आपण आपल्याला झोकून दिल्यावर जागृत शक्ती गंतव्य स्थानापर्यंत नेल्याशिवाय आपल्याला सोडणार नाही; पण हेही जीवाच्या हाती नाही, कारण "पैं व्यामोहाचिये शेजे। वळिया अविद्या निद्रितु होईजे। ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे। जन्ममृत्यूंचा ।।६.६८।।" व "पाठीं अवसांत ये चेवो। तैं तें अवघेंचि होय वावो। ऐसा उपजे नित्य सद्भावो। तोहि आपणपांचि ।। ६९ ।।" अशीच जीवाची वास्तविक स्थिती असते. जीव अशाच प्रकारे अकस्मात् व अचानक माघारी वळतो. मग वैराग्य व विरक्ती यांवाचून त्याला गती राहत नाही. "मग श्रीगुरु आपैसा। भेटेचि गा ।। १८.९६६ ।।" हे होतेच. हीच ईश्वराची कृपा होय. त्यामुळेच शक्ती जागृत होऊन जडचेतनभेदाला सुरुवात होते. राजहंस दूध आणि पाणी वेगळे करणारच. अग्नीत घातलेले अशुद्ध सोने हीन जाळून शुद्ध सोनेच देणार. दह्याचे घुसळण सुरू झाले की, लोणी बाहेर येणारच. वाऱ्यावर धान्य उपणल्यावर फोलकटे बाजूला होऊन धान्य मिळणारच. ( २.१२७ ते १३० ) एवढेच नव्हे तर अग्नीत घातलेले इंधन अग्नीरूप झाल्यावर लाकूडपणाने निराळे काढू म्हटले तरी ते शक्य नाही. उसाची साखर झाल्यावर पुन्हा त्या साखरेचा उस होत नाही. तूपही दूधपणाने पुन्हा आवृत्त होऊ शकत नाही व परिसाचा स्पर्श झालेले लोखंड आपले सोनेपण सोडू शकत नाही. अगदी याप्रमाणेच सद्गुरूंचा एकदा स्पर्श होऊन अनुग्रह झाला की, जीवाला ही विपरीतता प्राप्त होतेच होते. येथे पुन्हा माघारी फिरणे हे होऊच शकत नाही. जागृत शक्ती ही जीवाच्या सकल भेदांचा ग्रास करतेच करते. एक अद्वैत होण्याशिवाय मग दुसरी गतीच जीवाला उरत नाही. हाच अपुनरावृत्तीचा इतिहास आहे. (८.१९९ ते २०३ )

सारांश, "कनकत्वदीक्षागुरू। लोहा परिसु होय कीरू ।। १८.१६५० ।।"

हेच या विपरीत अनुग्रहाचे फल व हेच याचे महिमान होय. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

पुढती जे तेथ गेले। ते न घेतीच माघौतीं पाउलें।
महोदधीं कां मीनले। स्रोत जैसे ।।१५.३१७।।

कां लवणाची कुंजरी। सूदलिया लवणसागरीं।
होयचि ना माघारी। परती जैसी ।।३१८।।

नाना गेलिया अंतराळा। न येतीचि वन्हिज्वाळा।
नाहीं तप्तलोहौनि जळा। निघणें जेवीं ।।३१९।।

तेवीं मजसीं एकवट। जे जाले ज्ञानें चोखट।
तयां पुनरावृत्तीची वाट। मोडली गा ।।३२०।।

हें असो विस्मो दातारा। तूं होसी जयाचा सोयरा।
सोइरिकेचिया व्यवहरा। मुकेचि तो।।१७.९।।

### शिवशक्तिस्वरूप साधन :—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " वाप साक्षात्काराचा वेधु। कैसा देशधडी केला बोधु। हा गुरुशिष्यसंबंधु। विपाये नांदे ।। ११.३७० ।। " असा शिवशक्तिस्वरूप सिद्धयोगसाधनाचा फलयुक्त महिमा गाऊन त्याचे अपूर्व उद्घाटन केले आहे. मूळ तत्त्व हे " जो प्रियुचि प्राणेश्वरी ।।१.२।। असे "अमृतानुभवात" म्हटल्याप्रमाणे शिवशक्तिरूप असल्याने त्या तत्त्वप्राप्तीचे साधनही "सर्वोपशांतिप्रमदे कांतु होऊनियां ।। १८.१२३० ।। " हे घडल्यावर " मग तयाचेनि प्रसादें स्वानंदें स्वरूपींचि रमसी ।। १८.१२३० ।। " असे चालत असल्यामुळे ते स्वानंद-स्वरूपही शिवशक्तिस्वरूप आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. महायोगी गोरक्षनाथांनीही " सिद्धसिद्धांतपद्धतीच्या " सुरुवातीला " आदिनाथं नमस्कृत्य शक्तियुक्तं जगद्गुरुम् ।।१.१।।" असे म्हणून शिवशक्तियुक्त स्वरूपालाच नमन केले आहे. त्याचप्रमाणे त्यांनी "अनामेति स्वयमनादि सिद्धमेकमेवानादिनिधनं सिद्धसिद्धांतप्रसिद्धं तस्येच्छामात्रधर्माधर्मिणी निजा शक्तिः प्रसिद्धा ।। १.५ ।। " अशी ही शिवाची शक्ती अनाम, स्वयं, अनादिनिधन, सिद्धांचा सिद्धांत म्हणून प्रसिद्ध असलेली व विश्वाच्या उभारणी-संहारणीचा धर्माधर्म धारण करणारी निजाशक्ती प्रसिद्ध आहे असे सांगितले असून " सैव शक्तिर्यदा सहजेन स्वस्मिन्नुन्मिलिन्यां निरुत्थानदशायां वर्तते तदा शिवः सैव भवति ।। ४.१ ।। " असा परम सिद्धांत मांडला आहे. याचा अर्थ असा आहे की, ज्यावेळी सद्गुरुकृपेने शक्तिपात होऊन शिष्याला सहज अशी निरुत्थान दशा प्राप्त होते तेव्हा तो शिवरूप होतो. म्हणजे मुळात शिवशक्तिरूप तत्त्वाचा साधनरूपाने जो प्रत्यक्ष

आविर्भाव प्रकट झालेला दिसतो तो पुढे गुरुशिष्यसंबंधात प्रकट झालेला दिसतो, गुरुशिष्यरूपाने नांदतो व शेवटी साक्षात्काराच्या वेधाने उत्पन्न झालेल्या बोधामुळे पुन्हा एकरस होऊन शिवशक्तिरूप मूळ तत्त्वाच्या रूपाने विलसत राहतो. अशा रीतीने हे साधन प्रकट होते, चालते व संपते.

शिवशक्तिस्वरूप साधनाचा उद्‌भव, गती, स्थिती व शेवट अशा प्रकारे गुरुशिष्यरूपाने प्रकट होत असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " ते गुरुशिष्याची गोठी ।। ३.७७२ ।।, पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं । जे अक्षरा एकाची वदंती । ते मेघाचियापरी त्रिजगतीं । गर्जती सैंध ।। १०.१२६ ।।, एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु । तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावया ।। १८.१२२६ ।। " व " ना आदिगुरु शंकरा– । लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा संसरा । जाला जो आमुतें ।।१८.१७५९ ।। " असे म्हणून या साधनाचे अपूर्वत्व प्रकट केले आहे. गुरुशिष्याच्या एकांतातील गोष्टीत जे घडते ते मेघगर्जनेप्रमाणे तिन्ही लोकात गर्जना करून सांगण्यासारखे महत्त्वाचे असते असे महात्मे मानतात व गुरुशिष्य परंपरेनेच ज्ञान होत असून मलाही हे बोधाचे ऐश्वर्य त्यामुळेच प्राप्त झाले आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात, त्यावेळी वरवर अत्यंत सरळ दिसणाऱ्या या गोष्टीत काहीतरी अपूर्व रहस्य दडलेले आहे याची जाणीव होते. हे रहस्य प्रकट करताना " तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि, " या ग्रंथातील " तंत्रका स्वरूप, आविर्भाव और भेद, " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात " इस मध्यमा–भूमिमें परमेश्वर अपना स्वरूप दो अंशोंमें विभक्त कर स्वयंही गुरु और शिष्य रूप ग्रहण करते हैं । इस कल्पित गुरु शिष्य-भावके सहारेही गुप्तज्ञान प्रकट करते हैं। उस समय सदाशिव नामसे गुरु एवं ईश्वर नामसे शिष्यका आविर्भाव होता है । गुरु कौन है और शिष्य कौन ? वस्तुतः अद्वयमार्गमें परमार्थ-सत्तारूप संविद्ही सब कुछ है। प्रष्टा शिष्य और प्रतिवक्ता गुरुका भेद वास्तविक नहीं है । पारमार्थिक और पूर्णस्वभाव वस्तु संविदात्मक है । वह पश्यंति-प्रभृति भूमियोंको स्पर्श करते हुए वैखरी-भूमिपर्यंत स्फीत होता है । यह स्वसंविदही संकुचित होकर प्रमातृरूप शिष्यभूमिका अवभासन करके प्रष्टा बनता है । अतएव संविदही प्रष्टा हे । वस्तुतः प्रश्न और उत्तर किंवा शिष्य और गुरु दोनों संविन्मात्र है ।आत्मा स्वयं ही वक्ता गुरु एवं श्रोता शिष्य है ।"

या तत्त्वाचेच प्रकटीकरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या अलौकिक संविन्स्पर्शाने पुनित होऊन ज्ञानेश्वरीच्या सुरुवातीलाच "या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी। जेथ भवानी प्रश्नु करी । चमत्कारौनि ।। १.७० ।। " असे म्हणून झाले आहे. रहस्यमयतत्त्वे, तत्त्वार्थ, भाव्यार्थ इत्यादि अशीच प्रकट होतात. या दृष्टीनेच योगी अमृतानंद यांनी असे म्हटले आहे की—

विमर्शरूपिणी शक्तिरस्य विश्वगुरोः सदा ।
परिस्फुरति सैकापि नानाभावार्थरूपिणी ।।

विश्वगुरूची नित्यस्थित विमर्शरूपिणी शक्तीच नानाभावार्थाच्या रूपाने परिस्फुटित होत असते. ही शक्तीच शिष्य होय. म्हणून "भवानी प्रश्नु करी" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. "महास्वच्छंदतंत्रातही" हीच गोष्ट स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

गुरुशिष्यपदे स्थित्वा स्वयंदेवः सदाशिवः ।
प्रश्नोत्तरपदैर्वाक्यः तन्त्रं समवतारयत् ।।

स्वतः महेश्वर परमात्माच गुरूही आपण होतो व शिष्यही आपणच होऊन प्रश्नोत्तराच्या रूपाने शास्त्रे प्रकट करतो. श्रीसरस्वती गंगाधरकृत "श्रीगुरुचरित्र" या ग्रंथात सिद्धांनी नामधारकाला शेवटी हेच सांगितले की "श्रीगुरुरूपी नारायणा। विश्वंभरा दीनोद्धारणा । आपणा आपुली दावुनि खुणा । गुरुशिष्यरूपें क्रीडसी ।। ५३.१०४ ।।" महायोगी गोरक्षनाथांनी "विवेकमार्तंड" ग्रंथात "ज्ञानमोद-महोदधिः समभवत् यत्रादिनाथः स्वयं ।। १.२ ।।" असे म्हणून ज्ञानमहोदधी शिवच शिष्यभावाने प्रकट झाले असे स्पष्ट केले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही ''तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ।। १८.१७२९ ।।' असे म्हणून गोरक्षनाथांच्या म्हणण्याचा भावार्थ अधिक स्पष्ट करून आपली नाथपरंपरा शिवशक्तिसाधनरूप सिद्धयोगाने युक्त असल्याचे सांगितले आहे.

वास्तविक पाहता " शिवशक्तिरिति ह्येकं तत्त्वमाहुर्मनीषणः । " व "शक्त्याविना परे शिवे नाम धाम न विद्यते ।। " हा शास्त्राचा अंतिम सिद्धांत आहे. या दृष्टीनेच " शिवोऽपिशवतां याति कुंडलिन्या विवर्जितः ।। " असे " देवी-भागवतात " म्हटले आहे. या अर्थानेच महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांत-पद्धतीत असे म्हटले आहे की–

शिवस्याभ्यंतरे शक्तिः शक्तेरभ्यंतरे शिवः ।
अंतरं नैव जानीयात् चंद्रचंद्रिकयोरिव ।।४.२६।।
प्रसरं भासते शक्तिः संकोचं भासते शिवः ।
तयो संयोगकर्ता यः स भवद्योगिराट् ।।६.६५।।
शिवोऽपि शक्तिरहितः शक्तः कर्तुं न किंचन ।
स्वशक्त्या सहितः सोऽपि सर्वस्याभासको भवेत् ।।४.१३।।

असा हा चंद्र व चंद्रिकेप्रमाणे एकरूप असलेला शिवशक्तीचा महान् सिद्धांत असून नाथसंप्रदायाचे महान् भाष्यकार महायोगी गोरक्षनाथांनी तो अतीव स्पष्ट करून मांडला आहे. " यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।। गीता १८.७८।।"

या गीतेवरील श्लोकाचा भावार्थ, उपरोक्त संप्रदाय परंपरेच्या तत्त्वज्ञानास अनुसरून व भाष्यकाराते वाटपुसत स्पष्ट करताना योगेश्वर कृष्ण म्हणजे "सद्‌गुरू" व धनुर्धर पार्थ म्हणजे 'शिष्य' हे जेथे एकत्र येतात म्हणजे जेथे गुरुशिष्यरूपाने शिवशक्तीचे ऐक्य झालेले दृष्टीस पडते तेथे सिद्धयोगाचे श्री, विजय, ऐश्वर्य व नित्यन्याय या चतुर्विध रूपाचे नित्यदर्शन घडते, असा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केला आहे. ते म्हणतात—

> चंद्रु तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।
> संत तेथें विवेका । असणें कीं जी ।।१८.१६३३।।
> रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोयरीक ।
> वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ।।१६३४।।
> दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु ।
> सुखीं पुरुषोत्तमु ।असे जैसा ।।१६३५।।
> वसंतु तेथें वनें । वन तेथें सुमनें ।
> सुमनीं पालिंगने । सारंगांचीं ।।१६३६।।
> गुरु तेथे ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन ।
> दर्शनीं समाधान । आथी जैसें ।।१६३७।।

अशी ही शिवशक्तिरूप गुरुशिष्यांची एकता असल्यामुळे "जैसा शिष्यांतें गुरु । सर्वथा नेणें अव्हेरू । कीं सरितांतें सागरू । त्यजीं केवीं ।।२.६०।।" असे उद्‌गार अर्जुनाच्या मुखातून सहज बाहेर पडले व "ते गुरुशिष्याची गोठी । पद पिंडाची गांठी । तेथ स्थिर राहोनि नुठी । कवणे काळीं ।।३.२७२।।" असे श्रीकृष्णांनी त्याला उत्तर दिले. संजयानेही या एकतेपोटीच सद्‌गुरू विश्वरूप होऊन पुन्हा श्रीकृष्णरूप झाले हे सांगताना असे म्हटले आहे की—

> तैसें शिष्याचिये प्रीति जाहलें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें ।
> तें मना नयेचि मग आणिलें । कृष्णपण मागुतें ।।११.६४५।।
> हा ठाववरी शिष्याची निकसी । सहातें गुरु आहाती कवणे देशीं ?।
> परि नेणिजे आवडी कैशी । संजयो म्हणे ।।११.६४६।।

या सर्व विवेचनाचा साररूप भावार्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "देखा बालकाचिया धणि धाइजे । कां शिष्याचेनि जाहलेपणे होइजे । हें सदगुरूचि एकलेनि जाणिजे । कां प्रसवतिया ।। ८.५५ ।।" अशा प्रकारे व्यक्त करून सद्‌गुरू ही माउली आहे, ती कुंडलिनी जगदंबा आहे, ती आरंभरंभा आहे व तीच सर्वोपशांतिप्रदा असून तीच गुरूशिष्यरूपाने क्रीडत असते असे म्हटले आहे. त्यामुळेच "तेथ पार्थु म्हणे दातारा । भलें जाणसी माझिया अंतरा । हें म्हणों तरी दुसरा । जाणता असे काई ? ।। १८.१३३८ ।।" असे म्हणून जेव्हा अर्जुनाने सद्‌गुरूंची प्रश्नरूप स्तुती केली तेव्हा

त्यांनी शिवशक्तीची एकरूपता सद्‌गुरुशिष्यांच्या एकरूपतेत " आज्ञेच्या नटनाचानें ॥ १८.१३७० ॥" म्हणजे अनादि आत्मसत्तारूप चिच्छक्ती कुंडलिनीमुळे पिंडब्रह्मांडाची उभारणी–संहारणी, गुरुशिष्यरूप क्रीडा व द्वैताद्वैतविवर्जित काळाला जिंकून अवस्था प्राप्ती इत्यादि सर्व काही घडते, असा महासिद्धांत महायोगी गोरक्षनाथांच्या " अपरंपरं निखिलविश्वजालं परं तत्त्वं सम्पादयत्येकीकरोतीत्यपराशक्तिराज्ञावती प्रसिद्धा ॥४.१०॥" भूतभौतिक स्थावरजंगम सकल विश्वप्रपंच पिंडब्रह्मांडासह जी अपरंपरा नावाची शक्ती परमतत्त्वात समरस करते तीच सर्वेश्वर नाथाची शक्ती " आज्ञावती " म्हणून प्रसिद्ध आहे; या " सिद्धसिद्धांतपद्धतीतील " सिद्धांताला धरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडला आहे. ते म्हणतात—

जैसी जळींची प्रतिमा । जळनाशीं बिंबा ।
येतां गाभागोभा । कांहीं आहे ? ॥१८.१३६५॥
पैं पवनु अंबरा । कां कल्लोळु सागरा ।
मिळतां आडवारा । कोणाचा गा ? ॥१३६६॥
म्हणोनि तूं आणि आम्हीं । हें दिसताहे देहधर्मीं ।
मग ययाच्या विरामीं । मीचि होसी ॥१३६७॥
यया बोलामाझारीं । होय नव्हे झणें करीं ।
येथ आन आथी तरी । तुझीच आण ॥१३६८॥
पैं तुझी आण वाहणें । हें आत्मलिंगातें शिवणें ।
प्रीतीची जाती लाजणें । आठवों नेदी ॥१३६९॥
एऱ्हवी वेद्यु निष्प्रपंचु । जेणें विश्वाभासु हा साचु ।
आज्ञेचा नटनाचु । काळातें जिणें ॥१३७०॥

असे हे शिवशक्तिरूप साधन म्हणजे सद्‌गुरूंच्या आज्ञेने जागृत होणाऱ्या कुंडलिनी शक्तीचा नटनाच आहे. हा नाच ज्यांच्या शरीरात उपस्थित होऊन प्रतीतिबोधसागरात आपण एक कल्लोळ होण्याचे सामर्थ्य ज्यांच्या ठिकाणी उत्पन्न झाले आहे (९.९३) व या अपरंपरेचा खेळ किंवा लीला ज्यांच्या देहात सद्‌गुरुकृपेने होऊ लागली आहे ते धन्य होत. तेच लीला व माया तरतात पण " ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥७.१०२॥ " हेच खरे अशी ही सद्‌गुरूंची लीला आहे. कशी होते ही ? "अमृतानुभवात" ही लीला कशी होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

कां कस्तुरीसकट परिमळु । कां उष्मेसकट अनळु ।
तैसा शक्तीसी केवळु । शिवुचि जो ॥१.४२॥
एकपण नव्हे सुखास । म्हणोनि गुरुशिष्याचें करूनि मिस ।
पाहणेचि आपुली वास । पाहतसे ॥२.१३॥
म्हणोनि शिष्य आणि गुरुनाथु । या दोहो शब्दांचा अर्थु ।

श्रीगुरुचि परी होतु । दोहीं ठायीं ॥२.६१॥
सुवर्ण आणि लेंणें । वसते एके सुवर्णें ।
कां चंद्र आणि चांदिणें । चंद्रींचि जेंवि ॥६२॥
नाना कापूर आणि परिमळु । कापूरचि केवळु ।
कीं गोडीं आणि गुळु । गुळुचि जेंवि ॥६३॥
तैसा गुरुशिष्यमिसें । हाचि एक उल्हासे ।
जऱ्हीं कांहीं दिसे । दोन्हीपणें ॥६४॥
आरसा आणि मुखीं । मुख दिसे हे उखीं ।
हे आपुलिये ओळखी । जाणें मुख ॥६५॥
पाहा पां निरंजनीं निदेला । तो निर्विवादु एकला ।
परि चेता चेववविता झाला । दोन्ही तोचि ॥६६॥
जे तोचि चेता तोच चेववी । तेवीं हाचि बुझे हाचि बुझावी ।
गुरुशिष्यत्व नांदवी । ऐसेनि हा ॥६७॥
दर्पणेंविण डोळा । आपुले भेटीचा सोहळा ।
भोगिता तरी लीला । सांगतो हे ॥६८॥

एकच शिवशक्तिरूप तत्त्व गुरुशिष्य होऊन उल्हसत असते. जागे होणारे व जागे करणारे हे स्वतः शिवशक्तितत्त्वच असते. श्रीगुरूच या शिवशक्तितत्त्वरूपाने असल्याने तेच शिष्य होऊन जाणतात व तेच देशिक होऊन जाणवितात. अशा प्रकारे हे शिवशक्तिरूपत्व गुरुशिष्यपणा आपल्या ठिकाणी नांदविते. अशी ही आरशा-शिवाय स्वतःला स्वतः भेटण्याची लीला होते. ही लीला कुंडलिनी शक्ती गुरुशिष्य-रूपाने किंवा प्रश्नोत्तररूपाने स्वतःच करीत असते असे श्रीअभिनवगुप्तांनीही "तंत्रालोकात" सांगितले आहे. ते म्हणतात—

गुरुशिष्यपदेप्येष वेद्यभेदोऽप्यतात्त्विकः ।
प्रष्टी च प्रतीवक्त्री च स्वयं देवी व्यवस्थिता ॥१.२५६॥

गुरुशिष्यरूपाने चिच्छक्तीच वक्ता व श्रोता बनून हा भेद नुसता वरवर दर्शविते. खरे पाहता संशय व निश्चय वस्तुतः एकच आहे. या अर्थानेच "तत्त्वयुक्ती" या ग्रंथात असे म्हटले आहे की, संसारातील प्राणी ज्या ज्या भयंकर कर्मांनी बांधले जातात तेच वास्तविक रीतीने मुक्तीचे उपाय आहेत; परंतु मूर्खपणामुळे ते त्या भवबंधनांपासून मुक्त होऊ शकत नाहीत. "कलयुक्ती" या ग्रंथातही असेच म्हटले आहे की, पतन व अभ्युत्थान या दोहोंचे एकच कारण आहे. अज्ञानी ज्यामुळे बांधला जातो त्यामुळेच ज्ञानी मुक्त होतो. त्यामुळेच "तत्त्वमुक्ताकलाप" या ग्रंथात वेदान्तदेशिकाचार्यांनी असे म्हटले की, ईश्वरच आचार्य व शिष्याची भूमिका ग्रहण करून अभिनय करीत असतो.

युक्तिःप्रश्नोत्तरादेर्नहि पुरुषभिदां बुद्धिभेदं च भुक्त्वा
तस्माद् व्यूहादिभेदे कतिचन पुरुषाः स्युः परेणानुबद्धाः।
तन्न स्वच्छंदलीलः स्वयमभिनयति स्वान्यतां सर्ववेदी
तद्वच्छिष्यादिवृत्तिप्रसृतिमिह सतां शिक्षयन्सानुकंपः॥

यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "श्रीगुरु प्रसन्न होये। शिष्य विद्याही कीर लाहे॥१८.१४८४॥" असे सांगून पुढे म्हटले आहे की–

जयाचेनि संबंधें बंधु फिटे। जयाचिया आशा आस तुटे।
जें भेटलिया सर्व भेटे। आपणपांचि॥१८.१५६९॥
तें तूं गुरुलिंग जी माझें। जें एकलेपणींचें विरजें।
जयालागीं बोलांडिजे। अद्वैतबोधु॥१५७०॥
आपणचि होऊनि ब्रह्म। सारिजे कृत्याकृत्यांचें काम।
मग कीजे का निःसीम। सेवा जयाची॥१५७१॥

अशा प्रकारे "भावनोपनिषदात" म्हटल्याप्रमाणें "श्रीगुरुः परम-सर्व कारणभूता शक्तिः।" असा सिद्धांत असल्यामुळे "तेंचि प्रमेय एक वेळ। शिष्यीं होआवया अढळ। सांगतसे मुकुल। मुद्रा आतां॥१८.१२३८॥" असे म्हणून मुद्रा म्हणजे शक्तिपात दीक्षेचे ज्ञानेश्वरीतील सकलसिद्धांताचे साररूप रहस्य म्हणून कथन करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीच्या शेवटी सर्व सिद्धांतांची दीक्षारूप केंद्रसिद्धांताशी सांगड घालून आपल्या हृदयातील भावार्थ ठेवा प्रकट केला आहे.या सिद्धयोग साधन-ठेव्याशिवाय श्रीज्ञानेश्वरमहाराजांना ज्ञानेश्वरीत दुसरे काहीही सांगावयाचे नाही, हे त्यांनी वरील एकाच केंद्रबिंदूशी ज्ञानेश्वरीतील प्रत्येक विषयाची सांगड घालून दाखविल्याने स्पष्ट होते. शिवशक्तिरूप साधन गुरुशिष्यरूपाने अवतरित होण्याचा एक अत्यंत हृदयस्पर्शी संवाद चित्रित करताना श्रीज्ञानेश्वर म्हणतात–

तरी बाप वस्तुस्वभावो। फावे तंव तंव गोडिये थांवो।
म्हणौनि अनुभवियांचा रावो। अर्जुन म्हणे॥१५.४४५॥
जी व्यापकपण बोलतां। निरुपाधिक जें आतां।
स्वरूप प्रसंगता। बोलिले देवो॥४४६॥
तें एकवेळ अव्यंगवाणें। कीजो कां मजकारणें।
तेथ द्वारकेचा नाथु म्हणे। भलें केलें॥४४७॥
पैं अर्जुना आम्हांहि वाडेंकोडें। अखंड बोलों आवडे।
परी काय कीजे न जोडे। पुसतें ऐसें॥४४८॥
आजि मनोरथांसी फळ। जोडलासि तूं केवळ।
जे तोंड भरूनि निखळ। आलासि पुसों॥४४९॥

जे अद्वैताहीवरी भोगिजे । तें अनुभवींच तूं विरजं ।
पुसोनि मज माझें । देतोसि सुख ।।४५०।।
जैसा आरिसा आलिया जवळा । दिसे आपणयें आपला डोळा ।
तैसा संवादिया तूं निर्मळा । शिरोमणी ।।४५१।।
तुवां नेणोनि पुसावें । मग आम्ही परिसऊं बैसावें ।
तो गा हा पाडु नव्हे । सोयरेया ।।४५२।।
ऐसें म्हणौनि आलिंगलें । कृपादृष्टी अवलोकिलें ।
मग देवो काय बोलिले । अर्जुनेंसीं ।।४५३।।
पैं दोहीं वोठीं एक बोलणें । दोहीं चरणीं एक चालणें ।
तैसें पुसणें सांगणें । तुझें माझें ।।४५४।।
एवं आम्ही तुम्ही येथें । देखावें एका अर्थातें ।
सांगतें पुसतें येथें । दोन्हीं एक ।।४५५।।
ऐसा बोलत देवो भुलला मोहें । अर्जुनाते आलिंगूनि ठाये ।
मग बिहाला म्हणे नोहें । आवडी हे ।।४५६।।
जाले इक्षुरसाचें ढाळ । तरी लवण देणें किडाळ ।
जे संवादसुखाचें रसाळ । नासेल थितें ।।४५७।।
आधींच आम्हा यया कांहीं । नरनारायणासी भिन्न नाहीं ।
परी आतां जिरो माझ्या ठाईं । वेगु हा माझा ।।४५८।।

अशा प्रकारे श्रीगुरूंशी संवाद करण्याची व जन्मजन्मांतराच्या पुण्याईन त्यांच्या चरणांची प्रत्यक्ष सेवा करण्याची संधी मिळालेल्या एखाद्या विरळ भाग्यवंत गुरुभक्तास नव्हे गुरुपुत्रासच ही अनुभूतियुक्त वाणी प्रत्यक्ष हृदयात प्रकाशित होऊन त्याचा आनंद लुटता येईल. श्रीगुरुचरणसेवेचे प्रत्यक्ष सुख व त्यांच्या चरणसेवावियोगाचे दुःख जेव्हा अश्रुपर्यवसायी होऊन ते या भक्ताच्या डोळयांतून पाझरू लागते तेव्हा त्याला महाप्रभू श्रीचैतन्यांनी केलेल्या "नयनं गलदश्रुधारया वदनं गद्गदरुद्धया गिरा । पुलकैर्निचितं वपुः कदा तव नामग्रहणे ।।" या प्रार्थनेप्रमाणे अनुभव येऊन आपल्या डोळयांतून गळणाऱ्या अश्रूंच्या प्रत्येक बिंदूमध्ये श्रीगुरूंचे, त्यांच्या चरणांचे, प्रेमाचे, वात्सल्याचे दर्शन होते. त्या अश्रूंमधील पांढऱ्या शुभ्र काचेच्या घरात जे छोटेसे घर दिसते त्यामध्येच आपल्या सद्गुरूंचा निवास आहे याची जाणीव प्रत्यक् अनुभूतीने आल्यामुळेच तो अशा प्रत्येक क्षणी डोळयातून झरणाऱ्या अश्रुबिंदूमुळे कृतार्थ होत असतो. हे सर्व शब्दातून कसे उलगडणार ? निवांतपणे श्रीगुरुचरणी माथा ठेविजे हेचि भले !

सारांश, शिवशक्तिरूप सिद्धयोगसाधन ही शिष्याने सद्गुरूंची अर्थात् शक्तीने शिवाची केलेली स्तुती आहे यापरते या साधनाचे दुसरे महिमान नाही. तेही शिष्य करू शकत नाही म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

केउता कल्पतरूवरी फुलौरा । कायसेनि पाहुणेरु क्षीरसागरा ? ।
कवणें वासीं कापुरा । सुवास देवों ? ॥१०.११॥
चंदनातें कायसेनि चर्चावें । अमृतातें केउतें रांधावें ।
गगनावरी उभवावें । घडे केवीं ?॥१२॥
तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळितें कें असे साधन ? ।
हें जाणोनि मियां नमन । निवांत केलें ॥१३॥
जरी प्रज्ञेचेनि आथिलेपणें । श्रीगुरुसामर्थ्या रूप करूं म्हणें ।
तरी ते मोतियां भिंग देणें । तैसें होईल ॥१४॥
का साडेपंधरया रजतवणी । तैशीं स्तुतींचीं बोलणीं ।
उगियाच्चि माथा ठेविजे चरणी । हेंचि भले ॥१५॥
आणि दुजया थांवो मोडे । जेथ पेरशीं वैखरी वुडे ।
तो तूं या कोणें तोंडें । वानावासी ॥१४.१४॥
यालागी आतां । स्तुति सांडूनी निवांता ।
चरणीं ठेविजे माथा । हेंचि भलें ॥१५॥

**भक्तियोगाचा योगमार्ग :–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " भक्तियोगु समस्त । योगरूप ॥ १२. २२८ ॥ " असे म्हणून ज्या सिद्धयोगाचा महिमा सवंध ज्ञानेश्वरीत गायिला आहे, तो पाहिला म्हणजे " सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः । पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥" अशा रीतीने संस्तुत झालेले व श्रीकृष्णांनी वेदवेदान्त मथून काढलेले भक्तियोगाचे " जैसा रसाआंतु सिद्धरसु ॥ १०.७६ ॥" असे सिद्धयोगयुक्त श्रीकृष्णरसायन सर्व साधकांना "आणि सभाग्यु पाहुणा ये । सुभगाचि वाढती होये । तैं सरों नेणें रससोये । ऐसें आथी ॥१३.६४४॥" असे म्हणून माउली होऊन त्यांनी वाढले आहे हे स्पष्ट होते. साधकाने " जाणतेनें गुरु भजिजे ॥ १.२५ ॥" असे केले म्हणजे ही माउली " प्रसादरसकल्लोळीं । पुरें येसी तूं ॥ १२.३ ॥" हे घडून येऊन " आधारशक्तिचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं । हृदयाकाशपल्लकीं । परियें देसी निजें ॥ १२.५ ॥" या न्यायाने साधकाला आधारशक्ती कुंडलिनीच्या अंकावर कौतुकाने बसवून हृदयाकाशरूपी पाळण्यात घालून म्हणजे आज्ञाचक्रात नेऊन त्याला झोके देऊन "कां तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं । ना तरी अमृतरसस्वादनीं । रस सकळ ॥ १.२६ ॥" असे सकळ रसांचे सिद्धयोगरूप भक्तियोगाचे श्रीकृष्णरसायन पाजून " तेणें कृतकार्य होईजे ॥ १.२५ ॥ " या अवस्थेप्रत नेऊन सोडते. अशा प्रकारचे सिद्धयोगाचे साधनरसायन आपण सर्वांना वाढणार असल्याची नितांत खात्री श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ठिकाणी असल्यामुळे आपले हे ज्ञानेश्वरीचे सिद्धयोगदर्शन " म्हणौनि हा काव्यारावो । ग्रंथ गुरुवतीचा

ठावो । एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ॥ १.३३ ॥ " अशा रीतीने युक्त असल्याचा निभ्रांत निर्वाळा देऊन त्यांनी अपूर्व आत्मविश्वास प्रकट केला आहे. " तयां तो प्रयत्नुचि एके वेळे । मग समग्र परब्रह्में फळे । जया पिकलेया रसु गळे । पूर्णतेचा ॥ ७.१७६ ॥ " असे हे पूर्णतेचा रस पाजणारे व " अहो गूळासाखरे मालयाचे । हे बांधे तरी एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आनआन जैसें ॥ १०.३३ ॥ " असलेले साधनरसायन असल्यामुळे " म्हणौनि संवादाचा सुवावो ढळे । तऱ्ही हृदयाकाश सारस्वतें वोळे । आणि श्रोता दुश्चिता तरि वितुळे । मांडला रसु ॥ ९.२८ ॥ " या न्यायाने सांख्य, ज्ञान, कर्म, योग, भक्ती इत्यादि नानाविध विषयांनी वरवर विभक्त दिसणारी व भिन्नभिन्न साधनमार्गांनी परिलुप्त झाल्यासारखी वाटणारी श्रीमद्‌भगवद्‌गीता ही " इये आनानें नावें । परि निरूप्य आन नोहे ॥ १३.९६५ ॥ " व " कां शाखा सानिया थोरा । परि आहाती एकाचिया तरुवरा । बहु रश्मि परि दिनकरा । एकाचे जेवीं ॥९.२५१॥" याप्रमाणे एकरस अशी सिद्धयोगरूप श्रीकृष्णरसायन सांगणारी श्रीप्रभूची वाङ्मयमूर्ती आहे हे मनात प्रतीत होऊन " तरी न करितां पांडवा । भजन जहालें ॥ ९.२६१ ॥ " या सिद्धांताची सिद्धी होईल. एरवी हे कसे शक्य आहे?

श्रीज्ञानेश्वरमहाराज " तया बोलाचा हन पाडु । कीं रसवृत्तीचा निवाडु । येणें श्रोतयां होईल सुरवाडु । श्रवणसुखाचा ॥ ३.२७५ ॥ " व " ते कथेची संगति भावाची संपत्ति । रसाची उन्नति । म्हणिपेल पुढा ॥ ४.२११ ॥ " अशी सिद्ध-योगसाधनेची रसाळ कथा सांगण्यास कटिबद्ध झाले आहेत. त्यांच्या दृष्टीने भक्तियोगाच्या योगमार्गाची ही कथा " परि तो रसातिशयो मुकुळीं । मग ग्रंथार्थ-दीपु उजळीं । साधुहृदयराउळीं । मंगळ उखा॥ ५.१४२ ॥" अशी सर्व रसांच्या साररूप रसाने परिप्लुत झालेली, गीताग्रंथ भावार्थ दीपाप्रमाणे उजळणारी व आत्मशक्तीच्या जागृतीने साधुरूप साधकांच्या हृदयात मंगल उषःकाल करणारी असल्यामुळे नारायणस्वरूप सद्‌गुरुनाथ श्रीकृष्णांनी अर्जुनरूप साधकाला " सहजें ब्रह्मरसाचें पारणें ॥ ६.२ ॥ " कसे केले व ब्रह्म म्हणजे शिव व रस म्हणजे शक्ती असलेल्या शिवशक्तियुक्त साधनाने अर्जुनासारखा साधक " कुंकुमाचें भरींव । सिद्धरसाचें वोतींव । मज पाहतां सावेव । शांतीचि ते ॥ ६.२५५ ॥ " या परमा-वस्थेप्रत कसा जातो " हें असोतु या बोलांची ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरिलीं । ही प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी ॥ ६.२२ ॥ " असे सांगून, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " आत्मरसेचि निर्भिन्न ॥ २.३३४ ॥ " असलेल्या सिद्धयोगसाधनरसायनरूप ब्रह्म व कैवल्यरस साधकाला पाजून " हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रिया पोषवील । श्रवणाकरवीं ॥ १८.१७४८ ॥ " असे सर्वांच्या प्रतीतीस आणून दिले आहे. सिद्धयोगांतर्गत भक्तियोगाचा असा

महिमा असला तरी "वायसी चंद्र नोळखिजे ।। ६.२९ ।। " या न्यायाप्रमाणे अज्ञ असलेले व "मुकिया वहिरयाची ।। ६.२६ ।। " याप्रमाणे गोष्टी करणारे आणि "निष्कळ भक्तितत्त्व" खरोखरी काय आहे हे न जाणणारे अरसिक व अरसज्ञ श्रोते म्हणजे साधक श्रीज्ञानेश्वरमहाराजांना पसंत नसून "तेथ सुगरिणी आणि उदारे। रसज्ञ आणि जेवणारे। मिळती मग अवतरे। हातु जैसा ।।१३.११५०।।" असे साधन जाणणारे रसज्ञ व "तेंचि शरीरीं जीहीं केलें ।। ६.३२६ ।। " असे रससेवक साधक हवे आहेत. त्यामुळे "सुवायें मेघु सांवरे। जैसा चंद्रें सिंधु भरे। तैंसा मातला रसु आदरें। श्रोतयांचेनि ।। १३.११५२ ।। " असे श्रोते आपल्याला लाभल्यामुळे ह्या भक्तिरूप योगमार्गाचे कथन करण्याचे भरते मला आले आहे असे श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी म्हटले आहे.

श्रीकृष्णरसायनाने नटलेली श्रीमद्भगवद्गीतारूपी सिद्धयोगाची कथा ही मुळातच भक्तियोगाच्या योगमार्गामुळे विदग्ध रसवृत्तीने भरलेली असल्याने "उठा-वलिया भावा रूप। करितां रसवृत्तीचें लागे वडप। चातुर्य म्हणे पडप। जोडलें आम्हां ।।१०.४६।। " या पद्धतीने श्रीगुरुकृपेने भाव म्हणजे आत्मशक्ती कुंडलिनी जेव्हा उठावलिया रूप करते म्हणजे जागृत होऊन सुषुम्नेमध्ये गमन करण्याचा विलास करते तेव्हा "जयाचिया बरवेपणीं। कीजे आठां रसांची वोवाळणी। जो सज्जनांचियें आयणी। विसांवा जगीं ।।४.२१२।। " अशी अष्टसात्त्विकभावरूपी रसांची अनुभूती साधकाला येऊन शेवटी "तो शांतुचि अभिनवेल ।।४.२१३।।" ही अंतिम रसावस्था त्याला प्राप्त होते. मुळात वेदांनीच "रसो वै सः ।। तैत्तिरीयो-पनिषद ।।२.७।।, स यथा सैन्धवघनोऽनन्तरोऽब्राह्यः रसघन एव। बृहदारण्यकोप-निषद ।।४.५.१३।।" व "स एष रसानां रसतमः परमः। छांदोग्योपनिषद ।। १.३।।" असे म्हणून परमात्मा हा रसमय आहे, मिठाचा खडा हा अंतर्बाह्य संपूर्ण मीठच असतो तसा परमात्मा अंतर्बाह्य संपूर्ण रसघन आहे व तो ओंकारस्वरूप परमात्मा सर्व रसातील रसतम असा परश्रेष्ठ रस आहे, असा उद्घोष उपरोक्त ठिकाणांप्रमाणे अनेक ठिकाणी करून परमात्मा हा रसयुक्त म्हणजे शक्तियुक्त असल्याचे सांगून लगेच "रसं ह्येवायं लब्ध्वाऽनंदी भवति ।। तैत्तिरीयोपनिषद ।।२.७।।, तस्य यो रसः प्राणेदत् स आदित्योऽभवद्रसस्य रसः ।। जैमिनीयोपनिषद ।।१.५।।" व "ते वा एते रसानां रसा वेदा हि रसास्तेषामेते रसास्तानि वा एतान्यमृतानाममृतानि वदा ह्यमृतास्तेषामेतान्यमृतानि ।। छांदोग्यउपनिषत् ।।३.५.४।। " ज्याला या रसाचा म्हणजे आत्मशक्तीच्या जागृतीचा प्रसाद मिळाला आहे त्याला आनंदाची प्राप्ती होते, ही शक्ती प्राणस्वरूप असून तीच अग्निरूपाने रसरूप आहे व हे आत्मशक्तीच्या जागृतीचे साधन सर्व रसातील रस असून वेद हे रसरूप, शक्तिरूप व अमृतरूप असून हे वेदोक्त साधन सर्व अमृताचे अमृत आहे असे म्हटले आहे.अशी वास्तविक

स्थिती असल्यामुळे "मीनले गंगेयमुनेचे ओघ । तैसें रसां जाहलें प्रयाग । म्हणौनि सुस्नात होत जग । आघवें एथ ॥११.६॥" असे गंगायमुनांचें प्रवाह जेथे मिळतात ते ज्याप्रमाणे तीर्थराज प्रयाग क्षेत्र म्हणून प्रसिद्ध होते त्याप्रमाणे शांत व अद्भुत रसांच्या प्रतीतीने सुस्नात होण्यासाठी "मग पिकलिया सुखाचा परिमळु । कीं निवालिया अमृताचा कल्लोळु । तैसा कोंवळा आणि रसाळु । बोलु बोलिला ॥८.५७॥" असे म्हणून अमृतासारखे गोड, रसयुक्त, सुगधमंडित व कोवळे असे साधन तितक्याच पात्रतेच्या शव्दांनी जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज वर्णन करतात तेव्हा "परि आतां आमुतें गोड करावें । ऐसें तांदुळीं कासया विनवावें ? । साइ-खडियाने काइ प्रार्थावें । सूत्रधारातें ?॥९.३०॥" या न्यायाने सर्वस्वी गुरुकृपेने चाल-णाऱ्या सिद्धयोगसाधनेचाच महिमा ते सांगत आहेत हे स्पष्ट होते. "रत्नमाला आगमातही" "यस्मिन्काले तु गुरुणा निर्विकल्पं प्रकाशितम् । तदैव किल मुक्तोऽसौ यंत्रं तिष्ठति केवलम् ॥" असे म्हणून ज्यावेळी गुरुकृपेने निर्विकल्प बोध प्रकाशित होतो त्यावेळी साधक मुक्त होऊन केवळ यंत्रमात्र शिल्लक राहतो हे स्पष्ट केले आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराज रसज्ञ व रससेवक साधकांना जे श्रीकृष्णरसायनरूपाने गीतेत सिद्ध असलेले सिद्धयोगसाधनरूप भोजन वाढण्यास सिद्ध झाले आहेत ते इतर कोणत्याही उपायांनी प्राप्त होणार नसल्याची त्यांची खात्री असल्यामुळे व "येर मातें नेणोनि भजन । तें वायांचि आनेंआन ॥ ९.३५० ॥" असे होऊ नये म्हणून ते म्हणतात–

> **आतां आणिकही संप्रदायें । परी मातें नेणती समवायें ।**
> **जे अग्निइंद्रसूर्यसोमायें । म्हणौनि यजिति ॥९.३४४॥**
>
> **तेही कीर मातेंचि होये । कां जें हें आघवें मीचि आहें ।**
> **परि ते भजती उजरी नोहे । विषम पडे ॥३४५॥**
>
> **पाहे पां शाखा पल्लव रुखाचें । हे काय नव्हतीं एकाचि बीजाचें ।?**
> **परी पाणी घेणें मुळाचें । तें मुळींच घापे ॥३४६॥**
>
> **कां दहाही इंद्रियें आहाती । इयें जरी एकेचि देहींचीं होती ।**
> **आणि इहीं सेविले विषयो जाती । एकाचि ठायीं ॥३४७॥**
>
> **तरि करोनी रससोय बरवी । कानीं केवीं भरावी । ?**
> **फुलें आणोनि बांधावी । डोळां केवीं ? ॥३४८॥**
>
> **तेथ रसु तो मुखेंचि सेवावा । परिमळु तो घ्राणेंचि घ्यावा ।**
> **तैसे मी तो यजावा । मीचि म्हणौनि ॥३४९॥**
>
> **येर मातें नेणोनि भजन । तें वायाचि गा आनेंआन ।**
> **म्हणौनि कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ॥३५०॥**

इतर कोणतेही संप्रदाय मला सम्यक्‌रीतीने व सर्वव्यापकरूपाने जाणत नाहीत; कारण या सर्व संप्रदायातील साधकांनी केलेली साधना हे एका अर्थाने भजन असले तरी ही "भजनाची उजरी" म्हणजे सद्‌गुरुकृपेने अंतःशक्ती कुंडलिनी जागृत होऊन आपोआप घडणारे भजन नव्हे. वास्तविक अशा प्रकारे भजन होणे हेच खरे भजन होय. हे भजन जोपर्यंत प्राप्त होत नाही तोपर्यंत "विषम पडे" व "वायाचि गा आनें-आन "हेच साधकाच्या कपाळी येते.यासाठी जागृत शक्तीच्या द्वारा होणारे कर्माचे म्हणजे साधनाचे डोळे जेव्हा साधकाला प्राप्त होतात तेव्हाच ज्ञानरूप शक्तीच्या द्वारा निर्दोष ज्ञान मिळते. यामुळेच श्रीअभिनवगुप्तांनी "मालिनीविजवार्तिकात" असे म्हटले आहे की—

> युक्ति सुधीभिः स्वयमेव तत्र शक्येत संयोजयितुं ततो न ।
> पृथक्तया योजनमुक्तमत्र यद्‌ग्रंथतो विस्तर एष मिथ्या ॥१.९९४॥
> उपजग्मुरतोऽनपेक्षणीं शिवशक्ति न च तां विना भवेत् ।
> अपवर्गपदं यतो मुधा परशास्त्रेषु विमोक्षसंकथा ॥९९५॥
> शक्तिपातसमये विचारणं प्राप्तमीश न करोषि कर्हिचित् ।
> श्रीमदुत्पलगुरुर्न्यरूपयत् तत्र तत्र निजशास्त्र ईदृशम् ॥९९६॥
> तस्यैव हि प्रसादेन भक्तिरुत्पद्यते नृणाम् ।
> यया यांति परां सिद्धीं तद्‌भावगतमानसः ॥९९७॥

शक्तिपात योग हीच एकमेव युक्ती आहे. बाकी कोणत्याही मार्गाने अपवर्ग-रूप मोक्षप्राप्तीची कथा सांगणे म्हणजे ग्रंथाचा मिथ्या विस्तार आहे. केवळ श्रीगुरूच्या शक्तिपातयोगदीक्षारूप प्रसादानेच शिष्याची चिच्छक्ती जागृत होऊन त्याच्या ठिकाणी भक्ती उत्पन्न होते. येथे पात्रापात्रतेचा विचारच नाही. हाच परा-सिद्धीच्या प्राप्तीचा अंतिम सिद्धांत आहे. हे जो जाणतो तोच भक्त व चेइलिया आपुले ज्ञान होऊन त्याच्याकडून जे भजन होते तेच खरे भजन होय. असे निभ्रांत-पणे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> परी हें असो ऐसिया । मज पुरुशोत्तमातें धनंजया ।
> जाणे जो पाहलेया । ज्ञानमित्रें ॥१५.५५९॥
> चेइलिया आपुलें ज्ञान । जैसें नाहींचि होय स्वप्न ।
> तैसें स्फुरतें त्रिभुवन । वावों जालें ॥५६०॥
> कां हातीं घेतलिया माळा । फिटे सर्पाभासाचा कांटाळा ।
> तैसें माझेनि बोधें टवाळा । नागवे तो ॥५६१॥
> लेणें सोनेंचि जो जाणें । तो लेणेंपण तें वावो म्हणे ।
> तेवीं मी जाणोनि जेणें । वाळिला भेदु ॥५६२॥
> मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिद्धु ।

जो आपणेनसीं भेदु । नेणोनियां जाणे ।।५६३।।
तेणेंचि सर्व जाणितलें । हेंही म्हणणें थेंकुलें ।
जे तया सर्व उरलें । द्वैत नाहीं ।।६५४।।
म्हणौनि माझिया भजना । उचितु तोचि अर्जुना ।
गगन जैसें आलिंगना । गगनाचिया ।।५६५।।
क्षीरसागरा परगुणें । कीजे क्षीरसागरचिपणें ।
अमृतचि होऊनि मिळणें । अमृती जेवीं ।।५६६।।
साडेपंधरा मिसळावें । तैं साडेपंधरेंचि होआवें ।
तेवीं मी जालिया संभवे । भक्ति माझी ।।५६७।।
हां गा सिंधूसि आनी होती । तरी गंगा कर्सनि मिळती ? ।
म्हणौनी मी न होतां भक्ती–। अन्वयो आहे ? ।।५६८।।
ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळु अनन्य सागरीं ।
तैसे मातें अवधारीं । भजिन्नला जो ।।५६९।।
सूर्या आणि प्रभे । एकवंकी जेणें लोभें ।
तो पाडु मानूं लाभे । भजना तया ।।५७०।।

ज्याला ज्ञानमित्र म्हणजे कुंडलिनी शक्तीची पाहलेया म्हणजे जागृती झाली आहे तोच माझें अभेद भजन करण्यास उचित होतो व ज्याला सूर्य व त्याच्या प्रभेप्रमाणे एकरूप असलेल्या शिवशक्तीचे ऐक्य लाभते त्यालाच खऱ्या भजनाचा लाभ होतो.

असा हा असामान्य भक्तियोगाचा योगमार्ग श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कथन केला आहे. त्यांच्या लेखी "येर पत्र पुष्प फळ। हें भजावया मिस केवळ ।।९.३९६।।" हेच असून अशा प्रकारच्या बाह्य भक्तीच्या व्यापाराला ते भक्ती म्हणावयास तयार नाहीत. असे जर नसते तर उपरोक्त विवेचन करून "वांचूनि आमुचा लाग निष्कळ । भक्तितत्त्व ।।९.३९६।। हा सिद्धांत त्यांनी मांडला नसता व उपरोक्त प्रकारच्या भक्तीस गुरवी भक्ती व गहन भजन असे म्हटले नसते. "येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले । परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ।।७.१०२।।" हे जरी त्यांना माहीत होते तरी त्यांना हेच प्रतिपादन करावयाचे आहे; कारण "तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजही आंतु। रिघोनियां ।।१८.१७२९।। असा हा जागृत शक्तीच्या रूपाने असलेला नितांत रमणीय सद्‌गुरू त्यांच्या हृदयपुष्करणीवर भाष्यकार बनून जो नटनाच करीत आहे तोच कृपेचे वैभव होऊन साकार होत असल्याने तत्त्वाच्या सत्याविष्काराशिवाय श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रातिभज्ञानाने दुसरे काय आकळणे शक्य आहे ? हा भाव अधिक स्पष्ट करताना "भारतीय संस्कृति और साधना," या ग्रंथाच्या द्वितीय खंडातील, "भक्तिरहस्य" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, "साधारणतः

जगतमें जिसको साधना कहते हैं, वह वास्तविक साधना नहीं है। स्थूल देहमें अभिनिवेश या तादात्म्यबोधके रहते हुए कोई भी साधना क्यों न की जाय, वह अकृत्रिम स्वाभाविक साधनाके रूपमें परिगणित नहीं हो सकती। भाव (भक्ति) का साधनही यथार्थ साधन है। अभावके शरीरमें भावकी साधना नहीं हो सकती। अतएव प्रवर्तक अवस्थामें अभावके शरीरको भावके शरीरमें परिणत करनेकी चेष्टा करनी पडती है। नाम और मंत्र ये प्रारंभिक चेष्टामें सहायक होते है। जिन्होंने भक्तितत्त्वका अनुशीलन किया है, वे जानते हैं कि क्रिया—रूपा भक्ति फलरूपा भक्तिमें पर्यवसित होती है। प्रवर्तक अवस्थामें जो कुछ किया जाता है, वह क्रिया भक्तिकेही अंतर्गत है। कोई कोई इसे साधनभक्ति भी कहते है। परंतु वास्तविक साधनभक्ति यह नहीं है, यह कृत्रिम साधनभक्ति है; क्योंकि प्राकृत देहाभिमानके रहते हुए प्रकृत साधनभक्तिका उदय नहीं हो सकता। जिस नवधा भक्तिकी बात भक्त लोग कहते हैं तथा भक्तसंप्रदायमें जिसका साधन देखनेमें आता है, वह भी वस्तुतः प्रवर्तक अवस्थाकाही व्यापार है। इन सभी अनुष्ठानोंके पीछे केवल देहात्मबोधमूलक कृत्रिम अहंभावकी क्रीडा विद्यमान रहती है। भाव (भक्ति) कैसे उदित होता है, इसकी अलोचना करते समय आचार्योंने कहा हैं कि भावका प्रथम अविर्भाव कर्म अथवा कृपासे लक्षित होता है। भक्ति ल्हादिनी शक्तिको एक विशेष वृत्ति है। ल्हादिनी शक्ति महाभावस्वरूपा है। अतएव शुद्धभक्ति स्वरूपतः महाभावका अंश है, इसमें कोई संदेह नहीं है। अतएव भावरूपा भक्ति चाहे साधनपूर्वक हो अथवा कृपापूर्वक, वह वस्तुतः महाभावसेही स्फुरित होती है। अतएव कृत्रिम साधनभक्तिकी प्रयोजनीयता स्वीकार करनेपर भी, भावके उदयको सभी साधनद्वारा दुष्प्राप्य मानते हैं।"

महायोगी गोरक्षनाथांनीही खरी पूजा व खरी भक्ती म्हणजे काय हे सांगताना "मोक्षकारण सामग्र्यां भक्तिरेव गरियसी। स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्याभिधीयते।।" असे श्रीमदाद्यशंकराचार्यांप्रमाणेच स्वस्वरूपानुसंधानाला भक्ती म्हणतात व अशी भक्तीच सर्व मोक्षमार्गांत श्रेष्ठ आहे असे सांगताना "महार्थमंजरीत" असे म्हटले आहे की–

**निजबलनिभालनमेव वरिवस्या सा च दुर्लभा लोके।**
**सुलभानि विश्वपतेरासवतांबूलगंधपुष्पाणि ।।४२।।**

या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना त्यांनी स्वतःच त्यावर. केलेल्या "परिमल टीकेत" ते म्हणतात, "तस्मात् स्वस्वरूपपरामर्श एव परमा पूजा। अन्यत्तु गंधपुष्पधूपदीपादि आडंबरमात्रमिति तात्पर्यार्थः।" स्वस्वरूपाची अनुभूती घेणे हीच श्रेष्ठ पूजा होय. गंध, पुष्प, धूप, दीपादि बाह्योपचार म्हणजे केवळ अवडंबर होय. इतके सांगून ते पुढे म्हणतात, "स्वतःच्या हृदयात स्फुरणारी आत्मशक्ती हीच परमेश्वरी व हीच देवता होय. अशा प्रकारे आपल्या जागृत

आत्मशक्तिरूप आत्मदेवतेची पूजा करणारा साधक दुर्मिळ आहे. लोकांमध्ये अशा प्रकारच्या पूजेचा व भक्तीचा अभावच आढळतो. काही महाज्ञानी योगीच असा विचार करू शकतात म्हणून खरी पूजा हीच आहे. इतर उपचारांनी केलेली बाह्यपूजा ही वरवर सुलभ दिसत असली तरी दावाग्नीला दिवा ओवाळणे, पर्जन्यदेवतेला पाणपोई घालणे व सोसाटयाच्या वाऱ्याला पंख्याने वारा घालण्यासारखी ती निष्फळ आहे. सर्वद्रव्यरूपी सर्वव्यापकाला इतर तांबूल, आसव, पुष्पादि अर्पणाचा खटाटोप व्यर्थ आहे. इतर लोक कसेही पूजोत आम्ही मात्र स्वानंदमुद्रेनेच महापूजा करणारे आहोत. याप्रमाणे बाह्योपचारांचा पसारा म्हणजे पूजेची थट्टाच होय. "अर्चनत्रिंशिकेत" अशा पूजेबद्दल असे म्हटले आहे की, "लहान मुली कपडयाच्या बाहुल्या करून लुटुपुटीच्या लग्नाचा सोहळा करतात नि खेळतात तशी ही पूजा होय; कारण या पूजेत निर्मल-निस्तरंग-चित्समुद्रात चित्त मग्न होऊन समाधान पावत नाही." " श्रीपादुकोदयात " असे म्हटले आहे की, "सद्गुरूने जागृत करून दिलेल्या शक्तीची स्वात्मस्वरूपाने पूजा करणे हीच खरी पूजा होय. वेद्यरूप विश्वाची चित्स्वरूपात विश्रांती ही पूजा होय." "आम्नायामध्येही" " निर्विकल्प महाकाशात बुद्धी म्हणजे प्राण स्थिर व दृढ करून तेथेच तिचा लय करणे ही पूजा असून पुष्पादिकांनी केलेली पूजा ही पूजा नव्हे," असे म्हटले आहे. अशी पूजा एखाद्याच भाग्यवानाच्या अनुभवाला येते. त्यामुळेच तंत्रालोकात असे म्हटले आहे की, "ज्या कोणावर कुंडलिनीरूपी चैतन्यचक्राची प्रसन्नता होईल त्याला हा पूजाविधी आवडेल व तो पुढील जन्म येण्यापूर्वी म्हणजे याच जन्मात आत्मज्ञानसंपन्न होऊन जीवन्मुक्त होईल. इतके सांगून ते म्हणतात–

> **इदं हि शास्त्रमाहात्म्यदर्शनालसचेतसाम् ।**
> **अभाषणवद् भाति न च सौभाग्यमुज्झति ।**

शास्त्रमाहात्म्य पाहण्याविषयी ज्यांचे मन आळशी व उदासीन आहे त्यांना हे वरील विवेचन व्यर्थ व असंबद्ध भाषण वाटेल; पण त्यामुळे त्याचे सौभाग्य म्हणजे महत्त्व कमी होत नाही."

वरील सर्व विवेचन ध्यानात घेतले म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांना जो भक्तियोग सांगावयाचा आहे तो बाह्यत: घडणाऱ्या नवविध भक्तीच्या व्यापारासारखा कृत्रिम नसून सद्गुरुकृपेने आतून जागृत होणाऱ्या कुंडलिनी शक्तीच्या अकृत्रिम लीलामय विलासाने झळकणारा सिद्धयोगरूप मार्ग आहे हे स्पष्ट होते. स्वत: श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाची सर्व प्रमेये आपल्या मतिगंगेला स्फुरावीत व उन्मेषसागराला भरती येऊन ओसंडणाऱ्या स्फूर्तीने म्हणजे चिच्छक्ती कुंडलिनीच्या अनावर जागृतीने रसवृत्तीच्या म्हणजे तिचेच स्वरूप असणाऱ्या भक्तीच्या प्रकटीकरणार्थ "वरिष उदारें दिठिवेनी" व "तुझा प्रसादचंद्रमा करूं मज पूर्णिमा

स्फूर्तीची" असे म्हणून श्रीसद्गुरुनाथ निवृत्तिनाथमहाराजांपाशी दीक्षेची प्रार्थना केली आहे. ते म्हणतात–

प्रमेय महापूरें। हे मतिगंगा ये थोरें।
तैसा वरिष उदारें। दिठीवेनी ॥१४.२२॥

अगा विश्वैकधामा। तुझा प्रसाद चंद्रमा।
करूं मज पूर्णिमा। स्फूर्तीची जी ॥२३॥

जी अवलोकिलिया मातें। उन्मेषसागरीं भरितें।
वोसंडेल स्फूर्तीतें। रसवृत्तीचें ॥२४॥

या प्रार्थनेप्रमाणेच बहुतेक अध्यायांच्या सुरुवातीला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या सद्गुरुनाथांची जी प्रार्थना अनेक वेळा अनेक प्रकारे केली आहे त्या सर्वांचा भावार्थ हाच आहे की, सद्गुरूंच्या कृपेनें अनादि आत्मसत्तारूप चिच्छक्तियुक्त महामाया कुंडलिनी जागृत होऊन अननुभूत सारस्वताचा स्रोत स्वेच्छेने प्रकट व्हावा व श्रीगुरूंनी बोधौनि दिधलेल्या सिद्धयोगरूप समाधिधनाच्या कर्म, ज्ञान, भक्ती इत्यादि अंगोपांगांचे एकसमयावच्छेदाने समरसीकरणाच्या महासिद्धांताने मंडित होऊन प्रकटीकरण व्हावे. सद्गुरूंच्या कृपादृष्टीच्या वर्षावाने भरास आलेल्या प्रसन्नतेच्या मळ्यातील सावलीत लोळण्याची श्रीज्ञानेश्वरमहाराजांची इच्छा असल्यामुळे ते म्हणतात–

तुमचे या दिठिवेयाचिये वोलें। सासिन्नलें प्रसन्नतेचे मळे।
ते साउली देखोनि लोळें। श्रांतु जी मी ॥९.४॥
कां जैं दिठिवा तुमचा वरुषे। तैं सकळार्थ सिद्धि मती पिके।
एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके। जरी उदास तुम्ही ॥९.२५॥
म्हणौनि अंबे श्रीमंते। निजजनकल्पलते।
आज्ञापीं मातें। ग्रंथनिरूपणीं ॥१२.१०॥
नवरसीं भरवीं सागरु। करवी उचत रत्नांचें आगरु।
भावार्थाचे गिरिवरु। निफजवीं माये ॥११॥
जयांचेनि आठवे। शब्दसृष्टि आंगवे।
सारस्वत आघवें। जिव्हेसि ये ॥१३.२॥
वक्तृत्वा गोडपणें। अमृतातें पारुखें म्हणे।
रस होती वोळंगणें। अक्षरांसीं ॥३॥
भावाचें अवतरण। अवतरवती खूण।
हाता चढे संपूर्ण। तत्त्वभेद ॥४॥
श्रीगुरूंचे पाय। जैं हृदय गिंवसूनि ठाय।
तैं येवढें भाग्य होय। उन्मेखासीं ॥५॥

अशी ही भक्तीची चिद्‌गंगा गुरूच्या कृपादृष्टीच्या वर्षावाने म्हणजे शक्तिपाताने प्रकट होऊन सर्व सारस्वत जिव्हेवर नाचू लागते. अशा प्रकारचा उन्मेख म्हणजे जागृत शक्तीच्या उद्रेकाचे व विलासाचे भाग्य फक्त एकमात्र श्रीसद्‌गुरुचरण हृदयात पक्के रुतले जातात तेव्हाच प्राप्त होते व त्यानेच प्राप्त होते. इतर कशाने म्हणून कशानेही प्राप्त होत नाही. "जरी प्रसादरसकल्लोळीं । पुरें येसि तूं ॥१२.३॥" असा श्रीकृष्णरसायनरूप सिद्धयोगामृताच्या कल्लोळांचा प्रसाद शक्तिपाताने प्राप्त झाला तरच "तरी कवणातें तापु पोळी । कैसेनि वो शोकु जाळी ॥१२.३॥" ही अवस्था साधकाला येणार. एऱ्हवी भक्तीची गंगा म्हणत म्हणत तो ओहोळातच डुंबत राहाणार. काय करणार ? हे सर्व 'विपाइले' आहे. 'बहुवस नाहीं' हेच खरे. त्यामुळे सद्‌गुरुनाथ श्रीकृष्णमहाराजांना अर्जुन म्हणाला की–

म्हणौनि भाग्य जैं सानुकूळ । जालिया केले उद्यम सदां सफळ ।
तैसे श्रुताधीत सकळ । गुरुकृपा साच ॥१०.१६८॥
कां इंद्रियें वाचा प्राण । यां जालियांचें तैंचि सार्थकपण ।
जैं चैतन्य येऊनि आपण । संचरे माजीं ॥१७१॥
तैसें शब्दजात आलोडिलें । अथवा योगादिक जें अभ्यासिलें ।
तें तैंचि म्हणो ये आपुलें । जैं सानुकूल श्रीगुरु ॥१७२॥
तुझें वाक्य व्यक्ती न येतां देवा । जो आपुलिया जाणें जाणिवा ।
तो कहीचि नोहे हें मद्‌भावा । भरंवसेनी आलें ॥१७५॥

सद्‌गुरूंच्या कृपेने जी अनर्वचनीय स्थिती प्राप्त होते तीच खरी. आम्ही बाह्यतः जे जाणतो असे म्हणतो ते सर्व काही नसल्यासारखेच आहे हे निश्चित होय. अशा ह्या भक्तियोगरूप योगमार्गात श्रीज्ञानेश्वरमहाराज स्वतः सुस्नात झालेले असल्याने आपली वाचा आपल्यालाच या सिद्धयोगाचे महिमान गाताना अनावर झाली आहे हे सांगताना ते म्हणतात–

म्हणाल हिरवें चारीं गुरूं । विसरे मागील मोहर धरूं ।
का वारेलगें पाखिरूं । गगनीं भरें ॥१३.३१५॥
तैसिया प्रेमाचिया स्फूर्ती । फावलिया रसवृत्तीं ।
वाहविला मती । आकळेना ॥३१६॥

जेथे श्रीगुरुनाथांच्या दीक्षेमुळे वर्णवती होऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांची जागृतशक्ती नित्य सारस्वतस्रोताच्या उद्‌भूततेमध्ये बुडून गेली तेथे अर्जुनाची व संजयाची काय अवस्था झाली असेल ? सिद्धयोगाचे हे रसायन असेच दिव्य आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांना जसे हे दिव्य असे भक्तियोगरूप सिद्धयोगाचे श्रीकृष्णरसायन श्रीनिवृत्तिनाथांच्या कृपेमुळे प्राशन करावयास मिळाले तशी संधी ज्यांना आपल्या आयुष्यात परमपुण्याईने व भाग्याने सद्‌गुरुकृपा उपलब्ध होऊन मिळते त्यांचे जीवन श्रीतुकाराममहाराजांनी म्हटल्याप्रमाणें "चालविसी हातीं धरूनिया" अशा रीतीने

धन्य व कृतार्थ होते. अशा प्रकारे साधकाचा हात धरून त्याला गंतव्य स्थानापर्यंत नेणारा त्याच्या ठिकाणी जागृत शक्तीच्या रूपाने असलेला अंतरगुरूच असतो. ही अंतरगुरूची प्राप्ती होणे हेच सिद्धयोगाचे महिमान आहे. हाच ऋषी, महात्मा, संत व साधू बनण्याचा खरा मार्ग आहे. नारद महर्षींनी " भक्तिसूत्राच्या " शेवटी " इत्येवं वदंति जनजल्पनिर्भयाः एकमताः ॥ ८३ ॥ " असे म्हणून ज्यांनी ज्यांनी शक्तिपातयोगस्वरूप भक्तियोगाच्या योगमार्गाचा अगदी निर्भयपणे व लोकांच्या निरर्गल प्रवादांना न भिता एकमताने पुरस्कार केला आहे अशा महान भक्ताचार्यांचे स्मरण केले आहे. सनत्कुमार, व्यास,शुक, शांडिल्य, गर्ग, विष्णू, कौंडिण्य, शेष, उद्धव, अरुणी, बली, हनुमान व विभीषण हे शक्तिपातयोगाने प्राप्त होणाऱ्या भक्तीचे पुरस्कर्ते आहेत. या सर्वांना " मुख्यतस्तु महत्कृपयैव ॥३८॥" या न्यायाने संतमहात्म्यांच्या अहेतुक कृपेमुळे शक्तिपात होऊन स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची उपलब्धी झाली होती. साधुलोक अशा प्रकारच्या शक्तिपाताने साधकांच्या ठिकाणी भक्तिचिद्गंगा प्रकट करीत असल्याने " महत्संगस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च ॥ ३९॥" अशा सूत्राने नारदांनी त्याचे माहात्म्य प्रकट केले आहे. महापुरुषांची संगती म्हणजे दुर्लभ, अगम्य व अमोघ अशी कृपा असते. त्यांची संगती व कृपा एकदा झाली की, साधकाचे जीवन कृतार्थ होतेच होते.यालाच महायोगी अरविंद घोष यांनी "Divine Touch" म्हटले आहे. हा डिव्हाईन टच किंवा दिव्य स्पर्श हेच सिद्धयोगरूप भक्तियोगाच्या योगमार्गाचे सार व माहात्म्य आहे. यालाच पराभक्ती म्हणतात. " सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा ॥ २ ॥, अमृतस्वरूपाच ॥३॥, यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति अमृतो भवति तृप्तो भवति ॥४॥, यत्प्राप्य न किंचित् वांछति, न शोचति, न द्वेष्टी, न रमते नोत्साही भवति ॥५॥ यज्ज्ञात्वा मत्तो भवति,स्तब्धो भवति, आत्मारामो भवति ॥ ६ ॥" व " सा न कामयमाना निरोधरूपत्वात् ॥ ७ ॥ " असे या भक्तीचे लक्षण नारद महर्षींनी " भक्तिसूत्रात " स्पष्ट केले आहे. सद्गुरुकृपेने जागृत शक्तीच्या रूपाने प्राप्त होणारी पराभक्ती ही परमप्रेमरूप व अमृतस्वरूप आहे. ही भक्ती एकदा उत्पन्न झाली म्हणजे साधक कृतार्थ, अमर व तृप्त होतो. तो कशाचीही किंचित्सुद्धा इच्छा करीत नाही. कोणत्याही गोष्टीविषयी खेद करीत नाही, कोणाचाही द्वेष करीत नाही, कोणत्याही गोष्टीत रममाण होत नाही व कोणत्याही कर्माचा उत्साह त्याला नसतो. पराभक्तीचे हे स्वरूप अनुभविल्यामुळे असा साधकभक्त त्या भक्तिप्रेमाने धुंद व मस्त होऊन जातो. तो शांत होतो व आत्मस्वरूपात रममाण होतो. अशी भक्ती साधकाला प्राप्त झाली की, कोणतीही कामनाच साधकाला उत्पन्न होत नाही; कारण जागृत शक्तीच्या सुषुम्नाप्रवेशाने ही उद्भुत होत असल्याने ती सर्व कामनांचा आपणच स्वतः निरोध करीत असते. असे हे पराभक्तीचे स्वरूप, त्याची दिव्यता, श्रेष्ठता व भव्यता उपरोक्त सर्व भक्ताचार्यांनी अनुभविली व त्या भक्तिप्रेमाने ते धुंद व मस्त होऊन गेले.

" तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ।। १९ ।। " हे महर्षी नारदोक्त भक्तीचे लक्षण त्यांनी आपल्या जीवनात अनुभविले. जागृत चिच्छक्ती कुंडलिनीचे परम शिवाशी मीलन होत असताना भगवंताला सर्व कर्मे कशी अर्पण होत जातात व परमेश्वराच्या विरहाने, विस्मरणाने व मीलन न झाल्याने सुषुम्नाप्रवासमार्गाच्या वाटचालीत परम व्याकुलता कशी उत्पन्न होते हे त्यांनी साक्षात् अनुभविले. एवढेच नव्हे तर " तयेत्थमविरतपुरुषपरिचर्यया भगवति प्रवर्धमानानुरागभरद्रुतहृदयशैथिल्य: प्रहर्षवेगेनात्मन्युद्भिद्यमानरोमपुलककुलक औत्कंठयप्रवृत्तप्रणयबाष्पनिरुद्धावलोकनयन ।। ५.७.१२ ।। " अशी " श्रीमद्भागवतात " महर्षी व्यासांनी भरताची जी स्थिती भगवती कुंडलिनीच्या प्रसादाने झाली म्हणून वर्णन केले आहे त्याचा त्यांनी अनुभव घेतला. भरत जेव्हा एकांतात राहून साधन करू लागला तेव्हा भगवती चिच्छक्तीच्या प्रेमाचा वेग वाढत गेला. यामुळे त्याचे हृदय द्रवीभूत होऊन शांत झाले. आनंदाच्या प्रबल वेगामुळे शरीरावर रोमांच उभे राहिले व आत्यंतिक उत्कंठतेमुळे त्याच्या नेत्रातून अश्रू वाहू लागले. त्यामुळे त्याची दृष्टी थांबली. " सुरेतसाद: पुनराविश्य चष्टे ।।५.७.१४।।' असे महर्षी व्यासांनी " श्रीमद्भागवतात " म्हणून परमात्माच अंतर्यामीरूपाने पिंडब्रह्मांडात प्रविष्ट होऊन आपल्या चित्शक्तिद्वारा विषयलोलुप जीवांचे उपरोक्तप्रकारे रक्षण करतो असे स्पष्ट केले आहे. परम विरहाच्या अवस्थेचा भक्तीच्या रूपाने तीव्रतम उद्रेक झाला की, अष्टसात्त्विक भाव उपस्थित होऊन साधकाचे डोळे प्रेमाश्रूंनी पाझरू लागतात. कंठ सद्गदित होतो. अंगावर रोमाच उभे राहतात. भक्तीच्या उद्रेकाच्या वेडाने म्हणजे जागृत शक्तीच्या सुषुम्ना संतचराने ऊर्ध्वगामित्व प्राप्त झाल्याने साधक वेडाने नाचू व गाऊ लागतो. ओरडत व पळत सुटतो. इतकेच नव्हे तर नाना तऱ्हेच्या क्रिया त्याच्या शरीराकडून, शक्ती शिवाशी आपले मीलन व्हावे म्हणून, करवून घेत असते. नारद महर्षींच्या द्वारा प्रल्हादाला मातेच्या गर्भातच असताना जो भक्तीचा उपदेश झाला, त्याचे वर्णन करताना महर्षी व्यासांनी "श्रीमद्भागवतात" "वासुदेवे भगवती यया सलंभते रतिम् ।।७.७.३३।।" असे म्हणून श्रीवासुदेवाच्या भगवती चित्शक्तीमुळे भगवच्चरणी अतन्यप्रेमप्राप्ती कशी होते व भक्त्युद्रेकामुळे कोणत्या क्रिया होतात हे वर्णन करताना असे म्हटले आहे की—

निशम्य कर्माणि गुणानतुल्यान् वीर्याणि लीलातनुभि: कृतानि ।
यदातिहर्षोत्पुलकाश्रुगद्गदं प्रोत्कंठ उद्गायति रौति नृत्यति ।।७.७.३४।।
यदा ग्रहग्रस्त इव क्वचिद्हसत्याक्रंदते ध्यायति वंदते जनम् ।
मुहु: श्वसन्वक्ति हरे जगत्पते नारायणेत्यात्समतिर्गतत्रप: ।।३५।।
तदा पुमान्मुक्तसमस्तबंधनस्तद्भावभावानुकृताशयाकृति: ।
निर्दग्धबीजानुशयो महीयसा भक्तिप्रयोगेण समेत्यधोक्षजम् ।।३६।।

ज्यावेळी साधक भगवंताच्या लीलाशरीराने म्हणजे अंतस्थ कुंडलिनीशक्तीने केलेल्या पराक्रमाचे, अनुपम गुणांचे व चरित्राचे दिव्य श्रवणेंद्रियांनी श्रवण करतो म्हणजे अनाहतनाद ऐकू लागतो तेव्हा आनंदाच्या उद्रेकाने साधकाच्या शरीरातील कणन् कण जागृत होतो, अश्रुधारांमुळे त्याचा कंठ रुद्ध होतो व संकोच सोडून तो जोरजोराने गाऊ, ओरडू व नाचू लागतो. या अवस्थेने भाराक्रांत होऊन तो एखाद्या वेड्याप्रमाणे हसतो; तर कधी अत्यंत करुणपणे रडू लागतो. तो कधी ध्यान करतो; तर कधी भगवद्भावाने सर्व लोकांना नमस्कार करतो. ज्यावेळी साधकाची जागृत शक्ती परमात्म्याशी अधिकाधिक तन्मय होत जाते त्यावेळी तो हरे ! जगत्पते !! नारायण !!! इत्यादि त्याच्या नानाविध नामांनी त्याला आळवू लागतो. अशा प्रकारचा भक्तिप्रयोग जेव्हा साधकशरीरात आविर्भूत होतो तेव्हा त्याच्या महान प्रभावाने साधकाची सर्व बंधने तुटून जातात व शक्ती स्वसंकोच दूर करून स्व-भाव प्रकट करीत करीत साधकाचे हृदय भगवन्मय करते. त्यावेळी साधकाच्या जन्ममृत्यूचा खजिना जळून जातो व साधक भगवत्स्वरूप होतो.

या क्रियांनाच प्रेमाग्नी म्हणतात. ह्या क्रिया होणे ही असामान्य व अलौकिक गोष्ट असल्याने वर उल्लेखिलेल्या सर्व भक्ताचार्यांनी ह्या क्रिया होणे हीच भक्ति-योगरूप सिद्धयोगमार्गाची श्रेष्ठता आहे असे आपल्या जीवनाद्वारा सिद्ध केले. इतकेच नव्हे तर हे भक्तीचे तत्त्वज्ञान स्वानुभव घेऊन त्यांनी जगाला सांगितले. या भक्तीच्या उद्रेकामुळे, क्रियांमुळे व विश्वरूप दर्शनाच्या वेळी झालेल्या दिव्य दर्शनांमुळे साधक-रूप अर्जुनाला जशी भीती वाटते तशी ती सर्व साधकांना वाटते. तेथे सामान्य जनांची काय कथा ? हे काही तरी विचित्र व चमत्कारिक आहे अशी समजूत होते. त्या-मुळेच " देवा तुझ्या ये दर्शनीं । जें वैकल्य उपजलें आहे अंतःकरणीं । तें सावराव-यालागीं गंवसणी । धैर्याची करितसें ॥११.३७१॥ " असे अर्जुन म्हणाला. एवढेच नव्हे तर " अहा भाग्या विपरीता । विघ्न उठिलें शांत करितां । कटकटा विश्व गेलें आतां । तूं लागलासि ग्रासूं ॥११.३९०॥ " व " कटकटा धातया । कैसें जाहलें अनुग्रहा यया । मियां प्रार्थूनि जगा बापुडिया । आणिलें मरण ॥११.४००॥ " असे म्हणून भीतिग्रस्त होऊन त्याने कपाळावर हात मारून घेतला. शेवटी तर त्याने " यालागीं जी देवा । एथिंचे भय उपजतसे जीवा । म्हणौनि येतुला ळळा पाळावा । जे पुरे हें आतां ॥११.५९३॥" असे म्हणून अगदी दीनवाणीपणे भगवंतांची प्रार्थना केली; परंतु साधकाच्या ठिकाणी उत्पन्न होणाऱ्या नानाविध अवस्था, क्रिया व भाव ही खरोखरीच ब्रह्माभिव्यक्तीची लक्षणे असून त्यात खरा आनंद मिळत असतो हे साधकाला भीतिग्रस्त मनामुळे प्रथम प्रथम कळत नाही व सामान्य जनांना अनभिज्ञतेमुळे त्याची कल्पना येत नाही. या क्रिया पैशाचिक असतील, हा वेडेपणा असेल, ही भूतबाधा असेल, अशी कोठे कुंडलिनी शक्ती जागृत होते का ? आरडणे-

ओरडणे-हसणे-गाणे-रडणे-लोळणे-पळणे-नाचणे म्हणजे भक्ती नव्हे, हे काही खऱ्या ध्यानाचे लक्षण नाही, महर्षी पतंजलींनी योगशास्त्रात असे कुठे सांगितले आहे ?, श्रीज्ञानेश्वरमहाराजादि ब्रह्मनिष्ठांनी अशा दीक्षेचे वर्णनच केले नाही, खरा कुंडलिनी-योग काही निराळाच आहे इत्यादि नाना तऱ्हेचे निरर्गल आरोप अशिक्षित,असमंज, अल्पबुद्धी व अनुभूतिविहीन लोक करीत असतात. या सर्व लोकांना, सद्‌गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर भक्त्युद्रेकाने साधकाच्या ठिकाणी उपस्थित होणाऱ्या उपरोक्त सर्व गोष्टींचा व " कंठावरोधरोमांचाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयंति कुलानि पृथिवीं च ॥६८॥ " या नारद महर्षींनी सांगितलेल्या सूत्राप्रमाणे असणाऱ्या महात्म्यांचा महिमा व शास्त्र माहीत नसल्यामुळे व अनुभूती आली नसल्यामुळे, भक्तीचे खरे रहस्य कशात आहे हे कळत नाही. या सर्व आरोपांची व लोकमताची उपरोक्त भक्ताचार्यांनी अणुमात्रही पर्वा व फिकीर केली नाही व हे भक्तियोगाचे शास्त्र कथन केले असा निर्वाळा महर्षी नारदांनी दिला आहे. ज्या संतमहात्म्यांच्या कृपेने,स्पर्शाने, दर्शनाने अगर शब्दाने ही परमविरहअवस्थारूप भक्ती साधकाला प्राप्त होते तेच खरे साधन आहे, हा सिद्धांत त्यांनी ठामपणे जगाला सांगितला. भगवंतांनाही अर्जुनाने केलेल्या प्रार्थनेतील विफलता जाणवल्यामुळे त्याला "तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज । कीं एथ तुज गजबज । होआवी कां ?॥११.६२८॥" व "परि नेणसीच गांवढिया । काय कोपों आता धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा ? ॥६२९॥ असे प्रश्न करून रागवून गांवढळ म्हटले आहे. शक्तिपाताने प्राप्त होणाऱ्या भक्तिशास्त्राची महती न जाणणाऱ्या सर्वांना ही पदवी लागू आहे.

अर्जुन जरी विश्वरूप दर्शनाने भ्याला होता तरी त्याला " आजीं आनंदसरोवरींचीं कमळें । तैसे हे तुझे डोळे । आपुलिया प्रसादाचीं राउळें । जयालागीं करिती ॥११.६५॥" यामुळे येणारा अनुभव " स्तंभः स्वदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः। वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विका मताः॥" या आठही भावांच्या भक्त्युद्रेकाने आला होता. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> तेथ एक विश्व एक आपण । ऐसें अळुमाळ होतें जें दुजेपण ।
> तेही आटोनि गेलें अंत.करण । विरालें सहसा ॥११.२४५॥
> आंतु आनंदा चेईरें जाहलें । बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें ।
> आपाद पां गुंतलें । पुलकांचलें ॥२४६॥
> वर्षिये प्रथमदशे । वोहळलया शैलांचें सर्वांग जैसें ।
> विरूढे कोमलांकुरीं तैसे । रोमांच जाहले ॥२४७॥
> शिवतला चंद्रकरीं । सोमकांतु द्रावो धरी ।
> तैसिया स्वेदकणिका शरीरीं । दाटलिया ॥२४८॥

माजीं सांपडलेनि अलिकुळें। जळावरी कमळकळिका जेवीं आंदोळे।
तेवीं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें। बाहेरि कांपे ॥२४९॥
कर्पूरकर्दळीचीं गर्भपुटें। उकलतां कापुराचेनि कोंदाटें।
पुलिका गळती तेवीं थेंबुटें। नेत्रींनि पडती ॥२५०॥
उदयलेनि सुधाकरें। जैसा भरलाचि समुद्र भरे।
तैसा वेळोवेळां उर्मिभरें। उचंबळत असे ॥२५१॥
ऐसा सात्त्विकांही आठां भावा। परस्परें वर्ततसे हेवा।
तेथ ब्रह्मानंदाची जीवा। राणीव फावली ॥२५२॥

अर्जुनाला अशा प्रकारे अष्टसात्त्विकभावांच्या रूपाने ब्रह्मानंदाचे राज्य प्राप्त झाले. पण खरोखरी हे घडते तरी कसे ? वेदान्त व सिद्धयोगसंप्रदायामध्ये आत्मस्वरूपप्राप्तीची दीक्षा सद्‌गुरूंकडून मिळाल्याबरोबरच आत्मशक्ती जागृत होऊन मन, प्राण व शरीरामध्ये नानाप्रकारच्या क्रिया उत्पन्न होऊन साधकाचे आत्मज्ञानाचे साधन आतून आपोआप सुरू होते असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे भक्तिमार्गात ज्यावेळी प्रेमाचे दान करणारा कोणी तरी महापुरुष साधकाला भेटतो त्यावेळी अर्जुनाच्या ठिकाणी प्रगट झाली तशी कुंडलिनी देवींच्या जागृतीची पुढील लक्षणे आपोआप प्रकट होतात. श्रीरूपगोस्वामी विरचित "भक्तिरसामृतसिंधूमध्ये" या साधनात भक्तीच्या स्रोतामुळे पुढील क्रिया उत्पन्न होतात म्हणून वर्णन केले आहे.

अनुभावास्तु चित्तस्थभावानामवबोधकाः।
ते बहिर्विक्रियाप्रायाः प्रोक्ता उद्‌भासुराख्यया ॥२.१॥
नृत्यं विलुठितं गीतं क्रोशनं तनुमोटनम् ॥
हुंकारो जृम्भणं श्वासभूमा लोकानपेक्षिता ॥२॥
लालास्रावोऽट्टहासश्च घूर्णा हिक्कादयोऽपिच।
ते शीताः क्षेपणश्चेति यथार्थाख्या द्विधोदिताः ॥३॥

या भक्तियोगरूप योगमार्गात शक्तिपातामुळे भक्तिसाधन घडून येऊन चितस्थ भाव सूचित करणारी सर्व बाह्य लक्षणे प्रकट होतात. नाचणे, गाणे गाऊ लागणे, जमिनीवर गडबडा लोळणे, उंच आवाजात भगवंताचे नाव घेऊन ओरडणे, शरीराच्या निरनिराळ्या तऱ्हेच्या हालचाली करून ते जोरजोराने चोळणे, ओरबडणे व वाकविणे, हुंकार व जांभया देणे, दीर्घ श्वासप्रश्वास करणे, लोकांनी निंदा किंवा स्तुती केली तरी त्याची पर्वा न करता उपेक्षा करणे, लाळ गळणे, जोरजोराने हसणे, घूर्णा म्हणजे शरीर डोलणे, उचक्या येणे, हातपाय आपटणे, गारवा वाटणे इत्यादि लक्षणे भक्तीचा उद्रेक शरीरात उत्पन्न झाला की, प्रेमाच्या आविर्भावात साधन करताना प्रकट होतात. अशा प्रकारच्या क्रियांचे वर्णन केल्यावर उपरोक्त ग्रंथातच भक्तीच्या उद्रेकाची लक्षणे सांगताना पुढे असे म्हटले आहे की—

चित्तं सत्त्वीभवत् प्राणे न्यस्यत्यात्मनमुद्भटम् ।
प्राणस्तु विक्रियां गच्छन् देहं विक्षोभयत्यलम् ।।८।।
तदा स्तंभादयो भावा भक्तदेहे भवन्त्यमी ।।९।।
ते स्तंभस्वेदरोमांचाः स्वरभेदोऽथ वेपथुः ।
वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः ।।१०।।

हे साधन आतून होऊ लागले की, हळूहळू चित्त सत्त्वयुक्त व स्वस्थ होऊन प्राणामध्ये लीन होऊ लागते. भक्ती आतून उसळून व उफाळून आली की, अंतर्बहिः कुंभकाच्या रूपाने साधकाला आपोआप प्राणायाम होऊ लागून प्राणाच्या नाना प्रकारच्या आंतरिक क्रिया घडून येतात. या क्रियांमुळे साधकाचा देह विशेष प्रकारे क्षुब्ध झालेला दिसला तरी त्यामुळे आतून शक्तीचा स्वसंकोच टाकून शिवरूपाने प्रकट होण्याचा सतत विकास चालू असतो. भक्तीमुळे प्रक्षुब्ध झालेल्या प्राणामुळे साधकभक्ताच्या शरीरात अष्टसात्त्विक भाव आपोआप प्रकट होतात. स्तंभ म्हणजे खांबाप्रमाणे देहाची जडवत् स्थिती होणे, घाम, रोमांच, स्वरभेद म्हणजे कंठस्वरातून नाना प्रकारचे उच्चार विकृतरीतीने प्रकट होणे, कंप, वैवर्ण्य म्हणजे शरीराचा रंग पालटणे, अश्रू व निद्रा हे आठ भाव साधकाच्या अंतरातून उसळून येतात.

हे अष्टसात्त्विक भाव कसे प्रकट होतात व ही शास्त्रीय प्रक्रिया कशी घडते हे सांगताना " भक्तरसामृतसिंधुकार " म्हणतात–

चत्वारि क्ष्मादिभूतानि प्राणो जात्ववलंबते ।
कदाचित्स्वप्रधानः सन् देहे चरति सर्वतः ।।२.११।।
स्तंभं भूमिस्थितः प्राणस्तनोत्यश्रु जलाश्रयः ।
तेजस्थः स्वेदवैवर्ण्ये प्रलयं वियदाश्रितः ।।१२।।
स्वस्थ एव क्रमान्मंदमध्यतीव्रत्व भेदभाक् ।
रोमांचकंपवैस्वर्याण्यत्र त्रीणि तनोत्यसौ ।।१३।।

शक्तिपाताने भक्तीचा उद्रेक झाला की, प्राणाच्या गतीत बदल होऊन तो प्राण देहाला विशेष रीतीने प्रक्षुब्ध करतो. त्यामुळे प्राण कधी पृथ्वीतत्त्व, कधी जलतत्त्व, कधी तेजतत्त्व व कधी आकाशतत्त्व यापैकी कोणत्याही एका तत्त्वाचा आश्रय करून देहामध्ये संचार करतो. काही वेळेस तो स्वप्रधान होऊन स्वतःच्याच वायुतत्त्वाचे अवलंबन करून देहात वावरू लागतो. जेव्हा प्राण भूमितत्त्वाचे अवलंबन करतो तेव्हा शरीर खांबाप्रमाणे निश्चल होऊन साधकाला स्तंभभाव प्राप्त होतो. जलतत्त्वाशी प्राण निगडीत झाला की, अश्रुपात होऊ लागतो. तेजतत्त्वाशी प्राण संबद्ध होऊन स्थिर झाला की, घाम येऊ लागतो व साधकाच्या शरीराचा रंग पालटून जातो. यालाच वैवर्ण्य किंवा वर्णविकृती म्हणतात. जेव्हा प्राणाचा आकाशतत्त्वाशी

संयोग होतो तेव्हा प्रलय म्हणजे भावसमाधी, मूर्च्छा, तंद्रा अगर निद्रा हे भाव प्रकट होतात. जेव्हा प्राण स्वस्थ होतो म्हणजे तो आपल्या स्वतःच्याच वायुतत्त्वाचा अवलंब करून त्यामध्ये राहू लागतो तेव्हा मंद, मध्य व तीव्र अशा तीन स्तरांनी रोमांच, कंप व स्वरविक्रिया हे तीन भाव साधकात प्रकट होतात.

आपल्या देहामध्ये मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत व विशुद्ध ही पाच चक्रे पृथ्वी, जल, तेज, वायू व आकाश या पाच महाभूतांची स्थाने म्हणून प्रसिद्ध आहेत. मूलाधारात पृथ्वीतत्त्व, स्वाधिष्ठानात जलतत्त्व, मणिपुरात तेजतत्त्व, अनाहतामध्ये वायुतत्त्व व विशुद्ध चक्रामध्ये आकाशतत्त्व असते. वर जे प्राणाच्या गतीसंबंधी सांगितले त्याचा अर्थ असा आहे की, प्राण ज्या ज्या चक्रांचा आश्रय करतो त्या त्या वेळी तो ती ती भूततत्त्वाची लक्षणे प्रकट करतो. "पृथ्वीतें आप विरवी। आपातें तेज जिरवी। तेजातें पवनु हरवी। हृदयामाजीं ॥ ६.२९९ ॥ पाठीं आपण एकला उरे। परि शरीराचेनि अनुकारें। मग तोही निगे अंतरें। गगना मिळे ॥ ३०० ॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ही प्रक्रिया स्पष्ट केली आहे. यालाच षट्चक्रभेद म्हणतात. ब्रह्म, विष्णू व रुद्र ग्रंथींचे भेदन यामुळेच होते. "मार्ग मोडती नाडीचे। नवविधपण वायूचें। जाय म्हणौनि शरीराचे। धर्मु नाहीं ॥ ६.२४३ ॥ इडा पिंगळा एकवटती। गांठी तिन्ही सुटती। साही पदर फुटती। चक्रांचे हे ॥ २४४ ॥" असे म्हणून ज्या प्रक्रियेचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केले आहे ती भक्तियोगरूप आहे हे वरील सर्व विवेचनावरून ध्यानात येते व सिद्धयोग हा भक्तियोगाचा योगमार्ग असून "भक्तियोगु समस्त। योगरूप ॥ १२.२२८॥" कसा आहे याचे मर्म अंतःकरणात प्रतिबिंबित होते. "नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी। एक तरी ओवी अनुभवावी ॥" असे जे श्रीसंत नामदेवमहाराजांचे म्हणणे आहे त्यातील मर्म हेच आहे. त्यामुळे अनुभूती नसताना दिलेली ज्ञानेश्वरीवरील शेकडोशे प्रवचने ऐकली व लेख वाचले म्हणजे कालापव्यय झाल्याचे दुःख व शीणच पदरात येतो. खरे शास्त्र अंतरंग न झाल्यामुळे व अननुभूतीमुळे "येर पत्र पुष्प फळ। हें भजावया मिस केवळ ॥९.३९६॥" याप्रमाणे निमित्तमात्र असलेल्या गोष्टींनाच प्राधान्य देऊन भक्तीच्या बाह्य फुलोऱ्याच्या मान्यात सर्व समाजाला दडपून टाकून "वांचूनि आमुचा लाग निष्कळ। भक्तित्त्व ॥९.३९६॥" या बाबतीत त्याची दिशाभूल करणे ही महान वंचना आहे. यासाठी श्रीसंत नामदेवमहाराजांप्रमाणे खेचर सद्गुरूंसारख्या शक्तिपाताचार्यांच्या चरणी निवटून "पदपिंडा विवर्जित केला नामा ॥" अशी अनुभूती घ्यावी लागते. प्राण सुषुम्नेत संचारित व्हावे लागतात. बिंदू स्थिर व्हावा लागतो. सहजध्यान व्हावे लागते. अशी स्थिती झाली म्हणजे खरे तत्त्वज्ञान होते. हे जोपर्यंत होत नाही तोपर्यंत सर्व दंभमिथ्याप्रलाप आहेत हेच खरे.

अर्जुन भाग्यवान होता. त्याला श्रीकृष्णनाथांसारखे परंपराप्राप्त ज्ञानाने संपन्न असलेले व शक्तिपातयोगविद्या जाणून ती शिष्यात संक्रात करण्याचे सामर्थ्य बाळगून असलेले महान शक्तिपाताचार्य सद्‌गुरू म्हणून लाभले होते. या दृष्टीने "छांदोग्य उपनिषदात" असे म्हटले आहे की, "तद्धैतद्‌घोर अंगिरसः कृष्णाय देवकीपुत्रा-योक्त्वोवाचापिपास एव स बभूव ॥३.१७.६॥" घोर अंगिरस ऋषींनी शक्तिपाताने कृतार्थ केल्यामुळे आत्मयज्ञदर्शनाचे ज्ञान होऊन देवकीपुत्र श्रीकृष्णांना इतर सर्व विद्यांविषयी तृष्णाहीनता प्राप्त होऊन परम शांती मिळाली होती. त्यामुळे ज्यावेळी "जेथ तद्‌ब्रह्मवाक्यफळें । जिये नानार्थरसें रसाळें । बहकताती परिमळें । भावा-चेनि ॥७.१८६॥ सहज कृपामंदानिळें । कृष्णद्रुमाची वचनफळें । अर्जुन श्रवणाचिये खोळे । अवचित पडिलीं ॥१८७॥ तियें प्रमेयाची हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकळिलीं । मग तैसीचि कां घोळिलीं । परमानंदें ॥१८८॥" अशा प्रकारे शक्तिपाताचार्य श्रीकृष्णनाथांच्या प्रमेयपरिप्लुत, ब्रह्मरसयुक्त व परमानंददायक वाक्यांनी जेव्हा अर्जुनाच्या कानांचा आश्रय घेतला तेव्हा या शब्ददीक्षेमुळे नानार्थरस व सुगंधयुक्त भक्तीचा उद्रेक त्याच्या ठिकाणी कसा झाला हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

> तेणें वरवेपणें निर्मळें । अर्जुना उन्मेषाचे डोहळे ।
> घेताति गळाळे । विस्मयामृताचे ॥७.१८९॥
> तिया सुखसंपत्ती जोडलिया । मग स्वर्गा वाती वांकुलिया ।
> हृदयाच्या जीवीं गुतकुलिया । होत आहाती ॥१९०॥
> ऐसें वरचिलीचि बरवा । सुख जावों लागलें फावा ।
> तंव रसास्वादाचिया हांवा । लाहो केला ॥१९१॥
> झडकरी अनुमानाचेनि करतळें । घेऊनि तियें वाक्यफळें ।
> प्रतीतिमुखीं एके वेळे । घालूं पाहे ॥१९२॥
> तंव विचाराचिया रसना न दाटती । परी हेतूच्या दशनीं न फुटती ।
> ऐसें जाणोनि सुभद्रापती । चुंबिचिना ॥१९३॥
> मग चमत्कारला म्हणे । इयें जळींचीं मा तारांगणें ।
> कैसा झकविलों असलगपणें । अक्षरांचेनि ॥१९४॥

सिद्धयोगाने प्राप्त होणाऱ्या भक्तीच्या उद्रेकाची कथा योगरूप असल्याने जेथे अर्जुन चमत्काराला व झकविला गेला तेथे सामान्यांची काय कथा ! श्रीचैतन्य महाप्रभूंना श्रीपुरीजी महाराजांनी शक्तिपातयुक्त मंत्रदीक्षा कशी दिली व त्यामुळे त्यांची स्थिती कशी झाली याचे वर्णन श्रीप्रभुदत्त ब्रह्मचारी यांनी "श्रीचैतन्य चरितावली" खंड एक; मध्ये पुढीलप्रमाणे केले आहे. "नियत तिथि आ गयी । निमाई पंडित नवीन उल्हास और आनंदके साथ मंत्रदीक्षा लेनेके लिये तैयार हो गये ।

इनके सभी साथीयोंने उस दिन दीक्षोत्सवके उपलक्ष्यमें खूब तैयारियाँ की थी। नियत समयपर पुरी महाशय आ गये। उनकी पदधूली इन्होंने मस्तकपर चढाई और स्वस्त्ययनके पुण्यश्लोक पढकर और भगवानके मधुर मंजुल नामोंका संकीर्तन करनेके अनंतर पुरी महाशयने इनके कानमें "गोपीजनवल्लभाय नमः" इस दशाक्षर मंत्रका उपदेश कर दिया। मंत्रके श्रवणमात्रसेही ये मूर्छित होकर पृथ्वीपर गिर पडे और इन्हें अपने शरीरका बिल्कुल होश नहीं रहा।

साथीयोंने भाँति भाँतिके उपचार करके इन्हें सावधान किया। बहुत देरके अनंतर उन्हें कुछ होश हुआ। अब तो इनकी विचित्रही दशा हो गयी। कभी तो खूब जोरोंके साथ हँसते, कभी रोते और कभी हा कृष्ण! हा पिता! ऐसा कहकर जोरोंसे रुदन करते। कभी यह कहते हुए कि, "मैं तो श्रीकृष्णके पास व्रजमें जाऊँगा" व्रजकी ओर भागते। इनके साथी इन्हें पकड लाते किंतु ये पागलोंकी भाँति उनसे अपनें शरीरको छुडाछुडाकर भागते। कभी फिर उसी भाँति जोरोंसे प्रलाप करने लगते। रोतेरोते कहते, प्यारे! मुझे छोडकर तुम कहाँ चले गये? मेरे कृष्ण! मुझे अपने साथही ले चलो! इतना कहकर फिर जोरोंसे रोने लगते

उनकी हृदय कंदारसे जो भक्तिभावका भव्य स्रोत उदित हो गया, वह फिर उत्तरोत्तर वढताही गया। उनकी दशाभी विचित्रसी हुई। वे भोजन करते-करते सहसा बीचमेंही उठकर रुदन करने लगते थे। रास्ता चलते-चलते पागलोंकी भाँति नृत्य करते थे। शय्यापर लेटे-लेटे सहसा उठकर बैठ जाते थे और "हा कृष्ण! हा कृष्ण!!" कहकर जोरसे चिल्लाते थे। कभी कभी लोगोंसे बाते करते करते बीचमेंही जोरोंसे ठहाका मारकर हँसते थे। लंबी लंबी साँसे लेते रहते थे। कभी कभी अधीर होकर अत्यंत विरहकी भाँति हिचकियाँ भरते रहते थे। उनके नेत्रोंसे इतना जल निकलता था कि संपूर्ण वस्त्र गीले हो जाते थे।"

याला भक्ती म्हणतात. ही भक्ती योगरूपच आहे. अशी भक्तीच पराभक्ती होय. बाकी सर्व भक्तीचा व्यापार व बाजार होय. हे विपाइले आहे. महर्षी नारदांच्या भाषेत "प्रकाश्यते क्वापि पात्रे ॥५३॥ भक्तिसूत्र ॥" म्हणजे असे अनिर्वचनीय प्रेमस्वरूप क्वचित् एखाद्या सद्‌गुरुकृपेला पात्र झालेल्या भाग्यवानाच्या ठिकाणी प्रकाशमान होते, असे आहे. यासाठी श्रीकृष्णनाथांसारखे शक्तिपातयोगदीक्षा देणारे सद्‌गुरू भेटावे लागतात. अर्जुनाला ते भेटले. त्यांनी त्याला स्पर्शदीक्षा दिली. त्यामुळे त्याच्या ठिकाणी सुखाचा पूर आला. याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

मग सांवळा सकंकणु। बाहु पसरोनि दक्षिणु।
आलिंगिला स्वशरणु। भक्तराजु तो ॥१८.१४१८॥
न पवतां जयातें। काखे सूनि बुद्धीतें।
बोलणें मागौतें। वोसरलें ॥१४१९॥

ऐसें जें कांहीं येक । बोला बुद्धीसिही अटक ।
तें द्यावया मिष । खेवाचें केलें ।।१४२०।।
हृदया हृदय एक जाले । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें ।
द्वैत न मोडतां केलें । आपणाऐसें अर्जुना ।।१४२१।।
दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंगु तो जाला ।
द्वैत न मोडतां केला । आपणपें पार्थु ।।१४२२।।
तेव्हां सुखाचा मग तया । पूरु आला जो धनंजया ।
तेथ वाडु तऱ्ही बुडोनियां । ठेला देवो ।।१४२३।।
सिंधू सिंधूतें पावों जाये । तें पावणें ठाके दुणा होये ।
वरी रिगे पुरवणिये । आकाशही ।।१४२४।।
तैसें तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें ।
किंबहुना श्रीनारायणें । विश्व कोंदलें ।।१४२५।।

शक्तिपाताची स्पर्शदीक्षा मिळाली की असेच होते. साधकाला भक्तीच्या स्रोतोत्पन्नामुळे सुखात बुडावेच लागते. मग साधक सर्वत्र परमात्माच परमात्मा होतो. हे ज्या लक्षणांनी प्रकट होते त्याचे वर्णन कविराज गोस्वामींनी पुढीलप्रमाणे केले आहे. ते म्हणतात–

स्तंभ कंप प्रस्वेद वैवर्ण अश्रुस्वरभेद । देह हैल पुलके व्यापित ।
हासे कादे नाचे गाय, उठि इति–उति धाय । क्षणे भूमे पडिया मूर्छिते ।।

भक्तीचा स्रोत उत्पन्न झाला की, शरीर अगदी सुन्न पडते. शरीराला तीव्रतम कंप सुटतो. अक्षरशः घाम वाहू लागतो. चेहरा म्लान होतो. डोळ्यातून अश्रूंच्या धारा वाहू लागतात. गळा भरून येतो. तोंडातून शब्दोच्चार चांगला होत नाही. देहावर रोमांच उभे राहतात. साधक जोरजोराने हसू लागतो. मधूनच रडू लागतो व काही वेळा जमिनीवर मूर्छित होऊन पडतो. अशी अगदी वेड्यासारखी त्याची अवस्था होते.

ही लक्षणे प्रकट होणे ही परम सौभाग्याची गोष्ट आहे. थोर थोर महात्मे यासाठी देवाची प्रार्थना करीत असतात की, हे प्रभो ! आपण शक्तिपात करणाऱ्या सद्गुरूंची व माझी गाठ घालून द्या. त्यांची गाठ पडली म्हणजे परंपरेने प्राप्त झालेल्या श्रीकृष्णरसायनरूप सिद्धयोगांतर्गत भक्तियोगाच्या योगमार्गाने जो वेडेपणा त्यांना प्राप्त झाला असेल त्यातील थोडा जरी अंश त्यांनी मला दिला तरी माझे सर्व जीवन धन्य होईल. अशा प्रकारे मन उन्मन करणारे मादक रसायन जे मला पाजतील व वरील दिव्य लक्षणे माझ्या ठिकाणी प्रकट होऊन प्रेमानंदस्वरूप भगवंताचे आकंठ पान मला करवितील त्यांच्या चरणकमलांना मी कोटी कोटी नमस्कार करीन व सर्व जगाला ओरडून सांगेन की, "हाय रे कम्बख्त तूने पी ही नहीं ।" हे

जाणले म्हणजे जागृत शक्तीची भक्त्युद्रेकाने प्राप्त होणारी अलौकिक अवस्था जाणल्यासारखे आहे. मग "पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत् पतति भूतले। उत्थायच पुनः पीत्वा पुनर्जन्म न विद्यते ।।७.१००।।"या "कुलार्णवतंत्रातील"वचनाचा अर्थ कळल. नाहीतर सर्व अनर्थच ! सिद्धयोगसाधनरूप भक्तियोगाच्या योगमार्गाचे कथन श्रीकृष्णनाथ अर्जुनाला करीत असताना संजय ते ऐकत होता. या संवादाच्या श्रवणानेच त्याची अवस्था पालटून गेली. " संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ।।१८.७४।।" असे त्याने गीतेतच,मी या उभयतांच्या आश्चर्यकारक व अंगावर रोमांचादि अष्टसात्त्विक भाव उत्पन्न करणारा संवाद ऐकला, म्हणून सांगितले आहे. ऐवढेच नव्हे तर तो धृतराष्ट्राला म्हणाला—

**राजन् संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ।।१८.७६।।**

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।**
**विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनःपुनः ।।७७।।**

हे राजा धृतराष्ट्रा ! कृष्ण व अर्जुन यांचा हा अद्भुत व पुण्यप्रद संवाद पुनःपुन्हा आठवून मी पुनःपुन्हा आनंदित होतो आहे. ते हरीचे अतिशय अद्भुत रूप पुनःपुन्हा आठवून मला मोठा विस्मय वाटतो व त्यामुळे मी वारंवार संतुष्ट होत आहे.

पण संजयाला प्राप्त झालेली भक्तीची ही उत्कट अवस्था धृतराष्ट्राला प्राप्त झाली नसल्यामुळे धृतराष्ट्र त्याला काय म्हणाला हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तेथ कोणी येकी अवसरी । होआवी ते करूनि दुरी ।**
**रावो म्हणे संजया परी । कैशी तुझी गा ? ।।१८.१६२४।।**

**तेणें तूंतें येथें व्यासें । बैसविलें काय उद्देशें ।**
**अप्रसंगामाजीं ऐसें । बोलसी काई ? ।।१६२५।।**

हे संजया! तुझे हे सर्व सांगणे अप्रासंगिक आहे असे म्हणणाऱ्या धृतराष्ट्राच्या रूपाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगावर टीका करणाऱ्या सर्व टीकाकारांचे म्हणणे उधृत करून लगेच त्याला उत्तर देऊन, आपण ज्ञानेश्वरीच्याद्वारा गुरुकृपाप्राप्त सिद्धयोगाचेच दर्शन घडविले आहे, असा ठाम सिद्धांत मांडून ज्यांना सिद्ध योगाचा गौरव कळणार नाही त्यांना हे सर्व अप्रासंगिक व विपरीतच वाटेल असे सांगून वाटेला लावले आहे. ते म्हणतात—

**रानींचें राउळा नेलिया । वाही दिशा मानी सुनिया ।**
**कां रात्री होय पाहलया । निशाचरां ।।१८.१६२६।।**

जो जेंथिचें गौरव नेणें । तयासि तें भिगुळवाणें ।
म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ॥१६२७॥

रसज्ञ व रससेवक साधकांनी हे जाणले पाहिजे; कारण संजयाच्या स्वत:च्याच अनुभूतीचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

जी मिळतां दोन्ही उदकें–। माजीं लवण वाऊं ठाके ।
कीं तयासींही निमिखें । तेंचि होय ॥१८.१६०१॥
तैसें श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं ।
धरितां मजही वानी । तेंचि होतसे ॥१६०२॥
ऐसें म्हणे ना मोटकें । तंव हिरोनि सात्त्विकें ।
आठव नेला नेणों कें । संजयपणाचा ॥१६०३॥
रोमांच जंव जंव फरके । तंव तंव आंग सुरके ।
स्तंभ स्वेदातें जिके । एकला कंपु ॥१६०४॥
अद्वयानंदस्पर्शें । दिठी रसमय जाली असे ।
ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वचि ॥१६०५॥
नेणों काय न माय पोटीं । नेणों काय गुंफे कंठीं ।
वागर्था पडत मिठी । उससांचिया ॥१६०६॥
किंबहुना सात्त्विका आठां । चाचरु मांडतां उमेठा ।
संजयो जालासे चोहटां । संवादसुखाचा ॥१६०७॥

संजयासारखी स्थिती होणे हेच सर्व ज्ञानेश्वरीचे साररूप रहस्य आहे व हेच-सिद्धयोग दर्शन आहे; कारण " तस्यैवही प्रसादेन भक्तिरुत्पद्यते नृणाम् ॥ " व " तत्रैत्प्रथमं चिन्हं रुद्रे भक्ति सुनिश्चला ॥ " असा शास्त्राचार्यांचा सिद्धांत आहे. शक्तिपाताचे मुख्य लक्षण भगवद्‌भक्तीचा उन्मेष हेच आहे व ही अशी "नेणों काय न माय पोटीं । नेणों काय गुंफे कंठीं ।" अवस्था साधकाला प्राप्त करून देणारी भक्ती फक्त सद्‌गुरूच देऊ शकतात. अशा प्रकारच्या भक्तीचे दान करण्याचे सामर्थ्य त्रिभुवनात कोणाचेही नाही; कारण " शिष्य साचार अनुभव लाहे । तेणें सद्‌गुरु सुखाचा मेरु होये । जेवीं तानयाचे धणी माये । सुखावली राहे स्वानंदे ॥२९.४९१॥" व " तानयाचे लळे पुरवणे । हे व्याली तेंचि वेदना जाणें । कां शिष्यासी स्वानुभव देणें । हें स्वयें जाणे सद्‌गुरु ॥ ४९३ ॥ असे श्रीएकनाथमहाराजांनी " एकनाथी भागवतात " सिद्धांतरूपाने सांगून ज्या मार्गाने हे दान प्राप्त होते त्या सिद्धयोग-मार्गाला " भक्तियोगाचा योगमार्ग ॥ २९.६४३ ॥ " असे सार्थ नाव देऊन गौरविले आहे. हा मार्ग " गुरुगम्यता अगम्य ॥ २९.४९५ ॥ " आहे असे सांगून या साधनाचा महिमा सांगताना ते म्हणतात–

**असोत या बहुता गोष्टी । नव्हतां सद्‌गुरुकृपादृष्टी ।**
**करितां उपायांच्या कोटी । नव्हे भेटी परमार्था ।।२९.१३।।**

**जाहलिया सद्‌गुरुकृपादृष्टी । साधनें उठती उठाउठीं ।**
**ब्रह्मानंदें कोंदे सृष्टी । स्वानंदपुष्टी साधकां ।।१४।।**

**हा योग न कळे ज्यासी । दुःखरूप संसार त्यासी ।**
**हा अखंड योग मजपाशीं । मी संसारेंसीं सुखरूप ।।७५४।।**

**हा योग सदाशिवा जाणे । कां म्यां जाणिजें नारायणें ।**
**इतरांचें जें जाणणें । ते अगम्यपणे रिघेना ।।७५५।।**

श्रीएकनाथांनी अशा प्रकारे ज्या भक्तियोगाच्या योगमार्गाचा महिमा श्रीमद्‌भागवताच्या आधारे गाइला आहे त्याची लक्षणे सांगताना श्रीव्यास महर्षी "श्रीमद्‌भागवतात" म्हणतात–

**कथं विना रोमहर्षं द्रवता चेतसा विना ।**
**विनाऽऽनंदाश्रुकलया शुध्येद् भक्त्या विनाऽऽशयः ।।११.१४.२३।।**
**वाग् गद्‌गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च ।**
**विलज्ज उद्‌गायति नृत्यते च मद्‌भक्तियुक्तो भुवनं पुनाति ।।११.१४.२४।।**

जोपर्यंत सर्व शरीर रोमांचित होत नाही, चित्त द्रवून ते गद्‌गद होत नाही, आंनंदाश्रू डोळ्यातून पाझरत नाहीत व अंतर्बाह्यच भक्तीच्या प्रवाहात चित्त अंतर्बाह्य बुडत नाही तोपर्यंत चित्त शुद्ध होण्याची शक्यता नाही. ज्याची वाणी प्रेमाने गद्‌गद झाली आहे, चित्त द्रवून ते वाहू लागले आहे, एक क्षणभरही ज्याचे रडणे थांबत नाही, जो मधून मधून जोरजोराने खळखळून हसतो आहे, लाज सोडून कधी उंच स्वराने गातो तर कधी नाचतो आहे, असा भक्त केवळ स्वतःलाच नव्हे तर सर्व संसाराला पवित्र करतो. यावर श्रीएकनाथमहाराजांनी एकनाथी भागवतात विस्तृत भाष्य करून त्याचे मर्म फारच उत्तम रीतीने स्पष्ट केले आहेत. विस्तार भयास्तव ते येथे देत नाही. मुळातून जिज्ञासू वाचकांनी त्याचा जरूर आस्वाद घ्यावा. या साधनाचा महिमा वरील प्रमाणेच "शिवपुराणांगंत वायवीय संहितेत" त्याची शास्त्रीय प्रक्रिया सांगून पुढीलप्रमाणे कथन केला आहे.

**प्रत्ययाश्च प्रवर्तन्ते प्रशस्त फलसूचकाः ।**
**मयि भागवतां पुंसां प्राक्‌दृष्टार्थगोचराः ।।११.३५।।**
**कंपस्वेदोऽश्रुपातश्च कंठे च स्वरविक्रिया ।**
**आनंदाद्युपलब्धिश्च भवेदाकस्मिकी मुहुः ।।३६।।**
**सतैर्व्यस्तैः समस्तैर्वा लिंगैरव्यभिचारिभिः ।**
**मंदमध्योतमैर्भावैर्विज्ञेयास्ते नरोत्तमाः ।।३७।।**

**यथा योऽग्नि समावेशान्नायो भवति केवलम् ।**
**स तथैव मम सान्निध्यान्नते केवलमानुषाः ।।३८।।**

वरील श्लोकांचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी आपल्या "महायोग विज्ञान" या ग्रंथातील "एकादश प्रकाशात" असे म्हटले आहे की, "श्रीमहेश्वर म्हणतात की, सद्‌गुरुकृपेने शक्तिसंचार होऊन किंवा ईश्वरानुग्रहाने अगर पूर्वजन्मीच्या प्रबळ पुण्यप्रतापामुळे अथवा शिवरामकृष्णादि पूजनाद्वारे केलेल्या भक्तिसाधनामुळे जेव्हा मनुष्य माझ्या ठिकाणी अनुरक्त व भावान्वित होतो तेव्हा त्याची कुंडलिनी शक्ती जागृत होते. त्यामुळे पूर्वजन्मात केलेल्या यागसाधनेला या जन्मात पुन्हा प्रारंभ होतो. हे अंतरंग साधन सुरू झाले की, ब्रह्मप्राप्तीचे फल देणारी नाना तऱ्हेची चिन्हे प्रकट होऊन अनुभवास येतात. साधकाला कंप, घाम, अश्रुपात, कंठस्वरामध्ये फरक होऊन विकृत शब्दोच्चारण, उडचा मारणे, नाचणे, हसणे, रडणे, ओरडणे, गाणे या प्रकारच्या विविध क्रियांची उपलब्धी आवेशामुळे वारंवार होते. साधकामध्ये वरील सर्व अकृत्रिम लक्षणे निरनिराळचा पद्धतीने क्रमशः अगर सर्व लक्षणे एकदम मंद, मध्यम किंवा उत्तम श्रेणीने प्रकट होतात. मंदश्रेणीचा भक्त कंपनादि शारीरिक क्रिया आपल्या इच्छेने थांबवू शकतो. मध्यमश्रेणीतील भक्त आपल्या शारीरिक व मानसिक क्रियांचा वेग थोडचाफार कष्टाने आवरून सांभळू शकतो. हे करताना त्याला अर्थात् बाह्यतः व आंतरिक दुःख व कष्ट होतात हे निश्चित. उत्तम श्रेणीच्या भक्ताला इतक्या तीव्रतेने क्रिया होतात की, तो आपल्या मनाला व शरीराला आवरू शकत नाही. त्याचप्रमाणे क्रियाशक्तीला थांबविण्याचीही त्याची इच्छा नसते. जे जसे होईल व घडेल तसे तो होऊ व घडू देऊन पाहत राहतो. अशा प्रकारे गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ज्यांची माझ्या ठिकाणी भक्ती उत्पन्न होते त्यांना सामान्य भक्त व साधारण माणूस म्हणून संबोधणे योग्य होणार नाही. लोखंडाचा अग्नीशी संपर्क झाल्यावर ज्याप्रमाणे लोखंड अंतर्बाह्य पालटून जाते त्याप्रमाणे शक्तिपातयोगामुळे जो साधक माझ्या सान्निध्यामध्ये येतो तो सामान्य पुरुष राहत नाही. शक्तिपायोगरूप अग्निसंपर्कामुळे त्या साधकाला दिव्य भक्ती प्राप्त होऊन तो दिव्य गुणांनी व दैवी शक्तीने युक्त होतो." (पृ.२९५,२९६)

एवढे सर्व विवेचन ध्यानात घेतले म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी संजयाच्या अवस्थेचे जे वर्णन केले आहे त्याचे खरे मर्म आपल्या लक्षात येईल ते म्हणतात–

**येतुलें हें वाड सायासें । जंव बोलत असे दृढमानसें ।**
**तंव न धरवेचि आपुलिया ऐसें । सात्त्विकें केलें ।।९.५२६।।**
**चित्त चाकाटलें आटु घेत । वाचा पांगुळली जेथिंची तेथ ।**
**आपाद कंचुकित । रोमांच आले ।।५२७।।**

अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनंदजळें ।
आतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरी कांपे ॥५२८॥

पैं आघवाचि रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळी ।
लेइला मोतियांची कडियाळीं । आवडे तैसा ॥५२९॥

ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ आटणी हों पाहे जीवदशे ।
तेथ निरोपिलें व्यासें । तें नेंदीच हों ॥५३०॥

अशी ही भक्तियोगाच्या योगमार्गाची कथा आहे. "शब्दांचिया आसकडीं । भेदनदीच्या दोहीं थडीं । आरडते विरहवेडीं । बुद्धिबोधु ॥ १६.५ ॥" व "तया चक्रवाकांचें । मिथुन । सामरस्याचें समाधान । भोगवी जो चिद्गगन । भुवन दिवा ॥ १६. ६॥ " या पद्धतीने जीवशिवाच्या किंवा शिवशक्तीच्या भेदामुळे ही कथा सुरू होतें, सद्गुरुकृपेने शक्ती जागृत होऊन विरहावस्थेचा तिला भर येतो व शेवटी सामरस्याने शिवशक्तीचे मीलन होऊन ही कथा संपते. मात्र "आशेचिये अंजुळी । ठेऊनि हृदयाचिया निडळीं । चातक निराळी । लागले जैसे ॥ ११.६७९ ॥" या प्रमाणे आशेच्या अंजुलीने घडवून आणलेल्या विरहानेच अष्टसात्त्विकभावांची प्राप्ती होऊन या कथेला गोडी येते. विरह हा या सिद्धयोगाच्या कथेचा प्राण आहे. त्यामुळेच कबीर म्हणतात– "विरहा बुरहा जिन कहौ, विरहा है सुलतान । जिस घटि बिरह न संचैरे सो घट सदा मसान ।। " या विरहाची प्राणदात्री चित्शक्ती-रूपी अंजुली आहे; कारण "परी शांताद्भुत बरवे । जे डोळियांच्या अंजुळी घ्यावे ॥ ११.४ ॥" हे तिच्याशिवाय असे घडावे ? ही अंजुली शक्तीच हे भाव उत्पन्न करते व तिच्या आधारानेच विरहसंपन्न साधक ते प्राशन करतो. श्रीकृष्णचरणारविंदी दृष्टी लागल्यामुळे "नोडवेचि अवधानाचि अंजुळी ॥ ७.१८५ ॥" अशी अर्जुनाची क्षणभर स्थिती झाली होती; पण ती क्षणभरच. तोही "ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रिय कुड्मुळी । भरूनिया पुष्पांजुळी । अर्घ्यु देवो ॥ १५.२ ॥" म्हणून सिद्ध होताच. अर्जुनालाच काय सर्वांनाच असे आपले हृदय चौफाळून त्यावर श्रीगुरूच्या पादुकांची स्थापना करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणे "भरोनि सद्भावाची अंजुळी । मियां वोवियाफुलें मोकळीं । अर्पिलीं अंघ्रियुगलीं । विश्वरूपाच्या ॥ ११.७०८॥" अशी सद्भावाची अंजुली प्राप्त करून पूजा करावी लागते. सिद्धयोगाच्या विरहाची ही कथा जेव्हा अशाप्रकारे सद्भावरूप अंजुलीस्वरूप चित्शक्तीने संपन्न होते तेव्हा "जो मजा इंतजारीमें देखा । न वह मजा वस्ले यारी में देखा ।।" याची जाणीव होऊन साधक म्हणत राहतो–

जिसपर तुम हो रीझते, क्या देते जदुबीर ।
रोना धोना सिसकना, आहोंकी जागीर ।।

**मुहब्बतके जो कैदी हैं, न छूटेंगें वे जीते जी।**
**तडपते हैं, सिसकते हैं, उसीको याद करते हैं ॥**

श्रीज्ञानेश्वरमहाराजही " गांवा गेलिया वल्लभु । पतिव्रतेचा विरहक्षोभु ॥१६.७९॥" व " प्राणनाथाचिया आधी । विरहणीतें जिणेंही बाधी ॥१८.९२०॥" असे म्हणून दृष्टांताने या कथेचे विरहमर्म स्पष्ट करतात. सिद्धयोग ही कथाच आहे. फक्त ती परमार्थाची आहे, साधकाची आहे व " ते सविस्तर पुढारी कथा ॥१.२७५॥," व "ऐसी आघवीचि हे कथा ॥११.४८२॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज ती सांगत आहेत. अमृताचे घोट वरचेवर प्राशन करून धुंद व्हावे इतकी ती गोड आहे. सद्‌गुरुप्राप्तीने आनंदामुळे सुरुवातीला, जागृत शक्तीमुळे विरहावस्थेत मध्ये व सामरस्याच्या महामीलनामुळे शेवटी ही कथा अंतर्बाह्यच व आदिअंती गोडच आहे. त्यामुळे या कथेची अक्षरेही अमृतातेही पैजा जिंके अशी आहेत व ही कथा अमृताच्या ताटात वाढलेली आहे. "परिसीं लोहा घृष्टी किती । वेळवेळां कीजे गा ॥ १८.२८ ॥" या न्यायाने ही कथा एकदा सेवन केली की पुरे; मात्र "परी मात्रेचेनि मापें ॥१८.७७४॥" अशी सेवन करावी म्हणजे झाले.

सारांश, सिद्धयोगाच्या मुशीतून बाहेर पडलेली भक्तियोगरूप योगमार्गाची कथा जो सांगतो, तिचे प्राशन करवितो व या कथेच्या प्राणभूत अशा चित्‌शक्ती अंजुलीशी गाठ घालून आत्यंतिक विरहावस्थेने या कथेचा उत्कर्ष बिंदू जो प्राप्त करून देतो तोच खरा सद्‌गुरू होय. असे जेथे घडत नाही त्यावद्दल श्रीतुकाराममहाराज म्हणतात—

**नये नेत्रा जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥१॥**
**तो हे चावटीचे बोल । जन रंजविणें फोल ॥२॥**
**न फळें उत्तर । नाहीं स्वामी जो सादर ॥३॥**
**तुका म्हणे भेटी । जव नाहीं दृष्टादृष्टी ॥४॥**

नुसते चावटीचे बोल ऐकणे व अशा बोलांचे ग्रंथ वाचणे हे फोल आहे. ज्याच्या उपदेशाने डोळ्याला पाणी येत नाही व अंतरात विरह जागृत होत नाही तो गुरू व्यर्थ होय. ज्याचा उपदेश अनादि आत्मसत्तेचे जागरण घेऊन उठतो तोच खरा गुरू होय. त्याच्या चरणी सादर झाले पाहिजे; कारण त्याची दृष्टादृष्ट झाल्याशिवाय सर्व व्यर्थ आहे. अर्जुनाला असे सद्‌गुरू लाभले. त्यांच्या उपदेशानें कृतार्थ होऊन जेव्हा तो "नष्टो मोहः ॥ गीता ॥१८.७३॥" म्हणाला त्यावेळी त्याची जी अवस्था झाली होती तिचे जे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे ते वाचले म्हणजे भक्तियोगाच्या योगमार्गाचा महिमा स्पष्टपणे दृष्टिपथात येऊन मन संतुष्ट होते. ते म्हणतात.—

**मग क्षीराब्धीतें सांडितु । गगनीं पुंजु मंडितु ।**
**निवडे तैसा न निवडितु । पूर्णचंद्रु ॥१८.१५५०॥**

तैसा ब्रह्म मी हें विसरे । तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे ।
हेंही सांडी तरी विरे । ब्रह्मपणही ॥१५५१॥
ऐसा मोडतु मांडतु ब्रह्में । तो दुःखें देहाचिये सीमे ।
मी अर्जुन येणें नामें । उभा ठेला ॥१५५२॥
मग कांपतां करतळीं । दडपूनी रोमावळी ।
पुलिका स्वेदजळीं । जिरऊनियां ॥१५५३॥
प्राणक्षोभें डोलतया । आंगा आंगचि टेंकया ।
सूनि स्तंभु चाळया । भुलौनियां ॥१५५४॥
नेत्रयुगुळाचेनि वोतें । आनंदामृताचें भरितें ।
वोसंडत तें मागुतें । काढूनियां ॥१५५५॥
विविधा औत्सुक्यांची दाटी । चीप दाटत होती कंठीं ।
ते करूनियां पैठी । हृदयामाजीं ॥१५५६॥
वाचेचें वितुळणें । सांवरूनि प्राणें ।
अक्रमाचें श्वसणें । ठेऊनि ठायीं ॥१५५७॥
मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आवडें मोहो ।
तरी तो सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपुला ॥१५५८॥

## अविरोध साधनमार्गः—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोग हा इतर सर्व मार्गांना आपल्यात सामावून घेऊन त्या सर्वांना ओलांडून पलीकडे जाणारा असा एकमात्र अविरोध साधनमार्ग आहे हे " ऐसें अगाध माहात्म्य । जें सकळ मार्गैकगम्य । जें स्वात्मानुभवरम्य । तें इयापरी दाविलें ॥११.७३॥" असा त्याचा महिमा सांगून सिद्धांतरूपाने निभ्रांतपणे स्पष्ट केले आहे; कारण कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याशिवाय जडचेतनभेदप्रक्रिया घडून येणे ही केवळ अशक्यप्राय गोष्ट असून त्याशिवाय आत्मस्वरूपोपलब्धी होणे ही खपुष्पासारखी केवळ कल्पना ठरत असल्यामुळे "ऐसेसे हे उपाये । बहुवस एथें पाहें । जाणावया होये । एकी वस्तु ॥१३.१०४७॥ आतां पुरे हे बहुत । पैं सर्वार्थिचें माथित । सिद्धांतनवनीत । देऊं तुज ॥१०४८॥ येतुलेनि पंडुसुता । अनुभव लाहाणा आयिता । येर तंव तुज होतां । सायस नाहीं ॥१०४९॥ म्हणौनि ते बुद्धि रचूं । मतवाद हे खांचूं । सोलीव निर्वचूं । फलितार्थुची ॥१०५०॥" अशा प्रकारे इतर सर्व मतवाद्यांचे खंडन करून म्हणजे ते या मार्गात समाविष्टच आहेत असे दाखवून सोलीव फलितार्थ व सायास न करता आयता अनुभव सहज प्राप्त करून देणारा सिद्धांतनवनीतरूप असा सिद्धयोगसाधनाचा अविरोध साधनमार्ग त्यांनी उपलब्ध करून दिला आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनमार्ग हा अविरोध आहे असे सांगून त्याचा जो महिमा गायिला आहे व गौरव केला आहे, त्याचे सूत्र प्रकट करताना ते म्हणतात—

निवृत्तिसूत्र सोडवणिया । सर्व शास्त्रार्थ पुरवणिया ।
आवो साधिला मांडणिया । मोक्षरेखेचा ॥१८.३८॥
कां गंगायमुना उदक । वोघबगें वेगळिक ।
दावी होऊनि एक । पाणीपणें ॥५१॥
न मोडतां दोन्ही आकार । घडिलें एक शरीर ।
हें अर्धनारीनटेश्वर–। रूपीं दिसें ॥५२॥
नाना वाढिली दिवसें । कळा बिंबीं पैसे ।
तरी सिनानें लेवे जैसें । चंद्रीं नाहीं ॥५३॥
तैसीं सिनानीं चारीं पदें । श्लोक तो श्लोकावच्छेदें ।
अध्यावो अध्यायभेदें । गमे कीर ॥५४॥
परी प्रमेयाची उजरी । आनान रूप न धरी ।
नाना रत्नमणीं दोरी । एकचि जैसी ॥५५॥
मोतियें मिळोनि बहुवें । एकावळीचा पाडु आहे ।
परी शोभे रूप होयें । एकचि येथ ॥५६॥
फुलांफुलसरां लेख चढे । द्रुतीं दुजी अंगुळी न पडे ।
श्लोक अध्याय तेणें पाडें । जाणावे हे ॥५७॥
सात शतें श्लोक । अध्यायां अठरांचे लेख ।
परी देवो बोलिले एक । जें दुजें नाहीं ॥५८॥

अशा प्रकारे गीतेचा प्रतिपाद्य अर्थ एकच आहे, असे सांगून विषयानुराधानें कर्म भक्ति, ज्ञान इत्यादि विविध विषयांचे विवेचन आले असले; तरी ते या सिद्धयोग-साधनमार्गाचे अंगच आहे असे दाखवून, प्रथम गीतेत भिन्नभिन्न साधने सांगितली आहेत असा गीतेच्या प्रतिअध्यायरूप होणाऱ्या विषयप्रतिपादनामुळे होणारा अंतरंग विरोध मोडून काढून, गीता ही गंगायमुना, अर्धनारीनटेश्वर, चंद्रचांदणे, रत्ने-दोरी, मोती-कांतिशोभा इत्यादि दृष्टांताप्रमाणे अविरोध, एकरस, एकरूप व अद्वितीय आहे असे सिद्ध केले आहे. आपण एकच एक सिद्धयोगमार्गाच्या अविरोध साधनाचा सिद्धांत सांगत आहोत हे दृढ करण्यासाठी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

जे ग्रंथाच्या मध्यभागीं । नाना अधिकारप्रसंगीं ।
निरूपण अनेगीं । सिद्धांतीं केलें ॥१८.१२४०॥
तरी तेतुलेही सिद्धांत । इये शास्त्रीं प्रस्तुत ।
हें पूर्वापर नेणत । कोण्ही जें मानी ॥१२४१॥
तें महासिद्धांताचा आवांका । सिद्धांतकक्षा अनेका ।
भिडऊनि आरंभु देखा । संपवितु असे ॥१२४२॥
एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ ।
या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥१२४३॥

ज्ञान म्हणजे सिद्धयोगसाधनमार्ग हाच महासिद्धांत होय, हे आपण मागे पाहिलेच आहे. त्याची पुन्हा येथे चर्चा करण्याचे कारण नाही. या साधनमार्गाचे मूळ सूत्र श्रीनिवृत्तिनाथमहाराज आहेत असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. याचा अर्थ सद्‌गुरू हे मूळ सूत्र आहे. हे सूत्र खरोखरी काय आहे हे पाहिले, त्याचे स्वरूप काय आहे हे लक्षात घेतले व त्याचा आवाका शास्त्रदृष्टीने तपासून पाहिला म्हणजे ज्ञानेश्वरीसारख्या सिद्धांत ग्रंथांचे प्रकटीकरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांसारख्या महासिद्धांच्या राजाकडून कसे होते हे स्पष्टपणे प्रतीत होऊन " भाष्यकारांते वाट पुसतु ।।१८.१७२।।" या त्यांच्या म्हणण्याचा उलगडा होईल व महाराष्ट्रातील अनेक विद्वान लेखकांनी या विषयार जो गदारोळ माजविला आहे तो भ्रांत आहे असे दृष्टोत्पत्तीस येईल. ज्या भाष्यकारांना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वाट पुसली आहे ते श्रीमदाद्यशंकराचार्य किंवा श्रीरामानुजाचार्य हे दोन्हीही प्रत्यक्ष भाष्यकार नसून ते जागृत संवित् शक्तीच्या प्रातिभज्ञानाविष्कारात सहजतेने समाविष्ट झालेले भाष्यकार असून "तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ।।१८.१७२९।।" असे त्यांचे समर्थ सद्‌गुरूच साक्षात् भाष्यकार असून श्रीमत्स्येंद्रनाथ व श्रीगोरक्षनाथादि सर्व परंपरेने त्यांना ग्रंथरूपाने भाष्यकार म्हणून लाभले आहेत, हे मागे दोन वेळा स्पष्ट केले आहे. येथे याचा आणखीन सूक्ष्म विचार करावयाचा आहे. आपल्याकडून हा ज्ञानेश्वरी ग्रंथ कसा निर्माण झाला हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोले मी सधरु ।
जे सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ।।१.७५।।
जरी प्रकटे सिद्धसरस्वती । तरी मुकयाहि आथी भारती ।
एथ वस्तुसामर्थ्यशक्ती । नवल कायी ? ।।७८।।
द्रष्टा श्रीगुरूमूर्ती । न रिगता दृश्यपंथीं ।
तरी कां ह्या उपास्ती । आकळता तो ? ।।१८.१७०४।।
मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।
जो दिठीवेनि आपुला । बैसवी पदीं ।।१७३३।।
आधीचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी ।
तैं न दिसे ऐसी गोठी । केंही आहे ? ।। १७३४ ।।
म्हणौनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्‌वासही प्रबंध होआवे ।
श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ।। १७३५ ।।
एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें ।
तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ।। १७६४ ।।
सायिखडेयाचें बाहुलें । चालवित्या सूत्राचेनि चाले ।
तैसा मातें दावीत बोले । स्वामी तो माझा ।। १७६९ ।।

**यालागीं मी गुणदोष– । विषीं क्षमाविना विशेष ।**
**जे मी संजात ग्रंथलों देख । आचार्यें कीं ।। १७७० ।।**

हा ग्रंथ निर्माण होण्यास फक्त एकमात्र श्रीगुरूच आधार आहेत. आधार म्हणजे शक्ती होय. याचा अर्थ श्रीगुरू हीच शक्ती आहे. ही गुरुरूपाने असलेली शक्ती सधरू झाल्यामुळे म्हणजे जागृत झाल्यामुळेच मी बोलत आहे. या जागृतीचाच केवळ एकमात्र आधार मला आहे. ज्यावेळी श्रीनिवृत्तिनाथमहाराजांसारखे बाह्य सद्गुरू सानुकूळ होतात म्हणजे शक्तिपातयुक्त कृपा करतात त्यावेळी त्यांच्याच रूपाने असलेला शक्तियुक्त सद्गुरु अंतरात कुंडलिनीच्या रूपाने जागृत होतो. हिलाच वस्तुसामर्थ्यशक्ती म्हणजे स्वसंवेद्य आत्मरूपाशी अभिन्न असणारी वस्तूची समर्थ शक्ती म्हणतात. ही जागृत झाली की सिद्धसरस्वतीच तिच्या रूपाने प्रकट होते. मग मुक्यालाही भारती म्हणजे सौष्ठवपूर्ण, अर्थवाहक व काव्य–पुराण वेदोपनिषदादिरूपाने नटलेली वाचा फुटते. हेच गुरूंच्या कृपेने, त्यांच्या दृष्टीने व स्पर्शाने बोधून दिलेले समाधिधान होय. कळसूत्री बाहुले ज्याप्रमाणे सूत्रधाराच्या सूत्राने हलते व चालते त्याप्रमाणे अंतरातील जागृतशक्तीच्या रूपाने श्रीगुरूंनीच हा ग्रंथ माझ्याकडून लिहवून घेतला आहे. हाच श्रीज्ञानेश्वरीसारख्या सिद्धग्रंथांच्या निर्मितीचा परमसिद्धांत असून श्रीगुरुरूपाने असणारी जागृत शक्तीच अशा ग्रंथकारांची भाष्यकार असते. त्यामुळेच सर्व सिद्ध, संत, महंत व महात्मे यांचे ग्रंथ तत्त्वरूपाने अविरोध अशा साधनमार्गाचे निरूपण करणारे असतात असे दृष्टोत्पत्तीस येते. स्थूलबुद्धीचे लोक हे जाणू शकले नाहीत, आधार दुर्बलतेमुळे त्यांची दृष्टी तत्त्वदर्शी बनू शकली नाही व अशा प्रकारे शक्तिपात करून दिव्य चक्षूंचे उन्मीलन करणाऱ्या परमश्रेष्ठ सदगुरूंची गाठ पूर्वजन्मीच्या असौभाग्याने व अपुण्याईने पडली नाही म्हणजे वादातीत असलेल्या गोष्टीबद्दल दुराग्रहाने अगर अल्पबुद्धीने स्वमतपुष्टयर्थं पुरावे पुढे आणून आपलेच म्हणणे खरे करण्याचा ते प्रयत्न करतात. आजपर्यंत याबद्दल झालेल्या वादाची ही एवढीच उपपत्ती आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या जागृत शक्तीने विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण असे अलौकिक, अद्भुत व असामान्य प्रातिभज्ञानाचे व कलायुक्त वैखरीचे रूप धारण केल्यामुळे आजतागायत झालेल्या या विषयीच्या सर्व स्पंदांना तिने आत्मसात करून ज्ञानेश्वरीच्या रूपाने सिद्धयोग-साधनेचा महिमा सांगणारे एक अलौकिक दर्शन उपस्थित केले. हा सर्व त्या जागृत आत्मशक्तीचा महिमा आहे. महायोगी गोरक्षनाथ "महार्थमंजरी" आपण कशी रचली हे सांगताना या ग्रंथाच्या शेवटी स्वत: केलेल्या "परिमल टीकेत" असे म्हणतात की, "श्रीभैरवरूप महादेवांना इच्छारूप शक्तीने विचारले की, ज्याच्या ज्ञानाने साधकाला पूर्णता येते असे सर्व विश्वातील श्रेष्ठ साधनतत्त्व कोणते आहे ?". हा प्रश्न ऐकून भैरवाने अंतर्मुख होऊन तिला श्रेष्ठ असे साधनतत्त्व सांगितले. ते

म्हणाले, "श्रीगुरू प्रसन्न झाले की, आत्मज्ञान होऊन सर्व वस्तुजाताचेही ज्ञान होते. याचबरोबर मोहभ्रंश होऊन मनोनिर्मलता लाभते व जागृतशक्तीच्या साहाय्याने साधक शुद्धचित्त होऊन जीवनमुक्तीचा चमत्कार भोगतो.एवढेच नव्हे तर श्रीशिवच साधकाच्या चित्‌शक्तीचे उपबृंहण म्हणजे विकास किंवा प्रसार करीत त्याला अर्थतत्त्व सांगतो. या शक्तीनेच हे चिदद्वैताच्या प्राप्तीचे साधनतत्त्व शिवानंदाला सांगितले व क्रमाने ते नाथसंप्रदायाच्या रूपाने पृथ्वीवर आले. पुढे सिद्धयोग्यांच्या प्रवाहाने ते पृथ्वीवर पसरले. या शक्तीनेच मला हे साधनतत्त्व सांगितल्यामुळे मी ते महार्थ-मंजरीच्या रूपाने ग्रथित केले."

हे सर्व विवेचन ध्यानात घेतले म्हणजे "या गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी । जेथ भवानी प्रश्नु करी चमत्कारौनि ॥१.७०॥" व "क्षीरसिंधु परीसरीं। शक्तीच्या कर्णकुहरीं । नेणों कैं श्रीपुरारीं । सांगितलें जें ॥ १८.१७५२ ॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या म्हणण्याचा अर्थ स्पष्ट होऊन ज्ञानेश्वरीच्या उभारणीचे सूत्र "श्रीमहालया असे ॥ १८.१८०४ ॥" हे आहे हे ध्यानात येईल. श्रीसरस्वती गंगाधरांनी "श्रीगुरुचरित्रात" "गुरूचे नामी तुझी स्थिती" असे स्पष्ट म्हणून जी प्रार्थना सुरुवातीला केली आहे ती पाहिली म्हणजे गुरुशिष्यांच्या संवादाने जे सकल आगमनिगमपुराणकाव्यशास्त्रादि वाङ्मय या भूलोकावर अवतरित होते तिला ही शक्तीच "गुरुशिष्यपदेप्येष वेद्यभेदोऽप्यतात्त्विकः । प्रष्टी च प्रतीव-क्त्रीच स्वयं देवी व्यवास्थिता । तंत्रालोक ॥१.२५६॥" याप्रमाणे कारणीभूत होते हे सिद्ध होते. श्रीसरस्वती गंगाधर म्हणतात–

ऐक माझी विनंती । द्यावी आता अवलीला मती ।
विस्तार करावया गुरुचरित्रीं । मतिप्रकाश करीं मज ॥१.२०॥
जय जय वो जगन्माते । तूचि विश्वीं वाग्देवते ।
वेदशास्त्रें तुझीं लिखितें । नांदविशी येणेंपरी ॥२१॥
माते तुझिया वाग्बाणी । उत्पत्ति वेदशास्त्रपुराणीं ।
ववतां साही दर्शनीं । त्यांतें अशक्य परियेसा ॥२२॥
गुरूचे नामीं तुझी स्थिती । म्हणती नृसिंहसरस्वती ।
याकारणें मजवरी प्रीती । नाम आपुले म्हणोनि ॥२३॥
खांबसूत्रींचीं बाहुलीं जैसीं । खेळती तया सूत्रासरसीं ।
स्वतंत्रबुद्धि नाहीं त्यांसी । वर्तती आणिकाचेनि मतें ॥२४॥
तैसें तुझेनि अनुमतें । माझे जिव्हे प्रेरीं माते ।
कृपानिधी वाग्देवते । म्हणोनि विनवी तुझा बाळ ॥२५॥

श्रीसमर्थांनीही "दासबोधाचे" कर्तृत्व हे या शक्तीचेच आहे असे सांगताना म्हटले आहे की–

जे उठवी शब्दांकुर । वदे वैखरी अपार ।
जे निःशब्दाचें अभ्यंतर । उकलूनि दावी ।।१.३.२।।
तिहीं वाचा अंतरीं आलें । वैखरीया प्रकट केलें ।
म्हणौनि कर्तृत्व जितुके जालें । तें शारदेगुणें ।।१.३.१४।।

श्रीएकनाथमहाराजांनी "एकनाथी भागवताच्या" आरंभी तर चित्‌शक्ती कुंडलिनी जगदंबाच समाधीमध्ये माझ्या बुद्धीत आविर्भूत होऊन ग्रंथ लिहवून घेत आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

ते जयजय जगदंबा । उदो म्हणे ग्रंथारंभा ।
मतीमाजीं स्वयंभा । योगगर्भा प्रकटली ।। १.७८।।

श्रीसंततुकाराममहाराजांनीही "नेणे अर्थ कांहीं नव्हते माझे बोल । तुका म्हणे गुरुकृपेचा आधार ।।" असे म्हणून आपण श्रीगुरुकृपेमुळेच कवित्व केले असे स्पष्ट म्हटले आहे. "मज मूढा शक्ति कैंचा हा विस्तार। निगमादिकां पार बोलावया ।।" असेच त्यांचे म्हणणे आहे. कृपावंताच्या वाचाशक्तीने माझ्याकडून कवित्व करून घेतले हा भाव व्यक्त करताना ते म्हणतात–

आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची ।।१।।
साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शिकविता धनी वेगळाची ।।२।।
काय म्यां पामरे बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वभंरे बोलविलें ।।३।।
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायांविण ।।४।।

उपरोक्त सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, सद्‌गुरुकृपेने जागृत झालेली चित्‌शक्तीच हे ग्रंथरचनेचे कार्य करीत असते. त्यामुळे शब्द भिन्न असले तरी तत्त्व व साधन हे एकच असते व सर्वत्र त्याचेच प्रस्फुटीकरण झालेले आपल्या दृष्टीस येते. ही सूक्ष्म दृष्टी ज्यावेळेस प्राप्त होईल त्यावेळी भेदाची व आग्रहाची दृष्टी दूर होऊन खऱ्या रहस्याचा पत्ता लागेल. श्रीमदाद्यशंकराचार्य व श्रीरामानुजाचार्य यांच्या भाष्यातील भाष्याप्रमाणे असलेली साम्यस्थळे ज्ञानेश्वरीत इतकी आहेत असे दाखवून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अमक्यापासून अमुक घेतले व "भाष्यकारांतें ( वाट ) पुसत यातील भाष्यकार शब्दाने ज्ञानेशांना एकच भाष्यकार अभिप्रेत आहेत व ते म्हणजे शंकराचार्य होत असे या तुलनेवरून दिसेल," ( डॉ. शं. दा. पेंडसे – ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान – पृ. १६८ ) अशी मते मांडणें हे शास्त्रदृष्टी सोडून आहे असे वाटते. डॉ. शं . दा पेंडसे यांनी त्यांच्या पुस्तकात दाखविलेली साम्यस्थळे योग्यच आहेत. वाद फक्त त्यांनी प्रकट केलेल्या आग्रहाबद्दल आहे. सिद्धपुरुषांकडून ग्रंथनिर्मिती कशी होते हे पाहिले, त्यांचा स्वतःचा त्यांनी त्यासंबंधी केलेला ग्रंथातील खुलासा पाहिला व त्यांची परंपरा पाहिली म्हणजे त्या अनुरोधाने जे दृष्टीस येते ते स्वीकारले पाहिजे. जेथे "अनुभवावी हे कथा ।। १.५७ ।।"

म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात तेथे अनुभूतीशिवाय नुसत्या बुद्धीने केलेली विधाने ही कशी स्वीकारावीत असा प्रश्न पडतो. श्रीज्ञानेश्वरमहाराज शक्तीच्या कर्णकुहरातील वचने महेशान्वयसंभूत व श्रीगरुकृपालब्ध होऊन सांगत आहेत. आपणही तसेच होऊन जेव्हा ती वाचू तेव्हा "परी लोकु वाक्चातुर्ये। होईल सुखिया ॥ १८.१७५० ॥" यातून म्हणजे काव्याच्या मुलायम पडद्यातून व चिकित्सक जडबुद्धीतून आपली सुटका होऊन आपला भ्रम दूर होईल व आपला "अंतरंगचि अधिकारिये ॥ १८.१७५० ॥" मध्ये प्रवेश होऊन स्वानंद-साम्राज्याचे चक्रवर्ती होण्याचे भाग्य आपल्याला लाभेल. "आपण साधू झालो म्हणजे साधूला ओळखता येते," असे श्रीरामकृष्णपरमहंस म्हणत असत. त्याप्रमाणे ज्यावेळी आपली संविद्शक्ती श्रीज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणे जागृत होऊन त्यांच्या संविद्शी एकरूप होईल त्यावेळी सर्व भेदाभेद व मार्गामार्ग यांच्या गलबल्यातून आपली सुटका होऊन विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अशा स्वसंविद् जागृतीने प्राप्त झालेल्या ऋतंभरा प्रज्ञायुक्त शक्तीच्या जोरावर श्रीमदाद्यशंकराचार्य व श्रीरामानु-जाचार्यादि भाष्यकारच काय; पण सकल आगमनिगमपुराणकाव्यशास्त्रादींना व समस्त दर्शनादि मार्गांना आपल्या प्रतिभेच्या मुशीत घालून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी एक नवीन, तेजोमय व दिव्य अशी सिद्धयोग दर्शनाची मूर्ती ज्ञानेश्वरीच्या रूपाने आपल्यापुढे झळकत ठेवली आहे असे प्रतीत होईल. ही संविद्जागृती व एकरूपता साधेल तेव्हाच स्थूलबुद्धीचा त्याग होऊन गीताकाशीचे परमामृत काय आहे हे कळेल आणि अंतरंगतः व बाह्यरंगतः सिद्धयोगाचे साधन हे अविरोध कसे व का आहे हे लक्षात येऊन त्याचा महिमा अंतरंग होईल.

श्रीमद्भगवद्गीता ही श्रीकृष्णनाथांनी "इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयाऽनघ ॥ १५.२० ॥" असे म्हणून मी ती स्वतः सांगत आहे असे म्हटले असले तरी "तैसा आपुलिये सर्वशक्ती। तुज तूंचि जाणसी लक्ष्मीपती। येर वेदादिक मती। मिरविती वायां ॥ १०.१७७ ॥" असे त्याचे स्वरूप शक्तियुक्त असल्याने गीतेचे उद्घाटन हे त्या शक्तीचेच कर्तृत्व आहे हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> **म्हणौनि जगीं गीता। मियां आत्मेनि पतिव्रता।**
> **जे हे प्रस्तुत तुवां आतां। आकर्णिली ॥१५.५७६॥**
> **परी हें बोलों काय गीता। जे हे माझी उन्मेषलता।**
> **जाणे तो समस्ता। मोहा मुके ॥५८३॥**

गीता ही माझ्या आत्मस्वरूपाशी समव्याप्त असलेल्या उन्मेषलतेचे म्हणजे ज्ञानशक्तीचेच रूप आहे. महायोगी गोरक्षनाथांनी "महार्थमंजरीत" हाच विचार स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

एनमेव महार्थं युद्धारंभे पांडुपुत्रस्य ।
षोडश सहस्रशक्तिर्देव उपदिशति माधव ।।७०।।

या श्लोकावर केलेल्या स्वकृत " परिमल भाष्यात " ते म्हणतात, " जो हा महाप्रबंधाने भावार्थ, संप्रदायार्थ, अग्निगर्भार्थ, कौलिकार्थ, सर्वरहस्यार्थ व महातत्त्वार्थ सांगितलेला आहे तो हाच आहे. या आम्नायोक्तिप्रमाणे सर्व अर्थतत्त्वाच्या वैचित्र्याच्या समष्टीच्या अधिष्ठानरूपाने असलेल्या शक्तीचा हा महार्थ आहे. सर्व भेदप्रभेदाला या शक्तीने आपल्यात सामावून घेतले आहे आणि हेच मिळविण्यास योग्य असे तत्त्व आहे. हाच अर्थ तंत्रलोकात पुढीलप्रमाणे सांगितला आहे. सर्व विकल्पवार्तांच्या पलीकडे असलेली सार्थ व सर्वांना ओलांडून पलीकडे जाणाऱ्या स्वतःच्या स्वतंत्रघन अशा आत्मशक्तीच्या आधाराने सोळा हजार शक्तींनी युक्त होऊन श्रीभगवान् श्रीकृष्णदेवांनी हे साधनतत्त्व कौरवपांडवांच्या युद्धाच्या सुरुवातीला अर्जुनाला सांगितले. "

वरील सर्व विवेचनाचे सार लक्षात घेतले म्हणजे गीताच मुळात भगवंताच्या शक्तीचे प्रकटीकरण असल्यामुळे ते अविरोध साधनतत्त्वाच्या रूपाने उपलब्ध झाले आहे हे स्पष्ट होईल " कल्याण मासिकाच्या गीतांतील " " गीतातात्पर्य " या लेखात देवर्षी पं. श्रीरमानाथजी शास्त्री यांनीं जे विचार उपरोक्त दृष्टिकोन ठेवून स्पष्ट केले आहेत ते पाहण्यासारखे आहेत. ते म्हणतात, " कितनेही कहते हैं कि कर्म, ज्ञान और भक्ति तथा भगवत्स्वरूप ज्ञान इन सभी विषयोंको कहनेवाली गीता है, यह माननेसे तो वाक्यभेद–दोष आवेगा; इसलिये गीताका विषय तो एकही मानना उचित है । इसके उत्तरमें हमें कहना है कि गीतामें एकही विषय अनेक प्रकारसे कहा गया है । विषय एकही है, अतएव वाक्यभेद नहीं होता । कितनेही कहते हैं कि, साधनकी दृष्टिसे तो द्वैत माननाही पडेगा । भगवत्प्राप्ति साध्य है और ज्ञान, भक्ति तथा कर्म साधन हैं । यदि गीतामें ये हैं तो अवश्य द्वैत मानना होगा और त्रिविध साधनोंका वर्णन गीतामें हैं, इसलिए वाक्यभेद भी हो जायगा । इसके उत्तरमें कहना है कि, साधन ( उपाय) साध्य (फल) की दृष्टिसे भी पदार्थांतर नहीं होता। प्रकारभेद मात्र हैं। विषयभेद नहीं है। अनेक प्रकारसे भगवानही विषय रहता है । साधन भी भगवान है और साध्य (फल) भी भगवान है। साध्य भगवान् है, वह यदि पदार्थांतररूप साधनसे प्राप्त है तो असमर्थ है। श्रीकृष्ण असमर्थ नहीं हैं, वे स्वप्रकाशही हैं। उनकी प्राप्ति उन्हींसे होती है; उनका ज्ञान उन्हींसे होता है, अन्यसे नहीं । इस तरह साधन भी वही है और फल़ भी वही है। वे सर्वसमर्थ हैं-यः सर्वज्ञः सर्वशक्तिः । साधनभी सच्चिदानंद है और फल़ भी सच्चिदानंद है। अतएव गीताका विषय भी एकही है।" हाच आशय व्यक्त करताना श्री.श्रीकृष्ण प्रेम हे आपल्या "The yoga of the Bhagavat Gita"

या ग्रंथात म्हणतात, " As such, it deals with the whole path from the beginning to the end, from what Buddhists term "Entry in the stream " (स्रोतापन्न) to the goal of Nirvana. It follows that the sequence of the chapters is of great importence, and that it is a mistake to do as some expositors have done and expound the teachings with no reference to the place at which they occur in the general scheme .... The path is not the special property of Hinduism, nor indeed of any religion. It is something which is to be found, more or less deeply buried, in all religions and which can exist apart from any formal religion at all. That is why the Gita though a definitely Hindu Book,the very crest-jewel of Hindu teachings, is capable of being a guide to seekers all over word." (Introdnction)वास्तविक पाहता श्रीमद्भवद्गीतेतील सर्व विषय हा अव्वलपासून अखेरपर्यंत एकाच साधनमार्गाचे विवेचन करीत आहे. या साधन मार्गालाच बौद्ध लोकांनी स्रोतापन्न होणे अर्थात् निर्वाणपदप्राप्तीसाठी जीवाला सुषुम्नेतून प्रवाहित करणे असे म्हटले आहे. या दृष्टिकोनातून पाहिले म्हणजे गीताध्यायांचा क्रम हा अत्यंत महत्त्वाचा आहे हे लक्षात येते. अशा प्रकारे गीतेचे सर्व अध्याय एका महान साधनाच्या सर्वमान्य आविष्कारासाठी अवतरले आहेत हे जर लक्षात घेतले नाही; तर मोठमोठ्या टीकाकारांनी व भाष्यकारांनी आपापल्या टीकांमध्ये व भाष्यांमध्ये साधनानुसंधानसूत्रविस्मरणाची जी चूक केली आहे तीच आपण करू. हा साधनमार्ग ज्याप्रमाणे हिंदुधर्माची एकट्याचीच विशेष संपत्ती नाही त्याप्रमाणेच ती इतर कोणाचीही वैशिष्टचपूर्ण ठेव नाही.हा साधनमार्ग कमीअधिक प्रमाणात सर्व धर्मांमध्ये रुजलेला दिसून येतो. एवढेच नव्हे तर रूढीबद्ध धर्माच्या पलीकडेही या साधनमार्गाचे अस्तित्व दृग्गोचर होते. त्यामुळे श्रीमद्भगवद्गीता हा हिंदूधर्माचा ग्रंथ असला व त्यात हिंदूंचे अत्युच्च तत्त्वज्ञान ग्रंथित झाले असले तरी तो जगातील सर्व साधकांना मार्गदर्शनक्षम असा ग्रंथ आहे हे निर्विवाद सत्य आहे.

अशा प्रकारे श्रीमद्भगवद्गीता हाच मुळी भिन्न नावाने एकच साधनमार्ग सांगणारा असा अविरोध साधनमार्गाचा ग्रंथ असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " यतः सर्वदर्शनानां स्वस्वरूपदर्शने समन्वयं करोति सोऽवधूतयोगी स्यात् ॥ ६.२०॥". हा महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत " प्रकट केलेला सिद्धांत संप्रदाय परंपरेने कवळून घेऊन, सिद्धयोग दर्शनाच्या रूपाने ज्ञानेश्वरी जगापुढे प्रस्तुत केली आहे. सिद्धयोगमार्गाशिवाय अन्यत्र कोणत्याही मार्गात अशी अविरोध साधन-

मार्ग प्रकट करण्याची शक्ती नसल्यामुळे सिद्धसंप्रदायाचे प्रसिद्ध शक्तिशाली आचार्य श्रीजालंधरनाथ यांनी आपल्या "सिद्धांतवाक्य" नावाच्या पदावलीमध्ये "द्वैतं वाद्वैतरूपं द्वयत उत परं योगिनां शंकर वा।" असे म्हणून द्वैत व अद्वैत यापैकी कोणतेही मत सत्यरूप मानले नाही व त्यांचा भ्रांती म्हणून परिहारही केला नाही. उलटपक्षी द्वैत व अद्वैत या दोहोंचे सामरस्य झाल्यावरच पूर्ण साक्षात्कार होण्याची संभावना आहे असे त्यांनी म्हटले आहे. यामुळेच नाथमार्गात एक सर्वांगसुंदर अविरोध सामंजस्याचा आदर्श दृष्टीस पडतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही हाच आदर्श ज्ञानेश्वरीत प्रकट केल्याचे पुढील ओव्यांवरून स्पष्टपणे निदर्शनास येते. ते म्हणतात-

**ते हे कल्पादीं भवित मियां। भागवतमिषें ब्रह्मया।**
**उत्तम म्हणौनि धनंजया। उपदेशिली ॥१८.११३२॥**
**ज्ञानी इयेतें स्वसंवित्ती। शैव म्हणती शक्ती।**
**आम्ही परमभक्ती। आपुली म्हणों ॥११३३॥**

सारांश, अशा प्रकारे "आणि सर्वमार्गीं निंदा। सांडूनि आस्था पैं शुद्धा ॥ १८.१५२९॥" या स्वतःच सांगितलेल्या न्यायाने वागून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी महायोगी गोरक्षनाथांनी "महार्थमंजरीत" म्हटल्याप्रमाणे "कावेर्या इव माधुर्यं कल्हारस्यैव सौरभम्। नटेशस्येव तन्नृत्तमस्य ग्रंथस्य गौरवम्।।" म्हणजे कावेरी नदीच्या सारखे मधुर, कमल पुष्पाप्रमाणे सुगंधित व श्रीनटेशाच्या नृत्याप्रमाणे या ग्रंथाचे श्रेष्ठत्व आहे; अशी ज्ञानेश्वरीचीही स्तुती करताना "सेवंतीये अरिसि कांहीं। आंग पाहतां विशेषु नाहीं। परी सौरभ्य नेलें तिहीं। भ्रमरीं जाणिजे ॥१५.५९५॥ एऱ्हवीं वेद्यु निष्प्रपंचु। जेणें विश्वाभासु हा साचु। आज्ञेचा नटनाचु। काळातें जिणें ॥१८.१३७०॥" असे म्हटले आहे व "पैं मातें पावसी उपायें। साचचि येणें ॥ १८.१३७९ ॥" हे सांगून सिद्धयोगाच्या अविरोध साधनमार्गाचा सिद्धांतरूप महिमा प्रकट केला आहे.

## सर्वतंत्र स्वतंत्र साधनः—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वसंवेद्य आत्मरूपाच्या प्राप्तीसाठी "येथ एक नवलावो। जो जो कीजे तरणोपावो। तो तो आपावो। होय तें ऐक ॥७.८२॥" असे म्हणून इतर सर्व साधने निरर्थक असून एकमात्र सिद्धयोगाचेच सर्वतंत्र स्वतंत्र साधन उपयोगी आहे हे "जयां सद्गुरुतारूं फुडें। जें अनुभवाचे कासे गाढें। जयां आत्मनिवेदन तरांडें। आकळलें ॥९.९८॥" असे सांगून सिद्धयोगाचा अपरंपार महिमा प्रकट केला आहे. इतर सर्व साधने निरर्थक आहेत हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**एक स्वयंबुद्धीच्या बाहीं। रिगाले तयांची शुद्धीचि नाहीं।**
**एक जाणिवेचे डोहीं। गर्वेंचि गिळिले ॥७.८३॥**

एकीं वेदत्रयाचिया सांगडी । घेतल्या अहंभावाचिया घोंडी ।
ते मदमीनाच्या तोंडीं । सगळेचि गेले ॥८४॥
एकीं वयसेचें जाड बांधलें । मग मन्मथाचिये कांसे लागले ।
ते विषयमगरीं सांडिले । चघळूनियां ॥८५॥
एकीं यजनक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटीं ।
ते स्वर्गसुखाच्या कपाटीं । शिरकोनि ठेले ॥८९॥
एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला कर्मबाह्यांचा भरंवसा ।
परी ते पडिले वळसां । विधिनिषेधांच्या ॥९०॥
जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा न लगे ।
वरि कांहीं तरों ये योगें । तरी विपाय तो ॥९१॥
ऐसें तरीं जीवाचिये आंगवणें । इये मायानदीचें तरणें ।
हें कासयासारिखें बोलणें । म्हणावें पां ॥९२॥
जरी अपथ्यशीळा व्याधी । कळे साधूसी दुर्जनाची बुद्धी ।
कीं रागी सांडी रिद्धी । आली सांती ॥९३॥
जरी चोरां सभा दाटे । अथवा मीनां गळु घोटे ।
ना तरी भेडा उलटे । विवसी जरी ॥९४॥
पाडस वागुर करांडी । कां मुंगी मेरु वोलांडी ।
तरी मायेची पैलथडी । देखती जीव ॥९५॥
म्हणौनि गा पंडुसुता । जैसी सकामा न जिणवेचि वनिता ।
तेवीं मायामय हे सरिता । न तरवें जीवां ॥९६॥

अशा प्रकारे जीव स्वतःहून जेवढे प्रयत्न करतो तेवढे सर्व व्यर्थ ठरतात; कारण या सर्व उपायांमुळे "बोधाचा जोडला तारा ॥ ७.१०० ॥" ही गोष्ट म्हणजे कुंडलिनी शक्तीची जागृती कधीही घडून येत नाही. येथे सद्‌गुरूंची कृपा म्हणजे शक्तिपात हाच लीला तरण्याचा व सर्वभावे भजण्याचा एकमात्र उपाय असल्याने ज्या अक्षरांचे रूप घेऊन हे साधन प्रकट झाले आहे, ती सर्वतंत्र स्वतंत्र आहेत असे सांगून त्यांचा महिमा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अर्जुनाच्या मुखातून पुढीलप्रमाणे वदविला आहे. ते म्हणतात–

मग चमत्कारला म्हणे । इयें जळींचीं मा तारांगणें ।
कैसा झकविलों असलगपणें । अक्षरांचेनि ॥७.१९४॥
इयें पदें नव्हती फुडिया । गगनाचिया घडिया ।
येथ आमुची मति बुडालिया । थावो न निघे ॥१९५॥
मग विनविलें सुभटें । हां हो जी ये एकवाटे ।
सातही पदें अनुच्छिष्टें । नवलें आहाती ॥१९७॥

हे साधन म्हणजे एक नवल आहे. त्यामुळे अर्जुनही आश्चर्यचकित झाला. त्याला ज्या अक्षरांचे रूप घऊन हे साधन ऐकण्यास मिळाले व अनुभविता आले त्यामुळे हे साधन यापूर्वी कधीही कोणी न ऐकलेले व नवलपूर्ण आहे असे वाटून त्याची बुद्धीच त्यात संपूर्णपणे बुडून गेली. महायोगी गोरक्षनाथांनीही " महार्थमंजरीच्या " सुरुवातीला सिद्धयोगमार्ग हा निर्भय, दीक्षायुक्त व यापूर्वी कुणीही न सांगितलेला सर्वतंत्र स्वतंत्र असा साधनमार्ग असून " अथ यदेतदात्मस्वरूपाविभिन्नपरमेश्वर-परामर्शोपायप्रतिपादनप्रवृत्तम् ।। " असे म्हणून या महार्थमंजरीनामक महातंत्रात आत्मरूपाशी अभिन्न असलेल्या परमेश्वराच्या ज्ञानप्राप्तीचा उपाय सांगितलेला आहे असे सांगून ते पुढे म्हणतात—

**इति प्रकटितो मया सुघट एव मार्गो नवो ।**
**महागुरुभिरुच्यते स्म शिवदृष्टिशास्त्रे यथा ।।प्रत्यभिज्ञाहृदय।।**
**अर्थषट्कं च दीक्षा च शिवशास्त्रमिति स्मृतम् ।**
**दीक्षाध्वा निर्भयो भोगशास्त्रे भैरवसंज्ञके ।। सिद्धमत ।।**

मी अत्यंत सुंदर, सोपा व सहज अशा नवीन मार्गाचे प्रकटीकरण करीत आहे. या मार्गाला शिवशास्त्रदृष्टचा महागुरूचा, अंतरगुरूचा किंवा जागृत शक्तीचा मार्ग असे म्हणतात. हा मार्ग यापूर्वी कुणीही सांगितला नाही असे प्रत्यभिज्ञाहृदयात म्हटले आहे. श्रीसिद्धमतात, ज्यात दीक्षा व अर्थषट्क आहे त्याला शिवशास्त्र म्हटले असून हा दीक्षामार्ग निर्भय आहे, म्हणून सांगितले आहे आणि भैरव म्हणजे श्रीशंक-राच्या मताप्रमाणे सिद्धयोग हे अपूर्व भोग देणारे सर्वतंत्र स्वतंत्र शास्त्र आहे. एवढे सांगून " गुरुरुपाय: ।" व " गुरुमत्तैव न: शास्त्रे परमं फलमुच्यते ।" हे या साधन-गौरवाचे सूत्ररूप महासिद्धांत कथन केले आहेत. शिवसूत्रात गुरू हाच उपाय म्हणजे श्रेष्ठ साधन आहे असे सांगितले आहे, हे सांगून, गुरू करणे हेच आमच्या या शास्त्रा-तील श्रेष्ठ फळ किंवा अंग होय, अशी या साधनाची गुरुरूपाशी अभिन्नता दाखवून, त्याचा महिमा स्पष्ट केला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाचे साधन गुरु-रूपच असून ते गुरुकृपेनेच प्राप्त होते हे सूत्र ज्ञानेश्वरीत सर्वत्र कसे प्रकट केले आहे हे आपण मागे पाहिलेच आहे.

सिद्धयोग साधनेने जसे सुख प्राप्त होते तसे इतर दुसऱ्या कोणत्याही साधनाने ते प्राप्त होत नसल्यामुळे या दृष्टीनेही हे साधन सर्वतंत्र स्वतंत्र असून त्याचा महिमा अवाङ्मनसगोचर आहे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**जरी वेदाध्ययनाचें जालें । यथवा यज्ञाचें शेतचि पिकलें ।**
**कीं तपोदानांचे जोडलें । सर्वस्व हन जें ।।८.२६१।।**
**तया आघवयाची पुण्याचा मळा । भारु आंतौनि जया ये फळा ।**
**तें परब्रह्म निर्मळा । सांटि न सरे ।।२६२।।**

जें नित्यानंदाचेनि मानें । उपमेचा कांटाळा न दिसे सानें ।
पाहा पां वेदयज्ञादि साधनें । जया सुखा ॥२६३॥
जें विटे ना सरे । भोगी तयाचेनि पवाडें पुरे ।
पुढती महासुखाचें सोयरें । भावंडचि ॥२६४॥
ऐसे दृष्टीचेनि सुखपणें । जयासी अदृष्टाचें बैसणें ।
जें शतमखाही आंगवणें । नोहेचि एका ॥२६५॥
तयातें योगीश्वर अलौकिकें । दिठीचेनि हातलुकें ।
अनुमानती कौतुकें । तंव हळुवट आवडे ॥२६६॥
मग तया सुखाचीं किरीटी । करूनियां गा पाउटी ।
परब्रह्माचिये पाठीं । आरूढतो ॥२६७॥
ऐसे चराचरैक भाग्य । जें ब्रह्मेशा आराधना योग्य ।
योगियांचे भोग्य । भोगधन जें ॥२६८॥

सद्‌गुरूची दृष्टी एकदा पडून शक्तिपात झाला की, असे सुख प्राप्त होते व त्यामुळे साधकाचे अदृष्टपदी बैसणं होते. वेदयज्ञादि इतर सर्व साधने अशाप्रकारचे सुख प्राप्त करून देण्यास असमर्थ असल्यामुळे व त्यांच्यामुळे असे सुख कधी मिळतही नसल्यामुळे ही सर्व साधने परतंत्र व अस्वतंत्र असून अतएव सिद्धयोग साधनापुढे नगण्य ठरतात. अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे आपणास हे सर्वतंत्र स्वतंत्र अशा सिद्धयोगाचे शास्त्र कसे प्राप्त झाले व आपण हे साधन शब्दब्रह्म मथून काढून उदनिषदांचे सार म्हणून कसे प्रस्तुत करीत आहोत हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मियां गीता येणें नांवें । तुझें पसायामृत सुहावें ।
वानूं लाधलों तें दुणेन थावें । दैवलों दैवें ॥१६.३१॥
माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प ।
तया फळाचें हें महाद्वीप । पातली प्रभु ॥३२॥
एवं कथिलयावारभ्य । हें जें सर्व शास्त्रैकलभ्य ।
उपनिषदां सौरभ्य । कमळदळां जेवीं ॥१५.५७१॥
हें शब्दब्रह्माचें मथितें । श्रीव्यासप्रज्ञेचेनि हातें ।
मथूनि काढिलें आयितें । सार आम्हीं ॥५७२॥
जे ज्ञानामृताचि जान्हवी । जे आनंदचंद्रींची सतरावी ।
विचारक्षीरार्णवींची नवी । लक्ष्मी जे हे ॥५७३॥
जें उपनिषपांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर ।
परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥१८.१८०८॥

अनेक कल्पपर्यंत जे सत्यवादाचे तप माझ्या वाचेकडून घडले त्यामुळे मला हे साधन अत्यंत पुण्याईमुळे प्रसादामृत म्हणून सद्‌गुरूंकडून प्राप्त झाले.हे साधन म्हणजे

वेदोपनिषदादि सर्व शास्त्रांचे साररूप सार असून ही सर्वतंत्र स्वतंत्र अशी दुसरी नवी लक्ष्मीच आहे. महायोगी गोरक्षनाथांप्रमाणेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांना या साधनाबद्दल "नवी लक्ष्मी जे हे।" म्हणून जो निर्वाळा दिला आहे व "येवढेया लाठेपणाचा उपावो। आनु नाहींचि म्हणे देवो। हा सम्यक् ज्ञानाचा रावो। उपायांमाजीं ॥१६.५१॥" असे म्हणून जो गौरव केला आहे तो पाहिला म्हणजे अत्यंत दुर्मिळ अशी साधनकथा श्रीज्ञानेश्वरमहाराज आपल्यास सांगून तृप्त करीत आहेत याच्या प्रतोतीने मन आनंदाने भरून जाते. अशा या शक्तिपातयोगरूप सिद्धयोग साधनाचा सूत्रपात अदिनाथ शंकरांनी कसा केला व हे अपूर्व साधन भूमंडलावर त्यांनी कसे प्रकट केले हे सांगताना "सौंदर्यलहरी" या आपल्या प्रसिद्ध ग्रंथात श्रीमदाद्यशंकराचार्य म्हणतात–

**चतुःषष्ट्या तंत्रैः सकलमतिसंधाय भुवनं**
**स्थितस्तत्तसिद्धि-प्रसव-परतंत्रैः पशुपतिः ।**
**पुनस्त्वन्निर्बंधादखिलपुरुषार्थैकघटना–**
**स्वतंत्रं ते तंत्रं क्षितितलमवातीतरदिदम् ॥३१॥**

भगवान् पशुपतिनाथ शंकरांनी चौसष्ट तंत्रांची रचना करून ज्या ज्य. लोकांना सिद्धीची व काम्य फलांची इच्छा होती ती पूर्ण करण्याची सोय केली केवळ मोक्ष प्रतिपादन करणारा वेदांतही सांगितला व ते स्वस्थ बसले; परंतु ज्या योगे धर्म, अर्थ आणि काम यांच्यासह परमपुरुषार्थाचा लाभ होईल असे साधन प्रकट होणे आवश्यक होते. जगज्जननीने शंकरांना असे साधन प्रकट करण्याचा आग्रह केला. तेव्हा त्यांनी इतर पुरुषार्थसह प्रामुख्याने परमपुरुषार्थ जो मोक्ष त्याचा लाभ होईल अशा योग्यतेचे एक स्वतंत्रच तंत्र या भूमंडलावर प्रकट केले. यावर टीका करताना प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज आपल्या "सौंदर्यलहरीवर केलेल्या हिंदी टीकेत" म्हणतात, "भगवतीका तंत्र अर्थात् श्रीविद्याका तंत्र स्वतंत्र है और सब तंत्र गौण हैं। भगवतीके तंत्रसे कुंडलिनी शक्तिको जगाकर सहस्रारमें ले जाया जाता है; परंतु अन्य सब तंत्र धर्म, अर्थ और कामकीही सिद्धि दे सकते हैं। भगवतीका तंत्र चारों पदार्थ देता है।" या साधनाचा गौरव करून त्याला वंदन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज "अमृतानुभवात" म्हणतात–

**गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्याहि शांकरी ।**
**जयत्याज्ञानमस्तस्यै दयाद्रार्यै निरंतरम् ॥२॥**

गुरू म्हणजे अत्यंत श्रेष्ठत्वाने त्रैलोक्यामध्ये प्रसिद्ध असलेली शक्तिपातयोगरूप ब्रह्मविद्याच होय. ही मूढांना 'शं' म्हणजे सुख व 'कर' म्हणजे करणारी किंवा देणारी असल्यामुळे तिला शांकरी म्हणतात. ही विद्या "परंपराशक्तिराज्ञावती प्रसिद्धा ॥सि. स. प. ॥४.१०॥" या प्रमाणे साक्षात् चित्शक्ती कुंडलिनीरूप आज्ञाच

आहे.ही सिद्धयोग साधनाची विद्या साक्षात् आनंद देणारी, दयाळू व अत्यंत ज्ञानरूप आहे. या सिद्धयोग साधनविद्येचा जयजयकार असो. तिला मी वंदन करतो.

असे हे या सिद्धयोग साधनेचे श्रेष्ठत्व आहे." केनोनिपषदातही " या सर्वतंत्र स्वतंत्र साधनेचा अवतार गुरुरूपाने कसा झाला याची कथा आली आहे. ती जिज्ञासूंनी अवश्य वाचावी. सारांश, अर्जुनाने भगवंतांना विचारलेले प्रश्न व संजयाने गुरूच सुखाचे कारण आहेत असे सांगून या साधनाचे प्रकट केलेले महिमान पाहिले म्हणजे उपरोक्त सर्व विवेचनाचे सार हाती येऊन सर्वतंत्र अशा सिद्धयोगाचे श्रेष्ठत्व स्पष्ट होईल. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी तक्षकाची फडे। ठाकोनि कैं तो मणि काढे।
कैं नाकींचा केशु जोडे। सिंहाचिये ? ॥१७.२४॥
मग तेणें तो वोंविजे। तरीच लेणें पाविजे।
एऱ्हवीं काय असिजे। रिक्तकंठीं ? ॥२५॥
तैसी शास्त्रांची मोकळी। यां कैं कोण पां वेंटाळी।
एकवाक्यतेच्या फळीं। पैसिजे कैं ? ॥२६॥
जालयाही एकवाक्यता। कां लाभे वेळु अनुष्ठितां।
कैंचा पैसारु जीविता। येतुलालिया ? ॥२७॥
आणि शास्त्रें अर्थें देशें काळें। या चहूंही जें एकफळे।
तो उपावो कें मिळे। आघवयांसी ? ॥२८॥
म्हणौनि शास्त्रांचें घडतें। नोहें प्रकारें बहुतें।
तरी मूर्खा मुमुक्षां येथें। काय गती पां ? ॥२९॥
संजयो म्हणे कौरवराया। गुणा रिझों ये रिपूचिया।
आणि गुरुही हा आमुचिया। सुखाचा येथ ॥१७.४२७॥
हा न पुसता हे गोठी। तरी देवो कां सोडिते गांठी।
तरी कैसेंनि आम्हा भेटी। परमार्थेसी ! ॥४२८॥
होतों अज्ञानाच्या आंधारां। वोसंतीत जन्मवाहरा।
तों आत्मप्रकाशमंदिरा–। आंतु आणिलें ॥४२९॥

सद्गुरूने आपल्या कृपेच्या झोळीची गाठ सोडून शिष्याला सिद्धयोगाची कथा ऐकविली म्हणजे शिष्य सहजच आत्मप्रकाश मंदिरात प्रवेश करतो. नुसत्या शास्त्राभ्यासाने, बडबडीने, चर्चेने, व्याख्यानाने अगर तत्सम इतर कोणत्याही उपायाने ज्ञानप्राप्ती होऊन साधकाला परमार्थाची भेट होत नाही. हाच भाव व्यक्त करताना "कुलार्णवतंत्रात" महादेव पार्वतीला म्हणतात–

अन्यथा परमं तत्त्वं जनाः क्लिश्यंति चान्यथा।
अन्यथा शास्त्रसद्भावो व्याख्यां कुर्वंति चान्यथा ॥१.९२॥

कथयन्त्युन्मनीभावं स्वयं नानुभवंति हि ।
अहंकारहताः केचिदुपदेशविवर्जिताः ॥९३॥
पठंति वेदशास्त्राणि दुर्लभा भववेदकाः ।
न जानंति परं तत्त्वं दर्वी पाकरसं यथा ॥९४॥
शिरो वहंति पुष्पाणि गंधं जानाति नासिका ।
पठंति वेदशास्त्राणि विवदंति परस्परम् ॥९५॥
संसारमोहनाशाय शाब्दबोधो न हि क्षमः ।
न निवर्त्तेत तिमिरं कदाचित् दीपवार्त्तया ॥९७॥
इदं ज्ञानमिदं ज्ञेयं सर्वतः श्रोतुमिच्छति ।
देवि वर्षसहस्रायुः शास्त्रांतं नैव गच्छति ॥१०१॥
वेदाद्यनेकशास्त्राणि स्वल्पायुर्विघ्न कोटयः ।
तस्मात् सारं विजानीयात् क्षीरं हंस इवाम्भसः ॥१०२॥
न वेदाध्ययनान्मुक्तिर्न शास्त्रपठनादपि ।
ज्ञानदेव हि मुक्तिःस्यान्नान्यथा वीरवंदिते ॥१०५॥
मुक्तिदा गुरुवागेका विद्याः सर्वं विडंबकाः ।
काष्ठभारश्रमादस्मादेकं संजीवनं परम् ॥१०७॥
अद्वैतंतु शिवेनोक्तं क्रियायासविवर्जितम् ।
गुरुवक्त्रेण लभ्येत नान्यथागमकोटिभिः ॥१०८॥
अद्वैतं केचिदिच्छंति द्वैतमिच्छंति चापरे ।
मम तत्त्वं न जानंति द्वैताद्वैतविवर्जितम् ॥११०॥
यावत् कामादि दीप्येत यावत् संसारवासना ।
यावत् इंद्रियचापल्यं तावत्तत्त्वकथा कुतः ॥११३॥
यावत् प्रयत्नवेगोस्ति यावत् संकल्पकल्पना ।
यावन्न मनसा स्थैर्यं तावत्तत्त्वकथा कुतः ॥११४॥
यावत् देहाभिमानश्च ममता यावदास्ति हि ।
यावन्न गुरुकारुण्यं तावत्तत्त्वकथा कुतः ॥११५॥

अशा प्रकारे परमतत्त्व न जाणल्यामुळे लोक क्लेश भोगत राहतात व शास्त्रातील सद्भावांचीही चुकीची व्याख्या करतात. पुष्कळसे अहंकारी लोक गुरुजनांपासून उपदेश न घेता व स्वतः उन्मनी अवस्थेचा अनुभव प्राप्त न करताच निष्कारण बडबड करीत राहतात. या संसारात लोक वेदशास्त्राचा अभ्यास करतात हे खरे आहे; परंतु संसाराचे खरे स्वरूप काय आहे हे जाणणारे लोक फार दुर्मिळ असतात. बहुतेक ज्ञानी किंवा पंडित परमतत्त्व जाणत नाहीत. ज्याप्रमाणे स्वयंपाकाची चव पळी जाणत नाही त्याप्रमाणेच हे लोक परतत्त्वस्पर्शशून्य असतात. ज्याप्रमाणे डोक्यावर ठेवलेल्या फुलांचा वास नाकच घेऊ शकते, डोके घेऊ शकत नाही,

त्याप्रमाणेच जे लोक वेदशास्त्राचा अभ्यास केल्यावर साधनरत न राहता परस्परात फक्त वादविवाद करीत राहतात त्यांना परमतत्त्वाचे ज्ञान होत नाही. संसारमोहाचा नाश होण्यासाठी नुसते शाब्दिक ज्ञान समर्थ ठरत नाही. नुसत्या दिव्याची चर्चा केल्याने ज्याप्रमाणे अंधार नाहीसा होत नाही त्याप्रमाणे नुसत्या चर्चेने, पांडित्याने व प्रवचनाने आत्मस्वरूपाची प्राप्ती होत नाही. हे देवी पार्वती ! हे ज्ञान आहे व हे ज्ञेय आहे अशा प्रकारचे शास्त्र नुसते ऐकण्याची जे लोक इच्छा करतात त्यांना एक हजार वर्षांचे आयुष्य प्राप्त झाले तरी ते शास्त्रातील अंतिम तत्त्वाची प्राप्ती करू शकत नाहीत. वेद आदि शास्त्रे अनेक असून मनुष्याचे आयुष्य अत्यंत थोडे व अनेक विघ्नांनी युक्त असे आहे. यासाठी ज्याप्रमाणे दूधपाण्यातून हंस दूधच ग्रहण करतो त्याप्रमाणे माणसाने शास्त्रांचे सार ग्रहण केले पाहिजे हे वीरवंदिते देवी ! केवळ वेदाध्ययनाने व शास्त्र शिकल्याने मुक्ती प्राप्त होत नाही. एकमात्र ज्ञानानेच कैवल्यप्राप्ती होते. यादृष्टीने पाहिले म्हणजे इतर सर्व विद्या या विडंबनकारक असून एकमात्र गुरूपदेश अर्थात् शक्तिपातयोगदीक्षाच मुक्ती देणारी आहे. सर्व विद्या या मोळीच्या ओझ्याप्रमाणे व्यर्थ असून ही सिद्धयोगाची एकमात्र विद्या संजीवनी-सारखी तारक आहे. भगवान् शिवशंकराच्या मुखातून प्रतिपादित झालेल्या अद्वैत तत्त्वज्ञानाच्या प्राप्तीसाठी बाह्य क्रियांच्या व्यर्थ परिश्रमाची आवश्यकता नाही; कारण कोटी कोटी वेदशास्त्रांच्या अध्ययनानेही प्राप्त न होणारी गोष्ट केवळ सद्-गुरूंच्या शक्तिपाताने प्राप्त होऊ शकते. काही लोक अद्वैत ज्ञानप्राप्तीची व काही द्वैत ज्ञानप्राप्तीची इच्छा करतात; परंतु मी तत्त्वतः द्वैताद्वैतविवर्जित आहे हे ते जाणत नाहीत. जोपर्यंत साधकाच्या ठिकाणी काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, संकल्प व विकल्पादि दोष तेवत आहेत, संसार भोगण्याची वासना आहे व इंद्रि-यांचे चांचल्य आहे तोपर्यंत परमतत्त्वाची कथा ऐकू येणेही कठीण आहे; मग प्राप्तीची गोष्ट तर खूपच दूरची आहे. जोपर्यंत अभीष्ट वस्तूच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करण्याचा वेग मनात शिल्लक असतो; संकल्प किंवा विकल्पाचा क्रम अव्या-हत चालू असतो व मन निश्चल नसते तोपर्यंत परमतत्त्वाचा स्पर्श किंवा अनुभूती येणे शक्य नाही. जोपर्यंत आपल्या शरीराचा अभिमान आहे; मोह, ममता इत्यादि शिल्लक आहेत व सद्गुरूच्या शक्तीचा संचार होत नाही तोपर्यंत परमतत्त्वाच्या प्राप्तीचा कधीही संभव असत नाही.

सिद्धयोगाची ही कथा गुरुकारुण्याने प्रकट होते व गुरुमुखातूनच शक्तिसंक्र-मणद्वारा शिष्याला प्राप्त होते. कोटी कोटी शास्त्रेही येथे असमर्थ ठरतात; त्यामुळे हे सर्वतंत्र स्वतंत्र साधन मी तुला सांगतो असे महादेव भवानीला सांगतांना "कुला-र्णवतंत्रात" पुढे म्हणतात—

तस्मात् वदामि तत्त्वं ते विज्ञाय श्रीगुरोर्मुखात् ।
सुखेन मुच्यते देवि घोरसंसारबंधनात् ॥१.१२०॥

ब्रह्माविष्णुगुहादीनां न मया कथितं पुरा ।
कथयामि तव स्नेहात् श्रुणुष्वैकाग्रमानसा ॥२.४॥

यासाठी मी तुला तत्त्वज्ञान सांगतो. ज्यावेळी हे तत्त्वज्ञान श्रीसद्‌गुरूंच्या मुखातून संक्रात होऊन शिष्यदेहात प्रवेश करते तेव्हा मनुष्य अत्यंत सुखाने या संसार बंधनातून मोकळा होतो. पूर्वी हे मी ब्रह्मा, विष्णू इत्यादींनाही सांगितले नाही. तुझ्यावरील प्रेमामुळे मी हे तुला सांगत आहे. तू ते एकाग्र चित्ताने ऐक.

अशा प्रकारे सर्व संविद्‌स्पंद आकळून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सर्वतंत्र स्वतंत्र साधन "सांगेन ज्ञानचिये भेटी । उपावो तुज ॥४.१८५॥" असे म्हणून "जो मनासी चाड न सांगे । प्रकृतीचें केलें नेघे । जो श्रद्धाचेनि संभोगें । सुखिया जाहला ॥४.१८७॥" असा श्रद्धेच्या म्हणजे चित्‌शक्ती कुंडलिनीने प्राप्त होणारा संभोगसुखाचा मार्ग सांगून यामुळे "तें ज्ञान पावे निश्चित ॥४.१८८॥" व "तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे ॥४.१८९॥" असे त्याचे निश्चित फल मिळते म्हणून कथन केले आहे. या ओवीतून सिद्धयोगाचे अत्यंत गुह्यतम शास्त्र श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केले आहे. या गोष्टीचा शास्त्रदृष्टचा विचार केला म्हणजे सामान्यजनांच्या दृष्टीने स्त्रीसंभोगाने प्राप्त होणाऱ्या सुखापेक्षा ह्या श्रद्धासंभोगाने होणारे सुख हे कोटीपटीने श्रेष्ठ कसे आहे याचा उलगडा होईल व खरा भोग कोणाला प्राप्त होतो हे स्पष्ट होईल. त्याचप्रमाणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञान प्राप्तीचे जे निश्चित फळ यामुळे मिळते म्हणून सांगितले आहे ते शिवशक्तीच्या सामरस्याने कसे सिद्ध होते हे प्रतीत होऊन सिद्धयोगाची सर्वतंत्र स्वतंत्र साधनाच्यारूपाने प्रतिष्ठा का आहे हे आत्मसात होईल. "कुलार्णवतंत्र, योगिनीतंत्र व मेरुतंत्रात" या प्रक्रियेचा उलगडा करताना असे म्हटले आहे की –

पराशक्त्यात्ममिथुनसंयोगानंदनिर्भरः ।
य आस्ते मैथुनं तत् स्यादितरे स्त्रीनिषेवकाः ॥५ ११२॥ कुलार्णवतंत्र ॥
सहस्रोपरि बिंदौ कुंडल्या मेलनं शिवे ।
मैथुनं शयनं दिव्यं यतिनां परिकीर्त्तितम् ॥६.४१॥ योगिवीतंत्र ॥
इडा पिंगलयोः प्राणान्सुषुम्णायां प्रवर्त्तयेत् ।
सुषुम्णा शक्तिरुद्दिष्टा जीवोऽयं तु परः शिवः ॥१॥ मेरुतंत्र ॥
तयोस्तु संगमो देवाः सुरतं नाम कीर्तितम् ।
वीर्यपातस्य समये सुषुम्णासन्न मारुते ॥२॥
उत्पद्यते तु यत्सौख्यं तस्मात् कोटिगुणं तु तत् ।
एतदेवरतं प्रोक्तं अन्यस्यात् रासभं रतम् ॥३॥

यावर टीका करून त्याचा अर्थ स्पष्ट करताना श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी "महायोग विज्ञान" ग्रंथात असे म्हटले आहे की, "जो योगीलोग पराशक्ति कुंडलिनी

देवीके साथ परशिवसे मिलकर मैथुन-संयोग संपादन कर आनंद उपभोग करते हैं, उस परमानंदके फलस्वरूप वे जन्ममरणके बंधनोंसे मुक्त होते हैं। वही दिव्य मैथुन करनेवाले योगी वास्तविक भोगी है। अन्य लोग तो स्त्री सेवन करनेवाले स्त्रीके सेवक हैं। शिवशक्तिके सम्मिलनका नाम संयोग है। सहस्रारमें चिद्रूप शिवके साथ कुंडलिनी शक्तिका मिलन करना योगियोंका दिव्य मैथुन और शयन कहलाता है। इडा और पिंगला नाडीमेंसे प्राणसमूहको सुषुम्णा नाडीमें प्रवेश कराना चाहिये। सुषुम्णाको शक्ति कहते हैं और प्राणरूप जीवको शिव कहते हैं। अतएव सुषुम्णा और प्राणके संगमको सुरत अथवा मैथुन कहते हैं। योगियोंको जो कुछ दिव्य सुख होता है वह सुषुम्णा विवरमें मन तथा प्राणके जानेसे होता है। वीर्यपातके समय जो सुख होता है उससे कोटिगुना सुख सुषुम्णामें प्राणवायुके स्थिर होनेसे होता है। साधारणतः मैथुनसे तेज और बलका क्षय एवं अवसाद होता है, परंतु इस दिव्य मैथुनसे तेज, बल और उत्साहकी वृद्धि होती है। इसीका नाम वास्तविक रमण है, बाकी और मैथुन तो गर्दभका रमण है।"

"भैरवयामलातही" योगी लोकांच्या दिव्य मैथुनाचा किंवा सुरताचा उपरोक्त भावच खालीलप्रमाणे व्यक्त केल्याचे दिसून येते. ते म्हणतात–

या नाडी सूक्ष्मरूपा परमपदगता सेवनीया सुषुम्णा<br>
सा कांतालिंगनार्हा न मनुजरमणी सुंदरी वारयोषित्।<br>
कुर्याच्चंद्रार्कयोगे युगपवनगते मैथुनं नैव योनौ<br>
योगींद्रो विश्ववंद्यः सुखमयभवने तां परिष्वज्य नित्यम्॥

सूक्ष्म रूपाची सुषुम्णानाडी ही परमानंदाला जाऊन पोहोचलेली किंवा पोहोचविणारी आहे. अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे मानवी देहाने दिसणारी सुंदरी ही वेश्येप्रमाणे असून तिला आलिंगन देऊन तिचे सेवन करणे योग्य नसून सुषुम्णा हीच आलिंगन देण्यास योग्य असून तीच सेवनीय कांता आहे. इडा व पिंगलेतून म्हणजे सूर्य व चंद्रातून वाहणारे बहिः प्राणांचे आकर्षण करून त्यांचे सुषुम्नेत चालन करून सहस्रचक्रांतर्गत परब्रह्माबरोबर सामरस्य किंवा संयोग प्राप्त करणे यालाच खरे दिव्य मैथुन म्हणतात. स्त्रीशी केलेला संभोग किंवा मैथुन हे मैथुनच नव्हे. हाच भाव "कल्याण मासिकाच्या शक्ति विशेषांकातील" "शक्तिस्वरूप-निरूपण" या लेखात पं. बाळकृष्णजी मिश्र यांनी व्यक्त करताना असे म्हटले आहे की, "सिद्धासनमें सुप्त शेषनागसदृश विद्युत-वर्ण अधोमुख कुंडलिनी–शक्तिको उठाकर पंचचक्रकमलमार्गसे चित्रिणी–नाडीद्वारा सहस्रदलकमलमें परमशिवके साथ संयोग करानेपर जो शक्ती और शिवमें सामरस्य होता है, उसीको मैथुन कहते है। और उस सामरस्यसे जो शक्तिरसरूप अमृत उत्पन्न होता है वही मद्य है। इसका प्रमाण यह है–

न मद्यं माधवीमद्यं मद्यं शक्तिरसोद्भवम् ।
सामरस्यामृतोल्लासं मैथुनं तत्सदाशिवम् ।।

कुंडलिनी शक्तीच्या जागरणामुळे सुषुम्नेमध्ये जो रसाविर्भाव उत्पन्न होतो त्यालाच खरे मद्य म्हणतात. सामान्य मद्य हे मद्यच नव्हे. त्याचप्रमाणे शक्तीच्या सुषुम्नांतर्गत प्रवेशामुळे शेवटी तिचे सदाशिवाशी सामरस्य होऊन जो दिव्य अमृताचा प्रवाह उपस्थित होतो त्याला मैथुन म्हणतात.

या दिव्य मैथुनाचा किंवा सुरताचा अर्थ कल्याण मासिकाच्या शक्तिविशेषांकात "पंचमकारका आध्यात्मिक रहस्य" या लेखाच्या तळटीपेत कवी श्रीदयाशंकर रविशंकर या लेखकाने शास्त्रकारांचे म्हणणे मांडन पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे.

रेफस्तु कुंकुमाभासकुंडमध्ये व्यवस्थितः ।
मकारश्च बिंदुरूपः महायोनौ स्थितः प्रिये ।।
अकारहंसमारुह्य एकता च यदा भवेत् ।
तदा जातो महानंदो ब्रह्मज्ञानं सुदुर्लभम् ।।
कुलकुंडलिनी शक्तिः देहिनो देहधारिणी ।
तया शिवस्य संयोगो मैथुनं परिकीर्तितम् ।।

रेफ कुंकुमवर्णाच्या कुंडामध्ये राहतो व मकार बिंदुरूप महायोनीमध्ये असतो. अकाररूपी हंसाचा आश्रय घेऊन जेव्हा ही दोन्ही एकरूप होतात तेव्हा अत्यानंदाची व सुदुर्लभ ब्रह्मज्ञानाची प्राप्ती होते. जे अशा प्रकारचे मैथुन करतात तेच खरे मैथुन-साधक होत. प्रत्येक जीवमात्राच्या देहामध्ये कुलकुंडलिनी शक्ती आहे. या शक्तीचा शिवाबरोबर संयोग करण्यालाच मैथुन असे म्हणतात.

अशा प्रकारे ज्ञानाच्या व शांतीच्या अत्यंत सूक्ष्म,निगूढ व रहस्यमय उपायाचे उद्‌घाटन त्याच्या फलासह श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं तो सांगावयास सुरुवात केल्या-बरोबरच स्पष्टपणें केले आहे. तो सवंच भाग अत्यंत मननीय आहे. ते म्हणतात-

तरी आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो कां सकळ विषयां ।
जयाच्या ठायीं इंद्रियां । मानु नाहीं ।।४.१८६।।
जो मनासीं चाड न सांगे । जो प्रकृतीचें केलें ने घे ।
जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहला ।।१८७।।
तयातेंचि गिंवसत । तें ज्ञान पावे निश्चित ।
जयामाजि अचुंबित । शांति असे ।।१८८।।
तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे ।
मग विस्तार बहु प्रगटे । आत्मबोधाचा ।।१८९।।
मग जेउती वास पाहिजे । तेउती शांतीची देखिजे ।
तेथ आपपर नेणिजे । निर्धारितां ।।१९०।।

ऐसा हा उत्तरोत्तरु । ज्ञानबीजाचा विस्तारु ।
सांगतां असे अपारु । परि असो आतां ॥१९१॥

अशा प्रकारे सुषुम्नेमध्ये प्रविष्ट होणाऱ्या प्राणांमुळे जे दिव्य संभोगसुख साधकाला प्राप्त होते त्यातच सर्व ज्ञानबीजाचा म्हणजे भगवंतांनी उपदेशिलेल्या गीतेचा व त्यांच्या संवित्‌शी आपली संवित्‌शक्ती एकरूप करून भगवान् श्रीगोपाल-कृष्णनाथांच्या हृदयातील गीतेचा भावार्थ तत्स्वरूपाने जाणण्याचा एकमात्र उपाय आहे. हा उपाय ज्ञानेश्वरीच्या सिद्धयोग दर्शनाने प्रकट करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जो विस्तार केला आहे, तो ते म्हणतात त्याप्रमाणे अपार आहे, हे निःसंशय आहे; कारण ही एकच प्रक्रिया "ऐसें हळुवारपण जरी येईल ॥६.२६॥, मग ज्ञानाचिये वेळे । झांकती जाणिवेचे डोळे ॥७.४॥, ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेंवि चित्ताचें चैतन्य जाहालें । जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥८.८५॥,तें चित्त चैत्यत्यागें । मातेंचि भजे ॥१८.१२६७॥, ऐसें चैत्यजातें सांडिलें । चित्त माझ्या ठायीं जडलें॥ १८. १२६८॥" इत्यादि नानाविध पद्धतींनी, शब्दांनी व प्रकारांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केली आहे. सिद्धयोगाचे हे रहस्य श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ओवीओवीत नव्हे त्यांच्या प्रत्येक शब्दात दडलेले आहे. ते "रसज्ञ व जेवणारे" असे होऊनच पाहिले व अनुभविले पाहिजे. या रहस्याचे पापुद्रे उलगडणार तरी किती ? ही आत्मबुद्धि-संभोगाने प्राप्त होणारी गोष्ट आहे. संभोगातून समाधीकडे जाण्याचा हा खरा सर्वतंत्र स्वतंत्र असा एकमेव सिद्धयोगाचाच मार्ग आहे.म्हणूनच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र ।
पैं कैवल्या ऐसें पवित्र । जें वैरियांही दिधलें ॥११.९८॥
म्हणौनि आघवींचि शास्त्रें । अविद्याविनाशाचीं पात्रें ।
वांचोनि न होतीं स्वतंत्रें । आत्मबोधीं ॥१८.१२३३॥
तेथ कीं माझें श्रोत्र । पाटाचें जालें जी पात्र ।
काय वानूं स्वतंत्र । सामर्थ्य श्रीगुरूचें ॥१८.१६१३॥

हे सद्‌गुरुराज श्रीकृष्णनाथा ! तुमचे औदार्य स्वतंत्र आहे; कारण तुमच्याशी अभेद्य असणाऱ्या या स्वातंत्र्यशक्तीच्या सामर्थ्याने पात्रापात्रतेचा विचार न करता तुम्ही शिष्यावर शक्तिपात करून औदार्याने त्याची स्वतंत्र चित्‌शक्ती कुंडलिनी जागृत करता. हे दान तुम्ही शत्रूलाही दिले आहे. म्हणून सर्व शास्त्रे ही अविद्येचा नाश करण्यास योग्य असली तरी या स्वतंत्र आत्मशक्तीच्या जागरणाशिवाय इतर कोणतीही शास्त्रे आत्मस्वरूपाचा बोध करून देण्यास स्वतंत्र नाहीत; कारण गुरूशी अभेद्यपणे व स्वतंत्ररूपाने विराजमान असलेल्या चित्‌शक्तीचे सामर्थ्य अलौकिक

आहे. अशा या श्रीगुरूच्या स्वातंत्र्य शक्तीचे कोठवर वर्णन करणार ? असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सर्वतंत्र स्वतंत्र साधनाच्या रूपाने विलसणाऱ्या सिद्धयोगाच्या मूलभूत किंवा पायाभूत तत्त्वाचे प्रकटीकरण केले आहे. महायोगी गोरक्षनाथ "महार्थमंजरीत" हा विषय स्पष्ट करताना म्हणतात—

**एकरसे स्वभावे उद्भावयन्ती विकल्पशिल्पानि ।**
**मायेति लोकपतेः परमस्वतंत्रस्य मोहनी शक्तिः ॥१७॥**

यावर भाष्य करताना स्वकृत "परिमल टीकेत" ते लिहितात,"परमेश्वराचा विश्वस्फुरणात्मक, आस्तित्वरूप, एकरस, एकभाव व स्वज्ञानानंदाच्या परिस्पंदाचे सौंदर्यच त्याचे सार किंवा स्वभाव आहे. तेथे नानाविध विकल्परूप शंका व भेद नाहीत. असे असूनही त्या पारमेश्वरभावावरच स्थिर-चर, घट–पट व चैत्र-मैत्रादि पदार्थांची कल्पना होते. सुवर्णावर नानाविध दागिन्यांचा आभास होतो त्याप्रमाणे हे कल्पित पदार्थ पाहून मूळ वस्तू अज्ञात तर राहतेच शिवाय कल्पित वस्तू खऱ्या वाटतात व मूळ सुवर्णादि खोटे वाटते. परमेश्वरीभावावर मुक्तबद्धाचे जे व्यत्यासाने ज्ञान होते ते मायाशक्तीमुळे होते ; कारण हा ईश्वर परमस्वतंत्र आहे....ही माया म्हणजे परमेश्वराचे सर्वोच्च स्वातंत्र्य होय. परमार्थसंग्रहात असे म्हटले आहे की, महेशाचे दुर्घट गोष्टी करण्याचे जे परमस्वातंत्र्य आहे ती दिव्य मायाशक्ती होय. ही शिवाचे आत्मरूप झाकणारे पांघरूण आहे. शचीमत ग्रंथात असे सांगितले आहे की, तू माझी स्वातंत्र्यशक्ती आहेस. अघटित करणारी आहेस. अस्मत्स्वामीला तू विश्वरूप बहाल करणारी आहेस. माया या नावाने तू प्रसिद्ध होशील. श्रीतंत्रालोकातही असे म्हटले आहे की, याचा स्वतंत्रपणा काय काय अघटित करील याचा नेम नाही." इतके सांगून पुढे ६७ व्या गाथेवर भाष्य करताना ते "कुलाचार्यमधिष्ठाय देवो दीक्षयिता शिवः ॥" असे आगमातील व "गुरुहृदय-निविष्टः शंकरोऽनुग्रहीता ॥" असे तंत्रालोकातील वचन उधृत करून आत्म-स्वरूप रहस्याचा उपदेशक जो गुरू त्याच्या शरीरात आपल्या अभेद्य स्वातंत्र्य शक्तीसह प्रविष्ट होऊन परमेश्वरच करुणेने म्हणजे शक्तिपाताने दीक्षा देऊन औपाधिक प्रमातृरूप जीवाला, शिष्याला किंवा साधकाला स्वातंत्र्यशक्तीच्या उन्मेषाने तारून नेतो असे स्पष्ट केले आहे. "गूढाद् गूढतरो भवति स्फुटादपि स्फुटतर एषः । देशिककटाक्षपाते पक्षः प्रथमो न भवति धन्यानाम् ॥ ६७ ॥" असे म्हणून या सर्वतंत्र स्वतंत्र साधनेचा महिमा त्यांनी गाइला आहे आणि "एतद् गुह्यं महागुह्यं कथयस्व मम प्रभो ॥" असे श्रीत्रिशिकाशास्त्रातले वचन स्वमत-परिपुष्टचर्थं दिले आहे." "प्रत्यभिज्ञाहृदयातही," "चितिः स्वतंत्रा विश्वसिद्धिहेतुः ॥ १॥" असे प्रथम सांगून ही शक्ती स्वतंत्र आहे व तीच पिंडब्रह्मांड निर्मितीला कारण आहे हे स्पष्ट केले आहे; व शेवटी "बललाभे विश्वमात्मसात्करोति

॥ १५ ॥ " असे म्हणून ही स्वतंत्र शक्ती जेव्हा गुरुकृपेने शक्तिपात होऊन आपले पारतंत्र्य टाकून बलवान होते म्हणजे जागृत होते तेव्हा ती पिंडब्रह्मांडाची संहारणी करते असे म्हटले आहे. म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी " भारतीय संस्कृति और साधना, " खंड एक, या ग्रंथातील " तांत्रिक दृष्टि " या लेखात याबद्दल आपले विचार स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, " वस्तुतः आत्मा अपनी शक्तिसेही विमोहित होकर अपने पंचकृत्यकारित्वको मानो भूला रहता है। इसका मूल उसकी अपनी इच्छा या स्वातंत्र्य है। फिर, जब स्वेच्छासे, अर्थात् शक्तिपातके प्रभावसे उसका बल उन्मीलित होता है, तब वह पूर्ण सर्वज्ञत्व एवं सर्वकर्तृत्वादिरूप अपने पारमेश्वरिक स्वभावमें सदाके लिए स्थित हो जाता है। " " तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि " या ग्रंथातील " शुष्कज्ञान और दिव्यज्ञान " या लेखात उपरोक्त लेखकाने जे विचार मांडले आहेत ते पाहिले म्हणजे श्रीगुरूंच्या स्वतंत्र शक्तीच्या सामर्थ्याचा शिष्यावर पात झाल्याशिवाय म्हणजे त्याचे श्रोत्र पाटाचे पात्र झाल्याशिवाय तो कृतार्थ होऊ शकत नाही, असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीगुरूंच्या स्वातंत्र्यशक्तीचा महिमा किती गाणार असे जे म्हटले आहे, त्याचे मर्म स्पष्ट होईल. ते म्हणतात, " महामायाकी देह एकमात्र भगवान्‌के अनुग्रहके बिना प्राप्त होनेकी संभावना नहीं हैं। यह अधोवर्ती कालके राज्यकी देह नहीं है। कुंडलिनी शक्ति जागकर चिन्मय ज्योतिद्वारा इस देहकी रचना करती है। सद्‌गुरुके कृपाकटाक्षके बिना सुप्त महामाया क्षुब्ध नहीं होती और देहकी रचना भी नहीं करती। इस देहका Spiritual Body नामसे St. Paul, St. John आदि पाश्चात्य साधकगण निर्देश कर गये हैं। गुरुशक्तिकी क्रियाके बिना यह देह उत्पन्नही नहीं होती। मलपाक, कर्मसाम्य आदि निमित्तोंकी सहायतासे अथवा निमित्तोंके बिना परमेश्वरके स्वातंत्र्य अथवा श्रीभगवान्‌की अनुग्रहशक्तिका संचार होनेपर विशुद्ध महामायासे यह देह रचित होती है एवं दीक्षार्थी शिष्यको यह प्राप्त होती है। इस देहके द्वारा शुद्ध आत्मकर्मका अनुष्ठान होता है एवं विशुद्ध वासनाक्षयका उपयोगी मार्ग खुल जाता है। इस देहका कार्य संपन्न हो जानेपर इसके प्रति भी वैराग्य हो जाता है एवं अपना आत्मस्वरूप,जो इससे भी भिन्न हैं, अनुभूत होता है। यही श्रेष्ठ कैवल्य अवस्था है। "

सारांश, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोग दर्शनरूप सर्वतंत्र स्वतंत्र साधनेचा असा हा अनुत्तर, अनुपमेय व अप्रतिहत महिमा " म्हणौनि माझ्या ठायीं। जाचावें न लगे कांहीं। मी लाभें इयें उपायीं। साचचि गा ॥ १८.१२२५ ॥ " अशा रीतीने सांगून " कीर्ति विजयाचा धेंडा। नाचे जो कां ॥१८.१७८१॥" असे जे म्हटले आहे त्याचा अर्थच असा आहे की, ज्ञानेश्वरीच्या रूपाने सिद्धयोगदर्शनांतर्गत सर्वतंत्र स्वतंत्र साधनेच्या महिम्याचा ध्वजच फडकत आहे.

## दिव्यचक्षूंचे उन्मीलनः——

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "मग दिव्यचक्षुप्रकाशु प्रगटला। तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला। ययापरी दाविता जाहला। ऐश्वर्य आपुलें ॥११.१७९॥" असे म्हणून दिव्यचक्षुप्रकाशरूप कुंडलिनी शक्तीचे जागरण हेच ज्ञानदृष्टीचे उन्मीलन होण्यास व परमात्म्याचे ऐश्वर्य दृष्टीस पडून अनुभूत होण्यास एकमात्र कारण आहे, असे स्पष्ट करून सिद्धयोग साधनेचा महिमा प्रकट केला आहे. मुळात गीतेतच "पुरुषं शाश्वतं दिव्यं ॥१०.१२॥" असे म्हणून परमात्मा हा शाश्वत व दिव्य आहे असे भगवंतांनी स्वतःच सांगितले असल्यामुळे "वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः। याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥१०.१६॥" या दृष्टीने ज्या विभूतींनी तू या लोकांस व्यापून राहतोस त्या आपल्या दिव्य विभूती सांगण्यास तूच खरोखर योग्य आहेस असे अर्जुन म्हणाला. ज्या योग्यतेचे व किंमतीचे साध्य आहे त्याच योग्यतेचे व तितक्याच पात्रतेचे साधन हवे. एक पैसा खिशात ठेवून सराफाच्या दुकानातील माणिक, मोती व हिरे खरेदी करणे शक्य नाही. त्यामुळे "तूं परम दैवत तिही देवां। तूं पुरुष जी पंचविसावा। दिव्य तूं प्रकृतिभावा—पैलीकडील ॥१०.१५०॥" अशा मायेच्या पलीकडील दिव्यशक्तीने युक्त असलेल्या परमात्म्याच्या दिव्य स्वरूपाशी अभिन्न असलेल्या विभूतींच्या प्रतीतीसाठी "जी तुझिया विभूती आघविया। परि व्यापिती शक्ति दिव्या जिया। तिया आपुलिया दावाविया। आपण मज ॥१०.१८५॥ जिहीं विभूतीं यया समस्तां। लोकांतें व्यापूनि आहासी अनंता। तिया प्रधाना नामांकिता। प्रकटा करीं ॥१८६॥" अशी अर्जुनाला सद्गुरुस्वामी श्रीकृष्णनाथांची प्रार्थना करावी लागली. अशा प्रकारचे दिव्यचक्षूंचे उन्मीलन फक्त सद्गुरूच करू शकतात; कारण त्यांच्या जवळ परंपराप्राप्त दिव्य शक्तीचा शिष्यावर पात करून त्याच्या अनादिनिद्रित कुंडलिनी शक्तीचे जागरण करण्याचे सामर्थ्य असते. ही गोष्ट दुसरा कोणीही करू शकत नसल्याने श्रीगुरुगीतेत सद्गुरूची प्रार्थना करताना असे म्हटले आहे की—

> अज्ञानतिमिरान्धस्य ज्ञानांजनशलाकया।
> चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ॥३४॥

अज्ञानरूपी तिमिराने अंध झालेल्या साधकाचे नेत्र ज्ञानरूपी अंजनशलाकेच्या द्वारे जो उघडतो तोच खरा गुरू होय. अशा गुरुदेवांना नमस्कार असो. "विषयविषाचा पडिपाडू। गोड परमार्थु लागे कडू। कडू विषय तो गोडू। जीवासी जाहला ॥१०.१५९॥" हीच जीवाची अज्ञानरूपी तिमिराने अंध झालेली स्थिती आहे. जोपर्यंत सद्गुरुकृपेने दिव्यचक्षूंचे उन्मीलन होत नाही तोपर्यंत "जी आंधळेयांच्या गांवीं। आपणपें प्रकटलें रवी। तरी तिहीं वोतपलीचि घ्यावी। वांचूनी प्रकाशु कैंचा? ॥१०.१५६॥" एवढेच जीवाच्या बाबतीत घडत असते. अर्जुनानेही

आपल्या सद्‌गुरुनाथ श्रीकृष्णांना यासाठीच अशी प्रार्थना केली की, सामान्य चर्मचक्षूंनी मी आपले दिव्यरूप पाहू शकणार नाही. तो म्हणतो–

जें अतींद्रिय म्हणौनि व्यवस्थिलें । केवळ ज्ञानदृष्टीचिया भागा फिटलें ।
तें तुम्ही चर्मचक्षूंपुढें सूदलें । मी कैसेनि देखें ? ॥ ११.१५९ ॥

अर्जुन अशी प्रार्थना करीत असला तरी स्थूल दृष्टीने तू मला पाहू शकणार नाहीस असा स्पष्ट सिद्धांतच यापूर्वी भगवंतांनी त्याला ऐकविताना असे म्हटले होते की–

म्हणौनि पुढतपुढती धनंजया । झणें विसंबसी या अभिप्राया ।
जें इया स्थूलदृष्टी वायां । जाइजेल गा ॥९.१४३॥
पैं स्थूलदृष्टी देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें ।
जैसें स्वप्नींचेंनि अमृतें । अमरा नोहिजे ॥१४४॥
एऱ्हवीं स्थूलदृष्टी मूढ । मातें जाणती कीर दृढ ।
परि तें जाणणेंचि जाणणेया आड । रिगोनि ठाके ॥१४५॥
जैसा नक्षत्राचिया आभासा–। साठीं घातु झाला तया हंसा ।
माजीं रत्नबुद्धिचिया आशा । रिगोनियां ॥१४६॥
सांगें गंगा या बुद्धी मृगजळ । ठाकोनि आलियाचें कवण फळ ।
काय सुरतरु म्हणौनि बाबुळ । सेविली करी ? ॥१४७॥
हार निळयाचाचि दुसरा । या बुद्धी हातु घातला विखारा ।
कां रत्नें म्हणौनि गारा । वेंचि जेंवीं ॥१४८॥
अथवा निधान हे प्रकटलें । म्हणौनि खदिरांगार खोळे भरिले ।
कां साउली नेणतां घातलें । कुहा सिंहें ॥१४९॥
तेवीं मी म्हणौनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची ।
तिहीं चंद्रासाठीं जेवीं जळींची । प्रतिमा धरिली ॥१५०॥
तैसा कृतनिश्चयो वायां गेला । जैसा कोण्ही एकु कांजी प्याला ।
मग परिणाम पाहों लागला । अमृताचा ॥१५१॥
तैसें स्थूलाकारीं नाशिवंतें । भरंवसा बांधोनि चित्तें ।
पाहती मज अविनाशातें । तरी कैंचा दिसें ? ॥१५२॥

अज्ञानाच्या स्थूल दृष्टीमुळे जीवाची अशी स्थिती होत असल्यामुळे किंवहुना ही स्थूल दृष्टी हेच अज्ञान असल्यामुळे अज्ञानतिमिर म्हणजे काय?, अज्ञानाने मनुष्य अंध होतो म्हणजे काय होते?, दिव्यचक्षूंच्या उन्मीलनाचा खरा कोणता अर्थ अभिप्रेत आहे?, दिव्यचक्षूंचे उन्मीलन कसे घडते?, अशा तऱ्हेने दिव्यचक्षूंचे उन्मीलन झाल्यावर कोणते अनुभव येतात?, व याचे कोणते फल साधकाला मिळते ? या सर्व प्रश्नांची यथार्थ उत्तरे आपण ज्ञानेश्वरीत शोधली तर सिद्धयोग

साधनाचा महिमा स्पष्ट होऊन साधकाच्या अंतःकरणात श्रीसद्गुरुमहिमेचा ठसा निरंतर उमटल्याशिवाय राहणार नाही.

अज्ञानतिमिर म्हणजे अज्ञानरूपी अंधकार अर्थात् ज्ञानविरहित स्थिती होय. हेच स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**ये-हवीं ज्ञान फुडें जालिया । अज्ञान जाणवे धनंजया ।**
**जें ज्ञान नव्हे तें अपैसया । अज्ञानचि ॥१३.६५४॥**

अशीच अज्ञानाची व्याख्या त्यांनी "अमृतानुभवातही" केली आहे.ते म्हणतात—

**अज्ञान जेथें असावें । तेणें सर्व नेणें होआवें ।**
**ऐसी जाति स्वभावें । अज्ञानाची ॥७.९॥**

अज्ञानाचा स्वभावधर्मच असा आहे की, ते जेथे राहील तेथें ते कशाचेही ज्ञान होऊ देत नाही. यामुळेच " शिवसूत्रविमर्शिनीकारांनी " अज्ञानाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की, "परमेश्वराने आपल्या स्वातंत्रशक्तीने प्रकाशित केलेल्या स्वरूपाचे आच्छादन करणाऱ्या महाशक्तीच्या योगाने आकाशसम व्यापक स्वरूपाच्या ठिकाणी शिवापासून तर मायामात्रापर्यंत जो काही चैतन्यस्वरूपाचा तत्त्वरूपाने संकोचाचा आभास दाखविला तेच शिवाचे ऐक्य प्रकट न होऊ देणारे अज्ञान असून त्याचा स्वभाव होय. त्यामुळे आत्म्याच्या ठिकाणी अनात्म्याचा अभिमान उत्पन्न होऊन आत्मैक्य भासत नाही. यालाच अज्ञान म्हणतात." श्रीमद्आद्यशंकराचार्यांनी "ब्रह्मसूत्र भाष्याच्या" सुरवातीला अज्ञानाची व्याख्या केली आहे.ते म्हणतात, "आत्मा, अनात्मा व त्यांचा परस्परांशी ऐक्यतेचा व्यवहार, प्रत्यक्षादिप्रमाणे व त्यांच्या योगाने कळणारे पदार्थ, सर्व प्रकारचे विधिशास्त्र व मोक्षशास्त्र इत्यादि जीवाला येणाऱ्या सर्व प्रकारच्या द्वैतप्रत्ययाला भ्रम कारण असून या भ्रमालाच अविद्या, माया किंवा अज्ञान म्हणतात." अशा या अज्ञानाचे स्वरूप भगवंतांनी स्थूल दृष्टीचे स्वरूप म्हणून कसे व्यक्त केले आहे हे आपण वर पाहिलेच आहे. मी म्हणून कृतनिश्चयाने प्रपंचात बुडी देऊन राहणे म्हणजे मी देहस्वरूप आहे असे वाटणे, जाणणेच जाणण्याच्या आड आल्याने जगत् सत्य वाटणे व हंस-नक्षत्रप्रतिबिंब, गंगा-मृगजळ, कल्पवृक्ष-बाभूळ, नीलमणी-सर्प, रत्ने-गारा, द्रव्य-निखारा व पडछाया-सिंह यांच्या दृष्टांताप्रमाणे भ्रमरूपाने आत्मविस्मृत होणे आणि कल्पनेने स्वतःला बांधून घेऊन कांजी पिऊन अमृताचा परिणाम पाहणे हेच अज्ञानाचे साररूप स्वरूप आहे. सर्व अज्ञानाच्या स्वरूपाच्या साराचेही सार ही कल्पनाच आहे. तीच माणसाला बंधन करते. यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तेसें भूतजात माझ्या ठायीं । कल्पिजे तरी आभासे कांहीं ।**
**निर्विकल्पीं तरी नाहीं । तेथ मीचि मी आघवें ॥९.९०॥**

म्हणौनि नाहीं आणि असे। हे कल्पनेचेनि सौरसें।
जें कल्पनालोपें भ्रंशे। आणि कल्पनेसवें होय ॥९१॥

येथपर्यंत अज्ञानतिमिराचे स्वरूप कसे असते याचा विचार केला. आता अज्ञानामुळे मनुष्य अंध होतो म्हणजे नेमके काय होते याचा विचार करू. संसाराला प्रवृत्त करणाऱ्या अवगुणांच्या समुदायात जो गुरफटून जातो तो मनुष्य अज्ञानाने अंध होतो. त्याची नित्यानित्यविवेकाची बुद्धी नाहीशी होते. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, दंभ, दर्प, अभिमान, कठीणपणा, मान, अपमान इत्यादि अनेक अवगुणांमुळे जो संसारप्रवाहात वाहत जातो,तो अज्ञानतिमिराने अंध झालेला असतो.श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मनुष्याचे ठिकाणी अज्ञान कसे भरलेले असते हे सांगताना १३ व्या अध्यायात असे म्हटले आहे की, "अज्ञानामुळे अंध झालेला मनुष्य मोठेपणा करताच जगतो. तो आपला मानसन्मान व्हावा म्हणून वाट पाहत राहतो. स्वतःचा सत्कार झाला म्हणजे अज्ञानी माणसाला आत्यंतिक संतोष होतो. तो अत्यंत गर्विष्ठ असतो. आपण अध्ययन केलेल्या विद्येचा विनाकारण पसारा मांडून त्या विद्येची बढाई मारतो. केलेल्या पुण्यकर्माचा तो खूप गाजावाजा करतो. अज्ञानी माणसाचे मन विकाराने अत्यंत मलीन झालेले असते;पण आपण धर्मपरायण आहोत हे दाखविण्यासाठी तो बाहेरून शरीराला भस्म, गंध इत्यादि लावींत असतो. दुसऱ्यांना मान देण्याचा प्रसंग आला की,अज्ञानी माणूस मागे सरतो. तो लोकांना ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगून फसवितो.ज्याच्या हातून असे घडते तो मनुष्य अज्ञानाने अंध झालेला असतो.

अज्ञानी माणसाच्या आचरणाने जगाला दुःख होते. तो जे बडबडतो ते भाल्यापेक्षाही तीक्ष्णपणे टोचते. त्याच्या बोलण्यातील गर्भित हेतू विषापेक्षाही मारक असतो. आवडती वस्तू प्राप्त झाली की, त्याला सुख होते व तिच्या वियोगाने तो खिन्न होतो. तो हर्षाने फुगून जातो व निंदेने डोके धरून बसतो. त्याला निंदा, अपमान, दुःख इत्यादींची उर्मी सहन होत नाही.

अज्ञानी माणूस वरवर पाहिले असता बोलण्यात व पाहण्यात मोकळा दिसतो; पण त्याच्या मनात मात्र अढी असते. तो शरीराने इतरांशी मिसळलेला दिसला तरी अंतःकरणाने पाठमोराच असतो.

अज्ञानी माणूस आपण ज्या गुरुसंप्रदायात दीक्षा घेतली त्या गुरुसंप्रदायाचा संबंध ठेवीत नाही व असा संबंध ठेवण्याची त्याला लाज वाटते. गुरूपासून विद्या प्राप्त होऊनही विद्येच्या अभिमानाने तो गुरूला तुच्छ लेखतो. तो शास्त्रप्रमाण मानत नाही व मन मानेल तसे वागतो. परधन व परस्त्री इत्यादींविषयी त्याला योग्यायोग्य विचार सुचत नाही. स्नानसंध्यादि कर्माची वेळ चुकली किंवा नित्यनैमित्तिक कर्मे राहिली तरी त्याचे त्याला दुःख वाटत नाही.

ज्याप्रमाणे मुंगी तृणाचे बीज सहज ओढते त्याप्रमाणे अज्ञानी मनुष्य थोडयाशा स्वार्थाकरिता देखील धैर्यापासून ढळतो. ज्याप्रमाणे पाय ठेवल्याबरोबर डबके कालाविले जाऊन गढूळ होते त्याप्रमाणे नुसते भीतीचे नाव ऐकल्याबरोबर त्याच्या अंतःकरणात कालवाकालव होऊन तो घाबरतो. पुरात पडून वाहत जाणाऱ्या दुध्या-भोपळयाप्रमाणे त्याचे मन मनोरथांच्या धारेत सापडून वाहत असते. वावटळीमुळे धूळ जशी आकाशात जाते त्याप्रमाणे दुःखाची वार्ता ऐकल्याबरोबर त्याचे चित्त अस्वस्थ होते.

अज्ञानी माणसाचे मन स्वार्थाने लिडबिडलेले, भीतीने घाबरणारे, अखंड मनोरथ करण्यात मग्न झालेले, दुःखाने अस्वस्थ होणारे, स्थिरता नसलेले व माकडाप्रमाणे चंचल असते. संयम, विधिनिषेध, पापाचरण, कुलाचार, वेदाज्ञा इत्यादींविषयी कोणते करणीय व कोणते अकरणीय हा विवेक त्याच्या ठिकाणी नसतो. देवाला वाहिलेला सांड जसा मोकाट फिरतो, वारा जसा मर्यादारहित वाहतो किंवा बांधलेल्या पाण्याचा पाट जसा अमर्याद वाहतो त्याप्रमाणे अज्ञानी माणूस वागत असतो. आंधळा हत्ती जसा मस्त व्हावा किंवा डोंगर जसा पेटावा तसे त्याचे चित्त विषयाचे ठिकाणी स्वैर सुटलेले असते.

जिवंतपणी व मेल्यावरही अज्ञानी माणसाच्या अंतःकरणातून विषयाची आसक्ती जात नाही. तो अखंड विषयभोगाकरिता श्रमून जातो. त्याला विषयवैराग्याचा अत्यंत तिटकारा वाटतो. विषय भोगताना त्याला शीण वाटत नाही व तो सावधही होत नाही. इतकेच नव्हे तर विषयसुख भोगण्याकरिता तो दुःखाच्या खाईत उडी घालतो. जन्मल्यापासून मरेपर्यंत विषयांपासून नाना प्रकारचे दुःख अनुभवले असताही विषयभोगाचा त्याला कंटाळा येत नाही. उलट त्याबद्दल त्याला अधिकच प्रेम वाटते.

देह हाच मी आत्मा होय अशी अज्ञानी माणसाची दृढ बुद्धी होते. विद्येने व वयाने तो मस्त होतो. मी श्रीमंत, श्रेष्ठ, सर्वज्ञ असे मानून गर्वाने तो अगदी चढून जातो. दुसऱ्याचे सुख पाहून त्याला बरे वाटत नाही. इतरांच्या सद्गुणांचा त्याला मत्सर वाटतो. शास्त्रज्ञान, तप, व्युत्पत्ती इत्यादींमुळे त्याला अमर्याद ताठा चढतो. अज्ञानी माणसाला जन्म, मृत्यू, जरा व व्याधी यांबद्दल त्रास वाटत नाही. उलट तारुण्याच्या उत्कर्षाने व संपत्तीच्या साहाय्याने शास्त्राने विहित व निषिद्ध असे दोन्ही प्रकारचे विषय काही विचार न करता तो सरसकट भोगीत जातो."

इतके सांगून झाल्यावर श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**न करावें तें करी । असंभाव्य मनीं धरी ।**
**चिंतूं नये तें विचारी । जयाची मती ॥१३.७७२॥**

रिघे जेथ न रिघावें। मागे जें न घ्यावें।
स्पर्शे जेथ न लागावें। आंग मन ।।७७४।।
न जावें तेथ जाये। न पाहावें तें जो पाहे।
न खावें तें खाये। तेणेंचि तोषें ।।७७५।।
न धरावा तो संगु। न लागावे तेथ लागु।
नाचरावा तो मार्गु। आचरे तो ।।७७६।।
नायकावें तें आइके। न बोलावें तें बके।
परि दोष होतील हें न देखे। प्रवर्ततां ।।७७७।।
आंगा मनासि रुचावें। येतुलेनि कृत्याकृत्य नाठवें।
जो करणेयाचेनि नांवें। मलतेंचि करी ।।७७८।।
परि पाप मज होईल। कां नरकयातना येईल।
हे कांहींचि पुढील। देखेना जो ।।७७९।।

"इतकेच नव्हे तर नव्या सुगंधाने युक्त अशा कमळाच्या केसराचे ठिकाणी जशी भ्रमरी सुवासाने लुब्ध होऊन त्यात गुंतून पडते त्याप्रमाणे अज्ञानी माणसाचे आपल्या घरावर, स्त्रीवर व मुलांवर प्रेम असते. त्याला स्त्री हीच सर्वस्व वाटते. स्त्रीदेहाचे ठिकाणी तो सर्वस्व भावाने आसक्त राहतो. त्यामुळे आपण कोण, कशासाठी जन्मलो, आपले जीवित ध्येय काय, त्यासाठी आपण काय केले पाहिजे हे सर्व काही तो विसरून जातो. आपल्या कुलदेवतेप्रमाणे तो स्त्रीची उपासना करतो. आपल्या स्त्रीकडे कोणी पाहिल्यास किंवा तिच्याविरुद्ध कोणी गेल्यास त्याला कल्पान्त झाल्याचे दु:ख होते.

अज्ञानी मनुष्य वैराग्याचे सोंग करून खोटी भक्ती दाखवितो; पण त्याच्या चित्तात विषयसुखाची उत्कट इच्छा असते. असा हा मनुष्य एकटा सर्व देवांचा भक्त आहे असे दाखवून एखाद्या वेश्येप्रमाणे गावातील सर्व देवांचे अखंड भजन करतो. तपोवन, तीर्थनद्यांचे तीर इत्यादि एकांतातील उत्तम स्थाने पाहून अज्ञानी माणसाला वीट येतो. त्याला लोकात राहण्यानेच सुख होते. गोंगाट व गर्दी यांचेच कौतुक वाटते. आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून देणाऱ्या सिद्धयोगस्वरूप अशा ब्रह्मविद्येचा तो उपहास करतो. तो उपनिषदांसारख्या तत्त्वग्रंथांकडे कधी वळत नाही. योगशास्त्र त्याला आवडत नाही. अध्यात्मज्ञानाचे ठिकाण त्याचे मन घेत नाही. आत्मचर्चा व आत्मकल्याण सोडून अज्ञानी माणसाची बुद्धी उन्मार्गगामी होते.

कर्मकांड, पुराणे, फलज्योतिष, शिल्पशास्त्र, पाकशास्त्र, अथर्ववेदातील अभिचारिक विधी, कामशास्त्र, संपूर्ण भारत, सर्व प्रकारचे नीतिशास्त्र, वैद्यशास्त्र काव्य, नाटक इत्यादि साहित्य, स्मृतिचर्चा, गारुडीविद्या, वैदिकशब्दकोश, व्याकरण व तर्कशास्त्र इत्यादि अनेकानेक शास्त्रात मनुष्य पारांगत, निपुण, अधिकारी व ज्ञाता

झाला तरीसुद्धा जोपर्यंत सद्‌गुरूंची गाठ पडत नाही, कृपा होत नाही व शक्ती जागृत होत नाही तोपर्यंत मनुष्य अज्ञानीच राहतो. मोराच्या अंगावर सर्वच डोळे असलेली पिसे असतात; पण त्या पिसांच्या डोळयांना दृष्टी मात्र नसते. त्यामुळे त्या डोळयांचा काहीही उपयोग होत नाही. त्याप्रमाणेच जेव्हा सद्‌गुरुकृपेने दिव्य-चक्षूंचे उन्मीलन होते, तेव्हा मात्र खरे अध्यात्मज्ञान हाती येते. जोपर्यंत शक्तिपात होऊन हे अध्यात्मज्ञान मिळत नाही तोपर्यंत अज्ञान उन्मळून पडत नाही."

अशा रीतीने अज्ञानामुळे जीव नानाप्रकारे अवगुण समुदायात गुरफटलेला दिसतो. याचे खरे कारण असे आहे की, अनादि कालापासून या संसारात रमल्या-मुळे विशुद्ध शक्तीचे स्फुरण जीवाला कधी जाणवतच नाही. जीव नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त असूनही तो आपण स्वत: अल्पज्ञ व अल्पशक्ती आहो अशी कल्पना करतो. संसाराचे सोंग घेऊन तो मायिक जगतात आपापल्या अधिकाराप्रमाणे वावरत असतो. त्यामुळे चैतन्यशक्ती वास्तविक जागृत असूनही ती जणू काही लुप्त झाली आहे असे त्याला वाटते. अशा या अवस्थेलाच अज्ञानतिमिरांधत्व किंवा कुंडलिनीची निद्रावस्था असे म्हणतात. ही शक्ती प्रबुद्ध किंवा जागृत करणे हाच खरा मानवी जीवनाचा उद्देश आहे; कारण हा उद्देश एकदा सफल झाला म्हणजे शक्ती एकदा जागृत झाली की, जीव हा जीवभावापासून मुक्त होऊन शिवभाव प्राप्त करून घेण्यास समर्थ ठरतो.

जीवाची घोरतम निद्रावस्था कशी संपेल व शक्ती कशी जागृत होईल हाच एकमात्र खरा प्रश्न आहे. हा प्रश्न दिव्यचक्षूंच्या उन्मीलनाचा खरा अर्थ प्राप्त झाला म्हणजे सहज सुटतो. यासाठी दिव्यचक्षूंच्या प्रकटीकरणाचा खरा कोणता अर्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांना अभिप्रेत आहे हे पाहणे इष्ट होईल. मुळात भगवंतां-नीच दिव्यचक्षूंचे उन्मीलन म्हणजे ज्ञानचक्षूंची किंवा ज्ञानांजनशलाकेची प्राप्ती होय असे गीतेत म्हटले आहे; कारण जीवाची घोरतम निद्रावस्था ज्ञानांजनशलाकेने दूर होते. ज्ञानांजनशलाका म्हणजे ज्ञानरूपी अंजन शिष्याच्या डोळयात घालणारे साधन होय. हे साधन किंवा ही शलाका म्हणजेच शक्तिपात होय. वेदान्तज्ञान अनुभवगम्य होण्यासाठी शक्तिपाताशिवाय दुसरा मार्ग नाही. शक्तिपाताने ज्ञानचक्षू प्राप्त होऊन मनुष्य कृतकृत्य होतो. म्हणून भगवंतांनी "गीतेत" असे म्हटले आहे की—

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥१३.३४॥**

जड, विकारी, क्षणिक व नाशवान गोष्टीला क्षेत्र म्हणतात. नित्य, चेतन, अविकारी व अविनाशी गोष्टीला क्षेत्रज्ञ म्हणतात. या दोन गोष्टींमधील म्हणजे क्षेत्र व क्षेत्रज्ञ यातील भेद व अंतर लक्षात घेऊन त्याचा अनुभव आला पाहिजे. तसेच भूतमात्रांची मूळ प्रकृती जी अविद्या तिच्यापासून सुटण्याचा मार्ग जाणला

पाहिजे. जड व चैतन्य यातील अंतर कळून मुक्तीचा उपाय हा ज्ञानचक्षूंमुळेच प्राप्त होतो. हे ज्ञानचक्षू शक्तिपाताशिवाय अन्य कशानेही प्राप्त होत नाहीत. यादृष्टीनेच "सूतसंहितेत" असे म्हटले आहे की–

**शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदान्तवाक्यजा।**
**यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः॥४.३४.२६॥**

वेदान्ताने प्राप्त होणारी विद्या जेव्हा शक्तिपाताच्या संयोगाने मिळते तेव्हा मनुष्य तत्क्षणीचा मुक्त होतो त्यात काहीच संशय नाही. याचा अर्थच असा आहे की, गुरू हा श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ असूनसुद्धा जर शक्तिपात करण्याचे म्हणजे दिव्यचक्षूंचे उन्मीलन करण्याचे सामर्थ्य त्याच्यात नसेल तर ज्ञानसमावेश होऊन शिष्याला त्याचक्षणी साक्षात्कार होऊ शकत नाही.

ज्ञानचक्षूंचे सामर्थ्य वर्णन करताना भगवंतांनीही "गीतेत" असे म्हटले आहे की–

**उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम्।**
**विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः॥१५.१०॥**

देह सोडून जाताना, देहात असताना, विषयादि भोग भोगताना अथवा गुण-युक्त असताना अज्ञानी लोक आपल्या स्वरूपास पाहत नाहीत. ज्यांना शक्तिपाताने ज्ञानदृष्टी प्राप्त झालेली असते ते मात्र स्वरूपास पाहतात. जीवाला अशी ज्ञानदृष्टी महद्भाग्यानेच प्राप्त होते.श्रवणेंद्रिय, चक्षुरिंद्रिय, स्पर्शेंद्रिय, वागिंद्रिय, घ्राणेंद्रिय व मन यांच्या साहाय्याने म्हणजे त्यांचा अभिमान धरून जीवात्मा विषयभोग भोगीत असतो. या विषय भोगातून व इच्छा आकांक्षेतून शक्तिपात झाल्याशिवाय सुटका होत नाही.

अनादिकालापासून मनुष्याची कुंडलिनीशक्ती निद्रित अवस्थेतच असते. यामुळे तो जी उपासना, धर्म, कर्म करतो त्याचे फल त्याला मिळत नाही. एवढेच नव्हे तर शक्तीच्या या निद्रावस्थेमुळे जीवाला वास्तविक सुखशांती कदापीही मिळू शकत नाही. केवळ वरवर पाहिले तर मनुष्य आपण मनाने सुखी व सत्कर्मरत आहोत असे मानत असतो; परंतु जेव्हा तो आपल्या अंतर्मनात डोकावतो तेव्हा त्याला हे पक्के कळून चुकते की, आपले जप, तप, ज्ञान, ध्यान, भक्ती, योग, धर्म, कर्म इत्यादि सर्वांचे फळ आपली कुंडलिनीशक्ती निद्रिस्थ असल्यामुळे अंधकारात झाकून गेले आहे. नुसते आपण आनंदी आहो, सुखी आहो असे मानल्याने वास्तविक सुख मिळतच नाही. आत्मशक्ती जोपर्यंत सुप्त असते तोपर्यंत खरे सुख मिळत नाही. हे खरे सुख प्राप्त व्हावे म्हणून आत्मशक्ती जागृत झाली पाहिजे. या जागृती-साठी शक्तिपातरूप ज्ञानांजनशलाकाच उपयोगी पडते. इतर सर्व गोष्टी अगदी

व्यर्थ ठरतात. "वराहोपनिषदात" या ज्ञानांजनशलाकेची अपरिहार्यता पटवून देताना असे म्हटले आहे की—

**अज्ञस्य दुःखौघमयं ज्ञस्यानंदमयं जगत् ॥२.२२॥**
**अंधं भुवनमन्धस्य प्रकाशं तु सुचक्षुषाम् ॥२३॥**

संसारी लोकांना संसार दुःखरूप भासत असतो. संसारात अनेक प्रकारचे कष्ट दुःख, ताप, दैन्य, हाल भोगावे लागल्याने तो अगदी नकोसा होऊन जातो; परंतु ज्यावेळी आत्मशक्ती जागृत होते त्यावेळी सगळा संसार सुखरूप आहे असे वाटू लागते. मनातून भय निघून जाते. वास्तविक संसार आहे तसाच सुखदुःखरूप राहतो; परंतु आत्मशक्तीच्या जागृतीमुळे द्वैतावस्था गिळली जाऊन आपण एकरूप, एकरस व एकमेवाद्वितीय असे चैतन्यरूप आहोत अशी जाणीव उत्पन्न होऊ लागली की, अज्ञानपटल दूर होऊन मल, विक्षेप, आवरणादि दोषांची पटले गळून पडू लागल्याने आत्मस्वरूपाच्या दिव्य ज्ञानाची प्रभा अंतःकरणात स्वतःच प्रकाशित होऊ लागते व दिव्यदृष्टी उत्पन्न होऊन जीव शिवस्वरूप होऊन आत्मानंदात विभोर होऊन जातो. आंधळ्याला सर्व जग अंधाराने भरून गेले आहे असे वाटते; परंतु शक्तिपाताने ज्याच्या ठिकाणी मीच ते ब्रह्म आहे अशी ज्ञानाची दिव्यदृष्टी उत्पन्न झालेली असते व आपल्या स्वसंवेद्य अशा ब्रह्मरूपात जो बुडून गेलेला असतो त्याला सर्व जगत् हे प्रकाशरूप होऊन जाते. तेथे अंधकाराचा लवलेशही असत नाही. अशी स्थिती प्राप्त होण्यासाठी शक्तिपातासह तत्त्वज्ञान प्राप्ती व्हावी लागते; कारण मायेचा निरास करण्याचे सामर्थ्य एकमात्र शक्तिपातात असल्याने त्याचा आश्रय हा जीवाच्या कल्याणासाठी अपरिहार्य असतो. यादृष्टीनेच "सूतसंहितांर्गत सूतगीतेत" असे म्हटले आहे की—

**तत्त्वज्ञानेन मायाया बाधो नान्येय कर्मणा ॥८.६॥**
**ज्ञानं वेदान्तवाक्योत्थं ब्रह्मात्मैकत्वगोचरम् ।**
**तच्च देवप्रसादेन गुरोः साक्षान्निरीक्षणात् ।**
**जायते शक्तिपातेन वाक्यादेवाधिकारिणाम् ॥७॥**

तत्त्वज्ञानानेच मायेचा निरास होतो. दुसऱ्या कोणत्याही कर्माने म्हणजेच मार्गाने होत नाही. वेदांतशास्त्राला संमत असलेल्या महावाक्यामुळे उत्पन्न होणारे जीव व ब्रह्माचे ऐक्य दाखविणारे असे ज्ञान देवाच्या प्रसादामुळे गुरूकडून प्रत्यक्ष दृष्टिक्षेप झाल्यामुळे शक्तिपात होऊन अधिकारी शिष्याला नुसत्या वाक्योच्चाराबरोबर अनुभवाला येते.

असा अनुभव आपल्याला प्रत्यक्ष यावा म्हणूनच अर्जुनाने भगवंताला त्याचे स्वरूप दाखविण्याची विनंती केली. तो म्हणाला, "हे प्रभो ! मला तू आपल्या स्वरूपाविषयी जे वर्णन करून सांगितलेस ते समजले; पण तुझे स्वरूप प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहण्याची व प्रत्यक्ष अनुभव घेण्याची माझी इच्छा आहे." अर्जुनाची प्रार्थना ऐकल्या-

बरोबर भगवान् श्रीकृष्ण म्हणाले, “अर्जुना ! माझी नाना प्रकारच्या दिव्य वर्णांनी व आकृतींनी युक्त असलेली शेकडो व हजारो अशी अनंत रूपे पाहा.” असे म्हणताक्षणीच मर्यादित देहस्वरूपाचा आकार एकदम लुप्त करून व अज्ञानाने उत्पन्न झालेला स्थूल दृष्टीचा पडदा दूर करून भगवंतांनी आपले योगाचे परम ऐश्वर्य प्रकट केले.

भगवंत प्रेमाने उतावीळ होऊन अर्जुनाला विश्वरूप पाहा असे एकसारखे म्हणू लागले; परंतु अर्जुन हे पाहील किंवा नाही याची त्यांना आठवण झाली नाही. अर्जुनाच्या ठिकाणी ते दाखवीत असलेल्या योगाच्या वैभवाचा अनुभव घेण्याचे सामर्थ्य नव्हते. तो स्तब्धच होता. मी विश्वरूप पाहतो आहे किंवा पाहत नाही असे तो काही म्हणाला नाही.

श्रीकृष्ण म्हणाले, “ अरे ! तुला मी विश्वरूप दाखविले, योगाचे अनुभव घेण्याची संधी दिली तरी तू स्तब्ध का ? तू हे विश्वरूप का पाहत नाहीस ?”

अर्जुन म्हणाला, “ प्रभो ! हा उणेपणा आहे खरा ! पण मी विश्वरूप पाहू शकत नाही. बगळा चांदण्याचे सेवन करू शकत नाही. आंधळा मनुष्य आरशात पाहू शकत नाही. बहिऱ्याला कान नसल्याने त्याला गाण्याचा आस्वाद घेता येत नाही. तशीच माझी स्थिती झाली आहे. हे विश्वरूप इंद्रियाने दिसण्याजोगे नाही. ते केवळ ज्ञानदृष्टीच्याच आटोक्यातील आहे. ते विश्वरूप तुम्ही माझ्या चर्मचक्षूंपुढे मांडले खरे; पण मी ते कसे पाहणार ? माझ्यावर अनुग्रह न करता योगाचे सामर्थ्य चर्मचक्षूंनी पाहा असे म्हणणे निरर्थक आहे. फुलातील मधाचा चारा जाणूनबुजून बेडकाला घालून वाया घालविण्यासारखेच हे आहे. जोपर्यंत आपण मला ज्ञानदृष्टी देत नाही तोपर्यंत सर्व व्यर्थ आहे.”

त्यावर भगवान् म्हणतात, “ अर्जुना ! तुझे म्हणणे मला मान्य आहे. वास्तविक विश्वरूप पाहण्याचे सामर्थ्य तुला आधी द्यावयास पाहिजे होते. पण प्रेमाच्या आवेगामुळे मला तो विचार सुचला नाही. काही झाले तरी मशागत न करता जमिनीत पेरलेला वेल नाश पावतो. ”

या सर्व संवादाचा अर्थच असा आहे की, जोपर्यंत भगवंतांनी अर्जुनाच्या दिव्य चक्षूंचे शक्तिपाताने उन्मीलन केले नाही तोपर्यंत तो त्यांचे योगाचे ऐश्वर्य स्वतः पाहू व अनुभवू शकला नाही. अर्जुनाला दिव्यदृष्टी देऊन योगाचे निरनिराळे अनुभव देत देत व ब्रह्माभिव्यक्तीची लक्षणे प्रकट करीत करीत त्याला स्वस्वरूप प्राप्तीच्या गंतव्य स्थानापर्यंत घेऊन जावयाचे असे भगवंतानी ठरविले होते. भगवंतांनी अर्जुनाला दिव्यदृष्टी देऊन त्याची ज्ञानज्योती कशी उजळली ते आपण पुढे पाहणार आहोत.

सारांश, ज्ञानांजनशलाकेचा खरा अर्थ सिद्धयोग असून ज्याप्रमाणे एखाद्या शलाकेने डोळयात अंजन घातल्यावर भूमिगत द्रव्याचा साठा दिसू लागतो त्याप्रमाणे सिद्धयोगाने आपण जन्मजन्मांतरापासून ज्या मूळ आत्मस्वरूपास वंचित राहिलो ते चैतन्यरूप आपल्याला प्राप्त होते. हे आत्मरूप दुसरीकडून कोठून बाहेरून यावयाचे नसते. ते प्रत्येकाच्या ठिकाणी स्वयंसिद्ध असते. त्यावर मलविक्षेपआवरणादि जे झाकण पडलेले असते त्यामुळे ते दृष्टिगोचर होऊन त्याचा अनुभव येऊन त्याच्याशी एकरूपता होत नाही. जेव्हा केव्हा श्रीसद्‌गुरूंची गाठ कर्मसाम्य दशा प्राप्त होऊन किंवा अन्य प्रकाराने पडते तेव्हा "तस्य प्रसादयुक्तस्य विद्यावेदान्तवाक्यजा। दहत्यविद्यामखिलां तमः सूर्योदये यथा॥ सूतसंहिता चतुर्थखंड अध्याय ३५-२४॥" म्हणजे ज्याप्रमाणे सूर्योदय अंधकाराला दूर करतो त्याप्रमाणे वेदांत वाक्यापासून दिव्यचक्षूंचे उन्मीलन झाल्याने उत्पन्न होणारी ही विद्या ज्याला शक्तिपात योगरूप दीक्षा सद्‌गुरुप्रसादाने प्राप्त झाली आहे त्याची सर्व अविद्या जाळून टाकण्याची प्रक्रिया घडवून आणते.

येथपर्यंत ज्ञानांजनशलाकेचा खरा अर्थ व तिचे माहात्म्य काय आहे हे पाहिले. आता ज्ञानांजनशलाकेमुळे म्हणजे शक्तिपातामुळे दिव्यचक्षूंचे उन्मीलन कसे घडून येते हे पाहवयाचे आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीज्ञानेश्वरीच्या दहाव्या, अकराव्या व पंधराव्या अध्यायांत याचा अगदी सूक्ष्मतेने विचार केला आहे. भगवंतांनी गीतेच्या दहाव्या अध्यायात "ददामि बुद्धियोगं तं ॥१०.१०॥" मी माझ्या भक्तांना बुद्धियोग म्हणजे प्राणस्वरूप ज्ञानयोग देतो व "तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥१०.११॥" असे म्हणून मी माझ्या भक्तांवर दया करण्यासाठी त्यांच्या ठिकाणी जागृत शक्तीच्या रूपाने उपस्थित होऊन तेजस्वी देदीप्यमान अशा त्या ज्ञानदीपाने म्हणजे जागृत शक्तीने अज्ञानामुळे उत्पन्न झालेला अविवेक घालवितो असे स्पष्ट केले आहे. एवढेच नव्हे तर "यंततोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंतचेतसः ॥१५.११॥" असा निषेधात्मक उल्लेख करून वरील सिद्धांत "यतन्तो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् ॥१५.११॥" म्हणून दृढपणे मांडला आहे. याचा अर्थ असा आहे की, जे यत्न करणारे योगी नुसत्या स्वबलोपायाने अर्थात सद्‌गुरुकृपेने जागृत शक्तिसंपन्न न होता म्हणजे अचेतस राहून 'अकृतात्मनः' म्हणजे शक्तिपाताने व शक्तिसंचाराने चित्त संस्कृत न करता अर्थात् सुषुम्नेची प्राणगतीची वाट मोकळी न करता आत्म्याला पाहण्याचा प्रयत्न करतात ते त्याला पाहत नाहीत. मात्र ज्यांना ही शक्तिजागृती म्हणजे ज्ञानदृष्टी प्राप्त झालेली आहे ते यत्न करणारे योगी आत्मस्वरूपाला बुद्धीत म्हणजे प्राणात किंवा शक्तीत असलेला पाहतात. या सर्वांचा अर्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

ऐसी श्रीमुखौनि अक्षरें। निघती ना जंव एकसरें।
तंव अविद्येचे आंधारें। जावोंचि लागे ॥११.१७७॥
तीं अक्षरें नव्हती देखा। ब्रह्मसाम्राज्यदीपिका।
अर्जुनालागीं चित्कळिका। उजळलिया श्रीकृष्णें ॥१७८॥
आतां येणें वचन तेजाकारें। फिटलें आंतील बाहेरील आंधारें।
म्हणौनि देखतसें साचोकारें। स्वरूप तुझें ॥१०.१४८॥
तयां तत्त्वज्ञां चोखटां। दिवी पोतासाची सुभटा।
मग मीचि होऊनि दिवटा। पुढां पुढां चालें ॥१०.१४२॥
अज्ञानाचिये राती–। माजीं तमाचि मिळणी दाटती।
तें नाशूनि घालीं परौती। तयां करीं नित्योदयो ॥१४३॥

श्रीसद्‌गुरूंच्या मुखातून निघालेल्या अक्षरांमुळे शब्ददीक्षा होऊन नित्य अशा शक्तीचा उदय होऊन त्या शक्तीच्या रूपाने परमात्माच मशालजी बनून साधकाच्या पुढे पुढे चालत सुषुम्नामार्गाने त्याला घेऊन जातो. त्यामुळे अज्ञान, तम, अंधार इत्यादि सर्व दूर होऊन साधक ब्रह्मसाम्राज्यपदी आरूढ होतो. ही सर्व दीक्षाप्रक्रिया एकमात्र सद्‌गुरूंच्या अनुग्रहानेच म्हणजे केवळ साक्षात्कारी शक्तिवेधाने संपन्न होत असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

कैसें अनुग्रहाचें करणें। पार्थाचें पाहणें आणि न पाहणें।
तयाही सकट नारायणें। व्यापूनि घेतलें ॥११.२३०॥
बाप साक्षात्काराचा वेधु। कैसा देशधडी केला बोधु।
हा गुरुशिष्यसंबंधु। विपायें नांदे ॥३७०॥
तैसें माझिये साक्षात्कारीं। सरे अहंकाराची वारी।
अहंकारलोपीं अवधारीं। द्वैत जाय ॥६९४॥
नातरी गुरुकृपेसवें। वोसरलेया प्रपंचज्ञान आघवें।
स्फुरे तत्त्व तेवीं पांडवें। श्रीमूर्ति देखिली ॥६५६॥

अशा प्रकारे दिव्यचक्षूंचे उन्मीलन झाल्यावर कोणते अनुभव येतात हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ऐसें अगाध माहात्म्य। जें सकळमार्गैकगम्य। जें स्वात्मानुभवरम्य। तें इयापरी दाविलें ॥११.७३॥" असे म्हणून वर्णन केले आहेत. दहाव्या अध्यायातील भगवंतांनी अर्जुनाला अनुभूतीस आणून दिलेल्या आपल्या सर्व दिव्य विभूती व अकराव्या अध्यायातील विश्वरूपदर्शनाचा दाखविलेला सोहळा हे सर्व दिव्यचक्षूंच्या उन्मीलनाने म्हणजे शक्तिपाताने शक्ती जागृत झाल्यावर येणारे अनुभव आहेत. त्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विस्ताराने वर्णन केले आहे ते मुळातूनच पाहावे. या दिव्यांजनामुळेच म्हणजे दिव्यचक्षूंच्या उन्मीलनामुळेच सहजयोगाचा अभ्यास शक्य आहे असा त्यांचा स्पष्ट अभिप्राय असल्यामुळे ते म्हणतात–

तेथ सवेंवा आणि पायाळा। वरि दिव्यांजन होय डोळां।
मग देखे जैसी अवलीला। पाताळधनें ॥६.४५८॥
तैसें दुर्भेद जे अभिप्राय। का गुरुगम्य हन ठाय।
तेथ सोरसेंवीण जाय। बुद्धि तयाची ॥४५९॥
बळियें इंद्रियें येती मना। मन एकवटे पवना।
पवन सहजें गगना। मिळोंचि लागे ॥४६०॥
ऐसें नेणों काय अपैसें। तयातेंचि कीजे अभ्यासे।
समाधि घर पुसे। मानसाचें ॥४६१॥

योगाभ्यासाने अशा दिव्य अनुभूती येत असल्या तरी त्या इतक्या अद्‌भुत, महातेजस्वी, अपूर्व व अलौकिक असतात की, तेथे दिव्यचक्षूंचेही तेज अपुरे पडते कारण " नवल अंग्रप्रभेची नवाई " म्हणजे अंगाप्रभारूप कुंडलिनी शक्तीचे नवल उपरोक्त अनुभूतींपेक्षा अत्यंत आश्चर्यकारक असते हेच होय. हे स्पष्ट करताना ते म्हणतात–

परी कायसें बा हें चोज। विस्मयो करावयाहि पाडू नाहीं मज ।
चित्त होऊनि जातसें निर्बुज। आश्चर्यें येणें ॥११.२९८॥
हे एथ आथि कां येथ नाहीं। ऐसें श्वसोंही नये कांहीं।
नवल अंगप्रभेची नवाई। कैसी कोंदली संघ ॥२९९॥
एथ अग्नीचीही दिठी करपत। सूर्य खद्योतु तैसा हारपत।
ऐसें तीव्रपण अद्‌भुत। तेजाचें यया ॥३००॥
हो कां महातेजाचिया महार्णवीं। बुडोनि गेली सृष्टी आघवी।
कीं युगांतविजूंच्या पालवीं। झांकलें गगन ॥३०१॥
ना तरी संहारतेजाचिया ज्वाळा। तोडोनि माचू बांधला अंतराळां।
आतां दिव्य ज्ञानाचिया डोळां। पाहवेना ॥३०२॥
उजाळु अधिकाधिक बहुवसु। घडाडीत आहे अतिदाहसु।
पडत दिव्यचक्षूंसही त्रासु। न्याहाळितां ॥३०३॥

ही दिव्यशक्ती म्हणजे जागृत शक्ती कुंडलिनीच होय; कारण " त्या दिव्य-चक्षूंचेनि पैसें ॥११.२६६॥" म्हणजे दिव्यचक्षूंच्या बळाने असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्टच म्हटले आहे. " बललाभे विश्वमात्मसातकरोति ॥१५॥ " असा " प्रत्यभिज्ञाहृदयकारांनी " तिचा उल्लेखही केला आहे. जागृती हेच शक्तीचे बळ होय. ते एकदा गुरुकृपेने प्राप्त झाले की, ती सर्व विश्वप्रपंचरचना गिळून टाकते हे निस्संशय सत्य आहे. त्यामुळे " डोळे प्रसादाचीं राउळें करिती ॥११.६५॥, उन्मीलन होत आहे दिठी ॥११.१४१॥, ज्ञानदृष्टी फांटा फुटला ॥११.१७९॥, जियो प्रभेचिये झळाळा ॥११.२१२॥, तेथेंचि ज्ञानाचिया डोळां ॥११.२१४॥, दिव्य ज्ञानाचिया

डोळां ॥११.३०२॥, लोचनां भाग्य उदेलें ॥११.३३८॥" इत्यादि सर्व ओव्यातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त एकच एक प्रक्रिया प्रकट केली आहे हे स्पष्ट होते. हा सर्व स्वरूपप्रळय करणाऱ्या शक्तीचा अद्‌भुत विलास असल्यामुळे व तो आधारदुर्बलतेमुळे किंवा अपात्रतेमुळे जीवाला सोसवत नसल्यामुळे म्हणजे अशुद्ध शरीरामुळे अगर नाडीशुद्धी झालेली नसल्यामुळे कुंडलिनी शक्तीचे जागृत अवस्थेतील तेज सहन करण्याची साधकाची पात्रता नसल्यामुळे तो अर्जुनाप्रमाणे प्रार्थना करताना म्हणतो की—

संहारसमयींचा चंडानिळु । आणि महाकल्पांत प्रलयानळु ।
या दोहीं जैं होय मेळु । तैं काय एक न जळे ? ॥११.३७९॥
तैसीं संहारकें तुझीं मुखें । देखोनि धीरु कां आम्हां पारखे ? ॥
आतां भुललों मी दिशा न देखें । आपणपें नेणें ॥१८०॥
मोटकें विश्वरूप डोळां देखिलें । आणि सुखाचें अवर्षण पडिलें ।
आतां जापाणीं जापाणीं आपुलें । अस्ताव्यस्त हें ॥१८१॥
ऐसें करिसी म्हणौनि जरी जाणें । तरी हे गोष्टी सांगावीं कां मी म्हणें ।
आतां एक वेळ वांचवी जी प्राणें । या स्वरूपप्रळयापासोनि ॥१८२॥
जरी तूं गोसावी आमुचा अनंता । तरी सुईं वोडण माझिया जीविता ।
सांटवीं पसारा हा मागुता । महामारीचा ॥१८३॥
आईकें सकळ देवांचिया परदेवते । तुवां चैतन्यें गा विश्व वसतें ।
तें विसरलासि हें उपरतें । संहारूं आदरिलें ॥१८४॥
म्हणौनि वेगीं प्रसन्न होईं देवराया । संहरीं संहरीं आपुली माया ।
काढीं मातें महाभया–। पासोनियां ॥१८५॥
हा ठायवरी पुढतपुढतीं । तूंतें म्हणिजे बहुवा काकुळती ।
ऐसा मी विश्वमूर्ती । भेडका जाहलों ॥१८६॥

येथपर्यंत दिव्यचक्षूंच्या अनुभूतींचे व तत्संबंधीच्या अंगोपांगाचे वर्णन केले. आता दिव्यचक्षूंच्या उन्मीलनामुळे कोणते फल साधकाला मिळतें हे पाहवयाचे आहे. "ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची फलनिष्पत्ती" या ११ व्या प्रकरणात याचे सविस्तर वर्णन केले असल्यामुळे येथे ते विस्ताराने करण्याचे कारण नाही. तरीही श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात थोडक्यात पाहवयाचे झाले तर असे सांगता येईल की—

जाणिजे योगपीठाचा भैरवु । काय हा आरंभरंभेचा गौरवु ।
कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु । रूपा आला ॥६.४६२॥
मग भूतें हें भाष विसरला । जे दिठी मीचि आहें सूदला ।
म्हणौनि निर्वैर जाहला । सर्वत्र भजे ॥११.६९८॥

साधक आरंभरंभा कुंडलिनी शक्तीच्या महिम्याने योगपीठाचा भैरव जो शंकर तत्स्वरूप होतो. त्यामुळे सर्व विश्वप्रपंचाची व भूतमात्रांची निमिलित स्थिती त्याला प्राप्त होऊन खऱ्या अर्थाने तो निर्वेद होतो व दिव्यचक्षूंच्या उन्मीलनाने आपणच सर्वत्र भरून राहिलो आहोत हृया नित्योदित भावाच्या अखंड जागृतीमुळे त्याच्याकडून सर्वत्र भजे असे भजन घडून येते. हेच अद्वयभजन होय. म. म. श्रीगोपीनाथ कविराज " भारतीय संस्कृति और साधना, " खंड एक, या ग्रंथातील " चक्षुका उन्मीलन " या लेखात उपरोक्त सर्व विचारांचे सार सांगताना असे म्हणतात की, " अज्ञानका वास्तविक स्वरूप है– जगत्‌को अपनी आत्मासे भिन्न देखना। वास्तवमें जगत् अपनी आत्मासे भिन्न नहीं है, वह आत्माकाही तिरोहित प्रकाश है। जब सद्‌गुरुके अनुग्रहसे शुद्ध-ज्ञानका अंकुर हृदयमें रोपा जाता है, तब योगीकी दृष्टिमें द्वितीय बोध रहताही नहीं। उस समय प्रत्येक वस्तु पहले अपनी सत्ताके विसृष्ट अंशमात्र प्रतीत होती है, अर्थात समग्र विश्व तब शिवरूपी आत्माका शक्तिरूप धारण करता है। इसका नाम है– दिव्य चक्षुका उन्मीलन, एवं उसके द्वारा सत्य वस्तुका निरीक्षण। यादि गुरुरूपी आत्मा अपनी शक्तिसे कुंडलिनीको जाग्रत् कर उसे ऊर्ध्वमुख होनेकी प्रेरणा न दे, तो यह महान् परिवर्तन कदापि संभव नहीं हो सकता। भेद-ज्ञान हट जाने पर प्रत्येक वस्तुके साथ व्यक्तिगत अभेदका ज्ञान जाग जानेसे संपूर्ण विश्वही अपना अभिन्नरूप ज्ञात होता है, यही प्रेमकी अभिव्यक्ति है। इसका भी मूल पूर्वोक्त गुरुकृपासे उत्पन्न अभेददृष्टिका उन्मेष है। अतएव मलका परिपाक होनेपर गुरुकृपाका उदय हो अथवा गुरुकृपाके आविर्भावके कारण मलपरिपाक हो, जिस किसी दृष्टिसे प्रज्ञादृष्टिका उन्मीलन होनेपरही ब्रह्मस्वरूप इस महाज्ञानका उदय होता है, जिससे जीवनमुक्ति स्वभावतः फूट उठती है। यही जीवनकी चरम सफलता है एवं इसकी प्राप्तिके मूलमें है– श्रीगुरुका अनुग्रह। " हेच साररूपाने सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

ऐसा कृतकृत्य केला स्वामी। बहुवे लळा पाळिला तुम्हीं।
दाविलें जें हरब्रह्मीं। नायकिजे कानीं ॥११.५८३॥
तेथ डोळचां देखी होआवी। हे गोठिचि कायसया करावी।
किंबहुना पूर्वीं। दृष्ट ना श्रुत ॥५८८॥
तें हें विश्वरूप आपुलें। तुम्हीं मज डोळां दाविलें।
तरी माझें मन झालें। हृष्ट देवा ॥५८९॥

अशी कृतकृत्यता व हृष्टता प्राप्त होणे हाच दिव्यचक्षूंच्या उन्मीनाचा खरा महिमा होय.

**अंतरंग साधनः–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " एक अंतरीं निश्चळ। जें निहाळितां केवळ। विसरले सकळ। संसारजात ॥ २.१७२ ॥ " असे सुरुवातीलाच सांगून शेवटी

" तैसें अध्यात्मशास्त्रीं यिये । अंतरंगचि अधिकारिये ॥ १८.१७५० ॥ " म्हणून अंतरंग साधनरूप सिद्धयोगाचा आद्योपांत गौरव केला आहे. आतापर्यंत ज्या विविध रूपांनी व नावांनी सिद्धयोग हे गौरवाचे लेणे घेऊन कसा सजला, धजला व प्रभायुक्त झाला हे आपण पाहिले त्या सिद्धयोगाच्या सर्व विविध रूपांचे, नावांचे व प्रभेचे सार " अंतरंग साधन " या दोन शब्दात एकवटलेले आहे. किंवहुना हाच सिद्धयोग साधनेचा साररूप महिमा आहे; कारण अंतरंग म्हणजे कुंडलिनी शक्ती जेव्हा सद्‌गुरुकृपेने जागृत होते तेव्हाच साधकाचे खरे अंतस्थ साधन सुरू होते व त्याला रंग भरतो. ही शक्तीच जागृत अवस्थेत खऱ्या अर्थाने साधकाला आतमध्ये रंगविते, रमविते, मस्त करते, धुंद करते व विश्वाभास मावळून टाकून शिवाशी समरस करून साधकाला आनंदविभोर करते. या अर्थानेच अंतरंगाचा ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती व इच्छाशक्ती म्हणून श्रीअभिनवगुप्तांनी "मालिनीविजयवार्तिकात" गौरव केला आहे. ते म्हणतात–

> यः प्रकाशः स एवायं प्रतिभाति तथा तथा ।
> नैव चान्यस्य कस्यापि स तु भात्येव केवलम् ॥१.८६॥
> स एव परमोदारः सर्वस्यैवावभासकः ।
> स्वतंत्र इति तस्येच्छा शक्तिःस्वातंत्र्यसंज्ञिता ॥८७॥
> स च स्वात्मनि विश्रांतस्तदन्याभावयोगतः ।
> स्वात्मविश्रांतिरेवैषा देवस्यानंद उच्यते ॥८८॥
> स्वातंत्र्यमहिमा वास्य स्वरूपादपृथक्स्थितिः ।
> स्वप्रकाशे निजे धाम्नि भासयेद्भावविभ्रमान् ॥८९॥
> भासना च क्रियाशक्तिरिति शास्त्रेषु कथ्यते ।
> यया विचित्रतत्त्वादिकलना प्रविभज्यते ॥९०॥
> भासनानवभाते च कथं नाम प्रकल्पते ।
> तदवस्थान्तःस्थितं भानं ज्ञानशक्तिरहं स्मृता ॥९१॥

कुंडलिनी शक्तिरूप जो अंतरंग प्रकाश आहे तोच तसा तसा भासतो. हा अंतरंग प्रकाश दुसऱ्या कुणाचा व दुसऱ्या कुणाला नसून तो तिचाच केवळ अंतरात भासत असतो. हा प्रकाश शिवरूप असून तोच सर्व वस्तूंचा प्रकाशक, परम उदार, श्रेष्ठ व स्वतंत्र आहे. या अंतरंग प्रकाशरूप शिवाच्या इच्छाशक्तीला स्वातंत्र्य असे नाव आहे. दुसरा कोणताही पदार्थ नसल्यामुळे म्हणजे सर्व पदार्थ शिवशक्ति-स्वरूप असल्याने किंवा तद्‌भिन्न नसल्याने तो शिवशक्तिरूप साधक-जीव स्वात्म-स्वरूपातच विश्रांती घेतो. अशा प्रकारे अंतरंगात रंगल्यामुळे प्राप्त होणाऱ्या आत्मविश्रांतीलाच देवाचा आनंद म्हणतात. शिव स्वतःच्या तेजोरूप स्वप्रकाशात भावविभ्रम म्हणजे पदार्थांची विविधरूपे व अवस्था भासवितो. या भासनक्रमाला

क्रियाशक्ती असे नाव आहे. या क्रियाशक्तीमुळेच विचित्रतत्त्वांची विभागणी होते. या भासनशक्तीच्या अंतरंगात काही नसेल तर ती भासेल कशी ? तर आतमध्ये असलेले भान म्हणजेच ज्ञानशक्ती आहे.

अशी इच्छाज्ञानक्रियात्मक अंतरंग शक्तीची वास्तविक स्थिती असल्यामुळे गुरुकृपेने ती उद्‌भासित झाल्यावर जीवाच्या पूर्वजन्मकर्माच्या संस्काराप्रमाणे त्याच्या ठिकाणी तिचा विलास दिसून येतो व त्यानुसार अंतरंग साधन संपन्न होते. अंतरंग शब्दाचा अर्थ चित्‌शक्ती कुंडलिनीरूपी सत्ताच होय व तीच उपरोक्त पद्धतीने जगदाभास दाखविते हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी सच्छब्दें येणें । आटूनि असताचें नाणें ।
दाविजे अव्यंगवाणें । सत्तेचें रूप ॥१७.३८०॥
जें सत् तेंचि काळें देशें । होऊं नेणेचि अनारिसें ।
आपणपां आपण असे । अखंडित ॥३८१॥
हें दिसतें जेतुलें आहे । तें असतेपणें जें नोहे ।
देखतां रूपीं सोयें । लाभे जयाची ॥३८२॥
तेणेंसीं प्रशस्त तें कर्म । जें जालें सर्वात्मक ब्रह्म ।
देखिजे करून सम । ऐक्यबोधें ॥३८३॥
तरी ओंकार तत्कारें । जें कर्म दाविलें ब्रह्माकारें ।
तें गिळूनि होइजे एकसरें । सन्मात्रचि ॥३८४॥
ऐसा हा अंतरंगु । सच्छब्दाचा विनियोगु ।
जाणा म्हणे श्रीरंगु । मी ना म्हणें हो ॥३८५॥

स्वतः श्रीभगवंतच ओंकाररूपी अंतरंग सत्ता चित्‌शक्ती कुंडलिनी आहे असे सांगत असल्याचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी निर्वाळा दिला आहे. एवढेच नव्हे तर "चाडचि निचाडां करी । ऐसी मनोरथीं ये थोरी । तेणें विवळले अंतरीं । तेथ डोलु आला ॥६.१३५॥" असे सांगून ज्यावेळी ही शक्ती जागृत होऊन विवळते म्हणजे प्रकाशते तेव्हाच सर्व इच्छा व मनोरथे नाहीशी होऊन साधकाला खऱ्या आनंदाचा डोल येतो व "मग तया त्यागातें जगीं । संन्यासु ऐसया भंगीं । बोलिजे अंतरंगीं । सर्वद्रष्टा ॥१८.१०८॥" अशा प्रकारे अंतरंगाने म्हणजे शक्तीने अंतरंगात म्हणजे शक्तीतच रमून गेलेले सर्वद्रष्टे महात्मे, जागृत शक्तीमुळे जो त्याग साधकाकडून होतो, त्यालाच खरा संन्यास म्हणतात, असे सांगून गेले; परंतु जन्ममरणपरंपरेत अडकलेले विषयी जन हे अंतरंग साधन जाणत नसल्यामुळे ते बाह्यविषयातच कसे गरफटून जातात हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

एथ नेणावया हेंचि कारण । जें इंद्रियां आधीनपण ।
तिहीं आकळिजे अंतःकरण । म्हणऊनि भ्रमे ॥२.१११॥

इंद्रियें विषय सेविती । तेथ हर्ष शोक उपजती ।
ते अंतर आप्लविती । संगें येणें ॥११२॥
या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं ।
ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ॥१२०॥
म्हणौनि विषयभोगीं जें सुख । ते साद्यंतचि जाण दुःख ।
परि काय कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥५.१२०॥
तें अंतर नेणती बापुडे । म्हणौनि अगत्य सेवणें घडे ।
सांगें पूयपंकीचे किडे । काय चिळसी घेती ॥१२१॥
तयां दुःखियां दुःखचि जिव्हार । ते विषयकर्दमींचे दर्दुर ।
ते भोगजळींचे जळचर । सांडिती केवीं ॥१२२॥

जीव अशा प्रकारे दुःखालाच सुख मानून विषयभोगात रमण्याचे एकमात्र कारण स्वात्मशक्तीने चालणारे अंतरंग साधन प्राप्त न झाल्याने तो स्वतःच स्वतःला पाहत नाही हेच आहे. त्यामुळे अंतरंगात रंगल्याशिवाय म्हणजे साधनाने आत्मरत झाल्याशिवाय खरे सुख होत नाही हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जिहीं आपणपें नाहीं देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले ।
जैसें रंकु कां आळुकैलें । तुषांतें सेवी ॥५.११०॥
नातरी मृगें तृषापीडितें । संभ्रमें विसरोनि जळांतें ।
मग तोयबुद्धी बरडीतें । ठाकूनि येती ॥१११॥
तैसें आपणपें नाहीं दिठे । जयातें स्वसुखाचे सदा खरांटे ।
तयासीचि विषय हे गोमटे । आवडती ॥११२॥
एऱ्हवीं विषयीं सुख आहे । हे बोलणेंचि सारिखें नोहे ।
तरीं विद्युत्स्फुरणें कां न पाहे । जगामाजीं ॥११३॥
सांगें वात वर्ष आतपु धरे । ऐसें अभ्रच्छायाचि जरी सरे ।
तरी त्रिमाळिकें धवळारें । करावीं कां ॥११४॥
म्हणौनि विषयसुख जें बोलिजे । तें नेणता गा वायां जल्पिजे ।
जैसें महूर कां म्हणिजे । विषकंदातें ॥११५॥

यासाठी खरे सुख हे अंतरंगरूप कुंडलिनी शक्तीचे बहिर्मुख बंद होऊन म्हणजे अंतरीहून विषयमोह फिटून जाऊन जेव्हा ती सुषुम्नाश्रयाने ऊर्ध्वमुख होईल तेव्हाच प्राप्त होऊन " निःशेष अंतरीं सुख एक आथि " या कुंडलिनीच्या दुसऱ्या मुखाकडून प्राप्त होणाऱ्या अवस्थेप्रत जीव पोहचू शकेल असा सिद्धांत मांडताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

हे अंतरींहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले ।
जैसें रश्मीवीण उरलें । मृगजळ नाहीं ॥३.२७०॥

तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें ।
मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥२७१॥
ज्ञानियांच्या हन ठायीं । याची मातुही कीर नाहीं ।
देहीं देहभावो जिहीं । स्ववश केले ॥५.१२९॥
जयांतें बाह्याची भाष । नेणिजेचि निःशेष ।
अंतरीं सुख । एक आथि ॥१३०॥
परि तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे ।
तैसें नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥१३१॥
भोगी अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अंचळु लोटी ।
मग सुखेंसि घे आंटीं । गाढेपणें ॥१३२॥
तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप कवळी ।
तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥१३३॥
कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे ।
तैसे सुखचि उरे स्वरूपें । सुरतीं तिये ॥१३४॥
ऐसी द्वैताची भाष जाय । मग म्हणों जरी एक होय ।
तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणते जें ॥१३५॥
म्हणौनि असो हें आघवें । एथ न बोलणें काय बोलावें ।
ते खुणाचि पावले स्वभावें । आत्माराम ॥१३६॥
जे ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण गुंतले ।
तें मी जाणें निखळ वोतले । सामरस्याचे ॥१३७॥

सुषुम्नामार्गातील वायूच्या संचलनामुळे निःशब्द करणारी संभोगसुखाची म्हणजे सुरताची द्वैताद्वैतविवर्जित अशी सामरस्याची अपूर्व स्थिती अंतरंग साधनाने प्राप्त होत असल्याने वेदोक्त रजतमादि कर्मांचा त्याग करून वेदांतोक्त म्हणजे उपनिषदोक्त सात्त्विक कर्माच्या म्हणजे योगमार्गाच्या अंतरंग साधनाची कास साधकाने निःशंकपणे पकडली पाहिजे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तिन्हीं गुणीं आवृत । हे वेद जाणें निभ्रांत ।
म्हणौनि उपनिषदादि समस्त । सात्त्विक तें ॥२.२५६॥
येर रजतमात्मक । जेथ निरूपिजे कर्मादिक ।
जे केवळ स्वर्गसूचक । धनुर्धरा ॥२५७॥
म्हणौनि तूं जाण । हे सुखदुःखांसीच कारण ।
एथ झणें अंतःकरण । रिगों देसी ॥२५८॥
तूं गुणत्रयाते अव्हेरीं । मी माझें हें न करीं ।
एक आत्मसुख अंतरीं । विसंब झणीं ॥२५९॥

जो अंतरीं दृढ । परमात्मरूपीं गूढ ।
बाह्य भागू तरी रूढ । लौकिकु जैसा ॥३.६८॥

तूं मानसा नियमु करीं । निश्चळु होय अंतरीं ।
मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्तंतु सुखें ॥७६॥

अशा प्रकारे साधक एकदा या अंतरंग चित्‌शक्तीशी ऊर्ध्वबोधाने तल्लीन होऊन म्हणजे परमात्मरूपाशी गूढपणे समरस होऊन या शक्तीच्या जोरावर निश्चळ होतो तेव्हा तो निश्चितपणे सुखी होतो. अशी ही सुखात्मक स्थिती या साधनाने म्हणजे हे साधन शक्तीकडून होण्याने किंवा चालण्याने साधकाला कशी प्राप्त होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी गेलियाची से न करी । न पवतां चाड न धरी ।
जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा ५.१९॥

आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण ।
पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥२०॥

जो मनें ऐसा जाहला । संगी तोचि सांडिला ।
म्हणौनि सुखें सुख पावला । अखंडित ॥२१॥

आतां गृहादिक आघवे । तें कांहीं न लगे त्यजावें ।
जें घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणौनि ॥२२॥

अशा प्रकारे जे साधक अंतरंग साधनात रमून गेले आहेत ते निरंतर संन्यासीच असून त्यांना गृहदारापुत्रादि कशाचाही त्याग करण्याचे कारण उरत नाही; कारण अंतरतः ते स्वभावतःच निःसंग झालेले असतात. सिद्धयोग हा सर्व आश्रमातील, जातीतील व स्तरातील स्त्रीपुरुषांना किंवा समस्त मानवजातीला उपलब्ध असलेला सहज सोपा योगोपाय आहे. याचेच उद्‌घाटन येथे श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी केले आहे. त्यामुळे "गोरक्षनाथांचा योग हा हठयोग नसून मनोजयात्मक राजयोग होता हे त्यांचे म्हणणे मात्र पटणारे नाही," असे "श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान" या ग्रंथात म्हणून डॉ. शं. दा. पेंडसे यांनी डॉ. मोहनसिंग यांच्याशी तळटीपेत त्यांच्या ग्रंथातील वचने देऊन जो विरोध दर्शविला आहे व "But such a mental Yoga can be carried on in married life by suitable and requisite abstinence" (Gorakhnath and medieval mysticism - page 28) हे मत बरोबर नसल्याचे प्रदर्शित केले आहे, ते बरोबर नाही, असे लक्षात येते. डॉ. मोहनसिंग यांचेच मत योग्य आहे; कारण योग्य व आवश्यक संयम पाळला की, हे अंतरंग योगाचे साधन गृहस्थाश्रमी साधकालाही करता येतें. या दृष्टीनेच "रुद्रयामलात" असे म्हटले आहे की–

यत्रास्ति भोगो न तु तत्र योगो तत्रास्ति मोक्षो न तु तत्र भोग: ।
श्रीसुंदरी साधकपुंगवानां भोगश्च मोक्षश्च करस्थ एव ।।

जेथे भोग आहे तेथे योग नाही व जेथे योग आहे तेथे भोग नाही; परंतु हे सुंदरी पार्वती ! या सहज सोप्या अशा सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या सर्व साधकांच्या हातात भोग व मोक्ष हे दोन्हीही राहतात. म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड दोन, या ग्रंथातील "सहजयान और सिद्धमार्ग" या लेखात सहजयान मार्गावलंबी बौद्धमताचा उल्लेख करताना ही गोष्ट स्पष्ट केली आहे. ते म्हणतात, "सहजियागणोंके मतमें सहजावस्थाकी प्राप्तिही पूर्णता-सिद्धि है। इसके नामांतर निर्वाण, महासुख, सुखराज, महामुद्रा, साक्षात्कार इत्यादि हैं। इस अवस्थामें वाच्यवाचक, ज्ञाताज्ञेय और भोक्ताभोग्य भाव नहीं रहते। उभयनिष्ठ संबंध भी नहीं रहता। ज्ञाता, ज्ञेय और ज्ञान यह त्रिपुटीही विकल्पजाल है। इसका भेद करके निर्विकल्प पदकी उपलब्धिही सहज अवस्था है। उस अवस्थामें भोग और मोक्ष दोनों एकसे हो जाते हैं। " न प्रज्ञाकैवल्यमात्रेण बुद्धत्वं भवतिनाप्युपाय मात्रेण, किंतु यदि पुन: प्रज्ञोपायलक्षणौ समतास्वभावौ भवत:, एतौ द्वौ अभिन्नरूपौ भवत:, तदा भुक्तिमुक्तिर्भवति। " अन्यत्र कहा है–

उभयोर्मिलनं यच्च सलिलक्षीरयोरिव ।
अद्वयाकारयोगेन प्रज्ञोपायस्तदुच्यते ।।
चिंतामणिरिवाशेषजगत: सर्वदा स्थितम् ।
भुक्तिमुक्तिप्रदं सम्यक् प्रज्ञोपायस्वरूपत: ।।

यामुळे जी जी संप्रदाय परंपरा सिद्धयोग समाविष्ट करून किंवा होऊन प्रवाहित झाली त्या त्या ठिकाणी त्याचे हेच रूप दृष्टीस पडते. हा सर्व या अंतरंग साधनरूप सिद्धयोगाचा महिमा आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही तो स्पष्ट केला आहे. एवढेच नव्हे तर " तेथ अपानु आंतुलेकडे । वोहोटें लागे ।।६.२००।।, तंव आंतु त्राय मोडे । मनोधर्माची ।।६.२११।।, अंतरीं फांके । हृदय कोशु ।। ६.२०९।।, मग तोही निगे अंतरें। गगना मिळे ।।६.३००।।" इत्यादि पद्धतीने पंथराजाच्या साधनवाटचालीचा उल्लेख करून त्याचे अंतरंगस्वरूप स्पष्ट केले आहे. याचे स्वरूप अधिक स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी उदेलिया दिनकरु । चोरींसि थोके अंधारु ।
कां राजाज्ञा अव्यवहारु । कुंठवी जेवीं ।।१८.७३३।।
नाना पवनाचा साटु । वाजीनलिया नीटु ।
आंगेंसीं बोभाटु । सांडिती मेघ ।।७४३।।
कां अगस्तीचेनि दर्शनें । सिंधु घेऊनि ठाती मौनें ।
चंद्रोदयीं कमळवनें । मिठी देती ।।७३५।।

हें असो पावो उचलिला। मदमुख न ठेविती खालां।
गर्जोनि पुढां आला। सिंहु जरी ॥७३६॥

तैसा जो धीरु। उठलिया अंतरु।
मनादिकें व्यापारु। सांडिती उभीं ॥७३७॥

सूर्याप्रमाणे जेव्हा साधकाची निद्रिस्त शक्ती उदित होते तेव्हा उपरोक्त पद्धतीने साधन आपोआप घडून येऊन अंतरंग साधनाची सिद्धी होते. "म्हणौनि धनंजया। तूं संसारदुर्गंती यया। तरसील माझिया। प्रसादास्तव ॥ १८.१२७३ ॥" अशा पद्धतीने साधकावर सद्गुरूंचा प्रसाद झाला, कृपा झाली किंवा शक्तिपात झाला की, त्याच्या अंतरंगातील साधनयुक्त क्षात्रस्वभाव उचंबळून वर येतो ( "वृत्ते विप्रो नृपः शौर्य्ये उद्यमे विड् भयेंद्रिजः ॥ ३.२१ ॥ सिद्धसिद्धांतसंग्रह ॥" या देहात आचारात ब्राह्मण, शौर्यात अर्थात् पुरुषार्थात म्हणजे मोक्षप्राप्तीच्या साधनाभ्यासात क्षत्रिय, उद्योगात म्हणजे व्यवसायात वैश्य व भयात शूद्रजाती आहे. ) व त्याला "तैसा क्षात्रसंस्कारसिद्धा। प्रकृती घडिलासी प्रबुद्धा। आतां नुठी म्हणसी हा धांदा। परी उठविजसीचि तूं ॥१८.१२८८॥" या न्यायाने सद्गुरूंची गाठ पडल्यावर मी साधनझुंज करणार नाही, या साधकाच्या म्हणण्याला काही अर्थ उरत नाही; कारण सद्गुरूंच्या कृपेने उद्भूत झालेली अनादि प्रकृतिस्वरूप शक्ती नित्यानित्यविवेकाची प्रक्रिया साधकाच्या मनात उपस्थित करून जडचेतन किंवा क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगाचा छेदभेद घडवून आणल्याशिवाय कधीही शांत होत नाही. हा त्या प्रकृतीचा स्वभावच आहे. येथे साधकाच्या इच्छे-अनिच्छेचा प्रश्नच नाही. हे अंतरंग पद्धतीने घडणारच घडणार. याला पर्याय नाही. येथून माघारही नाही. हे घडणे ईश्वराच्या इच्छेचेच फल आहे. ते चुकविता येत नाही. अशी ही अवश्यंभावी गोष्ट असल्याचे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

पैं पूर्वे वाहतां पाणी। पव्हिजे पश्चिमेचे वाहणीं।
तरी आग्रहोची उरे तें आणी। आपुलिया लेखा ॥१८.१२८६॥

कां साळीचा कणु म्हणे। मी नुगवें साळीपणें।
तरी आहे आन करणें। स्वभावासी ? ॥१२७८॥

तरी बांधोनि हात पाये। जो रथीं घातला होये।
तो न चले तरी जाये। दिगंता जेवीं ॥१२९३॥

तैसा तू आपुलियाकडुनी। मी कांहींच न करीं म्हणौनि।
ठासी परी भरंवसेनि। तूंचि करिसी ॥१२९४॥

तें अदृष्ट अनारिसें। न करील ईश्वरवशें।
तो ईश्वरुही असे। हृदयीं तुझ्या ॥१२९८॥

**सर्व भूतांच्या अंतरीं । हृदय महाअंबरीं ।**
**चिद्वृत्तीच्या सहस्रकरीं । उदयला असे जो ॥१२९९॥**

चित्‌शक्तीच्या सहस्रकिरणांचा प्रकाश जेव्हा अशा रीतीने सद्‌गुरुकृपेने प्राप्त होतो तेव्हा या ईश्वरसत्तायोगाने अंतरंग साधन होतेच होते. " तेथ जया जें कर्मसूत्र । मांडूनि ठेविलें स्वतंत्र । तें तिये गती पात्र । होंचि लागे ॥ १८.१३०९॥ या न्यायाने साधकाकडून आपोआप साधन होते. यासंबंधी " रत्नमाला आगमात " असे म्हटले आहे की–

**यस्मिन्काले तु गुरुणा निर्विकल्पं प्रकाशितम् ।**
**तदैव किल मुक्तोऽसौ यंत्रं तिष्ठति केवलम् ॥**

ज्यावेळी सद्‌गुरूंच्या द्वारा निर्विकल्प बोध प्रकाशित केला जातो त्यावेळी साधक मुक्त होतो. मग तो केवळ यंत्रस्वरूपच शिल्लक राहतो.

अशी ही या अंतरंग साधनाची महती असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सर्व साधकांना अत्यंत कळकळीने उपदेश करताना असे म्हटले आहे की–

**तैसा सर्वज्ञु श्रीगुरु । भेटलिया आत्मनिर्धारु ।**
**न पुसिजे जैं आभारु । धरूनियां ॥१८.१३३५॥**
**तें आपणपेचि वंचे । आणि पापही वंचनाचें ।**
**आपणयाचि साचें । चुकविलें तेणें ॥१३३६॥**

असे अर्जुनरूपी साधकाकडून घडू नये म्हणून श्रीकृष्णनाथांनी त्याला " तरी बाह्य आणि अंतरा । आपुलिया सर्व व्यापारा । मज व्यापकातें वीरा । विषयो करीं ॥ १८.१३५३ ॥ " हेच सांगितले; कारण " तेव्हां भलतिये आवस्थे । मी तूंतें तूं मातें । भोगिसी ऐसें आइतें । वाढेल सुख ॥ १८.१३६३ ॥ " हा अंतरंग साधनाचा सर्वोच्च फलरूप महिमा दृश्यरूपाने आपल्या शिष्यात प्रकट व्हावा अशी त्यांची आंतरिक इच्छा होती. परंतु यासाठी वर म्हटल्याप्रमाणे नित्यानित्य किंवा क्षेत्रक्षेत्रज्ञभेदप्रक्रियेसाठी विवेकाचा म्हणजे ज्ञानरूपी शक्तिसूर्याचा अंतरंग साधनरूपानें उदय होणे नितांत आवश्यक आहे. यासाठी पुष्कळ उपाय असले तरी सिद्धांतनवनीतरूप असा श्रीगुरुकृपेने शक्तिपात होणें हाच एकमात्र उपाय " अत एव ह्यन्यत्राशरणानामेतदेशकशरणत्वमत्यंतदुर्घटघटनप्रागल्भ्योद्भटमुद्घाटयते । यदाहुः " सर्वोपायपरिक्षीणास्ते महार्थार्थिनः किल " इति । अस्ति नान्या गतिस्तेषां विकल्पग्राससाहसात्" इति च ॥ " असे म्हणून " महार्थमंजरीत " अडुसष्टाव्या श्लोकावर स्वरचित " परिमल टीकेत " महायोगी गोरक्षनाथांनी सांगितला आहे. त्याचेच प्रकटीकरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे. ज्यांना कुठेही थारा नाही त्यांच्यासाठी अलौकिक शक्तीचे हे तत्त्व आश्रयस्थान होईल व आहेही. या करिता सद्‌गुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताने सिद्ध होणाऱ्या या अत्यंत दुर्घटघटनायुक्त अशा रहस्यमय

प्रक्रियेचे आम्ही प्रकाशन करीत आहोत, कारण असे म्हटले आहे की, सर्व प्रयत्न करून भागलेले लोक या प्रक्रियेचे पायीक होतात व त्याचप्रमाणे विकल्पांनी ज्यांचे साहस खलास केले आहे त्यांना सिद्धयोगरूप अंतरंग साधनाशिवाय दुसरा मार्ग वा गती नाही. परंपराप्राप्त अशा या समाधिधनाचे उद्घाटन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

परी ह्याचि अंतरीं । विवेक भानूचिया परी ।
उदैजे तें अवधारीं । उपाय बहुत ॥१३.१०३६॥

ऐसेसे हे उपाये । बहुवस एथें पाहें ।
जाणावया होये । एकी वस्तु ॥१३.१०४७॥

आतां पुरे हे बहुत । पैं सर्वार्थांचें मथित ।
सिद्धांतनवनीत । देऊं तुज ॥१०४८॥

शब्दतत्त्वसारज्ञा । पैं देखणें तेचि प्रज्ञा ।
जे क्षेत्र क्षेत्रज्ञा । अपाडु देखे ॥११२९॥

इया दोहींचें अंतर । देखावया चतुर ।
ज्ञानियांचें द्वार । आराधिती ॥११३०॥

तें परमतत्त्व पार्था । होतीं ते सर्वथा ।
जे आत्मानात्मव्यवस्था । राजहंसु ॥११४३॥

ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा ।
उगाणा दिधला जीवा । जीवाचिया ॥११४४॥

येर कलशींचें येरी । रिचविजे जयापरी ।
आपणपें तया श्रीहरी । दिधले तैसें ॥११४५॥

अशा प्रकारे शक्तिपाताने साधकशरीरात, एका कळशीतील पाणी दुसऱ्या कळशीत ओतल्याप्रमाणे शक्तिसंचार झाला की, जागृत शक्ती राजहंसाप्रमाणे आत्मा व अनात्मा वेगळे करते व क्षेत्रक्षेत्रज्ञभेदप्रक्रिया पूर्ण होऊन साधक परमार्थरूप होतो. ही प्रक्रिया घडताना व पूर्ण झाल्यावर साधकाला "हृदया आंतुली प्रतीती ॥ १०.३३१ ॥" येते. " परी येतुलियाही वेगळा । जो केवळ आनंदैककळा । तया अंतरात्मयाही निश्चळा । शियारी आली ॥ ११.३६९ ॥" अशी अनुभूती प्राप्त होते. त्याचप्रमाणे "कोणे एके अवसरीं । अनुरागु भरे अंतरीं । कीं तया नाम करी । क्षीराब्धी ॥ १३.३९२ ॥, आणि अभ्यंतरीलियेकडे । प्रेमाचेनि पवाडे । श्रीगुरूंचें रूपडे । उपासी ध्यानी ॥१३.३८५॥ " व " किंबहुना यापरी । श्रीगुरुमूर्ति अंतरीं । भोगी ॥ १३.४०३ ॥" अशी गुरुभक्ती साधकाच्या अंतरंगात भक्तिरूप जागृत चित्शक्तीने स्वतः धारण केल्याची प्रतीती साधकाला येते. इतकेच नव्हे तर या

अंतरंग साधनामुळेच कामक्रोधादि अंतरातून समूळ नाहीसे होतात हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

इहीं कामक्रोधलोभेंसी । कार्यसिद्धि जाण तैसीं ।
म्हणौनि ठावोचि पुसीं । ययांचा गा ।।१६.४३७।।
जैं कहीं अवचटें । हे तिकडी सांखळ तुटे ।
तैं सुखें आपुलिये वाटे । चालों लाभे ।।४३८।।
त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटीं फिटलिया नगर ।
त्रिदाह निमालिया अंतर । जैसें होय ।।४३९।।
तैसा कामादिकीं तिघीं । सांडिला सुख पावोनि जगीं ।
संगु लाहे मोक्षमार्गीं । सज्जनांचा ।।४४०।।
मग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें ।
जन्ममृत्यूचीं निमाळें । निस्तरें रानें ।।४४१।।
ते वेळीं आत्मानंदें आघवें । जें सदा वसतें बरवें ।
तें तैसेंची पाटण पावे । गुरुकृपेचें ।।४४२।।
तेथ प्रियाची परमसीमा । तो भेटे माउली आत्मा ।
तयें खेंवी आटे डिंडिमा । सांसारिक हे ।।४४३।।
ऐसा जो कामक्रोधलोभां । झाडी करूनी ठाके उभा ।
तोचि एवढिया लाभा । गोसावी होय ।।४४४।।

श्रीगुरुकृपेचे पाटण म्हणजे शक्तिपाताने होणाऱ्या शक्तिसंचारामुळे मिळणाऱ्या आत्मनंदलाभाच्या अंतरंगयोगाची प्राप्ती झाली की, साधक शक्तिरूप होऊन त्या शक्तीला आपल्या प्रीतीची परमसीमा असलेल्या आत्मरूप शिवाची भेट होते. त्यामुळे समूळ संसाराचा डिंडिमा आटून जाऊन साधकाला सर्वत्र आनंदीआनंद प्राप्त होतो. अशा प्रकारे जोपर्यंत कामक्रोधादिरूप संसार अंतरंग साधनाने नाहीसा होत नाही तोपर्यंत इतर सर्व साधने व्यर्थ ठरतात. त्यामुळेच या साधनाला "आइसी-हूनी अंतरंगु ।।११.३२।।" व "गुज अंतरींचें हें निज ।।११.३६।।" म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गौरविले आहे. मन हे "जे भुलीचें कुहर । वायुतत्त्वाचें अंतर । बुद्धीचें द्वार । झाकविलें जेणें ।।१३.११५।।" याप्रमाणे नेहमी साधकाला खालीच ओढीत असते. अशा वेळी "अमानित्वापासून तत्त्वज्ञानार्थदर्शनम्" पर्यंत जी अठरा ज्ञानाची लक्षणे भगवंतांनी गीतेच्या तेराव्या अध्यायात सांगितली आहेत ती आपल्या ठिकाणी प्रकट व्हावी अशी जर साधकाची इच्छा असेल तर "ज्ञानदीपु अंतरीं ।।१३.४६७।।" उजळला पाहिजे. "म्हणौनि अंतरीं ज्ञान व्हावें ।।१३.४७३।।" असे झाले पाहिजे. "ज्ञानें फिटला वंगु । अंतरींचा ।।१३.४७४।।" हे घडलेच पाहिजे; कारण हे अंतरंग साधन प्राप्त झाल्याशिवाय "अज्ञानं यदतोऽन्यथा ।।१३.११।।"

म्हणून भगवंतांनी ज्याचे गीतेत वर्णन केले आहे व मान, दंभ, अक्षांती, अनार्जव, आचार्योपासनराहित्य, अशौच, अस्थैर्य, अवैराग्य, अहंकार, मृत्योरदर्शनम्, जराया अदर्शनम्, व्याधी अदर्शनम्, दुःख अदर्शनम्, आसक्ती, असमचित्तत्व, व्यभिचारिणी भक्ती, अविविक्तदेशसेवित्वम्, जनसंसदि अरतिः, अध्यात्मज्ञानाचा नित्य अभाव व तत्त्वज्ञानदर्शनाचा अभाव यांच्या रूपाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्या अज्ञानाचे सविस्तर वर्णन केले आहे त्यातील एकही अवगुण दूर होण्याची सुतराम् शक्यता नाही. मग सगळे अज्ञान दूर होणे ही खूप लांबची गोष्ट आहे. "लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।।" व "अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।।१४.१२,१३।।" हा भगवंतांनी रज व तमाच्या वाढीचा परिणाम सिद्धांत म्हणून गीतेत सांगितलेलाच आहे. हा रजतमांचा धुमाकूळ जावा असे ज्याला वाटत असेल त्याला शेवटी "हा ठायवरी । नेहटोनि ठेला अंतरीं ।।१४.३११।।" याप्रमाणे अंतरंग साधनालाच शरण जावे लागते. त्याशिवाय दुसरा मार्गच नाहीं; कारण "आतां काय वर्ते शरीरीं । हेंही नेणे ।।१४.३११।।" ही अंतिम अवस्था उपरोक्त साधनाश्रयाशिवाय साधकाला त्रिकालीही स्वप्नातसुद्धा प्राप्त होणे शक्य नाही. असा या साधनफलाचा अपरंपार महिमा असल्यामुळे तो प्रकट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

देखें ऋद्धीसिद्धि तयापरी । आली गेली से न करी ।
तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ।।२.३६२।।
जरी हे प्रतीति हन अंतरीं फांके । तरी विश्वचि हें अवघें झाके ।
तंव अर्जुन म्हणें निकें । साचचि जी हें ।।६.३२८।।
तैसें शरीरीं हन कर्में । तो भक्तु ऐसा गमे ।
परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाहला ।।७.११६।।
तैसें भोगाआंतूनी निगतां । चित्त मजमार्जी रिगतां ।
हळहळू पंडुसुता । मीचि होईल ।।१२.१०९।।

सारांश, शिवसूत्रात म्हटल्याप्रमाणे "रंगोऽन्तरात्मा ।।३.१०।।" म्हणजे अंतरात्मा हाच रंगमंच आहे, हे या अंतरंग साधनाचे सार आहे. हा अंतरात्माच संकुचितरूपाने जीवरूप निद्रिस्त चित्शक्ती असून तोच श्रीगुरुकृपेने स्वतःला स्वतःच आतून जागृत करून घेऊन साधनरूप बनून आज्ञेचा नटनाच करतो व शेवटी सर्वोपशांतिप्रमदेचा कांतु होऊन स्वानंदाने स्वतःतच रममाण होतो. ज्ञानेश्वरीतील सिद्धयोग साधनेचा आत्तापर्यंत विविध पद्धतीने जो महिमा आपण पाहिला त्याचे सर्व सार या अंतरंग साधनात आहे. भाग्यवशात् महापुरुषसंश्रय ज्याला प्राप्त होईल व गुरुकृपालब्धी होऊन चित्शक्तीच्या रंगात रंगून जाता येईल तोच कृतकृत्य व भाग्यवान् ठरेल !

## प्रकरण सातवे

# ज्ञानेश्वरीतील कुंडलिनी शक्तीचे स्वरूप

**प्रस्तावनाः—**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " ॐ नमो श्रीआद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ १.१ ॥ " असे म्हणून शिवशक्तिसमावेशनपूर्वक आत्मस्वरूप हे उभयरूप व एकरस आहे असा जयजयकार किंवा नमन करून " ते कुंडलिनी जगदंबा । चैतन्यचक्रवर्तीची शोभा । जया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ॥ ६.२७२ ॥ " या पद्धतीने शिवाशी समरस असलेल्या जगदंबेचा, चैतन्यचक्रवर्तीच्या शोभेचा व संकुचित झालेल्या शिवरूप जीवाला स्वतःच जागृत होऊन पुन्हा शिवरूपाची प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी साउली होणाऱ्या ज्या कुंडलिनी शक्तीचा महिमा गाइला आहे तिचे ज्ञानेश्वरीतील स्वरूप काय आहे याचे आता दर्शन घ्यावयाचे आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीगुरुकृपापात्र होऊन आपल्या विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अशा अपरंपार जागृत संविद्‌शक्तीच्या सामर्थ्याने सकल आगमनिगमशास्त्र आपल्या अपूर्व अशा ऋतंभराप्रज्ञायुक्त प्रातिभज्ञानाने आकळून व स्पर्शून त्यांना परंपरागत समाधिधनाशी समरस करून ज्ञानेश्वरीच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या रूपाचे ऐश्वर्यपूर्ण दर्शन अखिल मानवजातीस मार्गदर्शन करण्यासाठी सिद्धयोगाच्या रूपाने उभे केले आहे. त्याचे स्वरूप सर्वार्थाने स्पष्ट करण्यासाठी त्यांच्या इतकेच जागृत शक्तीचे सामर्थ्य व तितकीच संपन्न अनुभूती असल्याशिवाय ते शक्य होणार नाही हे निखलास सत्य आहे. आपण मागे दुसऱ्या प्रकरणात पाहिल्याप्रमाणे गीतातत्त्व हे कुंडलिनी शक्तिस्वरूप भवानीचे नित्यनूतन रूप असल्यामुळे " हा वेदार्थ सागरु । जया निद्रिताचा घोरु । तो स्वयें सर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला ॥१.७२॥ ऐसें जें अगाध । जेथ वेडावती वेद । तेथ अल्प मी मतिमंद । काई होये ॥७३॥ हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें । गगन मुठीं सुवावें । मशकें केवीं ? ॥७४॥ " असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी नम्रता स्वीकारून कुंडलिनी शक्तीचे अपारत्व कसे कवळावे, ते शक्तिस्वरूप महातेज कोणी धवळावे व ते मुठीत पकडावे तरी कसे? असा भाव जेथे व्यक्त केला आहे तेथे श्रीकृष्णस्वरूप श्रीज्ञानेश्वरमहाराजांकडून प्रकट झालेल्या ज्ञानेश्वरीतील शक्तीचे स्वरूप स्पष्ट करणे माझ्यासारख्या मशकाला कसे शक्य आहे? परंतु असे असले तरी " परी एथ असे एकु आधारु । तेणेंची बोले मी सधरु । जे सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥१.७५॥ " असे म्हणून

त्यांनी श्रीगुरुकृपेने कुंडलिनी शक्तीचे अपारत्व आपल्यात समाविष्ट करून ते महातेज स्वतःच अधिकाधिक स्पष्ट करून गगन मुठीत धरून दाखविल्याप्रमाणे ज्ञानेश्वरीत स्पष्ट केले आहे. त्याप्रमाणेच माझे परम सद्‌गुरू महायोगी श्रीगुळवणी-महाराज यांच्या चरणकृपाश्रयबलाने मी हे कार्य करण्यास उद्युक्त झालो आहे. श्रीगुरुमहाराज हेच माझे आधार आहेत व त्यांनीच मला साधार केले आहे. त्यांच्याच रूपाने असलेली अंतरातील जागृत शक्ती हे कार्य संपन्न करील व ज्ञानेश्वरीतील खऱ्या भावार्थवैभवाचा ठेवा सर्वांना उपलब्ध होईल असा नितांत विश्वास माझ्या अंतःकरणातील हृदयपुष्करणीवर तरंगित होत असून हृदयारविंदाशी सदा संलग्न असलेली माझी सद्‌भावाची अंजुली श्रीसद्‌गुरुचरणी ज्ञानेश्वरीतील कुंडलिनीशक्तिनिर्देशोन्मिलित फुले वाहण्यास उद्युक्त व समर्थ होईल.

ज्या ज्या लोकांनी या विषयाला हात घातला आहे त्या त्या लोकांनी कुंडलिनी शक्तीच्या व योगाच्या स्थूल, सूक्ष्म व पर अर्थाविषयी या ना त्या रीतीने आपली असमर्थता प्रकट केली आहे. " The Serpent Power " या केवळ कुंडलिनी शक्तीच्या विवेचनासाठी वाहिलेल्या ग्रंथातील " Theoretical Bases Of This Yoga " या सातव्या प्रकरणात या ग्रंथाचे लेखक Sir John Woodroffe म्हणतात, " This yoga had been widely affirmed. The following review does not profess to be exhastive, for the literature relating to Kundalini and Laya-Yoga is very great. " कुंडलिनीयोग हा विस्तृत प्रमाणात रुजलेला आहे. कुंडलिनी व लययोगाशी संबंधित असलेले वाङ्मय अत्यंत मोठे असल्याने या विषयाचे पुढे जे विवेचन केले आहे ते सर्वसमावेशक आहे असे म्हणता येणार नाही. सर जॉन वुड्रॉफ यांचे हे म्हणणे खरे आहे; कारण कुंडलिनीविषयी प्राचीन व अर्वाचीन साहित्य जमा केले तर ते हजारो पृष्ठांइतके भरल्याशिवाय राहणार नाही. वेद, उपनिषदे, तंत्रग्रंथ, योगग्रंथ, नाथसंप्रदाय साहित्य, समस्त संत वाङ्मय इत्यादींमध्ये कोठे ना कोठे तरी कुंडलिनीचा एखादा संदर्भ दिसल्याशिवाय राहत नाही. असे असले तरीही प्रथम कुंडलिनी शक्तीच्या सर्वसामान्य स्वरूपाची चर्चा करून मग श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत तिचे जे दर्शन घडविले आहे त्याचा आपण उपरोक्त ग्रंथांच्या आधाराने मागोवा घेत जाणार आहोत.

एखाद्या वस्तूची किंवा तत्त्वाची व्याख्या, विवरण, स्पष्टीकरण, कार्य, उपयोग, अनुभूती व फल हे पाहिले की, त्याचे स्वरूप स्पष्ट होत असते. या दृष्टीने कुंडलिनी शक्तितत्त्वाची चर्चा केली म्हणजे ही काय वस्तू आहे हे लक्षात येईल.

प्रथम कुंडलिनी शक्तीची शास्त्रकारांनी कोणती व्याख्या केली आहे हे पाहू. ग्रंथग्रंथांतरी धांडोळा घेतला म्हणजे हे लक्षात येते की, सूत्ररूपाने या शक्तीचे

स्वरूप सर्वार्थाने स्पष्ट होईल अशी व्याख्या कोणाही शास्त्रकाराने केलेली आढळत नाही; कारण शक्तीची व्याख्या करता येणे शक्य नाही. शक्ती म्हणजे काय? असा मोठमोठ्या विज्ञानशास्त्रज्ञांना जेव्हा प्रश्न विचारला गेला तेव्हा त्यांनी स्वच्छ सांगितले की, आम्ही शक्तीची व्याख्या करू शकणार नाही; परंतु तिचे स्पष्टीकरण व विवरण मात्र करू शकू. ( what is power ? Scientists say that we cannot define it but we can explain it. ) अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे वेदांनीही शेवटी या वस्तूच्या व्याख्येपुढे हात टेकले व " नेति नेति " म्हणून शरणागती पत्करली. " नेति नेति " म्हणजे न इति, हे इतकेच नव्हे, आम्ही म्हणतो तेवढ्या व्याख्येतच समाविष्ट होईल असे या शक्तीचे किंवा शक्तिमानाचे स्वरूप नसून त्याही पलीकडे आणखी आहे. " ऐसें जें अगाध। जेथ वेडावती वेद ॥ १.७३ ॥ " व " हें अपार कैसेनि कवळावें । महातेज कवणें धवळावें ॥ १.७४ ॥ " हेच त्याचे अंतिम उत्तर आहे. असे असले तरी " ॐ सर्वे वै देवा देवीमुपतस्थुः कासि त्वं महादेविति ॥ " याप्रमाणे सर्व देवांनी देवीसमोर एकत्रित होऊन तू कोण आहेस असा जो प्रार्थनात्मक प्रश्न केला त्याला उत्तर देताना देवी म्हणाली, " अहं ब्रह्मस्वरूपिणी ॥ २ ॥ " मी ब्रह्मस्वरूप आहे. " देवी अथर्वशीर्षातील " ही व्याख्या शक्तीचे स्वरूप व्यक्त करणारी सर्वोत्तम व्याख्या असून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही " स्वसंवेद्या आतमरूपा ॥ १.१ ॥ " असे म्हणूनच शक्तीची सूत्रात्मक व्याख्या केल्याचे दिसून येते. श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही प्रपंचसार तंत्रात कुंडलिनी शक्तीची स्वसंवेद्या अशा स्वरूपातच तिची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

> अंतरांतर्बहिश्चैव देहिनां देहपूरणी ।
> स्वसंवेद्यस्वरूपा सा दृश्या देशिकदर्शितैः ॥१.२४॥
> शब्दब्रह्मेति यत्प्रोक्तं तदुद्देशः प्रवर्त्यते ।
> अतः परमवाच्यं हि स्वसंवेद्यःस्वरूपतः ॥६१॥

कुंडलिनी शक्ती ही सूक्ष्म व स्थूल देहात अंतर्बाह्य व्याप्त असून ती स्वसंवेद्यस्वरूप आहे. ज्यावेळी सद्‌गुरू शक्तिपात करतात तेव्हाच ती दृश्य म्हणजे जागृतस्वरूप धारण करते. हिलाच शब्दब्रह्म म्हणतात. यामुळेच ही शक्ती स्वसंवेद्यस्वरूप आहे. याचेच अधिक स्पष्टीकरण " मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय । मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥७.७॥" असे म्हणून भगवंतांनी गीतेत केले आहे. हे व " प्रकृतिः निश्चला परावाग्रूपिणी परप्रणवात्मिका कुंडलिनी शक्तिः । " या श्रीमदाद्यशंकराचार्यांनी " प्रपंचसारतंत्रात " केलेल्या व्याख्येप्रमाणे प्रकृती ही निश्चल, परावाक् स्वरूपाची व परप्रणवात्मक कुंडलिनी शक्तीच आहे ही सूत्रे राबवून प्रकृतीचा अर्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत स्पष्ट केला आहे. उपरोक्त श्लोकाचा भावार्थ या रीतीने सांगताना ते म्हणतात—

हें रोहिणीचें जळ । तयाचें पाहतां येइजे मूळ ।
तें रश्मि नव्हती केवळ । होय तें भानु ।।७.२९।।
तयाचिपरी किरीटी । इया प्रकृति जालिये सृष्टी ।
जें उपसंहरूनि कीजेल ठी । तें मीचि आहें ।।३०।।
ऐसें होय दिसे न दिसे । हें मजचि माजीं असे ।
मियां विश्व धरिजे जैसें । सूत्रें मणी ।।३१।।
सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुतीं वोविले ।
तैसे म्यां जग धरिलें । सबाह्याभ्यंतरीं ।।३२।।

सूर्यकिरण व सूर्य आणि सोन्याचे मणी व सोन्याचे सूत ह्या गोष्टी बाह्यतः भिन्न दिसल्या तरी त्या स्वरूपतः एकरूप, एकरस व अभिन्न असतात त्याप्रमाणे परमात्मा व त्याची प्रकृती म्हणजे शिव व शक्ती ही अखंडैकरस आहेत. त्यामुळे शक्तीची स्वतंत्र व्याख्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केली नाही. त्यांची 'श्रीआद्या' व 'स्वसंवेद्या' ही आत्मरूपाच आहे. हीच त्यांची शक्तीची व्याख्या आहे. "अमृतानुभवात" या दृष्टीनेच ते म्हणतात–

साधं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ।
ज्ञातुं न शक्यते लग्नमितिद्वैतच्छलान्मुहुः ।।३।।

द्वैताच्या मिषाने वारंवार भिन्न भासणारे पण एकाच सच्चिदानंदरूपाने असणारे ब्रह्म व माया अगर प्रकृती किंवा शिव व शक्ती यात कोणाच्या योगाने कोण अर्ध्यासह आहे व कोण कोणाचा अर्ध असून त्यांचे ऐक्य व द्वैत केव्हा होते हे दोघेही पूर्ण एकरूप असल्यामुळे कोणीही जाणू शकत नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपला हा परमसिद्धांत प्रकट करूनच अमृतानुभवाच्या पहिल्या प्रकरणात शिव-शक्तिसमावेशनपूर्वक जे नमन केले आहे ते सर्व व्याख्यारूपच आहे. ते म्हणतात–

जयां एकसत्तेचें बैसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणें ।
जे अनादि एकपणें । नांदती दोघें ।।१.८।।
गोडी आणि गुळु । कापूर आणि परिमळु ।
निवडु जाता पांगळु । निवाडु होय ।।२३।।
समग्र दीप्ती घेतां । जेंवि दीपुचि ये हातां ।
तेंवि जियेचिया तत्त्वतां । शिवचि लाभे ।।२४।।
जैसा सूर्य मिरवी प्रभा । प्रभी सूर्यत्वाचा गाभा ।
तेंवि भेद गिळित शोभा । एकचि जे ।।२५।।
जिये प्राणेश्वरीविण । शिवीही शिवपण ।
थारों न शके ते आपण । शिवें घडली ।।२८।।

ज्ञा....३२

जैसी कां समीरेसकट गती । कीं सोनयासकट कांती ।
तैसी शिवेंसी शक्ती । आघवीचि जे ॥४१॥
कां कस्तुरीसकट परिमळु । कां उष्मेसकट अनळु ।
तैसा शक्तीसी केवळु । शिवुचि जो ॥४२॥
चांदाचिया दोंदावरी । होत चांदणियाची विखुरी ।
काय उणे दीप्तीवरी । गिंवसो पां दीपु ॥५६॥
म्हणौनि भूतेशु आणि भवानी । न करूनि सिनानी ।
मी रिघालो नमनीं । तें हें ऐसें ॥६०॥
सांडूनि मीठपणाचा लोभु । मिठें सिंधुत्वाचा घेतला लाभु ।
तेवि अहं देऊनि शंभु । शांभवी झालों ॥६३॥
शिवशक्तिसमावेशें । नमन केले म्यां ऐसें ।
रंभागर्भ आकाशें । रिघाला जैसा ॥६४॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी माया, प्रकृती किंवा शक्तियुक्त शिवाची ही जी नमनपूर्वक व्याख्या केली आहे व शेवटी शंभूला मीपणा देऊन आपण शांभवी शक्ती झालो म्हणण्यात धन्यता मानली त्याचे मूळ परंपराप्राप्त समाधिधनाचा ठेवा ज्यात साररूपाने साठविलेला आहे अशा "सिद्धसिद्धांतपद्धतीत" महायोगी गोरक्षनाथांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केल्याचे दिसून येते. ते म्हणतात–

अत्यंतनिजप्रकाश स्वसंवेद्यानुभवैकगम्यमान शास्त्रलौकिकसाक्षात्कार–
साक्षिणी सा परा चिद्रूपिणी शक्तिर्गीयते ॥४.१॥
शिवोऽपि शक्तिरहितः शक्तः कर्तुं न किंचन ।
स्वशक्त्या सहितः सोऽपि सर्वस्याभासको भवेत् ॥१३॥
शिवस्याभ्यंतरे शक्तिः शक्तेरभ्यंतरः शिवः ।
अंतरं नैव जानीयाच्चंद्रचंद्रिकयोरिव ॥२६॥

कुंडलिनी शक्ती केवळ स्वप्रकाशस्वरूप आहे म्हणजे ती स्वतःच स्वतःच्या अत्यंत प्रचंड प्रकाशाने प्रकाशित होत असते. ती स्वतःच स्वतःला जाणणारी असल्यामुळे एकमात्र अनुभवानेच ती जाणता येते. ती शास्त्रीय व लौकिक साक्षात्काराची साक्षिणी आहे. हिलाच परमश्रेष्ठ चिद्रूपाशी अभिन्न असलेली शक्ती म्हणतात. जर शिव शक्तिरहित असेल तर तो काहीही करण्यास एकटा समर्थ ठरत नाही. जर तो शक्तिसहित असेल तरच तो सर्व संसाराचा साक्षी होऊ शकतो. शिवात शक्ती व शक्तीत शिव सामाविलेले असून ते एकरूप झालेले आहेत. ज्याप्रमाणे चंद्र व चांदणे या गोष्टी भिन्न व दोन नसतात त्याप्रमाणे शिव व शक्तीत अंतर व भिन्नता नसते. एकाच अद्वितीय परमतत्त्वास दृष्टिभेदानुसार आत्मरूप शिव व स्वसंवेद्य शक्ती ही संज्ञा प्राप्त होते.

यापेक्षा शक्तीची अधिक व्याख्या करता येणे शक्य नाही व तशी ती शास्त्रकारांनी केलेली नाही. महायोगी गोरक्षनाथांनी जी साररूप व्याख्या केली आहे तीच सर्वंकष आहे व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही तिचाच मागोवा घेत ती त्याच स्वरूपात व्याख्यारूपाने प्रकट केली आहे. अशा या शक्तीचे तात्त्विक व सर्वसामान्य स्वरूप काय आहे ते आता पाहवयाचे आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केलेले तिचे स्वरूप आपण विस्ताराने पुढे पाहणारच आहोत. येथे फक्त आगमनिगमादि शास्त्रग्रंथातून प्रकट झालेल्या चित्‌शक्ती कुंडलिनीच्या स्वरूपाचा साररूपाने विचार प्रस्तुत करावयाचा आहे. चित्‌शक्तीच्या स्वरूपाचा हा विचारही " द्रष्टा श्रीगुरुमूर्ती । न रिगता दृश्यपंथीं । तरी कां ह्या उपास्ती । आकळता तो ? ॥१८.१७०४॥ " असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे द्रष्टा म्हणजे साक्षी आत्मरूप शिव जागृत शक्ती बनून श्रीगुरुमूर्तीच्या रूपाने सुषुम्नेच्या मार्गात प्रविष्ट झाला नसता तर त्या आत्मरूप व शिवस्वरूप श्रीगुरूंची सहस्रारातील शिवशक्तिसामरस्यात्मक प्राप्ती इतर कोणत्याही उपायांनी आकळणे किंवा प्राप्त करणे शक्य झाले नसते, एवढ्या पुरताच म्हणजे जागृत शक्तीच्याद्वारा साधक शिवस्वरूप कसा होतो, हे सांगण्यापुरताच मर्यादितरूपानें स्पष्ट केला आहे. त्यामुळे पिंडब्रह्मांडाची शक्तिद्वारा उभारणी कशी होते या विचाराला गौणत्व येऊन पिंडब्रह्मांडाची संहारणी कशी होते यालाच प्राधान्य प्राप्त होते. संहारणीच्या दृष्टीनेच चित्‌शक्तीच्या तत्त्वाचा येथे विचार केला आहे; कारण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीच या पद्धतीने या तत्त्वाचा विचार ज्ञानेश्वरीत केला आहे. " जैसें गंगेचेनि वोघें । डळमळीत जळ जें निघे । सिंधुपद तयाजोगें । आन नाहीं ॥ १४.३९९ ॥, तया लवणाची कणिका । मिळतखेंवो उदका । उदकचि होऊनि देखा । ठाके जेवीं ॥ १८.९८६ ॥, तया अहं वाचा चित्त आंग । देऊनियां शरण रिग । महोदधी का गांग । रिगालें जैसें ॥ १८.१३१९ ॥, गंगा सिंधू सेवूं गेली । पावतांची समुद्र जाली ॥ १८.१५७२ ॥, हां गा सिंधूसि आनी होती । तरी गंगा कैसेनि मिळती ? ॥ १५.५६८ ॥, घडोनि सिंधूचिया आंगा । सिंधूवरी तळपे गंगा । तैसा पाडु तया भोगा । अवधारी जो ॥ १८.११३८ ॥ " असे अनेक ठिकाणी त्यांनी म्हणून फक्त संहारणी आणि संहारणीच विशेषत्वाने आपणास अभिप्रेत असल्याचे स्पष्ट केले आहे. वन्ही-ज्वाळा, पाणीदूध-राजहंस, गंगा-सिंधू, दर्पण-प्रतिबिंब इत्यादि सर्व दृष्टांत संहारणीची प्रक्रियाच अधिक स्पष्ट करणारे आहेत. उभारणीचा विचार त्यांच्या लेखी नगण्य आहे. त्यामुळे " पैं सरितेचेनि ओघें । सिंधुजळा मीनलें घोघें । तें काय वर्तत आहे मागें । म्हणौनि पाहों येती ? ॥ ८.८४॥, ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेविं चित्ताचें चैतन्य जाहालें । जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥ ८.८५ ॥ " हीच त्यांची चित्त म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या चैतन्ययुक्त होण्याने पिंडब्रह्मांडाची संहारणी

होऊन घनानंदस्वरूप प्राप्तीची अंतिम सिद्धांतरूप मांडणी सर्व ज्ञानेश्वरीचे रूप घेऊन उभी राहिली असल्यामुळे सिद्धयोगाचे साधन, साधन आणि साधन व तद्द्वारा स्वसंवेद्य स्वरूपप्राप्ती हा एकच एक विचार अनंत शब्दरूपांनी साकार झालेला दृष्टिगोचर होतो. चित्‌शक्तिरूपी सरिता जेव्हा शिवरूपी सागराशी सिद्धयोगसाधनद्वारा पिंडब्रह्मांडाची संहारणी होऊन समरस होते तेव्हा मागे उभारणी झाली काय अन् न झाली काय, सर्व सारखेच आहे. तिकडे मागे काय होते आहे, झाले होते व चालले आहे हे पाहण्याकरिता ते चित्त परतत नाही. त्याच्या लेखी उभारणीची किंमत शून्य असते. "मावळवीत विश्वाभासु ।।१६.१।।" एवढेच त्याचे महत्त्व. त्यामुळे चितिशक्ती कुंडलिनी ही परमात्मप्राप्तीच्या साधनस्वरूपाने कशी प्रकट होते व ही परमप्रेमास्पद शक्तीच वस्तुनिर्देशप्रदर्शिका व वस्तुप्राप्तिपथगामिनी असल्यामुळे ती कशी अनुभूत होते एवढ्यापुरतेच हे शक्तिस्वरूपाचे विवेचन आहे. "भारतीय संस्कृति और साधना", खंड एक, या ग्रंथातील "कुंडलिनी-तत्त्व" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी यासंबंधी सुरुवातीलाच जी प्रार्थना केली आहे ती या दृष्टीने पाहण्यासारखी आहे. ते म्हणतात, "यह विषय साधना-जगत्‌का एक गंभीर रहस्य है। भाषाके साहाय्यसे इस विषयकी संपूर्ण आलोचना यद्यपि हो नहीं सकती, तथापि कुछ भी आलोचना न करना मानो भ्रांत-धारणाको स्थायित्व प्रदान करना है। अतएव यथाशक्ति स्पष्ट भावसे अपनी अनुभूति एवं श्रीगुरुदेवके "मौन व्याख्यान" का अनुसरण करते हुए, शास्त्रके तात्पर्यानुसार, हम इस निगूढ तत्त्वकी समालोचना करनेमें प्रवृत्त होते हैं। सहस्र वत्सरके पूर्व काश्मीर देशकी उपत्यकामें (पर्वतराजीके नीचे धरातलपर) बोधचक्षु श्रीतात्पर्याचार्यदेव "संविदेव हि भगवती वस्तूपगमे नः शरणम्" इत्यादि वाक्योंसे जिसकी जय-घोषणा कर चुके हैं, वर्तमान क्षेत्रमें भी वही भगवती संवद्देवी वस्तू-निर्देशकी प्रदर्शिका है। जो अनुभव-रसिक विद्वान् है, वे इस प्रबंधमें शब्दोंके ऊपर ध्यान न देकर तत्त्वांशकोही अपना लक्ष्य बनावें, यही प्रार्थना है।" ही प्रार्थना लक्षात घेऊनच "रसज्ञ व जेवणाऱ्या" श्रोत्यांनी "ज्ञानेश्वरीः सिद्धयोग दर्शन" या प्रबंधाकडे पाहावे अशी माझीही नम्र प्रार्थना आहे.

आपण प्रथम वेदातील शक्तीचे साधनस्वरूप पाहू. "ऋग्वेदातील" प्रथम मंत्रातील प्रार्थनेत ऋषी म्हणतात–

**ॐ अग्निमिळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम्॥१.१.१॥**

हे अग्निस्वरूप म्हणजे शक्तिस्वरूप परमेश्वरा तूच आमच्या साधनयज्ञमार्गाचा अग्रणी आहेस. हा अग्निदेव म्हणजे शक्तिदेव भक्तजनांचे मनोरथ उदार हस्ताने पुरवितो. तोच इतर देवतांना यज्ञस्थानात बोलावून आणतो म्हणजे ही अग्निरूप चित्‌शक्ती जागृत झाली की, ती इतर सर्व देवतांना आपल्यात समाविष्ट करते. या चित्‌शक्तिरूप अग्निदेवाच्या जवळ असंख्य रत्नांचा निधी असून तो पुण्यफलरूप

संपत्तीचे पोषण करतो. अशा या अग्नीचे म्हणजे शक्तीचे मी भक्तिपुरःसर स्तवन करतो. अशा प्रकारे ऋग्वेदाच्या दहाही मंडलात अग्नीची म्हणजे शक्तीची " अग्ने नय सुपथा राये ॥ १.१८९.१॥ " म्हणजे हे अग्निरूप शक्ती ! तू आम्हाला सुषुम्नेच्या योग्य मार्गाने बरोबर घेऊन जा व "प्रिये सदन आ शुशुक्वान् ॥१.१८९.४॥" म्हणजे मूलाधारातील तुझ्या यागगृहात उत्तम प्रकाशमान हो व सहस्रारातील घरात आम्हाला घेऊन जाऊन सोमामृताचे पान घडव अशी वारंवार प्रार्थना केली आहे. ऋग्वेदाच्या शेवटीही इतर सर्व भिन्नमते टाकून देऊन " नान्यः पंथा विद्यतेऽयनाया" म्हणजे या उपासनेशिवाय परमात्मप्राप्तीचा दुसरा मार्गच नसल्यामुळे या मार्गानेच जा असे सांगताना ऋषी म्हणतात—

सं गच्छध्वं सं वदध्वं सं वो मनांसि जानताम् ।
देवा भागं यथा पूर्वे संजानाना उपासते ॥१०.१९१.२॥
समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।
समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥१०.१९१.४॥

सर्वांनी आपापली भिन्न मते टाकून या एकाच साधनमार्गाचा अवलंब करावा. या बावतीत सर्वांची मने व हृदये समान, एकविध, सारखी व एकाच विचाराची असावीत; कारण या अग्नीच्या म्हणजे शक्तीच्या उपासनेशिवाय परमात्म-प्राप्तीचा दुसरा मार्ग नाही. " यजुर्वेदाच्या " शेवटी तर ऋषींनी स्पष्टपणे कुंडलिनी शक्तीच्या जागृतीची प्रार्थना करून उपासनामार्गाची याचनाच केली आहे. ते म्हणतात—

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।
तत्त्वं पूषन्नापावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥४०.१५॥
अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् ।
युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम् ॥१८॥

सहस्रारातील आदित्यमंडलात विराजमान असलेल्या आत्मरूप ब्रह्माचे द्वार मूलाधारात असून ते आत्मशक्तीच्या ज्योतिर्मय पात्रानेच झाकून टाकले आहे. हे पूषन् ! हे करुणाघन परमात्म्या ! मला सत्यधर्माची प्राप्ती व्हावी म्हणून हे मुख तू उघड. ती शक्ती जागृत होऊ दे. हे शक्ती ! तू जागृत झाल्यावर आम्हास सुषुम्नेच्या योग्य मार्गाने घेऊन जा. तू सर्व ज्ञान व कर्म म्हणजे योगसाधन जाणणारी आहेस. आमची सर्व पापे तू भस्म कर. यासाठी आम्ही तुला नमस्कार करतो.

"अथर्ववेदात" या शक्तीचे उच्छिष्ट ब्रह्म म्हणून वर्णन केले असून ठिकठिकाणी शब्दब्रह्म,वाक्ब्रह्म इत्यादि नावांनी चित्शक्तीचे स्वरूप स्पष्ट केले आहे.या दृष्टीने तिचे वर्णन करताना ऋषी म्हणतात—

अहमेव स्वयमिदं वदामि जुष्टं देवनामुत मानुषाणाम् ।
यं कामये ततमुग्रं कृणोमि तं ब्रह्माण तमृषिं तं सुमेधाम् ॥४.६.३०॥

मी स्वतःच आत्मरूप आहे. इंद्रादि देव व मनुष्यांना प्रिय ब्रह्मात्मक वस्तूची प्राप्ती व्हावी म्हणून मी उपदेश करते. मी ज्याचे रक्षण करण्याची इच्छा करते त्याला स्वतःच जागृत होऊन प्रबळ करते. अशा सर्वांना मीच ईश्वर, स्रष्टा व ऋषी करून त्यांना सुंदर बुद्धीने संपन्न करते. इतकेच नव्हे तर या शक्तीचे वर्णन करताना या सूक्तातच ऋषी म्हणतात, "अन्न भक्षण करणारा भोक्ता माझ्याद्वाराच अन्न खातो, पाहतो, ऐकतो, श्वास घेतो व सर्व कार्ये माझ्याद्वारेच करतो. अशा प्रकारे अंतर्यामी स्वरूपात मी व्याप्त आहे. जे मला जाणत नाहीत, उपासना करीत नाहीत व माझ्या जागृत अवस्थेच्या रूपाने साधनरत होत नाहीत ते उपेक्षणीय होतात. मी हे भक्ती करण्यास योग्य असे माझे तत्त्व सांगत आहे, ते श्रद्धेनें ऐकले पाहिजे. विधाता व संसार याला मीच कारण असून ब्रह्मचैतन्याचे निमित्तही मीच आहे. समुद्रातील वडवानल व विद्युतरूप तेज हे माझेच रूप आहे. मीच सर्व प्राण्यांना प्रकट करून स्वर्ग व ब्रह्मामधील विकारांना मायात्मक देहाने स्पर्श करते. मी कोणाच्याही कोणत्याही साहाय्याशिवाय सर्वांना उत्पन्न करते व वायुप्रमाणे प्रवृत्त होते. द्युलोक, पृथ्वी व संपूर्ण विकारांनी रहित अशी मी ब्रह्मचैतन्यरूप असून आपल्या स्वतःच्या श्रेष्ठत्वाने व महत्तेनेच मी अशी शक्तिशालिनी व ऐश्वर्यसंपन्न झाले आहे."

वेदातील शक्तीच्या साधनस्वरूपाच्या वर्णनाप्रमाणेच परमात्मप्राप्तीचे रहस्यमय व गूढ ज्ञान ज्यात साठविले आहे अशा वेदान्तात म्हणजे उपनिषदात तर नाना तऱ्हेने शक्तीचे साधनस्वरूप प्रकट झाल्याचे दिसून येते. आपण वर युजर्वेदाच्या शेवटच्या अध्यायातील जे शक्तीचे स्वरूप पाहिले तो अध्याय "ईशावास्योपनिषद" या नावाने प्रसिद्ध असल्याने उरलेल्या महत्त्वाच्या उपनिषदातून हे स्वरूप कसे प्रकट झाले आहे ते पाहू.

सिद्धयोगसाधनरूपी ब्रह्मविद्येचा गुरुरूपाने अवतार कसा झाला याची कथाच "केनोपनिषदात" ऋषींनी पुढील प्रमाणे सादर केली आहे. "एकदा देव व असुर यांचे युद्ध झाले. युद्धात देवांचा जय झाला. त्यामुळे त्यांना अभिमान उत्पन्न झाला. सात्त्विक देवांना असा अभिमान होणे बरे नव्हे, तो त्यांना देवत्वापासून भ्रष्ट करणारा आहे, असे भगवंताला वाटले. त्यांना सर्व जगच्चालक आत्मवस्तूची म्हणजे शक्तीची जाणीव करून देऊन, झालेला अभिमान घालविण्याच्या दृष्टीने भगवंतांनी आपल्या शुद्धसत्त्वात्मक मायाशक्तीने अत्यंत विस्मयकारक रूप धारण केले व ते देवांसमोर आले. देवांना ते कोण आहेत हे समजेना. इंद्रादि देवांनी ते कोण आहेत हे समजून घेण्याकरिता अग्नी व वायू यांना क्रमाने भगवंताकडे पाठविले. ते आल्या-

वर भगवंतांनी त्या प्रत्येकाला तू कोण म्हणून विचारले. त्यावेळी प्रत्यकाने आपले नाव सांगून आपल्या पराक्रमाचे वर्णन केले. तेव्हा भगवंतांनी त्यांच्यापुढे एक गवताची काडी टाकून अग्नीला ती जाळण्याला व वायूला ती उडवून द्यावयास सांगितले; पण अग्नीला ती काडी जाळता आली नाही किंवा वायूला ती उडविता आली नाही. तेव्हा अग्नी व वायू लज्जित होऊन इंद्राकडे परत आले व तूच जाऊन ते कोण आहेत हे जाणून घे असे ते म्हणाले. त्यामुळे इंद्र भगवंताकडे आला पण भगवान् तेथेच अंतर्धान पावले. अग्नी व वायू यांना दर्शन झाले व बोलण्यासही मिळाले पण आपल्याला मात्र दर्शन देखील झाले नाही, असे मनात येऊन इंद्राला फार वाईट वाटले. इंद्र अशा रीतीने शोकाकुल झाला असता त्याला भगवंतांचे ज्ञान करून देण्याकरिता, भगवान् शंकरांची विद्याशक्ती उमा अतिसुंदर स्वरूप धारण करून प्रकट झाली. इंद्राने सुवर्णभूषणांनी विभूषित झालेल्या पार्वतीस्वरूपी ब्रह्मविद्येला विचारले की, अति विस्मयजनक अशा स्वरूपाने इतक्यात येथे कोण आले होते ? तेव्हा ती म्हणाली, ते ब्रह्म होते. तुम्हाला जो विजय प्राप्त झाला तो परब्रह्मामुळेच झाला. तुम्ही येथे निमित्तमात्र झाला." या कथेवरून हेच सिद्ध होते की, जोपर्यंत चित्‌शक्ती जागृत होऊन मार्गदर्शन करीत नाही तोपर्यंत साधकाला ब्रह्मप्राप्ती होऊ शकत नाही. परमेश्वराला विसरलेल्या जीवाला त्या परमेश्वराचे ज्ञान करून देण्याकरिता भगवंताची विद्याशक्तीच गुरुरूपाने प्रकट होऊन जीवाला उपदेश करीत असते. " ब्रह्मैव गुरुरूपेणावतिष्ठते । " ब्रह्मच गुरुरूपाने प्रकट होते अशी स्मृतीही आहे. या परमेश्वराच्या शक्तीलाच प्रकृती, माया, विद्या, उमा, दुर्गा, प्राण, अग्नी, देवी इत्यादि नानाविध नावांनी गौरवून तिचे स्वरूप शास्त्रकारांनी स्पष्ट केले आहे.

"कठोपनिषदात" यमधर्म व नचिकेत यांचा जो संवाद आला आहे त्यातही शक्तीचे साधनस्वरूप पुढीलप्रमाणे दृष्टिगोचर झाल्याचे दिसून येते. नचिकेताने यमधर्माला विचारले आहे की, "आत्मस्वरूप हे अंगुलीनिर्देशाने दाखविता येण्याजोगे व सांगता येण्यासारखे नसून, ते निरतिशय आनंदस्वरूप व अत्यंत शांतिसुखयुक्त आहे, असे विवेकी, अनुभवसिद्ध व ब्रह्मज्ञ लोक मानतात. ते सुख कोणत्या साधनाने मला जाणता येईल ? व ते परमसुख प्रकाशात्मक होऊन स्पष्ट दिसण्यासाठी मला काय करावे लागेल हे समजेल काय ? ( कठोपनिषद २.२.१४ ) हा आत्मा वाणीने, मनाने व नेत्रादि इंद्रियांनी प्राप्त होण्यासारखा नाही व तो आहे असे म्हणणाऱ्यास मात्र तो प्राप्त होतो असा तर आपला सिद्धांत आहे. त्यामुळे नास्तिकांना तो उपलब्ध होणे शक्य नाही हे खरे असले तरी आस्तिकांना तो कोणत्या साधनाने उपलब्ध होतो हे मला कथन करावे. (कठ २.२.१२) नचिकेताच्या या प्रश्नाला उत्तर देताना यमधर्मांनी प्रथम योगाचे व्याख्येसह फल सांगून नंतर त्याच्या प्राप्तीचा मार्ग प्रकट

केला आहे. ते म्हणतात, "ज्यावेळी पंचज्ञानेंद्रिये मनासह किंवा अंतःकरणासह स्तब्ध व अंतर्मुख होऊन आत्म्यामध्येच स्थिर होतात व बुद्धी ही विषयनिवृत्त किंवा निर्विषय झाल्यामुळे अचंचल बनून आपला निश्चयरूप व्यापार करीत नाही, त्या अवस्थेला परम किंवा श्रेष्ठ गती म्हणतात. त्या स्थिर अशा इंद्रियधारणेला किंवा इंद्रियांच्या स्थिरीकरणाला योग असे म्हणतात.या योगसाधनेच्या स्थितीत साधकयोगी प्रमादशून्य, सावध व समाधानवृत्तीचा होतो; कारण शिवशक्त्यात्मक सामरस्यरूपी संयोग व संकल्पविकल्पात्मक विश्वाभासाचा वियोग असे योगाचे संयोग-वियोगात्मक लक्षण आहे. ( २.२.१०,११ )" इतके सांगून यमधर्म आत्मप्राप्तीचा जागृतशक्ति-युक्त मार्ग नचिकेताला कथन करताना म्हणतात–

**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ।**
**क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदंति ॥१.३.१४॥**
**शतं चैका च हृदयस्य नाडयस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका ।**
**तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवंति ॥२.३.१६॥**

अनादिनिद्रिने आत्मशक्तीत झोपलेल्या हे पुरुषांनो ! उठा, जागे व्हा. सर्व अनर्थाचे बीज असलेल्या अनादि आत्मशक्तीच्या अज्ञाननिद्रेचा त्याग करा. सद्गुरूला शरण जाऊन शक्तिपाताची दीक्षा घेऊन जागृत शक्तिद्वारा ज्ञान संपादन करा. एखाद्या शस्त्राला धार लावली असता ती धार जशी अतिशय तीक्ष्ण होते व त्या धारेवरून उघडचा पायाने जाता येत नाही, त्याप्रमाणे आत्मज्ञानाचा खरा साधनमार्ग किंवा तत्त्वज्ञान समजण्यास अतिशय कठीण आहे. यासाठी सद्गुरुकृपेने प्राणांना हळुवारपणा येऊन म्हणजे बुद्धी सूक्ष्म होऊन तिचे सुषुम्नेत चालन झाले पाहिजे असे ज्ञानी लोक सांगत असतात. हृदयातून एकशेएक नाडचा बाहेर निघून त्या शरीरभर पसरलेल्या आहेत. त्यातील सुषुम्ना नावाची नाडी मस्तकाचा भेद करून जाणारी आहे. हिलाच शक्ती म्हणतात. तिच्या साहाय्याने वर जाणारा जीव अमृतत्व प्राप्त करून घेतो. पण इतर नानामार्गांनी जाणाऱ्या ज्या इतर शंभर नाडचा आहेत, त्यांचे साहाय्य घेणारे जीव जन्ममरणाच्या चक्रात सापडतात."

"प्रश्नोपनिषदात" स एष वैश्वानरो विश्वरूपः प्राणोऽग्निरुदयते ॥१.७॥" असे म्हणून हा वैश्वानर म्हणजे ही शक्तीच प्राण व अग्निरूपाने उदय पावून सर्व व्यापते असे सांगितले आहे. पुढे " आत्मन एष प्राणो जायते । यथैषा पुरुषे छाये-तस्मिन्नेतदाततं मनोकृतेनाऽऽयात्यस्मिंशरीरे ॥ ३.३ ॥" असे उधृत करून आत्म्या-पासूनच प्राण म्हणजे शक्ती उत्पन्न होते व ती छायेप्रमाणे आत्म्याशी एकरूप असते असे तिचे शिवशक्त्यात्मकस्वरूप स्पष्ट केले आहे. शेवटी " अथैकयोर्ध्व उदानः पुण्येन पुण्यं लोकं नयति ॥३.७॥" असा जीवाच्या परमप्राप्तीचा साधनमार्ग सांगताना जीवाची उदानशक्तीच्या आधाराने जेव्हा सुषुम्नेतून ऊर्ध्वगती होते तेव्हाच तो

पुण्यलोकास म्हणजे सहस्त्रारातील शिवास जाऊन मिळतो म्हणून स्पष्ट केले आहे.

"मुंडकोपनिषदात" द्वे विद्ये वेदितव्ये पराचैवापरा च ।।१.१.४।।" असे प्रथम सांगून परा व अपरा अशा दोन विद्या आहेत हे साधकाने जाणून ऋग्वेदशिक्षाकल्पव्याकरणादि अपरा विद्येत त्याने न रमता पराविद्येच्या प्राप्तीसाठी "तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठं ।।१.२.१२।।" श्रोत्रीय व ब्रह्मनिष्ठ सद्गुरूंकडे अत्यंत लीन होऊन ब्रह्मपदाच्या साक्षात्कारासाठी जावे असे म्हटले आहे. ज्यावेळी साधक अशा प्रकारे सद्गुरूंकडे येतो तेव्हा ते शब्दज्ञानाने व शक्तिपाताने तिचे प्रत्यक्ष दान करून ती ब्रह्मविद्या "तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम् प्रोवाच ।।१.२.१३ ।।" म्हणजे त्याला तत्त्वतः सांगतात. त्यामुळे साधकाला "भिद्यंते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः। क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ।।२.२.८।। ही स्थिती प्राप्त होते. त्या परात्पर ब्रह्माला प्रत्यक्ष पाहिल्यामुळे त्याच्या सर्व हृदयग्रंथींचा छेद होतो. सर्व संशयांचा नाश होतो आणि कर्मांचा क्षय होतो. अर्थात् ही स्थिती "सत्येन पंथा विततो देवयानः ।। ३.१.६ ।।" म्हणजे सत्यस्वरूप अशा देवयानमार्गाच्या म्हणजे सुषुम्नापथाच्या रूपाने असलेल्या मार्गानेच "ज्ञानप्रसादेन विशुद्ध सत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ।।३.१.८।। या न्यायाने जेव्हा साधकाला सद्गुरुकृपेने शक्तिपातयोगदीक्षेचा प्रसाद प्राप्त होतो तेव्हा प्राणांचे सुषुम्नेत चालन झाल्यामुळे अंतःकरण आपोआप शुद्ध होऊन व अशा प्रकारे अवयवरहित निष्कल ब्रह्मध्यानाचे साधन नित्यनियमित अखंडपणे करून, तो आत्म्यास पाहतो. याशिवाय दुसरा मार्ग नाही; कारण परमात्मा स्वयंप्रभ म्हणजे आपल्या नित्यशक्तीने युक्त असून व्यापक, तेजोमय, दिव्य, महान्, अकल्पनीय व अचिंत्य स्वरूपाचा असल्यामुळे त्याची कल्पना येणे दुसऱ्या कोणत्याही साधनाने शक्य नाही. तो सूक्ष्माहून सूक्ष्म व दुराहून दूर असला तरी एकमात्र सद्गुरुकृपेने जागृत शक्तीच्या साहाय्याने जवळात जवळ असा आपल्या ठिकाणीच आहे असा प्रत्ययास येतो. केवळ अशा प्रकारे चेतनायुक्त झालेल्या पुरुषालाच हे गूढ तत्त्व आपल्या बुद्धिरूप गुहेत सापडते. तो परमात्मा डोळ्यांनी दिसत नाही. शब्दांनी सांगता येण्यासारखा नसल्यामुळे वाणीने त्याचे ग्रहण करता येत नाही. इतर इंद्रियांनी, तपश्चर्येने किंवा केवळ कर्माने तो प्राप्त होत नाही. "एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यो ।। ३.२ ९ ।।" म्हणजे हा अणुरूप आत्मा केवळ जागृत ज्ञानशक्तिद्वाराच प्राप्त होतो, एवढेच नव्हे तर; "यास्मिन्विशुद्धे विभत्येष आत्मा ।। ३.२.९ ।।" तो स्वतःच साधकाच्या ठिकाणी या साधनाने प्रकाशित होतो. एरवी हे स्वसंवेद्य आत्मरूप नुसत्या व्याख्यानाने, वेदशास्त्राध्ययनाने, तर्काने, धारणाशक्तीने, पुष्कळ श्रवणान व चित्शक्ती जागृत न झाल्यामुळे बलहीन असल्यामुळे साधकाला प्राप्त होत नाही. तर "यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ३ २.३ ।।" याप्रकारे ज्यावेळी तो

सद्गुरुकृपेने जागृत शक्तीकडून वरला जातो तेव्हा तो आपणच आपले स्वरूप स्वतःहून साधकापुढे प्रकट करतो. यामुळे साधक आत्मकाम व वितशोक होऊन परमामृत मिळवितो व आनंदरूपाने "परमं साम्यमुपैति ॥ ३.१.३ ॥" या न्यायाने अद्वयरूप परमसाम्यस्वरूपास प्राप्त होतो. साधनरूप कुंडलिनी शक्तीचे असे अद्‌भुत स्वरूप आहे.

"मांडूक्योपनिषदाच्या" सुरुवातीला "ओमित्येतदक्षरमिदं सर्वं तस्योपव्याख्यानं भूतं भवद्भविष्यदिति सर्वमोंकार एव । यच्चान्यत् त्रिकालातीतं तदप्योंकार एव ॥१॥" असे म्हणून ॐ हे अक्षरब्रह्म, परब्रह्म किंवा शब्दब्रह्म आहे असे स्पष्ट केले आहे. हे सर्व दृश्य विश्व त्याचेच स्वरूप आहे. सर्व भूत, भविष्य व वर्तमान म्हणजे झालेले, होत असलेले व होणारे जे काही सर्व आहे ते ओंकारच आहे. जे दुसरे काही त्रिकालाच्या पलीकडे आहे, ते सर्वही ओंकारस्वरूपच आहे. ओंकाराला शब्दब्रह्म म्हणतात. शब्द म्हणजे शक्ती होय. म्हणून ओंकार म्हणजे शक्तियुक्त ब्रह्म होय. त्यामुळे या शक्तियुक्त ओंकारस्वरूपाची उपासना येथे साधन म्हणून सांगितली आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही मांडूक्योपनिषदाच्या सुरुवातीच्या "संबंधभाष्यात" म्हणजे भाष्यपूर्व प्रस्तावनेत ॐकार हा साधनस्वरूप असून तो आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देणारा आहे हे सांगताना असे म्हटले आहे की, "आम्ही ओंकारस्वरूपाचा निर्णय आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देतो असे जे म्हटले आहे ते अनुमानाच्या जोरावर म्हटलेले नाही. आमचे म्हणणे श्रुतीच्या आधारावर आहे. श्रुती हा आमचा बळकट पुरावा आहे. म्हणून आम्हास व्याप्तिमूलक साहचर्याचा किंवा कार्यकारण-संबंधाचा विचार करण्याचे कारण नाही. प्रत्यक्ष श्रुतिमाता आमच्या म्हणण्यास आधार आहे. ओंकार हे सर्व आहे ( ओमित्येतत्-कठ. उ. १.२.१५), ओंकार श्रेष्ठ आलंबन आहे ( एतदालम्बनम्-कठ. उ. १.२.१७ ), हे सत्यकाम ! ओंकार अपर ब्रह्माचे व परब्रह्माचे प्रतीक व वाचक आहे (एतद्वै सत्यकाम-प्र. उ. ५.२), ओंकार आत्मरूप आहे असे समजून ध्यानमूलक योगाभ्यास करावा ( ओमित्यात्मानं युंजीत-मैत्र्यु. उ. ६.३. ), ओंकार हे ब्रह्म आहे ( ओमिति ब्रह्म-तै. उ. १.८.१ ), सर्व काही ओंकारमात्र आहे (ओंकार एवेदं सर्वम्-छा. उ. २.२३.३ ) इत्यादि अनेक श्रुती आमच्या म्हणण्याचे समर्थन करतात आणि ओंकारज्ञानाने ब्रह्मज्ञान होते असे सांगतात." सारांश, ओंकाराचे म्हणजे शक्तीचे ज्ञान होणे व ती सद्गुरुकृपेने जागृत होणे हा ब्रह्मज्ञानप्राप्तीचा उपाय आहे असे श्रुतिद्वारा सिद्ध होते. वरील मंत्रावर भाष्य करतानाही त्यांनी, ओंकार हा ब्रह्मस्वरूपाशी शक्तिरूपाने संलग्न असलेला पदार्थ असल्यामुळे तो ब्रह्मज्ञानप्राप्तीचा उत्तम उपाय आहे, असे म्हटले आहे. या उपनिषदाच्या शेवटच्या मंत्रात शक्तिस्वरूप ओंकार हा शिवाशी एकरूप व अद्वैतरूप कसा आहे हे सांगून याची उपासना स्वसंवेद्य व साम्यरूप

आत्मस्वरूपाची उपलब्धी करून देते हे सांगताना असे म्हटले आहे की, "अमात्रश्च-तुर्योऽव्यवहार्यः प्रपंचोपशमः शिवोऽद्वैत एवमोंकार आत्मैव संविशत्यात्मनाऽऽत्मानं य एवं वेद ॥१२॥" ज्याला मात्रा नाहीत असा ॐकराचा म्हणजे शक्तीचा चौथा पाद आहे. ही स्थिति अमात्रक, निष्कलंक, निरंजन अशी स्वसंवेद्य व आत्मरूप असल्याने ती व्यवहार्य नाही. हा पाद म्हणजे ही स्थिती किंवा हे ठिकाण सहस्रारात असून तेथे प्रपंच विलीन होतो व पिंडब्रह्मांडाची संहारणी पूर्ण होते. हा शक्तिरूप ओंकार या स्थितीत शिवरूप व अद्वैतरूप असतो. याप्रमाणे ओंकार म्हणजे ही शक्तीच आत्मा आहे असे ज्याला ज्ञान होते, तो या ओंकाररूपी आत्मशक्तीच्या साहाय्याने आत्मस्वरूपात प्रवेश करतो. श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही "ॐकार व आत्मस्वरूप हे एक आहेत असे ज्याला विज्ञान झाले आहे म्हणजे नाम व नामी हे एकरूप आहेत हे ज्याने ध्यानाने जाणले व अनुभविले आहे,तो ज्ञानी पुरुष आत्मरूप होऊन आत्म-साधनाने आपण स्वतः परमार्थतः आत्मस्वरूपामध्ये प्रवेश करतो," असे या मंत्राच्या भाष्यात म्हटले आहे. भगवान् रामचंद्रांनी श्रीमारुतीरायांना एवढे एकच उपनिषद अभ्यासिले म्हणजे सर्व उपनिषदांचा अभ्यास केल्यासारखे आहे असे सांगून त्याचा उपदेश केला. त्याचे रहस्य उपरोक्त विवेचनात व श्रीगौडपादाचार्यांनी " मांडूक्योपनिषदावरील कारिकेत " म्हटल्याप्रमाणे " दुर्दर्शमतिगंभीरजं साम्यं विशारदं पदमनानात्वं ॥४.१००॥ " या प्रकाराने पाहावयाला म्हणजे इंद्रियगोचर व्हावयाला व कल्पना करण्याला सर्वथा अशक्य, अत्यंत गूढ, अनुत्पन्न, निर्विशेष आणि परमशुद्ध असे जे आत्मरूप आहे, त्या आत्मस्वरूपाच्या स्थितीत संन्निविष्ट आहे.

याचप्रमाणे पुढे "तैत्तिरीय,ऐतरेय,छांदोग्य,बृहदारण्यक,कौषीतकी, जाबालादि उपनिषदांत" ओंकार, उद्गीथ, अग्नी व प्राण यांच्या म्हणजे शक्तीच्या आलंबनाने आत्मस्वरूप प्राप्तीचा मार्ग कथन केला आहे. " श्वेताश्वतरोपनिषदाच्या " सुरुवातीला तर सृष्टीचे कारण काय आहे? म्हणजे कारणब्रह्माचे स्वरूप काय आहे ?, आपण कोठून जन्मलो ?, कशामुळे जगतो ?, आपण कोणत्या आधारावर जिवंत आहोत ?, सुखदुःखात कोणाच्या व्यवस्थेने राहतो ? " इत्यादि प्रश्न ब्रह्म-वेत्यांना पडले असे सांगून लगेच त्याचे उत्तर देताना ऋषीं म्हणतात--

**ते ध्यानयोगानुगता अपश्यन्देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम् ।**
**यः कारणानि निखिलानि तानि कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः ॥१.१.३॥**

ब्रह्मवेत्ते ते कारण जाणण्यासाठी जेव्हा ध्यानयोगाच्या अभ्यासात रत झाले तेव्हा त्यांना देवाच्या आत्मशक्तीचे म्हणजे चित्शक्ती कुंडलिनीचे दर्शन झाले व तो अद्वितीय परमात्मा काल व पुरुष यांनी युक्त असलेल्या सर्व कारणांचे नियमन आपल्या या शक्तिद्वाराच करतो असे त्यांनी पाहिले. या शक्तीचे स्वरूप अधिक स्पष्ट करताना ऋषी म्हणतात--

मायां तु प्रकृतिं विद्यान्मायितं तु महेश्वरम् ।
तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥४.१०॥
परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ॥६.८॥

माया म्हणजेच प्रकृती आणि त्या मायेला सत्ता व स्फूर्ती देणारा महेश्वर होय. या शिवशक्तिरूप परमात्म्याच्या अवयवांनीच हे सर्व जग व्यापिले आहे. परमेश्वराची श्रेष्ठ शक्ती नानाप्रकारची आहे. ती स्वाभाविक म्हणजे अनादिसिद्ध असून तिची ज्ञानाची व बळाची क्रियाही स्वाभाविकच आहे.

उपरोक्त महत्त्वाच्या उपनिषदांप्रमाणे उरलेल्या समस्त उपनिषदात व विशेषेकरून "योगोपनिषदात" उपरोक्त विवेचनाचा पायाभूत पद्धतीने अगर सूत्ररूपाने अंगीकार करून या शक्तीच्या साधनभूत स्वरूपाचा सांगोपांग विचार मांडल्याचे दिसून येते. तो सर्व येथे प्रस्तुत केल्यास खूपच विस्तार होईल. वर जो सिद्धयोग साधनरहस्याचा विचार सविस्तर केला आहे त्याचे कारण मूळ गीताच "सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः ।" व " उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे ।" अशी असल्यामुळे आणि श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " जें उपनिषदांचें सार ॥ १८.१७९८ ॥" असा तिचा गौरव करून हे सार भावार्थाच्या रूपाने ज्ञानेश्वरीत प्रकट केल्याने हा सर्व विषय उलगडून सांगणे क्रमप्राप्त ठरले. गीता ही उपनिषदांचे सार असून त्याचे रहस्य आपण उलगडून दाखवित आहोत अशी त्यांची भूमिका असल्यामुळे उपनिषदांचा या दृष्टीने उल्लेख करताना ते म्हणतात –

एवं कथिलयादारभ्य । हें जें सर्व शास्त्रैकलभ्य ।
उपनिषदां सौरभ्य । कमळदळां जेवीं ॥१५.५७१॥
हें शब्दब्रह्माचें मथितें । श्रीव्यासप्रज्ञेचेंनि हातें ।
मथूनि काढिले आयितें । सार आम्हीं ॥५७२॥
एवं ॐतत्सदाकारु । ब्रह्मनाम हें त्रिप्रकारु ।
हे फुल तुरंबी सुंदरु । उपनिषदाचें ॥१७.३४३॥
तेव्हां बैसतेनि आनंदें । म्हणें जी जें उदनिषदें ।
नेणती तें व्यासप्रसादें । ऐकिलें मियां ॥१८.१६०९॥
जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर ।
परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥१८.१८०८॥
उपनिषदें जें गाती । योगियें हृदयीं रिगोनि पाहाती ।
तयातें सनकादिक आहाती । पोटाळुनियां ॥११.८५॥
ऐसें अगाध जें तुझें । विश्वरूप कानीं ऐकिजे ।
तें देखावया चित्त माझें । उतावीळ देवा ॥८६॥

आम्ही शब्दब्रह्माने म्हणजे शक्तियुक्त ब्रह्माने उपनिषदांचे मंथन करून

व सिद्धयोगाचे दर्शन आरंभापासून घडवून त्यातील साररूप सुवास सर्वत्र दरवळ-विला आहे. ॐकार म्हणजे शब्दब्रह्म अर्थात् शक्तियुक्त शिव किंवा शक्तियुक्त नाम हे उपनिषदांचे साधनरूप सुंदर फूलच आहे. शक्ती ही अशी साधनरूप असल्यामुळे त्यातील आनंद उपनिषदेही जाणत नाहीत असे संजय म्हणाला व उपनिषदांनी कथन केलेल्या स्वरूपाची प्राप्ती सद्‌गुरुकृपायुक्त शक्तिपाताने आपणास व्हावी म्हणून अर्जुनाने प्रार्थना केली.

उपनिषदांप्रमाणेच ब्राह्मण, आरण्यके, पुराणे, योगवासिष्ठ, ब्रह्मसूत्रे, सांख्य-दर्शन व समस्त तंत्र ग्रंथात शक्तीच्या तात्त्विक व साधनस्वरूपाचा विचार विस्ताराने केलेला आढळतो. पुराणातील लिंग, अग्नी व शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेत हा विषय अगदी स्पष्टपणे उलगडून त्याच्या अंगोपांगासह स्पष्ट केला आहे. सर्व तंत्र ग्रंथांनी तर शक्तीच्या स्वरूपाचा अत्यंत सूक्ष्मातील सूक्ष्म विचार प्रकट करून या विषयाची परमावस्था प्रकट केल्याचे दिसून येते. सर्व कौल दर्शने, त्रिकदर्शन, प्रत्यभिज्ञादर्शन, स्पंदशास्त्र, श्रीअभिनवगुप्तप्रणीत काश्मीरीय शैव दर्शन इत्यादि सर्वांनी या एकाच विषयाला प्राधान्य देऊन आपली दर्शने सजविल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. वरील सर्व ग्रंथांचा वारसा घेऊन समन्वयभूमिकेवर उभ्या राहिलेल्या महायोगी गोरक्षनाथांनी सिद्धसिद्धांतपद्धती, महार्थमंजरी, गोरक्षशतक, विवेकमार्तंड, गोरक्षसिद्धांतसंग्रह इत्यादि ग्रंथात शक्तीचे अपार असे साधनात्मक व तात्त्विक स्वरूप गुरुकृपेने कवळून व तिचे महातेज मुठीत धरून अत्यंत धवल व शुद्ध स्वरूपात पुढे मांडले आहे. अशा प्रकारे गुरुपरंपरेने प्राप्त झालेले हे समाधिधन ज्ञानेश्वरीत दृष्टीस पडत असल्याने त्यासंबंधी कितीही चर्चा केली तरी ती अपुरीच ठरेल. असे असले तरी उपरोक्त सर्व ग्रंथातील विषय साररूपाने मांडण्याचा प्रयत्न करतो.

शक्तीच्या स्वरूपाचा विचार मांडताना प्रथमतःच एक असा विचार स्पष्टपण मांडणे आवश्यक आहे की, बहुतेक समस्त दर्शनांनी या ना त्या रीतीने शक्तिवादाचा स्वीकार केला आहे. बहुतेक सर्व म्हणण्याचे कारण न्याय व वैशेषिक दर्शनात जडशक्तिवादाचाही स्वीकार केलेला नाही. तांत्रिक साहित्यात ज्या कुंडलिनी शक्तीचे वर्णन जागोजाग आले आहे, ती जडशक्ती नसून चिद्रूपशक्ती आहे. मीमांसक लोक शक्ती मानतात. शांकर-वेदांतीही शक्ती मानतात; परंतु ती शक्ती मायारूप असून ते लोक तिला अनिर्वचनीय व मिथ्या मानतात. ही मायारूप शक्ती अचिंत्य व दुर्घट अर्थसंपादनाचे कार्य करणारी असून ती प्राचीन कालापासून सर्वत्र प्रसिद्ध आहे. "इंद्रो मायाभिः पुरुरूप ईयते" इत्यादी वेदवाक्यांवरून "एकोऽहं बहुस्याम" होण्यात मुळात ह्या शक्तीची क्रियाच कारण मानली जात होती, हे प्राचीन मत स्पष्ट होते. खरे पाहिले तर ही शक्ती म्हणजे परमेश्वराचा अचिंत्य महिमा किंवा स्वातंत्र्य

आहे. " एतावानस्य महिमा ततो ज्यायांश्च पूरुषः ।। छां. ३.१२.६।।" असा उपनिषदकारांनीही गायत्र्यात्मक शक्तीची ब्रह्माशी एकरूपता दाखवून, जीवाने गायत्रीद्वारा म्हणजे शक्तिद्वारा ब्रह्मचिंतन करून ब्रह्माशी एकरूप व्हावे असे सांगून, या चिद्रूपा शक्तीचा व ती साधनस्वरूप असल्याचा स्पष्ट उल्लेख केला आहे योगदर्शनात "चितिशक्तिरपरिणामिनी" असे म्हटले आहे. संक्षेपशारीरकार सर्वज्ञात्ममुनींनी आपल्या ग्रंथात " अमला चितिशक्तिः " असे स्पष्ट म्हटले आहे. परंतु येथे पहिल्या ठिकाणी शक्ती पुरुषाभिन्न व दुसऱ्या ठिकाणी ब्रह्माभिन्न आहे. खरे म्हणजे चिद्रूप शक्तीचे विशेष विवेचन तांत्रिक आगम ग्रंथातच आले आहे. सोमानंदादि आचार्यांच्या " शिवदृष्टि " इत्यादि ग्रंथामध्ये त्याचे विवरण दिसून येते.

यामुळे शक्ती शब्दाने कूटस्थ ब्रह्म किंवा पुरुष अगर जडशक्ती असे सूचित करावयाचे नसून " वस्तुसामर्थ्यशक्ती ।। १.७८ ।।", "ईश्वरसत्ता ।। १८.१३११ ।।" किंवा " या उपाधीमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ।।२.१२६।।" अशा प्रकारची "चितिः स्वतंत्रा विश्वसिद्धिहेतुः ।। प्रत्याभिज्ञाहृदय ।।१।। अशी चिद्रूप शक्ती आहे असे सांगावयाचे आहे. ही चितिशक्ती स्वतंत्र आहे व ती पिंडब्रह्मांडाच्या उभारणी-संहारणीचे कारण आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अमृतानुभवात " पुढील ओव्यात ह्याच विचार स्पष्ट केला आहे. ते म्हणतात—

> ऐश्वर्येंसी ईश्वरा । जियेचें अंग संसारा ।
> आपलाही उभारा । आपणचि जे ।।१.२९।।
> जयां दोघांमाजी एखादें । विपायें उमजलें होय निदे ।
> तरी घरवाते गिळोनि नुसधें । कांहीं ना करी ।।१.१४।।

अशा प्रकारे ह्या शक्तीच्या उभारणी-संहारणीचा विषय अत्यंत सूक्ष्म आहे असे " जो हा ठावोवरी मंदरूपे ।। १.३५ ।। " असे म्हणून त्यांनी " अमृतानुभवात " प्रकट केला आहे. अशा प्रकारची शक्ती ऐश्वर्ययुक्त, स्फूर्तियुक्त, प्रकाशयुक्त, चैतन्ययुक्त व स्वातंत्र्ययुक्त शिवाशी अभिन्न असली तरी ती विश्वसृष्टीच्या निर्मितीचे मूलभूत कारण आहे. अर्थात् विश्वाची निर्मिती किंवा उभारणी होत असताना शक्तीचा परिणाम किंवा रूपांतर होत नाही; परंतु प्रसार किंवा संकोच होतो. शक्तीच जगताचे रूप घेऊन प्रकट होते. भोक्ता व भोग्य ही दोन्ही शक्तिरूप असतात. याची नियामिका शक्तीच असते. वस्तुतः अभिनयही शक्तीच करते व अभिनयाची प्रेक्षिका शक्तीच असते. " जो प्रियुचि प्राणेश्वरी । उलथे आवडीचिये सरोभरी । चारुस्थळीं एकाहारी । एकांशाची ।।१.२।। " या " अमृतानुभवातील" एका ओवीतच ह्या सर्व भाव श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं व्यक्त केला आहे. स्वरूपस्थितीमध्ये जीवसुद्धा शक्त्यात्मक असल्याने द्रष्टामात्रच असतो. तटस्थ जीव स्वरूपतः द्रष्टा तर मायाजाळयात अडकलेला जीव भोक्ता व किंचित् जागृत्

जीव अभिनेता असतो. पूर्ण जागरण्याच्या शेवटी शक्त्यात्मक जीवच शिवरूपात प्रकट होतो. त्यावेळी त्या जीवाला म्हणजे शिवाला पूर्ण शक्ती ही आपली स्वतःचीच शक्ती आहे, आपणच संकुचित शक्त्यात्मक जीवरूप घेऊन शिवरूप विसरलो होतो व शेवटी कुलाकुलातीत जे काही आहे, ती वाणी व मनाच्या वृत्तींपलीकडील एकमात्र अखंड सत्ता आहे, हेच अनुभवास येते. मात्र ही अनुभूती श्रीसद्गुरू शक्तिपाताने देत असल्यामुळे शक्तिपातयोगरूप शांभवीविद्येपुढे इतर सत्रं शास्त्रे व सर्व विद्या सर्वच लोक शिकत असल्याने त्या उच्छिष्टतुल्य होत असे "उच्छिष्टं सर्वशास्त्राणि सर्वविद्या मुखे मुखे ।। ५१।।" अशा रीतीने म्हणून "गुरोस्तुल्यं न वै कोऽपि यद्दृष्टं परमं पदम् ।। ९३ ।। " म्हणजे गुरूच्या बरोबर कोणत्याच गोष्टीची तुलना होऊ शकत नाही; कारण ते आपल्या दृष्टिपाताने शिष्याला परमपदाची प्राप्ती करून देतात, असा महान् सिद्धांत "ज्ञानसंकलिनीतंत्रात" मांडला आहे.

या रीतीने सर्व शास्त्रकारांनी स्वीकारलेली व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केलेली शक्तिस्वरूपाची ही बैठक, हे मूळ किंवा हा आधारस्तंभ गृहित धरून वर वर्णन केलेल्या ग्रंथातील शक्तीच्या साररूपाचे प्रकटीकरण करू. शास्त्रकार म्हणतात, "कुंडले अस्या स्तः इति कुंडलिनी।" इडा व पिंगला ही दोन कुंडले जिला आहेत ती कुंडलिनी होय. कुल म्हणजे शक्ती होय. 'कु' म्हणजे पृथ्वी व 'ल' म्हणजे जेथे ती लीन होते ती जागा होय. याचा अर्थ पृथ्वीच्या ठिकाणी लीन होणारी शक्तीच होय. मूलाधार चक्राचे तत्त्व पृथ्वी आहे. म्हणून मूलाधारात ही शक्ती लीन झालेली असते. ही कुंडलिनी शक्ती म्हणजेच उपनिषदोक्त नाचिकेत अग्नी किंवा प्राणशक्ती एखाद्या भुजंगीप्रमाणे असून ती साडेतीन वेटोळे घालून स्वयंभू लिंगास वेष्टून बिंदुरूप होऊन म्हणजे सूक्ष्म होऊन मूलाधारात स्वस्थ निद्रा घेत असते. हे स्वयंभू लिंग म्हणजे नाभिस्थानाच्या आतील कंद होय. नाभिस्थानी ही शक्तीच मध्यमा व सहस्रासात परा या नावाने ओळखली जाते. "घेरंड संहिता" व "योगशिखोपनिषदात" तिच्या या स्थानाचा उल्लेख करताना व तिच्या जागृत सामर्थ्याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की—

मूलाधारे आत्मशक्तिः कुंडली परदेवता ।
शयिता भुजगाकारा सार्धत्रयवलयान्विता ।।घे. सं. ३.४९।।

यावत् सा निद्रिता देहे तावज्जीवो पशुर्यथा ।
ज्ञानं न जायते तावत् कोटियोगविधेरपि ।।५०।।

उद्घाटयेत् कपाटं च यथाकुंचिकयाहठात् ।
कुंडलिन्या प्रबोधेन ब्रह्मद्वारं प्रभेदयेत् ।।५१।।

गुदामेढ्रांतरालस्थं मूलाधारं त्रिकोणकम् ।
शिवस्य जीवरूपस्य स्थानं तद्धि प्रचक्षते ।। यो. शि. उ. ५.५।।

यत्र कुंडलिनी नाम पराशक्तिः प्रतिष्ठिता ।
यस्मादुत्पद्यते वायुर्यस्माद्वन्हिः प्रवर्तते ॥६॥
यस्मादुत्पद्यते बिंदुर्यस्मान्नादः प्रवर्तते ।
यस्मादुत्पद्यते हंसो यस्मादुत्पद्यते मनः ॥७॥
तदेतत् कामरूपाख्यं पीठं कामफलप्रदम् ॥८॥

सर्पाचा आकार घेऊन व साडेतीन वेढे घालून अत्यंत श्रेष्ठ अशी कुंडलिनी देवता मूलाधारात झोपलेली आहे. जोपर्यंत ही शक्ती शरीरात अशा प्रकारे निद्रिस्त राहते तोपर्यंत जीव पशुप्रमाणे अज्ञानातच राहतो. ही शक्ती जोपर्यंत जागृत होत नाही तोपर्यंत कोटी कोटी प्रकारचे कितीही योग केले तरी जीवाच्या ठिकाणी ज्ञान उत्पन्न होत नाही. ज्याप्रमाणे किल्लीने कुलूप उघडले म्हणजे कपाटाचे द्वार मोकळे होते त्याप्रमाणे कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, ब्रह्मरंध्रात जाण्याचे द्वार मोकळे होते. गुदा व लिंग यांच्यामध्ये त्रिकोणाच्या आकाराचे मूलाधार चक्र आहे. यालाच जीवरूपी शिवाचे स्थान म्हणतात.येथेच कुंडलिनी नावाची पराशक्ती प्रतिष्ठित असते. ही शक्ती जागृत होऊन तिने सुषुम्नेत प्रवेश केला की, वायूचे म्हणजे प्राणाचे ऊर्ध्वमुखाने सुषुम्नेत चालन होते. हिच्या जागृतीमुळेच अग्नी उपस्थित होतो व बिंदू म्हणजे वीर्यही ऊर्ध्वमुखी होऊ लागते. त्यामुळेच अनाहत नाद उत्पन्न होऊन तो साधकाला ऐकू येऊ लागतो. त्यामुळेच अहं सः म्हणजे मीच परमात्मा आहे अशी भावना उत्पन्न होते व मनही उत्पन्न होऊन तत्स्वरूप बनते. असे हे शक्तीचे कामरूप नावाचे स्थान असून ते साधकाची परमात्मप्राप्तीची इच्छा पूर्ण करते.

"लघुस्तुती" या ग्रंथात "शक्तिः कुंडलिनीति विश्वजननी व्यापारबद्धोद्यता।" असे म्हणून कुंडलिनी शक्ती ही विश्वजननी असून ती अंतर्बाह्यच व्यापार करण्यास उद्युक्त होते असा तिचा गौरव केला आहे. "द्विवक्त्रा कुंडलिन्यभिधा नित्यानंदस्वरूपा परमा कला प्रकृतिर्वर्तते" असे तिचे शास्त्रात अन्यत्र वर्णन केले असून दोन मुखांची कुंडलिनी नावाची नित्यानंदस्वरूपाची सर्वश्रेष्ठ प्रकृती आहे हे सांगून तिच्या यथार्थ स्वरूपाची जाणीव करून दिली आहे. "हठयोगप्रदीपिकेत" हिचे वर्णन करताना असे म्हटले आहे की—

कुटिलांगी कुंडलिनी भुजंगी शक्तिरीश्वरी ।
कुंडल्यरुंधती चैते शब्दाः पर्यायवाचकाः ॥३.१०४॥
उद्घाटयेत् कपाटं तु यथा कुंचिकया हठात् ।
कुंडलिन्या तथा योगी मोक्षद्वारं विभेदयेत् ॥१०५॥
येन मार्गेण गतव्यं ब्रह्मस्थानं निरामयम् ।
मुखेनाच्छाद्य तद्द्वारं प्रसुप्ता परमेश्वरी ॥१०६॥
कंदोर्ध्वं कुंडली शक्तिः सुप्ता मोक्षाय योगिनाम् ।
बंधनायच मूढानां यस्तां वेत्ति स योगवित् ॥१०७॥

कुंडली कुटिलाकारा सर्पवत्परिकीर्तिता ।
सा शक्तिश्चालिता येन स मुक्तो नात्र संशयः ॥१०८॥
गंगायमुनयोरमध्ये बालरंडा तपस्विनीम् ।
बलात्कारेण गृह्णीयात् तद्विष्णोः परमं पदम् ॥१०९॥
इडा भगवती गंगा पिंगला यमुना नदी ।
इडापिंगलयोर्मध्ये बालरंडा च कुंडली ॥११०॥
पुच्छे प्रगृह्य भुजगीं सुप्तामुद्बोधयेच्च ताम् ।
निद्रां विहाय सा शक्तिरूर्ध्वमुत्तिष्ठते हठात् ॥१११॥

कुटिलांगी, कुंडलिनी, भुजंगी, शक्ती, ईश्वरी, कुंडली व अरुंधती हे सात शब्द पर्यायवाचक असून या सातही शब्दांचा अर्थ चित्शक्ती कुंडलिनी असाच आहे. किल्लीने कुलूप उघडून कपाटाचे द्वार मोकळे करावे त्याप्रमाणे साधकयोग्याने सद्गुरुद्वारा शक्तिपात झाल्यावर नित्य अभ्यासाने जागृतशक्तिद्वारा ब्रह्मद्वार किंवा मोक्षद्वार उघडून सुषुम्नामार्गाने सहस्रारात गमन करावे. "तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति ॥ ६.१६ ॥ म्हणजे सुषुम्नामार्गाने जाणारा साधकयोगी वर सहस्रारात म्हणजे ब्रह्मलोकात जाऊन अमृत म्हणजे मोक्ष प्राप्त करतो असे "कठोपनिषदात" म्हटले आहे. ज्या सुषुम्नामार्गाने सहस्रारातील दुःखातीत अशा निरामय ब्रह्मस्थानी जाऊन साधकयोगी ब्रह्म किंवा आत्मसाक्षात्कार करतो त्या सुषुम्नामार्गाचे मूलाधारातील ब्रह्मद्वार आपल्या दुसऱ्या मुखाने आच्छादन करून ही परमेश्वरी कुंडलिनी चित्शक्ती निद्रा घेत असते. "तस्याः शिखायामध्ये परमात्मा व्यवस्थितः ॥ चतुर्वेदोपनिषत् ६॥" म्हणजे या सुषुम्ना मार्गाच्या दुसऱ्या टोकाला सहस्रारात परमात्मा स्थित आहे असे श्रुतीत म्हटले आहे. अशा प्रकारे कंदाच्या वरच्या भागात निद्रिस्त असलेली कुंडलिनी शक्ती साधकयोग्यांना मोक्ष देण्यासाठी सिद्ध असते. मात्र ज्यांची वृत्ती कुंडलिनी शक्तीच्या बहिर्मुखाशी एकरूप होऊन बहिर्मुख झालेली असते त्या सर्व मूढ जनांना ही शक्ती बंधनकारकच होते. त्यामुळे साधकयोगी सद्गुरुचरणाश्रित होऊन शक्तिपातप्रसादोपलब्धिद्वारा चित्शक्तीचे चालन करून तिच्या जागृत स्वरूपात एकरूप होऊन अंतरंग साधनद्वारा मुक्त होतात. जे अज्ञानी व मूढ असतात ते हिच्या बंधनातच पडून राहतात. जो साधकयोगी कुंडलिनी शक्तीला म्हणजे तिच्या या संहारणीस्वरूप साधनरूपाला जाणतो तोच योगाचा ज्ञाता आहे; कारण संपूर्ण योगतंत्र कुंडलिनीच्या अधीन आहे. कुंडलिनी शक्ती ही सर्पाच्या आकाराप्रमाणे कुटिल आकाराची आहे असे योगीजनांनी सांगितले आहे; कारण ती या कुटिल अंगाने "भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ गीता १८.६१॥" हे कार्य सतत करीत असते व जीवाला बहिर्मुख ठेवते. जो सद्गुरुकृपेने या शक्तीचे सुषुम्नेतः

चालन करतो तो निःसंशय मुक्त होतो. गंगा व यमुना म्हणजे इडा व पिंगला या नाड्यांच्यामध्ये सुषुम्नानाडी असून तीत या उपाशी स्थितीतील तपस्विनीचे स्थान आहे.तिला बलत्काराने जागृत करून व तिचे नित्यशः सुषुम्नेत चालन करून सहस्रा-रातील विष्णुस्वरूप शिवाशी ती एकरूप केली पाहिजे. हेच परमपद व हीच अत्युच्च स्थिती होय. इडा म्हणजे डाव्या नाडीला भगवती गंगा म्हणतात व पिंगला म्हणजे उजव्या नाडीला यमुना नदी म्हणतात. या दोन नाड्यांच्या म्हणजे श्वासप्रश्वासाच्या गतीत अडकून जीव निरंतर बहिर्मुख होऊन जन्मजन्मांतरे भोगीत असतो. या दोन नाड्यांच्यामध्ये बालरंडा कुंडलिनी वास करीत असते. ज्यावेळी सद्‌गुरू शक्तिपात करून हिचे बाहेरचे मुख,द्वार किंवा शेपूट दाबून टाकतात त्यावेळी जीवाची बहिर्मुख गती बंद होऊन अंतर्मुख गती सुरू होते. अशा प्रकारे या भुजंगी कुंडलिनीला जागृत करणे आवश्यक आहे; कारण ज्यावेळी ही निद्रेचा त्याग करते तेव्हाच तिचे सुषुम्नेत चालन होऊन साधकयोगी मुक्त होतो.

"शिवसंहितेत" शक्तीच्या स्वरूपाचे वर्णन करताना असे म्हटले आहे की-

गुदाद्द्व्यंगुलतश्चोर्ध्वं मेढ्रैकांगुलतस्त्वधः ।
एवं चास्ति समं कदं समता चतुरंगुलम् ।।५.७४।।
पश्चिमाभिमुखी योनिर्गुदमेढ्रांतरालगा ।
तत्र कंदं समाख्यातं तत्रास्ति कुंडली सदा ।।७५।।
संवेष्ट्य सकला नाडीः सार्धत्रिकुटिलाकृतिः ।
मुखे निवेश्य सा पुच्छं सुषुम्णाविवरे स्थिता ।।७६।।
सुप्ता नागोपमा ह्येषा स्फुरंती प्रभया स्वया ।
अहिवत् संधिसंस्थाना वाग्देवी बीजसंज्ञका ।।७७।।
ज्ञेया शक्तिरियं विष्णोर्निर्मला स्वर्णभास्वरा ।
सत्त्वं रजतमश्चेति गुणत्रयप्रसूतिका ।।७८।।
सुषुम्णापि च संश्लिष्टो बीजं तत्र वरं स्थितम् ।
शरच्चंद्रनिभं तेजस्स्वयमेतत्स्फुरत्स्थितम् ।।८०।।
सूर्यकोटिप्रतीकाशं चंद्रकोटिसुशीतलम् ।
एतत्रयं मिलित्वैव देवी त्रिपुरभैरवी ।
बीजसज्ञं परं तेजस्तदेव परीकीर्तितम् ।।८१।।
क्रियाविज्ञानशक्तिभ्यां युतं यत्परितो भ्रमत् ।
उतिष्ठद्विशतस्त्वंभः सूक्ष्मं शोणशिखायुतम् ।।
योनिस्थः तत्परं तेजः स्वयंभूलिंगसंज्ञितम् ।।८२।।
आधारपद्ममेतद्धि योनिर्यस्यास्ति कंदतः ।
परिस्फुरत् वादिसांतचतुवर्णं चतुर्दलम् ।।८३।।

कुलाभिधं सुवर्णाभं स्वयंभूलिंगसंज्ञितम् ।
द्विरंडो यत्र सिद्धोऽस्ति डाकिनी यत्र देवता ॥८४॥
तत्पद्म मध्यगा योनिस्तत्र कुंडलिनी स्थिता ।
तस्य ऊर्ध्वे स्फुरत्तेजः कामबीजं भ्रमन्मतम् ॥८५॥

गुदेच्यावर चार अंगुळे व लिंगाच्या खाली एक अंगुळ अंतरावर चार अंगुळाच्या प्रमाणाचा एक कंद आहे. गुदा व लिंगाच्या मध्यभागी असलेली योनी पश्चिमाभिमुख म्हणजे मागे तोंड केलेली आहे. त्या ठिकाणीच कंद आहे. या स्थानातच कुंडलिनी शक्ती नेहमी राहते ही कुंडलिनी शक्ती सर्व नाडयांना आवृत्त करून म्हणजे त्यांना आपल्यात समेटून घेऊन किंवा नाडयांच्या रूपाने असणाऱ्या सर्व शक्तींना आपल्या ताब्यात ठेवून स्वतः साडेतीन वेढे घेऊन कुटिलाकृती होऊन आपले पुच्छ आपल्या मुखात घेऊन सुषुम्नेच्या मलाधारातील विवरात टोकाजवळ राहते. तेथे ही सर्पाप्रमाणे आकृती असलेली कुंडलिनी शक्ती सर्पाप्रमाणेच निद्रा घेत पहुडलेली असते. ती स्वतः आपल्याच प्रकाशाने नेहमी प्रकाशित होते व सर्पाप्रामणे उपरोक्त संधिस्थानात राहते. ही शक्तीच वाग्देवी असून ती बीजसंज्ञक म्हणजे संसाराचे बीज आहे. अर्थात् कुंडलिनी हीच सरस्वतीला प्रसूत करणारी म्हणजे आगमनिगमपुराण-शास्त्रादींची कर्त्री व वाणीला सिद्धी देणारी आहे. समस्त संसार बीजरूपाने हिच्यात राहत असल्याने हीच पिंडब्रह्मांडाची उभारणी व संहारणी करते. ही कुंडलिनी भगवान् विष्णूची शक्ती असून ती अत्यंत निर्मल व तप्तसुवर्णाप्रमाणे तेजस्वी आहे. सत्त्व, रज व तम हे तीन गुण ही शक्तीच उत्पन्न करते. याचा अर्थ ब्रह्मा, विष्णू व महेश हे या तत्त्वांचे प्रतीकात्मव देव हिच्यापासून उत्पन्न होतात. ज्या स्थानात कुंडलिनी शक्तीचा निवास असतो त्याच स्थानात कामबीजासह सुषुम्ना निवास करते. हे कामबीज शरदऋतूतील चंद्राप्रमाणे प्रकाशमान व तेजस्वी असून ते स्वतःच तेथे स्वतःच्या प्रकाशाने प्रकाशित व शक्तीने स्फुरित होत असते. या कामबीजाने युक्त अशी कुंडलिनी शक्ती कोटी कोटी सूर्याप्रमाणे तेजस्वी व कोटी कोटी चंद्राप्रमाणे शीतल आहे. कुंडलिनी, कामबीज व सुषुम्ना ह्या तीन गोष्टी मिळून ही कुंडलिनी शक्ती देवीत्रिपुरभैरवी असे नाव धारण करते किंवा या रूपाने प्रकट होते. बीज हेच जिचे नाव आहे अशी ही देवी अत्यंक तेजस्वी म्हटली जाते. हे बीज क्रियाशक्तीने व ज्ञानशक्तीने युक्त होऊन शरीरात भ्रमण करते. हे बीज कधी ऊर्ध्वगामी होते, कधी जलतत्त्वात प्रवेश करते, कधी सूक्ष्म होते व कधी अग्नीच्या ज्वालेप्रमाणे परम तेजस्वी होऊन योनिस्थानात स्वयंभूलिंग अशी संज्ञा धारण करून राहते. यालाच आधारपद्म म्हणतात. या आधारपद्माच्या मुळाशी योनीची जागा आहे. हे आधारपद्म अत्यंत प्रकाशमान व तेजस्वी असून ते 'व' पासून 'स' पर्यंत म्हणजे व, श, ष, स या चार वर्णांनी व चार पाकळयांनी

सुशोभित असते. मूलाधारातील या पद्मालाच म्हणजे पद्मयुक्त शक्तीला कुल असे नांव आहे. या कमलयुक्त शक्तीची सुवर्णासारखी कांती आहे व ती स्वयंभूलिंगयुक्त आहे. या कमलातच द्विरंड संज्ञक सिद्ध व डाकिनी देवतेचा निवास असून तीच येथील अधिष्ठात्री देवता आहे. या कमलामध्ये योनी आहे. त्यात कुंडलिनी शक्ती राहते व त्याच्यावर अत्यंत दीप्तिमान् व तेजस्वरूप कामबीज भ्रमण करते.

उपरोक्त विवेचनात शेकडोशे तंत्रग्रंथ, देवीभागवत, योगवासिष्ठ, सौंदर्यलहरी गोरक्षनाथांचे समस्त ग्रंथ व पुराणसंहितादि कुंडलिनी शक्तिसंबंधाचे वर्णन करणाऱ्या शेकडोशे ग्रंथांचा शब्द व अर्थभेदाने समावेश झाला आहे. Sir John Woodroffe यांनी लिहिलेल्या "The Serpent Power" या कुंडलिनी शक्तीवर लिहिलेल्या सुप्रसिद्ध ग्रंथात या विषयाचे अत्यंत विस्तृत व सांगोपांग वर्णन आले आहे. त्यात ते म्हणतात, "The Power is the Goddess (Devi) kundalini, or that which is coiled; for her form is that of a coiled and sleeping serpent in the lowest bodily centre, at the base of the spinal column, until by the means decribed she is aroused in that yoga which is named after her. Kundalini is the Divine Cosmic Energy in bodies. (Page 1) As one forces open a door with a key so the yogi should force open the door of liberation by kundalini. (P.262) She is the "Serpent Power" sleeps coiled up in the Muladhara, closing with Her mouth the entry to the sushumna called the door of Brahma. She sleeps above what is called the kanda or kandayoni, which is four fingers in length and breadth and is covered by a "soft white cloth" that is, membrane like the egg of a bird. It is generally described as being two fingers (Anguli) above the anus (Guda) and two fingers below the penis ( Medhra ). From this kanda spring the 72000 Nadis which here both unite and separate. Kula-Kundalini is the shabda-Brahman and all Mantras are Her manifestations (svarup-vibhuti). For this reason one of the names of this, the Mantra-devata, whose substance is "letters" is Matruka-that is, the Genetrix of all the universes. She is Matruka, for she is the Mother of all and not the child of any. She is the Worldconsciousness ( Jagadchai-

tanya ), the virat consciousness of the word as a whole. Just as in the space sound is produced by movements of air, so also in the ether whithin that Jiva's body current flow, owing to the movements of the vital-air ( Prana-vayu ), and its inward and outward passage as inhalation and exhalation. Verse 12 of Description of the six-Centers ( shatchakra-Nirupana) describes Kundalini as the revered supreme Parameshwari (sovereign-lady), the omnpiotent kala in the form of Nada-Shakti. she, the subtlest of the subtle, holds within Herself the mystry of creation, and the stream of Ambrosia which flows from the attributeless Brahman.(She is creation itself-srushti-rupa, in her are creation,maintenance and dissolution, srushti-sthiti-layatmika) By her radiance the universe is illumined and by it eternal consciousness is awakened (For she is also beyond universe-vishvateeta-and is consciousness itself-jnanarupa- As such she is thought of as going upward, as in descending she creates and binds.) that is she both binds as creatrix (Avidya-shakti) and is the means of vidya-shakti whereby Liberation may be attained. For this reason it is said in the Hatha-yoga-pradipika that she gives liberation to Yogis and bondage to the ingnorant. For he who knows her knows Yoga, and those who are ignorant of Yoga are kept in the bondage of this wordly life. As vv. 10 and the 11 of Shatchakra-nirupana say: "she, the world-Charmer is lustrous as lightning,her sweet murmur is like the indistinct hum of swarms of love-mad bees. (Vishwanath the Commentator says that she makes this sound when awakened. According to the commentator Shankara, this indicates the Vaikhari state of Kundalini.) She is the source of all speech. It is she who maintains all the beings of the world by means of inspiration and expiration and shines in the hollow of the Mula lotus like a chain of brilliant lights." Mantras are in all cases manifestations (vibhuti) of Kula-Kundalini Herself for she is all letters and Dhvani and the Paramatma

Itself. Hence Mantras are used in the rousing of Kundalini. The substance of Mantras is the eternal shabda or consciousness, though their appearnce and expression is in words. Words in themselves seem lifeless (Jada), but the Mantra Power which they embody is siddha-that is, action of Chaitanya, which is satya Itself. So veda, which is formless (Amurti) Brahman in veda-form (vedamurti), is the self-illuminated Principle of experience (chit) itself, (Veda is one with Chaitanya. As Shankar says-Comm. Trishati v.19 dealing with the Panchadashi-Mantra: sarve vada yatra ekam bhavanti etc. shrutya vedasya atmabhedena svaprakashataya) and is displayed in words (siddha-shabda) which are without human authorship (Apauru-sheya - And because it is without such authorship and is heard only, it is called shruti-what is heard: shruyate eva na tu kenachit kriyate: vada is Brahman; it came out as his breathing), incessantly revealing knowledge of the nature of Brahman, or Pure Being and of Dharma, or those principles aud laws physical and physical and spiritual by which the Universe is sustained (Dharayate) And so the Divine Mother is said to be Brahman–knowledge (Brahmavidya) in the form of that immediate experience which is the fruit of the realization of the great vendantic sayings ( Mah-vakya ).( Veda according to vedanta, is that word without human authorship which tells of Brahman and Dharma : Dharma-Brahma pratipadakam apaurusheyam vakyam. Sakshatkara-that is Nirvana Experience ( Aporoksha-juana ) as apposed to indirect ( parokha ) to merely intellectual knowledge. Vedanta-Mahavakyajanya-sakshatkararupa - Brahmavidya. ) As,notwithstanding the existence of feeling-consciousness in all things, it does not manifest without perticular processes, so, although the substance of Mantras is feeling-consciousness that feeling-consciousness is not perceptible without the union of the Sadhaka's Shakti (derived from sadhana) with Mantra-Shakti.

Hence it has been said in the Sharda-Tilaka : "Although Kul-Kundalini whose substance is Mantras, shines brilliant as lightning in the Muladhara of every Jiva, yet it is only in the lotuses of the hearts of Yogis that she reveals herself and dances in her own joy. In other cases (though existing in subtle form), she does not reveal Herself. Her substance is all Vedas, all Mantras, and all Tattvas. She is the Mother of the three forms of energy, Sun, Moon and fire and Shabda-Brahman itself. kundalini is therefore the mightiest manifestation of creative power in the human body. Kundalini is the Shabda-Brahman that is, Atma as manifested Shakti- in bodies, and in every power, person and thing. The six centres and all evolved therefrom are Her manifestation. Shiva dwells in the Sahasrara. The latter is the upper Shri-Chakra, as the six centres are the lower. Yet Shakti and Shiva are one. Therefore the body of Kundalini-shaki consists of eight parts (Angas)-nameiy, the six centres of psychic and physical force, Shakti and Sadashiva Her Lord. In the Sahasrara kundalini is merged in the Supreme Atma-Shakti. Kundalini is the great Pranadevata or Lord of life which is Nadatma, and if Prana is to be drawn up through the "Middle path", the Sushumna, towards the Brahmarandhra, it must of necessity pierce the lotuses or chakras which bar the way therein. Kundalini being Prana-shakti, if she is moved Prana is moved. (Page 257 to 261) The Prana then enters the six chakras in the sushumna, becomes Laya or absorbed in the Sahasrara. (P. 264) The final result is experience as Brahman, which is the effect of action of Kundalini, who is the shakti or power of will (Iccha), Action (Kriya), and knowledge (Jnana), and exists in forms both subtle and gross. (P. 265) The Power which is aroused is in itself (svarupa) Consciousness, and when aroused and taken to the upper cerebral Centre is the giver of true knowledge (Svarupa Jnana), which is the Supreme Consciousness. (P. 266) kundalini, who is then, in the langnage of the Shastra, seized with the passion of "desire" for Her Spouse, the Para-hamsah or Param-shiva. Shakti thus rendered active is drawn to Siva, as in the case of ordinary positive and negative electric Charges, which are themselves but other manifestations of the universal polarity which affects the manifested world. (P. 267)

Kundalini Herself takes on a different aspect as She ascends

the three planes, and unites with each of the lingas in that form of Hers which is appropriate to such union. For whereas in the Muladhara She is the Shakti of all in their gross or physical manifested state (Virat), at the stage of Ajna, She is the Shakti of the mental and psychic or subtle body (Hiranya-garbha) and in the region of the Sahasrara She is the Shakti of the "Spiritual" plane (Ishvara), which, though itself in its shiva aspect is undifferentiated, contains in its Power-aspect all lower planes in a concealed potential state. The Maya Tantra says that the four sound producing Shaktis-namely Para, Pashyanti, Madhyama and Vaikhari–are Kundali Herself (Kundalinya-bhedarupa). Hence-when Kundali starts to go to Sahasrara, she in Her form as Vaikhari bewitches svayambhu-Linga; she then similarly bewitches Bana-Linga in the heart as Madhyama and Itara-Linga in the eyebrows as Pashyanti. Then, when she reaches the stage of Para-bindu She attains the state of Para (Para-bhava). (P. 269, 270)

In short, Kundalini is the individual bodily representative of the great Cosmic Power (Shakti) which ctreates and sustains the universe. When this individual Shakti manifesting as the individual consciousness (Jiva) is merged in the consciousness of the supreme Shiva, the world is for such Jiva is dissolved, and Liberation (Mukti) is obtained (P. 281).

ही शक्ती म्हणजे देवी कुंडलिनी होय. ती कुंडलाकार अवस्थेत आहे; कारण ती वेटोळे घालून निद्रिस्त असलेल्या सर्पाप्रमाणेच मेरुदंडाच्या शेवटच्या टोकाशी मूलाधार नावाच्या स्थानी राहते. जोपर्यंत ती सद्‌गुरुकृपेने किंवा अन्य उपायांनी जागृत होत नाही तोपर्यंत ती कुंडलाकार अवस्थेतच मूलाधारात पडून राहते. तिच्यामुळे सुरू होणाऱ्या जागृतीच्या योगाला तिचेच कुंडलिनीयोग असे नाव दिले आहे. ही दैवी वैश्विक शक्ती कुंडलिनी मानवी शरीरात राहते. (पृ. १) ज्याप्रमाणे एखादा मनुष्य किल्ली चालवून ताकदीने एखादे दार उघडतो त्याप्रमाणे योगीसाधकाने कुंडलिनी शक्तिजागृतीने स्वबलाने मुक्तीचे दार उघडले पाहिजे. (पृ. २६२) या शक्तीलाच सर्पशक्ती असे म्हणतात. ती वेढे घालून मूलाधारात सुषुम्नाप्रवेशाचा मार्ग अर्थात् ज्याला ब्रह्मद्वार म्हणतात ते आपल्या मुखाने अडवून झोपते. ती कंद किंवा कंदयोनीच्यावर निद्रा घेते. हा कंद चार बोटे लांबरुंद असून एखादया पक्षाच्या अंड्याच्या आतील त्वचेप्रमाणे असलेल्या मऊ पांढऱ्या कपड्याने झाकलेला असतो. गुदद्वाराच्या वर दोन बोटे व लिंगाच्या खाली दोन बोटे इतक्या अंतरावर या कंदाचे स्थान आहे. या कंदापासूनच शरीरात पसरलेल्या ७२०००

हजार नाड्या एकत्रित होऊन विभक्त झालेल्या असतात. कुलकुंडलिनीलाच शब्दब्रह्म म्हणतात व हिच्यापासूनच सर्व मंत्रांचा आविष्कार होतो.या कारणामुळेच कुंडलिनी शक्तीचे एक नाव मंत्रदेवता असे असून वर्ण किंवा मातृका हेच या देवतेचे स्वरूप आहे. या देवतेचे हे स्वरूपच अनंत विश्वोत्पत्तीला अर्थात् उभारणीला कारणीभूत आहे. ही मातृकाशक्ती एकाच मुलाची माता नसून ती सर्वांची माता आहे. ही शक्तीच जगच्चैतन्य असून संपूर्ण जगाचे विराट चैतन्यही तीच आहे. ज्याप्रमाणे अवकाशात वायूमुळे ध्वनी उत्पन्न होतो त्याप्रमाणेच प्राणवायूमुळे जीवाच्या शरीरात चैतन्यप्रवाह उत्पन्न होऊन श्वासोच्छ्वासाच्या रूपाने आतबाहेर गमन सुरू होते. षट्चक्रनिरूपणातील बाराव्या श्लोकात कुंडलिनी ही पूज्य अशी सर्वश्रेष्ठ परमेश्वरी आहे असे वर्णन केले असून तिलाच नादशक्तीच्या रूपाने असलेला अपार सामर्थ्याचा सर्वशक्तिमान काल म्हटले आहे. ती सूक्ष्माहून सूक्ष्म असून पिंडब्रह्मांडाच्या उभारणीचे रहस्य ती आपल्या ठिकाणी धारण करते. सहस्रारातील निर्गुण ब्रह्मापासून प्रवाहित होणारा अमृताचा झरा तिच्यामुळेच उत्पन्न होतो. ( ही शक्तीच स्वत: श्रुतिरूप म्हणजे उभारणी असून ती सृष्टि-स्थिति-लयात्मक आहे. ) तिच्या तेजामुळेच विश्व प्रकाशित होते आणि अनादि चैतन्य अर्थात् ब्रह्म जागृत होते; ( कारण ती विश्वातीत आहे आणि चैतन्य हे ज्ञानरूप आहे. ऊर्ध्वगतीत जशी ती सामरस्यात्मक व मुक्त आहे असे म्हटले जाते त्याप्रमाणेच अधोगतीत ती सृजनशील व बंधनकारक आहे. ) याचा अर्थ असा की, अविद्या शक्तीच्या रूपाने उभारणी करून ती जीवाला बांधते व हीच विद्या शक्तीचे साधन असल्यामुळे जीव तिच्यामुळेच मुक्ती किंवा कैवल्य प्राप्त करून घेऊ शकतो. या कारणामुळेच हठयोगप्रदीपिकेत असे म्हटले आहे की, ही कुंडलिनी शक्तीच योग्यांना मुक्ती देते व अज्ञानी लोकांना बंधनकारक ठरते. जो या शक्तीला जाणतो त्यालाच खरा योग समजतो आणि जे या योगाबद्दल अज्ञानी असतात त्यांना या शक्तीकडूनच जगातील जीवनाच्या बंधनात ठेवले जाते. षट्चक्रनिरूपणाच्या १० व्या व ११ व्या श्लोकात असे म्हटले आहे की, " ही जगन्मोहिनी कुंडलिनी शक्ती विजेप्रमाणे कांतिमान् आहे. तिचा मधुर आवाज मधमाशा किंवा प्रेमाने धुंद झालेल्या भुंग्यांच्या अस्पष्ट आवाजाप्रमाणे असतो. ( ज्यावेळी ही शक्ती जागृत होते त्यावेळी ती असा ध्वनी करते असे टीकाकार विश्वनाथांचे मत आहे; तर ही कुंडलिनी शक्तीची वैखरी अवस्था आहे असे टीकाकार शंकरांचे मत आहे. ) ही शक्ती सर्व भाषणाचे उगमस्थान आहे. प्रेरणा किंवा स्फूर्ती व संहार या साधनांच्या आधारे ती जगातील सर्व प्राणिमात्रांचे पालनपोषण करते व मूलाधारचक्रात विद्युन्मालेप्रमाणे चमकत असते. ही कुलकुंडलिनी शक्तीच सर्व प्रकारच्या मंत्रांचे अवतरण, आविष्कार किंवा प्रकटीकरण स्वत:च करते; कारण तीच सर्व वर्ण किंवा मातृका, ध्वनी व खुद्द परमात्मा आहे. यासाठी कुंडलिनी शक्ती ऊर्ध्वगामी करण्यासाठी मंत्रांचा

उपयोग करतात. जरी मंत्राचे बाह्य स्वरूप व प्रकटीकरण हे स्थूल शब्दात्मक असले तरी अनादि शब्द हाच मंत्राचा खरा गाभा आहे. शब्द हे स्वत: चैतन्यहीन किंवा जड असतात; परंतु मंत्रचैतन्याने ते युक्त झाले की सिद्ध होतात. याचा अर्थ असा की, सत्यस्वरूप असलेले चैतन्यच या रीतीने कार्यान्वित होते. यामुळेच अमूर्त असलेले ब्रह्म हे शब्दरूप होऊन वेदमूर्तीच्या रूपाने समूर्त होते तेव्हा ते वेद स्वत:च अनुभूतीचे स्वत:प्रकाशित चैतन्यतत्त्वच असतात. ( वेद हे चैतन्याशी एकरूप आहेत. " सर्वे वेदा यत्र एकं भवंति " असे टीकाकार शंकरांनी त्रिशती श्लोक १९ वरील पंचदशी मंत्राच्या टीकेत म्हटले आहे. " श्रुत्य वेदस्य आत्मभेदन स्वप्रकाशत्यया । " ) वेद हे शब्दात अर्थात सिद्धशब्दात प्रकट होतात म्हणजे ते अपौरुषेय असतात. ( अशा प्रकारे वेद हे अपौरुषेय असल्यामुळे व ते फक्त ऐकले जात असल्यामुळे त्यांना श्रुती म्हणतात. "श्रूयते एव न तु केनचित् क्रियते ।" वेद हेच ब्रह्म आहे व ते परमेश्वराची नि:श्वसिते आहेत. ) वेद हे ब्रह्मस्वरूपाचे ज्ञान सतत वितरण किंवा प्रकट अगर प्रकाशित करीत असतात किंवा ते सत्स्वरूपाचे, धर्माचे व ज्यामुळे विश्वाचे धारण-पोषण-भरणादि होत असते अशा भौतिक व आध्यात्मिक तत्त्वांचे किंवा नियमांचे प्रकटीकरण करीत असतात. त्यामुळे या दैवीमातेला ब्रह्मविद्या असे म्हणतात. या ब्रह्मविद्येच्या स्वरूपातच वेदान्तातील महावाक्याद्वारा तत्काळ प्राप्त होणाऱ्या आत्मसाक्षात्कारात्मक अनुभूतीचे फल समाविष्ट आहे. ( वेदान्ताच्या दृष्टीने वेद म्हणजे मानवी कर्त्याशिवाय उत्पन्न झालेले ब्रह्म व धर्म प्रतिपादक शब्द होत. धर्म म्हणजे "ब्रह्मप्रतिपादकं अपौरुषेयं वाक्यम् ।" साक्षात्कार म्हणजे निर्वाणाची अनुभूती किंवा अपरोक्ष ज्ञान होय. अपरोक्ष ज्ञान परोक्षाच्या विरुद्ध असून परोक्ष ज्ञान म्हणजे फक्त बौद्धिक ज्ञान होय. वेदान्त म्हणजे "महावाक्यज्ञ साक्षात्काररूप ब्रह्मविद्या " होय. ) ज्याप्रमाणे विशेष प्रक्रियेशिवाय प्रत्येक वस्तुमात्रात असलेल्या जाणिवेची किंवा चैतन्याची प्रतीती येत नाही किंवा ते प्रकट होत नाही त्याप्रमाणेच मंत्र मुळात चैतन्यरूप असला तरी साधनापासून उत्पन्न झालेली साधकाची शक्ती ही मंत्रशक्तीशी एकरूप झाल्याशिवाय मंत्रचैतन्याची अनुभूती येत नाही. त्यामुळे शारदातिलक या ग्रंथात असे म्हटले आहे की, "जरी कुलकुंडलिनीचे स्वरूप मंत्रात्मक असले व प्रत्येक जीवाच्या मूलाधार चक्रात ती विजेच्या तेजाप्रमाणे प्रकाशित होत असली तरी ती योग्यांच्या हृदयकमलातच स्वत:ला प्रकट करून तेथे ती आत्मविभोर होऊन नाचत असते. बाकी सर्वमान्य माणसांमध्ये ( जरी ती सूक्ष्मरूपाने अस्तित्वात असली तरी ) ती स्वत:ला प्रकट करीत नाही. सर्व वेद, मंत्र व तत्त्वे हे तिचे स्वरूप आहे. त्रैमूर्तीची ती माता असून ती स्वत:च सूर्य, चंद्र, अग्नी व शब्दब्रह्म आहे. त्यामुळे कुंडलिनी म्हणजे मानवी शरीरातील सृजन शक्तीचा उत्कट किंवा प्रबळ आविष्कार होय. कुंडलिनी म्हणजे शब्दब्रह्म होय; म्हणजे आत्म्याचे

शक्तीच्या रूपाने झालेले प्रकटीकरण किंवा व्यक्तीकरण होय. शक्तीची ही अभिव्यक्ती प्रत्येक शरीरात, सामर्थ्यात, माणसात व वस्तूत झालेली दिसते. षट्चक्रे व त्यापासून झालेला विस्तार हाही तिचाच आविष्कार होय. शिव हा सहस्रारात निवास करतो. सहस्रार हे सर्वांत वरील श्रीचक्र असून बाकीची षट्चक्रे त्याखाली आहेत. मात्र शक्ती व शिव हे एकच आहेत. म्हणून कुंडलिनी शक्तीचे शरीर, मूर्ती किंवा विग्रह ह्या आत्मिक व भौतिक जोर किंवा बळ असलेली षट्चक्रे,शक्ती व तिचा पती सदाशिव या अष्टांगांनी बनलेला आहे. कुंडलिनी शक्ती सहस्रारात सर्वोच्च आत्मशक्तीशी एकरूप झालेली असते. कुंडलिनी शक्ती ही सर्वश्रेष्ठ प्राणदेवता किंवा जीवनाची स्वामिनी असून ती नादात्मा आहे. जर प्राण सुषुम्नेच्या मध्यमार्गाने वर खेचले तर ते त्यांच्या मार्गातील अडथळ्यांप्रमाणे असणाऱ्या षट्चक्रांचे भेदन निश्चितपण करतात. कुंडलिनी ही प्राणशक्ती असल्यामुळे जर तिला चाळविले किंवा जागृत केले तर प्राणही चलित होतात. ( पृ. २५७ ते २६१ ) हे जागृत किंवा चलित प्राण नंतर सुषुम्नेतील षट्चक्रांमध्ये प्रवेश करून शेवटी ते सहस्रारात खेचले जाऊन तेथे त्यांचा लय होतो. ( पृ. २६४ ) यामुळे साधकाला आपण ब्रह्मस्वरूपच झाल्याचा अंतिम परिणाम अनुभविण्यास मिळतो. कुंडलिनी शक्तीच्या ऊर्ध्वगमनाच्या कृतीचाच हा परिणाम आहे. ही शक्ती इच्छा, क्रिया व ज्ञान यांनी युक्त असून ती सूक्ष्म व स्थूल रूपाने अस्तित्वात असते. ( पृ. २६५ ) जागृत शक्ती ही स्वतःच आत्मस्वरूप किंवा चैतन्यस्वरूप असून ती जेव्हा सहस्रारात पोहोचते तेव्हा ती स्वरूपज्ञान देणारी होते. त्यामुळेच ही शक्तीच सर्वश्रेष्ठ चेतना होय. ( पृ. २६६ ) शास्त्राच्या भाषेत यानंतरची कुंडलिनी शक्तीची स्थिती सांगावयाची झाली तर असे म्हणता येईल की, यानंतर कुंडलिनी शक्ती तिच्या पतीशी अर्थात् परमशिवाशी किंवा परमहंसाशी समरस झाल्यामुळे तिच्या सर्व वासना व इच्छा लीन होतात. अशा प्रकारे ज्यावेळी शक्ती आपले कर्तृत्व सोडून देते तेव्हा ती आपोआपच शिवस्वरूपात खेचली जाते. ज्याप्रमाणे सर्वसाधारण व्यवहारात विजेचे ऋण व घन प्रवाह हे जागतिक ध्रुवाकर्षणाच्या आविष्काराविरहित असले तरी ते आविष्कृत जगावर परिणाम करतात त्याप्रमाणेच उपरोक्त गोष्ट घडते. ( पृ. २६७ )

कुंडलिनी सहस्रारातून जसजशी खाली येते तसतशी ती तीन पातळ्यांवर भिन्नभिन्न रूपे स्वतःच धारण करते. त्यावेळी तिच्या स्वरूपातील लिंगांशी ती एकरूप होते. असे एकरूप होणे हे योग्यच आहे. मूलाधारात ही शक्ती आपल्या समग्र अथवा भौतिक आविष्काराच्या विराट स्वरूपात, आज्ञाचक्रात ती मानसिक व भौतिक किंवा सूक्ष्म रूपाने हिरण्यगर्भाच्या स्वरूपात आणि सहस्रारात ही शक्ती चेतनावस्थेत ईश्वर रूपाने स्वतःसिद्ध अशा शिवस्वरूपात अभिन्न किंवा एकरस झालेली असून खालील पातळ्यांवर तिचे हे चेतनस्वरूप सुप्त व अव्यक्त स्थितीत

असते. यासंबंधी मायातंत्रात असे म्हटले आहे की, "परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या नावाच्या चारही वाचा ध्वनी उत्पन्न करणाऱ्या शक्ती असून त्या कुंडलिनीशक्तिस्वरूपच असतात. म्हणून ज्यावेळी कुंडलिनी शक्ती सहस्रारात जाण्यास निघते त्यावेळी ती आपल्या वैखरीच्या स्वरूपाने स्वयंभू लिंगाला भारून टाकून आनंदित करते. याचप्रमाणे ती बाणलिंगाला मध्यमावाणीने हृदयात मोहित करते व पश्यंतिवाणीने भ्रूमध्यातील इतरलिंगाला भुरळ घालून जादूने भारून टाकते. त्यानंतर ती पराबिंदूच्या अवस्थेत पोहोचते व तेथे ती परभावाची अवस्था प्राप्त करते. (पृ. २६९, २७०)

सारांश, कुंडलिनी ही महान् वैश्विक शक्तीचा एक वैयक्तिक शारीरिक प्रतिनिधी असून ती विश्वाची उत्पत्ती व स्थिती करते. ज्यावेळी ही वैयक्तिक सुप्त शक्ती जीवरूपाने प्रथम आविष्कृत किंवा जागृत अगर चेतन होऊन शेवटी सर्वश्रेष्ठ शिवात विलीन किंवा समरस होते त्यावेळी अशा जीवाच्या दृष्टीने जगत् नाहीसे होऊन त्याला मुक्ती प्राप्त होते." (पृ. २८१)

स्वामी नारायणानंद यांनीही "The Primal power In Man or The Kundalini Shakti" या पुस्तकात कुंडलिनी शक्तीचा सांगोपांग विचार केला आहे. त्याचप्रमाणे श्री. वसंत जी. रेळे यांनी "Mysterios Kundlini" या पुस्तकात, श्री. प प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज यांनी "Devatmashakti Kundlini or Divina Power" या पुस्तकात व सर जॉन वुड्रॉफ यांनी "Principles of Tantra," Part Iand II, "Shakti and Shakta," "The Great Liberation" ( महानिर्वाणतंत्र ), "Kamakalavilas," "Tantraraj Tantra" इत्यादि विविध पुस्तकात हा विषय विस्ताराने मांडलेला आहे. शक्तीचा हा विषय साधनात्मक असल्यामुळे "Principles of Tantra," Part II या पुस्तकाच्या प्रस्तावनेत सर जॉन वुड्रॉफ म्हणतात, The special virtue of the Tantra lies in its mode of sadhana. It is neither mere worihip ( upasana ) nor prayer. It is not lamenting or contrition or repentence before the Deity. It is the Sadhana which is the union of Purusha and Prakruti; the Sadhana which joins the male principle and the mother element whithin the body and strives to make the attributed attributeless. That which is in me and that for which I am ( this Conscionseness is ever present in me ) is spread like butter in milk, throughout the created world of moving and unmoving things, through the gross and the subtle, the conscious and unconscious-through all. It is the object of Tantrik Sadhana to merge that self-principle ( Svarat ) into the universal ( Virat ). This Sadhana is to be

performed through the awakening of the forces within the body. A man is siddha in this Sadhana when he is able to awaken Kundalini and pierce the Six Chakras. This is not mere "philosophy"—a mere attempt to ponder upon husks of words—but something which is to be done in a thoroughly practical manner. The Tantras say : "Begin practising under the guidence of a good Guru; if you do not obtain fevourable results immediately, you can freely give it up." No other religion dares to give so bold a challenge."

"The Tantra contains nothing like idolatry or worship of the doll. The Tantra repeatedly says that one is to adore the Deity by becoming Deity ( Devata ) himself."

तंत्रांचा विशेष गुण त्यांच्या साधनमार्गात साठविलेला आहे. हा साधनमार्ग म्हणजे नुसती उपासना किंवा प्रार्थना नव्हे. आपल्या इष्टदेवतेपुढे व्यक्त केलेला शोक किंवा विलाप, पश्चाताप किंवा पस्तावा अगर पापाचा झाडा किंवा कबुली म्हणजे ही साधनपद्धती नव्हे. ज्या मार्गात पुरुष व प्रकृतीचे एकीकरण होते, पुरुषतत्त्वाचे स्त्रीतत्त्वाशी शरीरातच एकीकरण होते व सगुणाकडून निर्गुणाकडे जाण्याचा जोरदार झगडा, युद्ध किंवा झुंज होते असे साधन आहे. जे माझ्यात आहे व ज्याच्यामुळे मी आहे असे जे चैतन्यतत्त्व माझ्या ठिकाणी कायम अस्तित्वात आहे ते दुधात सर्वत्र असलेल्या लोण्याप्रमाणे अखिल विश्वातील सर्व स्थिरचर वस्तूंना स्थूल व सूक्ष्म आणि चेतन व अचेतन रूपाने व्यापून असते. अहं अथवा स्वराट अर्थात् व्यष्टी तत्त्वाचा वैश्विक किंवा विराट अर्थात् समष्टीं तत्त्वात लय करणे हे तांत्रिक साधनाचे ध्येय आहे. शरीरातील सर्व शक्तींना जागृत करून ही साधना करावयाची असते. ज्यावेळी माणसाला कुंडलिनी शक्ती जागृत करणे शक्य होते व तो षट्चक्रभेदन करतो तेव्हा तो सिद्ध होतो. हा साधनमार्ग म्हणजे नुसते तत्त्वज्ञान नाही किंवा विचारांनी शब्दांची टरफले काढीत बसण्याचा अर्थात् शुष्क काथ्याकूट करण्याचा मार्ग नाही. मात्र हा साधनमार्ग संपूर्णपणे प्रयोगात्मक किंवा अनुभवात्मक पद्धतीने आचरण्याचा अगर करण्याचा आहे. यादृष्टीनेच तंत्र म्हणतात, " चांगल्या गुरूच्या मार्गदर्शनाखाली योगाभ्यासाला सुरुवात करा. जर तुम्हाला अनुकूल फल किंवा अनुभूती मिळाली नाही तर तुम्ही निःशंकपणे अगर मोकळेपणे त्या गुरूचा तत्काळ त्याग करा. " अशा प्रकारचे स्पष्ट आव्हान देण्याची कोणत्याही धर्मात ताकद अगर धारिष्टच नाही.

तंत्रांमध्ये मूर्तीपूजेसारखे किंवा एखाद्या बाहुलीच्या अर्थात् देवतेच्या उपासनेसारखे काहीही सामाविलेले नाही. आपण स्वतःच देवता बनून देवतेची पूजा करावी असे तंत्र वारंवार सांगत आहे.

याच पुस्तकाच्या पहिल्या भागांतील " What is Shakti " या आठव्या प्रकरणात कुंडलिनी शक्तीचे सारस्वरूप सांगताना ते म्हणतात–

" She, ( Shakti ) as Jiva appears both as enjoyment and suffering. If She does not exist as consciousness at the root who then is its cause. Light in the moon, radiance in the sun, power of buring in fire, motion in air, coolness in water, smell in earth—these Shaktis may ordinarily appear to be unconscious, but in reality they are not so.

In the root She is all-Brahman; in the stem She is all-maya; in the flower She is all-world, and in the fruit She is all liberation. Brahman, Ishvara, Maya and Avidya—these are her four aspects. Dividing Herself into these four parts, the player of the blissful play throughout the world becomes herself mad in the intoxication of Her own joy—Herself taking birth Herself, dying Herself, dancing in Her own cremation ground, and Herself becoming Shiva in Her own corpse. She Herself enjoys the play. She is Herself Purusha, Herseif Prakruti, Herself the Spouse of Mahakala, Herself attachment, inclination, and goal, and Herself the daughter of supreme bliss. She is Herself maya, Herself non-maya, and Herself She who yields maya. She is Herself vidya, Herself Avidya and Herself the eternal Devi who is the object of Sadhana. Ask the Vedas, the Vedantas, the Puranas, or the Tantras, and every one of these Shastras will bear unmistakable testimony to this Her ( monastic ) character. In this shastrik vision of faith, a Sadhaka sees the Brahmanda-play in both Her aspects of Vidya and Avidya and sits on the mothers lap in both bondage and liberation. ( Page 357, 358 )

ती शक्तीच जीवरूपाने सुखदुःख भोगण्यासाठी आविर्भूत होते. ही शक्ती जर चेतन स्वरूपात मूलत: आस्तिवात नसेल तर या सर्वांचे निमित्त कारण कोण असेल ? चंद्राचा प्रकाश, सूर्याचे तेज, अग्नीची दाहक शक्ती, वायूचे चलन, पाण्याची शीतलता, पृथ्वीचा गंध इत्यादि नानाविध शक्ती सर्वसाधारणपणे जरी अचेतन वाटल्या तरी प्रत्यक्षात त्या तशा नसतात.

मुळात ही शक्ती ब्रह्म आहे. खोडात ती सर्व माया आहे. फुलाच्या रूपाने ती सर्व विश्व आहे व फळाच्या दृष्टीने ती मुक्ती आहे. ब्रह्म, ईश्वर, माया व अविद्या हे तिचे चार पैलू आहेत. अशा प्रकारे शक्तीला स्वत:ला चार विभागात विभक्त करून शिव जो आनंददायक किंवा सुखकारक खेळ सर्व जगात ज्यावेळी

खेळत असतो त्यावेळी तो शिवच शक्ती होऊन ही शक्तीच स्वतःच्या आनंदाच्या धुंदीने वेडी होते. या अवस्थेत मग ती स्वतःच जीवरूपाने जन्म घेते, मरते, तिच्या स्मशानात तीच नाचते आणि आपल्याच शवात ती शिव होते. या खेळातील आनंद ती स्वतःच उपभोगते. ही शक्ती स्वतःच पुरुषतत्त्व, प्रकृती, महाकालाची पत्नी, आसक्ती, प्रवृत्ती, साध्य वस्तू किंवा ध्येय आणि सर्वश्रेष्ठ अशा अत्यानंदाची कन्या आहे. ही कुंडालिनी शक्ती स्वतःच माया व अमाया असून माया उत्पन्न करणारी आहे. ती स्वतःच विद्या, स्वतःच अविद्या आणि स्वतःच सनातन किंवा शाश्वत देवी असून तीच साधनाचे अंतिम ध्येय आहे. वेद, वेदान्त, पुराणे किंवा तंत्रे या सर्वांना जरी आपण विचारले अर्थात् त्यांचा धांडोळा घेतला तर यातील प्रत्येक शास्त्र या शक्तीच्या विरागीपणाच्या लक्षणाची साक्ष देतील. या शास्त्रीय दृष्टीने युक्त असलेल्या श्रद्धेने जेव्हा साधक पाहतो तेव्हा त्याला विद्या व अविद्या यांनी युक्त असलेल्या या शक्तीच्या ब्रह्मांडाच्या खेळाचे हे दोन्ही पैलू ज्ञात होऊन तो तिच्या अंकावर बंध व मुक्त अवस्थेत बसतो.

" स्पंदशास्त्र अर्थात् सिद्धयोग साधन पद्धती " या ग्रंथातील प्रथम प्रवाहात श्रीभट्ट कल्लटाने हे 'संवित्-तत्त्व' म्हणजे 'कुंडलिनीशक्ति-तत्त्व' काय आहे ? असा प्रश्न पहिल्या श्लोकावरील टीकेत उपस्थित करून त्याचे उत्तर देताना असे म्हटले आहे की, " संवित्-तत्त्वाच्या उन्मेषाने, उन्मुखतेनें, उकलण्याने किंवा उघडण्याने विश्वाचा उदय होतो व परंपरा चालू राहते. या तत्त्वाच्या निमेषाने, विश्रामाने, मिटण्याने किंवा बंद होण्याने प्रलय होतो व परंपरा संपुष्टात येते. ज्याप्रमाणे जागृत कालामध्ये दृश्याचा उदय व झोपेच्या कालामध्ये दृश्याचा प्रलय होतो त्याचप्रमाणे वरील क्रिया घडते. आत्मसंवितेच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या उन्मेष व निमेषाच्या अतिरिक्त उत्पत्ती-प्रलय किंवा उभारणी-संहारणी नावाची कोणतीही वस्तू नाही. हे आत्मरूप ईश्वराच्या शक्तीचा फक्त प्रसार व विराम आहे. अत्यंत शुद्ध संवित्चे हे दोन आकार आहेत. " तत्त्वविचार " या ग्रंथात असे म्हटले आहे की, " जगताचा उदय व विलय शक्तीच्या प्रसाराशी व संकोचाशी बांधलेला आहे. ज्याची ही अशी शक्ती आहे तोच शिव-आत्मा आहे. " "कक्ष्या-स्तोत्रातही " हाच भाव प्रकट झाला आहे. " हे प्रभो ! तुमच्या उन्मेष-निमेषाच्या केवळ आशयालाच सृष्टी व प्रलय म्हणतात. तुमची ही विचित्र निर्मिती पाहिल्यावर वरील गोष्ट स्वतःच स्पष्ट होते." उन्मेषामध्ये ज्ञानक्रिया आदि गर्भित इच्छा-शक्तीचा निवास असतो व तीच प्रसारित होते. इच्छेमुळे ज्ञान प्रवृत्त होते व क्रियाशक्तीच्या साधनामुळे पदार्थांची उत्पत्ती होते. याचा विराम म्हणजेच प्रलय होय. उन्मेषात मुक्ती आहे व निमेषामध्येही मुक्ती आहे; कारण निमेष निस्तरंग आहे.

आत्मसंवित्‌रूप शिवशंकराला "शक्तिचक्र–विभवप्रभव" असे म्हटले आहे. शक्ती अनेक असतात. "मालिनीविजय" ग्रंथानुसार जगत्स्रष्टयाची समवायिनी शक्ती इच्छा आहे. ती जेव्हा जगताला प्रकट करते तेव्हा ती ज्ञानशक्ती होते. ती कार्योन्मुख झाल्यावर क्रियाशक्ती होते. तिच्यातच आनंद, इच्छा, ज्ञान व क्रिया निवास करतात. या सर्व शक्ती आत्मसंवित्‌शी एकरूप असतात. पांचभौतिक शरीर-रहित केवळ चिदात्म्यामध्ये जो परमानंदाचा उल्लास दिसतो ती परा वैष्णवी शक्ती आहे. या शक्तींच्या साहाय्यानेच संवित् विग्रह म्हणजे रूप धारण करते व दानवांचा नाश करते. या शक्ती जीवांचे आत्यंतिक हित करीत असल्यानेच त्यांना माता म्हणून संबोधिले जाते. या सर्व शक्ती विज्ञानदेहरूपच असतात.

खेचरी, इच्छा, परा, अघोरा वामा, ब्राह्मी, वैष्णवी, शैवी, सौरी, बौद्धी इत्यादि नावांनी भिन्न भिन्न संप्रदायांनी आपापल्या मतानुसार प्रधानतेने या शक्तींचे वर्णन केले आहे. कोणी कोणी या शक्तीला अक्षररूप व साधनरूपही मानतात. काहीही असले व मानले तरी सर्व शक्तींचे मूळकारण स्पंदरूप भगवानच आहे. "माया-वामनसंहितेमध्ये" सर्व शक्तींनी युक्त असलेला एक भगवानच जीवाचे ध्येय व उपास्य मानला आहे. या बाबतीत "कलयुक्ती" ग्रंथात असे सुंदर वचन आहे की, "वेदांत, वैष्णव, सौर, बौद्ध व अन्यान्य मतमतांतरामध्ये ज्ञाता व ज्ञेय या दोन्ही गोष्टी एक शुद्ध आत्माच आहे. जो जाणणारा आहे तोच जाणला जाणार आहे. ज्याचे उन्मेष व निमेष हे जगताचे उदय व विलय आहेत त्याला आम्ही नमस्कार करतो." हे म्हणणे वरील दृष्टीने ठीकच आहे. खरी गोष्ट अशी आहे की, शक्ति-समूहच अनंतरूपाने स्फुरित होत आहे. शक्तिमान् आत्मा महेश्वर आहे व शक्ति जगत् आहे. ज्याप्रमाणे अत्यंत श्रेष्ठ अशा सुंदरीच्या अंग–प्रत्यंगातून कोटी कोटी गुणांनी लावण्य नुसते झळकत असते त्याप्रमाणे परमात्म्याची चिन्मात्रता जगताच्या रूपाने झळकत असते. कुंडलिनी शक्तीच्या सामर्थ्यामुळेच आत्म्याची प्रभू ही संज्ञा योग्य होते." आचार्य श्रीबलभद्रांनी "सिद्धसिद्धांतसंग्रहात" ही चित्‌शक्ती कुंडलिनी स्वसंवेद्य व आत्मस्वरूप आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

परमं पदमात्मवेद्यमेकं निखिलात्यंतविभासि मात्रमुक्तम् ।
अयमर्थ उदाहृतोऽस्ति दृष्टो जठराख्याधरसंहितानिबंधे ।।५.३।।
यथा–

यत्र बुद्धिर्मनो नास्ति सत्ता संवित्परा कला ।
ऊहापोहौ न तर्कश्च वाचा तत्र करोति किम् ।।४।।

वाङ्मात्राद् गुरुणा सम्यक् कथं तत्पदमीर्यते ।
तस्मादुक्तं शिवेनैव स्वसंवेद्यं परं पदम् ।।५।। इति

नानाविचारचातुर्य्यंचर्चाधिक्यादनाश्रयात् ।
निरुपाधितयोपाधिशून्यत्वात्तत्स्वसंवेद्यता ॥६॥

परमपदाचे ज्ञान हे स्वसंवेद्य म्हणजे स्वतःच स्वतःला जाणण्यास योग्य आहे व तेच सर्वांचे आभासक आहे. जठराख्याधरसंहितानिबंधात ह्याच अर्थ उधृत केला आहे. तो असा- जेथे बुद्धी, मन, ऊहापोह व तर्क हे काहीच चालत नाहीत अशी संविद्रूप श्रेष्ठ शक्ती कुंडलिनी आहे. अशा या शक्तीच्या ठिकाणी वाणीची कथाच काय आहे ? गुरूने केवळ वाणीने सांगून त्या पदाचे ज्ञान कसे होईल ? होणार नाही. म्हणूनच श्रीशिवाने हे शिवाने व शक्तीने समभावापन्न असलेले पद किंवा तत्त्व स्वसंवेद्य आहे असे म्हटले आहे. ही चिच्छक्ती कुंडलिनी स्वसंवेद्य कशी आहे यावद्दलची कारणे पुढीलप्रमाणे आहेत. अनेकविध विचारचातुर्याने हिजविषयी बरीचशी चर्चा झाली असूनही ही शक्ती अनाकलनीय राहिली. या शक्तीला दुसऱ्या कोणाचाही आधार नाही म्हणजे ही कुंडलिनी शक्तीच सर्वांना आधारभूत आहे. त्याचप्रमाणे हिला कसलीही उपाधी नाही. यांमुळे ही चिच्छक्ती कुंडलिनी स्वसंवेद्य आहे. या सर्व विवेचनाच्या आधारावर " जय जय स्वसंवेद्या। आत्मरूपा ॥१.१॥" या ओवीचा अर्थ पाहिला म्हणजे आत्मरूप हे चिच्छक्ती कुंडलिनीयुक्त असून तिच्यामुळेच स्वसंवेद्य आहे याचा उलगडा होईल व " शक्त्याविना परे शिवे नाम धाम न विद्यते ॥ " व " शिवशक्तिरिति ह्येकं तत्त्वमाहुर्मनीषिणः ॥ " हे शास्त्राचे अंतिम सिद्धांत आत्मसात होतील.

स्वामी शिवानंदानी " Kundlini Yoga " या आपल्या विख्यात ग्रंथात " Kundalini " या प्रकरणात ही शक्ती साधनात्मक कशी आहे हे स्पष्ट करताना सुरुवातीलाच असे म्हटले आहे की, " All Sadhanas in the form of Japa, meditation, kirtan and prayer as well as all development of virtues and observance of austerities like truth, non-violence and continence are at best calculated only to aweken this serpent-power and make it to pass through all the succeeding chakras beginning from swadhisthana to Sahasrara, the latter otherwise called as the thousand-petalled lotus, the seat of Sadashiva or the Parabrahman or the Absolute separated from whom the Kundalini or the Shakti lies at the Muladhara, and to unite with whom the Kundalini passes through all the Chakras, as explained above, conferring liberation on the aspirant who assidu-

ously practises Yoga or the technique of uniting her with her lord and gets success also in his effort." ( Page xxvii )

जप, ध्यान, कीर्तन व प्रार्थना या स्वरूपाने केलेल्या साधना, त्याचप्रमाणे नानाविध गुणांचे केलेले संवर्धन व सत्य, अहिंसा, ब्रह्मचर्यादि पाळून उपासनापूर्वक केलेली उग्र तपश्चर्या इत्यादि सर्व गोष्टींचा उत्तम विचार किंवा हिशेब हा कुंडलिनी जागृतीसाठीच गृहित धरला जातो. स्वाधिष्ठानापासून सहस्रारापर्यंतच्या एका पुढील एक चक्रांचे भेदन करण्यास उपरोक्त गोष्टी साहाय्यभूत होतात. सहस्रार-चक्रालाच सहस्रदलकमल म्हणतात. हेच सदाशिवाचे, परब्रह्माचे किंवा परिपूर्णतेचे स्थान आहे. या तत्त्वापासूनच कुंडलिनी शक्ती विभक्त होऊन ती मूलाधारात येऊन निद्रा घेते आणि वर कथन केल्याप्रमाणे आपल्या स्वरूपाशी एकरूप होण्या-करिता ती षट्चक्रभेद करून वर जाते. जो साधक अत्यंत निष्ठेने व परिश्रमपूर्वक योगाभ्यास किंवा या शक्तीचे शिवाशी मीलन करणाऱ्या तंत्राचा अर्थात् साधनमार्गाचा अभ्यास करतो त्याला ही शक्ती मुक्ती अर्पण करते व साधकाच्या प्रयत्नाला यश प्राप्त होते.

आत्तापर्यंत मांडलेले सर्व विचार अगदी साररूपाने श्रीसमर्थ रामदासस्वामी-महाराजांनी "दासबोधातील स्तवन दशकात," "शारदास्तवन" समासात पुढीलप्रमाणे मांडले आहेत. ते म्हणतात–

आता वंदीन वेदमाता । श्रीशारदा ब्रह्मसुता ।
शब्दमूळ वाग्देवता । महामाया ॥१.३.१॥
जे उठवी शब्दांकुर । वदे वैखरी अपार ।
जे निःशब्दाचें अभ्यंतर । उकलूनि दावी ॥२॥
जे योगियांची समाधी । जे धारिष्टाची कृतबुद्धी ।
जे विद्या अविद्या उपाधी । तोडून टाकी ॥३॥
जे महापुरुषाची भार्या । अति संलग्न अवस्था तुर्या ।
जियेचेनि महत्कार्या । प्रवर्तले साधू ॥४॥
जे महंतांची शांती । जे ईश्वराची निजशक्ती ।
जे ज्ञानियांची विरक्ती । नैराश्यशोभा ॥५॥
जे अनंत ब्रह्मांडे घडी । लीलाविनोदेची मोडी ।
आपण आदिपुरुषीं दडी । मारूनि राहे ॥६॥
जे प्रत्यक्ष पाहतां आढळे । विचार घेतां तरी नाढळे ।
जियेचा पार न कळे । ब्रह्मादिकांसी ॥७॥
जे सर्व नाटक अंतर्कळा । जे जाणीवस्फूर्ति निर्मळा ।
जियेचेनि स्वानंदसोहळा । ज्ञानशक्ती ॥८॥

जे लावण्यस्वरूपाची शोभा। जे परब्रह्मसूर्याची प्रभा।
जे शब्दीं वदोनि उभा। संसार नाशी ॥९॥
जे मोक्षश्रिया महामंगळा। जे सत्रावी जीवनकळा।
जे सत्त्वलीला सुशीला। लावण्यखाणी ॥१०॥
जे अव्यक्तपुरुषाची व्यक्ती। जे विस्तारे वाढली इच्छाशक्ती।
जे कळिकाळाची नियंती। सद्गुरुकृपा ॥११॥
जे परमार्थमार्गींचा विचार। निवडोनि दावी सारासार।
भवसिंधूचा पैलपार। पाववी शब्दबळें ॥१२॥
ऐसी बहुवेषें नटली। माया शारदा एकली।
सिद्धचि अंतरीं संचली। चतुर्विध प्रकारें ॥१३॥
तिहीं वाचा अंतरीं आले। तें वैखरिया प्रगट केलें।
म्हणोनि कर्तृत्व जितुके जाले। तें शारदागुणें ॥१४॥
जे ब्रह्मादिकांची जननी। हरिहर जियेपासुनी।
सृष्टिरचना लोक तिन्ही। विस्तार जियेचा ॥१५॥
जे परमार्थाचें मूळ। नातरी सद्विद्याचि केवळ।
निवांत निर्मळ निश्चळ। स्वरूपस्थिती ॥१६॥
जे योगियांचे ध्यानीं। जे साधकांचे चिंतनीं।
जे सिद्धांचे अंतःकरणीं। समाधिरूपें ॥१७॥
जे निर्गुणाची ओळखण। जे अनुभवाची खूण।
जे व्यापकपणें संपूर्ण। सकळां घटीं ॥१८॥
शास्त्रें पुराणें वेदश्रुती। अखंड जियेचें स्तवन करिती।
नानारूपीं जियेसि स्तविती। प्राणिमात्र ॥१९॥
जे वेदशास्त्रांची महिमा। जे निरुपमाची उपमा।
जियेकरितां परमात्मा। एसें बोलिजे ॥२०॥
नाना विधा कळा सिद्धी। नाना निश्चयांची बुद्धी।
जे सूक्ष्मवस्तूची शुद्धी। ज्ञप्तिमात्र ॥२१॥
जे हरिभक्तांची निजभक्ती। जे अंतर्निष्ठांची अंतरस्थिती।
जे जीवन्मुक्तांची मुक्ती। सायुज्यता ॥२२॥
जे अनंतमाया वैष्णवी। न कळे नाटक लाघवी।
जे थोरथोरांसी गोंवी। जाणपणें ॥२३॥
जें जें दृष्टीनें देखिलें। जें जें शब्दें ओळखिलें।
जें जें मनास भासलें। तितुकें रूप जियेचें ॥२४॥

स्तवन भजन भक्तिभाव। मायेवांचूनि नाहीं ठाव।
या वचनाचा अभिप्राव। अनुभवी जाणती ॥२५॥

म्हणोनि थोराहूनी थोर। जे ईश्वराचा ईश्वर।
तियेसी माझा नमस्कार। तदंशेंचि आतां ॥२६॥

सारांश, या प्रकरणाला इतकी सुदीर्घ प्रस्तावना लिहिण्याचे कारण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत जो कुंडलिनी शक्तीच्या स्वरूपाचा विचार आद्योपांत मांडला आहे तो सर्वस्वी सद्‌गुरुकृपेने जागृत शक्तीच्या द्वारा होणाऱ्या पिंडब्रह्मांडात्मक संहारणीचा साधनात्मक असा सूक्ष्म व जिव्हाळ्याचा विचार असून सर जॉन वुड्रॉफ यांच्या विचारधारेप्रमाणेच ज्ञानेश्वरी म्हणजे नुसते तत्त्वज्ञान नसून किंवा शब्दांवर कल्पनेने केलेली कसरत नसून "आम्हीं साधन हें जें सांगितलें। तेंचि शरीरीं जिहीं केलें। ते आमुचेनि पाडें आले। निर्वाळलेया ॥ ६.३२६ ॥" व "इये अभ्यासीं जे दृढ होती। ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती ॥ ६.३३० ॥" अशा प्रकारे साधनतत्त्व सांगण्याकरिता कथन केलेली आहे. हा दृष्टिकोन "हठयोगप्रदीपिका" व "गौतमीयतंत्रात" पुढीलप्रमाणे स्पष्ट झाला आहे.

कंदोर्ध्वं कुंडली शक्तिः सुप्ता मोक्षाय योगिनाम्।
बंधनाय च मूढानां यस्तां वेत्ति स योगवित् ॥३.१०७॥ हठयोगप्रदीपिका॥

कुंडली कुटिलाकारा सर्पवत्परिकीर्तिता।
सा शक्तिश्चालिता येन स मुक्तो नात्र संशयः ॥१०८॥

मूलपद्मे कुंडलिनी यावन्निद्रायिता प्रभो।
तावत् किंचिन्न सिध्येत् मंत्रयंत्रार्चनादिकम् ॥१॥ गौतमीयतंत्र॥

जार्गात यदि सा देवी बहुभिः पुण्यसंचयैः।
तदा प्रसादमायाति मंत्रयंत्रार्चनादिकम् ॥२॥ गौतमीयतंत्र॥

या दृष्टिकोनातून ज्ञानेश्वरीकडे पाहवयाचे आहे; कारण म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, या ग्रंथातील "शक्तिका जागरण" या लेखात शेवटी असे म्हटले आहे की, "कुंडलिनीके जागे विना इस महापथमें चला नहीं जा सकता, परम लक्ष्यकी प्राप्ति तो बहुत दूरकी बात है। मनुष्य जीवनका यही यथार्थ उद्देश्य है। केवल खंड-कैवल्य प्राप्त करके जन्म-मृत्युके आवर्तसे ऊर्ध्वमें स्थान प्राप्त करना मनुष्यका लक्ष्य नहीं है। अपनी सुप्त भगवत्ता जब तक पूर्णतया जाग न उठे तब तक मनुष्य जीवनकी यथार्थ सफलता कहाँ? कुंडलिनीके जागे बिना चित् और अचित्का द्वंद्वभाव ठीक-ठीक कट नहीं सकता। विवेक-ज्ञानका लाभ मार्गमें आरूढ होनेका एक उपयोगी सोपानमात्र है। शक्तिकी साधना छोडकर शिवभावकी प्राप्ति दुर्घट है और बिना कुंडलिनीके

जागरणके शक्ति-साधनाका कोई भी अंग निष्पन्न नहीं होता।" अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे ज्ञानेश्वरीतील कुंडलिनी शक्तीचा विचार या दृष्टीने पुढे करावयाचा आहे. हा विचार इतका गहन, गंभीर, सूक्ष्म, हळुवार व विस्तृत आहे की, तो करताना, "हें अपार कैसेनि कवळावें। महातेज कवणें धवळावें। गगन मुठीं सुवावें। मशकें केवीं ? ॥ १.७४॥" हें श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे म्हणणे सतत दृष्टीपुढे तरळू लागते व शेवटी "परी एथ असे एकु आधारु। तेणेंचि बोले मी सधरु। जे सानुकूळ श्रीगुरु। ज्ञानदेवो म्हणे ॥ १.७५ ॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडाने जसे हे अपार कुंडलिनी तत्त्व कवळले व महातेज धवळून ज्ञानेश्वरीच्या रूपाने मुठीत धरून जगापुढे मांडले त्याप्रमाणेच महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांच्या चरणकृपामृतप्रकाशाने उपरोक्त प्रकारानेच ज्ञानेश्वरीतील या निगूढ तत्त्वाचे प्रकाशीकरण करण्याचा प्रयत्न करणार आहे. या बाबतीत सर जॉन वुड्रॉफ यांनी "The Serpent Power" या ग्रंथात अगदी असेच म्हटले आहे. "This subjcet is vast and a very difficult one. It is not possible for one to go into the intricacies of the subject unless one be a great guru af vast learning and much personal expirience; great works have been written on even single points in the ascent of the aspirant of the psychic-centres." ( p. 287 ) हा विषय अत्यंत विस्तृत व कठीण आहे. सामान्य माणसाला या विषयाच्या गुंतागुंतीत शिरणे शक्य नाही. मात्र सखोल अभ्यास व वैयक्तिक अनुभव यांनी युक्त होऊन गुरुपदावर आरूढ झालेल्या व्यक्तीस हे शक्य आहे; कारण साधकाच्या षट्चक्रारोहणाच्या एकेका मुद्यावर मोठमोठे ग्रंथ लिहिले गेले आहेत.

येथपर्यंत केलेल्या सर्व विवेचनाच्या पार्श्वभूमीवर आपण ज्ञानेश्वरीतील कुंडलिनी शक्तीच्या स्वरूपाचा क्रमशः सांगोपांग विचार करू.

## ज्ञानेश्वरी :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरी, ज्ञानदेवी किंवा भावार्थदीपिका यांपैकी एकही नाव स्वतःहून आपल्या ग्रंथास दिलेले नसले व "केलें ज्ञानदेवें गीतें। देशीकार लेणें ॥१८.१८०६॥ एवढेच म्हणून ते थांबले असले तरी श्रीसंत नामदेवमहाराजांनी आपल्या अभंगात या ग्रंथाचा उल्लेख "ज्ञानदेवी","ज्ञानेश्वरी" आणि "गीताटीका" अशा तीन नावांनी केलेला असल्यामुळे ज्ञानदेवांची ती ज्ञानदेवी किंवा ज्ञानेश्वरी हेच सार्थ नाव पुढे रूढ झाले. वस्तू ज्या स्वरूपात असते त्या स्वरूपातच तिचे खरे स्वरूप स्पष्ट करण्याचे सामर्थ्य त्या वस्तूशी पूर्ण एकत्व पावलेल्या व्यक्तीने केले

म्हणजे तेच त्या वस्तूचे सम्यक् स्वरूप ठरते. श्रीनामदेवमहाराजांनी अशा रीतीनेच या ग्रंथाचे वर्णन करून पुढील अभंगात तिचे स्वरूप व्यक्त केले आहे. ते म्हणतात-

ज्ञानराज माझी योग्यांची माउली। जेणें निगमवल्लि प्रकट केली ॥१॥
गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी। ब्रह्मानंदलहरी प्रकट केली ॥२॥
अध्यात्मविद्येचें दाविलेंसें रूप। चैतन्याचा दीप उजळिला ॥३॥
छपन्न भाषेचा केलासे गौरव। भवार्णवीं नाव उभारीली ॥४॥
श्रवणाचे मिषें बैसावें येउनी। साम्राज्य भुवनीं सुखी नांदे ॥५॥
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी। एक तरी ओवी अनुभवावी ॥६॥९१२॥

॥ श्रीसकलसंतगाथा ॥

ह्या अभंगातील भावार्थ ध्यानात घेऊन हा ग्रंथ ज्ञानाची ईश्वरी अर्थात् निगमाची वल्ली, ब्रह्मानंदाची लहर, चैतन्याचा दीप व भवसागरातील नाव कशी आहे हे पाहवयाचे आहे. याचा अर्थ असा की, ज्ञान देणारी जी ईश्वरी शक्ती आहे तिचा श्रीमदाद्यशंकराचार्यांपासून तो श्रीअभिनवगुप्तांपर्यंत सकल शास्त्रपंडितधुरिणांनी स्वीकार करून महायोगी गोरक्षनाथांप्रमाणेच "कुंडलिनी शक्ती" या नावाने या ईश्वरी शक्तीला किंवा सत्तेला संबोधून जो गौरव केला आहे, त्या अनादि आत्मसत्तास्वरूप कुंडलिनी शक्तीने व तिच्या साधनाने संपन्न झालेले असे ज्ञानेश्वरीचे स्वरूप आहे, असे जोपर्यंत आपण पाहू शकत नाही, तोपर्यंत देवी भवानी कुंडलिनीच्या नित्यनूतन स्वरूपाप्रमाणे असलेल्या व गीतातत्त्वाच्या रूपाने साकार झालेल्या ज्ञानेश्वरीचे, तिच्याशी म्हणजे तिच्या शक्तिस्वरूपाशी समव्याप्त होऊन दर्शन न घेता, तिचे एकांगी वर्णन केल्यासारखे होईल. यामुळेच "स्वतः नाथपंथातले अधिकारी पुरुष असताना गीतेत कुंडलिनीयोग सांगितला आहे असा आग्रह धरण्याचा हेकडपणा ते करीत नाहीत." (सार्थ ज्ञानेश्वरी-प्रस्तावना-श्री. शं. वा. दांडेकर- पृ. ८५) व "गीतेत व ज्ञानेश्वरीत काहीतरी गूढ आहे व केवळ गुरुगम्य असा कुंडलिनी योगच त्यात प्रमुख निष्ठा आहे हे म्हणणे निराधार आहे." (ज्ञानदेव आणि नामदेव-डॉ. शं. दा. पेंडसे पृ. २१३) इत्यादि जी विविध विधाने आपणास पाहवयास मिळतात ती सर्व विधाने वस्तूच्या अंशात्मक सत्यस्वरूपाशी एकरूप होऊन केलेली असून, वस्तूशी समव्याप्त होऊन तिच्या संपूर्ण सत्यस्वरूपाची ओळख करून देत नसल्यामुळे, अशा प्रकारच्या सर्व संकुचित व अव्याप्त दृष्टिकोनांचा त्याग करून ज्ञानाच्या ईश्वरीशी म्हणजे कुंडलिनी शक्तीशी पूर्ण जागृतीने समरस होऊन तिच्या संपूर्ण अंगोपांगांनी श्रीप्रभूची वाङ्मयी मूर्ती म्हणून ती स्वतःच श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण प्रतिभेचे स्वरूप घेऊन ज्ञानेश्वरीच्या रूपाने कशी साकार झाली आहे, याचा श्रीगुरुचरणाश्रित होऊन आस्वाद घेतल्यशिवाय या ग्रंथाचे अखंड एकरसत्व, एकात्म व सामरस्यत्व त्रिकालीही प्रतीत होणार नाही. श्रीज्ञानेश्वर-

महाराजच ज्ञानाच्या प्राप्तीसाठी ईश्वरीशक्ती कुंडलिनीची अशी पूर्ण जागृती प्रभा, स्फूर्ती, उन्मेख, प्रकाश इत्यादि शब्दांतून व्यक्त करताना म्हणतात–

आणि तत्त्वज्ञान निर्मळ। फळें जें एक फळ।
तें ज्ञेयही वरी सरळ। दिठी जया॥१३.६२५॥
येऱ्हवीं बोधा आलेनि ज्ञानें। जरी ज्ञेय न दिसेचि मनें।
तरी ज्ञानलाभुही न मने। जाहला सांता॥६२६॥
आंधळेनि हातीं दिवा। घेऊनि काय करावा ?।
तैसा ज्ञाननिश्चयो आघवा। वायांचि जाय॥६२७॥
जरि ज्ञानाचेनि प्रकाशें। परतत्त्वीं दिठी न पैसे।
ते स्फूर्तीचि असे। अंध होऊनी॥६२८॥
म्हणौनि ज्ञान जेतुलें दावीं। तेतुली वस्तूचि आघवी।
तें देखे ऐशी व्हावी। बुद्धि चोख॥६२९॥
यालागीं ज्ञानें निर्दोखें। दाविलें ज्ञेय देखे।
तैसेनि उन्मेखें। आथिला जो॥६३०॥
जेवढी ज्ञानाची वृद्धी। तेवढीच जयाची बुद्धी।
तो ज्ञान हे शब्दीं। करणें न लगे॥६३१॥
पैं ज्ञानाचिये प्रभेसवें। जयाची मती ज्ञेयीं पावे।
तो हातधरणिया शिवे। परतत्त्वातें॥६३२॥

ज्ञानाची ईश्वरी अशा प्रकारे आपल्या प्रकाशाने, स्फूर्तीने, प्रभेने व उन्मेखाने साधकाला हाताला धरून ज्ञेयाशी एकरूप करीत असल्याने या ईश्वरी तत्त्वाचा म्हणजे ज्या तत्त्वाला शास्त्रकारांनी कुंडलिनी म्हटले आहे तिचा स्वीकार केल्यावाचून गत्यंतर नाही. "भावोपनिषदात" "कुंडलिनी ज्ञानशक्तिर्गृहम्॥" असे म्हटले आहे. त्याचा अर्थच ज्ञानशक्ती कुंडलिनी हे गृह होय किंवा कुंडलिनी शक्ती हेच ज्ञानाचे घर आहे, असा आहे. याच उपनिषदात " श्रीगुरुः परमकारणभूता शक्तिः॥" असे म्हणून श्रीगुरू ही सर्वप्रधान शक्ती आहे, हे स्पष्ट केले आहे. उपरोक्त दोन मंत्रांचे समीकरणच मांडावयाचे झाले तर असे मांडता येईल की–

कुंडलिनी = ज्ञानशक्ती
श्रीगुरू = परमकारणभूतशक्ती

वरील दोन्ही समीकरणांमध्ये शक्ती हा समान गुणक असल्याने आपल्याला असे म्हणता येईल की–

श्रीगुरू = कुंडलिनी = परमकारणभूतशक्ती = ज्ञानशक्ती

याचा अर्थ असा की, या सर्व गोष्टी एकरूप आहेत. हे समीकरण एकदा अंतःकरणात दृढ झाले म्हणजे श्रीगुरूच ज्ञानशक्ती कुंडलिनीच्या रूपाने साधकाच्या

अंतरंगात जागृत होऊन व सतत निवास करून आपणच सर्व कारण बनून साधकाला ज्ञेय प्राप्ती करून देऊन परमपदाला कसे पोहोचवितात याची प्रतीती येते. ज्ञानेश्वरी-तील एकाही शब्दातून हे समीकरण सुटलेले नसल्याने माझे परमाराध्य श्रीगुरुराज महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांनी " ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही, " असा महासिद्धांत प्रस्थापित केला. त्यांच्या या महासिद्धांताचे प्रकटीकरण म्हणजेच हा ग्रंथ आहे. या ग्रंथाच्या रूपाने त्यांची शक्तीच प्रकट झाली आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही श्रीगुरू हे साक्षात् चित्सूर्य किंवा ज्ञानमार्तंड म्हणजे कुंडलिनी शक्तीचे आगर असून त्यांची म्हणजे चित्शक्तीची जागृती विश्वाभास मावळून टाकून ज्ञानाज्ञानचांदणे कसे गिळून टाकते व आपल्या विवेक-किरणांनी, सूर्यकांताच्या उन्मेखाने व निवरू रश्मिपुंजाने जीवाला आत्मज्ञानाचे डोळे देऊन त्याला देहाहंतेच्या अविसाळातून, शब्दांच्या आसकडधातून व भेद नदीतून पार करून अद्वयाब्जिनीविकाशु असे स्वबोधरूपी मुक्तिकैवल्य देऊन सामरस्याचे समाधान उदैलाची उदैजतखेवो कसे करते हे सांगताना असे म्हटले आहे की–

मावळवीत विश्वाभासु । नवल उदयाला चंडांशु ।
अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥१६.१॥
जो अविद्याराती रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञानचांदणिया ।
जो सुदिनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥२॥
जेणें विवळतिये सवळे । लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे ।
सांडिती देहाहंतेचीं अविसाळें । जीवपक्षी ॥३॥
लिंगदेहकमळाचा । पोटीं वेंचु तया चिद्भ्रमराचा ।
वंदिमोक्षु जयाचा । उदैला होय ॥४॥
शब्दाचिया आसकडीं । भेद नदीच्या दोहीं थडीं ।
आरडतें विरहवेडीं । बुद्धिबोधु ॥५॥
तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान ।
भोगवी जो चिद्गगन । भुवनदिवा ॥६॥
जेणें पाहालिये पाहांटे । भेदाची चोरवेळ फिटे ।
रिघती आत्मानुभववाटे । पांथिक योगी ॥७॥
जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांतु फुणगे ।
दीपले जाळिती दांगें । संसाराचीं ॥८॥
जयाचा रश्मिपुंजु निबरु । होता स्वरूप उखरीं स्थिरु ।
ये महासिद्धीचा पूरु । मृगजळ तें ॥९॥
जो प्रत्यग्बोधाचिया माथया । सोऽहंतेचा माध्यान्हीं आलिया ।
लपे आत्मभ्रांतिछाया । आपणपां तळीं ॥१०॥

**ते वेळीं विश्वस्वप्नासहितें । कोण अन्यथामती निद्रेतें ।**
**सांभाळी नुरेचि जेथें । मायाराती ॥११॥**
**म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानंदाची दाटणी ।**
**मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं । मंदावों लागती ॥१२॥**
**किंबहुना ऐसैसें । मुक्तकैवल्य सुदिवसें ।**
**सदा लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनि ॥१३॥**
**जो निजधामव्योमींचा रावो । उदैलाचि उदैजतखेंवो ।**
**फेडी पूर्वादि दिशांसि ठावो । उदोअस्तूचा ॥१४॥**
**न दिसणें दिसणेंनसीं मावळवी । दोहीं झांकिलें ते सैंघ पालवी ।**
**काय बहु बोलों ते आघवी । उखाचि आनी ॥१५॥**
**तो अहोरात्रांचा पैलकडु । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु ।**
**जो प्रकाश्येंवीण सुरवाडु । प्रकाशाचा ॥१६॥**
**तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । आतां नमों म्हणों पुढतीपुढती ।**
**जे बाधका येइजतसे स्तुती । बोलाचिया ॥१७॥**

वरील ओव्यातील चंडाशु, आत्मज्ञानाचे डोळे, भुवनदिवा, पहाट, विवेक-किरण, उन्मेख, रश्मिपुंज, प्रत्यक्‌बोध, प्रकाश, उदय, उखा, ज्ञानमार्तंड व चित्सूर्य ह्या सर्व गोष्टी श्रीगुरूशी अभेद्य असणाऱ्या ज्ञानेश्वरीच्या म्हणजे श्रीगुरुकृपेनें जीवाच्या ठिकाणी ज्ञानाच्या रूपाने उदय पावणाऱ्या शक्तीच्या अर्थात् कुंडलिनीच्या द्योतक असून हिच्यामुळेच साधकरूपी पांथस्थयोगी आत्मानुभवाची वाटचाल करतात असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे व शेवटी या ज्ञान देणाऱ्या चित्‌शक्तीचा सूर्यच आपले श्रीगुरुमहाराज श्रीनिवृत्तिनाथ आहेत असे म्हणून त्यांना नमन केले आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराज सुरुवातीपासूनच " सांगेन ज्ञानाचिये भेटी । उपावो तुज ॥ ४.१८५ ॥ " असे म्हणून ज्ञान म्हणजे चित्‌शक्ती कुंडलिनीच्या जागृतीचा किंवा भेटीचा उपाय सांगण्यास कटिबद्ध झाले आहेत. " ज्ञानबीजाचा विस्तारु । सांगता असे अपारु ॥ ४. १९१ ॥ " असा ज्ञानाच्या बीजाचा म्हणजे शक्तीचा विस्तार अपार असला तरीही ते ज्ञानाची गोष्ट सांगण्यास " पां असो आतां ॥ ४.१९१ ॥ " असे म्हणून सिद्ध झाले आहेत. त्यांच्या लेखी सद्‌गुरुकृपेने होणाऱ्या या ज्ञानेश्वरीच्या जागृतीला आणि एकमात्र जागृतीलाच महत्त्व असल्याने त्यांनी हा विचार वारंवार प्रकट केला आहे. या दृष्टीने ते म्हणतात–

**जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें । फिटलें भेदाभेदांचें कडवसें ।**
**मग मीचि जाहला समरसें । आणि भक्तुही तेवींचि ॥७.११२॥**

आणि ज्ञानाचेनि उजिडलेपणें । मी आत्मा ऐसें तो जाणें ।
म्हणौनि मीही तैसेंचि म्हणें । उचंबळला सांता ॥११७॥
तैसींच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली ।
तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥१३१॥
म्हणौनि गा यापरी । ब्रह्मादिपिपीलिकावरी ।
मीवांचूनी दुसरी । गोठी नाहीं ॥१०.१०५॥
ऐसें जाणे जो साचें । तया चेइरे जाहाले ज्ञानाचें ।
म्हणौनि उत्तमाधम भेदाचें । दुःस्वप्न न देखे ॥१०६॥
ऐसी आत्मसाक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उजरी ।
ते सामुग्री कीर पुरी । मेळविली ॥१८.९९६॥
आतां याचि त्रिप्रकारा । ज्ञानाचेनि धनुर्धरा ।
प्रकाशें होती गोचरा । कर्तयांच्या क्रिया ॥१८.५८३॥
तया वेगळाचि क़ाय प्रकाशें । ज्ञानित्व यावें असें ।
कायि जळार्णव पाउसें । साजा होय ? ॥१४.३३३॥

ज्ञानाच्या प्रकाशाने, उजाडल्याने, वोतपली पडल्याने, चेइरे झाल्याने, उजरी लाभल्याने म्हणजे गुरूशी अर्थात् आत्म्याशी अभिन्न असणाऱ्या चित्‌शक्ती कुंडलिनीची जेव्हा शक्तिपातरूपी कृपाप्रसादाने उखा उजळते तेव्हा साधकाच्या ठिकाणी असणारे हे स्वतःसिद्ध ज्ञान आतूनच शक्तीच्या रूपाने उदयास येते. ही काही बाहेरून वेगळी उत्पन्न होणारी गोष्ट नाही. समुद्राला जशी पाऊस पडल्यावर भरती येऊन शोभा येत नाही; तर ती स्वतःसिद्धच असते त्याप्रमाणे ही ज्ञानेश्वरी शिवाशी एकरूप असल्यामुळे साधकाला स्वस्वरूपाचे ज्ञान आतूनच प्राप्त करून देते. आगमनिगमादि सकलशास्त्रांनी या गोष्टीचा एकमुखाने उद्‌घोष केला आहे. या दृष्टीने ' घेरंडसंहितेत " असे म्हटले आहे की–

यावत्सा निद्रिता देहे तावज्जीवः पशुर्यथा ।
ज्ञानं न जायते तावत् कोटियोगविधेरपि ॥३.५०॥

शक्तिजागृतीशिवाय कोणत्याही उपायाने ज्ञान होऊ शकत नाही हाच एकमात्र महासिद्धांत आहे; कारण श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तैसें ज्ञान जैं सांडूनि जाये । तैं ऐसी हे दशा आहे ।
म्हणौनि कीजे तें केलें नोहे । ज्ञानेंवीण ॥९.३०५॥
आंधळेया गरुडाचे पंख आहाती । ते कवणा उपेगा जाती ? ।
तैसें सत्कर्माचे उपखे ठाती । ज्ञानेंवीण ॥३०६॥
ज्ञानें कां जयाचे डोळे । देखोनि न राहती देहींचे खोळे ।
सूर्यरश्मी आणियाळें । ग्रीष्मीं जैसें ॥१५.३८२॥

**तैसे विवेकाचेनि पैसें। जयांची स्फूर्ती स्वरूपीं बैसे।**
**ते ज्ञानिये देखती ऐसें। आत्मयातें ॥३८३॥**

सूर्याची अणकुचीदार प्रखर किरणे ज्याप्रमाणे ग्रीष्मऋतूतील दाटून आलेल्या घनमालांचा भेद करून बाहेर येतात त्याप्रमाणे शक्तींच्या किंवा स्फूर्तीच्या जागृत सामर्थ्याने जडचेतनभेदप्रक्रिया पूर्ण होऊन साधक ज्ञानेश्वरीने कृतार्थ होतो. या दृष्टीचे "रुद्रयामल" ग्रंथात श्रीशंकरांनी पुढीलप्रमाणे अपूर्व उद्घाटन केले आहे. ते म्हणतात—

**अनंतज्ञाननिलयां यां भजंति मुमुक्षवः।**
**सुप्ता सर्पोपमा मौला पाति साधकमीश्वरी ॥१५.१॥**
**शक्तिः कुंडलिनी देवी जगन्मातास्वरूपिणी।**
**प्राप्यते यैः सदा भक्त्या मुक्तेरेवागमं फलम् ॥१४॥**
**आद्यपत्रे प्रतिष्ठंति वर्णजालसमाश्रिताः।**
**वायवीशक्तयः कांता ब्रह्मांडमंडलस्थिताः ॥१५॥**
**चैतन्या कुंडलीशक्तिर्वायवी बलतेजसा ॥१९॥**
**चैतन्या सिद्धिहेतुस्था ज्ञानमात्रं ददाति सा।**
**ज्ञानमात्रेण मोक्षः स्याद् वायवीज्ञानमाश्रयेत् ॥१९॥**
**महाबली महावाग्मी वर्धंते च दिने दिने।**
**आयुर्वृद्धिः सदा तस्य जरामृत्युविवर्जितः ॥२०॥**
**कुंडलीकृपया नाथ ! विना किंचिन्न सिध्यति ॥२१॥**

मूलाधारात सर्पाप्रमाणे झोपलेली कुंडलिनी शक्ती अनंत ज्ञानाचे साक्षात् घरच आहे. ही शक्तीच ज्ञान देऊन साधकांचे पालन व रक्षण करते. याकरिता मोक्षाची इच्छा करणारे साधक तिचे अखंड भजन करतात. ही देवी कुंडलिनी शक्ती जगन्मातास्वरूप आहे. ती भक्तीने प्राप्त होते व मुक्तीचे फल देते. तिची आद्यपत्रावर प्रतिष्ठा असून ज्ञानप्राप्तीचे 'अ' पासून 'ह' पर्यंतचे सर्व वर्ण तिच्यापासून उत्पन्न होतात. ही शक्ती सहस्त्रारातील ब्रह्मांडमंडलात शिवाबरोबर अभिन्नपणे वास करीत असून तिलाच वायवीशक्ती म्हणतात. ही चैतन्य-ज्ञानरूप कुंडलिनी शक्ती वायुस्वरूप असून बलाने व तेजाने युक्त आहे. ही चित्शती कुंडलिनी चैतन्ययुक्त म्हणजे ज्ञानयुक्त असून ज्ञेयसिद्धीचे तीच कारण आहे व ज्ञान देऊन ती ही गोष्ट सिद्धीस नेते. एकमात्र ब्रह्मज्ञानानेच मोक्ष होतो. त्यामुळे साधकांनी या वायवीज्ञानशक्ती कुंडलिनीचाच आश्रय केला पाहिजे. ही कुंडलिनी शक्ती महा बलवान असून सर्वश्रेष्ठ मंत्रात्मक संहिता आहे. ती जागृत झाल्यावर प्रतिदिन तिचा विकास होत जातो. तिच्यामुळे आयुष्य वृद्धी होऊन म्हातारपण व मृत्यू हे दूर राहतात. हे नाथ ! कुंडलिनी शक्तीची कृपा झाल्याशिवाय कोणतीही गोष्ट सिद्ध होत नाही.

अशी ही दिव्यज्ञानस्वरूप कुंडलिनी शक्ती ज्ञानेश्वरी असल्याने तिचे त्याच स्वरूपात " रुद्रयामलात " पुढीलप्रमाणे स्तवन केले आहे.

ज्ञानेश्वरी शुभकरी परिभावनीया योगेश्वरैर्हरिहरैर्गुरुभिर्महेंद्रैः ।
तां काकिनीं प्रसविनीं परमेशपत्नीं तां स्तौमि चारुहृदयांबुजराजिमध्ये ।।६०.१।।
श्वेतासने त्रिनयने जननि त्वमेव दीनोऽस्मि ते चरणपंकजमाश्रयामि ।
श्रीसुंदरी प्रणतवेदविचारवक्त्री तारेश्वरी त्वमपि रक्ष विनाशकाले ।।७।।
यद्येक एव इतिहासपुराणरूपे नित्यं तवैव खलु पादसरोजमीडे ।
ते श्रीपदं भुवनसारमनंतसेव्यं योगास्पदं क्रतिभिराश्रयमेकयोगम् ।।८।।
सर्वे भजंति निजमोक्षफलाय नित्यं दीनोऽहमद्य भुवनेशि ! मुदाऽऽश्रयामि ।
त्रैलोक्यपूजितपदं हृदयांबुजस्थं चित्तप्रकाशकमशेषसुखानुभूतम् ।।९।।
मायाश्रयं सकलसिद्धिनिदानरूपं मंजीरहारविनतं वरमाश्रयामि ।
चंद्रोद्रये सुखमयं द्युतिकोटिदीप्तं शोभाकरे स्थिरतरा भव मे हृदब्जे ।।१०।।
भूमंडले हि बलवान् कृतकृत्य एव स्वामीश्वरीं हृदि मुदा सुखमाश्रयामि ।
नित्यं पुरा भवसि खलु योगसिध्यै शंभुर्गिरिश इति चेश्वरपार्श्वगामी ।।११।।
सायुज्यं नाथपदवीं गत ईशकांते एकाकिनं कुललतांघ्रियुगं विमन्यैः ।
ध्यायंति योगिन इहैव तवांघ्रियुग्मं संसारहेतुकसदाऽघविनाशनाय ।।१२।।

ज्ञानाची ईश्वरी किंवा स्वामिनी व सर्वांचे शुभ करणारी अशी काकिनी शक्ती आहे. योगेश्वर, विष्णू, शिव, महेंद्रादिदेव व गुरुजन या काकिनीरूपी ज्ञानेश्वरीची चित्तामध्ये धारणा किंवा भावना करतात. अशा प्रसवधर्मिणी किंवा सृष्टयुत्पादिका परमेशपत्नी असलेल्या काकिनीशक्तीला माझ्या हृदयकमलामध्ये स्थापून मी तिचे स्तवन करतो. हे श्वेत आसनावर बसणाऱ्या त्रिलोचने ! तू सर्वांची माता आहेस. हा दीनदास तुझ्या चरणकमलाचा आश्रय करीत आहे. तू निरतिशय सुंदर आहेस. शरणागताला तू वेदविचार सांगतेस. हे तारेश्वरी ! संकटसमयी तूही माझे रक्षण कर. तू इतिहासपुराणरूपिणी अशी एकटीच आहेस. मी तुझ्याच चरणकमलांची सदैव स्तुती करतो. ते तुझे चरणकमल म्हणजे त्रिभुवनाचे सार, सर्वांना किंवा अनंताला अर्थात् शेषाशालाही सेवनीय, योगप्राप्तीचे स्थान, श्रेष्ठयोगरूप व पशूंना आश्रयभूत असे आहेत. हे भुवनेश्वरी ! सर्व लोक मोक्षरूप फलासाठी तुझी सेवा करतात. मी दीनदासही आनंदाने तुझाच आश्रय करतो. तुझे चरण चित्ताला प्रकाशित करणारे, सर्वांच्या हृदयकमलात असणारे, सर्व सुखांचा अनुभव करून देणारे व त्रैलोक्याला पूजनीय असे आहेत. तसेच तुझे चरण मायेला आश्रयभूत, सर्वसिद्धींच्या प्राप्तीला कारणीभूत, नूपुरांमुळे शोभणारे व सर्वश्रेष्ठ असे आहेत. त्यांच्या आश्रयाला मी आलो आहे. तुझे चरण चंद्रोदयाप्रमाणें सुखमय व अत्यंत दिव्यप्रकाशमय आहेत. त्यांना मी शरण आहे. हे शोभाकरे शक्तिदेवी !

माझ्या हृत्कमलात तू स्थिर राहा. हे काकिनीदेवी ! मी भूमंडलात कृतकार्य व बलवान व्हावे यासाठी हे ईश्वरी ! माझ्या हृदयात मी मोठ्या आनंदाने तुझी भावना करतो. तू योगसिद्धी प्राप्त करून देण्यासाठी नेहमी पुढे असतेस किंवा पुढाकार घेतेस व कैलासपती ईश्वर शंभू तुला अनुसरून तुला साहाय्य करीत असतो. हे ईशकांते ! तो गिरिशही तुझ्यामुळे सायुज्यमुक्ती व नाथपदवीला प्राप्त झाला. दुसऱ्यांबद्दल कशाला विचार करावयाचा ! योगीजन केवळ तुझ्या चरणयुगलाचेच ध्यान करतात; कारण ते चरणकमल संसाराला कारणीभूत अशा पातकांचा नाश करणारे आहेत.

अशा या शुभकरी ज्ञानेश्वरीच्या उजाळ्यासाठी म्हणजे शक्तीच्या जागृती-साठी योगी, मुनी, महंत, तडी, तापसी, संन्यासी, साधक, साधू किती महत्प्रयास करतात व शेवटी श्रीगुरुसेवेने शक्तिपात झाल्यावर ज्ञानशक्तीच्या जागृतिस्वरूपाचे बुद्धीचे डोळे उघडल्यावर संसार उन्मूळणामुळे आनंदाच्या दोंदावर लोळत विषयांनी विटलेले मन या पवित्रैकनिधनाने कसे चोख करतात हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात—

जया ज्ञानलागीं । गगन गिळिताती योगी ।
स्वर्गाची आडवंगी । उमरडोनि ॥१३.१६२॥

न करिती सिद्धीची चाड । न धरिती ऋद्धीची भीड ।
योगाऐसें दुवाड । हेळसिती ॥१६३॥

तपोदुर्गें वोलांडित । ऋतुकोटि वोवांडित ।
उलथूनि सांडित । कर्मवल्ली ॥१६४॥

नाना भजनमार्गीं । धावत उघडिया आंगीं ।
एक रिगताती सुरंगीं । सुषुम्नेचिये ॥१६५॥

ऐसी जिये ज्ञानीं । मुनीश्वरांची उतान्ही ।
वेदतरूच्या पानोवानीं । हिंडताती ॥१६६॥

देईल गुरुसेवा । इया बुद्धि पांडवा ।
जन्मशतांचा सांडोवा । टाकित जें ॥१६७॥

जया ज्ञानाची रिगवणी । अविद्ये उणें आणी ।
जीवा आत्मया बुझावणी । मांडूनि दे ॥१६८॥

जें इंद्रियांचीं द्वारें आडी । प्रवृत्तीचे पाय मोडी ।
जें दैन्यचि फेडी । मानसाचें ॥१६९॥

द्वैताचा दुकाळु पाहे । साम्याचें सुयाणें होये ।
जया ज्ञानाची सोये । ऐसें करी ॥१७०॥

मदाचा ठावोचि पुसी । जें महामोहातें ग्रासीं ।
नेदी आपपरु ऐसी । भाषा उरों ॥१७१॥

जें संसारातें उन्मूळी । संकल्पपंकु पाखाळी ।
अनावरातें वेंटाळी । ज्ञेयातें जें ॥१७२॥

जयाचेनि जालेपणें । पांगुळा होइजे प्राणें ।
जयाचेनि विंदाणें । जग हें चेष्टे ॥१७३॥

जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचें डोळे ।
जीवु दोंदावरी लोळे । आनंदाचिया ॥१६४॥

ऐसें जें ज्ञान । पवित्रैकनिधान ।
जेथ विटाळलें मन । चोख कीजे ॥१७५॥

येथे 'जे' व 'जयाचेनि' म्हणून ज्याचे वर्णन केले आहे ते काय आहे ? नुसते शाब्दिक ज्ञान ? खचित नाही. त्यानें प्राण पांगळा होईल काय ? त्याच्या विदाणाने, ओढीने किंवा स्फूर्तीने जगताची उभारणी-संहारणीरूप चेष्टा होईल काय ? आणि नुसत्या शब्दज्ञानाने द्वैताचा दुष्काळ होऊन साम्याच्या सुयाणाने बुद्धीचे डोळे उजाळून जीव आनंदाच्या दोंदावर लोळेल काय ? हे कधी स्वप्नात तरी शक्य आहे काय ? असे शब्दज्ञान सांगणारे जगाच्या बाजारात पैशाला पासरी भावाने विखुरलेले दिसतात. त्यांच्या ज्ञानाने विटलेले मन शुद्ध होते काय ? कल्पनेतसुद्धा होत नाही. मग हे ज्ञान काय आहे ? हे ज्ञान म्हणजे " ज्ञान जें निरवधी ॥१०.८३॥, भजती उजरी ॥९.३४५॥, कुलक्रमु शब्दब्रह्माचा ॥९.२७७॥, दिव्य ज्ञानाचिया डोळां ॥११.३०२॥" व " दिव्यचक्षूंचे गूढ ॥११.३०३॥" अशी शक्ती आहे. असे हे " जेणें सांगतयाचें बोलणें खुंटे । ऐकतयाचें व्यसन तुटे । हें जाणणें सानें मोठे । उरों नेदी । ॥७.८॥" अशा प्रकारचे शक्तीचे गूढ वर्म आहे. हे जाणणे म्हणजे ज्ञानेश्वरी ज्ञानेश्वरीच्या खऱ्या रूपाने जाणणे होय. पण ही फार वडील गोठी असल्याने विरळ माणसे हे जाणतात. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

पैं गा मनुष्यांचिया सहस्रशां-। माजीं विपाइले याचि धिवसा ।
तैसें या धिवसेकरां बहुवसां । माजीं विरळा जाणे ॥७.१०॥
म्हणौनि सामान्य गा नोहे । हें सांगतां वडिल गोठी आहे ॥१४॥

ज्ञान हे शक्तीच्या जागृतीतच समाविष्ट आहे हे खरोखरच फार थोडेजण जाणतात. त्यामुळे " भीतरीं ज्ञानें उजळला ॥१३.४६४॥, आणि ज्ञानदीपु अंतरीं । म्हणौनि शुद्ध ॥१३.४६७॥, म्हणौनि अंतरीं ज्ञान व्हावें ॥१३.४७३॥" व "ज्ञानें फिटला वंगु । अंतरींचा ॥१३.४७४॥" यातील मर्मही फारच विपाइले जाणतात हे खरे आहे. हे मर्म "प्रपंचसारतंत्रात" स्पष्ट करताना श्रीमदाद्यशंकराचार्य म्हणतात—

सूक्ष्मा सूक्ष्मामृता ज्ञानामृता चाप्यायिनी तथा ।
व्यापिनी व्योमरूपा चेत्यनन्ता नादसंभवा: ॥३.२६॥
मेधा प्रज्ञा प्रभा विद्या धीर्धृतिस्मृतिबुद्धय: ।
विद्येश्वरेति संप्रोक्ता भारत्या नव शक्तय: ॥७.९॥
प्रज्ञा मेधा श्रुतिरपि शक्ति: स्मृत्याह्वया च वागीशी ।
सुमति: स्वस्तिरिहाभिर्मातृभिराशेश्वरैः क्रमात्प्रजयेत् ॥८.६१॥

कुंडलिनी शक्ती सूक्ष्मातिसूक्ष्म अशी ज्ञानामृताचे पान करविणारी, व्यापक, व्योमस्वरूप, अनन्तचेतनयुक्त व नादापासून प्राप्त होणारी आहे. ही भारती शक्ती कुंडलिनी मेधा, प्रज्ञा, प्रभा, विद्या, धी, बुद्धी, धैर्य, स्मृती, विद्येश्वरी या नऊ नावांनी ओळखली जाते. या सर्वांना शक्तीच्या रूपातच जाणले पाहिजे; कारण साक्षात् श्रुतीसुद्धा शक्तिरूपानेच अवतरित झाली आहे व प्रज्ञा, मेधादिरूपाने शक्तीच ज्ञानरूपाने पाझरली आहे.अशा या शक्तीचे हे ज्ञानस्वरूप स्पष्ट करून तिची प्रार्थना करताना "देवीमाहात्म्यात" अर्थात् "श्रीदुर्गासप्तशतीत" असे म्हटले आहे की–

महाविद्या महामाया महामेधा महास्मृति: ॥१.७७॥
त्वं श्रीस्त्वमीश्वरी त्वं ह्रीस्त्वं बुद्धिबोधलक्षणा ॥१.७९॥
या देवी सर्वभूतेषु बुद्धिरूपेण संस्थिता ।
नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नम: ॥८.८॥
या देवी सर्वभूतेषु शक्तिरूपेण संस्थिता ।
नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नम: ॥८.१२॥

ईश्वराची शक्ती ही बुद्धिरूप किंवा ज्ञानरूप असून तीच श्री, ईश्वरी, ऱ्ही; महाविद्या, महामेधा व महास्मृती आहे. इतकेच नव्हे तर "हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आधवी । जडातेंही माजवी । इयेचा माजु ॥१३.९८८॥" असे म्हणन बहिर्मुखतेने असलेली ही कुंडलिनी शक्ती अज्ञानरूप असून ज्यावेळी ही शक्ती जागृत अवस्थेच्या नटनाचानें शुद्ध सात्त्विक स्वरूपात साधकाच्या ठिकाणी उदित होते तेव्हा साक्षात् ज्ञान हाती चढून साधक सहस्राराचे राजे होतात हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

हें असो या चिन्हांचा । नटनाचु ठायीं जयाच्या ।
जाण ज्ञान तयाच्या । हातां चढे ॥१३.२१६॥
तैसे सत्त्वाचेनि नटनाचें । असणें जाणें जयांचें ।
ते तनुत्यागीं स्वर्गीचे । राय होती ॥१४.२७१॥

महायोगी गोरक्षनाथांच्या "महार्थमंजरीत" नटनाच शक्तीच करते व ती ज्ञानस्वरूप आहे असे म्हटले आहे. ही ज्ञानशक्ती हाच अज्ञान खंडनाचा व संसारोन्मूळणाचा एकमात्र उपाय आहे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

एवं आदि ना अंतु स्थिती । ना रूप जयासि आथी ।
आतां कायसी कुंथाकुंथी । उन्मूळणी गा ॥१५.२४७॥
आपुलिया अज्ञानासाठीं । नव्हता थांवला किरीटी ।
तरी आतां आत्मज्ञानाच्या लोटीं । खांडेनि गा ॥२४८॥
वांचूनि ज्ञानेवीण एकें । उपाय करिसी जितुके ।
तिहीं गुंफसि अधिकें । रुखीं इये ॥२४९॥
मग किती खांदोखांदीं । यया हिंडावें ऊर्ध्वीं अधीं ।
म्हणौनि मूळचि अज्ञान छेदी । सम्यक्‌ज्ञानें ॥२५०॥
म्हणौनि स्वप्नींचिया घाया । ओखद चेवोचि धनंजया ।
तेवीं अज्ञानमूळा यया । ज्ञानचि खड्ग ॥२५४॥
तें आत्मज्ञानाचें खांडे । अद्वैत प्रभेचेनि वाडें ।
नेदील उरों कवणेकडे । भववृक्षासी ॥२६२॥

सम्यक् ज्ञान व त्याचा चेव म्हणजे शक्तिरूपाने जागृती हेच शस्त्र होय. बाकी सर्व व्यर्थ आहे; कारण श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

त्या मज पुरुषोत्तमा । ज्ञानें भेटे जो सुवर्मा ।
तो सर्वज्ञु तोचि सीमा । भक्तीचीही ॥१६.४८॥
भरूनि प्रपंचाचा घोटु । कीजे देखतांचि देखतया द्रष्टु ।
आनंदसाम्राज्यीं पाटु । बांधिजे जीवा ॥५०॥
येवढेया लोठपणाचा उपावो । आनु नाहींचि म्हणे देवो ।
हा सम्यक् ज्ञानाचा रावो । उपायांमाजीं ॥५१॥

ज्ञानशक्तीचे हे साधनरूप स्पष्ट करताना “The Primal Power in Man or Kundalini Shakti” या पुस्तकात स्वामी नारायणानंद हे या नावानेच लिहिलेल्या पाचव्या प्रकरणात असे म्हणतात की, “Kundalini Shakti is the subtlest of the subtle created things and It holds the creation of the Mystrey and the way to freedom (Moksha).It is both Avidya-Shakti ( ignorance )and Vidya-Shakti ( knowledge ). It is the Kundalini Shakti that liberates or binds beings. It is the source of all speech and mentains all beings by inspiration and expiration. It is the revealer and the substance of all the vedas ( scriptures ). Kundalini Shakti is the Brahman knowledge and the feeling consciousness in all beings. Though it lives in subtle form in all beings, yet, It does not reveal Itself easily till the Sadhaka ( spiritual aspirant ) adopts certain

processes to take the Kundalini Shakti for the Muladhara Chakra to the higher planes. Kundalini Shakti is also the Source and the mother of three forms of energy viz, sun, moon and fire, working in microcosm.

Shabdabrahman i. e. Kundalini Shakti is the kinetic ideating aspect of the undifferentiated supreme consciousness of Monism and the Suguna Brahman (God with form) of Dualism. It is the Chit-Shakti ( Power of Consciousness ) vehicled by undifferentiated Prakriti Shakti i. e. the creative aspect of that one Supreme Spirit or Brahman, who is both transcendent and formless (Nirguna) and immanent and with form (Saguna). Whatever is heard in the form of sound is Kundalini Shakti. Kundalini Shakti is also called Tripura as It lives in the three Nadis Ida, Pingala and Sushumna. It is the Kundalani Shakti that becomes the three Gunas (Sattva, Rajas and Tamas) to produce effects. Kundalini Shakti is the Ichha (will), Jnana ( knowledge ) and kriya (action), and is both forms consciousness ( Tejorupa ) and composed of three Gunas." (Page 81, 82)

कुंडलिनी शक्ती ही निर्मित वस्तूंमधील सूक्ष्मातील सूक्ष्म गोष्ट असून ती आपल्या ठिकाणी उभारणीचे रहस्य व संहारणीचा अर्थात् मोक्षाचा मार्ग धारण करते. तीच अविद्या व विद्या अशी उभयरूप शक्ती आहे. ही कुंडलिनी शक्तीच प्राणिमात्राला मुक्त करते किंवा बंधनात अडकविते. हीच सर्व वाणीचा उगम किंवा मूळ असून तीच सर्व भूतमात्रांना चेतना देऊन जगविते व चेतनहीन करून मारते. ही कुंडलिनी शक्तीच सर्व वेदांचे किंवा श्रुतीचे प्रकटीकरण करणारी असून तीच सर्व वेदाची सारवस्तू किंवा संपत्ती आहे. शक्ती म्हणजे ब्रह्मज्ञान व सर्वांतर्यामी असणारी चेतनेची जाणीव होय. जरी ही शक्ती सर्वांच्या ठिकाणी सूक्ष्मरूपाने वास करीत असली तरी जोपर्यंत मूलाधारचक्रापासून वरवरच्या चक्रांवर शक्ती नेण्याच्या मार्गाचा किंवा साधनेचा साधक अवलंब करीत नाही; तोपर्यंत ही शक्ती स्वतःला प्रकट करीत नाही. सूर्य, चंद्र व अग्नी ही शक्तीची जी तीन रूपे आहेत तिचा मूळस्रोत जननी कुंडलिनी शक्तीच असून ती सूक्ष्म-विश्वात व मानवीदेहात कार्यरत असते.

शब्दब्रह्म अर्थात् कुंडलिनी शक्ती ही अविभक्त अशा सर्वश्रेष्ठ चेतनरूप अद्वैततत्त्वाची व द्वैतरूपात्मक सगुणब्रह्माची गतिचलित आदर्शयुक्त मूर्ती आहे. अविभक्त अशा प्रकृतिशक्तीकडून चित्शक्ती प्रेरित होत असल्यामुळे म्हणजे सर्वश्रेष्ठ शक्तीची किंवा ब्रह्मस्वरूपाची सृजनशील बाजू स्पष्ट होत असल्यामुळे ती सर्वश्रेष्ठ, निर्गुण किंवा आकाररहित, सर्वव्यापी व आकारयुक्त असल्याचे स्पष्ट होते. जे ध्वनिरूपाने ऐकू येते ते म्हणजे कुंडलिनी शक्तीच होय. ही कुंडलिनी शक्ती इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन नाड्यांमध्ये राहत असल्यामुळे तिला त्रिपुरा असे म्हणतात. ही शक्तीच सत्त्व, रज व तम या त्रिगुणांनी आविर्भूत होऊन त्यांचे परिणाम उत्पन्न करते. ही कुंडलिनी शक्तीच इच्छा, ज्ञान व क्रियारूप असून ती चैतन्य किंवा तेजोरूप व त्रिगुणात्मक अशी दोन रूपांची आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कुंडलिनी शक्तीचे हे त्रिरूपत्व वर्णन करताना असे म्हटले आहे की–

**कळा एथूनि जालिया। विद्या इयेच्या केलिया।**
**इच्छा ज्ञान क्रिया। वियाली हे ॥१३.९९४॥**
**जें ज्ञान ज्ञाता ज्ञेय। हें जगाचें बीज त्रय।**
**तें कर्माची नि:संदेह। प्रवृत्ति जाण ॥१८.४६१॥**

सारांश, "षट्चक्रनिरूपणामध्ये" म्हटल्याप्रमाणे कुंडलिनी शक्ती ही "प्रकाशं वहंति सदा शुद्धबुद्धेः।" अशी आहे. ती प्रकाशाची वाहक असून शुद्धबुद्धयात्मक दिव्यज्ञानाची दात्री आहे. याच दृष्टीने महायोगी गोरक्षनाथांनी "कामकलाविकास" या ग्रंथात ज्ञानशक्ती कुंडलिनीचे वर्णन करताना असे म्हटले आहे की–

**इति कामकला विद्या देवीचक्रक्रमात्मिका सेयम्।**
**विदिता येन स मुक्तो भवति महात्रिपुरसुंदरीरूपः ॥८॥**

जो अशा प्रकारे कामकला विद्यादेवी कुंडलिनी शक्तीचे चक्रमय असे क्रमात्मकरूप जाणतो तो मुक्त होऊन साक्षात् महात्रिपुरसुंदरी कुंडलिनीरूप होतो. यावर भाष्य करताना श्रीनटनानंद म्हणतात, "इति पूर्वोक्तमहाप्रबंधेन व्याख्याता। कामकला महात्रिपुरसुंदरी। तस्याः विद्या ज्ञानम्। सा कीदृशीत्याकांक्षायामाह – देवीचक्रक्रमात्मिकेति। देव्याः त्रिपुरसुंदर्याः चक्रं श्रीचक्रम्; तस्य क्रमः चक्रमंत्रदेवतात्मना सर्वानंदमयादिसमस्तप्रकटपर्यंतरूपः, तदात्मिका तद्विषयिणी। येन-शक्तिपाञातसमुन्मिषद्ब्रह्मजिज्ञासुना भाग्यवता विद्यावता पुरुषेण। विदिता-गुरूपसदनादिना अवगता। सः–पुरुषो मुक्तो भवति।"

सर जॉन वुड्रॉफ यांनी या टीकेचा अर्थ पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे. ते म्हणतात, "आता 'इति' म्हणजे पूर्वीच्या परिच्छेदांमधून ज्यासंबंधी चर्चा केली ते. विद्येची कामकला म्हणजे महात्रिपुरसुंदरी होय. तिची विद्या म्हणजे ज्ञान होय

किंवा तिच्या संबंधीचे ज्ञान होय. हे ज्ञान कोणत्या प्रकारचे आहे? कुंडलिनी शक्तीच्या श्रीचक्राचा किंवा षट्चक्रांचा क्रम व त्यांच्या मांडणीची व्यवस्था किंवा परंपरा काय आहे हे जाणणे म्हणजे ज्ञान होय. देवी त्रिपुरसुंदरीच्या अर्थात् कुंडलिनीच्या चक्रालाच श्रीचक्र म्हणतात. त्याचा क्रम म्हणजे षट्चक्रे, त्यांचे मंत्र व देवता कोठे व कशा स्थित असतात व सर्वानंदमय परब्रह्मापासून शेवटच्या तत्त्वापर्यंत त्यांचा आविष्कार कसा होतो हे पाहणे होय. येन म्हणजे ज्या साधकावर शक्तिपात झाला असून ज्याच्या ठिकाणी ब्रह्मजिज्ञासा उपस्थित झाली आहे असा साधन करणारा भाग्यवान व विद्याप्राप्त पुरुष होय. विदिता म्हणजे गुरूच्या पायापाशी बसून या विद्येवर मिळविलेले प्रभुत्व होय. सः म्हणजे असा साधकयोगी आनंदाने विहार करतो आणि तरीही आपल्या भावनेने त्याने सर्व जग जिंकलेले असल्यामुळे तो सर्व वासनांपासून मुक्त असतो. मी सर्वत्र भरलेला व परिपूर्ण आहे असेच तो समजतो."

यामुळेच "प्रत्यभिज्ञाहृदय" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "जो साधक आपल्या परिपूर्ण शक्तिनिशी ईश्वराच्या ऐश्वर्याशी समव्याप्त होऊन विद्येमुळे जागृत झालेला असतो तो चिद्घनस्वरूप होऊन खरोखर मुक्त होतो."

अशा प्रकारे महायोगी गोरक्षनाथांच्या दृष्टीने सद्गुरूच्या कृपेने म्हणजे शक्तिपाताने पूर्णपणे जागृत होणारी शक्ती हीच ज्ञानाचे निखळ रूप आहे. हे परंपराप्राप्त ज्ञान शक्तीच्या रूपाने साधकाच्या ठिकाणी तिचेच रूप घेऊन कसे प्रकटीभूत होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

म्हणौनि असो हें इयापरी। तो देखे ज्ञानाची वाखारी।
तेणें संसरलेनि करी। आपु विश्व ॥७.१३५॥
जो हा विज्ञानात्मकु भावो। तया विवरितां जाहला वावो।
मग लागला जंव पाहों। तंव ज्ञान तें तोचि ॥६.८८॥
तें चालतें ज्ञानाचें बिंब। तयाचें अवयव ते सुखाचे कोंभ।
येर माणुसपण तें भांब। लौकिक भागु ॥१०.७७॥
तो जाण वेल्हाळ। ज्ञानाचें वेळाउळ।
हें असो निखिळ। ज्ञानचि तो ॥१३.३१२॥
जो अनन्यु यापरी। मी जाहलाही मातें वरी।
तोचि तो मूर्तधारी। ज्ञान पैं गा ॥१३.६११॥
एवं जीवधर्महीनु। जो जीवेंसीं अभिन्नु।
देख तो सुनयनु। ज्ञानियांमांजीं ॥१३.१०६७॥
ज्ञानाचा डोळा डोळसां-। माजीं डोळसु तो वीरेशा।
हे स्तुति नोहे बहुवसा। भाग्याचा तो ॥१०६८॥

**तैसा ज्ञानाचिया विठी । जो मातें सेवी किरीटी ।**
**तो होय ब्रह्मतेच्या मुकुटीं । चूडारत्न ॥१४.४००॥**

असे हे ज्ञानेश्वरीचे म्हणजे चित्शक्ती कुंडलिनीचे ज्ञानेश्वरीतील स्वरूप असल्यामुळे 'एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥१८.१२४३॥" असे सांगून अविद्यानाश व मोक्षप्राप्ती यासाठी ज्ञान म्हणजे कुंडलिनी शक्ती हेच एकमात्र साधन आहे असा महासिद्धांत श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी प्रस्थापित केला आहे.

## वस्तुसामर्थ्यशक्ती :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कुंडलिनी शक्तीचा " जरी प्रकटे सिद्धसरस्वती । तरी मुकयाहि आथी भारती । एथ वस्तुसामर्थ्यशक्ति । नवल कायी ॥ १.७८॥ " असे म्हणून जो गौरव केला आहे त्यातच ज्ञानेश्वरीच्या संपूर्ण उभारणीचे सार सामाविलेले असून " जो प्रियुचि प्राणेश्वरी ॥ १.२ ॥ " या त्यांच्या " अमृता-नुभवातील " कथनात गुरुसंप्रदायप्राप्त समाधिधनाचे रहस्य भरलेले आहे. वस्तू म्हणजे परब्रह्म होय. त्याची सामर्थ्यशक्ती म्हणजे अनादि आत्मसत्तारूप चित्शक्ती कुंडलिनी होय. ही शक्ती वस्तूशी समव्याप्त, एकरूप व एकरस असून अखंडअद्वैत-चिद्घनपूर्णरीतीने समरसलेली आहे, असा त्यांचा अत्यंत आवडता असा त्रिकाला-बाधित सिद्धांत आहे. ज्ञानेश्वरीतील जवळजवळ सर्व उपमा-दृष्टांतादि पाहिले तर ते परब्रह्मवस्तू व सामर्थ्यशक्ती कुंडलिनी यांच्या अफुट अद्वैताचेच द्योतक आहेत, हे स्पष्टपणे प्रतीत होते. त्यामुळे कित्येकवेळा विषयानुरोधाने स्पष्ट होणारा भावार्थ हा वस्तुप्रतिपादक आहे की सामर्थ्यशक्तिप्रतिपादक आहे असा वाचणाराला संभ्रम होतो. याचे कारण या दोन वस्तूतील अभेद्यपणा हेच आहे. त्यामुळे वस्तूचे वर्णन हे शक्तीचे व शक्तीचे वर्णन हे वस्तूचे आहे असे वाटू लागते. " जैसा घंटानाद लयस्तु । घंटेसीच होय ॥ ८.९७ ॥ " ही जशी घंटेची व नादाची अवच्छेद्य अवस्था असते किंवा "कां नापादितां गती । चरणीं जैसी आथी । नातरी ते दीप्ती । दीपबिंबीं ॥ १८.११६ ॥ " याप्रमाणे पायाची शक्ती पायात व दिव्याचा प्रकाश दिव्याच्या ज्योतीतच समाविष्ट असतो त्याप्रमाणें वस्तूचीं शक्ती वस्तूशी अवच्छेद्यच असते. त्यामुळे ती वस्तूचे रूप घेऊनच उभी राहते. या न्यायानेच ज्ञानेश्वरी ही परब्रह्मवस्तूच्या व त्याच्याशी समव्याप्त असलेल्या चित्शक्ती कुंडलिनीच्या रूपाने आद्योपांत नटलेली आढळते. हेच ज्ञानेश्वरीतील वस्तुसामर्थ्यशक्तीचे म्हणजे कुंडलिनी शक्तीचे स्वरूप आहे. त्यामुळे गीतेच्या शेवटच्या श्लोकाचा भावार्थ सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे शक्तीचे अवच्छेद्यरूप प्रकट करताना असे म्हटले आहे की–

चंद्रु तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।
संत तेथें विवेका । असणे कीं जी ॥१८.१६३३॥
रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोयरीक ।
वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥१६३४॥
दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु ।
सुखीं पुरुषोत्तमु । असे जैसा ॥१६३५॥
वसंतु तेथें वनें । वन तेथें सुमनें ।
सुमनीं पालिंगनें । सारंगांचीं ॥१६३६॥
गुरु तेथे ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन ।
दर्शनीं समाधान । आथी जैसें ॥१६३७॥
भाग्य तेथ विलासु । सुख तेथ उल्लासु ।
हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ॥१६३८॥
तैसें सकल पुरुषार्थ । जेणें स्वामी का सनाथ ।
तो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥१६३९॥

अशा प्रकारे वस्तू व वस्तूची सामर्थ्यशक्ती एकरूप असते याचा अर्थ वस्तू म्हणजे परब्रह्म हे तिच्या सामर्थ्यशक्ती कुंडलिनीशिवाय असूच शकत नाही. चंद्रिका, अंबिका, विवेक, कटक, सोयरीक, दाहकत्व यांच्या सामर्थ्यसंपन्नतेमुळेच चंद्र, शंभु, संत, राव, सौजन्य, अग्नी यांचे महत्त्व प्रतीतीस येते व हे आहेत म्हणून त्यांचे सामर्थ्य प्रकट होते. वस्तूचे हे सामर्थ्य हीच शक्ती होय. वस्तू म्हणजे सामर्थ्य व सामर्थ्य म्हणजे शक्ती होय. यामुळेच चित्शक्तिसामर्थ्याने संपन्न असलेल्या स्वस्वरूपवस्तूच्या ज्ञानप्राप्तीसाठीच "अमृतानुभवाच्या" सुरुवातीला श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी नमन करताना असे म्हटले आहे की—

अद्वैतमात्मनस्तत्त्वं दर्शयन्तौ मिथस्तराम् ।
तौ वंदे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये ॥४॥

शिवशक्ती हे दोनपणाने आपले अत्यंत अद्वैतस्वरूप परस्पर दाखवीत असतात. अशा त्या जगताच्या देवदेवीला त्यांच्या तात्त्विक स्वरूपाचे ज्ञान होण्यासाठी म्हणजे ब्रह्मस्वरूपाची प्राप्ती होण्याकरिता मी वंदन करतो.

वस्तू व वस्तूची शक्ती ही दोन नावे असली तरी वस्तू आपल्या शक्तीशी अवेच्छेद्यात्मक अवस्थेमुळे व तिच्याशी समव्याप्त असल्यामुळे एकच असते, म्हणून वस्तू व वस्तूची शक्ती यांचे नेहमीच अद्वैत असते. वस्तूची शक्ती स्फुरण पावत नाही तोपर्यंत वस्तू व शक्ती अत्यंत एकरूप असतात यात शंकाच नाही. पण शक्तीचे स्फुरण झाले असताही, ते शक्तीचे स्फुरण वस्तूवरच होत असून, त्या स्फुरणात मूळ वस्तूच स्फुरत असल्यामुळे, वरकरणी वस्तू व शक्ती असा दोनपणा दिसत

असला तरी, वस्तू व शक्ती या दोन निराळ्या वस्तू होऊन, त्या परस्परांहून भिन्न होत नाहीत. वस्तू व वस्तूची शक्ती यांचे जे दोनपण अव्यक्त असते ते, शक्तिस्फुरण झाले असता व्यक्त होते. व्यक्तदशेत दोघांना दोन नावे येतात; पण वस्तू एकच राहते. स्फुरणापूर्वी जी वस्तू होती तीच स्फुरणदशेतही एकच राहते. म्हणून वस्तू व वस्तूची शक्ती यांचे द्वैत कधीही उत्पन्न होत नाही. अशा रीतीने वस्तू व शक्ती ही परस्परात मिळून राहून आपले अद्वैतत्त्व सारखे दाखवीत असतात. शिवशक्तीही याच नियमानुसार एकरूपच असतात व एकरूपानेच स्फुरतात. या त्यांच्या दोनपणाच्या स्फुरणात जगाचा प्रत्यय येतो व स्फुरणाच्या लोपात जगाचा लय होतो. हाच सिद्धांत स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज "अमृतानुभवात" म्हणतात–

स्त्रीपुरुष नामभेदें। शिवपण एकले नांदे।
जग सगळें अधार्धे–। पणे जिहीं ॥१.१७॥
दो दांडी एक श्रुती। दो फुलीं एक वृती।
दो दिवीं दीप्ती। एकचि जेंवि ॥१८॥
दो ओठीं एक गोठी। दो डोळां एकचि दिठी।
तेंवि दोघी जिहीं सृष्टी। एकचि जेवीं ॥१९॥
दाऊनि दोनीपण। एकरसाचें आरोगण।
करीत आहे मेहुण। अनादि जे ॥२०॥
जे स्वामिचिया सत्ता–। विण असो नेणे पतिव्रता।
जियेविण सर्वकर्ता। कांहीं ना जो ॥२१॥
जें कीं भाताराचें दिसणें। भातार जियेचे असणें।
नेणिजती दोघेजणें। निवडू जिये ॥२२॥
गोडी आणि गुळु। कापुर आणि परिमळु।
निवडु जाता पांगळु। निवाडु होय ॥२३॥
समग्र दीप्ती घेतां। जेंवि दीपुचि ये हाता।
तेंवि जियेचिया तत्त्वतां। शिवुचि लाभे ॥२४॥

असे हे वस्तुसामर्थ्यशक्तीचे म्हणजे कुंडलिनी शक्तीचे स्वरूप असल्यामुळे "एथ समर्थु एक आथी। तयापासूनि भूतें होती। तरी हें वायांचि काय बोलती। जगामाजीं ? ॥२.९६॥" असा प्रश्न श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी भगवंताच्या मुखातून अर्जुनाला ऐकविला आहे. हा प्रश्न ऐकवून "हे उपजे आणि नाशे। तें मायावशें दिसे। एऱ्हवीं तत्त्वता वस्तु जें असे। तें अविनाशचि ॥२.१०५॥ जैसें पवनें तोय हालविलें। आणि तरंगाकार जाहलें। तरी कवण कें जन्मलें। म्हणों ये तेथ ? ॥१०६॥ तेंचि वायूचें स्फुरण ठेलें। आणि उदक सहज संपाट जाहलें। तरी आतां

काय निमालें । विचारीं पां ॥१०७॥" असे म्हणून लगेच पुढे ईश्वराच्या शक्तीची त्याच्याशी असणारी ऐक्यता स्पष्ट केली आहे. तरंगाची भासात्मकता एवढेच द्वैत. तेवढा भास जाण्यासाठीच सर्व खटाटोप. बाकी काही झाले नाही व होतही नाही. नुसते वाटते एवढेच. म्हणूनच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

माझें अव्ययत्व तरी न नसे । परी होणें जाणें एक दिसे ।
तें प्रतिबिंबें मायावशें । माझ्याचि ठायीं ॥४.४५॥
माझी स्वतंत्रता तरी न मोडे । परी कर्माधीनु ऐसा आवडे ।
तेही भ्रांतिबुद्धि तरी घडे । एऱ्हवीं नाहीं ॥४६॥
कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें ।
एऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे ? ॥४७॥
तैसा अमूर्तंचि मी किरीटी । परी प्रकृति जैं अधिष्ठीं ।
तैं साकारपणें नट नटीं । कार्यालागीं ॥४८॥

माया व प्रकृतिस्वरूप कुंडलिनी शक्तीचेच हे कार्य आहे व ही शक्ती स्पंदित झाल्यामुळेच ईश्वर हे कार्य करू शकतो असा सिद्धांत मांडताना श्रीमदाद्य-शंकराचार्य " सौंदर्यलहरीच्या" सुरुवातीलाच असे म्हणतात की–

शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुं ।
न चेदेवं देवो न खलु कुशलः स्पंदितुमपि ॥१॥

जर शिव शक्तीने युक्त असेल तरच तो सृष्टी निर्माण करण्यास समर्थ किंवा शक्तिमान होतो. जर शिव शक्तीने युक्त नसता तर तो स्पंदित होण्यास कधीच समर्थ ठरला नसता. इतका अवच्छेद्य संबंध असल्यामुळेच पुढे ते म्हणतात–

अतः शेषः शेषीत्ययमुभयसाधारणतया ।
स्थितः संबंधो वां समरस परानंदपरयोः ॥३४॥

हे आई जगज्जननी कुंडलिनी शक्ती ! तुझ्याशी समरस झालेले परानंद म्हणजे भगवान् शंकर आणि त्यांच्याशी समरस झालेली परा म्हणजे परात्पर शक्ति-स्वरूप तू आहेस. तुम्हा दोघांमध्ये परस्परांशी परस्परांचे एवढे तादात्म्य आहे की, त्यामुळे तुमचा तो तादात्म्यसंबंध तुम्हा दोघांमध्येही सारखाच दिसतो. तुमच्या तादात्म्यात अणुमात्रही भेद दिसत नसल्यामुळे तुम्हा दोघांमध्ये कोण मुख्य-शेष व कोण गौण-शेषी किंवा कोण प्रधान व कोण कोणाचे अंग हे कळतच नाही. जीवाला हे कळावे म्हणूनच सर्व प्रयत्न आहेत. ज्याने अहंकार टाकून म्हणजे शक्तीची बहिरो-न्मुखवृत्ती सद्गुरुकृपेने जागृत शक्तीच्या आधाराने गिळून टाकून अंतरोन्मुख-वृत्तीने वस्तूशी एकरूपता प्राप्त केली तोच कृतकृत्य होतो. हेच श्रीज्ञानेश्वरमहा-राजांनी "हा विचारूनि अहंकारु सांडिजे । मग असतीचि वस्तु होईजे । तरी आपली स्वस्ति सहजें । आपण केली ॥६.७१॥" असे म्हणून स्पष्ट केले आहे. ही वस्तूच

कुंडलिनी शक्ती आहे किंवा ही चित्‌शक्ती ऐक्याचीच ओतलेली, अविनाशी पणाच्या हृदयात घातलेली व अखंड शुद्ध अशी शिवसमरसतेने भरलेली आहे; कारण ही साक्षात् प्रतीती आहे. हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-

ते एक्याची आहे वोतिली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली ।
जैसी समरससमुद्रीं घुतली । रुळेचिना ॥८.६४॥
पैं अथावीं घट बुडाला । तो आंतबाहेरी उदकें भरला ।
पाठीं दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे ? ॥६५॥
नातरी सर्पें कवच सांडिलें । का उबारेनें वस्त्र फेडिलें ।
तरी सांग पां काय मोडलें । अवेवामाजीं ? ॥६६॥
आकारु हा आहाच भ्रंशे । वांचूनी वस्तु ते सांचलीचि असे ॥६७॥

यामुळेच "शिवशक्तिरिती ह्येकं तत्त्वमाहुर्मनिषिण:॥" असा शिवशक्ती एक असल्याचा सिद्धांत शास्त्रकारांनी मांडला आहे व "श्रीदुर्गासप्तशतीमध्ये" शुंभ दैत्याला देवीने उत्तर दिले आहे की—

एकैवाहं जगत्यत्र द्वितीया का ममापरा ।
पश्यैता दुष्ट मय्येव विशंत्यो मद्विभूतय: ॥१०.५॥

हे दुष्टा ! या जगामध्ये मी एकमेव व अद्वितीय आहे. या जगात माझ्या शिवाय दुसरे काय आहे ? जे काही तुला निराळे भासते आहे त्या सर्व शक्तिरूपाने भासणाऱ्या माझ्या विभूती आहेत. त्या सर्व माझ्यातच विलीन होतात. हे विलीनीकरण जागृत शक्तीमुळे कसे होते व मूळ वस्तूच शक्तीसहित कशी उरते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तेथ समविषम न दिसे कांहीं । म्हणौनि भूतें हे भाष नाहीं ।
जेंवि दूधचि जाहलिया दहीं । नामरूप जाय ॥८.१७०॥
तेंवि आकारलोपासरिसें । जगाचें जगपण भ्रंशे ।
परि जेथें जाहालें तें जैसें । तैसेंचि असे ॥१७१॥
तें तया नांव सहज अव्यक्त । आणि आकारावेळीं तेंचि व्यक्त ।
हें एकास्तव एक सूचित । एऱ्हवीं दोनी नाहीं ॥१७२॥
जैसें आटलिया रुपें । आटलेपण ते खोटी म्हणिपे ।
पुढती तो घनाकारु हारपे । जे वेळीं अलंकार होती ॥१७३॥
हीं दोहीं जैशीं होणीं । एकीं साक्षिभूत सुवर्णीं ।
तैसी व्यक्ताव्यक्ताची कडसणी । वस्तूच्या ठायीं ॥१७४॥
तें तरीं व्यक्त ना अव्यक्त । नित्य ना नाशवंत ।
या दोहीं भावाअतीत । अनादिसिद्ध ॥१७५॥
जें हें विश्वचि होऊनि असे । परि विश्वपण नासिलेनि न नासे ।
अक्षरें पुसिल्या न पुसे । अर्थु जैसा ॥१७६॥

पाहे पां तरंग तरी होत जात । परि तेथ उदक तें अखंड असत ।
तेवीं भूताभावीं न नाशत । अविनाश जें ॥१७७॥

नातरी आटतिये अळंकारीं । नाटतें कनक असे जयापरी ।
तेवीं मरतिये जीवाकारीं । अमर जें आहे ॥१७८॥

सापेक्षतेने अव्यक्त असलेल्या दूध, सोने, पाणी, अर्थ इत्यादि मूळ वस्तू परब्रह्म किंवा शिवरूप असून त्यामुळे व्यक्त झालेल्या दही, अलंकार, तरंग व अक्षर ह्या अवच्छेद्य व समव्याप्त असलेल्या गोष्टी शक्तिस्वरूप आहेत. इतके सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वस्तुसामर्थ्यशक्ती म्हणजे शिवयुक्त चित्शक्ती कुंडलिनी ही भावाभावातीत अनादिसिद्ध अशी द्वैताद्वैताविवर्जित म्हणजे व्यक्त वा अव्यक्त किंवा नित्य वा अनित्य यांच्या पलीकडील अपूर्व गोष्ट आहे असा सिद्धांत मांडला आहे. " श्रीदेवीभागवतपुराणातही " ही गोष्ट अशीच स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

अहमेवास पूर्वं मे नान्यत्किंचिन्नगाधिप ।
तदात्मरूपं चित्संवित्परब्रह्मैकनामकम् ॥७.३२.२॥
अप्रतर्क्यमनिर्देश्यमनौपम्यमनामयम् ।
तस्य काचित्स्वतःसिद्धा शक्तिर्मायेति विश्रुता ॥३॥
न सती सा नासती सा नोभयात्मा विरोधतः ।
एतद्विलक्षणा काचिद्वस्तुभूताऽस्ति सर्वदा ॥४॥
पावकस्योष्णतेवेयमुष्णांशोरिव दीधितिः ।
चंद्रस्य चंद्रिकेवेयं ममेयं सहजा ध्रुवा ॥५॥
केचित्तां तप इत्याहुस्तमः केचिज्जडं परे ।
ज्ञानं माया प्रधानं च प्रकृतिं शक्तिमप्यजाम् ॥९॥
विमर्श इति तां प्राहुः शैवशास्त्रविशारदाः ।
अविद्यातिमिरे प्राहुर्वेदतत्त्वार्थचिंतकाः ॥१०॥
एवं नानाविधानि स्युर्नामानि निगमादिषु ॥११॥

मन्मायाशक्तिसंक्लृप्तं जगत्सर्वं चराचरम् ।
साऽपि मत्तः पृथङ्माया नास्त्येव परमार्थतः ॥७.३३.१॥

सा च ब्रह्मस्वरूपा च नित्या सा च सनातनी ।
यथाऽऽत्मा च तथा शक्तिर्यथाऽग्नौ दाहिका स्थिता ॥९.१.१०॥

सर्वशक्तिस्वरूपा च शक्तिरीशस्य संततम् ।
सिद्धेश्वरी सिद्धरूपा सिद्धिदा सिद्धिरीश्वरी ॥९.१.१८॥

देवी पर्वतश्रेष्ठाला म्हणाली, "हे पर्वतश्रेष्ठा ! सृष्टीच्या पूर्वी त्रिभेदशून्य अशी मीच होते. दुसरे ( साकार किंवा निराकार ) असे काही नव्हते. त्या माझ्या

रूपालाच आत्मरूप, चित्, संवित् किंवा परब्रह्म अशी नावे आहेत. त्या रूपाविषयी काहीही तर्क करता येत नाही व त्याचा कसलाच व कसाही निर्देश करता येत नाही. त्याच्याशिवाय दुसरा पदार्थच नसल्यामुळे त्याला कशाचीही उपमा देता येत नाही व जनन, अस्तित्व इत्यादि सहा भावविकारांनी ते रहित असे आहे. त्याची स्वतःसिद्ध ( अनादि ) व अनिर्वचनीय अशी शक्ती माया या नावाने प्रसिद्ध आहे. ती सत् ( कालत्रयी बाध न पावणारी ) नाही व असत् ( वंध्यापुत्र, शशाशृंग, खपुष्प यांप्रमाणे ) नाही. ती सद्रूपही नाही; कारण एकच पदार्थ उभय स्वरूपाचा असणे अनुभवविरुद्ध आहे. सारांश, माया ही सर्वदा सत्, असत् व सदसत् यांहून अगदी निराळचा लक्षणाची, अनवर्चनीय व भावरूप अशी आहे. अग्नीच्या उष्णतेप्रमाणे, सूर्याच्या किरणांप्रमाणे व चंद्राच्या चांदण्याप्रमाणे ही माझी शक्ती सहज ( अकृत्रिम ) व नित्य ( मोक्षापर्यंत सतत राहणारी ) आहे. काही वैदिक शक्तीला तप म्हणतात. तर कोणी तम व अन्य जड असे म्हणतात. ज्ञान, माया, प्रधान, शक्ती व अजा अशीही तिला नावे आहेत. शैव शास्त्रात निपुण असणारे शास्त्रज्ञ तिला विमर्श म्हणतात व इतर वेदांच्या तत्त्वार्थाचे चिंतन करणारे तिला अविद्या असेही नाव देतात. सारांश, ह्याप्रमाणे वेदादिकांमध्ये तिची नाना प्रकारची नावे प्रसिद्ध आहेत. ज्या माझ्या मायारूपी शक्तीने हे सर्व जग कल्पिले आहे ती मायासुद्धा वस्तुतः माझ्याहून भिन्न नाही. ती शक्ती ब्रह्मस्वरूपच आहे. अग्नीमध्ये जशी दाहक शक्ती स्थित असते तशी ही माया ब्रह्मरूपामध्ये स्थित आहे. ( अग्नीपासून दाहक शक्ती जशी अगदी पृथक् करून दाखविता येत नाही त्याप्रमाणे हिला ब्रह्माहून निराळी करता येत नाही.) ती ब्रह्मरूप असल्यामुळे मोक्षापर्यंत राहणारी व अनादि आहे. (अर्थात् ही मायाशक्ती परमार्थतः अनादिसांत आहे. ) सर्व शक्ती हेच तिचे स्वरूप असून ती स्वतः ईश्वराची नित्य शक्ती आहे. सारांश, अशी ही कुंडलिनी शक्ती सिद्धांची ईश्वरी म्हणजे उपास्य दैवत असून ती स्वतः सिद्धिरूप, सिद्धी देणारी व मूर्तिमंत सिद्धीच आहे.

अशा प्रकारे जो ह्या जागृत कुंडलिनी शक्तीची कास पकडतो व वस्तुसामर्थ्य-शक्तीशी एकरूप होऊन या बोधाच्या सुखाने योगयुक्त होतो तो विश्वरूप दर्शना-सारखे भयंकर अनुभूतिरूपी अंतर व संसारप्रपंचरूपी बाह्यभोग सहजासहजी पेलून निजरूपाप्रत येतो. अशा साधकाला " मग मार्गातें कासया शोधावें ? कोणें कोठून कें जावें ?॥८.२५२॥" असे "मार्गामार्गाचे सांकडें ॥८.२५५॥" पडत नाही. कुंडलिनीरूपी वस्तुसामर्थ्यशक्ती हीच साधकाची देवता, हिचे ऊर्ध्वचालन हेच साधन व शिवाशी ऐक्य होणे हेच ध्येय. साधकाची स्वतःची अशी काय मजाल आहे की तो बाह्य भोग पेलून शिवरूप होईल ? तो अशी लीला तरेल काय ? " श्रीदुर्गासप्तशतीमध्ये" देवीने स्वतःच सांगितले आहे की—

ज्ञानिनामपि चेतांसि देवी भगवती हि सा ।
बलादाकृष्य मोहाय महामाया प्रयच्छिति ।।१.५५।।
महामाया हरश्चैषा तया संमोह्यते जगत् ।।१.५४।।

ज्ञानी मानवांची अंतःकरणेसुद्धा बलात्कारने आकृष्ट करून ती भगवती महामाया चित्शक्ती मोहाधीन करते; कारण ही महामाया चित्शक्ती कुंडलिनी जगदीश्वर विष्णूची योगनिद्रा या नावाची शक्ती आहे. तिने हे सर्व विश्व मोहित किंवा मोहव्याप्त झाले आहे. अशी वास्तविक स्थिती असल्याने जो या सामर्थ्य शक्तीच्या मार्गाने जातो तोच व एकमात्र तोच वस्तुरूप कसा होतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी आतां देह असो अथवा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों ।
कां जे दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनी ।।८.२४८।।
मज तरंगपण असे कीं नसे । ऐसें हें उदकासी कहीं प्रतिभासे ? ।
तें मलतेव्हां जैसे तैसें । उदकचि कीं ।।२४९।।
तरंगाकारें न जन्मेचि । ना तरंगलोपें न निमेचि ।
तेंवि देहीं जें देहेंचि । वस्तु जाहले ।।२५०।।
आतां शरीराचें तयाचिया ठाईं । आडनांवही उरलें नाहीं ।
तरी कोणें काळें काई । निमे तें पाहें पां ।।२५१।।
मग मार्गातें कासया शोधावें ? । कोणें कोठूनि कें जावें ? ।
जरी देशकालादि आघवें । आपणचि असे ।।२५२।।
आणि हां गा घटु जे वेळीं फुटे । ते वेळीं तेथिंचें आकाश लागे नीट वाटे ।
वाटा लागे तरी गगना भेटे । एऱ्हवीं चुके ? ।।२५३।।
पाहें पां ऐसें हन आहे । कीं तो आकारुचि जाये ।
येर गगन तें गगनीचि आहे । घटत्वाही आधीं ।।२५४।।
ऐसिया बोधाचेनि सुरवाडें । मार्गामार्गाचि सांकडें ।
तया सोऽहंसिद्धां न पडे । योगियांसी ।।२५५।।
येणें बोधें जो योगी होये । तयासीचि या बोधाचें नीटपण आहे ।
कां जे भोगातें पेलूनि पायें । निजरूपा ये ।।२५९।।

वस्तुसामर्थ्यशक्ती कुंडलिनीच्या बोधाने म्हणजे जागृतीने जो योगी होतो त्यालाच हे सर्व बोधाचे नीटपण उलडगते. इतरांना नाही. अशा बोधालाच श्रीज्ञानेश्वरमहाराज गुरुवी भक्ती व गहन भजन म्हणत आहेत, हे कल्पांतीही विसरून चालणार नाही. ही वस्तुसामर्थ्यशक्तीच भगवंताने अर्जुनाला दिली होती. त्यामुळेच " ते वस्तु मज स्वामी । ऐकीहेळां दिधली तुम्हीं ! ।।११.४८।।" असे तो भगवंताला म्हणाला व ज्यावेळी या वस्तूच्या सामर्थ्यशक्तिप्राप्तीमुळे विपरीत अनुग्रहसंपन्न झाल्याने भिऊन भगवंताला मानुषरूपात पुन्हा पाहण्याची प्रार्थना करू-

लागला, त्यावेळी "कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोषु न घेसी। मा भेणें काय नेणों बोलसी । हेकाडु ऐसा ॥११.६१०॥" असे म्हणून भगवंतांनी चित्‌शक्ती कुंडलिनीचा लाभ न घेणाऱ्या अर्जुनाचा हेकाड, धसाळ व गांवढळ म्हणून तिरस्कार केला; कारण "आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीयेसी जें कानडें । कायिसयाही सांगडें । नव्हेचि जें वस्तु ॥१२.३१॥" अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे भगवंतांच्या लेखी "मजमाजीं सूनि चित्त ॥१२.३८॥" असे करून जे चित्ताच्या म्हणजे वस्तुसामर्थ्यशक्तीच्याद्वारा "जे रात्रिदिवस न म्हणत। उपासिती ॥१२.३८॥" हेच अंतिम सत्य असल्याने "इयापरी जे भक्त । आपणपें मज देत । तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥१२.३९॥" हा त्यांचा सर्वश्रेष्ठ सिद्धांत आहे. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे ।
तें जया दिसें । ज्ञानास्तव ॥१३.६१६॥
तरि ज्ञेय ऐसें म्हणणें । वस्तूतें येणेंचि कारणें ।
जें ज्ञानावांचूनि कवणें । उपायें नये ॥८६५॥
ऐसेसे हे उपाये । बहुवस एथें पाहें ।
जाणावया होये । एकी वस्तु ॥१०४७॥
आतां पुरे हे बहुत । पैं सर्वार्थाचें ग्रथित ।
सिद्धांतनवनीत । देऊं तुज ॥१०४८॥

ज्या ज्ञानाने वस्तू प्राप्त होते तो सिद्धांतनवनीतरूप उपाय म्हणजे वस्तु-सामर्थ्यशक्तीची जागृती हाच आहे. अन्य बहुवस उपायांची येथे मात्रा चालत नाही. ते पुरेत; कारण ते व्यर्थ आहेत. असे का ? कारण ही वस्तुसामर्थ्यशक्ती बहिर्मुख होऊन अज्ञानरूपाने दृष्टिविकृतीचा नटनाच खेळवून जीवाला सतत व्यामोहित करीत राहते. ती जीवाला अंतर्मुख होऊच देत नाही. हा या सत्तेचा नैसर्गिक स्वभावच आहे. त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वस्तू-अवस्तू, ज्ञान-अज्ञान, प्रकृति-पुरुष, क्षर-अक्षर, क्षेत्र-क्षेत्रज्ञ यांनी एकरस बनलेली ही चित्‌शक्ती कुंडलिनी पुढीलप्रमाणे साकार केली आहे. ते म्हणतात–

जैसीं भांडघटशरावीं । तदाकारें असे पृथ्वी ।
तैसें सर्व होऊनियां सर्वीं । असे जे वस्तु ॥१३.८७३॥
पैं कल्लोळातें कल्लोळें । प्रसिजत असे ऐसें कळे ।
परी प्रसितें प्रासावेगळें । असे काई ? ॥८८६॥
तैसें साचचि जें एक । तेथ कें व्याप्यव्यापक ? ।
परी बोलावया नावेक । करावें लागे ॥८८७॥
तरी तें गा किरीटी ऐसें । अवकाशीं आकाश जैसें ।
परीं पटु होऊनि असे । तंतु जेवीं ॥८९२॥

उदक होऊनि उदकीं । रसु जैसा अवलोकीं ।
दीपपणें दीपकीं । तेज जैसें ॥८९३॥
कर्पूरत्वें कापुरीं । सौरभ्य असे जयापरीं ।
शरीर होऊनि शरीरीं । कर्म जेवीं ॥८९४॥
किंबहुना पांडवा । सोनेंचि सोनयाचा रवा ।
तैसें जें या सर्वां । सर्वांगीं असे ॥८९५॥
नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु ।
हा आकारासीच प्रवादु । वस्तूसि नाहीं ॥९०५॥
अज्ञान थोरिये आणिजे । आपणपें तरी नेणिजे ।
तें रूप जाणिजे । क्षेत्रज्ञाचें ॥१४.८०॥
हाचि उभय योगु । बुझें बापा चांगु ।
सत्तेचा नैसर्गु । स्वभावो हा ॥८१॥
एवं वस्तूचिया सत्ता । त्रिगुणासी पंडुसुता ।
दाविली सकारणता । आघवीचि ॥२७५॥
पैं वस्तु वस्तुत्वें असिकें । तें आपणपें गुणासारिखें ।
देखोनि कार्यविशेखें । अनुकरे गा ॥२७६॥
तरी ऐसें जाणिजे । सामर्थ्यें तिन्ही सहजें ।
होती देहव्याजें । गुणचि हे ॥२८०॥
इंधनाचेनि आकारें । अग्नि जैसा अवतरे ।
कां आंगवे तरुवरें । भूमिरसु ॥२८१॥
वस्तूसी आपुला जो अबोधु । तो ऊर्ध्वीं आठुळैजे कंदु ।
वेदांतीं हाचि प्रसिद्धु । बीजभावो ॥१५.८८॥
ते माया वस्तूच्या ठायीं । असे जैसेनि नाहीं ।
मग वस्तुप्रभाचि पाही । प्रगट होये ॥१५.८४॥

असे हे वस्तुसामर्थ्यशक्ती कुंडलिनी चितीचे द्विविध रूप आहे.ते श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी विस्ताराने वर्णन केले आहे. महाशिवाची शिवता महाशक्तीच्या उल्लासरूप सान्निध्यातच स्फुरत असल्यामुळे "स्कंदपुराणात" असे म्हटले आहे की—

जगत्कारणमापन्नः शिवो यो मुनिसत्तमाः ।
तस्यापि साऽभवच्छक्तिस्तया हीनो निरर्थकः ॥

शिव आपल्या सामर्थ्यशक्तीने संपन्न असतो म्हणूनच हे कार्य करू शकतो. एरवी शक्तीशिवाय वस्तू ही निरर्थक गोष्ट आहे. म्हणूनच "ब्रह्मणोऽभिन्नशक्तिस्तु ब्रह्मैव खलु नापरा ॥" असा सिद्धांत "सौरसंहितेत" मांडून शक्ती ही ब्रह्मवस्तूशी

अभिन्न असल्याकारणाने ती ब्रह्मवस्तूच आहे, ती दुसरे काहीही नाही, असे म्हटले आहे. " शिवपुराणांतर्गत वायवीव संहितेत " हाच भाव स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

शिवेच्छया पराशक्तिः शिवतत्त्वैकतां गता।
ततः परिस्फुरत्यादौ सर्गे तैलंतिलादिव ।।

ज्याप्रमाणे तिळातील तेल तिळाशीच एकरूप, अवच्छेद्य, एकरस व समव्याप्त असते त्याप्रमाणे पराशक्ती कुंडलिनी देवी शिवाशी समरसलेली असून त्या शिवावरच स्फुरण पावत असते. असे हे वस्तूचे त्याच्या सामर्थ्यशक्तीशी म्हणजे तेजाशी, प्रकाशाशी व स्फुरणाशी एकरूपत्व असल्याचे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

पैं दीपाचिया बंगाळीं। कां चंद्र हन जें उजळी।
हें काय बोलों अंशुमाळी। प्रकाशी जें ।।१५.३०८।।
तें आघवेंचि दिसणें। जयाचें कां न देखणें।
विश्व भासतसे जेणें। लपालेनी ।।३०९।।
जैसें शिंपीपण हारपे। तंव तंव खरें होय रुपें।
कां दोरी लोपतां सापें। फार होइजे ।।३१०।।
तैसीं चंद्रसूर्यादि थोरें। इयें तेजें जियें फारें।
तियें जयाचेनि आधारें। प्रकाशती ।।३११।।
ते वस्तु कीं तेजोराशी। सर्वभूतात्मक सरिसी।
चंद्रसूर्याच्या मानसीं। प्रकाशे जे ।।३१२।।
म्हणोनि चंद्रसूर्य कडवसां। पडतीं वस्तूच्या प्रकाशा।
यालागीं तेज जें तेजसा। तें वस्तूचें आंग ।।३१३।।
आणि जयाच्या प्रकाशीं। जग हारपे चंद्रार्केसीं।
सचंद्र नक्षत्रें जैसीं। विनोदयीं ।।३१४।।
नातरी प्रबोधलिये वेळे। ते स्वप्नींची डिंडिमा मावळे।
का नुरेचि सांजवेळे। मृगतृष्णिका ।।३१५।।
तैसा जिये वस्तूच्या ठायीं। कोण्हीच कां आभासु नाहीं।
तें माझें निजधाम पाहीं। पाटाचें गा ।।३१६।।

वस्तू लपून तिने सामर्थ्यशक्ती कुंडलिनीला प्रकट केले कीं, जगाचा भास होतो व ही शक्तीच प्रबोधाने म्हणजे सद्‌गुरूंनी केलेल्या शक्तिपाताने जागृत होते तेव्हा हा भास मृगजळाप्रमाणे आटून जातो. अशा प्रकारे उभयरूपाने म्हणजे उभारणी-संहारणीरूपाने एकच ब्रह्मवस्तू व एकच सामर्थ्यशक्ती कुंडलिनी एकत्वरूपाने नटलेली दिसते. म्हणूनच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

पैं आघवा मीचि असें। येथ नाहीं कीर अनारिसें।
परी प्राणियांचिया उल्लासें। बुद्धि ऐसा ॥१५.४१५॥
जैसें एकचि आकाशध्वनी। वाद्यविशेषीं आनानीं।
वाजावें पडे भिन्नीं। नादांतरीं ॥४१६॥
कां लोकचेष्टीं वेगळाला। जो हा एकुचि भानु उदैला।
तो आनानी परी गेला। उपयोगासी ॥४१७॥
नाना बीजधर्मानुरूप। झाडीं उपजविलें आप।
तैसें परिणमलें स्वरूप। माझें जीवां ॥४१८॥
एवं जीवचैतन्य आघवें। हें क्षर पुरुष जाणावें।
आतां रूप करूं बरवें। अक्षरासी ॥५०१॥
तरी अक्षरु जो दुसरा। पुरुष पैं धनुर्धरा।
तो मध्यस्थु गा गिरिवरां। मेरु जैसा ॥५०२॥
परी प्रकृतिपुरुषें दोनी। अभ्रें जालीं जियें गगनीं।
क्षेत्रक्षेत्रज्ञु स्वप्नीं। देखिला जियें ॥५१९॥

या सर्व विवेचनाचा सारांश हा आहे की, ब्रह्मवस्तू जेव्हा शक्तिरूपाने संकोच पावते तेव्हा पिंडब्रह्मांडरूपाने तिची उपरोक्त पद्धतीने उभारणी होते व ज्यावेळी सद्‌गुरुकृपेने शक्ती जागृत होते तेव्हा तिचा विकास होऊन पिंडब्रह्मांडाची आटणी होऊन क्षराक्षर, क्षेत्रक्षेत्रज्ञ, व्यक्ताव्यक्त, ज्ञानाज्ञान, प्रकृतिपुरुष इत्यादि सर्व द्वैताद्वैतभावांना आपल्यात समाविष्ट करून निखळ शिवरूपाने ती प्रतिष्ठित होते. हे रूप द्वैताद्वैतविवर्जित आहे हे निःसंशय आहे. हाच भाव व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

आपलिया संकोचविकाशा। आपणचि रूप वीरेशा।
हा जळीं चंद्र हन जैसा। समग्र गा ॥१५.५५४॥
तैसा विश्वपणें कांहीं होये। विश्वलोपीं कहीं न जाये।
जैसा रात्री दिवसें नोहे। द्विधा रवि ॥५५५॥
तैसा कांहींचि कोणीकडे। काथिसेनिहि वेंत्रीं न पडे।
जयाचें सांगडें। जयासीचि ॥५५६॥

वस्तुसामर्थ्यशक्तीच्या संकोचविकासाचा असा हा सर्व खेळ आहे. वास्तविक विश्वपणही नाही व विश्वलोपही नाही. एक अखंड साम्यावस्था हाच खरा सिद्धांत आहे. म. म. श्रीगोपीनाथ कविराज "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, या ग्रंथातील "काश्मीरीय शैव-दर्शन" या लेखात या दृष्टीने असे म्हणतात की, "इस आविर्भाव का बीज, जिसका क्रमविकासही विश्व है, शक्ति कहलाता है। इस शक्तिके साथ शिव सदा मिलित रहते हैं। शक्तिही अंतर्मुख होनेपर शिव है

और शिवही बहिर्मुख होनेपर शक्ति। अंतर्मुख और बहिर्मुख, दोनोंही भाव सनातन हैं; क्योंकि परमेश्वर नित्यही पंचकृत्यकारी हैं। शिवतत्त्वमें शक्तिभाव गौण और शिवभाव प्रधान है–शक्तितत्त्वमें शिवभाव गौण और शक्तिभाव प्रधान है। परंतु जहाँ शिव और शक्ति दोनों एकरस हैं, वहाँ न शिवका प्राधान्य है और न शक्तिका। वह साम्यावस्था है।" "अध्यात्मजीवनमें गुरुका स्थान," या लेखातही या दृष्टीनेच ते म्हणतात, "अंधकारमें जैसे सभी वस्तुएँ अपनी अपनी विशेषता खोकर उस अंधकारके रूपमें प्रतीत होती है, उनकी अपनी अपनी पृथक् सत्ताका भान नहीं होता, सृष्टिकी पूर्वावस्थाभी कई अशोंमें वैसीही है। किंतु, शक्तिके सक्रिय होनेपर भेद स्पष्ट रूपसे जग उठता है। शिव और शक्ति, अर्थात् चित्-शक्ति नित्य सम्बद्ध होकरभी पृथक् रूपसे दृष्टिगोचर होते हैं। इस शक्तिका हम 'पराशक्ति' नामसे निर्देश करेंगे। यह पराशक्तिही परशिवकी निजशक्ति है। यह महाकरुणाही भगवान्का महाप्रेम है, जिस करुणा और प्रेमसे विगलित होकर वे अनादि कालसे बद्ध जीवोंको मुक्त कर अपने साथ पूर्णरूपसे अभिन्नतामें लानेके लिए क्रिया करते हैं। वे निष्क्रिय रहकर इसतरह निरंतर क्रिया कर रहे हैं। यह क्रिया बाहरी रूपसे यद्यपि विभिन्न रूपोंमें प्रकाशित होती है, फिरभी इसका मूलरूप एक और अभिन्न है। यही मूलरूप अनुग्रह है। यह शक्ति परम अनुग्रहरूपा है, इसलिए यह सर्वमंगला कही जाती है। सृष्टि, स्थिति और संहार इसीके आत्म-प्रकाशके अतिरिक्त और कुछ नहीं है। शास्त्र कहते हैं, अनुग्रह–शक्तिही गुरुका स्वरूप है। परमशिवही गुरु हैं एवं यह अनुग्रह–शक्तिही उनकी पराशक्ति है। यह अनुग्रह–शक्ति अणुरूपी जीवोंको मुक्त कर उन्हें अपने शिवस्वरूपमें पुनः प्रतिष्ठित करती है।"

सारांश, "एऱ्हवीं सर्वांच्या हृदयदेशीं। मी अमुका आहें ऐसी। जे बुद्धि स्फुरे अहर्निशीं। ते वस्तु गा मी ॥१५.४२१॥" अशी ब्रह्मवस्तु व सामर्थ्यशक्ती एकत्र नांदत असली तरी "तरी अविद्येचिया निदा। विश्वस्वप्नाचा हा धांदा। भोगीत होता प्रबुद्धा। अनादि जो ॥१८.४०३॥" अशी जीवाची अज्ञान स्थिती "तो महावाक्याचेनि नांवें। गुरुकृपेचेनि थांवें। माथां हातु ठेविला नव्हे। थापटिला जैसा ॥१८.४०४॥ तैसा विश्वस्वप्नेंसीं माया। नीद सांडूनि धनंजया। सहसा चेइला अद्वया–। नंदपणे जो ॥४०५॥" या रीतीने सद्गुरूंच्या शक्तिपाताने दूर होऊन तो अखंड अद्वयानंदपणेंच जागृत होतो. हे वस्तुसामर्थ्यशक्तीच्या रूपाने असलेल्या कुंडलिनी शक्तीच्या स्वरूपाचे साररूप आहे. ते स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जे मुक्तातें निर्धारितां। लाभे आपलीच मुक्तता।
जैसी दीपें दिसे पाहतां। आपली वस्तु ॥१८.३९७॥

नातरी दर्पणु जंव उटिजे । तंव आपणपयां आपण भेटिजे ।
कां तोय पावतां तोय होईजे । लवणें जेवीं ॥३९८॥
हे असो परतोनि मागुते । प्रतिंबिब पाहे बिंबातें ।
तंव पाहणें जाउनी आयितें । बिंबचि होय ॥३९९॥
तैसें हारपलें आपणपें पावे । तैं संतांतें पाहतां गिंवसावें ।
म्हणौनि वानावे ऐकावे । तेचि सदा ॥४००॥

**ज्ञानशक्तीः–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " ॐ नमो श्रीआद्या । वेदप्रतिपाद्या । जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥१.१॥" असे म्हणून आत्मरूपाशी अभिन्न असणाऱ्या ज्या चित्‌शक्ती कुंडलिनीचा नमनपूर्वक जयजयकार केला आहे ती " जें चळवळिजे अनिळें । तें दैविकेनि जी निजबळें । नभ तुजमाजीं खेळे । लपीथपी ॥१४.९॥ किंबहुना माया असोस । ज्ञान जी तुझेनि डोळस । असो वानणें सायास । श्रुतीसि हे ॥१४.१०॥" याप्रकारे श्रीगुरूंची तेजयुक्त देविका ज्ञानशक्ती असून तीच ज्ञानाचे प्रकाशन करते असा परमसिद्धांत मांडून शक्तियुक्त ज्ञानाची अपरिहार्यता स्पष्ट केली आहे. ज्ञान जोपर्यंत जागृत कुंडलिनी शक्तीच्या रूपाने उभे राहत नाही तोपर्यंत अविद्यारूप संसाराचा अंत दुसऱ्या कोणत्याही उपायाने होणे शक्य नाही हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मूळ अज्ञानचि तंव लटिकें । मा तयाचें कार्य हें केतुकें ।
म्हणौनि संसाररुख सतुकें । वावोचि गा ॥१५.२२३॥
आणि अंतु यया नाहीं । ऐसें बोलिजें जें कांहीं ।
तेंही साचचि पाहीं । ग्रेकें परी ॥२२४॥
तरी प्रबोधु जंव नोहे । तवं निद्रे काय अंतु आहे ? ।
कीं रात्री न सरे तंव न पाहे । तया आरौतें ? ॥२२५॥
तैसा जंव पार्था । विवेकु नुधवी माथा ।
तंव अंतु नाहीं अश्वत्था । भवरूपा या ॥२२६॥
वाजतें वारें निवांत । जंव न राहे जेंथिचें तेथ ।
तंव तरंगता अनंत । म्हणावीचि कीं ॥२२७॥
म्हणौनि सूर्यु जैं हारपे । तैं मृगजळाभासु लोपे ।
कां प्रभा जाय दीपें । मालवलेनि ॥२२८॥
तैसें मूळ अविद्या खाये । तें ज्ञान जैं उभें होये ।
तैंचि यया अंतु आहे । एऱ्हवीं नाहीं ॥२२९॥

अज्ञान निवृत्तीसाठी ज्ञानशक्तीचा प्रबोध व अविद्या खाऊन टाकण्यासाठी

ज्ञानाचे उभे राहणे म्हणजे चित्‌शक्ति कुंडलिनीची जागृती हाच एकमात्र उपाय असल्याने महायोगी गोरक्षनाथ यांनी कुंडलिनी शक्तीच्या या ज्ञानरूपाचा व साधनरूपाचा " सिद्धसिद्धांतपद्धतीत " उल्लेख करताना असे म्हटले आहे की, " अस्ति काचिद्‌परंपरा संवित्‌स्वरूपा सर्वपिंडाधारत्वेन नित्यप्रबुद्धा निजाशक्तिः प्रसिद्धा कारणकर्तृणामुत्थानदशांकुरोन्मीलनेन कर्तारं करोति अतएवाधारशक्तिरिति कथ्यते। अत्यंत-निजप्रकाश-स्वसंवेद्यानुभवैकगम्यमान- शास्त्रलौकिकसाक्षात्कारसाक्षिणी सा परा चिद्रूपिणी शक्तिर्गीयते । सैव शक्तिर्यदासहजेन स्वस्मिन्नुन्मीलिन्यां निरुत्थानदशायां वर्तते तदा शिवः स एव भवति ।। ४.१ ।। अतएवानंतशक्तिमान् परमेश्वरः स विश्वसंवित्‌स्वरूपी विश्वमयो भवतीति प्रसिद्धं सिद्धानां च परापरस्वरूपा कुंडलिनी वर्तते । अतस्ते पिंडसिद्धाः प्रसिद्धाः । सा कुंडलिनी प्रबुद्धाअप्रबुद्धाचेति द्विधा। अप्रबुद्धेति तत्तत्पिंडे चेतनरूपा स्वभावेन नानाचिंताव्यापारोद्यमप्रपंचरूपा कुटिलस्वभावा कुंडलिनी ख्याता । सैव योगिनां तत्तद्विलसितविकाराणां निवारणोद्यमरूपा कुंडलिनी ऊर्ध्वगामिनी सुप्रसिद्धा भवति ।। ४.१४ ।। " सर्वश्रेष्ठ, ज्ञानस्वरूप व नित्यप्रकाशयुक्त सकल चराचर जगताची आधारभूत अशी परमेश्वराची निजशक्ती वेदादि शास्त्रात व सिद्धांच्या सिद्धांतात प्रसिद्ध आहे. ज्यावेळेस ही गुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताने उन्मीलित म्हणजे जागृत होते त्यावेळी आपल्या या उत्थानदशेमुळे साधकाच्या परमकारण अशा स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीचे ज्ञानरूप साधन बनते. म्हणून हिला आधारशक्ती म्हणतात. ही चित्‌शक्ती आपल्या स्वतःच्या विलक्षण अशा ज्ञानप्रकाशाने युक्त असून ती तिच्या ज्ञानप्रकाशानेच स्वतःच स्वतःला जाणण्यास योग्य आहे. शास्त्रीय ज्ञानाची जी लौकिक प्रक्रिया साधकाच्या अंतरंगात हिच्यामुळे घडून येते तिची ही स्वतःच साक्षिणी असते. म्हणून या शक्तीला चिद्‌रूपिणी असे म्हणतात. ज्यावेळी सद्‌गुरुकृपाकटाक्षपाताने ही स्वतःच उन्मीलित दशा धारण करते तेव्हा तिच्या या मूळस्वरूपाकडे उत्थान पावण्याच्या दशेमुळे ती शेवटी शिवस्वरूप किंवा ज्ञानस्वरूप होऊन जाते. ( शक्तिरहित परमेश्वर काहीही करू शकत नाही म्हणून ज्ञानशक्तिसंपन्न शिवच समस्त संसाराचा साक्षी आहे असे म्हटले जाते. ) अशा प्रकारे निजशक्तियुक्ततेमुळेच परमेश्वर सर्व विश्वाचा प्रकाशक असल्यामुळे त्याला सर्वशक्तियुक्त व अनंतशक्तिसंपन्न म्हटले जाते. या ज्ञानशक्तीच्या सामर्थ्याने परमेश्वर तिच्याच रूपाने विश्वरूपी व विश्वव्यापी होतो, हे सर्व सिद्धांमध्ये प्रसिद्ध आहे. ही कुंडलिनी परा व अपरा किंवा ज्ञान व अज्ञान या रूपाने प्रसिद्ध आहे. या शक्तीचे हे द्विविध रूप जे जाणतात त्यांनाच पिंडसिद्ध म्हणतात. या अर्थानेच ही कुंडलिनी शक्ती प्रबुद्ध व अप्रबुद्ध या दोन प्रकारची आहे असे म्हटले जाते. जरी ही शक्ती मुळात चेतनरूप असली तरी अज्ञानाचे स्वांग धारण करून जोपर्यंत ती मनुष्यमात्राच्या ठिकाणी

मूलाधारात अंतर्मुखाने निद्रा घेत वहिर्मुखाने जागृत राहून घोरत पडलेली असते व जोपर्यंत सद्गुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताने ती जागृत होत नाही तोपर्यंत संसारी पुरुषांना नानाप्रकारच्या शोकमोहादिचिंतेत प्रपंचव्यापाराच्या रूपाने उद्युक्त करीत राहते. ती जीवाला सहजासहजी स्वस्वरूपाकडे वळू न देता वाह्यरूपातील प्रपंचात गुंतवून ठेवून आपले अविद्याकार्य नेहमीच संपन्न करीत असते. यामुळेच या कुंडलिनी शक्तीला कुटिल स्वभावाची असे म्हणतात. हे हिचे अप्रवुद्ध किंवा अविद्यास्वरूप किंवा ज्ञानस्वरूप होय. मात्र ज्यावेळी ही सद्गुरुशक्तिपाताने जागृत होते त्यावेळी अविद्या, अज्ञान व समस्त प्रपंचाचे निवारण करून आपणच आपल्या कुटिल स्वभावाने उत्पन्न केलेले वाह्यरूपात्मक प्रपंचाचे अनंत विलास व विकार आपल्यातच समाविष्ट करूच त्यांचे जागृतरूपाने निवारण करते तेव्हा ती ऊर्ध्वं-गामिनी म्हणून प्रसिद्ध होते.

या परंपराप्राप्त अमर सिद्धांताशी आपल्या अपार जागृत संविदात्मक प्रातिभज्ञानाने व ऋतंभरायुक्त प्रज्ञेने समरस झाल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजही " मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलेंनि विवेकें । पद आलें परिपाकें । आमोदासी ॥१.५२॥" असे म्हणून भगवान् श्रीगोपालकृष्ण महाराज " यथा क्षीरे च धावल्यं दाहिकाच हुताशने । भूमौ गंधौ जले शैत्यं तथा त्वयि मम स्थितिः । मया विना त्वं निर्जीवा चादृश्योऽहं त्वया विना ॥ " ज्याप्रमाणे दूध व त्याची शुभ्रता, अग्नी व त्याची दाहक शक्ती, भूमी व गंध आणि पाणी व त्याची शीतलता यामध्ये भेद असत नाही त्याप्रमाणेच तुझ्यात व माझ्यात काहीही अंतर नाही, माझ्याशिवाय तू निर्जीव आहेस; कारण मीच जीवन आहे व तुझ्याशिवाय मी अप्रकट आहे; अशाप्रकारे "व्रह्मवैवर्तपुराणात " त्यांनी स्वमुखाने सांगितलेल्या त्या अनंत महामहिमाशाली शक्तीशी एकरूप असल्याने, गीता हे ज्ञानशक्तिरूपी अग्नीची आच देऊन कढ आल्यावर काढलेले साजूक तूप आहे असेच म्हणतात. "तैसें ज्ञान तरी शुद्ध ॥३.२६३॥" अशी मुळात अत्यंत शुद्ध असलेली शक्ती " परी इहीं असे प्ररुद्ध ॥३.२६३॥" या न्यायाने अज्ञानाने,अविवेकाने किंवा तत्स्वरूप कामक्रोधादि दोषांनी झाकली जाते. त्यामुळे ही शक्ती जागृत झाल्याशिवाय ज्ञान होणे शक्यच होत नाही. उलट " तैसे उपाय कीजती जे जे । ते ते यांसीचि होती विरजे ॥३.२६६॥" एवढेच घडते. येथे एकच भला उपाय आहे. त्यासाठी गुरुशिष्यांची गोठी घडली पाहिजे. ही गोठी म्हणजेच शक्तिपात होय. हा घडला की, पर्दापिंडाची गाठी होते. " एऱ्हवीं आघवी गोठी होईल मुकिया बहिरयाची ॥६.२६॥" एवढेच उरते.साधकाने ज्ञानेश्वरीकडे नुसत्या शब्दज्ञानाने पाहण्याची आपली दृष्टी सोडून देऊन व सर्व पूर्वग्रह टाकून देऊन आपल्या जागृत शक्तीच्या दृष्टीने या ग्रंथाशी समरस व्हावे म्हणजे त्यांना उपरोक्त अर्थाची प्राप्ती होऊन " जैसा वायसीं चंद्र नोळखिजे । तैसा

प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे ॥६.२९॥" या सदरात ते ढकलले न जाता "आणि तो हिमांशुचि जेविं खाजें । चकोराचें ॥६.२९॥" याप्रमाणे ते सत्पात्र ठरतील असा माझा, श्रीगुरुचरणांच्या प्राप्तिफलाचा, हृदयस्थ सिद्धांत आहे. श्रीगुरुचरणांनी उद्घोषिलेले ज्ञानेश्वरीचे हे त्रिकालाबाधित सत्यस्वरूप ज्या कोणाला गुरुकृपालब्धी होईल त्यावेळीच आहाच बोलाची वालीफ फिटून प्राण हळुवार होऊन हे प्राप्त होईल. हे होणे व जाणणे इतके सोपे आहे काय ? त्यासाठी जीवेप्राणे त्यांच्या चरणांची सेवा करावी लागते. आपल्या शरीराच्या चामडयाचे जोडे करून त्यांच्या चरणात घालावे लागतात. फार काय " इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षितीं । जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूंचे ॥१३.४३२॥" अशी एकांतिक निष्ठा उराशी बाळगावी लागते. तेव्हा ते कृपा करतात व वर्षानुवर्षे साधन केल्यावर त्यांच्या दुर्लभ कृपेचे अमोघत्व व अगम्यत्व उलगडून ज्ञेयरूपाने प्रकट होते. मग सिद्धांचे ग्रंथ कळतात म्हणजे ग्रंथाची प्रतीती येते. " एक तरी ओवी अनुभवावी " या श्रीनामदेवमहाराजांच्या म्हणण्याचा अर्थ हाच आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी यासाठी ज्ञानप्रकाश, ज्ञानशक्ती व ज्ञानबळ म्हणजे चित्‌शक्ती कुंडलिनीची सद्‌गुरुकृपेने होणारी आत्यंतिक जागृत अवस्थाच अत्यावश्यक आहे असे प्रतिपादन करताना असे म्हटले आहे की—

जयाचेनि वाक्य उजिवडें । जाहलें चित्त निधडें ।
ब्रह्माचेनि पाडें । निःशंकु होय ॥४.१६८॥
तें वेळीं आपणपेयां सहितें । इयें अशेषेंही भूतें ।
माझ्या स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥१६९॥
ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तें मोहांधकारु जाईल ।
जें गुरुकृपा होईल । पार्था गा ॥१७०॥
जरी कल्मषाचा आगरु । तूं भ्रांतीचा सागरु ।
व्यामोहाचा डोंगरु । होऊनी असशी ॥१७१॥
तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें । हे आघवेंची गा थोकडें ।
ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानीं इये ॥१७२॥
देखें विश्वभ्रमाऐसा । जो अमूर्ताचा कडवसा ।
तो जयाचिया प्रकाशा । पुरेचिना ॥१७३॥
तया कायसे हे मनोमळु । हें बोलतांचि अति किडाळु ।
नाहीं येणें पाडें ढिसाळु । दुजें जगीं ॥१७४॥
जें दिठीही न पविजे । तें दिठीविण देखिजे ।
जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥६.३३॥

ना तरी जे धातुवादाही न जोडे । तें लोहींचि पंधरें सांपडे ।
जरी दैवयोगें चढे । परिसु हातां ॥३४॥
तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।
म्हणौनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥३५॥

अशा प्रकारे श्रीगुरुकृपा अर्थात् शक्तिपात, शक्तिसंक्रमण, शक्तिजागृती; ज्ञानप्राप्ती व ज्ञेयरूपता हा क्रम आहे. हे एकदा घडले म्हणजे बाकीच्या कोणत्याही गोष्टीची किंमत त्यापुढे नाही. "एथ ज्ञान हें उत्तम होये । आणिकही एक तैसें कें आहे । जैसें चैतन्य कां नोहे । दुसरें गा ॥ ४.१७८ ॥" असे चैतन्यशक्तिस्वरूप ज्ञानासारखे चैतन्यशक्तिस्वरूप ज्ञानच होय म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञान-शक्तीचा महिमा सांगून "ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानीं इये ॥ ४.१७२ ॥" असे म्हटले आहे. याचा अर्थ ज्ञान, शक्ती, समर्थ्य, बळ व श्रीगुरुकृपा ह्या सर्व समानार्थक गोष्टी आहेत. यामुळेच "श्रीदुर्गासप्तशती" ग्रंथात "सा विद्या परमा मुक्तेर्हेतुभूता सनातनी ॥१.५७॥" असे म्हणून ज्ञानशक्ती कुंडलिनीचा गौरव केला आहे. ही महामाया महाशक्ती कुंडलिनीच मोक्षाला कारण असून तीच नित्य अशी सर्वश्रेष्ठ ब्रह्मविद्या आहे. अशा या देवी कुंडलिनीचे हे शक्तिस्वरूप अधिक स्पष्टपणे वर्णन करताना उपरोक्त ग्रंथातच असे म्हटले आहे की–

या मुक्तिहेतुरविचिन्त्यमहाव्रता त्वमभ्यसे सुनियतेन्द्रियतत्त्वसारैः ।
मोक्षार्थिभिर्मुनिभिरस्तसमस्तदोषैर्विद्यासि सा भगवती परमा हि देवि ॥४.९॥
शब्दात्मिका सुविमलर्ग्यजुषां निधानमुद्गीथरम्यपदपाठवतां च साम्नाम् ।
देवि त्रयी भगवती भवभावनाय वार्ता च सर्वजगतां परमार्तिहंत्री ॥१०॥
मेधासि देवि विदिताखिलशास्त्रसारा दुर्गासि दुर्गभवसागरनौरसंगा ।
श्रीः कैटभारिहृदयैककृताधिवासा गौरी त्वमेव शशिमौलिकृतप्रतिष्ठा ॥११॥

हे देवी कुंडलिनी शक्ती ! तू अचिंत्य तसे महाव्रत आहेस. तूच मोक्षाला कारण असून तूच सर्वश्रेष्ठ ब्रह्मविद्या आहेस. म्हणूनच मोक्षाची इच्छा असणारे मुनी आपले समस्त दोष निघून जावेत यासाठी तुझीच उपासना करतात. तू शब्दरूप आहेस. अत्यंत पवित्र अशा ऋग्वेद व यजुर्वेद यांचे तू निधान किंवा ठेवा असून रमणीय पदपाठ असलेल्या सामवेदाचे तू अधिष्ठान आहेस. हे भगवती कुंडलिनी शक्ती ! तू वेदत्रयरूप असून सर्व जगाचे दुःख म्हणजे जीवाला जी भवभावना झाली आहे ती दूर करणारी व तिचा नाश करणारी तू परमश्रेष्ठ वार्ताविद्या आहेस. तू सर्व शास्त्रांचे सार जाणलेली बुद्धी आहेस. जीवाला भवसागरातून पार करणारी तू दुर्गारूपी नौका आहेस. विष्णूच्या वक्षस्थलावर अभेद्यरूपाने वास करणारी तू लक्ष्मी आहेस व चंद्रशेखर शिवाने अर्धांगी म्हणून पार्वतीच्या रूपाने तुलाच प्रतिष्ठित केले आहे.

अशी ही कुंडलिनी शक्तिदेवी ज्ञानयुक्तच असल्याचा निर्वाळा "शिवपुराणातील वायवीय संहितेच्या उत्तरखंडात" पुढीलप्रमाणे दिलेला आढळतो.

शक्तिः स्वाभाविकी तस्य विद्याविश्वविलक्षणा ।
एकानेकस्वरूपेण भाति भानोरिवप्रभा ॥७.१॥
अनंताः शक्तयो यस्या इच्छाज्ञानक्रियादयाः ।
मायाद्याश्चाभवन्वन्होर्विस्फुलिंगा यथातथा ॥२॥
सदाशिवेश्वराद्याहि विद्याऽविद्येश्वरादयः ।
अभवन्पुरुषाश्चास्याः प्रकृतिश्च परात्परा ॥३॥
महदादिविशेषांतास्त्वजाद्याश्चापि मूर्त्तयः ।
यच्चान्यदस्ति तत्सर्वं तस्याः कार्य्यं न संशयः ॥४॥
सा शक्तिः सर्वगा सूक्ष्मा प्रबोधानंदरूपिणी ।
शक्तिमानुच्यते देवः शिवःशीतांशुभूषणः ॥५॥
वेद्यः शिवः शिवा विद्या प्रज्ञा चैव श्रुतिः स्मृतिः ।
धृतिरेषा स्थितिर्निष्ठा ज्ञानेच्छाकर्मशक्तयः ॥६॥
आज्ञा चैवपरं ब्रह्म द्वे विद्ये च परापरे ।
शुद्धविद्या शुद्धकला सर्वं शक्ति कृतं यतः ॥७॥

विश्वविलक्षण विद्याशक्ती कुंडलिनी देवी ही परमात्म्याची स्वाभाविक शक्ती आहे. ज्याप्रमाणे सूर्य आपल्याशी अभिन्न असलेल्या प्रकाश किरणांनी सर्वत्र प्रकाशतो त्याप्रमाणे परमात्मा आपल्या स्वांगभूत चित्‌शक्तीच्या योगाने एकरूप असूनही अनेक रूपाने प्रकाशित होतो. इच्छा, ज्ञान, क्रिया इत्यादि त्याच्या अनंत शक्ती या अनेक रूपाच्या द्योतक आहेत. अग्नीपासून अशा ठिणग्या उत्पन्न होतात त्याप्रमाणे या सर्व शक्ती चित्‌शक्ती मायेपासून उत्पन्न होतात. अशा या अत्यंत श्रेष्ठ शक्तीपासून सदाशिव, ईश्वर, पुरुष, विद्या, अविद्या इत्यादि सर्व प्रकट होतात. महदादिपासून स्थावरजंगमात्मक सर्व यच्चयावत् जगत् ब्रह्मादिक मूर्ती व जे काही सर्व आहे ते सर्व या चित्‌शक्ती कुंडलिनीचेच रूप आहे, यात शंका नाही. अशी ही सर्वगामिनी सूक्ष्म शक्ती असून ती ज्ञानरूप व आनंदरूप आहे. या शक्तीमुळेच शीतांशुभूषणधारी शिवाला शक्तिमान् म्हणतात. यासाठी विद्या किंवा ज्ञान हे शिवशिवायुक्त आहे, हेच जाणण्यास योग्य आहे. हिलाच प्रज्ञा, श्रुती, स्मृती, धृती, स्थिती, निष्ठा, ज्ञान, इच्छा व कर्मशक्ती म्हणतात. ही चित्‌शक्ती कुंडलिनीच परमेश्वराची आज्ञा आहे. परा व अपरा विद्या आणि शुद्धविद्या व शुद्धकला हे सर्व तिच्याकडून केलेले कार्य आहे.

"श्रीदेवीभागवतपुराणातही" ज्ञान हे शक्तिरूप आहे हे कथन करताना असे म्हटले आहे की–

मूलप्रकृतिरूपिण्याः संविदो जगदुद्भवे ।।९.५०.६।।
प्रादुर्भूतं शक्तियुग्मं प्राणबुद्ध्याधिदैवतम् ।
जीवानां चैव सर्वेषां नियंतृप्रेरकं सदा ।।७।।
तदधीनं जगत्सर्वं विराडादिचराचरम् ।
यावत्तयोः प्रसादो न तावन्मोक्षो हि दुर्लभः ।।८।।

मूळप्रकृती चित्‌शक्ती कुंडलिनी ही संवित्‌रूप म्हणजे ज्ञानरूप असून तिच्यापासूनच सृष्टीची उत्पत्ती झाली. या शक्तीपासूनच प्राण व बुद्धी या दोन श्रेष्ठ शक्तींची जोडी निर्माण झाली. या दोन शक्ती सर्व जीवांचे नियमन करणाऱ्या व त्यांना प्रेरणा देणाऱ्या आहेत. विराटादि सर्व जग त्यांच्या स्वाधीन आहे. यामुळे जोपर्यंत सद्‌गुरुप्रसाद होत नाही म्हणजे शक्तिपात होऊन चित्‌शक्तिस्वरूप प्राण व बुद्धी जागृत होत नाहीत तोपर्यंत ज्ञानप्राप्तिविना मोक्ष दुर्लभच राहतो.

इतकेच नव्हे तर या शक्तीचे हे ज्ञानस्वरूप अधिक स्पष्ट करताना महर्षी व्यासांनी " श्रीदेवीभागवतातच " पुढे असे म्हटले आहे की–

सर्वपूज्या सर्ववंद्या चान्यां मत्तो निशामय ।
वाग्बुद्धिविद्याज्ञानाधिष्ठात्री च परमात्मनः ।।९.१.२९।।
सर्वविद्यास्वरूपा च सा च देवी सरस्वती ।
सा बुद्धिः कविता मेधा प्रतिभा स्मृतिदा नृणाम् ।।३०।।
नानाप्रकारसिद्धान्तभेदार्थकलना मता ।
व्याख्याबोधस्वरूपा च सर्वसंदेहभंजिनी ।।३१।।
विचारकारिणी ग्रंथकारिणी शक्तिरूपिणी ।
स्वरसंगीतसंधानतालकारणरूपिणी ।।३२।।
विषयज्ञानवाग्रूपा प्रतिविश्वोपजीविनी ।
व्याख्यावादकरी शांता वीणापुस्तकधारिणी ।।३३।।
सिद्धिविद्यास्वरूपा च सर्वसिद्धिप्रदा सदा ।
यया विना तु विप्रौघो मूको मृतसमः सदा ।।३६।।

सर्वांना पूज्य व सर्वांना वंद्य असलेल्या कुंडलिनी शक्तीचे ज्ञानस्वरूप कसे आहे ते ऐका. परमात्म्याची वाणी, बुद्धी, विद्या व ज्ञान यांची ही आधारभूत देवी आहे.सर्व विद्यारूप अशी ही देवी कुंडलिनी तीच सरस्वती होय.तीच मनुष्यांना बुद्धी, कविता, मेधा, प्रतिभा व स्मृती देते. नाना प्रकारचे जे सिद्धांताचे भेद व त्यांच्या विषयाला आकलन करणारी अशी ही शक्तिदेवी आहे असे पंडितांना मान्य आहे. ही शक्ती व्याख्या व बोधस्वरूप असून ती सर्व संशयांचा भंग करीत असते. ही कुंडलिनी देवीच विचार करणारी, ग्रंथ करणारी,शक्तिरूपी,स्वरयुक्त,संगीतयुक्त व अनुसंधानयुक्त तालाची कारणरूप आहे. हीच विषयज्ञानरूपी व वाणीच्या रूपाची

असून प्रत्येक जीवाला जीवन देणारी आहे. ही शक्तीच व्याख्या व वाद करणारी, शांत स्वभावाची आणि वीणा व पुस्तक धारण करणारी आहे.ही कुंडलिनी शक्तीच सिद्धिरूप, विद्यारूप व नेहमीच सर्व सिद्धी देणारी अशी आहे. तिच्यावाचून ब्राह्मणसमूह सर्वदा मुक्यासारखा व शवासारखा असतो.

या सर्व कारणांमुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज इतर सर्व यज्ञांपेक्षा जागृत शक्तीने शरीरात घडून येणारा ज्ञानयज्ञ सर्वश्रेष्ठ आहे हे "ते द्रव्यादियागु कीर होती । परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती ।। ४.१५८ ।। " असे सांगून स्पष्ट करतात. त्यांच्या दृष्टीने ज्यावेळी श्रद्धेचा संभोग घडण्यास म्हणजे प्राणरूप शक्ती सुषुम्नेत प्रविष्ट होण्यास सुरुवात होते तेव्हाच प्रकृतिमनादि सर्व लयास जाऊन " तयातेंचि गिंवसित । तें ज्ञान पावे निश्चित । जयामाजि अचुंबित । शांति असे ।। ४.१८८ ।।" व " ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे । मग विस्तार बहु प्रकटे । आत्मबोधाचा ।। १८९ ।। " अशी स्थिती साधकाला प्राप्त होते. या स्थितीच्या प्राप्तीसाठीच म्हणजे संशयकल्पनादि संसाराच्या विस्तारभयनाशासाठीच "ऐसा जरी थोरावें । तरी उपायें एकें आंगवे । जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग ।। ४.२०६ ।। तरी तेणें ज्ञानशस्त्रें तिखटें । निखळु हा निवटे । मग निःशेष खता फिटे । मानसींचा ।। २०७ ।। " असे म्हणून शक्तिरूप ज्ञानशस्त्र हाती घेण्यास ते सुचवितात. एवढेच नव्हे तर " इया ज्ञाना झोंवावें हो ।। १४.३९ ।। " व " जे वन्हि हें तृणें । येरें ज्ञानें ।। १४.४३ ।। " असेच त्यांचे सांगणे आहे. या ज्ञानशक्तीला अनुसरून ज्ञानशक्तीच्या जागृतीची गोडी वाढावी म्हणून भगवंतांनी गीता अर्जुनाला सांगितली व हा भावार्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कळीकाळाने गिळल्या जाणाऱ्या जीवांसाठी स्पष्ट केला.यामुळेच "आणि ज्ञाना ऐसें जिव्हार। नेवों नेवों निरंतर। इंद्रियीं केलें थोर। शब्दादिक जे ।।१८.१०१४।।" अशा प्रकारे शब्दादि इंद्रियविषयांच्याद्वारा शक्तीने आपण स्वतःच अत्यंत जिव्हाळ्याची वस्तू असूनही आपल्या स्वतःलाच ज्या रीतीने बहिर्मुख केले आहे ते टाकून देऊन " तरी गुरु दाविलिया वाटा । येऊनि विवेकतीर्थतटा । धुऊनियां मळकटा । बुद्धीचा तेणें ।। १८.१०११ ।।" या पद्धतीने साधकाने ज्ञानशक्तीच्या अंतर जागृतीने उर्ध्वोन्मुख व्हावे म्हणून सांगितले आहे. अशा प्रकारचे " ज्ञान ऐसिया रूढी । वेदांतीं जयाची प्रौढी । वानितां कीर्ति चोखडी । पातली जगीं ।। १८.१३२४ ।। " म्हणून जे शक्तियुक्त ज्ञान आहे तेच आत्मज्ञान असून गौप्याचेही गुप्त धन आहे; कारण " कां जिये एक वस्तूलागीं। बाणोनि ज्ञानाची वज्रांगी । झुंजत प्रपंचेसीं समरंगीं । ज्ञानिये गा ।। ६.४७५ ।। " या न्यायाने साधक ज्ञानाच्या वज्रांगीचे म्हणजे चित्शक्ति कुंडलिनीचे कवच अंगावर चढवून साधनयुद्ध खेळत असतो. या युद्धात साधक विजयी होतोच होतो; कारण " ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्में अशेखें ।। ४.१०५ ।। " ही या

युद्धातील सर्व कर्मे जाळण्याची क्रिया ज्ञानाची अग्निरूप शक्तीच करीत असते व शेवटी " तो परब्रह्मचि मनुष्यवेखें । वोळख तूं ॥ ४.१०५ ॥ " या स्थितिप्रत साधकाला आणून सोडीत असते. ज्ञानाग्नीचे किंवा शक्तीचे हे मंथनयुद्ध गुरुकृपेनेच साधकशरीरात सुरू होते. " तो उपशमें निहटिला । धैर्येंवरी दाटिला । गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें ॥४.१३१॥ ऐसें समरसें मंथन केलें । तेथ झडकरी काजा आलें । जें उज्जीवन जाहलें । ज्ञानाग्नीचें ॥ १३२ ॥ " असे म्हणून ही गोष्ट श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केली आहे. "योगशिखोपनिषदात" उपरोक्त प्रकारेच ज्ञानशक्तीची सिद्धी कशी होते हे सांगताना असे म्हटले आहे की—

यन्नमस्यचिदाख्यातं यत् सिद्धीनां च कारणम् ।
येन विज्ञानमात्रेण जन्मबंधात् प्रमुच्यते ॥३.१॥
अक्षरं परमो नादः शब्दब्रह्मेति कथ्यते ।
मूलाधारगता शक्तिः स्वाधारा बिंदुरूपिणी ॥२॥
तस्यामुत्पद्यते नादः सूक्ष्मबीजादिवांकुरः ।
तां पश्यंतीं विदुर्विश्वं यया पश्यंति योगिनः ॥३॥
हृदये व्यंजते घोषो गर्जत्पर्जन्यसंनिभः ।
तत्र स्थिता सुरेशान मध्यमेत्यभिधीयते ॥४॥
प्राणेन च स्वराख्येन प्रथिता वैखरी पुनः ।
शाखापल्लवरूपेण ताल्वादिस्थानघट्टनात् ॥५॥
अकारादिक्षकारांतान्यक्षराणि समीरयेत् ।
अक्षरेभ्यः पदानि स्युः पदेभ्यो वाक्यसंभवः ॥६॥
सर्वे वाक्यात्मका मंत्रा वेदशास्त्राणि कृत्स्नशः ।
पुराणानि च काव्यानि भाषाश्च विविधा अपि ॥७॥
सप्तस्वराश्च गाथाश्च सर्वे नादसमुद्भवाः ।
एषा सरस्वती देवी सर्वभूतगुहाश्रया ॥८॥
वायुना वन्हीयुक्तेन प्रेर्यमाणा शनैः शनैः ।
द्वित्रिवर्णपदैर्वाक्यैरित्येवं वर्तते सदा ॥९॥
य इमां वैखरीं शक्तिं योगी स्वात्मनि पश्यति ।
स वाक्सिद्धिमवाप्नोति सरस्वत्याः प्रसादतः ॥१०॥
वेदशास्त्रपुराणानां स्वयं कर्ता भविष्यति ॥११॥

स्वसंवेद्य आत्मरूप हे चिद्रूप म्हणजे चैतन्ययुक्त कुंडलिनी शक्तियुक्त आहे.हेच सर्वसिद्धीचे कारण असून तेच नमस्करणीय आहे. याच्या केवळ विज्ञानानेच जीव जन्ममरणाच्या बंधनापासून मुक्त होतो. "स्वज्ञदृष्टया अनुभूतं तु अक्षरं " या न्यायाने हे स्वरूप आपल्या स्वरूपभूत शक्तीने स्वतःच स्वतःला जाणत असल्याने त्याला अक्षर

म्हणतात. या जाणण्याच्या वेळी अक्षररूप ॐकार साधकाच्या अंतरात परमश्रेष्ठ नादाच्या रूपाने प्रकट होतो.या ॐकाराला म्हणजेच जागृतशक्तीला किंवा कुंडलिनी शक्तीला शब्दब्रह्म म्हणतात. ही शब्दब्रह्मरूपी ज्ञानस्वरूप कुंडलिनी शक्ती मूलाधारात बिंदुरूपाने स्वतःच्याच आधाराने म्हणजे दुसऱ्या कोणाचाही आधार न घेता राहते. ज्याप्रमाणे सूक्ष्म बीजापासून अंकुरोत्पत्ती होते त्याप्रमाणे ही शक्ती जेव्हा गुरुकृपेने जागृत होते तेव्हा हिच्याशी अभेद्य असलेला नाद ॐकाररूपाने प्रकट होतो. साधक या नादाच्या द्वाराच नादाच्या विश्वावस्थेचे दर्शन घेतो. नादाच्या या अवस्थेचे नाव पश्यंती असे आहे. ज्यावेळी गर्जना करणाऱ्या पर्जन्यासारखा किंवा मेघासारखा हा ज्ञानशक्ती कुंडलिनीस्वरूप नाद हृदयात व्यक्त होतो तेव्हा त्या नादाला मध्यमा असे म्हणतात. ज्यावेळी ही चित्‌शक्ती प्राणवायुरूप होऊन ध्वनी उत्पन्न होतो त्यावेळी त्याला वैखरी म्हणतात. ही शक्तिरूप वैखरी वाणीच कंठ, तालु, दंत इत्यादि स्थानांवर आघात करून शाखा व पानांच्या रूपाने जसा वृक्ष फोफावतो त्याप्रमाणेच विस्तारली आहे. 'अ' पासून 'क्ष' पर्यंतच्या ध्वनीला अक्षरे म्हणतात. अक्षरांपासून पदे व पदांपासून वाक्ये होतात.सर्व मंत्र, वेद, शास्त्र, पुराणे, काव्ये, नाना प्रकारच्या भाषा, सप्तस्वर, कथा वगैरे या चित्‌शक्त्यात्मक कुंडलिनी-स्वरूप नादापासूनच उत्पन्न झाले आहेत. सर्व प्राण्यांच्या हृदयरूप गुहेमध्ये वास करणारी ही देवी कुंडलिनी शक्ती साक्षात् सरस्वती आहे. ज्यावेळी सद्‌गुरुकृपेने ही देवी जागृत होते तेव्हा वन्हीयुक्त वायूमुळे हळूहळू प्रेरित झालेली ही सरस्वती वेगवेगळ्या पदवाक्यादिरूपात प्रकट होत असते. जो योगी या चित्‌शक्ती कुंडलिनी-स्वरूप वैखरीशक्तीला तिच्या जागृत रूपाने स्वतःत आत्मरूपाने म्हणजे तिच्या पराखूपाने पाहतो म्हणजे सहस्रारात ती शिवाशी परारूपाने एकरूप आहे असे अनुभवितो त्याला या देवी सरस्वतीच्या कृपेने वाक्‌सिद्धी प्राप्त होते. या शक्ती-मुळेच साधक वेदशास्त्रपुराणांचा कर्ता होतो.

ज्ञानशक्तीची ही शिवाभिन्न स्थिती परारूपाने अखंड असल्याने "अमृता-नुभवात" श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> जयां एकसत्तेचें बैसणें। दोघां एका प्रकाशाचें लेणें।
> जे अनादि एकपणें। नांदती दोघें ॥१.८॥
> जेणे देवें संपूर्ण देवी। जियेवीण कांहीं ना तो गोसावी।
> किंबहुना एकोपजीवी। एकएकांची ॥१०॥

श्रीसंत गुलाबरावमहाराज यांनी उपरोक्त ओव्यांवर "चौसष्टी" लिहून त्यांचा अर्थ पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे. ते म्हणतात—

> दोन्हीही आहेती। ज्ञान आणि वृत्ती।
> अनादि असती। ज्ञानरूप ॥१.९॥

ज्ञानावांचोनी वृत्ती नाहीं। वृत्तीवांचोनी ज्ञान नाहीं।
दोन्ही नसोनी पाही। एक आनंद ।।११।।

सारांश "ऐसें व्यापक ज्ञान भले। जयांचिया हृदया गिंवसित आले। तयांची समता दृष्टि बोलें। विशेषूं काई।।५.८८।।" अशी ज्यांची स्थिती झाली आहे त्यांना ज्ञानरूप शक्त्यात्मक शिवाचीच अखंड प्रतीती कशी येत असते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

ज्ञातृज्ञेयाविहीन। नुसधेंचि जें ज्ञान।
सुखा भरलें गगन। गाळींव जें ।।१५.७७।।
जें कार्य ना कारण। जया दुजें ना एकपण।
आपणयां जें जाण। आपणचि ।।७८।।

ज्ञाता व ज्ञेय या दोहींवाचून ही कुंडलिनी चित्शक्ती नुसत्या ज्ञानरूपाने म्हणजे शिवस्वरूपानेच गगन गाळीव सुखाने भरलेले असावे त्याप्रमाणे सर्वत्र भरलेली आहे. ही शक्ती कार्यही नाही व कारणही. हिला दुसरेपण नाही व एकपणही नाही. अशी ही आपलीच आपण अखंड सत्तारूपाने असणारी स्वसंवेद्य आत्मस्वरूप कुंडलिनी शक्ती आहे. "जैसें बिंब तरी बचकें एवढें। परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें। शब्दाची व्याप्ति येणें पाडें। अनुभवावीं ।।४.२१४।।" हीच शब्दब्रह्मरूप कुंडलिनी शक्तीची ज्ञानेश्वरीतील खरी अनुभूती घेण्याची गोष्ट आहे व हेच ज्ञानेश्वरीचे अंतिम स्वरूप आहे, असा श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा परम सिद्धांत आहे. यासाठीच "शक्तिज्ञानं विना देवि मुक्तिः हास्यास्य कल्पते ।।" असे म्हणून, हे देवी ! शक्तीच्या ज्ञानाशिवाय मुक्ती प्राप्त होणे ही हास्यास्पद कल्पना आहे, असा उद्घोष स्वतः शिवाने केला आहे.

**उल्हाटशक्ती :–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "पाठीं समाधिश्रियेचा अशेखा। आत्मानुभव राज्यसुखा। पट्टाभिषेकु देखा। समरसें जाहला ।।९.२१८।।" असे म्हणून जेव्हा योगी-साधक ऐश्वर्यसंपन्न समाधिसुखाच्या आत्मानुभवाने सामरस्यात्मक राज्यसुखाचा पट्टाभिषेक होऊन परिपूर्ण होतो तेव्हाच त्याला "ऐसें हें गहन। अर्जुना माझें भजन ।।९.२१९।।" व "अर्जुना हे गुरवी भक्ती ।।९.२२८।।" हे भक्तीचे खरे रहस्य कळू लागते, असा सिद्धांत मांडला आहे. ही सामरस्यात्मक भक्तीची स्थिती आपल्याला "येथ उल्हाटशक्तीचेनि उजिवडें। मनापवनाचेनि सुरवाडें। सतराविये चें पाणियाडें। बळियाविले ।।९.२१४।।" या न्यायाने मुळात अधोमुख व निद्रिस्त असलेल्या उल्हाटशक्तीच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने मन व प्राणासकट ती सुषुम्नेमध्ये ऊर्ध्वगामी झाल्याने सतराव्या जीवनकलेचे म्हणजे सहस्रारातील चंद्रामृताचे तळे स्वाधीन झाल्यामुळे प्राप्त झाली आहे, हे लक्षात घेऊन साधकयोगी

त्या शक्तिरूप परमात्म्याची अखंड स्तुती करीतच कुंडलिनी देवीला परामाध्य देवता मानून उपासना करीत असतात. श्रीज्ञानेश्वरमहाराज या दृष्टीनेच असे म्हणतात की–

**अखंड अगर्वता होऊनि असती । तयांची विनय हेचि संपत्ती ।**
**जे जय जय मंत्रे अर्पिती । माझ्याचि ठायीं ॥९.२२६॥**
**नमितां मानापमान गळाले । म्हणौनि अवचितां मीचि जहाले ।**
**ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥२२७॥**

उल्हाटशक्तीची जे साधकयोगी अगर्वतेने, विनयाने व नम्रतेने तिच्याशी समरसून, मिसळून किंवा एकरूप होऊन उपासना करतात, तिचाच नेहमी जयजयकार करतात व तिलाच सतत नमन करतात ते इतर कोणत्याही प्रयत्नाशिवाय तिच्याच कृपेने अगदी अवचित, सहज व आपोआप स्वसंवेद्य आत्मरूप होतात, हे त्रिकालाबाधित सत्य आहे. अशा या अपूर्व उल्हटशक्तीचे स्वरूप ज्ञानेश्वरीत कसे चित्रित झाले आहे ते पाहवयाचे आहे.

उल्हाटशक्ती म्हणजे उलटून पडणारी, मागे फिरणारी किंवा संहारणी करणारी शक्ती होय; कारण उल्हाटणे या क्रियापदाचा अर्थच उलटून पडणे किंवा मागे फिरणे असा आहे. ज्यावेळी सद्‌गुरू साधकावर शक्तिपातदीक्षानुग्रह करतात तेव्हाच अज्ञान, प्रकृती, आद्या, क्षेत्र, व्यक्त, क्षर, स्फूर्ती, सत्ता इत्यादि विविध नावांनी संसारात्मक किंवा पिंडब्रह्मांडात्मक रूपाने अफाटपणे आभासात्मक पद्धतीने विस्तारलेली दिसणारी ही कुंडलिनी शक्ती आपले हे रूप आवरते घेऊन आपणच चित्तरूपाने किंवा जीवरूपाने बनलेल्या आपल्या संकुचित शिवरूपाचा त्याग करण्यासाठी सुषुम्नामार्गाने मार्गस्थ होते. अशा रीतीने मार्गस्थ होणे हेच उलटून पडणे होय. यालाच शास्त्रकार प्रतिप्रसव किंवा संहारणी म्हणतात. शक्तीच्या या उलटण्यासाठीच सर्व साधनांचा ज्ञाताज्ञात पद्धतीने प्रयत्न चाललेला असतो. अर्थात् एकमात्र सद्‌गुरुकृपेने ती जशी सहजतेने माघारी फिरते तशी इतर साधनांनी ती क्वचितच् आपले हे उलटे फिरण्याचे कार्य करते; कारण ही शक्ती सद्‌गुरुरूपाने भूतलावर अवतरलेल्या शिवाशी एकरूप असणारी अलौकिक, अपूर्व, असामान्य, सामर्थ्यरूप, ज्ञानसत्तात्मक, स्फूर्तिरूप, विलासात्मक, चिद्‌घनरसपूर्ण व आनंदयुक्त अशी शक्ती आहे. त्यामुळे शक्तिस्वरूप सद्‌गुरूंची या रूपाने प्रार्थना करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-

**विश्वविकासित मुद्रा । जया सोडी तुझी योगनिद्रा ।**
**तया नमोजी गणेंद्रा । श्रीगुरुराया ॥१७.१॥**
**त्रिगुणत्रिपुरीं वेढिला । जीवत्वदुर्गीं आडिला ।**
**तो आत्मशंभूनें सोडविला । तुझिया स्मृती ॥२॥**

म्हणौनि शिवेंसीं कांटाळा । गुरुत्वें तूंचि आगळा ।
तऱ्ही हळु मायाजाळा-। माजीं तारूनि ।।३।।
जे तुझ्याविखीं मूढ । तयांलागीं तूं वक्रतुंड ।
ज्ञानियांसी तरी अखंड । उजूचि आहासी ।।४।।
दैविकी दिठी पाहतां सानी । तऱ्ही मीलनोन्मीलनीं ।
उत्पत्ति प्रळयो दोन्ही । लीलाचि करिसी ।।५।।
वामांगीचा लास्यविलासु । जो हा जगद्रूप आभासु ।
तो तांडवमिसें कळासु । दाविसी तूं ।।८।।
हें असो विस्मो दातारा । तूं होसी जयाचा सोयरा ।
सोइरिकेचिया व्यवहारा । मुकेचि तो ।।९।।
फेडितां बंधनाचा ठावो । तूं जगद्‌बंधु ऐसा भावो ।
धरूं बोलणें उवावो । तुझाचि आंगीं ।।१०।।
तंव दुजयाचेनि नांवें तया । देहही नुरेचि पैं देवराया ।
जेणें तू आपणपयां । केलासि दुजा ।।११।।

अशा प्रकारे मुद्रा, दैविकी, लीला, वामांगी, उवाव इत्यादि नावांनी ही उल्हाटशक्ती श्रीगुरूशी समरस, समव्याप्त किंवा अवच्छेद्यरूपाने असल्याने ज्यावेळी ते आपल्या शक्तीचा संकोच करतात त्यावेळी त्यांची योगनिद्रा मोडून तांडवमिषाने जगदाभासाचे उन्मीलन करून जीवरूप होऊन जीवत्वदुर्गी ते स्वतःच शक्तिरूपाने अडकून बसतात व ज्यावेळी ते स्वतःच आपल्या शक्तीचा विकास करतात त्यावेळी अत्यंत विस्मयकारक पद्धतीने ते आपले शक्तिस्वरूप सोडून देऊन जीवबंधन तोडीत शिवस्वरूप होतात. त्यावेळी त्यांची शिव व शक्ती ही दोन्ही नावे लोपून ते एका अखंड अशा आपल्या स्वरूपाने अवशिष्ट राहतात. असा हा सद्‌गुरू, शक्तिस्वरूप असलेला व वामांगीच्या लास्यविलासाने शोभणारा, विस्मयकारक दाता आहे. या दात्याने आपल्यावर कृपा करून आपली उल्हाटशक्ती जागृत केल्याने "तैसा मीं अनुग्रहीतु ।।१.८२।।" आहे असे सांगून त्यामुळेच हे ज्ञानेश्वरीसारखे देशीकार लेणें तयार करण्यास मी समर्थ झालो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

या बोला निवृत्तिदासु । पावूनि परम उल्हासु ।
म्हणे परियेसा मना अवकाशु । देऊनियां ।।१.८४।।
तेथ संतोषोनि निवृत्तिदासें । जी जी म्हणौनि उल्हासें ।
अवधारा श्रीकृष्ण ऐसें । बोलते जाहले ।।९.३३।।

हा उल्हास म्हणजे उल्हाटशक्तीची अपरंपार अशी जागृत अवस्था आहे. हिच्या सामर्थ्यावरच विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण असे ज्ञानाचे सर्व स्पंद अत्यंत सहजतेने व लीलेने आपल्यात समाविष्ट करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ही श्रीची

वाङ्मयीमूर्ती उभी केली आहे. धडे वाचून काही सारस्वत त्यांच्या चरणी वोळगले नाही. हे सर्व सद्‌गुरूच्या शक्तिपाताचे फल आहे व ते शक्तिपाताने उन्मेषात्मक उल्हाटशक्तीच्या जागृतीनेच भोगले पाहिजे. म्हणूनच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

ज्ञानदेवो म्हणे निवृत्तीचा। चांग उठावा करूनि उन्मेषाचा।
मग संवादु श्रीहरिपार्थाचा। भोगावा बापा ।।३.२७६।।

श्रीहरी व पार्थाच्या संवादरूपाने उभी राहिलेली ज्ञानेश्वरी ही जागृतशक्तीने भोगण्याची म्हणजे अनुभूतीचीच गोष्ट आहे; कारण या उल्हाटशक्तीच्या उल्हासात हे ज्ञानेश्वरीचे जेवण कितीही जेवले तरी पुरे वाटत नाही अशी स्थिती होत असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जो शरीरीं उदासु। फळभोगीं निरासु।
नित्यता उल्हासु। होऊनि असे ।।४.१०६।।
जो संतोषाचा गाभारा। आत्मबोधाचिये वोगरां।
पुरे न म्हणेचि धनुर्धरा। आरोगितां ।।१०७।।
हा मत्सरु जेथ उपजे। तेतुलें नुरेचि जया दुजें।
तो निर्मत्सरु काइ म्हणिजें। बोलवरी ? ।।११३।।

अशा प्रकारे ही उल्हाटशक्तीची जागृती म्हणजे संसाराचा मत्सर उपजणे असल्यामुळे तिची जितकी जितकी जागृती वाढत जाते तसतसा साधक निर्मत्सर होत जातो म्हणजे बाह्यशक्तीमुळे जगभर व शरीरभर पसरलेला त्याचा अहंभाव " सांडोनियां आशा कुरोंडी। अहंभावेंसीं ।।४.१०८।। " या रीतीने कमी होऊन तो महासुखाची गोडी घेत सर्वतोपरी मुक्त होतो. या उल्हाटशक्तीच्या अशा प्रकारच्या उल्हासालाच ज्ञाननिष्ठा व भक्ती म्हणून गौरवून, तिच्या भजनानेच साधक ईश्वराशी समरस होऊन सुखी होतो, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे। तेथ भक्ति माझी उल्लासे।
तिया भजन समरसें। सुखिया होय ।।१८.१२४८।।
आणि विश्वप्रकाशितया। आत्मया मज आपुलिया।
अनुसरे जो करूनियां। सर्वत्रता हे ।।१२४९।।

विश्वप्रकाशित करणाऱ्या आत्म्याच्या उल्हाटशक्तीला सर्वभावे करून सर्वतोपरी जेव्हा साधक अनुसरतो तेव्हाच सामरस्यात्मक भक्तीची अवस्था त्याला प्राप्त होते. हीच गोष्ट श्रीसंत एकनाथमहाराजांनी "एकनाथी भागवतात" सांगताना असे म्हटले आहे की–

आणिक एक योगयुक्त। योगधारणा तूंतें भजत।
प्राणापानांची समता देत। आसनस्थ होऊनियां ।।६.१२६।।
वज्रासनीं दृढबंध। भेदोनी षट्‌चक्रांचे भेद।
कुंडलिनीचा स्कंध। अतिसुबुद्ध थापटिला ।।१२७।।

ते खवळली महाशक्ती। वेगें चालली ऊर्ध्वगती।
पवन प्राशूनि ग्रासिती। योगस्थिती गगनानें ॥१२८॥
शोषूनि सहस्त्रदळाचे पाट। औटपीठ आणि गोल्हाट।
क्रमोनियां श्रीहाट। आली अतिउद्‌भट ब्रह्मस्थाना ॥१२९॥
तेथ परमानंदाचा भोग। शिवशक्तींचा संयोग।
यापरी अभ्यासोनि योग। हा भजनमार्ग योग्यांचा ॥१३०॥

अशा रीतीने उल्हाटशक्तीच्या उल्हासाची नितांत आवश्यकता असल्याने नुसत्या अनुमानाला श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी "एऱ्हवीं अनुमानाचेनि पैसें। आवडे कीर कळलें ऐसें। परि मृगजळाचेनि वोलांशें। काय भूमि तिमे ?॥९.१३७॥" इतकीच किंमत असल्याने "तयाचेनि आंगलगें। अज्ञान जगीं दाटुगें। जें सज्ञानाहि सगें। झोंबों सके ॥१३.७८०॥" अशी खोटया उल्हासाने सज्ञानाची म्हणजे कोऱ्या शास्त्रपंडिताची स्थिती होते तेथे अज्ञानी माणसाचा काय लाग लागणार ? म्हणून खोटा उल्हास ही आसुरी संपत्ती असून म्हणजे कुंडलिनी शक्तीची अनादिनिद्रावस्था असून साधकाने या आसुरी संपत्तीचा त्याग करून खऱ्या उल्हासाचा म्हणजे दैवी संपत्तीचा अर्थात् मोक्षसूर्याची उखा उजळविणाऱ्या जागृत दैवी शक्तीचा आश्रय करावा हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

इया दोन्हींमाजीं पहिली। दैवी जे म्हणितली।
ते मोक्षसूर्यें पाहली। उखाचि जाण ॥१६.२६५॥
येरी जे दुसरी। संपत्ति कां आसुरी।
ते मोहलोहाची खरी। सांखळी जीवां ॥२६६॥
म्हणौनि पार्था तूं या। दैवी संपत्ती स्वामिया।
होऊनि यावें उवाया। कैवल्याचिया ॥२७०॥

दैवी व आसुरी संपत्तीने मायाशक्ती कुंडलिनीच शोभत असल्याने साधकानें उवाया होऊन म्हणजे शक्ती उल्हसित करून कैवल्याप्रत यावे. "श्रीमद्भागवतातही" हे स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

विद्याऽविद्ये मम तनू विद्‌ध्युद्धव शरीरिणाम्।
मोक्षबंधनकारी आद्ये मायया मे विनिर्मिते ॥११.११.३॥

हे उद्धवा ! विद्या व अविद्या या बंध व मोक्ष यांना सिद्ध करणाऱ्या माझ्या दोन शक्ती आहेत. याच जीवाच्या बंधाला व मोक्षाला उत्पन्न करणाऱ्या आहेत; कारण या दोन्ही अनादि असून त्या शक्ती मायावृत्तिरूप असल्यामुळे माझ्या मायेने त्या उत्पन्न केलेल्या आहेत. यातील विद्याशक्ती म्हणजे उल्हाटशक्ती कुंडलिनी मोक्षाला कारण होते असे "बंधोऽस्याविद्ययाऽनादिर्विद्यया च तथेतरः ॥११.११.४॥" असे म्हणून पुढील श्लोकात शुकमहामुनींनी तिचा निर्देश केलेला आहे. ही विद्या-

शक्तीच म्हणजे उल्हाटशक्तीच अद्वयबोधप्रकाशाला कशी कारण होते हे सांगताना या श्लोकावरील भाष्यात श्रीसंत एकनाथमहाराज "एकनाथी भागवतात" म्हणतात–

**यालागीं कृष्ण जगजेठी। उद्धवाची पाठी थापटी।**
**अतिगुह्याची गुह्य गोष्टी। तुझे कृपेसाठीं मी बोलतों ॥११.१२७॥**
**पाठी थापटावयामिसें जाण। करीत स्वशक्तिसंचरण।**
**तेणें अद्वयबोधलक्षण। उद्धवासी जाण प्रकाशी ॥१२८॥**

अशा प्रकारे सद्गुरूने शक्तिपाताने स्वशक्तीचा शिष्यदेहात संचार करून त्याची अनादि निद्रिस्त मायारूप चित्शक्ती कुंडलिनी जागृत करून, तिचे बहिर्मुख द्वैतरूप बाधित करून व तिच्या मूळ प्रकाशस्वरूपाप्रत तिला आणून शिष्याला अद्वयस्वरूप करून सोडणे हेच सर्व गुह्यांचे गुह्य व सकल आगमनिगमादि शास्त्रांचे सार आहे. हिच्या जागृतीशिवाय सर्व व्यर्थ ठरते. अगदी सामान्य भोजनानंदातही सात्त्विक भोजनाकडे हिच्या जागृतीनेच प्रवृत्ती होते हे " हा सात्त्विकु होय भोग्यु। तैंचि भोगावया आरोग्यु। शरीरासी भाग्यु। उदयलें जाणो ॥ १७.१३५ ॥ " अशा प्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. या सामान्य आनंदापासून बलवत्तर अशा कैवल्यनंदापर्यंतचे सर्व आनंद ही उल्हाटशक्ती प्राप्त करून देत असल्यामुळे "जो बहुवें विषयविलासें गुंफे। तो म्हणती उवाईं पडिला सापें। जों अभिलाषभारें दडपे। तयातें सज्ञान म्हणती ॥ ९.५०९ ॥" अशा प्रकारच्या विपरीत उवाईची म्हणजे सुखाची अर्थात् उल्हासाची म्हणजे अज्ञानीपणाची स्थिती सोडून देऊन " भग निस्सीमभाव उल्हासें ॥ ९.३८२ ॥ " अशा रीतीने साधकाने साधनाला सादर व्हावे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज वारंवार बजावीत आहेत. उल्हाटशक्तीच्याद्वारे प्राप्त होणाऱ्या सिद्धयोगाचा निभ्रांतपणे आश्रय घ्यावा; कारण दुसऱ्या कोणत्याही मार्गाने परमार्थप्राप्ती होणे शक्य नाही हे निभ्रांतपणे स्पष्ट करताना " श्रीमद्भागवतात " व्यास महर्षी म्हणतात–

**यमादिभिर्योगपथैरान्वीक्षिक्या च विद्यया।**
**ममाचार्योपासनाभिर्वा नान्यैर्योग्यं स्मरेन्मनः ॥११.२०.२४॥**

यमादि साधनसंपत्तीच्या अवलंबनाने सिद्धयोगमार्गाचा अवलंब करून जडचेतनपदार्थद्वयाचे शोधन करून म्हणजे जडापासूनचेतन वेगळे करून या वेदान्त-विद्येने किंवा अगदी स्वतंत्र अशा अर्चनध्यानदिकांचा अवलंब करून शेवटी या मार्गाला येऊन मिळावे व मनाने एकमात्र या शक्तीच्या साधनाचा अवलंब करावा. याहून दुसरे काहीही करू नये; कारण दुसऱ्या कोणत्याही उपायाने साधक ईश्वराप्रत जाऊच शकणार नाही. या श्लोकावर भाष्य करताना श्रीसंत एकनाथ-महाराज "एकनाथी भागवतात" म्हणतात–

त्यजोनियां सकळ भोग । यमनियमेंसीं योगमार्ग ।
आसनस्थ होऊनी चांग । देऊनि मुद्रा सांग अवधारी ॥२०.२५०॥
तेव्हां अपान ऊर्ध्वमुखें वाढे । जो वरता स्वाधिष्ठाना चढे ।
प्राणायामीं अडे । तो मागुता मुरडे नाभिस्थाना ॥२५१॥
सम होता प्राणापान । पिंडब्रह्मांडशोधन ।
स्वयें वायु करी गा आपण । मलक्षालन शरीरीं ॥२५२॥
कफ पित्त दोहीं खाये । नाडींतें शोधीत जाये ।
जुने संचित मल पाहें । तेही लवलाहें निर्दळी ॥२५३॥
नवल वायूचें प्रबळ बळ । पिंडब्रह्मांडींचे सकळ मळ ।
धोऊनि करी गा निर्मळ । पवित्रता केवळ महायोगें ॥२५४॥
तेथें प्रकटे रोगाची परवडी । महाविघ्नांची पडे उडी ।
धांवती विकल्पांच्या कोडी । सिद्धीची रोकडी नागवण पावे ॥२५५॥
इतुकीं अंगीं आदळतां जाण । साधक न सांडी जैं आंगवण ।
तैं सम होती प्राणापान । सत्य जाण उद्धवा ॥२५६॥
प्राणापानांच्या मिळणी । शक्ति चेतवे कुंडलिनी ।
ते प्राणापानांतें घेऊनि । सुषुम्नास्थानीं प्रवेशे ॥२५७॥
ते आद्यशक्ति अचाट । चढे पश्चिमेचा महाघाट ।
तेथ षड्चक्रांचा कडकडाट । पूर्वींच सपाट पवनें केला ॥२५८॥
कुंडलिनी चालतां वाटा । चुकल्या आधीव्याधींच्या लाटा ।
बुजाल्या विकल्पांच्या वाटा । महाविघ्नांच्या झटा बाधूं न शकती ॥२५९॥
साधितां उल्हाटशक्तीचे उलट । उघडे ब्रह्मरंध्रींचें कपाट ।
तंव लोटले सहस्रदळाचे पाट । अतिचोखट चंद्रामृत ॥२६०॥
तें प्राशूनि कुंडलिनी बाळा । संतोषें सांडी गरळा ।
तें शरीरीं वोतली कळा । तेणें पालटला देहभाव ॥२६१॥
शरीराकारें वोतिली कळा । तेणें देहो दिसे अति सोज्ज्वळा ।
ना तो ब्रह्मरसाचा पुतळा । कीं उमलला कळा शांतिसुखाचा ॥२६२॥

असे हे या उल्हाटशक्तीच्या योगाने प्राप्त होणाऱ्या महायोगाचे सामर्थ्य आहे. एका बाजूला या उल्हाटशक्तीच्या सामर्थ्याने “ हें तो ईश्वरु । सकल भूतांचा अहंकारु । पांघरोनि निरंतरु । उल्हासत असे ॥ १८.१३०२ ॥ स्वमायेचें झाडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र । बाहेरी नटी छायाचित्र । चौऱ्यांशी लक्ष ॥ १३०३ ॥ ” अशा प्रकारे ईश्वर पिंडब्रह्मांडाच्या उभारणीचे नाटक करीत असतो व दुसऱ्या बाजूला तोच ईश्वर गुरुरूपाने या उल्हाटशक्तीच्या सामर्थ्यानेच

" नातरी चंद्रबिंब वाटोळें । देखोनि क्षीरसागर उचंबळे । तैसा दुणेंही वरी प्रेमवळें । उल्लसितु जाहला ।।११.११४।। मग तिये प्रसन्नतेचेनि आटोपें । गाजोनि म्हणितलें सक्रपें । पार्था देख देख अपुमें । स्वरूपें माझीं ।।११५ ।। " अशा रीतीने जीवावर अत्यंत प्रसन्नपणे , आवेशाच्या भराने व मोठचा प्रेमाने अगदी गर्जना करून कृपा करण्यास उद्युक्त होतो. सद्गुरूंच्या ठायी असणारे शक्तिपाताचे हे सामर्थ्य इतके अपूर्व असते की, " ते सहसा मुद्रा सोडिली । आणि स्थूळदृष्टीची जवनिका फेडिली । किंबहुना उघडिली । योगऋद्धी ।। ११.१२१।। या रीतीनेच ते एका क्षणात आविर्भूत होते. वास्तविक पाहता "आधींच आम्हां यया कांहीं । नरनारायणासी भिन्न नाहीं ।। १५.४५८ ।। " या न्यायाने गुरुशिष्य एकच असतात; परंतु " तीव्र-तीव्रः शक्तिपातो देहपातवशात्स्वयम् ।। " अशी देहपातही करणारी स्थिती तीव्राततितीव्र शक्तिपाताने होत असल्याचे शास्त्रकारांनी वर्णन केलेले असल्यामुळे " परी आतां जिरो माझ्या ठाईं । वेगु हा माझा ।। १५.४५८ ।। " असे म्हणून श्रीकृष्णांनी कित्येक वेळा स्वतःला आवरले आहे. दीक्षाप्रदात्या सद्गुरूंची कृपापाताच्या वेळी काय स्थिती होत असेल हे तेच एकमेव जाणोत. इतरांचा तेथे लाग नाही; कारण हे एक अपूर्व रहस्य आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याचे उतरोक्त प्रकारे आणखीही चारपाच वेळा तसेच म्हणून वर्णन केले आहे. सद्गुरूंना आपला वेग, त्या महान् प्रलंयाकारी दिव्य कुंडलिनीरूपी उल्हाटशक्तीचा वेग, पुन्हा स्वतःत जिरविण्यासाठी किती सामर्थ्य लागत असेल हे कोण जाणू शकेल ? शंभुस्वरूप सद्गुरूच ते जाणतात. इतरांनी फक्त कल्पना करावयाची. हा केवळ शक्तिपात दीक्षादान देणाऱ्या विरळचा महात्म्यांच्या अनुभूतीचा अंतरंग विषय आहे.मग येथे अधिक काय लिहि-णार व बोलाची वालीफ फेडून रहस्य तरी कसे उलगडणार ? त्याचे निर्देशन केले इतकेच. उल्हाटशक्ती चिती कुंडलिनीचे हे गौप्य स्वरूप आहे. "जो अर्जुन श्रीकृष्णीं विरत होता । तो परतोनि मागुता । प्रश्नावळीची कथा । ऐकों आला ।।१५.४६०।।" व ' एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु । तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावया ।।१८.१२२६ ।। " या जगदुद्धाराच्या निमित्तासाठीच कदाचिन् सद्गुरु अशा प्रकारे आपला वेग आपल्या ठायी जिरवून शिष्याला आपल्यात विरवू देत नसावेत. काहीही असो, हे घडते खरे.

सारांश, " वेद जेणें सुभाष । सुख जेणें सोल्लास । हें असो रूपस । विश्व जेणें ।।१८.१७२८ ।।" अशा प्रकारे ज्या उल्हाटशक्ती कुंडलिनीच्या चितिसत्तेने वेद उद्भासित झाले आहेत, ज्या अनादि आत्मशक्तीमुळे सुखाला आनंदितपणा आला आहे व ज्याच्या सत्तास्फूर्तीने सर्व विश्व हे रूपवान झाले आहे, ती उल्हाटशक्ती ' तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरू श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजही शांतु । रिघोनियां ।। १८.१७२९ ।। " अशा प्रकारे गुरुरूपाने साधकाच्या अंतरात निरंतर त्याच्या कल्याणासाठी जागृत असते.

**आधारशक्ती:—**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ते तुझिये गुरुकृपादृष्टी ॥ १२.२ ॥ आधारशक्ती-चिया अंकीं । वाढविसी कौतुकीं । हृदयाकाशपल्लकीं । परियें देसी निजें ॥१२.५॥" असे म्हणून सद्गुरू जेव्हा साधकावर आपल्या कृपादृष्टीचा वर्षाव करतात म्हणजे आपल्या अमृतस्वरूप दृष्टीने शक्तिपात करून शक्तिसंक्रमणद्वारा शिष्याची आधार-शक्ती कुंडलिनी जागृत करतात तेव्हा मुळात तिच्या रूपानेच मूलाधारात निद्रा घेत पहुडलेल्या जीवरूपी साधकाला तिच्याच अंकावर वसवून स्वसंकोच सोडून देऊन म्हणजे जीवरूप टाकावयास लावून शिवरूप होण्याच्या दृष्टीने ते मोठ्या कौतुकाने वाढीस लावतात, असे सांगून ज्ञानेश्वरीतील कुंडलिनी शक्तीचे आधार-शक्तीच्या नावाने अपूर्व उद्घाटन केले आहे. ही चितिशक्ती कुंडलिनी जीवाला आपल्या हृदयाकाशरूपी पाळण्यात घालून त्याचे शिवस्वरूप प्रकट होण्यासाठी त्याला झोके देते. अशा प्रकारे जीवाला शिवस्वरूप करणाऱ्या आधारालाच शक्ती म्हणतात व या शक्तीलाच सद्गुरू म्हणतात. वास्तविक पाहता " निराधारा " म्हणून या शक्तीचा गौरव शास्त्रकारांनी केला आहे. असे असले तरी ही स्वतः मात्र "स्वाधारा" असून सकल पिंडब्रह्मांडात्मक अखिल चराचर जगताची "आधारा" आहे, हे नितांत सत्य आहे. इतकेच नव्हे तर ही चित्शक्ती कुंडलिनीच सद्गुरू-रूपाने विलसत असते असा सकल आगमनिगमशास्त्रकारांनी शेकडोशे वेळा उद्घोष केला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि वोले मी सधरु । जे सानुकूळ श्रीगुरु । ज्ञानदेवो म्हणे ॥ १.७५ ॥ " असे म्हणून श्रीगुरू आधारशक्तिरूपाने जेव्हा सानुकूळ म्हणजे जागृत होतात तेव्हाच साधक सधरू होतो असे स्वतःचे उदाहरण देऊन हे सिद्ध केले आहे.अशा प्रकारे ज्या अनादिसिद्ध आधाराश्रयाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांकडून ज्ञानेश्वरीची रचना झाली ती आधार-शक्ती कुंडलिनी कोणते रूप घेऊन ज्ञानेश्वरीत साकार झाली आहे तेच आता पाहवयाचे आहे. हे स्वरूप साधनात्मक व तात्त्विक अशा रीतीचे असल्यामुळे अशा द्विविध पद्धतीने या शक्तीच्या स्वरूपाची चर्चा करणे आवश्यक आहे.

ज्यावेळी साधक " मग वज्रासन तेचि उर्वी । शोधूनि आधारमुद्रा बरवी । वेदिका रचे मांडवी । शरीराच्या ॥८.४९॥" अशा रीतीने सिद्धासन घालून साधनाला बसतो त्यावेळी " ऐसी आधारीं मुद्रा पडे । आणि आधींचा मार्गु मोडे । तेथ अपानु आंतुलेकडे । वोहोटों लागे ॥६.२००॥" हे आपोआपच घडून येते; कारण "तंव येरीकडे धनुर्धरा । आसनाचा उबारा । शक्ति करी उजगरा । कुंडलिनीतें ॥६.२२१॥" ही गोष्ट या आसनाच्या सामर्थ्यानेच घडून येते. त्यामुळे " आधारीं नाभीं कंठीं । बंधत्रयाची घरटीं । चंद्रसूर्य संपुटीं । सूये चित्त ॥१३.५०९॥" अशा प्रकारे बंधत्रय होऊन व इडापिंगला एकवटून सुषुम्नेत चित्त म्हणजे कुंडलिनी शक्तीचे

चालन होण्यास साधक समर्थ होतो व " मग कुंडलिनियेचा टेंभा। आधारीं केला उभा। तया चोजवले प्रभा। निमथावरी ॥१२.५१॥" या प्रकारे कुंडलिनी शक्तीच्या प्रभेने सहस्रारातील शिवाशी तो एकरूप होतो. असा हा सद्‌गुरुकृपेने जागृत झालेल्या आधारशक्तीचा स्वसंवेद्य आत्मरूपाचा प्राप्तीसाठी चाललेला अभ्यास साधकाच्या ठिकाणी घडून येतो. आत्मज्ञानासाठी आधारशक्तिद्वारा घडून येणारा योगाभ्यासच नितांत आवश्यक ठरत असल्याने त्याचे समग्र वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

गुरुवाक्यें उठविला। बोधीं निश्चयो आपुला।
न्याहाळी हातीं घेतला। आरिसा जैसा ॥१८.१०३२॥
पैं ध्याता आपणचि परी। ध्यानरूप वृत्तिमाझारीं।
ध्येयत्वें घे हे अवधारीं। ध्यानरूढी गा ॥१०३३॥
तेथ ध्येय ध्यान ध्याता। ययां तिहीं एकरूपता।
होय तंव पंडुसुता। कीजे तें गा ॥१०३४॥
म्हणौनि तो मुमुक्षु। आत्मज्ञानी जाला दक्षु।
परी पुढां सूनि पक्षु। योगाभ्यासाचा ॥१०३५॥
आपानरंध्रद्वया–। माझारीं धनंजया।
पाष्णीं पिडूनियां। कांवरुमूळ ॥१०३६॥
आंकुचूनि अध। देऊनि तिन्ही बंध।
करूनि एकवद। वायुभेदी ॥१०३७॥
कुंडलिनी जागवूनि। मध्यमा विकाशूनि।
आधारादि भेदूनि। आज्ञावरी ॥१०३८॥
सहस्रदळाचा मेघु। पीयूषें वर्षोनि चांगु।
तो मूळवरी वोघु। आणूनियां ॥१०३९॥
नाचतया पुण्यगिरी। चिद्‌भैरवाच्या खापरीं।
मनपवनाची खीच पुरी। वाढूनियां ॥१०४०॥
जालिया योगाचा गाढा। मेळावा सूनि हा पुढां।
ध्यान मागिलीकडां। स्वयंभ केलें ॥१०४१॥
आणि ध्यान योग दोन्ही। इये आत्मतत्त्वज्ञानीं।
पैठी होआवया निर्विघ्नीं। आधींचि तेणें ॥१०४२॥
वीतरागतेसारिखा। जोडूनि ठेविला सखा।
तो आघवियाचि भूमिका–। सवें चाले ॥१०४३॥
पहावें दिसे तंववरी। दिठीतें न संडी दीप जरी।
तरी कें आहे अवसरी। देखावया ॥१०४४॥
तैसें मोक्षी प्रवर्तलया। वृत्ती ब्रह्मीं जाय लया।

तंव वैराग्य आथी तया । भंगु कैंचा ॥२०४५॥
म्हणौनि सवैराग्यु । ज्ञानाभ्यासु तो सभाग्यु ।
करूनि जाला योग्यु । आत्मलाभा ॥१०४६॥
ऐसी वैराग्याची आंगीं । बाणूनियां वज्रांगी ।
राजयोगतुरंगीं । आरूढला ॥१०४७॥
वरी आड पडिलें दिठी । सानें थोर निवटी ।
तें बळीं विवेकमुष्टीं । ध्यानाचें खांडें ॥१०४८॥
ऐसेनि संसाररणाआंतु । आंधारीं सूर्य तैसा असे जातु ।
मोक्षविजयश्रीये वरैतु । होआवयालागीं ॥१०४९॥

अशी ही आधारशक्तीच्याद्वारा प्राप्त होणाऱ्या आत्मलाभाची कथा असून ह्याच मोक्षरूपी विजयश्रीला वरण्याचा इतिहास आहे. गुरुकृपेने जागृत होणारी आधारशक्ती कुंडलिनी एखाद्या दीपाप्रमाणे, साधक सहस्त्रारात पोहचून शिवरूप होईपर्यंत, त्याला साथ देत राहते.ही गुरुरूपी आधारशक्ती साधक आपला अखेरचा मुक्काम गाठीपर्यंत त्याचा हात जन्मजन्मांतरीही सोडीत नाही. यालाच श्रीसंत तुकाराममहाराज "चालविसी हातीं धरूनिया" असे म्हणतात. जोपर्यंत चिद्‌भैरवाच्या म्हणजे चैतन्यशक्तिसंपन्न शिवाच्या रूपाशी ही शक्ती कुंडलिनी मनपवनासह एकरूप होत नाही तोपर्यंत तिचे साधननर्तन चालूच असते. ज्यावेळी शिवाशी तिचे महामीलन घडून येते तेव्हाच हे नर्तन थांबते. अशा प्रकारचा या चित्‌शक्ती कुंडलिनीच्या नर्तनाचा आविर्भाव आपल्या ठिकाणी घडून यावा म्हणून सर्व साधने प्रवृत्त झाली आहेत. त्यामुळे आगमनिगमादि शास्त्रांचे सार तत्त्वरूपाने सांगणाऱ्या श्रीमदाद्यशंकराचार्य, श्रीअभिनवगुप्त, महायोगी गोरक्षनाथ व समस्त तंत्रकारांनी हठ, लय, मंत्र, ज्ञान, चक्रपूजा, भावपूजा, इत्यादि नानाविध बाह्य साधनांचा अवलंब करण्यास सांगून, त्या त्या ठिकाणी वरील बाह्य क्रिया सांगून, त्यांचा महिमा गाइला असला तरी एक गोष्ट अखंड लक्षात ठेवली पाहिजे की, कुंडलिनी शक्ती जागृत होऊन साधकाला अंतरंग साधन मिळून तो स्वतः या जागृत आधारशक्तिरूपी गुरूच्या आधाराने सुषुम्नापथद्वारा मार्गस्थ व्हावा हेच खरे अंतिम तत्त्व व हाच खरा रहस्यमय उद्देश आहे. बाकी सर्व परंपरा व अधिकारभेदाने सांगितलेला तपशील आहे. यामुळेच हठयोगाच्या सर्व क्रियांचे सविस्तर वर्णन केल्यावर श्रीस्वात्माराम योगींद्रांनी "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की—

सशैलवनधात्रीणां यथाधारोऽहिनायकः ।
सर्वेषां योगतंत्राणां तथाधारो हि कुंडली ॥३.१॥
सुप्ता गुरुप्रसादेन यदा जार्गात कुंडली ।
तदा सर्वाणि पद्मानि भिद्यंते ग्रंथयोऽपि च ॥२॥

**प्राणस्य शून्यपदवी तथा राजपथायते ।**
**तदा चित्तं निरालंबं तदा कालस्य वंचनम् ।।३।।**

वने, पर्वत, नद्या, सरोवरे आणि समुद्रासहित सर्व पृथ्वीचा आधार ज्याप्रमाणे शेषनाग म्हणजे शेषतत्त्व आहे त्याचप्रमाणे सर्व योगांचा व सर्व तंत्रांचा आधार कुंडलिनी शक्तीच आहे. ज्यावेळी सद्गुरूंच्या प्रसादरूपी शक्तिपाताने ही आधार-शक्ती कुंडलिनी जागृत होते त्यावेळी सुषुम्नापथातील मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध व आज्ञा या षट्चक्रांचा आणि ब्रह्म, विष्णू व रुद्र या तीन ग्रंथींचा भेद होतो. अर्थात् षट्चक्ररूपी कमले उमलतात व गाठी मोकळ्या होतात. यामुळे प्राणाला शून्यपदवी प्राप्त करून देणारा सुषुम्नामार्ग राजपथाप्रमाणे सरळ, सहज, सोपा व मोकळा होतो म्हणजे या मार्गाने प्राण सहस्रारात सुखपूर्वक विनायास गमन करू लागतात. शक्ती सुषुम्नामार्गाने ऊर्ध्वगामी होताना प्राणा-बरोबर चित्तालाही नेत असल्याने तेही निरालंब होते म्हणजे निर्विषयी बनते व काळाची किंवा मृत्यूची सर्व बंधने छिन्नभिन्न होऊन जातात. चिद्भैरवाच्या खापरात मनपवनाची खीच पुरी होणे म्हणजे हेच होय.मन आणि प्राण या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. त्यामुळे एकाचा लय झाला की, दुसऱ्याचा लय आपोआप होतो. याचा अर्थच असा आहे की, जोपर्यंत एकाचा लय होत नाही तोपर्यंत दुसऱ्याचाही लय होत नाही व साधकाला कधीही तत्त्वज्ञानाचा लाभ होत नाही. सांख्ययोगद्वारा मनाचा तत्त्वचिंतनाने लय करण्याच्या किंवा सिद्धयोगद्वारा साधनाने प्राणाचा लय करण्याच्या मागे हेच रहस्य दडलेले आहे. म्हणून दोन्ही मार्ग " एकं साख्यं च योगं च ।। गीता ५.५ ।। " ह्या न्यायाने एक आहेत असे भगवंतांनी गीतेत स्पष्ट केले आहे व " आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे । म्हणौनि ऐक्य दोहींतें सहजें । इयापरी ।।५.२९।। तयासिचि जगीं पाहलें । आपणपें तेणेंचि देखिलें । जया सांख्ययोग जाणवले । भेदेंविण ।।३१।। " असे म्हणून श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी त्याचा भावार्थ व्यक्त केला आहे. अधिकारभेदाने व साधनभेदाने बाह्यतः या दोहोत फरक दिसतो इतकेच. पण अंततः या दोन्ही साधनांना जागृत शक्तीपाशी येऊन थडकावे लागतेच लागते, हे त्रिकालाबाधित सत्य आहे. म्हणून ज्या तत्त्वप्राप्तीसाठी एवढा खटाटोप चालला आहे त्याचे खरे रहस्य उपरोक्त सिद्धांतासह सांगताना " हठयोगप्रदीपिकेत " श्रीस्वात्माराम योगींद्रांनी असे म्हटले आहे की—

**सलिले सैन्धवं यद्वत्साम्यं भजति योगतः ।**
**तथात्ममनसोरैक्यं समाधिरभिधीयते ।।४.५।।**

**यदा संक्षीयते प्राणो मानसं च प्रलीयते ।**
**तदा समरसत्वं च समाधिरभिधीयते ।।६।।**

तत्समं च द्वयोरैक्यं जीवात्मपरमात्मनोः ।
प्रनष्टसर्वसंकल्पः समाधिः सोऽभिधीयते ।।७।।
पवनो बध्यते येन मनस्तेनैव बध्यते ।
मनश्च बध्यते येन पवनस्तेन बध्यते ।।२१।।
हेतुद्वय तु चित्तस्य वासना च समीरणः ।
तयोर्विनष्ट एकस्मिंस्तौ द्वावपि विनश्यतः ।।२२।।
मनो यत्र विलीयेत पवनस्तत्र लीयते ।
पवनो लीयते यत्र मनस्तत्र विलीयते ।।२३।।
दुग्धांबुवत्संमिलितावुभौ तौ तुल्यक्रियो मानसमारुतौ हि ।
यतो मरुत्तत्र मनः प्रवृत्तिर्यतो मनस्तत्र मरुत्प्रवृत्तिः ।।२४।।
तत्रैकनाशावपरस्य नाश एकप्रवृत्तेरपरप्रवृत्तिः ।
अध्वस्तयोश्चेंद्रियवर्गवृत्तिः प्रध्वस्तयोर्मोक्षपदस्यसिद्धिः ।।२५।।
ज्ञानं कुतो मनसि संभवतीह तावत्प्राणोऽपि जीवति मनो म्रियते न यावत् ।
प्राणो मनो द्वयमिदं विलयं नयेद्यो मोक्षं स गच्छति नरो न कथंचिदन्यः ।।१५।।

ज्याप्रमाणे पाण्यात मीठ विरघळल्यावर ते त्याच्याशी एकरूप होते त्याप्रमाणे मन आत्म्यात विरघळल्यावर आत्म्याशी एकरस होते. या एकतेलाच समाधी म्हणतात. ज्यावेळी प्राण सुषुम्नेत प्रविष्ट झाल्यामुळे क्षीण होतात व त्याचप्रमाणें मनाचाही तेथेच लय होतो, त्यावेळी जी समरसता उत्पन्न होते त्या स्थितीला समाधी म्हणतात. अशा प्रकारे मनप्राणांच्या सुषुम्नेतील एकवटण्याने शिवाशी शक्तीचे जे मीलन होते त्यालाच जीवात्मा व परमात्म्याची एकरूपता म्हणतात. या स्थितीत संपूर्ण संकल्प नष्ट झालेले असल्यामुळे या स्थितीला समाधी म्हणतात. ज्या जागृत शक्तीच्या साहाय्याने साधकयोगी प्राणांचे बंधन करतो, तिच्याच साहाय्याने तो मनाचेही बंधन करतो. आणि त्याचप्रमाणे ज्या आधार शक्तीच्या साहाय्याने तो मनाचे बंधन करतो त्या शक्तीच्या साहाय्यानेच तो प्राणांचेही बंधन करतो. वासना म्हणजेच मन व प्राण ह्या चित्ताला प्रवृत करणाऱ्या दोन गोष्टी किंवा हेतू आहेत. या दोहोंपैकी एकाचा नाश म्हणजे लय झाला की, दुसऱ्याचाही नाश किंवा लय होतो. ज्या सुषुम्नामार्गात मनाचा लय होतो तेथेच प्राणाचाही लय होतो व जेथे प्राणाचा लय होतो तेथेच मनाचाही लय होतो. दूध व पाण्याप्रमाणे मन व प्राण एकमेकात मिसळलेले आहेत. या दोन्ही गोष्टी एकमेकांवर पूर्णपणे अवलंबून आहेत. त्यांची प्रवृत्तिक्रिया एकसारखीच आहे. त्यामुळे जेथे मनाची प्रवृत्ती होते तेथे प्राणाची होते व जेथे प्राणाची प्रवृत्ती होते तेथे मनाची होते. त्यामुळे एकाचा नाश झाला की, दुसऱ्याचाही नाश होतो व एक प्रवृत्त झाला की, दुसरा प्रवृत्त होतो. ज्यावेळी कुंडलिनी शक्तीच्या द्वारा ही दोन्ही

अधोमुख होतात त्यावेळी समस्त इंद्रिये संसारोन्मुख होतात व ज्यावेळी या शक्तीच्या साहाय्याने ही सुषुम्नेत उर्ध्वमुख होतात त्यावेळी मोक्षसिद्धी होते.याप्रमाणे जोपर्यंत प्राण जिवंत आहेत व मन मरत नाही तोपर्यंत कधीही ज्ञान होणे शक्य नाही. जो कोणी आधारशक्ती कुंडलिनीचे सुषुम्नेत चालन करून या दोहोंनाही तिच्यासह तेथे लीन करीत नाही तोपर्यंत कोणत्याही साधकाला कधीही व केव्हाही मोक्षाची प्राप्ती होणे शक्य नाही.

अशा प्रकारचा या आधारशक्तीचा महिमा असल्यामुळे तिच्या आधारानेच साधकयोग्याने विहित निजाचाराने रहाटले पाहिजे हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

> तैसें ऐहिक तरी न नशे । आणि मोक्षु तो उरला असे ।
> जेथ पूर्वानुक्रमु दिसे । चोखाळत ॥२.२३३॥
>
> कर्माधारें राहाटिजे । परि कर्मफळ न निरीक्षिजे ।
> जैसा मंत्रज्ञु न बंधिजे । भूतबाधा ॥२३४॥
>
> तियापरी जे सुबुद्धि । आपुलालिया निरवधि ।
> हा असतांचि उपाधि । आकळूं न सके ॥२३५॥
>
> जेथ न संचरे पुण्यपाप । जें सूक्ष्म अति निष्कंप ।
> गुणत्रयादि लेप । न लगती जेथ ॥२३६॥
>
> अर्जुना तें पुण्यवशें । जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे ।
> तरी अशेषही नाशे । संसारभय ॥२३७॥
>
> येर योगिये कर्माधारें । विहितेंचि निजाचारें ।
> पूर्णता अवसरें । पावतें होती ॥३.४४॥

कर्म म्हणजे शक्ती किंवा या शक्तीपासून उपस्थित होणारा योगच असल्याचे आपण मागे पाहिलेच आहे. ही कुंडलिनी शक्ती सद्‌गुरुकृपेने अगदी अल्पप्रमाणात जरी प्रथमतः हृदयात उदित झाली; तरी साधनाभ्यासाने हळूहळू ती पूर्ण विकसित होत असल्याने अशेष संसारभय नाहीसे होते म्हणून तिचाच आश्रय साधकाने केला पाहिजे. हाच खरा कर्माधार होय. "ज्ञानासि अग्नि मूळ ॥८.२१९॥, एथ अग्नी हें पहिलें पायतरें ॥८.२२३॥" व "आकळलेनि योगें । मध्यमा मध्यमार्गें । आग्नि-स्थानौनि निगे । ब्रह्मरंध्रा ॥८.९४॥" असे म्हणून ज्या अग्निस्थानाचा श्रीज्ञाने-श्वरमहाराजांनी उल्लेख केला आहे तेच ज्ञानाचे मूळ असून पहिले पायतरे म्हणजे आधारशक्ती कुंडलिनी आहे. यामुळेच ही आधारशक्ती अग्निमय असून तीच ध्यानास योग्य आहे. महायोगी गोरक्षनाथांनी "गोरक्षशतकामध्ये" हेच सांगताना असे म्हटले आहे की–

आधारं प्रथमं चक्रं स्वाधिष्ठानं द्वितीयकम् ।
योनिस्थानं द्वयोर्मध्ये कामरूपं निगद्यते ।।१०।।
आधाराख्ये गुदास्थाने पंकजं यच्चतुर्दलम् ।
तन्मध्ये प्रोच्यते योनिः कामाख्या सिद्धवंदिता ।।११।।
योनिमध्ये महालिंगं पश्चिमाभिमुखं स्थितम् ।
मस्तके मणिवद्भिन्नं यो जानाति स योगवित् ।।१२।।
तप्तचामीकराभासं तडिल्लेखेव विस्फुरत् ।
चतुरस्त्रं पुरं वन्हेरधोमेढ्रात्प्रतिष्ठितम् ।।१३।।
आधारं प्रथमं चक्रं तप्तकांचनसन्निभम् ।
नासाग्रे दृष्टिमादाय ध्यात्वा मुंचति किल्बिषम् ।।७८।।

आधार हे प्रथमचक्र आहे. स्वाधिष्ठान हे दुसरे चक्र आहे. या दोन चक्रांमध्ये कामरूप नावाचे योनिस्थान आहे. गुदास्थानी असलेले हे आधारचक्र चार पाकळ्यांचे कमळ असून त्यामध्ये कामाख्या नावाचे सिद्धांकडून नेहमी वंदित होणारे योनिस्थान आहे. या योनीमध्ये सुषुम्नेच्या द्वारावर पश्चिमाभिमुख असे महालिंग असून त्याचे मस्तक एखाद्या रत्नाप्रमाणे झळकत असते. जो हे जाणतो त्यालाच योग जाणणारा असे म्हणतात. लिंगाच्या शेवटच्या टोकाला चतुष्कोनयुक्त असे अग्नीचे घर आहे. तेथे हा अग्नी विजेच्या लखलखाटाप्रमाणे प्रकाशत असतो व तप्त सुवर्णाप्रमाणे झळकत असतो. अशा प्रकारे पहिल्या आधारचक्राच्या ठिकाणी ही अग्निरूप चित्‌शक्ती कुडलिनी तापलेल्या सोन्याच्या कांतिप्रमाणे दिसते. जो नासाग्री दृष्टी ठेवून या चित्‌शक्ती कुंडलिनीचे ध्यान करतो तो सर्व पातकांपासून व वासनांपासून मुक्त होतो. "ध्यानबिंदू व योगकुंडल्युपषनिदात" उपरोक्त श्लोक असेच उधृत केलेले आढळतात.

आधारशक्तीचा आश्रय अशा प्रकारे अत्यावश्यक असल्याने "म्हणौनि संगू जंव प्रकृतीचा । तंववरी त्यागु न घडे कर्माचा । ऐसियाहि करू म्हणती तयांचा । आग्रहोचि उरे ।।३.६३।।" असा सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडला आहे. याचे खरे कारण असे आहे की, "तैसें प्रकृतिआधारें । कर्मेंद्रियविकारें । नैष्कर्म्यंही व्यापारें । निरंतर ।।३.६२।।" अशी वास्तविक स्थिती असल्याने नैष्कर्म्य म्हणजे परब्रह्मरूपी शिवच या प्रकृतिरूपी आधारशक्ती कुंडलिनीच्या साहाय्याने कर्मेंद्रियविकारयुक्त होऊन पिंडब्रह्मांडाच्या उभारणीचा व्यापार निरंतर करीत असतो. अशा वेळी हा उभारणीचा भासात्मक व्यापार मिटविण्यासाठी या शक्तीचाच आधार "दैवें अनुक्रमाधारें । स्वधर्मु जो आचारे । तो मोक्षु तेणें व्यापारें । निश्चित पावे ।।३.८०।।" या न्यायाने घेणे क्रमप्राप्तच ठरते. "पतन व उत्थान या दोहोंचे एकच कारण आहे. अज्ञानी ज्यामुळे बांधला जातो त्यामुळेच ज्ञानी मुक्त होतो,

असे "कलयुक्ती" ग्रंथातील वचन भट्ट कल्लटाने "स्पंदशास्त्रात" उल्लेखून उपरोक्त आधारशक्तीच्या द्विविध रहस्याचे उद्‌घाटन केले आहे. "इंद्रियें गुणाधारें। राहाटती निजव्यापारें। तें परकर्म बलत्कारें। आपादी जो ॥३.१८५॥" अशा प्रकारे जीव नेहमीच गुणाधार कुंडलिनी शक्तीच्या बलत्काराने होणाऱ्या परकर्माची म्हणजे बहिर्मुखतेत अडकून स्वतःवर भ्रमाने बळेच जीवत्वरूपी कल्पनेची आपत्ती ओढवून घेत असतो. हेच या शक्तीमुळे होणारे पतन होय. अशावेळी स्वतःच्या अभ्युत्थाना-साठी "मार्गाधारें वर्तावें। विश्व हें मोहरें लावावें ॥३.१७१॥" यारीतीने साधकाने आधारशक्ती कुंडलिनीच्या सुषुम्नामार्गाने जावे असेच श्रीज्ञानेश्वरमहा-राजांचे सांगणे आहे. यालाच उत्थान म्हणतात. या मार्गाधारात शिव, जीव, शक्ती, वन्ही, वायू, बिंदू, नाद, हंस, मन इत्यादि सर्वांचा समावेश होत असून जेव्हा शक्ती ऊर्ध्वगामी होते तेव्हा तिच्यापासूनच उत्पन्न झालेल्या या सर्व गोष्टींचा ती आपल्यात समावेश करते. ह्या पतनोत्थानाच्या दोन्ही गोष्टी कशा घडतात हे सांगताना "योगशिखोपनिषदात" असे म्हटले आहे की–

> गुदमेढ्रांतरालस्थं मूलाधारं त्रिकोणकम्।
> शिवस्य जीवरूपस्य स्थानं तद्धि प्रचक्षते ५५॥
> यत्र कुंडलिनी नाम परा शक्तिः प्रतिष्ठिता।
> यस्मादुत्पद्यते वायुर्यस्माद्वन्हिः प्रवर्तते ॥६॥
> यस्मादुत्पद्यते बिंदुर्यस्मान्नादः प्रवर्तते।
> यस्मादुत्पद्यते हंसो यस्मादुत्पद्यते मनः ॥७॥
> तदेतत् कामरूपाख्यं पीठं कामफलप्रदम् ॥८॥

गुदा व जननेंद्रिय यांच्यामध्ये त्रिकोणाकृती मूलाधारचक्र आहे. हेच शिवाचे व जीवाचे स्थान आहे. येथेच म्हणजे या स्थानातच कुंडलिनी नावाची श्रेष्ठशक्ती प्रतिष्ठित झालेली असते. तिच्यापासूनच वायू, अग्नी, बिंदू, नाद, हंस व मन या गोष्टी उत्पन्न होतात. या आधारशक्तियुक्त चक्रकालाच कामरूपपीठ म्हणतात. हे पीठ सर्व कामना पूर्ण करणारे आहे.

असा हा शक्तीचा होणारा बाह्यविकास म्हणजे पिंडब्रह्मांडाच्या प्रसवक्रमाचा इतिहास कथन केल्यावर उपरोक्त उपनिषदातच तिच्यामुळे होणाऱ्या प्रतिप्रसवक्रमाचा इतिहास पुढीलप्रमाणे कथन केला आहे. ऋषी म्हणतात–

> अधश्चोर्ध्वं च कुंडल्याः सर्वद्वारनिरोधनात् ॥६.१५॥
> वायुना सह जीवोर्ध्वंज्ञानान्मोक्षमवाप्नुयात् ॥१६॥
> केचिद्वदंति चाधारं सुषुम्ना च सरस्वती।
> आधाराज्जायते विश्वं विश्वं तत्रैव लीयते ॥२२॥
> तस्मात् सर्वप्रयत्नेन गुरुपादं समाश्रयेत्।
> आधारशक्तिनिद्रायां विश्वं भवति निद्रया ॥२३॥

तस्यां शक्तिप्रबोधेन त्रैलोक्यं प्रतिबुध्यते ।
आधारं यो विजानाति तमसः परमश्नुते ॥२४॥
तस्य विज्ञानमात्रेण नरः पापैः प्रमुच्यते ॥२५॥
आधारचक्रमहसा विद्युत्पुंजसमप्रभा ।
तदा मुक्तिर्न संदेहो यदि तुष्टः स्वयं गुरुः ॥२६॥
आधारचक्रमहसा पुण्यपापे निकृंतयेत् ।
आधारवातरोधेन लीयते गगनांतरे ॥२७॥
आधारवातरोधेन शरीरं कंपते यथा ।
आधारवातरोधेन योगी नृत्यति सर्वदा ।
आधारवातरोधेन विश्वं तत्रैव दृश्यते ॥२८॥
सृष्टिराधारमाधारमाधारे सर्वदेवताः ।
आधारे सर्ववेदाश्च तस्मादाधारमाश्रयेत् ॥२९॥
आधारे पश्चिमे भागे त्रिवेणीसंगमो भवेत् ।
तत्र स्नात्वा च पीत्वा च नरः पापात् प्रमुच्यते ॥३०॥
आधारे पश्चिमं लिंगं कवाटं तत्र विद्यते ।
तस्योद्घाटनमात्रेण मुच्यते भवबंधनात् ॥३१॥
आधारपश्चिमे भागे चंद्रसूर्यौ स्थिरौ यदि ।
तत्र तिष्ठति विश्वेशो ध्यात्वा ब्रह्ममयो भवेत् ॥३२॥
आधारपश्चिमे भागे मूर्तिस्तिष्ठति संज्ञया ।
षट्चक्राणि च निर्भिद्य ब्रह्मरंध्राद्बहिर्गतम् ॥३३॥
वामदक्षे निरुद्धंति प्रविशंति सुषुम्नया ।
ब्रह्मरंध्रं प्रविश्यंति ते यांति परमां गतिम् ॥३४॥

कुंडलिनी शक्तीच्या खालीवर असलेल्या सर्व मार्गांच्या निरोधाने या प्राणवायूच्या साहाय्याने जीव ऊर्ध्वगामी झाल्याने ज्ञानवान होऊन मुक्त होतो. काही विद्वान् लोक आधारशक्ती कुंडलिनी हीच सुषुम्ना व सरस्वती आहे असे म्हणतात. या आधार शक्ती कुंडलिनीपासूनच सर्व विश्व उत्पन्न होते व शेवटी तिच्यातच ते लीन होते. या याकरिता आधारशक्तीच्या प्राप्तीसाठी व ज्ञानप्राप्तीसाठी सर्वप्रयत्नाने शक्तिपात करणाऱ्या सद्गुरुचरणांचा आश्रय घ्यावा. ही आधारशक्ती झोपली म्हणजे बहिर्मुख झालेली असली की, सर्व विश्व निद्राधीन होते म्हणजे बाह्यप्रपंचव्यापार प्रवृत्त होते. ही कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, ती अंतर्मुख होऊन निद्राव्यापाराचा त्याग केल्याने त्रैलोक्य जागे होते.जो साधक या आधारशक्ती कुंडलिनीला जाणतो तो ज्ञानवान् होऊन अज्ञानांधकाराच्या पलीकडे जातो. या महाशक्तीच्या नुसत्या विज्ञानाने म्हणजे विशेष रीतीने ज्ञानस्वरूपाने जागृत होण्याने

साधक सर्व पापांपासून मुक्त होतो. जर गुरू संतुष्ट झाले व त्यांनी शक्तिपात केला तर विद्युल्लतेच्या पुंजाप्रमाणे तेजस्वी प्रभा असलेल्या आधारशक्ती कुंडलिनीच्या जागृतावस्थेच्या प्रभावाने साधकाला निःसंशयपणे मोक्ष मिळतो व सर्व पुण्यपापांचा नाश होतो. ज्यावेळी आधारशक्ती कुंडलिनी जागृत होते तेव्हा आपोआप वायुनिरोध होऊन तो सुषुम्नामार्गाने गगनात म्हणजे सहस्रारात जाऊन तेथे लीन होतो. ज्यावेळी आधारशक्ती कुंडलिनीच्या उद्‌बोधनामुळे प्राण क्षोभित होऊन आधारचक्रात निरोधित होतात किंवा थांबतात किंवा अडकतात तेव्हा साधकाचे शरीर कंपित होते अगर कंपायमान होते. मूलाधारात प्राणशक्तीचा अवरोध झाल्यामुळे साधकयोगी आनंदित होऊन नृत्य करू लागतो. आधारचक्रात वायूचा निरोध झाला की, साधकाला संपूर्ण विश्व तेथे दिसू लागते; कारण कुंडलिनी शक्ती हीच मूलाधारस्थित पिंडाचा व शेषरूपाने सर्व विश्वाचा आधार आहे. या आधारशक्ती कुंडलिनीच्या ठिकाणी सर्व देवदेवतांचा निवास असतो व सर्व वेद म्हणजे वेदांचे ज्ञान या शक्तीतच समाविष्ट झालेले असते. अशा रीतीने वाग्देवी वेदमयी ज्ञानशक्ती ही कुंडलिनीच्या रूपाने आधारात राहत असल्याने साधकाने एकमात्र तिचाच आधार घ्यावा. आधाराच्या पश्चिमभागी म्हणजे आज्ञाचक्रात इडा, पिंगला व सुषुम्ना या तीन नाड्यारूपी नद्यांचा संगम होतो. तेथे जो साधक स्नान करून ज्ञानामृताचे पान करतो तो सर्व पापांपासून मुक्त होतो. आधाराच्या पश्चिमभागात म्हणजे जरा वर स्वयंभू लिंग आहे. तेथेच सुषुम्नामार्गाचे प्रवेशद्वार किंवा ब्रह्मद्वार आहे. ज्यावेळी या ब्रह्मद्वाराला अडवून झोपलेली शक्ती जागृत होऊन ती या द्वारातून आत प्रवेश करते त्यावेळी मनुष्य समस्त संसारबंधनांपासून मुक्त होतो. आधाराच्या पश्चिमभागात म्हणजे आज्ञा-चक्रात जेव्हा चंद्र व सूर्य म्हणजे इडा व पिंगला या नाड्यातील प्राण एकवटून तेथे शक्तीसह स्थिर होतात त्यावेळी तेथे राहणाऱ्या विश्वेशाच्या ध्यानाने साधक ब्रह्ममय होतो. आधाराच्या पश्चिमभागातच परासंज्ञेच्या रूपाने सहस्रारात शिव प्रतिष्ठित असतात. ज्यावेळी जागृत शक्ती कुंडलिनी षट्चक्रांचा भेद करून शिवाशी समरस होते तेव्हा साधकयोगी ब्रह्मरंध्र ओलांडून पलीकडे जातो. अशा प्रकारे बहिर्मुखतेला म्हणजे पर्यायाने समस्त संसाराला प्रवृत्त करणाऱ्या वाम व दक्षिण किंवा इडा व पिंगला या नाड्यातील प्राणांचा निरोध होऊन ते कुंडलिनीसह सुषुम्नेत प्रवेश करतात व शेवटी ब्रह्मरंध्रात ज्यावेळी ते लीन होतात त्याचवेळी साधकाला परमगती प्राप्त होते.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही सर्व प्रकारच्या पतनोत्थानाला प्रकृती, मायादि भिन्न नावांनी प्रसिद्ध असलेली चेतनस्वरूप अशी परमेश्वराशी समव्याप्ततेमुळे अवच्छेद्यरहित व अभिन्न असलेली आधारशक्तीच कारणीभूत होते, हे तिचे

उभारणी-संहारणी स्वरूप, प्रसव-प्रतिप्रसवक्रम किंवा जीव-शिवस्थिती दाखवून उभयविध पद्धतीने स्पष्ट करून महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" प्रकट केलेल्या "अस्ति काचिदपरंपरा संवित्स्वरूपा सर्वपिंडाधारत्वेन नित्यप्रबुद्धा निजाशक्तिः प्रसिद्धा कार्यकारणकर्तृणामुत्थानदशांकुरोन्मीलनेन कर्तारं करोति अतएव आधारशक्तिरिति कथ्यते ॥४.१॥ कुलमिति परा सत्ताहंता स्फुरत्ता कलास्वरूपेण सैव पंचधा विश्वस्याधारत्वेन तिष्ठति ॥४.३॥ बाह्येंद्रियव्यापार नानाचिंतामया सैवाधः शक्तिरित्युच्यते। अतएव योगिनः तस्या आकुंचने रता यस्या आकुंचनं मूलाधारबंधनात् सिद्धं स्यात् ॥१८॥ यस्माच्चराचरं जगदिदं चिदचिदात्मकं प्रभवति। तदेव मूलाधारं संवित्प्रसरं प्रसिद्धम् ॥१९॥ सर्वशक्तिप्रसरसंकोचाभ्यां जगत्सृष्टिः संहृतिश्च भवत्येव न संदेहः तस्मात्तां मूलमित्युच्यते। अतः प्रायेण सर्वे सिद्धाः मूलाधाररता भवंति ॥ २० ॥ स्थूलसूक्ष्मरूपेण महासिद्धानां प्रतीयते इति निश्चयः ॥२१॥ स्थूलेति निखिलग्राह्याधारविग्राह्यस्वरूपापि पदार्थान्तरैर्भ्राम्यमाणा चिद्रूपायावर्तते सा कुंडलिनी साकारस्थूला पुनस्त्वियमेव स्वप्रसारचातुर्यतया वर्तमाना योगिनां परानंदतया कुंडलिनी या निश्चयभूता वर्तते सा सूक्ष्मा निराकारा प्रबुद्धा महासिद्धानां मते प्रसिद्धा ॥२२॥" या महासिद्धांताचेच प्रकटीकरण केले आहे. जिला कोणतीही परंपरा नाही म्हणजे जी स्वतःच एक परंपरा आहे अशी अपरंपरायुक्त, ज्ञानस्वरूप, सर्व पिंडांना आधार देणारी, नित्य जागृत अशी परमेश्वराची स्वतःची एक शक्ती प्रसिद्ध आहे. ही शक्तीच पिंडब्रह्मांडाच्या उभारणीचे किंवा प्रसवाचे कार्य करीत असल्याने या व्यापाराचे तीच कारण ठरते. आपल्या स्वसंकोचात्मक उत्थानदशेचे प्रकटीकरण ती अशा प्रकारचे कर्तृत्व प्रकट करून करीत असल्यामुळे तिलाच या कार्याचा कर्ता म्हणतात. म्हणून या कुंडलिनी शक्तीला आधारशक्ती म्हणतात. ही कुल नावाची कुंडलिनी शक्ती परा, सत्ता, अहंता, स्फुरत्ता व कला या पाच स्वरूपाने विश्वाचा आधार होऊन राहते. इंद्रियांना बहिर्मुख करून ही शक्तीच जीवाला बाह्येंद्रिय व्यापाराने नाना चिंतामय अशा जन्ममरणपरंपरारूपी संसारचक्रात घुमवीत राहते. त्यामुळेच हिला आधारशक्ती म्हणतात. त्यामुळे साधकयोगी या कुंडलिनीच्या आकुंचनासाठी नेहमी तत्पर राहतात. मूलाधारादि बंधनामुळे हे आकुंचन सिद्ध होते. अशा प्रकारे कुंडलिनी शक्तीला स्वसंकोच सोडावयास लावून जेव्हा साधकयोगी तिच्या स्वप्रसरणात्मक स्थितीला अंतरतः सुषुम्नेत उद्युक्त करतो तेव्हा सर्व चराचरात्मक जगत् चित्चैतन्याने भरून गेले आहे असे त्याला अनुभूत होते. यामुळेच ही मूलाधारस्थ शक्ती कुंडलिनी ज्ञानवृद्धी करणारी म्हणून प्रसिद्ध आहे. अशा प्रकारे या सर्वशक्तिमान कुंडलिनीशक्तीच्या प्रसार व संकोच या उभयविध अवस्थेत जगताची उभारणी व संहारणी होत असते याबद्दल संदेह नाही. यामुळेच या कुंडलिनी शक्तीला मूलाधारशक्ती

असे म्हणतात. यामुळे सर्व सिद्धयोगी या मूलाधारशक्तीच्या ध्यानात तत्पर राहतात. अशा प्रकारे स्थूल व सूक्ष्म रूपाने दोन प्रकारच्या भेदाने ही कुंडलिनी शक्ती महासिद्धांना प्रतीत होते. ही कुंडलिनी शक्ती शब्दात्मक स्थूल जगत् व अर्थात्मक सृष्टी उत्पन्न करून त्यांच्या विग्रहरूपाने सर्व पदार्थमात्रात भ्रमण करीत असल्यामुळे निखिल प्रपंचात्मक चराचर जगताच्या रूपाने साकार झालेल्या या एकमेव मूलाधारयुक्त ग्राह्यशक्तीला स्थूलशक्ती असे म्हणतात. ज्यावेळी ही सद्‌गुरुकृपेने जागृत होऊन साधकयोग्याच्या ठिकाणी आपल्या शिवस्वरूपाच्या प्रसाराचे चातुर्य प्रकट करते त्यावेळी ती आपले परमआनंददायक, ज्ञानमय व अखंड व्यापक रूप घेऊनच निश्चयात्मक रीतीने साधकाच्या ठिकाणी सिद्ध होते. यामुळेच या जागृत कुंडलिनी शक्तीला महासिद्धयोगी निराकार व सूक्ष्म शक्ती असे म्हणतात.

हा महासिद्धांत एकदा पूर्णपणे आत्मसात झाला म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्या पद्धतीने ज्ञानेश्वरीत प्रकृती, माया, सत्ता, अहंता, स्फुरत्ता, परा व कला इत्यादि रूपाने जे पिंडब्रह्मांडाच्या उभारणी-संहारणीचे कुंडलिनी शक्तिस्वरूपात्मक उभयविध रूप स्पष्ट केले आहे त्याची अंतःकरणात प्रतीती येईल. हे द्विविध स्वरूप स्पष्ट करताना ते म्हणतात—

म्हणौनि हें आघवें । मागील मज आठवें ।<br>
मी अजुही परि संभवें । प्रकृतियोगें ॥४.४४॥<br>
माझें अव्ययत्व तरी न नसे । परी होणें जाणें एक दिसे ।<br>
तें प्रतिबिंबें मायावशें । माझ्याचि ठायीं ॥४५॥<br>
माझी स्वतंत्रता तरी न मोडे । परी कर्माधीनु ऐसा आवडे ।<br>
तेही भ्रांतिबुद्धि तरी घडे । एऱ्हवीं नाहीं ॥४६॥<br>
कीं एकचि दिसे दुसरें । तें दर्पणाचेनि आधारें ।<br>
एऱ्हवीं काय वस्तुविचारें । दुजें आहे ? ॥४७॥<br>
तैसा अमूर्तचि मी किरीटी । परी प्रकृति जैं अधिष्ठीं ।<br>
तैं साकारपणें नट नटीं । कार्यालागीं ॥४८॥<br>
तरी हेचि प्रकृती किरीटी । मी स्वकीया सहजें अधिष्ठीं ॥<br>
तेथ तंतुसमवाय पटी । जेंवि विणावणी दिसे ॥९.१०६॥<br>
मग तिये विणावणीचेनि आधारें । लहाना चौकडिया पटत्व भरे ।<br>
तैसीं पंचात्मकें आकारें । प्रकृतीचि होय ॥१०७॥<br>
जैसें विरजणियाचेनि संगें । दूधचि आटेजों लागे ।<br>
तैशी प्रकृति आंगा रिगे । सृष्टीपणाचिया ॥१०८॥<br>
बीज जळाची जवळीक लाहे । आणि तेचि शाखोपशाखीं होये ।<br>
तैसें मज करणें आहे । भूतांचें हें ॥१०९॥

किंबहुना यापरी । मी निजप्रकृति अंगिकारीं ।
आणि भूतसृष्टी एकसरी । प्रसवोंचि लागे ॥११७॥
तैसें अनेकीं भूतजातीं । जें आहे एकी व्याप्ती ।
विश्वकार्या सुमती । कारण जें गा ॥१३.९२०॥
म्हणौनि हा भूताकारु । जेथोनि तेंचि तया आधारु ॥
कल्लोळा सागरु । जियापरी ॥९२१॥
तैसीं चंद्रसूर्यादि थोरें । इयें तेजें जियें फारें ।
तियें जयाचेनि आधारें । प्रकाशतीं ॥१५.३११॥
ते वस्तु कीं तेजोराशी । सर्वभूतात्मक सरिसी ।
चंद्रसूर्याच्या मानसीं । प्रकाशे जे ॥३१२॥
म्हणौनि चंद्रसूर्य कडवसां । पडती वस्तूच्या प्रकाशा ।
यालागीं तेज जें तेजसा । तें वस्तूचें आंग ॥३१३॥

येथपर्यंत वस्तूच्या म्हणजे परब्रह्माच्या आधारशक्ती कुंडलिनीमुळे प्रकृती, माया इत्यादि नामांच्या द्वाराने अमूर्तच समूर्त झाल्यासारखे कसे भासते हे वर्णन केल्यावर ही भूताधार कुंडलिनी शक्तीच आपले सकलग्रासात्मक स्वरूप सद्‌गुरुकृपेने जागृत झाल्यावर कसे प्रकट करते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ते वेळी आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होऊनि अवतरें ।
मग अज्ञानाचें आंधारें । गिळूनि घालीं ॥४.५१॥
मी विवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं ।
तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥५४॥
जयाचेनि वाक्य उजिवडें । जाहलें चित्त निधडें ।
ब्रह्माचेनि पाडें । निःशंकु होय ॥१६८॥
तैं वेळीं आपणपेयां सहितें । इयें अशेषेंही भूतें ।
माझ्या स्वरूपीं अखंडितें । देखसी तूं ॥१६९॥
ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल । तैं मोहांधकारु जाईल ।
जैं गुरुकृपा होईल । पार्था गा ॥१७०॥
आतां येणें उजिवडें निरुतें । न्याहाळीं पां ऐश्वर्ययोगातें ।
जे माझ्या ठायीं भूतें । परी भूतीं मी नसें ॥९.१३३॥
आणि जयाच्या प्रकाशीं । जग हारपे चंद्रार्केसीं ।
सचंद्र नक्षत्रें जैसीं । दिनोदयीं ॥१५.३१४॥
नातरी प्रबोधलिये वेळे । ते स्वप्नींची डिंडिमा मावळे ।
कां म्हरेची सांजवेळे । मृगतृष्णिका ॥३१५॥
तैसा जिये वस्तूच्या ठायीं । कोण्हीच कां आभासु नाहीं ।
तें माझें निजधाम पाहीं । पाटाचें गा ॥३१६॥

असे हे आधारशक्ती कुंडलिनीचे संहारणी करणारे स्वरूप आहे. येथपर्यंत आपण तिचे जे उभारणी-संहारणीयुक्त द्विविध स्वरूप पाहिले तेच स्वरूप स्पष्ट करताना "सौंदर्यलहरीवरील हिंदी टीकेत" प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामी-महाराज म्हणतात, "परमात्माकी अनंत शक्ति अणु-अणुमें अनंतही परिपूर्ण है। अनंत भंडारसे प्रवाहित शक्ति सक्रिय (Dynamic) होकर अनंत कार्य करके भी समाप्त नहीं होती, वरन् अनंतही बच रहती है। यदि सव समाप्त हो जाय, तो वह अनंत पदवाच्य नहीं। ब्रह्मांडकी रचना करके जो अनंत शक्ति वच रहती हैं, वह आणविक रूप धारण करनेके लिये मानो कुंडलोंमें घूमने लगती है और उसके कुंडलाकृति रूपोंके कारण उसको सर्पसे उपमा दी जाती है। उसे अथर्ववेदमें उच्छिष्ठ ब्रह्म कहा है ( देखे अथर्ववेदीय उच्छिष्ठ सूक्त ) और पुराणोंमें उसेही नारायणकी सेज बनानेवाला शेष ( वचा हुआ ) कहा हैं, उसको अनंतभी कहते हैं। उस शेष या उच्छिष्ठ शक्तिका ब्रह्मांडके धारण करनेमें उपयोग होता है। मानो वह ब्रह्मांडको अपने हजार फणोंपर धारण किये हुए हैं। शेष शक्ति विश्वको धारण करती है, इसीलिये उसकी संरक्षक और आधार होनेके नाते विष्णु-नारायण-काही रूप है। पिंड शरीरकी रचनाके उपरांत जो शक्ति बच रहती है, वह मूलाधारमें शरीरको धारण किये हुए प्रसुप्तवत् पडी रहती है; इसीलिये उसको आधारशक्तिभी कहते हैं, उसी को कुंडलिनी कहते है, यही शक्ति जागकर प्रतिप्रसव क्रमका आरंभ करती है और सब तत्त्वोंको लयाभिमुख करती हुई शिवमें लीन होनेको सुषुम्ना मार्गसे सहस्रारमें चढने लगती है, मानो सब तत्त्वोंको भस्म करके, शिवजीके अंगकी विभूति वना देती है। यह लय–क्रम मोक्षमार्ग है।" ( पृ.६८-६९ ) कुंडलिनी शक्तीचे हे उभयविध तांडवनृत्य असून ते मूलाधारात कसे प्रकट होते हे सांगताना श्रीमदाद्यशंकराचार्य "सौंदर्यलहरीत" म्हणतात–

> तवाधारे मूले सह समयया लास्यपरया
> शिवा (नवा) त्मानं मन्ये नवरस महातांडवनटम्।
> उभाभ्यामेताभ्यामुदय विधिमुद्दिश्य दययां
> सनाथाभ्यां जज्ञे जनकजननीमज्जगदिदम् ॥४१॥

हे माते कुंडलिनी शक्ती ! मूलाधारात समयानामक शक्तीचे रूप घेऊन लास्यनृत्य करण्यास उद्युक्त झालेल्या तुझ्या शक्तीसह नवरसांनी ओथंबलेले तांडव-नृत्य करणाऱ्या व आनंदभैरवरूप उत्कृष्ट नट असलेल्या शिवाची मी उपासना करतो. हे जगत् या दोघांमुळे जनकजननीप्रमाणे दयायुक्त होऊन उत्पन्न झाल्यामुळे सनाथ झाले आहे. यावर टीका करताना प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज म्हणतात, "यह समस्त जड-चेतनमय विश्व शंकर भगवान्‌के अविराम तांडवनृत्यका अभिनय है और उनके तांडवके अंगहार अथवा अंगविक्षेपही मानो सत्‌शक्तिके

परिणामक्रमके विभिन्न स्तरोंपर उसकी स्वांगभरी नृत्यकलाएँ है, जिस श्रृंगारके नवधा-रस परिपूर्ण हाव-भावोंमें शंकरके चिदानंदस्वरूपका प्रत्याभास हो रहा है। इस नृत्यको आनंदब्रह्मके उन्मेषसे प्रेरणा मिलती है और प्रलयकालीन विराम भी नृत्यके परिश्रमके अनंतर विश्रामरूपी आनंदका आभोगरूपी निमेष है। शिवजीके इस आनंदोन्मेषरूपी तांडवको वेदोंने संवर्तन और शंकर भगवत्पादने विवर्तन कहा है।....यह सब विराट् विश्वसृष्टिप्रसारका निम्नतम स्तररूपी मूलाधार है, जिसमें भगवतीके इस लास्य नृत्य और शंकरके तांडवको युगपद देखनेवाले उपासक जीवनमुक्तिका आनंद लेते हैं। जो मूढ अपने तुच्छ स्वार्थोंके अंधकारवश इसका साक्षात्कार नहीं कर पाते और मिथ्या अज्ञानवश शोकमोहके कूपोंमें पडे रोते हैं, वे वास्तवमें दयाके पात्र हैं।" ( पृ. २४१.२४२ )

आधारशक्ती कुंडलिनी अशा प्रकारे शिवाशी अभिन्न राहून उपरोक्तप्रकारे द्विविधकार्यसंपन्न होत असल्यामुळे शिवस्वरूप भगवान् श्रीगोपालकृष्णमहाराजांनी मीच हा आधार आहे असे "भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ गीती ९.५॥" हे सांगून स्पष्ट केले आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

म्हणौनि परियेसी गा प्रियोत्तमा। यापरी मी विश्वेंसीं विश्वात्मा।
जो इया लटकिया भूतग्रामा। भाव्यु सदा ॥९.८४॥
रश्मीचेनि आधारें जैसें। नव्हे तेंचि मृगजळ आभासे।
माझ्याठायीं भूतजात तैसें। आणि मातेंहीं भावी ॥८५॥
मी ये परीचा भूतभावनु। परि सर्व भूतांसि अभिन्नु।
जैसी प्रभा आणि भानु। एकचि ते ॥८६॥

सूर्य आणि त्याची प्रभा जशी एकच असते त्याप्रमाणे आधारशक्ती कुंडलिनी व परमात्मा हे एकरूपच आहेत. तिचे हे अपूर्व स्वरूप अधिक स्पष्ट करताना म. म. श्रीगोपीनाथ कविराज, "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, या ग्रंथातील "कुंडलिनी-तत्त्व" या लेखात असे म्हणतात की, "कुंडलिनीका दूसरा नाम आधार-शक्ति है। यह सभी पदार्थोंको आश्रय देती हुई संपूर्ण पदार्थोंके मूल-सत्ता-रूपमें वर्तमान रहती है। इसके चैतन्य संपादन करनेसे यह निराधार (निरालंब) होकर शुद्ध चित्स्वरूपमें स्थित हो जाती है, और जिस समय कुंडलिनी आधारशून्य हो जाएगी उस समय संसारकी सब वस्तुएँभी निराधार हो जाएँगी; तथा कुंडलिनी जिस समय प्रबुद्ध होकर चिन्मयी होती है, उस समय समस्त विश्वभी चैतन्यरूप धारण करता है। पारमार्थिक सत्ता आत्यंतिक साम्यावस्थास्वरूप है। उपनिषदोंनेभी इसके स्वरूप निर्देशके प्रसंगमें 'परमं साम्यम्'कहा है। इस मूल वस्तुमें नामरूपकी कल्पना,

त्विता तथा इसकी वर्णना नहीं हो सकती, यह अवाङ्मनसगोचर है। शक्तिका प्रसारही सृष्टि तथा उसका संकोचही संहार कहा जाता है। प्रसार और संकोच इन दोनोंके प्रारंभ तथा अंतमें साम्यावस्था रहती है। मध्यमें इसका वैषम्य या कालचक्रका आवर्त्तन रहता है। किंतु वैषम्यमेंभी साम्यावस्था अंतर्निहित होती है। सृष्टि और संहार-अर्थात् प्रसार और संकोच शक्तिका अनपायी स्वभाव या स्व-धर्म है। यह नियतरूपसे बराबर होताही रहता है। यह बहिर्गति और अंतर्गति, अधोगति एवं ऊर्ध्वगति, प्रवृति और निवृत्ति, सम्मिलित भावसे वृत्ताकार धारण करती हुई 'कालचक्र' नामसे पुकारी जाती है।"

स्वामी नारायणानंद यांनी "The Primal Power In Man or The Kundalini Shakti" या पुस्तकातील याच नावावर लिहिलेल्या पाचव्या प्रकरणात सुरुवातीलाच आधारशक्ती कुंडलिनी शक्तीचे परमेश्वराभिन्न सर्वात्मक स्वरूप श्रीज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणेच व्यक्त करताना असे म्हटले आहे की, "The physical body is the manifestion of the Kundalini Shakti (Primordial Power). The needs of the body are the needs of the Shakti. The joys and sufferings of the body are the joys and sufferings of the Shakti also. For, it is the Kundalini Shakti that enjoys and suffers through the body. The whole body and its manifold functions are the manifestations of the Kundalini Shakti. It is the Kundalini Shakti that polarises Itself in the living body in the potential and dynamic forms. Behind all the activites of the dynamic energy, there is a static-centre and such a centre in the human body is the sahasrara. But the dynamic - centre and the gross manifestation of the Kundalini shakti is at muladhara. This is the station, this is the power - house of all bodily-powers of a living man. This is the place of mind-stuff (chitta). This is the centre of the unconscious plane of the mind. All the powers of the mind, all the past and present experiences of the mind, intellect, will, ego, subtle body, senses and the gross body, are lying dormant in the Muladhara Chakra with the Kundalini Shakti. All memory proceeds from the Kundalini Shakti. All the past, present, and the future human and divine knowledge of a person lies dormant with the Kundalini Shakti at Muladhara.

The power, the Shakti that resides in Muladhara and that which works the whole body and mind, is called Kundalini Shakti or the primal Power in man."

आपले भौतिक किंवा स्थूल शरीर हा कुंडलिनी शक्तीचा अर्थात् आदि शक्तीचा आविष्कार आहे. शरीराच्या गरजा या शक्तीच्याच गरजा आहेत. शरीराची सुख-दुःखे ही शक्तीचीच सुख-दुःखे आहेत; कारण ही कुंडलिनी शक्तीच शरीराच्या द्वारा सुख-दुःखे भोगीत असते. संपूर्ण शरीर व त्याची विविध कार्ये हाही कुंडलिनी शक्तीचाच आविष्कार असतो. शरीरातील सुप्त व व्यक्त शक्तींचे संतुलन ही शक्तीच राखते. शरीरातील सर्व शक्तिशाली क्रियांच्यामागे एक अचल व स्थिर असे केंद्र असते. सहस्रार हे अशा प्रकारचे मानवी शरीरातील केंद्र आहे; परंतु कुंडलिनी शक्तीचे अत्यंत शक्तिशाली केंद्र मूलाधार हेच असून तेथेच तिचा समग्र आविष्कार प्रकट होतो. मनुष्याच्या शरीरात ज्या सर्व शक्ती दिसतात त्यांचे हेच स्थानक किंवा शक्तिपुरवठागृह आहे. हेच चित्ताचे स्थान आहे. मनाच्या सर्व शक्ती, मनाचे वर्तमान व भविष्यकालीन अनुभव, बुद्धी, इच्छा, अहंकार, सूक्ष्म शरीर, वृत्ती व समग्र शरीर या सर्व गोष्टी कुंडलिनी शक्तीबरोबर मूलाधारचक्रात निद्रा घेत पडलेल्या असतात. सर्व स्मृती किंवा आठवणी ह्या कुंडलिनी शक्तीपासूनच उत्पन्न होतात. माणसाचे भूत, वर्तमान व भविष्यकालीन दिव्यज्ञान कुंडलिनी शक्तीतच समाविष्ट होऊन मूलाधारात सुप्तावस्थेत स्थित असते. अशा प्रकारे जी शक्ती मूलाधारात राहते व शरीर आणि मनाच्या द्वारा कार्यान्वित होते तिलाच कुंडलिनी शक्ती किंवा माणसातील आदिशक्ती असे म्हणतात.

सर जॉन वुड्रॉफ यांनीही " The Serpent Power " या ग्रंथात मूलाधार-शक्ती कुंडलिनीचे वर्णन करताना असे म्हटले आहे की, " The Shakti or energy, the development of wich is the subject of these treatises, is called the Kundalini. The place where it resides is called the Muladhara ( original abode ). By a successful develpoment and working of this Shakti the liberation of the soul is attained. In the ordinary condition Kundalini sleeps quietly at the Muladhara. " (Page 282 )

शक्ती किंवा स्फूर्तीलाच कुंडलिनी शक्ती म्हणतात. तिचे संवर्धित स्वरूप स्पष्ट करणे हाच या प्रकारच्या प्रबंधांचा हेतू किंवा विषय आहे. ती जेथे राहते त्याला मूलाधार किंवा मूलगृह असे म्हणतात. या शक्तीच्या यशस्वी ऊर्ध्वचालनाने व कार्योन्मुखतेमुळे जीवाला आत्मस्वातंत्र्य किंवा मुक्ती प्राप्त होते. मात्र सर्वसामान्य अवस्थेत कुंडलिनी शक्ती अत्यंत स्वस्थपणे मूलाधारात निद्रा घेत पहुडलेली असते.

" सारांश " श्रीदुर्गासप्तशती " ग्रंथामध्ये म्हटल्याप्रमाणे कुंडलिनी शक्ती हीच "आधारभूता जगतस्त्वमेका ।।११.४।। अशी सर्व जगाचा एकमेव आधार आहे. त्यामुळेच या ग्रंथात तिची स्वरूपात्मक स्तुती करताना असे म्हटले आहे की–

त्वं वैष्णवी शक्तिरनन्तवीर्या विश्वस्य बीजं परमासि माया ।
सम्मोहितं देवि समस्तमेतत् त्वं वै प्रसन्ना भुवि मुक्तिहेतु ।।११.६।।

तू अनंत बलसंपन्न व अमर्याद पराक्रमयुक्त अशी वैष्णवी शक्ती आहेस. चराचर विश्वाचे तू मूलकारण असून सर्वश्रेष्ठ मूलप्रकृती किंवा मूळमाया आहेस. हे संपूर्ण विश्व तू मोहून टाकले आहेस. तू प्रसन्न झालीस म्हणजे जागृत झालीस तरच तू मुक्तीचे कारण होतेस म्हणजे तू मोक्षप्रदा आहेस.

श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही " प्रपंचसारतंत्रात" मूलाधारशक्ती कुंडलिनीचे हे अपूर्व स्वरूप पुढीलप्रमाणे प्रकट केले आहे. ते म्हणतात–

मूलाधारात्स्फुरन्तीं शिखिपुरपुटवीतां प्रभां विद्युदाभा–
मार्कात्तन्मध्यगेंदोः स्रवदमृतमुचा धारया मंत्रमय्या ।
सद्यः संपूर्यमाणां त्रिभुवनमखिलं तन्मयत्वेन मंत्री
ध्यायन्मुच्येत वैरूप्यकदुरितजरारोगदारिद्र्यदोषैः ।।८.३५।।
मूलाधारात्स्फुरिततडिभा प्रभा सूक्ष्मरूपोद्–
गच्छन्त्यामस्तकमणुतरा तेजसां मूलभूता ।
सौषुम्नाध्वाचरणनिपुणा सा सविन्नानुबद्धा
ध्याता सद्योऽमृतमथः रवेः स्रावयेत्सार्धसोमात् ।।९.७।।

ज्या कुंडलिनी शक्तीचे ध्यान करणारा साधक कुरूपता, आध्यात्मिक दुःखे, वार्धक्य, व्याधी व दारिद्र्यादि दोषांपासून मुक्त होतो, त्या शक्तीचे स्वरूप पुढीलप्रमाणे आहे. ही शक्ती मूलाधारचक्रापासून स्फुरण पावणारी, विजेप्रमाणे कांतियुक्त, जठराग्नीच्या मार्गातून जाणारी, सूर्यनाडी व चंद्रनाडी यांमधून संचार करणारी व मंत्रमय अशा अमृतस्राव करणाऱ्या धारेने संपूर्ण भरलेली आहे. हे सर्व त्रिभुवन त्या कुंडलिनीने व्यापिलेले आहे, असे ध्यान करणारा साधक उपरोक्त सर्व दोषांपासून दूर राहतो किंवा सुटतो. ज्या कुंडलिनी शक्तीचे ध्यान केले असता ती अमृताचा स्राव करते तिचे वर्णन असे आहे. ही शक्ती मूलाधारचक्रापासून मस्तकापर्यंत अर्थात् सहस्रारचक्रापर्यंत जाणारी आहे. ती अत्यंत सूक्ष्म किंवा अणुरूप, सर्व तेजांचे मूळ कारण, लख्खकन् स्फुरण पावणाऱ्या विद्युच्छलाकेप्रमाणे तजोमय, सुषुम्नानाडीच्या मार्गात संचार करण्यात चतुर, सूर्याशी संबंधित असणारी व अर्धचंद्रापासून अमृताचा स्राव करणारी आहे.

सारांश, उपरोक्त सर्व विवेचनाचे सार "आधारशक्तीचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं । हृदयाकाशपल्लकीं । परिये देसी निजे ।।१२.५।।" या श्रीज्ञानेश्वरमहा–

राजांच्या म्हणण्यात साठविलेले असल्याने हेच ज्ञानेश्वरीतील आधारशक्ती कुंडलिनीचे गुरुकृपादृष्टीने प्राप्त होणारे साररूप रहस्य व स्वरूप आहे.

**जगदंबा कुंडलिनी शक्ती :—**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ते कुंडलिनी जगदंबा। जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा। जया विश्वबीजाचिया कोंभा। साउली केली ॥६.२७२॥" असे म्हणून कुंडलिनी शक्ती ही जगदंबा असून ती चैतन्यचक्रवर्ती शिवाची त्याच्याशी एकरूप, अभिन्न, समव्याप्त, अवच्छेद्य, अंगभूत व स्वरूपतःच असलेली साक्षात् शोभा आहे व या जगदंबारूपी कुंडलिनी शक्तीनेच विश्वबीजाच्या कोंबरूपी जीवावर साउली धरली आहे हे सांगून कुंडलिनी शक्तीचे मातृरूप स्पष्ट केले आहे. ही जगदंबा म्हणजे साक्षात् शक्तिपाताच्या सामर्थ्याने संपन्न झालेली सद्गुरूची कृपादृष्टीच असून ज्यावेळी ती जीवावर आपल्या जागृतीच्या रूपाने दया करते व त्याला आश्रय देते त्यावेळी तो जीव सकलविद्यासंपन्न साक्षात् ब्रह्मदेवच होतो. जगदंबा कुंडलिनीचे हे स्वरूप स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

जय जय वो शुद्धे। उदारे प्रसिद्धे।
अनवरत आनंदें। वर्षतिये ॥१२.१॥
विषयव्याळें मिठी। दिधलिया नुठी ताठी।
ते तुझिये गुरुकृपादृष्टी। निर्विष होय ॥२॥
तरी कवणातें तापु पोळी। कैसेनि वो शोकु जाळी।
जरी प्रसादरसकल्लोळीं। पुरें येसि तूं ॥३॥
योगसुखाचे सोहळे। सेवकां तुझेनि स्नेहाळे।
सोऽहंसिद्धीचे लळे। पाळिसी तूं ॥४॥
आधारशक्तीचिया अंकीं। वाढविसी कौतुकीं।
हृदयाकाशपल्लकीं। परिये देसी निजें ॥५॥
प्रत्यक्ज्योतीचीं वोवाळणीं। करिसी मनपवनाचीं खेळणीं।
आत्मसुखाचीं बाळलेणीं। लेवविसी ॥६॥
सतरावियेचें स्तन्य देसी। अनुहताचा हल्लरू गासी।
समाधिबोधें निजविसी। बुझाऊनि ॥७॥
म्हणौनि साधकां तूं माउली। पिके सारस्वत तुझिया पाउलीं।
या कारणें मी साउली। न संडीं तुझी ॥८॥
अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी। तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी। धात्रा होय ॥९॥
म्हणौनि अंबे श्रीमंते। निजजनकल्पलते।
आज्ञापीं मातें। ग्रंथनिरूपणीं ॥१०॥

हे जगदंबा कुंडलनी शक्तीचे साररूप स्वरूप आहे. मूलाधारात अज्ञानावृत होऊन विषयव्याळाने मिठी दिल्यामुळे जीवरूपाने झोपलेली ही शक्ती जेव्हा सद्गुरुकृपा-दृष्टीने म्हणजे त्यांनी शक्तिपात केल्याने आपले अज्ञानावरण टाकून सुषुम्नाप्रवेशाने ज्ञानरूपाने आविर्भूत होते तेव्हा ती सिद्धयोगसंपन्न होऊन तिला सोऽहं सिद्धीची प्राप्ती, प्रत्यक् ज्योतीची प्राप्ती, मनपवनाचे शक्तीशी विलीनीकरण, अनाहतध्वनीची प्राप्ती, सहस्रारातील अमृतस्वरूप सतराव्या कलेची प्राप्ती, सकल विद्यांचे व सारस्वताचे उद्घाटन व समाधीची प्राप्ती होते व शेवटी या सर्वांमुळेच अज्ञानरूपी तापशोकादि विषयदुःखांचा नाश करून सर्व प्रसादरसाचा परिपूर्ण कल्लोळ ती साधकाच्या ठिकाणी स्वतःहून प्रकट करते. हाच सिद्धयोगसाधनमार्गाचा समग्र इतिहास आहे. या जगदंबेच्या कृपेशिवाय मार्गप्राप्ती, मार्गप्रवेश व मार्गसिद्धी होत नसल्यामुळे ही आरंभापासून अखेरपर्यंत अधिष्ठात्री देवता आहे. ती उपरोक्तप्रकारे जीवावर सावली व त्याच्यावर करुणरसपरिपूर्ण होऊन कृपा करीत असल्यामुळे तिच्या सामर्थ्याची कोणाबरोबरही तुलना करता येणे शक्य नाही. या दृष्टीने ती एकमेवाद्वितीयच आहे. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराज जगदंबा कुंडलिनी शक्तीला श्रीमंत म्हणतात. आपल्या सकल औदार्याची उधळण जीवावर करून त्याला शिवस्वरूप करण्यात ही माता सकलार्थाने सदैव तत्पर असल्याने ती श्रीमंत आहे यात शंकाच नाही. तिचे हे साधनात्मक व तात्त्विक स्वरूप सकल आगमनिगमशास्त्रांना आकळता न आल्याने त्यांनी बहुतेक ठिकाणी तिच्या फक्त स्तुतीचाच आश्रय केला आहे. असे असले तरी ही देवी जगदंबा कुंडलिनी शक्ती शब्दब्रह्मात्मक असल्याने " शब्दब्रह्मणि निष्णातः परं ब्रह्माधिगच्छति ।। अमृ. बि.उ. ५.१७।।" या वेदांतवचनाच्या आधाराने शब्दब्रह्मात म्हणजे जगदंबा कुंडलिनीशक्तिस्वरूप सिद्धयोगात निष्णात झाले की, परब्रह्माची प्राप्ती होते, असा अमर सिद्धांत वेदांनी प्रस्थापित केला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शब्दब्रह्मात्मक कुंडलिनी शक्तीचा महिमा सांगून तिचे हे स्वरूप प्रकट करताना असे म्हटले आहे की—

> **जैसें बिंब तरी बचकें एवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें ।**
> **शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ।।४.२१४।।**
> **आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे ।**
> **मन सुखेंसी सुरवाडिजे । सुखाचि माजीं ।।६.२५।।**

शब्द म्हणजे कुंडलिनी शक्तीची व्याप्ती जीवरूपाने अगदी थोडी असली तरी जेव्हा सद्गुरुकृपेने या जगदंबा कुंडलिनी शक्तीचे अनादि अज्ञानरूपी किंवा निद्रारूपी टरफल तिच्या जागृतीने काढून टाकले जाते तेव्हा ही शब्दब्रह्ममयी जगदंबा कुंडलिनी शक्ती स्वसंकोचाने चंद्रबिंबाप्रमाणे बचक्याएवढी जरी लहान झालेली असली तरी ज्यावेळी उपरोक्त प्रकाराने ती जागृत होऊन तिचा स्वसंकोच दूर होऊन ती आपले अपरंपार प्रकाशरूप घेऊन ऊर्ध्वोन्मुख होते तेव्हा तिच्या या

शिवरूपात संपूर्ण त्रैलोक्य थोकडें वाटू लागते. एवढेच नव्हे तर आपल्या अलौकिक व अपूर्व जागृत सामर्थ्याने ती ब्रह्मस्वरूपाशी एकरूप होत असल्याने साधक सुखामध्ये रंगून जाऊन सुखरूप होऊन सुखच भोगतो. साधनाने ही प्राणरूप कुंडलिनी शक्ती जेव्हा सहस्रारात येते तेव्हा तिचे शब्दरूप मावळत असल्याने "पाठीं तेथेंचि तो भेसळला । तैं शब्दाचा दिवो मावळला ॥६.३१४॥" असे म्हणून शब्दब्रह्मरूपी कुंडलिनी जगदंबा शक्ती परब्रह्मरूपी शिव कशी होते हे श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी स्पष्ट केले आहे. वास्तविक पाहता परब्रह्म हे "जें शब्दातीत स्वभावें ॥५.६८॥" असेच आहे; कारण ते शब्दातीत आत्मरूप शब्दब्रह्माला ओलांडून पलीकडे असलेले; पण स्व-भावयुक्त म्हणजे आपल्या शक्तीसह विलसणारे असे आहे. त्यामुळे "तें बोलींचि जरी फावे । तरी आणिकें काय करावें । कथा सांगै ॥५.६८॥" अशी जेव्हा संतश्रोत्यांनी आज्ञा केली तेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज "तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन । अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियाकरवीं ॥६.३६॥" अशी बलवत्तर प्रतिज्ञा "तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे । म्हणौनि ते अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥६.३५॥" अशा रीतीने सद्गुरुकृपेने स्वतःच्या ठिकाणी जागृत झालेल्या जगदंबा कुंडलिनी शक्तीच्या अपार बळाने तिचेच मूलभूत स्वरूप तिच्याच आधाराने तिच्याच स्वरूपात म्हणजे शब्दस्वरूपात व्यक्त करून अरूपाचे रूप दाखवून ते इंद्रियांकरवी भोगवीन म्हणून जेव्हा करतात; तेव्हा त्यांच्या ठिकाणी उद्भूत झालेल्या सद्गुरुस्वरूप जगदंबा कुंडलिनी शक्तीचे विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण सामर्थ्य किती अपार असेल याची हृदयात अंशात्मक अनुभूती येऊन मस्तक त्यांच्या चरणी अगदी नम्र होऊन जाते. "तेवींचि आइका आणिक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक । आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ॥१.३४॥" असे म्हणून त्यांनी गीता ही शब्दब्रह्मरूपी महालक्ष्मी जगदंबा कुंडलिनी शक्तीच असून तिच्यामुळेच गीतेला शास्त्राचे प्रामाण्य आले आहे आणि या शक्तीचे स्वरूप घेऊनच ही गीता साकार झालेली असल्यामुळे जीवाच्या ठिकाणी महाबोधजागृती करण्याचे सामर्थ्य गीतेच्या ठिकाणी अपरंपारपणे समाविष्ट झाले आहे हे स्पष्ट केले आहे.हीच गीतारूपी कुंडलिनी शक्तीची सुलभता व कोमलता आहे. त्यामुळे आपण जी कथा भावार्थाच्या रूपाने सांगणार आहोत ती जीवाने चित्त हळुवार करून अनुभवावी असा श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा आग्रह आहे; पण शब्दब्रह्म ओलंडल्याशिवाय किंवा त्याचा भेद झाल्याशिवाय हे घडणे कसे शक्य आहे? कारण शब्दाशिवाय म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या जडस्वरूपाचा त्याग झाल्यावरच म्हणजे ती सद्गुरुकृपेने सुषुम्नेत ऊर्ध्वोन्मुख झाल्यावरच ही अनुभूती व या कथेचा संवाद होत असल्याने "हें शब्देंवीण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे । बोलाआधि झोंबिजे । प्रमेयासी ॥१.५८॥" अशा प्रकारें तीव्रतीव्र शक्तिपाताने अपार

जागृती संपादून एका क्षणात शब्दब्रह्मभेद करून इंद्रियांना काही कळण्यापूर्वीच प्रमेयरूप किंवा शिवरूप व्हावे म्हणून जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात तेव्हा त्यांनी श्रोत्यांकडून जी अपेक्षा केली आहे ती इतकी मोठी आहे की, त्यासाठी महायोगी श्रीनिवृत्तिनाथांसारख्या किंवा महायोगी श्रीगुळवणीमहाराजांसारख्या असामान्य, लोकोत्तर व शिवस्वरूप सद्गुरूंचीच गाठ पडणे आवश्यक आहे याची खात्री पटते.

अशा प्रकारे या कुंडलिनी जगदंबेचे स्वरूप असल्याने "योगरहस्य" या ग्रंथात श्रीगुलाबरावमहाराज "कुंडलिनी जगदंबा" या प्रकरणात "ते कुंडलिनी जगदंबा ॥६.२७२॥" या ओवीवर टीका करून तिचा भावार्थ स्पष्ट करताना असे म्हणतात की–

सकल योगाचिया शक्ती । पार्था जेथ एकवटती ।
जियेते ब्रह्मवेत्ते वेदांती । स्तवनें बोलती शुद्ध बुद्धी ॥६॥
मांत्रिक बोलती अलौकिक शक्ती । जन्मसिद्ध अलोट बुद्धी म्हणती ।
जी प्रणवाची जन्मदाती । कुंडलिनी म्हणती योगी तिये ॥७॥
कुंडलाकार जिचे शयन । यालागीं कुंडलिनी अभिधान ।
कुंडल म्हणजे वर्तुळ पूर्ण । प्रणवाकार सिद्ध तो ॥८॥
प्रणवाची आद्य रेषा । तो कुंडलाकार वीरेशा ।
तेवीं कुंडलिनीचा ठसा । जाण विशेषा आदिपुरुषीं ॥९॥
प्राणप्रतिष्ठा करिता मूर्ती । जैसें देव आविर्भवती ।
कीं शून्य दाखवावया निश्चिती । बिंदु उपाधी करणें पडे ॥१०॥
कीं रूप दाखवावया जाण । पदार्थाचा आकार पूर्ण ।
उपाधि होय संपूर्ण । जयापरी ॥११॥
कां शब्द जरीं व्यक्त होवावा । तरी मुख उपाधि लागावा ।
उपाधिवांचोनी आघवा । शक्ति समुदायो व्यक्त नव्हे ॥१२॥
कीं अग्नि जरी व्यक्त करणें । तरी इंधनाची उपाधि घेणें ।
त्यावीण एवढा तेवढा म्हणणे । अग्निसी न लगे ॥१३॥
तैसी हृदयाची सत्त्वशक्ती । ते सूक्ष्म असे निश्चितीं ।
ती आणावया अभिव्यक्ती । एक नाडीची आकृती घेतली ॥१४॥
कंदावरी कुंडलाकार । नाडीचा असे आकार ।
तोचि तेथ करूनि ज्ञान प्रकार । शक्ति साचार व्यक्त करिती ॥१५॥
जैसे काष्ठ तंव आधीं श्वेत । परी अग्निसंगे होत आरक्त ।
तेवीं नाडीच पैं निश्चित । ध्यानसंगे कनकमय ॥१६॥
जी नाडीमय होती पूर्वीची । ती ध्यानें जाहली सुवर्णाची ।
सत्त्वगुणें चैतन्याची । अभिव्यक्ति ही ॥१७॥

सूर्यकांतामाजीं जाण । प्रतिबिंबे अदितिनंदन ।
तेवीं नाडीच सत्त्वमय होता जाण । श्रीपरमात्मा प्रतिबिंबे ।।१८।।

पद: – सुंदर कनकसमान । अंबा । सुंदर कनकसमान ।।धृ।।
योगी सांडुनी विषय कचाटे । ध्याती गत अभिमान ।।अंबा।।
प्रवण जपुनि निज अंतरीं । मिळविती प्राणापान ।।अंबा।।
माया कुंडलिनी ही नांवे । केवळ शब्द प्रमाण ।।अंबा।।
ज्ञानेश्वरगुरुचरणप्रसादें । कीजे अमृतपान ।।अंबा।।

दोहा:–हृदय–कमल अति पावुनी जपती सोहं नाम ।
वश करोनी निज शक्तीतें पावती दक्षिण वाम ।।२।।
एवं आदि पुरुषाची माया । जिच्या योगें धनंजया ।
तो अवतार घेवोनिया । जन उद्धरी ।।१९।।
आतां पौराणिक मतें । जे पृथ्वी शेषावरी वसते ।
आणि पहातां ज्योतिषमतें । पृथ्वी उभी आकाशीं ।।२०।।
पृथ्वीस धर्ता सहस्रफणीं । ऐसें बोलिलें असे पुराणीं ।
आणि सिद्धांत शिरोमणी । नान्याधार म्हणोनि सांगे ।।२१।।
येथे दोघांचा समन्वय । म्हणाल कोण्या रीति होय ।
तरी ऐका तेही सोय । निश्चितपणे ।।२२।।
कटीस्थानीं असे धरणी । कंदस्थानीं कुंडलिनी ।
ती जेवीं कां सहस्रफणी । तेवींच असे ।।२३।।
म्हणोनि शेषावरी धरणी । ऐसें बोलिलें पुराणी ।
किंवा उपपत्ति व्याख्यानी । दुसरीही असे ।।२४।।
व्यष्टि पृथ्वीचा शेष कुंडलिनी । समष्टि पृथ्वीचा सहस्रफणी ।
ती ही जाणिजे कुंडलिनी । महाशक्ति ।।२५।।
व्यष्टी देहांत कुंडलिनी सर्पिणी । विराट देहांत कुंडलिनी सहस्रफणी ।
एवं गुप्तरूपें ज्ञान पुराणीं । दृश्य ज्ञान सिद्धांत शिरोमणी बोलला ।।२६।।
ऐशी ती कुंडलिनी विश्वजननी । विश्व बीजाचिया कडसणी ।
विश्ववृक्षउभारणी । निकी करी ।।२७।।
पाणी आकाशाचिया येवढें करणें । तरी तयाचे बाष्प होणें ।
आणि पाणीयाचा संकोच करणें । तरी तुहीन होणें तयाचे ।।३१।।
तेवीं ब्रह्माकाशीं विचरणें । तरी कुंडलिनीसही सूक्ष्म करणें ।
आणि कुंडलिनीपासोनी सिद्धी घेणें । तरी येणें सृष्टि आंत ।।३२।।
पावावया ब्रह्मस्थानीं । मध्यस्त हीं कुंडलिनी ।।३३।।

अशा प्रकारे ब्रह्मस्थानाप्रत जाण्यासाठी एकमात्र जगदंबा कुंडलिनी शक्तीच मध्यस्थ असल्यामुळे "श्रीदेव्युपनिषदात" तिचे वर्णन करताना असे म्हटले आहे की-

महालक्ष्मीश्च विद्महे सर्वसिद्धिश्च धीमही ।।६।।
एषात्मशक्तिः । एषा श्रीमहाविद्या ।।१०।।
नमस्ते अस्तु भगवति मातरस्मान् पाहि सर्वतः ।।१०।।

ऋषी म्हणतात, आम्ही या महालक्ष्मीस्वरूप जगदंबा कुंडलिनी शक्तीला जाणतो. ती सर्व सिद्धी देणारी आहे व सर्व शक्तिरूपिणी आहे हे जाणूनच आम्ही तिचे ध्यान करतो. ही जगदंबाच परमात्मरूपाशी अभिन्न असलेली महाशक्ती असून तीच जागृत अवस्थेत श्रीमहाविद्या आहे. हे भगवती ! तुला नमस्कार असो. हे माते ! तू सर्व प्रकारे आमचे रक्षण कर.

" लक्ष्मीतंत्राच्या सतराव्या अध्यायात" शकाने देवीला " व्याचक्ष्माम्ब चतुर्थं तमुपायं परमम्बुजे ।।२।।" हे जगदंबे ! आता चौथा उपाय सांग, असे विचारल्यावर तिने आपण मोक्षस्वरूप असून आपण मोक्षोपायही आहोत असा स्पष्ट निर्वाळा दिला आहे. देवी आपल्या स्वरूपाचे वर्णन करताना म्हणते-

श्रीः- एको नारायणो देवो वासुदेवः सनातनः ।
चातुरात्म्यं परं ब्रह्म सच्चिदानंदमव्ययम् ।।१७.३।।
एकाहं परमा शक्तिस्तस्य देवी सनातनी ।
करोमि सकलं कृत्यं सर्वभावानुगामिनी ।।४।।
शांतानंतचिदानंदं यद् ब्रह्म परमं ध्रुवम् ।
महाविभूतिसंस्थानं सर्वतः समतां गतम् ।।५।।
तस्य शक्तिरहं ब्राह्मी शांतानंदचिदात्मिका ।
महाविभूतिरनघा सर्वतः समतां गता ।।६।।
आश्वासनाय जीवानां यत्तन्मूर्तीकृतं महः ।
नारायणः परं ब्रह्म दिव्यं नयननंदनम् ।।७।।
तदा मूर्तिमती साहं शक्तिर्नारायणी परा ।
समा समविभक्तांगा सर्वावयवसुंदरी ।।८।।
तयोर्नो परमं व्योम निर्दुःखं पदमुत्तमम् ।
षाड्गुण्यप्रसरो दिव्यः स्वाच्छन्द्याद्देशतां गतः ।।९।।

श्री म्हणजे जगदंबा कुंडलिनी शक्ती इंद्राला म्हणाली, सनातन वासुदेव नाव धारण करणारा एक नारायण देव आहे. तो शाश्वत सच्चिदानंद परब्रह्मरूपी आहे. त्याने चार आत्मरूपे धारण केली आहेत. त्या देवाची मी एक शक्ती आहे. त्याच्याप्रमाणेच मी दिव्य आणि सनातन आहे. मी सर्व भूत्रमात्राच्या भावाप्रमाणे सर्व कामे करते. शांत, अनंत, चैतन्य व आनंदयुक्त जे शाश्वतश्रेष्ठ ब्रह्म आहे ते

सर्वत्र सम असून आपल्या नित्य अर्थात् लीलाविभूतीपेक्षा श्रेष्ठ आहे. त्या ब्रह्माची मी ब्राह्मी शक्ती आहे. मीही शांत, आनंद, चैतन्यरूप, निर्दुष्ट व सर्वत्र सम आणि सर्वत्र समत्व पावलेली अशी असून महाविभूतिमयच आहे. प्राणिमात्रांना आश्वासन देण्यासाठी मूर्तिरूप बनलेले जे नारायण नामक दिव्य नेत्राल्हादक परब्रह्म आहे; त्याची मूर्तिधारिणी शक्ती मी आहे. माझे नाव नारायणी आहे. मी डौलदार शरीराची असून माझे सर्व अवयव रेखीव आणि सुंदर आहेत. आम्हा दोघांपासून दुःखरहित श्रेष्ठ स्थान म्हणून परमाकाश निर्माण झाले. माझ्या इच्छेने यशःश्रीऔदार्यादि षड्गुणांचा प्रसार झाला व तो अप्राकृत दिव्यत्व पावला.

आपल्या स्वरूपाचे असे वर्णन केल्यावर जगदंबा कुंडलिनी शक्तीने कर्म, सांख्य व हठयोगादि सर्व उपाय "देवदेव न ते शक्याः कर्तुं कालेन गच्छता ।।५०।।" या न्यायाने अशक्यप्राय असल्याचे कथन करून गुरुशरणागतीने प्राप्त होणाऱ्या जागृत शक्तीचा मध्यमार्गच म्हणजे सुषुम्नावलंबी सिद्धयोगमार्गच श्रेयस्कर आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

मां तु जिज्ञाससे देवि तथापि शृणु भामिनि ।
उपायाश्चाप्यपायाश्च शास्त्रीया निर्मिता मया ।।१७.५६।।
विहिता य उपायास्ते निषिद्धाश्चेतरे मताः ।
अधो नयन्त्यपायास्तं य एताननुवर्तते ।।५७।।
उपायापायसंत्यागी मध्यमां वृत्तिमाश्रितः ।।५८।।
मामेकं शरणं प्राप्य मामेवान्ते समश्नुते ।।५९।।
अतीत्य सकलं क्लेशं संविशत्यमलं पदम् ।
अपायोपायनिर्मुक्तां मध्यमां स्थितिमास्थिता ।।१००।।
शरणगतिरन्यैषा संसारार्णवतारिणी ।
इदं शरणमज्ञानामिदमेव विजानताम् ।।१०१।।
इदं तितीर्षतां पारमिदमानन्त्यमिच्छताम् ।
प्रायश्चित्तप्रसंगे तु सर्वपापसमुद्भवे ।।१०२।।
मामेकां देवदेवस्य महिषीं शरणं व्रजेत् ।
उपायाद्विरतः शश्वन्मां चैव शरणं व्रजेत् ।।१०३।।
तनूकृत्याखिलं पापं मां चाप्नोति नरः शनैः ।
अथोपायप्रसक्तश्च भुक्त्वा भोगाननामयान् ।।१०४।।
अंते विरक्तिमासाद्य विशते परमं पदम् ।
उपायः सुकरः सोऽयं दुष्करश्च मतो मम ।।१०५।।
शिष्टैर्निषेव्यते सोऽयमकामहतचेतनैः ।
अकामैश्च तस्मात्सिद्ध्यर्थमात्मनः ।।१०६।।

अर्चनीया नरैः शश्वन्मम मंत्रमयी तनुः ।
प्रविश्य विधिवद्दीक्षां गुरोर्लब्ध्वार्थसंपदः ।
मन्मयैरर्चयेन्मंत्रैर्मामिकां मांत्रिकीं तनुम् ॥१०७॥

श्रीवासुदेव म्हणाले, हे देवी ! हे सुंदरी ! ! माझे स्वरूप जाणण्याची तू इच्छा करतेस म्हणून ऐक. शास्त्रीय उपाय व अपाय मीच निर्माण केले आहेत. उपाय म्हणजे पुण्यसंपादक ज्योतिष्टोमादि याग व अपाय म्हणजे पापसंपादक परहिंसादि कर्मे होत. उपायांना विहित अर्थात् हितकारक विधिवाक्ये म्हणतात. अपायांना निषिद्धवचने म्हणतात. जो निषिद्धांचे म्हणजे अपायांचे आचरण करतो त्याला अपाय हे अधःपाताला नेतात. जो विहिताचरण करतो त्याला उपाय हे ऊर्ध्वलोकांची प्राप्ती करून देतात आणि जो उपाय व अपायांचा अर्थात् काम्य-निषिद्ध कर्मांचा त्याग करून मध्यमवृत्तीचा म्हणजे सुषुम्नामार्गाचा आश्रय करतो, तो मलाच शरण येतो व शेवटी ( सहस्रारात ) मलाच प्राप्त होतो. ( शरणागतीपूर्वी साधक मध्यमवृत्त्याचरणी असो अगर नसो.जर तो तसा असेल तर लौकर शरणागणत होतो व तो तसा नसेल तर शरणागतीला विलंब लागतो. सद्‌गुरूला शरण गेल्यानंतर मात्र यावज्जीव मध्यवृत्त्याश्रय अर्थात् जागृत शक्तीमुळे होणारा सुषुम्नामार्गाश्रयच करावा. अन्यथा फलप्राप्ती उशिरा होईल. ) या साधनमार्गाचा अवलंब केलेला साधक सर्व क्लेशांच्या पलीकडे जाऊन त्याला शुद्ध आत्मस्वरूपाची प्राप्ती होते. तो अपाय-उपाय, काम-निषिद्ध किंवा पुण्य-पाप यांपासून पूर्णपणे मुक्त होतो. अपायोपायमुक्त अशी जी मध्यमा स्थिती अर्थात् सुषुम्नामार्गावलंबनाने प्राप्त होणारी शरणागती ही संसारसागर तरण्यातील सर्व उपायात पहिल्या प्रतीची म्हणजे श्रेष्ठतम आहे. हीच ज्ञानी, अज्ञानी, संसार तरण्याची इच्छा करणारे आणि अनंतपदेच्छू अर्थात् मोक्षेच्छू या सर्वांना हितप्रद आहे. पापक्रियेमुळे प्रायश्चित्ताची पाळी आल्यास हे देवेंद्रा ! देवदेवेशाच्या पट्टराणीला अर्थात् मला लक्ष्मीला म्हणजे कुलकुंडलिनी देवीला शरण यावे. सर्व काम्य कर्मे टाकून निश्चित-पणे मलाच शरण यावे. ( साधनाने ) सर्व पापांना निर्बल करून क्रमशः मला शरण येणारा शेवटी मलाच म्हणजे शिवस्वरूपाला प्राप्त होतो. या साधनमार्गाचा काम्यासक्त साधकही सुंदर भोग भोगून शेवटी वैराग्य उत्पन्न झाल्यामुळे परमपद मिळवितो. हा सर्वकर्मसंन्यास म्हणजे शक्तिपातदीक्षेने सिद्ध होणारा मार्ग सोपाही आणि कठीणही आहे. यात कर्मातील उठाठेव नाही म्हणून हा सोपा व अत्यंत श्रद्धेची आवश्यकता असते म्हणून हा कठीण आहे, असे मला अर्थात् श्रीरूप कुंडलिनी शक्तीला वाटते. सकाम, निष्काम, व मोक्षकाम या सर्वांना हा शरणगतीचा मार्ग सेवनीय आहे. सद्‌गुरूंपासून शक्तिपाताची विधिवत् योगदीक्षा घ्यावी व माझ्याच मंत्रांनी माझी मंत्रमयी मूर्ती आराधावी.

"श्रीदुर्गासप्तशती" ग्रंथामध्येही जगदंबा कुंडलिनी शक्तीचा आश्रय घेणारे भक्तच तिच्या ज्ञानप्रकाशात्मक शक्तीमुळेच घोर अशा अज्ञानमय अंधकारातून परिपूर्णपणे तरून जातात हे सांगताना असे म्हटले आहे की–

एतत्कृतं यत्कदनं त्वयाद्य धर्मद्विषां देवि महासुराणाम् ।
रूपैरनेकैर्बहुधाऽऽत्ममूर्तिं कृत्वाम्बिके तत्प्रकोरोति कान्या ॥११.३०॥
विद्यासु शास्त्रेषु विवेकदीपेष्वाद्येषु वाक्येषु च का त्वदन्या ।
ममत्वगर्तेऽतिमहांधकारे बिभ्रामयत्येतदतीव विश्वम् ॥३१॥
विश्वेश्वरि त्वं परिपासि विश्वं विश्वात्मिका धारयसीति विश्वम् ।
विश्वेशवंद्या भवती भवंति विश्वाश्रया ये त्वयि भक्तिनम्राः ॥३२॥

हे देवी अंबिके ! तू ( जागृत अवस्थेत ) आपल्या स्वरूपाला अनेक रूपात ( शक्तीत ) विभक्त करून नाना रूपांनी यावेळी ( साधनात ) या धर्मद्रोही महासुरांचा ( काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सररूपी महासुरांचा ) जो नाश केलास तो तुझ्याशिवाय दुसरा कोण करू शकेल ? विद्येमध्ये, ज्ञानाचा प्रकाश देणाऱ्या शास्त्रांमध्ये व वेदोपनिषदांमध्ये तुझीच स्तुती आहे. तूच अशी शक्ती आहेस की, जी या विश्वाला ( किंवा जीवाला ) परिपूर्ण अशा घोर अज्ञानमय अंधारातून ममतारूपी संसारात पुन्हा पुन्हा फिरवितेस. हे विश्वेश्वरी जगदंबा कुंडलिनी शक्ती ! तू या जगाचे पालन करतेस. तू विश्वरूपा आहेस, म्हणून तू या विश्वाला धारण करतेस. तू भगवान् विश्वनाथांकडून वंदिली जातेस. जे भक्त भक्तिपूर्वक तुझ्यापुढे नम्र होतात, तुला शरण येतात म्हणजे तुझ्या जागृत स्वरूपाचा शरीरात आश्रय घेतात, ते साऱ्या विश्वाला आश्रय देतात.

"त्रिपुरारहस्याच्या ज्ञानखंडामध्ये" परा चितिर्मे जननी ॥८.२६॥" असे म्हणून जगदंबा चित्शक्ती कुंडलिनी ही जीवाची माता आहे हे स्पष्ट केले आहे. तांत्रिक-प्रवर श्रीअभिनवगुप्तांनी शिवसूत्रात "चैतन्यमात्मा ॥१.१॥" असे पहिलेच सूत्र शांभवोपायात लिहून चैतन्यशक्ती म्हणजे शिवाची स्वातंत्र्यशक्ती जगदंबा कुंडलिनी हीच चेतनतेचा भाव म्हणजे शक्ती असून तीच चैतन्य किंवा आत्मा आहे हे मत मांडले आहे. श्रीभट्टभास्कर यांनी या सूत्रावर "शिवसूत्रवृत्तीत" पुढील-प्रमाणे टीका करून उपरोक्त सिद्धांत विशेष प्रकारे सिद्ध केला आहे. ते म्हणतात, "चेतयते इति चेतनः सर्वज्ञानक्रियास्वतंत्रः तस्य भावश्चैतन्यं सर्वज्ञानक्रियासंबंधमयं परिपूर्णं स्वातंत्र्यं उच्यते, एतदेव आत्मा, न पुनः शरीर-प्राण-बुद्धि-शून्यानि लौकिकाद्यभ्युपगतानि । किंच यदेतत् चैतन्यमुक्तं स एव आत्मा स्वभावो भावाभावरूपस्य जगतः। तदुक्तं श्रीमदुच्छुष्मभैरवे–

यावन्न वेदका एते तावद्वेद्याः कथं प्रिये ।
वेदकं वेद्यमेकं तु तत्त्वं नास्त्यशुचिस्ततः ॥"

परमात्मा आपल्या चेतन शक्तीने चेतवितो म्हणून त्याला चेतन म्हणतात. सर्व क्रिया व सर्व ज्ञान या बाबतीत त्याचे भाव म्हणजे शक्तिचैतन्य स्वतंत्र आहे म्हणजे सर्व ज्ञानक्रियासंबंधमय परिपूर्ण स्वतंत्रता अर्थात् शक्ती हाच आत्मा होय. लौकिकांनी म्हणजे चार्वाकादिकांनी मानलेले शरीर, प्राण, बुद्धी व शून्य हे आत्मे नव्हेत. शिवाय हे जे चैतन्य आहे तोच आत्मा म्हणजे स्वभाव होय. (स्व = आत्मा अगर शिव. भाव = शक्ती. स्वभाव शिवशक्तिऐक्य) हा स्वभाव कोणाचा ? तर भाव व अभावरूप म्हणजे शिवशक्तियुक्त जगताचा. हेच श्रीमद्उच्छुश्मभैरवात सांगताना असे म्हटले आहे की, "हे प्रिये ! जोपर्यंत वेदक म्हणजे ज्ञाते नसतील तर वेद्य म्हणजे ज्ञेय अर्थात् जाणावयाचे पदार्थ तरी कसे असतील ? वेदक व वेद्य म्हणजे ज्ञाता व ज्ञेय अर्थात् शक्ती व शिव हे एक तत्त्व होऊ शकत नाही, असे मानणे अयोग्यच आहे."

"सीतोपनिषदात" जगदंबा कुंडलिनी शक्तीचे हे रूप वर्णन करताना असे म्हटले आहे की, "सा सर्ववेदमयी सर्वदेवमयी सर्वलोकमयी सर्वकीर्तिमयी सर्वधर्ममयी सर्वाधारकार्यकारणमयी महालक्ष्मीर्देवेशस्य भिन्नाभिन्नरूपा चेतनाचेतनात्मिका ब्रह्मस्थावरात्मिका तद्गुणकर्मविभागभेदाच्छरीररूपा देवर्षिमनुष्यगंधर्वरूपा असुर-रासक्षसभूतप्रेतपिशाचभूतादिभूतशरीररूपा भूतेंद्रियमनःप्राणरूपेति च विज्ञायते ॥२॥ साक्षात् शक्तिर्भगवतः स्मरणमात्ररूपाविर्भावप्रादुर्भावात्मिका निग्रहानुग्रहरूपा शांतितेजोरूपा व्यक्ताव्यक्तकारणचरणसमग्रावयवमुखवर्णभेदाभेदरूपा भगवत्सहचा-रिण्यनपायिन्यनवतरतसहाश्रयिण्युदितानुदितकरा निमिषोन्मेषसृष्टिस्थितिसंहारति-रोधानानुग्रहादिसर्वशक्तिसामर्थ्यात्साक्षात् शक्तिरिति गीयते ॥६॥" सीता या नावाने विराजमान झालेली ही जगदंबा कुंडलिनी शक्ती सर्व वेदमयी, सर्वदेवमयी, सर्व-लोकमयी, सर्वकीर्तिमयी, सर्वधर्ममयी, सर्वांचा आधार, कार्य व कारणरूप, चेतन व जडस्वरूप, ब्रह्मदेवापासून जड पदार्थांपर्यंत सर्वांना व्यापणारी, या सर्वांच्या गुण व कर्मभेदाप्रमाणे सर्व शरीरे धारण करणारी; देवता, ऋषी, मनुष्य व गंधर्व-स्वरूप; असुर, राक्षस, भूत, प्रेत, पिशाच्च इत्यादि प्राण्यांची शरीरे धारण करणारी, पंचमहाभूतात्मक; दहा इंद्रियें, मन व प्राणरूप अर्थात् समस्त विश्वरूपाने असणारी ही महालक्ष्मी देवतांचे स्वामी असलेल्या भगवंताशी भिन्न व अभिन्न रूपाने राहते व तसा तिचा प्रत्यय येतो. ही सीता नावाची जगदंबा कुंडलिनी भगवंताची साक्षात् शक्ती आहे. भगवंताच्या केवळ स्मरणाने किंवा संकल्पाने ती जगत्स्वरूप प्रकट करते व दृश्य जगात स्वतः प्रकट होते. ती शासन व कृपास्वरूप, शांती व तेजोरूप आणि व्यक्त प्राण्यांची व अव्यक्त देवतांची कारणभूत व त्यांच्या चरण, मुखादि समस्त अवयवांची व वर्णरूपांची भेदस्वरूप शक्ती आहे. ही चित्शक्ती जगदंबा निरंतर भगवंताच्या बरोबरच आश्रय करणारी आहे. ती सांगितल्या

जाणाऱ्या व न सांगितल्या जाणाऱ्या सर्व स्वरूपांनी युक्त असून निमिषोन्मेषात सृष्टी, स्थिती, संहार, तिरोधान, अनुग्रह इत्यादि सर्व सामर्थ्याने युक्त असल्याकारणाने साक्षात् शक्तिरूपातच तिचे वर्णन होऊ शकते किंवा केले जाते.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी एका ओवीत ज्या आदिशक्ती जगदंबा कुंडलिनी शक्तीचे वर्णन केले आहे ती आदिशक्ती जगदंबा कुंडलिनी शक्ती "ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील १२५ व्या सूक्तात" आपल्या स्वतःच्या स्वरूपाचे स्पष्टीकरण देताना असे म्हणते की—

अहं राष्ट्री संगमनी वसूनां चिकितुषी प्रथमा यज्ञियानाम् ।
तां मा देवा व्यदधुः पुरुत्रा भूरिस्थात्रां भूर्यावेशयन्तीम् ॥१०.१२५.३॥
मया सो अन्नमत्ति यो विपश्यति यः प्राणिति य ईं शृणोत्युक्तम् ।
अमन्तवो मां त उप क्षियन्ति श्रुधि श्रुत श्रद्धिवं ते वदामि ॥४॥
अहमेव स्वयमिदं वदामि जुष्टं देवेभिरुत मानुषेभिः ।
यं कामये तंतमुग्रं कृणोमि तं ब्रह्माणं तमृषिं तं सुमेधाम् ॥५॥
अहं रुद्राय धनुरा तनोमि ब्रह्मद्विषे शरवे हंतवा उ ।
अहं जनाय समदं कृणोम्यहं द्यावापृथिवी आ विवेश ॥६॥
अहं सुवे पितरमस्य मूर्धन्मम योनिरप्स्वन्तः समुद्रे ।
ततो वि तिष्ठे भुवनानु विश्वोतामूं द्यां वर्ष्मणोप स्पृशामि ॥७॥
अहमेव वात इव प्र वाम्यारभमाणा भुवनानि विश्वा ।
परो दिव पर एना पृथिव्यैतावती महिना सं बभूव ॥८॥

मी सर्व जगाची स्वामिनी आहे. उपासकाला सर्व प्रकारची संपत्ती मिळवून देणारी, परतत्त्वाचे साक्षात् ज्ञान करून घेतलेली व साधनयज्ञार्ह देवात प्रमुख अशी काय ती मीच आहे. अशा रीतीने मीच चेतन व सर्वज्ञ आहे. मी एक असले तरी आपल्या शक्तीनेच नानारूपाने भासमान होते. जो जो म्हणून अन्न खातो, विविध जग पाहतो व शब्द श्रवण करतो तो तो ती ती क्रिया माझ्यामुळेच करीत असतो. याप्रमाणे सर्वांच्या अंतर्यामी असणाऱ्या मला जे जाणत नाहीत ते संसारात हीनावस्थेत राहतात. हे सुप्रसिद्ध मित्रा ! साधका !! ऐक. श्रद्धा ठेवण्यासारखे सत्यज्ञानच मी तुला सांगत आहे. देव व मनुष्य यांना ज्या ज्ञानाचा साक्षात्कार झाला असे ज्ञानच मी तुला सांगत आहे. ज्याला मी वाचविण्याची इच्छा करते त्याच्या ठिकाणी मी स्वतः जागृत होऊन त्याला समर्थ करते, त्याला मी स्रष्टा बनविते, त्यालाच मी ऋषी बनविते व त्यालाच मी ज्ञानीही पण करते. वेदविद्येचा म्हणजे साधनविद्येचा द्वेष करणारा असा जो दुष्ट चांडाळ आहे, त्या ब्रह्मद्वेष्टचा किंवा साधनद्वेष्टचा शत्रूला बाणाने मारून धुळीत लोळविण्यासाठी रुद्र देवाचे धनुष्य जोडून सज्ज करणारी ती मीच होय. लोकरक्षणार्थ रणधुमाळी माजविणारी तीही

मीच ! या द्यावापृथ्वीमध्ये सर्वत्र व्यापून असणारी अशी काय ती मीच आहे. मीच भूलोक व स्वर्गलोकाचा विस्तार करते. मी जनकाचीही जननी आहे. मी सर्व भुवनात प्रवेश करून सर्वत्र विविधरूपांनी नटून राहिलेली आहे. तशीच मी स्वर्गालाही (सहस्रारातील शिवालाही) व्यापून आहे. फार काय सर्व विकारजाताला मी माझ्या मायात्मक देहाने स्पर्श करून आहे. ज्याप्रमाणे वायू आपोआप चलित होतो त्याप्रमाणे चलित होऊन मी आपल्या इच्छेने पिंडब्रह्मांडाची रचना करते. मी अगदी स्वतंत्र आहे. माझ्यावर कोणाचेही प्रभुत्व नाही. मी आकाश व पृथ्वीच्या पलीकडे आहे. संपूर्ण विश्व माझी विभूती आहे. मी माझ्या भक्तीच्या महिम्यानेच एवढी कर्तृत्वशालिनी किंवा सर्व काही झाले आहे.

"प्रपंचसारतंत्रामध्ये" श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही जगदंबा कुंडलिनी शक्ती हीच सर्व देवदेवता असून साधकाला तिचेच एकमात्र स्तवन करणे योग्य आहे हे सांगताना असे म्हटले आहे की, "स्तुती ही पुष्कळ वाक्यसमुदायाने होते. वाक्य पदांनी बनते.पद हे अक्षरसमुदायाने बनते. हे महेश्वरी ! अक्षर म्हणजे तूच आहेस. त्वन्मय अशा अक्षरांनी तू संतुष्ट होतेस; कारण वाणीची प्रवृत्ती ही त्वन्मय आहे. ब्रह्मदेव, विष्णू व त्रिनयनशिव देखील तुझे श्रेष्ठ असे मायामय रूप जाणत किंवा ओळखू शकत नाहीत. हे माते ! हे देव तुझ्या स्थूल रूपाचीच स्तुती वर्णन करतात म्हणून मीही तेच करावे हे योग्यच होय. हे बिंदुरूपिणी ! सर्वनियंत्री ! तुला नमस्कार असो. हे शब्दतत्त्वात्मक नामधारिणी ! हे प्रकृतिरूपिणी ! महतत्त्वरूपिणी! अहंकारतत्त्वात्मिके ! तुला वंदन असो. हें शब्दतन्मात्र व आकाशरूपिणी ! हे स्पर्शतन्मात्र सूक्ष्मवायुरूपे व स्थूलवायुस्वरूपे ! हे रूपतन्मात्ररूपिणी तेजोभूतात्मके! हे रस-जलस्वरूपे ! हे गंध-भूमिरूपे ! तुला वारंवार वंदन असो. हे श्रोत्र-त्वक् चक्षु-जिव्हा-घ्राणेंद्रियरूप ज्ञानेंद्रिय-स्वरूपिणी ! वाक्-हस्त-पाद-पायु-उपस्थरूप कर्मेंद्रिय स्वरूपिणी ! मन-बुद्धि अहंकार चित्तादि अंतःकरणचतुष्टयरूपे ! हे रूप-रहिते ! हे विश्वस्वरूपे ! तुला रूप नसूनही तू सर्व रूपे धारण करतेस.हे सर्वव्यापिके ! तुला नमस्कार असो. तू सूर्याच्या रूपाने अंतरात्मा होऊन प्रजांचे धारण करतेस आणि पुन्हा चंद्ररूपाने प्रजांचे तू पोषण करतेस. अग्निरूप घेऊन प्राणिमात्राने घेतलेल्या आहाराचे तू दहन म्हणजे पचन करतेस म्हणून हे महादेवी ! ही तेजाची तिन्ही रूपे तुझ्यापासूनच झाली आहेत. हे जगन्माते ? तूच चतुर्मख, हंसवाहन व रजोगुणी अशा ब्रह्मदेवाचे नाव धारण करून जगदुत्पत्तीबद्दल विचार करतेस.ते श्रेष्ठ असे ब्रह्मदेवाचे स्थान किंवा पद तूच आहेस.तूच नारायणनामधारिणी,सत्त्वगुणप्रधाना व किरीटशंखचक्रधर होऊन विश्वाची स्थिती म्हणजे पालनपोषण करतेस. तो विष्णू तुझाच अंश आहे किंवा तो तूच आहेस. तूच रुद्रसंज्ञा घेतेस. ज्याच्या जटेत चंद्र, गंगा व सर्प आहेत, जो त्रिनयन असून प्रलयसमयी जगत्संहार करतो, जो तमोगुणी आहे व जो परशु आणि अक्षमाला धारण करतो, त्या रुद्ररूपात तू

भासतेस किंवा शोभतेस. हे महेशी ! वागीश्वरी जी सरस्वती ती त्वन्मयच आहे. ती अक्षमाला, अमृतकलश व ग्रंथ यांना धारण करणारी, त्रिलोचना, जटाजूटात अर्थात् वेणीत अर्धचंद्राला धारण करणारी व अत्यंत शुभ्रवस्त्राने देहाला भूषविणारी सरस्वती तुझ्यावाचून कोण आहे ? शंखचक्राने विलसणारी, भयंकर व लवलवती तलवार धारण करणारी, गर्जना करणाऱ्या सिंहावर बसणारी, मस्तकावर धगधगता अग्निकपाल असलेली, दैत्यसमूहास दशदिशांना पळायला लावणारी, सिद्धसंघाकडून स्तविली जाणारी व जन्मादिरहित अशी दुर्गा तूच आहेस. त्रिपुरासुराचा शत्रू जो महादेव त्याची तू अर्धांगी भवानी आहेस. पर्वतराज हिमालयाची कन्या म्हणून तू शोभतेस. मोठमोठ्या योग्यांना तू वंदनीय आहेस. महादेव हा जिचा प्राणनाथ आहे अशी ही जगदंबा किंवा अंबिका तत्त्वदृष्ट्या त्वन्मयच म्हणजे महादेवच आहे. ( दशमपटल–५० ते ६१ )

"योगिनीहृदय" ग्रंथामध्यें कुंडलिनी शक्ती जगदंबारूप कशी आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

आत्मनः स्फुरणं पश्येद्यदा सा परमा कला ।
अंबिकारूपमापन्ना परावाक् समुदीरिता ।।चक्रसंकेतनिरूपण ।।३६।।

आत्म्याचे म्हणजे चैतन्यरूप परमशिवाचे स्फुरण कुंडलिनी शक्तीच्याद्वारा पश्यंती, मध्यमा व वैखरी वाणीच्या रूपाने दिसून येते. हिलाच परमा म्हणजे श्रेष्ठ किंवा सर्ववर्णांशभूत विमर्शरूप अशी विमर्शशक्तियुक्त कला किंवा परावाक् म्हणजे प्रकाशरूपाने शिवाशी अभिन्न असलेली किंवा समरस झालेली जगदंबा शक्ती असे म्हणतात.

सारांश, कुंडलिनी शक्ती ही जगदंबा असल्याने पिंडात व ब्रह्मांडात होणाऱ्या सर्व हालचालींचे मूलकेंद्रही तीच असते. ऋग्वेदात कुहरिणी, कुवरिणी इत्यादि नावांनी हिचा गौरव केला आहे. देवात्मशक्ती म्हणून उपनिषदांनी तिला भूषविले आहे. यजुर्वेदाने तर "यत्कुमारी मन्द्रयते यथोविद्य पतिव्रतो आरिष्टं यत्किंच अग्निस्तदनुवेधति ।।" असे म्हणून ही कुमारी, द्वयांगी, अग्निप्रमाणे सुप्त व जागृत अवस्थेने आहे असे वर्णन केले आहे. सर्व तंत्रशास्त्रांचा तीच एकमेव मध्यबिंदू आहे; कारण हिच्या आधारावर व पायावरच ती उभी आहेत. हठयोगादि व नाथसंप्रदायादि सर्व आचार्यांचे लक्ष्य हिची सुप्तावस्थेतून जागृती होऊन सुषुम्नामार्गाने हिचे संचरण व्हावे व तिने स्वसंकोचाने घेतलेले आपले जीवस्वरूप टाकून पुन्हा शिवस्वरूप व्हावे हेच आहे. अशा या कुंडलिनी शक्तिस्वरूप जगदंबेची उपासना हीच एकमात्र तारक उपासना आहे, असा उद्घोष ऋग्वेदातील ऋषींपासून तो श्रीज्ञानेश्वरमहाराज व श्रीगुळवणीमहाराज यांनी अंतरंगीचे रहस्य म्हणून

केला आहे. ही उपासना म्हणजे श्रीसद्‌गुरुकृपेने होणारी जगदंबा कुंडलिनी शक्तीची जागृती होय व हीच तिने जीवावर केलेली खरीखुरी साउली होय.

## चैतन्यचक्रवर्तीची शोभा :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जगदंबा कुंडलिनी शक्तीला " जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा ॥६.२७२॥" म्हणून गौरविले आहे. या गौरवात चैतन्यचक्रवर्ती शिव हा मूलाधारापासून सहस्रारापर्यंत व पिंडापासून ब्रह्मांडापर्यंत आपल्या अंगभूत, अच्छेद्य, अफुट, एकरस व अंगअंगिन्यायाने शक्तीच्या शोभेने विलसत असतो हे स्पष्ट करून, स्वसंवेद्य तत्त्व हे शिवशक्ती सामरस्याने ओतप्रोत भरलेले आहे. हा सिद्धांत प्रस्थापित केला आहे. वस्तूची शक्ती, प्रभा किंवा विमर्श हा वस्तू बरोबरच असतो. अग्नी व अग्नीची दाहक शक्ती, सूर्य व सूर्याची किरणे, झाड व झाडाची छाया, चंद्र व चंद्राचा प्रकाश यांची जाणीव किंवा प्रतीती एकाच वेळी होते. त्यांना वेगळे करून काढता येत नाही व येणार नाही. त्याप्रमाणेच चैतन्य-चक्रवर्ती शिव जेथे असतो तेथे त्याची शोभा कुंडलिनी शक्ती या नावाने विलसत असते व जेथे शोभाशक्ती कुंडलिनी असते तेथे शिव हा चैतन्यचक्रवर्ती म्हणून विलसत असतो. याचा अर्थ चैतन्य म्हणजे शक्ती व शक्ती म्हणजे चैतन्य होय. अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे श्रीकृष्णनाथ " मज चैतन्यशंभूचा माथां ॥१५.५७९॥" याप्रमाणेच स्वतःचा, आपल्या प्रिय प्राणेश्वरी कुंडलिनी शक्तीसकट आपण आहोत, असा उल्लेख करतात म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. एवढेच नव्हे तर स्वसंकोचाने शिव जेव्हा जीवरूप होऊन जन्ममरण परंपरा भोगण्याचा खेळ खेळण्यास उद्युक्त होतो तेव्हाही तो " चैतन्यनाथच " असतो; कारण हा जीवनाथ चैतन्यशक्ती कुंडलिनीच्या आधारानेच देहदेहांतराची प्राप्ती करून घेत असतो. " जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे । मग नूतन वेढिजे । तैसें देहांतरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥२.१४४॥" असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे त्याचा अर्थ जीव हा संकुचित झालेल्या कुंडलिनी शक्तीच्या रूपाने वासनात्मक होऊन परिभ्रमण करीत असतो हाच आहे. त्यामुळे क्षराक्षर पुरुषाच्या " एवं जीवचैतन्य आघवें । हें क्षर पुरुष जाणावें ॥१५.५०१॥" व " अक्षर पुरुषु जाण । चैतन्य तें ॥१५.५२५॥" अशा व्याख्या करून अज्ञानघनसुषुप्तीत सर्वोपाधी घेऊन निजलेला क्षरपुरुषरूपी जीव व अज्ञानघनसुषुप्ती टाकून सर्वोपाधिनिर्मुक्त असलेला अक्षरपुरुषरूपी शिव हे चैतन्ययुक्त म्हणजे शक्तियुक्तच असतात हे त्यांनी स्पष्ट केले आहे. " ऐसें जीवकार्य कारण । जया मायासंगुचि लक्षण ॥१५.५२५॥" अशी शक्तियुक्त शिवामुळेच पिंडब्रह्मांडाची उभारणी होत असल्यामुळे श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

तें आघवेंचि साकारें। कल्पुनी आपणपयां पुरे।
जालें असें तदनुसारें। चैतन्यचि ॥१५.४८६॥
आणि कर्ता हें दुजें। कर्माचें कारण जाणिजे।
प्रतिबिंब म्हणिजे। चैतन्याचें जें ॥१८.३२१॥
आकाशचि वर्षे नीर। तें तळवटीं बांधे नाडर।
मग बिंबोनि तदाकार। होय जेवीं ॥३२२॥
कां निद्राभरें बहुवें। राया आपणपें ठाउवें नव्हे।
मग स्वप्नींचिये सामावे। रंकपणें ॥३२३॥
तैसें आपुलेनि विसरें। चैतन्यचि देहाकारें।
आभासोनि आविष्करें। देहपणे जें ॥३२४॥

अशी ही कुंडलिनी शक्ती क्षराक्षरपुरुषाशी किंवा जीवशिवाशी एकरूप असलेली साक्षात् सत्ता किंवा चेतना असल्याने तीच सर्व जीवजगताची साकाररूपाने कल्पना करून तेच आपले राहण्याचे गाव आहे असे म्हणून त्यात व्याप्त होऊन त्या त्या प्रकाराने राहते. अशा प्रकारे शिवच शक्तीच्या रूपाने जीव व जगत् म्हणून प्रतिबिंबित होतो. राजा जसा अतिनिद्रेने स्वप्नात भिकारी होतो त्याप्रमाणे शक्तीमुळेच शिव आपणच आपल्याला विसरून जीवरूपाने देहाकारात प्रकट होतो. हे सर्व शक्तीमुळे घडत असल्याने तिची व्याख्या करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

आतां असंगा साक्षिभूता। देहीं चैतन्याची जे सत्ता।
तिये नाम पंडुसुता। चेतना येथें ॥१३.१३४॥

देहात असणाऱ्या चैतन्याची जी सत्ता आहे तिलाच चेतना असे नाव असून असंग अशा स्वसंवेद्य आत्मरूपाची तीच साक्षिभूत शक्ती आहे. महायोगी गोरक्षनाथांनी कुंडलिनी शक्तीचेच परा, सत्ता, अहंता, स्फुरत्ता व कला या पाच नावांनी सिद्धसिद्धांतपद्धतीच्या चवथ्या उपदेशातील तिसऱ्या श्लोकात वर्णन केल्याचे आपण मागे पाहिलेच आहे. तेव्हा चैतन्य व सत्ता म्हणजे कुंडलिनी शक्ती ही एकरूप आहे व ती " साक्षिणी सा पराचिद्रूपिणी ॥ सि. स. प. ॥४.१॥" या न्यायाने साक्षिभूता व परम चेतनस्वरूप आहे, हा सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रस्थापित केला आहे. "अमृतानुभवातही" "जो प्रियुची प्राणेश्वरी ॥१.२॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हाच सिद्धांत मांडला आहे व तो पुढील दृष्टांताने सिद्ध केला आहे. ते म्हणतात–

जैसा सूर्य मिरवी प्रभा। प्रभीं सूर्यत्वाचा गाभा।
तेंवि भेद गिळित शोभा। एकचि जे ॥१.२५॥

यावर श्रीनिरंजन रघुनाथ यांनी "अनुभवामृत-पद-बोधिनी" म्हणून जी टीका केली आहे त्यात असे म्हटले आहे की, "जैसा सूर्य जो तो आपले प्रभेतें मिरवितो आणि त्या प्रभेचा गाभा जो तोहि सूर्यचि असतो. ऐसी त्रिप्रकारक व्यवस्था झाली तरी भेदरहित सूर्य जो तो एकचि होय. तेवि परमात्मा शिव जो येणें धारणा केलेली चिच्छक्ति आणि तिच्या अंत:स्थिती पावला जो पुरुष, ऐसे हे तीन प्रकार आहेत ऐसें जरी वाटलें तरी भेद गिळित म्हणजे भेदरहित शोभा एकचि आहे." सूर्याची प्रभा सूर्याला घेऊन सूर्यावर फाकते आणि त्या प्रकाशातच प्रकाशघन सूर्य असतो. सूर्याला सोडून प्रकाश राहत नाही व प्रकाशाला सोडून सूर्य राहत नाही. प्रकाश व सूर्य यांचे ज्याप्रमाणे ऐक्य आहे त्याप्रमाणेच शिव व शक्ती यांचा यत्किंचित् भेद नसून भेद नाहीसा करीतच किंवा थोडाही उठू न देताच शक्ती ही शिवाची शोभा होऊन राहिली आहे. हे कसे घडते हे श्रीअभिनवगुप्तांनी आपल्या "बोधपंचदशिका" या प्रकरण ग्रंथातील श्लोकात व त्यावरील टीकेत पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात–

> **स एव सर्वभूतानां स्वभाव: परमेश्वर: ।**
> **भावजातं हि तस्यैव शक्तिरीश्वरतामयी ॥२॥**
> **शक्तिश्च शक्तिमद्रूपाद् व्यतिरेकं न वांछति ।**
> **तादात्म्यमनयोर्नित्यं वन्हिदाहकयोरिव ॥३॥**
> **स एव भैरवो देवो जगद्भरणलक्षण: ।**
> **स्वात्मादर्शे समग्रं हि यच्छक्त्या प्रतिबिंबितम् ॥४॥**
> **तस्यैवैषा परा (शक्ति:) देवी स्वरूपामर्शनोत्सुका ।**
> **पूर्णत्वं सर्वभावेषु यस्या नाल्पं नचाधिकम् ॥५॥**

परमेश्वर हा स्वतंत्र-चैतन्यघन असलेला सर्व भूते म्हणजे शिवादि सकलभूते व सर्व प्रमेये या दोन्ही ग्राहक व ग्राह्यांचा स्फुरणप्रकाशरूपी आहे. "अन्यथा त्या रूपात विश्रमिलेले आकाश हे पुष्परूप आहे," ( तंत्रालोक ८.३ ) या उक्तिप्रमाणे संवित्प्रकाशाहून भिन्न काहीही नसल्याने कोणती वस्तू भासेल ? परमार्थदृष्टया तर सदैव अभिन्नप्रकाशमय, श्रेष्ठ व अनिर्वचनीय संवित्स्वभावी परमेश्वरच स्वात्मेच्छेने त्या त्या विश्ववैचित्र्याच्या परिस्फुरणाने प्रकाशतो हे तात्पर्य आहे. "शक्तयोऽस्य जगत् कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वर: ।" या वचनाप्रमाणे महेश्वराची शक्ती म्हणजे सर्व जग आहे व शक्तिमान् हा महेश्वर आहे. यावरून हे स्पष्ट होते की, स्वातंत्र्य म्हणजे ईश्वरशक्तीच जगद्रूपाने व्यक्त होते. ईश्वरप्रत्यभिज्ञा या ग्रंथात असे म्हटले आहे की, "ऐश्वर्याने गच्च भरलेला एकटा शिवच तसा विश्वरूपाने स्फुरण पावतो म्हणून संवित् चित्शक्ती कुंडलिनी तत्त्वत: एकटीच आहे.(२) ज्याप्रमाणे अग्नीची व त्याच्या दाहक-पाचक-प्रकाशकरूपाने वेगळ्या असलेल्या शक्तीची एकात्मता

आहे म्हणजे अयुतसिद्धत्वामुळे समवाय संबंध आहे. दाहकत्वादि शक्ती स्वाधिष्ठान-स्वाश्रयवन्हीचा अनादर करून स्व-अस्तित्व दाखवू शकत नाहीत. "जे ज्यावाचून राहू शकत नाही ते त्यावाचून वेगळे नसते," या न्यायाने शिवशक्तीत अभिन्नरूपता असल्याने त्यांचे तादात्म्यच असते असे म्हणावे लागते. "गर्भ व गर्भिणीत भिन्नता नसते त्याप्रमाणे विश्ववैचित्र्य प्रथित करणारी स्वतंत्रशक्ती शक्तिमान् शिवाशी वेगळे होण्याची इच्छा करीत नाही." ही शक्ती शिवाहून वेगळी मानल्यास त्या शक्तीला रूप कसले ? व रूपाभावामुळे कार्यसंपादन शक्तीही जुळणार नाही व शेवटी विश्वस्फुरण होणार नाही. पण विश्व तर स्फुरतेच म्हणून शिवप्रकाशाशी अभिन्न अशी स्वातंत्र्यशक्तीच वेद्य व वेदकरूपाने स्फुरण पावते. याच आशयाने शिवसूत्रात "चैतन्यमात्मा ॥१.१॥" असा भावप्रधान निर्देश आहे. शिवाय क्रिया-भेदाने क्रियावानात भेद होत नाही. सतत क्रिया होत असल्या तरी कर्त्याच्या एकत्वात फरक किंवा विघाड होत नाही. तसेच शक्ती पुष्कळ असूनही शक्तिमानाचे एकत्व व्यभिचरित होत नाही. सर्व शक्तींचा एकाच स्वातंत्र्य शक्तीत अंतर्भाव होतो म्हणून ती सर्वत्र मान्य आहे. (३) तोच शक्तिमान् स्वतंत्र श्रेष्ठ देव स्व-स्वातंत्र्याने स्वत:वरच ( भिंतीवरील चित्राप्रमाणे )भासमान अशा विश्वाचे धारण पोषणादि करतो. तो विश्वव्यापनस्वभावी आहे म्हणून त्याला भैरव ही संज्ञा आहे. हाच शिव होय. या शिवभैरवाची संवित् कुंडलिनी शक्ती सर्वांना चेतविणारी, चैतन्य देणारी व सर्व ठिकाणी ओतप्रोत भरलेली परिपूर्ण अशी आहे. शास्त्रात असे म्हटले आहे की, "त्या ईश्वराची स्वतंत्र शक्ती काय करणार किंवा चिंतणार नाही ?सर्व काही तीच करते." त्रिशिर:शास्त्रात असे म्हटले आहे की,"हे जो जाणतो तो वृद्ध-ज्ञानी होय." या पराशक्तीच्या साहाय्यामुळे स्वात्मा अत्यंत निर्मलत्वामुळे दर्पणस्थानी होतो व त्यात उपादानकारणादिरहित असे प्रमातृप्रमेयादि वस्तुजात प्रतिबिंबित होते. लौकिक आरशात बिंबाच्या अपेक्षेने प्रतिबिंब पडते; पण ही पराशक्ती कुंडलिनी बिंबाशिवाय विश्ववैचित्र्य भासविते. हाच तो चैतन्याचा विलास किंवा शोभा होय. भट्ट उत्पलदेव म्हणतात, "उपादानसामग्रीशिवाय व अधिष्ठान म्हणजे भिंतीशिवायही जगच्चित्र रेखाटणाऱ्या अपूर्व कलावान् शंभूला नमस्कार असो. श्रीशक्तिसूत्रातही "स्वेच्छया स्वभित्तौ विश्वं उन्मीलयति ॥२॥" असेच म्हटले आहे. (४) त्या भैरवदेवाच्या संवित्प्रकाशाची विश्वरूपाने प्रफुल्लित होणारी स्वातंत्र्यनामक कुंडलिनी शक्ती प्रकाशादि क्रीडा करणारी आहे. ही दिव्यशक्तियुक्त देवी आत्मप्रकाशाशी अभिन्न आणि विश्वाचे विमर्शन व अवभासन करून पूर्णत्वाने स्फुरणारी असून स्वात्म्यात दर्पण-नगरादिवत् भेदाभेदत्वाने विश्वविमर्श करते म्हणून तिला परा-अपरा म्हणतात. विश्वोत्पन्न सर्व वस्तुजात स्वात्ममय आहे असे समजून ती विश्वाहंभावाविषयी समुत्सुक होऊन आत्मरूपपरामर्शासाठी प्रवृत्त होते. (५)

अशा प्रकारे चैतन्यचक्रवर्तीची शोभा असलेली कुंडलिनी शक्ती परा-अपरा स्वरूप असल्यामुळे एका बाजूने पिंडब्रह्मांडाची उभारणी करून जीवाला ती ज्याप्रमाणे निद्रिस्त अवस्थेप्रत जाऊन जन्ममरण परंपरा भोगावयास लावते त्याप्रमाणे सद्‌गुरुकृपेने शक्तिपात होऊन जेव्हा ती जागृत होते तेव्हा पिंडब्रह्मांडाची संहारणी करून जीवाला ती स्वसंवेद्य आत्मस्वरूपाप्रत घेऊन जाण्यास उद्युक्त होते. हे कार्य एकमात्र तीच करू शकते. तीच साधकाचे खरे साधन असते व तीच साध्यही असते; कारण ती शिवाची अभिन्न असलेली शोभा आहे. तिच्याशिवाय आत्मरूपपरामर्श कोणीही घडवू शकत नाही. त्यामुळे हिच्याशिवाय सर्व साधने केवळ बाह्य व्यापार ठरतात. ज्याप्रमाणे सूर्याचे किरणच फक्त सूर्याचे दर्शन घडवू शकतात किंवा दाहकताच फक्त अग्नीची अनुभूती आणून देते त्याप्रमाणे ही शोभारूप कुंडलिनी शक्ती साधकाला स्वस्वरूपाशी उपरोक्त दृष्टांताप्रमाणे अभिन्न असलेल्या शिवाशी एकरूप करते. हिचे हे साधन-साध्यस्वरूप श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात—

जे शून्यलिंगाची पिंडी । जे परमात्मया शिवाची करंडी ।
जे प्रणवाची उघडी । जन्मभूमी ।।६.२७३।।
हें असो ते कुंडलिनी बाळी । हृदयाआंतु आली ।
अनुहताची बोली । चावळे ते ।।२७४।।
शक्तीचिया आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें ।
तें तेणें आइकिलें । अळुमाळु ।।२७५।।
घोषाच्या कुंडीं । नादचित्रांचीं रूपडीं ।
प्रणवाचिया मोडी । रेखलीं ऐसीं ।।२७६।।
हेंचि कल्पावें तरी जाणिजे । परि कल्पितें कैचें आणिजे ।
तरी नेणों काय गाजे । तिये ठायीं ।।२७७।।
विसरोंनि गेलों अर्जुना । जंव नाशु नाहीं पवना ।
तंव वाचा आथी गगना । म्हणोनि घुमे ।।२७८।।
तया अनाहताचेनि मेघें । आकाश दुमदुमों लागे ।
तंव ब्रह्मस्थानींचें बेगें । सहज फिटे ।।२७९।।
आइकें कमळगर्भाकारें । जें महदाकाश दुसरें ।
जेथ चैतन्य आधातुरें । करूनि असिजे ।।२८०।।
तया हृदयाच्या परिवरीं । कुंडलिनिया परमेश्वरी ।
तेजाची शिदोरी । विनियोगिली ।।२८१।।
बुद्धीचेनि शाकें । हातबोनें निकें ।
द्वैत तेथ न देखे । तैसें केलें ।।२८२।।

निजकांती हारविली । मग प्राणुचि केवळ जाहाली ।
ते वेळीं कैसी गमली । म्हणावी पां ? ॥२८३॥
हो कां जे पवनाची पुतळी । पांघुरली होती सोनसळी ।
ते फेडूनियां वेगळी । ठेविली तिया ॥२८४॥
नातरी वायूचेनि आंगें झगटली । दीपाची दिठी निवटली ।
कां लखलखोनि हारपली । विजु गगनीं ॥२८५॥
तैशी हृदयकमळवेऱ्हीं । दिसे जैशी सोनियाची सरी ।
नातरी प्रकाशजळाची झरी । वाहत आली ॥२८६॥
मग ते हृदयभूमी पोकळे । जिराली कां एके वेळे ।
तैसें शक्तीचें रूप मावळे । शक्तीचिमाजीं ॥२८७॥
तेव्हां तरी शक्तीचि म्हणजे । एऱ्हवीं तो प्राणु केवळ जाणिजे ।
आतां नादबिंदु नेणिजे । कळा ज्योती ॥२८८॥
मनाचा हन मारु । कां पवनाचा आधारु ।
ध्यानाचा आदरु । नाहीं परी ॥२८९॥
हे कल्पना घे सांडी । तें नाहीं इये परवडी ।
हे महाभूतांची फुडी । आटणी देखां ॥२९०॥

कुंडलिनी शक्ती हीच निराकार परमात्म्याची साकार मूर्ती आहे. या शक्तिरूपी करंडीत किंवा संबळीतच परमात्मा शिव राहतो. ही शक्तीच ॐकाराची जन्मभूमी आहे. या सर्वाचा अर्थ असा की, शिवशक्ती ही एकरूप असून ज्याप्रमाणे अव्यक्त दशेत असलेले लिंग पिंडीच्या साहाय्याने व्यक्त होऊन दर्शनाला योग्य होते त्याप्रमाणे निर्विकल्प परब्रह्मस्वरूप आपल्या अंगभूत शक्तिरूपी शोभेच्या साहाय्याने व्यक्त होऊन साक्षात्काराला योग्य होते. ज्याप्रमाणे आपण करंडी किंवा संबळी देव ठेवण्याच्या कामाकरिता उपयोगात आणतो, त्यात दुसरे काही ठेवीत नाही, त्याप्रमाणे या कुंडलिनी शक्तिरूपी करंडीत देखील एका परमात्म्या शिवा-वाचून दुसरे काहीच नसते. शक्ती म्हटली म्हणजे शक्तीत शक्तच असतो हे उघड आहे. या कुंडलिनी शक्तीतूनच अव्यक्त असलेला ॐकार प्रकट होऊन शब्दब्रह्मात्मक पिंडब्रह्मांडाची रचना किंवा उभारणी होते व शक्ती जडस्वरूपाने मूलाधारात निद्रावस्थेला प्राप्त होते. पण जेव्हा ती सद्गुरुकृपेने जागृत होते तेव्हा साधक या ॐकाराच्या साहाय्यानेच प्रतिप्रसवक्रमाने पिंडब्रह्मांडाची संहारणी करीत शिव-स्वरूप होतो. हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज पुढे म्हणतात, ज्यावेळी जागृत कुंडलिनी शक्ती सुषुम्नाद्वारे हृदयात म्हणजे अनाहत चक्रापाशी येते तेव्हा अखंड अनाहत ध्वनी प्रकट होऊन तो साधकाला ऐकू येऊ लागतो. खरे पाहता ज्यावेळी बुद्धीला म्हणजे प्राणाला शक्तीच्या अंगाचा स्पर्श होत जातो त्यावेळी ते बुद्धिरूपी प्राण

हळूहळू चेतन होऊन अंशतः सुषुम्नेत प्रवेश करू लागतात व त्याचवेळी हा अनाहत नाद अळुमाळु म्हणजे सूक्ष्म ध्वनिरूपाने साधकाला ऐकू येऊ लागतो. पुढे जसजसा बुद्धिरूपी प्राणाचा शक्तीशी अधिकाधिक मेळ होत जातो तसतसे प्राण अधिकाधिक अंशाने जागृत होऊन साधकाचे संपूर्ण शरीरच एक घोषाचे कुंड बनते. त्यावेळी सर्व शरीरातून हा नाद उत्पन्न होत आहे व तो सर्व शरीराला व्यापून आहे असे वाटते. एवढेच नव्हे तर सर्व ब्रह्मांडकटाहामध्ये हा ध्वनी व्याप्त असून त्याचा घणघणाट चालू आहे अशी साधकाला अनुभूती येते. मग डोळे मिटल्यावर ध्यानात किंवा कधीकधी उघडया डोळयांनी सुद्धा हा अनाहत नाद ॐकाराचे रूप घेऊन किंवा प्रणवाच्या आकाराने रेखलेल्या चित्राप्रमाणे साधकापुढे साकार होतो. ही गोष्ट नुसत्या कल्पनेने जाणता येणार नाही; कारण प्रत्यक्ष अनुभूती ही कल्पनेने येऊ शकत नाही आणि कल्पनेने ही गोष्ट जाणावयाची म्हटली तरी प्रत्यक्ष साधनात हा अनाहत नाद कसा उत्पन्न होतो हे समजत नाही. जोपर्यंत प्राणशक्तीचा नाश होत नाही म्हणजे ती आज्ञाचक्र ओलांडून पलीकडे जात नाही तोपर्यंत ती आज्ञाचक्ररूपी गगनात दशविध नादाने गर्जना करीत घुमत असते. ज्यावेळी या अनाहत नादाच्या गडगडाटाने व वेगाने आज्ञाचक्ररूपी आकाश दुमदुमू लागते त्यावेळी ब्रह्मस्थानाला जाण्याचा मार्ग मोकळा होतो. या आज्ञाचक्राच्यावर कमळाच्या गर्भाच्या आकाराचे सहस्रारचक्र म्हणजे महदाकाश आहे. त्या सहस्रारचक्रात चैतन्यचक्रवर्ती शिव शक्तीशी ऐक्य पावण्याकरिता अत्यंत उत्कंठित असतो. जोपर्यंत शिवाशी शक्तीचे मीलन होत नाही तोपर्यंत शिव हा आधा म्हणजे अर्धाच असतो व शक्तीच्या मीलनासाठी तो आतुरही असतो. हृदयाकाशाच्या घरी म्हणजे सहस्रारात आलेली कुंडलिनी शक्ती आपल्या तेजाची शिदोरीच चैतन्याला अर्पण करते. याचा अर्थ जागृत अवस्थेत शक्ती ही पूर्ण तेजोमय व चैतन्यमय बनून शिवस्वरूप होते. (साधक साधन करताना रोजच ही अनुभूती घेत असतो. या अर्थानेच " छांदोग्य उपनिषदात " असे म्हटले आहे की, " स वा एष आत्मा हृदि तस्यैतदेव निरुक्तं हृद्यमिति तस्माद् हृदयमहरहर्वा एवं-वित्स्वर्गं लोकमेति ॥८.३.३॥" तो हा आत्मा हृदयात म्हणजे सहस्रारात आहे. " हृदि अयम् " तो हृदयात निवास करतो हीच त्याची व्युत्पत्ती आहे व त्याच्या निवासाला हृदय किंवा सहस्रार म्हणतात. ते जाणणारा पुरुष साधना करून स्वर्ग-लोकात म्हणजे सहस्रारात जाऊन प्रतिदिन शिवशक्तीच्या ऐक्याची अनुभूती घेतो.) ही शक्ती प्राणरूप होऊन सहस्रारात आली म्हणजे आपल्या बुद्धिरूपी भाजीचा म्हणजे प्राणरूपी शिदोरीचा उत्तम नेवेद्य शिवाला अर्पण करते म्हणजे शिवाशी एकरूप होते व तेथे द्वैताचा मागमूसही दिसणार नाही असे करून टाकते. या ठिकाणी सहस्रारात येऊन कुंडलिनी शक्तीचे शिवाशी मिलन झाल्यावर म्हणजे आपले तेज त्याला समर्पण केल्यावर ती केवळ प्राणस्वरूप होऊन राहते. हे मीलन, एकरूपता

किंवा अद्वैत कसे होते व दिसते म्हणून म्हणाल; तर ते असे सांगता येईल की, ज्याप्रमाणे एखाद्या वायूच्या पुतळीने पांघरलेला आपला सोन्याचा पितांबर सोडून बाजूला ठेवून आपल्या प्राणसख्याशी एकरूप व्हावे किंवा दिव्याच्या ज्योतीने वायूच्या अंगाला मिठी मारून त्याच्यात मिसळून जावे अथवा वीजेने चमचमाट करून आकाशात हरपून किंवा लुप्त होऊन त्याच्याशी एकरूप व्हावे त्याप्रमाणे सहस्रारूपी हृदयकमळापर्यंत सुषुम्नामार्गाने सोन्याच्या सतेज सरीप्रमाणे किंवा प्रकाशरूप पाण्याच्या झऱ्याप्रमाणे वाहत येऊन ती तेथील पोकळीत, सहस्रारातील शिवात, मिळून जाऊन एकरूप व एकरस होते. शिव म्हणजे शक्तीच असल्यामुळे या मीलनाच्या वेळी कुंडलिनी शक्तीचे रूप शक्तीतच लय पावते. असे मीलन झाल्यावर तिला शक्तीच म्हणावयाचे; पण एऱ्हवी शिवशक्तीचे मीलन म्हणजे प्राणाचे प्राणाशी झालेले मीलन असल्यामुळे सहस्रारात ती खरोखर केवळ प्राणरूपच असते. नाद, बिंदू, कळा व ज्योती ही तिची सर्व अंगे, विभाग किंवा अधोरूपात उत्पन्न झालेले विलास येथे ऊर्ध्वरूपात नाहीसे होतात. या अवस्थेत साधकाला मन मारावे किंवा जिंकावे लागत नाही, वायूचा आधार घेऊन निरोध करावा लागत नाही किंवा येथे ध्यानही करावे लागत नाही; कारण उपरोक्त सर्व गोष्टी शिवशक्ती ऐक्यात लय पावतात. एवढेच नव्हे तर कल्पना करावयाची ( पिंडब्रह्मांडाची उभारणी ) व कल्पना टाकावयाची ( पिंडब्रह्मांडाची संहारणी ) हे प्रकारही या स्थितीत संभवत नाहीत. अशी ही अनिर्वचनीय स्थिती आहे. ही स्थिती सद्गुरुकृपेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीमुळे सिद्ध झालेल्या सिद्धयोगमार्गामुळे पंचमहाभूतांची आटणी किंवा पूर्ण लय होऊन प्राप्त होते.

अशा प्रकारे स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देणारी कुंडलिनी शक्ती ही उन्मनीस्थितीचे सौंदर्य, तुर्येचे तारुण्य, विश्वाचे मूळ, आनंदाचे चैतन्य, आकाराचा प्रांत (म्हणजे विश्वाची उभारणी करणारी), मोक्षाचा एकांत (म्हणजे विश्वाची संहारणी करणारी ), महाभूतांचे बीज, महातेजाचे तेज असून शोभारूप असलेली ही माझी शक्तीच चतुर्भुज रूप घेऊन साकार होते असे श्रीकृष्ण स्वतः अर्जुनाला सांगत आहेत असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज स्पष्ट करतात. या दृष्टीने ते म्हणतात–

जें उन्मनियेचें लावण्य। जें तुर्येचें तारुण्य।
अनादि तें अगण्य। परमतत्त्व ।।६ ३२०।।
जें विश्वाचें मूळ। योगद्रुमाचें फळ।
जें आनंदाचें केवळ। चैतन्य गा ।।३२१।।
जें आकाराचा प्रांतु। जें मोक्षाचा एकांतु।
जेथ आदि आणि अंतु। विरोनी गेले ।।३२२।।

जें महाभूतांचे बीज । जें महातेजाचें तेज ।
एवं पार्था जें निज–। स्वरूप माझें ।।३२३।।
ते हे चतुर्भुज कोंभेली । जयाची शोभा रूपा आली ।
देखोनि नास्तिकीं नोकिलीं । भक्तवृंदें ।।३२४।।

असे हे शिवशक्ती सामरस्य आहे. आत्मस्वरूप जेव्हा चतुर्भुज होऊन साकार होते तेव्हा चैतन्यचक्रवर्तीची शोभाच ते रूप घेत असते. जेव्हा नास्तिक लोक भगवंताच्या प्रेमळ भक्तांना अत्यंत छळतात तेव्हा ती परब्रह्माची शोभारूप कुंडलिनी शक्ती सगुण साकार चतुर्भुज रूपाने प्रकट होते. त्यामुळे रामकृष्णादि सर्व अवतार या शक्तीचेच आहेत हे सिद्ध होते. शिवशक्तीचे ऐक्य निर्गुण-सगुण स्वरूपाने अशा प्रकारे खालच्या थरापर्यंत अवतरित होत असते. हे कसे घडते हे सांगताना " सौभाग्योदय किंवा सुभगोदय स्तुतिः " या प्रकरण ग्रंथात श्रीमदाद्य-शंकराचार्यांचे गुरू श्रीगौडपादाचार्य म्हणतात–

भवानि त्वां वंदे भवमहिषि सच्चित्सुख वपुः
पराकारां देवीममृतलहरीमैंदवकलाम् ।
महाकालातीतां कलितसरणी कल्पिततनुं
सुधासिंधोरन्तर्वसतिमनिशं वासरमयीम् ।।१।।

हे भवानी ! हे शंकराचे पट्टराणी !! तू सच्चिदानंद रूप, पराकार देवी व अमृताची लहरच आहेस. तू चंद्रकला असून महाकालाचेही अतिक्रमण करणारी आहेस. तू किरणांनी सजविलेली अशी कल्पित शरीराची असून नेहमी अमृताच्या सरोवरात वास करणारी म्हणजे अंधकाररहित व दिवसाच्या प्रकाशाप्रमाणे प्रकाशवती आहेस. तुला मी नमस्कार करतो. या श्लोकावर हिंदीत टीका करताना डॉ. ताराचंद गर्ग म्हणतात, " इसमें भगवती कुंडलिनी शक्तिकी स्तुति है। कुंडलिनी शक्तिही भवानी है ( ललितसहस्रनाम– ११० वा नाम )। भगवती भगवान् शंकरको जीवन देनेके कारण भवानी कहलती है। माँ भगवतीका श्रीविग्रह सचिदानंदस्वरूप है। श्रुति, पुराण, उपनिषद्, आगम, निगम आदि सब शास्त्र एक स्वरसे उस परा शक्तिको सच्चिदानंदरूपसे पुकारते हैं । देवीभागवत पुराणमें कहा है–

महाकुंडलिनीरूपे सच्चिदानंदरूपिणि ।
प्राणाग्निहोत्रविद्ये ते नमो दीपशिखात्मिके ।।४.१५.१३।।

हे सच्चिदानंदस्वरूप देवी ! तू प्राणाग्निहोत्रकी देवता है। तू महाकुंडलिनी और दीपशिखात्मकरूप है। भगवती पराशक्ति अपरिवर्तनशील है। केवल यह परात्पर शक्तिही सापेक्षितासे रहित परमसत्य है । प्रख्यात विज्ञानवेत्ता श्री. अल्बर्ट आइन्स्टीनके सापेक्षिताके सिद्धांतने भी इस तथ्यको सिद्ध कर दिया है। जो

कुछभी इस संसारमें है, वह सब साक्षेप है । परमसत्य ( Absolute ) तो केवल एकही हो सकता है । और वह है परब्रह्म या परमतत्त्व या पराशक्ति। इसलिये यह भगवती पराशक्ति सत्यस्वरूप है। महानिर्वाण तंत्रमें कुंडलिनी शक्तिकोही परब्रह्म कहा है । "

ॐ नमस्ते परमं ब्रह्म कुंडलिनीस्वरूपिणे ।
निर्गुणाय नमस्तुभ्यं सद्रूपाय नमो नमः ॥

शिवशक्तीचे हे एक्य किंवा शक्ती ही चैतन्यचक्रवर्तीची शोभा आहे हा सिद्धांत " Principles of Tantra, " part I, या पुस्तकातील Shiva and Shakti या प्रकरणात Sir John woodroffe यांनी पुढीलप्रमाणे मांडला आहे. ते म्हणतात " We shall possibly, while dealing with the subject of sadhana, be able to present to the scrutiny of sadhakas a sketch of a part of that aspect wherein bliss has its full play and which is monistic and eternal and above maya. Here we must understand that Chaitanya ( consciousness ) is nothing but Shakti, although the word itself is neuter in gender. The Nirvana-Tantra says:

" In the Satyaloka, Mahakali and Mahanidra iive, embracing one another inseparably. That eternal Shakti, possessing the lusture of the moon, the sun and fire, taken together and united with the eternal Purusha, exists Like a grain of gram. ( That is to say just as the two halves of a grain of gram are attached to one another, Sò they too are attached to one another. ) As a grain of gram in covered by an external Shell, so She is covered by her own covering of maya. As the Shell of a grain of gram is dark and hard compared with its brilliant and soft halves, so maya also, discordant with its three gunas, is dark and hard, compared with Shiva-Shakti, full of brilliance and Soft with supreme bliss. As the whole, consisting of two halves and a Shell, is called gram, so the whole consisting of Shiva-Shakti and maya, is called Brahman. To an ordinary observer, making his observation from outside the shell, a grain of gram seems to contain only one thing, but, he who can see

through the shell finds within that two halves facing and inseparably attached to one another. Similarly, he who judges Brahma-tattva through maya finds Brahman to be but one. To the eyes, however, of an adept in such knowledge, an accomplished Sadhaka, who is aware of the deceptive character of maya, there are manifested both His aspects of Shiva and Shakti, all full of supreme love. As sparks shoot from a burning fire, so Jivas, forming parts of her body, shoot from the limbs of the luminous Devi into infinite millions of Brahmandas." ( Page–378–373 )

ज्यावेळी कुंडलिनी शक्तीची कृपा पूर्णपणे आविष्कृत होईल व ती मायेच्यावर असलेल्या अशा एकमेवाद्वितीय व अनादि अवस्थेत असेल त्यावेळी आपण साधनेच्या विषयाचा विचार करताना साधकांच्या अवस्थेचे अंशात्मक विश्लेषण बहुत करून उपस्थित करू शकू. जरी चैतन्य हा शब्द नपुसकलिंगी असला तरी येथे आपण हे लक्षात ठेविले पाहिजे की, चैतन्य म्हणजे दुसरेतिसरे काही नसून शक्तीच आहे. निर्वाणतंत्रात असे म्हटले आहे की, "सत्यलोकात महाकाली व महानिद्रा एकमेकांना आलिंगन देऊन अविभक्तपणे राहतात. चंद्र, सूर्य व अग्नी यांच्याप्रमाणे तेजस्वी असलेली ही अनादि शक्ती एखाद्या हरबऱ्याच्या दाण्याप्रमाणें अनादि पुरुषाबरोबर एकरस व एकरूप झालेली असते. (याचा अर्थ असा की, ज्याप्रमाणे हरबऱ्याच्या दाण्याचे दोन भाग एकमेकाशी संलग्न झालेले असतात त्याप्रमाणे ही शक्ती व पुरुष एकत्रित झालेली असतात.) ज्याप्रमाणे हरबऱ्याचा दाणा बाहेरील टरफलाने आच्छादित झालेला असतो त्याप्रमाणे ही शक्ती तिच्याच मायास्वरूपाने आच्छादिलेली असते. तुलनात्मक दृष्टीने विचार करताना हरबऱ्याच्या दाण्याचे टरफल हे ज्याप्रमाणे आतील तेजस्वी व मऊ अशा दोन्ही भागांपेक्षा अधिक काळे व कठीण असते त्याप्रमाणेच त्रिगुणांसह असलेली विसंगत माया ही संपूर्ण बुद्धिप्रकाशयुक्त व परमकृपेने हळुवार असलेल्या अशा शिवशक्तीशी तुलना करताना काळी व कठीण वाटते. ज्याप्रमाणे दोन भाग व वरील टरफल मिळून एक हरबऱ्याचा दाणा पूर्ण होतो त्याप्रमाणे शिव, शक्ती व माया मिळून जे संपूर्ण स्वरूप तयार होते त्याला ब्रह्म म्हणतात. हरबऱ्याच्या दाण्याचे टरफलाच्या वरून निरीक्षण करणाऱ्या सामान्य निरीक्षकाला हरबऱ्याच्या दाण्यात एकच गोष्ट सामावलेली आहे असे वाटते; परंतु जो कोणी त्या टरफलामधून आत पाहू शकतो त्याला दाण्याचे दोन्ही भाग एकमेकांसमोर सम्मुख असून ते परस्परांशी अविभक्तपणे संबद्ध झाल्याचे दृष्टीस पडते. याच रीतीने जो मायेचा भेद करून ब्रह्मतत्त्वाचे परीक्षण करतो त्याला ब्रह्म हे एकमेवाद्वितीय आहे असे प्रतीत होते. सर्वसाधारणपणे या ज्ञानाच्या बाबतीत

एखाद्या तज्ज्ञाच्या दृष्टीने पूर्णत्वास गेलेला साधक हा मायेच्या फसव्या स्वरूपाबद्दल जागृत असल्याने त्याच्या ठिकाणी परमप्रेमयुक्त शिवशक्तीचे दोन्ही पैलू आविष्कृत होतात. ज्याप्रमाणे प्रदीप्त अग्नीपासून ठिणग्या बाहेर पडतात त्याप्रमाणे या शक्तीच्या शरीरापासून तयार झालेले जीव देवीच्या तेजस्वी अवयवांपासून उत्पन्न होऊन अनंतकोटी ब्रह्मांडात पसरतात.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "या उपाधीमाजीं गुप्त। चैतन्य असे सर्वगत ॥२.१२६॥" असे म्हणून उपरोक्त सिद्धांतच पुढीलप्रमाणे प्रस्थापित करून चैतन्य-चक्रवर्तीच्या शोभेमुळे पिंडब्रह्मांडाची उभारणी व संहारणी होत असते हे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात–

**तैसीं चैतन्याच्या ठायीं। इये शरीरांतरें होती जाती पाहीं ॥२.११०॥**
**जें सर्वत्र सर्वहीं देहीं। जया करितांही घातु नाहीं।**
**तें विश्वात्मक तूं पाहीं। चैतन्य एक ॥२.१७७॥**
**चैतन्याच्या अंशीं। शरीरा दशा जैशी ॥२.३२८॥**
**आइकें सकळ देवांचिया परदेवते। तुवां चैतन्यें गा विश्व वसतें ॥११.३८४॥**
**आणि कूटस्थु जो अक्षरु। दाविला पुरुषप्रकारु।**
**तेणें उपहिताही आकारु। चैतन्या केला ॥१६.४३॥**

अशी ही शक्ती असल्यामुळे "तूं अवीट तें पाहीं। चैतन्य एक ॥२.१६९॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शिवशक्तीची एकता प्रस्थापित केली आहे. शिव जर शक्तीसह नसेल, आपल्या शोभेसह नसेल व प्रकाशासह नसेल तर त्यात अवीटपणा येणार नाही. किंबहुना चैतन्यचक्रवर्ती म्हणजेच त्याची शोभा व शोभा म्हणजेच चैतन्यचक्रवर्ती होय. यादृष्टीनेच "तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि," या ग्रंथातील "सत्यका परम रूप तथा महाशक्तिकी लीला" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, "जो परम शिव है वह परमा शक्ति है। शक्ति बिना शिव इच्छाहीन, ज्ञानहीन, क्रियाहीन और स्पंदनमें असमर्थ, शवमात्र है; और प्रकाशात्मक शिवके बिना शक्ति आत्मप्रकाशमें भी असमर्थ है। दोनोंही चिद्रूप होनेके कारण स्वरूपतः अभिन्न हैं, एवं एकको छोडकर दूसरा रह भी नहीं सकता। वस्तुतः चित्स्वरूपमें लिंगभेद नहीं है। इसलिए वह अलिंग होकर भी, सर्वलिंग रूपमें प्रकाशित होता है तथा नाना लिंगरूपमें प्रकट होने पर भी अलिंग है। बृहणीमें लिखा है–

**शिवो देवः शिवा देवी शिवज्योतिरिति त्रिधा।**
**अलिंगमपि तत्त्वत्वं लिंगभेदेन कथ्यते ॥ (कुमारकृत तत्त्वप्रकाश व्याख्या)**

यह निम्न निर्दिष्ट श्वेताश्वतर श्रुतिकीही प्रतिध्वनि है–

**"नैव स्त्री न पुमानेष नचायं (स्यात्) नपुंसकः।"**

यह चिति देश, काल, आकार आदिद्वारा परिछिन्न नहीं है, इसका अवच्छेदक कोईभी नहीं है; इसलिए यह अखंड है।

"देशकालाकारभेदः संविदो नहि युज्यते।
तस्मादेकैव पूर्णाहं विमर्शात्मा चिदुच्यते॥"

इस अखंड सत्तामें बोध और स्वातंत्र्य अभिन्नरूपसे विद्यमान है। इसे स्वातंत्र्यमय बोध या बोधरूप स्वातंत्र्य जो कुछभी कहा जाय, अद्वैत–दृष्टिसे यही आत्मा है, स्वात्मा है और यही निखिल जगत्की आत्माके रूपसे माना जाता है।

यह यद्यपि शिव तथा शक्ति का अभेद है, फिर भी जागतिक दृष्टिकोणमें इसमें शिवांश निष्क्रिय और साक्षी है तथा शक्त्यंश सर्वदा पंचकृत्यकारी है, यही शक्त्यंश कही महेश्वर या महेश्वरी है। यह सर्वदाही पूर्ण है और सर्वदाही रिक्त है। यहाँ पूर्णता तथा रिक्ततामें कोई अंतर नहीं है। यह एक रहकर भी अनंत है तथा अनंत होकर भी नित्यही एक है, फिर भी विकल्पहिन होने के कारण, एक और अनंत ऐसा विकल्पभी इसमें नहीं है। यह कहनेकी आवश्यकता नहीं है कि यह पूर्णरूप जैसा एक ओर विश्वोत्तीर्ण शिवरूप है, ठीक वैसाही दूसरी ओर विश्वमय शक्तिरूप भी है, क्योंकि एकही समय दोनों हैं।

अनंत वस्तुतः एकही है, यही उस स्थानमें प्रकाशित होता है। वहाँ विश्व भी शिवात्मक है, शिवसे अभिन्न है, यही विश्वोत्तीर्ण दशा है; क्योंकि इसमें विश्वका पृथक्त्व नहीं रहता। परंतु परमशिव अवस्थामें कुछ विशेषता है। परमशिव तो शिवही है, इसीलिए पूर्ववर्णित शिवस्वरूप भी वह है। लेकिन परमशिव पराशक्तिके साथ नित्ययुक्त है। अतः उनमें शिवभाव रहनेपर भी शक्तिभाव भी रहता है। इसीलिए विश्वका भान अभिन्नरूपमें होता है, क्योंकि लीलामयी महाशक्तिके बाहर तो विश्वका कोई रूप रह नहीं सकता। इसीलिए परमशिवकी दृष्टिमें "शिवादिधरण्यन्तमखिलमभेदेनैव स्फुरति, न तु वस्तुतः अन्यत् किंचिद् ग्राह्यं ग्राहकं वा, अपितु श्रीपरमशिवाभट्टारक एव इत्थं नानावैचित्र्यसहस्रैः स्फुरति।" ज्ञानीकी भाषामें अद्वैत शिवका नाम परमशिव है, उपासककी भाषामें अद्वैतशक्तिका नाम महाशक्ति है या परमाशक्ति है। दोनो नाम एकही अखंड सत्ताके निर्देशक हैं। देखनेमें आता है कि चित्रकार अपनी निपुणता दिखलानेके लिए गज, वृषभ आदि भिन्न स्वभाववालोंकी रचना इस प्रकार करते हैं कि उसमें एक प्रकारकी संनिवेशयोजना द्वारा एकका अवभास होता है तथा अन्य संनिवेशयोजनासे अन्यका स्फुरण होता है, अर्थात् गजवृषभ चित्रमें एक दृष्टिसे जहाँ गज दखलाई देता है, दूसरी दृष्टिसे वही वृषभ भी दीख पडता है। जैसे ये विशिष्ट चित्र गज और वृषभ दोनों आकारके प्रकाशक हैं, वैसेही एकही पदार्थमें शिव और शक्ति दोनोंही कल्पनाओंका विधान है। यद्यपि सभी सब हैं, अर्थात् शिव भी शक्ति है और शक्ति भी शिव है; तथापि प्रकाश कदापि विमर्शक्रियता छोडता नहीं तथा विमर्श भी प्रकाशकर्तृत्वका त्याग नहीं

करता। इसीलिए शिव और शक्तिका वास्तविक रूप ऐक्यस्वभाव है। कोमल-वल्लीस्तलमें सिद्ध महेश्वरानंदने भगवतीको लक्ष्य करके कहा है–

**"त्वं यथा शिवमयी तथा शिवस्त्वन्मयो हि शिवयोरभेदिनोः।**
**तत्त्वमेकमबहिर्मुखास्पदं यत्र भिन्न इव विश्वविक्रिया॥"**

श्रीयोगींद्रपुण्यानंदनाथांनी आपल्या "कामकलाविलास" ग्रंथातही ही कुंडलिनी शक्ती चैतन्यचक्रवर्तीची शोभा आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

**स्फुटशिवशक्तिसमागमबीजांकुररूपिणी पराशक्तिः।**
**अणुतररूपानुत्तरविमर्शलिपिलक्ष्यविग्रहा भाति॥३॥**

पराशक्ती कुंडलिनी हीच सर्वश्रेष्ठ आहे. तीच शिवशक्तीच्या समागमाचे किंवा सामरस्याचे बीज व अंकुर दोन्हीही आहे. ती अत्यंत सूक्ष्म आहे. वर्णमालेतील पहिले अक्षर 'अ' व शेवटचे अक्षर 'ह' मिळून तिचे स्वरूप तयार होते. अशी ही शिवाची पराशक्ती सुशोभित होते. श्रीअमृतवाग्भवाचार्यांनी "श्रीमहानुभाव-शक्तिस्तव" या प्रकरण ग्रंथामध्येही ही कुंडलिनी शक्ती चैतन्यचक्रवर्तीची शोभा आहे अशी अनुभूती साधकाला कशी येते हे सांगताना असे वर्णन केले आहे की–

**चिदानंदाशंसा विदिक्कृतिमयी भावसुभगा**
**कला धन्या कन्या जयकृतिरनन्या शिवगुरोः।**
**दधानैंद्रीं भूतिं हिमकिरणशौक्लीं तनुरुचिं**
**प्रभां सौरी सोमामृतकवलिनी पातु जयिनी॥७॥**

या श्लोकार हिंदीत टीका करताना पं. बलजिन्नाथ म्हणतात, "जिस रूपमें सिद्धलोग इस भगवती पराशक्तिकी उपासना करते हैं, भगवतीके उस कुंडलिनी रूपका वर्णन इस सातवे श्लोकमें किया जाता हैं। चित् और आनंद भगवतीके दो नाम है। भगवती स्वयं ज्ञानक्रियामयी है। जगत्‌के समस्त भाव इसीके रूपांतर है। इन भावोंसे इसका रूप अत्यंत मनोहर बना हुआ है। यह शक्तिही परमेश्वरकी कला है। यही तो धन्य है; क्योंकि इसीके बलबूतेपर परमेश्वर अपनी परमेश्वरताको निभाते हैं। परमेश्वर इसीको अत्यंत चाहते हैं। परम गुरु भगवान् शिव शक्तिहीके कारण सबसे उत्कृष्ट बने हुए हैं। यह भगवती शिवसे अभिन्न है; क्योंकि शिव शक्तिसे रहित नहीं रह सकते और शक्ति शिवसे रहित नहीं रह सकती। इन दोनोंमें पूर्ण अभेद है। सिद्ध लोक जब कुंडलिनीके रूपमें इसकी उपासना करते हैं तो उन्हें यह करुणाशील भक्तवत्सला देवी ललाटके मध्यमें इंद्रधनुषकी जैसी कांतिवाले, सहस्रारचक्रमें चंद्रकी किरणोंके समान शुभ्रवर्ण द्युतिवाले और हृदयमें भगवान् आदित्यकी जैसे अरुण ज्योतिवाले अपने स्वरूपका दर्शन देती है और सिरमें स्थित चंद्रमंडलसे टपकनेवाले अमृतकी बूंदोंका आस्वाद लेती रहती है। इस प्रकार सबसे वडे उत्कर्षको धारण करनेवाली कुंडलिनी भगवती हमारी रक्षा करे।"

सारांश, चैतन्यचकवर्तीची शोभा असलेल्या कुंडलिनी शक्तीचे स्वरूप हे निखळ साधनात्मक आहे असा परम सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडला आहे. " तैसें चित्त लया जाये। आणि चैतन्यचि आघवें होये। ऐसी प्राप्ति सुखोपायें। आहे येणें ॥६.३८६॥" असे जेव्हा ते म्हणतात तेव्हा मूलाधारातील चित्तरूपी कुंडलिनी शक्ती जेव्हा सहस्रारात जाऊन चैतन्याशी एकरूप होते तेव्हाच चैतन्य आघवे म्हणजे परिपूर्ण होते व जीव सुखरूप होतो हे त्यांना सांगावयाचे आहे. " अगा योगी जो म्हणिजे। तो देवांचा देवो जाणिजे। आणि सुख सर्वस्व माझें। चैतन्य तो ॥६.४८२॥" या ठिकाणीही श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जीवरूपाने संकुचित झालेली कुंडलिनी शक्तीच शेवटी सिद्धयोगमार्गाने चैतन्यस्वरूप होते हे स्पष्ट केले आहे. " जयाचें मनचि चैतन्य जाहलें ॥५.३६॥, ते सत्त्वाचे सात्त्विक। कीं चैतन्याचे आंगिक ॥५.१४०॥, एऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे। तो चैतन्यचि केवळ माझें ॥७.१२६॥, ना तें समुद्रचि होऊन ठेलें। तेविं चित्ताचें चैतन्य जाहालें। जेथ यातायात निमालें। घनानंद जें ॥८.८५॥, तो देहसंगे तरी असे। परी चैतन्यासारिखा दिसे ॥४.११५॥" असे नानाठिकाणी म्हणत असताना श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्या चैतन्यचक्रवर्तीचे वर्णन करीत आहेत तो आपल्या शोभेसह साधनांती एकरूप होऊन विराजमान झालेला आहे हे नितांत सत्य आहे; कारण त्याशिवाय मनाचे किंवा चित्ताचे चैतन्य जाहाले याचा दुसरा अर्थच असू शकत नाही. त्यामुळेच " परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्। पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥गीता १०.१२॥" अशा परमात्म्याचे किंवा चैतन्याचे स्वरूप उभयविध आहे, शिवशक्तियुक्त आहे व चैतन्यचक्रवर्ती त्याच्या शोभेसह आहे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " तूं पुरुष जी पंचविसावा ॥१०.१५०॥" व " अनादिसिद्ध तूं स्वामी ॥१९.१५१॥" असे म्हणून त्या चैतन्याचे शिव किंवा पुरुषस्वरूप ज्याप्रमाणे कथन केले आहे त्याप्रमाणेच " तूं या कालत्रयासि सूत्री। तूं जीवकळेची अधिष्ठात्री। तूं ब्रह्मकटाहधात्री। हें कळलें फुडें ॥१०.१५२॥" असे म्हणून त्या चैतन्याचा दुसरा अविभाज्य घटक जो शक्ती किंवा शोभेच्या रूपाने नेहमी विलसत असतो त्याचेही वर्णन केले आहे. चैतन्यचक्रवर्तीच्या शोभेसह असलेल्या स्वरूपाची प्रतीती किंवा अनुभूती महायोगी गोरक्षनाथांनी " महार्थमंजरीत " वर्णन केलेल्या एकमात्र अर्थपंथाने म्हणजेच सिद्धयोगाने, कुंडलिनी शक्ती सद्‌गुरुकृपेने चेइल्याने, कशी येते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तरी पार्था जें ऐसें। बोधलेनि जीवें दिसें।
स्वप्न कां जैसें। चेइलेनी ॥१४.२८८॥
नातरी आपण जळीं। बिंबलों तीरोनी न्याहळी।
चळण होतां कल्लोळीं। अनेकधा ॥२८९॥

कां नटलेनि लाघवें। नटु जैसा न झकवे ।
तैसें गुणजात देखावें। न होनियां ॥२९०॥
पैं ऋतुत्रय आकाशें। धरूनियांहि जैसें ।
नेंदिजेचि येवों वोसें। वेगळेंपणा ॥२९१॥
तैसें गुणीं गुणापरौतें। जें आपणपें असे आयितें ।
तिये अहं वैसे अहंते। मूळकेचिये ॥२९२॥
पैं तेथूनि मग पाहतां। म्हणे साक्षी मी अकर्ता ।
हे गुणचि क्रियाजातां। नियोजित ॥२९३॥
सत्त्वरजतमांचा। भेदीं पसरु कर्माचा ।
होत असे तो गुणांचा। विकारु हा ॥२९४॥
ययामाजीं मी ऐसा। वनीं कां वसंतु जैसा ।
वनलक्ष्मीविलासा। हेतुभूत ॥२९५॥
कां तारांगणीं लोपावें। सूर्यकांतीं उद्दीपावें ।
कमळीं विकासावें। जावें तमें ॥२९६॥
ये कोणाचीं काजें कहीं। सवितिया जैसी नाहीं ।
तैसा अकर्ता मी देहीं। सत्तारूप ॥२९७॥
मीं दाऊनि गुण देखे। गुणता हे मियां पोखे ।
ययाचेनि निःशेखें। उरे तें मी ॥२१८॥
ऐसेनि विवेकें जया। उदय होय धनंजया ।
ये गुणातीतत्व तया। अर्थपंथें ॥२९९॥

यापेक्षा चैतन्यचक्रवर्तीच्या शोभारूप कुंडलिनी शक्तीचे सर्वांग परिपूर्ण असे दुसरे स्वरूप काय असू शकेल ?

## चैतन्याची परमप्रेमरूप शक्ती :—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "हें असो शब्दब्रह्म जिये बाजे। शब्द मावळलेया निवांतु निजे। तो गीतार्थु मऱ्हाठिया बोलिजे। हा पाडु काई ? ॥ ९.२२ ॥" असे म्हणून शब्दब्रह्म म्हणजे शक्तिसहित असलेले ब्रह्म जेव्हा शब्द म्हणजे शक्ती पूर्ण विरून ब्रह्माशी एकरूप होऊन सहस्रारूपी बाजेवर निवांतपणे निजते तेव्हा जीव कृतार्थ होतो व हाच खरा गीतार्थ असून तो मराठी भाषेत वर्णन करण्याचे माझे सामर्थ्य नाही असे अत्यंत विनयाने सुचवून लगेच "कां जैं दिठिवा तुमचा वरुषे। तैं सकळार्थ सिद्धि मती पिके। एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके। जरी उदास तुम्ही ॥ ९.२५ ॥" असा सिद्धांत त्यांनी मांडला आहे. याचा अर्थ असा की, ज्यावेळी सद्‌गुरू श्रीनिवृत्तिनाथमहाराजांची शक्तिपातरूपी कृपादृष्टीरूप वृष्टी

माझ्यावर होईल त्यावेळी चैतन्याची परमप्रेमरूप कुंडलिनी शक्ती जागृत होऊन माझ्या ठिकाणी सकल गीतार्थ कवळण्याची बुद्धी उपस्थित होईल; कारण जागृत शक्ती हाच उपरोक्त गीतार्थ स्पष्ट करण्याचा एकमेव मार्ग आहे. जर अशा प्रकारे सद्‌गुरूंनी शक्तिपात करून माझी शक्ती जागृत केली नाही व ते या बाबतीत उदास राहिले तर माझ्या ठिकाणी गीतार्थ मराठीत सांगण्याची जी इच्छा किंवा या कुंडलिनी शक्तीचा उन्मेष जन्मजन्मांतराच्या पुण्याईने अंकुरित झाला आहे अर्थात् जे ज्ञान गीतार्थ सांगण्यास अंकुरदशेत उदित झालेले आहे ते सुकून जाईल, असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. हे सांगत असताना श्रीगुरू म्हणजे चैतन्य व शिष्य म्हणजे त्या चेतन्याची परमप्रेमरूप शक्ती होय हा अमर सिद्धांत श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी प्रकट केला आहे. वास्तविक पाहता "गुरुशिष्य पदेप्येष वेद्यभेदोऽप्य-तात्त्विकः। प्रष्ट्री च प्रतीवक्त्री च स्वयं देवी व्यवस्थिता" (तंत्रालोक १.२५६) या न्यायाने चैतन्याची परमप्रेमरूप शक्तीच गुरु-शिष्यरूपाने प्रकट होऊन अलौकिक ग्रंथ रचनेचा प्रपंच करते. गीता व ज्ञानेश्वरी ही या शक्तीच्या परमप्रेमाचीच फळे आहेत. त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> आधींची चित्त मायेचें। वरी मिष जाहले पढियंताचें।
> आतां तें अद्‌भुतपण स्नेहाचें। कवण जाणे ॥५·१७०॥
> तें म्हणों कारुण्यरसाची वृष्टि। कीं नवया स्नेहाची सृष्टि।
> हें असो नेणिजे दृष्टी। हरीची वानूं ॥१७१॥
> जे अमृताची वोतली। कीं प्रेमचि पिऊनि मातली।
> म्हणौनि अर्जुनमोहें गुंतली। निघों नेणें ॥१७२॥
> हें बहु जें जें जल्पिजेल। तेथें कथेसि फांकु होईल।
> परी ते स्नेहरूपा न येल। बोलवरी ॥१७३॥

हे गुरुशिष्याचे, श्रीकृष्णार्जुनांचे, जीवशिवाचे किंवा शिवशक्तीचे प्रेमच अत्यंत अद्‌भुत आहे. या प्रेमाचे यथार्थ वर्णन शब्दांनी करता येणार नाही; कारण चैतन्याच्या परमप्रेमरूप कुंडलिनी शक्तीची कथाच अत्यंत लावण्ययुक्त रसाळ, कोवळी, प्रेमास्पद, सौभाग्यसुंदर, सुखकर, मधुर व श्रृंगारपूर्ण आहे. प्राणशक्ती कुंडलिनी श्रीगुरुकृपेने जागृत होऊन तिचे सुषुम्नेत चालन झाले की, परमप्रेमाची ही कथा सुरू होऊन श्रृंगारादि नाना रसांच्या आविष्काराने व विविध भावभावनांनी संपन्न बनून ती आविष्कृत होते. जन्मोजन्मीच्या वियोगामुळे किंवा विरहामुळे तडफडणारे जीव व शिव किंवा शक्ती व शिव अगर गुरू व शिष्य ज्यावेळी ईश्वर संकेताने जवळ येऊ लागतात त्यावेळी ही कथा सुरू होते. अर्थात् जीवाचे किंवा शक्तीचे शिवाशी सहजासहजी मीलन होत नाही. पूर्वसंस्कार, जडता, व्याधी स्त्यान, आळस, प्रमादादि खलनायक या मार्गात सतत आडवे येत राहतात.

अर्थात् या खलनायकांची, पूर्वपुण्याईमुळे मधूनमधून होणारी अनुपस्थिती, जेव्हा शिवशक्तीच्या अंशात्मक मीलनाला कारणीभूत होते, तेव्हा नाना रस व भाव यांच्या आविष्काराने जे प्रेमाचे प्रकटीकरण स्वतःच्या ठिकाणी होते, त्यामुळे साधक धन्य होतो. मात्र ज्यावेळी उपरोक्त सर्व खलनायकांचा पूर्णपणें निःपात होतो त्यावेळी शक्तीचे शिवाशी सहस्रारात महामीलन होऊन परमप्रेमाची ही कथा संपते. असे हे या अद्भुत कथेचे माहात्म्य असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

आतां अवधारा कथा गहन। जे सकळां कौतुकां जन्मस्थान।
कीं अभिनव उद्यान। विवेकतरूचें ॥१.२८॥
ना तरी सर्व सुखाचि आदि। जे प्रमेयमहानिधि।
नाना नवरससुधाब्धि। परिपूर्ण हे ॥२९॥
कीं परमधाम प्रकट। सर्व विद्यांचें मूळपीठ।
शास्त्रजाता वसौट। अशेषांचें ॥३०॥
ना तरी सकळ धर्मांचें माहेर। सज्जनांचें जिव्हार।
लावण्यरत्नभांडार। शारदेचें ॥३१॥
नाना कथारूपें भारती। प्रकटली असे त्रिजगतीं।
आविष्कारोनि महामतीं। व्यासाचिये ॥३२॥
म्हणौनि हा काव्यांरावो। ग्रंथ गुरुवतीचा ठावो।
एथूनि रसां झाला आवो। रसाळपणाचा ॥३३॥
तेवींचि आइका आणिक एक। एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक।
आणि महाबोधीं कोंवळीक। दुणावली ॥३४॥
एथ चातुर्य शहाणें झालें। प्रमेय रुचीस आलें।
आणि सौभाग्य पोखलें। सुखाचें एथ ॥३५॥
माधुर्यीं मधुरता। शृंगारीं सुरेखता।
रूढपण उचितां। दिसे भलें ॥३६॥
एथ कळाविदपण कळा। पुण्यासि प्रतापु आगळा।
म्हणौनि जनमेजयाचे अवलीळा। दोष हरले ॥३७॥
आणि पाहतां नावेक। रंगी सुरंगतेची आगळीक।
गुणां सगुणपणाचें बिक। बहुवस एथ ॥३८॥

ही कथा गुरुशिष्यांची आहे. गुरूने शिष्यावर केलेल्या शक्तिपाताने जागृत झालेल्या शक्तीची शिवाशी मीलन होताना आविष्कृत होणाऱ्या शृंगाररसाची ही कहाणी असून ती पतीपत्नीच्या सुरतप्रसंगापेक्षाही गुह्य असल्याने ती गुरुशिष्यां-पुरतीच मर्यादित असते. चैतन्याच्या परमप्रेमरूप कुंडलिनी शक्तीचे जागरण, श्रीसद्गुरू आपल्या ठिकाणी असलेल्या परंपराप्राप्त शक्तीचे शिष्यदेहात संक्रमण

करून, घडवून आणीत असल्याने श्रीसद्‌गुरुनाथ श्रीकृष्णमहाराज या बाबतीत अर्जुनापुरतेच कसे मर्यादित झाले हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जें न संगेचि पितया वासुदेवासी । जें न संगेचि माते देवकीसी ।
जें न संगेचि बळिभद्रासी । तें गुह्य अर्जुनेंशीं बोलत ॥४.८॥
देवी लक्ष्मीएवढी जवळिक । परीं तेही न देखे या प्रेमाचें सुख ।
आजि कृष्णस्नेहाचें बिक । यातेंचि आथी ॥९॥
सनकादिकांचिया आशा । वाढीनल्या होतिया कीर बहुवसा ।
परी त्याही येणें मानें यशा । येतीचिना ॥१०॥
या जगदीश्वराचें प्रेम । एथ दिसततसें निरुपम ।
कैसें पार्थें येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥११॥
हो कां जयाचिया प्रीती । अमूर्त हा आला व्यक्ती ।
मज एकवंकी याची स्थिती । आवडतु असे ॥१२॥
एऱ्हवीं हा योगियां नाडळे । वेदार्थासी नाकळे ।
जेथ ध्यानाचेही डोळे । पावतीना ॥१३॥
तो हा निजस्वरूप । अनादि निष्कंप ।
परी कवणें मानें सकृप । जाहला आहे ॥१४॥
हा त्रैलोक्यपटाची घडी । आकाराची पैलथडी ।
कैसा याचिये आवडी । आवरला असे ॥१५॥

श्रीसद्‌गुरूंच्या रूपाने असलेले चैतन्य व शिष्याच्या रूपाने असलेली परमप्रेमरूप कुंडलिनी शक्ती ही एकरूपच असतात हे " एकवंकी याची स्थिती ॥ ४.१२ ॥ " या सिद्धांताने मांडून ही स्थिती म्हणजे शिवशक्तीचे किंवा चैतन्ययुक्त परमप्रेमरूप कुंडलिनी शक्तीचे सामरस्यच आपल्याला अत्यंत प्रिय आहे असे " मज आवडतु असे ॥ ४.१२ ॥ " असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. चैतन्यरूप सद्‌गुरूंना शिष्याच्या ठिकाणी निद्रिस्त असलेले आपले कुंडलिनी शक्तिरूपी परमप्रेमस्वरूप प्रकट व्हावे व त्याच्यातील व आपल्यातील भेद किंवा विरह नाहीसा व्हावा असे वाटत असते. म्हणून ते निजगुजरूप किंवा मौनरूप शक्तिसंक्रमण अगर शक्तिपात शिष्यावर करीत असतात. सद्‌गुरूंची प्रेम करण्याची ही अपूर्व स्थिती मोठी विलक्षण असते. तिचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

हें जीवींचें निजगुज । परी केवीं राखों तुज ।
जे पढियेसि तूं मज । म्हणौनियां ॥४.२८॥
तूं प्रेमाचा पुतळा । भक्तीचा जिव्हाळा ।
मैत्रियेची चित्कळा । धनुर्धरा ॥२९॥

पाहा पां नवल कैसें चोज। कें उपदेशु केउतें झुंज।
परी पुढे वालभाचें भोज। नाचत असे ॥६.१२३॥
आवडी आणि लाजवी। व्यसन आणि शिणवी।
पिसें आणि न भुलवी। तरी तेंचि काई ? ॥१२४॥
म्हणौनि भावार्थु तो ऐसा। अर्जुन मैत्रियेचा कुवासा।
कीं सुखें श्रृंगारलिया मानसा। दर्पणु तो ॥१२५॥
पाहां पां अनुरागें भजें। जे प्रियोत्तमें मानिजे।
ते पतीहूनि काय न वानिजे। प्रतिव्रता ? ॥१२९॥
तैसा अर्जुनचि विशेषें स्तवावा। ऐसे आवडलें मज जीवा।
जे तो त्रिभुवनींचिया दैवां। एकायतनु जाहला ॥१३०॥

शिष्य म्हणजे जीव म्हणजेच संकुचित झालेली चित्‌शक्ती हीच प्रेमाचा पुतळा, भक्तीचा जिव्हाळा, मैत्रीची चित्कळा, वालभाचे भोज, भावार्थ, एवढेच नव्हे तर पतीपेक्षा पतिव्रता श्रेष्ठ असते त्याप्रमाणे श्रेष्ठ होय. चित्‌शक्ती कुंडलिनी जेव्हा जीवरूपापासून जागृत होते तेव्हा ती सद्‌गुरूस्वरूप चैतन्याशी एकरूप होऊ लागत असल्याने त्रिभुवनातील सर्व भाग्याला एकटीच आश्रय किंवा पात्र होते. हेच श्रीकृष्णांच्या जीवीचे निजगुज आहे. अर्जुनासारखा प्रेमळ शिष्य भेटल्याने ते प्रकट झाले. या प्रेमापोटीच शास्त्र ध्वनिरूपाने व शब्दरूपाने प्रकट होत असते. " स्वच्छंदतंत्राच्या " सुरुवातीलाच श्रीक्षेमेंद्रांनी हे रहस्य प्रकट करताना असे म्हटले आहे की—

अदृष्टविग्रहाच्छान्ताच्छिवात्परमकारणात्।
ध्वनिरूपं विनिष्क्रांतं शास्त्रं परमदुर्लभम् ॥

चिदात्मैव च भगवान् भैरवः सदाशिवादिमूर्तिग्रहणपूर्वं स्वाधारप्रपंचव्याप्तिप्रधानभूतमुमापतिरूपं स्वसत्तानुप्रवेशात् भैरवात्मकमेव मुदितमास्थाय तथाभूतामेव च उमाभट्टारिकामूर्तिं गुरुशिष्यभूमिकाग्रहणेन, शास्त्रं— वचनप्रतिवचनरूपं लोकानुग्रहार्थं प्रथयति, यद्वक्ष्यति—

गुरुशिष्यपदे स्थित्वा स्वयं देवः सदाशिवः।
पूर्वोत्तरपदैर्वाक्यैस्तंत्रमाधारभेदतः ॥

ज्याचे रूप चर्मचक्षूंना कधीच दृग्गोचर होत नाही, अशा शांत व विश्वाचे मुख्य कारण असलेल्या शिवापासून परमदुर्लभ असे ध्वनिरूपी शास्त्र निर्माण झाले. चिदात्माच असलेल्या भगवान् भैरवाने सदाशिव-तत्पुरुषादिरूप धारण करण्यापूर्वी आपल्या आधारावर असलेल्या, प्रपंचाच्या व्याप्तीला मुख्य कारण असलेल्या व स्वसत्तेत प्रवेश केल्यामुळे भैरवत्वाने उद्‌भूत झालेल्या उमापतीच्या रूपाचा अवलंब करून तशीच म्हणजे प्रपंचकारणीभूत उमामूर्ती धारण केली.

नंतर उमामूर्तीला शिष्यभूमिका दिली आणि स्वत: भैरवाने गुरुभूमिका घेतली व लोकांवर अनुग्रह करण्यासाठी प्रश्नोत्तररूपाने शास्त्र सांगितले. याचे प्रमाण असे आहे की, स्वत: भगवान् सदाशिवानेच गुरुशिष्यभूमिकेवर एकटयानेच राहून भिन्नभिन्न प्रमाणांच्याद्वारा प्रश्नोत्तररूप वाक्यांनी तंत्रांची रचना केली.

योगी अमृतानंदांनीही शास्त्राचे अवतरण कसे होते हे सांगताना असे म्हटले आहे की–

**विमर्शरूपिणी शक्तिरस्य विश्वगुरोः सदा ।**
**परिस्फुरति सैकापि नानाभावार्थरूपिणी ॥**

ही विमर्शरूपी शक्ती एकमेव असूनही विश्वगुरूच्या रूपाने नेहमी नाना-भावांनी व अर्थांनी म्हणजे ग्रंथरूपाने प्रकाशित किंवा परिस्फुरित होत असते. हाच भाव अधिक स्पष्ट करताना ते म्हणतात, " प्रकाशात्मकः परशिवोऽहमेत्र विश्वानुग्रहपरः परापश्यंतीमध्यमावैखरीक्रमेण व्यापृत्य विमर्शांशेन प्रकटो भूत्वा रुद्रप्रकाशांशेनप्रतिवचन दातापि सन् तंत्रं समवतारयामि । " याचा अर्थ असा की, प्रकाशरूप परमशिव मीच शक्ती असून विश्वावर अनुग्रह करण्याच्या हेतूने मी परा, पश्यंती मध्यमा व वैखरी या वाणींना क्रमश: व्यापून किंवा वचनकार्यात गोवून, विमर्शांशानें प्रकट होऊन अर्थात् प्रश्नरूपाने अवतरून रुद्रप्रकाशाच्या किंवा प्रकाशात्मक रुद्राच्या अंशाने उत्तर देणारीही मीच होते आणि वेगवेगळी तंत्रे सांगते.

असा हा शास्त्रप्रकटीकरणाचा म्हणजे पर्यायाने गीता किंवा ज्ञानेश्वरीच्या प्रकाशनाचा इतिहास असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजानी श्रीकृष्णार्जुनांच्या प्रेमाचे वर्णन जागोजाग केले आहे. या वर्णनात जीवशिवाचे म्हणजे शिवशक्तीचे प्रेमवर्णन अंतर्निहित आहे हे नितांत सत्य आहे. " देखा नवल तया प्रभूचें । अद्‌भुत प्रेम भक्ताचें । जें सारथ्यपण पार्थाचिं । करितु असे ॥१.१४२॥" असे सांगताना सुषुम्ना-प्रविष्ट जीवशक्तिरूप कुंडलिनीचे सारथ्य साक्षात् शिवरूप श्रीकृष्ण परमप्रेमाने करून ते जीवाला आपल्या घरी सहस्रारात घेऊन जातात हेच सूचित केले आहे. " परि ऐसें जें प्रेम । तें अर्जुनींचि आथि निस्सीम । म्हणौनि तयाचें काम । सदां सफळ ॥८.११॥" हे सांगण्याचे कारण हेच आहे. " ऐसें प्रेमरसें सुरफुरें । बोलिलें जंव यादववीरें । तंव अवधान अर्जुनाकारें । मूर्त जाले ॥१५.६८॥" असे म्हणून गुरुशिष्याची किंवा शिवशक्तीची एकता श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मोठ्या अपूर्व रीतीने प्रकट केली आहे. हेच अधिक स्पष्ट करताना ते " अमृतानुभवात " म्हणतात—

**म्हणोनि शिष्य आणि गुरुनाथु । या दोहो शब्दांचा अर्थु ।**
**श्रीगुरुचि परी होतु । दोहीं ठायीं ॥२.६१॥**

सुवर्ण आणि लेणें । वसे एकें सुवर्णें ।
कां चंद्र आणि चांदिणें । चंद्रींचि जेंवि ॥६१॥
नाना कापूर आणि परिमळु । कापूरचि केवळु ।
कीं गोडी आणि गुळु । गुळूचि जेंवि ॥६३॥
तैसा गुरुशिष्यमिसें । हाचि एकला उल्हासे ।
जऱ्ही कांहीं दिसे । दोनीपणें ॥६४॥
आरसा आणि मुखी । मुख दिसे हे उखी ।
हे आवुलिये ओळखी । जाणे मुख ॥६५॥
पाहा पां निरंजनीं निदैला । तो निर्विवादु एकला ।
परी चेता चेवविता झाला । दोन्ही तोचि ॥६६॥
जे तो चेता चेववी । तेंवि हा बुझे बुझावी ।
गुरुशिष्यत्व नांदवी । ऐसेंनि हा ॥६७॥

गुरुशिष्य एकीकरणाचा हा भावच अधिक सोप्या रीतीने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीकृष्ण व अर्जुनाच्या किंवा आपल्या व श्रीनिवृत्तिनाथमहाराजांच्या प्रेमाचे वर्णन करून ज्ञानेश्वरीत स्पष्ट केला आहे. उपरोक्त गुरुशिष्य संबंधातील शास्त्रीय ऐक्य समजणे हे अत्यंत अवघड आहे हे सांगताना अमृतानुभवाचे श्रीरघुवीरचरणारविंदपरागसेवन-भ्रमरीभूत श्रीगुरुदत्तात्रेयलब्धप्रसाद असे श्रीनिरंजनरघुनाथ आपल्या " अनुभवामृत-पद-बोधिनी " टीकेत ६७ व ६८ व्या ओवीवर टीका करताना असे म्हणतात की, "जैसा परमात्मा जो तो योगनिद्रेंतून उत्थितकाळीं चेता, जागें होणारा, आणि चेवविता, जागे करणारा आपणाचि होतो; तेंवि श्रीगुरु जो तो बुझे, शिष्य होऊन जाणतो, आणि बुझावी, देशिक होऊन जाणवितो. ऐसें गुरुशिष्यत्व जें तें आपले ठायीं नांदवितो. अहो ज्ञानोबा, तुम्ही हा प्रकार जो सांगितला तो परम दुर्ज्ञेय होय, येथें आमची मति कुंठित झाली... सारांश पूर्ण वस्तूचा बोध असला तरी हा सिद्धांत समजेल, नाही तर समजणार नाही, हा निर्धार." हाच दुर्ज्ञेय सिद्धांत सोप्या शब्दात मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

पैं प्रतिवर्षीं क्षेत्र पेरिजे । पिकाची जंव जंव वाढी देखिजे ।
यालागीं नुबगिजे । वाहो करितां ॥१०.५५॥
पुढतपुढती पुटें देतां । जोडे वानियेची अधिकता ।
म्हणौनि सोनें पंडुसुता । शोधूंचि आवडे ॥५६॥
तैसें एथ पार्था । तुज आभार नाहीं सर्वथा ।
आम्ही आपुलियाचि स्वार्था । बोलों पुढती ॥५७॥
जैसें बाळका लेवविजे लेणें । तया शृंगारा बाळ काइ जाणे ?।
परि ते सुखाचे सोहळे भोगणें । माउलिये दिठी ॥५८॥

तैसें तुझें हित आघवें । जंव जंव कां तुज फावे ।
तंव तंव आमुचें प्रेम दुणावे । ऐसें आहे ॥५९॥
आतां अर्जुना असो हे विकडी । मज उघडी तुझी आवडी ।
म्हणौनि तृप्तीची सवडी । बोलतां न पडे ॥६०॥

परमप्रेमस्वरूप कुंडलिनी शक्तीचे स्वरूप अशा प्रकारे चैतन्यमय आहे. भगवान् श्रीकृष्ण "तुज आभार नाहीं सर्वथा । आम्ही आपुलियाचि स्वार्था । बोलों पुढती ॥१०.५७॥" असे म्हणून हाच भाव प्रकट करीत आहेत. "ऐसा पतिकराचिया तोषा आंतु । प्रेमाचा वेगु उचंबळतु । सायासें सावरूनि अनंतु । काय बोले ॥१०.२०५॥" हे सांगण्यातील गर्भितार्थ जे जाणतील त्यांना श्रीसद्गुरुनाथ शिष्यावर शक्तिपात करून स्वस्वरूप जागृतीने प्रेमावस्था कशी उत्पन्न करतात हे कळेल. चैतन्यच परमप्रेमाची शक्ती असल्याने "आणि सोमवंशीं तुम्हां पांडवां–। माजीं अर्जुन तो मी जाणावा । म्हणौनि एकमेकांचिया प्रेमभावा । विघडु न पडे ॥१०.२९३॥" अशी आपल्या विभूतीची ओळख श्रीकृष्णनाथांनी दिली आहे. या ओळखीतील परमप्रेम-स्वरूप शक्ती ही शिष्यरूपाने व चैतन्य हे सद्गुरुरूपाने प्रकटत असते हा भाव हृदयंगम केला तरच "परि ऐसिया तूतें स्वामी । कहींच नेणों जी आम्ही । म्हणौनि सोयरे संबंधधर्मी । राहाटलों तुजसीं ॥११.५३७॥" येथपासून "तरी आतां अप्रमेया । मज शरणागता आपुलिया । क्षमा कीजो जी यया । अपराधांसि ॥५६०॥" येथपर्यंत अर्जुनाने जे म्हटले आहे त्याचा गर्भितार्थ ध्यानी येईल. परमप्रेमरूप कुंडलिनी शक्तीच्या जागृती नंतरची ही चैतन्याच्या चरणी पत्करलेली शरणागती आहे. शक्तीचा जागृत भाव हा शरणागतीचा व म्हणूनच प्रेमाचा असतो. ही शरणागती, असाहाय्यता अगर निरालंबता यांची वाढ, उत्कर्ष, किंवा विकास जसजसा होत जाईल तसतसा परमात्मप्रेमाचा विकास, उत्कर्ष किंवा वाढ होत जाते. यालाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ऐसें हें गहन । अर्जुना माझें भजन ॥९.२१९॥", अर्जुना हे गुरुवी भक्ती ॥९.२२८॥" व "तरी न करितां पांडवा । भजन जहालें ॥९.२६१॥" असे म्हटले आहे. या चैतन्याच्या परमप्रेमरूप शक्तीच्या विकासामुळेच साधकाच्या ठिकाणी "जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवंत ॥१०.११८॥" हा भाव अधिका-धिक स्वरूपात प्रकट होत जातो. त्यामुळे "हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥१०.११८॥" असा परम सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रस्थापित केला आहे. हेच भक्तीचे अंतिम रहस्य असून चैतन्याच्या परमप्रेमरूप शक्तीचे स्वरूप आहे. "सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा ॥२॥" असे महर्षी नारदांनी जे "भक्तिसूत्र" कथन केले आहे त्यातील भावही हाच आहे. भक्ती म्हणजे जागृत कुंडलिनी शक्ती होय. ही शक्ती सद्गुरुकृपेने शक्तिपात होऊन जागृत झाली म्हणजे शिव, ईश्वर, परमात्मा अगर चैतन्याविषयी परमप्रेमरूप होते. कुंडलिनी शक्ती ही स्वभावतःच प्रेमस्वरूप

असल्याचा निर्वाळा " वृह्वृचोपनिषदाने " पुढीलप्रमाणे दिला आहे. ऋषी म्हणतात " कामकलेति विज्ञायते । श्रृंगारकलेति विज्ञायते । सैषाऽपरा शक्तिः । सैषा शांभवी विद्या कादिविद्येति वा हादिविद्येति वा सादिविद्येति वा रहस्यम् । ओमों वाचि प्रतिष्ठा सैव पुरत्रयं शरीरत्रयं व्याप्य वहिरन्तरवभासयन्ती देशकालवस्त्वन्तरसंगान्महात्रिपुरसुंदरी वै प्रत्यक् चितिः । सैवात्मा ततोऽन्यदसत्यमनात्मा अत एष ब्रह्मसंवित्तिर्भावाभावकलाविनिर्मुक्ता चिदाद्याद्वितीयब्रह्मसंवित्तिः सच्चिदानंदलहरी महात्रिपुरसुंदरी वहिरंतरनुप्रविश्य स्वयमेकैव विभाति । " याचा अर्थ असा की, कुंडलिनी शक्ती हीच कामकला या नावाने विख्यात आहे. हिलाच श्रृंगारकला असे म्हणतात. हीच अपरा म्हणजे सर्वश्रेष्ठ शक्ती आहे. हिलाच शांभवी, कादी, हादी व सादी विद्या म्हणतात. ही कुंडलिनी शक्ती अत्यंत रहस्यरूप आहे. ही शक्तीच प्रणवाचे अक्षरतत्त्व आहे. ॐ अर्थात् सच्चिदानंदरूपाने ती वाणीमध्ये व सर्वत्र प्रतिष्ठित असते. जागृत, स्वप्न व सुषुप्ती या तीन नगरांना म्हणजे अवस्थांना व स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन शरीरांना व्यापून ही बाहेर व आत प्रकाश पसरवीत असते. देश, काल व वस्तू यांमध्ये ही महात्रिपुरसुंदरी परमप्रेमस्वरूप कुंडलिनी शक्ती असंग होऊन वास करते. हीच साक्षात् चैतन्यशक्ती आहे. ही चैतन्याची शक्ती म्हणजे आत्माच आहे. तिच्याशिवाय सर्व असत्य व अनात्म आहे. ही कुंडलिनी शक्ती म्हणजेच ब्रह्मविद्या होय. ही भाव व अभाव कलेपासून मुक्त असलेली चिन्मयी, आद्य व अद्वितीय अशी सच्चिदानंदाची म्हणजे सत्, चित् व आनंदस्वरूप चैतन्याची परमप्रेमस्वरूप लहर असून विद्या किंवा ब्रह्मशक्ती आहे. अशी ही महात्रिपुरसुंदरी सर्व चराचराला किंवा पिंडब्रह्मांडाला आतबाहेर व्यापून स्वतःच एकटी विराजमान होते.

हे उपनिषदकारांचे सिद्धांत उरी पचविले म्हणजे " म्हणौनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोहि भक्त झोंबे । परी मीचि करी वालभें । ऐसा ज्ञानिया एकु ॥७ ११९॥" यातील रहस्य उलगडेल. सद्गुरूंनी केलेल्या शक्तिपातामुळे अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी, शांभवी इत्यादि सर्व विद्यास्वरूपाने व काम, श्रृंगारादि चैतन्याच्या परमप्रेमरूपाने जागृत होत असल्याने भक्त व ज्ञानी हे एकच किंवा एकरूपच असतात व अशा ज्ञानी भक्तावरच म्हणजे ज्याच्या ठिकाणी ही चित्कला सद्गुरुकृपेने जागृत झाली आहे त्याच्यावरच मी प्रेम करतो असे श्रीकृष्णनाथ स्वतः सांगत आहेत. त्यामुळेच " एऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे । तो चैतन्यचि केवळ माझें ॥७ १२६॥ " असा सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडला आहे. चैतन्य हे परमप्रेमशक्तिस्वरूप असल्याने म्हणजे शिवशक्ती ही अभेद्य असल्याने या द्विधा दिसणाऱ्या एकस्वरूपाची व्याख्या करताना पतीपत्नीच्या रूपकाचा किंवा दृष्टांताचा आश्रय श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी घेतला आहे. या दृष्टीने ते म्हणतात—

तरी एकु प्रियोत्तमु-। वांचोनि वाढों नेदी कामु।
जैसा का मनोधर्मु। प्रतिव्रतेचा ॥१७.१७१॥
पैं आघवाचि भोगेंसीं। पतिव्रता क्रीडे प्रियेंसीं।
कीं तयाचीं नामें जैसीं। तपें तियां केलीं ॥१८.९०७॥
तरी सर्वेंद्रियांचिया वृत्ती। घेऊनि आपुल्या हातीं।
बुद्धि आत्मया मिळे येकांतीं। प्रिया जैसी ॥१८.८३३॥

शक्तीचे हे परमप्रेमस्वरूप शिवशक्तीच्या ऐक्यातच सिद्ध होत असल्याने "षट्चक्रनिरूपणात" असे म्हटले आहे की–

एतस्या मध्यदेशे विलसति परमाऽपूर्वनिर्वाणशक्तिः
कोटयादित्यप्रकाशां त्रिभुवनजननी कोटिभागैकरूपा।
केशाग्रस्यातिगुह्या निरवधि विलसत् प्रेमधाराधरा सा
सर्वेषां जीवभूता मुनिमनसि मुदा तत्त्वबोधं वहन्ती ॥४८॥

निर्वाणकलेच्या मध्यभागी कोटी सूर्यासारखी प्रकाशमान, त्रिभुवनाची माता, केशाग्राच्या कोटीभागातील एका भागासारखी अत्यंत सूक्ष्म, अत्यंत गुह्य म्हणजे गुप्त, सतत किंवा अखंड प्रेमधारा धारण केलेली, सर्व प्राण्यांची प्राणरूप, मुनीजनांना आनंद देणारी व नित्य तत्त्वज्ञानाची प्राप्ती करविणारी निर्वाणशक्ती कुंडलिनी निवास करते. सर जॉन वुड्रॉफ यांनी "निरवधि विलसत् प्रेमधाराधरा सा" यावरील श्री. कालीचरण यांची टीका उधृत करताना "The Serpent Power" या ग्रंथातील "Description of The Six Centres" या प्रकरणात असे म्हटले आहे की, "Prema is the tendreness of mind produced by feeling of gladness; that is, she holds within her the stream of excellent nectar which has its origin in the blissful union of Shiva and Shakti, and which flows incessantly. By "Her" is meant the shakti who is in in the Para-bindu, who is both Shiva and Shakti, and from her enamates the Jiva." आनंदी भावनेपासून उत्पन्न झालेल्या मनाच्या कोमल, नाजुक किंवा हळुवारपणाला प्रेम म्हणतात. याचा अर्थ असा आहे की, शिवशक्तीच्या आनंदमय व सुखकारक अशा एकीकरणात ही कुंडलिनी शक्ती स्वतःमध्येच सर्वोत्कृष्ट असा अमृताचा अर्थात् प्रेमाचा प्रवाह धारण करीत असते व हा प्रवाह तिच्यापासून अविरतपणे वाहत असतो. तिच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या होय. या शक्तीलाच परार्बिंदू असे म्हणतात. हा परार्बिंदूच शिव व शक्ती मिळून दोन्हीही असतो. या शक्तीपासूनच जीव उत्पन्न होतो.

चैतन्याच्या परमप्रेमरूप कुंडलिनी शक्तीचे स्वरूप अशा प्रकारे अखंड प्रेमयुक्त असल्याने या प्रेमाची व्याख्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे करून जागृत

शक्तीचे शिवाविषयीचे प्रेम कसे प्रकट होत जाते व त्याचे स्वरूप कसे असते हे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात–

आतां आवडी जेथ पडे। तयाची अवसरी पुढें पुढें ।
रिगों लागें हें घडे। प्रेम ऐसें ॥१६.५३॥
वत्स धालयाही वरी। धेनू न वचावी दुरी।
अनन्य प्रीतीती परी। ऐसी आहे ॥१८.७८॥
तेणें काजेवीणही बोलावें। तें देखिलें तरी पाहावें।
भोगितां चाड दुणावे। पढियंतयाठायीं ॥७९॥
ऐसी प्रेमाची हे जाती। आणि पार्थ तंव तेचि मूर्ती।
म्हणौनि करू लाहे खंती। उगेपणाची ॥८०॥
तेथ श्रीकृष्ण म्हणती निकें। अद्यापि नाहीं मा ठाउकें।
वेडया चंद्रा आणि चंद्रिके। न मिळणें आहे ? ॥१८.२९३॥
आणि हाही बोलोनि भावो। तुज दाऊं आम्ही भिवों।
जे रुसतां बांधे थावो। तें प्रेम गा हें ॥२९४॥
आणि निरुपचारा प्रेमा। विषय होय जें प्रियोत्तमा।
तें दुजें नव्हे कीं आत्मा। ऐसेंचि जाणावें ॥१८.१३४६॥
आरिसाचिया देखिलया। गोमटें कीजे धनंजया।
तें तया नोहे आपणयां–। लागीं जैसे ॥१३४७॥
तैसें पार्था तुझेनि मिषें। मी बोलें आपणयाचि उद्देशें।
माझ्या तुझ्या ठायीं असे। मीतूंपण गा ॥१३४८॥

असे हे गुरूने शिष्यावर केलेले प्रेम म्हणजे शिवाने शक्तीवर केलेले प्रेम होय. शिवशक्ती ही अभिन्न वस्तू असल्याने हे आपलेच आपल्यावर केलेले प्रेम आहे. चंद्र आणि त्याची प्रभा यांचा जसा कधी वियोग घडत नाही त्याप्रमाणेच गुरुशिष्यांचा किंवा शिवशक्तीचा कधीही वियोग घडत नाही; कारण जागृत कुंडलिनी शक्ती आपल्या परमप्रेमाच्या बळाने त्यांना सतत समरसून टाकीत असते. ही गोष्ट " मग वाढतेनि प्रेमें। मातें भजती जे महात्मे। परि दुजेपण मनोधर्में। शिवतलें नाहीं ॥ ९.१९५ ॥ " अशा प्रकारे घडते म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केली आहे. हीच गोष्ट श्रीकृष्णांनी शंकरांना "पद्मपुराणातील पातालखंडात" सांगितली आहे. ते म्हणतात–

यो मामेव प्रपन्नश्च मत्प्रियां न महेश्वर ।
न कदापि स चाप्नोति मामेवं ते मयोदितम् ॥
तस्मात्सर्वप्रयत्नेन मत्प्रियां शरणं व्रजेत् ।
आश्रित्य मत्प्रियां रुद्र मां वशीकर्तुमर्हसि ॥

**इदं रहस्यं परमं मया ते परिकीर्तितम् ।**
**त्वयाप्येतन्महादेव गोपनीयं प्रयत्नतः ।।**

जो पुरुष मला शरण येतो; परंतु माझ्या परमप्रेमरूप शक्ती कुंडलिनीला शरण येत नाही, तो वस्तुतः मला प्राप्त करून घेऊ शकत नाही. ( वरवर व बाह्यतः नुसते भजन, पूजन, अर्चन, स्मरण, चिंतन आदि कितीही साधने करून साधक ईश्वराला शरण गेला तरी जोपर्यंत सद्गुरुकृपेने परमप्रेमस्वरूप कुंडलिनी शक्ती जागृत होत नाही म्हणजे शक्तिपातयोगाची दीक्षा मिळून ज्याचे अंतरंग साधन आपोआप सुरू होत नाही तोपर्यंत साधक ईश्वरप्राप्ती करून घेऊ शकत नाही हा भावार्थ. ) हे मी अगदी सत्य सांगत आहे. याकरिता परिपूर्णपणे माझ्या परमप्रेमस्वरूप आत्मशक्ती कुंडलिनीला शरण गेले पाहिजे. माझ्या परमप्रिय शक्तीचा आश्रय ग्रहण करणारा साधक मला आपल्या स्वाधीन किंवा वश करून घेतो. अत्यंत श्रेष्ठ असे हे रहस्य मी आपल्याला सांगितले आहे. आपण ही गोष्ट प्रयत्नपूर्वक गुप्त ठेविली पाहिजे.

चैतन्याच्या परमप्रेमाची व्याख्या शास्त्रकारांनी पुढीलप्रमाणे केली आहे.

**दर्शने स्पर्शने वापि श्रवणे भाषणेऽपि वा ।**
**यत्र द्रवत्यंतरंगं स स्नेह इति कथ्यते ।।**

ज्याच्या दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने किंवा भाषणाने मनात एक अपूर्व प्रकारचा आनंद होऊ लागतो; हृदय आपोआप विरघळू लागते, काठिण्य नाहीसे होते व अपूर्व प्रेमाचा उद्रेक अंतःकरणात होऊ लागतो त्याला स्नेह किंवा प्रेम म्हणतात. अशा प्रकारे हृदयाचे सर्वप्रकारचे जडत्व नाहीसे होऊन ते विरघळ लागण्याच्या प्रक्रियेलाच प्रेमदान,शक्तिसंचार किंवा शक्तिपात म्हणतात.असे प्रेमाचे दान महापुरुषच करू शकतात. मात्र येथे एक गोष्ट विशेष लक्षात ठेवण्यासारखी आहे की, महापुरुष आपले संपूर्ण प्रेम कोणत्याही साधकाला एकदम देत नाहीत किंवा प्रेमाचे प्रकटीकरणही करीत नाहीत; कारण जीव दुर्बल असतो व परमप्रेम म्हणजे शक्ती अमोघ असते. त्यामुळे दुर्बल जीवावर जर महापुरुषांनी एकदम आपले सर्व प्रेम प्रकट केले तर त्या जीवाचे हृदय फाटून गेल्याशिवाय राहणार नाही. साधारण जीवसाधक महापुरुषांचे प्रेम सहन करू शकत नाही. त्याची तितकी पात्रता नसते. अर्जुनासारख्या महान् साधकालाही श्रीकृष्णांचे अत्युत्कट प्रेम सहन झाले नाही व त्यांच्या प्रेमामुळे प्राप्त झालेली विश्वरूपदर्शनाची अवस्था सोसली नाही; कारण "म्हणौनि तैसाचि साकरु होईं । हें सांवरी आतां ।।११.६०८।। अशी श्रीकृष्णांना प्रार्थना करून आपले प्रेम आवरण्याची त्याने प्रार्थना केली आहे. "परि नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितोसि मा ? ।।११.६२९।। हें कहीं नव्हतेंचि देखिलें । म्हणौनि भय जें तुज उपजलें । तें

सांडी एथ संचलें । असों दे प्रेम ।।११.६३८।।" असे म्हणून श्रीकृष्णांनी त्याला जागृत शक्तीमुळे प्राप्त झालेल्या विश्वरूपाच्या ठिकाणीच प्रेम कायम ठेवण्यास सांगितले; तरी या विपरीत प्रेमाची जात अर्जुनाला सहन झाली नाही. त्यामुळे " तैसें शिष्या-चिये प्रीति जाहलें । कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें ।।११.६४५।।" ही प्रेमाची किंवा चैतन्याच्या परमप्रेमरूप शक्तीच्या प्रकटीकरणाची स्थिती आवरून "तें मना नयेचि मग अणिलें । कृष्णपण मागुतें ।।११.६४५।।" ही स्थिती श्रीकृष्णांना आणावी लागली.याकरिता साधक जसजसा प्रेमाचा म्हणजे शक्ती धारण करण्याचा अधिकारी होत जातो तसतसे आपले प्रेम, सद्‌गुरुरूपाने साधकाच्या ठिकाणी असलेली जागृत कुंडलिनी शक्ती, साधकावर प्रकट करीत जाते. प्रेम ही अत्यंत महान् व अमोघ अशी शक्ती किंवा अग्नी आहे याची पूर्ण जाणीव महापुरुषांना असते. या दृष्टीनेच " तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि, " या पुस्तकातील "भगवत् कृपाका रहस्य " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, " जिस आधारमें शक्तिकी जितनी तीव्रताका सहन हो सकता है, उसमें उतनी अधिक शक्तिका संचार किया जाता है । सहनशक्तिकी अधिकताके आधारपर शक्तिकी मात्रा अधिक होती है, अन्यथा कम होती है । इसका मुख्य कारण यह है कि साधारण देहाभिमानी जीव साक्षात् रूपसे भगवत्-शक्तिको ग्रहण नहीं कर सकता, क्योंकि साक्षात् शक्ति अत्यंत तीव्र होती है, उसे सहन करना अत्यंत कठिन है, धारण करना तो बहुत दूरकी बात है ।"

साधक चैतन्याच्या परमप्रेमशक्तीच्या क्रमविकासयोगाने जसजसा उत्क्रांत होत जातो तसतसा "आंतु मीनलेनि मनोधर्में । स्वरूपप्राप्तीचेनि प्रेमें । आपेआप संभ्रमें । मिळावया ।।८.९३।।" या न्यायाने स्वस्वरूपप्राप्तीच्या प्रेमाने उन्मत्त होत जातो. त्यामुळे "जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम । जे माझिया भुली सभ्रम । नेणती लोक ।।९.३६३।।" अशी त्याची स्थिती होते.एवढेच नव्हे तर "ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ आटणी हों पाहे जीवदशे ।।९.५३०।।, तेव्हां तया महासुखाचेनि भरें । धांवोनि देहाचिये गांवाबाहेरें । मियां घाले तेणें उद्‌गारें । लागती गाजों ।।१०.१२५।।" व " ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें । नाहीं राती दिवो जाणणें । केलें माझें सुख अव्यंगवाणें । आपणपेयां जिहीं ।।१०.१२९।।" अशी दिव्य अवस्था त्या परमप्रेमस्वरूप शक्तीच्या उत्कर्षाने साधकाला प्राप्त होते. या अवस्थेत "ऐसिया व्यापका मातें । मानूनि जे भजती भलतेथें । परि साचोकारें उदितें । प्रेमभावें ।।१०.११५।।" या न्यायाने तो परमप्रेमरूपशक्तीशी एकरूप होऊन भजन करतो. हेच या परमप्रेमरूपशक्तीचे चैतन्याला खरे देणे असल्याने "म्हणौनि तिहीं जें प्रेम धरिलें । तेंचि आमुचें देणें उपाइलें ।।१०.१३२।।" असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. वास्तविक पाहता "नातरी चंद्रबिंब वाटोळें । देखोनि क्षीरसागर

उचंबळें । तैसा दुणेही वरी प्रमबळें । उल्लसितु जाहला ॥११.१३४॥" याप्रमाणे चैतन्यरूपी सद्गुरुनाथच उचंबळत असतात; परंतु त्यांचे हे प्रेम परमप्रेमास्पद अशा शक्तीच्या रूपाने उल्हसित झालेले दृग्गोचर होते; कारण शिष्यरूपी शक्तीची उल्हसित रूपात "आणिक स्तुतिही नाठवे । आणि निवांतुही न बैसवे । नेणें कैसा प्रेमभावें । गाजोंचि लागे ॥ ११.५२८॥" व "इंद्रियें प्रवृत्ती भुललीं । वाचा प्राणा चुकली । ऐसें आपांपरी होती जाली । शरीरग्रामीं ॥११.६६५॥ अशी विलक्षण अवस्था होते. मात्र चैतन्याच्या परमप्रेमरूप शक्तीचाच एकमात्र आश्रय जे घेतात त्यांनाच ही स्थिती प्राप्त होते. " येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले ॥७.१०२॥" यातील गर्भितार्थ हाच आहे. हा गर्भितार्थ ध्यानात घेऊन सिद्धयोगाचे साधन करणारे साधक फारच थोडे असतात.त्यामुळेच " परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥७.१२॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी व "भजंति त्वां धन्यः कतिचन चिदनंदलहरीम् ॥८॥" असे "सौंदर्यलहरीत" श्रीमदाद्यशंकराचार्यांनी म्हटले आहे. खरोखर काही थोडे भाग्यवान् लोकच चित् म्हणजे चैतन्यस्वरूपाच्या आणि आनंद म्हणजे परमप्रेमस्वरूपाच्या लहरींनी युक्त असलेल्या आदिशक्ती जगदंबा कुंडलिनीचे भजन, उपासना किंवा साधन करतात. हे साधक खरोखर धन्य होत. "सुधाधाराऽऽसारेश्चरणयुगलांतर्विगलितैः ॥१०॥" असे पुढे " सौंदर्यलहरीत " म्हणून सहस्रारात शिवाशी एकरूप किंवा रममाण झालेल्या शक्तीच्या दोन्ही चरणातून अमृतधारांचा व परमप्रेमाचा वर्षाव होत असतो हे सांगून सिद्धयोग साधनेचा व पर्यायाने चैतन्याच्या परमप्रेमस्वरूप शक्तीच्या फलस्वरूपाचा महिमा त्यांनी गाइला आहे.

या चैतन्याच्या परमप्रेमरूपशक्तीचेच श्रीगुरुपादुकांच्या पूजेच्या निमित्ताने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे व अशा प्रकारची श्रीगुरुचरणसेवा परम भाग्यवानालाच प्राप्त होते असे म्हटले आहे.

आतां हृदय हें आपुलें । चौफाळूनियां भलें ।
वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरूंचीं ॥१५.१॥
ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रिय कुड्मुळीं ।
भरूनियां पुष्पांजुळी । अर्घ्यु देवों ॥२॥
अनन्योदकें धुवट । वासना जे तन्निष्ठ ।
तें लागलेंसे अबोट । चंदनाचें ॥३॥
प्रेमाचेनि भांगारें । निर्वाळूनि नूपुरें ।
लेवऊं सुकुमारें । पदें तियें ॥४॥
घणावली आवडी । अव्यभिचारें चोखडी ।
तिये घालूं जोडी । आंगोळिया ॥५॥

आनंदामोदबहळ । सात्त्विकाचें मुकुळ ।
तें उमललें अष्टदळ । ठेऊं वरी ॥६॥
तेथें अहं हा धूप जाळूं । नाहं तेजें वोवाळूं ।
सामरस्यें पोटाळूं । निरंतर ॥७॥
माझी तनु आणि प्राण । इया दोनी पाउवा लेऊं श्रीगुरुचरण ।
करू भोगमोक्ष निंबलोण । पायां तयां ॥८॥
इया श्रीगुरुचरणसेवा । हों पात्र तया दैवा ।
जे सकळार्थमेळावा । पाट बांधे ॥९॥

हे सर्व वर्णन चैतन्याच्या म्हणजे श्रीगुरूंच्या पाउलांचे, पादुकांचे, चरणांचे म्हणजे प्रेमरूप कुंडलिनी शक्तीचे असून तिची अतंरंग पूजा कशी करावी याचे आहे. " नारायणोपनिषदातही " या दृष्टीने असे म्हटले आहे की–

चरणं पवित्रं विततं पुराणं येन पूतस्तरति दुष्कृतानि ।
तेन पवित्रेण शुद्धेन पूता अतिपाप्मानमरातिं तरेम ॥१.१३॥

विष्णूचे म्हणजे चैतन्याचे चरण म्हणजे कुंडलिनी शक्ती ही पवित्र, विस्तृत व पुरातन आहे. या शक्तीच्या जागृतीच्या आश्रयाने सुषुम्नेतून सहस्रारात वर सरकणारा जीव पापांचे उल्लंघन करतो. त्या पवित्र व शुद्ध शक्तीने ज्यांचे अंतःकरण पवित्र झाले आहे असे साधक नरकाला कारण होणाऱ्या पापांचे उल्लंघन करतात. " श्रीललितासहस्रनामस्तोत्रात " " कुंडलिनी बिसतंतुतनीयसी ॥ ९१ ॥ " असे म्हणून तिचा उल्लेख केला आहे. या दोन नामांवर टीका करताना श्रीभास्करराय मखी म्हणतात, " कुंडलिनी म्हणजे वेटोळे घातलेली शक्ती होय. तिची स्वतःची आकृती वेटोळे घातलेल्या सर्पिणीसारखी आहे. तंत्रराजात असे म्हटले आहे की, प्राणाचा आविष्कार असणाऱ्या तेजोमयी जीवशक्तीस कुंडलिनी असे म्हणतात. ही कुंडलिनी मूलाधाराच्या अग्निज्वालांच्या केंद्रभागी निवास करते. साडेतीन वेटोळे घातलेल्या सर्पिणीप्रमाणे ती निद्रिस्त असते. योगवासिष्ठातील चूडालकथेत असे म्हटले आहे की, तुझ्या स्वतःमधील कुंडलिनीला तू ओळख. तिला जाणून घे. ही कुंडलिनी मनाचे जीवनच आहे. या मनालाच पुर्यष्टक असे दुसरे नाव आहे. फुलात ज्याप्रमाणे गंध असतो त्याप्रमाणे मनात कुंडलिनीचा निवास असतो. देवीपुराणात असे स्पष्ट केले आहे की, तिला कुंडलिनी म्हणण्याचे कारण तिचा शृंगाटक म्हणजे इच्छा, ज्ञान व क्रिया या कोनांनी युक्त असा त्रिकोणाकृती आकार आहे. हिलाच वाग्भवबीज किंवा कुंडलिनी म्हणून ओळखतात. ही कुंडनिनी शक्ती बिसतंतुतनीयसी म्हणजे कमलनालाच्या तंतुप्रमाणे अतिशय सूक्ष्म आहे. श्रुतीत असे म्हटले आहे की, ही कुंडलिनी शक्ती भाताच्या कणसाच्या टोकाप्रमाणे अत्यंत सूक्ष्म, केशरी रंगाची, तेजस्वी

आणि परमाणूसारखी सूक्ष्म आहे. वामकेश्वर तंत्रात हिचे वर्णन करताना असे म्हटले आहे की, कुंडलिनी नावाची शक्ती मूलाधारात राहते. ती भुजंगाकार, सुंदर ( परमप्रेमस्वरूप ) व कमलनालातील तंतुप्रमाणे अत्यंत सूक्ष्म आहे. कमळाच्या कर्णिकेप्रमाणे असणाऱ्या मूलाधाराच्या कर्णिकेला फणाग्राने दंश करून व आपले शेपूट आपल्या तोंडात दाबून धरून ब्रह्मरंध्राशी ती संबंधित राहते. ही शक्ती जेव्हा जागृत होते तेव्हा ती सहस्रारकमलात शिवाशी ऐक्य साधते. या अवस्थेला परा किंवा श्रेष्ठतम अवस्था म्हणतात. ही अवस्था परमप्रेम, अंतिम सुख, परमानंद, निर्वृती किंवा मुक्तीला कारणीभूत होते. अरुणोपनिषदात देखील असे सांगितले आहे की, उठा निजू नका, हे तेजात रममाण होणाऱ्या साधकांनो, तुम्ही अग्नीची म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तीची इच्छा करा. प्रखर सूर्याच्या साहाय्यामुळे उमेसह म्हणजे कुंडलिनी शक्तीसह असणाऱ्या राजाच्या म्हणजे शिवाच्या ऐक्यरूप अमृताने तृप्त व्हा. “ उत्तिष्ठत मा स्वप्त अग्निमिच्छध्वं भारताः । राज्ञः सोमस्य तृप्तासः सूर्येण सयुजोषसः ।।” असे जे ऋषींनी म्हटले आहे ते निःसंदिग्धपणे देवी कुंडलिनी शक्तीसंबधीच म्हटले आहे. अग्नीची इच्छा म्हणजे स्वाधिष्ठानचक्रातील अग्नीचे अर्थात् कुंडलिनी शक्तीने उत्थान होय. या अग्नीला या शक्तीच्या स्वरूपात बदलून किंवा रूपांतरीत करून घ्या म्हणून ऋषी सांगतात. अग्नी-कुंडलिनीला जागृत केल्यावर आणि तिचा सूर्य कुंडलिनीशी संयोग साधल्यावर त्या दोघींना चंद्रमंडलात नेऊन व शिवशक्तींच्या सामरस्यातून त्यांना एकत्र आणून, त्यानंतर या सामरस्यामुळे द्रवणाऱ्या अमृताच्या स्रोतांनी ७२००० नाडीमार्ग भरून घेऊन साधकाने तृप्त झाले पाहिजे. या अमृत वर्षावाला स्वाधिष्ठानातील अग्नी म्हणजे कुंडलिनी शक्तीच साहाय्य करते; कारण अग्निज्वलनामुळे अर्थात् शक्ति-जागृतीमुळे चंद्रमंडल द्रवीभूत होते आणि त्यामुळे अमृताचा वर्षाव घडून येतो. ( हेच चैतन्याच्या शक्तीचे परमप्रेमस्वरूप आहे. ) ” वरील विधानास “ सनत्कुमारतंत्राचाही ” आधार आहे. तेथे असे म्हटले आहे की—

> पृश्नयो नाम मुनयः श्रीविद्योपासका मिथः ।
> संभूयोपदिशंत्येतामुत्थापयत मा चिरम् ।।
> कर्णिकायामधिष्ठाने वन्हीमिच्छत भारताः ।
> सूर्येणसह विद्राव्य राज्ञः सोमस्य तृप्यते ।।
> पातिव्रत्ये भुजंगम्या अग्निरेव सहायवान् ।

पृश्नी नावाचे श्रीविद्योपासक मुनी एकत्र जमून परस्परांना सांगताना की, उठा, हे भक्तांनो, उशीर करू नका. स्वाधिष्ठानाच्या कर्णिकेतील वन्हीची इच्छा करा. सूर्याच्या साहाय्याने सहस्रारातील चंद्रबिंबाचे विद्रावण करून, उमेसह असणाऱ्या राजराजेश्वर शिवाच्या म्हणजे शिवशक्तीच्या समायोगाने किंवा

सामरस्याने उत्पन्न झालेल्या अमृतप्रवाहाने तृप्त व्हा..... भुजंगमी कुंडलिनीच्या पातिव्रत्यात अग्नीच एकमेव साहाय्यक होता.

अशा प्रकारचे " तैत्तिरीय ब्राह्मणातील " आणखीही एक श्रुतिवचन असे आहे. " लोकस्य द्वारमर्चिमत्पवित्रम् । ज्योतिष्मद्भ्राजमानं महस्वत् । अमृतस्य धारा बहुधा दोहमानम् । चरणं नो लोके सुधितान्दधातु ॥ " प्रदीप्त, प्रकाशित, तेजस्वी आणि अत्युत्तम असे हे पवित्र चरण ब्रह्मलोकी प्रवेश करण्यास साधनीभूत आहेत. हे पावन चरण आम्हाला तृप्त करोत. अर्चिमत्, ज्योतिष्मत्, भ्राजमानम् व महस्वत् हे शब्द अनुक्रमे अग्नी, सूर्य, चंद्र आणि कला यांचे वाचक आहेत. चरति इति चरणम् म्हणजे मागे पुढे सरकणाऱ्या अशा अर्थाने चरण शब्द कुंडलिनी वाचक आहे. मूलाधार आणि सहस्रार यामध्ये कुंडलिनी सरकत असते. याचा अर्थ असा की, ती कुंडलिनी अग्नी, सूर्य, चंद्र, कला या स्थानात प्रवेश करून अमृत-वर्षावामुळे आम्हास तृप्ती देवो. हा विचार " शुकसंहितेत " पुढीलप्रमाणे अधिक स्पष्ट केल्याचे आढळते.

**दोहमानां सुधाधारा द्विसप्ततिसहस्रधा ।**
**गुप्ताचारा कुंडलिनी तृप्तानस्मांस्तनोतु सा ॥**

गुप्तपणे चलनवलन करणारी ही कुंडलिनी अग्नीच्या दीप्तीने, सूर्याच्या प्रकाशाने आणि चंद्राच्या ( शीतल ) तेजाने ७२००० नाडीमार्गातून सुधाधारांना वाहवू दे आणि आम्हास तृप्त करू दे. ''तांत्रिक वाङ्मयमें शाक्त दृष्टि," या ग्रंथाच्या प्रस्तावनमध्ये म. म. श्रीगोपीनाथ कविराजांनी या विषयाचे थोडक्यात स्पष्टीकरण करताना असे म्हटले आहे की, " परापरात्मक स्वात्माकी परानंदमयी पराशक्ति जब अपने आप भेदग्रास करनेके लिए उद्यत होती है तब उसका " पादुका " नामसे वर्णन किया जाता है; " परापरात्मनः स्वात्मनः परानंदमयी स्वव्यतिरेककवलनोद्युक्ता पराशक्तिः पादुकेति गीयते ।" वस्तुतः स्वात्मासे अभिन्न अनुत्तरस्वभाव नादशक्तिरूप विमर्शकोही गुरुतत्त्व जानना चाहिए । इसको स्वरूपतः जाननेके लिए पादुकाही एकमात्र उपाय है । क्रमका संकोच तथा प्रसार पादुकासेही होता है ।" " पादुका-पंचक स्तोत्रात " गुरुपादुकांचे म्हणजे चैतन्याच्या परमप्रेमस्वरूप शक्तीचे वर्णन करताना असे म्हटले आहे की—

**तत्र नाथचरणारविंदयोः कुंकुमासवझरीमरंदयोः ।**
**द्वंद्वमिंदुमकरंदशीतलं मानसं स्मरति मंगलास्पदम् ॥५॥**

श्रीगुरूचे चरणारविंद म्हणजे कुंडलिनी शक्ती कुंकुमाप्रमाणे रक्तवर्णासारखी असून परमामृताची किंवा परमप्रेमाची झरी आहे. अर्थात् ही शक्ती निर्झररूप मकरंदासारखी आहे. ज्याप्रमाणे चंद्राच्या अमृतमय किरणांनी तप्तपणा नाहीसा

होऊन शीतलता वाटते त्याप्रमाणे गुरुपदपद्‌ममकरंदाच्या सेवनाने म्हणजे जागृत शक्तीच्या आश्रयाने सिद्धयोगाचे साधन केल्याने साधकाच्या मनातील संसार कोलाहल शांत होतो.

सारांश, चैतन्याच्या परमप्रेमस्वरूप कुंडलिनी शक्तीचे हे असे अलौकिक स्थान असल्याने या प्रेमास्पद शक्तीच्या एकमात्र आश्रयाने साधकजीव स्वसंवेद्य आत्मस्वरूपाप्रत जाऊ शकतो असे शपथ वाहून श्रीकृष्णनाथ अर्जुनाला सांगत आहेत. हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> अगा मानस हें एक । माझ्या स्वरूपीं वृत्तिक ।
> करूनि घाली निष्टंक । बुद्धि निश्चयेंसीं ॥१२.९७॥
> इयें दोन्हीं सरिसीं । मजमाजीं प्रेमेसीं ।
> रिगालीं तरी पावसी । मातें तूं गा ॥९८॥
> जे मन बुद्धि इहीं । घर केलें माझ्या ठायीं ।
> तरी सांगें मज काई । मी तूं ऐसें उरे ? ॥९९॥
> म्हणौनि दीप पालवे । सवेंचि तेज मालवे ।
> कां रविबिंबासवें । प्रकाशु जाय ॥१००॥
> उचललेया प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं ।
> तैसा मनोबुद्धिपाशीं । अहंकारु ये ॥१०१॥
> म्हणौनि माझिया स्वरूपीं । मन बुद्धि इयें निक्षेपीं ।
> येतुलेनि सर्वव्यापी । मीचि होसी ॥१०२॥
> यया बोला कांहीं । अनारिसें नाहीं ।
> आपुली आण पाहीं । वाहतु असें ॥१०३॥

अशा प्रकारे चैतन्याच्या परमप्रेमरूप शक्तीचे स्वरूप आण वाहून भगवंतांनी सांगितले आहे; कारण सहस्रारात या शक्तीचे शिवाशी मीलन झाल्यानंतरही म्हणजे सामरस्यानंतरही अगर ज्ञानानंतरही या शक्तीच्या प्रेमाचा विलास दृग्गोचर होत असतो. ती शिवाच्या प्रेमाने रात्रंदिवस उसळत असते. असे भक्ति-प्रेमाने उसळणारे, नाचणारे, रडणारे, गाणारे, धुंद होणारे व सर्वेंद्रियासहित त्यात मस्त होऊन गेलेले साधकभक्तच परमयोगयुक्त आहेत असे मी मानतो असे सांगून ज्ञानोत्तर भक्तीचा शक्तिद्वारा होणारा विलास श्रेष्ठ आहे असा निर्वाळा देताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> परि ठाकिलियाहि सागरु । जैसा मागीलही यावा अनिवारु ।
> तिये गंगेचिये ऐसा पडिभारु । प्रेमभावा ॥१२.३७॥
> तैसे सर्वेंद्रियांसहित । मजमाजीं सूनि चित्त ।
> जे रात्रीदिवस न म्हणत । उपासिती ॥३८॥

इयापरी जे भक्त । आपणपें मज देत ।
तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥३९॥

चैतन्याच्या विषयी पूर्ण प्रेमभाव, त्याच्याशी एकरूप झाल्यावरही, कुंडलिनी शक्तीच्या उपासनेशिवाय कसा उचंवळेल ? कारण आपणपे मज देणे म्हणजेच सद्गुरुकृपेने जागृत झालेल्या शक्तीच्या अधीन होऊन सिद्धयोगाचे साधन करणें होय. त्यामुळे कुंडलिनी शक्तीचे साधन हीच उपासना. कुंडलिनी शक्ती हेच दैवत व ती ज्या चैतन्याचे परमप्रेमास्पद स्वरूप आहे त्या स्वरूपाशी तिच्या आधाराने एकरूप होणे हेच ध्येय ! " तेथ प्रियाची परिसीमा । तो भेटे माउली आत्मा । तयें खेंवीं आटे डिंडिमा । सांसारिक हे ॥ १६.४४ ॥ " या शब्दात श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी या ध्येयाचे वर्णन केले आहे. तेथ म्हणजे सहस्रारात, प्रियाची म्हणजे कुंडलिनी शक्तीची, परमसीमा म्हणजे अत्यंत प्रेमास्पद शिवाशी भेट होऊन ही कुंडलिनी शक्तिरूप माउली आत्मरूप शिव होते. या दोघांच्या आलिंगनात, सामरस्यात, एकीकरणात किंवा एकरूप होण्यात सर्व संसाराचा डिंडिमा, महिमा, भासात्मक विराट स्वरूप किंवा उभारणी आटून नाहीशी होते. हीच गोष्ट सर जॉन वुड्रॉफ यांनी " दी सर्पंट पॉवर " या ग्रंथात " Practice (Yoga : Laya-Krama ) " या प्रकरणात पुढीलप्रमाणे सांगितली आहे. ते म्हणतात, " She ( Kundalini Shakti ) has thus in Her progress upwards absorbed in Herself the twenty three Tattvas, commencing with the gross elements, and then remaining Herself Shakti as consciousness, the cause of all Shaktis, unites with Para-mashiva whose unture is one with Hers.

By this method of mental concentration, aided by the physical and other processes described, the gross is absorbed into the subtle, each dissolving into its immediate cause and all into Chidatma or the Atma which is Chit. In language borrowed from the world of human passion, which is itself but a gross reflection on the physcial plane of corresponding, though more subtle, supersensual activities and bliss, the Shakti-Kundalini who has been Seized by desire for Her Lord is said to make swift way to Him, and kissing the lotus mouth of Shiva, enjoys Him. By the term Samarasya is meant the sense of enjoyment arising from the union ( Samarasya ) of male and female. This is the most intense form of physical delight representing of the worldly Plane

he supereme bliss arising from the union of Shiva and Shakti on the Spiritual plane. So Daksha, the Dharma-Shastrkara, says "The Brahmn is to be known by Itself alone, and to know It is as the bliss of knowing a virgin. ( स्वसंवेद्य एतत ब्रह्म कुमारीस्त्रीसुखम् यथा । अयोगी नैव जानाति जात्यंधो हि यथा वटम् ॥७.२५॥ दक्षस्मृति ॥ जे स्वतःच स्वतःला जाणते असे स्वसंवेद्य ब्रह्म आहे. ज्याप्रमाणे कुमारी कन्या मैथुनाचे सुख व जन्मांध मनुष्य वट-वृक्ष जाणू शकत नाही त्याप्रमाणे जो योगी नाही तो स्वसंवेद्य ब्रह्म किंवा आत्म-स्वरूप कधीही जाणू शकत नाही. ) Similarly, the Sadhaka in Laya-siddhi-yoga, thinking of himself as Shakti and the Parama-tma as Purusha, feels himself in union ( sangama ) with Shiva and enjoys with him the bliss which is Shringara-rasa' the first of the nine Rasas, or the love sentiment and bliss. This Adirasa (Shringara) which is aroused by Sattva-guna is impartite ( Akhanda ), self-illuminating ( Svaprakasha ), bliss (Ananda) whose substance is chit ( Chinmaya ). It is so intense and all-exclusive as to render the lover uncons-cious of all other objects of knowledge (वेद्यांतर स्पर्शशून्यः Vedy-antara-Sparsha-Shunyah) and the own brother of Brahma-bliss (Brahmasvadasahodara). But as the Brahma-bliss is known only to the Yogi, so, as the Alamkara-shastra last cited observes, even the true love bliss of the mortal-world "is known to a few knowers only" ( ज्ञेयः कश्चित प्रमातृभिः । ), such as poets and others. Sexual as well as other forms of love are reflections or fragments of the Brahman-bliss.

This union of the Shakti-Kundalini with Shiva in the body of the Sadhaka is that coition ( Maithuna ) of the Sattvika Pancha-tattva which the Yogini-Tantra says is: "the best of all unions for those who have already controlled their passions," and are thus yati. In the Chintamani-stava attributed to Shri-Shankaracharya, it is said : "This family woman ( i. e. Kundalini ), entering the royal road ( i. e. Sushumna), taking rest intervals in the sacred places ( i. e.

Chakras), embraces the supreme Husband (i. e. Para-Shiva) and makes nectar to flow ( i. e. from the Sahasrara )." ( Page 272 to 274 )

अशा रीतीने स्थूलरूपाने समुच्चयात्मक तत्त्वांनीं आविर्भूत झालेली व इतर सर्व शक्तींचे कारण असलेली ती कुंडलिनी शक्ती ऊर्ध्व गतीने प्रवास किंवा विकास करताना तेवीस तत्त्वांना आपल्यात समाविष्ट करून शेवटी स्वस्वरूपतःच तिच्याशी अभिन्न असलेल्या परमशिवाशी एकरूप होऊन फक्त शक्ती म्हणजे चेतना या स्वरूपात अवशिष्ट राहते. ज्यावेळी शारीरिक व इतर वर्णिलेल्या साधनांच्या आधाराने साधलेल्या या मानसिक एकाग्रतेच्या पद्धतीमुळे स्थूल हे सूक्ष्मात आकर्षिले जाते त्यावेळी प्रत्येक स्थूल तत्त्व हे त्याच्या नजीकच्या कारणात विरघळून जाते. शेवटी सर्व चिदात्म्यात किंवा आत्म्यात विलीन होते. हा आत्माच चितिशक्ती आहे. मानवी वासना जरी खूप सूक्ष्म असल्या तरी त्या स्वतःच तत्समान भौतिक पातळीचे समग्र प्रतिबिंबच असतात. यांच्यात अत्यंत विषयासक्त झालेल्या माणसाला त्या क्रियां-पासून सुख होते. ह्या जगताच्या मानवी वासनांच्या भाषेची उसनवारी करून बोलावयाचे झाले तर असे म्हणता येईल की, आपल्या स्वामीच्या मीलनासाठीं उत्सुक झालेली कुंडलिनी शक्ती जलद मार्गक्रमण करून पतीच्या अर्थात् शिवाच्या मुखकमलाचे चुंबन घेऊन त्याला सुखी करते. स्त्रीपुरुष संगमोद्‌भूत किंवा संभोगजन्य इंद्रिय सुखसंवेदना म्हणजे सामरस्य होय. जागतिक पातळीवरील भौतिक किंवा शारीरिक सुखाची जी अत्यंत तीव्रतम पद्धत आहे तीच आध्यात्मिक पातळीवरील शिवशक्तीच्या मीलनातून उपस्थित होणाऱ्या अत्युच्च सुखाची कल्पना आहे. त्यामुळे धर्मशास्त्रकार दक्षाने असे म्हटले आहे की, "ब्रह्म जाणणे म्हणजे स्वतःच स्वतःला जाणणे होय. एखाद्या कुमारिकेने संभोगसुख जाणण्यासारखेंच हे आहे. त्याचप्रमाणे लयसिद्धियोगात आपण स्वतः शक्ती आहोत व परमात्मा पुरुष आहे असा साधक विचार करीत असताना त्याला शिवाशी ऐक्य किंवा संगम झाल्याची अनुभूती येते आणि तो नवरसातील प्रमुख किंवा प्रथम असलेल्या श्रृंगारसाचा, प्रेम-भावनेचा किंवा सुखाचा आनंद उपभोगतो. सत्त्वगुणांपासून उत्पन्न होणारा आदिरस श्रृंगार अखंड, स्वप्रकाश व आनंदस्वरूप असून त्याचा गाभा चैतन्ययुक्त असतो. हा श्रृंगाररस इतका तीव्र व इतर सर्व रसांना वगळणारा अगर गिळणारा असतो की, तो एकदा उद्‌भूत किंवा उपस्थित झाल्यावर प्रेमिकाला अर्थात् साधकाला ज्ञानाच्या इतर सर्व लक्ष्यांबाबत अज्ञात किंवा बेशुद्ध अर्थात् वेद्यांतर स्पर्शशून्यअवस्था व ब्रह्मास्वादसहोदर सुखाची प्राप्ती करून देतो. परंतु ब्रह्मसुख हे ज्याप्रमाणे योग्यांनाच ज्ञात असते त्याचप्रमाणें अलंकारशास्त्राच्या शेवटी उधृत केल्याप्रमाणे मर्त्य जगातील खरे प्रेमसुख कवींना किंवा इतर ज्ञाते असलेल्या अशा फारच विरळ जाणकारांना ठाऊक

असते. इंद्रियजन्य किंवा संभोगजन्य अथवा लैंगिक व त्याचप्रमाणे प्रेमाचे इतर आकृतिबंध हे केवळ ब्रह्मसुखाचे प्रतिबिंब किंवा अंश आहेत. साधकाच्या शरीरात होणारे शिवाचे व शक्ती कुंडलिनीचे मीलन हे सात्त्विक पंचतत्त्वांचे मैथुन असून योगिनीतंत्रात म्हटल्याप्रमाणे ज्यांनी आपल्या वासना आवरल्या किंवा ताब्यात ठेवल्या आहेत त्यांच्या बाबतीत हे सर्वोत्तम सामरस्य आहे. अशा प्रकारच्या समरसीकरणाची किंवा एकीकरणाची जे अनुभूती घेतात तेच खरे संन्यासी होत. शंकराचार्यांच्या नावावर असलेल्या "चिंतामणिस्तव" या स्तोत्रात असे म्हटले आहे की, ही कुंडलिनी नावाची सांसारिक स्त्री ज्यावेळी सुषुम्नेच्या राजमार्गात प्रवेश करून मार्गक्रमण करू लागते त्यावेळी ती मधून मधून चक्राच्या धार्मिक स्थानांवर विश्रांती घेते व शेवटी सहस्रारातील पतिश्रेष्ठ परम शिवाला आलिंगन देऊन तेथून अमृताचा प्रवाह प्रवाहित करते.

हे सर्व जरी खरे असले तरी "तो शांतुचि अभिनवेल ।।४.२१३।।," "आतां शांतरसाचें भरितें। सांडीत आहे पात्रातें। जें बोलणें बोलापरौतें। बोलवलें ।। ५.६४ ।।" व "शांतु श्रुंगारातें जिणें ।। १०.४२ ।।" असा सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडून शिवशक्तीच्या सामरस्यात शृंगारालाही शांतरस जिंकतो असे कथन केले आहे; कारण ज्यावेळी चैतन्याच्या परमप्रेमरूपशक्तीला सुषुम्नेतील शृंगाररसानंतर सहस्रारातील शांतरसाची स्थिती प्राप्त होते त्यावेळीच बोलापरौते असे ज्ञानेश्वरीसारखे बोलणे बोलविले किंवा कथन केले जाते. चैतन्याच्या परमप्रेमरूपशक्तीची यापेक्षा अत्युच्च अवस्था कोणती असू शकेल ?

## क्रियाशक्ती:–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "पैं प्राणाची अंतौरी। क्रियाशक्ति जे शरीरीं। तियेची रिगिनिगी द्वारीं। पांचें इहीं ।। १३.१०२ ।।" असे म्हणून जी क्रियाशक्ती कुंडलिनी या शरीरात वास करते ती प्राणाची स्त्री असून तीच पाच कर्मेंद्रियांच्या द्वाराने आत बाहेर जाण्यायेण्याचा व्यवहार करते व "तैसी क्रियाशक्ति पवनीं। असे जे अनपायिनी। ते पडिली नानास्थानीं। नाना होय ।। १८.३३३ ।।" असे म्हणून जी क्रियाशक्ती कुंडलिनी प्राणवायूत मुळचीच अखंड असते, ती अविनाशिनी शक्ती असून, ती एकच शक्ती निरनिराळ्या ठिकाणी व्यक्त झाल्याने नानारूपाने पिंडब्रह्मांडाची रचना करते हे सांगून तिच्या ज्ञान व अज्ञानात्मक द्विविध स्वरूपांपैकी अज्ञानात्मक स्वरूपाचेच अधिक वर्णन केले आहे. उभारणीचा हा विचार नगण्य असून चित्‌शक्तीचा संहारणीयुक्त साधनस्वरूपाचाच विचार आपण करणार आहोत असे या प्रकरणाच्या प्रस्तावनेत म्हटले असले तरी क्रियाशक्ती कुंडलिनी आपले जे भासात्मक स्वरूप सद्‌गुरुकृपेने जागृत झाल्यावर गिळणार आहे, ते काय आहे ?, हे पाहणे आवश्यक असल्याने साधनात्मक किंवा साधनावश्यक दृष्टीनेच

त्याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे प्रस्तुत केले आहे याचे विवेचन करू. क्रियाशक्ती कुंडलिनीचे पिंडब्रह्मांडात्मक रचना, स्थिती व कार्य हेच खरे अज्ञान असून जीव तिच्या या स्वरूपातच रममाण होऊन जातो. हीच त्याची बहिर्मुखता होय. यालाच जीवाची किंवा कुंडलिनी शक्तीची निद्रावस्था म्हणतात. संकुचित स्वरूपात जीवरूपाने ज्ञानविरहित अशा अज्ञान अवस्थेत जेव्हा कुंडलिनी शक्ती व्यक्त झालेली दिसते तेव्हा ती "जें ज्ञान नव्हे तें अपैसया। अज्ञानची ॥१३.६५४॥ व "तैसें ज्ञान जेथ नाहीं। तेंचि अज्ञान पाही ॥१३.६५६॥" या स्वरूपातच कशी व्यक्त होते हे आपण मागील प्रकरणातील "दिव्यचक्षूंने उन्मीलन" या मुद्यात सविस्तर पाहिलेच आहे. शक्तीच्या बहिर्मुखामुळे अज्ञानी बनलेल्या जीवाची लक्षणे "अज्ञानं यदतोऽन्यथा ॥१३.११॥" या गीतेवरील श्लोकचतुर्थांशाचा भावार्थ व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सविस्तर कथन केली आहेत. पुढे त्यांनी सोळाव्या अध्यायातही "दंभोदर्पोभिनाश्च.... ॥४॥" या श्लोकापासून "त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ॥२१॥" येथपर्यंतच्या भावार्थात कुंडलिनी शक्तीच्या बहिर्मुख अवस्थेचे म्हणजे पर्यायाने निद्रावस्थेचे वर्णन केले आहे. "अज्ञान आतुले घुळी। म्हणौनि आशा वाहटुळी। भोवंडीजती अंतराळीं। मनोरथांच्या १६.३६५॥" अशा या अज्ञानाचा खच माजविणाऱ्या कुंडलिनीरूपी कियाशक्तीचे अनादि, भवद्रुमबीज, विपरीत ज्ञानदीपिका, माया, बीजांकुरभाव, वस्तुप्रभा, इत्यादि विविध नावांनी वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तरी माया ऐसी ख्याती। नसतीच यया आथी।
कां वांझेची संतती। वानणें जैशी ॥१५.८०॥
तैसी सत् ना असत् होये। जे विचाराचें नाम न साहे।
ऐसेया परीची आहे। अनादि म्हणती ॥८१॥
जे नानातत्त्वांची मांदुस। जे जगद्भ्रमाचें आकाश।
जे आकारजाताचें दुस। घडी केलें ॥८२॥
जे भवद्रुमबीजिका। जे प्रपंचचित्र भूमिका।
विपरीत ज्ञानदीपिका। सांचली जे ॥८३॥
ते माया वस्तूच्या ठायीं। असे जैसेनि नाहीं।
मग वस्तुप्रभाचि पाही। प्रकट होये ॥८४॥
जेव्हां आपणया आली निद। करी आपणपें जेवीं मुग्ध।
कां काजळी आणि मंद। प्रभा दीपीं ॥८५॥
स्वप्नीं प्रियापुढें तरुणांगी। निदेली चेववूनि वेगीं।
आलिंगिलेनिवीण आलिंगी। सकामु करी ॥८६॥

तैसी स्वरूपीं जाली माया । आणि स्वरूप नेणे धनंजया ।
तेंचि रूखा यया । मूळ पहिलें ॥८७॥
वस्तूसी आपुला जो अबोधु । तो ऊर्ध्वीं आठुळैजे कंदु ।
वेदांतीं हाचि प्रसिद्धु । बीजभावो ॥८८॥
घन अज्ञान सुषुप्ती । तो बीजांकुरभावो म्हणती ।
येर स्वप्न हन जागृती । हा फळभावो तियेचा ॥८९॥

ही क्रियाशक्ती कुंडलिनी मुळात नुसती भासमान होणारी, जगद्भ्रम निर्माण करणारी, वांझेची संतती असल्याप्रमाणे दाखविणारी व आकारजाताच्या घडीच्या रूपाने नानातत्त्वांची पेटी असल्यासारखी दिसली तरी घन अज्ञान सुषुप्ती हेच तिचे खरे बहिर्मुख स्वरूप आहे. वास्तविक पाहता कियाशक्ती कुंडलिनी चैतन्याशी किंवा शिवाशी वस्तुप्रभेच्या रूपाने अभिन्नच आहे. फक्त वस्तूची प्रभा जशी वस्तूहून निराळी आहे असे वाटते किंवा भासते तसे या क्रिया-शक्तीचे पिंडब्रह्मांड रचनेचे कार्य हे शिवाशी किंवा स्वसंवेद्य आत्मरूपाशी अभिन्न राहून भासमान झालेले असते. शिवाशी अभेद्य, एकरूप, अच्छेद्य व अफुट असलेल्या या कुंडलिनीरूपी क्रियाशक्तीच्या कार्याचे किंवा स्वरूपाचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

जें विवेकें खोलें पाहिजे । तरी मी तेंचि ते सहजें ।
ना आहाचवाहाच तरी दुजें । ऐसेही गमती ॥१५.३३१॥
जैसे पाणियावरी वेगळ । तळपतां दिसती कल्लोळ ।
येऱ्हवीं तरी निखिळ । पाणीचि तें ॥३३२॥
कां सुवर्णाहुनि आनें । लेणीं गमती भिन्नें ।
मग पाहिजे तंव सोनें । अवघेंचि तें ॥३३३॥
तैसें ज्ञानाचिये दिठी । मजसीं अभिन्नच ते किरीटी ।
येर भिन्नपण तें उठी । अज्ञानास्तव ॥३३४॥
तें अज्ञान एक रूढे । तेणें कोऽहंविकल्पाचे मांडें ।
मग विवरूनि कीजे फुडें । देहो मी ऐसें ॥३४२॥
ऐसें शरींराचि येवढें । जें आत्मज्ञान वेगळें पडे ।
तें माझा अंशु आवडे । थोडेंपणें ॥३४३॥
समुद्र कां वायुवशें । तरंगाकार उल्लसें ।
तो समुद्रांशु ऐसा दिसे । सानिवा जेवीं ॥३४४॥
तेवीं जडातें जीवविता । देहअहंता उपजविता ।
मी जीव गमें पंडुसुता । जीवलोकीं ॥३४५॥

किंबहुना आत्मा चोखटु । होऊनि प्रकृतीसी एकवटु ।
बांधे प्रकृतिधर्मांचा पाटु । आपणपयां ॥३५१॥

शिव व जीवरूपाने दिसणारी क्रियाशक्ती कुंडलिनी यांचे समुद्र व तरंगा-प्रमाणे किंवा सुवर्ण व लेण्याप्रमाणे असणारे हे अभेद्यत्व "Tantra : Its Mystic And Scientific Basis." या ग्रंथात श्री. लालनप्रसाद सिंह यांनी "Principles of Tantra Phylosophy" या प्रकरणात पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात– "Shiva is the Jnana-Shakti and Devi (Kundalini) is the Kriya-Shakti. Shakti is the non-material principle. She is known as Chit-Shakti. ( Page 43. ) The Absolute is the nature of Pure Consciousness. It is unaffected by the limitations of Time, Space and Causality. It has absolute freedom. It is unrestricted by its Vimrsha Kriya. Vimarsha-Kriya is identical with Param-Shiva It remains involved in him. The Absolute is endowed with power which is indentical with Itself and by virtue of which It is described as the Free Agent. Freedom is the essence of consciousness.

Shiva and Shakti are the two aspects of the Absolute. It is unchanging, eternal, infinite, one and uncaused. It is the Supreme Reality. It is beyond the categories of existence and non-existence, being and non being. ( शिवशक्त्यात्मसंघट्टरूपे ब्रह्मणि शाश्वते-योगिनी हृदय– २.१९ – पृ. १०५ )

Param Shiva is both transcendent and immanent. Shiva-tattva is the transcendental aspect and Shakti-tattva is the immanent principle of Param-Shiva. Shiva and Shakti eternally coexist in him. The collective name of Shiva and Shakti is Param Shiva. The duality, involved in the admission of Shiva and shakti, is due to the analytical approach of mind. Shakti is indentical with Shiva, as salt is with the sea-water. शक्तिमदैक्यात्म्यलक्षणात्‌लवणारनालवत्परस्परमेलनात् । ११.१९२-तंत्रालोक )

Param Shiva is consciousness force (चित्‌शक्ति). He is the ultimate base of existence. The absolute Chiti is the cause when the universe is in the process of becoming perfected. Param Shiva is not a passive principle. He is the noumenal

cause of this phenomenal world. He is the ultimate cause of the manifest universe.

Param Shiva is the fundamental stuff out of which the whole manifest and unmanifest universe has been created. By the power of consciousness (चितिशक्ति) He creates the cosmos. Mahanirvana Tantra says: "I bow to Thee, the pure consciousness who art in the form of universe." (Page 45)

Shiva is Cosmic Consciousness and Shakti a Cosmic Principle. Shiva is a witnessing force, knowing entity but without the activation of Shakti. He remains objectless, unmanifested. Shiva is a Jnana–Tattva and Shakti is a Kriya-Shakti. But Shakti is neither absolute nor an idependant entity. She is an immanent principle of Shiva. Without Shakti, Shiva is inactive. Shakti is known as Devi and Maha-Maya. (शक्तिः सा शिवस्य शक्ति ॥ आनंद-सूत्रम् ॥) Shiva, being a supreme subjectivity, remains as a witnessing force. Shakti is the premordial force. Reality is one and Eternal but due to the activation of Shakti the Absolute Reality appears to have taken different forms and colours. It means that when Shakti gets the scope of her manifestation, Shiva (Cosmic Consciousness) undergoes a metamorphosis. The singular self (Shiva) is transformed into innumarable finite entities but remains the essence and the fundamental stuff of all physical and metaphysical entities. However, due to the operation of Shakti, shiva does not lose his transcendentality. (Page 52)

As Vimarsha–Shakti, she does not negate Shiva (Cosmic Consciousness) in the western sense; rather she fulfils the desire of Shiva by creating the world. She is said to be Nishedha Vyapararupa Shaktih. (निषेध व्यापाररूप शक्तिः) Here Nishedha means the veiling and projecting (विक्षेप) Kriya of Shakti which is quite different from the principle of Negation. (Page 52–53)

When Shakti, the causal matrix, gets the scope of expression the visible and the invisible world with all its forms and colours comes into being. (Page 52)

If Shakti had remained inexplicit, primordial and merged in Shiva, the diverse manifestations of different beings and existence would not have taken place. Creation means that the three components of Shakti are not in equilibrium. There is disparity. Either the sentiment or the static force is dominant. If the sentient force is predominant Shakti is known as Vidyamaya and if the static force in pronounced, then she is known as Avidyamaya. She is Vidya-Shakti when she reveals in the Pashu state of Atma whose true nature is lordship but when she veils then she is called Maya. (Page 53)

Shakti is the immanent aspect of the Absolute. She is the creative matrix. She eternally coexists with Shiva. Monism means the eternal coexistence of the two. Shiva is the Jnana-Shakti and Uma is the Kriya-Shakti. Shakti is Nitya (Eternal) Satyarupa (of the nature of Truth), Divya (Divine) and omni-active. Shakti is the creative principle. When she gets the scope of her manifestation she becomes the efficient cause of creation. She becomes the operative principle. She is called Maya. She remains merged into Cosmic Consciousness, in the non-qualified (nirguna) existance of Param Shiva. She exists at all levels of Consciousness. (Page 169)

शिव ही ज्ञानशक्ती व देवी कुंडलिनी ही क्रियाशक्ती आहे. शक्ती म्हणजे अभौतिक तत्त्व होय. चित्शक्ती या नावानेच ही कुंडलिनी ओळखली जाते. परिपूर्णता किंवा निरंकुशता हाच शुद्ध चैतन्याचा स्वभाव आहे. काळ, अवकाश व कारण यांच्या मर्यादांपासून हे चैतन्यतत्त्व अपरिणामीच राहते. त्याला पूर्ण स्वातंत्र्य असते. ते आपल्या विमर्शक्रियेपासून पूर्णपणे मुक्त असते. विमर्शक्रिया ही परमशिवाशी तंतोतंत जुळणारी आहे. ही क्रिया शिवामध्ये नेहमी अनुस्यूत असते. एकमेवाद्वितीय असलेले तत्त्व हे मुळातच सशक्तिक असून ही त्याची शक्ती त्याच्याशी एकरूप अर्थात् त्याच्याशी तंतोतंत जुळणारी असते. त्यामुळे या शक्तीचे शिवाचा मुक्त प्रतिनिधी म्हणून वर्णन केले जाते. स्वातंत्र्य हे चैतन्याचे सार आहे.

शिव व शक्ती हे आत्मतत्त्वाचे दोन पैलू आहेत. हे तत्त्वे कधीही न बदलणारे, अनादि, अनंत, एक व कारणरहित आहे. हे आत्मतत्त्वच सर्वश्रेष्ठ सत्यस्थिती आहे. हे तत्त्व असण्याच्या आणि नसण्याच्या किंवा अस्तित्वाच्या आणि नस्तित्वाच्या प्रकारांच्या पलीकडे आहे.

परमशिव हा सर्वश्रेष्ठ व स्वाभाविक असा दोन्हीही आहे. या परमशिवातील शिवतत्त्वाचा पैलू सर्वश्रेष्ठता हा असून स्वाभाविकता हा शक्तितत्त्वाचा पैलू आहे. शिव व शक्ती हे अनादिपणे या एकाच तत्त्वात अस्तित्वात आहेत. परमशिव हे शिव व शक्तीचे एकत्रित नाव आहे. शिव व शक्ती हे द्वैत मान्य करण्यात त्या तत्त्वाकडे पाहण्याची मनाची पृथक्करणात्मक वृत्ती गुंतलेली आहे.ज्याप्रमाणे मिठाचे समुद्राच्या पाण्याशी ऐक्य झालेले असते त्याप्रमाणे शक्ती ही शिवाशी समरस झालेली असते.

परमशिव म्हणजेच चितिशक्ती होय. तोच अस्तित्वाचा किंवा उभारणीचा अंतिम आधार आहे. विश्वाच्या उभारणीची प्रक्रिया परिपूर्णत्वास जाण्यास स्वयंपूर्ण चितिशक्तीच कारण आहे. परमशिव हे काही निष्क्रिय तत्त्व नव्हे. अत्यंत विलक्षण, असाधारण, आश्चर्यकारक व अद्‌भुत जगाचे शिव हे सर्व सारभूत कारण आहे. एवढेच नव्हे तर या दृग्गोचर किंवा व्यक्त जगताचे तेच अंतिम कारण आहे.

परमशिव हाच मुळातील गाभा असून त्यापासूनच व्यक्त व अव्यक्त विश्वाची निर्मिती होते. चितिशक्तीच्या सामर्थ्याच्या आधारानेच तो जगताची निर्मिती करतो. महानिर्वाण तंत्रात असे म्हटले आहे की, “ विश्वाकार होऊन साकार झालेल्या शुद्ध चैतन्याला मी प्रणाम करतो.”

शिव ही जागतिक चेतना असून शक्ती हे जागतिक तत्त्व आहे. शिव हे साक्षीयुक्त सामर्थ्य आणि ज्ञात व अस्तित्वात असलेली वस्तू असली तरी शक्ती-शिवाय तो हालचाल करण्यास असमर्थ असतो. शक्तीवाचून शिव ध्येयशून्य व अव्यक्तच राहतो. शिव हे ज्ञानतत्त्व असून शक्ती हे क्रियाशक्तितत्त्व आहे. परंतु शक्ती ही स्वयंपूर्ण व स्वतंत्र अस्तित्व असलेली वस्तू नाही. ती शिवाचे कायमचे तत्त्व आहे. शक्तीविना शिव हा कर्तृत्वशून्य असतो. शक्ती ही देवी व महामाया म्हणून प्रसिद्ध आहे. शिव हा सर्वश्रेष्ठ अशी कर्तृत्वता असल्याने तो शेवटपर्यंत साक्षीयुक्त सामर्थ्याच्या रूपानेच राहतो. सत्यता ही एकच व अनादि असली तरी शक्तीच्या क्रियाशीलतेमुळे ती एकमात्र सत्यता निरनिराळ्या रूपात व रंगात आविर्भूत झालेली दृष्टीस पडते. याचा अर्थ असा की, ज्यावेळी शक्तीला व्यक्त होण्याची संधी प्राप्त होते किंवा अवसर मिळतो त्यावेळी शिवामध्ये ( जागतिक चैतन्यात ) तिचे रूपांतर होते. एकमेव स्वत:च असलेला शिव हा असंख्य मर्यादित वस्तूंमध्ये परिवर्तित होतो; परंतु भौतिक व आध्यात्मिक वस्तूंमधील त्याचा मुळातील गाभा व सार हे स्वरूपत: तसेच राहते. मात्र शक्तीच्या क्रियाशीलतेमुळे किंवा उभारणीच्या कार्यामुळे शिव हा आपले श्रेष्ठत्व,उत्कृष्टता किंवा वरचढपणा गमावीत नाही. पाश्चात्य दृष्टीने शिवाला ( वैश्विक चैतन्याला ) विमर्श-शक्ती नाकबूल करीत नाही; उलट जगताची निर्मिती करून ती शिवाची इच्छा परिपूर्ण करते.

हिला निषेधव्यापाररूप शक्ती असे म्हटले जाते. येथे निषेध म्हणजे शक्तीची बुरखा घेण्याची, झाकण्याची किंवा लपविण्याची व विक्षेपाची क्रिया अभिप्रेत असून ती नकाराच्या तत्त्वापेक्षा फार निराळी आहे.

ज्यावेळी शक्तीच्या या कारणात्मक साच्याला किंवा मुशीला विश्वाच्या उभारणीची संधी किंवा अवसर मिळतो त्यावेळी व्यक्ताव्यक्त जगाचे सर्व रूपरंग साकार होऊन प्रत्यक्षात येतात.

जर शक्ती ही अव्यक्त व आहे त्या पहिल्या स्थितीतच शिवाशी एकरूप होऊन राहिली तर तिचे नाना रूपात विविधतेने होणारे आविष्करण अस्तित्वात येणे शक्य नाही. निर्मिती म्हणजे शक्तीच्या तीन गुणांचा असमतोल होय. निर्मितीत विषमता किंवा तफावत असते. त्यात एक तर भावना किंवा अचल शक्ती प्रभावी असते. जर भावनेचा जोर प्रबळ असेल तर त्या शक्तीला विद्या-माया म्हणतात आणि जर अचलतेचा जोर वरचढ असेल तर तिला अविद्या-माया म्हणतात. जेव्हा ही शक्ती आत्म्याच्या पशुस्वरूपात प्रकट होते तेव्हा या विद्याशक्तीचे खरे स्वरूप स्वामीचे म्हणजे शिवाचेच असते. मात्र जेव्हा ती आवृत अवस्थेत असते तेव्हा तिला माया म्हणतात.

शक्ती हा एकमेवाद्वितीय अशा शिवतत्त्वाचा स्थायी पैलू आहे. तीच उभारणीची मूस किवा साचा आहे.ती अनादि कालापासून शिवाशी एकरूपाने अस्तित्वात आहे. अद्वैत म्हणजे शिवशक्तीचे अनादि एकरूपत्वच होय. शिव म्हणजे ज्ञानशक्ती व उमा म्हणजे क्रियाशक्ती होय. शक्ती ही नित्य, सत्यरूप, दिव्य व सर्वत्र क्रियारूप अशी आहे. शक्ती हेच उभारणीचे तत्त्व आहे. जेव्हा तिला उभारणीचा अवसर मिळतो तेव्हा ती निर्मितीचे अचुक कारण होते. त्यावेळी तीच चलित तत्त्व बनते. तिला माया म्हणतात. विश्वचैतन्याने स्फुरणाऱ्या परमशिवाच्या निर्गुण स्वरूपाशी ती एकरूप होऊन राहते. चैतन्याच्या सर्व पातळयांवर ती अस्तित्वात असते."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अविद्या, माया किंवा अज्ञानरूपाने व्यक्त होणाऱ्या कुंडलिनी शक्तीची क्रिया गीतेत भगवंतांनी सांगितल्याप्रमाणे महाभूते, अहंकार, बुद्धी, अव्यक्त, दहा इंद्रिये, त्याच इंद्रियांचे विषय, इच्छा, द्वेष, सुख, दुःख, शरीर व इंद्रिये यांचा समुदाय, देहात व्यक्त झालेली चेतनाशक्ती व धैर्य हे सर्व पैलू घेऊन कशी साकार होते हे स्पष्ट केले आहे. उपरोक्त नावे भिन्न दिसली तरी "क्षेत्र" या नावाने ही कुंडलिनी शक्तीच क्रियारूपाने विस्तार पावलेली असते. अहंकार, अव्यक्त व चेतना यांचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केलेले विवेचन नमुन्यादाखल पाहिले तरी क्रियाशक्ती कुंडलिनी हीच पिंडब्रह्मांडाच्या व गुणांच्या रूपाने कशी व्यक्त होते हे लक्षात येईल. ते म्हणतात—

तैसी पांचांही गांठीं पडे । जें देहाकारु उघडे ।
तें नाचवी चहूंकडे । तो अहंकारु गा ॥१३.८१॥
नवल अहंकाराची गोठी । विशेषें न लगे अज्ञानापाठीं ।
सज्ञानाचे झोंबे कंठी । नाना संकटीं नाचवी ॥८२॥
पैं सांख्यांचिया सिद्धांतीं । प्रकृती जे महामती ।
तेचि एथें प्रस्तुतीं । अव्यक्त गा ॥९०॥
आतां असंगा साक्षिभूता । देहीं चैतन्याची जे सत्ता ।
तिये नाम पंडुसुता । चेतना येथें ॥१३४॥
जे नखौनि केशवरी । उभी जागे शरीरीं ।
ते तिहीं अवस्थांतरी । पालटेना ॥१३५॥
मनबुद्ध्यादि आघवीं । जियेचेनि टवटवीं ।
प्रकृतिवनमाधवी । सदांचि जे ॥१३६॥
जडाजडीं अंशीं । राहाटे जे सरिसी ।
ते चेतना गा तुजसी । लटिकें नाहीं ॥१३७॥
पैं रावो परिवारु नेणें । आज्ञाचि परिचक्र जिणे ।
कां चंद्राचेनि पूर्णपणें । सिंधू भरती ॥१३८॥
नाना भ्रामकाचें सन्निधान । लोहो करी सचेतन ।
कां सूर्यसंगु जन । चेष्टवी गा १३९॥
अगा मुख मेळेंवीण । पिलियाचें पोषण ।
करी निरीक्षण । कूर्मी जेवीं ॥१४०॥
पार्था तियापरी । आत्मसंगती इये शरीरीं ।
सजीवत्वाचा करी । उपेगु जडा ॥१४१॥
मग तियेतें चेतना । म्हणिपे पैं अर्जुना ॥१४२॥

शिव हा राजा, चंद्र, लोहचुंबक, सूर्य व कूर्मी यांच्याप्रमाणे असून राजाज्ञा, चंद्रकिरणे, चुंबकत्व, सूर्यकिरणे व कूर्मीची दृष्टी याप्रमाणे शक्ती असते. शिव हा अक्रिय किंवा निष्क्रियच असतो. त्याची शक्तीच उपरोक्त दृष्टांताप्रमाणे सर्वत्र क्रियारत झालेली दिसते. ही क्रियाशक्तिरूप कुंडलिनीच सत्त्व, रज व तम आणि इच्छा, ज्ञान व क्रिया यांच्या निर्मितीद्वारा अमूर्ताला मूर्तिमान व निराकाराला आकार देते. हीच माया होय. ही शक्तीच अद्वैतरूपाने व सामरस्याने शिवाशी एकवटून कालविलेली असली तरी ती दृष्टा, दृश्य व दर्शन आणि ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय यांच्या रूपाने भासमान झालेली कशी दिसते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जें प्राणाचा प्राण । जें गतीचे चरण ।
क्रियेचें कर्तेपण । जयाचेनि ।।१३.९३१।।
आकारु जेणें आकारे । विस्तारु जेणें विस्तारे ।
संहारु जेणें संहारें । पंडुकुमरा ।।९३२।।
जें देखलियाचिसवें । दृश्य द्रष्टा हें आघवें ।
एकवट कालवे । सामरस्यें ।।९३६।।
मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन ।
ज्ञानें गमिजे स्थान । तेंहि तेंची ।।९३७।।
तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता ।
परी इया पतिव्रता । भोगविजे ।।९८५।।
जियेतें अळुमाळु । रूपागुणाचा चाळढाळु
ते भलतैसाही खेळु । लेखा आणी ।।९८६।।
मा इये प्रकृती तंव । गुणमती हेंचि नांव ।
किंबहुना सावेव । गुण तेचि हे ।।९८७।।
हे प्रतिक्षणीं नित्य नवी । रूपा गुणाचीच आघवी ।
जडातेंही माजवी । इयेचा माजु ।।९८८।।
नामें इयें प्रसिद्धें । स्नेहो इया स्निग्धें ।
इंद्रियें प्रबुद्धें । इयेचेनि ।।९८९।।
कायि मन हें नपुंसक । कीं तें भोगवी तिन्ही लोक ।
ऐसें ऐसे अलौकिक । करणें इयेचें ।।९९०।।
हे भ्रमाचे महाद्वीप । हे व्याप्तीचें रूप ।
विकार उपम । इया केले ।।९९१।।
हे कामाची मांडवी । हे मोहवनींची माधवी ।
इये प्रसिद्धचि दैवी । माया हें नाम ।।९९२।।
हे वाङ्मयाची वाढी । हे साकारपणाची जोडी ।
प्रपंचाची धाडी । अभंग हे ।।९९३।।
कळा येथूनि जालिया । विद्या इयेच्या केलिया ।
इच्छा ज्ञान क्रिया । वियाली हे ।।९९४।।
हे नादाची टांकसाळ । हे चमत्काराचें वेळाउळ ।
किंबहुना सकळ । खेळु इयेचा ।।९९५।।
जे उत्पत्ति प्रलयो होत । ते इयेचे सायंप्रात ।
हें असो अद्भुत । मोहन हे ।।९९६।।
हे अद्वयाचें दुसरें । हे निःसंगाचे सोयरे ।
हे निराळेंसि घरें । नांदत असे ।।९९७।।

इयेतें येतुलावरी । सौभाग्यव्याप्तीची थोरी ।
म्हणौनि तया आवरी । अनावरातें ।।९९८।।
तयाच्या तंव ठायीं । निपटूनि कांहींचि नाहीं ।
कीं तया आघवेंही । आपणचि होय ।।९९९।।
तया स्वयंभाची संभूती । तया अमूर्ताची मूर्ती ।
आपण होय स्थिती । ठावो तया ।।१०००।।
तया अनार्ताची आर्ती । तया पूर्णाची तृप्ती ।
तया अकुळाची जाती-। गोत होय ।।१००२।।
तया अचर्चाचें चिन्ह । तया अपाराचें मान ।
तया अमनस्काचें मन । बुद्धीही होय ।।१००२।।
तया निराकाराचा आकारु । तया निर्व्यापाराचा व्यापारु ।
निरहंकाराचा आकारु । होऊनि ठाके ।।१००३।।
तया अनामाचें नाम । तया अजाचें जन्म ।
आपण होय कर्म-। क्रिया तया ।।१००४।।
तया निर्गुणाचे गुण । अचरणाचे चरण ।
तया अश्रवणाचे श्रवण । अचक्षूचे चक्षु ।।१००५।।
तया भावातीताचे भाव । तया निरवयवाचे अवयव ।
किंबहुना होय सर्व । पुरुषाचें हे ।।१००६।।
ऐसेनि इया प्रकृती । आपुलिया सर्व व्याप्ती ।
तयां अविकारातें विकृती-। माजीं कीजे ।।१००७।।

ईश्वराची सत्ता, आज्ञा, शक्ती, माया किंवा प्रकृती हीच त्रिरूप अगर त्रिगुणात्मक होऊन उपरोक्त प्रकारे पिंडब्रह्मांडाच्या रचनेचे कार्य करते. चैतन्याची शक्ती नानाप्रकारची असली तरी विशेष करून इच्छा, ज्ञान व क्रिया या रूपानेच ती प्रकट होते हे सांगताना "श्वेताश्वतर उपनिषदात" असे म्हटले आहे की-

पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते । स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ।।६.८।।

यादृष्टीनेच "योगवाणी या सिद्धयोगोपदेश" या पुस्तकात प. प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थ स्वामीमहाराज यांनी तृतीयाध्यात असे म्हटले आहे की, "हे वत्स ! मूलाधारस्थ कुंडलिनी शक्तिही हमारी माँ काली है । ये ही आद्याशक्ति और शिवस्वरूपिणी हैं, क्योंकि शक्ति और शक्तिमान् वस्तुतः अभिन्न हैं । देवीगीता में लिखा है कि-

तदूर्ध्वं तु शिखाकारा कुंडली रक्तविग्रहा ।
देव्यात्मिका तु सा प्रोक्ता मदभिन्ना नगाधिप ।।

मूलाधारमें स्वयंभूलिंगके ऊर्ध्वभागमें अग्नि–शिखाकार रक्तवर्ण देवीरूपा कुंडली है। हे पर्वतराज ! यह कुंडली हमसे अभिन्न है। यही शक्ति इच्छा, क्रिया और ज्ञान इन तीन शक्तियोंके रूपमें विराजती है। गोरक्षसंहितामें लिखा है।

इच्छा क्रिया तथा ज्ञानं गौरी ब्राह्मी तु वैष्णवी।
त्रिधा शक्तिः स्थिता यत्र तत्परं ज्योतिरोमिति ।।
ज्ञानं गौरीशक्तिरिच्छा ब्राह्मीशक्तिः।
क्रिया वैष्णवीशक्तिरिति त्रिधा त्रिप्रकारा ।।

शक्ति तीन प्रकारकी है– ज्ञानरूपा गौरी ( माहेश्वरी ) शक्ति, इच्छारूपा ब्राह्मीशक्ति, क्रियारूपा वैष्णवीशक्ति या लक्ष्मी। ये ही त्रिविधा शक्तियाँ हैं। जहाँ इन तीनो शक्तियोंका स्थान है, उसके परे चित्-ज्योति-स्वरूप ब्रह्मस्थान है।

मूलाधारसे नाभीचक्रपर्यंत इच्छाशक्तिरूपा ब्राह्मी-शक्तिका स्थान है। इसे अधःशक्ति भी कहते हैं। नाभीसे कंठचक्रपर्यंत क्रियाशक्तिरूपा विष्णुशक्तिका स्थान हैं। इस वैष्णवी शक्तिको मध्यशक्ति कहते है। कंठचक्रसे आज्ञाचकपर्यंत ज्ञानशक्ति-रूपा शिवशक्तिका स्थान है। इसे ऊर्ध्वशक्ति भी कहते है। इससे आगे शक्तिसे परे निरंजन निर्गुण ब्रह्मका स्थान हैं।

ऊर्ध्वशक्तिर्भवेत् कंठं अधःशक्तिःर्भवेत् गुदः।
मध्यशक्तिर्भवेन्नाभिः शक्त्यातीतं निरंजनम् ।।

हे वत्स ! शक्ति और शक्तिमान् वस्तुतः अभिन्न हैं। शक्ति जब निर्गुण ब्रह्ममें अभिन्न भावसे लीन होती है, तव कोई सृष्टि नहीं रहती। यही निर्विकार सत्स्वरूप अद्वैत ब्रह्मभाव है। षट्चक-भेदन करके शक्तिके ब्रह्मरंध्रमें लीन होनेपर साधक इस अवस्थाका अनुभव कर सकता है। यही क्रिया और ज्ञानकी परावस्था या निर्विकल्पावस्था है।

इस अवस्थामें इच्छा-क्रिया-ज्ञानमयी सृष्टि अप्रकट रहती है, इसलिए यही प्रलयावस्था है। ध्यानमें रक्खो कि सृष्टिकर्ता जब निर्विकल्प समाधिमें समाहित हो स्वरूपस्थ हो जाता है, तब प्रलयावस्था हो जाती है।

इसी ब्रह्मने ईक्षण (मनन) किया–" मैं एक हूँ, अनेक हो जाऊँ।" इस ईक्षण करनेवाली शक्तिके होते ही क्रमशः नानात्वमय विचित्र जगत्की सृष्टि हुई। इसी शक्तिके इच्छा, क्रिया और ज्ञान तीन भेद हुए। यही ब्रह्मलीना शक्ति जब आरंभमें कार्योन्मुखी होती है, तब इसे आदिकारण या सर्वकारण-कारण कहते हैं। यही सृष्टिकी अव्यक्त या प्राथमिक अवस्था है। इसी अवस्थामें ब्रह्मको सगुण ब्रह्म कहते हैं। आज्ञाचक्रही सगुण ब्रह्मका स्थान है। इसी स्थानमें मनका निवेश करनेसे

साधकको आदिकारणकी उपलब्धि होती है। इसी स्थानमें सविकल्प समाधि होती है।

सृष्टिकी इस अव्यक्त अवस्थाको कोई कोई 'तमस्' भी कहते हैं। यही आदि तमस् (तमरूप=अंधकाररूप) या आदिकालत्व निबंधन है। यह परमा शक्तिही काली नामसे प्रसिद्ध हुई और इसी कारणसे उसका रंग भी तम या अंधकारमय काला हुआ। इस अवस्थामें सब वर्णों और रूपोंका अभाव होनेसे इसको तमोरूपा कृष्णवर्णा कहा है।" (पृष्ठ ६१ ते ६४)

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "पैं तमोगुणाची राक्षसी। जे सद्‌बुद्धीतें ग्रासी। विवेकाचा ठावोचि पुसी। निशाचरी जे ॥ ९.१७९॥" असे या क्रियाशक्तीच्या काळेपणाचे, प्रवृत्तीचे व बहिर्मुखतेचे वर्णन केले आहे. श्रीसंत नामदेवमहाराजांनी "विष्णुदास नाम्याची स्वामिणी काळी। कृष्णमूर्ती बहु काळी वो माय ॥ २५५ सकलसंतगाथा॥" असे अभंगात म्हटले आहे. त्याचा अर्थही क्रियाशक्ती कुंडलिनी हीच विष्णुदास नाम्याची काळी स्वामिनी असून तीच सगुण काळी कृष्णमूर्ती होय. या काळेपणासंबंधीचे विवेचन "Tantra : Its Mystic And Scientific Basis" या पुस्तकात श्री. लालनप्रसाद सिंग यांनी "Principles of Tantra Philosophy" या प्रकरणात करताना असे म्हटले आहे की, "Kali worship is part of Shaktism. Kali is called Mahadevi. The deity symbolically represents the causal matrix. She is said to be beauteous with the beauty of a dark rain-cloud. She has been compared with a black cloud, because she is formless and colourless. Black is no colour. Want of colour is black." (Page 54, 55)

काली देवतेची पूजा हा शक्तिसंप्रदायाचा एक भाग आहे. कालीलाच महादेवी म्हणतात. ही देवता सांकेतिक दृष्टीने कारणरूप मूस किंवा साचा आहे असे म्हटले जाते. काळ्या ढगाच्या सौंदर्याप्रमाणे ही सुंदर आहे असे सांगतात. ती रंगरूप विरहित असल्याने तिची काळ्या ढगाबरोबर तुलना केली जाते. काळा हा काही रंग नाही. रंगाचा अभाव म्हणजे काळेपण होय.

"शिवपुराणांतर्गत वायवीयसंहितेच्या उत्तरखंडात" कुंडलिनी शक्तीच इच्छा ज्ञान व क्रियारूपाने कशी आविर्भूत होते हे सांगताना असे म्हटले आहे की—

> शक्तिः स्वाभाविकी तस्य विद्या विश्वविलक्षणा।
> एकानेकस्वरूपेण भाति भानोरिव प्रभा ॥७.१॥
> अनन्ताः शक्तयस्तस्य इच्छाज्ञानक्रियादयः।
> इच्छाशक्तिर्महेशस्य नित्या कार्यनियात्मिका ॥२॥

ज्ञानशक्तिस्तु तत्कार्यं कारणं करणं तथा ।
प्रयोजनं च तत्त्वेन बुद्धिरूपाध्यवस्यति ॥३॥
यथेप्सितं क्रियाशक्तिर्यथाध्यवसितं जगत् ।
कल्पयत्यखिलं कार्यं क्षणात् संकल्परूपिणी ॥४॥

विद्यास्वरूप व विश्वविलक्षण अशी परमात्म्याची स्वाभाविक म्हणजे ज्याच्याशी एकरूप व अवच्छेद्य असलेली अशी कुंडलिनी शक्ती आहे. ज्याप्रमाणे सूर्याची प्रभा ही किरणांच्या द्वारा अनेक रूपांनी प्रकट होते त्याप्रमाणे ही एकच कुंडलिनी शक्ती अनेक रूपांनी प्रकाशित होते. त्याच्या इच्छा, ज्ञान व क्रिया इत्यादि अनंत शक्ती आहेत. इच्छाशक्ती ही महेशाची नित्यकार्याचे नियमन करणारी असून त्याची ज्ञानशक्ती ही त्याच्या नित्यकार्याचे कारण व साधन आहे. बुद्धिरूपाने असणारी ही शक्तीच तत्त्वतः साधकाचा अंतिम हेतू किंवा प्रयोजन आहे. ही कुंडलिनी शक्तीच क्रियाशक्ती असून ती एका क्षणात संकल्परूपाने अखिल जगताची कल्पना करून पिंडब्रह्मांड निर्मितीचे ईप्सित कार्य सिद्धीस नेते.

" कालाग्निरुद्रोपनिषदातही " असे म्हटले आहे की, " यास्य प्रथमा रेखा सा.... क्रियाशक्तिः । यास्य द्वितीया रेखा सा.... इच्छाशक्तिः । यास्य तृतीया सा ....ज्ञानशक्तिः ।" " योगवासिष्ठात " ही कुंडलिनी शक्ती इच्छा, ज्ञान व क्रियारूपाने कशी प्रकट होते हे सांगताना असे म्हटले आहे की–

ज्ञानशक्तिः क्रियाशक्तिः कर्तृताऽकर्तृताऽपि च ।
इत्यादिकानां शक्तीनामन्तो नास्ति शिवात्मनः ॥६(१)३७।१६॥
सा हि क्रिया भगवती परिस्पंदैकरूपिणी ।
चितिशक्तिरनाद्यन्ता तथा भासात्मनात्मनि ॥१७॥
देव्यास्तस्या हि याः काल्या नानाभिनयनर्त्तनाः ।
ता इमा ब्राह्मणः सर्गजरामरणरीतयः ॥१८॥
क्रियासौ ग्रामनगरद्वीपमंडलमालिकाः ।
स्पंदान् करोति धत्तेऽन्तः कल्पितावयवात्मिका ॥१९॥
काली कमलिनी काली क्रिया ब्रह्मांडकालिका ।
धत्ते स्वावयवीभूतां दृश्यलक्ष्मीमिमां हृदि ॥६(२)८४।१७.२२॥

ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती, कर्तृत्व व अकर्तृत्व इत्यादि नानाविध शक्तींचा शिवाच्या ठिकाणी अंत नाही. त्या भगवती कुंडलिनी क्रियाशक्तीचे स्पंदन हेच स्वरूप आहे. ती अनादि व अनंत अशी चितिशक्ती असून जगत्‌रूपाने आपली आपणच आपल्यामध्ये प्रकट होते. या देवीचा समयानुसार होणारा अभिनय व नर्तन हाच ब्रह्मदेवाच्या सृष्टी, वृद्धी व लयाचा नियम आहे. ही कल्पित अवयवांची क्रियादेवी कुंडलिनी शक्ती गावे, नगरे, द्वीप, मंडल आदि स्पंदनांची मालिका रचते व ती

आपल्या ठिकाणी धारण करते. ज्याप्रमाणे कमळ पुष्प-लक्ष्मीला आपल्यामध्येच धारण करते त्याप्रमाणे ब्रह्मांडरूपाने स्पंदित होणारी काली क्रियाशक्ती आपल्या अवयवांच्या रूपाने असणाऱ्या या जगताला आपल्यामध्येच धारण करते.

"मातृकाचक्रविवेकाच्या प्रथम खंडातील ९ व्या कारिकेच्या टीकेतही" असे म्हटले आहे की–

**क्रियाशक्तिप्रधानायाः शब्दशब्दार्थकारणम् ।**
**प्रकृतेर्बिन्दुरूपिण्याः शब्दब्रह्माभवत्पुरा ॥**

**प्रकाशो हि स्वस्वभावभूतं स्वात्मविश्रांतं पराप्रकृतिस्वातंत्र्यमायाऽविद्यादि-शब्दैरागमिकैर्व्यवन्हीयमाणं जगद्बीजभूतं विमर्शम्, इत्यादि ।**

क्रियाशक्ती ही प्रधान असून तीच शब्द व शब्दार्थाला कारण आहे. हिलाच प्रकृती म्हणतात. ही बिंदूरूप आहे. शब्दब्रह्म हेच हिचे स्वरूप आहे. हीच शिवाचा प्रकाश आहे. ती शिवाशी एकरूप आहे. त्याच्याच ठिकाणी ती विश्रांती घेते. हिलाच पराप्रकृती व स्वातंत्र्य म्हणतात. माया, अविद्या इत्यादि शब्दांनी अगर नावांनी ती आगमशास्त्रात प्रसिद्ध आहे. ही शक्तीच बीज आहे. तीच विमर्श होय.

ही क्रियाशक्ती कुंडलिनी वरीलप्रमाणेच शिवाला भिन्नभिन्न नावाने कशी प्रकट करते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**आघवांचि देशीं काळीं । नव्हतां देशकाळांवेगळी ।**
**जे क्रिया स्थूळास्थूळीं । तेचि हात जयाचे ॥१३.८७४॥**
**तयातें याकारणें । विश्वबाहु ऐसें म्हणणें ।**
**जे सर्वंचि सर्वपणें । सर्वदा करी ॥८७५॥**
**आणि समस्तांही ठाया । एके काळीं धनंजया ।**
**आलें असे म्हणौनि जया । विश्वांघ्रिनाम ॥८७६॥**
**पैं सवितया आंग डोळे । नाहींत वेगळे वेगळे ।**
**तैसें सर्वद्रष्टे सकळें । स्वरूपें जें ॥८७७॥**
**म्हणौनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूच्या ठायीं पक्षु ।**
**बोलावया दक्षु । जाहला वेदु ॥८७८॥**
**जें सर्वांचें शिरावरी । नित्य नांदे सर्वांपरी ।**
**ऐसिये स्थितीवरी । विश्वमूर्धा म्हणिपे ॥८७९॥**
**पैं गा मूर्ति तेंची मुख । हुताशना जैसें देख ।**
**तैसें सर्वपणें अशेख । भोक्ते जे ॥८८०॥**
**यालागीं तया पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था ।**
**आली वाक्पथा । श्रुतीचिया ॥८८१॥**

आणि वस्तुमात्रीं गगन । जैसें असे संलग्न ।
तैसें शब्दजाती कान । सर्वत्र जया ॥८८२॥
म्हणौनि आम्हीं तयाते । म्हणों सर्वत्र आइकतें ।
एवं जें सर्वांतें । आवरूनि असे ॥८८३॥
एऱ्हवीं तरी महामती । विश्वतश्चक्षु इया श्रुती ।
तयाचिया व्याप्ती । रूप केलें ॥८८४॥

अशी ही विविध नावांनी नटलेली क्रियाशक्ती कुंडलिनीची "सत्कर्में-सात्त्विकीं । रज तें रजोविषयकीं । तम मोहादिकीं । वर्तत असे ॥ १४.३४४ ॥ परिस तयाचिया गा सत्ता । होती गुणक्रिया समस्ता । हें फुडे जाणे सविता । लौकिका जेवीं ॥ ३४५ ॥" या न्यायाने "प्रकृतिपुरुषविवंचना । जयाचिया मना । गोचर जाहली ॥१३.१०३२॥" तो धन्य व गुणातीत असा साधक होय असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. परंतु प्रकृतिपुरुषविवंचना म्हणजे प्रकृतिपुरुषभेद-प्रक्रिया सहजासहजी घडून येत नाही; कारण "सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ॥१४.५॥" असे भगवंतांनीच गीतेत सांगितल्याप्रमाणे प्रकृतीपासून म्हणजे क्रियाशक्ती कुंडलिनीपासून उत्पन्न झालेले सत्त्व, रज व तम हे गुण "निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥१४.५॥" याप्रमाणे देहातच अव्यय चैतन्यरूप शिवात्म्याला जीवरूपाने बद्ध म्हणजे बहिर्मुख करतात. क्रियाशक्ती कुंडलिनी हे कार्य या तीन गुणांच्याद्वारा कसे करते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ऐसें सत्त्व सुखज्ञानी । जीवासि लावूनि कानीं ।
बैलाची करी वानी । पांगुळाचिया ॥१४.१५८॥
ऐसा देहीं देहावेगळा । ले तृष्णेचिया सांखळा ।
खटाटोपु वाहे गळां । व्यापाराचा ॥१७२॥
हें रजोगुणाचें दारुण । देहीं देहियासी बंधन ॥१७३॥
अज्ञानाचें जियालें । जया एका लागलें ।
जेणें विश्व भुललें । नाचत असे ॥१७५॥
पार्था तें गा तम । रचूनि ऐसें वर्म ।
चौखुरी देहात्म-। मानियातें ॥१७७॥

सत्त्व, रज व तमाच्या क्रियांचे पुढे अठराव्या अध्यायातही असेच वर्णन करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी क्रियाशक्ती कुंडलिनी जीवाला बहिर्मुख कशी ठेवते व या आज्ञेचा नटनाच कसा चालतो याचे वर्णन केले आहे. वास्तविक प्रकृती किंवा शक्ती ही पुरुष किंवा शिवस्वरूपच असते. " आणि प्रकृति पतिव्रते । पडिला एकपत्नीव्रतें । येणेंहि कारणें जयातें । पुरुषु म्हणों ये ॥ ८.१८९ ॥, तरी पुरुष

अनादि आथी। आणि तैंचि लागोनि प्रकृती। संसरिसी दिवोराती। दोनी जैसी ॥ १३.९६० ॥ कां रूप नोहे वांया। परी रूपा लागली छाया। निकणु वाढे धनंजया। कणेंसीं कोंडा ॥ ९६१ ॥ तैसीं जाण जवटें। दोन्हीं इये एकवटें। प्रकृतिपुरुष प्रकटें। अनादिसिद्धें ॥ ९६२ ॥ " असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शिवशक्तिसामरस्याचा किंवा प्रकृतिपुरुषएकत्वाचा महान् सिद्धांत प्रस्थापित केला आहे. कुंडलिनी शक्ती ही क्रियात्मकरूपाने उद्भासित झालेली दिसली तरीही ती शिवाशी, चैतन्याशी किंवा पुरुषाशी एकरूपच झालेली असते. नुसते एकरूपत्व सांगूनही किंवा सामरस्य प्रतिपादूनही भागणार नाही असे वाटल्यामुळे की काय श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सत्ता म्हणजे क्रियाशक्ती कुंडलिनी हीच पुरुष म्हणजे चैतन्य किंवा शिव आहे असे अपूर्व समीकरण " तरी केवळ जे सत्ता। तो पुरुष गा पंडुसुता। प्रकृतीतें समस्तां। क्रिया नाम ॥ १३.९६६ ॥ " असे म्हणून मांडले आहे. "सिद्धसिद्धांतपद्धतीत" महायोगी गोरक्षनाथांनी पुढील शब्दात उपरोक्त सिद्धांतच स्पष्ट केल्याचे दिसते. ते म्हणतात—

अकुलं कुलमाधत्ते कुलं चाकुलमिच्छति।
जल बुदबुबवद् न्यायादेकाकार: पर: शिव: ॥४.११॥
अतएवैकाकार एवानन्त शक्तिमान् निजानंदतयावस्थितोऽपि
नानाकारत्वेन विलसन् स्वप्रतिष्ठां स्वयमेव भजतीति व्यवहार:।
अलुप्त शक्तिमान्नित्यं सर्वाकारतया स्फुरन्।
पुन: स्वेनैव रूपेण एक एवावशिष्यते ॥४.१२॥
अतएव परमकारणं परमेश्वर: परात्पर: शिव: स्वस्वरूपतया
सर्वतोमुख: सर्वाकारतया स्फुरितुं शक्नोतीत्यत: शक्तिमान् ॥
शिवोऽपि शक्तिरहित: शक्त: कर्तुं न किंचन।
स्वशक्त्या सहित: सोऽपि सर्वस्याभासको भवेत् ॥४.१३॥
शिवस्याभ्यंतरे शक्ति: शक्तेरभ्यन्तर: शिव:।
अंतरं नैव जानीयाच्चंद्रचंद्रिकयोरिव ॥४.२६॥

ज्यावेळी शिवाशी अभिन्न असलेली शक्ती ही महाप्रलयात म्हणजे सहस्रारात शिवाशी पूर्णपणे समरसून गेलेली असते त्यावेळी तिला अकुल किंवा अकुलअवस्था-युक्त असे म्हणतात; कारण यावेळी किंवा या अवस्थेत आपल्या नामरूपाचा म्हणजे विस्तृत चराचर समस्त पिंडब्रह्मांडाचा अर्थात् जीव जगताचा त्याग किंवा उपसंहार करून ती परमतत्त्वरूप शिवाशी स्वत:च मिळून गेलेली असते. जेव्हा सृष्टी निर्मितीची वेळ येते त्यावेळी ही शिवाची निजशक्ती प्राण्यांच्या कर्माबरोबर मिसळून परा-अपरा-सूक्ष्म इत्यादि भेदांनी आपले कुलरूप धारण करते म्हणजे अकुलरूप व्यक्त अवस्थेला आणते. अर्थात् ती सकल विश्वाची रचना करते.

यावेळी या शक्तीला कुल म्हणतात. ज्यावेळी महाप्रलय होतो त्यावेळी ती पुन्हा अकुलावस्थायुक्त होते. ( कुलस्वरूप होणे हेच कुंडलिनीचे क्रियाशक्तिस्वरूप होणे होय. ) याचा अर्थ असा की, क्रियाशक्ती कुंडलिनी ही द्वैतरूप कुल नाही व अद्वैतरूप अकुलही नाही. ज्याप्रमाणे फेस, तरंग किंवा बुडबुडे इत्यादि नावांनी पाणी भासमान होत असले तरी त्याला पाणीच म्हटले जाते; कारण तत्त्वतः ते केवळ पाणीच असते. अशा प्रकारे द्वैताद्वैतरहित स्वशक्तियुक्त एक शिवच आहे. म्हणून पूर्वी सांगितल्याप्रमाणे अभेदरूपाने निजशक्ती कुंडलिनीशी एकाकार असा अनन्त शक्तिमान शिव आपल्या निजानंद अवस्थेत राहूनही स्वशक्तीच्याद्वारा अनंतकोटी पिंडब्रह्मांडरूपी जगताचे नाना आकार धारण करून विलास करता-नाही आपल्या स्वत.च्या चित्स्वरूपात स्वतःच राहून स्वतःच स्वतःचे भजन करीत असतो. असा हा शिवशक्तीचा ( प्रकृतिपुरुषाचा किंवा क्षेत्रक्षेत्रज्ञाचा ) व्यवहार आहे. शक्ती ही शिवात अशेष रीतीने लुप्त, समरस किंवा एकरूप झालेली असल्याने शिव हा अखंड शक्तिमान असतो. या शक्तीमुळेच तो सर्व आकाररूपांनी स्फुरण पावत असतो आणि पुन्हा स्वतःच स्वतःच्या चिद्घनानंद किंवा सच्चिदानंदाखंड स्वरूपामध्ये अशेषपणे रममाण झालेला असतो. या प्रकारे सर्वशक्तिसंपन्न असल्या-मुळे तो परमेश्वरच स्थूल, सूक्ष्मादि सकल भूतभौतिक पदार्थांचे सर्वश्रेष्ठ आदि कारण आहे. इतकेच नव्हे तर सर्व जीवांपेक्षा श्रेष्ठ अशा परहिरण्यगर्भादींपेक्षाही शक्तियुक्त परमात्मा अत्यंत श्रेष्ठ व कल्याणस्वरूप आहे; कारण आपल्या भक्तांनी आपले स्मरण केल्याबरोबर तो त्यांची सर्व दुःखे समूळ नाहीशी करून त्यांना भोग व मोक्ष देतो. हा क्रियाशक्तियुक्त शिवच आपल्या चैतन्यस्वरूपामुळे सर्वांतर्यामी व व्यापक आहे. त्यामुळेच तो भूतभौतिक व जडचेतनादि सर्व आकार धारण करण्यास समर्थ आहे. यामुळेच शिवाला शक्तिमान् म्हटले जाते. शक्तियुक्त महेश्वरच सर्व काम करण्यास समर्थ आहे.एकटा नाही. शक्तिरहित किंवा शक्तिहीन महेश्वर काहीही करू शकत नाही. यामुळे निजशक्तिसंपन्न शिवच समस्त संसाराचा साक्षी आहे असे म्हटले जाते. ज्याप्रमाणे चंद्राचे चांदणे चंद्राहून भिन्न नसते तर एकरूपच असते त्याप्रमाणे शिवात शक्ती व शक्तीत शिव सामाविलेले असून ते एकरूप झालेले किंवा समव्याप्त असतात.

अशा प्रकारे क्रियाशक्ती कुंडलिनीचे अज्ञानात्मक, अविद्यात्मक, अप्रबुद्ध, बहिर्मुख किंवा विश्वाभासात्मक स्वरूपाचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विशेष किंवा अधिक वर्णन केले आहे असे जे सुरुवातीला म्हटले आहे त्याची ज्ञानेश्वरी वाचताना प्रतीती येते. मात्र हे वर्णन करण्याचा हेतू जीवाने यांपासून निवृत्त व्हावे व त्याची बहिर्मुखी गती थांबून अंतर्मुख गती त्यास प्राप्त व्हावी हाच आहे. सद्गुरुकृपेने शक्तिपात होऊन जेव्हा क्रियाशक्ती कुंडलिनी जागृत होते तेव्हाच

फलत्याग घडून नैष्कर्म्य सिद्धी जीवाला प्राप्त होते व हाच सर्व योगातील श्रेष्ठ असा सिद्धयोग होय हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगताना असे म्हटले आहे की–

वन्हीचीं ज्वाळा जैशी । वायां जाय आकाशीं ।
क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजीं ॥१२.१३३॥
अर्जुना हा फलत्यागु । आवडे कीर असलगु ।
परी योगामाजीं योगु । धुरेचा हा ॥१३४॥

अग्नीची ज्वाळा जशी आकाशात व्यर्थ किंवा अपेक्षारहित जाऊन मिळते त्याप्रमाणे क्रियाशक्ती कुंडलिनी ही सुषुम्नेद्वारा जाऊन शून्यामध्ये म्हणजे चैतन्यरूप शिवामध्ये अनपेक्षरीतीने मिळू देत; कारण सुषुम्नाद्वाराने जेव्हा जागृत शक्तीच्या आधाराने साधक सहस्राराकडे जाऊ लागतो तेव्हाच खरा फल-त्याग घडतो. असा हा अत्यंत सोपा व सहज मार्ग आहे. असे असले तरी सोपा असा हा सिद्धयोग सर्व योगांमध्ये श्रेष्ठ योग आहे. याचा अर्थ असा की, क्रिया-शक्तीच्या बहिर्मुख स्वरूपापेक्षा तिचे अंतर्मुख असे साधनस्वरूपच श्रीज्ञानेश्वर-महाराजांना अधिक प्रिय आहे; कारण " फळली केळी उन्मूळे । तैसी आत्मलाभें प्रवळे । तयाची क्रिया ढाळेंढाळें । गळती आहे ॥ १५.२८७ ॥ " असा क्रिया-शक्तीच्या अंतर्मुखी साधनगतीचा व साधकाच्या अव्ययपदप्राप्तीचा महान् सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडला आहे. ज्याप्रमाणे केळीच्या झाडाला केळी आल्यावर ती जशी उन्मळून पडते त्याप्रमाणे प्रवळ म्हणजे क्रियाशक्तीसह असलेल्या आत्मस्वरूपाच्या लाभामुळे साधकाची क्रियाशक्तीची वहिर्मुख गती हळूहळू सुटत जाऊन वंद पडते. सुषुम्नेत क्रियाशक्तीचे चालन होऊ लागले की, उपरोक्त गोष्ट आपोआप घडून येते. हा सिद्धांतच अधिक स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

ऐसी हे हातवटी । घेऊनि जे क्रिया उठी ।
आपण आपुलिया गांठी । लाहेचि तो ॥१८.१७५॥
किंबहुना आपुलें । जैं ज्ञान होय उदया आलें ।
तैं नक्षत्रातें पाहलें । गिळी जैसें ॥१९६॥
तैशा सकारण क्रिया । हारपती धनंजया ।
तो कर्मत्यागु ये जया । मोक्षफळासी ॥१९७॥
तैसेंचि अबोधनाशासवें । नाशे क्रियाजात आघवें ।
ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ॥९७२॥
तरंग सर्वांगीं तोय चुंबी । प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं ।
नाना अवकाश नभीं । लुंठतु जैसा ॥११४८॥

**तैसा रूप होऊनि माझें । मातें क्रियावीण तो भजे ।**
**अलंकारु का सहजें । सोनयातें जेवीं ॥११४९॥**

सर्वंच शास्त्रकारांना, मुमुक्षूंना, साधकांना व गुरुकृपायुक्तांना क्रियाशक्ती कुंडलिनीचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णिलेले उपरोक्त ज्ञानस्वरूपच अधिक पसंत आहे; कारण कुंडलिनी शक्तीच्या या अंतरस्वरूपामुळे जीव शिवस्वरूप होत असतो. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" "सा कुंडलिनी प्रबुद्धा-अप्रबुद्धा चेति द्विधा ॥ ४.१४ ॥" असे म्हणून ही कुंडलिनी शक्ती प्रबुद्ध व अप्रबुद्ध अशा दोन प्रकारची आहे हे स्पष्ट करून पुढे ती श्रीसद्‌गुरुकृपेने अर्थात् शक्तिपाताने ऊर्ध्वगामिनी कशी होते याचे वर्णन केले आहे. म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि" या ग्रंथातील "अद्वयतत्त्वके प्रकार भेद" या निबंधात उपरोक्त दृष्टीनेच असे म्हटले आहे की, "शक्तिने बहिर्मुख होकर भेद-सृष्टिकी अवतरणा की थी, जिसके मूलमें स्वरूपका आवरण निहित था। परंतु शक्तिकी यह बाह्यप्रवणता अथवा बहिर्मुख-गति केवल उसकी कार्य-निवृत्तिके साथ-साथ साम्य-भावको प्राप्त नहीं होती। सममात्रामें अंतर्मुखी गतिके द्वारा उसका साम्य स्थापित करना होता है। ऐसा न करनेपर शुद्ध आत्मस्वरूपमें स्थिति प्राप्त नहीं होती। इसी कारण क्रियाशक्तिका उन्मेष और विकास आवश्यक है। यह क्रियाशक्ति साधारणतः गुरु-शक्तिके नामसे प्रसिद्ध है। यह चित्‌शक्तिकी क्रिया है। क्रियाशक्तिके क्रमिक विकासमें अंतर्मुखी गति प्रारंभ होती है। यही गति मन, वायु और बिंदु सबके अंतरालमें प्रवाहित होती है, इसमें संदेह नहीं। शक्तिकी बाह्य-गतिके फलस्वरूप जिस प्रकार सृष्टि होती है, इस अंतर्गतिके परिणाममें भी उसी प्रकार सृष्टि होती है। पहली सृष्टि जडशक्तिका कार्य है, परंतु यह सृष्टि चैतन्य शक्तिका कार्य है। इस अंतःशक्तिकी क्रियाका एकबार सूत्रपात होनेपर वह निरंतर चलती रहती है।

क्रियाशक्तिके द्वारा अर्थात् शक्तिकी अंतर्मुखी गतिसे देहमें प्रवेश प्राप्त होता है। शक्तिकी बाह्यगतिसे जो देह निर्माण हुआ है, जब तक शक्तिकी अंतर्मुखी गति नहीं होती, तब तक उसमें प्रवेश प्राप्त नहीं होता। भेद-ज्ञान अचित्-शक्तिका कार्य है, उसी प्रकार अभेददर्शन चित्-शक्तिका कार्य है, यह भी याद रखना होगा। अतएव क्रियात्मिका गुरु-शक्ति अभेदज्ञानके रूपमें कार्य करती है। यह अभेदज्ञान पुष्ट होते होते क्रमशः समस्त देहमें व्याप्त हो जाता है। इसीको दूसरे शब्दोंमें क्रियाशक्तिके द्वारा देहभेद नाम दिया जाता है। मन,प्राण और बिंदुकी अंतर्मुखी गति अभेद-ज्ञानकाही क्रमिक विकास है। इस ज्ञानका पूर्ण विकास होनेपर, अर्थात् क्रियाशक्तिका कार्य संपन्न होनेपर आत्माकी परमात्माके रूपमें स्थिति होती है और उसका व्यष्टि-देह समष्टि-देहरूप विश्वरूपमें परिणत हो जाता है। इसको योगावस्था

कहते हैं। क्रियाशक्तिके उन्मेष या कुंडलिनीके जागरणसेही इस योगावस्थाकी सूचन मिलती है तथा क्रियाशक्तिकी पूर्णताही इसका पूर्ण विकास है। आत्मामें जब क्रिया-शक्तिका पूर्ण विकास होता हे तब आत्मा परमात्मरूपमें वर्णनके योग्य हो जाता है। कहना न होगा कि यह क्रियाशक्ति वस्तुतः चैतन्य-शक्तिही है; क्योंकी ज्ञानशक्ति सबसे पहले उपलब्ध हुई है। ज्ञानशक्ति यदि पहले प्रस्फुटित न हो तो क्रियाशक्तिका उन्मेष संभव नहीं होता। ज्ञानशक्तिके विकासमें द्रष्टा या साक्षीभावका आविर्भाव होता है। इस साक्षीभावके साथ क्रियाशक्तिका विकास न हो तो आत्मा क्रमशः परमात्माकी ओर अग्रसर नहीं हो सकता। स्थिति उपलब्ध न हो तो केवल गति संसारकाही नामांतर है, अर्थात् आत्माका स्वरूप जब आवरणयुक्त होता है, तब उसका आश्रय लेकर जो गति उदय लेती है, वह वस्तुतः भेदज्ञानकाही नामांतर है। स्वरूपका आवरण जब कट जाता है, तब उस अनावृत आत्माका आलंबन करके जिस गतिका उदय होता है, वह अभेद-ज्ञानकी क्रीडा होती है, वही चित्-शक्तिका विलास है।

जीव और ईश्वरका भेद स्वीकार्य है; परंतु आत्मा और परमात्मामें भेदा-भेदरूप क्रिया-शक्तिके पूर्ण विकासपर्यंत मानना ठीक है।

गुरु-शक्तिरूपी क्रियाशक्ति क्रमशः देहभेद करती रहती हैं। दीक्षाके बिना चैतन्य-शक्तिका संबंध परमाणुके ( जीवके ) साथ नहीं होता तथा परमाणु ( जीव ) अपनी सुप्तवत् अवस्थाके हो जानेपर दीक्षाके बिना जाग्रत् नहीं होता। योग-दीक्षाके समय शिष्य जो गुरुसे चिन्मय शरीर प्राप्त करता है, उसेही जाग्रत्-कुंडलिनीके नामसे पुकारते हैं। उसके संस्पर्शके द्वारा परमाणु कार्यविशिष्ट होकर कर्म करनेमें समर्थ होता है। परमाणुका कर्मही यथार्थ क्रियाशक्ति है। धीरे धीरे प्रयोजनके अनुसार क्रियाशक्तिका विकास होता है और उसके फलस्वरूप देह-राज्य सिद्ध होता है। अयोगी साधक भी दीक्षाके फलसे चैतन्यशक्ति प्राप्त करता है; परंतु वह दीक्षा कायाकारमें परिणत नहीं होती। कायाकारमें परिणत अवस्थाही जाग्रत् अवस्था है। अतएव साधकको कुंडलिनी-शक्ति जाग्रत् करनी पडती है। यह जागरण दीक्षा-कालीन जाग्रत् आभासका पूर्ण विकास है। दोनो स्थानोंमे चैतन्य-शक्तिके प्रभावसे परमाणुकीही क्रिया होती रहती है। अज्ञानराज्यका भेद करना और ज्ञानराज्यमें अग्रसर होना, दोनोंही चैतन्यरूपी क्रियाशक्तिका कार्य है। दोनों राज्य देहकेही भीतर है। अज्ञान-राज्य और ज्ञानराज्य दोनोंही राज्यरूपमें आलोचनाके योग्य है। अज्ञानराज्य कालकी सृष्टि है। परंतु ज्ञानराज्य कालकी सृष्टि होनेपर भी कालकी सीमाके परे है। यह ज्ञानराज्य वस्तुतः चैतन्य शक्तिकी विशिष्ट रचनाकेद्वारा विभूषित है।

इंद्रियके स्तरसे हृदयरूपी शून्यमें प्रवेश करनेके लिए नानाप्रकारके जाल

रचित होते हैं। बीच-बीचमें ग्रंथियाँ और घने आवरण दिखलायी देते हैं। निर्दिष्ट मार्गका अवलंबन करके इस विराट जालका भेद करना पडता है। इसकाही नाम मायाजाल है। मृत्युके पश्चात् इस जालका भेदन नही किया जा सकता; क्योंकि असाधक और अयोगीके परमाणु कर्महिन होनेके कारण इस जालको नहीं देख सकते, भेद भी नहीं कर सकते। जाग्रत्-अवस्थामें गुरुप्रदत्त कायामें कर्मके द्वारा यह जालभेद करना पडता है। दीक्षाके बाद कुछ भी कर्म न करनेपर भी केवल गुरुशक्तिके प्रभावसेही उसका भेद हो जाता है। गुरुशक्तिका मुख्य कार्य है— जीवको मोहमायाके जालसे उठाकर ज्ञानके राज्यमें पहुँचा देना।

क्रियाशक्तिका विकास तथा परमात्मभावकी अभिव्याक्ति एकही बात है। क्रियाशक्तिका विकास पूर्ण होनेपर ज्ञान और क्रिया अभिन्नरूपमें प्रकाशित होकर पूर्ण चैतन्य-शक्तिके नामसे प्रसिद्ध होते हैं।... क्रियाशक्तिके पूर्ण हुए बिना हृदयमें स्थिति नहीं होती। क्रियाशक्तिके उन्मेषके साथ साथ जो अंतर्मुखी गति प्रारंभ होती है, क्रियाशक्तिकी पूर्णता होनेपर परमात्मरूपसे हृदयमें स्थित हो जानेपर वह समाप्त हो जाती है।... यद्यपि हृदयमें यह स्थिति शाश्वत होती है, तथापि बहिर्मुखी शक्तिको संचालित करनेके समय उसका भान नहीं होता। योगी इस अतरंगा चित्-शक्तिके द्वाराही स्वसामर्थ्यके अनुसार मायाको वशमें कर सकता है। जब माया पूर्णरूपसे वशीभूत हो जाती है तो योगी परमात्मरूपमें हृदयके शून्य-प्रदेशमें अवस्थान करता है। क्रियाशक्तिकी पूर्णताके बिना यह अवस्था नहीं आती है। यह व्याप्तिकी अवस्था है। आत्मा जब हृदयमें प्रवेश करता है, तभी वह साक्षीभाव प्राप्त होनेके कारण समस्त जगत्को अर्थात् विश्वको दृश्यरूपमें एकसाथ देखता है। यही उसका सर्वज्ञत्व अर्थात् सर्व जगत् विषयक अपरोक्ष ज्ञानका विकास है। परंतु यह ज्ञान अपरोक्ष होते हुए भी पूर्ण नहीं है, क्योंकि दृश्योंके दृष्ट होनेपर भी वे अप्राप्य रहते है। क्रिया के बिना, केवल ज्ञानके द्वारा उसकी प्राप्ति सम्भव नहीं होती। ज्ञानके द्वारा जो सूक्ष्मरूपमें दिखलायी देता है, क्रियाके द्वारा वही अपने साथ अभिन्नरूपमें प्राप्त हो जाता है। क्रियाके पूर्ण होनेपर सारे व्यवधान दूर हो जाते हैं, अवएव उस समय कोई ऐसी वस्तु नहीं रह जाती, जो अप्राप्य कही जाय। इसीको आत्माकी व्याप्ति या विभुत्व कहते है। जब क्रियाशक्ति पूर्ण होती है, तब आत्माही परमात्मरूपमें सिद्ध होता है। यह केवल सब पदार्थोंका द्रष्टाही नहीं होता, बल्कि प्रति पदार्थके साथ अभेदभावयुक्त भी हो जाता है।

क्रियाशक्तिके क्रमविकासके समय चित्कलासंपन्न योगी अपनेको परमात्माका उपासक तथा परमात्माको अपना उपास्य जानकर, क्रमशः उपासनाके गाढतर होनेपर कलावृद्धिके प्रभावसे अपनेको परमात्माका अधिकतर निकटवर्ती जानता है। यह उपासना हृदयके आभ्यंतर परमात्म-साक्षात्कार-मूलक उपासना है।

शक्तिके उन्मेषसे परमात्माका ज्योतिर्मय राज्य ब्रह्मसत्ताके ऊपर स्तरस्तरमें गठित होने लगता है। शक्तिका प्रथम उन्मेष ज्ञानशक्तिके रूपमें होता है, यह जान लेना चाहिए। ज्ञानशक्तिके साथ क्रियाशक्ति और इच्छाशक्तिका स्वरूपतः अभेद रहनेपर भी, विकासके पथमें गुणप्रधान भावके अनुसार प्रत्येकका पार्थक्य निर्दिष्ट होता है। ज्ञानशक्तिके उन्मेष और विकासके सिद्ध होनेपर, क्रिया-प्रभृति शक्तियोंका आविर्भाव क्रमशः संभव होता है। क्रिया-प्रभृति शक्तियोंकी अभिव्यक्तिके बिना ज्ञानशक्तिकी अभिव्यक्ति पूर्णताको प्राप्त नहीं होती। उसी प्रकार ज्ञानादि शक्तिके प्रकाशके बिना क्रिया-प्रभृति शक्तियोंकी अभिव्यक्ति भी पूर्ण नहीं होती। जब कोई एक शक्ति पूर्णरूपमें अभिव्यक्त होती है, तब अन्यान्य शक्तियोंकी अभिव्यक्ति भी पूर्णरूपसे होने लगती है।

सारांश, क्रियाशक्तिके उन्मेषके साथ-साथ उपासनाका सूत्रपात होता है, क्रिया-शक्तिके पूर्ण विकासमेंही उपासनाकी समाप्ति होती है। उपासनाही योग है। इन दो वस्तुओंमें एक मुक्त पुरुष है, जिसमें क्रियाशक्तिका प्रथम उन्मेष हुआ है और दूसरी वस्तु है– परम-पुरुष; जिसमें क्रियाशक्तिका विकास समाप्त हो गया है। इस प्रकार जीवात्मा और परमात्माका मिलनही योग कहलाता है। जिस मात्रामें क्रियाशक्तिका विकास होता है, ठीक उसी मात्रामें योग स्थापित होता है। योगा-वस्थामें जीवात्मामें क्रमशः परमात्मभाव जागने लगता है। जीवात्मा जब अपनेको परमात्मरूपमें उपलब्ध करता है, तभी योग पूर्ण होता हैं, यह याद रखना चाहिये। पूर्णयोगही परमात्माका सायुज्य है।"

श्रीएकनाथमहाराजांनी "एकनाथी भागवतात" क्रियाशक्तीचे पिंडब्रह्मांडाच्या उभारणीच्या रूपाने दिसणारे अज्ञानात्मक किंवा बहिर्मुख स्वरूप सांगून लगेच सद्‌गुरुकृपेने शक्तिपात झाल्याने ही क्रियाशक्ति पिंडब्रह्मांडाची संहारणी करून ज्ञानात्मक, प्रेमात्मक व स्वस्वरूपात्मक कशी होते याचे वर्णन "यदू-अवधूत संवादात" पुढीलप्रमाणे केले आहे. ते म्हणातात–

तेणें निजात्मकाळसत्तें। अवलोकिलें निजमायेतें।
ते क्षोभोनि तेथें। निजसूत्रातें उपजवी ॥९.२०९॥

तेचि बोलली क्रियाशक्ती। करितीं झाली त्रिगुणव्यक्ती।
अहंकारद्वारा स्रजिती। जगउत्पत्तीतें मूळ ॥२१०॥

तेथें गुणागुणविभाग। सुर नर आणि पन्नग।
अध उर्ध्व मध्यभाग। रचिलें जग तत्काळ ॥२११॥

ब्रह्मांडीं सूत्र जाण। पिंडू वर्तवी प्राण।
पिंडब्रह्मांडीविदान। कर्त्री जाण क्रियाशक्ती ॥२१२॥

जीव करावया संसारी। षड्‌विकार वाढवी शरीरीं।
षडूर्मी त्यामाझारीं। जीव संचारी संचरवी ॥२१३॥

एवढी संसार उत्पत्ती । करावया इची व्युत्पत्ती ।
यालागीं नांवें क्रियाशक्ती । सांख्यसंमतीं बोलिजे ॥२१४॥
या क्रियाशक्तिसूत्राचे ठायीं । जग ओतिलें असे पाहीं ।
आडवेंतिडवें ठायींचे ठायीं । गोंवून लवलाहीं वाढत ॥२१५॥
ऐसी सुखदुःखाची कडी । घालोनि त्रिगुणी दृढ बेडी ।
भोगवी दुःखांच्या कोडी । तरी न सोडी अविद्या ॥२२२॥
हा थोर मायेचा खटाटोपू । तुज नाहीं भयकंपू ।
तुवा दृढ धरोनि अनुतापू । अभिमानदर्पू छेदिला ॥२२३॥
तुझी पालटली दिसे स्थिती । हृदयीं प्रगटली चिच्छक्ती ।
मावळली अविद्येची राती । बोधगभस्ति उगवला ॥२२४॥
जेथ छेदिला अभिमान । तेथें कामादि वैरी निमाले जाण ।
जेवीं शिर छेदिल्या करचरण । सहजें जाण निमालें ॥२२५॥
यापरी तूं अरिमर्दन । बोलिलों तें सत्य जाण ।
ऐकोनि अवधूतवचन । सुखसंपन्न नृप(यदुराजा) जाला ॥२२६॥
म्हणे धन्य धन्य मी सनाथ । मस्तकीं ठेविला हस्त ।
प्रेमें वोसंडला अवधूत । हृदयीं हृदयांत आलिंगी ॥२२७॥
दोघां निजात्मबोधें जाली भेटी । यालागीं खेवा पडली मिठी ।
तेणें आनंदें वोसंडे सृष्टी । सभाग्यां भेटी सद्गुरूसी ॥२२८॥
बाळका कीजेति सोहळे । तेणें निवती जननीचे डोळे ।
शिष्यासी निजबोधू आकळे । ते सुखसोहळे सद्गुरूसी ॥२२९॥

सारांश, " आणि आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्य सिद्ध आपैसा । अनादिपणें ॥ १३.११०७॥ " असे आत्म्याचे नित्यसिद्ध व अनादि स्वरूप मुळातच असल्यामुळे तो " अक्रियु ना क्रियाशीळु ॥ १३.११०८ ॥ " या न्यायाने द्वैताद्वैतविवर्जित किंवा क्रियाक्रियाविवर्जित आहे; परंतु असे असले तरी " अहोरात्रें जैशीं । येती जाती आकाशीं । आत्मसत्तें तैसीं । देहें जाण ॥१३.१११७॥" याप्रमाणे आत्म्याशी समव्याप्त असलेली त्याची सत्ता म्हणजे कुंडलिनी शक्ती क्रियारूपाने हे सर्व घडवीत असते. क्रियाशक्तीचे हे बहिर्मुखत्व थांबावे, अज्ञानरूप नाहीसे व्हावे, जन्ममरणपरंपरा भोगविणारी तिची कर्मे बंद व्हावीत व जीव शिवरूप व्हावा म्हणून साधकाने विहित क्रिया म्हणजे सद्गुरुकृपेने प्राप्त होणारे सिद्धयोगाचे साधन करावे व क्रियाशक्ति कुंडलिनीच्या आधाराने जीवदशेचा वेध करून शिव-स्वरूप व्हावे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी बजावून सांगितले आहे; कारण सिद्धयोगाचे साधन हाच स्वधर्म व जागृत शक्तीमुळे होणाऱ्या क्रिया हीच स्वकर्म-कुसुमांनी केलेली ईश्वराची पूजा आहे, एवढेच नव्हे तर वेधदीक्षेच्या बोधामुळेच

सम्यक्‌ज्ञान उत्पन्न होण्यापूर्वीच साधकाला ईश्वराशी तन्मयता प्राप्त करण्याची योग्यता येते; असे या सिद्धयोगांतर्गत वेधदीक्षेने जागृत होणाऱ्या प्रतिप्रसवात्मक क्रियाशक्ती कुंडलिनीचे सामर्थ्य व स्वरूप आहे, हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

म्हणौनि विहित क्रिया केली । नव्हे तयाची खूण पाळिली ।
जयापासूनि कां आलीं । आकारा भूतें ॥१८.९१४॥
जो अविद्येचिया चिंधिया । गुंडूनि जीव बाहुलिया ।
खेळवीतसे तिगुणिया । अहंकाररज्जू ॥९१५॥
जेणें जग हें समस्त । आंत बाहेरी पूर्ण भरित ।
जालें आहे दीपजात । तेजें जैसें ॥९१६॥
तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥९१७॥
म्हणौनि तिये पूजे । रिझलेनि आत्मराजें ।
वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ॥९१८॥
जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशें ।
हें सर्वही नावडे जैसें । वांत होय ॥९१९॥
प्राणनाथाचिया आधी । विरहणीतें जिणेंही बाधी ।
तसें सुखजात त्रिशुद्धी । दुःखचि लागे ॥९२०॥
सम्यक्‌ज्ञान नुदैजतां । वेधेंचि तन्मयता ।
उपजे ऐसी योग्यता । बोधाची लाहे ॥९२१॥
म्हणौनि मोक्षलाभालागीं । जो व्रतें वाहातसें आंगीं ।
तेणें स्वधर्मु आस्था चांगी । अनुष्ठावा ॥९२२॥

क्रियाशक्ति कुंडलिनीचे हे सद्‌गुरुकृपेने अंतरंगात उपस्थित होणारे व त्यामुळे आत्मराज संतुष्ट होऊन साधकाला वैराग्यसिद्धीचा प्रसाद देणारे स्वरूप किती विलोभनीय असेल हे सद्‌गुरुकृपापात्र सिद्धयोगाचे साधकच जाणू शकतील.

**सर्वोपशांतिप्रमदा:–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जीव शिवस्वरूप व्हावा म्हणून हृदयस्थ ईश्वराला साधकाने अनन्यभावाने शरण जावे म्हणजे तो सद्‌गुरुरूपाने भेटून शक्तिपाता-नुग्रहाने आपल्याशी अभिन्न असलेल्या कुंडलिनी शक्तीच्या म्हणजे सर्वोपशांति-प्रमदेच्या जागृतीचा प्रसाद देऊन कृतार्थ करतो; हे गीतेच्या शेवटी " तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत । तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥१८.६२॥" या शब्दात भगवंतांनी अर्जुनाला अखेरचे सांगणे म्हणून जे सांगितले आहे; त्याचा भावार्थ स्पष्ट करताना कथन केले आहे; कारण " इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्

गुह्यतरं मया ।।१८.६३।।" असे म्हणून भगवंतांनी अर्जुनाला गुह्याहून अतिगुह्य असे जे ज्ञान सांगितले आहे ते दुसरे तिसरे काहीही नसून सद्गुरुकृपेने शक्तिपात होऊन शक्ती जागृत होणे हेच असल्यामुळे, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हा गुह्यार्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

म्हणौनि ईश्वरु गोसावी । तेणें प्रकृती हे नेमावी ।
तिया सुखें राबवावीं । इंद्रियें आपुलीं ।।१८.१३१७।।
तूं करणें न करणें दोन्ही । लाऊनि प्रकृतीच्या मानीं ।
प्रकृतीही कां अधीनी । हृदयस्था जया ।।१३१८।।
तया अहं वाचा चित्त आंग । देऊनियां शरण रिग ।
महोदधी का गांग । रिगालें जैसें ।।१३१९।।
मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदे ।
कांतु होऊनियां स्वानंदें । स्वरूपींची रमसी ।।१३२०।।
संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथें विसंवे ।
अनुभूतिही अनुभवे । अनुभवा जया ।।१३२१।।
तिये निजात्मपदींचा रावो । होऊनि ठाकसी अव्ययो ।
म्हणे लक्ष्मीनाहो । पार्था तूं गा ।।१३२२।।

साधक ईश्वराला शरण गेला की, सद्गुरुरूपाने तो साधकावर शक्तिपाताचा अनुग्रह करून सर्वोपशांतिप्रमदास्वरूप कुंडलिनी शक्तीला जागृत करून साधकालाच तिचा पती म्हणजे शिवस्वरूप करतो. अशा प्रकारे स्वसंकोचाने जीवरूप झालेली किंवा साधक अगर शिष्यरूप असलेली कुंडलिनी शक्ती जागृततेच्या पूर्णावस्थेत स्वानंदाने आपल्याच शिवस्वरूपात रममाण होते. एका बाजूने ही सर्वोपशांति-प्रमादरूपी कुंडलिनी अविद्या, अज्ञान, प्रकृती, माया व क्षेत्र असल्यामुळे सत्त्व, रज, तम; ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय; प्रमाता, प्रमातृ, प्रमेय; उत्पत्ती, स्थिती, लय; ब्रह्मा, विष्णू महेश; इत्यादि नाना नावांनी संभूत म्हणजे बहिर्मुखाने उद्युक्त होऊन पिंडब्रह्मांडाची रचना, उभारणी किंवा सभव करते; तीच जेव्हा दुसऱ्या बाजूने म्हणजे अंतर्मुखाने सद्गुरुप्रसादाने अर्थात् शक्तिपाताने जागृत होते तेव्हा आपला स्वसंकोच म्हणजे जीवरूप सोडून पुन्हा शिवरूप होत असल्यामुळे, पिंडब्रह्मांडाची आटणी करून सहस्रारात विश्रांती घेते.हा विसावाही तिच्यामुळेच मिळतो.महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत ' नानाचिंताव्यापारोद्यमप्रपंचरूपा " व "विकाराणां निवार-णोद्यमस्वरूपा ।।४.१४।।" असे म्हणून तिची ही द्विविधरूपे स्पष्ट केली आहेत. साधकाला या सर्वोपशांतिप्रमदेची ही रहस्यमय अनुभूती ज्यावेळी अनुभवाला येते त्यावेळी तो शिवशक्तीच्या सामरस्याच्या रूपाने शोभणारा अखेरचा अनुभवच स्वतः झालेला असतो. हेच साधकाचे निजात्मपदीचे राजा होणे होय. हीच

अव्ययपदाची प्राप्ती आहे. या दृष्टीनेच गौडपादाचार्यांनी "सौभाग्योदय" स्तुतिस्तोत्रात असे म्हटले आहे की–

कुमारी यन्मन्द्रं ध्वनति च ततो योषिद परा
कुलं त्यक्त्वा रौति स्फुटति च महाकाल भुजगी।
ततः पातिव्रत्यं भजति दहराकाश कमले
सुखासीना योषा भवसि भवसीत्कार रसिका ॥६॥

कुमारीच्या रूपात कुंडलिनी शक्ती मंद मंद ध्वनी करते. स्त्रीप्रमाणे कुळाचा त्याग करून ती रडते किंवा शब्दरूपात प्रकट होते. ज्यावेळी ही महाकालरूपी भुजंगी प्रस्फुटित होते म्हणजे कुंडलिनी शक्तीचे पूर्ण जागरण होते त्यावेळी हृदयाकाशकमलात ती पतिव्रता धर्माचे भजन करते व सुखाने बसून भगवान् शंकरांच्या सीत्काराची रसिक होते. या श्लोकावरील डॉ. ताराचंद गर्ग यांनी " हिंदीत भाषांतरित केलेली गौडपादाचार्यांची टीका " पाहिली म्हणजे सर्वोप-शांतिप्रमदेचे स्वरूप अधिक स्पष्ट होईल. ते म्हणतात–

यत्कुमारी मंद्रयते यद्योषित्पतिव्रता।
अरिष्टं यत्किंच क्रियते अग्निस्तदनुवेधति ॥

यह ऋचा तैत्तिरीयारण्यकके प्रथम प्रपाठकके सत्ताईसवे अनुवाक्में आयी है। इसी ऋचाके आधारपर आचार्यश्रीका यह श्लोक है। श्रीलक्ष्मीधराचार्यने अपनी सौंदर्य लहरीकी टीकामें अरुणोपनिषद्से यह ऋचा ली है। इसकी व्याख्या करते हुए आचार्य लिखते है–

कुंडलिनी शक्तिकी तीन अवस्थाएँ हैं– प्रथम मूलाधारमें सोती हुई जो कुमारीके सदृश है। उस समय वह मंद मंद स्वर करती है। कुंडलिनी सर्पवत् है और सर्प सोतेमें मंदमंद स्वर करता है। दूसरी युवती अवस्था है। कुंडलिनी शक्ति जब मूलाधारसे उठकर ऊपर जाती है तो विष्णुग्रंथिपर्यंत अर्थात् हृदयकमल तक वह युवावस्थावाली होती है। इस अवस्थामें वह कुलको छोडती हुई इसप्रकार रोती है जिस प्रकार युवती शादीके समय अपने मातृ-ग्रहको छोडती हुई रोती है। तीसरी अवस्थामें सहस्रदल कमलमें पहुँचकर सदाशिवके साथ मिलनेपर वह पतिव्रता हो जाती है।

अरिष्टं यत्किंच क्रियतेका अर्थ श्रीलक्ष्मीधराचार्यजीने– अमृत आस्वादन करती है – लिया है। अरिष्ट का अर्थ सूतिकागृहभी होता है। इसलिये इस ऋचाका यह अर्थ भी लिया जा सकता है कि फिर वह सूतिका गृह करती है अर्थात् पतिव्रता होनेपर वह गर्भवती होकर मातृपद प्राप्त करती है या यों कहे कि वह फलवती होती है। इस अवस्थामें साधक ब्रह्मज्ञानकी प्राप्ति करता है।

"अग्निस्तदनुवेधति" का अर्थ स्वाधिष्ठान चक्रमें जो अग्नि है, उसका वेध होना लिया है। अर्थात् स्वाधिष्ठान चक्रका वेध होनेपर जब कुंडलिनी शक्ति ऊर्ध्वगामिनी होती है, तब वह सहस्रारमें जाकर अमृतका आस्वादन करती है।

यहाँ यह कहा जा सकता है कि जिस प्रकार स्त्रीकी तीन अवस्थाएँ– बालिका, युवति तथा पतिव्रता होती है; उसी प्रकार कुंडलिनी शक्तिकीभी तीन अवस्थाएँ होती हैं।

बालिका अवस्थामें स्त्री जब समझने लगती है तो वह विवाहकी इच्छा करने और नानाप्रकारके विचारोंको संजोने लगती है, परंतु वह इन इच्छाओंको व्यक्त नही करती। यहीं उसका मंद-मंद स्वर करना है।

तरुणी हो जानेपर जब विवाह हो जाता है तो वह मातृगृहका त्याग करते समय रोती हैं, शोर करती है, किंतु पतिगृह जाते समय रास्तेमें वह नाना प्रकारके विचारोंमें खो जाती है और अपने पतिके सहवासका आनंद लेने लगती है। फिर पतिगृहमें पहुँचकर वह गृहस्वामिनी होकर अपने स्वामीके साथ एकरूप होकर पतिव्रता हो जाती है।

कुंडलिनी शक्तिकीभी इसी प्रकार तीन अवस्थाओंमें अभिव्यक्ती होती है। बालिकाके रूपमें वह मूलाधार अर्थात् अपने कुलगृहमें निवास करती है और वहाँ मंद-मंद स्वर करती रहती है। मंद अर्थात् सुनाई न पडनेवाला अथवा परावाक्। अर्थात् कुंडलिनी शक्ति मूलाधारमें परावाक्‌रूपी होकर रहती है।

युवतिरूपमें कुंडलिनी शक्ति मूलाधारका त्याग करके सहस्रारकी ओर जाती है और उस समय वह अपने मातृ-गृह कुलका त्याग करती हुई रोती, चिल्लाती है। हृदयकमलमें आ जानेपर वह पतिव्रता धर्मपरायण होकर भगवान् शंकर (परमशिव) के मिलेनके आनंदकी रसिक हो जाती है एवं सहस्रार अर्थात् पति-गृहमें पहुँचकर पूर्णरूपेण पतिव्रता हो जाती है अर्थात् परमशिवमें लीन हो जाती है। यही शिव-शक्तिका मिथुन है।

हृदयाकाश (हृदय-कमल) मानो उसके विश्राम करनेका स्थान है। (जिस प्रकार स्त्री पतिगृह जाती हुई रास्तेमें विश्राम करती है।)

यहाँ यह भी कहा जा सकता है कि जब कुंडलिनी शक्ति मूलाधारमें रहती है तो वह परावाक्‌रूपिणी होती है अर्थात् यहाँ नादका स्तर सूक्ष्म अथवा मंद होता है। मूलाधारसे ऊपर अनाहततक वह पश्यंति एवं मध्यमा वाक्‌रूपी रहकर विशुद्ध चक्रमें आनेपर वैखरी वाणीका रूप धारण करती है अथवा वैखरी रूपमें नादका विस्फोट होता है तथा सहस्रारमें जाकर पुनः महाकारण बिंदुमें लीन हो जाती है। नादका आदि स्रोत सहस्रारही है। तैत्तिरीयारण्यक, प्रथम प्रपाठक, अनुवाक ११ में कहा है –

**हसितं रुदितं गीतम् वीणा पणव लासितम्।**
**मृतं जीवं च यत्किंचित् अंगानि स्नेह विद्धि तत् ।।**

शक्तिपातके बाद कुंडलिनी शक्तिके जागरणोपरान्त साधकमें विभिन्न प्रकारकी क्रियाएँ होती हैं जिनमें कि रोने, चिल्लाने, गाने आदिकी भी क्रियाएँ होती हैं। यही कुंडलिनी शक्तिका रोना आदि है।

जिस समय हृदयचक्रमें साधकका ध्यान लग जाता है, उस समय वह आत्माका दर्शन करता है और उसमें साधकको आनंद आने लगता है। यही भगवती कुंडलिनी शक्तिका सुखसे बैठे हुए भव ( शंकर = आत्मा ) के सीत्कारकी रसिका होना है। अथवा हृदय-कमलका वेध होनेपरही साधकके साधनमें दृढता आती है और साधकका मन ब्रह्मानंदका रसिक हो जाता है। साधकका मन हृदय चक्रका वेध होनेपर जब एकबार ब्रह्मानंदका लाभ कर लेता है तो वह बारंबार उसी आनंदको प्राप्त करना चाहता है। जिस प्रकार एक बार पतिके मिलनका सुख अनुभव करनेके पश्चात् स्त्री उसकी रसिका हो जाती है और बार-बार उस आनंदको प्राप्त करना चाहती है, उसी प्रकार भगवती महाशक्ति कुंडलिनी ब्रह्ममें लीन होनेके आनंदकी रसिका हो जाती है।

जिस समय हृदय-कमलका वेध होकर सूर्य ऊर्ध्वमुख होता है तो वह चंद्रमंडलपर अपनी किरणोंका प्रकाश करता है जिससे अमृतका स्राव होता है और कुंडलिनी शक्ति उस अमृतके पानसे प्राप्त आनंदकी रसिका हो जाती है। यथा वामकेश्वर महातंत्रातर्गत भैरवयामलमें बहुरूपाष्टक विद्यामें कथन किया है कि –

**शिवार्कमंडलं भित्वा द्रावयन्तीन्दु मंडलम् ।**
**तदुद्भूतामृतस्यंदि परमानंद नंदिता ।**
**कुल योषित् कुलं त्यक्त्वा परं वर्षण मेत्य सा ।**

सहस्रारमें पहुँचनेपर वह महाशक्ति शांतिसे बैठ जाती है अर्थात् उस महा-कारणमें लीन हो जाती है, जिस प्रकार पतिगृहमें जाकर पतिव्रता स्त्री सुखपूर्वक वहीं रम जाती है। अथवा जब कुंडलिनी शक्ति सहस्रारमें पहुँच जाती है, तब सब क्रियायें बंद हो जाती हैं तथा मन निर्विकल्प समाधिमें लय हो जाता है।

यहाँ यह भी कहा जा सकता है कि शक्तिपातके मुख्य तीन भेद–मंद, तीव्र एवं तीव्रतरही कुंडलिनी शक्तीके तीन स्वरूप हैं जिन्हें क्रमशः कुमारी, तरुणी एवं प्रौढा अवस्थायें कहा जा सकता है।"

श्रीगौडपादाचार्यांची ही टीका सविस्तर देण्याचे कारण " सर्वोपशांतिप्रमदे। कांतु होऊनियां स्वानंदें। स्वरूपींची रमसी ॥१८.१३२०॥" याचा अर्थ पूर्णांशाने स्पष्ट व्हावा हेच आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही " सौंदर्यलहरीमध्ये " " सकलमपि भित्त्वा कुलपथं सहस्रारे पद्मे सह रहसि पत्या विहरसि ॥९॥" असे म्हणून या प्रकारे ही कुंडलिनी शक्तिरूप तरुण स्त्री सर्व कुलपथ किंवा शक्तीचा अगर

सुषुम्नेचा मार्ग वेधून सर्व उपशांत करीत अर्थात् पिंडब्रह्मांडाची आटणी करून सर्व तत्त्वे आपल्यात सामावून घेऊन सहस्रार पद्मात आपल्या पतीबरोबर एकांतात विहार करते म्हणजे कुंडलिनी शक्ती ही सर्वोपशांतिप्रमदा कशी आहे हे स्पष्ट केले आहे.

"हठयोगप्रदीपिकेतही" कुंडलिनी शक्तीला बालरंडा, तपस्विनी इत्यादि विशेषणे देऊन ती सर्वोपशांतिप्रमदा कशी आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

कुंडली कुटिलाकारा सर्पवत्परिकीर्तिता ।
सा शक्तिश्चालिता येन स मुक्तो नात्र संशयः ॥३.१०८॥
गंगायमुनयोर्मध्ये बालरंडां तपस्विनीम् ।
बलात्कारेण गृह्णीयात्तद्विष्णोः परमं पदम् ॥१०९॥
इडा भगवती गंगा पिंगला यमुना नदी ।
इडापिंगलयोर्मध्ये बालरंडा च कुंडली ॥११०॥
पुच्छे प्रगृह्य भुजगीं सुप्तामुद्बोधयेच्च ताम् ।
निद्रां विहाय सा शक्तिरूर्ध्वमुत्तिष्ठते हठात् ॥१११॥

कुंडलिनी शक्तीचा आकार मूलाधारात सर्पाप्रमाणे वेटोळे घातलेला; गुंडाळलेला म्हणजे कुटिल असा आहे असे योगिजनांचे म्हणणे आहे. जो साधक या कुंडलिनी शक्तीचे चालन करतो म्हणजे तिला सुषुम्नेच्या मार्गाने मूलाधारापासून वर सहस्रारात पोहोचवितो तो मुक्त होतो कारण; "तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति ॥ कठोपनिषद- ६.१६॥" अशी श्रुती असल्यामुळे जो सुषुम्नामार्गाने वर जातो तो योगी-साधक मोक्षप्राप्ती करतो. गंगायमुनांमध्ये म्हणजे इडापिंगला या नाड्यांमध्ये सुषुम्नानाडी असून त्या नाडीच्या शेवटच्या टोकाला अनादिकालापासून शिवापासून अलग किंवा विभक्त झाल्यामुळे एखाद्या विधवेसारखी असलेली तरुण स्त्रीरूपी बालरंडा कुंडलिनी शक्ती शिवाशी मिलन व्हावे म्हणून तपस्विनीसारखी निद्रावस्थेत पडून राहिली आहे. जो साधकयोगी तिला बलात्काराने म्हणजे प्रयत्नाने जागृत करून तिचे ग्रहण करतो म्हणजे तिच्याशी पूर्ण समरस होऊन तिच्या मार्गाने सुषुम्नेत प्रवेश करतो तो सहस्रारातील अत्यंत श्रेष्ठ असे विष्णुपद प्राप्त करतो. इडा म्हणजे डाव्या श्वासोच्छ्वासाच्या नाडीला भगवती गंगा नदी म्हणतात व पिंगला म्हणजे उजव्या श्वासोच्छ्वासाच्या नाडीला यमुना नदी म्हणतात इडा व पिंगला यांच्यामध्ये जी कुंडलिनी शक्ती आहे तिला बाल म्हणजे अनादिकालापासून व रंडा म्हणजे शिवापासून विभक्त झालेली या अर्थाने बालरंडा असे म्हणतात. ही कुंडलिनी शक्ती आपले पुच्छ मुखात घालून सुषुम्नेचे द्वार बंद करून तेथेच झोपलेली आहे. ते तिचे पुच्छ तिच्या तोंडातून बाहेर काढून या

सर्पासारख्या सुप्त कुंडलिनी शक्तीला तिच्या बालभावापासून म्हणजे अनादि निद्रेतून उठविले म्हणजे ती सर्वोपशांतिप्रमदेच्या रूपात जागृत होते. ज्यावेळी ही शक्ती आपली अनादि निद्रा टाकून जागृत होते त्यावेळी एखाद्या तरुण स्त्रीप्रमाणे आपल्या स्वतःच्या तोऱ्यात, नादात किंवा डौलात ती ताठ उभी राहून सुषुम्नामार्गाने सर्व जग आपल्यात सामावून घेऊन किंवा पदन्यासाने पादाक्रांत करून शेवटी सहस्रारात शिवाशी एकरूप होते.

ही सर्वोपशांतिप्रमदास्वरूप कुंडलिनी शक्ती सद्‌गुरूशी एकरूप असल्यामुळे परावाणीच्या अर्थरूप स्त्रीशी विलास करण्याविषयी कुशल, तिच्या ऐक्यरूपतेमुळे मदनाचा गर्व हरण करणारे व तिच्या सामर्थ्यामुळे आत्मानुभवाचे राजे बनलेले असे म्हणून नानातऱ्हेच्या एतद्‌विषयवर्णक विशेषणांनी सद्‌गुरूचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**नमो विशदबोधविदग्धा । विद्यारविंदप्रबोधा ।**
**पराप्रमेयप्रमदा । विलासिया ॥१०.१॥**
**नमो संसारतमसूर्या । अपरिमितपरमवीर्या ।**
**तरुणतरतूर्या । लालनलीला ॥२॥**
**नमो जगदखिलपालना । मंगळमणिनिधाना ।**
**सज्जनवनचंदना । आराध्यलिंगा ॥३॥**
**नमो चतुरचित्तचकोरचंद्रा । आत्मानुभवनरेंद्रा ।**
**श्रुतिसारसमुद्रा । मन्मथमन्मथा ॥४॥**
**नमो सुभावभजनभाजना । भवेभकुंभभंजना ।**
**विश्वोद्‌भवभुवना । श्रीगुरुराया ॥५॥**
**तुमचा अनुग्रहो गणेशु । जैं दे आपुला सौरसु ।**
**तैं सारस्वतीं प्रवेशु । बाळकाही आथी ॥६॥**
**जी दैविकीं उदार वाचा । जैं उद्देशु दे नाभिकाराचा ।**
**तैं नवरससुधाब्धीचा । थावो लाभे ॥७॥**

हे सद्‌गुरो ! आपण सर्वोपशांतिप्रमदारूप कुंडलिनी शक्ती शक्तिपाताने जागृत करून शिष्यसाधकाला ब्रह्मज्ञानाचा स्पष्ट बोध करण्यात किंवा अनुभूती देण्यात चतुर आहात; कारण कुंडलिनी शक्ती ही जागृत अवस्थेत ब्रह्मज्ञानरूप व अनुभूतिरूपच आहे. विद्या व अविद्या ही शक्तीची आतील व बाहेरील दोन मुखे आहेत. त्यातील अविद्यारूप छेदून टाकून आपण विद्यारूपी कमलाला म्हणजे अंतर्मुखी कुंडलिनी शक्तीला विकसित करणारे आहात. या मुळेच ही शक्ती, पिंडब्रह्मांडरूपाने प्रसविलेली किंवा उभारलेली जगत्‌रचना क्रमशः गिळून टाकीत म्हणजे सर्व उपशांत करीत, स्वस्वरूप होते. ही कुंडलिनी शक्ती जागृत अवस्थेत

प्रमदास्वरूप बनून उपरोक्तप्रकारे सर्व प्रपंच गिळून टाकून सहस्रारात शिवाशी एकरूप होऊन राहते. त्यामुळे त्या अवस्थेत ही शक्ती परारूप ज्ञानवाणीचा विषय असलेल्या शिवशक्तिसामरस्यात्मक स्थितीत असते. हे सद्गुरो ! सहस्रारात या प्रमदारूपी तरुण स्त्रीशी विलास करण्यात आपण कुशल आहात म्हणजे आपण सहस्रारात शिवशक्तीच्या मिलनाने होणाऱ्या ब्रह्मानंदात सतत रत आहात. असे जे आपण त्या आपणास माझा नमस्कार असो. आपण संसाररूपी अंधकाराचा किंवा अज्ञानाचा नाश करणारे सूर्यच आहात; कारण शिष्यावर शक्तिपात करून त्याची कोटीकोटी सूर्यासारखी तेजस्वी अशी कुंडलिनी शक्ती जागृत करण्याचे आपले अपरंपार असे श्रेष्ठ सामर्थ्य आहे. अत्यंत तरुण अशा किंवा तारुण्यभरात असणाऱ्या तूर्येचे अर्थात् सहस्रारातील शिवशक्तीच्या सामरस्यात्मक स्थितीचे आपण सहज लीलेने पालन करता म्हणजे आपण खालच्या अवस्थेला उतरून येतच नाही अर्थात् वासनांचा आपल्या ठिकाणी पूर्णपणे अभाव असल्यामुळे शक्ती मूलाधारात पुन्हा उतरूनच येत नाही; कारण शक्तीची अधोगती तूर्यावस्थेत होत नाही. असे आपण आहात. आपणास माझा नमस्कार असो. आपण या कुंडलिनी शक्तीच्या योगाने सर्व जगाचे पालन करता. ही कुंडलिनी शक्ती हाच एखादा मंगळमणी किंवा जीव शिवस्वरूप करण्याचा कल्याणरूपी ठेवा आपल्याकडे आहे. आपण वनातील चंदनाप्रमाणे सज्जन आहात; कारण चंदन ज्याप्रमाणे आपल्याजवळील झाडांना आपल्याप्रमाणे सुगंधित करते त्याप्रमाणे आपण परंपरा-प्राप्त शक्तिसंक्रमणाचा प्रसाद जीवाला देऊन त्यालाही आपल्याप्रमाणे शिवस्वरूप करता. आपणच साधकशिष्याचे आराध्यलिंग आहात; कारण जागृत शक्तीच्या रूपाने आपला साधकाच्या ठिकाणी निरंतर वास असून गुरुरूप कुंडलिनी शक्ती हीच साधकाची एकमेव उपास्य किंवा आराध्यलिंग अर्थात् देवता असते. अशा अपार सामर्थ्याने आपण युक्त आहात. आपणास माझा नमस्कार असो. आपण भक्तांच्या चित्तरूपी चकोरचंद्राला शक्तिजागृतीचा आनंद देण्यात चतुर आहात. आपणास परंपरेने आपल्या गुरूकडून शक्तिपातायोगाचे किंवा सिद्धयोगाचे समाधि-धन मिळालेले असल्यामुळे आपण स्वतः ब्रह्मानंदरूप अनुभवाचे राजेच आहात. "वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो ।।गीता १५.१५।।" म्हणजे परमात्माच जाणण्यास, समजावून घेण्यास व अनुभूत करण्यास योग्य आहे व हेच श्रुतीचे सार असून परमात्मा जाणण्याच्या प्रक्रियेच्या ज्ञानाचे आपण समुद्रच आहात. कल्पनातीत सौंदर्यशालिनी असलेली कुंडलिनी शक्ती ही आपल्याशी अविभाज्यपणे समव्याप्त असल्यामुळे मदनाचा गर्व नाहीसे करणारे आपण साक्षात् शंकरच आहात. अशा आपणास माझा नमस्कार असो. हे श्रीगुरुराया ! आपणच भक्तिरूपी कुंडलिनी शक्ती जागृत करीत असल्यामुळे तिच्या रूपाने असणारे आपण भावयुक्त भजनास पात्र आहात.

या शक्तीच्या जोरावर आपण संसाररूपी हत्तीचे गंडस्थळ फोडता व तिच्या आधारानेच आपण जगद्‌उत्पत्तीचे स्थान बनला आहात. माझा आपणास नमस्कार असो. ज्यावेळी शिष्यावर आपला शक्तिपातदीक्षारूप गणेशाचा प्रसाद होतो त्यावेळी अनंत सामर्थ्यसंपन्न व सर्व ज्ञानाची जननी किंवा भांडार असलेली कुंडलिनी शक्ती जागृत होते. ही कुंडलिनी शक्तीची जागृती म्हणजे सर्व सारस्वत स्रोताचा उद्‌भवच असल्यामुळे लहान मुलाचाही सर्व शास्त्रविद्येत प्रवेश होऊन त्याला गुह्य सिद्धांताचे ज्ञान होते. एवढेच नव्हे तर ज्यावेळी आपल्या वाणीतून शिष्याला अभयदायक व प्रेमपूर्ण असा आशीर्वाद मिळतो त्यावेळी आपल्या नुसत्या शब्दांनी, सकल प्रेमास्पद अशा नवरसअमृताचा सागर असलेल्या व उसळविणाऱ्या शक्तीचा थांग साधकाला लागतो; कारण जागृत शक्तीमुळेच नऊरस कसे उत्पन्न होतात याची तो स्वतःच्या ठिकाणी अनुभूती घेतो.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी ही आदिपुरुषाची सत्ता प्रमदास्वरूपाने मूळ पुरुषापासून द्विविधरूपाने कशी प्रकट झाली हे सांगताना " दासबोधात " असे म्हटले आहे की–

जो कर्तृत्वास आरंभ । मूळपुरुष मूळारंभ ।
जो परात्पर स्वयंभ । आदिअंतीं ॥७.१.६॥
तयापासून प्रमदा । इच्छाकुमारी शारदा ।
आदित्यापासून गोदा । मृगजळ वाहे ॥७॥
जे मिथ्या म्हणताच गोंवी । मायिकपणे लाघवी ।
वक्त्यास वेढा लावी । वेगळेपणें ॥८॥
जे द्वैताची जननी । कीं ते अद्वैताची खाणी ।
मूळमाया गवसणी । अनंत ब्रह्मांडांची ॥९॥
कीं ते औदुंबरी वल्ली । अनंत ब्रह्मांडीं लगडली ।
मूळपुरुषाची माउली । दुहितारूपें ॥१०॥
वंदू ऐशी वेदमाता । आदिपुरुषाची सत्ता ॥११॥

सद्‌गुरूशी अभिन्न असलेल्या या सर्वोपशांतिप्रमदेचे स्वरूप अधिक स्पष्टपणे, चिकित्सा करून व विश्लेषणात्मक पद्धतीने सर जॉन वुड्रॉफ यांनी " The Serpent Power " या आपल्या सुप्रसिद्ध ग्रंथातील " Practice ( Yoga: Laya Krama ) या प्रकरणात विस्ताराने मांडले आहे. ते मुळातूनच पाहिले पाहिजे. त्याचे सारांशात्मक स्वरूप मांडताना त्यांनी वरील प्रकरणात असे म्हटले आहे की," Kunadlini being Prana-Shakti, if She is moved Prana is moved. The Prana withdrown from Ida and pingala may by the power of its Shakti, after entry into the Sushu-

mna or void ( shunya ), go upwards towards the Brahma-randhra. The Yogi is then said to be free of the active Karma, and attain the natural state. The object, then, is to devitalize the rest of the body by getting the Prana from Ida and Pingala into Sushumna, which is for this reason regarded as the most important of all the Nadis and " the delight of the yogi, " and then to make it ascend through the lotuses which " bloom " on its approach. The body on each side of the spinal columan is divitalized, and the whole current of prana thrown into that column. The Manonmani state is said to arise with the dissolution (Laya) of Prana, for on this ensues Laya of Manas. By daily practising restraint of Prana in Sushumna the natural effort of the Prana along its ordinary channles is weakend and the mind is steadied. For when there is movement (Pari-spanda) of Prana there is movement of mind, that is it feeds upon the objects ( Vishaya ) of the objective world. ( page 261, 262)

But when prana is in Sushumna " there is neither day nor night, " for Sushumna devours time. When there is movement of Prana ( Prana-Spanda ), there is no cessation of Vrutti ( mind functioning ). And, as the Yogavasistha says, so long as Prana does not cease to exist there is neither Tattva-jnana nor destruction of Vasana, the subtle cause of the will towards life which in the cause of rebirth. For Tattva-Jnana, or supreme Knowledge, is the destruction of both chitta and Vasana. Restraint of breath also renders the semen firm. For the semen fluctuates as long as Prana does so. And when the semen is not steady the mind is not steady. The mind thus trained detaches itself from the world. These various results are said to be achieved by rousing Kundlini, and by the subsequent process for which she is the " Key." " As one forces open a door with a key, so the Yogi should force upon the door of Liberation by Kunbalini." For it is she who sleeps in the Muladhara,

closing with her mouth the channel ( Sushumna ) by which ascent may be made to the Brahmarndhra. This must be opend when the Prana naturally enters into it. " She the ' yong window,' is to be despoiled forcibly. " It is prescribed that there shall be daily practice, with a view to acquiring power to manipulate this Shakti.

It generally takes from the commencement of the practice to lead the Shakti to the sahasrara, though in exceptional cases it may be done in a short time. At first she can only be led to a certain point, and then gradually higher. He who has led Her to a particular centre can reach the same centre more easily at the next attempt. But to go higher requires futher effort. At each centre a particular kind of bliss ( Ananda ) is experienced, and perticular powers, such as the conquest of the elementary forms of the sensible matter ( Bhuta ) are, it is said, gained, until at the Ajna centre the whole unirerse is experienced. In the earlier stages, moreover, there is a natural tendency of the Shakti to return. In the continued practice facility and greater control are gained. Where the Nadis are pure it is easy to lead Her down even from the Sahasrara. In the perfection of practice the Yogi can stay as long as he will in the Sahasrara (page 263)

Kundalini does not at first stay in Sahasrara. The length of stay depends on the strength of the Yogis practice. There is then a natural tendency ( Samskara ) on the part of Kundalini to return. The Yogi will use all effort at his disposal to retain Her above, for the longer this is done the nearer approach is made to the time when she can be in a permanent manner retained there. For it is to be observed that liberation is not gained by merely leading Kunadalini to the Sahasrara, and of course still less is it gain d by stirring it up in the Muladhara, or fixing it in any of the

lower centres. Liberation is gained only when Kundalini takes up Her premanent abode in the Sahasrara, So that She only returns by the will of the Sadhaka. ( page 278-279 )

कुंडलिनी ही प्राणशक्ती असल्यामुळे जेव्हा ही शक्ती चलित होते तेव्हा प्राणही चलित होतात. बहुतेक शक्तीच्या सामर्थ्याने इडापिंगलेतून आकर्षिलेले प्राण जेव्हा सुषुम्नेत किंवा शून्यात प्रवेश करतात तेव्हा ते ऊर्ध्वगामी होऊन ब्रह्मरंध्रात जातात. मग योगी नियत कर्मापासून मुक्त होतो व स्वाभाविक अशी अवस्था स्वतः प्राप्त करतो. इडापिंगलेतून प्राण खेचून घेऊन त्याला सुषुम्ना-प्रविष्ट करून व त्याच्या आगमनामुळे प्रफुल्लित होणाऱ्या कमलांमधून त्याला ऊर्ध्वगामी करून शरीर चेतनाहीन करणे हे त्यानंतरचे ध्येय होय. या कारणा-करिताच सुषुम्ना ही इतर सर्व नाड्यात प्रमुख गणली जाते व तिला " योग्यांचा आनंद " असे म्हणतात. मेरुदंडाच्या दोन्ही बाजूकडील शरीर चेतनाहीन झाल्यावर प्राणाच्या सर्व प्रवाहाचे सुषुम्नेमध्ये चालन होते. प्राणाचा लय झाला की, मनोन्मनी अवस्था उत्पन्न होते व त्यामुळेच मनाचाही लय उपस्थित होतो. सुषुम्नेतील प्राणाच्या संयमनाच्या नित्याभ्यासाने त्याच्या ( अधोगामी वाहण्याच्या ) नैसर्गिक प्रयत्ना-बरोबरच त्याचे सामान्य मार्गही क्षीण होऊन मन स्थिर होते. ज्यावेळी प्राणांचे परिस्पंद उमटत असतात त्यावेळी वस्तुनिष्ठ जगातील विषय सेवन करणाऱ्या मनाचीही हालचाल चालू असते.

परंतु प्राण जेव्हा सुषुम्नेमध्ये असतात तेव्हा तेथे दिवसही नसतो व रात्रही नसते; कारण सुषुम्ना ही कालभक्षक आहे. जोपर्यंत प्राणस्पंदांचे चलनवलन असते तोपर्यंत वृत्ती ( मनाची कार्ये ) थांबत नाहीत. यादृष्टीनेच योगवासिष्ठात असे म्हटले आहे की, " जोपर्यंत प्राणांचे अस्तित्व नाहीसे होत नाही तोपर्यंत संसाराच्या इच्छेला सूक्ष्म कारण असलेल्या व पुनर्जन्माला हेतुभूत होणाऱ्या वासना नाश पावत नाहीत आणि तत्त्वज्ञानही होत नाही; कारण तत्त्वज्ञानाने किंवा सर्व-श्रेष्ठ ज्ञानाने चित्त व वासना या दोहोंचा नाश होतो. " श्वासोच्छ्वासावरील संयम हा वीर्य दृढ करण्यास मदत करतो. जोपर्यंत प्राण चलित होतात तोपर्यंत बिंदू अर्थात् वीर्यही चलित होते आणि जोपर्यंत बिंदू स्थिर राहत नाही तोपर्यंत मनही स्थिर राहत नाही. अशा प्रकारे प्रशिक्षित झालेले मन संसारापासून स्वतःच विभक्त होते. ज्यावेळी कुंडलिनी शक्ती ऊर्ध्वगामी होते त्यावेळी वरील सर्व विविध फले प्राप्त होतात. इतर प्रक्रियांच्याद्वारा प्राप्त होणाऱ्या फलाचीही ही शक्तीच किल्ली आहे. ज्याप्रमाणे एखाद्याने किल्ली घालवून दार जोराने उघडावे त्याप्रमाणे योग्याने कुंडलिनी शक्ती उन्मुक्त, स्वतंत्र किंवा जागृत करून बलपूर्वक ब्रह्मद्वार

मोकळे करावे. ज्या मार्गाने ऊर्ध्वगामी होऊन ब्रह्मरंध्रात जाता येते असा सुषुम्नेचा मार्ग किंवा ब्रह्मद्वार आपल्या मुखाने रोधून ही कुंडलिनी शक्ती मूलाधारात निद्रा घेत पहुडलेली असते. ज्यावेळी प्राण स्वाभाविक रीतीने सुषुम्नेत प्रवेश करतात त्यावेळी सुषुम्नामार्ग किंवा ब्रह्मद्वार निश्चितपणे उघडले जाते. ही कुंडलिनी शक्ती म्हणजे "तरुण विधवा" असून तिला जबरदस्तीनेच नागविली पाहिजे. सामर्थ्य प्राप्त करण्याच्या दृष्टीने या शक्तीला कौशल्याने तयार करण्यासाठी शास्त्रकारांनी असे आवर्जून सांगितले आहे की, साधकाने नित्य अभ्यास केला पहिजे.

बहुतेक करून साधनाला सुरुवात केल्यानंतर शक्ती सहस्रारात पोहोचण्यासाठी खूप वर्षे लागतात. मात्र काही अपवादात्मक व्यक्तींच्या बाबतीत ही गोष्ट अत्यंत थोड्या काळातही घडून येते. प्रथम ही शक्ती एका विशिष्ट मर्यादेपर्यंत जाऊन नंतर ती क्रमाक्रमाने वरच्या पातळीवर जाते. जो साधक या शक्तीला प्रथम एका विशिष्ट चक्रापर्यंत नेऊ शकतो तो दुसऱ्यावेळी अत्यंत सुलभतेने तिला त्याच चक्रापर्यंत घेऊन जाऊ शकतो. परंतु अधिक वर जाण्यासाठी पुढील प्रयत्नांची आवश्यकता असते. प्रत्येक चक्रापाशी एका विशिष्ट प्रकारच्या आनंदाची व विशेष अशा शक्तींची साधकाला अनुभूती येते. ज्याप्रमाणे इंद्रियगम्य भौतिकतत्त्वांच्या किंवा पंचमहाभूतांच्या प्राथमिक किंवा स्थूल आकारावर विजय प्राप्त झाला म्हणजे आपण काही मिळविले आहे असे वाटते; त्याप्रमाणे आज्ञाचक्रापर्यंत गेल्यावर संपूर्ण विश्वाची साधकाला अनुभूती येते. बहुतकरून अगदी प्राथमिक अवस्थेत सहस्रारातून लगेच मूलाधारात परत येण्याचा शक्तीचा स्वाभाविक कल असतो. पुढे नित्य अभ्यास केला म्हणजे अधिक सुलभता व खूप मोठा संयम प्राप्त होतो. ज्या साधकाची नाडीशुद्धी झालेली असते तो सहस्रारातून या शक्तीला सहजतेने खाली आणू शकतो. अभ्यासाच्या पूर्णावस्थेत योगी आपल्या इच्छेला येईल तोपर्यंत या शक्तीचे सहस्रारात वास्तव्य करू शकतो.

साधनाच्या प्राथमिक अवस्थेत कुंडलिनी शक्ती सहस्रारात फार वेळ थांबू शकत नाही. तिचा तेथील वास्तव्याचा काळ वाढणे हे सर्वस्वी योग्याच्या नित्याभ्यासावर अवलंबून असते. त्यानंतर कुंडलिनी शक्तीच्या दृष्टीने तेथून परत खाली उतरून येण्याचा तिचा स्वाभाविक कल किंवा संस्कार असतो. या कुंडलिनी शक्तीला वर सहस्रारात थांबविण्यासाठी योगी-साधक आपल्याजवळील सर्व प्रयत्नांची पराकाष्ठा करतो; कारण हा काळ ज्या प्रमाणात वाढत जाईल त्या प्रमाणात ही शक्ती सहस्रारात कायम राहण्याची वेळ जवळ येईल. येथे एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे की, कुंडलिनी शक्ती नुसती ऊर्ध्वगामी करून सहस्रारात नेल्याने मुक्ती प्राप्त होत नाही आणि मूलाधारात तिला नुसते चाळविले किंवा कोणत्याही खालच्या चक्रावर स्थिर केले तरी फार मोठा लाभ होत नाही. ज्यावेळी कुंडलिनी

शक्ती सहस्रारातील आपल्या नित्याच्या किंवा कायमच्या घरात वास्तव्य करू लागेल आणि जेव्हा ती साधकाच्या इच्छनेच परत खाली येईल तेव्हाच साधकाला मुक्ती, कैवल्य किंवा स्वातंत्र्य प्राप्त होईल.

सारांश, सर्वोपशांतिप्रमदास्वरूप कुंडलिनी शक्तीचे स्वरूप हे पूर्णपणे साधनात्मक असून तेच भगवंताच्या मुखातून बाहेर पडून गीता या नावाने विख्यात झाले आहे भगवंतांशी एकरूप असलेल्या कुंडलिनी शक्तीनेच जीवाचे ब्रह्म व्हावे, त्याला स्वसंवेद्य आत्मरूपाची प्राप्ती व्हावी व तो शिवस्वरूप व्हावा म्हणून सर्व वेद-शास्त्रपुराणतंत्रादि आगमनिगमांचे मंथन करून आत्मा ज्यामुळे सहजासहजी प्राप्त होईल असे सिद्धयोगाचे साधनरत्न प्रकट केले आहे, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहा-राज म्हणतात–

हें गीतानाम विख्यात। सर्ववाङ्मयाचें मथित।
आत्मा जेणें हस्तगत। रत्न होय ॥१८.१३२३॥
तैसें सर्वज्ञेंही मियां। सर्वही निर्धारूनियां।
निकें होय तें धनंजया। सांगितलें तुज ॥१३३१॥

## चिद्वृत्ती किंवा चेतनाशक्ती :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " सर्व भूतांच्या अंतरीं। हृदय महाअंबरीं। चिद्-वृत्तीच्या सहस्रकरीं। उदयला असे जो ॥ १८.१२९९॥ " असे म्हणून सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी हृदयाच्या महाकाशात चिद्वृत्तीच्या सहस्रकिरणांनी म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या अपरंपार सामर्थ्याने तो ईश्वर उदित होत असतो म्हणजे जीवरूपाने वास करीत असतो व " आतां असंगा साक्षिभूता। देहीं चैतन्याची जे सत्ता। तिये नाम पांडुसुता। चेतना येथें ॥ १३.१३४ ॥ " असे सांगून अलिप्त व सर्वसाक्षीभूत अशा स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची देहात असणारी जी सत्ता, तिलाच चेतनाशक्ती किंवा कुंडलिनी शक्ती असे नाव आहे; हे सांगून चिद्वृत्ती किंवा चेतनाशक्तिरूपी कुंडलिनी शक्तीचे स्वरूप व्याख्यारूपाने यथार्थपणे व्यक्त केले आहे. मुळातच भगवंतांनी " ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ॥१८.६१॥ " व " एतत्क्षेत्रं ॥ १३.६ ॥ " असे म्हणून ईश्वर सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी या मायारूप शक्ती कुंडलिनीच्या साहाय्याने निवास करतो व तिच्या सर्व वृत्तींना किंवा शक्तिरूपाने प्रकट झालेल्या ३६ तत्त्वांना क्षेत्र म्हणतात हे गीतेत स्वच्छ सांगितले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्यातील भावार्थ उपरोक्त व्याख्यांनी अधिक स्पष्ट केला आहे. चिद्वृत्तिरूप कुंडलिनी शक्तीचे कार्यात्मक स्वरूप विस्ताराने विशद करण्यासाठी " भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥१८.६१॥ " या गीतार्ध श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना ते म्हणतात–

अवस्थात्रय तिन्हीं लोक। प्रकाशूनि अशेख।
अन्यथादृष्टि पांथिक। चेवविले ॥१८.१३००॥
वेद्योदकाच्या सरोवरीं। फांकतां विषयकल्हारीं।
इंद्रियषट्पदा चारी। जीवभ्रमरातें ॥१३०१॥
असो रूपक हे तो ईश्वरु। सकल भूतांचा अहंकारु।
पांघरोनि निरंतरु। उल्हासत असे ॥१३०२॥
स्वमायेचें आडवस्त्र। लावूनि एकला खेळवी सूत्र।
बाहेरी नटी छायाचित्र। चौऱ्याशीं लक्ष ॥१३०३॥
तया ब्रह्मादिकीटांता। अशेषांही भूतजातां।
देहाकार योग्यता। पाहोनि दावी ॥१३०४॥
तेथ जें देह जयापुढें। अनुरूपपणें मांडे।
तें भूत तया आरूढे। हें मी म्हणौनि ॥१३०५॥
सूत सूतें गुंतलें। तृण तृणचि बांधलें।
कां आत्मबिंबा घेतलें। बाळकें जळीं ॥१३०६॥
तयापरी देहाकारें। आपणपेंचि दुसरें।
देखोनि जीव आविष्करें। आत्मबुद्धि ॥१३०७॥
ऐसेनि शरीराकारीं। यंत्रीं भूतें अवधारीं।
वाहूनि हालवी दोरी। प्राचीनाची ॥१३०८॥
तेथ जया जें कर्मसूत्र। मांडूनि ठेविलें स्वतंत्र।
तें तिये गती पात्र। होंचि लागे ॥१३०९॥
किंबहुना धनुर्धरा। भूतातें स्वर्गसंसारा—।
माजीं भोवंडी तृणें वारा। आकाशीं जैसा ॥१३१०॥
भ्रामकाचेंनि संगें। जैसें लोहो वेढा रिगे।
तैसी ईश्वरसत्तायोगें। चेष्टती भूतें ॥१३११॥

चिद्वृत्तीच्या सहस्रकिरणांनी उदित होणारी ही जी ईश्वरीसत्तारूपी कुंडलिनी शक्ती आहे, तिचे अधिक स्पष्ट वर्णन करताना "सिद्धसिद्धांतसंग्रहात" आचार्य श्रीबलभद्र यांनी चतुर्थोपदेशात असे म्हटले आहे की, "ज्याच्या ज्ञानाने मनुष्य आत्मतत्त्वज्ञानसंपन्न होतो त्या पिंडाधाराचे आता वर्णन करतो. या पिंडाला आधारभूत अशी एक चित्-शक्ती आहे. या चैतन्यशक्तीचा अंत-पार कुणालाही लागत नाही. ही शक्ती कार्य, कारण व कर्ता या त्रिपुटीचे उत्थान करण्याला समर्थ आहे, म्हणून हीच सर्वसमर्थ चिच्छक्ती होय. ज्याप्रमाणे वस्त्राला नाना-प्रकारच्या सूत्ररूपाने तंतूच कारण किंवा आधार आहे त्याप्रमाणेच नानाविध अंशांनी किंवा किरणांनी या जड देहाला हीच चिच्छक्ती कारणीभूत म्हणजे आधारच

आहे. ही चिच्छक्ती स्वत: अत्यंत प्रकाशमान आहे. ( साधकाने किंवा मनुष्याने ) जाणण्यास योग्य अशी हीच एक शक्ती आहे; कारण ही कुंडलिनी शक्ती सर्व प्रकारच्या ज्ञानाची जन्मभूमी, सर्वसाक्षीभूत व अंत-पाररहित आहे.अशा चैतन्यस्वरूप बुद्धिशक्तीची ( साधकाने ) भावना करावी. ही शक्ती म्हणजे आत्म्याची सहज लीलाच आहे. ही स्वयंभू आहे. अनुद्भूत किंवा निरुत्थान दशेमध्ये या शक्तीलाच शिव असे म्हणतात. ही कुलाकुलस्वरूपिणी व समरसतेची भूमिका आहे. ही कुंडलिनी शक्तीच सर्वसत्तारूप, अहंस्वरूपिणी, परम तेजस्विनी व सर्वस्फुरणरूपिणी आहे. ही शक्ती अत्यंत निराभासालाही भासविणारी किंवा निराभास आत्मस्वरूपाचे सम्यक् प्रकाशन म्हणजे ज्ञान करून देणारी आहे. हीच सर्वांचे आभासन म्हणजे प्रकटन करणारी प्रमुख सत्ता आहे. या शक्तीला उत्पत्ती व नाश हे दोन्हीही नाहीत. त्यामुळे हिलाच अनादिनिधन असे म्हणतात. ही कोणत्याही प्रमाणांनी जाणली जात नाही. "मी आत्मसूर्याचा एक किरण आहे म्हणून अंशत: सुखी आहे," अशी जी अहंभावना ती चिच्छशक्ती कुंडलिनीच होय. हीच ज्ञानरूप, स्फुरणरूप व स्फूर्तिदायिनीही आहे. शुद्धबुद्धस्वरूप अशा आत्म्याच्या ज्ञानाला ही शक्ती आकलन करते म्हणून तिला कला किंवा चित्कला असे म्हणतात. सत्ताअहंतादि पंचकाला जी 'कुल' अशी योगपारिभाषिक संज्ञा आहे, ती या चिच्छक्तीला आहे. (या संज्ञेमुळे ही कुलयुक्त आहे. ) या शक्तीला वर्ण, गोत्र वगैरे काही नाही म्हणून ही अकुल म्हणजे कुलरहित आहे. या शक्तीच्या ठिकाणी अन्यत्व म्हणजे दुजेपणा नाही. ती अखंड आहे. तिच्या ठिकाणी द्वैत नाही. ती अविनाशी आहे. ती सर्व प्रकारच्या धर्मप्रकारांनी रहित म्हणजे निर्धर्मिणी व अवयवरहित आहे. या सर्वांमुळे ती नेहमीच अकुल आहे. सत्ता इत्यादि कुलाशी ही समरस होते म्हणून ही उत्पत्तीला कारणीभूत आहे. ही चिच्छक्ती कुंडलिनी ज्ञानप्रकाशाची भूमी किंवा आश्रयस्थान आहे. ही निरतिशय शक्तिशालिनी असून ती महेशाची स्वत:शी अभेद्य असलेली शक्ती आहे. समस्त अज्ञानजन्य संसाराला ज्ञानरूप जागृती देऊन प्रवृत्त करण्याला किंवा अज्ञानाचे ज्ञानात परिवर्तन करण्याला हीच एकटी समर्थ आहे. म्हणून ही चिच्छक्ती आज्ञेश्वरी आहे.

या शक्तीच्या मदतीवाचून शिव काहीच करू शकत नाही. तोच स्वशक्तिसंपन्न झाला की, निराभासालाही भासवितो किंवा प्रकाशित करतो. परमेश्वर हा या चिच्छक्ती कुंडलिनीमुळेच आनंदरूप, नित्य, शक्तिमान, ज्ञानरूप व सिद्धांच्या बुद्धीचा विषय आहे, असे सिद्धमत आहे. ही शक्ती परंपरास्वरूपिणी व पिंडाला आधारभूत आहे. ही चिच्छक्ती कुंडलिनीच देहपिंडाला सिद्धी प्राप्त करून देणारी आहे. ही जागृत व निद्रिस्त अशा दोन प्रकारची आहे. या शक्तीलाच चेतनस्वरूपा ( चिद्वृत्ती व चैतन्यशक्ती ) असेही म्हणतात. नानाप्रकारच्या चित्रविचित्र क्रिया

व उद्योगामुळेही ही प्रपंचाकार धारण करणारी आहे. ही सर्पासारखी वर्तुळाकार किंवा कुंडलाकार असल्यामुळे हिला व्यवहारात कुंडलिनी असे म्हणतात. शारीरिक विकृती दूर झालेल्या पुरुषाला निवृत्तिमार्गाकडे उद्युक्त करणारी हीच चैतन्यशक्ती आहे. या चैतन्यशक्तीचा प्रसर म्हणजे जगदुत्पत्ती व हिचा संकोच म्हणजे जगदुपसंहार होय, हे निःसंशय आहे. यामुळे हिला मूळशक्ती म्हणतात. सद्‌गुरुकृपेने ही शक्ती मूलाधारात जागृत झाली की, साधकाला सिद्धी म्हणजे स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती होते. जीव हा नानाविध उपाधींनी व्याप्त झालेला दिसतो; पण ही केवळ भ्रांती आहे. या चैतन्यशक्ती कुंडलिनीमुळेच शिवाला मध्यंतरी जीवस्वरूपता प्राप्त होते. ही कुंडलिनी शक्ती स्थूल व सूक्ष्म अशा दोन प्रकारची प्रतीत होते. ही निश्चलचित्ताने ग्राहय असल्यामुळे सूक्ष्म आहे व ध्यानावस्थेत ही स्थूल आहे. ही सर्वस्वरूपिणी असल्याने ( जीवाच्या ) भ्रांतीलाही तीच कारणीभूत आहे. सर्व ठिकाणी सर्वाकाराने भरून असल्याने हिला मध्यशक्ती असे म्हणतात. ही चिच्छक्ती कुंडलिनीच संकोच-प्रसारामुळे परिवर्तिनी झालेली आहे. ही नित्यानंदरूपा असल्याने निश्चला आहे. हिला आकार नसल्याने ही सूक्ष्म आहे. सिद्धयोगी हिलाच सिद्धमार्गातील वुद्धा किंवा जागृती किंवा शक्तीची चेतनशीलता असे म्हणतात.

तत्त्वसार नामक ग्रंथात याच अर्थाचे निरूपण पुढीलप्रमाणे केले आहे. ते असे-" सर्व अंशांनी युक्त अशी ही कुंडलिनी शक्ती म्हणजे सृष्टी होय. ही शक्ती लोकांच्या किंवा साधकांच्या अनुभवाला येत असल्याने किंवा ती ज्ञानाला विषय होत असल्याने प्रायः स्थूलरूपिणी आहे. त्याचप्रमाणे ही शक्ती सर्वगत असल्यामुळे ती व्याप्ति-व्यापकरहित आहे. त्यामुळे तिला सूक्ष्म म्हणतात. इतर किंवा बाहय ज्ञानाने मोहित झालेल्या मानवाला या शक्तीचे भेद समजत नाहीत व ती प्रत्ययालाही येत नाही. म्हणून ही चिच्छक्ती कुंडलिनी परम सूक्ष्म, संविद्रूप म्हणजे ज्ञानरूप, मध्यशक्ती म्हणजे सुषुम्ना व महेश्वरी म्हणजे मोठी नियामकशक्तिरूपा आहे. स्वतः स्वरूपदशेत श्रीगुरुकृपेने म्हणजे श्रीसदगुरूंनी केलेल्या शक्तिपाताने हिला जागृत करता येते व या जागृतीमुळेच हिला जाणता येते. हिच्या जागृतीमुळे सिद्धयोगाच्या साधकांना किंवा योग्यांना सिद्धिलाभ होतो. त्यामुळे मोक्षेच्छूसाठी ऊर्ध्वशक्तिनिपात सांगितला आहे. सर्व तत्त्वांपेक्षा ही चिच्छक्ती कुंडलिनी उच्चस्थानी असल्याने हिला नाव नाही. ही शक्तीच स्वतः सर्वश्रेष्ठ स्थान आहे व स्वात्मज्ञानाची ती साक्षात् आश्रयस्थान आहे. सामान्यांनी हिला ऊर्ध्वशक्ती असे म्हटले आहे. शक्तिपाताने हिला जागृत करून सहस्रारातील स्वसंवेद्य स्वस्वरूपात हिचे नित्य वास्तव्य असणे यालाच हिचे निरसन होणे म्हणजे शिवाशी पूर्णपणे समरस होणे असे म्हणतात. ज्यावेळी या चित्तरूप चैतन्यशक्तीचे निरुत्थान होते तेव्हा

स्वात्मरूपात या शक्तीचे अखंड प्रतिभान होते. शिवात शक्तीचे व शक्तीत शिवाचे वास्तव्य आहे. चंद्र व चांदणे यात जसे अंतर किंवा भिन्नता नाही तसेच शिव-शक्तीत भेद नाही. आपल्या नानाप्रकारच्या शक्तींनी किंवा वृत्तींनी ही चिद्‌वृत्ती किंवा चेतनाशक्तीच सर्व पिंडाला म्हणजे देहाला आधाररूप असल्याने हिला पिंडाधार हे नाव योग्य आहे असा योगिजनांचा सिद्धांत आहे."

अशा प्रकारे शिवशक्ती एकरूप व एकरस असले तरी या चिद्‌वृत्तीमुळेच पिंडब्रह्मांडाची रचना भासमान होते व शक्तीच प्रथम महत्त्वाच्या रूपाने उमलून मग सत्त्वरजतमात्मक पद्धतीने त्रिगुणात्मक कशी होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

तें ऊर्ध्व आत्मा निर्मळें । अधोर्ध्व सूचिती मूळें ।
बळिया बांधोनि आळें । मायायोगाचें ॥१५.९१॥
मग आधिली सदेहांतरें । उठती जियें अपारें ।
ते चौपासी घेऊनि आगारें । खोलावती ॥९२॥
ऐसें भवद्रुमाचें मूळ । हें ऊर्ध्वी करी बळ ।
मग आणियांचें बेंचळ । अधीं दावी ॥९३॥
तेथ चिद्‌वृत्ती पहिलें । महतत्त्व उमललें ।
तें पान वाल्हेंबुल्हें । एक निघे ॥९४॥
मग सत्त्वरजतमात्मकु । त्रिविध अहंकारु जो एकु ।
तो तिवणा अधोमुखु । डिरु फुटे ॥९५॥

चिद्‌वृत्ती कुंडलिनी शक्तीमुळेच विश्वाची उभारणी होते हे "श्रीरामपूर्व-तापिन्युपनिषदातही" पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे.

कारणत्वेन चिच्छक्त्या रजःसत्त्वतमोगुणैः ।
यथैव वटबीजस्थः प्राकृतश्च महाद्रुमः ॥२.२॥

ज्याप्रमाणे वटवृक्षाच्या बीजात सूक्ष्मरूपाने महान् असा वटवृक्ष सामाविलेला असतो व तो बीजरूपाने उत्पन्न झाल्यावर ज्याप्रमाणे एका विशाल वृक्षामध्ये परिवर्तित होतो त्याप्रमाणे परमात्म्याशी अभिन्न असलेल्या चिच्छक्ती कुंडलिनीत सर्व संसार किंवा पिंडब्रह्मांड सूक्ष्मरूपाने मुळातच सामाविलेले असून तिच्यामुळेच सत्त्वरजतमात्मक त्रिगुणात्मक सृष्टी उत्पन्न होते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ही चैतन्याची सत्ता किंवा चिच्छक्तीच हे कार्य करते हे सांगताना असे म्हटले आहे, की, "जे नखौनि केशवरी । उभी जागे शरीरीं । जे तिहीं अवस्थांतरीं । पालटेना ॥१३.१३५॥" असे या चैतन्यशक्तीचे अविद्यात्मक, प्रसवात्मक, उभारणीरूप, पिंडब्रह्मांडरचनात्मक व विश्वविस्तारभासक असे स्वरूप असले तरी जीवाकडून शक्तिजागृतीने अधियज्ञ घडून यावा व तो चेतनेचा चक्षू म्हणजे शिवस्वरूप व्हावा

म्हणून या चैतन्यशक्तीच्यारूपाने देहात घडणाऱ्या अधियज्ञाचे म्हणजे जागृतशक्तीने स्वत:च स्वत:ला जाणण्याचे वर्म सांगताना म्हणजे या चैतन्यशक्ती कुंडलिनीचे विद्यात्मक, प्रतिप्रसवात्मक, संहारणीरूप, पिंडब्रह्मांडरचनोन्मूलक, विश्वविस्तार-भासच्छेदक असे साधनस्वरूप स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जो चेतनेचा चक्षु। जो इंद्रियदेशींचा अध्यक्षु।
जो देहास्तमानीं वृक्षु। संकल्प विहंगमाचा ॥८.३४॥
जो परमात्माचि परी दुसरा। जो अहंकारनिद्रा निदसुरा।
म्हणोनि स्वप्नीचिया वोरबारा। संतोषें शिणे ॥३५॥
जीव येणें नांवें। जयातें आळविजे स्वभावें।
तें अधिदैवत जाणावें। पंचायतनींचें ॥३६॥
आतां इयेचि शरीरग्रामीं। जो शरीरभावातें उपशमी।
तो अधियज्ञु येथ गा मी। पंडुकुमरा ॥३७॥
येर अधिदैवाधिभूत। तेहि मीचि कीर समस्त।
परी पंधरे किडाळा मिळत। तें काय सांके आहे ? ॥३८॥
तरि ते पंधरेपण न मैळे। आणि किडाळाचियाही अंशा न मिळे।
परि जंव असे तयाचेनि मेळें। तंव सांकेंचि म्हणिजे ॥३९॥
तैसें अधिभूतादि आघवें। हें अविद्येचेनि पालवें।
झांकलें तंव मानावें। वेगळें ऐसें ॥४०॥
तेंचि अविद्येची जवनिका फिटे। आणि भेदभावाची अवधी तुटे।
मग म्हणों एक होऊनि जरी आटे। तरी काय दोनी होती ? ॥४१॥
पैं केशांचा गुंडाळा। वरि ठेविली स्फटिकशिळा।
ते वरि पाहिजे डोळां। तंव भेदली गमती ॥४२॥
पाठीं केश परौते नेले। आणि भेदलेपण काय नेणों जाहाले।
तरी डांक देऊनि सांदिलें। शिळेतें काई ? ॥४३॥
ना ते अखंडचि आयती। परि संगें भिन्न गमली होती।
ते सारिलिया मागौती। जैसी कां तैसी ॥४४॥
तेवींचि अहंभावो जाये। तरी ऐक्य तें आधींचि आहे।
हेंचि साचे जेथ होयें। तो अधियज्ञु मी ॥४५॥

सोने व हिण एकत्र असते तोपर्यंत ते शुद्ध सोने नसते त्याप्रमाणे अधिभूत व अविद्या एकत्र असते तोपर्यंत शुद्ध आत्मस्वरूप प्रत्ययाला येत नाही. यासाठी शक्तिपाताने चैतन्यशक्ती जागृत करूत सद्गुरू अविद्येची जवनिका दूर करतात. त्यामुळे मुळातच आपण शिवशक्तिरूप असे आत्मरूप आहोत याची जाणीव, भान किंवा अनुभूती साधकाला येते. हेच चैतन्यशक्ती कुंडलिनीचे अंतर्यागरूप

अधियज्ञाचे स्वरूप आहे. सर जॉन वुड्रॉफ यांनी "The Serpent Power" या ग्रंथातील "Practice ( Yoga : Laya-Krama )" या प्रकरणात हे स्वरूप अधिक स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, "Kundalini is chit, or Consciousness, in its creative aspect as Power. As Shakti it is through Her activity that the world and all beings there in exist Prakruti-Shakti is in the Muladhara in state of sleep ( Prasupta )-that is latent activity looking outwards ( Bahirmukhi ). It is because She is in this state of latent activity that through Her all the outer material world functions of life are being performed by man. And it is for this reason that man is engrossed in the world, and under the lure of Maya takes his body and egoism to be the real self, and thus goes round the wheel of life in its unending cycle of births and deaths. When the Jiva thinks the world to be different from himself and the Brahman, it is through the influence of Kundalini who dwells within him. Her sleep in the Muladhara, is, therefore, for the bondage of the ignorant. (Shandilya Upanishad, ch. 1) As long as she remains in the Muladhara lotus-namely, in that state of Hers which is the concomitant of the cosmic appearence-so long must that appearence endure. In short, when she is asleep, man is in the waking state (Jagrat). Hence it is said that the shakti of the initiate is awake, that of the Pashu is asleep. She is therefore aroused from sleep and when awake returns to Her Lord, who is but Herself in another aspect; Her return is, in fact, the withdrawal of that activity of Hers which produces the world of appearances, and which with such withdrawal disappears. For on Her upward path She absorbs into Herself all the Tattvas which had enamated from Her. The individual cousciousness of the Yogi, the Jivatma, being united with the world consciousness in Her, or Kundalini, then becomes the universal conscions-ness, or Parmatma, from which it appeared to be different

only by reason of the world-creating activity of Kundalini which is thus withdrawn. The establishment through Her of the pure state of Being-Consciousness-Bliss is Samadhi.

In short, Kundalini is the individual bodily representative of the great Cosmic Power (Shakti) which creates and sustains the universe. When this individual Consciousness (Jiva) is marged in the Consciousness of the Supreme Shiva, the world is for such Jiva dissolved, and Liberation (Mukti) is obtained. The rousing and stirring up of Kundalini Yoga is thus a form of that merger of the individual into the universal consciousness or union of the two which is the end of every system of Indian Yoga." ( Page 280, 281 )

कुंडलिनी म्हणजे चित् किंवा चेतना असून तिच्या उभारणीच्या कार्याच्या दृष्टीने ती शक्ती किंवा सामर्थ्य आहे. शक्ती म्हणून तिचे जे कर्तृत्व किंवा कार्य आहे त्यात जग व सर्व भूतमात्रांचे अस्तित्व असते. प्रकृतिशक्ती मूलाधारात निद्रिस्त किंवा प्रसुप्त अवस्थेत असते. अर्थात् या अवस्थेत ती बहिरुन्मुखी राहून अदृश्य कार्य करीत असते. तिच्या सुप्त अशा कार्यात्मक कारणामुळे माणसाकडून होणारी जीवनातील भौतिक कार्ये तिच्यातर्फे केली जातात आणि या कारणामुळेच मनुष्य हा जगात गुरफटून जाऊन, मायेच्या आकर्षणाने शरीर व अहंकार हाच खरा आपला आत्मा आहे असे समजून, जन्ममृत्यूच्या कधीही न संपणाऱ्या चक्रात सापडून, त्याबरोबर फिरत राहतो. जीवाच्या ठिकाणी वास्तव्य करणाऱ्या कुंडलिनी शक्तीच्या प्रभावामुळेच तो असा विचार करतो की, जग हे त्याच्यापासून व ब्रह्मापासून वेगळे आहे. त्यामुळे मूलाधारातील तिची निद्रा म्हणजे अज्ञानी माणसाकरिता बंधनच होय. जोपर्यंत ही शक्ती मूलाधारचक्रात निद्रावस्थेत राहते म्हणजे ज्या अवस्थेत ती जगताची उभारणी किंवा प्रकटीकरण करते; तोपर्यंत तिच्या निद्रावस्थेमुळे जगद्रूप अस्तित्वात असते. सारांश, ज्यावेळी शक्ती ही झोपलेली असते त्यावेळी मनुष्य हा बाह्यतः जागृत असतो. त्यामुळेच ज्याची दीक्षा झाली आहे त्याची शक्ती जागृत असते व जो पशू आहे त्याची शक्ती निद्रिस्त असते असे म्हटले जाते. या निद्रावस्थेतून तिला उठविल्यानंतर जेव्हा ती जागृत होते तेव्हा ती तिच्या स्वामीकडे अर्थात् शिवाकडे परत जाते. तिचा हा स्वामी शिव म्हणजे तिचे स्वतःचेच दुसरे रूप किंवा स्वरूप होय. तिचे स्वतःचे असे परत येणे हे खरोखर तिच्या ज्या कार्यामुळे जगताच्या स्वरूपाचे प्रकटीकरण झाले; त्या कार्यापासून तिची स्वतःचीच माघार होय. या परतीमुळे ही शक्ती स्वतःच नाहीशी होते; कारण तिच्या ऊर्ध्वगामी

मार्गात ती तिच्यापासून उत्पन्न झालेल्या तत्त्वांना आपल्यातच आकर्षून घेते. जीवात्म्याच्या रूपाने असणारे योग्याचे व्यष्टिगत चैतन्य जेव्हा कुंडलिनीमधील समष्टिगत जगच्चैतन्याशी एकरूप होते; तेव्हा विश्वचैतन्य किंवा परमात्म्यापासून उत्पन्न होऊन जी शक्ती जगताच्या उभारणीच्या कारणामुळे अलग झालेली असते; ती अशा प्रकारे आपल्या मूळस्वरूपात विलीन होते. आपल्या शुद्ध आत्म किंवा चैतन्यस्वरूपाचे तिच्यातर्फे होणारे हे पुन:प्रस्थापन हाच अत्यानंद, कल्याण, धन्यता किंवा सर्वात मोठे सुख असून हीच समाधी होय.

सारांश, विश्वोत्पत्ती व विश्वधारणा करणारी कुंडलिनी ही विश्वचैतन्याच्या शक्तीची व्यष्टिगत शारीरिक प्रतिनिधी आहे. जीवरूपाने आविष्कृत झालेली ही व्यष्टिगत शक्ती जेव्हा सर्वश्रेष्ठ शिवाच्या चैतन्यात विलीन होते; तेव्हा अशा जीवाच्या दृष्टीने विश्व हे मावळलेले किंवा विरघळून गेलेले असते व त्याला मुक्ती प्राप्त होते. कुंडलिनी योगातील शक्तीचे ऊर्ध्वगामित्व व चेतनायुक्तत्व म्हणजे व्यष्टीची समष्टी चैतन्यात विलीन होण्याची पद्धत आहे किंवा हे दोघांचे ऐक्य असून हीच भारतीय योगाच्या प्रत्येक मार्गाची अखेर आहे.

कुंडलिनी शक्ती ही अशा प्रकारे साधनसाध्यरूपाने चित् किंवा शिवस्वरूप असल्याने, आपले स्वरूप किंवा विभूती ही शक्तियुक्त आहे, असेच " भूतानामस्मि चेतना ॥ १०.२२ ॥ " म्हणजे भूतमात्रांची चिद्वृत्ती किंवा चेतनशक्ती मी आहे; असे म्हणून भगवंतांनी गीतेत अर्जुनाला सांगितले आहे व " भूतांमाजीं स्वभावें । चेतना ते मी ॥ १०.२२४ ॥ " असा त्याचा भावार्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केला आहे. शक्तिमान् व शक्ती यांचा कायम अभेद असतो हेच सूत्र येथे भगवान् श्रीगोपालकृष्णनाथांनी व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं राबविले आहे. या अर्थानेच " श्रीदुर्गासप्तशती " ग्रंथामध्ये असे म्हटले आहे की–

**या देवी सर्वभूतेषु चेतनेत्यभिधीयते ॥५.१७॥**
**या देवी सर्वभूतेषु शक्तिरूपेण संस्थिता ॥५.३२॥**

ही देवी कुंडलिनी शक्ती सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी चैतन्यरूपाने व शक्तिरूपाने राहिली आहे असे म्हटले जाते. " श्रीदेवीभागवतातही " असे म्हटले आहे की–

**चिच्छक्ति: परमेश्वरस्य विमला चैतन्यमेवोच्यते ॥**

चित्शक्ती, चैतन्यशक्ती किंवा चिद्वृत्ती कुंडलिनी हे परमेश्वराचे विमलचैतन्यच आहे असे म्हटले जाते. " योगशिखोपनिषदातही " हिचे चैतन्यरूप वर्णन करताना असे म्हटले आहे की–

**सुषुम्नायै कुंडलिन्यै सुधायै चंद्रमंडलात् ।**
**मनोन्मन्यै नमस्तुभ्यं महाशक्त्यै चिदात्मने ॥६.३॥**

**ब्रह्मरंध्रे महास्थाने वर्तते सततं शिवा ।**
**चिच्छक्तिः परमा देवी मध्यमे सुप्रतिष्ठिता ।।६.४७।।**

सुषुम्ना, कुंडलिनी, चंद्रमंडलातून पाझरणारे किंवा टपकणारे अमृत व मनोन्मीच्या रूपाने प्रकट होणाऱ्या चिदात्मिका अर्थात् चैतन्यात्मक महाशक्ती कुंडलिनीला नमस्कार असो. ब्रह्मरंध्ररूपी महास्थानात म्हणजे सहस्रारात शिव-शक्ती नेहमी राहते. हीच श्रेष्ठदेवता चिच्छक्ती किंवा चैतन्यदेवता मध्यमेत म्हणजे सुषुम्नेत राहते. " शक्तिपात किंवा कुंडलिनी महायोग " या ग्रंथात श्री. प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज यांनी या दृष्टीने पुढील सूत्रात ही गोष्ट स्पष्ट केली आहे.

**चितिर्वा ।।१.३।।**

आत्मा हा चितिशक्ती आहे. " चेतना ते मी ।। १०.२२४ ।। " असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात त्यातील व या सूत्रातील भाव व साम्य एकच आहे. " रुद्रयामल " ग्रंथातही या अर्थानेच कुंडलिनी शक्तीला चित्कला असे म्हटले आहे.

**ध्यायेत्कुंडलिनीं देवीं स्वयंभूलिंग वेष्टिताम् ।**
**चित्कलां यां कुंडलिनीं तेजोरूपां जगन्मयीम् ।।**

स्वयंभूलिंगाला वेढे घालून मूलाधारात राहिलेल्या, जगताच्या रूपाने नटलेल्या किंवा जगद्रूप असलेल्या व तेजोरूप अशा कुंडलिनी देवीचे ध्यान अगर उपासना करावी.

या चिद्वृत्तीला किंवा चैतन्यशक्तीला श्रेष्ठ प्रकृती असे म्हणून तीच जगताचे धारण करते हे " अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् । जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ।। ७.५ ।। " असे म्हणून भगवंतांनीच गीतेत स्पष्ट केले आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**आप तेज गगन । मही मारुत मन ।**
**बुद्धि अहंकारु हे भिन्न । आठै भाग ।।७.१८।।**
**या आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था ।**
**तिये नाम व्यवस्था । जीवु ऐसी ।।१९।।**
**जे जडातें जीववी । चेतनेतें चेतवी ।**
**मना करवीं मानवी । शोक मोहो ।।२०।।**
**पैं बुद्धीच्या अंगीं जाणणें । तें जिये जवळिकेचें करणें ।**
**जिया अहंकाराचेनि विंदाणें । जगचि धरिजे ।।२१।।**

चिद्वृत्तीचे किंवा चैतन्यशक्ती कुंडलिनीचे जडाते जीववी व चेतनेने चेववी हे जें सामर्थ्य आहे ते स्पष्ट करताना " त्रिपुरारहस्याच्या ज्ञानखंडातील अकराव्या

अध्यायात" असे म्हटले आहे की, " भगवान् अचिंत्यशक्तिसंपन्न आहे. त्यानेच प्रकट केलेल्या वेदात हे तत्त्व प्रकट केले आहे. वेदात असे म्हटले आहे की, सृष्टीच्या पूर्वी एकमात्र महेश्वरच होता. त्या परम स्वतंत्र परमेश्वराने दुसऱ्या कोणत्याही सामग्री-शिवाय आपल्या स्वातंत्र्याच्या उत्कर्षाच्या महिम्याने म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या अपरंपार सामर्थ्याने केवळ क्रीडाकौतुकाने आपल्या स्वरूपभूत पटावर हे जगत्‌चित्र भासमान केले. ज्याप्रमाणे जीव देहादींशिवाय शुद्ध चिन्मात्र स्वरूप आहे त्याप्रमाणे भगवंतही या जगतापासून सर्वथा निराळा, शून्य, अविनाशी व चैतन्यशक्तियुक्त आहे. त्याच्या शिवाय दुसरे कोणीच नसल्यामुळे तो हे जगच्चित्र आणखी कोठे प्रकट करणार ? त्या चैतन्यशक्तियुक्त ईश्वराशिवाय कधी कोठे काही होणे शक्य आहे काय ? जेथे चिद्‌वृत्तिरूप चैतन्यशक्ती कुंडलिनीचा किंवा चितीचा अभाव आहे असे म्हटले जाईल तो देश सिद्ध होऊ शकणार नाही; कारण त्या चैतन्यशक्ती कुंडलिनीच्या अभावाने कोणाला सिद्धी म्हणजे स्वसंवेद्य आत्मस्वरूपरूप परमपदाची प्राप्ती होईल ? यामुळे चिती म्हणजे चैतन्यशक्ती कुंडलिनी हेच परमतत्त्व आहे. ( चितिः परा ) ( यामुळे या तत्त्वाचा किंवा शक्तीचा निषेध होऊ शकत नाही. ) याप्रमाणे सर्व जगताला आपल्यामध्ये सामावून घेणारी किंवा लीन करणारी ही महासत्ता पूर्णरूपाने प्रकाशमान आहे. ज्याप्रमाणे समुद्राशिवाय तरंग व सूर्याशिवाय प्रकाशाची सत्ता असत नाही त्याप्रमाणे या चैतन्यशक्तिशिवाय संसार असत नाही. त्यामुळे सृष्टीपूर्वी महेश्वर हा शुद्धचैतन्ययुक्त असाच होता. त्याच्या-पासूनच चराचर जगत् उत्पन्न झाले; हे जगत् त्याच्यातच स्थित असून शेवटी ते त्याच्यातच लीन होते. शिवापासून उत्पन्न झालेले हे जगत् चैतन्यशक्तिमात्रच आहे; कारण शिव हा एकमात्र चितिशक्ती म्हणजे कुंडलिनीस्वरूप आहे. त्या चितिशक्तीला कोणतेही शरीर, रूप, आकार, देह किंवा विग्रह नाही. अनन्तशक्ती हेच तिचे एकमात्र स्वरूप आहे. ही सर्वसाक्षिणी चितिशक्ती त्रिपुरा आहे. ती परिच्छेदरहित व सर्वांगांनी परिपूर्ण आहे. या लोकात काल व देश हेच परिच्छेद करणारे आहेत असे मानले गेले आहे; कारण देश हा आकारमय व काल हा क्रियामय आहे; परंतु आकार व क्रिया ह्या गोष्टी शुद्ध चैतन्यशक्तीच्या आश्रित असल्यामुळे या दोन्ही गोष्टी चैतन्यशक्तीचा परिच्छेद करू शकत नाहीत. या भूतलावर असा कोणता देश व काल आहे की, ज्यात चैतन्यशक्ती कुंडलिनी नाही ? जेथे चितिशक्ती नाही तेथे देश व काल हे कसे राहतील ? त्यामुळे सत्ता-रूपाने चितीच सर्वकाही आहे. ( श्लोक २३ ते ४८ )

पदार्थांची सत्ता म्हणजे त्यांचे प्रकाशित होणे हेच होय. अन्य काही नाही. चितीलाच प्रकाश असे म्हटले जाते; कारण अचित् म्हणजे जडपदार्थ किंवा जडवर्ग प्रकाशरूप होऊ शकत नाही. प्रकाशच येथे मुख्य आहे; कारण तो

( दुसऱ्या कोणाच्याही साहाय्याशिवाय ) स्वतःच प्रकाशित होतो. ( अग्नी, सूर्य आदि ) जडपदार्थ स्वत: प्रकाशित होणारे नाहीत; कारण ते चैतन्यशक्तीच्या द्वाराच प्रकाशित होत असतात. केवळ चितिशक्ती कुंडलिनीच दुसऱ्या कोणाच्याही अपेक्षेशिवाय स्वत: प्रकाशित होते. जडपदार्थ तर चितिशक्तीच्या अधीन राहून प्रकाशित होतात. अन्य कोणत्याही प्रकारे नाही. त्यामुळे वस्तूची सत्ता याचा अर्थ चैतन्यशक्ती कुंडलिनीचा त्या रूपातील प्रकाश एवढाच आहे. दुसरा काही नाही. ज्याप्रमाणे प्रतिबिंबांची सत्ता आरसा आहे त्याप्रमाणेच चितिशक्ती हीच जगताची सत्ता आहे. त्यामुळे सर्व काही चैतन्यशक्ती किंवा चितीच आहे. जी घट-पटादि म्हणजे पिंडब्रह्मांडादि जगत्‌रचना विशिष्टरूपाने भासते तो त्या शक्तीच्या निर्मलतेचा महिमा आहे." ( श्लोक ४९ते ५४ )

या चैतन्यशक्तीच्या अपरंपार सामर्थ्यामुळेच "त्रिपुरारहस्यात" श्रीदत्ता-त्रेयांनी परशुरामाला शेवटी असे सांगितले आहे की–

**यदस्तीति भाति तत्तु चितिरेव महेश्वरी ।**
**एवं जगच्चिदेकात्मरूपं ते सम्यगीरितम् ॥११.८५॥**

**एवं चितिः सर्वगता सर्वाश्रयतया स्थिता ।**
**सर्वकाले समापूर्णा मनसि व्योमवद् द्विज ॥१६.४४॥**

**तस्मादन्यपरावृत्तिमात्रं मनस इष्यते ।**
**पश्य विप्र चितिः कुत्र कदा नास्त्यवभासिनी ॥१६.४५॥**

जे आहे या रूपाने भासमान होते ते सर्व केवळ महेश्वरी चितिशक्ती कुंडलिनीच आहे. या प्रकारे जगत् व चैतन्यशक्तीच्या एकरूपतेचे सम्यक् विवेचन झाले. चितिशक्तीच सर्वव्यापिका आहे. ती सर्वांच्या आश्रयरूपाने स्थित आहे. हे द्विजा ! ती आकाशाप्रमाणे सर्वकाळी मनाशी समव्याप्त आहे. यासाठी आपल्या साक्षात्काराकरिता केवळ मनाला म्हणजे त्या चैतन्यशक्ती कुंडलिनीला अन्य पदार्थांपासून निवृत्त करून म्हणजे तिचे बहिर्मुख बंद करून तिला अंतर्मुखाने जागृत करण्याची अपेक्षा आहे. हे विप्रवर ! विचार तर कर की, सर्वप्रकाशिनी चैतन्य-शक्ती केव्हा व कोठे नाही ?

"योगवासिष्ठात" चैतन्यशक्तीला चित्स्पंदरूपी शक्ती म्हणून तिचे स्वरूप पुढीलप्रमाणे प्रकट केले आहे. महर्षी वसिष्ठ म्हणतात–

**चित्स्पंदोऽन्तर्जगद्धत्ते कल्पनेव पुरं हृदि ।**
**सैव वा जगदित्येव कल्पनैव यथा पुरम् ॥६.२.८५.४॥**

**पवनस्य यथा स्पंदस्तथैवेच्छा शिवस्य सा ।**
**यथा स्पंदोऽनिलस्यांतः प्रशांतेच्छस्तथा शिवः ॥५॥**

**अमूर्तो मूर्तमाकाशे शब्दाडंबरमानिलः ।**
**यथा स्पंदस्तनोत्येव शिवेच्छा कुरुते जगत् ॥६॥**

ज्याप्रमाणे कल्पनेने आपल्या हृदयात कल्पित नगर निर्माण करावे त्याप्रमाणे ही चित्स्पंदरूपी शक्ती आपल्या ठिकाणी जगत् धारण करते. अथवा कल्पनाच ज्याप्रमाणे कल्पित नगर आहे त्याप्रमाणेच ही शक्ती स्वतः जगत् आहे असे म्हणता येईल. ही शक्ती शिवाची इच्छा आहे व वायूच्या स्पंदनाप्रमाणे शिवाची इच्छा आहे. ज्याप्रमाणे स्पंदनामध्ये केंद्रभागी शांतता असते त्याप्रमाणे या महाशक्तिरूप स्पंदनाच्या केंद्रभागी शांत इच्छेचा शिव असतो. ज्याप्रमाणे वायूचे स्पंदन आकाशात शब्दरूप प्रकट करते त्याप्रमाणे या शिवाची इच्छा अव्यक्त शिवामध्ये जगताला मूर्तरूपाने प्रकट करते.

शक्ती व शिव हे नेहमीच अनन्यभावाने एकरूप होऊन राहतात. ते एकमेकापासून कधी वेगळे असत नाहीत हे सांगताना महर्षी वसिष्ठ "योगवासिष्ठात" म्हणतात–

**यथैकं पवनः स्पंदमेकमौष्ण्यानलौ यथा ।**
**चिन्मात्रं स्पंदशक्तिश्च तथैवेकात्म सर्वदा ॥६(२)८४–३॥**
**चितिशक्तेः क्रियादेव्याः प्रतिस्थानं यदात्मनि ॥६(२)८४–२६॥**
**तथाभूतास्थितेरेव तदेव शिव उच्यते ॥६(२)८४–२७॥**
**अनन्यां तस्य तां विद्धि स्पंदशक्तिं मनोमयीम् ॥६(२)८४–२॥**
**कथमस्तां वद प्राज्ञ मरिचं तिक्ततां विना ॥६(२)८४–७॥**

ज्याप्रमाणे वारा व त्याचे स्पंदन, अग्नी व त्याची उष्णता ही एकच वस्तू आहे त्याप्रमाणे चिन्मात्र शिव व त्याची स्पंदनशक्ती ही नेहमी एकात्म आहेत. क्रियादेवी चितिशक्तीच्या आत तिच्याशी नेहमी एकरूप असणाऱ्या प्रतिस्थानाला शिव म्हणतात. मनोमयी स्पंदशक्ती शिवाहून दुसरी वस्तू नाही. ज्याप्रमाणे तिखटाशिवाय मिरची नसते त्याप्रमाणे शिवाशिवाय शक्ती असत नाही.

शिवरूप प्रतिस्थानाचे दर्शन किंवा स्पर्श केल्याबरोबर शक्तीचे स्पंदन शांत होते व संसाराची गती एकदम थांबते. हे चैतन्यशक्ती कुंडलिनीचे साधनरूप प्रकट करताना महर्षी वसिष्ठ "योगवासिष्ठात" म्हणतात–

**भ्रमति प्रकृतिस्तावत्संसारे भ्रमरूपिणी ।**
**यावन्न पश्यति शिवं नित्यतृप्तमनामयम् ॥६.२.८५.१६॥**
**संविन्मात्रैकधर्मित्वात्काकतालीययोगतः ।**
**संविद्देवशिवं स्पृष्ट्वा तन्मय्येव भवत्यलम् ॥१७॥**
**प्रकृतिः पुरुषं स्पृष्ट्वा प्रकृतित्वं समुज्झति ।**
**तदन्तस्त्वेकतां गत्वा नदीरूपमिवार्णवे ॥१९॥**

**चितिनिर्वाणरूपं यत्प्रकृतेः परमं पदम् ।**
**प्राप्य तत्तामवाप्नोति सरिदब्धाविवाब्धिताम् ।।२६।।**

जोपर्यंत चैतन्यशक्ती कुंडलिनी नित्य, तृप्त व अनामय शिवाला पाहत नाही तोपर्यंत ही भ्रमणशालिनी, स्पंदात्मिका अशी परमेश्वराची चिच्छक्ती प्रकृती संसारात भ्रमण करते. ही शक्ती स्वतः संवित्‌रूप म्हणजे चैतन्यमय ज्ञानरूप असल्याने ज्यावेळी ती अकस्मात् कधीतरी शिवाला स्पर्श करते त्यावेळी ती तत्काळ त्याच्याशी तन्मय होऊन जाते. अशा प्रकारे तन्मय झाल्यावर नदी समुद्राला मिळाल्यावर ज्याप्रमाणे आपले नदीरूप विसरून जाते त्याप्रमाणे शिवाशी एकरूप झाल्यावर ती आपले प्रकृतिस्वरूप विसरून जाते. संवित्‌रूप शिवाशी निर्वाण प्राप्त करणे हीच प्रकृतिरूप चैतन्यशक्ती कुंडलिनीची परमगती आहे. ज्याप्रमाणे नदी समुद्राला मिळाल्यावर त्याच्याशी एकरूप होते त्याप्रमाणे ही चिच्छक्ती शिवप्राप्तीनंतर शिवरूप होते.

सारांश, चिद्‌वृत्ती किंवा चैतन्यशक्ती कुंडलिनीने कल्पना, चित्त, मन, अहंकारादि जीवरूपाने आपल्या आज्ञेच्या जोरावर बहिर्मुखतेने कितीही नटनाच केला तरी ज्यावेळी सद्‌गुरुकृपेने अर्थात् शक्तिपातामुळे ती जागृत होऊन अंतर्मुख होते त्यावेळी "ना तें समुद्रचि होऊन ठेलें । तेवि चित्ताचें चैतन्य जाहालें । जेथ यातायात निमालें । घनानंद जें ।। ८.८५ ।। " हे घडून येतेच येते. सद्‌गुरूंच्या वाक्‌सामर्थ्याने शक्तिपात झाल्याबरोबर वृत्तिरूपी द्वैत गिळून टाकून जीव चिद्‌रूपी शिवस्वरूपाने कसा विसावतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**परी हेचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि ।**
**श्रीगुरुकृपालब्धि– । काळीं पावे ।।१८.९८४।।**
**उदयतांचि दिनकरु । प्रकाशुचि आते आंधारु ।**
**कां दीपसंगें कापुरु । दीपुचि होय ।।९८५।।**
**तया लवणाची कणिका । मिळतखेंवो उदका ।**
**उदकचि होऊनि देखा । ठाके जेवीं ।।९८६।।**
**कां निद्रितु चेवविलिया । स्वप्नेंसि नीद वायां ।**
**जाऊनि आपणपयां । मिळे जैसा ।।९८७।।**
**तैसें जया कोण्हासि दैवें । गुरुवाक्यश्रवणाचि सवें ।**
**द्वैत गिळोनि विसंवे । आपणया वृत्ती ।।९८८।।**

शक्तिपाताने जागृत होणाऱ्या कुंडलिनीरूपी चिद्‌वृत्ती किंवा चैतन्यशक्तीचे स्वरूप यापेक्षा अधिक मार्मिकतेने कोण वर्णन करू शकेल ?

येथपर्यंत केलेल्या सर्व विवेचनावरून भिन्न भिन्न नावांनी कुंडलिनी शक्तीचे स्वरूप ज्ञानेश्वरीत कसे अवतरीत झाले आहे हे स्पष्ट होईल. "म्हणे ऐसा नाहीं

देखिला । धसाळ कोणी ।। ११.६०९ ।। " कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोषु न घेसी । मा भेणें काय नेणों बोलसी । हेकाडु ऐसा ।। ६१० ।। " अशी अर्जुनाप्रमाणे स्थिती होऊ न देता ज्ञानेश्वरीतील या कुंडलिनी शक्तीच्या स्वरूपाचा आस्वाद घ्यावा, म्हणजे ही श्रीआद्याशक्ती वेदप्रतिपाद्या, स्वसंवेद्या व आत्मरूपा कशी आहे याची प्रत्यक्षानुभूती येऊन जीवन कृतार्थ, धन्य व तृप्त होईल. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे ज्ञानरूपी कुंडलिनी शक्तीचे ईश्वर असल्याने त्यांनी स्वमुखानेच आपल्या अनंत व अनादि अशा आत्मसत्तारूप चिच्छक्तीचा भावार्थ साधनात्मक रीतीने अर्थात् जीवाला शिवस्वरूप किंवा आत्मरूप करण्याच्या दृष्टीने स्पष्ट केला, ही त्यांनी आपणा सर्वांवर माउलीच्या मायेने केलेली अपरंपार कृपा आहे. महायोगी श्रीगुळवणीमहाराजांसारखे शक्तिपातयोगविद्यासम्राट् व स्वानंदसाम्राज्याचे चक्रवर्ती राजे असलेले महान् सद्गुरू मला लाभले म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केलेले चिच्छक्तीचे स्वरूप मला आकलन करता आले. येथपर्यंत केलेल्या विवेचनामुळे शब्दशक्तिसामर्थ्याने माझ्या सद्भावाच्या अंजुलीतील कुंडलिनीशक्तिनिर्देशित फुले उन्मिलित स्वरूपात व्यक्त झाल्यामुळे, ती त्याच स्वरूपात त्यांच्या चरणी अर्पण करताना मला आनंद होत आहे. हे सर्व त्यांच्या कृपेचे म्हणजे त्यांनी शक्तिपातयोगदीक्षा देऊन जागृत शक्तीच्या रूपाने अखंड अंतरात विराजमान होऊन गुरुरूपाने केलेल्या मार्गदर्शनाचे फल आहे.

# प्रकरण आठवे

# ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची शास्त्रीय प्रक्रिया

## प्रास्ताविक :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तैसा आत्मदर्शनीं आडळु । असे अविद्येचा जो मळु। तो शास्त्र नाशी येरु निर्मळु । मी प्रकाशें स्वयें ॥ १८.१२३२ ॥ " असे म्हणून आत्मदर्शनाच्या आड येणारा प्रतिबंधक असा अविद्येचा मळ सिद्धयोगाचे शास्त्र नाहीसा करते व निर्मळ आत्मरूप स्वत:सिद्धपणे प्रकाशित होते हे सांगून सिद्धयोग हे आत्मदर्शन करविणारे परंपराप्राप्त असे महान् दर्शन म्हणजे शास्त्र आहे असा सिद्धांत प्रस्थापित केला आहे. ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या शास्त्रीय प्रक्रियेचा चिकित्सक दृष्टीने सांगोपांग विचार केला म्हणजे उपरोक्त सिद्धांताच्या सर्व कक्षा स्पष्ट होतील. सिद्धयोग हे शास्त्र किंवा दर्शन आहे, याचा विचार आपण पहिल्या व दुसऱ्या प्रकरणात विषयानुरोधाने केला आहे. या प्रकरणात त्याचा अधिक सूक्ष्म विचार करावयाचा आहे.

ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाचे शास्त्र हे गुरुकृपा म्हणजे शक्तिपात, त्यामुळे जागृत होणारी कुंडलिनी शक्ती, जागृत शक्तीकडून स्वत: घडणारे साधन व स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती या चार अंगांनी व विभागांनी सिद्ध झाले आहे. गुरुकृपेचा महिमा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी, सर्व संतांनी व इतर अनेक शास्त्रकारांनी अगदी मुक्तकंठाने गाइला आहे. परंतु गुरुकृपा होते म्हणजे नेमके काय होते ?, गुरुकृपेचा अर्थ काय आहे ?, गुरुकृपेचा हेतू कोणता असतो ? व गुरुकृपा केव्हा व कशी होते ? या प्रश्नांचा सांगोपांग विचार केल्याशिवाय ज्ञानेश्वरीतील सिद्ध-योगाच्या शास्त्रीय प्रक्रियेचा उलगडा होणार नाही. त्याचप्रमाणे सिद्धयोग साधनाचे स्थान, साधनाचे आसन, साधनाला बसण्याची पद्धत, साधनातील क्रिया, अनुभव व त्यांची वैशिष्ट्ये पाहिल्याशिवाय सिद्धयोगसाधन कसे चालते किंवा साधनप्रक्रिया कशी घडते हे लक्षात येणार नाही. कुंडलिनी शक्तीचा विचार मागील सातव्या प्रकरणात सविस्तरपणे केला आहे व स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या फलप्राप्तीचा विचार अकराव्या प्रकरणात होणार असल्यामुळे त्या अंगाचा विचार या प्रकरणात करण्याचे कारण नाही. मात्र विषयानुरोधाने अंशात्मक पद्धतीने त्यांची जेवढी चर्चा आवश्यक आहे ती या प्रकरणात येईलच.

सिद्धयोगसाधनाचा विचार वरील चार अंगांनी करावयाचा असल्यामुळे या शास्त्राचे महत्त्व किंवा अपूर्वत्व स्वत:सिद्धपणेच ध्यानात येईल. या शास्त्राची

अंगं चार असली तरी क्षेत्रक्षेत्रज्ञ, जडचेतन, प्रकृतिपुरुष, नित्यानित्य किंवा बंधमोक्ष यांच्या भेदप्रक्रियेत या शास्त्राचे निरक्षीरविवेकी हंसस्वरूप साठविलेले आहे. या शास्त्राच्या भेदप्रक्रियेमुळेच जीवाला स्वस्वरूपाची प्राप्त होते. "श्रीमद्भागवतात" या शास्त्राचे हे महत्त्व स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

ऐश्वरं शास्त्रमुत्सृज्य बंधमोक्षानुदर्शनम् ।
विविक्तपदमज्ञाय किमसत्कर्मभिर्भवेत् ।।६.५.१८।।

भगवंताचे स्वरूप सांगणारे किंवा प्राप्त करून देणारे शास्त्र हे हंसाप्रमाणे नीर-क्षीर-विवेकी आहे. ते बंध व मोक्ष अर्थात् चेतन व जड वेगळे वेगळे करून दाखविते. अशा अध्यात्मशास्त्ररूपी हंसाचा आश्रय सोडून परमात्म्याला न जाणता किंवा स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती करून न घेता बहिर्मुख करणाऱ्या कर्मांपासून काय फायदा आहे ?

यासाठी साधनशास्त्राची कास पकडणे आवश्यक ठरते. " कल्याण मासिकाच्या साधना विशेषांकात " " साधना " या लेखात श्री. श्रीकृष्णशंकर उमियाशंकर म्हणतात, " one who runs can reach," जो दौडता है वह पहुँच सकता है। हमें कुछ करना तो है नहीं । फिर, " शास्त्रोंमें सब गपोडे भरे हैं " यों कहनेसे कोई भी काम सिद्ध नहीं होगा । साधनाका शास्त्र वरदान या शापका शास्त्र नहीं है । यह तो कर और देखका शास्त्र है। " ( पृ. २७९ ) याच " कल्याण मासिकाच्या साधना विशेषांकात " श्री. चंद्रदीप त्रिपाठी यांनी " The Yoga of Divine woiks " मधील योगी श्रीअरविंदांच्या एका लेखाचे भाषांतर " साधनाके चार सहायक " या नावाखाली दिले आहे. त्या लेखात सिद्धयोगशास्त्रांतर्गत दिव्यस्पर्शाची, गुरूची, शक्तिपाताची व त्यामुळे पूर्ण होणाऱ्या योगाची किंवा सिद्धीची माहिती देऊन शास्त्र एका विशेष मर्यादेपर्यंतच साधकाला मदत करते; कारण सिद्धयोग किंवा पूर्णयोगाचे साधन प्रत्येक साधकाच्या कर्म-गतिप्रमाणे भिन्नभिन्न प्रकारे होत असते व अंतरात्मा हा शब्दब्रह्माच्या पलीकडे असल्यामुळे शब्दब्रह्मात्मक शास्त्रे शेवटी कशी मागे राहतात हे सांगताना ते म्हणतात, " ऐसे चार ( शास्त्र, उत्साह, गुरु और काल ) महान् सहायक हैं, जिनके एक साथ मिलकर कार्य करनेसे मनुष्य बहुत शीघ्र योगसिद्धी, योगसाधनासे प्राप्त होनेवाली पूर्णता, प्राप्त करता है । उनमें पहला है शास्त्र– उन सत्यों, सिद्धांतों, शक्तियों और प्रक्रियाओंका ज्ञान, जो सिद्धिके लिये अत्यावश्यक है । ... हमारे पूर्णयोगका श्रेष्ठतम शास्त्र है सनातन वेद, जो प्रत्येक मनुष्यके हृदयमें गुप्तरूपसे विद्यमान है । उस सनातन ज्ञान और सनातन पूर्णत्वका कमल हमारे अंदर बंद, संकुचित कलीके रूपमें वर्तमान है । जब एक बार मनुष्यका मन सनातन प्रभुकी ओर देखना आरंभ कर देता है, जब उसका हृदय ससीम रूपोंके मोहपाशसे एकदम मुक्त होकर एक बार चाहे किसी मात्रामें असीम भगवान्‌की

ओर आकर्षित हो जाता है, तब क्रमशः होनेवाली अनुभूतियोंके द्वारा यह ज्ञान-कमल शीघ्रतासे या धीरे-धीरे, एक-एक दल करके, विकसित हो जाता है। उसके बाद सारा जीवन, सारे विचार, सारी वृत्तियोंके कार्य, सारे अनुभव– चाहे वे निष्क्रिय हों या सक्रिय– सब के सब, ऐसे प्रहार बन जाते हैं जो अंतरात्माके आच्छादनको भंग करते हैं और उसके अनिवार्य विकासके मार्गकी बाधाओंके दूर कर देते हैं। जो 'अनंत' को वरण करता है, वह अनंतके द्वारा वरण किया जा चुका है। उसने भगवान्‌का दिव्य स्पर्श अवश्य प्राप्त किया है; क्योंकि उसके बिना आत्मा कभी जाग्रत् नहीं हो सकता, कभी भगवान्‌की ओर उन्मुख नहीं हो सकता। और जब एक बार यह स्पर्श प्राप्त हो गया, तब सिद्धि निश्चित है– फिर चाहे वह एकही मनुष्यजीवनमें शीघ्रतासे प्राप्त हो या उसके लिये इस दृश्यमान जगतमें अनेक जन्मोंतक धैर्यपूर्वक प्रयत्न करना पडे।

ऐसा कोई ज्ञान किसीकी बुद्धिको नहीं सिखाया जा सकता, जो उसके विकासोन्मुख अंतरात्माके अंदर पहलेसेही गुह्यरूपमें विद्यमान न हो। उसी प्रकार मनुष्य अपने बाह्य भावसे जो-जो सिद्धिलाभ करनेमें समर्थ होता है, वह सब आत्माके अंदर विद्यमान सनातन पूर्णताकीही उपलब्धि मात्र है। हम भगवान्‌को जानते और भगवान् हो जाते हैं, क्योंकि हम अपने मूलस्वरूपमें वही हैं। जो कुछ शिक्षा हम प्राप्त करते हैं, वह सब हमारे अंदर गुप्तरूपसे विद्यमान ज्ञानकाही प्रकाशित होना है; हम जो कुछ होते हैं, अपने गुप्त स्वरूपकोही व्यक्त करते हैं। आत्मोपलब्धिही रहस्यकी वस्तु है, आत्मज्ञान और विकसनशील चेतना उसके साधन और साधनक्रम हैं।

साधारणतः इस आत्मप्रकाशका साधन श्रुत शब्द होता है, जिसे शब्दब्रह्म कहते हैं। यह शब्द अंदरसे आ सकता है अथवा बाहरसेभी। परंतु दोनोंही अवस्थाओंमें वह केवल हमारे अंतःस्थित गुप्त ज्ञानको जगाने, क्रियाशील बनानेका कारण-मात्र होता है। अंदरसे आनेवाला शब्द अंतस्थित अंतरात्माका हो सकता है, जो सदा भगवान्‌की ओर उन्मुख रहता है, अथवा यह सबके हृदयमें गुप्तरूपसे रहनेवाले जगद्‌गुरु जगदीश्वरका हो सकता है। विरलेही कोई पुरुष ऐसे होते हैं, जिन्हें इसके अतिरिक्त और किसी सहायकका प्रयोजन नहीं होता। क्योंकि इसके बाद योगमें जो कुछ करना बाकी रह जाता है वह उस अनवरत स्पर्श और पथप्रदर्शनके द्वारा आत्मोद्घाटन करताही है; हृत्कमलमें निवास करनेवाले प्रभुके समुज्ज्वल प्रकाशकी शक्तिसेही तब ज्ञानरूपी कमल स्वयं भीतरसे उद्घाटित होता है। ऐसे लोग निश्चयही महान् परंतु दुर्लभ होते हैं, जिनके लिये इस प्रकार भीतरसे प्राप्त होनेवाला अमर ज्ञानही पर्याप्त होता है, और किसी लिखित ग्रंथ या जीवित गुरुके प्रबल प्रभावकी अधीनतामें रहनेकी आवश्यकता नहीं होती।

साधारण तौरपर साधकको आत्मविकासके कार्यमें बाहरसे प्राप्त होनेवाले भगवत्प्रतिनिधिस्वरूप शब्दसे सहायता लेनेकी आवश्यकता होती ही है और यह या तो कोई पुराकालीन शब्द होता है अथवा वर्तमानकालीन किसी जीवित गुरुका उससेभी अधिक शक्तिशाली शब्द। कुछ साधकोंके लिये वह प्रतिनिधिक शब्द उनकी अंतःशक्तिको जगाने और व्यक्त करनेका केवल एक निमित्त हुआ करता है; एक प्रकारसे यह सर्वशक्तिान् और सर्वज्ञ प्रभुका प्रकृतिके एक सामान्य नियमकी मर्यादाको रखने-जैसाही है। उपनिषदोंमें देवकीपुत्र श्रीकृष्णके विषयमें यह वर्णन आता है कि उन्हें घोर ऋषिसे शब्द प्राप्त हुआ और उससे उन्हें ज्ञान हो गया। इसी प्रकार परमहंस श्रीरामकृष्णने स्वयं अपनी आंतरिक चेष्टासे केंद्रस्थ ज्ञानका प्रकाश पानेके बाद विभिन्न योगमार्गोंकी साधना करनेके लिये विभिन्न गुरुओंसे दीक्षा ली; परंतु इन विभिन्न मार्गोंसे उन्हें जिस प्रकार और जिस शीघ्र-तासे सिद्धि मिलती गयी, उससे यही तो बराबर प्रकट होता था कि उनका गुरुसे दीक्षा लेना केवल उस सामान्य नियमकी मर्यादाका पालनमात्र था जो शिष्यके लिये गुरुसेही सिद्धज्ञान प्राप्त करनेका नियम है।

परंतु सामान्यतः साधकके जीवनमें इस प्रातिनिधिक प्रभावका कार्य बहुत अधिक है। यदि कोई किसी लिखित शास्त्रके अनुसार– पूर्वके योगियोंका अनुभव बतलानेवाले वचनोंके अनुसार– योगसाधन करना चाहता है, तो वह केवल अपनेही प्रयासके बलपर या गुरुसे सहायता लेकर ऐसा कर सकता है। इस हालतमें वह उस ग्रंथके वचनोंका मनन निधिध्यासन करके आध्यात्मिक ज्ञानलाभ कर सकता है और उस ज्ञानको अपनी अपरोक्षानुभूतिसे सजीव और चिन्मय बना सकता है; योगका क्रम इसमें यही है कि शास्त्रसे या परंपरासे जो प्रक्रिया प्राप्त हुई, उसी प्रक्रियाको करके उसका अनुभव प्राप्त करना और इस तरह आगे बढना। योगाभ्यासकी यह पद्धति अवश्यही कुछ तंग सी है पर है अपनी मर्यादाके अंदर बहुत निरापद और फलप्रद; क्योंकि इसमें एक पक्की सडकसे अपने जाने समझे हुए लक्ष्यकी ओर सीधे चले जाना है।

परंतु पूर्ण योगके साधकको यह स्मरण रखना होगा कि कोई भी लिखित शास्त्र– चाहे उसका प्रामाण्य कितनाही बडा और विचार कितनाही उदार क्यों न हो–सनातन ज्ञानके प्रकाशका केवल एक अंशमात्र है। जो शास्त्र-ग्रंथ गंभीर, विशाल और उदार होगा, उसका परम कल्याणकारी और अत्यंत महत्वपूर्ण प्रभाव उसपर पड सकता है। सत्यके उच्चातिउच्च विविध रूपोंका प्रकाश पाने और परमानु-भूतियोंको प्राप्त करनेमें शास्त्रका यह प्रभाव उसके अनुभवका संगी होकर रह सकता है। उसका योग-साधन किसी एक शास्त्र-ग्रंथके द्वारा अथवा बारी-बारीसे अनेक शास्त्र ग्रंथोंके द्वारा नियत हो सकता है। अथवा उसकी साधनाका यह एक

उत्तम अंग हो सकता है कि वह उसमें अनेक सद्ग्रंथोंके सार-तत्त्वोंका विविध समृद्ध अनुभव सम्मिलित कर ले और पुराकालके सर्वोत्तम भागसे भविष्यको सुसमृद्ध बना दे। परंतु अंतमें, और हो सके तो अधिक अच्छा यहीं है कि सदाही तथा आरंभसेही उसे स्थित होना चाहिये अपने अंतरात्मामेंही, जो शब्दब्रह्मातिवर्तते-शब्दब्रह्मके परे है। कारण पूर्ण योगका साधक किसी ग्रंथका या अनेक ग्रंथोंका साधक नहीं है, वह अनंतका साधक है।

प्रत्येक योगमार्गका ऐसा एक अपना शास्त्र होता है, चाहे वह लिखित हो या गुरुपरंपरा या गुरुमुखसेही प्राप्त होता रहता हो। योगका प्रत्येक मार्ग इस प्रकार, यहाँ भारतवर्षमें सुनिश्चित माना जाता है और जिन गुरुने परंपरासे उसका शास्त्र पाकर साधनासे उसे अनुभवसिद्ध किया है, वे अपने शिष्योंको उसी पुरातन मार्गसे ले चलते हैं।

इसी प्रकार यहाँ यह कहा जा सकता है कि यह पूर्ण योग तभी अपनी पूर्णताको प्राप्त होगा, जब प्रत्येक मनुष्य अपने विशिष्ट योग मार्गका अनुसरण करने में समर्थ होगा अर्थात् अपनी प्रकृतिकी ऊर्ध्वगतिका अनुगमन करकेही उसकी तरफ जायगा, जो प्रकृतिके परे है। कारण, स्वतंत्रताही परम विधि और परम गति है। परंतु जबतक मनुष्य उस योग्य नहीं हो लेता, तबतक कुछ ऐसी मोटी मोटी बाते बतला देना जरूरी हैं, जो साधककी विचारधारा और साधनाका सम्यक् नियमन करनेमें सहायक हों। परंतु ये बातें भी, जहाँतक संभव हो, सामान्य सिद्धांतोंके रूपमें, तत्त्वोंके एक सामान्य विवरणके रूपमें, प्रयत्न और प्रगतिके अत्यंत शक्तिशाली और व्यापक निर्देशोंके रूपमेंही होनी चाहिये। शास्त्रमात्र भूतकालके अनुभवका फल और भविष्यकालके अनुभवका सहायक है। इससे सहायता मिलती और अंशतः पथप्रदर्शनभी होता है। मार्गमें यह मार्गदर्शक चिन्ह खडे करता और प्रधान –प्रधान मार्गों और जानी हुई दिशाओंके नाम बतला देता है, जिससे साधकको यह पता चलता है कि वह किस ओर और किस मार्गसे जा रहा है।

इसके सिवा और जो कुछ है, वह साधकके अपने प्रयत्न और अनुभवपर तथा मार्ग बतलानेवालेकी शक्तिपर निर्भर करता है।"

योगी श्रीअरविंदांनी कथन केलेली सिद्धयोगशास्त्राची किंवा पूर्णयोगाची अपरिहार्यताच "शिवसंहितेत" भगवान् श्रीशंकरांनी पुढील शब्दात व्यक्त केली आहे. ते म्हणतात—

आलोक्य सर्वशास्त्राणि विचार्य च पुनः पुनः।
इदमेकं सुनिष्पन्नं योगशास्त्रं परं मतम् ॥१.१७॥
यस्मिन् ज्ञाते सर्वमिदं ज्ञातं भवति निश्चितम्।
तस्मिन् परिश्रमः कार्यः किमन्यत् शास्त्रभाषितम् ॥१८॥

सर्व शास्त्रे पाहिल्यावर व पुन:पुन्हा विचार केल्यावर हे निश्चित होते की, योगशास्त्र म्हणजे सिद्धयोगसाधनशास्त्र हेच सर्व शास्त्रात उत्तम व सर्वात श्रेष्ठ शास्त्र आहे; कारण सिद्धयोगसाधनशास्त्राच्या आचरणाने ज्ञानलाभ झाल्याने सर्व जगताचे निश्चित ज्ञान होते. यासाठी या सिद्धयोगशास्त्राने कथन केलेले साधन परिश्रमपूर्वक करणे हेच उचित आहे. अन्य शास्त्राच्या अध्ययनाचे प्रयोजनच काय आहे ?

अर्थात् सिद्धयोगशास्त्राचे साधन "आम्हीं साधन हें जें सांगितलें। तेंचि शरीरीं जिहीं केलें ॥६.३२६॥" व "इये अभ्यासीं जे दृढ होती। ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती ॥६.३३॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे अभ्यासयुक्त किंवा क्रियायुक्त आहे, हे नितांत सत्य आहे. शास्त्राच्या वाचनाने तप होईल, साधन होणार नाही. यामुळेच "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की–

क्रियायुक्तस्य सिद्धिः स्यादक्रियस्य कथं भवेत् ।
न शास्त्रपाठमात्रेण योगसिद्धिः प्रजायते ॥१.६५॥
न वेषधारणं सिद्धेः कारणं न च तत्कथा ।
क्रियैव कारणं सिद्धेः सत्यमेतन्न संशयः ॥६६॥

गुरूने सांगितलेली क्रिया, अनुष्ठान किंवा साधन केल्यानेच साधकाला योगसिद्धी मिळते. जो साधक साधनक्रियेत रत असत नाही त्याला सिद्धी कशी मिळेल? नुसते योगशास्त्र शिकल्याने किंवा वाचल्याने साधकाला सिद्धी मिळत नाही. योग्याचा वेष म्हणजे भगवी वस्त्रे इत्यादि घातल्यानं सिद्धी मिळत नाही व योगाची कथा, विवेचन, व्याख्याने इत्यादींमुळेही कोणी योगी होऊ शकत नाही. क्रिया म्हणजे साधन हेच सिद्धीचे अर्थात् शिवशक्तीच्या ऐक्याचे मूळ आहे. गुरूने सांगितल्याप्रमाणे साधन करणे यातच योगसिद्धी आहे, हे नि:संशय होय. या दृष्टीनेच महायोगी गोरक्षनाथांनी "गोरक्षसिद्धांतसंग्रहात" सिद्धयोगसाधनशास्त्राची श्रेष्ठता, आवश्यकता, तौलनिक मोठेपणा व अपरिहार्यता इतर अनेक ग्रंथातील प्रमाणवचनांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केली आहे. ते म्हणतात, "विवेकमार्तंड ग्रंथामध्येही असे म्हटले आहे की, योगशास्त्राचाच नित्य अभ्यास केला पाहिजे. अन्य इतर विस्तृत शास्त्रांच्या अभ्यासाने कोणताही लाभ होणे शक्य नाही; कारण योगशास्त्र हे प्रत्यक्ष आदिनाथांच्या मुखकमलातून प्रकट झाले आहे. ध्यानबिंदूपनिषदात सुद्धा असे म्हटले आहे की, जरी पर्वताप्रमाणे अनेक योजनेपर्यंत विस्तार पावलेले पाप असले तरी ते ध्यानयोगानेच नष्ट होऊ शकते. पाप नष्ट करण्यासाठी अन्य दुसरा कोणताही उपाय नाही. वर्णाश्रमांच्या अभिमानाने भारलेला पुरुष श्रुतीचा दास आहे. अर्थात् तो वेदाच्या बंधनाने बांधलेला आहे. ज्याचा वर्णाश्रमाचा अभिमान सुटून जातो तो श्रुतीचा स्वामी होतो. सर्व शास्त्रे व जप होमादि सर्व कर्मे सोडून देऊन धर्माधर्मरहित होऊन

योगी साधकानें योगाचा अभ्यास करावा. वेदाच्या पुस्तकांना वेद म्हणत नाहीत; तर ज्या प्रक्रियेमुळे परमात्म्याचा साक्षात्कार प्रत्यक्ष प्राप्त होतो किंवा प्राप्त करून दिला जातो, त्या साधनशास्त्राच्या ज्ञानाला वेद म्हणतात. वर्णाश्रमधर्ममध्ये संध्येचे विधान सांगितलेले आहे; परंतु त्याच्यामुळे वास्तविक कोणत्या वस्तूची प्राप्ती होते हे योगी सांगतात. संध्येला संधी म्हणता येणार नाही; परतु संधीला मात्र संध्या म्हणतात. ज्यावेळी सुषुम्नेमध्ये प्राण जातो म्हणजे प्राणरूप कुंडलिनी शक्तीचे चालन होते तेव्हा त्याला यथार्थ संधी म्हणतात व त्यालाच खरी संध्याही म्हणतात. विवेकमार्तंड ग्रंथामध्येही असे म्हटले आहे की, वेदरूपी कल्पवृक्षाच्या नानाविध शाखांचे किंवा शास्त्रांचे अध्ययन द्विज आयुष्यभर करतात. त्या वेदाचेच, योग हे संसाराचे सर्व दु:ख नाहीसे करणारे फल आहे. यासाठी बुद्धिमान व शहाण्या सज्जन साधकांनी या सिद्धयोगशास्त्ररूप फलाचेच सेवन करावे. (पृ. ४) काही शास्त्रे मोक्षरक्षक व काही व्यवहाररक्षक आहेत. त्यामध्ये सिद्धयोगसाधनशास्त्र हे मोक्षरक्षक आहे. श्रुतिस्मृती इत्यादि शास्त्रे ही व्यवहाररक्षक आहेत. एक कोट माणसात मुमुक्षू पुरुष दोन तीनच असतात. मात्र इतर सर्व लोक व्यवहाररक्षक असतात. यासाठी व्यवहाररक्षण व्हावे म्हणून विधिवाक्ययुक्त शास्त्रे खूप आहेत; कारण संसारामध्ये व्यवहारी लोकच अधिक आहेत. सिद्धयोगसाधनशास्त्र अत्यंत सूक्ष्म आहे. हे शास्त्र व त्याची प्रक्रिया समजणारे मुमुक्षू पुरुष या भूतलावर फारच थोडे असतात. वेदादि शास्त्रांमध्ये योग अवश्य अंतर्निहित असतो; कारण सर्व शास्त्रांचे तात्पर्य योगातच होत असते. असे असले तरी प्रत्येक शास्त्राच्या रीतीमध्ये भेद असतो. समुद्रामध्ये रत्न, शंख, दगडाचे तुकडे, पाणी, जलजंतू इत्यादि पुष्कळशा वस्तू असतात. याप्रमाणेच वेदादि शास्त्रामध्ये योग आदि सर्व गोष्टी आहेत. समुद्रामध्ये इतर सर्व वस्तू अत्यंत सहजतेने प्राप्त होतात; परंतु रत्न मात्र मोठ्या कष्टाने मिळते. त्याचप्रमाणे वेदादि शास्त्रामध्ये व्यवहार वगैरे अगदी सहजतेने प्राप्त होतो. रत्नांच्या खाणीमध्ये अत्यंत श्रेष्ठ रत्न प्राप्त होणे हा मोठा योग आहे. त्याचप्रमाणे योगशाखांमध्ये सिद्धयोगाची प्राप्ती होणे हा श्रेष्ठ योग आहे. अन्य असार वस्तूंची प्राप्ती होणे हा काही योगाचा हेतू नाही. गुरूची थोडीही कृपा झाली तरी अत्यंत अल्प परिश्रमात या सिद्धयोगाची प्राप्ती होते. यासाठी इतर सर्व गोष्टी सोडून देऊन सिद्धयोगशास्त्राचाच अभ्यास केला पाहिजे."(पृ. १६)

उपरोक्त विचारांच्या दृष्टीनेच श्रीवसुगुप्तांनी "स्पंदशास्त्रात" असे म्हटले आहे की–

गुणादिस्पंदनिष्यंदा: सामान्यस्पंदसंश्रयात् ।
लब्धात्मलाभा: सततं स्युर्ज्ञस्यापरिपंथिन: ।।२.३।।

या कारिकेवर भाष्य करताना श्रीभट्ट कल्लटांनी असे म्हटले आहे की,

"परमेश्वराशी अभिन्न असणाऱ्या पराशक्तीला श्रेष्ठ असे शास्त्र-तत्त्व म्हणतात. या पराशक्तीचे तत्त्व सामान्य व विशेष या दोन प्रकारचे कसे आहे व त्याच्यातील सारासार किंवा ग्राह्याग्राह्य विभाग कोणते आहेत याचा विवेक करण्यास प्रबुद्ध साधक समर्थ असतो. दरएक वेळेला जेथे दुसरा पदार्थ दिसतो तेथे मीच आहे व माझ्या बाजूने द्वैताचा लय व्हावयाचा आहे अशा रीतीच्या विवेकामुळे प्रत्येक ठिकाणच्या आपल्या आत्मसत्तेच्या जागृतीला सामान्य स्पंद असे म्हणतात. सर्व पदार्थ आत्मस्वरूप असताना मी देहच आत्मा आहे अशी भावना होते. त्यामुळे मायेने निर्माण केलेले परस्पर भिन्न असे अनेक ज्ञानाचे विषय होतात. त्यामुळे मी सुखी व मी दुःखी इत्यादि त्रिगुणांनी निर्माण केलेले सुखदुःखाचे अनुभव जीवाला येतात. या सुखदुःखाचा सतत चालणारा प्रवाह हाच संसाराला टाकण्यास किंवा त्याचा त्याग करावा असे वाटण्यास कारण आहे. म्हणून देहाच्या ठिकाणी आत्मभावना उत्पन्न होण्याकरिता सतत सर्व अवस्थांमध्ये वरच्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे प्रत्येक ठिकाणी आत्म्याची जागृती ठेवून आत्मबल वाढविण्याचा निश्चय करावा.

सत्त्व, रज, तम हे तीन गुण व महान् अहंकार इत्यादींचे जे स्पंद आहेत ते सुख, दुःख, मोह आदींचे तरंग असून त्याचेच निष्यंद अर्थात् प्रवाह आहेत. ते सामान्य स्पंदाच्या अंतर्लीन होऊन अनंत विषयांचे आलंबन प्राप्त करूनच सत्तावान् होतात. त्यामुळे तत्त्वज्ञ योग्याच्या स्वरूपामध्ये उपरोक्त गोष्टींमुळे कोणतेही व्यवधान उपस्थित होत नाही. त्या गोष्टी योग्याच्या विरोधी नसून, तो त्याच्या स्वरूपाचाच विलास असतो. ज्याप्रमाणे फुलाचा रस त्याच्या स्वभावाला-आकाराला झाकणारा किंवा आच्छादन करणारा असत नाही त्याचप्रमाणे स्पंदांचे प्रवाह कमळाच्या मकरंदासारखे असतात. एका सिद्धाचे असे वचन आहे की, "प्रकाशाच्या महालात प्रकाश्य वस्तू दिसत नाही. अनंत संविदामध्ये संवेद्यही संविद्रूपच असते." "मतंग पारमेश्वर" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "शिवापासून (सहस्रारापासून) पृथ्वीपर्यंत (मूलाधारापर्यंत) हा जो विस्तीर्ण मार्ग (सुषुम्ना पथ-मार्ग) आहे, तो चिद्वस्तूनेच (कुंडलिनी शक्तीनेच) सिद्ध होतो व त्या शक्तीमुळेच जाणला जातो. गीतेमध्ये मायेला "दैवी" म्हणण्याचा अभिप्राय हाच आहे."

येथपर्यंतच्या विचारानुरोधाने ज्ञानेश्वरील सिद्धयोगाच्या शास्त्रीय प्रक्रियेचा सांगोपांग विचार यापुढे प्रस्तुत केला आहे.

## सिद्धयोग हे शास्त्र आहे:—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "एवं वेदाचें मूळसूत्र । सर्वाधिकारैकपवित्र । श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें ॥ १८.१४२६ ॥" असे म्हणून जगातील सर्व

ज्ञा....४५

आबालवृद्ध स्त्री-पुरुषांना कुल, गोत्र, वर्ण व जात यांचे बंधन नसलेले म्हणजे सर्वांना अधिकार असलेले एकमेव पवित्र असे किंवा सर्वांना पवित्र करणारे असे साधन, वेदाचे मूळसूत्र म्हणून श्रीकृष्णांनी गीताशास्त्र किंवा सिद्धयोगसाधनशास्त्र प्रकट केले असे सांगितले आहे. सिद्धयोगसाधन सर्वांना खुले असल्यामुळे व या साधनाशास्त्रात पात्रापात्रेचा विचार नसल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "सर्वाधिकारैकपवित्र" या विशेषणाने या शास्त्राचा गौरव केला आहे. सहाव्या अध्यायात पंथराज या नावाने हे सिद्धयोगाचे साधनशास्त्र सांगितल्यावर त्यावेळी अर्जुनाने "हां हो जी अवधारिलें। जें हें साधन तुम्हीं निरुपिलें। तें आवडतयाहि अभ्यासिलें। फावों शके ? ॥ ६.३३७ ॥ कीं योग्यतेवीण नाहीं। ऐसें हन आहे कांही ? ॥ ३३८ ॥" असा प्रश्न श्रीकृष्णांना विचारल्यावर "तरी तैसी एथ कांहीं। सावियाची केणी नाहीं। आणि योग्यतेची काई। खाणी असे ? ॥ ६.३४१ ॥" असेच प्रश्नात्मक उत्तर अर्जुनाला देऊन सिद्धयोगसाधन सर्वांना खुले असल्याचा निर्वाळा त्यांनी दिला आहे. "हठयोगप्रदीपिकेतही" या दृष्टीने असे म्हटले आहे की–

युवा वृद्धोऽतिवृद्धो वा व्याधितो दुर्बलोऽपि वा।
अभ्यासात्सिद्धिमाप्नोति सर्वयोगेष्वतंद्रितः ॥१.६४॥

साधक तरुण, वृद्ध, अतिवृद्ध, व्याधिग्रस्त किंवा दुर्बल असला तरी सिद्धयोगाच्या अभ्यासाने तो समाधीचे फल प्राप्त करतो. याचा अर्थ असा की, वयाची, जातीची, कुलाची, गोत्राची किंवा वर्णाची कोणतीही अट या सिद्धयोगसाधनशास्त्राला नाही. "मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ ९.३२ ॥" असा जो निर्वाळा भगवंतांनी गीतेत दिला आहे तो या सिद्धयोगसाधनशास्त्राच्या महतीचाच डंका आहे हे निःसंशय आहे. यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

म्हणौनि कुळ जाती वर्ण। हें आघवेंचि गा अकारण।
एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक ॥९.४५६॥
तेंचि भलतेणें भावें। मन मज आंतु येतें होआवें।
आलें तरी आघवें। मागील वावो ॥४५७॥
जैसें तंवची वहाळ वोहळ। जंव न पवती गंगाजळ।
मग होऊनि ठाकती केवळ। गंगारूप ॥४५८॥
कां खैर चंदन काष्ठें। हे विवंचना तंवचि घटे।
जंव न घापती एकवटे। अग्नीमाजीं ॥४५९॥
तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया। कां शूद्र अंत्यजादि यया।
जाति तंवचि वेगळालिया। जंव न पवती मातें ॥४६०॥

असे हे सर्वांना परमात्मप्राप्तीचा मार्ग उघडा करणारे साधनशास्त्रच वेदाचे

मूळ सूत्र असल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. एवढेच नव्हे तर " वेदु संपन्नु होय ठाईं । परी कृपणु ऐसा आनु नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ।। १८.१४५७ ।। येरां भवव्यथा ठेलियां । स्त्रीशूद्रादिका प्राणियां । अनवसरू मांडूनियां । राहिला आहे ।। १४५८ ।। तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेदु वेठला भलतेणें । सेव्य होआवया ।। १४५९ ।। " असे सांगून वेदच या सिद्धयोगशास्त्राच्या रूपाने गीता म्हणून सर्वांना सेवन होण्यासाठी प्रकट झाला आहे असा निर्वाळा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी दिला आहे.

सर्वांना मुक्तद्वाराप्रमाणेच मोकळे असलेले हे सिद्धयोगाचे साधन म्हणजे " साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र । पैं संसारु जिणतें हें शास्त्र । आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरें इयें ।। १५.५७७ ।। " असे आत्मा हस्तगत करून देणारे व करतलामलकवत् स्वसंवेद्य आत्मस्वरूपोपलब्धी करून देणारे शास्त्र किंवा दर्शन आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. याचा अर्थ सिद्धयोगसाधनशास्त्र हे नुसते शब्दाने बोलून सांगण्याचे, प्रवचनात वर्णन करण्याचे, चर्चेचे, बडबडीचे किंवा शब्दपांडित्याचे शास्त्र नसून अनुभूती देण्याचे व घेण्याचे शास्त्र आहे. श्री. ऑर्थर अव्हॅलॉन अर्थात् सर जॉन वुड्रॉफ यांनी " Principles of Tantra Shastra," Part I, या ग्रंथातील "Introduction" मध्ये असे म्हटले आहे की, " It is idle to suppose that all or any may, through vedantik talk or by the mere closing of the eyes in pious pose, realize the Nirguna Brahman. The great teaching of the Vedanta by itself and without accompanying Sadhana can achieve nothing of real worth. Its study may produce a Pandit. But to the Sadhaka the disputations of Pandits, whether philosophical or scientific, is like " the cawing of crows." There is both reason and humour in the Hindu saying that a logician will be reborn a jackass. It is Sadhana wich alone in any system, whether Hindu or otherwise, is really fruitful. The Tantra ( i. e. Sadhana Shastra ) claims to be practical and to be a pratyaksha Shastra in that it affords the direct proof of experience. It is therefore one of its common saying that, " Whereas other shastras are concerned with speculation only, the art of medicine and Tantra are practical, self-evident and prove themselves at every step. (Page- 79,80)

In the opening chapter of the Kularnava Tantra it is said that, " Those who read the Scriptures and know not

the truth, but pass their time in disputation, are like "the ladle which, lying in syrup knows not the teste of it." Mere talk leads to nothing. "One may discuss as to what is knowledge and what is knowable, for a thousand years." Life is short. Many are the Vedas, many are the Shastras, infinite are the obstacles; therefore it is necessary that the essences be mastered, as the gander sips the water the milk which has been mixed with it." (Page 81)

The knowledge of which the shastra speaks is not the metaphysical faculty (with its acquisitions) of the mind on the ordinary plane of jagrat consciousness but is that spiritual experience the existence of which constitutes the forth stage of turya consciousness attained by successful yoga. (Page 83)

सगळ्यांना किंवा एखाद्यालाही नुसत्या वेदान्तचर्चेने किंवा धार्मिक पद्धतीने फक्त डोळे मिटून बसल्याने निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार होईल असे समजणे व्यर्थ आहे. साधनेची जोड नसलेली वेदान्ताची शिकवण किंवा तत्त्वज्ञान अस्सल किंमतीचे किंवा योग्यतेचे असे काहीही स्वत: प्राप्त करू शकत नाही. वेदान्ताच्या अभ्यासाने एखादा पंडित सहज निर्माण होईल; परंतु पंडितांची चर्चा किंवा वादविवाद म्हणजे साधकाला कावळ्यांनी कावकाव केल्यासारखेच आहे. नैय्यायिक किंवा तर्कशास्त्री पंडित हा गद्धा किंवा ठोंब्या म्हणूनच पुन्हा जन्माला येईल असे जे एका हिंदू म्हणीत म्हटले आहे, त्यात विनोद व कारणमीमांसा या दोन्ही गोष्टी अभिप्रेत आहेत. हिंदूंची किंवा दुसऱ्या कोणाचीही असली तरी कोणत्याही पद्धतीतील फक्त साधनाच खरोखर फलदायी होते. आपण स्वत: अनुभूतियुक्त व प्रत्यक्ष शास्त्र असल्याचा दावा तंत्र अर्थात् साधनशास्त्र करते; कारण अनुभवाचा सरळ पुरावाच हे शास्त्र सादर करते. यामुळे या बाबतीतील एक सामान्य तत्त्व असे आहे की, जेथे इतर सर्व शास्त्रे तर्काशी संबधित असतात तेथे वैद्यक व तंत्र ही दोन्ही शास्त्रे अनुभूतियुक्त, स्वत:प्रमाणयुक्त व पावलापावलागणिक स्वत:ला सिद्ध करणारी आहेत. ( पृ. ७९,८० )

कुलार्णवतंत्राच्या पहिल्याच प्रकरणात असे म्हटले आहे की, जे लोक नुसते धर्मग्रंथ वाचतात व ज्यांना सत्य माहीत नसते ते आपला वेळ फक्त वादविवादात खर्च करतात. असे लोक आमटीतील पळीप्रमाणे असून पळीला ज्याप्रमाणे आमटीची चव माहीत नसते त्याप्रमाणे त्यांनाही खऱ्या तत्त्वाची अनुभूती नसते. नुसते

बोलणे, चर्चा किंवा वडबड कोणतेही मार्गदर्शन करू शकत नाही. एखाद्याने ज्ञान व ज्ञेय म्हणजे काय याची चर्चा हजारो वर्षे केली तरी त्याचा काहीही उपयोग होत नाही. आयुष्य हे अत्यंत थोडे आहे. वेद व शास्त्रे अनेक आहेत. अडथळे तर अनंत आहेत. यासाठी सारभूत तत्त्वांवर अधिकार प्राप्त करणे किंवा ती आत्मसात करणे आवश्यक आहे. ज्याप्रमाणे एकमेकात मिसळलेले दूध व पाणी वेगळे करून राजहंस दूध पितो त्याप्रमाणे सारतत्त्वाचे ग्रहण केले पाहिजे. ( पृ. ८१ )

ज्याविषयी शास्त्रे चर्चा करतात ते ज्ञान काही मनाच्या जागृत चेतनावस्थेतील सर्वसामान्य पातळीवरील आध्यात्मिकशास्त्राचा ( त्याच्या लाभांसह असलेला ) विद्याविभाग नसून; ज्ञान म्हणजे यशस्वी योगाच्या द्वारा प्राप्त केलेल्या चवथ्या तुर्यात्मक चेतनावस्थेची आध्यात्मिक अनुभूती आहे.( पृ. ८३ )

याच पुस्तकाच्या दुसऱ्या भागात उपरोक्त लेखक "Preface" मध्ये मागे प्रकरण ७,पृष्ठ ५२४ वर उल्लेखिल्याप्रमाणे साधनशास्त्राची महती सांगून पुढे असे म्हणतात की, "Where ever there is Sadhana we believe that there is the system of the Tantra. The Tantra has made the Yoga system of Patanjali easily practicable. (Page 18)

The Tantra is only a system of Shakti-Sadhana. There are rules in it where by we may draw Shakti from all created things. There is nothing to be accepted or rejected in it. Whatever is helpful for Sadhana is acceptable. This Sadhana is decided according to the fitness of the particular person ( Adhikari-Anusare - अधिकारानुसारे ). The very meaning of Sadhana is unfolding, rousing up or awakening of power ( Shakti ). That is the reason why Bhakta Sang :-

"How long wilt thou sleep in the Muladhara,
O Mother! Kulkundalini ?" ( page 20, 21 )

आमचा असा विश्वास आहे की, ज्या ज्या ठिकाणी साधना आहे त्या त्या ठिकाणी तंत्रशास्त्राची पद्धत आहे. तंत्रशास्त्रानेच पतंजलीच्या योगशास्त्राचा मार्ग हा सहजतेने शक्य, व्यवहार्य व साध्य होईल असे केले आहे.

तंत्र ही फक्त शक्तिसाधनाची पद्धत, प्रणाली किंवा संप्रदाय आहे. उत्पन्न झालेल्या सर्व वस्तूतून आपल्याला शक्ती खेचून घेता येणे शक्य होईल असे नियम या तंत्रशास्त्रात आहेत. स्वीकारणीय किंवा त्याज्य असे यात काहीही नाही. जे साधनाला साहाय्यकारी आहे ते या तंत्रशास्त्रात स्वीकारणीय आहे.अधिकारानुसार ही साधना आपोआप निश्चित होते. साधनाचा खरा अर्थ विकास पावणे, ऊर्ध्वगमन

करणे किंवा शक्ती जागृत करणे हाच आहे. या कारणानेच एका भक्ताने असे गीत गाइले आहे की–

"हे आई ! कुलकुंडलिनी !! तू मूलाधारात किती काळपर्यंत निद्रिस्त राहणार आहेस. (पृ. २०,२१)

सिद्धयोग हे साधनाचे अनुभूतिसंपन्न शास्त्र असून नुसत्या पोकळ तत्त्वज्ञानाला या शास्त्रात काडीचीही किंमत नाही, हे सांगताना उपरोक्त पुस्तकाच्या पहिल्या भागातील "What is Shakti" या आठव्या प्रकरणात प्रस्तुस्त लेखकानेच असे म्हटले आहे की, "It must therefore be understood that the loquacious philosopher and the Sadhaka who knows the truth concerning things are not one and the same person. The fundamental principle of a Sadhana Shastra is attainment of Siddhi, while the fundamental philosophy is merely looking abroad with the eyes wide open. In the presnt discussion of Shakti-Tattva we shall therefore depend entirely on Sadhana-Shastra ( i. e. Tantra ) and have nothing to do with philosophy; for millions of systems of philosophy may disappear from view,but not the least change can occur in a Sadhana-Shastra." (Part I page 367)

या सर्व विवेचनावरून हे लक्षात घेतले पाहिजे की, एखादा वाचाळ किंवा बडबडया तत्त्वज्ञानी व ज्याला वस्तुमात्राशी निगडित असलेले सत्य माहीत आहे असा साधक, या दोन्ही एकच व सारख्या व्यक्ती नव्हेत. साधनशास्त्राचे मूलभूत तत्त्व सिद्धीची प्राप्ती हे असून; डोळे उघडे ठेवून सर्वत्र नुसते निरीक्षण करावयाचे ही तत्त्वज्ञानाची पायाभूत दृष्टी किंवा कल्पना आहे. त्यामुळे प्रस्तुतच्या शक्ति-तत्त्वाच्या विवेचनात आपण संपूर्णपणे फक्त साधनाशास्त्रावरच म्हणजे तंत्रशास्त्रावरच अवलंबून राहणार आहोत. आपल्याला नुसत्या तत्त्वज्ञानाशी काहीही करावयाचे नाही; कारण तत्त्वज्ञानाच्या करोडो पद्धती जरी दृष्टिआड होऊन नाहीशा झाल्या तरी साधनाशास्त्रामध्ये तसूभरसुद्धा बदल होणे संभवनीय नाही.

वरील सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, सिद्धयोग हे साधनशास्त्र आहे. विवेचनाचे, पांडित्याचे, प्रवचनाचे किंवा बडबडण्याचे हे शास्त्र नाही. "पलालमिव धान्यार्थी त्यजेद्ग्रंथमशेषतः ।।१८।।" असे "अमृतबिंदू उपनिषदात" व "पलालमिव धान्यार्थी सर्वशास्त्रं परित्यजेत् ।।१.१०३।।" असे "कुलार्णवतंत्रात" या दृष्टीनेच स्पष्टपणे सांगितले आहे.त्यामुळे "आतां अवधारा कथा गहन ।।१.२८।।" असे म्हणून सुरुवातीपासूनच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनशास्त्राची गहन कथा सांगण्यास

सुरुवात केली आहे ते म्हणतात, "या साधनशास्त्राच्या कथेची महती इतकी मोठी आहे की, या सिद्धयोगसाधनशास्त्रामुळे "शब्दश्री सच्छास्त्रिक ॥१.३४॥" झाली; म्हणजे शब्दरूपी चिच्छक्ती कुंडलिनी उत्तम शास्त्रयुक्त परिभाषेने शोभू लागली." याचा अर्थ असा की, सिद्धयोगाच्या शास्त्रामुळे ही अपरंपार शक्ती साधनाचा मूळस्तंभ कसा आहे हे साधकांना कळू लागले. खरे पाहता "पैल योगवृंदें वहिलीं । आडवीं आकाशीं निघालीं ॥६.१५४॥" अशीच मुळात अशास्त्रीय स्थिती होती. सुषुम्नेचा ऋजू मार्ग त्यांना अवगत नव्हता किंवा जो योग हिरण्यगर्भापासून चालत आला त्याला शास्त्रीय बैठक उरली नाही. ("हिरण्यगर्भो योगस्य वक्ता नान्यः पुरातनः ।" असे योगीश्वर याज्ञवल्क्यांनी म्हटले असून महाभारतातही (१२-३४९-६५) असेच म्हटले आहे. हिरण्यगर्भ हाच योगाचा आदि वक्ता किंवा गुरू असून त्याच्यापेक्षा पुरातन कोणीही योगाचार्य किंवा योगशास्त्रनिर्माता झाला नाही.) ती पंथराज किंवा सिद्धयोगशास्त्रामुळे अर्थात् नाथपरंपरेने प्राप्त झालेल्या शक्तिपातयोगामुळे साधकांना प्राप्त झाली, हे "कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं । धोरणु पडिला ॥६.१५४॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अगदी स्पष्ट सांगितले आहे. एवढेच नव्हे तर या गीतारूपी सिद्धयोगसाधनशास्त्रामुळेच साधकाला आत्मा सहजतेने हाती घेता येतो म्हणजे त्याचा साक्षात्कार करून घेता येतो हे सांगताना ते म्हणतात—

म्हणौनि आघवींचि शास्त्रें । अविद्यानाशाचीं पात्रें ।
वांचोनि न होतीं स्वतंत्रें । आत्मबोधीं ॥१८.१२३३॥
तया अध्यात्मशास्त्रांसीं । जैं साचपणाची ये पुसी ।
तैं येइजे जया ठायासी । ते हे गीता ॥१२३४॥
भानुभूषिता प्राचिया । सतेजा दिशा आघविया ।
तैसी शास्त्रेश्वरा गीता या । सनाथें शास्त्रें ॥१२३५॥
हें असो येणें शास्त्रेश्वरें । मागा उपाय बहुवे विस्तारें ।
सांगितला जैसा करें । घेवों ये आत्मा ॥१२३६॥

आत्मबोध करून देण्यास गीतारूपी अध्यात्मशास्त्र किंवा शास्त्रेश्वर म्हणजे सिद्धयोगसाधनशास्त्रच एकमेव समर्थ असल्याने आपण मागे सर्व ज्ञानेश्वरीत हा उपाय म्हणजे साधन खूप विस्ताराने सांगितले आहे असे त्यांनी म्हटले आहे. हेच गीतेचे खरे स्वरूप आहे. आत्मस्वरूपाची प्राप्ती करणे हाच अध्यात्मशास्त्राचा किंवा दर्शनाचा हेतू असतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीच्या रूपाने सिद्धयोगाचे दर्शन "गीता जाणा हे वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची ॥१८.१६८५॥" असे म्हणून घडविले आहे. नुसत्या विचारांचे किंवा तर्काचे हे काम नव्हे. त्यासाठी सद्गुरुकृपेने आत्मसत्तारूपी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ब्रह्म हे सत्तास्वरूपानेच आहे याची अनुभूती घ्यावी लागते. ही अनुभूती घेणे हेच शास्त्र किंवा दर्शन होय. या दृष्टीनेच

"भारतीय दर्शन", खंड एक, या विश्वविख्यात ग्रंथात डॉ. राधाकृष्णन् यांनी पहिल्या अध्यायात असे म्हटले आहे की, "भारतमें जीवनका एकमात्र ध्येय ब्रह्मके नित्य सत्तास्वरूपको जानना है। समस्त दर्शनशास्त्रकी परम धारणा है कि कोई भी पदार्थ, जो यथार्थ सत् है, स्वतः विरोधी नहीं हो सकता। वस्तुसत्ताके अतिरिक्त और कुछ है, इसे हम नहीं जान सकते। वास्तविक सत्ताका अस्तित्व है, यद्यपि हम उसे नहीं जान सकते और जो कुछ हम जानते हैं वास्तविक नहीं है, क्योंकि जगत्की बुद्धिगम्य पद्धतिके रूपमें की गई प्रत्येक व्याख्या भंग हो जाती है। इस (बौद्धादि) सबने तर्ककी आत्मचेतन समीक्षाके लिए मार्ग तैयार किया। विचार अपने–आपमें परस्पर–विरोधी एवं अपर्याप्त है। इस प्रकारसे विचार संपूर्ण सत्ताका ज्ञान करानेमें असमर्थ हैं। ब्रैडलेके शब्दोंमें वह 'क्या' से ऊपर है। विचार हमें वास्तविक सत्ता का ज्ञान करता है किंतु वह केवल ज्ञानमात्र है, स्वयं वस्तुसत्ता नहीं है। दूसरी ओर ऐसे भी व्यक्ति है, जिनका विश्वास हैं कि वास्तविक सत्ता स्वतःसंगत है और जो कुछ विचार है स्वतः असंगत है। विचार, ज्ञाता और ज्ञेय पदार्थके विरोधके साथ काम करता है और परम वास्तविक सत्ता ऐसी है जिसमें ये प्रतिकूल तत्त्व नष्ट हो जाते हैं। अत्यंत ठोस विचार, जहांतक यह अनेकोंको एकमें संयुक्त करनेका प्रयत्न करता है, फिर भी अमूर्त है, क्योंकि वह स्वतः विरोधी है और यदि हम वास्तविक सत्ताको ग्रहण करना चाहते हैं तो हमें विचारको त्याग देना होगा। ( म्हणौनि थोरपणा पऱ्हां सांडिजे। एथ व्युत्पत्ती आघवी विसरिजें। जैं जगा धाकुटें होईजे। तैं जवळीक माझी ॥ ९.३७८॥ " ) प्रथम कल्पनाके ऊपर जो कुछ प्रकाशित करता है वह वस्तु-सत्ताके विरोधमें नहीं जाता किंतु केवल एक भागकाही प्रकाश करता है। अवयव-विशेषके संबंध रखनेवाले विचार परस्पर विरोधी इसीलिए होते हैं कि वे आंशिक हैं। जहांतक उनकी पहुँच है वहांतकही वे सत्य हैं, किंतु पूर्ण सत्य नहीं। दूसरी कल्पना हमें बताती है कि वास्तविक सत्ताका ज्ञान एक प्रकारकी विशेष भावना अथवा अंतर्दृष्टिद्वारा प्राप्त हो सकता है। ( तुलना कीजिए, ब्रैडले, जो कहता है कि हम वास्तविक सत्ताको एकप्रकारकी भावनाद्वारा प्राप्त कर सकते हैं और मैक्टेगार्ट, जो प्रेम भक्तिको परमसत्ताका स्वरूप मानता है।) पहले मतवाले भी, यदि यथार्थ सत्ताका पूर्ण रूपमें जानना अभीष्ट है तो, भावनाद्वारा विचारका ग्रहण करनेका आग्रह करते हैं। विचारके अतिरक्त भी हमें एक अन्य तत्त्वकी आवश्यकता है और वह है 'दर्शन' जिस शब्दका प्रयोग दार्शनिक पद्धति, सिद्धांत अथवा शास्त्रके लिए होता है।

दर्शन शब्दकी उत्पत्ति 'दृश्' धातुसे हुई है, जिसका अर्थ है देखना। यह दर्शन या तो इंद्रियजन्य निरीक्षण हो सकता है, या प्रत्ययी ज्ञान अथवा अंत-

दृष्टिद्वारा अनुभूत हो सकता है। यह घटनाओंके सूक्ष्म निरीक्षण, तार्किक परीक्षण अथवा आत्माके अंतर्निरीक्षणद्वारा भी प्राप्त हो सकता है। साधारणतः दर्शनोंसे तात्पर्य आलोचनात्मक व्याख्याओं (भाष्य), तार्किक अथवा दार्शनिक पद्धतियोंसे होता है। दार्शनिक विचारकी प्रारंभिक अवस्थाओंमें दर्शन शब्दका प्रयोग इन अर्थोंमें हमें नहीं मिलता, क्योंकि उस समय दार्शनिक ज्ञान अधिकतर आभ्यंतर दृष्टिपरक था। यह दर्शाता है कि 'दर्शन' अंतर्दृष्टि नहीं है, भलेही यह उससे कितनाही संवद्ध क्यों न हो। संभवतः इस शब्दका प्रयोग बहुत सोच विचारके वाद उस विचार-पद्धतिके लिए किया गया है जिसकी प्राप्ति तो अंत-दृष्टिजन्य अनुभवसे होती है पर जिसकी पुष्टि तार्किक प्रमाणोंद्वारा होती है। परम अद्वैतवादकी दर्शन पद्धतियोंमें दार्शनिक ज्ञान विचारकी शक्तिहीनताका भाव हमारे समक्ष रखकर आंतरिक अनुभवका मार्ग तैयार करता है। उदार अद्वैत-पद्धतियोंमें, जहां वास्तविक सत्ताको एक पूर्ण ठोस रूपमें माना गया है, दर्शनशास्त्र अधिकसे अधिक यथार्थ सत्ताकी आदर्श पुनर्रचनाका विचार हमें देता है। किंतु यह यथार्थ हमारी निरानंद श्रेणियोंसे कही ऊपर और इनके चारों ओर और इनसे अतीत है। परम अद्वैतमें यह आंतरिक अनुभव है जो हमारे सामने वास्तविक यथार्थ सत्ताको उसके पूर्ण रूपमें प्रकट करता है।

दर्शन एक ऐसा शब्द है जो सुविधाजनक रूपमें स्वयंमें संदिग्ध है, क्योंकि परम अद्वैतकी तार्किक पद्धतिसे रक्षा करनेके लिए और अंतर्दृष्टि–संवंधी सत्यके वचावके लिए भी,जिसके ऊपर यह आश्रित हैं, यह प्रयोगमें आ सकता है। दार्शनिक विधिमें दर्शनसे तात्पर्य अंतर्ज्ञानका प्रमाण मांगना है और उसका तार्किक रूपमें प्रचार करना है।.... अनेक मतोंपर वहुत निकटसे विचार करनेपर, जो हमें भिन्न–भिन्न दृष्टिसे यथार्थ सत्ताका चित्र लेनेपर प्राप्त हो, हम यथार्थ सत्ताके पूर्ण रूपको तार्किक परिभाषाओंमें जान सकते हैं। जब हमें अनुभव होता है कि वास्तविक सत्ताकी धारणात्मक व्याख्या पर्याप्त नहीं है तब हम अंतर्ज्ञानद्वारा यथार्थ सत्ताको पकडनेका प्रयत्न करते हैं और वहाँ सव वौद्धिक विचार समाप्त हो जाते हैं। उस समय हमें परम अद्वैतवादकी विशुद्ध सत्ताका ज्ञान होता है जिसके द्वारा हम फिर तार्किक विचारद्वारा प्राप्त यथार्थ सत्ताकी ओर वापस आते हैं, जिसकी हम भिन्न–भिन्न पद्धतियोंमें अक्षरशः व्याख्या पाते हैं। इस अंतिम विधिके लिए उपयुक्त दर्शन शब्दका तात्पर्य है–यथार्थ सत्ताकी वैज्ञानिक व्याख्या।

दर्शन एक ऐमा आध्यात्मिक ज्ञान है, जो आत्मारूपी इंद्रियके समक्ष संपूर्ण रूपमें प्रकट होता है। यह आत्मदृष्टि, जो वहीं संभव है जहां दर्शनशास्त्रका अस्तित्व है, एक सच्चे दार्शनिककी स्पष्ट पहचान है। इसप्रकार दर्शनशास्त्रके विषयमें उच्चतम विजय उन्हीं व्यक्तियोंको प्राप्त हो सकती है,जिन्होंने अपने अंदर आत्माकी पवित्रताको

प्राप्त कर लिया है। इस पवित्रताका आधार है अनुभवकी प्रगाढ स्वीकृति, जो केवल उसी अवस्थामें साक्षात् हो सकती है जब मनुष्यको अंतर्निहित उस शक्तिकी उपलब्धि हो, जिसके द्वारा वह न केवल जीवनका निरीक्षणही अपितु पूर्णतया ज्ञान प्राप्त कर सके। इस अंतस्तम निकाससेही दार्शनिक हमारे सामने जीवनके सत्यको प्रकट करता है– उस सत्यको जो केवल बुद्धिद्वारा प्रकाशमें नहीं आ सकता। इस प्रकारकी दर्शनशक्ति लगभग ठीक उसी प्रकार स्वाभाविक रूपमें उत्पन्न हो जाती है जैसे फूलसे फलकी उत्पत्ति होती है, और इसका उत्पत्तिस्थान वह रहस्य-मय केंद्र है, जहां सब प्रकारके अनुभवका सामंजस्य होता है।" (पृष्ठ ३६ ते ३९)

अंतःशक्ती कुंडलिनीच्या जागृतीने येणाऱ्या आत्मस्वरूप प्राप्तीच्या अनुभूतीला किती अनन्य साधारण महत्त्व आहे हे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. सिद्धयोग हे शास्त्र आहे हे म्हणण्याचा हेतूच असा आहे की, सद्गुरु शिष्याची निद्रिस्त कुंडलिनी शक्ती आपल्या अमोघ कृपाबलाने अर्थात् शक्तिपाताने जागृत करून त्याला सुषुम्नामार्गाने सहस्रारात घेऊन जाऊन, त्याचे शिवाशी ऐक्य घडवून आणवून, त्याला स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देतात. असे हे सामर्थ्य एकमात्र सिद्धयोगसाधनशास्त्रातच असल्यामुळे गुरुशिष्यांच्या रूपाने शक्तिसंक्रमण परंपरेने चाललेले एकमात्र गीतारूपी सिद्धयोगसाधन हेच प्रमाणसिद्ध असून अन्य दुसरे सर्व शास्त्रीय उपाय हे अप्रमाण आहेत; कारण ते मोक्ष देण्यास समर्थ नाहीत हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

म्हणौनि माझ्या ठायीं। नाचावें न लगे कांहीं।
मी लाभें इयें उपायीं। साचचि गा ॥१८.१२२५॥
एक शिष्य एक गुरु। हा रुढला साच व्यवहारु।
तो मत्प्राप्तिप्रकारु। जाणावया ॥१८ १२२६॥
अगा वसुधेच्या पोटीं। निधान सिद्ध किरीटी।
वन्हि सिद्ध काष्ठीं। वोहां दूध ॥१२२७॥
परी लाभें तें असतें। तया कीजे उपायातें।
येर सिद्धचि तैसा तेथें। उपायीं मी ॥१२२८॥
जें गीतार्थचिं चांगावें। मोक्षोपायपर आघवें।
आन शास्त्रोपाय कीं नव्हे। प्रमाणसिद्ध ॥१२३०॥

अशा या प्रमाणसिद्ध शास्त्राची निर्मिती " गुरुशिष्यपदे स्थित्वा स्वयं देवः सदाशिवः। पूर्वोत्तरपदैर्वाक्यैस्तंत्रमाधारभेदतः॥ स्वच्छंदतंत्र–प्रथम पटल–श्लोक तीन–टीका॥" असे स्वच्छंदतंत्रात म्हटल्याप्रमाणे किंवा " गुरुशिष्यपदेऽप्येष वेद्यभेदोऽप्यतात्त्विकः। प्रष्ट्री च प्रतीवक्त्री च स्वयं देवी व्यवस्थिता॥ तंत्रालोक १.२५६॥" असे तंत्रालोकात म्हटल्याप्रमाणे एकमात्र श्रीकृष्णांनीच वाच्य वाचक

वनून केली आहे हे "जे इये शास्त्रीं येकु। श्रीकृष्णचि वाच्य वाचकु। हे प्रसिद्ध जाणे लोकु। भलताही ॥१८.१६८३॥" व "अहो अर्जुनाचेनि मिषें। आपणपेंचि दुजें ऐसें। नटोनि आपणया उद्देशें। वोलिलें जें देव ॥१८.१६१२॥" असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. सिद्धयोगसाधनशास्त्र हे "वाच्यवाचक येकवटें। साधितें शास्त्र ॥१८.१६८४॥" असं असल्यामुळे "पैं दोहीं वोठीं एक वोलणें। दोहीं चरणीं एक चालणें। तैसें पुसणें सांगणें। तुझें माझें ॥१५.४५४॥ एवं आम्ही तुम्ही येथें। देखावें एका अर्थातें। सांगतें पुसतें येथें। दोन्ही एक ॥४५५॥' या दृष्टीने गुरुशिष्य, शिवशक्ती व प्रकृतिपुरुष या सर्वांचे समरसीकरण करणारे आहे हे "आधींच आम्हां यया कांहीं। नरनारायणासी भिन्न नाहीं ॥१५.४५८॥" असे सांगून "गीता जाणा हे वाङ्मयी। श्रीमूर्ति प्रभूची ॥१८.१६८५॥ असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. वर जे डॉ. राधाकृष्णन् यांचे विचार विस्ताराने मांडले आहेत त्याचे हे सार आहे; कारण गीता ही सिद्धयोगसाधनशास्त्राची वाङ्मयी मूर्ती आहे. याचा अर्थ असा आहे की, भगवान् श्रीगोपालकृष्णच गुरुशिष्यरूपाने या वाङ्मयी मूर्तिद्वारा आपल्या अच्छेद्य व अभेद्य आत्मसत्तेने साकार झाले आहेत. तेच अनुभूती व अंतर्ज्ञानाचे प्रमाण असून त्यांनीच गीतेच्या रूपाने सिद्धयोगसाधनशास्त्राच्या मूळ सूत्रात्मक अशा यथार्थ सत्तेची किंवा कुंडलिनी शक्तीची अगर आपली आपणच वैज्ञानिक व्याख्या सांगून तार्किक पद्धतीने या शास्त्राचा प्रचार केला आहे. एवढेच नव्हे तर इतर शास्त्रांप्रमाणे सिद्धयोगसाधनशास्त्र हे कधीही नाहीसे होणारे शास्त्र नाही; कारण साधनसाध्य-रूपाचो एकता ही याच एकमेव शास्त्रात असल्यामुळे हे सर्व शास्त्र केवळ परब्रह्मच आहे हे "शास्त्र वाच्यें अर्थें फळे। मग आपण मावळे। तैसें नव्हे हें सगळें। परब्रह्मचि ॥१८.१६८६॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे.

संप्रदाय हा या शास्त्राचा खरा आधार आहे; कारण संप्रदाय परंपरेनेच कुंडलिनी शक्तीच्या जागृतीची विद्या अविच्छिन्नपणे प्रवाहित झालेली दृष्टीस पडते. संप्रदाय सोडून ही शक्ती राहत नाही व संप्रदायाप्रमाणे उपासना केल्या-शिवाय ती प्रसन्नही होत नाही. पुढे नवव्या प्रकरणात याचा विस्ताराने विचार केला आहे म्हणून याबद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी काय म्हटले आहे ते फक्त सूचित करतो. ते म्हणतात—

> म्हणौनि बहुत पुण्य तुवां। केलें तेणें धनंजया।
> आजि शास्त्रराजा इया। जालासि विषयो ॥१८.१४८०॥
> तरी ययाचि शास्त्राचेनि। संप्रदायें पांघुरौनि।
> शास्त्रार्थु हा निकेनि। अनुष्ठीं हो! ॥१४८१॥

एऱ्हवीं अमृतमंथना- । सारिखें होईल अर्जुना ।
जरी रिघसी अनुष्ठाना । संप्रदायेंवीण ॥१४८२॥
गाय धड जोडे गोमटी । तें तेंचि पिवों ये किरीटी ।
जैं जाणिजे हातवटी । सांजवणीची ॥१४८३॥
तैसा श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर लाहे ।
परी ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥१४८४॥
म्हणौनि शास्त्रीं जो इये । उचितु संप्रदायो आहे ॥१४८५॥

या सर्व विवेचनावरून शास्त्र, संप्रदाय व उपासना यांचा अविच्छिन्न संबंध लक्षात येईल. "तया स्वभावविहिता कर्मा । शास्त्राचेनि मुखें वीरोत्तमा । प्रवर्तावयालागीं प्रमा । अढळ कीजे ॥१८.८८८॥ पैं आपुलेंचि रत्न थितें । घेपे पारखियाचेनि हातें । तैसें स्वकर्म आपैतें । शास्त्रें करावीं ॥८८९॥" असे म्हणून शास्त्राप्रमाणे आचरण करणे हेच श्रेष्ठ आहे; कारण त्यामुळेच मोक्षप्राप्ती होते हा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अढळ सिद्धांत मांडला आहे. यातील स्वभाव, स्वकर्म यांचे अर्थ आपण मागे विस्ताराने पाहिले आहेत. ते लक्षात घेतले म्हणजे सिद्धयोगसाधनशास्त्रांतर्गत शक्तिपाताने शक्ती जागृत झाल्यावर स्वभावविहित असे स्वकर्म कसे उपस्थित होते हे कळेल व 'तैसें शास्त्राचारें तेणें । ईश्वरुचि येकु पावणें ॥१८.८४५॥" व "सकळ शास्त्रांचे येईल । सर्वस्व हातां ॥१५.३९१॥" यातील रहस्य किंवा मर्म कळेल. "शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें । जें घेववी तें न म्हणावें । विषही विरु ॥१६.४६०॥" व "जे कृत्याकृत्यव्यवस्था । अनुष्ठावया पार्था । शास्त्रचि एक सर्वथा । प्रमाण तुज ॥१७.२२॥" असे जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज निक्षून सांगतात तेव्हा सिद्धयोगसाधनशास्त्राच्या सर्व अंगोपांगाच्या पालनाचा त्यांचा कटाक्ष स्पष्ट होतो व त्या शास्त्रावरील अढळ श्रद्धा स्पष्ट होते. मात्र शास्त्राभ्यासाचा किंवा साधनाभ्यासाचा कंटाळा करून नुसत्या श्रद्धेने परमपद मिळत नाही हे "म्हणे पार्था तुझा अतिसो । हेंही आम्ही जाणतसों । जे शास्त्राभ्यासाचा आडसो । मानितोसि कीं ॥१७.४९॥ नुसधीयाचि श्रद्धा । झोंबों पाहसी परमपदा । तरी तैसें हें प्रबुद्धा । सोहोपें नोहे ॥५०॥" या शब्दात भगवंतांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मुखाने स्पष्ट केले आहे. सिद्धयोगशास्त्राच्या श्रद्धापूर्वक अनुष्ठानाने, साधनाने किंवा अभ्यासाने मूर्खही तरून जातो हाच या साधनशास्त्राचा अपरंपार व अपूर्व महिमा आहे. या दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-

हे सात्त्विकमति जया । निर्वाहती होय धनंजया ।
बागूल नोहे तया । कैवल्य तें ॥१७.८४॥
तो न पढो का ब्रह्मसूत्र । नालोढो सर्व शास्त्र ।
सिद्धांत न होत स्वतंत्र । तयाच्या हातीं ॥८५॥

परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊनि मूर्त ।
अनुष्ठानें जगा देत । वडील जे हे ॥८६॥

तयांचीं आचरतीं पाउलें । पाऊनि सात्त्विकी श्रद्धा चाले ।
तो तेंचि फळ ठेविलें । ऐसें लाहे ॥८७॥

पैं एक दीपु लावी सायासें । आणिक तेथें लाऊं बैसें ।
तरी तो काय प्रकाशें । वंचिजे गा ? ॥८८॥

कां येकें मोल अपार । वेंचोनि केलें धवळार ।
तो सुरवाडु वस्तीकर । न भोगी काई ? ॥८९॥

हें असो जो तळें करी । तें तयाचीच तृषा हरी ।
कीं सुआरासीचि अन्न घरीं । येरां नोहे ? ॥९०॥

बहुत काय बोलों पैं गा । येका गौतमासीचि गंगा ।
येरां समस्तां काय जगा । वोहोळ जाली ? ॥९१॥

म्हणौनि आपुलियापरी । शास्त्र अनुष्ठिती कुसरी ।
जाणे तयातें श्रद्धाळु जो वरी । तो मूर्खुही तरे ॥९२॥

सारांश, "आम्हीं योगजात अभ्यासावें । तेणें याचि अनुभवा यावें । शास्त्रातें आलोडावें । परि सिद्धांतु तो हाचि ॥ ११.५९५॥" असे सिद्धयोगसाधनशास्त्राचे अनुभवात्मक व तर्कात्मक द्विविधरूप श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत मांडले असून "जेथ नानामतां बुझावणी जाहाली । एकमेकां शास्त्रांची अनोळखी फिटली । चुकलीं ज्ञानें जेथ मिळों आलीं । जें पवित्र म्हणिजे ॥ ९.२७४ ॥" असे सहस्रारातील अंतिम अवस्थेचे वर्णन करून सिद्धयोगशास्त्रात इतर सर्व साधनांचा, मतांचा शास्त्रांचा व ज्ञानाचा समावेश कसा होतो हे स्पष्ट केले आहे. त्यामुळेच गीता म्हणजे सिद्धयोग "हा शास्त्रसिद्धांतु आघवा" ॥ १८.१५४० ॥" व "जे उपनिषदांचे सार । सर्व शास्त्रांचें माहेर ॥ १८.१८०८ ॥" असा मूर्धन्य सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रस्थापित केला आहे व वेदप्रतिपाद्य श्रीकृष्ण स्वतःच या गीताशास्त्ररूप सिद्धयोगाचे वक्ते असल्यामुळे या शास्त्राचा गौरव कसा करावा हे जेथे श्रीशंकरांच्या बुद्धीलाही कळले नाही तेथे मी कसे वर्णन करणार, असे म्हणून गीताशास्त्ररूप सिद्धयोगसाधनशास्त्रास जीवाभावाने वंदन करावे हेच चांगले, हे सांगताना ते म्हणतात–

बाप बाप ग्रंथ गीता । जो वेदीं प्रतिपाद्य देवता ।
तो श्रीकृष्ण वक्ता । जिये ग्रंथीं ॥११.२६॥

तेथिचें गौरव कैसें वानावें । जें श्रीशंभूचिये मती नागवे ।
तें आतां नमस्कारिजे जीवेंभावें । हेंचि भलें ॥२७॥

**गुरुकृपेचा महिमाः–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " मज हृदयीं सद्‌गुरु । जेणें तारिलो हा संसारपुरु ॥ १.२२ ॥ " या पहिल्या अध्यातील ओवीपासून ते " श्रीगुरुकृपा काय नोहे। ज्ञानदेवो म्हणे ॥ १८.१७३५ ॥" या अठराव्या अध्यायातील ओवीपर्यंत सिद्धयोग-साधनेच्या शास्त्रीय प्रक्रियेला सर्वात आधारभूत व मूर्धन्य गोष्ट म्हणून गुरुकृपेचा महिमा कसा गाइला आहे याचा आता विचार करावयाचा आहे. हा विचार करताना गुरू म्हणजे काय ? व कृपा म्हणजे काय ? याचा प्रथम विचार करणे अत्यावश्यक आहे; कारण हे पाहिल्याशिवाय गुरुकृपा म्हणजे खरोखरी काय आहे हे कळणार नाही व त्याशिवाय गुरुकृपेच्या महिम्याचा महिमाही कळणार नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती। आतां नमों म्हणों पुढतपुढती ॥ १६.१७ ॥" असे म्हणून चित्‌शक्तिस्वरूपी कुंडलिनीने युक्त कसे श्रीगुरुनाथ निवृत्तिमहाराज सूर्यासारखे असून मी त्यांना नमस्कार करतो हे सांगून श्रीगुरू हे चित्‌शक्तिस्वरूप आहेत, हा सिद्धांत गुरू म्हणजे काय या प्रश्नाचे उत्तर देताना मांडला आहे. " भावनोपनिषदात " " श्रीगुरुः सर्वकारणभूता शक्तिः ॥ " असे सांगून श्रीगुरू ही सर्वकारणभूत शक्ती आहे, असेच म्हटले आहे. " शिवसूत्रवार्तिकातही " परमेश्वराच्या अनुग्रहात्मक पराशक्तीला गुरू असे म्हटले आहे. " तंत्रराजातही " गुरूची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**गुरुराद्या भवेत्‌शक्तिः सा विमर्शमयी मता ।**
**नवत्वं तस्य देहस्य रंध्रत्वेन विभासते ॥**

गुरू हीच आद्यशक्ती कुंडलिनी होय. ती विमर्शमयी विश्वाची उभारणी करणारी आहे. देहाच्या नऊ रंध्रांनी किंवा द्वारांनी ती भासित होत असते. महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांतपद्धतीत " ज्या कुंडलिनी शक्तीचा " परंपराशक्तिराज्ञावती प्रसिद्धा ॥ ४.१० ॥ " असे म्हणून उल्लेख केला आहे, ती प्रसिद्ध आज्ञावती कुंडलिनी शक्ती म्हणजेच गुरूरूपाने प्रकट झालेली व जीवावर निरंतर दया करणारी अशी साक्षात् शांकरी विद्या आहे असे सांगताना " अमृतानुभवात " श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**गुरुरित्याख्यया लोके साक्षात् विद्याहि शांकरी ।**
**जयत्याज्ञा नमस्तस्यै दयार्द्रायै निरंतरम् ॥२॥**

या सर्व विवेचनाचा अर्थ असा की, गुरू म्हणजेच शक्ती होय. " जय जय आचार्या। समस्तसुरवर्या । प्रज्ञाप्रभासूर्या । सुखोदया ॥ १४.१ ॥ रविचंद्रादि शक्ती। उदय करिती त्रिजगतीं। तें तुझिया दीप्ती। तेज तेजां ॥ ८ ॥ जें चळवळिजे अनिळें। तें दैविकेनि जी निजबळें। नभ तुजमाजीं खेळे। लपीथपी

॥९॥ " या सर्व ओव्यांचा भावार्थ ध्यानी घेतला म्हणजे गुरू हीच शक्ती होय हे समीकरण सिद्ध होते.

कृपेला शास्त्रीय परिभाषेत शक्तिपात असे म्हणतात.या शक्तिपातालाच अनुग्रह किंवा दीक्षा असे शास्त्रकारांनी संबोधिले आहे. कृपेचा अर्थ सविस्तरपणे आपण पुढे पाहणारच आहोत; म्हणून येथे त्याचे फक्त दिग्दर्शन मात्र केले. " लोहाचें कनक होये । हें सामर्थ्य परिसींच आहे । कीं मृतही जीवित लाहे । अमृतसिद्धि ॥१.७७॥ जरी प्रकटे सिद्धसरस्वती । तरी मुकयाहि आथी भारती । एथ वस्तुसामर्थ्यशक्ति । नवल कायी ॥ ७८ ॥ " या ओव्यांच्या अर्थांतरात आपण प्रवेश केला म्हणजे आपल्या असे लक्षात येईल की, ज्याप्रमाणे परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते व अमृतामुळे मेलेला माणूसही जिवंत होतो; त्याप्रमाणे सद्गुरूंनी कृपा म्हणजे शक्तिपात केला, अनुग्रह केला किंवा दीक्षा दिली की, साधकाच्या जीवाचे सोने होते. तो शिवरूप होतो. साधकाला सद्गुरूंनी स्पर्श केला की, त्यांच्या ठिकाणची शक्ती शिष्यात संक्रमित होऊन शिष्याच्या देहात मूलाधारात निद्रिस्त असलेली कुंडलिनी शक्ती म्हणजे वस्तुसामर्थ्यशक्ती प्रकट होते. ती सर्व विद्यांची जननी किंवा सिद्धसरस्वती असल्यामुळे ती जेव्हा जागृत होते तेव्हा मुकाही महान् लेखक किंवा कवी होतो. अशा प्रकारे शक्ती जागृत होणे म्हणजेच श्रीगुरूंची कृपा होणे होय. सद्गुरूला शिष्य अनन्यभावाने शरण जाऊन तो त्यांच्या मनात कृपा कशी उत्पन्न करतो व सद्गुरूही अशा शिष्याला कृपेने म्हणजेच शक्तिपातदीक्षानुग्रहाने कसे कृतार्थ करतात याचा अगदी स्पष्ट उल्लेख श्रीमुकुंदरायांनी " विवेकसिंधु " या ग्रंथात करताना असे म्हटले आहे की—

तंव शिष्यु तापत्रयीं संतप्तु । शमदमसाधनीं संयुक्तु ।<br>
गुरूतें शरणागतु । विनविता जाला ॥१.८९॥

जी मी संसारसागरीं बुडालों । तापत्रयें वडवानळीं पोळलों ।<br>
क्रोधादि जळचरीं विसंचिलों । जालों अतिशोच्यु ॥९०॥

ज्ञानाचिया तारुवीं बैसउनि । कृपेचिये सुवायें पेलौनि ।<br>
देवेंची तारक होवौनि । उतरावें मातें ॥९१॥

संसाराचिये बंदिशाळें । बांधलों अज्ञानसाखळें ।<br>
तियें बंधनें तोडावीं स्वामी सकळें । ज्ञानशस्त्रें करौनिया ॥९२॥

भवार्क मध्यान्ह तापवेळें । तापलो तापत्रयें दावानळें ।<br>
जी कृपाजळधरा ज्ञानजळें । निववावें मातें ॥९३॥

ऐसी कृपा उपजवौनि । विनवी शिष्यशिरोमणी ।<br>
मस्तकु श्रीगुरुचरणीं । न्यासिता जाला ॥९४॥

तंव बोलिला श्रीगुरुराजा । बारे तूं शिणलासी कवणीये काजा ।
कैसें बंधन तोडीजैल वोजा । हें चोज पाही रोकडेंचि ॥९५॥

ऐसी प्रतिज्ञा स्वीकारौनि । शिष्यातें सन्मुख बैसवोनि ।
ज्ञानसमावेश करौनि । गुरुसंप्रदायक्रमें ॥९६॥

तेथें ज्ञानशक्तीचा प्रकाशु । अज्ञानशक्तीचा निरासु ।
बोध उठिला स्वयंप्रकाशु । शिष्यचैतन्यीं ॥९७॥

ते वेळीं कंपस्वेदादिक । उठिले भाव सात्त्विक ।
जैसें साम्राज्य पावे रंक । तैसें वर्त्तते जाले ॥९८॥

या नांव शक्तिपातु बोलिजे । जेथें स्वानुभवुचि अनुभविजे ।
निःशेष तेहीं विसरिजे । स्मरण सांसारिक ॥९९॥

याप्रमाणे अनेक आगमनिगमपुराणतंत्रशास्त्रादि ग्रंथांच्या आधारे व संतांच्या ग्रंथाधारे कृपा म्हणजे शक्तिपात, अनुग्रह किंवा दीक्षा होय असे दाखविता येईल. वरील सर्व विवेचना सारांश असा की, गुरुकृपा म्हणजे शक्तिस्वरूपात असलेल्या गुरूने शिष्यावर शक्तिपात करून केलेला अनुग्रह किंवा दीक्षा होय व तद्द्वारा शिष्याची निद्रिस्त कुंडलिनी शक्ती जागृत करणे होय. अज्ञानशक्तीच्या रूपाने बहिर्मुख असलेली ही शक्ती अंतर्मुखाने जागृत करून तिचे सुषुम्नेत चालन करणे व जीवशिवाचे ऐक्य सहस्रारात घडवून आणणे हाच खरा गुरुकृपेचा अर्थ आहे. या अर्थानेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सद्गुरुनाथ श्रीकृष्ण कृपासागर होते हे सांगताना असे म्हटले आहे की—

ऐसेनि तो कृपावंतु । नानापरी असे शिकवितु ॥२.२९॥
ऐसें सर्वज्ञाचा बापु । जो श्रीकृष्णु ज्ञानदीपु ।
तो म्हणतसे सकृपु । ऐकें राया ॥४.२०९॥
तंव अर्जुना म्हणे हे कायी । चकोरेंवीण चांदणेंचि नाहीं ।
जगचि निवविजे हा तयाच्या ठायीं । स्वभावो कीं जी ॥९.२३३॥
येरें चकोरें तिये आपुलिये चाडे । चांचू करिती चंद्राकडे ।
तेवीं आम्ही विनवूं तें थोकडें । देवो कृपासिंधु ॥२३४॥
तैसा कृपाळुवांचा रावो । म्हणे आइकें गा महाबाहो ॥१०.५४॥
हें बोलोनी तो कृपावंतु । म्हणे विष्णु मी आदित्यांआंतु ॥१०.२२१॥
राया जो निर्मळु । निष्कलंक लोककृपाळु ।
शरणागतां प्रतिपाळु । शरण्यु जो ॥१२.२४०॥
यावरी बाप पुण्यपवित्र । जगीं भक्तिबीजासि सुक्षेत्र ।
तो श्रीकृष्णकृपे पात्र । याचिलागीं ॥६.१२६॥

हा बोलु आइकतखेवीं । अर्जुना आधि न माये जीवीं ।
म्हणे देवें कृपा करावी । सांगावें तें ।।१७.३२६।।

तेथ कृपाळुचक्रवर्ती । म्हणे आईक तयाची व्यक्ती ।
जेणें सात्त्विक तें मुक्ती–। रत्न देखे ।।३२७।।

किंवहुना ऐसा नृपा । पार्थु जालासे कृष्णकृपा ।।१८.१६५४।।

कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा ।
अर्जुनव्याजें रूपा । आणिला देवें ।।१८.१६८७।।

पैं आणिकही एक परी । इये प्रतीतीची येतसे थोरी ।
जे मागें ऐसेंचि ऋषीश्वरीं । सांगितलें तूंतें ।।१०.१५३।।

परि तया सांगितलियाचें साचपण । हें आतां माझें देखतसे अंतःकरण ।
जे कृपा केली आपण । म्हणौनि देवा ।।१५४।।

तो निर्गुण काय आचरे । कैसेनि गुण निस्तरे ।
हें सांगिजो माहेरें । कृपेचेनि ।।१४.३२१।।

अर्जुनाच्या बावतीत त्याचे गुरू श्रीकृष्णनाथ हे जसे कृपाळुचक्रवर्ती म्हणजे शक्तिपात करण्यात अनन्यसाधारण व एकमेवाद्वितीय असे सर्वश्रेष्ठ राजे होते त्याचप्रमाणे आपले गुरू श्रीनिवृत्तिनाथमहाराजही कृपेच्या म्हणजे शक्तिपाताच्या अलौकिक सामर्थ्यानें संपन्न असून "ज्ञानदेव म्हणे मी चाडें। सद्गुरूंनी केलें कोडें। माथां हात ठेविला तें फुडें। वीजचि वाइलें ।।६ ४९२।।" याप्रमाणे त्यांनी प्रत्यक्ष डोक्यावर हात ठेवून आपल्याला स्पर्शदीक्षा दिली व आपली शक्ती जागृत केली हे सांगून ज्ञानेश्वरीत अनेक वेळा त्यांच्या शक्तिपातसामर्थ्याच्या महिम्याचा उल्लेख श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केला आहे. यासंबंधी ते म्हणतात–

तो हा निजस्वरूप । अनादि निष्कंप ।
परी कवणें मानें सकृप । जाहला आहे ।।४.१४।।
संजयें व्यासाचिया निरोपा । तो वेळु फेडिला तया नृपा ।
तैसा मोही निवृत्तिकृपा । सांगेन तुम्हां ।।१६.४७१।।
आधींच तंव तो कृपाळू । वरी गुरुआज्ञेचा बोलू ।
जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघां ।।१८.१७६१।।
हे तीन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें ।
तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ।।१.२०।।
तें बुद्धीही आकळितां सांकडें । म्हणौनि बोलीं विपायें सांपडे ।
परी श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखैन मी ।।६.३२।।

जें दिठीही न पविजे । तें दिठीविण देखिजे ।
जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥३३॥
ना तरी जें धातुवादाही न जोडे । तें लोहींचि पंधरें सांपडे ।
जरी दैवयोगें चढे । परिसु हातां ॥३४॥
तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।
म्हणौनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥३५॥
तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।
अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥३६॥

गुरुकृपेने मी शब्दब्रह्म कवळले आहे, त्या शब्दब्रह्मरूपी आदिबीजाला मी नमस्कार केला आहे,अरूप शब्दब्रह्माचे रूप मी बोलीने म्हणजे शब्दब्रह्मानेच दाखवीन व ही शब्दब्रह्माची अतींद्रिय अवस्था मी इंद्रियांकडून भोगवीन अशी जेव्हा श्रीज्ञानेश्वरमहाराज प्रतिज्ञा करतात तेव्हा हे सर्व आपण श्रीनिवृत्तिनाथमहाराजांच्या कृपेच्या म्हणजे शक्तिपातरूपी दिव्याच्या साहाय्याने पाहून सांगणार आहोत; कारण शब्दब्रह्म किंवा अरूप हे बुद्धीला आकलन करणे कठीण असून तेथे दृष्टी पोहोचत नाही व ते वैखरी वाणीने सांगता येत नाही असे ते म्हणतात. मात्र आत्मशक्ती कुंडलिनी श्रीगुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताने जागृत झाली की, अतींद्रिय ज्ञानबळ प्राप्त होऊन हे अरूप शब्दब्रह्म दृष्टीशिवाय पाहता येते व इंद्रियांशिवाय भोगता येते. "परापरिमलोल्लासामध्ये" शब्दब्रह्माची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

शब्दब्रह्मेति तं प्राह साक्षाद्देवः सदाशिवः ।
अनाहतेषु चक्रेषु स शब्दः परिकीर्त्यते ॥

ज्याला शब्दब्रह्म म्हणतात तो साक्षात् सदाशिवच आहे. हा शब्द अनाहत चक्रामध्ये आहे. यापूर्वी आपण हे पाहिले आहे की, शब्द म्हणजे शक्ती व ब्रह्म म्हणजे शिव होय. त्याचा अर्थ शब्दब्रह्माच्या रूपाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शिव-शक्तीला कवळले म्हणजे श्रीगुरुकृपेने त्या तत्त्वाशी ते एकरूप झाले. असे एकरूप होणे हाच खरा नमस्कार होय. यालाच श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी आत्म-निवेदन भक्ती असे म्हटले आहे. श्रीगुरुकृपेचा म्हणजे जागृत कुंडलिनी शक्तीचा आधार घेऊनच त्यांनी अरूपाचे रूप दाखविले आहे म्हणजे शब्दब्रह्म साकार केले आहे. हे कसे घडते ? शास्त्रात असे लिहिले आहे की, "अनादिनिधनं ब्रह्म शब्दतत्त्वं यदक्षरम् । विवर्ततेऽर्थभावेन प्रक्रिया जगतो यतः ॥" अनादि अनंत शब्द नामक ब्रह्मतत्त्वच अर्थरूपाने विवर्तित म्हणजे भासमान होऊन जगताची रचना करते. "वागेव विश्वा भुवनानि जज्ञे" याचा अर्थ हाच आहे. सर्व वर्णमाला किंवा वर्णमातृका या शब्दब्रह्माचेच अंग आहेत. या दृष्टीने म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि" या ग्रंथात "शाक्तदृष्टिसे श्रीगुरुतत्त्व" या लेखात

असे म्हटले आहे की, "गुरुतत्त्व शब्दब्रह्मस्वरूप है। "शब्दब्रह्मणि निष्णात: परं ब्रह्माधिगच्छति," यही शास्त्रीय सिद्धांत है। अर्थात् परब्रह्मरूप उपेयको यदि पाना हो तो शब्दब्रह्मही उसका एकमात्र उपाय है। शब्दब्रह्मसे उद्‌भूत चैतन्यशक्तिसंपन्न शब्द या वाक्यही मंत्ररूपमें परिगणित होता है। यह शब्द जिनके मुखसे उच्चारित होकर शुश्रूषु शिष्यके कानमें तथा उनके द्वारा हृदयमें अर्पित होता है, उनके व्यवहारभूमिमें गुरुपद वाच्य और गुरुरूपसे पूजनीय होनेपर भी वास्तवमें यह मंत्रही यथार्थ गुरुरूपमें ग्राह्य है। इस शब्दब्रह्मसे परा, पश्यंति आदिके क्रमके अनुसार वैखरीपर्यंत चार प्रकारकी वाक् उत्पन्न हुई हैं एवं वाक्से पृथिवीसे लेकर सदाशिवपर्यंत सब तत्त्व उत्पन्न हुए हैं। इसीलिए गुरु व्यक्त और अव्यक्तरूपसे समग्र विश्वमें व्याप्त हैं एवं वे विश्वके बाहर शब्द-ब्रह्मके रूपसे एवं शब्दब्रह्मका अतिक्रमण कर परब्रह्म सच्चिदानंदरूपसे नित्य विराजमान हैं। पूर्ण ब्रह्मका परम स्वरूप अव्यक्त हैं और वह बद्ध जीवके लिए अवाङ्मनसगोचर है। इसीलिए वे जीवको स्वरूप धरा देनेके लिए गुरुरूपसे नीचे उतर आते हैं एवं जीवको धरकर क्रमश: फिर उसी अव्यक्त परम धाममें पहुँचा देते हैं। यही उनकी महाकृपाका विलास है। वह परम धाम सकल तत्त्वोंके अतीत, चित्तके संचारक्षेत्रके ऊपर एवं शिवशक्तिकी सामरस्यमय अद्वय भूमि है। इनका बाहरी अंश अतिसूक्ष्म ध्यानके गोचर और अखंड सच्चिदानंदस्वरूप होनेपर भी अंतरतम अंश वैसे ध्यानके भी अगोचर तथा सब प्रकारके विकल्पोंके अतीत होनेके कारण 'नेति नेति' रूपसेही निर्देशके योग्य है।"

या सर्व विवेचनाच्या पार्श्वभूमीवर "आंगें सानें परिणामें थोरु। जैसें गुरुमुखींचें अक्षरु ॥१७.१२९॥" हा दृष्टांत वाचला म्हणजे त्यातील रहस्य उलगडू लागते. श्रीगुरुकृपा हीच आत्मविश्रांती देणारी, विषयत्याग घडविणारी, तत्त्वदर्शन करविणारी व सहजावस्था देणारी असल्यामुळे तिचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

> ते वेळीं आत्मनंदें आघवें। जें सदा वसतें बरवें।
> तें तैसेंचि पाटण पावे। गुरुकृपेचें ॥१६.४४२॥
> तेथ प्रियाची परमसीमा। तो भेटे माउली आत्मा।
> तयें खेवीं आटे डिंडिमा। सांसारिक हे ॥४४३॥
> ऐसा जो कामक्रोधलोभां। झाडी करूनि ठाके उभा।
> तोचि येवढिया लाभा। गोसावी होय ॥४४४॥
> नातरी श्रीगुरुवचना। दिठी देतु जतना।
> शिष्य आत्मभुवना–। माजीं पैसे ॥४५७॥

हा सद्‌गुरुकृपेचा महिमा खरोखर अपरंपार आहे. एकदा गुरुकृपा झाली व गुरुवचनाप्रमाणे साधनाभ्यास घडला की शिष्याला चिच्छक्ती कुंडलिनीच्या

परमप्रेमाची सीमा असलेला शिवरूप आत्मा भेटून सर्व संसाराचा डिंडिमाच नाहीसा होतो. हीच खरी आत्मविश्रांती आहे. ती गुरुकृपेनेच मिळते हे सांगताना श्रीस्वात्मारामयोगींद्र " हठयोगप्रदीपिकेत " असे म्हणतात की–

**दुर्लभो विषयत्यागो दुर्लभं तत्त्वदर्शनम् ।**
**दुर्लभा सहजावस्था सद्‌गुरोः करुणां विना ॥४.९॥**

सद्‌गुरूच्या कृपेशिवाय विषयत्याग, तत्त्वदर्शन व सहजावस्था या गोष्टी अत्यंत दुर्लभ आहेत. अशा प्रकारे कृपा करणारा गुरु साक्षात् शिव असल्यामुळे त्याला नमस्कार करताना ते म्हणतात–

**नमः शिवाय गुरवे नादबिंदुकलात्मने ।**
**निरंजनपदं याति नित्यं यत्र परायणः ॥४.१॥**

नाद, बिंदू व कला या गोष्टींनी युक्त होऊन आत्मरूपाने शोभणाऱ्या शिव-रूप गुरूला नमस्कार असो. जो प्रतिदिन व अखंड गुरुतत्त्वाशी किंवा गुरूने दिलेल्या साधनात तत्पर राहतो तो साधक शुद्धरूप ब्रह्मपदाला पोहोचतो. आचार्य बलभद्रांनी यासंबंधी "सिद्धसिद्धांतसंग्रहाच्या " पाचव्या उपदेशात असे म्हटले आहे की, " परंपरेने प्राप्त झालेल्या सन्मार्गाचे ज्ञान करून देण्याची योग्यता जेथे असेल तोच गुरू पदवीस योग्य होय; कारण तोच या जडजीवाला विश्रांती प्राप्त करून देऊ शकतो. अशा गुरुमाउलीने दाखविलेल्या मार्गानेच स्वसंवेद्य आत्मस्वरूपाचे ज्ञान किंवा दर्शन होते म्हणून या गुरुमाउलीचे देवभावाने नेहमी चिंतन करावे. परमात्मरूपी सद्‌गुरूची कृपादृष्टी ही सर्व कल्याणांची खाण आहे. योगीलोक सर्व सिद्धींचा परिपूर्णपणे त्याग करून एकमात्र स्वात्मवेद्य निरुत्थान दशेचीच प्राप्ती करतात व स्वपिंडाला म्हणजे कुंडलिनी शक्तीला शिवाशी समरस करण्याची क्षमता प्राप्त करतात.एखादाच साधक या सिद्धांताला आत्मसात करून निरुत्थानरूपी ऐश्वर्यलाभासाठी किंवा निरुत्थानस्थितीच्या ज्ञानासाठी प्रयत्न करतो. यामुळे स्वतःच्या अंतःकरणाची निर्मनस्कस्थिती किंवा निश्चलता पूर्वकर्मानुसंधानाने व ज्ञानावेशाने त्याला साधते. नेहमी ज्ञानाचा चित्तप्रवेश साधू लागला म्हणजे प्राण हळूहळू सुषुम्नेत जाऊ लागले की, अतिशय दृढ किंवा गाढ असे चित्ताचे उत्थान साधते. त्यामुळे निरतिशय आनंदावस्थेचा लाभ होतो; म्हणजे त्या आनंदाचे नेहमी स्फुरण होत राहते. त्यानंतर ज्ञानाच्या सातत्यामुळे निर्मलानंदरूपी चमत्काराचे गमक म्हणून ज्ञानप्रकाशाचा उदय होतो व त्यामुळे जीव आणि परमात्मा यातील भेददृष्टी दूर होते. असा साक्षात्कार वरचेवर होऊ लागला की, चैतन्याचे आभासक असे भेदरहित अभिन्नज्ञान नेहमी स्फुरते व ते करतलातील आवळ्याप्रमाणे आपल्या अधीन होऊन राहते. त्यामुळे त्या साधकामध्ये परमपद मोक्षाचा अभ्युदय होऊ लागतो व त्या ज्ञानबलाने त्याला स्वपिंडदेहाचे यथायोग्य

ज्ञान होते. अशा रीतीने पिंडाचे उत्तम ज्ञान झाल्यानंतर परमपदाच्या ठिकाणीं त्याचे ऐक्य करून ज्ञानवृत्ती अंतर्मुख करण्याचा अभ्यास वरचेवर केल्यास उन्मेष म्हणजे आत्मज्ञान उदय पावते. ही दुसरी अवस्था होय. याच उन्मेषाचा प्रत्याहार समरसतेला उत्पन्न करतो. या सामरस्य क्रियेपासून ज्ञानप्रकाशाचा पुंज उत्पन्न होतो. मुनी याच ज्ञानाला आत्मस्वरूपाच्या ठिकाणी अंगीकृत किंवा विलीन करून स्वत: फलप्राप्तीसाठी उद्युक्त होतात. हे ज्ञान आत्मसात केलेला योगी पूर्णतृप्त, संकल्पातीत, स्थिरचित्त व सिद्धसिद्धी प्राप्त झालेला असा होतो. ही ज्ञानप्रक्रिया केवळ गुरुमुखाने म्हणजे शक्तिपातानेच समजू शकते. अन्यथा समजू शकत नाही. अनेक शास्त्राध्ययनाने, स्वकर्तृत्वाने, विज्ञानाने, वलाने किंवा वेदपठनाने हे कळत नाही. ज्ञानाने, लक्ष्याकडे नुसती दृष्टी ठेवल्याने, कर्माभ्यासाने, अपेक्षेने अर्थात् वासनेमुळे, वैराग्याने, नैराश्याने, कायक्लेशाने किंवा प्राणायामाने हे ज्ञान प्राप्त होऊ शकत नाही. मुद्रा धारणाने, मौनव्रताने, उदासीनतेने, देहत्यागाने किंवा अहिंसावृत्तीनेही हे ज्ञान समजत नाही. सेवावृत्तीने, उपदेशाने, अनेक व्रतानुष्ठानाने, षड्दर्शनाध्ययनाने, वेष धारणाने अगर मुंडनाने हे ज्ञान प्राप्त होऊ शकत नाही. सारांश, अनंत उपायांनी किंवा प्रयत्नांनी ते परमपद मिळत नाही. ज्या साधकांना शक्तिपात योगाचा अनुग्रह मिळाला आहे म्हणजे ज्यांच्यावर गुरुकृपा झाली आहे अशा हठयोगी किंवा सत्यवादी साधकांना हे ज्ञान गुरूने आपल्या दृष्टीच्या पाताने त्याच्या ठिकाणी संक्रमित करताच म्हणजेच शक्तिपाताने अनादि आत्मसत्तारूप निद्रिस्त कुंडलिनी शक्तीचे मूलाधारातील अज्ञानावरण काढून टाकून सुषुम्नेमध्ये तिचे चालन करताच मूलतःच शक्तीच्या रूपाने शिष्याच्या ठिकाणी असलेल्या ज्ञानाचा म्हणजेच जागृत शक्तीचा उदय होतो. सद्गुरूने वाणीने सांगताच म्हणजे शब्दाने दृष्टिपात करताच म्हणजे दृष्टीने, त्याच्या सान्निध्याने, दर्शनाने किंवा गुरुप्रसन्नतेने शिष्यसाधकाला शक्तिपातदीक्षेचा प्रसाद प्राप्त होऊन हे ज्ञान उत्तम रीतीने प्राप्त होते."

या सर्व प्रक्रियेचा निर्देश श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ते गुरुशिष्याची गोठी। पदापिंडाची गांठी। तेथे स्थिर राहोनि नुठी। कवणे काळीं ॥ ३.२७२ ॥" या ओवीत साररूपाने केला आहे. गुरुशिष्यांची गुह्य गोष्ट म्हणजे गुरूने शिष्यावर केलेला शक्तिपात अनुग्रहच होय. त्यामुळेच पद म्हणजे सहस्रारातील शिवाची ( पदं हसः प्रकीर्तितः ) व पिंड म्हणजे मूलाधारातील कुंडलिनी शक्तीची ( पिंडं कुंडिलिनी शक्तिः ) गाठ पडते, एकीकरण घडते किंवा सामरस्य होते. या सामरस्यात शिष्याने स्थिर राहावे, तेथून कधीही हलू नये, ती अवस्था मोडू देऊ नये व व्युत्थान दशेत येऊ नये असे श्रीकृष्णांचे अर्जुनाला सांगणे आहे. या बाबतीत म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि" या ग्रंथातील

" अमरत्व साधनपर शाक्तदृष्टि " या लेखात असे म्हटले आहे की, " परपिंडसे लेकर स्वपिंडपर्यंत सब पिंडोंका ज्ञान संपादित कर परमपदमें समरसता प्राप्त की जाती है। परंतु स्वात्मविश्रांति प्राप्त किये विना पिंड और परमपद समरस नहीं किये जा सकते। इसलिए सबसे पहले विश्रांति आवश्यक है, जिसके मूल सद्गुरु स्वयंही हैं। सद्गुरु वाक्यसे अथवा दृष्टिसे एकही क्षणमें स्वाश्रित शिष्यकी चित्त-विश्रांति संपादित कर देते हैं। कहा भी है—

**किमत्र बहुनोक्तेन शास्त्रकोटिशतेन वा**
**दुर्लभा चित्तविश्रांतिर्विना गुरुकृपां पराम् ॥**

अर्थात् इस विषयमें बहुत कहनेसे अथवा करोडो शास्त्रवचनोंको उद्धृत करनेसे क्या लाभ ? गुरुके परमकृपाके बिना चित्तविश्रांति कदापि प्राप्त नहीं हो सकती। चित्तविश्रांतिके अनंतर परमपद साक्षात्कारकी अपेक्षा होती है। यह साक्षात्कार यद्यपि अत्यंत दुःसाध्य है तथापि जिसका चित्त विश्रांत हो चुका हो उसके लिए यथाकथंचित् सुसाध्य होता है। परमपदका साक्षात्कार कर उसमें अपने पिंडका समरसीकरण करना चाहिये। उसी समय आत्यंतिक निरुत्थान दशाका उदय होता है। परमपद स्वसंवेद्य है, वहाँतक न वाणीकी पहुँच है और न मनकी। योगी महती सिद्धि प्राप्त कर अपने स्वरूपका अनुसंधानेच्छु होकर निजावेशका सेवन करता है और निरुत्थान अवस्थाको प्राप्त करता है। सच्चिदानंद चमत्कार, अद्भुत–अद्भुत आकारोंका प्रकाश, प्रबोध और परमपदमें प्रवेश क्रमशः धीरे–धीरे होने लगते हैं। इस अनुभवके बलसे अपने पिंडकी सिद्धि होती है। तब सिद्ध हुए निज पिंडके साथ परपिंडका एकीकरण होता है। " (पृ. २४०)

गुरुकृपेचा महिमा असा अपार असल्याने आपण त्याच जोरावर संसारसागर तरून गेलो हे स्वानुभवपूर्वक सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**मज हृदयीं सद्गुरु। जेणें तारिलों हा संसारपूरु।**
**म्हणौनि विशेषें अत्यादरु। विवेकावरी ॥१.२२॥**

माझ्या हृदयात वास करणारे जे सद्गुरू आहेत त्यांच्या कृपेने मी संसारमहापुरातून बाहेर पडलो. यामुळे विवेकाबद्दल मला विशेष व अत्यंत आदर आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ' मज हृदयीं सद्गुरु ' व ' अत्यादरु विवेकावरी ' असे म्हणून बाह्य सद्गुरू व आंतर सद्गुरू असे दोन भेद स्पष्टच दाखविले आहेत. यातील बाह्य सद्गुरू शक्तिपातरूपी उपायाच्या मंद, मध्य व तीव्र इत्यादि भेदांनी अनेक प्रकारचे असतात असे शास्त्रकारांनी सांगितले आहे. त्यातील अकल्पित, अकल्पितकल्पक, कल्पित व कल्पिताकल्पिक हे चार भेद विशेष मानले आहेत. याशिवाय सिद्धगुरू व दिव्यगुरूही शास्त्रांनी मानले आहेत. बाह्य गुरूचे पृथक्करणात्मक पद्धतीने कितीही भेद मानले तरी सर्वांच्या मुळाशी शेवटी परमेश्वराची

अनुग्रह शक्तीच आहे. त्यामुळे या शक्तिरूपी सद्‌गुरूशिवाय कोणीही अनुग्रह करू शकत नाही किंवा दीक्षा देऊ शकत नाही. त्यामुळे शास्त्रात असे म्हटले आहे की–

**यस्मान्महेश्वरः साक्षात् कृत्वा मानुषविग्रहम् ।**
**कृपया गुरुरूपेण मग्नाः प्रोद्धरति प्रजाः ॥**

याचा अर्थ असा की, स्वतः महेश्वरच आपल्या शक्तितत्त्वाच्या रूपाने मनुष्यरूप धारण करून कृपेने म्हणजे शक्तिपाताने गुरुरूपाने मायामग्न जीवांचा उद्धार करतो. या उद्धारात आंतरिक विवेकरूपी सद्‌गुरूची म्हणजे कुंडलिनी शक्तीची किंवा निद्रिस्त आत्मस्वरूपाची जागृती होत असल्याने विवेकरूपाने उदित होणाऱ्या जागृत कुंडलिनी शक्तिरूपी अंतस्थ गुरूवर आपले विशेष प्रेम आहे, असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. " आत्मा वै गुरुरेकः । " म्हणजे आत्माच एकमात्र गुरू आहे असे सांगून शास्त्रकारांनी आंतर सद्‌गुरूची ' विशेषे अत्यादरु ' या रूपाने प्रतिष्ठा केली आहे. एकदा कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, बाह्य गुरूचे कार्य संपून तिच्या रूपाने उपस्थित होणाऱ्या आंतरगुरूचे कार्य सुरू होते. या दृष्टीनेच महर्षी पतंजलींनी " स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनाऽनवच्छेदात् ॥समाधिपाद १.२६॥ " असे " योगसूत्र " सांगून हा आतून विवेकशक्तीच्या रूपाने प्रकट झालेला सद्‌गुरू पूर्वी होऊन गेलेल्या सर्व गुरूंचाही गुरु आहे; कारण या गुरूला कालाचे बंधन नाही असे म्हटले आहे. ही सर्व प्रक्रिया कशी घडते हे " भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, या ग्रंथातील " शक्तिपात–रहस्य " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी कसे स्पष्ट केले आहे ते आपण " ज्ञानेश्वरीतील नाथसंकेतीचा दंश " या तिसऱ्या प्रकरणात पृष्ठ २४४ वर पाहिलेच आहे. त्याचप्रमाणे अंतरंगात विवेकरूपी गुरूच्या रूपाने उपस्थित होणारे अनुत्तर महाज्ञान हे शास्त्रज्ञानापेक्षा कसे श्रेष्ठ आहे, हे स्वसंवेद्य तत्त्वप्राप्तीच्या प्रक्रियेतील विवेकाचे स्थान कोणते आहे ? या प्रश्नाचा उलगडा करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे केले आहे, याचीही आपण चर्चा केली आहे.

हे विवेकाने उत्पन्न होणारे प्रातिभज्ञान प्रत्येक जीवाच्या ठिकाणी मुळातच असते. मात्र ते गुरूकडून शक्तिपात झाल्यावर उदय पावून शेवटी साधकाला गुणातीत अवस्थेला नेते. हे सर्व अर्थपंथाने म्हणजे सिद्धयोगाने घडते. त्यामुळे " मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे । प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपैसयाचि ॥९.४९॥ " असा गुरुकृपेचा सिद्धांतरूप महिमा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडला आहे. त्यासाठीच जाणत्या साधकाने सद्‌गुरूंचे भजन केले पाहिजे व मीही त्यासाठीच त्यांना अभिवंदन करतो हे सांगताना ते म्हणतात—

**जैसें डोळचां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीस फांटा फुटे ।**
**मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥१.२३॥**

कां चिंतामणी जालियां हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं ।
तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो म्हणे ॥२४॥
म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होईजे ।
जैसें मूळसिंचनें सहजे । शाखापल्लव संतोषती ॥२५॥
कां तीर्थें जियें त्रिभुवनीं । तियें घडती समुद्रावगाहनीं ।
ना तरी अमृतरसास्वादनीं । रस सकळ ॥२६॥
तैसा पुढतपुढती तोचि । मियां अभिवंदिला श्रीगुरुचि ।
जो अभिलषित मनोरुचि । पुरविता तो ॥२७॥

सद्गुरुकृपेचा महिमा असा अपार आहे. या दृष्टीनेच "Principles of Tantra," Part II, या ग्रंथामध्ये श्री. आँर्थर अव्हेलाॅन यांनी "On The Guru" या प्रकरणात असे म्हटले आहे की, "Shastra has therefore said: "He who is my Lord is the Lord of the world. He who is my Guru is the Guru of the world; and hence in all Tantras there has been ordained one Dhyana and one Mantra in the case of the Guru. In fact, just as the wick of one lamp is ignited at the flame of another, so the Divine Shakti which is Mantra is communicated to the disciples body from that of the Guru. Just as the power of burning and giving light in the case of either lamp or of the fire which is the result of their combination remains the same, both before and after the ignition (the fire of both lamps being the same), so the real Guru is everywhere the same, whether in the body of the (earthly) Guru or in that of his disciple. (Page 206)

Even Shastra is not greater than Guru, nor is Tapasya, Mantra, or the fruit of religious rites greater than Guru, nor is the Devi Herself greater than Guru, nor is even Shiva Greater than Guru. No form and appearance is superior to that of Guru, and there is even no Japa which is superior to Guru-that is to say, by performance of Sadhana of Guru alone one becomes Siddha in all the other methods of Sadhana. Hence it has been said in Yamala :

Shiva alone is Guru and I am that Shiva. O great Devi, Thou too art Guru and Mantra alone is Guru. For this reason as regards Mantra there is no difference between Gurudeva and Ishtadeva. (page 211,212)

For this reason Bhagwan, the creator of all things, has said in the Pichchila Tantra: " This Sadhanashatra is based soley on Guru. In it there is no beneficient lord other than Guru. O Maheshvari ! a Sadhaka should seek the protection of Guru " ( Page 213 )

त्यामुळेच शास्त्राने असे म्हटले आहे की, जो माझा (ब्रह्माचा) स्वामी आहे तो सर्व जगाचा स्वामी आहे व जो माझा गुरू आहे तो सर्व जगाचा गुरू आहे. यासाठीच सर्व तंत्रांमध्ये गुरूबद्दल एकाच ध्यानाची व मंत्राची दीक्षा कथन केली आहे. वास्तविकपणे ज्याप्रमाणे एका दिव्याची वात दुसऱ्या दिव्याच्या ज्योतीवर पेटविली जाते त्याप्रमाणेच मंत्ररूपाने असलेली दैवी शक्ती ही गुरूकडून शिष्याच्या देहात संक्रमित केली जाते. अग्नीची जळण्याची व दिव्याची प्रकाश देण्याची शक्ती हा अग्नी व इंधन किंवा ज्योत व वात यांच्या एकीकरणाचा परिणाम असला तरी ज्वलनापूर्वी व नंतरही ही शक्ती सारखीच असते (किंवा दोन्ही दिव्यातील अग्नी सारखाच असतो); त्याप्रमाणे आपल्या भौतिक शरीरातील किंवा शिष्याच्या देहात असणारा खरा गुरू सर्वत्र सारखाच असतो. (पृ. २०६)

एवढेच नव्हे तर शास्त्रसुद्धा गुरूपेक्षा श्रेष्ठ नाही; तपस्या, मंत्र, व धार्मिक संस्कारांचे फलसुद्धा गुरूपेक्षा श्रेष्ठ नाही. स्वतः देवीसुद्धा गुरूपेक्षा श्रेष्ठ नाही व शिवसुद्धा गुरूपेक्षा श्रेष्ठ नाही. कोणतीही आकृती किंवा स्वरूप गुरूपेक्षा वरचढ नाही किंवा कोणताही जपसुद्धा गुरूपेक्षा अधिक महत्त्वाचा नाही. याचा अर्थ असा आहे की, गुरुप्रदत्त साधनेच्या आविष्कारानेच साधक कोणत्याही पद्धतीच्या साधनाने सिद्ध होतो. त्यामुळेच यामलात असे म्हटले आहे की—

शिव हाच एकमात्र गुरू असून तो शिव मीच आहे हे श्रेष्ठ देवी ! तू स्वतःच गुरु असून फक्त मंत्रच गुरू आहे. या कारणामुळेच मंत्रासंबंधी विचार करता गुरुदेव व इष्टदेवता यांच्यामध्ये कोणताही फरक नाही. (पृ. २११,२१२)

या कारणामुळेच सर्व गोष्टींचा निर्माता असलेल्या भगवंताने पिच्छिलातंत्रात असे म्हटले आहे की, " हे साधनाशास्त्र संपूर्णपणे गुरूवरच आधारलेले आहे. यामध्ये गुरूशिवाय कोणीही कल्याणकारक स्वामी नाही. हे महेश्वरी ! साधकाने गुरूचा आधार किंवा संरक्षण मिळविण्याचा अवश्य प्रयत्न केला पाहिजे. (पृ.२१३)

" गुरुतंत्रात " या दृष्टीने असे म्हटले आहे की, " जर गुरू संतुष्ट झाला तर शिव संतुष्ट होतो. जर गुरू असंतुष्ट झाला तर त्रिनेत्र शिव असंतुष्ट होतो. याकरिता हे महेश्वरी ! संसारसागर तरून जाण्याला गुरू हाच तारक, संरक्षक आहे व तोच मुक्तिदाता आहे. त्यामुळे शिवच गुरुरूपाने अधिष्ठानभेदाने सर्वत्र विद्यमान असतो. याकरिता शिवात व गुरूत भेद करणे योग्य नाही. सर्व जगच गुरुमय आहे असे समजले पाहिजे. समस्त शास्त्र, तप, मंत्र फल, देवी, शिव, मुक्ती व जप यांपैकी कोणीही गुरूपेक्षा श्रेष्ठ नाही.

" रुद्रयामलातही " गुरूचा महिमा कथन करताना असे म्हटले आहे की–

**भावेन ज्ञानमुत्पन्नं ज्ञानान्मोक्षमवाप्नुयात ।**
**आत्मना मनसा वाचा गुरुरीश्वर उच्यते ।।१.२२३।।**
**ध्यानं संयोजनं प्रोक्तं मोक्षमत्र मनोलयम् ।**
**गुरोः प्रसादमात्रेण शक्तितोषो महान् भवेत् ।**
**शक्तिसंतोषमात्रेण मोक्षमाप्नोति साधकः ।।२२४।।**
**गुरुमूलं जगत्सर्वं गुरुमूलं परंतपः ।**
**गुरोः प्रसादमात्रेण मोक्षमाप्नोति सद्वशी ।।२२५।।**
**गुरुभक्तेः परं नास्ति भक्तिशास्त्रेषु सर्वतः ।**
**गुरुपूजां विना नाथ ! कोटिपुण्यं वृथा भवेत् ।।२४५।।**

भावनेने ज्ञानोत्पत्ती व ज्ञानाने मोक्षप्राप्ती होते. काया–वाचा–मनाने गुरूला ईश्वर समजावे. गुरूशी एकरूप होणे म्हणजे ध्यान व गुरुरूपात मनोलय होणे म्हणजे मोक्ष होय. गुरूच्या केवळ कृपेनेच कुंडलिनी शक्ती संतुष्ट म्हणजे जागृत होते. शक्तिसंतोषाने साधकाला मोक्ष मिळतो. सर्व विश्वाचे मूळ गुरू होय. गुरूच परमतप आहे. जितेंद्रिय साधकाला केवळ गुरुप्रसादाने मोक्ष मिळतो. भक्तिशास्त्रात गुरुभक्तीशिवाय काहीही श्रेष्ठ नाही व गुरुपूजेशिवाय इतर कोटी कोटी पुण्यकारक गोष्टी व्यर्थ आहेत असे म्हटले आहे.

" योगिनीतंत्रामध्येही " देवीने शंकरांना गुरू कोण आहे ?, त्याचे स्वरूप काय आहे ? व तत्त्वज्ञानापेक्षाही गुरू श्रेष्ठ आहे असे आपण कसे म्हणता ?, त्याबद्दल आपले विवरण ऐकण्याची माझी इच्छा आहे असे विचारताच शंकर गुरूचा महिमा सांगताना असे म्हणतात की–

**आदिनाथो महादेवि महाकालो हि यः स्मृतः ।**
**गुरुः स एवं देवेशि सर्वमंत्रेऽधुना परः ।।१.४२।।**
**शैवे शाक्ते वैष्णवे च गाणपत्ये तथैन्दवे ।**
**महाशैवे च सौरे च स गुरुर्नात्र संशयः ।**

मंत्रवक्ता स एव स्याज्ञापरः परमेश्वरी ।।४३।।
मंत्रप्रदानकाले हि मानुषो नगनंदिनी ।
अधिष्ठान भवेत्तस्य महाकालस्य शांकरी ।
देवि ह्यमानुषी चेयं गुरुता नात्र संशयः ।।४४।।
मंत्रदाता शिरःपद्मे यज्ज्ञानं कुरुते गुरुः ।
तज्ज्ञानं कुरुते देवि शिष्योयं शीर्षपंकजे ।।४५।।
गुरुमूलमिदं शास्त्रं गुरुमूलमिदं जगत् ।
गुरुरेव परं ब्रह्म गुरुरेव शिवः स्वयम् ।
गुरुर्यस्य वशीभूतो देवास्तं प्रणमंति च ।।२४।।
अतएव महेशानि एक एव गुरुः स्मृतः ।
अधिष्ठानं भवेत्तस्य मानुषस्य महेश्वरी ।
माहात्म्यं कीर्तितं तस्य सर्वशास्त्रेषु शांकरी ।।४६।।

हे देवेशी ! हे महादेवी !! जो आदिनाथ महाकाल आहे तोच परमश्रेष्ठ गुरू आहे. शैव, शाक्त, वैष्णव, गाणपत्य, ऐंदव, महाशैव व सौरादि मंत्रांचा तोच मंत्रवक्ता किंवा दीक्षागुरू आहे. त्याच्याशिवाय दुसरा कोणीही गुरू नाही यात संदेह नाही. हे परमेश्वरी ! हे पर्वतनंदिनी !! मंत्रप्रदान करण्याच्यावेळी तो आदिनाथच मनुष्यरूपाने मंत्र देतो. हे शांकरी ! त्या मंत्रप्रदानाच्या वेळी गुरूमध्ये महाकालाचेच अधिष्ठान असते. त्यामुळे हे देवी ! गुरूचे हे कर्म अमानुष म्हणजे दैवी आहे असे समज. याबद्दल कोणताही संदेह बाळगू नकोस. शिवस्वरूप मंत्रदीक्षादाता गुरू शिरोरूप सहस्रदलकमलामध्ये ज्याप्रकारे शिवशक्तीच्या सामरस्याचे ज्ञान प्राप्त केलेला असतो त्याप्रमाणेच हे देवी ! दीक्षादानानंतर शिष्यही स्वतःच्या शीर्षकमलामध्ये त्याच प्रकारच्या शिवशक्तिसामरस्यात्मक ज्ञानाची अनुभूती घेतो. हे देवी ! हे सिद्धयोगाचे शास्त्र व सर्व जग हे गुरुमूलक आहे. गुरूच परब्रह्म व गुरूच स्वतः शिव आहे किंवा साक्षात् शिवस्वरूप आहे. ( शिष्य व गुरू तो स्वतःच आहे. ) ज्याने गुरूला वश केले आहे त्याला सर्व देव प्रणाम करतात. त्यामुळे हे महेशानी ! गुरूलाच सर्वश्रेष्ठ समजले पाहिजे. हे महेश्वरी ! मंत्र म्हणजे दीक्षा देताना गुरूच्या मनुष्य देहात अमानुष देवतेचे अधिष्ठान असल्यामुळे सर्व शास्त्रात गुरूचे म्हणजेच गुरुकृपेचे माहात्म्य सांगितले आहे.

गुरूच्या महिम्याची किंवा गुरुकृपेच्या श्रेष्ठत्वाची पावती अशा प्रकारे सर्व शास्त्रे देत असल्यामुळे व शेवटी तोच एकमात्र सर्व आपत्तीत तारक किंवा आश्रयस्थान असल्यामुळे आपले गुरू श्रीकृष्णनाथ यांची प्रार्थना करताना, करुणा भाकताना, महिमा वर्णन करताना किंवा मागणी करताना अर्जुनाच्या मुखातील श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे उद्गार मननीय व चिंतनीय आहेत. ते म्हणतात—

तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें। निकें तें आम्हां सांगावें।
जे सखा सर्वस्व आघवें। आम्हांसि तूं ॥२.५८॥
तूं गुरु बंधु पिता। तूं आमची इष्ट देवता।
तूंचि सदा रक्षिता। आपदीं आमुतें ॥५९॥
जैसा शिष्यांतें गुरु। सर्वथा नेणें अव्हेरू।
कीं सरितातें सागरू। त्यजीं केवीं ॥६०॥
नातरी अपत्यांतें माये। सांडूनि जरी जाये।
तरी तें कैसेनि जिये। ऐकें कृष्णा ॥६१॥
तैसा सर्वांपरी आम्हांसी। देवा तूंचि एक आहासी।
आणि बोलिलें जरी न मानिसी। मागील माझें ॥६२॥
तरी उचित काय आम्हां। जें व्यभिचरेना धर्मा।
तें झडकरी पुरुषोत्तमा। सांगें आतां ॥६३॥
देवा तुज ऐसा निजगुरु। आजि आर्तीधणी कां न करूं।
एथ भीड कवणाची धरूं। तूं माय आमुची ॥३.२१॥
हां गां कामधेनूचें दुभतें। दैवें जाहलें जरी आपैतें।
तरीं कामनेची कां तेथें। वानी कीजे ?॥२२॥
जरीं चिंतामणी हातां चढे। तरी वांछेचें कवण सांकडें।
कां आपुलेनि सुरवाडें। इच्छावें ना ? ॥२३॥
देखा अमृतसिंधूतें ठाकावें। मग ताहानाचि जरी फुटावे।
तरी सायासु कां करावे। मागील ते ? ॥२४॥
तैसा जन्मांतरीं बहुतीं। उपासितां श्रीलक्ष्मीपती।
तूं दैवें आजि हातीं। जाहलासी जरी ॥२५॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांप्रमाणेच उपरोक्त प्रकारे श्रीगुरुकृपेचा महिमा सांगताना शास्त्रकारांनी उद्‌घोष करून असे म्हटले आहे की–

त्वमेव माता च पिता त्वमेव त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव त्वमेव सर्वं मम देवदेव ॥

गुरू हा माता, पिता, बंधू, मित्र, विद्या, द्रव्य इतकेच नव्हे तर सर्वकाही आहे. तो कामधेनू, चिंतामणी व अमृतसिंधू आहे असे सांगून या वस्तूंतील सामर्थ्या-प्रमाणे त्याची कृपा अगाध आहे हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मोठ्या खुबीने सूचित केले आहे. महायोगी गोरक्षनाथांशी " विवेकमार्तंड व गोरक्षपद्धति " या दोन्ही ग्रंथांच्या सुरुवातीला निम्नलिखित श्लोकाने श्रीगुरुकृपेचा अकथनीय महिमा आपल्या संप्रदाय परंपरेला अनुसरून सांगून शिवजीवाचे समरसीकरण करणाऱ्या सिद्धयोगाचे प्रतिपादन केले आहे. ते म्हणतात–

**श्रीगुरुं परमानंदं वंदे स्वानंदविग्रहम् ।**
**यस्य सन्निधिमात्रेण चिदानंदायते तनुः ॥१॥**

श्रीगुरू हे परम आनंदमय आहेत.जागृत कुंडलिनी शक्तीच्या रूपाने असणारा स्वतःचा आनंद हीच त्यांची शरीर धारण केलेली सच्चिदानंदमय मूर्ती आहे. ही मूर्ती शक्तिपातदीक्षेने शिष्याची किंवा साधकाची निद्रिस्त कुंडलिनी शक्ती आपल्या कृपाबलाने जागृत करून शिष्यालाही आपल्यासारखी स्वानंदरूप बनविणारी किंवा स्वानंद देणारी आहे. श्रीगुरुदेवांच्या केवळ सान्निध्यानेच जीवाच्या, साधकाच्या किंवा शिष्याच्या देहात शक्तिसंक्रमण होऊन तोही चैतन्यशक्तीच्या जागृतीमुळे स्वशरीर आनंदमय होऊन जातो. असे कृपाबल असणाऱ्या गुरुंना नमस्कार असो.

शिवसूत्रकार श्रीअभिनवगुप्तांनी शाक्तोपायाचे कथन करताना "गुरुरुपायः ॥ २.६ ॥" असे जे सूत्र सांगितले आहे त्याचा अर्थच शक्तीच्या जागृतीसाठी शक्तिसंपन्न गुरूची कृपा हाच उपाय आहे असा आहे. प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामी-महाराज यांनी "शक्तिपात किंवा कुंडलिनी महायोग" या आपल्या पुस्तकात "शक्तिपाताद् विशेषेण ॥ ४.७ ॥" व "तत्तु गुरुकृपयैव लभ्यते ॥ ४.८ ॥" अशी दोन सूत्रे लिहून कुंडलिनी शक्ती शक्तिपाताने विशेषरीतीने जागृत होते व शक्तिपाताची म्हणजे दीक्षेची किंवा अनुग्रहाची प्राप्ती गुरुकृपेनेच होते असे सांगून गुरुकृपेचा महिमा स्पष्ट केला आहे. "श्रीवातूलनाथसूत्रात" "महासाहसवृत्त्या स्वरूपलाभः ॥१॥" असे सूत्र घालून शक्तिपातरूपी श्रीगुरुकृपेने म्हणजेच महासाहसाने साधकाला स्वस्वरूपाचा लाभ होतो असे सांगितले आहे. यावर टीका करताना "श्रीमदनन्तशक्तिपाद" यांनी आपल्या "वृत्तीत" असे म्हटले आहे की, "अतितीव्रातितीव्रतर विश्रृंखलशक्तिपाताघ्रातस्य स्वस्वरूपसमाविष्टस्य कस्यचित् क्वचित् कदाचित् अकस्मादेव महासाहसवृत्त्या घस्मरमहाघनतरपरनादोल्लासस्फारेण सविकल्पनिर्विकल्पात्मकसमस्तसंविन्निवहघट्टनान्निरावरणमहाशून्यतासमावेशनिष्ठया "स्वरूपलाभः" समस्तकल्पनोत्तीर्णत्वादकृतकनिरवकाशनिरुत्तरनिस्तरंगनिरवधि-र्निनिकेतास्पर्शसंवित्प्राप्तिर्भवति ॥" सद्गुरुकृपेने होणाऱ्या अतितीव्रातीतीव्रतर शक्तिपाताने साधकाला सर्व कल्पनांच्या उत्तरांच्या, तरंगांच्या, कालाच्या, स्पर्शाच्या पलीकडे चैतन्ययुक्त स्वरूपाची म्हणजे शिवशक्तीच्या स्वरूपाची प्राप्ती होते. हेच गुरुवाक्याचे बळकटपण होय. हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तो उपशमें निहटिला । धैर्येंवरी दाटिला ।**
**गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें ॥४.१३१॥**

गुरुवाक्याचे हे बळकटपण, ही कृपा, साहस किंवा धैर्य आणि शक्तिपातदीक्षा किंवा अनुग्रह यांच्या जोरावरच आपण भगद्गीतेवर ओव्यांच्यारूपाने सहजतेने ज्ञानेश्वरी हा प्रबंध लिहीत आहोत हे नऊ अध्याय संपल्यावर "आतां आपुलेनि

कृपाप्रसादें । मियां भगवद्गीता वोंवीप्रबंधे । पूर्वखंड विनोदें । वाखाणिलें ॥१०.२३॥" असे सांगून त्यांनी स्पष्ट केले आहे. सद्गुरू श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी केलेल्या कृपेमुळे म्हणजे शक्तिपात दीक्षेमुळेच हें अलौकिक कार्य आपण संपन्न करू शकलो याची जाणीव श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रोत्यांना वारंवार करून देताना असे म्हटले आहे की—

तुमचा अनुग्रहो गणेशु । जैं दे आपुला सौरसु ।
तैं सारस्वतीं प्रवेशु । बाळकाही आथी ॥१०.६॥
जी दैविकीं उदार वाचा । जैं उद्देशु दे नाभिकाराचा ।
तैं नवरससुधाब्धीचा । थावो लाभे ॥७॥
जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी । जरी मुकेयातें अंगिकारी ।
तो वाचस्पतीशीं करी । प्रबंधुहोडा ॥८॥
मागां दूध दे म्हणतलियासाठीं । आघविया क्षीराब्धीची करूनि वाटी ।
उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविली जैसी ॥१७॥
ना तरी वैकुंठपीठनायकें । रुसला ध्रुव कवतिकें ।
बुझाविला देऊनि भातुकें । ध्रुवपदाचें ॥१८॥
तैसी जे ब्रह्मविद्यारावो । सकल शास्त्रांचा विसंवता ठावो ।
ते भगवद्गीता वोंवियें गावों । ऐसें केलें ॥१९॥
जयांचेनि आठवें । शब्दसृष्टि आंगवें ।
सारस्वत आघवें । जिव्हेसि ये ॥१३.२॥
वक्तृत्वा गोडपणें । अमृतातें पारुखें म्हणे ।
रस होती वोळंगणें । अक्षरांसीं ॥३॥
भावाचें अवतरण । अवतरविती खण ।
हाता चढे संपूर्ण । तत्त्वभेद ॥४॥
श्रीगुरूंचे पाय । जैं हृदय गिवसूनि ठाय ।
तैं एवढें भाग्य होय । उन्मेखासी ॥५॥
हा ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें ।
केलें असे श्रीमंतें । श्रीगुरुरायें ॥१३.११६५॥
तेणें जी कृपासावायें । मी बोलें तेतुलें सामाये ।
आणि मी तुमचिये सभे लाहें । गीता म्हणों ॥११६६॥
आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे ।
कां वर्शी दीपसंगें । दिपुचि होय ॥१७.१९॥
तैसा तुझिया प्रणितीं । मी पूर्णु जाहलों श्रीनिवृत्ती ।
आतां आणोन व्यक्तीं । गीतार्थु तो ॥२०॥

तो सर्वोपकारी समर्थु । सद्‌गुरु श्रीनिवृत्तिनाथु ।
राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ॥१८.१७२९॥
आतां आयती गीता जगीं । मी सांगें मऱ्हाठिया भंगीं ।
येथ कें विस्मयालागीं । ठावो आहे ॥१७३०॥
श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं जयापासीं हो ी ।
तेणें कोळियें त्रिजगतीं । येकवद केली ॥१७३१॥
चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें ।
वसिष्ठें मानिली कीं भांडें । भानूसीं शाटी ॥१७३२॥
मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।
जो दिठीवेनि आपुला । बैंसवी पदीं ॥१७३३॥
आधींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी ।
तें न दिसे ऐसी गोठी । कैंही आहे ? ॥१७३४॥
म्हणौनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्‌वासही प्रबंध होआवे ।
श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥१७३५॥
आधींच तंव तो कृपाळू । वरी गुरुआज्ञेचा बोलू ।
जाला जैसा वर्षाकाळू । खवळणें मेघां ॥१७६१॥
मग आर्तीचेनि वोरसें । गीतार्थग्रंथनमिसें ।
वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥१७६२॥
तेथ पुढां मी बापिया । मांडला आर्ती आपुलिया ।
कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥१७६३॥
एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें ।
तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ॥१७६४॥
वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणें स्वामीची ।
ऐशिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ? ॥१७६५॥
परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनी मातें ।
प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥१७६६॥
यालागीं मी गुणदोष–। विषीं क्षमाविना विशेष ।
जे मी संजात ग्रंथलों देख । आचार्यें कीं ॥१७७०॥

उपरोक्त सर्व ओव्या गुरुकृपेच्या अपार महिम्याने ओतप्रोत भरल्या आहेत. ज्ञानेश्वरीचे सर्व कर्तृत्व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या गुरुचरणी अर्पण केले आहे. किंबहुना " ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचे । ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तियें ॥ १८.१७५१ ॥ " अशीच त्यांची धारणा आहे. ग्रंथ ज्ञानेश्वरी हा आपल्या गुरुमहाराजांच्या कृपेचाच गौरव किंवा वैभव आहे, या

उत्कट धारणेपेक्षाही आपल्याला गुरुकृपाप्रसादाची नितांत आवश्यकता असल्यामुळे आपणाला ग्रंथ निर्मितीचे निमित्त केले गेले असे " किंवाहुना मज। तुमचिया कृपा काज। तियेलागीं व्याज । ग्रंथाचें केलें ॥ १३.३३३ ॥ " या प्रमाणे सांगून सद्गुरूच्या कृपाप्रसादाचा महिमा हा अंतिम व एकमेव आधार असून त्याच्या पलीकडे या जगात दुसरी कोणतीही गोष्ट श्रेष्ठ असू शकत नाही किंवा कधीही असणार नाही हाच सिद्धांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रस्थापित केला आहे. त्यांच्या लेखी " गुरोः कृपैव केवलम् ॥ " हेच सर्वश्रेष्ठ आहे. त्यापलीकडे सिद्धांतच नाही. गुरू ही सर्व शास्त्रांची त्यांच्या दृष्टीने परमसीमा आहे. "गुरुमूलमिदं सर्वं शास्त्रज्ञानं सुरेश्वरी" हे जे शंकरांनी पार्वतीला सांगितले आहे त्याचा विस्तार म्हणजे ज्ञानेश्वरी आहे. गुरुकृपा या एका शब्दात सर्व ज्ञानेश्वरी साठविलेली आहे. किंबहुना गुरुकृपा म्हणजे ज्ञानेश्वरी असे समीकरण मांडले तर ते अधिक शोभून दिसेल; कारण ज्ञानेश्वरी म्हणजे काय हे एका शब्दात सांगा असे कोणी विचारल्यास त्याला गुरुकृपा येवढे एकाच शब्दात सुंदर उत्तर देता येईल. आपल्या कृपेचे संचरण शिष्यदेहात करणारा म्हणजे वेधदीक्षा देणारा किंवा शक्तिपात करणारा गुरू ही भूलोकावरील दुर्लभ गोष्ट असून ही दीक्षा स्वीकारणारा अधिकारी शिष्यही दुर्लभच असतो हे सांगताता "कुलार्णवतंत्रात" असे म्हटले आहे की–

**वेधदीक्षाकरो लोके श्रीगुरुर्दुर्लभः प्रिये।**
**शिष्योऽपि दुर्लभस्तादृक् पुण्ययोगेन लभ्यते ॥१४.६६॥**

शिव पार्वतीला म्हणतात, हे प्रिये ! ह्या भूलोकावर वेधदीक्षा देणारा म्हणजे परंपराप्राप्त शक्तीने शक्तिपात करून शिष्याची निद्रिस्त कुंडलिनी शक्ती जागृत करणारा गुरू अत्यंत दुर्मिळ असून या दीक्षेचा अधिकारी शिष्यही अत्यंत दुर्मिळच असतो. केवळ पूर्वपुण्याच्या प्रभावाने अशा गुरूची प्राप्ती होते.

अर्थांतराने हीच गोष्ट सर्व संतांनी, महात्म्यांनी व शास्त्रकारांनी आपल्या ग्रंथात उच्चरवाने सांगितली आहे. "श्रीरामचरितमानसाच्या" सुरुवातीला श्रीगोस्वामी तुलसीदासांनी " वंदे बोधमयं नित्यं गुरुं शंकररूपिणम् " म्हणजे शक्तिपाताने बोध देणाऱ्या नित्य अशा शिवरूप गुरूला मी नमस्कार करतो असे म्हटले आहे. गुरुकृपेच्या म्हणजेच गुरुप्रदत्त शक्तीच्या, शक्तिसंचाराच्या किंवा दिव्य शक्तिप्रदानाच्या दृष्टीनेच संत मीराबाईंनी असे म्हटले आहे की, " पायो जी मैंने राम रतन धन पायो। वस्तु अमोलक दी मेरे सतगुरु किरपा करी अपनायौ ॥ " संत कबीरांनी " कुलार्णवतंत्रातील " उक्ती निम्नोक्त पद्धतीने प्रकट केली आहे. ते म्हणतात–

**यह तन विष की बेलडी, गुरु अमृतकी खान ।**
**सीस दिये जो गुरु मिलै तो भी सस्ता जान ॥**

याचा अर्थ असा की, शक्तिपात दीक्षा देणारा म्हणजे पूर्णकृपा करणारा

गुरू दुर्लभ आहे. " जब सत्‌गुरु पूरा मिलै चाखै अमृत सार । " असे संत श्रीचरणदासांनी म्हटले आहे त्याचा अर्थही हाच आहे. यावर टीका करताना "गुरुपरंपरा" या ग्रंथात प. प. श्रीशिवोमतीर्थस्वामीमहाराज म्हणतात, " शक्तिसंपन्न समर्थ गुरुकी कृपा प्राप्त होनेपरही शिष्य आंतरिक साधनकी अवस्थायें प्राप्त करता हुआ उन्नतिकी ओर अग्रसर होता है । केवल बाते बनानेवाले और मौखिक उपदेश देकरही गुरु-कर्त्तव्यकी इतिश्री मान लेनेवाले गुरुओंके द्वारा यह काम कदापि संभव नहीं । गुरुके अंदर वह चेतन शक्ति जाग्रत होनी चाहिए जिससे वह शिष्यकी अंतःकरणकी लहरोंको अभीष्ट दिशामें मोड दे, अपने अंतःमें प्रकाशित दीपसे शिष्यके अंतःके तिरोहित दीपको प्रज्वलित कर उसके हृदयको भक्ति और ज्ञानसे आलोकित कर दे । इसका तात्पर्य यह है कि सद्‌गुरु शिष्यको मौखिक उपदेशही नहीं, अपितु और भी कुछ देता है । उस शक्तिविशेषको देनेकोही गुरुकृपा कहते है । इसके अनुभवका आनंद तो सौभाग्यप्राप्त साधकही उठा सकते हैं । "

गुरुकृपेचे हे महत्त्व महर्षी व्यासांनी " श्रीमद्‌भागवतात " सांगताना असे म्हटले आहे की—

अनाद्यविद्यायुक्तस्य पुरुषस्यात्म वेदनम् ।
स्वतो न संभवादन्यस्तत्त्वज्ञो ज्ञानदो भवेत् ॥११.२०.१०॥

जीव अनादि कालापासून अविद्येने ग्रस्त असल्यामुळे त्याला स्वतःला स्वतःचे ज्ञान होऊ शकत नाही किंवा तो स्वतः आपले आपल्याला जाणू शकत नाही. त्याला आत्मज्ञान होण्यासाठी दुसऱ्या कोणाच्या तरी सर्वज्ञाच्या म्हणजे सद्‌गुरूच्या साहाय्याची आवश्यकता असते. जनकाने शुकाला उपदेश करताना हेच सांगितले की, गुरुकृपेची नितांत आवश्यकता आहे. तो म्हणतो—

न विना ज्ञान विज्ञाने मोक्षस्याधिगमो भवेत् ।
न विना गुरुसंबंध ज्ञानस्याधिगमः स्मृतः ॥
गुरुः प्लावयितातस्य ज्ञानं प्लवमिहोच्यते ।
विज्ञाय कृतकृत्यस्तु तीर्णस्तदुभयं त्यजेत् ॥

ज्याप्रमाणे ज्ञान-विज्ञानाशिवाय मोक्षाची प्राप्ती होत नाही; त्याप्रमाणे सद्‌गुरूची कृपा झाल्याशिवाय म्हणजे शक्तिपातदीक्षा झाल्याशिवाय ज्ञानप्राप्तीही होऊ शकत नाही. या संसारसागरातून पलीकडे नेणारे किंवा तारणारे सद्‌गुरूच आहेत व त्यांनी दिलेले ज्ञान हे नौकेप्रमाणे आहे असे म्हटले जाते. ज्याप्रमाणे नदी पार केल्यावर मनुष्य नाव व नाविक ह्या दोन्ही गोष्टी सोडून देतो त्याप्रमाणे मुक्त झालेला पुरुष गुरू व ज्ञान ह्या दोन्ही गोष्टी सोडून देतो.

श्रीगुरुकृपेचा महिमा श्रीएकनाथमहाराजांनी " एकनाथी भागवतात " फारच सविस्तरपणे वर्णन केला आहे. त्यात ते म्हणतात—

आता वंदू जनार्दनु । जो भवगजपंचाननु ।
जनीं विजनीं समानु । सदा संपूर्णु समत्वें ।।१.७९।।
ज्याचेनि कृपापांगें । देहीं न देखतीं देहांगें ।
संसार टवाळ वेगें । केलें वाउगे भवस्वप्न ।।८०।।
जयाचेनि कृपाकटाक्षें । अलक्ष्य लक्ष्येंवीण लक्षे ।
साक्षी विसरली साक्षें । निजपक्षें गुरुत्वें ।।८१।।
तो मुखाचें जाला निजमुख । दृष्टीतें प्रकटे सन्मुख ।
तोचि विवेकेंकरून देख । करवी लेख ग्रंथार्थी ।।९८।।

याप्रमाणेच श्रीएकनाथमहाराजांनी श्रीकृष्णांनी गुरुरूपाने उद्धवावर शक्तिपाताने स्वशक्तिसंचरण करून गुरुकृपा कशी केली व हीच गुह्यातिगुह्य गोष्ट आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

यालागीं कृष्ण जगजेठी । उद्धवाची पाठी थापटी ।
अतिगुह्याची गुह्य गोष्टी । तुझे कृपेसाठीं मी बोलतों ।।११.१२७।।
पाठी थापटावयामिसें जाण । करीत स्वशक्तिसंचरण ।
तेणें अद्वयबोधलक्षण । उद्धवासी जाण प्रकाशी ।।१२८।।
तेवीं गुरुकृपाउजियेडें । ज्याचें लिंगदेह विघडे ।
त्यासी परमात्म्यासी ऐक्य घडे । येर बापुडे देहबंदीं ।।१५२।।
बाप भाग्य उद्धवाचें । सगुणनिर्गुण दोहींचें ।
सुख भोगीतसें साचें । हें श्रीकृष्णकृपेचें महिमान ।।२१.५२३।।
जेथ सद्‌गुरुकृपा संपूर्ण । तेथ शिष्याची आवडी प्रमाण ।
तो जें मागे मूर्ति सगुण । तें तेचि जाण गुरु दे ।।५२४।।
पाहिजे निर्गुण निजप्राप्ती । ऐशी आवडी ज्याचें चित्ती ।
तें निर्गुणाचिये निजस्थितीं । गुरुकृपा निश्चितीं नांदवी ।।५२५।।
सगुण निर्गुणे स्वरूपें दोनी । भोगावया आवडी ज्याचें मनीं ।
तेही स्थितीच्या गुरु दानीं । कृपाळूपणें समर्थ ।।५२६।।
सद्‌गुरूचें अगाध महिमान । जें वेदा न बोलवेचि जाण ।
त्याची कृपा झालिया पूर्ण । दुर्लभ कोण पदार्थ ।।५२७।।
ते कृष्णकृपेस्तव जाण । फिटलें उद्धवाचें दुर्लभपण ।
सगुण निर्गुण एक कृष्ण । हे खूण संपूर्ण बाणली ।।५२८।।
कोटीकोटी साधनें करितां । गुरुकृपेवीण सर्वथा ।
हे न ये कोणाचे हातां । जाण तत्त्वतां उद्धवा ।।५३८।।
ते गुरुकृपेलागीं जाण । आचरावे स्वधर्म पूर्ण ।
करावें गा शास्त्रश्रवण । वेदपठण तदर्थ ।।५३९।।

ते कृपेलागीं आपण । व्हावें दीनाचेंही दीन ।
धरितां संतांचें चरण । स्वामी जनार्दन संतुष्टे ।।५४०।।
गुरु संतुष्टोनि आपण । करवी भागवत निरूपण ।
एका विनवी जनार्दन । कृपा नित्य नूतन करावी ।।५४१।।

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही "दासबोधात" उपरोक्त संतांप्रमाणेच सद्‌गुरुकृपेचा महिमा सांगताना असे म्हटले आहे की–

सद्‌गुरुकृपेविण कांहीं । भवतरणोपाय नाहीं ।
याकारणें लवलाही । सद्‌गुरुपाय सेवावे ।।४.४.४।।
सद्‌गुरूविण ज्ञान कांहीं । सर्वथा होणार नाहीं ।
अज्ञानप्राणी प्रवाहीं । वाहतचि गेले ।।५.१.२१।।
तरी सद्‌गुरुकृपेंविरहित । सर्वथा न घडे स्वहित ।
यमपुरीचा अनर्थ । चुकेना येणें ।।३४।।
जंव नाहीं ज्ञानप्राप्ती । तंव चुकेना यातायाती ।
गुरुकृपेवीण अधोगती । गर्भवास चुकेना ।।३५।।
ध्यान धारणा मुद्रा आसन । भक्तिभाव आणि भजन ।
सकळही फोल ज्ञान । जंव तें प्राप्त नाहीं ।।३६।।
सद्‌गुरुकृपा न जोडे । आणि भलतीकडे वावडे ।
जैसे आंधळें चांचरूनी पडे । गारी आणि गडदरा ।।३७।।
आतां सद्‌गुरु ते कैसे । नव्हेत इतरा गुरू ऐसे ।
जयांचे कृपेनें प्रकाशे । शुद्ध ज्ञान ।।४५।।
जे नेणवें पुराणीं । जेथें शिणल्या वेदवाणी ।
तेंचि आतां येच क्षणीं । बोधीन गुरुकृपें ।।५.६.३२।।
पाहिलें नसतां संस्कृतीं । रीग नाहीं महाराष्ट्र ग्रथीं ।
हृदयीं वसिल्या कृपामूर्ती । सद्‌गुरु स्वामी ।।३३।।
आतां न लगे संस्कृत । अथवा ग्रंथ प्राकृत ।
माझा स्वामी कृपेसहित । हृदयीं वसे ।।३४।।
न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवणसायास ।
प्रयत्नेंवीण सुरस । सद्‌गुरुकृपा ।।३५।।
सद्‌गुरुकृपा कळे त्यासी । जो शोधील आपणाशीं ।
पुढें कळेल अनुभवासी । आपोआप वस्तु ।।६.१०.११।।
सद्‌गुरुकृपेस्तव । झाला संसार वाव ।
ज्ञान झालिया ठाव । पुसे अज्ञानाचा ।।३७।।
आतां आठवीन समर्था । सद्‌गुरूसी ।।७.१.११।।
जयाचेनि कृपादृष्टी । होय आनंदाची वृष्टी ।

तेणें गुणें सर्व सृष्टी । आनंदमय ॥१२॥
सद्‌गुरुकृपा तेचि किल्ली । जेणें बुद्धि प्रकाशली ।
द्वैतकपाटें उघडलीं । एकसरां ॥७.२.१५॥

श्रीतुकाराममहाराजांनी तर आपल्यावर सद्‌गुरुकृपा कशी झाली हे "सद्‌गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥१॥ सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा ठेविला कर ॥२॥" अशा प्रकारे कथन करून स्पर्शदीक्षेचे वर्णन केले आहे. गुरू किंवा संतकृपेचे त्यांनी पुढील काही अभंगातून जे वर्णन केले आंहे ते पाहण्यासारखे आहे. ते म्हणतात—

श्रीसंतांचिया माथा चरणांवरी । साष्टांग हें करी दंडवत ॥१॥
विश्रांति पावलों सांभाळ उत्तरीं । वाढलें अंतरीं प्रेमसुख ॥२॥
डौरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें उद्धरलों ॥३॥
तुका म्हणे मज न घडतां सेवा । पूर्वपुण्यठेवा वोढवला ॥४॥१९२७॥

卐 卐 卐

पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥१॥
मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ती ॥२॥
नव्हे हा उपदेश । तुमचें बडबडलों शेष ॥३॥
तुमचे कृपेचें पोसणें । जन्मोजन्मीं तुका म्हणे ॥४॥२१३३॥

卐 卐 卐

आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥१॥
साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥२॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परी त्या विश्वंभरें बोलविलें ॥३॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायावीण ॥४॥२९८२॥

अशा प्रकारे अनेक संतांची वचने उधृत करून गुरुकृपेचा महिमा स्पष्ट करता येईल; परंतु विस्तारभयास्तव तसे करणे योग्य ठरणार नाही. उपरोक्त सर्व विवेचनाचा अर्थ गुरुकृपा म्हणजे शक्तिपात होणे अपरिहार्य आहे हाच आहे. आपल्याला निमित्त करून या ग्रंथाच्या रूपाने श्रीनिवृत्तिनाथमहाराजांची कृपा तर शब्दरूपाने साकार झालीच; पण गीतेचा भावार्थ स्पष्ट होऊन गुरुकृपा म्हणजे सिद्धयोगाचे सोपे साधन होय, हे त्यांनी जगाला दाखवून उपलब्ध करून दिले असे "एथ श्रवणाचेनि द्वारें । तीर्थी रिघतां सोपारें । ज्ञानदेवो म्हणे दातारें । माझेनि केलें ॥११.८॥" या रीतीने सांगितले म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. "मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण । करूनि सद्‌गुरुस्मरण । अनुभविजे ॥६.१८६॥" हे सांगताना गुरुकृपा व सिद्धयोगसाधन हे कसे एकरूप आहेत हेच त्यांना साधकाच्या मनावर ठसवावयाचे आहे. या साधनाच्या फलस्वरूपात गुरुकृपेचा महिमाही अंतर्निहित असल्यामुळे तो सांगताना ते म्हणतात—

तें वेळीं आपणपेयां सहितें। इयें अशेषेंही भूतें।
माझ्या स्वरूपीं अखंडितें। देखसी तूं ॥४.१६९॥
ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकारु जाईल।
जैं गुरुकृपा होईल। पार्था गा ॥१७०॥
तैसें दुर्भेद जे अभिप्राय। कां गुरुगम्य हन ठाय।
तेथ सौरसेंवीण जाय। बुद्धि तयाची ॥६.४५९॥
जयां सदगुरुतारूं फुडें। जे अनुभवाचे कांसे गाढे।
जयां आत्मनिवेदनतरांडें। आकळलें ॥७.९८॥
येणें उपायें मज भजले। ते हे माझी माया तरले ॥१०२॥
तैसीच गुरुकृपा उखा उजळली। ज्ञानाची वोतपली पडली।
तेथ साम्याची ऋद्धि उघडली। तयाचिये दिठी ॥७.१३१॥
ते वेळीं आत्मानंदे आघवें। जें सदा वसतें बरवें।
तें तैसेंचि पाटण पावे। गुरुकृपेचें ॥१६.४४२॥
ते सत्त्वशुद्धी साहाकारें। गुरुकृपामृततुषारें।
सासिन्नलेनि वोधें वोसरे। द्वैतदैन्य ॥१८.२५९॥
परी हेचि आत्मासिद्धि। जो कोणी भाग्यनिधि।
श्रीगुरुकृपालाब्धि-। काळीं पावे ॥९८४॥

गुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीमुळे उपरोक्त सर्व फले साधकाला प्राप्त होऊन तो कृतार्थ होतो. ही सर्व फलनिष्पत्ती एकमात्र गुरुकृपांतर्गतच आहे असा निर्वाळा सकल शास्त्रकारांनी एकमुखाने दिला आहे. "श्रीगुरुनाथस्य सर्वकारणकारणम् ॥ १४ ॥" असे "काश्यपसूत्रात" म्हटले आहे. श्रीगुरू हे सर्व कारणांचे व त्यांच्या परिणामांचे कारण असून त्यांची एकमात्र कृपाच फक्त मुक्ती देऊ शकते हे नितांत सत्य आहे. या दृष्टीनेच महायोगी गोरक्षनाथांनी "गोरक्षसिद्धांतसंग्रहात" असे म्हटले आहे की, "अस्मिनमार्गे सर्वश्रेयोमूलभूतो गुरुरेव (पृ. १) भो पुरुषः ! गुरुहीनानां तेषां कष्टं भवेत्; तदा तादृशः पूर्वोक्तः पूर्णो गुरुर्लभ्येत तदा महदपि कष्टं स्वल्पं भवेत्। तत्र दृष्टांतः यथा महाभारयुक्ता या शिला भवेत् तस्या उत्थापने सहस्राणामपि पुरुषाणां कष्टं भवेत्, सा च बुद्धिमता पुरुषेण कृतकाष्ठादियत्नेनाप्रयासेनैवोत्थाप्यते, तथा गुरुमय्या कुंचिकया स्वल्पेनापि कष्टेन सहजसिद्धिर्भवति, यदि च महत्कष्टमपि भवेत् तदा कष्टोत्तरे तु महानानंदो भवत्येव यस्त्वखंडैकनाथरूपो भवति। (पृ. १२) स च योगो गुरुकृपयाऽल्पश्रमेणैव प्राप्तो भवेदतोऽन्यत्सर्वं परित्यज्य योग एव सेवनीयः।" (पृ. १६) याचा अर्थ असा की, या सिद्धयोगमार्गामध्ये सर्व कल्याणाचे मूळ गुरूच आहे. हे साधकांनो ! जे लोक गुरुविरहित असतात त्यांना निश्चितच खूप

कष्ट पडतात. जर पूर्वी सांगितल्याप्रमाणे शांकरी विद्या जाणणारा म्हणजे शक्तिपात करणारा गुरू मिळाला तर अत्यंत महान् कष्टही अत्यंत स्वल्प होतात. काही विशेष युक्तीशिवाय किंवा गोल गोल लाकडांच्या आधाराशिवाय जर खूप मोठी शिला हलविण्याचा प्रयत्न केला तर हजारो पुरुषांनाही ती शिला हलत नाही व खूप कष्ट होतात. मात्र एखाद्या बुद्धिमान पुरुषाने सांगितलेल्या युक्तीमुळे लाकडांच्या व आधारांच्या साहाय्याने ती शिला सहज हलविता येते. याच प्रकारे गुरुदेवांनी सांगितलेल्या युक्तीच्या किल्लीने अत्यंत थोड्या कष्टात खूप मोठी सिद्धी म्हणजे ब्रह्मज्ञान प्राप्त होते.ही सिद्धी प्राप्त होताना जे कष्ट होतात ते खूप कष्ट आहेत असे मानले तरीसुद्धा त्या कष्टांनंतर खूप मोठा आनंद साधकाला प्राप्त होतो. गुरूची थोडीही कृपा झाली तरी अत्यंत अल्प परिश्रमात या सिद्धयोगाची प्राप्ती होते. यासाठी इतर सर्व गोष्टी सोडून देऊन योगाचाच अभ्यास केला पाहिजे. "महार्थमंजरी" या ग्रंथामध्येही महायोगी गोरक्षनाथांनी सिद्धयोगसाधनशास्त्राचा अमर सिद्धांत पुढील शब्दात ग्रथित केला आहे. ते म्हणतात–

> यदुक्तं मयैव श्रीपादुकोदये ।
> गुरुमत्तैव नः शास्त्रे परमं फलमुच्यते ।। (पृ. १७०)

श्रीपादुकोदय या ग्रंथांत मीच असे सांगितले आहे की "गुरू करणे हेच आमच्या या सिद्धयोगशास्त्रातील श्रेष्ठ फल ( किंवा अंग ) होय. गुरुकृपेचा हा महिमा "गुरुगीतेत" श्रीशंकरांनी पार्वतीला स्वतःच सांगताना असे म्हटले आहे की–

> अखंडमंडलाकारं व्याप्तं येन चराचरम् ।
> तत्पदं दर्शितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ।।१४८।।
> अज्ञानतिमिरांधस्य ज्ञानांजनशलाकया ।
> चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः ।।१४९।।
> न गुरोरधिकं तत्त्वं न गुरोरधिकं तपः ।
> तत्त्वज्ञानात्परं नास्ति तस्मै श्रीगुरवे नमः ।।१५७।।
> गुरुरादिरनादिश्च गुरुः परमदैवतम्
> गुरोः परतरं नास्ति तस्मै श्रीगुरवे नमः ।।१५९।।
> ध्यानमूलं गुरोर्मूर्तिः पूजामूलं गुरोः पदम् ।
> मंत्रमूलं गुरोर्वाक्यं मोक्षमूलं गुरोः कृपा ।।१६०।।
> गुरोः कृपाप्रसादेन आत्मारामो हि लभ्यते ।
> अनेन गुरुमार्गेण आत्मज्ञानं प्रवर्तते ।।१६८।।

जो अखंड मंडलाकार रूप धारण करून हे सारे चराचर विश्व व्यापून राहिलेला आहे व जो परमात्म्याच्या परमपदाचे दर्शन घडवून आणतो अशा श्रीगुरूला नमस्कार असो. अज्ञानरूपी तिमिराने अंध झालेल्या व्यक्तीचे नेत्र ज्ञानरूपी अंजन-

शलाकेच्या द्वारे जो उघडतो तोच खरा गुरू होय. अशा गुरुदेवांना नमस्कार असो. गुरुतत्त्व हे सर्वात श्रेष्ठ आहे; कारण गुरूहून दुसरे मोठे तत्त्व नाही. गुरुसेवा व गुरुभक्तीहून श्रेष्ठ असे दुसरे तप नाही म्हणजे कोणतेही तप गुरूपेक्षा श्रेष्ठ नाही. गुरुतत्त्वज्ञानाहून दुसरे कोणतेही तत्त्वज्ञान या जगात श्रेष्ठ नाही. अशा श्रेष्ठ गुरूला नमस्कार असो. गुरूच सर्वांचे उगमस्थान आहे. तोच आदि किंवा प्रथमपासून आहे. त्याच्याहून आदि असे दुसरे काहीच नाही. याचा अर्थ गुरूला स्वतःला दुसरे उगमस्थान नाही. गुरुतत्त्व स्वयंभू आहे. गुरूच परमदैवत आहे. गुरूहून दुसरे श्रेष्ठ काही नाही. अशा श्रीगुरूला नमस्कार असो. गुरुमूर्तीचे ध्यान हे सर्व ध्यानाचे मूळ किंवा आधारस्थान आहे. गुरूच्या चरणकमलांची पूजा हीच सर्व पूजांचे मूळ आहे. गुरुवाक्य हे सर्व मंत्रांचे मूळ आहे व गुरूची कृपा हेच मुक्ती प्राप्त करण्याचे प्रमुख साधन आहे. केवळ गुरुकृपेच्या सामर्थ्यानेच आत्मारामपदाचा लाभ होतो. गुरुमार्गाचा अवलंब केल्यानेच आत्मज्ञानाचा उदय होतो.

सारांश प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांनी "वृद्धशिक्षा" या प्रकरण ग्रंथात म्हटल्याप्रमाणे " विशारदं ब्रह्मनिष्ठं श्रोत्रियं गुरुमाश्रयेत् ॥ ६ ॥ " अशा गुरूलाच शरण जावे. वृद्धशिक्षेतील उपरोक्त श्लोकावर टीका करताना स्वतः श्रीटेंबेस्वामीमहाराजच असे म्हणतात की, मुमुक्षूने शब्दब्रह्म व परब्रह्मनिष्णात म्हणजे दृष्टान्तादिकांनी व शक्तिपाताने सर्वानर्थमूळ अज्ञान निवृत्त करणाऱ्या समर्थ अशा सद्गुरूचा आश्रय करावा. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या गुरुकृपेच्या महिमाकथनाचे हे सार आहे. किंबहुना महिमा किंवा स्तुती सांडून श्रीगुरुचरणावर माथा ठेवणे हेच गुरुकृपेच्या महिम्याचे सार असल्यामुळे व " द्रष्टा श्रीगुरुमूर्ती । न रिगता दृश्यपंथीं । तरी कां ह्या उपास्ती । आकळता तो ? ॥१८.१७०४॥" अशी त्यांची नितांत धारणा असल्यामुळे ते म्हणतात—

> तैसें श्रीगुरूचें महिमान । आकळितें कें असे साधन ?।
> हें जाणोनि मियां नमन । निवांत केलें ॥१०.१३॥
> जरी प्रज्ञेचेनि आथिलेपणें । श्रीगुरुसामर्थ्या रूप करूं म्हणे ।
> तरि ते मोतियां भिंग देणें । तैसें होईल ॥१४॥
> का साडेपंधरतया रजतवणी । तैशीं स्तुतींचीं बोलणीं ।
> उगियाचि माथा ठेविजे चरणीं । हेंचि भलें ॥१५॥
> यालागीं आतां । स्तुति सांडूनि निवांता ।
> चरणीं ठेविजें माथा । हेंचि भलें ॥१४.१५॥

श्रीगुरूंच्या चरणावर माथा ठेवल्यावर त्यांच्या कृपेचे महिमान हृदयात कसे प्रस्फुटित होते हे ज्यांनी अनुभविले आहे त्यांनाच यातील रहस्य हृदयंगम होईल हेच खरे !

## गुरुकृपेचा अर्थ:-

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तैसा मी अनुग्रहीतु। साधूंचा निरूपितु ॥१.८२॥" या पहिल्या अध्यायातील प्रास्ताविक कथनात आपण स्वतःच गुरुकृपेने कसे न्हाऊन गेलो आहोत हे स्पष्ट करून शेवटी "येवढा जिये सांकडां। कैसा अनुग्रहो पैं गाढा। जे ब्रह्मानंदु उघडा। भोगवीतसे ॥१८.१५८४॥" असे धृतराष्ट्राला सांगणारा संजयही ब्रह्मानंद उघडपणे भोगविणाऱ्या गुरुकृपेत कसा बुडून गेला आहे, हे स्पष्ट केले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी "तुमचा अनुग्रहो गणेशु। जैं दे आपुला सौरसु। तैं सारस्वतीं प्रवेशु। बाळकाही आथी ॥१०.६॥" असाच गुरुकृपेचा अर्थ असल्याने त्यांनी श्रीकृष्णांच्या मुखातून अर्जुनाला असे विचारले आहे की, "पाठीं म्हणतसे पांडवा। शास्त्र हें मानलें कीं जीवा ? ॥ १८.१४७४॥" या भगवंताच्या प्रश्नाला अर्जुनाने उत्तर दिले की, "तेथ येरु म्हणे देवा। आपुलिया कृपा ॥१८.१४७४॥" याचा अर्थ असा की, गीताशास्त्र समजावयाचे असेल, त्याचे आकलन व्हावयाचे असेल नव्हे त्याची प्रतीती घ्यावयाची असेल; तर गुरुकृपेशिवाय पर्याय नाही हेच त्यांना सांगावयाचे आहे. अशा प्रकारे शास्त्रात गती होण्यासाठी, त्यातील प्रत्यक्षानुभूतीसाठी व फलप्राप्तीसाठी गुरुकृपेची नितांत आवश्यकता आहे हे लक्षात आले तरी गुरुकृपेचा खरा अर्थ काय आहे हे जोपर्यंत लक्षात येत नाही तोपर्यंत सामान्य माणसाची व अजाणत्या साधकाची स्थिती हवेवर तरंगणाऱ्या कागदाच्या कपटचासारखी अनिश्चित राहते. मात्र शास्त्रकारांनी गुरुकृपेचा अर्थ काय सांगितला आहे, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुरुकृपेच्या अर्थाचे स्पष्टीकरण कसे केले आहे व आपली अनुभूती याबद्दल कोणती आहे हे पाहिले म्हणजे असे लक्षात येते की, ज्याला कृपा म्हणतात त्या शब्दाचा किंवा वस्तूचा किंवा प्रक्रियेचा शास्त्रीय अर्थ शक्तिपात असा आहे. या संबंधी "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, या ग्रंथातील "शक्तिपात रहस्य" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, "आत्माकी स्वरूपावस्थिति अथवा मोक्षप्राप्तिही मानव-जीवनका स्वाभाविक उद्देश्य है। धारणाशक्तिके अभावसे साधारण लोग भलेही यह बात स्वीकार न करें, परंतु इसकी सत्यताके विषयमें विश्वास न करनेका कोई कारण नहीं है। यथासमय सभीको यह बात हृदयंगम हो जाती है। जबतक मनुष्य अपने स्वरूपमें स्थिति प्राप्त न करेगा अथवा कम-से-कम स्थिति-लाभके सच्चे मार्गमें पदार्पण नहीं करेगा तबतक उसको अपने शुभाशुभ कर्मोंके अधीन होकर उनके सुखदुःखरूप फल भोगनेके लिए तदनुरूप विभिन्न स्थानोंमें निरंतर भटकना पडेगा तथा बाध्य होकर जन्म-मरणके चक्रमें नियमतः आवर्त्तन करना पडेगा। यही संसार है। विना स्वरूपमें स्थित हुए इससे मुक्तिलाभकी कोई संभावना नहीं है।

तो क्या स्वरूप-स्थितिका कोई उपाय नहीं है ? है, अवश्य है और जीव उसे

प्राप्त भी कर सकते हैं। जिस समय जीव उस उपायको प्राप्त कर लेते हैं, उस समय उसके तारतम्यके अनुसार शीघ्र अथवा विलंवसे अक्रम अथवा सक्रम भावसे वे संसारसे मुक्त होकर अपने पूर्ण स्वरूपमें प्रतिष्ठित हो सकते हैं। आत्माका यह पूर्ण स्वरूपही भगवत्तत्त्व या पूर्णब्रह्मभाव है।

तांत्रिक आचार्योंकी परिभाषामें इस उपायको "शक्तिपात" कहा जाता है। भगवदनुग्रह या कृपा भी इसीका नामांतर है। इसको छोडकर शुद्ध पौरुष प्रयत्नसे भगवत्प्राप्ति नहीं हो सकती। वस्तुतः भगवन्मुखी वृत्तिके मूलमें सर्वत्र भगवत्कृपा माननीही पडती है; क्योंकि विना उनकी कृपाके उनकी ओर चित्तकी गति हो ही नहीं सकती।" (पृ. २२०)

यावरून हे स्पष्ट होते की, कृपा म्हणजे शक्तिपात होय. या शक्तिपातालाच अनुग्रह किंवा दीक्षा असे शास्त्रकारांनी संवोधिले आहे. वस्तुतः दीक्षा, अनुग्रह किंवा शक्तिपात ही सर्व आत्मसंस्काराचीच नामांतरे असून हा आत्मसंस्कार अखेरचा संस्कार आहे असा उद्‌घोष शास्त्रकारांनी केला आहे. या संवंधी "स्पंदशास्त्रात" असे म्हटले आहे की—

> इयमेवाऽमृतप्राप्तिरयमेवाऽऽत्मनो ग्रहः।
> इयं निर्वाण दीक्षाच शिवसद्‌भावदायिनी ॥४.२॥

या श्लोकावर टीका करताना श्रीभट्ट कल्लट्टांनी असे म्हटले आहे की, "जीव शरीरादि नश्वर वस्तूंचे अवलंवन करून त्यालाच अहं अहं म्हणत बसतो. त्याच-प्रमाणे सर्व ठिकाणी परमशिव आहे ही भावना सुटून द्वैतरूपाने त्यास मिथ्या ज्ञानच भासमान होते. वरील दोन्ही गोष्टींचा उच्छेद करून सर्व काळी सर्व देशी स्वच्छपूर्ण स्वतंत्र अशा एका चैतन्य तत्त्वाचीच जाणीव असणे यालाच सम्यक्‌ज्ञान असे म्हणतात. अशा प्रकारचे ज्ञान प्राप्त झाले म्हणजे साधकाला अमृताचीच प्राप्ती झाल्यासारखे आहे. याचाच अर्थ साधकाला परमशिवाची प्राप्ती होऊन मोक्ष मिळाला असा होतो. अमृतासारख्या जड वस्तूला मोक्ष म्हणत नाहीत. अमृताची प्राप्ती झाली की, पुष्कळ काळ टिकणारे शरीर प्राप्त होते. मात्र अमृताने आत्मप्राप्तिरूपी मोक्ष प्राप्त होत नाही. खरे म्हणजे मोक्षप्राप्तीसाठी वरीलप्रमाणे ज्ञानसिद्धी झाली पाहिजे. गुरूने दिलेला मंत्रोच्चार करण्याच्या वेळी इच्छा करता-क्षणीच साधक किंवा दीक्षाकाळी शिष्य तद्रूप म्हणजे आत्मरूप बनत असतो. दीक्षा-काळी गुरूने आपण स्वतःला परमात्मस्वरूप आहोत अशी भावना करून शिष्याला ही स्थिती प्राप्त होवो असा संकल्प करीत शिष्याच्या ठिकाणी शक्तिपाताने ही स्थिती प्रविष्ट करावी. अशा प्रकाराने आत्मप्राप्ती करून घेण्याच्या विधीचा विवेक शिष्यानेही नीट केला पाहिजे. अमूर्त अशा परब्रह्म तत्त्वाचे देणे अगर घेणे संभवत नाही; परंतु देणारा गुरू व ग्रहण करणारा शिष्य हे दोघे व्यापक अशा संवित्

स्वरूपाशी अभिन्न असल्याने गुरूकडून शिष्याशी अभिन्न अशा रूपाने राहूनच दान दिले जाते व शिष्याकडूनही अभिन्न अशा रूपानेच दान स्वीकारले जाते. यालाच निर्वाण दीक्षा म्हणतात. निर्वाण म्हणजेच निवृत्ती होय. जीवाच्या ठिकाणी द्वैताच्या भावाचा जो क्षोभ झालेला असतो किंवा होतो त्याचा दीक्षेने नाश झाला की, जीवाला आत्यंतिक शांती प्राप्त होते. या दीक्षेमुळेच स्वस्वरूपाच्या ठिकाणी ज्ञान स्थित होते. आपपररूपी बंधाचा नाश ज्या संस्काराने होतो व ज्यामुळे स्वस्वरूपाच्या ज्ञानाचे दान केले जाते त्या विधीला दीक्षा (कृपा) म्हणतात. 'दी' म्हणजे दान व 'क्षा' म्हणजे बंधाचा नाश होय. अशा प्रकारे ज्ञानाचा उपदेश झाला म्हणजे त्याला निर्वाण दीक्षा म्हणतात. या निर्वाण-दीक्षेलाच संवित्-दीक्षा असे नाव आहे. परमेश्वराच्या अनादि सत्तेच्या (कुंडलिनीच्या) जागृतीमुळे 'मी अहं आहे' म्हणजे मी परब्रह्म आहे अशा ज्ञानाच्या सिद्धीची अवस्था या संवित्दीक्षेमुळे साधकाला प्राप्त होते. ही निर्वाण-दीक्षा देऊन (कृपा करून) परमशिवात्मक अशा आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देण्यास फक्त सुप्रबुद्ध असे गुरूच समर्थ असतात. (दीक्षा किंवा कृपा किंवा अनुग्रह) हा अखेरचा संस्कार आहे. देणारा व घेणारा तयार असला की, हा संस्कार संपन्न होतो. जगत् किंवा प्रपंच सत्य असल्याचे मिथ्या ज्ञान ज्याचे पूर्णपणे नष्ट झाले असेल तोच ही दीक्षा देण्यास समर्थ असा अधिकारी पुरुष असतो.

या दीक्षेमुळे स्वरूपाच्या संवेदनाला सुरुवात होते. शक्तीच्या जागृतीमुळे आत्म्यावरील आवरण हळूहळू दूर होत जाते. हाच आत्म्याच्या अमृतत्त्व प्राप्तीचा मार्ग आहे. मृत्यू, म्हातारपण इत्यादि परंपरा संपून पुन्हा जन्म प्राप्तीचा संभव उरत नाही, अशा अवस्थेला आम्ही मुक्ती म्हणत नाही. (दीक्षेने किंवा कृपेने) शक्तीची जागृती म्हणजे क्षीरसागरातून स्वतः परमात्म्याने प्रकट किंवा उद्भूत होणे आहे. हाच खरा आत्म्याचा अनुग्रह आहे. हीच निर्वाण-दीक्षा आहे. हेच खरे परमात्म्याशी मीलन आहे. "मोक्षधर्मात" असे म्हटले आहे की, "सर्व संकल्प सोडून देऊन चित्त सत्त्वात विलीन केले पाहिजे. जेव्हा चित्त सत्त्वात विलीन होते तेव्हा काळावर विजय प्राप्त होतो." 'आत्मसंबोधातही" असे सांगितले आहे की, "स्वभाव-संवित्चे ज्ञानच मनुष्याला या संसार सागरातून तरून नेण्यास समर्थ ठरते. एक वेळेला केलेले अमृतपानही मृत्यूपंथाला लागलेल्या माणसाला अमर करते. ज्ञानसद्भावाचे दान व सर्व मल धुऊन टाकणे किंवा नाहीसा करणे हाच दीक्षा पदाचा अर्थ आहे. जेव्हा सद्गुरू आपल्या अपार सामर्थ्याने शक्तिपात करून बोधानुवेध करतात तेव्हा उपरोक्त गोष्ट सिद्ध होते. दीक्षेतील 'द' शब्दाचा अर्थ दान असा असून 'क्ष' या शब्दाने क्षपण म्हणणे दूर करणे असा अर्थ सूचित होतो."

महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धान्तपद्धतीतही" गुरुकृपा म्हणजे शक्तिपात होय हे स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

**तत्कथम् ? गुरुदृक्पातनात् प्रायो**
**दृढानां सत्यवादिनां सा स्थितिर्जायते ।।५.६४।।**
**कथनाच्छक्तिपाताद्वा यद्वापादावलोकनात् ।**
**प्रसादात्स्वगुरोः सम्यक् प्राप्यते परमंपदम् ।।६५।।**

तत्त्वस्थिती म्हणजे स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती साधकाला कशी होते ? ज्यावेळी श्रीसद्गुरू आपली कृपादृष्टी शिष्यावर टाकतात म्हणजे तिचा पात करतात त्यावेळीच दृढ व सत्यवादी साधकाला ही स्थिती प्राप्त होते. या कृपेलाच शक्तिपात असे म्हणतात. श्रीसद्गुरूंच्या कथनाने म्हणजे शब्दाने शक्तिपात किंवा कृपेचा संचार होतो. प्रत्यक्ष स्पर्शाने शक्तीचे शिष्यदेहात संक्रमण होऊन शक्तिपात होतो. श्रीसद्गुरूंच्या नुसत्या चरणांचे अवलोकन किंवा दर्शन घेतल्यानेही शिष्याला हा शक्तिपाताचा म्हणजे कृपेचा दिव्य प्रसाद प्राप्त होऊन सम्यक् अशा परमपदाची प्राप्ती होते.

"महार्थमंजरी" या ग्रंथातही उपरोक्तप्रकारे कृपेचा अर्थ शक्तिपात आहे हे स्पष्ट करताना महायोगी गोरक्षनाथ म्हणतात–

**गूढात् गूढतरो भवति स्फुटादपि स्फुटतर एषः ।**
**देशिककटाक्षपाते पक्ष. प्रथमो न भवति धन्यानाम् ।।६७।।**

या श्लोकावर स्वतःच टीका करताना ते म्हणतात, "कुलगुरूंच्या शक्तिपात-रूप दृष्टिपाताने म्हणजे कृपेने भाग्यवंतांना व पुनर्जन्मरहितांना गूढतरता संभवत नाही; तर त्यांना सर्व स्पष्टतर असते व दिसते. "दीयते शिवसद्भावः क्षप्यते पापसंचयः ।" या न्यायाने दीक्षेच्या वेळी सद्गुरू शिष्याला शिवसद्भावाचे दान करतात व पापराशींचे क्षालन करतात. याप्रमाणे शिष्याच्या किंवा साधकाच्या बाबतीत स्पष्टतरत्वच संभवते. गुरुकृपालाभाने धन्य झालेल्यांना परमशिवरूप मोक्ष मिळतो. इतर लोक अशा कृपेच्या किंवा दीक्षेच्या म्हणजेच शक्तिपाताच्या प्रसादापासून वंचित राहत असल्यामुळे ते जीवभावाने बद्धच राहतात. अशी व्यवस्था आहे. आत्मस्वरूपरहस्याचा उपदेश करणाऱ्या गुरूच्या शरीरात प्रविष्ट होऊन परमेश्वरच करुणेने औपाधिक प्रमातृरूप जीवाला किंवा शिष्याला तारून नेतो. "आगमात" "कुलाचार्यमधिष्ठाय देवो दीक्षयिता शिवः ।" व "श्रीतंत्रालोकात" "गुरुहृदयनिविष्टः शंकरोऽनुग्रहीता ।" असे म्हटले आहे. याचा अर्थ शिव किंवा शंकरच कुलाचार्यांच्या किंवा गुरूंच्या हृदयात अधिष्ठित होऊन किंवा प्रवेश करून शिष्याला स्वतःच दीक्षा देतात किंवा अनुग्रह करतात असा होतो." श्रीकिरण ग्रंथात" असे म्हटले आहे की–

**दीक्षया मुच्यते जन्तुः प्रातिभेन तथा प्रिये ।**
**गुर्वायत्ता तु सा दीक्षा बद्धबंधनमोक्षणे ।।**
**प्रतिभा स्वस्वभावस्तु केवलीभावसिद्धिदः ।।**

दीक्षेने व प्रातिभज्ञानाने मनुष्य मुक्त होतो. दीक्षा ही गुरूंवर अवलंबून असते. मात्र बंधमुक्त होण्यासाठी स्वत:च स्वत:ला प्राप्त होणाऱ्या म्हणजे साधकाच्या ठिकाणी स्वत:च उत्पन्न होणाऱ्या प्रातिभज्ञानाने त्याला केवलत्व सिद्धी मिळते किंवा त्याचा केवलभाव सिद्ध होतो. या किरणोक्तिप्रमाणे साधकाच्या प्रातिभज्ञानालाही सद्‌गुरुनाथांच्या कृपेची, दीक्षेची, अनुग्रहाची म्हणजे शक्तिपाताची आवश्यकता आहे; कारण अशा प्रकारचे प्रातिभज्ञानाचे प्रस्फुटीकरण किंवा प्रकटन किंवा उत्पत्ती ही परमेश्वराधीनच आहे. गुर्वाज्ञेवाचून जीवामध्ये अशी प्रतिभा उत्पन्नच होऊ शकत नाही आणि परमेश्वराचा गुरुशरीरात आविर्भाव झाला तरच तो दीक्षादान करण्यास समर्थ होतो."

या सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्या ज्या ठिकाणी कृपा, अनुग्रह किंवा कारुण्य या शब्दांचा वापर केला आहे त्या त्या ठिकाणी सद्‌गुरुनाथ श्रीकृष्णांनी अर्जुनाच्या ठिकाणी किंवा श्रीनिवृत्तिनाथांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ठिकाणी शक्तिसंक्रमण केले आहे हे स्पष्ट आहे. या दृष्टीने पुढील ओव्या पाहण्यासारख्या आहेत.

तुमचा अनुग्रहो गणेशु । जें दे आपुला सौरसु ।
तें सारस्वतीं प्रवेशु । बाळकाही आथी ॥१०.६॥
अहो सद्‌गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥१२.९॥
आईकें गा आर्तबंधू । निरंतरकारुण्यसिंधू ।
विशदविद्यावधू–। वल्लभा जी ॥१४.३॥
आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी ।
करीं ज्ञानपद्य जोडी । थोरा मातें ॥१४.१७॥

शंभुस्वरूप सद्‌गुरूंचे कारुण्य किंवा कृपा अशी शक्तिपातरूप असल्यामुळे या शक्तिपाताचा श्रीमदाद्यशंकराचार्यांनी सौंदर्यलहरीत " जगत् त्रातुं शंभोर्जयति करुणा काचिदरुणा ॥ ९३ ॥" असे म्हणून जो जयजयकार केला आहे त्याचा अर्थ असा आहे की, जगताचे रक्षण करणारी अशी किंचित् अरुण वर्णाची जी शंभूची करुणा आहे म्हणजे सद्‌गुरूंच्या रूपाने शक्तिपात करण्याचे त्यांचे जे सामर्थ्य आहे, त्या करुणारूपी किंवा कृपारूपी कुंडलिनीशक्तीचा जयजयकार असो. या श्लोकावर टीका करताना प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज यांनी "सौंदर्य लहरीका हिंदी अनुवाद ( श्रीविद्या-तत्त्व और कुंडलिनी-रहस्य सहित)" या ग्रंथात असे म्हटले आहे की, " इस श्लोकमें यह भाव भी प्रतीत होता है कि सद्‌गुरुस्वरूप शिवके अनुग्रहसे जो शक्तिकी जागृति होती है और उपरोक्त करुणाके स्वरूपमें साधकगण उसे अपने अंतरमें अनुभव करते हैं, वह शंभुकी करुणा है। अर्थात्

शिवस्वरूप गुरुका अनुग्रह शंभुकाही अनुग्रह है, जिससे शिष्यमें शक्तिका उत्थान होता है। इसलिए गुरुकृपा, शक्तिकी अभिव्यक्ति और शंभुकी करुणा–तीनों पर्यायवाची हैं।"

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तुमचे या दिठिवेयाचिये वोलें। सासिन्नलें प्रसन्न-तेचे मळे ।। ९.४ ।।, कां जैं दिठिवा तुमचा वरुषे। तैं सकळार्थ सिद्धि मती पिके ।।९.२५।।, हें असो दिठी जयावरी झळके। कीं हा पद्मकरु माथां पारुखे। तो जीवचि परी तुके। महेशेंसीं ।।१०.९।।" असे वारंवार म्हणून जी सद्‌गुरूंची स्तुती केली आहे त्यात त्यांच्या दृष्टिपाताचे अर्थात् कृपेचे किंवा शक्तिपाताचे सामर्थ्यंच वर्णन केले आहे. दृष्टीतून कृपेचा वर्षाव होणे म्हणजे शक्तिपात होणे होय. या दृष्टीनेच "कल्याण मासिकाच्या साधना विशेषांकात" "दीक्षा और अनुशासन" या लेखात लेखक म्हणतात, "श्रीगुरुदेवकी कृपा और शिष्यकी श्रद्धा, इन दो पवित्र धाराओंका संगमही दीक्षा है। गुरुका आत्मदान और शिष्यका आत्मसमर्पण, एककी कृपा और दुसरेकी श्रद्धाके अतिरेकसेही संपन्न होता है। दान और क्षेप यही दीक्षाका अर्थ है। ज्ञान,शक्ति और सिद्धिका दान एवं अज्ञान,पाप और दारिद्र्यका क्षय; इसीका नाम दीक्षा है। सभी साधकोंके लिए यह दीक्षा अनिवार्य है। चाहे जन्मोंकी देर लगे; परन्तु जबतक ऐसी दीक्षा नहीं होगी, तबतक सिद्धिका मार्ग रुकाही रहेगा। यदि समस्त साधकोंका अधिकार एक होता, यदि साधनाएँ बहुत नहीं होती और सिद्धियोंके बहुतसे स्तर न होते तो यह भी संभव था कि बिना दीक्षाकेही परमार्थकी प्राप्ती हो जाती; परन्तु ऐसा नहीं है। इस मनुष्य-शरीरमें कोई पशु-योनिसें आया है और कोई देवयोनिसे; कोई पूर्वजन्ममें साधनसंपन्न होकर आया है और कोई सीधे नरककुंडसे; किसीका मन सुप्त है और किसीका जाग-रित; ऐसी स्थितिमें सबके लिए एक मंत्र, एक देवता और एक ध्यान हो ही नहीं सकते। यह सत्य है कि सिद्ध, साधक, मंत्र और देवताओंके रूपमें एकही भगवान् प्रकट है; फिर भी किस हृदयमें,किस देवता और मंत्रके रूपमें उनकी स्फूर्ति सहज है–यह जानकर उसी रूपमें उनको स्फुरित करना, यह दीक्षाकी विधि है।

दीक्षा एक दृष्टिसे गुरुकी ओरसे आत्मदान, ज्ञानसंचार अथवा शक्तिपात है तो दूसरी दृष्टिसे शिष्यमें सुषुप्त ज्ञान और शक्तियोंका उद्‌बोधन है। दीक्षासेही शरीरकी समस्त अशुद्धियाँ मिट जाती है और देहशुद्धि होनेसे देवपूजाका अधिकार मिल जाता है। वास्तवमें गुरु एक हैं और उन्हींसे चारों ओर शक्तिका विस्तार हो रहा है। यदि परंपराकी दृष्टिसे देखे तो मूल पुरुष परमात्मासेही ब्रह्मा, रुद्र आदिके क्रमसे ज्ञानकी परंपरा चली आयी है और एक शिष्यसे दूसरे शिष्यमें संक्रांत होकर वही वर्तमान गुरुमें भी है। इसीका नाम संप्रदाय है और गुरुके द्वारा इसी अविच्छिन्न सांप्रदायिक ज्ञानकी प्राप्ति होती है। क्योंकि मूलशक्तिही क्रमशः

प्रकाशित होती आयी है। उससे हृदयस्थ सुप्त शक्तिके जागरणमें बडी सहायता मिलती है और यही कारण है कि कभी-कभी तो जिनके चित्तमें बडी भक्ति है, व्याकुलता और सरल विश्वास हैं, वे भी भगवत्कृपाका उतना अनुभव नहीं कर पाते जितना कि शिष्यको दीक्षासे होता है।

दीक्षा बहुत वार नहीं होती क्योंकि एक बार रास्ता पकड लेनेपर आगेके स्थान स्वयंही आते रहते हैं। पहली भूमिका स्वयंही दूसरी भूमिकाके रूपमें पर्यवसित होती है। साधनाका अनुष्ठान क्रमशः हृदयको शुद्ध करता जाता है और उसीके अनुसार सिद्धियोंका उदय एवं ज्ञानका सान्निध्य भी प्राप्त होता जाता है। ज्ञानकी पूर्णताही साधनाकी पूर्णता है।" (पृ. २१०)

श्रीज्ञानेश्वरमहाराजांना कृपेचा हा अर्थच अभिप्रेत असल्याने त्यांनी "तैसा अनुग्रहो पैं राया। श्रीहरी केला धनंजया। आतां कवणेकडेही माया। ऐसी भाष नेणेंचि तो ॥ ११.१८५ ॥" असा सिद्धांतच प्रस्थापित केला आहे. अनुग्रह होताक्षणीच मायेची भाषा संपविण्याचे सामर्थ्य एकमात्र सद्‌गुरूंच्या कृपेत आहे व कृपा म्हणजे सद्‌गुरूंनी केलेला शक्तिपात होय. हे महायोगी गहिनीनाथांचे परंपराप्राप्त धन श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी त्यांना मुक्तहस्ताने दिलेले असल्यामुळे त्यांनी या अर्थानेच कृपेचा आविष्कार ज्ञानेश्वरीत केला आहे हे निभ्रांत सत्य आहे. या दृष्टीने "कल्याण मासिकाच्या साधना विशेषांकात," "सहज साधन" या लेखात श्रीधीरेंद्रकृष्ण मुखोपाध्याय यांनी असे म्हटले आहे की, "सद्‌गुरुकृपाके विना साधनराज्यमें कोई व्यक्ति प्रवेश नहीं कर सकता। जिस विधिसे सद्‌गुरु शिष्यको साधन-राज्यमें प्रवेश करनेका अधिकार देते हैं, उसीको दीक्षा कहते है। दीक्षासे दिव्य ज्ञान होता है और पापका क्षय हो जाता है, इसलिये उसे दीक्षा कहते हैं।

दिव्यज्ञानं यतो दद्यात्कुर्यात्पापस्य संक्षयम्।
तस्माद्दीक्षेति सा प्रोक्ता मुनिभिस्तंत्रवेदिभिः॥
दीक्षामूलं जपं सर्वं दीक्षामूलं परं तपः।
दीक्षामाश्रित्य निवसेद्यत्र कुत्राश्रमे वसन्॥

卐　　卐　　卐

देवि दीक्षाविहीनस्य न सिद्धिर्न च सद्‌गतिः।
तस्मात् सर्वप्रयत्नेन गुरुणा दीक्षितो भवेत्॥

卐　　卐　　卐

उपपातकलक्षाणि महापातककोटिशः।
क्षणाद्दहति देवेशि दीक्षा हि विधिना कृता॥१४.८५॥कुलार्णव तंत्र॥

अर्थात् जप-तप सबका मूल दीक्षा है; जहाँ कही जिस किसी आश्रममें भी दीक्षाका आश्रय करकेही रहना चाहिये। दीक्षाके विना सिद्धि नहीं मिलती,

सद्गति नहीं प्राप्त होती। इसलिये हर उपायसे गुरुके द्वारा दीक्षित होना चाहिए। विधिपूर्वक दीक्षा होनेसे वह दीक्षा एक क्षणमें लाखों उपपातक और करोडो महापातक जला डालती है।

अग्निसेही अग्नि प्रज्वलित होता है। सद्गुरुसे प्राप्त मंत्र अग्निके समान पापराशिको जलाकर शिष्यका मुक्तिद्वार उन्मुक्त कर देता है। ग्रंथोंके पठन-पाठनसे केवल शब्द-पांडित्य वढ सकता है, पर प्रत्यक्ष क्रियाका बोध सद्गुरुकृपाके विना नहीं हो सकता।"

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी दीक्षेचा किंवा कृपेचा किंवा अनुग्रहाचा हाच अर्थ असल्यामुळे उपरोक्त शास्त्रकारांच्या म्हणण्याचे सार मांडताना ते म्हणतात–

कैसें अनुग्रहाचें करणें। पार्थाचें पाहणें आणि न पाहणें।
तयाही सकट नारायणें। व्यापूनि घेतलें ॥११.२३०॥

या ओवीचा अर्थ जर अधिक स्पष्टपणे पाहवयाचा असेल तर अनुग्रहाचा अर्थ अत्यंत सूक्ष्मपणे लक्षात घेणे आवश्यक आहे; कारण त्याशिवाय अर्जुनासारख्या शिष्याला श्रीकृष्णांनी त्याच्या पाहाण्या व न पाहण्यासकट आपलेसे करून कसे व्यापून टाकले म्हणजे पर्यायाने अर्जुनरूपी जीव किंवा संकुचित झालेली शक्ती श्रीकृष्णांच्या शक्तिपात दीक्षेमुळे अखेरीस शिव, नारायण किंवा श्रीकृष्णस्वरूप होऊन सामरस्यात्मक अवस्थेला कशी प्राप्त झाली हे कधीही कळणार नाही. या दृष्टीनेच "विश्वसार, शारदातिलक व रुद्रयामलतंत्रात" असे म्हटले आहे की–

अथ दीक्षां प्रवक्ष्यामि श्रुणुष्व कमलानने।
अस्यविज्ञानमात्रेण देवत्वं लभते नरः ॥२॥ विश्वसार ॥
दिव्य ज्ञानं यतो दद्यात्कुर्यात्पापक्षयं ततः।
तस्मात् दीक्षेति सा प्रोक्ता सर्व तंत्रस्य सम्मता ॥४.२॥ शारदातिलक ॥
ददाति शिवतादात्म्यं क्षिणोति च मलत्रयम्।
अतो दीक्षेति संप्रोक्ता दीक्षातंत्रार्थवेदभिः ॥१॥
दीयते परमं ज्ञानं क्षीयते पाप पद्धतिः।
तेन दीक्षोच्यते मंत्रे स्वागमार्थबलाबलात् ॥२॥ रुद्रयामल तंत्र ॥

श्रीशंकर भगवती पार्वतीदेवीला दीक्षेबद्दल सांगताना असे म्हणतात की, या दीक्षेचे विज्ञान अर्थात् शास्त्रीय प्रक्रिया नुसती जाणल्यानेही मनुष्य देवत्वाचा लाभ करतो. अर्थात् या शक्तिपात दीक्षेने साधकास सद्गुरूंकडून दैवीशक्ती प्राप्त होते. या दीक्षा शब्दात दी+क्षा अशी दोन अक्षरे आहेत. या दोन अक्षरांच्या अर्थ असा होतो की, जी दिव्य ज्ञान देते व जिच्यामुळे सर्व पापांचा क्षय होतो. यामुळेच तिला दीक्षा असे म्हणतात. ही दीक्षा सर्व तंत्रांना मान्य असून ती शास्त्रानुसार आहे. ( दिव्य ज्ञान देणाऱ्या व पापक्षय करणाऱ्या क्रियेला दीक्षा ही संज्ञा सर्व गुरूंनी व

तंत्रवेत्त्यांनी दिली आहे. ) ही दीक्षाच साधकाला शिवाशी तद्रूपता प्राप्त करून देणारी समाधी देते व आणव, कर्म व मायिक या तीन मलांचा नाश करते. यामुळे दीक्षातंत्राच्या अर्थज्ञात्या ऋषीमुनींनी या प्रक्रियेला 'दीक्षा' असे नाव दिले आहे. ही दीक्षा किंवा कृपा साधकाला परमश्रेष्ठ असे ज्ञान देऊन पापाची शृंखला तोडून टाकते. यासाठीं मंत्र व आगमशास्त्रात हिला दीक्षा असे म्हणतात.

"योगिनीतंत्रातही" दीक्षेचा किंवा सद्‌गुरुकृपेचा हा अर्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

**दीयते ज्ञानमत्यर्थं क्षीयते पाशबंधनम् ।**
**अतो दीक्षेति देवेशि कथिता तत्त्वचिंतकैः ॥१॥**
**मनसा कर्मणा वाचा यत्पापं समुपार्जितम् ।**
**तेषां विशेषा करणी परमज्ञानदायतः ॥२॥**
**तस्मात् दीक्षेति लोकेऽस्मिन् गीयते शास्त्रवेदकैः ।**
**विज्ञानफलदा सैव द्वितीया लयकारिणी ।**
**तृतीयामुक्तिदा चैव तस्माद्दीक्षेतिधीयते ॥३॥**

जी महान् ब्रह्मज्ञान देते व पाश किंवा कर्मबंधनांचा नाश करते तिला तत्त्वचिंतन करणाऱ्या ज्ञानी लोकांनी दीक्षा म्हटले आहे. मन, कर्म व वाणीने जो पापसंचय केला जातो त्या सर्वांचा समूळ नाश करणारी व परमज्ञान प्रदान करणारी असल्यामुळे शास्त्रवेत्त्यांनी हिला दीक्षा असे नाव दिले आहे. प्रथमतः विज्ञानाचे फल देणारी, दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे द्वैतभावाचा व मनाचा लय करणारी व तिसरी सर्वात श्रेष्ठ गोष्ट म्हणजे मुक्ती देणारी असल्यामुळे हिला दीक्षा असे म्हटले गेले आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही नाथसंप्रदाय परंपरेने आपल्या स्वतःला सद्‌गुरुनाथ श्रीनिवृत्तिनाथमहाराजांकडून शक्तिपातयुक्त सिद्धयोगाची दीक्षा कशी प्राप्त झाली हे सांगताना असे म्हटले आहे की–

**ज्ञानदेव म्हणे मी चाडें । सद्‌गुरूंनीं केलें कोडें ।**
**माथां हात ठेविला तें फुडें । बीजचि वाइलें ॥६.४९२॥**

मी बीज पेरण्याचे यंत्र आहे किंवा माझे शरीर ज्ञानाचे बीज पेरण्यास योग्य आहे असे समजून माझ्या सद्‌गुरुनाथांनी असे काही कोडे, आश्चर्य किंवा चमत्कार केला की, त्यांनी माझ्या मस्तकावर हात ठेवून प्रत्यक्ष स्पर्श करून शक्तिसंक्रमण केले व चाड्यात जसे बी घालतात त्याप्रमाणे माझ्या ठिकाणी आपली शक्ती प्रविष्ट करून, माझी शक्ती जागृत करून, ज्ञानाचे बीज घातले.शक्ती जागृत करणे म्हणजेच ज्ञानाचे बीज घालणे होय. यालाच कृपा म्हणतात. सद्‌गुरूंनी परंपराप्राप्त शक्तीचे शिष्यदेहात संक्रमण करून त्याची अनादि निद्रस्त आत्मसत्तारूपी कुंडलिनी

शक्ती जागृत करून सुषुम्नेद्वारा त्याला ऊर्ध्वगामी बनवून त्याचे शिवाशी मीलन घडवून आणणे ह्याच कृपेचा एकमेव व अंतिम अर्थ आहे. या कृपेलाच शास्त्रकारांनी दीक्षा, अनुग्रह, शक्तिपात, शक्तिसंक्रमण, उद्धार इत्यादि विविध नावांनी गौरविले आहे. नावे भिन्न असली तरी वस्तू एकच आहे हे नितांत सत्य आहे व त्याचा अर्थही एकच आहे, हे त्याहून मोठे सत्य आहे. अज्ञानाने,अननुभूतीने किंवा आग्रहाने कृपेचा हा अर्थ नाकारावयाचा असेल तर "परि नेणसीच गांवढिया। काय कोपों आतां धनंजया। आंग सांडोनि छाया। आलिंगितोसि मा ? ॥११.६२९॥" असे श्रीकृष्णांनी अर्जुनाला म्हटल्याप्रमाणे आपण कृपेचा शक्तिपातदीक्षा हा अर्थ टाकून सामान्य अर्थाचा स्वीकार केला तर ते गांवढळपणाचे, अशास्त्रीय व छायेला आलिंगन दिल्याप्रमाणे खोटे ठरेल हे निश्चित आहे. "शक्तिपात" या पुस्तकातील प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराजांची पुढील सूत्रे पाहिली म्हणजे उपरोक्त ओवीचा अर्थ अधिक स्पष्ट होईल. ते असे म्हणतात की–

ब्रह्मनिष्ठो वेधकः शक्तिपातक्षमश्च गुरुः ॥२.२॥
निग्रहानुग्रहक्षमश्च ॥३॥
शक्तिपात एव दीक्षा ॥५॥
ततः शक्ति प्रदीपनं दीपवत् ॥६॥
ततः दिव्यं ज्ञानं सम्पद्यते क्षीयते च बंधनम् ॥७॥
दीप्ते ज्ञानाग्नौ मलविक्षेपाऽवरणहानिः ॥८॥

वरील सर्व सूत्रांचा त्यांनी त्यावर केलेल्या हिंदी टीकेसहित थोडक्यात अर्थ असा सांगता येईल की, "सद्गुरू ह्या ब्रह्मनिष्ठ, वेध करणारा म्हणजे वेधदीक्षा देणारा व शक्तिपाताची योग्यता असलेला असा समर्थ असला पाहिजे. तो निग्रह व अनुग्रह या दोहोत समर्थ हवा. शक्तिपात करणे म्हणजेच दीक्षा देणे किंवा कृपा करणे होय. एका दिव्याने दुसरा दिवा लावावा त्याप्रमाणे सद्गुरूने केलेल्या शक्तिपाताने शिष्याची शक्ती प्रदीप्त होते. त्यामुळे शिष्याला दिव्यज्ञान प्राप्त होते व त्याच्या सर्व बंधनांचा नाश होतो. शक्तिपाताने जागृत झालेली कुंडलिनी शक्ती हीच प्रज्ज्वलित ज्ञानाग्नीसारखी असून तिच्यामुळेच मल, विक्षेप व आवरण हे तिन्ही अडथळे जळून भस्मसात होतात.

या दृष्टीने विचार केला म्हणजे कृपेची अर्थात् शक्तिपाताची ही अपरिहार्यता किती सत्य आहे हे स्पष्ट होऊ लागते."कल्याण मासिकाच्या उपासना विशेषांकात" "अनुपाय आदि चतुष्टयका दिग्दर्शन" या लेखात श्रीसंमुख ब्रह्मचारीजी, वेदान्तचार्य, या लेखकाने असे म्हटले आहे की, "श्रीपरमेश्वरकी अनुग्रहशक्तिही उसे (जीवको) स्वरूपकी प्राप्ति करानेमें सहायक है। जैसा कि कहा गया है–

न नरो मोक्षमाप्नोति स्वसामर्थ्यात् कदाचन ।
विनानुग्रहं देवस्य शिवस्य परमात्मनः ।
तदाऽऽत्मज्ञानसम्पत्ति ददात्यानन्दवारिधिः ।।

मनुष्य स्वयंप्रकाश परमात्मा शिवकी कृपाके बिना केवल अपनी सामर्थ्यसे कदापि मोक्ष नहीं पाता है। उस समय आनंदमहासागर शिव स्वयं आत्मज्ञान-संपत्ति प्रदान करते हैं।

जो आत्मा विशिष्ट अधिकारसे सम्पन्न हैं, उनमें भगवानकी सुदृढ अनुग्रह-शक्तिका पात हुआ है तथा वे उस शक्तिपातसे पवित्र हुए महापुरुषोंकी श्रेणीमें आते हैं। उनको कोई उपाय या साधन किये बिनाही परमेश्वर-समावेश प्राप्त होता है। उनका वह परमेश्वर-समावेश उपाय-साध्य न होनेसे 'अनुपाय' कहलाता है। उन्हें आन्तर गुरुराजकी कृपासे स्वतःही विवेक प्राप्त (प्रादुर्भूत) होता है।.... इस रीतिसे सुदृढ विवेकका उदय होनेपर महापुरुषोंका शाश्वतिक परमेश्वर-समावेश निरुपायही होता है (उपाय-साध्य नहीं)। ऐसे महापुरुषोंपर पूजा, ध्यान, चर्या आदिका कोई नियंत्रण नहीं है। जैसा कि निम्नांकित श्लोकमें कहा गया है—

तत्र तावत् क्रियायोगो नैवोपायत्वमर्हति ।
एषां मंत्रो न च ध्यानं न पूजा नापि कल्पना ।।

पूर्वोक्त महापुरुषोंसे भिन्न जो निम्नस्तरके जीव हैं, जो उन महापुरुषोंकी भाँति अखंडमंडलरूप महाप्रकाश शिवमें स्वतः प्रवेश नहीं कर पाते हैं, वे आत्म-स्वरूपसे अभिन्न जो परमेश्वरकी स्वातंत्र्यशक्ति है, उसका उपायरूपसे आश्रय ग्रहण करते हैं। फिर तो वे भी अनायासही स्वात्मरूपमें प्रवेश पाते हैं और विधि-निषधके नियंत्रणसे परे हो जाते हैं। पूजा, ध्यान, चर्या आदिका नियंत्रण उनपर भी लागू नहीं होता है। उनके अन्तस्तलमें भी इस प्रकारका विवेक उदित होता है कि श्रीपरमेश्वरसे अभिन्न जो 'स्वातंत्र्य' नामक उनकी शक्ति है, इसीके द्वारा समग्र, भाव-समूह बोध-गगनमें प्रतिबिम्बरूपसे प्रस्फुटित होते रहते हैं।....श्रीपरमेश्वरकी अनुग्रह-शक्ति जब तीव्र मात्रामें संचारित होती है, तब आविर्भूत सदागम आदिके अवलम्बनसे विकल्पोंका संशोधन होता है।" (पृ.४४४,४४५)

वरील विवेचनाप्रमाणेच शास्त्रकारांनी केलेल्या पुढील व्याख्या लक्षात घेतल्या म्हणजे कृपेचा अर्थ अधिकाधिक स्पष्ट झाल्याशिवाय राहणार नाही. "गौतमीय-तंत्रात" दीक्षेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

ददाति दिव्यभावंचेत् क्षिणुयात् पापसन्ततिम् ।
तेन दीक्षेति विख्याता मुनिभिस्तंत्रपारगैः ।।७.३।।

ज्या कार्यामुळे किंवा प्रक्रियेमुळे दिव्यभावाची प्राप्ती होऊन पापाचा क्षय होतो, त्याला तंत्रज्ञ मुनी दीक्षा असे म्हणतात.

" पिच्छिलातंत्रात " असे म्हटले आहे की–

**दीक्षां विना न मोक्षः स्यात् प्राणिनां शिवशासनात् ।**
**सा च न स्याद् विनाचार्यमित्याचार्यपरंपरा ॥४॥**
**उपासनाशतेनापि यां विना नैव सिद्धयति ।**
**तां दीक्षामाश्रयेद् यत्नात् श्रीगुरोर्मंत्रसिद्धये ॥५॥**

शिवाच्या अनुशासनामुळे म्हणजे आज्ञेमुळे दीक्षेशिवाय अर्थात् सद्‌गुरुकृपेशिवाय कोणालाही मोक्षप्राप्ती होत नाही. आचार्य परंपरेशिवाय दीक्षाही होऊ शकत नाही. शेकडो प्रकारच्या उपासना आहेत; परंतु दीक्षेशिवाय सिद्धी मिळू शकत नाही. श्रीगुरूंकडून दीक्षा घेऊनच साधकाला मोक्ष प्राप्त करणे भाग पडते.

कुलार्णवतंत्राच्या चौदाव्या उल्लासात पार्वतीने शंकरांना दीक्षेबद्दल विचारले असता ते म्हणाले, " शिवशासनात योगेच्छू लोकांना दीक्षेवाचून फलप्राप्ती नाही. गुरुवाचून दीक्षा नाही अशी योगमार्गपरंपरा आहे; म्हणून संप्रदायादि क्रमानेच सिद्धांतज्ञान मिळवावे. गुरुवाचून अन्य उपायाने मिळविलेले मंत्र फलदायक होत नाहीत. दीक्षेने व तद्‌द्वारा जागृत होणाऱ्या कुंडलिनी शक्तीच्या द्वारा म्हणजे ज्ञानदीप प्रज्ज्वलित झाल्याने चांडाळही मुक्त होतो. या दोन गोष्टींशिवाय साधकाची मुक्ती होत नाही. शरीर नुसत्या संस्काराने किंवा कर्माने शुद्ध होऊ शकत नाही. मात्र अनादि कुलकुंडलिनी जागृतीची दीक्षा घेतल्याने आत्मस्वरूपप्राप्ती साधते. कर्मसाम्याने व उत्तम गुरुशिष्यांच्या ऐक्याने होणाऱ्या दीक्षा या एकच किंवा समान असल्या तरी परिणामी त्या विविध हेतू साधणाऱ्या अगर भिन्न क्रिया प्रकट करणाऱ्या असतात. मंत्र व विषघ्न औषधीने जशी विषाची मारकशक्ती नष्ट होते त्याप्रमाणेच मंत्रज्ञ गुरूच्या दीक्षेने पशुपाशाचा छेद होतो. या दृढतर व विस्तृत बंधनातून परमस्थानाचे ज्ञान देऊन फक्त दीक्षाच मुक्त करणारी व दिव्य किंवा श्रेष्ठस्थानी सहस्रारात साधकाला घेऊन जाणारी आहे. श्रीसद्‌गुरूंकडून होणारी विधियुक्त दीक्षा ही उपपातक व महापातकांच्या राशी एका क्षणात् भस्मसात करते. जिच्यामुळे सामान्य माणसांची किंवा पशूंचीही दिव्यदृष्टी उघडते म्हणजे कुंडलिनी जागृत होऊन आत्मजागृतिद्वारा आत्मविकास होतो व ते शिवस्वरूप होतात, तिला पशुपाशमोचक दीक्षा असे म्हणतात. जी दीक्षा होताच दिव्य अनुभव येऊ लागतात, ती मोक्ष देणारी दीक्षा होय. इतर सर्व दीक्षा जनसेविका म्हणजे सामान्य किंवा निरर्थक होत. शेकडो उपासना करूनही दीक्षेवाचून सिद्धी प्राप्त होत नाही. यासाठी श्रीगुरुमंत्राच्या सिद्धीसाठी प्रयत्नाने साधकाने दीक्षा घ्यावीच. धातुवादक्रियेत पाऱ्याच्या संबंधाने संस्कारित लोहाला सुवर्णत्व येते; त्याप्रमाणे दीक्षेमुळे जीवाला शिवभावप्राप्ती होते. दीक्षारूप अग्नीने ज्याची कर्मे दग्ध झाली आहेत, मायिक बंधने तुटून गेली आहेत व ज्याला परमश्रेष्ठ तत्त्वज्ञान प्राप्त झाले तो शिवच

समजावा. दीक्षासंस्कार झाला की, जातिभेद राहत नाही. अर्थात् दीक्षेमुळे शूद्राचे शूद्रत्व व ब्राह्मणाचे ब्राह्मण्यही राहत नाही."

" विष्णुयामल " ग्रंथात गुरूला प्रणाम करून आपले सर्वस्व त्याच्या चरणी निवेदन करून म्हणजे अर्पण करून त्याच्याकडून वैष्णव मंत्राची दीक्षा शास्त्रपूर्वक घ्यावी हे सांगताना असे म्हटले आहे की–

अतो गुरुं प्रणम्यैवं सर्वस्वं विनिवेद्य च ।
गृह्णीयाद्वैष्णवं मंत्रं दीक्षापूर्वं विधानतः ॥

तंत्रकारांनी तर असे अगदी स्पष्ट केले आहे की, कोटी कोटी मंत्र हे चित्ताच्या व्याकुलतेलाच कारणीभूत होतात. मात्र जो मंत्र गुरुकृपापूर्वक म्हणजे शक्तिपात दीक्षेने युक्त होऊन मिळतो तो सर्व सिद्धी देणारा असतो. ते म्हणतात–

अनेककोटिमंत्राणि चित्तव्याकुलकारणम् ।
मंत्रं गुरोः कृपाप्राप्तमेकं स्यात् सर्वसिद्धिदम् ॥

" दत्तात्रेययामल " ग्रंथात या दृष्टीनेच असे म्हटले आहे की; ईश्वर न मानणाऱ्या नास्तिकाला ज्याप्रमाणे या भूलोकावर कोणी त्राता असत नाही त्याप्रमाणें दीक्षाविहीन साधकाचा येथे व परलोकी कोणीही त्राता असत नाही.

अनीश्वरस्य मर्त्यस्य नास्ति त्राता यथा भुवि ।
तथा दीक्षाविहीनस्य नेह स्वामी परत्र च ॥

" स्कंदपुराणातही " ज्या लोकांनी सद्‌गुरुस्वरूप हरीची दीक्षा घेऊन जनार्दनाचे अर्चन केले नाही ते नर म्हणजे या लोकातील पशूच असून त्यांचे जीवन हे निरर्थक होय किंवा फलरहित होय हे सांगताना असे म्हटले आहे की–

ते नरा पशवो लोके किं तेषां जीवने फलम् ।
यैर्न लब्धा हरेर्दीक्षा नार्चितो वा जनार्दनः ॥

श्रीज्ञानेश्वरमहाराज " तें बुद्धीही आकळितां सांकडें । म्हणौनि बोलीं विपायें सांपडे । परी श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखैन मी ॥६.३२॥" असे जेव्हा वारंवार म्हणतात त्यावेळी उपरोक्त कृपार्थ आपल्या दृष्टीपुढे साकार झाल्याशिवाय राहत नाही. " दीक्षा-सर्वस्व " या ग्रंथात श्रीयोगेश्वरानंदतीर्थ, शंकराचार्य जगन्नाथपुरी, यांनी पहिल्या भागातील " कुंडलिनी-सर्वस्व " या प्रकरणात " शक्तिपात अथवा कुंडलिनीशक्तिप्रबोध " या नावाखाली दीक्षेचे लक्षण व दीक्षेचे रहस्य सांगताना असे म्हटले आहे की,"दीक्षेचे दुसरे नाव आत्मसंस्कार असे आहे.... मलत्रयाचा नाश व शिवतत्त्वाच्या अभिव्यक्तीची योग्यता दीक्षेनेच प्राप्त होते. ज्याप्रमाणे भाजलेले गहू पुन्हा उगवत नाहीत त्याप्रमाणेच अचिंत्य मंत्रशक्तीच्या प्रभावाने निर्मूल झालेले मल पुन्हा जागृत होत नाहीत. मलविच्छेद आणि सर्वज्ञात क्रियेची सिद्धी म्हणजेच सर्वज्ञत्व, सर्व कर्तृत्व शक्तीची प्राप्ती, हाच मोक्ष होय. परमेश्वर स्वतः आपल्या

क्रियाशक्तिरूप दीक्षेच्या साधनाने आत्म्याला मुक्त करतो. काही आशांचा नाश झाला तरी त्या व्यक्तीला मुक्त म्हणता येणार नाही. असंस्कृत मानव म्हणजे पशू. हा पशू स्वकृत क्रिया व ज्ञान साधनादि उपायांनी मुक्त होत नाही; कारण पशू, ईश्वराच्या प्रेरणेखेरीज स्वयंशक्तिरूपाने काहीही करू शकत नाही. प्रकृती आदि सर्व पाशरूप आहेत म्हणून कार्यकारिणी प्रकृतीला मोक्षसाधनीभूत ती आहे असे म्हणता येणार नाही.

काही ज्ञानी लोक सर्व मलाचा नाश स्वाभाविक रीतीने होत असतो असे मानतात; परंतु जीवामध्ये अथवा पशुवर्गात स्वतः प्रवृत्त अथवा पशुनिवृत्त होण्याचे सामर्थ्य नाही, म्हणून ईश्वरच कर्तारूप धारण करून मलांची निवृत्ती करू शकतो असे मानवे लागते. ही गोष्ट खरी आहे की, संसारात कार्यकारणरूपी सर्व पाश नाना प्रकारांनी पुरुषाच्या ठायी ज्ञान आणि क्रिया उत्पन्न करतात. तथापि मलत्रय स्वतः त्यांच्या बंधनांपासून मुमुक्षूला मुक्त करू शकत नाहीत.

मुमुक्षूच्या ठायी अपरिछिन्न म्हणजे सर्वांशाने ज्ञानक्रियाशक्ती जागृत होणे याचे नाव मोक्ष. पाशविच्छेद आणि सर्व ज्ञानक्रियेची जागृती अर्थात् सर्वज्ञत्व, सर्व कर्तृत्व यांची मुमुक्षूच्या ठिकाणी जागृती झालेली अनुभवास येणे हा मोक्ष. स्वयं परमेश्वर आपल्या क्रियाशक्तिरूप दीक्षेच्या द्वाराने पशुतुल्य आत्म्याला मुक्त करतो. एक किंवा अनेक पाश नाश पावल्यावरसुद्धा मुमुक्षूंच्या ठायी मोक्षाची अभिव्यक्ती होते असे म्हणता येणार नाही. म्हणून ( सर्व ) पाशातून मुक्त होण्यास दीक्षेची जरूरी आहे.

दीयते ज्ञान सद्भावः क्षीयते पशुवासना ।
दानक्षपण संयुक्ता दीक्षा तेनेह कीर्त्यते ॥

दिव्य ज्ञानाची परिस्फुटता व पशुवासना अर्थात् नीतिरहित इंद्रिय भोगांकडे होणारी मनाची धाव बऱ्याच अंशाने क्षीण होणे हे दीक्षेचे लक्षण आहे."

म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, या ग्रंथातील निरनिराळ्या लेखात गुरुकृपा म्हणजे शक्तिपात दीक्षा होय, हा अर्थ मोठ्या साकल्याने स्पष्ट केला आहे. त्यातील काही भाग विषयानुरोधाने पाहण्या-सारखा आहे. "मैं कौन हूँ" या लेखात ते म्हणतात, "साधक वास्तविक दीक्षा प्राप्त होनेपर क्रमशः स्थूलसे सूक्ष्म और सूक्ष्मसे कारणका दर्शन और अनुभव करता है। तदुपरान्त कारणका अतिक्रमण होनेपर सत्यस्वरूपका साक्षात्कार प्राप्त होता है। निरपेक्ष गुरुकृपाके विना सत्यदर्शन नहीं हो सकता। तब वासनाक्षय आदि अपने-आपही हो जाते हैं। पर, कृपाको रखनेके लिए आधारशुद्धिका प्रयत्न आवश्यक है।" (पृ. ६१)

"गुरुतत्त्व और सद्‌गुरु–रहस्य" या लेखात ते म्हणतात, "जिसका सत्तर्क स्वभावतः (अपने आपही) उदित होता है, उसके अधिकारमें बाधा पहुँचा सके, ऐसी कोई भी शक्ति नहीं है। उसको बाह्य दीक्षा और बाह्य अभिषेककी आवश्यकता नहीं होती। वह स्वयं संवित्ति देवियोंके द्वाराही दीक्षित और अभिषिक्त होता है। उसकी अपनी इंद्रियाँही अंतर्मुखी होकर प्रमाताके साथ-उसके स्वात्माके साथ–ऐक्य संपन्न करा देती है। यही द्योतनकारिणी संविद् देवियाँ हैं। ये उसके ज्ञानक्रियाख्य प्रसुप्त चैतन्यको उत्तेजित करती हैं। यही दीक्षा है। जिस क्रियाके फलस्वरूप वह सर्वत्र स्वतंत्रता प्राप्त करता है, वही अभिषेक है। बहिर्मुख चित्तकी वृत्तियाँही अंतर्मुख अवस्थामें शक्ति कहलाती हैं। (पृ. २५६) निजबोधरूप स्व–शक्तिके संचारद्वारा शिष्यको अपने साथ समभावापन्न कर लेनाही अनुग्रहका लक्षण है। (पृ.२५७) कल्पित गुरु भी शिष्यका पाशच्छेदन करके शिष्यत्वकी अभिव्यक्ति कर सकते हैं। कारण, स्वयं परमेश्वरही आचार्य देहमें अधिष्ठित होकर बंधन खोलते हैं–नहीं तो एक जीव दूसरे जीवका उद्धार नहीं कर सकता। शास्त्रमें कहा गया है–

**यस्मान्महेश्वरः साक्षात् कृत्वा मानुषविग्रहम् ।**
**कृपया गुरुरूपेण मग्नाः प्रोद्धरति प्रजाः ।।**

अर्थात् स्वयं महेश्वरही मानुष-मूर्ति धारण करके कृपापूर्वक गुरुरूपसे (माया) मग्न जीवोंका उद्धार करते हैं।" (पृ. २५९)

"दीक्षा–रहस्य" या लेखात ते म्हणतात, "दीक्षा वस्तुतः आत्मसंस्कारकाही नामांतर है। .... दीक्षाद्वारा इस मलयुक्त आत्माका संस्कार होता है। उससे मल-निवृत्ति होती है, निवृत्तिका संस्कारभी शांत हो जाता है–

**दीयते ज्ञानसद्भावः क्षीयते पशुवासना ।**
**दानक्षणपणसंयुक्ता दीक्षा तेनेह कीर्तिता ।।**

अर्थात् जिसके द्वारा ज्ञान दिया जाता है और पशुवासनाका क्षय होता है, ऐसी दान और क्षपणयुक्त क्रियाको दीक्षा कहते हैं। यही दीक्षाका स्वरूप है। (पृ. २६६) ईश्वर दीक्षाव्यापारसे इस मलको निवृत्त करते हैं। इसलिए मोक्ष आत्मकर्तृक नहीं है, ईश्वरकर्तृक है –

**दीक्षेव मोचयत्यूर्ध्वं शैवं धाम नयत्यपि ।**

अर्थात् दीक्षाही मुक्त करती है और ऊपरकी ओर शिवधाममें भी ले जाती है।" (पृ. २६८)

सारांश, सद्‌गुरुकृपा म्हणजे सिद्धयोगांतर्गत शक्तिपात दीक्षा होय हे निर्भ्रांतपणे सिद्ध झाले. या कृपेच्या जोरावरच साधकाला इंद्रियातीत ब्रह्मज्ञान प्राप्त होते. जेथे कोणाची दृष्टी पोहोचू शकत नाही ते शिवशक्तिस्वरूप तो दृष्टीशिवाय पाहतो. असे हे श्रीगुरुकृपेचे ऐश्वर्य असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज प्रतिज्ञेवर सांगतात की–

जें दिठीही न पविजें । तें दिठीविण देखिजे ।
जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥६.३३॥
ना तरी धातुवादाही न जोडे । तें लोहींचि पंधरें सांपडे ।
जरी दैवयोगें चढे । परिसु हातां ॥३४॥
तसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।
म्हणोनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥३५॥
तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।
अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥३६॥

## गुरुकृपेचा हेतू :—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " मग प्रगटला सूक्ष्मु । विस्फुलिंगु ॥४.१३३॥, जे न विसंविती अंजन । उन्मेषनेत्रीं ॥४.१५९॥, जेणें अंतःकरण वोधलें । संकल्पा नये ॥४.१६७॥, जयाचें मनचि चैतन्य जाहलें ॥५.३६॥, शक्ति करी उजगरा । कुंडलिनीतें ॥६.२२१॥, आकळलेनि योगें । मध्यमा मध्यमागें । अग्निस्थानौनि निगे । ब्रह्मरंध्रा ॥८.९४॥, मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे । प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपैसयाचि ॥९.४९॥, आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे । कां दशीं दीपसंगें । दीपुचि होय ॥१७.१९॥, ते सत्त्व-शुद्धी साहाकारें । गुरुकृपामृततुषारें । सासिन्नलेनि बोधें वोसरे । द्वैतदैन्य ॥१८.२५९॥" इत्यादि प्रकारे वारंवार कथन करून गुरुकृपेचा एकमेव व अंतिम हेतू शिष्याच्या किंवा साधकाच्या ठिकाणी निद्रिस्त असलेल्या सनातन आत्मसत्तेची जागृती होणे हाच आहे, हा सिद्धान्त प्रस्थापित केला आहे; कारण शक्तिजागृतीचा हेतू एकदा गुरुकृपेने सिद्ध झाला की, त्याच्या अनुषंगाने इतर सर्व हेतू सिद्ध होतात, हे लक्षात येते. अंगांगी न्यायाने मुख्य अंगात इतर अंगाचा जसा समावेश होतो त्याप्रमाणे मुख्य हेतूमध्ये इतर अवांतर हेतूंचाही समावेश होतो, हे स्पष्ट आहे. बहिर्मुख इंद्रिये किंवा चित्त अंतर्मुख होणे, जडता दूर होणे, साधक दिक्कालातीत होणे, अपरोक्ष ज्ञानाने मोक्ष प्राप्ती होणे, शिष्यस्थ शिव स्पंदित होणे, मायेच्या यंत्राचे भ्रमण थांबून त्यातून सुटका होणे, मनाची गती थांबणे, संकल्प संपणे, जडचेतनभेदप्रक्रिया सिद्ध होणे, सर्व द्वंद्वे संपणे, दिव्य शरीराची प्राप्ती होणे, दिव्यानंदाच्या लहरी सर्व शरीरातून उसळणे, कार्याचे कारणात विलिनीकरण होणे, स्थूल, सूक्ष्म व कारण या त्रिविध देहांच्या अध्यासापासून मुक्त होणे, मलनिवृत्ती होऊन पशुत्व दूर होणे, ज्ञानाग्नीचे उद्दीपन होणे व ज्ञानप्राप्ती होऊन सहस्रारात शिवाशी मीलन होणे हे सर्व अनुषंगिक हेतू मूलाधारस्थ कुंडलिनी शक्ती गुरुकृपेने एकदा जागृत झाली की, सिद्ध होत असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुरुकृपेच्यां हेतूचे या अर्थानेच ज्ञानेश्वरीत आद्योपांत वर्णन केले आहे. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत"

"सैव शक्तिर्यदा सहजेन स्वस्मिन्नुन्मीलिन्यां निरुत्थानदशायां वर्तते तदा शिवः स एव भवति ॥ ४.१ ॥" व "तस्माद्गुरुकटाक्षपातात् स्वसंवेद्यतया च महासिद्धयोगिभिः स्वकीयं पिंडं निरुत्थानानुभवेन समरसं क्रियते इति सिद्धान्तः ॥५.७॥" असे जे महत्त्वाचे सिद्धान्त प्रस्थापित केले आहेत त्यातील गर्भितार्थ ध्यानात घेतला म्हणजे गुरुकृपेने अर्थात् शक्तिपाताने आत्मशक्ती कुंडलिनी सहज जागृत होऊन तिचे शिवाशी समरसीकरण होणे हाच गुरुकृपेचा एकमात्र हेतू आहे हे स्पष्ट होते. परंपराप्राप्त गुरुकृपेचा हा हेतू श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत व अमृतानुभवात वारंवार स्पष्ट केला आहे. गुरुकृपेचा अर्थात् शक्तिपाताचा व तद्द्वारा शक्तिजागृतीचा हेतू स्पष्ट करताना "अमृतानुभवात" श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> जेयाचेनि कृपातुषारें। परतलें अविद्येचें महुरें।
> परिनमलें अपारें। बोधामृतें ॥२.१४॥
>
> वेद्या देतां मिठी। वेदकत्व सुवोनि पोटीं।
> तरी नोहेचि उशिटी। दिठी जेयाची ॥१५॥

यावर भाष्य करून अर्थ सांगतांना श्रीनिरंजन रघुनाथ आपल्या "अनुभवामृत-पद-वोधिनीमध्ये" असे म्हणतात की, "जैसा काशीकडे माघमासापासून पुढें पर्जन्य पडून आम्रवृक्षाचा महुर म्हणजे आंबट आंबे जे त्यातें पिकवून अमृततुल्य मिष्ट करितो तैसा गुरुकृपातुषारमात्रेंकरून अविद्येचा महुर अविद्याकार्य अज्ञान जें तें परतले, तत्त्वज्ञानरूप होतें झालें; आणि अपारवोधामृतें परिनमलें, परिपाकातें पावलें. आतां श्रीगुरूचे शक्तिपात करण्याचा प्रकार वर्णितात– (२.१४) श्रीगुरु जो तो ब्रह्मसाक्षात्कारप्रसंगीं स्वशिष्य जो त्यातें सन्मुख वैसवून निजदृष्टीचें वेदकत्व म्हणजे ज्ञान जें तें शिष्याचे पोटीं सुवोनि, शिष्याचे हृदयीं प्रत्रिष्ट करून उपनिषदैक वेद्य वस्तू जें त्यातें मिठी, आलिंगन देतो. तथापि त्या गुरूची निजदृष्टि जे ते शिष्याचे उदरांत गेली म्हणोन उष्टी होत नाहीं; कारण जे द्वितीय शिष्यास ब्रह्मसाक्षात्कार करण्याचे उपयोगीं पडती म्हणून." (२.१५)

गुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताने आत्मशक्ती जागृत करणे हाच गुरुकृपेचा एकमात्र हेतू कसा असतो व त्यामुळे अन्य हेतू कसे सिद्ध होतात हे सांगताना श्रीशिवोम्प्रकाश ब्रह्मचारी यांनी "श्रीनारायण-उपदेशामृत" या पुस्तकात असे म्हटले आहे की, "तुम्हारे अंदर जो कुंडलिनी शक्ति जाग्रत हुई है, वह सर्व मंगलमयी और ज्ञानमयी है। तुम्हारे लिए जो कुछ मंगलदायक है, वह उसे तुम्हारी अपेक्षा अधिक जानती है। वह तो सब कुछही जानती है। तुम्हारी उन्नति और लाभके लिए जो वह तुमसे करवाये, उसमें अपनी इच्छाओंको बाधा मत बनने दो।

हमने तुम्हारे लिए असीम शक्तिका द्वार खोल दिया और हमारा कार्य पूरा हो गया। अब अपने देहमध्यस्थ उसी चैतन्य गुरुके ऊपर स्वयंको निर्भर

करो। वही तुमको लक्ष्यपर पहुँचायेंगे। तुम्हारे अंदर जो असीम शक्ति सोई हुई थी, उसको हमने जगा दिया। हम तो तुम्हारे उत्कर्षके लिए निमित्तमात्र हैं, अब वही जाग्रत शक्ति अपने स्वभावसेही तुमको उन्नतिकी दिशामें ले जायगी।

**निमित्तमप्रयोजकं प्रकृतीनां वरणभेदस्तु ततः क्षेत्रिकवत् ॥४.३॥**

**(पातंजल योगसूत्र-कैवल्यपाद)**

गुरुप्रदत्त दीक्षा, योग, तपस्यादि निमित्त प्रकृतिके प्रयोजक अर्थात् परिणामके साक्षात् कारण नहीं हैं, किंतु उसके प्रवाहमें अडी बाधाओंको भग्न करनेके लिए साधनमात्र हैं।

किसी खेतके पास जलाशय वर्तमान हो और कृषक खेतको सींचनेकी इच्छा रखता हो, तो उसको किसी अन्य स्थानसे जल लानेकी आवश्यकता नहीं है। खेतके पासमेंही जल संचित है, केवल मध्यवर्ती बंधको तोडनेसेही जल स्वयमेव खेतमें चला जायेगा। इसीप्रकार सब मनुष्योंमें सर्व प्रकार उन्नतिकारक शक्ति विद्यमान है, परंतु प्रतिबंधके कारण उसका द्वार रुद्ध है, इसीलिए विकासोन्मुख नहीं होती। सिद्ध गुरु उस प्रतिबंधको हटा देते हैं और शक्ति अपनी स्वभाविक गतिसे स्वयमेव अपने गंतव्य मार्गसे अग्रसर होने लगती है। तब मनुष्य अपने भीतर छिपी हुई शक्तिके उद्देश्यको समझता है।"

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तैशी ते कुंडलिनी। मोटकी औट वळणी। अधोमुख सर्पिणी। निदेली असे ॥ ६.२२३ ॥" असे सांगून पुढे ही शक्ती जागृत झाल्यावर काय करते याचा सविस्तर इतिहास दिला आहे. तो आपण मागे चवथ्या प्रकरणातील "पिंडे पिंडाचा ग्रासु" या मुद्यात सविस्तर पाहिलाच आहे. या जागृत शक्तिमुळेंच "जे उज्जीवन जाहलें। ज्ञानाग्नीचें ॥ ४.१३२॥" हे घडून येत असते. किंबहुना असा ज्ञानाग्नी प्रदीप्त होणे म्हणजेच शक्ती जागृत होणे होय; कारण शक्ती कुंडलिनी ही माँ जगदंबा असून सर्व ज्ञानाची जननी किंवा तीच प्रत्यक्ष ज्ञानस्वरूप कशी असते हे आपण मागे सातव्या प्रकरणात पाहिलेच आहे. "जाण पां ज्ञानासि अग्नि मूळ ॥ ८.२१९॥" यातील गर्भितार्थ हाच आहे. महामहोपाध्याय श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संकृति और साधना," खंड एक, या ग्रंथांतील "तांत्रिक दृष्टि" या निबंधात या संबंधी असे म्हटले आहे की, "जिनके ऊपर भगवत्कृपाकी मात्रा अधिक होती है, अर्थात् जिनमें तीव्र शक्तिपात होता है वे केवल एक बारही उपदेश प्राप्त करके उपाधिसे मुक्त हो जाते हैं। इस क्रमसे सृष्टि आदि तीनों उपाधियाँ सर्वथा चिदग्निमें भस्म हो जाती हैं, अर्थात् वे अचिद्भावको छोडकर आत्मशक्तिके स्फुरणरूपमें प्रतिभाग होने लगती हैं। ज्ञानाग्निके उद्दीपनके अनंतर इस प्रकारके पाकसे सृष्टि आदि पदार्थगत भेद छूट जाता है। उस समय विश्व अमृतमय हो जाता है, अर्थात् उसे बोधके साथ

तादात्म्य प्राप्त होता है।" या विवेचनाच्या प्रकाशात " एथ अविद्यानाशु हें स्थळ। तेणें मोक्षोपादान फळ। या दोहीं केवळ। साधन ज्ञान ॥ १८.१२४३ ॥ " ही ओवी अभ्यासिली म्हणजे ज्ञान हे साधन कसे होते हे कळते ज्ञान म्हणजे येथे जागृत शक्तीच होय हे निभ्रांत सत्य आहे; कारण त्याशिवाय ते साधन आहे असे कदापीही म्हणता येणार नाही. एवढेच नव्हे तर जागृत शक्तीचा म्हणजे गुरु-कृपेचा अंगभूत हेतू म्हणून ज्ञानाग्नीचे जे उद्दीपन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णिले आहे त्याचा गर्भितार्थ अंतर्यागाची सिद्धी हाच आहे. गीतेच्या चवथ्या अध्यायातील " सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे। आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥ " या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना त्यांनी " एकीं ययापरी पार्था। दोषु क्षाळिले सर्वथा। आणिकीं हृदयारणीं मंथा। विवेकु केला ॥ ४.१३० ॥ " येथपासून जे सर्व वर्णन केले आहे ते पाहिले म्हणजे या अंतर्यागाची प्रक्रिया उत्तम तऱ्हेने स्पष्ट होते. अंतर्यागाची सिद्धी होणे हा गुरुकृपेचा हेतू पुढील ओव्यातूनही फार सुंदर रीतीने स्पष्ट होतो. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

जे यजनशील अहर्निशीं। जिहीं अविद्या हविली मनेंसीं।
गुरुवाक्य हुताशीं। हवन केलें ॥४.१२३॥
जेणें भ्रांतीपासूनि हिरतले। गुरुवाक्यें मन धुतलें।
मग आत्मस्वरूपीं घातलें। हारौनियां ॥५.३४॥
जैसें समुद्रीं लवण न पडे। तंव वेगळें अल्प आवडे।
मग होय सिंधूचि एवढे। मिळे तेव्हां ॥३५॥
तैसें संकल्पोनि काढिलें। जयाचें मनचि चैतन्य जाहलें।
तेणें एकदेशियें परी व्यापिलें। लोकत्रय ॥३६॥

गुरुकृपेच्या म्हणजे जागृत शक्तीच्या अंगभूत हेतूंचा वरील प्रमाणे आणखी उलगडा करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

ऐसी शरीराबाहेरलीकडे। अभ्यासाची पांखर पडे।
तंव आंतु त्राय मोडे। मनोधर्माची ॥६.२११॥
कल्पना निमे। प्रवृत्ती शमे।
आंग मन विरंमे। सावियाचि ॥२१२॥
क्षुधा काय जाहली। निद्रा केउती गेली।
हे आठवणही हारपली। न दिसे वेगां ॥२१३॥

याचा अर्थ असा की, साधकाचे म्हणजे जीवाचे किंवा जीवस्वरूप शक्तीचे अनंत जन्मपर्यंत जे बहिर्मुख लक्ष्य असते ते गुरुकृपेमुळेच अर्थात् शक्तिपातामुळे अंतर्मुखी होते. त्यामुळे मनाची चंचलता नाहीशी होते. कल्पना थांबते. प्रवृत्ती थंडावते. शरीर व मन शांत होते. भूक, निद्रा व आठवण या गोष्टी नाहीशा होतात.

माणसाची इंद्रिये भगवंतांनी बहिर्मुखच ठेविली आहेत. त्यामुळे मनुष्य स्वभावतःच बाह्य विषयात रममाण होतो. त्यामुळे तो अंतरात्म्याला पाहत नाही; पण मोक्ष इच्छिणारा विवेकी पुरुष इंद्रिये स्तब्ध करून प्रत्यागात्म्याचे ज्ञान करून घेतो. " कठोपनिषदात " या अर्थानेच असे म्हटले आहे की, " परांचि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन् । कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ॥२.१.१॥" बहिर्मुख इंद्रिये ही आत वळावीत म्हणजे चित्तवृत्ती आत वळून वृत्ती अंतर्मुखी व्हावी म्हणून गुरुकृपेची नितांत आवश्यकता आहे; कारण जोपर्यंत गुरुकृपेशिवाय शक्ती जागृत होऊन सुषुम्नेत प्रवेश करीत नाही; तोपर्यंत ही गोष्ट सिद्ध होत नाही. यासाठीच "तद्विज्ञार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥ मुंडकोपनिषद १.१२॥" असे वेदांनी गर्जून सांगितले आहे. ब्रह्मनिष्ठ गुरूचा आश्रय म्हणजे शक्तिपाताने समूळ अनर्थ नाहीसा करणाऱ्या गुरूचा आश्रय होय, हे आपण मागे प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वतीस्वामीमहाराज यांच्या " वृद्धशिक्षेच्या" भाष्यात व "शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ॥३.२१॥" या "श्रीमद्भागवताच्या" श्लोकावर श्रीएकनाथमहाराजांनी "एकनाथी भागवताच्या" टीकेत कसे केले आहे हे पाहिले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांना असा शक्तिपातयोगसंपन्न गुरूच अभिप्रेत असल्याने व त्यांचे श्रीसद्गुरुनाथमहाराज हे त्यातील परंपरासंपन्न महान् असे शक्तिपाताचार्य अधिकारी पुरुष असल्यामुळे त्यांनी आपल्या मुलायम भाषेतून हा अर्थ अतीव नाजुकपणे स्पष्ट केला आहे. हे जर आपण मान्य केले नाही; तर " आजीं आनंदसरोवरींचीं कमळें । तैसे हे तुझे डोळे । आपुलिया प्रसादाचीं राउळें । जयालागीं करिती ॥ ११.६५ ॥ "यांसारख्या ओव्यांचा अर्थ आपणास कधीच लागणार नाही, त्यातील हेतू स्पष्ट होणार नाही; मग त्याची प्रतीती आपणापासून शेकडोशे जन्म दूर राहिली तर नवल नाही. या दृष्टीने " श्रीनारायण उपदेशामृत " या ग्रंथात श्रीशिवोम्प्रकाश ब्रह्मचारी यांनी असे म्हटले आहे की " कुंडलिनी शक्तिके दो मुख है– एक बहिर्मुख दूसरा अंतर्मुख । वह चराचर जगत्में बहिर्मुख जागती है इसीलिए जीव बहिर्जगत्के व्यापारमें लिप्त रहकर घृणा, लज्जा, भय, शोक, निंदा, कुल, शील और जाति– इन आठ पाशोंमें बंधा रहता है । उसका अंतर्मुख निद्रित रहता है, अतः जीव अंतर्जगत्का अनुभव नहीं कर पाता । कुंडलिनी साढे तीन कुंडलाकार सर्पिणीके सदृश मूलाधारमें सोई हुई स्थित है । यह कुंडलिनी और कुछ नहीं, चंचल प्राणका नामांतर मात्र है । इस प्राणके बहिर्मुख प्रवाहित होनेपर मनुष्य धर्म, अर्थ, काम– इस त्रिवर्गमेंही उलझा रहता है । कुंडलिनीके बहिर्मुखी तीन कुंडलही त्रिवर्ग है । आधा कुंडल मोक्ष है जो अंतर्मुखी है । अंतर्मुखी होनेपर वह सुषुम्नामें अग्रसर होती है ।

"नाक्षतं मोक्षमार्गं स्यात् प्रसिद्धं पश्चिमं विना ॥१.१४५॥ योगशिखोपनिषद ॥"

जवतक प्राण सुषुम्ना मार्गसे प्रवाहित न हो, तब तक मोक्ष नहीं होता।" (पृ.८७)

श्रीगुरुकृपेचा हेतू मोक्षप्राप्ती असल्याने व मोक्ष हा जागृत शक्तीच्या अधीन असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "बाप साक्षात्काराचा वेधु। कैसा देशधडी केला बोधु। हा गुरुशिष्यसंबंधु। विपायें नांदे ॥११.३७०॥" असे सांगून मोक्षाची आपली अत्युच्च कल्पना स्पष्ट केली आहे; कारण सहस्रारात शिवशक्तीचे मीलन झाल्यावर बोधूही राहत नाही व गुरुशिष्यसंबंधही राहत नाही. शिवशक्तीचे सामरस्य होणं म्हणजेच मोक्ष होय व जागृत शक्तीने साधणारा हा अंतिम हेतू आहे, हे निश्चित असल्याचे घोषित करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**तियें ओळखीचिसरसे। सुखाचिया साम्राज्यीं बैसे।**
**मग आपणपां समरसें। विरोनि जाय ॥६.३६७॥**
**तैसें होय तिये मेळीं। मग सामरस्याचिया राउळीं।**
**महासुखाची दिवाळी। जगेंसि दिसे ॥३८९॥**

अशा प्रकारच्या सामरस्यात्मक मोक्षाची सिद्धी होण्यासाठी गुरुकृपेचा आणखी एक अंगभूत हेतू सिद्ध व्हावा लागतो. याला शिष्यस्थ शिव स्पंदित होणे असे म्हणतात. "ईश्वरः सर्वभूतांना हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ गीता॥१८.६१॥" या भगवंताच्या न्यायाने तो ईश्वर आपल्या मायेचा आडपडदा पुढे लावून आतून एकटाच सूत्र हालवीत पडद्याच्या बाहेर चौऱ्याशी लक्ष योनीतून जीवाला फिरवीत असतो. एवढेच नव्हे तर "भ्रामकाचेनि संगें। जैसें लोहो वेढा रिगे। तैसीं ईश्वरसत्तायोगें। चेष्टती भूतें ॥ १८.१३११ ॥" यातून जर जीवाला सुटावयाचे असेल तर त्याला गुरुकृपेचा आश्रय अपरिहार्य ठरतो. या आश्रयाशिवाय म्हणजे अंतस्थ शिव अर्थात् स्वतःच जीवाच्या किंवा शक्तीच्या रूपाने असलेला शिव सद्गुरूने केलेल्या शक्तिपाताने स्पंदित झाल्याशिवाय आपल्या मूळ स्वरूपाप्रत जाऊ शकत नाही. हे स्पंदनत्व त्याला शरणागतीने प्राप्त होते व त्यामुळेच गुरुकृपेचा सारभूत हेतू सिद्धीस जातो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तया अहं वाचा चित्त आंग। देऊनियां शरण रिग।**
**महोदधी का गांग। रिगालें जैसें ॥१८.१३९९॥**
**मग तयाचेनि प्रसादें। सर्वोपशांतिप्रमदे।**
**कांतु होऊनियां स्वानंदें। स्वरूपींचि रमसी ॥१३२०॥**

गुरुकृपेचा आणखी एक अंगभूत हेतू जडचेतनभेदप्रक्रिया संपन्न व्हावी हा असून, ज्यावेळी जागृत प्राणशक्ती कुंडलिनी सुषुम्नेत प्रविष्ट होते त्यावेळी मूलाधारातील पृथ्वीतत्त्वाला, स्वाधिष्ठानातील जलतत्त्वाला, मणिपुरातील तेजतत्त्वाला, अनाहतातील वायुतत्त्वाला व विशुद्धातील आकाशतत्त्वाला ती आपल्यात समाविष्ट करते. याचाच अर्थ असा आहे की, या तत्त्वांच्या रूपाने

देहात असलेली जडता ही शक्ती गिळून टाकून शेवटी ती निखळ चेतन म्हणजे शिवरूपाने सहस्रारात शिल्लक राहते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुरुकृपेचा हा हेतू कसा सिद्ध होतो हे सांगताना असे म्हटले आहे की—

पृथ्वीतें आप विरवी । आपातें तेज जिरवी ।
तेजातें पवनु हरवी । हृदयामाजीं ॥६.२९९॥
पाठीं आपण एकला उरे । परि शरीराचेनि अनुकारें ।
मग तोही निगे अंतरें । गगना मिळे ॥३००॥
तंव महाभूतांची जवनिका फिटे । मग दोहींसि होय झटें ।
तेथ गगनासकट आटे । समरसीं तिये ॥३०६॥
पैं मेघाचेनि मुखीं निवडला । समुद्र कां वोघीं पडिला ।
तो मागुता जैसा आला । आपणपयां ॥३०७॥
तेवीं पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशे ।
तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ॥३०८॥

श्रीमदाद्यशंकराचार्यांनी " सौंदर्यलहरी " या ग्रंथात उपरोक्त गोष्टीचे वर्णन करताना असे म्हटले आहे की—

अविद्यानामन्तस्तिमिरमिहिरोद्दीपनकरी ।
जडानां चैतन्यस्तबकमकरन्दस्रुतिझरी ॥३॥

हे कुंडलिनी शक्ती देवी भगवती ! तू अविद्येत गुरफटून पडलेल्या जीवांच्या हृदयातील अंधकार दूर करणाऱ्या ज्ञानरूपी सूर्याचे उद्दीपन करणारी आहेस. जड माणसांसाठी चैतन्यगुच्छातून प्रवाहित होणारा मधाच्या स्रोताचा तू झराच आहेस. या श्लोकावर टीका करताना " सौंदर्यलहरीवर केलेल्या हिंदी टीकेत, " प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज म्हणतात, " शरीरके योगसेही आत्माका स्वाभाविक आनंदस्वरूप तिरोहित हो गया है । जितना मनुष्य देहवृत्तिका त्याग करके आत्मस्थितिमें ऊँचा उठ जाता है, उसे शारीरिक कष्ट उतनाही कम संताप पहुँचाते हैं और उसके आनंदानुभवकी वृद्धि होती है । कुंडलिनी शक्ति जागकर पांचों तत्त्वों और मनका वेध करके जड-चेतनकी ग्रंथियोंको खोल देती है । तब साधकका देहाध्यास शिथिल हो जानेपर वह आत्मस्थिति की उच्च भूमिकाओंका अनुभव करने लगता है और आनंदकी लहरे उसकी प्रत्येक नाडीमें प्रवाहित होने लगती है । .... चैतन्यका अर्थ मंत्र-चैतन्य भी ग्रहण किया जा सकता है, उस पक्षमें श्रीविद्याके मंत्रको स्तबक और मंत्रके अनुष्ठान द्वारा कुंडलिनी शक्तिके जागरणसे प्राप्त होनेवाले दिव्यानंदावेशका प्रवाह मकरंदके स्रोतकी झरीसे उपमित किया जा सकता है । मंत्रचैतन्यका लक्षण योगशिखोपनिषदमें इस प्रकार कहा गया है—

यदानुध्यायते मंत्रं गात्रकंपोऽथ जायते ॥१.७०॥

अर्थात् जब मंत्रका ध्यान किया जा सकता है, तब गात्रोंमें कंपका अनुभव होना चाहिये। कंप शक्तिके सक्रिय होनेपर हुआ करते हैं और उस कंपमें दिव्यानंदकी लहरें प्रवाहित होती हुई अनुभवमें आती हैं,जिससे शिरमें आत्मानंदकी मस्ती प्रदान करनेवाला नशासा चढ जाता है। मंत्र-चैतन्यका अर्थ मंत्रयोग द्वारा शक्तिका जागरणही समझना चाहिये। कुंडलिनी शक्तिके जागनेपर शरीरकी जडता, आलस्य, भारीपन इत्यादि दोष तत्क्षण दूर हो जाते हैं।"

श्रीगुरुकृपेने अर्थात् जागृत शक्तीने दिव्य शरीराच्या प्राप्तीचा हेतूही, जडता दूर झाल्याने, आपोआप सिद्ध होतो. हे कसे घडते व साधकाला निर्मल, दिव्य किंवा अपूर्व अशा शरीराची, नवी जडण-घडण होऊन प्राप्ती कशी होते, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तैसें पिंडाचेनि आकारें। ते कळाचि कां अवतरे।
वरी त्वचेचेनि पदरे। पांघुरली असे ॥६.२५०॥

जैशी आभाळाची वुंथी। करूनि राहे गभस्ती।
मग फिटलिया दीप्ती। धरूनि ये ॥२५१॥

तैसा आहाचवरि कोरडा। त्वचेचा असे पातोडा।
तो झडोनी जाय कोंडा। जैसा होय ॥२५२॥

मग काश्मीरीचे स्वयंभ। कां रत्नबीजा निघाले कोंभ।
अवयव कांतीची भांब। तैसी दिसे ॥२५३॥

नातरी संध्यारागींचे रंग। काढूनि वळिलें तें आंग।
कीं अंतर्ज्योतीचें लिंग। निर्वाळिलें ॥२५४॥

कुंकुमाचें भरीव। सिद्धरसाचें वोतींव।
मज पाहतां सावेव। शांतिचि ते ॥२५५॥

तें आनंदचित्रींचें लेप। नातरी महासुखाचे रूप।
कीं संतोषतरूचें रोप। थांवलें जैसें ॥२५६॥

तो कनकचंपकाचा कळा। कीं अमृताचा पुतळा।
नाना सासिन्नला मळा। कोंवळिकेचा ॥२५७॥

हो कां जे शारदियेचेनि वोलें। चंद्रबिंब पाल्हेलें।
कां तेजचि मूर्त बैसलें। आसनावरी ॥२५८॥

तैसें शरीर होये। जे वेळीं कुंडलिनी चंद्र पीये।
मग देहाकृति बिहे। कृतांतु गा ॥२५९॥

वार्धक्य तरी बहुडे। तारुण्याची गांठी विघडे।
लोपली उघडे। बाळदशा ॥२६०॥

श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "सौंदर्यलहरीत" श्रीगुरुकृपेने जागृत होणाऱ्या भगवती कुंडलिनी शक्तीमुळे हा हेतू कसा सिद्धीस जातो हे सांगताना असे म्हटले आहे की-

नरं वर्षीयांसं नयनविरसं नर्मसु जडं ।
तवापांगालोके पतितमनुधावन्ति शतशः ॥१३॥

हे भगवती कुंडलिनी शक्ती ! जो मनुष्य वृद्ध, दिसण्यात कुरूप व प्रेमक्रीडेमध्ये मूर्ख आहे अशावरही तुझ्या कटाक्षकिरणांचा अनुग्रह किंवा कृपा झाली म्हणजे तो इतका रमणीय होतो की, शेकडोशे तरुण सुंदर स्त्रिया त्याच्या मागे धावू लागतात.

याच रीतीने श्रीगुरुकृपेने अर्थात् जागृत शक्तीने घडून येणारे अनेक अंगभूत हेतू श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत सिद्ध केलेले दिसून येतात. "जयां सद्गुरुतारूं फुडें । जे अनुभवाचे कांसे गाढे । जयां आत्मनिवेदनतरांडें । आकळलें ॥७.९८॥ ते हे माझी माया तरले ॥७.१०२॥" हे सांगून सद्गुरुकृपेने साधक मायेच्या यंत्राचे भ्रमण थांवून त्यातून कसा सुटतो हे सांगितले आहे. त्याचप्रमाणे कारणाचे कार्यात विलिनीकरण होणे हा गुरुकृपेचा हेतूही कसा सिद्धीस जातो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

आकारु जेथ सरे । जीवत्व जेथ विरे ।
द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ॥१३.११४२॥
तेचि अविद्येची जवनिका फिटे । आणि भेदभावाची अवधी तुटे ।
मग म्हणों एक होऊनि जरी आटे । तरी काय दोनी होती ? ॥८.४१॥

श्रीगुरुकृपेने जडचेतनभेदप्रक्रिया सिद्ध होऊन साधक मोक्षश्रीचा अधिकारी होत असल्याने हा हेतूही आपण कसा सिद्ध करणार आहोत हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

परि तेंचि ऐसेनि निवाडें । जैसें भेसळलें खरें कुडें ।
मग काढिजे फाडोवाडें । पारखूनियां ॥९.४३॥
कां चांचूचेनि सांडसें । खांडिजे पय पाणी राजहंसें ।
तुज ज्ञान विज्ञान तैसें । वांटूनि देऊ ॥४४॥
मग वारयाचिया धारसा । पडिन्नला कोडा कां नुरेचि जैसा ।
आणि कणांचा आपैसा । राशिवा जोडे ॥४५॥
तसें तें जाणतलेयासाठीं । संसार संसाराचिये गांठीं ।
लाऊनि बैसवीं पाटीं । मोक्षश्रियेच्या ॥४६॥

अर्थात् ही सर्व प्रक्रिया "मोटकें गुरुमुखें उदैजात दिसे ॥९.४९॥" यामुळेच घडणार आहे हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तत्काळ प्रकट केले आहे. त्याचप्रमाणे "ना तैं समुद्रचि होऊन ठेलें । तेवि चित्ताचें चैतन्य जाहालें । जेथ यातायात निमालें ।

घनानंद जें ॥८.८५॥, जैसा सैंधवाचा रवा । सिंधूमाजीं पांडवा । विरालेया विरवावा । हेंही ठाके ॥१४.३९३॥, जैसें गंगेचिनि वोघें । डळमळीत जळ जें निघे । सिंधुपद तयाजोगें । आन नाहीं ॥ १४.३९९ ॥" इत्यादि अनेक ओव्यातून सर्व द्वंद्वे संपणे, सामरस्य होणे, सर्व अध्यासांपासून जीवाची मुक्ती होणे, मल व भ्रांतीची निवृत्ती होणे हे व इतर तदनुषंगिक हेतू कसे सिद्ध होतात हे त्यांनी स्पष्ट केले आहे.

सारांश, " तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि " या ग्रंथातील "दीक्षा ( २ )" या निबंधात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी म्हटल्याप्रमाणे गुरुकृपेचा सारभूत हेतू स्पष्ट करावयाचा झाला तर असे म्हणता येईल की, "दीक्षाके प्रभावसे आत्माकी सम्यक् शुद्धि होती है और पूर्णत्वकी प्राप्ति भी होती है । पशुभावमें स्थित आत्मा पशुत्वसे निवृत्त होकर शिवत्वको प्राप्त होते हैं । अनादि कालसे आणवमलके संबंधसे आत्माकी दृक्शक्ति तथा क्रियाशक्ति संकुचित है, भेदज्ञानके प्रभावसे कर्म-संस्कारवश संसारमंडलमें निरंतर भ्रमण करते हैं। जबतक भगवान्‌की तिरोधान शक्तिका प्राबल्य रहता है, तबतक इसी रूपमें अर्थात् संसारीके रूपमें आत्माको रहना पडता है। मेघदूतके यक्षके तुल्य आत्मा उस समय ' शापेनास्तंगमितमहिमा ' होकर अपने धाम तथा प्रियजनसे अर्थात् चिदानंदमय अपनी सत्तासे निर्वासित है । शाप कालकी अवधि पूर्ण होनेके साथ तिरोधान-शक्तिमें शिथिलता आती है और अनुग्रह-शक्तिका जागरण होता है। उसके पश्चात् उसकी दिव्य स्वदेश-यात्राका आरंभ होता है। यात्राके अवसानमें वह अपने शिवमय नित्यधाममें प्रवेश करता है। वहाँ कर्मकी चंचलता नहीं है तथा स्वरूपशक्तिका संकोच नहीं है । वहाँ स्वातंत्र्यका पूर्ण विकास है । " उपरोक्त सर्व विवेचनाचे सार श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात कथन करावयाचे झाले तर असे म्हणता येईल की–

**तिये ओळखीचिसरिसें । सुखाचिया साम्राज्यीं बैसे ।**
**मग आपणपां समरसें । विरोनि जाय ॥६.३६७॥**
**तैसीच गुरुकृपा उखा उजळली । ज्ञानाची वोतपली पडली ।**
**तेथ साम्याची ऋद्धि उघडली । तयाचिये दिठी ॥७.१३१॥**

## गुरुकृपा केव्हा होते ? :–

भगवान् श्रीगोपालकृष्णमहाराजांनी " असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः । नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥१८.४९॥ " असे गीतेत सांगून गुरुकृपा म्हणजे शक्तिपात योगदीक्षा साधकाला केव्हा प्राप्त होते याचे स्वच्छ उत्तर दिले आहे. ज्याचे अंतःकरण कोठेही आसक्त झालेले नसते, ज्याने आपल्या अंतःकरणाला जिंकले आहे व ज्याची सर्व प्रकारची इच्छा नाहीशी झालेली आहे असा जो साधक असतो त्याच्यावर गुरुकृपा होऊन त्याची प्राणशक्ती कुंडलिनी

सुषुम्नेत शिरल्यामुळे त्याला सर्वकर्मसंन्यासाने सर्वोत्कृष्ट अशी निष्क्रिय व स्वसंवेद्य आत्मस्वरूपावस्था सहस्रारात शिवशक्तीच्या सामरस्यामुळे प्राप्त होते असे त्यांनी या श्लोकात स्पष्ट केले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "पैं परिपाकाचिये वेळे। फळ देठें ना देठु फळें। न धरे तैसें स्नेह खुळें। सर्वत्र होय ॥१८.९५७॥" असे सांगून गुरुकृपेपूर्वी होणारी साधकाची स्थिती वर्णन केली आहे. अर्थात् साधकाच्या परिपक्वतेची वेळ केव्हा व का येते याची चिकित्सा शास्त्रकारांनी भिन्न भिन्न प्रकारे केली आहे. असे असले तरी "यतः सर्वदर्शनानां स्वस्वरूपदर्शने समन्वयं करोति सोऽवधूत योगी स्यात् ॥६.२०॥" या महायोगी गोरक्षनाथांच्या "सिद्ध-सिद्धांतपद्धतीतील" न्यायाचा अवलंब करून गुरुकृपावतरणाच्या चिकित्सेचा हा अत्यंत सूक्ष्म व जटिल विषय, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या प्रक्रियेचे सर्व भिन्न पैलू प्रस्तुत करून, समन्वयपूर्वक कसा सादर केला आहे, याचा आता विचार करावयाचा आहे.

शास्त्रकारांचे पहिले मत असे आहे की, कर्मसाम्य झाले की, गुरुकृपा किंवा शक्तिपात होतो. हे मत प्रस्तुत करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**धरवणी वेंचें सरे। तैसें भोगें प्राचीन पुरे।**
**नवें तंव नुपकरे। कांहींचि करूं ॥१८.९६५॥**
**ऐसीं कर्में साम्यदशा। होय तेथ वीरेशा।**
**मग श्रीगुरु आपैसा। भेटेचि गा ॥९६६॥**

साचविलेले पाणी रोज खर्च केले म्हणजे जसे ते संपते तसे प्रारब्धकर्म हे भोगानंतर संपते आणि नवे क्रियमाण काहीच करण्यास उपयोगी पडत नाही; (कारण अहंकर्तृत्वभावना व रागद्वेषमूलकता नसल्यामुळे म्हणजे कर्तृत्वबुद्धी नसल्यामुळे त्या कर्माचा असंश्लेष–असंबंध होतो.) अर्जुना! अशा प्रकारे कर्माची साम्यावस्था साधकाला प्राप्त होते तेव्हा मग श्रीगुरू आपण होऊन सहजच खात्रीने भेटतात.

कर्मसाम्यामुळेच सिद्धयोग संप्रदाय प्रवर्तक श्रीशंकरांचा प्रसाद किंवा कृपा म्हणजे शक्तपातयोगदीक्षा प्राप्त होते असे "स्कंदपुराणांतर्गत सूतसंहितेच्या यज्ञ-वैभवखंडाच्या पूर्वार्धात," "महादेवप्रसादकारणनिरूपणम्" या प्रकरणात सांगताना महर्षी व्यासांनी असे म्हटले आहे की–

**महादेवो महानन्दो महाकारुणिकोत्तमः।**
**स्वात्मभूतां परां शक्तिं प्रेरयत्येव सुव्रताः ॥३४.१६॥**
**प्रसन्ना सा महादेवी महाकारुणिकोत्तमा।**
**शिष्यस्याऽऽत्मनि चिद्रूपे स्वयं पतति निर्मले ॥१७॥**
**शक्तिपाते तु संजाते शिष्यस्याऽऽत्मनि संस्थिता।**
**माया दग्धा भवेत्किंचिन्नात्र संदेहकारणम् ॥१८॥**

**सर्वसाधनसंयुक्तः साक्षादास्तिक्यसंयुतः ।**
**महादेवस्य भक्तश्चेच्छिष्यः सद्गुरुभक्तिमान् ॥१९॥**
**तस्य शिष्यस्य विप्रेन्द्राः कर्मसाम्ये सति द्विजाः ।**
**शांभवी शक्तिरत्यर्थं तस्मिन्पतति चिद्घने ॥२०॥**

हे व्रतसंपन्न मुनीहो ! परम दयाळू गुरूंनी ग्रंथींचे छेदन केल्यानंतर सदानंदरूप परमकृपाळू श्रीमहादेव श्रेष्ठ अशा स्वात्मशक्तीची प्रेरणा शिष्यशरीरात म्हणजे चित्तात करतात. त्यावेळी अत्यंत दयाळू अशी ती शिवशक्ती सुप्रसन्न होऊन निर्मल व चिद्रूप अशा शिष्याच्या चित्तात किंवा हृदयात स्वतः प्रविष्ट होते या रीतीने शक्तिपात झाल्यानंतर शिष्याच्या चित्तातील अज्ञान पार नाहीसे होते. याविषयी शंका घेण्याचे काहीही कारण नाही. सर्वसाधनांनी युक्त, आस्तिक, महादेव व गुरू यांची भक्ती करणारा असा साधक असल्यास संचित व प्रारब्धकर्म समतेला प्राप्त होऊन (अर्थात् पूर्वकर्मप्रतिबंधशून्यता प्राप्त होऊन) म्हणजे कर्मसाम्याची स्थिती साधकाला प्राप्त होऊन त्या चित्स्वरूपाधिकारी शिष्यात ती शंभुशक्ती पूर्णपणे पडते, प्रवेशते किंवा प्रविष्ट होते म्हणजे तिचा पात होतो.

या श्लोकांवर टीका करताना व त्यातील कर्म्यसाम्याचा अर्थ स्पष्ट करताना श्रीमद्विद्यारण्यस्वामींनी आपल्या "तात्पर्यदीपिकेत" असे म्हटले आहे की, कर्मसाम्ये सतीति । परमेश्वरानुग्रहवशाद्दीक्षासंस्कारेण भाविजन्मोपादककर्मक्षयाद्वर्तमानजन्मनि च सुखदुःखहेतुभूतयोः पुण्यपापयोरुपभोगेन क्षीणत्वादारब्धफलयोः संचितवर्तमानकर्मणोः क्षयसाम्ये सतीत्यर्थः । तदुक्तम्–

**जन्तोरपश्चिमतनोः सति कर्मसाम्ये निःशेषपाशपटलाच्छिदुरा निमेषात् ।**
**कल्याण देशिककटाक्षसमाश्रयेण कारुण्यतो भवति शांभववेधदीक्षा ॥इति ॥**
**आगमिका अप्याहुः–**
**अधर्मधर्मयोः साम्ये जाते शक्तिः पतत्यसौ ।**
**ज्ञानात्मिका परा शक्तिः शंभोर्यस्मिन्निपातिता ॥ इति ॥**

ज्यावेळी पुढील जन्माच्या उपादक कर्माचा म्हणजे क्रियमाणाचा क्षय होतो, वर्तमान जन्मातील सुखदुःखाला कारण असलेले प्रारब्ध कर्म पुण्यपापांच्या उपभोगाने क्षीण होते व संचित कर्म क्षीणरूपात समतेला प्राप्त होते त्यावेळी कर्मसाम्य होऊन परमेश्वराच्या अनुग्रहाने शक्तिपातदीक्षासंस्कार सिद्ध किंवा संपन्न होतो. या दृष्टीनेच असे म्हटले की, "प्राणिमात्राचे पूर्वजन्मातील कर्म म्हणजे धर्माधर्म समान असताना एका क्षणात सर्व पाशच्छेदक व कल्याणकारक अशी शांभवी वेधदीक्षा सद्गुरूच्या फक्त दयार्द्र दृष्टीने होते." आगमातही असेच सांगितले आहे की, "अधर्म व धर्माचे साम्य झाले की, शंभूच्या ज्ञानात्मिका श्रेष्ठ शक्तीचा शिष्यावर पात होतो म्हणजे ही शक्ती शिष्यदेहात संक्रात होते." आगमातील या श्लोकाचा

अर्थ अधिक स्पष्ट करताना " जीवनमुक्तिविवेक " या ग्रंथावर टीका करताना श्रीअच्युतराय मोडक यांनी " पूर्णानन्देन्दु कौमुदीत " असे म्हटले आहे की, " अत्रैव योजना–आचार्येण शिष्यस्याधर्मधर्मयो: साम्ये जाते सति शंभोर्ज्ञानात्मिकाऽत एव परा शक्तिर्यस्मिन्नधिकारिणी शिष्ये निपात्यते चाक्षुष्यादिदीक्षाकरणद्वारा प्रेर्यतेऽसौ शक्तिस्तस्मिन्पततीति । " याचा अर्थ असा की, गुरू व शिष्य यांचे धर्माधर्म समान झाले की, शिवाची परमशक्ती किंवा ज्ञानात्मिका शक्ती अधिकारी शिष्याच्या ठिकाणी चाक्षुष्यादि दीक्षासाधनद्वारा म्हणजे चक्षू, हस्त, शब्द व मनाच्या द्वारा प्रेरिली जाते. हाच शक्तिपात होय.

" श्रीस्कंदपुराणांतर्गत सूतसंहितेच्या यज्ञवैभव खंडाच्या उत्तरभागातील ब्रह्मगीतेतही " महर्षी व्यासांनी कर्मसाम्यामुळेच शक्तिपातयोगदीक्षा अर्थात् गुरुकृपा होते हा सिद्धांत मांडताना असे म्हटले आहे की–

**प्रसादो नाम रुद्रस्य कर्मसाम्ये तु देहिनाम् ।।४.११८।।**
**प्रसादादेव रुद्रस्य श्रद्धया स्वस्य धैर्यत: ।**
**देशिकालोकनाच्चैव कर्मसाम्ये प्रकाशते ।।५.१२५।।**

ज्यावेळी शिष्याच्या किंवा साधकाच्या देहात कर्मसाम्य उपस्थित होते त्यावेळी रुद्राचा प्रसाद म्हणजे शक्तिपातयोगदीक्षा प्राप्त होते. ( ज्ञान्याला सुद्धा ब्रह्मप्राप्ती किंवा स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची उपलब्धी ही सहजसाध्य नसून ) त्यासाठी रुद्राचा प्रसाद, स्वत:ची श्रद्धा व धैर्य आणि गुरुचरणांचा कृपाप्रसाद यांची आवश्यकता आहे. ज्यावेळी धर्म व अधर्म किंवा पुण्य व पाप यांचे साम्य होते, ( म्हणजे उपभोगाने त्यांचा क्षय होतो, ) त्यावेळी रुद्रस्वरूप श्रीसद्गुरूचा प्रसाद म्हणजे शक्तिपात प्रकाशित अर्थात् फलित होतो. श्रीमद्विद्यारण्यस्वामींनी श्लोक ४.११८ वर टीका करताना आपल्या " तात्पर्यदीपिकेत " असे म्हटले आहे की, " प्रसादस्य स्वरूपमाह- प्रसादो नामेति ( परशक्ते: प्रसादेन ) । कर्मसाम्य इति । सुखदु:खहेतुभूतयोर्धर्माधर्मलक्षणयो: कर्मणोरुपभोगेन प्रक्षीणत्वसाम्ये सतीत्यर्थ: । प्रागुक्तं शक्तिपातस्वरूपनिरूपणप्रस्तावे चतुस्त्रिंशेऽध्याये ।। "

कर्मसाम्यामुळे शक्तिपात होतो असे जे हे मत आहे त्याचे प्रथम दिग्दर्शन करून नंतर त्यात कोणता दोष दिसून येतो हे सांगताना म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी " भारतीय संस्कृति और साधना, " खंड एक, या ग्रंथातील " शक्तिपात-रहस्य " या लेखात असे म्हटले आहे की, " किसी किसी आचार्यका ऐसा मत है कि शक्तिपातका वास्तविक कारण ज्ञान नहीं है, अपितु कर्मसाम्य है। दो समान बलवाले विरुद्ध कर्मोंके पारस्परिक प्रतिबंधसे कर्मका साम्य होता है और इस साम्यसेही शक्तिपात होता है । क्रमिक भोगके प्रभावसे बहुतसे कर्म क्षीण हो जानेपर किसी अनिश्चित समयमें यदि परिपक्व और समान बलविशिष्ट

विरुद्ध कर्म फलके विषयमें रुद्ध हो जायें, अर्थात् अपना-अपना फल प्रदान न करें, नियत भोगविधान न करें, और उसके पीछे होनेवाले सभी कर्म अपरिपक्व होनेके कारण भोगोन्मुख न हों, तो इसप्रकारसे विरुद्ध कर्मोंका साम्यभाव हो जाता है।

इस मतके विषयमें कहना यह है कि यदि कर्मको क्रमिक माना जाय, तो उसके फलदानको भी क्रमिकही मानना होगा। ऐसी अवस्थामें किन्हीं भी दो कर्मोंको पारस्परिक विरोधकी संभवनाही कहाँ है। एक कर्मके स्वरूपमेंही दूसरे कर्मकी स्थिति तो रह नहीं सकती। इसलिए, किन्हीं भी विभिन्न कर्मोंका एकसाथ रहना संभव नहीं है। इस प्रकार इस आलोचनासे स्पष्ट मालूम होता है कि कर्म सर्वथाही क्रमके अधीन हैं। दो कर्मोंके पारस्परिक विरोधसे यही समझना चाहिए कि वे दोनों एक दूसरेके फलको रोकते हैं, जिससे किसी क्षणमें उनकी युगपत् प्रवृत्तिका उदय नहीं होता। एक बात और भी है, विरोध स्वीकार करते हुए साथसाथ यह भी मानना पडता है कि उस समय एक दूसरा अविरुद्ध कर्म भोगात्मक फल दान करता रहता है। यदि उस अवस्थामें किसी भी अविरुद्ध कर्मकी प्रवृत्ति स्वीकार न करें, तो उसी क्षण देहपात हो जाना चाहिए; क्योंकि यह भोगायतन देह एक क्षणभी विना भोगके रह नहीं सकता। यदि यह कहा जाय कि जाति और आयु इन दो फलोंको देनेवाला कर्म प्रतिबद्ध नहीं होता, केवल भोगप्रद कर्मही प्रतिबद्ध होता है तो यह प्रश्न होगा कि यदि जाति और आयुप्रद कर्मके रहते हुए भी शक्तिपात हो सकता है तो भोगप्रद कर्म रहनेपरही क्यों नहीं हो सकेगा।"

गुरुकृपा अर्थात् शक्तिपात केव्हा होतो याबद्दल काही शास्त्रकारांचे दुसरे मत असे आहे की, ज्यावेळी मलपाक होतो त्यावेळी साधकावर किंवा शिष्यावर शक्तीचा पात होऊन गुरूची कृपा संपन्न होते. ही प्रक्रिया कशी घडते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> रात्रीची चौपाहरी। वेंचलिया अवधारीं।
> डोळयां तमारी। मिळे जैसा ॥१८.९६७॥

रात्रीचे चार प्रहर संपले म्हणजे मग अंधाराचा नाश करणारा सूर्य दृष्टीस पडतच असतो. याचा अर्थ असा की सूर्य दृष्टीस पडण्यासाठी रात्रीच्या चार प्रहरांचे उलटणे आवश्यक आहे. चार प्रहर संपल्याशिवाय ज्याप्रमाणे सूर्य दृष्टीस पडत नाही त्याप्रमाणे मलपाक झाल्याशिवाय गुरुकृपा अर्थात् शक्तिपात होऊ शकत नाही. त्यामुळे शक्तिपाताने मलादि आवरणाचा भेद करणारा व परतत्त्वाशी गाठ घालून देणाराच खरा गुरू होय हे सांगताना शास्त्रकार म्हणतात –

> परिपक्वमला ये तानुत्सादनहेतुशक्तिपातेन।
> योजयती परे तत्त्वे स दीक्षाचार्यमूर्तिस्थः॥

ज्यावेळी शिष्याचा मूळ आवरणरूप मल हा परिपक्व होऊन गळून पडण्याच्या अवस्थेला येतो त्यावेळी सद्‌गुरू शक्तिपात करून शिष्याच्या मलादि आवरणाचा भेद करतात व त्याची परतत्त्वाशी गाठ घालून देतात. अशा प्रकारे शक्तिपाताने ज्ञानदान करणाऱ्या गुरूला मूर्तिमंत दीक्षाचार्य म्हणतात.

या प्रकाराचे अधिक स्पष्टीकरण करताना उपरोक्त लेखातच म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात," तंत्रशास्त्रके द्वैतमतावलंवी आचार्योंका यह मत है कि ज्ञान अथवा कर्मसाम्य शक्तिपातका हेतु नहीं है, उसका कारण तो मलपाकही है। ये लोग कहते हैं –

**परस्परविरोधेन निवारितविपाकयोः।**
**कर्मणोः सन्निपातेन शैवी शक्तिः पतत्यसौ ॥**

परस्पर विरोधेके द्वारा जिनका फलदान रुक गया है, उन कर्मोंका सन्निपात होनेपर यह शैवी शक्ति पतित नहीं होती।

दो विरुद्ध कर्मोंमें दोनोंही धर्मात्मा हो सकते हैं जैसे स्वर्गप्रापक और ब्रह्मलोकप्रापक कर्म। दोनोंही अधर्मात्मक हो सकते हैं। जैसे अवीचिनरक–प्रापक और रौरवनरक–प्रापक कर्म। अथवा एक धर्म्य और एक अधर्म्य हो सकता है– जैसे अश्वमेध और ब्रह्महत्या। ऐसे दो विरुद्ध कर्मोंका सन्निपात होनेपर भी शिवत्व-दायिनी अनुग्रहात्मिका शक्तिका आत्मामें पात नहीं होता। विना मलपाक हुए शक्तिपात हो ही नहीं सकता। मतंगागममें लिखा है–" मलपाककी अविनाभूत दीक्षा कर्मक्षयकेद्वारा मोक्षप्राप्तिका हेतु बनती है। " किरणागममें कहा है–

**अनेकभविकं कर्म दग्धवीजमिवाग्निभिः ॥**
**भविष्यदपि संरुद्धं येनेदं तद्धि भोगतः ॥**

अनेक जन्मोंका संचित कर्म अग्निसे भुने हुए बीजके समान दग्ध हो जाता है; भावी कर्मकी फलोत्पादिका शक्ति रुक जाती है तथा जिससे यह जन्म हुआ है, उस प्रारब्धकर्मका भोगसे क्षय हो जाता है।

मलपाकसे अनुग्रह–शक्तिका पात होता है। शक्तिपात होतेही मलका आवरण हट जाता है और अपना विशुद्धसर्वज्ञत्वादिमय स्वरूप प्रकाशित होता है, अर्थात् शांत और निर्मल आत्माके स्वरूपका साक्षात्कार हो जाता है। एकही परमेश्वर जीवका बंधन भी करते हैं और मोक्ष भी। जैसे एकही सूर्य अपने सान्निध्यसे द्रवीभूत हो जानेवाले मोममें द्रवता तथा सूख जानेवाली मृत्तिकामें शुष्कता उत्पन्न करते हैं, वैसे एकही परमेश्वर मोक्षके अधिकारी पक्वमल जीवके लिए मोक्षका प्रबंध करते हैं और बंधनके योग्य अपक्वमल जीवके मलपाकके लिए उसके बंधनकी व्यवस्था करते हैं। मलपाकसे उपकार तथा अपकाररूप दोनों प्रकारके कर्मोंके विषयमें साम्यबुद्धि होनेपर मोक्ष होता है। सब प्रकारके कर्मसाम्यसे केवल विज्ञानकैवल्य-

कीही प्राप्ति होती है, मोक्ष–प्राप्ति नहीं होती। यथार्थ कर्मसाम्यका कारण मलका पाकही है। इससेही दीक्षाके द्वारा मोक्षप्राप्ति हो सकती है। परमेश्वर नित्य, निर्मल, सर्वज्ञ और सर्वकर्ता हैं, परंतु पशुआत्मा मल, माया और कर्मरूपपाशसे बँधा हुआ है। परमेश्वर कृपा करके उसके ये समस्त पाशात्मक बंधन काटकर उसको अपने सदृश बना लेते हैं। इसीको शिव-साधर्म्यकी अभिव्यक्ति कहते हैं, जिसका नामांतर 'अनुग्रह' अथवा 'मोक्ष' भी है। परंतु, जबतक पशुओंके चैतन्यका उपरोध करनेवाले अनादि मलका अधिकार निवृत्त नहीं होता, तबतक इस अनुग्रहकी प्रवृत्तिही नहीं होती। मृगेंद्र–आगममें लिखा है–

**तमःशक्त्यधिकारस्य निवृत्तेस्तत्परिच्युतौ।**
**व्यनक्ति दृक्क्रियानन्त्यं जगद्बंधुरणोः शिवः ।।**

आवरणशक्तिके अधिकारकी निवृत्ति हो जानेपर उस शक्तिका क्षय हो जानके अनन्तर जगद्बंधु परमेश्वर पशु (बद्धजीव) के प्रति उसकी ज्ञानक्रियाका अनन्तत्व अभिव्यक्त कर देते हैं, अर्थात् उसे मुक्त कर देते हैं।

तमःशक्ति रोधशक्ति या तिरोधानका नामांतर है। जबतक इस शक्तिका अधिकार रहेगा, तबतक उद्धारका उपाय नहीं है। अनादि मल क्रमसे धीरे–धीरे पक्व हो रहा है–परिणामको प्राप्त हो रहा है। पूर्ण परिपक्वता होनेपर उसकी निवृत्तिका समय उपस्थित होता है। नेत्रमें जाली पड जानेपर अस्त्रक्रियाद्वारा उसे दूर करना पडता है। परंतु, जबतक वह पूरी पक नहीं जाती, तबतक अस्त्रप्रयोग नहीं किया जाता। अपक्व मलको खींचकर हटानेका प्रयत्न करनेसे जीवका सर्वनाश हो जायगा। इसीलिए मंगलमय भगवान् इस प्रकारका बल-प्रयोग नहीं करते। वे मलके परिपाकके लिए अवसरकी प्रतीक्षा करते हैं और मल परिपक्व होनेपर दीक्षाके द्वारा उसे हटाते हैं। यही उनका जीवोद्धारका क्रम है। इस मतमें मल द्रव्यात्मक है और क्रियासेही उसकी निवृत्ति मानी जाती है। अवश्य यह क्रिया जीवका कर्म नहीं है, ईश्वरला व्यापार है, जिसका शास्त्रीय नाम दीक्षा है। परंतु, जबतक मलका परिपाक नहीं होता, तबतक इस व्यापारकी प्रवृत्ति नहीं हो सकती। मलपाकके लिएही भगवान् जीवको अलक्षित भावसे अनादि कर्मभोगात्मक संसारमें डालते हैं। यही उनका तिरोधान या रोधनात्मक कृत्य है। वस्तुतः सृष्टि, स्थिति और संहार तीनों तिरोधानके प्रकारभेद हैं- तीनोंमें तिरोधान अनुस्यूत है। मलके समान माया तथा कर्मका पाक भी आवश्यक है। माया-शक्तियोंको अभिव्यक्तिके योग्य करनाही मायापाकका उद्देश्य है। इसी प्रकार कर्म भी पक्व होनेपरही अपना फल देनेमें समर्थ होते हैं, अपक्व कर्म फलदान नहीं कर सकता। सब पाशोंके पाक या परिणामका मुख्य कारण परमेश्वरका सामर्थ्य या स्वातंत्र्य है। अनेक जन्मोंकी वासना तथा पुण्यपुंजके प्रभावसे किसीभी समयमें अथवा किसीभी आश्रममें स्थित

रहनेके समय अचिंत्य भाग्योदयसे किसी आत्माकी चैतन्यशक्तिके अनादि आवरणभूत मलका किंचित् पाक होनेपर तदनुरूप शक्तिपात होता है। यही कृपा है। इसकी मात्राके अनुसार परमेश्वरके प्रति भक्तिश्रद्धादिका उदय होता है। उस समय उस शक्तिके अनुरूप दीक्षाका अवसर आता है। शक्तिपातके तारतम्यके अनुसार दीक्षाका भी भेद होता है। इस मतमें शक्तिपातके तारतम्यका मूल मलपाककी विभिन्नताही है।"

ह्या मलपाकाच्या सिद्धांतानेही गुरुकृपेच्या कारणांची संगती पूर्णतया लागू शकत नसल्याने त्यावर टीका करताना ते पुढे म्हणतात, "यह कहना निष्प्रयोजन है कि इस मलपाकके सिद्धांतसेभी अनुग्रहतत्त्वका चरम रहस्य नहीं खुलता। भेदवादी आचार्य मलका नाश नहीं मानते; क्योंकि मल एक होनेके कारण यदि उसका नाश स्वीकार किया जाय तो एक आत्माके मलहीन होनेके साथ सभी आत्माओंके मलहीन होनेका प्रसंग प्राप्त होता है। इससे एककी मुक्तिसे सबकी मुक्ति हो जायगी। इसलिए ये लोग कहते हैं कि मलका पाकही होता है, नाश नहीं होता। 'पाक' शब्दसे इस मतमें मलकी अपनी शक्तिका प्रतिबद्ध भाव समझना चाहिए, परंतु बात यह है कि इस प्रकारसे विचार करनेपर भी पूर्वोक्त दोष निवृत्त नहीं होता। विष अथवा अग्निकी अपनी शक्ति स्तंभित होनेपर जैसे वह सबके लिए समान होता है, वैसे यदि मलका पाकही माना जाय तो भी मल वस्तुतः अभिन्न होनेके कारण वह पाक भी सबके लिए समानही मानना पडेगा। एक बात और है, पाकका हेतु क्या है, यह भी विचारणीय है। कर्म अथवा ईश्वरकी इच्छा इनमेंसे किसीको भी मलपाकका हेतु मानना युक्तिसंगत नहीं है; क्योंकि कर्म केवल भोगकेही कारण होते हैं और किसी कार्यकी कारणता कर्ममें नहीं मानी जा सकती। ईश्वरकी इच्छाको भी कारणरूपसे ग्रहण करनेसे समाधान नहीं होता; क्योंकि वह इच्छा स्वतंत्र है या परतंत्र, इसकी मीमांसा करना भी आवश्यक है। परतंत्र कहनेसे मानना पडेगा कि उसे कर्मादि किसी अन्य निमित्तकी अपेक्षा है। तब तो पूर्वोक्त दोष रहही जाता है। और यदि ईश्वरेच्छाको स्वतंत्र माना जाय तो इस स्वतंत्र इच्छाका फलस्वरूप मलपाक सबके लिए समानही होना चाहिए। ईश्वरमें रागद्वेष नहीं है। तब उनकी इच्छासे किसीका मल पक्व होता है, किसीका नहीं होता अथवा किसीका शीघ्र होता है, किसीका देरसे होता है– यह वैषम्य क्यों होगा? वैषम्य तथा पक्षपातदोष ईश्वरमे नहीं हो सकता। स्मरण रखना चाहिए की यह आलोचना द्वैतदृष्टिसे की जा रही है। इस प्रकार, प्रतीत होता है कि मलपाकका कोई हेतु नहीं है। परंतु, इसे अहेतुक भी नहीं माना जा सकता। कारणके विना कार्यकी सिद्धि माननेपर इस संशयका समाधान नहीं होगा कि इतने दिनोंतक मलपाक क्यों नहीं हुआ? वस्तुतः, अहेतु-पक्षमें मलकी

स्थितिही नहीं हो सकती। अतएव शक्तिपातके विषयमें मलपाकवादकोही चरम सिद्धान्तरूपमें ग्रहण नहीं किया जा सकता।"

काही काही शास्त्रज्ञांचे तिसरे मत असे आहे की, ज्ञानोदयामुळे शक्तिपात अर्थात् गुरुकृपा होते. ही गोष्ट कशी घडून येते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात -

कां येऊनि फळाचा घडु। पारुषवी केळीची वाढु।
श्रीगुरु भेटोनि करी पाडु। बुभुत्सु तैसा ॥१८.९६८॥

फळाचा घड येऊन तो ज्याप्रमाणे केळीची वाढ खुंटवितो त्याप्रमाणे साधकाची, शिष्याची किंवा मुमुक्षूची स्थिती श्रीगुरूंची भेट झाल्यावर होते; कारण शक्तिपातयोगदीक्षा अर्थात् कृपा झाल्यावर त्याचे कर्मकर्तृत्व संपल्यामुळे त्याची जन्ममरण परंपरा संपून तो मुक्त होतो. ज्याप्रमाणे केळीची वाढ खुंटण्यास फळाचा घड येणे आवश्यक ठरते; त्याप्रमाणे शिष्याच्या ठिकाणी ज्ञानोदय झाला की, त्यावर सद्‌गुरुकृपा होऊन तो मुक्त होतो.

यासंबंधी उपरोक्त लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, "किन्हीं किन्हींका मत है कि शक्तिपात ज्ञानके उदयसे होता है। अज्ञानसे संसारका उद्‌भव होता है और ज्ञानोदयसे अज्ञानकी निवृत्ति होकर शक्तिपात होता है। ज्ञानरूप अग्नि सब प्रकारके कर्मोंको भस्म करके शक्तिपातकी भूमि तैयार करता है। ये लोग कहते है कि कर्मफलका भोग चाहे, क्रमसे हो, चाहे क्रमहीन भावसे, उसके द्वारा कर्मकी आत्यंतिकी निवृत्ति हो नहीं सकती। क्रमिक भोग स्वीकार करनेपर कर्मान्तरका प्रसंग अनिवार्य हो जाता है। अतः, निरंतर नूतन कर्म उत्पन्न होते रहनेके कारण किसीभी समय समस्त कर्मोंके क्षयकी संभावना नहीं हो सकती और उस संदेहकी निवृत्ति कर्मफलभोगको क्रमिक न मानकर युगुपत् (एकसाथ) माननेपरभी नहीं हो सकती; क्योंकि इस प्रकार तो कर्मफलका भोग होनाही संभव नहीं है। क्रमशः फल देना यही कर्मोंका स्वभाव है। एकही समय समस्त कर्मोंका फलभोग स्वीकार करनेपर तो कर्मका स्वभावही नष्ट हो जाता है। परंतु, स्वभावका नाश होना कदापि संभव नहीं है। इसलिए किसी भी प्रकारसे भोगके द्वारा कर्मका क्षय होना उपपन्न नहीं होता। इसीसे ज्ञानवादी आचार्योंके मतमें ज्ञानकोही कर्मक्षयके कारण-रूपसे ग्रहण करके उसीके साथ शक्तिपातका कार्य-कारण संबंध माना जाता है।"

ज्ञानाने शक्तिपात अर्थात् गुरुकृपा होते या मताचे खंडन करताना ते म्हणतात, "परंतु यह ज्ञान या सम्यग्ज्ञान किस प्रकारसे आविर्भूत होता है, इसका ठीक ठीक प्रकारसे समाधान नहीं होता। यदि कर्मको ज्ञानका कारण माना जाता है, तो ज्ञानको कर्मका फल मानना पडता है। इस अवस्थामें ज्ञान और कर्मफल समानार्थक हो जाते हैं और ज्ञानीको भी कर्मफलभोगीरूपसे स्वीकार करना

अनिवार्य हो जाता है। अतएव, ज्ञानोदयसे शक्तिपात स्वीकार करनेपर प्रकारान्तरसे भोगोंमेंही शक्तिपात मानना पडता है। इसमें अतिप्रसंग दोष आता है। कोई कोई कहते हैं कि कर्मका फल होनेपर भी ईश्वरकी इच्छासे ज्ञानमें कुछ विशेषता है। स्वर्गादि फल कर्मांतरको दग्ध नहीं कर सकते, किंतु ज्ञान स्वयं कर्मफलात्मक होनेपर भी कर्मांतरको दग्ध कर देता है। यही इसकी विशेषता है। इस मतके अनुसार ज्ञानोदयमें अन्योन्याश्रय (अर्थात् ज्ञानोदयसे ईश्वरेच्छाकी निमित्तताका अनुमान और ईश्वरेच्छाके अनुमानसे ज्ञानोदय) और व्यर्थतादोषका तथा ईश्वरमें रागादिकी प्राप्तिका प्रसंग आता है, इसलिए यह मतभी उपादेय नहीं है।"

वरील तिन्ही मते अंशात्मक रीतीने श्रीगुरुकृपावतरण केव्हा होते याचे स्पष्टीकरण करीत असल्याने या शास्त्रातील श्रेष्ठ आचार्यांनी अद्वैतदृष्टीने जो परम सिद्धांत प्रस्थापित केला आहे त्याचाच स्वीकार करणे भाग पडते. अद्वैत-मतावलंबी श्रेष्ठाचार्यांच्या मते शक्तिपात अर्थात गुरुकृपा ही सर्वार्थाने मायानिर-पेक्ष व स्वतंत्र असून ती कर्मसाम्य, मलपाक व ज्ञान इत्यादि कोणत्याही मायिक व्यापाराच्या अधीन नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त तिन्ही सिद्धान्त गुरुकृपा केव्हा होते याची काही प्रमाणात उत्तरे देत असल्याने, वर उल्लेखिलेल्या महायोगी गोरक्षनाथांच्या सिद्धांताप्रमाणे, आपल्या परंपरेला अनुसरून उपरोक्त सर्व सिद्धांताचा समन्वय करताना, त्यांना आपल्या दृष्टांतांच्या साच्यात घालून ते प्रस्तुत करून, शेवटी ईश्वराच्या केवळ स्वातंत्र्येच्छेने गुरुकृपा किंवा शक्तिपात होतो, हा अंतिम सिद्धांत प्रस्थापित केला आहे.हा सिद्धांत मांडताना ते म्हणतात—

**मग आलिंगिला पूर्णिमा। जैसा उणीव सांडी चंद्रमा।**
**तैसें होय वीरोत्तमा। गुरुकृपा तया॥१८.९६९॥**
**तेव्हां अबोधुमात्र असे। तो तंव तया कृपा नासे।**
**तेथ निशीसवें जैसें। आंधारें जाय॥९७०॥**

पौर्णिमेने आलिंगिलेला चंद्र ज्याप्रमाणे आपल्या स्वरूपातील कलेचा कमी-पणा मुळीच राहू देत नाही त्याप्रमाणे हे श्रेष्ठवीरा! ज्यावेळी श्रीगुरुकृपा होते त्यावेळी साधकाला पूर्णत्व प्राप्त होते. त्यावेळी, रात्र नाहीशी झाली म्हणजे जसा अंधार नाहीसा होतो; त्याप्रमाणे साधकाच्या ठिकाणी असणारे सर्व अज्ञान गुरुकृपेनेच म्हणजे शक्तिपातानेच नष्ट होते. याचा अर्थ असा की, ज्याप्रमाणे पौर्णिमेच्या चंद्रात कला नसतात म्हणजे त्या चंद्राला इतर कशानेही पूर्णता येण्याची आवश्यकता नसते किंवा त्याच्यात जशा सर्व कला समाविष्ट झालेल्या असतात; त्याप्रमाणे निखळ गुरुकृपेला कर्मसाम्य,मलपाक किंवा ज्ञानादि मायांतर्गत कोणत्याही गोष्टीची आवश्यकता असत नाही किंवा उपरोक्त सर्व गोष्टी गुरुकृपेत अर्थात् शक्तिपातात किंवा शक्तिपाताच्या कारणात समाविष्ट असतात, असे श्रीज्ञानेश्वर-

महाराजांनी स्पष्ट केले आहे. या प्रक्रियेत कोणत्याही बाह्य गोष्टींची आवश्यकता संभवत नसल्याने साधकाला एकमात्र स्वतंत्र ईश्वरेच्छाच अखेरपर्यंत म्हणजे नैष्कर्म्यसिद्धीसारख्या परमसिद्धीपर्यंत, शक्तिपात योगदीक्षेने अंतरंग साधन उपस्थित करून पोहोचविते, हे स्पष्ट करताना ते म्हणतात–

चेइलियावरी पाहीं। स्वप्नींचिया तिये डोहीं।
आपणयातें काई। काढूं जाइजे ? ॥१८.९७४॥
तें मी नेणें आतां जाणेन। हें सरलें तया दुःस्वप्न।
जाला ज्ञातृज्ञेयाविहीन। चिदाकाश ॥९७५॥
मुखाभासेंसीं आरसा। परौता नेलिया वीरेशा।
पाहातेपणेंवीण जैसा। पाहाता ठाके ॥९७६॥
तैसें नेणणें जें गेलें। तेणें जाणणेंही नेलें।
मग निष्क्रिय उरलें। चिन्मात्रची ॥९७७॥
तेथ स्वभावें धनंजया। नाहीं कोणीचि क्रिया।
म्हणौनि प्रवादु तया। नैष्कर्म्यु ऐसा ॥९७८॥
तें आपुलें आपणपें। असे तेंचि होऊनि हारपे।
तरंगु कां वायुलोपें। समुद्रु जैसा ॥९७९॥
तैसें न होणें निफजे। ते नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे।
सर्वसिद्धींत सहजें। परम हेचि ॥९८०॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गुरुकृपा केव्हा होते याचा उलगडा त्याच्या फलासहित वर केला आहे व ईश्वराची स्वातंत्र्येच्छा हे शक्तिपाताचे खरे कारण आहे, हे समन्वयात्मक पद्धतीने मांडलेले आहे. या समन्वयात्मक अवलंबनाच्या आधारानेच हेच म्हणणे श्रीअभिनवगुप्ताचार्यांनी "मालिनीविजयवार्तिक" या ग्रंथात मांडताना असे म्हटले आहे की–

शक्तिपातस्य तेनोक्ता नवधात्र व्यवस्थितिः।
अन्यथा नेश्वरस्यास्ति रागो द्वेषोऽथ वा क्वचित् ॥प्रथमकांड ॥६८७॥
येन क्वाप्येष नियतां स्वां शक्ति पातयेद्विभुः।
अनिमित्तस्तथा चायं शक्तिपातो महेशितुः ॥६८८॥
तेन रागक्षयात्कर्मसाम्यात्सुकृतगौरवात्।
मलपाकात्सुहृद्योगाद्भक्तेर्भावाच्च सेवनात् ॥६८९॥
अभ्यासाद्वासनोद्भेदात्संस्कारपरिपाकतः।
मिथ्याज्ञानक्षयात्कर्मसंन्यासात्काम्यविच्युतेः ॥६९०॥
साम्याच्चितस्य सा शक्तिः पततीति यदुच्यते।
तदसन्नु तत्रापि निमित्तान्तरमार्गणात् ॥६९१॥

अनवस्थातिप्रसंगसंभवाभावयोगतः ।
अन्योन्याश्रयनिः श्रेणिचक्रकाद्युपपाततः ॥६९२॥
अस्मिंस्तु पक्षे सर्वेषां प्रवादानामपि स्थितिः ।
युक्ता सर्वंसहे पक्षे न किंचित्किल दुष्यति ॥६९३॥
युक्तिः सुधीभिः स्वयमेव तत्र शक्येत संयोजयितुं ततो न ।
पृथक्तया योजनमुक्तमत्र यद्ग्रंथतो विस्तर एष मिथ्या ॥६९४॥
उपजग्मुरतोऽनपेक्षिणीं शिवशक्ति न च तां विना भवेत् ।
अपवर्गपदं यतो मुधा परशास्त्रेषु विमोक्षसंकथाः ॥६९५॥
शक्तिपातसमये विचारणं प्राप्तमीश न करोषि कर्हिचित् ।
श्रीमदुत्पलगुरुर्न्यरूपयत् तत्र तत्र निजशास्त्र ईदृशम् ॥६९६॥
तस्यैव हि प्रसादेन भक्तिरुत्पद्यते नृणाम् ।
यया यांति परां सिद्धिं तद्भावगतमानसाः ॥६९७॥
इत्थं पुराणशास्त्रादौ शक्तिः सा पारमेश्वरी ।
निरपेक्षैव कथिता सापेक्षत्वे ह्यनीशता ॥६९८॥
केवलं भेदवादान्ध्यस्थगितालसदृष्टिभिः ।
दुःसमर्थत्वमेतस्या नियमेन क्वचित्स्थितेः ॥६९९॥
पर्यालोच्यानिशं कर्ममलसाम्यप्रपाकतः ।
इत्यादिहेतुजालेषु वृथात्मा परिखेद्यते ॥७००॥
तत्तेषां नोपकाराय कुशकाशावलम्बनम् ।
तस्मात्स एव तादृक्षस्वस्वातंत्र्योपबृंहितः ॥७०१॥
तदा तथा तथेत्यादिवैचित्र्येणावभासते ।
तदित्थं सर्वदृष्टीनामत्रैव परमेश्वरे ॥७०२॥
अनुप्रवेश इत्यन्यैरलं वा युक्तिडम्बरैः ।
तदित्थं देवदेवेन स्वस्वरूपमिहोदितम् ॥७०३॥

शक्तिपात ही स्वस्वरूपापर्यंत नेऊन पोहोचविणारी एक विशिष्ट अशी श्रेष्ठ अवस्था आहे. या अवस्थेत साधक हा स्वतःला "मी शिवकृपेला अर्थात् शिवप्राप्तीला योग्य झालो आहे" असे समजतो. ज्या विलक्षण संयोगामुळे साधक स्वतःला शिवरूपत्व आल्याचे अनुभवितो तो शक्तिपात नऊ प्रकारचा असल्याचे इतरत्र वर्णिले आहे. ईश्वराच्या ठिकाणी रागद्वेष इत्यादी नसल्यामुळे तो व्यापक भगवान् कोठेही स्वतःच्या स्वाभाविक शक्तीचा पात अर्थात् संक्रमण कोणत्याही कारणावाचून करील; कारण तो सर्वनियामक व स्वतंत्र आहे. काहींचे म्हणणे असे आहे की, शक्तिपात होण्यासाठी पुढील कारणांची आवश्यकता आहे. आसक्तिक्षय किंवा लोभराहित्य, कर्मसाम्य, पुण्याचे आधिक्य, मलपाक, देहधातूतील समता म्हणजे

विषमतेचा अभाव, शिवभक्तांचा समागम, भक्ती, सेवा, अभ्यास म्हणजे नित्यानित्यविचार किंवा प्राणायामदिशीलन, मानसिक दुर्वासनांचे उच्चाटन, संस्कारांचा परिपाक, मिथ्याज्ञानाचा किंवा भ्रमाचा अगर आभासाचा क्षय, सर्वकर्मसंन्यास, काम्यकर्मत्याग व चित्ताची समता या सर्व कारणांमुळे शक्तिपात होतो. पण असे म्हणणे बरोबर नाही; कारण शक्तिपातासाठी काही निमित्ताची अपेक्षा केल्यास अनवस्था, अतिप्रसंग, असंभव, अभाव, अन्योन्याश्रय, चक्रकापत्ती इत्यादि शास्त्रसंमत दोष येतात. या सर्व पक्षात अनेक प्रवाद किंवा दोष येणे साहजिक आहे. मात्र आमच्या सर्व सहन करणाऱ्या अर्थात् समावेश करणाऱ्या पक्षात म्हणजे मतात कसलेच दोष नाहीत. बुद्धिमान लोकांनी येथे आपली युक्ती चालवून पाहावी. यासाठी आम्ही वेगळे काही सांगितले नाही; कारण निष्कारण ग्रंथविस्तार हा व्यर्थ होय. निरपेक्ष अशा शिवशक्तीशिवाय लोक मोक्षपदाला जातात असे सांगणाऱ्या इतर शास्त्रातील कथा या कथाच होत. शक्तिपातयोगातील आचार्य श्रीउत्पलगुरू तर असे म्हणतात की "हे ईशा! शिवा!! तू शक्तिपातप्रसंगी साधकाविषयी योग्यायोग्यतेचा विचार करीत नाहीस." अशी स्वशास्त्रात त्यांची वचने जागोजागी विखुरली आहेत.त्यांच्याच प्रसादाने म्हणजे शिवस्वरूप सद्‌गुरूच्या शक्तिपाताने मानवाच्या ठिकाणी भक्ती उत्पन्न होते. या भक्तीमुळेच साधकांची मने शिवभावात लीन होतात व ते भाग्यवान् परमसिद्धी अर्थात् मोक्ष प्राप्त करून मुक्त होतात. अशा रीतीने पुराणातून व शास्त्रातून ती परमेश्वराची शक्ती निरपेक्ष आहे व तिला कर्मसाम्यादि हेतूंची गरज किंवा जरूरी नाही असे सांगितले आहे. अन्यथा सापेक्षत्वामुळे त्या शक्तीचे सर्व नियामकत्व अर्थात् परम ईश्वरत्व कसे राहील? केवळ एखाद्या ठिकाणी नियमाला अपवाद म्हणून शक्तिपात झाला नसेल तर एवढेच अपवादभूत स्थळ पाहून अपवादालाच नियम समजणे योग्य नाही. भेदभावाने ज्यांची दृष्टी आणि बुद्धी गढूळ झाली आहे अशी सामान्य विचारांची माणसे कर्मसाम्य, मलपाक इत्यादी कारण समूहाला महत्त्व देतात व स्वतःला शीण करून घेतात; पण ते त्यांना उपकारक ठरत नाही, कारण अगदी सामान्य हेतूंनी महत्त्वाचे प्रमेय सोडविण्याचा कसून प्रयत्न करणे म्हणजे दर्भतृणादिकांच्या आधारे दुथडी भरून वाहणारी नदी पार करण्याच्या इच्छेसारखेच निष्फल किंवा हास्यास्पद आहे. म्हणून आम्ही म्हणतो की, तो परमेश्वर सर्व प्रकारच्या स्वातंत्र्याने परिपूर्ण असल्यामुळे त्या त्या प्रकारच्या वैचित्र्याने भासतो.अशा रीतीने सर्व दृष्टींचा म्हणजे सर्व विचारांचा याच सर्वशक्तियुक्त परमेश्वरात अंतर्भाव किंवा समावेश आहे. यासाठी युक्तिप्रयुक्तींच्या जाळ्यात गुरफटून साशंक होणे बरोबर नाही.

याबाबतीत वर उल्लेखिलेल्या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, "पूर्वनिर्दिष्ट कारणोंसे कर्मसाम्यादि किसीभी मतको समीचीन नहीं माना जा

सकता। अद्वय दृष्टिही चरम दृष्टि है। इस दृष्टिसे परमेश्वर अद्वय तथा स्वातंत्र्य-मय हैं। इस मतके अनुसार शक्तिपातका जो विवरण शास्त्रमें देखा जाता है, आचार्योंका वही चरम सिद्धान्त है। नीचे इस विषयमें कुछ प्रकाश डालनेका प्रयत्न किया जाता है।

परमेश्वर स्वभावतः नियतिक्रम तथा अनियतिक्रम दोनोंकाही स्पर्श करते हुए प्रकाशमान होते हैं, इसीलिए शास्त्रमें उनको स्वच्छंद कहा है। उनका स्वकीय भाव अथवा इच्छाही 'स्वभाव' पदवाच्य है। जब वे कर्म और फलके पारस्परिक संबंधविषयक नियमका आश्रय करके अवांतर स्थितिमें सृष्टि-संरक्षण तथा संहार व्यापार करते हैं तब नियतिक्रम अर्थात् नियम या कार्यकारणभावका आश्रय करते हैं ऐसा कहा जाता है। अर्थात् ब्रह्मांड प्रकृत्यंड तथा मायांडकी सृष्टिमें वे कर्म और फलके नियमका अवलंब करते हैं। परंतु शाक्त महासर्गमें, अर्थात् शाक्तांडकी सृष्टिमें वे सर्वथा निरक्षेप और पूर्णरूपेण स्वतंत्र रहते हैं, उसमें कर्मफलादि किसीभी नियमके अधीन होकर वे अपनेको प्रकाशित नहीं करते। यही परमेश्वरका अनियति-क्रम प्रकाश है। महासर्गमें सृष्टि और संहार अनन्त हैं। शक्तिपर्यंत अध्वाकी, अर्थात् शाक्तांडकी सृष्टिमें जगत्का असंख्य सृष्टि-समूह अंतर्भूत है। यही शाक्त महासृष्टि है। यह प्राक्तन कर्मोंके फलरूपमें प्रादुर्भूत नहीं होती। इसीसे इसमें कर्मकी अपेक्षासे नियतिका परिग्रह आवश्यक नहीं होता। मायाके बाहर कर्म नहीं रह सकता यह कहना तो निष्प्रयोजनही है। अवश्य अवान्तर सृष्टिमें भी अर्थात् ब्रह्मांडादिके भीतर भी परमेश्वर नियतिके अधीन नहीं। वे स्वतंत्र हैं। उनका नियतित्याग और नियतिग्रहण इस प्रकार होता है – जब वे नियतिके द्वारा अर्थात् अपने स्वरूपका आच्छादन करते हुए भोक्ताके रूपमें दुःखमोहादिका भोग करते हैं, तब कर्मफल क्रम, अर्थात् नियतिका ग्रहण होता है और जिस समय वे अनपेक्ष होनेके कारण कर्म-नियमको छोडते हुए तिरोधानमें दुःखमोहका संबंध अवभासित करनेकी इच्छा करते हैं, उस समय वे स्वतंत्र और नियतित्यागी हैं। अभी जो तिरोधानका विषय कहा गया है, वह एक प्रकारसे उनका स्वेच्छाकृत आत्मगोपन है, जैसा कि रंगमंचपर अभिनयके समय कुशल नट करते हैं। तिरोधानके कारण प्राक्तन कर्मादि नहीं हो सकते। कर्मसे जाति, आयु और भोगरूप फल उत्पन्न होता, तिरोधानका आविर्भाव नहीं होता। परमेश्वरकी स्वतंत्र इच्छाही इसका एकमात्र कारण है, दूसरा कोई कारण नहीं। यहाँ स्मरण रखना चाहिए कि हम यह आलोचना अद्वैत दृष्टिसे कर रहे हैं। द्वैतसम्मत स्वतंत्र ईश्वरेच्छामें जो दोष होता है, उसमें उसका प्रसंग नहीं है; क्योंकि इस मतमें मूल तत्त्व अद्वैत होनेके कारण रागद्वेषादिका प्रसंगही नहीं उठता। अतएव, कर्मादि निरपेक्ष भावसे केवल भगवान्‌की इच्छासेही अनुग्रह होता है, यही वास्तविक सिद्धांत है। अर्थात्,

शक्तिपात कर्मसाम्य, मलपाक आदिके अधीन नहीं है, किंतु निरपेक्ष तथा स्वतंत्र है। पुराणादिमें भी ऐसीही बात मिलती है–

**तस्यैव तु प्रसादेन भक्तिरुत्पद्यते नृणाम् ।**

महामाहेश्वराचार्य उत्पलदेवने भगवान्‌की स्तुतिके प्रसंगमें कहा है–

**शक्तिपातसमये विचारणं प्राप्तमीश न करोषि कर्हिचित् ।**
**अद्य मां प्रति किमागतं यतः स्वप्रकाशनविधौ विलम्बसे ।।**

"हे भगवन् ! तुम शक्तिपातके समय, अर्थात् जीवपर कृपा करनेके समय न्यायतः प्राप्त होनेपर भी कभी पात्र–अपात्रका विचार नहीं करते। तब आज तुझमें ऐसी क्या नई बात आ गई है, जो मेरे प्रति आत्मप्रकाशनमें विलंब कर रहे हो?"

यहाँ "प्राप्तम्" और "कर्हिचित्" इन दो शब्दोंके प्रयोगसे प्रतीत होता है कि शक्तिपात अनपेक्ष, दुर्लभ तथा रागादि–प्रसंगके लेशसे रहित है। मतंगागमके टीकाकार अनिरुद्धनेभी शक्तिपातके विषयमें निरपेक्षता-सिद्धन्तकाही ग्रहण किया है। यथा–

**स्थावरान्तमपि देवस्य स्वरूपोन्मीलनात्मिका ।**
**शक्तिः पतन्ती सापेक्षा न क्वापि . . . ।।**

यहाँ स्थावरान्त पदसे सूचित होता है कि अत्यंत अयोग्यमें भी शक्तिपात हो सकता है।

शक्तिपातमें मायांतर्गत कर्मादिका व्यापार नहीं है, इसमें कोई संदेह नहीं; क्योंकि कर्मादि जीवको मायाके भीतर आवद्ध रखते हैं। जिसके कारण मायासे उद्धार नहीं हो पाता। शक्तिपात सर्वथा मायानिरपेक्ष है, अतएव जितने देवता मायाके भीतर अथवा मायासे ऊपर रहते हैं, वे अपने अधिकारकी समाप्ति होनेपर अकस्मात् कर्मादिनिरपेक्ष भगवदनुग्रहसेही भगवद्‌भाव प्राप्त कर लेते हैं। जो लोग मायासे आक्रांत नहीं हैं, वे कर्मादिके अधीन नहीं होते, केवल शक्तिपातके प्रभावसेही उनको भोग अथवा मोक्षरूपा सिद्धिकी प्राप्ति होती है। यहाँ किसी-किसीके मनमें ऐसी शंका हो सकती है कि ये सब शुद्धात्मा जब पूजा–ध्यान, देवाराधन प्रभृतिके प्रभावसे मायातीत शुद्ध अवस्था, मंत्रत्व, मंत्रेश्वरत्व इत्यादि प्राप्त करते हैं, तब कहना पडेगा कि यह भी एक प्रकारसे कर्मकाही फल है। परंतु, वस्तुतः यह बात ठीक नहीं है; क्योंकि कर्मादि सारे उपाय मायाकेही अंतर्गत है और ईश्वरभाव मायासे परे है। अतएव मायातीत वस्तुके ध्यान, जप आदि विषयोंमें सर्वप्रथम प्रवृत्त होना मायाके भीतर डूबे हुए आत्माके लिए किस प्रकार संभव हो सकता है? कर्म, कर्मसाम्य, वैराग्य, मलपाक आदि कोई भी मायिक व्यापार इसका कारण नहीं हो सकता। इसलिए स्वतंत्र ईश्वरकी इच्छाकोही कारण मानना पडता है। निरपेक्ष शक्तिपातवादियोंका यही सिद्धान्त है। जप-ध्यान प्रभृति कर्म नहीं है, अपि

तु क्रिया है। 'कर्म' शब्दसे ऐसे पदार्थोंका बोध होता है, जो परिमित भोग उत्पन्न करते हुए भोक्ताके पूर्ण रूप, अर्थात् अपरिच्छिन्न चित्स्वरूपको तिरोहित कर लेता है, अर्थात् उसे विभिन्न रूपसे संकुचित करके आच्छादित कर लेता है। सिद्धान्त दृष्टिसे जपध्यानादि परमेश्वरकी स्वरूपविकासिका क्रियाशक्ति है, स्वरूपका आवरण करनेवाला कर्म नहीं है।"

सारांश, ईश्वराच्या अहेतुक व अकारण हेतूनेच कृपा होते व त्याला कोणतेही कारण लागत नाही हे सांगताना व्यास महर्षी "श्रीमद्भागवतात" प्रल्हादाच्या मुखाने नृसिंहभगवंताची स्तुती करताना म्हणतात –

क्वाहं रजःप्रभव ईश तमोऽधिकेऽस्मिन् जातः सुरेतरकुले क्व तवानुकंपा।
न ब्रह्मणो न तु भवस्य न वै रमाया यन्मेऽर्पित शिरसि पद्मकरः प्रसादः ॥७.९.२६॥
नैषा परावरमतिर्भवतो ननु स्याज्जन्तोर्यथाऽऽत्मसुहृदो जगतस्तथापि।
संसेवया सुरतरोरिव ते प्रसादः सेवानुरूपमुदयो न परावरत्वम् ॥२७॥

हे प्रभो! रजोगुणाच्या प्रभावानेच केवळ ज्यांचे जन्म झालेले आहेत व तमोगुणाने ज्यांना ग्रासले आहे अशा दैत्यकुलात जन्मलेला मी कोठे आणि तुझी कृपा कोठे? जो हस्त ब्रह्मादिक देवांना, शंकरासारख्या श्रेष्ठांना, इतकेच नव्हे तर प्रत्यक्ष लक्ष्मीला देखील लाभला नाही तो परमप्रसादस्वरूप व सकल संतापहारी वरदहस्त तू माझ्या मस्तकावर ठेवलास! दुसऱ्या संसारी जीवांप्रमाणे आपल्या ठिकाणी लहानमोठा हा भेदभाव नाही; कारण आपण सर्वांतरात्मा असून अकारण प्रेमी अर्थात् कृपा करणारे आहात. कल्पतरूची सेवा करणाराला जसे त्या सेवेप्रमाणेच फळ मिळते त्याप्रमाणेच आपली सेवा करणाऱ्या जीवांवर आपल्या अहेतुक कृपेचा उदय होतो. यासाठी कोणत्याही कारणांची अपेक्षा आपल्याला नसते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी देवळाचा कळस बसविणे, गंगेचे सिंधूत प्रवेश करणे, सोळावा कस लावून सुवर्णशुद्धी पारखणे हे दृष्टांत देऊन श्रीगुरुकृपा ही शेवटची व अंतिम गोष्ट असून ती कारणरहित आहे हे सांगून त्यामुळे आपले आपण असण्याची स्थिती अगर ज्ञानाज्ञान गिळून उरणारी नैष्कर्म्यसिद्धी साधकाला कशी प्राप्त होते हे सिद्धांतरूपाने सांगताना असे म्हटले आहे की–

देउळाचिया कामा कळसु। परम गंगेसी सिंधु प्रवेशु।
कां सुवर्णशुद्धी कसु। सोळावा जैसा ॥१८.९८१॥
तैसें आपुलें नेणणें। फेडिजे कां जाणणें।
तेंही गिळूनि असणे। ऐसी जे दशा ॥९८२॥
तियेपरतें कांहीं। निपजणें आन नाहीं।
म्हणौनि म्हणिपे पाहीं। परमसिद्धि ते ॥ ९८३॥

**परी हेंचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि ।**
**श्रीगुरुकृपालब्धि–। काळीं पावे ॥९८४॥**

## गुरुकृपा कशी होते ?:–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " दिठीची पाहतां निविजे । कां तोंड भ ोनि वोलिजे । नातरी दाटूनि खेंव दीजे । ऐसें कवण आहे ? ॥६.११७॥ आमुतें कीर प्रसवली । तुझीच कृपा ॥४.३३॥ " अशा चार प्रकाराने गुरुकृपा कशी होते याचे विवेचन प्रथमाध्यापासून अठराव्या अध्यायापर्यंत समुच्चयाने व विभागशः केले आहे. गुरुकृपेचे अवतरण कसे होते याचे वर्णन उपमा, दृष्टांतादिकांच्या काव्यरूपी मुलायम मखमली आवरणाखाली झाकले गेल्याने त्याचे सत्य किंवा सम्यक् स्वरूप दृष्टिआड झाले आहे. शास्त्रीय प्रमेयांच्या चिमटचाने हे आवरण वर उचलेले म्हणजे गुरुकृपा कशी होते याचे सत्य दर्शन आपणास घडेल. " आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे । मन सुखेंसी सुरवाडिजे । सुखाचि माजीं ॥६.२५॥ ऐसें हळुवारपण जरी येईल । तरीच हें उपेगा जाईल । एऱ्हवीं आघवीं गोठी होईल । मुकिया बहिरयाची ॥२६॥ " यासाठीच उपरोक्त प्रकारची शास्त्र-चिकित्सा करणे आवश्यक आहे.

स्पर्श, शब्द किंवा भाषण, दर्शन व कृपा किंवा संकल्प या चार प्रकाराने शक्तिपात दीक्षा अर्थात् गुरुकृपा होते. या दृष्टीनेच " योगवासिष्ठाच्या निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धात " असे म्हटले आहे की–

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके ।**
**जनयेद्यः समावेशं शांभवं स हि देशिकः ॥१.१२८.१६१॥**

जे दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व कृपेने अशा चार प्रकारांच्या किंवा साधनांच्या द्वारा शिष्याच्या देहात शांभवी शक्तीचा अगर शिवभावाचा आवेश करू शकतात तेच देशिक म्हणजे गुरू होत. कुंडलिनी जागृत होऊन ती षट्चक्रांचा भेद करून जेव्हा ब्रह्मरंध्रातील परशिवाशी एकरूप होते तेव्हा हा आवेश उत्पन्न होतो. सत्यसंकल्प गुरू केवळ एकदाच कृपापूर्ण दृष्टिपात करून हे अत्यंत श्रेष्ठ असे कार्य पूर्ण करतात.

वर सुरुवातीला श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ज्या दोन ओव्या उधृत केल्या आहेत त्यांच्याकडे या दृष्टीने पाहिले म्हणजे त्यांचा असा अर्थ स्पष्ट होतो की, केवळ दृष्टीनेच पाहून शांत व्हावे, तोंड भरून बोलावे किंवा आनंदाने कडकडून आलिंगन द्यावे असे अर्जुनाशिवाय कोण आहे ?, असे श्रीकृष्ण म्हणतात व आम्हाला केवळ तुझी कृपाच फलद्रूप झाली आहे असे अर्जुन म्हणतो. या दोघांच्या म्हणण्यात क्रमाने दृष्टी, शब्द, स्पर्श व कृपा या कृपेच्या साधनांचा उल्लेख आला असून कृपावतरण

कसे होते हे स्पष्ट झाले आहे. मुळात भगवंतांनीच गीतेत उपरोक्त चार प्रकारांनी सद्‌गुरू कृपा कशी करतात हे स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।
उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिन: ॥४.३४॥

ते आत्मज्ञान आचार्यांजवळ जाऊन साष्टांग नमस्कार घातला की, केवळ त्यांच्या दर्शनाने, त्यांना बंधमोक्षादिकांविषयी प्रश्न केल्यावर त्यांनी दिलेल्या उत्तरात्मक भाषणाने अगर शब्दाने व त्यांची सेवा शुश्रूषा करून म्हणजे स्पर्शाने हे ज्ञान तू संपादन कर. तत्त्ववेत्ते ज्ञानी कृपेने तुला हे ज्ञान सांगतील. या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तरी संतां यां भजावें। सर्वस्वेंसीं ॥ ४.१६४ ॥" असे म्हणून दर्शनाने, "तेथ सेवा हा दारवंठा ।" आणि "अगर्वता करावें। दास्य सकळ ॥ ४.१६५,१६६ ॥" असे म्हणून स्पर्शाने, "तेंही सांगती पुसिलें ॥ ४.१६७ ॥" असे म्हणून शब्दाने व "जेणें अंत:करण बोधलें। संकल्पा नयें ॥ ४.१६७ ॥" असे सांगून केवळ कृपेने सद्‌गुरूंची दीक्षा कशी होते हे सांगितले आहे.

अशा प्रकारे या समुच्चयात्मक चारी किंवा पहिल्या तीन कृपेच्या प्रकारांचा उल्लेख करताना ते म्हणतात–

परी एथ असे एकु आधारु। तेणेंचि बोले मी सधरु।
जे सानुकूळ श्रीगुरु। ज्ञानदेवो म्हणे ॥१.७५॥
यऱ्हवीं तरी मी मूर्खु। जरी जाहला अविवेकु।
तऱ्ही संतकृपादीपकु। सोज्वळु असे ॥७६॥
लोहाचें कनक होये। हें सामर्थ्य परिसींच आहे।
कीं मृतही जीवित लाहे। अमृतसिद्धि ॥७७॥
जरी प्रकटे सिद्धसरस्वती। तरी मुकयाहि आथी भारती।
एथ वस्तुसामर्थ्यशक्ति। नवल कायी ॥७८॥

सानुकूळ श्रीगुरू म्हणजे कृपा, संतकृपादीपकु म्हणजे दर्शन, परिसाने लोखंडाचे सोने होणे किंवा अमृताने मृत जिवंत होणे म्हणजे स्पर्श व सिद्धसरस्वती प्रकटणे म्हणजे शब्दपात होणे होय. येथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, दर्शन, स्पर्श व शब्द या तिन्ही प्रकारच्या कृपेच्या साधनात कृपा ही अनुस्यूत किंवा आधारभूत आहेच. असे असले तरी व कित्येक वेळा कृपेचा स्वतंत्र उल्लेख केलेला नसला तरी कृपा म्हणजे नुसत्या संकल्पाने होणारा शक्तिपात हा सूक्ष्मतम असून स्पर्श, भाषण व दर्शन हे क्रमाने स्थूल, सूक्ष्म व सूक्ष्मतर आहेत. या दृष्टीनेच श्रीस्वामीविद्यारण्य-प्रणीत "जीवन्मुक्तिविवेक" या ग्रंथावर टीका करताना श्रीअच्युतराय मोडक "पूर्णानंदेंदुकौमुदी व्याख्येत" असे म्हणतात की–

**विद्धि स्थूलं सूक्ष्मं सूक्ष्मतरं सूक्ष्मतममपि क्रमतः ।**
**स्पर्शनभाषणदर्शनसंकल्पनजत्वतश्चतुर्धा तम् ।।**

शक्तिपात हा स्पर्श, भाषण, दर्शन व संकल्प या चार कारणाने क्रमशः स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतर व सूक्ष्मतम या चार प्रकारचा आहे असे जाणावे. या या श्लोकावर टीका करताना ते पुढे म्हणतात, " हे शिष्या ! गुरुविभेदाने शक्तिपात नानाविध असला तरी क्रमाने तो स्थूलादि चारच प्रकारचा असून अशीच त्याची अध्याहृत योजना आहे असे समज. स्थूलादि चारही प्रकारच्या शक्तिपाताचे कारणासह स्पष्टीकरण असे आहे. श्रीगुरुवरांच्या करस्पर्शाने होणारा शक्तिपात अर्थात् कृपा ही स्थूल होय. भाषणादिकांहून साक्षात् स्पर्श हा स्थूलच होय. याच रीतीने भाषणामुळे म्हणजे शब्दाने सूक्ष्म, दर्शनाने सूक्ष्मतर व संकल्पाने सूक्ष्मतम शक्तिपात होतो असे समजावे. स्पर्शादिकात संकल्प हा कारणीभूत असला तरी संकल्पज शक्तिपातात त्याचे प्रामुख्य आहे. " बृहद्योगवासिष्ठातील निर्वाण-प्रकरणच्या पूर्वार्धात "हेच प्रकरण पुढीलप्रमाणे आले आहे.

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके ।**
**जनयेद्यः समावेशं शांभवं स हि देशिकः ।। इति ।।**

जो उपदेष्टा गुरू दर्शनाने म्हणजे दृष्टिक्षेपाने किंवा कटाक्षपाताने, स्पर्शनाने म्हणजे प्रत्यक्ष डोक्यावर हात ठेवून, शब्दाने म्हणजे तत्त्वमस्यादि महावाक्यांच्या उपदेशात्मक भाषणाने व कृपेने म्हणजे नुसत्या मनःसंकल्पाने अशा साधनचतुष्काने शिष्यदेहात शांभवी शक्तीचे संक्रमण किंवा समावेश करतो तो शिवरूपच समजावा.

यातील संकल्पशक्तीचे विवरण असे आहे की,"विशुद्धसत्त्व पुरुष मनाने अर्थात संकल्पाने ज्या ज्या स्वर्गादि लोकांची भावना करतो व ज्या ज्या इच्छा करतो ते ते लोक व इष्ट पदार्थ तो मिळवू शकतो," असे श्रुतीने वर्णन केले आहे. तसेच—

**यद्दुष्करं दुराराध्यं दुर्जयं दुरतिक्रमम् ।**
**तत्सर्वं तपसा साध्यं तपो हि दुरतिक्रमम् ।।**

जे दुष्कर, दुराराध्य, दुर्जय व दुरतिक्रम आहे ते सर्व तपाने मिळते; कारण तपःशक्ति फार मोठी आहे, असे जे स्मृतीत म्हटले आहे ते कैमुतिकन्यायाने सूचित होणारे असून सिद्धच आहे. " मनसश्चेंद्रियाणां च ऐकाग्र्यं परमं तपः ।।" असे स्मृतीत म्हटले आहे. यावरून मन व इंद्रिये यांचे ऐकाग्र्य हे श्रेष्ठ तप आहे हे सिद्ध होते व जीवन्मुक्त योगींद्र वसिष्ठादिक हे परम तपस्वी असल्यामुळे त्यांच्या सत्यसंकल्परूप तपाने " तपसा संकल्पसिद्धिः ।।" या योगवैभवानुरूप संकल्पज शक्तिपात होतो; म्हणून स्थूलादिकारणभेदामुळे शक्तिपाताने होणारे अर्थात् शक्तिपातजन्य ज्ञानही स्थूलादि चार प्रकारचे व दैवार्षपौरुषरूप त्रिप्रकारचे आहे असे सिद्ध होते. जरी हा शक्तिपात शिष्यदेहातील कुंडलिनी शक्तीच्या

चालनाने षट्चक्रभेदपूर्वक प्राणवायूच्या ब्रह्मरंध्रातील प्रवेशाने मनाच्या असंप्रज्ञात समाधीचे दृढत्व संपादन करणारा यौगिक असला तरी तसाच तो–

**सुसमे सुप्रदेशे तु निर्जने निर्भये शुभे ।**
**गोमयेनोपलिप्ते तु पुष्पैरभ्यर्चिते तथा ।।**

असा सूतसंहितेत सांगितल्याप्रमाणे कुंडमंडपादि संभारसंभृत दीक्षाप्रदान-स्वरूपाने तांत्रिक असला; तरी तो निरुक्त व श्रुती इत्यादींमध्ये सांगितलेले शिष्याचे संकल्प सिद्ध करणारा व तत्त्वज्ञानोत्पत्तीच्या जीवन्मुक्तिरूपी फलाच्या प्रतिबंधक असलेल्या पापविशेष अशा रज–तमसंस्कारमलांचा नाश करणारा असून, योग-वासिष्ठादिग्रंथप्रसिद्ध व शास्त्रीय आहे. त्यामुळे तो स्पर्श, भाषण व दर्शन या तीन प्रकारांनी स्थूल, सूक्ष्म व सूक्ष्मतर असा मुख्यत्वेकरून असला तरी प्रकरणानुरोधाने येथे कृपा किंवा संकल्प हा चौथा प्रकार सूक्ष्मतम आहे असे मानावे.

**तत्रापि चरमयुक्तं साम्यासाम्यप्रदत्वतो द्विविधम् ।**
**साम्यं तु शक्तिपाते गुरुवत्स्वस्यापि सामर्थ्यम् ।।**

तथापि चरम म्हणजे श्रेष्ठ असा जो चौथा कृपायुक्त किंवा संकल्पात्मक प्रकार आहे तो साम्य व असाम्य प्रदान करणारा असा दोन प्रकारचा आहे. साम्यात शिष्याला शक्तिपाताने गुरुसाम्यता व स्वतःप्रमाणेच इतरांना शक्तिपात दीक्षेने तारण्याचे सामर्थ्य येते.

मात्र स्थूल, सूक्ष्म व सूक्ष्मतर शक्तिपाताचेही असेच दोन दोन भेद आहेत असे समजावे. आता चारही प्रकारच्या शक्तिपातात साम्यासाम्यभेदाने दोन प्रकार कसे घडतात हे सांगतो. साम्यसाम्यभेदाचा अर्थ असा आहे की, शक्तिपात दीक्षा मिळालेल्या शिष्यांमधील काही असे असतात की, जे स्वतःही ज्ञानप्राप्तीने कृतार्थ झालेले असतात व इतरांनाही दीक्षा देऊन ते कृतार्थ करू शकतात. याला साम्य-भेद किंवा प्रकार असे म्हणतात. मात्र ज्यांना असाम्य प्रकारची शक्तिपातदीक्षा प्राप्त झालेली असते ते शिष्य स्वतः कृतार्थ झाले तरी दुसऱ्यांना दीक्षा देऊन कृतार्थ करण्याचे सामर्थ्य त्यांच्यात असत नाही.

प्रथम स्पर्शपूर्वक होणाऱ्या शक्तिपातदीक्षेच्या स्थूल प्रकाराच्या गुरु साम्या-साम्यतेचे वर्णन करतो.

**स्थूलं ज्ञानं द्विविधं गुरुसाम्यासाम्यदत्वभेदेन ।**
**दीपप्रस्तरयोरिव संस्पर्शात्स्निग्धवर्त्ययसोः ।।११।।**

ज्याप्रमाणे एखादा जळणारा दिवा तेलात अगर तुपात भिजविलेल्या दुसऱ्या दिव्याच्या वातीला स्पर्श करून पेटवितो व आपल्यासारखे रूप व शक्ती म्हणजे साम्यत्व देतो आणि परिस लोहाला स्पर्श करून सुवर्णरूप म्हणजे आपल्यापेक्षा निराळे असे रूप देतो म्हणजे असाम्यत्व देतो त्याप्रमाणे स्पर्शरूप शक्तिपाताने होणारे स्थूल

ज्ञान गुरुसाम्यासाम्यभेदाने दोन प्रकारचे असते. एका दिव्याने पेटविलेली दुसरी वात आणखी दुसऱ्या कोणत्याही वातीला आपल्या स्पर्शाने प्रज्ज्वलित करू शकते. स्वत: प्रज्ज्वलित होण्याची व दुसऱ्या वातींना प्रज्ज्वलित करण्याची ही शक्ती जशी एका दिव्याला प्राप्त झाली तशी ती सर्व प्रज्ज्वलित दीपांना प्राप्त झालेली असते. याप्रमाणेच सद्‌गुरू काही शिष्यांना साम्यत्व म्हणजे स्पर्शदीक्षा देऊन स्वत:सारखे ज्ञान व इतरांना तारण्याचे अर्थात् शक्तिपात करण्याचे सामर्थ्य देतात. यालाच परंपरा म्हणतात व सद्‌गुरुकृपा अशीच होण्याचे समाजात चालत राहते. दुसरे उदाहरण परिसाचे आहे. परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते; परंतु या सोन्यामध्ये आपल्या स्पर्शाने दुसऱ्या लोखंडाचे सोने बनविण्याचे सामर्थ्य असत नाही. साम्यदान करण्याची शक्ती त्या सोन्यात नसते. त्याप्रमाणेच बहुतेक शिष्य सद्‌गुरुकृपेने स्वत: कृतार्थ होतात; पण या शिष्यांच्या जवळ इतरांना तारण्याचे, प्रदीप्त करण्याचे किंवा शक्तिपात करण्याचे सामर्थ्य नसते. अर्थात् साम्यदान करण्याची शक्ती या शिष्यांमध्ये नसते. त्यामुळे परंपरा पुढे चालू शकत नाही.

सूक्ष्म शक्तिपाताने अर्थात् शब्ददीक्षेने गुरुसाम्यासाम्यभेद पुढीलप्रमाणे दोन प्रकारचा होतो.

**तद्वद् द्विविधं सूक्ष्मं शब्दश्रवणेन कोकिलाम्बुदयोः ।**
**तत्सुतमयुरयोरिव तद्विज्ञेयं यथासंख्यम् ॥१२॥**

कोकिळेच्या शब्दाच्या श्रवणाने कावळ्याने पोसलेल्या कोकिळेच्या पिलाला 'मी कोकिळ आहे' असे साम्यप्रद ज्ञान होते व मेघाचा गडगडाट ऐकून मोर आनंदाने नाचू लागतो. हे असाम्यरूप ज्ञान आहे. या दृष्टांताप्रमाणेच सूक्ष्म शक्तिपाताचे शिष्यांमध्ये दोन प्रकार दिसून येतात. कोकिळेच्या पिलाला आपल्या आईचा शब्द ऐकून आपण स्वत: कोण आहोत याचे ज्ञान होते व कालांतराने हे पिलू मोठे झाले की, आपल्या पिलाला बोध देण्याची शक्तीपण त्याच्यात येते. त्याचप्रमाणे काही शिष्यांच्या ठिकाणी तत्त्वमस्यादि महावाक्याच्या, मंत्राच्या अगर भगवन्नामाच्या म्हणजे शब्दाच्या आधाराने सद्‌गुरू आपली शक्ती संक्रांत करून त्यांना स्वसंवेद्य आत्मस्वरूपाचे ज्ञान देतात व कालांतराने या शिष्यांच्या ठिकाणीही उपरोक्त प्रकारच्या कोणत्याही शब्दाच्या आधाराने आपल्या गुरुप्रमाणेच शक्ती संक्रांत करण्याचे किंवा इतरांना देण्याचे सामर्थ्य येते. या प्रकारालाच सूक्ष्म शब्ददीक्षा असे नाव असून अनवच्छिन्न परंपरेचा द्योतक असा हा साम्यज्ञानदानप्रकार आहे. मात्र मोर जेव्हा मेघाचा गडगडाट ऐकतो तेव्हा फक्त त्याला स्वत:लाच आनंद होतो. मोराला मेघसाम्य प्राप्त होत नसल्याने तसा गडगडाट करून, आपल्याला झाला तसा आनंद, त्याला इतरांना देता येत नाही. याचा अर्थ असा की, बहुतेक शिष्यांना सद्‌गुरूंकडून होणाऱ्या शक्तिपात दीक्षेमुळे मोराप्रमाणे स्वत:ला आनंद-

प्राप्ती होते; परंतु या शिष्यांना सद्गुरुसाम्याने आपल्या शब्दाने इतरांना तो आनंद देण्याचे सामर्थ्य प्राप्त झालेले नसल्याने, इतरांना आपला आनंद ते शब्दाने अगर भाषणाने प्रदान करू शकत नाहीत. यालाच असाम्यदानकारक सूक्ष्मदीक्षा असे नाव असून ती विच्छिन्नपरंपरा द्योतक आहे.

सूक्ष्मतर शक्तिपाताने अर्थात् दृष्टिदीक्षेने गुरुसाम्यासाम्यत्व कसे प्रस्थापित होते हे दृष्टांताने स्पष्ट करताना शास्त्रकार म्हणतात–

**इत्थं सूक्ष्मतरमपि द्विविधं कूर्म्या निरीक्षणात्तस्याः ।**
**पुत्र्यास्तथैव सवितुर्निरीक्षणात्कोकमिथुनस्य ॥१३॥**

कासवीच्या केवळ निरीक्षणाने म्हणजे पाहण्यानेच तिच्या पिलांचे पोट भरते किंवा ती सुदृढ होतात व सूर्य उगवल्यानंतर रात्रभर एका पानाच्या आड येण्याने एकमेकांच्या भेटीला पारखी झालेली चकोर व चकोरी यांची भेट झाल्याने त्यांना अत्यंत आनंद होतो. या दृष्टांताप्रमाणे सूक्ष्मतर शक्तिपात दोन प्रकारचा आहे. याचा अर्थ असा आहे की, ज्याप्रमाणे कासवीच्या केवळ दृष्टिसंचारानेच तिची पिले तृप्त होतात त्याप्रमाणेच श्रीसद्गुरूंच्या कृपादृष्टिसंचाररूप शक्तिपाताने अर्थात् दयार्द्र दृष्टिपाताने शिष्यामध्ये ज्ञानाचा उदय होतो. यातील विशेष असा की, कालांतराने केवळ स्वकृपादृष्टिसंचाराने इतर अधिकारी शिष्यांमध्येही ज्ञानाचा उदय करण्याची शक्ती किंवा ज्ञानजननशक्तिसाम्य प्रकट करण्याचे सामर्थ्य त्याच्यात येते. अर्थात् कासवीचे पिलू ज्याप्रमाणे मोठे झाल्यावर त्याच्या ठिकाणी केवळ आपल्या दृष्टिसंचाराने आपल्या पिलांना तृप्त करण्याचे सामर्थ्य येते; त्याप्रमाणे निरीक्षणात्मक चाक्षुषदीक्षाशक्तिपाताने उत्पन्न होणारे ज्ञान अधिकारी शिष्याला जरी दीक्षासमयीच प्राप्त होत असले तरी कालौघात ते प्रकट होते, असा याचा भाव आहे. यालाच साम्यदानप्रदायक अशी सूक्ष्मतर दृष्टिदीक्षा असे म्हणतात. मात्र चकोर पक्षांच्या जोडप्याला भेटीचा जो आनंद सूर्यदर्शनामुळे प्राप्त होतो तो आनंद आपल्या दर्शनाने ते दुसऱ्या चकोर चकोरीच्या जोडप्याला देऊ शकत नाहीत. त्याप्रमाणेच काही शिष्यांना सद्गुरूंच्या कृपेने सूक्ष्मतर अशी दृष्टिदीक्षा प्राप्त होऊन जीवशिव भेटीचा ब्रह्मानंद स्वतःला प्राप्त होतो; मात्र हा आपला आनंद ते दुसऱ्या जीवांना, सूक्ष्मतर दृष्टिदीक्षा प्रदानाचे सामर्थ्य नसल्याने, देऊ शकत नाहीत. यालाच असाम्यप्रदायक अशी सूक्ष्मतर दृष्टिदीक्षा असे म्हणतात.

सूक्ष्मतम अर्थात् संकल्पजनित शक्तिपाताने किंवा सद्गुरूंच्या केवळ मनःसंकल्पाने कृपा होऊन शिष्याच्या ठिकाणी गुरुसाम्यासाम्यत्व कसे उत्पन्न होते हे दृष्टांत देऊन विशद करताना शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की–

**सूक्ष्मतममपि द्विविधं मत्स्याः संकल्पतस्तु तद्दुहितुः ।**
**तृप्तिर्नगरादिजनिर्मांत्रिकसंकल्पतश्च भुवि तद्वत् ॥१४॥**

मत्स्यीच्या केवळ स्मरणाने, संकल्पाने किंवा चिंतनानेच तिच्या पुत्रीचे पोट भरते व एखादा मांत्रिक किंवा जादूगार स्वतःच्या संकल्पाने नगर इत्यादि विविध प्रकार दाखवितो त्याप्रमाणे सूक्ष्मतम शक्तिपात हा दोन प्रकारचा आहे. ज्याप्रमाणे मत्स्यीच्या नुसत्या स्मरणाने तिच्या पिलांचे पोट भरते व ही पिले मोठी झाल्यावर त्यांनाही ही शक्ती प्राप्त होते त्याप्रमाणे सद्‌गुरूंच्या केवळ संकल्पाने शिष्याच्या ठिकाणी शक्ती संक्रांत होऊन शक्तिपातजन्य ज्ञान उत्पन्न होते व पुढे त्या अधिकारी शिष्याच्या ठिकाणीही ही संकल्पजज्ञानशक्ती उपस्थित होते. याला सूक्ष्मतम साम्य-प्रदायक संकल्पदीक्षा असे म्हणतात. मांत्रिक किंवा जादूगार आपल्या संकल्पाने नगरे, झाडे, रस्ते, विहिरी, वाडे इत्यादि निर्माण करतो; परंतु या वस्तूंच्या ठिकाणी त्या मांत्रिकाच्या संकल्पशक्तीचे कोणतेही सामर्थ्य असत नाही. त्याप्रमाणे श्रीसद्‌-गुरुकृपेने अर्थात् संकल्पाने काही शिष्यांच्या ठिकाणी शक्तिपातजन्य ज्ञान प्रकट होते; परंतु त्यांच्याजवळ हे ज्ञान दुसऱ्यांना देण्याचे सामर्थ्य असत नाही.

वरील सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, ज्या शिष्यांच्या ठिकाणी स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतर व सूक्ष्मतम अर्थात् स्पर्श, शब्द, दृष्टी व संकल्प या चारांपैकी कोणत्याही प्रकाराने साम्यत्वोपादक शक्तिपातदीक्षा अर्थात् सद्‌गुरुकृपा झाली असेल ते आपल्याला स्वभावतःच प्राप्त होणाऱ्या सामर्थ्याच्या जोरावर गुर्वाज्ञेने संप्रदाय परंपरा पुढे चालू ठेवतात व ज्यांना असाम्यत्वोपादक अशी शक्तिपातदीक्षा झाली असेल ते संप्रदाय परंपरा पुढे चालू ठेवू शकत नाहीत. गुरुकृपा कशी होते व संप्रदायपरंपरा अविच्छिन्नपणे कशी चालू राहते हे या विवेचनावरून स्पष्ट होईल.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त प्रकारे स्पर्श, शब्द, दृष्टी व संकल्प या द्वारा दिल्या जाणाऱ्या दीक्षा किंवा केली जाणारी कृपा ही एकापेक्षा एक वरच्या दर्जाची कशी आहे हे सांगताना असे म्हटले आहे की—

**कैसी पुसती पाहें पां जाणीव । भिडेचि तरी लंघों नेदीं शिव ।**
**एऱ्हवीं श्रीकृष्ण हृदयासि खेंव । देवों सरला ॥७.२०३॥**
**आतां तयाचें तें प्रश्न करणें । वरी सर्वज्ञ श्रीहरीचें बोलणें ।**
**संजयो आवडलेपणें । सांगेल कैसें ॥२०५॥**
**तिये अवधान द्यावें गोठीं । बोलिजेल नीट मऱ्हाटी ।**
**जैसी कानाचे आधीं दिठी । उपेगा जाये ॥२०६॥**
**पुढां स्नेह पाझरे । मागां चालती अक्षरें ।**
**शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥१३.२६३॥**

"श्रीकृष्ण हृदयासि खेंव देवों सरला" या वाक्यातून अर्जुन स्पर्शासाठी म्हणजे स्पर्शदीक्षेसाठी आतुर झाला होता हे स्पष्ट करून त्यापेक्षा श्रीहरीचे बोलणे अर्थात् शब्द किंवा शब्ददीक्षा श्रेष्ठ असल्याने, तेच संजय प्रेमाने सांगण्यास उद्युक्त

झाला. परंतु शब्ददीक्षेपेक्षाही म्हणजे कानावर शब्द पडून ते अंत:करणात शिरून शब्दाने शक्तिपात होण्यापूर्वीच दृष्टीने होणारा म्हणजे दृग्दीक्षेचा संचार अगर गती तीव्रतर असल्याने तिचाच उपयोग अधिक लवकर होतो. हे सर्व खरे असले तरी सद्गुरूंचा स्नेह म्हणजे दृष्टीचा पात प्रथम शिष्यावर होतो व त्यानंतर अक्षरे म्हणजे शब्ददीक्षा होते; पण या दोहोंच्याही आधी ते मन:संकल्पानेच शिष्यावर कृपा अर्थात् शक्तिपात करून त्याला कृतार्थ करतात.

वरीलप्रमाणें या दीक्षा एकापेक्षा एक कशा वरच्या दर्जाच्या आहेत हे त्यांनी अन्यत्र ध्वन्यर्थानेही सूचित केले आहे. असे असले तरी बहुतेक ठिकाणी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त चार प्रकारांचे तुलना टाळून पुढीलप्रमाणे वर्णन केल्याचे दिसून येते. या दृष्टीने ते म्हणतात –

**हें जाणोनि ऐसी प्रौढी । जो दृष्टिसवेंचि विष फेडी ।**
**तो धांवया श्रीहरी गारुडी । पातला कीं ॥२.७२॥**
**तैसिया पंडुकुमरा व्याकुळा । मिरवतसे श्रीकृष्ण जवळा ।**
**तो कृपावशें अवलीळा । रक्षील आतां ॥७३॥**
**म्हणोनि सहजें सुनीळु । कृपामृतें सजळु ।**
**तो बोळलासे श्रीगोपाळु । महामेघु ॥७७॥**
**तेथ सुदर्शनांची द्युति । तेचि विद्युल्लता झळकती ।**
**गंभीर वाचा ते आयती । गर्जनेची ॥७८॥**

'दृष्टिसवेंचि विष फेडी' यातून दृग्दीक्षा, 'कृपावशें अवलीळा रक्षील' यातून संकल्पदीक्षा, 'कृपामृतें सजळु बोळलासे' यातून स्पर्शदीक्षा व 'गंभीर वाचा ते आयती' यातून शब्ददीक्षा या चार प्रकारांद्वारा भगवंतांनी अर्जुनावर कृपा कशी केली, त्याची कथा मी सांगतो, ती आपण ऐका, असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "आतां तो उदार कैसा वर्षेल । तेणें अर्जुनाचळु निवेल । मग नवी विरूढी फुटेल । उन्मेषाची ॥२.७९॥ ते कथा आइका । मनाचिया आराणुका ॥८०॥" असे म्हणून स्पष्ट केले आहे.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही "मनाच्या श्लोकात" या चार प्रकारच्या दीक्षांचे वर्णन करताना असे म्हटले आहे की –

**हरीभक्त वीरक्त विज्ञानराशी ।**
**जेणें मानसी स्थापिलें निश्चयासी ।**
**तया दर्शनें स्पर्शनें पुण्य जोडे ।**
**तया भाषणें नष्ट संदेह मोडे ॥१३३॥**

श्रीसद्गुरू हे हरिभक्त व विरक्त असून शिष्याच्या ठिकाणी ज्ञान संक्रमित करण्याची अर्थात् शक्तिपात दीक्षेने ज्ञान देण्याची विशेष प्रक्रिया जाणणारे

असतात. ते सूक्ष्म संकल्पाने शिष्याच्या मनात ज्ञानाचा निश्चय शक्तिपाताने स्थापन करतात. दर्शनाने व स्पर्शाने त्यांच्या ठिकाणी दीक्षा देण्याचे सामर्थ्य असल्याने शिष्याला ज्ञानभिक्षारूप पुण्याची प्राप्ती होते. अशा समर्थ सद्गुरूंच्या तत्त्वमसि अहं ब्रह्मास्मि, प्रज्ञानं ब्रह्म किंवा अयमात्मा ब्रह्म या चार महावाक्यांपैकी एखाद्याही महावाक्याने,मंत्राने किंवा नुसत्या कल्याणकारक शब्दाने ज्ञानप्राप्ती होऊन शिष्याचा संदेह दूर होतो.

सद्गुरू या चारही प्रकाराने शिष्यावर कृपा करून त्याच्या ज्ञानस्वरूपाच्या आड आलेला मायेचा पडदा कसा दूर करतात हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अर्जुनाच्या मुखात जे उद्गार घातले आहेत ते पाहण्यासारखे आहेत. ते म्हणतात–

**ऐसें अगाध माहात्म्य । जें सकळमार्गैकगम्य ।**
**जें स्वात्मानुभवरम्य । तें इयापरी दाविलें ।।११.७३।।**
**जैसा केरु फिटलिया आभाळीं । दिठी रिगे सूर्यमंडळीं ।**
**कां हातें सारूनि बाबुळीं । जळ देखिजे ।।७४।।**
**नातरी उकलतया सापाचे वेढे । जैसें चंदना खेंव देणें घडे ।**
**अथवा विवसी पळे मग चढे । निधान हातां ।।७५।।**
**तैसी प्रकृति हे आड होती । ते देवेंचि सारौनि परौती ।**
**मग परतत्त्व माझिये मती । शेजार केलें ।।७६।।**

अर्जुन म्हणाला, "देवा ! सर्व मार्गांनी ज्या आत्मास्वरूपाप्रत साधक जातात व ज्याचे माहात्म्य अगाध आहे, ते आत्मानुभवाने परिपूर्ण व नितांत रम्य असे स्वसंवेद्य आत्मस्वरूप, तुम्ही मला पुढील उपायांनी कृपा करून दाखविले. आकाशातील ढग दूर झाल्यावर सूर्यमंडळापर्यंत दृष्टी जाते त्याप्रमाणे दृष्टिपाताने अगर दृग्दीक्षेने, पाण्यावरील शेवाळे हाताने बाजूला केल्यावर स्वच्छ उदक दृष्टीस पडते किंवा साप चंदनाचे झाड सोडून निघून गेल्यावर झाडाला ज्याप्रमाणे आलिंगन देता येते त्याप्रमाणे स्पर्शदीक्षेने व मंत्राने द्रव्यावरील पिशाच्च दूर झाल्यावर ते द्रव्य हाती येते त्याप्रमाणे शब्ददीक्षेने आपण मूलाधारात ब्रह्मद्वार अडविल्यामुळे परमतत्त्वदर्शनाच्या आड येणाऱ्या माझ्या प्रकृतीला अर्थात् कुंडलिनी शक्तीला जागृत करून अर्थात् परौती सारून माझी बुद्धी म्हणजे प्राण सहस्रारातील शेजघरात जाऊन शिवाशी एकरूप होतील असा मार्ग दिला आहे. या दृष्टीनेच "कल्याण मासिकाच्या साधना विशेषांकात" "सहज साधन" या लेखात अध्यापक श्रीधीरेंद्रकृष्ण मुखोपाध्याय यांनी असे म्हटले आहे की– "शास्त्रोंका कथन है कि, अत्यंतोत्कृष्टसुकृतपरिपाकवशात् सद्भिः संगो जायते । तस्माद् विधिनिषेधविवेको भवति । ततः सदाचारप्रवृत्तिर्जायते । सदाचारादखिलदुरितक्षयो भवति। तस्मादन्तःकरणमतिविमलं भवति । ततः सद्गुरुकटाक्षमन्तःकरणमाकां

क्षति। यथा जात्यंधस्य रूपज्ञानं न विद्यते तथा गुरूपदेशेन विना कल्पकोटिभिः तत्त्वज्ञानं न विद्यते। तस्मात् सद्गुरुकृपाकटाक्षलेशविशेषेणाचिरादेव तत्त्वज्ञानं भवति। यदा सद्गुरुकटाक्षो भवति तदा भगवत्कथाश्रवणध्यानादौ श्रद्धा जायते। तस्माद् हृदयस्थितानादिदुर्वासनाग्रंथिविनाशो भवति। ततो हृदयस्थिताः कामाः सर्वे नश्यंति। तस्माद् हृदयपुंडरिककर्णिकायां परमात्माविर्भावो भवति ॥ "

अर्थात् अत्यंत उत्कृष्ट पुण्यके परिपाकसे सत्संग प्राप्त होता है; उससे विधि-निषेधका विवेक उत्पन्न होता है। विवेकमें सदाचारमें प्रवृत्ति होती है। सदाचारसे सब पापोंका क्षय होता है। तब अंतःकरण अत्यंत निर्मल हो जाता है। तब सद्गुरुकटाक्ष (शक्तिपात) पानेकी इच्छा अंतःकरणमें होती है। जन्मांध व्यक्तिको जैसे रूपका वोध नहीं होता, वैसेहि गुरूके उपदेश विना कोटि कल्पोंमें-भी किसीको तत्त्वका ज्ञान नहीं होता। सद्गुरुकी कृपादृष्टिके (शक्तिपातके) लेशमात्रसे तुरंत तत्त्वज्ञान होता है। जब सद्गुरुकी कृपादृष्टि पड जाती है, तब भगवत्कथाश्रवणध्यानादिमें श्रद्धा उत्पन्न होती है। उनसे हृदयस्थित अनादि दुर्वासनाग्रंथिका विनाश होता है। उनसे हृदयस्थित सब काम नष्ट हो जाते हैं। तब उससे हृत्पद्मकी कर्णिकामें परमात्माका आविर्भाव होता है।"

उपरोक्त विवेचनांत फक्त गुरुकटाक्षपाताचा म्हणजे दृग्दीक्षेचा एकमात्र उल्लेख केला असला तरी गुरुकृपा कशी होते याची उत्कृष्ट परंपरा त्यात निर्दिष्ट केली आहे. बहुतेक शास्त्रकारांनी गुरुकटाक्षपात असे म्हणून उपरोक्त चार प्रकार त्यात अंतर्भूत आहेत असे गृहित धरले आहे. संत, महंत व महात्म्यांनी तर आपल्या काव्यात फक्त गुरुकृपा एवढ्या एकाच शब्दाचा वापर केला आहे. त्यांनी उपरोक्त प्रकारच्या चिकित्सेचा अवलंब न करता मूख्य मुद्याची गोष्ट पकडून त्या केंद्रबिंदूभोवती आपल्या सर्व विचारांची गुंफण केली आहे. याचा अर्थ त्यांना ही चिकित्सा मान्य नव्हती व या विषयाचे पृथक्करण त्यांना माहीत नव्हते असे नसून, गुरुकृपेची अपरिहार्यता समाजाच्या शेवटच्या स्तरापर्यंत त्यांना पाझरत न्यावयाची होती. त्यामुळे जितक्या सोप्या भाषेचा, कमी पृथक्करणाचा व कमी चिकित्सेचा अवलंब करता येईल तितका करून, त्यांनी हा विषय सजविला असल्याचे दिसून येते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सोळाव्या अध्यायाच्या सुरवातीला श्रीसद्गुरुकृपेचे जे वर्णन केले आहे ते सद्गुरुकटाक्षपाताच्या अपूर्वतेने नुसते ओतप्रत भरले आहे, नव्हे त्याने ते अगदी मुसमुसले आहे. " मावळवीत विश्वाभासु। नवल उदयला चंडांशु। अद्वयाब्जिनीविकाशु। वंदूं आतां ॥ १६ १ ॥ " या एका ओवीतूनच त्या सद्गुरुकृपेची झळाळी प्रतीत होते. सद्गुरूंच्या दर्शनाने प्राप्त होणारी ही अपूर्व स्थिती आहे. " जेणें पाहालियें पाहांटे। भेदाची चोरवेळ फिटे। रिघती आत्मानुभव वाटे। पांथिक योगी ॥ १६.७ ॥ " या ओवीतही सद्गुरूंच्या

दृग्दीक्षेने आत्मसत्ता कुंडलिनी शक्ती जागृत झाल्याने साधकांची भेददृष्टी नाहीशी होऊन ते आत्मानुभव देणाऱ्या सुषुम्नेच्या वाटेने मार्गस्थ कसे होतात, हे सांगितले आहे. "जयाचा रश्मिपुंजु निबरु । होता स्वरूप उखरीं स्थिरु । ये महासिद्धीचा पुरु । मृगजळ तें ॥ १६.९ ॥" या ओवीतूनही त्यांनी सूक्ष्मतर दृष्टिदीक्षेचा महिमा मोठ्या अपूर्वतेने कथन केला आहे. त्याचप्रमाणेच "जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांतु फुगणे । दीपले जाळिती दांगें । संसाराचीं ॥ १६.८ ॥" व "जो निजधामव्योमींचा रावो । उदैलाचि उदैजतखेंवो । फेडी पूर्वादि दिशांसि ठावो । उदोअस्तूचा ॥ १६.१४ ॥" या ओव्यांतून त्यांनी स्थूल अशा स्पर्शदीक्षेची महत्ती वर्णन केली आहे. एवढेच नव्हे तर "जो सर्वनेणिवां जाणिजे । मौनाचिया मिठीया वानिजे । कांहीच न होनि आणिजे । आपणपया जो ॥ १६.१९ ॥" असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सूक्ष्मतम अशा संकल्प किंवा मानसिक दीक्षेचे अलौकिक वर्णन केले आहे. या बाबतीत "भारतीय संस्कृति और साधना" खंड दुसरा, या ग्रंथातील "संत परिचय" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी श्रेष्ठ, मध्यम व अधम अधिकाऱ्यांवर संत कृपा कशी करतात याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की, "जिन्होंने, सत्यको उपलब्ध किया है, वे समर्थ होनेपर और आवश्यक समझनेपर दूसरेको भी उपदेश देते हैं। यह उपदेश श्रेष्ठ अधिकारीको प्रातिभ ज्ञानके रूपमें दिया जाता है । यह प्रातिभ ज्ञान अपने आपही हृदयमें उत्पन्न हुआ करता है । यह अनौपदेशिक ज्ञान होनेपर भी एक प्रकारसे उपदेशरूप है । बाह्यशब्दका आश्रय लेकर इसको अन्यत्र संचारित नहीं करना पडता । इस प्रकारके विशुद्ध ज्ञानके द्वाराही हृदयका संशय सम्यक् प्रकारसे मिट जाता है । "गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्य संछिन्नसंशयः" इस कथनका यही तात्पर्य है । मध्यम अधिकारीको वे विशुद्ध चेतनके साथ उपदेश दिया करते हैं । इस चेतन शब्दमें इतना सामर्थ्य है कि यह कानोंमें प्रवेश करतेही मर्मस्थानमें प्रविष्ट हो जाता है और हृदयको असाधारणरूपसे आंदोलित कर देता है । इस शब्दको सुननेके बाद बाह्य जगत्की ओर आकर्षण नहीं रह सकता । मन, प्राण और इंद्रिया समस्त एकीभूत होकर प्रबल वेगसे और उद्दाम स्रोतसे अंतरात्माके साथ मिलनेके लिए दौड पडते हैं । श्यामकी वंशध्वनी सुनकर राधा अथवा गोपियोंका कैसा भाव होता था इस बातको वैष्णव महापुरुषोंने अपनी पदावलीयोंमें कविताके द्वारा संक्षेपमें बतलाया है। तंत्रशास्त्रके मंत्रचैतन्यकी व्यवस्था भी इसीलिए हैं, क्योंकि शब्दको चेतन किये बिना उस शब्दकी सहायतासे परब्रह्मका साक्षात्कार नितांत असंभव है, क्योंकि अचेतन शब्द शब्दब्रह्म नहीं कहा जा सकता। पृथ्वीके सभी धर्म-संप्रदायोंमें इस शब्द-चैतन्य की बात गंभीरताके साथ कही गयी है। शब्द चेतन होतेही कुंडलिनी-शक्ति जाग्रत हो गई यह कहा जा सकता है। अचेतन शब्दका बार-बार जप करनेकी एक विशेष प्रक्रियाके द्वारा बहुत

परिश्रमसे उसे चेतन किया जा सकता है। संत महात्मागण इच्छा करनेपर साक्षात् रूपसे चेतन शब्दका प्रयोग कर सकते हैं। यह मध्यम अधिकारीकी बात है। अधम अधिकारीको संतलोग अचेतन शब्दके द्वाराही उपदेश दिया करते हैं, पर उसके साथही ऐसी कोई क्रिया बतला देते हैं जिसके करनेसे वह अचेतन शब्द क्रमश: चेतन शब्दके रूपमें परिणत हो जाता है। अवस्थाविशेषमें क्रियाकौशलके बिना भी दीर्घकालके विचारादिके प्रभावसे अथवा अन्य किसी कारणसे तीव्र संघर्षवश अचेतन शब्द चेतन शब्दके रूपमें प्रस्फुटित हो सकता है।"

अशा प्रकारे चार प्रकारांनी शक्तिपात किंवा गुरुकृपा होत असली तरी या बाबतीत अशी एक शंका नेहमी घेतली जाते की, शक्तिपात या शब्दातील शक्ती शब्दाने जर अद्वैत चितिशक्ती कुंडलिनी अभिप्रेत असेल; तर ती स्वस्वरूपभूत, अनंत व अमूर्त आहे, त्यामुळे अशा शक्तीचा पात होणे अशक्य किंवा असंभव आहे. आणि जर ही शक्ती स्वरूपाहून भिन्न व दुसरीच गोष्ट असेल; तर तिला ज्ञानात्मिका व परा म्हणता येणार नाही. अशा प्रकारची शंका श्रीअच्युतराय मोडक यांनी "जीवन्मुक्ती विवेकाच्या पूर्णानंदेंदु कौमुदीत" उपस्थित करून त्याला उत्तर देताना ते म्हणतात, "ही शंका योग्य नाही; कारण शक्ती म्हणजे चिती किंवा चैतन्यशक्तीच होय. ही चितिशक्ती अद्वैतरूप, परमेश्वरस्वरूपभूत व सर्वगत आहे. असे शक्तीचे स्वरूप असल्यामुळे तिचे पतन होते हे म्हणणे अगदी औपचारिक आहे. या दृष्टीनेच सूतसंहितेत असे म्हटले आहे की—

**शक्तिपातप्रकारस्य रहस्यांशश्च कश्चन।**
**मया नोक्तो रहस्यत्वादाज्ञाभंगभयादपि ॥यज्ञवैभवखंड ॥४.३४.२७॥**

शक्तिपाताचे रहस्य किंवा मर्म मी सांगितले नाही; कारण रहस्य प्रकट केल्याने शास्त्राज्ञाभंगाचे भय वाटते म्हणजे हे रहस्य प्रकट करण्याची शास्त्राज्ञा नाही. यावर टीका करताना श्रीमाधवारण्यस्वामी म्हणतात, "अयमत्र रहस्यांश:— परमेश्वरस्वरूपभूतत्वेन सर्वगताया: संविद्रूपिण्या: परशक्ते: पतनसंभवाच्छिष्यस्याऽऽत्मनि प्रागेवावस्थिता सा पाशजालावृतत्वेन तिरोहिता सती पश्चात् दीक्षासंस्कारेणाऽऽवरणापगमे सत्यभिव्यक्तिमासादमयन्ती पतितेत्युपचर्यते। ऊर्ध्वदेशादधोदेशप्राप्तिर्हि पतनं न खलु तादृशमस्या: संभवतीति। आगमेऽप्युक्तम्—

**व्यापिनी परमा शक्ति: पतितेत्युच्यते कथम्।**
**ऊर्ध्वादधोगति: पातो मूर्तस्यासर्वगस्य च॥**
**सत्यं सा व्यापिनी नित्या सहजा शिववत्स्थिता।**
**किंत्वियं मलकर्मादिपाशबंधेषु संवृता।**
**पक्वपाकेषु सुव्यक्ता पतितेत्युपचर्यते॥ इति॥**

ते रहस्य असे आहे — सर्वंगत पराशक्ती परमेशस्वरूपभूत व संविद्रूप

असल्याने तिचा पात होणे अशक्य आहे; पण शिष्याचे चैतन्य नानाविध पाशजालाने झाकलेले असते. ते आवरण दीक्षासंस्काराने दूर करून चिच्छक्ती प्रकट करणे यालाच पात म्हणतात. वरून खाली येणे म्हणजे पतन हे या चिच्छक्तीला संभवत नाही म्हणून आगमात पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

ती परमशक्ती सर्वव्यापिनी आहे. मग तिला पतित होते किंवा पडते असे का म्हटले जाते ? साकार व परिच्छिन्न पदार्थच वरून खाली पडू शकतो. म्हणजे जो पदार्थ एकदेशीय व मूर्तिमान म्हणजे साकार व परिच्छिन्न असून सर्वव्यापक नाही तो वरून खाली पडला म्हणजे त्या पदार्थाच्या पडण्याला पात किंवा पतन म्हणतात; परंतु खरे म्हणजे ती चिच्छक्ती सर्वव्यापिनी, शिवाप्रमाणे सर्वत्र राहणारी व सहजा आहे. मात्र ही शक्ती मलकर्मादि पाशबंधामुळे झाकलेली आहे. जेव्हा मलकर्मपाशबंधादि दोष नष्ट होतात म्हणजे पक्व होऊन गळून पडण्याच्या मार्गावर असतात तेव्हा ती शक्ती व्यक्त होते. या शक्तीच्या प्रकटीकरणालाच पतित असे म्हटले जाते.

श्रीगुरुकृपा वरील चार प्रकाराने होत असली तरी त्याचे मूळ अधिष्ठान सद्गुरूंच्या ठिकाणी उपस्थित होणारे अत्यंतिक कारुण्य हेच आहे. अर्थात् शिष्याची शरणागती, ही हे अधिष्ठान उपस्थित करण्यास कारणीभूत आहे, हे कधीही विसरता येणार नाही. या दृष्टीनेच श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी "दासबोधात" असे म्हटले आहे की–

नमस्कारें कृपा उचंबळे। नमस्कारें प्रसन्नता प्रबळे।
नमस्कारें गुरुदेव वोळे। साधकावरी ॥४.६.१७॥
विशेष करितां नमस्कार। नासती दोषांचे गिरिवर।
आणि मुख्य परमेश्वर। कृपा करी ॥१८॥
साधक भावें नमस्कार घाली। त्याची चिंता साधूस लागली।
सुगम पंथें नेऊनि घाली। जेथील तेथें ॥२४॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही कृपेचे अधिष्ठान सद्गुरू, महापुरुष किंवा महात्मेच असून तेच शिष्यांवर किंवा साधकांवर अपूर्व कृपा, केवळ तो शरण आला म्हणून मोठ्या करुणतेने करतात, हे स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

तैसी आघवियांचि भूतमात्रीं। एकपणें जया मैत्री।
कृपेसी धात्री। आपणचि जो ॥१२.१४८॥
ऐसाही कोणे एके वेळे। भीतरले कृपेचेनि बळें।
उघडोनियां डोळे। दृष्टी घाली ॥१३.२७५॥
तरी चंद्रबिंबौनि धारा। निघतां नव्हती गोचरा।
परी एकसरें चकोरां। निघती दोंदें ॥२७६॥

तैसे प्राणियांसि होयें। जरी तो कहीं वासु पाहे।
तया अवलोकनाची सोये। कूर्मीही नेणें ॥२७७॥

कूर्मी आपल्या पिलावर दृष्टी ठेवून त्यांचे पोषण करते त्यापेक्षाही सूक्ष्मतम कृपा सद्‌गुरू शिष्यावर करीत असतात व तीही "तंव सहजें कृपा केली तुम्ही ॥८.१०९॥" या अर्जुनाच्या म्हणण्याप्रमाणे अगदी सहज असते. मात्र शिष्याने करुणरसपूर्ण प्रार्थना केल्यावर सद्‌गुरूला आपले प्रेम आवरत नाही व त्यामुळेच शक्तिपात किंवा कृपा कशी होते हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तुझें विश्वरूप आकळे। ऐसें जरी जाणसी माझे डोळे।
तरी आर्तीचे डोहळे। पुरवीं देवा ॥११.१११॥
ऐसी ठायेंठावो विनंती। जंव करूं सरला सुभद्रापती।
तंव तया षड्‌गुणचक्रवर्ती। साहवेचिना ॥११२॥
तो कृपापीयूषसजळु। आणि येरु जवळां आला वर्षाकाळु।
नाना श्रीकृष्ण कोकिळु। अर्जुन वसंतु ॥११३॥
नातरी चंद्रबिंब वाटोळें। देखोनि क्षीरसागर उचंबळे।
तैसा दुणेंही वरी प्रेमबळें। उल्लसितु जाहला ॥११४॥
मग तिये प्रसन्नतेचेनि आटोपें। गाजोनि म्हणितलें सक्रुपें।
पार्था देख देख अमुपें। स्वरूपे माझीं ॥११५॥

अशा प्रकारे सद्‌गुरू कारुण्याधिष्ठित होऊन जेव्हा शिष्यावर कृपा करतात तेव्हा त्यांना काही जीवभाव बाकी ठेवूनच कृपा करावी लागते; कारण प्रेमावेगाने त्यांना संपूर्ण समाधी लागून शिवावस्था प्राप्त झाली तर त्या अवस्थेत शक्तिपाताची क्रिया संभवणार नाही. आपला शिवभाव आवरून श्रीकृष्णनाथांनी अर्जुनावर कृपा कशी केली हे ठायी ठायी स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ऐसा पतिकराचिया तोषा आंतु। प्रेमाचा वेगु उचंबळतु।
सायासें सांवरूनी अनंतु। काय बोले ॥१०.२०५॥
आधींच आम्हां यया कांहीं। नरनारायणासी भिन्न नाहीं।
परी आतां जिरो माझ्या ठाईं। वेगु हा माझा ॥१५.४५८॥

श्रीकृष्णांनी त्यांच्या ठिकाणी उपस्थित झालेला आत्यंतिक प्रेमभाव का आवरला? प्रेमवेग त्यांनी आपल्या ठिकाणीच का जिरविला? या प्रश्नाचे उत्तर देताना "गुरु-परंपरा" या पुस्तकात श्रीशिवोम्‌प्रकाश म्हणतात, "ध्यान रहे कि गुरु-मूर्तिमें शिवभाव और जीवभाव दोनो होते हैं। यदि गुरुमें केवल शिवभावही हो तो ऐसी स्थितिमें संसारके कल्याण–अकल्याणका भाव समाप्त हो जानेसे गुरु–शिष्य, परोपकार, उत्थान–पतन तथा अन्य ऐसे विचारोंका प्रश्नही नहीं रहेगा। यदि केवल जीवभावही हो तो अंधा अंधेका क्या मार्गदर्शन करेगा? अतः जिसमें

शिवभावकी जागृति हो चुकी है, किंतु जीवभाव भी अभी बाकी है, वही गुरु होकर अपने साथ-साथ अन्योंका भी कल्याण करनेमें समर्थ होता है। इसलिए जीवभाव तथा पूर्वसंचित कर्माशयके कारण गुरुमें सामान्य मनुष्योंकी भांति कुछ बातें दीख सकती हैं। किंतु शिष्यका संबंध तो गुरुके अंदर प्रकट शिवभावसे होता है। गुरुके शिवरूपसे जितनाही अधिक शिष्यका संबंध होगा, उतनीही आत्मोन्नति अधिक हो सकेगी। यदि गुरुके जीवभावको दृष्टिमें रखकर उनके अवगुणोंकी ओर ध्यान दिया जाये तो श्रद्धाका टिके रहना असंभव हो जाता है। अवतारी पुरुषोंका व्यवहार भी मानवस्तरपर आकर कई लोगोंकी दृष्टिमें आलोचनाका विषय बन जाता है। फिर जिनके अंदर शिवभावके साथ-साथ अभी जीवभाव भी बाकी है, उनके बारेमें तो कहनाही क्या ? ”

अशा प्रकारे शिष्याची दृष्टी ही गुरूच्या जीवभावापुरतीच संकुचित किंवा मर्यादित राहत असल्यामुळे खरे सद्‌गुरुस्वरूप तो ओळखू शकत नाही. मात्र त्यांच्या अपार शक्तीच्या सामर्थ्याची त्याला जेव्हा अनुभूती येते तेव्हा तो अर्जुनाप्रमाणे सद्‌गुरुनाथांची प्रार्थना करताना असे म्हणतो की-

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात् प्रणयेन वापि ॥११.४१॥ गीता ॥
यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु।
एकोऽथवाप्यच्युत तत् समक्षं तत् क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥४२॥

तुझे हे शक्तिपातदीक्षेचे माहात्म्य न जाणता चुकीने किंवा प्रेमाने तुला मित्र समजून हे कृष्णा ! हे यादवा ! ! हे सख्या ! ! ! असे जे मी उद्धटपणे बोललो असेन आणि त्याचप्रमाणे क्रीडा किंवा थट्टा करताना, विहार करताना, शय्येवर निजताना, आसनावर बसताना, जेवताना, एकटा असताना किंवा सर्वांच्या समक्ष जो मी तुझा अपमान केला असेल त्याबद्दल हे अचिंत्यप्रभाव असलेल्या अच्युता ! तुझी मी क्षमा मागतो. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शिष्याच्या मनातील गुरूकडे पाहण्याचा जीवभाव जाऊन जेव्हा शिवभाव येतो, तेव्हा जीवभावात आपण सद्‌गुरूंशी केलेल्या व्यवहाराबद्दल त्याच्या मनाला जी खंत वाटते, त्याचे सुंदर चित्र रेखाटले आहे. ते म्हणतात-

परि ऐसिया तूंतें स्वामी। कहींच नेणों जी आम्ही।
म्हणौनि सोयरे संबंधधर्मी। राहाटलों तुजसीं ॥११.५३७॥
अहा थोर वाउर जाहलें। अमृतें संमार्जन म्यां केलें।
वारिकें घेऊनि दिधलें। कामधेनूतें ॥५३८॥
परिसाचा खडवाचि जोडला। कीं फोडोनि आम्ही गाडोरा घातला।
कल्पतरू तोडोनि केला। कूंप शेता ॥५३९॥

चिंतामणीची खाणी लागली । तेणे करें वोढाळें वोल्हांडिली ।
तैसी तुझी जवळिक धाडिली । सांगातींपणें ॥५४०॥
हें आजिचेंचि पाहें पां रोकडें । कवण झुंज हें केवढें ।
एथ परब्रह्म तूं उघडें । सारथी केलासी ॥५४१॥
ययां कौरवांचिया घरा । शिष्टाई धाडिलासि दातारा ।
ऐसा वणिजेसाठीं जागेश्वरा । विकलासि आम्हीं ॥५४२॥
तू योगियांचें समाधिसुख । कैसा जाणेचिना मी मूर्ख ।
उपरोधु जी सन्मुख । तुजसीं करूं ॥५४३॥

शिष्याची अपात्रता,संकुचितपणा किंवा जीवभावच या सर्वाला कारण असल्या-मुळे श्रीशिवोमप्रकाश आपल्या "गुरुपरंपरा" या ग्रंथात पुढे म्हणतात," गुरुमें यदि, शिवभाव पूर्णतः प्रकट हो भी गया हो, तो भी शरीर रहते पूर्वसंचित संस्कारों एवं स्वभावके कारण कई बातें शिष्यको उचित न लगनी संभव है। अतः ऐसे अवसर आनेपर इस बातको इसप्रकार लेना चाहिये-"यह सब प्रारब्धके कारण है, वास्तवमें अंतरसे गुरु इस सब व्यवहारसे अलिप्त हो चुके हैं।"-ऐसा विचार करके यदि कोई ऐसी बात दीखे तो उससे श्रद्धा नहीं घटने देनी चाहिये।

भगवान्की शक्ति मायाके रूपमें बंधन बनकर जीवत्वका कारण बनती है, किंतु जीवोंके कल्याणके लिए वही ईश्वरीय शक्ति गुरुतत्त्व होकर गुरु-शरीरोंके द्वारा कार्य करती है। जब महापुरुषोंमें शिवभावका उदय होकर उनमें अन्य जीवोंके कल्याणकी रुचि उत्पन्न होती है, तो यही गुरुतत्त्वका प्राकटच कहलाता है। इसीलिए गुरु-पद व्यवसायका विषय नहीं, लोककल्याणका विषय है।

किसीके मनमें शंका उत्पन्न हो सकती है कि गुरु-तत्त्व तो ईश्वर-तत्त्व है, फिर उसमें यह जीवभावका प्रसंग कैसे आ गया? इसका उत्तर इस प्रकार समझना चाहिए कि गुरुमूर्तिमें जो शिवभाव है, वही गुरु-तत्त्व है, वही ईश्वरतत्त्व है। जीवभाव तो केवल मात्र संस्कार हैं। गुरुशिष्यका आंतरिक संबंध उस शिवभावकेही कारण है। यदि गुरुमें शिवके लक्षण दिखते हों तो उनमें जीवभावकी विद्यमानता होनेपर भी उसे अपने संबंधोंमें बाधक नहीं बनने देना चाहिये।"

यासाठी अर्जुनाने भगवंताची जशी प्रार्थना केली तशीच प्रार्थना शिष्याने करणे उचित ठरते. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की-

यालागीं पुढां अथवा पाठीं । जियें राहटलों बहुवें वोखटीं ।
तियें मायेचिया परी पोटीं । सामावीं प्रभो ॥११.५५६॥
जी कोण्ही एके वेळे । सरिता घेऊन येती खडुळें ।
तियें सामाविजेती सिंधुजळें । आन उपायो नाहीं ॥५५७॥

तैसी प्रीती कां प्रमादें। देवेंसीं मज विरुद्धें।
बोलविलीं तिये मुकुंदें। उपहासावीं जी ॥५५८॥
आणि देवाचेनि क्षमत्वें क्षमा। आधारु जाली आहे या भूतग्रामा।
म्हणौनि जी पुरुषोत्तमा। विनवूं तें थोडें ॥५५९॥
तरी आता अप्रमेया। मज शरणागता आपुलिया।
क्षमा कीजो जी यया। अपराधांसि ॥५६०॥

अशा प्रकारची आत्यंतिक शरणागतीच गुरुकृपेला कारणीभूत होत असते. जीव अनादि काळापासून आत्मविस्मृत व बहिर्मुख होऊन धावत असतो. त्यामुळे अविद्येच्या महानिद्रेत गुरफटून तो विश्वव्यवहाराचा अनुभव घेत राहतो व जन्मजन्मांतरी त्या चक्रात फिरत राहतो. जेव्हा पूर्णपुण्येकरून अकस्मात् गुरुकृपा होते तेव्हाच तो यातून मोकळा होतो. या सर्व अवस्थेचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी अविद्येचिया निदा। विश्वस्वप्नाचा हा धांदा।
भोगीत होता प्रबुद्धा। अनादि जो ॥१८.४०३॥
तो महावाक्याचेनि नांवें। गुरुकृपेचेनि थावें।
माथां हातु ठेविला नव्हे। थापटिला जैसा ॥४०४॥
तैसा विश्वस्वप्नेंसीं माया। नीद सांडूनि धनंजया।
सहसा चेइला अद्वया–। नंदपणें जो ॥४०५॥
तेव्हा मृगजळाचे पूर। दिसते एक निरंतर।
हारपती का चंद्रकर। फांकतां जैसे ॥४०६॥

जीव हा मूळाचाच प्रबुद्ध म्हणजे चैतन्य किंवा शिवस्वरूप असला तरी तो अविद्यारूपी निद्रेत विश्वरूपी स्वप्नव्यवहाराचा अनुभव अनादि कालापासून घेत असतो. ज्यावेळी त्याला सद्‌गुरू भेटतात तेव्हा ते शक्तिपातपूर्वक ‘तत्त्वमसि’ या महावाक्याचा उपदेश करतात. यालाच शब्ददीक्षा म्हणतात. ते त्याच्यावर कृपा करतात म्हणजे कृपादृष्टी टाकून अर्थात् दृग्‌दीक्षेने शक्ती संचार करतात किंवा मनःसंकल्पाने कृपा करून अर्थात् ध्यान, कृपा किंवा संकल्पदीक्षा देऊन त्याची अंतःशक्ती कुंडलिनी जागृत करतात. किंवा सद्‌गुरू शिष्याच्या मस्तकावर नुसता हात ठेवीत नाहीत तर प्रत्यक्ष थापटी मारून ते आत्मस्वरूप कुंडलिनी शक्ती जागृत करून ज्ञानदान करतात. अशा प्रकारे गुरुकृपा होऊन ज्ञानदान घडले की, मायारूपी अनादि शक्ती बहिर्मुखतेने पाहत किंवा अनुभवीत असलेले जगद्‌रूपी स्वप्न अज्ञानरूपी निद्रेसह टाकून देते. ही प्रक्रिया घडली की या शक्तीच्या ऊर्ध्वगमनाच्या सामर्थ्यामुळे आपण शिवस्वरूप आहोत असा यथार्थबोध साधकाला होतो.

" स्कंदपुराणांतर्गत सूतसंहितेत " या विषयाचे स्पष्टीकरण करताना असे म्हटले आहे की–

तस्य प्रसादयुक्तस्य विद्या वेदान्तवाक्यजा ।
दहत्यविद्यामखिलां तमः सूर्योदयो यथा ।।यज्ञवैभवखंड ।।४.३५.२४।।
शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदान्तवाक्यजा ।
यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः ।।२६।।
तत्त्वज्ञानेन मायाया बाधो नान्येन कर्मणा ।। सूत गीता ।। अ. ८.६ ।।
ज्ञानं वेदान्तवाक्योत्थं ब्रह्मात्मैकत्वगोचरम् ।
तच्च देवप्रसादेन गुरोः साक्षान्निरीक्षणात् ।
जायते शक्तिपातेन वाक्यादेवाधिकारिणाम् ।।७।।

ज्याप्रमाणे सूर्योदय अंधकाराला जाळून टाकतो त्याप्रमाणे वेदान्त वाक्यापासून उत्पन्न होणारी ही विद्या अशा प्रकारचा शक्तिपातयोगदीक्षाप्रसाद ज्याला प्राप्त झाला आहे त्याची सर्व अविद्या जाळून टाकते. वेदान्ताने प्राप्त होणारी विद्या जेव्हा शक्तिपाताच्या संयोगाने मिळते तेव्हा मनुष्य तत्क्षणीच मुक्त होतो, यात काहीच संशय नाही. तत्त्वज्ञानानेच मायेचा निरास होतो. अन्य दुसऱ्या कोणत्याही कर्माने मायेचा बाध होत नाही. आत्मा व परमात्मा यांचे अभिन्नत्व सांगणारे ज्ञान वेदान्त महावाक्याच्या उपदेशामुळेच ईश्वरप्रसादाने, गुरूच्या साक्षात् निरीक्षणाने अर्थात् दृग्दीक्षेने शक्तिपात केल्याने, अधिकारी शिष्याला समजते अगर त्याच्या ठिकाणी उपस्थित होते.

याप्रमाणेच " शिवपुराणातील वायवीय संहितेतील उत्तरखंडात " असे म्हटले आहे की–

गुरोरालोकमात्रेण स्पर्शात्संभाषणादपि ।
सद्यः संज्ञा भवेज्जंतोर्दीक्षा सा शांभवी मता ।।१५.७।।

सद्गुरूंच्या दृष्टीने, स्पर्शाने व शब्दाने सद्गुरूंची शक्ती शिष्यात संक्रमित होते व तत्काळ शिष्याच्या ठिकाणी जीवशिव ऐक्याचे दिव्य ज्ञान उत्पन्न होते. गुरूंची महान् कृपा व शिष्याचे सौभाग्य यांमुळे ज्या महान् आत्मसाक्षात्काराची अवस्था प्राप्त होते त्याला तत्त्ववेत्त्यांनी शंभुपद प्राप्त करून देणारी शांभवी दीक्षा असे म्हटले आहे.

" कुलार्णवतंत्रात " व " शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेच्या उत्तरखंडात " आत्तापर्यंत केलेल्या सर्व विवेचनाचे सार मांडताना असे म्हटले आहे की–

**शक्तिपातानुसारेण शिष्योऽनुग्रहमर्हति ।**
**यत्र शक्तिर्न पतति तत्र सिद्धिर्न जायते ।।कुलार्णव तंत्र ।।१४.३८।।**
**।। शि. पु. वा. सं. उ. खं. ।।१५.१२.१३।।**

शक्तिपाताच्या मार्गानेच अर्थात् शक्तिसंचाराच्या मात्रेनुसारच शिष्याला खराखुरा अनुग्रह होत असतो. ज्या अनुग्रहामध्ये, दीक्षेमध्ये अगर कृपेमध्ये शक्तीचा पात म्हणजे शक्तिसंक्रमण होऊन अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत होत नाही त्या ठिकाणी मोक्षसिद्धी अर्थात् स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची उपलब्धी कदापीही होऊ शकत नाही.

येथपर्यंत सद्गुरुकृपा कशी होते याचे सर्वसामान्य विवेचन आपण तपशीलाने पाहिले. आता स्पर्शदीक्षा, दृग्दीक्षा, शब्ददीक्षा व संकल्प अर्थात् ध्यान किंवा कृपा-दीक्षा कशी होते हे आपण क्रमाने पाहू.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अर्जुनाला श्रीकृष्णांनी स्पर्शपूर्वक दीक्षा कशी दिली हे ध्रुवाचा दृष्टांत देऊन सांगताना असे म्हटले आहे की—

**ना तरी मधुवनीं ध्रुवासि केलें । जैसें कपोल शंखें शिवतलें ।**
**आणि वेदांचियेही मतीं ठेलें । तें लागला बोलों ।।११.१८४।।**
**तैसा अनुग्रहो पैं राया । श्रीहरी केला धनंजया ।**
**आतां कवणेकडेही माया । ऐसी भाष नेणेंचि तो ।।१८५।।**

मधुवनात ध्रुव तपश्चर्या करीत होता. त्याला भगवंताची स्तुती करण्याची इच्छा होती; परंतु अशी स्तुती करण्यास तो असमर्थ आहे असे पाहून भगवंतांनी ध्रुवाच्या गालाला आपल्या हातातील शंखाचा स्पर्श केला. त्याबरोबर वेदालाही जे अगम्य होते ते त्याच्या मुखातून आपोआप उमटू लागले. अगदी याचप्रमाणे भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनाला स्पर्शदीक्षानुग्रह दिला. त्यामुळे त्याच्या दृष्टीने मायेची भाषाच नाहीशी झाली.

ध्रुवाला भगवंताकडून स्पर्शदीक्षा कशी झाली याचे वर्णन महर्षी व्यासांनी "श्रीमद्भागवत महापुराणात" कसे केले आहे हे आपण दुसऱ्या प्रकरणात पृष्ठ ७६ वर पाहिलेच आहे.

या स्पर्शदीक्षेची व्याख्या करताना "कुलार्णवतंत्रात" महादेव पार्वतीला असे म्हणतात की —

**यथा पक्षी स्वपक्षाभ्यां शिशून् संवर्धयेच्छनैः ।**
**स्पर्शदीक्षोपदेशश्च तादृशः कथितः प्रिये ।।१४.३५।।**

हे प्रिये पार्वती ! ज्याप्रमाणे पक्षी आपल्या पंखांचा स्पर्श करून आपल्या पिल्लांचे लालन, पालन व वर्धन करतो त्याप्रमाणे सद्गुरू आपल्या स्पर्शाने शिष्याच्या ठिकाणी असलेली निद्रिस्त शक्ती जागृत करून त्याचे लालन, पालन,

व वर्धन करतात. याप्रमाणे स्पर्शदीक्षा असते. जोपर्यंत पिल्लू अंड्याच्या बाहेर येत नाही तोपर्यंत पक्षी अंडे उबवितो व अंड्यातून पिल्लू बाहेर आल्यावर ते जोपर्यंत लहान असते तोपर्यंत त्याला आपल्या पंखाखाली तो झाकून ठेवतो. याप्रमाणेच सद्‌गुरू शिष्याच्या ठिकाणी सुप्त असलेली कुंडलिनी शक्ती जागृत करून तिचे संवर्धन करतात. पुढे शक्तीचा हळूहळू विकास होऊन शेवटी ती सहस्रारापर्यंत जाते. त्यामुळे साधकाला पूर्णावस्था प्राप्त होते. अशा प्रकारे जी दीक्षा होते तिला स्पर्शदीक्षा किंवा स्पर्शद्वारा शक्तिसंचार असे म्हणतात.

श्रीकृष्णांनी अर्जुनाला आलिंगन देऊन आपले ज्ञान त्याच्या ठिकाणी कसे संक्रमित केले, याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जे वर्णन केले आहे, ते स्पर्शदीक्षेचे सर्वोत्तम वर्णन आहे. ते म्हणतात–

**मग सांवळा सकंकणु। बाहु पसरोनि दक्षिणु।**
**आलिंगिला स्वशरणु। भक्तराजु तो ॥१८.१४१८॥**
**न पवतां जयातें। काखे सूनि बुद्धीतें।**
**बोलणे मागौतें। वोसरलें ॥१४१९॥**
**ऐसें जें कांहीं येक। बोला बुद्धीसिही अटक।**
**तें द्यावया मिष। खेवाचें केलें ॥१४२०॥**
**हृदया हृदय येक जाले। ये हृदयींचें ते हृदयीं घातलें।**
**द्वैत न मोडतां केलें। आपणाऐसें अर्जुना ॥१४२१॥**
**दीपें दीप लाविला। तैसा परिष्वंगु तो जाला।**
**द्वैत न मोडितां केला। आपणपें पार्थु ॥१४२२॥**

कंकणांनी युक्त असा आपला श्यामवर्णाचा उजवा हात श्रीकृष्णांनी पुढे करून आपल्यास शरण आलेल्या भक्तराज अर्जुनाला आलिंगन दिले. स्वसंवेद्य आत्मरूप हे बुद्धीला व शब्दाला आकलन होत नाही.त्यामुळे तेथे बोलणे खुंटून जाते. ते स्वरूप अर्जुनाला देण्याकरिता देवांनी आलिंगनाचे निमित्त केले. श्रीकृष्णांचे हृदय व अर्जुनाचे हृदय एकमेकांना भिडले. श्रीकृष्णांनी आपल्या हृदयातील ज्ञान अर्जुनाच्या हृदयात घातले. त्यांनी देव व भक्त किंवा सद्‌गुरू व शिष्य या रूपाने दिसणारे द्वैत न मोडता अर्जुनाला आपल्यासारखे केले. एका दिव्याने दुसरा दिवा लावला असता जसे दिव्याचे प्रतीतीमात्र द्वैत कायम राहून प्रकाशदृष्ट्या ऐक्य मोडत नाही; तसाच प्रकार या आलिंगनाचा होऊन द्वैत न मोडता स्पर्शदीक्षेने श्रीकृष्णनाथांनी अर्जुनाला आपल्यासारखे केले.

श्रीगुरू स्पर्शदीक्षा देऊन अविद्येचा अंधार दूर करून आत्मबोधाचा उदय कसा करतात हे सांगताना "अमृतानुभवात" श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**अविद्येचें काळवखें। स्वबोधसुदिनें फाकें।**
**शिवतलेंनि प्रसादाकें। जयाचेनी ॥२.१०॥**

श्रीगुरूंच्या कृपाप्रसादरूपीसूर्याने स्पर्श केला असता म्हणजे स्पर्शाने शक्तिपात दीक्षा झाली असता आत्मबोधरूपी दिवसाचा उदय होऊन म्हणजे कुंडलिनी शक्तीची जागृती होऊन अंतर्गती सुख झाल्याने अविद्येचा अंधार म्हणजे वहिर्गती नाहीशी होते.

अशा प्रकारची स्पर्शदीक्षा ही नुसती कल्पनेतील गोष्ट, अर्थवाद किंवा अनुभूतिशून्य वस्तू नसून ती शास्त्रीय कसोटीवर घासलेली, परंपरेने प्राप्त झालेली व सद्गुरूंनी अनुभूतीने दिलेली गोष्ट असल्याने, प्रत्यक्ष डोक्यावर हात ठेवून श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी आपल्याला स्पर्शदीक्षा देऊन ज्ञानाचे बीज आपल्या ठिकाणी कसे रुजविले, याचे कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**ज्ञानदेव म्हणे मी चाडें। सद्गुरूंनीं केलें कोडें।**
**माथां हात ठेविला तें फुडें। बीजची बाइलें ॥६.४९२॥**

"कुलार्णवतंत्रात" या दृष्टीनेच स्पर्शदीक्षा कशी द्यावी हे सांगताना असे म्हटले आहे की–

**हस्ते शिवं गुरुं ध्यात्वा जपेन्मूलांगमालिनीम् ।**
**गुरुः स्पृशेच्छिष्यतनुं स्पर्शदीक्षा भवेदियम् ॥१४.५३॥**

गुरूने स्वकरतलात मूलमंत्रजपपूर्वक शिवरूप गुरूचे ध्यान करावे व त्या हाताने शिष्यशरीरास स्पर्श करावा. ही स्पर्शदीक्षा होय.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही सद्गुरूंच्या हस्तस्पर्शानेच ईश्वर प्रकट होऊन साधक जन्ममृत्यूच्या अतीत होतो हे सांगून स्पर्शदीक्षेचे वर्णन करताना "दासबोधात" असे म्हटले आहे की–

**सद्गुरूचेनि अभयकरें। प्रकट होईजे ईश्वरें।**
**जन्मदुःखें अपारें। नासूनि जाति ॥५.१४०॥**

सद्गुरूंच्या या स्पर्शदीक्षेचे अपूर्वत्व वर्णन करताना "एकनाथी भागवतातील यदू-अवधूत संवादात" श्रीएकनाथमहाराज म्हणतात–

**तो अवधूत जाण दत्तात्रय। तेणें आलिंगूनि यदुराया।**
**निजरूपाचा बोधू तया। अनुभवावया दीधला ॥९.४२९॥**
**दत्तात्रेयशिष्यपरंपरा। सहस्रार्जुन यदु दुसरा।**
**तेणें जनार्दनू तिसरा। शिष्य केला खरा कलियुगीं ॥४३०॥**
**गुरुप्राप्तीलागीं सर्वथा। थोर जनार्दनासी चिंता।**
**विसरला तीन्ही अवस्था। सद्गुरु चिंतता चिंतनीं ॥४३१॥**
**देवो भावाचा भोक्ता। दृढ जाणोनी अवस्था।**
**येणें झालें श्रीदत्ता। तेणें हातु माथां ठेविला ॥४३२॥**

**हातु ठेवितांचि तत्काळ। बोधू आकळिला सकळ।**
**मिथ्या प्रपंचाचें मूळ। स्वरूप केवळ स्वबोधें ॥४३३॥**

श्रीएकनाथमहाराजांनी उपरोक्त ओव्यातून आपली शक्तिपातयोगाची परंपरा स्पष्ट केली असून "आदिनाथ ठेवणे सिद्ध परंपरा। जनार्दनी वेव्हारा एकनाथी॥" असे म्हणून आदिनाथांचे ठेवणे म्हणजे शक्तिपातयोग हा सिद्धपरंपरेने श्रीसद्‌गुरुनाथ जनार्दनस्वामींकडून आपणास कसा प्राप्त झाला हे स्पष्ट केले आहे. स्पर्शपूर्वक शक्तिपातदीक्षेची अपूर्वाई ही अशीच असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याचा फलासहित महिमा वर्णन करताना असे म्हटले आहे की–

**हें असो दिठी जयावरी झळके। कीं हा पद्मकरु माथां पारुखे।**
**तो जीवचि परी तुके। महेशेंसीं ॥१०.९॥**

स्पर्शदीक्षेने जीव हा साक्षात् शिवच होतो; कारण सद्‌गुरूंचा पद्‌मकर हा साक्षात् शिवाचाच हस्त असून तो ब्रह्म व प्रपंच म्हणजे चेतन व जड हे वेगळे करणारा अर्थात् सर्व पाश छेदणारा असतो हे सांगताना शास्त्रकारांनी असे वर्णन केले आहे की–

**ब्रह्मप्रपंचसंयुक्ता शिवेनाधिष्ठत: शिव:।**
**पाशच्छेदकर: क्षेमी शिवहस्त: प्रकीर्तित:॥**

स्पर्शदीक्षेचे व सद्‌गुरूंच्या पद्‌मकराचे हे सामर्थ्य, श्रीकृष्णांनी उद्धवाला स्पर्शदीक्षा कशी दिली हे वर्णन करताना, श्रीएकनाथमहाराज "एकनाथी भागवतात" म्हणतात–

**ते कृष्णकृपेस्तव जाण। फिटलें उद्धवाचें दुर्लभपण।**
**सगुण निर्गुण एक कृष्ण। हे खूण संपूर्ण बाणली ॥२१.५२८॥**
**जाणोनि कृष्णाचें पूर्णपण। त्याचे लक्षोनि श्रीचरण।**
**धांवोनि उद्धवें आपण। घाली लोटांगण हरिचरणीं ॥५२९॥**
**तेव्हां सावळा संकर्षण। चारी बाह्या पसरी श्रीकृष्ण।**
**उद्धवा सप्रेमें उचलून। दीधलें आलिंगन स्वानंदे ॥५३०॥**
**त्या आलिंगनाचें सुख। अनुभवी जाणती देख।**
**जो उद्धवासी झाला हरीख। त्याचा जाणता एक श्रीकृष्ण ॥५३१॥**

卐 卐 卐

**यालागी कृष्ण जगजेठी। उद्धवाची पाठी थापटी।**
**अतिगुह्याची गुह्य गोष्टी। तुझे कृपेसाठी मी बोलितों ॥११.१२७॥**
**पाठी थापटावयामिसें जाण। करीत स्वशक्तिसंचरण।**
**तेणें अद्वयबोधलक्षण। उद्धवासी जाण प्रकाशी ॥१२८॥**

सद्‌गुरुनाथ हे शिष्याचे सर्व संशय शब्दाने दूर करण्याचा प्रयत्न करतात;

परंतु ज्यावेळी शब्दांची मर्यादा संपतें व शिष्याचीही समजूत पटत नाही त्यावेळी योगवासिष्ठात विश्वामित्रांनी शक्तिपाताची जी स्तुती केली आहे, तिचा वशिष्ठां॰ प्रमाणे आश्रय घेऊन ते त्याचा संशय दूर करतात. " हे वसिष्ठ महाभाग ब्रह्मपुत्र महानसि। गुरुत्वं शक्तिपातेन तत्क्षणादेव दर्शितम् ॥ " या प्रमाणेच " जे भेदु एक आणि आम्ही। सांडावा एकीं ॥१०.३१९॥" असे म्हणून माझ्या विभूतीच्या ठिकाणी भेद मानू नको असे जे तुम्ही सांगितले ते मला पटत नाही; कारण तुम्ही भेद टाक म्हणून सांगता त्यावरून भेद एक निराळा व त्याचा त्याग करणारा मी एक निराळा असे द्वैत बाळगल्यासारखे झाले, याचे मला आश्चर्य वाटते, हा प्रश्न जेव्हा अर्जुनाने उपस्थित केला, तेव्हा या प्रश्नाला कोणतेही शाब्दिक स्पष्टीकरण न देता श्रीकृष्णांनी जो उपाय केला तो पाहण्यासारखा आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> **तेथ सावियाची परितोषोनि देवें। अर्जुनातें आलिंगिलें जीवें।**
> **मग म्हणे तुवां न कोपावें। आमुचिया बोला ॥१०.३२४॥**

स्पर्शदीक्षेने होणाऱ्या संशयनिवृत्तीचा हा उपाय पाहिला म्हणजे श्रीज्ञानेश्वर॰ महाराजांनी वारंवार ही गोष्ट घडल्याचे का सांगितले आहे याचा उलगडा होतो. स्पर्शदीक्षेचा हा संस्कार गुरुशिष्यात घडून येऊन दोघे एकरूप कसे होतात याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> **ऐसें म्हणौनि आलिंगिलें। कृपादृष्टी अवलोकिलें।**
> **मग देवो काय बोलिले। अर्जुनेंसीं ॥१५.४५३॥**
> **पैं दोहीं वोठीं एक बोलणें। दोहीं चरणीं एक चालणें।**
> **तैसें पुसणे सांगणे। तुझें माझें ॥४५४॥**
> **एवं आम्ही तुम्ही येथें। देखावें एका अर्थातें।**
> **सांगतें पुसतें येथें। दोन्ही एक ॥४५५॥**
> **ऐसा बोलत देवो भुलला मोहें। अर्जुनातें आलिंगूनि ठाये।**
> **मग बिहाला म्हणे नोहें। आवडी हे ॥४५६॥**

स्पर्शदीक्षा देताना होणारी सद्गुरूंची स्थिती, त्यामुळे शिष्याला होणारी प्राप्ती व गुरुशिष्य संबंधाची एकतानता यांचे यापेक्षा अपूर्व वर्णन दुसरा कोणी करू शकेल असे वाटत नाही.

येथपर्यंत स्थूल स्वरूपाच्या स्पर्शदीक्षेचे विवेचन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे केले ते आपण पाहिले. आता सूक्ष्मतर अशा दर्शन किंवा दृग्दीक्षेचे वर्णन त्यांनी कसे केले आहे ते पाहवयाचे आहे.

श्रीसद्गुरू निवृत्तिनाथमहाराजांनी दृग्दीक्षा देऊन आपल्याला कृतार्थ कसे केले याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

तुमचे या दिठिवेयाचिये वोलें । सासिन्नलें प्रसन्नतेचे मळें ।
ते साउली देखोनि लोळें । श्रांतु जी मी ॥९.४॥
कां जें दिठिवा तुमचा वरुषे । तें सकळार्थ सिद्धि मती पिके ।
एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके । जरी उदास तुम्हीं ॥२५॥

श्रीगुरुमहाराजांच्या कृपादृष्टीच्या ओलाव्यामुळे माझ्या अंतःकरणात प्रसन्नतेचें हिरवेगार मळे अगदी भरास आले आहेत. मी संसारतापाने अगदी पोळून गेलो होतो; परंतु त्यांची दृग्दीक्षा प्राप्त झाल्याबरोबर मी त्या कृपेच्या सावलीत अगदी आनंदाने लोळत आहे; कारण जेव्हा गुरूंच्या कृपादृष्टीचा म्हणजे दृग्दीक्षेचा साधकावर वर्षाव होतो तेव्हा सकलार्थाची सिद्धी करणारी बुद्धी उत्पन्न होते. मात्र अशी दृग्दीक्षा साधकाला मिळाली नाही; तर ज्ञानाचा फुटलेला अंकुरही सुकून जातो. सकलार्थाची याचा अर्थ असा आहे—सकल म्हणजे ब्रह्म. अर्थ म्हणजे पूर्ण अहंरूप आत्मपदार्थ होय. तो शिव-शक्तिदृष्टया द्वैत दिसला तरी परमार्थतः स्फुरणरूपाची अद्वैतरूपता होय. ह्याच अर्थाचा अर्थ "विश्वतदुत्तरोभयस्पंदतया पूर्णाहंभावस्वभावस्यार्थस्य अर्थ्यतें इति व्युत्पत्त्या सर्वप्रार्थ्यस्य वस्तुनः शिवशक्त्यादिभेदप्रथाप्ररोहेऽपि पारमार्थिकाद्वैतप्रथासतत्त्वां स्फुरत्तामुपदर्शयति ।" अशा प्रकारे "महार्थमंजरीत" महायोगी गोरक्षनाथांनी सांगितला आहे. म्हणजे ज्यावेळी दृग्दीक्षा होते तेव्हा शिवशक्तिरूप ब्रह्माची सिद्धी करणारे ज्ञान जागृत शक्तीच्या रूपाने साधकाच्या ठिकाणी उपस्थित होते.

दृग्दीक्षेने अर्थात् सद्गुरूंच्या नुसत्या दर्शनाने किंवा दृष्टिपाताने शक्तिसंचार कसा होतो हे पार्वतीला सांगताना श्रीमहादेवांनी "कुलार्णवतंत्रात" असे म्हटले आहे की—

स्वापत्यानि यथा मत्स्यो वीक्षणेनैव पोषयेत् ।
दृग्भ्यां दीक्षोपदेशश्च तादृशः परमेश्वरि ॥१४.३६॥

हे पार्वती ! मासा ज्याप्रमाणे आपल्या अपत्यांचे पालन केवळ प्रेमळ दृष्टीने करतो त्याप्रमाणे सद्गुरूंच्या केवळ कृपाकटाक्षाने शिष्यामध्ये शक्तिसंचार होऊन शिष्य कृतार्थ होतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "हें असो दिठी जयावरी झळके । तो जीवचि परि तुके । महेशेंसीं ॥ १०.९ ॥" असे म्हणून सद्गुरुरायांची दृष्टी ज्यावेळी साधकावर पडते किंवा झळकते त्यावेळी साधकाच्या जीवस्थितीचा भंग होऊन त्याची योग्यता शिवाइतकी होते; अर्थात् दृग्दीक्षेच्या प्रभावाने जीव शिवस्वरूप होतो, हे सिद्धांतरूपाने कथन केलें आहे.

या दृष्टीनेच "कुलार्णवतंत्रात" सद्गुरूंनी शिष्याला दृग्दीक्षा कशी द्यावी हे सांगताना असे म्हटले आहे की—

**निमील्य नयने ध्यात्वा परतत्त्व प्रसन्नधीः।**
**सम्यक् पश्येद्‌गुरुः शिष्यं दृग्‌दीक्षा च भवेत् प्रिये ॥१४.५५॥**

हे पार्वती ! गुरूने डोळे झाकून प्रसन्नमनाने परमतत्त्वाचे ध्यान करून त्या ध्यान साठविलेल्या नेत्रांनी शिष्याकडे नीट अवलोकन करावे. यालाच दृग्‌दीक्षा असे म्हणतात.

दृग्‌दीक्षेचा प्रभाव असा अपार आहे. सद्‌गुरुनाथ श्रीकृष्णांच्या दृष्टीचे किंवा डोळयांचे हे सामर्थ्य कल्पनातीत असल्याचे अर्जुनाला जाणवले. त्यांच्या डोळयांच्या द्वारा होणाऱ्या कृपादृष्टीच्या वर्षावामुळे शिष्याला प्रसादाची मंदिरे कशी प्राप्त होतात व त्यामुळे मोहाची गोष्ट कायमची दूर कशी होते, हे सांगून त्यांच्या दृग्‌दीक्षेच्या प्रभावाने अर्जुन कृपेच्या गाभाऱ्यात रिघून ब्रह्मरसाचे पान कसे करीत आहे, हा त्याचा अनुभव कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**आर्जी आनंदसरोवरींची कमळें। तैसे हे तुझे डोळे॥**
**आपुलिया प्रसादाचीं राउळें। जयालागीं करिती ॥११.६५॥**
**हां हो तयाही आणि मोहाची भेटी। हे कायसी पाबळी गोठी ?।**
**केउती मृगजळाची वृष्टी। वडवानळेंसी ? ॥६६॥**
**आणि मी तंव दातारा। ये कृपेचिये रिघोनि गाभारां।**
**घेत आहें चारा। ब्रह्मरसाचा ॥६७॥**
**तेणें माझा जी मोह जाये। एथ विस्मो कांहीं आहे ?।**
**तरी उद्धरलों कीं तुझे पाये। शिवतले आहाती ॥६८॥**

दृग्‌दीक्षेचे अर्थात् सद्‌गुरूंच्या दर्शनाचे किंवा भेटीचेही सामर्थ्य शिष्याला तद्वारा होणाऱ्या कृपेच्या संक्रमणाने कसे तारून नेते याचे वर्णन "अमृतानुभवात" करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**जो भेटलियासवें। पुरतीं उपायांचे धावे।**
**प्रवृत्तिगंगा स्थिरावे। सागरीं जिये ॥२.८॥**
**जयाचेनि अनवसरें। द्रष्टा ले दृश्याचे मोहरे।**
**जो भेटतखेंवो सरे। बहुरूप हें ॥९॥**
**जयाचा विठिवा वसंतु। जंव न रिघे निगमवना आंतु।**
**तंव आपुलिया फळा हातु। न घापती ॥१८॥**
**पुढें विठीचेनि अलगें। खांचि की निवटी मागें।**
**एव्हडिया जैता ने घे। आपणपें जो ॥१९॥**

या चारही ओव्यांवर "अमृतानुभव-पद-बोधिनी" नावाच्या टीकेत अर्थासह भाष्य करताना श्रीरघुनाथस्वामींकडून शक्तिपातदीक्षेने स्वतः कृतार्थ झालेले श्रीनिरंजन रघुनाथ म्हणतात, "जो भूमास्वरूप गुरु भेटला असतां, अपरोक्षत्वेंकरून

अनुभविला असतां, मोक्षविषयीं श्रवणमननादिक नाना उपायांचे धावे पुरती, यत्न सरतात; कां जे,शिष्य जो तो मोक्षरूप आपणचि होतो म्हणून.आणखी प्रवृत्ति म्हणजे प्राक्प्रवणवृत्ति हेचि कोण्ही एक गंगा जे ती आनंदसिंधु अपारावार गुरु तल्लक्षण सागर जो त्याचे ठायीं स्थिरावे, विलयातें पावते. ( ८ ) ज्या गुरूच्या अनवसरें, अदर्शनास्तव ऐसें घडतें. जैसा बहुरूपी जो तो अनेक पक्ष्यांचे परांचा टोप करून, आपले अंगावर घेऊन विचित्र पक्षिरूप दिसतो; तैसा द्रष्टा जो तो दृष्याचे मोहरे म्हणजे पंचभूतांची खोळ हा देह जो त्यातें लेऊन, धारण करून, आपणातें देहत्वें मानितो. त्यातें ब्रह्मरूप गुरु भेटतखेंवो, भेटते क्षणींच हें बहुरूप म्हणजे दृश्य-दर्शन-द्रष्टा हे त्रिपुटी सरती, निःशेष नाहींसी होती. ( ९ ) ज्या श्रीगुरूचा दिठिवा म्हणजे अनुभवरूप ज्ञानदृष्टि हाच कोण्ही एक अलौकिक वसंतकाल होय, तो श्रीगुरुप्रसादें प्राप्त नसतां जिवाचें मोक्षरूपफल निगमवनाचे ठायीं असतांही बापुडे जीव जे ते आत्मफलातें हात न घापति म्हणजे अंतःकरणवृत्तीनें स्वत्वेंकरून अनभवूं शकत नाहींत; कारण जे, निगम म्हणजे वेदान्तशास्त्र जें तें वनासारिखें परम दुर्गम होय, म्हणून कदाचित् शब्देंकरून ब्रह्म जाणितलें तरी त्याची ओळखी नाहीं म्हणोनि परोक्ष राहतें. याजकरितां श्रीगुरुकृपाकटाक्षें आत्मओळखी करून अनंतर अनुभव-दृष्टीनें शास्त्रांत पाहू गेलें असतां ठायीं ठायीं ब्रह्मदर्शनचि होतें. तस्मात् श्रीगुरु-दृष्टिरूप वसंतकालाची प्राप्ती पाहिजे. ( १८ ) आतां श्रीगुरूची अघटित करणी आणि निरभिमानित्व वर्णितात, शिष्य जो त्याचे दृष्टीचे पुढील अलगें म्हणजे दृष्टीचे पुढले बाजूला जें दृश्य दिसत होतें त्यातें खाचि म्हणजे नाशतें पावविती, कीं सवेंचि माघील द्रष्टा जो त्यातें निवटी म्हणजे नाशातें पावविती. एवं शिष्याचे ब्रह्मानुभवप्रसंगीं दृश्यद्रष्ट्रत्व नाहींसें करून ऐसा जय मिळविला. परंतु एव्हडिया जैता, जयाभिमानातें श्रीगुरु आपुले ठायीं धारण करीत नाहीं. कारण जे आपली अद्वितीय परमात्मरूपता स्मरतो म्हणून. " (१९)

दृग्दीक्षेनंतर कुंडलिनी शक्ती जागृत होऊन सुषुम्नामार्गाने ऊर्ध्वस्थ होऊ लागली की, साधकाला एक प्रकारची उदासीनता किंवा वैकल्य प्राप्त होते. संसाराच्या विलीनीकरणाने येणारे हे वैकल्य किंवा मनाची विकल अवस्था ही "उदासीनता तत्त्वतां सार आहे ।। ५७ ।। " या प्रमाणे श्रीसमर्थांनी 'मनाच्या श्लोकात" म्हटल्याप्रमाणे साररूप व उच्च अवस्था असली तरी ती साधकाला सोसत नाही. यादृष्टीने अर्जुनाची स्थिती कशी झाली हे त्याच्याच मुखातून स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> बाप साक्षात्काराचा वेधु । कैसा देशधडी केला बोधु ।
> हा गुरुशिष्यसंबंधु । विपायें नांदे ।।११.३७०।।
> देवा तुझ्या ये दर्शनीं । जें वैकल्य उपजलें आहे अंतःकरणीं ।
> ते सांवरावयालागीं गंवसणी । धैर्याची करितसें ।।३७१।।

सद्‌गुरूंच्या नुसत्या दर्शनाने दृग्‌दीक्षा किंवा वेधदीक्षा संपन्न होऊन साधक कृतार्थ कसा होतो याचे वर्णन करताना "श्रीशारदातिलक" या तंत्र ग्रंथात असे म्हटले आहे की–

ततो वेधमयीं वक्ष्ये दीक्षां संसारमोचिनीम् ।
ध्यायेच्छिष्यतनोर्मध्ये मूलाधारे चतुर्दले ॥५.१२८॥
त्रिकोणमध्ये विमले तेजस्त्रयविजृम्भिते ।
वलयत्रयसंयुक्तां तडित्कोटिसमप्रभाम् ॥१२९॥
शिवशक्तिमयीं देवीं चेतनामात्रविग्रहाम् ।
सूक्ष्मां सूक्ष्मतरां शक्तिं भित्वा षट्चक्रमंजसा ॥१३०॥
गच्छंतीं मध्यमार्गेण दिव्यां परशिवावधि ॥१३१॥
सहैवमात्मनः शक्तिं वेधयेत्परमेश्वरे ।
गुर्वाज्ञया छिन्नपाशस्तदा शिष्यः पतेद्भुवि: ॥१३९॥
संजातदिव्यबोधोऽसौ सर्वं विंदति तत्क्षणात् ।
साक्षात् शिवोभवेत्येष नात्र कार्या विचारणा ॥१४०॥
एषा वेधमयी दीक्षा सर्वसंवित्प्रदायिनी ॥१४१॥

आता संसार-बंधनाचा नाश करणारी वेधमयी दीक्षा कशी होते ते सांगतो. मूलाधारातील चतुर्दल कमलातील तीन रंगांनी युक्त असलेली, तेजत्रयाने देदीप्यमान बनलेली, त्रिकोणरूपी योनिस्थानात राहणारी, त्रिवलयाकार, कोटी-कोटी विद्युत-पुंजांप्रमाणे महाप्रकाशाने युक्त, शिवशक्तिमयी, चेतनारूपी शरीराची व सूक्ष्माहून सूक्ष्म असलेली अशा कुंडलिनी शक्तिदेवीचे सद्‌गुरूंनी शिष्याच्या शरीरामध्ये ध्यान करावे. नंतर त्या दिव्य शक्तीला जागृत करून अर्थात् तिचा वेध करून तिचा मध्यमार्गरूपी सुषुम्नेत प्रवेश करून षट्चक्रांचा वेध करावा व तिला पराशिवामध्ये विलीन करावे. अशा प्रकारे सद्‌गुरूंनी आपल्या आत्मशक्तीचा संचार करून शिष्याला परमेश्वराच्या स्वरूपाचा बोध करून त्याला त्यातच स्थिर करावे. ज्यावेळी गुर्वाज्ञेने म्हणजे शक्तिसंचाराने शिष्याच्या पाशांचा छेद किंवा नाश होतो त्यावेळी आवरण विरहित झालेली शक्ती वर उसळत असल्याने व तो वेग शिष्याला सहन होत नसल्याने त्याचे शरीर जमिनीवर पुढे अगर मागे पडते. त्यावेळी शिष्याच्या ठिकाणी दिव्य बोध म्हणजे मीच ब्रह्म आहे असे ज्ञान उत्पन्न होते व एका क्षणात् तो सर्वकाही जाणतो. या वेधदीक्षमुळे शिष्य साक्षात् शिवच होतो. याबद्दल कोणताही संशय घेण्याचे कारण नाही. शिष्याला सर्वप्रकारचे चैतन्य प्रदान करणारी अशी ही वेधमयी दीक्षा आहे.

सद्‌गुरूंच्या या दृग्‌दीक्षेचा, दर्शनाचा किंवा कृपादृष्टीचा अद्‌भुत महिमा अत्यंत बहारदारपणे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

जय जय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनवरत आनंदें । वर्षतिये ॥१२.१॥
विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताठी ।
ते तुझिये गुरुकृपादृष्टी । निर्विष होय ॥२॥
तरी कवणातें तापु पोळी । कैसेनि वो शोकु जाळी ।
जरी प्रसादरस कल्लोळीं । पुरें येसि तूं ॥३॥
योगसुखाचे सोहळे । सेवकां तुझेनि स्नेहाळे ।
सोऽहंसिद्धीचे लळे । पाळिसी तूं ॥४॥
आधारशक्तिचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं ।
हृदयाकाशपल्लकीं । परियें देसी निजें ॥५॥
प्रत्यक्ज्योतीचीं वोवाळणीं । करिसी मनपवनाचीं खेळणीं ।
आत्मसुखाचीं बाळलेणीं । लेवविसी ॥६॥
सतरावियेचें स्तन्य देसी । अनुहताचा हल्लरु गासी ।
समाधिबोधें निजविसी । बुझाऊनि ॥७॥
म्हणोनि साधकां तूं माउली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं ।
या कारणें मी साउली । न संडीं तुझी ॥८॥
अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥९॥

हे दृग्दीक्षे किंवा हे गुरुकृपादृष्टी माते ! तुझा जयजयकार असो. तू शुद्ध आहेस. तू अत्यंत उदार म्हणून प्रसिद्ध आहेस. शिष्यावर तू निरंतर आनंदाचा वर्षाव करतेस. विषयरूपी भयंकर सर्पाने जीवाला मिठी मारून वेढून टाकल्यामुळे त्याला आत्मविस्मृतिरूप मूर्च्छा येते. ती कशानेही नाहीशी होत नाहीं; परंतु ज्यावेळी सद्गुरूंचे दर्शन होऊन ते आपल्या कृपादृष्टीचा वर्षाव करतात म्हणजे दृग्दीक्षा देतात त्यावेळी त्यांच्या या दृष्टिपातानेच अर्थात् शक्तिसंक्रमणानेच विषयरूपी सर्पाचे विष उतरून ती मूर्च्छा नाहीशी होते. या दृग्दीक्षेचा महिमा अपार आहे. ज्यावेळी सद्गुरूंच्या अंतःकरणात साधकाच्याविषयी कृपाप्रेमाचा पूर येऊन त्याच्या लाटा उसळू लागतात तेव्हा हे कृपाप्रेम दृष्टिद्वारा स्रवून शिष्याच्या ठिकाणी संक्रात होते. यालाच प्रसादरस म्हणजे शक्तिपातयुक्त दृग्दीक्षेद्वारा प्राप्त होणारे प्रेम असे म्हणतात. त्यावेळी संसारातील त्रिविध ताप साधकाला पोळू किंवा तप्त करू शकत नाहीत; कारण तो आधीच शांत झालेला असतो. त्याचप्रमाणे प्रियवस्तूचा वियोग व अप्रियवस्तूचा संयोग यांच्या विषयीचा शोक त्याला जाळू शकत नाही.

हे स्नेहाळे दृग्दीक्षे ! तुझ्या कृपेमुळेच साधकाला कोणत्याही प्रकारचे सायास

न करता योगसुखाचे सोहळे भोगावयास मिळतात. तू साधकाची कुंडलिनी शक्ती जागृत करून त्याला अत्यंत प्रेमाने व सहजतेने योगाचा आनंद उपभोगवीत उन्नती पथावर नेत असतेस. 'मीच ब्रह्म आहे' अशी साधकाची बोधाच्या अंतिम सिद्धीची हौसही तू पूर्ण करतेस. तूच आधार शक्तीच्या अंकावर साधकाला जीवरूपाने बैसवून मोठ्या लीलीने व कौतुकाने त्याचा सुषुम्नामार्गात प्रवेश करून त्याला वर वर नेत वाढवितेस म्हणजे विकास करून शिवस्वरूप करतेस. षट्चक्रांचा वेध होत होत जेव्हा शक्ती वर जाते तेव्हा ती हृदयाकाशात म्हणजे आज्ञाचक्रात येते. तेथे साधकाला आपल्या शुद्ध आत्मस्वरूपाचे ज्ञान होते. हे कृपादृष्टी माते ! तू साधकाला हृदयाकाशरूपी पाळण्यात घालून त्याला गुह्य उपदेशाचे अर्थात् आत्मस्वरूपाच्या ऐक्याचे झोकेच देतेस. तू आपल्या दीक्षेच्या सामर्थ्याने जीवाला स्थलकालदिशांपलीकडील आत्मतत्त्वरूपी ज्योतीची अर्थात् शिवरूपाची म्हणजे ब्रह्मात्मैक्यज्ञानप्रकाशरूप आत्मज्योतीची ओवाळणी घालतेस. याचा अर्थ असा की, देहापासून बुद्धीपर्यंत जेवढी सूक्ष्म तत्त्वे आहेत; त्या सर्वांच्या अंतर्यामी राहणाऱ्या चैतन्याची या दृग्दीक्षेमुळे साधकाला प्राप्ती होते. तू साधकाला मन व प्राणरूपी खेळणी देतेस. अर्थात् या दीक्षेमुळे एकाच नाण्याच्या दोन बाजूंप्रमाणे एकस्वरूप असलेले मन व प्राण हे खेळण्याप्रमाणे साधकाच्या स्वाधीन होऊन राहतात. एखाद्या लहान बाळाला आईने अलंकार घालावेत त्याप्रमाणे ही दृग्दीक्षारूपी माता आत्मसुखरूपी अलंकार किंवा बाळलेणी साधकाला घालते. तूच साधकाची शक्ती ऊर्ध्वगामी करून त्याला सहस्रारांतर्गत व्योमचक्रातील अमृत, स्तनातून दूध पाजावे त्याप्रमाणे पाजतेस. हे करण्यापूर्वी तू साधकाला नाना तऱ्हेचे अनाहत ध्वनी ऐकवून हळूहळू त्याला त्यामध्ये लीन करून शेवटी शिवशक्तीचे ऐक्य घडवून आणून व मनाचा लय करून समाधिसुखाच्या बोधामध्ये म्हणजे स्वस्वरूपात निजवितेस. (याचा अर्थ असा की, प्राण अंशतः सुषुम्नेतून वर जाऊ लागते की, नाडीशुद्धी होते. त्यामुळे नाना तऱ्हेचे अनाहत नाद शरीरात उत्पन्न होतात. त्या नादाकडे मन आकर्षित होऊन त्यात ते लीन होते. अशा प्रकारे मन प्राणात लीन होऊन सहस्रारात गेले म्हणजे समाधी लागते. तेथे शिवशक्तीचे ऐक्य होऊन साधकाला नामरूपातीत दिव्य अवस्था प्राप्त होते. ही वास्तविक ज्ञानाची भूमी आहे; कारण येथेच मी ब्रह्म आहे असे ज्ञान साधकाला उत्पन्न होऊन तो या ज्ञानामुळे मुक्त होतो. प्राण व मन पुन्हा खाली आले तरी हे ज्ञान राहते. त्यामुळे देह असला तरी साधक मुक्तच असतो.) म्हणून हे गुरुकृपादृष्टे ! तुझ्यामुळे जे अंतरंग साधन प्राप्त होते त्यामुळे तू साधकांचा सतत सांभाळ करणारी आई आहेस. तुझ्या चरणकृपेने जेव्हा कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा सर्व प्रकारच्या विद्या साधकाला प्राप्त होतात; कारण ही शक्ती सर्व विद्यानिधी असून तिच्या जागृतीनेच सर्व विद्या फलीभूत होतात. म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराज

म्हणतात की, मी दृग्दीक्षेने उपस्थित होणाऱ्या साधनाची कृपारूप सावली कधीही सोडणार नाही अर्थात् जागृतशक्ती गुरुरूपाने साधकावर नेहमी सावलीच धरीत असते. हे सद्गुरू कृपादृष्टे ! तुझी ज्याच्यावर दया होते तो सर्व विद्यारूप सृष्टीचा उत्पन्नकर्ताच होतो.

सद्गुरूंच्या, संतांच्या, महात्म्यांच्या किंवा तत्सम शक्तिसंक्रमणाधिकाऱ्यांच्या दृष्टीचा हा महिमा लक्षात घेतला म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराज संतमंडळींची जी प्रार्थना करीत आहेत त्यातील गर्भितार्थ लक्षात येईल. ते म्हणतात–

तुम्ही संत माझिया कडा । दिठीचा कराल बहुडा ।
तरी तुम्हां माने येवढा । होईन मी ॥१६.४७२॥

परंतु या बाबतीतील त्यांचा आत्मविश्वास अपार आहे; कारण त्यांचे सद्गुरुनाथ श्रीनिवृत्तिनाथमहाराज हे सिद्धयोग संप्रदायप्रणीत दृग्दीक्षेने श्रीगहिनीनाथांकडून गुरुसाम्ययुक्त शक्तिपातदीक्षेने कृतार्थ झाले असल्यामुळे त्यांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनाही उपरोक्त पद्धतीनेच कृतार्थ केले होते. अशी वास्तविक स्थिती असल्यामुळे ते म्हणतात–

चंदनें वेधलीं झाडें । जालीं चंदनाचेनि पाडें ।
वसिष्ठें मानिली कीं भांडें । भानूसीं शाटी ॥१८.१७३२॥
मा मी तव चित्ताथिला । आणि श्रीगुरु ऐसा दादुला ।
जो दिठीवेनि आपुला । बैसवी पदीं ॥१७३३॥
आधींचि देखणी दिठी । वरी सूर्य पुरवी पाठी ।
तैं न दिसे ऐसी गोठी । केंही आहे ? ॥१७३४॥

अशा प्रकारे सद्गुरूंच्या नुसत्या दर्शनाने अर्थात् दृष्टिपाताने म्हणजे दृग्दीक्षेने साधक कृतार्थ होऊन आत्मस्वरूपाशी एकरूप होतो. एखाद्या पाटीवर लिहिलेली अक्षरे जशी हाताने पुसता येतात त्याप्रमाणे सद्गुरूंच्या एका कृपाकटाक्षपाताने साधकाची द्वैत किंवा भेदावस्था पार नाहीशी होते. दृग्दीक्षेचे हे सामर्थ्य व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

पाटियेवरील अक्षरें । जैसीं पुसतां येती करें ।
तैसीं हारपती भेदांतरे । तयाचिये दृष्टी ॥१८.१०९९॥

आता श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सूक्ष्म स्वरूपाच्या शब्ददीक्षेचे विवेचन कसे केले आहे ते पाहू. सद्गुरूंच्या शब्दाबरोबर शक्ती संक्रमित होऊन शिष्याच्या ठिकाणी आपण ब्रह्म आहोत असा भाव जेव्हा उदित होतो तेव्हा शब्ददीक्षा घडून येते. अशा या शब्ददीक्षेचे व तिच्या सामर्थ्याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जयाचेनि वाक्य उजिवडें। जाहलें चित्त निधडें।
ब्रह्माचेनि पाडें। निःशंकु होय ॥४.१६८॥
तें वेळीं आपणपेयां सहितें। इयें अशेषेंही भूतें।
माझ्या स्वरूपीं अखंडितें। देखसी तूं ॥१६९॥
ऐसें ज्ञानप्रकाशें पाहेल। तैं मोहांधकारु जाईल।
जें गुरुकृपा होईल। पार्था गा ॥१७०॥

हे अर्जुना ! ज्यावेळी सद्गुरू शिष्याला तत्त्वमसि इत्यादि महावाक्याच्या द्वारा म्हणजे शब्दाचा आधार घेऊन दीक्षा देतात अर्थात् शक्तिसंक्रमण करतात त्यावेळी त्याचे चित्त म्हणजे कुंडलिनी शक्ती निधडी होते म्हणजे निर्धोकपणे अगर निःशंकपणे सुषुम्नामार्गाने ऊर्ध्वगमन करू लागते. यालाच उजिवडे म्हणजे ज्ञानाचे प्रकाशणे असे म्हणतात. त्यामुळे साधक सहस्रारातील ब्रह्मस्वरूपाप्रमाणे निःशंक होतो. शक्तीच्या स्वरूपाने असलेले जीवचैतन्य जेव्हा सहस्रारात शिवाशी एकरूप होते तेव्हा ते ब्रह्मासारखेच निर्भय किंवा निःशंक होते; कारण एकरूपात भय नसते. "द्वितीयात् वै भयं भवति" असा शास्त्रकारांचा सिद्धांत आहे. अशा प्रकारे ही शब्ददीक्षा झाली की, तत्काळ ब्रह्मज्ञान उत्पन्न होऊन तू आपल्यासह सर्व जग भगवत्स्वरूप आहे असे नेहमी पाहू लागशील. अशा रीतीने जेव्हा श्रीगुरुंची शब्द-दीक्षारूप कृपा होईल तेव्हा शक्तिसंक्रमण होऊन मलविक्षेपआवरणादि सर्व दोष जळून जाऊन तुझ्या अंतःकरणात जागृत शक्तीच्या रूपाने ज्ञानप्रकाशाचा उदय होऊन मोहरूपी अंधकार पूर्णपणे नाहीसा होईल.

शास्त्रकारांनीही शब्ददीक्षेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

निशम्य कोकिलाशब्दं कोकिलः काकपालितः।
स्वीयां जातिं विजानाति गुरुवाक्यश्रवात्तथा।
स्वीयं स्वरूपं विज्ञाय शिष्यो ब्रह्मत्वमश्नुते ॥

हेच दुसऱ्या शब्दात सांगताना त्यांनी असे म्हटले आहे की–

यथा पिको वायसरक्षितः स्वां श्रुत्वा पिकारावमवैति जातिम्।
शिष्यस्तथा देशिकवाक्प्रभवात् परं पदं वेत्त्यचिरादशंकम् ॥

कावळ्यांच्यामध्ये पाळलेलेले कोकिळेचे पिल्लू कोकिळेचा शब्द ऐकताच मी कावळा नसून कोकीळ आहे असे ओळखते. त्याप्रमाणे तू ब्रह्म आहेस असे सद्गुरू म्हणताच शिष्याच्या ठिकाणी तो भाव उदित होऊन जेव्हा त्यास तसा अनुभव येतो तेव्हा त्याला शब्ददीक्षा म्हणतात.

यादृष्टीने श्रीकृष्णांकडून अर्जुनाला शब्ददीक्षेचा लाभ होऊन तो कृतार्थ कसा झाला हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जेथ तद्ब्रह्मवाक्यफळें । जिये नानार्थरसें रसाळें ।
बहकताती परिमळें । भावाचेनि ॥७.१८६॥
सहज कृपामंदानिळें । कृष्णद्रुमाची वचनफळें ।
अर्जुन श्रवणाचिये खोळे । अवचित पडलीं ॥१८७॥
तियें प्रमेयाची हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकळिलीं ।
मग तैसीचि कां घोळिलीं । परमानंदें ॥१८८॥
तेणें बरवेपणें निर्मळें । अर्जुना उन्मेषाचे डोहळे ।
घेताति गळाळे । विस्मयामृताचे ॥१८९॥
तिया सुखसंपत्ती जोडलिया । मग स्वर्गा वाती वांकुलिया ।
हृदयाच्या जीवीं गुतकुलिया । होत आहाती ॥१९०॥
ऐसे वरचिलीची बरवा । सुख जावों लागलें फावा ।
तंव रसास्वादाचिया हांवा । लाहो केला ॥१९१॥

भगवंताच्या बोलण्यात तद्ब्रह्म इत्यादि ब्रह्मप्रतिपादक वाक्यरूपी फळे आली. या वाक्यरूप फळांचे सामर्थ्य अद्भुत व अपार होते. ती वाक्यफळे ब्रह्मप्रतिपादक अशा नाना अर्थानि व रसाने भरलेली होती. भगवंताच्या मुखातून जी जी अक्षरे निघत होती ती ती शक्तिसहित संक्रमित होत असल्याने अर्जुनाच्या अंतःकरणात त्यामुळे भक्तिप्रेमाचा सुगंध दरवळू लागला. अर्जुनावर असलेल्या भगवंताच्या स्वाभाविक कृपारूपी मंदवायूमुळे श्रीकृष्णरूपी वृक्षाची वचनरूपी फळे अर्जुनाच्या कानरूपी झोळीत अकस्मात पडली. ती शक्तियुक्त वाक्यरूपी फळे सिद्धांताची वनविलेली, ब्रह्मरसाच्या समुद्रात बुडविलेली व परमानंदात घोळलेली होती. अशा त्या शुद्ध व उत्कृष्ट वाक्यांनी अर्जुनाच्या अंतःकरणाचा वेध घेतला. त्याबरोबर शक्ती जागृत होऊन त्याच्या ठिकाणी "मी ब्रह्म आहे" असे ज्ञान उत्पन्न झाले. (शक्तिजागृती व अहं ब्रह्मास्मि ज्ञानाचा उदय या दोन्ही गोष्टी एकच आहेत.) इतकेच नव्हे तर या शब्ददीक्षेमुळे अर्जुनाला अनेक दिव्य अनुभव येऊ लागल्यामुळे तो विस्मयामृताच्या डोहामध्ये बुडून गेला. अशा दिव्य अनुभवांच्या रसाळ स्वादाच्या सुखाने अर्जुन संपन्न झाल्यामुळे त्याला स्वर्गसुख तुच्छ वाटू लागले. शब्ददीक्षेमुळे जे अपूर्व अनुभव अर्जुनाला आले त्यामुळे त्याचे अंतःकरण एका अनिर्वचनीय आनंदाने भरून जाऊन त्याला गुदगुल्या होऊ लागल्या. अशा रीतीने भगवंताच्या तोंडून निघालेल्या शब्दांमुळे अगदी सुरुवातीलाच वरवर पाहता पाहता अर्जुनाच्या मनात सुख उचंबळून आले; परंतु या वरवरच्या सुखकारक अनुभवांचा जो ब्रह्मरूप शेवट, त्या ब्रह्मरसाचा स्वाद घेण्याची त्याला उत्कट इच्छा झाली. ती त्याची इच्छा पूर्ण झाली; कारण श्रीकृष्णांच्या मुखातून निघालेल्या शब्दांचे सामर्थ्य इतके अपूर्व होते की, विस्मयालाही विस्मय वाटला.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी "दासबोधात" सद्‌गुरूंच्या शब्दाने शक्तिपातदीक्षा होऊन साधक ज्ञानसंपन्न कसा होतो हे सांगताना असे म्हटले आहे की—

जैसे नेत्रीं घालितां अंजन। पडे दृष्टीस निधान।
तैसें सद्‌गुरुवचनें ज्ञान—। प्रकाश होय ।।५.१.३८।।
अरे गहनाचेंहि गहन। तें तूं जाण सद्‌गुरुवचन।
सद्‌गुरुवचनें समाधान। नेमस्त आहे ।।५.६.३९।।
सद्‌गुरुवचन तोचि वेदान्त। सद्‌गुरुवचन तोचि सिद्धांत।
सद्‌गुरुवचन तोचि धादांत। सप्रतीत आतां ।।४०।।
जें अत्यंत गहन। माझे स्वामीचें वचन।
जेणें माझें समाधान। अत्यंत जाहलें ।।४१।।
तें हें माझे जीवीचें गुज। मी सांगेन म्हणतों तुज।
जरी अवधान देशी मज। तरी आतां येच क्षणीं ।।४२।।
तंव शिष्य म्लानवदनें बोले। धरिली सदृढ पाउलें।
मग बोलों आरंभिलें। गुरुदेवें ।।४३।।
अहं ब्रह्मास्मि महावाक्य। तेथींचा अर्थ अतर्क्य।
तोही सांगता ऐक्य। गुरुशिष्य जेथें ।।४४।।
ऐक शिष्या येथींचे वर्म। स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म।
येविषयीं संदेह भ्रम। धरूंच नको ।।४५।।

सद्‌गुरूंच्या वचनाचे किंवा शब्दाचे हेच सामर्थ्य आपल्या काव्यमय भाषेत कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

झडकरी अनुमानाचेनि करतळें। घेऊनि तियें वाक्य फळें।
प्रतीतिमुखीं एके वेळे। घालूं पाहे ।।७.१९२।।
तंव विचाराचिया रसना न द्राटती। परी हेतूच्या दशनीं न फुटती।
ऐसें जाणौनि सुभद्रापती। चुंबिचिना ।।१९३।।
मग चमत्कारला म्हणे। इयें जळींचीं मा तारांगणें।
कैसा झकविलों असलगपणें। अक्षरांचेनि ।।१९४।।
इयें पदें नव्हती फुडिया। गगनाचिया घडिया।
येथ आमुची मति बुडालिया। थावो न निघे ।।१९५।।
वांचूनि जाणावयाची कें गोठी। ऐसें जीवीं कल्पूनि किरीटी।
तिया पुनरपि केली दृष्टी। यादवेंद्रा ।।१९६।।
मग विनविलें सुभटें। हां हो जी ये एकवाटे।
सातही पदें अनुच्छिष्टें। नवलें आहाती।।१९७।।

एऱ्हवीं अवधानाचेनि वहिलेपणें। नाना प्रमेयांचे उगाणें।
काय श्रवणाचेनि आंगवणें। बोलों लाहाती ? ॥१९८॥
परी तैसें हें नोहेचि देवा। देखिला अक्षरांचा मेळावा।
आणि विस्मयाचिया जीवा। विस्मयो जाला ॥१९९॥
कानाचेनि गवाक्षद्वारें। बोलाचे रश्मी अभ्यंतरें।
पाहेना तंव चमत्कारें। अवधान ठकलें ॥२००॥

श्रीकृष्णांनी अर्जुनाला शब्ददीक्षा दिल्यावर अर्जुन या दीक्षेची शब्दरूपी फळे तर्काच्या कसोटीवर घासून ती अनुभवरूपी मुखात एकदम घालावयास पाहू लागला; परंतु ही शब्ददीक्षेची फळे विचाररूपी जिभेने घेता येईनात व हेतुरूपी दातांनी ती फळे फुटेनात, हे पाहून अर्जुन ती वाक्यरूपी फळे तोंडास लावीना. याचा अर्थ असा की,शब्दाने होणारी शक्तिपात दीक्षा ही तर्क, विचार व हेतू यांनी स्पष्ट किंवा सिद्ध होणारी गोष्ट नसून तिची अनुभूती घ्यावी लागते. परंतु जेव्हा साधक तर्कादि विचारांच्या दुष्ट जाळ्यात गुंतून जातो तेव्हा तो फक्त चिकित्साच करीत बसतो व त्यांच्या आधाराने प्रतीतीच्या मुखात ही गोष्ट तो घालण्याची इच्छा करतो; परंतु प्रत्यक्ष चुंबिचिना अशी त्याची स्थिती असते. यामुळे चमत्कार वाटून अर्जुन म्हणाला की,श्रीकृष्णांच्या मुखातील हे शब्द किंवा ही वाक्ये म्हणजे पाण्यात पडलेल्या ताऱ्यांचे प्रतिबिंबच आहे. मी या अक्षरांच्या सुलभपणाने त्यांना फळे समजून कसा फसलो ! वास्तविक दृष्टचा स्वसंवेद्य आत्मस्वरूपता किंवा संपूर्ण शिवात्मकताच शब्दाने संक्रमित होऊन कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने शिष्याच्या ठिकाणी प्रतिबिंबाप्रमाणे प्रस्फुटित व्हावयाची असते; परंतु शब्द, वाक्ये किंवा कृपा ही प्रत्यक्ष फळाप्रमाणे चाखता येत नाही व तद्द्वारा होणारी दीक्षा ही नुसत्या विचारांच्या किंवा तर्काच्या कक्षेत येत नाही. अर्जुन म्हणतो, वास्तविक रीत्या ही खरोखर अक्षरांची पदे किंवा वाक्ये नसून हे शब्द म्हणजे केवळ आकाशाच्या घड्याच आहेत. येथे आमच्या बुद्धीने कितीही जरी बुड्या मारल्या तरी तिला सद्गुरूंच्या शब्दाचा थांग लागावयाचा नाही. याचे कारण शब्द म्हणजे शक्ती ही अर्थाचा म्हणजे ब्रह्माचा महिमा पूर्णपणे व्यक्त करू शकत नाही. मात्र शब्द अर्थात् शक्ती ही आपल्यात सामावलेल्या शिवाच्या अत्यंत निगूढ व अपार वैभवाचे दिग्दर्शन मात्र करते. मूळ किंवा परशब्द हीच महाशक्ती कुंडलिनी असून ती अगणित अर्थांच्या समाहारात्मक ब्रह्म किंवा भूमास्वरूपाला आपल्या अंतःस्तरात लपवून राहिलेली असते. या शब्दात्मक शक्तीला व अर्थात्मक शिवाला महामिथुन किंवा दिव्य दम्पती म्हणतात. त्यामुळे शब्द हे रूपाचे किंवा अर्थाचे म्हणजे ब्रह्मप्राप्तीचे एक महान् साधन असून ज्यावेळी सद्गुरु शब्दांच्या आश्रयाने

शक्तीचा पात शिष्यावर करतात त्यावेळी शब्दरूप कुलकुंडलिनी शक्ती जागृत होऊन साधक धन्य होतो व त्याला पुन्हा कधीही दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी येत नाही. ज्यावेळी ही शब्दशक्ती शिष्यदेहात प्रवेश करते अर्थात् बोलाच्या रश्मी अभ्यंतरात प्रवेशतात तेव्हा प्राणांवरील जन्मजन्मांतरी संचित झालेल्या मलाचे क्षालन होऊन स्वाभाविक शक्तीचा स्रोत उद्‌घाटित होतो. या सर्व विवेचनावरून शब्दाचा वेध करणे किती कठीण आहे व शब्दवेधाशिवाय वस्तुरूप अर्थाची प्राप्तीही होत नाही, हे सिद्ध होते. अशी स्थिती असल्यामुळे ती वाक्ये जाणावयाची गोष्ट कशाला ? असा अर्जुनाने मनात विचार करून पुन्हा यादवेंद्र श्रीकृष्णांकडे दृष्टी केली. मग अर्जुनाने विनंती केली की, " हे देवा ! ब्रह्म,अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैवत, अधियज्ञ व अंतकाली होणारे स्मरण ही सातही पदे सारखीच अनुच्छिष्ट म्हणजे अर्थभेद न होता राहिली, अशी ती आश्चर्यकारक व नवलपूर्ण आहेत. सहज विचार करून पाहिले तर, या सात पदातील निरनिराळ्या प्रमेयांचा उलगडा वेगाने अवधान देऊन श्रवण केले तरी त्या श्रवणाच्या बलाने बोलून दाखवून करता येईल असे मला वाटत नाही. शब्दाच्या नुसत्या श्रवणाने अर्थबोध व प्रमेयप्राप्ती होत नाही. त्यासाठी तो शक्तीसह संक्रमित व्हावा लागतो. शब्दबोधाची अशी प्रक्रिया घडली म्हणजे शक्ती जागृत होऊन अर्थबोध म्हणजे शिवप्राप्ती होते. परंतु श्रीकृष्णांच्या मुखातून बाहेर पडलेले शब्द हे असे असल्यामुळे अर्जुन म्हणतो, आपले शब्द हे शक्तिहीन नाहीत. ते स-शक्ती आहेत. त्यामुळे आपल्या मुखातून शब्दांचा समुदाय निघताना पाहिला व विस्मयालाही विस्मय वाटला. तो शेवटी म्हणतो, माझ्या कानांच्या झरोक्यातून आपल्या शब्दांचे किरण हृदयात गेल्याबरोबर शक्ती जागृत होऊन प्रकाशित झाली नाही तोच माझे मन आश्चर्यचकित होऊन माझे अवधान संपले व मी अर्थरूप अर्थात् शिवरूप झालो.

" अमृतानुभवात " श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शब्ददीक्षेचे वर्णन करताना शब्दाचे अपार सामर्थ्य वर्णन करून त्याचे ऋण कधीही फिटत नाही हे खरे असले तरी मी मात्र श्रीगुरूंच्या पाया पडून ते सोडविले आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

> जियाचेनि बोभाटें । आत्मयाची झोप लोटे ।
> तरी ऋण न फिटे । जे चेणेंचि नीद कीं ॥३१॥
> तें ऋणशेष वाचा इया । न फेडवेचि मरौनिया ।
> तें पायां पडौनि मियां । सोडविलें ॥३२॥

ज्यावेळी श्रीगुरू शब्ददीक्षा देतात तेव्हा त्या शब्दाच्या सामर्थ्याने म्हणजे शक्तिसहित संक्रमित होण्याने कुंडलिनी शक्तीच्या रूपाने संकुचित जीवात्मा होऊन मूलाधारात निजलेल्या आत्म्याची झोप नाहीशी होते म्हणजे तो जागृत होतो.

परंतु मूलाधारातील ही जागृती म्हणजे पूर्णावस्था नसल्याने शब्दांचे ऋण फिटत नाही. मात्र शक्ती जसजशी सुषुम्नेतून वर जाऊ लागते तसतशी तिची निद्रा अंशात्मक पद्धतीने दूर होत होत सहस्रारात जेव्हा ती शिवाशी एकरूप होते तेव्हाच शब्दाचा दिवा मावळतो. अर्थात् शक्तिजागृतीमुळे मी ब्रह्म आहे अशी जी वृत्ती उपस्थित होते ती ब्रह्मैक्यबोधाची वृत्तीही वाचेचे ऋणच आहे. मेले तरीं ते सुटत नाही. मात्र श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, मी सहस्रारात असलेल्या सद्-गुरूंच्या परापादुकांना वंदन करून हे शब्दऋण फेडले. गुरुचरणांच्या एका चरणात शिवाची व दुसऱ्या चरणात शक्तीची पादुका असते. या परापादुकाच सामरस्याने सहस्रारात झळकत असतात. ज्यावेळी जीव सहस्रारात येतो व पादुकांना वंदन करतो तेव्हा तो तेथेच लीन होतो. अर्थात् येथे शब्द, मन, प्राण इत्यादींचे स्वतंत्र अस्तित्व संपून जाते.

शब्ददीक्षेची ही प्रक्रिया आणखी स्पष्ट करताना व त्यामुळे होणाऱ्या लाभाचा महिमा वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी। जरी मुकेयातें अंगिकारी।
तो वाचस्पतीशी करी। प्रबंधु होडा ॥१०.८॥
तरी ऐकें गा सुवर्म। वाक्य माझें परम।
जें अक्षरें लेऊनी परब्रह्म। तुज खेंवासि आलें ॥६२॥
पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं। जे अक्षरा एकाची वदंती।
ते मेघाचियापरी त्रिजगतीं। गर्जती सेंघ ॥१२६॥
आजि आयुष्या उजवण जाहली। माझिया दैवा दशा उदयली।
जे वाक्यकृपा लाधली। दैविकेनि मुखें ॥१४७॥
आतां येणें वचन तेजाकारें। फिटलें आंतील बाहेरील आंधारें।
म्हणौनि देखतसें साचोकारें। स्वरूप तुझें ॥१४८॥
ते आतां वाक्यसूर्यकर तुझे फांकले। आणि ऋषीं मार्ग होते जे कथिले।
तयां आघवियांचेंचि फिटलें। अनोळखपण ॥१६३॥
तुझें वाक्य व्यक्ती न येतां देवा। जो आपुलिया जाणे जाणिवा।
तो कहींच नोहे हें मद्भावा। भंरवसेनि आलें ॥१७५॥
जयाची गोठीचि ऐकतखेंवो। आघवा संसारु होय वावो।
बळिया नित्यता लागे येवों। आपणपेंया ॥१९७॥
जन्ममृत्यूची भाख। हारपोनि जाय निःशेख।
आंत बाहेरी महासुख। वाढोंचि लागे ॥१९८॥
मग दैवगत्या जरी सेविजे। तरी तें आपणचि होऊनि ठाकिजे।
तें तुज देता चित्त माझें। पुरें म्हणों न शके ॥१९९॥

हे सद्‌गुरो ! आपल्या प्रेमाच्या रूपाने साकार झालेली वाक्-ईश्वरी म्हणजे शब्दाच्या आकाराने प्रकट झालेली आपली प्रेमरूपी शक्ती जेव्हा मुक्याच्या शरीराचा अंगिकार करून त्यात संक्रात होते त्यावेळी त्या शिष्यदेहातील सरस्वती-माता कुंडलिनी शक्ती सर्व ज्ञानासह जागृत होऊन तो मुका बृहस्पतीशी देखील ग्रंथरचनेत प्रतिज्ञेने पैज मारू शकतो. असे हे शब्ददीक्षेचे सामर्थ्यच अलौकिक आहे. त्यामुळे श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतात, माझे हे शक्तीने संपुटित झालेले किंवा भरलेले किंवा ग्रासलेले वाक्य ऐक. माझे हे वाक्य साधेसुधे नसून अक्षररूपाचा अंगरखा घालून म्हणजे शक्तियुक्त होऊन त्या रूपाने प्रत्यक्ष परब्रह्मच तुला आलिंगन देण्यास आले आहे. सद्‌गुरू शिष्याला एकांतात शब्ददीक्षा एखाद्या नाममंत्राने किंवा तत्त्वमस्यादि महावाक्याचा आश्रय करून देतात. त्या एका शब्दाने, नामाने किंवा वाक्याने शिष्याची कुंडलिनी शक्ती जागृत होऊन जेव्हा ती सुषुम्नेमध्ये मार्गस्थ होते तेव्हा शरीर अर्थात् नाडीशुद्धी होऊन शरीरस्थ त्रिजगतात मेघाच्या गर्जनेप्रमाणे अनाहत नादाची उपस्थिती होऊ लागते. शक्तीचे चालन झाले की, ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी व रुद्रग्रंथीचे भेदन होते. शरीरस्थ त्रिजगतात ज्ञानरूपा गौरी म्हणजे माहेश्वरीशक्ती, इच्छारूपी ब्राह्मीशक्ती व क्रियारूपी वैष्णवीशक्ती किंवा लक्ष्मी यांचा निवास असतो. मूलाधारापासून नाभिचक्रापर्यंत इच्छाशक्तिरूप ब्राह्मीशक्तीचे स्थान आहे. हिलाच अधःशक्ती म्हटले जाते. नाभीपासून अर्थात् स्वाधिष्ठान चक्रापासून कंठापर्यंत म्हणजे विशुद्ध चक्रापर्यंत क्रियाशक्तिरूप विष्णुशक्तीचे स्थान आहे. या वैष्णवीशक्तीलाच मध्यशक्ती म्हणतात. विशुद्ध-चक्रापासून अर्थात् कंठापासून भिवयांच्या मध्यापर्यंत म्हणजे आज्ञाचक्रापर्यंत ज्ञानशक्तिरूप शिवशक्तीचे स्थान आहे. हिला ऊर्ध्वशक्ती म्हणतात. या तीनही ग्रंथींचा भेद करून कुंडलिनी शक्ती ऊर्ध्वगामिनी झाली की, तीनही शक्तींना आपल्यामध्ये सामावून ती ब्रह्मरंध्रामध्ये स्थिर होते. त्यावेळी साधक नामरूपातीत अशा निरंजन पदाची प्राप्ती करून घेतो. शब्ददीक्षेचा महिमा असा अपूर्व आहे.

अर्जुन म्हणाला, हे श्रीकृष्णनाथा ! आपण वाक्यद्वारा कृपा करून अर्थात् शब्द-दीक्षेने माझ्यावर जो शक्तिपातयोगपूर्वक अनुग्रह केला त्यामुळे माझ्या आयुष्याचे सार्थक झाले व माझ्या दैवाचा भाग्योदय झाला. इतकेच नव्हे तर हे प्रभो ! आपल्या वचनाच्या तेजामुळे अर्थात् शक्तिसंपन्न वचनामुळे किंवा अर्थरूप ज्ञान-प्रकाशाने माझा आतील व बाहेरील अज्ञान अंधकार नाहीसा झाला. त्यामुळे तुझे खरे स्वरूप आता मी पाहत आहे. तुझे वाक्यरूपी सूर्यकिरण माझ्या अंतःकरणात फाकल्यामुळे अर्थात् शब्ददीक्षेमुळे शक्ती जागृत झाल्यामुळे पूर्वी ऋषींनी जे मार्ग सांगून ठेवले आहेत ते सर्व या अंतरजागृतीच्या मार्गालाच येऊन मिळतात याची ओळख मला पटली व त्यांनी जे तुझ्या स्वरूपाचे पूर्णब्रह्मत्व म्हणून वर्णन केले आहे ते सर्व यथार्थ आहे याचा आज मला अनुभव आला. हे प्रभो ! अशा प्रकारे

जोपर्यंत आपली शब्ददीक्षा होऊन शक्तिपात होत नाही तोपर्यंत साधकाच्या दिव्यचक्षूंचे उन्मीलनही होत नाही. त्यामुळे हे घडल्याशिवाय आपल्या बुद्धीनेच जो ईश्वराला अर्थात् आपल्याला जाणले असे म्हणतो किंवा जाणण्याचा प्रयत्न करतो त्याला आपला यथार्थ बोध होणे कधीही शक्य नाही, हे मला निश्चित कळून आले आहे. असा साधक कोठेच असत नाही; कारण मार्गस्थ झाल्याशिवाय कोठे असणे हे संभवत नाही.

अर्जुन म्हणाला, हे प्रभो ! या तुमच्या शब्ददीक्षारूपी परमामृताचे जो पान करतो त्याच्या सर्व संसाराचा निरास किंवा निपटारा होऊन त्याला तो मिथ्या वाटू लागतो. या दीक्षेच्या बळामुळेच आपण नित्य, निरंजन, अखंड असे ब्रह्मरूप आहोत अशी अवस्था साधकाला साधनामुळे आपली आपणच प्राप्त होते. या शब्ददीक्षेमुळे जन्ममरणाची भाषा अर्थात् परंपरा किंवा चक्र निःशेष नाहीसे होते व आतबाहेर परमसुख वाढू लागते. सुदैवाने सद्‌गुरू भेटून जर साधकाकडून या शब्ददीक्षारूपी परमामृताचे सेवन झाले अर्थात् त्याची कुंडलिनी शक्ती जागृत झाली तर तो परमामृतस्वरूप अर्थात् जागृत शक्तीच्या आधाराने आत्मरूप होऊन जातो. असे हे शब्ददीक्षारूपी परमामृत तू मला पाजीत असताना माझे चित्त पुरे म्हणू शकत नाही.

हे सर्व कसे घडते हे सांगताना "श्रीमद्‌भागवतमहापुराणात" असे म्हटले आहे की—

**नैतन्मनो विशति वागुत चक्षुरात्मा प्राणेंद्रियाणि च यथाऽनलमर्चिषः स्वाः ।**
**शब्दोऽपि बोधकनिषेधतयात्ममूलमर्थोक्तमाह यदृते न निषेधसिद्धिः ।।**
**।।११.३.३६।।**

मन हे या परमतत्त्वाला विषय करू शकत नाही अर्थात् मनाने परमात्मतत्त्व जाणता येत नाही. त्याप्रमाणेच वागींद्रिय, चक्षुरिंद्रिय, बुद्धी, क्रियाशक्ती व इंद्रिये या परमतत्त्वाला जाणत नाहीत. ज्याप्रमाणे अग्नीच्या ठिणग्या अग्नीला प्रकाशित करीत नाहीत व जाळीत नाहीत त्याप्रमाणे शब्दही बोधकनिषेधरूपत्वाने आत्म्याविषयी प्रमाण होऊन अर्थाच्या दृष्टीने त्याचा बोध करतो; कारण त्या ब्रह्मावाचून निषेधाची सिद्धी होत नाही. याचा अर्थ अधिक स्पष्ट करताना "एकनाथी भागवतात" श्रीएकनाथमहाराज म्हणतात—

**।। आशंका ।। इंद्रियीं नव्हे ब्रह्मज्ञान । तैं जीवाचें भवबंधन ।**
**कदाकाळीं न तुटे जाण । जन्ममरण अनिवार ।।३.६६२।।**
**'शब्दादेवापरोक्षे' ति । ऐशी श्रुतिशास्त्रोपपत्ती ।**
**तेही मिथ्या वाटे वदंती । ऐसें तूं निश्चितीं मानिसी राया ।।६६३।।**
**तेंही अर्थाचें निरूपण । ऐक राया सावधान ।**
**शब्द निमोनि आपण । दे ब्रह्मज्ञान जीवासी ।।६६४।।**

जीवू सोडवावया होडा । शब्दें सवेग उचलिला विडा ।
तेणें घेतां तत्त्वांचा झाडा । आपणही पुढां निमाला ॥६६५॥

श्रुति ' नेति नेति ' येणें शब्दें । अतद्व्यावृत्तिनिषेधबोधें ।
परी साक्षात् वेदानुवादें । निज वस्तु शब्दें न बोलवे ॥६६६॥

शब्दासी जें वाच्य नोहे । तेंचि परब्रह्म जाणावें ।
तेथील जो खुणे पावे । तो ब्रह्म सद्भावें स्वयें होय ॥६६७॥

श्रुति ' नेति नेति ' येणें वचनें । शब्द निषेधूनि वस्तू दावणें ।
शब्दीं निःशब्द जो लक्षूं जाणे । तेणें पावणें परब्रह्म ॥६६८॥

शब्दु निजनिषेधें जें बोधी । तेथ समरसे ज्याची बुद्धी ।
तेंचि परब्रह्म गा त्रिशुद्धी । निषेधावधी तो ठावो ॥६६९॥

शब्द निमोनि सर्व शक्ती । जीवासी दे ब्रह्मप्राप्ती ।
शब्दादेवापरोक्षेति जाण निश्चिती । या नांव ॥६७०॥

असे हे शब्दाचे म्हणजे शक्तीचे सामर्थ्य असल्याने सद्गुरुमुखातून या शक्तीचे दीक्षेच्या रूपाने जेव्हा अवतरण घडते तेव्हा साधक कसा कृतार्थ होतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

म्हणौनि तो देवांचा रावो । म्हणे पार्थातें तुज दृष्टि देवों ।
जया विश्वरूपाचा ठावो । देखसी तूं ॥११.१७६॥

ऐसी श्रीमुखौनि अक्षरें । निघती ना जंव एकसरें ।
तंव अविद्येचे आंधारें । जावोंचि लागे ॥१७७॥

तीं अक्षरें नव्हती देखा । ब्रह्मसाम्राज्यदीपिका ।
अर्जुनालागीं चित्कळिका । उजळलिया श्रीकृष्णें ॥१७८॥

मग दिव्यचक्षुप्रकाशु प्रगटला । तया ज्ञानदृष्टी फांटा फुटला ।
ययापरी दाविता जाहला । ऐश्वर्य आपुलें ॥१७९॥

तो देवांचाही देव भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाला, ज्या दृष्टीने माझ्या विश्वरूपाचे दर्शन तुला घेता येईल अशी दृष्टी मी तुला देतो. श्रीकृष्णांच्या मुखातून अशी अक्षरे निघाल्याबरोबर शक्तिसंक्रमण होऊन अर्जुनाची शक्ती जागृत झाल्यामुळे त्याच्या ठिकाणचा अज्ञानांधकार नाहीसा होऊ लागला. भगवंताच्या मुखातून " मी तुला दिव्य दृष्टी देतो " ही जी अक्षरे निघाली ती साधीसुधीं अक्षरे नव्हती. त्या शब्दांच्या ठिकाणी अपूर्व सामर्थ्य होते. ती अक्षरे म्हणजे ब्रह्मस्वरूपाचे साम्राज्य दाखविणारी ज्योती होती. शब्ददीक्षा देऊन ती ज्ञानज्योती अर्जुनाकरिता भगवंतांनी उजळली होती. या शब्ददीक्षेमुळे अर्जुनाचा अज्ञानांधकार नाहीसा होऊन चैतन्याचा प्रकाश सर्वत्र पसरला. त्यामुळे ज्ञानदृष्टी प्राप्त होऊन

अर्जुनाला अद्वैत स्थिती प्राप्त झाली. याप्रमाणे शब्ददीक्षा देऊन भगवंतांनी अर्जुनाला आपले योगाचे ऐश्वर्य नाना तऱ्हेचे दिव्य अनुभव देऊन दाखविले.

"हा तत्त्वज्ञानदिवा ! मरौनी इहीं लावावा ॥ अमृ. ३.८ ॥" म्हणजे शब्द स्वत: नाहीसा होऊन साधकाच्या ठिकाणी संक्रात होतो व तत्त्वज्ञानाचा दिवा लावतो अर्थात् तत्त्वज्ञान म्हणजे ब्रह्मज्ञान झाल्यावर विपरीत समजूत धारण करणाऱ्या चारही वाणी नाश पावतात असा सिद्धांत मांडून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अमृतानुभवात" शब्ददीक्षानुवेधाने होणाऱ्या शक्तिपात दीक्षेची जी अपूर्वाई प्रकट केली आहे त्याप्रमाणेच या दीक्षेची अपूर्वाई "ज्ञानेश्वरीत" प्रकट करताना ते म्हणतात—

तैसें जया कोण्हासि दैवें । गुरुवाक्यश्रवणाचिसवें ।
द्वैत गिळोनि विसंवे । आपणया वृत्ती ॥१८.९८८॥
कानावचनाचिये भेटी—। सरिसाची पैं किरीटी ।
वस्तु होऊनि उठी । कवणि एकु जो ॥९९१॥
गुरुवाक्यें उठविला । बोधीं निश्चयो आपुला ।
न्याहाळी हातीं घेतला । आरिसा जैसा ॥१०३२॥

ज्यावेळी दैवयोगाने साधकाला सद्गुरूंची प्राप्ती होते त्यावेळी गुरुवाक्य-श्रवणावरोबर म्हणजे शब्ददीक्षा झाल्यावरोबरोबर त्याच्या सर्व भेदाचा नाश होऊन अर्थात् द्वैत गिळून टाकून तो आपल्या स्वरूपाच्या ठिकाणी स्थिर होतो म्हणजे त्या स्वसंवेद्य आत्मस्वरूपात त्याच्या सर्व वृत्ती विसावतात. अर्जुना ! जो साधक तीव्र अधिकारी असेल व ज्याच्यावर तीव्रतम शक्तीचा म्हणजे शब्दाचा पात होईल अर्थात् सद्गुरूंच्या शब्दाची किंवा उपदेशरूपी वचनांची अगर तत्त्व-मस्यादि महावाक्यांची व त्याच्या कानाची भेट होईल त्याक्षणीच तो साधक ब्रह्मरूप होतो अर्थात् वस्तू होऊन राहतो.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही शब्द हे दीक्षेचे माध्यम कसे बनतात व शेवटी ते स्वत:च नाहीसे होऊन साधक ब्रह्मरूप कसा होतो, ही प्रक्रिया "पंच-समासी" या प्रकरण-ग्रंथात मांडताना असे स्पष्ट केले आहे की—

प्रत्यक्ष जन प्रगटला । दृश्य पदार्थ बोधिला ।
असतच नाहींसा झाला । सद्गुरुप्रतापें ॥५.१७॥
ऐसें नाहीं हें गे तें गे । ऐसें तैसें पुढें मागें ।
पूर्वस्थिति बोलणें लागे । ऐसिया परी ॥१८॥
स्वरूप बोलिलें नव जाये । बोलिल्यावीण हातां नये ।
म्हणोनि शब्द उपाये । रचिला देवें ॥१९॥

शब्दाचे उदरीं अगाध । सांठवला नीनिबोध ।
अर्थ पाहतां स्वानंद । तुंबळे बळें ॥२०॥
शब्दमंथन शब्दें केलें । अर्थ नवनीत प्रगटलें ।
मंथनकर्त्यासी भक्षिलें । त्या नवनीतें ॥२१॥
प्रपंचतक्राअंतरीं । नवनीत वास्तव्य करी ।
तक्र आटोनी पात्रभरी । नवनीत झालें ॥२२॥
अवघें नवनीत दाटलें । तेणें बळें पात्र फुटलें ।
नवनीतें संपूर्ण झालें । ब्रह्मांड अवघें ॥२३॥
तेथेंहि दाटलें उदंड । तेणें उतटलें ब्रह्मांड ।
सकळ लोपोनि उदंड । तेंचि तें झालें ॥२४॥
नवनीत प्राप्त व्हावयासी । जातां तयासि तेंचि ग्रासी ।
सकळ पदार्थमात्रासी । नवनीतें सेविलें ॥२५॥
सेविलें आपणा आपण । हे अनुभवाची खूण ॥२६॥
सद्गुरूसी जातां शरण । शीघ्र तुटे जन्ममरण ।
सर्व मनोरथ होती पूर्ण । वचनमात्रें ॥२७॥

शब्ददीक्षेची ही प्रक्रिया सद्गुरूंच्या ठिकाणी पूर्णपणे मुरलेली असल्यामुळे असे महात्मे किंवा संत हे " कां नादब्रह्मचि मुसे आलें ॥ १३.२६९ ॥ " असे असतात हे सांगून त्या शब्दांचे शब्द व त्यांचे सामर्थ्य किती अलौकिक असते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तैसें साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।
शब्द जैसें कल्लोळ । अमृताचे ॥१३.२७०॥

याहीपुढे जाऊन शब्दाचे सामर्थ्य किती अचिंत्य, अनुपमेय, अप्रमेय व अगाध असते, हे संजयाने श्रीकृष्णार्जुनांचा जो संवाद झाला, तो दुरून ऐकून मनात धरला, तेव्हा त्याच्या ठिकाणी अष्टसात्त्विक भावांचा उद्रेक कसा झाला, हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कथन केले आहे. ही गोष्ट संजयाच्या मुखातून स्पष्ट करताना व त्याच्याबद्दल स्वत: सांगताना ते म्हणतात–

तैसें श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं ।
धरितां मजही वानी । तेंचि होतसे ॥१८.१६०२॥
तें श्रीकृष्णवचनामृत । पार्थीं भरोनि असे वोसंडत ।
मग व्यासकृपा प्राप्त । संजयासी ॥१५.५८९॥
ऐसा श्रीकृष्णार्जुन–। संवादसंगमीं स्नान ।
करूनि देतसे तिळवान । अहंतेचें ॥१८.१६२०॥

यापेक्षाही गुरूंकडून शिष्याला ही शब्ददीक्षा कशी होते व त्यामुळे उभयतात कोणते नाते प्रस्थापित होते हे संवादरूपी अर्थात् शब्ददीक्षारूपी बोहोल्यावर श्रीकृष्णार्जुनांचे लग्न कसे लागले हे दृष्टांताने स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात की—

उणेनि उमचला सुधाकरु। देखुनी आपला कुमरु।
मर्यादा क्षीरसागरु। विसरेचिना ? ॥१८.१५७७॥
ऐसें संवादाचिया बहुलां। लग्न दोघांचियां आंतुला।
लागलें देखोनि जाला। निर्भरु संजयो ॥१५७८॥
तेणें म्हणतसे संजयो। बाप कृपानिधी रावो।
तो आपुला मनोभावो। अर्जुनेंसी केला ॥१५७९॥

आपला मुलगा जो चंद्र, त्याने उणेपणा टाकलेला आहे म्हणजे तो पूर्णकलेने युक्त आहे असे पाहून क्षीरसागर आपली मर्यादा विसरतच नाही काय ? त्याप्रमाणेच शिष्याला पाहिल्यावर सद्गुरू मर्यादा विसरून त्याच्यावर कृपा करतात. त्यामुळे संवादाच्या म्हणजे शब्ददीक्षेच्या बोहोल्यावर कृष्ण व अर्जुन या गुरुशिष्यांचे लग्न लागलेले अर्थात् ते स्वस्वरूप ऐक्यतेला प्राप्त झालेले पाहून संजय आनंदाने तल्लीन झाला. या अवस्थेत तो म्हणाला, श्रीकृष्ण हे कृपेचा ठेवाच आहेत. त्यांनी अशा प्रकारे शब्दातून शक्ती संक्रांत करून आपल्या मनाचा भाव अर्थात् आपली स्वसंसिद्ध आत्मस्थिती अर्जुनाच्या ठिकाणी उपस्थित केली.

सारांश, अशा प्रकारे शब्ददीक्षा होते. यामुळे उत्पन्न होणाऱ्या बोधाला परमगती असे संबोधून ही स्थिती शिष्याच्या ठिकाणी नित्यसिद्धच असते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

म्हणौनि अक्षर जें म्हणिजे। तेवींचि म्हणतां बोधुहि उपजे।
जयापरौता पैसु न देखिजे। या नाम परमगती ॥८.१८१॥
मोटकें गुरुमुखें उवैजत दिसे। आणि हृदयीं स्वयंभचि असे।
प्रत्यक्ष फावों लागे तैसें। आपैसयाचि ॥९.४९॥

येथपर्यंत आपण स्थूल, सूक्ष्मतर व सूक्ष्म अशा स्पर्श, दृग् व शब्ददीक्षा कशा होतात हे पाहिले. आता सूक्ष्मतम स्वरूपाची संकल्प, कृपा किंवा ध्यानदीक्षा कशी होते याचे विवेचन करावयाचे आहे. "तूं संसारश्रांतांची साउली। अनाथ जीवांची माउली। आमुतें कीर प्रसवली। तुझीच कृपा ॥४.३३॥" हे अर्जुनाचे आपल्या सद्गुरुनाथ श्रीकृष्णांच्या बद्दलचे म्हणणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी नाना तऱ्हेने सांगून प्रमेयाच्या रूपाने सिद्ध केले आहे. एवढेच नव्हे तर अशा प्रकारच्या श्रीनिवृत्तिनाथांनी दिलेल्या सूक्ष्मतम कृपादीक्षेच्या बळावरच आपण ज्ञानेश्वरी-सारखा ग्रंथ लिहिण्यास समर्थ झालो हे सांगताना ते म्हणतात—

तें बुद्धीही आकळितां सांकडें । म्हणौनि बोलीं विपायें सांपडे ।
परी श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखैन मी ॥६.३२॥
तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।
म्हणौनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥३५॥
तेंणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।
अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥३६॥

श्रीकृष्णांच्या बोलण्याचा म्हणजे गीतेचा अर्थ नुसत्या बुद्धीने आकलन करणे कठीण आहे. त्यामुळे या अर्थाचे म्हणजे परब्रह्माचे शब्दाने क्वचित्‌च वर्णन करता येते. असे जरी असले तरी श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी मला कृपादीक्षा देऊन माझ्या ठिकाणचा अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्तीच्या जागृतीचा जो दिवा प्रज्ज्वलित केला आहे, त्या दिव्याच्या प्रकाशात मी ते परब्रह्म पाहीन, असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. ज्यावेळी सद्‌गुरू संकल्पाने अशी सूक्ष्मतम ध्यान, कृपा किंवा संकल्पदीक्षा देतात तेव्हा तीव्रतम शक्तिपातामुळे साधकाला इंद्रियातीत असे ब्रह्मज्ञान प्राप्त होते. ते जर प्राप्त झाले; तर दृष्टी जेथे पोहोचू शकत नाही ते दृष्टीशिवाय पाहता येते.अशा प्रकारे संकल्पदीक्षेने गुरुकृपा झाली तर प्रयत्न केल्यावर कोणती गोष्ट प्राप्त होणार नाही ? श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, अशा प्रकारची सद्‌गुरुकृपा माझ्यावर पूर्ण आहे.

अशी ही कृपा, ध्यान किंवा संकल्पदीक्षा कशी होते हे सांगताना "कुलार्णवतंत्रात" असे म्हटले आहे की—

यथा कूर्मः स्वतनयान् ध्यानमात्रेण पोषयेत् ।
वेधदीक्षोपदेशश्च मानसः स्यात् तथाविधः ॥१४.३७॥

ज्याप्रमाणे कासवी केवळ मनाने चिंतन करून भूमीच्या खाली ठेवलेली अंडी उबवून पिल्लांना वाढविते व त्यांचे पोषण करते त्याप्रमाणे केवळ संकल्पाने सद्‌गुरु शक्तिसंचार करून शिष्याची कुंडलिनी शक्ती जागृत करतात. या प्रकाराने जी वेधदीक्षा किंवा शक्तिसंचार होतो त्याला मानसदीक्षा असेही म्हणतात.

अशा प्रकारची ध्यानदीक्षा आपल्याला श्रीनिवृत्तिनाथमहाराजांकडून मिळाल्यामुळेच आपल्या हातून श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या पहिल्या नऊ अध्यायांचा भावार्थ सहजतेने सांगितला गेला व त्यांच्या कृपेमुळेच गीतेचा संवादरूपी भावार्थ फळास आला याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

आतां आपुलेनि कृपाप्रसादें । मियां भगवद्‌गीता वोंवीप्रबंधें ।
पूर्वखंड विनोदें । वाखाणिलें ॥१०.२३॥
जी ज्ञानाचें बीज तयांचे बोल । माझीं हृदयभूमिके पडले सखोल ।
वरि इथे कृपेची जहाली वोल । म्हणौनि संवाद फळेशीं उठलें ॥१६४॥

भगवंताचे खरे भगवंतपण हेही आपल्याला "परि तया सांगितलियाचें साचपण। हें आतां माझें देखतसे अंत:करण। जे कृपा केली आपण। म्हणौनि देवा ॥१०.१५४॥" अशा प्रकारे या कृपादीक्षेमुळेच स्वत:ला आकळता आले हे अर्जुनाने अत्यंत नम्रतापूर्वक आपल्या सद्गुरुनाथांच्या चरणी निवेदन केले आहे. एवढेच नव्हे तर तो पुढे या दृष्टीनेंच काय म्हणतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

एऱ्हवीं वडिलवडिलांचेनि मुखें। मी सदां तूंतें कानीं आइकें।
परि कृपा न कीजेचि तुवां एकें। तंव नेणवेचि कांहीं ॥१०.१६७॥
म्हणौनि भाग्य जें सानुकूळ। जालिया केले उद्यम सदां सफळ।
तैसे श्रुताधीत सकळ। गुरुकृपा साच ॥१६८॥

मुळात "गीतेतच" अर्जुनाने भगवंतांना असे सांगितले आहे की, आपल्या कृपादीक्षेमुळेच माझा मोह विलयाला गेला. आपण माझ्यावर जर अशा प्रकारचा अनुग्रह केला नसता तर हे शक्य नव्हते. हे कथन करताना तो म्हणतो–

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम्।
यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥११.१॥

हे कृष्णा! माझ्यावर अनुग्रह करण्यासाठी अध्यात्म या नावाचे जे अत्यंत गुह्य तत्त्व तू सांगितलेस त्याच्या योगाने माझा हा अविवेक पार निघून गेला आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मग पार्थु देवातें म्हणे। जी तुम्हीं मजकारणें।
वाच्य केलें जें न बोलणें। कृपानिधे ॥११.४४॥
जैं महाभूतें ब्रह्मीं आटती। जीव महदादींचे ठाय फिटती।
तें जें देव होऊनि ठाकती। तें विसवणें शेषींचें ॥४५॥
होतें हृदयाचिये परिवरीं। रोंविलें कृपणाचिये परी।
शब्दब्रह्मासही चोरी। जयाची केली ॥४६॥
तें तुम्हीं आजि आपुलें। मजपुढां हियें फोडिलें।
जया अध्यात्मा वोवाळिलें। ऐश्वर्य हरें ॥४७॥
ते वस्तु मज स्वामी। ऐकीहेळां दिधली तुम्हीं।
हें बोलों तरी आम्ही। तुज पावोनि कैंचे ॥४८॥
परी साचचि महामोहाचिये पुरीं। बुडालेया देखोनि सीसवरी।
तुवां आपणपें घालोनि श्रीहरी। मग काढिलें मातें ॥४९॥
आणि मी तंव दातारा। ये कृपेचिये रिघोनि गाभारां।
घेत आहें चारा। ब्रह्मरसाचा ॥६७॥

मग अर्जुन म्हणाला, देवा! तुम्ही कृपासागर आहात. त्यामुळे जे परब्रह्म बोलून दाखविले जात नाही ते तुम्ही मला कृपादीक्षा देऊन प्रत्यक्षात आणून दिले.

जेव्हा जागृत शक्तीमुळे पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश ही मूलाधार, स्वाधिष्ठान मणिपूर, अनाहत व विशुद्ध या चक्रांमधील महाभूते क्रमशः एकमेकात लीन होत शक्तीत एकरूप होत जाऊन शेवटी ही शक्तीही परब्रह्मात लय पावते म्हणजे पर्यायाने ही संपूर्ण महाभूते परब्रह्मात लय पावतात व जीवरूप पराप्रकृती व महादिरूप अपराप्रकृती यांचे नावही राहत नाही ; तेव्हा जीव शिव होऊन परब्रह्मस्वरूपात स्थिर होऊन राहतो. हेच कुंडलिनीरूप शेषशक्तीचे खरे विश्रांतिस्थान आहे. हे स्थान सहस्रारात आहे. तेच खरे हृदयमंदिर आहे. त्या ठिकाणी हे परब्रह्म एखाद्या कृपण मनुष्याप्रमाणे लपवून ठेविले आहे. शब्दब्रह्मापासून म्हणजे स्थूलार्थाने वेदापासून, ( कारण वार्तिककारांनी " शब्दब्रह्मेति यद्वेदशास्त्रं वेदाख्यमुच्यत" असे म्हटले आहे. ) सूक्ष्मार्थाने ज्ञानापासून ( कारण भर्तृहरीने " अनुविद्धमिवं ज्ञानं सर्वं शब्देन गृहयते " असे म्हटले आहे. ) व परार्थाने कुंडलिनी शक्तीपासून ( अर्थात् मूलाधारात निद्रिस्त असल्यामुळे; कारण " सा प्रसूते कुंडलिनी शब्दब्रह्ममयी विभुरिति " असे शास्त्रकारांनी म्हटले आहे. ) ते चोरून ठेविले आहे म्हणजे या गोष्टींपासून हे स्वरूप लपवून ठेविले आहे; परंतु तुम्ही ते आत्मस्वरूप हृदय उघडे करून कृपेने मला दाखविले. ज्या अध्यात्मस्वरूपावरून शंकराने कैलासाचे राज्य ओवाळून टाकून स्मशानात वास केला, त्या परमात्मस्वरूपाचे ऐश्वर्य काय सांगावे ! हे प्रभो ! ती अध्यात्म वस्तू, ज्ञान किंवा स्वरूप तुम्ही मला एकदम दिले. वास्तविक दिले व घेतले ही भाषा खरी नाही; कारण तुमच्याशी ऐक्य झाल्यावर आम्ही तुमच्यापासून निराळे नसल्यामुळे ही स्वभावतःच होण्याघडण्याची गोष्ट आहे. पण खरोखर मी या संसाररूपी महामोहाच्या पुरात डोक्यापर्यंत बुडलो आहे हे पाहून देवा ! आपण स्वतः त्यात उडी टाकून मला बाहेर काढले. ही खरी कृपादीक्षा आहे आणि हे कृपादीक्षेच्या दातारा ! मी तर तुझ्या कृपामंदिराच्या गाभाऱ्यात शिरून ब्रह्मरसाचे भोजन म्हणजे शिवशक्त्यात्मक ऐक्यज्ञानाचा पूर्ण अनुभव घेत आहे.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी " आत्माराम " व " पंचसमासी " या प्रकरण-ग्रंथातूनही कृपादीक्षेचा उल्लेख करताना असे म्हटले आहे की—

जी जी स्वामी सर्वेश्वरा। आम्हा अनाथांचिया माहेरा।
सार्थक झालें जी दातारा। कृपाकटाक्षें ।। आत्माराम ।।५.१।।

तुझ्या कृपेचें उजेडें। तुटे संसारसांकडें।
दृश्य मायेचें मढें। भस्मोनि जाय ।। पंचसमासी ।।१.१३।।

तुझे कृपेचा प्रकाश। करी अज्ञानाचा नाश।
भाविक भोगती सावकाश। अक्षयी पद ।।१४।।

क्षयचि नाहीं कल्पांतीं। एक स्वयें आदिअंतीं।
ऐसें सुख कृपामूर्ति। प्रकट कीजे ॥१५॥
जें साधनाचें निजसाध्य। निगमागमप्रतिपाद्य।
योगेश्वरांचें सद्य। विश्रांतिस्थळ ॥१६॥
जें सकळ श्रमाचें सार्थक। जें भाविका मोक्षदायक।
तुमच्या हृदयीं अलौकिक। परम गुह्य ॥१७॥
जें महावस्तूचें साधन। जें अद्वैतबोधाचें अंजन।
जेणें पावती समाधान। महायोगी ॥१८॥

आपल्या कृपेच्या कटाक्षाने श्रीकृष्णांनी महायोग्यांनाच समाधान दिले असे नसून आपल्या प्रिय शिष्य अर्जुनाला व मातेला विश्वरूप कसे दाखविले हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आले आहे की–

हे अवतार जे सकळ। ते जिये समुद्रींचे कां कल्लोळ।
विश्व हें मृगजळ। जया रश्मीस्तव दिसे ॥११.१८०॥
जियें अनादिभूमिके निटें। चराचर हें चित्र उमटे।
आपणपें श्रीवैकुंठें। दाविलें तया ॥१८१॥
मागां बाळपणीं येणें श्रीपती। जैं एक वेळ खादली होती माती।
तैं कोपोनिया हातीं। यशोदां धरिला ॥१८२॥
मग भेणें भेणें जैसें। मुखीं झाडा द्यावयाचेनि मिसें।
चवदाही भुवनें सावकाशें। दाविलीं तिये ॥१८३॥

हे सर्व श्रीकृष्णांच्या रश्मींमुळे म्हणजे कृपेच्या किरणांमुळे घडले याचा उल्लेख श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " रश्मीस्तव दिसे " असा करून, हे सर्व कसे घडले हे या वाक्यातून दर्शविले आहे. श्री. प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांनीही आपल्या धर्मपत्नीला केवळ कृपाकटाक्षेकरून एका क्षणात निर्विकल्प समाधीत स्थिर केल्याचा उल्लेख त्यांच्या चरित्रात आला आहे तो या संदर्भात पाहण्यासारखा आहे. अर्जुनाने " तुझें विश्वरूप आकळे। ऐसें जरी जाणसी माझे डोळे। तरी आर्तीचे डोहळे। पुरवीं देवा ॥११.१११॥ " असे म्हणून विनंती केली तेव्हा या बाबतीत " तंव तया षड्गुणचक्रवर्ती। साहवेचिना ॥ ११.११२ ॥" अशी श्रीकृष्णांची अनावर स्थिती होऊन अर्जुनाला कृपादीक्षा कशी झाली याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तो कृपापीयूषसजळु। आणि येरु जवळां आला वर्षाकाळु।
नाना श्रीकृष्ण कोकिळु। अर्जुन वसंतु ॥११.११३॥
नातरी चंद्रबिंब वाटोळें। देखोनि क्षीरसागर उचंबळे।
तैसा दुणेंही वरी प्रेमबळें। उल्लसितु जाहला ॥११४॥

मग तिये प्रसन्नतेचेनि आटोपें। गाजोनि म्हणितलें सकृपें।
पार्था देख देख अमुपें। स्वरूपें माझीं ॥११५॥

ज्याप्रमाणे पौर्णिमेचा चंद्र पाहून समुद्र उचंबळतो त्याप्रमाणे कृपेचा पात्र होताना अर्जुनरूपी शिष्याला पाहताच सद्गुरू श्रीकृष्णनाथ दुप्पट प्रेमबळाने उल्हसित झाले. शिष्याची विनंती व सद्गुरूंची आतून शिष्यानुग्रहासाठी उल्हसित झालेली शक्ती यांचा जेव्हा संगम होतो तेव्हा कृपादीक्षा सिद्ध होते. त्यामुळेच " म्हणे जयजयाजी स्वामी। नवल कृपा केली तुम्हीं। जें हें विश्वरूप कीं आम्हीं। प्राकृत देखों ॥११.२५५॥" असे उद्गार अर्जुनाच्या मुखातून बाहेर पडले. अर्जुनाच्या प्रार्थनेनुसार आपल्या कृपाबलाने श्रीकृष्णांनी जसे त्याला विश्वरूप दाखविले तसेच त्याच्या विनंतीनुसार त्यांनी आपल्या कृपाबलानेच ते सर्व आवरून घेऊन पुन्हा आपले मूळरूप धारण केले, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

नातरी गुरुकृपेसवें। वोसरलेया प्रपंचज्ञान आघवें।
स्फुरे तत्त्व तेवीं पांडवें। श्रीमूर्ति देखिली ॥११.६५६॥

अशा प्रकारे सद्गुरू हे कारुण्याची मूर्तीच असतात. शिष्याच्या बाबतीत " ते वाट कृपेची करितु। ते दिशाचि स्नेहभरितु। जीवातळीं आंथरितु। आपुला जीवु ॥ १३.२५० ॥ कां स्नेहाळु मायें। तान्हयाची वास पाहे। तिये दिठी आहे। हळुवार जें ॥ २५३ ॥ ऐसी जयाची चाली । कृपाफळी फळा आली। देखसी जियाली। दया वाचे ॥ २६१ ॥ " अशीच त्यांची दृष्टी असते. तीच अधिक स्पष्ट करताना " अमृतानुभव " ग्रंथात श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जयाचेनि कृपासलिलें। जीवु हा ठावोवरी पाखाळे।
जे शिवपणही वोवळें। आंगीं न लावी ॥२.११॥
राखों जातां शिष्यातें। गुरुपण धाडिलें थितें।
परी गुरुगौरव तेयातें। सांडीचिना ॥१२॥
एकपण नव्हे सुखास। म्हणोनी गुरुशिष्याचें करोनि मिस।
पाहाणेंचि आपुली वास। पाहातसे ॥१३॥
जयाचेनि कृपातुषारें। परतलें अविद्येचें महुरें।
परिनमलें अपारें। बोधामृतें ॥१४॥
वेद्या देतां मिठी। वेदकत्व सुवोनि पोटीं।
तरी नोहेचि उशिटी। दिठी जयाची ॥१५॥

या ओव्यांवर टीका करताना " अनुभवामृत-पद-बोधिनीत " श्रीनिरंजन रघुनाथ म्हणतात, "ज्या गुरूची कृपा ( शक्तिपात ) हेचि कोण्ही एक सलिल, स्वच्छ उदक होय; त्यायोगें जीव जो तो हा ठावोवरि, येथपर्यंत पाखाले म्हणजे मूळ

अविद्यासहित पिंडब्रह्मांडरूप मळ जाऊन धुतला जातो, केवल ब्रह्मरूप होतो. तेव्हां त्यातें शिवपण म्हणजे शबलब्रह्मशक्तिसहित परमात्मशिवपदवी जे तेहि वोवळी वाटून तें शिवपण अंगी लावीत नाहीं. म्हणजे तें शबल ब्रह्म जें तें मी होय ऐसें मानीत नाहीं. कां जे, अखिल उपाधिविनिर्मुक्त शुद्ध शांत पूर्वसिद्ध आपली ब्रह्मरूपता अनुभविली आहे म्हणून. अहो, गुरु जो तो शिष्याते बोध करून, शिवपण मात्र वोवळें वाटवून आपलें गुरुत्व ठेवीत असेल कीं ? यासि उत्तर ( ११ ) शिष्य जो तो मरणधर्मवान् जीवत्व जें त्यास स्वीकारून रक्षणकर्ता गुरु जो त्यातें शरण गेला. त्या कालीं गुरु जे त्यांनीं तूं अविनाश ब्रह्म आहेस ऐसा बोध ( शक्तिपाताने शब्दसंक्रमणात्मक दीक्षा ) केला. त्यायोगें शिष्याचें जीवत्व आणि बोधापूर्वी गुरुत्व जे शिष्यदृष्टीनें स्थित होतें, हें उभयही नाहींसें झालें. ऐसें हें कृत्य गुरूंनीं केलें; कारण जे शिष्याला शिष्यभानत्व राहिलें नाहीं, मग गुरुत्वभान कोठून असणार? अस्तु, पुनरपि शिष्य वृत्तीवर येऊन आपलें भूमा ब्रह्मस्वरूप स्मरूं लागला. तेव्हां गुरूचा गौरव म्हणजे अतिशयेंकरून स्तुति करूं लागला जे, ज्याचे प्रसादें मजला इतुकी पदवी प्राप्त झाली तो गुरु परमधन्य, परमधन्य, त्याचा जय असो ! या प्रकारें गुरूचा गौरव म्हणजे योग्यता गुरूतें सांडीचिना, टाकीत नाहीं. अहो, परमात्मरूपें श्रीगुरु एक असतां गुरुशिष्य हे दोनपण कशास दाखविलें ? यासि उत्तर ( १२ ) परमात्मा जो गुरु त्यास एकपण सुखास पडेनासें झालें म्हणोनि तेणें शिष्याचें मिष मात्र केलें. परंतु पाहाणे म्हणजे सर्वद्रष्टा परमात्मा जो तोचि आपली वास म्हणजे आपलें वसतें स्थान ब्रह्म जें त्यातें शिष्यरूपेंकरून पाहतो. आतां गुरुकृपा जे ते माघोटीचा पर्जन्य होय ऐसे वर्णितात, ( १३ ) जैसा काशीकडे माघमासापासून पुढें पर्जन्य पडून आम्रवृक्षाचा महुर म्हणजे आंबट आंबे जें त्यातें पिकवून अमृततुल्य मिष्ट करितो, तैसा गुरुकृपातुषारमात्रेंकरून अविद्येचा महुर, अविद्याकार्य अज्ञान जें तें, परतलें, तत्त्वज्ञानरूप होतें झालें; आणि अपारबोधामृतें ( तीव्रतम शक्तिपाताने ) परिनमलें परिपाकतें पावलें. आता श्रीगुरूचे शक्तिपात करण्याचा प्रकार वर्णितात, ( १४ ) श्रीगुरु जो तो ब्रह्मसाक्षात्कार प्रसंगीं स्वशिष्य जो त्यातें सन्मुख बैसवून निजदृष्टीचें वेदकत्व म्हणजे ज्ञान जें तें शिष्याचें पोटीं सुवोनि, शिष्याचें हृदयीं प्रविष्ट करून उपनिषदैक वेद्य वस्तु ब्रह्म जें त्यातें मिठी, आलिंगन देतो. तथापि त्या गुरूची निजदृष्टी जे ते शिष्याचे उदरांत गेली म्हणोन उष्टी होत नाही; कारण जे द्वितीय शिष्यास ब्रह्मसाक्षात्कार करण्याचे उपयोगी पडती म्हणून."

कृपादीक्षेचे हे अपूर्वत्व असल्याने ते स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> ते सत्त्वशुद्धी साहाकारें । गुरुकृपामृत तुषारें ।
> सासिन्नलेनि बोधें वोसरे । द्वैतदैन्य ॥१८.२५९॥

म्हणौनि धनंजया । तूं संसारदुर्गती इया ।
तरसील माझिया । प्रसादास्तव ॥१२७३॥
कूर्मीचिया पिलियां । दिठी पान्हा ये धनंजया ।
कां आकाश वाहे बापिया । घरींचें पाणी ॥१३४३॥
जो व्यवहारु जेथ न घडे । तयाचें फळचि तेथ जोडे ।
काय दैवें न सांपडे । सानुकूळें ? ॥१३४४॥
एऱ्हवीं द्वैताची वारी । सारूनि ऐक्याच्या परिवरीं ।
भोगिजे तें अवधारीं । रहस्य हें ॥१३४५॥

असे हे सद्‌गुरूंच्या कृपेचे रहस्य आहे. त्यामुळेच द्वैताची जन्ममरणपरंपरा संपते. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी यासाठीच सद्‌गुरूंच्या कृपादीक्षेची आवश्यकता वारंवार प्रतिपादन करताना "दासबोधात" असे म्हटले आहे की-

सद्‌गुरुकृपेविण कांहीं । भवतरणोपाय नाहीं ।
याकारणें लवलाही । सद्‌गुरुपाय सेवावे ॥४.४.४॥
जयाचेनि कृपादृष्टि । होय आनंदाची वृष्टि ।
तेणें गुणें सर्व सृष्टि । आनंदमय ॥७.१.१२॥
सद्‌गुरुकृपा तेचि किल्ली । जेणें बुद्धि प्रकाशिली ।
द्वैतकपाटें उघडलीं । एकसरां ॥७.२.१५॥

"कुलार्णवतंत्रातही" गुरूच्या कृपेला, संकल्पाला किंवा ध्यानाच्याद्वारा होणाऱ्या दीक्षेला वेधदीक्षा असे संबोधून तिचे वर्णन करताना असे म्हटले आहे की-

गुरूपदिष्टमार्गेण वेधं कुर्याद्विचक्षणः ।
पाशयुक्तः क्षणाच्छिष्यश्छिन्नपाशस्तदा भवेत् ।
एषा मुक्तिप्रदा प्रोक्ता तीव्रदीक्षा कुलेश्वरि ॥१४.५९॥
देवि तीव्रतरा चापि गुरुणा स्मृतमात्रतः ।
सम्यक्संवेधिनः शिष्यश्छिन्नपापस्तदा भवेत् ॥६०॥
बाह्यव्यापारनिर्मुक्तो भूमौ पतति तत्क्षणात् ।
संजातदिव्यभावोऽसौ सर्वं जानाति शांभवि ॥६१॥
यदस्ति वेधकाले तत् स्वयमेवानुभूयते ।
प्रबुद्धः सन् न शक्नोति तत् सुखं वक्तुमीश्वरि ॥६२॥
वेधविद्धः शिवः साक्षान्न पुनर्जन्मतां व्रजेत् ।
एषा तीव्रतरा दीक्षा भवबंधविमोचनी ॥
शिवभावप्रदा साक्षात् त्वां शपे कुलनायिके ॥६३॥

शंकर म्हणाले, हे पार्वती ! परंपराप्राप्त अर्थात् गुरूने उपदेश केलेल्या मार्गानुसार जेव्हा ज्ञानी पुरुष आपल्या शिष्याला वेधदीक्षा देतो त्यावेळी पाशांनी

बांधलेला शिष्य या तीव्रतम दीक्षेने एका क्षणात सर्व पाश तुटून त्यांपासून मोकळा होतो. मुक्ती देणाऱ्या सर्व दीक्षांमध्ये या संकल्प किंवा वेधदीक्षेला तीव्र असे म्हटले आहे. ज्यावेळी सद्‌गुरू नुसत्या स्मरणानेच आपल्या शक्तीचा संचार शिष्याच्या ठिकाणी करून सम्यक्‌रीतीने वेध करतात त्यावेळी शिष्याची सर्व पापे तुटून छिन्नभिन्न होतात. या दीक्षेला तीव्रतर वेधदीक्षा म्हणतात. या दीक्षेमुळे शिष्य बाह्य क्रियादि व्यापारांपासून मुक्त होत असल्यामुळे अर्थात् पाप व पाशच्छेदामुळे शक्ती एका क्षणात् सुषुम्नेत ऊर्ध्वगामी होत असल्याने व तो वेग त्याला सहन न झाल्यामुळे तो भूमीवर खाली पडतो. त्यावेळी त्याच्या ठिकाणी दिव्य भाव उत्पन्न होतो व शांभवी शक्तीच्या संचारामुळे तो सर्व जाणू लागतो. एवढेच नव्हे तर दीक्षेच्या वेळी सद्‌गुरूंचा जो शिवभाव असतो त्याचा तो या अवस्थेत स्वतः अनुभव घेतो; परंतु त्या अवस्थेतून तो जागृत झाल्यावर त्या अनुभविलेल्या अवस्थेचे किंवा सुखाचे वर्णन करू शकत नाही. अशा प्रकारे वेधदीक्षा ज्याला प्राप्त झाली आहे तो साक्षात् शिवरूपच होत असल्याने त्याला पुनर्जन्म नाही. ही दीक्षा भव-पाशमोचक अर्थात् संसारबंधनांचा नाश करणारी असून शिवभाव देणारी आहे, हे मी शपथ अगर प्रतिज्ञापूर्वक सांगतो, असे शिव गिरिजेला म्हणाले.

सारांश, " ऐसे म्हणौनि आलिंगिलें । कृपादृष्टी अवलोकिलें । मग देवो काय बोलिले । अर्जुनेंसीं ।। १५.४५३ ।। " ही कृपेची दृष्टी राबवून किंवा कृपादीक्षेची भूमी उपस्थित करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " संजयें व्यासाचिया निरोपा । तो वेळु फेडिला तया नृपा । तैंसा मीही निवृत्तिकृपा । सांगेन तुम्हां ।। १६.४७१ ।। " याप्रमाणे भावार्थ कथन करून ज्ञानेश्वरीची निर्मिती केली आहे. या दृष्टीने ते म्हणतात—

> तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सर्वे ।
> तरी आतांचि हें आघवें । निर्मीन माये ।।१२.१७।।
> इये विनवणीयेसाठीं । अवलोकिलें गुरुकृपादृष्टी ।
> म्हणे गीतार्थेसीं उठीं । न बोलें बहु ।।१८।।
> तरी तूं जैसा आहासि तैसिया । नमो जी श्रीगुरुराया ।
> मज ग्रंथोद्यमु फळावया । वेव्हारा होईं ।।१४.१६।।
> आतां कृपाभांडवल सोडीं । भरी मति माझी पोतडी ।
> करीं ज्ञानपद्य जोडी । थोरा मातें ।।१७।।
> अगा विश्वैकधामा । तुझा प्रसाद चंद्रमा ।
> करूं मज पूर्णिमा । स्फूर्तीची जी ।।२३।।
> जे तान्हेनि मियां अपत्यें । आणि माझे गुरु एकलौतें ।
> म्हणौनि कृपेंसी एकहातें । जालें तिये ।।१५.१९।।

पाहा पां भरोवरी आघवी। मेघ चातकांसी रिचवी।
मजलागीं गोसावी। तैसें केलें ॥२०॥
म्हणौनि रिकामे तोंड। करूं गेलें बडबड।
कीं गीता ऐसें गोड। आतुडलें ॥२१॥
होय अदृष्ट आपैतें। तैं वाळूचि रत्नें परते।
उजू आयुष्य तें मारितें। लोभु करी ॥२२॥
आधणीं घातलिया हरळ। होती अमृताचे तांदुळ।
जरी भुकेची राखे वेळ। श्रीजगन्नाथु ॥२३॥
तयापरी श्रीगुरु। करिती जैं अंगीकारु।
तैं होऊनी ठाके संसारु। मोक्षमय आघवा ॥२४॥

सद्गुरूंच्या कृपेचे किंवा वेधदीक्षेचे अगर संकल्पाचे यापेक्षा उच्चतर वर्णन कोणत्याही शास्त्रकारांनी केलेले दृष्टोत्पत्तीस येत नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या विश्वात्मक व विश्वोत्तीर्ण अशा जागृत शक्तीच्या प्रातिभज्ञानाने गुरुकृपेचे जे वर्णन केले आहे ते सर्व सांप्रदायिकांना कायमचेच ललामभूत ठरणारे आहे. महायोगी गोरक्षनाथांनी "यस्मिन् दर्शिते सति तत्क्षणात् स्वसंवेद्यसाक्षात्कारः समुत्पद्यते। ततो गुरुरेवात्र कारणमुच्यते ॥५.६॥ तस्माद् गुरुकटाक्षपातात् स्वसंवेद्यतया च महासिद्धयोगिभिः स्वकीयं पिंडं निरुत्थानानुभवेन समरसं क्रियते इति सिद्धान्तः ॥५.७॥" असे जे "सिद्धसिद्धांतपद्धतीत" सिद्धान्तरूपाने सांगितले आहे तेच कृपादीक्षा कशी होते याचे सार असून, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही दृष्टांतादिकांनी याच सिद्धांताची अलौकिक सिद्धी करून आपल्या संप्रदायाच्या तत्त्वज्ञानाचा ध्वज सर्वत्र फडकविला आहे. निराग्रहाने पूर्व दूषित संस्कारांचा त्याग केला व स्वच्छ दृष्टीने या विषयाकडे पाहिले तर; आणि याहीपेक्षा जर शक्तिपात सामर्थ्याने एका क्षणात् निरुत्थान् दशा प्राप्त करून देणारे परंपराप्राप्त सद्गुरू भेटले तर, सिद्धयोगशास्त्रातील हा गहनतम विषय अंतरंग झाल्याशिवाय राहणार नाही. असे सद्गुरू दुर्मिळ नाहीत. ईश्वराच्या माया निरपेक्ष अहेतुक कृपेने तेही भेटतात, हे त्रिकालाबाधित सत्य आहे.

### साधनाचे स्थान :—

आत्तापर्यंत सिद्धयोगाच्या शास्त्रीय प्रक्रियेतील सद्गुरूंच्या बाजूचे म्हणजे त्यांच्याकडून होणाऱ्या कृपेच्या सर्वांगांचे तात्त्विकदृष्ट्या विवेचन केले. येथून पुढे या प्रक्रियेतील दुसऱ्या म्हणजे शिष्याच्या बाजूचे अर्थात् त्याच्याकडून होणाऱ्या साधनाचे व साधनांगभूत गोष्टींचे विवेचन करावयाचे आहे. सिद्धयोग साधना साधकाकडून उत्तम रीतीने होऊन शास्त्रात सांगितलेली सर्व फले त्याच्या पदरात पडावी म्हणून ज्या घटकांची (Factors) व आजूबाजूच्या परिस्थितीची (Environ-

ment) आत्यंतिक आवश्यकता असते आणि ज्या गोष्टींशिवाय हा साधनप्रयोग किंवा साधनाभ्यास सिद्धीस जात नाही; त्यातील सिद्धयोग साधनाचे स्थान ही पहिली महत्त्वाची गोष्ट आहे. "तरी विशेषें आतां बोलिजेल । परि तें अनुभवें उपेगा जाईल । म्हणौनि तैसें एक लागेल । स्थान पाहावें ॥६.१६३॥" असे म्हणून पंथराजाच्या अभ्यासातील पहिल्या घटकाचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आवर्जून उल्लेख केला आहे. सिद्धयोग साधनाचा उत्तम अभ्यास होऊन त्याचा अनुभव आला तरच त्याचा उपयोग म्हणजे फलसिद्धी अर्थात् स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती होणार असल्याने या सिद्धयोगाभ्यासाकरिता अत्यंत योग्य असे स्थान साधकाने शोधून स्वतःकरिता निवडणे आवश्यक आहे, असे ते म्हणतात. नूतन विज्ञानप्रयोगशाळेत शास्त्रीय प्रयोगांची उत्तरे शंभर टक्के बरोबर येण्यासाठी प्रयोगाच्या घटकांची व परिस्थितीची शंभर टक्के अचुकता जशी अपेक्षित असते; तशी ती येथेही ग्राह्य धरलेली आहे; हे या सिद्धयोग साधनेचा अभ्यास करणाऱ्या साधकांनी कधीही विसरता काम नये. फलनिष्पत्तीच्या दर्जातील उणीव ही अनेक घटकातील किंवा गुणकातील कोणत्याही एकामुळे असू शकते हे सिद्धच आहे. असे असल्यामुळे साधनाच्या स्थानाचे महत्त्व कधीही दृष्टिआड करून चालणार नाही.

सिद्धयोग साधनाचे स्थान साधकाचे समाधान वाढविणारे व त्याच्या मनातील वैराग्य दुपटीने वाढविणारे असावे, हे साधनस्थानाचे महत्त्वाचे लक्षण सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**जेथ अराणुकेचेनि कोडें । बैसलिया उठों नावडे ।**
**वैराग्यासी दुणीव चढे । देखिलिया जें ॥१.६६४॥**
**जया आड जातां पार्था । तपश्चर्या मनोरथा ।**
**पाखांडियाहि आस्था । समूळ होय ॥१६७॥**
**स्वभावें वाटे येतां । जरी वरपडा जाहला अवचितां ।**
**तरी सकामुही परी माघौता । निघों विसरे ॥१६८॥**
**ऐसेनि न राहतयातें राहावी । भ्रमतयातें बैसवी ।**
**थापटूनि चेववी । विरक्तीतें ॥१६९॥**
**हें राज्य वर सांडिजे । मग निवांता एथेंचि असिजे ।**
**ऐसें श्रृंगारियांहि उपजे । देखतखेंवो ॥१७०॥**

साधनाची जागा अशी असावी की, त्या ठिकाणी सहज आनंदाने समाधान व्हावे या इच्छेने बसले असता त्या जागेवरून उठूच नये असे वाटावे आणि ती जागा पाहताक्षणीच साधकाचे वैराग्य दुपटीने वाढावे. पार्था ! एखादा नास्तिक जरी सहज या जागेजवळून गेला तरी त्यालाही तपश्चर्या करण्याची इच्छा मनापासून उत्पन्न व्हावी अर्थात् त्याचाही मनात मुळापासून वैराग्य उत्पन्न व्हावे अशी

साधनाची जागा असावी. एखादा विषयासक्त पुरुष सहज वाटेने जात असताना जरी अवचित या ठिकाणी आला तरी तोही त्या जागेवरून परत फिरण्याचे विसरून जाईल इतकी ती जागा वैराग्य उत्पन्न करणारी असावी. अशा रीतीने ज्याला त्या ठिकाणी राहण्याची इच्छा नाही, त्यालाही जी जागा राहवून घेते, व्यर्थ भटकणाऱ्याला एके ठिकाणी बैसविते व साधकाच्या वैराग्याला थापटून किंवा हलवून जागे करते अशी ही जागा असावी. त्याचप्रमाणे एखादा राजा किंवा विलासी पुरुष जरी असला तरी त्यालाही हे साधनाचे स्थान पाहताक्षणीच आपले राज्य किंवा विलासस्थाने सोडून या ठिकाणी एकांतवासातच निवांत राहावे असे वाटावे.

शास्त्रकारांनी दृष्टांताने वैराग्याची ही अपेक्षा व्यक्त करताना असे म्हटले आहे की–

**मातुरंकगतो बालो ग्रहीतुं चंद्रमिच्छति ।**

**यथा योगं तथा योगी संत्यागेन विनाऽबुधः ।।**

आईच्या मांडीवर पहुडलेला बालक ज्याप्रमाणे चंद्र पकडण्याची इच्छा करतो त्याचप्रमाणे सर्वसंग परित्याग केल्याशिवाय म्हणजे वैराग्यस्थानी गेल्याशिवाय जो साधक योगसिद्धीची इच्छा करतो तो त्या बालकाप्रमाणेच मूढ असतो. यासाठी साधकाने वैराग्यसंपन्न स्थानामध्ये जाऊन राहिले पाहिजे.

"महानारायणोपनिषदातही" साधकाला त्यागानेच अमृतत्त्वाची प्राप्ती होते हे सांगून वैराग्याची आवश्यकता प्रतिपादन करताना असे म्हटले आहे की–

**न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः ।।१०.५।।**

परमात्म तत्त्वाची प्राप्ती कर्माच्या द्वारा, संतानांकडून किंवा धनामुळे होत नाही. एकमात्र त्यागानेच अर्थात् वैराग्यानेच त्या अमृतरूपी स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती होते.

साधनाच्या सिद्धीसाठी लागणारी वैराग्याची आवश्यकता उपरोक्त प्रकारेच "कैवल्य ।।१.३।।, अवधूत ।।५।। व "सदानंद ।।५।।" या उपनिषदातून प्रतिपादन केली आहे. "पंचदशीमध्ये" सुद्धा "चित्रदीप" प्रकरणात प. प. श्रीविद्यारण्यभारतीतीर्थ स्वामीमहाराजांनीसुद्धा या दृष्टीने असेच सांगितले आहे की–

**संगी हि बाध्यते लोके निःसंगः सुखमश्नुते ।**

**तस्मात् संगः परित्याज्यः सर्वदा सुखमिच्छता ।।६.२७४।।**

आसक्त होणाऱ्या अर्थात् जनसंसर्ग करणाऱ्या पुरुषाला व्यवहारात पीडा होते व निःस्पृहाला, निःसंगाला किंवा वैराग्यसंपन्न पुरुषाला सुख मिळते असा अनुभव येतो. यासाठी ज्या पुरुषाला परम सुखाची इच्छा आहे त्याने नेहमीच सर्व संगाचा परित्याग केला पाहिजे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोग साधनेसाठी स्थान कसे असावे हे सांगताना दुसरा महत्त्वाचा भाग असा कथन केला आहे की, संत, महात्मे व साधक यांची

त्या ठिकाणी वस्ती असून पाणी, फळे व फुले यांनी हे स्थान संपन्न असावे. या सर्वांचा उल्लेख करताना ते म्हणतात–

जो संतीं वसविला ठावो। संतोषासी सावावो।
मना होय उत्सावो। धैर्याचा ॥६.१६५॥
आणिकही एक पहावें। जें साधकीं वसतें होआवें।
आणि जनाचेनि पायरवें। रुळेचिना ॥१७२॥
जेथ अमृताचेनि पाडें। मुळाहीसकट गोडें।
जोडती दाटें झाडें। सदा फळतीं ॥१७३॥
पाउला पाउला उदकें। वर्षाकाळेंही अतिचोखें।
निर्झरें कां विशेखें। सुलभें जेथ ॥१७४॥

साधनाची जागा, पूर्वी ज्या ठिकाणी सत्पुरुषांनी वास्तव्य केले आहे अशी, मनाला अधिकाधिक संतोष देणारी किंवा संतोषास साहाय्य करणारी व मनास धैर्याचा उत्साह प्राप्त करून देणारी, अशी असावी. आणखी एक गोष्ट त्या स्थानाच्या बाबतीत पाहावी, ती ही की, त्या ठिकाणी काही साधकांची वस्ती असावी व इतर लोकांच्या वर्दळीने ते स्थान रुळलेले नसावे म्हणजे सामान्य संसारीजनांची तेथे जा ये नसावी. त्या ठिकाणीं अमृतासारखी मुळासुद्धा गोड असलेली व नेहमी फळांनी लगडलेली दाट झाडे असावीत. तेथे पावलोपावली पावसाळ्यातही अत्यंत निर्मळ पाण्याचे निर्झर असावेत. अशा प्रकारे त्या स्थानी विशेष सोय सुलभपणे व्हावी.

उपरोक्त प्रकारच्या विवरणाप्रमाणेच "याज्ञवल्क्यसंहितेमध्ये" साधनाचे स्थान रम्य, पवित्र, सुंदर व तपस्वी लोकांनी युक्त असावे हे सांगताना असे म्हटले आहे की–

तपोवनं सुसंप्राप्य फलमूलोदकान्वितम् ॥५.५॥
तत्र रम्ये शुचौ देशे ब्रह्मघोषसमन्विते।
स्वधर्मनिरतैः शांतैर्ब्रह्मविद्भिः समाश्रिते ॥६॥
वारिभिश्च सुसंपन्नैः पुष्पैर्नानाविधैर्युते।
फलमूलैश्च संपूर्णे सर्वकामफलप्रदे ॥७॥
देवाश्रमे वा नद्यां वा ग्रामे वा नगरेऽथवा।
सुशोभनं मठं कृत्वा सर्वरक्षासमन्वितम् ॥८॥
त्रिकालस्नानसंयुक्तः स्वधर्मनिरतः सदा।
वेदान्तश्रवणं कुर्वन् तस्मिन् योगं समभ्यसेत् ॥९॥

योगाभ्यासाठी पुढील प्रकारचे स्थान असावे. साधनासाठी रम्य, पवित्र व सुंदर असे तपोवन असावे. त्यात कंदमुळे, फळे व स्वच्छ जलाशय असावेत. तेथे सतत वेदध्वनी होत असावा. त्या स्थानी स्वधर्मनिरत व तत्पर अशा ब्रह्मवेत्या तपस्वी

लोकांचे अधिष्ठान असावे. निर्झरांनी किंवा सरोवरांनी व नानाप्रकारच्या पुष्पांनी ते स्थान शोभायमान असावे. सर्व ऋतूतील फलमूलांनी ते स्थान संपन्न असावे. तपोवनाच्या या स्थानाप्रमाणेच गंगेचा किनारा, देवालय किंवा रमणीय असा पवित्र देश अर्थात् नगर पाहून तेथेही साधक पुरुषाने जाऊन आपले सर्व प्रकारे रक्षण होईल असा सुंदर मठ बनवावा. तेथे राहून त्रिकाल स्नान करावे व वेदान्तशास्त्राचे श्रवण करीत योगाभ्यास करावा. वरील श्लोकांवर टीका करताना "योगतत्त्वामृत" या ग्रंथात श्री. बाबूराव चिमणाजी गोंधळे यांनी असे म्हटले आहे की–

> ऐसें जें कां तपोवन । धार्मिक सुदेशीं जाण ।
> निरंतर वेदघोषपठन । होत जेथें ।।७.२२।।
> स्वधर्मी होऊनि रत । ब्रह्मभावनें सदा शांत चित्त ।
> देवालय अथवा पुण्यनदी सन्निधानांत । असावी गा ।।२३।।
> अथवा ग्रामीं वा नगर प्रदेशीं । स्थान असावें एकांतेंसी ।
> जें सतत जनपायरवेंशी । न मैळावें ।।२४।।
> फलमूलें उदक पूर्ण । उथलत्वें परिपूर्ण ।
> नानाविधपुष्पें जाण । गुल्मलता ।।२५।।
> आनंदयुक्त सदा मन । त्रिकाल करावें स्नान ।
> सदा वेदान्तश्रवण । करावें गा ।।२६।।
> ऐसें स्थल पाहुनी । मठ कीजे तये स्थानीं ।
> सर्व रक्षण परिपूर्णीं । करावें गा ।।२७।।
> ऐसिया रहावें स्थलांत । तरीं योग होय परिप्लुत ।।२८।।

सिद्धयोग साधनाभ्यासाचे स्थान अत्यंत रम्य, निःशब्द, आपोआप साधन घडविणारे व उत्तमोत्तम अनुभव प्राप्त करून देणारे असावे, हे साधनस्थानाबद्दलचे तिसरे महत्त्वाचे अंग स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

> अभ्यासुचि आपणयातें करी । हृदयातें अनुभवु वरी ।
> ऐसी रम्यपणाची थोरी । अखंड जेथ ।।६.१६६।।
> हा आतपुही आळुमाळु । जाणिजे तरी शीतळु ।
> पवनु अति निश्चळु । मंदु झुळके ।।१७५।।
> बहुत करूनि निःशब्द । दाट न रिगे श्वापद ।
> शुक हन् षट्पद । तेउतें नाहीं ।।१७६।।
> पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें ।
> कवणे एके वेळे बैसे । तरी कोकिळही हो ।।१७७।।
> निरंतर नाहीं । तरी आलीं गेलीं कांहीं ।
> होतु कां मयुरेंही । आम्ही ना न म्हणों ।।१७८।।

सिद्धयोग साधनेचे हे स्थान असे असावे की, त्या जागेत साधानाभ्यास आपोआप व्हावा अगर त्याने आपल्याला साधकाकडून करवावे. या स्थानात साधन करताना साधकाला उत्तरोत्तर वरच्या दर्जाचे अनुभव यावेत व या अनुभवांनी त्याच्या हृदयाला वरून आनंदित करावे. अशी साधनानुकूल व अनुभवप्रदान करणारी रम्यपणाची थोरवी जेथे अखंड आहे अशी जागा असावी. या जागेत उन्हाचा कडाका नसावा अर्थात् सूर्याचे ऊनही येथे सौम्य असून त्यापासून ताप होणार नाही अशी शीतलता तेथे असावी. तसेच या जागेत मंद झुळका वाहत असतील असा अत्यंत शांत व निश्चल वारा असावा. या स्थानी बहुतकरून कोणाची गडबड नसावी. श्वापदे म्हणजे मांसभक्षक वाघ, सिंहादि पशूंना या जागेत रिघाव नसावा. असे हे स्थान संरक्षित असावे. त्याचप्रमाणे पोपट व भुंगे यांनाही तेथे शिरकाव नसावा. मात्र पाण्यासाठी येणारे हंस, दोन चार सारस पक्षी व एखादे वेळी कोकिळा तेथे आली तर त्याला काही हरकत नाहीं. त्या जागी नेहमी नाही तरी एखादे वेळीं मधून मधून मोर येत जात असले तर आम्ही नको असे म्हणत नाही.

या दृष्टीनेच "श्वेताश्वतर उपनिषदात" असे म्हटले आहे की–

समे शुचौ शर्करावन्हिवालुकाविवर्जिते शब्दजलाश्रयादिभिः।
मनोऽनुकूले न तु चक्षुपीडने गुहानिवाताश्रयणें प्रयोजयेत् ॥२.१०॥

साधनाभ्यासाची जागा समान व पवित्र असावी. तेथे साखर, अग्नीं, वाळू, खडे, शब्द, पाणी व जोराने वाहणारा वारा यांचा उपसर्ग असू नये. अशा प्रकारे मनाला प्रसन्न करणारे व डोळयांना त्रास न होणारे गुहेसारखे निवांत असे सुंदर स्थान असावे. अशा ठिकाणी जाऊनच साधक पुरुषाने योगाभ्यास करणे योग्य आहे.

"नंदिकेश्वर पुराणातही" साधनाच्या स्थानाबद्दल वरील गोष्टींचा उल्लेख करताना असे म्हटले आहे की—

मंदिरं रम्यविन्यासं मनोज्ञं गंधवासितम् ।
धूमामोदादिसुरभि कुसुमोत्करमंडितम् ॥१॥
मुनितीर्थनदीवृक्षपद्मिनीशैलशोभितम् ।
चित्रकर्मनिबद्धं च चित्रभेदविचित्रतम् ॥२॥
कुर्याद् योगगृहं धीमान् सुरम्यं शुभवर्त्मना ।
दृष्ट्वा विचित्रितान् शांतान् मुनीन् याति मनः शमम् ॥३॥
सिद्धान् दृष्ट्वा चित्रगतान् मतिरभ्युद्यमे भवेत् ।
मध्ये योगगृहस्यास्य लिखेत् संसारमंडलम् ॥४॥
श्मशानं च महाघोरं नरकांश्च लिखेत् क्वचित् ।
तान् दृष्ट्वा भीषणाकारान् संसारे सारवर्जिते ॥५॥
अनवसादो भवति योगी सिद्धयभिलाषुकः ॥६॥

साधनाभ्यासाला पुढीलप्रमाणे स्थान किंवा मंदिर असावे. या स्थानाची किंवा मंदिराची रचना अत्यंत सुंदर व मनोहर असावी. ते धूपादि सुगंधित पदार्थांनी सुगंधित केलेले असावे. तेथे नाना प्रकारची उत्तमोत्तम फुले येणारी व शोभा देणारी झाडे असावीत. त्या जागी मुनी लोकांचा निवास असावा. नदी, वृक्ष व पर्वत यांच्या जवळ ही जागा असावी. या जागेतील मार्ग स्वच्छ असावेत. तेथे मुनी, यती यांची चित्रे व मूर्ती असाव्यात. त्यामुळे साधकयोग्याला योगाविषयी विश्वास व उत्साह उत्पन्न होण्याला मदत होते. त्याचप्रमाणे या मठात निरनिराळ्या स्थळी संसार-मंडल, स्मशान व घोर नरक यांचीही चित्रे असावीत. ही चित्रे पाहून योगसिद्धीची अभिलाषा करणारा योगी या नि:सार संसारचक्राविषयी उदासीन होऊन योगाभ्यासा-विषयी जास्त जास्त उत्साही होतो.

"घेरंडसंहितेतही" स्थान निर्णय करताना असे म्हटले आहे की –

**दूरदेशे तथारण्ये राजधान्यां तथान्तिके ।**
**योगारंभे न कुर्वीत कृतेच सिद्धिहाभवेत् ।।५.३।।**
**अविश्वासंदूरदेशे अरण्येरक्षिवर्जितम् ।**
**लोकाकुले प्रकाशश्चतस्मात् त्रीणिविवर्जयेत् ।।४।।**
**सुदेशेधार्मिके राज्ये सुभक्ष्ये निरुपद्रवे ।**
**कुटीं तत्र विनिर्माय प्राचीरैः परिवेष्टिताम् ।।५।।**
**वापीकूपतडागं च प्राचीर मध्यवर्ति च ।**
**नात्युच्चं नातिनीचं कुटीरं कीटवर्जितम् ।।६।।**
**सम्यग्गोमया लिप्तं च कुटीरं तत्रनिर्मितम् ।**
**एवं स्थानेषु गुप्तेषु प्राणायामं समभ्यसेत् ।।८।।**

दूर देशात, अरण्यात व राजधानीतील स्थानी राहून साधकाने कधीही साधनारंभ करू नये. त्याने असे केले तर सिद्धीची अर्थात् आत्मस्वरूपाच्या प्राप्तीची हानी होण्याचा संभव असतो. याचे कारण असे आहे की, दूर असलेला देश अपरिचित असून तेथे साधकाला कोणाचाही विश्वास वाटत नाही. मनात नेहमी अविश्वास राहतो. अरण्यात नेहमीच असुरक्षितता वाटत राहते व राजधानीत कोलाहल किंवा गडबड असून साधनाभ्यास प्रकट होण्याचे भय असते. यासाठी साधकाने या तिन्हीही स्थानांचा त्याग करावा अर्थात् तेथे राहून साधन करू नये. साधकाने ज्या ठिकाणी खाद्य पदार्थ सुलभतेने मिळतात व ज्या स्थानी कोणत्याही प्रकारचा उपद्रव नाही अशा ठिकाणी एक झोपडी तयार करावी. मध्ये काही अंतर सोडून या झोपडीच्या चारी बाजूंनी भिंती घालाव्यात. या मोकळ्या जागेत तलाव, विहीर किंवा बाव असावी. ही झोपडी किंवा कुटी फार सखल किंवा फार उंच असू नये. ती कीटक इत्यादींनी रहित व गायीच्या शेणाने सारविलेली असावी.

अशा प्रकारच्या एकांत व गुप्त स्थानात साधकाने प्राणायामाचा अभ्यास करावा.

यासाठी मठ किंवा शिवालयासारखे बहुतकरून एकांतस्थान निवडून तेथे सिद्धयोगशास्त्रांतर्गत पंथराजाचे साधन करावे, हे शेवटी सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

परी आवश्यक पांडवा। ऐसा ठावो जोडावा।
तेथ निगूढ मठ होआवा। कां शिवालय ॥६.१७९॥
दोहींमाजी आवडे तें। जें मानलें होय चित्तें।
बहुतकरूनि एकांतें। वैसिजे गा ॥१८०॥

तरी हे अर्जुना ! ज्याला या मार्गाचा अभ्यास करावयाचा आहे, त्याने ज्या ठिकाणी गुप्त किंवा सहजासहजी न दिसणारा असा एखादा मठ किंवा शिवालय आहे, असे निसर्ग रमणीय स्थान शोधून ठेवावे. साधकाने या दोहोतून आपणास जे आवडेल व आपल्या चित्तास जे पसंत पडेल ते स्थान निवडून शक्यतो नेहमी एकांतामध्ये साधानाभ्यासास बसावे.

श्रीस्वात्मारामयोगींद्रांनी "हठयोगप्रदीपिकेत" सिद्धयोगांतर्गत हठयोगाभ्यासा-साठी साधनस्थान कसे असावे हे मठाची सर्व लक्षणे सांगताना असे म्हटले आहे की–

सुराज्ये धार्मिके देशे सुभिक्षे निरुपद्रवे।
धनुः प्रमाणपर्यंतं शिलाग्निजलवर्जिते।
एकांते मठिकामध्ये स्थातव्यं हठयोगिना ॥१.१२॥
अल्पद्वारमरंध्रगर्तविवरं नात्युच्चनीचायतं
सम्यग्गोमयसांद्रलिप्तममलं निःशेषजंतूज्झितम् ॥
बाह्ये मंडपवेदिकूपरुचिरं प्राकारसंवेष्टितं
प्रोक्तं योगमठस्य लक्षणमिदं सिद्धैर्हठाभ्यासिभिः ॥१३॥
एवंविधे मठे स्थित्वा सर्वचिंताविवर्जितः।
गुरूपदिष्टमार्गेण योगमेव समभ्यसेत् ॥१४॥

साधनाभ्यास करणाऱ्या साधकाने अत्यंत सुसंपन्न, धार्मिक व उत्तम भिक्षा मिळणाऱ्या देशात ज्या ठिकाणी चोर, व्याघ्र इत्यादींपासून उपद्रव होत नाही असे निरुपद्रवी स्थान निवडून दीर्घकालपर्यंत निवास करावा. हे स्थान धनुष्याच्या अंतराच्या मापाने म्हणजे चार हातपर्यंत चारी बाजूला दगड अगर शिळा, अग्नी व पाणी नसलेले असे असावे. अशा एकांत मठामध्ये राहून साधकाने साधनाभ्यास करावा. या मठाचे दार छोटे किंवा लहान असावे. त्याला छिद्रे खड्डे व बिळे असू नयेत. हे स्थान फार उंच किंवा फार नीच-खाली असे असू नये. ते गायीच्या शेणाने सारवलेले असावे. ते अत्यंत शुद्ध व कोणत्याही प्रकारच्या जंतू-

विरहित असावे. या स्थानाच्या बाहेर मंडप, वेदी व विहीर असावी व ते सुशोभित असून त्याच्या चारी बाजूला भिंत असावी. अशा प्रकारचा मठ हठयोगी साधकाभ्यासाकरिता असावा असे सिद्धयोग्यांनी कथन केले आहे. अशा प्रकारे वर सांगितलेल्या लक्षणांनी युक्त असलेल्या मठात राहून सर्व चिंतापासून मुक्त होऊन सद्‌गुरूंनी उपदेश केलेल्या मार्गाने नेहमी योगाचा अभ्यास करावा.

स्वामी शिवानंद यांनी "Kundalini Yoga" या पुस्तकातील "प्रिलिमिनरी" या पहिल्या प्रकरणात साधनाच्या स्थानाबद्दल "The Place For Yoga Sadhana" असे शीर्षक देऊन जे लिहिले आहे ते या संदर्भात पाहण्यासारखे आहे. ते म्हणतात– "Sadhana should be done in secluded place. There should be no interruption by anyone. When you live in a house, a well ventilated room should be reserved for sadhana purposes. Do not allow anyboody to enter the room. Keep it under lock and key. Do not allow even your wife, children or intimate friends to enter the room. It should be kept pure and holy. It should be free from mosquitoes,flies and lice and absolutely free from dampness. Do not keep too many things in the room. They will distract you every now and then. No surrounding noise also should disturb you. The room should not be too big as the eyes will begin to wonder.

Places of cool or temperate climate are required for yoga abhyasa as you will get easily exhausted in hot place. You must select such a place where you can comfortably stay all through the year in winter, summer and rainy season. You must stick to one place throughout Sadhana period. Select a beautiful and pleasant spot where there is no disturbance, on the banks of a river, lake or sea or top of a hill where there is a nice spring and grove of trees and where milk and articles of food are easily procurable. You should select such a place where there are some other yogic practitioners. When you see others who are devoted to yogic practices, You will diligently apply yourself to your practices. You can consult them in time of difficulties. Do not wander

here and there in search of place where you will get all conveniences. Do not change your place very often when you find some incovenience. You must put up with it. Every place has some advantage and disadvantage. Find out a place where you have many advantages and a few disadvantages."

साधना ही अगदी एकांत स्थानातच केली पाहिजे. तेथे कोणाकडूनही अडथळा येता कामा नये. जर तुम्ही एखाद्या घरात राहत असाल तर त्या घरात एखादी हवेशीर मोकळी खोली साधनासाठी वेगळी राखून ठेविली पाहिजे. साधना-व्यतिरिक्त तिचा इतर कशासाठीही वापर करू नये; ती कुलूप लावून बंद ठेवावी. त्या खोलीत आपली बायको, मुले व जिवलग मित्रालाही प्रवेश करण्यास अनुमती देऊ नये. ती अत्यंत शुद्ध व पवित्र ठेवावी. त्या खोलीत डास, माशा व उवा नसाव्यात. ती खोली सर्द, दमट व ओलसरही नसावी. साधनाच्या खोलीत खूप वस्तू ठेवू नयेत; कारण त्या वस्तू तुमच्या मनाला वारंवार अस्वस्थ करतील किंवा चित्तविभ्रमाला अगर गोंधळाला कारण ठरतील. मनाची एकाग्रता भंग पावेल असा आवाजही तेथे आजूबाजूला नसावा. दृष्टी विस्फारित होऊन आश्चर्यचकित होईल इतकी मोठी खोलीही साधनासाठी नसावी.

योगाभ्यासासाठी थंड किंवा समशीतोष्ण हवामानाची जागा आवश्यक आहे; कारण उष्ण हवामानाच्या जागेत तुम्ही अगदी लवकर सहजतेने दमून जाल. हिवाळा, उन्हाळा व पावसाळा या तिन्ही ऋतूत सबंध वर्षभर तुम्ही सुखावह रीतीने व सोयिस्कर पद्धतीने राहू शकाल अशीच जागा तुम्ही निवडली पाहिजे. संपूर्ण साधनकाळात तुम्ही एकाच जागी निश्चलपणे राहिले पाहिजे. जेथे दूध व खाण्याचे पदार्थ सहजासहजी मिळू शकतील, जेथे सुंदर झरा असेल व जेथे उपवन, वृक्षराई, कुंज किंवा वृक्षवाटिका असेल अशा नदी तीरावरील, तळयाच्या किनाऱ्या-वरील, समुद्राच्या काठची किंवा पर्वतावरील निःशब्द, शांत अगर अक्षुब्ध म्हणजे एकाग्रता भंग न करणारी सुंदर व आल्हाददायक स्थळाची साधकाने निवड करावी. जेथे दुसरेही योगसाधनाभ्यासक आहेत अशी ही निवड केलेली जागा असावी; कारण जेव्हा दुसरे साधक योगाभ्यासात रत असलेले तुम्ही पाहाल तेव्हा तुम्हीही तुम्हाला स्वतःला योगसाधनाभ्यासात अधिक दक्षतेने लक्ष द्यावयास लावाल. ज्यावेळी तुम्हाला अडचणी येतील त्यावेळी त्या संबंधी त्यांच्याशी चर्चा करता येईल. सर्व सुखसोयी व अनुकूलता असलेली जागा मिळविण्यासाठी सर्वत्र भटकण्याचे कारण नाही. काही अननुकूलता आढळल्यास वारंवार आपली जागा बदलू नका. असेल त्या जागेशी जमवून घ्या. प्रत्येक जागेत काही फायदे व काही

गैरफायदे असणारच. जेथे अधिक फायदे किंवा अनुकूलता आहे व कमी गैरफायदे किंवा अननुकूलता आहे अशी जागा साधकाने निवडावी.

सारांश, नित्याच्या साधनाची जागा अत्यंत रमणीय, सुंदर, मनोहर व एकांत अशी असावी असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले असले व अशी जागा शंभर टक्के फलाच्या प्राप्तीसाठी अत्यंत आवश्यक असली; तरी जे गृहस्थ साधक आहेत त्यांना अशी जागा सध्याच्या काळात उपलब्ध होणे शक्य नसल्याने, काल-मानाला अनुसरून जागा कशी असावी या संबंधीचा जो विचार प्रस्तुत ग्रंथकाराने " शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र" या ग्रंथातील अकराव्या प्रकरणात " दीक्षेचे व साधनाचे स्थान " या विभागीय शीर्षकाखाली मांडला आहे, तोच येथे उधृत करीत आहे. " साधनाला शक्यतो स्वतंत्र व एकांताची खोली असावी. तेथे निदान साधनाच्या वेळी तरी लोकांची जा-ये नसावी. साधनाची खोली किंवा जागा दररोज एकच असली म्हणजे खूप फायदा होतो. अशी शक्यता नसल्यास भिन्न जागी साधन करण्यास हरकत नाही. साधनाच्या खोलीत जितका अधिक एकांत, स्वच्छता व प्रसन्नता राहील तितका अधिक लाभ होईल.पलंग,टेबल दिवा, उदबत्ती, समई, काचेच्या वस्तू इत्यादि शरीराला जखम करणाऱ्या किंवा साधनात क्रिया सुरू झाल्यावर काहीतरी अनिष्ट घडून येईल अशा वस्तू आसपास असू नयेत. जागा भरपूर मोकळी असावी.आपण नित्य ज्या खोलीत अभ्यास करतो त्या खोलीचे वातावरण शक्तियुक्त होत असते. जर ती खोली दुसऱ्या कामासाठी उपयोगात आणली तर तेथील वातावरण दूषित होते. यासाठी साधनाव्यतिरिक्त खोली बंद ठेवणे अधिक श्रेयस्कर ठरते. खोलीत उन्हाळ्यात गारवा व थंडीत उष्णता असावी. मात्र पंखा लावून-ठेवून साधन करू नये. खोलीजवळ कोणत्याही प्रकारची घाण असू नये. दुर्गंधीमुळे साधन चांगले होत नाही. साधनापूर्वी धूप जाळून किंवा उदबत्ती लावून खोली सुवासिक करावी. मात्र धूर होणार नाही याची काळजी घ्यावी. डास, पिसवा, किडे, ढेकूण किंवा मुंग्या खोलीत असू नयेत. असे स्थान न मिळाल्यास किंवा परिस्थितीमुळे काही कमतरता असल्यास भगवान् वेदव्यासांच्या "ब्रह्मसूत्रातील" " यत्रैकाग्रता तत्राविशेषात् ॥४.१.११॥" या सूत्रा-प्रमाणे जागा कशीही असली तरी जेथे मन एकाग्र होईल तेथे साधन करावे." या सूत्रावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, "श्वेता-श्वतर उपनिषदामध्ये जागे संबंधी नियम सांगितले आहेत खरे; परंतु या नियमां-मध्ये ज्या ज्या विशेष गोष्टी सांगितल्या आहेत त्यांच्याविषयी काही नियम नाही असे मित्रत्वाच्या नात्याने आचार्य सांगतात. शिवाय " मनाला अनुकूल " ही श्रुती जेथे एकाग्रता करता येईल तेथे उपासना करावी असेच सांगते." याचा अधिक उलगडा करताना "ब्रह्मसूत्रशांकरभाष्याच्या मराठी भाषांतराच्या तळटीपेत" म. म.

श्रीवासुदेवशास्त्री अभ्यंकर म्हणतात, "श्रुतीमध्ये जरी देश, काल वगैरेंविषयी नियम सांगितले आहेत; तरी ते सर्व नियम अवश्य पाळले पाहिजेत असा श्रुतीचा अभिप्राय नाही. तर " कोणीकडून तरी मनाची एकाग्रता करण्याविषयी झटावे," असा श्रुतीचा गूढ अभिप्राय आहे."

या दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जेथे अधिष्ठानरूपी शिवशक्तीचे ऐक्य प्रत्यक्ष ज्ञानचक्षूस दिसेल तेथे साधन करावे हे सांगताना असे म्हटले आहे की–

जें येणें मानें बरवंट । आणि तैसेंचि अतिचोखट ।
जेथ अधिष्ठान प्रगट । डोळां दिसे ॥६.१७१॥
म्हणौनि तैसें तें जाणावें । मन राहतें पाहावें ।
राहील तेथ रचावें । आसन ऐसें ॥१८१॥

## साधनासाठी आसन :–

सिद्धयोग साधनासाठी कोणत्या प्रकारचे आसन असावे याचा आता विचार करावयाचा आहे. मुळात भगवंतांनीच "गीतेत" अर्जुनाला सिद्धयोग साधनार्थ आसन कसे असावे हे सांगताना असे म्हटले आहे की–

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजीनकुशोत्तरम् ॥६.११॥

अतिशय शुद्ध अशा पवित्र स्थळी अत्यंत उंच होणार नाही व अगदी जमिनीशी लागून होणार नाही असे आपले स्थिर आसन असावे. हे आसन खाली दर्भ आंथरून त्यावर मृगचर्म घालून व शेवटी वस्त्राची घडी घालून तयार करावे.

या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

वरी चोखट मृगसेवडी । माजीं धूतवस्त्राची घडी ।
तळवटीं अमोडी । कुशांकुर ॥६.१८२॥
सकोमळ सरिसे । सुबद्ध राहती आपैसे ।
एकपाडें तैसे । वोजा घालीं ॥१८३॥
परि सावियाचि उंच होईल । तरी आंग हन डोलेल ।
नीच तरी पावेल । भूमिदोषु ॥१८४॥
म्हणौनि तैसें न करावें । समभावें धरावें ।
हें बहु असो होआवें । आसन ऐसें ॥१८५॥

तळास अग्रासह असलेले दर्भ घालून त्यावर उत्तम कृष्णाजिन घालून त्यावर धुतलेल्या वस्त्राची घडी घालावी. तळाला घालावयाचे कोवळे दर्भ सरळ व आपोआपच एकमेकाला लागून एकसारखे राहतील अशा व्यवस्थित रीतीने चांगले घालावेत. मात्र हे आसन कदाचित् उंच झाले तर शरीर तोल जाऊन कलंडेल आणि

जर ते जमिनीलगत असे सखल झाले तर जमिनीचा गारवा अगर इतर दोष प्राप्त होतील. म्हणून आसन उंच अथवा सखल होऊ न देता ते समांतर घालावे. अशा प्रकारचे आसन साधनासाठी असावे. यापेक्षा अधिक वर्णन करण्याचे कारण नाही.

"कुलार्णव, संमोहन व गंधर्वतंत्रात" आसन कोणते असावे व त्याचा उपयोग कसा होतो हे सांगताना असे म्हटले आहे की—

तूलकंबलवस्त्राणां सिंहव्याघ्रमृगाजिनम् ।
कल्पयेदासनं धीमान् सौभाग्यज्ञानवर्धनम् ।।
कृष्णाजिने ज्ञानासिद्धिः मुक्तिः स्याद्व्याघ्रचर्मणि ।
वस्त्रासने व्याधिनाशः कंबलं दुःखमोचनम् ।।

( सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या साधकाने आसनाशिवाय साधन करणे योग्य व शास्त्रसंमत नसल्यामुळे त्याने पुढील प्रकारची आसने वापरावीत. ) बुद्धिमान् साधकाने सौभाग्य प्राप्तीसाठी व ज्ञानाची वाढ व्हावी म्हणून वस्त्राचे किंवा लोकरीपासून तयार केलेले कांबळचाचे आसन वापरावे. सिंह, व्याघ्र किंवा मृग-चर्माचाही साधनासाठी उपयोग करण्यास हरकत नाही. काळचा हरणाच्या कात-ड्यावर बसून साधन केल्याने ज्ञानाची सिद्धी होते. सिंह किंवा व्याघ्रचर्मावर बसून साधन केल्याने समाधीची सिद्धी होऊन मोक्षप्राप्ती लवकर होते. वस्त्रासना-वर बसून साधन केल्याने शारीरिक व्याधींचा नाश होतो व कंबलासनावर बसून साधन केल्याने दुःखाची निवृत्ती होते.

साधकाने कोणती आसने वापरू नयेत याचा निर्णय देताना शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की—

धरण्यां दुःखसंभूतिर्दौर्भाग्यं दारुजासने ।
वंशासने दरिद्रः स्यात्पाषाणे व्याधिपीडनम् ।।
तृणासने यशोहानिः पल्लवे चित्तविभ्रमः ।
जपध्यानतपोहानि जायते वसनासने ।।

आसन न घालता जमिनीवर बसून साधन केल्याने त्रास, दुःख व व्याधी होण्याचा संभव असतो. बांबूपासून तयार केलेल्या आसनावर बसून साधन केल्याने दारिद्र्य येते. पाषाणावर बसून साधन केल्याने पीडा व रोगाची उत्पत्ती होते. गवतावर बसून साधन केल्याने साधकाच्या यशाची हानी होते व पानांवर बसून साधन केल्याने चित्तामध्ये भ्रांती उत्पन्न होते. नुसत्या वस्त्रासनावर बसून साधन केल्याने जप, ध्यान व तप यांचा नाश होतो.

साधकाने कोणत्या आसनावर बसून साधन करावे यासंबंधी "घेरंडसंहिते-तही" असे म्हटले आहे की—

**कुशासने मृगाजिने व्याघ्राजिने च कंबले।**
**स्थलासनेसमासीनः प्राङ्मुखोवाप्युदङ्मुखः।**
**नाडीशुद्धिः समासाद्य प्राणायामं समभ्यसेत् ॥५.३२॥**

साधकाने कुशासन, मृगाजिन, व्याघ्राजिन किंवा कांबळयाचे आसन यांपैकी जे आसन उपलब्ध असेल ते खोलीच्या मध्यभागी घालून पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे मुख करून प्रथम नाडीशुद्धीचा अभ्यास झाल्यावर नंतर प्राणायामाचे साधन करावें.

सारांश, वरील सर्व विवेचनाचे सार असे आहे की, पाटावर, पलंगावर किंवा टेबलावर बसून साधन करू नये. अशा ठिकाणी बसून साधन करण्याने एखाद्या-वेळी खाली पडून लागण्याचा व दुखापत किंवा इजा होण्याचा संभव असतो. साधनासाठी घ्यावयाचे आसन पाच-सात फूट लांब-रुंद, मऊ, नरम, सुखकारक, जाड व औरस-चौरस प्रशस्त असे असावे. गादीपेक्षा चौपदरी घोंगडी किंवा ब्लँकेट उत्तम. आसन खोलीच्या मधोमध घालावे. भिंतीजवळ घालू नये; कारण त्यामुळे भिंतीला टेकण्याची इच्छा होते व प्रसंगी झोपही लागते. त्याचप्रमाणे साधनाच्या वेळी शक्तिचालनामुळे क्रिया जोरात झाल्यास किंवा शरीर मागे-पुढे पडल्यास त्याला दुखापत होण्याचा संभव असतो. यासाठी आसनाच्या चारही बाजूला जागा मोकळी असावी. आपल्या आसनावर दुसऱ्या कोणालाही बसू देणे उचित व इष्ट नाही. त्यामुळे दुसऱ्याचे दोष आपल्या ठिकाणी संक्रात होण्याची शक्यता असते.

## साधनाला बसण्याची पद्धत:–

सिद्धयोगाचे साधन करण्यासाठी साधकाने कोणते आसन घालून बसावे यासंबंधीची आपली धारणा स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**मुद्रेची प्रौढी ऐशी। तेचि सांगिजेल आतां परियेसीं।**
**तरी ऊरु या जघनासी। जडोनी घालीं ॥६.१९२॥**
**चरणतळें देव्हडीं। आधारद्रुमाच्या बुडीं।**
**सुघटितें गाढीं। संचरीं पां ॥१९३॥**
**सव्य तो तळीं ठेविजे। तेणें सिवणीमध्यें पीडिजे।**
**वरी बैसे तो सहजें। वाम चरणु ॥१९४॥**
**गुद मेंढ्रांआंतौतीं। चारी अंगुळें निगुतीं।**
**तेथ सार्ध सार्ध प्रांतीं। सांडूनियां ॥१९५॥**
**माजी अंगुळ एक निगे। तेथ टांचेचेनि उत्तरभागें।**
**नेहटिजे वरी आंगें। पेललेनि ॥१९६॥**
**उचलिलें कां नेणिजे। तैसें पृष्ठांत उचलिजे।**
**गुल्फद्वय धरिजे। तेणेंचि मानें ॥१९७॥**

**मग शरीर संचु पार्था । अशेषही सर्वथा ।**
**पार्ष्णीचा माथा । स्मयंभु होय ।।१९८।।**
**अर्जुना हे जाण । मूळबंधाचें लक्षण ।**
**वज्रासन गौण । नाम यासी ।।१९९।।**

अर्जुना ! मुद्रेची म्हणजे आसनाची थोरवी कशी आहे तेच आता सांगतो. ती तू ऐक. प्रथम पोटऱ्याला चिकटून मांडी घालावी. मग दोन्ही तळपाय वाकडे करून ते आधारचक्राखाली अर्थात् गुदस्थानावरील शिवणीवर चांगले सुस्थिर राहतील असे घट्ट बसवावेत. त्यात उजव्या पायाची टाच खाली ठेवून त्याने वृषणापासून गुदस्थानापर्यंत असणारी शिवणरेषा मधोमध पक्की दावावी म्हणजे मग उजव्या पायावर डावा पाय सहजच बसतो. अपानद्वार आणि शिश्न यांच्यामध्ये बरोबर जी चार बोटे जागा आहे, त्यात दीड बोट वर व दीड बोट खाली जागा सोडून मध्ये जी एक बोट जागा राहते, तेथे टाचेच्या वरच्या भागाने दाबावे व त्या टाचेवरच शरीर तोलून धरावे. अशा प्रकारे शरीर उचलले आहे की नाही हे समजू न देता पाठीच्या कण्याचा शेवटला खालचा भाग वर उचलावा आणि त्याच प्रमाणात दोन्ही पायांचे घोटे उचलून धरावेत. मग पार्था ! हा सर्व शरीराचा आकार घोटयांच्या पायावर दुसऱ्या आधाराशिवाय स्वयंभू असल्या-प्रमाणे स्वतःसिद्ध होईल. अर्जुना ! हे मूळबंध नावाच्या आसनाचे लक्षण होय. याचेच वज्रासन असे गौण नाव आहे.

श्रीस्वात्मारामयोगींद्रांनी " हठयोगप्रदीपिकेत " या संबंधी असे म्हटले आहे की–

**योनिस्थानकमंघ्रिमूलघटितं कृत्वा दृढं विन्यसे–**
**न्मेन्ढ्रे पादमथैकमेव हृदये कृत्वा हनुं सुस्थिरम् ।**
**स्थाणुः संयमितेन्द्रियोऽचलदृशा पश्येद्भ्रुवोरंतरं**
**ह्येतन्मोक्षकपाटभेदजनकं सिद्धासनं प्रोच्यते ।।१.३५।।**
**मेढ्रादुपरि विन्यस्य सव्यं गुल्फं तथोपरि ।**
**गुल्फांतरं च निक्षिप्य सिद्धासनमिदं भवेत् ।।३६।।**
**एतत्सिद्धासनं प्राहुरन्ये वज्रासनं विदुः ।**
**मुक्तासनं वदंत्येके प्राहुर्गुप्तासनं परे ।।३७।।**

गुदा व लिंग या इंद्रियांच्या मध्यभागी जे योनिस्थान आहे ते डाव्या पायाच्या टाचेने दाबून त्यावर उजवा पाय ठेवावा व त्यामध्ये जी पोकळी तयार होईल तेथे लिंग राहील असे करून हनुवटीला कंठाच्या खालील भागातील खळग्यात अडकवून व अचल दृष्टी भ्रूमध्यात स्थिर करून सर्व इंद्रिये आवरून निश्चलपणे बसावे. अशा प्रकारे मोक्षाचे कपाटद्वार उघडणाऱ्या या आसनाला सिद्धासन

म्हणतात. मत्स्येंद्रनाथांना व अन्य योग्यांना संमत असलेले सिद्धासन कोणते आहे ते सांगताना ते म्हणतात, लिंगाच्या खाली उजवा पाय ठेवून त्याच्यावर डावा पाय ठेवावा व याप्रमाणे बसावे. यालाही सिद्धांनी सिद्धासन असे म्हटले आहे. या सिद्धासनालाच काही जण वज्रासन, काही जण मुक्तासन व काही जण गुप्तासन असे म्हणतात. यावर केलेल्या " ज्योत्स्ना " टीकेत श्री. ब्रह्मानंद म्हणतात, " जे आसनांचे प्रकार उत्तम प्रकारे जाणतात ते या चारही आसनातील भेद पुढीलप्रमाणे सांगतात. ज्या प्रकारात डावी टाच लिंगाखाली ठेवून लिंगावर उजव्या पायाची टाच ठेविली जाऊन साधक स्थिर होतो, त्याला सिद्धासन म्हणतात. ज्या प्रकारात उजवी टाच लिंगाखाली व डावी टाच लिंगावर असते त्या आसनाला वज्रासन असे म्हणतात. अर्थात् या दोहोत काहीच फरक नाही. ज्यावेळी डावी व उजवी टाच वरखाली करून एकत्र मिळवून योनिस्थानावर लावल्या जातात तेव्हा त्या आसनाला मुक्तासन म्हणतात व ज्यावेळी वर सांगितल्याप्रमाणे दोन्ही टाचा मिळवून लिंगावर ठेवल्या जातात तेव्हा त्या आसनाला गुप्तासन असे म्हणतात.

या सर्व विवेचनावरून हे लक्षात येईल की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धासन घालताना उजव्या पायाची टाच शिवणीवर दावून धरून त्यावर डाव्या पायाची टाच ठेवून आसन घालावे म्हणून सांगितले आहे. यालाच ते वज्रासन असे गौण नाव आहे म्हणून सांगतात. " विवेकमार्तंड, गोरक्षपद्धति व गोरक्षशतक " या ग्रंथातून सिद्धासनाचे लक्षण सांगणारा जो श्लोक महायोगी गोरक्षनाथांनी सांगितला आहे तोच " हठयोगप्रदीपिकाकारांनी " वरीलप्रमाणे उधृत केल्याचे दिसून येते

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी साधनाला बसण्यापूर्वी साधकाने सिद्धासन घालून बसावे म्हणून जे सांगितले आहे, ते साधकाला प्राणशक्ती कुंडलिनी ऊर्ध्वगामी होण्याला नितांत आवश्यक आहे. शक्ती मूलाधारात राहूनच दक्षिणवाममार्गाने अर्थात् डाव्या उजव्या म्हणजे इडापिंगलांच्या द्वारा गतिमान राहून जीवाला संसार-चक्रात भ्रमण करवीत असते. तिच्या या गतीचा विच्छेद व्हावा म्हणून या आसनात वसून केलेला अभ्यास अत्यंत उपयुक्त होतो. प्राण व अपान किंवा श्वास व प्रश्वास यांच्या गतीचा विच्छेद होण्यालाच योगशास्त्रकारांनी प्राणायाम म्हटले आहे. "तस्मिन्सति श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः ॥ २.४९ ॥" असे या अर्थाचे " योग-सूत्र " आहे. येथे ही गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धासन घालून साधकास साधन करावयास सांगितले आहे; कारण नित्यनियमित साधन करताना शक्तीचे चालन हमखास व्हावे हेच आहे. गुरुकृपेने जागृत झालेल्या शक्तीच्या चालनाला व विकासाला साहाय्यभूत होणारी सिद्धासन ही एक बाह्य

गोष्ट, प्रक्रिया किंवा अंग आहे. मुळात कुंडलिनी शक्ती जागृत होऊन साधकाला अंतरंग साधन मिळून तो मार्गस्थ होणे, हे खरे तत्त्व व ह्याच खरा उद्देश आहे. बाकी सर्व परंपराभेदाने, पद्धतीने व साधकाच्या इयत्तेच्या धारणेनुसार सांगितलेला तपशील होय. काही वेळेस असे दृष्टोत्पत्तीस व अनुभवास येते की, साधकाचे पूर्वजन्मीचे संस्कार इतके बलवत्तर व दृढ असतात की, त्यामुळे आलेली जडता गुरुकृपेने कार्यान्वित झालेल्या शक्तीला दूर करण्यास खूप वेळ लागतो. अशा वेळी सद्गुरू सिद्धासनादि एखाद्या आसनाचा अवलंब साधकास करावयास सांगून त्याची जडता दूर करण्याचा प्रयत्न करतात. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" या दृष्टीनेच असे म्हटले आहे की, "आसनमिति स्वस्वरूपे समासन्नता । स्वतिकासनं पद्मासनं सिद्धासनमेतेषां मध्ये यथेष्टमेकं विधाय सावधानेन स्थातव्यं इत्यासनलक्षणम् ।। २.३४ ।।" याचा अर्थ असा की, शिवशक्तियुक्त अशा चेतन आत्मस्वरूपात स्थित होणे यालाच आसन म्हणतात. या खऱ्या आसनाची सिद्धी व्हावी म्हणून स्वस्तिकासन, पद्मासन व सिद्धासन इत्यादि व्यावहारिक आसनांची आवश्यकता लागते. या आसनातील जे आसन साधकाला इष्ट व योग्य वाटेल ते त्याने निवडून मोठ्या सावधानतेने त्यात बसून साधन करावे. हे आसनाचे लक्षण आहे.

आसनासंबंधीचा किंवा एका विशिष्ट पद्धतीत बसूनच उपासना करण्यासंबंधीचा अभिप्राय महर्षी व्यासांनी "ब्रह्मसूत्रात" पुढील सूत्रे घालून प्रकट करताना असे म्हटले आहे की—

**आसीनः संभवात् ।।४.१.७।।**

**ध्यानाच्च ।।८।।**

**अचलत्वं चापेक्ष्य ।।९।।**

**स्मरन्ति च ।।१०।।**

उपासकाने अर्थात् साधकाने बसूनच उपासना करावयाची आहे. उपासना ही ध्यानरूप असल्यामुळे ती देखील बसूनच करावयाची आहे. आणि अचलत्वाला अनुलक्षूनच पृथ्वीला ध्यान हा शब्द श्रुतीने लाविला आहे. स्मृतीकारही असेच सांगतात.

या सूत्रांवर भाष्य करून सिद्धयोगाच्या दृष्टीने त्याचा उलगडा करताना श्री. प. प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराजांनी आपल्या "योगवाणी या सिद्धयोगोपदेश" या ग्रंथात प्रथम या संबंधी शिष्याचा प्रश्न देऊन त्यावर उत्तर देताना असे म्हटले आहे की, "शिष्य—पिता ! ब्रह्मसूत्रमें लिखा है—"आसीनः संभवात्"— अर्थात् बैठकर जप और ध्यानादि करना चाहिए। किंतु मुझे तो कभी-कभी करवट, कभी चित और कभी औंधे लेटकर जप और ध्यान होते हैं। इससे मनमें संशय होता है कि कहीं मैं शास्त्रनीतिका उल्लंघन तो नहीं करता ? गुरु—

अब तुम्हारे मनका संशय दूर करते हैं। गुरुकृपासे सर्वयोगकी आधाररूपा मूलाधारस्था कुंडलिनी शक्ति जागरित होनेसेही आसन, मुद्रा, प्राणायामादि अस्वाभाविक रीतिसे नहीं करने पडते। तब ये स्वतः आवश्यकतानुसार होते जाते हैं।

यह कुंडलिनी-शक्ति तीन उपायोंसे जागती है। एक तो योगशास्त्रोक्त आसन, मुद्रा और प्राणायामके अभ्याससे, दूसरे सिद्ध-गुरुकी कृपाद्वारा और तीसरे जन्म-जन्मांतरके भक्तिद्वारा।

वत्स! दूसरा उपाय सबके लिए उत्तम और सहज है। गुरुकृपा अथवा जन्मजन्मांतरोंको भक्तिद्वारा जिनकी कुंडलिनी-शक्ति नहीं जागती, उन्हें उस शक्तिको जगानेके लिए अस्वाभाविक रीतिसे याने हठयोगकी विधिसे आसन, मुद्रा, प्राणायामका अभ्यास करना पडता है। कुंडलिनी शक्तिजागरणद्वारा इस स्वाभाविक या सहजयोगको प्राप्त करनेके पूर्व यदि साधक, लेटकर उपासना या साधन करे, तो वह तमोगुणमें दबकर सोता पडा रह सकता है। इसीलिए शासन-वाक्य " आसीनः संभवात्।" कहा गया है। किंतु सद्‌गुरुकी कृपासे सहजयोग प्राप्त हो जानेपर कोई बंधन नहीं रहता। गुरुशक्तिकी प्रेरणासे जब, जिस अवस्थामें रहकर जप या ध्यान करनेकी इच्छा हो, उसी भावसे जपादि करनेसे शांति मिलेगी।" (पृ.१७४,१७५)

आसनासंबंधीचे हे विवेचन ध्यानात ठेविले म्हणजे सिद्धयोग साधन करताना सिद्धासनात बसण्याचा निर्देश श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी का केला आहे, हे स्पष्ट होईल. सिद्धयोगसाधना ही शक्ती जागृत होऊन चालणारी व प्रत्यक्ष अनुभूती देणारी साधना आहे. त्यामुळे शास्त्रकारांनी अमुकच आसन घातले पाहिजे, असा आग्रह धरलेला दिसत नाही; कारण महर्षी पतंजलींनी "योगसूत्रात" "स्थिरसुखमासनम् ॥ २.४६॥" असे सूत्र कथन करून निश्चलपणे व सुखकारक पद्धतीने बसण्यालाच आसन असे म्हणतात, हे स्पष्ट केले आहे व "स्थिरसुखमासनमिति न नियमः ॥६.२४॥" असे सूत्र महर्षी कपिलांनी "सांख्यसूत्रात" सांगून ज्यामुळे देह व मन स्थिर होऊन सुख वाढेल त्याला आसन म्हणतात, हे स्पष्ट केले आहे. यासाठी आसनासंबंधी आणखी कोणताही नियम नाही. कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ज्यांना घूर्णा, कंप, मूर्च्छा इत्यादि क्रिया सुषुम्नाद्वार उघडण्यासाठी तीव्रतेने होत असतील, त्यांनी सिद्धासन किंवा अन्य आसनात बसून साधन सुरू केले; तरी वर होणाऱ्या शारीरिक क्रियांमुळे ते सुटून जाईल म्हणून क्रियांना न अडविता आसन सुटले व काही काळ अस्थिरता आली तरी येऊ द्यावी. आसनाचाच आग्रह प्रथम प्रथम धरला तर शरीरावर ताबा व संयम येऊन साधनाच्या वेळी आतून होणाऱ्या ब्रह्मद्वारभेदन क्रियांना अडथळा उत्पन्न होतो. साधनात होणाऱ्या या प्राथमिक क्रियांना अगदी मोकळेपणाने वाव मिळाला पाहिजे. यासाठी प्रथम

जोपर्यंत विविध क्रिया शक्तीकडून होत आहेत तोपर्यंत साधी मांडी घालून बसले म्हणजे शक्तीकडून सुषुम्नामुखभेदनक्रिया पूर्ण होऊन तिचे सुषुम्नेत ऊर्ध्वंचालन सुलभपणे होऊ लागले की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे सिद्धासनात बसण्यास काहीच हरकत नाही. अर्जुन रणांगणावर असताना श्रीकृष्णांनी त्याच्यावर केलेली शक्तिपाताची प्रक्रिया व श्रीमुकुंदराजांनी एका राजाला चावकाच्या एका फटकाऱ्याने त्याच्या घोड्यासकट लावलेली तीन दिवसांची समाधी, ही व अन्य उदाहरणे बसण्याच्या व शरीराच्या आसनांचा अनाग्रहच दाखविणारी आहेत, हे स्पष्ट होते. अनाग्रह म्हणजे अनावश्यकता नव्हे, हे साधकांनी लक्षात ठेवावे व आपल्या इयत्तेच्या दर्जानुसार सारभूत गोष्टी ग्राह्यग्राह्य ठरवाव्यात. समन्वयात्मक पद्धतीने शास्त्राचा विचार केला नाही; तर अनर्थ होईल म्हणून वरील सर्व विवेचन सांख्यसूत्रे, योगसूत्रे, सिद्धयोगसाधनशास्त्र व श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे सिद्धांतरूप कथन यांच्या समन्वयाने प्रस्तुत केले आहे.

## साधनातील क्रिया व अनुभव:—

सिद्धयोगाचे संप्रदाय-प्रवर्तक श्रीमहेश्वर आपल्याशी अभेद्य व एकरस असलेल्या अभिन्न शक्तीसह सहस्रारात विराजमान असतात.ज्यावेळी श्रीमहेश्वरांची कृपा होते तेव्हा त्यांच्याशी अभिन्न असलेली शक्ती गुरुरूपाने उपस्थित होऊन; मागे कथन केल्याप्रमाणे स्पर्श, दर्शन, शब्द किंवा संकल्प यांपैकी एका साधनाचा अवलंब करून,ते जेव्हा साधकाला मध्यमा मध्यमार्गात अर्थात् सुषुम्नेमध्ये प्रवाहित करून मार्गस्थ करतात, त्यावेळी ब्रह्मद्वार उघडण्यापासून सहस्रारात शिवाशी समरस होईपर्यंत ज्या नानाविध क्रिया या शक्तीकडून होतात व त्यामुळे जे अपरंपार अनुभव साधकाला येतात, त्याचे आत्तापर्यंतच्या प्रकरणांमध्ये विषयानुरोधाने विभागश: वर्णन येऊन गेले असले; तरी सिद्धयोगाच्या साधनेत शक्तिपाताने जागृत झालेल्या मूलाधारस्थ निद्रिस्त शक्तीच्या होणाऱ्या क्रिया व त्यामुळे साधकाला प्राप्त होणारे अनुभव यांचा शास्त्रीय प्रक्रियेच्या चिकित्सेतून अभ्यास होणे जरूर असल्यामुळे व साकल्याने त्यांचा विचार येथे करणे आवश्यक असल्याने, तो प्रस्तुत करीत आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे "परी हेचि आत्मसिद्धि। जो कोणी भाग्यनिधि। श्रीगुरुकृपालब्धि-। काळीं पावे ॥ १८.९८४॥" या न्यायाने जो साधक भाग्याचा साठा असतो अर्थात् प्रबल पुण्यप्रतापाने जो साधक संपन्न असतो, त्याला जेव्हा गुरुकृपेची अर्थात् शक्तिपात दीक्षेची प्राप्ती होते तेव्हा कुंडलिनी शक्ती जागृत होऊन त्याला आत्मसिद्धीचा लाभ होतो. अशा रीतीने आत्मसिद्धीचा लाभ करून देणाऱ्या आत्मसत्तेला योगी लोक कुंडलिनी शक्ती म्हणतात. भक्त हिलाच आल्हादिनी शक्ती म्हणतात. वेदान्ती लोक हिला आत्मसत्ता किंवा चित्‌शक्ती

असे नाव देतात आणि मंत्रतंत्रयंत्राचे उपासक हिलाच महामाया आद्याशक्ती कुल-कुंडलिनी या नावाने संबोधितात. माया, प्रकृती, आज्ञा, कलावती, परा, सत्ता, अहंता, स्फूर्ती, प्रतिभा, प्रभावती, बल इत्यादि नानाविध नावांनी शास्त्रकारांनी या एकाच वस्तूचा निर्देश केला आहे. त्याचप्रमाणे राधा, लक्ष्मी, सीता, दुर्गा, जगदंबा, सरस्वती, महाकाली, उग्रतारा, षोडशी, भुवनेश्वरी, छिन्नमस्ता, भैरवी, धूमावती, बगलामुखी, गौरी, सावित्री, मातंगी, कमला इत्यादि विविध विग्रहही या एकाच शक्तीने उपासनाभेदाने धारण केलेले आहेत. एवढेच नव्हे; तर राम, कृष्णादि सर्व अवतार या शक्तीनेच धारण केल्याचे पुराणातील वर्णन आपण मागे पाहिलेच आहे. त्यामुळे सद्गुरुकृपेने ज्यावेळी ही शक्ती जागृत होते, त्यावेळी मूलाधारातून सहस्राराकडे जाताना ती आपल्या विग्रह व अवतारांच्या उपासनेशी जन्मजन्मांतरी संबंधित झाल्यामुळे इतक्या विविध क्रिया करते व साधकाला इतके अनंत अनुभव देते की, त्याचे मोजमाप करता येत नाही. जन्मजन्मांतरी केलेल्या विविध देवतांच्या साधना पूर्वसंस्कारांच्या रूपाने सुषुम्नेमध्ये स्थित असतात. त्या सर्व एकामागून एक प्रकट होत या महाशक्तीत विलीन होत जातात. त्याचप्रमाणे पापपुण्य, सुखःदुख इत्यादि सर्व द्वंद्वे ही शक्ती गिळून टाकीत असल्याने व शेवटी सहस्रारात ती केवळ स्वसंवेद्य आत्मरूपानेच शिल्लक राहत असल्याने या आत्मसत्तेच्या जागृतीची व तिच्या द्वारा परमात्मप्राप्तीची इच्छा सर्वजण करीत असतात. काही जण हे जाणून करतात व काही जणांकडून अजाणतेपणे हेच घडत असते. ही आत्मसत्ता जागृत झाल्याशिवाय व स्वतः वाटचाल करू लागल्याशिवाय इतर कोणत्याही मार्गाने, उपासनेने किंवा प्रकाराने साधक सुलभतेने परमात्मस्वरूप होऊ शकत नाही, असा सकल सिद्धांचा अंतिम सिद्धांत आहे. दुराग्रहाने एखाद्याने ही गोष्ट मान्य केली नाही; तरी ज्यावेळी परमेश्वरी कृपेचा पात त्याच्यावर होईल त्यावेळी बहिर्मुख असलली त्याची शक्ती अंतर्मुख होऊन त्याला ही गोष्ट मान्य करण्यास भाग पाडेल. ज्याच्या ठिकाणी जेवढी जडता असते तेवढे चेतनतत्त्व झाकलेले किंवा संकुचित झालेले असल्यामुळे त्याची जाणीव किंवा ज्ञानाची पात्रताही तितकीच असल्याने, हा सूक्ष्म विषय त्याच्या ध्यानात येत नाही व त्याचे महत्त्वही त्याला पटत नाही; एवढेच नव्हे तर ते त्याच्या लक्षातही येत नाही. ज्यावेळी ही आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा ती आपल्या अनादि निद्रेचा अर्थात् बहिर्मुखतेने संसारात भ्रमण करण्याच्या वृत्तीचा त्याग करीत असल्याने जसजसा ती आपल्या संकुचितपणाचा व कुटिलांगाचा त्याग करीत ऊर्ध्वोन्मुखाने सरळ होत ब्रह्मस्वरूप प्रकट करीत शिवाशी ऐक्य व्हावे म्हणून गतिमान होते, त्यावेळी खरे अंतरंग साधन सुरू होऊन जन्मजन्मांतरी केलेल्या उपासनादि पुण्यकारक अनुभवांच्या व दुष्ट संस्कार, जडता इत्यादि पापकारक अनुभवांच्या रूपाने अनंत क्रिया अत्यंत विविधतेते साकार होतात. हे वैविध्य इतके

अनंत असते की, त्याची गणना करणे, मोजदाद करणे व ते एका विशेष परिमाणात आणणे हे प्रत्येक जीवाचे कर्म,संस्कार व गती भिन्न असल्यामुळे केवळ अशक्य आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विश्वरूपदर्शनाचा सोहळा वर्णन करताना याचा वारंवार प्रत्यय आणून दिला आहे. अर्थात् हा सोहळा किंवा ही परा पूजा, भक्ती किंवा साधन सुरू झाले की, त्यामुळे जप, यज्ञ, तप, पूजा, ध्यान, धारणा, आसन इत्यादि सर्व बाह्य साधने किंवा व्यापार समाप्त होऊन खरे अंतरंग साधन सुरू होते.

हे साधन सुरू असताना शक्ती शिवाशी समरस होण्यासाठी तडफडत असते. ही जी शक्तीची शिवाशी मिलनासाठी होणारी धडपड, तडफड किंवा ऊर्ध्वमुखाने होणारा उन्मुक्त संचार आहे, त्याच क्रिया होत व त्यांच्यामुळे साधकाला जी अनुभूती येते, तेच अनुभव होत. शक्ती ही प्राणस्वरूप असल्याने व प्राण आणि मन एकरूप असल्याने ज्यावेळी शक्ती उपरोक्तप्रकारे सामरस्याकरिता गतिमान होते तेव्हा ती विशेष रीतीने क्षुब्ध होत असल्याने प्राण व मनही क्षुब्ध होतात. अर्थात् ज्याच्या आश्रयाने या गोष्टी राहतात ते शरीरही यामुळे आंदोलित होते. ही जी शक्तीची प्रक्षुब्धावस्था आहे ती कधी कर्माचे, कधी क्रियेचे, कधी भक्तीचे किंवा कधी ज्ञानाचे स्वरूप घेऊन उठते. याचा अर्थच असा की, हठयोग, लययोग, मंत्रयोग व राजयोगातील निरनिराळ्या क्रिया साधकाला आपोआप होऊ लागतात. यामुळेच "योगशिखोपनिषदात" "मंत्र, लय, हठ व राजयोग या एकाच योगाच्या चार आंतरभूमिका असून वरील चार प्रकारात योग विभक्त असला तरी या चारही योगांचा शक्तिपातयोगात अर्थात् सिद्धयोगात समावेश होत असल्याने त्याला महायोग असे म्हणतात," असे स्पष्ट केले आहे. शक्तिपाताची दीक्षा ही कुंडलिनी शक्तीच्या आविर्भावक लक्षणांवरून क्रियावती, वर्णमयी, कलात्मा व वेधमयी या चार प्रकारची होते, असे "श्रीशारदातिलक" नावाच्या तंत्रग्रंथात सांगताना असे म्हटले आहे की–

> चतुर्विधा सा संदिष्टा क्रियावत्यादि भेदतः ।
> क्रियावती वर्णमयी कलात्मा वेधमय्यपि ।। ४.३।।

यावरून हे स्पष्ट होते की, क्रियावती इत्यादि तिचे जे भेद आहेत ते सर्व सिद्धयोग साधनातील क्रियांच्या व अनुभवांच्या प्रकारांवरूनच पडले आहेत, हे निश्चत आहे. याचे कारण देताना व या चार प्रकारांचा खुलासा करताना प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज यांच्या " Divine Power " या ग्रंथाचा श्री. विनायकराव करमळकर यांनी "देवात्मशक्ती" या नावाने जो अनुवाद केला आहे, त्यात "उद्‌बोधित कुंडलिनीची लक्षणे" या प्रकरणात ते म्हणतात, "हठयोगाचे पातळीवर कुंडलिनी कार्यान्वित होते तेव्हा तिला क्रियावती संबोधणे अगदी युक्त आहे. ह्याच स्थितीत साधकाच्या अनेकानेक हठयोगाच्या क्रिया आपसुखच चालू

असतात. तो हेतुपूर्वक काही करीत नाही. ह्या त्याच्या क्रिया नूतन जागृत झालेल्या शक्तीच्या प्रभावाने तिच्या दावाखाली आपोआप सुरू असतात. हठयोगांतर्गत असलेल्या या क्रिया आसने, प्राणायाम, बंध व मुद्रा या सदरात उद्‌बोधित कुंडलिनीच्या प्रभावामुळे घडून येतात हे खरेच; पण तो कोणत्या क्रिया कशाकरिता करीत आहे यासंबंधी त्यास मुळीच आवाका नसतो. काही क्रिया योगशास्त्राच्या संदर्भग्रथांमध्ये मुळीच आढळून येत नाहीत. कधी कधी या मांसपेशींच्या क्रिया इतक्या गुंतागुंतीच्या व कठीण असतात की, त्या इतर वेळी (जेव्हा तो शक्तिवर्चस्वाखाली नसेल तेव्हा) करणे केवळ अशक्यप्रायच होय....उद्‌बोधित कुंडलिनी आपल्या वल्लभास म्हणजे शिवास मिळावयास जात असता निवृत्ती, प्रतिष्ठा, विद्या, शांती व शांत्यातीता या पाच कला पादाक्रांत करते. अशावेळी तिला कलावती म्हणतात. इंद्रियग्राह्य बाह्य रूपात्मक भावावर जेव्हा कुंडलिनी प्रभावी होते तेव्हा ती कलावतीच म्हटली जाते. हीच कुंडलिनी जेव्हा नामात्मक बाजूस प्रभावी होते तेव्हा ती वर्णमयी म्हटली जाते.वर्णमयी म्हणजे तिचे अक्षरात्मक स्वरूप होय. याप्रमाणे नामरूपात्मक अखिल क्षेत्र कुंडलिनीच्या कलावती आणि वर्णमयी या दोन प्रकारात सामाविलेले आहे.

योगशास्त्राच्या ज्या शाखेस सामान्यतः हठयोग म्हणतात, ती शाखा हा क्रियावतीचा विषय होय. कलावतीचे साध्य लययोग म्हटले जाईल तर वर्णमयीचे साध्य मंत्रयोग म्हटले जाईल. यात क्रमच लावावयाचा ठरला तर पहिल्याने क्रियावती मग वर्णमयी नंतर कलावती व वेधमयी असा होईल. शारीरिक आसने, मुद्रा, बंध व क्रिया इत्यादींनी उत्थित कुंडलिनीचा प्रवास चालू होतो. ती पहिल्याने भौतिक पातळीवरून मन व प्राण यास पृथक् करते. आणि शनैः शनैः वरील पायऱ्यांवर उन्नत होता होता मंत्रद्वारा वर्णमयीने व तदनंतर लययोगेकरून कलावतीने यशस्वीरीत्या इच्छित कार्य घडवून आणते. वेधमयी ही परमोच्च दीक्षा असून तिच्या द्वारे प्रकट होणारी लक्षणें, क्रिया व अनुभूती ही अत्यंत वरच्या दर्जाची असते. गुरुदेवांच्या अनुग्रहाने जेव्हा शिष्याला वेधदीक्षा प्राप्त होते तेव्हा आनंद, कंप, आसनापासून उत्थान, घूर्णा म्हणजे डोलणे, निद्रा व मूर्च्छा या सहा अवस्था शिष्याच्या ठिकाणी प्रकट होतात. प्राणांचा प्रवाह पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश ही पाच तत्त्वे वेधून जेव्हा भ्रूमध्यातील आज्ञाचक्रही वेधतो व याहीवरील असलेल्या पायऱ्यांची मालिका चढून परमोच्च सहस्रारात विराम पावतो तेव्हा वेध पूर्ण होऊन क्रिया व अनुभूतीची समाप्ती होते. बिंदू,अर्धेंदू (अर्धचंद्र), निरोधिका (एकाग्रताशक्ती), नाद, नादान्त, शक्ती, व्यापिका, समनी, उन्मनी व प्रतिष्ठा किंवा पूर्णस्थिती अशा या भूमिका असून त्या एकामागून एक ओलांडत असता विविध रूपांची दर्शने व अत्यंत दिव्य प्रकाशांची दृश्ये साधकाच्या अंतर्दृष्टीस दिसू लागतात. यात चंद्र, सूर्य, तारांगण, अग्नी, विद्युत, ज्वाला इत्यादींचा समावेश होतो. त्याप्रमाणेच घंटा, भेरी,

वंशी, मृदंग, ढोल असे अनेक प्रकारचे नाद अंतःश्रवणेंद्रियास ऐकू येतात. त्यावेळी या क्रियांमुळे व अनुभूतींमुळे मनाचे मनपण नाहीसे होत होत शेवटी साफ नाहीसे होते. या भूमिकेस लययोग असे म्हणतात. या जागी मन आपले संकल्प-विकल्पात्मक स्वरूप टाकून पूर्ण स्थिरतेला प्राप्त होते व परमात्मीय आनंदपूर्ण शांतीचा आस्वाद घेत असता विचारहीन अशा अकामशून्य व अमनस्क अवस्थेस पोहोचते."

येथपर्यंत सिद्धयोगसाधनात होणाऱ्या क्रियांचा व येणाऱ्या अनुभूतींचा आपण साकल्याने विचार केला. त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत प्रकट केलेल्या क्रियानुभूतींच्या चिकित्सेला योग्य पृष्ठभूमी उपस्थित होईल. ही चिकित्सा करण्यापूर्वी दोन शंकांची किंवा प्रश्नांची उत्तरे देणे आवश्यक आहे. त्यातील पहिली शंका अशी की, "श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत जो सिद्धयोगमार्ग कथन केला आहे तो आपण म्हणता त्या संप्रदायाहून किंवा मार्गाहून भिन्न आहे; कारण त्यांनी आपण सांगत आहात त्या क्रियांचे व अनुभूतींचे कथन केलेले नाही; यामुळे त्यांचा व आपला शक्तिपात हा भिन्न प्रकारचा आहे," ही पहिली शंका आहे. या शंकेचे उत्तर असे आहे की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त सर्व क्रियांचे वर्णन केले आहे; फक्त शास्त्रकारांच्या परिभाषेहून त्यांची भाषा भिन्न असून ती काव्यशास्त्राच्या मुलायम आवरणाने लपटलेली आहे. आपण काव्याची पडलेली ही मधुर मिठी जर सोडविली तर सिद्धयोगाच्या साधनक्रियांचा व अनुभूतीचा निश्चित उलगडा होईल. याशिवाय दुसरी एक गोष्ट महत्त्वाची आहे की, हठ, लय, मंत्र अर्थात् क्रियामयी, कलावती व वर्णमयी यांच्या वर्णनापेक्षा राजयोगाच्या म्हणजे वेधमयीच्या क्रिया व अनुभूती त्यांनी अधिक सविस्तरपणे वर्णिली आहे किंवा प्रकट केली आहे, हे खरे आहे. यामुळे उपरोक्त क्रियानुभूतिवर्णनाला स्वाभाविकपणेच गौणत्व आले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज राजयोगांतर्गत क्रियांचे व अनुभूतींचे वर्णन करीत असले तरी ते वाचीत असताना हे लक्षात येते की, त्यांनी कोणत्याही प्रकारच्या पृथक्करणाला (An\lisis) सवड ठेविली नाही किंवा वाव दिलेला नाही. याचे महत्त्वाचे कारण असे आहे की, ज्या पातळीवरून गीतेचा भावार्थ त्यांच्याकडून प्रकट झाला आहे, ती इतकी वरच्या दर्जाची आहे की, त्यामुळे सामान्य गोष्टींचा निर्देश होण्यापलीकडे भावार्थाच्या कक्षा रुंदावलेल्या दृष्टोत्पत्तीस येत नाहीत. एखाद्या वस्तूचा निर्देशच झाला नाही; तर ती गोष्ट ग्रंथकर्त्यास अभिप्रेत नाही असे म्हणता येईल; परंतु तसे येथे घडलेले नाही. प्रमाणाचा फरक, पृथक्करणाची मर्यादा व काव्यमय भाषेचे आवरण यामुळे शंका उपस्थित झाली असली तरी तिची निवृत्ती कशी होते, हे आपण पाहिले. या शंकेच्या उत्तरातच "श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा व श्री. प. प. श्रीगंगाधरतीर्थस्वामीमहाराज, श्री प. प. श्रीनारायणतीर्थस्वामीमहाराज, श्री प. प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराज व

श्री. प. प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज या क्रमाने चालत येऊन महायोगी श्रीगुळवणीमहाराजांकडून हजारो साधकांना वितरित झालेला सिद्धयोग हा या संप्रदायाहून किंवा मार्गाहून भिन्न आहे," या तदंतर्गत शंकेचे उत्तरही समाविष्ट आहे. असे असले तरी या शंकचे थोडक्यात समाधान असे आहे की, शक्ती दोन असू शकत नाहीत. ती एकच आहे. त्यामुळे जितके म्हणून संप्रदाय, मार्ग किंवा परंपरा आहेत व ज्यांच्यात हे संक्रमणाचे सामर्थ्य चालत आलेले आहे, ते सर्व एकाच प्रकारचे आहे, हे लक्षात ठेविले पाहिजे. परंपराभेदाने क्रियांमधील किंवा अनुभूतीतील फरक अगर कमीजास्तपणा हा शक्तिपात भिन्न प्रकारचा आहे, असे म्हणण्यात जर परिणत होईल; तर याच्या इतकी हास्यास्पद गोष्ट दुसरी कोणती असू शकेल? तीव्र, मध्य व मंद शक्तिपाताचे तीव्र-तीव्र, तीव्र-मध्य व तीव्र-मंद या प्रकारांनी नऊ भेद होतात असे शास्त्रकारांनी वर्णिले आहे. हे भेद क्रिया, अनुभूती व शिष्याची आणि गुरूंची पात्रता यांना अनुलक्षून असले; तरी मुळात शक्तिपात भिन्न नाही, हे नितांत सत्य आहे आणि संप्रदायाचे भिन्नत्व हे केवळ अभिमानाचे व अहंकाराचे द्योतक असल्याने, ही शंकाही निर्मूल आहे, हे स्पष्ट होते. आपल्या आवडीप्रमाणे आपल्या उपास्य दैवतालाच श्रेष्ठ मानणे व आपले सद्गुरुनाथ हे त्रैलोक्याचे स्वामी असून आपली दीक्षा किंवा ज्ञानपरंपरा अत्युत्तम आहे अशी दृढ श्रद्धा ठेवणे हे साधकाला योग्य व आवश्यक असले; तरी भिन्न संप्रदाय परंपरेने वाहत आलेल्या उपासना या शेवटी जागृत कुंडलिनी शक्तीच्या अंतरंग उपासनारूपी गंगेला विविध नद्यांचे शतशत प्रवाह सागराला एकत्र मिळावेत, त्याप्रमाणे समरसून जात असल्याने, वरवर दिसणारे भिन्नत्व हे केवळ स्थूल किंवा जडदृष्टीमुळे भासत असून; शक्तीची रूपे अनंत, क्रिया अपार व अनुभूती विविध असली; तरी ही एकमात्र आधारशक्ती आहे हे नितांत हृदयात बाळगून इतर संप्रदाय, मार्ग, साधक, गुरू, परंपरादि सर्व गोष्टी आपल्याहून भिन्न असून कमी दर्जाच्या आहेत हे समजणे अश्लाघ्य, हानिकारक व साधनातील एक मोठा अडथळा आहे, हे निश्चित होय. हे सर्व उपासनाभेदाने शक्तिपातविद्येची परंपरा ज्या संप्रदायातून अविच्छिन्नपणे प्रवाहित होत राहिली आहे, त्यांच्या संबधीच लिहिले आहे. ज्यांना या विषयाची किंचिन्मात्र अनुभूती नाही, त्यांच्याकरिता हे लिहिले नाही; कारण साधन जगताचे जे अत्यंत निगूढ रहस्य ज्ञानेश्वरीच्या ओवीओवीत व शब्दाशब्दात प्रकट झाले आहे व ज्याच्या प्राप्तीकरिता " तरी गुरु दाविलिया वाटा। येऊनि विवेक तीर्थतटा। धुऊनियां मळकटा। वृद्धीचा तेणें ॥ १८.१०११ ॥ " या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या सांगण्याप्रमाणे दीर्घकालपर्यंत सत्यस्वरूप सद्गुरूंच्या कृपेचा अवलंब करून असिधारपत्रव्रताप्रमाणे मार्गक्रमणा करीत तीव्र पुरुषार्थाचा प्रयोग करणे आवश्यक पडते; ते नसत्या प्रवचनाने, पांडित्याने, बडबडीने, तर्काने, कर्माने, भक्तीने, ज्ञानाने अगर वरवरच्या कोणत्याही उपायाने प्राप्त होत नसल्याने; या प्रकाराने जे संप्रदाय,

मार्ग व परंपरा चालतात व जे लोक नुसते तार्किक व साधनरहित आहेत, त्यांच्यासाठी ही सिद्धयोगशास्त्राची व त्यातील रहस्याची आलोचना निश्चित नाही; कारण या सर्व लोकांनी साखर कशी तयार होते, कशी असते व त्याची चव कशी असते हे कधीही न पाहता व चाखता खूप चर्चा केलेली असल्याने व त्यातच त्यांना आनंद वाटत असल्याने, साखर प्रत्यक्ष न खाणाऱ्या साधकाप्रमाणे त्यांच्या समोर केलेल्या या रहस्यदर्शनाचे यथार्थ फल उत्पन्न होत नाही व होणार नाही. "अशिष्याय न देयं।" असा जो सर्व उपनिषदांच्या शेवटी ऋषींनी दंडक घातला आहे त्याचा अर्थ हाच आहे.

दुसरी शंका अशी की, "काही लोकांना व कित्येक वेळा नवीन साधकालाच असे वाटते की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांसारखे सद्गुरू तर अत्यंत दुर्मिळ आहेत आणि कुंडलिनी-जागरण ही तर अत्यंत दुर्लभ गोष्ट आहे; मग अत्यंत सहजपणे ती आपल्यासारख्या सामान्य माणसाला प्राप्त होणे कसे शक्य आहे ? आपल्याला ज्या क्रिया होतात व जी अनुभूती येते त्यात काही मायाजाल किंवा जादूटोणा तर नसेल ? संमोहन विद्येच्या प्रभावाने तर लोक इकडे आकर्षित होत नसतील? अशा प्रकारे शक्ती जागृत करणारे व स्वतःला सद्गुरू म्हणविणारे लोक जादूगार तर नसतील?" या प्रश्नांचे उत्तर असे आहे की, ज्यावेळी दुर्लभ वस्तू सहजतेने प्राप्त होते तेव्हा योगवासिष्ठातील मणिकाच उपाख्यानातील ब्राह्मणाप्रमाणे साधकाची किंवा जिज्ञासूची स्थिती होऊन त्याला चिंतामणीची किंमत कळत नाही व तो काचेलाच चिंतामणी समजतो. हे दुर्लभ साधन सहजासहजी मिळाल्याने त्याचे विशेष महत्त्व व श्रेष्ठता साधकाला जाणवत नाही. अशा वेळी साधकाने हृदयाच्या कसोटीवर साधनाला पारखून आपल्याला सोने मिळाले आहे का पितळ हे साक्षेपाने पाहिले पाहिजे. आपण चिंतामणीचे स्वामी आहोत की काचेचे याची परीक्षा त्याने केली पाहिजे. आपल्या हातात परिस आहे का गारगोटी आहे याचा पडताळा त्याने घेणे आवश्यक आहे. साधना नियमित करून म्हणजे या शास्त्राचा प्रयोग करून गुरुवाक्य व शास्त्रवाक्य यांच्याशी आपली अनुभूती जुळते की नाही, याची चिकित्सा त्याने अवश्य केली पाहिजे. जर गुरुवाक्य, शास्त्रवाक्य व स्वतःचा अनुभव या तीनही गोष्टी बरोबर जुळल्या तर साधन-तत्त्वासंबंधी कोणताही संशय मनात ठेविता उपयोगी नाही. जादुटोण्यानें किंवा संमोहन विद्येच्या जोरावर एखाद्याने काही काळ माणसाला झुलविले; तरी फार काळ त्याचा प्रभाव राहणार नाही. या साधनाने मिळणारा आनंद, प्रचीती व ब्रह्मप्राप्ती ही जादुटोण्याने किंवा संमोहन विद्येच्या प्रभावाने कदापीही मिळणार नाही. संमोहनामुळे तात्कालिक भ्रम पडेल; पण निरंतर सुख कसे मिळेल ? सारांश, सिद्धयोग, शक्तिपात व तदंगभूत क्रियानुभूती म्हणजे मायाजाल, जादूटोणा, किंवा संमोहनविद्या नव्हे. अशा प्रकारे शक्तीची जागृती करणारे सद्गुरू हे जादूगारही नव्हेत; तर आदिगुरू शंकरांपासून

शिष्यपरंपरेने हे महायोगाचे ऐश्वर्य चालत आलेले असून ते महद्‌भाग्याने आपणास प्राप्त झालेले आहे, याची निरंतर जाणीव अंतःकरणात बाळगून निःशंक होऊन साधन केले पाहिजे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीने तर सगुण-साकाररूपाची अपेक्षाही काचेसारखी असून या साधनाने प्राप्त होणारे निर्गुण व निराकार रूप हेच अपार असे परात्पर रूप खरे अमृत, सोने, चिंतामणी इत्यादि सर्व असल्याने तेच एकमात्र उपासनेस योग्य आहे. हे भगवंताच्या मुखाने अर्जुनास पटविताना ते म्हणतात—

या अर्जुनाचिया बोला। विश्वरूपा विस्मयो जाहला।
म्हणे ऐसा नाहीं देखिला। घसाळ कोणी ॥११.६०९॥
कोण हे वस्तु पावला आहासी। तया लाभाचा तोषु न घेसी।
मा भेणें काय नेणों बोलसी। हेकाडु ऐसा ॥६१०॥
तैसें ऐश्वर्य हें महातेज। आजि हातां आलें आहे सहज।
कीं एथ तुज गजबज। होआवी कां ? ॥६२८॥
परि नेणसीच गांवढिया। काय कोपों आतां धनंजया।
आंग सांडोनि छाया। आलिंगितोसि मा ? ॥६२९॥
हें नव्हे जो मी साचें। एथ मन करूनियां काचें।
प्रेम धरिसी अवगणियेचें। चतुर्भुज जें ॥६३०॥
तरी अझुनिवरी पार्था। सांडीं सांडीं हे व्यवस्था।
इयेविषयीं आस्था। करिसी झणें ॥६३१॥
हें रूप जरी घोर। विकृती आणि थोर।
तरी कृतनिश्चयाचें घर। हेंचि करीं ॥६३२॥

सारांश, सिद्धयोगातील क्रिया व अनुभूती ज्या रूपाने प्राप्त होतात त्या अत्यंत घोर, विकृत व विपरीत असल्या तरी त्याच थोर व खऱ्या आहेत असा कृत-निश्चय करून साधकाने कधीही संशयाने धीर सोडता कामा नये. या साधनात उपस्थित होणाऱ्या क्रियांमुळे साधक कितीही डळमळीत झाला तरी तो शेवटी या डळमळणाऱ्या क्रियांमधूनच स्वसंवेद्य आत्मस्वरूपाप्रत जात असल्याने दृष्टांताच्या आधाराने हे अधिक स्पष्ट करून सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

जैसें गंगेचेनि वोघें। डळमळीत जळ जें निघे।
सिंधुपद तयाजोगें। आन नाहीं ॥१४.३९९॥
म्हणौनि वारियासवें धांवणें। न ठके गगना खेंव देणें।
जळकेली खेळणें। समुद्रीं केउतें ? ॥११.५९२॥
यालागीं जी देवा। एथिचे भय उपजतसे जीवा ॥५९३॥

येथपर्यंत आपण सिद्धयोगशास्त्रांतर्गत क्रियांचे व अनुभूतीचे सामान्य विवेचन पाहून तत्संबंधीच्या शंकांचेही निराकरण करून घेतले. मात्र येथे एक गोष्ट साधकाने

विशेष लक्षात ठेविण्यासारखी आहे की, साधन करताना क्रियांचा क्रम एकसारखा राहील असे नाही.त्याचप्रमाणे एक क्रिया चालू असताना दुसरी होणार नाही,असेही नाही.दीक्षा झाल्याबरोबर साधकांचे शरीर,मन, बुद्धी, प्राण, वासना व जडता यांचे शुद्धीकरण सुरू होत असल्याने भक्ती, ज्ञान, हठ, लय, मंत्र, राज, वर्ण,कला व वेध यांच्याशी संबधित अशा मिश्रस्वरूपात अनेक बाह्य व अंतर्गत क्रिया एकसमयावच्छेदेकरून एकाच अगर भिन्न पातळीवरून साधकदेहात आविष्कृत होतात. हे सर्व कसे घडते याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मग तेथ आपण । एकाग्र अंतःकरण ।
करूनि सद्‌गुरुस्मरण । अनुभविजे ।।६.१८६।।
जेथ स्मरतेनि आदरें । सबाह्य सात्त्विकें भरे ।
जंव काठिण्य विरे । अहंभावाचें ।।१८७।।
विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे ।
मनाची घडी घडे । हृदयामाजीं ।।१८८।।
ऐसें ऐक्य हें सहजें । फावें तंव राहिजे ।
मग तेणेंचि बोधें बैसिजे । आसनावरी ।।१८९।।
आतां आंगातें आंग वरी । पवनातें पवनु धरी ।
ऐसी अनुभवाची उजरी । होंचि लागें ।।१९०।।
प्रवृत्ति माघौति मोहरे । समाधि ऐलाडी उतरे ।
आघवें अभ्यासु सरे । बैसतखेंवो ।।१९१।।

साधक आसनावर बसताक्षणीच "आंगाते आंग वरी,सबाह्य सात्त्विकें भरे" व "जंव काठिण्य विरे" यांमुळे शारीरिक अर्थात् हठयोगाच्या, "मनाची घडी घडे, इंद्रियांची कसमस मोडे" व "विषयांचा विसरु पडे," यांमुळे मनाच्या आणि "पवनातें पवनु धरी" व "प्रवृत्ति माघौति मोहरे" यांमुळे प्राणाच्या क्रिया एकदम सुरू होऊन अनुभवाची "ऐसी उजरी" होऊ लागते व अभ्यास आपोआप पूर्ण होतो किंवा साधन साध्यात परिणत होते, हे त्यांनी स्पष्ट केले आहे. जागृत शक्तीच्या या विविध क्रिया घडल्यावर मनःप्राण सुषुम्नेत प्रविष्ट होऊन आसनावर बसताक्षणीच "समाधि ऐलाडी उतरे" ही अत्युच्च स्थिती सिद्धयोगांतर्गत जागृत कुंडलिनी शक्तीच्या अंतरंग साधनाशिवाय साधणे कसे शक्य आहे ? असे आपोआप घडणे हा सिद्धयोगाचा व तदंतर्गत क्रियांचा भाग असल्याने "योगशिखोपनिषदात" या दृष्टीने असे म्हटले आहे की–

निरुध्य मारुतं गाढं शक्तिचालनयुक्तितः ।
अष्टधा कुंडलीभूतामृज्वीं कुर्यात्तु कुंडलीम् ।।१.८२।।
पायोराकुंचनं कुर्यात् कुंडलीं चालयेत् तदा ।
मृत्युवक्त्रगतस्यापि तस्य मृत्युभयं कुतः ।।८३।।

एतदेव परं गुह्यं कथितं तु मया तव।
वज्रासनगतो नित्यमूर्ध्वाकुंचनमभ्यसेत् ॥८४॥
वायुना ज्वलितो वन्हिः कुंडलिमनिशं दहेत्।
संतप्ता साग्निना जीवा शक्तिस्त्रैलोक्यमोहिनी ॥८५॥
मनसा मन आलोक्य वृत्तिशून्यं यदा भवेत्।
ततः परं परब्रह्म दृश्यते च सुदुर्लभम् ॥६.६२॥
मनसा मन आलोक्य मुक्तो भवति योगवित्।
मनसा मन आलोक्य उन्मन्यन्तं सदा स्मरेत् ॥६३॥
मनसा मन आलोक्य योगनिष्ठः सदा भवेत्।
मनसा मन आलोक्य दृश्यन्ते प्रत्यया दश ॥६४॥
यदा प्रत्यया दृश्यन्ते तदा योगीश्वरो भवेत् ॥६५॥
बिंदुनादकलाज्योतिरविंदुर्ध्रुवतारकम्।
शांतं च तदतीतं च परं ब्रह्म तदुच्यते ॥६६॥
हसत्युल्लसति प्रीत्या क्रीडते मोदते तदा।
तनोति जीवनं बुद्धया बिभेति सर्वतोभयात् ॥६७॥
रोधते बुध्यते शोके मुह्यते नवसंपदा।
कंपते शत्रुकार्येषु कामेन रमते हसन् ॥६८॥
स्मृत्या कामरतं चित्तं विजानीयात् कलेवरे।
यत्र देशे वसेद्वायुश्चित्तं तद्वसति ध्रुवम् ॥६९॥

साधकाने गुरूच्या सूचनेनुरूप दृढ प्राणायाम करून किंवा साधनात होणाऱ्या दृढ प्राणायामाला वाव देऊन आठ वळणे घेऊन वर्तुळरूपाने असलेल्या कुंडलिनी शक्तीला शक्तिचालनाच्या युक्तीने सरळ म्हणजे जागृत करावी. त्याचप्रमाणे गुदद्वाराचे आत आकुंचन करून अर्थात् अश्विनी मुद्रेने कुंडलिनी शक्तीचे सुषुम्नेत चालन करावे. अशा प्रकारे शक्ती जागृत झाली म्हणजे मनुष्य मृत्युचक्रात सापडला तरी त्याला मृत्यूचे भय राहत नाही. हेच परम रहस्य असून ते मी तुला अर्थात् शंकरांनी ब्रह्मदेवाला सांगितले आहे. नेहमी वज्रासन अर्थात् सिद्धासन घालून गुदद्वाराच्या ऊर्ध्वाकुंचनाचा म्हणजे मूलाधार चक्राच्यावर शक्तीच्या आकर्षणाचा अभ्यास करावा. अशा प्रकारे ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन क्रियाशील होईल त्यावेळी मनानेच मनाला पाहून वृत्तिशून्य अवस्था उत्पन्न होऊन त्यामुळे अत्यंत दुष्प्राप्य अशा परब्रह्माचेही दर्शन घडते. मनानेच मनाला पाहिल्यावर योगी-साधक मुक्त होतो. मनाने मनाची आलोचना करून उन्मनी अवस्थेचे नेहमी स्मरण करावे. मनानेच मनाला पाहिल्यावर साधकयोगी योगनिष्ठ होऊन त्याला ब्रह्माभि-व्यक्ती करणारे दशप्रत्यय दिसू लागतात. अशा प्रकारे साधन करताना जेव्हा अनुभव येऊ लागतात तेव्हा साधकाला लवकर योगसिद्धी प्राप्त होऊन तो योगीश्वर

होतो. नाद, बिंदू, कला, ज्योती, सूर्य, चंद्र, ध्रुव, तारा इत्यादि परब्रह्माची अभिव्यक्ती करणारी चिन्हे साधकाला अंतराकाशात दिसतात व पुढे ती नाहीशी होतात. ज्यावेळी ह्या क्रिया संपतात त्यावेळी मन शांत होते व कोणतीही क्रिया होत नाही. मग शांत्यातीत अवस्था प्राप्त होते. शांत्यातीत अवस्था ही परब्रह्म आहे. ही अवस्था मनाच्या व वाणीच्या पलीकडे असल्यामुळे केवळ स्वानुभवगम्य आहे हेच खरे !

साधन करताना साधकाला दिव्य अनुभव येऊ लागले कीं, त्याला अपार आनंद होतो. या आनंदामुळे तो उल्हासाने उत्फुल्ल होऊन हसतो व प्रसन्न होतो. प्रेमाने आपल्याशीच क्रीडा करीत तो स्वतःतच रममाण होऊन महासुखाच्या अपार सागरात पोहू लागतो. तो बुद्धीने म्हणजे दक्षतेने जीवनव्यवहार करतो व संसारापासून भय आहे हे जाणून त्यापासून दूर राहतो. शोकाच्या प्रसंगात तो बुद्धीच्या जोरावर विवेकाने राहतो. ज्यावेळी साधकाला खूप संपत्ती मिळते त्यावेळी तो मोहित होत नाही. शत्रुत्वाच्या कार्याबद्दल त्याला भय वाटते म्हणजे दुष्ट कार्यापासून तो दूर राहतो. कामामुळे जे विकार शरीरामध्ये उत्पन्न होतात त्याचे परिणाम त्याला जाणवतात. त्यामुळे तो सर्व कामनांपासून मनाला आवरतो. शरीरामध्ये ज्या ज्या स्थानी वायू राहतो त्या त्या स्थानी चित्तही राहत असते हे जाणून तो साधन व व्यवहार करतो.

अशा प्रकारे कुंडलिनी शक्ती मूलाधारातून निघून सहस्राराकडे जाऊ लागली की, अनंत क्रिया होऊन साधकाला अपार अनुभव येतात. त्यामुळे साधनात क्रिया का होतात ? अनुभव का व कोणते येतात ? क्रिया कोणत्या होतात ? क्रियांचा व अनुभवांचा शेवट केव्हा व कसा होतो ? हे सर्व प्रश्न उपस्थित होतात. आपण या प्रश्नांचा क्रमशः विचार करू.

सिद्धयोग साधनात क्रिया का होतात ? असा पहिला प्रश्न आहे. याचे उत्तर देताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की, ज्यावेळी साधक साधनाला बसतो त्यावेळी प्राण प्रक्षुब्ध होऊन मूलाधारात त्याची गती रुद्ध झाल्याने क्रिया सुरू होतात. यासंबंधी ते म्हणतात—

**जो मूळबंधें कोंडला । अपानु माघौता मुरडला ।**
**तो सवेंचि वरी सांकडला । धरी फुगूं ।।६.२१४।।**
**क्षोभलेंपणे माजे । उवाइला ठायीं गाजे ।**
**मणिपूरेंसी झुंजे । राहोनियां ।।१५।।**

साधन सुरू झाले की, मूळबंध लागून अपानवायू म्हणजे अपान नावाचा प्राण कोंडला जातो म्हणजे त्याची अधःमार्गाकडे जाण्याची प्रवृत्ती बंद पडून ती ऊर्ध्वमार्गी होते म्हणजेच तो माघारी फिरतो; परंतु ब्रह्मद्वार बंद असल्याने तो तेथेच अडकतो व फुगवटा धारण करतो. जसजशी साधनाची गती दिवसेंदिवस वाढत

जाते तसतसा तो अपानवायू खवळून बलवत्तर होतो व अडकल्या ठिकाणी तो गर्जना करू लागतो आणि तेथेच राहून नाभिस्थानातील मणिपूर चक्राला धक्के देत झुंजत राहतो.

आपला मार्ग मोकळा करण्यासाठी हा अपान वायू ज्या गर्जना करतो व धक्के देऊन जी झुंज खेळतो त्यामुळे नाना तऱ्हेच्या हठयोगाच्या शारीरिक क्रिया शिष्य-देहात प्रकट झालेल्या दृष्टोत्पत्तीस येतात. या दृष्टीनेच "योगशिखोपनिषदात" असे म्हटले आहे की –

आधारचक्रमहसा विद्युत्पुंजसमप्रभा।
तदा मुक्तिर्न संदेहो यदि तुष्टः स्वयं गुरुः ॥६.२६॥
आधारचक्रमहसा पुण्यपापे निकृंतयेत्।
आधारवातरोधेन लीयते गगनांतरे ॥२७॥
आधारवातरोधेन शरीरं कंपते यथा।
आधारवातरोधेन योगी नृत्यति सर्वदा।
आधारवातरोधेन विश्वं तत्रैव दृश्यते ॥२८॥

जर सद्गुरू संतुष्ट होऊन त्यांनी शक्तिपातदीक्षा दिली तर कुंडलिनी शक्ती जागृत होऊन विद्युल्लतेच्या पुंजाप्रमाणे तेजस्वी असलेल्या आधारशक्तीच्या प्रभा-वाने मोक्ष निःसंशय मिळतो. आधारगत वायुनिरोधाने जेव्हा आधारचक्राचा भेद होतो तेव्हा साधकाच्या पुण्यपापाचा नाश होतो व तो सुषुम्नामार्गाने जाऊन सहस्रारातील गगनात किंवा अंतरिक्षात विलीन होतो. ज्यावेळी आत्मशक्तीच्या उद्‌बोधनामुळे अपानाच्या रूपाने असलेला प्राण क्षोभित होऊन आधारचक्राच्या खाली रुद्ध होतो त्यावेळी साधकाच्या शरीरात कंप उत्पन्न होतो. एवढेच नव्हे तर मूलाधारात प्राण रुद्ध झाल्यामुळे साधक आनंदित होऊन नाचू लागतो. अशा प्रकारे आधारचक्रामध्ये प्राणवायूचा निरोध झाल्याने तेथे साधकाला संपूर्ण विश्वाचे दर्शन होते.

सिद्धयोगाचे साधन सुरू झाले की क्रिया का होतात, याचे दुसरे कारण असे आहे की, साधकाची शक्ती जागृत होते. हे स्पष्ट करून सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

तैशी सुबद्ध आटली। पुटीं होती दाटली।
तें वज्रासनें चिमुटली। सावधु होय ॥६.२२५॥
तेथ नक्षत्र जैसें उलंडलें। कीं सूर्याचें आसन मोडलें।
तेजाचें बीज विरूढलें। अंकुरेंशीं ॥२२६॥
तैशी वेढियातें सोडिती। कवतिकें आंग मोडिती।
कंदावरी शक्ती। उठली दिसे ॥२२७॥

कुंडलिनी शक्ती अत्यंत व्यवस्थितपणे आकुंचित किंवा लहान होऊन नाभिस्थानाजवळच्या संकुचित जागी दाटून बसलेली असते. ती वज्रासनामुळे ज्यावेळी चिमटली जाते, चेपली जाते किंवा आसनाच्या अग्नीमुळे तप्त होते तेव्हा जागृत होते. त्यावेळी एखादे नक्षत्र तुटून पडावे किंवा सूर्याचे आसन मोडावे अथवा तेजाच्या बीजापासूनच अंकुर फुटावा त्याप्रमाणे ती कुंडलिनी शक्ती आपले साडेतीन वेढे सोडून कौतुकाने अंग मोडते अर्थात् आळस झाडून टाकून नाभिस्कंदावर उभी राहते.

अशा प्रकारे शक्ती जागृत झाली की, शरीरात उलथापालथ सुरू होते व ही गोष्टच शत शत क्रियांची व अनुभूतींची जननी ठरते. कुंडलिनी शक्तीने आपले वेढे सोडून म्हणजे संकुचितपणा सोडून शिवरूप धारण करावयास सुरवात केली व जीवपणाचा अगर बहिर्मुखतेचा आळस झटकला की, शरीरात नक्षत्र तुटल्याप्रमाणे, सूर्याचे आसन मोडल्याप्रमाणे व तेजाला अंकुर फुटल्याप्रमाणे भयानक उत्पात सुरू होतात. या सर्वांमुळे ज्या शेकडो क्रिया शरीरात उपस्थित होतात त्यांचे वर्णन सूक्ष्मपणे आपण पुढे पाहणारच आहोत. "योगकुंडल्युपनिषदात" अपान वायूच्या ऊर्ध्वगमनाच्या क्षुब्धतेमुळे अग्नी प्रदीप्त होऊन शक्ती कशी जागृत होते व ती सुषुम्नाप्रवेश कशी करते हे सांगताना असे म्हटले आहे की–

अधोगतिमपानं वै ऊर्ध्वगं कुरुते बलात् ।
आकुंचनेन तं प्राहुर्मूलबंधोऽयमुच्यते ॥१.४२॥
अपाने चोर्ध्वगे याते संप्राप्ते वन्हीमंडले ।
ततोऽनलशिखा दीर्घा वर्धते वायुना हता ॥४३॥
ततो यातौ वन्ह्यपानौ प्राणमुष्णस्वरूपकम् ।
तेनात्यन्तप्रदीप्तेन ज्वलनो देहजस्तथा ॥४४॥
तेन कुंडलिनी सुप्ता संतप्ता संप्रबुध्यते ।
दंडाहतभुजंगीव निश्वस्य ऋजुतां व्रजेत् ॥४४॥
बिलप्रवेशतो यत्र ब्रह्मनाड्यान्तरं व्रजेत् ॥४६॥

अधोगतीने वाहणाऱ्या अपानवायूचे बलपूर्वक किंवा शक्तिपूर्वक आकुंचन केले तर अधोगती असणारा अपानवायू प्रयत्नाने ऊर्ध्वगामी होतो. ज्यावेळी अपानाच्या रूपाने असणारा प्राणवायू वर जाऊन वन्ही मंडलाला मिळतो त्यावेळी त्याच्या प्रभावाने अग्नीची तीव्रता खूपच अधिक वाढते. त्यानंतर अग्नी व अपानवायू मिळून प्राणवायूला तीव्र उष्ण करतात. या तिघांची उष्णता सर्व शरीराला अत्यंत गरम व तप्त बनविते. यामुळे तप्त झालेली कुंडलिनी शक्ती काठीने डिवचलेल्या सर्पिणीप्रमाणे जागी होऊन फूत्कार करून ताठ होते व सर्पिणीने बिळात प्रवेश करावा त्याप्रमाणे ही शक्ती ब्रह्मनाडीरंध्रात अर्थात् सुषुम्नेत शिरते.

सिद्धयोग साधन करताना साधकाला ज्या नानाविध क्रिया होतात त्याचे तिसरे महत्त्वाचे कारण असे आहे की, जागृत शक्ती पश्चिममार्ग खुला करण्याचा प्रयत्न करते. हे स्पष्ट करून सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**निगिजे पूर्वीलिया मोहरा । कीं येइजे पश्चिमेचिया घरा ।**
**निश्चलपणें धनुर्धरा । चालणें एंथिचें ॥६.१५९॥**

ज्यावेळी साधक पूर्वेच्या म्हणजे प्रवृत्तीच्या किंवा बाह्यवृत्तींच्याकडे असलेला आपला मोहरा वळवून आतमध्ये पश्चिमेच्या घराकडे येईल त्यावेळी तो सिद्धयोग-मार्गाने प्रवास करू लागला असे होईल. एका जागेवर निश्चलपणे बसून सुषुम्नेतून शक्तीचे उर्ध्वोन्मुख चालन होऊ देणे हेच या साधनातील खरे चालणे आहे; किंवा हळूहळू मन निश्चल होत जाणे हेच या मार्गातील चालणे आहे. जसजशी शक्ती सुषुम्नेतून वर जात जात विकसित होत होत आपला सर्व संकुचितपणा सोडून देऊन शेवटी ती निश्चल असे शिवरूप प्राप्त करील, त्यावेळी तिचे चालणे संपेल. शक्तीच्या सुषुम्नेतून होणाऱ्या ऊर्ध्वोन्मुखतेने हे कार्य शनैः शनैः घडत असल्याने "निश्चळपणें चालणे येंथिचें" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे. हाच भाव व्यक्त करताना शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की–

**द्विवक्त्रा कुंडलिन्यभिधा नित्यानंदस्वरूपा परमा कला प्रकृति वर्तते ॥**

दोन मुखें असलेली कुंडलिनी नावाची नित्यानंदस्वरूपाची परमप्रकृती जीवन किंवा प्राणशक्तीच्या रूपाने शरीरात निवास करते. या शक्तीला जी दोन मुखे आहेत त्यातील एक मुख सुषुम्नानाडीच्या शेवटच्या टोकाला मूलाधारात आहे व दुसरे ऊर्ध्वस्थानी सहस्रारात आहे. या मूलाधातील मुखाला म्हणजे ब्रह्मद्वाराला किंवा ब्रह्मविवराला अडवून त्याच्या तोंडावरच एक मुख ठेवून ती झोपली आहे. हे तिचे अंतर्मुख आहे. दुसरे जे बहिर्मुख आहे त्याच्या द्वारा ही प्राणरूप कुंडलिनी शक्ती श्वासप्रश्वास करते यालाच जीवाचा श्वासनिश्वास म्हणतात. या मुखानेच ती नित्य जागृत आहे असे दिसते. यामुळेच जीवाला बाह्य ज्ञान किंवा चेतना प्राप्त होत असते. जीवाला जो भिन्नतेचा, द्वैताचा किंवा संकुचितपणाचा भास सतत होत असतो त्याला कारण ही शक्तीची बहिर्मुखताच आहे. एवढेच नव्हे तर जीवाला एकत्वाचा बोध न होण्याचे तिची ही बहिर्मुख वृत्तीच कारण आहे. ज्या ठिकाणी तिचे अंतर्मुख आहे तेथे ती अनादि कालापासून घोर निद्रेत असून दुसऱ्या बाह्य-मुखाने जन्ममरणपरंपरा भोगीत पडलेली आहे. त्यामुळे जीवाला अंतर्ज्ञान, ब्रह्मज्ञान किंवा आत्मज्ञान न होता तो अज्ञानाने बद्ध होतो. या मार्गानेच गेले असता साधक सहस्रारातील निरायम अशा ब्रह्मस्थानात पोहोचून तो शिवाशी अर्थात् स्वसंवेद्य

आत्मस्वरूपाशी एकरूप होऊन त्याला आत्मसाक्षात्कार होतो; परंतु ब्रह्मद्वार अडवून परमेश्वरी शक्ती तेथे झोपलेली असल्यामुळे साधकाचे प्राण सुषुम्नेत प्रवेश करीत नाहीत. आणि जोपर्यंत प्राणशक्ती कुंडलिनी सुषुम्नामार्गात प्रवेश करीत नाही तोपर्यंत मोक्षप्राप्तीचा संभव नाही, हे अगदी निश्चित आहे. हाच भाव निराळ्या शब्दात व्यक्त करताना "श्रीदेवीभागवतात" ऋषींनी असे म्हटले आहे की–

**योगेनात्मा सृष्टिविधौ द्विधारूपो बभूव सा ।**
**पुमांश्च दक्षिणार्धांगो वामार्धा प्रकृतिः स्मृता ।।९.१.९।।**

सृष्टीची उत्पत्ती करण्याकरिता योगरूप शक्तीने युक्त असलेला परमात्मा दोन रूपांचा झाला. त्यातील उजव्या बाजूच्या अर्ध्या अंगाने तो पुरुष व डाव्या बाजूच्या अर्ध्या अंगाने तो प्रकृती झाला.

पुरुष सहस्रारात स्थित राहिला व प्रकृती ही खाली उतरून संसाराची उत्पत्ती करून त्यात रमूत गेली. असे असले तरी तीच मोक्षदायिनी असल्यामुळे ते पुढे म्हणतात की–

**सा च ब्रह्मस्वरूपा च नित्या सा च सनातनी ।**
**यथाऽत्मा च तथा शक्तिर्यथाऽग्नौ दाहिका स्थिता ।।९.१.१०।।**
**सर्व शक्तिस्वरूपा च शक्तिरीशस्य संततम् ।**
**सिद्धेश्वरी सिद्धिरूपा सिद्धिदा सिद्धिरीश्वरी ।।१८।।**
**पापिपापेध्मदाहाय ज्वलदग्निस्वरूपिणी ।**
**सुखस्पर्शा स्नानपानैर्निर्वाणपददायिनी ।।६१।।**
**यया विना च विश्वेषु सर्वकर्म च निष्फलम् ।**
**मोक्षदा या मुमुक्षूणां कामिनी सर्वकामदा ।।६९।।**

ही कुंडलिनी शक्ती ब्रह्मस्वरूपच आहे. अग्नीमध्ये जशी दाहकशक्ती स्थित असते तशी ही कुंडलिनी ब्रह्मस्वरूपामध्ये स्थित आहे व अग्नीपासून दाहकशक्ती जशी पृथक् करून दाखविता येत नाही त्याप्रमाणे हिला ब्रह्माहून निराळी करता येत नाही. ती ब्रह्मरूप असल्यामुळे नित्य म्हणजे मोक्षापर्यंत राहणारी व सनातनी म्हणजे अनादि आहे. अर्थात् ही कुंडलिनी शक्ती परमार्थतः अनादिसांत आहे. सर्व शक्ती हेच तिचे स्वरूप असून ती स्वतः ईश्वराची नित्य शक्ती आहे. सिद्धांचे नियमन करणारी, सिद्धिरूप, सिद्धी देणारी, मूर्तिमंत सिद्धी व ईश्वरी अशी ही शक्ती आहे. पाप्यांच्या पापरूप काष्ठांचे दहन करण्याकरिता तिने (सद्‌गुरुकृपेने मूलाधारात जागृत होऊन) पेटणाऱ्या अग्निप्रमाणे स्वरूप धारण केले आहे. (ज्यावेळी ती सुषुम्नेत प्रवेश करते) त्यावेळी तिच्या स्पर्शापासून सुख होते. (तिच्या उदकात) स्नान व तिचे पान यांच्या योगाने ती निर्वाण स्थान देत असते. या कुंडलिनी शक्तीवाचून या सृष्टीतील सर्व कर्म निष्फल होय. ती मुमुक्षूंना मोक्ष देणारी व (भक्तांच्या) सर्व इच्छा पूर्ण करणारी कामिनी आहे.

यामुळे ज्याला पश्चिमेच्या म्हणजे सुषुम्नेच्या निवृत्तिमार्गाने जावयाचे आहे तो जर पूर्वेच्या मार्गाने म्हणजे संसारप्रवृत्तीच्या मार्गाने गेला; तर कायम बहिर्मुख राहिल्यामुळे तो कधी अंतर्मुख होण्याची वार्ताच उपस्थित होणार नाही; मग ईश्वरकृपा, सद्‌गुरुकृपा, मार्गप्राप्ती, वाटचाल, क्रियानुभूती व शेवटी गतंव्यस्थान-प्राप्ती या गोष्टी त्याच्या बावतीत खपुष्पासारख्याच ठरतात. कोंडा कितीही कांडला तरी ज्याप्रमाणे धान्याचा एकही कण मिळत नाही त्याप्रमाणे प्रवृत्तीच्या पूर्वमार्गाने धावणारा साधक पश्चिममार्गाच्या समुद्रतटावर कधीही पोहोचू शकत नाही. हेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे व्यक्त करताना असे म्हटले आहे की–

**अगा काई पश्चिमसमुद्राचिया तटा। निघिजत आहे पूर्वीलिया वाटा।**
**कां कोंडा कांडतां सुभटा। कणु आतुडे ? ॥९.१५३॥**

या अर्थानेच "योगशिखोपनिषदात" असे म्हटले आहे की–

**नाकृतं मोक्षमार्गं स्यात् प्रसिद्धं पश्चिमं विना ॥१.१४५॥**

पश्चिमेच्या मार्गाने गेल्याशिवाय म्हणजे पाठीतून जाणारा सुषुम्नेचा मार्ग मोकळा झाल्याशिवाय मोक्षमार्गात प्रगती होत नाही. शरीरात मूलाधारातून निघून सहस्रारापर्यंत पाठीमागून जी नाडी जाते तिला सुषुम्ना म्हणतात. हिलाच पश्चिम-मार्ग म्हटले जाते. शरीरातील गुह्यस्थान, बेंबी, हृदय, कंठ व नाक यांच्या द्वाराने जो प्राणाचा प्रवाह पुढील भागातून चालू असतो त्याला पूर्वमार्ग असे म्हणतात. या पूर्वमार्गाने म्हणजेच पूर्वमुखाने प्राणाची गती बहिर्मुख अशी चालू असते. इडा व पिंगलांच्या द्वारानेच श्वासप्रश्वासाची क्रिया अर्थात् जीवाचे संसारभ्रमण चालू असते. अंतर्मुखाकडील गती मूलाधारात कपाटात वस्तू बंद करून ठेवल्याप्रमाणे बंद असते. ज्यावेळी गुरुकृपा होते तेव्हा प्राणशक्तीचे चालन होऊन हे बंद द्वार उघड-ण्याचा प्रयत्न होऊ लागतो. या प्रयत्नामुळेच नाना प्रकारच्या क्रिया साधनात प्रकट होतात. त्यामुळेच "योगशिखोपनिषदात" असे म्हटले आहे की–

**आधारे पश्चिमे भागे त्रिवेणीसंगमो भवेत्।**
**तत्र स्नात्वा च पीत्वा च नरः पापात् प्रमुच्यते ॥६.३०॥**
**आधारे पश्चिमं लिंगं कवाटं तत्र विद्यते।**
**तस्योद्घाटनमात्रेण मुच्यते भवबंधनात् ॥३१॥**

मूलाधारात पश्चिमभागात इडा,पिंगला व सुषुम्ना यांचा त्रिवेणी संगम होतो. (या नाड्यांना गंगा, यमुना व सरस्वती म्हणतात व त्यांच्या संगमाला तीर्थराज प्रयाग म्हणतात.) ज्यावेळी गुरुकृपेने शक्ती जागृत होते त्यावेळी मन व प्राण एकत्र होऊन दिव्य क्रिया होऊ लागतात. हेच खरे स्नान होय. हे क्रियारूप स्नान होऊ लागले की, अद्‌भुत अनुभवांचे पान साधक करतो व सर्व पापांपासून तो मुक्त होतो. आधाराच्या पश्चिम भागात स्वयंभू लिंग प्रतिष्ठित आहे. त्या ठिकाणी

सुषुम्नेमध्ये प्रवेश करण्याचे ब्रह्मद्वार आहे. नाना प्रकारच्या क्रियांनी कुंडलिनी शक्ती जेव्हा धडका मारून ते दार उघडते तेव्हा साधक संसारबंधनातून मोकळा होतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरील सर्व विवेचनाचा जणू काही सारांश व्यक्त करताना असे म्हटले आहे की–

**तैं तरी गा सुवर्मा । बिजावळी आत्मया कर्मा ।**
**अपाडें जैसी पश्चिमा । पूर्वेसि कां ॥१८.२६९॥**

ज्याप्रमाणे पूर्व म्हणजे पूर्वदिशा, उदय किंवा प्रवृत्ती यांचा पश्चिमा म्हणजे पश्चिम दिशा, अस्त किंवा निवृत्ती यांच्याशी संबंध नसतो त्याप्रमाणे आत्मा व कर्म यांचा अत्यंत वेगळेपणा असल्यामुळे मुळीच संबंध नसतो.

सिद्धयोग साधनेत साधकाला क्रिया होण्याचे चवथे महत्त्वाचे कारण हे आहे की, प्राणशक्तीची गती ऊर्ध्वमुखी होते. हे कसे घडते हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात की–

**सहजें बहुतां दिवसांची भूक । वरी चेवविली तें होय मिष ।**
**मग आवेशें पसरी मुख । ऊर्ध्वा उजू ॥२६.२८॥**

कुंडलिनी शक्ती आपल्या अनादि निद्रेत असल्यामुळे ती सहजच खूप दिवसांची भुकेलेली असते. या बाबतीत सद्‌गुरूंनी तिला जागृत केल्याचे निमित्त पुरे होते.ती जागृत झाल्यावर अत्यंत आवेशाने आपले तोंड सरळ असे वरती उघडते. ( येथे हे लक्षात ठेविले पाहिजे की, " सा देवी वायवी शक्तिः " म्हणजे कुंडलिनी देवी ही वायवी अर्थात् प्राणरूप किंवा वायुरूप शक्ती आहे," असे रुद्रयामल-तंत्रात म्हटले आहे. ) या कुंडलिनीरूपी प्राणशक्तीचे तोंड आवेशाने वर उघडते म्हणजे ही प्राणशक्ती ऊर्ध्वमुखी होऊन सुषुम्नेमधून वर वर जाण्याचा प्रयत्न करू लागते; मात्र वर जाताना शरीर, मन, पूर्वसंस्कार, जडता, व्याधी, स्त्यान, संशय, प्रमाद, आळस, अविरती भ्रांतिदर्शन, अलब्ध भूमिकत्व इत्यादि नानाविध गोष्टी आड येतात; परंतु ही शक्ती फार दिवसांची भुकलेली असल्यामुळे हे सर्व दोष गिळून टाकते. अशा प्रकारे वर जाण्याच्या मार्गात जे जे अडथळे येतात ते ते निरनिराळ्या प्रकारच्या क्रिया करून प्राणशक्ती खाऊन टाकून दूर करीत असते. अर्थात् प्राणशक्ती कुंडलिनीच्या भुकेच्या पोटीच साधनात क्रियांचे विश्व आकार घेत राहते. मात्र " जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥ ६.८२॥" या न्यायाने प्रत्येक सोन्यातील हीण हे जसे कमी-जास्त असते व त्यामुळे त्याला किती प्रमाणात तापवून त्यातील हीण काढून टाकावयाचे हे जसे सोनार जाणत असतो त्याप्रमाणे प्रत्येक जीवाची कर्मगती काय आहे हे पाहून व " आणि मागील जे सद्‌बुद्धि । जेथ जीवित्वा जाहाली होती अवधि । मग तेचि पुढती निरवधि । नवी लाहे ॥६.४५७॥" याप्रमाणे पूर्व जन्मात

साधकाने केलेल्या साधनामुळे तो कोठपर्यंत आला आहे हे जाणून प्रत्येक साधकाच्या मार्गात जे भिन्न अडथळे येत असतात ते सर्व ती शक्ती आपल्या सामर्थ्याने दूर करते. " ऐसें नेणों काय अपैसें। तयातेंचि कीजे आभ्यासें ॥६.४६१॥" या न्यायाने हे आपोआप घडते हे खरे आहे. जागृत शक्ती ही ब्रह्मांडचालिनी, सर्वव्यापक, सर्व जीवांच्या जाणिवांची ज्ञाती व सर्व संस्काररूपिणी असल्यामुळे ती हे कार्य सहज करू शकते. प्रत्येक जीवाच्या अडथळचात सारखेपणा असणे कधीही शक्य नसल्याने जागृत आत्मशक्तीला हे अडथळे ओलांडून साधकाला पलीकडे कसे न्यावयांचे याची पुरेपूर जाणीव असते. साधकातील हीण, दोष व अडथळे दूर करण्यासाठी कोणत्या क्रियांची आवश्यकता आहे हेही ती जाणते. या जाणीवेतूनच अनंत जीवांच्या अनंत क्रिया प्रकट होऊन प्राणशक्ती सुषुम्नेतील आपला मार्ग मोकळा करीत सहस्राराकडे जाते. सहस्रारापाशी जाईपर्यंत जी हालचाल होते ती आज्ञाचक्रापर्यंत होणाऱ्या बाह्य क्रियांच्या रूपाने प्रकट होते व तेथून पुढे अत्यंत सूक्ष्मपणे मनःप्राणांच्या अंतःक्रियांच्यारूपाने क्रिया जाणवतात. हे कसे घडते हे सांगताना " योगकुंडल्युपनिषदात" असे म्हटले आहे की—

प्राणाभ्यासस्ततः कार्यो नित्यं सत्त्वास्थया धिया।
सुषुम्ना लीयते चित्तं न च वायुः प्रधावति ॥१.६२॥
शुष्के मले तु योगी च स्याद् गतिश्चालिता ततः।
अधोगतिमपानं वै ऊर्ध्वगं कुरुते बलात् ॥६३॥
आकुंचनेन तं प्राहुर्मूलबंधोऽयमुच्यते।
अपानश्चोर्ध्वगो भूत्वा वह्निना सह गच्छति ॥६४॥
प्राणस्थानं ततो वह्निः प्राणापानौ च सत्वरम्।
मिलित्वा कुंडलीं याति प्रसुप्ता कुंडलाकृतिः ॥६५॥
तेनाग्निना च संतप्ता पवनेनैव चालिता।
प्रसार्य स्वशरीरं तु सुषुम्नावदनांतरे ॥६६॥

साधकाने यासाठी नेहमी स्थिर व सात्त्विक बुद्धीने प्राणायामाचा अभ्यास करावा. ( सिद्धयोगात हा अभ्यास जागृत शक्ती स्वतःच साधकाकडून करवून घेत असल्याने त्याला तो स्वतंत्रपणे करण्याचे कारण पडत नाही.) यामुळे चित्त सुषुम्नेमध्ये लीन होते व प्राणवायूही सुषुम्नेतून ऊर्ध्वगामी झाल्यामुळे इतस्ततः सैरावैरा धावत नाही. ज्यावेळी अशा प्रकारे सुषुम्नेमध्ये चित्त व प्राणाची गती होऊन केवल कुंभक साधत जाईल त्यावेळी साधकाच्या शरीरातील धातुगत मल शुष्क अर्थात् नाहीसे होत जातात. असे झाले म्हणजे कुंडलिनी किंवा प्राणशक्ती अधोगतीशील अपानाला आकुंचनाने ( मूलबंधाने ) बलपूर्वक ऊर्ध्वगती करते. अशा प्रकारे ओटीपोटापासून गुदद्वारापर्यंत जे आकुंचन होते त्याला मूलबंध म्हणतात. हा

अपानवायू वर येऊन अग्नीला मिळतो व आणखी वर चढतो. नंतर हे दोघे प्राण-स्थानी प्राणाला येऊन मिळतात. मग अग्नी, प्राण व अपान हे तिघे तत्काळ कुंडलिनी शक्तीला येऊन मिळतात. त्यावेळी अनादि कालापासून प्रसुप्त असलेली कुंडलाच्या आकृतीची ही कुंडलिनी शक्ती अग्नीच्या तेजाने किंवा उष्णतेने विशेष प्रकारे तप्त होऊन व दोन्ही वायूंमुळे चलित होऊन आपली वर्तुलाकृती टाकून सरळ होते. अशा प्रकारे स्वशरीर ताणून, ताठ करून किंवा सरळ करून ही शक्ती सुषुम्नेच्या मुखात शिरते.

अशा प्रकारे अग्नी, अपान व प्राण यांचे संमीलन होऊन त्यामुळे शक्ती जागृत होणे व शेवटी ती सुषुम्नेत शिरणे यामुळे शरीर, मन, प्राण इत्यादि सर्वां-मध्ये किती प्रचंड घडामोड होते व या तिन्ही गोष्टी एकत्र येताना किती क्रिया होतात याची ज्याने अनुभूती घेतली असेल त्यालाच याची कल्पना येईल. इतरांच्या बाबतीत ह्या क्रिया व ही अनुभूती म्हणजे श्रीसंत तुकाराममहाराजांनी म्हटल्या-प्रमाणे "बोलाचीच कढी बोलाचाच भात। जेवूनिया कोण तृप्त झाले॥" असे आहे हेच खरे. अशा प्रकारच्या प्रचंड उलथापालथीच्या क्रिया जो साधक सहन करतो किंवा धारण करतो त्याचे धैर्य हे सात्त्विकधैर्य होय हे सांगताना भगवंतांनीच गीतेत असे म्हटले आहे की—

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः।**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥१८.३३॥**

हे अर्जुना ! सिद्धयोगाच्या द्वारे उपस्थित होणाऱ्या मन, प्राण व इंद्रियांच्या क्रिया ज्या अव्यभिचारिणी धैर्याने साधक धारण करतो त्या धारणेला सात्त्विक धैर्य असे म्हणतात. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**हें असो पावो उचलिला। मदमुख न ठेविती खालां।**
**गर्जोनि पुढां आला। सिंहु जरी ॥१८.७३६॥**
**तैसा जो धीरु। उठलिया अंतरु।**
**मनादिकें व्यापारु। सांडिती उर्मी ॥७३७॥**
**इंद्रियां विषयांचिया गांठी। अपैसया सुटती किरीटी।**
**मन मायेच्या पोटीं। रिगती दाही ॥७३८॥**
**अधोर्ध्व गूढें काढी। प्राण नवांची पेंडी।**
**बांधोनि घाली उडी। मध्यमेमाजीं ॥७३९॥**

अपानवायू व प्राणवायूंची दोन्ही गूढे काढून म्हणजे त्यांना आपल्यात सामावून घेऊन अर्थात् अपान, समान, उदान, व्यान, नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय या सर्व नऊ प्राणांना आपल्याशी एकरूप करून प्राणशक्ती कुंडलिनी एकवटून

सुषुम्नेमध्ये उडी घेते. त्यावेळी ज्या क्रिया शरीरात उसळतात त्या एखाद्या गर्जना करणाऱ्या सिंहासारख्या असून शरीर हत्तीसारखे समर्थ असले तरी त्यालाही त्यावेळी कसलेही भान राहत नाही. ज्यावेळी ही शक्ती मनःप्राणेंद्रियांच्या क्रियांच्या रूपाने उभी ठाकते त्यावेळी तिच्यामुळेच जे धैर्य उत्पन्न होते त्यामुळे साधकाच्या मनाचे व्यापार थांबतात, इंद्रियांच्या व विषयांच्या गाठी आपोआप सुटतात व मनादि दहाही इंद्रिये मायेच्या म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या ठिकाणी समरस होऊन ती सुषुम्नेत तिच्याबरोबर विलीन होतात.

सिद्धयोगाचे साधन जागृत शक्तीकडून होत असताना ज्या क्रिया होऊन साधकाला अनुभूती येते त्याचे पाचवे महत्त्वाचे कारण सुषुम्नेतून प्राणशक्ती कुंडलिनीचे सहस्राराकडे जे ऊर्ध्वचालन होते त्यावेळी इडा व पिंगला ह्या नाड्यांचे एकीकरण, तीन ग्रंथींचे भेदन व षट्चक्रवेध होतो, हे आहे. या कारणाचे स्पष्टीकरण करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

इडा पिंगळा एकवटती। गांठी तिन्ही सुटती।
साही पदर फुटती। चक्रांचे हे ॥६.२४४॥

ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होते त्यावेळी इडा व पिंगला ह्या नाड्यांचे एकीकरण होते; ब्रह्म, विष्णू व रुद्र या तिन्ही ग्रंथी किंवा गाठी सुटतात आणि मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध व आज्ञा या सहाही चक्रांचे पदर फुटतात म्हणजे त्यांचा वेध होतो किंवा शक्ती त्यांचा वेध करून सहस्रारात जाते.

शक्तीच्या जागृतीमुळे शरीरात उपस्थित होणाऱ्या क्रियांना व अनुभूतीला ज्या तीन गोष्टी कारणीभूत होतात म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरील ओवीत सांगितले आहे; त्यातील पहिली गोष्ट इडा व पिंगला ह्या नाड्यांचे एकीकरण ही आहे. हे एकीकरण होते म्हणजे नेमके काय घडते हे पाहिले म्हणजे ते क्रियांना व अनुभूतीला कारण कसे ठरते हे स्पष्ट होईल. इडा म्हणजे डावी निःश्वासाची नाडी असून पिंगला ही उजवी निःश्वासाची नाडी आहे. या नाड्यांनाच अनुक्रमे गंगा व यमुना अशी नावे असून या दोहोंच्या मध्ये असणाऱ्या नाडीला सुषुम्ना किंवा सरस्वती असे नाव शास्त्रकारांनी दिले आहे. इडा व पिंगलेतून वाहणाऱ्या प्राणाला संसारचक्र असे नाव असून जेव्हा या दोहोतून प्राणवायू निघून तो सुषुम्नेत शिरतो तेव्हाच "इडा पिंगळा एकवटती" हे सिद्ध होते व संसारचक्राचा उच्छेद किंवा शेवट होतो. हे कसे घडते हे सांगताना "भारतीय संस्कृति और साधना," खंड एक, या ग्रंथातील "अजपा रहस्य" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज म्हणतात, "प्राणवायु इडासे पिंगलामें संचार करता है एवं पिंगलासे इडामें लौटता है। ये दो उत्तरायण और दक्षिणायनके नामसे प्रसिद्ध हैं। प्राणका मूलाधारमें प्रवेश एक-विषुव तथा उसका मस्तकमें प्रवेश दूसरा–विषुव है। विषुव कहनेसे ठीक उसी

अवस्थाकी प्रतीति होती है, जिसमें दिन और रात्रीकी समानता होती है। देहमेंभी इन दो बिंदुओंमें साम्य प्रकट होता है। इसीलिए इनको विषुव कहते हैं। योगीका कर्तव्य है—मंत्रके साथ (मंत्रयुक्त) या केवल (अमंत्र) प्राणायामके द्वारा अर्थानुसंधान करते हुए प्रवण और हंसमंत्रका उच्चारण और प्रणवका अर्थभूत जो हंस है, उसका सोऽहंके रूपमें अनुसंधान करना। यह ऐक्यानुसंधान ही नमस्कार—योगका रहस्य है।...उस समय प्राण–वायु पिंगला मार्गसे कुंडलिनीमें प्रवेश करता है, यही आध्यात्मिक सूर्यग्रहण है। (पृ. ३४८)

उपरोक्त ग्रंथातील "यज्ञका रहस्य" या लेखात या संबंधी लेखक म्हणतात, "इस कारण उसका आरंभ करनेके पूर्वही देहस्थित आधारकुंडमें होमाग्निको प्रज्वलित करनेकी आवश्यकता होती है। वह अग्नि यद्यपि मूलमें एकही है, तो भी उसके आकृति और प्रकृतिगत अनेक भेद हैं। तदनुसार, कर्मगत और अधिकारगत भेद भी विद्यमान हैं। प्राण और अपानके संघर्षसे अथवा प्रणव और आत्माके ध्यान-रूप मंथनसे अथवा अन्य किसी उपायसे अग्निको प्रज्वलित करना पडता है। अनादि कालसे जो अमूल्य रत्न उपेक्षित होकर गुप्त रूपसे पडा हुआ है, उसका उस प्रदीप्त अग्निके आलोकसे अन्वेषण कर आविष्कर करना चाहिए। लौकिक आलोक तो क्या, दिव्य आलोक भी उस "गुहा-निहित" पदार्थको प्रकाशित करनेमें समर्थ नहीं है।

योगी जिसको कुंडलिनीका उद्‌वोधन कहते हैं, वह इस होमाग्निवोधनका भीतरी पर्याय है। आत्मविस्मृत, संशयाच्छन्न जीव श्वास-प्रश्वासके अधीन रहकर इडा-पिंगलामय कालराज्यमें विचरण कर रहे हैं। जबतक कुंडलिनी नहीं जगती, तबतक काल-मार्गका त्याग कर सुषुम्णा-रूप मध्यमार्गमें प्रवेश नहीं हो सकता एवं मध्यमार्गमें प्रविष्ट हुए विना योगस्थ होकर कोई कर्म करनेका भी कोई उपाय नहीं है। 'मध्य' कहनेसे वास्तवमें शुद्ध चित्का बोध होता है, कारण कि वही सब वस्तुओंका अंतरतम है एवं उसकी भित्तिपर खडा होकरही संपूर्ण विश्व प्रकाशित है। किंतु, मायिक अवस्थामें शुद्ध चित् निजस्वरूपमें रहकर भी मायिक खेलके लिए अपने स्वरूपका गोपन करती है और स्वभावत: प्राण—बुद्धि और देहभाव धारण कर हजारो नाडियोंके जालमें व्याप्त होती है और नाडी-मार्गका अनुसरण करती है। उन सब नाडियोंमें मध्यनाडी प्रधान है। वह देहके उपरसे नीचेतक फैली है। वही प्राणशक्तिका आश्रय है। सब नाडियोंके उदय और विश्रांतिका वही एकमात्र आधार है। जबतक उस नाडीका विकास नहीं होता, तबतक साधकका पशुभाव नष्ट नहीं होता। परमेश्वरके समान सृष्टि आदि पाँच कर्मोंके कर्त्तृत्वकी भावना, विकल्पक्षय, शक्तिसंकोच, शक्तिविकास आदि बहुतसे उपायोंसे उक्त विकास हो सकता है (द्रष्टव्य प्रत्यभिज्ञाहृदय)। योगकुंडलिनी-उपनिषदमें जो शक्तिचालनरूप

सरस्वतीचालन और प्राणरोधरूप नाना प्रकारके कुंभकोंका उल्लेख है, उसका भी एकमात्र फल यही है। विज्ञानभैरवमें शाक्तक्षोभ,कुलावेश आदि और भी कितनेही विशिष्ट उपायोंका विवरण दिखाई देता है। सभीका मूल लक्ष्य मध्यनाडीमें प्रवेश है।" (पृ. १८५,१८६)

"इडा पिंगळा एकवटती" याचा अर्थ इडापिंगलेतील प्राण सुषुम्नेत प्रवेश करणे असून हे घडतानाच शरीरात नानाविध क्रिया उपस्थित होऊन त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या अनुभूतींचा साधक अधिकारी होतो. ही एकवटण्याची क्रिया सामान्य नव्हे. याचे अधिक स्पष्टीकरण करताना म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड दुसरा, या ग्रंथातील "सहजयान और सिद्धमार्ग" या लेखात असे म्हटले आहे की, "बिंदुसाधनाके फलस्वरूप स्थूल देहकी आपेक्षिक शुद्धि होनेपर प्राण, मन और विज्ञानकी क्रियामें क्रमशः अधिकार उत्पन्न होता है। वस्तुतः असिद्ध बिंदुवाले साधकके लिये प्राणायामका अभ्यास अत्यंत दुष्कर कार्य है। सुषुम्णाद्वारके खुले विना प्राणवायु इडा और पिंगला-मार्गका त्याग नहीं कर सकता। देहशुद्धिके अभावसेही वायु वक्र रहता है और दक्षिण और वामपथसे संचरण करता है। बिंदुसाधनाके अभ्याससे साधकका देहमल हट जाता है, देहमें सात्त्विक तेजका प्रादुर्भाव होता है, ओजका विकास होता है और दृढताका उदय होता है;– तव बाहरका आकर्षण अपने आपही मंद पड जाता है। सुषुम्णा-पथ जब खुलता है तब बाह्य स्थूल वायु, जो इडादि मार्गोंसे गमनागमन करता है, शोधित और सूक्ष्म होकर उस खुले हुए सूक्ष्म-पथसे वहना लगता है। उस सूक्ष्म और निर्मल वायुमें सत्त्वगुणका भाग अपेक्षाकृत अधिक रहता है। इसीलिये सात्त्विक तेजसे तेजोमय होकर वह हल्का वायु सरल मार्गसे ऊपर नीचे संचरण करता है एवं ऊर्ध्वगति और अधोगतिके मध्यमें बीच-बीचमें आपेक्षिक स्थिरता प्राप्त करता है। यही सुषुम्णाके मध्यमें प्राणकी क्रिया है। पूर्वमें जो अजपाकी बातका उल्लेख किया गया है, वह अंतः-प्राणायाम अथवा स्वाभाविक प्राण–व्यापारही उसका स्वरूप है। प्राणक्रियामें अधिक उत्कर्ष प्राप्त करनेपर जो बलसंचय होता है, उसके प्रभावसे प्राणका आवरण कुछ कुछ हटने लगता है। जैसे देहमल कुछ हटनेपर प्राणराज्यमें प्रवेश किया जाता है, वैसेही प्राणका मल कुछ दूर होनेपरही मनका पता लगता है, तब प्राणक्रिया स्वभावतःही मनकी क्रियामें परिणत हो जाती है। प्राण जब स्वभावसेही चलित होकर कार्य करता है तब जैसे देह स्थिर और निश्चल रहती है, वैसेही स्वभावके स्रोतमें मनके प्रवाहित होनेपर प्राण स्वतःही स्थिर हो जाता है। स्थूल-देहमें इडा और पिंगलामें जो स्थूल वायुकी निःश्वास प्रश्वासरूप क्रिया है, वही सुषुम्णामें सूक्ष्म प्राणकी ऊर्ध्वगति और अधोगतिरूप क्रिया है, वही फिर वज्र-

नाडीके मध्यमें सूक्ष्म मनकी संकल्प विकल्परूप क्रिया है। स्वभावकी प्रेरणासे जब मनकी क्रिया चलने लगती है तब मन क्रमशः निर्मल होने लगता है, उसका आवरण हटने लगता है। संकल्प-विकल्प वृत्ति क्रमशः तिरोहित होने लगती है। इस प्रकार साधनाके वलसे विकल्प वृत्तिके वहुत कुछ दवनेपर चित्रा नाडीके विकासके साथही साथ विज्ञानमय कोष खुल जाता हे। तब संकल्प शुद्ध होनेसे मन स्थिर हो जाता है और सत्यसंकल्प भावका उदय होता है। योगियोंकी जिन सब योगविभूतियोंका वर्णन मिलता है वे इस भूमिमेंही उपलब्ध होती हैं। इस अवस्थामें संकल्प कभी रहता है और कभी नहीं रहता। विज्ञान अथवा संकल्प-त्यागकी साधनाही इस अवस्थाके साधककी स्वाभाविक साधना है। मनोमय भूमिमें जो द्वंद्व संकल्प और विकल्पके रूपमें प्रकाशित होता है, वही शुद्ध संकल्पमय विज्ञानभूमिमें संकल्पके आविर्भाव और तिरोभावके रूपसे प्रकटित होता है। यह निर्विकल्प अवस्था होनेपर भी निःसंकल्प अवस्था नहीं है। इसके वाद उस आविर्भाव और तिरोभावके पुनः पुनः आवर्तनसे चित्तसे संकल्पकी सत्ता विलकुल मिट जाती है- संकल्प फिर कभी उठता नहीं। संकल्पही ज्ञान और इच्छा है, उसकी निवृत्ति परमानंद है। वह आनंदमय कोषमें ब्रह्मनालके मध्यमें उपस्थित होता है। इसके पश्चात् जो अवस्था प्राप्त होती है वह वस्तुतः अवस्था नहीं है। वह "स्वभाव" या "सहज" है, वह अव्यक्त है। परमार्थ दृष्टिसे वह आनंदके भी अतित है।

योगी इस सहज या स्वभावको प्राप्त होनेके लियेही आयास करते हैं। इसके संबंधमें कहा गया है-

"दुर्लभा सहजावस्था सद्‌गुरोः करुणां विना।"

वेदान्तका पंचकोष-विवेक, तंत्रका चक्रभेद, पातंजलमतका अष्टांगयोगाभ्यास, बौद्धोंका अनुपूर्वविहार- मूलतः एकही पथके प्रकार भेद मात्र हैं।" (पृ.२८८,२८९)

येथपर्यंत इडापिंगला नाडयांचे एकवटणे म्हणजे काय आहे याचा सूक्ष्म विचार करून इडापिंगलानाडयांमधून प्राण निघून प्रथम सुषुम्नेत कसे प्रविष्ट होतात व नंतर ते वज्रा नाडीत प्रवेशून शेवटी चित्रिणी नाडीत कसे जातात व प्राणांतर्गत सूक्ष्म मनाचे प्रकटीकरण होऊन शेवटी त्याची परिणती काय होते हे आपण पाहिले. या सर्व क्रियांचे व अनुभूतीचे साररूप वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात -

मग शशी आणि भानु। ऐसा कल्पिजे जो अनुमानु।
तो वातीवरी पवनु। गिवसितां न दिसे ।।६.२४५।।
बुद्धीची पुळिका विरे। परिमळु घ्राणीं उरे।
तोही शक्तीसवें संचरे। मध्यमेमाजीं ।।२४६।।

नंतर शशी म्हणजे चंद्ररूपी डावी इडा नाडी व भानु म्हणजे सूर्यरूपी उजवी

पिंगला नाडी यातून वाहणारे जे वायू आहेत असे कल्पनेने मानले जाते ते सुषुम्नेत प्रविष्ट झाल्यामुळे नाकापुढे कापसाची वात धरून पाहिले तरी त्यांचे अस्तित्व दिसत नाही. अशा प्रकारे प्राणापान सुषुम्नेत प्रविष्ट झाले की, त्यांच्या-बरोबर बुद्धीही म्हणजे आकार, स्फूर्ती किंवा वृत्तीचा अगर संकल्पविकल्पात्मक ज्ञानाचा उठावही समाविष्ट होऊन विरून जातो. त्याचप्रमाणे नाकात उरलेली जी गंध घेण्याची शक्ती तीही देवात्मशक्तीबरोबर सुषुम्ना नाडीत शिरते.

आता "गांठी तिन्ही सुटती" म्हणजे काय होते हे पाहू व सुषुम्नांतर्गत ब्रह्म, विष्णू व रुद्रग्रंथींचे ऊर्ध्वगामी कुंडलिनी शक्तीकडून भेदन होत असताना ज्या स्थूल व सूक्ष्म क्रिया शरीरात उपस्थित होतात व जी अनुभूती येते त्याला ही गोष्ट कशी कारणीभूत होते याचे स्पष्टीकरण पाहू. ग्रंथी किंवा गाठ म्हणजे काय ? शरीरात त्या कोठे आहेत ? त्यांचा भेद होतो किंवा त्या सुटतात म्हणजे नेमके काय होते ? या प्रश्नांची उत्तरे पाहिली म्हणजे आपोआपच कुंडलिनी शक्तीमुळे होणारा ग्रंथि-त्रयभेद हा क्रियानुभूतींच्या उत्पादनाला कसा साहाय्यभूत ठरतो हे स्पष्ट होईल. श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या " सौंदर्यलहरीवर " केलेल्या हिंदी टीकेत प. प. श्री १०८ स्वामी विष्णुतीर्थजीमहाराज ३९ व्या श्लोकावर टीका करताना " ग्रंथित्रय और अध्यास " यांचे विवरण करताना म्हणतात " ग्रंथियाँ तीन हैं– ब्रह्मग्रंथि विष्णुग्रंथि और रुद्रग्रंथि । ग्रंथि गांठ को कहते हैं । दो भिन्न वस्तुओंको जोडने या बांधनेके लिए गांठसे काम लिया जाता है और प्रायः एकही वस्तुमें विकार आनेपर उलझनोंकी ग्रंथियां भी पड जाया करती हैं जैसे केशों अथवा धागोंमें । अध्यात्म ग्रंथिके स्वरूपका वर्णन श्रीगोस्वामी तुलसीदासजीने इन शब्दोंमें किया है–

**" जड चेतन हि ग्रंथि पडि गई, जदपि मृषा छूटत कठिनई । "**

अर्थात् जड प्रकृति और चेतन आत्माकी गांठ पड गई है, यद्यपि वह झूठी है, तो भी बडी कठिनतासे खोली जा सकती है ।

आत्मा शुद्ध चेतन स्वरूप निर्विकारी है और देह, इंद्रियों तथा मन बुद्धिका संघात प्रकृतिके विकार हैं, दोनोंमें गठबंधन होना असंभव है, परंतु दोनोंका भिन्न स्तरोंपर ऐसा तादात्म्य दिखता है कि उनके पृथक् होनेका ज्ञान अति दुर्लभ हो रहा है। जैसे देहके अभिमानसे आत्मा अपनेको देहके धर्मवाला समझता है। दार्शनिक परिभाषामें इस मिथ्या प्रतितिको अध्यास, विपर्यय ज्ञान अथवा ख्याति कहते हैं।

श्रीमच्छंकर भगवत्पादने शब्दको इस प्रकार समझाया है। आत्मा अहं अथवा अस्मत् पद है और प्रकृति युष्मत् पद है । पहिला विषयी है और दूसरा विषय । दोनों प्रकाश और तमवत् विरुद्ध स्वभाववाले हैं परंतु दोनों एक दूसरेके भावको प्राप्त हो जाते हैं, अर्थात् चिदात्मक विषयी आत्मामें युष्मत् प्रत्ययकी प्रतीति

गोचर विषयके धर्मोंका भाव और इसके विपरीत विषय और विषयके धर्मोंमें विषयी और उसके धर्मीका आभास दिखने लगता है। इस इतरेतर अध्यारोपणके मिथ्या ज्ञानको अध्यास कहते हैं। यह स्मृतिरूप होता है, पूर्वदृष्ट अर्थात् पहिले देखे हुए किसी पदार्थके अन्यत्र अवभास द्वारा उत्पन्न हुआ करता है। पूर्व मीमांसा-वाले इसे अख्याति, वैशेषिक और नैयायिक इसे अन्यथाख्याति, शून्यवादी असत्-ख्याति, बौद्धलोग आत्मख्याति, सांख्यवादी सदसत्ख्याति और वेदान्तवादी इसे अनिर्वचनीयख्याति कहते हैं। परंतु इस सिद्धान्तमें सब एक मत हैं, कि यह एक वस्तुका अन्यत्र मिथ्या अवभासमात्र है। उक्त मिथ्या अवभासकी निवृत्तिको और आत्मतत्त्वके शुद्ध चेतन ब्रह्मस्वरूप ज्ञानको 'ज्ञान' कहते हैं। आत्मामें देहाध्यास अथवा देहमें आत्माध्यासकी निवृत्तिस्वरूपही जड-चेतनकी ग्रंथिका छुडाना है, जिसका सुंदर निरूपण श्रीगोस्वामीजीने ज्ञान-दीपकमें किया है। अध्यात्माध्यास प्रकृतिके तीन गुणोंके योगसे तीन स्तरोंपर प्रतित होता है। सत्त्वगुणके योगसे उत्पन्न अध्यासको विष्णुग्रंथि, रजोगुणके योगसे उत्पन्न अध्यासको ब्रह्मग्रंथि और तमोगुणके योगसे उत्पन्न अध्यासको रुद्रग्रंथि कहते हैं। इसलिये स्थूल देहाध्यासको रुद्रग्रंथि, इंद्रियजनित अध्यासको ब्रह्मग्रंथि और अंत:करणके योगसे उत्पन्न अध्यासको विष्णुग्रंथि कहते हैं। रुद्रग्रंथिका स्थान मूलाधारमें, विष्णुग्रंथिका स्थान हृदयमें और ब्रह्मग्रंथिका स्थान आज्ञाचक्रमें, बताया जाता है, परंतु "ललितासहस्रनाममें" ग्रंथित्रयके स्थानोंका वर्णन इस प्रकार है—

मूलाधारैकनिलया ब्रह्मग्रंथिविभेदिनी।
मणिपूरान्तरुदिता विष्णुग्रंथिविभेदिनी ।।२.३८।।
आज्ञाचक्रान्तरालस्था रुद्रग्रंथिविभेदिनी।
सहस्राराम्बुजारूढा सुधासाराभिवर्षिणी ।।३९।।

भूतजय होनेपर रुद्रग्रंथिका, इंद्रियजय होनेपर ब्रह्मग्रंथिका और मनोजय होनेपर विष्णुग्रंथिका वेध जानना चाहिए।"

वर वर्णन केलेल्या "श्रीललितासहस्रनामस्तोत्रातील" श्लोकांचा अर्थ असा असा आहे की, कुंडलिनी शक्ती ही मूलाधारावर असणाऱ्या ब्रह्मग्रंथीचा भेद करते आणि मणिपुरात ती प्रकट होते किंवा उदय पावते. त्यानंतर ती विष्णुग्रंथीचा भेद करते. ( विष्णुग्रंथीचा भेद केल्यानंतर ) ती भगवती आज्ञाचक्राच्या केंद्रभागाला व्यापते, केंद्रभागी राहते. त्यानंतर पुन्हा ती रुद्रग्रंथीचा भेद करून सहस्रदलकम-लाशी पोहोचते आणि तेथून ती अमृतस्रोतांना खालील भागी पाठविते. श्रीभास्करराय मखी यांनी श्रीललितासहस्रनामस्तोत्रावर "सौभाग्यभास्कर" नावाचे जे भाष्य लिहिले आहे त्यात ते उपरोक्त श्लोकांवर टीका करताना असे म्हणतात की, "मूलाधारैकनिलया म्हणजे मुख्यत: मूलाधारात राहणारी. मूलाधार नावाचे एक

चतुर्दल कमळ आहे.या कमळाच्या कर्णिकेमध्ये कुलकुंड नावाचा एक मध्यबिंदू आहे. त्या बिंदूत नेहमी स्वत:चे मुख झाकून घेऊन कुंडलिनी झोपलेली असते. मूल म्हणजे मूळ, आधार किंवा आश्रय होय. मूलाधार हे सुषुम्नेचे मूळ आहे. सुषुम्नेच्या मुळाशी किंवा तळाशी मूलाधार कमल असते. हे कुंडलिनीचे आश्रयस्थान आहे. कुंडलिनीला मूलाधाराचा आश्रय किंवा आधार असतो. ब्रह्मग्रंथिविभेदिनी म्हणजे ब्रह्मग्रंथी नावाची गाठ तोडणारी किंवा भेदणारी. सहा चक्रातील प्रत्येक चक्राच्या दोहो बाजूस दोन ग्रंथी आहेत. ब्रह्मग्रंथीसह स्वाधिष्ठान चक्राला तीन ग्रंथी आहेत.

मणिपुरांतरुदिता म्हणजे मणिपुरचक्रात प्रकट झालेली किंवा उदित झालेली. मणिपूरचक्र नाभिस्थानात असून तेथील कमळाला दहा पाकळ्या आहेत. नाभिस्थानातील या दशदलकमलात समय पूजा करीत असता देवीला रत्नांनी विभूषित करतात. (समयाचारतत्परा या देवी नामावर भाष्य करताना समयाचाराबद्दल श्रीभास्करराय असे म्हणतात की– दीक्षा घेतलेला साधक, उपासक किंवा दीक्षित गुरूच्या कटाक्षपातामुळे षड्विध किंवा चतुर्विध ऐक्याच्या परिपाठामुळे जेव्हा दृढ, स्थिर, निश्चल होतो आणि 'महावेध' नावाच्या गूढ संस्कारामुळे दृढ अनुसंधान मिळवून शुद्ध किंवा पवित्र होतो तेव्हा देवी कुंडलिनी मूलाधार सोडून जागृत होते आणि मग ती साधकाला मणिपूर चक्रात दृश्यमान होऊन साक्षात् दिसते.) रत्नांनी पूरित किंवा भूषित असल्यामुळे या चक्रास मणिपूर असे म्हणतात. उदिता म्हणजे या चक्राच्या अधोभागी असणाऱ्या ब्रह्मग्रंथीचा भेद करून ती उदिता किंवा प्रकट होते.

विष्णुग्रंथिविभेदिनी म्हणजे विष्णुग्रंथी नावाची गाठ तोडणारी किंवा भेद करणारी. मणिपुराच्या वर असणाऱ्या ग्रंथीला विष्णुग्रंथी असे म्हणतात. मणिपुरात विष्णूचे वास्तव्य असते म्हणून या ग्रंथीला विष्णुग्रंथी असे म्हणतात. अशाच प्रकारे ब्रह्म आणि रुद्र यांच्या निवासस्थानाला अनुक्रमे ब्रह्मग्रंथी आणि रुद्रग्रंथी असे म्हणतात.

आज्ञाचक्रांतरालस्था म्हणजे आज्ञाचक्राच्या केंद्रात राहणारी. दोन भुवयांच्या मधोमध एक द्विदल कमल आहे. त्याला आज्ञाचक्र म्हणतात; कारण आज्ञा करणारा गुरू तेथे निवास करीत असतो. किंवा 'आ' म्हणजे किंचित् व 'ज्ञा' म्हणजे ज्ञान होय. अर्थात् आज्ञाचक्रापर्यंत मनोनिग्रहाच्या अभ्यासाने किंचित् ज्ञानोदय होत असतो. प्रथम भक्तात ज्ञानाचा उदय होतो आणि मानसिकरीत्या तो चक्रेशत्व प्राप्त करतो म्हणून त्याला आज्ञा म्हणतात.

रुद्रग्रंथिविभेदिनी म्हणजे रुद्रग्रंथीचे भेदन करणारी कुंडलिनी शक्ती होय. हृदयाच्या मध्यभागी असणाऱ्या अनाहत चक्रातील दोन रुद्रग्रंथींचा भेद करणारी ती. अनुष्ठान करीत असताना मात्र हा क्रम विपरीत असतो. किंवा श्रीविद्यामंत्रात

चार भाग किंवा खंड आहेत. यांनाच वाग्भव, कामराज, शक्ती आणि तुरीय(कूट) असेही म्हणतात. ( पाहा ८५ ते ९० देवीनामे ) या चार कूटांमध्ये तीन हृल्लेखा ( ऱ्हीं ) आहेत. यांना ग्रंथीं असे म्हणतात आणि त्या तिघींना अनुक्रमाने रुद्र, विष्णू आणि ब्रह्मग्रंथी अशी नावे आहेत. या तिन्ही ग्रंथींचा ती भेद करते म्हणजे या तिन्ही ग्रंथींच्या आत ती प्रवेश करते." श्री. मु. मा. घाणेकर यांनी "पंथराज त्रैमासिक" वर्ष ३ अंक ४ मधील "श्रीललितासहस्रनाम," लेखांक आठवा, यामध्ये श्रीभास्करराय मखी यांच्या भाष्याचे वरीलप्रमाणे अपूर्व भाषांतर दिले आहे.

म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी यासंबंधी "भारतीय संस्कृति और साधना," खंड दुसरा, या ग्रंथातील "सहजयान और सिद्धमार्ग" या निबंधात असे म्हटले आहे की, "अपर और पर ज्योतिमें वास्तविक स्थूल कोई व्यवधान नहीं है। पर सूक्ष्म व्यवधान अवश्य हैं। वे ही ग्रंथिरूपमें (ब्रह्मग्रंथि, विष्णुग्रंथि और रुद्रग्रंथि रूपमें) एवं और भी सूक्ष्मरूपसे देखनेपर चक्ररूपमें प्रतीत होते हैं। इनका भेद कर सकनेपरही अपर और पर ज्योतिका योग अथवा मिलन संपन्न हो सकता है। इसलिये सुषुम्णानाडी सरल रश्मि होनेपर भी जब वह ब्रह्मनालमें परिणत होती है तभी वह यथार्थ 'सरल' कही जा सकती है। (पृ.२९५,२९६)

उपरोक्त लेखकानेच या ग्रंथाच्या प्रथम खंडातील "अजपा रहस्य" या लेखात तिन्ही ग्रंथींचे मोचन कसे होते हे सांगताना असे म्हटले आहे की, "उपनिषदोंमें हंसयोग या अजपासाधनका विवरण दिया गया है। इस योगके प्रभावसे प्रत्यगात्माका ज्ञान होता है। यही हंस–ज्ञान (अहं सा–मैं वही हूँ।) है। जो योगी इस पद्धतिके अनुसार अजपा साधन करे, उन्हें पहले सिद्धासनसे बैठकर बाएँ टखनेसे गुदद्वारको आवृत कर पूरक क्रिया करनी चाहिये। इस तरह मूलाधारमें वायु इकठ्ठा हो जाती है। तदनंतर अपनी शक्तिके अनुसार आकुंचन क्रियाद्वारा मूलाधारसे उस वायुको उठाना चाहिये। इतनी जब क्रिया सिद्ध हो जाय, तब प्राण और अपानमें साम्यस्थापना करनी चाहिये। प्राण और अपानके साम्यभावको प्राप्त होनेपर मूलाधारस्थित त्रिकोणमें जो अग्नि रहती है, उसको उठाकर प्राण और अपान के साथ मिलातेही, कुंडलिनी शक्ति जाग उठती है। कुंडलिनीके जागनेके बाद, उस कुंडलिनीसे ब्रह्मग्रंथि खोलनी चाहिये। जबतक ब्रह्मग्रंथि नहीं खुलतीं, तबतक षट्चक्रोंके पहले चक्र मूलाधारमें यानी चतुर्दलमें प्रवेश करनेकी सामर्थ्यंही उत्पन्न नहीं होती। कमलमें प्रविष्ट होकर उस कमलका जो एकबिंदु या तुरीय-भूमि है,उसका ध्यान करना चाहिये। इसका नाम विराट्का ध्यान है, इस ध्यानसे ऊर्ध्वगति होती है। तब षड्दल अधिष्ठान-चक्रकी तीन बार प्रदक्षिणा करके,दशदल मणिपूरमें जाना चाहिये। तब फिर ग्रंथि खोलनेकी आवश्यकता पडती है। उस ग्रंथिका नाम "विष्णु ग्रंथि" है। वह अनाहत–चक्रके नीचे रहती है। उसका भेदन

किये बिना हृदय-चक्रमें प्रवेश नहीं किया जा सकता। हृदयमें प्रवेश कर पहलेकी तरह उस चक्रमें स्थित मध्यबिंदुमें तुरीयका ध्यान आवश्यक होता है। वह सूत्रात्माका ध्यान है। उस समय सविकल्प समाधिका उदय होता है। अनाहतको लाँघकर विशुद्ध चक्रमें प्रवेश करनेके मार्गमें स्तनोंके समान लटक रहे दो मांसपिंड दिखाई देते हैं। उस समय अगल-बगलके दो मार्गोंका त्यागकर मध्यमार्गका अवलंबन करके विशुद्धमार्गमें प्रवेश करना चाहिये। वहाँ प्राण निरुद्ध होता है। उसके बाद तृतीय या अंतिम ग्रंथिका भेद कर आज्ञाचक्रमें चढना चाहिये। इस ग्रंथिका नाम 'रुद्रग्रंथि' है। यह आज्ञा-चक्रके नीचे रहती है। आज्ञाचक्रमें प्रवेश करनेके पश्चात् वहाँके बीज या तुरीयका ध्यान आवश्यक होता है। योगी यदि यहाँतकका मार्ग तय कर सके तो चंद्र, सूर्य. और अग्नि इन तीनों तेजोंको अथवा तीन बिंदुओंको वह मिलानेमें समर्थ होता है। उस समय इन तीनों तेजोंका पार्थक्य नहीं रहता। तीनोंके मिलनसे एक महातेजका विकास होता है। उससे सहस्रारसे टपक रहे अमृतका आस्वाद लेनेका अधिकार पैदा होता है। उस समय योगी अजर और अमर पिंडको पाकर सहस्रारमें विराजमान ब्रह्मरंध्रमें प्रवेश करता है। वहाँ तुर्य या तुर्य-तुर्यके दर्शन प्राप्त होते हैं। तुर्य कहनेसे चतुर्थका बोध होता है। जिसके ऊपर तीन मात्राएँ आरोपीत होती हैं,उसका नाम तुर्य है। जिस समय इस अवस्थाका अनुभव होता है, उस समय त्रिमात्राके रूपमें प्रतीति होती है। किंतु तुर्य-तुर्यमें मात्राएँ लुप्त हो जाती हैं। यही अमात्र स्थिती है। यह साक्षात्कार क्षणिक न होकर सनातन होना चाहिये। तुर्यमें कुछ साकार-भाव रहाता है। किंतु तुर्य-तुर्यमें साकार भाव बिलकुल नहीं रहता। यह प्रतिद्वंद्वहीन, एक और अद्वितीय अवस्था है। परमहंस अवस्था इसीका नामांतर है। तुर्य-तुर्यके स्वगत अंशसे तुर्यकी उत्पत्ति होती है। इसको योगी लोग करोडो सूर्योंके समान देदीप्यमान कहते हैं। किंतु वास्तविक रूपमें इसका वर्णन नहीं हो सकता। तुर्यके साथ अभेद मानकर यथा-कथंचित् वर्णन किया जा सकता है, वस्तुतः यह वर्णनातीत है। ( पृ. ३४८, ३४९, ३५० )

" ब्रह्मविद्योपनिषदामध्ये " ग्रंथित्रयभेदनप्रक्रिया स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

> अकारे वन्हिरित्याहुरुकारे हृदि संस्थितः ।।६९।।
> मकारे च भ्रुवोर्मध्ये प्राणशक्त्या प्रबोधयेत् ।
> ब्रह्मग्रंथिरकारे च विष्णुग्रंथि हृदि स्थितः ।।७०।।
> रुद्रग्रंथिर्भ्रुवोर्मध्ये भिद्यतेऽक्षरवायुना ।
> अकारे संस्थितो ब्रह्मा उकारे विष्णुरास्थितः ।।७१।।
> मकारे संस्थितो रुद्रस्ततोऽस्यान्तः परात्परः ।
> कंठं संकुच्य नाडचादौ स्तम्भिते येन शक्तितः ।।७२।।

'अ' कार नावाचा अग्नी मूलाधारात वैश्वानर नावाने राहतो. 'उ' कार नावाचा अग्नी हृदयात राहतो व 'म' कार नावाचा अग्नी भुवयांच्यामध्ये राहतो. या तिन्ही अग्नींना प्राणशक्ती कुंडलिनीने फुंकर घालून जागृत करावे. 'अ' कारात म्हणजे मूलाधारात ब्रह्मग्रंथी, 'उ' कारात म्हणजे हृदयात विष्णुग्रंथी व 'म' कारात म्हणजे भ्रूमध्यात रुद्रग्रंथी आहेत.त्या हंसरूप वायूने सुटतात म्हणजे "सोऽहं" मंत्राच्या अजपाजपाने या ग्रंथींचा भेद होतो. अ उ म या तीन ग्रंथींच्या पलीकडे सहस्रारात परब्रह्म आहे.कंठाचे संकोचन करून नाडी आदि शक्तींचे स्तंभन करावे. शेवटच्या श्लोकावर भाष्य करताना श्री. उपनिषद-ब्रह्म-योगिन् यांनी असे म्हटले आहे की, "तद्दर्शनग्रंथित्रयभेदनोपायतया योगमुपदिशति– कंठमिति । जालंधरबंधेन कंठं संकुच्य सिद्धासनरूढेन येन योगिना नाड्याद्दौ सुषुम्नामूले कुंडलिनीशक्तितः कुंडलिनीशक्त्या सह दृष्टिप्राणादौ स्तंभिते सति ।। ७२ ।। " याचा अर्थ असा की, कंठसंकोचाचा उपाय ग्रंथत्रयभेदनपूर्वक सहस्रारातील परात्पर आत्मस्वरूपाच्या दर्शनासाठी सांगतात. सिद्धासन घालून जालंधरबंधाने कंठसंकोच करून सुषुम्नेच्या मुळाशी असणाऱ्या कुंडलिनी शक्तीने कुंडलिनीशक्तीसह दृष्टीचे व प्राणापानांचे स्तंभन करावे.

"योगकुंडल्युपनिषदातही" तीनही ग्रंथींचा भेद कसा होतो हे सांगताना असे म्हटले आहे की–

> **ब्रह्मग्रंथिं ततो भित्त्वा रजोगुणसमुद्भवम् ।**
> **सुषुम्नावदने शीघ्रं विद्युल्लेखेव संस्फुरेत् ।।१.६७।।**
> **विष्णुग्रंथिं प्रयात्युच्चैः सत्वरं हृदि संस्थिता ।**
> **ऊर्ध्वं गच्छति यच्चास्ते रुद्रग्रंथिं तदुद्भवम् ।।५८।।**
> **भ्रुवोर्मध्यं तु संभिद्य याति शीतांशुमंडलम् ।**
> **अनाहताख्यं यच्चक्रं दलैः षोडशभिर्युतम् ।।६९।।**

प्रथम रजोगुणापासून उत्पन्न झालेल्या दशदलयुक्त नाभिपद्मातील ब्रह्मग्रंथीचा भेद करून कुंडलिनी शक्ती सुषुम्नेमध्ये विजेप्रमाणे चमचमाट व झगझगाट करीत वर वर चढत जाते. ( कुंडलिनी शक्तीचे हे स्फुरण अनेक क्रियांना व अनुभूतींना जन्म देते. ) अशा प्रकारे क्रिया करीत व साधकाला अनुभूती देत कुंडलिनी शक्ती अत्यंत जलद गतीने द्वादशदल हृदयपद्मस्थित विष्णुग्रंथीचा भेद करून पुढे आज्ञाचक्रातील भ्रूमध्यस्थ द्विदलचक्रयुक्त रुद्रग्रंथीचा भेद करते व सहस्रारात जाते.

याच उपनिषदात शास्त्रकारांनी ग्रंथित्रयभेदाने साधकाला परावस्था कशी प्राप्त होते हे सांगताना अग्नी व प्राण यांच्या आघाताने जागृतशक्ती हे कार्य कसे घडवून आणते अर्थात् यामुळे होणाऱ्या अनंत क्रिया व अनुभूती उपस्थित होऊन नंतर हे कसे घडते हे सूचित करून असे म्हटले आहे की–

ज्वलनाघातपवनाघातोरुन्निद्रितोऽहिराट् ।
ब्रह्मग्रंथिं ततो भित्त्वा विष्णुग्रंथिं भिनत्त्यतः ॥१.८५॥
रुद्रग्रंथिं च भित्त्वैव कमलानि भिनत्ति षट् ।
सहस्रकमले शक्तिः शिवेन सह मोदते ॥८६॥
सैवावस्था परा ज्ञेया सैव निर्वृतिकारणा ॥८७॥

नंतर अग्नी व वायूच्या आघाताने निद्रिस्त कुंडलिनी शक्ती जागृत होते. त्यावेळी ती शक्ती ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी व रुद्रग्रंथी यांचा व षट्चक्ररूप कमलांचा भेद करून सहस्रारात शिवाशी एकरूप होऊन आनंदात राहते. हीच साधनाची श्रेष्ठ अवस्था होय. हीच संसाराच्या निवृत्तीला व विदेहमुक्तीला कारण होते.

" योगशिखोपनिषदात " गंथित्रय कशा मोकळचा होतात हे सांगताना असे म्हटले आहे की—

प्रविशेच्चंद्रतुंडे तु सुषुम्नावदनांतरे ।
वायुना वन्हिना सार्धं ब्रह्मग्रंथिं भिनत्ति सा ॥१.८६॥
विष्णुग्रंथिं ततो भित्त्वा रुद्रग्रंथौ च तिष्ठति ।
ततस्तु कुंभकैर्गाढं पूरयित्वा पुनः पुनः ॥८७॥
वज्रासनस्थितो योगी चालयित्वा तु कुंडलीम् ॥११२॥
कुर्यादनन्तरं भस्त्रीं कुंडलीमाशु बोधयेत् ।
भिद्यन्ते ग्रंथयो वंशे तप्तलोहशलाकया ॥११३॥
तथैव पृष्ठवंशे स्याद् ग्रंथिभेदस्तु वायुना ।
पिपीलिकायां लग्नायां कण्डूस्तत्र प्रवर्तते ॥११४॥
सुषुम्नायां तथाऽभ्यासात् सततं वायुना भवेत् ।
रुद्रग्रंथिं ततो भित्त्वा ततो याति शिवात्मकम् ॥११५॥
चंद्रसूर्यौ समौ कृत्वा तयोर्योगः प्रवर्तते ।
गुणत्रयमतीतं स्याद् ग्रंथित्रयविभेदनात् ॥११६॥
शिवशक्तिसमायोगे जायते परमा स्थितिः ।
यथा करी करेणैव पानीयं प्रपिबेत् सदा ॥११७॥
सुषुम्नावज्रनालेन पवमानं ग्रसेत् तथा ॥११८॥

कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, ती सुषुम्ना नाडीच्या मुखात म्हणजे चंद्रखंडात प्रवेश करते व वायू आणि अग्नी यांच्यासह ती ब्रह्मग्रंथीचा भेद करते. सुषुम्नेत प्रविष्ट झालेली कुंडलिनी शक्ती क्रमाक्रमाने ऊर्ध्वगामिनी होऊन विष्णुग्रंथीचा भेद करून रुद्रग्रंथीच्या ठिकाणी स्थिर होते. त्यानंतर वरचेवर कुंभक करून ते स्थान वायूने पूर्ण भरून साधकयोग्याने रुद्रग्रंथीचा भेद करावा. वज्रासन घालून

योग्याने कुंडलिनी शक्तीचे चालन करावे. नंतर भस्त्राप्राणायामाने कुंडलिनी शक्ती जागृत करावी. तापलेल्या लोखंडाच्या सळईने वेळूतील गाठी जशा फुटतात तशाच रीतीने पृष्ठवंशातील ( सुषुम्नेतील ) ग्रंथीचा किंवा सत्त्व, रज व तम यांनी युक्त अशा जन्मजन्मांतरीय संस्कारादि वासनांच्या एकत्रीकरणाचा वायूने भेद होतो. यावेळी मुंगीच्या स्पर्शाप्रमाणे तेथे खाज सुरू होते. ज्यावेळी नियमित अभ्यासाने किंवा साधनाने सुषुम्नेत वायूचे चालन व वास्तव्य सतत होईल त्यावेळी रुद्रग्रंथीचा भेद होऊन जीवरूपी साधकाला शिवात्मकता येते. चंद्राचा व सूर्याचा म्हणजे इडेचा व पिंगलेचा संयोग झाला किंवा समरसीकरण झाले म्हणजे ब्रह्म, विष्णू व रुद्र या ग्रंथित्रयाचे भेदन होऊन त्रिगुणातीत अवस्था प्राप्त होते. अशा प्रकारे शिवशक्तींच्या एकत्र वास्तव्याने, समरसीकरणाने किंवा सामरस्याने साधकाला अत्यंत ... अवस्था प्राप्त होते. हत्ती जसा आपल्या सोंडेने पाणी पितो त्याप्रमाणे योगी-साधक सुषुम्नेच्या आतील वज्रनाडीने प्राणवायू खेचून घेतो.

कल्याण मासिकाच्या वर्ष ४२ च्या " उपासना विशेषांकात " श्री. उदासीन स्वामीजी श्रीकृपाल्वानंदजी यांनी आपल्या " खेचरी मुद्राकी साधना " या लेखात तीन ग्रंथींबद्दल असे म्हटले आहे की " आमच्या प्राचीन तत्त्वदर्शी ऋषीमुनींनी योगाच्याद्वारा तीन ग्रंथींचे ज्ञान प्राप्त करून घेतले आहे. ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी व रुद्रग्रंथी अशी त्यांची नावे आहेत. ब्रह्मग्रंथी रजोगुण, विष्णुग्रंथी सत्त्वगुण व रुद्रग्रंथी तमोगुणाची ग्रंथी आहे. मूलाधारापासून मणिपूरचक्रापर्यंत ब्रह्मग्रंथीची सीमा आहे. अनाहतचक्रापासून विशुद्धचक्रापर्यंत विष्णुग्रंथीची व आज्ञाचक्रापासून सहस्त्रदलापर्यंत रुद्रग्रंथीची सीमा आहे. गुह्येंद्रियाला ब्रह्मग्रंथी म्हणतात. त्याचे स्थान हृदयात आहे. योगींद्र लोकांनी तीन हृदये स्वीकारली आहेत. पहिले हृदय मूलाधारात आहे. तेथे ब्रह्मग्रंथी आहे. दुसरे हृदय दोन फुफ्फुसांच्या मध्ये व तिसरे हृदय मस्तकात आहे. तिसऱ्या हृदयात मन, बुद्धी, चित्त व अहंकार हे राहतात. जिव्हेला विष्णुग्रंथी म्हणतात. त्याचे स्थान विशुद्धचक्रात आहे. टाळूच्या शेवटी लंबिका ( Uvula ) आहे. त्याला रुद्रग्रंथी म्हणतात. योगिराज श्रीगोरक्षनाथांनी जिव्हेच्या खाली मध्यभागी आलेल्या नाडीबद्दल " गोरक्षपद्धती " च्या प्रथम शतकात असे म्हटले आहे की–

> बिंदुर्मूलं शरीराणां शिरास्तत्र प्रतिष्ठिताः ।
> भावयन्ति शरीराणामापादतलमस्तकम् ।।६७।।

वीर्य हेच सर्व शरीराचे कारण आहे. या वीर्याचे एक नाडीकेंद्र जिव्हेच्या खालच्या भागात विद्यमान आहे. हे केंद्र संपूर्ण शरीराला अपादमस्तक समृद्ध करते.

कुंडलिनी शक्ती ब्रह्मग्रंथीचा भेद करीत व चक्रांना ओलांडीत जेव्हा विष्णुग्रंथीत येते तेव्हा ते नाडीकेंद्र प्रज्ज्वलित होते व त्याचा स्वाभाविक भेद होतो.

यामुळे वीर्याचा ऊर्ध्वगमनाचा मार्ग मोकळा होतो. त्यात कोणताही अडथळा येत नाही. त्यामुळे रजोगुण व तमोगुण निर्बल होऊन सत्त्वगुण प्रबल होतो. रुद्रग्रंथीचा भेद झाल्यावर सत्त्वशुद्धीचा क्रम अत्यंत प्रबल होतो व निर्वीज समाधी सिद्ध झाल्यावर योगी त्रिगुणातीत होतो. दक्षिणायनात अमृतप्राप्ती होते; परंतु त्यात तीन ग्रंथींचा भेद होत नाही. ग्रंथींचा भेद न झाल्यामुळे साधक ऊर्ध्वरेता होत नाही."

"हठयोगप्रदीपिकेत" कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर ग्रंथिभेद कसा होतो हे सांगताना असे स्पष्टपणे म्हटले आहे की–

**सुप्ता गुरुप्रसादेन यदा जागर्ति कुंडली ।**
**तदा सर्वाणि पद्मानि भिद्यंते ग्रंथयोऽपि च ।।३.२।।**

ज्यावेळी श्रीगुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताने मूलाधारात राहणारी सुप्त कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा सर्व पद्मांचा म्हणजे षट्चक्रांचा व ब्रह्म, विष्णू आणि रुद्र या तीन ग्रंथींचा क्रमशः भेद होतो. या तीन ग्रंथी म्हणजे सत्त्व, रज व तम या तीन गुणांची तीन स्थाने आहेत. या तीन गुणांना ओलांडून, वेधून व आपल्यामध्ये सामावून घेऊन कुंडलिनी शक्ती जेव्हा ब्रह्मरंध्रात स्थिर होते तेव्हा साधकाला अखंड चैतन्याचा बोध होऊन दिव्यज्ञान प्राप्त होते.

"कठोपनिषदातही" ऋषींनी द्रष्टेपणाने हाच भाव व्यक्त करताना असे म्हटले आहे की–

**यदा सर्वे प्रभिद्यन्ते हृदयस्येह ग्रंथयः ।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्येतावद्धयनुशासनम् ।।२.३.१५।।**

जेव्हा साधन करताना साधकाच्या हृदयाच्या सर्व ग्रंथी या लोकी तुटून जातात तेव्हा हा मर्त्य जीव मृत्युरहित म्हणजे अमर होतो. सर्व वेदान्ताचे हेच सार व हाच उपदेश आहे.

या श्लोकावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, "अविद्या अथवा आपले अज्ञान ज्या ज्या विशेष ज्ञानाला किंवा वासनेला उत्पन्न करते ते ते विषय व त्या त्या वासना म्हणजे आपल्या हृदयात वास्तव्य करणाऱ्या बुद्धीमध्ये मोठमोठ्या गाठीच होत. ह्या आपल्या अज्ञानाने अत्यंत घट्ट बनलेल्या असतात. 'मी हे शरीर आहे', 'हे माझे धन आहे', 'मी सुखी आहे,' 'मी दुःखी आहे', 'मला अमुक हवे आहे' इत्यादि प्रकाराची आभासिक ज्ञाने व भोगात्मक वासना यांनी बनविलेल्या या गाठी आहेत. ह्या अज्ञानाच्या गाठी सोडावयाच्या कशा व फोडावयाच्या कशा ? चित्त शुद्ध झालेल्या अधिकाऱ्याने आत्मज्ञान संपादून "मी ब्रह्ममात्र आहे" असे ज्ञानविज्ञान करून घेतले म्हणजे आताच सांगितलेले अज्ञान-जन्य विषय व वासना ही नाहीशी होतात. मी ब्रह्म आहे, मी असंसारी आहे, असे पूर्ण ज्ञान झाले की, अविद्येचा अस्त होऊन या वासनादिकांचा

अवतार संपतो. ह्या भयंकर गाठी फुटतात व अर्थात्‌च अज्ञानासह कामादि विकारास तीलांजली मिळते. अशी स्थिती ज्यावेळी प्राप्त होते म्हणजे सर्व ग्रंथींचा जेव्हा समूळ उच्छेद होतो तेव्हा जीवाचे अज्ञान अर्थात् मरण-कारण नाहीसे झाल्यामुळे तो स्वस्वरूप ब्रह्म होऊन अमर होतो.

सारांश, 'गांठी तिन्ही सुटती' असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी संक्षेपाने निर्दिष्ट केले आहे त्याचा हा सविस्तर खुलासा असून ही गोष्ट क्रियांची व अनुभूतीची जननी कशी आहे, याची वरील विवेचनावरून प्रतीती येते. हा सर्व विषय एका ओवीत मांडावयाचा झाला तर त्यांच्याच शब्दात असे म्हणता येईल की-

इंद्रिया विषयांचिया गांठी । अपैसया सुटती किरटी ।
मन मायेच्या पोटीं । रिगती दाही ॥१८.७३८॥

शेवटी "साही पदर फुटती । चक्रांचे हे ॥६.२४४॥" असे जे श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी म्हटले आहे त्या संबंधीचा विचार करू. षट्‌चक्रे म्हणजे काय ? ती कोठे असतात ? व त्यांचे पदर फुटतात म्हणजे नेमके काय होते ? या सर्व प्रश्नांची उत्तरे पृथक्‌पणे अगर साकल्याने पाहिली म्हणजे षट्‌चक्रवेध ही गोष्ट क्रियानुभूतींची जननी कशी ठरते हे लक्षात येईल. येथे एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे की, हा विषय अत्यंत विस्तृत असून त्याची व्याप्तीही खूप मोठी आहे. सर जॉन वुड्रॉफ लिखित दी सर्पंट पॉवर, श्री. वसंत जी. रेळे लिखित दी मिस्टीरियस कुंडलिनी, श्री. प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज लिखित देवात्मशक्ती व सौंदर्यलहरीवरील हिंदी टीका, स्वामी नारायणानंद लिखित दी प्रायमल पॉवर इन मॅन ऑर दी कुंडलिनी शक्ती, श्री. सी. डब्ल्यू लेडबिटर लिखित दी चक्राज, श्रीयोगश्वरानंदतीर्थ लिखित दीक्षा सर्वस्व, षट्‌चक्र निरूपण, ज्ञानसंकलिनीतंत्र, श्री. प. प. श्रीशंकरपुरुषोत्तम तीर्थस्वामीमहाराज लिखित योगवाणी, श्रीयोगेंद्र विज्ञानी लिखित महायोग विज्ञान, डॉ. श्री. म. वैद्य लिखित षट्‌चक्र दर्शन व भेदन, श्रीगुलाबराव महाराज लिखित योगरहस्य, डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी लिखित नाथसंप्रदाय, श्रीमुकुंदराजकृत विवेकसिंधु इत्यादि विविध ग्रंथांतून या विषयाची माहिती आढळते. त्यातच शरीरशास्त्राशी या विषयाची सांगड घालण्याचा कित्येक पाश्चात्य लेखकांनी प्रयत्न केला असल्यामुळे इकडील पंडितांनीही त्याच पद्धतीचे अनुसरण करून आधुनिक विज्ञानाशी अगर शरीरशास्त्राशी त्यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे चक्रांच्या नावांविषयी व स्थानांविषयी ग्रंथग्रंथांतरी बरेच मतभेद दिसतात. त्यामुळे प्राकृत जनांना हे समजावून घेण्याचे काम अत्यंत अवघड होऊन बसले आहे. असे असले तरी उपरोक्त सर्व ग्रंथांच्या आधाराने "साही पदर फुटती । चक्रांचे हे ॥६.२४४॥" याचे साररूपाने विवेचन करू.

वर म्हटल्याप्रमाणे चक्रांची शरीरशास्त्राशी सांगड घालणे कितपत योग्य

आहे ? याचा विचार प्रथम केला म्हणजे विवेचनाची मर्यादा स्पष्ट होऊन मार्ग सुकर होईल."योगरहस्य" या ग्रंथात "योगविषयक प्रश्नोत्तरे" या प्रकरणात,"अलीकडचे योगी चक्राला जी नावे ठेवतात ती तुम्हाला पसंत आहेत काय ?।।प्र. ५वा।।" असा प्रश्न विचारलेला असून त्याला ग्रंथलेखक श्रीगुलाबरावमहाराज यांनी असे उत्तर दिले आहे की, "चक्रांविषयीच्या व योगाविषयीच्या सर्व गूज गोष्टी आजपर्यंत सर्व साधूंनी गुप्त ठेविल्या आहेत. तथापि तुझे समाधान होईल असे गुप्त या ग्रंथात मला सांगता येते तितके सांगतो. इंग्रजीमध्ये ज्याला प्लेक्सस (Pleuxs) म्हणतात त्यालाच अलीकडचे योगी चक्र म्हणतात, हे मला पसंत नाही.एका आधुनिक पुस्तककाराने लार्ज बॉवेलला ( मोठे आतडे ) कुंडलिनी म्हटले आहे. परंतु लार्ज बॉवेल जर कुंडलिनी होईल तर ती चढवावी कशी हा प्रश्न राहतो; कारण लार्ज बॉवेल्स जर मस्तकात चढतील तर विचाऱ्या योग्याला समाधीच्या ऐवजी मृत्यूसच वरावे लागेल.

चक्रांची वास्तविक गोष्ट अशी आहे की, शरीराचे काही भाग स्वतंत्र मानसिक बनले आहेत. मनाची भावना झाली की, शरीरात न कळताना विकार होतो. माझा हात वाळला अशी भावना झाली तर रक्त बंद होण्याची क्रिया काही प्रत्येक नाडीवर लक्ष देऊन करावी लागत नाही. त्या नाडया आपण होऊनच ते काम करतात.

अस्लर साहेबांनी मेडीसीन नावाचा जो ग्रंथ लिहिला आहे त्याच्या ११२ व्या पानावर असे म्हटले की, हिस्टेरिया नावाच्या रोगात ११२ ते १२० अंश असा ताप येत असतो. साधारण ११० अंशामध्येच मनुष्य वाचू शकत नाही. स्त्रियांमध्येच तर १२० अंशाच्या वरही ताप येतो. आम्हाला जरी आमच्या नियमाप्रमाणे याचा उलगडा करता येत नाही आणि अशा केसेसमध्ये लुच्चेगिरी होणे जरी शक्य आहे; तरी आमच्या अनुभवाच्या काही केसेस अगदी खऱ्या आहेत, असे कबूल करणे भाग आहे. ज्याकुबीच्या रिपोर्टात १४८ अंश तापाची एक केस झाली म्हणून म्हटले आहे. उमाहा केस तर १७० डिग्री तापाची होती. ही तेवढी केस संशयातीत आहे असे म्हणतात. सँडो आपल्या पुस्तकात म्हणतो, " मी स्वतः मनात आणतो तेव्हा माझे शरीर इतके फुगते की, माझ्या पाठीवर लोखंडाचा खांब मारला असता तो मोडून जाईल."

तेव्हा शरीरात असणाऱ्या गुप्त गोष्टी मनाच्या भावनेने प्रकट होतात हे खरे आहे. चक्रे व कुंडलिनी ही तशाच प्रकारची गोष्ट असून मनाच्या भावनेने ती शरीरात प्रकट होऊ लागते व नंतर तिचे प्रकार प्रत्यक्ष दिसू लागतात....गुप्त वस्तू शब्दप्रमाणाने सुचविल्या जातात व नंतर त्या भावनेने प्रकट होतात; म्हणून गुरुवाक्यानुसार भावनाच करावी. अलीकडचे योगी ज्या इंग्रजी अवयवाला चक्रांची

नावे ठेवतात ते योग्य नाही....शब्दप्रमाण भावनाजनक नसते ते वस्तूसूचकही असते. भावानुसारे क्वचित् शब्दाने वस्त्वाभास होईल तर तो भ्रम आहे हे सर्वासच कबूल आहे; परंतु प्लेक्ससला चक्र म्हणावे हे अलीकडच्या गुरूंचे सांगणे मात्र भावनाजनक व प्रमाणाभास खरे."

याबाबतीत "The Primal Power In Man or The Kundalini Shakti" या ग्रंथात स्वामी नारायणानंद म्हणतात, "Kundalini Shakti is not a thing to be seen and experienced with the physical or gross eyes or by the most subtle apparatus invented by man so far. It is a thing to be felt and experienced by making the mind pure and subtle and by leading a strict life of discipline and Brahmacharya (Celibacy). (Page 29, 30 – 3rd Edition) आपण भौतिक दृष्टीने, आपल्या स्थूल डोळचांनी किंवा आजपर्यंत संशोधिलेल्या अत्यंत सूक्ष्म यंत्राने पाहू व अनुभवू शकू अशी कुंडलिनी शक्ती ही वस्तू नाही. अत्यंत काटेकोरपणे शिस्तबद्ध आयुष्य जगून व ब्रह्मचर्याच्या पालनाने मन पवित्र व सूक्ष्म करून ह्या वस्तूची जाणीव प्राप्त करावयाची असते व अनुभूती घ्यावयाची असते.

वरील ग्रंथाच्या उपोद्घातात डॉ. महेन्द्रनाथ सरकार म्हणतात की– "Kundalini is an old but a very intricate theme and its province is strictly beyond the field of scholarship .... ..... The matter is so subjective that every adept has the right to put down his own personal experience and opinion; contributing to the better understanding and grasp of the subject." (Page 6- 3rd Edition)

कुंडलिनी हा पुरातन परंतु अत्यंत गुंतागुंतीचा विषय असून तिचा प्रांत हा पूर्णपणे विद्वत्तेच्या क्षेत्रापलीकडील आहे. हा विषय व्यक्तिगत असून तो उत्तम प्रकारे समजण्यासाठी व आकलन होण्यासाठी या विषयासंबंधी प्रत्येक प्रवीण साधकाला आपले अनुभव व मते मांडण्याचा अधिकार आहे.

श्री. उत्तरयोगी यांनी आपल्या "Yogic Sadhan" या पुस्तकात असाच सिद्धांत मांडला असून युरोपियन विज्ञान व शरीरशास्त्रावर फार विसंबून राहणे बरे नाही, हे सांगताना ते म्हणतात– "I come next to Prana, the nervous or vital element in man which is centralised below the Manas and Chitta in the subtle body and connected with the navel in sthula Deha. There I must distinguish bet-

ween the Sukshma Prana and the Sthula Prana, the former moving in the nervous system of the subtle body as prescribed in the Yogic books, the latter in the nervous system of the gross body. The two are closely connected and almost always act upon each other. The prana forms the link between the physical and mental-man. I must here warn you against stumbling into the error of those who try to harmonise Yogic Science with the physical science of the Europeans and search for the Yogic Nadis and Chakras in the physical body. You will not find them there. There are certain centres in the physical nervous system with which the Chakras correspond, otherwise Hatha-Yoga would be impossible. But the Chakras are not these centres. The Europeans are masters in their own province of knowledge and there you need not hesitate to learn from them, but for God's sake do not subject your higher knowledge to their power. You will only create a most horrible confusion. Develop your higher know-ledge first, then study their sciences and the latter will at once fall into their place."

या नंतर मी प्राणतत्त्वाच्या विवेचनाकडे वळतो. प्राणतत्त्व हे मनुष्यामधील अत्यंत बळकट व उत्साहवर्धक अर्थात् चेतनशील तत्त्व असून ते सूक्ष्मदेहात मन व चित्ताच्या खाली केंद्रीभूत झाले असून स्थूलदेहात हे तत्त्व नाभीशी संबंधित असते. येथे सूक्ष्मप्राण व स्थूलप्राण यातील फरक स्पष्ट करणे मला आवश्यक वाटते. योगाच्या पुस्तकात वर्णिल्याप्रमाणे पहिला सूक्ष्मप्राण हा सूक्ष्मदेहातील व दुसरा स्थूलप्राण हा स्थूलदेहातील नाडयांचे चलनवलन करतो. हे दोन्ही प्राण अगदी निकटपणे एकमेकांशी संबंधित असून ते बहुतकरून एकमेकांवर परिणाम करीत असतात. शारीरिक व मानसिक माणूस यांच्यामध्ये प्राण संबंध जोडींत असतो. जे कोणी योगशास्त्र व पाश्चात्यांचे शरीरशास्त्र यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न करतात आणि योगाच्या नाडचा व चक्रे यांचा स्थूल शरीरात शोध घेतात, त्यांच्या अशा चुकांमुळे उत्पन्न होणाऱ्या अडथळ्यांबद्दल येथे मला पुन्हा एकदा असे बजवावे लागत आहे की, या नाडचा व ही चक्रे आपल्याला स्थूल शरीरात सापडणार नाहीत. स्थूल शरीराच्या नाडयांच्या जाळ्यांमध्ये अशी काही केंद्रे आहेत की, ती चक्रांशी मिळती जुळती आहेत. असे नसते तर हठयोग हा अशक्य कोटीतील ठरला असता.

परंतु चक्रे म्हणजे ही केंद्रे नव्हेत. पाश्चात्यलोक हे त्यांच्या ज्ञानाच्या क्षेत्रात तज्ज्ञ आहेत. असे असले तरी तुम्ही या बाबतीत त्यांच्याकडून काही शिकण्याची घाई करता कामा नये. एवढेच नव्हे; तर ईश्वरासाठी तरीं तुम्ही तुमचे उच्च ज्ञान हे त्यांच्या स्थूल शक्तीचा विषय करता कामा नये. असे केले तर तुम्ही एक महाभयानक गोंधळ उपस्थित कराल. प्रथम आपले उच्च ज्ञान वृद्धिगत करा व नंतर त्यांचे शास्त्र अभ्यासा म्हणजे तुमच्या असे लक्षात येईल की, पाश्चात्यांचे शास्त्र हे तेथेच जिरून गेलेले आहे.

केवळ स्थूल अशा शरीर किंवा विज्ञानशास्त्राच्या मागे लागल्यापासून फारसा उपयोग होणार नाही हे वरील उताऱ्यांवरून सिद्ध होईल. यासाठी या दृष्टीने केलेले सर्व विवेचन दृष्टिआड करून परंपरागत शास्त्रीय विवेचनची कास ज्यांनी पकडली आहे ते काय म्हणतात हे पाहिले म्हणजे हा सर्व विषय करतलामलकवत् स्पष्ट होईल. प्रथम सामान्य विवेचन करून नंतर प्रत्येक चक्राची क्रमशः माहिती पाहू.

सर जॉन वुड्रॉफ यांनी " The Serpent Power " या आपल्या प्रख्यात ग्रंथात " The Centres or Lotuses (Chakra, Padma)" या पाचव्या प्रकरणाच्या सुरुवातीलाच या संबंधी असे म्हटले आहे की, "At this stage we are in a position to pass to a consideration of the Chakras, which may be shortly described as subtle centres of operation in the body of the Shaktis or Powers of the verious Tattvas or principles which constitute the bodily Sheaths. Thus the five lower Chakras from Muladhara to Vishudha are centres of the Bhutas or five forms of sensible matter. The Ajnya and other Chakras in the region between it and the sahasrara are centres of the Tattvas constituting the mental Sheaths, whilst the Sahasrara or thousand-petalled lotus at the top of the brain, is the blissful abode of Parama Shiva–Shakti which is the state of pure Consciousness."

आता या पातळीवर आपण अशा स्थितीत आलो आहोत की, आपण चक्रांसंबंधी विचार करू शकू. त्यांचे थोडक्यात वर्णन करावयाचे झाले तर असे म्हणता 'येईल की, ही चक्रे म्हणजे शारीरिक शक्तींच्या वृत्तीची किंवा व्यापाराची सूक्ष्म केंद्रे आहेत. किंवा शरीरात कोषासारखी तयार झालेली अशी भिन्न तत्त्वांची ती सामर्थ्यशाली शक्तिकेंद्रे आहेत. मूलाधार ते विशुद्ध ही पाच अधोचक्रे पंचमहाभूतांची केंद्रे किंवा इंद्रियांनी जाणण्यासारखी पाच तत्त्वे अगर आकार आहेत. आज्ञा व त्या

भागातील इतर चक्रे आणि सहस्रारचक्र ही केंद्रे मानसिक कोष तयार करणारी केंद्रे आहेत.मात्र बुद्धीच्या अगदी वर अग्रभागी असलेले सहस्रार किंवा सहस्रदल-कमलचक्र हे परमशिवशक्तीचे शुद्ध चैतन्यस्वरूपाचे असे आनंददायक व सुखकारक गृह आहे.

स्वामी नारायणानंद यांनी आपल्या " The Primal Power In Man or the Kundalini Shakti " या ग्रंथात ही चक्रे प्रसवक्रमाने कशी तयार होतात व प्रत्येक चक्रात कोणती तत्त्वे स्थित असतात हे सांगताना, " The Chakras " या चवथ्या प्रकरणात असे म्हटले आहे की, "In the Saharara the Parakundalini Shakti is one with the supreme Self in dissolution. In creation, It evolves. It descends and becomes grosser and grosser. In this process of evolution, the Kund-lini Shakti first becomes or creates mind. Then it produces Akasha, air, fire, water and earth. From earth all the bodies of the living creatures are produced. In the human body the corresponding centres of mind, Akasha, air, fire, water and earth, are called by the name of Ajnya Chakra, Vishudha Chakra, Anahata Chakra, Manipur Chakra, Swadhisthana Chakra and Muladhara Chakra. The seat of the Mind or the Mind Tattva is the Ajna Chakra in the region of brain-centre. The seat of the Akasha Tattva is the Vishudha Chakra in the region of the throat The seat of the Air Tattva is Anahata Chakra in the region of the heart. The seat of the Fire Tattva is the Manipura Chakra in the region of the naval. The seat of the Water Tattva is the Swadi thana Chakra in the region of the testes. And the seat of the Earth Tattva is the Muladhara Chakra in the meeting place of the urethra canal and the anus.

These centres are metaphorically called the Chakras (Wheels) and the Padmas (Lotuses). Every centre is pervaded by Prana Shaktis and they have certain special energies predominating or working. These energies fully influence the mind. The different Chakras or centres are located along the passage of the sushumna canal. The passage

of the sushumna Nadi is very subtle and its actions are just like wireless operations. The subtle energies and the Yoga-Nadis that meet at the different centres are on the wireless passage of the Sushumna canal and, as such, these are very subtle and invisible to the physical senses and to the gross mind. These subtle Yoga-Nadis of the different centres, the subtle energies that work in the different centres, can be perceived only mentally, when one gains the purity and the subtleness of the mind. So, these different Chakras or the centres and the subtle energies and the Yoga-Nadis are mental visions and they cannot be seen by the gross mind and the senses. But, at the same time these are great facts which a Yogi, a man of religion or one advanced in religion perceives mentally. As has been said already, there is no religious awakening or attainment so long as the Kundalini Shakti does not rise upwards and reach the higher planes. And when the kundalini Shakti leaves the Muladhara Chakra for the higher ones, one has to feel the different Chakras and their energies along with the subtle passage of the Sushumna canal.

It is a most difficult thing to prove the existence of these different Chakras and their different energies to an ordinary person. For, we have not yet got any instrument to detect and see them. But those who are bent upon carrying experiments have to take the aid of their own minds. This is the only way left for us and there is no other alternative. In different Chakras, different kinds of subtle energies work and operate and the number of Yoga-Nadis that meet in different Chakras also differ. As per the number of these subtle energies that work and as for the number of Yoga-Nadis that meet in different Chakras and the distribution of the alphabets are determined. Often we see people drawing the Chakras with different colours in different centres. Some others

have lotuses and their coloures and number of petals differing in different centres. The Lotuses and the Chakras of mental visions are depicted by different people in different ways, for the sake of Upasana (spiritual practice). A novice cannot concentrate his mind on subtle things in the beginning. He can only concentrate his mind on gross things and when he makes headway spiritually, he can fix and concentrate his mind on subtle things. So, these Chakras and Lotuses are drawn only for the novice and for the ignorant, so that they may have a rough idea of the subtle energies and Yoga-Nadis.

The Chakras or the centres are the different seats of the Kundalini Shakti. These are the different planes and centres of Consciousness. Extremely subtle forces work in these different centres. All the different Chakras tend to form the whole body of the Kundalini Shakti. In these different Chakras are contained the different energies of the Kundalini Shakti. In evolution the Kundalini Shakti apparentty loses Its subtleness. With Its descent from one Chakra to another, It becomes grosser and grosser. In getting down from one Chakra to another and becoming grosser, It apparently loses Its powers, i.e. when It descends, It leaves behind certain energies in different centres. When it reaches the lowest centre; Muladhara, and when It evolves the Earth Tattva, there It becomes the grossest and It loses apparently almost all Its subtle powers that work in the different higher centres. But the Kundalini Shakti in Its return journey or by Its ascent from the lower to higher Chakras, regains Its subtleness and all the powers lost during the time of Its descent. When the Kundalini Shakti ascends, It absorbs all the energies that work in the Chakra It leaves. The centre or the Chakra thus left becomes extinct and actionless. And when the Shakti descends again to that centre, the centre once again becomes active. It regains its energies and activities. The existence and the activities of these Chakras and the different kinds of subtle energies working there can only be felt with the

ascent or the descent of the Kundalini Shakti from Chakra to Chakra but never otherwise. (Pages 56 to 65)

सहस्रारात पराकुंडलिनी शक्ती ही परमोच्च आत्मस्वरूपाशी समरसून एकरूप झालेली असते. उभारणीमध्ये ती उद्‌भूत किंवा विकसित होते. ती जेव्हा खाली उतरते तेव्हा ती अधिकाधिक स्थूल होत जाते. या उभारणीच्या कार्यपद्धतीमध्ये ही कुंडलिनी शक्ती प्रथम स्वत: मन होते किंवा उत्पन्न करते. नंतर ती आकाश, वायू, अग्नी, आप व पृथ्वी ही तत्त्वे उत्पन्न करते. पृथ्वीतत्त्वापासून सर्व जीवांच्या शरीराची निर्मिती केली जाते. मानवी शरीरात मन, आकाश, वायू, अग्नी, आप व पृथ्वी ही तत्त्वे आज्ञाचक्र, विशुद्धचक्र, अनाहतचक्र, मणिपूरचक्र, स्वाधिष्ठानचक्र व मूलधारचक्र या केंद्राशी मिळती जुळती असतात. बुद्धिकेंद्राच्या भागातील मनाचे किंवा मनस्तत्त्वाचे स्थान आज्ञाचक्र हे आहे. कंठाच्या भागातील विशुद्धचक्र हे आकाशतत्त्वाचे स्थान आहे. हृदयाच्या भागातील अनाहतचक्र हे वायूतत्त्वाचे स्थान आहे. नाभीच्या भागातील मणिपूरचक्र हे अग्नितत्त्वाचे स्थान आहे आणि गुदद्वाराच्या व मूत्रमार्गाच्या भागातील मूलाधारचक्र हे पृथ्वीतत्त्वाचे स्थान आहे.

या केंद्रांना रूपकात्मक दृष्टीने चक्रे किंवा कमळे म्हणतात. प्रत्येक केंद्र हे प्राण शक्तींनी व्यापिलेले असते आणि त्या केंद्राना निश्चित अशा विशेष शक्ती प्रबळ करीत असतात किंवा त्या तेथे कार्य करीत असतात. या शक्ती मनावर पूर्णपणे प्रभाव पाडतात. ही निरनिराळी चक्रे किंवा केंद्रे सुषुम्ना प्रवाहाच्या मार्गात स्थित असतात. सुषुम्ना नाडीचा हा मार्ग अत्यंत सूक्ष्म असून तिची कार्ये ही बिनतारी संदेह वाहकासारखी असतात. या सूक्ष्म शक्ती आणि योग-नाडचा सुषुम्ना प्रवाहाच्या बिनतारी मार्गातील भिन्न चक्रांपाशी एकत्रित येतात; मात्र ही चक्रे व नाडचा हचा अत्यंत सूक्ष्म असल्यामुळे त्या भौतिक इंद्रियांना व स्थूल मनाला अगोचर असतात. भिन्नभिन्न केंद्राच्या या सूक्ष्म नाडचा व तेथे काम करणाऱ्या सूक्ष्म शक्ती केवळ मानसिक रीतीनेच कळणे शक्य असल्याने जेव्हा एखादा साधक शुद्धता व सूक्ष्मता प्राप्त करतो तेव्हाच त्याला त्यांचे ज्ञान होते. म्हणून ही भिन्न चक्रे, केंद्रे, सूक्ष्म शक्ती व योग नाडचा म्हणजे मानसिक दृष्टी असून, या गोष्टी स्थूल मनाला व इंद्रियांना अगोचर आहेत. परंतु त्याच वेळी हेही खरे आहे की, या महान् गोष्टी योगी, धार्मिक मनुष्य किंवा धर्मात प्रगती केलेला मनुष्य मानसिक रीतीने पाहू शकतो. यापूर्वी कथन केल्याप्रमाणे जोपर्यंत कुंडलिनी शक्ती ऊर्ध्वगामिनी होत नाही व अधिक उच्च स्तरावर पोहोचत नाही तोपर्यंत कोणतीही धार्मिक जागृती किंवा प्राप्ती होत नाही. मात्र ज्यावेळी कुंडलिनी शक्ती वरील चक्रांवर जाण्यासाठी मूलाधारचक्राचा त्याग करते त्यावेळी साधकाला सुषुम्ना प्रवाहाच्या सूक्ष्म मार्गाबरोबर भिन्न चक्रांची व शक्तींची अनुभूती येते.

सामान्य माणसाला भिन्नभिन्न चक्रांचे व त्यांच्या शक्तींचे अस्तित्व सिद्ध करून दाखविणे हे अत्यंत अवघड आहे; कारण या गोष्टी शोधून काढणारे व त्या पाहू शकणारे असे एखादे उपकरण अद्यापपर्यंत आम्हाला मिळालेले नाही. परंतु या बाबतीत प्रयोग करावयाचेच असा ज्यांनी निश्चय केला आहे; त्यांना त्यांच्या मनाचे साहाय्य घेणे आवश्यक आहे. आपल्यासाठी हा एकच मार्ग मोकळा किंवा शिल्लक असून याला दुसरा कोणताही पर्याय नाही. भिन्नभिन्न चक्रांमध्ये भिन्नभिन्न प्रकारच्या सूक्ष्म शक्तींची कार्ये व व्यापार चालू असतो आणि भिन्नभिन्न चक्रांपाशी येऊन मिळणाऱ्या योगनाड्यांमध्येही भेद व फरक असतो. अशा प्रकारे काम करणाऱ्या अनेक सूक्ष्म शक्ती, विभिन्न चक्रात एकत्रित येणाऱ्या योग-नाड्या व मातृकांची वाटणी या सर्व गोष्टी निश्चित असतात. बहुत करून आपणास असे दिसते की, भिन्न केंद्रातील चक्रे लोक भिन्नभिन्न रंगांनी रंगवितात. ही कमळे, त्यांचे रंग व त्यांच्या पाकळ्यांची संख्या भिन्न चक्रापाशी भिन्न आहेत असा काही जणांचा त्या बाबतीत मतभेद असतो. मानसिक दृष्टीने दिसणाऱ्या या कमळांची व चक्रांची वर्णने निरनिराळ्या लोकांनी आपापल्या उपासनेप्रमाणे (आध्यात्मिक मार्गाभ्यासाप्रमाणे) रेखाटलेली आढळतात. नवशिका साधक सुरुवातीला आपले मन सूक्ष्म वस्तूंवर केंद्रित करू शकत नाही. तो आपले मन प्रथम स्थूल वस्तूंवरच केंद्रित करू शकतो आणि जेव्हा तो आध्यात्मिक प्रगती करतो तेव्हा तो आपले मन सूक्ष्म वस्तूंवर स्थिर व एकाग्र करू शकतो. या करिता नवीन शिकणाऱ्या व अज्ञानी साधकाला सूक्ष्मशक्तींची व योग-नाड्यांची सर्वसाधारण कल्पना यावी म्हणून ही चक्रे व कमळे रेखाटलेली असतात.

चक्रे व केंद्रे ही कुंडलिनी शक्तीची भिन्नभिन्न स्थाने किंवा पीठे आहेत. ह्या गोष्टी चेतनेचे विभिन्न स्थर किंवा केंद्रे आहेत. अत्यंत सूक्ष्म जोर या विभिन्न चक्रात कार्य करीत असतात. सर्व विभिन्न चक्रांचा कुंडलिनी शक्तीचा विग्रह किंवा शरीर तयार करण्याकडे अर्थात् तिला समूर्त करण्याकडे कल असतो. उभारणीमध्ये कुंडलिनी शक्ती बाह्यतः आपला सूक्ष्मपणा गमावून बसते. वरील एका चक्रापासून ती खालील दुसऱ्या चक्रावर उतरून आली की, अधिकाधिक स्थूल होत जाते. एका चक्रावरून खालील दुसऱ्या चक्रावर येण्याने व स्थूल होण्याने ती स्वाभाविकपणे आपल्या शक्ती गमाविते म्हणजे जेव्हा ती खाली उतरत जाते तेव्हा ती मागील प्रत्येक चक्रावर काही शक्तींचा त्याग करीत जाते. ती जेव्हा निम्नतम अशा मूलाधारचक्रापाशी पोहोचून पृथ्वीतत्त्व निर्माण करते तेव्हा ती अत्यधिक स्थूल बनल्यामुळे ऊर्ध्वस्थित चक्रांमध्ये कार्य करणाऱ्या सर्व सूक्ष्म शक्ती बहुतेककरून स्वभावतःच गमाविते. परंतु ही कुंडलिनी शक्ती आपल्या परतीच्या प्रवासात किंवा निम्न चक्रांकडून ऊर्ध्व चक्रांकडे जाताना उभारणीच्या वेळी गमाविलेली आपली सूक्ष्मता

व सर्व शक्ती परत मिळविते. ज्यावेळी कुंडलिनी शक्ती ऊर्ध्वं गमन करते त्यावेळी ती निम्नस्थित चक्रे सोडताना त्यातील शक्ती आपल्यात सामावून घेते. अशा प्रकारे तिने सोडलेली चक्रे किंवा केंद्रे ही कार्यहीन व शक्तिहीन होतात. ज्यावेळी शक्ती, पुन्हा वरून उतरून खालील केंद्रांवर येते त्यावेळी ही केंद्रे पुन्हा कार्यान्वित होतात; कारण त्यामुळे ही चक्रे किंवा केंद्रे पुन्हा आपल्या शक्ती व कार्ये प्राप्त करून घेतात. या चक्रांचे अस्तित्व व त्यांमध्ये कार्य करणाऱ्या विभिन्न प्रकारच्या सूक्ष्म शक्तींच्या कार्याची जाणीव ही शक्तीच्या आरोह किंवा अवरोहामुळेच होऊ शकते; अन्यथा दुसऱ्या कशानेही ही जाणीव होऊ शकत नाही.

श्री. प. प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थ स्वामीमहाराज यांनी आपल्या सिद्धयोग शास्त्रावरील प्रख्यात अशा "योगवाणी या सिद्धयोगोपदेश" या मूळ वंगाली भाषेतील पुस्तकात असे म्हटले आहे की, "अब षट्चक्रका वर्णन करते हैं। यह चक्रसमूह प्राणप्रवाहका केंद्रस्थान है। भिन्न-भिन्न केंद्रोंमें मनका संयम करनेसे भिन्न भिन्न शक्तियोंकी प्राप्ति होती है। षट्चक्रके सिवाय और भी कई गुप्त चक्र हैं, जिनका हाल तुमसे कहूँगा। सब मिलकर ९ चक्र हैं, जिनमेंसे छ: प्रधान होनेके कारण षट्चक्र कहे जाते हैं, अन्य चक्रोंका वर्णन प्राय: कोई नहीं करता। सब चक्रोंके परे सहस्रार परब्रह्मका स्थान है। यहाँ पहुँचकर योगीकी योग-क्रियाकी समाप्ति होती है।"(पृष्ठ २२७, २२८)

मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध, ललना, आज्ञा, मन व सोम अशी नऊ चक्रे असून सहस्रार हे शेवटचे स्थान, पद्म किंवा कमल आहे. महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" ब्रह्म, स्वाधिष्ठान, नाभी, हृदय, कंठ, तालु, भ्रू, निर्वाण व आकाश अशी नऊ चक्रे कथन केली आहेत. आणखीही काही ग्रंथकारांनी निरनिराळी चक्रे कथन केली आहेत. यासंबंधी "Kundalini Yoga" या पुस्तकात स्वामी शिवानंदांनी असे म्हटले आहे की, "The following are Some other Chakras :– Adhara (another name of Muladhara Chakra), Amrita, Ananda, Lalita, Balwana, Brahmadwara, Chandra, Dipaka, Karnamula, Gulhaha, Kuladipa, Kundali, Galabaddha, Kaladaada, Kaladhwara, Karangaka, Kalabhedhan, Lalana, Mahotasaha, Manas, Talana, Mahapadma, Niradhara, Naukula, Prana, Soma, Triveni, Urdhvarandhra, Vajra etc. Some of these names refer to the six important Chakras only. There are also many minor Chakras. Some Hatayogis Say, that there are 21 minor Chakras besides 13 major Chakras and Some other Hathayogis hold that there are fortynine Chakras while the

ancient Yogis taught that there are 144 Chakras. Talana Chakra with its twelve red petals is located near the base of the palate and Manas Chakra with its six petals closely associated with sensations, dreams and astral travelling." (Page 46)

काही चक्रे पुढीलप्रमाणे आहेत. आधार ( मूलाधारचक्राचे दुसरे नाव ) अमृत, आनंद, ललिता, वलवान्, ब्रह्मद्वार, चंद्र, दीपक, कर्णमूळ, कलाध्वर, करंगक, कलाभेदन, ललना, महोत्साह, मनस्, तलना, महापद्म, निराधार, नौकुल, प्राण, सोम, त्रिवेणी, ऊर्ध्वरंध्र, वज्र इत्यादि. यातील काही नावे फक्त महत्त्वाच्या षट्चक्रांशी संबंधित आहेत. याशिवाय आणखीही काही लहान अर्थात् कमी महत्त्वाची अशी चक्रे आहेत. काही हठयोगी असे म्हणतात की, लहान किंवा सामान्य अशी २१ चक्रे असून त्याशिवाय १३ मोठी किंवा महत्त्वाची चके आहेत. आणि काही दुसऱ्या हठयोग्यांचे असे मत आहे की, एकूण ४९ चके आहेत; तर प्राचीन योग्यांनी असे प्रतिपादले आहे की, एकूण १४४ चके आहेत. बारा लाल पाकळ्यांचे तलनाचक हे टाळूच्या टोकाच्या खाली असल्याचे शोधून निश्चित करण्यात आले असून सहा पाकळ्यांचे मनस्चक्र हे भावनांशी, स्वप्नांशी व ताऱ्यांच्या गतीशी संबधित आहे.

सारांश, प्राण जेव्हा योगबलाने भिन्न भिन्न नाड्यांमधून खेचले जाऊन त्यांचे विशुद्ध ज्ञानयुक्त अशा सुषुम्ना नाडीत चालन होते त्यावेळी जीवाला आध्यात्मविषयक ज्ञान होते. या सुषुम्ना नाडीच्या शिवाय इतर सर्व नाड्यांना भोगवाहिनी नाड्या आहेत असे म्हणतात. सुषुम्नेमध्ये असलेले षट्चक्र-मंडल सूक्ष्म नाडीसमूहांच्या द्वारा कमलाप्रमाणे तयार झालेले असल्यामुळे त्याला षट्कमल असेही म्हणतात. ज्यावेळी प्राणशक्ती कुंडलिनी ऊर्ध्वगामी होते त्यावेळी त्याच्या प्रभावाने ही सर्व चक्रे उमलतात, विकसित होतात व अनुभूतीला येतात. ही कमले सूक्ष्म दृष्टीलाच दिसतात. स्थूल दृष्टीला ही दिसत नाहीत. योगीसाधकाला ही चक्रे साधनकालात अंतर्दृष्टीने अनुभूतीला येत असल्याने सामान्य माणसाला त्याची अनुभूती येणे व ती स्थूल दृष्टीने दिसणे दुरापास्त आहे. यामुळे मनुष्य मृत झाल्यावर शवाची चिरफाड केली तरी ही चक्रे दिसू शकत नाहीत.

मनुष्याच्या देहात पाठीकडच्या भागात मेरुदंड आहे. त्याच्यामध्ये सुषुम्नानाडी आहे. ही नाडी चंद्रासारखी शीतल, सूर्यासारखी तेजस्वी व अग्नीसारखी प्रखर असून सत्त्वरजतमोगुणयुक्त व किंचित् उमलेल्या धोतऱ्याच्या फुलासारखी आहे. ही मूलाधारचक्रापासून सहस्रारचक्रापर्यंत गेली आहे. सुषुम्नेच्या आत वज्रानाडी आहे. ही शिश्नापासून सहस्रारपद्मापर्यंत गेली आहे. एखाद्या दिव्याप्रमाणे ती जळते. वज्रा नाडीच्या आत चित्रिणी नाडी आहे. ज्याप्रमाणे कोळ्याच्या जाळ्याचा

धागा सूक्ष्म असतो त्याप्रमाणे चित्रिणी नाडी सूक्ष्म आहे. या चित्रिणी नाडीतच एखाद्या माळेप्रमाणे षट्चक्रे व इतर चक्रे आहेत. ही नाडी मूलाधारापासून आज्ञाचक्राच्या वर ॐकारापर्यंत पसरलेली आहे. ही नाडी म्हणजे एकप्रकारे प्रणवाचा किंवा ॐकाराचा विलासच आहे. अर्थात् पहिल्यापासून शेवटपर्यंत ही नाडी ॐकारानेच स्फूर्तिमान् किंवा प्रकाशमान होते. साधकयोग्याच्या योगबलानेच या नाडीचे तत्त्व अनुभूतीला येते.

शरीरात प्राणप्रवाहिनी अशा असंख्य नाड्या आहेत. एखाद्या अश्वत्थ वृक्षाच्या शाखांप्रमाणे त्या शरीरात पसरल्या आहेत. या नाड्यातून प्राण किंवा जीवनशक्ती वाहत असल्याने मनही सर्व शरीरभर व्याप्त असते. "भूतशुद्धि-तंत्रात" शरीरातील या नाड्यांची संख्या ७२००० आहे असे म्हटले आहे. "प्रपंचसारतंत्रात" ही संख्या ३०,०००० व "शिवसंहितेत" नाडीसंख्या ३५०,००० आहे असे सांगितले. या सर्वात सुषुम्ना, इडा, पिंगला, गांधारी, हस्तिजिव्हा, कुहू, सरस्वती, पूषा, शूरा किंवा पयस्विनी, वारुणी, अलंबुषा, विश्वोदरी, राका किंवा यशस्विनी, शंखिनी व चित्रा या १५ नाड्या प्रमुख आहेत. यातही सुषुम्ना, इडा व पिंगला या प्रधान नाड्या असून त्यातही सुषुम्ना ही सर्वश्रेष्ठ आहे; कारण ही आत्मज्ञान देणारी नाडी आहे. हीच मोक्षाचे प्रधान साधन किंवा आधार आहे. वर कथन केलेली मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध व आज्ञा ही षट्चक्रे व सहस्रार हे मुख्य सातवे चक्र म्हणजे वेदान्ती लोकांच्या शुभेच्छा, विचारणा, तनुमानसा, सत्त्वापत्ती, असंसक्ती, पदार्थाभाविनी व तुर्यगा या सप्त-भूमिका असून त्याचे योगवासिष्ठात सविस्तर वर्णन केले आहे त्याचप्रमाणे ही चक्रे म्हणजे भूः, भुवः, स्वः, महा, जनः, तपः व सत्य लोक; पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश अशी मूलाधार ते विशुद्धापर्यंत पंचमहाभूतांची स्थाने; वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत व शिशिर हे ऋतू आणि युक्ता, संयुक्ता, विलग्ना, मग्ना, रुध्दा, लीना व सहजा या वृत्तीच्या भूमिका होत किंबहुना सर्व सृष्टीच या ना त्या प्रकारे यात अंतर्भूत आहे.

या दृष्टीनेच सर जॉन वुड्रॉफ यांनी "The Serpent Power" या ग्रंथातील "The Centres OR Lotuses" या प्रकरणात असे म्हटले आहे की, "Of these Nadis, the principal are fourteen, and of these fourteen Ida, Pingala and Sushumna are the chief. Of these three, again Sushumna is the greatest, and to it all others are subordinate; for by the power of Yoga (yogabala) Prana is made to go through it, and, passing the Chakras, leaves the body through the Brahma-randhra. It is situate in the interior of the cerebro-

spinal axis, the Merudanda, or spinal column, in the position assigned to its interior Canal, and extends from the basic plexus, the Tattvik centre called the Muladhara, to the twelve-petalled lotus in the pericarp of the Sahasra-Padma or thousand-petalled lotus. Whithin the fiery red Tamasik Sushumna is the lustrous Rajasik Vajra or vajrini-Nadi, and within the latter the pale nectar-dropping sattvik Chitra or chitrini. The interior of the latter is called the Brahma-Nadi. The first is said to be fire-like (Vahni-Svarupa), the second Sun-like (Surya-Svarupa) and the third moon-like (Chandra-Svarupa). These are the threefold aspect of the Shabda-Brahman. The opening at the end of the Chitrini-Nadi is called the door of Brahman. (Brahman-dvara), for through it the Devi Kundalini enteres to ascend. It is along this last mentioned Nadi, known as the Kula-Marga and the " Royal Road " that the Shakti Kundalini is led in the process hereafter described."

या नाड्यांमधील चौदा नाड्या प्रमुख किंवा महत्त्वाच्या असून, या चौदा नाड्यांमधील इडा, पिंगला व सुषुम्ना या मुख्य आहेत. या तिन्हींमधील सुषुम्ना ही सर्वात मोठी किंवा महत्त्वाची आहे. तिच्यापुढे इतर सर्व नाड्या गौण आहेत; कारण योगबलाच्या सामर्थ्याने प्राण सुषुम्नेमधून ऊर्ध्वगामी होतो आणि चक्रे भेदून तो ब्रह्मरंध्राच्या द्वारा शरीराचा त्याग करतो. ही सुषुम्नानाडी मेरुदंडात किंवा पाठीच्याकण्यात तिला नेमून दिलेल्या आतील प्रवाहाप्रमाणे किंवा मार्गाप्रमाणे स्थित आहे. ही नाडी, मूलाधाराच्या तात्त्विक केंद्रापासून बारा किंवा हजार पाकळ्यांच्या सहस्रारकमलाच्या कर्णिकेपर्यंत किंवा बीजकोशापर्यंत पसरलेली आहे. अग्निप्रमाणे लाल असलेल्या तामसिक सुषुम्नानाडीत वज्रा किंवा वज्रिणी ही तेजस्वी राजसिक नाडी असून तिच्या आत शेवटी फिकट किंवा शुभ्र अशी अमृताचा स्राव करणारी चित्रा किंवा चित्रिणी नाडी आहे. या आतील शेवटच्या चित्रा नाडीलाच ब्रह्मनाडी म्हणतात. पहिली सुषुम्नानाडी ही अग्निसारखी ( वन्हिस्वरूप ), दुसरी वज्रिणीनाडी ही सूर्यासारखी ( सूर्यस्वरूप ) व तिसरी चित्रिणीनाडी ही चंद्रासारखी ( चंद्रस्वरूप ) आहे असे म्हटले जाते. ह्या तीन नाड्या म्हणजेच शब्दब्रह्माचे त्रिगुणात्मक स्वरूप होय. चित्रिणी नाडीच्या आरंभालाच ब्रह्मद्वार असे म्हणतात; कारण या द्वारातूनच देवी कुंडलिनी ही ऊर्ध्वगामी होण्यासाठी प्रवेश करते. ज्या

कुंडलिनी शक्तीच्या मार्गप्रक्रियेचे यापुढे वर्णन केले आहे, ती शेवटची चित्रिणी नाडीच ' कुलमार्ग' किंवा ' राजपथ' म्हणून ओळखली जाते.

आता आपण क्रमश: षट्चक्रांची माहिती पाहू. त्यामुळे "साही पदर फुटती। चक्रांचे हे ॥ ६.२४४॥" यातील चक्रांच्या सहा पदरांची माहिती होईल.

**१) मूलाधार चक्र :–** गुदद्वाराच्या दोन बोटे वर व लिंगाच्या दोन बोटे खाली मूलाधार नावाचे चक्र किंवा कमळ आहे.हे सुषुम्नेचे उगमस्थान असून येथे कुंडलिनी शक्ती विश्रांती घेत असते; कारण हे चक्रच या मूळ शक्तीचा आधार आहे. कुंडलिनी शक्ती हीच सर्व साधन-भजनाचे मूळ असल्यामुळे या चक्राला मूलाधार असे म्हटले जाते. या कमळाचे मुख खाली आहे. साधकाने साधनाने ते ऊर्ध्व करावयाचे असते. सर्व नाड्यांचे हेच उगमस्थान आहे व येथेच सर्व नाड्या येऊन मिळतात. यालाच कंद म्हणतात. या चक्राला चार पाकळ्या आहेत. त्यांचा रंग लालसर आहे. या चक्राच्या चार पाकळ्यांवर वं, शं, षं, सं हे चार वर्ण आहेत. हे चारही वर्ण तापलेल्या सोन्याप्रमाणे प्रकाशमान आहेत. या चार पाकळ्यात क्रमश: गुप्ता, प्रासका, कराळा व विकराळा अशा चार शक्ती वास्तव्य करतात व त्यांपासून परमानंद, सहजानंद, योगानंद व वीरानंद हे प्राप्त होतात. या चार पाकळ्या म्हणजे गुरुकृपेने प्राप्त होणाऱ्या कृपेच्या अर्थात् शक्तिवृत्तीच्या द्योतक आहेत. हे चार वर्ण म्हणजे आतील सूक्ष्मशब्दाचे वैखरीच्या रूपाने झालेले संपूर्ण प्रकटीकरण आहे. ह्या कमळाच्या मध्यस्थानी किंवा केंद्रस्थानी अष्टशूलयुक्त, चतुष्कोणी व पिवळ्या रंगाचे पृथ्वीतत्त्वाचे मंडल आहे. त्याचे बीज किंवा मंत्र ' लं ' आहे. या पृथ्वीचक्राच्या अंतर्गत पृथ्वीबीजाने प्रतिपाद्य होणारी, चार हाताची, नाना भूषणांनी युक्त असलेली व पांढऱ्या ऐरावतावर बसलेली ब्रह्म देवता आहे. ब्रह्मदेव हा या चक्राचा अधिपती असून तो नवीन सूर्यासारखा रक्तवर्णाचा, चतुर्भुज व चतुर्मुख आहे. त्याच्या चारही हातात चार वेद असून ते त्याच्या चार मुखातून प्रकट होत आहेत किंवा तो चारही वेदांचा चारही मुखाने उच्चार करीत आहे. या स्थानीच म्हणजे चतुष्कोण चक्राच्या पृथ्वी बीजात चतुर्भुज, रक्तनेत्रा व प्रलयकालीन बारा सूर्यांसारखी तेजस्वी अशी डाकिनी नावाची ब्रह्मदेवाची शक्ती आहे. तीच शुद्ध-बुद्ध ब्रह्मदेवाला प्रकाश देते म्हणजे ती त्याला सृष्टी रचण्याची शक्ती देते; कारण शक्तीशिवाय देव काहीही करण्यास समर्थ नाहीत. किंवा हीच देवता शुद्ध-बुद्ध योगी-साधकांना ईशत्वसिद्धी प्रदान करते. या चक्राच्या अगदी मध्यभागी वज्रानाडीच्या मुखप्रदेशात योनिमंडलासारखे कामकलारूप त्रिकोणयंत्र आहे. ते विजेप्रमाणे तेजस्वी, प्रकाशमान व शोभायुक्त असून कामदेवाप्रमाणे सुंदर व कोमल आहे. ते साधकाच्या सर्व कामना पूर्ण करणारे असल्यामुळे हे योनिमंडल किंवा त्रिकोणमंडल सर्वकामफल देणारे "कामरूपपीठ" या

नावाने प्रसिद्ध आहे. याच्या मध्यभागी तेजोमय व रक्तवर्णाचा 'क्लीं' बीजरूप कंदर्प नावाचा स्थिरतर वायू असतो. हा वायू अत्यंत लाल, कोटी सूर्यांप्रमाणे प्रकाशमान, चारीही बाजूला विलास करणारा व संपूर्ण शरीरात भ्रमण करीत संसारी जीवाला आपल्या ताब्यात ठेवणारा आहे. या योनिमंडलाच्या डाव्या कोनात इडा, उजव्या कोनात पिंगला व मध्यभागी सुषुम्नानाडी असते. यालाच त्रिपुरादेवीसंबंधीचे त्रैपुर नावाचे त्रिकोणयंत्र म्हणतात. या यंत्राच्या मध्यभागी ब्रह्मनाडीच्या मुखात तापलेल्या सोन्याप्रमाणे कोमल, अत्यंत कमनीय, अधोमुख, ज्ञान-ध्यान द्वारा जाणण्यास योग्य, नवीन पानाप्रमाणे सुंदर, पौर्णिमेच्या चंद्राच्या किरणांप्रमाणे प्रकाशमान व विलासयुक्त असे स्वयंभूलिंग आहे. या स्वयंभू लिंगाच्या वर मूलाधार कमळाच्या आतल्या गाभ्यात अत्यंत श्रेष्ठ प्रकाश धारण केलेली, कमळाच्या देठातील तंतुप्रमाणे अत्यंत सडपातळ, आपल्या शोभेने जगताला मोहित करणारी, ब्रह्मद्वाराचे मुख अर्थात् सुषुम्नाडीचे मुख आपल्या मुखाने आच्छादित करणारी, शंखाच्या वेढ्याप्रमाणे भासमान होणारी, सापाप्रमाणे साडेतीन वेढ्यांनी महाकालाला लपेटून टाकणारी, विजेच्या कडकडाटाप्रमाणे विलास करणारी, निद्रिस्त म्हणजे झोप घेत पहुडलेली कुल-कुंडलिनी नावाची महामाया मत्त भ्रमरांच्या झुंडीप्रमाणे मधुर ध्वनीचा गुंजारव करीत तेथे निवास करते. ही कुंडलिनी अत्यंत सुंदर अशा काव्यरचनेचे सामर्थ्य देणारी असून ती श्वासोच्छवास किंवा प्राणापानद्वारा जीवाच्या प्राणांना धारण करते. या कुंडलिनीच्या मध्यभागी नित्य ज्ञान देणारी, अत्यंत सूक्ष्म व श्रेष्ठ, नित्यानंदस्वरूप, विद्युन्माले-प्रमाणे प्रकाशयुक्त, परमकला नावाची महाप्रकृती शोभायमान असते. हिच्या तेजामुळे संपूर्ण ब्रह्मांड प्रकाशित होते. ही परमेश्वरी जययुक्त ( तत्र श्रीविजयो गीता-१८७८ ) होऊन नानाप्रकारचे पदार्थ देण्यास समर्थ असते. ही शक्तीच जेव्हा सद्‌गुरूंच्या कृपाकटाक्षाने जागृत होते तेव्हा साधनद्वारा नित्य स्वच्छ ज्ञानाचा उदय करीत शेवटी ऋतंभरा प्रज्ञा साधकाला प्राप्त करून देते. अशा प्रकारे प्राप्त होणाऱ्या प्रज्ञेने जे विज्ञान प्राप्त होते त्यामुळे साधकाला सर्व विज्ञा-नाचा लाभ होऊन तो कृतकृत्य होतो.

ज्यावेळी मूलाधार चक्राचा भेद होतो तेव्हा अधोमुख व मिटलले हे कमळ ऊर्ध्वमुख व उत्फुल्ल होऊन त्यातील निद्रिस्त शक्ती जागृत होते. हिच्या जागृती-मुळे साधक सर्वविद्यासंपन्न, शुद्धस्वभावी व सकलआरोग्यसंपन्न होतो. या मूलाधार चक्राला भूलोक म्हणतात.

२) **स्वाधिष्ठान चक्र** :- मूलाधार चक्राच्या वर लिंगाच्या मुळाशी सुषुम्ना नाडीत जी चित्रिणी नाडी आहे तिच्यामध्ये सहा पाकळ्यांचे स्वाधिष्ठान चक्र विरा-जमान आहे. हे कमळ शेंदराच्या रंगाप्रमाणे गुलाबी रंगाने सुशोभित झालेले आहे. या

कमळाच्या सहाही पाकळ्यांवर विजेप्रमाणे चमकणारे निर्मल असे वं, भं, मं, यं, रं, लं हे सहा वर्ण झळकत असतात. या सहा पाकळ्यात अव्यंगता, शारदा, वाणी, अमृता, पूर्णा व रोहिणी अशा शक्ती वास करतात व त्यापासून क्रमशः प्रशस्त, कुरंग, गर्वगत, अवज्ञ, अविश्वास व मूर्च्छित हे आनंद प्राप्त होतात. या स्वाधिष्ठान चक्राच्या मध्यभागी स्वच्छ, निर्मल व शुक्ल वर्णाचे चंद्रमंडलाकार वरुण चक्र आहे. अर्थात् या चक्राचे तत्त्व आप म्हणजे पाणी हे आहे. शरत्कालीन चंद्राप्रमाणे असलेले शुभ्रवर्णाचे वरुण बीज 'वं' हे येथे विद्यमान आहे. या 'वं' बीजाने मस्तकावर अर्धचंद्र धारण केला आहे. ते सुसरीवर आरूढ आहे; कारण या बीजाचे वाहन सुसर हे आहे व वरुणाचे वाहनही सुसरच आहे. या चक्राची अधिपती देवता चतुर्भुज भगवान् विष्णू आहे. त्यांचा वर्ण निळा असून ते पितांबर नेसलेले, अत्यंत सुंदर, नवयौवनसंपन्न, हृदयावर श्रीवत्स व कौस्तुभमणी धारण केलेले आहेत. ते सर्वांचे पालनकर्ते आहेत. त्यांच्या डाव्या बाजूला राकिनी नावाची लक्ष्मी देवता आहे. ही देवी निळ्या कमळाच्या कांतिप्रमाणे श्यामवर्णाची, नाना प्रकारची श्रेष्ठ शस्त्रे चारी हातात धारण केलेली, विजेप्रमाणे विविध दिव्य वस्त्रे व अलंकारांनी सुशोभित असलेली, मत्त किंवा आनंद चित्तयुक्त व प्रसन्न वदनाने झळकणारी अशी आहे. ज्यावेळी कुंडलिनी शक्तिद्वारा या चक्राचे भेदन होते तेव्हा हे अधोमुख कमल ऊर्ध्वमुख होऊन साधकाच्या हृदयातील अहंकारादि रिपुसमूह नष्ट होतो व अज्ञानांधकाररूपी विचित्र मोहांधकार नष्ट होऊन साधक सूर्यासारखा तेजस्वी होतो. या स्वाधिष्ठान चक्रालाच भुवर्लोक असे म्हणतात.

३) मणिपूर चक्र :- स्वाधिष्ठान चक्राच्यावर बेंबीमध्ये दहा पाकळ्यांचे मणिपूर नावाचे चक्र आहे. या दहा पाकळ्यांवर डं, ढं, णं, तं, थं, दं, धं, नं, पं, फं हे दहा वर्ण आहेत. या पाकळ्यात सर्वगा, सोमा, या, भद्रा, तक्षिणी, सौंदर्या, शांतमुद्रा, विशाखा, दंशिनी व रुचिरा या शक्ती असून त्यांपासून क्रमशः सुषुप्त, वृष्ण, इच्छा, पिशुण, सल्लस, मोह, भय, द्रोण, कशाय व विशाद हे दहा आनंद प्राप्त होतात. या मणिपूर चक्राचा वर्ण मेघाप्रमाणे निळा असून त्याच्या दहा वर्णांचा रंगही निळाच आहे. या चक्रात रक्तवर्णाचे त्रिकोणी अग्निमंडल आहे. त्याच्यामध्ये 'रं' हे रक्तवर्णाचे अग्निबीज आहे. अग्निबीजाची प्रतिपाद्य देवता अग्नी असून त्याला चार हात आहेत. ते रक्तवर्णाचे आहेत. या बीजाचे वाहन मेंढा आहे या चक्राचा अधिपती रुद्र आहे. त्यांचा रंग शेंदरासारखा लाल असून त्यांचे रूप वृद्ध व सृष्टिसंहारक आहे. त्यांना तीन डोळे असून त्यांचे अंग भस्मभूषित आहे. त्यांना दोन हात आहेत. एक हात वरदान देणारा असून दुसरा अभयप्रदान करणारा आहे. त्यांच्या अंगावर नाना प्रकारचे अलंकार आहेत. अशा प्रकारचे समर्थ रुद्ररूप शिव येथे निवास करतात. यांच्या शेजारी सर्व प्रकारे मंगल करणारी, चतुर्भुज,

निर्मल अंगाची, अतिप्रकाशमान, श्यामवर्णा, पितांवरधारी, विभिन्न प्रकारच्या अलंकारांनी विभूषित झालेली व आनंदाने उन्मत्तचित्तयुक्त असलेली अशी लाकिनी नावाची त्यांची शक्ती आहे. ज्यावेळी गुरुकृपेने जागृत झालेली शक्ती या चक्राचा वेध करते तेव्हा साधक शिवाप्रमाणे संहारपालनात समर्थ होतो व ज्ञानप्रकाश करणारी वाणी त्याच्या मुखकमलात विलास करते.

"पातंजल योगसूत्रात" असे सांगितले आहे की, "नाभिचक्रे कायव्यूह ज्ञानम्। विभूतिपाद ३०॥" नाभिचक्रात मनःसंयम केल्याने देहतत्त्वाविषयीचे ज्ञान होते या चक्रातच ब्रह्मग्रंथी आहे. तिचा भेद होत असताना साधकाचे शरीर कृश होते व पोटाचे रोग होतात. अशावेळी रोग दूर होण्यासाठी औषधे न घेता या चक्रातच ध्यान केले पाहिजे. त्यामुळे ही व्याधी दूर होईल.श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " नाडीतें सोडवी। गात्रांतें चिरडवी। साधकातें भेडसावी। परी विहावें ना ॥६.२२१॥" या ओवीतून हे सूचित केले आहे. या मणिपूर चक्राला स्वर्लोक असे म्हणतात.

४) अनाहत चक्रः– मणिपूर चक्राच्यावर हृदयात बारा पाकळयांचे अनाहत नावाचे चक्र आहे.या चक्राचा रंग बंधूक म्हणजे दुपारी नावाच्या लाल फुलासारखा आहे. या चक्राच्या बारा पाकळया असून त्या पाकळयांवर कं,खं,गं,घं,ङं,चं,छं,जं,झं, ञं, टं, ठं हे बारा वर्ण विराजमान असतात. त्याचप्रमाणे पद्मिनी, सदर्भा, रतिप्रिया, वैजयंती, सौभद्रा, अग्निमाया, कुहवासिनी, घोकिनी, रेखा, श्रिया, तरंगिणी व तारा या बारा शक्ती बारा पाकळयात स्थित असून त्यांपासून क्रमशः त्रैलोक्य, वित्कर,प्राण, स्वपद, अंशप्रकाश,अनुताप,कपद,चित्तसंमत,विकल्प,महद,विवेक व अहंकृत हे आनंद चक्रभेदाच्यावेळी साधकाला प्राप्त होतात. हे चक्र कल्पवृक्षाप्रमाणे फलादायक आहे किंबहुना कल्पवृक्षापेक्षाही अधिक फल देणारे आहे. या चक्राच्या मध्यभागी धूम्र-वर्णाचे षट्कोणयुक्त वायुमंडल आहे. यामध्येच 'यं' हे धूम्रवर्णाचेच वायुबीज आहे. त्याच्या मांडीवर वायुबीज-प्रतिपाद्य वायुदेवता आहे.ही वायुदेवता म्हणजे काळे हरण असून ते अत्यंत श्रेष्ठ, मधुर आकृतीचे व चतुर्भुज आहे. या मृगावरच 'यं' हे वायुबीज स्वार झाले आहे. या चक्राची अधिपती देवता ईशान किंवा ईश्वर आहे. त्यांचा रंग पांढराशुभ्र असून त्यांना दोन हात आहेत. त्यातील एक हात स्वर्ग,मृत्यू व पाताळा-तील लोकांना म्हणजे त्रैलोक्यवासीयांना अभयपद अर्थात् मुक्तिदान करणारा असून दुसरा हात हा नाना प्रकारचे वरदान देणारा आहे. वरील 'यं' बीजाच्या मध्यभागी असणाऱ्या ईशान नावाच्या शिवाजवळ काकिनी नावाची देवी आहे. ती विजेसारखी तेजस्वी अशा पिवळया वर्णाची, तीन डोळयांची, सर्व प्रकारे कल्याण करणारी, विविध अलंकारांनी युक्त, हर्षपूर्वक योगी-साधकांचे हित करणारी, हर्षित चित्ताची, अमृतमय हृदयाची, चार हातात पाश, कपाल, वर व अभय असणारी आणि कंकाल ( अस्थिपंजर ) व कपालमाला धारण करणारी आहे. या अनाहत चक्राच्या

मध्यभागी त्रिकोणा नावाची शक्ती आहे. या शक्तीच्या मध्यभागी कोटी कोटी विजेप्रमाणे सुंदर शरीराची व त्रिनेत्रधारी एक प्रसिद्ध शक्ती निवास करते. तिच्या बरोबर सोन्यासारखे प्रकाशमान असलेले व कुंकाने सुशोभित झालेल्या अंगाने विराजमान असणारे असे बाण नावाचे शिवलिंग आहे. या शिवलिंगाच्या मस्तकात एक छिद्र आहे. या छिद्राबरोबर मण्याप्रमाणे चमचमणारे असे लक्ष्मीचे उत्तम स्थान अर्थात् अष्टदल कमल आहे किंवा शिवलिंगाच्या मस्तकात अत्यंत सूक्ष्म व अर्धचंद्राकृती असा एक तेजोमय मणी आहे.त्याच्यात वायुविरहित, दीपशिखाकार व श्वेतवर्णाच्या 'हंस' बीजाचे प्रतिपाद्य व अहंकाराचा आश्रय असलेले एक विशेष तेज आहे.त्याला जीवात्मा म्हणतात.हाच सुखदु:खाचा व कर्मफलाचा भोग भोगीत असतो. सद्गुरुकृपेने जेव्हा या ज्योतीचे दर्शन होते व त्याच्या ठिकाणी मन:संयम होतो तेव्हा शोकमोहादि षड्रिपू नष्ट होतात.त्यामुळे या ज्योतीला विशोका हे प्रख्यात नाव आहे.

हे चक्र कल्पवृक्षाप्रमाणे फल देणारे आहे. सगुणोपासकाच्या सर्व इच्छा या चक्रभेदनाने पूर्ण होतात. या चक्रापासून कोणत्याही प्रकारच्या आघाताशिवाय नाद उत्पन्न होत असल्यामुळे याला अनाहत चक्र असे म्हणतात.येथेच शब्दब्रह्म ॐकाराचे स्थान आहे. "परापरिमलोल्लासात" या दृष्टीने असे म्हटले आहे की–

शब्दब्रह्मेति तं प्राह साक्षाद्देवः सदाशिवः ।
अनाहतेषु चक्रेषु स शब्दः परिकीर्त्यते ॥

ज्याला शब्दब्रह्म म्हणतात तो साक्षात् सदाशिवच आहे. तो शब्द अनाहत चक्रात आहे.

या चक्रात विष्णुग्रंथी आहे. या चक्राचा भेद होताना साधकाला खूप कष्ट होतात. या चक्राला महर्लोक असे नाव आहे. त्याला 'पूर्णगिरि' नावाचे पीठही म्हणतात. या चक्राचे ध्यान केल्याने साधकाला वाक्सिद्धी प्राप्त होते व तो श्रेष्ठ असा जितेंद्रिय योगी होतो. त्याला यामुळे अत्युत्तम कवित्व व परकायप्रवेशाची शक्तीही प्राप्त होते.

**५) विशुद्ध चक्र :–** अनाहत चक्राच्या वर कंठामध्ये सोळा पाकळ्यांचे विशुद्ध नावाचे चक्र आहे.या चक्राचा धुरासारखा रंग आहे.त्याच्या सोळा पाकळ्यांवर अं,आं,इं,ईं,उं,ऊं,ऋं,ॠं,ऌं,ॡं,एं,ऐं,ओं,औं,अं,अः हे सोळा स्वर वर्ण आहेत.त्यांचा रंग रक्तासारखा लाल आहे. या पाकळ्यात सर्वतोभद्रा, प्राणधारिणी, सप्तद्योतिनी, ब्रह्मायणी, शबरी, लोहिता, यक्षिणी, सौभाग्यदायिक, भानुमती, मदालसा, शिखरिणी, छाया, विष्णुप्रिया, विश्वोदरा, माया व चित्रघंटा या सोळा शक्ती असून हुम्, फट्, वौषट्, स्वाहा, स्वधा, मन, अमृत, गांग, शुद्ध, रूप, धर, नील, धीम व प्राण हे सोळा आनंद चक्रभेदाच्यावेळी साधकाला प्राप्त होतात. या चक्राच्या मध्यभागी पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे गोलाकार आकाश-मंडल आहे अर्थात् पौर्णिमेच्या

चंद्रप्रकाशाने हे चक्र संपूर्णपणे प्रकाशित झालेले असून त्यात हा प्रकाश भरून राहिला आहे. या चंद्रमंडलाच्या मध्यात स्फटिकाप्रमाणे स्वच्छ असे 'हं' बीज आहे. या बीजाची प्रतिपाद्य देवता आकाश आहे. हे बीज बर्फाच्या छायेप्रमाणे चमकणाऱ्या हत्तीवर आरूढ झाले आहे. त्याचा रंग पांढरा असून त्याला चार हात आहेत. या चार हातात पाश, अंकुश अभय, व वर हे चार पदार्थ आहेत. या 'हं' कार आकाशाच्या बीजाच्या मांडीवर या चक्राची अधिपती देवता सदाशिव गौरीसह म्हणजे अर्धनारीनटेश्वराच्या रूपाने विराजमान झालेली आहे. त्यांचे शरीर वर्फा-सारखे उज्ज्वल असून ते सिद्धांमध्ये प्रसिद्ध आहेत. त्यांना पांच मुखे असून त्या प्रत्येक मुखाला तीन नेत्र आहेत. त्यांना दहा हात असून आकाशाप्रमाणे व्याघ्रचर्म त्यांनी कमरेभोवती नेसले आहे. या अमृताने भरलेल्या कमलाच्या मध्यभागी सदा-शिवांच्या जवळ निर्मल शुक्लवर्णाची शाकिनी नावाची शक्ती आहे. तिने पितांबर परिधान केला असून तिच्या चारही हातात बाण, धनुष्य, पाश व अंकुश ही चार आयुधे आहेत. ती नेहमी चंद्रापासून प्रवाहित होणाऱ्या अमृतप्राशनाने आनंदित किंवा पुलकित असते. या चक्राच्या मध्यभागी निष्कलंक, षोडशकलायुक्त व विशुद्ध असे पूर्ण चंद्रमंडल आहे. शुद्ध मनाच्या व परमपदप्राप्तीसाठी साधनरत झालेल्या जितेंद्रिय साधकयोग्यांना हे चंद्रमंडल मोक्षाच्या द्वारासारखे आहे.

ज्यावेळी या चक्राचा भेद होऊन साधकयोग्याची या साधनद्वारावर एकाग्रता, प्रतिष्ठा किंवा स्थिती होते तेव्हा त्याचे मन आकाशाप्रमाणे विशुद्ध होते म्हणून याला विशुद्ध चक्र म्हणतात. "देवी भागवतात" असे म्हटले आहे की, "हंस" च्या दर्शनाने जीव शुद्ध होत असल्याने या चक्राला विशुद्ध चक्र हे नाव मिळाले. याला भारतिस्थान असे दुसरे नाव आहे; कारण वाग्देवतेचे हे निवासस्थान आहे. या चक्रालाच जनलोक असे म्हणतात.

या चक्राच्या ठिकाणी धारणा किंवा मनःसंयम करून योगी-साधक क्रोधित झाला तर त्रिभुवन विचलित झाल्याशिवाय राहणार नाही. या चक्राच्या वेधामुळेच ज्ञानी साधक वर्तमान, भूत व भविष्य कालांना पाहून त्रिकालदर्शी आणि पाताल, भू व स्वर्ग लोकांतील सर्व वृत्तांत जाणण्यास समर्थ होतो. त्याचप्रमाणे तो शांतचित्त, सर्वहितकारी, निरोगी, शोकहीन, कवी, उत्तम वक्ता, महाज्ञानी व दीर्घजीवी होतो

६) **आज्ञा चक्र :–** दोन भिवयांच्यामध्ये किंवा भ्रूमध्यात आज्ञा नावाचे चक्र आहे. या चक्रात मन व प्रकृतीची सूक्ष्मतत्त्वे वास करतात. सद्‌गुरूंची वरून येणारी आज्ञा शिष्य या ठिकाणी स्वीकृत करीत असल्याने व या चक्राचा भेद होत असताना साधकाचा मनःसंयम या ठिकाणी होऊन त्याला दैवीवाणी प्राप्त होत असल्याने या स्थानाला आज्ञाचक्र असे नाव प्राप्त झाले आहे.हे चक्र शुभ्रवर्णाचे असून योगिजनांचे ध्यानस्थल आहे.या चक्राला दोन पाकळ्या असून त्यावर 'हं' व 'क्षं' हे दोन वर्ण विराजमान असतात.या पाकळ्यांमध्ये महाकाली व महालक्ष्मी या दोन शक्ती असून

त्यांपासून सहज व नित्य आनंद साधकाला प्राप्त होतो.त्याचप्रमाणे प्रवृत्ती व निवृत्ती नावाच्या दोन वृत्ती दोन पाकळ्यात आहेत. या चक्राची अधिपती देवता ज्ञानदाते शिव आहेत. त्यांना दोन हात असून ते शुभ्रवर्णाचे, त्रिनेत्र, व अर्धांगीसहित आहेत. त्याच्या शेजारी चंद्रासारख्या शुक्लवर्णाची, स्वच्छ स्वरूपाची, निर्मलचित्ताची व सहामुखाची हाकिनी नावाची देवी असून तिच्या चार हातात ज्ञानमुद्रा, कपाल (कवटी), डमरू व जपमाला या चार गोष्टी आहेत. या चक्रात मनाचा अत्यंत सूक्ष्मरूपाने निवास असतो. या चक्राच्या मध्यस्थानी केंद्रबिंदूत तीन गुण आहेत. या योनिरूपी केंद्रबिंदूच्या गाठीच्या तीन कोनात यथाक्रम ब्रह्मा, विष्णू व महेश्वर आहेत. या गाठीचा रंग पांढरा आहे. त्याच्यामध्ये इतर नावाचे शिवस्थान असून तेथे कोटी विजेप्रमाणे चमकणारे अर्धांगी परमशक्तिसहित इतर नावाचे शिवलिंग आहे. येथूनच ब्रह्मनाडीचा बोध साधकाला होतो. या स्थानीच वेदांचे बीज प्रणव अर्थात् ॐ झळकत असतो. हे चक्र इच्छाशक्तीचे स्थान आहे. त्याचा अधिष्ठाता परमात्मा आहे. या चक्राचा भेद होताना जेव्हा येथे मनःसंयम होतो तेव्हा प्रगाढ शक्ती साधकाच्या ठिकाणी उत्पन्न होते. या इच्छाशक्तीच्या बळावर साधक सृष्टी, स्थिती व संहार करण्यास समर्थ होऊन ब्रह्मा, विष्णू व शिवाच्या सारखा होतो. भिन्नभिन्न चक्रांच्या ध्यानाने जी फले प्राप्त होतात ती सर्व या एका चक्राचे ध्यान साधनात घडले की प्राप्त होतात.

या चक्रात रुद्रग्रंथी आहे. या रुद्रग्रंथीचा भेद होण्याच्या वेळी साधकाचा आहार व मलमूत्रादि कमी होतात. अर्थात् आहार कमी झाला तरी साधकाचे शरीर दुर्बल किंवा कृश होत नाही. उलट त्याची कांती वाढते. या चक्राचा भेद झाल्यावर कुंडलिनी शक्ती अनायास अर्थात् कोणत्याही अडथळ्याशिवाय सहस्रारात परमशिवाशी एकरूप होते. या चक्राचा भेद होत असताना भ्रूमध्यात किंवा कपाळात भयानक ठणकते. कधी कधी भयंकर वेदना होतात व शूळ उठतो. त्यावेळी असे वाटते की, भ्रूमध्यात वज्रपातासारखे काहीतरी घडत असून ते फाटूनतुटून त्याचे शतशः तुकडे होणार. यावेळी नाना प्रकारच्या क्रिया शरीरात होतात.

सर्वसाधारण लोक वक्षस्थललाच हृदय म्हणतात; परंतु शास्त्रकारांनी आज्ञाचक्रालाच हृदय म्हटले आहे हे त्यांना माहीत नसते. "योगस्वरोदय" या ग्रंथात या दृष्टीनेच असे म्हटले आहे की–

**तदेव हृदयं नाम सर्वशास्त्रादि सम्मतम् ।**
**अन्यथा हृदि किंचास्ति प्रोक्तं यत् स्थूलबुद्धिभिः ।।**

आज्ञाचक्रच सर्वशास्त्रसम्मत असे हृदय आहे. जे लोक स्थूल बुद्धीचे असतात ते अन्यस्थलाला म्हणजे वक्षस्थललाच हृदय म्हणतात.

मूलाधारापासून निघालेल्या इडा, पिंगला व सुषुम्ना या नाड्या भिन्न भिन्न मार्गाने प्रवाहित होऊन शेवटी त्या पुन्हा आज्ञाचक्रात एकत्रित होतात. आज्ञाचक्र हे त्यांचे एकत्र मिळण्याचे स्थान आहे. "ज्ञानसंकलिनीतंत्रात" या दृष्टीने असे म्हटले आहे की—

इडा भगवती गंगा पिंगला यमुना नदी ।
तयोर्मध्यगता नाडी सुषुम्णाख्या सरस्वती ॥११॥
त्रिवेणी संगमो यत्र तीर्थराजः स उच्यते ।
तत्र स्नानं प्रकुर्वीत सर्वपापैः प्रमुच्यते ॥ १२॥

इडा नाडी ही भगवती गंगा नदी असून पिंगला नाडी ही यमुना नदी आहे. इडा व पिंगला या नाड्यांच्या मध्यातून गुप्तरूपाने सुषुम्नानाडी सरस्वती नदीरूपाने वाहते. जेथे या तीन नाड्यांचा संगम होतो त्या आज्ञाचक्राला तीर्थराज प्रयाग किंवा युक्तत्रिवेणी असे म्हणतात. जे साधक मनाने या तीर्थात स्नान करतात ते सर्व प्रकारच्या पातकांपासून मुक्त होतात. या चक्रालाच तपोलोक असे म्हणतात.

**७) सहस्रार चक्र :–** आज्ञा चक्राच्यावर शंखिनी नाडीच्या शिखरावर शून्यस्थानी अर्थात् ब्रह्मांडामध्ये पसरलेल्या विसर्गशक्तीच्या खाली अत्यंत सुंदर, प्रकाशमान, पौर्णिमेच्या चंद्रासारखे शुभ्र, अधोमुखी, प्रातःकालीन सूर्याच्या किरणांसारखे रक्तवर्णाचे व शोभिवंत असे सहस्रार चक्र आहे. या चक्राला हजार पाकळ्या असून त्यावर 'अ' पासून 'क्ष' पर्यंत सर्व पन्नास वर्ण विराजमान असतात. या सर्व पाकळ्यात मूलाकृती ही शक्ती असून त्यापासून साधकयोग्याला निरानंदाची प्राप्ती होते हे सर्व चक्रच नित्यानंदस्वरूप आहे.

या अधोमुख सहस्रार चक्राच्या खाली बारा पाकळ्यांचे एक ऊर्ध्वमुखी चक्र आहे. त्याचा रंग पांढरा आहे. या चक्रात श्वेतवर्णाचे वाग्भव म्हणजे 'ऐं' हे गुरुबीज आहे. त्याच्या मागे या बीजाची प्रतिपाद्य देवता श्रीगुरू हे आहेत. त्यांचा श्वेतवर्ण असून त्यांच्या दोन्ही हातात वर व अभय या गोष्टी आहेत. त्यांच्या गळ्यात पांढरी माळ आहे. त्यांनी श्वेत वस्त्र नेसले असून शरीराला श्वेतगंधाचा लेप लाविला आहे. त्यांचे मुख प्रसन्न आहे. त्यांच्या मांडीवर प्रातःकालीन सूर्याप्रमाणे रक्तवर्णाची व दोन हातांची त्यांची शक्ती आहे. तिने आपल्या डाव्या हातात कमळ धारण केले असून उजव्या हाताने तिने श्रीगुरुंचे शरीर लपेटून घेतले आहे. या चक्राच्या मध्यभागी त्रिकोणमंडल आहे. त्यात शून्याकार स्थान आहे. या ऊर्ध्वमुखी बारा पाकळ्यांच्या कमळावर एखाद्या छत्रासारखे अधोमुख सहस्रदल कमळ किंवा चक्र विकसित झालेले दिसते.

सहस्रार चक्र पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे शोभिवंत असून त्याची अमृतमय प्रकाश किरणे त्याच्या उत्कृष्ट शोभेचा विस्तार करीत असतात किंवा सर्वत्र विलास करीत

असतात. या चंद्रमंडळाच्या मध्यभागी विजेप्रमाणे चमकणारे त्रिकोण यंत्र आहे. या यंत्राच्या तीन कोनांवर 'हं,' 'लं' व 'क्षं' हे तीन वर्ण आहेत. या त्रिकोण मंडलाचे नाव शक्तिमंडल असून त्याच्या मध्यभागी अत्यंत सूक्ष्म, परमानंदकंद-स्वरूप, श्रेष्ठ, सोळा कलांनी सुशोभित, कोटी कोटी सूर्याप्रमाणे तेजस्वी व व कोटी कोटी पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे शीतल असे एक बिंदुस्वरूप शून्यस्थल आहे. या ठिकाणीच सर्व देवतांचे परम गुरू श्रीशिव हे आकाशरूपाने, परमात्मस्वरूपाने व शून्य ब्रह्माच्या रूपाने विराजमान झालेले आहेत. ते सिद्धांचे सिद्ध म्हणून प्रसिद्ध असून नेहमी अमृताची वृष्टी करीत, शुद्धबुद्धी साधकयोग्यांना आत्मज्ञानाचे दान करीत, त्यांच्या अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करतात. हे शिवगुरू सर्वांतरात्मा असून आपल्या शक्तीसह एकरस होऊन नित्य योगानंदात निमग्न असतात. असे हे सर्वांचे ईश्वर, सकलसुखसागर, अखिलानंदमय व परमहंसस्वरूपाने येथे निवास करतात.

या ठिकाणीच मूलाधारस्थ कुंडलिनी शक्तीचे परमशिवाबरोबर मिलन झाले की, सर्व वृत्तींचा निरोध होतो. या शून्यस्थानालाच शैव किंवा शिवभक्त शिवाचे स्थान, विष्णुभक्त किंवा वैष्णव विष्णूचे म्हणजे परमपुरुषाचे स्थान, अनेक भक्तजन हरिहरांचे स्थान, देवीच्या चरणकमलांची सेवा करणारे उपासक शक्तिस्थान व काही काही मुनिश्रेष्ठ प्रकृति-पुरुषाचे निर्मलस्थान अशी संज्ञा देऊन भिन्न नावाने एकाच स्थानाचे वर्णन करीत असतात. अशा प्रकारे सर्व उपासक सहस्रार चक्र हेच आपल्या उपास्य देवतेचे इष्टस्थान आहे असे मानून उपासना करीत असतात.

या स्थानी त्रिकोणामध्ये प्रात:कालीन बालसूर्याच्या कलेप्रमाणे रक्तवर्णाच्या किरणांनी चमकणारी अत्यंत निर्मल, कमलनालाच्या तंतूच्या शंभराव्या भागा इतकी सूक्ष्म, अत्यंत श्रेष्ठ, नित्य प्रकाशमान, अधोमुखी, परमानंद देणारी, पूर्ण चंद्राच्या सोळाव्या कलेप्रमाणे सूक्ष्म व अमृताच्या धारा धारण केलेली अमा नावाची शक्ती निवास करते. चंद्राच्या सोळा कला आहेत; परंतु या सोळा कलां-मध्ये अमा कलेच्या व्यतिरिक्त सर्व कलांची क्षय व वृद्धी होत असते. मात्र या अमा कलेची क्षय व वृद्धी होत नाही. पंधरा कलांमध्ये जे सर्व काही आहे ते सर्व या अमा कलेमध्ये आहे. चंद्राचे सर्व अमृत ही अमा नावाची कला धारण करते. हिच्या-पासूनच साधकयोग्यांना प्राप्त होणाऱ्या पूर्णानंदाच्या अमृतधारा प्रवाहित होतात. अमा कलेपासून निघणारे अमृत सोमचक्रात दोन धारांमध्ये विभक्त होते. त्यातील एक धारा सुषुम्नेमध्ये प्रवेश करते व दुसरी धारा दिवसरात्र इडानाडीत प्रवाहित होते. देहातील सूर्य आपल्या ऊर्ध्व किरणांनी या अमृताचे आकर्षण करतो. त्यामुळे शरीर जीर्ण, म्हातारे व नाना प्रकारच्या रोगांनी आक्रांत होत असते. याच्या निवारणार्थच "विपरीतकरणी मुद्रा" योगी-साधक करीत असतात.

या अमा नावाच्या कलेमध्ये निर्वाण नावाची कला आहे. ती बारा सूर्यांप्रमाणे प्रकाशमान, अत्यंत श्रेष्ठ, नित्य ज्ञान देणारी भगवती, एका केसाच्या सहस्रांश भागाइतकी अत्यंत सूक्ष्म, सर्व प्राण्यांची अधिष्ठात्री किंवा इष्टदेवतारूप, षडैश्वर्य-युक्त व कुटिलाकार आहे. हिची आकृती अर्धचंद्राप्रमाणे असून हिलाच महाकुंड-लिनी असे म्हणतात. या कलेची भावना किंवा ध्यान, मनन, चिंतनादि झाल्याने साधकाला तत्त्वज्ञानाची प्राप्ती होते. या निर्वाण कलेच्या मध्यभागी कोटी कोटी सूर्यांप्रमाणे प्रकाशमान, त्रिभुवनाची रचना करणारी, केसाच्या कोटचांश भागाइतकी सूक्ष्म, अत्यंत गुह्य किंवा गोपनीय, सततकाल प्रेमधारा धारण केलेली, सर्व प्राण्यांची प्राणस्वरूप, निरंतर अमृतस्राव करणारी, मुनींना आनंद देणारी, नित्य तत्त्वज्ञानाची प्राप्ती करून देणारी, एकमात्र गुरुकृपेनेच उपलब्ध किंवा प्राप्त होणारी व अनुभूतिगम्य अशी निर्वाण नावाची शक्ती निवास करते. ज्यावेळीं साधकाला साधना करता करता या कलेच्या शक्तीच्या एका कणमात्राचे आस्वादन करण्याचे भाग्य लाभते त्यावेळी जीव धन्य होतो व शिवस्वरूपप्राप्तीमुळें तो पुन्हा देह धारण करीत नाही.

या निर्वाण शक्तीच्या मध्यभागी योगी-साधकांना ध्यानद्वारा जाणण्यास योग्य अगर ज्ञेय, विशुद्ध, नित्य, सकल शक्तींचे आश्रयकारक किंवा सर्वशक्तिमय, शुद्ध-ज्ञानाचा प्रकाश करणारे असे नित्यानंद नावाचे परमशक्तियुक्त शिवपद, शिवस्थान किंवा तुरीयपद आहे. या स्थानालाच बुद्धिमान वैष्णव परमज्योतिस्थान किंवा ब्रह्मस्थान, कोणी हंसस्थान, कोणी परमब्रह्मस्थान, कोणी परमहंसस्थान, कोणी पुण्यात्मे मोक्षद्वार इत्यादि नानाविध उपासक नानाविध नावांनी संबोधित असतात.

या सहस्रार चक्रालाच सत्यलोक म्हणतात. या सहस्रार चक्रात जेव्हा साधक-जीव षट्चक्रभेद करून जाऊन पोहोचतो तेव्हा तो शिवस्वरूप होऊन स्वानंद-साम्राज्याचा चक्रवर्ती राजा होतो.

येथपर्यंत आपण षट्चक्रांची माहिती पाहिली. येथे एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे की, मूलाधारस्थ कुंडलिनी शक्ती जेव्हा षट्चक्रांचा भेद करीत सहस्रारात येते तेव्हा ती एकदम संपूर्णांशाने किंवा पूर्णरूपाने तेथे न येता अंशात्मकतेने किंवा थोडीथोडी येत असते. त्यामुळे सर्ववृत्तींचा निरोध होऊन असंप्रज्ञात किंवा निर्विकल्प समाधीची अवस्था साधकाला तत्काळ प्राप्त होत नाही. गुरुकृपेने जागृत झालेली शक्ती मूलाधारातून सुषुम्नेतून मार्गस्थ होण्यासाठी व हा मार्ग परिष्कृत किंवा शुद्ध करण्यासाठी नाना प्रकारच्या हठयोगोक्त क्रिया साधकाकडून करवून घेते. सुषुम्नेचा मार्ग मोकळा झाल्यावर ती निर्वेधपणे सहस्रारात जाते. मात्र तेथे गेल्यावरही आपल्या निर्दिष्ट स्थानापर्यंत जाण्याकरिता ती आपला मार्ग मोकळा व्हावा म्हणून नाना प्रकारच्या प्राणांच्या क्रिया करते. या प्राणक्रियांमध्ये पूरक, रेचक

व कुंभकादि क्रिया नसतात; तर केवळ अनुभूती मात्र असते. अर्थात् मनःप्राणांचे नानाविध स्पंदन मात्र होत असते. ज्यावेळी हे स्पंदनही थांबते व मन पूर्णपणे शिवरूपात विलीन होते तेव्हा साधकाला स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती होते.

वरील सर्व विवेचनाचे रहस्य प्रकट करताना "तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि" या ग्रंथातील "षट्-चक्रका भेद," या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, "जीवके क्रमविकासके इतिहासमें मनुष्यदेह प्राप्त करना एक मुख्य कार्य है। स्थावर, उद्भिज, पशु-पक्षी आदि चौरासी लाख योनियोंमें घूमनेके अनंतर जीवको मनुष्य देह प्राप्त होती है। मनुष्यदेह प्राप्तिके पहले तक उसके पाँच कोषोंमेंसे अन्नमय और प्राणमय कोषकाही विकास होता है। मनोमय कोषकी क्रिया एकमात्र मनुष्यदेहमेंही हो सकती है। मनुष्यदेहमें मनोमयकोषकी क्रिया आरंभ होती है एवं दीर्घकालापर्यंत जन्मजन्मांतरोंतक वह चलती रहती है। कर्तृत्वाभिमानके प्रभावसे नूतन क्रिया संपन्न होती है, एवं उसके फलभोगके लिए उसके उपयोगी भोग-शरीरका ग्रहण करना पडता है। दीर्घकालतक भोग संपन्न होनेपर स्वभावके नियमानुसार वैराग्यका उदय होता है एवं चित्त वहिर्मुखताका परित्याग कर अंतर्मुख हो जाता है। इस अवस्थामें मनके परिपाकवश अलक्षित-रूपमें गुरुशक्तिकी क्रिया चलती है। तत्पश्चात् उक्त गुरुशक्ति प्रबल होकर, चाहे निराधार अनुग्रहद्वाराही हो चाहे आचार्यदेहरूप आधारके अवलंबनपूर्वक अनुग्रह-द्वाराही हो, जीवके ऊपर संचारित होती है। अधिकारकी विशिष्टता रहनेपर विवेक अथवा प्रातिभज्ञानकेद्वारा गुरुशक्तिका कार्य होता है। यही जीवके जीवनमें भगवत्शक्तिके अनुग्रहरूप व्यापारका रहस्य है।

मनुष्यदेहमें गुरुशक्तिकी क्रियाके प्रभावसे अणुरूपी जीवकी शिवमय शक्ति सुप्तावस्थासे जाग्रत-अवस्थामें उत्थित होती है, एवं जीवके जीवभावको क्रमशः शिवभावमें परिणत करती है। जीवभावकी निवृत्ति होकर शिवभावका उदय होनाही षट्चक्र-भेदका रहस्य है। शिवकी शक्ति चिद्रूपा होनेपर भी जीवदेहमें वह मूला-धारकुंडमें अचिद्रूपसे सोई हुई है, एवं जीवको अपने शिवस्वरूपका अनुभव नहीं करने देती। स्वरूपका आवरण तथा असत्य परकीय रूपका ग्रहण इसके कार्य हैं। पंचभौतिक तत्त्व तथा चित्त ये छः केंद्ररूपमें रहकर छः चक्रोंका निर्माण करते हैं। ये छः चक्र निरंतर चक्कर लगाकर शुद्ध आत्माको जीवरूपमें घुमा रहे हैं। ये यंत्रस्वरूप हैं, जिनमें आरूढ होकर जीवमात्र इनके द्वारा नियंत्रित जीवन बितानेको बाध्य होता है।

परावाक्से लेकर वैखरी-वाक् तक शब्दका अवतरण होनेपर वर्णात्मक शब्दका उदय होता है एवं वर्णको मूल बनाकर पद, वाक्य आदिके सहकारसे भाषाकी सृष्टि होती है। ये सब वर्ण अथवा मातृकाएँही तत्त्वज्ञानकी दृष्टिसे चित्तमें

विकल्पोंके उदयमें निमित्त हैं। जबतक मूलमें वर्णको वर्णहीन अविच्छिन्न नादरूपमें परिणत न किया जा सके, एवं नादको बिंदुरूपमें प्रतिष्ठित न किया जा सके तबतक विकल्पोंका अंत होना संभव नहीं है। बिंदु परबिंदुके रूपमें आज्ञाचक्रके ऊपर नित्य विराजमान रहता है। किंतु उसकी यदि उपलब्धि करनी हो तो अपने स्वरूपमें बिंदुके बिखरे हुए अनंत अंशोंका इकट्ठा कर पुनः उस बिंदुमें उनका उपसंहार करना आवश्यक है। हम लोगोंके जो लय और विक्षेप हैं, वे इन बिखरे हुए अंशोंके आवरण और चंचलताके कारण हैं, इसमें संदेह नहीं। षट्चक्रोंका भेद करनेवाले योगीका पहला लक्ष्य यहीं है कि वह उन बिखरे अंशोंको एकत्र कर ऊर्ध्वगामी महास्रोतसे युक्त कर दे। शास्त्रमें कहा गया है कि "चित्तनदी उभयतोवाहिनी" है। वह संसारकी तरफ प्रकट रूपसे निरंतर बहिर्मुख अथवा अधोमुख होकर बह रही है एवं वही पुनः कल्याणकी और गुप्तरूपसे अंतर्मुख अथवा ऊर्ध्वमुख होकर बह रही है। यह जो ऊर्ध्वमुखी अथवा अंतर्मुखी धारा है, यह मानवशरीरके मेरुदंडके बीचमें स्थित सुषुम्ना नाडीका अवलंबन कर प्रवाहित होती है, एवं बहिर्मुखी अथवा अधोमुखी धारा इडा या पिंगला तथा उनकी असंख्य शाखा-प्रशाखाओंका अवलंबन कर प्रवाहित होती है।

शास्त्रोमें मूलाधार आदि जिन सब चक्रों अथवा कमलोंका वर्णन दिखाई देता है, वे सभी पूर्वोक्त विशेष वर्णोंद्वारा निर्मित एक प्रकारके यंत्र हैं। ये सब वर्णही परस्पर अलग-अलग रहकर और परस्परके योगसे विभिन्न प्रकारके विकल्पोंकी सृष्टि करते हैं। काम, क्रोध, लोभ, मोह, भय, ताप आदि सभी वृत्तियाँ इन सब विकल्पोंसे अनुप्राणित हैं। वैखरीके सब वर्णोंको विगलित कर मध्यमामें नादाभासमें परिणत करना एवं तदनंतर पश्यंतीसे विशुद्ध नादमय ज्योतिमें प्रकाशित करनाही योगसाधनाका प्रयोजन है। पश्यंतीसे परामें जाकर शब्दब्रह्मभेद होनेपर परमसिद्धीका उदय होता है।

किंतु प्रश्न यह है कि वर्णोंको विगलित कर नादरूपमें परिणत करनेके लिए ताप आवश्यक होता है। इस तापका मूल क्या है? यह ताप अग्निका ताप है, एवं यह अग्नि लौकिक अग्नि नहीं है, यह चिद्-अग्नि है। मूलाधार कुंडमें जो कुंडलिनी सोई हुई है, उसे जाग्रत कर सकने परही इस चिद्ग्निकी प्राप्ति और उपयोग हो सकता है। इसलिए योगीका पहला कार्य है कि जिस किसी भी प्रक्रियाद्वारा कुंड-लिनीको उद्बुद्ध करे और उसके बाद उद्बुद्ध कुंडलिनीके तेजके साथ विशेष प्रक्रियाद्वारा अथवा भावनाकेद्वारा अपने प्राण और मनको मिलावे। इस अवस्थामें मन, प्राण और जाग्रत् कुंडलिनी; ये तीनों वस्तुएँ पृथक् न रहकर एक शक्तिके रूपमें परिणत होती हैं। मनको यदि चंद्र माना जाय तो प्राणको सूर्य मानना आवश्यक है, एवं कुंडलिनीरूपा वाक्शक्ति वास्तवमें अग्निका स्वरूप है। इस तरह चंद्रमा, सूर्य और अग्नि ये तीन शक्तियाँ एक शक्तिमें परिणत होती है। इसके

प्रभावसे मूलाधारके चतुर्दलमें स्थित चार वर्ण-मातृकाएँ विगलित होकर नादका रूप ग्रहण करती हैं, एवं ये चार नाद समष्टि रूपसे अभिन्न नादके आकारमें प्रत्यावर्तनद्वारा मूलधारके केंद्रस्थ बिंदुमें पहुँचाये जाते हैं। मूलधारका बिंदु ऊर्ध्वमुख सुषुम्नास्रोतसे क्रमशः ऊपरकी ओर उठता है। इस तरह मूलाधार चक्र शून्य हो जाता है। ठीक इसी प्रणालीसे स्वाधिष्ठानसे आरंभकर आज्ञाचक्रतक सभी चक्रोंमें संस्कार-कार्य चलता है। अन्तमें षट्चक्रकी पचास मातृकाएँ नादरूपमें परिणत होकर एवं पहले छः बिंदुओंमें परिणत होकर क्रमशः अन्तमें एक बिंदुमें स्थित होती है। यही बिंदु भ्रूमध्यमें स्थित तृतीय नेत्ररूप बिंदु है। इसका स्थान आज्ञाचक्रके ऊपर है। इस नेत्रके उन्मीलनको आज्ञाचक्रका उन्मीलन कहा जाता है। यह मूलमें गुरुशक्तिके द्वाराही निष्पन्न होता है एवं साधकके प्राण, मन और जाग्रत कुंडलिनी इसके सहयोगी हैं। बिंदुके उन्मीलित होनेपर अर्थात् तृतीय नेत्र या आज्ञाचक्रके खुल जानेपर जीव फिर जीव नहीं रहता, वह अपना नित्य शुद्ध शिवरूप धारण करता है। क्योंकि तीन नेत्र एकमात्र शिवजीकेही है–जीवके नहीं। सहस्रारमें गति वास्तवमें शिवकीही गति परमशिवकी ओर है।" (पृ- ९८ ते १००)

याचप्रमाणे आणखी दुसरी एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे की, सिद्धयोगात षट्चक्रभेदाचा प्रश्न हा कधी कधी क्रमाने तर कधी कधी अक्रमाने प्रत्ययास येतो. पण याहीपेक्षा आश्चर्याची गोष्ट म्हणजे चक्रभेद व चक्रदर्शनाचा प्रश्नच उपस्थित न होता साधक सहस्रारात जातो. हे कसे घडते याचे दिग्दर्शन "विहंगमयोग और महापथ." या "भारतीय संस्कृति और साधना," खंडा दुसरा, या ग्रंथांतील लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी करताना असे म्हटले आहे की, "संतोंमें कुछ लोग योगमार्गको दो भागोंमें विभक्त करते हैं। उनमे एकका नाम पिपीलिका मार्ग है और दुसरेका नाम है विहंगम मार्ग। इन दो योगोंके आपेक्षिक उत्कर्षका विचार करनेपर यह अवश्यही कहना पडेगा कि पिपीलिकायोगकी अपेक्षा विहंगमयोग श्रेष्ठ है।... साधारणतः जो हठयोग कहा जाता है, वह पिपीलिकायोगकाही एक भेदमात्र है। इस प्रक्रियामें आसन, प्राणायाम, मुद्रा आदि सहायक होते हैं एवं सुप्त कुंडलिनी शक्तिको प्रबुद्ध कर और उस जाग्रत् शक्तिके द्वारा मनुष्य देहमें स्थित षट्चक्र नामक छह शक्ति--केंद्रोंका भेदन कर ऊपर उत्थित होना पडता है। .... हठयोग अत्यंत जटिल और कठिन है एवं अनेकके लिए तो उसे स्वायत्त करना संभव नहीं। किंतु विहंगमयोग इतना सहज है कि सरलताके कारण किसी-किसी संतने उसका सहजयोग नाम रख छोडा है। .... पिपीलिकायोगके लक्ष्यसे विहंगमयोगका लक्ष्य बहुत ऊँचा है, कारण सत्य–राज्य भ्रमर–गुहाके अतीत है और भ्रमर–गुहा महाशून्यके दूसरे छोरपर स्थित है। सत्य–राज्य तो बहुत दूरकी बात है, महाशून्य और भ्रमर–गुहाभी ब्रह्मांडके अतीत हैं, किंतु सहस्रदल कमल ब्रह्मांडके अंतर्गत है। विहंगम–योग मुख्यतः इस शब्दब्रह्मके सहारेही अनुष्ठित होता है। शब्द आकाशका

धर्म है। शुद्ध चैतन्यमय आकाशके धर्म चिन्मय शब्दका आश्रय लेकर सत्य–राज्यमें प्रवेश करना होता है। तब सोऽहं बोध होता है। इस योगके अनुष्ठानमें चक्रभेदका कोई प्रश्नही नहीं है। किंतु जो लोग निरालंब अवस्थाका अवलंबन नहीं कर सकते एवं जिनमें एकाग्रता नहीं, उनके लिए इस मार्गका अवलंबन करना संभव नहीं है। पर एक बार शब्दके जग जाने अथवा सत्पुरुषकी कृपासे शब्दका संधान पा सकनेपर फिर कुछ भी असुविधा नहीं रहती। पिपीलिकामार्गमें क्रम है,कारण वहाँ अवलंबन है। इसीलिए वहाँ एक त्यागकर किसी दूसरेका ग्रहण किया जाता है। किंतु विहंगम–मार्गमें वास्तवमें कोई क्रम नहीं है; क्योंकि चलनेका मार्ग शून्यके मध्य है। मार्गमें विश्रामस्थान न होनेसे विहंगममार्ग अक्रम है।" (पृ. ४२ ते ४५)

उपरोक्त विवेचनाचा सर्व सारांश "ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति। भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया।।१८.६१।।" या भगवंतांच्या गीतोक्त वचनात ग्रथित झाला आहे व त्याचा भावार्थ "एसेनि शरीराकारीं। यंत्रीं भूतें अवधारीं। वाहूनि हालवी दोरी। प्राचीनाची ।। १८.१३०८ ।। " या ओवीत श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी प्रकट केला आहे.

सिद्धयोग साधनेमुळे ज्या क्रिया होऊन साधकाला अनुभूती येते त्याचे सहावे कारण असे आहे की, जागृतशक्ती बंधत्रय म्हणजे मूळबंध, उड्डीयानबंध व जालंधरबंध ओलांडून सहस्रारात जाते. यातील मूळबंधाचे लक्षण आपण याच प्रकरणात " साधनाला बसण्याची पद्धत " या मुद्यात पाहिले आहे. उरलेल्या दोन बंधांचे लक्षण व शक्तिद्वारा त्यांना ओलांडण्याचे कार्य कसे होते, याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

नाभीवरी पोखे। उदर हें थोके।
अंतरीं फांके। हृदयकोशु ।। ६.२०९।।
स्वाधि ठानावरीचिले कांठीं। नाभिस्थानातळवटीं।
बंधु पडे किरीटी। वोढियाणा तो ।। २१०।।
मग कंठनाळ आटे। हनुवटी हडौती दाटे।
ते गाळी होऊनि नेहटे। वक्षःस्थळीं ।।२०७।।
माजीं घंटिका लोपे। वरी बंधु जो आरोपे।
तो जालंधरु म्हणिपे। पंडुकुमरा ।।२०८।।

ज्या क्रियेत नाभी वर उचलली जाते, पोट खपाटीला जाते व हृदयकमल अंतर्यामी विकसित किंवा प्रफुल्लित होऊन स्वाधिष्ठान चक्राच्या वरच्या भागावर व बेंबीच्या खालच्या भागामध्ये बंध पडतो, त्याला वोढियाण किंवा उड्डीयान बंध असे म्हणतात. त्याचप्रमाणे ज्या क्रियेत किंवा शरीराच्या रचनेत मानेचा भाग आखडला जाऊन किंवा संकुचित होऊन, हनुवटी गळ्याखालच्या खळगीत अडकून

बसल्यामुळे ती वक्षःस्थलाच्या वरच्या बाजूला दृढ होऊन दाबन किंवा रोवून राहिल्यामुळे कंठमणी दिसेनासा होतो, त्यावेळी जो बंध सिद्ध होतो, त्याला जालंधर बंध असे म्हणतात.

मुळात शास्त्रकारांनी या बंधत्रयांची लक्षणे कथन करून ते मुद्दाम कसे लावावेत हे सांगितले आहे. कुंडलिनी शक्ती जागृत होऊन तिचे सुषुम्नेत चालन व्हावे हाच त्यांचा उद्देश आहे. या दृष्टीने क्रमशः त्यांचे म्हणणे पाहू.

मूलबंधाबद्दल "हठयोगप्रदीपिकेत" योगी श्रीस्वात्माराम यांनी असे म्हटले आहे की--

पार्ष्णिभागेन संपीडच योनिमाकुंचयेद्गुदम् ।
अपानमूर्ध्वमाकृष्य मूलबंधोऽभिधीयते ।।३.६१।।
अधोगतिमपानं वा ऊर्ध्वगं कुरुते बलात् ।
आंकुचनेन तं प्राहुर्मूलबंधं हि योगिनः ।।६२।।
गुदं पार्ष्ण्या तु संपीडच वायुमाकुंचयेद्बलात् ।
वारं वारं यथा चोर्ध्वं समायाति समीरणः ।।६३।।
प्राणापानौ नादबिंदू मूलबंधेन चैकताम् ।
गत्वा योगस्य संसिद्धिं यच्छतो नात्र संशयः ।।६४।।
अपानप्राणयोरैक्यं क्षयो मूत्रपुरीषयोः ।
युवा भवति वृद्धोऽपि सततं मूलबंधनात् ।।६५।।
अपाने ऊर्ध्वगे जाते प्रयाते वन्हिमंडलम् ।
तदाऽनलशिखा दीर्घा जायते वायुनाऽहता ।।६६।।
ततो यातो वन्हचपानौ प्राणमुष्णस्वरूपकम् ।
तेनात्यन्तप्रदीप्तस्तु ज्वलनो देहजस्तथा ।।६७।।
तेन कुंडलिनी सुप्ता संतप्ता संप्रबुध्यते ।
दंडाहता भुजंगीव निश्वस्य ऋजुतां व्रजेत् ।।६८।।
बिलं प्रविष्टेव ततो ब्रह्मनाडच्यंतरं व्रजेत् ।
तस्मान्नित्यं मूलबंधः कर्तव्यो योगिभिः सदा ।।६९।।

टाचेने गुदद्वार व लिंगस्थानामधील शिवण दाबून गुदद्वाराचा संकोच व अपान वायूचे वर आकर्षण केले जाते तेव्हा त्याला मूलबंध म्हणतात. मूलाधाराचे आकुंचन करून अधोगती असलेल्या अपान वायूला जेव्हा बलाने ऊर्ध्वगामी केले जाते अर्थात् अपान वायूला सुषुम्नेमध्ये मार्गस्थ केले जाते त्यावेळी योगाभ्यासी त्याला मूलबंध म्हणतात. टाचेने गुदद्वार अर्थात् गुदा व लिंग यांमधील शिवण दाबून अपान वायू उर्ध्वगती होऊन सुषुम्नेत प्रवेश करीपर्यंत त्याचे पुनःपुन्हा बलाने आकुंचन करावे. मूलबंधामुळे प्राण व अपान हे नाद (स्वाभाविक अनाहत नाद)

व बिंदू यांच्याशी एकरूप होऊन योगाभ्यासी साधकाला योगाची सिद्धी उत्तम प्रकारे देतात यात काही एक संशय नाही. मूलबंधमुद्रा निरंतर केल्याने अपान व प्राणाची एकता होते व देहातील मलमूत्राचे प्रमाण अत्यल्प होऊन वृद्ध मनुष्यही तरुण होतो. मूलबंध केल्याने अधोगामी अपान जेव्हा ऊर्ध्वगामी होऊन अग्निमंडलात पोहोचतो तेव्हा अपान वायूने ताडित झालेली अग्निशिखा दीर्घ होते म्हणजे वाढते. नंतर अग्नी व अपान हे मुळातच उष्णस्वरूप असलेल्या प्राणाला जेव्हा येऊन मिळतात; त्यावेळी देहांतील अग्नी अत्यंत प्रज्ज्वलित किंवा प्रदीप्त होतो अर्थात् शरीरातील उष्णता खूप वाढते. या तिघांच्या एकीकरणाने उपस्थित झालेल्या प्रचंड अग्नीमुळे मूलाधारात निद्रिस्त असलेली कुंडलिनी शक्ती दंडाने प्रहार केलेल्या सर्पिणीप्रमाणे निश्वास टाकून विशेष रीतीने जागृत होऊन सरळ किंवा कोमल होते. त्या नंतर बिळात सर्पिणीने प्रवेश करावा त्याप्रमाणे ब्रह्मनाडीत म्हणजे सुषुम्नेत कुंडलिनी शक्ती प्रवेश करते. यासाठी योगाभ्यासी साधकाने नेहमी मूलबंधाचा अभ्यास करणे आवश्यक आहे.

याप्रमाणेच "योगकुंडलिनी उपनिषदात ॥१.४२ ते ४६॥" व "योगशिखोपनिषदात ॥ १.१०४, १०५ ॥ " मूलबंधाचे वर्णन केले आहे. आता उड्डीयानबंधाचे वर्णन " हठयोगप्रदीपिकेत " श्रीस्वात्मारामयोगींद्रांनी कसे केले आहे ते पाहू. ते म्हणतात–

बद्धो येन सुषुम्नायां प्राणस्तूड्डीयते यतः ।
तस्मादुड्डीयनाख्योऽयं योगिभिः समुदाहृतः ॥३.५५॥
उड्डीनं कुरुते यस्मादविश्रान्तं महाखग : ।
उड्डीयानं तदेव स्यात्तत्र बंधोऽभिधीयते ॥५६॥
उदरे पश्चिमं तानं नाभेरूर्ध्वं च कारयेत् ।
उड्डीयानो ह्यसौ बंधो मृत्युमातंगकेसरी ॥५७॥
उड्डीयानं तु सहजं गुरुणां कथितं यथा ।
अभ्यसेत् सततं यस्तु वृद्धोऽपि तरुणायते ॥५८॥
नाभेरूर्ध्वमधश्चापि तानं कुर्यात् प्रयत्नतः ।
षण्मासमभ्यसेन्मृत्युं जयत्येव न संशयः ॥५९॥
सर्वेषामेव बन्धानामुत्तमो ह्युड्डियानकः ।
उड्डियाने दृढे बंधे मुक्तिः स्वाभाविकी भवेत् ॥६०॥

ज्यावेळी अज्ञान बंधनाने बांधलेला प्राण मोकळा होऊन मध्यनाडीरूप सुषुम्नेत प्रविष्ट होऊन वरवर उडत अर्थात् चढत जातो त्यावेळी त्या बंधमुद्रेला योगी लोक उड्डीयान बंध असे म्हणतात. अत्यंत मोठ्या पक्षाप्रमाणे असलेला

प्राण जेव्हा अविश्रांतपणे सुषुम्नेमध्ये निरंतर उड्डीन ( पक्षाच्या एका गतीचे किंवा उडीचे नाम ) अर्थात् उडी घेत राहतो म्हणजे ऊर्ध्वक्रमण करीत राहतो त्यावेळी त्या बंधाला उड्डीयान असे म्हणतात. बेंबीवरील व बेंबीखालील पोट अशा प्रकारे आकर्षून आत घ्यावे की, ते दोन्ही पोटाचे भाग पाठीला लागतील. अशा प्रकारे नाभीच्या ऊर्ध्व व अधोभागाच्या ताणाला किंवा बंधाला उड्डीयान बंध म्हणतात. ह्या बंध म्हणजे मृत्यूरूपी हत्तीला सिंहाप्रमाणे ठार मारणारा आहे. जो साधक सद्‌गुरूने शिकविल्याप्रमाणे नेहमी उड्डीयान बंध करतो किंवा याचा नेहमी अभ्यास करतो त्या साधकाच्या बाबतीत हा बंध करणे ही गोष्ट स्वाभाविक होते व तो साधक वृद्ध असला तरी तरुण होतो. साधकाने बेंबीच्या वरील व खालील पोटाच्या भागाला ताण देऊन ते पाठीला लावण्याचा प्रयत्न केला व सहा महिनेपर्यंत या उड्डीयान बंधाचा वारंवार अभ्यास केला; तर तो साधक मृत्यूला जिंकतो यात काहीच शंका नाही. सर्व बंधात उड्डीयान बंध हा उत्तम आहे; कारण हा बंध दृढ झाला म्हणजे साधक स्वाभाविकपणे मुक्त होतो.

याप्रमाणेच " योगकुंडलिनी उपनिषदात ॥ १.४७ ते ५० ॥" व "योगशिखोपनिषदात ॥ १.१०६ ते १०९ ॥ " या उड्डीयान बंधाचे वर्णन केले आहे. शेवटी जालंधर बंधाची माहिती देताना " हठयोगप्रदीपिकाकारांनी " असे म्हटले आहे की—

**कंठमाकुंच्य हृदये स्थापयेच्चिबुकं दृढम् ।**
**बंधो जालंधराख्योऽयं जरामृत्युविनाशकः ॥३.७०॥**
**बध्नाति हि शिरोजालमधोगामि नभोजलम् ।**
**ततो जालंधरो बंधः कंठदुःखौघनाशनः ॥७१॥**
**जालंधरे कृते बंधे कंठसंकोचलक्षणे ।**
**न पीयूषं पतत्यग्नौ न च वायुः प्रकुप्यति ॥७२॥**
**कंठसंकोचनेनैव द्वे नाड्यौ स्तंभयेत्दृढम् ।**
**मध्यचक्रमिदं ज्ञेयं षोडशाधारबंधनम् ॥७३॥**

कंठाचा किंवा गळ्याचा संकोच करून वक्षस्थळावर हनुवटी घट्ट दाबून धरावी. याला जालंधर बंध म्हणतात. हा बंध म्हातारपणाचा व मृत्यूचा विध्वंस करतो. शिरांच्या म्हणजे नाड्यांच्या समूहरूप जाळ्याला बांधणारा, अधोगामी अमृताला इडा नाडीत पडून अग्नीने भक्षण करण्यास प्रतिबंध करणारा व कंठातील सर्व दुःखांचा नाश करणारा असा हा बंध असल्यामुळे याला जालंधर बंध असे म्हणतात. ज्यावेळी साधक जालंधर बंधाचा अभ्यास करतो त्यावेळी कंठसंकोचामुळे वरून खाली येणारे अमृत अग्नीत पडून नाहीसे होत नाही व इतर नाड्यांमधून वायूचे संचरण होऊन त्याचाही प्रकोप होत नाही अर्थात् तो बिघडत नाही.

जालंधरबंधातील कठसंकोचामुळे इडा व पिंगला या दोन नाड्यांचे अत्यंत दृढपणे स्तंभन होते. यालाच अगुंष्ठ, गुल्फ, जानु, ऊरू, शिवणी, लिंग, बेंबी, हृदय, ग्रीवा, कंठदेश, लंबिका, नासिका, भ्रूमध्य, मस्तक, मूर्धा व ब्रह्मरंध्र या सोळा आधारांचे बंधन करणारे मध्यचक्र किंवा विशुद्धचक्र म्हणतात.

"योगकुंडलिनी उपनिषदात ॥ १.५१ ते ५३ ॥" व "योगशिखोपनिषदात ॥१.१०९ते११२॥" असेच वर्णन जालंधर बंधाचे केलेले आढळते. या सर्व वर्णनात हठयोगप्रदीपिकाकारांचा व उपनिषद्द्रष्ट्यांचा अंतिम हेतू प्राणांचे सुषुम्नेत चालन व्हावे व कुंडलिनी शक्ती जागृत व्हावी हाच आहे. त्यांनी हे तीन बंध किंवा क्रिया मुद्दाम करण्यास सांगितल्या आहेत, हे त्यातील क्रियापदांवरून अगदी स्पष्ट होते; परंतु श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मूळबंधात्मक सिद्धासन घालण्यास सांगितल्यावर इतर बंध मुद्दाम करावेत म्हणून सांगितले नाही. उलट आटे, दाटे, नेहटे, लोपे, थोके, फांके व ( बंधु ) पडे ही सर्व क्रियापदे आपोआप होणाऱ्या कृतीची किंवा बंधात्मक रचनेची द्योतक असल्यामुळे जागृत शक्तीकडून साधन आपोआप होते व हे बंधत्रयही आपोआप लागतात, हेच त्यांना स्पष्ट करावयाचे आहे, हे निभ्रांत सत्य आहे. अशा प्रकारे प्राणशक्ती कुंडलिनी ऊर्ध्वगामी होताना हे बंध साधकाला होतात व ती या बंधात्मक किंवा बंधाला पूरक अशा क्रियांना जन्म देते. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "मग जालंधर सांडी । ककरांत फोडी । गगनाचियें पाहाडीं । पैठी होय ॥६.३०२॥" असे जे वर्णन केले आहे ते या कुंडलिनी शक्तीमुळे आपोआप होणाऱ्या क्रियांचेच द्योतक आहे.

येथपर्यंत आपण मूलाधारापासून आज्ञाचक्रापर्यंत क्रिया का होतात हे पाहिले. "मूलाधारादिषट्चक्रं शक्तिस्थानमुदीरितम् ॥५.५३॥" असे "वराहोपनिषदात" म्हटले असल्यामुळे मूलाधारापासून आज्ञाचक्रापर्यंत असलेली ही षट्चक्रे, शक्तिस्थाने असून, त्यात वर वर्णिलेल्या कारणांमुळे होणाऱ्या क्रिया या सर्वसाधारपणे "ऐसी शरीराबाहेरलीकडे । अभ्यासाची पांखर पडे ॥६.२११॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या म्हणण्याप्रमाणे विशेषेकरून व्यक्त स्वरूपाच्या होत्या, त्याप्रमाणेच "आंतु त्राय मोडे । मनोधर्मांची ॥६.२११॥" अशा प्रकारच्या अव्यक्त स्वरूपाच्याही होत्या. या क्रियांमुळे आज्ञाचक्रापर्यंत मनोधर्मांचे बळ नाहीसे होत चालले आहे हे लक्षात येते. मात्र त्यापुढील क्रिया या इतक्या सूक्ष्म असतात की, त्यांची फक्त अनुभूती येते; पण त्यांचे पृथक्करणात्मक वर्णन करता येणे फारसे शक्य होत नाही. याचे कारण आज्ञाचक्रापासून सहस्रारापर्यंतचा मार्ग हा "कंठादुपरि मूर्धान्तं शांभवं स्थानमुच्यते ॥५.५३॥" या "वराहोपनिषदातल्या" उक्तिप्रमाणे शांभवस्थान असल्यामुळे, एकप्रकारे आत्यंतिक निरालंब असा मार्ग आहे. तरीही आज्ञाचक्राच्या वर त्रिकूट, श्रीहाट, गोल्हाट, औटपीठ, भ्रमरगुंफा व ब्रह्मरंध्र ही सहा चक्रे आहेत, असे

शास्त्रकारांनी वर्णन केले आहे. ज्यावेळी ही वरील सर्व चक्रे भेदून साधक पलीकडे जातो तेव्हाच त्याला स्वाराज्यसिद्धी मिळते; कारण " नाहीं दिनराती नाहीं कुळयाती" असे श्रीसंत नामदेवमहाराजांनी वर्णन केलेले स्वराज्य भ्रमरगुंफेच्या पलीकडेच आहे. यासंबंधी म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना," खंड दुसरा, या ग्रंथातील, " सहजयान और सिद्धमार्ग " या लेखात असे म्हटले आहे की,"आज्ञाचक्रतक इंद्रियोंकी क्रिया न्यूनाधिक परिमाणमें दिखाई देती है। मनकी क्रिया तो रहतीही है। किंतु आज्ञाचक्र भेद हो जानेपर इंद्रियाँ सर्वथा उपरत हो जाती हैं, पर मानस क्रिया तब भी बंद नहीं होती। जितनीही सहस्रारकी ओर गति बढती जाती है उतनाही मन भी निश्चल होता है। सहस्रदल कमलकी कर्णिकाके मध्यमें मनके बंध जानेपर उसका चांचल्य फिर नहीं रहता। निष्क्रिय मन तब विलीन हो जाता है-उसकी पृथक् सत्ता या कार्य फिर मालूम नहीं पडते। यही अमनस्कावस्था है। इसीकी पूर्णता शांभवी मुद्रा है। जब तक ठीक इस अवस्थामें न पहुँचा जाय तब तक बाहृय दृष्टिके उन्मेष और निमेष व्यापार भलीभाँति तिरोहित नहीं होते। बहिर्दृष्टिके उन्मेष, निमेष आदिसे रहित होनेपरही जानना होगा कि अंतर्लक्ष्य स्थिर हुआ है, मनपर विजय हुई है एवं आत्मचैतन्यका प्रकाश हुआ है। मानसिक चांचल्य वायुके स्पंदनसे होता है। इसलिये उस अवस्थामें मन, वायु ( प्राण ) और दृष्टि सभी स्थिर रहते हैं—केवल आकाशरूपी आत्मचैतन्यही प्रकाशमान रहता है।" (पृ. २८६ तळटीप )

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आज्ञाचक्रापासून सहस्रारापर्यंतच्या क्रिया शक्तीकडून का होतात व त्यांचे वर्णन करणे कसे अशक्य आहे हे सांगताना असे म्हटले आहे की—

> **ते ॐकाराचिये पाठी । पाय देत उठाउठी ।**
> **पश्यंतिचिये पाउटीं । मागां घाली ॥६.३०३॥**
> **पुढें तन्मात्रा अर्धवेरी । आकाशाच्या अंतरीं ।**
> **भरती गमे सागरीं । सरिता जेवीं ॥३०४॥**
> **गगनीं गगन लया जाये । ऐसें जें कांहीं आहे ।**
> **तें अनुभवें जो होये । तो होऊनि ठाके ॥३१०॥**
> **म्हणौनि तेथिंची मातु । न चढेचि बोलाचा हातु ।**
> **जेणें संवादाचिया गांवाआंतु । पैठी कीजे ॥३११॥**
> **अर्जुना एऱ्हवीं तरीं । इया अभिप्रायाचा जे गर्व धरी ।**
> **ते पाहें पां वैखरी । दुरी ठेली ॥३१२॥**
> **भ्रूलता मागिलीकडे । तेथ मकाराचेंचि आंग न मांडे ।**
> **सडेया प्राणा सांकडें । गगना येतां ॥ ३१३ ॥**
> **पाठीं तेथेंचि तो भेसळला । तें शब्दाचा दिवो मावळला ।**
> **मग तयाही वरी आटु भविन्नला । आकाशाचा ॥३१४॥**

आतां महाशून्याचिया डोहीं । जेथ गगनासीचि थावो नाहीं ।
येथ तागा लागेल काई । बोलाचा इया ?॥ ३१५ ॥
म्हणौनि आखरामजीं सांपडे । कीं कानवरी जोडे ।
हें तैसें नव्हे फुडें । त्रिशुद्धी गा ॥३१६॥

या सर्वांचा सारांशरूपाने अर्थ असा की, आज्ञाचक्रापर्यंत ॐकाराच्या साडेतीन मात्रांपैकी अ, उ व म या तीन मात्रा शक्तीत लय पाऊन शेवटी अर्धी मात्रा उरते. तीही सहस्राराकडे जाता जाता नाहीशी होऊन साधकयोग्याला अमात्रक स्थिती प्राप्त होते व शब्दाचा म्हणजे कुंडलिनी शक्तीचा दिवा मावळून ती शिवाशी एकरूप होते. कुंडलिनी शक्तीचे साडेतीन वेढे अर्थात औट वळणे येथे पूर्ण सुटतात. अर्थात् ही स्थिती संवाद, अक्षर व बोल यांच्या पलीकडची आहे. शक्तीची अर्धमात्रा शिल्लक राहिल्याने आज्ञाचक्रापासून सहस्रारापर्यंत क्रिया होतात; पण त्यांचे स्वरूप हे असे सूक्ष्म असल्याने अनुभूती हेच त्यांचे खरे स्वरूप आहे.

कुंडलिनी शक्ती ॐकाराच्या पाठीवर पाय देऊन येते व पश्यंतीची पायरी ती मागे टाकते म्हणजे अकार, उकार व मकार या प्रणवाच्या तीन मात्रा व वैखरी, मध्यमा व पश्यंती या तीन वाणी ती आज्ञाचक्रापर्यंत ओलांडून पुढे जाते. पुढे तिची जी अर्धमात्रा राहते त्यात बिंदु, अर्धचंद्र, निरोधिका, नाद, नादान्त, शक्ती, व्यापिनी, समना व उन्मना इतके तिचे अंश असतात. हे सर्व अंश व पूर्वोक्त चक्रे शांभव स्थानीय मार्गातून ओलांडून जाताना ज्या सूक्ष्म अनुभूतीमात्र क्रिया होतात त्यांनाही गणती नसते. असे असले तरी उपरोक्त सर्व अडथळे तुटेपर्यंत मनःप्राणाच्या क्रिया चालू असतात, हे नितांत सत्य आहे. मुळात मकाराचा म्हणजे आज्ञाचक्राचा भेद करणे अत्यंत कठीण आहे व शेवटी अमात्रक स्थिती प्राप्त करणे हे तर त्याहूनही कठीण आहे. अर्थात् गुरुकृपेने तेही सहजसाध्य होते हे खरे आहे. मात्र श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणें महाशून्याच्या डोहात प्रविष्ट झाल्याशिवाय अनावृत अशा मुक्तभावाचा बोध जागृत होत नाही. वस्तुतः या महाशून्याच्या किंवा परमशून्याच्या डोहात प्रवेश करणें यालाच मुक्ती किंवा निर्वाण म्हणतात. या बाबतीत सिद्धगणांचे म्हणणे असे आहे की, "परमशून्यस्थानादुपरि गत्वा योगी न जायते म्रियते न गच्छति नागच्छति । स च योगी तिष्ठति युगे युगे ज्योतिः समेत्य।"

येथपर्यंत साधनात क्रिया का होतात या प्रश्नाचा आपण सांगोपांग विचार केला. आता साधनात अनुभव का व कोणते येतात याचा विचार करावयाचा आहे. ज्या कारणांमुळे साधकाला सिद्धयोग साधनात क्रिया होतात त्यांमुळेच त्याला अनुभूती येत असते. ही अनुभूती शारीरिक, मानसिक, बौद्धिक व प्राण यांच्याशी संबंधित असून, या सर्वांच्या भिन्न भिन्न पातळयांवर तिचे आविष्कृतीचे क्षेत्र खूपच अमर्याद पसरले असल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. त्यामुळे त्यांचे संयोगीकरण करणे

( Synthesis ) हे सर्वस्वी अशक्य आहे. असे असले तरी काही एका मर्यादेपर्यंत हे शक्य होते व या अनुभूतींची सर्वसामान्य कारणमीमांसा स्पष्ट करता येते. सिद्धयोग साधन ही जीव–शिवाच्या अर्थात् शिव-शक्तीच्या प्रेमाची अमर कथा आहे. ही कथा मूलाधारापासून सुरू होऊन सहस्रारापाशी संपते. सहस्रारात "जेथ चैतन्य आधातुरें। करूनि असिजे ॥६.२८०॥" याप्रमाणे चैतन्य हे मूलाधारातून वर येणाऱ्या शक्तीला मिठी मारण्यासाठी अगदी आतुर झालेले असते आणि शक्तीही तेथे गेल्यावर "सोऽहंभावाच्या बाह्या पसरूनी। परमात्मलिंगा धावोनी। आंगा घडे ॥६.३०५॥" याप्रमाणे शिवाच्या कुशीत शिरते, हे सत्य आहे. अशा स्थितीत मूलाधारातून निघून सुषुम्नामार्गाने येताना ती जो श्रृंगाराचा आविष्कार करते त्यालाच शास्त्रकारांनी क्रिया म्हटले असून तीच साधकाच्या अनुभूतींची जननी आहे. त्यामुळे या कथासाधनात श्रृंगाररसालाच किंवा क्रियांनाच प्राधान्य असले; तरी शेवटी सहस्रारात या उभयतांच्या मिलनानंतर जी सहजप्रकाशभक्ती उपस्थित होते तिची सर्व परिणती शांतरसात होत असल्याने, शेवटी ही अनुभूती किंवा शांतरसाची प्रतिष्ठाच अंतिम म्हणून सिद्ध होते. यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

> नुसधीचि शांतिकथा। आणिजेल कीर वाक्पथा।
> जें श्रृंगाराच्या माथां। पाय ठेवी ॥ १३.११५६ ॥

हा मूलाधारापासून सुरू झालेला शक्तीचा श्रृंगार आज्ञाचक्रापर्यंत शरीर व प्राण यांच्या संचालनामुळे विशेष रीतीने दृग्गोचर होतो व पुढेही तो सहस्रारापर्यंत सूक्ष्मरीतीने चालतो, हे आपण वर पाहिलेच आहे. मात्र साधक जेव्हा परमशून्यावस्थेप्रत जातो तेव्हा शांतरस प्रतिष्ठित होतो. श्रीमद्भागवत महापुराणादि ग्रंथात राधाकृष्णांच्या ज्या रासलीलेचे वर्णन आले आहे, त्याचे रहस्य हेच आहे. एवढेच नव्हे तर "आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा। म्हणोनि व्यभिचारा टेकलियें ॥" किंवा "हाचि नेम आतां न फिरें माघारी। बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥" या श्रीसंत तुकाराममहाराजांच्या विरण्यांपासून शब्दभिन्नतेने प्रकट झालेल्या उपरोक्त प्रकारच्या सर्व संत महात्म्यांच्या भावाचे रहस्य हेच आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "एवं जे महाभारतीं। श्रीव्यासें आप्रांतमती। भीष्मपर्वसंगतीं। म्हणितली कथा ॥१३.११५४॥" असे म्हणून जी कथा ज्ञानेश्वरीच्या रूपाने प्रस्तुत केली आहे, त्यात शक्तीचा श्रृंगार सुरू झाल्यापासून पावलापावलावर शांतरसाची उत्क्रांती किंवा भरभराट होत असल्याने व त्यांचा कल शांतरसाकडे अधिक असल्याने श्रृंगाररसाच्या अर्थात् शक्तीकडून होणाऱ्या शारीरिक क्रियांच्या विवेचनाला, भावार्थ प्रकट होताना अवसर प्राप्त न होता, तो विशेषेकरून शांतरसाच्या अनुभूतीला प्रकट करण्याकडेच प्रवृत्त झाला आहे, हे ज्ञानेश्वरी

वाचताना स्पष्टपणे प्रतीत होते. वास्तविक रीतीने शक्तीने संकोच टाकून चैतन्याची अभिव्यक्ती कशी केली हे सांगावयाचे आहे. हे सांगताना चित्शक्ती स्वातंत्र्यमयी होऊन जी श्रृंगाराभिव्यक्ती करते त्याला प्राधान्य न देता श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्या अभिव्यक्तीच्या फलाला प्राधान्य दिल्याने ज्ञानेश्वरीत जागोजागी शांतरसाचे प्रकटीकरण झाले आहे. अर्थात् श्रृंगाराची ही अभिव्यक्ती कशी झाली आहे ते आपण पुढे पाहणारच आहोत. या संबधी "भारतीय संस्कृति और साधना," खंड पहिला, या ग्रंथातील " कुंडलिनी–तत्त्व " या लेखात म. म. गोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, "जबतक कुंडलिनीका संपूर्ण जागरण नहीं होता तबतक मुक्ति नहीं होती।....तात्पर्य यह है कि सांख्यनिर्दिष्ट साधनासे जीव तटस्थ भावको प्राप्त करके ऊर्ध्व उत्थित नहीं हो सकता। तटस्थबिंदु ऊर्ध्वबिंदुके आकर्षणकी सीमाके बहिः प्रदेशमें अवस्थित रहनेके कारण सहस्रारके मार्गको नहीं प्राप्त कर सकता। उस समयमें उसका संपूर्ण आवरण तिरोहित नहीं होता, क्योंकि कुंडलिनी आंशिक रूपसे प्रसुप्त रहती है। शैवागमके मतसे यह एक 'विज्ञानकल' अवस्था है। भक्ति ( वैधी ) एवं उपासनाके बलसे अखंडसत्त्वकी धाराके साथ, अर्थात् आदिसूर्यकी एक रश्मिके साथ, खंड-सत्त्व संयोगको प्राप्त होता है और क्रमसे उसीं रश्मिके आश्रयसे केंद्रके निकटवर्ती होता रहता है। खंड-सत्त्वमें भावके विकसित होनेपर सहस्रदल कमलकी नित्यविभूतिका प्रत्यक्ष अनुभव होता है। वह भाव धीरे-धीरे प्रगाढ होता हुआ विधि-कोटिको याने वैधी भक्तिको अतिक्रम करके रागरूपमें परिणत होता है। रागका भी क्रमिक विकास है। ऐश्वर्यावस्थाका अनुभव दास्यभावपर्यंतही होता है। इसके अनन्तर दास्यभावके अतिक्रान्त होनेपर माधुर्यावस्थाका विकास होता है। यह माधुर्यावस्था सख्य, वात्सल्य और कान्तरूपसे तीन प्रकारकी होती है। इन तीनोंमें कान्तभावमेंही माधुर्यकी पराकाष्ठा है। इसके अनंतर यह कांतभाव क्रमसे महाभाव रूपमें परिणत होता है। यही महाभाव विभाव और अनुभाव प्रभृति कारणोंसे श्रृंगार रसका रूप धारण करता है, और यही आदि-रस कहा जाता है।

इस प्रकार कुंडलिनीके क्रमिक जागरणसे ऊर्ध्वबिंदुपर्यंतही जीव उत्थित होता है और केंद्रमें प्रविष्ट होतेही लीलाभूमिके अपर प्रांतको अपने आयत्त कर लेता है। इस समयमें साम्यभावसे स्थिती रहती है और यही उपशम वा शांतावस्था है। किसी किसी शास्त्रके परिभाषानुसार यही निर्वाण पद कहा जा सकता है। अतएव शुद्ध सत्त्वके प्रकट होनेपर श्रृंगाररसही सब रसोंका सारभूत एवं आदिरस है, यह बिना प्रयासकेही सिद्ध होता है। गुणातीत अवस्थामें इसका आस्वाद भी नहीं रहता।

शांत और शृंगार इन दोनो रसोंमें कौन आदि रस है, इस विषयमें साधक-

संप्रदायमें बडा मतभेद चलता है। लीलानुरागी संप्रदाय शृंगारकोही आदिरस कहता है। गौडीय वैष्णवगण शांतरसको सर्वापेक्षा निम्न मानते हैं। मुख्य बात यह है कि शान्त और श्रृंगार दोनोंही रसास्वादनकी प्रांतावस्था है। काश्मीरीय शैवाचार्य यद्यपि शांतरसको प्रधान बतलाते हैं तथापि वे शिव-शक्तिके सामरस्यरूपमें श्रृंगारका शांतके साथ समन्वय करते हैं, यहाँतक कि चैतन्य महाप्रभुके रसतत्त्वकी शिक्षा भी श्रृंगाररसकीही प्राधान्यत: व्यापिका है।" (पृ. ३१४,३१५)

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शांतरसाला प्राधान्य देऊन जी भावकक्षा ज्ञानेश्वरीत प्रकट केली आहे तिचे दर्शन घेताना आपणास असे प्रतीत होते की, जागृत शक्तीची ऊर्ध्वगमनाला होणारी सुरुवात हाच श्रृंगाररसाचा आविर्भाव असून तीच शांतीच्या अंकुराला व तिचा अखेरपर्यंत विस्तार करण्यास कारणीभूत होते. या दृष्टीनेच त्यांनी असे म्हटले आहे की–

**तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे। आणि शांतीचा अंकुर फुटे।**
**मग विस्तार बहु प्रगटे। आत्मबोधाचा ॥४.१८९॥**

**मग जेउती वास पाहिजे। तेउती शांतीची देखिजे।**
**तेथ आपपरु नेणिजे। निर्धारितां ॥१९०॥**

ज्ञानाची हृदयात प्रतिष्ठा म्हणजे शक्ती कुंडलिनीची जागृती होय; कारण ही शक्तीच सर्व ज्ञानाची जननी असून तीच जागृत अवस्थेत ज्ञानाचा अर्थात् आत्मबोधाचा विस्तार करते, हे आपण पूर्वीच पाहिले आहे. अर्थात् शक्तीचा हा श्रृंगारच शेवटी साधकाला सर्वत्र शांती किंवा शांतरस भरला असल्याची अनुभूती आणून देतो, हे अगदी खरे आहे. येथे एक गोष्ट सर्व वाचकांनी प्रामुख्याने लक्षात ठेवली पाहिजे की, येथे ज्या श्रृंगारासंबंधी चर्चा चालू आहे तो अप्राकृत श्रृंगार आहे; कारण अप्राकृत सौंदर्य व अप्राकृत काम यांच्या सामरस्यामधूनच शुद्ध किंवा अप्राकृत श्रृंगार प्रकट होत असतो व तोच शांतरसाची पृष्ठभूमी असतो. अर्थात् प्राकृत सौंदर्य व प्राकृत कामाची साम्यावस्था म्हणजे मलिन श्रृंगार होय. हा श्रृंगार शांतरसाची पृष्ठभूमी होऊ शकत नाही; कारण तो क्षणजीवी व परावलंबी असतो. या दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**निश्चळत्वाची भावना। जरी नव्हेचि देखें मना।**
**तरी शांति केवीं अर्जुना। आपु होय ॥२.३४४॥**

**जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं। तेथ सुख विसरोनि न रिगे कहीं।**
**जैसा पापियाच्या ठायीं। मोक्षु न वसे ॥३४५॥**

**तरी आत्मयोगें आथिला। जो कर्मफळाशीं विटला।**
**तो घर रिघोनि वरिला। शांति जगीं ॥५.७१॥**

ज्यावेळी साधकयोग्याची श्रृंगाररसाची अर्थात् जागृत कुंडलिनी शक्तीच्या नानाविध क्रियांची परिपूर्ती होते त्यावेळी शांतरसाची तो साधक प्रत्यक्ष मूर्ती कसा होतो व शांतीची लेणी तो कसा घालतो, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी आत्मयोगें आथिला । जो कर्मफळाशीं विटला ।
तो घर रिघोनि वरिला । शांति जगीं ॥५.७१॥
जें ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले ।
जे शांतीसी आले । पालव नवे ॥९.१९०॥
जे आघवांचि करणीं । लेइले शांतीचीं लेणीं ।
जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥१९३॥
मग माझी नित्य शांती । तया दशा तेचि कांती ।
किंबहुना जिती । माझेनि जीवें ॥४२९॥

हा जो शांतीचा अनुभव आहे तो येण्यासाठी जागृत शक्तीच्या शृंगारामुळे कर्मदशा संपुष्टात येऊन फलत्याग घडावा लागतो. कर्म म्हणजे जागृत शक्तीचा विलास होय, हे आपण मागे पाहिलेच आहे. या दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

कर्म जेथ दुरावे । तेथ फलत्यागु संभवे ।
त्यागास्तव आंगवे । शांति सगळी ॥१२.१३९॥
म्हणौनि यावया शांती । हाचि अनुक्रमु सुभद्रापती ।
म्हणौनि अभ्यासुचि प्रस्तुतीं । करणें एथ ॥१४०॥

अभ्यास म्हणजे सिद्धयोगाचे साधन होय हे आपण मागे सिद्ध केले आहे. या अभ्यासामुळेच ज्ञान, ध्यान, कर्मफलत्याग इत्यादि सुषुम्नेतील शक्तीचे श्रृंगारविशेष सिद्धीस जाऊन शेवटी शांतीचा आविष्कार होतो, हे सांगताना ते म्हणतात–

अभ्यासाहूनि गहन । पार्था मग ज्ञान ।
ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे ॥१२.१४१॥
मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासोनि चांगु ।
त्यागाहूनि भोगु । शांतिसुखाचा ॥१४२॥
ऐसिया या वाटा । इहींचि पेणा सुभटा ।
शांतीचा माजिवटा । ठाकिला जेणें ॥१४३॥
तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं ।
मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप ॥१६.१४०॥
ते शांति पैं गा सुभगा । संपूर्ण ये तयाचिया आंगा ।
तैं ब्रह्म होआवयाजोगा । होय तो पुरुष ॥१८ १०८६॥
पुनवेहुनी चतुर्दशी । जेतुलें उणेपण शशी ।
कां सोळे पाऊनि जैसी । पंधरावी वानी ॥१०८७॥

सागरींही पाणी वेगें । संचरे तें रूप गंगे ।
येर निश्चळ जें उगें । तें समुद्र जैसा ॥ १०८८ ॥
ब्रह्मा आणि ब्रह्महोतिये । योग्यते तैसा पाडु आहे ।
तेंचि शांतीचेनि लवलाहें । होय तो गा ॥ १०८९ ॥

या ओव्यातून श्रृंगारसाची अनुभूती ही चतुर्दशीचा चंद्र, सोन्याचा पंधरा आणे कस व गंगेचा समुद्रातील वेग या प्रमाणे असून शांतरस हा पौर्णिमेचा चंद्र, सोन्याचा सोळा आणे कस व समुद्र याप्रमाणे आहे हे सुचवून, श्रृंगारातच शांती अनुस्यूत असते, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. एवढेच नव्हे; तर "येथ एकचि लीला तरले ॥७.९७॥" असे म्हणून त्यांनी ही अनुभूती अधिक उच्च पातळीवर व्यापक स्वरूपाने व्यक्त केली आली आहे. या संबंधी " भारतीय संस्कृति और साधना," खंड पहिला, या ग्रंथात म. म. श्रीगोपीनाथ कविराज हे "एक अलौकिक भक्त सिद्धिमाता" या लेखात असे म्हणतात की, " लीला स्वरूपशक्तिका खेल है। उसमें संधिनी,संवित् और ल्हादिनी-इन तीन शक्तियोंकाही व्यापार रहता है। साधनके विविधमार्ग जगत्में प्रसिद्ध हैं, यह सत्य है; किंतु वास्तविक सत्य-मार्ग कुंडलिनीका जागरण हुए बिना खुलता नहीं। यहाँ तक कि उसका पतातक नहीं लगता। सत्यमार्गका अवलंबन किये विना कोईभी पूर्ण ब्रह्मज्ञानकी अवस्थामें पहुँच सकेंगे, ऐसी संभावना नहीं है। इससे जीवोंकी अनादि मोहनिद्रा टूट जाती है एवं वे जाग उठते हैं। आत्माके जाग उठनेपर शिवका निद्रारूप महायोग भंग हो जाता है। तब चित्तकी मलीनता दूर हो जाती है। कुंडलिनीके जागे बिना तथा आत्माके उद्‌बुद्ध हुए विना चित्तशुद्धि संभव नहीं है।...कुंडलिनीके जागनेके बाद महामिलन तथा साधन-पथ अत्यंत दुर्गम है। उस समय अहंकार, प्रलोभन तथा विविध प्रकारकी विभीषिकाएँ इस पथमें विघ्नरूपमें प्रकट होती है।" अशा प्रकारच्या या स्वरूपशक्तीच्या खेळाला शास्त्रकारांनी लीला, अप्राकृत शृंगार, शिवशक्ती महामिलन प्रसंग किंवा विविध रूपके देऊन गौरविले आहे. त्यामुळे अनुभूतीची कक्षा किंवा क्षेत्र विस्तृत असले तरी शांतावस्थेची प्राप्ती हे या सर्व अनुभूतींचे सार आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " कल्पना निमे, प्रवृत्ती शमे, आंग मन विरंमे, आठवण हारपे, निद्रा केउती गेली? ॥६.२१२,२१३॥ तेचि कल्पितें मुद्दल जाये। तें असे नाहीं हें कें आहे ? ॥९.९२॥" व "मावळवीत विश्वभासु ॥१६.१॥" या सर्वांना अनुभूतीच्या वोधसागराचे कल्लोळ ॥९.९३॥ असे म्हटले असून शेवटी प्रतीतिवोधसागरीं। तूं आपणपेयातें कल्लोळु एक करीं। मग जंव पाहासी चराचरीं तव तूंचि आहासी ॥९.९३॥" असे सांगितले आहे. सर्व अनुभूतींचे हे मर्म आहे. हीच शांती होय व हेच सर्व रहस्य होय.

आता सिद्धयोग साधनाची दीक्षा घेतल्यावर जागृत शक्तीमुळे साधकाला

साधनात कोणत्या क्रिया होतात, याचा विचार करावयाचा आहे. शक्ती जागृत झाल्यावर साधकाला ज्या क्रिया होतात त्या इतक्या विविध प्रकारच्या आहेत की, त्यांची गणना व वर्गीकरण करणें हे केवळ अशक्यप्राय आहे. असे असले तरी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या क्रिया जशा सूचित केल्या आहेत, त्या दृष्टीनें सूत्र पकडून, त्यांचे सविस्तर वर्णन शास्त्रांतरी कसे केले आहे हे पाहू.

सिद्धयोगाचे साधन करण्यासाठी साधक आसनावर बसल्यावर त्याला ज्या पहिल्या प्रकारच्या क्रिया होतात, त्यात अष्टसात्त्विकभाव प्रथम कसे उत्पन्न होतात, याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

जेथ स्मरतेनि आदरें। सबाह्यच सात्त्विकें भरे।
जंव काठिण्य विरे। अहंभावाचें ॥ ६.१८७ ॥

ज्यावेळी साधक सद्गुरूंचे स्मरण करून आसनावर डोळे मिटून स्तब्ध बसतो तेव्हा त्याचे अंत:करण व शरीर अष्टसात्त्विक भावांनी भरून जाते. यामुळे त्याच्या ठिकाणी अहंकाराचा, अहंभावाचा अर्थात् 'अ' म्हणजे शिव व 'हं' म्हणजे शक्ती ही भिन्न असल्याचा म्हणजे द्वैताचा जो कठिणपणा असतो, तो विरून जातो.

संजयाने श्रीकृष्णार्जुन संवाद ऐकल्यामुळे त्यालाही शब्ददीक्षा आपोआप प्राप्त होऊन त्याने या संवाद-संगमात स्नान करून आपल्या अहंतेचे तीळदान कसे केले, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

ऐसा श्रीकृष्णार्जुन-। संवादसंगमीं स्नान।
करूनि देतसे तीळदान। अहंतेचें ॥ १८.१६२० ॥
तेथ अवसरें आनंदें। अलौकिकही कांहीं स्फुंदें।
श्रीकृष्ण म्हणे सद्गदें। वेळोवेळां ॥ १६२१ ॥
या अवस्थांची कांहीं। कौरवांतें परी नाहीं।
म्हणौनि रायें तें कांहीं। कल्पावें जंव ॥ १६२२ ॥
तंव जाला सुखलाभु। आपणपां करूनि स्वयंभु।
बुझाविला अवष्टंभु। संजयें तेणें ॥ १६२३ ॥

अशा प्रकारे शब्ददीक्षेमुळे संजयाला अष्टसात्त्विकभावांच्या जागृतीची अलौकिक अवस्था प्राप्त झाली. त्याला प्राप्त झालेल्या या अष्टसात्त्विकभावांचे सविस्तर वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

येतुलें हें वाड सायासें। जंव बोलत असे वृढमानसें।
तंव न धरवेचि आपुलिया ऐसें। सात्त्विकें केलें ॥ ९.५२६ ॥
चित्त चाकाटलें आटु घेत। वाचा पांगुळली जेथिंची तेथ।
आपाद कंचुकित। रोमांच आले ॥ ५२७ ॥

अर्धोन्मीलित डोळे । वर्षताति आनंदजळें ।
आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरी कांपे ॥ ५२८ ॥
पैं आघवाचि रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळी ।
लेइला मोतियांची कडियाळीं । आवडे तैसा ॥ ५२९ ॥
ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ आटणी हों पाहे जीवदशे ।
तेथ निरोपिलें व्यासें । तें नेदीच हों ॥ ५३० ॥
आणिक श्रीकृष्णाचें बोलणें । घोकरी आलें श्रवणें ।
कीं देहस्मृतीचा तेणें । वापसा केला ॥ ५३१ ॥
तेव्हां नेत्रींचें जळ विसर्जी । सर्वांगींचा स्वेदु परिमार्जी ।
तेवींचि अवधारा म्हणे हो जी । धृतराष्ट्रातें ॥ ५३२ ॥

या सर्व क्रिया कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने कशा घडतात हे "सहाव्या प्रकरणातील" "भक्तियोगाचा योगमार्ग" या मुद्यात "भक्तिरसामृतसिंधू' या ग्रंथातील श्रीस्वरूपगोस्वामींच्या म्हणण्याचा आधार देऊन स्पष्ट केले आहे. येथे फक्त हे सूचित करावयाचे आहे की, भक्ती हा जागृत शक्तीचा सात्त्विक श्रृंगार आहे. संजयाच्या ठिकाणी तो ज्या पद्धतीने उपस्थित झाला तसेच त्याचे प्रकटीकरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे. त्याच्या या क्रियांचे व स्थितीचे त्याच्या मुखातूनच आणखी एका ठिकाणी वर्णन करताना ते म्हणतात–

जी मिळतां दोन्ही उदकें- । माजीं लवण वारूं ठाके ।
कीं तयासींही निमिखें । तेंचि होय ॥ १८.१६०१ ॥
तैसें श्रीकृष्ण अर्जुन दोन्ही । संवादले तें मनीं ।
धरितां मजही वानी । तेंचि होतसे ॥ १६०२ ॥
ऐसें म्हणे ना मोटकें । तंव हिरोनि सात्त्विकें ।
आठव नेला नेणों कें । संजयपणाचा ॥ १६०३ ॥
रोमांच जंव फरके । तंव तंव आंग सुरके ।
स्तंभ स्वेदातें जिके । एकला कंपु ॥ १६०४ ॥
अद्वयानंदस्पर्शें । दिठी रसमय जाली असे ।
ते अश्रु नव्हती जैसें । द्रवत्वचि ॥ १६०५ ॥
नेणों काय न माय पोटीं । नेणों काय गुंफे कंठीं ।
वागर्था पडत मिठी । उससांचिया ॥ १६०६ ॥
किंबहुना सात्त्विकां आठां । चाचरु मांडतां उमेठा ।
संजयो जालासे चोहटा । संवादसुखाचा ॥ १६०७ ॥
तया सुखाची ऐसी जाती । जे आपणचि धरी शांती ।
मग पुढती देहस्मृती । लाधली तेणें ॥ १६०८ ॥

वर कथन केल्याप्रमाणे साधन करताना साधकाला अष्टसात्त्विकभावांच्या ज्या ज्या क्रिया होतात त्या त्या क्रियांपासून त्याला परमानंदाची प्राप्ती अद्वयानंदाच्या स्पर्शाने होत असते; कारण या सर्व क्रिया आनंदाला व शांतीला पोषक असून त्यांपासून अद्वैत अवस्थेचीच प्राप्ती क्रमशः साधकाला होत जाते. या अर्थानेच "हसत्युल्लसति प्रीत्या क्रीडते मोदते तदा ॥६.६७॥" असे "योगशिखोपनिषदात" म्हटले आहे. श्रीमुकुंदराजांनी "परमामृत" ग्रंथात वेदान्ताचे निजवर्म श्रीगुरुमुखाने शक्तिपात होऊन साधकाला मिळाल्यावर अष्टसात्त्विकभावांच्या क्रिया त्याच्या ठिकाणी प्रकट होऊन अद्वैत त्याच्या पोटी कसे जिरते व आनंदाची प्राप्ती होऊन तो कसा कृतार्थ होतो, हे सांगताना असे म्हटले आहे की--

सांडूनि आपुले जाणिवेसी । जें स्वस्थ उगा राहसी ।
तें काय आहे मग जाणसी । निःसंगपणें ॥ ११.१८ ॥
विसरे प्रकाशे स्वरूप । हारपे सांपडे आपेंआप ।
ऐसा करिता साक्षेप । मन स्थिरावे ॥ २८ ॥
निवांत भोगी स्वरूप । डुल्लत आनंदें आपेंआप ।
मग तया सुखाचें माप । कवण करी ॥ २९ ॥
स्वेदकंपादि उठती । अष्टसात्त्विक भाव प्रगटती ।
पावे साम्राज्यसंपत्ति । रंक जैसा ॥ १२.१ ॥
चित्त चैतन्यीं हारपे । उरिजे ज्ञप्तिस्वरूपें ।
अखंडित आपआपें । ब्रह्मानंद ॥ २ ॥
तया सुखाचेनि समरसें । पावे सुलीन दशे ।
तें बोलावें कैसें । अनुभवी जाणती ॥३॥
जैसें अमृत चाखे आपुली चवी । तैसें स्वसुख अनुभवीं ।
तेथें कोण आठवी । संसारासी ॥४॥
वोळे स्वानंदाचा घन । दाटे सुख परिपूर्ण ।
तयामाजी विवेक सुजाण । हारपोनि जाय ॥५॥
अहंता स्वरूपीं गळे । विषयतृष्णा मावळे ।
इंद्रियांचे लळे । क्रियेविण पूर्ण होती ॥६॥
महासुखाचे अरुवारीं । आलिंगी स्वानुभूती सुंदरी ।
ज्ञानमात्र इयापरी । स्वस्वरूप भोगी ॥७॥
निरसितां नेणीव । स्वरूपीं समरसे जाणीव ।
मग एकछत्री राणीव । योगियासी ॥८॥
सदा स्वानंदाचे सोहळे । विषयविजाती वितळे ।
स्वरूपसुखाचेनि मेळें । इंद्रियां तृप्ती ॥९॥

परमसुखाचेनि भरें । एकहि स्फूर्ती न स्फुरे ।
कार्यजाती विसरे । निमिषांत ॥१०॥

करूनि यज्ञाचिया कोडी । उभविती स्वर्गाची गुढी ।
तें सुख कीजे कुर्वंडी । या ब्रह्मसुखासी ॥११॥

आनंद आनंदासी घोंटी । बोलतां परेसी पडे मिठी ।
मुक्यानें सुखाच्या गोष्टी । केंवि कीजे ॥१२॥

खुंटलें मनाचे जाणणें । तें सुख अनुवादावें कवणें ।
हें अनुभवीं तोचि जाणे । इतरां टकमक ॥१३॥

ऐशी पावोन योगखुण । स्वानंद भोगितो परिपूर्ण ।
तया योगिया न घडे शीण । संसाराचा ॥ १३.१ ॥

यावरून हे स्पष्ट होते की, शक्तिपातामुळे साधकाच्या ठिकाणी ज्या अष्टसात्त्विकभावादि क्रिया प्रकट होतात त्या एखाद्या भिकाऱ्याला साम्राज्याची संपत्ती प्राप्त व्हावी त्याप्रमाणे मोलाच्या व श्रेष्ठतम असतात, याची जाणीव साधकाने निरंतर बाळगली पाहिजे; परंतु भिकाऱ्याला जशी साम्राज्याची किंमत कळत नाही त्याप्रमाणे सामान्य माणसाला व क्वचित्प्रसंगी साधकालाही या क्रियांची किंमत कळत नाही त्याचप्रमाणे सद्गुरूंकडून शक्तिपात होऊन जोपर्यंत अष्टसात्त्विकभावादि क्रिया शरीरात उत्पन्न होत नाहीत व त्यांची अनुभूती येत नाही तोपर्यंत कितीही विवेचन केले तरी इतरांना ज्ञानेश्वरी, अमृतानुभव इत्यादि सर्व ग्रंथ व त्यातील अद्वैतवेदान्त या बाबतीत नुसते टकमक पाहवे लागते हेच खरे.

" कुलार्णव तंत्राच्या आठव्या व चौदाव्या उल्लासात," "सूतसंहितेच्या चतुर्थ खंडातील पस्तीसाव्या अध्यायावरील श्रीविद्यारण्यस्वामींच्या टीकेत" व "शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेच्या पंधराव्या अध्यायात" आनंद, कंप, आसनापासून उत्थान, घुमणे, डोलणे, निद्रा, मूर्च्छा, देह धरणीवर पडणे, घाम येणे, रोमांच उभे राहणे, गाणे, जमिनीवर लोळणे, रडणे, जांभया देणे, भाषण करणे इत्यादि नानाविध क्रिया कशा होतात, याचे वर्णन आले असून, ते मागे आपण पाहिले आहे. या व इतर अनेक प्रकारच्या क्रिया जागृतशक्तीच्या अविभाज्य घटक आहेत, हे निःसंशय होय. जागृत शक्ती साधकाच्या कोटी कोटी जन्मांचे संस्कार छिन्नभिन्न करण्याकरिता उद्युक्त झाल्यामुळे या क्रियांच्या रूपाने ती नानाप्रकारची रूपे धारण करताना दिसते. प्रत्येक जीवाची कर्मगती व संस्कार भिन्न असल्याने या क्रियाही भिन्नरूपात प्रकट होतात. अर्थात् काही क्रिया समानतेने होतात हेही खरे आहे. संजयाप्रमाणेच अर्जुनाच्या ठिकाणी अष्टसात्त्विकभावांच्या क्रियांद्वारा अद्वैतस्थिती कशी प्रकट झाली हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

एवं करोनियां प्रश्न । नसतेंचि अर्जुनपण ।
आणूनियां जालें पूर्णपण । तें बोलवी स्वयें ॥१८.१५४९॥
मग क्षीराब्धीतें सांडितु । गगनीं पुंजु मंडितु ।
निवडे जैसा न निवडितु । पूर्णचंद्रु ॥१५५०॥
तैसा ब्रह्म मी हें विसरे । तेथ जगचि ब्रह्मत्वें भरे ।
हेंही सांडी तरी विरे । ब्रह्मपणही ॥१५५१॥
ऐसा मोडतु मांडतु ब्रह्में । तो दुःखें देहाचिये सीमे ।
मी अर्जुन येणें नामें । उभा ठेला ॥१५५२॥
मग कांपतां करतळीं । दडपूनि रोमावळी ।
पुलिका स्वेदजळीं । जिरऊनियां ॥१५५३॥
प्राणक्षोभें डोलतया । आंगा आंगचि टेकया ।
सूनि स्तंभु चाळया । भुलौनियां ॥११५४॥
नेत्रयुगुळाचेनि वोतें । आनंदामृताचें भरितें ।
वोसंडत तें मागुतें । काढूनियां ॥११५५॥
विविधा औत्सुक्यांची दाटी । चीप दाटत होती कंठीं ।
ते करूनियां पैठी । हृदयामाजीं ॥११५६॥
वाचेचें वितुळणें । सांवरूनि प्राणें ।
अक्रमाचें श्वसणें । ठेऊनि ठायीं ॥११५७॥
मग अर्जुन म्हणे काय देवो । पुसताति आवडे मोहो ।
तरी सकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपुला ॥११५८॥

अशा प्रकारे कंप, स्वेद, रोमांच, प्राणक्षोभ, स्तंभ, अश्रुपात, घाम, औत्सुक्य, उत्कंठा, विस्कळित वाचा, श्वासोच्छवासाची क्रमविरहित गती इत्यादि ज्यात प्रकट होतात तोच खरा प्राणायाम होय, हे सांगताना " लिंगपुराणात " सूत म्हणतात की–

मुख्यस्तु यस्त्रिरुद्घातः षट्‌त्रिंशन्मात्र उच्यते ।
प्रस्वेदकंपनोत्थानजनकश्च यथाक्रमम् ॥८.४८॥

आनंदोद्‌भवयोगार्थं निद्राघूर्णिस्तथैवच ।
रोमांचध्वनिसंविद्धस्वांगमोटनकंपनम् ॥४९॥

भ्रमणं स्वेदजन्या सा संविन्मूर्च्छा भवेद्यदा ।
तदोत्तमोत्तमः प्रोक्तः प्राणायामः सुशोभनः ॥५०॥

( प्राण व अपान या दोन प्रकारच्या वायूंच्या निरोधाला प्राणायाम म्हणतात असे सांगून सर्वश्रेष्ठ प्राणायामाचे लक्षण सांगताना सूत म्हणतात की, ) जो सर्वात मुख्य किंवा उत्तम अगर श्रेष्ठ प्राणायाम आहे त्यात तीन उद्घात असून

त्याच्या छत्तीस मात्रा असतात. या प्राणायामात यथाक्रम स्वेद, कंप व उत्थान या क्रिया उत्पन्न होतात. त्याचप्रमाणे आनंदाचा उद्भव व्हावा व योगाची सिद्धी अर्थात् स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती व्हावी म्हणून, निद्रा, घूर्णा म्हणजे शरीर डोलणे, अंगावर रोमांच उभे राहणे, अनाहत नाद ऐकू येणे, स्वतःचे शरीर नाना तऱ्हेने वाकविणे, तोडणे किंवा मोडणे, कंप होणे, सर्व शरीर भ्रमण करणे किंवा फिरणे, खूप घाम येणे व चित्शक्तीच्या सुषुम्नेतील अनावर वेगाने ज्ञानयुक्त मूर्च्छा येणे हे जेव्हा घडू लागते तेव्हा या प्राणायामालाच उत्तमातील उत्तम प्राणायाम असे म्हणतात व तेव्हाच खरा योग कशाला म्हणतात याचा अर्थ स्पष्ट होऊ लागतो.

अशा प्रकारच्या अत्युत्तम प्राणायामाचा, क्रियांचा किंवा अष्टसात्त्विकभावांचा उद्रेक " कैसें अनुग्रहाचें करणें। पार्थाचें पाहणें आणि न पाहणें। तयाही सकट नारायणें। व्यापूनि घेतलें ॥ ११.२३० ॥ " या न्यायाने भगवान् श्रीकृष्णनाथांच्या शक्तिपातानुग्रहामुळे अर्जुनाच्या ठिकाणी कसा झाला याचे अत्यंत मुलायम अशा काव्यमय भाषेत दृष्टांतांनी नटवून व सजवून वर्णन करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज म्हणतात–

तेथ एक विश्व एक आपण। ऐसें अळुमाळ होतें जें दुजेपण।
तेंही आटोनि गेलें अंतःकरण। विरालें सहसा ॥११.२४५॥

आंतु आनंदा चेइरें जाहलें। बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें।
आपाद पां गुंतलें। पुलकांचलें ॥२४६॥

वार्षिये प्रथमदशे। वोहळलया शैलांचें सर्वांग जैसें।
विरुढे कोमलांकुरीं तैसे। रोमांच जाहले ॥२४७॥

शिवतला चंद्रकरीं। सोमकांतु द्रावो धरी।
तैसिया स्वेदकणिका शरीरीं। दाटलिया ॥२४८॥

माजीं सांपडलेनि अलिकुळें। जळावरी कमळकळिका जेवीं आंदोळे।
तेवीं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें। बाहेरि कांपे ॥२४९॥

कर्पूरकर्दळींचीं गर्भपुटें। उकलतां कापुराचेनि कोंदाटें।
बुलिका गळती तेवीं थेंबुटें। नेत्रौनि पडती ॥२५०॥

उदयलेनि सुधाकरें। जैसा भरलाचि समुद्र भरे।
तैसा वेळोवेळां उर्मिभरें। उचंबळत असे ॥२५१॥

ऐसा सात्त्विकांही आठां भावां। परस्परें वर्ततसे हेवा।
तेथ ब्रह्मानंदाची जीवा। राणीव फावली ॥२५२॥

ही सर्व शक्तिपाताने प्राप्त होणाऱ्या क्रियांची लक्षणे आहेत. या दृष्टीनेच " शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेत " असे म्हटले आहे की–

शक्तिपातानुसारेण शिष्योऽनुग्रहमर्हति।
शैवधर्मानुसारस्य तन्मूलत्वात् समासतः ॥१५.१२॥
यत्र शक्तिर्न पतिता तत्र शुद्धिर्न जायते।
न विद्या न शिवाचारो न मुक्तिर्न च सिद्धयः ॥१३॥
तस्माल्लिंगानि संवीक्ष्य शक्तिपातस्य भूयसः।
ज्ञानेन क्रियया वाथ गुरुः शिष्यं विशोधयेत् ॥१४॥
लक्षणं शक्तिपातस्य प्रबोधानंदसंभवः।
सा यस्मात् परमाशक्तिः प्रबोधानंदरूपिणी ॥१६॥
आनंदबोधयोर्लिंगमंतःस्फुरणविक्रियाः।
यथास्यात्कंपरोमांचस्वरनेत्रांगविक्रियाः ॥१७॥

या श्लोकांचा अर्थ सांगता सांगता त्यावर टीका करताना श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी " महायोग विज्ञान " या ग्रंथात असे म्हटले आहे की "अतएव शैवधर्ममें यह प्रत्यक्ष है कि शिष्यमें महेश्वरकी शक्तिका प्रकाशही शिष्यके कल्याणका मूल कारण हैं, इसलिये शक्तिसंचारके अनुसारही शिष्य फललाभ करता है। शक्तिपात नहीं होनेसे शिष्यकी शुद्धि नहीं होती और न विद्या होती है और न शैवधर्म का आचार अष्टांग योग होता है। जहाँ शक्तिका पात नहीं होता वहाँ मुक्ति भी नहीं हो सकती और न किसी प्रकारके कर्म धर्मकी सिद्धि होती है, इसलिए गुरु दीक्षा देकर देखें कि शक्तिपातसे जो नानाप्रकारकी योग क्रियायें तथा आनंद और प्रबोध होते हैं वे सब लक्षण शिष्यमें होते हैं या नहीं। यदि न हुए हों तो चेष्टा करके प्रकाश करके शिष्यको उसका अनुभव कराना चाहिये ताकि उसकी कुंडलिनी शक्ति स्वयं उनमें आवश्यकतानुसार क्रियायें करती रहे और वह सर्वदाकाल उसका बोध करता रहे। इसी तरह गुरुका कर्तव्य है कि ज्ञानसे अथवा योगक्रियासे शिष्यके अंतःकरणकी शुद्धि करके उसमें ज्ञान और योग प्रकाश करें। जबतक शिष्यका ज्ञान स्वयमेव प्रकाशित न हो और योगकी क्रियायें स्वतः न हों तबतक गुरुका गुरुपना सिद्ध नहीं होता है।

श्रीशंभुके शक्तिपातका लक्षण यह है कि, शिष्यमें आनंद और प्रबोधका उद्‌भव होता है; क्योंकि यह परमाशक्ति आनंद और प्रबोध स्वरूपिणी है। प्रबोध और आनंदसे शिष्यको अंतःस्फुरणरूप विक्रियासे हठयोग, मंत्रयोग, लययोग आदिकी नाना प्रकारकी योगक्रियायें तथा कंप, रोमांच और स्वरनेत्रादि अंगकी विक्रियायें होती हैं, अतएव इन लक्षणोंसे शिष्य भी शक्तिमान् गुरुकी परीक्षा कर सकता है कि गुरु सामर्थ्यवाले हैं या सामर्थ्यहीन हैं। वह अपनेमें शक्तिका संचार हुआ कि नहीं,यह जानकर निश्चिन्त हो सकता है और गुरुभी शिष्यमें परमेश्वरकी शक्तिके

प्रकाशकी ये सब बाह्य, आभ्यंतर क्रियायें देखकर परीक्षा करके निश्चिन्त हो सकते हैं। ईश्वरकी शक्ति गुरुद्वारा शिष्यमें संचारित होनेसे शिष्य प्रबोध और आनंद लाभ करता है। शिष्यको एक प्रकारका अपूर्व ज्ञान एवं निर्विषय परमानंद सुखका अनुभव होता है। यह लक्षण परम और चरम है। इसलिए हरएक शिष्य तात्कालिक इसका ठीक ठीक अनुभव नहीं कर सकता। परंतु अंतःस्फुरणरूप नानाविध आभ्यंतरिक क्रियाओंका अनुभव करता है। उसमें प्रबोध और आनंद मिश्रित रहता हैं, कि जिससे शिष्य समझ सकता हैं कि, शरीरमें कोई शक्ति प्रवेश कर गई है। उससे विद्युत्स्पर्श सदृश स्फुरण चमकका अनुभव होता है और कंप, रोमांच, स्वरभंग, नेत्रविकृति एवं सिरके बालका कंपन होता है, अथवा शरीर टूटने लगता है या भारी हो जाता है अथवा हाथ पैर ढीले हो जाते हैं और मूलाधार पृष्ठ, हृदय एवं मस्तकमें भारीपनेका बोध होता है और शरीर हिलने झूलनेको चाहता है। इच्छा शक्तिको छोड देनेमे भूमिमें पतन और अंगकी विक्रिया चेष्टायें होने लगती हैं अथवा श्वासप्रश्वास बढ जाते हैं या निद्राकीसी अवस्था होकर चित्त किंकर्तव्यविमूढ हो जाता है। शरीरमें चेंटी लगनेका अनुभव होता है अथवा शरीर शून्य हो जाता है; मन प्राण निष्क्रिय हो जाते हैं या शरीरका उत्ताप बढ जाता है और निद्रा, सुषुप्ति और मूर्च्छाकिसी अवस्था भी हो जाती है अथवा सिरमें चक्कर आने लगते हैं। भांग जैसा नशा चढता है और मनके संकल्प बहुत कम हो जाते हैं अथवा बडी स्फूर्ति आ जाती है जिससे आनंद आवेशमें साधक नानाप्रकारकी योगक्रियायें कर जाता है।" ( २७१ ते २७४ )

हठयोगशास्त्रात कुंडलिनी शक्ती जागृत करण्याकरिता प्राणायाम हेच मुख्य साधन सांगितले आहे. मात्र सिद्धयोगशास्त्रात सद्‌गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत होत असल्याने ज्या ज्या वेळी कुंडलिनी शक्तीला सुषुम्ना मार्गातून ब्रह्मरंध्रात जाण्याची आवश्यकता उत्पन्न होते त्या त्या वेळी कुंडलिनी महादेवी स्वतः साधकाकडून योगशास्त्रात कथन केल्याप्रमाणे नाना प्रकारच्या क्रियांबरोबर वरीलप्रकारे प्राणायाम करविते. त्यामुळे साधकाचे शरीर, मन व प्राण स्वस्थ होऊन त्याला विनासायास आपली अभीष्ट सिद्धी प्राप्त होते. याचप्रमाणे कुंडलिनी महाशक्ती साधनात साधकाकडून कित्येक प्रकारचे प्राणायाम करविते. सूर्यभेदन, उज्जायी, सीत्कारी, शीतली, भस्त्रिका, भ्रामरी, मूर्च्छा व प्लाविनी हे आठ प्रकारचे कुंभक प्राणायाम आहेत. बाह्याभ्यंतर स्तंभवृत्ती व केवल कुंभक हेही प्राणायाम आहेत. तेही साधकाला आवश्यकतेनुसार स्वतः आपोआप होतात. या सर्वांचे प्रत्यक्ष ज्ञान महायोगाचे साधन करण्यानेच होते. या प्राणायामामुळेच साधकाला पंचमहाभूतांच्या तत्त्वसमूहाचे ज्ञान आतून स्फुरू लागते. साधक जन्मजन्मांतरी ज्ञान, योग, भक्ती, मंत्र, जप, देवीदेवतांची पूजा इत्यादि साधने मोक्षप्राप्तीसाठी करीत आलेला असतो. प्राणायामाने संस्कारांची पुटे गळून पडू लागली की, किंवा संस्कार प्रकट होत गेले की, पूर्व जन्मातील

संस्कारानुसार साधन प्रकट होत जाते. जर पूर्वजन्मी ज्ञानाचे साधन केले असेल तर त्याला हे सिद्धयोगाचे साधन करताना प्राणायामादि ज्या क्रिया होतात त्यामुळे आत्मतत्त्वाच्या एकत्वाचा अनुभव येऊ लागतो. योगसाधनाचे संस्कार यमनियमादि अष्टांग योगातील क्रिया होऊन प्रकट होतात. चित्तचांचल्य, चित्तक्षोभ, भय, त्रास, शंका, संशय, उग्रता, गर्व, प्रफुल्लता, विषाद, स्वप्नयुक्त निद्रा, सुषुप्ती, मूर्च्छा, भाव इत्यादि भगवत्प्रेमाच्या लक्षणांद्वारा भक्तिसाधनाचा आविष्कार होतो. पूर्वजन्मात मंत्रयोगाचा अभ्यास केलेला असल्यास वरील भक्तिमार्गाच्या लक्षणांबरोबरच मुखातून नाना तऱ्हेचे मंत्र किंवा तत्सदृश उच्चार प्रकट होऊन त्याला देवदेवतांची दर्शने होतात.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी, सिद्धयोगाच्या साधनात मूलबंध लावल्यावर उड्डीयान व जालंधरबंध हे जागृतशक्ती कुंडलिनीमुळे आपोआप लागतात, हे सांगितल्याचे आपण मागे पाहिले आहे. क्रियांचा हा दुसरा प्रकार आहे. या बंधांबरोबर इतरही बंध व मुद्रा साधकाला होत असतात या सर्वांना मुद्रा संबोधून त्यांची नावे व संख्या सांगताना महर्षी घेरंड यांनी "घेरंडसंहितेत" असे म्हटले आहे की–

> महामुद्रा नभोमुद्रा उड्डीयानं जलंधरम् ।
> मूलबंधं महाबंधं महावेधश्च खेचरी ॥३.१॥
> विपरीतकरिणी योनि वज्रोली शक्तिचालिनी ।
> तडागी मांडुकी मुद्रा शांभवी पंचधारणा ॥२॥
> अश्विनी पाशिनी काकी मातंगी च भुजंगिनी ।
> पंचविंशति मुद्रावै सिद्धिदाश्चेहयोगिनाम् ॥३॥

घेरंड ऋषी म्हणतात की, "महामुद्रा, नभोमुद्रा, उड्डीयान, जालंधर, मूळबंध, महाबंध, महावेध, खेचरी, विपरीतकरणी, योनी, वज्रोली, शक्तिचालिनी, तडागी, मांडुकी, शांभवी, पार्थिवी आम्भसी, वैश्वानरी, वायवी, आकाशी, अश्विनी, पाशिनी, काकी, मातंगी व भुजंगिनी या पंचवीस मुद्रा योग्यांना सिद्धी देणाऱ्या आहेत. सिद्धयोगाच्या साधनात हे बंध व या मुद्रा साधकाला पूर्वसंस्काराप्रमाणे व आवश्यकतेप्रमाणे आपोआप होतात. साधनात होणाऱ्या भिन्न भिन्न आसनांचे मुख्य कार्य शरीर स्थिर करून दहा वायूंना उत्तम प्रकारे चालविणे हे आहे व मुद्रांचे प्रधान कार्य शरीर दृढ करून प्रावायूला शरीराच्या विशेष भागात स्थिर करणे हे असून त्याच्या योगाने मन धारणा करण्यास समर्थ होते

साधन होत असताना वरील मुद्रा पुढीलप्रकारे शरीराच्या निरनिराळ्या भागात होतात. मूलाधारात व योनिस्थानामध्ये अश्विनीमुद्रा, मूलबंध व महाबंध होतो. गुदद्वाराचे संकोचन व विकास झाल्याने ह्या क्रिया होतात. बेंबी व पोटाच्या ठिकाणी उड्डीयान बंध, तडागी व सारंगी मुद्रा होतात. यांचे कार्य

पोटात वायू भरणे व सोडणे हे आहे. कंठ संकोचामुळे जालंधर बंध लागतो.डोळ्यांच्या ठिकाणी त्राटक व शांभवी मुद्रा होते. कानात नादश्रवण, षण्मुखीमुद्रा व भ्रामरी होते. जिभेच्या ठिकाणी खेचरीमुद्रा, नभोमुद्रा व मांडुकीमुद्रा होते. मुखात भुजंगी, काकी व योनिमुद्रा होते. मस्तकाच्या ठिकाणी विपरीतकरणीमुद्रा आणि सर्वांगाच्या ठिकाणी महामुद्रा, महावेध, ताडन व परिधानादि क्रिया होतात.

यातील त्रिबंधांचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे केले आहे ते आपण मागे पाहिले. वरील सर्व क्रियातील त्राटक व शांभवीमुद्रा यांचे महत्त्व अनन्यसाधारण असून त्यांचे वर्णन करताना ते म्हणतात–

**माजीं उभारलेनि दंडें । शिरकमळ होय गाढें ।**
**नेत्रद्वारींचीं कवाडें । लागूं पाहती ।।६.२०२।।**
**वरचिलें पातीं ढळतीं । तळींचीं तळीं पुंजाळती ।**
**तेथ उर्धोन्मीलित स्थिती । उपजे तया ।।२०३।।**
**दिठी राहोनि आंतुलीकडे । बाहेर पाऊल घाली कोडें ।**
**ते ठायीं ठावो पडे । नासाग्रपीठीं ।।२०४।।**
**ऐसे आंतुच्या आंतुचि रचे । बाहेरी मागुतें न वचे ।**
**म्हणौनि राहणें आधिये दिठीचें । तेथेंचि होय ।।२०५।।**
**आतां दिशांचि भेटी घ्यावी । कां रूपाची वास पहावी ।**
**हे चाड सरे आघवी । आपैसया ।।२०६।।**

मूळबंधामुळे वर चढलेल्या खांद्यात शिरकमल हे घट्ट रुतून बसते आणि डोळ्यांच्या पापण्या झाकावयास लागतात. डोळ्यांच्या वरच्या पापण्या आपोआप खाली ढळतात व खालच्या पापण्या खालीच प्रफुल्लित होतात. त्यावेळी डोळ्यांची अर्धी उघडलेली व अर्धी मिटलेली अशी अर्धोन्मीलित दृष्टी सहजच होते. त्यावेळी दृष्टी आतल्या आतच राहते. जर ती कौतुकाने बाहेर आलीच तर ती नेमकी नाकाच्या शेंड्यावर पडते.अशी आतल्या आतच दृष्टी कायम राहते. ती पुन्हा बाहेर येत नाही. त्यामुळे अर्धोन्मीलित दृष्टी नाकाच्या शेंड्यावरच स्थिर होते. या स्थिरदृष्टीमुळे इतर दिशांकडे पाहावे किंवा दुसरी रूपे पाहावीत, अशा या सर्व इच्छा आपोआप नाहीशा होतात.

सिद्धयोग साधनात जागृत शक्तीमुळे वरील प्रकारची जी क्रिया होते त्याला शास्त्रकारांनी शांभवी मुद्रा असे नाव दिले आहे. श्रीस्वात्मारामयोगींद्रांनी या संबंधी " हठयोगप्रदीपिकेत " असे म्हटले आहे की–

**वेदशास्त्रपुराणानि सामान्यगणिका इव ।**
**एकैव शांभवी मुद्रा गुप्ता कुलवधूरिव ।।४.३५।।**

अंतर्लक्ष्यं बहिर्दृष्टिर्निमेषोन्मेषवर्जिता ।
एषा सा शांभवी मुद्रा वेदशास्त्रेषु गोपिता ॥३६॥
अंतर्लक्ष्यविलीनचित्तपवनो योगी यदा वर्तते ।
दृष्टचा निश्चलतारया बहिरधः पश्यन्नपश्यन्नपि ॥
मुद्रेयं खलु शांभवी भवति सा लब्धा प्रसादाद्गुरोः
शून्याशून्यविलक्षणं स्फुरति तत्तत्त्वं परं शांभवम् ॥३७॥

चार वेद, षट्शास्त्रे व अठरा पुराणे ही सर्व सामान्य गणिकेप्रमाणे किंवा वेश्येप्रमाणे आहेत; (कारण अनेक पुरुष त्यासंबंधी ज्ञाते असतात व या गोष्टी ते सहज वापरू शकतात.) मात्र शांभवी मुद्रा ही कुलवधुप्रमाणे गुप्त आहे; (कारण एखाद्या विरळचाच साधकाला ही सद्‌गुरुकृपेने प्राप्त होते.) ज्यावेळी साधकाचे मन किंवा चित्त संपूर्णपणे आत राहील व दृष्टी उघडी राहून ती 'निमेषोन्मेष-वर्जित असेल म्हणजे डोळयांची उघडझाप होणार नाही अर्थात् ती एकाग्र झाली असेल त्यावेळी या स्थितीला शांभवी मुद्रा असे म्हणतात. सर्व वेदात व शास्त्रात या मुद्रेचे रहस्य गुप्त ठेवण्यात आले आहे. ज्यावेळी साधकाच्या चित्त व प्राणाचा आतील म्हणजे सुषुम्नानाडीत लय होतो व दृष्टी ही निश्चल असून ती खाली पाहणारी अर्थात् नाकाच्या शेंडयावर स्थिर झालेली असल्यामुळे पाहणे व न पाहणे या दोन्ही अवस्थांनी ती युक्त असते, त्यावेळी या स्थितीला शांभवी मुद्रा असे म्हणतात. ज्यावेळी ही मुद्रा सद्‌गुरुप्रसादाने अर्थात् शक्तिपात दीक्षेमुळे साधकाला प्राप्त होते त्यावेळी शून्याशून्याहून विलक्षण किंवा पलीकडे असलेले शंभूचे परमपदरूप तत्त्व साधकाला प्राप्त होते.

"घेरंडसंहितेत" दृष्टी भ्रूमध्यावर स्थिर करावी असे सांगून या शांभवी मुद्रेचे लक्षण व महिमा सांगताना असे म्हटले आहे की—

नेत्रांजनं समालोक्य आत्मारामं निरीक्षयेत् ।
साभवेच्छांभवी मुद्रा सर्वतंत्रेषुगोपिता ॥३.६४॥
वेदशास्त्र पुराणानि सामान्य गणिका इव ।
इयं तु शांभवीमुद्रा गुप्ताकुलवधूरिव ॥६५॥
स एव आदिनाथश्च स च नारायणः स्वयम् ।
स च ब्रह्मा सृष्टिकारी यो मुद्रां वेत्ति शांभवीम् ॥६६॥
सत्यं सत्यं पुनः सत्यं सत्युमुक्तं महेश्वरः ।
शांभवीं यो विजानाति स च ब्रह्म न चान्यथा ॥६७॥

"अद्वयतारकोपनिषदात" "अंतर्बाह्यलक्ष्ये दृष्टौ निमेषोन्मेषवर्जितायां सत्यां शांभवी मुद्रा भवति ॥१२॥" असा या मुद्रेसंबंधी उल्लेख आला असून "मंडल-ब्राह्मणोपनिषदातही" तिच्या संबंधी असेच म्हटले आहे.

सिद्धयोगाचे साधन होत असताना होणाऱ्या तिसऱ्या प्रकारच्या क्रिया या नाडीशुद्धीच्या असून त्या कोणकोणत्या होतात हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मग थावलिये वाहटुळी । सँघ घेऊनि घर डहुळी ।
बाळपणींची कुहीटुळी । बाहेर घाली ॥६.२१६॥

भीतरीं वळी न धरे । कोठचामाजीं संचरे ।
कफपित्तांचे थारे । उरों नेदी ॥२१७॥

धातूंचे समुद्र उलंडी । मेदाचे पर्वत फोडीं ।
आंतील मज्जा काढी । अस्थिगत ॥२१८॥

नाडीतें सोडवी । गात्रांतें विघडवी ।
साधकातें भेडसावी । परी बिहावें ना ॥२१९॥

व्याधीतें दावी । सवेंचि हरवी ।
आप पृथ्वी कालवी । एकवाट ॥२२०॥

सहजें बहुतां दिवसांची भूक । वरी चेवविली तें होय भिष ।
मग आवेशें पसरी मुख । ऊर्ध्वा उजू ॥२२८॥

तेथ हृदयकोशातळवटीं । जो पवनु भरे किरीटी ।
तया सगळेयाचि मिठी । देऊनि घाली ॥२२९॥

मुखींच्या ज्वाळीं । तळीं वरी कवळी ।
मांसाची वडवाळी । आरोगूं लागे ॥२३०॥

जे जे ठाय समांस । तेथ आहाच जोडे घाउस ।
पाठी एकवोनी घांस । हियाही भरी ॥२३१॥

मग तळवे तळहात शोधी । ऊर्ध्वींचे खंड भेदी ।
झाडा घे संधी । प्रत्यंगाचा ॥२३२॥

अधोभाग तरी न संडी । परि नखींचेही सत्त्व काढी ।
त्वचा धुवूनि जडी । पांजरेशीं ॥२३३॥

अस्थींचे नळे निरपे । शिरांचे हीर वोरपे ।
तंव बाहेरी विरूढी करपे । रोमबीजांची ॥२३४॥

मग सप्तधातूंच्या सागरीं । ताहानेलेली घोंट भरी ।
आणि सवेंचि उन्हाळा करी । खडखडीत ॥२३५॥

नासापुटौनि वारा । जो जातसे अंगुळें बारा ।
तो गच्चं धरूनि माघारा । आंतु घाली ॥२३६॥

तेथ अध वरौतें आकुंचे । ऊर्ध्व तळौते खांचे ।
तया खेंवामाजि चक्राचे । पदर उरती ॥२३७॥

एऱ्हवीं तरी दोन्ही तेव्हांचि मिळती। परी कुंडलिनी नावेक दुश्चित्त होती।
ते तयांतें म्हणे परौति। तुम्हीचि कायसी एथें ? ॥२३८॥
आइकें पार्थिव धातु आघवी। आरोगितां कांहीं नुरवी।
आणि आपातें तंव ठेवी। पुसोनियां ॥२३९॥
ऐसी दोनी भूतें खाये। ते वेळीं संपूर्ण धाये।
मग सौम्य होऊनि राहे। सुषुम्नेपाशीं ॥२४०॥
तेथ तृप्तीचेनि संतोषें। गरळ जें वमी मुखें।
तेणें तियेचेनि पीयूषें। प्राणु जिये ॥२४१॥
तो अग्नि आंतूनि निघे। परी सबाह्य निववूंचि लागे।
ते वेळीं कसु बांधिती आंगें। सांडिला पुढती ॥२४२॥
मार्ग मोडिती नाडीचे। नवविधपण वायूचें।
जाय म्हणौनि शरीराचे। धर्मु नाहीं ॥२४३॥

'नाडीतें सोडवी' व 'मार्ग मोडिती नाडीचे' असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोग साधनात जी नाडीशुद्धी व तदंगभूत क्रिया होतात त्यांचे मोठ्या साक्षेपाने सांगोपांग वर्णन केले आहे. मुळात नाडीशुद्धी म्हणजे काय हे पाहून, ती होताना ज्या क्रिया होतात, त्यांचे उपरोक्त वर्णनाच्या आधारे अधिक स्पष्टीकरण करू. "घेरंडसंहितेत" याबद्दल असे म्हटले आहे की–

नाडीशुद्धिं समासाद्य प्राणायामं समभ्यसेत् ॥५.३२॥
मलाकुलासु नाडीसु मारुतो नैवगच्छति।
प्राणायामः कथं सिद्धस्तत्त्वज्ञानं कथं भवेत् ॥३४॥

प्रथम नाडीशुद्धी करून नंतर प्राणायामाचा अभ्यास करावा. शरीरातील सर्व नाड्या मलाने भरलेल्या असतात. त्यामुळे त्यातील प्राण मुख्य प्राणाशी एकरूप होऊन त्यांचा सुषुम्नेमध्ये सहजतेने प्रवेश होऊ शकत नाही. यामुळे प्राणायामाची सिद्धी होत नाही व तत्त्वज्ञानाचीही प्राप्ती साधकाला होत नाही. यासाठी साधनाच्या सुरुवातीला नाडीशुद्धी होणे आवश्यक असते.

ज्यावेळी अपानवायू उन्मत्त वावटळीप्रमाणे शरीरात संचार करू लागतो तेव्हा तो शरीराचे सर्व घर ढवळून काढतो. नाडीशुद्धीसाठी अर्थात् बाळपणापासून शरीरात साठलेली कुचकी घाण बाहेर घालवून शरीरशुद्धीसाठी अपानवायूची ही उन्मत्तता व शरीर ढवळण्याची क्रिया आवश्यकच असते. वातक्रम, व्युत्क्रम, शीतक्रम, भस्त्रा, अग्निसार, वायुसार, नौली व कपालभाती इत्यादि क्रिया अपानवायूच्या ऊर्ध्वसंचारामुळे होतात व या क्रिया नेती, धौती व बस्ती या हठयोगोक्त क्रियांचे फल साधकाला देतात. या क्रिया साधकाला आपोआप वायूच्या द्वाराने रेचक; पूरक व कुंभकप्राणायामाच्या रूपाने होतात. अर्थात् साधकाच्या मुखातून, नाकातून;

गुदद्वारातून व लिंगातून प्राणापान वायूंच्या सोडणे, ग्रहण करणे व निरोध करणे यांच्या रूपाने या सर्व क्रिया कुंडलिनी शक्तीच्या प्रेरणेने होत राहतात. या सर्व क्रियांमुळे कफ, पित्त, धातू, मेद व मज्जा या सर्वांचे अत्यंत तीव्रतमपणे शुद्धीकरण होत असते.

ज्यावेळी 'नाडीतें सोडवी व गात्रांतें विघडवी' हे शरीरात होऊ लागते त्यावेळी अनेक प्रकारे अंग विकृतीच्या क्रिया होतात. या क्रिया होत असताना साधकाच्या चेहऱ्यावर नानाविध भाव उमटत असतात. या व अनेक जन्मातील कोटी कोटी संस्कार छिन्न भिन्न होत असताना हे होणे व तदनुसार भाव उमटणे साहजिक आहे. देहविक्षोभ, व्यायाम, अंगमर्दन, झोप, घर्षण, डोळचातील बुबळे निरनिराळचा तऱ्हेने व प्रकाराने फिरविणे, हातपाय फेकणे व पसरणे, डोळे लहान मोठे करणे, धावणे, फिरणे, घूर्णा म्हणजे शरीर डावीकडून उजवीकडे किंवा उजवीकडून डावीकडे चक्कीसारखे गोलाकार फिरणे, शरीर मागे अथवा पुढे पडणे, मान गोलाकार फिरणे, घरभर गडबडा लोळणे, नाक, डोके इत्यादि अवयव जमिनीला घासणे, नृत्य करणे, वेडकाप्रमाणे इकडून तिकडे उडचा मारणे व पडणें, नुसत्या उडचा मारणे, ओलांडल्यासारखी उडी मारणे, वेडचाप्रमाणे किंवा दारू पिऊन उन्मत्तझालेल्या माणसाप्रमाणे शारीरिक व मानसिक क्रिया करून त्याप्रमाणे भाव दाखविणे इत्यादि क्रिया जड गात्रांना विघडविताना अर्थात् चेतनापासून त्यांना मोकळे करताना होत असतात. अपानवायूची गती ऊर्ध्व झाली की, गात्रे व अवयव शिथिल करण्याकरिता या क्रियांची आवश्यकता असते. माणसाची इंद्रिये इतकी बहिर्मुख व जड असतात की, ती इतक्या विविध क्रिया झाल्याशिवाय अंतर्मुख होत नाहीत व त्यातील जडत्व नाहीसे होऊन त्याच्याशी मिसळलेले चेतनत्व वेगळे होऊन प्रकट होत नाही.

या क्रियांप्रमाणेच सिद्धयोग साधनात कितीतरी विकृत व भयानक क्रिया साधकाच्या प्रकृतिभेदानुसार जडचेतनभेदप्रक्रियेसाठी अर्थात् नाडचांना सोडविण्यासाठी,शुद्ध करण्यासाठी किंवा प्राणाच्या गमनागमनासाठी होत असल्यामुळे, या क्रियांना "साधकातें भेडसावी। परी विहावें ना ॥६.२१९॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सुचविले आहे साधन सुरू झाले की. कंप, रोमांच, अंतःस्फुरण, स्पंदन, स्पर्श, जांभया, हसणे,रडणे,पडणे, उसासे टाकणे, हुंकार देणे, खांबाप्रमाणें स्थिर होणे, शरीर जड होणे, जमिनीला चिकटून जाणे, श्वासप्रश्वास अत्यंत जोरजोराने होणे, घाम येणे, डोळचांतून पाणी गळणे, लाळ गळणे, शरीर कृश होणे, मलमूत्र अल्प होणे, कोष्ठकाठिण्य होणे, कमी किंवा जास्त झोप येणे किंवा झोप नाहीशी होणे, थंडी वाजणे, ताप आल्यासारखे वाटणे, शरीरात जो सुप्त रोग असेल तो प्रकट होऊन बाहेर पडणे, शरीर दुखू लागणे, पोटात दुखणे, कामवासना उत्तेजित होणे, आत्यंतिक

कामेच्छेने वीर्यपात होणे, जुलाब होणे, लघवी जास्त होणे, ताप येणे, उचकी लागणे, श्वास, दमा इत्यादि शरीरात मूळ धरून राहिलेले किंवा सुप्त असलेले रोग वाढणे, भूक वाढणे किंवा कमी होणे इत्यादि साधकाच्या संस्कारनुसार कुंडलिनी शक्ती सर्व दोषांच्या निवारणार्थ नाना प्रकारच्या क्रिया करविते.

सिद्धयोगाच्या साधनात नाडीतें सोडवी, गात्रांतें विघडवी, एकवाट आपपृथ्वी कालवी, कत्रळी मांसाची वडवाळी व नखींचेही सत्त्व काढी इत्यादि गोष्टी घडण्यासाठी कुंडलिनी शक्ती साधकाकडून सिद्ध, पद्म, भद्र, मुक्त, सिंह, गोमुख, वीर, धनु, मृत, गुप्त, मत्स्य, पश्चिमोत्तान, मत्स्येंद्र, गोरक्ष, उत्कट, मयूर, कुक्कुट, कूर्म, मंडूक, वृक्ष, गरुड, वृषभ, शलभ, मकर, उष्ट्र, भुजंग इत्यादि योगाची नानाप्रकारची आसने करवून घेते. या आसनांनी शरीराला स्थिरता प्राप्त होते व अग्नी प्रदीप्त होऊन पचनक्रिया उत्तमप्रकारे होऊ लागते.त्यामुळे " कायस्य कृशता कांतिस्तदा जायेत निश्चितम् ॥२.१९॥ " व "वपुःकृशत्वं वदने प्रसन्नता ॥३.७८॥ " या "हठयोगप्रदीपिकेत " सांगितलेल्या लक्षणांप्रमाणे शरीर कृश झाले तरी चेहऱ्यावर प्रसन्नता राहते व शरीर नेहमी निरोगी राहते; कारण या आसनां-मुळे नाडीशुद्धी होऊन रजोगुण व तमोगुणांचा लोप होत जातो

या साधनात साधकाला कित्येक योनीतील आसने होतात; कारण जीवाचे कोटी कोटी योनीतून जन्म झालेले असतात. इतकेच नव्हे तर चौऱ्यांशी लक्ष योनी-तून वारंवार भ्रमण केल्यामुळे जन्मजन्मांतरी भोगलेल्या त्या नानाविध योनीतील अत्यंत सूक्ष्म संस्कार जीवावर झालेले असतात. कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर उक्त प्रकारच्या नानाविध क्रिया होऊन हे सस्कार त्या त्या क्रियांच्या रूपाने अगर मानसिक अनुभूतींच्या रूपाने स्मृतिपथात येऊन निघून जातात. या संस्कारांमुळेच साधक स्वाभाविकपणे आसनादि क्रिया करतो. कोणत्या योनीचे संस्कार कसेकसे आहे। हे शरीर, मन, बुद्धी, प्राण व स्वर यांच्या क्रियेवरून अनुमानाने साधकाला समजून येतात. स्वप्नाप्रमाणे हे सर्व संस्कार ध्यानावस्थेमध्ये साधकाला भासमान होतात किंवा ज्यावेळी साधकाची शुद्धस्मृती दृढ होते त्यावेळी त्याला जन्मजन्मांत-रातील संस्कारांचा उत्तमप्रकारे अनुभव येतो असे प्रत्यक्ष दिसते. सारांश, नाडीशुद्धी होण्यासाठी जागृत कुंडलिनी शक्ती चौऱ्यांशी लाख आसनांपैकी हजारो प्रकारची आसने साधककाडून करवून घेते व साधकाच्या संस्कारांच्या दृढ परिणामांमुळे त्याला ती आपोआप होतातही. पद्म, ताल, वृक्ष इत्यादि उद्भिजयोनींची; कूर्म, मत्स्य, मकर, इत्यादि जलयोनींची; भुजंग, शलभ, वृश्चिक इत्यादि कीटयोनींची; मयूर, गरुड, कुक्कुट, हंस इत्यादि पक्षीयोनींची व सिंह, वृषभ, उष्ट्र इत्यादि पशु-योनींची आसने तो करतो.साधनाच्यावेळी शक्तीकडून साधकाला उभे करून,बसवून, झोपून आडवे पाडून, उलटसुलट करून, वाकडेतिकडे व्हावयास लावून नाना-

प्रकारची आसने करवून घेतली जाताना व तद्द्वारा नाडीशुद्धी व गात्रांचे विघडणे अर्थात् जडचेतनभेदप्रक्रिया होताना दिसून येते.

कुंडलिनी शक्ती नाकपुड्यातून बारा बोटे बाहेर वाहणारा वायू गच्च धरून जेव्हा माघारी आणून त्याला आत घालते म्हणजे इडापिंगला नाड्यातील श्वासोश्वासाची गती थांबवून ती त्यांचे संमीलन सुषुम्नेत करते त्यावेळी खालचा अपान वायू वरती आकुंचित होतो किंवा ऊर्ध्वगमन करू पाहतो व वरचा प्राण वायू खाली खेचला जातो किंवा अधोगमन करू पाहतो. या क्रियांमुळे अनिवार्य असा दीर्घ कुंभक होतो. सर्व शरीराला विजेचे झटके बसावेत त्याप्रमाणे कंप उत्पन्न होऊन शरीर सांभाळणे साधकाला मुष्किल होते. ज्यावेळी या क्रियांमुळे केवल कुंभक होऊन. आसन दृढ होऊन, दृष्टी भ्रूमध्यात स्थिर होते तेव्हा मन बाह्यज्ञान-शून्य व निष्क्रिय होते. क्वचित्प्रसंगी प्राणकलेचा अंशात्मक प्रवाह मूलाधारातून सहस्राराकडे व पुन्हा सहस्रारातून मूलाधाराकडे वाहत असतो. त्यावेळी आतल्या आत प्रणवाचा जप आपोआप होऊ लागतो. या प्राणकलेच्या उत्थापनामुळे नाना प्रकारच्या सुखाचा अनुभव साधकाला येतो. काही वेळेस कुंडलिनी शक्तीच्या "वारा गच्च धरूनि माघारा आंतु घाली" या क्रियेतूनच मेरुदंडात तीव्र कंपन होऊन शरीर शून्य होते. आपल्याला शरीरच नाही किंवा शरीर हलके झाले आहे अगर आपण हवेवर तरंगत आहोत अथवा आकाशात संचार करीत आहोत अशी प्रतीती येते. त्यावेळी सर्वत्र शून्य भासू लागते. डोळे इतके आत ओढले जातात की, कितीही इच्छा केली तरी ते उघडत नाहीत. शरीरातून विजेचे प्रवाह चालले आहेत याचा अनुभव येतो. सर्व शरीर इतके आत खेचले जाते की, ते चिमटून लहान होऊन नाहीसे होईल असे वाटते. मन इतके आवेशयुक्त होते की, शरीरात कोणीतरी प्रवेश केला आहे व अष्टौप्रहर आत क्रिया चालू आहेत याची जाणीव होते. जेथे कोठे मन एकाग्र होईल तेथे शरीर झटकन कंप पावू लागते व अनिच्छेने हलू लागते. अत्यंत घाणेरड्या किंवा मलिन स्थानामध्येही ते आनंदमग्न राहते.

सिद्धयोग साधनेत नाडीशुद्धीनंतर होणारी चवथ्या प्रकारची क्रिया ही अनाहत नादाची किंवा नादानुसंधानाची असून ती या साधनात आपोआप कशी उपस्थित होते, तिच्या अनुषंगाने आणखी इतर कोणत्या क्रिया उपस्थित होतात व शेवटी या क्रियेची परिणती कशात होते, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात-

हें असो ते कुंडलिनी बाळी । हृदया आंतु आली ।
अनुहताची बोली । चावळे ते ॥६.२७४॥

शक्तीचिया आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें ।
तें तेणें आइकिलें । अळुमाळु ॥२७५॥

घोषाच्या कुंडीं । नादचित्रांचीं रूपडीं ।
प्रणवाचिया मोडी । रेखलीं ऐसीं ।।२७६।।
हेंचि कल्पावें तरी जाणिजे । परी कल्पितें कैचें आणिजे ।
तरी नेणों काय गाजे । तियें ठायीं ।।२७७।।
विसरोनि गेलों अर्जुना । जंव नाशु नाहीं पवना ।
तंव वाचा आथी गगना । म्हणौनि घुमे ।।२७८।।
तया अनाहताचेनि मेघें । आकाश दुमदुमों लागे ।
तंव ब्रह्मस्थानींचें बेगें । सहज फिटे ।।२७७।।

कुंडलिनी शक्ती हृदयापाशी म्हणजे अनाहत चक्रापाशी आली की, ती अनाहत नादाची किंवा ध्वनीची बोली बोलू लागते. अर्थात् या ठिकाणी अनाहत नाद उपस्थित होतो. मागे तिसऱ्या प्रकरणात "पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे रहस्य" या मुद्यात व पाचव्या प्रकरणात " भक्तियोग " या मुद्यात अनाहत नाद हा प्रतिप्रसवक्रमाला कसा कारणीभूत होतो व भक्तियोगातील त्याचे स्थान याचा शास्त्रीय विचार आपण केला आहे. येथे फक्त त्याची क्रिया या दृष्टीने चर्चा करावयाची आहे. नुसत्या बाह्य मंत्राच्या जपाने साधकाला इष्टसिद्धी अर्थात् स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची उपलब्धी होत नाही; कारण इतर अनेक गोष्टींप्रमाणें हा एक बाह्य व्यापार होऊन त्यामुळे मन नाहीसे होत नाही. "मननात् त्रायते यस्मात् तस्मात् मंत्रः प्रकीर्तितः ।। " म्हणजे जो मनन करण्यापासून रक्षण करतो अर्थात् ज्याच्या मननाने मन नाहीसे होते त्याला मंत्र म्हणतात. अशा प्रकारचा मंत्र फक्त अनाहत नादच असून त्यालाच मंत्रचैतन्य किंवा चेतन मंत्र अगर शक्तीची जागृत अवस्था म्हणतात. नादासारखा श्रेष्ठ मंत्र व आत्म्यासारखा श्रेष्ठ देव दुसरा कोणीही नाही. त्याचप्रमाणे नादानुसंधानासारखी सर्वश्रेष्ठ पूजाही दुसरी कोणती नाही. अर्थात् या साधनाने तृप्त होण्यापलीकडे दुसरे सुख नाही. या दृष्टीनेंच " रुद्रयामल व गौतमीयतंत्रात " असे म्हटले आहे की–

शृणुदेवि प्रवक्ष्यामि सर्वं ज्ञानोत्तमोत्तमम् ।
येन विज्ञानमात्रेण क्षिप्रं विद्या प्रसिद्धयति ।।१।।

मूलकंदे च या शक्तिर्भुजगाकार रूपिणी ।
तद् भ्रमावर्त वातो यः प्राण इत्युच्यते बुधैः ।।२।।

झिंजी वाव्यक्त मधुरा कूजन्ती सततोत्थिता ।
गच्छंति ब्रह्मरंध्रे तु प्रविशंती स्वकेतने ।।३।।

यातायात क्रमेणैव यत्र कुर्यान्मनोलयम् ।
तेन मंत्र शिखाजाता सर्वमंत्रप्रदीपिका ।।४।।

तमः पूर्णगृहे यद्वत् न किंचित् प्रतिभासते ।
शिखाहीनास्तथा मंत्रा न सिद्धयंति कदाचन् ।।५।।

श्रीमहादेव देवी भगवतीला म्हणाले की, जे ज्ञान जाणले असता किंवा ज्याचा अनुभव आला असता विद्या सत्वर सिद्ध होते असे सर्वश्रेष्ठ ज्ञान तुला सांगतो. मूलाधारात कुंडलिनी नावाची सर्पाकृती शक्ती आहे. शक्तिपात दीक्षा झाल्यावर ही शक्ती संचालित होते. तिच्या संचलनाने वायूही घुमू लागतो. या वायूलाच शास्त्रकारांनी प्राण किंवा प्राणशक्ती असे म्हटले आहे. ही प्राणशक्ती उत्थित होऊन झिन् झिन्, चिन् चिन् इत्यादि नाना प्रकारचे अव्यक्त श्रुतिमधुर शब्द उच्चारीत सुषुम्नामार्गातून सतत वर जाऊन आपल्या घरात अर्थात् ब्रह्मरंध्रात किंवा सहस्रारात प्रवेश करते व पुन्हा आपल्या मूळस्थानात म्हणजे मूलाधारात परत येते. या जाण्यायेण्यात उत्पन्न होणाऱ्या नादात मन लीन झाले की, सर्व मंत्रांना प्रकाशित व चैतन्यमय करणारी मंत्रशीखा प्रदीप्त होते. अंधकारमय घरात जसे दिव्याशिवाय काहीही दिसत नाही त्याप्रमाणे कुंडलिनी शक्तीच्या दिव्याशिवाय सुषुम्नापथ व पर्यायाने साधकाचे घर सहस्रार अंधारातच राहते.

"शारदातिलकतंत्राच्या प्रथम पटलामध्ये" दीक्षा झाल्यावर कुंडलिनीच्या जागृतीमुळे अनाहत नाद कसा उत्पन्न होतो हे सांगताना असे म्हटले आहे की, "गुरुदीक्षा झाल्यावर संवित्स्वप्रकाशिका अशी ज्ञानशक्ती कुंडलिनी देवी साधकाला आपल्या स्वरूपाचे ज्ञान करून देण्यासाठी विशेप गुणयुक्त होऊन क्रियाशील झालेली दिसते. त्यावेळी ती आपल्या ब्रह्ममयी शक्तीने अनेकानेक गुणवती शक्तीचे चमत्कार करते त्या शक्तीपासून ध्वनी, नाद, निबोधिका, अर्धेंदू, परा, पश्यंती, मध्यमा व वर्णमालेला प्रकाशित करणारी वैखरी वाणी उत्पन्न करते. कुंडलिनी शक्तीच्या जागृतीमुळे साधकाला प्रथम अव्यक्त ध्वनी शब्दरूपाने ऐकू येतो; परंतु या ध्वनीचा नेमका निर्देश मात्र करता येत नाही. याचाच निर्देश "अनुहताची बोली । चावळे ते ।।६.२७४।।" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केला आहे. शक्तीचे हे अनाहताच्या बोलीने अर्थात् ध्वनीने व्यक्त होणे अगदी सूक्ष्म असते. मात्र जेव्हा शक्ती नादाचे रूप धारण करते तेव्हा साधक अंतरंगामध्ये व्यक्त व सूक्ष्मातिसूक्ष्म नाद स्पष्टपणे ऐकतो. "शक्तीचिया आंगा लागलें । बुद्धीचें चैतन्य होतें जाहलें । तें तेणें आइकलें । अळुमाळु ।।६.२७५।।" असे याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे. मुळात देवात्मशक्तीच्या अंगभूत असलेल्या बुद्धीचे अर्थात् प्राणाचे चैतन्यात रूपांतर झाले किंवा ते चेतन झाले की, हा नाद उत्पन्न होऊन ती बुद्धी स्वतःच तो नाद ऐकते. यानंतर साधकाच्या ठिकाणी निबोधिका अवस्था उत्पन्न होते. या अवस्थेतच त्याला ज्योतींचे दर्शन होण्यास आरंभ होतो. त्यानंतर अर्धचंद्राचे दर्शन होऊन बिंदुरूप ज्योती प्रकाशू लागते. त्यामुळे सर्व प्रकारचे नाद

सुस्पष्ट होत जातात. हे नाद भिन्न भिन्न शब्दांच्या रूपाने किंवा वीणा, वंशी, भ्रमर यांच्यासारख्या नादाच्या रूपाने परा, पश्यंती व मध्यमा वाणीमध्ये अनुभवाला येतात. शेवटी वैखरी वाणीच्या द्वारे वर्णमालेचे रूप घेऊन नानाप्रकारच्या क्रियां-द्वारा नाद शब्दरूपाने व्यक्त होतो. हा व यांपेक्षाही नादानुसंधनाच्या क्रियांशी युक्त असलेला मंत्राचा, मंत्रात्मक रचनेचा, त्याच्याशी संबंधित असलेल्या ॐकाराचा व तदंतर्गत किंवा तदंगभूत अशा सूक्ष्मातिसूक्ष्म, अनुभवात्मक व लयराज-योगाच्या समन्वयात्मक भूमिकेचा उल्लेख "घोषाच्या कुंडीं । नादचित्रांचीं रूपडीं । प्रणवाचिया मोडी । रेखलीं ऐसीं ।।६.२७६।।" या एका ओवीत श्रीज्ञानेश्वमहाराजांनी केला आहे. ही क्रिया साधकाच्या शरीरात सुरू झाली की, सर्व शरीरच नादाचे किंवा घोषाचे कुंड बनते. अर्थात् मूलाधार हेच कुंडलिनी देवीच्या चैतन्यस्वरूप अग्नीच्या प्रकटीकरणाचे कुंड आहे. "श्रीललितासहस्रनामस्तोत्रात" सुरुवातीलाच कुंडलिनी शक्तीला "चिदग्निकुंडसंभूता" असे म्हणून या अर्थानेच गौरविले आहे. तीच मूलाधाराच्या कुंडाची व्याप्ती शरीरभर पसरविते. हे कसे होते हे सांगताना "श्रीशारदातिलकतंत्रात" असे म्हटले आहे की–

ततश्चैतन्यरूपा सा सर्वंगा विश्वरूपिणी ।
शिवसन्निधिमासाद्य नित्यानंदगुणोदया ।।१.५१।।
दिक्कालाद्यनवच्छिन्ना सर्ववेदार्थगा (देहानुगा) शुभा ।
परापरविभागेन परशक्तिरियं स्मृता ।।५२।।
योगिनां हृदयांऽभोजे नृत्यंति नित्यमंजसा ।
आधारे सर्वभूतानां स्फुरंती विद्युदाकृतिः ।।५३।।
शंखावर्तक्रमाद्देवी सर्वमावृत्य तिष्ठति ।
कुंडलीभूतसर्पाणामंगश्रियमुपेयुषी ।।५४।।
सर्वदेवमयी देवी सर्वमंत्र (वर्ण) मयी शिवा ।
सर्वतत्त्वमयी साक्षात् सूक्ष्मात्सूक्ष्मतरा विभुः ।।५५।।
त्रिधामजननी देवी शब्दब्रह्मस्वरूपिणी ।
द्विचत्वारिंशद्वर्णात्मा पंचाशद्वर्णरूपिणी ।।५६।।
गुणिता सर्व गात्रेषु कुंडली परदेवता ।
विश्वात्मना प्रबुद्धा सा सूते मंत्रमयं जगत् ।।५७।।
एकधा गुणिता शक्तिः सर्वविश्वप्रवर्त्तिनी ।
वेदादिबीजं श्रीबीजं शक्तिबीजं मनोभवम् ।।५८।।
प्रासादं तुंबरुं पिंडं चिंतारत्नं गणेश्वरम् ।
मार्तण्डभैरवं दौर्गं नारसिंहं वराहजम् ।।५९।।

शरीरोत्पत्तीनंतर चैतन्यस्वरूपिणी शब्दब्रह्ममयी कुंडलिनी देवी सर्वत्र सामान्य-

रूपाने व्यापून, जगत्स्वरूपाने नटून, शिवाचे सान्निध्य मिळवून, सत्त्वादि त्रिगुणांचा उदय तिच्यामध्ये झाल्यामुळे ( जगत् उत्पन्न करते. ) ( या श्लोकावर श्रीमद्-राघवभट्टांनी आपल्या "पदार्थदर्श व्याख्येत" टीका करताना असे म्हटले आहे की, "तत्र मूलाधारे कुंडलीभूतसर्पवन्नाडी वर्त्तते। तन्मध्ये वायुवशादस्याः संचरणमेव गुणनम्। ....अनेन शैवसिद्धान्ते-शक्तिशब्दवाच्येयमित्युक्तम्। सन्निधिशब्दोप्यौ-पचारिकस्तन्मते शिवशक्त्योरभेदात्। तदुक्तमभिनवगुप्तपादाचार्यैः- "शक्तिश्च शक्तिमद्रूपाद् व्यतिरेकं न वांछति। तादात्म्यमनयोर्नित्यं वन्हिदाहकयोरिव॥" यद्वा सम्यङ्गिनधिस्वरूपं शिवस्वरूपं प्राप्येत्यर्थः। वक्ष्यति च- "पिंडं भवेत् कुंडलिनी शिवात्मे" ति।)" या शक्तीला देश,काल व दिशा यांचा उपाधिसंबंध नाही. ही शक्ती जागृत अवस्थेत अनाहत नादाच्या रूपाने सर्व देहात व्यापून राहणारी आहे किंवा वेदांना व्यापून राहणारी आहे.(स्थूल किंवा जडावस्थेतही ती देहाला व्यापून असते; पण त्याची अनुभूती येत नाही व सर्वमंत्रादि किंवा वेदादि शास्त्रे तिच्यापासून प्रकट होत असल्याने ते अपौरुषेय आहेत हे पटत नाही. ज्ञानेश्वरीही अशीच अपौरुषेय आहे )स्थूल व सूक्ष्म भेदाने या कुंडलिनीला परशक्ती असे म्हटले जाते.ती रमणीय, शुभ व सुंदर आहे. ही शक्ती सद्गुरुकृपेने समजणारी, त्यांच्या आज्ञेनेच योगी-साधकांच्या हृदयात नेहमी नृत्य करणारी, सर्व जंतूंच्या मूलाधार चक्रात स्फुरण पावणारी व विजेसारखे तेजस्वी स्वरूप असलेली अशी आहे. ही शंखांतर्गत भोवऱ्या-प्रमाणे सर्वावरण करून राहणारी किंवा सर्व भूतादि प्राणिमात्रांना आवृत करून राहणारी आहे. वेटोळे घालून बसलेल्या सर्पाच्या अंगकांतिप्रमाणे हिची कांती आहे ही कुंडलिनी शक्ती सर्व देव, मंत्र व वर्णस्वरूप असून ती साक्षात् सर्व तत्त्वांचे स्वरूपच आहे. ही शक्तिदेवी सूक्ष्माहून सूक्ष्म किंवा निरतिशय सूक्ष्म असून व्यापकही आहे. ती कल्याण करणारी आहे. ही सूर्य, चंद्र व अग्निस्वरूपिणी किंवा सूर्यादितेजोजननी अथवा स्वर्ग मृत्यू व पाताळ उत्पन्न करणारी व त्यांना व्यापणारी आहे. तसेच ती शब्दब्रह्मस्वरूपिणी आहे. ती अकारादि बेचाळीस वर्णांच्या रूपाची व पन्नास मातृकांच्या स्वरूपाची आहे. सर्व अवयवगुणांनी युक्त असलेली ही श्रेष्ठ देवी कुंडलिनी विश्वात्म्याकडून जागृत झाली की, मंत्रमय जगताची उत्पत्ती करते. ही एकरूप शक्ती गुणप्रेरित झाली की, सर्व शब्दार्थरूप विश्वाची प्रवर्तक होते. तशीच ही शक्ती प्रणवबीज अर्थात् ॐकारबीज, श्रीबीज, शक्तिबीज व मनोभव आहे. ही शिवप्रिया शक्ती प्रासाद, तुंबर,गणेश, भैरव, दुर्गा, नरसिंह, वराह, वासुदेव, हयग्रीव, पुरुषोत्तम इत्यादि देवतांचे ॐ, ऱ्हीं, श्रीं, क्लीं इत्यादि नानाविध देवतांच्या बीजमंत्रांचे उच्चारण करू लागते.

अशा प्रकारे ही परमदेवतास्वरूपिणी ईश्वरी शक्ती जागृत होऊन उत्तम प्रकारे क्रिया करू लागली म्हणजे साधकाच्या सर्व शरीरात ती व्याप्त होऊन मंत्र-

मय जगताची रचना करून लागते. हेच घोषाचे कुंड होय. अशा तऱ्हेने सर्व शरीर नादात्मक झाले म्हणजे त्या योगाने साधनामध्ये वेदादिशास्त्रांचे बीजमंत्र असलेल्या प्रणवाचा ध्वनी साधक आतून करू लागतो. त्या आवेशातच तो उपरोक्त प्रकारे नाना देवदेवतांच्या मंत्रांचा व त्यांच्या बीजांचा उच्चार करतो किंवा आतल्या आत जपू लागतो. साधकाने न पाहिलेले, न ऐकलेले व न शिकलेले अनेक प्रकारचे विविध मंत्र जागृत झालेली कुंडलिनी शक्ती निश्चियपूर्वक साधकाच्या मुखातून प्रकट करते. यातील काही मंत्र व बीजे साधकाच्या नावाला व राशीला प्रतिकूल व अनिष्ट असली तरी ते आतून शक्तीकडून प्रकट झालेले किंवा होत असल्याने ते चैतन्यरूप व सिद्धरूप होऊन साधकाचे कल्याणच करतात. यामुळे चैतन्य मंत्राने जागृत होणारी कुंडलिनी शक्ती किंवा जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीकडून प्रकट होणारे चैतन्यस्वरूप मंत्र यांची एकताच सिद्ध होते.

साधनात साधकाचे शरीर नादयुक्त झाले की, जे नानाप्रकारचे नाद त्याला ऐकू येतात त्याचे वर्णन करताना श्रीस्वात्मारामयोगींद्रांनी "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की–

श्रूयते प्रथमाभ्यासे नादो नानाविधो महान्।
ततोऽभ्यासे वर्धमाने श्रूयते सूक्ष्मसूक्ष्मकः॥४.८४॥
आदौ जलधिजीमूतभेरीझर्झरसंभवाः।
मध्ये मर्दलशंखोत्था घंटाकाहलजास्तथा॥८५॥
अंते तु किंकिणीवंशवीणाभ्रमरनिःस्वनाः।
इति नानाविधा नादाः श्रूयंते देहमध्यगाः॥८६॥

साधनाभ्यासाच्या सुरुवातीला अत्यंत मोठ्या आवाजाचे व नानाविध प्रकारचे नाद साधकाला ऐकू येतात. जसजसा अभ्यास किंवा साधन वृद्धिगत होत जाते तसतसा हा नाद किंवा ध्वनी मंद व सूक्ष्म सूक्ष्म होत जातो. प्रथम हे नाद समुद्र, मेघाचा गडगडाट, भेरी( वाद्य ), झांझ, मर्दल, शंख, घंटा, काहल, किंकिणी म्हणजे लहान घटा वाजणे, बासरी, भुंगे इत्यादि नानाविध प्रकारांनी ऐकू येतात. जरी मेघ व भेरीसारखे मोठमोठे ध्वनी ऐकूत येत असले; तरी साधकाने सूक्ष्मातील सूक्ष्म नादात मन लीन करावे; कारण सूक्ष्मनाद चिरकाल राहतो व साधकाचे चित्त तेथे कायम स्थिर होते. याशिवाय धबधबा, गाडी, धडधडता अग्नी, सूं असा वाऱ्याचा आवाज, नाना तऱ्हेची तंतुवाद्ये, झिन् झिन्, चिन् चिन् इत्यादि प्रकारचेही नाद साधकाला ऐकू येतात. एवढेच नव्हे; तर बैल, मोर, भुंगा, मधमाशी इत्यादि नानाविध पशुपक्षांच्या व कीटपतंगाच्या शब्दाप्रमाणे शब्दध्वनी ऐकू येतो. काही वेळेला स्त्रियांच्या गीताप्रमाणे किंवा पुष्कळशा लोकांच्या कोलाहलाप्रमाणे घोषयुक्त ध्वनी ऐकू येतो.

वरील सर्व नादांचे रूपांतर शेवटी प्रणवात होते व वैखरी वाणीने व्यक्त झालेला ॐकार मध्यमेत व्यक्त होत होत जेव्हा पश्यंतीमध्ये रूपांतरीत होतो तेव्हा " प्रणवाचिया मोडी । रेखलीं ऐसीं ।। ६.२७६ ।। " अशी नादाचित्रांची रूपे दिसू लागतात. या सर्व गोष्टी अनुभूतीच्या असल्यामुळे त्या कल्पनेने जाणावयाच्या म्हटल्या तरी जी गोष्ट कल्पनेच्या बाहेर आहे ती कल्पनेत कशी आणावयाची हा खरा प्रश्न आहे, असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. तेव्हा नाडीशुद्धीनंतर अशा गर्जना, ध्वनी, शब्द किंवा नाद शरीरात उत्पन्न होतो, हेच खरे आहे. हे जे कल्पितें कैचें आणिजे ।। ६.२७७ ।। " असे जे नादानुसंधानाचे स्वरूप आहे त्याचे शास्त्रकारांच्या व आजपर्यंत हजारोहजार साधकांच्या क्रियानुभूतींच्या द्वारे प्रत्यक्ष पाहिल्यावरून असे वर्णन करता येईल की– जागृत कुंडलिनी शक्तीच्या व्यक्त, अव्यक्त अगर व्यापक अवस्थेपासून अगदी प्रथम वेदाचा बीजमंत्र ओंकार प्रकाशित होतो. ओंकारानंतर निरनिराळ्या देवतांच्या मंत्रांची रचना होते. यामुळे कुंडलिनी शक्ती जागृत झाली की, प्रथम ओंकार शब्द ध्वनिरूपाने पराःवाणीमध्ये होत असल्याची जाणीव होते. याचे कारण असे आहे की, ओंकारापासूनच मंत्रसृष्टीचा आरंभ होतो. यामुळेच " कठोपनिषदात " ऋषींनी असे म्हटले आहे की–

सर्वे वेदा यत्पदमामनंति तपांसि सर्वाणि च यद्वदंति ।
यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ।।१.२.१५।।

एतद्ध्येवाक्षरं ब्रह्म एतद्ध्येवाक्षरं परम् ।
एतद्ध्येवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत् ।।१७।।

एतदालंबनंश्रेष्ठमेतदालंबनं परम् ।
एतदालंबनं ज्ञात्वा ब्रह्मलोके महीयते ।।१७।।

सर्व वेद ज्या पदाचे एककंठाने वर्णन करतात, सर्व तपे ज्याच्या प्राप्तीची साधने आहेत असे म्हणतात व ज्या पदाच्या प्राप्तीची इच्छा करणारे ब्रह्मजिज्ञासू ब्रह्मचर्याचे अनुष्ठान करतात, ते पद तुला ( यम नचिकेतला म्हणत आहेत. ) मी संक्षेपाने सांगतो. ॐ हेच ते पद होय. हे ॐ अक्षरच ब्रह्म आहे. किंवा ॐकार हा अक्षर ब्रह्मच आहे. हे अक्षरच श्रेष्ठ आहे किंवा अविनाशी परब्रह्मतत्त्व आहे. या अक्षराचे ज्ञान ज्याला होईल त्याला जे हवे असेल ते प्राप्त होईल. ॐकार हे सर्वश्रेष्ठ आलंबन आहे अर्थात् ॐकार हेच ब्रह्मप्राप्तीचे सर्वश्रेष्ठ साधन आहे. किंबहुना हेच अत्युत्तम आलंबन किंवा आश्रयस्थान आहे. या आलंबनाचे अर्थात् साधनाचे ज्ञान झाले असता साधक ब्रह्मस्वरूपात आनंद पावतो म्हणजे ब्रह्मरूप होतो.

यामुळे हा बीजरूप ॐकार ब्रह्म आहे असे वेदांचे सांगणे आहे. ब्रह्म अवाङ्नामनसगोचर आहे. वेदांशी एकरूप असलेला व त्यांना व्यापून राहणारा हा मूर्तिम-

ॐकारही मन व वाणीच्या पलीकडे आहे. ज्याप्रमाणे ब्रह्माचे रूप वाणीने व्यक्त करता येत नाही त्याप्रमाणेच ॐकाराचे रूपही सामान्य वाणीने व्यक्त करता येत नाही. मात्र या ॐकारांच्या अर्थात् शब्दब्रह्माच्या अंतरंगाचा साधक जेव्हा भेद करतो तेव्हा त्याला याच्याशी एकरूप असलेल्या ब्रह्माचा बोध होतो. साधारणपणे व्यवहारात येणाऱ्या अक्षरांचे सोळा स्वर व छत्तीस व्यंजनयुक्त वर्ण प्रचलित आहेत. हे स्वर व व्यंजने व्याकरणाच्या नियमाप्रमाणे उदात्त, अनुदात्त व स्वरित या भेदांमुळे कित्येक प्रकारचे होऊन ऱ्हस्व, दीर्घ, प्लुतादि स्वरांच्या योगाने उच्चारण केले जातात; परंतु उद्गीथस्वरूप अशा ब्रह्मरूप ॐकारासारखी आकृती असलेले अक्षर कोणतेच नाही. म्हणून याचे उच्चारणही या अक्षरांच्या साहाय्याने होऊ शकत नाही. ही व तदनुषंगिक गोष्टी सांगताना " वराहोपनिषदात " असे म्हटले आहे की–

> ऱ्हस्वो दहति पापानि दीर्घो मोक्षप्रदायकः ॥५.६८॥
> आप्यायनः प्लुतो वापि त्रिविधोच्चारणेन तु ।
> तैलधारमिवाच्छिन्नं दीर्घघंटानिनादवत् ॥६९॥
> अवाच्यं प्रणवस्याग्रं यस्तं वेद स वेदवित् ।
> ऱ्हस्वं बिंदुगतं दैर्घ्यं ब्रह्मरंध्रगतं प्लुतम् ॥
> द्वादशान्तगतं मंत्रं प्रसादं मंत्रसिद्धये ॥७०॥
> सर्वविघ्नहरश्चायं प्रणवः सर्वदोषहा ॥७१॥

ज्यावेळी सिद्धयोग साधनेत स्वतःसिद्ध ॐकाराची विचित्र स्वरयुक्त निर्मिती कुंडलिनी शक्तीकडून होते तेव्हा ऱ्हस्व किंवा एक मात्रेचा उच्चार झाला की, पापांचा नाश होतो. दीर्घस्वराने म्हणजे तीन मात्रांनी युक्त अशा प्रणवाचे उच्चारण झाल्यास आनंदप्राप्ती होते. ज्यावेळी ॐकाराचा आप्यायन नावाचा म्हणजे द्विमात्राप्रणवाचा उच्चार होतो त्यावेळी संपत्तीची प्राप्ती होते व जेव्हा प्लुत म्हणजे चार मात्रात्मक प्रणवाचा उच्चार होतो तेव्हा साधकाला मोक्षप्राप्ती होऊन त्याच्या शरीर, मन व प्राणाची तृप्ती होते. घंटेच्या दीर्घ आवाजाप्रमाणे अगदी टोकाचा किंवा टीपेचा अगर अत्युच्च असा ॐकारध्वनी तैलधारवत् अविच्छिन्नपणे उच्चारणे केवळ अशक्य आहे. ज्याला या ॐकाराची माहिती असते किंवा अनुभूती असते तो वेद जाणतो. ऱ्हस्व ॐकारमंत्र बिंदुपर्यंत पोहोचू शकतो. दीर्घ ॐकारमंत्र ब्रह्मरंध्रापर्यंत पोहोचतो व प्लुत ओंकारमंत्रोच्चार द्वादशान्तापर्यंत म्हणजे ब्रह्मरंध्राच्या ऊर्ध्वभागापलीकडे जाऊन पोहोचतो. अशा प्रकारे मंत्राचा प्रसाद झाला म्हणजे मंत्राची सिद्धी होते. त्यामुळे हा प्रणव सर्व अडथळे दूर करतो व सर्व दोषांचा विध्वंस करतो.

ज्यावेळी सद्‌गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत होऊन महायोग सिद्ध व्हावा म्हणून कार्यरत होते तेव्हा ती योगमाया शक्ती समस्त वैदिक मंत्रांच्या स्वरांचे संपादन करते व ॐकाराच्या रूपाने प्रकाशित होऊन ती साधकाला दर्शनही देते. परावाणीत प्रस्फुरित होऊन पश्यंतीद्वारा प्रणवाच्या रूपाने दिसणारा हा ॐकार मध्यमेतून आणखी खाली येऊन शेवटी वैखरी वाणीने व्यक्त होतो. ॐकार प्रत्यक्ष वैखरीतून उच्चारण होण्याच्या क्रियेला आरंभ झाला की, साधकाच्या मूलाधारात व तालुमूलात कंपनाला आरंभ होतो. या कंपानाबरोबरच षड्ज, ऋषभ, गांधार, इत्यादि नानाविध स्वरांनी दीर्घ प्रणवाचा उच्चार होऊ लागतो. अशा प्रकारे आतून उच्चारित होणाऱ्या प्रणवाच्या ध्वनीचा अर्थ, स्वर, व्यंजन, वर्ण यांच्याशी कोणताही संबंध राहत नाही. कुंडलिनी शक्तीच्या प्रेरणेमुळे साधकाकडून जेव्हा मूलाधारापासून आपोआप वरीलप्रमाणे ॐकाराचे उच्चारण होऊ लागते तेव्हा साधक बहुतेक करून अर्धसंज्ञाशून्य होतो व तो आपल्या हृदयाकाशात पुष्कळशा नादांचा गुंजारव ऐकतो; परंतु या नादांचा तो निर्देश मात्र करू शकत नाही. ज्यावेळी साधकाकडून ओंकाराचा उच्चार आवेशाने वारंवार होत राहतो तेव्हा तो प्लुत होतो. त्यावेळी साधकाला आपण अत्यंत जोरजोराने ॐकार ध्वनीचे उच्चारण करीत असल्याचे भान राहत नाही. अशा प्रकारचा गगनभेदी ध्वनी रात्रीच्या वेळी खुल्या मैदानात केला तर तो तीन मैलपर्यंत ऐकू जाईल. साधकाकडून ज्यावेळी कुंडलिनी शक्तीच्या आतील जोराने ओंकाराचे उच्चारण होत राहते तेव्हा तो आवाज इतका श्रुतिमधुर असतो की, ऐकणाराचे मन अगदी मुग्ध होऊन जाते. मात्र त्या आवाजाचे स्वर लक्षात येत नाहीत. इतकेच नव्हे तर त्या ध्वनीत निरनिराळ्या स्वरांचे एकत्रित मिश्रण झाल्यामुळे एका विलक्षण अशा अद्‌भुत स्वराची प्रचीती व प्रतीती साधकाला येते. ज्याप्रमाणे सामवेद म्हणणारा व ऐकणारा श्रोता त्यातील स्वरांच्या एकतेमध्ये तल्लीन होतात त्याप्रमाणे ओंकाराचा आतून उमटणारा ध्वनी साधकाला व ऐकणाऱ्याला अर्थबोधरहित आश्चर्यामध्ये बुडवून टाकतो. ॐकार बाहेर पडताना त्यातील स्वरांचा काही भाग 'हुं' कार शब्दासारखा वाटतो; कारण मुखातून बाहेर पडताना ॐकार हुंकाराशी मिळून बाहेर पडतो; परंतु तो सर्वस्वी हुंकार असतो किंवा ॐकार हुंकाराशी मिसळून बाहेर उमटतो हे सांगता येत नाही. याचे खरे कारण असे आहे की, आतून आपोआप उमटणाऱ्या या ओंकाराच्या विचित्रतेचे वर्णन करता येत नाही.

वरील दीर्घ प्रणवजपापेक्षा सूक्ष्म जप होण्याने साधकाच्या मनाला शतपट सुखाचा अनुभव येतो. स्व प्रणव जपाची क्रिया साधकाच्या अंतरामध्ये अष्टौप्रहर चालू असते. योगमाया कुंडलिनी शक्तीमुळे उत्पन्न झालेल्या स्वतःसिद्ध प्रणवाला तो वर्णरूप आहे असे म्हणता येत नाही. मात्र तो ध्वनिरूप आहे असे म्हणणे

आवश्यक आहे; कारण षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद या सप्त स्वरांबरोबर याच्या ध्वनीचा संबंध प्रतीत होतो; परंतु स्वरांचा निरनिराळा निर्देश होत नाही. त्यामुळेच या ॐकाराला अद्‌भुत व विचित्र म्हटले असता काहीही अत्युक्ती होणार नाही. स्वतःप्रणव जपात मनाची अवस्था मनच जाणते. सूक्ष्म प्रणव जपाच्या ध्वनीच्या स्वरांसंबंधी सांगणे आत्तापर्यंत कोणत्याही शास्त्रकाराला व साधकाला शक्य झालेले नाही. सर्वांनी याला अनाहत ॐकाराचा ध्वनी म्हणून मौन स्वीकारले आहे ; परंतु अनाहत ध्वनी व स्वतःप्रणव ध्वनी यांच्यात विशेष फरक आहे. अनाहत ध्वनी चिण् चिण्, घंटा, शंख, वीणा, टाळचा, बासरी, मृदंग, भेरी आणि मेघ असा मुख्यतः दहा प्रकारचा असून प्राणवायू ब्रह्मरंध्रात जाताना तो ऐकू येतो. याच्या गर्जनेमुळेच शेवटी ब्रह्मस्थानाची खिडकी सहज उघडते. "तया अनाहताचेनि मेघें। आकाश दुमदुमों लागे। तंव ब्रह्मस्थानींचें वेगें। सहज फिटे ॥६.२७९॥" असे श्रीज्ञानेश्वमहाराजांनी म्हटले आहे; कारण नादानुसंधान हे स्थिर व चिरस्थायी असून शेवटी शक्ती नादाच्या रूपाने "ते ॐकाराचिये पाठी। पाय देत उठाउठी। पश्यंतीचिये पाउटी। मागा घाली ॥६.३०३॥" असे करून म्हणजे ओंकाररूपी शब्दब्रह्माचा भेद करून व पश्यंती वाणीला मागे टाकून महाशून्याच्या डोहात शिवाशी एकरूप होते. जेथे शब्दाचा म्हणजे कुंडलिनी शक्तीचा दिवा मावळतो अर्थात् तिचे शिवाशी सामरस्य होते तेथे ॐकार नाही किंवा वैखरी, मध्यमा व पश्यंती वाणीही नाहीत. प्रणवाच्या मोडीने रेखलेल्या नादचित्रांची रूपे आज्ञाचक्रापर्यंतच दिसतात. तीच प्रत्यक्षानुभूतीची व सगुणब्रह्माची मर्यादा आहे. त्याच्यापुढे सर्व निर्गुणाचा प्रांत आहे.

या अनाहत नादाला किंवा नादानुसंधानालाच अमानव पुरुष व सत्यमार्ग म्हणून उपनिषदात गौरविले आहे. "छांदोग्य उपनिषदात" "आदित्याच्चंद्रमसं चंद्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एतान्ब्रह्म गमयत्येष देवयानः पंथा इति ॥१.१०. २॥" असे म्हणून, ते उपासक किंवा साधक सूर्य लोकापासून चंद्रलोकास,चंद्रलोकाहून अग्निलोकाप्रत व तेथून अमानव वायुरूप पुरुषाप्रत जातात.शेवटी तो अमानव पुरुष त्यांना ब्रह्माप्रत नेतो. ह्या देवयान पंथ होय !" हे स्पष्ट केले आहे व "सत्येन पंथा विततो देवयानः ॥३.५॥" म्हणजे सत्यामुळेच देवयानमार्गाचा विस्तार होतो, असे "मुंडकोपनिषदात" सांगितले आहे.

सिद्धयोगांतर्गत नादानुसंधानाचे साधन हे "नादानुसंधानसमाधिमेकं। मन्यामहे मान्यतमं लयानाम् ॥२॥" व "न धारणाध्यान परिश्रमो वा। समेधमाने सति राजयोगे ॥१४॥" अशा प्रकारचे आहे असे श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "योगतारावली" या प्रकरण ग्रंथात सांगून या नादानुसंधानापासूनच लय व राज हे योगाचे उच्च प्रकार सिद्ध होतात, हे स्पष्ट केले आहे. अनाहत नादाच्या अनुसंधानाने प्राप्त

होणारी समाधी किंवा लय हाच मला अत्यंत योग्य किंवा श्रेष्ठ वाटतो व धारणा, ध्यान इत्यादि परिश्रमांची किंवा यांपैकी कसल्याही साधनाची आवश्यकता नादानुसंधानामुळे वृद्धिंगत झालेल्या राजयोगात लागत नाही, हे त्यांचे म्हणणे आपण आत्तापर्यंत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगांतर्गत सद्‌गुरुकृपेने जागृत शक्तीमुळे उपस्थित होणाऱ्या नादानुसंधानाच्या साधनाचे जे विवेचन केले, त्यावरून स्पष्ट होते. महायोगी गोरक्षनाथांनीच हे सिद्धयोगांतर्गत साधन कसे स्पष्ट केले आहे, हे सांगताना श्रीस्वात्मारामयोगींद्रांनी "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की, "आता महायोगी गोरक्षनाथांनी सांगितलेल्या नादानुसंधानाच्या साधनाचे निरूपण करतो. अव्युत्पन्न व मूढ असल्याने ज्या लोकांना तत्त्वज्ञान होणे अशक्य आहे अशा अगदी सामान्य लोकांनाही हे साधन अगदी सहजतेने करता येण्यासारखे आहे. श्रीआदिनाथ शिवांनी चित्ताचा लय होणारी सव्वा करोड साधने सांगितली आहेत; परंतु या सर्व साधनांमध्ये नादानुसंधान हेच चित्तलयाचे एकमेव मुख्य साधन आहे. हे साधन महायोगी गोरक्षनाथांना अभिमत असल्याने त्याचा आश्रय अवश्य करावा. साधकयोग्याने मुक्तासनात बसून शांभवी मुद्रा करून प्राणांचे सुषुम्नेत चालन झाल्यामुळे शरीरात उपस्थित झालेला अनाहत नाद उजव्या कानाने ऐकावा. आरंभ, घट, परिचय व निष्पत्ती अशा सर्व योगांच्या चार अवस्था आहेत. ज्यावेळी अनाहत चक्रातील ब्रह्मग्रंथीचा साधनाभ्यासाने भेद होतो त्यावेळी हृदयाकाशरूपी शून्यात आनंददायक व विचित्र असा किण् किण् नाद देहात उत्पन्न होऊन तो साधक ऐकू लागतो. याला आरंभावस्था म्हणतात. ज्यावेळी प्राणवायू अपान व नादबिंदूला आपल्याशी एकरूप करून सुषुम्नामार्गाने जाऊ लागतो त्यावेळी साधकयोग्याचे आसन अत्यंत दृढ होते, त्याचे ज्ञान वृद्धिंगत होते व तो देवतुल्य होतो. नंतर कंठांतर्गत विष्णुग्रंथीचा भेद प्राणाने केला की, साधकाला परमानंददायक असे भेरीच्या नादासारखे अनेक नाद अतिशून्यस्थानी ऐकू येऊ लागतात. या अवस्थेला घटावस्था म्हणतात. ज्यावेळी प्राण भ्रूकुटीच्या मध्यस्थानी आज्ञाचक्रात जातात तेव्हा साधकाला त्या महाशून्यस्थानात ढोलासारखे ध्वनी ऐकू येतात. सर्व सिद्धी देणारे असे हे स्थान आहे. या अवस्थेला परिचयावस्था म्हणतात. ज्यावेळी भ्रूमध्यातील रुद्रग्रंथीचा भेद करून प्राणवायू शर्वपीठापाशी पोहोचतो तेव्हा साधकाला वीणेचा अत्यंत मधुर नाद ऐकू येतो. या अवस्थेला निष्पत्ती अवस्था म्हणतात. नादानुसंधानाने उत्पन्न होणारा चित्ताचा लय हाच सर्व योगांचा राजासारखा राजयोग असून तो तत्काळ प्रचीती देणारा आहे. नादानुसंधानाच्या द्वारा ज्यावेळी महान् योगी समाधी साधतात त्यावेळी अवाङ्‌मनसगोचर अशा आनंदाचा उदय होतो. हा आनंद एकमात्र श्रीगुरुनाथच जाणू शकतात; कारण तेच शक्तिपातदीक्षेद्वारा हा आनंद शिष्याला उपलब्ध करून देऊ शकतात. ज्याप्रमाणे फुलातील रस पिणारा भृंगा फुलाच्या गंधाची अपेक्षा करीत नाही त्याप्रमाणे नादात आसक्त झालेले चित्त विषयांची

इच्छा करीत नाही. ज्यावेळी जळणारे लाकूड संपते त्यावेळी त्याच्याबरोबर जळणारा अग्नीही विझून जातो. त्याचप्रमाणे नादात गुंतलेले चित्त नादाच्या बरोबरच सुषुम्नामार्गाने सहस्रारात लीन होते. कशावरही आपटल्याशिवाय जो शब्द उत्पन्न होतो व त्याचा जो ध्वनी प्रतीत होतो त्याला अनाहतनाद म्हणतात. या ध्वनीच्या अंतरंगातच ज्ञेयस्वरूप प्रकाशमान चैतन्य आहे. या ज्ञेयाच्या आत मन आहे. ज्यावेळी ज्ञेयस्वरूपात मनाचा पूर्ण लय होतो त्यावेळी जी अवस्था प्राप्त होते त्यालाच परमश्रेष्ठ विष्णुपद असे म्हणतात. जोपर्यंत अनाहत ध्वनी ऐकू येतो तोपर्यंत आकाशतत्त्व शिल्लक असते; कारण आकाश व शब्द हे गुणगुणीप्रमाणे एक आहेत. निःशब्द अवस्थेलाच परब्रह्म म्हणतात. हाच परमात्मा होय. जोपर्यंत अनाहत नाद ऐकू येतो तोपर्यंत त्या नादाच्या रूपाने कुंडलिनी शक्ती शेष असते. ज्यावेळी सर्व तत्त्वांची जननी शक्ती सदाशिवाशी पूर्ण एकरूप होते त्यावेळी जी अनंत, निराकार व कल्पनेपलीकडील अवस्था साधकाला प्राप्त होते, त्यालाच परमेश्वर म्हणतात.

संतांच्या पुढील वचनांमध्ये वरील सर्व विवेचनाचे सार मिळेल.

सहस्रदळांमधुन अनुहात ध्वनि उठी ।
नामाचेनि गजरे पातके रिघाली कपाटी ।। श्रीसंत नामदेवमहाराज ।।

卐 卐 卐

चार वाचा कुंठित जाहली ।
सोऽहं ज्योती उभारली ।।
अनुहात घंटा श्रवणी ।
ऐकून विस्मित झाली जनी ।।श्रीसंत जनाबाई।।

सिद्धयोग साधनेत होणारी सहाव्या प्रकारची क्रिया ही पंचमहाभूतांच्या विलीनीकरणांची असून तिचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

पृथ्वीतें आप विरवी । आपातें तेंज जिरवी ।
तेजातें पवनु हरवी । हृदयामाजीं ।।६.२९९।।
पाठीं आपण एकला उरे । परी शरीराचेनि अनुकारें ।
मग तोही निगे अंतरें । गगना मिळे ।।३००।।

पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश ही पंचमहाभूते आपापल्या तत्त्वांच्या रूपाने मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत व आज्ञा या चक्रांच्या आश्रयाने राहतात व ज्यावेळी कुंडलिनी शक्ती या चक्रांचा वेध करीत जाते त्यावेळी ही तत्त्वेही या शक्तीत क्रमशः विलीन होत जातात. अर्थात् हे घडत असताना मागे वर्णन केलेल्या अनंत क्रियांची ही पृष्ठभूमी ठरते. ज्याप्रमाणे लढाया शेवटी सेनापतींच्या नावाने इतिहासात शिल्लक राहतात व सैनिकांची नावे काळाच्या उदरात लुप्त होतात त्याप्रमाणे ही पंचमहाभूते अनेकानेक क्रियांना जन्म देत असली तरी

या संग्रमात या क्रिया महाभूतांची नावनिशाणी शिल्लक ठेवून लुप्त होतात. अर्थात् सेनापतींनाही काळ खाऊन टाकतो त्याप्रमाणे शक्तीही या पंचमहाभूतांना गिळून टाकते. या विलीनीकरणाचे विवेचन मागे येऊन गेल्याने येथे फक्त क्रियात्मक भागाचा उल्लेख केला आहे. पंचमहाभूतांचे विलीनीकरण किंवा "तंव महाभूतांची जवनिका फिटे ।।६.३०६।।" व "साही पदर फुटती । चक्रांचे हे ।।६.२४४।।" या दोन्ही क्रिया एकच आहेत, हे लक्षात ठेवणे जरूर आहे.

सिद्धयोग साधनेत होणाऱ्या सातव्या प्रकाराच्या सर्व क्रिया या राजयोगाच्या व तदनुषंनिक अशा क्रिया असून त्यांचे वर्णन अकराव्या अध्यायात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी फार विस्तृत प्रमाणात केले आहे. " आतां देखें आघवें भरिलें। माझ्याचि रूपीं ।।११.१२३।।" असे म्हणून भगवंतांनी अर्जुनाला दीक्षापूर्व व दीक्षेनंतर जी दर्शने घडविली आहेत, त्याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

एवं नानाविधें परी बहुवसें । आणि दिव्यतेजप्रकाशें ।
तेवींचि एकएकाऐसें । वर्णेंही नव्हे ।।११.१३१।।
एकें अतिलावण्यसाकारें । एकें स्निग्धवपु मनोहरें ।
शृंगारश्रियेचीं भांडारें । उघडिलीं जैसीं ।।१३८।।
पैं सौम्यतेचा वोलावा । मिती नेणिजे अश्विनौदेवां ।
ख्रोत्रीं होती पांडवा । अनेक वायु ।।१४४।।
कीं आनंदाची वनें सासिन्नलीं । जैसी सौंदर्या राणीव जोडली ।
तैसीं मनोहरें देखिलीं । हरीचीं वक्त्रें ।।१९८।।
जियो प्रभेचिये झळाळा । उजाळु चंद्रादित्यमंडळा ।
जे महातेजाचा जिव्हाळा । जेणें विश्व प्रगटे ।।२१२।।
तो दिव्यतेज शृंगारु । कोणाचिये मतीसी होय गोचरु ।
देव आपणपेंचि लेइले ऐसें वीरु । देखत असे ।।१२३।।

अशा प्रकारची जी विविध दर्शने अर्जुनाला झाली ती सर्व शब्द, स्पर्श, रूप, रस व गंधात्मक अशी होती. ही दर्शने कशी होतात, किंवा राजयोगाच्या या क्रिया साधकाच्या देहात कशा उत्पन्न होतात, हे सांगताना महर्षी पतंजलींनी " योगदर्शनात " असे म्हटले आहे की—

विषयवती वा प्रवृत्तिरुत्पन्ना मनसः स्थितिनिबंधिनी ।।१.३५।।
विशोका वा ज्योतिष्मती ।।३६।।

दिव्य विषयांचे ज्ञान ज्यामध्ये असते अशी प्रवृत्ती उत्पन्न झाली असता मन स्थिर होते अथवा प्रकाशाची शोकरहित तेजस्वी वृत्ती उत्पन्न झाली असता मनाची एकाग्रता होते. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पाच विषय आहेत. जिभेच्या मुळावर चित्ताची एकाग्रता केली तर दिव्य शब्दांचे ज्ञान होते. जिभेच्या मध्यावर

चित्ताची एकाग्रता केल्यास दिव्य स्पर्शाचा साक्षात्कार होतो. टाळूमध्ये चित्त एकाग्र केल्यास दिव्य रूपाचा साक्षात्कार होतो. जिभेच्या टोकावर चित्ताची एकाग्रता केल्यास दिव्य रसाचा साक्षात्कार होतो व नाकाच्या शेंड्यावर चित्ताचे संयमन केल्याने दिव्य गंधाचा साक्षात्कार होतो. अशा प्रकारची चित्ताची स्थिती किंवा वृत्ती झाली व हे अनुभव आले की, चित्त तेथे गुंतून पडते. वर ज्या प्रवृत्ती सांगितल्या आहेत त्यात रूप हा विषय असल्याकारणाने योगशास्त्रात अन्यत्र चंद्र, सूर्य, नक्षत्रे, रत्ने, दीप इत्यादिकांचे जे ध्यान सांगितले आहे ते साक्षात्कारासाठीच आहे. शोकरहित प्रकाशाची धारणा अनाहत चक्रात केली की, मन स्थिर होते; कारण या ठिकाणी अर्थात् बुद्धिसत्त्वाच्या ठिकाणी एकाग्रता झाली की, बुद्धि-प्रवृत्ती सूर्य, चंद्र, मणी व प्रभा यांच्यासारख्या आकाराने विशेषेकरून उत्पन्न होते. या दोन सूत्रांवर टीका करताना श्रीयोगेन्द्र विज्ञानी यांनी " महायोग विज्ञान " या पुस्तकात असे म्हटले आहे की, " अशा प्रकारे कुंडलिनी शक्तीच्या प्रेरणेने क्रिया करता करता ज्यावेळी साधकाचे शरीर, मन व प्राण राजयोगाचे उत्कर्ष साधन करतात त्यावेळी विषयवती प्रवृत्ती उत्पन्न होते व साधकाच्या चित्ताच्या स्थिरते-करिता अंतरामध्ये दिव्य वस्तू अगर ज्योत् स्वत: प्रकट होते. त्या दिव्य ज्योतीचे दर्शन झाल्यावर साधकाचे मन स्वाभाविकपणेच त्यात गुंतून जाते व साधनाचे फल आपल्याला मिळेल किंवा नाही अशी चिंता त्याला राहत नाही. प्रकाशमान दिव्य ज्योतीचे दर्शन होताच साधकाच्या चित्ताला तिच्यामध्येच निरतिशय सुखाचा अनुभव येतो. "

उपरोक्त पंचविषयांपैकी शब्दाच्या किंवा अनाहत नादाच्या साक्षात्काराने किंवा अनुभूतीमुळे चित्ताचा लय कसा होतो हे आपण यापूर्वी पाहिलेच आहे. त्याचप्रमाणे अष्टसात्त्विक भावांच्या उदयाने साधकाला येणारा स्पर्शाचा अनुभव म्हणजे काय याचे विवेचनही पूर्वी केले आहे. शक्तीच्या ऊर्ध्वगमनामुळे होणारे हे स्पर्शाचे सुख जसे सात्त्विक व कोमल असते तसे ते " उजाळु अधिकाधिक बहु-वसु । धडाडीत आहे अतिदाहसु । पडत दिव्यचक्षूंसही त्रासु । न्याहाळितां ।। ११. ३०३ ।।" असे अत्यंत दाहकही असते हे सत्य आहे. यादृष्टीनेच " योगचूडामणी उपनिषदात " व अन्यत्र शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की–

प्रबुद्धा वन्हियोगेन मनसा मरुता सह ।।३८।।
सूचीवद्गात्रमादाय व्रजत्यूर्ध्वं सुषुम्णया ।।३९।।
यथा कुंडलिनी देहे स्फुरत्यब्ज इवालिनी ।
तथा संविदुदेत्यंतर्मृदुस्पर्शवशोदया ।।

साधकाने कुंडलिनी शक्तीचा आश्रय केला की,ही जागृत शक्ती अग्नी, मन व प्राणासहित सुषुम्नेत प्रवेश करून ऊर्ध्वगमन करू लागते. ज्याप्रमाणे सुई वस्त्राला

स्पर्श करीत वेधत वेधत पुढे जाते त्याप्रमाणे कुंडलिनी शक्ती मूलाधारापासून एक एक चक्राचा भेद करीत सुषुम्नामार्गाने ब्रह्मरंध्रात जाते. त्यावेळी तिच्या दिव्य स्पर्शाचा साधकाला अनुभव येतो. ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन शरीरामध्ये अशा प्रकारे क्रिया करते त्यावेळी भुंगा जसा कमलावर मृदुमृदूपणे गुंजारव करीत असतो तसा मृदू व कोमल अशा महासुखकर दिव्य स्पर्शाचा साधकाला अनुभव येतो. हा स्पर्श जसा अष्टसात्त्विकभावोद्रेकांच्या रूपाने कोमल भासतो त्याप्रमाणे भयानक व दिव्य दर्शनांच्या रूपाने कठोर किंवा उग्रही भासतो.

जागृत कुंडलिनी शक्तीमुळे रूपाचा आविष्कार कसा होतो, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विश्वरूप दर्शनाची जी धडी उपलविली आहे, त्यावरून सर्वांशाने कळून येतो. हे सर्व रूपदर्शन अनंत प्रकारचे असल्याचे " तैसा अर्जुनु असाधारणें। आपुलिया दर्शनाचेनि विदाणें। कवळूनि घेतला तेणें। अनंतरूपें ॥ ११.२३२ ॥ " असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. त्या विश्वरूपाचे तेज अपूर्व होते किंवा हे तेजच विश्वरूप दर्शनाच्या वेळी कसे प्रकट झाले होते, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तियें अंगप्रभेचा देवा। नवलावो काइसया ऐसा सांगावा।**
**कल्पांतीं एकुचि मेळावा। द्वादशादित्यांचा होय ॥११.२३७॥**
**तैसे ते दिव्यसूर्य सहस्रवरी। जरी उदयजती कां एकेचि अवसरीं।**
**तर्‍ही तया तेजाची थोरी। उपमूं नये ॥२३८॥**
**आघवयाचि विजूंचा मेळवा कीजे। आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे।**
**तेवींचि दशकुही मेळविजे। महातेजांचा ॥२३९॥**
**तर्‍ही तिये अंगप्रभेचेनि पाडें। हें तेज कांहीं कांहीं होईल थोडें।**
**आणि तया ऐसें फीर चोखडें। त्रिशुद्धी नोहे ॥२४०॥**
**ऐसें माहात्म्य या श्रीहरीचें सहज। फांकतसे सर्वांगीचें तेज।**
**तें मुनिकृपा जी मज। दृष्ट जाहलें ॥२४१॥**

अशा प्रकारची रूपाची जी दर्शने साधकाला होतात ती सर्व ब्रह्माभिव्यक्तीची लक्षणे असून अशी दर्शने साधकाला कशी होतात हे सांगताना " श्वेताश्वतर उपनिषदामध्ये " असे म्हटले आहे की—

**नीहारधूमार्कानलानिलानां खद्योतविद्युत्स्फटिकशशीनाम्।**
**एतानि रूपाणि पुरःसराणि ब्रह्मण्यभिव्यक्तिकराणि योगे ॥२.११॥**

सिद्धगुरूंच्या संकल्पाने शक्ती जागृत झाल्यावर धुके, धूर, सूर्य, अग्नी, वायू, काजवा, वीज, स्फटिक, मणी व चंद्र ही सर्व रूपे साधनाभ्यासात दिसू लागतात. ता ब्रह्माची अभिव्यक्ती करणारी म्हणजे अविद्यारूपी पटलाने आच्छादित झालेल्या ब्रह्माला प्रकट करणारी चिन्हे आहेत. यावर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे

म्हटले आहे की, " नीहार धुक्याला म्हणतात. योगाभ्यासात प्राणांच्यासहित चित्त-वृत्ती धुक्यासारखी प्रवृत्त होऊ लागते. ( याचा अर्थ असा की, अभ्यासकालात साधकाला धुके किंवा धुक्यासारखा शुभ्रवर्ण दिसू लागतो. ) त्यानंतर त्याला धूर दिसू लागतो. मग सूर्य व वायूची दर्शने होतात. त्यानंतर वायू अग्निप्रमाणे अत्यंत उष्ण, प्रकाशयुक्त व दाह करणारा आहे असे प्रतीत होत असताना बाह्यवायूसारखा तो अत्यंत क्षुब्ध होऊन मोठा बलवान् झालेला आहे असे लक्षात येते. कधी कधी साधकाला काजव्यांच्या प्रकाशाप्रमाणे झगमगणारे अंतराकाश दिसते तर कधी विजा चमकत आहेत किंवा विजेसारख्या तेजस्वी वस्तू लखलखत आहे असे दिसते. कधी कधी त्याला पौर्णिमेचा चंद्र दिसतो. साधकाला साधनाभ्यासात सुरुवातीला अशी कितीतरी रूपे अनुभूत होतात. त्यानंतर परमयोगाची सिद्धी होते. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी अर्जुनाच्या राजयोगाच्या या अनुभूतींचे वर्णन करताना असे म्हटले आहे की–

हें एथ आथि कां येथ नाहीं । ऐसें श्वसोंही नये कांहीं ।
नवल अंगप्रभेची नवाई । कैसी कोंदलीं सेंघ ॥११.२९९॥
एथ अग्नीचीही दिठी करपत । सूर्य खद्योतु तैसा हारपत ।
ऐसें तीव्रपण अद्भुत । तेजाचें यया ॥३००॥
हो कां महातेजाचिया महार्णवीं । बुडोनि गेली सृष्टी आघवी ।
कीं युगांतविजूंच्या पालवीं । झांकलें गगन ॥३०१॥
ना तरी संहारतेजाचिया ज्वाळा । तोडोनि माचू बांधला अंतराळां ।
आतां दिव्य ज्ञानाचिया डोळां । पाहवेना ॥३०२॥

या दृष्टीनेच "सूर्यगीता व शिवपुराणांतर्गत उमासंहितेत" असे म्हटले आहे की–

यदा कुंडलिनी शक्तिराविर्भवति साधके ।
तदा स पंचकोशे मत्तेजोऽनुभवति ध्रुवम् ॥१.४८॥ सूर्यगीता ॥
ततस्तु तमसि ध्यानी पश्यति ज्योतिरीश्वरम् ।
श्वेतं रक्तं तथा पीतं कृष्णमिन्द्रायुधप्रभम् ॥२७.१९॥ उमासंहिता ॥
भ्रुवोर्मध्ये ललाटस्थं बालार्क सम तेजसम् ।
दर्शनं नाम दिव्यानां दर्शनं चाप्रयत्नतः ॥२०॥

जेव्हा कुंडलिनी शक्ती साधकाच्या ठिकाणी क्रियारूपाने प्रकाशित होते त्यावेळी अन्नमय, प्राणमय, मनोमय, आनंदमय व विज्ञानमय पंचकोशात माझ्या ( म्हणजे परमेश्वराच्या ) सूर्यरूप ज्योतिर्मय तेजाचा निश्चित अनुभव येतो. ध्यानाच्या वेळी साधकाला अंधकारमय अंतराकाशात ज्योतिरूप ईश्वराचे दर्शन होते. ही ज्योत शुभ्र, तांबडी, काळी व इंद्रधनुष्याप्रमाणे नाना प्रकारच्या रंगांची

असते. प्रात:काली उगविणाऱ्या सूर्याप्रमाणे ही ज्योत साधकाला भ्रूमध्याच्या ठिकाणी दिसते. यालाच दिव्यदर्शन म्हणतात. अंत:शक्ती कुंडलिनी जागृत झाल्यावर प्रयत्नाशिवाय असे दर्शन आपोआप होऊन राजयोगाच्या पूर्णतेकडे साधक वाटचाल करतो.

अर्जुनाला जी दिव्य दर्शने झाली ती सर्व जागृत शक्तीमुळे झाली. "शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेच्या उत्तरखंडात" या शक्तीबद्दल असे म्हटले आहे की—

**अंगुष्ठमात्रममलं दीप्तमानं समंततः ।**
**शुद्धदीपशिखाकारं स्वशक्त्या पूर्णमंडितम् ।।३८.७१।।**

अंगुष्ठमात्र व निर्मल असा परमात्मा आपल्या दीप्तिमान प्रकाशाने आसमंतात भरून राहिलेला असतो.तो दिव्याच्या शुद्धज्वालेप्रमाणे आकारयुक्त होऊन आपल्या शक्तीने विराजमान झालेला असतो. ज्यावेळी सद्‌गुरुकृपेने शरीरातील ही शक्ती जागृत होते त्यावेळी ती आपले प्रकाश व ज्योतीचे मूळ रूप घेऊन उठते. त्यामुळे या प्रकाशाचे किंवा ज्योतीचे जेवढे पर्याय आहेत त्या सर्वांचे साधकाला भिन्न भिन्न अवस्थेत व भिन्न भिन्न काळी आवश्यकतेप्रमाणे दर्शन होते. यावर टीका करताना श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी "महायोग विज्ञान" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "या ज्योतीचे दर्शन कित्येक प्रकारांनी होते. विजेचा चमचमाट, विजेचा प्रकाश, नक्षत्र, चंद्र, सूर्य, अग्नी व ज्योत या प्रकारांनी साधनात दर्शने होतात. कधी कधी कोटी कोटी सूर्याच्या प्रकाशाप्रमाणे या ज्योतीचे उग्र तर कधी अनुग्रह-सूचक महाज्योतीचे दर्शन होते. या ज्योतीचे रंगही विविध प्रकारचे असतात. याशिवाय प्रज्ज्वलित अग्निशिखा, दीपशिखा, बिंदू, काच, स्फटिकमणी, काजवा इत्यादींच्याप्रमाणें लहानमोठ्या रूपरंगांचे दर्शन होते. कधी कधी ताऱ्यांनी झगमग-णारे आकाश, नीलाकाश, तुषार, जलकण, अंधार व अत्यंत भयानक अंधकाराचे दर्शन होते. साधन करता करता साधकाचे मन सूक्ष्म विषयाचे ग्रहण करण्यास जितके समर्थ होते तितकी सूक्ष्मातिसूक्ष्म दर्शने साधकाला होतात. वर वर्णन केलेल्या दर्शनांशिवाय कधी कधी साधकाला अनेक सिद्धपुरुषांची किंवा आपल्या गुरुदेवांचे दर्शन होते. त्याचप्रमाणे ब्रह्मा, विष्णू, महेश किंवा आपल्या इष्ट देवतेचे दर्शन होते. गंधर्व, अप्सरा, विद्याधर, नाग, यक्ष, राक्षस, किन्नर आदि देवतांचीही दर्शने साधनात होतात. सात्त्विक भावापन्न साधकाला विशेषकरून संन्यासी, ब्रह्मचारी, शिवलिंग अथवा अन्यान्य देवतांच्या प्रतिमांचे दर्शन ध्यानाच्या वेळी अमनस्क अवस्थेत, जागृतीत किंवा स्वप्नातही होते. विशेषकरून साकार उपासक व भक्तिप्रधान साधकांना ही दर्शने अधिकतर प्रमाणात होतात.

रसप्रवृत्तीही रूपात्मक आलंबनाच्या आधारावर जागृत शक्तीमुळे साधक-देहात उत्पन्न होत असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी रसक्रियेच्या उपस्थितीचे

अर्थात् अनुभूतीचे वर्णन करताना असे म्हटले आहे की—

> कां जे द्यौर्लोक आणि पाताळ । पृथिवी आणि अंतराळ ।
> अथवा दशदिशा समाकुळ । दिशाचक्र ॥११.३१५॥
> हें आघवेंचि तुवां एकें । भरलें देखत आहे कौतुकें ।
> परी गगनाहीसकट भयानकें । आप्लविजे जेवीं ॥३१६॥
> ना तरी अद्भुत रसाचिया कल्लोळीं । जाहली चवदाही भवनांसि कडियाळीं ।
> तैसें आश्चर्यंचि मग मी आकळीं । काय एक ? ॥३१७॥

सिद्धयोग साधनाभ्यासात साधकाच्या ठिकाणी उपरोक्त प्रकारे रस पाझरून चवदा भुवनांची कडियाळी म्हणजे पिंडब्रह्मांडाच्या संहारणीला उपयुक्त अशी क्रियानुभूती कशी उत्पन्न होते हे सांगताना "योगशिखोपनिषदात व धर्मसंहितेत" असे म्हटले आहे की—

> रेचकं पूरकं मुक्त्वा वायुना स्थीयते स्थिरम् ।
> नानानादाः प्रवर्तंते संस्रवेच्चंद्रमंडलम् ॥१.१२७॥ योगशिखोपनिषत् ॥
> समाकुंच्याभ्यसेद्योगी रसनां तालुकं प्रति ।
> किंचित्कालांतरेणैव क्रमात्प्राप्नोति लंबिकाम् ॥१॥ धर्मसंहिता ॥
> ततः प्रस्रवते सा तु संस्पृष्टा शीतलां सुधाम् ।
> पिबन्नेव सदा योगी सोऽमरत्वं हि गच्छति ॥२॥

ज्यावेळी सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या साधकाचा कुंडलिनी शक्तीच्या प्रेरणेने रेचक-पूरकाचा त्याग होऊन केवल कुंभक होऊ लागल्याने प्राण स्थिर होत जातात तेव्हा नाना प्रकारचे नाद उत्पन्न होतात व मस्तकातील चंद्रमंडलातून अमृतस्राव होऊ लागतो. आत्मशक्तीच्या उद्बोधनानंतर खेचरी क्रिया झाली की, साधकाची जीभ उलट होऊन टाळूत व वर खेचली जाते. त्यावेळी गळयाच्या आणखीही खूप क्रिया अशा होतात की, त्यावेळी जीभ पडजीभेला वर करून आत जाते. त्यावेळी अकस्मात् सुधारसाचे पान घडते. अथवा हीच जीभ जेव्हा आभ्यंतरिक क्रियाशक्तीच्या योगाने टाळूला घट्ट चिकटून बसते तेव्हा सहस्रारातील शीतल चंद्रामृत पाझरते. त्याच्या सेवनाने साधक नखशिखांत शांत होऊन आश्चर्यात निमग्न होतो व नित्य साधनाभ्यासाने अमृतपान करीत अमर होतो. ही क्रिया कशी घडते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

> तंव वरीलेकडोनि ढाळें । चंद्रामृताचें तळें ।
> कानवडोनी मिळे । शक्तिमुखीं ॥६.२४७॥
> तेणें नाळकें रस भरे । तो सर्वांगामाजीं संचरें ।
> जेथिंचा तेथ मुरे । प्राणपवनु ॥२४८॥

हे जे चंद्रामृताचे तळे कलंडून त्याचा रस सर्वांगात संचरू लागतो तो रस

किंवा ते अमृत केव्हा पाझरते व ते कशा प्रकारचे असते किंवा त्याची चव कशी असते, हे " घेरंडसंहिता व याज्ञवल्क्यसंहिता " या ग्रंथात सांगताना असे म्हटले आहे की –

> मनोलयं यदा याति भ्रूमध्ये योगिनां नृणाम् ।
> जिव्हामूलेऽमृतस्रावो भ्रूमध्ये चात्मदर्शनम् ॥१२.२६॥ यज्ञावल्क्यसंहिता ॥
> नाना रससमुद्भूतमानंदं च दिने दिने ।
> आदौ लवणक्षारं च ततस्तिक्त कषायकम् ॥३.३१॥ घेरंडसंहिता ॥
> नवनीतं घृत क्षीरं दधितक्रमधूनि च ।
> द्राक्षा रपं च पोयूषं जायते रसनोदकम् ॥३२॥

सिद्धमहायोगाचे साधन सतत करीत राहिल्याने साधकाचे मन ज्यावेळी आज्ञा-चक्रामध्ये लीन होऊन त्याला भ्रूकुटीमध्ये आत्मदर्शन होते त्यावेळी जिभेच्या मुळाशी अमृतस्राव होऊन त्याचे सेवन साधन करतो.हे साधन करीत असताना जिभेवर नाना तऱ्हेच्या अद्भुत रसांचा संचार होतो. त्यामुळे नव्या नव्या आनंदाची अनुभूती होऊ लागते. सुरुवातीला या रसाचा स्वाद खारट, क्षारयुक्त, कडू, तिखट व कषाय असा असतो.त्यानंतर किंवा मध्ये तो लोणी, तूप, दूध, दही व ताक यांच्याप्रमाणे असतो. शेवटी तो स्वाद मध व द्राक्षाच्या रसाप्रमाणे असून त्याप्रमाणे साधकाला अमृतपान होते.

या दिव्य रसांमुळे शरीरावर कोणते परिणाम घडतात अर्थात् त्यात कोणते गुण आहेत हे सांगताना " योगसागर " या ग्रंथात असे म्हटले आहे की–

> रसस्वादभेदेन विशेषं श्रृणु पार्वति ।
> क्षारेण नश्यति व्याधिः कटुना कुष्ठनाशनम् ॥१॥
> अम्लकेन महादेवि वलिपलितवर्जितः ।
> मधुस्वादुरसाद्देवि शास्त्रमुद्गीयंते ध्रुवम् ।
> घृत स्वादु रसाद्देवि अमरत्वं प्रजायते ॥२॥

निरंतर साधनाभ्यासाने जेव्हा वर वर्णन केलेल्या दिव्य रसाच्या भिन्न भिन्न रसांचे पान साधकाला घडते तेव्हा लवणादि क्षाररसाने त्याच्या रोगाचा नाश होतो. तिखट रसाने कुष्ठरोगाचाही नाश होतो. आम्लरसाने शरीराच्या कातडीची शिथिलता किंवा वळचा पडणे नाहीसे होऊन केस अकाली पिकत नाहीत. मधुर-रसाच्या प्राशनाने शास्त्रज्ञानाचा प्रकाश साधकाच्या ठिकाणी उत्पन्न होतो. ज्यावेळी तुपाच्या स्वादाचे रसपान होते त्यावेळी साधकाला अमरत्व म्हणजे मोक्षप्राप्ती होतें.

दिव्य रसाप्रमाणेच सिद्धयोग साधनेत दिव्य गंधही साधकाच्या ठिकाणी उत्पन्न होऊन ही क्रिया साधकाच्या एकाग्रतेस कारणीभूत होत असते. दिव्य गंधाचें वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

श्रीमहादेवो कापुरें उटिला । कां कैलासु पारजें डवरिला ।
नाना क्षीरोदकें पांघरविला । क्षीरार्णवो जैसा ॥११.२२२॥
जैसी चंद्रमयाची घडी उपलविली । मग गगनाकरवीं वुंथो घेवविली ।
तैसी चंदनपिंजरी देखिली । सर्वांगीं तेणें ॥२२३॥
जेणें स्वप्रकाशा कांती चढे । ब्रह्मानंदाचा निदाघु मोडे ।
जयाचेनि सौरभ्यें जीवित जोडे । वेदवतीये ॥२२४॥
जयाचे निर्लेप अनुलेपु करी । जे अनंगुही सर्वांगीं धरी ।
तया सुगंधाची थोरी । कवण वानी ? ॥२२५॥

या दिव्य गंधामुळे मन स्तंभित कसे होते हे सांगताना "अग्निपुराणात" असे म्हटले आहे की–

दिव्यं स्तंभं समाकर्षेद् गंधो नासांतिको भ्रुवः ।
गंधलीनं मनः कृत्वा स्तंभयेन्नात्र संशयः ॥

दिव्य गंधाचे स्थान भ्रूमध्यापासून नाकाच्या शेंडयापर्यंत आहे. या गंधामध्ये मन लीन केल्याने अगर झाल्याने ते निस्संदेहपणे स्तंभित होते व एकाच ठिकाणी बांधून राहते.हा गध व शब्द,स्पर्श,रूप व रस हे बुद्धीचे गुणही शक्ती बरोबर सुषुम्नेत लीन होत असल्याने " बुद्धीची पुळिका विरे । परिमळु घ्राणीं उरे । तोही शक्तीसवें संचरे । मध्यमेमाजीं ॥६.२४६॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे.

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या पाच सांसारिक प्रबल विषयांमुळे मनुष्याचे मन बलात्काराने बधनात पडते. या विषयांमध्ये आसक्त झाल्याने मनुष्याचे पतन व अधोगमन होऊन सर्वनाश होतो.हे विषय मनुष्याचे मन खेचून घेऊन त्याला नाना तऱ्हेच्या कामोपभोगवासनेत गुंतवून हतप्रभ करून दुःखी करतात; परंतु ज्यावेळी सद्‌गुरुकृपेने सिद्धयोगाचे अंतरंग साधन सुरू होते त्यावेळी साधक या पाचही विषयांचा दिव्य अनुभव जागृत शक्तीमुळे अंतरामध्येंच घेतो. अशा प्रकारे या पाच विषयांचा अंतरंगात अनुभव घेऊन त्यांचा उपभोग घेतल्याने व त्यांत मन लीन किंवा आसक्त करून बांधून टाकल्याने साधकाचे कधीही पतन न होता उलट ऊर्ध्वगमनच होते. यासाठी श्रीमहेश्वरांनी अनुप्रणित केलेल्या सिद्धयोगाच्या आश्रयाने मन अंतर्मुख करून साधक स्वतःमध्येच सर्व विषयांचा उपभोग घेत सुखी होतात.

अशा प्रकारे सिद्धयोग साधनेने अंतर्मुख झालेले पंचविषय वरवर साहित्याचा विषय वाटले अर्थात् त्यांच्यात संसार प्रवृत्ती दिसली तरी ते सहस्रारातील अमृतालाही पैजेने जिंकतात; कारण रसिक अक्षरे अर्थात् अनाहत ध्वनी किंवा नाद उपस्थित झाल्याशिवाय साधकाला हे अमृत हस्तगत करता येत नाही. साधक शब्दब्रह्मात निष्णात झाला की,तो परब्रह्मातही निष्णात होतो,हेच सत्य आहे. इतरही विषयांबद्दल हाच आध्यात्मिक नियम लागू आहे. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तो अध्यावो सहावा। वरि साहित्याचिया बरवा।
सांगिजैल म्हणौनि परिसावा। चित्त देउनी ॥६.१३॥
माझा मराठाचि बोलु कौतुकें। परि अमृतातेंही पैजा जिंके।
ऐसीं अक्षरें रसिकें। मेळवीन ॥१४॥
जिये कोवळिकेचेनि पाडें। दिसतीं नादींचें रंग थोडे।
वेधें परिमळाचें बीक मोडे। जयाचेनि ॥१५॥
ऐका रसाळपणाचिया लोभा। कीं श्रवणींचि होति जिभा।
बोलें इंद्रियां लागे कळंभा। एकमेकां ॥१६॥
सहजें शब्दु तरी विषो श्रवणाचा। परि रसना म्हणे रसु हा आमुचा।
घ्राणासि भावो जाय परिमळाचा। हा तोचि होईल ॥१७॥
नवल बोलतीये रेखेची वाहणी। देखतां डोळयांही पुरों लागे धणी।
ते म्हणती उघडली खाणी। रूपाची हे ॥१८॥
जेथ संपूर्ण पद उभारे। तेथ मनचि धांवे बाहिरें।
बोलु भुजाही आविष्कारें। आलिंगावया ॥१९॥
ऐशीं इंद्रियें आपुलालिया भावीं। झोंबती परि तो सरसेपणेंचि बुझावी।
जैसा एकला जग चेववी। सहस्रकरु ॥२०॥

हा सहावा अध्याय वरवर साहित्याच्या शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधादि, प्रवृत्तींनी नटवून सांगीन; पण अध्यात्माच्या साधकांनी तो चित्त देऊन म्हणजे शक्ती जागृत करूनच त्याचे ग्रहण करावे.माझे हे शब्द प्राकृत असले तरी ते शक्तीचे वाहक असल्यामुळे किंवा शब्द हे शक्तीच असल्यामुळे ते जेव्हा जागृत स्वरूप धारण करतील तेव्हा ते अनाहत नादात रूपांतरित झाल्यावर लीलीने सहस्रारातील अमृतालाही पैजेने जिंकतील. अशा प्रकारची रसभरित किंवा रसोत्पादक अक्षरेच मी कथन करीन. ज्यावेळी माझे शब्द अनाहत नादाची कोमलता धारण करतील त्यावेळी सर्व बाह्य नादांचे रंग त्याच्यापुढे फिके पडतील.या त्यांच्या वेधाच्या सामर्थ्यामुळे बाह्य सुगंधाचेही सामर्थ्य तोकडे पडेल. या अनाहत नादाच्या रसाळपणाच्या लोभाने कानच जिभा होऊन त्यांचा रस चाटू लागतील व यामुळे इंद्रिये आपापसात कलह करू लागतील. सहज विचार करून पाहिले तर शब्द हा कानाचा विषय आहे; पण तो शक्तीच्या रूपाने चेतन झाला की,जीभ म्हणेल हा आमचाच रसविषय आहे व नाकालाही असे वाटेल की, हा तर आमचा गंध विषय आहे. असे होण्याचे कारण शब्दाची शक्तीच्या रूपाने झालेली चेतनावस्था किंवा जागृती हेच आहे. माझ्या अपूर्व अशा सुंदर अक्षर रचनेची पद्धत नवलपूर्ण आहे ; कारण हे बोल ज्यावेळी जागृत शक्तीच्या सामर्थ्याने परमेश्वराच्या अनंत रूपांची खाण नानाविध पद्धतीने उघडून दाखवितील तेव्हा अंत:चक्षू अगदी तृप्त होतील.ज्यावेळी

शब्दांच्या अर्थात् शक्तीच्या सामर्थ्याने सर्व आवरणे दूर होऊन पद म्हणजे परमात्मा ( पदं हंसः प्रकीर्तितः– गुरुगीता ) उभा ठाकेल त्यावेळी सुप्तावस्थेतील मन अर्थात् जीवरूपाने संकुचित झालेली मूलाधारातील निद्रिस्त शक्ती आपले स्थान सोडून सुषुम्नामार्गाने धाव घेत आपल्या शक्तींच्या बाहूंनी त्याला आलिंगन देण्यासाठी अर्थात् त्याच्याशी समरस होण्यासाठी आविष्कृत किंवा प्रकट होईल. अशा प्रकारे सर्व इंद्रिये आपापल्या स्वभावांप्रमाणें अंतर्मुखी प्रवृत्तीने प्रकट होऊन अनाहत नादाला झोंबताना दिसली; तरी सूर्य ज्याप्रमाणे सर्व जग जागृत करून आपल्या प्रकाशाने भरून टाकतो त्याप्रमाणे हा नाद या सर्व प्रवृत्तींना आपल्यात समाविष्ट करून शेवटी सहस्रारात लीन होतो.

सारांश, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी साधनातील क्रियांचे व अनुभवांचे हे सार अशा रीतीने स्पष्ट केले आहे. साहित्याच्या बरवेपणाची त्यांची कोवळीक बाजूला करून आपण शुद्ध शास्त्रीय चिकित्सेच्या दृष्टीने त्याचे आलोडन केले. "जात्यंधु कैसें पाहेल ।।६.७।।" अशी धृतराष्ट्राप्रमाणे आपली स्थिती होऊ नये म्हणून अर्जुनालागी नारायणांनी केलेल्या ब्रह्मरसाच्या सहज पारण्याची अर्थात् सिद्धयोगशास्त्राची ही चिकित्सा श्रीज्ञानेश्वरमहाराजस्वरूप सद्‌गुरुनाथांच्या आशीर्वादाने फळास आली. यावेळी माझ्या अंतःकरणात सामरस्याने उपस्थित असलेले हे अद्वैतरूप सिद्धांचे गुरू तू धन्यवादास पात्र आहे, असेच म्हणत असल्यामुळे त्यांच्या चरणकमलभृंगरूप सेवकाला याबद्दल कृतार्थता वाटते.

## साधनक्रियांची वैशिष्टये :–

सिद्धयोग साधनात कोणकोणत्या क्रिया होतात याचा आपण सांगोपांग विचार केला. या साधनक्रियांची वैशिष्टये श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कशी स्पष्ट केली आहेत ते यापुढे पाहू.

सिद्धयोग साधनात होणाऱ्या साधनक्रियांचे पहिले वैशिष्टय हे आहे की, या सर्व प्रकारच्या क्रिया भिकाऱ्याला साम्राज्यसंपत्ती किंवा त्रिभुवनैक दुर्लभ वस्तूची प्राप्ती व्हावी इतक्या श्रेष्ठ, लोकोत्तर, अलौकिक, अद्‌भुत, असामान्य, एकमेवाद्वितीय व ब्रह्मस्वरूपप्राप्तीसारख्याच महान् आहेत. असे असले तरी भिकाऱ्याला जशी साम्राज्याची किंमत कळत नाही त्याप्रमाणेच संकुचित स्वरूपाने जडस्वरूपाप्रत गेलेल्या जीवालाही याची किंमत आत्यंतिक बहिर्मुख वृत्तीमुळे अर्थात् अंतर्मुखी वृत्तीच्या अभावामुळे कळत नाही. या बाबतीत सर्व जीवांचे प्रतीक म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी धृतराष्ट्राचे चित्र रंगविले आहे. "जात्यंधु कैसें पाहेल ।।६.७।।" ही सर्व जीवमात्रांची स्थिती आहे, असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे म्हणणे आहे; कारण सिद्धयोग व तदंतर्गत क्रियादि संबंधीची माहिती सांगून त्याची स्तुती करताना किंवा माहात्म्य अगर वैशिष्टये सांगताना संजय धृतराष्ट्राला असे म्हणाला आहे की–

मग रायातें म्हणे संजयो । तोचि अभिप्रावो अवधारिजो ।
कृष्ण सांगती आतां जो । योगरूप ।।६ १।।
सहजें ब्रह्मरसाचें पारणें । केलें अर्जुनालागीं नारायणें ।
कीं तेचि अवसरीं पाहुणे । पातलों आम्ही ।।२।।
कैसी दैवाची आगळिक नेणिजे । जैसें तान्हेलिया तोय सेविजे ।
कीं तेंचि चवी करूनि पाहिजे । तंव अमृत आहे ।।३।।
तैसें आम्हां तुम्हां जाहलें । हें आडमुठीं तत्त्व फावलें ।।४।।
ऐसेसें हो अवधारा । तो अनन्याचा सोयरा ।
सांगतसे वीरा । पार्थासी ।।१४.४०८।।

परंतु संजयाने धृतराष्ट्राला असे कितीही सांगितले, तरी "या अवस्थांची कांहीं। कौरवांते परी नाहीं ।।१८ १६२२।।" हेच खरे होते; कारण संजयाने कितीही वर्णन केले तरी धृतराष्ट्र त्याला असेच म्हणत होता की—

तंव धृतराष्ट्रें म्हणितलें । हें न पुसो तूंतें ।।६.४।।
येथ धृतराष्ट्र म्हणे । संजया हें तूंतें कोणें ।
पुसलेंनिविण वायाणें । कां बोलसी ।।१४.४०९।।

तेथ कोणी येकी अवसरी । होआवी ते करूनि दुरी ।
रावो म्हणे संजया परी । कैशी तुझी गा ? ।।१८.१६२४।।
तेणें तूंतें येथें व्यासें । बैसविलें कासया उद्देशें ।
अप्रसंगामाजीं ऐसें । बोलसी काई ? ।।१६२५।।

धृतराष्ट्राची ही अत्यंत निकृष्ट अवस्था पाहून संजय मनात हसून "म्हणे म्हातारा मोहें नाशिला ।। ६.६ ।।" ऐवढे म्हणूनच थांबला नाही; तर त्याच्या सबंधी अनुकंपा व्यक्त करताना तो म्हणाला की—

संजयो विस्मयो मानसीं । आहा करूनि रसरसी ।
म्हणे कैसें पां देवेंसी । द्वंद्व यया ? ।।१४.४११।।
तरी तो कृपाळु तुष्टो । यया विवेकु हा घोंटो ।
मोहाचा फिटो । महारोगु ।।४१२।।

परंतु यापेक्षाही धृतराष्ट्राच्या वरील म्हणण्यावर टीका करताना सिद्धयोग साधनांतर्गत क्रियांच्या अपार वैभवाचे माहात्म्य ज्यांना माहीत नसते त्यांना ही गोष्ट भयंकरच वाटते व ते या क्रियांना अप्रासंगिक गोष्ट म्हणून तुच्छ लेखतात हे सांगताना स्वत: श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीच असे म्हटले आहे की—

रानींचें राउळा नेलिया । दाही दिशा मानी सुनिया ।
कां रात्री होय पाहलया । निशाचरां ।।१८.१६२६।।

**जो जेथिंचें गौरव नेणें । तयासि तें भिंगुळवाणें ।**
**म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ॥१६२७॥**

रानात राहणाऱ्या एखाद्या अडाणी किंवा रानटी मनुष्याला एखाद्या मोठ्या महालात किंवा राजमंदिरात नेले असता त्याला जशा दाही दिशा उदास वाटतात किंवा उजाडले असतानाही जशी निशाचरांना रात्रच आहे असे वाटते त्याप्रमाणे ज्याला येथील महत्त्व माहीत नसते त्याला ती गोष्ट विपरीत किंवा भयंकरच वाटत असते. म्हणून सिद्धयोग साधनेत उपस्थित होणाऱ्या अष्टसात्त्विकादि सर्व क्रियांना तो वाईट, अप्रासंगिक किंवा अप्रस्तुत असेच म्हणणार.परंतु यासंबंधी " कुलार्णव-तंत्रामध्ये " असे म्हटले आहे की–

**यत्र यद् यत् कृतं कर्म शुभं वा यदि वाऽशुभम् ।**
**तत्सर्वं देवताप्रीत्यै जायते सुरसुंदरि ॥८.५८॥**
**जल्पो जपफलं तंद्रा समाधिरभिधीयते ।**
**विक्रिया पूजनं देवि छेदितं भैरवे बलिः ॥५९॥**
**मुक्तिः स्याच्छक्तिसंयोगः स्तोत्रं तत्कालभाषितम् ।**
**न्यासोऽवयवसंस्पर्शो भोजनं हवनक्रिया ॥६०॥**
**वीक्षणं ध्यानमिशानि शयनं वंदनं भवेत् ।**
**तदुल्लासे कृता नाना या चेष्टा सा च सत्क्रिया ॥६१॥**

( साधनात ज्या ज्या विविध क्रिया होतात त्या अर्थशून्य तर नाहीत ना असा संशय अनेक विद्वानांना, पंडितांना, नूतन साधकांना व सामान्य जीवाला सतत येतो याचे एकच कारण अनुभूतिशून्यता हे आहे. ) कुंडलिनी महाशक्ती जागृत झाल्यावर या जन्मी अगर जन्मजन्मांतरी सरळ किंवा उलटसुलट पद्धतीने शुभ किंवा अशुभ कर्म,यंत्र, जप, तप, पाठ, पूजा, उपासना इत्यादींच्या रूपाने जे जे काही केले असेल ते ते सर्व शुभरूप होऊन फलित होते व सर्व देवदेवता प्रसन्न होतात. ( अशा क्रिया होणे ही परम भाग्यकारक व पुण्यकारक गोष्ट आहे. सद्गुरूंनी शक्तिपात दीक्षा दिल्याशिवाय हा क्रियांचा प्रसाद साधकाला प्राप्त होत नाही. साधनाच्यावेळी साधकाकडून ज्या काही शुभ व अशुभ क्रिया होत असतात त्या सर्व कुंडलिनी शक्तीच आत्मप्राप्तीसाठी करीत असते, त्यामुळे ) साधकाचे ओरडणे, बडबडणे व वाटेल तसे बोलणे या क्रिया जपाचे फल देतात. नाना तऱ्हेच्या शरीराच्या ज्या हालचाली होतात त्या पूजेचे फल देतात. साधनात येणारी तंद्रा किंवा निद्रा समाधीचे फल देतात. रेचक, पूरक, कुंभक या द्वारा होणाऱ्या प्राणायामाच्या सर्व क्रिया बलीचे काम करतात. त्यामुळे सर्व पापांचा नाश होतो. ज्यावेळी या क्रियांमुळे तीव्र स्वरूपात शक्ती जागृत होऊन विकासोन्मुख होते तेव्हा

या संयोगामुळे मुक्तीचे फल साधकाला मिळते. साधनाच्या वेळी त्याच्या मुखातून जे जे काही शब्दरूपाने बाहेर पडते त्यापासून स्तोत्रपाठाचे फल त्याला मिळते. हाताने निरनिराळ्या अवयवयांना केलेला स्पर्श व स्वत:च्या शरीराच्या अंगप्रत्यंगांना केलेले मर्दन हे मंत्रन्यासाचे काम करतात. साधकाचे भोजन ही हवन क्रियाच होय. साधनाच्या वेळी क्रियाशक्तीच्या आवेशात साधकाची जिकडे दृष्टी जाते किंवा त्याच्याकडून पाहिले जाते ते त्याचे पाहणे ध्यानरूप होते व त्यामुळे त्याला ध्यानाचे फल मिळते. क्रिया होत असताना साधक जेव्हा जमिनीवर पडतो, लोळतो, आडवा होतो किंवा कसाही कलंडतो तेव्हा त्याला साष्टांग नमस्काराचे फल मिळते. अशा प्रकारे कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यावर जन्मजन्मांतरी केलेल्या नानाविध साधनांच्या संस्कारानुरूप साधकाला क्रिया होतात. साधनातील या क्रिया शुभ किंवा अशुभ असल्या तरी त्या सर्व आध्यात्मिक ज्ञानामध्ये परिणत होऊन महामंगलकारक व सुखदायक होतात.

क्रियाच आध्यात्मिक ज्ञानात परिणित होतात हीच गोष्ट अधिक स्पष्ट करताना "तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि" या ग्रंथातील "देहविज्ञान" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, "ज्ञान और क्रियाका स्वरूप क्या है ? ज्ञान अभेदात्मक होनेसे चित् है। क्रिया भेदरूपा है, यह चैत्य है। गुरुके कृपाकटाक्षसे जिनके अज्ञानांधकारकी निवृत्ति हो चुकी हो, वे ही इसको समझ सकते हैं। अतएव क्रिया ज्ञानसे वस्तुत: अभिन्न है, यह बात सत्य है। इसके विपरीत यह भी सत्य है कि विमर्शरूप क्रिया काठिन्यका त्यागकर विश्रांतिस्वरूप विरलता ग्रहण करनेपर ज्ञान कही जाती है, अर्थात् प्रकाशके साथ एकरस होती है। अतएव ज्ञानकी बाह्यरूप क्रिया, क्रियाका वास्तविकरूप ज्ञान—दोनोंका एकही अर्थ है। यह ज्ञानही प्रकाश या शिव है एवं क्रिया विमर्श या शक्ति है। दोनोंकी प्रधानता एकसी है, इसलिए दोनोंही युगपत् सत्य हैं। सिद्धलोग कहते हैं कि यह यामलसिद्धांत मंत्रविज्ञानका रहस्य स्वरूप है।

कुछ लोग प्रश्न करते है की ज्ञान क्रियाका कारण हो और क्रिया ज्ञानका कारण हो, यह कैसे हो सकता है ? इसका उत्तर यह है कि क्रिया या विमर्शके बिना ज्ञानका प्रकाशस्वरूपही सिद्ध नहीं होता। ठीक उसी तरह ज्ञानके बिना क्रियाकी उपलब्धि भी सिद्ध नहीं होती। इसलिए सिद्धलोग कहते हैं कि ज्ञान और क्रिया यामल या युगपतसिद्ध हैं। यही मंत्रका रहस्य है। ज्ञान और क्रियामें पौर्वापर्य नहीं है। यौगपद्यही है। वेद्य-वेदकके रूपसे, प्रकृति-पुरुषके रूपसे, देह-आत्माके रूपसे और शब्द-अर्थके रूपसे अथवा अन्य किसी प्रकारके पर्यायके आकारसे ज्ञान और क्रिया दोनोंही युगपतसिद्ध है। इसका तात्पर्य यह है कि क्रिया विमर्शरूप होनेके कारण शक्तिरूप है तथा ज्ञान प्रकाशरूप होनेसे शिवस्वरूप है, यह रहस्य जानना चाहिये।" (पृ.१२६) .....

सिद्धयोग साधनात होणाऱ्या क्रियांचे दुसरे वैशिष्टय असे आहे की, या योगक्रियांच्या द्वारा कर्मनिवृत्ती होऊन साधकाला नैष्कर्म्य अवस्था किंवा नैष्कर्म्य सिद्धी प्राप्त होते सिद्धयोगांतर्गत क्रियांमुळे साधकाची कर्म अर्थात् पापपुण्याची निवृत्ती कशी होते, हे सांगताता श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

जे बुद्धियोगा योजिले। तेचि पारंगत जाहले।
इहीं उभयबंधीं सांडिले। पापपुण्यीं ॥२.२७७॥
म्हणौनि तयाची बुद्धी। नेणे पापपुण्याची गंधी।
गंगा मीनलिया नदी। विटाळु जैसा ॥१८.४५०॥
मग ताकौनियां काढिलें। लोणी मागौतें ताकीं घातलें।
परी न घेपेचि कांहीं केलें। तेणें जेवीं ॥१८.१४०६॥
तैसें अद्वयत्वें मज। शरण रिघालिया तुज।
धर्माधर्म हे सहज। लागतील ना ॥१४०७॥
अर्जुना काय दिनकरु। देखत आहे अंधारु।
कीं प्रबोधीं होय गोचरु। स्वप्नभ्रमु ॥१४१०॥
तैसें मजसीं एकवटलेया। मी सर्वरूप वांचूनियां।
आन कांहीं उरावया। कारण असे ? ॥१४११
म्हणौनि तयाचें कांहीं। चिंतीं ना आपुल्या ठायीं।
तुझें पाप पुण्य पाहीं। मीचि होईन ॥१४१२॥

कर्माची निवृत्ती होणे याचा अर्थ पाप व पुण्य हे दोन्हीही नाहीसे होणे होय; कारण यांपैकी काहीही राहिले तरी ते पुनर्जन्मास व पर्यायाने सुखदुःखास कारण होणार. अर्थात् त्यामुळे नैष्कर्म्य सिद्धी होणार नाही. यासाठी मुळातच भगवंतांनी अर्जुनाला "सर्वधर्मान्परित्यज्य ॥ गीता ॥ १८.६६ ॥" असे सांगितले आहे व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याचा भावार्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, ताक घुसळून लोणी बाहेर काढावे त्याप्रमाणे साधनातील क्रियांनी जेव्हा शरीर, मन व प्राण घुसळून निघतात तेव्हा आत्मस्वरूप प्रकट होते व पापपुण्य दोन्हीही जळून जातात. या अद्वय स्थितीत साधकाला धर्माधर्म लागत नाहीत; कारण तो स्वतःच परमात्मरूप अर्थात् पापपुण्यभक्षक झालेला असतो. इतर सर्व साधने ही पापभक्षक व पुण्योत्पादक असल्याने साधकाची जन्ममरणपरंपरा तुटत नाही; कारण पुण्य शिल्लक राहिल्यामुळे ते भोगण्यासाठी त्याला जन्म ग्रहण करणे भाग पडते. यासाठी पाप व पुण्य हे दोन्हीही जाळणारे साधन हवे. सिद्धयोग हेच एकमात्र साधन असे असल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरील ओव्यातून स्पष्ट केले असून या साधनातील योगक्रियांचे अत्यंत श्रेष्ठ असे मार्मिक तत्त्व फक्त सद्‌गुरूंपासूनच प्राप्त होणारे आहे व त्यामुळेच सर्व कर्मांची निवृत्ती होते, हे सांगताना ते म्हणतात–

कर्माधारें राहाटिजे । परी कर्मफळ न निरीक्षिजे ।
जैसा मंत्रज्ञु न बंधिजे । भूतबाधा ॥२.२३४॥
तियापरी जे सुबुद्धि । आपुलिया निरवधि ।
हा असतांचि उपाधि । आकळूं न सके ॥२३५॥
जेथ न संचरे पुण्यपाप । जें सूक्ष्म अति निष्कंप ।
गुणत्रयादि लेप । न लगती जेथ ॥२३६॥
अगा करितेनवीण कर्म । तेंचि तें नैष्कर्म्य ।
हें जाणती सुवर्म । गुरुगम्य जें ॥५.६३॥
मुखाभासेंसीं आरिसा । परौता नेलिया वीरेशा ।
पाहातेपणेंवीण जैसा । पाहाता ठाके ॥१८.९७६॥
तैसें नेणणें जें गेलें । तेणें जाणणेंही नेलें ।
मग निष्क्रिय उरलें । चिन्मात्रचि ॥९७७॥

या दृष्टीनेच " योगाशिखोपनिषदात " असे म्हटले आहे की–

आधारचक्रमहसा विद्युत्पुंजसमप्रभा ।
तदा मुक्तिर्न संदेहो यदि तुष्टः स्वयं गुरुः ॥६.२६॥
आधारचक्रमहसा पुण्यपापे निकृंतयेत् ॥२७॥
योगशिखां महागुह्यां यो जानाति महामतिः ।
न तस्य किंचिदज्ञातं त्रिषु लोकेषु विद्यते ॥५.६०॥
न पुण्यपापे नास्वस्थो न दुःखं न पराजयः ।
न चास्ति पुनरावृत्तिरस्मिन् संसारमंडले ॥६१॥

जर सद्गुरू संतुष्ट झाले तर विद्युल्लतेच्या पुंजाप्रमाणे तेजस्वी असलेल्या आधारशक्तीच्या प्रभावाने मोक्ष निःसंशय मिळतो. या आधारशक्तीच्या सामर्थ्याने, तेजाने किंवा तिच्या जागृतीमुळे घडून येणाऱ्या यज्ञाने अर्थात् सुषुम्नेतून मार्गस्थ झाल्यामुळे या नाडीच्या आश्रयाने राहणाऱ्या सर्व पापपुण्यांचा म्हणजेच सर्व कर्मांचा उच्छेद होतो. हेच सर्व योगातील शीर्षस्थ, मूर्धन्य किंवा शिखारूप रहस्य आहे. जो साधक हे क्रियांचे व तद्द्वारा होणाऱ्या कर्मनिवृत्तिपूर्वक नैष्कार्म्यावस्थेचे रहस्य जाणतो तोच खरा महान् बुद्धिमान मनुष्य होय.अशा साधकाला त्रैलोक्यामध्ये काहीही अज्ञात राहत नाही. त्याला पुण्यपाप, अस्वस्थता, दुःख व पराजयादि गोष्टी कधीही स्पर्श करू शकत नाहीत. इतकेच नव्हे तर या संसारचक्रव्यूहात तो पुन्हा कधीही सापडत नाही.

" शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेतही " या दृष्टीनेच असे कथन केले आहे की–

अध्यात्मविद्या हि नृणां सौख्यमोक्ष्यकरीभवेत् ।
धर्मं कर्मं तथा जप्यमेतत्सर्वं निवर्तते ॥११.१॥

**तेषां ममात्मविज्ञानं विशुद्धानां विवेकिनाम् ।**
**मत्प्रसादाद्विशुद्धानां दुःखमाश्रमरक्षणात् ॥२९॥**
**नास्ति कृत्यमकृत्यं च समाधिर्वा परायणम् ।**
**न विधिर्न निषेधश्च तेषां मम यथा तथा ॥३०॥**

अध्यात्मविद्या अर्थात् सिद्धयोगशास्त्र हेच माणसाला आत्यंतिक सुख व मुक्ती प्रदान करणारे आहे. सिद्धयोगाची प्राप्ती झाली की, धर्म, कर्म, जप, पूजा, पाठ इत्यादि आपोआप सुटतात व साधक विधिनिषेधाच्या सर्व धर्मकर्मांपासून निवृत्त होतो. यामुळे श्रीमहेश्वर म्हणतात, "माझ्या कृपाप्रसादाने प्राप्त झालेल्या क्रियाशक्तीमुळे जे साधक विशुद्ध झाले आहेत व ज्यांच्या ठिकाणी विवेक उत्पन्न झाला आहे, ते आश्रमधर्मांचे रक्षण करू शकत नाहीत. जे अशा प्रकारे समाधीमध्ये निपुण, युक्त, डुंबलेले किंवा बुडालेले असतात ते माझ्या भक्तीच्या व शक्तीच्या बळावर माझ्या सारखेच विधिनिषेधाच्या पलीकडे गेलेले असतात. त्यामुळे त्यांना कृत्याकृत्याचे किंवा विधिनिषेधाचे कोणतेही बंधन नाही.

"सूर्यगीतेत" तर साधक अतिवर्णाश्रमी कसा होतो अर्थात् तो नैष्कर्म्याव-स्थेप्रत कसा जातो, हे सांगताना असे म्हटले आहे की–

**आद्यज्ञानोदये काम्यकर्मत्याग उदीर्यते ।**
**द्वितीयसम्यग्ज्ञाने तु नैमित्तिकनिराकृतिः ॥३.६२॥**
**तृतीयपूर्णज्ञाने तु नित्यकर्मनिराकृतिः ।**
**चतुर्थाद्वैतबोधे तु सोऽतिवर्णाश्रमी भवेत् ॥६३॥**

या श्लोकांवर अर्थात्मक टीका करताना श्रीयोगेंद्र विज्ञानी यांनी "महायोग विज्ञान" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "प्रथम योगसाधनाने ज्ञानाचा उदय होतो व त्यामुळे साधक काम्य कर्माचा त्याग करतात. ज्ञानाचा प्रकाश अंतःकरणात उत्पन्न झाल्याने साधकाच्या मनात संसारसुखप्राप्तीची कोणतीच इच्छा राहत नाही. त्यामुळे साधक कामनापूर्वक कोणतेही कर्म करीत नाहीत.अशा प्रकारे ज्ञानाचा उदय झाल्याने साधकाच्या काम्यकर्माचा त्याग होतो. त्यानंतर दुसरी गोष्ट अशी होते की; योग साधनाने प्रकाशित झालेले ज्ञान साधकाच्या बुद्धीत समाविष्ट होते. सम्यक्-रीतीने ज्ञान बुद्धीत प्रतिष्ठित झाले की,साधक नैमित्तिक कर्माचाही त्याग करतात; कारण कोणत्याही निमित्ताने कोणतेही काम ते करीत नाहीत. याच ज्ञानाच्या विचाराने त्यांचा नैमित्तिक कर्माचा त्याग होतो. ज्यावेळी साधकाला तिसरी अवस्था प्राप्त होते त्यावेळी योग साधनेत साधकाला पूर्ण ज्ञान होते व त्यावेळी नित्यकर्मा-चाही तो त्याग करतो. चौथ्या अवस्थेत साधकाला अद्वैत ज्ञान झाले म्हणजे त्याचा वर्णाश्रम धर्माचाही त्याग होतो.याप्रमाणे श्रीशंकरांच्या कृपाप्रसादाने क्रियाशक्तीमुळे ज्ञानाचा उदय होऊन स्थिरता व पूर्णता प्राप्त झाल्यावर साधकाच्या नित्य,

नैमित्तिक, काम्य, प्रायश्चित्त व निषिद्धादि सर्व कर्मांचा त्याग होऊन साधक अद्वैत ज्ञानाने शिवस्वरूप होऊन जातात. या अवस्थेत कोणतेही कर्म त्यांना बद्ध करू शकत नाही."

वरील सर्व विवेचनाचे सार श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात सांगावयाचे झाले; तर असे म्हणता येईल की—

जेथ न संचरें पुण्यपाप। जें सूक्ष्म अति निष्कंप।
गुणत्रयादि लेप। न लगती जेथ ॥२.२३६॥
अर्जुना तें पुण्यवशें। जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे।
तरी अशेषहि नाशे। संसारभय ॥२३७॥

सिद्धयोग साधनेत होणाऱ्या क्रियांचे तिसरे वैशिष्टच असे आहे की, या क्रियांद्वारा ज्ञानयज्ञ किंवा आत्मयज्ञ "परी ज्ञानयज्ञाची सरी न पवती ॥४.१५८॥" याप्रमाणे उपस्थित होऊन त्यात "इंद्रियद्रव्याचेनि पवाडें॥ ८.५०॥" व "मन-प्राणसंयमु। हाचि हवनसंपदेचा संभ्रमु ॥८.५१॥" या न्यायाने इंद्रिये, मन व प्राण यांचे विविध प्रकारे विविध स्तरांवर हवन घडत असते. "धर्मसूत्रकार" बौधायनाने असे म्हटले आहे की, "सर्वक्रतुयाजिनामात्मयाजी विशिष्यते।" याचा अर्थ आहे की, सर्व प्रकारच्या यज्ञांमध्ये आत्मयज्ञच सर्वश्रेष्ठ आहे; कारण आधानानंतर जेव्हा निरनिराळे अग्नी यजमानामध्ये राहतात तेव्हा प्रथम गार्हपत्य अग्नी यजमानाच्या प्राणरूपाने राहतो. नंतर दक्षिणाग्नी अपानरूपाने, आहवनीय व्यानरूपाने, सभ्य उदानरूपाने व आवसथ्य समानरूपाने राहतो. हे पाचही अग्नी आत्मस्थ म्हणजे आत्म्यात राहतात. यावेळी कोणताही अग्नी बाहेर राहत नाही. त्यामुळे त्यावेळी "आत्मन्येव जुहोति" या न्यायाने आत्म्यातच हवन होते. याचेच नाव आत्मयाग, आत्मनिष्ठा व आत्मप्रतिष्ठा असे आहे. ( बौधायन पृ. २१०-२११)

अशा या यज्ञाचे व तदंगभूत क्रियांचे वैशिष्टच स्पष्ट करताना "भारतीय संस्कृति और साधना" खंड पहिला, या ग्रंथात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "यज्ञका रहस्य" या लेखात असे म्हटले आहे कीं, "यज्ञ शब्दसे कर्मका बोध होता है, इसमें संदेह नहीं है। किंतु जिस किसी कर्मको यज्ञ नहीं कहा जा सकता। यद्यपि काम्य कर्म भी यज्ञ नामसे परिचित है तथापि वह यज्ञका वास्तविक आदर्श नहीं है, यह पहलेही कहा जा चुका है। जिस कर्मसे शुद्धि-देहशुद्धि, इंद्रियशुद्धि, अहंकारशुद्धि और चित्तशुद्धि होती है, जिस कर्मका फल स्वार्थ नहीं, परार्थ है, जिस कर्मसे नया आवरण नहीं बनता, वल्कि पहलेका आवरण क्षीण हो जाता है, जो मार्ग जीवको क्रमशः कल्याणके मार्गमें अग्रसर होनेमें सहायता देता है और अंतमें महाज्ञान तक प्राप्त कराता है, वही यज्ञ है। इसीलिए गीतामें कहा है, यज्ञार्थके अतिरिक्त अन्य कर्मोंसे बंधन होता है। वास्तवमें निष्काम भावसे किया गया, फलाकांक्षारहित योगस्थ कर्म या स्वभावसिद्ध कर्मही यज्ञ है।

त्याग और ग्रहण ये दो कर्मके अंग हैं। जो असार होनेसे हेय है, उसका त्याग करना और जो ससार होनेसे उपादेय है उसका ग्रहण करना, ये दोनों क्रियाएँही कर्म या यज्ञके स्वरूप हैं। प्रकृतिराज्यमें सभी पदार्थ सांकर्य दोषसे युक्त हैं। यहाँ ऐसी कोई वस्तू नहीं है, जिसमें विलकुल मल न हो और ऐसी भी वस्तु नहीं है, जिसमें केवल मलही मल हो और कुछ न हो। जगत्की सभी वस्तुओंमें शुद्ध और अशुद्ध अंश संमिलित है। क्रियाकौशलसे शुद्धाशुद्धमिश्रित पदार्थसे क्रमशः उस अशुद्ध अंशका त्याग और शुद्ध अंशकी वृद्धि होती है। उक्त क्रियाकौशलही यज्ञका रहस्य है। जिसके द्वारा यह त्याग-ग्रहणरूप सारासार-विवेचन-क्रिया निष्पन्न होती है, वही चैतन्यशक्ति है। यज्ञीय परिभाषामें उसीका प्रतिनिधि है यथाविधि सुसंस्कृत 'अग्नि'। शक्तिके सुप्त रहनेपर कर्म नहीं होता। उसे जगाकर और साधनादि द्वारा संस्कृत कर उससे कर्म किया जाता है। अग्न्याधान आदि क्रिया उसीकी केवल पारिभाषिक संज्ञा है। कुंडलिनीके जागे विना जैसे योग-क्रिया सिद्ध नहीं होती, वैसेही होमाग्निके प्रज्वलित हुए विना यज्ञका कामभी सिद्ध नहीं होता।

मूल शक्तिके एक और अभिन्न होनेपर भी व्यवहार-भूमिमें वह अनेक और भिन्न है। मूल शक्तिमें यद्यपि क्रम नहीं है तो भी जागतिक शक्तिमें जो क्रम है, उसका अपलाप नहीं किया जा सकता। स्तर-भेदसे ऊर्ध्वगति या विकासकी क्रमिक अभिव्यक्ति आदि उसीके ऊपर निर्भर हैं। ऊपर चढनेकी सीढीपर पदार्पण करनेके पहले सर्वप्रथम शक्तिके जागरणका अनुभव होता है। उसके बाद इसी स्तरमें जाग्रत् शक्तिके प्रभावसे मलिनांश दूर हो जाता है और शुद्धांश प्रकाशित होता है। उसके अनंतर उच्चतर भूमिकी जाग्रत शक्तिमें उस शुद्धांशकी आहुति दी जाती है। पहली अग्निसे दूसरी अग्नि तीव्रतर होती है। प्रथम अग्निपरीक्षामें जिसका शुद्धांश-रूपसे निर्णय किया जाता है, द्वितीय अग्निमें आहुति देनेके बाद उस शुद्धांशमें भी सूक्ष्म मल दिखाई देता है। दूसरी अग्नि उसे जला देती है और उस शुद्धांशको शुद्धतर करके प्रकाशित करती है। यद्यपि वह शुद्ध अंश भी अशुद्धिरहित नहीं है, तथापि द्वितीय अग्निकी क्रियासे वह अशुद्धि प्रतीत नहीं होती। उसके बाद तृतीय अग्निकी क्रिया चलती है। इस प्रकार जबतक अशुद्धि रहती है, तबतक अग्निकी दाहिका शक्ति दहनकार्य और मलापसरण-कार्यमें व्यापृत रहती है। सत्त्वके मलके पूर्णतया निकल जानेपर वह विशुद्ध सत्त्वके नामसे परिचित होता है। अग्नि उस समय फिर अग्नि नहीं रहती; क्योंकि मल या विशुद्धी दाह्य है– दाह्यके न रहनेपर दाहिका शक्ति भी कार्य नहीं करती। तब फिर अग्नि,अग्नि नहीं कही जा सकती। तब वह विशुद्ध ज्योतिमात्र है। उसमें एक ओर विशुद्ध ज्योति और दूसरी ओर विशुद्ध सत्त्व विद्यमान रहते हैं। ( पृ १८० – १८१ )

आगममें कहा है, यज्ञका यथार्थ स्वरूप तभी हृदयंगम होता है, जब इंद्रिय-

गोचर और इंद्रियातीत संपूर्ण ज्ञेय पदार्थोंकी आहुति देनेकी योग्यता प्राप्त हो जाती है। उस समय इंद्रिया स्रुक होती है ( हविके आधार होमसाधन जुहूको स्रुक् कहते हैं ) स्वयं ( साधक ) होता है होता, अपने आत्मरूपी शिव होते हैं अग्नि और शक्तियाँ होती है अग्निज्वालाएँ अर्थात् परिच्छिन्न चिदात्मा स्वयंही होता बनकर अपरिच्छिन्न विशुद्ध चैतन्यात्मक निजस्वरूपभूत अग्निमें इंद्रियसंवेद्य सब विषयोंकी इंद्रियोंद्वारा आहुति देता है। निजबोधरूप अग्निमें सब भाव समर्पित होकर अपनी अपनी पृथक्ता और भेदका त्याग कर एकमात्र बोधरूपमें स्फुरित होते हैं। इसीका नाम अमृतीभाव है। इस प्रकार बोधके प्रदीप्त होनेपर इंद्रियोंकी आधिष्ठात्री देवियाँ इस अमृतका भोग करती हैं अर्थात् परमबोधरूपसे परामर्श करती हैं। देवियाँ तृप्त होकर परमबोधके साथ अभेदको प्राप्त होती हैं। उस समय महास्वातंत्र्यका उदय होता है और परमप्रकाशके साथ अद्वैतभावमें स्थिति होती है।"( पृ. १८७-१८८ )

सिद्धयोग साधनेतील क्रियांचे चौथे वैशिष्टच हे आहे की, कर्म, जाती व व अवस्थांचे बंधन क्रियांना पडू शकत नाही. हे वैशिष्ट "मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥९.३२॥" या भगवान् श्रीगोपालकृष्णनाथांच्या वचनात स्पष्ट झालेच आहे. त्यांच्या म्हणण्याचा भावार्थ अधिक स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात–

म्हणौनि भक्ति गा एथ सरे। जाति अप्रमाण ॥९.४५२॥
म्हणौनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण।
एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक ॥४५६॥
तेंचि भलतेणें भावें। मन मज आंतु येतें होआवें।
आलें तरी आघवें। मागील वावो ॥४५७॥
जैसें तंवचि वहाळ वोहळ। जंव न पवती गंगाजळ।
मग होऊनि ठाकती केवळ। गंगारूप ॥४५८॥
कां खैर चंदन काष्ठें। हे विवंचना तंवचि घटे।
जंव न घापती एकवटे। अग्नीमाजीं ॥४५९॥
तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया। कां शूद्र अत्यंजादि इया।
जाति तंवचि वेगळालिया। जंव न पवती मातें ॥४६०॥

या दृष्टीनेच श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनी "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की–

युवा वृद्धोऽतिवृद्धो वा व्याधितो दुर्बलोऽपि वा।
अभ्यासात्सिद्धिमाप्नोति सर्वयोगेष्वतंद्रितः ॥१.६४॥

साधक तरुण, वृद्ध, अतिवृद्ध, रोगी किंवा दुर्बल असला तरीं योगाच्या सर्वां-

गांचा जो अत्यंत नेकीने व न थकता अभ्यास करतो त्याला सिद्धी अर्थात् स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती होते. या पद्धतीने विचार केला म्हणजे ही गोष्ट स्पष्ट होते की, सिद्धयोगशास्त्र हे जगातील सर्व धर्मांच्या लोकांना खुले आहे; कारण हे साधन व तदंगभूत क्रिया या अंतरंग असल्यामुळे सद्‌गुरुकृपेने दीक्षा झाल्यावर साधक स्त्री, पुरुष, बालक, तरुण, वृद्ध, रोगी, निरोगी, पापी, पुण्यवान्, महामूर्ख, पंडित, विद्वान्, आस्तिक, नास्तिक यांपैकी कसाही असला; तरी उपरोक्त क्रियांपैकी काही क्रिया तत्काल अगर क्रमाक्रमाने प्रकट झाल्याशिवाय राहत नाहीत. सिद्धी आपापल्या संस्कारांप्रमाणे व गतिप्रमाणे साधकाला होत जाते. मात्र आत्मशक्ती कुंडलिनीच्या जागृतीमध्ये व क्रियांच्या उद्‌भूतीकरणामध्ये कर्म, जाती, अवस्था व आश्रम आड येत नाहीत. इतकेच काय देश, काल, परिस्थिती व धर्म या गोष्टीही क्रियांना बंधनकारक होत नाहीत. मनुष्यमात्र ईश्वरी ज्ञानाचा अधिकारी असल्यामुळे " यालागीं पापयोनीही अर्जुना। कां वैश्य शूद्र अंगना। मातें भजतां सदना। माझिया येती ॥९.४७४॥ " असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी निक्षून सांगितले आहे.

सिद्धयोग साधनातील क्रियांचे पाचवे वैशिष्टच हे आहे की, या क्रियांमुळे कालेकरून साधकाच्या मनाची व विचार प्रवाहाची एकाग्रता होते. याचा अर्थ असा की मनाची एकाग्रता व विचार प्रवाहांचे थांबणे या गोष्टी साधन सुरू झाल्यावर तत्काळ होत नाहीत; कारण शक्ती जागृत झाल्यावर विहिरीच्या तळातील गाळाप्रमाणे जन्मजन्मांतरी साठलेल्या अनेक वासना, संस्कारादि गोष्टी सतत ढवळून वर येत असतात. हे शुद्धीकरण असले; तरी " अहा भाग्या विपरीता। विघ्न उठिलें शांत करितां ॥११.३९०॥ " अशी अर्जुनाप्रमाणेच सर्व साधकांची स्थिती होत असल्याने मनही शांत राहत नाही व विचारही थांबत नाहीत. त्यामुळे चांगले, वाईट नानाप्रकारचे अनंत विचार साधकाच्या मनात सतत येतात. पूर्वायुष्यातील अनेक चांगल्या वाईट गोष्टी, संसारातील चिंता व भवितव्याबद्दलचे विचार याचवेळी दत्त म्हणून पुढे येतात. या जन्मीचे व पूर्व जन्मांचे संस्कार, विकार, वासना, इच्छा, भोगाकांक्षा, सत्त्व-रज-तम हे गुण व इतर अनेक गोष्टी विचारांच्या रूपाने मनात उसळून येतात. यामुळे साधनाच्या प्रारंभीच्या अवस्थेत विचार कमी होत नाहीत व मनाची एकाग्रताही अल्पावकाशात साधत नाही. जोपर्यंत साधकाच्या मनात भोग, इच्छा, आकांक्षा, तृष्णा, संसारवासना, संस्कार इत्यादि गोष्टी शिल्लक राहतात व त्या पूर्णपणे निवृत्त होत नाहीत तोपर्यंत विचार येत राहतात व मनाची एकाग्रता होत नाही. हेच म्हणणे अर्जुनरूपी साधकाच्या शब्दात मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**तंव अर्जुन म्हणे देवा। तुम्ही सांगा कीर आमुचिया कणवा।**
**परी न पुरों जी स्वभावा। मनाचिया ॥६.४११॥**

हें मन कैसें केवढें। ऐसें पाहों म्हणों तरी न सांपडे।
एऱ्हवीं राहाटावया थोडें। त्रैलोक्य यया ।।४१२।।
म्हणौनि ऐसें कैसें घडेल। जे मर्कट समाधी येईल।
कां राहा म्हणितलिया राहेल। महावातु ? ।।४१३।।
जें बुद्धीतें सळी। निश्चयातें टाळी।
धैर्येसीं हातफळी। मिळऊनि जाय ।।४१४।।
जें विवेकातें भुलवी। संतोषासी चाड लावी।
बैसिजे तरी हिंडवी। दाही दिशा ।।४१५।।
जे निरोधिलें घे उवावो। जया संयमुचि होय सावावो।
तें मन आपुला स्वभावो। सांडील काई ? ।।४१६।।
म्हणौनि मन एक निश्चळ राहेल। मग आम्हांसि साम्य होईल।
हें विशेषेंही न घडेल। याचिलागीं ।।४१७।।

अर्जुनाने केलेल्या या तक्रारीला " तंव कृष्ण म्हणती साचचि। बोलत आहासि तें तैसेंचि। यया मनाचा कीर चपळचि। स्वभावो गा ।।६.४१८।। " असे म्हणून श्रीकृष्णांनीही मान्यता दिली आहे. याचा अर्थ असा की, साधना सुरू झाल्यावर अशा प्रकारे विचार उसळून आल्याने साधक घाबरून जातो. त्याला वाटते मन एकाग्र व्हावे म्हणून साधन घेतले; पण " कटकटा धातया। कैसें जाहलें अनुग्रहा यया ।।११.४००।।" याप्रमाणे येथे सर्व विपरीतच होत आहे. अशा वेळी विचारांना थोपवून धरण्याचा, त्यांच्याशी सामना करून त्यांना बाहेर काढण्याचा किंवा मनन, जप, ध्यान आदि करून त्यांना दूर करण्याचा तो प्रयत्न करतो. यावेळी साधकाने सिद्धयोग हा समर्पणाचा मार्ग आहे, हे लक्षात घेऊन विचारांना कोणत्याही प्रकारे अडविता कामा नये. जितके विचार मनात येतील तितके साधकाने येऊ द्यावेत. चांगले, वाईट, सुंदर, असुंदर, भयानक, उत्तम इत्यादि नाना प्रकारचे विचार येणे हा सुद्धा एक क्रियेचा भाग असू शकतो. अशा प्रकारचे विचार उसळून आल्याने अंतःकरणात लपलेले संस्कार, वासना, इच्छा, भोगाकांक्षा इत्यादि बाहेर निघून जाऊन शरीर, मन व प्राण शुद्ध होत जातात. जेव्हा ही शुद्धिकरणाची क्रिया पूर्ण होते; तेव्हा मन आपोआप एकाग्र होते.

शारीरिक रोग, मानसिक जडता, संशय, निरुत्साह, आळस, भोगासक्ती, साधन करूनही उन्नती न होणे, दुःख, मानसिक कष्ट, अज्ञान, अहंकार, जीवनासक्ती, द्वेष, अविवेक, हिंसा, दुःख, यमनियमांचे व खाण्यापिण्याच्या नियमांचे पालन नीट रीतीने न होणे, स्पर्शास्पर्श दोष, पूर्वजन्मांचे तीव्रतर संस्कार उसळून येणे, पापाकडे प्रवृत्ती होणे, नानातऱ्हेच्या वासना, सांसारिक अडचणी इत्यादि अनेक कारणांमुळे साधनात अडथळे येऊन मन एकाग्र होत नाही. साधन नियमित केले म्हणजे जागृत शक्तीचा क्रियांद्वारे क्रमशः विकास होत जातो म्हणजेच वरील

विघ्ने हळूहळू दूर होऊन शरीर, मन, प्राण व नाडीशुद्धी होऊन मन आपोआपच एकाग्र होते. जसजशी ही शुद्धी म्हणजे कुंडलिनी शक्तीचा विकास अर्थात् तिचा संकुचितपणा कमी होत जाऊन शिवत्वाची अभिव्यक्ती घडून येते तसतसा चित्ताच्या सर्व वृत्तींचा निरोध होऊन मन शनैः शनैः व क्रमाक्रमाने शांत होत जाते. चित्त-वृत्तींचा पूर्ण निरोध, विचाररहित स्थिती व पूर्ण वासनानिवृत्ती ही खूप वरची अवस्था आहे. दीर्घकाल, अखंड व प्रतिदिनी आदरपूर्वक श्रद्धेने अभ्यास केला म्हणजे ही स्थिती सद्गुरुकृपेने प्राप्त होते. यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**परि वैराग्याचेनि आधारें। जरी लाविलें अभ्यासाचिये मोहरें।**
**तरी केतुलेनि एके अवसरें। स्थिरावेल ॥६.४१९॥**
**कां जें यया मनाचें एक निकें। जें देखिलें गोडीचिया ठाया सोके।**
**म्हणौनि अनुभवसुखचि कवतिकें। दावीत जाइजे ॥४२२॥**

असा अभ्यास केला म्हणजे "तरी मन केतुलें चपळ ? ॥६.४२६॥" हे भगवंतांचे वचन पटू लागते. आज्ञाचक्रापर्यंत इंद्रियांच्या क्रिया कमी अधिक परि-माणात होत असल्याचे दिसून येते. मनाच्या क्रिया तर या क्रियांबरोबर होत राह-तातच. ज्यावेळी आज्ञाचक्राचा भेद होतो त्यावेळी इंद्रियांच्या अर्थात् शारीरिक बाह्यक्रिया सर्वथा थांबतात; परंतु मनाचा व्यापार तेव्हाही बंद होत नाही. जस-जशी प्राणशक्तीची गती सहस्राराकडे वाढू लागते त्या त्या प्रमाणात मनही शांत होत जाते. ज्यावेळी सहस्रदलकमलामध्ये मन बांधले जाते त्यावेळी त्याचे चांचल्य पूर्णपणे नाहीसे होते. मन तेथे पूर्णपणे विलीन झाल्याने त्याची कोणत्याही प्रकारची वेगळी सत्ता किंवा कार्य दृग्गोचर होत नाही. यालाच अमनस्कावस्था म्हणतात. शांभवीमुद्रा ही या अवस्थेची पूर्णता आहे. जोपर्यंत साधकाला ही अवस्था प्राप्त होत नाही तोपर्यंत बाह्यदृष्टीच्या उन्मेषनिमेषाचा व्यापार हा संपुष्टात येत नाही. ज्यावेळी बाह्यदृष्टीचा उन्मेषनिमेषाचा व्यापार थांबेल त्यावेळी अंतर्लक्ष स्थिर झाले आहे, मनावर विजय प्राप्त झाला आहे व आत्मचैतन्याचा प्रकाश उत्पन्न झाला आहे, असे साधकाच्या अनुभवाला येते. मानसिक चांचल्य हे वायूच्या स्पंदनामुळे होत असते. यासाठी या अवस्थेत मन, वायू म्हणजे प्राण व दृष्टी ह्या सर्व गोष्टी स्थिर राहतात. या अपूर्व अवस्थेत केवळ आकाशरूपी आत्मचैतन्य प्रकाशमान राहते. मन व विचार या अवस्थेत विरून जात असल्याने ते येथेच अंतिमरूपाने एकाग्र होतात, हे म्हणणे योग्य ठरेल.

सारांश, ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची शास्त्रीय प्रक्रिया माझे परम सद्गुरु महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांनी ज्या प्रकारे मला समजावून दिली त्याप्रमाणे यथामती लिहिली आहे. त्यांच्या परमकृपेमुळेच या अत्यंत सूक्ष्म विषयाची चिकित्सा करणे माझ्यासारख्या मतिमंद चरणकमलसेवकाला शक्य झाले आहे. हा विषय

अत्यंत गहन, गंभीर व रहस्यमय आहे, असे शास्त्रांतरी वर्णन केले आहे. या रहस्याचा भेद करू नये अशी आज्ञा असल्याचे स्पष्ट करताना " स्कंदपुराणांतर्गत सूतसंहितेतील यज्ञवैभवखंडाच्या महादेवप्रसादकारणनिरूपण " या प्रकरणात सूत म्हणतात–

**शक्तिपातप्रकारस्य रहस्यांशश्च कश्चन ।**
**मया नोक्तो रहस्यत्वादाज्ञाभंगभयादपि ।।३४.२७।।**

असे असले तरी श्रीविद्यारण्यस्वामींनी ज्याप्रमाणे "तात्पर्यदीपिका" लिहून या रहस्याचा आपल्या टीकेत भेद केला आहे त्याप्रमाणे श्रीगुरुचरण हृदयाशी धरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत प्रस्तुत केलेल्या सिद्धयोगाची शास्त्रीय चिकित्सा गुर्वाज्ञेने केली आहे. सामान्य जनानांही ज्ञानेश्वरी हा सिद्धयोगाचा साधनग्रंथ कसा आहे व अशा प्रकारचे साधन देणारे सद्‌गुरू व ते साधन करणारे शिष्य या काळात या महाराष्ट्र देशात एवढेच नव्हे; तर सर्व भारतात वर्तमान आहेत, हे या चिकित्सेवरून ध्यानात आले व " मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् यतति सिद्धये ।। ७.३ ।।" असे भगवंतांनी गीतेत सांगितल्याप्रमाणे जरी घडले; तरी या श्रमाचे सार्थक झाले असे वाटेल.

# प्रकरण नववे

# ज्ञानेश्वरीची सिद्धयोगाच्या दृष्टीने विषयाध्यायसंगती

**प्रस्तावनाः—**

ज्ञानेश्वरीची सिद्धयोगाच्या दृष्टीने विषयाध्यायसंगती कशी लागते हे आपल्याला या प्रकरणात पाहवयाचे आहे. प्रथम तात्पर्य निर्णायक षड्लिंगाधारे ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची विषयसंगती कशी लागते याचे विवेचन करावयाचे आहे. त्यानंतर ज्ञानेश्वरीतील प्रत्येक अध्यायाच्या सुरुवातीला व शेवटी सिद्धयोगाचा महिमा सांगून या साधनशास्त्राच्या प्रकटीकरणामुळे सर्व अध्याय एकमेकाला साखळीसारखे जोडले जाऊन, सिद्धयोग साधनेच्याद्वारा अध्यायसंगती लागून ज्ञानेश्वरीची वाङ्मयमूर्ती आपोआप कशी सिद्ध होते हे आपण पाहणार आहोत. पुढे अनुबंध चतुष्टयद्वारा ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची संगती कशी लागते याचे विवेचन करावयाचे आहे व शेवटी कर्म, उपासना किंवा भक्ती व ज्ञान या सिद्धयोगाच्या तीन अवच्छेद्य अवस्थांमध्ये श्रीमद्भगवद्गीता कशी विभागली आहे, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या कथनाधारे स्पष्ट करावयाचे आहे. या चार मुद्यांचे विवेचन करण्यापूर्वी म्हणजे " सिद्धयोगसाधनद्वारा अज्ञाननिवृत्तिपूर्वक मोक्षसिद्धी " या महासिद्धांताची विषय व अध्याय यांप्रमाणे संगती लावण्यापूर्वी या विषयाकडे कोणत्या दृष्टीने पाहिले आहे, याचे दिग्दर्शन करणे नितांत आवश्यक आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांची श्रीमद्भगवद्गीतेकडे पाहण्याची दृष्टी कशी व कोणती आहे, याचा सांगोपांग विचार आपण दुसऱ्या प्रकरणात केलाच आहे. श्रीमद्भगवद्गीतेकडे पाहण्याची त्यांची ती दृष्टी पायाभूत म्हणून स्वीकारून व त्यावरून निघणाऱ्या निष्कर्षांचा आधार घेऊन विषयाध्यायसंगती लावताना ज्या तीन मुद्यांचे स्पष्टीकरण आवश्यक आहे ते प्रथम करून नंतर आपण वरील चार मुद्यांकडे वळणार आहोत.

ज्ञानेश्वरीची सिद्धयोगाच्या दृष्टीने विषयाध्यायसंगती लावताना पहिला विशेष दृष्टिकोन असा ठेविला आहे की, श्रीमद्भगवद्गीता व ज्ञानेश्वरी हे साधन ग्रंथ आहेत. गीता हा साधन ग्रंथ आहे, हे गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे" असा जो निर्देश आला आहे, त्यावरून स्पष्ट होते. भगवंतांनी सांगितलेल्या उपनिषदातील ब्रह्मविद्येपैकी हे योगशास्त्र आहे, असा याचा अर्थ आहे. योग म्हणजे उपाय किंवा साधन होय, म्हणून

योगशास्त्र म्हणजे ब्रह्मविद्याप्राप्तीच्या उपायाचे किंवा साधनाचे शास्त्र होय. याचे सांगोपांग विवेचन आपण दुसऱ्या प्रकरणातील "महेशान्वयसंभूत गुरुक्रमप्राप्त समाधिधनरूप गीतानिधान" या मुद्याच्या स्पष्टीकरणाच्या वेळी पाहिलेच आहे. गीता हा योगसाधनेचा अपूर्व ग्रंथ आहे हे "कल्याण मासिकाच्या योगांक" या विशेषांकातील "गीतामें योगका स्वरूप" या लेखात श्रीकृष्णप्रेमभिखारी यांनी स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, "आजकल योगकी चर्चा सर्वत्र चल रही है; परंतु लोग बहुधा यह भूल जाते हैं कि, योगका सर्वश्रेष्ठ ग्रंथ गीता है। अवश्य ही पातंजल योगसूत्र, घेरण्डसंहिता, शिवसंहिता तथा अन्य ऐसे धर्मग्रंथोंमें योगका वर्णन आया है; परंतु उनमें गीता जैसा न विस्तारही है न प्रामाणिकता ही। वे संप्रदाय-विशेषके ग्रंथ हैं। गीताजीके सामने तो सभी संप्रदायके आचार्योंने सिर झुकाया है और इसे प्रामाणिक माना है। गीता वेदान्तकी प्रस्थानत्रयीमें एक है। कोई भी आचार्य, चाहे जिस संप्रदायका वह क्यों न हो, अपने विचारों-द्वारा तबतक कुछ भी प्रभाव नहीं डाल सकता जबतक उसके कथनका समर्थन गीता नहीं करती। केवल भारतवर्षकेही नहीं, अपितु संसारके समग्र उत्कृष्ट धर्म ग्रंथोंमें,– ( ऐसे ग्रंथोंकी संख्या बहुत अधिक नहीं है ) जहाँतक मेरी बुद्धि जाती है, उच्च योगके संबंधमें कुछही ऐसे ग्रंथ मिलेंगे जो गीताके समकक्ष माने जायँ! यह तो निस्संदेह कहा जा सकता है कि, गीतासे बढकर योगविषयक कोई ग्रंथ है ही नहीं। इसी परम उच्च योगके संबंधमें बहुत पहले याज्ञवल्क्य मुनिने कहा था– "यह वह प्राचीन दुर्गम सँकरीला मार्ग है जो बहुत दूरतक फैला हुआ है।" इसमें संदेह नहीं कि गीताका अभिप्राय योगकी शिक्षा देना है। आरंभसे अंततक सभी अध्यायोंका नाम 'योग' विशेष है और भगवान् श्रीकृष्णको 'योगेश्वर' कहा गया है।" या सर्वाचा सारांश हा आहे की, गीता हा योगसाधनमार्गाचा ग्रंथ असून त्यात श्रीकृष्णांनी कालाच्या प्रवाहात लुप्तप्राय व संप्रदायरहित झालेल्या सिद्धयोगाचा किंवा शक्तिपातयोगाचा अर्जुनाला उपदेश केला आहे. गीतेत हा सिद्धयोगच सांगितला आहे, हे आत्तापर्यंतच्या आठ प्रकरणात आपण विविध रीतीने पाहिले आहेच. याज्ञवल्क्य मुनींनी हा मार्ग अत्यंत प्राचीन, दुर्गम व प्रवेशास कठीण असून तो मूलाधारापासून ब्रह्मरंध्रापर्यंत पसरलेला आहे, असे जे म्हटले आहे; तसेच पंथराजमार्गाबद्दल सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की, "हे अर्जुना ! मी तुला आता पंथराजाबद्दल म्हणजे सिद्धयोगसाधनमार्गाबद्दल माहिती सांगतो, ती तू एक. प्रथम योग्यांचे समुदायही हृदयाकाशात अर्थात् सहस्रारात आड-मार्गाने सत्वर जाण्यास निघाले; परंतु शेवटी अनुभवाच्या पाउलांनी चालता चालता त्यांना योगाचा हमरस्ता सापडला. मग इतर अज्ञानरूपी सर्व मार्ग सोडून आत्मबोध तत्काळ प्राप्त करून देणाऱ्या मार्गाने त्यांची सरळ वाटचाल सुरू झाली.

हा मार्ग दुर्गम व कठीण असला. तरी तो गुरुकृपेने सुलभ झाला. ( ६.१५४ ते १५६ )

गीतेबद्दल हाच दृष्टिकोन श्री. रा. द. उर्फ गुरुदेव रानडे यांनी " The Bhagavadgita As A Philosophy Of God - Realisation " या ग्रंथात अगदी सुरुवातीलाच मांडला आहे. त्यांनी असे स्पष्ट म्हटले आहे की, " The question of the supreme teaching of the Bhagavadgita has engaged the attention of scholars throughout the centuries. As the title of the present work will show, God- realisation according to us is the supreme teaching of the Bhagavadgita. This has not been properly insisted on by any of the great scholars that have gone by. We Shall see presently how both in ancient and modern times they have produced labyrinth out of which the only way to escape is by holding securely in our hands the thread or clue of God-realisation." गुरुवर्य रानडे यांची गीतेकडे पाहण्याची ही दृष्टी खरोखरीच अपूर्व अशी आहे. भगवद्गीतेची अत्युच्च शिकवण काय आहे, हा आज शतकानुशतके विचारवंत व तत्त्वज्ञांच्या चिकित्सेचा विषय झाला आहे. खरे पाहिले तर " ईश्वराचा साक्षात्कार " हीच श्रीमद्भगवद्गीतेची अत्युच्च शिकवण आहे, यात तिलःप्राय शंका नाही; परंतु आजपर्यंत ज्यांनी ज्यांनी गीतेवर भाष्ये व टीका लिहून विवेचन केले त्यांनी त्यांनी ईश्वरी साक्षात्काराच्या दृष्टीवर म्हणजे ईश्वरी साक्षात्कार ज्यामुळे घडून येतो अशा साधनावर, मार्गावर किंवा योगावर भर देऊन त्याचे सांगोपांग विवेचनच केलेले नाही. या सर्व पूर्वसूरींनी तत्त्वज्ञानावर, विवेचनावर, शब्दावर व त्याच्या अर्थावर भर दिला आहे. एका अर्थाने त्यांनी फक्त साध्यावर भर दिला त्यामुळे या अध्यात्माच्या किंवा परमार्थाच्या नाण्याची दुसरी बाजू " साधन " ही पूर्ण दुर्लक्षित व उपेक्षित राहिली. श्रीज्ञानेश्वरमहाराज, श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराज आदि संतवर्यांनी मात्र अध्यात्म व परमार्थाची चर्चा करताना साधनाची बाजू प्रकर्षत्वाने मांडली आहे, हे सूर्यप्रकाशाइतके स्वच्छ आहे.

नुसत्या साध्याच्या चर्चेने, विचाराने किंवा प्रवचनाने साध्य कधीही प्राप्त होत नाही. नावेचा उपयोग केला नाही; तर मनुष्य नदीच्या पैलतीराला जाऊ शकत नाही व जिन्याचा उपयोग केल्याशिवाय तो वरच्या मजल्यावर पोहोचूही शकत नाही. म्हणजे साध्य गाठण्याची साधनाची नितांत गरज असते. "हठयोगप्रदीपिकेतही " हा साधनश्रेष्ठतेचा विचार पुढील शब्दात मांडताना श्रीस्वात्मारामयोगींद्रांनी असे म्हटले आहे की—

**यावन्नैव प्रविशति चरन्मारुतो मध्यमार्गे**
**यावद्बिंदुर्न भवति दृढप्राणवातप्रबंधात् ।**
**यावद्धयाने सहजसदृशं जायते नैव तत्त्वं**
**तावज्ज्ञानं वदति तदिदं दंभमिथ्याप्रलापः ।।४.११४।।**

जोपर्यंत प्राणवायू सुषुम्नेमध्ये प्रवेश करून उर्ध्वगतीने वर जात जात सहस्रारात प्रवेश करून ब्रह्मरंध्रात स्थिर होत नाही, जोपर्यंत प्राणवायूची गती रुद्ध होऊन म्हणजे केवल कुंभक साधून वीर्य स्थिरभाव धारण करीत नाही व ध्यानाने चित्त ध्येयाकार होऊन जोपर्यंत आतूनच तत्त्वज्ञान उत्पन्न होत नाही म्हणजे " मी ब्रह्म आहे," अशी अनुभूती व साक्षात्कार होत नाही तोपर्यंत शब्दांनी सांगितलेले ज्ञान ही केवळ पोकळ बडबड, दंभ व खोटेपणा ठरतो.

" मी ब्रह्म आहे," असा विचार करावा म्हणजे ब्रह्मप्राप्ती होते, असे तत्त्वज्ञानी पंडित लोक सांगतात; परंतु नुसत्या विचाराने आत्यंतिक जड जीवाचे मनही थांबत नाही व त्याला तत्त्वज्ञानही होत नाही. ज्ञानमार्ग किंवा सांख्यमार्ग हा केवळ उच्चतम साधकांसाठी असल्यामुळे व सामान्य जीव हा उन्नत होऊन आलेला नसल्यामुळे अर्थात् अपात्रतेमुळे किंवा आधारदुर्बलतेमुळे फक्त मनाने ब्रह्मचिंतन केल्याने त्याची शाश्वत आत्मतृप्ती होत नाही. ही वस्तुस्थिती " तैसा सांख्याहूनि प्रांजळा । आम्हांसारिखियां अभोळां । एथ आहाति परि कांहीं काळा । तो साहों ये वर ।।५.१६६।।" असे म्हणून अर्जुनाने व्यक्त केली आहे. नुसते मानसिक भोजन केले म्हणजे कोणाचे पोटही भरत नाही व तृप्तीही होत नाही. " बोलाचीच कढी बोलाचाच भात । जेऊनिया कोण तृप्त झाले ।। " असे जे श्रीसंत तुकाराममहाराजांनी म्हटले आहे, ते साध्य प्राप्तीसाठी असणाऱ्या साधनश्रेष्ठतेची महती दाखविण्यासाठीच आहे, हे अगदी स्पष्ट आहे; कारण त्यांच्या व सर्व संतांच्या लेखी साधनाला व अनुभूतीला अपार महत्त्व आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तर " भाष्यकारांते वाट पुसतु ।।१८.१७२२।।" असे आपण जात आहोत हे सांगून संप्रदाय परंपरेला म्हणजे नाथसंप्रदायाला अर्थात् सिद्धयोगमार्गाला धरूनच श्रीमद्भगवद्गीतेकडे कसे पाहिले आहे, याचे समीक्षण आपण मागे तीन ठिकाणी केले आहे. त्यावरून हे स्पष्ट होते की, श्रीमद्भगवद्गीता हा सिद्धयोगाचे साधन सांगणारा अर्थात् सिद्धयोगासाधनशास्त्राचे दर्शन घडविणारा एक महान् ग्रंथ आहे. हा सिद्धांत त्यांनी ज्ञानेश्वरीत प्रथमपासून अखेरपर्यंत दृढमूल केला आहे. अगदी पहिल्याच अध्यायात आपल्या गीतेकडे पाहण्याच्या या दृष्टीचे उद्घाटन करताना त्यांनी असे म्हटले आहे की—

**जें भगवद्गीता म्हणिजे । जें ब्रह्मेशांनीं प्रशांसिजे ।**
**जें सनकादिकीं सेविजे । आदरेंसीं ।।१.५५।।**

जैसें शारदीचिये चंद्रकळे । माजि अमृतकण कोंवळे ।
ते वेंचिती मनें मवाळे । चकोरतलगें ॥५६॥
तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा ।
अतिहळुवारपण चित्ता । आणूनियां ॥५७॥
हें शब्देंवीण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।
बोलाआधि झोंबिजे । प्रमेयासी ॥५८॥
जैसे भ्रमर परागु नेती । परी कमळदळें नेणती ।
तैसी परी आहे सेविती । ग्रंथीं इये ॥५९॥
कां आपुला ठावो न सांडितां । आलिंगिजे चंद्रु प्रकटता ।
हा अनुरागु भोगितां । कुमुदिनी जाणे ॥६०॥
ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंतःकरणें ।
आथिला तोचि जाणें । मानूं इये ॥६१॥

सर्व लोकात गीता ही श्रीमद्भगवद्गीता म्हणून प्रसिद्ध आहे. या भगवद्गीतेची ब्रह्मा व शंकर हे ही स्तुती करतात व सनकादिक तिचे अत्यंत आदराने सेवन करतात. ज्याप्रमाणे शरदृतूतील पौर्णिमेच्या चांदण्याचे, चंद्रकिरणांचे अती सूक्ष्म व कोमल अमृतकण चकोर पक्षांची पिले हळुवार, मृदू मनाने व कुशलतेनें प्राशन करतात त्याप्रमाणे साधकाने चित्त अगदी हळुवार व अती सूक्ष्म करून या कथेचा अनुभव घ्यावा. या कथेची ही अनुभूती शब्दांशिवाय संवाद करून घ्यावी, इंद्रियांना न कळत हिच्यातील परमतत्त्वाचा उपभोग घ्यावा व तिच्यासंबंधी काही बोलण्यापूर्वीच सिद्धांताला जाऊन भिडावे. ज्याप्रमाणे कमळाच्या पाकळयांना खबर नसताना भुंगे कमळातील पराग घेऊन जातात त्याप्रमाणे गीतेच्या सेवनाची म्हणजे अनुभूती घेण्याची पद्धत आहे. किंवा चंद्रप्रकाश प्रकट झाल्याबरोबर चंद्रविकासी कमलिनी प्रफुल्ल होऊन आपली जागा न सोडता चंद्राला किंवा चंद्रप्रकाशाला प्रीतीने आलिंगन देते व त्यातील प्रेमसौख्य कसे भोगावे हे एक तिचे तिलाच ठाऊक असते त्याचप्रमाणे गंभीर व स्थिर झालेल्या अंतःकरणाने जो साधक संपन्न होऊन साधन करीत असेल तोच या गीतेचे रहस्य जाणू शकतो.

ज्या कथेची अनुभूती घ्यावयाची आहे ती कथा मोठी विलक्षण आहे. " राम राम सर्वही म्हणती । कोणी न जाणती आत्माराम ॥" व " राम तो कालचा सुत दशरथाचा । अनंत युगींचा आत्माराम ॥" असा श्रीसमर्थ रामदासस्वामी-महाराजांनी जो उद्‌घोष वारंवार केला आहे, त्यातील आत्मारामाची ही कथा आहे. " ही रामकथा ब्रह्मांड भेदून पैलाड न्यावी " म्हणून श्रीसमर्थांनी आवर्जून सांगितले आहे. महर्षी पतंजलींनी "स एष पूर्वेषामपि गुरु कालेनाऽनवच्छेदात् ॥ समाधिपाद ॥१.२६॥" या सूत्रात हेच सांगितले आहे. हा आत्माराम अनादी काला-

पासून शक्तीच्या रूपाने मूलाधारात झोपलेला असतो. जेव्हा गुरुकृपा होते तेव्हा पूर्वी होऊन गेलेल्या सर्व गुरूंचाही गुरू असलेला हा आत्माराम जागृत शक्तीच्या रूपाने प्रकट होतो. त्याची मूलाधारापासून सुरू झालेली व सहस्रारात संपणारी ही कथा आहे. आत्मारामच " जो प्रियुचि प्राणेश्वरी ।। अमृतानुभव ।। १.२ ।।" या नात्याने चित्‌शक्ती होतो. "चितिरेव चेतनपदादवरूढा चेत्यसंकोचिनी चित्तम् ।।५।।" व " तन्मयो मायाप्रमाता ।।६।।" या " प्रत्यभिज्ञाहृदयातील " सूत्रांप्रमाणे कुंडलिनी चितिशक्ती जेव्हा चेतन पदापासून खाली उतरून चैतन्याचा संकोच करते तेव्हा ती चित्त या नावाने ओळखली जाते व ते चित्तच जीवरूप आहे, म्हणजे पर्यायाने संकुचित शक्तीच जीव होय. असे असले तरी " सदाकारा परानंदा संसारोच्छेद कारिणी । सा शिवा परमादेवी शिवाभिन्ना शिवंकरी ।।" या न्यायाने शिवाची शक्ती शिवा ही परमदेवी, सत्स्वरूप, परानंदरूप, संसाराचा उच्छेद करणारी, शिवाशी एकरूप असणारी व आत्यंतिक कल्याण करणारी आहे. म्हणजे ही जड जीवाची किंवा निद्रिस्त शक्तीची कथा आहे. जीव किंवा ही शक्ती निद्रिस्त असल्यामुळे व तिच्यावर स्थूल तत्त्वांची आवरणे असल्याने सूक्ष्म अशा सुषुम्ना-मार्गात ती प्रविष्ट होऊ शकत नाही. पूर्वसंस्कार किंवा वासना, अभिमान किंवा कर्तृत्वबोध व फलाकांक्षा किंवा भोगाभिलाषा या तीन आवरणांमुळे जीवाला स्थूलत्व प्राप्त होते. तो संकुचित होतो. अशावेळी जोपर्यंत गुरुकृपेने कुंडलिनी शक्ती जागृत होऊन इडा व पिंगला नाड्यांमधून वाहणारे प्राणप्रवाहांचे स्रोत सूक्ष्म होत होत सुषुम्नेमध्ये प्रवेश करीत नाहीत व सुषुम्नेच्या मार्गाने वर जाता जाता अधिकाधिक सूक्ष्म होत होत सहस्रारात जात नाहीत तोपर्यंत ही रामकथा सुरूही होत नाही व ती ब्रह्मांडही भेदीत नाही. चित्त हळुवार होण्याचा, सूक्ष्म बनण्याचा एकमात्र उपाय शक्तिजागृती हाच आहे. हे साधन एकदा सुरू झाले की, " कल्पना निमे ।।६.२१२।।" ही स्थिती आपोआप येत असल्यामुळे शब्द आपोआपच संपतात. "जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।। गीता ६.४४।।" म्हणजे योगाचे स्वरूप जाणण्याची इच्छा करणाराही शब्दब्रह्माचे उल्लंघन करून जातो. ' शब्दब्रह्मणि निष्णातः परंब्रह्माधिगच्छति ।। " असे जे शास्त्रकारांनी म्हटले आहे, त्याचा अर्थ हाच आहे. शब्दब्रह्माचे स्वरूप जाणून त्याचे अतिक्रमण करणे हे मुमुक्षूचे एकमात्र लक्ष्य आहे. त्याचे अतिक्रमण केल्याशिवाय विशुद्ध परमतत्त्वरूप चैतन्याचा साक्षात्कार होणे कधीही संभवत नाही. हेच " शब्देंवीण संवादिजे" होय. महायोगी गोरक्षनाथांनी " गोरख-बानीमध्ये" ही प्रक्रिया कशी मांडली हे आपण तिसऱ्या प्रकरणातील " पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचे रहस्य" या मुद्यात पृष्ठ १७९ वर पाहिली आहे. त्याचप्रमाणे म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी " भारतीय संस्कृती और साधना," खंड एक, या ग्रंथातील

"ॐकार साधन" या लेखात शब्दब्रह्म म्हणजे काय व त्याचे अतिक्रमण करणे किती आवश्यक आहे हे सांगून " हें शब्देंविण संवादिजे" म्हणजे काय करावयाचे, हे जे स्पष्ट केले आहे, ते आपण पृष्ठ १८१ वर व अन्यत्र विषयानुरोधाने पाहिलेच आहे. या सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, अनाहतनादाचा अर्थात् शब्दब्रह्माचा अंत झाल्याशिवाय देहात्मबोध छिन्नभिन्न होत नाही. असे जोपर्यंत घडत नाही तोपर्यंत चकोर पक्षी, चांदणे व भ्रमर मकरंद प्राशन करताना जो हळुवारपणा किंवा सूक्ष्मता धारण करतात तशी अवस्था साधकाला कधीही प्राप्त होणार नही. चंद्रविकासिनी कमलिनीप्रमाणे आपली जागा न सोडता चंद्रकिरणांना आलिंगन देऊन प्रेमसौख्याची अनुभूतीही त्याला घेता येणार नाही म्हणजे जागृत शक्तीशी समरस होऊन तिच्या द्वारा जडत्व विसरून शिवरूप किंवा प्रमेयरूपही होता येणार नाही. हे सर्व होण्यासाठी परमेश्वराची अनुग्रहरूप चित्शक्ती जागृत होऊन कथेला आरंभ झाला पाहिजे. शक्तिपाताशिवाय ही शक्ती जागृत होत नाही व शब्दब्रह्माच्या लंघनाचे कार्य कधीही पूर्ण होऊ शकत नाही. मग अंतःकरण शुद्ध, स्थिर व गंभीर बनून गीतेच्या प्रतिपाद्य विषयाच्या रहस्याची अनुभूती येणे ही फार दूरची गोष्ट ठरते.

गीतेचे हे रहस्य नुसते चर्चेने समजण्यासारखे नसल्याने श्रीकृष्णांनी बुद्धीला व शब्दाला अनाकलनीय असे स्वरूप अर्जुनाला प्रत्यक्ष देण्याकरिता खेवाचे निमित्त केले व शक्तिसंक्रमणाच्या साधनाचा अवलंब करून " हृदया हृदय येक जाले। यें हृदयींचें ते हृदयीं घातलें। द्वैत न मोडता केलें। आपणाऐसें अर्जुना ॥ १८.१४२१॥" हे घडवून आणले. त्याचप्रमाणे या साधनाचाच अवलंब करून " येर कलशींचें येरीं । रिचविजें जयापरी। आपणपें श्रीहरी। दिधले तैसें ॥१३. ११४५॥" हे श्रीकृष्णांनी केले. साधनाशिवाय हे घडत नाही. साध्याच्या चर्चेने काय होणार? त्याने काहीही होत नाही. फक्त फोलफटे व भुस्कट हाती येते. "जें प्रचीतीस आलें खरे। तेंचि घ्यावें अत्यादरें। अनुभवावीण जीं उत्तरें। तीं फलकटें जाणावीं ॥१८.५.२१॥" असे जे श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी "दासबोधात" म्हटले आहे तेच खरे आहे.

द्वैताची येरझार संपून साधकाला ऐक्याच्या घरामध्ये जे स्वस्वरूपसौख्य भोगावयाचे आहे त्याचे खरे रहस्य, गुह्य किंवा तात्पर्य सिद्धयोग साधनच आहे, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

तरी अवधान पघळ। करूनियां आणिक येक वेळ।
वाक्य माझें निर्मळ। अवधारीं पां ॥१८.१३४१॥
हें वाच्य ह्मणौनि बोलिजे। का श्राव्य मग आयिकिजे।
तैसें नव्हें परी तुझें। भाग्य बरवें ॥१३४२॥

कूर्मीचिया पिलियां । दिठी पान्हा य धनंजया ।
का आकाश वाहें आदिया । घरींचे पाणी ॥१३४३॥
जो व्यवहारु जेथ न घडे । तयाचें फळचि तेथ जोडे ।
काय दैवें न सांपडे । सानुकूळें ? ॥१३४४॥
एऱ्हवीं द्वैताची वारी । सारूनि ऐक्याच्या परिवारीं ।
भोगिजे ते अवधारीं । रहस्य हें ॥१३४५॥

श्रीकृष्ण म्हणाले, "हे अर्जुना! तुझ्या मनोगताप्रमाणे आणखी एकवेळ तू आपले लक्ष चांगले विस्तृत करून माझे आत्मज्ञानाविषयी निर्मळ असे वचन ऐक. मी जे तुला आता साधनाचे रहस्य सांगणार आहे, ते बोलण्यासारखे आहे म्हणून बोलावे व ऐकण्यासारखे आहे म्हणून ऐकावे असे नाही. म्हणजे साधनरहस्य हा नुसता बोलण्याचा व ऐकण्याचा विषय नसून तो अनुभूतीचा विषय आहे. खरे म्हणजे तुझ्या भाग्याने हे साधनरहस्य तुला ऐकावयास मिळत आहे. हे धनंजया! कासवीने आपल्या पिलांकडे दृष्टिक्षेप केला की, तोच पान्हा ठरून पिलांचे पोषण होते व ती तृप्त होतात. त्याचप्रमाणे आकाश चातक पक्षांकरिता लागणारे पाणी नेहमी आपल्या पोकळीत धारण करते. चातकपक्षाने आकाशाकडे पाहिले की, त्याची तहान भागते. उपरोक्त दोन्ही गोष्टीत जरी प्रत्यक्ष व्यवहार घडत नसला तरी त्याचे फल मात्र मिळालेले दिसते. जर दैव अनुकूल असेल तर कोणता लाभ होणार नाही ? याविषयी विचारपूर्वक पाहिले असता द्वैताची येरझार नाहीशी करून ऐक्याच्या घरात जी गुह्य गोष्ट भोगावयाची आहे किंवा अनुभवावयाची आहे, तेच या साधनाचे रहस्य आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या मते गीतेमध्ये जे आत्मज्ञान सांगितले आहे ते चर्चेचा, बोलण्याचा, ऐकण्याचा, बडबडण्याचा, प्रवचनांचा, पांडित्याचा किंवा निरर्थक गप्पांचा विषय नसून तो अनुभूतीचा विषय आहे. आपल्या म्हणण्याचा पुष्ट्यर्थ त्यांनी पहिला दृष्टांत कासवीचा व तिच्या पिलांचा दिला आहे. तो अगदी यथार्थ आहे. "कुलार्णवतंत्राच्या १४ व्या उल्लासात" गुरू शिष्याला शक्तिसंचारपूर्वक वेधदीक्षेने किंवा मानसदीक्षेने आत्मज्ञान कसे देतात, हे सांगताना उपरोक्त दृष्टांतच वापरला आहे. या दृष्टीनेच श्रीशिव पार्वतीला हे सांगताना असे म्हणतात की—

यथा कूर्मः स्वतनयान्ध्यानमात्रेण पोषयेत् ।
वेधदीक्षोपदेशश्च मानुषस्य तथाविधः ॥१४.३६॥

ज्याप्रमाणे कासवी आपल्या पिलांचे नुसत्या ध्यानाने किंवा चिंतनाने पोषण करते त्याप्रमाणे गुरू नुसत्या मननाने शिष्याची शक्ती जागृत करून त्याला आत्मज्ञान देतात. या वेध दीक्षेला किंवा शक्तिसंचाराला मानस दीक्षा असे म्हणतात. या दीक्षेत प्रत्यक्ष कोणताही व्यवहार घडत नाही; परंतु त्याचे फल मात्र आपल्याला पाहवयास मिळते.

चातकपक्षाची केवळ आकाशाकडे पाहूनच तहान भागते व तृप्ती होते असा जो दुसरा दृष्टांत त्यांनी दिला आहे, तो तर केवळ अपूर्व आहे. चातकपक्षाची व पाण्याची गाठ पडत नाही; परंतु नुसत्या आकाशाकडे पाहण्याने त्याची तृप्ती होते. " दयाब्द वळशील तूं, तरि न चातका सेवका। उणे किमपि; भाविका उवगशील तूं देव कां। अनन्यगतिका जना निरखिताचि सोपद्रवा। तुझेचि, करुणार्णवा! मन धरी उमोप द्रवा ॥२०॥" याप्रकारे " केकावलीमध्ये " कविवर्य मोरोपंतांनी चातक पक्षाचा दृष्टांत वापरून उपरोक्त भाव अधिक स्पष्ट केला आहे. श्रीएकनाथ-महाराजांनीही चातकाला आकाशातील मघोदकावाचून दुसरी गती नाही या प्राचीन संकेताचा वापर करून हीच गोष्ट सांगतली आहे." एकनाथी भागवतात" ते म्हणतात, "जैसा मेघांचेनि गर्जनें। मयूर उपमों पाहे गगनें। नाना मवेनि जीवनें। जेवीं चातकमनें उल्हासे ॥ १.६२॥"

या सर्व विवेचनाचा अर्थ असा आहे की, द्वैतामुळे प्राप्त होणाऱ्या अनंत जन्म-मरणांच्या येरझारातून सुटका करून घ्यावयाची असेल व ऐक्याच्या परिवारात म्हणजे योगाब्जिनीसरोवरात शांभवाद्वयानंदवैभव भोगावयाचे असेल; तर एकमात्र गीतारहस्याची म्हणजे सिद्धयोगसाधनाची कास धरली पाहिजे, हे त्रिकालाबाधित सत्य आहे. गीतेकडे श्रीज्ञानेश्वरमहाराज उपरोक्त पद्धतीने साध्य प्राप्तीचा साधन-ग्रंथ म्हणून पाहत असल्याने तोच दृष्टिकोन ज्ञानेश्वरीत उतरला आहे. " जेणें सप्रपंच अज्ञान जाये। एकु मी गोचरु होये। तें उपपत्तीचेनि उपायें। गीतारूप हें ॥ १८.१३८८॥ " या ओवीतून त्यांची उपरोक्त दृष्टीच पुष्ट होते. ज्या योगाने प्रपंचासह अज्ञान जाऊन एकमात्र परमात्माच गोचर होतो किंवा अनुभूतीस येतो त्या युक्तीचा उपाय म्हणजे परमात्मानुभूतीचे साधन सांगणें हेंच खरे गीतेचें स्वरूप आहे.

अशा प्रकारे गीता हा साधन ग्रंथ असल्यानें श्रीज्ञानेश्वरमहाराज गीता ग्रंथाचा खरा अधिकारी अंतरंग साधनात रंगलेला साधकच आहे, हे अगदी निक्षून सांगताना असे म्हणतात की, " तैसें अध्यात्मशास्त्रीं यिये। अंतरंगचि अधिकारिये। परी लोकु वाक्चातुर्यें। होईल सुखिया ॥१८.१७५०॥" या गीतारूपी अध्यात्मशास्त्रात जो साधक अंतर्मुख झाला आहे किंवा ज्या साधकाला अंतर्मुख होण्याची इच्छा आहे, तोच याचा खरा अधिकारी आहे. ज्याला ब्रह्मैक्यप्राप्तीची, शिवसायुज्याची, व स्वानंदसाम्राज्याचा चक्रवर्ती होण्याची इच्छा आहे अशा साधकांकरिता हे गीतारूपी अध्यात्मशास्त्र म्हणजे साधनशास्त्र कथन केले आहे; इतरांकरिता नाही. इतर सामान्य लोक वाक्चातुर्यानें सुखी होतील. ते वरवर पाहणारे असल्याने शब्दार्थातच गुंतून पडल्याने त्यांची दृष्टी सामान्यच असणार. या ओवीत वापरलेला 'अंतरंग' हा शब्द मोठा विलक्षण आहे. अंतरंग ( अंतर+अंग ) म्हणजे ज्याला

आतीलच अंग आहे असे साधन होय. जागृत शक्ती हेच खरे एकमात्र अंतरंग साधन आहे. जगातील परमात्म्याच्या प्राप्तीची इतर सर्व साधने ही बहिरंग साधने आहेत. सिद्धयोग हेच एकमात्र अंतरंग साधन आहे. सद्‌गुरुकृपेने दीक्षा मिळाली की, अनादी आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत होऊन साधकाला खरे अंतरंग साधन मिळते व त्याची खरी साधना सुरू होते. असे साधन मिळालेला किंवा मिळवू इच्छिणारा साधकच या गीतेचा अधिकारी आहे. म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "भारतीय संस्कृति और साधना" या ग्रंथाच्या पहिल्या खंडात, "कुंडलिनी तत्त्व" या लेखात या दृष्टीने मोठे उद्‌बोधक विचार मांडले आहेत. ते म्हणतात, "कुंडलिनीशक्तिके उद्‌बोधनके बिना जीवकी ऊर्ध्वगति नहीं हो सकती। अरणि-मंथन करनेसे जिस प्रकार अग्नि प्रज्ज्वलित की जाती है, अर्थात् अरणिस्थ सुप्त ( Latent ) अग्नि जिस प्रकार संघर्षण से उद्दीप्त होती है, उसी प्रकार साधन-प्रणाली द्वारा प्रसुप्त कुंडलिनी को जगाना पडता है। अग्नि जिस प्रकार प्रकट होतेही इंधन ( काष्ठादि ) को दग्ध करती है, उसी प्रकार कुंडलिनीके चैतन्य होनेपर साधना विलुप्त हो जाती है। बाह्य साधनामात्र-अर्थात् विचार, भक्ति या हठ किंवा मंत्रयोगादि-यह संपूर्ण उपासना पुरुषाकारसापेक्ष अथवा कर्तृत्वाभिमान-जन्य हैं। यह कर्तृत्व-बोध क्रमसे कुंडलिनी-चैतन्यके समयमें लुप्त हो जाता है, और कर्तृत्वबोधके लुप्त होनेसे कुंडलिनी अधिक जाग्रत होती है। जिस समय एक बार कुंडलिनी चेतन होने लगती है, उस समय स्वभावके नियमसेही सब कार्य स्वयंही होते जाते हैं। जिस प्रकार अनुकूल स्रोतमें नौका छोड देने पर उसको समुद्रमें पहुँचानेके अन्य प्रयत्न करनेकी आवश्यकता नहीं होती, उसी प्रकार कुंडलिनीके जगानेसे और उसके प्रवाहमें प्राण वा मनको डाल देनेसे जीवको ब्रह्मावस्था प्राप्त करनेके लिए पृथक् उपाय करनेकी आवश्यकता नहीं रहती। संकोच-शक्ति ऊर्ध्व-बिंदु-स्थित आकर्षण-शक्तिके प्रभावमें अंतर्मुखगति क्रमशः वृद्धिगत होती है, और अंतमें साम्यावस्थामें स्थिर हो जाती है। प्राचीन बौद्धगण इसको 'स्रोत आपन्न' कहते हैं। बुद्धदेव शक्ति-संचारपूर्वक शिष्यको इसी ऊर्ध्वस्रोतमें स्थापित करते थे। यह सुषुम्नावाही ऊर्ध्वस्रोतसे भिन्न और कुछ नहीं है। इस स्रोतको प्राप्त किए हुए जीवको कदापि 'अपाय' में गिरनेका भय नहीं रहता, कारण उस समयमें उसके सत्काय-दृष्टि, विचिकित्सा एवं शीलव्रतपरामर्श नामक त्रिविध बंधन या संयोजन छिन्न हो जाते है। संचारित शक्ति न्यूनाधिकता एवं संचित वासनादिकोंकी गाढताके तारतम्यके कारण अवश्य 'स्रोत आपन्न' अवस्था नाना प्रकारकी होती है।"

अशा प्रकारे स्रोतापन्न साधक हाच गीतेच्या अध्यात्मशास्त्राचा अंतरंग अधि-कारी असून त्याच्यासाठीच अर्थात् मोक्षेच्छूने असे स्रोतापन्न अंतरंग साधना-धिकारी व्हावे म्हणून भगवान् श्रीगोपालकृष्णांनी गीता म्हणजे साधन सांगितले

आहे,असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. हे गीतासाधन अंतरंग साधकांसाठी सांगितलेले असल्यामुळे हे अंतरंग साधन देणारे जे महात्मे गुरुपदी आरूढ होऊन परंपरागत साधनसंप्रदाय चालवितात व मुमुक्षूंना दीक्षा देऊन कृतार्थ करतात त्यांच्याहून या भूलोकी मला दुसरे कोणीही प्रिय नाही, हे भगवंतांचे म्हणणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील शब्दात वर्णिले आहे.

आणि देहाचेंही लेणें । घेऊनि वेगळेपणें ।
असें तंव जीवेंप्राणें । तोचि पढिये ॥१८.१५१४॥
ज्ञानियां कर्मठां तापसां । यया खुणेचिया माणुसां-।
माजीं तो येकु गा जैसा । पढिये मज ॥१५१५॥
तैसा भूतळीं आघवा । आन न देखे पांडवा ।
जो गीता सांगे मेळावा । भक्तजनांचा ॥१५१६॥
मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां अक्षोभें ।
जो मंडन होय सभे । संतांचिये ॥१५१७॥
नेत्रपल्लवीं रोमांचितु । मंदानिळें कांपवितु ।
आमोदजळें वोलवितु । फुलांचे डोळें ॥१५१८॥
कोकिळा कलरवाचेनि मिषें । सद्गद बोलवीत जैसें ।
वसंत का प्रवेशे । मद्भक्त आरामीं ॥१५१९॥
का जन्माचें फळ चकोरा । होत जें चंद्र ये अंबरा ।
नाना नवघन मयूरां । वो देत पावे ॥१५२०॥
तैसा सज्जनांच्या मेळापीं । गीतापद्यरत्नीं उमपीं ।
वर्षे जी माझ्या रूपीं । हेतु ठेऊनि ॥१५२१॥
मग तयाचेनि पाडें । पढियंतें मज फुडें ।
नाहींचि गा मागेंपुढें । न्याहाळितां ॥१५२२॥
अर्जुना हा ठायवरी । मी तयातें सूयें जिव्हारीं ।
जो गीतार्थाचें करी । परगुणें संतां ॥१५२३॥

जे महात्मे सद्गुरुरूपाने भक्तांना, मुमुक्षूंना व साधकांना दीक्षा देऊन कृतार्थ करतात ते देहाने जरी माझ्याहून निराळे असले तरी असे साधुलोक माझे जीव की प्राण असतात. ज्ञानी, कर्मठ व तपस्वी ही सर्व मला जाणण्याचा प्रयत्न करणारी खुणेची माणसे आहेत; परंतु हे सर्व लोक बाह्यांगाधिकारी असल्यामुळे या सर्व लोकांपेक्षा उपरोक्त अंतरंग साधनाचे दीक्षादान करणाराच मला अत्यंत आवडतो. हे पांडवा ! जो माझ्या भक्तजनांच्या समुदायात हे गीतारूपी सिद्धयोगाचे शास्त्र सांगतो त्याच्याप्रमाणे या संपूर्ण पृथ्वीतलावर मला दुसरा कोणीही प्रिय दिसत नाही. साधकांना ईश्वराची प्राप्ती व्हावी म्हणून अत्यंत निरभिमानाने व निरहं-

कारीपणे जो गीता म्हणजे सिद्धयोग सांगतो तो संतजनांच्या सभेला भूषणच होतो. त्याच्या नुसत्या कथनानेही शक्तिसंचालन होऊन श्रोत्यांच्या अंगावर झाडास फुटणाऱ्या नवीन कोवळया पानांप्रमाणे रोमांच उभे राहतात. त्याच्या कथनातून शक्तिस्रोत प्रवाहित होत असल्यामुळे मंद मंद वाहणाऱ्या वाऱ्यामुळे हलणाऱ्या झाडाप्रमाणे त्यांचे शरीर आनंदभराने डोलते आणि सुगंधाच्या पाण्याने फुले जशी डबडबतात किंवा स्रवतात त्याप्रमाणे त्यांचे डोळे आनंदाश्रूंनी भरून येतात. ज्यावेळी सिद्धयोगशास्त्राचे विवेचन सद्‌गुरुमहाराज व्याख्यात्याच्या रूपाने करतात त्यावेळी कोकिळ पक्षाच्या सुमधुर स्वराप्रमाणे कंठ दाटून येऊन धन्यतेचे उद्‌गार साधकाच्या तोंडून बाहेर पडतात. भक्तरूपी उद्यानात या गीतशास्त्ररूपी साधनाचे विवेचन करणारा व्याख्याता वसंतऋतू म्हणूनच प्रवेश करतो. आपल्याला जन्माचे फळ मिळाले असे चकोराला वाटावयास लावीत चंद्र आकाशात उगवितो किंवा नाना नवनवीन मेघ मोरांना जणू ओ देतच प्राप्त होतात त्याप्रमाणे सज्जन साधकांच्या मेळाव्यात,ईश्वराची त्यांना प्राप्ती व्हावी म्हणून, तो गीताश्लोकरूपी पुष्कळ रत्नांचा वर्षाव करतो. अर्जुना ! मग मागे होऊन गेलेले भक्त व पुढे होणारे भक्त यांचा विचार करून पाहिले असता त्यामध्ये मला सिद्धयोगशास्त्र म्हणजे गीता सांगणारा तो भक्त जितका आवडतो तितका दुसरा कोणीही निश्चितपणे आवडत नाही. अर्जुना ! जो गीतेच्या अर्थाची संतजनास मेजवानी करतो, तो मला इतका आवडतो की, त्याला मी माझ्या हृदयात धारण करून ठेवतो.

सारांश, श्रीमद्‌भगवद्‌गीता हा सिद्धयोगाचे साधन सांगणारा अपूर्व असा ग्रंथ आहे, हे वरील सर्व विवेचनावरून सिद्ध होते. श्रीमद्‌भगवद्‌गीतेकडे पाहण्याच्या या दृष्टीचेच अवतरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांकडून ज्ञानेश्वरीत सर्वत्र झालेले असल्यामुळे ज्ञानेश्वरी हा ही सिद्धयोगाचे साधन सांगोपांग रीतीने कथन करणारा ग्रंथराज झाला आहे. ज्ञानेश्वरीची विषयाध्यायसंगती लावताना जर ही दृष्टी ठेविली नाही; तर संजयाच्या ठिकाणी अष्टसात्त्विक भावांचा उद्रेक झाल्यावर " अप्रसंगामाजीं ऐसें । बोलसी काई ? ।। १८.१६२५।।" असे म्हणून धृतराष्ट्राने संजयावर जी टीका केली आहे, त्या टीकेचा चमत्कार वाटून श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात त्याप्रमाणे आपली स्थिती झाल्याशिवाय राहणार नाही. याबाबत ते असे म्हणतात की-

रानींचें राउळा नेलिया । दाही दिशा मानी सुनिया ।
कां रात्री होय पाहलया । निशाचरां ।।१८.१६२६।।
जो जेंथिचें गौरव नेणें । तयासि तें भिगुळवाणें ।
म्हणौनि अप्रसंगु तेणें । म्हणावा कीं तो ।।१६२७।।

रानात राहणाऱ्या रानटी मनुष्यास एखाद्या मोठ्या महालात नेले असता त्याला दाही दिशा अगदी उदास वाटतात किंवा उजाडले असतानाही जशी निशा-

घरास रात्र होते, तसे ज्या गोष्टीचे महत्त्व ज्याला माहीत नसते, त्याला ती गोष्ट भयंकर किंवा विपरीतच वाटत असते. त्यामुळे चांगल्या गोष्टीस तो अप्रसंग म्हणणारच यात काहीच नवल नाही. सिद्धयोग साधनेचे परंपराप्राप्त धन श्रीनिवृत्तिनाथ-महाराजांनी दीक्षारूपाने बोधकरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांना दिले होते. या अपूर्व, अपरिचित व लुप्तप्राय झालेल्या साधनपद्धतीचा सर्वांना लाभ व्हावा म्हणून तर त्यांनी श्रीमद्‌भगवद्‌गीतेचा भावार्थ स्पष्ट केला आहे. ज्ञानेश्वरीची विषयाध्याय-संगती लावताना वरील दृष्टीच अगदी प्रामुख्याने विचारात घेतली आहे.

ज्ञानेश्वरीची विषयाध्यायसंगती लावताना श्रीमद्‌भगवद्‌गीता व ज्ञानेश्वरी हे समाधिधनाचे ग्रंथ आहेत, हा दुसरा प्रमुख दृष्टिकोन ठेविला आहे; कारण समाधि-धनाचे प्रकटीकरण, प्रतिपादन किंवा विवेचन करणे हाच गीतेचा व ज्ञानेश्वरीचा प्रतिपाद्य विषय आहे. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की –

एवं गुरुक्रमें लाधलें। समाधिधन जें आपुलें।
तें ग्रंथें बोधौनि दिधलें। गोसावी मज ॥१८.१७६४॥

अशा प्रकारे गुरुपरंपरेने आपल्याला प्राप्त झालेले समाधिधन श्रीनिवृत्तिनाथ-महाराजांनी ग्रंथरूपाने प्रकट होईल अशा रीतीनें बोध करून अर्थात् शक्तिपात दीक्षा देऊन तद्द्वारा ते प्रस्फुटित होईल असे करून मला दिले. यातील समाधिधन या शब्दाचा अर्थ योगधन असा आहे; कारण भगवान् वेदव्यासांनी "पातंजल योगसूत्रावरील भाष्यात" अगदी सुरुवातीलाच "योगः समाधिः" म्हणजे समाधी-लाच योग म्हणतात, हे स्पष्ट केले आहे. हे योगधन नाथ परंपरेने श्रीनिवृत्तिनाथमहा-राजांपर्यंत आले व दीक्षा होऊन ते आपल्याला मिळाले असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्टच म्हटले आहे. यावरून त्यांची गीतेकडे पाहण्याची दृष्टी स्पष्ट होते. त्यामुळे ज्ञानेश्वरीत समाधिधनाशिवाय अर्थात् सिद्धयोगसाधनाशिवाय दुसरे काहीही असण्याची शक्यता नाही. असे म्हणण्याचे दुसरे आणखी एक कारण असे आहे की, ज्ञानेश्वरीच्या रूपाने श्रीगुरुमहाराजांनी आपल्याला निमित्त करून सिद्धयोगसाधनाचे समग्र शास्त्र सांगून जगाचे संरक्षण केले, हे स्पष्ट करताना त्यांनी असे म्हटले आहे की–

वांचूनि पढे ना वाची। ना सेवाही जाणें स्वामीची।
ऐशिया मज ग्रंथाची। योग्यता कें असे ? ॥१८.१७६५॥
परी साचचि गुरुनार्थे। निमित्त करूनि मातें।
प्रबंधव्याजें जगातें। रक्षिलें जाणा ॥१७६६॥

सिद्धयोग हा केंद्रबिंदू धरून उरलेले सर्व विषय त्याच्या अंशीभावाने ज्ञाने-श्वरीत वर्णन केलेले आहेत. जर ही दृष्टी स्वीकारली नाही; तर " ना आदिगुरु शंकरा–। लागोनि शिष्यपरंपरा। बोधाचा हा संसरा। जाला जो आमुतें ॥१८.१७५९॥

तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जिवां । सर्वं प्रकारीं धांवा । करीं पां वेगीं ॥१७६०॥" अशी जी श्रीगहिनीनाथमहाराजांनी श्रीनिवृत्तिनाथमहाराजांना आज्ञा केली त्याला काहीही अर्थ उरणार नाही. गुरुशिष्यपरंपरेने होणारे बोधाचे ऐश्वर्य अर्थात् शक्तिपातयोगदीक्षेची महानता ही एकमात्र सिद्धयोगातच असल्याने व या ऐश्वर्यामुळेच जीव शिवस्वरूप होत असल्याने श्रीनिवृत्तिनाथमहाराजांनी पीडित झालेल्या लोकांना दुःखापासून सोडवावे या कळकळीने शांतरसाचा वर्षाव केला. त्यामुळेच ज्ञानेश्वरीच्या रूपाने सिद्धयोगसाधनशास्त्र अर्थात् "सिद्धयोग दर्शन" हा ग्रंथ प्रकट झाला. गुरुद्वारा होणारा शांतरसाचा वर्षाव ही सिद्धयोगशास्त्रातील महान् प्रक्रिया कशी आहे, याचा विचार आपण आठव्या प्रकरणात केला आहे.

सारांश, ज्ञानेश्वरीच्या शब्दशब्दात सिद्धयोगाचे रहस्य भरलेले आहे. "विषय-प्रवेश" या पहिल्या प्रकरणाच्या प्रस्तावनेत उल्लेख केल्याप्रमाणे माझे सद्गुरू महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांनी त्यांचे परम सद्गुरू प. प. श्रीलोकनाथतीर्थ-स्वामीमहाराज यांच्या आज्ञेप्रमाणे भारतातील हजारो साधकांना सिद्धयोगशास्त्रां-तर्गत शक्तिपातयोगदीक्षा देऊन कृतार्थ केलेले आहे. ते नेहमी म्हणत असत की, "ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही." उपरोक्त व आत्तापर्यंत केलेल्या आठ प्रकरणातील विवेचन वाचले म्हणजे त्यांचे म्हणणे अक्षरशः खरे ठरते. त्यांची ज्ञानेश्वरीकडे पाहण्याची दृष्टी ही भारतवर्षातील सिद्धयोगशास्त्रातील एका महान् अधिकारी महायोग्याची दृष्टी आहे, हे आपल्याला कधीही विसरता व दृष्टिआड करता येणार नाही. त्यांचा हा दृष्टिकोन विषयाध्यायसंगतीच्या विवेचनात सर्वार्थाने अनुस्यूत झालेला आहे.

ज्ञानेश्वरीची विषयाध्यायसंगती लावताना श्रीमद्भगवद्गीता व ज्ञानेश्वरी हे ग्रंथ एकरस व अखंड आहेत, हा तिसरा दृष्टिकोन डोळ्यापुढे ठेविला आहे; कारण कर्म, उपासना किंवा भक्ती व ज्ञान या वरवर तीन भिन्न प्रकारच्या साधन-पद्धती वाटल्या; तरी त्या एकाच महायोगाच्या अर्थात् सिद्धयोगाच्या अवस्था आहेत, याचा विचार आपण पाचव्या प्रकरणात "ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या विविध नावांचे रहस्य" पाहताना केलाच आहें व या प्रकरणातील शेवटच्या मुद्यात त्याचे विवेचन येणारच आहे. श्रीमद्भगवद्गीता ही "अहो गूळासाखरे मालयाचे । हे बांधे तरी एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आनआन जैसें ॥१०.३३॥" या न्यायाने एकरस व अखंड असल्याने, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "आणि प्रसंगें गीता । ठावोही हा संपता । म्हणौनि दावी आद्यंता । एकार्थत्व ॥१८.१२३९॥" असे म्हणून शेवटी या ग्रंथाचे ऐक्य सिद्ध केले आहें. त्यांच्या दृष्टीने गीता हा रत्नप्रासाद किंवा वैष्णव-प्रासाद आहे. एवढेच नव्हे तर त्यांच्या लेखी गीता म्हणजे प्रभूची वाङ्मयी श्रीमूर्ती आहे. त्यांच्या या म्हणण्यावरून हे स्पष्ट होते की, प्रासाद व मूर्ती जर एकच आहे

तर त्यात भिन्नत्व असे उपस्थित होऊ शकेल ? अंगअंगीन्यायाने मुख्य सिद्धांत व उपसिद्धांत यांचे ऐक्य जेव्हा दृष्टिगोचर होते तेव्हा भिन्नत्व न भासता अवच्छेद्यत्व किंवा एकरसत्व अगर अखंडत्वच प्रतीत होते. त्यामुळे " सात शतें श्लोक । अध्यायां अठरांचे लेख । परी देवो बोलिले एक । जें दुजें नाहीं ॥१८.५८॥ " या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कथन केलेल्या सिद्धांताप्रमाणे ज्ञानेश्वरीची विषयाध्यायसंगती लावताना, श्रीगोपालकृष्णनाथमहाराज जे एक म्हणजे सिद्धयोगसाधनशास्त्र बोलले व त्याशिवाय अव्वलपासून अखेरपर्यंत त्यांनी गीतेत दुसरे काहीच सांगितले नाही, ही एकरसतेची व अखंडपणाची दृष्टीच प्रस्तुत केली आहे. या संबंधीचे सविस्तर विवेचन आपण दुसऱ्या प्रकरणातील "सिद्धयोग महासिद्धांतयुक्त गीताशास्त्रेश्वर" या मुद्यात केले आहे. विषयानुरोधाने त्याचा येथे निर्देश केला एवढेच.

## तात्पर्य निर्णायक षड्लिंगाधारे विषयसंगती:–

श्रीमद्‌भगवद्‌गीतेकडे पाहण्याच्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीचा अशा प्रकारे पक्का निर्णय झाल्यावर त्या पायावर उभे राहून सिद्धयोगाच्या दृष्टीने ज्ञानेश्वरीची विषयसंगती कशी लागते हे प्रथम पाहू. अशा प्रकारे विषयसंगती पाहिली म्हणजे ग्रंथतात्पर्यनिर्णय आपोआप होऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वाङ्मयमूर्तीत सिद्धयोग अंगोपांगात कसा अवतरला आहे, हे स्वत:सिद्धपणे स्पष्ट होईल. त्यांच्याच शब्दात सांगावयाचे झाले तर " कीं प्रथम वयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी । प्रगटे जैसी आगळी । अंगनाअंगीं ॥१.४२॥ ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे । आदिलापासौनि अपाडें । जियापरी ॥४३॥ नानाघनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण । मग अलंकारीं बरवेपण । निवाडु दावी ॥४४॥" असे हे विवेचन होईल.

वैदिक वाङ्मयात ग्रंथतात्पर्य निर्णायक सहा लिंगे पुढीलप्रमाणे सांगितली आहेत.

उपक्रमोपसंहारौ अभ्यासोऽपूर्वता फलम् ।
अर्थवादोपपत्ती च लिंगं तात्पर्यनिर्णये ॥

उपक्रमोपसंहारांची एकरूपता, अभ्यास, अपूर्वता, फल व अर्थवाद ही तात्पर्यबोधक सहा लिंगे आहेत. लिंग म्हणजे " लीनं अर्थं गमयति इति ।" लीन म्हणजे गूढ किंवा गुह्यतम असा जो अर्थ, त्याचा जे बोध करून देते, त्यास लिंग ही संज्ञा आहे. वरील सहाही लिंगांच्या आधारे सिद्धयोगाचा गूढार्थ ज्ञानेश्वरीतील शब्दाशब्दातून कसा ओसंडून जात आहे, हे आपणास समजून येईल. " ब्रह्मसूत्रशांकरभाष्याच्या अनुवादात " म. म. श्री. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनी "जन्माद्यस्य यतः ॥१.१.२॥" या सूत्रावरील भाष्याच्या तळटीपेत लिंग कशाला म्हणतात हे सांगताना असे म्हटले आहे की, " एक विशेष प्रकारचा अर्थ दाखविण्याचे शब्दाचे सामर्थ्य असते त्याला लिंग असे म्हणतात."

प्रथम उपक्रमोपसंहाराची एकरूपता या पहिल्या ग्रंथतात्पर्याचा निर्णय करणाऱ्या लिंगाचा विचार करू. उपक्रमोपसंहार म्हणजे ग्रंथाचा आरंभ व शेवट होय. कोणीही ग्रंथकार झाला; तरी तो मनामध्ये काही विशिष्ट हेतू धरून ग्रंथ लिहिण्यास सुरुवात करतो आणि सदर विशिष्ट उद्देश सिद्ध झाल्यावर ग्रंथ समाप्त करतो. म्हणून ग्रंथतात्पर्यनिर्णयासाठी उपक्रम व उपसंहार हे प्रथम लक्षात घेतले पाहिजेत. भूमितिशास्त्रात सरळ रेषेची व्याख्या, आरंभीच्या बिंदूपासून जी रेघ डाव्या किंवा उजव्या बाजूस अगर वर किंवा खाली न कलता शेवटच्या बिंदूपर्यंत नीट जाते तिला सरळ रेघ म्हणावे, अशी केली आहे. ग्रंथाच्या तात्पर्यास हाच न्याय लागू आहे. ग्रंथाच्या उपक्रमात म्हणजे सुरुवातीला जो प्रतिपाद्य विषय असतो तोच विषय उपसंहारात म्हणजे समाप्तीत असतो व या दोन टोकांना न सोडता संपूर्ण ग्रंथभर या दोन टोकात प्रतिपाद्य विषय नीट बसतो तेव्हा त्यास उपक्रमोपसंहाराची एकरूपता म्हणतात. "छांदोग्य उपनिषदाच्या" आरंभी " सदेव सौम्येदमग्र आसित् एकमेवाद्वितीयम् " असा अद्वय ब्रह्म प्रतिपादनाने उपक्रम केला आहे आणि " एतदात्ममिदं सर्वं " असा अद्वय ब्रह्मप्रतिपादानानेच उपसंहार केला आहे.

उपक्रमोपसंहाराची एकरूपता म्हणजे काय हे पाहिल्यावर आपण प्रथम गीतेचा उपक्रमोपसंहार पाहून नंतर ज्ञानेश्वरीकडे वळू. रणांगणावर हातातील धनुष्यबाण टाकून देऊन शोकाने व उद्विग्न मनाने अर्जुन जेव्हा बसून राहिला तेव्हा श्रीकृष्णांनी त्याला क्षुद्र दुबळेपणा टाकून देऊन युद्धास उभे राहण्याबद्दल सांगितले; परंतु अर्जुन जीवबुद्धीने व कार्पण्य दोषाने ग्रस्त झाल्यामुळे अत्यंत शोकाकुल झाला होता. हा आपला शोक दूर व्हावा म्हणून तू मला काही उपाय किंवा साधन सांग असे म्हणत तो भगवान् श्रीकृष्णांना गुरू म्हणून शिष्य या नात्याने शरण गेला. हाच गीतेचा उपक्रम आहे. तो पुढील दोन श्लोकात निबद्ध झाला आहे. अर्जुन म्हणतो की–

> कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
> यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥२.७॥
> न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।
> अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥८॥

दैन्याने, कृपणतेने किंवा मी जीव आहे या भावनेने संकुचित झाल्यामुळे माझा मूळचा स्वभाव म्हणजे मी शक्तियुक्त आत्मा आहे हा भाव नष्ट होऊन स्वधर्माविषयी म्हणजे आत्मधर्माविषयी माझे चित्त मूढ झाल्यामुळे मी तुला विचारीत आहे. जे निश्चयेकरून श्रेयस्कर असेल म्हणजे ज्या साधनापासून किंवा उपायापासून मला माझे आत्मस्वरूप प्राप्त होईल असे साधन तू मला सांग. मी

तुझा शिष्य आहे. मी तुला शरण आलो असून तू मला उपदेश कर; कारण पृथ्वीवर निष्कंटक समृद्ध राज्य किंवा देवांचेही स्वामित्व मिळाले, तरी इंद्रियांना शोषून टाकणारा हा माझा शोक जे दूर करील, असे काहीच साधन मला दिसत नाही.

अशा प्रकारे भगवंताला शरण गेलेल्या अर्जुनाला श्रीकृष्णांनी साधन देऊन कृतार्थ केले व त्याचे दैन्य, कृपणता किंवा मी जीव आहे हा संकुचित भाव घालवून टाकून त्यास ब्रह्मरूप केले, असे सांगताना गीतेच्या उपसंहारात श्रीकृष्ण म्हणतात—

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥१८.६६॥

सर्व धर्म सोडून देऊन तू मला एकटयालाच शरण ये. मी तुला सर्व पापांपासून सोडवीन. तू शोक करू नकोस. या संबंधी "शक्तिपातयोगरहस्य किंवा सिद्धमहायोगशास्त्र" या ग्रंथात प्रस्तुत लेखकाने असे म्हटले आहे की, "शक्तिपातयोगाच्या मार्गाला निरनिराळी नावे प्राप्त झाल्याने त्याचे बहिरंग विविध बनले असले तरी त्याचे अंतरंग मात्र सद्‌गुरुकृपा व शिष्य शरणागती या एकाच प्रक्रियेत एकरसपरिपूर्ण झालेले दिसते. सद्‌गुरूंची कृपा व शिष्याची शरणागती या एकाच गोष्टीत शक्तिपातयोगाचे सर्व रहस्य सामावलेले आहे. कृपा म्हणजे दान व शरणागती म्हणजे दानच होय. कृपा म्हणजे सद्‌गुरूंनी शिष्याला अहेतुकपणे केलेले विभुत्वाचे किंवा शिवत्वाचे दान होय तर शरणागती म्हणजे साधकाने सद्‌गुरूंना आपल्या अणुत्वाचे किंवा जीवत्वाचे निरहंकारित्वाने केलेले दान होय. असे जेव्हा उभयविध दान घडते तेव्हाच कृपेचा आविष्कार होतो व गुरुशिष्य दोघेही सुखानंदात निमग्न होतात."

गीतेतील उपक्रमोपसंहाराच्या श्लोकांचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त भाव अधिक स्पष्ट केले आहेत. प्रथम ज्ञानेश्वरीचा उपक्रम व नंतर उपसंहार पाहू म्हणजे त्यांची एकवाक्यता कशी होते हे स्पष्ट होईल. ज्ञानेश्वरीच्या उपक्रमात अर्जुन भगवंताला असे म्हणाला की—

आम्हां काय उचित । तें पाहतां न स्फुरे एथ ।
जें मोहें येणें चित्त । व्याकुळ माझें ॥२.५५॥
तिमिरावरुद्ध जैसें । दृष्टीचें तेज भ्रंशे ।
मग पासींच असतां न दिसे । वस्तुजात ॥५६॥
देवा तैसें मज जाहलें । जें मन हें भ्रांती ग्रासिलें ।
आतां काय हित आपुलें । तेंही नेणें ॥५७॥
तरी श्रीकृष्णा तुवां जाणावें । निकें तें आम्हां सांगावें ।
जे सखा सर्वस्व आघवें । आम्हांसि तूं ॥५८॥

तूं गुरु बंधु पिता । तूं आमुची इष्ट देवता ।
तूंचि सदा रक्षिता । आपदीं आमुतें ॥५९॥
जैसा शिष्यांतें गुरु । सर्वथा नेणें अव्हेरू ।
कीं सरितांतें सागरू । त्यजीं केवीं ॥६०॥
नातरी अपत्यांतें माये । सांडूनि जरी जाये ।
तरी तें कैसेंनि जिये । ऐकें कृष्णा ॥६१॥
तैसा सर्वांपरी आम्हांसी । देवा तूंचि एक आहासी ।
आणि बोलिलें जरी न मानिसी । मागील माझें ॥६२॥
तरीं उचित काय आम्हां । जें व्यभिचरेना धर्मा ।
तें झडकरी पुरुषोत्तमा । सांगें आतां ॥६३॥
हें सकळ कुळ देखोनि । जो शोकु उपनलासे मनीं ।
तो तुझिया वाक्यावांचुनी । न जाय आणिकें ॥६४॥
एथ पृथ्वीतळ आपु होईल । हें महेंद्रपदही पाविजेल ।
परी मोह हा न फिटेल । मानसींचा ॥६५॥
जैसीं बीजें सर्वथा आहाळलीं । तीं सुक्षेत्रीं जऱ्ही पेरिलीं ।
तरी न विरूढती सिंचिलीं । आवडे तैसीं ॥६६॥
ना तरी आयुष्य पुरलें आहे । तरी औषधें कांहीं नोहे ।
एथ एकचि उपेगा जाये । परमामृत ॥६७॥
तैसे राज्यभोगसमृद्धि । उज्जीवन नोहे जीवबुद्धि ।
एथ जिव्हाळा कृपानिधि । कारुण्य तुझें ॥६८॥

आम्हास काय करणे उचित आहे, हे यावेळी विचार करून पाहिले तरी सुचत नाही; कारण या मोहामुळे माझे चित्त व्याकुळ झाले आहे. ज्याप्रमाणे अंधाराच्या प्रतिबंधामुळे डोळ्यांना दिसेनासे झाले म्हणजे दृष्टीचे तेज लोपते व मग जवळ असलेलाही कोणताच पदार्थ दिसत नाही, तशी देवा ! माझी स्थिती झाली आहे; कारण माझे मन भ्रांतीने ग्रासले आहे. म्हणून आपले हित कशात आहे, तेही मला यावेळी समजत नाही. तरी श्रीकृष्णा! आमचे इष्टमित्र वगैरे सर्व काही तूच असल्यामुळे आपण विचार करून पाहावे आणि जे खरे हितकर असेल ते आम्हाला सांगावे. तू आमचा गुरू, बंधू, पिता, कुलदैवत असून नेहमी संकटसमयी रक्षण करणाराही तूच आहेस. ज्याप्रमाणे श्रीगुरूच्या मनात शिष्याचा अव्हेर करण्याची गोष्ट कधीही येत नाही किंवा नद्यांचा त्याग करण्याचे समुद्राच्या मनात कधीही येत नाही अर्थात् श्रीगुरू शिष्याचा व समद्र नद्यांचा त्याग किंवा अव्हेर करतीलच कसा? त्याचप्रमाणे आपण माझा अव्हेर करणार नाही. किंवा हे कृष्णा! एक. आई जर मुलाला सोडून गेली; तर ते कसे जगेल? (सुखी होईल?)

तसे आम्हास तूच सर्वस्वी एकमेव आधार आहेस. आणि आतापर्यंत सांगितलेले माझे बोलणे जर तुला पटत नसेल; तर हे पुरुषोत्तमा! आम्हाला उचित अशी धर्माविरुद्ध नसलेली गोष्ट तू मला सांग. हे सर्व गोत्रज पाहून माझ्या मनात जो शोक, मोह, अज्ञान इत्यादि उत्पन्न झाले आहेत ते तुझ्या उपदेशाशिवाय,कृपेशिवाय व काहीतरी साधन सांगितल्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपायाने जाणार नाहीत. मला पृथ्वीचे राज्य मिळाले किंवा इंद्रपदही प्राप्त झाले; तरी देखील माझ्या अंतः-करणात उत्पन्न झालेले हे मोह-शोकादि दूर होणारच नाहीत. ज्याप्रमाणे पूर्ण भाजलेले बी उत्तम जमिनीत पेरले व त्यास हवे तितके पाणी जरी घातले; तरी त्याला अंकूर फुटत नाही किंवा ते उगवत नाही अथवा आयुष्य संपले असले म्हणजे इतर कोणत्याही औषधाचा काहीही उपयोग होत नाही; मात्र येथे एका परमामृताचाच उपयोग होतो त्याप्रमाणे मला सर्व राज्यभोग व संपत्ती प्राप्त झाली तरीही मी जीव आहे; अशा बुद्धीने मोहित झालेल्या मला या मोहातून पार पडण्यास त्यांचा मुळीच उपयोग होणार नाही. यासाठी हे कृपानिधे! तुझ्या कृपेचा जिव्हाळाच माझा आधार आहे.

या ठिकाणी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी, मोहाने व्याकुळचित्त झालेल्या, काम-क्रोधलोभमोहमत्सरादि गोत्रजांना मारण्यास घाबरल्यामुळे शोकाकुल झालेल्या व मी शिव नसून जीव आहे अशा अल्पबुद्धीने मोहित झालेल्या अर्जुनाने भगवान् श्रीकृष्णरूपी गुरूंकडे परमामृतरूपी कृपेची मागणी केल्याचे सांगून, ग्रंथाचा उपक्रम केला आहे. महायोगी गोरक्षनाथांनी "योगबीज" ग्रंथाचा व ऋषींनी "योगशिखोपनिषदाचा" असाच उपक्रम केला आहे. ते म्हणतात—

> सर्वे जीवा. सुखैदुःखैर्मायाजालेन वेष्टिताः ।
> तेषां मुक्तिः कथं देव कृपया वद शंकर ।।४।।
> सर्वसिद्धिकरं मार्गं मायाजालनिकृन्तनम् ।
> जन्ममृत्युजराव्याधिनाशनं सुखदं वद ।।५।।

ब्रह्मदेव म्हणाले, हे शंकरा ! सर्व जीव सुखदुःखरूप मायाजालात गुरफटले आहेत. या मायापाशातून त्यांची सुटका कोणत्या उपायाने होईल हे कृपा करून आपण मला सांगावे. सर्व सिद्धींची प्राप्ती करून देणारा, अज्ञानरूप बंधनाचा नाश करणारा किंवा मायेचे जाळे निःशेष छेदून टाकणारा, जन्म-मरण-वार्धक्य व व्याधी यांचा नाश करणारा आणि परमसुख देणारा असा उपाय आपण मला सांगा.

मोहाने व मायेने बद्ध झालेला अर्जुनरूपी जीव-साधक श्रीकृष्णरूपी गुरूंकडे कृपेची मागणी करीत आहे. कृपा म्हणजे काय? हे आपण आठव्या प्रकरणात विस्ताराने पाहिले आहे. त्यावरून हे सिद्ध होते की, अर्जुनाची कृपेची मागणी म्हणजे सिद्धयोग साधनासाठी केलेली शक्तिपाताचीच मागणी आहे. अर्जुनाने आपला

मोह व शोक घालविण्यासाठी उपाय विचारला त्यावेळी श्रीकृष्णनाथांनी त्याला सिद्धयोगाची दीक्षा देऊन शोकमोहादि मायेचे जाळे तोडून कृतार्थता प्राप्त करण्यास कसे समर्थ केले, असा उपक्रम करून, ही सिद्धयोग साधनाचीच कथा मी सांगत आहे,हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

ऐसें अर्जुन तेथ बोलिला। जंव क्षण एक भ्रांति सांडिला।
मग पुनरपि व्यापिला। उर्मी तेणें ॥२.६९॥
कीं मज पाहातां उर्मी नोहे। हें अनारिसें गमत आहे।
तो ग्रासिला महामोहें। काळसर्पें ॥७०॥
सवर्म हृदयकल्हारीं। तेथ कारुण्यवेळेच्या परीं।
लागला म्हणोनि लहरी। भांजेचिना ?॥७१॥
हें जाणोनि ऐसी प्रौढी। जो दृष्टिसवेंचि विष फेडी।
तो धांवया श्रीहरी गारुडी। पातला कीं ॥७२॥
तैसिया पंडुकुमरा व्याकुळा। मिरवतसे श्रीकृष्ण जवळा।
तो कृपावशें अवलीळा। रक्षील आतां ॥७३॥
म्हणोनि तो पार्थु। मोहफणिग्रस्तु।
स्यां म्हणितला हा हेतु। जाणोनियां ॥७४॥
मग देखा तेथ फाल्गुनु। घेतला असें भ्रांती कवळूनु।
जैसा घनपटळीं भानु। आच्छादिजे ॥७५॥
तयापरी तो धनुर्धरु। जाहलासे दुःखें जर्जरु।
जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरु। वणवला कां ॥७६॥
म्हणोनि सहजें सुनीळु। कृपामृतें सजळु।
तो वोळलासें श्रीगोपाळु। महामेघु ॥७७॥
तेथ सुदर्शनांची द्युति। तेचि विद्युल्लता झळकती।
गंभीर वाचा ते आयती। गर्जनेची ॥७८॥
आतां तो उदार कैसा वर्षेल। तेणें अर्जुनाचळु निवेल।
मग नवी विरूढी फुटेल। उन्मेषाची ॥७९॥
ते कथा आइका। मनाचिया आराणुका।
ज्ञानदेवो म्हणे देखा। निवृत्तिदासु ॥८०॥

जेव्हा अर्जुनाची भ्रांती क्षणभर दूर झाली तेव्हा त्याने श्रीकृष्णांकड कृपामृतरूपी शक्तिपाताची मागणी केली; परंतु त्याला पुन्हा मोहलहरींनी व्यापिले. या अर्जुनाच्या स्थितींवर श्रीज्ञानेश्वरमहाराज असे रूपक करतात की,विचार केला असता मला असे वाटते की, याला आलेली ही मोहाची लहर नसून हा काही निराळाच प्रकार असावा. महामोहरूपी काळसर्पानेच अर्जुनास ग्रासले असावे व त्याचे मर्मस्थान

जे हृदयकमल त्या ठिकाणी कारुण्याची पूर्ण भरतीची वेळ आहे अशी संधी साधून त्या महामोहरूपी काळसर्पाने त्याला दंश केला. त्यामुळे त्या लहरी उतरतच नाहीत अशी त्या विषाची तीव्रता जाणून ज्याच्या कृपादृष्टीने म्हणजे शक्तिपातातील दृग्दीक्षेने त्या महामोहरूपी सर्पाचे विष नाहीसे होते, तो श्रीकृष्णरूपी गारुडी अर्जुनाच्या हाकेसरसी त्याच्या रक्षणाकरिता तेथे धावून आला. अशा त्या मोहाने व्याकूळ–व्याप्त–झालेल्या अर्जुनाजवळ श्रीकृष्ण गारुड्यासारखा शोभत होता. आता तो श्रीकृष्ण आपल्या कृपेने म्हणजे शक्तिपातदीक्षेने त्याचे सहजच रक्षण करील. हा अभिप्राय मनात जाणला म्हणूनच मोह हाच कोणी एक सर्प अर्जुनाला चावला आहे, असे हेतुपुरःसरच मी येथे रूपकाने कथन केले आहे. आता दुसरे रूपक असे की, जसा मेघपटलांनी सूर्य आच्छादित व्हावा, त्याप्रमाणे अर्जुन ह्या वेळी भ्रांतीने घेरला होता असे समजा. किंवा जसा उन्हाळ्यात वणव्याने डोंगर व्यापला जावा तसा अर्जुन दुःखाने, मोहाने व अज्ञानाने अगदी जर्जर होऊन गेला होता. म्हणून अशा वेळी पाण्यांनी भरलेल्या नीलवर्ण मेघांनी वृष्टी करून वणव्याने पेटलेला डोंगर शांत करावा तसा आधीच स्वभावतः अत्यंत सावळावर्ण असलेला व कृपामृतरूप जलाने भरलेला असा तो महामेघरूप गोपाळ अर्जुनाकडे वळून आला. त्या श्रीकृष्ण-रूप मेघाच्या ठिकाणी शुभ्र दातांची प्रभा हीच कोणी एक वीज चमकत होती व त्याचे गंभीर भाषण ही एकप्रकारे मेघगर्जनाच होती. असा तो श्रीभगवानरूप उदार मेघ आता वृष्टी करील. त्या वृष्टीने दुःखाने पेटलेला अर्जुनरूप पर्वत कसा शांत होईल आणि त्याला ब्रह्मज्ञानाचा अंकूर कसा फुटेल ती कथा शांत व सावधान चित्ताने ऐका असे श्रीनिवृत्तिनाथमहाराजांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात.

श्रीकृष्णनाथ हे अर्जुनाचे गुरू आहेत आणि खऱ्या सद्गुरूचे स्वरूप व कार्य कोणते हे आपण आठव्या प्रकरणात पृष्ठ ७८४ वर " गुरुकृपा कशी होते ? " या मुद्यात व अन्यत्रही विषयानुरोधाने " योगवासिष्ठाच्या निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धात " केलेल्या व्याख्याधारे पाहिले आहे. सद्गुरुनाथ श्रीकृष्णांनी उपरोक्त व्याख्येप्रमाणे अर्जुनाच्या बाबतीत कार्य केल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरील ओव्यात स्पष्ट केलेच आहे.

अशा प्रकारे सिद्धयोगशास्त्राचा उपक्रम करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी संपूर्ण ज्ञानेश्वरीत गीताविषयानुरोधाने हा विषय प्रस्तुत करून शेवटी उपसंहारात श्रीकृष्णांनी अर्जुनाला स्पर्शदीक्षा देऊन कृतार्थ कसे केले, हे सांगितले आहे. आपण आठव्या प्रकरणात पृष्ठ ८०३ वर " गुरुकृपा कशी होते ? " या मुद्यात हे पाहिलेच आहे.

महायोगी गोरक्षनाथांनी आपल्या " योगबीज " ग्रंथाचा उपसंहार अगदी असाच केला आहे ते म्हणतात–

**देहो ब्रह्मत्वमायाति जलतां सैंधवं यथा।**

**अनन्यतां यदा याति तदा मुक्तः स उच्चते ॥१८४॥**

मीठ पाण्यात पडल्यावर ज्याप्रमाणे पाण्याशी एकरूप होते त्याप्रमाणे सिद्धयोग साधनाने साधकाचा देह ब्रह्मरूप होतो. अशा प्रकारे जेव्हा साधक अनन्यतेने सदगुरूंना शरण जातो त्यावेळी शक्तिपातयोगदीक्षेने कृतार्थ होऊन तो ब्रह्माशी एकरूप होऊन जीवन्मुक्त होतो

श्रीज्ञानेश्वरमहाराज हे नाथसंप्रदायी असल्यामुळे नमुन्यादाखल महायोगी गोरक्षनाथांनी रचलेल्या योगबीज ग्रंथाच्या उपक्रमोपसंहाराचा उल्लेख करून त्यातील एकरूपता निदर्शनास आणली. त्यांचे विवेकमार्तंड, महार्थमंजिरी, गोरक्षपद्धति, गोरक्षशतक इत्यादि ग्रंथ पाहिले म्हणजे ज्ञानेश्वरीच्या उपक्रमोपसंहाराप्रमाणेच त्यांचाही उपक्रमोपसंहार आहे असे दिसून येते.

सारांश, ज्ञानेश्वरीच्या उपक्रमात व उपसंहारात उपरोक्त प्रकाराने कृपा अर्थात् शक्तिपात झाल्याशिवाय स्वरूपोपलब्धी कदापीही होत नाही हे सांगून त्यांची एकरूपता दाखविली आहे.

यानंतर अभ्यास या ग्रंथतात्पर्याचा निर्णय करणाऱ्या दुसऱ्या लिंगाचा विचार करू. ग्रथातील किंवा प्रकरणातील प्रतिपाद्य विषयाचे व त्याच त्या अर्थाचे वारंवार प्रतिपादन करणे, यास अभ्यास म्हणतात. " छांदोग्य उपनिषदात " तत्त्वमसि या महावाक्याचा उपदेश नऊ वेळा आला आहे. म्हणून त्याचा अभ्यासही अद्वयब्रह्मज्ञानाच्या अभ्यासात आहे.

गीतेतील प्रतिपाद्य विषय कोणता आहे हे आपण वर उपक्रमोपसंहाराच्या वेळी पाहिलेच आहे. सिद्धयोग किंवा शक्तिपातयोग हाच गीतेचा प्रतिपाद्य विषय असून गीतेत त्याचे वारंवार प्रतिपादन करून अभ्यास या लिंगाद्वारे या विषयाचे गूढ प्रकट करताना भगवंतांनी वारंवार असे म्हटले आहे की, " समत्वं योग उच्यते ॥ २.४८॥, योऽन्तःसुखोन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः। स योगी ..॥५.२४॥, तस्मात् योगाययुज्यस्व ॥२.५०॥, तस्माद्योगी भवार्जुन ॥६.४६॥, तदा योगमवाप्स्यसि ॥२.५३॥, आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन । सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥६.३२॥,अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः। तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ ८.१४॥, नैते सृती पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन । तस्मात् सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ ८.२७॥, ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः । अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥१२.६॥, यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः। तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥१८.७८॥"

ज्यावेळी अर्जुन मोहग्रस्त झाला त्यावेळी " गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पंडिताः ॥ २.११॥, न त्वं शोचितुमर्हसि ॥ २.२७॥" व " नैनं शोचितुमर्हसि

॥२.२६॥' असे श्रीकृष्णांनी अर्जुनाला सांगून तू हा शोक टाक व "योगस्थः कुरु कर्माणि ॥२.४८॥" असे सुरुवातीलाच सांगून सिद्धयोगात स्थित होऊन कर्मे करण्याचा उपदेश केला आहे व "समत्वं योगे उच्यते ॥ २.४८॥" असे सांगून सिद्धयोगाचे अंतिम फलही सांगितले आहे. याप्रमाणेच सिद्धयोगसाधनाचे माहात्म्य, फल, पद्धती, त्याच्या कक्षा, अधिकारी इत्यादींचे वारंवार प्रतिपादन करीत शेवटी जेथे श्रीकृष्ण हे गुरू व अर्जुन हा शिष्य आहे तेथे संपत्ती, विजय, ऐश्वर्य व नित्य न्याय आहेत, असा सिद्धांत मांडून सिद्धसाधक व गुरुशिष्यएकरूपत्व हा ज्याचा अनन्यसामान्य विशेष आहे, अशा सिद्धयोगाचे अलौकिकत्व सांगून तोच गीतेचा एकमात्र प्रतिपाद्य विषय आहे, हे सांगितले आहे.

ज्ञानेश्वरीतही उपरोक्त पद्धतीने गीतेच्या अनुरोधानेच सिद्धयोगाचे व त्याच्या अंगोपांगांच्या अर्थाचे वारंवार प्रतिपादन आल्यामुळे अभ्यास हे लिंग सिद्ध झाले आहे. ग्रंथकाराच्या मनात जी गोष्ट सिद्ध करावयाची असते तिच्या समर्थनार्थ तो अनेक वेळा अनेक कारणे दाखवून दरवेळी "म्हणून ही गोष्ट सिद्ध झाली" किंवा "अमुक केले पाहिजे" असा पुनःपुन्हा एकच सिद्धान्त सांगत असतो. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही सिद्धयोगाच्या विषयाचे व त्याच्या अर्थाचे समर्थन करण्यासाठी अनेक कारणे दाखवून सिद्धयोगशास्त्राचे प्रतिपादन केले आहे.

जीवाच्या अज्ञानतिमिरांधाचा नाश होऊन ज्यांच्या कृपेमुळे जीव ब्रह्मरूप होऊन जातो त्या श्रीसद्‌गुरूंना सिद्धयोगामध्ये सर्वांत मोठे व वरचे स्थान आहे. "नास्ति तत्त्वं गुरोः परम्" व "गुरोः कृपैव केवलम्" हेच सिद्धयोगाचे सार असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीसद्‌गुरुकृपेचा महिमा या ग्रंथात वारंवार प्रतिपादन केला आहे. जीवाच्या ठिकाणी शक्तीचे जागरण घडून येऊन तो शिवरूप होण्याच्या सिद्धयोगाच्या प्रक्रियेतील श्रीसद्‌गुरू हे एकमेव आलंबन आहेत. त्यांच्या कृपेतच मोक्षफल व अज्ञाननाश ही अंतर्निहित आहेत. त्यामुळे श्रीसद्‌गुरुकृपा व सिद्धयोग हे पर्यायवाची शब्द आहेत असे म्हटल्यास किंचितही अतिशयोक्ती होणार नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीच्या आरंभापासून अखेरपर्यंत आपल्या नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञेच्या फुलोऱ्याने श्रीसद्‌गुरुकृपा = सिद्धयोग = अज्ञाननाश = मोक्षप्राप्ती हा गणिताप्रमाणे मांडलेला रुक्ष सिद्धान्त आपल्या काव्यात्म पद्धतीने कसा मांडला आहे, हे आपण मागे वेळोवेळी विषयानुरोधाने अनेक वेळा पाहिले आहेच. अशा प्रकारे वारंवार गुरुस्तुती करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाचा जो महिमा स्पष्ट केला आहे, त्यामुळेच अभ्यास लिंगाची सिद्धी झाली आहे.

अपूर्वता हे ग्रंथ तात्पर्याचा निर्णय करणारे तिसरे लिंग आहे. त्याचा आता विचार करू. प्रमाणांतराने जे अज्ञात असते अर्थात् ग्रंथातील प्रतिपाद्य विषय इतर दुसऱ्या कोणत्याही लौकिक प्रमाणाला विषय न होणारा असणे यासच अपूर्वता असे

म्हणतात. सिद्धयोगद्वारा अद्वैतामृताचा वर्षाव श्रीसद्‌गुरूंच्या शक्तिपातयोगस्वरूप कृपेने होऊन संसाराचा उच्छेद झाल्याने ज्ञानप्राप्तिद्वारा स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची उपलब्धी व्हावी, हा ज्ञानेश्वरीचा प्रतिपाद्य विषय असल्याने तो कोणत्याही लौकिक प्रमाणाला विषय न होणारा असाच आहे. जर ग्रंथातील प्रतिपाद्य विषय इतर कोणत्याही लौकिक प्रमाणाला विषय न होणारा असेल म्हणजे असामान्य असेल तर तो कोणत्या अलौकिक व असामान्य प्रमाणाला विषय होतो म्हणजे कोणत्या अलौकिक व असामान्य प्रमाणांनी त्या ग्रंथातील विषयाची श्रेष्ठता सिद्ध होते. हे पाहणे क्रमप्राप्त आहे.

"वृत्तिप्रभाकररहस्य" या ग्रंथात साधु निश्चलदासजी यांनी पहिल्या प्रकाशात प्रमाण-भेदाचे कथन पुढीलप्रमाणे केले आहे. "प्रमा" या संस्कृत शब्दाचा अर्थ प्रमाणांपासून उत्पन्न झालेले यथार्थ ज्ञान असा आहे व त्या प्रमेचे जे करण (असाधारण कारण) त्यास प्रमाण असे म्हणतात. १) प्रत्यक्ष, २) अनुमान, ३) शब्द, ४) उपमान, ५) अर्थापत्ती आणि ६) अनुपलब्धी असे प्रमाणांचे सहा भेद आहेत. यातील ब्रह्मज्ञानाचे असाधारण कारण शब्दप्रमाणच आहे; कारण ब्रह्म हे शब्द-प्रमाणाशिवाय इतर कोणत्याही प्रमाणाचा विषय होणार नाही. इतर प्रमाणे याबाबतीत कशी व्यर्थ ठरतात हे पाहिले म्हणजे शब्द-प्रमाण कसे असाधारण आहे, हे अपोआपच सिद्ध होईल.

'अशब्दमस्पर्शम्' ही श्रुती ब्रह्माचे ठिकाणी शब्दस्पर्शादिकांचा अभाव असल्याचे सांगते; म्हणजे बाह्य पंचेंद्रियास ब्रह्म विषय होत नाही. शिवाय 'न द्रष्टेर्द्रष्टारं पश्येः॥ बृ.उ. ३.४.२॥ किंवा "अद्रष्टोद्रष्टा" या श्रुतीत पंचज्ञानेंद्रियादिकास व या लौकिक चक्षुरादि दृष्टीस प्रकाशक जो द्रष्टा त्याच्या ठिकाणी शब्दस्पर्शादि लौकिक प्रत्यक्ष योग्य गुण नाहीत, मग या लौकिक इंद्रियांकडून तो कसा प्रकाशित होईल? जर ब्रह्माचे इंद्रियांकडून प्रकाशन मानले; तर ब्रह्म दृश्य व जड ठरेल, म्हणून प्रत्यक्षाचा विषय नाही. एवढेच नव्हे; तर ही पंचज्ञानेंद्रिये आंतरसुखदुःखाच्या प्रत्यक्षात असमर्थ आहेत; तर तो इंद्रिये पंचविषयातीत "मन-बुद्धि-अगोचर" ब्रह्मास कसे विषय करतील? असे कैमुतिक न्यायानं म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. सारांश, प्रत्यक्ष प्रमाणाचा ब्रह्म विषय नाही. शिवाय श्रुतीने "न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा ॥मुंडकोपनिषद् ३.८॥" असे सांगितले आहे. तो चक्षुरिंद्रियास, वाणीस, किंवा इतर कोणत्याही ज्ञानेंद्रियास-कर्मेंद्रियास विषय होत नाही. एवढेच नव्हे; तर तपाने किंवा कर्माने त्याचे ग्रहण, आकलन होऊ शकत नाही. सारांश, ब्रह्म प्रत्यक्ष प्रमाणाचा विषय होत नाही.

ब्रह्म अनुमान प्रमाणाचाही विषय नाही; कारण तेथे व्याप्ती लिंगादिकांचा अभाव आहे. जर कोणी असे म्हणेल की, "जगद्रूपी प्रत्यक्षावरून कार्यनिरूपित

कारणात ब्रह्मास सिद्ध होण्यास काय हरकत आहे? याला उत्तर असे की, "हे जगद्रूपी कार्य, ब्रह्मजन्य आहे," असे अनुमान ब्रह्मकारणतेस साधक आहे काय? "जे जे कार्य असते ते ते सकारण असते," हे अनुमान साधक आहे? प्रथम अनुमान साधक मानील तर ते संभवत नाही; कारण ब्रह्माचे ठिकाणी व्याप्तिज्ञान होणे शक्य नाही. एक तर ब्रह्म अतिंद्रिय आहे व ब्रह्माच्या ठिकाणी शब्द-स्पर्शाचा अभाव आहे. म्हणून धूम आणि अग्निप्रमाणे व्याप्तीचे प्रत्यक्ष संभवत नाही. म्हणून प्रथम अनुमानाने ब्रह्माची जगत्कारणत्वरूपाने सिद्धी होत नाही. अनुमान साधक मानले तर कारणाची सिद्धी होईल, पण ते कारण ब्रह्मच आहे, हे श्रुतिप्रमाणाविना कळणारच नाही. सारांश, अनुमान प्रमाणाचाही ब्रह्म विषय होऊ शकत नाही.

श्रीमद्भगवद्गीतेत भगवान् सांगतात "अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।।२.२५।।" हा आत्मा अव्यक्त, अचिंत्य व अविकार्य आहे असे म्हटले जाते. या श्लोकाचा भावार्थ सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**हा तर्काचिये दिठी । गोचर नोहे किरिटी ।**
**ध्यान याचिये भेटी । उत्कंठा वाहे ।।२.१४८।।**
**हा सदा दुर्लभु मना । आपु नोहे साधना ।**
**निःसीमु हा अर्जुना । पुरुषोत्तमु ।।२.१४९।।**

अर्जुना ! हा आत्मा तर्कास म्हणजे अनुमानाला विषय होत नाही. ध्यान याच्या भेटीसाठी उत्कंठित झालेले असते. हा मनासच जर दुर्लभ आहे तर मनाधीन ज्याचे व्यापार आहेत अशा इतर साधनांना तो कसा प्राप्त होईल ? निःसीम म्हणजे देशकालवस्तुपरिच्छेदरहित व पुरुषोत्तम म्हणजे क्षराक्षर पुरुषात समव्याप्त असून त्या उभय उपाधींहून अतीत, केवळ निर्विशेष व अनुभूतिरूप उत्तम पुरुष होय. "तर्कुं आयणी नेघे । आंगीं जयाच्या ।। " सारांश, तर्काच्या चातुर्यास म्हणजे अनुमानास ब्रह्म विषय होऊ शकत नाही.

ब्रह्माच्या ठिकाणी सादृश्याचा अभाव आहे. ब्रह्मासारखे पारमार्थिक ब्रह्मच. दुसरी ब्रह्मासारखी स्वगत-सजातीय-विजातीय भेदशून्य वस्तूच नाही. म्हणून ब्रह्म उपमान प्रमाणाचाही विषय नाही.

अर्थापत्ती प्रमाणाचाही ब्रह्म विषय होऊ शकत नाही. अन्यथानुपपत्तीचा किंवा उपपाद्य-उपपादक भाव ब्रह्माच्या ठिकाण नाही; म्हणून ब्रह्म अर्थापत्ती प्रमाणाचाही विषय नाही."

सारांश, ब्रह्माच्या अपरोक्ष ज्ञानास 'तत्त्वमसि' इत्यादि महावाक्यरूप शास्त्राचे "शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदान्तवाक्यजा । यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः ।। " या सूतसंहितेत सांगितलेल्या न्यायाने श्रवण होणे हेच असाधारण कारण आहे, म्हणून वेद हा सर्व प्रमाणांचा राजा आहे. वेदान्ताने

प्राप्त होणारी विद्या जेव्हा शक्तिपाताच्या संयोगाने मिळते तेव्हा मनुष्य तत्क्षणीच मुक्त होतो, यात काहीच संशय नाही. याचा अर्थच असा आहे की, गुरू हा श्रोत्रीय व ब्रह्मनिष्ठ असूनसुद्धा जर शक्तिपात करण्याचे सामर्थ्य त्याच्यात नसेल तर शिष्याला त्याचक्षणी साक्षात्कार होऊ शकत नाही. ब्रह्म उपनिषद्वेद्य आहे ही गोष्ट भगवान् व्यासांनीही "शास्त्रयोनित्वात् ॥ १.१.४ ॥" या "ब्रह्मसूत्रात" ब्रह्मज्ञानाविषयी शास्त्र प्रमाण आहे, हे सांगून स्पष्ट केली आहे. श्रीशंकराचार्य-देखील या सूत्रातील द्वितीय वर्णकात असे सांगतात की, ब्रह्माच्या यथार्थ स्वरूपाचे ज्ञान होण्याकरिता ऋग्वेदादि शास्त्रे हेंच प्रमाण होय. योनी = कारण = प्रमाण असे या सूत्राच्या आधारे ब्रह्माच्या अपरोक्ष ज्ञानाचे साधन शास्त्रश्रवण हेच आहे. याविषयी "आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यः ॥ बृहदारण्यकोपनिषत् – २.४.५ ॥" ही श्रुती आत्मज्ञान संपादन करावे असे सांगून ज्ञानाचे साधन म्हणून "श्रोतव्यः" श्रवण करावे म्हणजेच "तत्त्वमस्यादि" महावाक्यरूप शास्त्राचेच श्रवण केले पाहिजे असे म्हणते. अतएव ब्रह्म उपनिषद्वेद्य आहे. किंवा "तं त्वौपनिषदं पुरुषं पृच्छामि ॥ बृह. ३.९.२६ ॥" तुला मी उपनिषद्वेद्य पुरुष विचारीत आहे. "नावेद विन्मनुते तं बृहन्तम् ।" वेदास न जाणणारा त्या व्यापक अशा परमात्म्यास जाणू शकत नाही. या वेदवचनांवरूनही ब्रह्म वेदैकगम्य आहे म्हणजे शब्दप्रमाणा-नेच त्याचे ज्ञान होते. याच अभिप्रायाने श्रीसंत तुकाराममहाराज शब्दाचे उपकार सांगताना असे म्हणतात की–

**शब्द हा बहुसार उपकाराची राशी ॥**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीदेखील "अमृतानुभवाच्या" सहाव्या प्रकरणाच्या प्रारंभी शब्दाचे महत्त्व वर्णन करताना असे म्हटले आहे की–

**बाप उपेगी वस्तु शब्दु । स्मरण दानी प्रसिध्दु ।**
**अमूर्ताचा विशवु । आरिसा नव्हे ? ॥६.१॥**

धन्य ! धन्य ! शब्द ही अत्यंत उपयोगी वस्तू आहे; कारण जीवास अनादि-अविद्येने आत्मस्वरूपाविषयी जो विसर पडला आहे त्या आत्मस्वरूपाचे दान देण्याविषयी याची मोठी प्रसिद्धी आहे. अमूर्त अशा आत्म्याचे स्वरूप दाखविणारा जणू एक प्रकारचा हा आरसा नव्हे का ?

अशा प्रकारे शब्दप्रमाण हेच ब्रह्मज्ञानाचे असाधारण कारण आहे, ब्रह्माचे नाही. कारण शब्दप्रमाणाचा व ब्रह्माचा साध्य-साधन भाव नाही. ब्रह्म हे साध्य नसून नित्यसिद्ध आहे. शिवाय कोणतेही प्रमाण हे नवीन प्रमेयास उत्पन्न करीत नाही तर सिद्ध असलेल्याच वस्तूचे प्रकाशन म्हणजे ज्ञान करून देत असते; कारण कोणत्याही प्रमाणाचे साध्य 'प्रमेय' नसून 'प्रमेयाचे ज्ञान' असते असा नियम आहे. म्हणून महावाक्यादि शब्द-प्रमाणाचे साध्य ब्रह्म नसून ब्रह्माचे अपरोक्ष ज्ञान आहे, हे नीट लक्षात ठेविले पाहिजे. शब्दप्रमाणाच्याद्वारा ब्रह्माचे अपरोक्ष ज्ञान

होते, म्हणूनच वर शब्द-प्रमाणास 'ब्रह्मज्ञानाचे असाधारण कारण' असे म्हटले आहे.

अद्वय ब्रह्म व धर्म इत्यादि अतींद्रियार्थ श्रुतिप्रमाणाव्यतिरिक्त दुसऱ्या प्रत्यक्षादि कोणत्याही प्रमाणाचा विषय होत नाहीत. हे उपरोक्त विवेचनावरून स्पष्ट झाले. म्हणून अद्वय ब्रह्मप्रतिपादनाच्या बाबतीत एकमेव श्रुती प्रामाण्यच असणे म्हणजे अपूर्वताच होय. अद्वय ब्रह्माच्या व धर्माच्या ठिकाणी शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे गुण नसल्यामुळे त्यांचे प्रत्यक्ष ज्ञान होणे अशक्य आहे. अनुमान हे कोणत्याही वस्तूच्या स्वरूपाचे ज्ञान करून देण्याच्या कामी उपयोगी पडत नाही; तर "जी वस्तू पूर्वी समजलेली आहे अशा वस्तूचा एखाद्या पदार्थाशी संबंध आहे", इतकेच अनुमानाने समजते. उपमानानेही अद्वय ब्रह्माचे व धर्माचे ज्ञान होत नाही; कारण वस्तू आणि तिचे नाव या दोहोतील संबंधच फक्त उपमानाने समजतो, आणि येथे तर वस्तूचेच मुळी ज्ञान झालेले नसते. तेव्हा प्रथमतः अद्वय ब्रह्माचे व धर्माचे ज्ञान शब्दावरूनच होणे शक्य आहे. परंतु अद्वय ब्रह्माच्या प्राप्तीमध्ये जशी श्रुती प्रमाण आहे; (कारण वेद हे ईश्वराचे श्वासोच्छवास असून ते ध्यानात ऋषींना दिसले म्हणून ते अपौरुषेय असून अलौकिक व असामान्य प्रमाण होत.) त्याप्रमाणेच अनुभव हे अलौकिक व असामान्य प्रमाण आहे. "जन्माद्यस्य यतः ॥१.१.२॥" या "ब्रह्मसूत्रावर" भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी या विषयी असे म्हटले आहे की, "ज्याप्रमाणे धर्मजिज्ञासेमध्ये श्रुत्यादिकच फक्त प्रमाण होतात, त्याप्रमाणे ब्रह्मजिज्ञासेमध्ये नाही; तर या ठिकाणी श्रुत्यादिक प्रमाण होऊन अनुभवादिक देखील संभवतील तशी प्रमाण होतात; कारण ब्रह्मज्ञानाचे पर्यवसान अनुभवातच होते.'' (अनुभव म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार होय. अनुभव हा अविद्येचा नाश करून साक्षात् ब्रह्माविषयी प्रमाण होतो.) सिद्धयोगाच्याद्वारा म्हणजे गुरुकृपेच्याद्वारा होणाऱ्या ब्रह्मज्ञानाला उपरोक्त श्रुती व अनुभूती ही दोन अलौकिक प्रमाणेच विषय होतात, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे सांगितले आहे. ते म्हणतात—

तें बुद्धीही आकळितां सांकडे । म्हणौनि बोलीं विपायें सांपडे ।
परी श्रीनिवृत्तिकृपादीप उजियेडें । देखैन मी ॥६.३२॥

जें दिठीही न पविजे । तें दिठीविण देखिजे ।
जरी अतींद्रिय लाहिजे । ज्ञानबळ ॥३३॥

ना तरी जे धातुवादाही न जोडे । तें लोहीचि पंधरें सांपडे ।
जरी दैवयोगें चढे । परिसु हातां ॥३४॥

तैसी गुरुकृपा होये । तरी करितां काय आपु नोहे ।
म्हणौनि तें अपार मातें आहे । ज्ञानदेवो म्हणे ॥३५॥

**तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचें रूप दावीन ।**
**अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ।।३६।।**

ब्रह्मज्ञान किंवा आत्मज्ञान हे बुद्धीला देखील आकलन करण्यास कठीण आहे म्हणून शब्दांनी क्वचित्‌च सांगता येईल; परंतु श्रीगुरुनिवृत्तिनाथमहाराजांच्या शक्तिपातरूप दिव्याच्या उजेडात मी ते पाहीन. (ही पाहण्याची प्रक्रिया "आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे । मन सुखेंसी सुरवाडिजे । सुखाचि माजीं ।।६.२५।।" या ओवीत स्पष्ट झाली आहे. वरवर असलेली शब्दरूपी किंवा शब्दांची टरफले किंवा कवचे प्रथम काढून टाकावीत म्हणजे साधनाने शब्दब्रह्माचा वेध करावा. मग साधक आपोआपच ब्रह्मस्वरूपाशी तद्रूप होतो व सुखामध्येच सुखाने रगून जातो.) श्रीगुरुकृपेचे म्हणजे शक्तिपाताचे ऐश्वर्य काय आहे म्हणून सांगावे ! जर दीक्षेच्यामुळे अतींद्रिय ज्ञानबळ प्राप्त झाले तर त्यावेळी आतून ज्ञान स्वतःच उत्पन्न होऊन जेथे दृष्टीही पोहोचू शकत नाही ते दृष्टीशिवाय पाहता येते. जर दैवयोगाने परिस हाती आला तर किमयागारासही न मिळणारे उत्तम सोने लोखंडातच मिळेल. त्याप्रमाणे जर सद्‌गुरूंची कृपा म्हणजे शक्तिपात-योगसाधन प्राप्त होईल तर प्रयत्न केला असता म्हणजे नित्यनेमाने साधक केले असता कोणती गोष्ट प्राप्त होणार नाही ? म्हणूनच श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात की, श्रीसदगुरूंची माझ्यावर पूर्ण कृपा आहे. त्या श्रीगुरुकृपेच्या म्हणजे शक्तिपात-योगस्वरूप सिद्धयोगाच्या बलाने मी बोलेन. या साधनाच्या आधारानेच मी अरूप निराकर परब्रह्म वस्तूचे स्वरूप सर्वांस दाखवीन आणि जी परब्रह्म वस्तू इंद्रियादिकास अविषय, न दिसणारी किंवा गोचर होण्यापलीकडची आहे, तिचाही इंद्रियांकडून अनुभव घेता येईल, असे मी करीन.

येथपर्यंत आपण शब्द व अनुभूती या अलौकिक व असामान्य प्रमाणांच्या द्वारा अपूर्वता हे लिंग कसे सिद्ध होते हे पाहिले. या आधारावरच म्हणजे उपरोक्त दोन प्रमाणांच्या द्वारा गीतेमध्ये अपूर्वता हे लिंग कसे अवतरले आहे, याचे प्रथम विवेचन करून नंतर ज्ञानेश्वरीमध्ये ते कसे प्रकट झाले आहे ते पाहू. अद्वितीय ब्रह्म हे उपनिषद्‌रूप शब्दप्रमाणातिरिक्त कोणत्याही प्रमाणाचा विषय नाही, म्हणून अद्वितीय ब्रह्मामध्ये प्रमाणांतरांनी अज्ञातरूप अपूर्वता आहे. गीतेच्या ध्यानातील श्लोकात उपरोक्त भाव अधिक स्पष्ट झाला आहे.

**सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः**
**पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ।।**

उपनिषद्‌रूपी गायींपासून पार्थरूपी जीवासाठी अंतर्यामी नारायणाने गीता-रूपी अमृताचे दोहन केले. हे अमृत म्हणजे सिद्धयोग होय; कारण गीतेच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे" असे स्पष्ट म्हटले आहे. त्याचप्रमाणे

चवथ्या अध्यायाच्या सुरुवातीला " परंपरेने चालत आलेला हा सिद्धयोग राजर्षी जाणत होते; परंतु दीर्घकालानंतर तो सिद्धयोग या लोकी लुप्त झाला. तोच हा पुरातन सिद्धयोग आज मी तुला सांगितला आहे," असे अर्जुनाला सांगून, " हा योग म्हणजे वैदिक धर्माचे उत्कृष्ट रहस्यच आहे," हे स्पष्ट करून भगवंतांनी त्याची अपूर्वता कथन केली आहे. "समत्व योग उच्यते ।। २ ४८।।, तपस्विभ्योऽधिकोयोगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः । कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ।। गीता ६ ४६।। " इत्यादि गीतेतील वाक्यातून सिद्धयोगाची अपूर्वता स्पष्ट झाली आहे.

वर उधृत केलेल्या गीतेच्या ध्यानाच्या श्लोकातील उपनिषद्‌रूपी गायी म्हणजे शब्दरूपी श्रुतिप्रामाण्य होय. आता अनुभूती हे दुसरे अलौकिक व आसामान्य प्रमाण गीतेत कसे अवतरले आहे हे पुढील श्लोकांवरून स्पष्ट होईल.

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ।।६.३०।।**
**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ।।३१।।**
**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ।।३२।।**

जो मला सर्व भूतांमध्ये पाहतो व सर्व भूतवर्गास माझ्यामध्ये पाहतो त्याला मी नाहीसा होत नाही व तो मला नाहीसा होत नाही. एकत्वास पूर्णपणे प्राप्त झालेला जो सर्व भूतांमध्ये स्थित असलेल्या मला भजतो तो योगी कोणत्याही प्रकारे जरी वागत असला तरी माझ्या ठिकाणी-परमपदी राहतो. हे अर्जुना ! जो सर्व ठिकाणी—सर्व भूतांमध्ये आपल्याप्रमाणे सुख किंवा दुःख सारख पाहतो तो श्रेष्ठ योगी मानलेला आहे.

आता ज्ञानेश्वरीत अपूर्वता हे लिंग कसे अवतरले आहे ते पाहू. प्रथम ज्ञानेश्वरीत आलेला सिद्धयोग हा विषय लौकिक प्रमाणाला विषय कसा होऊ शकत नाही हे पाहू व नंतर अलौकिक व असामान्य असलेल्या शब्द म्हणजे श्रुती व अनुभूती या दोन प्रमाणांना सिद्धयोग हा विषय कसा झाला आहे हे पाहू.

शक्तिपाताने सद्‌गुरू ज्ञानाचे दान करून शिष्याच्या अनादि अविद्येचा नाश करणारी प्रक्रिया म्हणजे कुंडलिनी शक्तिरूप अग्नी शरीरात प्रदीप्त करून तसा प्रत्यक्ष अनुभव शिष्याला देतात व त्यास ब्रह्मरूप करतात. यासाठीच योगवासिष्ठात सद्‌गुरूचा व्याख्या करताना असे म्हटले आहे की, " जो दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व कृपेने शिष्याच्या देहामध्ये शांभवी शक्तीचा संचार करून ज्ञानप्राप्तिद्वारा वेदप्रतिपादित स्वसंवेद्य आत्मस्वरूप प्राप्त करून देतो तोच गुरू होय."

अशा प्रकारे शक्तिपात करणारा सद्‌गुरू त्रिभुवनात दुर्लभ असल्यामुळे त्याच्याद्वारा प्राप्त होणारा सिद्धयोग हा कोणत्याही लौकिक प्रमाणाला विषय होऊ शकत नाही.

गीतार्थाची म्हणजे गीतातत्त्वरूप अद्वयानंदशांभवविद्येची किंवा ज्ञानाची थोरवी एवढी आहे की, स्वतः शंकर त्याची चर्चा करीत असता पार्वतीला चमत्कार वाटून तिने त्याबद्दल शंकरांना प्रश्न केला. त्यावेळी शंकर म्हणाले, हे पार्वता ! तुझे स्वरूप नित्यनूतन असल्यामुळे जसा तुझा स्वरूपाचा पार लागत नाही त्याप्रमाणे गीतातत्त्वरूप सिद्धयोग हा जेव्हा पाहावा तेव्हा नवीनच आहे असे वाटते. म्हणून तोही जाणण्यास कठीणच आहे. हे सिद्धयोगशास्त्र गहन असून त्याच्याबद्दल वेदांची देखील मती कुंठित होऊन गेली. त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज प्रश्न विचारतात की, तेव्हा अशा ठिकाणी अल्पज्ञ व मतिमंद असलेल्या माझी क य कथा ? हा अपार सिद्धयोग कोणत्या उपायाने समजून घ्यावा ? हा सिद्धयोग म्हणजे साक्षात् महान् तेजच आहे. त्या तेजाला उजळा देण्याचे सामर्थ्य कोणात आहे ? चिलटाने आपल्या मुठीत आकाश कसे धरावे ? अशी या सिद्धयोगाची अपूर्वता असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात की, जर कोणी मला असे विचारले की; सिद्धयोगासारखे अपूर्व शास्त्र व तत्त्व आपण कोणत्या प्रमाणांच्या, उपायांच्या व आधारांच्या जोरावर सांगावयास प्रवृत्त झाला आहात, तर मी त्याला एवढेच म्हणेन की, "परी एथ असे एकु आधारु । तेणेंचि बोले मी सधरु । जे सानुकूळ श्रीगुरु ॥ ज्ञानदेवो म्हणे ॥ १.७५ ॥ " ज्याअर्थी श्रीगुरू मला अनुकूल आहेत त्याअर्थी एवढे महत्कृत्य करण्याला त्यांचाच एकमेव आधार आहे व याचमुळे मला सिद्धयोगाची उपलब्धी सर्वसामान्य जनांना करून देण्यास धीर आला आहे. खरे पाहिले तर मी अज्ञानी, मूर्ख व विवेकहीन आहे; परंतु असे असले तरी संतांचा कृपारूपी शक्तिपातयोगाचा सोज्वळ दीप सदासर्वदा तेवतच असतो. त्याच्या साहाय्याने मी गीतार्थ करण्यास प्रवृत्त झालो आहे. परिसाच्या अंगी लोखंडाचे सोने करण्याचे व अमृताच्या अंगी मेलेल्या माणसाला जिवंत करण्याचे सामर्थ्य असते. त्याचप्रमाणे सद्‌गुरू आपल्या कृपेने शक्तीचा संचार शिष्याच्या देहामध्ये करून कुंडलिनीच्या रूपाने निद्रिस्त असलेली अनादी आत्मसत्ता जागृत करतात व त्याला आपल्यासारखे ब्रह्मरूप करतात. यालाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "एथ वस्तुसामर्थ्यशक्ति। नवल कायी ।।१.७८।।" असे म्हटले आहे. वस्तूची सामर्थ्य शक्ती वस्तूशीच समव्याप्त असते. ज्याप्रमाणे घंटेचा नाद घंटेमध्ये अंतर्निहित असतो व चालण्याची गती पायातच समाविष्ट असते त्याचप्रमाणे वस्तू म्हणजे परब्रह्म व त्याची सामर्थ्यशक्ती म्हणजे कुंडलिनी शक्ती ही परब्रह्माशी समव्याप्त किंवा एकरूप असते. ही शक्ती सद्‌गुरुकृपाप्रसादाने जागृत झाली की, " अनधीतस्य शास्त्रस्य स्वत एव प्रकाशनम् ।। सूतसंहिता-यज्ञवैभवखंड-ब्रह्मगीता अ. ४ श्लोक १२३।।" या न्यायाने शक्तिपात झाला की, जागृत शक्तीमुळे साधकाच्या ठिकाणी न

शिकलेल्या शास्त्रांचा प्रकाश स्वत: होतो व त्याला ती शास्त्रे व त्यांची रहस्ये कळू लागतात. त्याचप्रमाणे "योगशिखोपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायातही" असे म्हटले आहे की, साधकाची शक्ती जागृत झाली की, "वेदशास्त्रपुराणानां स्वयं कर्ता भविष्यति ॥३.११॥ म्हणजे तो साधक वेदशास्त्रपुराणांचा स्वत: कर्ता होतो. ज्यांचा कधीही अभ्यास केला नाही अशी शास्त्रे साधकाच्या मुखातून आपोआप बाहेर पडू लागतात. हेच श्रीज्ञानेश्वरमहाराज आपल्या शब्दात सांगताना असे म्हणतात की, "ज्यावेळी सद्‌गुरू कृपा करतात त्यावेळी परब्रह्मस्वरूप असलेली कुंडलिनी शक्ती जागृत होऊन सिद्धसरस्वती म्हणजे अनादिसिद्ध अशी वाग्देवताच खरोखर प्रकट होते. अशा प्रकारे एखाद्यावर शक्ती प्रसन्न झाली की, मग तो मुका असला तरीही त्या मुक्याला भारती म्हणजे सौष्ठवपूर्ण,यथार्थ,अर्थवाहक व शब्दाविष्कारक्षम अशी वाचा फुटते. यात नवल ते काय?; कारण शक्ती जागृत झाली की, हे आपोआपच घडून येते. ज्यांना हे माहीत नाही त्यांना नवल वाटणे साहजिक आहे. अशा रीतीने कामधेनुप्रमाणे असणारी सद्‌गुरू आई ज्याला प्राप्त होते त्याला जगात काहीही दुर्लभ असत नाही. ( ज्ञा. अ १.७० ते ७८ )

सारांश, शक्तिपातयोगाशिवाय म्हणजे सद्‌गुरुकृपेशिवाय ज्ञानप्राप्ती होऊन जीव कधीही मुक्त होत नाही ; म्हणून ज्ञानेश्वरीतील प्रतिपाद्य विषय इतर कोणत्याही लौकिक प्रमाणाला विषय होऊ शकत नाही, हीच खरी अपूर्वता आहे.

आता श्रुती म्हणजे शब्द व अनुभूती या दोन अलौकिक व असामान्य प्रमाणांना ज्ञानेश्वरीतील सिद्धयोग हा विषय कसा झाला आहे हे पाहू. श्रुती म्हणजे शब्द अर्थात् वेदान्त तत्त्वज्ञान हे शक्तिपाताच्या हातात हात घालून आल्यावरच कसे उपयुक्त ठरते हे सांगताना "सूतसंहितेतील सूतगीतेत" असे म्हटलें आहे की—

तत्त्वज्ञानेन मायाया बाधो नान्येन कर्मणा ॥८.६॥
ज्ञानं वेदान्तवाक्योत्थं ब्रह्मात्मैकत्वगोचरम् ।
तच्च देवप्रसादेन गुरोः साक्षान्निरीक्षणात ।
जायते शक्तिपातेन वाक्यादेवाधिकारिणाम् ॥७॥

तत्त्वज्ञानानेच मायेचा निरास होतो. दुसऱ्या कोणत्याही कर्माने किंवा उपासनेने अगर मार्गाने माया दूर होत नाही. महावाक्यामुळे उत्पन्न होणारे जीव व व ब्रह्माचे ऐक्य दाखविणारे असे ज्ञानच वेदान्तशास्त्राला संमत आहे. हे ज्ञान देवाच्या प्रसादामुळे गुरूंकडून प्रत्यक्ष दृटिक्षेप झाल्यामुळे शक्तिपात होऊन अधिकारी शिष्याला नुसत्या वाक्योच्चाराबरोबर अनुभवाला येते. यालाच शब्ददीक्षा म्हणतात. अशा प्रकारे शब्द-प्रमाणाने ब्रह्माचे ज्ञान होते; परंतु तत्त्वत: ब्रह्म निर्गुण-निर्विशेष असल्यामुळे ते कोणत्याही प्रमाणास विषय होऊ शकत नाही. याविषयी श्रुती सांगते

की, "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसासह ।। तैत्तिरीय उपनिषत् २.३।।, यद्वाचाऽनभ्युदितम् ।। केनोपनिषत् ५।।" म्हणजे ज्या ब्रह्मापासून मनासह वाणी परत फिरते, जे (ब्रह्म) वाणीने बोलले जात नाही, तसेच " ठावो न पावतां जयाचा। मनेंसी मुरडली वाचा ।।, श्रुति नेति नेति म्हणती ।।, नये अनुमाना श्रुतीशी ।।, तेथील प्रमाण नेणवे वेदासी ।।, न करवे अर्थ उपनिषदा।।" इत्यादि संतवाचनातसुद्धा ब्रह्म शब्द-प्रमाणासही विषय होत नाही, असे सांगितले असता, ब्रह्म शब्दप्रमाणाचा विषय आहे असे कसे म्हणता येईल ? याचे उत्तर असे आहे की, निर्गुण ब्रह्माचे वर्णन करण्यास वेद असमर्थ असले तरीसुद्धा 'जगत्कारणत्व' इत्यादि उपाधींच्या गुणांचा आश्रय घेऊन श्रुतिप्रमाण म्हणजे वेद ब्रह्माचे वर्णन करतो. याविषयी श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**उपाधीचा ओथंबा। घेऊनि श्रुति उभविती जिभा।**
**नामरूपाचा वडंबा। करिती वाया ।।**

**उपाधीचा दुसरा। घालितां ओपसरा।**
**नामरूपाचा संसारा। होय जयाते ।।१५.७६।।**

तात्त्विक ब्रह्म निर्गुण असल्यामुळे ते शब्दाचा विषय होत नाही, हे खरे; पण श्रुती जगत्कारणादि उपाधींचा ओथंबा म्हणजे साहाय्य घेऊन परमात्म्याचे वर्णन करते. याचे दुसरे उत्तर असे की,'आवरणसहित' आत्मा, ब्रह्म आवरण निवृत्तीसाठी "वृत्तिव्याप्ती" आहे म्हणजे वृत्तीचा विषय आहे. असा आवरणसहित आत्मा, ब्रह्म शुद्ध बुद्धीचा, शब्दाच्या लक्षणा वृत्तीचा विषय आहे, असे " दृश्यते त्वग्रया बुद्धया ।। कठोपनिषत् ३.१२ ।।, मनसैवेदमाप्तव्यम् ।। कठोपनिषत् ४.११ ।। मनसैवेदं द्रष्टव्यम् ।। बृहदारण्यकोपनिषत् ४.४.१९।।" इत्यादि श्रुतिवाक्ये सांगतात.

आवरणसहित आत्मा आवरणनिवृत्तीसाठी सिद्धयोगसाधनेचा विषय कसा झाला याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**जें गीतार्थाचें चांगावें। मोक्षोपायपर आघवें।**
**आन शास्त्रोपाय कीं नव्हे। प्रमाणसिद्ध ।।१८.१२३०।।**
**वारा आभाळचि फेडी। वांचूनि सूर्यातें न घडी।**
**कां हातु बावुळी धाडी। तोय न करी ।।१२३१।।**
**तैसा आत्मदर्शनीं आडळु। असे अविद्येचा जो मळु।**
**तो शास्त्र नाशी येरु निर्मळु। मी प्रकाशें स्वयें ।।१२३२।।**

फक्त संपूर्ण गीताशास्त्राचे म्हणजे सिद्धयोगाचेच सामर्थ्य असे आहे की, ते मोक्षप्राप्तीचे सामर्थ्य प्राप्त करून देणारे आहे. हा गीतार्थातील महत्त्वपूर्व चांगुलपणा आहे. दुसरी कितीही शास्त्रे असली; तरी ती सिद्धयोगासारखी प्रमाणसिद्ध मोक्षाचा उपाय किंवा मार्ग सांगणारी नाहीत. वारा सूर्याच्या आड आलेले ढग दूर

करतो; मात्र तो नवीन सूर्य उत्पन्न करीत नाही. हाताने पाण्यावर आलेले फक्त गोंडाळ दूर केले जाते; नवीन पाणी उत्पन्न केले जात नाही. त्याप्रमाणे आत्मज्ञानास अडथळा निर्माण करणारा किंवा आवरणरूप प्रतिबंध शास्त्रजन्य-शब्द प्रमाणजन्य अशा सिद्धयोगशास्त्रातील शक्तिपाताने नाहीसा होतो. त्याशिवाय मी जो स्वयंप्रकाश निर्मळ असा आहे, त्या माझे आत्मस्वरूप त्यास प्रकाशित करवत नाही; कारण ते स्वतःसिद्ध स्वयंप्रकाशानेच प्रकाशित किंवा अभिव्यक्त होते.

असे असले तरी वास्तविकरीत्या विचार केला; तर अनुभूती याच एकमात्र व असामान्य प्रमाणाला ज्ञानेश्वरीतील सिद्धयोग हा विषय झाला आहे. इतर प्रमाणांना तो विषय कसा होत नाही, हे पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल

सुखदुःखे म्हणजे अंतःकरणाचेच धर्म आहेत. त्या सुखदुःखांचे ज्ञान करून देण्यास पंच ज्ञानेंद्रिये ही असमर्थ आहेत. अशावेळी शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पंचविषयातीत मनबुद्धचगोचर अशा ब्रह्माचे प्रत्यक्ष ज्ञान कसे करून देतील ? याविषयी श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

मनाची नखी न लगे। बुद्धीची दृष्टि न रिगे।
ते इंद्रियां कीर जोगें। कायि होईल ? ॥१२.४१॥

मन बुद्धीस अगोचर असलेले निर्गुण, निराकार अशा ब्रह्माचे या इंद्रियांनी प्रत्यक्ष ज्ञान होणार कसे ? निर्गुण ब्रह्म प्रत्यक्ष प्रमाणाचा विषय नाही व कधीही होणे शक्य नाही.

तसेच अनुमान प्रमाणानेही निर्गुण ब्रह्माचे प्रत्यक्ष ज्ञान होणार नाही; कारण अनुमान प्रमाणात 'व्याप्ति लिंगादिकांची' आवश्यकता असते; पण ब्रह्माच्या ठिकाणी व्याप्ति लिंगादिकांचाच जर मुळात अभाव आहे तर मग शुद्ध व निर्गुण ब्रह्म अनुमान प्रमाणास तरी कसे विषय होईल ?

निर्गुण विशुद्ध ब्रह्म शब्द–प्रमाणाचासुद्धा अर्थात् चेतनरहित जडशब्दाचा विषय होत नाही; कारण शब्दाने नाम, रूप, जाती आणि क्रियादिकांचे ज्ञान होत असते; पण अधिष्ठान ब्रह्माच्या ठिकाणीं तर नाम, रूप आणि क्रियादिकांचा अत्यंताभाव आहे. याविषयी श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**नामरूपसंबंधु। जातिक्रियाभेदु।**
**हा आकारसीच प्रवादु। वस्तूसि नाहीं ॥१३.९०४॥**
**हा लोकत्रयाकारु। तो जयाचा विस्तारु।**
**तेथ नाम वर्ण आकारु। चिन्ह नाहीं ॥२.१३४॥**

निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी श्रीज्ञानेश्वमहाराज लोकानुभवसिद्ध आकाराचा अनुवाद करून त्या आकाराचा निषेधही करतात; कारण आकार तेवढा अध्यस्त म्हणजे कल्पित आहे व परमात्मा नाम, रूप, वर्ण, आकार, जाती, क्रिया, भेद इत्यादि

चिन्हांनी रहित अत्यंत निर्विशेष निरुपाधिक अर्थात् सामान्य विशेषभावरहित आहे. याविषयी श्रुती सांगते " यद्वाचानभ्युदितं । " वाणीनेही ते कळत नाही. शिवाय याविषयी श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात " आतां सांगिजे केउते । शब्दाचा संसार नाहीं जेथें ।। " म्हणून ब्रह्म अत्यंत निर्विशेष असल्यामुळे त्याच्या ठिकाणी शब्द-प्रमाणाचाही लाग चालत नाही.

ब्रह्म उपमान-प्रमाणासही विषय होत नाही; कारण उपमान-प्रमाणात सादृश्याची आवश्यकता असते. ब्रह्माचे सादृश्य कोणाशी म्हणून सांगावे ?; कारण ब्रह्मासारखे स्वगत-सजातीय-विजातीय इत्यादि त्रिविध भेदरहित असे आहे कोण ? कोणीच नाहीं. श्रीमद्भगवद्गीतेत अर्जुन असेच म्हणतो की, " न त्वत्समोऽस्त्यभ्य-धिकः कुतोऽन्यो ।। ११.४३ ।। " हे भगवन् ! तुझ्यासारखी दुसरी वस्तू नाही; तर तुझ्यापेक्षा अधिक वस्तू तरी कशी असू शकेल ? तर तशी वस्तू नाही म्हणून निर्गुण ब्रह्माचे ज्ञान करून देण्याच्या बाबतीत हे उपमान-प्रमाण देखील लंगडे पडते.

अर्थापत्ती-प्रमाणासही ब्रह्म विषय होऊ शकत नाही; कारण अर्थापत्ती प्रमाणात उपपाद्याचे प्रत्यक्ष ज्ञान असावे लागते व त्या उपपाद्याच्या अनुपपत्ती-वरून उपपादकाची कल्पना केली जाते; परंतु ब्रह्माचे प्रत्यक्षप्रमाणानेच जर ज्ञान होऊ शकत नाही; तर मग प्रत्यक्षोपजीवी अशा अर्थापत्ती प्रमाणाने तरी ब्रह्माचे ज्ञान कसे होईल ? ते होत नाही हे आपोआपच सिद्ध होते.

अनुपलब्धी-प्रमाणासही ब्रह्म विषय होऊ शकत नाही; कारण या अनुपलब्धी प्रमाणाने अभावाचे ज्ञान होत असते. ब्रह्म हे भावरूप असल्यामुळे अनुपलब्धी प्रमाणासही विषय होत नाही.

ब्रह्म कोणत्याही प्रमाणास विषय का होत नाही ? अर्थात् ती प्रमाणे ब्रह्मास का प्रकाशित करीत नाहीत ? याचे कारण श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात—

**विषो नाहीं कोणाही । जया प्रमेयत्वचि नाहीं ।**
**तया स्वप्रकाशा काई । प्रमाण होय ? ।। अमृ. ५.१६।।**

ज्या चक्षुरादि साधनांनी घटादिकांचे ज्ञान होते त्या इंद्रियांना ' प्रमाण, ' घट पाहणारास ' प्रमाता ' आणि ज्या घटादिकांचे ज्ञान होते त्या घटादिकास ' विषय ' किंवा ' प्रमेय ' असे म्हणतात. जी वस्तू ' प्रमेय ' असते ती अज्ञानाने आवृत असते आणि जी वस्तू अज्ञानाने आवृत असते तीच प्रमाणाचा विषय असते म्हणजे ती वस्तू प्रमेयत्वास प्राप्त होते. ब्रह्म स्वयंप्रकाश असल्यामुळे त्या ब्रह्माच्या ठिकाणी अज्ञानाचे आवरणही संभवत नाही म्हणून ब्रह्मास प्रमेयत्वसुद्धा संभवत नाही. प्रमेयत्वच संभवत नसल्यामुळे तेथे कोणत्याही प्रमाणाची प्रवृत्तीच संभवत नाही.

शिवाय कोणत्याही प्रमाणाचे ' प्रामाण्य ' म्हणजे त्या प्रमाणाची ' अपूर्वता '

सिद्ध होण्यासाठी त्याचा विषय 'अज्ञात' व 'अबाधित' म्हणजे दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाने बाधित न होणारा असावा लागतो. ज्याचे एखाद्या अन्य प्रमाणाने ज्ञान असते, तेच ज्ञान जर दुसरे प्रमाण करून देईल तर त्यास ' ज्ञातज्ञापकत्व ' म्हणजे ज्ञात वस्तूचेच पुनः ज्ञान करून देणे हा दोष येतो व त्यामुळे या प्रमाणास अप्रामाण्य येते. एवढेच नव्हे; तर ते प्रमाण, प्रमाण पदवीवर आरूढच होऊ शकत नाही.

सारांश, कोणत्याही प्रमाणाचे ' प्रामाण्य ' त्याचा विषय ' अज्ञात ' व ' अबाधित ' असेल तरच सिद्ध होते. ज्या प्रमाणाचा विषय ' अज्ञात ' व ' अबाधित ' नसतो ते प्रमाण, प्रमाण पदवीसच योग्य होऊ शकत नाही; तर मग त्याचे 'प्रामाण्य' सिद्ध होणे तर दूरच राहिले; पण ब्रह्म स्वयंप्रकाश असल्यामुळे त्यास प्रेमयत्व-भावच जर प्राप्त होत नाही; मग त्यास ही प्रमाणे कशी बरे प्रकाशित करतील? याविषयी श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**प्रमेयपरिच्छेदें। प्रमाणत्व नांदे।**
**ते कायी स्वतःसिद्धें। वस्तूच्या ठायीं ? ।। अमृ. ५.१७।।**

प्रमेय आकळल्यामुळे प्रमाणाला महत्त्व येते; पण स्वतःसिद्ध वस्तूच्या ठायी या प्रमाणांचा काय लाग लागणार आहे ?

याचा भावार्थ असा की, प्रमेयाला व्याप्त करून त्या प्रमेयाचे प्रमाण ज्ञान करून देते. अर्थात् जे प्रमेय परिच्छिन्न असते त्यास व्यापून प्रमाणांचे ठिकाणी प्रमाणत्व नांदत असते आणि त्या प्रमेयाची ते प्रमाण सिद्धी करून देते; पण ज्या ठिकाणी प्रमेय अपरिच्छिन्न व स्वतःसिद्ध प्रकाशमान् असते तेथे प्रमाणाची अपेक्षाच नसते. घटाच्या प्रकाशनास दीपाची साहाय्यता लागते; पण एखाद्या दीपाच्या प्रकाशनास मात्र दुसऱ्या दीपाची साहाय्यता नको. त्याप्रमाणे स्वतःसिद्ध व स्वयं-प्रकाश ब्रह्माचे प्रकाशन करण्यास ही सहा प्रमाणे समर्थ ठरत नाहीत. याविषयी श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**एवं प्रमाणें अप्रमाण। येणें केले प्रमाण।**
**दृष्टांतें वाइली आण। दिसावयाची ।।अमृ. ५.५४।।**

या प्रकारे प्रमाणांनी आपल्या अप्रामाण्याची सिद्धी केली म्हणजे ब्रह्म आम्हाला विषय होत नाही, हे सिद्ध केले व दृष्टांतांनी तर पुढे न येण्याची आण म्हणजे शपथच वाहिली आहे.

याप्रमाणे ही सहा प्रमाणे व्यवहारात प्रमेयाची सिद्धी करतात हे खरे; परंतु स्वसंवेद्य ब्रह्मस्वरूपाची मात्र ही प्रमाणे सिद्धी करू शकत नाहीत. म्हणजे ब्रह्म सहाही प्रमाणांना विषय होत नाही. याचा अर्थ ब्रह्म अभावरूप आहे, म्हणून ते प्रमाणाला विषय होत नाही, असा मात्र नाही; कारण ज्या पदार्थाची प्रमाणाने सिद्धी होत नाही, तो पदार्थ वंध्यापुत्राप्रमाणे नसतोच. त्याचप्रमाणे कोणत्याही

प्रमाणाने ब्रह्माची सिद्धी होत नाही म्हणून ते अभावरूप आहे व म्हणूनच ते प्रमाणाचा विषयही होत नाही, असे कोणी म्हणेल; पण ते म्हणणे बरोबर नाही. कारण, ब्रह्म कोणत्याही प्रमाणाला विषय होत नसले; तरी सुद्धा ते सर्व प्रमाणांना 'उपजीव्यभूत' असल्यामुळे ते वंध्यापुत्राप्रमाणे 'असत्' आहे असे म्हणता येणार नाही. अर्थात् सर्वच्या सर्व प्रमाणे त्या स्वयंप्रकाश अधिष्ठान ब्रह्माचा आधार घेऊनच आपापल्या विषयांकडे प्रवृत्त होतात. ज्या स्वयंप्रकाश ब्रह्माची साहाय्यता घेऊन प्रकाशरूप झालेली व व्यावहारिक पदार्थांस प्रकाशित करणारी प्रमाणे त्या 'उपजीव्यभूत' ब्रह्मास विषय करणे शक्य नाही. याविषयी श्रुतीही असेच सांगते की, "विज्ञातारमरे केन विजानीयात् ?।।" विज्ञात्यास (ब्रह्मास) कोणी जाणावे ?

येथे एक गोष्ट स्पष्ट करणे आवश्यक आहे. प्रथम शब्द हे अलौकिक व असामान्य प्रमाण आहे असे सिद्ध करून नंतर ब्रह्म कोणत्याही प्रमाणास विषय होत नाही असे म्हटले आहे. त्यामुळे शब्द प्रमाणाची सिद्धी बाधित होते. परंतु आत्म्याची विस्मृती नाहीशी करून आत्म्याचे स्मरण करून देण्यापुरती शब्दाची गरज आहे. यासाठी बंधमोक्षाचे काम संपत नाही, तोपर्यंत शब्दाचा वेदांतात आश्रय केला आहे. यावद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**सहाय आत्मविद्येचें । करावया आपण वेंचे ।**
**गोमटें काय शब्दाचें । एकैक वाणूं ।। अमृ. ६.११।।**

जीव हा सकल संसारदुःखशोकजालातून एक स्वात्मज्ञानानेच मुक्त होतो, असे समजून मुमुक्षुजन आत्मज्ञानाच्या प्राप्तीकरिता सत्संगतीने सच्छास्त्राचा अभ्यास करतात. अशा ह्या साधकजनांना आत्मज्ञानाची प्राप्ती होण्याकरिता शब्द त्यांना साहाय्य करतो व त्या साहाय्य करण्यात आपण स्वतः नष्ट होतो. कारण इतर वस्तूंचे ज्ञान शब्द हा आपण ह्यात राहून देतो. तसा प्रकार आत्मज्ञानाचा नाही; कारण आत्मवस्तू अपरिच्छिन्न, चिद्रूप व स्वयंप्रकाश आहे. म्हणून जड शब्दादिकाने तिचे प्रकाशन होत नाही उलट, आत्मज्ञान देण्याकडे शब्द वळला की, तो आपण स्वतः नाहीसा होतो व त्याच्या नाहीसे होण्यातच आत्मज्ञान अभिव्यक्त होते. "ज्ञानेश्वरीत" पुढील ओव्यातून ही प्रक्रिया स्पष्ट झाली आहे.

**जैसें न सांगणेंवरी । बाळा पतीसी रूप करी ।**
**बोल निमालेपणें विवरी । अचर्चातें ।।१५.४६८।।**
**आहाच बोलाची वालीफ फेडिजे । आणि ब्रह्माचियाचि आंगा घडिजे ।**
**मग सुखेंसी सुखाडिजे । सुखाचि माजीं ।।६.२५।।**

ज्याप्रमाणे नववधू न बोलण्यानेच आपल्या पतीच्या स्वरूपाची ओळख करून देते त्याप्रमाणेच जेथे शब्दाची गती कुंठित होते तेच अवर्णनीय असे शुद्ध स्वरूप होय. वरवर असलेली शब्दरूपी टरफले, कवचे प्रथम काढून टाकावीत आणि त्या

शब्दाचे लक्ष्यार्थभूत असलेल्या ब्रह्मस्वरूपाशीच तद्रूप व्हावे. मग स्वस्थपणाने सुखामध्येच रंगून जावे व सुखाची गोडी घ्यावी. असा शब्द हा इतर परोपकाऱ्यांपेक्षा श्रेष्ठ परोपकारी आहे. इतर परोपकारी दुसऱ्यावर परोपकार करतात; पण ज्या परोपकारामध्ये स्वनाशाचा प्रसंग येतो, तेथे मात्र ते परोपकारबुद्धी टाकून मागे हटतात. तसे शब्दाचे नाही. वर सांगितल्याप्रमाणे शब्द हा आपण नाहीसा होऊन आत्मज्ञान करून देतो. या शब्दाचा एकएक चांगुलपणा कोठपर्यंत वर्णन करावा ?

अशा प्रकारे सिद्धयोगप्राप्त ब्रह्म किंवा स्वसंवेद्य आत्मा हा इतर कोणत्याही प्रमाणाला विषय होत नाही, हे निःसंदिग्धरीत्या सिद्ध झाले. मात्र एकमात्र 'अनुभूती' या असामान्य व अलौकिक प्रमाणाला तो कसा विषय होतो, हे पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल.

"पंचदशी" या ग्रंथात श्रीविद्यारण्यभारतीतीर्थ यांनी "चित्रदीप" प्रकरणात अनुभवाचा महिमा सांगताना असे म्हटले आहे की–

स्वप्रकाशे कुतोऽविद्या तां विना कथमावृतिः ।
इत्यादितर्कजालानि स्वानुभूतिर्ग्रसत्यसौ ।।६.२८।।
स्वानुभूतावविश्वासे तर्कस्याप्यनवस्थितेः ।
कथं वा तार्किकंमन्यस्तत्त्वनिश्चयमाप्नुयात् ।।२९।।

स्वप्रकाश आत्माच्या ठिकाणी अविद्या कोठून आली ? तिच्यावाचून आवरण तरी कसे झाले ? इत्यादि प्रकारच्या तर्कसमूहांना हा प्रत्येक मनुष्याचा अनुभव गिळून टाकतो. स्वतःच्या अनुभवाविषयीचा जर अविश्वास झाला तर तर्कसुद्धा अप्रतिष्ठित असल्यामुळे 'मी तार्किक आहे' असे स्वतःला समजणारा तत्त्वनिश्चयाला कसा प्राप्त होणार ? अशा प्रकारे अनुभूतीचा अलौकिक महिमा असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओव्यातून जे आवाहन केले आहे, ते अनुभूतीचे प्रमाण सिद्ध करणारे आहे. ते म्हणतात की-

जैसें शारदीचिये चंद्रकळे । माजि अमृतकण कोंवळे ।
ते वेंचिती मनें मवाळे । चकोरतलगें ।।१.५६।।
तियापरी श्रोतां । अनुभवावी हे कथा ।
अतिहळुवारपण चित्ता । आणूनियां ।।५७।।
हें शब्देंवीण संवादिजे । इंद्रियां नेणतां भोगिजे ।
बोलाआधि झोंबिजे । प्रमेयासी ।।५८।।
ऐसिया प्रतीतिबोधसागरीं । तूं आपणपेयातें कल्लोळु एक करी ।
मग जंव पाहासी चराचरीं । तंव तूंचि आहासी ।।९.९३।।

ऐसा हा जी आघवा । श्रीकृष्णें तया पांडवा ।
उगाणा दिधला जीवा । जीवाचिया ।।१३.११४४।।

येर कलशींचें येरीं । रिचविजे जयापरीं ।
आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ।।११४५।।

उपरोक्त सर्व विवेचनावरून हे स्पष्ट झाले की, ज्ञानेश्वरीतील प्रतिपाद्य विषय इतर दुसऱ्या कोणत्याही लौकिक प्रमाणाला विषय होऊ शकत नाही, हीच खरी अपूर्वता आहे.

फल हे ग्रंथतात्पर्याचा निर्णय करणार चवथे लिंग आहे. त्याचा आता विचार करू. ग्रंथातील प्रतिपाद्य विषयाच्यामुळे म्हणजे ब्रह्मज्ञानामुळे ब्रह्मस्वरूपाची प्राप्ती होणे, हे जे श्रुतीने प्रयोजन म्हणून सांगितले आहे, तेच फल होय. ' छांदोग्य उपनिषदातील सहाव्या प्रपाठकात " " आचार्यवान् पुरुषो वेद । तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्य ।।६.१४.२।।" ज्याने श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ अशा श्रीगुरूंपासून "तत्त्वमस्यादि" महावाक्यांचा उपदेश घेतला आहे, त्यासच श्रीगुरूंनी महावाक्य उच्चारल्यावरोबर कानावचनाची भेट होऊन, शक्तिपात झाल्यामुळे तत्काळ अज्ञानमलादींची निवृत्ती झाल्यामुळे त्याचक्षणी " अहं ब्रह्मास्मि " अशी साक्षात्कारात्मक अनुभूती लाभते. या दृढ व अपरोक्ष अशा ब्रह्मात्मैक्यज्ञानाने मूळ अज्ञानासहवर्तमान शोकमोहाची निवृत्ती होते व प्रारब्धावशेष असेपर्यंत तो देहतादात्म्यरहित ब्रह्मस्थितीत असतो व देहांती देहरहित ब्रह्मस्थितीत असतो, असे जे प्रयोजन सांगितले आहे, तेच फल संज्ञक लिंग आहे.

गीतेमध्ये हे लिंग पुढीलप्रमाणे स्पष्ट झाले आहे. ब्रह्मात्मैक्यज्ञानाने मोक्ष, परमशांती, परमसिद्धी, अपुनरावृत्ती, अमृतत्त्व व आत्यंतिक सुख प्राप्त होते, असे गीतेत अनेक वेळा सांगितले आहे. " ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ।।४.३९।।, ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ।।५.२९।।, गच्छंत्य पुनरावृत्तिं ज्ञान निर्धूत कल्मषाः ।।५ १७।।, यज्ज्ञात्वामृतमश्नुते।।१३.१२।।, सुखमक्षयमश्नुते ।।५.२१।।, परां सिद्धिमितो गताः ।।१४.१।।" इत्यादि वाक्यात गीतेने जे मोक्षरूप परमप्रयोजन सांगितले आहे, तेच मुख्य फल होय. या फलाच्या प्राप्तीसाठी गीतेत सिद्धयोग साधन हे ब्रह्मात्मैक्यज्ञानास साक्षात् साधन असून बाकीची सर्व साधने परंपरेने मोक्षास कारणीभूत होतात असे कथन केले आहे; कारण इतर सर्व साधने ही सिद्धयोगाची उपसाधने असून ती साधने सिद्धयोगाच्या कक्षा, बाजू किंवा विभाग आहेत, हे त्यांच्या विवेचनातच स्पष्ट झाले आहे.

ज्ञानेश्वरीत फल हे लिंग पुढीलप्रमाणे स्पष्ट झाले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज पहिल्या अध्यायातच असे म्हणतात की–

मज हृदयीं सद्‌गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।
म्हणौनि विशेष अत्यादरु । विवेकावरी ॥१.२२॥
जैसें डोळचां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे ।
मग वास पाहिजे तेथ प्रगटे । महानिधी ॥२३॥
कां चिंतामणी जालियां हातीं । सदा विजयवृत्ति मनोरथीं ।
तैसा मी पूर्णकाम श्रीनिवृत्ति । ज्ञानदेवो म्हणे ॥२४॥
म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे । तेणें कृतकार्य होईजे ।
जैसें मुळसिंचनें सहजें । शाखापल्लव संतोषती ॥२५॥

माझ्या हृदयात जागृत शक्तीच्या रूपाने सद्‌गुरू अखंड वास करीत आहेत. त्यांनी माझ्यावर कृपा करून जो शक्तिपात केला त्यामुळे माझ्या ठिकाणची अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत झाल्यामुळे माझ्या सर्व वासना जळून गेल्या व मी या दुस्तर संसारमहापुरातून पार पडलो. त्यामुळेच प्रातिभ ज्ञान जागृत होऊन मोक्षस्वरूप जो आत्मविचार अर्थात् आत्मगुरू, तो माझ्या ठिकाणी आतून प्रस्फुटित झाल्याने त्यावर माझी विशेष प्रीती जडली आहे. ( प्रातिभ ज्ञानसुद्धा गुरूपदिष्ट शक्तिपाताने समन्वित झालेल्या क्रियांच्या द्वारा व्यक्त होत असते. हे अनुत्तर महाज्ञान शास्त्रज्ञानापेक्षाही श्रेष्ठ आहे; कारण ते विवेकामुळे उत्पन्न होते. अतींद्रिय व अप्रमेय चैतन्यतत्त्व ज्यावेळी विचारांच्या भूमीवर अवतीर्ण होऊन आत्मबोधाचे रूप धारण करते त्यावेळी त्याला विवेक म्हणतात. त्यावेळी जीव, ईश्वर इत्यादि मायादि पाशांचे ज्ञान आपोआप उदित होते.) ज्याप्रमाणे पायाळूच्या डोळचात अंजन घातले म्हणजे त्यावेळी त्याच्या दृष्टीस विशेष सामर्थ्य येते व त्यानंतर ज्या बाजूस दृष्टी जाईल त्या बाजूस भूमिगत द्रव्याचा किंवा अदृश्य धनस्थानाचा महान् ठेवा त्याला स्पष्ट दिसू लागतो; त्याप्रमाणे शक्तिपातदीक्षा झाली की, कुडलिनी शक्तीच्या जागृतीमुळे दिव्यचक्षूंचे उन्मीलन होऊन मोक्षाची प्राप्ती होते. चिंतामणी हस्तगत झाल्यानंतर ज्याप्रमाणे मनातील सर्व इच्छिलेले हेतू पूर्ण होतात त्याप्रमाणे श्रीनिवृत्तिनाथांच्या कृपाप्रसादाने माझे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत. ( गुरू शिष्यावर कृपा करून त्याची कुंडलिनी शक्ती जागृत करून त्याला अंतरंग साधन प्राप्त करून देतात. हे साधन चिंतामणीप्रमाणे सर्व फले देणारे व मनोरथ पूर्ण करणारे असते. जेव्हा सद्‌गुरू शिष्याला दीक्षेचा प्रसाद देतात तेव्हा तेच जागृत शक्ती बनून शिष्याला आतून मार्गदर्शन करतात. त्यामुळे सद्‌गुरू हेच साधन होत. "जय जयाजि गुरुमूर्ति । तूंचि साधन परमार्थी । मातें निरोपिलें प्रीती । तत्त्वबोध कृपेनें ॥ श्रीगुरुचरित्र १६.१४२॥" असे जे श्रीगुरुचरित्रात म्हटले आहे त्याचा अर्थ, साधन हे चिंतमणिस्वरूप असून ह्या दोन्ही गोष्टी सद्‌गुरुस्वरूप आहेत, हाच आहे. ) म्हणून जाणत्या माणसाने म्हणजे साधकाने श्रीगुरूंची सेवा

करून त्यांच्याकडून शक्तिपातयोगदीक्षेची भिक्षा प्राप्त करून घ्यावी. अशा प्रकारे सद्‌गुरूंची दीक्षारूप कृपा प्राप्त झाली म्हणजे " तस्य प्रसादयुक्तस्य विद्या वेदान्तवाक्यजा । दहत्यविद्यामखिलां तमः सूर्योदयो यथा ॥४.३५.२४॥" असे "सूतसंहितेत" म्हटल्याप्रमाणे, ज्याप्रमाणे सूर्योदय अंधकाराला जाळून टाकतो त्याप्रमाणे शक्तिपातासहित वेदान्तवाक्याच्या उपदेशापासून उत्पन्न होणारी विद्या अशा प्रकारचा दीक्षाप्रसाद ज्याला प्राप्त झाला आहे, त्याची सर्व अविद्या जाळून टाकते त्यामुळे मोक्षप्राप्ती होऊन साधक कृतकृत्य होतो. ज्याप्रमाणे झाडाच्या मुळाशी पाणी घातले म्हणजे फांद्या व पाने आपोआप टवटवीत होतात, त्याप्रमाणे सद्‌गुरुसेवेने प्राप्त होणाऱ्या आत्मविद्येने मोक्षप्राप्तीचे फल मिळते.

शेवटी अठराव्या अध्यायातही शक्तिपाताने आत्मसिद्धिरूप मोक्षप्राप्तीचे फल कसे मिळते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

परी हेचि आत्मसिद्धि । जो कोणी भाग्यनिधि ।
श्रीगुरुकृपालब्धि–। काळीं पावे ॥१८.९८४॥
उदयतांचि दिनकरु । प्रकाशुचि आते आंधारु ।
कां दीपसंगें कापरु । दीपुचि होय ॥९८५॥
तया लवणाची कणिका । मिळतखेंवो उदका ।
उदकचि होऊनि देखा । ठाके जेवीं ॥९८६॥
कां निद्रितु चेवविलिया । स्वप्नेंसि नीद वायां ।
जाऊनि आपणपयां । मिळे जैसा ॥९८७॥
तैसे जया कोण्हासि दैवें । गुरुवाक्यश्रवणाचि सवें ।
द्वैत गिळोनि विसंवे । आपणया वृत्ती ॥९८८॥
तयासि मग कर्म करणें । हे बोलिजैलचि कवणें ।
आकाशा येणें जाणें । आहे काई ? ॥९८९॥
म्हणौनि तयासी कांहीं । त्रिशुद्धि करणें नाहीं ।
परि ऐसें जरी हें कांहीं । नव्हे जया ॥९९०॥
कानावचनाचिये भेटी–। सरिसाचि पैं किरीटी ।
वस्तु होऊनि उठी । कवणि एकु जो ॥९९१॥

जो कोणी एकादा मोठा भाग्याचा साठा असलेला साधक असतो त्याला ईश्वरीकृपेने श्रीगुरूंच्या कृपेची म्हणजे शक्तिपातयोगाची प्राप्ती होऊन त्याची चित्‌शक्ती जागृत होऊन " चितिरेव चेतनपदादवरूढा चेत्यसंकोचिनी चित्तम् ॥५॥ प्रत्यभिज्ञाहृदय ॥" या न्यायाने चेतनपदापासून आपल्या चैतन्याच्या संकोचाने जीव दशेला प्राप्त झालेली कुंडलिनी शक्ती जेव्हा आपल्या मूळ सिद्ध किंवा शिव पदाला जाते, तेव्हा साधकाला आत्मसिद्धी प्राप्त होते. सूर्य उगवताक्षणीच जसा अंधकाराचा

प्रकाशच होतो किंवा दिव्याच्या संगतीने ज्योतीस कापूर लागताच तो दिवाच होतो. मिठाचा खडा पाण्यात मिळता क्षणीच जसा जलरूपच होऊन राहतो किंवा निजलेल्या मनुष्यास जागे केले असता मिथ्या स्वप्नासह झोप नाहीशी होऊन तो आपल्या जागृतीतील मूळस्वरूपाप्रत प्राप्त होतो. "आपणासारिखे करिती तात्काळ । नाहीं काळवेळ तयालागीं ॥" या श्रीसंत तुकाराममहाराजांच्या उक्तिप्रमाणेच हे घडते. " कुलार्णवतंत्रात " ही प्रक्रिया कशी घडते ते पुढील प्रमाणे स्पष्ट केले आहे.

यस्यानुभवपर्यन्तं बुद्धिस्तत्र प्रवर्त्तते ।
तस्यालोकनमात्रेण मुच्यते नात्र संशयः ॥१३.१११॥
शंकया भक्षितं सर्वं त्रैलोक्य सचराचरम् ।
सा शंका भक्षिता येन स गुरुर्देवि दुर्लभः ॥११२॥
यथा वन्हिसमीपस्थं नवनीतं विलीयते ।
तथा पापं विलीयेत सदाचार्य समीपतः ॥११३॥
यथा दीप्तानलः काष्ठं शुष्कमार्द्रंच निर्दहेत ।
तथा गुरुकटाक्षस्तु शिष्यपापं दहेत् क्षणात् ॥११४॥
यथा महानिलोद्भूतं तूलं दशदिशो व्रजेत् ।
तथैव गुरुकारुण्यात् पापराशिः पलायते ॥११५॥
दीपदर्शनमात्रेण प्रणश्यति तमो यथा ।
सद्गुरोर्द्दर्शनाद्देवि तथाऽज्ञानं विनश्यति ॥११६॥

ज्यांची बुद्धी आत्मज्ञानाच्या अनुभवापर्यंत पोहोचली आहे अशा गुरूंच्या केवळ दृष्टिक्षेपानेच साधक मुक्त होतो, यात कसलाही संशय नाही. स्थावर जंगमात्मक सर्व त्रिभुवन संशयाने ग्रासलेले आहे. त्या संशयाचा ग्रास करणारे गुरू देवांमध्येही सापडायचे नाहीत. ज्याप्रमाणे अग्नीच्या सान्निध्यात लोणी विरघळून जाते त्याप्रमाणे सद्गुरूंच्या सान्निध्यात शिष्याचे पातक वितळून जाते. प्रदीप्त झालेला अग्नी ज्याप्रमाणे ओली व सुकी लाकडे क्षणात् जाळून टाकतो त्याप्रमाणे गुरूंच्या दृष्टिक्षेपाने-शक्तिपाताने-शिष्याचे पातक क्षणात् भस्मसात होते. सोसाट्याच्या वाऱ्यापुढे कापसाची रास टिकत नाही. ती दशदिशा उधळून जाते. याप्रमाणेच गुरुकृपेपुढे शिष्याच्या पातकांच्या राशी तग धरू शकत नाहीत. त्या गुरुकृपेमुळे तत्काळ नाहीशा होतात. दिवा लागताच अंधार जसा नाहीसा होतो तसे सद्गुरुदर्शनाने अज्ञान नाहीसे होते.

याप्रमाणेच दैवयोगाने एखाद्याच भाग्यवान् साधकाला शक्तिपाताने तत्त्वमस्यादि महावाक्याचा उपदेश देणारे गुरू भेटतात. त्यांनी " हे शिष्या ! तू स्वतःच ब्रह्म आहेस, " असे म्हटले व शिष्याने ते ऐकले की, त्याच्या ठिकाणचे सर्व भेद व द्वैतबुद्धी नाहीशी होऊन तो आपल्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणी स्थिर होतो.

मग त्याला काही कर्म करण्याचे उरले आहे असे कोणी म्हणावे ? आकाश सर्वत्र व्यापक भरलेले असल्यामुळे त्याला इकडून तिकडे जाणे व तिकडून इकडे येणे या क्रिया घडतात काय ? म्हणून ज्यास आत्मसिद्धी प्राप्त झाली आहे, त्याला खरोखरच निश्चयेकरून काही एक कर्तव्य उरत नाही. परंतु मंदप्रज्ञ अधिकारी म्हणजे भोगाकांक्षायुक्त जीव जडता, दुष्टपूर्वसंस्कार, मंदभाग्य इत्यादींमुळे शक्तिपात होऊनही तत्काळ कृतार्थ होत नाही. परंतु जो जीव अशा सर्व दोषांपासून निर्मुक्त असतो, त्याला सद्‌गुरूंनी तत्त्वमसि इत्यादि महावाक्याचा उपदेश केल्याबरोबर शिष्याच्या कानाची व सद्‌गुरूंच्या वचनांची भेट होऊन म्हणजे शक्तिपाताने सर्व मल, अज्ञानादींचा छेद होऊन शिष्य "मी ब्रह्म आहे" या आतून प्रस्फुटित झालेल्या ज्ञानाने कृतार्थ होतो.

वरील सर्व विवेचनात साधनच साध्यरूप कसे होते व साधक ब्रह्मरूप कसा होतो याचे अपूर्व वर्णन आले आहे. हेच खरे फल होय व हीच ज्ञानेश्वरीतील फल या लिंगाची सिद्धी होय.

अर्थवाद हे ग्रंथतात्पर्याचा निर्णय करणारे पाचवे लिंग आहे. त्याचा आता विचार करू. ग्रंथातील जो प्रतिपाद्य विषय असेल त्याची स्तुती करणाऱ्या स्तुति-बोधक वचनास अर्थवाद म्हणतात. उपनिषदातही प्रतिपाद्य विषयानुकूल अर्थवादी वचने आली आहेत. " छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायातच" "येनाश्रुतं श्रुतं भवति । अमतम् मतम् अविज्ञातम् विज्ञातम्—इति ।।६.१ ३।।" इत्यादि वाक्यात अद्वय ब्रह्मवस्तूची स्तुती व महती सांगितली असल्याचे स्पष्ट आहे.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेमध्ये हे लिंग पुढीलप्रमाणे स्पष्ट झाले आहे. भगवंतांनी गीतेत जागोजागी ज्ञानाची महती व स्तुती गाइली आहे. " सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ।।४.३३।।, नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।।४.३८।।, ज्ञानग्नि: सर्व कर्माणि भस्मसात कुरुते ।।४.३७।।, सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतिरष्यसि ।।४.३६।।, ज्ञानी त्वामैव मे मतम् ।।७.१८।।" इत्यादि वाक्यातून मोक्षसाधनी-भूत ज्ञानाची दृष्टांतपूर्वक व सोपपत्तिक स्तुती गाइली आहे.

सद्‌गुरू शिष्याला शक्तिपात दीक्षा देतात त्यावेळी कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने ज्ञानाग्नी सिद्ध होतो व तोच साधकाची अविद्या जाळून टाकून मोक्षसिद्धी करून देतो.ज्ञानग्नी सिद्ध करणारी ही ज्ञानदीक्षा सद्‌गुरूंकडून मिळत असल्याने या प्रक्रियेतील त्यांचे स्थान अपूर्व, अलौकिक व दिव्य आहे, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अनेक प्रकारांनी सांगितले आहे. सद्‌गुरूंच्या वर्णनातच साधन व साध्याची स्तुतीही अंतर्निहित झाली आहे. " ज्ञानेश्वरीत " साधन, साध्य, साधक व साधनदाता या सिद्धयोगाच्या चार प्रमुख अंगांची स्तुती पुढीलप्रमाणे जागोजाग आली आहे.

जयाचेनि वाक्य उजिवडें । जाहलें चित्त निधडें ।
ब्रह्माचेनि पाडें । निःशंकु होय ।।४.१६८।।
आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरीं जिहीं केलें ।
ते आमुचेनि पाडें आले । निर्वाळलेया ।।६ ३२६।।
येथ एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ ।।७.९६।।
अहो सद्‌गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ।।१२.९।।
एऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता ।
काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ? ।।१२.८५।।
श्रीगुरूंचे पाय । जैं हृदय गिंवसूनि ठाय ।
तैं येवढें भाग्य होय । उन्मेखासी ।।१३.५।।
आधणीं घातलिया हरळ । होती अमृताचे तांदुळ ।
जरी भुकेची राखे वेळ । श्रीजगन्नाथु ।।१५.२३।।
तयापरी श्रीगुरु । करिती जैं अंगिकारु ।
तैं होऊनि ठाके संसारु । मोक्षमय आघवा ।।१५.२४।।
म्हणौनि माझे नित्य नवे । श्वासोच्छ्‌वासही प्रबंध होआवे ।
श्रीगुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ।।१८.१७३५।।

या सर्व ओव्यांतून ज्ञानेश्वरीतील अर्थवाद हे लिंग स्पष्ट झाले आहे.

उपपत्ती हे ग्रंथतात्पर्याचा निर्णय करणारे सहावे लिंग आहे. या शेवटच्या लिंगाचा आता विचार करू. ग्रंथातील प्रतिपाद्य विषयाच्या अर्थास अनुकूल उपमा, दृष्टांत किंवा युक्ती सांगून विषय प्रतिपादन केलेला असतो त्याला उपपत्ती असे नाव आहे. " छांदोग्य उपनिषदात " सर्व पदार्थांचा ब्रह्माशी अभेद सांगण्याकरिता " कार्याचा कारणाशी अभेद असतो " हे अनेक दृष्टांतांनी प्रतिपादन केले आहे. " यथा सोम्य मधु मधुकृतो निस्तिष्ठंति नानात्ययानां वृक्षाणां रसान्समवहारमेकतां रसं गमयन्ति ।।६.९.१।। इमाः सोम्य नद्यः पुरस्तात्प्राच्यः स्यंदंते पश्चात्प्रतीच्यस्ताः समुद्रात्समुद्रमेवापियंति स समुद्र एव भवति ता यथा तत्र न विदुरियमहमस्मीय महस्मीति ।।६.१०.१।।" वरील दोन्ही श्रुतीत मधमाशांच्या व नद्यांच्या दृष्टांताने कार्यकारणाची एकरूपता दाखविली आहे.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेत हे लिंग पुढीलप्रमाणे स्पष्ट झाले आहे. गीतेत भगवंतांनी सिद्धयोगाच्या प्रतिपादनास अनुकूल असे वर्णन पुढील श्लोकातून केले आहे.

शनैः शनैरुपरमेद्‌बुद्धया धृतिगृहीतया ।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ।।६.२५।।

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरंति ते ॥६.१४॥
क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥१३.३४॥
सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥१८.६६॥

धैर्याने युक्त अशा बुद्धीने हळहळू मन शांत करावे म्हणजे श्रीगुरूंनी सांगितल्याप्रमाणे डोळे मिटून स्वस्थ बसावे आणि मन आत्म्यामध्ये संस्थित करून कशाचेही चिंतन करू नये. ( काही एक न करता स्वस्थ बसले म्हणजे गुरूपदिष्ट साधन आतून आपोआप होते. ) (या आतून चालणाऱ्या साधनामुळे म्हणजे गुरुकृपेने) माझ्या दैवी, गुणमयी व अनुल्लंघनीय अशा योगमायेला शरण आल्याने साधकांना सद्गुरुकृपेची प्राप्ती होऊन सिद्धयोगदीक्षेमुळे ह्या मायेची जागृती होऊन तिच्याच आधाराने ते तरून जातात. अशा प्रकारे क्षेत्र व क्षेत्रज्ञ म्हणजे जीव व शिव किंवा जड व चेतन यातील अंतर व विकाराने युक्त अशा प्रकृतीपासून सुटण्याचा उपाय, जे पुरुष गुरूंनी केलेल्या शक्तिपातामुळे उत्पन्न झालेल्या ज्ञाननेत्रांच्याद्वारा तत्त्वतः जाणतात, ते साधक परब्रह्म परमात्म्याला प्राप्त होतात. यासाठी सर्व धर्म व अधर्मांचा त्याग करून साधकाने केवळ परमात्म्यालाच शरण गेले पाहिजे. त्यामुळे तो सर्व पापांपासून व शोकांपासून साधकाला मुक्त करतो.

ज्ञानेश्वरीत हे लिंग पुढीलप्रमाणे अवतरित झाले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनद्वारा साधकास ब्रह्मप्राप्ती अधिकारभेदानुसार तत्काळ किंवा हळूहळू कशी होते, त्यामुळे अद्वैतसिद्धी कशी होते व ही सिद्धी झाली की, सर्व पदार्थांचा ब्रह्माशी अभेद होऊन " सर्वं खल्विदं ब्रह्म " अशी दृष्टी साधकाच्या ठिकाणी कशी उदित होते, हे सुवर्ण, अलंकार, आकाश, पाणी इत्यादि अनेक दृष्टांतांच्याद्वारा प्रतिपादले आहे. या दृष्टीने ते असे म्हणतात की—

वाजतें वारें निवांत । जंव न राहे जेंथिचें तेथ ।
तंव तरंगतां अनंत । म्हणावीचि कीं ॥१५.२२७॥
म्हणौनि सूर्यु जें हारपे । तें मृगजळाभासु लोपे ।
कां प्रभा जाय दीपें । मालवलेनि ॥२२८॥
तैसें मूळ अविद्या खाये । तें ज्ञान जें उभें होये ।
तेंचि यया अंतु आहे । एऱ्हवीं नाहीं ॥२२९॥
जैसें घटाचें नाहींपण । असतचि असे केलेनिवीण ।
तैसा समूळ वृक्षु जाण । अनादि हा ॥२३६॥
नानारंगी गजबजे । जैसें इंद्रधनुष्य देखिजे ।
तैसा नेणतया आपजे । आहे ऐसा ॥२४०॥

कां मिनलेनि किडाळें । व्रानिभेदासि ये सोळें ।
तैसा स्वप्नायें वेंटाळें । शुद्ध जें मी ॥३४१॥

वरील सर्व ओव्यातून ज्ञानेश्वरीतील उपपत्ती हे लिंग उत्तमरीतीने दिग्दर्शित झालेले दिसून येते.

येथपर्यंत आपण ग्रंथतात्पर्य निर्णायक षड्‌लिंगाधारे ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची विषयसंगती कशी लागते हे पाहिले. लिंग म्हणजे गूढ किंवा गुह्यतम अर्थाचा बोध करून देणारे व एक विशेष प्रकारचा अर्थ दाखविण्याचे शब्दाचे सामर्थ्य होय, हे आपण वर पाहिलेच आहे. या सहाही लिंगांच्या आधाराने ज्ञानेश्वरीत सिद्धयोग शब्दाशब्दात कसा अवतरला आहे हे स्पष्ट होते.

## सिद्धयोगसाधनेच्याद्वारा ज्ञानेश्वरीची अध्यायसंगती:--

सिद्धयोग साधनेच्याद्वारा ज्ञानेश्वरीची अध्यायसंगती कशी लागते, हे आता पाहवयाचे आहे. "ॐ नमो श्रीआद्या । वेदप्रतिपाद्या । जयजय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥१.१॥" येथपासून "जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सविजे जें ॥१८.१८०८॥" येथपर्यंत प्रत्येक अध्यायाच्या सुरुवातीला व शेवटी सिद्धयोगाचा म्हणजे साधक, साधन देणारे सद्‌गुरू, साधन व साध्य या चारांपैकी एकाचा अगर समुच्चयाने दोघांचा, तिघांचा किंवा चारही गोष्टींचा महिमा कथन करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीची वाङ्मयमूर्ती सिद्ध केली आहे. "एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ॥१८.१७६४॥ परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंध-व्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥१७६६॥" ही ज्ञानेश्वरी रचनेची भूमिका आहे,असे स्वतः श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीच स्पष्ट केले आहे. जगाच्या रक्षणाकरितां सद्‌गुरु-नाथमहाराजांनी आपल्याला निमित्त करून आपल्याकडून हा ग्रंथ व्हावा म्हणून एकमात्र संप्रदाय परंपरेनेच लाभणारे सिद्धयोगाचे धन दीक्षा देऊन आपल्याला दिले आहे व आदिनाथ शंकरांपासून गुरुशिष्यपरंपरेने शक्तिपाताने शक्तिसंक्रमण करून दुसऱ्याला तत्काळ बोध, ज्ञान व अनुभूती प्राप्त करून देणारे जे ऐश्वर्यसंपन्न साधन आम्हाला प्राप्त झाले आहे ते तू घेऊन, म्हणजे हा दीक्षाधिकार आम्ही तुला देत आहोत, त्याचा तू वापर करून, कलीने त्रस्त झालेल्या व गिळल्या जाणाऱ्या जीवांना दुःखापासून सर्वप्रकारे सत्वर मुक्त कर, असे सांगितले आहे, म्हणून या सिद्धयोग-साधनेचा अर्थात् कृपेचा मी सर्वत्र वर्षाव करीत आहे, असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराज सांगतात, त्यावरील दृष्टी यत्किंचितही विचलित होऊ न देता ज्यावेळी आपण ज्ञानेश्वरीकडे पाहू, त्यावेळी सिद्धयोग साधनस्वरूप असलेल्या ज्ञानेश्वरीचे आपल्याला दर्शन होईल. "आतां चंदनाच्या तरुवरीं । परिमळालागीं फुलवरी । पारुखणें जियापरी । लागेना कीं ॥१८.१७४४॥ तैसा प्रबंधु हा श्रवणीं । लागतखेंवो समाधि आणी ।

ऐकिलियाही वाखाणी। काय व्यसन न लवी ? ।। १७४५ ।।" ही श्रीज्ञानेश्वरमहाराजांची प्रतिज्ञा खरी असल्याचा अनुभव आपल्याला येईल." एऱ्हवीं आघवी गोठी होईल। मुकिया बहिरयाची ।।६.२६।।" असे होईल. असे होऊ नये. नाहीतर "रानींचें राउळा नेलिया। दाही दिशा मानी सुनिया। कां रात्री होय पाहलया। निशाचरां ।।१८.१६२६।। जो जेथिचें गौरव नेणें। तयासि तें भिंगुळवाणें। म्हणौनि अप्रसंगु तेणें। म्हणावा कीं तो ।।१६२७।।" अशी खुद्द श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीच धृतराष्ट्राच्या बोलण्याचा चमत्कार वाटून जी टीका केली आहे ती आपणसही लागू झाल्याशिवाय राहणार नाही असे वाटते. रानात राहणाऱ्या रानटी मनुष्यास एखाद्या मोठ्या महालात नेले असता त्याला दाही दिशा उदास वाटू लागतात. निशाचर माणसास उजाडले तरी रात्र होते. ज्या माणसाला एखाद्या गोष्टीचा गौरव, महत्त्व किंवा रहस्य माहीत नसते त्याला ती गोष्ट त्रासदायक, विपरीत व भयंकरच वाटत असते. त्यामुळे चांगल्या गोष्टीला तो वाईट किंवा अप्रसंग म्हणणारच. तसे न होता ज्ञानेश्वरी हा सिद्धयोग साधनाचा सांप्रदायिक ग्रंथ आहे, ही धारणा आपल्या हृदयात दृढमूल झाली म्हणजे सिद्धयोगाच्या दृष्टिकोनातून लावलेल्या ज्ञानेश्वरीच्या अध्यायसंगतीचा महिमा आपल्या लक्षात येईल.

"ॐ नमो श्रीआद्या। वेदप्रतिपाद्या। जयजय स्वसंवेद्या। आत्मरूपा ।। १.१।। देवा तूंचि गणेशु। सकलार्थमतिप्रकाशु। म्हणे निवृत्तिदासु। अवधारिजो जी ।। २।।" या पहिल्या अध्यायातील मंगलाचरणाच्या पहिल्या दोन ओव्यातच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगशास्त्राचे अपूर्व उद्‌घाटन केले आहे. "आशीर्नमस्क्रियावाच्यवस्तुनिर्देशोऽपि तन्मुखम्" या "न्यायप्रकाशातील" न्यायाप्रमाणे ग्रंथाच्या मंगलाचरणाचे म्हणजे नमनाचे आशीर्वादरूप, नमस्क्रियारूप व वस्तुनिर्देशरूप असे तीन मुख्य प्रकार आहेत. "परमेश्वरात्स्वस्य स्वशिष्यस्य वा वांछितार्थप्रार्थनम् आशीर्वादः।" या "न्यायप्रकाशातील" न्यायाने आपली किंवा शिष्याची इच्छित वस्तू प्राप्त व्हावी अशा प्रकारच्या ईश्वराच्या प्रार्थनेस आशीर्वादरूप मंगल म्हणतात. श्रीआद्या, स्वसंवेद्या व आत्मरूपा या तिन्ही शब्दातून आशीर्वादरूप मंगल स्पष्ट झाले आहे. श्री म्हणजे शक्ती व आद्या म्हणजेही शक्तीच होय. ज्यावेळी अनादि आत्मसत्तारूप निद्रिस्त अशी शिष्याची कुंडलिनी शक्ती जागृत होते त्यावेळीच तो स्वतःच स्वतःला जाणू शकतो. एरवी शक्तिविरहित शिव शवच असतो. ही जागृत शक्तीच शिष्य-साधकाला आत्मरूप करते. शिष्याची इच्छित वस्तू त्याला प्राप्त व्हावी अशी गुरूंची इच्छा असते व ते येथे सूचित झाले आहे, म्हणून हे आशीर्वादरूप मंगलच झाले आहे. दुसऱ्या ओवीत हे आशीर्वादरूप मंगलच अधिक स्पष्ट झाले आहे. श्रीनिवृत्तिनाथांचे शिष्य श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, हे आत्मरूपा परमेश्वरा ! माझ्या बोलण्याकडे लक्ष द्यावे. सर्व प्रकारच्या अर्थाच्या ज्ञानाचा

प्रकाश किंवा स्फुरणरूप असा जो गणेश म्हणजे गुरू तो तूच आहेस. वैदिक वाङ्मयात ज्ञानदात्री देवता गणेश समजली जाते. गणेश म्हणजे गुरू होय. "गणेशो वाऽग्निना युक्तो विष्णुना च समन्वितः। वर्णद्वयात्मको मंत्रश्चतुर्वर्गफलप्रदः॥" असे याबद्दल शास्त्रकारांनी सांगितले आहे. गणेश म्हणजे 'ग' कार, अग्नी म्हणजे 'र' कार व विष्णू म्हणजे 'उ' कार होय. हा 'उ' कार मागील दोन वर्णांना, 'ग' व 'र' यांना लावावयाचा. असे केले म्हणजे गुरू हा द्वयक्षरी मंत्र तयार होतो. तो चतुर्वर्ग म्हणजे चारी पुरुषार्थ देणारा आहे. या श्लोकार टीका करताना श्रीसरस्वती गंगाधरांनी "श्रीगुरुचरित्र" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "गणेशातें म्हणती गुरु। तैसाचि असे वैश्वानरु। ऐसाचि जाण शाङ्र्गधरु। गुरु शब्द वर्ते इतुके ठायीं॥२.१३२॥" त्यामुळे गणेश म्हणजे गुरू होय हे स्पष्ट झाले. सर्व देवतांच्या ठिकाणी जो काही शक्तीचा उद्‌बोध दिसून येतो तो सर्व माझ्याच शक्तीचा उद्‌बोध आहे, असे भगवंतानीच गीतेत "गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा॥१५.१३॥, सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तःस्मृतिर्ज्ञानमपोहनं च॥१५.१५॥" इत्यादि श्लोकांनी सांगितले आहे याला धरूनच या ओवीत बुद्धीत होणाऱ्या अर्थज्ञानाच्या स्फुरणाला गणेश म्हणजे गुरू हे नाव दिले आहे. मतिप्रकाश करणाऱ्या गणेश देवतेच्या ठिकाणी मतिप्रकाश करण्याची जी शक्ती आहे, ती मूळची परमेश्वराचीच जीवानुग्राहकशक्ती असून ती गणेश या नामरूपाने प्रकट झाली असल्यामुळे जागृत शक्ती म्हणजे परमेश्वरच गणेश किंवा गुरू होय, असा आपला अनुभवजन्य निर्धार प्रकट करून त्यांच्या आशीर्वादाची याचना त्यांनी केली आहे. हेच आशीर्वादरूप मंगलाचरण होय.

"स्वापकर्षबोधानुकूलः स्वीय व्यापरविशेषः नमस्कारः॥" म्हणजे ईश्वरास वंदन करणे व त्या वंदन करण्यात आपला अपकर्ष म्हणजे कमीपणा दाखवून परमेश्वराचा उत्कर्ष दाखविणे यास नमस्क्रियारूप मंगल म्हणतात, असे "न्यायप्रकाशात" म्हटले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही ग्रंथारंभीच्या नमनात "येन्हवीं तरी मी मुर्खू। जरी जाहला अविवेकु॥ १.७६॥" असा स्वतःकडे कमीपणा घेऊन परमात्म्याचे उत्कृष्टत्व दाखविले आहे ; म्हणून त्यांचे नमस्क्रियारूप मंगल यथार्थ झाले आहे. "नमस्कारादिमन्तरा परमेश्वरस्य संकीर्त्तनं वस्तुःनिर्देशः॥" असे "न्यायप्रकाशात" सांगितले आहे. त्याचा अर्थ वस्तूचा म्हणजे ब्रह्माचा निर्देश करणे किंवा त्याचे स्वरूप कथन करणे यास वस्तुनिर्देशरूप मंगल म्हणतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही परब्रह्माचे प्रतीक अशा मंगल वाचक 'ॐ' अक्षराची ग्रंथारंभी योजना करून म्हणजे साधकाचे साध्य सांगून लगेच 'स्वसंवेद्या' या पदाची योजना करून आत्मशक्ती कुंडलिनीच्या जागृतीच्या साधनानेच हे साध्य साधणार आहे, असे सांगून साध्यसाधनाचे एकरूपत्व कथन केले आहे. त्याचप्रमाणे ॐकार हे शब्दब्रह्म असून जागृत

शक्तीच्या साधनाने या शब्दब्रह्माचा भेद करून साधकाला आत्मरूप व्हावयाचे आहे, हे ही येथे सूचित केले आहे. अशाप्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पहिल्या ओवीतच 'ॐ' व 'नमो' हे शब्द योजून अनुक्रमे 'वस्तुनिर्देशरूप' व 'नमस्क्रियारूप' अशा दोन्हीही मंगलांचा अंतर्भाव करून सिद्धयोगशास्त्राचे प्रकटन केले आहे.

मंगलाच्या रूपाने सिद्धयोगशास्त्राचे उद्‌घाटन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे केले आहे हे येथपर्यंत आपण पाहिले. आता आपण पहिल्या दोन ओव्यांचा शब्दशः अर्थ पाहू म्हणजे सिद्धयोगाचे शास्त्र त्यातून कसे प्रकट झाले आहे, हे स्पष्ट होईल.

ॐ–"ओंकार आदिनाथः उदोनाथ पार्वतिः सत्यनाथ ब्रह्माः संतोषनाथ विष्णुः गजगंथडि गणेशनाथः अचळचळंति स्वामि कार्तिकनाथः मायारूपि मछींद्रनाथः घट व्यापंति गुरु गोरक्षनाथः ज्ञानप्रकाश चौरंगिनाथः" या सांप्रदायिक नवनाथस्मरणास अनुलक्षून "ॐ नमो श्रीआद्या" हे ग्रंथारंभीचे नमन आहे. आद्यस्वरूप "श्री–मान" असून "उदय–सत्य–सताप" (सत्ता–प्रकाश–सुख) यांनी युक्त आहे. तेच गणेशरूपाने "गजगंथडी" जगद्‌रूपी कंथा म्हणजे वेष धारण करणारे म्हणजे जगदाकार प्रकट झाले. ते गुरुरूप असल्याने सकलतत्त्वप्रकाशी आहे, असा सांप्रदायिक क्रम या नमनात आहे." असे श्री. त्र्यं. ग धनेश्वर यांनी नाथपंथी टीपांसह छापलेल्या "श्रीज्ञानेश्वरीमध्ये' म्हटले आहे

ॐ हे निर्गुण ब्रह्माचे शब्दब्रह्मात्मक प्रतीक आहे, हे त्याचे सिद्धयोग साधनाच्या दृष्टीने पहिले वैशिष्टच होय. "तस्य वाचकः प्रणवः ॥१.२७॥" असे "पातंजल योगसूत्रात" महर्षी पतंजलींनी म्हटले आहे. त्या ईश्वराचा स्वरूपबोधक शब्द ॐ आहे. ब्रह्मतत्त्व हे नामरूपातीत असल्यामुळे ते अवाङ्‌मनसगोचर आहे; परंतु अज्ञानी जीवांना त्याच्याशी व्यवहार करता यावा म्हणून श्रुतिमाउलीने त्याला "ॐ" हे नाव ठेविले व त्या अक्षरात ते अभिव्यक्तही झाले आहे. "तें कीर अनाम अजाती। परी अविद्यावर्गाचिये राती–। माजीं ओळखावया श्रुती। खूण केली ॥१७.३२९॥" असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. ते परब्रह्म खरोखरच शब्दाच्या पलीकडे असल्यामुळे नामावाचून व त्याच्यासारखी दुसरी वस्तू नसल्यामुळे जातीवाचून आहे. परंतु त्या परब्रह्माच्या आधाराने जीवाला भासत असलेल्या अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश या ब्रह्मपदाचा विसर पाडणाऱ्या गाढ अज्ञानात किंवा अंधारात न दिसणारे परब्रह्म अज्ञानी जीवाला ओळखता यावे म्हणून श्रुतीने परब्रह्माचे ज्या खुणेने वर्णन केले आहे, तेच त्या ब्रह्माचे ॐ हे नाव होय. गीतेत, "ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ॥१७.२३॥" असे म्हटले आहे. ॐ, तत् व सत् असा परब्रह्माचा तीन प्रकारचा नामनिर्देश केला आहे. त्याच्या ह्या तीन सांकेतिक खुणा आहेत.

ॐकारालाच "प्रणव" व "उद्‌गीथ" अशी नावे आहेत. 'नु' म्हणजे 'स्तवणे' व ह्या धातूला 'प्र' म्हणजे प्रकर्ष हा उपसर्ग जोडून 'प्रणव' असा

शब्द बनलेला आहे. " प्रकर्षेण नूयते स्तूयते अनेन इति प्रणवः । " त्यांचा अर्थ, प्रकर्षाने केलेली स्तुती किंवा उत्तम स्तोत्र असा होतो. तेव्हा ज्याच्या योगाने परमात्मा प्रकर्षाने स्तविला जातो तो ' प्रणव ' म्हणजे ' ओंकार ' होय. अशा या परब्रह्माच्या स्तवनाला ॐकाराच्या बाजारात शब्दब्रह्म म्हणजे वेदरूपी उत्कृष्ट वस्त्र निघाले; परंतु ते लहान असल्यामुळे परमात्म्याच्या यशास वेढण्यासही पुरत नाही हे " प्रणवाचिये पेठे । जाहलें शब्दब्रह्म माजिठे । तें जयाचिया यशा धाकुटें । वेढूं न पुरे ।।६.१०९।। " असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. तसेच " उद्गीथ " हा शब्द " गै " म्हणजे गाणे ह्या धातूला " उत् " म्हणजे उच्च हा उपसर्ग लावल्याने झाला आहे ॐ असा आरंभ करून परमात्म्याचे गायन करतात म्हणून ओंकाराला " उद्गीथ " म्हणतात. उपनिषदांनी ॐकाराचे माहात्म्य पुढील प्रकारे सांगितले आहे.

**ॐमित्येतदक्षरमिदं सर्वं तस्योपव्याख्यानं भूतं भवद्भविष्यदिति सर्वमोंकार एव । यच्चान्यत्त्रिकालातीतं तदप्योंकार एव ॥ मांडूक्योपनिषद् १॥**

हे सर्व काही ओंकार आहे व ओंकाराचे उपव्याख्यान आहे. भूत, वर्तमान आणि भविष्य सर्व ॐकारच होय. त्रिकालातीत जे काही असेल तेही ॐकारच होय.

**ॐमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत ओमिति ह्युद्गायति ॥ छां. उप. १.१.१॥**
**स एष रसानां रसतमः परमः परार्ध्योऽष्टमो यदुद्गीथः ॥ छां. उप. १.१.३॥**
**अथ खलु यः उद्गीथः स प्रणवो यः प्रणवः स उद्गीथः ॥ छां. उप. १.५.१॥**

उद्गीथाची म्हणजे ॐ या अक्षराची उपासना करावी. ॐ असा आरंभ करून गायन करतात म्हणून याला उद्गीथ म्हणतात. हा उद्गीथ सर्व रसांमध्ये अत्यंत श्रेष्ठ व उत्कृष्ट असा आठवा रस अर्थात् शक्ती आहे. उद्गीथ म्हणजेच ॐकार व ॐकार म्हणजेच उद्गीथ होय.

" कठोपनिषदातही " ॐकार हा साधनस्वरूप कसा आहे, ते स्पष्ट केले आहे. त्याचे विवेचन आपण आठव्या प्रकरणात " साधनातील क्रिया व अनुभव " या मुद्द्याचे विवेचन करताना पृष्ठ ९४४ वर पाहिलेच आहे.

**वाग्वा ॐकारो वागेव ह्यनुजानाति चिन्मयो ह्ययमोंकारश्चिदेव ह्यनुज्ञाता ॥ नृसिंहोत्तरतापनीयोपनिषत् ८.६॥**

वाणीच ॐकार आहे असे सांगितले जाते. हा ॐकार चिन्मय आहे हे जाणणाराही चिन्मय आहे.

**ओमिति ब्रह्म । ओमिति इदं सर्वम् ।।तैत्तिरीयउपनिषद १.८.१॥**

ॐ हे ब्रह्म आहे. हे सर्व ( विश्व ) ॐ आहे.

इतरही अनेक उपनिषदातून वरीलप्रमाणे ॐकाराचे विवेचन केलेले आढळते. त्या सर्वांचा भावार्थ हाच आहे. वरील सर्व विवेचन करण्याचे एवढेच कारण आहे

की, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरी या सिद्धयोग दर्शनाचे ॐकारपूर्वक मंगल करून सिद्धयोगसाधनाचे सर्वांगांनी व सर्वार्थांनी दर्शन घडविले आहे. या दर्शनातील काही पैलू पुढे स्पष्ट केले आहेत.

ॐकाराचा संबध मुख्यत: सिद्धयोगाशी आहे; कारण ब्रह्म ही कल्पनातीत व कालातीत वस्तू असल्याने त्याच्या प्राप्तीसाठी कल्पनातीत व कालातीत अशा जागृत शक्तीच्या अंतर्योगसाधनाची नितांत आवश्यकता आहे. ही आवश्यकता सिद्धयोगाने पूर्ण होते; कारण आतून जागृत झालेली शक्ती स्वत: ॐकाराचे स्फुरण व उच्चारण करीत साधकाला परंधामापर्यंत घेऊन जाते. 'अ', 'उ' व 'म' यांच्या एकीकरणामुळे ॐ तयार होतो व या तीन अक्षरांचे ब्रह्मा, विष्णू महेश किंवा सत्त्व, रज, तम असे अनेक अर्थ सांगितले जातात; परंतु हा सर्व तर्क आहे. पंडितांनी चालविलेली प्रतिभा आहे. वास्तविकरीत्या व्याकरणाच्या नियमानुसार ॐकार तयार होत नाही. तो अव्युत्पन्नच आहे. याबाबतीत दुसरे मत असे आहे की, 'अव्' धातूला औणादिक 'मन्' प्रत्यय लागून 'ॐ' तयार होतो. यासाठी ॐकार व्याकरणदृष्ट्या व्युत्पन्न आहे. त्यामुळे 'अव्' धातूचे जेवढे अर्थ आहेत त्या सर्वांचा ॐकार सूचक आहे. रक्षण, गती, कांती, प्रीती, तृप्ती, अवगम, प्रवेश, श्रवण, स्वाम्यर्थ, याचन, क्रिया, इच्छा, दीप्ती, अवाप्ती, अलिंगन, हिंसा, दान, भाग व वृद्धा हे अव्' धातूचे १९ अर्थ आहेत. व्याकरणाच्या रीतीने वरीलप्रमाणे ॐ शब्द सिद्ध होऊन वरील १९ अर्थ तो प्रकट करतो. असे जरी असले तरी "कल्याण मासिकाच्या वर्ष ४२ च्या उपासना अंकात" "वेदोक्त उपासना सुरत शब्द योग" या लेखात डॉ संपूर्णानंदजी असे म्हणतात की, "प्रणवको लोग मुख्यतया ओंकारके नामसे जानते है। ऐसा माना जाता है कि अ, उ, म के मिलानेसे ओ३म् बनता है और इन तीन अक्षरोंके ब्रह्मा, विष्णु, महेश आदि अनेक अर्थ बताये जाते है। यह सब तो पंडितोंका वाग्विलास है। वस्तुत: ओंकार व्याकरणके अनुसार नहीं बना है। यह एक ऐसी ध्वनि है जिसका अनुभव योगीकोही होता है और वह भी अपने अभ्यासके आरंभमें नहीं, प्रत्युत उस भूमिकामें पहुँचनेपर, जहाँ ध्याता, ध्यान और ध्येयकी त्रिपुटी सिमटकर ध्यानमात्र अवशेष रह जाता है। इस बातकी ओर " दुर्गासप्तशतीके " प्रथम अध्यायमें इन शब्दोंमे संकेत किया गया है—

त्वं स्वाहा त्वं स्वधा त्वं हि वषट्कार: स्वरात्मिका ।।१.७३।।
सुधा त्वमक्षरे नित्ये त्रिधामात्रात्मिका स्थिता ।
अर्धमात्रास्थिता नित्या यानुच्चार्या विशेषत: ।।७४।।

" ( हे भगवती ! ) तुम स्वाहा और स्वधा हो, तुम ही वषट्कार हो, तुम ही वाक्स्वरूपा हो, तुम अमृतस्वरूपा हो और अविनाशी अक्षर हो, तुममें साढे तीन मात्राएँ हैं; तीन तो वे जो प्रत्यक्ष हैं और अर्धमात्रा वह जो नित्य है, अविनाशी है, परंतु अनुच्चार्य है ।" स्पष्टही यह ओंकारका वर्णन है। इसकी प्रथम तीन मात्राएँ तो वे हैं जिनको ' अ, उ, म ' से व्यक्त करते हैं और इन तीन मात्राओंके समाप्त होनेपर एक झीना दिव्य नाद शेष रह जाता है, वह अनुच्चार्य है। उसका अनुभव हो सकता है, परंतु न तो उसे वाणीसे व्यक्त कर सकते हैं, न लिखनेकी किसी परिपाटीसे उसका संकेत कर सकते हैं ।

यह ॐकार हिंदुओंके ब्रह्मा आदि उपास्योंसे संबंध नहीं रखता, प्रत्युत योगसे संबंध रखता है । इसके दो प्रमाण हैं । एक तो यह है कि "छांदोग्य-उपनिषद्" के द्वितीय खंडके अनुसार अनुसंधान करनेके बाद देवगणने उसको मुख्य प्राणमें पाया । इस वाक्यका यही अर्थ हो सकता है कि, प्राणके अभ्याससे अर्थात् योगाभ्याससेही इसकी प्राप्ति हो सकती है । दूसरा प्रमाण यह है कि, बौद्ध और जैन आम्नायोंमें भी इसका स्थान है। उनके मंत्रोंमे भी आरंभमें ओंकार आता है। यद्यपि साधारणत: वे लोग भी हिंदुओंकी भाँति इसके अर्थको भूल गये हैं। तिब्बतमें तो अशिक्षित लोग भी " ओं मणिपद्मे हुम् " मंत्रका जप करते हैं, परंतु यह नहीं जानते कि " ॐ " तथा " हुम् " का क्या तात्पर्य है । "

वरील उताऱ्यावरून हे स्पष्ट होते की, ॐकार हा योगाचा व अनुभूतीचा विषय आहे. सिद्धयोगाचे महान् आचार्य श्री. योगेंद्र विज्ञानी यांनी आपल्या " महायोग विज्ञान " या ग्रंथातील द्वादश प्रकाशात " स्वत:सिद्ध प्रणव " या नावाखाली या सिद्धयोगांतर्गत रहस्यमय विषयाचे जे प्रकटन केले आहे, ते आपण आठव्या प्रकरणातील " साधनातील क्रिया व अनुभव " या मुद्याचे विवेचन करताना सविस्तरपणे पाहिलेच आहे.

ॐ काराचे दुसरे वैशिष्टच हे आहे की, तो साध्यसाधनरूप आहे; म्हणजे प्रणवच ब्रह्म आहे व ब्रह्मप्राप्तीचे अमोघ साधनही तोच आहे. ॐकार हा परब्रह्माचा वाचक आहे, हे " तस्य वाचक: प्रणव: ॥१.२७॥" या " योगसूत्रात " महर्षी पतंजलींनी सांगितले आहे. परब्रह्म हे वाच्य आहे. तेव्हा परब्रह्म व ॐकार यांचा वाच्यवाचक संबंध आहे. परंतु " पाहें पां ॐतत्सत् ऐसें। हें बोलणें तेथ नेतसे। जेथूनि कां हें प्रकाशे। दृश्यजात ॥१७.४०१॥ " असे सांगून ओंकार हा जसा परब्रह्म प्राप्तीचे साधन आहे तसाच तो साक्षात् साध्यरूप म्हणजे ब्रह्मरूपही आहे हे " परी आश्रयो आकाशा। आकाशचि का जैसा। या नामानामी आश्रयो तैसा। अभेदु असे ॥ १७.४०३॥ म्हणौनि त्र्यक्षर हें नाम। नव्हे जाण केवळ ब्रह्म ॥४०५॥ " या ओव्यातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे.

सर्व वस्तूंचे नाव वाच्यार्थ असते; परंतु त्यांचे रूप लक्ष्यार्थ असते. याप्रमाणेच परमपवित्र ब्रह्माचे रूप ॐ जपादि साधनकालात प्रणव नावाने वाच्यार्थ होते आणि जप केल्यानंतर स्थिती कालात ब्रह्माचे रूप ॐ लक्ष्यार्थ असते. एखाद्या व्यक्तीचे नाव हरी आहे. हरी शब्दाने हरीच्या रूपाचा बोध होत नाही. नावाचा बोध होतो. म्हणून नाम वाच्यार्थ आहे. हरीची भेट झाल्यावर त्याच्या रूपाचा बोध होतो. ते त्याचे रूप लक्ष्यार्थ आहे. म्हणून "योगदर्शनात" "तस्य वाचक: प्रणव: ॥१ २७॥" असे महर्षी पतंजलींनी सांगून प्रणव ईश्वराचा वाचक आहे, हे स्पष्ट केले आहे. अर्थात् प्रणव हा ईश्वराच्या नावाचा प्रकाशक आहे, म्हणून तो वाच्यार्थ आहे. योगसाधन किंवा जपसाधन केल्यावर ईश्वराशी साधकाचे ऐक्य झाले की, ॐ लक्ष्यार्थ होतो. यासाठी प्रणव नाम आहे म्हणजे साधन आहे व ॐ वस्तू आहे म्हणजे परब्रह्म किंवा साध्य आहे. यासाठी महर्षी पतंजलींनी उपरोक्त सूत्राच्या पुढे "तज्जप-तदर्थभावनम् ॥१.२८॥" असे सांगून प्रणव जप करताना अर्थचिंतन करणेही आवश्यक आहे, हे सांगितले आहे. यावरूनही हे स्पष्ट होते की, प्रणव नाम आहे आणि ॐ वस्तू आहे. हा ॐ स्वर, व्यंजन किंवा वर्ण नाही. जो वर्ण नाही तो ऱ्हस्व, दीर्घ किंवा प्लुत कसा असू शकेल ? यासाठी वर्णरूप प्रणव शब्द नामवाच्यार्थ आहे आणि ध्वनिरूप हा ॐ शब्द लक्ष्यार्थ आहे. ॐ कारात लपलेल्या साध्यसाधनाच्या एकत्वाचा विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे. ते म्हणतात की–

**उदयिला आकाशीं । रवीचि रवीतें प्रकाशी ।**
**हे नामव्यक्ती तैसी । ब्रह्मचि करी ॥१७ ४०४॥**
**एवं पार्था तुजप्रती । ब्रह्मनामाची हे शक्ती ।**
**सांगितली हे उपपत्ती । डोळसा गा ॥४०९॥**

आकाशात उदय पावलेल्या सूर्याला सूर्यच प्रकाशित करतो त्याप्रमाणे "ॐ तत्सत्" या नावाचा उच्चार ब्रह्माचा आत्मत्त्वाने बोध करून ब्रह्मच करतो. हे अर्जुना ! याप्रमाणे ब्रह्मनामाच्या शक्तीचा विचार तुला दृष्टांतपूर्वक उघड करून सांगितला.

ॐकार हा कुंडलिनी शक्तीच आहे, हे सिद्धयोगसाधनाचे तिसरे महत्त्वाचे वैशिष्टच येथे मंगलाचरणात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रकट केले आहे. संप्रदाय परंपरेने लाभलेल्या ज्या समाधिधनाचे प्रकटीकरण करण्यास ते सिद्ध झाले आहेत, ते त्यांनी सिद्धप्रज्ञेच्या जोरावर ॐ या एका अक्षरात प्रकट केले आहे, असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती ठरणार नाही. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "प्रपंचसारतंत्रात" तात्त्विक दृष्टीने कुंडलपक्षयुक्त प्रणवच कुल–कुंडलिनी आहे, हे सांगताना असे म्हटले आहे की–

**तामेनां कुंडलीत्येते संतो हृदयगां विदु: ।**

सा रौति सततं देवी भृंगी संगीतकध्वनिः ॥४.१२॥
आकृतिं स्वेन भावेन पिंडितां बहुधा विदुः ।
कुंडली सर्वथा ज्ञेया सुषुम्नानुगतैव सा ॥१३॥
सकारं च हकारं च लोपयित्वा प्रयोजनेत् ।
संधिं वै पूर्णरूपाख्यं ततोऽसौ प्रणवो भवेत् ॥२१॥

कुंडलिनी शक्तीच अशा प्रकारे, "अहं सा" म्हणणाऱ्या जीवाचे "अहं" व "सा" हे दोन्ही लोपल्यावर, केवळ प्रणवरूपानेच उरते. हा प्रणवच तार-कुंडलिनी शक्ती आहे, असे वरील ग्रंथातील द्वितीय पटलात सांगताना ते म्हणतात की–

अप्यव्यक्तं प्रलपति यदा कुंडलिनी तदा ।
मूलाधाराद्विसरति सुषुम्ना वेष्टिनी मुहुः ॥५२॥
शक्तिः कामाग्निनादात्मा गूढमूर्तिः प्रवर्तते ॥५४॥
तदा तां तारमित्याहुरोमात्मेति बहुश्रुताः ।
तामेव शक्तिं ब्रुवते हरेरात्मेति चापरे ॥५५॥
त्रिगुणा सा त्रिदोषा सा त्रिवर्णा सा त्रयी च सा ।
त्रिलोका सा त्रिमूर्तिः सा त्रिरेखा सा विशिष्यते ॥५६॥
एतेषां तारणात्तारः शक्तिस्तद्धृतशक्तितः ।
यदा चतुर्धा गुणिता सूक्ष्मादिस्थानवाचिका ॥५७॥

जरी कुंडलिनी शक्ती अव्यक्त आहे असे म्हटले जाते; तरी सुषुम्नेचे मुख वेढून व आपल्या स्वतःला विसरून ही शक्ती मूलाधारात निद्रा घेत असते. ही शक्ती काम जाळणाऱ्या अग्नीसारखी असून ती नादयुक्त आहे. ती गूढमूर्ती आहे असे भासते. ही कुंडलिनी शक्ती तार ॐकारस्वरूपी आत्माच आहे असे सर्वमान्य आहे. ही शंकराची शक्ती आहे, असेही दुसरे कित्येक म्हणतात. ही शक्ती त्रिगुण, त्रिदोष, त्रिवर्ण, त्रिलोक, त्रिमूर्ती व त्रिरेखा यांनी युक्त आहे हा तिचा विशेष आहे.

"जयद्रथयामलातही" कुंडलिनी ही ॐकार स्वरूप आहे असे वर्णन करताना म्हटले आहे की–

अकुलं शिवमित्याहुः कुलं कुंडलिनी मता ।
अणुमात्रशरीरा सा सार्धत्रिवलया स्मृता ॥
स्वरैः षोडशभिः पूर्वं स्पर्शैस्तत्स्याद् द्वितीयकम् ।
अन्तःस्थवर्णैर्घटितं वलयं स्यात्तृतीयकम् ॥
शेषवर्णैर्भवेदर्धं सार्धत्रिवलयं भवेत् ।

अकुल शिव आहे व कुलकुंडलिनी शक्ती आहे. ती अणुमात्र अर्थात् सूक्ष्म शरीराची असून ॐकाराच्या साडेतीन वेढ्यांनी युक्त आहे असे म्हटले जाते. हिच्या

पहिल्या वेढ्यात–वलयात अकारादिविसर्गान्त १६ स्वर आहेत. दुसरे वलय स्पर्श म्हणजे 'क' पासून 'म' पर्यंतचे २५ व्यंजनें यांनी बनलेले आहे. तिसरे वलय अन्तःस्थ म्हणजे य, र, व, ल ही व्यंजने यांनी बनलेले आहे व उरलेल्या श ष, स, ह या वर्णांनी अर्धवलय बनलेले आहे. अशा रीतीने कुंडलिनी साडेतीन वलयाची आहे. (सर्ववर्णमयी आहे.)

याप्रमाणेच "कंकालमालिनीतंत्रातही" जीवाचे शिवाशी तादात्म्य व्हावे म्हणून प्रणवाचा प्रयोग सांगताना असे म्हटले आहे की–

**आकृष्य प्रणवेनैव जीवात्मानं नगेंद्रजे ।**
**कुंडलिन्या सह प्राणं गंधमादाय साधकः ।**
**सोऽहं तु मनुना देवीं स्वाधिष्ठाने प्रवेशयत् ।।**

हे नगराजकुमारी पार्वती ! ॐ कारानेच अर्थात् ॐकाराच्या उच्चाराने जीवात्म्याचे आकर्षण करून कुंडलिनीसह प्राणवायूला व (नासास्थ) पार्थिवगंधाला घेऊन साधकाने सोऽहं या मंत्राने या देवीकुंडलिनीला स्वाधिष्ठानचक्रात प्रविष्ट करावे.

असा हा कुंडलिनी शक्तिरूप प्रणव केवळ उपासनेचा व अनुभवाचा विषय आहे. त्याचा खरा उच्चार श्रीगुरूंकडूनच ज्ञात होत असल्याने मंगलाचरणात प्रारंभी त्याची उपाययोजना करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शिवसूत्रात सांगितलेल्या "गुरुरुपायः ।।२.६।।" या सिद्धयोगशास्त्राच्या महान् सिद्धांताचे उद्घाटन केले आहे. कुंडलिनी शक्ती जागृत होण्यासाठी समर्थ व शक्तिसंपन्न गुरूंची कृपा हाच एकमात्र उपाय आहे. हे घडल्याशिवाय श्रीगुरुरूपाने आतून स्वतः साधन करणाऱ्या व जागृत शक्तीच्या द्वारा प्रकटणाऱ्या ॐकाराची अनुभूती साधकाला कदापीही येत नाही. त्यामुळेच "श्रीदुर्गासप्तशतीतील रात्रिसूक्तात" असे म्हटले आहे की–

**अर्धमात्रा स्थिता नित्या यानुचार्य्या विशेषतः ।।३।।**

कुंडलिनी शक्ती प्रणवरूप व प्रणवात स्थिर असून ती विशेषेकरून अनुच्चार्य नादस्वरूप अर्धमात्रारूप आहे. श्रीगुरुकृपेने शक्तिपात होऊन शक्ती जागृत झाल्याशिवाय या अनुच्चार्य अर्धमात्रारूप प्रणवाचे आंतर उच्चारण आपोआप कसे होते, हे कधीही कळणार नाही. यासाठीच शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की –

**गुरूपदेशात्तद्गम्यं नान्यथा शास्त्रकोटिभिः ।।**

कोटी कोटी शास्त्रे नुसती वाचली तरी जोपर्यंत गुरूपदेश म्हणजे शक्तिपात होत नाही तोपर्यंत यातील खरे रहस्य किंवा मर्म कळत नाही व त्यात साधकाचा प्रवेशही होत नाही. "अथर्वशिरोपनिषदात," 'अथ कस्मादुच्यत ॐकारो?" म्हणजे परब्रह्माला कोणत्या कारणामुळे ॐकार म्हटले जाते असा प्रश्न विचारून त्याचे

जे उत्तर दिले आहे त्यात उपरोक्त रहस्याचा उलगडा झाला आहे. ऋषी म्हणतात की–

**यस्मादुच्चार्यमाण एव प्राणानूर्ध्वमुत्क्रामयति तस्मादुच्यते ॐकारः ॥४॥**

ॐकाराचे उच्चारण करताना प्राणांना वर खेचावे लागते म्हणून परब्रह्माला ॐकार म्हटले जाते. " अथर्वशिखोपनिषदातही " अगदी हाच अर्थ स्पष्ट करणारी प्रणवाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**प्रणवः सर्वान्प्राणान्प्रणामयति नामयति चैतस्मात्प्रणवः ॥२॥**

सर्व प्राणांना परमात्म्याला प्रणाम व नमस्कार करावयास लावतो म्हणून ॐकाराला प्रणव म्हणतात.

शक्तिपाताचार्य महायोगी ब्रह्मलीन श्री. प प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज यांनी आपल्या "शक्तिपात अर्थात् कुंडलिनी महायोग" या ग्रंथात चतुर्थ पादामध्ये कुंडलिनी ॐकारस्वरूप असल्याचे सूत्र सांगून त्यावर स्वतःच टीका करताना ते म्हणतात की–

**कुंडलिनी प्रणवस्वरूपिणी ॥४.१॥**

कुंडलिनी शक्ती प्रणवस्वरूपिणी आहे. " योगकुंडलिनी उपनिषदात " असे म्हटले आहे की–

**महा कुंडलिनी प्रोक्ता परब्रह्म स्वरूपिणी ।**
**शब्दब्रह्ममयी देवी एकाऽनेकाक्षराऽकृतिः ॥**

कुंडलिनी शक्ती ही परब्रह्मस्वरूपिणी, महादेवी, शब्दब्रह्ममयी अर्थात् प्रणव-स्वरूपिणी आहे. ती एक व अनेक अक्षरांच्या मंत्रांच्या आकृतीमध्ये व्यक्त होते. तिच्यामधील 'अ' म्हणजे सत्त्वगुण, 'उ' म्हणजे रजोगुण व 'म' म्हणजे तमोगुण आहे. अर्धमात्रेपासून उत्पन्न होणारा अनुनासिक ध्वनी हा आत्म्याच्या शुद्ध स्वरूपाचा दर्शक आहे ज्याप्रमाणे घंटेचा नाद शेवटी घंटेत लय पावतो त्याप्रमाणें हा अर्ध-मात्रेचा ध्वनी ब्रह्मामध्ये लय पावतो. हेच कुंडलिनी शक्तीचे साडेतीन वेढे किंवा कुंडल होत असे समजले पाहिजे. स्वयंभू लिंगाला हे वेढे घालून ती बसली आहे.

वरील सर्व विवेचनाचा सारांश " अहं ओंकारः ॥ गीता ९.१७॥ " हा आहे. याचा भावार्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केला आहे. ते म्हणतात की–

**पैं ब्रह्मबीजा जाहला अंकुरु । घोषध्वनीनादाकारु ।**
**तयाचें गा भुवन जो ॐकारु । तोही मी गा ॥९·२७५॥**
**जया ॐकाराचिये कुशीं । अक्षरें होतीं अउमकारेंसीं ।**
**जियें उपजत वेदेंसी । उठलीं तिन्हीं ॥२७६॥**

**म्हणौनि ऋग्यजुःसामु । हे तीन्ही म्हणे मी आत्मारामु ।**
**एवं मीचि कुळक्रमु । शब्दब्रह्माचा ॥२७७॥**

तसेच ब्रह्मरूपी बीजाला घोष, ध्वनी, नाद व आकार या रूपाने किंवा परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या वाणीरूपाने जो अंकुर फुटला त्याचे राहण्याचे वसतिस्थान जो ॐकार तोही मीच आहे. या ॐकाराच्या पोटात अ, उ, म अशी अक्षरे होती. ही अक्षरे उत्पन्न होताच ती तीन वेदांना घेऊन प्रकट झाली. म्हणून ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद हे तिन्ही वेद मी आत्मारामच आहे याप्रमाणे शब्दब्रह्माचा म्हणजे ॐकाराचा उद्गाता कुलक्रमाने म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या परंपरेने मीच आहे. मागे कुल शब्दाचा अर्थ कुंडलिनी आहे, हे स्पष्ट झालेच आहे. " सौभाग्यभास्कर " या ग्रंथातही हाच अर्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

**कुलं शक्तिरितिप्रोक्तमकुलं शिव उच्यते ।**
**कुलेऽकुलस्य संबंधः कौलमित्यभिधियते ॥**

कौल लोकांच्या मताप्रमाणे कुलाचा अर्थ शक्ती आहे व अकुलाचा अर्थ शिव आहे. कुलाच्याद्वारा अकुलाशी संबंध स्थापन करणे हाच कौल मार्ग होय. ॐकाराचे किंवा वेदाचे म्हणजे शब्दब्रह्माचे ज्ञान हे गुरूपदिष्ट अशा शक्तिपाताने परंपरेनेच प्राप्त होत असल्याचे कौलज्ञान निर्णय ग्रंथाच्या १४ व्या उल्लासाच्या ९ व्या श्लोकात स्पष्ट म्हटले आहे.

'श्रीआद्या' शब्दाने सिद्धयोग साधनातील कोणते वैशिष्टच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विशद केले आहे ते पाहण्यासारखे आहे. प्रथम " श्री " शब्दाने काय सूचित होते ते पाहू. सामन्यतः "श्री" शब्दाचा लक्ष्मी असा अर्थ प्रसिद्ध आहे. परंतु हारितायनसंहिता, ब्रह्मांडपुराणोत्तरखंड इत्यादि पुराणेतिहासात ज्या कथांचे वर्णन आले आहे त्यानुसार " श्री " शब्दाचा मुख्यार्थ महात्रिपुरसुंदरी किंवा कुंडलिनी शक्ती असा आहे. श्रुतीनेही "सा हि श्रीरमृता सताम्" म्हणजे ती कुंडलिनी शक्ती अर्थात् "श्री" ही खरोखरच अमृतस्वरूप आहे असे म्हणून परब्रह्मस्वरूपिणी शक्तीची स्तुती केली आहे. "दुर्गासप्तशतीमध्ये" असे म्हटले आहे की–

**त्वं श्रीस्त्वमीश्वरी ॥१.७९॥**

हे कुंडलिनी शक्ती ! तूच "श्री" आहेस व तूच ईश्वरी आहेस. "श्री" शब्दाची व्युत्पत्ती पाहिली तरी हाच अर्थ स्पष्ट होतो. "श्रियते सर्वैरिति श्रीः।" कारण "श्री" शब्द "श्रि" धातूपासून तयार होतो. "श्रि" धातूचा अर्थ सेवा करणे असा आहे. या धातूला "आङ्" उपसर्ग लागला की, त्याच्या योगाने त्याचा अर्थ " आश्रय करणे " असा होतो. कधी कधी उपसर्गाशिवायही धातू आपल्या सामर्थ्याने उपसर्गयुक्त अर्थ स्पष्ट करतो. "श्रयत इन्दिरा शश्वदत्र हि ॥१०.३१.१॥" म्हणजे (व्रजात) लक्ष्मी निरंतर आश्रय ग्रहण करते, असे "श्रीमद्भागवतात" म्हटले आहे. अशा प्रकारे

सर्वांकडून सेवा केली जाणारी व सर्वांचा आश्रय असलेली "श्री" ही कुंडलिनी शक्ती असून तिलाच आदिशक्ती असे म्हटले आहे. ही आदिशक्ती संपूर्ण जगताचा आधार व आश्रय आहे. "दुर्गासप्तशतीमध्ये" या दृष्टीनेच असे म्हटले आहे की–

आधारभूता जगतस्त्वमेका ॥११.४॥
सर्वाश्रयाखिलमिदं जगद् ॥४.७॥

हे कुंडलिनी शक्ती! तूच एकमात्र जगताचा आधारस्वरूप आहेस व तूच या सर्व जगताचा आश्रयही आहेस.

"प्रपंचसारतंत्रात" श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही चित्शक्तीच "श्री" असून ती इतर सर्व देवतांच्या रूपाने प्रकट झाली हे सांगताना असे म्हटले आहे की–

शक्तिः श्रीः संनतिः कान्तिर्लक्ष्मीर्मेधा सरस्वती ॥४.१०॥
क्षांतिः पुष्टिः स्मृतिः शांतिरित्याद्यैः स्वार्थवाचकैः ।
नानाविकारतां प्राप्तैः स्वैः स्वैर्भावैर्विकल्पितैः ॥११॥
तामेनां कुंडलीत्येते सन्ती हृदयगां विदुः ॥१२॥

वरील सर्व विवेचनावरून हे लक्षात येते की, "श्री" ही कुंडलिनी शक्ती असून ती सर्व जगताचा आधार व आश्रय आहे. त्या शक्तीची उपासना करूनच साधक ब्रह्मरूप होत असतो. एरवी ब्रह्मरूप होण्याला दुसरा मार्गच नाही.

यानंतर आद्या शब्दाचे सिद्धयोगाच्या दृष्टीने कोणते महत्त्व आहे ते पाहू. येथे एक गोष्ट प्रथमतः लक्षात घेतली पाहिजे की, "श्रीआद्या" म्हणजे श्रीस्वरूप आद्या होय. येथे "श्री" शब्दाचा व "आद्या" शब्दाचा परस्पर समानाधिकरण्य झाल्याने या दोन्ही शब्दांचा अभेद संबंध प्रस्थापित होतो. अर्थात् "श्री" व "आद्या" या दोहोत येथे कोणताही भेद नसून ते दोन्ही एकच आहेत. "श्री" ही अनादी चित्शक्ती व आदिशक्ती असून ती आद्यारूपाने अभिप्रेत आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सहाव्या अध्यायात या शक्तीला "आरंभरंभा ॥६.४६२॥" म्हणून तिचा आद्या या अर्थानेच गौरव केला आहे. "प्रत्याभिज्ञाहृदयात" "स्वेच्छया स्वभित्तौ विश्वमुन्मीलयति ॥२॥" म्हणजे चितिशक्ती कुंडलिनी ही आपल्या स्वतःच्या इच्छेनेच स्वात्मरूप भिंतीवर किंवा पटावर विश्वाचे उन्मीलन अगर प्रकटीकरण करते असे म्हटले आहे. हा पिंडब्रह्मांडाच्या उभारणीचा जसा आरंभ म्हणजे सुरुवात ही रंभा म्हणजे कुंडलिनी करते त्याप्रमाणेच "तत्परिज्ञाने चित्तमेव अंतर्मुखीभावेन चेतनपदाध्यारोहात् चितिः ॥१३॥' असे "प्रत्यभिज्ञाहृदयात" म्हटल्याप्रमाणे श्रीगुरूंनी साधकावर किंवा जीवावर शक्तिपात करून त्याची चितिशक्ती जागृत केल्यावर त्याचे चित्त म्हणजे संकुचित कुंडलिनी शक्तीच अंतर्मुख होऊन ते चित्त अंतर्मुखीभावद्वारा चेतनपदावर म्हणजे आपल्या चिन्मय परावस्थेत पुन्हा प्रविष्ट होऊन शिवरूप होते. येथेही पिंडब्रह्मांडाच्या संहारणीचा आरंभ ही रंभाच करते.

"दुर्गासप्तशतीमध्ये" या शक्तीलाच आद्या म्हटले आहे.

अव्याकृता हि परमा प्रकृतिस्त्वमाद्या ॥४.७॥

तू अव्यक्त असणारी सर्वश्रेष्ठ मूळ प्रकृती आहेस.

"ब्रह्मवैवर्तपुराणाच्या" प्रकृतिखंडात कुंडलिनी शक्तीचे आद्या म्हणून पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे.

प्रेमप्राणाधिदेवी या पंचप्राणस्वरूपिणी ।
प्राणाधिकप्रियतमा सर्वाद्यासुंदरी वरा ॥४१॥
परावरा सर्वव्रता परमाद्या सनातनी ।
परमानंदरूपा च धन्या मान्या च पूजिता ॥४३॥
त्वमेव सर्वजननी मूलप्रकृतिरीश्वरी ।
त्वमेवाद्या सृष्टिविधौ स्वेच्छया त्रिगुणात्मिका ॥२.३६॥
कार्यार्थे सगुणा त्वं च वस्तुतो निर्गुणा स्वयम् ।
परब्रह्मस्वरूपा त्वं सत्या नित्या सनातनी ॥३७॥
तेजःस्वरूपा परमा भक्तानुग्रहविग्रहा ।
सर्वस्वरूपा सर्वेशा सर्वाधारा परात्परा ॥३८॥
सर्वबीजस्वरूपा च सर्वपूज्या निराश्रया ।
सर्वज्ञा सर्वतोभद्रा सर्वमंगलमंगला ॥७.१०॥

कुंडलिनी शक्ती ही प्रेमाची व प्राणाची आधिदेवी आहे. ती पंचप्राणस्वरूपाची आहे. ती प्राणांपेक्षाही अधिक प्रिय आहे. ती सर्वांमध्ये आद्य अशी श्रेष्ठ सुंदरी आहे. हे देवी! तू विश्वजननी मूळप्रकृती ईश्वरी आहेस. तू सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळी आद्याशक्तीच्या रूपाने विराजमान असतेस व स्वेच्छेने त्रिगुणात्मक होतेस. हे देवी! तू स्वतः निर्गुण आहेस तथापि कार्यासाठी तू सगुण होतेस. तू परब्रह्मस्वरूप, सत्य, नित्य व सनातन आहेस. तू परमतेजस्वरूप असून भक्तांवर अनुग्रह करण्याच्या हेतूने शरीर धारण करतेस. तू सर्वस्वरूपा, सर्वेश्वरी, सर्वाधार व परात्पर आहेस. तू सर्वज्ञ, सर्वप्रकारचे मंगल करणारी व सर्व मंगलांचेही मंगल आहेस.

"बृहवृचोपनिषदातही" कुंडलिनी ही परमात्म्याची आद्य चेतनशक्ती कशी आहे, हे स्पष्ट केले आहे. ते आपण आठव्या प्रकरणातील "चैतन्याची परमप्रेमरूप शक्ती" या मुद्यात पृष्ठ ६३३ वर पाहिलेच आहे.

सारांश, ॐकाररूपाने प्रकटणाऱ्या व जीवाला ब्रह्मस्वरूप करणाऱ्या श्रीआद्यास्वरूप साधनाला नमस्कार करताना "योगतारावली" या प्रकरण-ग्रंथात असे म्हटले आहे की–

नादानुसंधान नमोऽस्तु तुभ्यं त्वां साधनं तत्त्वपदस्य जाने ।
भवत्प्रसादात् पवनेन साकं विलीयते विष्णुपदे मनो मे ॥४॥

हे नादानुसंधानाच्या साधना! तुला माझा नमस्कार असो. 'ते ब्रह्म तूच आहेस' असा ब्रह्मात्मभावाचा अनुभव प्राप्त करून घेण्याचे तूच साधन आहेस, असे मी समजतो. तुझ्या प्रसादाने माझे मन प्राणासमवेत विष्णुपदी लीन होऊन विरून जाते. याप्रमाणेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी येथे साधनाला नमस्कार केला आहे. सिद्धयोगात साध्यसाधनाची एकरूपता आहे, हे वर स्पष्ट केलेच आहे. त्यामुळे येथे साध्यालाही नमस्कार केला आहे, असे म्हणण्यास हरकत नाही.

"वेदप्रतिपाद्या" या शब्दातून सिद्धयोग साधन हे वेदप्रतिपादित कसे आहे, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. मुळात गीतेतील माहात्म्यात असे म्हटले आहे की–

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत्॥

सर्व उपनिषदरूपी गायींपासून पार्थरूपी जीवासाठी अंतर्यामी भगवान् श्रीगोपालकृष्णांनी गीतामृताचे दोहन केले. याचा अर्थच असा आहे की, भगवंतांनी स्वतःचे असे काहीही सांगितलेले नाही. त्यांनी फक्त उपनिषदप्रतिपादित ईश्वरप्राप्तीच्या साधनाचे अमृत सर्वांना उपलब्ध करून दिले. येथे दुधाच्या द्वारा साधनाचाच उल्लेख केला आहे, हे लक्षात घेतले पाहिजे; कारण हे दूधरूपी सिद्धयोगाचे साधन अमृतस्वरूप असून ते मोक्षासारखे श्रेष्ठ फल देणारे आहे, असे माहात्म्यकारांनी स्पष्ट केले आहे. त्याचप्रमाणे गीतेत प्रत्येक अध्यायाच्या शेवटी "इति श्रीमद्भगवद्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे".... असा संकल्प आला आहे. त्याचा अर्थ स्पष्ट आहे की, भगवान् श्रीकृष्णांनी गाइलेल्या किंवा सांगितलेल्या उपनिषदातील रहस्यविद्यांतील ब्रह्मविद्येपैकी योगशास्त्रातील किंवा साधनशास्त्रातील....हा गीतेचा अध्याय आहे. "गीतारहस्यातही" लोकमान्य टिळकांनी गीता ही वेदार्थ साररूप व उपनिषत्साररूप आहे, हे पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात, "वैदिक धर्माचे सार श्रीभगवंताच्या वाणीने साठविले आहे. (गी. र. पृ. १) सर्व उपनिषदांचे सार या ग्रंथात आले आहे इतकेच नव्हे; तर या ग्रंथाचे पुरे नावही "श्रीमद्भगवद्गीता उपनिषत्" असे आहे. (गी. र. पृ. २) महाभारतातच जागोजाग उपनिषदांचा सामान्यरीत्या उल्लेख आला आहे.... याखेरीज उपनिषदांतील पुष्कळ वाक्ये महाभारतात ठिकठिकाणी आली आहेत. किंबहुना महाभारतातील अध्यात्मज्ञान बहुतेक उपनिषदातलेच आहे असे म्हणण्यास हरकत नाही. महाभारताप्रमाणेच भगवद्गीतेतील अध्यात्मज्ञानही उपनिषदास धरून आहे. (गी. र. पृ. ५२१) गीतेतील वेदान्त उपनिषदांच्या आधारे प्रतिपादन केला आहे याबद्दल कोणालाच शंका नाही." (गी. र. पृ. ५२२)

श्रीमदाद्यशंकराचार्यही गीता हे स्वतंत्र प्रकरण मानीत नाहीत. गीता-भाष्याच्या आरंभी ते म्हणतात, "तदिदं गीताशास्त्रं समस्तवेदार्थसारसंग्रहभूतं" म्हणजे ते हे अशा प्रकारचे गीताशास्त्र सर्व वेदार्थाच्या साराचा ज्यात संग्रह केला आहे असे आहे. याचा अर्थच असा आहे की, भगवान् श्रीकृष्णांनी स्वतःला मन मानेल ते सांगितले नसून सर्व वेदोपनिषदांचे मंथन करून त्याचे सार म्हणून ईश्वर प्राप्तीचे साधन सांगणारे गीताशास्त्र कथन केले आहे. गीता हे सिद्धयोग-साधनाचे शास्त्र आहे, हे आपण पूर्वी पाहिलेच आहे. त्यामुळे हे सिद्ध होते की, गीता हे सिद्धयोगाचे वेदप्रतिपादित शास्त्र आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही गीता हे सर्व वेदांचे व उपनिषदांचे सारभूत असे सिद्धयोगशास्त्र आहे, हे सांगताना असे म्हटले आहे की—

**हें गीतानाम विख्यात। सर्व वाङ्मयाचें मथित।**
**आत्मा जेणें हस्तगत। रत्न होय॥१८.१३२३॥**
**जें उपनिषदांचें सार। सर्व शास्त्रांचें माहेर।**
**परमहंसीं सरोवर। सेविजे जें॥१८०८॥**

मागील ओव्यांमधून जे सिद्धयोगाचे साधन सांगितले तेच गीता या नावाने प्रसिद्ध आहे. हे साधन सर्व वाङ्मयाचे म्हणजे वेदांचे मंथन करून काढलेले सार आहे. आत्मा सहज हस्तगत करविणारे किंवा प्राप्त करून देणारे हे साधन म्हणजे एक अमूल्य रत्नच आहे. सिद्धयोग साधन हे सर्व उपनिषदांचे सार असून ते सर्व शास्त्रांचे माहेरघर आहे. हे सिद्धयोगरूप गीताशास्त्र परमहंसरूपी राजहंसांनी सेवन करण्याचे जणू मानस सरोवरच आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या कथनावरूनही हे साधन वेदप्रतिपादित आहे, हे सिद्ध होते.

माझ्या इंद्रियांना सुकविणाऱ्या शोकाला घालवील असे साधन किंवा उपाय मला दिसतच नाही, हे अर्जुनाने "न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषण-मिंद्रियाणां॥ गीता २.८॥" असे म्हणून सांगितले त्यावेळी अहं-ममाभिमानामुळे अर्जुनाला झालेला शोक व मोह घालविण्यासाठी भगवंतांना आत्मज्ञान सिद्धयोग साधनासह सांगावे लागले. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी गीतेच्या दुसऱ्या अध्यायावर भाष्य करताना याचे कारण असे दिले आहे की, "तदुपदिदिक्षुः सर्वलोकानुग्रहार्थ-मर्जुनं निमित्तीकृत्याह भगवान्वासुदेवः अशोच्यानित्यादि॥" ते आत्मज्ञान उपदे-शिण्याची इच्छा करणारा भगवान् वासुदेव सर्व लोकांवर अनुग्रह करण्यासाठी अर्जुनाला निमित्त करून तू शोक करण्यास योग्य नसलेल्या भीष्मादिकांविषयी शोक केलास इत्यादि म्हणतो. हा शोक जाण्यासाठी आचार्यांनी "योगे तत्प्रा-प्त्युपाये॥ गी. भा. २.३९॥" तसे लिहून सांख्यबुद्धीचा म्हणजे आत्मज्ञानप्राप्तीचा योगबुद्धी हा उपाय किंवा साधन आहे असे सुचविले आहे. त्याचप्रमाणे "धर्मा-

धर्मविवेकपूर्वको मोक्षसाधनानुष्ठाननिरूपणलक्षणो योगः, तद्विषया बुद्धिर्योगबुद्धिः। सा येषां कर्मिणामुचिता भवति ते योगिनः ॥ गी. भा. २.१० ॥" असे सांगून योगाचे व योग्यांचे लक्षण स्पष्ट केले आहे. धर्म व अधर्म यांच्या विवेकपूर्वक मोक्षसिद्धीसाठी जे परंपरेने साधन होते त्याचे निरूपण करणे, हेच ज्याचे स्वरूप आहे, तोच योग होय. या योगाविषयीची जी बुद्धी किंवा निष्ठा असते तिला योगबुद्धी म्हणतात. ती कर्मनिष्ठा ज्या कर्माधिकारी लोकांना उचित असते ते योगी होत या सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते की, सिद्धयोगी श्रीकृष्णांनी अर्जुनाचा शोक-मोह घालविण्यासाठी त्याला परंपराप्राप्त अर्थात् वेदप्रतिपाद्य असे सिद्धयोगाचे साधनच सांगितले.

ब्रह्म, धर्माधर्म, स्वर्ग, मोक्ष इत्यादि व त्यांच्या प्राप्तीची साधने ही प्रत्यक्षादि प्रमाणांचे विषय नसून ती केवळ वेदैक समाधिगम्य आहेत. "धर्म-ब्रह्मप्रतिपादकमपौरुषेयं यं प्रमाणवाक्य वेदः।" अशी व्याख्याच यासंबंधी शास्त्रकारांनी केली आहे. वेद अनादि, नित्य व अपौरुषेय आहेत. या अर्थानेच वेदस्तुतीमध्ये "अपौरुषेयं वाक्यं वेदः।" असे म्हटले आहे. त्यामुळे त्यांच्यात अप्रमाण्याचे मुळीच कारण नाही. याच्या उलट, मनुष्यकृत वाङ्मय, भ्रम म्हणजे संशय, प्रमाद म्हणजे अनवधानता, विप्रलिप्सा म्हणजे लोभाधिक्य व कर्णपाटव म्हणजे रोगादिकांमुळे इंद्रियात स्वविषय ग्रहण करण्याचे असामर्थ्य यांपैकी काहीतरी एखाद्या दोषाने दूषित असते. त्यामुळे त्याच्यात अप्रामाण्याचा संभव असतो. वेद अपौरुषेय असल्यामुळे ते निर्दुष्ट आहेत. वेदाचे प्रामाण्य हे स्वतःप्रामाण्य आहे. स्वतःप्रामाण्य व परतःप्रामाण्य असे प्रामाण्यात दोन प्रकार आहेत. वेद स्वतः प्रमाणभूत आहेत ह्याचा अर्थ वेदाविषयी वेद हेच प्रमाण होय त्याचे प्रामाण्य दुसऱ्या कोणत्याही प्रमाणावर अवलंबून नाही. मीमांसक व वेदान्ती हे वेदाचे स्वतःप्रामाण्यत्व मानतात. नैय्यायिक वेदाचे प्रामाण्य अनुमानाने म्हणजे ईश्वराने ते प्रकट केले म्हणून मानतात. ईश्वर महाकल्पाच्या अंती लय पावलेले वेद, प्रत्येक कल्पाच्या प्रारंभी, ते पूर्वकल्पात ज्याप्रमाणे होते त्याचप्रमाणे ते प्रकट करीत असतो. आता ईश्वरालाही पुरुष, पुराणपुरुष इत्यादि नावे आहेत. तेव्हा वेद हे पौरुषेय म्हणजे ईश्वराने प्रकट केले किंवा सांगितले असे मानणे योग्य होय असे नैय्यायिक म्हणतात; परंतु ज्याअर्थी वेदांचा कर्ता म्हणून कोणाचेही नाव अद्याप एकाच्याही कानांवर आलेले नाही व ज्याअर्थी गुरुअध्ययन संप्रदायाला अनुसरून स्वरादि विशिष्ट वर्णाची आनुपूर्वी म्हणजे गुरुजी म्हणतात त्याच क्रमाने म्हणण्याची पद्धत अखंड चालू आहे, त्या अर्थी वेद हे अपौरुषेय आहेत, असे मीमांसकांचे म्हणणे आहे वेदान्तीही वेद अपौरुषेय आहेत असेच मानतात. साक्षात् ईश्वरही वेदाचा कर्ता नसून तो केवळ वेदाचा प्रकाशक आहे; यास "स यथार्द्रैधाग्नेरभ्याहितात्पृथग्धूमा विनिश्चरन्त्येव वा अरेऽस्य महतो भूतस्य निश्वस-

तमेतद्यदृग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगीरस इतिहासः पुराणं विद्या उपनिषदः श्लोकः सूत्राण्यननुव्याख्यानानि व्याख्यानान्यास्यैवैतानि सर्वाणि निश्वसितानी ।। बृह. उप. २.४.१०।। " ही बृहदारण्यक श्रुती प्रमाण आहे. याचा अर्थ असा आहे की, ज्याचे इंधन ओले आहे अशा अग्नीपासून ज्याप्रमाणे निरनिराळा धूर निघतो त्याप्रमाणे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषद्, श्लोक, सूत्रे, मंत्रांची विवरणे व अर्थवाद ही सर्व या महद्भूताची म्हणजे परमात्म्याचीच निःश्वसिते आहेत. वेद हे महाभूताचे म्हणजे मायाविशिष्ट ब्रह्मचैतन्याचे म्हणजे ईश्वराचे निःश्वसित आहेत. पुरुषाला श्वासोच्छ्वासाच करण्यास ज्याप्रमाणे काहीही बुद्धीचा प्रयत्न करावा लागत नाही त्याप्रमाणे पुरुषबुद्धयादि प्रयत्नांवाचून अनायासाने वेद हे ईश्वरापासून प्रत्येक कल्पारंभी व्यक्त होतात ईश्वर वेद नवीन निर्माण करीत नाही. फक्त प्रत्येक कल्पाच्या आरंभी तो ते व्यक्त करतो इतकेच. "श्वेताश्वतर उपनिषदात " या दृष्टीनेच असे म्हटले आहे की, " यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वेदांश्च प्रहिणोति तस्मै ।।६.१८।। " परमात्मा सृष्टीच्या आरंभी हिरण्यगर्भाला विविध सामर्थ्यांनि युक्त असा उत्पन्न करतो व तो प्रसिद्ध आत्मा त्या हिरण्यगर्भाला ऋग्वेदादि महान् शास्त्रे देतो.

या दृष्टीनेच महाभारताच्या शांतिपर्वातही असे म्हटले आहे की--

**अनादि निधना नित्या वागुत्सृष्टा स्वयंभुवा ।**
**आदौ वेदमयी दिव्या यतः सर्वाः प्रवृत्तयः ।।**

श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही " स्मृत्यनवकाशदोषप्रसंग इति चेन्नान्यस्मृत्यनवकाशदोषप्रसंगः ।।२.१.१।। " या ब्रह्मसूत्रावर भाष्य करताना " वेदस्यहि निरपेक्षं स्वार्थे प्रामाण्यं रविरिव रूपविषये । " असे म्हटले आहे. ज्याप्रमाणे रूपाच्या संबंधाने सूर्याचे प्रामाण्य निरपेक्ष आहे त्याप्रमाणे स्वतःच्या विषयासंबंधाने वेदाचे प्रामाण्य निरपेक्ष आहे.

वरील सर्व विवेचनावरून हेच सिद्ध होते की, सर्व प्रमाणांमध्ये मुख्य प्रमाण जो वेद तोच ब्रह्मप्राप्तीचे साधन सांगत असल्यामुळे त्याविषयी शंका घेण्यास काहीच जागा उरत नाही. त्यामुळे आत्मरूप " श्रीआद्या " या साधनद्वारा प्राप्त होते हे स्वतःच्या पदरचे नसून ते श्रुत्यनुसार आहे हीच गोष्ट श्रीज्ञानेश्वरमहाराज " वेदप्रतिपाद्या " या शब्दाने सुचवितात.

" सूतसंहितेतही " सूतांनी उपरोक्त वेदप्रतिपाद्य विद्यासाधनास " वैदिकी विद्या" असे म्हणून या साधनाचा गौरव केला आहे. या संबंधी ते असे म्हणतात की--

**तस्मात् संवत्सरं शिष्यं परीक्ष्य कृत्रिमं पुनः ।**
**पदद्याद् वैदिकीं विद्यांगुर्विद्याभिवृद्धये ।।४.३५.१७।।**

एक वर्षभर शिष्याची योग्य प्रकाराने परीक्षा करून व तो निष्कपट किंवा निर्मलचित्त असल्याची खात्री करून विद्येच्या अर्थात् सिद्धयोगाच्या प्रसारासाठी सद्गुरूंनी ही वैदिक विद्या त्याला द्यावी.

जय जय या दोन शब्दांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वसंवेद्य आत्मरूपाचा जयजयकार केला असला तरी अंगअंगीभाव, शक्तिशक्तिमतयोरभेदः व साध्यसाधन-एकता या न्यायाने हा ब्रह्मरूप प्राप्त करून देणाऱ्या साधनाचाही जयजयकार आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. वास्तविक पाहिले तर साध्याच्या जयजयकारापेक्षा परंपराप्राप्त सिद्धयोगसाधनाचा जयजयकारच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केला आहे, हेच म्हणणे संयुक्तिक होईल. "श्रीमद्भागवताच्या" दशम स्कंधात वेदस्तुती करताना श्रुतींनी "जय जय जह्यजामजित ॥१०.८७.१४॥" असे म्हणून परमात्म्याच्या स्तुतीला सुरवात केली असली; तरी परमात्मा हा साध्यसाधनरूप असल्यामुळे त्याच्या साधनरूपाची स्तुती करताना महर्षी व्यास असे म्हणतात की–

उदरमुपासते य ऋषिवर्त्मसु कूर्पदृशः ।
परिसरपद्धतिं हृदयमारुणयो दहरम् ।
तत उदगादनन्त तव धाम शिरः परमं ।
पुनरिह यत् समेत्य न पतंति कृतांतमुखे ॥१०.८७ १८॥

ऋषींनी परमात्म्याच्या प्राप्तीचे अनेक मार्ग मानले आहेत. त्यातील स्थूल दृष्टीचे लोक मणिपूर चक्रात अग्निरूपाने त्याची उपासना करतात. अरुण वंशातील ऋषी जेथून सर्व नाड्या बाहेर पडतात त्या स्थानी हृदयात आपल्या परम सूक्ष्मरूप दहर ब्रह्माची उपासना करतात. हे प्रभो ! हृदयापासून आपल्याला प्राप्त करण्याचा श्रेष्ठ मार्ग सुषुम्नानाडीच्या रूपाने ब्रह्मरंध्रापर्यंत गेला आहे. तुझे ज्योतिर्मय शुद्ध-चैतन्यरूप ब्रह्मतत्त्व ब्रह्मरंध्रात निविष्ट असल्यामुळे जो पुरुष सिद्धयोगाचा हा ज्योतिर्मय मार्ग प्राप्त करून घेतो व प्राणशक्तीच्या आधाराने ऊर्ध्वगतीने वर जातो तो पूर्ण ब्रह्मनिष्ठ होऊन जन्ममरणाच्या चक्रातून कायमचा मुक्त होतो.

हा जयजयकार करण्याचे आणखी एक कारण सांगताना श्रुती परमात्म्याला म्हणतात, "कर्तुमकर्तुं अन्यथा कर्तुं" अशी शक्ती एक तुलाच आहे. प्रभो ! जीवांच्या अंगी विद्यमान असणारी मायेची उपाधी त्यांची त्यांना कधीही दूर करता येणार नाही; कारण त्यांच्या अंगी ज्या ज्या कर्तृत्वशक्ती आहेत, त्या तुझ्यापासूनच त्यांना मिळालेल्या आहेत. त्यामुळे अविद्या नाहीशी करण्याकरिता जीवांना जी शक्ती प्राप्त होणे अवश्य आहे, ती तुझ्याकडूनच त्यांना मिळाली पाहिजे.

ही शक्ती प्राप्त होणे म्हणजे ईश्वराच्या प्रेरणेने सद्गुरू प्राप्त होऊन त्यांच्या कृपेने अनादी आत्मसत्ता जागृत होऊन सिद्धयोगाच्या प्राप्तीने सुषुम्नामार्गाने पर-ब्रह्मापर्यंत जाण्याचा सहजसुलभ मार्ग प्राप्त होणे होय. ह्या भावनेनेच वरील

वेदस्तुतीवर श्रीश्रीधरस्वामी यांनी जी श्लोकात्मक टीका केली आहे त्यात ते असे म्हणतात की—

**द्युपतयो विदुरंतमनंत ते न च भवान्न गिरः श्रुतिमौलयः ।**
**त्वयि फलंति यतो नम इत्यतो जय जयेति भजे तव तत्पदम् ॥२८॥**

हे अनंता ! ब्रह्मा आदि देवता आपला अंत जाणू शकत नाहीत. आपणही आपला महिमा जाणत नाही व वेदांचे मुकुटमणी असलेली उपनिषदेही हा महिमा जाणत नाहीत; कारण आपण अनंत आहात. उपनिषदे "नमो नमः" "जय हो, जय हो" असे म्हणून कृतकृत्य होतात. यासाठी मीही "नमो नमः" व 'जय हो, जय हो" असे म्हणत आपल्या चरणकमलांची उपासना करतो.

ही उपासना, हा जयजयकार किंवा नमस्कार हे सर्व साधनाचे वर्णन आहे, साध्याचे नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ह्या पद्धतीनेच जयजयकार करून आपल्याला परंपरेने प्राप्त झालेल्या अनादिसिद्ध सिद्धयोगाचा महिमा गाइला आहे.

स्वसंवेद्या या शब्दाने श्रीज्ञानेश्वरमहाराज सिद्धयोगाचे कोणते दर्शन घडवितात ते पाहण्यासारखे आहे स्वसंवेद्या म्हणजे स्वतःला स्वतः जाणण्यास योग्य असणारा व आपले आपण जाणणारा होय. "अवेद्यत्वे सति अपरोक्षत्वम् स्वसंवेद्यत्वम्।" म्हणजे जी वस्तू कोणाकडूनही वेद्य होत नाही; पण आपल्या ठिकाणीच जी स्वयंप्रकाश ज्ञप्तिस्वरूप असते तिला स्वसंवेद्य म्हणतात या स्वसंवेद्य तत्त्वाचे सर्व विवेचन चवथ्या प्रकरणातील "स्वसंवेद्य तत्त्व" या तिसऱ्या मुद्यात केले आहे. त्यावरून हे स्पष्ट होते की, आत्मशक्तीशिवाय आत्मवस्तू प्रकाशित होत नाही. "वस्तुसामर्थ्यशक्ती ॥१.७८॥, आत्मप्रभा ॥ ६.२३॥, आत्मसत्ता ॥१३.१११७, १५.३८०–३८५॥, आरंभरंभा ॥६.४६२॥, सर्वोपशांतिप्रमदा ॥१८.१३२०॥" इत्यादि सर्व शब्दांच्या द्वारा आत्मशक्ती कुंडलिनीचा निर्देश करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वसंवेद्य तत्त्वाची प्राप्ती कशी होते हे स्पष्ट केले आहे. स्वसंवेद्या या एका शब्दानेच सिद्धयोगसाधनाच्या रहस्याचे उद्घाटन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे असे म्हटले; तर ते वावगे ठरणार नाही.

आत्मरूपा या शब्दाने मागील सर्व शब्दांनी म्हणजे विशेषणांनी ज्या साधनाचा निर्देश श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केला आहे, त्या सिद्धयोगाच्या प्राप्तव्याचे, गंतव्याचे. अंतिम स्थानाचे अगर साध्याचे त्यांनी प्रकटीकरण केले आहे. अर्थात् आत्म म्हणजे ब्रह्म व रूपा म्हणजे शक्ती होय. आत्मरूप हे सशक्तीकच आहे. "स्पंदशास्त्राच्या" सुरवातीला श्रीभट्ट कल्लटांनी जे म्हटले आहे त्यावरून हे सिद्ध होते. ते म्हणतात की, "दिशा व काल हे पदार्थ उत्पत्तीच्या पूर्वी शक्तीशी तन्मय असल्याने स्वतःतील लक्षणे प्रकट करू शकत नाहीत. शक्ती सुद्धा स्वतः शिवाशी तादात्म्य पावलेली असल्याने केवळ शिवस्वरूप बनलेली असते.

म्हणून चैतन्य हेच ज्याचे शरीर आहे तो परशिव स्वतःच स्वस्वरूपात स्फुरण पावत असतो. पण तो परशिव शक्तियुक्त असल्याने ब्रह्मानंदादि शक्तिस्वरूपी शब्दांनी त्याचे वर्णन केले जाते. "ब्रह्म" म्हणजे आत्मा व "आनंद" म्हणजे शक्ती होय. स्वरूपाचा अर्थही असाच होतो. "स्व" म्हणजे आत्मा व " रूप" म्हणजे शक्ती होय." या दृष्टिकोनातून पाहिले म्हणजे "आत्मरूपा" हे साध्य " सार्धं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः।" व " ऐसीं हीं निरुपाधिकें। जगाचि जियें जनकें। वंदिलीं मिया मूळिकें। देवोदेवी ।। अमृ. १.१.।। " यांमधून " अमृतानुभवातही " शिवशक्तिरूपानेच प्रकट झाले आहे. "श्रीरामचरितमानसाच्या " प्रारंभी गोस्वामी श्रीतुलसीदासांनीही मंगलाचरण करताना असे म्हटले आहे की–

**भवनीशंकरौ वंदे श्रद्धाविश्वासरूपिणौ।**

**याभ्यां विना न पश्यंति सिद्धाः स्वान्तस्थमीश्वरम् ।।२।।**

श्रद्धा व विश्वासरूपी शिवशक्तीला मी नमस्कार करतो. यांच्याशिवाय योगीसुद्धा आपल्या हृदयस्थ परमाम्याचे दर्शन करू शकत नाहीत.

पहिल्या अध्यायातील पहिल्या ओवीच्या प्रत्येक शब्दाचे सिद्धयोगसाधनेच्या दृष्टीने सविस्तर विवेचन केल्यामुळे या ग्रंथाकडे पाहण्याची आपली दृष्टी स्पष्ट होईल व ज्या दृष्टिकोनातून अध्यायसंगती लावली आहे तो दृष्टिकोन दृढ होऊन पुढील ओव्यांची साखळी कशी लाविली आहे, ते उलगडेल.

पहिल्या अध्यायाच्या शेवटी श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

**आतां यापरी तो वैकुंठनाथु। देखोनि सखेद पार्थु।**
**कवणेपरी परमार्थु। निरूपील ।।१.२७४।।**

श्रीकृष्णांनी अर्जुनाला परमार्थाचा बोध केला म्हणजे काही नुसती वाचाळ वडबड केली नाही; तर परंपरेने प्राप्त झालेला साधनमार्गच सांगितला. श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी केलेला परमार्थाचा अर्थ पाहिला म्हणजे उपरोक्त विधानाचा उलगडा होईल. श्रीसमर्थ " दासबोधात" या दृष्टीने असे म्हणतात की–

**आतां स्तवूं हा परमार्थ। जो साधकांचा निजस्वार्थ।**
**नातरी समर्थांमध्ये समर्थ। योग हा ।।१.१०.१।।**
**आहे तरी परम सुगम। परि जनासि जाहला दुर्गम।**
**कां जयाचें चुकलें वर्म। सत्समागमाकडे ।।२।।**
**नाना साधनांचें उधार। हा रोकडा ब्रह्मसाक्षात्कार।**
**वेदशास्त्रीं जें सार। तें अनुभवास ये ।।६।।**
**आहे तरी चहूंकडे। परि अणुमात्र दृष्टीस न पडे।**
**उदास परी एकीकडे। पाहतां दिसेना ।।४।।**
**आकाशमार्गी गुप्तपंथ। जाणती योगिये समर्थ।**
**इतरांस हा गुह्यार्थ। सहसा न कळे ।।५।।**

आता ईश्वरप्राप्तीच्या साधनाची म्हणजेच परम अर्थाची स्तुती करतो. परम म्हणजे श्रेष्ठ असे शिवतत्त्व व अर्थ म्हणजे शक्ती होय. असा हा शिवशक्तियुक्त मार्ग म्हणजे साधकांचा अपूर्व ठेवा असून साधकांचे स्वतःचेच हित करणारा असा या साधनमार्ग आहे. हे स्वहित सगळचात श्रेष्ठ व बलवान् अशा योगाच्या आश्रयाने होते. या योगालाच पंथराज किंवा सिद्धयोग म्हणतात. हा योग सर्व समर्थ योगांमध्ये समर्थ आहे. वास्तविक पाहता तो अगदी सुगम, सहज व सोपा आहे; परंतु लोकांना मात्र तो कठीण वाटतो. हा योग कठीण वाटण्याचे खरे कारण म्हणजे सुत्पुरुषांच्या संगतीचे मर्म लोक विसरून गेले आहेत. त्यांच्या संगतीमुळेच शक्तिसंक्रमण घडून येत असते. हा परमार्थ म्हणजे सिद्धयोग हा रोकडा ब्रह्मसाक्षात्कार घडविणारा अत्यंत गुप्त मार्ग आहे, हे सांगताना समर्थ पुढे म्हणतात, " परमेश्वरप्राप्तीची इतर अनेक साधने आहेत; परंतु इतर साधनांमुळे साधकाला केव्हातरी कालांतराने प्रचीती येते. इतर साधनात सर्व हिशेब उधारीचाच असतो; परंतु सद्गुरू समागमामुळे सिद्धमार्गाची प्राप्ती झाल्यावर तत्क्षणीच ब्रह्मप्राप्ती होते. या साधनमार्गात उधारीचा हिशेब नाही. रोकडा ब्रह्मसाक्षात्कार, तत्काल स्वरूपप्राप्ती व प्रत्यक्ष अनुभव हेच या मार्गाचे खरे वैशिष्टच आहे. परब्रह्मप्राप्ती हे वेदशास्त्राचे सार आहे. शक्तिपात होताक्षणीच ते अनुभवास येते. परब्रह्म सर्वत्र आहे; परंतु त्याची थोडीशीही प्रचीती माणसाला येत नाही. ते अलिप्त असे तत्त्व आहे. परब्रह्म सर्वव्यापी असल्यामुळे ते एकीकडेच आहे व दुसरीकडे नाही, असे म्हणता येणार नाही. सहस्रारूपी आकाशात जाण्याचा म्हणजे शिवाशी समरस होण्याचा सिद्धमार्ग हा अत्यंत गुप्त मार्ग आहे. तो समर्थ योगीच जाणतात. इतर सामान्य जनाला या सिद्धमार्गाचा गुह्यार्थ सहसा कळत नाही. "

इतके सांगून झाल्यावर समर्थांनी पुढेही या परमार्थाची म्हणजे सिद्धयोगाची जी महती सांगितली आहे ती पाहिली म्हणजे वैकुंठनाथ श्रीकृष्णांनी अर्जुनाला जी परमार्थाची सविस्तर कथा सांगितली ती ऐकण्याची श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रोत्यांना विनंती का केली, हे स्पष्ट होते. श्रीसमर्थ म्हणतात, " या साधनमार्गाची हीच अपूर्वता व हेच आश्चर्य आहे की, इतर कोणत्याही साधनात न सापडणारा असा गुण यात आहे. या साधनामुळे जन्ममृत्यूची वार्ताच नाहीशी होते आणि सायुज्य मुक्ती तत्काल प्राप्त होते. साधकाच्या मनात नित्यानित्यविवेक उत्पन्न होऊन माया मावळून जाते. संसार असार असून परब्रह्मच सार आहे, हा विचार अंतःकरणात बिंबून जातो. हृदयामध्ये परब्रह्म आपणहून प्रकट होऊन स्थिर होते. सर्वत्र ब्रह्म भरून राहिले आहे, असा साक्षात्कार होतो. असे हे साधन आहे. "

परमार्थ म्हणजे महार्थ होय असे प्रतिपादून महायोगी गोरक्षनाथांनी " महार्थमंजरीत " असे प्रतिपादिले आहे की, " यातील अर्थ म्हणजे शिवशक्तियुक्त

पूर्ण अहंरूप आत्मपदार्थ होय. यात शिवशक्तिदृष्टचा द्वैत दिसले तरी परमार्थतः त्यांच्या ठिकाणी स्फुरणस्वरूपाची एक अद्वैतरूपताच आहे.... श्रीसिद्धमतात हा दीक्षामार्ग निर्भय म्हणून सांगितला आहे."

वरील सर्व विवेचनावरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांना सिद्धयोगाचा निर्भय दीक्षामार्ग म्हणजे शक्तिपातयोगमार्गच किंवा गुरुकृपामार्गच कथन करावयाचा आहे हे स्पष्ट होते.

दुसऱ्या अध्यायाच्या सुरुवातीला "महामोहें अति जर्जरु ॥ २.५ ॥" अशा रथातून खाली उडी टाकलेल्या, भ्रमाने व्यापलेल्या व दुःखाने अत्यंत व्याकुळ झालेल्या अर्जुनाला श्रीकृष्णांनी उपदेश करून क्षत्रियाने झुंज केलीच पाहिजे असे आग्रहाने प्रतिपादले आहे. या दृष्टीने ते असे म्हणतात की—

**हृदयाचें ढिलेपण। एथ निकयासी नव्हे कारण।**
**हें संग्रामीं पतन जाण। क्षत्रियांसीं ॥२.२८॥**
**म्हणौनि यालागीं पाहीं। तुम्हां क्षत्रियां आणीक कांहीं।**
**संग्रामावांचूनि नाहीं। उचित जाणें ॥२.१८९॥**

अशा प्रकारे उपदेश करण्याचे कारण अगदी उघड आहे. जसा राजहंस पक्षी चिखलात रुतल्यावर म्लान दिसतो तसा अर्जुन ममतेने व्याकुळ होऊन अगदी कोमेजून गेलेला दिसत होता. संसारचक्रात सापडलेल्या प्रत्येक जीवाची अर्जुनासारखी स्थिती होते. अर्जुन हा सामान्य जीवाचे प्रतिक आहे. त्या जीवाला मोक्षाचे साधन सांगून या शोकमोहातून वर काढण्यासाठीच गीताशास्त्र प्रवृत्त झाले आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनीही आपल्या "श्रीमद्भगवद्गीताभाष्यात" हेच स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, "तत्रैवं सति धर्माधर्मोपचयादिष्टानिष्ट-जन्मसुखदुःखसंप्राप्तिलक्षणः संसारोऽनुपरतो भवति, इत्यतः संसारबीजभूतौ शोक-मोहौ। तयोश्च सर्वकर्मसंन्यासपूर्वकादात्मज्ञानान्नान्यतो निवृत्तिरिति तदुपदिदिक्षु सर्वलोकानुग्रहार्थमर्जुनं निमित्तीकृत्याह भगवान्वासुदेवः — अशोच्यानित्यादि ॥ गी. भा. २.१० ॥" जीवांची स्वधर्मप्रवृत्ती फलासाठी व अभिमानपूर्वक होऊ लागली असता धर्म व अधर्म यांची वृद्धी झाल्यामुळे इष्ट व अनिष्ट जन्म आणि सुखदुःखांची प्राप्ती इत्यादि रूपांनी भासणारा संसार अविच्छिन्न असतो. संसाराचा विच्छेद किंवा शांती होत नाही म्हणून शोक व मोह हे संसाराचे बीजभूत दोष आहेत. सर्वकर्मसंन्यास करून अर्थात् सुषुम्नामार्गस्थ झाल्याने सर्व कर्मांचा संन्यास होत असल्याने त्या मार्गाचा अवलंब करून आत्मज्ञाननिष्ठ झाल्यावाचून दुसऱ्या कोणत्याही उपायाने त्या शोकमोहांची निवृत्ती होत नाही. म्हणून ते आत्मज्ञान उपदेशिण्याची इच्छा करणारा भगवान् वासुदेव सर्व लोकांवर अनुग्रह करण्यासाठी अर्जुनाला निमित्त करून तू शोक करण्यास योग्य नसलेल्यांविषयी शोक करणे योग्य नाही असे म्हणतो.

अर्जुनाला अहं–ममाभिमानामुळे शोक मोह झाला, म्हणून भगवंतांना त्याला शोक-मोह घालविणारे आत्मज्ञान योगासह म्हणजे सिद्धयोगसाधनेसह सांगावे लागले. "योगे तु तत्प्राप्त्युपाये ।।गी. भा.२.३९।।" म्हणून श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "गीताभाष्यात" आत्मज्ञानप्राप्तीच्या उपायाविषयी म्हणजे योगाविषयी बुद्धी ऐक, असे स्पष्टच म्हटले आहे.

वरील सर्व विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट झाली की, श्रीकृष्ण अर्जुनाला प्रथम त्याच्या मनातील अंतर्संघर्षाला म्हणजे संग्रामाला उद्युक्त करीत आहेत; कारण साधकाच्या जीवनात असा संग्रामच जन्मजन्मांतरी उपस्थित होत नाही. असा संग्राम श्रीगुरूंच्या अनुग्रहाने शक्ती जागृत झाली म्हणजे सुरू होतो व मग अनित्य किंवा क्षर यांचा नाश होऊन अर्थात जडचेतनभेदप्रक्रिया घडून येऊन नित्यस्वरूपाची, अक्षरपदाची किंवा साध्याची साधकाला प्राप्ती होते. हा संग्राम म्हणजे चिंतामणी किंवा अमृत आहे असेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील दृष्टांतानी सूचित केले आहे. ते म्हणतात की –

**अर्जुना झुंज देखें आतांचें । हें हो कां जें दैव तुमचें ।**
**कीं निधान सकळ धर्माचें । प्रकटलें असे ।।२.१९१।।**
**क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तें झुंज ऐसें लाहिजे ।**
**जैसें मार्गें जातां आडळिजे । चिंतामणी ।।१९४।।**
**ना तरी जांभया पसरे मुख । तेथ अवचटें पडे पीयुख ।**
**तैसा संग्रामु हा देख । पातला असे ।।१९५।।**

अगदी असेच विचार बंगालमधील शक्तिपातयोगाचार्य श्रीश्रीविजयकृष्ण गोस्वामी या महान् साधुपुरुषाने त्यांचे शिष्य श्रीश्रीकुलदानंद ब्रह्मचारी यांना सांगितल्याचे त्यांनी स्वतः लिहिलेल्या "श्रीश्रीसद्‌गुरुसंग" या पुस्तकाच्या तृतीय खंडाच्या शेवटी पुढीलप्रमाणे नमूद केले आहेत. ते म्हणतात की, "गीतेमध्ये श्रीकृष्णांनी अर्जुनाला वारंवार संग्राम कर म्हणून सांगितले आहे. असा संग्राम सर्व साधकांच्या जीवनामध्ये येणारच असतो. अनेक प्रकारच्या वाईट अवस्थांमध्ये सापडून साधकाला प्रलोभनांशी, आशेशी किंवा वासनांशी सामना, युद्ध किंवा झुंज करणे भागच पडते. या सामन्यात कधी कधी साधक प्रलोभनांचा पराभव करतो तर कधी कधी आशाआकांक्षा अगर वासना त्याचा पराभव करतात. या विषम युद्धात साधकाला खूप वेळ काढावा लागतो. अशा वेळी गुरूंनी दिलेल्या नामाचे अस्त्र करून मोठ्या धैर्याने षड्‌रिपूंबरोबर प्राणपणाने युद्ध करावे लागते. अशा प्रकारच्या युद्धाच्या दशेसारखी भयंकर दशा साधकाच्या जीवनात दूसरी कोणतीही नाही. प्राणपणाने वारंवार प्रयत्न करूनही साधक जेव्हा अनेक प्रकारच्या भयंकर प्रलोभनांना बळी पडून षड्‌रिपूंकडून पुनःपुन्हा पराभूत होतो त्यावेळी त्याचे धैर्य सुटून जाते. साधन-भजन करण्याने काहीही होत नाही व साधन-भजन या गोष्टी अगदी

व्यर्थ आहेत असे वाटून साधक अगदी नास्तिकाप्रमाणे होतो. जे साधक वरील शत्रूंकडून दोन चार धक्के खाताच हात पाय गाळतात व अगदी सुस्त होऊन स्वस्थ बसतात त्यांचा कर्मभोग नाहीसा होण्यास वेळ लागतो. परंतु जे साधक वारंवार पडल्यावरही छाती ताठ करून पुन्हा युद्धाला उभे राहतात व पाठ दाखवून पळ काढीत नाहीत त्यांचा कर्मभोग लवकर संपुष्टात येतो. ज्या साधकाचा जसा स्वभाव असतो तशी झुंज तो खेळतो. कोणी कमी तर कोणी जास्त. परंतु शेवटी सर्वांना या युद्धात पराभूत व्हावे लागेल. युद्धात पावलापावलावर पराभूत होता होता शेवटी जेव्हा साधक संपूर्णपणे निराश होईल, दमेल, त्याची हड्डी नरम होईल, अहंकाराचा चुराडा होऊन सर्वत्र अंधकार दिसू लागेल त्यावेळी त्याला हे समजून येईल की, आपल्या बळावर काहीही होऊ जाऊ शकत नाही. मी अगदीच निरुपयोगी आहे. मी तर सामान्य कामही करू शकत नाही त्यावेळी तो आपल्याला खुराखुरा हीन, पतित व अधम समजून प्रबल शक्तिशाली ईश्वर अगर सद्गुरूंकडे पाहील, हृदयापासून त्यांचा आश्रय घेईल व सोळा आणे त्यांच्या भरवशावर राहून त्यांच्या कृपेसाठी प्रार्थना करील ज्यावेळी साधक आपली काहीही योग्यता नाही, आपण अगदी अयोग्याहून अयोग्य व असाराहूनही असार आहोत असे समजून अंतःकरणापासून परमेश्वराला शरण जातो त्यावेळी त्याच्या ठिकाणी भक्तियोगाला आरंभ होतो. अशी स्थिती किंवा दशा साधकाला प्राप्त झाली म्हणजे त्या अवस्थेत पुन्हा त्या साधकाला कोणत्याही प्रकारे इच्छा, क्रिया, प्रयत्न किंवा स्वाधीनता राहत नाही. सर्व काही परमात्माच करतो अशी दृढ धारणा झाल्यामुळे तो त्याच्या कृपेच्या भरवशावर आपल्या स्वतःला सोडून देतो. भक्त ज्यावेळी परमेश्वराच्या चरणांवर संपूर्णपणे आत्मसमर्पण किंवा आत्मनिवेदन करतो त्यावेळी भगवत्कृपेने त्याच्यासमोर अनेक तत्त्वे प्रकाशित होऊ लागतात. या तत्त्वांची प्रकट होण्याची स्थिती किंवा दशा हाच "ज्ञानयोग" होय. गीतेमध्ये कर्मयोग, भक्तियोग किंवा ज्ञानयोगाच्या विषयासंबंधी जे सांगितले आहे त्याचे तात्पर्य हेच आहे. तीव्र तपस्या, कठोर वैराग्य व प्राणपणाने साधन-भजन केल्यावरही वास्तविक अवस्थेची प्राप्ती साधकाला होत नाही. परमात्म्याच्या कृपेशिवाय काहीही होऊ शकत नाही. त्याला चांगल्या प्रकारे जाणण्यासाठीच साधन भजन आहे. आपला प्रयत्न व साध्य हे सर्व असार आहे.. एकमेव त्याची कृपा हेच सार आहे.

साधकाने मोठ्या शर्थीने झुंजले पाहिजे. अशा प्रकारची झुंज, संग्राम, युद्ध किंवा लढाई आपल्या जीवनात उपस्थित झाली हे आपले सर्वात मोठे भाग्य आहे, असे साधकाने समजले पाहिजे. बहुतेकांच्या जीवनात अशी झुंज येतच नाही. युद्धाचा आरंभ झाला की, खरे धर्मजीवन सुरू झाले असे साधकाने निश्चित समजावे. जे

लोक या शक्तिपात्योगाचे किंवा सिद्धयोगाचे साधन करतात म्हणजे जे या साधनमार्गात आहेत त्या सर्वांना या युद्धात पडावेच लागेल. सर्वांना सर्व अंतरंग शत्रूंपासून पराभव स्वीकारावाच लागेल. प्रत्येकाला आपापल्या यथार्थ पातळीवर जाऊन उभे राहवेच लागेल व अत्यंत हीन, पतित व कंगाल समजून परमात्म्याला दीनबंधू, पतितपावन व निर्धनांचे धन म्हणून हाक मारली की, ती कर्म, भक्ती किंवा अन्य कोणत्याही प्रकारच्या सामान्य व्यापारासारखी गोष्ट राहणार नाही. आपल्या दुरवस्थेचा अनुभव घेऊन भगवंताला हाक मारली की, ती खरी हृदयाची हाक होते. त्यावेळी भगवान् दया करतात."

डॉ. ॲनी बेझंट यांनी " भगवद्गीतेचे अंतरंग " या पुस्तकातील " एका प्रचंड योजनेचे दर्शन " या पहिल्याच व्याख्यानात उपरोक्त विचार अधिक स्पष्ट मांडले आहेत. त्या म्हणतात, " रूपकाच्या दृष्टीने या युद्धाचा काय बरे बोध घ्यावयाचा ? हा बोध म्हणजे मन, अर्जुनरूपी विकास पावत असलेले किंवा ज्ञानोन्मुख मन आणि 'काम' दुर्योधनप्रमुख बांधवरूपी वासनात्मक स्वभाव, यातच पूर्वकृत सर्व ऋणानुबंध अंतर्भूत झाले, यांच्यातील लढा होय हे उघड आहे. यात अर्जुन हा अज्ञानात चाचपडणाऱ्या, साशंक, डळमळणाऱ्या, प्रश्नशील, घटकाभर एका बाजूला व पुन्हा दुसऱ्या बाजूला झुकणाऱ्या, आत्मविश्वास नसलेल्या, सारखे प्रश्न करीत सुटलेल्या, त्या प्रश्नास उत्तर मिळेल तेव्हा ते उत्तरही न समजणाऱ्या व खरोखर उत्तम पक्ष कोणता याविषयी नित्य घोटाळ्यात पडलेल्या अशा मनाच्या ठिकाणी आहे.... हे असले मन हा अज्ञानी मनाचा एक नमुना आहे.... तो संशयात्मा आहे.... संशयाने पंगू बनला आहे.... अशा जीवाची नैसर्गिक उर्मींच्या व वासनांच्या समाधानाने तृप्ती होत नाही. वासनांच्या पूर्णतेने सुखाबरोबरच दुःखही ओढवून येते. त्यावेळी हे कळून चुकते की, तृप्त वासनांच्या पावलावर पाऊल टाकीतच मागोमाग निराशा व विफलता हीही येऊन पोहचतात आणि हे कळले म्हणजे हे असे का होते हे समजावे अशी उत्कंठा लागते. ही उत्कंठा लागली की, धडपड, झगडा, दुःख, शोक, शंका इत्यादि उद्भवून साधकाच्या मनात झुंज सुरू होते.

खरी गोष्ट अशी आहे की, हा क्षात्र वृत्तीच्या जीवाचा मार्ग आहे क्षात्रवृत्तीच्या जीवाने याच मार्गाने गेले पाहिजे. या युद्धात दोन्हीही बाजूला स्नेहीच ! कारण जेव्हा जीवाच्या कुरुक्षेत्रावर शेवटला विजय मिळवून देणारा, ज्ञान प्राप्त करून देणारा व परमात्म्याशी ऐक्य करून देणारा संग्राम जुंपतो तेव्हा पूर्वऋणानुबंधामुळे झालेले सर्व स्नेही कधीही एकाच पक्षाकडे असत नाहीत. स्नेहीच दोन्ही पक्षांकडे असतात व परस्परांशी लढत असतात.

अर्जुन जसा त्या दोन्ही फौजांच्या मधल्या शून्य अवकाशात एकटा उभा होता तसे त्या लढणाऱ्या जीवाला एकटे उभे राहवे लागते एकटा, पण एकटा नव्हेही;

कारण तो जगद्‌गुरू त्याच्या जवळच वाजूला असतो. तो दैवी सारथी तेथे असतो. आपल्याला जाणावे म्हणून तिष्ठत उभा असलेसा शुद्ध आत्मा तेथे असतो. पण या युद्धात जीवाने एकटेच घुसले पाहिजे. आपल्या बलिष्ठ बाहूंनी, आपल्या न चाचरणाऱ्या इच्छाशक्तीच्या बळावर आणि आपल्या न डगमगणाऱ्या धैर्याच्या सामर्थ्यावर जीवाने या लढाईची पुरती तड लागेपर्यंत ती लढलीच पाहिजे. अगदी एकटे एकटे वाटण्याची देखील जी काही परमावधी असेल तितके जीवाला एकटे एकटे वाटत असते पण असे एकटे एकटे वाटत असतानाच त्या निर्जन ठिकाणीच त्याने आत्मप्रतीती करून घ्यावयाची असते. तेथे त्या युद्धाच्या ऐन भरात जीव एकटाच असताना, सगळं त्याच्याविरुद्ध असतानाच आत्म्याच्या देदीप्यमान प्रकाश त्याच्या हृदयात फाकतो आणि मी खरोखरी एकटा नाही असे त्याला कळून येते."

वरील सर्व विवेचनावरून अर्जुन, क्षत्रिय व झुंज या शब्दांतील सर्व मर्म स्पष्ट होऊन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कळीने गिळणाऱ्या जीवाला संप्रदायप्राप्त सिद्धयोगाचे साधन प्राप्त व्हावे म्हणून दृष्टीसवेच विष फेडणाऱ्या श्रीहरीरूप गारुड्याकडून व कृपामृताचा वर्षाव करणाऱ्या श्रीगोपाळरूपी सजल महामेघाकडून अर्जुनाला अमृतासारखी सिद्धयोगाची दिव्यौषधी देवविली. त्यामुळे तो या झुंजीत यशस्वी झाला. अशी ही सिद्धयोगाची महती असल्याने दुसऱ्या अध्यायाच्या शेवटी या योगामुळे "हे ब्रह्मस्थिति निःसीम। जे अनुभवितां निष्काम। ते पावले परब्रह्म। अनायासें ॥२.३६८॥" असे सांगून झाल्यावर श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात—

**तो प्रसंगु असे नागरु। जो सकळ धर्मासी आगरु।**
**कीं विवेकामृतसागरु। प्रांतहीनु ॥२.३७४॥**

सिद्धयोग साधनेचा कथाभाग फारच मनोहर आहे; कारण तो सर्व धर्मांचे माहेर किंवा विवेकरूपी अमृताचा अमर्याद सागरच आहे. सिद्धयोग साधनेच्या कथाभागाला विवेकामृत सागराची उपमा किती औचित्यपूर्ण आहे, हे आपण चवथ्या प्रकरणातील "स्वसंवेद्य तत्त्वाची" चर्चा करताना 'स्वसंवेद्यतत्त्वप्रतीच्या प्रक्रियेतील विवेकाचे स्थान" स्पष्ट करताना पाहिलेच आहे. या सिद्धयोगाला "नागरु" हे औचित्यपूर्ण विशेषण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी लाविले आहे; कारण नागरु म्हणजे अत्यंत श्रेष्ठ, परिपूर्णतेचा, परिपूर्ण करणारा किंवा कृपेची शेवटची इच्छा असा आहे. सिद्धयोग हा स्वतः परिपूर्ण असून तो साधकालाही परिपूर्ण अवस्थेला नेणारा आहे; कारण ब्रह्म ही एकमात्र परिपूर्ण वस्तू असल्याने तिच्या प्राप्तीसाठी परिपूर्णच साधन हवे. सिद्धयोग हे असे साधन आहे म्हणून "तंत्रालोकात" अभिनवगुप्तांनी, "योगबीजात" महायोगी गोरक्षनाथांनी व "योगशिखोपनिषदात" ऋषींनी कथन केले आहे. या सिद्धयोगामुळेच साधकाची कृपेची म्हणजे शक्तिपाताची शेवटची इच्छा पूर्ण होते; कारण "शक्तिपाताची

दीक्षा हा अंतिम संस्कार आहे," असे "स्पंदशास्त्रात" व "कुलार्णवतंत्रात" म्हटले आहे.

सिद्धयोग हा सर्व धर्मांचे माहेर आहे असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे तेही अगदी अपूर्व असेच आहे. महायोगी गोरक्षनाथ लिखित "गुरुदत्तात्रेय व श्रीगोरक्षनाथ संवाद उर्फ ज्ञानदीप बोध" या ग्रंथात धर्म म्हणजे काय हे सांगताना श्रीगुरुदत्तात्रेय म्हणतात–

**धरम सोइ दरसण आदेसा ॥२८॥**

हे अवधूत गोरक्षनाथा ! ज्या गोष्टीच्या साहाय्याने आत्मदर्शनाचा निर्देश किंवा आदेश म्हणजे उपाय किंवा मार्ग प्राप्त होतो त्याला धर्म म्हणतात महर्षी याज्ञवल्क्यांनीही धर्माची व्याख्या करताना असेच म्हटले आहे की–

**अयं तु परमो धर्मो यद् योगेनात्मदर्शनम् ॥**

ज्या साधनाच्या द्वारे स्वस्वरूपाचे दर्शन होते त्याला धर्म म्हणतात. "सिद्ध-सिद्धांतपद्धतीमध्येही" महायोगी गोरक्षनाथांनी स्वधर्माची व्याख्या अशीच केली आहे. ते म्हणतात–

**तत्स्वधर्मइति प्रोक्तो योगमार्गे विशेषतः ॥५.२०॥**

ज्या योगाने, ज्या साधनाने किंवा ज्या मार्गाने मोक्षरूप परमशांतीची प्राप्ती होते, त्यालाच वास्तविक पाहता धर्म किंवा स्वधर्म समजावे.

वरील सर्व विवेचनावरून हे सिद्ध होते की, सिद्धयोग हा सर्व योगमार्गांचे माहेर, उत्पत्तिस्थान, कोठार, अधिष्ठान किंवा वास्तव्यस्थान आहे, असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे ते यथार्थ आहे.

तिसऱ्या अध्यायाच्या सुरुवातीला अर्जुन श्रीकृष्णांना म्हणतो की–

**तरी मातें केवीं श्रीहरी । म्हणसी पार्था संग्रामु करीं ।**

**इये लाजसी ना महाघोरीं । कर्मीं सुतां ॥३.३॥**

(आत्मस्वरूपाच्या ठिकाणी जर कर्म व कर्ता ही उरतच नाहीत असे हे श्रीअनंता तुझे निश्चित मत असेल;) तर मग हृषीकेशा ! पार्था तू युद्धच कर असे मला का सांगता. ह्या भयंकर कर्मात मला घालताना तुम्हाला लाज वाटत नाही काय ? अर्जुनाने असे म्हटले तरी शक्ती जागृत होऊन जडचेतनभेदप्रक्रिया घडून आल्याशिवाय त्याला आत्मस्वरूपाची प्राप्ती होणे शक्य नसल्याने श्रीकृष्णांनी अर्जुनाने झुंज केलीच पाहिजे म्हणजे साधन केलेच पाहिजे असा आग्रह धरला. त्या करिता ते म्हणाले–

**एकु कर्मयोगु जाण । जेथ साधकजन निपुण ।**

**होऊनियां निर्वाण । पावती वेळे ॥३.३७॥**

दुसऱ्या योगास अर्थात् सिद्धयोगास कर्मयोग म्हणतात. या योगामार्गाने जाणारे साधक त्या मार्गात निष्णात होऊन काही काळाने परमगतीला किंवा पूर्णावस्थेला

पोहोचतात. पहिला ज्ञानयोग हा सांख्ययोग म्हणजे विचारयोग आहे. जो साधक जडतारहित आहे त्याला सद्गुरूंनी तत्त्वमस्यादि महावाक्याचा उपदेश केल्याबरोबर "शक्तिपातेन संयुक्ता विद्या वेदांतवाक्यजा। यदा यस्य तदा तस्य विमुक्तिर्नात्र संशयः ।।४.३४.२६।।" या "सूतसंहितेतील" वचनाप्रमाणे म्हणजे वेदांत वाक्याने प्राप्त होणारी विद्या जेव्हा शक्तिपाताच्या संयोगाने प्राप्त होते तेव्हा साधक त्या क्षणाला मुक्त होतो, या न्यायाने, परमतत्त्वाची प्राप्ती होते. परंतु सामान्य साधकाला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेल्या उपरोक्त कर्ममार्गाच्या म्हणजे सिद्धयोग साधनाधारेच पुढे जावे लागते. सांख्ययोग व कर्मयोग ही दोन्ही नावे सिद्धयोगमार्गाचीच आहेत; फक्त त्यात तरतमभावाचा किंवा स्तरभिन्नतेचा फरक आहे. हा फरक पुढीलप्रमाणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केला आहे ते म्हणतात–

देखैं उत्प्लवनासरिसां। पक्षी फळासि झोंवें जैसा।
सांगैं नरू कैवीं तैसा। पावे वेगा ? ।।३ ४१।।
तो हळू हळू ढाळेंढाळें। केउतेनि एके वेळे।
तया मार्गाचेनि बळें। निश्चित ठाकी ।।४२।।
तैसें देख पां विहंगमातें। अधिष्ठूनि ज्ञानातें।
सांख्य सद्य मोक्षातें। आकळती ।।४३।।
येर योगिये कर्माधारें। विहितेंचि निजाचारें।
पूर्णता अवसरें। पावतें होती ।।४४।।

यावरून हे स्पष्ट होते की, मार्ग एकच आहे; परंतु त्यातील गती ही पक्षाची आहे की पिपीलिकेची आहे, एवढाच फरक किंवा प्रश्न आहे. जे साधक पूर्वजन्मीच साधन करून आलेले असतात त्यांना "एकु ज्ञानयोगु म्हणजे। जो सांख्यीं अनुष्ठिजे। जेथ ओळखीसवें पाविजें। तद्रूपता ।।३.३६।। " ही स्थिती सद्गुरुकृपेने तत्काळ येते. ज्ञानयोगी व कर्मयोगी या दोघांची गाठ मूलाधारातील सुषुम्नेच्या प्रसुप्त द्वारमार्गाला रोधून बसलेल्या कुंडलिनीशी पडतेच पडते. परंतु ज्ञानयोगमार्गी साधकाची प्रसुप्तावस्था व कर्मयोगमार्गी साधकाची प्रसुप्तावस्था यात भेद असल्याने अर्थात् स्तरभिन्नता म्हणजे अधिकारपात्रतेचा फरक असल्याने त्यांच्या गतीत भेद दिसतो इतकेच. "भारतीय संस्कृति और साधना," खंड दोन, या पुस्तकातील "श्रीगुरुचरणोंके प्रथम दर्शन" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी त्यांच्या गुरूंनी म्हणजे श्रीविशुद्धानंदसरस्वतींनी त्यांना शक्तिपातयोगाची दीक्षा देऊन जो उपदेश केला आहे,त्यात कर्माचा अर्थ क्रियाशक्ती असा केला असून,कर्म करणे म्हणजे साधन करणे, हे स्पष्ट केले आहे. ते म्हणतात, "यथाविधी कर्म करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कर्मच सर्वांचे मूळ आहे. त्यामुळे आपोआप विश्वास उत्पन्न होईल व ज्ञान, भक्ती, प्रेम या गोष्टी सहजच अभिव्यक्त होतील.... साधकाच्या जीवनात कर्मच

प्रधान आहे. पुस्तकाचे ज्ञान केवळ शुष्कज्ञान आहे. वास्तविक ज्ञान व वास्तविक भक्ती या महत्त्वपूर्ण वस्तू आहेत. त्यांचा विकास कर्मामुळे आपोआप होत राहतो. केवळ कृपेवर अवलंबून राहणे हे सुविवेकी साधकाचे कार्य नाही. कृपा अत्यंत पवित्र वस्तू आहे. ही कृपा त्या महाशक्तीपासून सतत टिपकत राहते. त्याच्याशिवाय जीवाच्या ऊर्ध्वगतीचा दुसरा कोणताही उपाय नाही; परंतु कर्माशिवाय साधक ती कृपा धारण करू शकत नाही. यासाठी कर्मच प्रधान आहे. कर्मानेच असाध्यसाधन होते. कर्म म्हणजे क्रियाशक्ती (कुंडलिनी) होय, हे नेहमी लक्षात ठेविले पाहिजे."

वरील सर्व विवेचनावरून श्रीज्ञानेश्वरमहाराज कर्मयोगु हा शब्द कोणत्या अर्थाने वापरतात ते स्पष्ट होईल. सिद्धयोगाचे साधन सांगणे हाच त्यांचा ज्ञानेश्वरी लिहिण्याचा हेतू असल्याने त्यांच्या शब्दाचे अर्थ त्या दृष्टीनेच घेणे आवश्यक आहे. एरवी कर्मयोगाचा अनेकांनी लावलेला अर्थ येथे घेतला; तर हा एक स्वतंत्र साधन-मार्ग त्यांनी सांगितला आहे असे होईल व गीतेत अनेक योगमार्ग सांगितले असून त्यातील एका मार्गाचे नाव कर्मयोग आहे असे होईल. परंतु कर्मयोग हा निराळा मार्ग नसून सिद्धयोगाचेच ते निराळे नाव आहे एवढेच. त्याचा गूढार्थ लक्षात घेतला की, सिद्धयोगसाधनेच्या दृष्टीने गुंफलेली ज्ञानेश्वरीची अध्यायसंगती अधिक स्पष्ट होते, हे लक्षात येईल. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनकथनाची ही दृष्टी राबविताना जे धोरण ठेविले आहे ते पुढील ओव्यातून स्पष्ट होते.

**अहो गूळासाखरे भालयाचे । हे बांधे तरी एकाचि रसाचे ।**
**परि स्वाद गोडियेचे । आनआन जैसें ।।१०.३३।।**
**एक जाणोनियां बोलती । एक ठायें ठावो जाणविती ।**
**एक जाणों जातां हारपती । जाणते गुणेंशीं ।।३४।।**

गूळ, साखर व राव किंवा ढेपा या जरी एकाच रसाच्या तयार झालेल्या असतात तरी त्यांच्या गोडीचा स्वाद निरनिराळा असतो. त्याप्रमाणे गीतेच्या सर्व अध्यायात जरी सिद्धयोगसाधनाचे वर्णन केले असले; तरी काही अध्यायात सिद्ध-योगाचे साध्य जे ब्रह्म त्याचे प्रतिपादन केले आहे, काही अध्यायात या साधनाच्या द्वारा प्राप्त होणारे ब्रह्माचे स्थान दर्शविले आहे व काही अध्यायात साधक ब्रह्म जाणण्यास गेला असता आपल्या जाणत्या गुणांसह ब्रह्मरूप कसा होतो याचे प्रति-पादन केले आहे.

तिसऱ्या अध्यायाच्या शेवटी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगसाधनाच्या एका अपूर्व रहस्याचे उद्‌घाटन पुढील ओवीने केले आहे. ते म्हणतात–

**ते गुरुशिष्याची गोठी । पर्दापिंडाची गांठी ।**
**तेथ स्थिर राहोनि नुठी । कवणे काळीं ।।३.२७२।।**

या सर्व ओवीचे विवेचन "ज्ञानेश्वरीतील नाथसंकेतीचा दंश" या चवथ्या प्रकरणातील "स्वसंवेद्य तत्त्वाचे" विवेचन करताना "स्वसंवेद्यतत्त्वप्राप्तीच्या

प्रक्रियेतील गुरूचे स्थान" या मुद्यात केले आहे. ते पाहिले म्हणजे सिद्धयोगसाधनेच्या अध्याय संगतीची साखळी तिसऱ्या अध्यायाच्या अखेरपर्यंत किती स्पष्टपणे आली आहे हे सिद्ध होईल.

चवथ्या अध्यायाच्या सुरुवातीला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाची, भगवान् श्रीकृष्ण-विवस्वान-मनू-इक्ष्वाकू अशी गीतेत सांगितलेली परंपरा सांगून, पुढे आणखीही काही राजर्षी हा सिद्धयोग जाणत होते; परंतु सध्या मात्र हा सिद्धयोग कोणी जाणत नाही, असे सांगितले आहे. या दृष्टीने श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतात--

**तोचि हा आजि आतां । तुजप्रती कुंतीसुता ।**
**सांगितला आम्हीं तत्त्वतां । भ्रांति न करीं ।।४.२७।।**
**हें जीवींचें निजगुज । परी केवीं राखों तुज ।**
**जे पढियेसि तूं मज । म्हणौनियां ।।४ २८।।**

येथे श्रीकृष्णांनी हा सिद्धयोग म्हणजे माझा जीव की प्राण इतकी गुह्य गोष्ट असून तू माझा आवडता भक्त असल्याने तुझ्यापासून लपवून न ठेवता तो तुला मी अगदी यथार्थपणे सांगितला आहे व यात शंका धरण्याचे काही कारण नाही, हे स्पष्ट केले आहे. "जऱ्ही संग्रामरूढ आहों । जाहलों आम्ही ।।४.३०।।" अशी बाहेरील युद्धाची गडबड चालू असतानाही ती क्षणभर बाजूला ठेवून "परी तुझें अज्ञानत्व हरावें । लागे आधीं ।।४.३१।।" असे म्हणून अर्जुनाच्या अंतरंगातील युद्धासाठी प्रथम ते सिद्ध झाले आहेत. अज्ञान हरण करण्यासाठी परंपरेने प्राप्त झालेला परंतु कालौघात नष्ट झालेला असा प्राचीन योग तुला मी सांगतो असे श्रीकृष्णांनी म्हटले आहे. गीतेतील चवथ्या अध्यायाच्या पहिल्या तीन श्लोकात भगवंतांनी व त्यांचा भावार्थ व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "योग" एवढाच शब्द वापरला आहे. अशा वेळी हा योग म्हणजे सिद्धयोगच होय हे कशावरून ? मुळात श्रीकृष्णांनाच घोर अंगिरस ऋषींकडून शक्तिपातयोगाची दीक्षा मिळाली होती. "छांदोग्य उपनिषदात" याचे वर्णन पुढीलप्रमाणे आले आहे.

**तद्धैतद्घोर अंगिरसः कृष्णाय देवकीपुत्रायोक्त्वोवाचापिपास**
**एव स बभूव ।।३.१७.६।।**

घोर अंगिरस ऋषींनी देवकीपुत्र श्रीकृष्णाला यज्ञदर्शनाचा अर्थात् आत्म-यज्ञाचा उपदेश करून म्हणजे दीक्षा देऊन कृतार्थ केले. या दीक्षेमुळे श्रीकृष्णाच्या मनातील इतर सर्व गोष्टींबद्दलची इच्छा किंवा तृष्णा नाहीशी झाली.

छांदोग्य उपनिषदातील उपरोक्त खंडात दीक्षेचे वर्णन चालू असताना श्रीकृष्णांच्या दीक्षेचे वर्णन आले आहे. सिद्धयोगाच्या दीक्षेशिवाय अशी अपिपासा किंवा वितृष्णा साधकाच्या मनात तत्काळ उत्पन्न होत नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी

सहाव्या अध्यात "विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे । मनाची घडी घडे । हृदयामाजीं ॥१८८॥" व "कल्पना निमे । प्रवृत्ती शमे । आंग मन विरमे । सावियाचि ॥२१२॥" यांमधून हे अगदी स्पष्टपणे व्यक्त केले आहे. शिवाय सिद्धयोग हा अंतर्यज्ञ आहे हे आपण कधीही विसरता कामा नये. "शिवपुराणाच्या उमासंहितेत" भगवान् श्रीकृष्णांच्या तपस्यंचे वर्णन करताना त्यांच्या दीक्षाप्राप्ती-बद्दल सांगताना असे म्हटले आहे. की—

**नवमे तु दिने प्राप्ते मुनिना स च दीक्षित: ॥३.१०॥**

ज्या योगाची दीक्षा परंपरेने श्रीकृष्णांना प्राप्त झाली तीच त्यांनी पुढे विवस्वानाला दिली यात शंका असण्याचे कारण नाही. श्रीज्ञानेश्वरमहाराजांना तर आदिगुरू शंकारांपासूनच शिष्यपरंपरेने आलेले समाधिधन सिद्धयोगामुळे प्राप्त झाले होते. त्यामुळे त्यांनीही योग हा शब्द सिद्धयोग या अर्थीच वापरला आहे हे उघड आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी गीताभाष्यात "रहस्यं हि यस्मादेतदुत्तमं योगो ज्ञानमित्यर्थ: ॥ गी. भा. ४.३॥" असे म्हणून योग म्हणजे ज्ञान हे उत्तम रहस्य आहे, असा योगाचा अर्थ लिहिला आहे. याचा सर्व उलगडा "ज्ञानेश्वरीतील नाथ-संकेतीचा दंश" या चवथ्या प्रकरणातील 'दानप्रक्रियेचे अलौकिकत्व" या पाचव्या मुद्यात केला आहे. त्यामुळे योगाचा ज्ञान हा अर्थ विरोध उत्पन्न करीत नाही.

अशा या सिद्धयोगाचे अपूर्व वैशिष्टच सांगताना चवथ्या अध्यायाच्या शेवटी श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**तैसें कथेचें इये ऐकणें । एक श्रवणासी होय पारणें ।**
**आणि संसारदु:ख मूळवणें । विकृतीविणें ॥४.२२१॥**
**जरी मंत्रेंचि वैरी मरे । यरी वायां कां बांधावीं कटारें ?।**
**रोग जाय दूधसाखरें । तरी निंब कां पियावा ?॥२२२॥**
**तैसा मनाचा मारु न करितां । आणि इद्रियां दु:ख न देतां ।**
**एथ मोक्षु असे आयता । श्रवणाचिमाजि ॥२२३॥**

सिद्धयोगाची ही कथा ऐकली की, कानांचे पारणे फिटेल व संसारदु:ख काही एक कष्ट न होता आपोआपच समूळ नाहीसे होईल. जर मंत्रानेच शत्रू मरू शकेल तर मग कंवरेला व्यर्थ कटचार का बांधून ठेवावी ? त्याचप्रमाणे दूधसाखरेनेच जर रोग समूळ जात असेल तर कडुनिंबाचा रस पिण्याचे काय कारण ? त्याप्रमाणे मनाला न मारता व इंद्रियांना दु:ख न देता केवळ या गीताशास्त्र श्रवणाने आयताच मोक्ष प्राप्त होतो.

या ओव्यांमधून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाचे स्वरूप स्पष्ट केले आहे. सिद्धयोग हा आपोआप सर्व विकार व संसारदु:खाचे मूळ कारण शोक-मोह नाहीसे करणारा आहे; कारण तो मंत्र व दूधसाखरेसारखा आहे. सहज आहे. इतर

साधनाप्रमाणे त्यात हट्टाने मनाला दडपण्याचे किंवा इंद्रियांना कोंडून दुःख देण्याचे कारण पडत नाही. या सिद्धयोगात सहजासहजी सर्व साधन पूर्ण होऊन साधक मोक्षाचा अधिकारी कसा होतो, हे आपण डॉ. मोहनसिंग यांनी "Gorakhanath and Medieval Hindu Mysticism" या पुस्तकात गोरक्षमताचे जे सार दिले आहे, ते "ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या विविध नावांचे रहस्य" या पाचव्या प्रकरणात "सहजयोग" या नावाचे विवेचन करताना पष्ठ ३३३ वर पाहिलेच आहे. हे विवेचन या संदर्भात लक्षात घेतले म्हणजे सिद्धयोगाच्या दृष्टीने ज्ञानेश्वरीची अध्यायसंगती कशी लागते हे अधिक स्पष्ट होईल.

पाचव्या अध्यायाच्या सुरुवातीला अर्जुनाने श्रीकृष्णांना असे विचारले की, "ज्ञानयोग किंवा कर्मयोग या दोन मार्गांपैकी उत्तम मार्ग कोणता हे मला सांगा ?" या प्रश्नाचे उत्तर देताना श्रीकृष्ण असे म्हणाले की–

**आणि सांख्यीं जें पाविजे । तेंचि योगीं गमिजे ।**
**म्हणौनि ऐक्य दोहींतें सहजें । इयापरी ॥४.२१॥**

ज्ञानयोग व कर्मयोग या दोन्हींमुळे मोक्षच प्राप्त होत असल्यामुळे या दोन्ही मार्गांमध्ये सहजच ऐक्य आहे; कारण सम्यक् अनुभवामुळे ज्यांनी संपूर्ण तत्त्व जाणलेले आहे, ते हे दोन्ही योग एकच आहेत असे मानतात. परंतु सांख्य हा "मी ब्रह्म आहे" या तैलधारवत् अखंड मननचिंतनाने प्राणशक्ती जागृत करून स्वस्वरूपाशी प्राणाचे ऐक्य घडविणारा व कर्मयोग हा गुरुकृपेने प्राणशक्ती जागृत करून स्वस्वरूपाशी मनाचे ऐक्य घडविणारा योग आहे. 'मनो यत्र विलीयेत पवनस्तत्र लीयते । पवनो लीयते यत्र मनस्तत्र विलीयते ॥४.२३॥" या 'हठयोगप्रदीपिकेत' सांगितलेल्या न्यायाने मन व प्राण या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. जेथे मनाचा लय होतो तेथे प्राणाचा व जेथे प्राणाचा लय होतो तेथे मनाचा लय होतो, असा शास्त्रकारांचा निर्णय आहे. मात्र मनोलयाच्या मार्गाने म्हणजे सांख्ययोगरूप ज्ञानमार्गाने प्राणलय करणे अवघड असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कर्मयोगरूप सिद्धयोगमार्गच सुलभ आहे म्हणून त्याचे प्रतिपादन करताना असे म्हटले आहे की–

**तरी जाणां नेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा ।**
**जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणी ॥५.१६॥**
**तैसें सारसार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे ।**
**येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥१७॥**

ज्याप्रमाणे नावेत बसून स्त्रियांना व मुलाबाळांना नदी सहज सुलभतेने तरून जाता येते त्याप्रमाणे जाणत्या व नेणत्या अशा सर्वांना हा क्रियाशक्तीचा योग म्हणजे सिद्धयोग हा संसारसमुद्र तरून जाण्याला, अनुष्ठान करण्याला व साध्य प्राप्त करण्यास सहज, सरळ व सुलभ आहे. योग्यायोग्याचा व सारासाराचा विचार

केला तर हा सिद्धयोगच सोपा दिसतो. याचे आचरण केले असता अनायासाने कर्मसंन्यासाचे फळ प्राप्त होते.

येथे एक गोष्ट निश्चित लक्षात घेतली पाहिजे की, दिशा, काल, अवस्था, कर्म किंवा अन्य कोणत्याही सापेक्ष गोष्टींची निरपेक्ष स्थिती म्हणजे संन्यास हा फक्त सुषुम्नेत प्राण गेल्यावरच प्राप्त होत असतो. एरवी खरा संन्यास घडत नाही; कारण जोपर्यंत मन आहे तोपर्यंत संन्यास नाही व त्याचे फळही नाही. ही स्थिती प्राणशक्तीची सुषुम्नेद्वारा सहस्रारात शिवाशी एकरूपता झाल्यावरच येत असल्याने व सिद्धयोगाने ही गोष्ट सुलभ असल्याने या मार्गाने कर्मसंन्यासाचे फळ प्राप्त होते' असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. अशी या योगाची ही महती असल्याने पाचव्या अध्यायाच्या शेवटी अर्जुनाच्या मुखात पुढील ओव्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी घातल्या आहेत. ते असे म्हणतात की–

**एऱ्हवीं तरी अव्रधारा। जो दाविला तुम्हीं अनुसारा।**
**तो पव्हण्याहूनि पायउतारा। सोहपा जैसा ॥५.१६५॥**
**तैसा सांख्याहूनि प्रांजळा। आम्हासारिखियां अभोळां।**
**एथ आहाति परि कांहीं काळा। तो साहों ये वर ॥१६६॥**

सहज पाहिले तर हे प्रभो ! तुम्ही जो मार्ग सांगितला, तो खोल पाण्यातून पोहून जाण्यापेक्षा पायउताराने जाणे जसे सोपे असते, तसा आहे. त्याचप्रमाणे ज्ञानयोगापेक्षा सिद्धयोगाचा हा मार्ग आमच्यासारख्या अधिकार दुर्बळांना, अशक्तांना किंवा जड लोकांना सुगम आहे. या मार्गाने जाताना साध्यप्राप्तीस काही विलंब लागेल; परंतु तो विलंब सहन करता येईल.

इतकी स्तुती करून ज्यावेळी अर्जुनाने श्रीकृष्णांना हा सिद्धयोगमार्ग सार्वंत सांगण्याची प्रार्थना केली त्यावेळी श्रीकृष्णही मोठ्या आनंदाने म्हणाले, "हे अर्जुना ! ज्या ज्या रीतीने तुझे समाधान होईल, तुझ्या चित्ताला बोध होईल व मनाला पटेल त्या त्या प्रकाराने मोठ्या कौतुकाने मी तुला हा योगमार्ग सांगेन." श्रीकृष्णांच्या या वचनावरून हे स्पष्ट होते की, पुढेही त्यांनी नानाप्रकाराने अर्जुनाला सिद्धयोग कथन केला आहे.

सहाव्या अध्यायाच्या सुरुवातीला "सहजें ब्रह्मरसाचें पारणें। केलें अर्जुनालागीं नारायणें ॥ ६.२ ॥" असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी शिवशक्तियुक्त सिद्धयोग कथन केला आहे. ब्रह्म म्हणजे आत्मा व रस म्हणजे शक्ती होय. या दोहोंच्या मीलनाचा सोहळा या अध्यायात असल्याने ते असे म्हणतात की–

**तैसें गीतार्थाचें सार। जे विवेकसिंधूचें पार।**
**नाना योगविभवभांडार। उघडलें कां ॥६.११॥**

शक्ती जागृत झाली की, तिचा सुषुम्नेतून प्रवास सुरू होतो. यामुळेच योगाच्या वैभवाची साधकावर उधळण होते. साधकाला हे वैभव प्राप्त होऊन तो कुंडलिनी शक्तीच्या जागृतीने चैतन्यचक्रवर्ती व्हावा यासाठी " अर्जुना हा अवधारीं । पंथराजु ॥ ६.१५२ ॥ " असे म्हणून पंथराज म्हणजे सिद्धयोग सर्व प्रक्रियांसह श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या अध्यायात कथन केला आहे. हाच " नाथसंकेतीचा दंशु " होय. हे साधन करून साधकाने आपल्याला येऊन मिळावे म्हणून " आम्हीं साधन हें जें सांगितलें। तेंचि शरीरीं जिहीं केलें। ते आमुचेनि पाडें आले । निर्वाळलेया ॥ ६ ३२६ ॥ " व " इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती ॥ ६.३३० ॥ " असा उपदेश व दिलासा त्यांनी दिला आहे. शेवटी सिद्धयोगासंबंधीचे माझे बोलणे किती महत्त्वाचे आहे, हे सांगताना व या मार्गाचे माहात्म्य कथन करताना ते असे म्हणतात की--

हे स्वहितातें निववितो । परिणामातें जीववितो ।
सुखाचि वाहविती । लाखोली जीवां ॥६.४९६॥

सातव्या अध्यायाच्या सुरुवातीला सिद्धयोग साधनाचा महिमा जाणणारे फारच विरळ असतात, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की--

पैं गा मनुष्यांचिया सहस्रशां--। माजीं विपाइले याचि धिंवसा ।
तैसें या धिंवसेकरां बहुवसां । माजीं विरळा जाणे ॥७.१०॥

सामान्य माणसे वरवरच पाहतात; त्यामुळे या सिद्धयोग साधनाचा अधिकारी फार विरळा सापडतो. हजारो मनुष्यात एखाद्यालाच या सिद्धयोगसाधनाची इच्छा होते आणि तशी इच्छा होऊन हे साधन घेणारे जे आहेत त्यातील एखादाच साधक स्वस्वरूपास यथार्थपणे जाणतो. साधनाची महती जाणून साध्य जाणणारा विरळा व क्वचित्च सापडतो. " स्पंदशास्त्रातही " भट्टकल्लटाने " रहस्यस्तोत्राचा " आधार देऊन असे म्हटले आहे की, " ज्यांनी आपल्या आत्मसंवितेत सूर्यचंद्राला अर्थात् ज्ञानक्रियेला विलीन केले आहे, जे व्योममार्गाचे उल्लंघन करून पलीकडे गेले आहेत व ज्यांनी आपल्या दृष्टीत भावनेचे अंजन घातले आहे अशा मोठमोठ्या आकाशगमन करणाऱ्या सिद्धपुरुषातील काही काही जणांनाच आपल्या स्वरूपाचे दर्शन होते." सिद्धयोग हा सद्गुरुकृपेने प्राप्त होणारा मार्ग आहे असे " जयां सद्‌गुरुतारूं फुडें । जे अनुभवाचे कांसे गाढे । जयां आत्मनिवेदन तरांडें । आकळलें ॥७.९८॥" या ओवीतून सूचित करून शेवटी शब्ददीक्षेने अनिर्वचनीय स्थिती साधकाला एका क्षणात कशी प्राप्त होते हे सांगताना असे म्हटले आहे की --

कानाचेनि गवाक्षद्वारें । बोलाचे रश्मी अभ्यंतरें ।
पाहेना तंव चमत्कारें । अवधान ठकलें ॥७.२००॥

सद्‌गुरूंच्या शब्दांचे किरण शिष्याच्या कानांच्या झरोक्यातून त्याच्या अंतःकरणात प्रविष्ट होताक्षणीच शक्तिपाताची प्रक्रिया घडून येऊन त्याला अनिर्वचनीय

आत्मस्थिती प्राप्त होते व त्याचे भान हरपून जाते. सिद्धयोगाचा हा अपूर्व महिमा देशीभाषेतून प्रकट झाला असला; तरी त्या शब्दातही उपरोक्त शक्तिपाताचे सामर्थ्य अंतर्निहित आहे, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहे.

**तैसें देशियेचिया हवावा । इंद्रियें करिती राणिवा ।**
**मग प्रमेयाचिया गांवा । लेसां जाईजे ॥७·२०९॥**

या मराठी भाषेतील शब्दांचे अर्थात् शक्तीचे सामर्थ्यच असे आहे की, त्यांच्यामुळे इंद्रिये सुखाने राज्य करतील व मग साधकाला सिद्धांताच्या गावाला सहस्रारात त्वरित चांगल्या तयारीने जाता येईल.

आठव्या अध्यायाच्या सुरुवातीला अर्जुनाने श्रीकृष्णांना ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव आणि अधियज्ञ म्हणजे काय ? व मरणाच्या वेळी तू शांतचित्त पुरुषांकडून कसा जाणला जातोस ? असे विचारल्यावर, या सर्वांची उत्तरे श्रीसद्गुरु-कृपेतच समाविष्ट झालेली असल्याने, श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की -

**श्रीगुरु । कोपोनी ज्यासी मारी । तो पावे परब्रह्मसाक्षात्कारीं ।**
**मा कृपेनें उपदेशु करी । तो कैशापरी न पवेल? ॥८.९॥**
**जैं कृष्णचि होईजे आपण । तैं कृष्ण होय आपुलें अंतःकरण ।**
**मग संकल्पाचें आंगण । वोळगती सिद्धी ॥१०॥**

सिद्धयोग हा कृपेचा मार्ग आहे, या रहस्याचे येथे उद्घाटन झाले आहे. श्रीकृष्ण हे अर्जुनाचे सद्गुरू आहेत. सद्गुरूंचा कोप झाला तरी शिष्य कृतार्थ होतो; मग कृपा म्हणजे शक्तिपात झाल्यावर तो ब्रह्मसाक्षात्कारी होतोच होतो. अशी दीक्षा झाली की, आपण सद्गुरुरूप आहोत असा शिष्याचा निश्चय होतो व त्याचे अंतःकरणही सद्गुरुरूप होऊन जाते. अशा वेळी शिष्याच्या संकल्पाच्या अंगणात अष्टमहासिद्धी राबतात. मग उपरोक्त प्रश्न शिल्लकच राहत नाही. श्रीज्ञानेश्वर-महाराजांच्या दृष्टीने एकमात्र मातेसदृश सद्गुरुकृपाच सर्वांचे अधिष्ठान आहे व सर्व प्रश्नांचे उत्तर तेच आहे. या दृष्टीने ते असे म्हणतात की—

**जें अपत्य थानीहुनि निगे । तयाची भूक ते मायेसीचि लागे ।**
**एऱ्हवीं तें शब्दें काय सांगे । मग स्तन्य दे येरी? ॥८·१३॥**
**म्हणौनि कृपाळुवा गुरूचिया ठायीं । हें नवल नोहे कांहीं ॥१४॥**

आईसारखे असणारे हे प्रेम, ही कृपा फक्त सद्गुरूच जाणत असल्याने पुढेही ते असे म्हणतात की—

**देखा बालकाचिया धणि धाइजे । कां शिष्याचेनि जाहलेपणें होइजे ।**
**हें सद्गुरूचि एकलेनि जाणिजे । कां प्रसवतिया ॥८·५५॥**

तान्ह्या मुलाला दूध पाजून त्याच्या तृप्तीने आई जशी तृप्त होते त्याप्रमाणे सद्गुरू शिष्याला दीक्षा देऊन त्याला स्वसाम्यत्व प्रदान करतात किंवा "आपणा-

सारिखे करिती तात्काळ " याप्रमाणे कृतार्थ करतात. ही अनुभूतीची गोष्ट आहे. ती दूध पाजणारी आई व दीक्षा देणारा सद्गुरू यांच्याशिवाय तिसऱ्याला कशी कळणार? "दीक्षैव मोचयत्यूर्ध्वं शैवं धाम नयत्यपि।" म्हणजे दीक्षाच साधकाला शिवधामाकडे नेऊन मुक्त करते हे इतरांना कळावे कसे? असे हे सिद्धयोगदीक्षेचे सामर्थ्य असल्याने आठव्या अध्यायाच्या शेवटी श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

येणें बोधें जो योगी होये। तयासीचि या बोधाचें नीटपण आहे।
कां जे भोगातें पेलूनि पायें। निजरूपा ये ॥८ २५९॥

या बोधामुळे म्हणजे दीक्षेमुळेच साधक योगी होतो. जो साधक या सिद्धयोगाची दीक्षा घेतो त्यालाच त्याची फलप्राप्ती होते. या दीक्षेमळेच साधक विषयोपभोगाला ओलांडून निज म्हणजे ब्रह्म व रूप शक्ती असलेल्या शिवशक्तिरूप आत्मरूपाशी मिळून जातो. " कुलार्णवतंत्रातही " हे सांगताना अगदी असेच म्हटले आहे की–

विना दीक्षां न फलं स्यात्तदुक्तं शिवशासने।
सा च न स्याद्विनाचार्यमित्याचार्यपुरःसरम् ॥१४.३॥
देवि दीक्षाविहीनस्य न सिद्धिर्न च सद्गतिः।
तस्मात् सर्वप्रयत्नेन गुरुणा दीक्षितो भवेत् ॥९७॥

ज्या साधकाला आपले ज्ञान, ध्यान योग, जप, तप, भक्ती कर्म, धर्म इत्यादि सर्व फलित होऊन मोक्षप्राप्ती व्हावी असे वाटत असेल त्याने दीक्षा घेतलीच पाहिजे; कारण दीक्षेवाचून फलप्राप्ती होत नाही, असा शिवाने सांगितलेल्या सिद्धमार्गाचा सिद्धांत आहे गुरुवाचून दीक्षा नाही अशी योगमार्ग परंपरा आहे, म्हणून आपले कल्याण व्हावे असे वाटत असलेल्या साधकाने सद्गुरूंकडून शक्तिपातयोगदीक्षा घेतलीच पाहिजे. दीक्षाविहीन माणसाचे कोणतेही धर्म–कर्म सिद्धीस जात नाही. त्याला सद्गती व मोक्षही मिळत नाही. यासाठी महत्प्रयासाने सद्गुरूंकडून साधकाने दीक्षा मिळविली पाहिजे.

नवव्या अध्यायाच्या सुरुवातीलाच सिद्धयोगाच्या दीक्षेचा महिमा व गुरुतत्त्वाचे निरूपण मी प्रतिज्ञापूर्वक करणार आहे असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी लगेच पुढे असे सांगितले आहे की–

कां जैं दिठिवा तुमचा वरुषे। तैं सकळार्थ सिद्धि मती पिके।
एऱ्हवीं कोंभेला उन्मेषु सुके। जरी उदास तुम्ही ॥९.२५॥

जेव्हा साधकावर सद्गुरुकृपेचा वर्षाव होतो तेव्हाच साधकाची आत्मशक्ती कुंडलिनी जागृत होऊन ती त्याच्या बुद्धीत सर्व शास्त्रे प्रगट करते; परंतु जोपर्यंत अशी कृपा – शक्तिपात– होत नाही तोपर्यंत हे घडून येत नाही. सद्गुरूंच्या या

कृपावर्षावाशिवाय साधकाच्या ठिकाणी अंकुर दशेत मुळातच असलेले ज्ञान वाढीस लागत नाही; उलट सुकून जाते. या अर्थानेच सदगुरुकृपेचा अगाध महिमा " अनधीतस्य शास्त्रस्य स्वत एव प्रकाशनम् । सूतसहिता–ब्रह्मगीता–अ.४.११८ ।। " व " वेदशास्त्रपुराणानां स्वयं कर्ता भविष्यती ।। योगशिखोपनिषद ३.११ ।।" या रीतीने शास्त्रकारांनी स्पष्ट केला आहे. शक्ती जागृत झाली की, अनधीत शास्त्रे साधकाच्या मुखातून निघतात व तो वेदशास्त्रपुराणांचाही कर्ता होतो. "शिवपुराणातील वायवीय संहितेतही " असे म्हटले आहे की–

**सर्ववेदमयी देवी सर्वमंत्रस्वरूपिणी ।**
**सर्वमंत्रात्मिका विद्या वेदविद्याप्रकाशिनी ।।२९.७।।**
**सैव कुंडलिनी माया शुद्धाध्वपरमासती ।।८।।**

कुंडलिनी शक्ती ही अशी असल्यामुळे ती जागृत झाली की, सर्व वेदविद्या व मंत्र प्रकट करते. यामुळे " योगशिखोपनिषदात " तिला "एषा सरस्वती देवी सर्वभूतगुहाश्रया ।।३.८।।" असे म्हटले आहे. सद्‌गुरूंच्या दिठिवेच्या वर्षावाने ही जागृत होते व साधक सकळार्थाला म्हणजे शिवशक्तिरूप सिद्धतत्त्वाला पोहोचतो. अशी ही सिद्धयोगाची अपूर्वता असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गूढ व दंश अर्थात् रहस्य म्हणून त्याची स्तुती केली आहे. या दृष्टीने ते असे म्हणतात की–

**हें सर्वस्व आमुचें गूढ । परि दाविलें तुज उघड ।**
**आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ।।९.१३५।।**
**हा दंशु जंव नये हातां । तंव माझें साचोकारपण पार्था ।**
**न संपडे गा सर्वथा । जेंवि तुषीं कणु ।।१३६।।**

श्रीकृष्ण अर्जुनाला हे गूढ रहस्य सांगत असताना संजय ते ऐकत होता व धृतराष्ट्राला सांगत होता; पण भगवंताच्या मुखातून निघणाऱ्या सिद्धयोग साधनामृताच्या वर्षावात तो न्हाऊन गेल्याने त्यांच्या ठिकाणी अष्टसात्त्विकभावांचा उद्रेक झाला. त्याचे चित्त चाकाटले. वाचा पांगुळली. सर्वांगावर रोमांच आले डोळे अर्धोन्मिलित होऊन आनदाश्रू पाझरू लागले. अंगास कंप सुटला व सर्वांग घामाने डवडवून गेले. असे सांगून शेवटी श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात की, " ऐसा महासुखाचेनि अतिरसें । जेथ आटणी हों पाहे जीवदशे । तेथ निरोपिलें व्यासें । तें नेदीच हों ।।९.५३०।।" अशी संजयाची स्थिती झाली. जागृत शक्तीमुळे जीवदशेची आटणी होऊन त्याला महासुख प्राप्त झाले. सिद्धयोगाच्या अप्रत्यक्ष उपदेशाने संजयही कृतार्थ झाला, ही या मार्गाची अपूर्वता वरीलप्रमाणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी व्यक्त केली आहे.

दहाव्या अध्यायाच्या सुरुवातीला सिद्धयोगातील दृक्‌दीक्षा व स्पर्शदीक्षा यांच्यामुळे जीव शिव होतो, असे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात की–

**हें असो दिठी जयावरी झळके । कीं हा पद्मकरु माथां पारुखे ।**
**तो जीवचि परि तुके । महेशेंसीं ॥१०.९॥**

ज्यावेळी सद्गुरूंची कृपादृष्टी शिष्यावर पडते किंवा ते आपला वरदहस्त ज्याच्या डोक्यावर ठेवतात त्यावेळी तो जीवरूपाने संकुचित झालेला शिव पुन्हा आपल्या स्वस्वरूपास म्हणजे शिवस्वरूपास प्राप्त होतो. जो अशा प्रकारे शिष्याला दीक्षा देतो तोच खरा सद्गुरू होय, हे सांगताना "योगवासिष्ठाच्या निर्वाण प्रकरणाच्या पूर्वार्धात" असे म्हटले आहे की–

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके ।**
**जनयेद्यः समावेशं शांभवं स हि देशिकः ॥१२८.६१॥**

जे दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व कृपेने दीक्षा देऊन शिष्याच्या देहामध्ये शिव-भावाची मंगलमय अनुभूती करू शकतात त्यांनाच सद्गुरू म्हणतात.

शास्त्रकारांनी पद्मकराचे सामर्थ्य वर्णन करताना असे म्हटले आहे की–

**ब्रह्मप्रपंचसंयुक्ता शिवेनाधिष्ठितः शिवः ।**
**पाशच्छेदकरः क्षेमी शिवहस्तः प्रकीर्तितः ॥**

असे हे पद्महस्ताच्या स्पर्शाचे सामर्थ्य आहे. शब्दाचे सामर्थ्यही असेच आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे सामर्थ्य वर्णन करताना असे म्हटले आहे की–

**तरी ऐकें गा सुवर्म । वाक्य माझें परम ।**
**जें अक्षरें लेऊनी परब्रह्म । तुज खेंवासि आलें ॥१०.६२॥**

सिद्धयोगाचे हे सामर्थ्य पुढील ओवीतूनही या अध्यायात व्यक्त झाले आहे.

**म्हणौनि निःशंकें येणें महायोगें । मज मीनला मनाचेनि आंगें ।**
**एथ संशय करणें न लगे । तो त्रिशुद्धी जाहला ॥१०.१०८॥**

अशा प्रकारे अर्जुन या महायोगाच्याद्वारा ब्रह्मात्मैक्यरूप झाला. तो सद्गुरु-रूपी श्रीकृष्णांशी मिसळून गेला. श्रीकृष्णांनी अर्जुनाला आलिंगन दिले; तेव्हा तर तो म्हणाला "परी देखतसें विश्व आघवें । तुवां भरिलें ॥ १०.३२७ ॥" अशी माझी पक्की समजूत आहे; परंतु एवढ्याने त्याचे समाधान झाले नाही, म्हणून त्याला असे वाटू लागले की–

**म्हणे हेचि हृदया आंतुली प्रतीती । बाहेरी अवतरो कां डोळचांप्रती ।**
**इये आर्तीचिया पाउलीं मती । उठतो जाहली ॥१०.३३१॥**

आपल्याला सर्व जग सद्गुरुरूप, श्रीकृष्णरूप किंवा ईश्वररूप आहे असा जो अंतःकरणात अनुभव आला आहे तो आपल्या डोळ्यांसमोर प्रकट व्हावा. अर्जुनाची ही इच्छा योग्यच होती. वैचारिक अनुभवाची प्रतीती प्रत्यक्षानुभूतीत व्हावी असेच साधकाला वाटत असते. त्यामुळे त्याने पुढील अध्यायात श्रीकृष्णांकडे विश्वरूप पाहण्याची इच्छा प्रकट केली व श्रीकृष्णांनी दिव्यचक्षू देऊन म्हणजे शक्तिपाताने शक्ती जागृती करून त्याची ही इच्छा पूर्ण केली.

अकराव्या अध्यायाच्या सुरुवातीला सिद्धयोगसाधनातील एका अपूर्व रहस्याचे उद्‌घाटन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओवीने केले आहे. ते म्हणतात–

**जेथ शांताचिया घरा। अद्‌भुत आला आहे पाहुणेरा।**
**आणि येरांही रसां पांतिकरां। जाहला मानु ॥११·२॥**

या ठिकाणी शांतरसाच्या घरी अद्‌भुतरस हा पाहुणा म्हणून आलेला आहे आणि इतर रसांनाही या दोन रसांच्या पंक्तीचा लाभ मिळाला आहे.

या ओवीतून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोगाच्या साधनातील एक अत्यंत गूढतम रहस्याचे उद्‌घाटन केले आहे. मुळात " रसौ वै स । रसं ह्येवायं लब्ध्वानंदी भवति ॥ २.७.१ ॥" असे "तैत्तिरीय उपनिषदात" म्हटले आहे. तो परमात्मा रस म्हणजे शक्तीच आहे. ज्यावेळी हा रस जीवाला मिळतो त्यावेळी तो परमात्मस्वरूप होऊन आनंदी होतो. परमात्म्याची निगूढतम अव्यक्त स्थिती परम साम्यरूप आहे, असे योगी म्हणतात. ही अवस्था ब्रह्मरूप आहे असे ज्ञानी मानतात आणि वरील वचनाप्रमाणे तो रसरूप आहे असे रसिक मानतात. खरे तर सच्चिदानंदाची स्वरूपस्थिती व स्वरूपलीला दोन्ही एकच आहे. ज्यावेळी शक्तिपाताने शक्ती जागृत होते त्यावेळी रौद्र, अद्‌भुत, शृंगार, हास्य, वीर, दया, भयानक, बीभत्स व शांत हे नऊही रस साधकाच्या शरीरात साधन कालात निरनिराळ्या क्रियांच्या रूपाने प्रकट होत असतात. हा सिद्धयोग साधनाचा खरा गौरव आहे व हे गूढ रहस्य आहे म्हणून याला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी फक्त नमस्कार केला आहे. या दृष्टीने ते असे म्हणतात की–

**तेथिंचे गौरव कैसें वानावें। जें श्रीशंभूचियें मती नागवे।**
**तें आंता नमस्कारिजे जीवेंभावें। हेंचि भलें ॥११·२७॥**

अशा या सिद्धयोगाच्या दीक्षेच्या सामर्थ्याने श्रीकृष्णांनी अर्जुनाला दिव्यचक्षू देऊन म्हणजे शक्तिपाताने शक्ती जागृत करून आपले ऐश्वर्य कसे दाखविले हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**ऐसी श्रीमुखौनि अक्षरें। निघतां ना जंव एकसरें।**
**तंव अविद्येचे आंधारें। जावोंचि लागे ॥११·१७७॥**
**तीं अक्षरें नव्हती देखा। ब्रह्मसाम्राज्यदीपिका।**
**अर्जुनालागीं चित्कळिका। उजळलिया श्रीकृष्णें ॥१७८॥**
**मग दिव्यचक्षुप्रकाशु प्रगटला। तया ज्ञानदृष्टी फाटा फुटला।**
**ययापरी दाविता जाहला। ऐश्वर्य आपुलें ॥१७९॥**

सिद्धयोगातील शब्ददीक्षेचे हे सामर्थ्य अपूर्व आहे. शब्ददीक्षेने अर्जुनाचा अविद्यामल गेला, चित्कळिका उजळून त्याच्या ठिकाणी दिव्यचक्षू प्रकट झाला व त्याला ज्ञानदृष्टी प्राप्त होऊन तो परमात्म्याचे खरे ऐश्वर्य पाहू शकला. ज्यांना

सदगुरूंकडून अशी दीक्षा मिळते त्यांनाही असेच होते. संत विसोबा खेचरांकडून दीक्षा मिळाल्यावर आपल्यालाही असेच झाले म्हणून नामदेवांनी " डोळियांचे डोळे उघडिले जेणे । " असे म्हणून याचे वर्णन केले आहे.

या अध्यायाच्या शेवटी सिद्धयोगाचे साध्य जे समरसीकरण ते साक्षात्काराने प्राप्त होते असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुढील ओव्यांनी स्पष्ट केले आहे. ते असे म्हणतात की–

तैसें माझिये साक्षात्कारीं । सरे अहंकाराचो वारी ।
अहंकारलोपीं अवधारीं । द्वैत जाय ॥११.६९४॥
मग मी तो हें आघवें । एक मीचि आथी स्वभावें ।
किंबहुना साम्रावे । समरसें तो ॥६९५॥

समरसीकरण हा सिद्धयोगाचा म्हणजे नाथसंप्रदायाचा विशेष असून ते सिद्धयोगाचे फलित किंवा साध्य आहे.

बाराव्या अध्यायाच्या सुरुवातीलाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीगुरुकृपादृष्टीचा अगाध महिमा वर्णन केला आहे. ते असे म्हणतात की–

जय जय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनवरत आनंदें । वर्षतिये ॥१२.१॥
विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताठी ।
ते तुझिये गुरुकृपादृष्टी । निर्विष होय ॥२॥

विषयरूप सर्पांनी जीवाला मिठी मारल्यावर व दंश केल्यावर त्याला जी मूर्च्छा येते ती इतकी जबरदस्त असते की, इतर कोणत्याही उपायांनी ती कमी केल्या जात नाही; परंतु गुरुकृपादृष्टीच्या म्हणजे दृग्दीक्षेच्या योगाने होणाऱ्या सिद्धयोगांतर्गत शक्तिपाताचा महिमा इतका अगाध आहे की, अशी दीक्षा झाल्याबरोबर जीवाचे हे विष म्हणजे विषयरूप मूर्च्छा उतरून जाते. त्याचा संसार, ताप व शोक नाहीसा होतो ज्यावेळी शक्ती जागृत होते तेव्हाच हे घडते. एरव्ही हे शक्य नाही. दृक्दीक्षेमुळे शक्ती जागृत होऊन उपरोक्त गोष्टी घडतातच; पण मागे सांगितल्याप्रमाणे " एषा सरस्वती देवी सर्वभूतगुहाश्रया ॥ योगशिखोपनिषद ३.८॥ " अशी ही कुंडलिनी शक्ती देवी सरस्वतीच असून जीवाच्या मूलाधाररूपी गुहेत आश्रय घेऊन राहत असते. तिच्या जागृतीने काय घडते ? हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

म्हणौनि साधकां तूं माउली । पिकें सारस्वत तुझिया पाउलीं ।
या कारणें मी साउली । न संडीं तुझी ॥१२.८॥
अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥९॥

हे सांगून साधकाने साधन कसे केले पाहिजे हे सांगताना ते असे म्हणतात की–

**माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें।**

**तया पाणिया ऐसें केलें। होआवें गा ।।१२ १२०।।**

ज्या साधकाची अंतःशक्ती जागृत झाली आहे त्याला असेच जावे लागते; कारण जागृतशक्तीच्या रूपाने तो माळी आत बसूनच त्या साधकाला सद्‌गुरू म्हणून मार्गदर्शन करीत असतो. अशावेळी मी हे करीन व हे करणार नाही हा भावच शिल्लक राहत नाही. तो जगद्‌गुरू ब्रोटाला धरून जसे नेईल तसे साधकाला जावे लागते; कारण "एऱ्हवीं तरी सुभटा। उजू कां अव्हांटा। रथु काई खटपटा। करीतु असे ? ।।१२०।।" हेच खरे आहे.

शेवटी सिद्धयोग हा भक्तियोगच आहे हे सांगताना ते असे म्हणतात की–

**जो हा अर्जुना साद्यंत। सांगितला प्रस्तुत।**

**भक्तियोगु समस्त–। योगरूप ।।२२८।।**

ज्याप्रमाणे कर्मयोग हा सिद्धयोग आहे त्याप्रमाणे भक्तियोगही सिद्धयोगच आहे. ज्ञानयोग, कर्मयोग व भक्तियोग ही एकाच महायोगाची अंगे आहेत, पैलू आहेत. ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होते त्यावेळी ही सर्व अंगे अंगांगीभावन्यायाने प्रकट होतात व साधकाचे जीवन कृतार्थ करतात भक्तियोगाच्या नावाने आपण काही निराळे स्वतंत्रमार्गाचे निरूपण केले आहे ही कल्पना मनात राहू नये म्हणून भक्तियोग हा संपूर्णपणे सिद्धयोगरूपच आहे असा समन्वयात्मक दृष्टिकोन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडला आहे.

तेराव्या अध्यायाच्या सुरुवातीला सिद्धयोगशास्त्रातील साधनरहस्याचा एक महत्त्वाचा सिद्धांत कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**श्रीगुरूंचे पाय। जैं हृदय गिंवसूनि ठाय।**

**तैं एवढें भाग्य होय। उन्मेखासी ।।१३.५।।**

ज्यावेळी साधक आपल्या हृदयात सद्‌गुरूंचे चरण दृढ धरून ठेवितो म्हणजे त्यांच्या चरणांचे अर्थात् शक्तीचे अखंड स्मरण करतो त्यावेळी अनादि आत्मशक्तीच्या प्रकटीकरणाचे व विकासाचे भाग्य जीवाला प्राप्त होते या ओवीतील श्रीसद्‌गुरुचरण हे शब्द अत्यंत महत्त्वाचे आहेत. श्रीसद्‌गुरुचरण किंवा पादुका हा सिद्धयोगातील साधनाचा मूर्धन्य सिद्धांत आहे. "कुलार्णवतंत्रात" श्रीगुरुचरणांचे व पादुकांचे महत्त्व पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे. श्रीशिव पार्वतीला म्हणतात की–

**कोटिकोटिमहादानात् कोटिकोटिमहाव्रतात्।**

**कोटिकोटिमहायज्ञात् परा श्रीपादुकास्मृतिः ।।१२.४।।**

**कोटिकोटिमंत्रजपात् कोटितीर्थावगाहनात्।**

**कोटिदेवार्चनाद्देवि परा श्रीपादुकास्मृतिः ।।'५।।**

श्रीगुरूंच्या पादुकांचे हृदयात केलेले स्मरण हे कोटयवधी महाज्ञानांहून, महाव्रतांहून, महायज्ञांहून, मंत्रजपांहून, तीर्थस्नानांहून व देवांच्या पूजेहून श्रेष्ठ आहे.

"श्रीललितासहस्रनामाच्या" "बीसतंतुतनीयसी" या १११ व्या नामावर भाष्य करताना "सौभाग्यभास्करभाष्यात" श्रीभास्करराय मखी असे म्हणतात की, "कमलाच्या तंतुप्रमाणे अत्यंत सूक्ष्म अशी कुंडलिनी शक्ती असा या नामाचा अर्थ असून ती चरणस्वरूप आहे. प्रदीप्त, प्रकाशित, तेजस्वी आणि अत्युत्तम असे हे पवित्र चरण ब्रह्मलोकी प्रवेश करण्यास साधनीभूत आहेत. हे पावन चरण आम्हाला तृप्त करोत. चरण (पाय) चरति इति चरणम् । मागे पुढे सरकारी अशा अर्थाने चरण शब्द कुंडलिनी वाचक आहे. मूलाधार आणि सहस्रार यांमध्ये कुंडलिनी सरकत असते.

चरणांचे रहस्य व्यक्त करताना "तांत्रिक वाङ्मयमें शाक्त दृष्टि" या ग्रंथाच्या प्रस्तावनेत म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटलें आहे की, "परापरात्मक स्वात्म्याची परानंदमयी पराशक्ती जेव्हा आपली आपण भेदग्रास करण्यासाठी उद्युक्त होते तेव्हा त्या शक्तीचेच पादुका नावाने वर्णन केले जाते." "परापरात्मनः स्वात्मनः परानंदमयी स्वव्यतिरेककवलनोद्युक्ता पराशक्तिः पादुकेति गीयते ।" असे "महार्थमंजरीत" महायोगी गोरक्षनाथांनी म्हटले आहे. वस्तुतः आत्म्याशी अभिन्न असलेल्या अनुत्तरस्वभावाच्या नादशक्तिरूप विमर्शालाच गुरुतत्त्व म्हणून जाणले पाहिजे. हे गुरुतत्त्व स्वरूपतः जाणण्याचा एकमात्र उपाय पादुका हाच आहे.

उन्मेष म्हणजे विकास होय. "स्पंदशास्त्राच्या पहिल्या प्रवाहातील पहिल्या श्लोकावर टीका" करताना भट्ट कल्लटांनी उन्मेषाचा अर्थ सांगताना असे म्हटले आहे की, "ज्या परब्रह्माचा उन्मेष म्हणजे स्वतःच्या स्वरूपाचा विकास झाला असताना म्हणजे स्वस्वरूपाची जागृती झाली असताना जगाचा प्रलय म्हणजे नाश होतो."

तेराव्या अध्यायाच्या शेवटीही शक्तिपातयोगदीक्षेची प्रक्रिया कशी होते, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**येर कलशींचें येरीं । रिचविजे जयापरी ।**
**आपणपें तया श्रीहरी । दिधलें तैसें ॥१३.११४५॥**

**आणि कोणा देता कोण । तो नर तैसा नारायण ।**
**वरी अर्जुनातें श्रीकृष्ण । हा मी म्हणे ॥११४६॥**

ज्याप्रमाणे एका घागरीतील सर्व पाणी दुसऱ्या घागरीत ओतावे त्याप्रमाणे श्रीकृष्णांनी शक्तिपात करून आपल्या हृदयातील ज्ञान अर्जुनाच्या हृदयात ओतले. वास्तविक येथे देणारा कोण व घेणारा कोण ? अर्जुन हा नर-जीव होता व श्रीकृष्ण हे नारायण-शिव होते. अशा वेळी श्रीकृष्ण अर्जुनाकडे बोट दाखवून, हा तो मीच

आहे, असे म्हणाले. ही साध्यसाधनाची किंवा गुरुशिष्यांची एकरूपता हा सिद्धयोगाचा एक महान् विशेष आहे. त्याची सविस्तर चर्चा आपण मागे केलीच आहे. माझे परात्पर गुरू प. प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराजही माझ्या सद्गुरुनाथ महाराजांजवळ असे नेहमी म्हणत की, "अरे कौन शिष्य और कौन गुरु! दीक्षा क्या लेने देनेकी बात है? वह तो पाने होनेकी बात है!"

चौदाव्या अध्यायाच्या सुरुवातीला "गुरोः कृपैव केवलम्" या सिद्धयोगाच्या सिद्धांताचे उद्घाटन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

अगा विश्वैकधामा। तुझा प्रसाद चंद्रमा।
करूं मज पूर्णिमा। स्फूर्तीची जी ॥२३॥
जी अवलोकिलिया मातें। उन्मेषसागरीं भरितें।
वोसंडेल स्फूर्तीतें। रसवृत्तीचें ॥२४॥

हे विश्वैकधामा श्रीगुरो! आपला प्रसाद म्हणजे कृपा हा चंद्रच आहे एकदा का शक्तिपाताचा चंद्रमा विकसित झाला की, स्फूर्तिरूपी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ती शिवैक्यरूपी पौर्णिमा साजरी करील. यासाठी आपण कृपा करा. आपण माझ्याकडे कृपादृष्टीने पाहिले की, शक्तिसंक्रमण घडून येऊन संविदेच्या विकासाला भरती येऊन ती शिवाशी मिळण्याकरिता सुषुम्नेत प्रवेश करील. त्यावेळी शांताद्भुतादि नवरस ओसंडून वाहू लागतील.

सिद्धयोगसाधनाची श्रेष्ठता पटविण्यासाठी श्रीज्ञानेश्वमहाराज चौदाव्या अध्यायाच्या शेवटी असे म्हणतात की–

परी माझें आराधन। ब्रह्मत्वीं होय सोपान।
तेथ मी हन साधन। गमेन हो ॥१४.४०२॥
परी झणीं ऐसें। तुझ्या चित्तीं पैसें।
पैं ब्रह्म आन नसे। मीवांचूनि ॥४०३॥

हे अर्जुना! माझे हे सिद्धयोगाचे साधनच ब्रह्मत्व प्राप्त करून देणारा जिना आहे. माझे सगुणस्वरूप साधनरूप आहे असे तुला वाटेल; पण तसे वाटू देऊ नकोस; कारण माझ्याहून म्हणजे जागृत शक्तीहून ब्रह्म दुसरे नाही.

सिद्धयोगाची परिणती शेवटी निर्गुण स्वरूपात होत असल्याने सगुणसाकारस्वरूपाची भक्ती अर्थात् भक्तीचा बाह्य व्यापार ही निर्गुण परब्रह्माच्या प्राप्तीला साधनभूत आहे असे जे समजतात त्यांच्या मताचे येथे स्पष्ट खंडन केले आहे. सगुणस्वरूप हे कालातीत वस्तू जाणण्याचे साधन होणार नाही. यासाठी "तन्त्रालोकात" श्रीअभिनवगुप्ताचार्यांनी असे म्हटले आहे की, "ब्रह्म ही कालातीत वस्तू असल्याने ते जाणण्यासाठी शक्तिपातयोगासारखे कालातीतच साधन हवे."

"योगवाणी या सिद्धयोगोपदेश" या पुस्तकात प.प. श्रीस्वामी शंकरपुरुषोत्तमतीर्थमहाराज वरील विषय पटवून देताना आपल्या शिष्याला असे म्हणतात की, "हे

पुत्रा ! ज्याप्रमाणे आकाशातून पडणारे पाणी नदी व नाल्यांच्या रूपाने वाहत जाऊन शेवटी आपल्या नामरूपाचा त्याग करून सागराशी एकरूप होऊन जाते त्याप्रमाणे ही कुंडलिनी शक्ती परमात्म्याशी मिळून एकरूप व एकरस होऊन आपल्या नामरूपाचा पूर्णपणे त्याग करते. नाम व रूप ही लीला आहे. जेथे नाम व रूप आले तेथे जप, तप, पूजा, अर्चा इत्यादि गोष्टी सुरू होतात. सर्व नामरूपे ही शक्तीचीच आहेत. यासाठी शक्तिसाधनेपेक्षा निराळचा अशा दुसऱ्या कोणत्याही साधनेच्या द्वारा कोणी केव्हाही नामरूपाच्या पलीकडे असलेल्या त्या निर्गुण चैतन्याची प्राप्ती करू शकणार नाही.

ज्याप्रमाणे पाण्यावर तरंग किंवा लहरी उठत असतात त्याप्रमाणे निर्गुण चैतन्यरूपाच्या आधारावर सगुण नाम व रूप भासत असते गुरूपदिष्ट साधनामुळे किंवा क्रियांमुळे जेव्हा शक्ती ब्रह्मरंध्रात लीन होते तेव्हाच निर्गुण सच्चिदानंद स्वरूपाची प्राप्ती होते. तेव्हा साध्य व साधक एक होतात."

पंधराव्या अध्यायाच्या सुरुवातीला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीगुरुचरणपूजा अर्थात् सद्‌गुरुरूपाने अंतरात जागृत झालेल्या शक्तीच्याकडून होणारे साधन हेच संसारवृक्षाचे मूळ तोडण्याचे साधन आहे, हे सांगताना असे म्हटले आहे की–

**आतां हृदय हे आपुलें। चौफाळूनियां भलें।**
**वरी बैसऊं पाउलें। श्रीगुरूंचीं ॥१५.१॥**

या ओवीत हृदयामध्ये श्रीगुरूंच्या पादुकांची किंवा चरणांची स्थापना करून पूजेस आरंभ करू असे म्हटले आहे. हे हृदयाचे स्थान कोठे आहे? "योगस्वरोदय" ग्रंथात असे म्हटले आहे की, "आज्ञाचक्रच सर्वशास्त्रसंमत असे हृदय आहे. स्थूल बुद्धीचे लोक अन्य जागेला म्हणजे वक्षस्थलालाच हृदय म्हणतात." यासाठी भ्रूमध्यात श्रीगुरूंच्या चरणांची पूजा करावयाची आहे. चरण म्हणजे कुंडलिनी शक्ती हे आपण मागे पाहिलेच आहे. ही शक्ती आज्ञाचक्रात आली म्हणजे खरी पूजा सुरू होते; कारण हे स्थान म्हणजे तीर्थराज प्रयाग आहे, असे जे "ज्ञानसंकलिनी व रुद्रयामल तंत्रात" म्हटले आहे, त्याचा मागे आपण विचार केलाच आहे.

अशा या हृदयात सद्‌गुरुपादुकांची पूजा केली म्हणजे जीव सर्व पापांपासून मुक्त होतो असे सांगून शेवटी सिद्धयोगाचे कथन करणारे गीताशास्त्र हेच एकमेव संसाराला जिंकणारे शस्त्र व गीतेची अक्षरे म्हणजे आत्मा प्रकट करणारे मंत्रच आहेत, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**साचचि बोलाचें नव्हे हें शास्त्र। पैं संसारु जिणतें हे शस्त्र।**
**आत्मा अवतरविते मंत्र। अक्षरें इयें ॥१५.५७७॥**

सोळाव्या अध्यायाच्या सुरुवातीला साधकाच्या ठिकाणी जीवदशेमुळे उत्पन्न झालेला विश्वाभास "अद्वयाब्जिनीविकाशु" मुळे म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या जागृती-

मुळे कसा जातो व चक्रवाकांचें मिथुन म्हणजे शिवशक्तीचे जोडपे सामरस्याचे समाधान चिद्गगनात म्हणजे सहस्त्रारात कसे भोगते हे सांगताना असे म्हटले आहे की-

**मावळवीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु ।**
**अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥१६·१॥**
**तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान ।**
**भोगवी जो चिद्गगन । भुवनदिवा ॥६॥**

श्रीगुरुरूपी सूर्याचा उदय झाला, त्याची कृपा झाली की, अद्वैत तत्त्वाचा प्रकाश करणारी कुंडलिनी कमलिनी जागृत होऊन विश्वाभास मावळतो. शिवशक्तींचे मीलन होते. हे सामरस्य हे भुवनदिव्यामुळेच म्हणजे सद्गुरुकृपेनेच होते. यामुळेच साधक दैवी संपत्तीचा अधिकारी होतो. यासाठी साधनाशी एकनिष्ठ राहिले पाहिजे व त्याची हेळसांड करता कामा नये. म्हणून या अध्यायाच्या शेवटी श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की-

**नातरी श्रीगुरुवचना । दिठी देतु जतना ।**
**शिष्य आत्मभुवना- । माजीं पैसे ॥१६·४५७॥**
**पैं अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती ।**
**नाहीं गा श्रुतिपरौती । माउली जगा ॥४६२॥**
**म्हणौनि ब्रह्मेंशीं मेळवी । तंव हे कोणें न सांडावी ।**
**अगा तुवांही एसीचि भजावी । विशेषेंसी ॥४६३॥**

श्रीगुरुंनी आज्ञा केल्याप्रमाणे जो साधन करतो तो शिष्य आत्मभुवनात प्रवेश करतो. हे साधन श्रुतिसंमत असल्याने व ते जीवाला अहितापासून दूर करून त्याचे हित करणारे असल्याने म्हणजे ब्रह्मस्थिती प्राप्त करून देणारे असल्याने श्रुतीशिवाय जगात दुसरी माउली नाही. यासाठी जीवाचे ब्रह्माशी ऐक्य करणाऱ्या श्रुतीची म्हणजे श्रुत्युक्त साधनाची हेळसांड किंवा अवज्ञा करू नये व विशेषकरून श्रुतीलाच एकनिष्ठपणे भजावे. या अर्थानेच महर्षी पतंजलींनी "स तु दीर्घकालनैरन्तर्यसत्कारासेवितो दृढभूमिः ॥ समाधिपाद १.१४॥" असे "योगसूत्रात" म्हटले आहे.

सतराव्या अध्यायाच्या सुरुवातीला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीनिवृत्तिनाथमहाराजांच्या कृपेमुळे आपण कृतकृत्य झालो याची ग्वाही देऊन सिद्धयोगाचा महिमा गाइला आहे. या दृष्टीने ते असे म्हणतात की-

**आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे । तो उचंबळत भरोनि निगे ।**
**कां दर्शी दीपसंगें । दीपुचि होय ॥१७·१९॥**
**तैसा तुझिया प्रणिती । मी पूर्ण जाहलो श्रीनिवृत्ती ॥२०॥**

सद्गुरूंजवळ जाणाऱ्या जीवाची स्थिती रित्या घागरीसारखीच असते. मात्र सद्गुरू आपल्या कृपेने ही रिकामी घागर भरून टाकतात. त्याचप्रमाणे हे साधन एक दिव्याने दुसरा दिवा लावावा असेच आहे. वात दिव्याच्या संसर्गाने दीपस्वरू-

पच होते त्याप्रमाणे जीव सद्‌गुरूंजवळ गेला की, शक्तिसंक्रमण घडून गेऊन चित्‌शक्तीचा दीप प्रज्ज्वलित होतो. सद्‌गुरूंना नमस्कार केल्याने मीही परिपूर्ण व कृतकृत्य झालो, असे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. या दृष्टीने "रत्नमालाआगमामध्ये" असे लिहिले आहे की–

> यस्मिन्काले तु गुरुणा निर्विकल्पं प्रकाशितम् ।
> तदैव किल मुक्तोऽसौ यंत्रं तिष्ठति केवलम् ॥

ज्यावेळी श्रीगुरूंकडून निर्विकल्पाचा बोध शिष्याला प्रकाशित करून दिला जातो त्याचवेळी तो मुक्त होतो. त्यानंतर मात्र तो केवळ यंत्रवत् होऊन राहतो.

सतराव्या अध्यायाच्या शेवटी अर्जुनाने श्रीकृष्णांना साधनाची ही गोष्ट विचारल्यामुळेच आपल्याला हा सिद्धयोगशास्त्राचा व या साधनमार्गाचा लाभ झाला असा निर्वाळा संजयाने दिला आहे. या दृष्टीने तो असे म्हणतो की–

> हा न पुसता हे गोठी । तरी देवो कां सोडिते गांठी ।
> तरी कैसेंनि आम्हां भेटी । परमार्थेसी ! ॥१७·४२८॥
> होतों अज्ञानाच्या आंधारां । वोसंतीत जन्मबाहरा ।
> तों आत्मप्रकाशमंदिरा–। आंतु आणिलें॥४२९॥

सद्‌गुरुनाथ श्रीकृष्णांनी सोडलेली ही गाठ सिद्धयोगशास्त्राच्या गाठोड्याचीच आहे, हे सहाव्या अध्यायात पंथराजाचे साधन सांगताना " तया ध्वनिताचें केणें सोडुनि । यथार्थाची घडी झाडुनी । उपलविली म्यां जाणुनी । ग्राहीक श्रोते ॥६.२२९॥" असे सांगितल्यावरून स्पष्ट होते, हे कधीही विसरता येणार नाही.

अठरावा अध्याय " हे एकाध्यायी गीताचि आहे ॥१८.८४॥ " असे म्हणून सिद्धयोगाच्या साधनाची साध्यरूपात परिणिती कशी होते, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

> पद्‌मिनी रविकिरण । लाहे मग लाजें कवण? ।
> कां जळें शिवतलें लवण । आंग भुलें ॥१८·१६॥
> तैसा तूंतें जेथ मी स्मरें । तेथ मीपण मी विसरें ।
> मग जाकळिला ढेंकरें । तृप्तु जैसा ॥१७॥

सद्‌गुरूंची भेट झाली की, त्यांच्या रविकिरणरूप कृपेने आत्मशक्तिरूप पद्‌मिनी जागृत होऊन पूर्ण विकसित होणारच. जीवाची ही कळी शक्तिपात झाल्यावर लाजून, संकोचून राहूच शकत नाही. सद्‌गुरूंच्या नुसत्या संपर्कानेच सर्व संकोच अवस्था संपून जीव शिवरूप होतो. यालाच योगी अरविंद यांनी "Divine Touch" अर्थात् " दिव्य स्पर्श " असे म्हटले आहे. हा झालाच पाहिजे. तो झाला की, मीठ पाण्यात घातल्यावर जसे आपले स्वरूप विसरते व पाण्यात विरघळून जाऊन तद्रूप होते त्याप्रमाणे सद्‌गुरुस्मरणाने जीव कृतकृत्य होऊन मीपणा विसरून जातो. हें सर्व साधनाचे सार आहे. त्यामुळे तृप्तीचा ढेकर येतो.

या अध्यायाच्या शेवटी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अंतरंग साधनप्राप्तीमुळे अंतर्मुख झालेले व ऊर्ध्वगती पावलेले किंवा तशी इच्छा असलेले साधकच या सिद्ध-योगरूप अध्यात्मशास्त्राचे अधिकारी आहेत असे स्पष्ट सांगून; आपल्याला आदिगुरू शंकरांपासून शिष्यपरंपरेने व गुरुक्रमाने सिद्धयोगरूपी समाधिधन गुरूंकडून शक्ति-पाताची दीक्षा झाल्याने कसे प्राप्त झाले, हे कथन केले आहे. असे हे सिद्धयोगाचे शास्त्र महेशान्वयसंभूत असल्याने त्याचा अपूर्व महिमा सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की—

**जें उपनिषदांचें सार। सर्व शास्त्रांचें माहेर।**
**परमहंसी सरोवर। सेविजे जें ॥१८·१८०८॥**

सिद्धयोगाचे हे शास्त्र म्हणजे उपनिषदांचे सार असून सर्व शास्त्रांचे माहेर-घर आहे. परमहंसरूपी राजहंसांनी-साधूंनी सेवन करण्याचे जणू काही हे सिद्धयोग-शास्त्र म्हणजे मानस सरोवरच आहे.

येथपर्यंत ज्ञानेश्वरीच्या अठरा अध्यायांची जी संगती लावून दाखविली आहे त्यावरून अर्जुनविषादयोग, सांख्ययोग, कर्मयोग, राजविद्याराजगुह्ययोग इत्यादि प्रत्येक अध्यायाला दिलेल्या नावांचा निरनिराळा योग त्यात सांगितला नसून किंवा प्रधान अशा कर्म, भक्ती व ज्ञान या तीन स्वतंत्र निष्ठांची खिचडी अगर कापूस, रेशीम व जर यांच्या चिंध्या शिवून तयार केलेली ज्ञानेश्वरी ही गोधडी नसून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे "अहो गूळासाखरे मालयाचे। हे बांधे तरी एकाचि रसाचे। परि स्वाद गोडियेचे। आनआन जैसें॥ १०.३३॥" या न्यायाने एकरसपरिपूर्ण अशा सिद्धयोगशास्त्राचे सर्वोपकारी समर्थ अशा सद्गुरू श्रीनिवृत्तिनाथ-महाराजांनी केलेल्या प्रसादचंद्रामुळे उत्फुल्ल झालेल्या कमलिनी कुंडलिनीचा वास असलेले ज्ञानेश्वरी हे अपूर्व सरोवर आहे हे सिद्ध होते.

इतर दुसरी कितीही शास्त्रे असली; तरी ती सिद्धयोगासारखी प्रमाणसिद्ध साधन सांगणारी नसल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या स्वतःला गुरुकृपेने प्राप्त झालेले सिद्धयोगाचे साधन ज्ञानेश्वरीत अथपासून इतिपर्यंत कथन केले आहे. यासंबंधी ते असे म्हणतात की, "माझ्या अर्थात् स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीकरिता साधकांना शिणावे लागत नाही; कारण परमात्मा या सिद्धयोगाच्या उपायाने अगदी सहजतेने निश्चितपणे प्राप्त होतो. गुरूंनी शिष्याला दीक्षा देऊन व त्याला पुढे दीक्षाधिकार देऊन शिष्यपरंपरा व संप्रदायपरंपरा चालविण्यास सांगण्याचा जो व्यवहार रूढ झाला आहे तो माझ्या प्राप्तीचा उचित मार्ग आहे. (कारण संप्रदाय परंपरेने चालत आलेली शक्ती संप्रदायाच्या व सिद्धगुरूंच्यामुळे शिष्यामध्ये तत्काळ संक्रांत होऊन आपल्या उपस्थितीने त्याला अनुभूती देते. एरवी हे कार्य संपन्न होत नाही.) पृथ्वीच्या पोटात द्रव्यठेवा आयताच आहे, लाकडात अग्नी आयताच आहे व कासेत दूधही आयतेच असते. या सर्व गोष्टी स्वतःसिद्धच आहेत

व त्याच प्राप्त होत असतात. असे असले तरी त्या सिद्धवस्तूंचा लाभ होण्यासाठी काही उपाय करावे लागतातच. त्याप्रमाणे परमात्माही स्वतःसिद्ध आहे हे खरे असले; तरी त्याच्या प्राप्तीसाठी काही उपाय हे करावेच लागतात. स्वतःसिद्ध अशा परमात्म्याच्या प्राप्तीसाठी स्वतःसिद्ध असे सिद्धयोगाचे साधनच उपयोगी असल्याने व इतर शास्त्रे अशा प्रकारे स्वतःसिद्ध नसल्याने मी आरंभापासून शेवटपर्यंत सिद्धयोगाचे प्रतिपादन केले आहे. ग्रंथाच्या मध्यभागी गीतेत आलेल्या विषयाच्या अनुरोधाने व निरनिराळ्या अधिकार प्रसंगाने भिन्नभिन्न अनेक सिद्धांत मांडून प्रतिपादन केले असले तरी पूर्वापार संबंध न जाणून गीतेमध्ये वरील प्रकारचे अनेक सिद्धांत सांगितले आहेत, असे जर कोणी मानील तर ते चूक ठरेल; कारण सिद्धयोगशास्त्राच्या महासिद्धांतापाशी इतर सर्व उपसिद्धांतांचे ऐक्य करून दाखवून, मुख्य महासिद्धांताच्या सिद्धीकरिता बाकीचे अनंत सिद्धांत या कक्षा म्हणजे उपसिद्धांत व भाग किंवा बाजू आहेत असे सांगून, ग्रंथारंभी जो सिद्धयोगसाधनसिद्धांत सांगितला आहे त्यानेच या ग्रंथाची समाप्ती केली आहे."

श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे हे म्हणणे लक्षात ठेवूनच सिध्योगसाधनेच्याद्वारा अध्यायसंगती लावताना कक्षा, बाजू, उपसिध्दांतादि अवांतर गोष्टींची चर्चा केली नाही.या सव गोष्टींची सिद्धी ही गुरुकृपेने होते, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पावलोपावली सांगितले आहे. सारांश,चंदनाचे झाड जसे सर्वांगाने सुगंधमय झालेले असते त्याप्रमाणे ज्ञानेश्वरी हा ग्रंथ सिद्धयोगशास्त्राच्या सुगंधाने भरून गेला आहे.

## अनुबंधचतुष्टयद्वारा सिद्धयोगाची संगती --

अनुबंधचतुष्टयद्वारा ज्ञानेश्वरीची सिद्धयोगाच्या दृष्टीने संगती कशी लागते. ते आता पाहवयाचे आहे. विषय, प्रयोजन, संबंध आणि अधिकारी या चार गोष्टींना अनुबंधचतुष्टय असे म्हणतात. प्रत्येक शास्त्रीय ग्रंथाला अनुबंधचतुष्टय असतात. अनुबंधचतुष्टयाशिवाय ग्रंथाला शास्त्रीयत्व येत नाही.या अनुबंधचतुष्टयाचा विचार प्रस्तुत केला म्हणजे ज्ञानेश्वरीत सिद्धयोगशास्त्र कसे अवतरित झाले आहे व तद्द्वारा ज्ञानेश्वरीची संगती लागून, हा ग्रंथ " सिद्धयोग दर्शन " कसे आहे, हे निर्विवादपणे सिद्ध होईल आपण क्रमशः त्यांचा विचार करू.

ग्रंथातील प्रतिपाद्य अर्थाला विषय म्हणतात. आपण येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून हे स्पष्ट होते की, ' गुरुकृपाद्वारा अर्थात् सिद्धयोगसाधनद्वारा स्वसंवेद्य आत्मस्वरूपप्राप्ती " हा ज्ञानेश्वरीचा प्रतिपाद्य विषय आहे " एथ अविद्यानाशु हें स्थळ। तेणें मोक्षोपादान फळ। या दोहीं केवळ। साधन ज्ञान ॥१८ १२४३॥, एऱ्हवीं द्वैताची वारी। सारूनि ऐक्याच्या परिवरीं। भोगिजे तें अवधारीं। रहस्य हें ॥१३४५॥ " व ' जेणें सप्रपंच अज्ञान जाये। एकु मी गोचरु होयं। तें उत्पत्तीचेनि ठायें। गीतारूप हें ॥१३८८॥ " या ओव्यांमधून ज्ञानेश्वरांचा प्रतिपाद्य विषय स्पष्ट झाला आहे.

ग्रंथात जो लाभ किंवा जी फलनिष्पत्ती सांगितली असेल त्याला ग्रंथाचे प्रयोजन असे म्हणतात. अनादि कालापासून घोरतम अशा अज्ञानघनसुषुप्तीत पहुडलेली आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत होऊन व तिचे सहस्रारात शिवाशी मिलन अर्थात् सामरस्य होऊन जीवसाधकाची अज्ञान, कल्पनादि रूपाने उपस्थित झालेली बहिर्गती निःशेष नाहीशी व्हावी व तो स्वानंदसाम्राज्याचा चक्रवर्ती राजा व्हावा, हेच ज्ञानेश्वरीचे प्रयोजन आहे. "तिये ओळखीचिसरिसे । सुखाचिया साम्राज्यीं वैसे । मग आपणपां समरसें । विरोनि जाय ॥६.३६७॥, भरूनि प्रपंचाचा घोंटू । कीजे देखतांचि देखतया द्रष्टु । आनंदसाम्राज्यीं पाटु । बांधिजे जीवा ॥१६.५०॥ " व "म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवकु होईल इयेचा । तो स्वानंदसाम्राज्याचा । चक्रवर्ती करी ॥१८.१६६८॥ " या ओव्यांमधून ज्ञानेश्वरीचे प्रयोजन प्रस्फुटित झाले आहे.

ग्रंथातील बोध्यबोधकभावाला म्हणजे फलनिष्पत्ती व साधक यांच्या भावाला संबंध असे म्हणतात. अर्थात् फलनिष्पत्ती ही गुरुरूप व साधक हा शिष्यरूप असल्यामुळे गुरुशिष्यभावाला संबंध असे म्हणतात. या दृष्टीनेच अधिकारी म्हणजे मुक्त, मुमुक्षू व बद्ध या अधिकाऱ्यांचा व प्रयोजनाचा म्हणजे सामरस्यात्मक अखंड ब्रह्मानंदाचा प्राप्यप्रापकसंबंध आहे, असे म्हटले जाते. "ते गुरुशिष्याची गोठी । पदपिंडाची गाठी । तेथ स्थिर राहोनि नुठी । कवणे काळीं ॥३.२७२॥, बाप साक्षात्काराचा वेधु । कैसा देशधडी केला बोधु । हा गुरुशिष्यसंबंधु । विपायें नांदे ॥११.३७०॥ " व "एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु । तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणावया ॥१८.१२२६॥" या ओव्यांतून ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या दृष्टीने स्पष्ट होणारी संबंधाची कल्पना लक्षात येते.

ग्रंथातील लाभाची किंवा फलनिष्पत्तीची ज्याला प्राप्ती व्हावयाची आहे, त्याला अधिकारी असे म्हणतात. "जिहीं आत्मबोधाचिया आवडी । केली स्वर्गसंसाराची कुरोंडी । तेवांचूनि एथींची गोडी । नेणती आणिक ॥६.२८॥, जैसा वायसीं चंद्र नोळखिजे । तैसा प्राकृतीं हा ग्रंथु नेणिजे । आणि तो हिमांशुचि जेंवि खाजें । चकोराचें ॥६.२९॥, आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरीं जिहीं केलें । ते आमुचेनि पाडें आले । निर्वाळलेया ॥६.३२६॥, इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भंरवसेनि ब्रह्मत्वा येती ॥६.३३०॥, नावेक विरक्तु । जाहला देहधर्मीं नियतु । तरि तोचि नव्हे व्यवस्थितु । अधिकारिया ? ॥६.३४२॥ " व "तैसें अध्यात्मशास्त्रीं यिये । अंतरंगचि अधिकारिये ॥१८.१७५०॥ " या ओव्यांवरून ज्ञानेश्वरीतील सिद्धयोग साधनाचा अधिकारी कोण ? हे स्पष्ट होते.

वरील सर्व विवेचनावरून अनुबंधचतुष्टयद्वारा ज्ञानेश्वरीची सिद्धयोगाच्या दृष्टीने संगती कशी लागते हे स्पष्ट झाले.

**श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी लाविलेली गीतेची विषयाध्यायसंगती:—**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी दहाव्या अध्यायात सुरुवातीलाच ओव्या २६ ते ३१ यांमध्ये प्रत्येक अध्यायातील विषय सांगून लगेच "अहो गूळासाखरे मालयाचे। हे बांधे तरी एकाचि रसाचे। परि स्वाद गोडियेचे। आनआन जैसें ॥१०.३३॥" या न्यायाने श्रीमद्भगवद्गीता ही एकरस व अखंड कशी आहे, हे सिद्ध केले आहे. दुसऱ्या प्रकरणातील "सिद्धयोग महासिद्धांतयुक्त गीताशास्त्रेश्वर" या मुद्यात श्रीमद्भगवद्गीता म्हणजे सिद्धयोगशास्त्र किंवा सिद्धयोग दर्शन कसे आहे, हे आपण सिद्ध केले आहे. त्यामुळे गीतेची विषयाध्यायसंगती म्हणजे सिद्धयोगशास्त्राची विषयाध्यायसंगती होय, हे स्पष्टच आहे.

या प्रमाणेच अठराव्या अध्यायातही "तरी कांडत्रयात्मकु। शब्दराशी अशेखु। गीतेमाजीं असे रुखु। बीजीं जैसा ॥१८.४३१॥" येथपासून "हे असो कांडत्रयात्मक। श्रुति मोक्षरूप फळ येक। वोभावे जें आवश्यक। ठाकावें म्हणौनि ॥१८.१४५१॥" येथपर्यंत श्रीमद्भगवद्गीता म्हणजे पर्यायाने ज्ञानेश्वरी ही कर्म, उपासना किंवा भक्ती व ज्ञान या वेदोक्त तीन कांडांमध्ये कशी विभक्त झाली आहे, हे सांगितले आहे. अध्याय एक ते सहापर्यंत कर्म, सात ते तेरापर्यंत उपासना किंवा भक्ती व चौदा ते अठरा अध्यायापर्यंत ज्ञान अशी त्यांची सर्वसाधारण विभागणी आहे, हे त्यांनी स्पष्ट केले आहे. असे असले तरी "ऐसा गीता वैष्णवप्रासादु ॥१८.४९॥" व "गीता जाणा ते वाङ्मयी। श्रीमूर्तिं प्रभूची ॥१८.१६८५॥" असे कथन करून गीता ही एकरस, एक अर्थ प्रतिपादक व अखंड असून ती एक तत्त्व प्रतिपादन करणारे अपूर्व शास्त्र आहे, हे त्यांनी सिद्धांतरूपाने वारंवार प्रतिपादन केले आहे कर्म, उपासना किंवा भक्ती व ज्ञान हे सद्गुरुकृपेने जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीमुळे उपस्थित होणारे सिद्धयोगाच्या अंतरंग साधनाचेच भिन्न अवस्थेतील व भिन्न पातळयांवरील तीन आविष्कार मात्र आहेत, हे आपण मागे वेळोवेळी विषनुरोधाने नाना प्रमाणे देऊन सिद्ध केले आहे. त्याचप्रमाणे येथे एक गोष्ट अत्यंत प्रामुख्याने अशी लक्षात घेतली पाहिजे की, ज्यावेळी कुंडलिनी शक्ती जागृत होऊन ती अंतरंग साधन स्वत: करू लागते त्यावेळी मूलाधारापासून स्वाधिष्ठानचक्रापर्यंत ती जे साधन करते किंवा त्यावेळी ज्या क्रिया साधकाला होतात, त्यालाच कर्मयोग असे म्हणतात. स्वाधिष्ठानचक्रापासून आज्ञाचक्रापर्यंत ती जो क्रियाविष्कार किंवा रसाविष्कार करते त्याला भक्तियोग किंवा उपासना म्हणतात आणि आज्ञाचक्रापासून सहस्रदलकमलापर्यंत जी अनुभूती ही शक्ती साधकाला देते तोच ज्ञानयोग होय. अर्थात् हे तिन्ही योग भिन्नतेने, क्रमश: अगर एकसमयावच्छेदेकरून साधकदेहात त्याच्या आधारभिन्नतेंप्रमाणे म्हणजे पात्रापात्रतेप्रमाणे प्रकट होत असल्यामुळे हे तिन्ही योग स्वरूपत: भिन्न नसून, ते एकच महायोगाचे

किंवा सिद्धयोगाचे आविष्कारमात्र आहेत, हे सिद्ध होते. श्रीज्ञानेश्वरमहाराज "म्हणौनि वेदांचे बीज । श्रीगीता होय हें मज । गमे आणि सहज । दिसतही आहे ॥१८.१४३२॥ जे वेदांचे तिन्ही भाग । गीते उमटले असती चांग । भूषणरत्नीं सर्वांग । शोभलें जैसें ॥१४३३॥ तियेचि कर्मादिकें तिन्ही । कांडें कोणकोणें स्थानीं । गीते आहाति तें नयनीं । दाखऊं आईक ॥१४३४॥" असे म्हणून वेदाचे बीज म्हणजे गीता होय व त्या गीतेत कर्म,भक्ती व ज्ञान हे कांडत्रयात्मक शब्दराशींच्या रूपाने आहे,असा सिद्धांत जेव्हा मांडतात तेव्हाच हे स्पष्ट होते की,वेद म्हणजे बीजरूप गीता हे सिद्धयोगशास्त्र असल्याने व सिद्धयोग हा अनुभूतीचा विषय असल्याने तदंगभूत कांडत्रय अर्थात् कर्म, भक्ती व ज्ञान, या गीतानुभूतींच्यारूपाने शरीरात उपस्थित होणाऱ्या एकाच अवच्छेद्य गोष्टीच्या केवळ भिन्नावस्था आहेत. त्या "नयनीं दाखऊं" म्हणून अध्यायानुसार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रस्तुत केल्या आहेत एवढेच. शिवाय "तरी कांडत्रयात्मकु । शब्दराशी अशेखु ॥१८.१४३१॥" असा सिद्धांतच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रस्थापित केला आहे. या सिद्धांताच्या अर्थांतरात आपण प्रवेश केला म्हणजे आपल्या असे लक्षात येईल की, कांडत्रय म्हणजे कर्म, भक्ती व ज्ञान हे तिन्ही योग, शब्द म्हणजे शक्ती व राशी म्हणजे समूह आहेत अर्थात् शक्तिसमूह आहेत. शक्ती ही एकरस, अखंड, अभिन्न व अवच्छेद्य अशी वस्तू आहे; म्हणून शक्तिसमूह असणारे वरील तिन्ही योग हे ही तसेच आहेत, हे सिद्ध होतें. या बाबतीत "इये आनानें नांवें । परि निरूप्य आन नोहे । हें लक्षण न चुकावें । पुढतपुढती ॥१३.९६५॥" ही श्रीज्ञानेश्वरमहाराजांची सूचना न विसरता वारंवार लक्षात ठेविली पाहिजे, हे नितांत जरूर आहे. हे सर्व रहस्य मनात दृढमूल केले व आपण मागे सिद्ध केलेले कर्म, भक्ती व ज्ञान यांचे परार्थ साकल्याने अंतरंग केले म्हणजे श्रीमद्भगवद्गीतेची सिद्धयोगसाधनानुरोधाने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विषयाध्यायसंगती कशी स्पष्ट केली आहे, ते लक्षात यईल व यातच सिद्धयोगसाधनशास्त्रदृष्टया ज्ञानेश्वरीची विषयाध्यायसंगती अनुस्यूत असल्याची प्रतीती येईल.

सारांश,आत्तापर्यंत केलेल्या सर्व विवेचनावरून "तैं महासिद्धांताचा आवांका । सिद्धांतकक्षा अनेका । भिडऊनि आरंभु देखा । संपवितु असे ॥ १८.१२४२ ॥" व "हे इनुलेंचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारीं ॥१२४४॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या म्हणण्याप्रमाणे ज्ञानेश्वरीची सिद्धयोगाच्या दृष्टीने विषयाध्यायसंगती कशी लागते, ते सिद्ध झाले. ही सर्व सिद्धी म्हणजे माझे सद्गुरू महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांचा माझ्यावरील प्रेमाचा व कृपेचा आविष्कार होय, हे नितांत सत्य आहे.

## प्रकरण दहावे

# ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची साधनसंपत्ती

**प्रास्ताविक :–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीने ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या साधनसंपत्तीचा विचार आता करावयाचा आहे. हा विचार करताना साधनसंपत्ती म्हणजे काय ? याची प्रथम चर्चा करणे आवश्यक आहे; कारण साधनसंपत्ती म्हणजे नेमकी कोणती गोष्ट अभिप्रेत आहे याचा उलगडा त्याशिवाय होणार नाही. मुळात श्रीमद्‌भगवद्‌गीतेत दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञ, नवव्या व बाराव्या अध्यायात भक्त, तेराव्या अध्यायात ज्ञानी, सोळाव्या अध्यायात दैवीसंपत्ती आणि सतराव्या व अठराव्या अध्यायात सात्त्विक अशा विविध नावांखाली एकाच विषयाची लक्षणे सांगून भिन्न नावांनी भगवान् श्रीगोपालकृष्णनाथांनी त्याची चर्चा केली आहे. यालाच काही लोकांनी सद्‌गुण व काहींनी नीतिशास्त्र, नीतिमीमांसा किंवा अध्यात्म म्हणून संबोधिले आहे. श्रीएकनाथमहाराजांनी यालाच " एकनाथी भागवतात " साधनसंपत्ती किंवा भागवतधर्म असे म्हटले असून " जेणें भजनें भगवंत । भजोनि जाले उत्तम भक्त । ते भागवतधर्म समस्त । शिकावे निश्चित सद्‌भावेंसीं ॥ ३.३५० ॥" याप्रमाणे साधकाने हे गुण शिकावेत म्हणून आग्रहाने सांगितले आहे. मुळात " श्रीमद्‌भागवतातच " महर्षी व्यासांनी यासंबंधी असे म्हटले आहे की–

> **तत्र भागवतान् धर्मान् शिक्षेद्‌गुर्वात्मदैवत: ।**
> **अमाययानुवृत्त्या यैस्तुष्येदात्माऽऽत्मदो हरि: ॥११.३.२२॥**
> **इति भागवतान् धर्मान् शिक्षन् भक्त्या तदुत्थया ।**
> **नारायणपरो मायामंजस्तरति दुस्तराम् ॥२३॥**

साधकाने सद्‌गुरूलाच आपला अत्यंत प्रियतम आत्मा व इष्टदैवत मानून त्याची निष्कपटभावाने सेवा करावी व त्याच्यापाशी राहून भागवतधर्माची अर्थात् भगवंताची प्राप्ती करविणाऱ्या भक्तिभावाच्या साधनसंपत्तीचे क्रियात्मक शिक्षण ग्रहण करावे. या साधनसंपत्तीमुळेच सर्वात्मा व भक्तांना आत्मदान करणारा भगवान् साधकांवर प्रसन्न होतो. जे अशा प्रकारे भागवतधर्माचे अर्थात् साधनसंपत्तीचे शिक्षण ग्रहण करतात त्यांना त्यापासून प्रेमभक्तीची प्राप्ती होते व ते भगवान् नारायणपरायण होऊन दुस्तर माया तरून जातात.

पाश्चात्य लोकांनी सद्‌गुणांना किंवा नीतीला Ethics असे म्हटले असून मिल्ल, स्पेन्सर, कान्ट इत्यादि विख्यात पाश्चात्य पंडितांनी सुखवाद, उपयुक्ततावाद, समाजहितवाद या दृष्टिकोनातून या विषयाची खूप चर्चा केली आहे; "परंतु अव्यक्तावर अविश्वास असल्यामुळे तात्त्विकदृष्टया कार्याकार्यनिर्णयास आधिभौतिक तत्त्वे अपुरी पडतात हे जाणूनही त्यातल्यात्यातच शब्दजाल वाढवून पाश्चिमात्य आधिभौतिक पंडित व्यक्तानेच ज्याप्रमाणे कसातरी सर्व निर्वाह करून घेतात तसे न करता, या तत्त्वांची परंपरा पिंडब्रह्मांडाच्या मूळ अव्यक्त व नित्य तत्त्वापर्यंत नेऊन मोक्ष, नीतिधर्म व व्यवहार या तिहींचीही तत्त्वज्ञानाच्या आधारे गीतेत भगवंतांनी पूर्ण एकवाक्यता करून दाखविली आहे व त्यामुळे कार्याकार्यनिर्णयार्थ जो धर्म सांगितला तोच मोक्ष प्राप्त करून देण्यासही समर्थ आहे, असे अनगीतेच्या आरंभी स्पष्ट म्हटले आहे." (पृ. ४८८) "गीतारहस्याच्या उपसंहारातील" लो. टिळकांचे हे म्हणणे पाश्चात्यांचे नीतिशास्त्र कसे अपूर्ण व जीवनाला पूर्णता आणण्यास असमर्थ आहे हे लक्षात येण्यास पुरे आहे. "मोक्षधर्म व नीतिशास्त्र किंवा अध्यात्मज्ञान आणि नीती यांची सांगड घालून देण्याचे कारण नाही; असे ज्यांचे मत असेल त्यांना या उपपादनाचे महत्त्व कळणार नाही," असे जे त्यांनी पुढे म्हटले आहे त्यातच साधनसंपत्तीच्या श्रेष्ठत्वाचे महत्त्व इंगित असून नीतिशास्त्राची मोक्षधर्माला नितांत आवश्यकता आहे, हे स्पष्ट आहे.

या दृष्टीनेच Paul Brunton याने "The Hidden Teaching Beyond Yoga" या पुस्तकातील "The Philosophical Discipline" या पाचव्या प्रकरणात असे म्हटले आहे की, "The simple fact that the average person permits whatever desire for knowcledge he may possess to be overborne by dislike arising from his superficial impression of philosophy or by a feeling of fear of the abstract itself unfits him to pursue such study. For there are certain cardinal characteristics required of every man before he can even be permitted to cross its very threshold. Nobody can hope to philosophize with profit who lacks seven psychological qualities. They are necessary because they present the means whereby he may successfully to reach his end. An explorer who wishes to penetrate into difficult new territories, who will have to cross mountains, rivers and deserts on his journey, should, if he knows his business at all, first prepare for the expedition by obtaining a proper

equipment. He who seeks to explore the hidden philosophy and penetrate into the new territory of truth must likewise look to the nature and quality of his own personal equipment before his mind may venture forth into an activity which is likely to try and test his capacity to the uttermost.

It is not anybody and everybody who can undertake such an expedition. Those who will fulfil the preliminary conditions can alone hope for final success. These conditions are not externally imposed but are inherent in the very nature of the apprehension of truth, and therefore their fulfilment is inexorable. Nor are they manufactured arbitrarily by any exacting teacher. They are imposed by Nature herself and accepted by long tradition. However, nobody need trouble himself with them unless he or she belongs to the earnest few who seek to know the ultimate secret of life at any cost. All other persons can comfortably ignore them and take their own time and ease in life. Emerson has well said; " Take that thou will, but pay the price. " These words fit quite squarely at this point of our quest. " A ten–thousand mile journey starts with the first step " says a Chinise proverb." ( Page·92,97 )

एक साधी गोष्ट अशी आहे की, सर्वसामान्य माणूस त्याच्या ठिकाणी असलेल्या ज्ञानप्राप्तीच्या इच्छेला, ज्ञानाची नावड उत्पन्न करणाऱ्या तत्त्वज्ञानाच्या वरवरच्या समजूतींना किंवा मतांना अधिक महत्त्व देतो अथवा त्यांचे आपल्यावर खूप आक्रमण होऊ देतो किंवा त्याच्या ठिकाणी अशी भीतीची भावना असते की, ते अमूर्ततत्त्वच स्वतः त्याला अशा प्रकारच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्यास अपात्र ठरवील याचे कारण असे आहे की, या तत्त्वज्ञानाचा उंबरठा ओलांडण्यासाठी अर्थात् तो ओलांडून त्यात प्रवेश करण्यास त्यास परवानगी देण्यापूर्वी प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणी काही महत्त्वाचे गुणविशेष किंवा लक्षणविशेष असणे आवश्यक असते. जो सप्त मानसिक गुणांविरहित असतो त्याने तत्त्वज्ञानान्वेषण करण्याची आशा व्यर्थ ठरते. हे गुण आवश्यक आहेत; कारण ते साधकाचे प्रतिनिधित्व करतात न त्यांच्या आधारानेच साधक गंतव्य स्थानापर्यंत यशस्वीरीत्या जाऊ शकतो. ज्याला आपल्याला कोणते कार्य किंवा मोहीम अंगिकृत करावयाची आहे याची जाणीव

असते असा एखादा संशोधक जेव्हा नवीन दुर्गम प्रदेशात प्रवेश करतो; तेव्हा तो प्रवासात आपल्याला पर्वत, नद्या व वाळवंटे ही सर्व ओलांडावयाची आहेत, हे लक्षात घेऊन, त्यादृष्टीने प्रथमच सर्व साधनसामुग्री आपल्याबरोबर बाळगून, प्रवासाची किंवा मोहिमेची तयारी करतो. ज्याला गुप्त अशा तत्त्वज्ञानाचा शोध किंवा अनुभूती घेण्याची इच्छा असते व जो सत्याच्या नूतन प्रदेशात शिरकाव करतो त्याने आपल्याजवळील साधनसामुग्रीची पात्रता किंवा मगदूर व स्वभाव काय आहे, हे ओळखून त्याप्रमाणे या साहसास उद्युक्त व्हावे; कारण या गोष्टी बहुतकरून त्याच्या पात्रतेची जास्तीत जास्त परीक्षा घेण्याचा प्रयत्न करतील.

अशा प्रकारची मोहीम प्रत्येकजण व कोणीही अंगिकृत करू शकेल असे नाही. जे प्राथमिक अटी परिपूर्ण करू शकतील तेच फक्त अंतिम यशाची आशा करू शकतात. या अटी साधकावर बाहेरून लादलेल्या नसतात; तर त्या त्याच्या खऱ्या स्वभावातच अनुस्यूत असतात. या अटी अर्थात् साधनसंपत्ती ही जबरदस्तीने एखाद्या कठोर शिक्षकाकडून शिकवून उत्पन्नही करता येत नाही. या गोष्टी निसर्गानेच साधकात अंतर्निहित केलेल्या व प्राचीन परंपरेने त्या स्वीकृत केलेल्या असतात. अर्थात् जोपर्यंत कोणतेही मूल्य देऊन अंतिम सत्याची किंवा रहस्याची प्राप्ती करणाऱ्या अत्यंतिक उत्सुक अशा स्त्री किंवा पुरुष साधकांपैकी कोणीही नसतात तोपर्यंत वरील गोष्टीसंबंधी स्वतःला त्रास करून घेण्याचे त्यांना कारण नाही. इतर सर्व लोक सोयीस्करपणे या गोष्टींकडे दुर्लक्ष करू शकतात व ते आयुष्यातील आपल्या वेळेचा उपभोग व सुख घेऊ शकतात "योग्य मूल्य मोजून आपणास पाहिजे ते घ्या" असे जे इमर्सनने म्हटले आहे, ते आपल्या प्रश्नाच्या उत्तराला सर्वांगाने चपखल लागू पडते. एका चिनी म्हणीतही असे सांगितले आहे की, "दहा हजार मैलांच्या प्रवासाला पहिले पाउल टाकल्यानेच सुरुवात होते."

साधनसंपत्तीचे हे महत्त्व ओळखूनच श्री. सुरेंद्रनाथ दासगुप्ता यांनी 'A History of Indian Philosophy" या विश्वविख्यात ग्रंथातील "The Philosophy of Bhagavad Gita" या दुसऱ्या खंडातील १४ व्या प्रकरणात असे म्हटले आहे की, "A part from the caste-duties and other deeds that are to be performed without any attachment the Gita Speaks again and again of sacrifices, tapas and gifts, as duties which cannot be ignored at any stage of our Spiritual development" ( Page 513 )

कोणत्याही आसक्तीशिवाय केलेल्या वर्णाच्या कर्तव्याशिवाय व इतर कर्मांशिवाय आपल्या आध्यामिक उन्नतीसाठी त्याग, तप व दान यांच्या विषयी अर्थात् साधनसंपत्तीच्या बाबतीत कधीही व कोणत्याही पातळीवर अगर परिस्थितीत दुर्लक्ष करून चालणार नाही, असे गीता पुनःपुन्हा बजावून सांगते.

डॉ. राधाकृष्णन् यांनी आपल्या " भारतीय दर्शन " या विश्वविश्रुत ग्रंथाच्या पहिल्या भागातील " भगवद्गीताका आस्तिकवाद " या नवव्या अध्यायात उपरोक्त प्रश्नाचा उहापोह करताना असे म्हटले आहे की, " वह प्रसंग जिसमें पडकर कहा जाता है कि गीताका उपदेश दिया गया, वह निर्देश करता है कि इसका मुख्य प्रयोजन जीवनकी समस्याको हल करना और न्यायोचित आचरणको प्रेरणा देना था। प्रत्यक्षरूपमें यह एक नैतिक ग्रंथ है, एक योगशास्त्र है। गीताका निर्माण एक नैतिक धर्मके युगमें हुआ था और इसीलिए उस युगकी भावनामें इसने भी भाग लिया। भलेही गीतामें योग शब्दका व्यवहार किसी भी प्रकरणानुकूल अर्थोंमें क्यों न हुआ हो, यह समस्त ग्रंथमें आदिसे अंततक अपने कर्मपरक निर्देशको स्थिर रखता है। (योग क्रियात्मक अभ्यास है और भगवानके योगको उसकी अद्भुत शक्ति कहा गया है।) योग ईश्वरके सान्निध्यमें पहुंचने, एक ऐसी शक्तिके साथ जो विश्वका शासन करती है, संबंध जोडने और परमसत्ताको स्पर्श करनेका नाम है। यह न केवल आत्माकी किसी विशेष शक्तिको अपितु हृदय, मन एवं इच्छाकी समस्त शक्तियोंको ईश्वरके अधीन कर देना है। यह मनुष्यका अपनेको गंभीरतम तत्त्वके साथ संयुक्त कर देनेका प्रयत्न है। हमें आत्माके संपूर्ण संतुलनको परिवर्तित करके एक निरपेक्ष तथा दृढ भावमें लाने एवं शक्ति और सुखके प्रतिरोधक शक्तिको विकसित करनेकी आवश्यकता है। इस प्रकार योगसे तात्पर्य उस अनुशासन (अथवा आत्मनियंत्रण) से है जिसके द्वारा हम संसारके आघातोंको सहन करनेके लिए अपनेको अभ्यस्त बना सके और हमारी आत्माके मुख्य अस्तित्व-पर भी कोई प्रतिकूल प्रभाव न पड सके। योग एक ऐसा साधन अथवा उपाय है, जिसके द्वारा लक्ष्यको प्राप्त किया जा सकता है। (पृ. ४९०)

गीताने जो योग-प्रणालीको अंगीकार किया है वह मानसिक प्रशिक्षणके साधनके रूपमेंही स्वीकार किया है। योग-साधना हमें ऐसे निर्देश देती है जिनके द्वारा हम अपनेको अपने परिवर्तनशील व्यक्तित्वसे ऊपर उठाकर असाधारण प्रवृत्तिमें ला सकते हैं जहां हमारे पास ऐसी कुंजी रहती है जो संबंधोंरूपी समस्त नाटकका सूत्र है। योगसाधनाके अनिवार्य उपाय ये हैं। (१) मन, शरीर एवं इंद्रियोंको पवित्र करना जिससे कि दैवीय शक्तिका उनके अंदर संचार हो सके; (२) एकाग्रता, अर्थात् इंद्रियोंकी और दौडनेवाले विशृंखल विचारोंकी चेतनासे मनको हटाकर उसे सर्वोपरि ब्रह्ममें स्थिर करना; (३) और यथार्थसत्ताके पहुंचनेके पश्चात् उसके साथ तादात्म्य स्थापित करना। " (पृ ५१३)

या साधनसंपत्तीलाच वेदान्तात साधन चतुष्टय म्हटले असून महर्षी पतंजलींनी हेच यम-नियम होत असे सांगून सार्वभौम महाव्रत म्हणून त्यातील

यमाचा उल्लेख केला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी साधनसंपत्तोला दैवीसंपत्ती म्हटले असून साधनासाठी दैवीसंपत्तीची नितांत आवश्यकता आहे, हे सांगून दैवी-संपत्ती म्हणजे काय, हे सांगताना ते असे म्हणतात की–

मग जाणतया जें विरू। तयाची वाट वाहती करूं।
ज्ञाना हित तेंचि विचारूं। सर्वभावें ॥१६.५७॥
ऐसा ज्ञानजिज्ञासु तुम्ही समस्तीं। भावो जो धरिला असे चित्तीं
तो पुरवावया लक्ष्मीपती। बोलिजेल ॥५८॥
ज्ञानासि सुजन्म जोडे। आपुली विश्रांतिही वरी वाढे।
ते संपत्तीचे पवाडे। सांगिजेल दैवी ॥५९॥
आणि ज्ञानाचेनि कामाकारें। जे रागद्वेषांसि दे थारे।
तिये आसुरियेहि घोरे। करील रूप ॥६०॥
सहज इष्टानिष्ट करणी। दोघीचि इया कवतुकिणी ॥६१॥
परी हें असो आतां प्रस्तुतीं। ज्ञानाच्या हिताहितीं।
समर्था संपत्ती। इयाचि दोन्ही ॥६४॥
जे मुमुक्षुमार्गींची बोळावी। जे मोहरात्रीची धर्मदिवी।
ते आधीं तंव दैवी। संपत्ती ऐका ॥६५॥
जेथ एक एकाते पोखी। ऐसे बहुत पदार्थ येकीं।
संपादिजती ते लोकीं। संपत्ती म्हणिजे ॥६६॥
ते दैवी सुखसंभवी। तेथ दैवगुणें येकोपजीवीं।
झाली म्हणौनि दैवी। सपत्ति हे ॥६७॥

साधकाने ज्ञानप्राप्तीसाठी त्याच्या विरुद्ध जी सामुग्री असेल तिची वाट मोकळी करून म्हणजे ती सोडून देऊन ज्ञानप्राप्तीस हितकर व अनुकूल अशी कोणती सामुग्री आहे तिचाच मनोभावाने विचार करावा तुम्ही सर्व मुमुक्षूंनी ज्ञानप्राप्तीची जी इच्छा मनात धरली आहे, तीच पूर्ण करण्याकरिता श्रीकृष्ण आता यापुढे उपाय सांगतील. ज्याच्या योगाने आत्मज्ञान सुलभ होऊन उत्तम रीतीने अंतः-करणात प्रकट होईल व चित्ताची पूर्ण शांती होईल अशा दैवीसंपत्तीची महती भग-वान् सांगतील. आणि अज्ञानामुळे उत्पन्न होणाऱ्या विषयवासनेच्या रूपाने राग-द्वेषाला आश्रय देणाऱ्या व उत्पन्न झालेल्या ज्ञानाचाही नाश करणाऱ्या अशा अत्यंत घोर आसुरी संपत्तीचेही स्वरूप ते वर्णन करतील. ह्या दोन संपत्तीच इष्ट म्हणजे कल्याण व अनिष्ट म्हणजे अकल्याण करण्याचे कौतुक करून दाखविणाऱ्या आहेत. परंतु आता हे असो. प्रस्तुत सांगण्याचे तात्पर्य इतकेच आहे की, ज्ञानाचे हित व अहित करण्यास अनुक्रमे या दोन संपत्तीच समर्थ आहेत. जी दैवी संपत्ती मुमु-क्षूला मोक्षमार्गात सोबत करून इष्टस्थळी पोहोचविणारी किंवा पाठराखण कर-

णारी आहे व मोहरूपी रात्रीत वाट चालण्यास जणू काही धर्मरूपी तेवती मशालच आहे, तिचे आधी वर्णन करतो ते ऐका. ज्या ठिकाणी एक पदार्थ दुसऱ्या पदार्थाचे पोषण करतो व असे एकमेकाला पोसणारे पुष्कळ पदार्थ एके ठिकाणी मिळविले जातात त्याला लोकात संपत्ती असे म्हणतात. ती दैवीसंपत्ती सुख उत्पन्न करणारी आहे. ही संपत्तीच सर्व दैवी गुणांना एकमात्र आश्रयस्थान आहे. म्हणूनच या संपत्तीला दैवी असे म्हटले आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी दैवी व आसुरी संपत्तीचे वर्णन विस्ताराने केले आहे; कारण त्यांचे स्वरूप विधिनिषेधरूप आहे. याचा अर्थ दैवी संपत्तीचे विधिरूपाने आचरण करावयाचे व आसुरी संपत्तीचा निषेधरूपाने त्याग करावयाचा. "विधीते पाळीत । निषेधाते गाळीत ।।" असेच सर्व धर्मशास्त्राचे स्वरूप असून नीतिशास्त्र किंवा साधनसंपत्ती हा अध्यात्माचा एक अविभाज्य असा पायभूत घटक असल्याने त्याचेही स्वरूप असेच असणार हे निश्चित आहे. साधनसंपत्तीचे हे ग्रहणत्यागरूप ओळखून दैवी संपत्तीचे ग्रहण व आसुरी संपत्तीचा त्याग करून साधकाने वाटचाल करीत साधनात अखेरची स्थिती किंवा अंतिम ध्येय प्राप्त करून घ्यावयास हवे. त्याचप्रमाणे श्रीमद्भगवद्गीतेत वर उल्लेखिल्याप्रमाणे भक्त, ज्ञानी, स्थितप्रज्ञ इत्यादींची जी लक्षणे कथन केली आहेत, ती उभयविध म्हणजे साधकाच्या दृष्टीने साधनरूप व सिद्धांच्या दृष्टीने साध्यरूप अशी आहेत. "सिद्धस्य लक्षणानि साधकस्य साधनानि" असे जे शास्त्रकारांनी म्हटले आहे, त्याचा अर्थही सिद्धांची जी लक्षणे असतात ती साधकांची साधने असतात असाच आहे. साधनसंपत्तीचे हे उभयविधरूप लक्षात घेतले म्हणजे प्रत्येक सद्गुण हा अपूर्ण अवस्थेत साक्षात्काराचे साधन असतो व साक्षात्काराने तो पूर्णावस्थेला जातो हे ध्यानात येते. त्यामुळे साधनसंपत्ती सिद्धसाधक लक्षणांनी एकाचवेळी मंडित झालेली आढळली; तरी ती अविरोधात्मकच असते, हे सत्य आहे.

साधनसंपत्तीचे किंवा दैवीसंपत्तीचे गुण हे नेहमीच अमूर्त असतात. जोपर्यंत त्यांना साधकाच्या शरीराचा आश्रय, अधिष्ठान किंवा आधार मिळत नाही तोपर्यंत ज्ञानाशी एकरूप असलेले हे गुण समूर्त होऊन प्रकट होऊ शकत नाहीत. सिद्धयोगाचे साधन करताना ही साधनसंपत्ती किंवा दैवीगुण साधकात क्रमशः कसे वाढत जातात व साधकाच्या परिपक्व किंवा सिद्धावस्थेत हे सद्गुण उत्कटत्वाने कसे विलसत असतात, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

तें अनिरूप्य कीं निरूपिजे । ऐकतां बुद्धी आणिजे ।
वांचूनि डोळा देखिजे । ऐसें नाहीं ।।१३·१७७।।
मग तेचि इये शरीरीं । जैं आपुला प्रभावो करी ।
तैं इंद्रियांचिया व्यापारीं । डोळांहि दिसे ।।१७८।।

पैं वसंताचें रिगवणें । झाडांचेनि साजेपणें ।
जाणिजे तेवीं करणें । सांगती ज्ञान ॥१७९॥
अगा वृक्षासि पाताळीं । जळ सांपडे मुळीं ।
तें शाखांचिये बाहाळीं । बाहेर दिसे ॥१८०॥
कां भूमीचें मार्दव । सांग कोंभाची लवलव ।
नाना आचारगौरव । सुकुलीनाचें ॥१८१॥
अथवा संभ्रमाचिया आयती । स्नेहो जैसा ये व्यक्ती ।
कां दर्शनाचिये प्रशस्तीं । पुण्यपुरुष ॥१८२॥
नातरी केळीं कापूर जाहला । जेवीं परिमळें जाणों आला ।
कीं भिंगारी दीपु ठेविला । बाहेरि फांके ॥१८३॥
तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जियें देहीं उमटती चिन्हें ।
तियें सांगों आतां अवधानें । चांगें आइक ॥१८४॥

ज्ञान म्हणजे जागृत शक्ती होय. तिचे निरूपण करता येत नाही. तरीही तिचे जेव्हा निरूपण केले जाते तेव्हा बुद्धीची म्हणजे प्राणाची जागृत अवस्थाच ते निरूपण ग्रहण करण्यासाठी आणणे अर्थात् उपस्थित करणे आवश्यक आहे. याशिवाय कोणत्याही उपायाने ते डोळयास पाहता येईल, अशी ती वस्तू नाही हे खरे. पण तेच ज्ञान ज्यावेळेस या शरीरात अभिव्यक्त होऊन आपले सामर्थ्य प्रकट करते त्यावेळी ते इंद्रियांच्या आचारावरून दृष्टोत्पत्तीस येते. ज्याप्रमाणे झाडाच्या टवटवीतपणावरून वसंत ऋतूचा प्रवेश किंवा आरंभ झाला आहे हे समजते त्याप्रमाणे ज्ञानी माणसाची अगर साधकाची इंद्रिये त्याची ज्ञानस्थिती सांगतात. अर्जुना ! झाडाला जमिनीत मुळाशी पाणी सापडले आहे हे त्याच्या फांद्यांच्या विस्तारावरून व त्यांच्या टवटवीतपणावरून दिसून येते. अथवा अंकुराच्या लुसलुशीतपणामुळे जसा जमिनीच्या अंगातील मृदुपणा हा गुण स्पष्ट होतो किंवा उत्तम प्रकारच्या आचारावरून माणसाचा कुलीनपणा दिसून येतो. अथवा आदरातिथ्याच्या तयारीवरून जसा स्नेहभाव किंवा मनातील प्रेम दिसून येते. एखाद्याचे प्रथम दर्शन होताच मनाला होणाऱ्या समाधानावरून किंवा चित्ताच्या प्रसन्नतेवरून हा पुण्यवान् पुरुष आहे असे कळून येते. केळीत उत्पन्न झालेला कापूर जसा सुवासावरून लक्षात येतो किंवा भिंगात अगर तावदानात ठेविलेल्या दिव्याचा प्रकाश ज्याप्रमाणे सभोवार पसरतो त्याप्रमाणे हृदयात आत्मशक्ती कुंडलिनी ज्ञानरूपाने प्रकट झाल्यावर जी लक्षणे उमटलेली, प्रकट झालेली किंवा व्यक्त दशेस आलेली दिसतात ती आता सांगतो. चांगले लक्ष देऊन ऐक.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या सर्व विवेचनाचा अर्थ अगदी स्पष्ट आहे की, ज्यावेळी प्रसवक्रमाने किंवा उभारणीच्या क्रमाने आद्या शक्ती " दैवी झोपा

गुणमयी ॥ गीता ७.१४ ॥ " या न्यायाने पिंडब्रह्मांडाची रचना करून "अज्ञानं यदतोऽन्यथा ॥ गीता १३.११ ॥ " चाच विस्तार करताना दिसते त्यावेळी हा विस्तार " अधःशाखं अश्वत्थं ॥ गीता १५.१ ॥ " याचाच विस्तार असून यालाच " अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ गीता १६.४ ॥ " असे भगवान् श्रीगोपालकृष्णनाथ म्हणत आहेत, हे स्पष्ट दिसते. परंतु ज्यावेळी सद्गुरुकृपेने ही अनादि निद्रिस्त अशी आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती जागृत होते तेव्हा ती प्रतिप्रसवक्रमाने किंवा संहारणीच्या क्रमाने " दैवीं प्रकृतिमाश्रिताः ॥ गीता ९.१३ ॥" या न्यायाने पिंडब्रह्मांडाची संहारणी करून " एतज्ज्ञानमिति प्रोक्तम् ॥ गीता-१३.११ ॥ " चाच विस्तार करताना दिसते. वास्तविक हा उर्ध्वमूलाकडे अर्थात् सहस्राराकडे होणारा संकोच आहे. असे असले; तरी " सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते ॥ गीता १४.११ ॥ " अशा अवस्थेप्रत जेव्हा साधन परिणत होत जाते तेव्हा ते " तैसें हृदयींचेनि ज्ञानें। जिये देहीं उमटती चिन्हें ॥१३.१८४॥" असेच प्रकट होते, हे निःसंशय सत्य आहे; कारण जेव्हा साधनाने ही स्थिती देहात उत्पन्न होते तेव्हा काय घडते हे सांगताना उपरोक्त गीता श्लोकार्धाचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

पैं रजतमविजयें। सत्त्व गा देहीं इयें।
वाढतां चिन्हें तियें। ऐसीं होती ॥१४·२०४॥

जे प्रज्ञा आंतुलीकडे। न समाती बाहेरी वोसंडे।
वसंतीं पद्मखंडें। दृती जैसी ॥२०५॥

सर्वेंद्रियांच्या आंगणीं। विवेक करी राबणी।
साचचि करचरणीं। होती डोळे ॥२०६॥

राजहंसापुढें। चांचूचें आरगडें।
तोडी जेवीं झगडे। क्षीरनीराचे ॥२०७॥

तेवीं दोषादोषविवेकीं। इंद्रियेंचि होती पारखीं।
नियमु बा रे पायिकी। वोळगे तें ॥२०८॥

नाइकणें तें कानचि वाळी। न पहाणे तें दिठीचि गाळी।
अवाच्य तें टाळी। जीभचि गा ॥२०९॥

वाती पुढां जैसें। पळो लागे काळवसें।
निषिद्ध इंद्रिया तैसें। समोर नोहे ॥२१०॥

धाराधरकाळें। महानदी उचंबळे।
तैसी बुद्धि पघळे। शास्त्रजातीं ॥२११॥

अगा पुनवेच्या दिवशीं। चंद्रप्रभा धांवे आकाशीं।
ज्ञानीं वृत्ति तैसी। फांके सैंघ ॥२१२॥

**वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे ।**
**मानस विटे । विषयांवरी ।।२१३।।**

या सर्वाचा अर्थ असा आहे की, एकमात्र सिद्धयोग साधनामुळेच साधक साधनसंपत्तीचा किंवा दैवीसंपत्तीचा अधिकारी बनतो. जागृत शक्तीमुळेच "वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे । मानस विटे । विषयांवरी ।।१४.२१३।। " हे सर्व आपोआप घडून येते. यासाठी साधकाने नियमित साधन करणे नितांत आवश्यक ठरते. त्याने "आम्हीं साधन हें जें सांगितले । तेंचि शरीरीं जिहीं केलें ।।६.३२६।। याप्रमाणे दीर्घकाल, निरंतर व मोठ्या आदर सत्काराने साधन केले म्हणजे "ते आमुचेनि पाडें आले । निर्वाळलेया ।। ६.३२६ ।। " या न्यायाने साधक परमात्मस्वरूप होत असल्याने तो त्याच्याप्रमाणेच सर्वोत्तम दैवीसंपत्तीचा अधिकारी होतो यात काही शंकाच नाही. अशा प्रकारे साधक सिद्धयोग साधनानेच साधनसंपत्तीचा अधिकारी होतो, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**बळियें इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना ।**
**पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ६.४६०।।**
**ऐसें नेणों काय अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासें ।**
**समाधि घर पुसे । मानसाचें ।।४६१।।**

सारांश, सिद्धयोग साधनेच्या अर्थात् जागृत शक्तीच्या अपार महिम्याने साधक निम्नाधिकारी असला तरी कालेकरून तिच्यामुळे उपरोक्त प्रकारे प्राप्त होणाऱ्या संपत्तीमुळे भाग्यपुरुष होतो, यात तिलप्राय शंका नाही. हे सर्व खरे असले तरी " तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं । विक्षेपांचीं पाणिवळें झाडिलीं ।।६.४७१।। " हे लक्षात घेऊन विधिनिषेध किंवा ग्रहणत्यागरूपाने साधकाने आपल्या अंगी साधन-संपत्ती बाणविण्याचा खूप प्रयत्न केला पाहिजे. अशा प्रकारच्या स्वतंत्र प्रयत्नांना साधकाने अवसर द्यावा म्हणूनच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे अगदी निक्षून सांगितले आहे की—

**शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें ।**
**जें घेववी तें न म्हणावें । विषही विरु ।।१६.४६०।।**

याचा अर्थ असा आहे की, साधकाने साधनसाध्य व प्रयत्नसाध्य अशा दोन्ही गोष्टींना अवसर देऊन साधनसंपत्तीचे अधिकारी व्हावे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे सांगणे आहे.

## साधनसंपत्तीचे माहात्म्य व श्रेष्ठता :—

सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या साधकाच्या दृष्टीने अंतिम साध्यापर्यंत जाण्या-साठी साधनसंपत्ती ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट असल्याने " ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंतःकरणें । आथिला तोचि जाणें । मानूं इये ।।१.६१।। " येथपासून

तो " तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारिये ॥१८.१७५०॥ " येथपर्यंत ही गोष्ट श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पुनःपुन्हा आवर्जून व आवर्तून सांगितली आहे. जो साधक साधनसंपत्तीने युक्त होऊन शुद्ध व स्थिर झालेल्या अंतःकरणाने संपन्न असेल तोच या गीतेच्या प्रतिपाद्य अशा सिद्धयोग या विषयाचे रहस्य जाणू शकतो व जे साधनसंपत्तीने युक्त आहेत तेच या सिद्धयोगाच्या अध्यात्मशास्त्रात अधिकारी आहेत, असे आपले मत आहे, असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे, त्यातच साधनसंपत्तीचे माहात्म्य व श्रेष्ठता अंतर्निहित झाली आहे, हे निभ्रांत सत्य आहे.

स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती किंवा शिवशक्तीचे सामरस्य हे अंतिम तत्त्व सिद्धयोगाच्या प्रयोगशाळेत साधकाच्या द्वारा सिद्ध होणार असल्यामुळे किंवा करावयाचे असल्यामुळे, ज्याप्रमाणे शास्त्रीय प्रयोगाचे जर अचुक उत्तर हवे असेल; तर सर्व उपकरणे व परिस्थिती (Instruments and invironment) त्या प्रयोगाला अनुकूल अशीच आवश्यक असते त्याप्रमाणे या सिद्धयोगाची किंवा शक्तिपातयोगाची फले शास्त्रीय निकषावर उत्तम ठरतील इतकी चांगली व उत्कृष्ट यावी असे वाटत असेल; तर साधनसंपत्तीचा अपूर्व साठा साधकाजवळ असला पाहिजे हे उघड आहे. असे घडले; तर सिद्धयोगाच्या प्रयोगशाळेत सुरू केलेल्या प्रयोगाचे अचुक फळ मिळाल्याशिवाय किंवा शंभर टक्के फलनिष्पत्ती झाल्याशिवाय राहणार नाही.ही वस्तुस्थिती लक्षात घेऊनच वेद,उपनिषदे,शास्त्रे, पुराणे, गीता, महाभारत, रामायण, तंत्रग्रंथ व सर्व साधुसंतांचे ग्रंथ यातून उपरोक्त प्रकारे साधनसंपत्तीचा महिमा किंवा श्रेष्ठत्व सांगितलेले आढळते.आपल्या या सर्व शास्त्रकारांनी या प्रयोगशाळेतील साधनांचा फार फार चिकित्सेने विचार केला आहे. जगाच्या पाठीवरील अध्यात्माच्या कोणत्याही प्रयोगशाळेत इतक्या सूक्ष्मरीतीने उपकरणांच्या चिकित्सेचा विचार अशा प्रकारे प्रस्तुत झाला असेल असे वाटत नाही. विषयाच्या, साध्याच्या किंवा ज्या वस्तूची प्राप्ती व्हावयाची आहे तिच्या माहात्म्यामुळे किंवा श्रेष्ठतेमुळे तत्प्राप्तीच्या साधनसंपत्तीचाही तितकाच महिमा असणे अगदी स्वाभाविक आहे. वस्तू जेवढी मौल्यवान असते तेवढी तिची किंमतही मोठी असते. ती मोजल्याशिवाय वस्तू मिळत नाही. " व्हावया वस्तूची प्राप्ती । साधन साधक करिती । तंव तंव वस्तु आहुती । साधकाचीच मागे ॥२१.४४॥ " असे जे श्रीसमर्थांनी " एकवीस समासी " या प्रकरण ग्रंथात म्हटले आहे त्याचा अर्थही हाच आहे. या दृष्टीने या विषयाकडे पाहिले म्हणजे आपल्या सर्व शास्त्रकारांनी साधनसंपत्तीचा हा विषय पुनःपुन्हा घोळवून घोळवून का मांडला आहे, हे स्पष्ट होईल. साध्यप्राप्तीमध्ये किंवा ध्येयसिद्धीमध्ये या साधनसंपत्तीचे महत्त्व फार मोठे असल्याने वेदान्त्यांनी साधन चतुष्टय, योगशास्त्रकारांनी यम—नियम, काहींनी गुरु-शिष्यांचे गुण व इतरांनी

सद्‌गुण किंवा नीती म्हणून हा विषय मांडला आहे. "इयें आनानें नांवें। परि निरूप्य आन नोहे ॥१३.९६५॥" हा श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा सिद्धांत लक्षात ठेविला म्हणजे प्रत्येकाने आपापल्या पद्धतीने निरनिराळ्या नावांनी हा विषय प्रस्तुत केला असला तरी त्याचा केंद्रबिंदू,पाया किंवा हेतू एकच आहे हे लक्षात येते. त्याचप्रमाणे सर्व पारमार्थिक ग्रंथांचे अभ्यासपूर्वक वर्गीकरण (Anylisis) किंवा चिकित्सा (Dissection) केली; तर असे आढळून येईल की,तीनचतुर्थांशापेक्षा जास्त भाग या साधनसंपत्तीच्या स्पष्टीकरणाकरिता खर्ची पडला आहे. यावरून या विषयाचे महत्त्व किती आहे याचे आकलन होईल. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही भगवान् श्रीगोपालकृष्णनाथांच्या म्हणण्याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीमद्‌भगवद्‌गीतेत जेथे जेथे हा विषय उपस्थित झाला आहे तेथे तेथे कोसळणाऱ्या पावसाच्या सरींप्रमाणे ओव्यांची झड पाडून तो सजविला आहे. सबंध ज्ञानेश्वरीत स्थितप्रज्ञ, भक्त, ज्ञानी, गुणातीत इत्यादि विविध नावानी जी लक्षणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केली आहेत ती जर एकत्र केली; तर हे वर्गीकरण वरील विधान सहजी सिद्ध करील हे सांगण्याचे कारण नाही.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी साधनसंपत्तीचा महिमा व श्रेष्ठत्व हे अन्वय व व्यतिरेक अर्थात् विधी व निषेध म्हणजेच होकारात्मक व नकारात्मक पद्धतीने मांडून त्यांच्या दोन्ही बाजू स्पष्ट केल्या आहेत. दैवीसंपत्तीचे ग्रहण करण्यातच आसुरीसंपत्तीचा त्याग समाविष्ट असल्यामुळे हे विवेचन ग्रहणत्यागरूपाने उभयविध झाले आहे. "म्हणौनि विषय हे आघवे। सर्वथा मनौनि सांडावे ॥२.३३१॥" व "या कारणें इंद्रियांचें। दमन निकें ॥२.३४७॥" असे अन्वयाने विधानात्मक रीतीने (Positively) जसे या विषयाचे महत्त्व त्यांनी सांगितले आहे त्याप्रमाणेच "तरी विरक्तीवाचूनि कहीं। ज्ञानासि तगणेंचि नाहीं ॥१५.३६॥" व "आणि मनाचा उंबरा। वृत्तीसी देखों नेदी वीरा ॥१८.१०३०॥" असे व्यतिरेक पद्धतीने किंवा नकारात्मकरीतीने (Negatively) या विषयाचे श्रेष्ठत्व त्यांनी स्पष्ट केले आहे. अर्थात् "आतां आत्मप्रभा नीच नवी। तेचि करूनि ठाणदिवी। जो इंद्रियातें चोरूनि जेवी। तयासीचि फावे ॥६.२३॥" हा सिद्धयोगाच्या साधनशास्त्रामुळे प्राप्त होणाऱ्या स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या उपलब्धीसाठी आवश्यक असलेल्या साधनसंपत्तीच्या बैठकीचा,आधाराचा किंवा भूमिकेचा पाया आहे, हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. याचा अर्थ असा आहे की, जो साधक आत्मप्रभा नित्य नवी करतो म्हणजे जो सद्‌गुरुकृपेने जागृत झालेल्या आत्मसत्तारूपी कुंडलिनी शक्तीच्या अतःविकासाला नित्य साधन करून वाव देतो इतकेच नव्हे; तर या आत्मशक्तीच्या दिव्याच्या उजेडात इंद्रियांना आवरून साधन करतो किंवा साधनाने आवरलेल्या इंद्रियांनी मार्गक्रमण करतो त्यालाच शिवशक्तीचे सामरस्य प्राप्त होते. साधन-

संपत्तीच्या प्राप्तीचा हा पाया आहे. साधनसाध्य व प्रयत्नसाध्य हे त्याचे उभयविध रूप आहे. यातील साधनासाध्याचा महिमा व श्रेष्ठत्व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आवर्जून वारंवार कथन केला असला व साधनसंपत्तीच्या प्राप्तीचा किंवा वाढीचा तोच एकमात्र अस्सल उपाय असला तरी प्रयत्नसाध्य साधनसंपत्तीचा महिमाही श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितला आहे, हे विसरून चालणार नाही.

स्थितप्रज्ञाच्या लक्षणाचा भावार्थ प्रकट करताना साधनसंपत्तीचा महिमा सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

तैसें विषयांचें ध्यान । जरी विपायें वाहे मन ।
तरी येसणें हें पतन । गिंवसित पावे ॥२.३३०॥
म्हणौनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि सांडावे ।
मग रागद्वेष स्वभावें । नाशतील ॥३३१॥
यें युक्तीची कडसणी । नाहीं जयाच्या अंतःकरणीं ।
तो आकळिला जाण गुणीं । विषयादिकीं ॥३४२॥
तया स्थिरबुद्धि पार्था । कहीं नाहीं सर्वथा ।
आणि स्थैर्याची आस्था । तेही नुपजे ॥३४३॥
निश्चळत्वाची भावना । जरी नव्हेचि देखें मना ।
तरी शांति केवीं अर्जुना । आपु होय ॥३४४॥
जेथ शांतीचा जिव्हाळा नाहीं । तेथ सुख न्निसरोनि न रिगे कहीं ।
जैसा पापियाच्या ठायीं । मोक्षु न वसे ॥३४५॥
देखें अग्निमाजों घापती । तियें बिजें जरी विरूढती ।
तरी अशांता सुखप्राप्ती । घडों शके ॥३४६॥
म्हणौनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें ।
या कारणें इंद्रियांचे । दमन निकें ॥३४७॥
इंद्रियें जें जें म्हणती । तें तेंचि जें पुरुष करिती ।
ते तरलेचि न तरती । विषयसिंधु ॥३४८॥
जैसी नाव थडिये ठाकितां । जरी वरपडी होय दुर्वाता ।
तरी चुकलाही मागौता । अपावो पावे ॥३४९॥
तैसीं प्राप्तेंही पुरुषें । इंद्रियें लाळिली जरी कौतुकें ।
तरी आक्रमिला जाण दुःखें । संसारिकें ॥३५०॥

येथे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मनाचे अयुक्तपण हेच दुःखाचे सर्वस्वी एकमात्र कारण आहे असा सिद्धांत प्रस्थापित केला आहे. या दृष्टीनेच "The Hidden Teaching Beyond Yoga" या पुस्तकात Paul Brunton यांनी "The Philosophical Discipline" या पाचव्या प्रकरणात असे म्हटले

आहे की, " After the reading of the present chapter has been completed the student should earnestly examine himself at leisure in a strictly objective manner to ascertain how far the desirable characteristics are present within his mental make-up. The examination must be conducted on a basis of the strictest honesty. The results of this leisurely survey may startle him if he is earnest, shame him if he is sensitive or enlighten him if he is eager for self knowledge. One of the first things it will show him is the extent to which he is swayed by harmful instincts, well-known prejudices, unknown bias, hidden fears, foolish hopes, unjust attitudes, moods o· the moment, powerful hallucinations or deep seated illuf sions; and how he gropes in a fog of conflicting motives and powerful subconscious influence. Thus he discovers what he really is ! Such a revelation will not be pleasant. If he is really unfitted for philosophy this moment will become the crucial one, when he will irritably cast the book aside and drop the subject altogether. But if he is made of the right stuff he will take to the needed discipline and gradually bring about the desired change....This cannot be done until the intellect is well clarified and the strength of its hidden complexes vanishes. The task of re-ordering one's mind is likely to be a painful process. The work of clearing away the falsities and foolishnesses which beset it is likely to leave some emptiness behind.

It is essential to find out what forces are acting in the mind and affect its reasoning and its outlook. Once the student unearths the real bases of his actions and attitudes he can philosophize freely and fearlessly, but not before. He must ruthlessly unmask by searching criticism his hidden motives, his unconscious desires, his darkly covered bias. The complexes which fill the subconscions layer of the human mind and which he neither recognizes nor names are

partly responsible for his inability to apprehend truth. A most important department of preliminary activity is therefore to dig out these mental weeds and present them to the clear light of consciousness.

Once he becomes aware of the secret processes of his mind and the secret workings of his wishes he will discover that many false beliefs, many emotional distortions, cling to it out of its long past, acting as powerful detriments to right conduct and preventing the clear insight into truth. He will find that he carries a heavy burden of illusions and rationalizations which resist the entry of real knowledge. Only through such a thorough phychological understanding into what is going on behind the scenes of his conscious personal life can liberation come and prepare the way for further steps on the ultimate path. He must strip naked his innermost characteristics, taking and making no excuses, but boldly seeking to understand the bitterest truths about himself. He must see himself as he really is, exposing self to self. Such is the delicate psychological operation needed to detect for removal from the process of thought and action all those tendencies, complexes, hallucinations and rationalizations which prevent the entry of truth into the mind or drive it along wrong roads. Until these influences are detected by analysis and exposed by interrogation they will not cease their maleficent operation. Those complexes come to dominate the man and retard his free use of reason. He has to humble himself from the beginning by not hesitating to admit that his character, both in its open and concealed phases, is a deformed, crippled and unbalanced thing. In short, he has to study a little psychology before he can profitably study philosophy. He has to analyse his emotions, examine the interaction of feeling and reason, perceive how he forms conceptions of ideas and things, and tackle the problem of unconscious motivation." (Page 94, 95).

हे प्रकरण वाचल्यानंतर मोकळ्या वेळेत पूर्ण वस्तुनिष्ठ पद्धतीने साधकाने मोठ्या आस्थेने आत्मपरीक्षण करून (तत्त्वज्ञानप्राप्तीच्या) मानसिक तयारीकरिता आपल्या ठिकाणी अपेक्षित लक्षणे किती प्रमाणात आहेत हे निश्चित करावे. ही परीक्षा अत्यंत प्रामाणिकपणाच्या भूमिकेवरूनच करावी. जर साधक आस्थेवाईक असेल; तर मोकळ्या वेळेत केलेल्या या आत्मपरीक्षणाच्या निकालामुळे बहुतकरून तो चकित होईल किंवा दचकून घाबरून जाईल; जर तो भावनाशील असेल; तर त्याची त्यालाच लाज वाटेल व जर तो आत्मज्ञानासाठी उत्सुक असेल; तर त्याला प्रकाश किंवा चेतना प्राप्त होईल. या सर्वांतील पहिली गोष्ट अशी आहे की, अपायकारक अशा सहज भावनांमुळे, ख्यातनाम पूर्वग्रहांमुळे, अज्ञात पक्षपाती दृष्टीमुळे, दडलेल्या भीतींमुळे, मूर्ख आशांमुळे, अयोग्य धारणांमुळे, मनाच्या क्षणिक कलांमुळे, जबरदस्त मानसिक भ्रांतीमुळे किंवा व्यामोहामुळे आणि मनात खोल रुतून बसलेल्या स्वप्नाळू कल्पनांमुळे तो बहकला जातो आणि अंतस्थ हेतूंच्या झगड्यामुळे तो धुक्यातील अंधारात सापडतो व शक्तिशाली अप्रकट जाणिवेच्या प्रभावाखाली येतो, हे वरील आत्मपरीक्षणावरून स्पष्ट होते. अशा प्रकारे आपण खरे कोण आहोत हे तो शोधून काढतो. अशा प्रकारचे प्रकटीकरण काही सुखकारक असत नाही.जर साधक तत्त्वज्ञानासाठी अर्थात् त्याच्या प्राप्तीसाठी अयोग्य असेल; तर त्या आत्मपरीक्षणानंतर लगेच तो रागाने पुस्तक बाजूला टाकून देईल व हा विषय सर्वस्वी गाळून टाकण्याचा निर्णय घेईल. मात्र साधक जर सत्त्वगुणयुक्त असेल; तर तो आवश्यक शिस्तीत स्वतःला बांधून घेईल किंवा ती मान्य करील व शनैः शनैः इष्ट तो बदल घडवून आणील .... बुध्दी उत्तम प्रकारे शुद्ध झाल्याशिवाय व त्यात लपलेल्या पूर्वग्रहांचे किंवा काल्पनिक गंडांचे अर्थात् आसुरी संपत्तीचे सामर्थ्य निःशेष नाहीसे होईपर्यंत ही गोष्ट घडू शकणार नाही. आपल्या मनाला पुन्हा व्यवस्थित मार्गी लावणे ही गोष्ट बहुतकरून फार त्रासदायक अशी प्रक्रिया आहे. चुकीच्या व मूर्खपणाच्या कल्पना स्वच्छ व सरळ करताना त्या साधकावर हल्ला करतात अर्थात् उसळून वर येतात व त्यामुळे मागे एक प्रकारची पोकळी शिल्लक राहते.

आपल्या मनात कोणत्या शक्ती कार्य करीत आहेत व सत्तर्कता आणि दृष्टिकोन यावर त्या शक्ती काय परिणाम करतात हे साधकाने शोधून काढणे आवश्यक आहे. ज्यावेळी साधक हा त्याच्या कार्यांचा व दृष्टिकोनांचा सत्य पाया शोधून काढील त्यावेळी तो अत्यंत मुक्त व निर्भयपणे तत्त्वनिष्ठ होऊ शकेल. मात्र या संशोधनापूर्वी साधक हे कार्य कधीही करू शकणार नाही. त्याने शोधक टीकेने अत्यंत निर्दयपणे आपल्या ठिकाणी लपलेल्या वासना, सुप्त इच्छा व काळोखात लपेटलेल्या पूर्वग्रहांचा बुरखा फाडला पाहिजे. हे सुप्त पातळीवर वावरणारे किंवा

तेथे भरून राहिलेले व ज्यांना साधक ओळखू शकत नाही किंवा त्यांना नाव देऊ शकत नाही असे गंड अंशात्मकपणे सत्य पकडू न शकण्याच्या अपात्रतेला कारणीभूत होतात. यासाठी या आसुरी संपत्तिरूपी मानसिक रानगवताला उपटून काढून अर्थात् सुप्त मनातील सर्व आसुरी संपत्तीचा त्याग करून त्यांना चैतन्याच्या स्वच्छ प्रकाशात उभे करणे हे अगदी महत्त्वाचे प्राथमिक कार्य साधकाला करावे लागेल.

ज्यावेळी साधक त्याच्या मनाच्या गुप्त प्रक्रियेविषयी व इच्छांच्या गुप्त कार्याविषयी सजग होईल त्यावेळी चांगल्या वागणुकीला अत्यंत अपायकारक असणाऱ्या व सत्याच्या अंतर्दृष्टीला बाधक होणाऱ्या किंवा सत्य थोपविणाऱ्या अशा कित्येक चुकीच्या श्रद्धा व भावनात्मक विकृती यांच्याशी भूतकाळात आपण कसे समरस झालो होतो, हे तो शोधून काढील. त्यावेळी त्याच्या हे लक्षात येईल की, सत्याच्या मार्गात प्रवेश करण्यास अडथळा करणाऱ्या कितीतरी चुकीच्या व सुज्ञतेच्या गोष्टींचे खूप मोठे ओझे आपण वागवीत होतो. हे फक्त मानसिक समजुतीद्वारा पाहिले; तर वैयक्तिक जागृत आयुष्याच्या मागे काय चालले आहे हे कळून त्यामुळे स्वातंत्र्य येऊ शकेल आणि सत्याच्या अंतिम मार्गावर पुढील पावले पडण्यासाठी साधक तयारी करतील. यासाठी या बाबतीत स्वतःच स्वतःची कसलीही गय न करता किंवा सवड न घेता साधकाने अगदी आतील नैसर्गिक प्रवृत्तींना उघडेनागडे करून अत्यंत निधडेपणाने आपल्या संबंधीचे कटु सत्य माहीत करून घेतले पाहिजे. आपण स्वतःच स्वतःला अनावृत करून आपण खरे काय आहोत हे साधकाने पाहिले पाहिजे. मनाचे कल, गंड, भ्रांती, तार्किकता इत्यादि ज्या गोष्टी मनात सत्याचा प्रवेश होण्यास प्रतिबंध करतात किंवा ज्या गोष्टी साधकाला चुकीच्या मार्गावर नेऊन सोडतात, अशा सर्व गोष्टी दूर करण्यासाठी त्या शोधून, विचारांची पद्धत व कार्य यांपासून त्यांना दूर करण्यासाठी, वरील प्रकारच्या नाजूक मानसिक शस्त्रक्रियेची जरूरी आहे. जोपर्यंत पृथक्करणात्मक पद्धतीने हे परिणाम शोधून काढले जात नाहीत व प्रश्नात्मक पद्धतीने ते अनावृत केले जात नाहीत तोपर्यंत त्यांचे दुष्ट कार्य थांबणार नाही. हे गंड माणसावर अधिसत्ता गाजविण्यासाठी येतात व मुक्त तर्काला किंवा विचाराला ते अडथळा करतात. साधकाने या बाबतीत विनयशील किंवा शरणागत राहून, उघड व लपलेल्या अशा दोन्ही पातळ्यांवरील आपले व्यक्तित्व हे आकारहीन, खुरवटलेले किंवा असंतुलित आहे, हे मान्य करण्याची घाई करू नये. सारांश, तत्त्वज्ञान शिकण्यापूर्वी साधकाने मानसशास्त्राचा थोडा अभ्यास करावा, आपल्या भावनांचे पृथक्करण करावे, आतील इच्छांच्या व तर्काच्या परिणामांचे परीक्षण करावे, कल्पना व गोष्टी आपल्या मनात कशा आकार घेतात याचा मागोवा घ्यावा आणि सुप्त हेतूंचे प्रश्न हाताळावेत.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णिलेल्या मुक्तीच्या कडसणीचे सांख्य दृष्टिकोनातून केलेले हे विस्तृत स्पष्टीकरण आहे. ते ध्यानात घेतले म्हणजे अध्यात्मशाळेतील अंतिम फलनिष्पत्तीसाठी त्याची किती आवश्यकता आहे हे लक्षात येईल. वरील सर्व स्पष्टीकरणाचे सार "त्रिपुरारहस्याच्या ज्ञानखंडात" मांडताना श्रीत्रिपुरादेवीने सर्व ऋषींना असे म्हटले आहे की—

एतदादीनि लक्ष्माणि भार्गवोत्तमज्ञानिनाम् ।
स्वात्मनस्तु परीक्षायां सुस्थिराणि न संशयः ।।२१.३०।।
साधकस्तु सदा स्वात्मपरीक्षातत्परो भवेत् ।
यथा परीक्षणेऽन्यस्य निपुणः संप्रवर्त्तते ।।३१।।
तया परीक्षन् स्वात्मानं सिद्धिं न कथमाप्नुयात् ।
यदान्यगुणदोषाणामविचारणतत्परः ।।३२।।
स्वीयानां गुणदोषाणां विचारपरमो भवेत् ।
तदा सर्वसाधनानां प्राप्त्या सिद्धिमुपेष्यति ।।३३।।

अशी ही ज्ञानी पुरुषाची लक्षणे साधकाला आपले स्वतःचे परीक्षण करता यावे म्हणून सांगितली आहेत. साधकाने नेहमी आत्मपरीक्षण करावे. दुसऱ्याचे दोष शोधण्यात मनुष्य जसा निपुण असतो, तशा नैपुण्याने तो जर आपल्याला तपाशीत राहिला; तर त्याला ज्ञान कसे प्राप्त होणार नाही ? जर साधक दुसऱ्यांच्या गुणदोषांचा विचार किंवा परीक्षा करण्याचे सोडून देऊन आपल्याच गुणदोषांचा विचार करू लागेल; तर त्याला सर्व साधने प्राप्त होऊन तो सिद्ध पुरुष होईल.

परंतु ही आवश्यकता जेव्हा विस्मृतीच्या खोल गर्तेत पडते म्हणजे आसुरी-संपत्तीचा प्रादुर्भाव तीव्रतम स्तरावर समाजात उपस्थित होतो त्यावेळी "स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ।। गीता ४.२।।" या पद्धतीने सिद्धयोगाची परंपरा क्षीणप्राय झालेली दृष्टीस येते. या श्लोकार्थाचा भावार्थ स्पष्ट करताना साधसंपत्तीच्या अभावाची ही चिकित्सा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केली आहे. यादृष्टीने ते असे म्हणतात की—

मग आणिकही या योगातें । राजर्षि जाहले जाणते ।
परी तेथोनि आता सांप्रतें । नेणिजे कोण्ही ।।४.१९।।
जे प्राणियां कामीं भरु । देहाचियावरी आदरु ।
म्हणौनि पडिला विसरु । आत्मबोधाचा ।।२०।।
अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखची परमावधि ।
जीवु तैसा उपाधि । आवडे लोकां ।।२१।।
एऱ्हवीं तरी खवणेयांच्या गांवी । पाटाउवें काय करावीं ।
सांगें जात्यंधा रवी । काय आथी ? ।।२२।।

कां बहिरयांच्या आस्थानीं । कवण गीतातें मानी ।
कीं कोल्हेया चांदणीं । आवडी उपजे ? ॥२३॥
पैं चंद्रोदया आरौतें । जयांचे डोळे फुटती असते ।
ते काउळे केवीं चंद्रातें । ओळखती ? ॥२४॥
तैसी वैराग्याची शिव न देखती । जे विवेकाची भाष नेणती ?।
ते मूर्ख केंवीं पावती । मज ईश्वरातें ? ॥२५॥
कैसा नेणों मोहो वाढीनला । तेणें बहुतेक काळु व्यर्थ गेला ।
म्हणौनि योगु हा लोपला । लोकीं इये ॥२६॥

अशा प्रकारे हा जो नीतीचा विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी येथे मांडला आहे; तो जितका आध्यात्मिका आहे तितकाच सामाजिक आहे, हे स्पष्ट आहे. "ज्ञानदेवांचे नीतिशास्त्र आध्यात्मक की सामाजिक ?" असा प्रश्न उपस्थित करून "पांच संतकवी" या पुस्तकातील ज्ञानदेवांची "नीतिमीमांसा" या प्रकरणात डॉ. शं गो. तुळपुळे यांनी त्याची चर्चा केली आहे. परंतु प्रस्तुत चर्चेत किंवा खंडन-मंडनात शिरण्याचे कारण नाही; कारण या ग्रंथाचा हेतू ज्ञानेश्वरीच्या आधाराने सिद्धयोग साधनशास्त्राची सर्व अंगे स्पष्ट करावयाची असा असल्याने "वादो नावलंब्य: ॥७४॥" या महर्षी नारदांच्या भक्तिसूत्राप्रमाणे वागून उपरोक्त हेतूचे दिग्दर्शन मात्र करणे एवढेच शिल्लक राहते. सिद्धयोगासारखे मूर्धन्य असे आध्यात्मिक साधनही कामाच्या दहराने, देहाच्या आदराने व मोहाच्या वाढीने विसर पडून लुप्त होत असेल तर नीतिशास्त्राची व्यापक दृष्टीने समाजातील धारणेची आवश्यकता नाकारता येणार नाही. त्याचप्रमाणे ज्यावेळी साधनसंपत्तीच्या उत्कटोत्कट लाटांची घुसळण समाजपुरुषाच्या अंगप्रत्यंगामध्ये भिनेल तेव्हाच त्याच्यावरील शुभ्रधवल फेसाप्रमाणे असणाऱ्या श्रीज्ञानेश्वरमहाराजांसारख्या अनर्घ्य रत्नांचे दर्शन घडत असते, हे कधीही विसरता येणार नाही. याचा अर्थ असा की, नीतिशास्त्र हे अध्यात्मशाळेतील प्रयोगाच्या सिद्धीचे जितके आवश्यक अंग आहे; तितकेच ज्याच्यावर हा प्रयोग व्हावयाचा आहे तो प्रमाता किंवा साधक हा ज्या समाजातून येणार आहे तोच जर निकृष्ट साधनसंपत्तीने युक्त असेल; तर फलनिष्पत्ती, सिद्धी, शास्त्राचा प्रवाहीपणा इत्यादि सर्व गोष्टी कालौघात टिकणे कसे शक्य आहे ? या सर्व पार्श्वभूमीवर जेव्हा "किं पुनर्ब्राह्मणा: पुण्या ॥९ ३३॥" हे भगवंतांचे वचन आपण तपासून पाहू तेव्हा त्याचे खरे मर्म आपल्याला उलगडले व "जे तपोवतार सावयव ॥९.४७६॥" हा श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा त्यावरील भावार्थ आपल्याला समजला असे होईल सारांश, नीतिशास्त्र किंवा साधनसंपत्ती ही सिद्धयोगासारखी शास्त्रे टिकण्यासाठी वैयक्तिक व सामाजिक दृष्ट्या आवश्यक आहे, असाच कौल वरील श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे विवेचन वाचून प्रतीत होत असेल; तर तेच योग्य आहे, असे म्हणणे भाग पडेल.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी साधनसंपत्तीचे महत्त्व असे उभयविध असले तरी त्याचा अंतिम हेतू सिद्धयोगाची अंतिम फलनिष्पत्ती अचूक व्हावी हाच असल्याने ते असे म्हणतात की–

**तरी तोचि योगु बापा । एके परी आहे सोपा ।**
**जरी पुत्रशोकु संकल्पा । दाखविजे ।।६.३७५।।**
**या सोपिया योगस्थिती । उकलु देखिला गा बहुतीं ।**
**संकल्पाचिया संपत्ती । रुसोनियां ।।३८७।।**
**तरी मना या बाहेरीलीकडे । यावयाची साविया सवे मोडे ।**
**हें हृदयाचिया डोहीं बुडे । तैसें कीजे ।।८.१११।।**

सिद्धयोग हा सोपा असला व या सोप्या योगस्थितीचा पुष्कळांनी अनुभवात्मक उलगडा पाहिला असला; तरी या सर्व साधकांनी संकल्पविकल्पाला पार बुडवून टाकले होते. याचा अर्थच असा आहे की, ज्यांनी काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर हे संकल्पाचे पुत्र व मनातील विषयवासना, भोगाकांक्षादि संकल्पाच्या आसुरी-संपत्तीचा पूर्ण त्याग करून साधनसंपत्तीच्या शिखरावर आरोहण केले आहे त्यांनाच सिद्धयोगाच्या अनुभूतीने कृतार्थता प्राप्त होते. अशा प्रकारची साधन-संपत्ती जर साधकाजवळ नसेल; तर त्याची एखाद्या भिकाऱ्यासारखी स्थिती होते, हे सांगताना "दासबोधात" श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**अथवा गुरु पूर्ण कृपा करी । शिष्य जाहला अनधिकारी ।**
**भाग्य पुरुषाचा भिकारी । पुत्र जैसा ।।५.३.५।।**
**तैसें एकाविण एक । होतसे निरर्थक ।**
**परलोकींचें सार्थक । तें तरी दुरावें ।।६।।**
**म्हणोनि सद्गुरु आणि सच्छिष्य । तेथे न लागती सायास ।**
**त्या उभयतांचा हव्यास । पुरे एकसरां ।।७।।**

सद्गुरू आपली शक्ती शिष्याच्या ठिकाणी संक्रमित करून दीक्षेच्यावेळी पूर्ण कृपाच करीत असतात; परंतु साधनसंपत्तीच्या अभावी शिष्याचा अधिकार कमी पडल्याने त्याची स्थिती श्रीमंत माणसाच्या भिकारी मुलासारखी होते. सद्गुरू शिष्यावर कृपा करताना पूर्ण कृपाच करतात; परंतु शिष्याच्या योग्यते-नुसार किंवा आधारग्रहणपात्रतेप्रमाणे कृपास्वीकृतीचे अथवा शक्तीच्या ग्रहणाचे प्रमाण स्वाभाविकपणे निश्चित होत जाते. ज्या जीवाचा जसा अधिकार असतो तसा त्याला लाभ होतो. सद्गुरूंच्या कृपारूप गंगेचा प्रवाह वाहत असूनही साधकाचे भांडे लहान असल्यामुळे, त्याची झोळी फाटकी असल्याने, शरीर अशुद्ध असल्याने, नाडीशुद्धी झालेली नसल्याने अर्थात् जन्मजन्मांतरी साठलेल्या कुसंस्कारांचा

साठा वासना, भोगाकांक्षा, मल इत्यादींच्या रूपाने इतका तीव्रतम रूपात दृढ किंवा घट्ट होऊन राहतो की, शक्तीचे शिष्य देहात संक्रमण होऊनही ती या गोष्टींचा भेद लवकर करू शकत नाही. या दृष्टीनेच "त्रिपुरारहस्याच्या ज्ञानखंडात" असे म्हटले आहे की—

यस्तृतीयो बुद्धिदोषो जाड्यरूपो व्यवस्थितः ।
असाध्यः सोऽभ्यासमुखैः सर्वथा ऋषिसत्तमाः ॥२०९६॥
येन तात्पर्यतश्चापि श्रुतं बुद्धिमनारुहेत् ।
तज्जाड्यं हि महान् दोषः पुरुषार्थविनाशनः ॥९७॥
तत्रात्मदेवतासेवामृते नान्यद्धि कारणम् ।
सेवायास्तारतम्येन जाड्यं तस्य हराम्यहम् ॥९८॥
जाड्याल्पानल्पभावेन सद्यो वा परजन्मनि ।
भवेत्तस्य फलप्राप्तिर्जाड्यसंयुक्तचेतसः ॥९९॥
सर्वसाधनसंपत्तिर्ममैव प्रणिधानतः ।
उपयाति च यो भक्त्या सर्वदा मामकैतवात् ॥१००॥
स साधनप्रत्यनीकं विधूयाशु कृती भवेत् ।
यस्तु मामीश्वरीं सर्वबुद्धिप्रसरकारिणीम् ॥१०१॥
अनादृत्य साधनैकपरः स्यान्मूढभावतः ।
पदे पदे विहन्येत फलं प्राप्येत वा न वा ॥१०२॥
तस्मात्तु ऋषयो मुख्यं तात्पर्यं साधनं भवेत् ।
एवं तात्पर्यवानेव साधकः परमः स्मृतः ॥१०३॥
तत्र मद्भक्तियुक्तस्तु साधकः सर्वपूजितः ॥१०४॥

बुद्धीचा तिसरा दोष जाड्य हा आहे. तो नुसत्या पुरुषार्थाने अर्थात् अभ्यासाच्या द्वारा निवृत्त करणे किंवा जिंकणे अत्यंत कठीण आहे. हा दोष असला तर पुरुषाने मोठ्या तत्परतेने श्रवण चालू ठेविले; तरी ते बुद्धीत प्रविष्ट होत नाही. हा पुरुषार्थाचा नाश करणारा मोठा दोष आहे. परमेश्वराच्या सेवेशिवाय किंवा उपासनेशिवाय त्याच्या निवृत्तीचा दुसरा कोणताही उपाय नाही. साधकाच्या सेवेप्रमाणे अर्थात् साधनाप्रमाणेच मं (जागृत कुंडलिनी शक्ती) त्याच्या बुद्धीचे जाड्य हरण करते. या जाड्याच्या अधिक-उणेपणाला अनुसरून त्याच किंवा दुसऱ्या जन्मी साधकाला ही फलप्राप्ती होते. सर्व प्रकाराची साधनसंपत्ती कोणाही साधकाला माझ्या कृपेनेच प्राप्त होते. जो पुरुष निष्काम बुद्धीने, निश्चल भावाने व भक्तिपूर्वक नित्य माझी उपासना करतो तो साधनातील सर्व अडचणींचे किंवा विघ्नांचे निवारण करून कृतकृत्य होतो. मात्र जो सर्वांच्या बुद्धीला विकसित, प्रवृत्त किंवा प्रका-

शित करणाऱ्या माझ्या अर्थात् भगवती कुंडलिनी शक्तीचा म्हणजे माझ्या जागृतीमुळे उपस्थित होणाऱ्या अंतरंग अशा सिद्धयोगसाधनाचा अनादर व दुर्लक्ष करून मूढपणे अनेक साधनांच्या मागे लागतो त्याचे बुद्धिमांद्य दूर न होता त्यास त्यामुळेच पदोपदी ठेचा खाव्या लागतात. यामुळे अशा साधकाला फळ मिळण्याची वानवाच असते. सारांश, ऋषीहो! तत्परता हेच ज्ञानाचे मुख्य साधन आहे. जो अशा प्रकारे तत्परतासंपन्न अर्थात् साधनसंपत्तिसंपन्न आहे, तोच श्रेष्ठ साधक मानला जातो. त्यातही जो माझी अर्थात् जागृत शक्तीची भक्ती करतो तो सर्वांच्या आदराला पात्र होतो.

या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे साधनसंपत्तीची अनिवार्यता अर्थात् श्रेष्ठता किंवा महत्ता लक्षात येऊन तिच्या प्राप्तीचे अखेरचे, एकमात्र व अचूक साधन जागृत कुंडलिनी शक्तीच आहे, हे ही लक्षात येते. या दृष्टिकोनातून पाहिले म्हणजे अधिकारी गुरू व अधिकारी शिष्य असल्याशिवाय संपूर्णपणे फलनिष्पत्ती किंवा सिद्धी होत नाही व सर्व गोष्टी निरर्थक होतात. शिष्याची इच्छा साधनसंपत्तीच्या अभावी अपूर्ण राहते. सद्गुरूंनी कृपा करूनही आपल्या जीवनाचे सार्थक घडले नाही असे त्याला वाटते. परंतु ज्यावेळी सद्गुरू व सच्छिष्य एकत्र येतात त्यावेळी कसलेही श्रम पडत नाहीत. आपल्याला चांगला अधिकारी शिष्य मिळून परंपराप्राप्त ज्ञानाचे संक्रमण होऊन बोधाची अतुट परंपरा सिद्ध व्हावी ही सद्गुरूंची इच्छा पूर्ण होते व आपल्याला सद्गुरूंकडून ब्रह्मज्ञान प्राप्त व्हावे ही शिष्याची आकांक्षा सफल होते. ही शास्त्रीय चिकित्सा लक्षात ठेविली म्हणजे अर्जुन, उद्धव, ध्रुव, श्रीसमर्थ, श्रीतुकाराममहाराज आदींप्रमाणे तत्काल फलप्राप्ती झाली नाही अगर अंशात्मक झाली किंवा निम्नतम लक्षणांनी ती प्रकट झाली; तर साधकाने आपल्या अपात्रतेचा विचार मनात बाळगून उत्तरोत्तर साधनद्वाराच ती वाढविण्याचा प्रयत्न करणे जसे आवश्यक आहे त्याप्रमाणेच या शास्त्राकडे चिकित्सक व बुद्धिनिष्ठ दृष्टिकोनातून जे विद्वान् पंडित पाहतात त्यांनीही "दांतही आन होती ॥६.२६३॥, देह होय सोनियाचे ॥२६८॥, लाघव ये वायूचें ॥२६८॥, मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा आलोचु आइके । मनोगत ओळखे । मुंगियेचें ॥२६९॥" इत्यादि सिद्धी साधकाच्या ठिकाणी दिसत नाहीत (अर्थात् त्यांनी पाहिलेल्या साधकाच्या) म्हणून हा शक्तिपातच नव्हे, ज्ञानेश्वरांचा शक्तिपात व सध्या जे लोक अशी दीक्षा देतात त्या शक्तिपातात भिन्नता आहे, हा नुसता एक धक्का आहे इत्यादि नाना तऱ्हेचे आक्षेप जे लोक अप्रबुद्धपणे करतात त्यांनीही साधनसंपत्तीच्या असण्यानसण्यामुळे उपस्थित होणाऱ्या पात्रापात्रतेचा विचार दृष्टीआड करता कामा नये. हा विचार एकदा सुटला; तर वरीलप्रमाणेच अनेक शंकाकुशंका वप्रश्न उपस्थित होण्यास अवसर प्राप्त होईल. निरपवाद फले दृष्टीस पडत नाहीत

म्हणून सिद्धयोगशास्त्र खोटं आहे असे जर कोणी म्हणेल; तर याच न्यायाने सर्व शास्त्रे खोटी ठरतील व त्यांचा वापर करणारे मूर्ख ठरतील. याला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जे उत्तर दिले आहे ते पाहिले म्हणजे समाधान होईल. या संबंधी ते असे म्हणतात की–

तेणें बहुतीं जन्मीं मागिलीं। विक्षेपांचीं पाणिवळें झाडिलीं।
म्हणौनि उपजतखेंवो बुडाली। लग्नघटिका ॥६.४७१॥

जे तो विषयांची दाट झाडी–। माजीं कामक्रोधांचीं सांकडीं।
चुकावूनि आला पाडीं। सद्वासनेचिया ॥७.१२७॥

अशा प्रकारे जन्मजन्मांतरी साधनसंपत्तीची प्राप्ती व्हावी, साठा व्हावा व लाभ व्हावा म्हणून जेव्हा प्रयत्न करावा तेव्हाच या जन्मात अर्जुन किंवा उद्धावासारखी प्राप्ती होत असते. एक पैसा घेऊन बाजारात गेल्यावर जवाहिऱ्याच्या दुकानात हिरा विकत मिळत नसतो हे साधकांनी व विचारवंतांनीही पक्के लक्षात ठेविले पाहिजे. हेच विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरच्या दर्जाने सांगताना असे म्हटले आहे की–

तरी विरक्तीवांचूनि कहीं। ज्ञानासि तगणेंचि नाहीं।
हें विचारूनी ठाईं। ठेविलें देवें ॥१५.३६॥

अध्यात्माच्या सर्व शाखांना हा नियम पूर्णांशाने लागू असल्याने "नैष्कर्म्यसिद्धी" या वेदान्तावरील अग्रगण्य ग्रंथात श्रीसुरेश्वराचार्य असे म्हणतात की–

शमादिसाधनः पश्येदात्मन्यात्मानमंजसा।
अन्वयव्यतिरेकाभ्यां त्यक्त्वा युष्मदशेषतः ॥३.४॥

शमदमादि साधनयुक्त होऊन व अन्वयव्यतिरेकांनी संपूर्ण युष्मदर्थाचा त्याग करून आत्म्यात शीघ्र आत्मदर्शन करावे. ही सर्व दृष्टी वेदोपनिषदांपासून ऋषीमुनींनी आग्रहपूर्वक राखविली असल्याचे स्पष्ट होते. उपनिषदातील पुढील काही उल्लेख पाहिले म्हणजे हे स्पष्ट होईल. ऋषी या संबंधी म्हणतात–

नाविरतो दुश्चरितान्नाशांतो नासमाहितः।
नाशांतमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ॥ कठोपनिषद् १.२.२४॥
सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्।
अंतःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यंति यतयः क्षीणदोषाः ॥मुं.उ.३.१.५॥
नायमात्मा बलहिनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाप्यलिंगात्।
एतैरुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्म धाम ॥ मुं.उ. ३.२.४॥
परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन।
तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥१.२.१२॥

मनुष्य कितीही बुद्धिमान् असला तरी त्याने दुष्टाचरण सोडल्याशिवाय म्हणजे पापकर्मापासून किंवा इंद्रियभोगांपासून परावृत अगर उपरत झाल्याशिवाय व त्याचे मन पूर्णपणे शांत व सुसमाहित अर्थात् एकाग्र झाल्याशिवाय केवळ प्रज्ञेच्या जोरावर त्याला आत्मज्ञान मिळविता येणार नाही. सत्य, तपाचरण, सम्यग्ज्ञान व अखंड ब्रह्मचर्य या गुणांच्या अर्थात् साधनसंपत्तीच्या योगाने हा आत्मा ( साधकाला ) प्राप्त होतो. ज्यांचे दोष नाहीसे झाले आहेत अर्थात् जे आसुरी संपत्तीपासून मुक्त झाले आहेत असे यती आपल्या शरीरामध्येच ( सहस्रारात ) या ज्योतिर्मय व शुभ्र अशा आत्मस्वरूपाचे दर्शन घेतात ज्याच्याजवळ जागृत कुंडलिनी शक्तीचे अर्थात् सुषुम्नेतून ऊर्ध्वमुख होऊन साधनसंपत्तीचा विकास करणारे बळ नाही, प्रमादाने अर्थात् आसुरीसंपत्तीने जो युक्त आहे व जो संन्यासयुक्त अर्थात् वैराग्ययुक्त ज्ञानाने किंवा तपाने संपन्न नाही त्याला हा आत्मा प्राप्त होत नाही. परंतु जो विद्वान् जागृत शक्ती, साधनसंपत्ती व वैराग्ययुक्त ज्ञान या उपायांनी प्रयत्न करतो त्याचा आत्मा ब्रह्मधामात अर्थात् सहस्रारात प्रविष्ट होतो. कर्मापासून प्राप्त होणारे लोक ( स्थाने ) नाशिवंत आहेत असे जाणून ब्राह्मणाने वैराग्ययुक्त व्हावे. कर्माने नित्य असे ब्रह्म प्राप्त होत नाही. त्याच्या ज्ञानाकरिता साधकाने हातात समिधा घेऊन म्हणजे साधनसंपत्तीने युक्त होऊन श्रोत्रिय म्हणजे शब्दनिष्ठ अर्थात् शास्त्रपारंगत व ब्रह्मनिष्ठ म्हणजे शक्तिपात-सामर्थ्याने ब्रह्मामध्ये तत्काल निष्ठा प्रस्थापित करणाऱ्या सद्‌गुरूंकडे जावे.

साधनसंपत्तीचे हे श्रेष्ठत्व श्रीज्ञानेश्वरमहाराजांना परंपरेने प्राप्त झालेले असल्याने, संसाराच्या रणांगणावर " रात्रीदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ।। " अशी जी श्रीतुकाराममहाराजांनी सांगितलेली लढाई साधक खेळणार असतो, त्यात या साधनसंपत्तीचा प्रथमपासून अखेरपर्यंत त्याला शस्त्रांप्रमाणे कसा उपयोग होतो व या साधनसंपत्तीच्या व जागृत शक्तीच्या जोरावर तो मोक्षरूपी विजयश्रीला कसे वरतो, हे सांगताना ते असे म्हणतात की—

**गजबजा सांडिलिया । वसवी वनस्थळिया ।**
**अंगाचियाचि मांदिया । एकलेया ।।१८.१०२२।।**
**शमदमादिकीं खेळे । न बोलणेंचि चावळे ।**
**गुरुवाक्याचेनि मेळें । नेणे वेळ् ।।१०२३।।**
**आणि आंगा बळ यावें । नातरी क्षुधा जावें ।**
**कां जिभेचे पुरवावे । मनोरथ ।।१०२४।।**
**भोजन करितांविखीं । यया तिहींतें न लेखी ।**
**आहारीं मिती संतोषीं । माप न सूये ।।१०२५।।**
**अशनाचेनि पावकें । हारपतां प्राणु पोखे ।**
**इतुकियाचि भागु मोटकें । अशन करी ।।१०२६।।**

आणि परपुरुषें कामिली । कुळवधू आंग न घाली ।
निद्रालस्या न मोकली । आसन तैसें ॥१०२७॥
दंडवताचेनि प्रसंगें । भुयीं हन अंग लागे ।
वांचूनि येर नेघे । राभस्य तेथ ॥१०२८॥
देहनिर्वाहापुरतें । राहाटवी हातांपायांतें ।
किंबहुना आपैतें । सबाह्य केलें ॥१०२९॥
आणि मनाचा उंबरा । वृत्तीसी देखों नेदी वीरा ।
तेथ कें वाग्व्यापारा । अवकाशु असे ॥१०३०॥
ऐसेनि देह वाचा मानस । हे जिणौनि बाह्यप्रदेश ।
आकळिलें आकाश । ध्यानाचें तेणें ॥१०३१॥
गुरुवाक्यें उठविला । बोधीं निश्चयो आपुला ।
न्याहाळी हातीं घेतला । आरिसा जैसा ॥१०३२॥
कुंडलिनी जागवूनि । मध्यमा विकाशूनि ।
आधारादि भेदूनि । आज्ञावरी ॥१०३८॥
जालिया योगाचा गाढा । मेळावा सूनि हा पुढां ।
ध्यान मागिलीकडां । स्वयंभ केलें ॥१०४१॥
आणि ध्यान योग दोन्ही । इयें आत्मतत्त्वज्ञानीं ।
पैठी होआवया निर्विघ्नीं । आधींचि तेणें ॥१०४२॥
वीतरागतेसारिखा । जोडूनी ठेविला सखा ।
तो आघवियाचि भूमिका-। सवें चाले ॥१०४३॥
पहावें दिसे तंववरी । दिठीतें न सांडी दीप जरी ।
तरी कें आहे अवसरी । देखावया ॥१०४४॥
तैसें मोक्षीं प्रवर्तलया । वृत्ती ब्रह्मीं जाय लया ।
तंव वैराग्य आथी तया । भंगु कैचा ॥१०४५॥
म्हणौनि सवैराग्यु । ज्ञानाभ्यासु तो सभाग्यु ।
करूनि जाला योग्यु । आत्मलाभा ॥१२४६॥
ऐसी वैराग्याची आंगीं । बाणूनियां वज्रांगीं ।
राजयोगतुरंगीं । आरूढला ॥१०४७॥
वरी आड पडिलें दिठी । सानें थोर निवटी ।
तें बळीं विवेकमुष्टीं । ध्यानाचें खांडें ॥१०४८॥
ऐसेनि संसाररणाआंतु । आंधारीं सूर्य तैसा असे जातु ।
मोक्षविजयश्रीये वरैतु । होआवयालागीं ॥१०४९॥

अशी ही साधनसंपत्तीच्या व जागृन कुंडलिनी शक्तीच्या जोरावर संसाराच्या रणांगणावर केलेली लढाई आहे. हेच धर्मक्षेत्र आहे व कुरुक्षेत्रही आहे. आणि या

क्षेत्रावरच " अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् । विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ।। गीता १८.५३।। " असा उपदेश भगवंतांनी अर्जुनाला केला आहे. ज्यावेळी अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व संग्रह टाकून जेव्हा साधक ममतारहित व शांत अंतःकरणयुक्त होतो तेव्हा स्वसंवेद्य आत्मस्वरूपाशी एकरूप होण्यास तो योग्य होतो. या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करताना दैवीसंपत्तीच्या जोरावर आसुरी संपत्तीशी होणाऱ्या लढ्याचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी फारच सुंदर रंगविले आहे. ते मुळातूनच पाहावे. " पैं तेंचि होणेंनवीण । प्रतीती आलें जें ब्रह्मपण । तें ब्रह्म होती जाण । योग्यता येथ ।।१८.१०९०।। " या एका ओवीत उपरोक्त विषयाचे सर्वार्थाने दर्शन होते, एवढे येथे सूचित केले म्हणजे पुरे.

सारांश, साधनसंपत्ती म्हणजे ब्रह्मसंपदा, मोक्षचक्रवर्तीचे अग्रहार, भगवती गंगा, गुणकुसुमांची माळा, गुणज्योती, गुणरूपी निर्मळ मोती इत्यादि गुणांनी संपन्न असलेली अलौकिक, लोकोत्तर, अद्भुत, अपूर्व व असामान्य गोष्ट आहे हे पटविताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जणू काही आपल्या प्रातिभ ज्ञानालाही कसोटीला लावले आहे; कारण सिद्धयोग साधनशास्त्रातील अंतिम साध्यप्राप्तीसाठी आवश्यक असलेल्या अत्युच्च गोष्टीचे श्रेष्ठत्व व महती त्यांना प्रस्तुत करावयाची असल्याने ते असे म्हणतात की–

एवं इहीं सव्विसें । ब्रह्मसंपदा हे वसत असे ।
मोक्षचक्रवर्तीचे जैसें । अग्रहार होय ।।१६.२०७।।
नाना हे संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नीच नवी ।
निर्विण्णसगरांची दैवी । गंगाचि आली ।।२०८।।
कीं गुणकुसुमांची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा ।
वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे ।।२०९।।
कीं सव्विसें गुणज्योती । इहीं उजळूनि आरती ।
गीता आत्मया निजपती । नीरांजना आली ।।२१०।।
उगळितें निर्मळें । गुण इयेचि मुक्ताफळें ।
दैवी शुक्तिकळें । गीतार्णवींची ।।२११।।
काय बहु वानूं ऐसी । अभिव्यक्ती ये अपैसी ।
केलें दैवी गुणराशी । संपत्तिरूप ।।२१२।।

## साधनसंपत्तीच्या समुच्चयाची अनिवार्यताः–

सिद्धयोगाचे साधन करीत अध्यात्ममार्गाची वाटचाल करणाऱ्या किंवा करू इच्छिणाऱ्या प्रत्येक साधकाला असे वाटत असते की, आपले मन लवकरात लवकर एकाग्र व्हावे, विषयांच्या विसर तत्काल पडावा, इंद्रियांचे चांचल्य त्वरित नाहीसे व्हावे, मनाचे मनपण अविलंब संपावे व त्याची धाव शीघ्र नाहीशी होऊन ते

सहस्रारात विलीन व्हावे. इतकेच नव्हे; तर शक्ती जागृत झाल्याबरोबर एकदम सहस्रारात जाऊन आपल्याला समाधी अवस्था प्राप्त होऊन अनिर्वचनीय सुखाची प्राप्ती व्हावी असेही त्यांना वाटत असते; परंतु प्रत्यक्षात असे एकदम घडत नाही. असे का होते ? याचे शास्त्रीय कारण आधार दुर्बलता किंवा साधनसंपत्तीचा अभाव हे आहे. ज्यावेळेस सिद्धयोग साधनेची फले पूर्णांशाने अपेक्षित असतात त्यावेळी आधार सबलता किंवा साधनसंपत्तीच्या समुच्चयाची अपरिहार्यताही तितक्याच प्रमाणात अपेक्षित असते, हे कधीही विसरून चालणार नाही. शास्त्रकारांनी वर्णन केलेल्या साधनसंपत्तीतील एकही गुणक जरी या सिद्धयोगाच्या शास्त्रीय प्रयोगात अनुपस्थित असेल; तर त्याच्या अचुक उत्तराची प्राप्ती आपणास होणार नाही, हे साधकाला कधीही विसरून चालणार नाही. येथे कमी टक्केवारीने पूर्णतः उत्तीर्ण होण्याची सोय नाही. शंभर टक्के तयारी व शंभर टक्के प्राप्ती हेच या शास्त्रातील गणित आहे. याबद्दल कोणतीही सूट किंवा दया, माया, क्षमादि करण्यास हे शास्त्र तयार नाही. ही गोष्टच सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**परी हे तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें ।**
**सर्वद्वारीं कवाडें । कळासती ।।८ ११२।।**

सर्व इंद्रियांच्या द्वारातील निग्रहरूपी कवाडे अखंड बंद केली तरच स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीचे अंतिम साध्य साधक साध्य करू शकतो. येथे सर्व इंद्रियांची सर्व द्वारे अखंड बंदचीच परिभाषा असून तीच अपेक्षा आहे. यातील एकही गोष्ट कमी असण्यास त्यांची तिलप्राय मान्यता नाही. विमलज्ञानप्राप्तीच्या ध्येयप्राप्तीसाठी साधनसंपत्तीच्या समुच्चयाची उपस्थिती व अनिवार्यता प्रकट करताना श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी "दासबोधात" असे म्हटले आहे की–

**म्हणोनि साधन अभ्यास आणि सद्‌गुरु । सच्छिष्य आणि सच्छास्त्रविचारु ।**
**सत्कर्म आणि सद्वासना पारू । पाववी भवाचा ।।५.३.१२।।**

**सदुपासना आणि सत्कर्म । सच्छिष्य सत्क्रिया आणि स्वधर्म ।**
**सत्संग आणि नित्यनेम । निरंतर ।।१३।।**

**ऐसें हें अवघेंचि मिळे । तरीच विमळ ज्ञान निवळे ।**
**नाहीं तरी पाषांड संचरे बळें । समुदायीं ।।१४।।**

साधनसंपत्तीच्या समुच्चयाची ही अपरिहार्यता म्हणजे सिद्धयोग साधनशास्त्राचे रहस्य आहे व त्याशिवाय आत्मस्वरूपाची प्राप्ती होणे कधीही शक्य नाही, असा सिद्धांत प्रस्थापित करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**हें सर्वस्व आमुचें गूढ । परि दाविलें तुज उघड ।**
**आतां इंद्रियां देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ।।९.१३५।।**

हा दंशु जंव नये हातां। तंव माझे साचोकारपण पार्था।
न संपडे गा सर्वथा। जैंवि तुषीं कणु ॥१३६॥

हृदयात गूढ भोगण्याचे जे रहस्य आहे ते इंद्रियांना कवाड देण्यात अर्थात् साधनसंपत्तीत आहे. दिसण्यास अत्यंत सोपी; परंतु आचरण्यास अत्यंत कठीण अशी ही गोष्ट असल्यामुळे ज्याप्रमाणे नुसत्या कोंडचात दाणा शोधू लागले असता दाण्याचा एक कणसुद्धा सापडत नाही त्याप्रमाणे साधनसंपत्तिविरहित केलेल्या साधनाने ईश्वराच्या सत्य रूपाचे दर्शनही होत नाही. श्रीसंत तुकाराममहाराजांनीही ज्ञानप्राप्तीसाठी, गुरुकृपेसाठी, त्रिगुणातीत होण्यासाठी व ईश्वराच्या सत्य दर्शनासाठी साधनसंपत्तीच्या समुच्चयाची नितांत आवश्यकता कशी आहे, हे सांगताना "अभंगांमध्ये" असे म्हटले आहे की–

साधकाची दशा उदास असावी। उपाधि नसावी अंतर्बाहीं॥
लोलुप्यता काय निद्रेसी जिंकावें। भोजन करावें परिमित॥
एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण। प्राण गेल्या जाण बोलों नये॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे। तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा॥२४६३॥

卐 卐 卐

निर्वाहापुरतें अन्न आच्छादन। आश्रमासी स्थान कोंपी गुहा॥
कोठेंही चित्तासी नसावें बंधन। हृदयीं नारायण सांठवावा॥
नये बोलों फार बैसो जनामधीं। सावधान बुद्धी इंद्रियें दमी॥
तुका म्हणे घडी घडीनें साधावी। त्रिगुणाची गोवी उगवूनि॥२४६४॥

卐 卐 卐

तरि कां नेणते होते मागें ऋषी। तींहीं जगासी दुराविलें॥
वोळगती जया अष्टमहा सिद्धी। ते या जनबुद्धी नातळती॥
कंदमुळे पाला धातूच्या पोषणा। खाती वास राना तरी केला॥
लावुनियां नेत्र उगेंचि बैसले। न बोलत ठेले मौन्यरूप॥
तुका म्हणे ऐसें करी माझ्या चित्ता। दुरावीं अनंत जन दुरी॥८८८॥

卐 卐 卐

झाडे वोरपोनि खाऊनियां पाला। आठवी विठ्ठला वेळोवेळां॥
वल्कले नेसुनी ढुंगा गुंडाळुनी। सांडी देहाभिमाना जवळुनी॥
लोकमान वमनासमान मानणें। एकांतीं राहणें विठोसाठीं॥
सहसा करू नये प्रपंचीं सौजन्य। सेवावें अरण्य एकान्तवास॥
ऐसा हा निर्धार करी जो मनाचा। तुका म्हणे त्याचा पांग फिटे॥२२४८॥

卐 卐 卐

इतुलें करीं भलत्या परी। परद्रव्य परनारी॥
सांडुनी अभिलाष अंतरीं। वर्ते वेव्हारीं सुखरूप॥

न करी दंभाचा सायास । शांती राहें बहुवस ।।
जिव्हे सेवीं सुगंधरस । न करीं आळस रामनामीं ।।
जनमित्र होई सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा ।।
संग न धरी दुर्जनांचा । करी संतांचा सायास ।।
करिसी देवाविण आस । अवघी होईल निरास ।।
तृष्णा वाढविसी बहुवस । कधी सुखास न पावसी ।।
धरुनी विश्वास करीं धीर । करितां देव हाचि निर्धार ।।
तयाचा वाहे योगक्षेमभार । नाहीं अंतर तुका म्हणे ।।४४२।।

ही साधनसंपत्तीची समुच्चयता मनाला आवरण्यासाठीच आहे हे उघड आहे. यामुळेच भगवंतांनी गीतेंत "शक्योऽवाप्तुमुपायतः ।।६.३६।।" असे म्हणून असंयत मनाला आवरणे हे साधनसंपत्तीच्या उपायांनी सहज शक्य आहे असे सांगितले आहे. त्याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

एऱ्हवीं विरक्ति जयासी नाहीं । जे अभ्यासीं न रिघती कहीं ।
तयां नाकळे हें आम्हीही । न मनूं कायी ।।६.४२१।।
परि यमनियमांचिया वाटा न वचिजे । कहीं वैराग्याचि से न करिजे ।
केवळ विषयजळीं ठाकिजे । बुडी देउनी ।।४२२।।
यया जालिया मानसा कहीं । युक्तीची कांबी लागली नाहीं ।
तरी निश्चळ होईल काई । कैसेनि सांगें ? ।।४२३।।

"हठयोगप्रदीपिकेतही" श्रीस्वामात्माराम योगींद्रांनी योगाभ्यास प्रतिबंधक गोष्टींचा उल्लेख करून नकारात्मक किंवा व्यतिरेक पद्धतीने साधनसंपत्तीची समुच्चयता साधकाला किती आवश्यक आहे, हे सांगताना असे म्हटले आहे की–

अत्याहारः प्रयासश्च प्रजल्पो नियमग्रहः ।
जनसंगश्च लौल्यं च षड्भिर्योगो विनश्यति ।।१.१५।।
वर्जयेद्दुर्जनप्रांतं वन्हीस्त्रीपथिसेवनम् ।
प्रातःस्नानोपवासादि कायक्लेशविधिं तथा ।।६१।।

भूकेपेक्षा जास्त भोजन करणे, व्यायामादि खूप श्रम करणे, अतिशय बोलणे किंवा वडबडणे, प्रातःकाली थंड पाण्याने स्नान करणे, फलाहार, नक्त इत्यादि नियम व बंधने स्वतःवर लादून घेणे, लोकांच्या संगतीत राहणे व लोलुपता म्हणजे हाव किंवा चंचलता असणे या सहा गोष्टी घडल्या की, योगाचा नाश होतो. यासाठी साधकानें उपरोक्त निषेधादि गोष्टी टाळून साधन केले पाहिजे. त्याचप्रमाणे साधकाने दुःसंगती टाळावी. दुर्जनाशी प्रीती करू नये. वाईट जागी जाऊ नये. अग्नीपाशी बसून सतत शेक घेऊ नये. अत्यंत कामासक्त व स्त्रीसक्त असू नये. फार चालू नये. थंड पाण्याने प्रातःस्नान करू नये. अत्यंत कडक उपवास करू नयेत. फार कष्टाचा

व्यायाम करू नये. अर्थात् आपापल्या वर्णाश्रमधर्माशी, शरीरप्रकृतीशी, स्वभावाशी, प्राप्तपरिस्थितीशी व देशकालवर्तमानाशी मेळ घालून नियमांचे पालन करावे.

साधनसंपत्तीची अनिवार्यता दीक्षेसाठीही आहे; कारण यामुळेच कर्मसाम्यदशा साधकाच्या ठिकाणी उपस्थित होऊन त्याला सद्गुरू आपोआप भेटतात हा सिद्धांत मांडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

तरी देहादिक हें संसारें। सर्वही मांडलेंसे जें गुफिरें।
तेथ नातुडे तो वागुरें। बारा जैसा ।।१८.९५६।।
पैं परिपाकाचिये वेळे। फळ देठें ना देठु फळें।
न धरे तैसें स्नेह खुळें। सर्वत्र होय ।।९५७।।
पुत्र वित्त कलत्र। हें जालियाही स्वतंत्र।
माझें न म्हणे पात्र। विषाचें जैसें ।।९५८।।
हें असो विषयजाती। बुद्धि पोळली ऐसी माघौती।
पाउलें घेऊनि एकांतीं। हृदयाच्या रिगे ।।९५९।।
ऐसया अंतःकरण। बाह्य येतां तयाची आण।
न मोडी सर्वथा भेण। दासी जैसी ।।९६०।।
पैं अन्यथा बोधु आघवा। मावळोनि तया पांडवा।
बोध मात्रींची जीवा। ठावो होय ।।९६४।।
धरवणी वेंचें सरे। तैसें भोगें प्राचीन पुरे।
नवें तंव नुपकरे। कांहींचि करूं ।।९६५।।
ऐसीं कर्मं साम्यदशा। होय तेथ वीरेशा।
मग श्रीगुरु आवैसा। भेटेचि गा ।।९६६।।

साधनसंपत्तीच्या समुच्चयाची ही अपरिहार्यता सर्व विद्वानांनी मान्य केली आहे; कारण त्याशिवाय अध्यात्मशास्त्राच्या मार्गाची वाटचाल होऊच शकत नाही. एवढेच नव्हे; तर संसार रणांगणावरील जे भीषण युद्ध लढण्यासाठी साधक सज्ज होऊन उतरतो म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेले आपण मागे पाहिले, तेही या साधनसंपत्तीशिवाय तो कधीही खेळू शकत नाही. जो साधक याशिवाय हे महाभयानक युद्ध खेळण्यास उतरतो तो पहिल्या काही घावाडावातच परास्त होऊन ची ची करत पाठ दाखवून रणछोडदास होतो. यामुळेच "The Hidden Teching beyond yoga" या प्रख्यात ग्रंथातील "The Philosophical Discipline" या पाचव्या प्रकरणात Paul Brunton यांनी यासंबंधी असे म्हटले आहे की, "It would be easy for the inexperienced to undervalue the necessity of these seven psychologicol qualifications, but the striving philosopher

knows that they are his most precious attributes. With them he is rendered ready for enlightenment and may hope to realize life's supreme goal, but without them never !....To alter Miltons line : they are not served who only stand and wait....so we must fight our own weakness of purpose. The real struggle in life is the struggle of man against himself. It is the one which fewest enter because it asks so much from him. Yet it is the only one which is really worth while. Nothing great or grand can be obtained by mere wanting. To get one must be prepared to give oneself ! There was once a wandering teacher in Galilee who noticed the common inclination to feebleness in his own followers. He had to tell them : " Those that do my words shall know my doctrine ".... Instruction in moral preparations should be regarded by every aspirant as one of the major necessities of the philosophical discipline. The philosophical aspirant should comprehend that, because he too practices meditation, he must satisfy the same self-purificiory requirements that are laid down for the mystical aspirant. If his meditation practices are to be protected from the dangers involved in them, he should seek constantly to refrain from harming others, to ennoble his character, to govern his passions and to cultivate virtues, the major virtues inculcated by the prophets of all great religions."

जो अननुभवी आहे त्याला ह्या सात मानसिक लक्षणांच्या अर्थात् साधनसंपत्तीच्या आवश्यकतेची किंमत कमी करणे हे सोपे असले; तरी प्रयत्नशील अर्थात् अभ्यासू साधकतत्त्वज्ञाला हे माहीत असते की, साधनसंपत्ती हा आपला अमूल्य ठेवा आहे. यांच्या साहाय्यानेच तो चैतन्यशील होण्यासाठी तयार केला जातो व जीवनातील सर्वोत्कृष्ट साध्य आविष्कृत करण्याची आशा बाळगू शकतो; मात्र साधनसंपत्तीशिवाय ही गोष्ट कधीही शक्य होत नाही.... (या बाबतीत) मिल्टनचे म्हणणे बदलून असे म्हणता येईल की, जे नुसते स्तब्ध राहतात व थांबतात ते निरुपयोगी ठरतात. यासाठी आपण आपल्या हेतूच्या शैथिल्याविरुध्द लढले पाहिजे. आपण आपल्या स्वतःविरुध्द केलेली झुंज हीच आयुष्यातील खरी झुंज आहे. ही

झुंज अशी आहे की, त्यात फारच थोडेजण प्रवेश करतात; कारण ती साधकाकडे खूपच मोठी मागणी करीत असते. असे असले; तरी ही एकमात्र झुंज अशी आहे की, जिला खरोखरच काही अपूर्व मूल्य किंवा फार मोठी किंमत आहे. कोणतीही मोठी किंवा भव्य, उदात्त व श्रेष्ठ गोष्ट ही फक्त उणेपणाने अर्थात् साधनसंपत्तीच्या अभावी प्राप्त होऊ शकत नाही. साध्याच्या प्राप्तीसाठी साधकाला आत्मार्पणाची तयारी ठेवावी लागते. पूर्वी एकदा गॅलिलीमधील एका प्रवासी शिक्षकाने दुबळेपणाच्या सर्वसामान्य कलाकडे किंवा प्रवृत्तीकडे आपल्या अनुयायांचे लक्ष वेधले होते त्याने त्यांना असे सांगितले की, जे साधक माझे शब्द कृतीत आणतील त्यांनाच तत्त्वाचे ज्ञान होईल. मानसिक तयारीसाठी ज्या सूचना किंवा नियम आहेत; त्या प्रत्येक साधकाने तत्त्वज्ञानप्राप्तीच्या शिस्तीतील महत्त्वाच्या गोष्टी आहेत, हे लक्षात ठेवून, त्यांची बूज राखली पाहिजे. तत्त्वज्ञानाच्या साधकाला ही गोष्ट निश्चितच उमजली पाहिजे की, ज्याअर्थी तो सुद्धा ध्यानाचा अभ्यास करीत आहे त्याअर्थी, ज्याप्रमाणे गूढ, रहस्यपूर्ण व गहन शास्त्राभ्यासी साधकाला आपल्या आत्मशुद्धीसाठी घालून दिलेल्या नियमांचे पालन करणे आवश्यक असते, त्याप्रमाणे त्यानेही नियमांची परिपूर्ती करणे आवश्यक आहे. जर ध्यानाच्या अभ्यासातच अंतर्निहित असलेल्या धोक्यांपासून बचाव करावयाचा असेल; तर साधकाने दुसऱ्यांना त्रास देणे, हिंसा करणे किंवा दुखविणे, हे टाळून आपले स्वतःचे व्यक्तित्व उदात्त केले पाहिजे, वासनांवर नियंत्रण ठविले पाहिजे किंवा त्या आवरल्या पाहिजेत व महान् धर्मांच्या प्रेषितांनी सांगितलेले महत्त्वाचे गुण अर्थात् साधनसंपत्ती वाढविली पाहिजे.

सारांश, साधनसंपत्तीच्या समुच्चयाची अपरिहार्यता सर्व धर्मातील लोकांनी सार्वत्रिकरीत्या मान्य केली आहे. सिद्धयोगाच्या प्रयोगशाळेतील अंतिम सिद्धांताच्या सिद्धीसाठी तर त्याची नितांत आवश्यकता आहे; कारण जीवशिवाच्या उत्कट प्रेमाची ही कथा जितकी नाजूक व हळुवार आहे तितकीच ती भयानक व भयावह आहे. जीवशिवाचे सामरस्यात्मक महामीलन सहस्रारात होईपर्यंत सुषुम्नेच्या महातीर्थावर या प्रेमोत्कटतेचे भयंकर दर्शन युद्धस्वरूपात घडून दैवी व आसुरीसंपत्तीचा जो घनघोर सामना रात्रंदिवस होत राहतो त्याची अनुभूती एक साधकच जाणू शकतो. इतरांच्या लेखी पुस्तकींचे शाब्दिक तेवढे उरते; कारण अशा प्रकारचे प्रेम स्वतःच्या ठिकाणी उपस्थित होऊ देण्यास व त्यानंतर होणाऱ्या लढाईस तोंड देण्यास "मनुष्याणां सहस्रेषु ।।गीता ६.३।।" असाच तयार होतो, हेच खरे आहे. यासाठी "ते सामुग्री कीर पुरी । मेळविली ।।१८.९९६।।" असे साधनसंपत्तीसज्ज होऊनच साधकाला या रणांगणातील महाभयानक प्रेमोत्कट लढाईसाठी उतरावे लागते, हे नितांत सत्य आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज या दृष्टीनेच असे म्हणतात की—

एऱ्हवीं स्वकर्माचेनि वन्ही । काम्यनिषिद्धाचिया इंधनीं ।
रजतमें कीर दोन्ही । जाळिलीं आधीं ॥१८.९९२॥
पुत्र वित्त परलोकु । यया तिहींचा अभिलाखु ।
घरीं होय पाइकु । हेंही जालें ॥९९३॥
इंद्रियें सैरा पदार्थीं । रिगतां विटाळलीं होतीं ।
तियें प्रत्यहार तीर्थीं । न्हाणिलीं कीर ।।९९४॥
आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पूनि सकळ ।
घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद ॥९९५॥
एसी आत्मसाक्षात्कारीं । लाभे ज्ञानाची उजरी ।
ते सामुग्री कीर पुरी । मेळविली ॥९९६॥
आणि तेचि समयीं । सद्‌गुरु भेटले पाहीं ।
तेवींचि तिहीं कांहीं । वंचिजेना ॥९९७॥
तरी गुरु दावलिया वाटा । येऊनि विवेकतीर्थतटा ;
धुऊनियां मळकटा । बुद्धीचा तेणें ॥१०११॥
मग राहूनें उगळिली । प्रभा चंद्रें आलिंगिली ।
तैसी शुद्धत्वें जडली । आपणयां बुद्धि ॥१०१२॥
सांडूनि कुळें दोन्ही । प्रियासी अनुसरे कामिनी ।
द्वंद्वत्यागें स्वचिंतनीं । पडली तैसी ॥१०१३॥
आणि ज्ञाना ऐसें जिव्हार । नेवों नेवों निरंतर ।
इंद्रियीं केलें थोर । शब्दादिक जे ॥१०१४॥
ते रश्मीजाळ काढलेया । मृगजळ जाय लया ।
तैसें वृत्तिरोधें तया । पांचांही केलें ॥१०१५॥
नेणतां अधमाचिया अन्ना । खादलिया कीजे वमना ।
तैसीं वोकविली सवासना । इंद्रियें विषयीं ॥१०१६॥
मग प्रत्यगावृत्तो चोखटें । लाविलीं गंगेचेनि तटें ।
ऐसी प्रायश्चित्तें धुवटें । केलीं येणें ॥१०१७॥
पाठीं सात्विकें धीरें तेणें । शोधारलीं तियें करणें ।
मग मनेंसीं योगधारणें । मेळविलीं ॥१०१८॥
तेवींचि प्राचीनें इष्टानिष्टें । भोगेंसीं येउनी भेटे ।
तेय देखलियाही वोखटें । द्वेषु न करी १०१९॥
ना गोमटेंच विपायें । ते आणूनि पुढां सूयें ।
तयालागीं न होये । साभिलाषु ॥१२२०॥
हे साधनसंपत्तीच्या समुच्चयाच्या अपरिहार्यतेचे सार आहे. या साराचेही

सार सांगताना श्रीयेशू ख्रिस्ताने "बायबलमध्ये" असे म्हटले आहे की, "Except ye become as little children ye shall in no wise enter the Kingdom of heaven." श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दात याचा अनुवाद करून सांगावयाचे झाले; तर असे म्हणता येईल की–

म्हणौनि थोरपण पऱ्हां सांडिजे । एथ व्युत्पत्ती आघवी विसरिजे ।
जैं जगा धाकुटें होईजे । तैं जवळीक माझी ।।९.३७८।।
यालागीं शरीरसांडोवा कीजे । सकळ गुणांचें लोण उतरिजे ।
संपत्तिमदु सांडिजे । कुरवंडी करुनी ।।३८१।।

**गुरुभक्ती:–**

साधक, साधन, साधन महिमा, साधनसंपत्ती व साध्य म्हणजेच गीता किंवा सिद्धयोगशास्त्र होय. वरील पाच गोष्टींपैकी तीन गोष्टींची चर्चा आपण आतापर्यंत अनेक दृष्टिकोनातून सर्वांगांनी केली. साधनसंपत्तीच्याही महत्त्वाच्या अंगाचा विचार येथपर्यंत केला. आता भगवान् श्रीगोपालकृष्णनाथांनी श्रीमद्भगवद्गीतेत जी साधनसंपत्ती कथन केली आहे व त्याचा भावार्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट करून त्याचे जे यथार्थ रूप प्रकट केले आहे, त्याचा परामर्श घ्यावयाचा आहे. श्रीमद्भगवद्गीतेत दोन, तीन, चार, पाच, सहा, नऊ, बारा, तेरा, चौदा, पंधरा, सोळा, सतरा व अठरा या अध्यायांमध्ये कमीअधिक प्रमाणात भिन्न नावाने भगवंतांनी विषयानुरोधाने साधनसंपत्तीचा विषय प्रस्तुत केला आहे. त्यामुळे या विषयाची व्याप्ती खूपच विस्तृत झाली आहे. अर्थात् एकच विषय भिन्न नावाने किंवा त्याच नावाने दोन ठिकाणी किंवा क्वचित् अधिक ठिकाणी अवतरित झालेला दिसतो. "एकाकी रहसि स्थितः ।।" व "शुचौ देशे प्रतिष्ठाप्य ।। गीता ६.१०, ११।।" हीच साधनसंपत्ती "विविक्तसेवी ।।१८.५२।।" या शब्दांनी पुन्हा सूचित झाली आहे. "ब्रह्मचारिव्रतेस्थितः ।।६.१४।।, ब्रह्मचर्यं चरंति ।।८.११।।" व "ब्रह्मचर्यं शारीरं तप उच्यते ।।१७.१४।।" असे ब्रह्मचर्य या साधनसंपत्तीचे तीन ठिकाणी वर्णन आले आहे. यासाठी आपण वेदांतातील साधनचतुष्टय, योगशास्त्रातील यमनियम व तद्व्यतिरिक्त राहिलेले विविधगुण असे तीन विभाग पाडून त्यात भिन्न ठिकाणी वर्णिलेल्या एकाच गुणाचा साकल्याने विचार करू म्हणजे साधनसंपत्तीचे संपूर्ण चित्र आपल्यासमोर उभे राहील. वरील तीन प्रकारच्या विभागणीतच गुरुभक्तीचा समावेश होत असला व श्रीमद्भगवद्गीतेतील तेराव्या अध्यायात ज्ञानी साधकाजवळ अत्यावश्यक असलेल्या साधनसंपत्तीचा उल्लेख करताना "आचार्योपासनम् ।।१३.७।।" म्हणून ती भगवंतांनी सूचित केली असली; तरी सिद्धयोगसाधनशास्त्रांगभूत साधनसंपत्तीतील एवढेच नव्हे; तर साधक, साधन व साध्यातीलही ती मूर्धन्य गोष्ट असल्याने तिच्या अंगोपांगासह आपण अत्यंत सूक्ष्मतेने तिचा

सर्वांगीण विचार प्रथमच करणार आहोत. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही "मज हृदयीं सद्‌गुरु ॥१.२२॥ "अशी पहिल्या अध्यायात सुरुवात करून "श्रीगुरुकृपा काय नोहे ॥१८.१७३५॥" अशी अठराव्या अध्यायापर्यंत या साधनसंपत्तीच्या विषयाची विविध पद्धतीने मांडणी करून या विषयाचे महत्त्व, अलौकिकत्व व एकमेवाद्वितीयत्व स्पष्ट केले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी गुरुभक्ती व गुरुकृपा यातच सिद्धयोगसाधनशास्त्राचे सकल रहस्य गुंफित झालेले आहे. या रहस्याचा उलगडा आतापर्यंतच्या प्रकरणात विषनुरोधाने करण्याचा प्रयत्न केला असला; तरी येथे त्याचा साकल्याने विचार करणे आवश्यक आहे.

गुरुभक्तीचा विचार करताना साधक ज्या गुरूची भक्ती करणार, सेवा करणार व त्याच्या चरणी आपले सर्वस्व अर्पण करणार तो गुरूच श्रीज्ञानेश्वर-महाराजांना कसा अपेक्षित आहे याचा विचार करणे आवश्यक आहे; कारण "द्रष्टा श्रीगुरुमूर्ती। न रिगता दृश्यपंथीं ॥१८.१७०४॥" असे म्हणून "गुरुरुपाय: ॥२.६॥" हे "शिवसूत्र" त्यांनी स्पष्ट केले असल्यामुळे शिष्याच्या दृष्टीने गुरू ही उपायरूप साधनसंपतीच आहे. तेव्हा गुरू म्हणजे उपाय व उपाय म्हणजे साधनसंपत्ती अशी दोन समीकरणे सिद्ध झाली. यावरून हे सिद्ध होते की, गुरू म्हणजे साधन-संपत्ती होय. अर्थात् साधनसंपत्तीचा सर्व विचार शिष्यासाठी अपेक्षित असल्याने त्या दृष्टिकोनातून गुरूचा विचार करावयाचा आहे म्हणजे "जयजयाजी गुरुमूर्ती। तूंचि साधन परमार्थी॥१६.१४१॥" या श्रीसरस्वतिगंगाधर लिखित "श्रीगुरुचरित्रातील" म्हणण्याचा मागोवा घेत "म्हणोनि जाणतेनें गुरु भजिजे ॥१.२५॥" याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जे भाव उकलून दाखविले आहेत त्याचे स्पष्टीकरण करावयाचे आहे. गुरुभक्ती हा शब्दात दोन शब्द आहेत. पहिला शब्द गुरू असून भक्तीचे तो साधन आहे; तर दुसरा शब्द भक्ती असून ही भक्ती शिष्य करणार असल्याने गुरू हे शिष्याचे साध्य आहे. याचा अर्थ असा की, गुरू म्हणजे सद्‌गुरू व भक्ती म्हणजे शिष्य होय. उपदेशक व उपदेशग्राहक असे हे स्वरूप आहे. त्यामुळे प्रथम गुरू हीच साधनसंपत्ती कशी आहे याचा पूर्ण विचार करून नंतर त्याची भक्ती करणाऱ्या शिष्याचा त्याच दृष्टिकोनातून विचार करणे आवश्यक आहे.

हा विचार करावयाचा म्हणजे गुरू शब्दाचा अर्थ काय? गुरुतत्त्व म्हणजे काय? गुरूचे खरे स्वरूप व कार्य कोणते? आदर्श गुरूची लक्षणें कोणती? सत् शिष्याची लक्षणे कोणती? गुरुभक्तीचा उच्च आदर्श कसा असतो? व गुरुशिष्य-संबंधाची परिणिती कशात होते? इतक्या प्रश्नांचा विचार करणे होय. या सर्व प्रश्नांचा क्रमवार किंवा साकल्याने केलेला विचार ज्ञानेश्वरीत आढळत नसला; तरी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी उपरोक्त सर्व प्रश्न सूचितार्थाने स्पष्ट केलेले असल्याने आपण त्यांचा शास्त्राधारे मागोवा घेऊन त्यांचे स्पष्टीकरण करू.

गुरू शब्दाचा अर्थ काय ? किंवा गुरू म्हणजे काय ? असा पहिला प्रश्न आहे. आठव्या प्रकरणातील "गुरुकृपेचा अर्थ" या तिसऱ्या मुद्यात गुरुकृपेचा महिमा कथन करताना सुरुवातीलाच या प्रश्नाचे विषयानुसंधाने थोडक्यात उत्तर दिले आहे. त्याचा सविस्तर विचार असा आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "परी श्रीनिवृत्ति-कृपादीप उजियेडे। देखँन मी ।।६.३२।।, रविचंद्रादि शुक्ती। उदय करिती त्रिजगतीं तें तुझिया दीप्ती। तेज तेजां ।।१४.८।।, तो अहोरात्रांचा पैलकडु। कोणें देखावा ज्ञानमार्तंडु। जो प्रकाश्येंवीण सुरवाडु। प्रकाशाचा ।।१६.१६।। तया चित्सूर्या श्रीनिवृत्ती। आतां नमो म्हणों पुढतपुढती ।।१६.१७।।" व "जयजय देव स्वप्रभ ।।१८.६।।" अशा प्रकारे अनेक ठिकाणी व्याख्या करून सद्गुरू म्हणजे काय ? हे अगदी व्याख्यारूपाने स्पष्ट केले आहे. सद्गुरू श्रीनिवृत्तिनाथमहाराज हे कृपादीप तेजाचे तेज, ज्ञानमार्तंड चित्सूर्य व स्वयंप्रकाश असे आहेत, हे सांगताना सद्गुरू हे या रूपाने उपायस्वरूप म्हणजे भक्तिस्वरूप आहेत अर्थात् त्यांची भक्ती, सेवा किंवा भजन करण्यास ते योग्य आहेत, असेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे. "गुरुरुपायः ।।२.६।।" असे जे "शिवसूत्र" आहे त्याचा अर्थही हाच आहे. गुरू हाच उपाय आहे. या सूत्रावर टीका करताना श्रीभास्करभट्टाने "शिवसूत्रवार्तिकात" गुरू म्हणजे काय हे सांगताना असे म्हटले आहे की–

**प्राप्तावत्र गुरुः शक्तिरुपायः परमः स्मृतः ।**

**यतः सा शांभवी शक्तिरनुग्रहकरी सदा ।।२३।।**

गुरू म्हणजे अनुग्रह करणारी शांभवी शक्ती असून हाच अत्यंत श्रेष्ठ उपाय आहे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही ही दृष्टी ज्ञानेश्वरीत सर्वत्र राबविली असल्याचे स्पष्टपणे प्रतीत होते, हे आपण मागे आठव्या प्रकरणात पाहिले आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराजांची ही दृष्टी मनात ठसली म्हणजे "मावळवीत विश्वाभासु। नवल उदयला चंडांशु ।।१६.१।।, जयाचेनि विवेककिरणसंगें। उन्मेखसूर्यकांतु फुणगे ।।१६.८।।, अगा विश्वैकधामा। तुझा प्रसाद चंद्रमा। करूं मज पूर्णिमा। स्फूर्तीची जी ।।१४.२३।।" इत्यादि ओव्यांचा परार्थ आपल्याला लागेल. गुरू म्हणजे शरीर विग्रहधारी माणूस या कल्पनेचा आपल्या मनातून पूर्णपणे उच्छेद करून एका अपार चैतन्यशक्तीच्या सामर्थ्याने ओतप्रोत भरलेली व हे चैतन्य शक्तिपात सामर्थ्याने वितरण करणारी अशी तेजोमय मूर्ती आहे, हे सतत लक्षात ठेविले पाहिजे. यामुळेच "यामलतंत्रात" असे म्हटले आहे की–

**गुरुरेकः शिवः प्रोक्तः सोऽहं देवि न संशयः ।**
**गुरुस्त्वमपि देवेशि मंत्रोऽपि गुरुरुच्यते ।।**
**अतो मंत्रे गुरौ देवि नहि भेदः प्रजायते ।**

कदाचित् स सहस्त्रे पद्मे ध्येयो गुरुः सदा ।
कदाचित् हृदयांभोजे कदाचित् दृष्टिगोचरे ।।

हे देवी पार्वती ! गुरू हा एकच असून त्यालाच शिव म्हणतात. हा गुरू दुसरा तिसरा कोणी नसून मीच आहे, हे निःसंशय होय. त्याचप्रमाणे तू व मंत्र हे सुद्धा गुरूच आहेत. त्यामुळे गुरू, देवता व मंत्र यांच्यामध्ये कोणत्याही प्रकारचा भेद नाही कधीकधी सहस्राचक्रात, कधीकधी हृदयचक्रात व कधीकधी आपल्या दृष्टीसमोर वावरणाऱ्या मानुष विग्रहधारी गुरूचे ध्यान करावे.

सारांश, महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धनीत" प्रकट केलेला व श्रीज्ञानेश्वरमहाराजांना समाधिधनाच्या रूपाने परंपरेने मिळालेला गुरु शब्दाचा अर्थच किंवा गुरु म्हणजे काय याची केलेली व्याख्याच येथे अभिप्रेत आहे, हे निभ्रांतपणे स्वीकारणे आवश्यक आहे; कारण त्याशिवाय "मज हृदयीं सद्गुरु ॥१.२२॥" व "तो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्रीनिवृत्तिनाथु । राहाटत असे मजही आंतु । रिघोनियां ॥१८.१७२९॥" याच्या अर्थांतरात आपल्याला यावज्जन्म प्रवेश मिळणार नाही. मग समजण्याची व प्रतीतीची गोष्ट कोसो मैल दूर राहील यात काय शंका! गुरूची व्याख्या करताना महायोगी गोरक्षनाथ म्हणतात—

न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकं न गुरोरधिकं ।
शिवशासनतः शिवशासनतः शिवशासनतः शिवशासनतः ॥५.६३॥
वाङ्मात्राद्वाथदृक्पातात् यः करोति च तत्क्षणात् ।
प्रस्फुटं शांभवं वेद्य स्वसंवेद्यं परं पदम् ॥६४॥
करुणाखड्गपातेन छित्वा पाशाष्टकं शिशोः ।
सम्यगानंदजनकः सद्गुरुः सोऽभिधीयते ॥६५॥
निमिष र्धार्धपाताद्वा यद्वा पादावलोकनात् ।
स्वात्मन स्थिरमाधत्ते तस्मै श्रीगुरवे नमः ॥६६॥
नानाविकल्पविश्रांतिं कथया कुरुते तु यः ।
सद्गुरुः स तु विज्ञेयो न तु मिथ्याविडंबकः ॥६७॥
अतएव परमपद प्राप्त्यर्थं स सद्गुरुः सदा वंदनीयः ।
गरुरिति गृणाति शं सम्यक् चैतन्यविश्रांतिमुपदिशति ।।
विश्रान्त्या स्वयमेव परात्परं परमपदमेव प्रस्फुटं भवति
तत्क्षणात्साक्षात्कारो भवति ॥६८॥
अतएव महासिद्धानां मते प्रोक्तं वाङ्मात्रेण वा दृकपातमात्रेण वा
सम्यगवलोकनेन वा तत्क्षणान्मुहूर्तविश्रांतियुक्तं करोतीति यः स
सद्गुरुर्भवति । नो चेन्निजविश्रांतिं विना पिंडपदयोःसमरसकरणं
ज्ञा....७०

**न भवतीति सिद्धान्तः । तस्मान्निजविश्रांतिकारकः सद्गुरुरभिधीयते नान्यः। पुनर्वागादि शास्त्रदृष्टयानुमानस्तर्कमुद्रया भ्रामिको गुरुस्त्याज्यः ॥६९॥**

सद्गुरूंच्या शिवाय मोक्षाचे द्वार उघडण्याचा अर्थात् मूलाधारातील निद्रिस्त शक्ती जागृत करण्याचा दुसरा कोणताही सोपा उपाय नाही. ही गोष्ट दृढपणे मनावर ठसावी म्हणून ती चार वेळा पुनःपुन्हा कथन केली आहे. अशा प्रकारचे उत्तम साधन या भूतलावर दुसरे नाही, असे शिवाचे सांगणे असून हीच शिवाची आज्ञा किंवा शासन आहे. (शिवोपदेशाज्ज्ञायते यद् गुरोरधिकमुत्तमं साधनं न किमप्यस्ति महीतलेत्र-टीकाकार पं. श्री. गंगानाथ योगिराज) जो वाणीने अर्थात् शब्ददीक्षेने व दृष्टीने म्हणजे दृग्दीक्षेने शक्तिपात करून एका क्षणात शिष्याला शांभव तत्त्व स्वसंवेद्य होईल असे अभिव्यक्त करून देतो व आपल्या कृपादृष्टीने अर्थात् कृपादीक्षेने शिष्याच्या जरा, मरण, काम, क्रोध, लोभ, मोह, अहंकार व अविद्या किंवा घृणा, लज्जा, भय, शोक, जुगुप्सा, कुल, शील व जात या जीवाच्या अष्ट पाशांना (घृणा लज्जा भयं शोको जुगुप्सा चाथ पंचमी । कुलं शीलं तथा जातिरष्टौ पाशाः प्रकीर्तिताः ॥ कुलार्णवतंत्र १३.९०॥) तोडून टाकून अगर ते छिन्न-भिन्न करून आत्मज्ञानाच्या द्वारा सर्वश्रेष्ठ आनंद प्राप्त करून देतो त्यालाच सद्गुरू म्हणतात. जो एका निमिषात किंवा अर्ध्या निमिषात शिष्याला आत्मानंदात स्थिर करतो तोच सद्गुरू होय. अशा परमपद शांतिदात्या सद्गुरूला नमस्कार असो. जो आत्मस्वरूप बोधक व आध्यात्मिक कथा सांगून शिष्याच्या मनातील नाना संकल्प-विकल्पांचे जाळे तोडून त्याला आत्मविश्रांती प्राप्त करून देतो त्यालाच सद्गुरू म्हणतात. जो शिष्याला मिथ्या गोष्टी, प्रवचने व चर्चा ऐकवून आत्मकल्याणापासून वंचित करतो त्याला सद्गुरू म्हणत नाहीत. यामुळे परमपदाच्या प्राप्तीसाठी सद्गुरू नेहमीच वंदनीय आहेत. जो शिष्याच्या अंतःकरणातील अज्ञानाचा समूळ उच्छेद करून कल्याणाचा मार्ग दाखवील अर्थात् आत्मनंदाचा किंवा चैतन्यप्राप्तीरूप विश्रांतीचा उपदेश करील तोच सद्गुरू होय; कारण त्या उपदेशाने आत्मनिष्ठा-रूपी शांतीच्या द्वारा सर्वोत्तम असे मोक्षरूपी परमपद प्रस्फुटित होऊ लागते व त्याच क्षणी साक्षात्कार होतो. यामुळे महासिद्धांचे असे मत आहे की, जो शब्दाने, कृपादृष्टीने किंवा सम्यक्रीतीने अवलोकन करून अर्थात् दर्शनाने शिष्यावर शक्ति-पात करून एका क्षणात विश्रांतियुक्त करतो त्यालाच सद्गुरू म्हणतात. जर उपरोक्त लक्षणांनी सद्गुरू युक्त नसेल अर्थात् शक्तिपाताचे सामर्थ्य त्याच्याजवळ नसेल; तर तो स्वतःच परंपराप्राप्त अशा ज्ञानाने आत्मनिष्ठासंपन्न न झाल्याने, तो शिष्यावरही शक्तिपात करून पदपिंडाचे अर्थात् शिवशक्तीचे सामरस्य करण्यास सर्वथा असमर्थ असतो. यामुळे शिष्याला आत्मविश्रांती देणारा व श्रेष्ठ कल्याणाचा मार्ग दाखविणारा जो पथप्रदर्शक आहे त्यालाच सद्गुरू म्हणतात. म्हणून शक्तिपात

करतो तोच सद्गुरू होय, दुसरा कोणीही सद्गुरू नाही. याशिवाय जे लोक प्रवचने, भाषणे देऊन शास्त्रदृष्टचा तर्क, अनुमानद्वारा नुसते विवेचन करतात ते सर्व भ्रामक गुरू त्याज्य आहेत.

असा गुरू शब्दाचा अर्थ असून " दिठीचि पाहातां निविजें । कां तोंड भरोनि बोलिजे । नातरी दाटूनि खेंव दीजे । ऐसें कवण आहे ॥६ ११७॥ " या ओवीत त्याचे सार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले असून जो शिष्यात शक्तिसंचार करू शकतो तोच सद्गुरू होय, हा सिद्धयोगशास्त्राचा या बाबतीतील अटळ सिद्धांत आहे. " योगवासिष्ठात " वसिष्ठांनी हा सिद्धांत व्याख्यारूपाने पुढीलप्रमाणे प्रकट केला आहे. ते म्हणतात की–

**दर्शनात् स्पर्शनात् शब्दात् कृपया शिष्यदेहके ।**

**जनयेद्यः समावेशं शांभवं सहि देशिकः ॥ निर्वाणप्रकरण पूर्वार्ध ॥१२८.६१॥**

जो दर्शनाने, स्पर्शाने, शब्दाने व कृपेने शिष्याच्या देहात शिवतत्त्वाचा समावेश शक्तिसंचारपूर्वक करू शकतो तोच सद्गुरू होय.

" ब्रह्मनिष्ठो वेधकः शक्तिपातक्षमश्च गुरुः ॥२.२॥ " असे जे प. प. श्रीविष्णुतीर्थस्वामीमहाराज यांनी "शक्तिपात किंवा कुंडलिनी महायोग" या पुस्तकात सूत्ररूपाने प्रकट केले आहे तेच गुरू म्हणजे काय या प्रश्नाचे साररूप उत्तर आहे.

गुरुतत्त्व म्हणजे काय ? असा दुसरा प्रश्न आहे. या प्रश्नाचे स्पष्टीकरण करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती ॥९.१४॥**

**प्रभू तुम्ही सुखामृताचे डोहो ॥९.५॥**

सद्गुरू हे साक्षात् शंकराचे मूर्तस्वरूप व सुखरूपी अमृताचे डोहच असतात. अशा प्रकारे गुरुतत्त्व म्हणजे शिवतत्त्व किंवा ईश्वरीतत्त्व आहे. सिद्धयोगसंप्रदाय आदिनाथ शंकरांनी प्रवर्तित केलेला असल्याने परंपरेने हे शिवतत्त्व सद्गुरूंमध्ये अवतरित होत असते. त्यामुळे सद्गुरू हा शिवस्वरूप असतो असा सिद्धयोगशास्त्राचा सिद्धांत आहे. या दृष्टीनेच " कुलार्णवतंत्रात " असे म्हटले आहे की–

**यः शिवः सर्वगः सूक्ष्मश्चोन्मना निष्कलोऽव्ययः ।**

**व्योमाकारो ह्यजोऽनन्तः स कथं पूज्यते प्रिये ॥१३.५१॥**

**अतएव शिवः साक्षाद्गुरुरूपं समाश्रितः ।**

**भक्त्या सम्पूजयेद्देवि भुक्ति मुक्ति प्रयच्छति ॥५२॥**

**शिवोऽहं नाकृतिर्देवि नरदृग्गोचरो नहि ।**

**तस्मात् श्रीगुरुरूपेण शिष्यान् रक्षति सर्वदा ॥५३॥**

**मनुष्यचर्मणा बद्धः साक्षात् परशिवः स्वयम् ।**

**स्वशिष्यानुग्रहार्थाय गूढं पर्यटति क्षितौ ॥५४॥**

**सद्भक्तरक्षणायैव निराकारोऽपि साकृतिः ।**

शिवः कृपानिधिर्लोके संसारीव हि चेष्टते ।।५५।।
नरवद्दृश्यते लोके श्रीगुरुः पापकर्मणा ।
शिववद्दृश्यते लोके भवानि पुण्यकर्मणा ।।५८।।
श्रीगुरुं परमं तत्त्वं तिष्ठंतं चक्षुरग्रतः ।
मंदभाग्या न पश्यंति ह्यंधाः सूर्यमिवोदितम् ।।५९।।
गुरुः सदाशिवः साक्षात् सत्यमेव न संशयः ।
शिवरूपी गुरुर्नो चेद्भुक्तिं मुक्तिं ददाति कः ।।६०।।
सदाशिवस्य देवस्य श्रीगुरोरपि पार्वति ।
उभयोरन्तरं नास्ति यः करोति स पातकी ।।६१।।
देशिकाकृतिमास्थाय पशुपाशानशेषतः ।।
छित्वा परं पदं देवि नयत्येवमतो गुरुः ।।६२।।
शिवरूपं समास्थाय पूजां गृण्हाति पार्वति ।
गुरुरूपं समादाय भवपाशान्निकृंतयेत् ।।६६।।
सर्वानुग्रहकर्तृत्वादीश्वरः करुणानिधिः ।
आचार्यस्वरूपमास्थाय दीक्षया मोक्षयेत् पशून् ।।६३।।

हे शिवस्वरूप सर्वव्यापी, सूक्ष्म, अवयवरहित, अविनाशी, मनाला अगोचर, गगनाकार व अनादि-अनंत असे आहे. अशा परतत्त्वाचे पूजन कसे करता येईल? अर्थात् यामुळे त्याची पूजा करणे शक्य होत नाही. यासाठी साक्षात् शिवच गुरुरूपाचा आश्रय करून भूलोकावर वावरतात. यामुळे भक्तिद्वारा त्यांचे पूजन करता येते. या भक्तीमुळे संतुष्ट होऊन ते भुक्ती व मुक्ती देतात. हे देवी पार्वती! परमेश्वरी तत्त्वांनी युक्त असलेली माझी शिवरूपी आकृती मनुष्याला दृष्टिगोचर होऊ शकत नाही. यासाठी गुरुरूप धारण करून मीच शिष्यांचे नेहमी रक्षण करीत असतो. साक्षात् परमशिवच स्वतः आपल्या शिष्यांवर अनुग्रह करण्याकरिता मनुष्यरूपाच्या आवरणाखाली पृथ्वीवर संचार करीत असतात. हे परमशिवतत्त्व अत्यंत निरामय असून सुद्धा सद्‌भक्तांचे रक्षण करण्याकरिता व साधकांना मार्गदर्शन देण्याकरिता अर्थात् शक्तिपातयोगाची दीक्षा देण्याकरिता गुरुरूपाने साकार होऊन आपल्या कृपेचा साठा मुक्त हस्ताने देत एखाद्या संसारी माणसाप्रमाणे राहताना दृष्टोत्पत्तीस येते. जे लोक पापी असतात ते सद्‌गुरूला मनुष्यरूपाने पाहतात; परंतु जे लोक पुण्यवान् असतात त्यांना गुरुतत्त्वाच्या रूपाने अर्थात् मनुष्य रूपाने साकार झालेले शिवतत्त्व ज्ञात होते.

ज्याप्रमाणे आंधळा मनुष्य उगवलेल्या सूर्याला पाहू शकत नाही त्याप्रमाणे साक्षात् परमतत्त्वस्वरूप श्रीगुरू दृष्टीसमोर वावरत असून सुद्धा भाग्यहीन माणसांना त्यांचे खरे स्वरूप कळत नाही. त्यामुळे हे अगदी नितांत व त्रिकालाबाधित सत्य

आहे की, गुरू अगदी साक्षात् सदाशिवस्वरूपच असतात याबद्दल कसलीही शंका बाळगण्याचे कारण नाही. जर सद्गुरू हे अशा प्रकारे सदाशिवतत्त्वस्वरूप नसते तर त्यांच्यात भुक्ती व मुक्ती देण्याचे सामर्थ्य कसे आले असते ? यामुळे सदाशिव व सद्गुरू या दोहोंमध्ये कोणताही भेद नाही; परंतु या दोघात जे लोक अंतर, भेद किंवा द्वैत पाहतात ते पापी आहेत. शिवच सद्गुरुरूपाने उपदेशकरूप ग्रहण करून जीवांचे विषयपाश निःशेष तोडून त्यांना परमपदाची प्राप्ती करून देतो. सद्गुरू हे शिवरूपात पूजा घेतात आणि सद्गुरुरूपात जीवाचे भवपाश छिन्नभिन्न करून त्याला मुक्त करतात. सर्वांवर अनुग्रह करतो म्हणून शिव हा करुणासागर आहे. तो सद्गुरुरूपाने विषयी जीवांना दीक्षा देऊन मुक्त करतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी नवव्या अध्यायापासून तो अठराव्या अध्यायापर्यंत प्रत्येक अध्यायाच्या सुरुवातीला ज्या विविध पद्धतीने सद्गुरूंच्या प्रार्थना केल्या आहेत त्या सर्व उपरोक्त शास्त्रीय दृष्टिकोनातून पाहिल्या म्हणजे सद्गुरू हे ईश्वराभिन्न तत्त्व आहे, हेच त्यांनी स्पष्ट केल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. "मंत्रचैतन्यविज्ञाता गुरुरुक्तः स्वयंभुवा ।" हे "गौतमीयतंत्रातील" व "स गुरुर्मत्समो प्रोक्तो मंत्रवीर्यप्रकाशकः ।" हे "मालिनीविजयतंत्रातील" वचन वरील सर्व विवेचनाचे सारच सांगत आहेत. जो मंत्राला चैतन्ययुक्त बनवू शकतो त्याला ब्रह्मदेवानेच गुरू म्हटले आहे व अशा प्रकारे मंत्रवीर्याचे प्रकाशन करणारा गुरू हा साक्षात् शिवच असतो. "कामाख्यातंत्रातही" "ज्ञानं यत्र समाभाति स गुरुः शिव एव हि ।" असे म्हणून ज्याच्या ठिकाणी ज्ञानाचा प्रकाश विलसत असतो तोच गुरू व तोच शिव होय असे म्हणून गुरुतत्त्व हे शिवस्वरूप आहे हे स्पष्ट केले आहे.

सारांश, "गुरुराद्या भवेच्छक्तिः ।" असे "तंत्रराजात" व "श्रीगुरुः (सर्व) परमकारणभूता शक्तिः। " असे "भावनोपनिषदात" म्हटल्याप्रमाणे सद्गुरू ही आद्य, अनादि व सर्व कारणभूत अशी परमश्रेष्ठ शक्ती असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे ती "तैसें हें नित्यनूतन देखिजे ॥१.७१॥" अशी आहे; कारण ही गुरुशक्तीच गीततत्त्वाच्या रूपाने साकार झाली आहे, हे आपण मागे दुसऱ्या प्रकरणातील "गीतातत्त्व म्हणजे कुंडलिनी शक्तिस्वरूप भवानीचे नित्यनूतन रूप" या दुसऱ्या मुद्यात पाहिले आहे. येथे एकच गोष्ट सूचित करावयाची आहे, की, भवानीदेवी कुंडलिनीच्या स्वरूपाप्रमाणेच गुरुतत्त्व ही कायम नवीन राहणारी, कधीही जुनी न होणारी अगर विटणारी, शिळी होणारी किंवा तत्सम जीर्णशीर्ण दशेला प्राप्त होणारी वस्तू नसून एक अखंड सच्चिदानंदमय अशी अनुभूती मात्र आहे.

सद्गुरूंचे खरे स्वरूप व कार्य कोणते ? असा तिसरा प्रश्न आहे. एखाद्या वस्तूचे किंवा तत्त्वाचे स्वरूप हे त्याच्या कार्यावरून निश्चित होत असल्याने त्या वस्तूचे किंवा तत्त्वाचे कार्य पाहिले की, त्याचे स्वरूप निश्चित होत जाते. सद्गुरूंच्या

वास्तविक कार्यावरून त्यांचे स्वरूप, महिमा व शिष्याच्या अध्यात्म जीवनातील त्यांच्या स्थानाची निश्चिती होणार असल्याने सद्‌गुरुंच्या कार्याचा परिचय हा त्यांच्या स्वरूपाचाच परिचय करून घेण्यासारखे आहे.

शरण आलेल्या शिष्यावर शक्तिपातयुक्त दीक्षानुग्रह करणे हे सद्‌गुरुंचे खरे कार्य आहे. या अनुग्रहामुळेच आनंदाची मंगलमय अनुभूती, योग्य शिष्याचा उद्धार व अयोग्याला योग्यता देऊन उद्धार, समभावसंपन्नता, दुःखनिवृत्ती, ज्ञानदान, शक्ती जागरण, भक्तीचे दान, दिव्यचक्षूंचे उन्मीलन इत्यादि तदनुषंगिक सर्व कार्ये आपोआप घडून येतात. एका अनुग्रहातच ही सर्व कार्ये अनुस्यूत असतात. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सद्‌गुरुंच्या या कार्याचा उल्लेख करताना असे म्हटले आहे की–

तुमचा अनुग्रह गणेशु। जैं दे आपुला सौरसु।
तैं सारस्वतीं प्रवेशु। बाळकाही आथी ॥१०.६॥
तैसा अनुग्रहो पैं राया। श्रीहरी केला धनंजया।
आतां कवणेकडेही माया। ऐसी भाष नेणेंची तो ॥११.१८५॥
कैसें अनुग्रहाचें करणें। पार्थाचिं पाहणें आणि न पाहणें।
तयाही सकट नारायणें। व्यापूनि घेतलें ॥२३०॥
तरी मज पाहतां मुकुंदा। तूं ऐसाची व्यापकु सर्वदा।
मग भक्तानुग्रहें तया मुग्धा। रूपातें धरिसी ॥२८९॥
येवढा जिये सांकडां। कैसा अनुग्रहो पैं गाढा।
जे ब्रह्मानंदु उघडा। भोगवीतसे ॥१८.१५८४॥

सर्व शास्त्रकारांनी सद्‌गुरुंच्या या अनुग्रह, दीक्षा किंवा कृपेच्या कार्याचा उल्लेख, स्पष्टीकरण किंवा विवेचन अगत्याने केल्याचे आढळून येते. सद्‌गुरुंचे हे मूलभूत स्वरूप असल्याने शास्त्रकारांनी असे म्हटले आहे की–

यस्मान्महेश्वरः साक्षात् कृत्वा मानुषविग्रहम्।
कृपया गुरुरूपेण मग्नाः प्रोद्धरति प्रजाः ॥

प्रत्यक्ष महेश्वरच मनुष्यरूप धारण करून गुरुरूपाने मायामग्न जीवांवर अनुग्रह किंवा कृपावर्षाव करून त्यांचा उद्धार करतात. ही गोष्ट अन्यथा दुसऱ्या कोणालाही शक्य नाही; कारण एक बद्धजीव दुसऱ्या बद्धजीवाचा उद्धार करू शकत नाही. सद्‌गुरुंच्या या अनुग्रहरूप मूळ कार्याचा महिमा "भारतीय संस्कृति और साधना," खंड पहिला, या ग्रंथातील "अध्यात्मजीवनमें गुरुका स्थान" या लेखात म.म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी वर्णन करताना असे म्हटले आहे की, "शिव, अर्थात् गुरु सच्चिदानंदमयस्वरूप हैं। उनमें जो नित्य शक्ति अभिन्नरूपसे विराजमान है, वह भी सच्चिदानंदस्वरूप है। दोनोंही एक हैं अवश्य—स्वरूपतः।

किन्तु, प्रकाशकी दृष्टिसे दोनोंमे कुछ विलक्षणता है। शिव निष्क्रिय द्रष्टा और कर्त्ता है। शक्ति उनके साथ पूर्णरूपसे अभिन्न होकर भी दृष्टिस्वरूप तथा करण-स्वरूप है। सृष्टिके पहले शिव और शक्तिमें कोई अंतर लक्षित नहीं होता। आपाततः हम द्वैतदृष्टिका आश्रयण करकेही विचार कर रहे हैं। उसके अनुसार जीव भी अनादि कालसेही अणुरूपमे विद्यमान है। यद्यपि जीव स्वरूपतः शिवसे अभिन्न है, तथापि अनादिकालके मल-संबंधसे शिवकी अपरिच्छिन्न ज्ञानशक्ति और क्रियाशक्ति परिच्छिन्न होकर अणुभावको प्राप्त हुई है। यही चिदणु जीव अथवा पशुके नामसे विख्यात हैं। जीवोंकी संख्या अनंत है। अनादिकालसेही ये अनंत जीवाणु मुक्तिकी प्रतीक्षा कर रहे हैं। इससे ज्ञात हो जायगा कि जीवका एक ऐसा आवरण है, जो अनादिकालसेही विद्यमान है। यही आवरण जीवत्व या पशुत्व कहा जाता है। इसीका नाम मल है। यह यदि न रहता, तो जीवरूपसेही अपनेको पहचानता, पशुरूपसे नहीं। इसी आवरणके समान कहीं-कहीं इसके ऊपर दूसरा आवरण भी दिखाई देता है। इस आवरणका 'कर्म' नामसे उल्लेख किया जाता है। आणव मल और कर्म-इन दो के ऊपर भी कहीं-कहीं तीसरा एक आवरण दृष्टिगोचर होता है। यह आवरण है कर्ममय जीवका मायिक देह। माया आवरणरूप है, इसमें संदेह नहीं। किंतु, सृष्टिके पहले जैसे शिव और शक्तिमें भेद नहीं दिखाई देता, वैसेही चित्-शक्ति और मायामें भेद नहीं लक्षित होता। केवल यही नहीं, जीव और शिवमें भी कोई अंतर नहीं लक्षित होता एवं जीवोंमें भी परस्पर एकका दूसरेसे भेद लक्षित नहीं होता। तब प्रकाश भी नहीं रहता और अंधकार भी नहीं रहता। क्या रहता है और क्या नहीं रहता, कुछ भी नहीं कहा जा सकता। सत् और असत् कोई भी विशेषण उस अवस्थाके वर्णनके लिए पर्याप्त नहीं होते। वह अवस्था चित्-शक्तिकी निष्क्रिय अवस्था जाननी होगी। वास्तविक स्थितिमें शक्तिकी निष्क्रिय और सक्रिय अवस्थामें कोई अंतर नहीं है। किंतु, यदि बुद्धिके द्वारा जानना हो, तो दोनोंमें भेद स्वीकार किये विना दूसरी गति नहीं है। यह निष्क्रिय शक्ति जब सक्रिय रूप धारण करती है, तब सब मानो अपना स्वरूप लेकर व्यक्त हो उठते हैं। पहले भी सब थे, इसमें संदेह नहीं है, किंतु अस्फुट रूपसे न रहनेके समान थे। अंधकारमें जैसी सभी वस्तुएँ अपनी-अपनी विशेषता खोकर उस अंधकारके रूपमें प्रतीत होती हैं, उनकी अपनी अपनी पृथक् सत्ताका भान नहीं होता, सृष्टिकी पूर्वावस्था भी कई अंशोंमें वैसीही है। किंतु, शक्तिके सक्रिय होनेपर भेद स्पष्ट रूपसे जग उठता है। शिव और शक्ति, अर्थात् चित्-शक्ति नित्य सम्बद्ध होकर भी पृथक् रूपसे दृष्टिगोचर होते हैं। इस शक्तिका हम 'पराशक्ति' नामसे निर्देश करेंगे। यह पराशक्तिही पराशिवकी निज शक्ति है। यही अखंड अनुग्रहरूप, विशाल करुणारूप धारण करके कार्यक्षेत्रमें अग्रसर होती

है। यह महाकरुणाही भगवानका महाप्रेम है, जिस करुणा और प्रेमसे विगलित होकर वे अनादि कालसे बद्ध जीवोंको मुक्त कर अपने साथ पूर्णरूपसे अभिन्नता लानेके लिए क्रिया करते हैं। वे निष्क्रिय रहकर भी इस तरह निरंतर क्रिया कर रहे हैं। यह क्रिया बाहरी रूपसे यद्यपि विभिन्न रूपोंमे प्रकाशित होती है, फिर भी इसका मूल रूप एक और अभिन्न है। यही मूलरूप अनुग्रह है। यह शक्ति परम अनुग्रहरूपा है, इसलिए यह सर्वमंगला कही जाती है। सृष्टि, स्थिती और संहार इसीके आत्मप्रकाशके अतिरिक्त और कुछ नहीं हैं, यह क्रमशः स्पष्ट होगा। शास्त्र कहते हैं, अनुग्रह-शक्तिही गुरुका स्वरूप है। परमशिवही गुरु हैं एवं यह अनुग्रह-शक्तिही उनकी पराशक्ती है। यह अनुग्रह-शक्ति अणुरूपी जीवोंको मुक्त कर उन्हें अपने शिवस्वरूपमें पुनः प्रतिष्ठित करती है।'' (पृ. २४८,२४९)

सारांश, अनुग्रह हे सद्‌गुरूंचे सर्वात मोठे कार्य आहे. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी अनुग्रह हा प्रसाद देणारा आहे असे म्हणून सद्‌गुरूंना "आत्मानुभवनरेंद्रा ।। १०.४ ।। " म्हणून गौरविले आहे. सद्‌गुरू हे स्वतः जसे आत्मानुभवाचे राजे असतात त्याप्रमाणे ते आपल्या शक्तिपात सामर्थ्याने शिष्यालाही आत्मानुभव प्राप्त करून देणारे राजेच असतात. राजाचे सेवक जसे राजाचा हुकूम पाळतात त्या-प्रमाणे आत्मानुभवही शक्तिसंक्रमणाच्या रूपाने श्रीगुरूचा हुकूम पाळतो. "मोक्षु दुराराध्य कीर होय। परी तोही आराधी तुझे पाय। म्हणौनि धांडसी तेथ जाय। पाइकु जैसा ।। १३ ९९ ।। " असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे त्याचा अर्थही हाच आहे. यामुळेच भगवान् श्रीशंकराचार्यांनी देखील महापुरुषांच्या आश्रयाचा महिमा " दृष्टान्तो नैव दृष्टस्त्रिभुवनजठरे सद्‌गुरोर्ज्ञानदातुः।" व "श्रीसद्‌गुरुणामतुलित करुणापूर्णपीयूषदृष्टचा ।।" अशा प्रकारे " शतश्लोकीमध्ये " व इतरत्रही अगदी मुक्तकंठाने गाइला आहे. ते महापुरुष दुसरे तिसरे कोणी नसून सद्‌गुरूच होत. असे हे मानव देहधारी सद्‌गुरूच भ्रांत जीवांना आपल्या मूळ स्वरूपाकडे पोहोचते करून त्यांना चैतन्यरूप करणारे खरे अधिकारी असतात. एखाद्या साधकाला दुर्लभ असे तीव्र वैराग्य, तीव्रतर निवृत्तिभाव व मुक्तीची तीव्रतम आकांक्षा पूर्वपुण्याईने उत्पन्न झाली; तरी सुद्धा आत्मस्वरूपाच्या उपलब्धीसाठी महामाया आदिशक्ती कुंडलिनीच्या अनादि निद्रेचा भंग होण्यासाठी सद्‌गुरूंच्या अनुग्रहाची प्राप्ती करून घेणे अगदी अपरिहार्य व आवश्यक ठरते. भ्रांत जीवांना ब्रह्मानंद प्राप्त करून देण्याचा हा अधिकार देवतांनाच काय परंतु मुक्त पुरुषांनाही असत नाही एकमात्र सद्‌गुरूच हे अनुग्रहाचे कार्य करू शकतात. यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अनुग्रह म्हणजे गणेशदेवता असे स्थूलार्थाने व सर्व गणांचा ईश म्हणजे स्वामी असा शंकर हे सूक्ष्मार्थाने सूचित केले असले; तरी गणेश म्हणजे अनुग्रहात्मक पराशक्ती होय, हेच त्यांना परार्थाने सूचित करावयाचे

आहे. सद्गुरूंचे हे स्वरूप पाहिले म्हणजे " तो जीवचि परी तुके महेशेंसीं ॥ १०.९॥" व " एवढें जिये महिमेचें करणें । ते वाचावळें वानूं मी कवणे॥१०.१०॥" यातील मर्म स्पष्ट होते.

आनंदाची मंगलमय अनुभूती देणे हे सद्गुरूंचे दुसरे महत्त्वाचे कार्य आहे. मुळात परमतत्त्व हे अत्यंत आनंदघनयुक्त व आनंदरसपरिपूर्ण असे आहे; कारण " मी अनंतानंदु ॥ १४.५३ ॥, जो भोगिजतसे आनंदु । आनंदेंचि ॥ १५ ५४७ ॥, मी स्वानंदाभिरामु ॥ ९.१६७ ॥, एऱ्हवीं तरी नरकींचें दुःख । पावोनि स्वर्गा नाम कीं सुख । वांचूनि नित्यानंद गा निर्दोख । तें स्वरूप माझें ॥ ९.३१४ ॥, कीं आनंदाचीं वनें सासिन्नलीं । जैसी सौंदर्या राणीव जोडली । तैसीं मनोहरें देखिलीं । हरीची वक्त्रें ॥ ११.१९८ ॥, जो केवळ आनंदैककळा ॥११.३६९॥, कां आनंदासि निघालिया भुजा ॥ ११.६०१ ॥, आनंदु मी ॥ १८.११९३ ॥ " व " जो आंगाथिला आनंदु । सुरतेविण ॥ १५ ७४ ॥ " असे अनेक ठिकाणी म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी परमात्मरूपी अव्यय पुरुषतत्त्वाचे हे आनंदस्वरूप प्रकट केले आहे. याचा अर्थ असा की, जीव हा मूळ शिवरूपच असल्याने त्याचे स्वरूपही आनंदयुक्त असून हा आनंद सुरताशिवाय म्हणजे संभोगाशिवाय अर्थात् बाह्येंद्रियांमुळे उत्पन्न न होणारा असा अतिंद्रिय स्वरूपाचा आहे हे निश्चित होय.

ज्याप्रमाणे स्वरूप आनंदाने भरलेले असते त्याप्रमाणे स्वरूपाशी अभिन्न असलेले सद्गुरूही स्वानंदाभिरामच असतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " ते वेळीं आत्मानंदें आघवें । जें सदा वसतें बरवें ॥ १६.४४२ ॥ " व " जय जय देव निष्कळ । स्फुरदमंदानंदवहळ ॥ १८.५ ॥ " असे म्हणून सद्गुरू हे आत्मानंदाने भरलेले व शिष्याच्या अंतःकरणातील आनंदाला उत्स्फूर्त करणारे " हे अद्वयानंद ॥ १६ २१ ॥ " आहेत असे म्हटले आहे. त्यामुळे जीवरूपाने संकुचित झालेल्या आपल्या शक्तीलाच अर्थात् शिष्याला शिवरूपातील सद्गुरू आपल्याशी अभिन्नत्व देण्यासाठी शक्तिसंचारपूर्वक दीक्षा देऊन आनंदाची मंगलमय अनुभूती आणून देतात. ईश्वराशी अद्वैत किंवा अभिन्न स्थितीत राहणे हीच सर्वोत्कृष्ट आनंदाची प्राप्ती आहे. हे कार्य सद्गुरू करतात म्हणूनच त्यांना सद्गुरू म्हणतात. त्यांच्या या कार्याची घडी आपल्यासमोर उलगडताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं ।
एकसरें आनंदाचें आवारूं । होत जगा ॥९.२०२॥
होती देहबुद्धी एकसरी । ते आनंदभांडारा केली धोवरी ।
मन गीतार्थसागरीं । जळशयन जालें ॥१०.२१॥
आजीं आनंदसरोवरींचीं कमळें । तैसे हे तुझे डोळे ।
आपुलिया प्रसादाचीं राउळें । जयालागीं करिता ॥११.६५॥

जय जय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनवरत आनंदें । वर्षतिये ॥१२.१॥
जो निजानंदें धाला । परिणामु आयुष्या आला ।
पूर्णते जाहला । वल्लभु जो ॥१२.१७१॥
जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे ।
जीवु दोंदावरी लोळे । आनंदाचिया ॥१३.१७४॥
म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानंदाची दाटणी ।
मग सुखानुभूतीचीं घेणीं देणी । मंदावों लागती ॥१६.१२॥
तैसा विश्वस्वप्नेंसीं माया । नीद सांडूनि धनंजया ।
सहसा चेइला अद्वया-। नंदपणें जो ॥१८.४०५॥
मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदे ।
कांतु होऊनियां स्वानंदें । स्वरूपींचि रमसी ॥१८.१३२०॥

सद्गुरूंच्या या कार्याला तोड नाही. सुरतेविण प्राप्त होणाऱ्या अगर भोग-साधन निरपेक्ष अशा स्वस्वरूपभूत सोलीव स्वरूपानंदाची जीवाला जाणीव नसते; कारण "ये हि संस्पर्शजा भोगा ॥ गीता५.२२॥" एवढेच त्याला जन्मजन्मांतरीच्या सवयीने माहीत असते. अशा वेळी सद्गुरूंनी उजाळा म्हणजे दीक्षा दिल्याने ज्यावेळी शिष्याच्या बुद्धीचे डोळे उघडतात अर्थात् शक्ती जागृत होते त्यावेळी जीव आनंदाच्या दोंदावर लोळू लागतो. अशा प्रकारे सद्गुरू जेव्हा आपल्या कृपादृष्टीचा पात करतात तेव्हाच आनंदाचा वर्षाव शिष्यावर होतो. सद्गुरूंच्या कार्याची ही महती अशी श्रेष्ठ असल्यामुळे "कुलार्णवतंत्रात" असे म्हटले आहे की –

गुरोर्यस्यैव संस्पर्शात् परानंदोऽभिजायते ।
गुरुं तमेव वृणुयान्नापरं मतिमान्नरः ॥१३.११०॥

ज्याच्या करस्पर्शाने परमपदाचा अनुभव प्राप्त होईल असाच मनुष्य गुरू होण्यास योग्य आहे. बुद्धिमान शिष्याने अशालाच सद्गुरू म्हणून मान्य करावे. दुसऱ्या कोणालाही मान्यता देऊ नये. बाप दाखव नाहीतर श्राद्ध कर, या म्हणी-प्रमाणे शिष्याने आनंदानुभूतीच्या करोटीवर सद्गुरूला एकदा जरूर तपासून पाहावे. येथे अंधश्रद्धा ठेवण्याचे कारण नाही. उपरोक्त म्हणीप्रमाणेच वागावे. ही कसोटी हातात घेतली म्हणजे शंभर नंबरी सोन्याचा शोध लागेल व तांबा-पितळ उघडे पडेल. शास्त्रकारांनी ही जी कसोटी आपल्या हाती दिली आहे ती अस्सलते-साठी आहे. परनिंदा व परदोष शोधण्यासाठी किंवा कोणाला अध्यात्मदृष्टचा कमी लेखण्यासाठी नाही. शिष्याला अस्सल काय व नक्कल काय हे कळावे म्हणून त्यांनी हें सांगितले आहे. जन्मजन्मांतरीचे आपले भटकणे थांबावे म्हणून शास्त्रकारांनी मोठ्या साक्षेपाने केलेली ही सूचना आहे. जीवाची ही स्थिती व आनंदाच्या उप-

लब्धींचे सद्गुरूंचे हे कार्य यांचा अन्योन्य संबंध असल्याने या संबंधीचे स्पष्टीकरण करताना " भारतीय संस्कृति और साधना, " खंड पहिला, या ग्रंथातील " अध्यात्म जीवनमें गुरुका स्थान " या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, " मनुष्य अनादि कालसे संसारमें पडकर कालचक्रमें घूम रहा है। बहिर्मुख चित्त अपने कर्मोंके संस्कारोंके अनुसार बाहरी जगत्में सुखकी खोज कर बार-बार विफल मनोरथ होकर भी विरत नहीं हो रहा है। जन्मके बाद मृत्यु और मृत्युके बाद फिर जन्म, इस तरह जन्म-मृत्युके चक्रमें विषय-सुखकी खोजमें चित्त निरंतर दौड रहा है। यही प्रवृत्तिका स्रोत है। जबतक इस स्रोतका वेग मंद नहीं पडता, तबतक इसके प्रवाहमें वह जानाही पडेगा। किंतु, पुनःपुनः भोग करते-करते एक ऐसा समय आता है, जब फिर भोगका सामर्थ्य तो रहताही नहीं, इच्छा भी नहीं रहती। यह केवल बुढापा अथवा व्याधिके कारण नहीं होता, किंतु प्रवृत्तिके नियमसे भोगकी मात्रा पूर्ण होतेही स्वभावत: अंतर्मुखी गतिका सूत्रपात हो जाता है। यह गति निवृत्तिमार्गकी गति है। बहुत जन्मोंके भोग-विलासके बाद इस निवृत्ति-मार्गका द्वार प्रत्येक मनुष्यके जीवनमें खुलता है। जब मनुष्य विषयोंकी खोजसे क्लांत होकर सुख और समृद्धिकी आशाको तिलांजलि देनेके लिए तैयार होता है, तब एकमात्र निवृत्तिके सिवा और कोई मार्ग उसके सामने खुला नहीं रहता। मनुष्य यह नहीं समझ पाता कि मैं कितना चल चुका हूँ तथा कब मेरे लौटनेका दिन आयेगा। किंतु, जो प्रत्येक मनुष्यके अंतर्यामीके रूपमें, उसके हृदयमें विहार कर रहे हैं, वे सब कुछ जानते हैं। मनुष्यके प्रत्यावर्तनके मोडपर पहुँचनेपर उसके जीवनमें कई एक नूतन धर्मोंकी अभिव्यक्ति दिखाई देती है। वे धर्म उनके बहि- र्जीवनमें प्रकट होते हैं, कहीं-कहीं नहीं भी होते। किंतु, अंतर्जीवनमें इन धर्मोंका अथवा लक्षणोंका प्रकाश अवश्यंभावी है। जो अंतर्यामी तथा सद्गुरु हैं, वे यह देख पाते हैं एवं साथही उनकी सहायता करनेके लिए हात बढाते हैं। किसी प्रकारका देह धारण कर गुरु मनुष्यके निकट इस संधिकालमें आविर्भूत होते हैं एवं एक थके-माँदे और निराश, मायांधकारसे विडंबित मनुष्यके समीप सुशीतल शांति और आनंदकी मोहिनी बातोंकी घोषणा करते हैं। आनंदसे वंचित हताश मनुष्यको नित्य आनंदपथ दिखानाही गुरुका कार्य है। गुरु शरणागत त्रिपाप-दग्ध जीवको अभयदान देकर इष्टप्राप्तिका उपाय बतलाते हैं। इष्टके मानी संसारके समस्त दुःखोंसे निवृत्ति समझनी चाहिए। केवल वही नहीं, परमानंदकी अभिव्यक्ति भी समझनी चाहिए। वास्तवमें निर्मल अपरिछिन्न आनंदही मनुष्यको इष्ट है। क्योंकि उसीको हरएक चाहता है। " ( पृ. २४४,२४५ )

श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे पुढील उद्गार पाहिले म्हणजे सद्गुरूंच्या या कार्याची जाणीव त्यांच्याशी किती अभिन्नरूपाने विलसत होती हे स्पष्ट होते व स्वानंद-

भोगाची मेल देण्यासाठी त्यांना श्रीगुरुआज्ञेचा जो वोलू झाला होता, तो किती अनुपमेय आहे याची जाणीव होऊन मन आनंदाने भरून जाते. या बाबतीत ते म्हणतात-

तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेंसी विश्व भरूं ।
आनंदाचें आवारूं । मांडूं जगा ॥१३.११६०॥

ऐसी गीता धनंजया । ऐकतया आणि पढतया ।
फळे महानंदें मियां । बहु काय बोलों ॥१८.१५३८॥

येवढा जिये सांकडा । कैसा अनुग्रहो पैं गाढा ।
जे ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ॥१५८४॥

म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवकु होईल इयेचा ।
तो स्वानंदस्वाम्राज्याचा । चक्रवर्ती करी ॥१६६८॥

हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीचि देईल ।
सेवेंद्रियां पोषवील । श्रवणाकरवीं ॥१७४८॥

सारांश, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे सद्गुरूच्या या कार्यामुळे जीव किंवा शिष्य "जो परमानंदें पोखला ॥२.३६६॥,तें आनंदाचे अनुकार । केले जैसे । ५.१३८॥, तें आनंदचित्रींचें लेप ॥६.२५६॥, जें आनंदाचें केवळ । चैतन्य गा ॥६.३२१॥, जेथ यातायात निमालें । घनानंद जें ॥८.८५॥, जो परमानंदाचा पुतळा ॥८.२६९॥, जें आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरिले ॥९.१९१॥, येतुलेनि आनंदाचे राशीवरी बैसावें ॥९.५३४॥,तेथ ब्रह्मानंदाची जोवा । राणोव फावली ॥११.२५२॥, तेथ बुझिजे बोधु वोधें । आनंदु घेपे आनंदें ॥१८.१२१५॥ मी स्वानंदोदधी वेगें । ठाकिला कीं गा ॥१८.१२२२॥" व "तैसा मी तो हे जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें । कालवूनियां प्रवेशें । मजचिमाजीं ॥१८.१२०९॥" अशा स्थितिप्रत जात असल्याने त्यांच्या या कार्याला तोड नाही असेच म्हणावे लागेल.

योग्य शिष्याचा उद्धार करणे व अयोग्य शिष्याला योग्य करून तारणे हे सद्गुरूंचे तिसरे महत्त्वाचे कार्य आहे. "म्हणौनि साधकां तूं माउली ॥१२.८॥" असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले यातच हे कार्य अनुस्यूत आहे; कारण आईला ज्याप्रमाणे आपली चांगली-वाईट सर्व मुले आवडतात व ती मुले उत्तम प्रकारे मोठी व्हावीत अशी तिची जशी इच्छा असते त्याप्रमाणेच सद्गुरू योग्य शिष्याचा उद्धार तर करतातच; पण अयोग्य शिष्यालाही योग्य करून तारतात, हेच त्याचे वैशिष्ट्य होय. योग्य शिष्याचा उद्धार सद्गुरू कसा करतात, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

मावळवीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु ।
अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥१६.१॥

जो अविद्याराती रुसोनियां । गिळी ज्ञानज्ञानचांदणिया ।
जो सुदिनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥२॥
जेणें विवळतिये सवळे ; लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे ।
सांडिती देहाहंतेचीं अविसाळें । जीवपक्षी ॥३॥
लिंगदेहकमळाचा । पोटीं वेंचु तया चिद्‌भ्रमराचा ।
बंदिमोक्षु जयाचा । उदैला होय ॥४॥
शब्दाचिया आसकडीं । भेद नदीच्या दोहीं थडीं ।
आरडते विरहवेडीं । बुद्धिबोधु ॥५॥
तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान ।
भोगवी जो चिद्‌गगन । भुवनदिवा ॥३॥
जेणे पाहालिये पाहांटे । भेदाची चोरवेळ फिटे ।
रिघती आत्मानुभववाटे । पांथिक योगी ॥७॥

इतरही ठिकाणी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सद्‌गुरूंचे हे सामर्थ्य वर्णन केले आहे. परंतु आपल्या स्वतःकडे अयोग्य शिष्याची भूमिका घेऊन आई ज्याप्रमाणें बोबड्या मुलाचे कौतुक करते त्याप्रमाणे सद्‌गुरू अशा शिष्याला योग्य करून उद्धार कसा करतात, हे सांगताना श्रीज्ञानेश्वमहाराज असे म्हणतात की—

नातरी बालक बोबडां बोलीं । कां वांकुडा विचुका पाउलीं ।
तें चोज करूनि माउली । रिझे जेवीं ॥९.६॥
बाळक बापाचिये ताटीं रिगे । आणि बापातेंचि जेवऊं लागे ।
कीं तो संतोषिलेनि वेगें । मुखचि वोढवी ॥१५॥
तैसा मीं जरी तुम्हांप्रती । चावटी करीतसें बाळमती ।
तरी तुम्ही संतोषिजे ऐसी जाती । प्रेमाची असे ॥१६॥
आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्हीं संत घेतले असा बहुवे ।
म्हणौनि केलिये सलगीचा नोहे । आभारु तुम्हां ॥१७॥
अहो तान्हयाचें लागतां झटें । तेणें अधिकचि पान्हा फुटे ।
रोषें प्रेम दुणवटे । पढियंतयाचेनि ॥१८॥
म्हणौनि मज लेंकुरवाचेनि बोलें । तुमचें कृपाळुपण निदैलें ।
तें चेइलें ऐसें जी जाणवलें । यालागीं बोललों मी ॥१९॥
जी आपुलिया स्नेहाची वागेश्वरी । जरी मुकेयातें अंगिकारी ।
तो वाचस्पतीशीं करी । प्रबंधुहोडा ॥१०.८॥

श्रीसमर्थ रामदास स्वामीमहाराजांनीही सद्‌गुरू योग्य शिष्याचा कसा उद्धार करतात व हे कार्य जे करतात तेच सद्‌गुरू या पदास कसे सार्थ ठरतात, हे सांगताना "दासबोधात" असे म्हटले आहे की—

जो ब्रह्मज्ञान उपदेशी । अज्ञानअंधार निरसी ।
जीवात्मया परमात्मयाशीं । ऐक्य करी ॥५.२.९॥
विघडे देव आणि भक्त । जीवशिवपणें द्वैत ।
तयां देवभक्ता एकांत । करी तो सद्गुरु ॥१०॥
भवव्याघ्रें घालूनि उडी । गोवत्सास ताडातोडी ।
केली देखोनि शीघ्र सोडी । तो सद्गुरु जाणावा ॥११॥
प्राणी मायाजाळीं पडले । संसारदुखें दुखवले ।
ऐसें जेणें मुक्त केले । तो सद्गुरु जाणावा ॥१३॥
गर्भवास अतिसाकडी । इच्छाबंधनाची बेडी ।
ज्ञान देऊनि शीघ्र सोडी । तो सद्गुरु जाणावा ॥१४॥
फोडूनि शब्दांचें अंतर । वस्तु दाखवी निजसार ।
तोचि सद्गुरु माहेर । अनाथांचें ॥१५॥

इतके सांगून झाल्यावर अयोग्य शिष्यांच्या उद्धारव्यवस्थेच्या कार्याचे स्पष्टीकरण करताना ते असे म्हणतात की–

जीव एकदेशी बापुडें । तयासी ब्रह्मचि करी रोकडें ।
फेडी संसारसांकडें । वचनमात्रें ॥१६॥
जें वेदाचें अभ्यंतरीं । तें काढूनि अपत्यापरी ।
शिष्यश्रवणीं कवळ भरी । उदारवचनें ॥१७॥
वासनानदीमहापुरीं । प्राणी बुडतां ग्लानी करी ।
तेथें उडी घालूनि तारी । तो सद्गुरु जाणावा ॥१२॥

सद्गुरूंच्या उपरोक्त कार्याला अनुसरूनच "बोधसार" या ग्रंथात श्रीनरहरी यांनी असे म्हटले आहे की–

तत्तद्विवेकवैराग्ययुक्तवेदान्तयुक्तिभिः ।
श्रीगुरुः प्रापयत्येव न पद्ममपि पद्मताम् ।
प्रापय्य पद्मतामेनं प्रबोधयति तत्क्षणात् ॥

सद्गुरू विविकेवैराग्ययुक्त वेदान्तयुक्त्यांच्या साहाय्याने अपद्माला म्हणजे अयोग्य शिष्यालाही पद्मरूपात म्हणजे योग्य शिष्याच्या रूपात परिणत करतात आणि नंतर त्याच्यावर शक्तिपाताचा अनुग्रह करुन शक्तिसंचारद्वारा त्याला त्याचक्षणी जागृत करतात.

"श्रीललितासहस्रनामाच्या सौभाग्यभास्कर भाष्यातही" श्रीभास्करराय मखी यांनी यासंबंधी असे म्हटले आहे की–

अयोग्येऽपि योग्यतामापाद्य श्रीगुरुसूर्यो बोधयति ।

श्रीगुरूरूपी सूर्य अयोग्य शिष्यालाही योग्य करून प्रबुद्ध करतात. हीच गोष्ट दृष्टांताने पटवून सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**मागां दूध दे म्हणतलियासाठीं । आघविया क्षीराब्धीची करूनि वाटी ।**
**उपमन्यूपुढें धूर्जटी । ठेविली जैसी ॥१० १७॥**

**ना तरी वैकुंठपीठनायकें । रुसला ध्रुव कवतिकें ।**
**बुझाविला देऊनि भातुकें । ध्रुवपदाचें ॥१८॥**

**तैसी जे ब्रह्मविद्यारावो । सकल शास्त्रांचा विसंवता ठावो ।**
**ते भगवद्गीता वोंविये गावों । ऐसें केलें ॥१९॥**

सारांश, योग्य शिष्याचा उद्धार करणे हे सद्गुरूंचे कार्य महत्त्वाचे असले, तरी एक दृष्टीने सोपे आहे; परंतु अयोग्य शिष्याला योग्य करून त्याचा उद्धार करणे हे कार्य अधिक महत्त्वाचे असून विकट आहे.असे असले;तरी सद्गुरू हे कार्य करतात,हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वतःकडे ती भूमिका घेऊन जे सद्गुरूंचे सामर्थ्य वर्णन केले आहे त्यावरून स्पष्ट होते.

शिष्याला आपल्यासारखे अर्थात् समभावसंपन्न करणे हे सद्गुरुंचे चवथे महत्त्वाचे कार्य आहे. सद्गुरू स्वतः शिवरूप झालेले असतात. त्यामुळे शिष्यालाही आपल्यासारखे शिवस्वरूप अर्थात् ब्रह्मस्वरूप करणे हे आपले कार्य आहे असे ते समजतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सद्गुरूंचे हे कार्य गुरुशिष्यपरंपरेने कसे सिध्द होते, हे स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

**एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु ।**
**तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणवया ॥१८.१२२६॥**

शिष्याने सद्गुरुकृपाप्राप्त शक्तीच्या साहाय्याने शिवरूपच व्हावयाचे असते. त्याला दुसरा पर्याय नसतो; कारण तो मत्स्वरूप व्हावा अशी दीक्षाकालीच सद्गुरूंची इच्छा असते. यासाठीच सिद्धयोगसाधनशास्त्र प्रवृत्त झाले आहे. ही गोष्टच स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**आम्हीं साधन हें जें सांगितलें । तेंचि शरीरीं जिहीं केलें ।**
**ते आमुचेनि पाडें आलें । निर्वाळलेया ॥६ ३२६॥**
**इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरंवसेनी ब्रह्मत्वा येती ॥३३०॥**

सद्गुरूंच्या या कार्याची थोरवी फार मोठी असल्याने शास्त्रकारांनी या त्यांच्या कार्याचे आवर्जून वर्णन केलेले आढळून येते.श्रीमदाद्यशंकराचार्यांनी " शत-श्लोकीच्या " सुरुवातीच्या श्लोकातच असे म्हटले आहे की—

**दृष्टांतो नैव दृष्टस्त्रिभुवनजठरे सद्गुरोर्ज्ञानदातुः ।**
**स्पर्शश्चेतत्र कल्प्यः स नयति यदहो स्वर्णतामश्मसारम् ॥**

**न स्पर्शत्वं तथापि श्रितचरणयुगे सद्‌गुरुः स्वीयशिष्ये ।**
**स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमस्तेन वालौकिकोपि ॥१॥**

ज्ञानदान करणाऱ्या सद्‌गुरूंना शोभेल असा दृष्टांत या त्रिभुवनामध्ये कोठेही मिळत नाही. त्यांना परिसाची उपमा जरी दिली तरी तीही योग्य वाटत नाही; कारण परीस लोखंडाला सुवर्णत्व देत असला तरी परिसत्व देत नाही. परंतु सद्‌गुरूंच्या चरणयुगुलाचा आश्रय करणाऱ्या शिष्याला ते आपल्यासारखे करून सोडतात, म्हणून सद्‌गुरूंना कोणतीही उपमा देता येत नाही.

श्रीसंत तुकाराममहाराजांनीही सद्‌गुरूंच्या या अलौकिक कार्याचा उल्लेख करताना पुढील "अभंगात" असे म्हटले आहे की–

**सद्‌गुरुवांचूनि सांपडेना सोय । धरावे ते पाय आधी आधी ॥१॥**
**आपणासारिखे करिती तात्काळ । नाहीं काळवेळ तयालागीं ॥२॥**
**लोह परिसाची न साहे उपमा । सद्‌गुरुमहिमा अगाधची ॥३॥**
**तुका म्हणे कैसे आंधळें हे जन । गेले विसरोन खऱ्या देवा ॥४॥**

" कुलार्णवतंत्रातही " सद्‌गुरूंच्या या कार्याचा सर्वश्रेष्ठ कार्य म्हणून उल्लेख करताना असे म्हटले आहे की–

**संजातदिव्यभावोऽसौ सर्वं जानाति शांभवी ॥१४.६१॥**
**यदस्ति वेधकं तत्तत् स्वयमेवानुभूयाते ॥६२॥**

शांभवी शक्ती कुंडलिनीच्या आधाराने सद्‌गुरू ज्या दिव्य अशा शिवभावाने संपन्न असतात त्याचाच शिष्य स्वत: अनुभव घेतो.

" अमृतानुभवात " श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सद्‌गुरूंच्या या कार्याचा उल्लेख करताना असे म्हटले आहे की–

**शिष्या देतां वाटे । अद्वैताचा समो न फूटे ।**
**तरी कांह्या होती भाटे । शास्त्रें तुझीं ॥९ ७०॥**
**किंबहुना दातारा । मीतूंपणाचा संसारा ।**
**वेचौनि होसी सोयरा । तेणेंची तूं तोखें ॥७१॥**

यावर अर्थात्मक टीका करताना " अनुभवामृत-पद-बोधिनीत " श्रीनिरंजन रघुनाथ यांनी असे म्हटले आहे की, " हे गुरु, तुझ्या अद्वैतपणाचा समान भाव न फुटून सहज स्थिति शिष्यास मी देतो ऐसें तुला वाटतें तरि शास्त्रें तुझीं भाटें कांह्या, कशास होतीं ? जैसा एक वृक्ष उभय शाखीं फुटतो, तैसा तूं अद्वैतपरमात्मरूपें एक जो त्याचाच समानरूपत्वें गुरु शिष्य हा भेद होय. या हेतूस्तव हे सहज-स्थिति मी शिष्यातें देत नाहीं, शिष्यरूपें माझी सहज स्थिति मीच भोगितों ऐसा तुझा निर्धार आहे. म्हणून संपूर्ण शास्त्रें भाट-बंदिजनांसारखीं तुझी स्तुति करितात. (७०) किंबहुना आतां फार काय सांगावें ? कदाचित् शिष्याचे ठायीं मी-तूंपणाचा

संसार व्यवहार असला तरी तो वेंचून म्हणजे नाहीसा करून टाकतोस. मग तुझे ठायीं मी-तूंपणाचा व्यवहार तो कोठून असणार ? अस्तु, शिष्य जो तो भेदरहित जाला असतां,त्या संतोषानेंचि तूं सोइरा होसि म्हणजे निजभक्तसखा होतोसि हा भाव."

इमर्सन या प्रख्यात लेखकाने " No really great soul ever leaves this sphere without confiding his secret to another." असे जे म्हटले आहे त्यातच सद्‌गुरूंच्या या कार्याचे रहस्य लपलेले आहे. कोणताही थोर महात्मा आपले जीवनरहस्य कोणावर तरी विश्वासाने सोपविल्यावाचून अंतर्धान पावत नाही, हे अक्षरशः सत्य आहे; कारण यात अनेक रहस्ये दडली आहेत. ही सर्व रहस्ये प्रकट करताना श्रीएकनाथमहाराजांनी " एकनाथी भागवतात " असे म्हटले आहे की—

शिष्य साचार अनुभव लाहे । तेणें सद्‌गुरु सुखाचा मेरु होये ।
जेवीं तानयाचे धणी माये । सुखावली राहे स्वानंदें ॥२९.४९१॥
सेवक विभांडितां परचक्र । तेणें रायासीं संतोष थोर ।
गुढी उभारूनि साचार । करी निजगजर स्वानंदें ॥४९२॥
तानयाचे लळे पुरवणे । हे व्याली तेचि वेदना जाणे ।
कां शिष्यासी स्वानुभव देणें । हें स्वयें जाणे सद्‌गुरु ॥४९३॥
निजपुत्रें लाधल्या निधान । पिता संतोषे आपण ।
तेवीं उद्धवाचेनि अनुभवें जाण । स्वयें श्रीकृष्ण संतोषे ॥४१४॥
कृष्णसुखें सुखरूप नित्यता । तोही शिष्यानुभवें सर्वथा ।
लाहे सुखाची परमावस्था । गुरुगम्यता अगम्य ॥४९५॥
शिष्यासी उपदेश करितां । गुरूसी नसती सुखावस्था ।
तरी उपदेशपरंपरता । नव्हे तत्त्वतां इये लोकीं ॥४९६॥
गुरु सांगे जें उबगलेसाठीं । तें ते शिष्यासी बोधेना गोष्टी ।
मा निजानुभवाची भेटी । केवीं निजदृष्टी देखेल ॥४९७॥
जेवीं बाळा लेणे लेविवितां । तें नेणे परी सुखावे माता ।
तेवीं शिष्यासी अनुभव होतां । सुखावे तत्त्वतां सद्‌गुरुरावो ॥४९८॥

येथपर्यंत जे विवेचन केले ते साधनसंपत्तीने संपन्न अशा सच्छिष्यावर होणाऱ्या अनुग्रहाने जी समभावसपन्नता त्याला तत्काळ प्राप्त होते त्याचे आहे. परंतु ज्यावेळी अनुग्रह ग्रहण करणारा शिष्य हा आधारदुर्बल, अपात्र, साधनसंपत्ती नसलेला व खूप खालच्या दर्जावर असतो त्यावेळी हठ, लय किंवा मंत्र यांपैकी एखाद्या उपकरणांचा किंवा बाह्य आलंबनाचा उपयोग करून सद्‌गुरूंना हे कार्य पूर्ण करावे लागते.

उपरोक्त तिन्ही उपाय श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे कथन केले आहेत हे आपण मागे पाहिलेच आहे. " अधिकार तैसा करू उपदेश । " हा श्रीसंत तुकाराममहाराजांचा नियमच येथे लागू आहे.या दृष्टीने " भारतीय संस्कृति और साधना," खड पहिला, या ग्रंथातील " गुरुतत्त्व और सद्‌गुरु–रहस्य " या लेखात म म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, " इस परानुग्रहको ग्रहण करनेवाले अपनी–अपनी योग्यताके तारतम्यसे विभिन्न प्रकारके हुआ करते हैं। जो शिष्य निर्मल संवित्–संपन्न या शुद्धचित्त होता है, उसपर अनुग्रह करनेके समय गुरुको किसी उपकरणका आश्रय लेनेकी आवश्यकता नहीं होती। वे केवल निष्काम (अनुसंधानहीन) दृष्टिके द्वाराही इस प्रकारके अनुग्रह चाहनेवाले योग्य शिष्यपर अनुग्रह कर देते हैं। निजबोधरूप स्वशक्तिके संचारद्वारा शिष्यको अपने साथ समभावापन्न कर लेनाही अनुग्रहका लक्षण है।

तं ये पश्यंति ताद्‌रूप्यक्रमेणामलसंविदः ।
तेऽपि तद्‌रूपिणस्तावत्येवास्यानुग्रहात्मता ।।

इस प्रकारके निष्काम शिष्यपर अनुग्रह करनेमें उपकरणकी आवश्यकता नहीं होती। यह निर्मित्तिक ज्ञानका उदाहरण है।

परंतु अनुग्राह्य शिष्य यदि वैसा निर्मल संवित्–संपन्न नहीं होता, तो उपकरणकी आवश्यकता होती है। अर्थात् ऐसे अवसरपर सांसिद्धिक गुरुमें " मैं इसपर इस प्रकार अनुग्रह करूँगा " ऐसी अनुसंधानमूलक प्रवृत्ति उत्पन्न होती है। इसीसे बाह्य उपकरणोंकी आवश्यकता होती है और शास्त्रीय मर्यादाका आश्रय लेना पडता है। इसीसे गुरु स्वयं परमेश्वररूप होनेपर भी उपायभूत शास्त्रादिके श्रवण और अध्ययनके प्रति आदर दिखलाते हैं। अनुग्रह चाहनेवाले अशुद्धचित्त शिष्य भाँति–भाँतिके होते हैं, इसीसे उनकी विभिन्न मानसिक प्रकृतिके अनुसार आवश्यक उपकरण भी भिन्न–भिन्न होते हैं। ऐसे प्रसंगमें जिन शास्त्रोंमें इन उपकरणोंका वर्णन है, उनकी भी आवश्यकता होती है, नहीं तो परानुग्रह किया नहीं जाता। मनुष्यके चित्त भिन्नभिन्न हैं इसीलिए शास्त्रोंके भी विभिन्न प्रकार हैं। ठीक वैसेही, जैसा रोगोंकी विभिन्नताके कारण औषधमें भेद होता है—

यथैकं भेषजं ज्ञात्वा न सर्वत्र भिषज्यति ।
तथैकं हेतुमालंब्य न सर्वत्र गुरुर्भवेत् ।।"

सारांश, " तैसाचि तया सुखानुभवापाठीं । केला द्वैताचा सांभाळु दिठी ।।११२५२।। " या न्यायाने सद्‌गुरू शिष्याला आपल्यासारखे सुखी करून तर सोडतातच; पण हे सुख त्याला व स्वत:ला अनुभवण्यासाठी पुन्हा द्वैत स्थितीत आणतात हे खरे आहे. श्रीकृष्णांनी अर्जुनाला वारंवार या स्थितीत आणले आहे त्याचे कारण हेच आहे.

शिष्यरूपी जीवाची दुःखनिवृत्ती करणे हे सद्गुरूंचे पाचवे महत्त्वाचे कार्य आहे. हे दुःखनिवृत्तीचे कार्य म्हणजेच अज्ञाननिवृत्तीचे कार्य होय; कारण अज्ञानामुळेच जीवाला दुःख होत असते. आत्मस्वरूपाचे विस्मरण व जीवस्वरूपाची जागृती हेच अनादि अनंत अज्ञान दुःखास कारणीभूत असून अहंममता, कल्पना, वासना, जन्ममरण, भोग, आकांक्षा, विषय, इंद्रियप्रवृत्ती, अविद्या इत्यादि त्याची अनेक अंगोपांगे आहेत. आपण जीवरूपाने संकुचित आहोत ही जी निरंतर भावना झालेली आहे तेच सर्वात मोठे दुःख आहे. या दुःखाचे उपरोक्त अंगोपांगांच्या साहाय्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी खूप सविस्तर वर्णन केले आहे. त्याचे सार त्यांच्या शब्दात पाहवयाचे झाले; तर असे म्हणता येईल की–

पैं व्यामोहाचिये शेजे । बळिया अविद्या निद्रितु होइजे ।
ते वेळीं दुःस्वप्न हा भोगिजे । जन्ममृत्यूंचा ॥६.६८॥

मग क्लेशतरूची वाडी । जें तापत्रयाग्नीची सगडी ।
जें मृत्युकाकासीं कुरोंडी । सांडिली आहे ॥८.१४०॥

जें दैन्याचें दुभतें । जें महाभयातें वाढवितें ।
जें सकळ दुःखाचें पुरतें । भांडवल ॥१४१॥

जें दुर्मतीचें मूळ । जें कुकर्माचें फळ ।
जें व्यामोहाचे केवळ । स्वरूपचि ॥१४२॥

जें संसाराचें बैसणें । जें विकारांचें उद्यानें ।
जें सकळ रोगांचें भाणें । वाढिलें आहे ॥१४३॥

जें काळाचा खिचु उशिटा । जें आशेचा आंगवठा ।
जन्ममरणाचा वोलिवटा । स्वभावें जें ॥१४४॥

जें भुलीचें भरिव । विकल्पाचें वोतिव ।
किंबहुन पेंव । विंचुवांचें ॥१४५॥

जें व्याघ्राचें क्षेत्र । जें पण्यांगनेचें मैत्र ।
जें विषयविज्ञानयंत्र । सुपूजित ॥१४६॥

जें लावेचा कळवळा । निवालिया विषोदकाचा गळाळा ।
जें विश्वासु आंगवळा । संवचोराचा ॥१४७॥

जें कोढियाचें खेंव । जें काळसर्पाचें मार्दव ।
गोरियेचें स्वभाव । गायन जें ॥१४८॥

जें वैरियाचा पाहुणेरु । जें दुर्जनाचा आदरु ।
हें असो जें सागरु । अनर्थांचा ॥१४९॥

जें स्वप्नीं देखिलें स्वप्न । जें मृगजळें सासिन्नलें वन ।
जें धूम्ररजांचें गगन । ओतलें आहे ॥१५०॥

आणखी एके ठिकाणी या दुःखाचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**आतां सुखेंसि जीविता। कैंचीं ग्राहिकी कीजेल पंडुसुता।**
**काय राखोंडी फुंकितां। दीपु लागे ?॥९.४९७॥**

**अगा विषाचे कांदे वाटुनी। जो रसु घेईजे पिळुनी।**
**तया नाम अमृत ठेवुनी। जैसें अमर होणें॥४९८॥**

**तेवीं विषयांचें जें सुख। तें केवळ परम दुःख।**
**परि काय कीजे मूर्ख। न सेवितां न सरे॥४९९॥**

**कां शीस खांडूनि आपुलें। पायींच्या खतीं बांधिलें।**
**तैसे मृत्युलोकींचें भलें। आहे आघवें॥५००॥**

**म्हणौनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी। ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं।**
**कैंची सुखनिद्रा अंथरुणी। इंगळांच्या ! ॥५०१॥**

**हें कळानळाच्या तोंडी। घातली लोणियाची उंडी।**
**माशी पांखु पाखडी। तंव हें सरे॥१३.११०४॥**

हे जे सर्व दुःख आहे ते देहात्मबुद्धीचे आहे. सद्‌गुरू "देह म्हणजे मी होय" ही बुद्धी घालवून "देह म्हणजे मी नाही" अशी बुद्धी उत्पन्न करतात. यालाच शास्त्रकारांनी नित्यानित्यविवेक असे म्हटले आहे. एकदा 'देह' जो जड-स्वरूप व 'मी' जो चेतनस्वरूप यांचा विवेकाच्या सामर्थ्याने भेद होण्यास सुरुवात झाली की, दुःखनिवृत्तीला व तदनुषंगिक सर्व अंगोपांगे विगलित होण्यास किंवा मावळण्यास सुरुवात होते. यालाच जडचेतनभेदप्रक्रिया म्हणतात व तीच दुःख निवृत्तीचे मूळ आहे. या विवेचनाच्या उजेडात "मज हृदयीं सद्‌गुरु। जेणें तारिलों हा संसारपूरु। म्हणौनि विशेषें अत्यादरु ! विवेकावरी ॥ १.२२ ॥" ही ओवी अभ्यासून पाहिली म्हणजे तिची अनुभूती घेतली; तर हे लक्षात येईल की, सद्‌गुरूंच्या दुःखनिवृत्तीच्या आत्यंतिक महत्त्वाच्या कार्याची पताकाच विवेकावरील अत्यादर प्रकट करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी फडकाविली आहे. महर्षी कपिलाचार्यांनी "अथ त्रिविधदुःखात्यंतनिवृत्तिरत्यंतपुरुषार्थः ॥ १.१ ॥" असे "सांख्य-दर्शनात" म्हणून तीन प्रकारच्या दुःखांची पूर्ण निवृत्ती म्हणजेच मोक्ष होय, हे सांगून एक प्रकारे सद्‌गुरूंच्या कार्याचे दर्शनच घडविले आहे. सद्‌गुरूंच्या या दुःखनिवृत्तीच्या कार्याला अनुलक्षूनच अत्यंत गुह्यतम म्हणून ही जडचेतनभेदप्रक्रिया सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**आतां किती नावानावा गुज। म्हणतां कानडें वाटेल तुज।**
**तरी ज्ञान सांगेन सहज। विज्ञानेंसीं॥९.४२॥**

**परि तेंचि ऐसेनि निवाडें। जैसें भेसळलें खरें कुडें।**
**मग काढिजे फाडोवाडें। पारखूनियां ॥४३॥**

**कां चाचूचेनि सांडसें। खांडिजे पय पाणी राजहंसें।**
**तुज ज्ञान विज्ञान तैसें। वांटूनि देऊं ॥४४॥**

**मग वारयाचिया धारसा। पडिन्नला कोंडा कां नुरेचि जैसा।**
**आणि कणांचा आपैसा। राशिवा जोडे ॥४५॥**

**तैसें जें जाणतलेयासाठीं। संसार संसाराचिये गांठीं।**
**लाऊनि वैसवी पाटीं। मोक्षश्रियेच्या ॥४६॥**

सद्‌गुरूंच्या दुःखनिवृत्तीच्या या कार्याचा विचार करताना " भारतीय संस्कृति और साधना, " खंड पहिला, या ग्रंथातील " अध्यात्मजीवनमें गुरुका स्थान " या लेखात म.म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, " गुरुका पहला काम शिष्यरूपी जीवके दुःखकी निवृत्तिकी व्यवस्था करना है। मायिक जगत्‌में भेदज्ञानके अधीन होकर कर्मसंस्कार-संपन्न कर्तृत्वाभिमानसे पुष्ट जीव अनादि कालसे कर्म करता हुआ और साथ-ही-साथ कृत कर्मोंका फल भोगता हुआ आ रहा है। जन्मजन्मांतरोंसे संसारकी यह धारा वहती चली आ रही है। भेदज्ञान और कर्तृत्वाभिमान जबतक नष्ट नहीं होते, तवतक इस संसार-लीलाका अंत नहीं होता एवं जन्म-मृत्यु तथा कालचक्रके आवर्त्तनकी निवृत्ति नहीं होती। जीव चिदात्मक है, इसमे संदेह नहीं। किंतु मायाके प्रभावसे वह जडसत्ताको अपनी चित्सत्ता मानकर भीषण भूल करता आ रहा है। इस भूलके कारणही कर्मक्षेत्रमें पतन और अनुरूप भोग अवश्य प्राप्त होते हैं। ऊपर देवलोकसे नीचे तीर्यक् और स्थावरसीमातक असंख्य प्रकारके जीव हैं। सभी इस दुःखमय संसारके आवागमनमें चक्कर खा रहे हैं। अस्थायी ऊर्ध्वगति अथवा अधोगति वास्तविक पथकी कोई सूचना नहीं देती। चेतन आत्मा जबतक अपनेको " मैं जडसे पृथक् हूँ।" यों नहीं पहचानेगा, तबतक इस दुःखमय कालचक्रसे उसके उद्धारकी कोई आशा नहीं। जो अनुग्रहपूर्वक ज्ञान प्रदान कर इस अज्ञानसे उसे विमुक्त करते हैं अथवा मुक्त होनेमें साहाय्य प्रदान करते हैं, वे गुरु हैं। इस ज्ञानको विवेक-ज्ञान कहते हैं। जडसत्ता भिन्न-भिन्न स्तरोंकी है, इसीलिए विवेक-ज्ञानमें भी तारतम्य है। जो विशुद्धतम विवेकज्ञान है, उससे आत्माकी निर्मल स्वरूपमें स्थिति होती है। इसेही कैवल्य अथवा मुक्ति कहा जाता है। कई लोग इसे निर्वाण भी कहते हैं। " ( पृ. २४३ )

सारांश, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " म्हणौनि अयुक्तपण मनाचें। तेंचि सर्वस्व दुःखाचें ॥ २.३४७ ॥" असा सिद्धांत प्रस्थापित केला असून, " ये युक्तीची कडसणी। नाहीं जयाच्या अंतःकरणीं। तो आकळिला जाण गुणीं। विषयादिकीं

॥ २.३४२ ॥ " असे म्हणून सिद्धयोगसाधनद्वारा सद्गुरूंमुळे प्राप्त होणाऱ्या युक्तीची कडसणी अर्थात् शक्तिपाताने प्राप्त होणाऱ्या विवेकाची उपस्थिती नसेल; तर गुण व विषयांच्या पाशात जीव सापडतो हे स्पष्ट करून, या दुःखनिवृत्तीसाठी सद्गुरूंच्या आश्रयाने शक्ती जागृत करून घेणे आवश्यक आहे, हे सांगून त्यांच्या या अलौकिक कार्याचा उद्घोष करताना ते म्हणतात–

देखें अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता ।
तेथ रिगणें नाहीं समस्ता । संसारदुःखा ॥२.३३८॥
जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु ।
तया क्षुधेतृषेचा अडदरु । कहींचि नाहीं ॥३३९॥
तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें कें आहे ?।
तेथ आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥३४०॥
जैसा निर्वातीचा दीपु । सर्वथा नेणें कंपु ।
तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु । योगयुक्तु ॥३४१॥

आत्तापर्यंत वर्णन केलेल्या कार्याप्रमाणेच शक्तिजागरण, ज्ञानदान व दिव्यचक्षूंचे उन्मीलन ही ही सद्गुरुंची मोठी कार्ये आहेत.या सर्व कार्यांची चर्चा आपण मागील प्रकरणांमधून केली असल्यामुळे त्याचा येथे फक्त निर्देश केले आहे. सद्गुरूंचे शेवटचे महत्त्वाचे कार्य सन्मार्ग दाखविणे हे आहे. त्यामुळे सन्मार्ग प्रदर्शक हे त्यांचे पहिले व शेवटचे स्वरूप आहे. सद्गुरुंच्या या कार्याचे व स्वरूपाचे उद्घाटन खुद्द भगवंतांनीच " गीतेत " करताना असे म्हटले आहे की–

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥३.२०॥

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥२५॥

जनकादिकांना सिद्धयोगानेच अमृतत्व प्राप्त झाले. यासाठी लोकांनी सन्मार्गगामी व्हावे म्हणून सुद्धा तुला सिद्धयोगच आचरिला पाहिजे. ज्याप्रमाणे सामान्य साधक सिद्धीच्या प्राप्तीच्या इच्छेने साधनात रत होतात त्याप्रमाणे लोकसंग्रह किंवा लोकानुग्रह करण्याच्या इच्छेने अर्थात् त्यांनी आपल्याप्रमाणे साधन करून सिद्ध व्हावे म्हणून फलाविषयी अनासक्त असलेल्या सिद्धाने साधन केलें पाहिजे.

या दोन श्लोकांचा भावार्थ स्पष्ट करताना सद्गुरूंच्या सन्मार्ग प्रदर्शकाचे कार्य व स्वरूप श्रीज्ञानेश्वरमहाराजांकडून कसे प्रकट झाले आहे हे पाहताना असे दिसते की –

देख पां जनकादिक । कर्मजात अशेख ।
न सांडितां मोक्षसुख । पावते जाहले ॥३.१५२॥

याकारणें पार्था । होआवी कर्मी आस्था ।
हे आणिकही एका अर्था । उपकारैल ।।१५३।।
जे आचरतां आपणपयां । देखी लागेल लोक यया ।
तरी चुकेल अपाया । प्रसंगेंचि ।।१५४।।
देखैं प्राप्तार्थ जाहले । जें निष्कामता पावले ।
तयाही कर्तव्य असे उरले । लोकांलागीं ।।१५५।।
मार्गी अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा ।
अज्ञाना प्रगटावा धर्मु तैसा । आचरोनी ।।१५६।।
हां गा ऐसें जरी न कीजे । तरी अज्ञाना काय उमजे ?।
तिहीं कवणेपरी जाणिजे । मार्गातें या ? ।।१५७।।
देखैं फळाचिया आशा । आचरे कामकु जैसा ।
कर्मी भरु होआवा तैसा । निराशाही ।।१६९।।
जे पुढतपुढतीं पार्था । हे सकळ लोकसंस्था ।
रक्षणीय सर्वथा । म्हणौनियां ।।१७०।।
मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें ।
अलौकिक नोहावें । लोकांप्रति ।।१७१।।

या अर्थानेच "भारतीय संस्कृति और साधना," खंड दुसरा, या ग्रंथातील "सहजयान और सिद्धमार्ग" या लेखात म. म. श्रीपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, "सिद्धगण कहते हैं कि विकल्पका उपशम एवं इस अनादि कालसे बह रहे भ्रांतिस्रोतका निरोध न होने तक जीवके परम कल्याणकी प्राप्तिकी कोई आशा नहीं है। अंधा जैसे अंधेको मार्ग दिखाकर चला नहीं सकता वैसेही एक विकल्प–ग्रस्त जीव अन्य विकल्प-ग्रस्त जीवको केवल विकल्पके साहाय्यसे निर्विकल्प परम पदपर चढा नहीं सकता। इसीलिये गुरुकी आवश्यकता हैं। गुरुकृपाके बिना जीवके लिये मोहसे उत्तीर्ण होनेका और कोई मार्ग नहीं है। जो परंपराप्राप्त महाजनोंद्वारा आचरित सुमार्ग दरसाकर जीवकी भ्रांति हटाने और बल-संपादन करनेमें समर्थ हैं, जिनका आश्रय लेकर असाहाय जीव – अर्थात जलप्रवाहमें तैरते हुए तृणके टुकडेके समान संसारसागरमें निरंतर डूबता और उतरता हुआ असाहाय जीव-आत्मस्वरूपमें विश्राम–लाभ कर सकता है, वे ही 'गुरु' कहलाते हैं। वे जिस पथका प्रदर्शन करते हैं उस पथपर चलनेपरही स्वसंवेद्य आत्मवस्तुका दर्शन प्राप्त होता है। आत्मसाक्षात्कारके लिये दूसरा कोई भी उपाय नहीं है। केवल उपदेशमय वाक्याडंबरके द्वारा आत्माके स्वरूपके संबंधमें परिचय प्रदान नहीं किया जा सकता। क्योंकि आत्मा स्वयंप्रकाश है, मन वचन इंद्रिय आदिका अगोचर है। इसलिये 'गुरोस्तु मौनं व्याख्यानम्' है। सिद्धसिद्धांतसंग्रहमें आचार्य बलभद्रने जठरसंहिताका वचन उधृत करते हुए इसके बारेमें कहा है कि –

परंपराप्तसन्मार्गदर्शने यस्य योग्यता ।
स गुरुर्भवति श्रीमानात्मविश्रांतिकारणम् ।।
तेन संदर्शिते मार्गे स्वसंवेद्यस्य दर्शनम् ।
भवतीति गुरुं देवभावेन परिचिन्तयेत् ।।

जो परंपरासे प्राप्त सन्मार्गका प्रदर्शन करनेमें समर्थ हैं, वे ही वास्तवमें गुरुपदवाच्य हैं। आत्मविश्रांति प्रदानकी सामर्थ्य उन्हींमें है। वह जो पथ दिखला देते हैं उसी पथपर चलते चलते 'स्वसंवेद्यका दर्शन' होता है। इसीलिए गुरुका देवरूपसे चिंतन करना चाहिये।

सद्गुरुकी कृपादृष्टिसे मुनि लोग सब सिद्धियोंके फलोंका त्यागकर स्वात्मैकवेद्यरूपसे निरुत्थानदशाकी प्राप्तिके बाद कृतार्थ होते हैं। एकमात्र गुरुके कृपाकटाक्षपातसे निरुत्थान दशाका उदय होता है। इस अवस्थामें स्वदेह आत्मसंवेद्य अवस्थाको प्राप्त होकर परमपदके साथ सामरस्य प्राप्त करती है। तब निजावेशवश अर्थात् आत्मस्मृतिके उदयसे एक अनिर्वचनीय महानंदमय अवस्थाका स्फुरण होता है। इससे जिस प्रकाशका उद्दीपन होता है, उसकी अनुभूति होनेपरही सब भेद तिरोहित हो जाते हैं।" (पृ. २७२,२७३)

सारांश, नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त झालेल्या दिव्य व लोकत्तर महापुरुषांनी सद्गुरुपदाचा आश्रय ग्रहण करून सन्मार्गदर्शनाचे कार्य केले पाहिजे, असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितले आहे, ते अत्यंत करुणासंपन्न झाल्यामुळेच कथन केले आहे. सद्गुरूंच्या ठिकाणी चिच्छक्ती अविच्छेद्यपणे विलसत असल्याने तिच्या पाताचे सामर्थ्यही त्यांच्याजवळ अभिन्नपणे झळकत असते. विश्व हे मोहरे लावण्याचा व लोकांलागी कर्तव्य करण्याचा यापेक्षा दुसरा श्रेष्ठ मार्ग नाही. ही खरी समाजसेवा व हा खरा लोकोद्धार होय. सद्गुरूंच्या उपरोक्त सर्व कार्यातून जी अवस्था व्यक्तीला किंवा साधकाला प्राप्त होते, तीच खरी सामरस्यावस्था किंवा साम्यावस्था होय व हाच खरा साम्यवाद होय. बाकी सर्व स्थूलार्थाने खरे आहे, परार्थाने नव्हे.

येथपर्यंत सद्गुरूंच्या कार्याचा विचार करून त्यांच्या यथार्थ स्वरूपाचा परिचय आपण एवढ्यासाठी करून घेतला की, साधक ज्या सद्गुरूंची भक्ती करणार त्यांच्यापासून त्याने कोणत्या गोष्टींची अपेक्षा धरावी हा आहे. अशा प्रकारची कार्यशक्ती ज्यांच्या ठिकाणी प्रस्फुटित झालेली आहे अशांनाच सद्गुरू म्हणून स्वीकारणे योग्य होय, असे शास्त्रकारांनी स्वच्छ सांगितले आहे. या दृष्टीने शास्त्रकारांचे म्हणणे लक्षात घेतले म्हणजे सिद्धयोगसाधनशास्त्राच्या प्रयोगशाळेत अंधश्रद्धेला अवसर नाही हे लक्षात येईल. शास्त्रकार "कामाख्यातंत्रात" यासंबंधी असे म्हणतात की–

सर्वेषां भुवने सत्यं ज्ञानाय गुरुरेव हि ।
ज्ञानान्मोक्षमवाप्नोति तस्माज्ज्ञानं परात्परम् ॥३.१॥
अतो यो ज्ञानं न दत्ते न क्षमेत्तं त्यजेत् गुरुम् ।
अन्नाकांक्षी निरन्नं हि सदा संत्यजति प्रिये ॥२॥
ज्ञानं यत्र समाभाति स गुरुः शिव एव हि ।
अज्ञानिनं वर्जयित्वा शरणं ज्ञानिनां व्रजेत् ॥३॥

संसारात ज्ञान देण्यासाठीच गुरू असतात. ज्ञानानेच मोक्षाची प्राप्ती होते. त्यामुळे ज्ञान हीच सर्वोत्तम गोष्ट आहे. यासाठी ज्याप्रमाणे क्षुधार्त झालेला व अन्नाची अपेक्षा असलेला मनुष्य भोजन किंवा अन्न देऊ न शकणाऱ्या व्यक्तीचा जसा त्याग करतो त्याप्रमाणे जो गुरू ज्ञान देण्यास असमर्थ आहे त्याचा त्याग केला पाहिजे. ज्याच्या ठिकाणी ज्ञान झळकत असते तोच गुरू व तोच शिव होय. यासाठी ज्याच्याजवळ ज्ञान देण्याची शक्ती नाही, त्याचा त्याग करून शहाण्या मनुष्याने ज्ञानदानाचे सामर्थ्य असलेल्या गुरूचा आश्रय घ्यावा.

"कुलार्णवतंत्र व शिवपुराणांतर्गत वायवीय संहितेतही" अशा अपात्र व अकार्यक्षम अर्थात् शक्तिपातसामर्थ्यविहीन गुरूचा त्याग करावा, हे सांगताना असे म्हटले आहे की—

अनभिज्ञं गुरुं प्राप्य संशयच्छेदकारकम् ।
गुर्वन्तरं तु गत्वा स नैतद्दोषेण लिप्यते ॥१३.१३१॥
मधुलुब्धो यथा भृंगः पुष्पात् पुष्पांतरं व्रजेत् ।
ज्ञानलुब्धस्तथा शिष्यो गुरोर्गुर्वन्तरं व्रजेत् ॥१३२॥
यत्रानंदः प्रबोधो वा नाल्पमप्युपलभ्यते ।
संवत्सरादपि शिष्येण सोऽन्यं गुरुमुपानयेत् ॥१५.४१॥

अज्ञानी व अनभिज्ञ गुरूंच्यामुळे जर संशयाचा नाश झाला नाही; तर जो आपल्या संशयाचा नाश करील अशा समर्थ गुरूंपाशी शिष्य गेल्यास त्यात शिष्याला कोणताही दोष लागत नाही. ज्याप्रमाणे मध मिळावा म्हणून मधमाशी एका फुलावरून दुसऱ्या फुलावर जाते त्याप्रमाणे जो ज्ञानार्थी शिष्य आहे त्याने ज्ञानप्राप्ती होईपर्यंत एक गुरू सोडून दुसरा गुरू करावा. दीक्षा झाल्यानंतर जर शिष्याला अल्पमात्रही आनंद व प्रबोध अगर शक्तिपाताच्या इतर लक्षणांपैकी कोणत्याही लक्षणाचा थोडाफार प्रत्यक्ष अनुभव आला नाही; तर दीक्षेनंतर एक वर्षभर वाट पाहावी. गुरूने सांगितल्याप्रमाणे साधन करूनही जर एका वर्षात आनंद व प्रबोध प्राप्त झाला नाही; तर दुसऱ्या गुरूचा आश्रय अवश्य करावा. अशा रीतीने सद्गुरूंचे सन्मार्ग दर्शनाचे कार्य व स्वरूप अपूर्व असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**द्रष्टा श्रीगुरुमूर्ती । रिगता दृश्यपंथीं ।**
**तरी कां ह्या उपास्ती । आकळतां तो ? ॥१८.१७०४॥**

सद्‌गुरू ही शिष्याची सर्वात मोठी साधनसंपत्ती असल्याने आपण त्या दृष्टीने गुरू, गुरुतत्त्व व गुरुकार्य यांचा आत्तापर्यंत विचार केला. आता आदर्श गुरूची कोणती लक्षणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितली आहेत याचा विचार करावयाचा आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आदर्श गुरूची जी लक्षणे कथन केली आहेत त्यात कृपा, ज्ञान व अनुभूती यांच्या दानाचे सूत्र अनुस्यूत आहे. पूर्ण प्रज्ञा, महाकरुणा, योगाचे असीम ऐश्वर्य व वात्सल्यरस ही स्थायी लक्षणे सद्‌गुरूंच्या इतर सर्व लक्षणांची पृष्ठभूमी आहे, हे लक्षात घेतले म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सद्‌गुरूंची जी लक्षणे सांगितली आहेत ती आपल्याला यथार्थपणे अंतरंग होतील.

सद्‌गुरूंचे सर्वात महत्त्वाचे लक्षण म्हणजे 'कारुण्य किंवा स्नेह' होय.याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**हा कारुण्याची आदि । सकल गुणांचा निधि ॥२.४३॥**
**तैसे राज्यभोगसमृद्धि । उज्जीवन नोहे जीवबुद्धि ।**
**एथ जिव्हाळा कृपानिधि । कारुण्य तुझें ॥२.६८॥**
**तें म्हणों कारुण्यरसाची वृष्टि । कीं नवया स्नेहाची सृष्टि ।**
**हें असो नेणिजे दृष्टी । हरीचीं वानूं ॥५.१७१॥**
**ऐसें विश्वमूर्ती तेणें । बोलिले कारुण्यपूर्णें ॥११.१५२॥**
**ऐसें जगदुदरदोंदिलें । तेणें करुणारसरसाळें ।**
**संजयो म्हणे बोलिलें । श्रीकृष्णदेवें ॥११.७००॥**
**अहो सद्‌गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयाते अधिष्ठी ।**
**तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥१२.९॥**
**तैसें परमाणु पां गुंतले । जाणूनि जीव सानुले ।**
**तेथ कारुण्यामाजीं पाउलें । लपवूनि चाले ॥१३.२४९॥**
**आइकें गा आर्तबंधू । निरंतर कारुण्यसिंधू ॥१४.३॥**

कारुण्य हे सद्‌गुरूंचे सर्वात मोठे लक्षण असल्याचे श्रीसंत तुकाराममहाराजांनीही आपल्या "अभंगात" स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

**काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥१॥**
**थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥२॥**
**जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती उपकारें ॥३॥**
**भूतांची दया हे भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥४॥**
**तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥५॥१९४७॥**

卐 卐 卐

जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥१॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥२॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनांचें चित्त ॥३॥
ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥४॥
दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥५॥
तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥६॥१९६२॥

सद्गुरूंच्या ठिकाणी ही करुणा कशी प्रकट होते व तीच अधिष्ठित होऊन जीवाला दुःखमुक्त कशी करते याचा उलगडा करताना "भारतीय संस्कृति और साधना," खंड दुसरा, या ग्रंथातील "मनुष्यत्व" या लेखात म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे स्पष्टीकरण केले आहे की, "ब्राह्मी स्थितिकी अवस्था और उसके बाद आनेवाली अवस्थाके बीच एक सामान्य भेद है। ब्राह्मी स्थितिके पूर्वकी अवस्थामें जैसे केवल जीवभाव रहता है, उस समय ब्रह्मभावका स्फुरण नहीं होता, उसी प्रकार ब्राह्मी स्थितिमें ब्रह्मभावना जब होती है, तब जीवभावका स्फुरण भी नहीं होता; परंतु तृतीय अवस्थामें परिनिष्ठित ब्रह्मभावके भीतरही जीव और जगत्‌की अनुभूति यथावत् लौट आती है। इसके फलस्वरूप पूर्वोक्त ब्राह्मीस्थितिके भीतरही एक अभूतपूर्व उल्लास लक्षित होता है,जिसके फलस्वरूप पूर्ण आनंद महा-करुणाके रूपमें प्रकट होता है। जीव अवस्थामें समस्त विश्व दुःखमय होता है, यथार्थ आनंदका आभास वहाँ जाग्रत् नहीं होता। जो आनंद छायाके रूपमें वहाँ उपलब्ध होता है वह दुःखकाही एक भेद-मात्र होता है; परंतु ब्रह्मावस्थामें समस्त दुःखोंकी निवृत्ति और परमानंदकी प्राप्ति एक साथही होती है। इस अवस्थामें दुःखकी अनुभूति भी नहीं रहती। जीवकी अनुभूति भी नहीं रहती एवं जगत्‌की अनुभूति भी नहीं रहती। सर्वत्र अपनाही स्वरूप दिखता है तथा अविच्छिन्न स्वरूपमें आनंदके सिवा और कुछ लक्षित नहीं होता। यही वस्तुतः स्वरूपस्थितिका विवरण है। परंतु यह श्रीभगवान् के साथ 'जीवात्माका' साम्य है यह भी परिपूर्ण अवस्था नहीं है; क्योंकि जो अखंड सत्ता योगीका परम लक्ष्य है, वह सम्यक् प्रकारसे अब भी अधिगत नहीं होती; क्योंकि एकमुक्ति और सर्वमुक्तिके अभिन्न रूपमें प्रकाशित होनेका अभी अवसरही नहीं आया। तृतीय अवस्थामें द्वितीय अवस्थाकी पूर्णताके भीतरही प्रथम अवस्थाकी वेदना प्रतिभासित हो उठती है। उस समय जीव और जगत् तथा अनन्त दुःख अखंड पूर्ण आनंदके भीतर फूट पडता है। जो समाधिके आवरणमें दबा हुआ था वह अवसर पाकर अपनेको प्रकट करता है। इसके फल-स्वरूप दुःखके सान्निध्यके कारण पूर्ववर्णित आनंद करुणाका रूप धारण करता है। जिसमें इस करुणाशक्तिका जितनाही अधिक उद्रेक होता है, वह उतनाही अधिक परिपूर्ण स्थिति प्राप्त करनेकी योग्यतासे संपन्न होता है। यह तृतीय अवस्थाही

सद्‌गुरुकी अवस्था है। वे नित्यमुक्त पूर्ण ब्रह्मस्वरूप होकर भी एक प्रकारसे प्रत्येक जीवके दुःखके स्पर्शसे करुणार्द्रहृदय होते हैं। दुर्गासप्तशतीमें श्रीजगदंबाको "सर्वोपकारकरणाय सदाऽऽर्द्रचित्ता" कहा गया है। संतान-वात्सल्य-मूलक जो आनंदमयी माँकी आर्द्रचित्तता है, वही महाकरुणाका निदर्शन है। स्वयं आनंदमें प्रतिष्ठित होकर भी जबतक दूसरेको उसी प्रकारके आनंदमें प्रतिष्ठित नहीं किया जाता, तबतक यह कहना नहीं बनता कि जीवनका यथार्थ महत्त्व संपन्न हो गया। परंतु यह बात सबके लिए नहीं है। किसी-किसी भाग्यवान्‌के लिए है। इसी कारण एक और अनवच्छिन्न परमानंद होते हुए भी दूसरी ओर अशेष करुणाका स्थान रहता है। कहना नहीं होगा कि परमानंदकी भित्तिमें यह परम रसका उल्लास है। ...इसी कारण महाकवि भवभूतिने कहा है–'एको रसः करुण एव।'

यह जिस स्थितिकी बात कही गयी है, वही सद्‌गुरुकी स्थिति है। दूसरेके दुःखसे दुःखित हुए बिना करुणाका उदय नहीं होता और करुणाके बिना दूसरेका दुःख भी दूर नहीं किया जाता। जबतक दूसरा है, तबतक उसका दुःख भी है तथा उसको निवृत्त करनेका प्रयोजन भी है और उसकी निवृत्ति आवश्यक है। अतः गुरुभावका योग भी स्वाभाविक है।" (पृ.२२,२३)

सद्‌गुरूंचे दुसरे महत्त्वाचे लक्षण ते 'ज्ञानी असणे' हे आहे. "जे ज्ञानाचा कुरुठा ॥४·१६५॥" म्हणजे सद्‌गुरू हे साक्षात् ज्ञानाचे घरच आहेत, असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी हे लक्षण स्पष्ट केले आहे. सद्‌गुरू ज्ञानीच असले पाहिजेत असा जो त्यांचा आग्रह आहे त्याचे कारण सद्‌गुरूंच्या लक्षणासह स्पष्ट करताना ते म्हणतात–

**शब्दतत्त्वसारज्ञा। पैं देखणें तेचि प्रज्ञा।**
**जे क्षेत्र क्षेत्रज्ञा। अपाडु देखे ॥१३·११२९॥**
**इया दोहींचें अंतर। देखावया चतुर।**
**ज्ञानियांचे द्वार। आराधिती ॥११३०॥**

अशा प्रकारे सद्‌गुरूंच्या ठिकाणी ज्ञान अपेक्षित असल्याने "विद्यासिंधु निरवधी। अर्जुन म्हणे ॥२.४३॥" व "विशदविद्यावधू–। वल्लभा जी ॥१४.३॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आपल्या सद्‌गुरूंचा व तत्सदृश संताचा ज्ञानी म्हणूनच गौरव केला आहे. ज्ञान हे सद्‌गुरूंचे व्यवच्छेदक लक्षण असले; तरी या लक्षणाची पृष्ठभूमी किंवा पाया हा वर सांगितलेल्या करुणा लक्षणात सामावलेला आहे, हे लक्षात ठेविले पाहिजे; कारण अपार करुणेशिवाय सद्‌गुरु दुसऱ्याला ज्ञान देऊच शकत नाहीत. याचा अर्थ असा की, शिष्याच्या ज्ञानप्राप्तीचा ओघ हा सद्‌गुरुरूपी ज्ञानसाठ्यातून संक्रमित होत असला किंवा पाझरत असला; तरी त्याच्या मुळाशी त्यांची करुणाच कारणीभूत असते, हे निःसंशय सत्य आहे. या बाबतीत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीच असे म्हटले आहे की–

अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी। तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी।
तो सकळ विद्यांचिये सृष्टी। धात्रा होय ॥१२.९॥

हे वाक्सृष्टि एके वेळे। देखतु माझे बुद्धीचे डोळे।
तैसा उदैजो जी निर्मळें। कारुण्यबिंबें ॥१४.२०॥

आणि संसाराऐसा दारुणु। जो भेटलाचि हरी शीणु।
तो ज्ञानदानीं सकरुणु। भजिजे गुरु ॥१७.२०८॥

या ओव्यातून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सद्गुरूंची करुणा व ज्ञान ही दोन लक्षणे कशी एकरूप किंवा अवच्छेद्य आहेत हे दाखवून ज्ञानप्राप्तीच्या उपायाच्या रहस्याचाही भेद केला आहे. या दृष्टीनेच "भारतीय संस्कृति और साधना," खंड पहिला, या ग्रंथातील "अध्यात्मजीवनमें गुरुका स्थान" या लेखात म.म.श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, "जो स्वयं अंधा है, वह जैसे दूसरेको मार्ग नहीं दिखा सकता, और यदि दिखानेका दुस्साहस करता भी है, तो दोनो विपत्तिमें पड जाते हैं, वैसेही जो स्वयं अज्ञान हैं, उन्हें स्वयं भी मार्गका पता नहीं रहता; क्योंकि उनके मार्गकी यात्राका अंत नहीं होता, वे दूसरेको पथ कैसे दिखलायेंगे ? इसलिए, पहले स्वयं सम्यक् ज्ञानको अपरोक्ष रूपसे प्राप्त कर तदनन्तर गुरुके रूपसे दूसरेको उस ज्ञानका उपदेश दिया जाता है। किंतु यहाँ प्रश्न होता है कि परोक्ष ज्ञान तो दूरकी बात है, अपरोक्ष ज्ञान प्राप्त करनेपर भी क्या वह दूसरेको दिया जा सकता है ? इसका उत्तर है–नहीं दिया जा सकता। ज्ञानकी सहायिका रूपसे दो शक्तियोंकी आवश्यकता है–एक इच्छा और दूसरी क्रिया। दूसरेका दुःख दूर करनेकी जो इच्छा है, उसे कृपा अथवा करुणा कहते हैं। जो ज्ञानी होकर भी इस प्रकारकी इच्छासे रहित, अर्थात् कृपाहीन हैं, वे दूसरेको उसका दुःख निवृत्त करनेके लिए ज्ञानोपदेश देनेको क्यों प्रवृत्त होंगे ? करुणाही एकमात्र प्रवर्त्तक है। इच्छाहीनमें करुणा कहाँ ? किंतु, केवल इच्छा रहनेपरही कार्यसिद्धि नहीं होती,यदि उस इच्छाको सफल बनानेका सामर्थ्य न हो। केवल इच्छा इच्छा है, यदि इच्छा-शक्ति न रहे। इच्छा अप्रतिहत रहनेपरही वह क्रियाके रूपसे स्थूल आकार धारण करती है। तब वह इच्छा होती है अमोघ,अर्थात् अव्यर्थ। इसलिए ठीक-ठीक गुरु रहनेपर प्रत्यक्ष ज्ञानके साथ इच्छा और क्रियाका भी योग रहना चाहिए। यही सद्गुरु अथवा आप्त पुरुषका लक्षण है। इस अवस्थामें गुरुकी इच्छाके साथही शिष्यके हृदयमें ज्ञानका स्रोत बह उठता है एवं उनकी क्रियाशक्तिके प्रभावसे शिष्यके जीवन-पथ या साधन-मार्गकी संपूर्ण विघ्न-बाधाएँ दूर हो जाती हैं। शास्त्रकार लोगोंने इस प्रकारके महापुरुषको आप्त पुरुष कहा है। इस आदर्शकाही पूर्णरूप सद्गुरु है।"(पृ.२४४)

सद्गुरूंचे तिसरे महत्त्वाचे लक्षण असे आहे की, "ते स्वतः ब्रह्मज्ञानाच्या अनुभूतीने संपन्न असून ही अनुभूती ते दुसऱ्याला देऊ शकतात."त्यांच्या या सामर्थ्य-संपन्न लक्षणाचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

नमो विशदबोध विदग्धा । विद्यारविंदप्रबोधा ॥१०.१॥
नमो चतुरचित्तचकोरचंद्रा । आत्मानुभवनरेंद्रा ॥१०.४॥
जय जय आचार्या । समस्तसुरवर्या ।
प्रज्ञाप्रभासूर्या । सुखोदया ॥१४.१॥
जयजय सर्व विसांवया । सोऽहंभावसुहावया ॥१४.२॥
मावळतीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु ।
अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥१६.१॥
जो अविद्यारातीं रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञानचांदणिया ।
जो सुदिनु करी ज्ञानियां । स्वबोधाचा ॥२॥

स्वतः अनुभूतीने संपन्न असण्याला शास्त्रकारानी परंपराप्राप्त असे संबोधिले असून "एवं गुरुक्रमें लाधलें ॥ १८.१७६४ ॥" असा त्याचा श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी उल्लेख केला आहे व ही अनुभूती दुसऱ्याला देता येणे याला शास्त्र-कारांनी शक्तिपात असे म्हटले असून "श्रीगुरुकृपा काय नोहे ॥ १८.१७३५ ॥" असा त्याचा त्यांनी उल्लेख केला आहे. सद्‌गुरूंचे हे लक्षण फार मोलाचे असून सिद्धयोग शास्त्रकारांनीच त्याचा आवर्जून उल्लेख केला आहे; कारण अशा प्रकारच्या लक्षणाने अर्थात् साधनसंपत्तीने युक्त असलेले सद्‌गुरू या संप्रदायतच प्राप्त होत असल्याने इतरांनी सद्‌गुरूंची लक्षणे सांगताना या लक्षणाचा उल्लेख केलेला दिसत नाही. अनुभूती संपन्नता व दान हेच एकमात्र सद्‌गुरूंचे सर्वश्रेष्ठ लक्षण आहे, असे सांगताना " एकनाथी भागवतातील तिसऱ्या अध्यायात " श्रीएकनाथमहाराज असे म्हणतात की, " ज्याने स्वतः एखाद्या वस्तूची चव मुळीच घेतलेली नाही तो दुसऱ्याला त्याची गोडी कशी चाखावयास देणार ? यामुळे जो गुरू पूर्ण अनुभवी असतो तोच सच्छिष्याला सद्‌भावाने तारू शकतो. आदर्श गुरूच्या लक्षणाबद्दल जगामध्ये नाना प्रकारची मतमतांतरे आहेत; परंतु जो शिष्याला अनुभवाची प्राप्ती करून देतो त्यालाच सद्‌गुरुस्वामी म्हणतात. ज्याच्या वाक्याने शक्तिसंक्रमण घडून आल्याने शिष्याची मिथ्या जगद्‌भावना तत्त्वतः निःशेष मावळते त्यालाच सद्‌गुरुत्व आहे असे वेद व शास्त्रे यात प्रतिपादन केले आहे. जे मंत्रतंत्राचा उपदेश करतात तेही पूज्यत्वाने फार थोर होत; परंतु पूज्य व पूजक हा विकार मावळून टाकणारे साधन जो देतो तोच खरा सद्‌गुरुस्वामी होय. ( ३.२८५ ते २८८ )

अशा प्रकारची दुसऱ्याला अनुभूती देणारा सद्‌गुरू स्वतः पूर्णपणे आत्मानुभवी असतो. त्याचे ब्रह्मज्ञान शुद्ध असते ब्रह्मवस्तूला पाहून त्याचे मन विरून गेलेले असते. त्याचे द्वैताचे भान मावळून नाहीसे झालेले असते. त्याच्या चारही वाणींना मौन पडते व सर्व इंद्रिये तटस्थ होतात. परम अद्‌भुत ब्रह्मवस्तूच्या अनुभूतीने त्याचे

प्राण पांगळून त्याच्या देहभावाला ताटस्थ्य प्राप्त झालेले असते. अशा आत्मानुभवी सद्गुरूला जेव्हा शिष्य सद्भावाने अनुग्रहार्थ प्रार्थना करतो तेव्हा असला गुरू त्या शिष्याला काही विचारीत नाही व काही समजून सांगत नाही; तर तो अगदी तटस्थपणे मौन धरून बसतो. त्याच्या या मौनानेच सर्व कार्य घडून येते. शिष्याचे कल्याण व्हावे असा भाव सद्गुरूच्या मनात उत्पन्न झाल्याबरोबर त्याच्या कृपानुग्रहरूप शक्तिपाताने शिष्याला ब्रह्मानुभव प्राप्त होऊन त्याचा बाध्यबाधकतेचा भ्रम निवृत्त होतो. द्वैतभावाचे कर्म थांबते. जगातील विषमभाव जातो. अशा प्रकारे कोठेही आसक्त न होता जगात राहून दुसऱ्या कोणालाही करता येणार नाही असे अनुभूती दानाचे कार्य सद्गुरू करतात." ( ३.२८९ ते २९३ )

सद्गुरूंचे चवथे महत्त्वाचे लक्षण ते " योगाच्या ऐश्वर्याने संपन्न असणे " हे आहे. हे लक्षण अत्यंत अलंकारिक व काव्यमय भाषेत वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

कां जें लळेयांचे लळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती ।
जरी माहेरें श्रीमंतें होती । तुम्हां ऐसीं ।।९.३।।
पराप्रमेयप्रमदा । विलासिया ।।१०.१।।
नमो संसारतमसूर्या । अपरिमितपरमवीर्या ।
तरुणतरतूर्या । लालनलीला ।।१०.२।।
योगसुखाचे सोहळे । सेवका तुझेनि स्नेहाळे ।
सोऽहंसिद्धीचे लळे । पाळिसी तूं ।।१२.४।।

सद्गुरूंजवळ हे लक्षण असल्याशिवाय ज्ञान व अनुभूतीचे दान घडू शकत नाही. या लक्षणाचे अधिक स्पष्टीकरण करताना 'कुलार्णवतंत्रात' असे म्हटले आहे की—

अंतर्लक्ष्यो बहिर्दृष्टिः सर्वज्ञो देशकालवित् ।
आज्ञासिद्धिस्त्रिकालज्ञो निग्रहानुग्रहक्षमः ।।१३ ४१।।
वेधको बोधकः शांतः सर्वजीवदयापरः ।
स्वाधीनेंद्रियसंचारषड्वर्गविजयप्रदः ।।४२।।
अग्रगण्योऽतिगंभीरः पात्रापात्रविशेषवित् ।
शिवविष्णुसमः साधुमनुभूषणभूषितः ।।४३।।

सद्गुरूंची दृष्टी बाहेर असली; तरी त्यांचे सर्व लक्ष अंतरंगात असते ते सर्वज्ञ असून देशकालादींचे त्रिकालदर्शी ज्ञाते असतात. सिद्धी त्यांच्या आज्ञेत असतात. सद्गुरू आपले सामर्थ्य अनुग्रह करून स्वेच्छेने देऊन निग्रहाने ते परतही घेऊ शकतात. सद्गुरू आपल्या आत्मसामर्थ्याने शिष्याच्या ठिकाणी शक्तिसंचार करतात व तत्त्वमस्यादि महावाक्यांद्वारे त्याला ज्ञानाचा बोध करतात. ते शांत असून सर्व जीवांवर दया करतात. त्यांनी इंद्रिये ताब्यात ठेविलेली असतात. काम-क्रोधादि

षड्रिपू जिंकून ते जितेंद्रिय झालेले असतात. सर्व कार्यात ते अग्रगण्य राहतात.त्यांची प्रकृती अत्यंत गंभीर असते. पात्र कोण व अपात्र कोण हे ते विशेषत्वाने जाणतात. शिव, विष्णू इत्यादि सर्व देवतांच्याबद्दल त्यांची बुद्धी सम असते. असे सद्गुरू सद्गुणांनी विभूषित झालेले असल्याने साधूंचे भूषणच असतात. त्यामुळे योगदीक्षा देण्यास ते योग्य असतात.

आत्तापर्यंत चर्चिलेल्या महत्त्वाच्या गुणांशिवाय आणखीही विविध प्रकारची गुणलक्षणसंपत्ती सद्गुरूंजवळ असते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की, "सद्गुरू महातेजस्वी असतात. ते अमृतस्वरूप असून चंद्रासारखे शीतल व नादब्रह्मासारखे मधुर असतात ते सर्व गुणालंकारांनी युक्त असून गुणरूपी सुगंधानेच ते दरवळत असतात. ते सर्वार्थाने सागरासारखे विशाल व आकाशासारखे महान् असतात. (९-९ ते १२) ते सर्व जगाचे पालन करणारे असतात. कल्याणरूपी रत्नांची ते खाणच असतात किंवा सर्व कल्याणात श्रेष्ठ असे जे आत्मकल्याण त्याचा ते साठाच असतात. ते सज्जनरूपी वनास अर्थात् सच्छिष्यांना चंदनासारखे सुगंधित करून सोडणारे असतात. ते आराधनेचे लिंग असतात. सद्गुरू भक्तांच्या चतुर-चित्तरूप चकोरपक्षास आनंद देणारे चंद्र, श्रुतीच्या तात्पर्याचे अर्थात् ब्रह्मज्ञानाचे समुद्र व मदनाचा गर्व हरण करणारे शंकर असतात. ते संसाररूपी हत्तीचे गंडस्थल फोडणारे असतात. ते साक्षात् सूर्यच असतात. सद्गुरू हे कल्पतरुप्रमाणे फलद्रूप होणारे, क्षीरसागराप्रमाणे उदार, कापराप्रमाणे सुवासिक, चंदनाप्रमाणे दुसऱ्यासाठी झिजणारे, अमृताप्रमाणे अमर करणारे व गगनाप्रमाणे उंच असतात. (१०-३ते१२) ते आपले आपल्यातच रममाण झालेले असतात. ते पाण्याप्रमाणे द्रवरूप व गोड असून पृथ्वीप्रमाणे सहनशील व क्षमाशील असतात. ते तेजशक्तीने संपन्न असतात. (१४.६,७) सद्गुरू द्वैत व अज्ञानाची सोयरिक तोडणारे असतात. ते जगद्वंधू असतात. ते ध्याता, ध्यान व ध्येय विरहित म्हणजे साधक, साधना व साध्य विरहित असतात. ते मौनसंपन्न असतात. (१७.९ ते १५) ते निर्मल म्हणजे अविद्यादि मलरहित असून आपल्या भक्तांचे सर्वतोपरी मंगल करणारे असतात.ते जन्म, मृत्यू, जरा व व्याधी इत्यादि मेघांचा वाऱ्याप्रमाणे नाश करण्यात किंवा त्यांना उडवून लावण्यात समर्थ असतात. ते प्रबळ असून त्याच्या जोरावर ते शिष्याच्या सर्व अज्ञानाचा नाश करतात. सद्गुरू स्वतःच वेद,स्मृती, तंत्र, शास्त्रे असून त्याचे फळही तेच असतात. ते स्वरूपतः पूर्ण असून कालातीत,अंशरहित, निश्चल, निष्कल, आनंद निर्मिति किंवा उत्स्फूर्त करणारे, स्वयंप्रकाश,मूळ आधारस्तंभ, विशुद्ध, दयेचा समुद्र, देवस्वरूप, अद्वितीय, नम्र, साधनसंपत्तिसंपन्न शिष्यावर प्रेम करणारे, भक्ताधीन व मायातीत असतात. (१८.१ ते ९)

सद्गुरूंची अशाच प्रकारची विविध लक्षणे सांगताना "कुलार्णवतंत्रात" असे म्हटले आहे की–

श्रीगुरुः परमेशानि शुद्धवेशो मनोहरः ।
सर्वलक्षणसंपन्नः सर्वावयवशोभितः ॥१३.३८॥
सर्वागमार्थतत्त्वज्ञः सर्वतंत्रविधानवित् ।
लोकसंमोहनाकारो देववत् प्रियदर्शनः ॥३९॥
सुमुखः सुलभः स्वच्छो भ्रमसंशयनाशकः ।
इंगिताकारवित् प्राज्ञ ऊहापोहविदुज्ज्वलः ॥४०॥
निर्ममो नित्यसंतुष्टः स्वतंत्रोऽनन्तशक्तिमान् ।
सद्भक्तवत्सलो धीरः कृपालुः स्मितपूर्णवाक् ॥४४॥
भक्तिप्रियः सर्वशास्त्रज्ञ गंभीरः शिष्टसाधकः ॥४५॥
नित्ये नैमित्तिके काम्ये रतः कर्मण्यनिंदिते ।
रागद्वेषभयक्लेशदंभाहंकारवर्जितः ॥४६॥
स्वविद्यानुष्ठानरतो धर्मज्ञानार्थदर्शकः ।
यदृच्छालाभसंतुष्टो गुणदोषविभेदकः ॥४७॥
स्त्री धनादिष्वनासक्तो दुःसंगो व्यसनादिषु ।
सर्वाहंभावसंयुक्तो निर्द्वंद्वो नियमव्रतः ॥४८॥
अलोलुपो ह्यसंगश्चऽपक्षपाती विचक्षणः ।
निःसंगो निर्विकल्पश्च निर्णीतात्मातिधार्मिकः ॥४९॥
तुल्यनिंदास्तुतिर्मौनी निरपेक्षो नियामकः ।
इत्यादिलक्षणोपेतः श्रीगुरुः कथिते प्रिये ॥५०॥

श्रीमहेश्वर भगवती पार्वतीला म्हणाले, "हे सर्वश्रेष्ठ देवी ! श्रीगुरू निर्मल वेषधारी व मनोहर असतात. ते सर्व शारीरिक अवयवांनी सुंदर व सर्व शुभ लक्षणांनी संपन्न असतात. ते सर्व शास्त्रांचा अर्थ तत्त्वतः जाणतात. त्यांना सर्व तंत्रातील विधी-विधानाची माहिती असते. ते लोकदृष्टीला सुखकारक अर्थात् सर्वांना नेहमी पाहवेसे वाटणारे असे असतात. त्यांचे दर्शन देवाप्रमाणे सर्वांना प्रिय असते. त्यांचे मुखमंडल नेहमी प्रसन्न असते. ते सहज कोणालाही भेटण्यासारखे असतात. ते निर्मळ अर्थात् निर्व्यसनी असून शिष्याची भ्रांती किंवा संशय दूर करणारे असतात. ते दुसऱ्याचे मन ओळखतात. ते ज्ञानी असून विचारविनिमयात कुशल असतात. सद्गुरू ममतारहित, नेहमी संतुष्ट, स्वतंत्र व अपार शक्तिशाली असतात. त्यांना भक्ती अत्यंत प्रिय असते. ते सर्वशास्त्रज्ञ, गंभीर व उत्तम साधक असतात. ते सच्छिष्यांवर प्रेम करणारे असून धैर्यवान्, दयाळू व हास्यपूर्ण सुखप्रद बोलणारे असतात. ते राग, द्वेष, भय, क्लेश, दंभ, अहंकार इत्यादि दोषांपासून दूर असून नित्य, नैमित्तिक व काम्य कर्मात मग्न राहणारे असतात. ते स्वतःच्या विद्या-

व्यासंगात व अनुष्ठानात मग्न राहून धर्म,ज्ञान,अर्थ आदि सर्व पुरुषार्थांचे मार्गदर्शन करतात. ते मिळेल त्यात संतुष्ट राहतात त्यांना गुणदोष उत्तम प्रकारे कळतात. ते स्त्री, धन इत्यादींमध्ये आसक्त नसतात. सद्गुरू व्यसनांपासून अलिप्त, सर्वत्र आत्मदृष्टी ठेवून संतुष्ट असणारे, सुखदु:ख किंवा शीतोष्णादि द्वंद्वांपासून दूर असणारे व नियमानें व्रताचरण करणारे असतात. ते तृष्णारहित, संकल्पशून्य, अपक्षपाती, विचक्षण अर्थात् विवेकी, नि:संग, निर्विकल्प अर्थात् विकल्पशून्य व आत्मतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतलेले असतात. ते अत्यंत धार्मिक, निंदा व स्तुतीला समान समजणारे, मौनी, निरपेक्ष व आत्मबलाने दुसऱ्यांचे नियंत्रण करणारे असतात. अशा नानाविध शुभ लक्षणांनी युक्त गुरूच शास्त्रसंमत होय किंवा दीक्षाग्रहणाला योग्य होय.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी सद्गुरूंच्या लक्षणरूप साधनसंपत्तीचे जे अपूर्व वर्णन केले आहे ते मुळातूनच वाचण्यासारखे आहे. आपल्या सर्व म्हणण्याचे सार सांगताना ते असे म्हणतात की—

मुख्य सद्गुरूचें लक्षण । आधीं पाहिजे विमळ ज्ञान ।
निश्चयाचें समाधान । स्वरूपस्थिति ।।५.२.४५।।
याहीवरी वैराग्य प्रबळ । वृत्ति उदासीन केवळ ।
विशेष आचरें निर्मळ । स्वधर्माविषयीं ।।४६।।
याहीवरी आध्यात्मश्रवण । हरिकथानिरूपण ।
जेथें परमार्थ विवरण । निरंतर ।।४७।।
जेथें सारासारविचार । तेथें होय जगदुद्धार ।
नवविधाभक्तीचा आधार । बहुत जनांसी ।।४८।।
म्हणोनि नवविधा भजन । जेथें प्रतिष्ठिलें साधन ।
हें सद्गुरूचें लक्षण । श्रोतीं ओळखावें ।।४९।।
अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान । बाह्य निष्ठेचें भजन ।
तेथें बहुत भक्तजन । विश्रांति पावती ।।५०।।
नाहीं उपासनेचा आधार । तो परमार्थ निराधार ।
कर्मेंविण अनाचार । भ्रष्ट होती ।।५१।।
म्हणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन । स्वधर्मकर्म आणि साधन ।
कथानिरूपण श्रवणमनन । नीति न्याय मर्यादा ।।५२।।
यांमध्यें एक उणे असे । तेणें तें लक्षण दिसें ।
म्हणोनि सर्वही विलसें । सद्गुरूपाशीं ।।५३।।

श्रीसंत एकनाथमहाराजांनीही "एकनाथी भागवतात" सद्गुरूंची साधनसंपत्तिरूप लक्षणे कथन करताना असे म्हटले आहे की—

आतां सद्‌गुरूचीं जीं निजलक्षणें । राया सांगेन तुजकारणें ।
जे ऐकतां अंतकरणें । सुखीं होणें सद्‌भावें ॥३.२९६॥
तरी जो कायावाचामनें । अतिकृपाळू दीनाकारणें ।
तोडी शिष्यांचीं भवबंधनें । उठवी ठाणें अहंकाराचें ॥२९७॥
जो शब्दज्ञानें पारंगतू । ब्रह्मानंदे सदा डुल्लतू ।
शिष्यप्रबोधनीं समर्थू । यथोचितू निजभावें ॥२९८॥
ज्याचा जैसा जैसा भावो । तैसा तैसा करी अनुभवो ।
तरी गुरुत्वाचा अहंभावो । अणुमात्र पाहा हो धरीना ॥२९९॥
शिष्यापासूनि सेवा घेणें । हें स्वप्नींही न स्मरे मनें ।
शिष्याची सेवा स्वयें करणें । पूज्यत्वें पाहणें निजशिष्या ॥३००॥
शिष्य देखावा पुत्रासमान । हें स्मृतिवाक्य असे प्रमाण ।
दृष्टी देखों नेणे गौण । शिष्या देखे पूर्ण ब्रह्मत्वें ॥३०१॥
शिष्य सेवा करी निजभावार्थें । परी तो सेवक न म्हणे त्यातें ।
ज्यासी भगवद्‌रूप सर्व भूतें । शिष्य वेगळा तेथें सेवकत्वें नुरे ॥३०२॥
ऐसा मी एक महायोगी । हेंही न मिरवी तो जगीं ।
गुरुत्वाचा ताठा अंगीं । सर्वथा शिर्गी लागों नेदी ॥३०३॥
आपुल्या योगक्षेमाचें सांकडें । स्वप्नींही न घाली शिष्याकडे ।
शिष्यसंकट अतिगाढें । निवारी रोकडे निजांगें जो ॥३०४॥
मी एक अकर्ता निजात्मयोगी । म्हणोनि विषयांतें न भोगी ।
अथवा विषयो निःशेष त्यागी । हाही आग्रहो अंगीं असेना ॥३०५॥
तो विषय भोगी ना स्वयें त्यागी । तो अदृष्टाच्या निजविभागीं ।
लावूनियां देहाच्या अंगीं । परब्रह्मयोगीं विचरत ॥३०६॥
देह दैवें पालखीमाजीं चढे । अथवा विष्टेमाजीं पडे ।
तें दोहींचें सुखदुःख त्याकडे । मी म्हणोनि पुढें कदा न रिघे ॥३०७॥
देहीं असोनि नाहीं अहंकृती । देहीं असोनि नाहीं गृहासक्ती ।
लोखीं लोकांमाजी लौकिकस्थितीं । सुखें वर्तते लोकांसरिसें ॥३०८॥
हीं सद्‌गुरूचीं निजलक्षणें । पंडितां न कळती ज्ञातेपणें ।
पूर्णानुभवी जाणती खुणे । इतरांचें जाणणें पांगुळे तेथ ॥३११॥
त्याचे गुरुत्वाची वोळखण । अंगीं निजशांति पूर्ण ।
हेंचि सद्‌गुरुत्वाचें लक्षण । मुख्य भूषण हेंचि राया ॥३१२॥

येथपर्यंत आपण गुरुभक्ती या सर्वश्रेष्ठ साधनसंपत्तीतील गुरूचा म्हणजे पहिल्या शब्दाचा विचार पूर्ण केला. आता या शब्दातील जो उत्तरार्ध आहे अर्थात् जो दुसरा शब्द भक्ती आहे त्याचा विचार करावयाचा आहे. गुरूची भक्ती, साधन

किंवा उपासना करणारा शिष्य असल्यामुळे आता आपणास शिष्याच्या साधनसंपत्तीचा विचार करावयाचा आहे. " गुरुशिष्यपदेप्येष वेद्यभेदोऽप्यतात्त्विकः ॥तंत्रालोक १.२५६॥ " व " गुरुशिष्यपदे स्थित्वा स्वयं देवः सदाशिवः ॥ स्वच्छंदतंत्र १.३॥ " ही दोन्ही वचने आपण मागे पाहिली आहेत. याचा अर्थ असा की, गुरू आणि शिष्य हा भेद अतात्त्विक आहे. त्यामुळे सद्‌गुरूंच्या ठिकाणी जी लक्षणे विलसत असतात तितक्याच दर्जाची उत्तमोत्तम लक्षणे सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या साधकाच्या ठिकाणी असणे आवश्यक असते. यादृष्टीने शिष्याची कोणकोणती लक्षणे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितली आहेत त्याचा आपण विचार करू.

सद्‌गुरूला सर्वार्थाने शरण जाणे हे सच्छिष्याचे सर्वात मोठे लक्षण आहे. शिष्याच्या या शरणागतीचा व त्यातील रहस्याचा भेद करण्याचा प्रयत्न आपण मागे चवथ्या प्रकरणात " दानप्रक्रियेचे अलौकिकत्व " या मुद्यात केला आहे. त्यामुळे या ठिकाणी त्याचा अधिक उहापोह न करता थोडक्यात सार पाहू. मुळात " श्रीमद्‌भगवद्‌गीतेतच " भगवान् गोपालकृष्णनाथांनी शिष्याच्या ठिकाणी अपेक्षित अशा या अनन्यसाधारण लक्षणाचे उद्‌घाटन करताना असे म्हटले आहे की—

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ॥१८.६२॥**
**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥६६॥**

यातील 'शरण' शब्दाचा अर्थात् शिष्याच्या ठिकाणी उत्कटत्वाने अपेक्षित अशा मूर्धन्य साधनसंपत्तीचा भावार्थ किंवा लक्षण स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

**तया अहं वाचा चित्त आंग । देऊनियां शरण रिग ।**
**महोदधी का गांग । रिगालें जैसें ॥१८.१३१९॥**
**पैं आपुलेनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण ।**
**तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥१८.१३९८॥**
**जैसें घटाचेनि नाशें । गगनीं गगन प्रवेशें ।**
**मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥१३९९॥**
**सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळु जैसा पाणिया ।**
**तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥१४००॥**
**तैसें अद्वयत्वें मज । शरण रिघालिया तुज ।**
**धर्माधर्म हे सहज । लागतील ना ॥१४०७॥**

अशा प्रकारे शिष्य शरणागत झाल्याशिवाय शिष्याच्या ठिकाणी शक्तिसंक्रमणाची भूमीच उपलब्ध होऊ शकत नाही. अहंकार गळून गेल्याशिवाय शिष्याच्या ठिकाणी हा सद्‌गुण उपस्थित होऊ शकत नाही. यासाठीच महायोगी गोरक्षनाथांनी " सिद्धसिद्धांतपद्धतीत " असे म्हटले आहे की—

**सर्वांगप्रणिपातेन स्तुवन्नित्यं गुरुं भजेत् ।**
**भजनात्स्थैर्यमाप्नोति स्वस्वरूपमयो भवेत् ।।५.७७।।**

दररोज सद्‌गुरूला साष्टांग नमस्कार घालून त्याची भक्ती केली पाहिजे. त्याची स्तुती करून त्याला प्रसन्न केले पाहिजे. या भजनामुळे साधकाला स्थिरता प्राप्त होऊन तो स्वस्वरूपमय होतो.

असा जो शरणागत होतो तोच खरा शिष्य आहे, हे सांगताना "कुलार्णव-तंत्रात" असे म्हटले आहे की–

**शरीरमर्थं प्राणांश्च सद्‌गुरुभ्यो निवेद्य यः ।**
**गुरुभ्यः शिक्षते योगं शिष्य इत्यभिधीयते ।।१७.३०।।**

जो साधक तन, मन, धन व प्राण गुरूला समर्पण करून योगाचा अभ्यास करतो व योग शिकतो त्यालाच वास्तविक शिष्य म्हटले जाते.

श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनीही "दासबोधात" शिष्याच्या शरणागतीच्या लक्षणाला अनन्यसाधारण महत्त्व देऊन सच्छिष्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**मुख्य सच्छिष्याचें लक्षण । सद्‌गुरुवचनीं विश्वास पूर्ण ।**
**अनन्यभावें शरण । त्या नांव सच्छिष्य ।।५.३.१९।।**
**लागतां सद्‌गुरुवचनपंथें । झालें ब्रह्मांड पालथें ।**
**तरी जयाच्या शुद्ध भावार्थें । पालट न धरिजे ।।५१।।**
**शरण सद्‌गुरूसी गेले । सच्छिष्य ऐसे निवडले ।**
**क्रियापालटें झालें । पावन ईश्वरीं ।।५२।।**

सारांश, साधक कोणत्याही जातीचा व वर्णाचा असला; तरी त्याच्या ठिकाणी शरणागती हे लक्षण उत्कटत्वाने असले पाहिजे, हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी असे म्हटले आहे की–

**म्हणौनि राजर्षि कां ब्राह्मण । जयां गति मति मीचि शरण्य ।**
**तया त्रिशुद्धी मीच निर्वाण । स्थितीही मीचि ।।९.४८९।।**

शरणागतीची ही अपरिहार्यता पाहिली म्हणजे "ऐसें आमुचें सोडवणें । तुजवांचोनि कीजेल कवणें ? । तुज शरण गा सर्वप्राणें । म्हणता देवा ।।११.३३०।।, तरी आतां अप्रमेया । मज शरणागता आपुलिया । क्षमा कीजो जी यया । अपराधांसि ।।११.५६०।।" अशी अर्जुनाने भगवंतांची केलेली प्रार्थना व "राया जो निर्मळु । निष्कलंक लोकक्रुपाळु । शरणागतां प्रतिपाळु । शरण्यु जो ।।१२.२४०।।" ही धृतराष्ट्रापुढे संजयाने केलेली स्तुती किती यथार्थ व सूचक आहे, याचा उपरोक्त लक्षणाच्या दृष्टीने विचार केला म्हणजे लक्षात येते.

सच्छिष्याची इतर सर्व लक्षणें आपण पुढील तीन मुद्यात पाहणार असल्याने

त्यांचा येथे उल्लेख करून विवेचन करण्याचे कारण नाही. गुरू आणि भक्ती म्हणजे सद्‌गुरू व शिष्य यांचे जेव्हा ऐक्य होते तेव्हा गुरुभक्ती म्हणजे काय याची खरी अनुभूती येते. यालाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं सामरस्य असे म्हटले आहे. हे सामरस्य जेव्हा होते तेव्हा गुरुभक्तीचा उच्च आदर्श उपस्थित होतो. याचा विचारच आपणास या पुढे करावयाचा आहे.

सिद्धयोगाच्या साधनसंपत्तीचा विचार करताना गुरुभक्तीचा उच्च आदर्श कसा असतो ? या प्रश्नाची चर्चा आता करावयाची आहे. गुरुभक्ती ही बाह्य व आंतर अशा दोन प्रकारची आहे. बाह्यतः ती प्रत्यक्ष शारीरिक अर्थात् दास्य भावाने किंवा श्रवण-कीर्तनादि भक्तीच्या इतर प्रकारांनी केली जाते व आंतरसेवा गुरुपादुकांच्या पूजेने अर्थात् ध्यानाने केली जाते.श्रीज्ञानेश्वरमहाराज हे स्वतःच अत्यंत थोर असे गुरुभक्त असल्याने त्यांनी ह्या दोन्ही प्रकारांचे ज्ञानेश्वरीत साग्रपणे वर्णन केले आहे. आपण ते क्रमशः पाहू.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील तेराव्या अध्यायात ज्ञानी पुरुषाची लक्षणे सांगताना " आचार्योपासनं ॥ १३.७॥" असे एक महत्त्वाचे लक्षण भगवंतांनी सांगितले आहे. त्या लक्षणाचा भावार्थ स्पष्ट करताना "श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ " हे शास्त्रकारांनी कथन केलेले नवविधा भक्तीचें सर्व प्रकार साररूपाने वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की, " हे चतुर पुरुषांमध्ये श्रेष्ठ अशा अर्जुना ! आता यानंतर मी तुला गुरुभक्तीचा प्रकार सांगतो. तो प्रकार तू ऐक. ही गुरुसेवा म्हणजे सर्व सद्‌भाग्यांना जन्म देणारी पृष्ठभूमी किंवा आधार आहे; कारण त्रिविध दुःखाने पोळलेल्या व शोकाने ग्रस्त झालेल्या जीवाला ही सेवाच अविनाशी, सुखस्वरूप व स्वसंवेद्य आत्मरूप करते. अशी फलप्राप्ती करून देणारी सद्‌गुरुसेवा कशी करावयाची हे तुला सविस्तरपणे स्पष्ट करून सांगतो. त्याकडे तुझे संपूर्ण लक्ष एकाग्र होऊ दे. ज्याप्रमाणे आपली सर्व जलसंपत्ती घेऊन गंगा ही समुद्रास मिळण्याकरिता निघते, सर्व वेदांचा अभिप्राय हा ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीच सामावून गेलेला दिसतो किंवा उचित कर्तव्य म्हणून पतिव्रता स्त्री आपले जीवित व गुणावगुण हे सर्व आपल्या प्रिय पतीस समर्पण करते त्याप्रमाणे साधकाने आपले अंतर्बाह्य गुरुकुलाला समर्पण करून आपल्या मनाला श्रीगुरूंच्या प्रेमरूपी भक्तीचे घर केले पाहिजे. ज्याप्रमाणे विरहिणी पतिव्रता स्त्रीच्या चित्तात अखंड पतीचेच चिंतन असते त्याप्रमाणे गुरुभक्ताच्या अंतःकरणात ज्या देशात श्रीगुरूंच्या राहण्याचे घर (स्थूल अर्थाने देशकालादि मर्यादेने असलेले घर व परार्थाने सहस्रार होय. सहस्रार हेच श्रीगुरूंचे खरे घर होय, असे पादुका-पंचक-स्तोत्रात शिवांनी सांगितले आहे.) असेल त्या देशाचेच सारखे चिंतन असते. (साधकाने आपले सर्व लक्ष सहस्रारात ठेवावे हा अभिप्राय.)

ज्या दिशेस गुरू राहतात त्या दिशेकडून वारा येत असेल तर त्या वाऱ्यासही साधक सामोरा धावतो व त्याला लोटांगण घालून ' आपण माझ्या घरी वस्तीस यावे ' अशी प्रार्थना करतो. सद्गुरूंबद्दलच्या निर्व्याज व खऱ्या प्रेमाने वेडावून जाऊन सद्गुरू ज्या दिशेस राहतात त्या दिशेशीच बोलणे त्याला आवडते. असा गुरुभक्त आपला जीव गुरूंच्या घरी कायम अडकवून ठेवून त्याला तेथील वतनदार किंवा मिरासदार करून ठेवतो. परंतु ज्याप्रमाणे वासराला दाव्याला बांधून गोठचात ठेविले तरी त्याचे सर्व लक्ष गायीकडेच लागलेले असते त्याप्रमाणे गुरूंनी आज्ञा दिलेली असल्यामुळे शिष्य देहाने आपल्या गावी राहत असला तरी त्याचे सर्व लक्ष सतत गुरुगृहाकडेच असते. त्यामुळे त्याला सतत असे वाटत असते की, संसारबंधनाचे हे दावे केव्हा तुटेल ? व हे बंधन सुटून सद्गुरुस्वामींची भेट केव्हा होईल ? अशी चिंता सतत लागलेली असल्यामुळे साधकाला एक एक क्षणही युगापेक्षा मोठा भासतो. अशा स्थितीत गुरूंच्या गावाहून कोणी आल्यास किंवा स्वतः श्रीगुरूंनीच त्याच्याकडे एखादा मनुष्य पाठविला तर आयुष्य संपलेल्या माणसाला आणखी आयुष्य प्राप्त व्हावे किंवा सुकत असलेल्या अंकुरावर अमृताचा वर्षाव होऊन त्यास नवजीवन प्राप्त व्हावे, किंवा डबक्यातील माशाला समुद्रात आल्यावर आनंद प्राप्त व्हावा, नाहीतर एखाद्या दरिद्री माणसास द्रव्याचा ठेवा दृष्टीस पडावा, किंवा जन्मांधास एकाएकी दृष्टी यावी अथवा भिकाऱ्याच्या वाटचाला जसे इंद्रपद यावे त्याप्रमाणे श्रीगुरूंच्या कुळाचे नाव ऐकताच त्याला अत्यंत महान् आनंद किंवा सुख होऊन त्यामुळे आपण खूप मोठे झालो आहोत असे त्याला वाटते. त्यावेळी कौतुकाने आकाशालाही आपणास आलिंगन देता येईल किंवा ते कवटाळता येईल असे त्याला वाटते.

श्रीगुरूंविषयी साधकाच्या अंतःकरणात नितांत प्रेम असते. या प्रेमाच्या बळाने तो श्रीगुरूंच्या रूपाचे ध्यान करून उपासना करतो. प्रथम साधक शुद्ध अशा हृदयाचा किंवा अंतःकरणाचा तट अगर आवार उभे करतो. मग आराध्य अशा श्रीगुरूंच्या रूपाला तो ध्रुवाप्रमाणे अंतःकरणात अचलपणे स्थापन करतो. नंतर सर्व मनोभाव व पूजासाहित्य यांच्या रूपाने आपणच आहोत अशी बुद्धी धारण करून चैतन्याच्या चौथऱ्यावर ब्रह्मानंदाचे देऊळ उभारून व त्या देवळात श्रीगुरुरूपी शिवलिंगाची स्थापना करून त्याच्यावर ध्यानरूपी अमृताचा अभिषेक करतो. अशा प्रकारच्या पूजेने प्रातिभज्ञानाचा सूर्य उगवतो. त्यामुळे अद्वैतज्ञान होते. अशा ऐक्यज्ञानरूप बुद्धीच्या परडीत अष्टसात्त्विक भावांची लाख लाख कमळे भरून साधक ती श्रीगुरुरूप त्र्यंबकाला वाहतो. प्रातःकाळ, माध्यान्हकाळ व सायंकाळ असे जे शिवपूजेकरिता म्हणजे साधनाकरिता तीन शुद्ध काळ सांगितले आहेत, त्या तिन्ही काळी साधक उदित शक्तीच्या साहाय्याने जीवदशेचा अर्थात् जीवपणाचा

धूप जाळीत असतो आणि ज्ञानरूप दिव्याने श्रीसद्‌गुरूंना अखंड ओवाळतो. श्रीगुरूंशी ऐक्यभाव किंवा त्यांच्याशी ऐक्य पावून सामरस्य स्थिती प्राप्त होणे हाच नैवेद्य असून साधक हाच नैवेद्य श्रीगुरूंना अखंड अर्पण करीत असतो व आपण पुजारी बनून श्रीगुरूंना शंकराची पिंड मानून स्तवन करतो.

कधी कधी साधक जीवरूप शय्येवर श्रीगुरुरूप शिवाला पती करून त्यांचा उपभोग घेतो. अशी नाना प्रकारे साधकाची बुद्धी प्रेमाच्या उल्हासाने स्फुरत असते. साधनरत असताना जेव्हा साधकाच्या अंत:करणात प्रेम दाटून येते तेव्हा त्या प्रेमाला साधक दुधाचा सागरच समजतो. तेथे ध्येय, ध्यान व अपार सुख म्हणजे ध्याता ही त्रिपुटीच निर्दोष अशी शेषरूप गादी आहे व त्यावर शयन करणारे भगवान् विष्णू हे श्रीगुरू आहेत अशी तो भावना करतो. मग साधक त्या श्रीगुरुरूपी विष्णूची सेवा करणारी लक्ष्मी आपण होतो आणि आपणच गरुडही होऊन हात जोडून सन्मुख उभा राहतो. श्रीगुरुरूपी विष्णूच्या नाभिकमळापासून जन्म घेणारा जो ब्रह्मदेव तोही आपणच होतो. याप्रमाणे श्रीगुरूमूर्तीच्या प्रेमाने आपल्या ठिकाणी मनाने नाना प्रकारच्या सेवकाच्या भावना करून तो ध्यानाचे सुख उपभोगतो. एखाद्या वेळी तो साधकभक्त श्रीगुरूला प्रेमाच्या वळावर आपली आई कल्पून मी तिचे स्तनपान करीत आनंदाने तिच्या मांडीवर लोळत आहे अशी भावना करतो किंवा चैतन्यरूपी वृक्षाच्या खाली श्रीगुरू हीच कोणी गाय आहे असे कल्पून आपण तिच्या-मागून चाललेले वासरू होतो. एखाद्या वेळी श्रीगुरुकृपेच्या स्नेहरूपी उदकात आपण मासोळी झालो आहोत अशी तो भावना करतो. श्रीगुरुकृपा हीच अमृताची वृष्टी असून आपण सेवावृत्तिरूप रोप आहोत, असे निरनिराळे संकल्प त्याचे मन करीत असते. या दृष्टीने विचार केला; तर निरनिराळ्या कल्पना करण्याच्या त्याच्या आवडीला मर्यादा नाही. कधी कधी तो आपण डोळे न उघडलेले व पंख न फुटलेले पिलू होऊन श्रीगुरूंना पक्षिणी करून तिच्या चोचीतील चारा घेतो; तर कधी कधी श्रीगुरू भवसमुद्रातून तारणारे आहेत असे समजून आपण त्यांच्या कासेस लागलो आहोत अशी भावना करतो. अशा प्रकारे ज्याप्रमाणे समुद्राला भरती आल्यावर लाटांपासून लाटा उत्पन्न होतात त्याप्रमाणे श्रीगुरुभक्ताच्या अंत:करणात श्रीगुरूंविषयी असलेल्या अथांग प्रेमामुळे नाना प्रकारच्या भावनांनी ध्यानापाठी ध्यान होत जाते किंवा गुरुध्यानच अनेक ध्यानास प्रसवते.

साधक आपल्या मनात असा निश्चय करतो की, मी श्रीगुरूंची इतकी उत्तम सेवा करीन की, त्यामुळे श्रीगुरू संतुष्ट होऊन मला प्रेमाने काही तरी माग असे म्हणतील. अशा प्रकारच्या माझ्या खऱ्या शुद्ध सेवेने गुरू प्रसन्न होतील तेव्हा मी त्यांची अशी प्रार्थना करीन की, हे प्रभो! तुमच्या सेवेला जेवढा काही सेवकवर्ग लागतो तो संपूर्ण एक मीच व्हावे आणि आपल्या सेवेला साहाय्यभूत होणारी जेवढी

काही उपकरणे व सामग्री आहे ती सर्व माझीच रूपे व्हावीत. असा वर मी मागेन व श्रीगुरू प्रसन्न होऊन हो म्हणतील. मग त्यांचा सर्व परिवार व उपचार सामग्री मीच होईन. श्रीगुरूंच्या सेवेमध्ये जेवढी उपकरणे लागतात त्यांपैकी प्रत्येक वस्तू जेव्हा मीच होईन तेव्हाच मला सेवेचे सुख प्राप्त होईल. श्रीगुरू हे जरी पुष्कळ भक्तांची माउली असले; तरीपण त्या गुरूंच्या कृपेस मी आपली शपथ वाहवीन व त्यांना माझी एकटयाचीच माउली करून घेईन. श्रीगुरूंच्या प्रेमाला मी आपला छंद लावून त्याबाबतीत त्यांच्याकडून एकपत्नीव्रत आचरवीन आणि त्यांचा लोभ माझ्याशिवाय अन्यत्र कोठेही न जाता तो माझ्यावरच राहावा यासाठी त्यांच्या लोभाला क्षेत्रसंन्यास करावयास लावीन. अत्यंत जोराने वाहणारा वारा जसा चारहीदिशांच्या आतच वाहतो, तो त्यांच्या बाहेर निघू शकत नाही, त्याप्रमाणे श्रीगुरूंच्या कृपेस सर्व बाजूंनी मीच पिंजरा होईन. माझी स्वामिनी जी गुरुसेवा, तिला मी आपल्या गुणांची लेणी करीन. फार तर काय ! श्रीगुरूंच्या भक्तीला मीच गवसणी होईन. श्रीगुरूंच्या प्रेमाच्या वर्षावाखाली राहून तो सर्व वर्षाव घेणारी पृथ्वी मी होईन.साधक गुरुभक्ती करताना अशा अनंत प्रकारच्या मनोरथांच्या सृष्टीची रचना करतो.

साधक गुरुभक्ती करताना म्हणतो, श्रीगुरूंच्या राहण्याचे घर मीच होईन आणि त्यांच्या चरणांचा दास होऊन त्यांची त्या ठिकाणी सेवाचाकरी करीत राहीन. जाता-येता जे घराचे उंबरे श्रीगुरू ओलांडतात ते मीच होऊन घराची दारे व द्वारपाळही मीच होईन. श्रीगुरूंच्या पादुका मीच होऊन त्या पादुका-खडावा त्यांच्या पायात मीच घालीन आणि छत्रही मीच होऊन मीच ते छत्र श्रीगुरूंवर धरण्याचे काम करीन. श्रीगुरू चालत असता उंचवटा व खळगा यांची जाणीव करून देऊन इशारा देणारा चोपदार, चवरी ढाळणारा, त्यांना आधारासाठी हात देणारा किंवा हात हातात घेऊन आश्रय देणारा व त्यांच्यापुढे दिवटी धरून वाट दाखविणाराही मीच होईन. श्रीगुरूंची झारी हातात घेणारा शागीर्द मीच होईन व त्यांना चूळ भरण्यासाठी पाणीही मीच देईन. चूळ टाकण्याचे निर्मळ तस्तही मीच होईन. त्यांचे तांबूलादि साहित्य व पानदान मी बाळगीन. त्यांनी चावलेला विडा, पिंक मी घेईन व त्यांना स्नान घालण्याची खटपट मीच करीन. श्रीगुरूंचे आसन, अलंकार, वस्त्र व चंदनादि उपचार मीच होईन. त्यांचा स्वयंपाक करणारा आचारी मीच होईन व त्यांना फराळाचे पदार्थ वाढीन आणि माझा जीव त्यांच्यावरून ओवाळून टाकीन. ज्यावेळी श्रीगुरुमहाराज भोजन करतील त्यावेळी त्यांच्या पंक्तीचा लाभ घेणाराही मीच होईन आणि जेवण झाल्यावर मीच पुढे होऊन त्यांना विडा देईन. श्रीगुरूंचे भोजन केलेले उष्टे ताट मी काढीन. त्यांचे अंथरूण झाडून घालीन व त्यांची चरणसेवाही मीच करीन. मीच त्यांचे सिंहासन होईन व त्यावर श्रीगुरू बसतील. याप्रमाणे सेवेची पूर्णताही मीच होईन.

श्रीगुरूंचे लक्ष ज्या गोष्टीकडे लागेल ती वस्तूही होण्याचा चमत्कार मीच

करीन. श्रीगुरूंच्या श्रवणरूप अंगणात शब्दांचे असंख्य समुदाय मीच होईन. आणि श्रीगुरूंच्या अंगाला लागणारा स्पर्शही मीच होईन. श्रीगुरूंचे प्रेमाने अवलोकन करणारे डोळे ज्या ज्या वस्तू अवलोकन करतील ती ती सर्व रूपे व त्या त्या सर्व वस्तू मीच होईन. त्यांच्या जिभेला जो रस आवडेल तो तो रसही मीच होईन. मीच त्यांच्या घ्राणेंद्रियाला आवडणारा सुवास होऊन त्या सुवासाच्या रूपाने मी त्यांच्या घ्राणेंद्रियांची सेवा करीन. याप्रमाणे बाह्य व मनोगत सेवेला उपयोगी पडणाऱ्या सर्व वस्तू मीच होऊन श्रीगुरूंच्या संपूर्ण सेवेला व्यापून टाकीन.

अशा प्रकारे देह असेपर्यंत श्रीगुरूंची अशीच सर्वतोपरी सेवा करीन असे गुरुभक्त म्हणतो आणि मग देह पडल्यानंतरही त्याची सेवेविषयी आस्थावुद्धी कशी असते, हे एक आश्चर्यच आहे. गुरुभक्त साधक म्हणतो की, पृथ्वीच्या ज्या भागावर श्रीगुरूंचे चरण उभे राहतील त्या मातीत मी माझ्या शरीराची माती मिळवीन. माझे श्रीगुरुस्वामी ज्या पाण्याला कौतुकाने स्पर्श करतात त्या पाण्यामध्ये मी आपल्या शरीरातील जलाच्या अंशाचा लय करीन. ज्या दिव्यांनी लोक श्रीगुरूंना ओवाळतील अथवा जे दिवे श्रीगुरूंच्या घरी उजळले जातील, त्या दिव्यांच्या तेजात मी आपल्या शरीरातील तेजाचा अंश मिळवीन. श्रीगुरूंना पंख्याने किंवा चवरीने जो वारा घातला जात असेल त्यात मी आपल्या देहातील प्राणांचा लय करीन. अशा प्रकारे वारा होऊन मी त्यांच्या शरीराची सेवा करीन. ज्या ज्या पोकळीत श्रीगुरू आपल्या परिवारासह असतील त्या त्या पोकळीत मी आपल्या शरीरातील पोकळीचा अर्थात् आकाशाचा लय करीन. मी जिवंत असताना आणि मेल्यावरही श्रीगुरूंची सेवा केल्याशिवाय राहणार नाही आणि एक निमिषभर किंवा पळभरही दुसऱ्यांवर श्रीगुरूंची सेवा सोपविणार नाही. याप्रमाणे कोटयवधी कल्पच्या-कल्पपर्यंत मी श्रीगुरुसेवा करीतच राहीन.

गुरुभक्त साधकाच्या मनात अपार धैर्य असते. अशा प्रकारची प्रत्यक्ष सेवा करूनही तो गुरुसेवेसाठी रात्र व दिवस जाणत नाही किंवा ही सेवा थोडी झाली, ही जास्त झाली असे त्याच्या मनात येत नाही. उलट श्रीगुरूंची आज्ञा वारंवार होत असताना त्याला सेवेचा अधिक हुरूप येतो. श्रीगुरूंची अशा प्रकारे सेवा करताना त्यांच्या मुखातून अमुक काम कर असे निघाल्याबरोबर तो आनंदाने आकाशापेक्षा मोठा होतो आणि एकटाच संपूर्ण सेवा एकाकाळीच करतो. साधकाचे शरीर अंतःकरणवृत्तीच्या पुढे धाव घेते व सेवा करण्याची प्रत्यक्ष कृती ही मनाशी पैज मारते. एखाद्या वेळेस साधक श्रीगुरूंच्या लीलांवरून आपले जीवित ओवाळून टाकतो.

श्रीगुरूंच्या सेवेने गुरुभक्त साधक कृश होतो. मात्र तो त्यांच्या प्रेमाने पुष्ट होतो. श्रीगुरूंची आज्ञा पालन करणे एवढेच त्याला माहीत असते. आपल्या

कुळाच्या कुलीनपणामुळे आपल्याला कुलीन न समजता केवळ श्रीगुरूंच्या कुलीनपणामुळे तो आपल्याला कुलीन समजतो. आपल्या बांधवांच्या सौजन्यामुळे आपण सज्जन आहो असे न समजता श्रीगुरुबंधूंच्या सौजन्यामुळे आपण सज्जन आहो असे साधक समजतो. त्याला निरंतर एकमात्र श्रीगुरुसेवेचेच व्यसन लागलेले असते. श्रीगुरुसंप्रदायात परंपरेने चालत आलेले धर्म व आचार हेच त्याला आपले विहित वर्णाश्रमधर्म आहेत असे वाटते. श्रीगुरूंची सेवा हेच त्याचे नित्यकर्म असते. श्रीगुरू हे त्याचे पुण्यक्षेत्र असून श्रीगुरू हीच त्याची उपास्य देवता असते. त्याचे माता-पिता श्रीगुरूच असतात. त्याला श्रीगुरुसेवेवाचून दुसरा परमार्थमार्गच माहीत नसतो. श्रीगुरूचे द्वार हे साधकाचे सारसर्वस्व असते. आपल्या बरोबरीच्या गुरुसेवकांवर साधक सख्ख्या भावाप्रमाणे प्रेम करतो. साधकाच्या मुखातून रात्रंदिवस श्रीगुरुनामाचा मंत्रोच्चार सारखा चालू असतो. श्रीगुरूंच्या वचनावाचून साधकाला दुसरे कोणतेही शास्त्र माहीत नसते अर्थात् गुरुवाक्य हेच त्याचे शास्त्र असल्यामुळे इतर शास्त्रे तो हाती धरीत नाही किंवा मानीत नाही. ज्या पाण्यास श्रीगुरूंच्या चरणाचा स्पर्श झाला आहे ते पाणी कसलेही असले तरी त्यात संपूर्ण ब्रह्मांडाची तीर्थे साठविली असून ते सर्व तीर्थात श्रेष्ठ तीर्थ आहे असे श्रीगुरुभक्त समजतो. त्याला श्रीगुरूंचा उच्छिष्ट प्रसाद अकस्मात् मिळाला; तर त्या लाभापुढे त्याला समाधी-सुखही तुच्छ वाटते. श्रीगुरू चालत असताना त्यांच्या पायामागून जे धुळीचे रजःकण उडतात ते साधक आपल्या मस्तकावर धारण करतो व त्या लाभामुळे आपल्याला कैवल्यसुखाची प्राप्ती झाली आहे असे समजतो.

येथपर्यंत श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "किंबहुना यापरी । श्रीगुरुमूर्ति अंतरी । भोगी आतां अवधारीं । बाह्यसेवा ।। १३.४०३ ।।" असे म्हटल्याप्रमाणें मानसिक ध्यानसेवेचे व शारीरिक बाह्यसेवेचे वर्णन केले. शारीरिक बाह्य सेवा ही स्थूल स्वरूपाची असून मानसिक ध्यानसेवा ही त्यापेक्षा वरच्या दर्जाची असून ती सूक्ष्म व आंतर स्वरूपाची आहे. ही सूक्ष्म सेवा मनाने करावयाची असल्यामुळे व "मनःषष्ठानीन्द्रियाणि ।। " गीता १५.७ ।। " असे भगवंतांनी म्हटले असल्यामुळे मन हे इंद्रिय असून ते जड आहे हे निश्चित होत असल्यामुळे या सेवेला सूक्ष्मत्व असले; तरी ती जडापासून पूर्णपणे मुक्त नाही हे लक्षात ठेविले पाहिजे.

येथपर्यंत आपण गुरुभक्तीच्या बाह्य प्रकाराचे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे ते पाहिले. आता आपल्याला सूक्ष्मतम किंवा परसेवेचा उच्च आदर्श कसा असतो हे पाहवयाचे आहे. ही परसेवा म्हणजे श्रीसद्गुरूंच्या पादुकांचे पूजन करणे होय. ही सर्वश्रेष्ठ सेवा कशी करावी अर्थात् मोक्षप्राप्तीसाठी श्रीसद्गुरूंच्या पादुकांची पूजा कशी करावी याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**आतां हृदय हें आपुलें । चौफाळूनियां भलें ।**
**वरी बैसऊं पाउलें । श्रीगुरूंचीं ।।१५.१।।**

ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रिय कुड्मुळीं ।
भरूनियां पुष्पांजुळी । अर्घ्यु देवों ।।२।।

अनन्योदकें धुवट । वासना जे तन्निष्ठ ।
तें लागलेंसे अबोट । चंदनाचें ।।३।।

प्रेमाचेनि भांगारें । निर्वाळूनि नूपुरें ।
लेवऊं सुकुमारें । पदें तियें ।।४।।

घणावली आवडी । अव्यभिचारें चोखडी ।
तिये घालूं जोडी । आंगोळिया ।।५।।

आनंदामोदबहळ । सात्त्विकाचें मुकुळ ।
तें उमलेले अष्टदळ । ठेऊं वरी ।।६।।

तेयें अहं हा धूप जाळूं । नाहं तेजें वोवाळूं ।
सामरस्यें पोटाळूं । निरंतर ।।७।।
माझी तनु आणि प्राण । इया दोनी पाउवा लेऊं श्रीगुरुचरण ।
करूं भोगमोक्ष निंबलोण । पायां तयां ।।८।।
इया श्रीगुरुचरणसेवा । हों पात्र तया दैवा ।
जे सकळार्थमेळावा । पाटु बांधे ।।९।।

आता आपले हृदय चांगले स्वच्छ व शुद्ध करून त्यावर श्रीगुरूंच्या पादुकांची स्थापना करू म्हणजे हृदयकमळाच्या अर्थात् आज्ञाचक्राच्या ठिकाणी श्रीगुरूंचे चरण दृढ धारण करू. नंतर मनातील सर्व भेद नाहीसे करून ऐक्यभावाच्या ओंजळीत सर्व इंद्रियरूपी फुलांच्या कळ्या भरून त्यांच्या चरणावर वाहून अर्घ्य देऊ म्हणजे सर्व इंद्रियांना एकवटून त्यांचे व्यापार त्या चरणांच्या ठिकाणीच अनन्यभावाने समर्पण करू. श्रीगुरुचरणांना अनन्यभावरूपी किंवा एकनिष्ठभावरूपी स्वच्छ उदकाने स्नान घालून नंतर श्रीगुरुचरणनिष्ठारूप वासनेच्या सुवासिक चंदनाचे बोट लावू. प्रेमरूपी सोने शुद्ध करून त्या सोन्याचे पैंजण घडवून ते श्रीगुरूंच्या सुकुमार पायात घालू. दृढप्रेमाची एक व शुद्ध अव्यभिचारी प्रेमाची एक अशा दोन उत्तम अंगठ्या श्रीगुरूंच्या दोन चरणांच्या बोटात घालू. आनंदरूपी सुगंधाने परिपूर्ण भरलेले व अष्टसात्त्विकभावरूपी आठ पाकळ्यांचे उमलेले कमळ श्रीगुरुचरणांवर वाहू. श्रीगुरूंच्या पूजेच्या वेळी अहंकाररूपी धूप जाळू. "मी नाही, सर्व काही श्रीगुरूच आहेत." या अद्वैतबुद्धिरूप दीपाने त्यांच्या चरणांची आरती करू व शेवटी त्यांच्या चरणांशी समरस होऊन जाऊ.माझे शरीर व प्राण यांच्या पादुका करून श्रीगुरूंच्या दोन्ही चरणात् घालू व त्या चरणांवरून भोग व मोक्ष दोन्ही ओवाळून टाकू.मोक्षासकट सर्व अर्थांची प्राप्ती करून देणें हे या सेवेचे फल असल्यामुळे जो कोणी परम भाग्यवान् असेल त्यालाच या प्रकारची श्रीगुरुचरणांची सेवा प्राप्त होईल.

अशा प्रकारचे चरण किंवा पादुका पूजन हा गुरुभक्तिरूपी साधनसंपत्तीतील गुह्य भाग असून त्याचे रहस्य समजणे अत्यंत दुरापास्त आहे. "पादुका-पंचक-स्तोत्रात" या रहस्याचा भेद करण्याचा प्रयत्न केला आहे. या स्तोत्रात भगवान् शंकर असे म्हणतात की–

ब्रह्मरंध्रसरसीरुहोदरे नित्यलग्नमवदातमद्‌भुतम् ।
कुंडलीविवरकांडमंडितं द्वादशार्णसरसीरुहं भजे ॥१॥
तस्य कंदलितकर्णिकापुटे क्लृप्तरेखमकथादिरेखया ।
कोणलक्षितहलक्षमंडली भावलक्ष्यमवलालयं भजे ॥२॥
तत्पुटे पटुतडित्कडारिमस्पर्द्धमानमणिपाटलप्रभम् ।
चिन्तयामि हृदि चिन्मयं वपुर्नादबिंदुमणिपीठमंडलम् ॥३॥
उद्‌र्ध्वमस्य हुतभुक् शिखात्रयं तद्‌विलासपरिबृंहणास्पदम् ।
विश्वघमस्मरमहाचिदोत्कटं व्यामृशामि युगमादिहंसयोः ॥४॥
तत्र नाथचरणारविंदयोः कुंकुमासवझरीमरंदयोः ।
द्वंद्वमिंदुमकरंदशीतलं मानसं स्मरति मंगलास्पदम् ॥५॥
निषक्तमणिपादुकानियमिताघकोलाहलं
स्फुरत्किशलयारुणं नखसमुल्लसच्चंद्रिकम् ।
परामृतसरोवरोदितसरोजसद्रोचितं
भजामि शिरसिस्थितं गुरुपदारविंदद्वयम् ॥६॥
पादुकापंचकस्तोत्रं पंचवक्त्राद्विनिर्गतम् ।
षडाम्नायफलं प्राप्तं प्रपंचे चातिदुर्लभम् ॥७॥

सहस्रारस्थित ब्रह्मरंध्रामध्ये कुंडलिनीने युक्त अशा श्वेतरंगाच्या द्वादश-वर्णाच्या पाकळ्यांच्या कमळाचे मी ध्यान करतो आणि त्याचबरोबर त्या कमलाच्या अद्‌भुत तेजाचा अनुभव घेऊन परमानंदित होतो. या कंदाच्या कर्णिकापुटामध्ये मी शक्तिपीठाचे भजन करतो. शक्तिपीठ वामा, ज्येष्ठा व रौद्री म्हणजे अ, क व थ या रेखांनी बनलेला त्रिकोण आहे. या त्रिकोणाच्या आतील बाजूस प्रत्येक कोणामध्ये आणखीही तीन बिंदू आहेत. त्या बिंदूंमुळे मंडल बनते. या तीन बिंदूंना त्रिबिंदू, त्रिशक्ती, त्रिमूर्ती इत्यादि नावांनी आपापल्या गुरुमुखानुकूल प्रसिद्धी आहे. ( त्रिबिंदुः सा त्रिशक्तिः सा त्रिमूर्तिः सा सनातनी-यामल) उक्त त्रिकोणाच्या मंडलात नाद आणि बिंदूशी संलग्न अशा मणिपीठाचे अर्थात् मणिसमान ज्योतीचे मी ध्यान करतो आणि हृदय, मन व चित्त यांना एकीभूत करतो. येथे हंसपीठाच्या वरच्या भागी नादबिंदूच्या मध्यात जो त्रिकोण आहे ते श्रीगुरूंचे स्थान आहे. त्यात परम-हंसपुरुषाचे मी ध्यान करतो. ही ज्योती सर्व प्रकारच्या ज्योतींमध्ये श्रेष्ठ आहे आणि हिच्यात सर्व विश्व देखील सामाविलेले आहे. या त्रिकोणामध्ये वामारेखा

अग्निरूपा आहे, ज्येष्ठारेखा चंद्ररूपा आहे आणि रौद्रीरेखा सूर्यरूपा आहे. वामारेखा दक्षिण दिशेस आरंभ होऊन उत्तरपूर्व टोकापर्यंत, ज्येष्ठारेखा उत्तरपूर्वेस आरंभ होऊन उत्तरपश्चिमेपर्यंत आणि रौद्रीरेखा उत्तरपश्चिमदिशेस आरंभ होऊन वामारेखेमध्ये मिळून जाते. हे तिन्ही बिंदू "त्रिपुरा" अथवा 'त्रिपुरसुंदरी" या नावाने प्रसिद्ध आहेत. श्रीगुरूंच्या सहस्रारातील चरणकमलामधून लालरंगसदृश अमृताचे निरंतर क्षरण होत असते. अशा प्रकारे सद्गुरूच्या चरणारविंदांचे मानसध्यान केल्याने ज्याप्रमाणे चंद्राच्या अमृत किरणांनी सर्व तापांचा नाश होतो त्याप्रमाणे चंद्राच्या अमृतमयी किरणांसमान शीतल अशा गुरुपदपद्ममकरंदाच्या सेवनाने सर्व प्रकारची दुःखे, संताप व संसार-कोलाहल यापासून साधक मुक्त होऊन त्यास शांती प्राप्त होते अर्थात् सर्व अभीष्ट फले त्याला प्राप्त होतात. मस्तकातील पूर्वोक्त पीठामध्ये स्थित असलेल्या सद्गुरूंच्या पदकमलांचे मी ध्यान करतो. पादपद्माशी संलग्न असलेल्या मणिमय पादुकांच्या ध्यानाने साधक संसाराच्या पाप कोलाहलापासून कायमचा निवृत्त होतो सद्गुरूंचे चरणकमल वृक्षाच्या नवोदित पानांसारखे लालरंगाचे आहेत व त्यांच्या चरणांची नखे चंद्रम्याच्या प्रकाशासारखी प्रकाशमान आहेत. हे कमल अमृताच्या सरोवरामध्ये उमलेले आहे. पंचवक्त्र महादेवाच्या पाच मुखातून हे पादुकापंचकस्तोत्र बाहेर पडले आहे. शिवाने कथन केलेल्या सर्व षडाम्नाय स्तोत्रांप्रमाणे याच्या पठणाने व श्रवणाने मोक्षफलप्राप्ती होते; परंतु या मायारचित संसारामध्ये अशा प्रकारची फलप्राप्ती होणे, ही अत्यंत कष्टसाध्य व म्हणूनच अत्यंत दुर्लभ गोष्ट आहे.

वरील रहस्याचे अधिक स्पष्टीकरण व सोप्या भाषेत त्याचा सारांश व्यक्त करताना "तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि" या ग्रंथातील, "तांत्रिक पूजाका परम आदर्श' व "सामरस्य या महामीलन" या दोन लेखात आणि प्रस्तावनेत म. म श्रीगोपीनाथ कविराज यांनी असे म्हटले आहे की, "परपरात्मक स्वात्माकी परमानंदमयी पराशक्ति जब अपने आप भेदग्रास करनेके लिए उद्यत होती है तब उसका 'पादुका' नामसे वर्णन किया जाता है। "परा परात्मनः स्वात्मनः परानंदमयी स्वव्यतिरेककवलनोद्युक्ता परा शक्तिः पादुकेति गीयते।"वस्तुतः स्वात्मासे अभिन्न अनुत्तरस्वभाव नादशक्तिरूप विमर्शकोही गुरुतत्त्व जानना चाहिए। इसको स्वरूपतः जाननेके लिए पादुकाही एकमात्र उपाय है। क्रमका संकोच तथा प्रसार पादुकासेही होता है।" (प्रस्तावना)

"बाह्य-चक्र, आवरण आदिकी रचना करके अपरा पूजा की जाती है। अतएव इसमें सदासर्वदा भेदज्ञान रहताही है– यह बतलाना व्यर्थ है। इसलिये पूजामार्गमें अग्रसर होनेवाले साधकको पहले बाह्यपूजासे साधना आरंभ करनी पडती है, फिर क्रमशः आंतरपूजाभावनामेंसे होते हुए अंतिम भूमिकामें विशुद्ध आंतर-पूजाका

अधिकार प्राप्त करना पडता है । इससे समझमें आ गया होगा कि प्रथम पूजाका आधार भेद-ज्ञान है, द्वितीय-पूजामें भेद-ज्ञानका थोडा-सा उपशम होता है और भावनाके द्वारा अभेद-ज्ञानकी सूचना की जाती है एवं तृतीय अथवा श्रेष्ठ पूजामें भेदज्ञानका लेश भी नहीं रहता । उस समय केवल अभेद या अद्वैत-बोधही रह जाता है ।

हम जिस चक्र-पूजाकी बात कह आये हैं, वह इष्ट-देवताके तारतम्यके अनुसार नाना प्रकारकी होनेपर भी मूलत: एकही है । सभी चक्रोंका प्रारंभ चतुष्कोणसे होता है और समाप्ति बिंदुमें होती है । वस्तुत: सभी देवताओंके चक्र मूलाधारसे लेकर सहस्रार-तकके सात चक्रोंका वासनानुकूल विकास और विस्तारमात्र हैं। यहाँ ' चतुष्कोण ' शब्दसे मूलाधार और ' बिंदु' शब्दसे सहस्रार समझना चाहिये । इस चक्रपूजाके अंदर अपने इष्टदेवताके आवरण रूपमें सभी देवताओंकी पूजाका विधान है । यह अपरा पूजा तीसरी श्रेणीकी होनेपर भी, उपेक्षाके योग्य नहीं है। क्योंकि तांत्रिक सिद्धाचार्योंने कहा है कि परमेश्वर स्वयं सर्वज्ञ होनेपर भी नित्य-निरंतर महाशक्तिकी यह अपरा पूजा किया करते हैं । इसीसे समयपर अभेदज्ञानका आविर्भाव होता है । इसीलिये अभेदज्ञानरूपी संपत्तिको चाहनेवाले ज्ञानी साधकमात्रको सर्वदा अपरा पूजा करनी चाहिये । इस श्रेणीकी पूजाका विधिपूर्वक और नियमपूर्वक अनुष्ठान करनेपर इसीके द्वारा साधक मध्यम-पूजाका अधिकार प्राप्त करनेमें समर्थ होता है । आवरणार्चनारूपी कर्मात्मक बाह्य तथा भेदमयी अवस्था क्रमश: भावनाके क्रमिक उत्कर्षके द्वारा ज्ञानमय अथवा अद्वैतबोधमय स्वरूपमें विलीन हो जाती है । जब दृढ भावनाके फलस्वरूप कर्म ज्ञानका रूप धारण करने लगता है, ठीक उसी समय मध्यमपूजाके अनुष्ठानकी सूचना मिलती है । प्रज्वलित अग्निमें जिस प्रकार घी की आहुति दी जाती है, ठीक उसी प्रकार अर्चनाके द्वारा अपनी विकल्पात्मक प्रकृतिको अखंड प्रकाशस्वरूप चिदानंदघन परमेश्वरकी परम-ज्योतिमें निक्षेप करना पडता है । यही मध्यमपूजाका रहस्य है । साधनके बलसे इसके सिद्ध होनेपर परमपूजाकी महिमा अपने-आपही फूट पडती है । देहके ऊर्ध्वभागमें ब्रह्मरंध्र-नामक स्थानमें सहस्रदल-विशिष्ट शुभ्रवर्णका अधोमुख अकुल पद्म है, उसके बीचमें ' निष्कलाशक्ति ' विराजमान है, जिसके गर्भमें सूक्ष्म दृष्टिसे अनंत शक्तियोंकी सत्ता अनुभव की जाती है । इन सब शक्तियोंके बीच 'व्यापिनी ' नामकी एक शक्ति या कला है । इसके द्वारा ऊपरसे नीचेकी ओर अमृत झरता रहता है । इस महापद्म-वनके ऊपर ' समना ' रूपी तिरोधानशक्तिका अधिष्ठान है । मनकी गति यहींतक हो सकती है । इसके ऊपर मनोराज्यकी क्रिया संचारित नहीं होती । इस पद्मकी भीतरी कर्णिकामें ' वाग्-भव ' नामक एक त्रिकोण है, जहाँसे परा, पश्यंति, मध्यमा और वैखरी— ये चार प्रकारकी वाणियाँ

निकलती हैं। जिसे भक्त साधक गुरुपादुकाके नामसे वर्णन करते हैं, वह इसी त्रिकोणके भीतर अवस्थित है। विश्वगुरु परम शिवकी पादुकाही गुरुपादुका है, यही तंत्रका सिद्धांत है।

गुरुपादुका 'पर' और 'अपर' भेदसे दो प्रकारकी है। इनमें स्वप्रकाश परमशिव, उनकी स्वरूपभूता विमर्श-शक्ति तथा इन दोनोंका सामरस्य—ये तीन परापादुकाके भेद हैं।

**स्वप्रकाशशिवमूर्तिरेकिका तद्विमर्शतनुरेकिका तयोः।**
**सामरस्यवपुरिष्यते परा पादुका परशिवात्मनो गुरोः।।**

इस गुरुपादुकासे निरंतर स्निग्ध चंद्र-रश्मिके समान घनीभूत चिद्-रस या परमानंदकी धारा बरसती हुई चराचर जगत्को आप्यायित और अनुप्राणित करती है। यही साधककी अपनी आत्मा है।" ( तांत्रिक पूजाका परम आदर्श पृ. ८७, ८८ )

"सामरस्यही सर्वोत्तम गुरुपादुका है। स्वप्रकाश शिवरूप भी गुरुपादुका है, विमर्श अथवा शक्तिरूप भी गुरुपादुका हैं; किंतु श्रेष्ठ गुरुपादुका वही है जहाँ शिव और शक्तिका सामरस्य रहना है—परमशिवही गुरु हैं—शिवभी उनकी पादुका है तथा शक्ति भी वही हैं। दोनोंका सामरस्यही परापादुका है।" (सामरस्य या महामिलन पृ. १७०)

वरील सर्व विवेचनाचे सार आपणास "श्रीमद्भागवतात" पाहवयास मिळते. भगवान् श्रीगोपालकृष्णनाथांनी उद्धवाला जेव्हा शेवटी बदरीकाश्रमात तपश्चर्या करण्याकरिता जाण्यास सांगितले तेव्हा तो त्यांच्या चरण-पादुका घेऊन कसा निघाला याचे वर्णन करताना व्यास-महर्षींनी असे म्हटले आहे की—

**सुदुस्त्यजस्नेहवियोगकातरो न शक्नुवंस्तं परिहातुमातुरः।**
**कृच्छ्रं ययौ मूर्धनि भर्तृपादुके बिभ्रन्नमस्कृत्य ययौ पुनः पुनः।।११.२९.४६।।**

भगवंतावर प्रेम करून नंतर त्याचा त्याग करणे संभव नाहीं. त्यांच्या वियोगाच्या कल्पनेने उद्धव कातर झाला. त्यांचा त्याग करण्यास तो असमर्थ ठरला. तो पुनःपुन्हा विव्हल होऊन मूर्च्छित होऊ लागला. त्यानंतर काही वेळाने त्याने श्रीकृष्णांनीच कृपा करून दिलेल्या चरण पादुका मस्तकावर धारण केल्या व व पुनःपुन्हा त्यांना नमस्कार करून तो तेथून निघून गेला.

या श्लोकातील पादुकांचे रहस्य प्रकट करताना श्रीएकनाथमहाराजांनी "एकनाथी भागवतात" असे म्हटले आहे. की—

**एवं सगुण आणि निर्गुण। उद्धवासी समसमान।**
**गुरुत्वें कृष्णीं प्रेम गहन। तो त्यागितां पूर्ण विव्हळता।।२९.८८२।।**
**आज्ञा नुल्लंघवे सर्वथा। म्हणोनि निघावें बदरीतीर्था।**
**तंव श्रीकृष्णासी सांडूनि जातां। परमावस्था उद्धवीं।।८८३।।**

उद्धव प्रयाणअवसरीं । लोळणी घाली पायांवरी ।
चरण आलिंगी हृदयीं धरी । जावया दूरीं धीर नव्हे ॥८८४॥
मज एथोनि गेलिया आतां । मागुती न देखें श्रीकृष्णनाथा ।
तेणें अनिवार अवस्था । पाउल सर्वथा न घालवे ॥८८५॥
मी निवालों कृष्णचरणामृतीं । मज चाड नाहीं महातीर्थीं ।
त्याहीमाजी अदृष्टगती । अंतीं श्रीपति त्यागवी ॥८८६॥
सप्रेम चळचळां कांपत । कंठ जाहला सद्‌गदित ।
बाष्पें क्षणक्षणा स्फुंदत । स्वेदरोमांचित उद्धव ॥८८७॥
गमनालागीं अतिउद्यत । पायां लागोनि पऱ्हा जात ।
सवेंचि येऊनि पायां लागत । विगुंतलें चित्त हरिप्रेमीं ॥८८८॥
पुढती नमन पुढती गमन । पुढती घाली लोटांगण ।
पुढती वंदी श्रीकृष्णचरण । सर्वथा जाण निघवेना ॥८८९॥
देखोनि उद्धवाचा भावो । परमानंदें तुष्टला देवो ।
यासी माझ्या ठायीं अतिस्नेहो । गुरुत्वें पहा हो अनन्य ॥८९०॥
कृपा उपजली यदुनायका । आपुले चरणींच्या पादुका ।
उद्धवासी दिधल्या देखा । तेणें निजमस्तकीं ठेविल्या ॥९९१॥
पादुका ठेवितांचि शिरीं । मी जातों कृष्णापासूनि दूरी ।
हें नाठवें उद्धवाभीतरीं । ऐशियापरी प्रबोधिला ॥९९२॥
पादुका ठेवितांचि माथा । स्वयें उपशमें अवस्था ।
नमस्करोनि श्रीकृष्णनाथा । होय निघता तदाज्ञा ॥९९६॥

उपरोक्त सर्व विवेचनाच्या साराचे सार "कुलार्णवतंत्रात" महादेवांनी पार्वतीला सांगताना स्पष्ट केल्याचे दृष्टोत्पत्तीस येते. तेथे ते असे म्हणतात की—

श्रीदेव्युवाच—
कुलेश श्रोतुमिच्छामि पादुका भक्तिलक्षणम् ।
आचारमपि देवेश वद मे करुणानिधे ॥१२.१॥
ईश्वरउवाच—
श्रृणु देवि प्रवक्ष्यामि यन्मां त्वं परिपृच्छसि ।
तस्य श्रवणमात्रेण भक्तिराशु प्रजायते ॥२॥
वाग्भवा मूलवलये सूत्राद्याः कवलीकृताः ।
एवं कुलार्णवे ज्ञानं पादुकायां प्रतिष्ठितम् ॥३॥
कोटिकोटिमहादानात् कोटिकोटिमहाव्रतात् ।
कोटिकोटिमहायज्ञात् परा श्रीपादुकास्मृतिः ॥४॥

कोटिकोटिमंत्रजापात् कोटितीर्थावगाहनात् ।
कोटिदेवार्चनाद्देवि परा श्रीपादुकास्मृतिः ॥५॥
महारोगे महोत्पाते महादोषे महाभये ।
महापदि महापापे स्मृता रक्षति पादुका ॥६॥
दुराचारे दुरालापे दुःसंगे दुष्प्रतिग्रहे ।
दुराहारे च दुर्बुद्धौ स्मृता रक्षति पादुका ॥७॥
तेनाधीतं स्मृतं ज्ञातम् इष्टं दत्तंच पूजितम् ।
जिव्हाग्रे वर्त्तते यस्य सदा श्रीपादुकास्मृतिः ॥८॥
सकृत् श्रीपादुकां देवि यो वा जपति भक्तितः ।
स सर्वपापरहितः प्राप्नोति परमां गतिम् ॥९॥
शुचिर्वाप्यशुचिर्वापि भक्त्या स्मरति पादुकाम् ।
अनायासेन धर्मार्थकाममोक्षान् लभेत सः ॥१०॥
श्रीनाथचरणांभोजं यस्यां दिशि विराजते ।
तस्यां दिशि नमस्कुर्यात् भक्त्या प्रतिदिनं प्रिये ॥११॥
न पादुकापरो मंत्रो न देवः श्रीगुरोः परः ।
न हि शास्त्रात् परं ज्ञानं न पुण्यं कुलपूजनात ॥१२॥
ध्यानमूलं गुरोर्मूर्त्तिः पूजामूलं गुरोः पदम् ।
मंत्रमूलं गुरोर्वाक्यं मोक्षमूलं गुरोः कृपा ॥१३॥
गुरुमूलाः क्रियाः सर्वा लोकेऽस्मिन् कुलनायिके ।
तस्मात् सेव्यो गुरुर्नित्यं सिद्धयर्थं भक्तिसंयुतैः ॥१४॥

देवी पार्वती म्हणाली, हे कुलेशा! दयाळू महादेवा!! गुरुपादुकांच्या बद्दल साधकाच्या अंतःकरणात भक्ती व आचार कसा असावा हे ऐकण्याची माझी इच्छा आहे; तरी आपण कृपा करून त्यासंबंधी मला सांगावे. महादेव म्हणाले, हे देवी! तू मला जो प्रश्न विचारलास त्याचे उत्तर सांगतो ते ऐक. त्याच्या केवळ श्रवणाने अंतःकरणात भक्ती उत्पन्न होते. वेदांमध्ये जशी सर्व सूत्रे आली आहेत त्याप्रमाणे कुलार्णवतंत्रामध्ये पादुकांविषयीचे सर्व ज्ञान साठविलेले आहे. कोटीकोटी महाज्ञानांपेक्षा, कोटीकोटी महव्रतांपेक्षा व कोटीकोटी महायज्ञांपेक्षा श्रीगुरुपादुकांचे स्मरण श्रेष्ठ आहे.तसेच कोटीकोटी मंत्राच्या जपाहून, कोटीकोटी पुण्यतीर्थांच्या स्नानाहून व कोटी कोटी देवांच्या पूजनाहूनही श्रीसद्गुरुनाथांच्या पादुकांचे स्मरण श्रेष्ठ आहे मोठमोठे रोग, उत्पात, दोष, भय, पाप व महाभयानक आपत्ती यांच्यापासून श्रीसद्गुरूंच्या पादुकांचे नुसते स्मरण केले तरी संरक्षण होते. तसेच दुष्टाचार, दुष्कीर्ती, दुःसंगती, दुष्टखाद्य आणि दुष्टबुद्धी यांपासूनही श्रीगुरुपादुकांचे नित्य स्मरण करणाऱ्या साधकाचे रक्षण होते. ज्या साधकाच्या जिभेवर श्रीगुरु-

पादुकांचे सतत स्मरण तरळत असते अर्थात् जो साधक वाणीने श्रीगुरुपादुकांचे सतत स्मरण करीत असतो त्याने सर्व वेदांचे अध्ययन केले, स्मृती अभ्यासल्या, सर्व देवांचे पूजन केले. सर्व काही पाहिले, यच्चयावत् सर्व काही दिले आणि समस्त जाणले असे म्हणावयास काहीही हरकत नाही, असे निश्चित समज. भक्तिभावाने एकवेळा जरी श्रीगुरुपादुकांचे स्मरण केले; तरी सर्व पातकांचा नाश होऊन साधकाला श्रेष्ठ गती मिळते. शुची किंवा अशुची अशा कोणत्याही अवस्थेत श्रीगुरुपादुकांचे साधकाने स्मरण केल्यास धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ती त्याला अगदी अनायासाने होते. श्रीगुरुचरणकमल जेथे आहेत त्या दिशेला दररोज भक्तीने नमस्कार करावा. हे पार्वती ! श्रीगुरुपादुकांच्या स्मरणापेक्षा श्रेष्ठ मंत्र नाही. श्रीगुरूपेक्षा श्रेष्ठ देव नाही. शास्त्रापेक्षा म्हणजे गुरू हेच शास्त्र व त्यापेक्षा श्रेष्ठ ज्ञान नाही आणि कुलपूजनाइतके म्हणजे कुंडलिनी शक्तीच्या पूजनाइतके श्रेष्ठ पुण्य नाही. श्रीगुरुमूर्तीचे ध्यान हे ध्यानात म्हणजे ध्येयवस्तूमध्ये श्रेष्ठ आहे; कारण ते सर्व ध्यानाचे मूळ आहेत किंवा तेच ध्यानाच्या मुळाशी आहेत. श्रीगुरुचरणपूजा ही सर्व पूजेत श्रेष्ठ पूजा आहे; कारण सर्व पूज्य वस्तूत श्रीगुरुचरण अतिशय पूज्य आहेत व त्यांचे चरण हेच सर्व पूजेचे मूळ आहे किंवा तेच पूजेच्या मुळाशी आहेत. श्रीगुरुवचन हे सर्व मंत्रांहून श्रेष्ठ आहे; कारण त्यांचा कोणताही शब्द किंवा वाक्य हे मंत्रस्वरूप असून तेच सर्व मंत्राचे मूळ आहे आणि मोक्षप्राप्तीच्या मुळाशी गुरुकृपाच अर्थात् शक्तिपातपूर्वक केलेला शक्तिसंचारच कारणीभूत आहे. हे कुलनायिके! सर्व क्रियांचे मूळ श्रीगुरूच आहेत म्हणजे या जगात श्रीगुरूंवाचून दुसरे काहीच नाही.यासाठी भक्तियुक्त अंतःकरणाने सिद्धीसाठी अर्थात् स्वसंवेद्यआत्मस्वरूपाच्या प्राप्तीसाठी श्रीगुरूंचीच सेवा करावी.

सारांश, बाह्य, आंतर व पर अशा तिन्ही प्रकारांनी श्रीगुरुभक्तिरूप साधनसंपत्तीचे वैशिष्टच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्थूल, सूक्ष्म व परपूजारूपाने सांगून कसे स्पष्ट केले आहे, ते आपण पाहिले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या लेखी याचे इतके अपरंपार महत्त्व आहे की,आपण हे वर्णन का केले हे सांगताना ते असे म्हणतात की-

जिये गुरुसेवेविखीं । माझा जीव अभिलाखी ।
म्हणौनि सोयचुकी । बोली केली ॥१३.४५६॥
येऱ्हवीं असतां हातीं खुळा । भजनावधानीं आंधळा ।
परिचर्येलागीं पांगुळा- । पासूनि मंदु ॥४५७॥
गुरुवर्णनीं मुका । आळशी पोशिजे फुका ।
परि मनीं आथी निका । सानुरागु ॥४५८॥
तेणेंचि पैं कारणें । हें स्थूळ पोसणें ।
पडलें मज म्हणे । ज्ञानदेवो ॥४५९॥

गुरुशिष्यसंबंधाची परिणिती अखेर कशात होते ? हा आपल्या विवेचनातील शेवटचा प्रश्न असून त्याचे उत्तर पाहिले म्हणजे गुरुभक्तिरूप साधनसंपत्तीला श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी इतके महत्त्व का दिले आहे व त्यांच्या लेखी गुरुभक्तीला मूर्धन्य स्थान का प्राप्त झाले आहे याचाही उलगडा होईल. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ते आमुचेनि पाडें आले। निर्वाळलेया ॥६·३२६॥" व "ते भंरवसेनि ब्रह्मत्वा येती ॥६·३३०॥" असे अगदी स्पष्टपणे सांगून श्रीगुरुशिष्य संबंधाची परिणिती अखेर सामरस्यात, स्वसंवेद्य आत्मस्वरूपाशी एकरस होण्यात व ईश्वराभिन्न अद्वैत स्थितीच्या प्राप्तीत होते, हा सिद्धांत ज्ञानेश्वरीत अनेक वेळा स्पष्ट केला आहे. "जे साम्या-परौती जगीं। प्राप्ति नाहीं ॥६·४१०॥" हेच त्यांचे वारंवार सांगणे आहे. "बाप साक्षात्काराचा वेधु। कैसा देशधडी केला बोधु। हा गुरुशिष्यसंबंधु। विपाये नांदे ॥११·३७०॥" असे अर्जुनाने जरी भयाने म्हटले असले; तरी गुरुशिष्यसंबंध नांदू नये म्हणजे ते एकरूप व्हावेत व हेच योग्य आहे, असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांना यातून सुचवावयाचे आहे. गुरुशिष्यसंबंधाची ही अंतिम परिणितीच श्रीज्ञानेश्वरमहाराजांना अपेक्षित असल्याने ते असे म्हणतात की–

**ते गुरुशिष्याची गोठी। पर्दापिडाची गांठी।**
**तेथ स्थिर राहोनि नुठीं। कवणे काळीं ॥३.२७२॥**
**म्हणौनि मन एक निश्चळ राहेल। मग आम्हांसि साम्य होईल ॥६.४१७॥**
**ना तें समुद्रचि होऊन ठेलें। तेंवि चित्ताचें चैतन्य जाहालें।**
**जेथ यातायात निमालें। घनानंद जें ॥८.८५॥**

यापेक्षा गुरुशिष्यसंबंधाच्या परिणितीचे उत्तम वर्णन कोणते असू शकेल? ही परमोच्च स्थिती आहे. वेदही या स्थितीचे "नेति नेति" वर्णन करून थकले तेथे त्याचे यापेक्षा अधिक स्पष्टीकरण करणे शक्य नाही.

अशा प्रकारे येथपर्यंत श्रीगुरुभक्तिरूप साधनसंपत्तीचा परिचय आपण अगदी सविस्तरपणे करून घेतला. याचा इतका सविस्तर विचार करण्याचे कारण श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या गुरुभक्तीत सामाविलेले आहे.

श्रीगुरूंबद्दलचे त्यांचे प्रेम जेव्हा ज्ञानेश्वरीत पावलागणिक ओसंडून जाताना दिसते व गुरुवर्णनाच्या वेळी त्यांच्या प्रतिभेला जे पालव फुटलेले दिसतात त्यावेळी असे वाटते की, ज्ञानेश्वरीचे सर्व रहस्य एका शद्वात सांगा असे जर कोणी म्हटले तर "गुरुभक्ती" एवढ्या एका शब्दातच त्याचे सुंदर व समर्पक उत्तर देता येईल. "जिये गुरुसेवेविखीं। माझा जीव अभिलाखी। म्हणौनि सोयचुकी। बोली केली ॥१३·४५६॥" असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी म्हटले आहे, तेच जर या विस्तृत विवेचनाबद्दल मी म्हटले; तर काही गैर होईल असे मला वाटत नाही." श्रीगुरु-सेवेविषयी माझ्या ठिकाणी खूप उत्कंठा आहे, त्याबद्दल मला तीव्र तळमळ आहे किंवा

त्यासाठी जीवाची जी तडफड चालली आहे ती शमविण्यासाठी म्हणून मी या गुरु-भक्तीचे अमर्याद असे वर्णन केले आहे," असे जे श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात ते गुरुसेवेने आपले जीवन धन्य करून घेतल्यावरही ज्यांच्या ठिकाणी "जिये गुरुसेवेविखीं। माझा जीव अभिलाखी ।।" अशी वृत्ती राहते त्यांनाच त्यातील रहस्य कळेल. "स्वसंवेद्यं हि तद्ब्रह्म कुमारीस्त्रीसुखं यथा ।।७·२५।।" असे जे "दक्षस्मृतीत" म्हटले आहे तो न्याय अनुभूतिशून्यतेच्या पातळीवर सर्व ज्ञानेश्वरीच्या रहस्याबद्दल लागू आहे असे म्हटले; तर ते चुकीचे ठरणार नाही.

सारांश, गुरुभक्ती ही अशा प्रकारची अनुभूतीने संपन्न असलेली सर्वश्रेष्ठ प्रकारची साधनसंपत्ती आहे हे जेव्हा पटू लागते तेव्हा "आतां उपायवनवसंतु। जो आज्ञेचा अहेवतंतु। अमूर्तचि मूर्तु। कारुण्याचा ।।२·१।।" या "अमृतानुभवातील" ओवीच्या सर्व पापुद्रयांचा यथार्थ उलगडा होऊन या साधनसंपत्तीच्या रहस्याचा भेद झाल्याचे अनुभूत होते.

## साधन चतुष्टय :—

वेदान्तशास्त्राने विषय, प्रयोजन, संबंध व अधिकारी असे अनुबंध चतुष्टय सांगून आपल्या शास्त्राची मूलभूत विभागणी स्पष्ट केली आहे. यातील अधिकारी जो आहे त्याला या शास्त्राने साधनचतुष्टयसंपन्न प्रमाता असे म्हटले आहे. ज्या बुद्धिमान पुरुषाच्या ठिकाणी ही चार प्रकाराची साधने असतात त्यालाच सिद्धी प्राप्त होते. यातील एक जरी उणे असले तरी सिद्धी प्राप्त होत नाही असा या शास्त्राचा सिद्धांत आहे. हा सिद्धांत श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी "सर्ववेदान्तसिद्धान्त-सारसंग्रहात" स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

**साधनचतुष्टयसंपत्तिर्यस्यास्ति धीमतः पुंसः।**
**तस्यैवैतत्फलसिद्धिर्नान्यस्य किंचिदूनस्य ।।१२।।**
**चत्वारि साधनान्यत्र वदन्ति परमर्षयः।**
**मुक्तिर्येषां नु सद्भावे नाभावे सिध्यति ध्रुवम् ।।१३।।**

अशा प्रकारे ऋषिमुनींनी सांगितलेली ही साधनसंपत्ती आहे. तिच्याशिवाय सिद्धी व मुक्ती मिळणे शक्य नाही. यासाठी नित्यानित्यवस्तुविवेक, वैराग्य, शमादि षट्संपत्ती व मुमुक्षत्व या चार गोष्टी साधकाजवळ असणे आवश्यक आहे असा वेदान्तशास्त्राप्रमाणे इतरही साधनशास्त्रकारांचा उद्घोष आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी ज्ञानेश्वरीत याचा आविष्कार कसा केला आहे ते यापुढे पाहवयाचे आहे.

साधन चतुष्टयसंपदेतील नित्यानित्यविवेक या साधनसंपत्तीचा प्रथम विचार करू. एकमात्र अखंड चैतन्यरूप ब्रह्मच नित्य असून त्याच्याशिवाय इतर सर्व अनित्य आहे असे जे निश्चयाचे ज्ञान असते त्यास नित्यानित्यविवेक म्हणतात.

कूटस्थ केवल परब्रह्म आहे असा जो विचार त्यास नित्यानित्यवस्तुविवेक असे म्हणतात. या दृष्टीनेच श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी " सर्ववेदान्तसिद्धांतसारसंग्रहात " याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

ब्रह्मैव नित्यमन्यत्तु ह्यनित्यमिति वेदनम् ।
सोऽयं नित्यानित्यवस्तुविवेक इति कथ्यते ।।१६।।

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीने संपूर्ण गीताशास्त्र हीच नित्यानित्यविवेक-रूपी साधनसंपत्ती असून तोच गीतेचा खरा ठेवा आहे. आपले हे म्हणणे स्पष्ट करताना ते असे म्हणतात की –

आजि श्रवणेंद्रियां पाहलें । जें येणें गीतानिधान देखिलें ।
आतां स्वप्नचि हें तुकलें । साचासरिसे ।।४.१।।
आधींचि विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी ।
आणि भक्तराजु किरिटी । परिसत असे ।।२।।

अशा प्रकारे गीतानिधान म्हणजे विवेकाची गोष्ट आहे हे स्पष्ट करून हा विवेक सद्‌गुरुकृपेने उपस्थित होतो हे सांगताना त्यांनी असे म्हटले आहे की –

मज हृदयीं सद्‌गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।
म्हणौनि विशेषें अत्यादरु । विवेकावरी ।।१.२२।।
मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं ।
तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ।।४.५४।।
जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांतु फुणगे ।
दीपले जळती दांगें । संसाराचीं ।।१६.८।।

श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीने ' नित्यानित्य ' या दोन गोष्टी एकत्र मिसळल्या असून त्यांना वेगळे करणे हेच सर्व साधनाचे सार आहे. हे नित्य-अनित्य खरे-कुडे, ज्ञान-विज्ञान, क्षेत्र–क्षेत्रज्ञ, क्षरअक्षर, प्रकृति-पुरुष किंवा जड-चेतन दूध-पाण्याप्रमाणे एकत्र भेसळले आहे. त्यांना वेगळे करण्याचे काम विवेकरूपी मंथा करीत असतो. ही जी विवेकाची क्रिया आहे किंवा उपरोक्त प्रक्रियेतील त्याचे स्थान आहे, तीच खरी विवेकाची व्याख्या आहे. या दृष्टीने श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की –

एकी ययापरी पार्था । दोक्षु क्षाळिले सर्वथा ।
आणिकीं हृदयारणीं मंथा । विवेकु केला ।।४.१३०।।
परि तेंचि ऐसेनि निवाडें । जैसें भेसळलें खरें कुडें ।
मग काढिजे फाडोवाडें । पारखूनियां ।।९.४३।।
कां चाचूचेनि सांडसें । खांडिजे पय–पाणी राजहंसें ।
तुज ज्ञान विज्ञान तैसें । वांटूनि देऊं ।।४४।।

विवेकाचे स्थान राजहंसासारखे आहे. विवेक एकदा जागृत झाला की, तो जड-चेतन या गोष्टी फाडून तोडून वेगळ्या करतो. ही फाडतोड चालली असता साधकाला खूप यातना होतात; परंतु " ऐसेनि विवेकें उदो चित्तीं । तयासी भेदु कैंचा त्रिजगतीं । देखें आपुलिया प्रतीति । जगचि मुक्त ॥५.८५॥ " याप्रमाणे विवेकामुळेच साधकाला अभेदस्थिती प्राप्त होते. अशा प्रकारे सर्वांगांनी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी विवेकाचे वर्णन केले आहे. मागे " ज्ञानेश्वरीतील नाथ-संकेतीचा दंश " या चवथ्या प्रकरणात " स्वसंवेद्य तत्त्व " या मुद्यात आपण स्वसंवेद्य तत्त्वप्राप्तीच्या प्रक्रियेतील विवेकाचे स्थान कोणते ? या प्रश्नाची जी चर्चा केली आहे ती साधसंपतीच्या चर्चानुषंगाने लक्षात घेतली म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी नित्यानित्यविवेकरूप साधनसंपत्तीचे वारंवार वर्णन का केले आहे ते स्पष्टपणे दृग्गोचर होऊन या साधनसंपतीच्या बळावर साधक ब्रह्मरूप कसा होतो हे प्रतीत होईल. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की –

**विवेकु आपलें काम । सारूनि ठाकी जें धाम ।**
**निष्कर्षाचें निःसीम । किंबहुना मी ॥१४.४०७॥**

विवेकाने आपले जडचेतनभेदाचे काम पूर्ण केले की, तोही शेवटी स्वरूपात विरून जातो. तेच परमात्म्याचे अंतिम स्थान आहे. तोच निष्कर्ष आहे. त्यामुळेच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या साधनसंपत्तीच्या प्राप्तीसाठी जी प्रार्थना केली आहे ती अपूर्व असून त्यातच तिचा महिमा स्पष्ट झाला आहे. ते म्हणतात–

**फिटो विवेकाची वाणी । हो कानामनाची जिणी ।**
**देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥१३.११६१॥**

साधन चतुष्टयसंपदेतील दुसरी महत्त्वाची गोष्ट वैराग्य किंवा विरक्ती ही असून या वैराग्याचा किंवा विरक्तीचा साधनसंपत्तीतील दर्जा फार उंच आहे. वैराग्याची व विरक्तीची व्याख्या करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी " सर्ववेदान्त-सिद्धान्तसारसंग्रहात " असे असे म्हटले आहे की–

**ऐहिकामुष्मिकार्थेषु ह्यनित्यत्वेन निश्चयात् ।**
**नैःस्पृह्यं तुच्छबुद्ध्या यत्तद्वैराग्यमितीर्यते ॥२२॥**
**नित्यानित्यपदार्थविवेकात्पुरुषस्य जायते सद्यः ।**
**स्रक्चंदनवनितादौ सर्वत्रानित्यवस्तुनि विरक्तिः ॥२३॥**
**काकस्य विष्ठावदसह्यबुद्धिर्भोग्येषु सा तीव्रविरक्तिरिष्यते ।**
**विरक्तितीव्रत्वनिदानमाहुर्भोग्येषु दोषेक्षणमेव सन्तः ॥२४॥**

या लोकातील व परलोकातील सर्व सुखे विनाशी असल्यामुळे ती तुच्छ आहेत अशा भावनेने त्या सर्व सुखाविषयी जी वितृष्णता किंवा अनिच्छा असते त्यास वैराग्य असे म्हणतात. नित्यानित्यवस्तूच्या विवेकाने भोग्य अशा चंदन,

वनितादि सर्व अनित्य पदार्थांच्या ठिकाणी पुरुषास तत्काळ वैराग्य उत्पन्न होते. सर्व पदार्थांच्या ठिकाणी काकविष्ठेप्रमाणे जी किळस उत्पन्न होते त्यास तीव्र वैराग्य म्हणतात. ज्या पदार्थांच्या ठिकाणी पुरुषास दोष दिसतात तेथे त्याची प्रवृत्ती होत नाही. म्हणून तीव्र वैराग्य प्राप्त होण्यासाठी भोग्य पदार्थांच्या ठिकाणी साधकाने दोष पाहावेत.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी तर " तरी विरक्तीवांचूनि कहीं। ज्ञानासि तगणेंचि नाहीं ॥१५.३६॥ " असे सांगून विरक्तीच्या अपरिहार्यतेचा जो महान् सिद्धांत प्रस्थापित केला आहे त्याच्या पुढेच " हें विचारूनि ठाईं। ठेविलें देवें ॥१५.३६॥ " हे सांगून प्रत्यक्ष श्रीगोपालकृष्णमहाराजांचेच हे म्हणणे आहे असे स्पष्ट केले आहे. असे सांगण्यात अंतिम ज्ञानप्राप्तीसाठी वैराग्यरूपी साधनसंपत्तीची मौलिकता किती वरच्या दर्जाची आहे, हेच त्यांना प्रतिपादन करावयाचे आहे. परमात्मा स्वतःच ज्या षड्गुणांमुळे भगवंत या संज्ञेला पात्र होतो त्यातील एक गुण वैराग्य असून तो निःसंगांचा सांगाती असल्यामुळेही साधकाजवळ ही साधनसंपत्ती आवश्यक आहे. वरील सर्व दृष्टीने आवश्यक असलेली वैराग्याची ठेव अर्जुनाजवळ असल्यामुळे त्याचे सद्गुरुनाथ त्यास दीक्षा द्यावयास सिद्ध झाले. हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

आइका यश श्री औदार्य। ज्ञान वैराग्य ऐश्वर्य।
हे साही गुणवर्य। वसती जेथ ॥६.३७॥
म्हणौनि तो भगवंतु। जो निःसंगाचा सांगातु।
तो म्हणे पार्था दत्तचित्तु। होईं आतां ॥३८॥
येथ ऐसेंचि एक विचारिलें। जे हा ब्रह्मत्वाचे डोहळे जाहले।
परी उदरा वैराग्य आहे आलें। बुद्धीचिया ॥१४८॥
एऱ्हवीं दिवस तरी अपुरे। परी वैराग्यवसंताचेनि भरें।
जें सोऽहंभाव महुरे। मोडोनि आला ॥१४९॥
म्हणौनि प्राप्तीफळीं फळतां। यासि वेळु न लगेल आतां।
होय विरक्तु ऐसा अनंता। भरंवसा जाहला ॥१५०॥

अशी ही भगवंतासम असलेली साधनसंपत्ती साधकाला कशी प्राप्त होते हे वर उल्लेखिलेल्या श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या म्हणण्याप्रमाणेच स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

आतां विरक्तीची कवण परी। जे येऊनि मनातें वरी।
हेंही सर्वज्ञें श्रीहरी। देखिलें असे ॥१५.३७॥
जे विषें रांधिली रससोये। जें जेवणारा ठाउवी होये।
तें तो ताटचि सांडूनि जाये। जयापरी ॥३८॥

तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता ।
तैं वैराग्य दवडितां । पाठी लागे ॥३९॥

अशी विरक्ती व वैराग्यरूपी साधनसंपत्ती श्रीज्ञानेश्वरमहाराजांना अपेक्षित असल्यामुळे तिची आवश्यकता प्रतिपादन करताना वारंवार ते असे म्हणतात की—

तूं ऐसा तैं होसी । जैं मोहातें यया सांडिसी ।
आणि वैराग्य मानसीं । संचरैल ॥२.२८०॥
मग निष्कळंक गहन । उपजेल आत्मज्ञान ।
तेणें निचाडें होईल मन । अपैसें तुझें ॥२८१॥
पैं चंद्रोदया आरौतें । जयांचे डोळे फुटती असते ।
ते काउळे केवीं चंद्रातें । वोळखती ? ॥४.२४॥
तैसी वैराग्याची शिव न देखती । जे विवेकाची भाष नेणती ? ।
ते मूर्ख केंवीं पवती । मज ईश्वरातें ? ॥२५॥
तरी वैराग्याचेनि आधारें । जिहीं विषय दवडूनि बाहिरें ।
शरीरीं एकंदरें । केलें मन ॥५.१५१॥

तरी अभ्यासाचेनि बळें । प्रत्याहारीं निराळें ।
नखीं लागेल ढाळें ढाळें । वैराग्याची ॥६.५७॥

ऐसें वैराग्य हें करी । तरी संकल्पाची सरे वारी ।
सुखें धृतीचिया धवळारीं । बुद्धि नांदे ॥३७७॥

एऱ्हवीं विरक्ति जयांसि नाहीं । जे अभ्यासीं न रिघती कहीं ।
तयां नाकळे हें आम्हीही । न मनूं कायी ॥४२१॥
परि वैराग्याचेनि आधारें । जरी लाविलें अभ्यासाचिये मोहरें ।
तरी केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल ॥४१९॥

जेथ वैराग्याची नाव न रिगे । विवेकाचा तागा न लागे ।
वरि कांहीं तरों ये योगें । तरी विपाय तो ॥७.९१॥
आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी ।
पुरवणी मानसीं कीं । जिती आथी ॥१३.५१३॥

परी तेचि लीला परजवे । तैसें वैराग्याचें नवें ।
अभंगबळ होआवें । बुद्धीसी गा ॥१५.२५५॥
उठिलेनि वैराग्यें जेणें । हा त्रिवर्गु ऐसा सांडणें ।
जैसें वमुनिया सुणें । आतांचि गेलें ॥२५६॥
हा ठायवरी पांडवा । पदार्थजातीं आघवा ।
विटवी तो होआवा । वैराग्य लाठु ॥२५७॥

देत सर्वस्नेहा मिठी । आगीं ऐसें वैराग्य उठी ।
स्वर्ग संसारा कांटी । काढितचि ॥१८.७८२॥
तें वैराग्यादिक तैसें । पिकलिया आत्मप्रकाशें ।
मग वैराग्येसींही नाशे । अविद्याजात ॥७९१॥
तेव्हां सागरी गंगा जैसी । आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी ।
अद्वयानंदाची आपैसी । खाणी उघडे ॥७९२॥
ऐसें स्वात्मानुभव विश्रामें । वैराग्यमूळ जें परिणमे ।
तें सात्त्विक येणें नामें । बोलिजे सुख ॥७९३॥
तैसा वैराग्यलाभु जाला । वरी सद्‌गुरुही भेटला ।
जीवीं अंकरु फुटला । विवेकाचा ॥१००१॥
भुकेलियापासीं । वोगरिलें षड्रसीं ।
तो तृप्ति प्रतिग्रासीं । लाहे जेवीं ॥१००७॥
तैसा वैराग्याचा वोलावा । विवेकाचा तो दिवा ।
आंवुथितां आत्मठेवा । काढीचि तो ॥१००८॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अशा रीतीने या साधनसंपत्तीच्या अपरिहार्यतेचे जे आवर्तन केले आहे त्याला कारण संसाराच्या रणांगणावर जी लढाई होणार आहे त्यात जय मिळण्यासाठी "वैराग्येण च गृह्यते ॥६.३५॥" व "वैराग्यं समुपाश्रितः ॥१८.५२॥" ही साधनसंपत्ती अत्यावश्यक असल्याचे भगवंतांनीच गीतेत सांगितले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या वैराग्यरूपी साधनसंपत्तीलाच वज्रांगी किंवा वज्र-कवच अगर अभेद्य चिलखत म्हणून तिची अध्यात्माच्या लढाईतील आवश्यकता अपरिहार्यतेसह स्पष्ट करताना असे म्हटले आहे की—

वीतरागतेसारिखा । जोडूनि ठेविला सखा ।
तो आघवियाचि भूमिका-। सवें चाले ॥१८.१०४३॥
पहावें दिसे तंववरी । दिठीतें न संडी दीप जरी ।
तरी कें आहे अवसरी । देखावया ॥१०४४॥
तैसें मोक्षी प्रवर्तलया । वृत्ती ब्रह्मीं जाय लया ।
तंव वैराग्य आथी तया । भंगु कैंचा ॥१०४५॥
म्हणौनि सवैराग्यु । ज्ञानाभ्यासु तो सभाग्यु ।
करूनि जाला योग्यु । आत्मलाभा ॥१०४६॥
ऐसी वैराग्याची आंगीं । बाणूनिया वज्रांगीं ।
राजयोगतुरंगीं । आरूढला ॥१०४७॥

साधक जो आत्मयज्ञ करणार असतो त्यासाठीही अग्नीच्या रूपाने वैराग्याची नितांत आवश्यकता असते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

एक संयमाग्निहोत्री । ते युक्तित्रयाच्या मंत्रीं ।
यजन करिती पवित्रीं । इंद्रियद्रव्यीं ।।४.१२६।।
एकां वैराग्य रवि विवळे । तंव संयती विहार केले ।
तेथ अपावृत जाहले । इंद्रियानळ ।।१२७।।
तिहीं विरक्तीची ज्वाळा घेतली । तंव विकारांचीं इंधनें पळिपलीं ।
तेथ आशाधूमें सांडिलीं । पांचही कुंडें ।।१२८।।
आतां अविवेकु कुमारत्वा मुकले । जयां विरक्तीचें पाणिग्रहण जाहलें ।
मग उपासना जिहीं आणिलें । योगाग्नीचें ।।१२२।।
पहिलिया वैराग्यइंधन परिपूर्तीं । इंद्रियानळीं प्रदीप्तीं ।
विषयद्रव्याचिया आहुती । देऊनियां ।।८.४८।।
पैं वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें ।
अधपलीं तवकें । इंद्रियें धरिलीं ।।१२.४६।।

वैराग्याची ही साधनसंपत्ती ईश्वराच्या उपासनेमुळेच साधकाला प्रसादरूपानें प्राप्त होते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।
पूजा केली होय अपारा । तोषालागीं ।।१८.९१७।।
म्हणौनि तिये पूजे । रिझलेनि आत्मराजें ।
वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ।।९१८।।
जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशें ।
हें सर्वही नावडे जैसें । वांत होय ।।९१९।।
जियें वैराग्य येणें बोलें । मागां संसिद्धी रूप केलें ।
किंबहुना तें आपुलें । मेळवी खागें ।।९५४।।
आणि स्वधर्माचें फळ । ईश्वरीं अर्पूनि सकळ ।
घेऊनि केलें अढळ । वैराग्यपद ।।९९५।।

सारांश, " तें हें विषयवैराग्य । जें आत्मलाभाचें सभाग्य । येणें ब्रह्मानंदा योग्य । जीव होती ।।१३.५२३।। " अशी वैराग्य किंवा विरक्तीबद्दल श्रीज्ञानेश्वरमहाराजांची धारणा असल्याने त्यांनी सिद्धांतरूपाने हे सांगताना असे म्हटले आहे की—

तरी जयाचे चोखटे मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी ।
जया निर्जेलियातें उपासी । वैराग्य गा ।।९.१८८।।
जाणिजे योगपीठीचा भैरवु । काय हा आरंभरंभेचा गौरवु ।
कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु । रूपा आला ।।६.४६२।।
परी ते व्युत्पत्ति ऐसी । जरी विरक्ति न रिगे मानसीं ।
तरी सर्वात्मका मजसीं । नव्हेचि भेटी ।।१५.३९२।।

ऐसेंनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं ।
वैराग्य मोक्षद्वारीं । उभा ठाके ॥१८.९००॥
जें सकळ भाग्याची सीमा । मोक्षलाभाची जें प्रमा ।
नाना कर्ममार्गश्रमा । शेवटु जेथ ॥९०१॥
मोक्षफळें दिधली वोल । जें सुकृततरूचें फूल ।
तयें वैराग्यीं ठेवी पाऊल । भंवरु जैसा ॥९०२॥
पाहीं आत्मज्ञानसुदिनाचा । वाधावा सांगतया अरुणाचा ।
उदयो त्या वैराग्याचा । ठावो पावे ॥९०३॥
किंबहुना आत्मज्ञान । जेणें होता ये निधान ।
तें वैराग्य दिव्यांजन । जीवें लें तो ॥९०४॥

साधन चतुष्टयातील तिसऱ्या प्रकारची महत्त्वाची साधनसंपत्ती ही शमादिषट्क आहे. शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा व समाधान या सहा गुणांना षट्संपत्ती असे म्हणतात. आपण त्यांचा क्रमशः विचार करू.

षट्कसंपत्तीतील पहिला गुण शम हा आहे. "विषयांकडून मनाला वळवून स्वरूपी ठेवणे तो शम किंवा शांती होय" अशी त्याची व्याख्या "लघुवासुदेवमननसार" या ग्रंथात प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांनी केली आहे. शास्त्रकारांनी शमाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

श्रवणादिव्यतिरिक्त विषयेभ्यो मनसः निवर्तनं शमः ॥

श्रवणादि व्यतिरिक्त विषयांपासून मनाच्या निवृत्तीस शम म्हणतात. याचा अर्थच असा आहे की, ब्रह्म व ईश्वरविषयांशिवाय शेष संसारसंबंधी सर्व विषयांपासून मन निघून ते केवळ ब्रह्म व ईश्वर यांच्याकडे लागणे यालाच शम म्हणतात.

मुळात "श्रीमद्‌भगवद्‌गीतेत" भगवंतांनी "सर्वद्वाराणि संयम्य ॥८.१२॥" असे सांगून योगाभ्यासासाठी शमाची आत्यंतिक आवश्यकता आहे असे प्रतिपादन केले आहे. पुढे 'आत्मविनिग्रहः ॥१३.७॥" असे म्हणून हा शमच ज्ञानी पुरुषाचे लक्षण कसे असते व "शमो ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥१८.४२॥" असे म्हणून शम हे ब्राह्मणजातीचे स्वभावजन्य कर्म कसे आहे हे प्रतिपादन केले आहे. वरील तिन्ही पदांचा जो भावार्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केला आहे त्यात शमाचे व्याख्येसह स्पष्टीकरण आले आहे. या दृष्टीनेच ते असे म्हणतात की –

तरी मना या बाहेरिलीकडे । यावयाची सविया सवे मोडे ।
हें हृदयाचिया डोहीं बुडे । तैसें कीजे ॥८.१११॥
परी हे तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें ।
सर्वद्वारीं कवाडें । कळासती ॥११२॥
तरी सहजे मन कोंडलें । हृदयींचि असेल उगलें ।
जैसें करचरणीं मोडलें । परिवढ न संडीं ॥११३॥

आणि इसाळु जैसा घरा । कां दंदिया हतियेरा ।
न विसंबे भांडारा । बद्धकु जैसा ॥१३.५०२॥
कां एकलौतिया बाळका । वरि पडौनि ठाके अंबिका ।
मधुविषीं मधुमक्षिका । लोभिणी जैसी ॥५०३॥
अर्जुना जो यापरी । अंतःकरण जतन करी ।
नेदी उभें ठाकों द्वारीं । इंद्रियांच्या ॥५०४॥
म्हणे काम बागुल ऐकेल । हे आशा सियारी देखैल ।
तरी जीवा टेंकैल । म्हणौनि बिहे ॥५०५॥
बाहेरी धीट जैसी । दाटुगा पती कळासी ।
करी टेहणी तैसी । प्रवृत्तीसी ॥५०६॥
सचेतनी वाणेपणें । देहासकट आटणें ।
संयमावरीं करणें । बुझूनि घाली ॥५०७॥
मनाचिया महाद्वारीं । प्रत्यहाराचिया ठाणांतरीं ।
जो यमदम शरीरीं । जागवी उभे ॥५०८॥
आधारीं नाभीं कंठीं । बंधत्रयाची घरटीं ।
चंद्रसूर्य संपुटीं । सूये चित्त ॥५०९॥
समाधीचे शेजेपासीं । बांधोनि घाली ध्यानासी ।
चित्त चैतन्य समरसी । आंतु रते ॥५१०॥
अगा अंतःकरणनिग्रहो जो । तो हा हें जाणिजो ।
हा आथी तेथ विजयो । ज्ञानाचा पैं ॥५११॥
तरी सर्वेंद्रियांचिया वृत्ती । घेऊनि आपुल्या हातीं ।
बुद्धि आत्मया मिळे येकांतीं । प्रिया जैसी ॥१८.८३३॥
ऐसा बुद्धीचा उपरमु । तया नाम म्हणिपे शमु ॥८३४॥

या शमरूपी साधनसंपत्तीचेच अधिक वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

या विषयांवांचूनि कांहीं । आणीक सर्वथा रम्य नाहीं ।
ऐसा स्वभावोचि पाहीं । इंद्रियांचा ॥२.१२०॥
हे विषय तरी कैसे । रोहिणीचें जळ जैसें ।
कां स्वप्नींचा आभासे । भद्रजाति ॥१२१॥
देखें अनित्य तियापरी । म्हणौनि तूं अव्हेरीं ।
हा सर्वथा संगु न धरीं । धनुर्धरा ॥१२२॥
कां कूर्म जियापरी । उवाइला अवेव पसरी ।
ना तरी इच्छावशें आवरी । आपुले आपण ॥२०१॥

तैसीं इंद्रियें आपैतीं होती। जयाचें म्हणितलें करिती।
तयाची प्रज्ञा जाण स्थिति। पातली असे ॥३०२॥
आतां आत्मप्रभा नीच नवी। तेचि करूनि ठाणदिवी।
जो इंद्रियांतें चोरूनि जेवी। तयासीची फावे ॥६.२३॥
हे सर्वस्व आमुचें गूढ। परि दाविलें तुज उघड।
आतां इद्रियां देऊनि कवाड। हृदयीं भोगीं ॥२.१३५॥

शमरूपी साधनसंपत्तीचे हे महत्त्व असल्याने तिचे स्वरूपात्मक माहात्म्य पटविताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

एऱ्हवीं इंद्रियांचिया अर्थी—। सारिखा विषो पोखितां।
संतोषु कीर चित्ता। आपजेल ॥३.२१०॥
परी तो संवचोराचा सांगातु। जैसा नावेक स्वस्थु।
जंव नगराचा प्रांतु। सांडिजेना ॥२११॥
बापा विषाची मधुरता। झणे आवडी उपजे चित्ता।
परी तो परिणामु विचारितां। प्राणु हरी ॥२१२॥
देखें इंद्रियीं कामु असे। तो लावी सुखदुराशे।
जैसा गळीं मीनु आमिषें। भुलविजे गा ॥२१३॥
परी तयामाजीं गळु आहे। जो प्राणातें घेऊनि जाये।
तो जैसा ठाउवा नोहे। झांकलेपणें ॥२१४॥
तैसें अभिलाषें येणें कीजेल। विषयांची आशा धरिजेल।
तरी वरपडा होईजेल। क्रोधानळा ॥२१५॥
जैसा कवळोनियां पारधी। घातेचिये संधी।
आणी मृगातें बुद्धि। साधावया ॥२१६॥
एथ तैसेचि परी आहे। म्हणौनि संगु हा तुज नोहे।
पार्था दोन्ही कामक्रोध हे। घातुक जाणें ॥२१७॥
म्हणौनि हा आश्रोचि न करावा। मनेंहि आठवो न धरावा।
एकु निजवृत्तीचा वोलावा। नासों नेदो ॥२१८॥

षट्‌कसंपत्तीतील दुसरा गुण दम हा आहे. "लघुवासुदेवमननसार" या ग्रंथात प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांनी दमाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की, "बाह्येंद्रियांचा निग्रह करणे किंवा ती स्वाधीन ठेवणे म्हणजे दम होय." शास्त्रकारांनीही दमाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

**बाह्येंद्रियाणां श्रवणादिव्यतिरिक्त विषयेभ्यो निवर्तनं दमः।**

श्रवणादि व्यतिरिक्त विषयांपासून बाह्येंद्रियांची निवृत्ती यास दम म्हणतात.

शमामध्यें इंद्रियांना किंवा मनाला विषयांकडून वळवून आत्मस्वरूपात स्थिर करण्याच्या क्रियेवर भर असतो तर दमामध्ये मनाचा व इंद्रियांचा हठपूर्वक निग्रह असतो. इंद्रिये ही स्वभावतः बाह्य विषयांकडे धावतात. "कठोपनिषदात" असे म्हटले आहे की, "परमेश्वराने चक्षुरादि इंद्रिये बाह्य विषयांच्या ठिकाणीच प्रवृत्त होणारी अशी निर्माण केली आहेत. त्यामुळे ती आत्म्याकडे प्रवृत्त न होता बहिर्विषयांकडेच धावत असतात; परंतु ब्रह्मचर्यादि साधनसंपन्न,जितेंद्रिय व मोक्षाची इच्छा करणारा असा एखादाच महापुरुष स्वाभाविक अशा इंद्रियांच्या प्रवाहाचा निरोध करून प्रत्यगात्मप्रवण होतो. त्यामुळे त्याला आत्मसाक्षात्कार होतो." पाण्याचा प्रवाह स्वाभाविकपणे सखल भूमीकडे असतो. तो प्रवाह जर वर चढवावयाचा असेल; तर त्या प्रवाहाला बांध घालावा लागतो. त्यासाठी प्रथम बाह्य इंद्रियांचा निरोध केल्याशिवाय मनोनिग्रह होत नाही. यासाठी दमरूपी साधनसंपत्तीची आवश्यकता असते.

"श्रीमद्भगवद्गीतेत" दैवीसंपत्तीचे लक्षण सांगताना व ब्राह्मणाच्या स्वाभाविक कर्माचा उल्लेख करताना "दमः ।।१६.१।।, ।।१८.४२।।" या साधनसंपत्तीचा भगवंतांनी उल्लेख केला आहे. त्याचा भावार्थ व्याख्येसह स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

हें असो आइक चिन्ह । दमाचें तें ।।१६.८८।।
तरी विषयेंद्रियां मिळणी । करूनि घापे वितुटणी ।
जैसें तोडिजे खड्गपाणी । पारकेया ।।८९।।
तैसा विषयजातांचा वारा । वाजों नेदिजे इंद्रियद्वारां ।
इयें बांधोनि प्रत्याहारा । हातीं वोपी ।।९०।।
आंतुला चित्ताचें अंगवरी । प्रवृत्ति पळे पर बाहेरी ।
आगी सुयिजे दाहींहि द्वारीं । वैराग्याची ।।९१।।
श्वासोश्वासाहुनी बहुवसें । व्रतें आचारे खरपुसें ।
वोसंतिता रात्रिदिवसें । नाराणुक जया ।।९२।।
पैं दमु ऐसा म्हणिपे । तो हा जाण स्वरूपें ।।९३।।
आणि बाह्येंद्रियांचें धेंडें । पिटूनि विधीचेनि दंडें ।
नेदिजे अधर्माकडे । कहींचि जावों ।।१८.८३५।।
तो पैं गा शमा विरजा । दमु गुण जेथ दुजा ।
आणि स्वधर्माचिया वोजा । जिणें जें कां ।।८३६।।

अशा प्रकारचे विषयांचे निर्दाळणच योगनिष्ठेस कारण असून तोच आत्मबोधयुक्त होण्याचा एकमात्र उत्तम मार्ग आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. हे निर्दाळण किंवा निष्कासन पूर्णांशाने अपेक्षित असल्याचे स्पष्ट करताना ते असे म्हणतात की–

म्हणौनि आइकें पार्था । यांतें निर्दाळी जो सर्वथा ।
सर्व विषयीं आस्था । सांडूनियां ॥२.३१५॥
तोचि तूं जाण । योगनिष्ठेसी कारण ।
जयाचे विषयसुखें अंतःकरण । झकवेना ॥३१६॥
जो आत्मबोधयुक्तु । होऊनि असे सततु ।
जो मातें हृदयाआंतु । विसंबेना ॥३१७॥
येऱ्हवीं बाह्य विषय तरी नाहीं । परी मानसीं होईल जरी कांहीं ।
तरी साद्यंतुचि पाहीं । संसारु असे ॥३१८॥
जैसा कां विषाचा लेशु । घेतलियां होय बहुवसु ।
मग निभ्रांत करी नाशु । जीवितासी ॥३१९॥
तैसी विषयाची शंका । मनीं वसती देखा ।
घातु करी अशेखा । विवेकजाता ॥३२०॥

सारांश, दमाची म्हणजे इंद्रियांच्या निर्दाळणाची किंवा त्यांना दडपून नाहीसे करण्याची नितांत आवश्यकता आहे; कारण त्याशिवाय ब्रह्मीचे स्वराज्य प्राप्त होत नाही असा अटळ सिद्धांत असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

म्हणौनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें ।
या कारणें इंद्रियांचें । दमन निकें ॥२.३४७॥
म्हणौनि इंद्रियें एकें । जाणतेनीं पुरुखें ।
लाळावीं ना कौतुकें । आदिकरुनी ॥३.२०२॥
हां गा सर्पेसीं खेळों येईल ? । कीं व्याघ्रसंसर्ग सिद्धि जाईल ?।
सांगें हाळाहाळ जिरेल । सेविलिया काई ? ॥२०३॥
देखें खेळतां अग्नी लागला । मग तो न सांवरे जैसा उधवला ।
तैसा इंद्रियां लळा दिधला । भला नोहे ॥२०४॥
यांचा पहिला कुरुठा इंद्रियें । एथूनि प्रवृत्ति कर्मातें विये ।
आधीं निर्दाळूनि घाली तियें । सर्वथैव ॥२६८॥
मग मनाचीं धांव पारुषेल । आणि बुद्धीची सोडवण होईल ।
इतुकेन थारा मोडेल । या पापियांचा ॥३६९॥
हे अंतरींहूनि जरी फिटले । तरी निभ्रांत जाण निवटले ।
जैसे रश्मीवीण उरलें । मृगजळ नाहीं ॥२७०॥
तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें ।
मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥२७१॥

षट्संपत्तीतील तिसरा गुण उपरती हा असून त्याचा अर्थ औदासीन्य असा आहे. विषयप्रवृत्तीची एकवेळा निवृत्ती झाल्यावर पुन्हा ती प्रवृत्ती जागृत न होणे

याला उपरती म्हणतात. शास्त्रकारांनी उपरतीची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

**निर्वतितानां तेषां तद्व्यतिरिक्तविषयेभ्य उपरमणउपरतिः ॥**

मनादि सर्व इंद्रिये आत्मप्राप्तीशिवाय सर्व बाबतीत उदासीन होणे याला उपरती म्हणतात. याचा अर्थ असा की, शमदमादि साधनांनी बहिर्विषयांपासून निवृत्त केलेली जी इंद्रिये आहेत, त्या इंद्रियांचा श्रवणादिव्यतिरिक्त विषयांकडे जो स्वाभाविक प्रवृत्तिप्रवाह असतो, तो वळवून आत्मस्वरूपाच्या ठिकाणी मन स्थिर करणे, याला उपरती असे म्हणतात. थोडक्यात चित्तवृत्तीला बाह्यविषयांचा आश्रय न देणे हे उपरतीचे स्वरूप आहे.

"श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी "असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ॥१३.९॥" व "सर्वारंभपरित्यागी ॥१४.२५॥,॥१२.१६॥" असे म्हणून उपरती या गुणाचा उल्लेख केला आहे. याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की—

**तरि जो या देहावरी। उदासु ऐसिया परी।**
**उखिता जैसा बिढारीं। बैसला आहे ॥१३.५९४॥**
**कां वृक्षाची साउली। वाटे जातां मीनली।**
**घरावरी तेतुली। आस्था नाहीं ॥५९५॥**
**साउली सरिसीच असे। परी असे हें नेणिजे जैसें।**
**स्त्रियेचें तैसें। लोलुप्य नाहीं ॥५९६॥**
**आणि प्रजा जे जाली। तियें वस्ती कीर आलीं।**
**कां गोरुवे बैसलीं। रुखातळीं ॥५९७॥**
**जो संपत्तीमाजीं असतां। ऐसा गमे पंडुसुता।**
**जैसा कां वाटे जातां। साक्षी ठेविला ॥५९८॥**
**आणीकही एकु पाहीं। आचारु तयाच्या ठायीं।**
**तरी व्यापारासि नाहीं। जालें दिसे ॥१४.३६५॥**
**सर्वारंभा उटकलें। प्रवृत्तीचें तेथ मावळलें।**
**जळती गा कर्मफळें। ते तो आगी ॥३६६॥**
**दृष्टादृष्टाचेनि नांवें। भावचि जींवीं नुगवे।**
**सेवी जें कां स्वभावें। पैठें होय ॥६६७॥**
**सुखे ना शिणे। पाषाणु कां जेणें मानें।**
**तैसीं सांडीमांडी मनें। वर्जिली असे ॥६६८॥**

आणि कर्मारंभालागीं । जया अहंकृती नाहीं अंगीं ।
जैसें निरिंधन आगी । विझोनि जाय ।।१२.१८३।।
तैसा उपशमुचि भागा । जयासी आला पैं गा ।
जो मोक्षाचिया आंगा । लिहिला असे ।।१८४।।

उपरतीचा अर्थ प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेंस्वामीमहाराज यांनी "लघुवासुदेवमननसार" या ग्रंथात "संन्यास व तो न घडेल तर निष्काम कर्मानुष्ठान किंवा व्यवहारलोप करणे," असा केला आहे. भगवंतांनी गीतेत संन्यासी कोण आहे याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टी न कांक्षति ।
निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ।।५.३।।

अर्जुना ! जो कशाचाही द्वेष करीत नाही व कशाचीही आसक्ती ठेवीत नाही, तोच नित्यसंन्यासी समजावा. कारण द्वंद्वरहित झालेला पुरुष बंधनापासून अनायासाने सर्वथा मुक्त होतो. ही जी नित्यसंन्यासाची स्थिती आहे तीच उपरती होय. उपरोक्त श्लोकाचा हा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

तरी गेलियाची से न करी । न पवतां चाड न धरी ।
जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा ।।५.१९।।
आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण ।
पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ।।२०।।
जो मनें ऐसा जाहला । संगीं तोचि सांडिला ।
म्हणौनि सुखें सुख पावला । अखंडित ।।२१।।
आतां गृहादिक आघवे । तें कांहीं नलगे त्यजावें ।
जें घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणौनि ।।२२।।
देखें अग्नि विझोनी जाये । मग जे राखोंडी केवळु होये ।
तें ते कापुसें गिवसूं ये । जियापरी ।।२३।।
तैसा असतेनि उपाधी । नाकळिजे तो कर्मबंधीं ।
जयाचिये बुद्धी । संकल्पु नाहीं ।।२४।।
म्हणौनि कल्पना जें सांडे । तैंचि गा संन्यासु घडे ।
इयें कारणें दोनी सांगडे । संन्यासयोगु ।।२५।।

सारांश, निष्कामकर्मानुष्ठानात्मक संन्यास म्हणजे उपरती होय असा सिद्धांत मांडून मी व माझे ही कल्पना नाहीशी होणे हे त्याचे खरे स्वरूप आहे असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे.

षट्कसंपत्तीतील चवथा गुण तितिक्षा हा आहे. शास्त्रकारांनी तितिक्षेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**शीतोष्णादिद्वंद्वसहिष्णुता तितिक्षा ।**
**सहनं सर्व दुःखानां अप्रतिकारपूर्वकम् ।**
**चिंता विलाप रहितं सा तितिक्षा निगद्यते ।।पंचदशी।।**
**अध्यात्मिकादि यद्दुःखं प्राप्तं प्रारब्धवेगतः ।**
**अचिंतया तत्सहनं तितिक्षेति निगद्यते ।।१३७।।सर्ववेदान्तसिद्धांतसारसंग्रह।।**

शीतोष्ण, मानापमान, लाभालाभ, जयाजय, सुखदुःख इत्यादि सर्व प्रकारची द्वंद्वे सहन करणे याला तितिक्षा म्हणतात. चिंता, विलाप व कोणत्याही प्रकारचा प्रतिकार न करता सर्व दुःखे सहन करणे याला तितिक्षा म्हणतात, अशी व्याख्या श्रीविद्यारण्यमहामुनींनी पंचदशी या ग्रंथात केली आहे. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक इत्यादि जी दुःखे प्रारब्धामळे येतात ती चिंता न करता सहन केली असता त्याला तितिक्षा म्हणतात, अशी व्याख्या सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रहामध्ये श्रीमदाद्यशंकराचार्य यांनी केली आहे.

" श्रीमद्भगवद्गीतेत " तितिक्षा या गुणाचा उल्लेख भगवंतांनी समचित्तत्व किंवा निर्द्वंद्वता या नावांनी पुढीलप्रमाणे केला आहे.ते असे म्हणतात की, "दु.खेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।।२.५६।।, समदुःखसुखः ।। १२.१३ ।।, हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो ।। १२.१५ ।।, समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः । शीतोष्णसुखदुःखेषु समः ।। १२.१८ ।।, तुल्यनिंदास्तुतिः ।। १२.१९ ।।, समदुःखसुखः ।। १४.२४ ।।, समलोष्टाश्मकांचनः ।। १४.२४ ।।, तुल्यप्रियाप्रियो ।। १४.२४ ।।, तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ।। १४.२४ ।।, मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।।१४.२५।।" व " समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ।।१३.९।।"

साधकाचे मन दुःखाने उद्विग्न होत नाही व सुखाबद्दल त्याला आसक्ती नसते. त्याला सुख व दुःख सारखे असते. तो हर्ष, क्रोध, भय व त्रास या सर्वांपासून मुक्त असतो. शत्रु व मित्र, मान व अपमान, शीत व उष्ण आणि सुख व दुःख ही त्याला समान असतात. निंदा व स्तुती या दोन्ही गोष्टी त्याला सारख्याच असतात. त्याला सुखदुःख आणि माती, दगड व सोने सारखेच असते. प्रिय व अप्रिय, निंदा व स्तुती, मान व अपमान आणि मित्र व शत्रू ही द्वंद्वे त्याला नसतात. या सर्वांचा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी व्याख्येसह जो भावार्थ स्पष्ट केला आहे तो पाहिला म्हणजे तितिक्षा या गुणाची उंची अध्यात्मक्षेत्रात अर्थात् सिद्धयोगसाधनशास्त्रात साधनसंपत्तीच्या दृष्टीने किती वरच्या दर्जाची आहे हे लक्षात येईल. ते असे म्हणतात की –

**नाना दुःखीं प्राप्तीं । जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं ।**
**आणि सुखाचिया आर्ती । अडपैजेना ।।२.२९४।।**

ऐसा जो निरवधि । तो जाण पां स्थिरबुद्धि ।
जो निरसूनि उपाधि । भेदरहितु ।।२९६।।
सुख दुःख जाणणें । नाहीं जया ।।१२.१४९।।
जगचि देह जाहलें । म्हणौनि प्रियाप्रिय गेलें ।
हर्षामर्ष ठेलें । दुजेनविण ।।१६८।।
ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु । भयोद्वेगरहितु ।।१६९।।
पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं ।
रिपुमित्रां दोहीं । सरिसा पाडु ।।१९७।।
कां घरींचियां उजियेडु करावा । पारखियां आंधारु पाडावा ।
हें नेणेंचि गा पांडवा । दीपु जैसा ।।१९८।।
जो खांडावया घावो घाली । कां लावणी जयानें केली ।
दोघां एकचि साउली । वृक्षु दे जैसा ।।१९९।।
नातरी इक्षुदंडु । पाळितया गोडु ।
गाळितया कडु । नोहेंचि जेवीं ।।२००।।
अरिमित्रीं जैसा । अर्जुना जया भावो ऐसा ।
मानापमानीं सरिसा । होतु जाय ।।२०१।।
तिहीं ऋतूं समान । जैसें कां गगन ।
तैसा एकचि मान । शीतोष्णीं जया ।।२०२।।
दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पंडुसुता ।
तैसा सुखदुःखप्राप्तां । मध्यस्तु जो।।२०३।।
माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका ।
तैसा जो सकळिकां । भूतां समु ।।२०४।।
जो निंदेतें नेघे । स्तुति न श्लाघे ।
आकाशा न लगे । लेपु जैसा ।।२०७।।
तैसे निंदे आणि स्तुति । मानु करूनि एके पांती ।
विचरे प्राणवृत्ती । जनीं वनीं ।।२०८।।
तेवीं आपणपांचि जया । वस्ती जाली गा धनंजया ।
तया देहीं अपैसया । सुख तैसें दुःख ।।१४.३५४।।
रात्रि तैसें पाहलें । हें धारणा जेवीं एक जालें ।
आत्माराम देहीं आतलें । द्वंद्व तैसें ।।३५५।।
पैं निद्रिताचेनि आंगेशीं । साप तैशी उर्वशी ।
तेवीं स्वरूपस्था सरिशीं । देहीं द्वंद्वें ।।३५६।।
म्हणौनि तयाच्या ठायीं। शेणा सोनया विशेष नाहीं ।
रत्ना गुंडेया कांहीं । नेणिजे भेदु ।।३५७।।

महासिंधु जैसें। ग्रीष्मवर्षीं सरिसे।
इष्टानिष्ट तैसें। जयाच्या ठायीं ॥१३.६०१॥
कां तिन्ही काळ होतां। त्रिधा नव्हे सविता।
तैसा सुखदुःखीं चित्ता। भेदु नाहीं ॥६०२॥

सारांश, तितिक्षा ही शीतोष्णादि सर्व प्रकारची द्वंद्वे सहन करण्यात सामावि-लेली असल्यामुळे समचित्तत्व हे तिचे स्वरूप आहे.

षट्कसंपत्तीतील पाचवा गुण श्रद्धा हा आहे. "सर्ववेदान्तसिद्धान्तसार-संग्रहामध्ये" श्रीमदाद्यशंकराचार्यांनी श्रद्धेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

गुरुवेदान्तवाक्येषु बुद्धिर्या निश्चयात्मिका।
सत्यमित्येव सा श्रद्धा निदानं मुक्तिसिद्धये ॥२१०॥

गुरू व वेदान्त वाक्य ह्या मुक्तीच्या सिद्धीला कारणीभूत होणाऱ्या सत्य गोष्टी आहेत अशी ज्याची निश्चयात्मक बुद्धी असते तिला श्रद्धा म्हणतात. वेदांनी "श्रद्धापत्नी व श्रद्धावित्तो" म्हणून श्रद्धेचा गौरव केला आहे. "श्रद्धावीर्यस्मृति-समाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम् ॥ ३० ॥" असे भगवान् पतंजलींनी "योगदर्शनातील" समाधिपादात सूत्र घालून ज्यांना नैसर्गिक, स्वयमेव व काही साधन केल्याशिवाय निरोध होत नाही ते लोक श्रद्धा, वीर्य, स्मृती, समाधी आणि प्रज्ञा या पाच गुणांच्या साहाय्याने कैवल्य अवस्था प्राप्त करून घेतात, असे म्हटले आहे. श्रीगुलाबरावमहाराजांनी श्रद्धेला माता म्हटले असून तिच्यामुळेच ऋतंभरा प्रज्ञा प्राप्त होते हे स्पष्ट केले आहे.

सिद्धयोगसाधनशास्त्रात श्रद्धेची साधनसंपत्ती साधकाजवळ असणे नितांत आवश्यक असल्याने भगवंतांनी "श्रीमद्भगवद्गीतेत" अन्वय-व्यतिरेक अशा दोन्ही पद्धतीने श्रद्धेची आवश्यकता प्रतिपादन करताना असे म्हटले आहे की–

श्रद्धावाँल्लभते ज्ञानं ॥४.३९॥
अश्रद्दधानश्च विनश्यति ॥४.४०॥
योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना।
श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥६.४७॥
अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥९.३॥
सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥१७.३॥
अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत्।
असदित्युच्यते पार्थ न च तत् प्रेत्य नो इह ॥१७.२८॥

श्रद्धावान् साधकालाच ज्ञान प्राप्त होते. जो साधक श्रद्धावान् नसतो त्याचा नाश होतो. सर्व साधकयोग्यांमध्ये जो माझ्या ठिकाणी अंतःकरण लावून श्रद्धेने मला निरंतर भाजतो तो योगी मला सर्वात श्रेष्ठ वाटतो. हे शत्रूला ताप देणाऱ्या अर्जुना ! ज्यांच्या अंतःकरणात या उपासनारूपी सिद्धयोगशास्त्राच्या धर्मावर श्रद्धा नसते त्यांना माझी प्राप्ती होत नसल्यामुळे ते जन्ममृत्युरूप संसारमार्गात फिरत राहतात. हे अर्जुना ! सर्वांची श्रद्धा त्यांच्या त्यांच्या प्रकृतिस्वभावानुसार बनलेली असते. हा मनुष्यप्राणी श्रद्धाशीलच आहे. ज्याची जशी श्रद्धा असेल तशाच प्रकृतीचा तो असतो. हे अर्जुना ! अश्रद्धेने केलेले हवन, दिलेले दान, आचारलेले तप किंवा इतर कोणतेही कर्म असत् असे म्हटले जाते. ते परलोकात उपयोगी पडत नाही व इहलोकातही फल देत नाही.याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

जो मनासीं चाड न सांगे । जो प्रकृतीचें केलें नेघे ।
जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहला ।।४.१८७।।
पाहे पां दूध पवित्र आणि गोड । पासी त्वचेचिया पदराआड ।
परि तें अव्हेरूनि गोचिड । अशुद्ध काय न सेवती ? ।।९.५७।।
कां कमलकंदा आणि दर्दुरी । नांदणूक एकेचि घरीं ।
परि परागु सेविजे भ्रमरीं । येरां चिखलुचि उरे ।।५८।।
नातरी निदैवाच्या परिवरीं । लोह्या रुतलिया आहाति सहस्रवरी ।
परि तेथ बैसोनि उपवासु करी । कां दरिद्रें जिये ।।५९।।
तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्वसुखाचा आरामु ।
कीं भ्रांतासी कामु । विषयावरी ।।६०।।
बहु मृगजळ देखोनि डोळां । थुंकिजे अमृताचा गिळितां गळाळा ।
तोडिला परिसु बांधिला गळां । शुक्तिकालाभें ।।६१।।
तैसी अहंममतेचिये लवडसवडी । मातें न पवतीचीं बापुडीं ।
म्हणौनि जन्ममरणाची दुथडीं । डहुळतें ठेलीं ।।६२।।
एवं सत्त्वरजतमा–। वेगळी श्रद्धा सुवर्मा ।
नाहीं गा जीवग्रामा–। माजीं यया ।।१७.६६।।
म्हणौनि श्रद्धा स्वाभाविक । असे पैं त्रिगुणात्मक ।
रजतमसात्त्विक । भेदीं इहीं ।।६७।।
ना सांडूनि हे सोये । मोडूनि श्रद्धेची बाहे ।
दुराग्रहाची त्राये । वाढऊनियां ।।४१४।।
मग अश्वमेध कोडी कीजे । रत्नें भरोनि पृथ्वी दीजे ।
एकांगुष्ठींही तपिजे । तपसाहस्रीं ।।४१५।।

जळाशयाचेनि नांवें । समुद्रही कीजती नवे ।
परी किंबहुना आघवें । वृथाचि ते ॥४१६॥

सारांश, " यः श्रद्धावान् पूत एव सः ॥" असे " महाभारतात " म्हटले आहे ते लक्षात घेतले म्हणजे या साधनसंपत्तीचे माहात्म्य किती मोठे आहे हे कळते.

षट्कसंपत्तीतील सहावा गुण समाधान हा आहे. ईश्वराच्या ठिकाणी चित्ताची एकाग्रता होणे याला समाधान म्हणतात. श्रीसंत तुकाराममहाराजांनी " सदा राहे समाधान । हेचि देवाचें दर्शन ॥" असे म्हणून या गुणाचा महिमा गाईला आहे व " ठेविलें अनंतें तैसेचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥ " असे म्हणून साधकाने प्रयत्नाने हे समाधान अंगी बाणवून घेतले पाहिजे हे सांगितले आहे. " सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रहात " श्रीमदाद्यशंकराचार्यांनी समाधानाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की –

श्रुत्युक्तार्थवगाहाय विदुषा ज्ञेयवस्तुनि ।
चित्तस्य सम्यगाधानं समाधानमितीर्यते ॥२१८॥

श्रुतीच्या अर्थाचे पूर्ण अध्ययन करून ज्ञानी मनुष्याच्या चित्ताची ज्ञेय वस्तूच्या ठिकाणी जी सम्यक् धारणा होते त्याला समाधान असे म्हणतात. " श्रीमद्भगवद्गीतेत " भगवंतांनी या गुणाचे दर्शन प्रसाद, प्रसन्नचित्त व स्थैर्य या शब्दातून निर्दिष्ट करताना असे म्हटले आहे की–

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥२.६५॥
स्थैर्यं ज्ञानम् इति प्रोक्तम् ॥१३.७॥
मनःप्रसादः एतत् मानसं तपः ॥१७.१६॥

साधकाला समाधान प्राप्त झाल्यावर त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो. कारण प्रसन्नचित्त पुरुषाची बुद्धी तत्काळ सर्व बाजूंनी स्थिर होते. बुद्धी स्थिर अर्थात् समाधानी ठेवणे याला ज्ञान असे म्हणतात. अंतःकरण प्रसन्न ठेवणें याला मानस तप असे म्हणतात. याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की–

देखैं अखंडित प्रसन्नता । आथी जेथ चित्ता ।
तेथ रिगणें नाहीं समस्ता । संसारदुःखा ॥२.३३८॥
जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु ।
तया क्षुधेतृषेचा अडदरु । कहींचि नाहीं ॥३३९॥
तैसें हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें कें आहे ? ।
तेथ आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥३४०॥
जैसा निर्वातीचा दीपु । सर्वथा नेणें कंपु ।
तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु । योगयुक्तु ॥३४१॥

आणि स्थिरता साचें। घर रिघाली जयाचें।
तो पुरुष ज्ञानाचें। आयुष्य गा ॥१३.४८५॥
देह तरी वरिचिलीकडे। आपुलिया परी हिंडे।
परी बैसका न मोडे। मानसींची ॥४८६॥
वत्सावरूनि धेनूचे। स्नेह राना न वचे।
नव्हती भोग सतियेचे। प्रेमभोग ॥४८७॥
कां लोभिया दूर जाये। परी जीव ठेविलाची ठाये।
तैसा देहो चाळितां नव्हे। चळु चित्ता ॥४८८॥
जातया अभ्रासवें। जैसें आकाश न धांवे।
भ्रमणचक्रीं न भंवे। ध्रुव जैसा ॥४८९॥
पांथिकाचिया येरझारा। सवें पंथु न वचे धनुर्धरा।
कां नाहीं जेवीं तरुवरां। येणें जाणें ॥४९०॥
तैसा चळणवळणात्मकीं। असोनि ये पांचभौतिकीं।
भूतोर्मी एकीं। चळिजेना ॥४९१॥
वाहुटळीचेनि बळें। पृथ्वी जैसी न ढळे।
तैसा उपद्रव उमाळें। न लोटे जो ॥४९२॥
दैन्यदुःखीं न तपे। भयशोकीं न कंपे।
देहमृत्यु न वासिपे। पातलेनी ॥४९३॥
आर्ति आशा पडिभरें। वय व्याधी गजरें।
उजू असतां पाठिमोरें। नव्हे चित्त ॥४९४॥
निंदा निस्तेज दंडी। कामलोभा वरपडी।
परी रोमा नव्हे वांकुडी। मानसाची ॥४९५॥
आकाश हें वोसरो। पृथ्वी वरि विरो।
परी नेणें मोहरों। चित्तवृत्ती ॥४९६॥
हाती हाला फुलीं। पासवणा जेवीं न घाली।
तैसा न लोटे दुर्वाक्यशेलीं। शेलिला सांता ॥४९७॥
क्षीरार्णवाचिया कल्लोळीं। कंपु नाहीं मंदराचळीं।
आकाश न जळे जाळीं। वणवियाच्या ॥४९८॥
तैसा आल्या गेल्या ऊर्मी। नव्हे गजबज मनोधर्मी।
किंबहुना धैर्य क्षमी। कल्पांतींही ॥४९९॥
परी स्थैर्य ऐसी भाष। बोलिजे जे सविशेष।
ते हे दशा गा देख। देखणया ॥५००॥
तरी सरोवर तरंगीं। सांडिलें आकाश मेघीं
कां चंदनाचें उरगीं। उद्यान जैसें ॥१७.२२५॥

**नाना कळावैषम्यें चंद्र । कां सांडिला आधी नरेंद्रु ।**
**ना तरी क्षीरसमुद्रु । मंदारचळें ॥२२६॥**
**तैसीं नाना विकल्पजाळें । सांडूनि गेलिया सकळें**
**मन राहे कां केवळें । स्वरूपें जें ॥२२७॥**

सारांश, श्रीसमर्थ रामदासस्वामीमहाराजांनी "दासबोधात" म्हटल्याप्रमाणे "समाधाना एवढे थोर नाहीं ॥ १९.९.३० ॥" हे नितांत सत्य असल्याने व समाधान ही साधनसंपत्तीतील अपूर्व व उंच गोष्ट असल्याने "श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला । समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥२.५३॥" असे म्हणून "श्रीमद्‍भगवद्‍गीतेत" भगवंतांनी तिचा गौरव केला आहे. अनेक साध्यसाधनसंबंध दाखविणाऱ्या श्रवणांनी विक्षिप्त झालेली साधकाची बुद्धी जेव्हा विक्षेपरहित व विकल्पशून्य होऊन आत्म्यामध्ये अर्थात् सुषुम्नामार्गाने जाऊन सहस्रारात स्थिर होते तेव्हाच खरा सिद्धयोग साधकाला प्राप्त होतो. म्हणूनच श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**इंद्रियांच्या संगति । जिये पसरु होतसे मति ।**
**ते स्थिर होईल मागुती । आत्मस्वरूपीं ॥२.२८३॥**
**समाधिसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ ।**
**तैं पावसी तूं सकळ । योगस्थिति ॥२८४॥**

साधन चतुष्टयातील शेवटची चौथ्या प्रकारची साधनसंपती मुमुक्षुता ही आहे. प.प. श्रीवासुदेवानंदसरस्वती टेंबेस्वामीमहाराज यांनी "लघुवासुदेवमननसार" या ग्रंथात मुमुक्षुतेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की "चोहो बाजूंनी घर जळत असता धन, धान्य, स्त्री–पुत्रादिकांना सोडून घरधनी स्वतापोपशांत्यर्थं आपणच बाहेर पडून तापशांतीची जशी इच्छा करतो तशी सांसारिक तापत्रय शमन करण्याची जी तीव्र इच्छा होणे ती मुमुक्षा होय." श्रीमदाद्यशंकराचार्यांनी मुमुक्षुतेची व्याख्या करताना "सर्ववेदान्तसिद्धान्तसारसंग्रहात" असे म्हटले आहे की—

**ब्रह्मात्मैकत्वविज्ञानाद्यद्विद्वान्मोक्तुमिच्छति ।**
**संसारपाशबंधं तन्मुमुक्षुत्वं निगद्यते ॥२२६॥**

ब्रह्म व जीवात्मा यांचे मुळातच ऐक्य आहे हे जाणून जो विद्वान् साधक संसारपाशबंधनातून मुक्त व्हावे म्हणजे आपणास मोक्षप्राप्ती व्हावी अशी इच्छा करतो त्यास मुमुक्षू असे म्हणतात.—

"श्रीमद्‍भागवद्‍गीतेत" "मयि चानन्ययोगेन ॥ १३.१० ॥" व "भक्त्यात्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन । ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥११.५४ ॥' असे म्हणून भगवंतांनी ज्या अनन्यतेचा उल्लेख केला आहे ती मुमुक्षुताच होय. मी अनन्यतेने प्राप्त होतो व अनन्य अशा भक्तीनेच मला जाणणे,

पाहणे व येऊन मिळणे शक्य आहे हे जे त्यांचे सांगणे आहे ते उपरोक्त व्याख्यां-प्रमाणे मुमुक्षुत्वाचेच लक्षण आहे. याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

कां सकळ जळसंपत्ति । घेऊनि समुद्रातें गिवसती ।
गंगा जैसी अनन्यगती । मिळालीचि मिळे ।।११.६८७।।
तैसें सर्वभावसंभारें । न धरत प्रेम एकसरें ।
मजमाजीं संचरें । मीचि होऊनि ।।६८८।।
आणि तेवींचि मी ऐसा । थडिये माझारीं सरिसा ।
क्षीराब्धि कां जैसा । क्षीराचाचि ।।६८९।।
तैसें मजलागुनी मुंगीवरी । किंबहुना चराचरीं ।
भजनासि कां दुसरी । परीची नाहीं ।।६९०।।
आणि मीवांचूनि कांहीं । आणिक गोमटें नाहीं ।
ऐसा निश्चयोचि तिही । जयाचा केला ।।१३.६०४।।
शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश ।
एक मीवांचूनि वास । न पाहती आन ।।६०५।।

सारांश, अशी ही मोक्षाची तीव्र इच्छा ज्याच्या ठिकाणी उत्पन्न झाली आहे किंवा अशी तीव्र तळमळ ज्याला लागली आहे तोच मुमुक्षू होय. " मुनिर्मोक्ष-परायणः ।।५.२८।।, भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।।८.२२।।" इत्यादि विविध ठिकाणी विविध पद्धतीने भगवंतांनी " श्रीमद्भगवद्गीतेत " ही अत्यावश्यक साधनसंपत्ती सूचित केली असून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याचा भावार्थ मुमुक्षुत्वाच्या आशयाने स्पष्ट केला आहे.

येथपर्यंत आपण वेदांतशास्त्राने सांगितलेल्या साधन चतुष्टयाचा श्रीज्ञानेश्वर-महाराजांच्या दृष्टिकोणातून विचार केला. वेदान्तशास्त्राने आधीच पृथक्करण करून ठेवलेल्या गुणांच्या आधाराने साधन संपत्तीचे जे संकलनात्मक विवेचन येथे प्रस्तुत केले आहे; त्यामुळे आपोआपच विषयाला संकोचात्मक स्वरूप प्राप्त होऊन साकल्याने सर्व विषय डोळ्यांपुढे उभा राहण्यास मदत होईल. ज्ञानेश्वरीतील साधनसंपत्तीचे हे पृथक्करणात्मक संकलन आहे, हेच म्हणणे योग्य होईल.

**यम व नियमः—**

सिद्धयोगाच्या साधनशास्त्रात यमनियमांच्या साधनसंपत्तीला अन्यसाधारण महत्त्व असल्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या साधनसंपत्तीचा ज्ञानेश्वरीत विचार कसा केला आहे ते आता पाहवयाचे आहे. " तैसे यमनियमीं कडसले । जे तपोज्ञानें चोखाळले । मी तेचि ते जाहले । एथ संशयो कायसा ? ।। ४.६५ ।।" असा या साधनसंपत्तीचा महिमा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वतःच सांगितला आहे

ही साधनसंपत्ती साधकाला भगवत्स्वरूपाची प्राप्ती करून देणारी असल्यामुळें तिच्या उपस्थितीची नितांत आवश्यकता, अनुपस्थितीमुळे भासणारी तीव्रतम उणीव व उपस्थितीमुळे होणारी प्रगती प्रस्तुत करून त्यांची अपरिहार्यता स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की –

जैं यमनियम ठाकती । तेथ इंद्रिये सैरा राहाटती ।
म्हणौनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियांसी ॥१.२४९॥
जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी ।
जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ॥२.३११॥
तेही कीजती कासाविसी । या इंद्रियांची प्रौढी ऐसी ।
जैसी मंत्रज्ञातें विवसी । भुलवी कां ॥३१२॥
आम्हीं मागां हन सांगितलें । जे देहींचि ब्रह्मत्व पावले ।
तें येणें मार्गें आले । म्हणौनियां ॥५.१५८॥
आणि यमनियमांचे डोंगर । अभ्यासाचे सागर ।
क्रमोनि हे पार । पातले ते ॥१५९॥
तिहीं आपणपें करूनि निर्लेप । प्रपंचाचें घेतलें माप ।
मग साचाचेंचि रूप । होऊनि ठेले ॥१६०॥
येणें यमनियमांचेनि तळवटें । रिगे आसनाचिये पाउलवाटें ।
येई प्राणायामाचेनि आडकंठें । वरौता गा ॥६.५५॥
परि यमनियमांचिया वाटा न वचिजे । कहीं वैराग्याचि से न करिजे ।
केवळ विषयजळीं ठाकिजे । बुडी देउनी ॥४२२॥
जे गुणघनाचेनी वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापुरें ।
घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं ॥७.७१॥
बाहेरी यमनियमांची कांटी लाविली । आंतु वज्रासनाची पौळी पन्नासली ।
वरी प्राणायामाचीं मांडिलीं । वाहातीं यंत्रें ॥९.२१३॥

वरील सर्व ओव्यांवरून सिद्धयोगसाधनात श्रीज्ञानेश्वरमहाराज यमनियमांची आवश्यकता किती मानतात हे स्पष्ट होते. महर्षी पतंजलींनी तर आपल्या "योगदर्शनामध्ये" यमाचा महिमा सांगताना असे म्हटले आहे की–

एते जातिदेशकालसमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम् ॥२.३१॥

जात, ठिकाण, वेळ, प्रसंग यांची बंधने नसलेले व संपूर्णतया लागू असणारे म्हणजे उपरोक्त कोणत्याही गोष्टींमुळे खंड पडू न देता हे यमाचे पालन करीत राहवयाचे म्हणजे सार्वभौम असे महान् व्रत आहे. यमनियमरूपी साधनसंपत्तीच्या माहात्म्याच्या या पार्श्वभूमीवर आपणास श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दृष्टीने त्यांचा सांगोपांग विचार करावयाचा आहे.

प्रथम आपण यमाचा विचार करू. महर्षी पतंजलींनी "योगदर्शनात" "अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ॥२ ३०॥ असे सूत्र सांगून अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह असे पाच यम आहेत असे कथन केले आहे. श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनी "हठयोगप्रदीपिकेत" यम कोणकोणते आहेत हे सांगताना असे म्हटले आहे की –

**अहिंसा सत्यमस्तेयं ब्रह्मचर्यं क्षमा धृतिः ।**
**दयार्जवं मिताहारः शौचं चैव यमा दश ॥१.१७॥**

अहिंसा, सत्य, चोरी न करणे, ब्रह्मचर्य, क्षमा, धैर्य, दया, आर्जव, मिताहार व शुचिता हे दहा यम आहेत. योगदर्शनातील व हठयोगप्रदीपिकेतील चार गुण समान असल्यामुळे आपणास एकूण अकरा गुणांची चर्चा करावयाची आहे. आपण क्रमशः त्यांचा विचार करू.

पहिला गुण अहिंसा हा आहे. "पातंजलयोगसूत्रांवरील व्यासभाष्यामध्ये" अहिंसेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की –

**अहिंसा सर्वथा सर्वदा सर्वभूतानामनभिद्रोहः ।**

याचा अर्थ असा की काम, क्रोध लोभ मोह मद व मत्सर या षड्विकारांच्या आधीन होऊन शरीराने वाणीने किंवा मनाने अगर आचार, विचार किंवा उच्चारानेही भूतमात्रापैकी कोणाचाही घात, हानी किंवा नुकसान न करणे अथवा क्लेश देण्यास अनुमती अथवा स्पष्ट किंवा अस्पष्टपणे परवानगी न देणे याला अहिंसा म्हणतात.हाच भावार्थ व्यक्त करून व्याख्या करताना "शांडिल्योपनिषदात" असे म्हटले आहे की–

**तत्राहिंसा नाम मनोवाक्कायकर्मभिः सर्वभूतेषु सर्वदाक्लेशजननम् ॥१.५॥**

"श्रीमद्भागवद्गीतेत" भगवंतांनी "अहिंसा म्हणजे ज्ञान होय ॥१३.७॥, अहिंसा ही दैवीसंपत्ती आहे ॥१६.२॥" व "अहिंसा हे शारीरिक तप होय ॥१७.१४॥" असे सांगून अहिंसेचा साधनसंपत्तीच्या दृष्टीने उल्लेख केला आहे. यांचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**आणि जगाचिया सुखोद्देशें । शरीरवाचामानसें ।**
**राहाटणें तें अहिंसे । रूप जाण ॥१६.११४॥**
**भूतमात्राचेनि नांवें । तृणही नासुडावें ।**
**किंबहुना सांडावे । छेद भेद ॥१७.२१२॥**
**तैसे ज्ञानामनाचिये भेटी । सरिसेंचि अहिंसेचें बिंब उठी ।**
**तेंचि ऐसें किरीटी । परिस आतां ॥१३ २४५॥**
**कां कमळावरी भ्रमर । पाय ठेविती हळुवार ।**
**कुचुंबैल केसर । इया शंका ॥२४८॥**

तैसे परमाणु पा गुंतले । जाणूनि जीव सानुले ।
तेथ कारुण्यामाजीं पाउलें । लपवूनि चाले ॥२४९॥
ते वाट कृपेची करितु । ते दिशाचि स्नेहभरितु ।
जीवातळीं आंथरितु । आपुला जीवु ॥२५०॥
ऐसिया जतना । चालणें जया अर्जुना ।
हे अनिर्वाच्य परिणामा । पुरिजेना ॥२५१॥
नाना कमळदळें । डोलविजती ढाळें ।
तो जेणें पाडें बुबुळें । वारा घेपे ॥२५४॥
तैसेनि मार्दवें पाय । भूमीवर न्यसीतु जाय ।
लागती तेथ होय । जीवां सुख ॥२५५॥
जीवाचेनि नांवें । तृणातेंही नोलांडावे ।
मग न लेखितां जावें । हे कें गोठी ? ॥२५९॥
ऐसी जयाची चाली । कृपाफळी फळा आली ।
देखसी जियाली । दया वाचे ॥२६१॥
स्वयें श्वसणेंचि सुकुमार । मुख मोहाचें माहेर ।
माधुर्या जाहले अंकुर । दशन तैसें ॥२६२॥
पुढां स्नेहा पाझरे । माघां चालती अक्षरें ।
शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥२६३॥
तंव बोलणेंची नाहीं । बोलों म्हणे जरी काहीं ।
तरी बोल कोणाहि । खुपेल कां ॥२६४॥
बोलतां अधिकुही निघे । तरी कोण्हाही वर्मी न लगे ।
आणि कोण्हासि न रिघे । शंका मनी ॥२६५॥
कां नादब्रह्मचि मुसे आलें । कीं गंगापय असललें ।
पतिव्रते आलें । वार्धक्य जैसें ॥२६९॥
तैसें साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥२७०॥
आणि तयाचि परी किरीटी । थाउ जयाचिये दिठी ।
सांडिलिया भ्रुकुटी । मोकळिया ॥२७३॥
कां जे भूतीं वस्तु आहे । तिये रुपों शके विपायें ।
म्हणौनि वासु न पाहे । बहुतकरूनी ॥२७४॥
ऐसाही कोणे एके वेळे । भीतरलें कृपेचेनि बळें ।
उघडोनियां डोळे । दृष्टी घाली ॥२७५॥
तरी चंद्रबिंबौनि धारा । निघतां नव्हती गोचरा ।
परी एकसरें चकोरां । निघती दोंदें ॥२७६॥

तैसें प्राणियांसि होये । जरी तो कहीं वासु पाहे ।
तया अवलोकनाची सोयें । कूर्मीही नेणें ।।२७७।।
तरी होऊनियां कृतार्थ । राहिले सिद्धांचे मनोरथ ।
तैसे जयाचे हात । निर्व्यापार ।।२७९।।
आसुडेल वारा । नख लागेल अंबरा ।
इया बुद्धी करां । चळो नेदी ।।२८२।।
जे सदा रिते मोकळे । जैशीं चंदनांगें निसळें ।
न फळतांही निर्फळें । होतीचिना ।।२९१।।
यालागीं साचोकारें । मनीं अहिंसा थांवे थोरें ।
जैसी पिकली द्रुती आदरें । बोभात निघे ।।३०५।।
हें बहु असो पंडितु । धरूनि बाळकाचा हातु ।
वोळी लिही व्यक्तु । आपणचि ।।३०८।।
तैसे दयाळुत्व आपुलें । मनें हातापायां आणिलें ।
मग तेथ उपजविलें । अहिंसेतें ।।३०९।।

सारांश, चालणे, बोलणे, हात हलविणे इत्यादि सर्व क्रियांमधून साधकाची अहिंसा व्यक्त झाली पाहिजे. "ऐसे मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडाचा । जाहला ठायीं जयाचा ।।१३.३११।।" अशी स्थिती साधकाला प्राप्त झाली म्हणजे खरी अहिंसा प्रतिष्ठित होते व " अहिंसा प्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः ।।२.३५।।" असे "योगसूत्रात" महर्षी पतंजलींनी सांगितलेले फल प्राप्त होते.

यमातील दुसरा गुण सत्य हा आहे. शास्त्रकारांनी सत्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की, सत्यं यथार्थे वाङ्मनसे, यथादृष्टं यथा} अनुमितं यथाश्रुतं, यदि चैवमप्यभिधीयमाना भूतोपघातपरैव स्यान्न सत्यंभवेत् ।।" जसे पाहिले व ऐकले असेल त्याप्रमाणे विचार व उच्चार करणे ते सत्य होय. यालाच यथार्थवाणी म्हणतात. याचा अर्थच असा आहे की, मन व वाणी एकरूप होणे हे सत्य होय. तरीपण वेळ प्रसंग पाहून जर दुसऱ्याचा घात होत असेल तर पाहिल्याप्रमाणे व ऐकल्याप्रमाणे न बोलणे हेही सत्य होय. "शांडिल्योपनिषदात" सत्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**सत्यं नाम मनोवाक्कायकर्मभिर्भूतहितयथार्थाभिभाषणम् ।।१.६।।**

कायावाचामनाने सर्व भूतमात्रांच्या हितासाठी केलेले यथार्थ बोलणे म्हणजे सत्य होय.

श्रीमद्भगवद्गीतेत "दैवीसंपत्ती कथन करताना भगवंतांनी "सत्यं ।।१६.२।।" हा गुण उधृत केला आहे. याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर महाराज असे म्हणतात की–

आतां तीख होऊनि मवाळ । जैसें जातीचें मुकुळ ।
कां तेज परी शीतळ । शंशाकाचें ॥१६.११५॥
शके दावितांचि रोगु फेडूं । आणि जिभे तरी नव्हे कडू ।
तें वोखदु नाहीं मा घडु । उपमा कैंची ॥११६॥
तरी मऊपणें बुबुळे । झगडतांही परी नाडळे ।
एऱ्हवीं फोडी कोंराळें । पाणी जैसें ॥११७॥
तैसें तोडावया संदेह । तीख जैसें कां लोह ।
श्राव्यत्वें तरी माधुर्य । पायीं घालीं ॥११८॥
ऐकों ठातां कौतुकें । कानातें निघती मुखें ।
जें साचारिवेचेनि बिकें । ब्रह्महीं भेदी ॥११९॥
किंबहुना प्रियपणें । कोणातेंही झकऊं नेणें ।
यथार्थ तरी खुपणें । नाहीं कवणा ॥१२०॥
एऱ्हवीं गोरी कीर काना गोड । परी साचाचा पाखाळीं कीड ।
आगीचें करणें उघड । परी जळों हें साच ॥१२१॥
कानी लागतां महूर । अर्थें विभांडी जिव्हार ।
तें वाचा नव्हे सुंदर । लांवचि पां ॥१२२॥
परी अहितीं कोपोनि सोप । लालनीं मऊ जैसें पुष्प ।
तिये मातेचें स्वरूप । जैसें कां होय ॥१२३॥
तैसें श्रवणसुख चतुर । परिणमोनि साचार ।
बोलणें जें अविकार । तें सत्य येथें ॥१२४॥

सारांश, सत्य पूर्णपणे अंगी बाणले असता म्हणजे आचार विचार व उच्चाराने सर्व प्रकारे सत्याची स्थिरता झाली असता साधकाला क्रियेचे फळ क्रियेवाचून स्वत:करिता व दुसऱ्याकरिता मिळते अर्थात् त्याच्या वाचेला क्रियेची सिद्धी आश्रयस्थान समजते म्हणजे त्याचे शब्द खरे होतात. महर्षी पतंजलींनी हाच अर्थ स्पष्ट करताना "सत्यप्रतिष्ठायां क्रियाफलाश्रयत्वम् ॥२.३६॥" असे सूत्र "योगदर्शनात" प्रकट केले आहे

यमाचा तिसरा गुण अस्तेय हा आहे. अस्तेयाची व्याख्या करताना "शांडिल्योपनिषदात" असे म्हटले आहे की–

अस्तेयं नाम मनोवाक्कायकर्मभिः परद्रव्येषु निःस्पृहता ॥१.७॥

कायेने, मनाने व वाचने सर्वथा परद्रव्याचा त्याग करणे याला अचौर्य, अस्तेय किंवा चोरी न करणे असे म्हणतात. याचा अर्थ असा की, शरीराने कोणाचे द्रव्य बळेच हरण करू नये, वाचने कोणाला मागू नये व द्रव्य उत्तम आहे म्हणून ते मिळाले पाहिजे असे मनाने चिंतू नये. अर्थात् द्रव्य म्हणजे पैसा एवढाच अर्थ

मर्यादित नाही. मातीच्या भांड्यापासून ते सुवर्णापर्यंत जे काही सामान ते द्रव्यच आहे. या सर्वांचाच कायावाचामनाने त्याग करावा.

भगवंतांनी "श्रीमद्भगवद्गीतेत" द्रव्याची आत्यंतिक इच्छा करणारे आसुरी संपत्तीच्या लोकांचे चित्र उभे करून व्यतिरेकाने अस्तेयाचे महत्त्व पटवून देताना असे म्हटले आहे की–

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥१६.१३॥**
**धनमानमदान्विताः ॥१६.१७॥**

आता मी हे धन संपादन केले आहे.हे माझे मनोरथ पूर्ण होतील.माझ्याजवळ हे द्रव्य आहे आणि हे ही धन पुन्हा हस्तगत होणार आहे. हे आसुरी स्वभावाचे लोक संपत्ती व मोठेपणा यांच्या मदाने उन्मत्त झालेले असतात. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**म्हणजे आजि मियां । संपत्ति बहुतेकांचिया ।**
**आपुल्या हातीं केलिया । धन्यु ना मी ? ॥१६.३४८॥**
**ऐसा श्लाघों जंव जाये । तंव मन आणीकही वाहे ।**
**सवेंचि म्हणे पाहे । आणिकांचेंही आणूं ॥३४९॥**
**हें जेतुलें असे जोडिलें । तयाचेनि भांडवलें ।**
**लाभा घेईन उरलें । चराचर हें ॥३५०॥**
**ऐसेनि धना विश्वाचिया । मीचि होईन स्वामिया ।**
**मन दिठी पडे तया । उरों नेदी ॥३५१॥**
**कुवेरु आथिला होये । परी तो नेणें माझी सोये ।**
**संपत्ती मजसम नव्हे । श्रीनाथाही ॥३५७॥**
**वरी धनाचिया मदिरा । माजूनि धनुर्धरा ।**
**कृत्याकृत्यविचारा । सवतें केलें ॥३८१॥**

सारांश,अशा प्रकारे जे लोक आसुरीसंपत्तीने युक्त असतात त्यांना परमात्मा अत्यंत दारुण क्लेश कोट्यवधी कल्पपर्यंत देतो. यामुळे साधकाला अस्तेयाची नितांत आवश्यकता आहे. अस्तेयाची प्रतिष्ठा झाली असता म्हणजे ते अंगी बाणले असता अथवा ते स्थिर झाले असता जगातील उत्तमोत्तम रत्ने अर्थात इष्ट वस्तू स्वतःहून साधकाकडे येतात किंवा दासासारख्या हात जोडून पुढे उभ्या राहतात. या अर्थानेच महर्षी पतंजलींनी 'योगदर्शनात' "अस्तेयप्रतिष्ठायां सर्वरत्नोपस्थानम् ॥३७॥" असे सूत्र ग्रथित केले आहे.

यमाचा चौथा गुण आर्जव हा आहे. "शांडिल्योपनिषदात" आर्जवाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**आर्जवं नाम मनोवाक्कायकर्मणां विहिताविहितेषु जनेषु प्रवृत्तौ निवृत्तौ वा एकरूपत्वम् ॥१.१०॥**

विधिनिषेधाचरणात व प्रवृत्तिनिवृत्तीत मन-वाचा-कर्माने लोकांशी एकरूपत्वाने अर्थात् समानतेने वागणे याला आर्जव म्हणतात. थोडक्यात आर्जव म्हणजे मनाचा सरळपणा होय. यादृष्टीनेच आर्जवाची व्याख्या करताना "दर्शनोपनिषदात" असे-म्हटले आहे की–

**पुत्रे मित्रे कलत्रे च रिपौ स्वात्मनि संततम् ॥१.१५॥**
**एकरूपं मुने यत्तदार्जवं प्रोच्यते मया ॥१६॥**

आपला मुलगा, मित्र, बायको, शत्रू व स्वात्मा या सर्वांविषयी एकरूपता अर्थात् भेदभावराहित्य किंवा सरलता असणे याला आर्जव असे म्हणतात.

"श्रीमद्‌भगवद्‌गीतेत" भगवंतांनी ज्ञानी पुरुषाची व दैवी संपत्तीची लक्षणे सांगताना, दैवीसंपत्ती उधृत करताना व शारीरिक तप स्पष्ट मांडताना "आजर्वम् ॥१३.७॥१६.१॥१७.१४॥" हे अत्यंत महत्त्वाचे लक्षण ग्रथित केले आहे. याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**आतां परिस आर्जवा। रूप करूं ॥१३.३५४॥**
**तरी आर्जव तें ऐसें। प्राणाचें सौजन्य जैसें।**
**आवडे तयाही दोषें। एकचि गा ॥३५५॥**
**का तोंड पाहूनि प्रकाशु। न करी जेवीं चंडांशु।**
**जगा एकुचि अवकाशु। आकाश जैसें ॥३५६॥**
**तैसें जयाचें मन। माणुसाप्रती आन आन।**
**नव्हे आणि वर्तन। ऐसें पैं तें ॥३५७॥**
**जें जगेंचि सनोळख। जगेंसीं जुनाट सोयरिक।**
**आपपर हे भाख। जाणणें नाहीं ॥३५८॥**
**भलतेणेंसीं मेळु। पाणिया ऐसा ढाळु।**
**कवणेविखीं आडळु। नेघे चित्त ॥३५९॥**
**वारियाची धांव। तैसें सरळ भाव।**
**शंका आणि हांव। नाहीं जया ॥३६०॥**
**मायेपुढें बाळका। रिगतां न पडे शंका।**
**तैसें मन देतां लोकां। नालोची जो ॥३६१॥**
**फांकलिया इंदीवरा। परिवाठ नाहीं धनुर्धरा।**
**तैसा कोन–कोंपरा। नेणेचि जो ॥३६२॥**

**चोखाळपण रत्नाचें । कां रत्नावरी किरणाचें**
**तैसें पुढां मन जयाचें । करणें पाठीं ।।३६३।।**
**आलोचु जो नेणें । अनुभवचि जोगावणें ।**
**धरी मोकली अंतःकरणें । नव्हेचि जया ।।३६४।।**
**दिठी नोहे मिणधी । बोलणें नाहीं संदिग्धी ।**
**कवणेंसीं हीनबुद्धी । राहाटीजे ना ।।३६५।।**
**दाही इंद्रियें प्रांजळें । निःप्रपंचें निर्मळें ।**
**पांचही पालव मोकळे । आठही पाहर ।।३६६।।**
**अमृताची धार । तैसें उजू अंतर ।**
**किंबहुना जो माहेर । या चिन्हांचें ।।३६७।।**
**तो पुरुष सुभटा । आर्जवाचा आंगवटा ।**
**जाण तेथेची घरटा । ज्ञानें केला ।।३६८।।**

सारांश, "वस्तु भूतमात्रीं नमिजे । परोपकारीं भजिजे ।।१७·२१०।।" व "आतां बाळाच्या हितीं स्तन्य । जैसें नानाभूतीं चैतन्य । तैसें प्राणिमात्रीं सौजन्य । आर्जव तें ।।१६·११३।।" अशी जी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी आर्जवाची व्याख्या केली आहे तेच या गुणाचे साररूप आहे.

यमाचा पांचवा गुण क्षमा हा आहे. "शांडिल्योपनिषदात" क्षमेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**क्षमा नाम प्रियाप्रियेषु सर्वेषु ताडनपूजेषु सहनम् ।।१·११।।**

प्रिय व अप्रिय आणि ताडन व पूजा या गोष्टी समानतेने सहन करणे याला क्षमा म्हणतात. कोणी प्रिय बोलो अथवा अप्रिय बोलो, दंड मारो अथवा सन्मान करो आणि चंदन लावो अथवा घाण टाको; परंतु ते सर्व सहन करून घ्यावयाचे. इतकेच नव्हे; तर मनाने देखील कोणाचे नुकसान चिंतावयाचे नाही. साधकाने वरवर एखादी गोष्ट सहन केली आणि मनाने मात्र नुकसान चिंतिले तर पूर्वी सांगितलेल्या अहिंसेचा भंग होईल आणि योगसिद्धी होणार नाही. यासाठी मनाने देखील कोणाचे वाईट चिंतणे योग्य नाही. एवढेच नव्हे; तर परपीडनेही क्रोधादि वृत्ती उसळू देणे गैर आहे. या दृष्टीनेच "दर्शनोपनिषदात" क्षमेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**कायेन मनसा वाचा शत्रुभिः परिपीडते ।।१.१६।।**
**बुद्धिक्षोभनिवृत्तिर्या क्षमा सा मुनिपुंगव ।।१७।।**

देह, मन व वाणीने शत्रूंनी कितीही पीडा दिली तरी बुद्धीमध्ये कोणत्याही प्रकारे क्षोभ उत्पन्न न होणे ही क्षमा होय. साधकाला ही क्षमेची साधनसंपत्ती अत्यावश्यक असल्याने श्रीसंत तुकाराममहाराजांनी आपल्या "अभंगात" तिचे महत्त्व सांगताना असे म्हटले आहे की–

क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी ॥१॥
तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि । जाय तो विझोनी आपसया ॥२॥
तुका म्हणे क्षमा सर्वांचें स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥३॥३३९३॥

भगवंतांनीही "श्रीमद्भगवद्गीतेत" ज्ञानी पुरुषाची लक्षणे सांगताना व ब्राह्मणाचे स्वाभाविक कर्म काय आहे हे कथन करताना "क्षांतिः ॥१३.७॥१८.४२॥", दैवीसंपत्तीची लक्षणे सांगताना "शांतिः॥१६.२॥" व भक्तांची लक्षणे सांगताना "क्षमी ॥१२.१३॥" या नावांनी उपरोक्त लक्षणाचा उल्लेख केला आहे. त्याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

तरी ज्ञान गा तें एथें । ओळखे तूं निरुतें ।
आक्रोशेंवीण जेथें । क्षमा असे ॥१३.३४०॥
तरि पढियंते लेणें । आंगीं भावें जेणें ।
धरिजे तेवीं साहणें । सर्वचि जया ॥३४३॥
त्रिविध मुख्य आघवे । उपद्रवांचे मेळावे ।
वरि पडिलिया नव्हे । वाकुडा जो ॥३४४॥
अपेक्षित पात्रे । तें जेणें तोषें मानवें ।
अनपेक्षिताही करवे । तोचि मानु ॥३४५॥
जो मानापमानातें साहे । सुखदुःख जेथ सामाये ।
निंदास्तुती नोहे । दुखंडु जो ॥३४६॥
उन्हाळेनि जो न तपे । हिमवंती न कांपे ।
कायसेनिही न वासिपे । पातलेया ॥३४७॥
स्वशिखरांचा भारु । नेणें जैसा मेरु ।
कीं धरा यज्ञसूकरु । वोझें न म्हणे ॥३४८॥
नाना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे क्षिती ।
तैसा नाना द्वंद्वीं प्राप्तीं । घामेजेना ॥३४९॥
घेऊनी जळाचे लोट । आलिया नदीनदांचे संघाट ।
करी वाड पोट । समुद्र जेवीं ॥३५०॥
तैसें जयाचिया ठायीं । न साहणें कांहींची नाहीं ।
आणि साहतु असे एसेंही । स्मरण नुरे ॥३५१॥
आंगा जें पातलें । तें करूनि घाली आपुलें ।
तेथ साहतेनि नवलें । घेपिजेना ॥३५२॥
हे अनाक्रोश क्षमा । जयापाशीं प्रियोत्तमा ।
जाण तेणें महिमा । ज्ञानासि गा ॥३५३॥
आणि पृथ्वीचिया परी सर्वथा । सर्व जें साहाणें ॥१८.८४०॥

**ते गा क्षमा पांडवा । गुण जेथ पांचवा ।**
**स्वरांमाजीं सुहावा । पंचमु जैसा ॥८८१॥**
**तेवींचि क्षमेलागीं । पृथ्वीसि पवाडु आंगीं ॥१२.१५०॥**

सारांश, "आतां सर्वंही साहातिया गरिमा । गर्वा न ये तेचि क्षमा । जैसें देह वाहोनि रोमा । वाहणें नेणें ॥१६.१९१॥" हे क्षमेचे स्वरूप असून "तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोवरी कासया फुंदा तुम्ही ॥" ही त्याची साधनशास्त्रातील आवश्यकता आहे व त्या दृष्टीनेच "अन्याये थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे॥" असे श्रीसमर्थांनी सांगितले आहे.

यमाचा सहावा गुण धृती म्हणजे धैर्य हा आहे. "शांडिल्योपनिषदात" धृतीची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**धृतिर्नामार्थहानौ स्वेष्टबंधुवियोगे तत्प्राप्तौ सर्वत्र चेतःस्थापनम् ॥१.१२॥**

धनहानी व प्रियाप्रियादि वियोग-संयोगात नेहमी चित्तस्थैर्य ठेवणे याला धृती असे म्हणतात. "दर्शनोपनिषदात" धृतीची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**वेदादेव विनिर्मोक्षः संसारस्य न चान्यथा ॥१.१७॥**
**इति विज्ञाननिष्पत्तिर्धृतिः प्रोक्ता हि वैदिकैः ।**
**अहमात्मा न चान्योऽस्मीत्येवमप्रच्युता मतिः ॥१८॥**

वेदाने म्हणजे वेदप्रणीत ज्ञानानेच संसारातून सुटका होते व इतर कोणत्याही प्रकारने ती अशक्यच आहे. असे ज्ञान होणे ही वेदोक्त धृती होय. मी (जीव) आत्मा ब्रह्म किंवा शिवस्वरूप आहे अशी अविचल बुद्धी म्हणजे धृती, धारणा किंवा धैर्य होय.

"श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी गुणातीताची लक्षणे सांगताना "धीरः ॥१४.२४॥", दैवी संपत्तीची लक्षणे सांगताना "धृतिः॥१६.३॥" व धृतीचे सात्त्विक, राजसिक व तामसिक भेद सांगताना "धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः । योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ १८.३३ ॥" असे म्हणून या साधनसंपत्तीचा उल्लेख केला आहे. ज्या अव्यभिचारी म्हणजे अचंचल धारणेने साधक आपली मन, प्राण व इंद्रिये यांच्या क्रिया योगयुक्त चित्ताने धारण करतो त्याला सात्त्विक धैर्य म्हणतात. धृतीचा हा भावार्थ व्याख्येसह स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की–

**आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्राचीनें खवळले रोग ।**
**अथवा योगवियोग । प्रियाप्रियांचे ॥१६.१९२॥**
**यया आघवियांचाचि थोरु । एके वेळे आलिया पूरु ।**
**तरी अगस्त्य कां होऊनि धीरु । उभा ठाके ॥१९३॥**

आकाशीं धूमाची रेखा । उठिली बहुवा आगळिका ।
ते गिळी येकीं झुळुका । वारा जेवीं ॥१९४॥
तैसें अधिभूताधिदैवां । अध्यात्मादि उपद्रवां ।
पातलेया पांडवा । गिळूनि घाली ॥१९५॥
ऐसें चित्तक्षोभाच्या अवसरीं । उचलूनि धैर्या जें चांगावें करी ।
धृती म्हणिपे अवधारीं । तियेतें गा ॥१९६॥
तरी उदेलिया दिनकरु । चोरीसि थोके अंधारु ।
कां राजाज्ञा अव्यवहारु । कुंठवी जेवीं ॥१८.७३३॥
नाना पवनाचा साटु । वाजीनलिया नीटु ।
आंगेंसीं बोभाटु । सांडिती मेघ ॥७३४॥
कां अगस्तीचेनि दर्शनें । सिंधु घेऊनि ठाती मौनें ।
चंद्रोदयीं कमळवनें । मिठी देती ॥७३५॥
हें असो पावो उचलिला । मदमुख न ठेविती खाला ।
गर्जोनि पुढे जाला । सिंहु जरी ॥७३६॥
तैसा जो धीरु । उठलिया अंतरु ।
मनादिकें व्यापारु । सांडिती उभीं ॥७३७॥
इंद्रियां विषयांचिया गांठी । अपैसया सुटती किरीटी ।
मन मायेच्या पोटीं । रिगती दाही ॥७३८॥
अधोर्ध्व गूढें काढी । प्राण नवांची पेंडी ।
बांधोनि घाली उडी । मध्यमेमाजीं ॥७३९॥
संकल्पविकल्पांचें लुगडे । सांडूनि मन उघडें ।
बुद्धि मागिलेकडे । उगीचि बैसे ॥७४०॥
ऐसी धैर्यराजें जेणें । मन प्राण करणें ।
स्वचेष्टांचीं संभाषणें । सांडविजती ॥७४१॥
मग आघवींची सडीं । ध्यानाच्या आंतुल्या मढीं ।
कोंडीजती निरवडी । योगाचिये ॥७४२॥
परी परमात्मया चक्रवर्ती । उगाणिती जंव हातीं ।
तंव लांचु न घेतां धृती । धरिजती जिया ॥७४३॥
ते गा धृती येथें । सात्त्विक हें निरुतें ।
आईक अर्जुनातें । श्रीकांतु म्हणे ॥७४४॥

सारांश " घरा येवो पां स्वर्ग । कां वरिपडो वाघ । परी आत्मबुद्धीसि भंग । कदा नोहे ॥ १४.३५८ ॥ " व " मग मेरूपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां पडिभरें । चित्त न दटे ॥ ६.३६९ ॥ " असे व वर उद्धृत

केलेले धैर्य साधकाला साधनानेच प्राप्त होते हे निःसंशय सत्य आहे. सिद्धयोग साधनानेच साधकाच्या ठिकाणी साधनसंपत्ती उपस्थित होत असते हे श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी सर्वत्र दाखविले असून येथे ते विशेष रीतीने स्पष्ट केल्याचे दिसून येते.

यमाचा सातवा गुण अपरिग्रह हा आहे. "पातंजल योगदर्शनावरील भाष्यात" महर्षी व्यासांनी अपरिग्रहाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

**विषयाणामर्जनरक्षणक्षयसंगहिंसादोषदर्शनादस्वीकरणमपरिग्रहः ॥२.३०॥**

वस्तू किंवा विषय मिळविण्यास होणारे श्रम, रक्षण करण्याचा त्रास, तिचा नाश होणे, तिचा सहवास जो जो करावा तो तो भोगाभ्यास अधिक वाढणे, तत्प्राप्तीप्रीत्यर्थ हिंसा करणे इत्यादि दोषांचा विचार करून विषयांचा स्वीकार न करणे याला अपरिग्रह असे म्हणतात.

"श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी "अपरिग्रहः॥६·१०॥" असे म्हणून या गुणाचा प्रत्यक्ष व "अनपेक्षः,उदासिनः ॥१२·१६॥" व "अनिकेतः ॥१२·१९॥" या शब्दांतून अप्रत्यक्षरीत्या अपरिग्रह या गुणाचा उल्लेख केला आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी याचा भावार्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की-

**पुढती अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतदिवसें ।**
**मग आपणपांचि आपणु असे । अखंडित ॥६.१०५॥**
**ऐसिया दृष्टी जो विवेकी । पार्था तो एकाकी ।**
**सहजें अपरिग्रही जो तिहीं लोकीं । तोचि म्हणौनि ॥१०६॥**
**जयाचिया ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिगावा ।**
**सुखासि चढावा । जयाचें असणें ॥१२.१७२॥**
**व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश ।**
**तैसें जयाचें मासन । सर्वत्र गा ॥१८०॥**
**आणि वायूसि एके ठायीं । बिढार जैसें नाहीं ।**
**तैसा न धरीच कहीं । आश्रयो जो ॥२११॥**
**आघवाची आकाशस्थिति । जेवीं वायूसि नित्य वसती ।**
**तेवीं जगचि विश्रांति-। स्थान जया ॥२१२॥**
**हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ॥२१३॥**

सारांश, अपरिग्रहाची साधनसंपत्ती दृढ झाल्यावर साधक विश्वरूप होत असल्याने " अपरिग्रहस्थैर्ये जन्मकंथतासंबोधः ॥ २.३९ ॥" म्हणजे अपरिग्रहाची स्थिरता झाली असता पूर्वजन्म कसा होता याबद्दल ज्ञान होते असे जे फल " योग-दर्शनातील " सूत्रात महर्षी पतंजलींनी सांगितले आहे, ते सहज सिद्ध होते.

यमाचा आठवा गुण दया हा आहे, " शांडिल्योपनिषदात " दयेची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**दया नाम सर्वभूतेषु सर्वत्रानुग्रहः ॥१.९॥**

सर्व प्राणिमात्रांवर सदैव कृपा करणे याला दया म्हणतात. " दर्शनोपनिषदात " दयेची व्याख्या करताना असे म्हटलें आहे की–

**स्वात्मवत् सर्वभूतेषु कायेन मनसा गिरा ॥१.१४॥**
**अनुज्ञा या दया सैव प्रोक्ता वेदान्तवेदिभिः ॥१५॥**

देहाने, वाणीने व मनाने सर्वभूतमात्रांना आपल्या आत्म्याप्रमाणे समजणे ही वेदान्तोक्त दया होय. " सर्वभूतेषु दया ब्रह्म । एतद्ब्राह्मणलक्षणम् ॥ " असे " सामवेदात " म्हटले आहे. याचा अर्थ असा की, सर्वाभूती एक ब्रह्म आहे असे जाणून जो सर्व भूतांवर दया करतो तो कोणत्याही जातीचा असला; तरी तो खरोखर ब्राह्मण आहे.श्रीसंत तुलसीदासांनी दया हे मुक्तीचे मूळ आहे हे सांगताना असे म्हटले आहे की–

**दया मुक्तका मूल है। नरकमूल अभिमान।**
**तुलसी दया न छांडिये। जबलग घटमों प्राण ॥**

मुक्तिप्रमाणेच दया हे भक्तीचेही मूळ आहे हे सांगताना श्रीएकनाथमहाराज असे म्हणतात की–

**ज्याचे अंगीं दया शांती। तया न लगे ईश्वरभक्ती ॥**

दया हे संतांचे, देवांचे, साधकांचे व सर्व साधनाचे असे गुह्य तत्त्व आहे हे सांगताना श्रीसंत तुकाराममहाराज असे म्हणतात की–

**काय वानूं आतां न पुरे हे वाणी। मस्तक चरणीं ठेवीतसें ॥१॥**
**थोरीव सांडिली आपुली परिसें। नेणे शिवो कैसें लोखंडासी ॥२॥**
**जगाच्या कल्याणा संताच्या विभूती। देह कष्टवीती उपकारें ॥३॥**
**भूतांची दया हे भांडवल संतां। आपुली ममता नाहीं देहीं ॥४॥**
**तुका म्हणे सुख पराविया सुखें। अमृत हें मुखें स्रवतसे ॥५॥१९४७॥**

卐 卐 卐

**जे कां रंजलें गांजले। त्यांसि म्हणे जो आपुले ॥१॥**
**तोचि साधु ओळखावा। देव तेथेंचि जाणावा ॥२॥**
**मृदु सबाह्य नवनीत। तैसें सज्जनांचें चित्त ॥३॥**
**ज्यासी आपंगिता नाहीं। त्यासि धरी जो हृदयीं ॥४॥**
**दया करणें जे पुत्रासी। तेचि दासा आणि दासी ॥५॥**
**तुका म्हणे सांगू किती। तोचि भगवंताची मूर्ती ॥६.१९६२॥**

卐 卐 卐

दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणीक निर्दाळण कंटकांचें ॥

卐 卐 卐

या सर्वाचा अर्थ दया हे योगाचे मूळ आहे. याविषयी श्रीसमर्थ रामदास-स्वामीमहाराजांनी असे म्हटले आहे की—

दया जयाचें अंतरीं । त्याला दूर नाहीं हरी ।
हारवोनी सर्व धन । करा दया हे साधन ।
रामी रामदास म्हणें । दया सर्वत्र ठेवणे ॥

श्रीमद्भगवद्गीतेत भगवंतांनी " दया भूतेषु ॥ १६.२ ॥ " व " मैत्रः करुण एव च ॥ १२.१३ ॥ " म्हणून या साधनसंपत्तीचा निर्देश केला आहे. याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना वरील सर्व संतमहंतांच्या म्हणण्याचे सार श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या कथनात कसे प्रस्फुटित झाले आहे हे पाहण्यासारखे आहे ते असे म्हणतात की--

आतां दया ते ऐसी । पूर्णचंद्रिका जैसीं ।
निववितां न कडसी । साने थोर ॥१६.१५४॥
तैसें दुःखिताचें शिणणें । हिरतां सकणवपणें ।
उत्तमाधम नेणें । विवंचूं गा ॥१५५॥
पैं जगीं जीवनासारिखें । वस्तु अंगवरी उपखें ।
परी जातें जीवित राखे । तृणाचेंहि ॥१५६॥
तैसें पुढिलाचेनि तापें । कळवळलिये कृपें ।
सर्वस्वेंसीं द्रिधलेंहि आपणपें । थोडेंचि गमे ॥१५७॥
निम्न भरलियाविणें । पाणी ढळोंचि नेणें ।
तेवीं श्रांता तोषौनि जाणें । सामोरें पां ॥१५८॥
पैं पायीं कांटा नेहटे । तंव व्यथा जीवीं उमटे ।
तैसा पोळे संकटें । पुढिलांचेनि ॥१५९॥
कां पावो शीतळता लाहे । कीं ते डोळयाचिलागीं होये ।
तैसा परसुखें जाये । सुखावतु ॥१६०॥
किंबहुना तृषितालागीं । पाणी आरायिलें असे जगीं ।
तैसें दुःखितांचे सेलभागीं । जिणें जयाचें ॥१६१॥
तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया ॥१६२॥
गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं ।
ऐसें नेणेंचि गा करूं । तोय जैसें ॥१२.१४७॥
तैसी आघवियांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री ।
कृपेसी धात्री । आपणचि जो ॥१४८॥

सारांश, दया ही सर्वश्रेष्ठ साधनसंपत्ती असल्याने असा पुरुष जन्माला आल्याबरोबर परमात्मा त्याचा ऋणी असतो हे " मी उदयतांचि तया । ऋणिया लाभें ॥ १६.१६२ ॥ " असे भगवंतांच्या मुखात वचन घालून श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी स्पष्ट केले आहे.

यमाचा नववा गुण शौच हा आहे " शांडिल्योपनिषदात " शौचाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**शौचं नाम द्विविधं बाह्यमांतरं चेति । तत्र मृज्जलाभ्यां बाह्यम् ।**

**मनःशुद्धिरांतरम् । तदध्यात्मविद्यया लभ्यम् ॥१.१४॥**

बाह्य व अंतर असे दोन प्रकारचे शौच किंवा शुद्धता आहे. माती व पाणी यांच्या उपयोगाने शरीराची बाह्य शुद्धी होते व मनाची शुद्धी ही अंतरशुद्धी होय. ही शुद्धी अध्यात्मविद्येनेच प्राप्त होते. " दर्शनोपनिषदात " शौच गुणाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**स्वदेहमलनिर्मोक्षो मृज्जलाभ्यां महामुने ।**

**यत्तच्छौचं भवेद्बाह्यं मानसं मननं विदुः ॥१.२०॥**

**अहं शुद्ध इति ज्ञानं शौचमाहुर्मनीषिणः ।**

**अत्यंतमलिनो देहो देही चात्यंतनिर्मलः ॥२१॥**

**उभयोरंतरं ज्ञात्वा कस्य शौचं विधीयते ।**

**ज्ञानशौचं परित्यज्य बाह्ये यो रमते नरः ॥२२॥**

**स मूढः कांचन त्यक्त्वा लोष्टं गृह्णाति सुव्रत ॥२३॥**

शुद्धी दोन प्रकारची आहे. माती व पाणी यांनी स्वतःच्या देहाचा मळ नाहीसा करणे याला बाह्यशौच असे म्हणतात आणि मनाने आत्मस्वरूपाचे सतत चिंतन करणे हे मानसशौच होय. मी निर्मळ, शुद्ध व निरंजन आहे असे ज्ञान असणे हीच खरी शुद्धी होय, असे तत्त्ववेत्त्यांचे म्हणणे आहे; कारण देह अत्यंत मलीन असून जीवात्मा हा शिवरूप किंवा स्वसंवेद्य आत्मरूप असल्यामुळे अत्यंत निर्मळ आहे. दोन्हीमधील अंतर जाणल्यावर कोणाची शुद्धी करावयाची हे साधकाने ठरविले पाहिजे. स्वस्वरूप चिंतनाने ज्ञानशुद्धी करण्याचे सोडून जो बाह्य अशा देहशुद्धीत रमतो तो सोने टाकून मातीचेंच ढेकूळ घेतो

" पातंजल योगदर्शनात " साधनसंपत्तीच्या या गुणाला नियम पंचकात घातले आहे. "सूत्रावरील भाष्यात" या गुणाची व्याख्या करताना महर्षी व्यासांनी असे म्हटले आहे की–

**शौचं मृज्जलादिजनितं मेध्याभ्यवहरणादि च बाह्यम् । आभ्यंतरं चित्तमलानां क्षालनम् ॥२.३१॥**

मातीने, पाण्याने, भस्माने किंवा अन्य साधनाने जी देहाची शुद्धी केली जाते ती बाह्यशुद्धी होय आणि मनातील सर्व कृत्रिम भाव काढून टाकणे व वाईट

वासनेचा त्याग करणे ही आंतरशुद्धी होय. ही साधली म्हणजे योगी पातकापासून मुक्त होतो.

" श्रीमद्‌भगवद्‌गीतेत " ज्ञानी पुरुषाची लक्षणे सांगताना, दैवीसंपत्तीचे गुण उधृत करताना, शारीरिक तपाचा उल्लेख करताना व ब्राह्मणाचे स्वाभाविक कर्म सांगताना " शौचम् ॥ १३.७ ॥ १६.३ ॥ १७.१४॥ १८.४२ ॥ " हा साधन-संपत्तीचा गुण भगवंतांनी कथन केला आहे. याचा व्याख्येसह भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

म्हणे शुचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे ।
आंग मन जैसें । कापुराचें ॥१३.४६२॥
कां रत्नाचें दळवाडें । जैसें सबाह्य चोखडें ।
आंत बाहेरि एक पाडें । सूर्यु जैसा ॥४६३॥
बाहेरीं कर्में क्षाळला । भीतरीं ज्ञाने उजळला ।
इहीं दोहीं परी आला । पाखाळा एका ॥४६४॥
मृत्तिका आणि जळें । बाह्य येणें मेळें ।
निर्मळु होय बोलें । वेदाचेनी ॥४६५॥
भलतेथ बुद्धीबळी । रजआरिसा उजळी ।
सौंदणी फेडी थिगळी । वस्त्रांचिया ॥४६६॥
किंबहुना यियापरी । बाह्य चोख अवधारीं ।
आणि ज्ञानदीपु अंतरीं । म्हणौनि शुद्ध ॥४६७॥
येऱ्हवीं तरी पंडुसुता । आंत शुद्ध नसता ।
बाहेरि कर्म तो तत्त्वता । विटंबु गा ॥४६८॥
मृत जैसा शृंगारिला । गाढव तीर्थीं न्हाणिला ।
कडुवुधिया माखिला । गुळें जैसा ॥४६९॥
वोस गृहीं तोरण बांधिलें । कां उपवासी अन्नें लिंपिलें ।
कुंकुमसेंदुर केलें । कांतहीनेनें ॥४७०॥
कळस ढिमाचे पोकळ । जळो वरील ते झळाळ ।
काय करूं चित्रींव फळ । आंतु शेण ॥४७१॥
तैसें कर्म वरीचिलेंकडां । न सरे थोर मोलें कुडा ।
नव्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगें ॥४७२॥
म्हणौनि अंतरीं ज्ञान व्हावें । गम बाह्य लाभेल स्वभावें ।
वरी ज्ञान कर्में संभवें । एसें कें जोडे ? ॥४७३॥
यालागीं बाह्य भागु । कर्में धुतला चांगु ।
ज्ञानें फिटला वंगु । अंतरींचा ॥४७४॥

तेथ अंतर बाह्य गेलें । निर्मळत्व एक जाहलें ।
किंबहुना उरलें । शुचित्वचि ॥४७५॥
म्हणौनि सद्भाव जीवगत । बाहेरी दिसती फांकत ।
स्फटिकगृहींचे डोलत । दीप जैसे ॥४७६॥
विकल्प जेणें उपजे । नाथिली विकृती निपजे ।
अप्रवृत्तीचीं बीजें । अंकुर घेती ॥४७७॥
तें आइके देखे अथवा भेटे । परी मनीं कांहींचि नुमटे ।
मेघरंगे न कांटे । व्योम जैसें ॥४७८॥
येऱ्हवीं इंद्रियांचेनि मेळें । विषयांवरी तरी लोळे ।
परी विकाराचेनि विटाळें । लिंपिजेना ॥४७९॥
भेटलेया वाटेवरी । चोखी आणि महारी ।
तेथ नातळें तियापरी । राहाटों जाणें ॥४८०॥
कां पतिपुत्रांते आलिंगी । एकचि ते तरुणांगी ।
तेथ पुत्रभावाच्या आंगीं । न रिगे कामु ॥४८१॥
तैसें हृदय चोख । संकल्पविकल्पीं सनोळख ।
कृत्याकृत्य विशेख । पुढे जाणें ॥४८२॥
पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळु न शिजे ।
तैसी विकल्पजातें न लिंपिजे । मनोवृत्ती ॥४८३॥
तया नांव शुचिपण । पार्था गा संपूर्ण ।
हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥४८४॥
आणि स्वधर्माचा आगिठां । देह जाड्याचिया किटा ।
आवृत्तिपुटीं सुभटा । झाडी कीजे ॥१७.२०९॥
आणि शौचही निष्पाप । द्विविध जेथ ॥१८.८३८॥
मन भावशुद्धी भरलें । आंग क्रिया अळंकारिलें ।
ऐसें सबाह्य जियालें । साजिरें जें कां ॥१८.८३९॥

सारांश, " आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगेंपीयूखें । तया कलशाचिया सारिखें । शौच असें ॥ १६.१९७ ॥ जे आंगीं निष्काम आचारु । जीवीं विवेकु साचारु । तो सबाह्य घडला आकारु । शुचित्वाचाचि ॥ १९८ ॥" अशी शुचित्वाची साधनसंपत्ती श्रीज्ञानेश्वरमहाराजांना साधकांकडून अपेक्षित आहे.

यमाचा दहावा गुण आहार हा आहे. आहार म्हणजे मिताहार होय. या दृष्टीने आहाराची व्याख्या करताना " शांडिल्योपनिषदात " असे म्हटले आहे आहे की —

मिताहारो नाम चतुर्थांशावशेषसुस्निग्धमधुराहारः ॥१.१३॥

पोटातील चौथा भाग मोकळा राहून उत्तम तूप व दुधापासून तयार केलेल्या

पदार्थांचे सेवन करणे याला मिताहार असे म्हणतात. "दर्शनोपनिषदात" मिताहाराची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

अल्पमृष्टाशनाभ्यां च चतुर्थांशावशेषकम् ।
तस्माद्योगानुगुण्येन भोजन मित भोजनम् ॥१.१९॥

कोठ्याचा चौथा भाग वायुसंचारार्थं रिकामा ठेवून अल्पप्रमाणात निर्मल व सात्त्विक आहाराचे सेवन करणे हे योगानुकूल असे मितभोजन आहे.

मिताहाराची व्याख्या करताना "हठयोगप्रदीपिकेत" श्रीस्वात्माराम-योगींद्र यांनी असे म्हटले आहे की–

सुस्निग्धमधुराहारश्चतुर्थांशविवर्जितः ।
भुज्यते शिवसंप्रीत्यै मिताहरः स उच्यते ॥१.५८॥

पोटातील चौथा भाग मोकळा सोडून शिवाच्या प्रेमासाठी किंवा शिवाला नैवेद्य दाखवून जो उतम प्रकारचा स्निग्ध व मधुर आहार करतो त्याला मिताहार म्हणतात.

"घेरंडसंहितेत" मिताहाराची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

शुद्धं सुमधुरं स्निग्धं उदरार्धविवर्जितम् ।
भुज्यते सुरसं प्रीत्या मिताहारमिमं विदुः ॥५.२१॥

पोटातील अर्धा भाग मोकळा सोडून शुद्ध, सुमधुर, स्निग्ध व सुरस असा आहार साधकयोग्याने करावा. यालाच विद्वान् लोक मिताहार म्हणतात.

साधकाने नेहमी मिताहार करणेच उचित आहे; कारण अत्याहाराने योगाचा नाश होतो असे "हठयोगप्रदीपिकेत" सांगितले आहे. "घेरंडसंहितेत" तर असे स्पष्ट म्हटले आहे की–

मिताहारं विना यस्तु योगारंभं तु कारयेत् ।
नानारोगा भवेतस्य किंचित् योगो न सिद्धयति ॥५.१६॥

जो साधक परिमित आहार करण्याचा निश्चय व नियम न करता योगाभ्यासाला सुरुवात करतो त्याला नाना प्रकारचे रोग होतात व त्याची साधनात थोडींसुद्धा प्रगती होत नाही. यासाठीच "श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी या या साधनसंपत्तीचा आजर्वून उल्लेख करताना असे म्हटले आहे की–

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥६.१६॥
युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥१७॥

हे अर्जुना ! अतिशय खाणाऱ्याला व मुळीच न खाणाऱ्याला आणि अत्यंत निद्रा घेणाऱ्याला व अगदीं झोप न घेणाऱ्याला सिद्धयोग साध्य होत नाही. ज्याचा आहारविहार, कर्माचरण, निद्रा आणि जागृती ही यथायोग्य असतात त्यांनाच हा

सिद्धयोग दुःखनाशक होतो. या श्लोकांचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की–

जो रसनेंद्रियाचा अंकिला । कां निद्रेसी जीवें विकला ।
तो नाहींच एथ म्हणितला । अधिकारिया ॥६.३४५॥
अथवा आग्रहाचिये बांदोडी । क्षुधा तृषा कोंडी ।
आहारातें तोडी । मारूनियां ॥३४६॥
निद्रेचिया वाटा न वचे । ऐसा दृढिवेचेनि अवतरणें नाचे ।
तें शरीरचि नव्हे तयाचें । मा योगु कवणाचा ? ॥३४७॥
म्हणौनि अतिशयें विषयो सेवावा । तैसा विरोधु नोहावा ।
कां सर्वथा निरोधावा । हेंही नको ॥३४८॥
आहार तरी सविजें । परी युक्तीचेनि मापें मविजे ।
क्रियाजात आचरिजे । तयाचि स्थिती ॥३४९॥
मितला बोलीं बोलिजे । मितलिया पाउलीं चालिजे ।
निद्रेही मानु दीजे । अवसरें एकें ॥३५०॥
जागणें जरी जाहलें । तरी होआवें तें मितुलें ।
येतुलेनि धातुसाम्य संचलें । असेल सहजें ॥३५१॥
ऐसें युक्तीचेनि हातें । जें इंद्रियां वोपिजे भातें ।
तैं संतोषासी वाढतें । मनाचि करी ॥३५२॥

परिमित आहाराप्रमाणेच साधकाचा आहार पौष्टिक, मधुर, धातूंचे पोषण करणारा, रुचकर, स्निग्ध व मनाला प्रसन्न करणारा असावा असे शास्त्रकारांचे मत आहे. या दृष्टीनेच " श्रीमद्भगवद्गीतेत " सात्त्विक माणसाला अर्थात् साधकाला प्रिय असणारा आहार कोणता असावा हे सांगताना असे म्हटले आहे की –

आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकाप्रियाः ॥१७.८॥

आयुष्य, बुद्धी, शक्ती, आरोग्य, सुख व प्रीती यांना वाढविणारे, स्नेहयुक्त, शरीरावर कायमचा हितकारक परिणाम करणारे व आल्हादजनक असलेले असे आहार सात्त्विक लोकांना प्रिय असतात.याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी असे म्हटले आहे की–

तरी सत्त्वगुणाकडे । जैं दैवें भोक्ता पडे ।
तैं मधुरीं रसीं वाढे । मेचु तया ॥१७.१२५॥
आंगेंचि द्रव्यें सुरसें । जे आंगेंचि पदार्थ गोडसे ।
आंगेंचि स्नेहें बहुवसें । सुपक्वें जियें ॥१२६॥

आकारें नव्हती डगळें । स्पर्शे अति मवाळें ।
जिभेलागीं स्नेहाळें । स्वादें जियें ।।१२७।।
रसें गाढीं वरी ढिलीं । द्रवभावीं आथिलीं ।
ठायें ठावो सांडिलीं । अग्नितापें ।।१२८।।
आंगें सानें परिणामे थोरु । जैसें गुरुमुखींचें अक्षरु ।
तैशी अल्पीं जिहीं अपारु । तृप्ति राहे ।।१२९।।
आणि मुखीं जैसीं गोडें । तैसीचिहि ते आतुलेकडे ।
तिये अन्नीं प्रीति वाढे । सात्त्विकांसी ।।१३०।।
एवं गुणलक्षण । सात्त्विक भोज्य जाण ।
आयुष्याचें त्राण । नीच नवें हें ।।१३१।।
येणें सात्त्विक रसें । जवं देहीं मेहो वरिषे ।
तंव आयुष्यनदी उससे । दिहाचि दिहा ।।१३२।।
सत्त्वचिये कीर पाळती । कारण हाचि सुमती ।
दिवसाचिये उन्नती । भानु जैसा ।।१३३।।
आणि शरीरा हन मानसा । बळाचा पैं कुवासा ।
हा आहारु तरी दशा । कैंची रोगां ।।१३४।।
हा सात्त्विकु होय भोग्यु । तैंचि भोगावया आरोग्यु ।
शरीरासी भाग्यु । उदयलें जाणो ।।१३५।।
आणि सुखाचें घेणें देणें । निकें उवाया ये येणें ।
हें असो वाढे साजणें । आनंदेंसीं ।।१३६।।
ऐसा सात्त्विकु आहारु । परिणमला थोरु ।
करी हा उपकारु । सबाह्यासी ।।१३७।

अशा प्रकारचे सात्त्विक भोजन साधकाने केले पाहिजे. साधकाने भोजन करताना प्रथम आपल्या इष्ट देवतेला सर्व अन्न अर्पण करून भोजनास आरंभ करावा. भोजन करताना मन प्रसन्न व संतोषित असावे. निर्मल, सुमधुर, स्निग्ध व सरस भोजनाने पोट अर्धे भरेल इतकेच खावे.नंतर एक चतुर्थांश भाग पाणी प्यावे व एक चतुर्थांश भाग वायूसाठी मोकळा सोडावा. मिताहारासंबंधी एकच विशेष गोष्ट अशी लक्षात ठेविली पाहिजे की, भोजन झाल्यावर पोट थोडेसे मोकळे राहिले पाहिजे आणि मनाला असे वाटले पाहिजे की, आपण आणखी थोडे खाऊ शकू. असे वाटले म्हणजे उत्तम मिताहार झाला असे समजावे. पोटाला तडणी लागेल इतके खाणे योग्य नाही; कारण त्यामुळे शरीराला जडता व आळस येऊन साधन चांगले होत नाही. भूक लागल्यावर साधकाने थोडे अवश्य खावे; परंतु एका वेळेलाच अधिक खाणे साधकाला कधीही योग्य नाही. साधकाने हे लक्षात

ठेविले पाहिजे की, जेवण झाल्यावर त्याने तीन तास साधन करता काम नये. त्याचप्रमाणे अतिशय भूक लागली असताना उपाशी पोटी साधन करणे चांगले नाही. अत्यंत भूक लागली तर थोडेसे हलके खाऊन साधन करण्यास हरकत नाही. मोकळ्या पोटी व भूक लागली असताना साधनास बसल्यास चित्त स्थिर होत नाही.

साधकाने सकाळ संध्याकाळ नियमित वेळी भोजन केले पाहिजे. त्याचप्रमाणे जेवताना उजव्या नाकपुडीने म्हणजे पिंगला नाडीने श्वास चालू असणे अधिक श्रेयस्कर असते. पिंगला नाडीलाच सूर्यनाडी म्हणतात.ही नाडी चालू असली म्हणजे श्वासोच्छ्वास उजव्या नाकपुडीने चालू असला की, देहरूपी लघुब्रह्मांडात दिवस होतो. इडा नाडीला चंद्रनाडी म्हणतात. जेव्हा प्राणवायू या नाडीतून वाहत असतो तेव्हा देहात रात्र असते. त्यामुळे जेव्हा पिंगला नाडी चालू असून देहात दिवस असतो तेव्हा आहार घेतल्याने शरीररस उत्पन्न न होता अन्नाचे सहज पचन होते. मात्र इडा नाडी चालू असताना म्हणजे देहात रात्र असताना जर भोजन केले; तर त्याचे पचन ठीक होत नाही व शरीरात रसाचा खूप संचार होतो.

साधकाच्या भोजनात साळीचे तांदूळ, गहू, मूग, पडवळ, काकडी, सातू, दूध, तूप, साखर, लोणी, वेलदोडे, तूर, पालक, चवळई, घोळू, दुधी भोपळा, घोसाळे, सुरण, साठीभात, वरई, केळफूल, परवरची भाजी इत्यादि पदार्थ विशेषेकरून असावेत. यासंबंधी अधिक स्पष्टीकरण करताना "हठयोगप्रदीपिकेत व घेरंडसंहितेत" असे म्हटले आहे की–

पुष्टं सुमधुरं स्निग्धं गव्यं धातुप्रपोषणम् ।
मनोभिलषितं योग्यं योगी भोजनमाचरेत् ।। ह.प्र.१.६३ ।।
शाल्यन्नं यवपिंड वा गोधूमपिंडकं तथा ।
मुद्गं माषचणकादि शुभ्रं च तुषवर्जितम् ।।घे.सं.५.१७।।
पटोलं पनसं मानं कंकोलं च शुकाशकम् ।।
द्राढिका कंकरी रंभोदुंबरी कंट कंकटम् ।।१८।।
आमरंभावालरंभा रंभादंडं च मूलकम् ।
वार्ताकी मूलकं ऋद्धि योगी भक्षणमाचरेत् ।।१९।।
वालशाकं कालशाकं तथा पटोलपत्रकम् ।
पंचशाकं प्रशंसीयात् वास्तुकं हिलमोचिकाम् ।।२०।।

साधकाने पुष्टीकारक, सुमधुर, स्निग्ध, गाईचे तूप इत्यादि शरीराचे उत्तम पोषण करणारे असे मनाला आवडणारे व योग्य पदार्थ खावेत. त्याचप्रमाणे तांदूळ, जव, गहू, मूग, उडीद व हरबऱ्याची डाळ इत्यादि पदार्थ साफसुफ करून खावेत. परवर, कच्चा फणस, अळूची भाजी, कंकोळ, कारले, पातळ ताक, केळे, औदुंबराची फळे, बोरे, काकडी, कच्ची व पक्की केळी, केळीचा दांडा व मूळ, वांगी, मुळे,

शेंगा, चुका, परवरची पाने, पुनर्नवा, चाकवत इत्यादि फळ भाज्या व पालेभाज्या साधकाने खाण्यास हरकत नाही.

साधकाच्या खाण्याच्या योग्य पदार्थांप्रमाणेच त्याने कोणते पदार्थ वर्ज्य करावेत हे राजस व तामस लोकांना जे पदार्थ किंवा खाणे आडवते ते सांगताना भगवंतांनी " श्रीमद्भगवद्गीतेत " असे म्हटले आहे की–

**कट्वम्ललवणात्युक्ष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ।।१७.९।।**
**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ।।१०।।**

तिखट, आंवट, खारट, अति उष्ण, झणझणीत, रुक्ष, नीरस व दाहक म्हणजे पोटाची व तोंडाची आग करणारे आणि दुःख,शोक व रोग उत्पन्न करणारे आहार राजस प्रकृतीच्या लोकांना आवडतात. शिळे, नीरस, दुर्गंधियुक्त, उष्टे व अपवित्र भोजन असते ते तामस लोकांना अत्यंत प्रिय असते. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**तरी मारें उणें काळकूट । तेणें मानें जें कडुवट ।**
**कां चुनियाहूनि दासट । आम्ल हन ।।१७.१३९।।**

**कणिकीतें जैसें पाणी । तैसेंचि मीठ बांधाया आणी ।**
**तेतुलीच मेळवणी । रसांतरांची ।।१४०।।**

**ऐसें खारट अपाडें । राजसा तया आवडे ।**
**उन्हाचेनि मिषें तोंडें । आगीचि गिळी ।।१४१।।**

**वाफेचिया सिगे । वातीही लाविल्या लागे ।**
**तैसें उन्ह मागे । राजसु तो ।।१४२।।**

**वावदळ पाडूनि ठाये । साबळु डाहारला आहे ।**
**तैसें तीख तो खाये । जें घायेंविण रुपे ।।१४३।।**

**आणि राखेहूनि कोरडें । आंत बाहेरी येके पाडें ।**
**तो जिव्हादंशु आवडे । बहु तया ।।१४४।।**

**परस्परें दांतां । आदळु होय खातां ।**
**तो गा तोंडीं घेतां । तोषों लागे ।।१४५।।**

**आधींच द्रव्यें चुरमुरीं । वरी परवडिजती मोहरी ।**
**जियें घेतां होती घुवारी । नाकेंतोंडें ।।१४६।।**

**हें असो उगें आगीतें । म्हणे तैसें राइतें ।**
**पढिये प्राणापरौतें । राजसासि गा ।।१४७।।**

ऐसा न पुरोनि तोंडा । जिभा न केला वेडा ।
अन्नमिषें अग्नि भडभडां । पोटीं भरी ॥१४८॥
तैसाचि लवंगा सुंठे । मग भुइँ ना सेजे खाटे ।
पाणियाचे न सुटे । तोंडोनि पात्र ॥१४९॥
ते आहार नव्हती घेतलें । व्याधिव्याळ जे सुतले ।
ते चेवावया घातलें । माजवण पोटीं ॥१५०॥
तैसें एकमेकां सळें । रोग उठति एके वेळे ।
ऐसा राजसु आहारु फळे । केवळ दुःखें ॥१५१॥
एवं राजसा आहारा । रूप केले धनुर्धरा ।
परिणामाचाही विसुरा । सांगितला ॥१५२॥
आतां तया तामसा । आवडे आहारु जैसा ।
तेंही सांगों चिळसा । झणें तुम्ही ॥१५३॥
तरी कुहिलें उष्टें खातां । न मनिजे तेणें अनहिता ।
जैसें कां उपहिता । म्हैसी खाय ॥१५४॥
निपजलें अन्न तैसें । दुपाहरीं कां येरें दिवसें ।
अतिकरें तैं तामसें । घेईजे तें ॥१५५॥
नातरी अर्ध उकडिले । कां निपट करपोनि गेलें ।
तैसेंहि खाय चुकलें । रसा जें येवों ॥१५६॥
जया कां आथि पूर्ण निष्पत्ती । जेथ रसु धरी व्यक्ती ।
तें अन्न ऐसी प्रतीती । तामसा नाहीं ॥१५७॥
ऐसेनि कहीं विपायें । सदन्ना वरपडा होये ।
तरी घाणी सुटे तंव राहे । व्याघ्रु जैसा ॥१५८॥
कां बहुवे दिवशी वोलांडिलें । स्वादपणें सांडिलें ।
शुष्क अथवा सडलें । गाभिणेंही हो ॥१५९॥
तेंही बाळाचे हातवरी । चिवडिलें जैसी राडी करी ।
कां सवें बैसोनि नारी । गोतांबोल करी ॥१६०॥
ऐसेनि कश्मळें जें खाय । तें तया सुखभोजन ऐसें होय ।
परी येणेंही न धाय । पापिया तो ॥१६१॥
मग चमत्कारु देखा । निषेधाचा आंबुखा ।
जया का सद्दोखा । कुद्रव्यासी ॥१६२॥
तया अपेयांच्या पानीं । अखाद्यांच्या भोजनीं ।
वाढविजे उतान्ही । तामसें तेणें ॥१६३॥

एवं तामस जेवणारा । ऐसैसी मेचु हे वीरा ।
तयाचें फल दुसरां । क्षणीं नाहीं ।।१६४।।
जे जेव्हांची हें अपवित्र । शिवे तयाचें वक्त्र ।
तेव्हांचि पापा पात्र । जाला तो कीं ।।१६५।।
यावरतें जे जेवीं । ते जेविती वोज न म्हणावी ।
पोटभरती जाणावी । यातना ते ।।१६६।।
शिरच्छेदें काय होये । का आगीं रिघतां कैसें आहे ।
हें जाणावें काई पाहें । परी साहातुचि असे ।।१६७।।
म्हणौनि तामसा अन्ना । परिणामु गा सिनाना ।
न सांगोंचि गा अर्जुना । देवो म्हणे ।।१६८।।

सारांश, साधक, योगी व रोगी हे जवळ जवळ सारखेच असतात; कारण रोगी वैद्याकडे जाऊन योग्य औषध व आहाराच्या पथ्याचे पालन करून प्रकृती ठीक करतो व साधक भवरोग पीडित असल्याने गुरूंपाशी जाऊन भवरोग-समुद्रातून पार होण्यासाठी साधनरूप औषध घेऊन विधिनिषेधादि आहाराच्या नियमांचे पालन करणे त्याला भाग पडते. त्यामुळे साधनसंपत्तीच्या दृष्टीने आहाराचे महत्त्व अनन्यसाधारण आहे हे निश्चित होय.

यमाचा अकरावा गुण ब्रह्मचर्य हा आहे "शांडिल्योपनिषदात" ब्रह्मचर्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की-

**ब्रह्मचर्यं नाम सर्वावस्थासु मनोवाक्कायकर्मभिः सर्वत्र मैथुनत्यागः ।।१.८।।**

शरीर, मन व वाणी यांच्या द्वारा सर्व अवस्थांमध्ये मैथुनाचा त्याग करणे याला ब्रह्मचर्य म्हणतात. "योगदर्शनावरील भाष्यात" ब्रह्मचर्याची व्याख्या करताना महर्षी व्यासांनी असे म्हटले आहे की-

**ब्रह्मचर्यं गुप्तेंद्रियस्योपस्थस्यसंयमः ।।१.३०।।**

गुप्त इंद्रिय म्हणजे उपस्थाच्या संयमाला ब्रह्मचर्य म्हणतात. "दर्शनोपनिषदात" ब्रह्मचर्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की-

**कायेन वाचा मनसा स्त्रीणां परिविवर्जनम् ।**
**ऋतौ भार्यां तदा स्वस्य ब्रह्मचर्यं तदुच्यते ।।१.१३।।**
**ब्रह्मभावे मनश्चारं ब्रह्मचर्यं परंतप ।।१४।।**

कायेने, मनाने, व वाणीने केलेल्या स्त्रीच्या त्यागाला ब्रह्मचर्य म्हणतात. गृहस्थाश्रमी साधकाने फक्त ऋतुकाली स्वतःच्या स्त्रीशी समागम करणे यालाही ब्रह्मचर्य म्हणतात. नेहमी ब्रह्मभावात मन निमग्न असणे किंवा ब्रह्मरूपात मनाचा सदैव संचार असणे हे उत्कृष्ट ब्रह्मचर्य व श्रेष्ठ तप होय. "याज्ञवल्क्यसंहितेमध्ये" ब्रह्मचर्याची उपरोक्त प्रकारचीच व्याख्या करून शेवटी असे म्हटले आहे की-

**शुश्रूषया गुरौ नित्यं ब्रह्मचर्यमुदाहृतम् ॥१.५९॥**

सद्गुरूंची नित्य सेवाशुश्रूषा करणे यालाच ब्रह्मचर्य म्हणतात.

"श्रीमद्भगद्वगीतेत" भगवंतांनी ब्रह्मचर्य या साधनसंपत्तीचा "ब्रह्मचारिव्रते स्थित: ॥६·१४॥, यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति ॥८.११॥" व "ब्रह्मचर्यं शारीरं तप उच्यते ॥१७·१४॥" असा तीन वेळा उल्लेख केला आहे. त्यातील आठव्या व सतराव्या अध्यायातील ब्रह्मचर्य या पदाचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**जयाचिया आवडी । न गणिती ब्रह्मचर्याचीं सांकडीं ।**
**निष्ठुर होऊनी वापुडीं । इंद्रियें करिती ॥८.१०६॥**
**स्त्रीविषयीं नियमिजे । नांवेंनांवें ॥१७.२१०॥**
**जन्मतेनि प्रसंगे । स्त्रीदेह शिवणें आंगें ।**
**तेथूनि जन्म आघवें । सोंवळें कीजे ॥२११॥**

हे स्थूल प्रकारचे अर्थात् सर्वसाधारणपणे ज्या अर्थाने ब्रह्मचर्य हा शब्द वापरला जातो त्याचे विवेचन आहे. वीर्यपात न करणे किंवा होऊ न देणे हा स्थूलार्थ असून शास्त्रकारांनी मैथुनाचे आठ प्रकार सांगून मुमुक्षूने ब्रह्मचर्याचे अनुष्ठान कसे केले पाहिजे हे सांगताना असे म्हटले आहे की–

**स्मरण कीर्तनं केलि: प्रेक्षणं गुह्यभाषणम् ।**
**संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिष्पत्तिरेव च ॥**
**एतन्मैथुनमष्टांगं प्रवदन्ति मनीषिण: ।**
**विपरीतं ब्रह्मचर्यमनुष्ठेयं मुमुक्षुभि: ॥**

कोणत्याही अवस्थेत स्त्रीचे स्मरण करणे, तिच्या रूपाचे व गुणाचे वर्णन करणे किंवा श्रृंगाररसप्रधान ग्रंथ वाचून स्त्रीसंबंधी चर्चा करून तिची स्तुती करणे, स्त्रियांवरोबर पत्ते सोंगट्या इत्यादि खेळणे, स्त्रियांकडे वाईट दृष्टीने पाहणे, स्त्रीबरोबर एकांतात बोलणे, स्त्री प्राप्त व्हावी म्हणून व तिच्याशी संभोग व्हावा असा संकल्प करणे, हा संकल्प पूर्ण व्हावा म्हणून उपाय किंवा प्रयत्न करणे आणि स्त्रीशी संभोग करणे असे आठ प्रकारचे मैथुन शास्त्राने व विद्वानांनी सांगितले आहे. मोक्षाची इच्छा करणाऱ्या साधकाने या आठही प्रकारच्या मैथुनाचा त्याग अवश्य केला पाहिजे.

" श्रीमद्भगवद्गीतेतील " सहाव्या अध्यायातील " ब्रह्मचारिव्रते स्थित: ॥ १४ ॥ " याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्यातील सूक्ष्मतम अर्थ स्पष्ट केला आहे. " आचार्योपासनं ॥ गीता १३.७ ॥ " या पदावरील भावार्थाच्या स्पष्टीकरणाच्या वेळी गुरुशुश्रूषा म्हणजे ब्रह्मचर्य होय, हे उपरोक्त व्याख्येचे प्रकटीकरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कसे केले आहे, ते आपण पाहिले.

आता ब्रह्मभावात मनाचा संचार होऊन ते तेथे विलीन कसे होते व यालाच ब्रह्मचर्य कसे म्हणतात हे पाहवयाचे आहे. या दृष्टीनेच ज्ञानेश्वरीत हे वर्णन सुरू होण्यापूर्वी श्री. कुंटे यांनी संपादन केलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रतीत "श्रीभगवता संक्षेपेणोक्तं योगं विशेषेणं व्याचष्टे–ब्रह्मचारिव्रते स्थितः।" असे म्हटले आहे. या म्हणण्यात मोठा गूढार्थ आहे; कारण या पदाचा भावार्थ स्पष्ट करण्यास "तंव येरीकडे धनुर्धरा। आसनाचा उवारा। शक्ति करी उजगरा। कुंडलिनीतें ॥६.२२१॥" असे म्हणून सुरुवात करून हे विवेचन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "पिंडें पिंडाचा ग्रासु। तो हा नाथसंकेतीचा दंशु। परि दाऊनि गेला उद्देशु। श्रीमहाविष्णु ॥ ६.२९१ ॥" असे म्हणून संपविले आहे. याचा अगदी सरळ अर्थ असा आहे की, ब्रह्मचर्यामध्ये स्थित होणे व कुंडलिनी शक्तीचे जागरण होणे या दोन्हीही गोष्टी मुळात एकच आहेत. वास्तविक पाहता हा विषय अत्यंत जटिल व रहस्यमय असून गुरुपरंपराप्राप्त ज्ञानानेच त्याचा भेद होऊन आकलन होणे शक्य आहे. आत्तापर्यंत आपण या रहस्याचा तळ गाठण्यासाठीच नाना अंगांनी त्याचा विचार केला. येथे साधनसंपत्तीच्या दृष्टिकोनातून विचार प्रस्तुत करावयाचा आहे. या दृष्टीने म. म. श्रीगोपीनाथ कविराज यांनी "तांत्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि" या ग्रंथातील "अद्वयतत्त्वके प्रकारभेद" या लेखात असे म्हटले आहे की, "बिंदु स्वभावतः साधारण रूपमें भी निरंतर क्षरण-शील होता है। इसी कारण यह अक्षरको प्राप्त नहीं हो सकता। बिंदु क्षरित होकर खंड-खंड वर्णरूपमें प्रकट होता रहता है। परंतु ये सारे वर्ण परस्पर मिलकर एक आकारको प्राप्त नहीं होते। वर्णोंके संयोग-वियोगसेही पद, वाक्य और भाषाकी उत्पत्ति होती है। यदि नाना वर्ण विलीन होकर एक रूप ग्रहण कर लें; तो उनसें पद-वाक्यादि कुछ नहीं बन सकते। तब जो कुछ रहेगा, वह ऊर्ध्व-प्रवाहशील नादरूपी शब्द होगा। वर्ण-समूहसे हमारे व्यावहारिक विकल्प-ज्ञानका उदय होता है। अतएव नाद-भावकी अभिव्यक्तिके साथ-साथही परमार्थज्ञानका मार्ग खुल जाता है। गुरुशक्तिके उन्मेषके पश्चात् नाद-विकासके समय यह ऊर्ध्वगति लक्षित होती है, यही यथार्थ ब्रह्मचर्य है। इस अवस्थामें गुरुशक्ति अंतःसलिला फल्गुके समान कार्य करती है। यही अक्षरभावकी प्राप्तिकी धारा है, बाहरके आपाततः प्रतीयमान क्षरणके होते हुए भी, भीतरका अक्षर-भाव क्रमशः अधिकतर स्पष्ट हो उठता है। प्राणकी श्वासरूपी धाराकी भी यही बात है। गुरुशक्तिकी प्राप्तिके पहले श्वास निरंतर खंडित होता है। परंतु गुरुशक्तिकी प्राप्तिके बाद इसमें अविच्छिन्नता आ जाती है; क्योंकि बाह्यदृष्टिसे श्वासकी अंतर्गति और बाह्यगतिके होते हुए भी, दोनों एकही धाराके रूपमें उपलब्ध होते हैं। यह उपलब्धि क्रमशः व्यापक रूपमें परिणत होती है और गतिकी अविच्छिन्नता सिद्ध हो जानेके बाद वक्रता भी निवृत्त

हो जाती है। इस प्रकार सरल गतिकी प्राप्तिके साथ-साथ बिंदु और ब्रह्मका भेद मिट जाता है।" (पृ. ७०–७१)

ही दृष्टीच अधिक स्पष्ट करताना त्यांनी "भारतीय संस्कृति और साधना," प्रथम खंड, या ग्रंथातील "तांत्रिक बौद्ध साधना" या लेखात असे म्हटले आहे की, "क्रियाके प्रभावसे बिंदुकी निर्मलता तथा स्थिरताकी सिद्धी होती है। वैदिक युगमें ब्रह्मचर्य और गार्हस्थ्य आश्रमकी रहस्यसाधनामें बिंदुसाधनाका स्थानही सर्वोच्च था। पहले आश्रमका लक्ष्य था–बिंदु–शोधन तथा बिंदु–प्रतिष्ठा। उस समय सभी प्रकारसे बिंदु–क्षोभ निषिद्ध था, क्योंकि अशुद्ध-बिंदु क्षुब्ध होनेपर प्राकृतिक नियमसे अधोगतिकी ओर उन्मुख होता है। इसीका नाम च्युति या पतन है, जिसका फल है मृत्यु। इस बिंदुको धारण करके यदि कोई इसे ऊर्ध्वगामी कर सके, तो वह अनिवार्य रूपसे अमरत्व-लाभ कर सकता है। "मरणं बिंदुपातेन जीवनं बिंदुधारणात्"–यह सिद्धांत सर्वसंमत है। ऊर्ध्वरेताकी अवस्थाका लाभ करनेके लिये बिंदुका ऊर्ध्वगामित्व होना चाहिए। ऊर्ध्वरेताकी अवस्थामें मनुष्यका अंतःस्रोत सदैव ऊर्ध्वगामी रहता है। यही दिव्य अवस्था है। प्राचीन समयमें गृहस्थ आश्रममें परिणीता धर्मपत्नीके साथ यह साधना चलती थी। 'सस्त्रीको धर्ममाचरेत्'– इस वचनका आंतरिक तात्पर्य यही है। (पृ. ५५२, ५५३) बिंदु पारदके समान सदा चंचल रहता है। परंतु योगवलसे इसे स्थिर करना आवश्यक है।... बिंदुका उद्‌बोध और कुंडलिनी-शक्तिका जागरण, वस्तुतः एकही व्यापार है। (पृ. ५५४, ५५५) ऊर्ध्वशक्तिकी चरम स्थिति, मस्तक-स्थित ऊर्ध्व-बिंदुमें हैं। जब इसका भी भेद हो जाता है, तब वह विश्वव्यापक होता है।" (पृ. ५५६)

वरील ग्रंथातील "योगका विषय-परिचय" या लेखात ग्रंथकार ब्रह्मचर्य व ऊर्ध्वरेता या संबंधी माहिती देताना असे म्हणतात की," आध्यात्मिक साधनामें उन्नति करनेके लिए ब्रह्मचर्यका विशेषरूपसे पालन करनेकी आवश्यकता है। वैदिक, तांत्रिक, बौद्ध, जैन एवं अन्यान्य देशोंके अन्यान्य प्रकारके धर्म एवं संप्रदायोंमें भी इसकी आवश्यकता बतलायी गयी है। जिन ऋषियोंने आश्रम-चतुष्टयकी व्यवस्था की थी, उन्होंने भी इसीलिए सर्वप्रथम ब्रह्मचर्यको स्थान दिया था। ब्रह्मचर्यका पालन किये बिना शारीरिक, मानसिक और आध्यात्मिक, किसी प्रकारका बल संचित नहीं होता और बलका संचय हुए बिना कार्यमें सिद्धि प्राप्त करनेकी आशा आकाश-कुसुममात्र है। शास्त्रमें कहा है– "नायमात्मा बलहिनेन लभ्यः।" अतएव इसमें काई संदेह नहीं कि ब्रह्मचर्यके बिना आत्माकी उपलब्धि नहीं हो सकती।

साधारणतः लोग वीर्यधारणकोही ब्रह्मचर्य समझते हैं। वीर्यधारणा ब्रह्मचर्यका एक प्रधान अंग है, इसमें संदेह नहीं और इसके इस अंगको सम्यक् रूपसे

पालन करनेसे अन्यान्य अंग सहजही सिद्ध हो जाते हैं। जो लोग अष्टांग-मैथुनके त्यागको ब्रह्मचर्य बताते हैं, वे भी इस वीर्यरक्षाकी ओरही अपना लक्ष्य रखकर इस प्रकारके लक्षण निर्धारित करते हैं। यह परिच्छिन्न ब्रह्मचर्य योगशास्त्रमें यमके अंतर्गत माना गया है। बौद्धोंने भी शील संपत्तिके अंदर इसको प्रधान स्थान दिया है। जैन तथा अन्यान्य शास्त्रोंमें भी प्राय: उसी रूपमें देखा जाता है। ऋषिप्रणित धर्मशास्त्र तथा गृह्य और धर्मसूत्रादिमें ब्रह्मचारीकी आदर्श दिनचर्याके विषयमें बहुतसी बाते कही गई हैं।

जो लोग ब्रह्मचर्यके तत्त्वकी खोज करना चाहते हैं, वे थोडासा अनुसंधान करनेपर सहजही समझ सकते हैं कि बिंदुका संरक्षण, संशोधन और उद्बोधन–ये तीनही ब्रह्मचर्यके यथार्थ उद्देश्य हैं। ब्रह्ममें अथवा ब्रह्मपथमें जिसके द्वारा संचार नहीं होता, वह वास्तविक ब्रह्मचर्य नहीं है। जो शास्त्र-सिद्ध ब्रह्मचर्यसे संपन्न हैं, वस्तुत: वे एकमात्र ब्रह्मपथमेंही संचरण करते हैं। क्योंकि वासना, मिथ्या-संकल्प, इंद्रिय-चांचल्य और चित्तकी विक्षेप-वृत्ति निवृत्त होनेपर बिंदुकी जो आपेक्षिक साम्यावस्था होती है, वही ब्रह्मचर्य-प्रतिष्ठाकी प्रथम भूमि है। बिंदुके क्षरणसे संसार और बिंदुकी स्थिरतासे अमृतत्व अथवा मोक्ष सिद्ध होता है। गणित-शास्त्रमें जिस तरह वृत्त और त्रिकोण आदिका केंद्रही बिंदु कहलाता है, उसी तरह देहतत्त्वके वेत्तागण भी देहके अथवा कोषके केंद्रकोही बिंदु नाम देते हैं। अन्नमय-कोष या स्थूल-शरीर जिसके आधारपर प्रतिष्ठित है, उसीको अन्नमय-कोषका केंद्र या स्थूल बिंदु कहा जा सकता है। इसी तरह जिन प्राणमय, मनोमय और विज्ञानमय कोषके आधारपर सूक्ष्म-शरीरपर गठित हुआ है, उनके भी कोषगत केंद्र रूपमें एक–एक बिंदु है। वेदान्तकी पारिभाषाके अनुसार साधारणत: आनंद-मय–कोषकोही कारण–शरीर कहा जाता है। कहना नहीं होगा कि इसका भी केंद्र है और यही अमृत–बिंदुके नामसे परिचित है। ये सब बिंदु वस्तुत: एकही महाबिंदुके देशगत और संस्कार–गत भेदमात्र हैं। जबतक औपाधिक भेद वर्तमान रहता है, तबतक यह भेद अनिवार्य है। इस भेदको मानकरही क्रमश: इसके अतिक्रम करनेकी चेष्टा करनी होगी। जिस कारणसे बिंदु क्षरित होता है, उसको रोके बिना बिंदुकी ऊर्ध्वगति तो दूर रही, उसकी स्थिरता भी संभव नहीं। पहले स्थिररेता हुए बिना कोई भी ऊर्ध्वरेता–भूमिपर आरोहण नहीं कर सकता। जो लोग अप्राकृत कामबीजका रहस्य जानते हैं और जिन्होंने गुरूपदिष्ट प्रणालीसे रस–तत्त्वका सम्यक्‌रूपसे परिशीलन किया है, वे इसे सहजही समझ सकते हैं। साधारणत: हठयोगी कहा करते हैं कि बिंदुके स्थिर होनेपर प्राण भी स्थिर हो जाता है और प्राणके स्थिर होनेपर बिंदु भी स्थिर हुए बिना नहीं रह सकता। इसी प्रकार बिंदुके साथ मनका और मनके साथ प्राणका परस्पर संबंध समझना चाहिए।

कौशलसे उनमेंसे किसी एकको भी वद्ध कर लेनेपर शेष दो को अधीन करना सहज हो जाता है। हठयोगके शास्त्रोंमे तथा योगवासिष्ठ रामायणमें इस संबंधमें प्रासंगिक अन्यान्य बातें भी लिखी हैं। शास्त्रका यह सिद्धांत अत्यंत सारगर्भित है,क्योंकि हमने पहले ही कहा है कि एकही विंदु आधार–भेदसे भिन्न-भिन्न स्थानोंमें भिन्न-भिन्न रूपोंमें प्रकाशित हुआ है। अतएव साधकके पूर्वसंस्कार तथा योग्यताके अनुसार चाहे जिस स्थानमें संयम संभव हो, उसीसे अन्यान्य स्थानगत विक्षेप भी निवृत्त हो जाता है। एवं वहाँ–वहाँके विंदु भी स्थिर–भावको प्राप्त हो जाते हैं।

चक्षु जिस समय रूप देखता है, श्रोत्र जिस समय शब्द ग्रहण करता है और अन्यान्य इंद्रिया जिस समय अपना–अपना विषय ग्रहण करती हैं, उस समय वास्तवमें देहके मध्यमें स्थित विंदुही क्षरित होकर उस–उस स्थानमें विषय–प्रतिभासके रूपमें जन्म ग्रहण करता है। विंदुके क्षरण हुए बिना विषय–ग्रहण करना असंभव है। अतएव जबतक हम इंद्रियोंके मार्गसे विषय ग्रहण करते हैं तबतक तथाकथित रूपमें वीर्यरक्षा करनेपर भी व्यभिचार होताही है। विषयका भेद हट जानेपर जब सर्वत्रही ब्रह्मसाक्षात्कार होता है, तब समझना चाहिये कि व्यभिचार निवृत्त हो गया है और साधक ब्रह्मचर्यमें स्थित हो गया है। विंदु क्षरित हुए विना अखंड एवं कूटस्थ–ब्रह्म–तत्त्व अपने सामने स्वयं प्रकाशित नहीं हो सकता। अतएव ब्रह्मकी जो स्वयं–प्रकाश अवस्था है, जिस अवस्थामें एकमात्र विशुद्ध चैतन्यही अपने सामने आप प्रकाशित है, वह भी ब्रह्मचर्यकी अवस्था है। उस अवस्थामें बिंदुके क्षरित होनेपर भी वह सरल मार्गसे संपन्न होता है, इस कारण अद्वैत–भावमें व्याघात नहीं पहुँचता, भेद–प्रतीति उत्पन्न नहीं होती और विषयकी सत्ता भी भासमान नहीं होती। यह अवस्था रहस्यदृष्टिसे 'उपकुर्वाण ब्रह्मचर्य' की अवस्था है। इसका अनुकरण करके समाजके अंदर भी उपकुर्वाण ब्रह्मचर्यकी व्यवस्था की गयी है। गुण–भेदसे उपकुर्वाण–ब्रह्मचर्यके तीन भेद हैं–शुक्ल, रक्त और कृष्ण। परंतु जिसे नैष्ठिक ब्रह्मचर्य कहते हैं, उसमे बिंदुक्षरण बिल्कुलही संभव नहीं है। बिंदुका क्षरण नहीं हो सकता, इसी कारण उस निर्गुण ब्रह्मचर्यावस्थाकी गणना अव्यक्तभावके अंदर होती है। सामाजिक दृष्टिसे विवाह न करना और विवाह करके स्व-पत्नीके साथ संयत रहना, ये दोनोंही ब्रह्मचर्यके स्वरूप हैं। पर-स्त्रीके प्रति तानिक भी चित्तमें आसक्ति उत्पन्न हो जानेपर ब्रह्मचर्यावस्थासे पतन हो जाता है, क्योंकि चित्तकी वह अवस्था व्यभिचारकेही अंतर्गत मानी गयी है। स्व-दाराके प्रति निरत रहनेपर भी चित्त-संयमके तारतम्यके अनुसार गुण–भेदसे गृहस्थका ब्रह्मचर्य सात्त्विक, राजसिक और तामसिक तीन प्रकारका होता है।

बिंदुका शोधन सम्यक् प्रकारसे हुए बिना अन्य क्रिया-कौशल द्वारा उसे स्थिर करनेपर भी उसमें स्थायित्व नहीं आता। क्योंकि संसारात्मक मलके आकर्षणसे निर्दिष्ट स्थितिकालके अतीत होनेके बाद बिंदु पूर्वकी तरह नीचेकी ओर गतिशील हो जाता है ....बिंदु शुद्ध होनेपरही वह स्वभावत: स्थिर होता है। इस स्थिर बिंदुको किसी अलौकिक प्रक्रिया द्वारा विक्षुब्ध कर लिया जाय तो यह स्वभावत:ही ऊर्ध्वदिशामें संचरणशील हो जाता है । बिंदुकी यह ऊर्ध्वगति प्रवुद्ध कुंडलिनीके सहस्रारके आकर्षणसे ऊर्ध्वप्रवाहका नामांतर है। बिंदु क्रमश: स्थूल-भाव छोडकर सूक्ष्म, सूक्ष्मतर और सूक्ष्मतम अवस्था को प्राप्त होता है और अंतमें सहस्रदल कमलकी कर्णिकामें स्थित महाबिंदुके साथ मिल जाता है। यही चित्-चंद्रमाका षोडशी कलारूप अमृत बिंदु है। नाभिग्रंथिका भेद करके बिंदुको ऊर्ध्वस्रोतमें सांश्लिष्ट कर देनाही उपनयन या दीक्षाका यथार्थ रहस्य है। नाभि-चक्रसे ऊपर उठे बिना बिंदु मध्याकर्षणके चक्रके अंदर रहना संसारकाही दूसरा नाम है। ब्रह्मचर्यकी साधनाके द्वारा बिंदुको विषय-जगत्से पृथक् करके, उसे पवित्र बनाकर, ब्रह्ममार्गमें लगानाही संसारसे मुक्ति प्राप्त करनेका एकमात्र उपाय है। बिंदुके विक्षुब्ध होकर ऊर्ध्वकी ओर संचरण करनेपरही नाद का विकास होता है। अतएव नाभि-चक्रसे ऊपर स्वाभाविक खेल नाद एवं ज्योतिके रूपमें अनुभूत होता है। यही शब्दब्रह्मके संचारकी अवस्था है । इसके बाद नाद, ज्योति इत्यादिकी पूर्णतासे जो परम भावका उदय होता है, वही निजबोधरूप आत्मज्ञान का विकास है।

भगवान् पतंजलिने यह निर्देश किया है कि ब्रह्मचर्य-धारण करनेसे वीर्यकी प्राप्ति होती है। वास्तवमें ब्रह्मचारीकी अवस्थाकाही वर्णन योगसूत्रमें प्रकारांतरसे श्रद्धारूपमें किया है। ब्रह्मचर्य-पालनसे संभूत वीर्यकी प्राप्ति होनेपर देहके अंदर दिव्य-तेज अथवा विद्युत शक्तिका विकास होता है। इस तेजकी अधिकताके कारण चित्तकी चंचलता नष्ट हो जाती है, प्राणोंकी गति स्थिर हो जाती है और ध्येयकी ओर चित्तका एकतान प्रवाह उत्पन्न होता है। इसीका दूसरा नाम ध्यान अथवा स्मृति है। उपासनाका यही स्वरूप है। क्रमश: इन सबके घनीभूत होते-होते चित्तकी समाधिअवस्था उत्पन्न होती है। चित्तके समाहित होनेपर ध्येयवस्तु आवरण-विमुक्त होकर उज्ज्वल रूपमें अपनी ज्योतिसे उद्भासित और प्रकाशित हो उठता है। उस समय चित्त तिरोहित हो जाता है और एकमात्र ध्येयही उसके अनुभव क्षेत्रमें जागरूक रहता है। कहना नहीं होगा कि यह ध्येय चित्तकाही एक आकार विशेष है, यह चित्तसे भिन्न कोई पदार्थ नहीं है। इस प्रकाशको प्रज्ञाका उन्मेष अथवा ज्ञान-चक्षुका खुल जाना कहते हैं। इस प्रज्ञाके निरुध्द होनेके बाद जिस असंप्रज्ञात समाधिका उदय होता है, वही वास्तवमें योग कहलाने योग्य है। ब्रह्मचर्य योगकी

पूर्णावस्था प्राप्त करनेके लिए नितांत आवश्यक है, यह बात इस संक्षिप्त विवरणसे संभवत: पाठकोंको अवश्य मालूम हो जायगी ।" (पृ.३८९ तं ३९३)

सारांश, श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्थूल व सूक्ष्म ब्रह्मचर्याचा अर्थ कसा स्पष्ट केला आहे हे उपरोक्त विवेचनावरून साकल्याने ध्यानात येईल व ब्रह्मचर्यरूपी साधनसंपत्तीचे अपरिहार्य महत्त्व लक्षात येऊन " गीतेत नसलेला कुंडलिनी योगाचा विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी येथे नाथपंथाचे रहस्य म्हणून प्रस्तुत केला आहे," ह्या अनर्थकारक आक्षेपाचे निरसन होऊन ब्रह्मचर्याचा श्रीगोपालकृष्णनाथांच्या मनातील अर्थच येथे त्यांनी अत्यंत विस्तारपूर्वक स्पष्ट केला असून, त्यालाच ते " नाथसंकेतीचा दंश " म्हणत असून, हेच गीतेचेही रहस्य आहे, असे आपल्याला प्रतीत होईल.

येथपर्यंत आपण योगांग यमलक्षणाच्या अकरा गुणांचा साकल्याने विचार केला. आता आपल्याला योगांगातील नियमांचा विचार साधनसंपत्तीच्या दृष्टीने करावयाचा आहे. "योगदर्शनात' नियमाची व्याख्या करताना महर्षी पतंजलींनी असे म्हटले आहे की–

**शौचसंतोषतप:स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमः ॥२.३२॥**

शरीराची आतील व बाहेरील शुद्धता किंवा पवित्रता, संतोष अर्थात् समाधान, तपश्चर्या, स्वाध्याय म्हणजे साधनाभ्यास व ईश्वरोपासना हे नियम आहेत. " शांडिल्योपनिषदात व याज्ञवल्क्यसंहितेत " पुढील दहा प्रकारचे नियम सांगताना असे म्हटले आहे की–

**तप.संतोषास्तिक्यदानेश्वरपूजनसिद्धान्तश्रवणऱ्हीमतिजपव्रतानि**
**दश नियमः ॥१.२.१॥**

तप, संतोष, आस्तिक्य, दान, ईश्वरपूजन, सिद्धान्तश्रवण, ऱ्ही, मती, जप व व्रत असे दहा नियम आहेत.

वरील सर्व नियमांपैकी शुचितेचा विचार योगांग यमलक्षणात केला आहे. इतर तीन नियम दोन्ही व्याख्येत सारखे आहेत. त्यामुळे येथेही अकरा नियमांची चर्चा आपणास करावयाची आहे.

नियमाचे पहिले लक्षण तप हे आहे. "शांडिल्योपनिषदात" तपाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**तत्र तपो नाम विध्युक्तकृच्छ्रचांद्रायणादिभिः शरीरशोषणम् ॥१.२.२॥**

विधिपूर्वक कृच्छ्र, चांद्रायणादि व्रते करून शरीराला सुकविणे याला तप म्हणतात. "दर्शनोपनिषदात" तपाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**वेदोक्तेन प्रकारेण कृच्छ्रचांद्रायणादिभिः ॥२.२॥**
**शरीरशोषणं यत्तत्तप इत्युच्यते बुधैः ।**
**को वा मोक्ष कथं केन संसारं प्रतिपन्नवान् ॥३॥**

**इत्यालोचनमर्थज्ञास्तपः शंसंति पंडिताः ।**

वेदोक्त नियमानुसार कृच्छ्रचांद्रायणादि व्रतानुष्ठानाने शरीर शोषण करणे व शरीरात कफादि दोषांची अतिमात्र वृद्धी होऊ न देणे याला तप म्हणावे. अर्थज्ञांच्या किंवा पंडितांच्या दृष्टीने मोक्ष म्हणजे काय व कसा आहे आणि हा संसार मनुष्याला कशामुळे प्राप्त होतो याचा विचार करणे म्हणजे तप होय.

" श्रीमद्भगवद्गीतेत " भगवंतांनी दैवी संपत्तीची लक्षणे सांगताना " तप ॥ १६.१ ॥ " या योगांग नियमाचा उल्लेख केला आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

**आतां तप शब्दाभिप्रावो । आईक सांगों ॥१६.१०५॥**
**तरी दानें सर्वस्व देणें । वेचणें तें व्यर्थ करणें ।**
**जैसें फळोनि स्वयें सुकणें । इंद्रावणी जेवीं ॥१०६॥**
**नाना धूपाचा अग्निप्रवेशु । कनकी तुकाचा नाशु ।**
**पितृपक्षु पोषिता ऱ्हासु । चंद्राचा जैसा ॥१०७॥**
**तैसा स्वरूपाचिया प्रसरा—। लागीं प्राणेंद्रियशरीरां ।**
**आटणी करणें जे वीरा । तेंचि तप ॥१०८॥**
**अथवा अनारिसे । तपाचें रूप जरी असे ।**
**तरी जाण जेवीं दुधीं हंसें । सूदली चांचू ॥१०९॥**
**तैसें देहजीवाचिये मिळणीं । तो उदयजत सूये पाणी ।**
**तो विवेक अंतःकरणीं । जागवीजे ॥११०॥**
**पाहतां आत्मयाकडे । बुद्धीचा पैसु सांकडें ।**
**सनिद्र स्वप्न बुडे । जागणीं जैसें ॥१११॥**
**तैसा आत्मपर्यालोचु । प्रवर्ते जो साचु ।**
**तपाचा हा निर्वेचु । धनुर्धरा ॥११२॥**

याशिवाय भगवंतांनी "श्रीमद्भगवद्गीतेत" शारीरिक, वाङ्मयीन व मानसिक तपाचा निर्देश करून या साधनसंपत्तीचा सविस्तर व सूक्ष्मतेने विचार केला आहे. शारीरिक तप म्हणजे काय हे सांगताना ते असे म्हणतात की—

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥१७.१४॥**

देव, ब्राह्मण, गुरु व विद्वज्जन यांचे पूजन अर्थात् आदरसत्कार करणे, पवित्र व शुचिर्भूत असणे, सरळपणाने वागणे, ब्रह्मचर्य व अहिंसा पाळणे याला शारीरिक किंवा कायिक तप असे म्हणतात. शारीरिक तपापैकी आपण शौच, आर्जव, ब्रह्मचर्य व अहिंसा या गुणांचा विचार मागे केला आहे. "देवद्विजगुरुप्राज्ञपूजनम्" या लक्षणासंबंधी श्रीज्ञानेश्वरमहाराज काय म्हणतात तेवढे पाहिले की, शारीरिक तपाच्या सर्व

लक्षणांचा विचार पूर्ण होईल. उपरोक्त लक्षणाचा भावार्थ स्पष्ट करताना ते असे म्हणतात की–

तया प्रिय देवतालया । यात्रादिकें करावया ।
आठही पाहार जैसें पायां । उळिग घापे ।।१७.२०२।।
देवांगणमिरवणियां । अंगोपचार पुरवणियां ।
करावया म्हणियां । शोभती हात ।।२०३।।
लिंग कां प्रतिमा दिठी । देखतखेंवों अंगेष्टी ।
लोटिजे कां काठी । पडिली जैसी ।।२०४।।
आणि विधिविनयादिकीं । गुणीं वडील जे लोकीं ।
तया ब्राह्मणाची निकी । पाइकी कीजे ।।२०५।।
अथवा प्रवासें कां पीडा । का शिणले जे सांकडां ।
ते जीव सुरवाडा । आणिजती ।।२०६।।
सकल तीर्थांचिये धुरे । जियें का मातापितरें ।
तयां सेवेसि कीर शरीरें । लोण कीजे ।।२०७।।
आणि संसारऐसा दारुणु । जो भेटलाचि हरी शीणु ।
तो ज्ञानदानीं सकरुणु । भजिजे गुरु ।।२०८।।

वाङ्मयीन तप म्हणजे काय हे सांगताना भगवंतांनी "श्रीमद्भगवद्गीतेत" असे म्हटले आहे की–

अनुद्वेकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ।।१७.१५।।

कोणाच्याही मनात उद्वेग उत्पन्न न करणारे, खरे, प्रिय आणि हितकारक असे भाषण करणे व यथाविधी वेदशास्त्राध्ययन करणे ह्यास वाङ्मयीन किंवा वाचिक तप असे म्हणतात. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

तरी लोहाचे आंग तुक । न तोडतांचि कनक ।
केलें जैसें देख । परिसें तेणें ।।१७.२१६।।
तैसें न दुखवितां सेजे । जावळिया सुख निपजे ।
ऐसें साधुत्व कां देखिजे । बोलणां जिये ।।२१७।।
पाणी मुदल झाडा जाये । तृण तें प्रसंगेंचि जियें ।
तैसें एका बोलिलें होये । सर्वांहि हित ।।२१८।।
जोडे अमृताची सुरसरी । तें प्राणांतें अमर करी ।
स्नानें पाप ताप वारी । गोडीही दे ।।२१९।।

तैसा अविवेकु ही फिटे । आपुलें अनादित्व भेटे ।
आइकतां रुचि न विटे । पीयुषीं जैसी ॥२२०॥
जरी कोणी करी पुसणें । तरी होआवें ऐसें बोलणें ।
नातरी आवर्तणें । निगमु का नाम ॥२२१॥
ऋग्वेदादि तिन्ही । प्रतिष्ठीजती वाग्भुवनीं ।
केली जैसी वदनीं । ब्रह्मशाळा ॥२२२॥
नातरी एकाधें नांव । तेंचि शैव का वैष्णव ।
वाचे तें वाग्भव । तप जाणावें ॥२२३॥

मानसिक तप म्हणजे काय हे कथन करताना भगवंतांनी "श्रीमद्भगवद्गीतेत" असे म्हटले आहे की–

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत् तपो मानसमुच्यते ॥१७.१६॥

मन अत्यंत शांत किंवा प्रसन्न ठेवणे, सौम्यता, मौन, मनोनिग्रह आणि शुद्ध भावना ठेवणे याला मानसिक तप म्हणतात. यातील "मनःप्रसादः" या गुणाचा भावार्थ आपण मागे षट्कसंपत्तीतील समाधान या गुणाची चर्चा करताना पाहिला आहे. उरलेल्या गुणांचा भावार्थ व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की

आतां तप जें मानसिक । तेहीं सांगों आइक ।
म्हणे लोकनाथनायक । नायकु तो ॥१७.२२४॥
तपनेंवीण प्रकाशु । जाड्येंवीण रसीं रसु ।
पोकळीवीण अवकाशु । होय जैसा ॥२२८॥
तैसी आपली सोय देखे । अणि आपलिया स्वभावा मुके ।
हिंवली जसी आंगिकें । हिंवों नेदी निजांग ॥२२९॥
न चलतें कळंकेंवीण । शशिबिंब जैसें परिपूर्ण ।
तैसें चोखी शृंगारपण । मनाचें जें ॥२३०॥
बुजाली वैराग्याची वोरप । जिराली मनाची धांपकांप ।
तेथ केवळ जाली वाफ । निजबोधाची ॥२३१॥
म्हणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र ।
तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरी ॥ २३२॥
तें स्वलाभ लाभलेपणें । मन मनपणही धरूं नेणें ।
शिवतलें जैसें लवणें । आपुलें निज ॥२३३॥
तेथ कें उठिती ते भाव । जिहीं इंद्रियमार्गीं धांव ।
घेऊनि ठाकावे गांव । विषयांचे ते ॥२३४॥

**म्हणौनि तियें मानसीं । भावशुद्धिचि असे अपैसी ।**
**रोमशुचि जैसी । तळहातासी ॥२३५॥**
**काय बहु बोलों अर्जुना । जैं हे दशा ये मना ।**
**तैं मनोतपाभिधाना । पात्र होय ती ॥२३६॥**

नियमाचे दुसरे लक्षण संतोष हे आहे. "शांडिल्योपनिषदात" संतोषाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**संतोषो नाम यदृच्छालाभतुष्टिः ॥१.२.३॥**

ईश्वरइच्छेने प्रारब्धवशात् जे मिळेल त्यात सुखी राहणे याला संतोष म्हणतात. "दर्शनोपनिषदात" संतोषाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की –

**यदृच्छालाभतो नित्यं प्रीतिर्या जायते नृणाम् ॥२.४॥**
**तत् संतोषं विदुः प्राज्ञाः परिज्ञानैकतत्पराः ।**
**ब्रह्मावलोकपर्यन्ताद्विरक्त्या यल्लभेत् प्रियम् ॥४॥**
**सर्वत्र विगतस्नेहः संतोषं परमं विदुः ॥६॥**

यदृच्छेनें मिळालेल्या वस्तूंवर संतुष्ट राहणे व आनंदाने उपजीविका करणे याला ज्ञानीजनांनी संतोष असे म्हटले आहे. ब्रह्मलोकप्राप्तीविषयीही विरक्त राहून मिळेल त्या आवडत्या वस्तूविषयी आसक्तिविरहित राहणे याला संतोष म्हणतात.

"श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी "सततं संतुष्टः ॥ १२.१४ ॥" व "येनकेनचित् संतुष्टः ॥१२.१९॥" असे म्हणून संतोष या साधनसंपत्तीचा निर्देश करून साधकयोगी नेहमी संतुष्ट असतो व ज्यावेळी जे असेल त्यात संतोष मानणारा अर्थात् प्राप्त परिस्थितीविषयी कुरकुर न करणारा असतो, हे स्पष्ट केले आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की –

**वर्षियेवीण सागरु । जैसा जळें नित्य निर्भरु ।**
**तैसा निरुपचारु । संतोषी जो ॥१२.१५१॥**
**जो यथालाभें न तोखे । अलाभें न पारुखे ।**
**पाउसेंवीण न सुके । समुद्रु जसा ॥२१०॥**

नियमाचे तिसरे लक्षण आस्तिक्य हे आहे. "शांडिल्योपनिषदात" आस्तिक्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**आस्तिक्यं नाम वेदोक्तधर्माधर्मेषु विश्वासः ॥१.२.४॥**

वेदाने सांगितलेल्या धर्मावर व अधर्मावर विश्वास ठेवणे याला आस्तिक्य म्हणतात. "दर्शनोपनिषदात" आस्तिक्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**श्रौते स्मार्ते च विश्वासो यत्तदास्तिक्यमुच्यते ॥२.६॥**

"श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी ब्राह्मणाच्या स्वाभाविक कर्माचा उल्लेख करताना "आस्तिक्यं ॥१८.४२॥" या गुणाचा उल्लेख केला आहे. आस्तिक्य

याचा अर्थ स्थूलपणे श्रद्धा असा असला; तरी सूक्ष्मपणे श्रुती व स्मृतिशास्त्रांवर पूर्ण विश्वास असणे असा आहे. या गुणाचा भावार्थ स्पष्ट करताना या दृष्टीनेच श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की--

पैं राजमुद्रा आथिलिया । प्रजा भजे भलतया ।
तेवीं शास्त्रें स्वीकारिलिया । मार्गमात्रातें ॥१८.८४९॥
आदरें जें कां मानणें । तें आस्तिक्य मी म्हणें ॥८५०॥

ऋग्वेदादि चार वेद व स्मृती यांनाच शास्त्र म्हणतात. वेदाचे व स्मृतींचे माहात्म्य वर्णन करताना " मनुस्मृतीत " मनूने असे म्हटले आहे की --

श्रुतिस्मृत्युदितं धर्ममनुतिष्ठन् हि मानवः ।
इह कीर्तिमवाप्नोति प्रेत्य चानुत्तमं सुखम् ॥
श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः
ते सर्वार्थेष्वमीमांसे ताभ्यां धर्मो हि निर्बभौ ॥
आचारः परमो धर्मः श्रुत्युक्तः स्मार्त एव च ।
तस्मादस्मिन्सदा युक्तो नित्यं स्यादात्मवान्द्विजः ॥१.८॥
वेदशास्त्रार्थतत्त्वज्ञो यत्र तत्राश्रमे वसन् ।
इहैव लोके तिष्ठन्स ब्रह्मभूयाय कल्पते ॥१२.१०२॥
आर्षं धर्मोपदेशं च वेदशास्त्राऽविरोधिना ।
यस्तर्केणानुसंधत्ते स धर्मं वेद नेतरः ॥१०६॥

श्रुती व स्मृती यांमध्ये सांगितलेल्या धर्माचे अनुष्ठान करणाऱ्या मनुष्याची या लोकी कीर्ती होते व परलोकी गेल्यावर त्यास अत्युत्तम सुख मिळते. श्रुती म्हणजे वेद व स्मृती म्हणजे धर्मशास्त्र असे समजावे. त्या दोघांचाही प्रतिकूल तर्क करून विचार करू नये; कारण त्यांच्यापासून संपूर्ण धर्म प्रकट झाला आहे. वेदोक्त व स्मृत्युक्त आचार हाच परमधर्म आहे.याकरिता आपल्या हिताची इच्छा करणाऱ्या द्विजाने आचारामध्ये सतत व अहर्निश तत्पर असावे. जो वेद, वेदार्थ व वेदात्मक कर्म यांना तत्त्वतः जाणतो तो नित्यनैमित्तिक कर्मानुगृहित ब्रह्मज्ञानाने युक्त असल्यामुळे ब्रह्मचारी गृहस्थ इत्यादि कोणत्याही आश्रमामध्ये याच लोकी जरी राहिला; तरी ब्रह्मभावास समर्थ होतो. ऋषींनी सांगितलेले वेद व तन्मूलक स्मृत्यादि धर्मोपदेश यांचा त्यांच्याविरुद्ध कुतर्क न करता जो विचार करतो त्यासच धर्मज्ञान होते. इतर कोणसही होत नाही.

वेद व स्मृतीशास्त्रातील विश्वासालाच आस्तिक्य म्हणतात. हे आस्तिक्य प्रथम व्यतिरेक म्हणजे निषेधात्मक रीतीने व नंतर अन्वय म्हणजे होकारात्मक पद्धतीने सांगताना भगवंतांनी "श्रीमद्भगवद्गीतेत" असे म्हटले आहे की–

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥१६.२३॥

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥२४॥**

जो शास्त्राचे विधी झुगारून देऊन विषयवासनांच्या लहरींप्रमाणे वर्तन करतो त्याला आत्मसिद्धी मिळत नाही, सुख होत नाही व श्रेष्ठ गतीही प्राप्त होत नाही. यासाठी हे अर्जुना ! काय केले पाहिजे व काय करता कामा नये यांचा निश्चय करण्याकरिता शास्त्र हेच प्रमाण आहे. म्हणून शास्त्राने विहित ठरविलेल्या कर्माचे यथार्थ ज्ञान संपादन करून त्या कर्माचे इहलोकी आचरण करणे हेच तुला योग्य आहे. या श्लोकांचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की –

ना हें नावडोनि कांहीं । कामादिकांच्याचि ठायीं ।
दाटिली जेणें डोई । आत्मचोरें ॥१६.४४५॥
जो जगीं समान सकृपु । हिताहित दाविता दीपु ।
तो अमान्यु केला बापु । वेदु जेणें ॥४४६॥
न धरीचि विधीची भीड । न करीचि आपली चाड ।
वाढवीत गेला कोड । इंद्रियांचें ॥४४७॥
कामक्रोधलोभांची कास । न सोडीच पाळिली भाष ।
स्वैराचाराचें असोस । वळघला रान ॥४४८॥
तो सुटकेचिया वाहिणीं । मग पिवों न लाहे पाणी ।
स्वप्नींही ते कहाणी । दूरीचि तया ॥४४९॥
आणि परत्र तंव जायें । हें कीर तया आहे ।
परी ऐहिकही न लाहे । भोग भोगूं ॥४५०॥
तरी मत्स्यालागीं भुलला । ब्राह्मण पाणबुडां रिघाला ।
कीं तेथही पावला । नास्तिकवादु ॥४५१॥
तैसें विषयांचेनि कोडें । जेणें परत्रा केलें उबडें ।
तंव तोचि आणिकीकडे । मरणें नेला ॥४५२॥
एवं परत्र ना स्वर्गु । ना ऐहिकही विषयभोगु ।
तेथ केउता प्रसंगु । मोक्षाचा तो ? ॥४५३॥
म्हणौनि कामाचेनि बळें । जो विषय सेवूं पाहे सळें ।
तया विषयो ना स्वर्गु मिळे । ना उद्धरे तो ॥४५४॥
या कारणें पैं बापा । जया आथी आपुली कृपा ।
तेणें वेदांचिया निरोपा । आन न कीजे ॥४५५॥
पतीचिया मता । अनुसरोनि प्रतिव्रता ।
अनायासें आत्महिता । भेटेचि ते ॥४५७॥

नातरी श्रीगुरुवचना । दिठी देतु जतना ।
शिष्य आत्मभुवना- । माजीं पैसे ।।४५७।।
हें असो आपुला ठेवा । हाता आथी जरी यावा ।
तरी आदरें जेवीं दिवा । पुढां कीजे ।। ४५८।।
तैसा अशेषांही पुरुषार्थां । जो गोसावी हो म्हणे पार्था ।
तेणें श्रुतिस्मृति माथां । बैसणें घापे ।।४५९।।
शास्त्र म्हणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें ।
जें घेववी तें न म्हणावें । विषही विरु ।।४६०।।
ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा ।
तरी कें आहे अनिष्टा । भेटणें गा ।।४६१।।
पैं अहितापासूनि काढिती । हित देऊनि वाढविती ।
नाहीं गा श्रुतिपरौती । माउली जगा ।।४६२।।
म्हणौनि ब्रह्मेंशीं मेळवी । तंव हें कोणें न सांडावी ।
अगा तुवांही ऐसीचि भजावी । विशेषेंसी ।।४६३।।
कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं ।
अकृत्य तें कुडें लोकीं । वाळावें गा ।।४६६।।
मग कृत्यपणें खरें निगे । तें तुवां आपुलेनि आंगें ।
आचरोनि आदरें चांगें । सारावें गा ।।४६७ ।।

नियमाचे चौथे लक्षण दान हे आहे. दानाची व्याख्या करताना "शांडिल्योपनिषदात" असे म्हटले आहे की –

**दानं नाम न्यायार्जितधनधान्यादेः श्रद्धयार्थिभ्यः प्रदानम् ।।१.२.५।।**

न्यायाने मिळविलेले धन, धान्य इत्यादि अत्यंत श्रद्धापूर्वक गरिबांना देणे याला दान म्हणतात. "दर्शनोपनिषदात" दानाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**न्यायार्जितधनं श्रांते श्रद्धया वैदिके जने ।**
**अन्यद्वा यत् प्रदीयंते तद्दानं प्रोच्यते मया ।। २.७।।**

न्यायाने मिळविलेले धन थकलेल्या वैदिकांना श्रद्धेने देणे व वस्त्र, अन्न इत्यादि आणखी इतर रंजलेल्यांना अथवा गांजलेल्यांना देणे याला दान म्हटले जाते

"श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी दैवी संपत्तीचे लक्षण सांगताना व क्षत्रियाचे स्वाभाविक गुण कथन करताना "दानम् ।।१६.१।।१८.४३।।" असा या गुणाचा उल्लेख करून पुढे सात्त्विक दानाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ।।१७.२०।।**

दान करणे हे आपले कर्तव्य आहे असे समजून जे दान प्रत्युपकाराची अपेक्षा ज्याच्यापासून नाही अशा मनुष्यास योग्य स्थली, योग्य काली व पात्रापात्रविचार-पूर्वक दिले जाते ते दान सात्त्विक मानले जाते. एवढा विधानात्मक, होकारार्थी किंवा अन्वयात्मक विचार दानासंबंधी मांडून पुढे राजस व तामस दान म्हणजे काय हे सांगून त्याची विरोधी बाजूही त्यांनी स्पष्ट केली आहे. त्याचप्रमाणे दान हे सत्कर्म आहे असे पुढे सांगून त्यासंबंधी अधिक सूक्ष्म विचार स्पष्ट केला आहे. साधनसंपत्तीच्या दृष्टीने वरील दोन ठिकाणी उधृत केलेला निर्देश पुरेसा असून त्याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

आतां देहवाचाचित्तें । यथासंपन्नें वित्तें ।
वैरी जालियाही आर्तातें । न वंचणें जें कां ॥१६.८५॥
पत्र पुष्प छाया । फळ मूळ धनंजया ।
वाटेचा न चुके आलिया । वृक्षु जैसा ॥८६॥
तैसें मनौनि धनधान्यवरी । विद्यमानें आल्या अवसरीं ।
श्रांताचिये मनोहारीं । उपयोगा जाणें ॥८७॥
तया नांव जाण दान । जें मोक्षनिधानाचें अंजन ॥८८॥
तरी स्वधर्मा आंतौतें । जें जें मिळेल आपणयातें ।
तें तें दीजे बहुतें । सन्मानयोगें ॥१७.२६६॥
जालया सुबीजप्रसंगु । पडे क्षेत्रवाफेचा पांगु ।
तैसाचि दानाचा हा लागु । देखतसें ॥२६७॥
अनर्घ्य रत्न हातां चढे । तैं भांगाराची बोढी पडे ।
दोनी जाली तरी न जोडे । लेतें आंग ॥२६८॥
परी सण सुहृद संपत्ती । हे तिन्ही येकीं मिळती ।
जैं भाग्य धरी उन्नतीं । आपुल्याविषयीं ॥२६९॥
तैसें निफजावया दान । जैं सत्त्वासि ये संवाहन ।
तैं देश काळ भाजन । द्रव्यही मिळे ॥२७०॥
तरी आधीं तंव प्रयत्नेंसीं । होआवें कुरुक्षेत्र का काशीं ।
नातरी तुके जो इहींसीं । तो देशुही हो ॥२७१॥
तेथ रविचंद्रराहुमेळु । होतां पाहे पुण्यकाळु ।
का तयासारिखा निर्मळु । आनुही जाला ॥२७२॥
तैशा काळीं तिये देशीं । होआवो पात्र संपत्ती ऐसी ।
मूर्त आहे धरिली जैसी । शुचित्वेंचि कां ॥२७३॥
आचाराचें मूळपीठ । वेदांची उतारपेठ ।
तैसें द्विजरत्न चोखट । पावोनियां ॥२७४॥

जग तयाच्या ठाईं वित्ता । निवर्तवावी स्वसत्ता ।
परी प्रियापुढें कांता । रिगे जैसी ॥२७५॥
का जयाचें ठेविलें तया । देऊनि होईजे उतराइया ।
नाना हडपें विडा राया । दिधला जैसा ॥२७६॥
तैसेनि निष्कामें जीवें । भूम्यादिक अर्पावें ।
किंबहुना हांवे । नेदावें उठों ॥२७७॥
आणि दान जया द्यावें । तयातें ऐसेया पाहावें ।
जया घेतलें नुमचवे । कायसेंनही ॥२७८॥
साद घातलिया आकाशा । नेदी प्रतिशब्दु जैसा ।
का पाहिला आरसा । येरीकडे ॥२७९॥
नातरी उदकाचिये भूमिके । आफळिलेनि कंदुकें ।
उधळौनि कवतिकें । न येईजे हाता ॥२८०॥
नाना वसो घातला चारू । माथां तुरंबिला बृरु ।
न करी प्रत्युपकारु । जियापरी ॥२८१॥
तैसें दिधलें दातयाचें । जो कोणेही आंगें नुमचे ।
अर्पिलया साम्य तयाचें । कीजे पैं गा ॥२८२॥
ऐसिया जें सामग्रिया । दान निफजे वीरराया ।
तें सात्त्विक दानवर्या । सर्वांही जाण ॥२८३॥
आणि तोचि देशु काळु । घडे तैसाचि पात्रमेळु ।
दानभागुही निर्मळु । न्यायगतु ॥२८४॥
आणि जालेनि फुलें फळें । शाखिया जैसीं मोकळे ।
कां उदार परिमळें । पद्माकरु ॥१८.८६८॥
नाना आवडेनि मापें । चांदणें भलतेणें घेपे ।
पुढिलांचेनि संकल्पें । तैसें जें देणें ॥८६९॥
तें उमप गा दान । जेथ सहावें गुणरत्न ॥८७०॥

नियमाचे पाचवे लक्षण ईश्वर प्रणिधान किंवा ईश्वर पूजन हे आहे. याची व्याख्या करताना "शांडिल्योपनिषदात" असे म्हटले आहे की–

ईश्वरपूजनं नाम प्रसन्नस्वभावेन यथाशक्ति विष्णुरुद्रादिपूजनम् ॥१.२.६॥

अत्यंत प्रसन्न भावाने आपल्या शक्तिप्रमाणे विष्णू, रुद्र किंवा आपल्या उपास्य देवतेच्या पूजनाला ईश्वरपूजा असे नाव आहे. "दर्शनोपनिषदात" या गुणाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की-

रागाद्यपेतं हृदयं वागदुष्टानृतादिना ।
हिंसादिरहितं कर्म यत्तदीश्वरपूजनम् ॥२.८॥

चित्त लोभमोहादि दुर्गुणरहित होणे, वाणी अश्लील असत्यादिरहित होणे व कर्म हिंसाचौर्यादिरहित होणे हेच खरे ईश्वरपूजन होय. याचा अर्थ असा की, कायावाचामने निर्मलत्व प्राप्त होणे हीच खरी देवपूजा होय.

"ऐतरेय उपनिषदात व पांतजल योगदर्शनावरील व्यास भाष्यात" ईश्वरप्राणिधानाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की –

**ईश्वरप्रणिधानं तस्मिन्परमगुरौ सर्वकर्मार्पणम् ॥२.३२॥**

परमगुरू परमेश्वराला सर्व कर्मे समर्पण करणे हे ईश्वरप्राणिधान होय. "पातंजल योगदर्शनात" पुढे "समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात् ॥ २.४५॥" असे सांगून ईश्वराला सर्वस्व अर्पण केल्याने समार्धाची सिद्धी होते, हे कथन केले आहे.

"श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी ईश्वरपूजन या साधनसंपत्तीचा अनेक वेळा उल्लेख केला आहे. विशेषत: गुणकथनाच्या दृष्टीने अनन्य व अव्यभिचारिणी भक्ती साधकाला आवश्यक आहे हे सांगताना त्यांनी असे म्हटले आहे की–

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्परा: ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥१२.६॥**
**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ॥१३.१०॥**
**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ॥१४.२६॥**
**यो मद्भक्त: ॥१२.१६॥**

जे माझ्याविषयी तत्पर होऊन, सर्व कर्मे मला अर्पण करून, माझे ध्यान करीत अनन्ययोगाने माझीच उपासना करतात व माझ्यावर अनन्यभाव ठेवून अढळ भक्ती करतात ते माझी अव्यभिचारी भक्तियोगाने सेवा करतात व तेच माझे भक्त होत. याचा भावार्थ व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानासिक भाव ।**
**तयां मीवांचूनि धांव । आनौती नाहीं ॥१२.७९॥**
**ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर ।**
**ध्यानमिषें घर । माझें झालें ॥८०॥**
**जयांचिये आवडी । केली मजशीं कुळवाडी ।**
**भोगमोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥८१॥**
**आणि मीवांचूनि कांहीं । आणिक गोमटें नाहीं ।**
**ऐसा निश्चयोचि तिहीं । जयाचा केला ॥१३.६०४॥**
**शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश ।**
**एक मीवांचूनि वास । न पाहती आन ॥६०५॥**
**किंबहुना निकट निज । जयाचें जाहलें मज ।**
**तेणें आपणयां आम्हां सेज । एकी केली ॥६०६॥**

रिगतां वल्लभापुढें । नाहीं आंगीं जीवीं सांकडें ।
तिये कांतेचेनि पाडें । एकसरला जो ।।६०७।।
मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें ।
मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ।।६०८।।
म्हणौनि विश्वपण जावें । मग तें मातें घेयावें ।
तैसा नव्हे आघवें । सकटचि मी ।।१४.३८०।।
ऐसेनि मातें जाणिजे । ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे ।
येथ भेद कांहीं देखिजे । तरी व्यभिचारु तो ।।३८१।।
अर्जुना हा ठावोवरी । जो सोऽहंभावो सरोभरी ।
द्वैताच्या पैलतीरीं । निगों सरला ।।१२.१८५।।
कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोहीं भागीं ।
वांटूनियां आंगीं । सेवकै बाणे ।।१८६।।
येरा नाम मी ठेवी । मग भजती वोज बरवी ।
न भजतया दावी । योगिया जो ।।१८७।।

नियमाचे सहावे लक्षण सिद्धान्तश्रवण हे आहे. " शांडिल्योपनिषदात " या लक्षणाची व्याख्या करताना अस म्हटले आहे की –

सिद्धान्तश्रवणं नाम वेदान्तार्थविचारः ।।१.२.७।।

वेदान्ताच्या अर्थाचा विचार करणे याला सिद्धान्तश्रवण असे म्हणतात. " दर्शनोपनिषदात " या गुणाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की –

सत्यं ज्ञानमनन्तं च परमानंदं परं ध्रुवम् ।
प्रत्यगित्यवगंतव्यं वेदान्तश्रवणं बुधः ।।२.९।।

हा जीवात्मा सत्य, ज्ञान, अनंत व परमानंदयुक्त अर्थात् शाश्वतनित्यादि गुणवानच आहे असे समजणे व त्यासाठी उपनिषदादि ऐकणे हे सिद्धान्तश्रवण होय.

" श्रीमद्भगवद्गीतेत " भगवंतानी " अध्यात्मज्ञाननित्यत्वं ।।१३.११।। " असे म्हणून वरील गुणांचा उल्लेख केला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी याचा भावार्थ अन्वयाने जसा स्पष्ट केला आहे त्याप्रमाणेच " अध्यात्मज्ञान नित्यत्वाभावः । " याचेही व्यतिरेकाने या गुणाचे अज्ञान म्हणून वर्णन करून त्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. याचे वर्णन करताना ते असे म्हणतात की–

तरी परमात्मा ऐसें । जें एक वस्तु असे ।
तें जया दिसें । ज्ञानास्तव ।।१३.६१६।।
तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें ।
तें अज्ञान ऐसा मनें । निश्चयो केला ।।६१७।।
स्वर्गा जाणें हें सांडी । भवविषयीं कान झाडी ।
दे अध्यात्मज्ञानीं बुडी । सद्भावाची ।।६१८।।

भंगलिये वाटे। शोधूनिया अव्हांटे।
निधिजे जेवीं नीटे। राजपंथें ॥५१९॥
तैसें ज्ञानजातां करी। आघवेंचि एकीकडे सारी।
मग मन बुद्धि मोहरी। अध्यात्मज्ञानीं ॥५२०॥
म्हणें हेंचि एक आथी। येर जाणणें ते भ्रांती।
ऐसी निकुरेंसीं मती। मेरु होय ॥५२१॥
एवं निश्चयो जयाचा। द्वारीं अध्यात्मज्ञानाचा।
ध्रुव देवो गगनाचा। तैसा राहिला ॥५२२॥

卐 卐 卐

आणि आत्मा गोचरु होये। ऐसी जे विद्या आहे।
ते आइकोनि डौर वाहे। विद्वांसु जो ॥१३·८२६॥
उपनिषदांकडे न वचे। योगशास्त्र न रुचे।
अध्यात्मज्ञानीं जयाचे। मनचि नाहीं ॥८२७॥
आत्मचर्चा एकी आथी। ऐसिये बुद्धीची भिंती।
पाडूनि जयाची मती। वोढाळ जाहली ॥८२८॥
आयुष्येंवीण लक्षणें। सिसेंवीण अळंकरणें।
वोहरेंवीण वाधावणें। तो विटंबु गा ८३८॥
तैसें शास्त्रजात जाण। आघवेंचि अप्रमाण।
पार्था अध्यात्मज्ञानेंवीण। एकलेनी ॥८३९॥
यालागीं अर्जुना पाहीं। अध्यात्मज्ञानाच्या ठायीं।
जया नित्यबोधु नाहीं। शास्त्रमूढा ॥८४०॥

नियमाचे सातवे लक्षण ऱ्ही असे आहे. "शांडिल्योपनिषदात" या गुणाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

ऱ्हीर्नाम वेदलौकिकमार्गकुत्सितकर्मणि लज्जा ॥१.२.८॥

वेदमार्गात व लौकिक मार्गात नीच किंवा वाईट समजले जाणारे कर्म करताना जो अनुभव येतो त्याला ऱ्ही म्हणजे लज्जा असे म्हणतात. "दर्शनोपनिषदात" या गुणाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

वेदलौकिकमार्गेषु कुत्सितं कर्म यद्भवेत्।
तस्मिन् भवति या लज्जा ऱ्हीः सैवेति प्रकीर्तिता ॥२.१०॥

वेदमार्ग व लौकिकमार्ग यातील चांगले कर्म टाकून कुत्सित कर्म करणे याला लज्जा असे म्हणतात.

"श्रीमद्भगवद्गीतेत" दैवी संपत्तीची लक्षणे सांगताना भगवंतांनी "ऱ्हीः॥ १६.२॥" असे म्हणून या नियमाचा उल्लेख केला आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

आतां पराजयें राजा । जैसा कदर्थिजे लाजा ।
कां मानिया निस्तेजा । निकृष्टास्तव ॥१६.१७५॥
नाना चांडाळ मंदिराशीं । अवचटें आलिया संन्यासी ।
मग लाज होय जैसी । उत्तमा तया ॥१७६॥
क्षत्रिया रणीं पळोनि जाणें । तें कोण साहे लाजिरवाणें ।
कां वैधव्यें पाचारणें । महासतियेतें ॥१७७॥
रूपसा उदयलें कुष्ट । संभावितां कुटीचें बोट ।
तया लाजा प्राणसंकट । होय जैसें ॥१७८॥
तैसें औटहातपणें । जें शव होऊनि जिणें ।
उपजों उपजों मरणें । नावानावा ॥१७९॥
तियें गर्भमेदमुसें । रक्तमूत्ररसें ।
वोंतीव होऊनि असे । तें लाजिरवाणें ॥१८०॥
हें बहु असो देहपणें । नामरूपासि येणें ।
नाहीं गा लाजिरवाणें । तयाहूनी ॥१८१॥
ऐसैंसिया अवकळा । घेपे शरीराचा कंटाळा ।
ते लाज पैं निर्मळा । निसुगा गोड ॥१८२॥

नियमाचे आठवे लक्षण मती असे आहे. "शांडिल्योपनिषदात" या लक्षणाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

मतिर्नाम वेदविहितकर्ममार्गेषु श्रद्धा ॥१.२.९॥

वेदोक्त कर्ममार्गावरील श्रद्धेला मती असे म्हणतात. "दर्शनोपनिषदात" या नियमाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

वैदिकेषु च सर्वेषु श्रद्धा या सा मतिर्भवेत् ।
गुरुणा चोपदिष्टोऽपि तत्र संबंधवर्जितः ॥२.११॥

सर्व वैदिक कर्माविषयी जी श्रद्धा ती मती होय. गुरुजनांनी वेदविरुद्ध मार्ग सांगितला ; तरी तो वर्ज्य करून तेथे संबंध न ठेवता वेदोक्त उपासनाच करणे याला मती म्हणतात.

भगवंतांनी "श्रीमद्‌भगवद्‌गीतेत" "कर्मेंद्रियाणि संयम्य ॥३.६॥" अशी सुरुवात करून "यो भुंक्ते स्तेन एव सः ॥३·१२॥" येथपर्यंत वैदिक कर्माच्या श्रद्धेबद्दलची आवश्यकता प्रतिपादली असून या मतीला स्वधर्म म्हणून त्याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

वांचोनि कर्मारंभ उचित । न करितां सिद्धवत ।
कर्महीना निश्चित । होईजेना ॥३.४५॥
कीं प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होईजे ।
हे अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥४६॥

सांगें पैलतीरा जावें। ऐसें व्यसन कां जेथ पावे।
तेथ नावेतें त्यजावें। घडे केवीं ?॥४७॥

जंव निरार्तता नाहीं। तंव व्यापारु असे पाहीं।
मग संतुष्टीच्या ठायीं। कुंटे सहजें॥४९॥

म्हणौनि आइकें पार्था। जयां नैष्कर्म्यपदीं आस्था।
तया उचित कर्म सर्वथा। त्याज्य नोहे॥५०॥

आणि आपुलिये चाडे। आपादिलें हें मांडे।
कीं त्यजिलें कर्म सांडे। ऐसें आहे ? ॥५१॥

हें वायाचि सैरा बोलिजे। उकलु तरी देखोनि पाहिजे।
परी त्यजितां कर्म न त्यजे। निभ्रांत मानीं॥५२॥

म्हणौनि संगू जंव प्रकृतीचा। तंववरी त्यागु न घडे कर्माचा।
ऐसियाहि करूं म्हणती तयांचा। आग्रहोचि उरे॥६३॥

म्हणौनि नैकर्म्य होआवें। तरी एथ तें न संभवें।
आणि निषिद्ध केवीं राहाटावें। विचारीं पां॥७७॥

म्हणौनि जें जें उचित। आणि अवसरेंकरूनि प्राप्त।
तें कर्म हेतुररित। आचरे तूं॥७८॥
स्वधर्मु जो बापा। तोचि नित्ययज्ञु जाण पां।
म्हणौनि वर्तता तेथ पापा। संचारु नाहीं॥८१॥
म्हणौनि स्वधर्मु जो सांडील। तयातें काळु दंडील।
चोरु म्हणौनि हरील। सर्वस्व तयाचें॥११२॥
मग सकळ दोषु भंवते। गिंवसोनि घेति तयातें।
रात्रीसमयीं स्मशानातें। भूतें जैसीं॥११३॥
तैसीं त्रिभुवनींचीं दुःखें। आणि नानाविधें पातकें।
दैन्यजात तितुकें। तेथेंचि वसे॥११४॥
ऐसें होय तया उन्मत्ता। मग न सुटे बापा रुदतां।
कल्पांतींही सर्वथा। प्राणिगणहो॥११५॥
म्हणौनि निजवृत्ती हे न संडावी। इंद्रियें बरळों नेदावीं।
ऐसें प्रजांतें शिकवी। चतुराननु॥११६॥
जैसे चळचरा जळ सांडें। आणि तत्क्षणी मरण मांडे।
हा स्वधर्मू तेणें पाडें। विसंबो नये॥११७॥

नियमाचे नववे लक्षण जप हे आहे. "शांडिल्योपनिषदात" जपाची व्याख्या सांगताना असे म्हटले आहे की—

**जपो नाम विधिवद्गुरूपदिष्टवेदाविरुद्धमंत्राभ्यासः । तद्द्विविधं वाचिकं मानसं चेति । मानसं तु मनसा ध्यानयुक्तम् । वाचिकं द्विविधमुच्चैरुपांशुभेदेन । उच्चैरुच्चारणं यथोक्तफलम् । उपांशु सहस्रगुणम् । मानसं कोटिगुणम् ॥१.२.१०॥**

सद्गुरूंनी विधिवत् उपदेश केलेल्या वैदिक मंत्राच्या अभ्यासाला जप असे म्हणतात. हा जप वाचिक व मानसिक अशा दोन प्रकारचा आहे. मनाच्या द्वारा ध्यानयुक्त होऊन केलेल्या जपाला मानसिक जप म्हणतात. उच्च व लहान आवाजात केलेल्या दोन प्रकारच्या जपाला वाचिक जप म्हणतात. मोठ्या आवाजात जप केल्यास जितका जप केला असेल तितकेच फळ मिळते. हळू म्हणून जप केल्यास हजारपट फळ मिळते व मानसिक जप केल्यास कोटीपट फळ मिळते. " दर्शनोपनिषदात " जपाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**वेदोक्तेनैव मार्गेण मंत्राभ्यासो जपः स्मृतः ।**
**कल्पसूत्रे यथा वेदे धर्मशास्त्रे पुराणके ॥२.१२॥**
**इतिहासे च वृत्तिर्या स जपः प्रोच्यते मया ॥१३॥**

वेदोक्त मार्गानेच एखाद्या मंत्राचा अभ्यास करणे याला जप म्हणतात. कल्पसूत्र, वेद ,धर्मशास्त्र,पुराण व इतिहास यांचे पुनःपुन्हा वाचन, आवृत्ती व पठणपाठण करणे यालाही जप असे म्हणतात.

"श्रीमद्भगवद्गीतेत " भगवंतांनी " सततं कीर्तयंतो मां ॥ ९.१४ ॥, यज्ञानां जपयज्ञोऽस्मि ॥१०.२५॥" व " ॐ तत्सदिति निर्देशोब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः। ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ १७.२३ ॥ " असे म्हणून या गुणाचा उल्लेख केला आहे. भक्त माझे सतत कीर्तन करतात. यज्ञांमध्ये जपरूप यज्ञ मीच आहे. ॐ तत् सत् असा ब्रह्माचा तीन प्रकारचा वाचक शब्द किंवा मंत्र आहे. याच्यामुळेच पूर्वकाली ब्राह्मण, वेद आणि यज्ञ निर्माण झाले. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे आहे की–

**तरी कीर्तनाचेनि नटनाचे । नाशिले व्यवसाय प्रायश्चिताचे ।**
**जें नामचि नाहीं पापाचे । ऐसें केलें ॥९.१९७॥**
**तो मी वैकुंठीं नसें । वेळु एक भानुबिंबींही न दिसें ।**
**वरी योगियांचींही मानसें । उमरडोनि जाय ॥२०७॥**
**परी तयांपाशीं पांडवा । मी हारपला गिंवसावा ।**
**जेथ नामघोषु बरवा । करिती माझा ॥२०८॥**
**कैसे माझ्या गुणीं धाले । देशकालातें विसरले ।**
**कीर्तनें सुखी झालें । आपणपांचि ॥२०९॥**

कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामाचे निखळ प्रबंध ।
माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥२१०॥
अशेषांही वाचा–। माजीं नटनाच्र सत्याचा ।
तें अक्षर एक मी वैकुंठींचा । वेल्हाळु म्हणे ॥१०.२३१॥
समस्तांही यज्ञांच्या पैकीं । जपयज्ञु मी यें लोकीं ।
जो कर्मत्यागें प्रणवादिकीं । निफजविजे ॥२३२॥
नामजपयज्ञु तो परम । बाधूं न शके स्नानादि कर्म ।
नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थे ॥२३३॥
तरी सर्व मंत्रांचा राजा । तो प्रणवो आदिवर्णु बुझा ।
आणि तत्कारु जो दुजा । तिजा सत्कारु ॥१७.३४२॥
एवं ॐतत्सदाकारु । ब्रह्मनाम हें त्रिप्रकारु ।
हे फुल तुरंबो सुंदरु । उपनिषदाचें ॥३४३॥
येणेंसीं गा होऊनि एकु । जें कर्म चालें सात्त्विक ।
तें कैवल्यातें पाइक । घरींचें करी ॥३४४॥

नियमाचे दहावे लक्षण व्रत हे आहे. "शांडिल्योपनिषदात" व्रताची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

व्रतं नाम वेदोक्तविधिनिषेधानुष्ठाननैयत्यम् ॥२१.२.११॥

वेदोक्त विधिनिषेधाचे नियमित आचरण करणे याला व्रत असे म्हणतात.

"श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी "यज्ञ शिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ॥३.१३॥" व "यें तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः॥१२.६॥" असे म्हणून या नियमाचा निर्देश केला आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

देखा विहित क्रियाविधि । निर्हेतुका बुद्धि ।
जो असतिये समृद्धि । विनियोगु करी ॥३.११९॥
गुरु गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं ।
निमित्तादिकीं यजी । पितरोद्देशें ॥१२०॥
या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करितां ।
हुतशेष स्वभावतः । उरे जें जें ॥१२१॥
तें सुखें आपुलें घरीं । कुटुंबेंसी भोजन करी ।
कीं भोग्यचि तें निवारी । कल्मषातें ॥१२२॥
कर्मेंद्रिये सुखें । करिती कर्मे अशेखें ।
जियें कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥१२.७६॥

विधीतें पाळित । निषेधातें गाळित ।
मज देऊनि जाळित । कर्मफळें ।।७७।।

याशिवायही या साधनसंपत्तीचा उल्लेख करताना त्यांनी असे म्हटले आहे की–

म्हणौनि मोक्षलाभालागीं । जो व्रतें वाहातसें आंगीं ।
तेणें स्वधर्मु आस्था चांगी । अनुष्ठावा ।।१८.९२२।।
विवेकश्रवणें खरपुसें । जेथ व्रताचरणें कर्कशें ।
करितां जाती भोकसे । बुद्ध्यादिकांचे ।।१८.७८३।।
तपोव्रतांचा मेळावा । जयाचे ठायीं पांडवा ।।१३.५१९।।
श्वासोश्वासाहूनी बहुवसें । व्रतें आचरे खरपुसें ।
वोसंतिता रात्रीदिवसें । नाराणुक जया ।।१६.९२।।

नियमाचे अकरावे लक्षण स्वाध्याय हे आहे. स्वाध्याय म्हणजे साधनाभ्यास होय. " योगदर्शनावरील भाष्यात " महर्षी व्यासांनी या गुणाची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

स्वाध्यायो मोक्षशास्त्राणामध्ययनम्प्रणवजपो वा ।।२.३२।।

ब्रह्मसूत्रे, उपनिषदे, गीता इत्यादि मोक्षशास्त्राचे अध्ययन करणे किंवा शास्त्रोक्त रीतीने प्रणवाचा जप करणे यास स्वाध्याय असे म्हणतात.

" श्रीमद्‌भगवद्‌गीतेत " भगवंतांनी या साधनसंपत्तीचे वर्णन करताना असे म्हटले आहे की–

मनः अभ्यासेन गृह्यते ।।६.३५।।
अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ।।८.८।।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ।।१२.९।।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ।।१८.३६।।

अभ्यासाने मनाचा निग्रह करता येतो. अभ्यासयोगाने युक्त असल्यामुळे एकाग्र चित्ताने ध्यान करणारा पुरुष त्याच दिव्य परमपुरुषाला म्हणजे परमेश्वराला प्राप्त होतो. अभ्यासयोगाने मला प्राप्त होण्याची इच्छा ठेव. अभ्यासाने आवड उत्पन्न होऊन मनुष्याच्या दुःखाचा अंत होतो. वरील श्लोकांचा व अन्यत्र श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जो भावार्थ स्पष्ट केला आहे त्यातून स्वाध्याय या नियमाची पुढील लक्षणे स्पष्ट दिसतात. ते असे म्हणतात की–

जैसें भाग्याचिया भडसें । उद्यमाचेनि मिसें ।
मग समृद्धिजात आपैसें । घर रिघे ।।६.३५४।।

तैसा युक्तिमंतु कौतुकें । अभ्यासाचिया मोहरा ठाके ।
आणि आत्मसिद्धीचि पिके । अनुभवु तयाचा ॥३५५॥

म्हणौनि आसनाचिया गाढिका । जो आम्हीं अभ्यासु सांगितला निका ।
तेणें होईल तरी हो कां । निरोधु यया ॥३६४॥

तंव कृष्ण म्हणती साचचि । बोलत आहासि तें तैसेंचि ।
यया मनाचा कीर चपळचि । स्वभावो गा ॥४१८॥

परि वैराग्याचेनि आधारें । जरी लाविलें अभ्यासाचिये मोहरें ।
तरी केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल ॥४१९॥

येणेंचि अभ्यासेंसी योगु । चित्तासि करी पां चांगु ।
अगा उपायबळें पंगु । पहाड ठाकी ॥८.८१॥

तेंवि सदभ्यासें निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर ।
लावीं मग शरीर । राहो अथवा जावो ॥८२॥

म्हणौनि अभ्यासासी कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं ।
यालागीं माझ्या ठायीं । अभ्यासें मीळ ॥१२.११३॥

सारांश, येथपर्यंत आपण ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या साधनसंपत्तीची यम-नियमांच्या द्वारा सविस्तर चर्चा केली. शास्त्रकारांनी साध्य सिद्ध होईपर्यंत यम-नियमांचे कटाक्षाने पालन करावे म्हणून सांगितले आहे. गाय, म्हैस, बकरी, मेंढी इत्यादि प्राण्यांपासून रक्षण व्हावे म्हणून लहान लहान झाडांच्या रोपट्यांना काट्यांचे कुंपण घालतात; परंतु ती रोपटी जेव्हा मोठी होऊन त्यांचे वृक्षात रूपांतर होते तेव्हा त्यांना काटेरी कुंपणाची आवश्यकता राहत नाही; कारण पशू असले; तरी ते वृक्ष नष्ट होण्याची भीती नसते. उलट हे प्राणी व प्रचंड हत्तीही त्या वृक्षाच्या बुंध्यालाच बांधता येतात. त्यावेळी झाडाचे काय होईल अशी भीती वाटत नाही. त्याचप्रमाणे यमनियमादिद्वारा नियमित साधन केले म्हणजे पांचभौतिक जड देहातील जडत्व योगाग्नीने दग्ध झाल्यामुळे साधकाचा देह परि-पक्व होऊन त्यास अखंड चैतन्याची प्रत्याक्षानुभूती प्राप्त होते. यासाठी साध्याची अर्थात् शांतभावाची प्राप्ती झाल्यावर साधक ब्रह्मरूप होत असल्याने त्यावेळी ही यमनियमांची चिलखते सैल करण्यास हरकत नाही, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

ऐसा जिंतिलिया रिपुवर्गु । अपमानिलिया हें जगु ।
अपैसा योगतुरंगु । स्थिर जाला ॥१८.१०७६॥

वैराग्याचें गाढलें । अंगीं त्राण होतें भलें ।
तेंही नावेक ढिलें । तेव्हां करी ॥१०७७॥

आणि निवटी ध्यानाचें खांडें। तें दुजें नाहींचि पुढें।
म्हणौनि हातु आसुडें। वृत्तीचाही ॥१०७८॥

जैसें रषौषध खरें। आपुलें काज करोनि पुरें।
आपणही नुरे। तैसें होतसे ॥१०७९॥

देखोनि ठाकिता ठावो। धांवता थिरावे पावो।
तैसा ब्रह्मसामीप्यें थावो। अभ्यासु सांडी ॥१०८०॥

घडतां महोदधीसी। गंगा वेगु सांडी जैसी।
कां कामिनी कांतापासीं। स्थिर होय ॥१०८१॥

नाना फळतिये वेळे। केळीची वाढी मोटुळे।
कां गावापुढें वळे। मार्गु जैसा ॥१०८२॥

तैसा आत्मसाक्षात्कारु। होईल देखोनि गोचरु।
ऐसा साधनहतियेरु। हळूचि ठेवी ॥१०८३॥

## विविधगुणयुक्त साधनसंपत्ती:—

श्रीमद्भगवद्गीतेत भगवंतांनी जी सिद्धयोगशास्त्राची साधनसंपत्ती सांगितली आहे व तिचा जो भावार्थ श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी कथन केला आहे त्याच्या आधारे आपण वेदान्त व योगशास्त्रदृष्टचा येथपर्यंत त्याचा विचार केला. आत्तापर्यंत चर्चिलेल्या एकतीस गुणात साधनसंपत्तीचा बहुतेक सर्व विचार समाविष्ट झाला आहे. असे असले; तरी साधकाच्या मनाचा व साधनाच्या शास्त्राचा व्यापक प्रमाणावर विचार करून उपरोक्त गुणांशिवायही श्रीमद्भगवद्गीतेत भगवंतांनी कितीतरी आणखी गुण सांगून या शास्त्राचे सामान्यीकरण केले आहे. श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी या सर्व गुणांचा भावार्थ साधनदृष्टचा स्पष्ट केला असून हे सर्व सद्गुण सिद्धयोगाच्या साधकाला आवश्यक आहेत असे स्पष्ट केले आहे. " सिद्धस्य लक्षणानि साधकस्य साधनानि भवंति। " म्हणजे सिद्धांची जी लक्षणे असतात ती साधकांची साधने असतात, असे शास्त्रकारांनी सांगितले आहे. या दृष्टीनेच श्रीमद्भगवद्गीतेत दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाची, बाराव्या अध्यायात भक्ताची, तेराव्या अध्यायात ज्ञानी पुरुषाची व चौदाव्या अध्यायात गुणातीताची लक्षणे आली आहेत. यातील जी लक्षणे उपरोक्त पृथक्करणातून शिल्लक राहिली आहेत व जी महत्त्वाची आहेत त्यांचा आपण क्रमशः विचार करू.

सद्भक्ताचे पहिले लक्षण " अद्वेष्टा सर्वभूतानाम् ॥ गीता १२.१३ ॥ " असे आहे. कोणत्याही प्राणिमात्राचा द्वेष न करणारा असा त्याचा अर्थ असून श्रीमदाद्यशंकराचार्यांनी " श्रीमद्भगवद्गीताभाष्यात " त्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की—

**अद्वेष्टा सर्वभूतानां न द्वेष्टाऽऽत्मनो दुःखहेतुमपि न किंचिद्द्वेष्टि**
**सर्वाणि भूतान्यात्मत्वेन हि पश्यति।**

सर्वभूतांचा अद्वेष्टा म्हणजे कोणाचाही द्वेष न करणारा आपल्या दुःखाला कारण होणाऱ्या कशाचाही द्वेष करीत नाही; कारण सर्व भूतांना तो आत्मत्वाने पाहतो. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**जों सर्वभूतांच्या ठायीं। द्वेषातें नेणेंचि कहीं।**
**आपपरु नाहीं। चैतन्या जैसा ॥१२.१४४॥**
**उत्तमातें धरिजे। अधमातें अव्हेरिजे।**
**हें कांहींच नेणिजे। वसुधा जेवीं ॥१४५॥**

सद्भक्ताचे दुसरे लक्षण " मैत्रः ॥ गीता १२.१३ ॥ " असे आहे. सर्वांशी मित्रत्वाने राहणारा असा या लक्षणाचा अर्थ असून श्रीमदाद्यशंकराचार्यांनी " गीता भाष्यात " त्याची व्याख्या करताना असे म्हटले आहे की–

**मैत्रो मित्रभावो मैत्री मित्रतया वर्तत इति मैत्रः ॥**

मैत्र म्हणजे मित्रभाव होय. मैत्री अर्थात् सर्व भूतांशी मित्रत्वाने वागतो म्हणून मैत्र. या लक्षणाचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**कां रायाचे देह चाळूं। रंका परौतें गाळूं।**
**हें न म्हणेचि कृपाळू। प्राणु पैं गा १२.१४६॥**
**तैसी आघवियांचि भूतमात्रीं। एकपणें जया मैत्री।**
**कृपेसी धात्री। आपणचि जो ॥१४८॥**

सद्भक्ताचे तिसरे लक्षण " यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ॥ गीता १२.१५ ॥ " हे आहे. भगवद्भक्तापासून कोणताही प्राणी उद्विग्न होत नाही व त्याला कोणत्याही प्राण्यापासून उद्वेग होत नाही. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**तरी सिंधूचेनि माजे। जळचरां भय नुपजे।**
**आणि जळचरीं नुबगिजे। समुद्रु जैसा ॥१२.१६५॥**
**तेवीं उन्मत्तें जगें। जयासी खंती न लगे।**
**आणि जयाचेनि आंगें। न शिणे लोकु ॥१६६॥**

सद्भक्ताचे चवथे लक्षण " अनपेक्षः ॥ गीता १२.१६ ॥" हे आहे. अनपेक्ष म्हणजे निस्पृह किंवा निरिच्छ होय. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी या लक्षणाची व्याख्या करताना " गीताभाष्यात " असे म्हटले आहे की–

**देहेंद्रियविषयसंबंधादिष्वपेक्षाविषयेष्वनपेक्षो निःस्पृहः ।।**

देह, इंद्रिये, विषय, संबंध व आणखीही सर्व अपेक्षित पदार्थांच्या विषयी अनपेक्ष म्हणजे निरिच्छ किंवा निःस्पृह असणारा. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी याचा भावार्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

**जयाचिया ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिगावा ।**
**सुखासि चढावा । जयाचें असणें ।।१२.१७२।।**

सद्भक्ताचे पाचवे लक्षण "दक्ष ।। गीता १२.१६ ।।" असे आहे. या लक्षणाची व्याख्या करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "गीताभाष्यात" असे म्हटले आहे की–

**दक्षः प्रत्युत्पन्नेषु कार्येषु सद्यो यथावत्प्रतिपत्तुं समर्थः ।।**

अनेक कर्तव्ये उपस्थित झाली असता त्यात जो जाणण्यास योग्य असतील ती तत्काल जाणण्यास व जी करण्यास योग्य असतील ती तत्काल करण्यास जो समर्थ असतो तो दक्ष होय. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**आंतु बाहेरी चोखाळु । सूर्य तैसा निर्मळु ।**
**आणि तत्त्वार्थींचा पायाळु । देखणा जो ।।१२.१७९।।**

सद्भक्ताचे सहावे लक्षण "उदासीनः ।। गीता १२.१६ ।।" असे आहे. या लक्षणाची व्याख्या करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "गीताभाष्यात" असे म्हटले आहे की–

**न कस्यचिन्मित्रादेः पक्षं भजते यः स उदासीनो ।**

कोणाही मित्रादिकांचा पक्ष धरीत नाही तो उदासीन होय. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश ।**
**तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा १२.१८०।।**

सद्भक्ताचे सातवे लक्षण "गतव्यथः ।। गीता १२.१६ ।।" असे आहे. या लक्षणाची व्याख्या करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "गीताभाष्यात" असे म्हटले आहे की–

**गतव्यथो गतभय ।**

सद्भक्त गतव्यथ म्हणजे निर्भय असतो. कोणी काही अपकार केला; तरी त्याला त्याची भीती वाटत नाही. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की–

**संसारव्यथें फिटला । जो नैराश्यें विनटला ।**
**व्याधाहातोनि सुटला । विहंगु जैसा ।।१२.१८१।।**

तैसा सतत जो सुखें। कोणीही टवंच न देखे।
नेणिजे गतायुषें। लज्जा जेवीं ॥१८२॥

सद्भक्ताचे आठवे लक्षण " यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति शुभाशभपरित्यागी ॥ गीता १२.१७ ॥" असे आहे. सद्भक्त कशाचाही हर्ष मानीत नाही, द्वेष करीत नाही, शोक करीत नाही, अभिलाष ठेवीत नाही व शुभाशुभ कर्मांचा परित्याग करतो. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

जो आत्मलाभासारिखें। गोमटें कांहींचि न देखे।
म्हणौनि भोगविशेखें। हरिखेजेना ॥१२ १९०॥
आपणचि विश्व जाहला। तरी भेदभावो सहजचि गेला।
म्हणौनि द्वेषु ठेला। जया पुरुषा ॥१९१॥
पैं आपुलें जें साचें। तें कल्पांतींही न वचे।
हें जाणोनि गताचें। न शोची जो ॥१९२॥
आणि जयापरौतें कांहीं नाहीं। तें आपणपेंचि आपुल्या ठायीं।
जाहला यालागीं जो कांहीं। आकांक्षी ना ॥१९३॥
वोखटें कां गोमटें। हें काहींचि तया नुमटे।
रात्रीदिवस न घटे। सूर्यासि जेवीं ॥१९४॥

सद्भक्ताचे नववे लक्षण "संगवर्जितः ॥ गीता १२.१८ ॥ " असे आहें, याचा अर्थ कोठेही आसक्ती न ठेवणारा असा आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

जो सबाह्यसंग। सांडोनियां लाग।
एकाकीं असे आंग। आंगीं सूनी ॥१२ २०६॥

सद्भक्ताचे दहावे लक्षण " अनिकेतः ॥ गीता १२.१९ ॥ " असे आहे. ज्याचे एक नियत किंवा नेमलेले राहण्याचे स्थान नसलेला व तो जेथे राहील तेच त्याचे घर असा साधकभक्त. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात–

आणि वायूसि एके ठायीं। बिढार जैसें नाहीं।
तैसा न धरीच कहीं। आश्रयो जो ॥१२.२११॥
आघवाची आकाशस्थिति। जेवीं वायूसि नित्य वसती।
तेवीं जगचि विश्रांति–। स्थान जया ॥२१२॥

येथपर्यंत आपण विविधगुणयुक्त साधनसंपत्तीतील सद्भक्ताची विविध लक्षणे पाहिली. आता आपणास ज्ञानी पुरुषाची लक्षणे पाहवयाची आहेत.

ज्ञानी पुरुषाचे पहिले लक्षण "अमानित्वं ॥ गीता १३.७ ॥ " हे आहे. या

गुणाची व्याख्या करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी " गीताभाष्यात " असे म्हटले आहे की–

**अमानित्वं मानिनो भावो मानित्वमात्मन: श्लाघनं तदभावोऽमानित्वम् ॥**

ज्याला मी मोठा आहे, मी विद्वान् आहे इत्यादि मान असतो अर्थात् एक प्रकारचा गुप्त गर्व असतो त्याला मान म्हणतात. या मानाचा, मानीपणाचा व आत्मश्लाघेचा अभाव असणे यालाच अमानित्व म्हणतात. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

**तरी कवणेही विषयींचें। साम्य होणें न रुचे।**
**संभावितपणाचें। वोझें जया ॥१३.१८५॥**

**आथिलेचि गुण वानितां। मान्यपणें मानितां।**
**योग्यतेचें येतां। रूप आंगा ॥१८६॥**

**तैं गजबजों लागे कैसा। व्याधें रुंधला मृगु जैसा।**
**कां बाही तरतां वळसा। दाटला जेवीं ॥१८७॥**

**पार्था तेणें पाडें। सन्मानें जो सांकडें।**
**गरिमेतें आंगाकडे। येवोंचि नेदी ॥१८८॥**

**पूज्यता डोळां न देखावी। स्वकीर्ती कानीं नायकावीं।**
**हा अमुका ऐसी नोहावी। सेचि लोकां ॥१८९॥**

**तेथ सत्काराची कें गोठी। कें आदरा देईल भेटी।**
**मरणेंसीं साटी। नमस्कारितां ॥१९०॥**

**वाचस्पतीचेनि पाडें। सर्वज्ञता तरी जोडे।**
**परि वेडीवेमाजीं दडे। महिमेभेणें ॥१९१॥**

**चातुर्य लपवी। महत्त्व हारवी।**
**पिसेपण मिरवी। आवडोनि ॥१९२॥**

**लौकिकाचा उद्वेगु। शास्त्रांवरी उबगु।**
**उगेपणीं चांगु। आथी भरु ॥१९३॥**

**जगें अवज्ञाचि करावी। संबंधीं सोयचि न धरावी।**
**ऐसी ऐसी जीवीं। चाड बहु ॥१९४॥**

**तळौटपण बाणे। आंगीं हिणावो खेंवणें।**
**तें तेंचि करणें। बहुतकरूनी ॥१९५॥**

**हा जीतु ना नोहे। लोक कल्पी येणें भावें।**
**तैसें जिणें होआवें। ऐसी आशा ॥१९६॥**

**पैं चालतु कां नोहे। कीं वारेनि जातु आहे।**
**जना ऐसा भ्रमु जाये। तैसें होईजे ॥१९७॥**

माझें असतेपण लोपो । नामरूप हारपो ।
मज झणें वासिपो । भूतजात ॥१९८॥
ऐसी जयाचीं नवसियें । जो नित्य एकांता जातु जाये ।
नामेंचि जो जिये । विजनाचेनि ॥१९९॥
वायू आणि तया पडे । गगनेंसीं बोलों आवडे ।
जीवें प्राणें झाडें । पढियंतीं जया ॥२००॥

ज्ञानी पुरुषाचे दुसरे लक्षण " अदंभित्वं ॥ गीता १३.७ ॥ " असे आहे. याचा अर्थ अदांभिकपणा असा असून त्याची व्याख्या करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "गीताभाष्यात" असे म्हटले आहे की–

स्वधर्मप्रकटीकरणं दंभित्वं तदभावोऽदंभित्वम् ॥

खरोखर धार्मिक नसताना तसा आव आणणे व वरवर धार्मिकता प्रकट करणे हा दांभिकपणा आहे. तसा दांभिकपणा न दाखविणे हाच अंदाभिकपणा होय. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

आतां अदंभाचिया वोळखीसी । सौरसु देवों ॥१३.२०२॥
तरी अदंभित्व ऐसें । लोभियाचे मन जैसें ।
जीवु जावो परी नुमसें । ठेविला ठावो ॥२०३॥
तयापरी किरीटी । पडिलाही प्राणसंकटीं ।
तरी सुकृत न प्रकटी । आंगें बोलें ॥२०४॥
खडाणें आला पान्हा । पळवी जेवीं अर्जुना ।
कां लपवी पण्यांगना । वडिलपण ॥२०५॥
आढ्यु आतुडे आडवीं । मग आढ्यता जेवीं हारवी ।
नातरी कुळवधू लपवीं । अवेवांतें ॥२०६॥
नाना कृषीवळु आपुलें । पांघुरवी पेरलें ।
तैसें झांकी निपजलें । दानपुण्य ॥२०७॥
वरिवरी देहो न पूजी । लोकांतें न रंजी ।
स्वधर्मु वाग्ध्वजीं । बांधों नेणें ॥२०८॥
परोपकारु न बोले । न मिरवी अभ्यासिलें ।
न शके विकूं जोडलें । स्फीतीसाठीं ॥२०९॥
शरीर भोगाकडे । पहातां कृपणु आवडे ।
एऱ्हवीं धर्मविषयीं थोडें । बहु न म्हणे ॥२१०॥
घरीं दिसे सांकड । देहींची आयती रोड ।
परी दानीं जया होड । सुरतरूसीं ॥२११॥

किंबहुना स्वधर्मी थोरु । अवसरीं उदारु ।
आत्मचर्चे चतुरु । एऱ्हवीं वेडा ॥२१२॥
केळीचें दळवाडें । हळू पोकळ आवडे ।
परी फळोनियां गाढें । रसाळ जैसें ॥२१३॥
कां मेघाचें आंग झील । दिसे वारेनि जैसें जाईल ।
परी वर्षती नवल । घनवट तें ॥२१४॥
तैसा जो पूर्णपणीं । पाहतां धाती आयणी ।
एऱ्हवीं तरी वाणी । तोचि ठावो ॥२१५॥

ज्ञानी पुरुषाचे तिसरे लक्षण "अनहंकार ॥ गीता १३.८ ॥" हे आहे. मी अमुक अशा प्रकारचा आहे असा गर्व किंवा अभिमान न वाहणे म्हणजे अहंकार-रहित असणे याला अनहंकार असे म्हणतात. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी या गुणाचा भावार्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

आणि सचाडाचियेपरी । इष्टापूर्त करी ।
परी केलेंपण शरीरीं । वसों नेदी ॥१३.५२५॥
वर्णाश्रमपोषकें । कर्मे नित्यनैमित्तिकें ।
तयामाजीं कांहीं न ठके । आचरतां ॥५२६॥
परि हें मियां केलें । कीं हें माझेनि सिद्धी गेलें ।
ऐसें नाहीं ठेविलें । वासनेमाजीं ॥५२७॥
जैसें अवचितपणें । वायूसि सर्वत्र विचरणें ।
कीं निरभिमान उदैजणें । सूर्याचे जैसें ॥५२८॥
कां श्रुति स्वभावतां बोले । गंगा काजेंवीण चाले ।
तसें अवष्टंभहीन भलें । वर्तणें जयाचें ॥५२९॥
ऋतुकाळीं तरी फळती । परी फळलों हे नेणती ।
तया वृक्षांचिये ऐसी वृत्ती । कर्मी सदा ॥५३०॥
एवं मनीं कर्मी बोलीं । जेथ अहंकारा उखी जाहली ।
एकावळीची काढिली । दोरी जैसी ॥५३१॥
संबंधेंवीण जैसीं । अभ्रें असती आकाशीं ।
देहीं कर्म तैसीं । जयासि गा ॥५३२॥
मद्यपाआंगींचें वस्त्र । कां लेपाहातींचें शस्त्र ।
बैलावरी शास्त्र । बांधलें आहे ॥५३३॥
तया पाडें देहीं । जया मी आहें हें सेचि नाहीं ।
निरहंकारता पाहीं । तया नांव ॥५३४॥

ज्ञानी पुरुषाचे चौथे लक्षण "जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ १३.८॥"

हे आहे. जन्म, मरण, म्हातारपण, रोग व दुःख या प्रत्येकातील दोषांचा विचार करणे किंवा जन्म, मरण, म्हातारपण व रोग यातील असह्य दुःखरूप दोषांचे चिंतन करणे असा या लक्षणाचा अर्थ आहे. या प्रत्येक गोष्टीचे साधकाने चिंतन कसे करावे हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

जन्म–

वैर जन्मांतरींचे । सर्पा मनौनि न वचे ।
तेवीं अतीता जन्माचें । उणें जो वाहे ॥१३.५३८॥
डोळां हरळ न विरे । घाईं कोत न जिरे ।
तैसें काळींचें न विसरे । जन्मदुःख ॥५३९॥
म्हणे पूयगर्तें रिगाला । अहा मूत्ररंध्रें निघाला ।
कटा रे मियां चाटिला । कुचस्वेदु ॥५४०॥
ऐसऐसिया परी । जन्माचा कांटाळा धरी ।
म्हणे आतां ते मी न करीं । जेणें ऐसें होय ॥५४१॥
हारी उमचावया । जुंवारी जैसा ये डाया ।
कीं वैरा बापाचेया । पुत्र जचें ॥५४२॥
मारीलियाचेनि रागें । पाठीचा जेवीं सूड मागे ।
तेणें आक्षेपें लागे । जन्मापाठीं ॥५४३॥
परी जन्मती ते लाज । न सांडी जयाचें निज ।
संभाविता निस्तेज । न जिरे जेवीं ॥५४४॥

मृत्यू–

आणि मृत्यु पुढां आहे । तोचि कल्पांतीं कां पाहे ।
परी आजचि होये । सावधु जो ॥५४५॥
माजीं अथांव म्हणतां । थडीयेचि पंडुसुता ।
पोहणारा आइता । कासे जेवीं ॥५४६॥
कां न पवतां रणाचा ठावो । सांभाळिजे जैसा आवो ।
वोडण सुइजे घावो । न लागताचि ॥५४७॥
पाहेचा पेणा वाटवधा । तंव आजीची होइजे सावधा ।
जीवु न वचतां औषधा । धांविजे जेवीं ॥५४८॥
येऱ्हवीं ऐसें घडे । जो जळत घरीं सांपडे ।
तो मग न पवाडे । कुहा खणों ॥५४९॥
चोंढिये पाथरु गेला । तैसेनि जो बुडाला ।
तो बोंबेहीसकट निमाला । कोण सांगे ॥५५०॥
म्हणौनि समर्थेंसीं वैर । जया पडिलें हाडखाइर ।
तो जैसा आठही पाहर । परजून असे ॥५५१॥

नातरी केळवली नोवरी । कां संन्यासी जियापरी ।
तैसा न मरतां जो करी । मृत्युसूचना ॥५५२॥
पैं गा जो ययापरी । जन्मेंचि जन्म निवारी ।
मरणें मृत्यु मारी । आपण उरे ॥५५३॥

जरा—

आणि तयाचिपरी जरा । न टेंकतां शरीरा ।
तारुण्याचिया भरा—। माजीं देखें ॥५५५॥
म्हणे आजिच्या अवसरीं । पुष्टि जे शरीरीं ।
ते पाहेल होईल काचरी । वाळली जैसी ॥५५६॥
निर्दैव्याचे व्यवसाय । तैसे ठाकती हातपाय ।
अमंत्र्या राजाची परी आहे । बळा यया ॥५५७॥
फुलांचिया भोगा—। लागीं प्रेम टांगा ।
ते करेयाचा गुडघा । तैसें होईल ॥५५८॥
वोढाळाच्या खुरीं । आखरुआतें बुरी ।
ते दशा माझ्या शिरीं । पावेल गा ॥५५९॥
पद्मदळेंसी इसाळें । भांडताति हे डोळे ।
ते होती पडवळें । पिकलीं जैसीं ॥५६०॥
भंवईंचीं पडळें । वोमथती सिनसाळें ।
ऊरु कुहिजैल जळें । आंसुवाचेनि ॥५६१॥
जैसें बाभुळीचें खोड । गिरबडूनि जाती सरड ।
तैसें पिचडीं तोंड । सरकटिजैल ॥५६२॥
रांधवणी चुलीपुढे । पऱ्हे उन्मादती खातवडे ।
तैसींचि ये नाकाडें । बिडबिडती ॥५६३॥
तांबूलें वोंठ राऊं । हांसतां दांत दाऊं ।
सनागर मिरऊं । बोल जेणें ॥५६४॥
तयाचि पाहे या तोंडा । येईल जळंबटाचा लोंढा ।
इया उमळती दाढा । दांतांसहित ॥५६५॥
कुळवाडी रिणें दाटली । कां वांकडिया ढोरें बैसलीं ।
तैसी नुठी कांहीं केली । जीभचि हे ॥५६६॥
कुसळें कोरडीं । वारेनें जाती बरडीं ।
तैसी आपदा तोंडीं । दाढीयेसीं ॥५६७॥
आषाढींचेनि जळें । जैसीं झिरपती शैलांचीं मौळें ।
तैसें खांडीहूनि लाळे । पडती पूर ॥५६८॥

वाचेसि अपवाडु । कानीं अनुघडु ।
पिंड गरुवा माकडु । होईल हा ॥५६९॥
तृणाचें बुझवणें । आंदोळे वारेनगुणें ।
तैसें येईल कांपणें । सर्वांगासी ॥५७०॥
पायां पडती वेंगडी । हात वळती मुरकुंडी ।
बरवेपण बागडी । नाचविजैल ॥५७१॥
मळमूत्रद्वारें । होऊनि ठाती खोंकरें ।
नवसियें होती इतरें । माझिया निधनीं ॥५७२॥
देखोनि थुंकील जगु । मृत्यूचा पडैल पांगु ।
सोइरियां उबगु । येईल माझा ॥५७३॥
स्त्रिया म्हणती विवसी । बाळें जाती मूर्च्छी ।
किंबहुना चिळसी । पात्र होईन ॥५७४॥
उभळीचा उजगरा । सेजारियां साइलिया घरां ।
शिणवील म्हणती म्हातारा । बहुतांतें हा ॥५७५॥
ऐसी वार्धक्याची सूचणी । आपणियां तरुणपणीं ।
देखे मग मनीं । विटे जो गा ॥५७६॥
म्हणे पाहे हें येईल । आणि आतांचें भोगितां जाईल ।
मग काय उरेल । हितालागीं ? ॥५७७॥
म्हणौनि नाइकणें पावे । तंव आइकोनि घालीं आघवें ।
पंगु न होतां जावें । तेथ जाय ॥५७८॥
दृष्टी जंव आहे । तंव पाहावें तेतुलें पाहे ।
मूकत्वा आधीं वाचा आहे । सुभाषितें ॥५७९॥
हात होती खुळे । हें पुढील मोटकें कळे ।
तंव करूनि घाली सकळें । दानादिकें ॥५८०॥
ऐसी दशा येईल पुढें । तैं मन होईल वेडें ।
तंव चिंतूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान ॥५८१॥
जैं चोर पाहे झोंबती । तंव आजीचि रुसिजे संपत्ती ।
कां झांकाझांकी वाती । न वचतां कीजे ॥५८२॥
तैसें वार्धक्य यावें । मग जें वायां जावें ।
तें आतांचि आघवें । सवतें करीं ॥५८३॥

व्याधी–

तैसेंचि नाना रोग । पडिघाती ना जंव पुढांआंग ।
तंव आरोग्याचे उपेग । करूनि घाली ॥५८४॥

सापाच्या तोंडीं । पडली जे उंडी ।
ते लावूनि सांडी । प्रबुद्धु जैसा ॥५८९॥
दुःखदोषानुदर्शन–
तैसा वियोगें जेणें दुःखें । विपत्ति शोक पोखें ।
तें स्नेह सांडूनि सुखें । उदासु होय ॥५९०॥
आणि जेणें जेणें कडे । दोष सूतील तोंडें ।
तया कर्मरंध्रीं गुंडे । नियमाचे दाटी ॥५९१॥

ज्ञानी पुरुषाचे पाचवे लक्षण " विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥१३.१०॥" हे आहे. एकांत, निर्भय व पवित्र प्रदेशात राहणे व सामान्य प्राकृत जनांच्या समूहात मिसळण्याची आवड नसणे असे ज्ञानी पुरुषाचे लक्षण आहे. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

आणि तीर्थें धौतें तटें । तपोवनें चोखटें ।
आवडती कपाटें । वसवूं जया ॥१३.६१२॥
शैलकक्षांची कुहरें । जळाशय परिसरें ।
अधिष्ठी जो आदरें । नगरा नये ॥६१३॥
बहु एकांतावरी प्रीती । जया जनपदाची खंती ॥६१४॥

आता गुणातीताची उरलेली लक्षणे पाहवयाची आहेत. गुणातीत पुरुषाचे लक्षण सांगताना भगवंतांनी " श्रीमद्भगवद्गीतेत " असे म्हटले आहे की–

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
गुणा वर्तंत इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥१४.२३॥

साधक तटस्थाप्रमाणे उदासीन राहून त्रिगुणांनी विचलित होत नाही. गुणच वर्तन करीत आहेत असे जाणून तो स्थिर राहतो व चंचल होत नाही. याचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

तैसें गुणागुणकार्य हें । आघवेंचि आपण आहे ।
म्हणौनि एकेका नोहे । तडातोडी ॥१४.३३६॥
येवढे गा प्रतीती । तो देहा आलासे वस्ती ।
वाटे जाता गुंती–। मार्गी जैसा ॥३३७॥
तो जिणता ना हारवी । तैसा गुण नव्हे ना करवी ।
जैसी कां श्रोणवी । संग्रामींची ॥३३८॥
कां शरीराआंतील प्राणु । घरीं आतिथ्याचा ब्राह्मणु ।
नाना चोहटांचा स्थाणु । उदासु जैसा ॥३३९॥
आणि गुणांचा यावाजावा । चळे ढळे ना पांडवा ।
मृगजळाचा हेलावा । मेरु जैसा ॥३४०॥

हें बहुत कायि बोलिजे । व्योम वारेनि न वचिजे ।
कां सूर्य ना गिळिजे । अंधकारें ? ॥३४१॥
स्वप्न कां गा जयापरी । जागतयातें न सितरी ।
गुणीं तैसा अवधारीं । न बंधिजे तो ॥३४२॥
गुणांसि कीर नातुडे । परी दुरूनि जें पाहे कोडें ।
तें गुणदोष सायिखडें । सभ्यु जैसा ॥३४३॥
सत्कर्में सात्त्विकीं । रज तें रजोविषयकीं ।
तम मोहादिकीं । वर्तत असे ॥२४४॥
परिस तयाचिया गा सत्ता । होती गुणक्रिया समस्ता ।
हें फुडें जाणे सविता । लौकिका जेवीं ॥३४५॥
समुद्रचि भरती । सोमकांतचि द्रवती ।
कुमुदें विकासती । चंद्रु तो उगा ॥३४६॥
कां वाराचि वाजे विझे । गगनें निश्चळ असिजे ।
तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना जो ॥३४७॥

सारांश, येथपर्यंत आपण साधनसंपत्तीचा सर्वांगांनी विचार केला. सिद्धयोग साधनशास्त्राच्या दृष्टीने ही साधनसंपत्ती म्हणजे धर्म्य अशा अमृतधारा व मोक्ष-चक्रवर्तीचे अग्रहार असल्याने श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी साधनाच्या दृष्टीने त्या पदांचा भावार्थ स्पष्ट केला आहे. साधकाने साधनसंपत्तीची नुसती चर्चा करावयाची नसून ही गोष्ट साधनाने प्रत्यक्ष अनुभूत करावयाची आहे असे त्यांचे सांगणे आहे. साधनसंपत्तीची अमूर्त लक्षणे ज्याच्या ठिकाणी सिद्धयोगसाधनद्वारा समूर्त होतात तोच भक्त, योगी, तीर्थक्षेत्र इत्यादि सर्व असून देवाला असा भक्त किंवा सद्गुरूला असा शिष्य आवडतो हे सांगताना व साधनसंपत्तीचा महिमा उत्कटपणे गाताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य ।
करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥१२.२३०॥
तैसेचि श्रद्धेचेनि आदरें । जयांचे ठायीं विस्तरे ।
जीवीं जया थारे । जे अनुष्ठिती ॥२३१॥
परी निरूपिली जैसी । तैसीच स्थिती मानसीं ।
मग सुक्षेत्रीं जैसी । पेरणी केली ॥२३२॥
परी मातें परम करूनि । इये अर्थीं प्रेम धरूनि ।
हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ॥२३३॥
पार्था गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी ।
उत्कंठा तयांलागीं । अखंड मज ॥२३४॥

तें तीर्थ तें क्षेत्र । जगीं तेंचि पवित्र ।
भक्ति कथेसि मैत्र । जयां पुरुषां ॥२३५॥
आम्ही तयांचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन ।
ते वांचूनि आन । गोमटें नाहीं ॥२३६॥
तयांचें आम्हां व्यसन । ते आमुचें निधिनिधान ।
किंबहुना समाधान । ते मिळती तैं ॥२३७॥
पैं प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पंडुसुता ।
ते मानूं परमदेवता । आपुली आम्ही ॥२३८॥

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत प्रकट केलेल्या साधनसंपत्तीचे जे दर्शन आपण आत्तापर्यंत घेतले ते माझे सद्‌गुरू महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांच्या परमकृपाबलाचेच फल आहे; कारण उपरोक्त साधनसंपत्ती साकार व समूर्त होऊन त्यांच्या रूपाने प्रकट झालेली पाहण्याचे सौभाग्य मला त्यांच्याच कृपेने प्राप्त झाले.

# प्रकरण अकरावे

# ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाची फलनिष्पत्ती

**प्रास्ताविक :–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीत सिद्धयोगसाधनशास्त्राचे जे सांगोपांग दर्शन घडविले आहे त्याचे विस्तृत विवेचन येथपर्यंत करून त्याचा सर्वांगिण परिचय घडविण्याचा प्रयत्न केला. आता हे साधन साध्यरूपात परिणत होते म्हणजे नेमके काय होते अर्थात् ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगशास्त्राची फलनिष्पत्ती काय आहे, हे आता पाहवयाचे आहे. सिद्धयोगाच्या साधनशाळेत आपण जे साधन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे करीत आहोत किंवा करणार आहोत त्यात शेवटी आपल्या हाती काय लागणार आहे व आपण काय होणार आहोत याची चर्चा आता करावयाची आहे. जसे बीज तसे झाड व जसे झाड तशी त्याची फळे असतात त्याप्रमाणे सद्‌गुरूंनी मूलाधारात शक्तिजागृतीचे जे बीज पेरलेले असते त्याला साधकाने प्रयत्न केल्यावर कोणते फळ प्राप्त होते, याचे आता दर्शन घ्यावयाचे आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्वसंवेद्य आत्मस्वरूपाची प्राप्ती ही सिद्धयोगशास्त्राची एकमात्र फलनिष्पत्ती आहे असा अमर सिद्धांत सुरुवातीलाच मांडून "एऱ्हवीं द्वैताची वारी । सारूनि ऐक्याच्या परिवरीं । भोगिजे तें अवधारीं । रहस्य हें ॥१८.१३४५॥' असे म्हणून शेवटी त्याचे स्पष्टीकरणही केले आहे. फलनिष्पत्ती किंवा प्राप्ती ही दोन प्रकारची असू शकत नाही. ती एकच असते. या दृष्टीने स्वसंवेद्य आत्मस्वरूपाशी ऐक्य होणे अर्थात् त्याच्याशी समरस होणे हेच सिद्धयोग-साधनशास्त्राचे साररूप फल आहे. हीच सिद्धयोग साधनाची अंतिम अवस्था आहे. यालाच शास्त्रकारांनी निर्विकल्प, असंप्रज्ञात किंवा निर्बीज समाधी असे म्हटले आहे.

समाधीचे दोन प्रकार आहेत. एक सविकल्प, संप्रज्ञात किंवा सबीज समाधी व दुसरी निर्विकल्प, असंप्रज्ञात किंवा निर्बीज समाधी होय. यातील पहिल्या प्रकारच्या समाधीची व्याख्या करताना महर्षी पतंजलींनी "योगदर्शनातील समाधि-पादात," असे म्हटले आहे की–

**वितर्कविचारानंदास्मितानुरूपानुगमात् सम्प्रज्ञातः ॥१:१७॥**

विवेचक बुद्धी, विचार, आनंद व अस्मिता या चारही गोष्टींशी एकरूप झाल्याने जी समाधी प्राप्त होते तिला संप्रज्ञात किंवा सम्यक् ज्ञानयुक्त समाधी

असे म्हणतात. या चार गोष्टींमुळेच या समाधीचे चार प्रकार होत असून त्यांना सवितर्क, सविचार, सानंद व सास्मिता असे म्हणतात. पुढे "ता एव सबीजः समाधिः ।।१.४६।।" असे म्हणून संप्रज्ञात समाधीचे हे जे प्रकार सांगितले त्यांनाच सबीज समाधी असे समजावे किंवा या सर्व समाधी बीजयुक्त होत असे स्पष्ट केले आहे. दुसऱ्या प्रकारच्या समाधीची व्याख्या करताना त्यांनी असे म्हटले आहे की–

**विरामप्रत्ययाभ्यासपूर्वः संस्कारशेषोऽन्यः ।।१.१८।।**

ज्या अवस्थेत चित्ताचे गतिशून्यत्व पुनःपुन्हा जाणवू लागते व जिच्यामध्ये चित्ताचे फक्त अनभिव्यक्त संस्कार किंवा भावनाच शिल्लक राहते तिला असंप्रज्ञात समाधी असे म्हणतात. या निर्विचार समाधीत शुद्धता आल्यावर चित्त दृढ होते. ही विचाररहित चित्ताची दृढता प्राप्त झाल्यावर साधकयोग्याला आध्यात्मिक प्रसाद प्राप्त होतो आध्यात्मिक प्रसाद प्राप्त झाला की,सत्यज्ञान धारण करणारी ऋतंभरा प्रज्ञा साधकाला लाभते. श्रुती व अनुमान यामुळे प्राप्त होणाऱ्या बुद्धिपेक्षा ऋतंभरा प्रज्ञा विशेषरूपाने अर्थाचा प्रकाश साधकाच्या ठिकाणी उपस्थित करते. या समाधीपासून उत्पन्न होणार संस्कार इतर संस्कारांचा प्रतिरोध करतो. यामुळे निर्बीज समाधी सिद्ध होते. समाधीच्या या अवस्थेचे संपूर्ण वर्णन भाषेतून व्यक्त करता येत नाही. " जळीं पडिलिया लवणा । सर्वंही जळ होईल विचक्षणा । तुज मी अनन्यशरणा । होईन तैंसा ।।१८.१४१४।।" अशी श्रीकृष्णनाथांनी अर्जुनाला दिलेली ग्वाही किंवा "जी मिळतां दोन्ही उदकें– । माजीं लवण वारूं ठाके । कीं तयासींही निमिखें । तेंचि होय ।। १८.१६०१ ।।" अशी संजयाने वर्णन केलेली स्वतःची अवस्था हेच या अवस्थेचे उत्तम निदर्शन आहे. अशा प्रकाराची अवस्था साधकाला स्वतःलाच साधनाने आपोआप प्राप्त होत असल्याने ती शब्दात पकडताही येत नाही; मग व्यक्त करणे ही तर खूप दूरची गोष्ट होय! ही अवस्था किंवा स्थिती यांचे वर्णन करता येणे शक्य होत नसले; तरी भिन्न भिन्न नावांनी ही एकच गोष्ट निर्दिष्ट केली जाते, हे सांगताना श्री. स्वात्मारामयोगींद्र यांनी "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की–

**राजयोगः समाधिश्च उन्मनी च मनोन्मनी ।**
**अमरत्वं लयस्तत्त्वं शून्याशून्यं परं पदम् ।।४.३।।**
**अमनस्कं तथा द्वैतं निरालंबं निरंजनम् ।**
**जीवन्मुक्तिश्च सहजा तुर्या चेत्यकवाचकाः ।।४।।**

राजयोग, समाधी, उन्मनी, मनोन्मनी, अमरत्व, लय, तत्त्व, शून्याशून्य, परमपद, अमनस्क, अद्वैत, निरालंब, निरंजन, जीवन्मुक्त, सहज व तुर्या हे सर्व शब्द एकाच अवस्थेचे वाचक आहेत. भिन्न भिन्न नावांनी जरी ही अवस्था वर्णन केलेली असली; तरी ती अवस्था एकच आहे, हे नितांत सत्य आहे. त्याचप्रमाणे ही

अवस्था जेथे उपलब्ध व्हावयाची आहे ते स्थानही एकच आहे. जरी उपास्यभेदाने उपासकांनी व दर्शनकारांनी त्या स्थानाला भिन्न नावाने संबोधित केले असले; तरी जशी स्वसंवेद्य अवस्था एकच आहे त्याप्रमाणे या अवस्थेच्या प्राप्तीचे स्थानही एकमेव सहस्रार हेच आहे. या दृष्टीनेच "षट्चक्र-निरूपणात" असे म्हटले आहे की—

**शिवस्थानं शैवाः परमपुरुषं वैष्णवगणा।**
**लपंतीति प्रायो हरिहरपदं केचिदपरे।**
**पदं देव्या देवीचरणयुगुलानंदरसिका**
**मुनींद्रा अप्यन्ये प्रकृतिपुरुषस्थानममलम् ॥४४॥**

सहस्रारातील स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीच्या स्थानालाच शैवगण शिवस्थान व वैष्णवगण परमपुरुष हरीचे स्थान असे म्हणतात.काही काही लोक या स्थानालाच हरिहरांचे स्थान म्हणतात; तर देवीच्या चरणकमलांची उपासना करणारे भक्त या स्थानाला देवीपद किंवा शक्तिस्थान म्हणून संबोधितात. अनेक मुनिश्रेष्ठ या स्थानालाच प्रकृति-पुरुषांचे निर्मल स्थान अशी संज्ञा देतात.

वास्तविक रीतीने विचार केला; तर जडवादी व द्वैतवादी दर्शनकारांच्या शिवाय इतर सर्व दर्शनकारांनी मोक्षाचे जे स्वरूप व स्थान वर्णन केले आहे, ते सर्व शब्दभिन्नतेचे व एकाच अवस्थेचे द्योतक आहे. शब्द बदलले म्हणून गंतव्य स्थान व स्वरूप बदलू शकत नाही. उपासनामार्ग निराळे असले व उपास्य दैवते भिन्न असली; तरी शेवटी एकाच तत्त्वाची सर्वांना प्राप्ती व्हावयाची आहे, हे निश्चित होय. दर्शनकारांनी आपापल्या मताप्रमाणे मोक्षाची कल्पना स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. वास्तविक पाहता संसाराच्या अनादि अनंत अशा दुःखचक्रातून माणसाची सुटका होऊन त्याला अमृतत्त्वाची, सत्तत्त्वाची किंवा सहजस्थितीची प्राप्ती व्हावी म्हणूनच भिन्न भिन्न दर्शनकारांनी मार्ग कोणता याचे दिग्दर्शन केले आहे. हे करीत असताना या तत्त्वाची जी वैचारिक पातळी व उंची त्यांनी गाठली आणि त्याचे जे दर्शन अर्थात् अनुभूती त्यांना आली त्याचे त्यांनी वर्णन केले आहे. या सर्वांच्या मोक्ष कल्पनांचा साकल्याने विचार करताना पं. श्री. द. वा. जोग यांनी "भारतीय दर्शन संग्रह" व "वैदिक शांकर अद्वैतमतानुवाद अर्थात् प्रस्थानत्रयभाष्याचा उपसंहार" या ग्रंथात असे म्हटले आहे की, "मनसोक्त वागण्याचे स्वातंत्र्य किंवा मृत्यू म्हणजे मोक्ष असे चार्वाकाचे मत आहे. आत्मविनाश म्हणजे मोक्ष असे माध्यमिक (शून्यवादी) बौद्धांना वाटते. स्वच्छ ज्ञानाचा उदय म्हणजे मोक्ष असे दुसरे बौद्ध मानतात. बौद्धांच्या मते सर्व पदार्थ क्षणिक असता ते स्थिर आहेत अशा बुद्धीने व्यवहार केल्यामुळे दुःख प्राप्त होते. या दुःखाचा क्षणिकत्व विज्ञानाने नाश होऊन निर्वाणपद प्राप्त होते. जैन तत्त्वज्ञांनी असे म्हटले आहे की, अनेकविध शरीरात परिणाम पावणारा व सुखदुःखाचा अनुभव घेणारा आत्मा हा

अहंपदाने ओळखला जातो. या अहंपदाच्या यथार्थज्ञानाने दुःखविनाश होऊन अहं-पदप्राप्ती होते. कर्मांनि प्राप्त झालेल्या देहरूप आवरणाचा अभाव झाला असता जीवाचे जे सतत ऊर्ध्वगमन तोच मोक्ष होय. परमात्म्याच्या गुणांची प्राप्ती आणि भगवत्स्वरूपाचा जो अनुभव यालाच रामानुज मोक्ष असे म्हणतात. जगत्कर्तृत्व, लक्ष्मीपतित्व, श्रीवत्स यांची प्राप्ती न होता दुःखाने अमिश्रित असे जे पूर्ण सुख त्यालाच मोक्ष असे माध्व म्हणतात. परमैश्वर्यप्राप्ती म्हणजे मोक्ष असे नकुलीश आणि पाशुपत यांचे मत आहे. पारदरसाने देह स्थिर ठेवणे हीच जीवन्मुक्ती असे रसेश्वरांचे मत आहे. शिवत्वप्राप्ती म्हणजे मोक्ष असे शैव म्हणतात. प्रत्यभिज्ञावादी पूर्णात्मता-लाभाला मोक्ष म्हणतात.मोक्ष म्हणजे संपूर्ण विशेषगुणांचा नाश असे वैशेषिक व आत्यंतिक दुःखनिवृत्ती असे नैयायिक म्हणतात. नैयायिक आणि वैशेषिक यांनी इच्छा, प्रवृत्ती इत्यादि गुण आत्म्याच्या ठिकाणी भासतात, असे मानले आहे; परंतु ज्ञान हाच आत्म्याचा गुण आहे. अशा प्रकारच्या यथार्थज्ञानाने दुःखविनाश होतो आणि स्वप्नरहित निद्रेच्या स्थितिप्रमाणे असलेल्या अपवर्गाची प्राप्ती होते.मीमांस-कांचा विचार असा आहे की, अधर्माने दुःखप्राप्ती व धर्माने स्वर्गप्राप्ती होते.सकाम कर्मानुष्ठानाने अदृष्ट उत्पन्न होते व ते अदृष्ट सुखदुःखाला कारण होते. शुभकारी आणि निष्कामकर्मानुष्ठानाने अदृष्टाच्या अभावी दुःखविनाश होतो. पाणिनीच्या दृष्टीने मूलचक्राच्या ठिकाणी असलेल्या परावाणीचे दर्शन म्हणजे मोक्ष होय. प्रकृतीचा उपरम होऊन पुरुषाचे स्वरूपामध्ये अवस्थान राहणे म्हणजे मोक्ष होय असे सांख्याचे मत आहे. सांख्यतत्त्वज्ञ असे सांगतात की, पुरुष आणि प्रकृती या दोन एकमेकांपासून अगदी भिन्न असणाऱ्या अशा तत्त्वांच्या अविविकाने दुःख निर्माण होते. जड प्रकृतीपासून चेतन पुरुष कसा वेगळा आहे, याचा अनुभव आला म्हणजे विवेकज्ञान होते व दुःखाभिघात होऊन कैवल्य प्राप्त होते. चितिशक्तीचे निरुपाधिक अवस्थेत राहणे म्हणजे मोक्ष असे पातंजल आणि मूल अज्ञानाची निवृत्ती होऊन स्वस्वरूपाची–आत्मस्वरूपाची–प्राप्ती असे अद्वैतवेदान्ती मोक्षाचे स्वरूप सांगतात."

वरील सर्व मोक्ष कल्पनांवरून सर्वसामान्यपणे असे म्हणता येईल की, नानात्ववाद आणि द्वैतवाद यांवर आधारलेल्या मोक्षकल्पनात कोठेना कोठेतरी दोष आढळतो. तो दोष टाळण्यासाठी आणि विचारांच्या तर्कशुद्धतेसाठी अद्वैत-वादाचीच भूमिका स्वीकारावी लागते. ही भूमिकाच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी प्रस्तुत केलेली असल्यामुळे अद्वैताच्या दृष्टीने मोक्षाचे स्वरूप काय आहे हे पाहिले म्हणजे त्यांनी गीतानुरोधाने विविध पद्धतीने रंगविलेले; परंतु मूलतः एकविध असलेल्या मोक्षाचे किंवा सिद्धयोगाच्या फलनिष्पत्तीचे यथार्थ स्वरूप साकल्याने आपल्या दृष्टीसमोर उभे राहील. या दृष्टीने "भारतीय दर्शन," खंड दोन, या

विश्वविख्यात ग्रंथातील शंकरका अद्वैत वेदान्त या प्रकरणात डॉ. सर्वेपल्ली राधाकृष्णन् यांनी असे म्हटले आहे की, " मोक्ष एक ऐसी सत्ताके साक्षात्कारका विषय है जो अनंत कालसे विद्यमान है, यद्यापि वह हमारे दृष्टिके क्षेत्रसे परे है। जब प्रतिबंध दूर हो जाते हैं तो आत्मा मुक्त हो जाती है। यह जहां थी और जो कुछ है और अनंत कालसे है तथा वस्तुमात्रके मूलतत्त्वरूपमें वैसीही वर्तमान रहती है। यह वह शांति है जो संसार नहीं दे सकता। न उसे हर सकता है। यह सर्वश्रेष्ठ तथा अद्वितीय स्वर्गीय सुख है। " वह जो परम अर्थोंमें यथार्थ है, निर्विकार है, नित्य है, आकाशके समान सर्वान्तिर्यामी है, हरप्रकारके परिवर्तनसे मुक्त, सर्वसन्तोषप्रद, अविभक्त, जिसका स्वरूपही उसका अपना प्रकाश है और जिसके अंदर न तो भला है न बुरा, न कोई प्रभाव है, न भूत, न वर्तमान और न भविष्यत्को कोई स्थान है–इस अलौकिकको मोक्ष कहा गया है। (इदं तु पारमार्थिकम्, कूटस्थम्, नित्यम्. व्योमवत्, सर्वव्यापि, सर्वविक्रियारहितम्, नित्यतृप्तम्, निरवयवम्, स्वयंज्योतिःस्वभावम्, यत्र धर्माधर्मौ सह कार्येण कालत्रयं च नोपवर्तते तद अशरीरं मोक्षाख्यम्– शांकरभाष्य १ : १, ४) जब अविद्याका लोप हो जाता है तो यथार्थ आत्मा स्वतः प्रकाशित रह जाती है, ठीक जिस प्रकार असर करनेवाली मलिनताओंके छूट जानेपर सुवर्णमें चमक आ जाती है अथवा जैसे मेघशून्य रात्रिमें तारे प्रकाश देने लगते हैं जब कि उन्हें अभिभूत करनेवाला दिन छिप जाता है। मनुष्यका अपने समस्त स्वनिर्मित बंधनोंसे दास्यविमोचन एक ऐसा ऐश्वर्य है, जो विचारके क्षेत्रसे सर्वथा परे है; एक ऐसी शांति जो हमारे सब प्रकारके पुरुषार्थका प्रयोजन है, हमारे अपने निकटतम चैतन्यसे भी अधिकतर समीप विद्यमान है। शंकर हमारे संमुख एक ऐसे स्वर्गका चित्र प्रस्तुत नहीं करते जो इस लोकसे पृथक् अथवा इस लोकके अनुभवकी व्यवस्थासे भिन्न प्रकारका है, अपितु एक ऐसा स्वर्ग है जो सर्वदा यहां उपस्थित है, यदि केवल उसे हम देख सकते। यह किसी काल्पनिक भविष्यके गर्भमें अवस्थित नहीं जो वर्तमान जीवनकी समाप्तिपर आनेवाले लोकमें निरंतर स्थायी जीवन हो, अपितु यह यथार्थतत्त्वके साथ एकत्व (तादात्म्य) की एक अवस्था है जो इसी लोकमें है और वर्तमान कालमें भी है।

मुक्तात्मा अपने यथार्थस्वरूपको धारण कर लेते हैं (स्वात्मन्यवस्थानम्)। आत्माके विलोपका नाम मोक्ष नहीं है, अपितु चैतन्यके विस्तार तथा प्रकाशके द्वारा अपनी अनन्तता और निरपेक्षताका साक्षात्कार कर लेनेका नाम मोक्ष है। चित्सुखाचार्यका कहना है कि, आनंदमयका साक्षात्कारही मोक्ष है। आत्माके तात्त्विक स्वरूपको, जो परमानंद है, दुःख आवृत कर लेता है और अज्ञान इसमें सहायक होता है। अज्ञानके अभावमें दुःख लुप्त हो जाता है और आत्माका

स्वरूप, जो विशुद्ध आनंद है, अपनेको व्यक्त कर देता है। मोक्ष-प्राप्ति कोई ऐसी प्रक्रिया नहीं है जिससे हम समस्त जगत्को नष्ट करनेका प्रयत्न करते हैं। यह इस प्रकारकी कोई प्रक्रिया नहीं है "जैसे कि घीको आगके ऊपर रखकर उसके कडेपनका विनाश किया जाता है।" समस्त संसारके विनाश-जैसा महान् कार्य केवल एक मनुष्यके द्वारा होना असंभव है। यदि मोक्षसे तात्पर्य जगत्के अनेकत्वका विनाश हो, तब पहले पहल जब किसी एक मनुष्यने मोक्ष प्राप्त किया होगा तभी समस्त जगत्को विनष्ट हो जाना चाहिए था। सत्य ज्ञानकी प्राप्तिसे तात्पर्य अनेकत्वका विनाश नहीं है किंतु केवलमात्र अनेकत्वके भावका अभाव है। यह एक प्रकारकी अंतर्दृष्टि है जो जगत्के चित्रकोही बदल देती है और सब वस्तुओंका नये सिरेसे निर्माण करती है। यह अंतर्दृष्टि, जीवन तथा इसकी घटनाओंके प्रति इस प्रकारका परिवर्तित दृष्टिकोण मोक्ष की अवस्था नहीं, अपितु साक्षात् मोक्ष है।

अविद्या शब्दका प्रयोग स्थितिके सारतत्त्वका प्रतिपादन करनेके लिए किया गया है। मोक्षकी प्राप्तिसे संसारमें तो कोई भी परिवर्तन नहीं होता, केवल इसके प्रति जो हमारा दृष्टिकोण है वह परिवर्तित हो जाता है। इसकी क्षणभंगुर वस्तुएं, जो अल्पमति व्यक्तियोंके लिए एक प्रकारका मोहक आकर्षण रखती हैं, मुक्तात्माको सर्वथा आकृष्ट नहीं करती। दुःखका कारण केवल मिथ्याज्ञानकी भ्रांति है, और भ्रांतिसे मुक्ति पा जानेपर दुःखसे भी मुक्ति मिल जाती है। इस प्रकार मोक्ष संसारका विलय नहीं है वरन् एक मिथ्या दृष्टिकोणका मिट जाना-मात्र है। मुक्तात्माकी फिरसे लौकिक जगत्में वापस आनेकी संभावना नहीं रहती; इस सिद्धान्तका प्रतिपादन करनेकी उत्सुकतासे शंकर बार-बार सुझाव देते हैं कि मुक्तिके अंदर समस्त व्यावहारिक विभागों व गुण तथा विषय-विषयीके भेदोंका भी पूर्णरूपसे विलय हो जाना आ जाता है।

इस प्रकारकी आपत्तिकी कि, यह जगत् केवल एक भ्रांति-मात्र है, इस प्रकारके विचारसे पुष्टि होती है कि यह आनुभविक जगत्, आत्मा, वस्तुए तथा ईश्वर आदि भेदों सहित ऐसे व्यक्तिके लिए, जो बाह्य तथा आत्माके एकत्वको जान जाता है, विलुप्त हो जाता है।

जब हम तुरीय अवस्थाको प्राप्त करते हैं हम एक अन्य दृष्टिकोणसे एवं एक अन्य प्रकाशके द्वारा भासित यथार्थसत्ताको पाते हैं। केवल यही दृष्टिकोण तथा यही प्रकाश निरपेक्ष है। जब हम इस दृष्टिकोणसे यथार्थसत्ताका बोध करते हैं तो हमें ज्ञात होता हैं कि जगत्का यथार्थ तत्त्व स्वयं ब्रह्मही है। जिसका हम निराकरण करते हैं वह एक भ्रांतिमय ढांचा है और जो शेष बचता है वह अपने आपमें यथार्थ है। मुक्तात्माके ऊपर आवरणस्वरूप मायाका कोई वश नहीं है।

जब अनुभवके द्वारा ब्रह्म तथा आत्माके एकत्वतक हम पहुंच जाते हैं तो वह बंधन जो हमें नानारूपोंसे जकडे हुए है कट जाता है और उक्तरूपोंके अपने अंदर कोई आकर्षण नहीं रह जाता। वे रह सकते हैं और रहेंगे जबतक इंद्रियां जीवितरूपमें विद्यमान है और बुद्धि क्रियाशील है किंतु उन्हें अंतर्दृष्टिद्वारा ज्ञान ब्रह्मके साथ संबद्ध करनेकी कोई आवश्यकता नहीं। जब मृगतृष्णिका की भ्रांति वैज्ञानिक ज्ञानके द्वारा मिट जाती है तो भ्रांतिजनक प्रतीति रहती अवश्य है; किंतु अब यह हमें आगेसे भ्रांतिमें नहीं डाल सकती। हम उसी आभासको देखते है किंतु अब उसका महत्त्व भिन्न प्रकारकाही होता है।

शंकरने अनेक वाक्योंमें यह घोषणा की है कि मुक्तिका स्वरूप ब्रह्मके साथ एकत्वका है और यहां तक कि ब्रह्म अनुभवके सब प्रकारके विभागोंसे ऊपर उठा हुआ है। इस प्रकार मोक्षकी अवस्थाका वर्णन हमारे ज्ञानके शब्दोंमें नहीं किया जा सकता। चूंकि हमारा ज्ञान देश, काल,कारण और कार्य,व्यक्तियों तथा वस्तुओं एवं कर्मों तथा दुःखोंसे संबंध रखनेवाले भेदोंका प्रतिपादन करता है, इसलिए यह कहा जाता है कि, इनमेंसे कोई भी भेद मोक्षकी अवस्थामें लागू नहीं होता। यह नहीं कहा जा सकता कि मुक्तात्मा पुरुष किसी एक भौगोलिक क्षेत्रमें निवास करते हैं जिसका नाम स्वर्ग अथवा ब्रह्मलोक है; और न यही कहा जा सकता है कि वे अनंतकालतक रहते हैं । क्योंकि शंकर अरस्तूके साथ इस विचारसे सहमत है कि अनंत कालकी अवधि न तो उत्तमतर बना सकती है और न श्वेतको अधिक श्वेतही बना सकती है। हम मोक्षकी अवस्थाको निरंतर क्रियाशीलताकी अवस्थाके रूपमें नहीं मान सकते। यह सर्वोन्नत अनुभव है जो सब प्रकारकी क्रियाशीलतासे अतीत है और यहां तक कि इस अवस्थामें आत्मचैतन्य भी मिटा दिया जाता है। आत्मा संसारचक्रके ऊपर उठकर, जिसके साथ विकास और क्षय, जन्म और पुनर्जन्मका सदा चलते रहनेवाला प्रवाह लगा हुआ है, ऐसे नित्यत्वके अनुभवको प्राप्त कर लेती है जिसका लक्षण करते हुए बौथियसने कहा है कि यह "अनंत जीवनकी संपूर्ण रूपमें तथा क्षणमात्रके अंदर प्राप्ति है।" मोक्षकी अवस्था विश्वात्माके साथ सर्वात्मभाव प्राप्त करना है, अर्थात् उस ब्रह्मके साथ जो कि व्यावहारिक जगत्के समस्त भेदोंसे ऊपर उठा है। (स सर्वात्मभावः सर्वसंसारधर्मातीतब्रह्मस्वरूपत्वम् एव–शांकरभाष्य तै. उ. २:१) मोक्षकी अवस्था अपने निजी ब्रह्मरूपी आंतरिक रूपके अतिरिक्त अन्य कोई वस्तु नहीं है और स्वर्गकी भांति कोई उपार्जित अवस्था भी नहीं है। शास्त्रों (श्रुति) में शिक्षा दी गई है, और यही तर्कसंमत भी है, कि ब्रह्मका एकही रूप है और मोक्ष भी एकही प्रकारका है, चाहे उसे ब्रह्म प्राप्त करे चाहे मनुष्य। सालोक्य (ब्रह्मके साथ एकही लोकमें निवास ) और अन्य प्रकारके विशिष्ट मोक्ष जिनका वर्णन आता है चूंकि अर्जित परिणाम है इसलिए भिन्न-भिन्न

कोटियोंकी पूजाके कारण उनमें श्रेष्ठता आदिका भेद हो सकता है, किंतु मुक्ति उस स्वरूपकी नहीं है। चूंकि ब्रह्म " सब स्थानोंमें उपस्थित है, हर एक वस्तुके अंदर है, और सब वस्तुओंकी आत्मा है, यह सर्वथा असंभव है कि यह गतिकी प्रक्रियाका लक्ष्य बन सके। क्योंकि जिसपर हम पहलेही पहुंच गए हैं उसके प्रति चलनेका कुछ अर्थ नहीं है। अनुभव हमें बताता है कि, मनुष्य अपनेसे पृथक्की ओर जाता है। '

शरीरधारी ईश्वरके उपासक तो ब्रह्मलोकको जा सकते हैं किंतु उन्हें नहीं जाना होता जिन्होंने मोक्ष प्राप्त कर लिया है।

मोक्षका वर्णन निषेधात्मक रूपमें ऐसी स्वतंत्रताकी अवस्थाके रूपमें किया गया है कि जहां न दिन है न रात है, जहां कालकी धाराका प्रवाह रुक गया है और जहां सूर्य तथा तारे आकाशसे दूर कर दिए गए हैं। ज्ञानके भेद इसके अंदर कोई शक्ति नहीं रखते।.... इसी प्रकार उनका मत है कि मोक्षमें केवल प्रतिबंध उत्पन्न करनेवाले सहायक नष्ट हो जाते हैं किंतु स्वयं आत्मा नष्ट नहीं होती।.... इसकी ठीक-ठीक विषय वस्तु क्या है, यह वर्णन करना कठीन है। यह सत्य है कि इसको आंखोंने नहीं देखा, न कानोंने सुना और नहीं इसने मनुष्यके हृदयमें प्रवेश पाया और न कभी उस दिव्य ज्योतिके भावमात्रका भी विचार किया जिसकी अभिव्यक्ति अवश्य कभी न कभी होकर रहेगी। तो भी मोक्षका हमारे लिए कोई महत्त्व है तो हमें अमरत्वके विचारको कालसंबंधी भाषामें रखकर इसे ' सर्वात्मभाव ' के नामसे पुकारना चाहिए। ( सर्वात्मभावो मोक्ष उक्तः– शांकर-भाष्य: बृ. उ. ४: ४, ६ ) ( पृ. ६३६ ते ६४२ )

श्रीमदाद्यशंकराचार्य यांचे मोक्ष किंवा मुक्तीसंबंधी जे विचार वर विस्तार-पूर्वक उधृत केले आहेत त्यामुळे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मोक्षासंबंधी जे विचार प्रस्तुत केले आहेत त्याची यथार्थ पृष्ठभूमी काय आहे किंवहुना त्यांच्या विचाराची पार्श्वभूमी कोणती आहे याची समग्र कल्पना आपल्या दृष्टीसमोर उभी राहील. सर्व अद्वैती संप्रदायांनी शब्दभिन्नतेच्या आश्रयाने वरील कल्पनाच अधिक स्पष्ट करून अथवा सूत्ररूपाने सांगितल्या आहेत. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे नाथसंप्रदायी असल्याने त्यांनी शिवशक्तीच्या ऐक्याने उपस्थित होणारी मोक्षाची सिद्धी ज्ञानेश्वरीत सर्वत्र प्रस्तुत केली आहे. मात्र त्यांनी मांडलेली ही मोक्षाची सिद्धी किंवा समाधी जड अथवा तटस्थ वृत्तीची नसून नित्याच्या सर्व प्रकारच्या व्यव-हारातही जी लीलेने भंग पावत नाही; अशा प्रकारची आहे. हीच गोष्ट अधिक स्पष्ट करताना " एकनाथी भागवतात " श्रीएकनाथमहाराज असे म्हणतात की, " चित्त, चिंत्य आणि चिंतन या त्रिपुटीचे समाधान म्हणजे एकरूपत्व झाले असता, ते समाधानही आपोआपच पूर्ण कृष्णार्पण होते. अशा भगवद्भजन

प्रकाराने बुद्धी भजनशील झाली की, सर्व कर्मांमध्ये साक्षात् समाधी प्राप्त होऊन त्रिशुद्धी आपोआपच झाली असे जाणावे. कर्माचरण करीत असताना समाधी लागत नाही असे कित्येकजण म्हणतात; पण त्यांना आत्मसाक्षात्कार झाला नाही, हे तू निश्चयाने जाण. मात्र जे विदेही असतात त्यांची त्रिशुद्धी झालेली असते. केवळ तटस्थवृत्तीला जर कोणी समाधी समजत असतील तर त्या ज्ञात्याच्या बुद्धीला भ्रम झाला आहे असे म्हणावे लागेल; कारण ती खरोखर समाधी नसून त्या स्थितीत त्रिशुद्धी झाल्यामुळे साधकाला नुसती मूर्च्छा आलेली असते. जो साधक तटस्थपणा विसर्जून उठतो त्याची समाधी तेथेच संपते किंवा भंग पावते किंवा तो त्या समाधी अवस्थेला मुकतो. अर्थात् समाधीला तटस्थ अवस्था मानल्याने त्याला एकदेशी म्हणजे सीमित किंवा संकुचित भाव प्राप्त होतो. परंतु जे अज्ञानी लोक आहेत त्यांना हे खरे वाटत नाही. समाधी आणि ती एकदेशी आहे हे बोलणे बोलतानाच लज्जास्पद आहे असे वाटते. पण त्यालाही जो सत्य मानतो, तो शब्दपांडित्याने वेडा झाला आहे असे समजावे. त्याला शुद्ध-स्वरूपाची ओळखच नाही. वसिष्ठादि प्राचीन अतिसमर्थ ज्ञानी भक्त चालते-बोलते समाधिस्थ होते. मनाला मूर्च्छित करून ते तटस्थ करणे म्हणजे समाधिस्थ होणे, असे ते समजत नव्हते. देवर्षी नारदाचा समाधिबोध कधी लीलेनेही भंग पावला नाही. याज्ञवल्क्यांचा समाधिसंबंध किती दृढ होता याची परीक्षा ऋषींनी यज्ञात केली होती. स्वरूपाला पाहून जो मूर्च्छित झाला तो आपला आपणच तरला. असे महात्मे स्वत: तरून लोकांचा उद्धार करतात. शुक, वामदेव इत्यादिकांनी अशा प्रकारचाच बोध प्रकट केला आहे. म्हणून समाधी आणि व्युत्थान या दोन्ही अवस्थांसह बुद्धीने ब्रह्मरूप होणे हीच अखंड पूर्ण समाधी आहे. कृपासागर भगवान् श्रीगोपालकृष्णनाथांनी अर्जुनाला आत्मसमाधी देऊन तत्काळ महायुद्धामध्ये गुंतविले; मात्र त्यांनी त्याला तटस्थपणाचा अर्थात् त्रिशुद्धीचा स्पर्शही होऊ दिला नाही. सर्व कर्मामध्ये चित्ताची साम्यावस्था किंवा समाधान राहणे हीच समाधी असून सद्गुरू अशा प्रकारच्या बुद्धीचा बोधच साधकाला करीत असतात. अशा प्रकारच्या त्रिशुद्धीलाच निजसमाधी असे म्हणतात. एकदा ही समाधी प्राप्त झाली म्हणजे ती संसाररूपी रणांगणावरील वृत्तियुद्धात किंवा प्रत्यक्ष युद्धातही भंग पावत नाही. बुद्धीने परब्रह्माचे ग्रहण केले म्हणजे निर्हेतुक कर्म अविच्छिन्न चालते. हेच बुद्धीचे अंतिम समर्पण आहे. बाकी सर्व अनुमानज्ञान हा भ्रम आहे. स्वरूपामध्ये दृष्टी नि:शेषपणे तन्मय झाली व अनवच्छिन्न समान-बुद्धी कर्माकर्मप्रसंगातही प्राप्त झाली म्हणजे अज्ञान त्या समबुद्धी पुरुषाला बाधा करू शकत नाही. यालाच परमसमाधी असे म्हणतात. देहबुद्धी नि:शेष गेली म्हणजे

मग अहंकार जीवभावाने पीडा देत नाही व कर्मात किंवा अकर्मातही अज्ञानाची बाधा न होता साधकाला निर्दुष्ट अशी परमसमाधी प्राप्त होते. अशा प्रकारे स्वरूपाशी तादात्म्यता प्राप्त झाली म्हणजे बुद्धी खरी भजनशील होते. ही बुद्धी स्वतःच आत्मस्वरूपाशी एकरूप झाल्यामुळे साधकाला सर्व कर्मांमध्ये समाधी अवस्था प्राप्त होते. मनाची तळमळ नाहीशी होणे हीच परमसमाधी होय. बाकी देहबुद्धीला न टाकता नुसते चित्ताला स्थिर करणे म्हणजे देहाला काष्ठासारखे मूर्च्छित करणे ही खरी समाधी नव्हे. (अध्याय २–४२४ ते ४३७)

समाधीच्या या अवस्थेचेच अधिक स्पष्टीकरण करताना "श्रीमद्भागवतात" महर्षी व्यासांनी असे म्हटले आहे की–

देहोऽपि दैववशगः खलु कर्म यावत्स्वारम्भकं प्रतिसमीक्षत एव सासुः।
तं सप्रपंचमधिरूढसमाधियोगः स्वाप्नं पुनर्न भजते प्रतिबुद्धवस्तुः ॥१३ ३७॥

दैवाधीन असलेला देहही व्यवहार करीत असताना आपला आरंभ करणारे प्रारब्धकर्म जोपर्यंत असते तोपर्यंत प्राण व इंद्रिये यांसह तो जिवंत राहतो. ज्याने समाधीपर्यंत योग संपादन करून परमार्थवस्तू साक्षात् जाणली आहे असा ज्ञानी साधक स्वप्नाप्रमाणे असलेल्या प्रपंचासह आपल्या देहावर आसक्त होत नाही. यावर भाष्य करून याचा अर्थ स्पष्ट करताना श्रीएकनाथमहाराजांनी "एकनाथी भागवतात" असे म्हटले आहे की–

जितुकें देहाचें वर्तन । तितुकें अदृष्टास्तव जाण ।
अज्ञानासी देहाभिमान । त्यातें सज्ञान न धरिती ॥१३.६५४॥
जैसें अदृष्ट पूर्वस्थित । तैसा देह उपजे येथ ।
सावेव प्राणेंसहित । ऐसें वर्तत जंव दैवें ॥६५५॥
म्हणाल दैवयोगें देहीं असतां । अवश्य वाढेल देहअहंता ।
जेवीं एकत्र गमनें मार्गस्थां । येरयेरांच्या व्यथा भोगिती ॥६५६॥
लवणाच्या मिळणीं पाणी । होऊनि ठाके खारवणी ।
तेवीं ज्ञाताही देहाचे मिळणीं । देहाभिमानी होईल ॥६५७॥
जेवीं लोहसंगाचिये प्राप्ती । दुर्धर अग्नि घण वरी घेती ।
तेवीं देहाचिया संगतीं । ज्ञाते भोगिती सुखदुःखें ॥६५८॥
ऐसा कल्पाल अभिप्रावो । तो सज्ञानासी न घडे भावो ।
तिहीं निवटूनियां अहंभावो । चिदानंदें पहा वो समाधिस्थ ॥६५९॥
'अधिरूढसमाधियोग' । हें मूळींचें पद अमंग ।
येणें समाधि अतिनिर्व्यंग । साधिली चांग निजबोधें ॥६६०॥
तरी समाधी ते कैशी असें । तटस्थ काष्ठाचेपरी दिसे ।
कां समाधिस्थ केवळ पिसें । अथवा असे सज्ञान ॥६६१॥

ते समाधीचीं लक्षणे । ऐक सांगेन संपूर्णे ।
देहीं असोन देहबंधनें । नाहीं अडकणें सज्ञाना ।।६६२।।
केवळ ताटस्थ्या नांव समाधी । म्हणतां ज्ञात्याची ठकली बुद्धी ।
ते समाधि नव्हे त्रिशुद्धी । मूर्च्छित ते संधी असे वृत्ती ।।६६३।।
निरभिमान निरवधी । त्या नाव अखंड समाधी ।
मरी काष्ठातें त्रिशुद्धी । नव्हे समाधी सर्वथा ।।६६४।।
ताटस्थ्यचि समाधि साचें । जे मानिती त्यांसी स्वरूपाचें ।
ज्ञान नाहीं निश्चयाचें । अनुमानाचें बोलणें ।।६६५।।
प्रचंड आघाताच्या भुलीं । तत्काळ तटस्थता बाणली ।
तरी काय तेणें झाली । सत्यचि भली समाधि त्यासी ।।६६६।।
ओंवाळणीचिया आस्था । बहुरूपीं सोंग संपदितां ।
वायू स्तंभविला अवचितां । तेणें तटस्थता बहुकाळ ।।६६७।।
परी वासना जंव उरली आहे । तंव समाधि कैसेनि हों लाहे ।
सावध होतांचि म्हणे काये । ये दात्याचे रायें उचित द्यावें ।।६६८।।
सर्व संकल्पांची अवधी । त्या नांव निर्विकल्प समाधी ।
सकळ शास्त्र हेंचि प्रतिपादी । समाधि त्रिशुद्धी त्या नांव ।।६६९।।
सापु आल्या शेळीप्रती । तटस्थ होय सकळवृत्ती ।
तैशी झालिया ताटस्थ्यस्थिती । नव्हे निश्चतीं ते समाधी ।।६७०।।
अकस्मात् अवचितां । दिव्य स्वरूप देखतां ।
आश्चर्यें झाली तटस्थता । तेथ जाणावी तत्त्वतां वृत्ती आहे ।।६७१।।
स्वस्वरूप देखतां प्रथमदृष्टीं । न संवरतु विस्मयो उठी ।
तोही जिरवूनियां पोटीं । दशा जे उठी ते समाधी ।।६७२।।
निःशेष कल्पना जेथ विरे । तेथ विस्मयो कोठें स्फुरे ।
सूक्ष्म कल्पना थावरे । तेणें वोसरे विस्मयो ।।६७३।।
जेथ साचार ब्रह्मप्राप्ती होये । तेथें देहचि स्फुरों न लाहे ।
तेव्हां तटस्थ कीं चालताहे । हें देखणें होये पुढिलांचें ।।६७४।।
एवं देहचि जेथ मिथ्यापणें । त्यासी कवण लक्षी लक्षणें ।
हो कां मृगजळींचेनि नाहाणें । जेवीं कां निवणें सज्ञानीं ।।६७५।।
मिथ्या देहासी तटस्थता । झाल्या मानावी समाध्यवस्था ।
ऐशीं लक्षणें सत्य मानिता । ठकले तत्त्वतां परीक्षक ।।६७६।।
हो कां स्वप्नींचें सज्ञानासी । ताटस्थ्यमुद्रा लागल्या त्यासी ।
जरी मान्य झाल्या स्वप्नींच्यासी । तरी जागृतीही नाहीं आला ।।६७७।।

हो कां स्वप्नीचिया लोकांप्रती । थोर झाली समाधीची ख्याती ।
तरी नाहीं आला तो जागृती । जाणावा निश्चितीं निद्रिस्तू ॥६७८॥
तेवीं ताटस्थ्यां नांव समाधी । ते अविद्या स्वप्नमूर्च्छासिद्धी ।
परी स्वस्वरूपप्रबोधीं । जागा त्रिशुद्धी नाहीं झाला ॥६७९॥
तो जागा होऊनी स्वप्न पाहे । ते मिथ्यात्वे देखताहे ।
त्यांतु आपुला देहो सत्य काये । या ताटस्थ्य राहे ते ठायीं ॥६८०॥
जो जागा होऊनी तत्त्वतां । स्वप्नदेहासी तटस्थता ।
साक्षेपपूर्वक लावूं जातां । लाजे परी अधिकता दशा न मनीं ॥६८१॥
जो जागा होऊनि स्वप्न सांगे । तें मिथ्यापणेंची अवघें ।
परी सत्यत्वाचेनी पांगें । कदा निजांगें नातळे ॥६८२॥
तैशी साचार वस्तुप्राप्ती । तो नातळे देहस्थितीं ।
तरी देह वर्ते कोणे रीतीं । तो प्रारब्धगतीचेनि शेषें ॥६८३॥
स्थंडिलीं अग्नि विझोनि जाये । तरी भूमिये उष्णता राहे ।
कर्पूर सरल्याही पाहे । सुवासु आहे ते देशीं ॥६८४॥
पाळणा हालवितां वोसरे । तरी तो हाले पूर्वसंस्कारें ।
तेवीं अविद्यानाशें प्रारब्ध उरे । तेणें देहो वावरे मुक्तांचा ॥६८५॥
लक्ष भेदोनियां तीरें । बळें चालिजे पुढारें ।
तेवीं अविद्यानाशें प्रारब्ध उरे । तेणें देहो वावरे मुक्तांचा ॥६८६॥
शरीराचेनि छाया चळे । परी शरीर छायेवेगळें ।
तेवीं देह मिथ्या मुक्ताजवळें । चळे वळे प्रारब्धें ॥६८७॥
हेतुवीण अनायासें । पुरुषासवें छाया असे ।
तेवीं सज्ञानासरिसें । देह दिसे मिथ्यात्वें ॥६८८॥
तैसें गलितपत्र वारेंनि चळे । तैसें देह वर्ते प्राचीन मेळें ।
परी देहकर्माचेनि विटाळें । ज्ञाना न मैळे निजबोधें ॥६८९॥
त्या प्रारब्धाच्या पोटीं । सांगों सकळ जगेंसी गोठी ।
कां धरोनि मौनाची मिठी । गिरीकपाटीं पडो सुखें ॥६९०॥
तो आचरों सकळ कर्में । अथवा पिसा हो कां निभ्रमें ।
तेणें तेणें अनुक्रमें । जाण परिणामें प्रारब्धें ॥६९१॥
तो चढो पालखीं गजस्कंधीं । कां पडो विष्ठामूत्रसंधीं ।
ते ते प्रारब्धाची सिद्धी । जाण त्रिशुद्धी ज्ञात्यासी ॥६९२॥
जेथ बाध्यबाधकता फिटली । सकळ अहं अविद्या तुटली ।
सहज समाधी त्या नांव झाली । हे संख्या केली सिद्धांतीं ॥६९३॥

ऐशी जे सैर समाधिअवस्था । तोचि भोग भोगोनि अभोक्ता ।
कर्में करोनि अकर्ता । जाण तत्त्वतां तो एक ॥६९४॥
तो क्रियाकारणसंयोगें । डुलत देखिजे विषयभोगें ।
परी समाधिमुद्रा न भंगे । भोगसंगें अलिप्त ॥६९५॥
जें सिंहासनीं राजत्व जोडे । तें वनांत खेळतां न मोडे ।
कीं धावतां व्याहाळींपुढें । राजपद चोखडें ढळूं नेणें ॥७०१॥
रावो रानीं वशिन्नला । त्या रानासी राजभोग आला ।
रानीं रावो राजत्वा मुकला । मूर्खही या बोला न बोलती ॥७०२॥
तेवीं पावोनि स्वरूपप्राप्ती । प्रारब्धाच्या स्थितीं ।
नाना कर्में करितां दिसती । परी निजात्मस्थिती भंगेना ॥७०३॥
यालागीं समाधि आणि व्युत्थान । या दोहीं अवस्थांचें लक्षण ।
अपक्वासीचि घडे जाण । परिपूर्णासीं लक्षण तें कैंचें ॥७०४॥
स्वरूपावेगळें कांहीं एक । पूर्णासी उरलें नाहीं देख ।
समाधिव्युत्थानाचें मुख । त्या संमुख येवों लाजे ॥७०५॥
अर्जुना देवोनि समाधी । सवेंचि घातला महायुद्धीं ।
परी कृष्णकृपानिधी । तटस्थ त्रिशुद्धी न करीच ॥७०६॥
यालागी समाधिव्युत्थानविधी । ताटस्थ्येंसहित निरवधी ।
गिळूनि झाली सैर समाधी । पूर्ण निजपदीं विलसतां ॥७०७॥

श्रीएकनाथमहाराजांनी ज्या सहज समाधीचे वर्णन वर केले आहे तीच सिद्धयोग साधनाची अंतिम स्थिती किंवा फलनिष्पत्ती आहे. या स्थितीचे वर्णन करताना "कुलार्णवतंत्रात ' असे म्हटले आहे की–

प्रणष्टबाह्यसंचारः पाषाण इव निश्चलः ।
परजीवैकधामज्ञो योगी योगविदुच्यते ॥९.८॥
यदत्र नात्र निर्भासः स्तिमितोदधिवत् स्थितम् ।
स्वरूपशून्यं तद्ध्यानं समाधिरभिधीयते ॥९॥
न किंचिच्चिंतनादेव स्वयं तत्त्वं प्रकाशते ।
स्वयं प्रकाशिते तत्त्वे तत्क्षणात्तन्मयो भवेत् ॥१०॥
स्वप्नजाग्रदवस्थायां सुप्तवत् योऽवतिष्ठते ।
निश्वासोच्छ्वासहीनश्च निश्चलं मुक्त एव सः ॥११॥
निष्पंदकरणग्रामः स्वात्मलीनमनोऽनिलः ।
य आस्ते मृतवत्सासाक्षात् जीवन्मुक्तः स उच्यते ॥१२॥
न शृणोति न चाघ्राति न स्पृशति न पश्यति ।
न जानाति सुखं दुःखं न संकल्पयते मनः ॥१३॥

न चापि किंचिज्जानाति न च बुध्यति काष्ठवत् ।
एवं शिवे विलीनात्मा समाधिस्थ इहोच्यते ।।१४।।

यथा जले जलं क्षिप्तं क्षीरे क्षीरं घृते घृतम् ।
अविशेषो भवेत्तद्वज्जीवात्मपरमात्मनोः ।।१५।।

यथा ध्यानस्य सामर्थ्यात् कीटोऽपि भ्रमरायते ।
तथा समाधि सामर्थ्याद्ब्रह्मभूतो भवेन्नरः ।।१६।।

ज्या साधकाचा वायू स्थिर झाला आहे, त्याच्या मनाचा बाह्य संचारही पूर्णपणे नष्ट झाला आहे, जो दगडासारखा निश्चल आहे व जो जीवाचे सहस्रारातील परमश्रेष्ठ स्थान जाणतो त्या साधकयोग्याला योगवेत्ता म्हणतात. जेथे वस्तूचे भान किंवा भास असत नाही, ज्या अवस्थेत गंभीर सागराप्रमाणे स्तिमितावस्था असते व स्वरूपशून्य असे जे ध्यान त्याला समाधी म्हणतात. तत्त्व किंवा सत्य स्वतःच प्रकाशित होते. ते कोणत्याही प्रकारच्या चिंतनाने किंवा ध्यानाने प्राप्त होत नाही. अशा प्रकारे तत्त्व स्वतःच प्रकाशित झाले की, साधक त्याक्षणीच तत्त्वाशी तन्मय होतो. स्वप्न व जागृत अवस्थेत जो झोपल्याप्रमाणे असतो, ज्याचे श्वासोच्छ्वासाचे व्यापार थांबले आहेत व ज्याचे चित्त स्थिर झाले आहे तो मुक्तच होय. ज्याचा इंद्रियसमूह निष्क्रिय झाला आहे, वायू व मन आत्म्यात लीन झाले आहेत व जो मृतवत् वाटतो त्याला जीवन्मुक्त म्हणतात. जो काही ऐकत नाही, वास घेत नाही, स्पर्श करीत नाही, पाहत नाही, सुखदुःख जाणत नाही, मनाचे संकल्पादि करीत नाही, एखाद्या लाकडाच्या ओंडक्याप्रमाणे जो काहीच जाणत नाही व कशाचाही विचार करीत नाही आणि जो शिवात विलीन झालेला असतो त्याला समाधिस्थ म्हणतात. ज्याप्रमाणे पाण्यात पाणी, दुधात दूध, तुपात तूप टाकले असता कोणताही वेगळेपणा उरत नाही त्याप्रमाणेच सिद्धयोगाचे साधन करणाऱ्या साधकात जीवात्मा व परमात्मा यांचे विशेषत्व अर्थात् वेगवेगळेपण शिल्लक राहत नाही. ज्याप्रमाणे ध्यानाच्या सामर्थ्याने किंवा प्रभावाने क्षुद्रकीटकाला भ्रमररूपता प्राप्त होते त्याप्रमाणे समाधिसामर्थ्याने साधक ब्रह्मरूप होतो.

वरील सर्व विवेचनाचे किंवा सिद्धयोग साधनाच्या फलनिष्पत्तीचे सार पाहावयाचे झाले तर महर्षी व्यासांनी "श्रीमद्भागवतामध्ये" म्हटल्याप्रमाणे असे सांगता येईल की—

एतावानेन योगेन समग्रेणेह योगिनः ।
युज्यतेऽभिमतो ह्यर्थो यदसंगस्तु कृत्स्नशः ।।३.३२.२७।।

एतदन्तः समाम्नायो योगः साख्यं मनीषिणाम् ।
त्यागस्तपो दमः सत्यं समुद्रान्ता इवापगाः ।।१० ४७.३३।।

संपूर्ण संसारात आसक्तीचा अभाव होणे हेच योग्यांच्या सर्व प्रकारच्या

योगसाधनाचे एकमात्र फळ आहे. ज्याप्रमाणे सर्व नद्या वाहत वाहत समुद्राला येऊन मिळतात त्याप्रमाणे मनस्वी पुरुषांचा वेदाभ्यास, योगसाधन, आत्मानात्म-विवेक, त्याग, तपस्या, इंद्रियसंयम व सत्य इत्यादि सर्व धर्म माझ्या-परमेश्वराच्या प्राप्तीतच समाप्त होतात. सर्वांचे अखेरचे फल माझा साक्षात्कार आहे; कारण वरील सर्व गोष्टी मनाला निरुद्ध करून त्याला माझ्यापर्यंत पोहोचवितात.

येथपर्यंत आपण सिद्धयोग साधनाच्या फलनिष्पत्तीचे सर्वसामान्य रूप पाहिले. फलनिष्पत्तीची अर्थात् समाधीची ही पार्श्वभूमी लक्षात घेतली म्हणजे साधकाच्या गंतव्य स्थानाची, त्या स्थानी पोहचल्यावर होणाऱ्या अवस्थेची व त्यानंतर तो ज्या स्थितीत राहतो किंवा वावरतो त्याची संपूर्ण कल्पना आपल्या दृष्टीसमोर उभी राहून, समाधी अवस्थेसंबंधीच्या सर्व विपरीत धारणा गळून जाऊन, जे चित्र आपल्या धारणेत पक्के होईल, त्या पार्श्वभूमीवर श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोग साधनाची जी फलनिष्पत्ती सांगितली आहे, ती पाहिली म्हणजे त्याचे स्वरूप उत्तम प्रकारे आपल्याला प्रतीत होईल. ही प्रतीती उत्कटपणे, स्पष्टपणे व अशेषरूपात निश्चित व्हावी म्हणूनच येथपर्यंत विस्ताराने वरीलप्रमाणे पार्श्वभूमी चित्रित केली आहे. या पार्श्वभूमीवर श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे कथन अधिक उठावदार होऊन समजण्यास सोपे जाईल.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी साधकाला प्राप्त होणारी अंतिम स्थिती किंवा फल-निष्पत्ती भिन्न भिन्न कल्पनांनी, उदाहरणांनी व दृष्टांतांनी स्पष्ट केली आहे. त्यांनी जरी निरनिराळ्या नावांनी व प्रकारांनी या स्थितीचे किंवा अवस्थेचे वर्णन केले असले तरी हे सर्व वर्णन एकाच वस्तूचे आहे, हे नितांत सत्य आहे. वास्तविक रीतीने सिद्धयोग साधनाने प्राप्त होणारी फलनिष्पत्ती ही अनुभूतीची गोष्ट आहे; कथन करण्याची नाही. या अवस्थेचे किंवा फलाचे वर्णन करताना वेदोपनिषदांनाही मर्यादा पडल्याने त्यांनी " नेति नेति " असे म्हणून आपली असमर्थता प्रकट केली आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीही या दृष्टीने असे म्हटले आहे की—

ऐसें जें पद । दुर्लभ आणि अगाध ।
जयाचिये थडिये वेद । चुबुकळिले ठेले ॥८.१०७॥
तें ते पुरुष होती । जे यापरी लया जाती ।
तरी पार्था हेचि स्थिती । एकवेळ सांगों ॥१०८॥
म्हणौनि तेथिंची मातु । न चढेचि बोलाचा हातु ।
जेणें संवादाचिया गांवा आंतु । पैठी कीजे ॥६.३११॥
अर्जुना एऱ्हवीं तरी । इया अभिप्रायाचा जे गर्व धरी ।
ते पाहे पां वैखरी । दुरी ठेली ॥३१२॥
आतां महाशून्याचिया डोहीं । जेथ गगनासीचि थावो नाहीं ।
तेथ तागा लागेल काई । बोलाचा इया ? ॥३१५॥

म्हणौनि आखरामाजीं सांपडे । कीं कानवरी जोडे ।
हें तैसें नव्हे फुडें । त्रिशुद्धी गा ।।३१६।।
जें कहीं दैवें । अनुभविलें फावे ।
तें आपणचि हें ठाकावें । होऊनियां ।।३१७।।
पुढती जाणणें तें नाहींचि । म्हणौनि असो किती हेंचि ।
बोलावें आतां वायांचि । धनुर्धरा ।।३१८।।

**पदपिंडाचे ऐक्यः—**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी पदपिंडाच्या ऐक्याने सिद्धयोग साधनाची फल-निष्पत्ती सिद्ध होते हे सांगून नाथसंप्रदाय परंपरेने प्राप्त झालेल्या समाधिधनाचा किंवा मोक्षाचा म्हणजेच स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या प्राप्तीचा पहिला पैलू किंवा निकष प्रकट केला आहे. महायोगी गोरक्षनाथांनी पदपिंडाच्या ऐक्याची प्रक्रिया कशी स्पष्ट केली आहे, ते आपण मागे पाहिले आहे. येथे फक्त पदपिंडाचे ऐक्य होते म्हणजे नेमके काय होते व ही स्थिती साधकाला प्राप्त झाल्यावर त्याची कोणती अवस्था असते एवढेच पाहवयाचे आहे. "श्रीमद्भगवद्गीतेत" भगवंतांनी पदपिंडाच्या ऐक्याची ही स्थिती अत्यंत स्पष्टपणे प्रकट करताना असे म्हटले आहे की—

जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ।।२.५१।।
ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तंति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ।।१५.४।।
निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ।।१५.५।।
न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम् ।।१५ ६।।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ।।१७.५६।।

साधकयोगी जन्ममरणाच्या बंधनातून मुक्त होऊन निर्विकार ब्रह्मपदाला जातात. स्वसंवेद्य आत्मस्वरूपाशी एकरूप झालेले साधक पुन्हा त्या पदापासून परत येत नाहीत. अर्थात् ते जन्ममरणरूप संसारात पडत नाहीत म्हणजे ते मुक्त होतात. ज्याच्यापासून हा प्राचीन विश्वपसारा निघाला त्या आदिपुरुषाशी अर्थात् परब्रह्माशी आपले ऐक्य व्हावे म्हणून ते ब्रह्मपद शोधावे. ज्यांचा अभिमान आणि मोह नष्ट झाला आहे, ज्यांनी विषयासक्तीचे दोष जिंकले आहेत, जे आत्म्याच्या ठिकाणी नित्य रमतात, ज्यांच्या कामना दूर झाल्या आहेत, जे सुख-दुःखादि द्वंद्वापासून मुक्त झाले आहेत आणि जे ज्ञानी आहेत तेच या अविनाशी पदाला प्राप्त होतात. सूर्य, चंद्र किंवा अग्नी ते स्थान प्रकाशित करावयास समर्थ

नाहीत. ज्या ठिकाणी गेले म्हणजे परत यावे लागत नाही तेच सहस्रारातील माझे परम धाम होय. साधक माझ्या कृपेने शाश्वत आणि अव्यय पदाला प्राप्त होतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वरील श्लोकांचा भावार्थ स्पष्ट करताना व अन्यत्रही पदपिंडाच्या, जीवशिवाच्या किंवा शिवशक्तीच्या ऐक्याचे वर्णन करताना असे म्हटले आहे की–

मग निरामयभरित । पावती पद अच्युत ।
ते बुद्धियोगयुक्त । धनुर्धरा ॥२.२७९॥
ते गुरुशिष्याची गोठी । पदपिंडाची गांठी ।
तेथ स्थिर राहोनि नुठी । कवणे काळीं ॥३.२७२॥
पैं मेघाचेनि मुखीं निवडिला । समुद्र कां बोधीं पडला ।
तो मागुता जैसा आला । आपणपयां ॥६.३०७॥
तेवीं पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशे ।
तें एकत्व होय तैसें । पंडुकुमरा ॥३०८॥
आतां दुजे हन होतें । कीं एकचि हें आइतें ।
ऐशिये विवंचनेपुरतें । उरेचिना ॥३०९॥
गगनीं गगन लया जाये । ऐसें जें कांहीं आहे ।
तें अनुभवें जो होये । तो होऊनि ठाके ॥३१०॥
मग इदंतेसि वाळलें । जें मीपणेंवीण डाहारलें ।
तें रूप पाहिजे आपलें । आपणचि ॥१५.२६७॥
परी दर्पणाचेनि आधारें । एकचि करूनि दुसरें ।
मुख पाहाती गव्हारें । तैसें नको हो ! ॥२६८॥
हें पाहाणें ऐसें असे वीरा । जैसा न बोडलिया विहिरा ।
मग आपुलिया उगमीं झरा । भरोनि ठाके ॥२६९॥
नातरी आटलिया अंभ । निजबिंबीं प्रतिबिंब ।
निहटे कां नभीं नभ । घटाभावीं ॥२७०॥
नाना इंधनांशु सरलेया । वन्हि परते जेवीं आपणपयां ।
तैसें आपेंआप धनंजाया । न्याहाळणें जें गा ॥२७१॥
जिव्हें आपली चवी चाखणें । चळु निज बुबुळ देखणें ।
आहे तया ऐसें निरीक्षणें । आपुलें पैं ॥२७२॥
कां प्रभेसि प्रभा मिळे । गगन गगनावरी लोळे ।
नाना पाणी भरलें खोळे । पाणियाचिये ॥२७३॥
आपणचि आपणयातें । पाहिजे जें अद्वैतें ।
तें ऐसें होय निरुतें । बोलिजतु असे ॥२७४॥

ते वस्तु कीं तेजोराशीं । सर्व भूतात्मक सरिसी ।
चंद्रसूर्याच्या मानसीं । प्रकाशे जे ॥३१२॥
म्हणौनि चंद्रसूर्य कडवसां । पडती वस्तूच्या प्रकाशा ।
यालागीं तेज जें तेजसा । तें वस्तूचें आंग ॥३१३॥
आणि जयाचया प्रकाशीं । जग हारपे चंद्रार्केसीं ।
सचंद्र नक्षत्रें जैसीं । दिनोदयीं ॥३१४॥
नातरी प्रबोधलिये वेळे । ते स्वप्नींची डिंडिमा मावळे ।
कां नुरेचि सांजवेळे । मृगतृष्णिका ॥३१५॥
तैसा जिये वस्तूच्या ठायीं । कोण्हीच कां आभासु नाहीं ।
तें माझें निजधाम पाहीं । पाटाचें गा ॥३१६॥
पुढती जे तेथ गेले । न घेतीच माघौतीं पाउलें ।
महोदधीं कां मिनले । स्रोत जैसे ॥३१७॥
कां लवणाची कुंजरी । सूदलिया लवणसागरीं ।
होयचि ना माघारी । परती जैसी ॥३१८॥
नाना गेलिया अंतराळा । न येतीचि वन्हीज्वाळा ।
नाहीं तप्तलोहौनि जळा । निघणें जेवीं ॥३१९॥
तेवीं मजसीं एकवट । जे जाले ज्ञानें चोखट ।
तयां पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥३२०॥

अशा प्रकारे पदपिंडाचे ऐक्य होऊन साधक आत्मस्वरूप होतो. या अवस्थेत साधकाची अर्थात् सिद्ध पुरुषाची स्थिती कशी असते हे सांगताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की—

जया दुरुषांचे कां मन । सांडोनि गेलें मोहमान ।
वर्षांतीं जैसें घन । आकाशातें ॥१५.२८५॥
निकवडचा निष्ठुरा । उबगिजे जेवीं सोयरा ।
तैसें नागवती विकारां । वेटाळूं जे ॥२८६॥
फळली केळी उन्मूळे । तैसी आत्मलाभें प्रबळे ।
तयाची क्रिया ढाळेंढाळें । गळती आहे ॥२८७॥
आगी लागलिया रुखीं । देखोनि सैरा पळती पक्षी ।
तैसें सांडिलें अशेखीं । विकल्पीं जे ॥२८८॥
आइकें सकळ दोषतृणीं । अंकुरिजती जिये मेदिनी ।
तिये भेदबुद्धीची काहाणी । नाहीं जयातें ॥२८९॥
सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय अपैसी ।
गेली देहअहंता तैसी । अविद्यासवें ॥२९०॥

पैं आयुष्यहीना जीवातें । शरीर सांडी जेवीं अवचितें ।
तेवीं निदसुरे द्वैतें । सांडिले जे ॥२९१॥

लोहाचें सांकडें परिसा । न जोडे आंधारु रवि जैसा ।
द्वैतबुद्धीचा तैसा । सदा दुकाळ जया ॥२९२॥

अगा सुखदु:खाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें ।
तियें जयां कां सामोरें । होतीचिना ॥२९३॥

स्वप्नींचें राज्य कां मरण । नोहे हर्षशोकांसि कारण ।
उपवढलिया जाण । जियापरी ॥२९४॥

तैसें सुखदु:खरूपीं । द्वंद्वीं जे पुण्यपापीं ।
न घेपिजती सर्पीं । गरुड जैसे ॥२९५॥

आणि अनात्मवर्गनीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर ।
चरताति जे सविचार । राजहंसु ॥२९६॥

जैसा वर्षोनि भूतळीं । आपुला रसु अंशुमाळी ।
मागौता आणि रश्मिजाळी । बिंबासीचि ॥२९७॥

तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली बारावाटीं ।
ते एकवटिती ज्ञानदृष्टी । अखंड जे ॥२९८॥

किंबहुना आत्मयाचा । निर्धारीं विवेकु जयांचा ।
बुडाला बोधु गंगेचा । सिंधूमाजीं जैसा ॥२९९॥

पैं आघवेंचि आपलेंपणें । नुरेचि जया अभिलाषणें ।
जैसें येथूनि पऱ्हा जाणें । आकाशा नाहीं ॥३००॥

जैसा अग्नीचा डोंगरु । नेघे कोणी बीज अंकुरु ।
तैसा मनीं जयां विकारु । उदैजैना ॥३०१॥

जैसा काढिलिया मंदराचळु । राहे क्षीराब्धि निश्चळु ।
तैसा नुठी जयां सळू । कामोर्मीचा ॥३०२॥

चंद्रमा कळीं धाला । न दिसे कोणें आंगीं वोसावला ।
तेवीं अपेक्षेचा अवखळा । न पडे जयां ॥३०३॥

हें किती बोलू असांगडें । जेवीं परमाणु नुरे वायूपुढें ।
तैसें विषयांचें नावडे । नांवचि जयां ॥३०४॥

एवं जे जे कोणी ऐसे । केले ज्ञानाग्नि हुताशें ।
ते तेथ मिळती जैसें । हेमीं हेम ॥३०६॥

तेथ म्हणजे कवणें ठाईं । ऐसेंही पुससी कांहीं ।
तरी तें पद गा नाहीं । वेंचु जया ॥३०६॥

दृश्यपणें देखिजे । कां ज्ञेयत्वें जाणिजे ।
अमुकें ऐसें म्हणिजे । तें जे नव्हे ॥३०७॥

सारांश, महायोगी गोरक्षनाथांनी "सिद्धसिद्धांतपद्धतीत" "अथ पिंडपदयोः समरसकरणं कथ्यते ॥ ५.१ ॥ निजपिंडमिती स्वरूपकिरणानंदोन्मेषमात्रं यस्योन्मेषस्य प्रत्याहरणमेव समरकरणं भवति ॥ ५.११ ॥ " असे म्हणून पदपिंडाच्या ऐक्याचा जो महासिद्धांत प्रस्थापित केला आहे त्याचेच प्रकटीकरण श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे. वरील सर्व दृष्टांतांनी त्यांनी जी गोष्ट पटवून दिली आहे ती पाहिली म्हणजे महायोगी गोरक्षनाथांनी प्रकट केलेल्या पदपिंडाच्या समरसीकरणावरील हे उत्तम भाष्य आहे असेच म्हणावे लागते. श्रीनामदेवमहाराजांनीही " पदपिंडा विवर्जित केला नामा ॥ " असे म्हणून या अवस्थेचे वर्णन केले आहे. पदपिंडाच्या ऐक्याने प्राप्त होणाऱ्या या द्वैताद्वैतविवर्जित अवस्थेचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

सांडूनि आपुला आडळ । लवण आश्रयी जळ ।
का हिंडोनि राहे निश्चळ । वायु व्योमीं ॥१८.१२५०॥
तैसा बुद्धी वाचे कायें । जो मातें आश्रऊनि ठायें ।
तो निषिद्धेंही विपायें । कर्में करूं ॥१२५१॥
परी गंगेच्या संबंधीं । विदी आणि महानदी ।
एक तेवीं माझ्या बोधीं । शुभाशुभांसी ॥१२५२॥
का बावनें आणि धुरें । हा निवाडु तंवचि सरे ।
जंव न घेपती वैश्वानरें । कवळूनि दोन्ही ॥१२५३॥
ना पांचिकें आणि सोळें । हें सोनया तंवचि आलें ।
जंव परिसु आंगमेळें । एकवटीना ॥१२५४॥
तैसे शुभाशुभ ऐसें । हें तंवचिवरी आभासे ।
जंव येकु न प्रकाशे । सर्वत्र मी ॥१२५५॥
अगा रात्री आणि दिवो । हा तंवचि द्वैतभावो ।
जंव न रिगिजे गांवो । गभस्तीचा ॥११५६॥
म्हणौनि माझिया भेटी । तयाचीं सर्व कर्में किरिटी ।
जाऊनि बैसे तो पाटीं । सायुज्याच्या ॥११५७॥
देशें काळें स्वभावें । वेंचु जया न संभवे ।
तें पद माझें पावे । अविनाश तो ॥११५८॥

## ज्ञानोदयीं चेइला :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी 'जैं भ्रांति सेजे सुतला । तैं स्वप्नसुखें भुतला । मग तो ज्ञानोदयीं चेइला । म्हणौनियां ॥ ५.४७ ॥ " असे सांगून सिद्धयोग

साधनाने जीवाच्या ठिकाणी जागृत शक्तीमुळे ब्रह्मात्मैक्यज्ञानाचा उदय आपोआप होतो, हा सिद्धांत प्रस्थापित करून या साधनाच्या फलनिष्पत्तीचा दुसरा पैलू किंवा निकष प्रकट केला आहे. " सूर्यें अधिष्ठिली प्राची । जगा राणीव दे प्रकाशाची । तैंसी वाचा श्रोतयां ज्ञानाची । दिवाळी करी ॥ १५.१२ ॥ " या श्रीसद्गुरूंच्या कार्यातच ज्ञानाच्या फलनिष्पत्तीचे दिग्दर्शन करून " जें ज्ञान जयाच्या हातीं । तोचि समर्थु मुक्ति ॥ १५.३० ॥ " व " तेवीं ज्ञानेंचि सौरसु । मोक्षाचा तो ॥ १५.३२ ॥ " असे सांगून ज्ञानाची जागृती होणे किंवा प्राप्ती होणे म्हणजेच मोक्ष होय, असे त्यांनी स्पष्ट केले आहे. सिद्धयोग साधनाने प्राप्त होणाऱ्या ज्ञान जागृतीच्या फलनिष्पत्तीला दुसरी उपमा नसल्याने किंवा ही प्राप्ती अजोड असल्याने " एथ ज्ञान हें उत्तम होये । आणीकही एक तैसें कें आहे । जैसें चैतन्य कां नोहे । दुसरें गा ॥ ४.१७८ ॥, म्हणौनि बहुतीं परी पाहतां । पुढतपुढती निर्धारितां । हें ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींची आथि ॥ १८१ ॥ " व " जैसी अमृताची चवी निवडीजे । तरी अमृताचिपारिखी म्हणिजे । तैसें ज्ञान हे उपमिजे । ज्ञानेंसींची ॥ १८२ ॥" असे त्यांनी म्हटले आहे. ही फलनिष्पत्ती अत्यंत श्रेष्ठ दर्जाची असल्यामुळे " तो म्हणे गा अर्जुना । अवधानाची सर्व सेना । मेळऊनि इया ज्ञाना । झोंबावें हो ! ॥ १४.३९ ॥ " असे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी अगदी स्पष्टपणे म्हटले आहे. ज्ञानप्राप्तीची ही अवस्था किंवा स्थिती म्हणजे नेमके काय आहे याचे वर्णन करताना ते असे म्हणतात की–

जें अग्नीचें दीपन । जें चंद्राचे जीवन ।
सूर्यांचे नयन । देखती जेणे ॥१३.९२७॥

जयाचेनि उजियेडें । तारांगण उभडें ।
महातेज सुरवाडें । राहाटे जेणें ॥९२८॥

जें आदीची आदी । जें वृद्धीची वृद्धी ।
बुद्धीची जे बुद्धी । जीवाचा जीवु ॥९२९॥

जें मनाचें मन । जें नेत्राचे नयन ।
कानाचे कान । वाचेची वाचा ॥९३०॥

जें प्राणाचा प्राण । जें गतीचे चरण ।
क्रियेचें कर्तेपण । जयाचेनि ॥९३१॥

आकारु जेणें आकारे । विस्तारु जेणें विस्तारे ।
संहारु जेणें संहारे । पंडुकुमरा ॥९३२॥

जें मेदिनीची मेदिनी । जें पाणी पिऊनि असे पाणी ।
तेजा दिवेलावणी । जेणें तेजें ॥९३३॥

जें वायूचा श्वासोश्वासु । जें गगनाचा अवकाशु ।
हे असो आघवाची आभासु । आभासे जेणें ॥९३४॥
किंबहुना पांडवा । जें आघवेंचि असे आघवा ।
जेथ नाहीं रिगावा । द्वैतभावासी ॥९२५॥
जें देखलियाचिसवें । दृश्य द्रष्टा हें आघवें ।
एकवाट कालवे । सामरस्यें ॥१३६॥
मग तेंचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन ।
ज्ञानें गमिजे स्थान । तेंहि तेंची ॥९३७॥

या अवस्थेचे, स्थितीचे किंवा फलाचे वर्णन करताना " स्पंदशास्त्रात " असे म्हटले आहे की–

परामृतरसापायस्तस्य यः प्रत्ययोद्भवः ।
तेनास्वतंत्रामेति स च तन्मात्र गोचरः ॥४.१६॥

यावर टीका करून त्याचा भावार्थ स्पष्ट करताना भट्टकल्लटाने असे म्हटले आहे की, " सर्वात श्रेष्ठ अशा अविनाशी चिन्मय पदाला शिवास्य म्हणजे शिवस्वरूप म्हणतात. त्याचा रस म्हणजे मी ते आहे या अनुभवापासून च्युत होऊन मी ते नाही अशी भावना करून मी केवळ यत्किंचित् जीव आहे असे मानणे हे पशुस्थितीला जाणे होय. त्यामुळे श्रोत्रादि विषय जे सुखदुःख दाखवितील ते खरे मानल्यामुळे जीव परतंत्र बनतो. अहं हा शब्द खरोखर देहाचा वाचक नसून परशिवाच्या ज्ञानस्वरूपाचा वाचक आहे. अशा ज्ञानाला परमामृत म्हणतात. या ज्ञानाची सतत जागृती ठेवणे याला त्याचा रस चाखणे म्हणतात. त्या जागृतीचा आपण नाश केला; तर आपण परतंत्र बनतो व पंचविषयांच्या तडाख्यात सापडतो. शिव व शक्ती अभिन्नच आहेत. निरुपाधिक ज्योतिस्वरूप स्वरूपात्म्याला शिव असे नाव आहे व त्याच्या शक्तीला उन्मेष अगर स्पंद म्हणतात. स्वस्वरूपाच्या सदोदित असण्याला सामान्य स्पंद अगर धर्म म्हणतात. मी परशिव आहे असे जे ज्ञान तेच शक्तीचे स्वरूप होय. निरुपाधिक ज्योतिस्वरूप शिवतत्त्वच मी आहे अशा ज्ञानाला शक्तितत्त्व म्हणतात. " या स्थितीचे किंवा अवस्थेचे म्हणजे ज्ञानोदयीं चेइण्याचे अर्थात् जागृत शक्तीने प्राप्त झालेल्या स्वरूपावस्थेचे अधिक वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

परी हें असो ऐसिया । मज पुरुषोत्तमातें धनंजया ।
जाणे जो पाहलेया । ज्ञानमित्रें ॥१५.५५९॥
चेइलिया आपुलें ज्ञान । जैसें नाहींचि होय स्वप्न ।
तैसें स्फुरतें त्रिभुवन । वावों जालें ॥५६०॥

कां हातीं घेतलिया माळा । फिटे सर्पाभासाचा कांटाळा ।
तैंसा माझेनि बोधें टवाळा । नागवे तो ॥५६१॥
लेणें सोनेंचि जो जाणें । तो लेणेंपण तें वावो म्हणे ।
तेवीं मी जाणोनि जेणें । वाळिला भेदु ॥५६२॥
मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिध्दु ।
जो आपणेनसीं भेदु । नेणोनियां जाणे ॥५६३॥
तेणेंचि सर्व जाणितलें । हेंही म्हणणें थेंकुलें ।
जें तया सर्व उरलें । द्वैत नाहीं ॥५६४॥

अशा प्रकारे या अवस्थेचे वर्णन करून या अवस्थेतील ज्ञानीच खरा भक्त असून तो या अवस्थेशी कसा समरस झालेला असतो किंवा सिद्धयोग साधनाच्या फलनिष्पत्तीची जी स्थिती त्याला प्राप्त झालेली असते तिचे उपरोक्त वर्णनाच्या पुढेच कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

म्हणौनि माझिया भजना । उचितु तोचि अर्जुना ।
गगन जैसे आलिंगना । गगनाचिया ॥१५.५६५॥
क्षीरसागरा परगुणें । कीजे क्षीरसागरचिपणें ।
अमृतचि होऊनि मिळणें । अमृतीं जेवीं ॥५६६॥
साडेपंधरा मिसळावें । तें साडेपंधरेचि होआवें ।
तेवीं मी जालिया संभवे । भक्ति माझी ॥५६७॥
हां गा सिंधूसि आनी होती । तरी गंगा कैसेनी मिळति ?।
म्हणौनि मी न होतां भक्ती–। अन्वयो आहे ? ॥५६८॥
ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळु अनन्यु सागरीं ।
तैसा मातें अवधारीं । भजिन्नला जो ॥५६९॥
सूर्या आणि प्रभे । एकवंकीं जेणें लोभें ।
तो पाडु मानूं लाभे । भजना तया ॥५७०॥

साधकाला ज्ञानजागृतीच्या निष्पत्तीचे फळ मिळाल्यावर त्याची स्थिती कशी असते हे अन्यत्र सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

तेथ राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखें ।
अजत्व माझें देखे । आपुलिया डोळां ॥१०.७४॥
मी आदीसि परु । सकळलोकमहेश्वरु ।
ऐसिया मातें जो नरु । यापरी जाणें ॥७५॥
तो पाषाणामाजीं परिसु । जैसा रसाआंतु सिद्धरसु ।
तैसा मनुष्याआंतु तो अंशु । माझाचि जाण ॥७६॥

तें चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ ।
येर माणुसपण तें भांब । लौकिक भागु ॥७७॥

म्हणौनि गा यापरी । ब्रह्मादिपिपीलिकावरी ।
मीवांचूनि दुसरी । गोठी नाहीं ॥१०५॥

ऐसें जाणे जो साचें । तया चेइरे जाहालें ज्ञानाचें ।
म्हणौनि उत्तमाधम भेदाचें । दुःस्वप्न न देखे ॥१०६॥

म्हणौनि भक्तु एकु पाहीं । ज्ञानिया जो ॥७.१११॥
जे तया ज्ञानाचेनि प्रकाशें । फिटलें भेदाभेदांचें कडवसें ।
मग मीचि जाहला समरसें । आणि भक्तुही तेवींचि ॥११२॥

परि आणिकांचिये दिठी नावेक । जैसा स्फटिकुचि आभासे उदक ।
तैसा ज्ञानी नव्हे कौतुक । सांगता तो ॥११३॥

जैसा वारा कां गगनी विरे । मग वारेपण वेगळें नुरे ।
तेवीं भक्त हे पैंज न सरे । जरी ऐक्या आला ॥११४॥

जरीं पवनु हालवूनि पाहिजे । तरी गगनावेगळा देखिजे ।
एऱ्हवीं गगन तो सहजें । असे जैसें ॥११५॥

तैसें शरीरीं हन कर्में । तो भक्तु ऐसा गमे ।
परी अंतरप्रतीतिधर्में । मीचि जाहला ॥११६॥

आणि ज्ञानाचेनि उजिडलेपणें । मी आत्मा ऐसें तो जाणें ।
म्हणौनि मीही तैसेंचि म्हणें । उचंबळला सांता ॥११७॥

हां गा जीवापैलीकडिलीये खुणे । जो पावोनि वावरों जाणें ।
तो देहाचेनि वेगळेपणें । काय वेगळा होय ? ॥११८॥

सारांश, “ जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे । जीवु दोंदावरी लोळे आनंदाचिया ॥१३·१७४॥ ऐसें जें ज्ञान । पवित्रैकनिधान । जेथ विटाळलें मन । चोख कीजे ॥१७५॥” असे सांगून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी “ ज्ञानोदयीं चेइला ” या फलनिष्पत्तीचा अपूर्व महिमा कथन केला आहे. त्याचप्रमाणे त्यांनी ज्ञानी माणसाची लक्षणे कथन करून “ज्ञाना रूप दावूं ॥१३·१६०॥” ही प्रतिज्ञा पूर्ण केली आहे. असे असले; तरी ज्ञानही शेवटी त्या अनिर्वचनीय अवस्थेत बुडून जात असल्याचे व सिद्धयोग साधनाने येणारी ही स्थिती ज्ञानाज्ञानाच्या पलीकडील अर्थात् द्वैताद्वैतविवर्जित अशी आहे, हे “द्वैतं वाद्वैतरूपं द्वयत उत परं योगिनां शंकरं वा।” असे “सिद्धांतवाक्य” नावाच्या पदावलीत सिद्धसंप्रदयाचे एक अत्यंत प्रसिद्ध व शक्तिशाली आचार्य महायोगी श्रीजालंधरनाथ यांनी सांगितल्याप्रमाणे परंपरा प्राप्त पद्धतीने कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की-

मग आगी लागलिया कापुरा । ना काजळी ना वैश्वानरा ।
उरणें नाही वीरा । जयापरी ॥१५.४३९॥

तेवीं समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जें बुडोनि जाये ।
तऱ्ही नाहीं कीर नोहे । आणि न साहे असणेंही ॥४४०॥

तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया ।
जैसा वन्हि काष्ठ जाळूनियां । स्वयें जळे ॥५२७॥

तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपण वस्तु देऊनि गेलें ।
ऐसें जाणणेंनिवीण उरलें । जाणतें जें ॥५२८॥

## नैष्कर्म्य सिद्धी :–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " तो हा सकळ जीवांचा विसांवा । नैष्कर्म्य सुखाचा ठेवा । परी उघड करूनि पांडवा । दाविजत असे ॥८.४७॥" असे म्हणून सिद्धयोग साधनाने प्राप्त होणाऱ्या शिवशक्तीच्या ऐक्यरूपी कैवल्यरत्नाच्या तिसऱ्या पैलूचे किंवा निकषाचे दिग्दर्शन केले आहे. ज्ञानयज्ञामुळे अर्थात् सिद्धयोग साधनामुळेच ही "नैष्कर्म्यबोधाची खाण ॥४.१६०॥" फलनिष्पत्तीच्या रूपाने साधकाच्या ठिकाणी उपस्थित होत असल्याने "तैसें न होणें निफजे । ते नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे । सर्व सिद्धींत सहजें । परम हेचि ॥१८.९८०॥" असे म्हणून या पैलूचा डिंडिम गायिला आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सांगितलेला हा महिमा अगदी यथार्थ आहे; कारण सद्‌गुरूंनी शक्तिपात केल्यावरच सिद्धयोग साधनमार्गाची उपलब्धी होऊन ही नैष्कर्म्य सिद्धी होते याचा निर्वाळा देताना त्यांनी स्वतःच "अगा करतेनवीण कर्म । तेंचि तें नैष्कर्म्य । हें जाणती सुवर्म । गुरुगम्य जें ॥५.६३॥" असे सिद्धांतरूपाने स्पष्ट केले आहे भगवंतांनीच "श्रीमद्‌भगवद्‌गीतेत" नैष्कर्म्य सिद्धी हे सिद्धयोग साधनाचे सर्वोत्कृष्ट फल आहे, हे सांगताना असे म्हटले आहे की–

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥१८.४९॥

ज्याची बुद्धी कोठेही आसक्त नाही, जो जितेंद्रिय व निस्पृह झाला आहे तो मनुष्य संन्यासाने परमश्रेष्ठ अशी नैष्कर्म्यसिद्धी मिळवितो. यांचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

तरी देहादिक हें संसारें । सर्वही मांडलेंसे जें गुफिरें ।
तेथ नातुडे तो वागुरें । वारा जैसा ॥१८.९५६॥
पैं परिपाकाचिये वेळे । फळ देठें ना देठु फळें ।
न धरे तैसें स्नेह खुळें । सर्वत्र होय ॥९५७॥

पुत्र वित्त कलत्र । हें जालियाही स्वतंत्र ।
माझें न म्हणे पात्र । विषाचें जैसें ।।९५८।।

हें असो विषयजाती । बुद्धि पोळली ऐसी माघौती ।
पाउलें घेऊनि एकांतीं । हृदयाच्या रिगे ।।९५९।।

ऐसया अंत:करण । बाह्य येतां तयाची आण ।
न मोडी समर्था भेण । दासी जैसी ।।९६०।।

तैसें ऐक्याचिये मुठी– । माजिवडें चित्त किरीटी ।
करूनि वेधीं नेहटी । आत्मयाच्या ।।९६१।।

तेव्हां दृष्टादृष्ट स्पृहे । निमणें जालेंचि आहे ।
आगी दडपलिया धुयें । राहिजे जैसें ।।९६२।।

म्हणौनि नियमिलिया मानसीं । स्पृहा नासौनि जाय आपैसीं ।
किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ।।९६३।।

मग आलिंगिला पूर्णिमा । जैसा उणीव सांडी चंद्रमा ।
तैसें होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ।।९६९।।

तेव्हां अबोधुमात्र असे । तो तंव तया कृपा नासे ।
तेथ निशीसवें जैसें । आंधारें जाय ।।९७०।।

तैसी अबोधाचिये कुशी । कर्म कर्ता कार्य ऐशी ।
त्रिपुटी असे ते जैसी । गाभिणी मारिली ।।९७१।।

तैसेंचि अबोधनाशासवें । नाशे क्रियाजात आघवें ।
ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ।।९७२।।
येणे मूळाज्ञानसंन्यासें । दृश्याचा जेथ ठावो पुसे ।
तेथ बुझावें तें आपैसें । तोचि आहे ।।९७३।।
चेइलियावरी पाहीं । स्वप्नींचिया तिये डोहीं ।
आपणयातें काई । काढूं जाइजे ? ।।९७४।।
तैं मी नेणें आतां जाणेन । हें सरलें तया दुःस्वप्न ।
जाला ज्ञातृज्ञेयाविहीन । चिदाकाश ।।९७५।।
मुखाभासेंसीं आरिसा । परौता नेलिया वीरेशा ।
पाहातेपणेंवीण जैसा । पाहाता ठाके ।।९७६।।
तैसें नेणणें जें गेलें । तेणें जाणणेंही नेलें ।
मग निष्क्रिय उरलें । चिन्मात्रचि ।।९७७।।
तेथ स्वभावें धनंजया । नाहीं कोणाचि क्रिया ।
म्हणौनि प्रवादु तया । नैष्कर्म्यु ऐसा ।।९७८।।

तें आपुलें आपणपें । असें तेंचि होऊनि हारपे ।
तरंगु कां वायुलोपें । समुद्रु जैसा ॥९७९॥
तैसें न होणें निफजे । ते नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे ।
सर्वसिद्धींत सहजे । परम हेचि ॥९८०॥

अशा प्रकारे नैष्कर्म्य सिद्धीचे वर्णन करून सिद्धयोग साधनाने प्राप्त होणारी ही फलनिष्पत्ती नेणणे व जाणणे गिळून असणारी दशा अर्थात् द्वैताद्वैतविवर्जित अवस्थाच आहे,हा नाथसंप्रदायप्राप्त सिद्धांत प्रस्थापित करताना ते असे म्हणतात की-

देउळाचिया कामा कळसु । परम गंगेसी सिंधु प्रवेशु ।
कां सुवर्णशुद्धी कसु । सोळावा जैसा ॥९८१॥
तैसें आपुलें नेणणें । फेडिजे का जाणणें ।
तेंही गिळूनि असणें । ऐसी जे दशा ॥ ९८२॥
तियेपरतें कांहीं । निपजणे आन नाहीं ।
म्हणौनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥९८३॥

सिद्धयोग साधनाने साधकाला ही नैष्कर्म्याची परमसिद्धी प्राप्त झाल्यावर साधकाची अवस्था कशी असते, तो कसा राहतो व त्याची स्थिती कशी असते याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

जो सकळकर्मीं वर्ततां । देखैं आपुली नैष्कर्म्यता ।
कर्मसंगे निराशता । फळाचिया ॥४.९३॥
आणि कर्तव्यतेलागीं । जया दुसरें नाहीं जगीं ।
ऐसिया नैष्कर्म्यता तरी चांगीं । बोधला असे ॥९४॥
तरी क्रियाकलापु आघवा । आचरतु दिसे बरवा ।
तोचि तो ये चिन्हीं जाणावा । ज्ञानिया गा ॥९५॥
जैसा कां जळापाशीं उभा ठाके । तो जरी आपणपें जळामाजि देखे ।
तरी तो निभ्रांत वोळखे । म्हणे मी वेगळा आहें ॥९६॥
अथवा नावें हून जो रिगे । तो थडियेचें रुख जातां देखे वेगें ।
तेचि साचोकारें जों पाहों लागे । तंव रुख म्हणे अचळ ॥९७॥
तैसें सर्व कर्मीं असणें । तें फुडें मानूनि वायाणें ।
मग आपणया जो जाणे । नैष्कर्म्यु ऐसा ॥९८॥
आणि उदोअस्तुचेनि प्रमाणें । जैसें न चालतां सूर्याचें चालणें ।
तैसें नैष्कर्म्यत्व जाणें । कर्मींचि असतां ॥९९॥
तो मनुष्यासारखा तरी आवडे । परी मनुष्यत्व तया न घडे ।
जैसें जळामाजीं न बुडे । भानुबिंब ॥१००॥
तेणें न पाहतां विश्व देखिलें । न करितां सर्व केलें ।
न भोगितां भोगिलें । भोग्यजात ॥१०१॥

एकेचि ठायीं बैसला । परि सर्वत्र तोचि गेला ।
हें असो विश्व जाहला । आंगेंचि तो ॥१०२॥

## त्रिपुटीचा भेदव्यवहार नाहीसा होऊन जीव गुणातीत होतो :-

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " म्हणौनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहलें जया । नाहीं शरीरादिकीं तया । कर्मीं बंधु ॥ १८.४५३ ॥ " व " ऐसेनि विवेकें जया । उदो होय धनंजया । ये गुणातीतत्व तया । अर्थपंथे ॥१४.२९९॥" असे म्हणून सिद्धयोग साधनाने त्रिपुटीचा भेदव्यवहार कसा नाहीसा होतो व त्यामुळे जीव गुणातीत कसा होतो हे स्पष्ट करून फलनिष्पत्तिरूप हिऱ्याचा चवथा पैलू किंवा निकष प्रकट केला आहे. कर्ता-कर्म-क्रिया, ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय, सत्त्व-रज-तम अशा प्रकारच्या सर्व त्रिपुटींना ओलांडून जीव पलीकडे जाऊन अमृतस्वरूप कसा होतो हे सांगताना भगवंतांनी " श्रीमद्भगवद्गीतेत " असे म्हटले आहे की-

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥१४.२०॥

जीवात्मा देहापासून उत्पन्न होणाऱ्या सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या तावडीतून सुटून त्यांना उल्लंघून परपाराला गेला म्हणजे तो जन्म, मृत्यू, वार्धक्य व दुःख यांपासून मुक्त होऊन अमृतत्त्वाला प्राप्त होतो. अर्थात् जीवन्मुक्त होतो. या श्लोकाचा भावार्थ स्पष्ट करून सिद्धयोग साधनाने प्राप्त होणाऱ्या या स्थितीचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की-

आता निर्गुण असे आणिक । तें तो जाणें अचुक ।
जें ज्ञानें केलें टीक । तयाचिवरी ॥१४.३००॥
किंबहुना पंडुसुता । ऐसी तो माझी सत्ता ।
पावे जैसी सरिता । सिंधुत्व गा ॥३०१॥
नळिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला ।
तैसा मूळ अहंतें वेठिला । तो मी म्हणौनि ॥३०२॥
अगा अज्ञानाचिया निदा । जो घोरत होता बदबदा ।
तो स्वस्वरूपीं प्रबुद्धा । चेइला कीं ॥३०३॥
पैं बुद्धिभेदाचा आरिसा । तया हातोनि पडिला वीरेशा ॥
म्हणौनि प्रति-मुखाभासा । मुकला तो ॥३०४॥
देहाभिमानाचा वारा । आतां वाजो ठेला वीरा ।
तें ऐक्य वीचिसागरां । जीवेशां हें ॥३०५॥
म्हणौनि मद्भावेंसी । प्राप्ति पाविजे तेणेंसरिसी ।
वर्षांतीं आकाशीं । घनजात जेवीं ॥३०६॥

तेवीं मी होऊनि निरुता । मग देहींचि ये असतां ।
नागवे देहसंभूतां । गुणांसि तो ॥३०७॥
जैसा भिंगाचेनि घरें । दीपप्रकाशु नावरे ॥
कां न विझेचि सागरें । वडवानळु ॥३०८॥
तैसा आलागेला गुणांचा । वोधु न मैळे तयाचा ।
तो देहीं जैसा व्योमींचा । चंद्र जळीं ॥३०९॥
तिन्ही गुण आपुलालिये प्रौढी । देहीं नाचविती बागडीं ।
तो पाहोंही न धाडी । अहंतेतें ॥३१०॥
हा ठायवरी । नेहटोनि ठेला अंतरीं ।
आतां काय वर्ते शरीरीं । हेंही नेणें ॥३११॥
सांडूनि आंगींची खोळी । सर्प रिगालिया पाताळीं ।
ते त्वचा कोण सांभाळी । तैसें जालें ॥३२१॥
कां सौरभ्य जीर्णु जैसा । अमोदु मिळोनि जाय आकाशा ।
माघारा कमळकोशा । नयेचि तो ॥३१३॥
पैं स्वरूप समरसें । ऐक्य गा जालें तैसें ।
तेथ किं धर्म हें कैसें । नेणें देह ॥३१४॥
म्हणौनि जन्मजरामरण । इत्यादि जे साही गुण ।
ते देहींचि ठेलें कारण । नाहीं तया ॥३१५॥
घटाचिया खापरिया । घटभंगीं फेडिलिया ।
महदाकाश अपैसया । जालेंचि असे ॥३१६॥
तैसी देहबुद्धी जाये । जैं आपणपां आठौ होये ।
तैं आन कांहीं आहे । तेंवांचुनी ? ॥३१७॥
येणें थोर बोधलेपणें । तयासि गा देहीं असणें ।
म्हणूनि तो मी म्हणें । गुणातीत ॥३१८॥

येथपर्यंत जी स्थिती साधकाला प्राप्त होते म्हणून वर्णन केले आहे त्याचेच सूत्रात्मक पद्धतीने वर्णन करताना महर्षी पतंजलींनी "योगसूत्रात" असे म्हटले आहे की—

तस्यापि निरोधे सर्वनिरोधान्निर्बीजः समाधिः ॥१.५१॥
पुरुषार्थशून्यानां गुणानां प्रतिप्रसवः कैवल्यं स्वरूपप्रतिष्ठा
वा चितिशक्तिरिति ॥४.३४॥

ऋतंभरा प्रज्ञेपासून उत्पन्न झालेल्या संस्कारांचा निरोध केल्याने सर्व वृत्तींचा निरोध होत असल्यामुळे निर्बीज समाधी सिद्ध होते. त्रिगुणाचे काही एक काम न उरल्यामुळे ते आपल्या कारणात लय पावतात म्हणजे प्रतिप्रसवक्रमाने

उलटे फिरून स्वस्वरूपी स्थित होतात. हे जे गुणांचे स्थित किंवा विलीन होणे यालाच कैवल्य असे म्हणतात. किंवा चितिशक्ती कुंडलिनी आपल्या मूळ स्वरूपाने विराजमान झाली की, जीव कैवल्यरूप होतो असे म्हणतात. या सूत्रावर "भाष्य" करताना महर्षी व्यासांनी असे म्हटले आहे की– "कृतभोगापवर्गाणां पुरुषार्थ-शून्यानां य: प्रतिप्रसव: कार्यकारणात्मनां गुणानां तत्कैवल्यं स्वरूपप्रतिष्ठा: पुनर्बुद्धि-सत्त्वानभिसंबंधात्पुरुषस्य चितिशक्तिरेव केवला तस्या: सदा तथैवावस्थानं कैवल्य-मिति ॥ " पुरुषाचे भोग व अपवर्ग म्हणजे मोक्षरूप कार्य पूर्ण केल्यामुळे ज्यांना कोणतेही कार्य न उरल्यामुळे गुण आपल्या मूळ कारणात विलीन होतात. यालाच कैवल्य किंवा मोक्ष म्हणतात. हीच चितिशक्तीची स्वरूपप्रतिष्ठा होय; कारण यावेळेस पुरुषाला बुद्धिसत्त्वाचा काहीच संबंध नसल्यामुळे केवळ चितिशक्तीच असते. याप्रमाणे चितिशक्तीचे जे नेहमी स्वस्वरूपाने राहणे हाच मोक्ष होय.

अशी स्थिती सिद्धयोग साधनाने ज्याला प्राप्त होते तोच खरा योगयुक्त असतो हे सांगताना भगवंतांनी " श्रीमद्भगवद्गीतेत " असे म्हटले आहे की–

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रिय: ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ।।५.७।।**
**नैव किंचित् करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।**
**पश्यंशृण्वंस्पृशंजिघ्रन्नश्नंगच्छंस्वपंश्वसन् ।।८।।**
**प्रलपन् विसृजन् गृण्हन्नुन्मिषन् निमिषन्नपि ।**
**इंद्रियाणीइंद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ।।९।।**
**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति य: ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ।।१०।।**

जो योगाचे आचरण करतो, ज्याचे अंत:करण शुद्ध आहे, ज्याने स्वत:च स्वत:ला अर्थात् स्वत:च्या मनाला जिंकले आहे, ज्याने आपली इंद्रिये जिंकली आहेत आणि सर्वाभूती असलेल्या आत्मतत्त्वाशी ज्याच्या आत्म्याचे ऐक्य झाले आहे तो कर्म करूनही अलिप्त असतो. योगयुक्त तत्त्ववेत्याने पाहताना, ऐकताना, स्पर्श करताना, वास घेताना, खाताना, चालताना, निजताना, श्वासोच्छ्वास करताना, बोलताना, विसर्जन करताना, ग्रहण करताना, डोळ्यांच्या पापण्या उघडताना व मिटताना देखील केवळ इंद्रियेच आपापल्या विषयात वर्तत आहेत आणि मी काहीही करीत नाही असा अनुभव घ्यावा. जो फलासक्ती सोडून ब्रह्मार्पणबुद्धीने कर्मे करतो तो कमळाचे पान पाण्याने जसे लिप्त होत नाही तसा पापाने लिप्त होत नाही. या श्लोकांचा भावार्थ स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**जेणें भ्रांतीपासूनि हिरतलें । गुरुवाक्यें मन धुतलें ।**
**मग आत्मस्वरूपीं घातलें । हारोनियां ।।५.३४।।**

जैसें समुद्रीं लवण न पडे । तंव वेगळें अल्प आवडे ।
मग होय सिंधूचि एवढें । मिळे तेव्हां ॥३५॥
तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचें मनचि चैतन्य जाहलें ।
तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय ॥३६॥
आतां कर्ता कर्म करावें । हें खुंटलें तया स्वभावें ।
आणि करी जऱ्ही आघवें । तऱ्ही अकर्ता तो ॥३७॥
जे पार्था तया देहीं । मी ऐसा आठऊ नाहीं ।
तरी कर्तृत्व कैचें काई । उरे सांगें ? ॥३८॥
ऐसें तनुत्यागेंवीण । अमूर्ताचे गुण ।
दिसती संपूर्ण । योगयुक्तां ॥३९॥
एऱ्हवीं आणिकांचिये परी । तोही एक शरीरी ।
अशेषाही व्यापारीं । वर्ततु दिसे ॥४०॥
तोही नेत्रीं पाहे । श्रवणीं ऐकतु आहे ।
परि तेथींचा सर्वथा नोहे । नवल देखें ॥४१॥
स्पर्शासि तरी जाणे । परिमळु सेवी घ्राणें ।
अवसरोचित बोलणें । तयाहि आथी ॥४२॥
आहारातें स्वीकारी । त्यजावें तें परिहरी ।
निद्रेचिया अवसरीं । निदिजे सुखें ॥४३॥
आपुलेनि इच्छावशें । तोही गा चालतु दिसे ।
पैं सकळ कर्म ऐसें । रहाटे कीर ॥४४॥
हें सांगों काई एकैक । देखें श्वासोच्छ्वासादिक ।
आणि निमिषोन्मिष । आदिकरूनि ॥४५॥
पार्था तयाचे ठायीं । हें आघवेचि आथि पाहीं ।
परी तो कर्ता नव्हे कांहीं । प्रतीतिबळें ॥४६॥
तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळें ।
जैसें न सिंपे जळीं जळें । पद्मपत्र ॥५०॥

अशा प्रकारे त्रिपुटीचा भेदव्यवहार नाहीसा होऊन जीव गुणातीत कसा होतो हे " अर्जुना येणें लक्षणें । तो गुणातीतु जाणणें ॥ १४.३४८ ॥ " असे सांगून " परिस आतां आचरणें । तयाचीं जीं ॥१४.३४८॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी या अवस्थेला पोहोचलेल्या साधकाची स्थिती वर्णन करताना असे म्हटले आहे की—

तरी वस्त्रासि पाटीं पोटीं । नाहीं सुतावांचूनि किरीटी ।
ऐसें सुये दिठी । चराचर मद्रूपें ॥१४.३४९॥

म्हणौनि सुखदुःखासरिसें । कांटाळें आचरे ऐसें ।
रिपुभक्तां जैसें । हरीचे देणें ॥३५०॥
एऱ्हवीं तरीं सहजें । सुखदुःख तैंचि सेविजे ।
देहजळीं होईजे । मासोळी जैं ॥३५१॥
आतां तें तंव तेणें सांडिलें । आहे स्वस्वरूपेंसीचि मांडिलें ।
सस्यांतीं निवडिलें । बीज जैसें ॥३५२॥
कां वोघ सांडूनि गांग । रिघोनि समुद्राचें आंग ।
निस्तरली लगबग । खळाळाची ॥३५३॥
तेवीं आपणपाचि जया । वस्ती जाली गा धनंजया ।
तया देहीं अपैसया । सुख तैसें दुःख ॥३५४॥
रात्रि तैसें पाहलें । हें धारणा जेवीं एक जालें ।
आत्माराम देहीं आतलें । द्वंद्व तैसें ॥३५५॥
पैं निद्राताचेनि आंगेशीं । साप तैशी उर्वशी ।
तेवीं स्वरूपस्था सरिशीं । देहीं द्वंद्वें ॥३५६॥
म्हणौनि तयाच्या ठायीं । शेणा सोनया विशेष नाहीं ।
रत्ना गुंडेया कांहीं । नेणिजे भेदु ॥३५७॥
घरा येवो पां स्वर्ग । कां वरिपडो वाघ ।
परी आत्मबुद्धीसि भंग । कदा नोहे ॥३५८॥
निवटलें न उपवडे । जळिनलें न विरूढे ।
साम्यबुद्धि न मोडे । तयावरी ॥३५९॥
हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजो । कां नीच म्हणौनि निंदिजो ।
परी नेणें जळों विझों । राखोंडी जैसी ॥३६०॥
तैसी निंदा आणि स्तुति । नये कीण्हेचि व्यक्ती ।
नाहीं अंधारें कां वाती । सूर्या घरी ॥३६१॥

इतके कथन केल्यावर साधकाची द्वैताद्वैतविवर्जित स्थिती हीच गुणातीत महात्म्यांची अंतिम अवस्था असल्याचा निर्वाळा आपल्या नाथसंप्रदायाच्या वैशिष्टयात्मक पद्धतीने कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की-

सुखे ना शिणे । पाषाणु कां जेणें मानें ।
तैसीं सांडीमांडी मनें । वर्जिली असे ॥३६८॥

## मनोरूप पटु फाटे :-

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " जेथ हें संसार चित्र उमटे । तो मनोरूप पटु फाटे । जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा नाहीं ॥ ५.१५६ ॥ " असे सांगून सिद्धयोग साधनानें प्राप्त होणाऱ्या सर्वोत्कृष्ट अशा अंतिम फलनिष्पत्तीच्या स्थितिरूप

रत्नाचा पाचवा पैलू सिद्धान्तरूपाने प्रस्थापित केला आहे. "म्हणौनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दु:खाचें ॥ २.३४७ ॥" अशी जीवाची वास्तविक स्थिती असल्याने "तया मनाचें मोकळें । तेंचि पेटवण घातलें ॥ ४.१३४ ॥" असे करून सिद्धयोग साधनाने मन जाळून नाहीसे करणे हाच अंतिम सुखप्राप्तीचा मार्ग ठरतो. कपिल महर्षींनी "ध्यानं निर्विषयं मन: ॥ ६.२५ ॥" असे म्हणून ज्याचे वर्णन "सांख्यदर्शनात" केले आहे व महर्षी पतंजलींनी "योगश्चित्तवृत्तिनिरोध: ॥ १.२ ॥" असे म्हणून "योगसूत्रात" ज्याचा उल्लेख केला आहे, त्या योगसाधनातच फलनिष्पत्तीची अंतिम स्थिती अंतर्निहित असून याचेच "तो मनोरूप पटु फाटे ॥५.१५६॥" या शब्दात श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णन केले आहे. "एथ वेद मुके जाहाले । मन पवन पांगुळले । रातीविण मावळले । रविशशी जेथ ॥ १०.६४॥" या प्रमाणे आत्मस्वरूप स्वसंवेद्य असल्याने शेवटी मन विरघळून जाणे आवश्यक ठरते. अशा प्रकारे मन नाहीसे झाल्यावर जी स्थिती साधकाला प्राप्त होते त्याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

तेथ मनाचें मेहुडें विरे । पवनाचे पवनपण सरे
आपणपां आपण मुरे । आकाशही ॥६.४६८॥
प्रणवाचा माथा बुडे । येतुलेनि अनिर्वाच्य सुख जोडे ।
म्हणौनि आधींची बोलू बहुडे । तयालागीं ॥४६९॥
ऐसी ब्रह्मींची स्थितीं । जे सकळां गतींसी गती ।
तया अमूर्ताची मूर्ति । होऊनि ठाके ॥४७०॥
आणि तद्रूपतेसीं लग्न । लागोनि ठेलें अभिन्न ।
जैसें लोपलें अभ्र गगन । होऊनि ठाके ॥४७२॥
तैसें विश्व जेथ होये । मागौतें जेथ लया जाये ।
तें विद्यमानेंचि देहें । जाहला तो गा ॥४७३॥

मोक्षसिद्धीसाठी उपरोक्तप्रकारे होणाऱ्या मनप्राणाच्या नाशाची आवश्यकता प्रतिपादन करताना श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनी "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की–

ज्ञानं कुतो मनसि संभवतीह तावत्प्राणोऽपि जीवति मनो म्रियते न यावत् ।
प्राणो मनो द्वयमिदं विलयं नयेद्यो मोक्षं स गच्छति नरो न कथंचिदन्य: ॥
॥४.१५॥

तत्रैकनाशादपरस्य नाश एकप्रवृत्तेरपरप्रवृत्ति: ।
अध्वस्तयोश्चेंद्रियवर्गवृत्ति: प्रध्वस्तयोर्मोक्षपदस्यसिद्धि: ॥२५॥
सोऽयमेवास्तु मोक्षाख्यो मास्तु वापि मतांतरे ।
मन:प्राणलये कश्चिदानंद: संप्रवर्तते ॥३०॥

जोपर्यंत प्राण जिवंत आहेत व मन मेलेले नाही तोपर्यंत साधकाला ज्ञान

होऊ शकत नाही. जो साधक प्राणाच्या व मनाचा लय करतो त्यालाच मोक्ष प्राप्त होतो. दुसरा कोणताही साधक कोणत्याही प्रकारे मोक्ष प्राप्त करू शकत नाही. यातील एकाचा नाश झाला की, दुसऱ्याचा नाश होतो व एक कार्यप्रवण झाला की, दुसराही होतो. जोपर्यंत मन व प्राण नष्ट होत नाहीत तोपर्यंत सपूर्ण इंद्रियांचा समुदाय आपापल्या विषयात प्रवृत्त होत राहतो. जेव्हा मनाचा व प्राणाचा लय होतो तेव्हा साधकाला मोक्ष प्राप्त होतो. अशा प्रकारे होणाऱ्या चित्ताच्या लयाला मोक्ष म्हणतात किंवा हा लयच मोक्षरूप आहे. चित्ताचा लय झोपेतही होत असल्यामुळे मतभिन्नतेमुळे हे म्हणणे कोणी मानले नाही; तरी मनाचा व प्राणाचा लय सहस्रारात झाल्यावर जो अकथनीय आनंद प्रकट होतो, तो अनिवर्चनीय आनंद प्रकट झाल्यावर जीवन्मुक्तिरूपी सुख अवश्य प्राप्त होते. हीच अनुभूती अधिक स्पष्टपणे व्यक्त करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे ।
मनाची घडी घडे । हृदयामाजीं ।।६ १८८।।
तंव आंतु त्राय मोडे । मनोधर्माची ।।२११।।
कल्पना निमे । प्रवृत्ती शमे ।
आंग मन विरमे । सावियाचि ।।२१२।।
अनादि जे मुक्तता । आपुली असे पंडुसुता ।
तो मोक्षु हातां येता । होय जेणें ।।१४.४८।।
जयाचिया प्रतीती । विचारवीरीं समस्तीं ।
नेदिजेचि संसृतीं । माथां उधऊं ।।४९।।
मनें मन घालूनि मागें । विश्रांति जालिया आंगें ।
ते देहीं देहाजोगें । होतीचि ना ।।५०।।
मग तें देहाचें बळें । वोलांडूनि ऐकेचि वेळें ।
संवतुकी कांटाळें । माझें जालें ।।५१।।

अशा रीतीने अंतिम स्थितीच्या प्राप्तीसाठी मनाचे थांबणे किंवा त्याचे उन्मूळण होणे अत्यंत आवश्यक असल्याचे महायोगी गोरक्षनाथांनी "अमनस्क-योग" या ग्रंथात सांगताना असे म्हटले आहे की–

औदासीन्यामृतौघेन वर्तमानेन योगिनाम् ।
उन्मूलितमनोमूलो जगद्वृक्षः पतिष्यति ।।१२.५९।।

योगिजनांच्या निरंतर वर्धिष्णू अशा औदासीन्यरूपी अमृताच्या प्रवाहाने मनरूपी मूळ किंवा जगताचा पाया एकदा उखडला गेल्यावर अर्थात् मूळ उन्मूलित झाल्यावर हा जगद्रूपी वृक्ष कोसळून पडतो. ही गोष्ट अधिक स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

तैसी वासनांतराची विवंचना । मग आपैसी पारुखे अर्जुना ।
जे वेळीं गगनीं लयो मना । पवनें कीजे ॥५.१५५॥
जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूप पटु फाटे ।
जैसें सरोवर आटे । मग प्रतिमा नाहीं ॥१५६॥
तैसें मन एथ मुद्दल जाये । मग अहंभावादिक कें आहे ।
म्हणौनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवीं तो ॥१५७॥
तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सावरें ।
इंद्रियांचे रश्मी माघारे । हृदयवरी भरलें ॥११.१९१॥
तेथ ताटस्थ्या ताटथ्य पाडलें । टकासी टक लागले ।
जैसें मोहनास्त्र घातलें । विचारजातां ॥१९२॥

अशी ही स्थिती प्राप्त झाल्यावर साधकाची दशा कशी असते हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

तरी गेलियाची से न करी । न पावतां चाड न धरी ।
जो सुनिश्चळु अंतरीं । मेरु जैसा ॥५.१९॥
आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयाचें अंतःकरण ।
पार्था तो संन्यासी जाण । निरंतर ॥२०॥
जो मनें ऐसा जाहला । संगीं तोचि सांडिला ।
म्हणौनि सुखें सुख पावला । अखंडित ॥२१॥
आतां गृहादिक आघवें । तें कांहीं न लगे त्यजावें ।
जें घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणौनि ॥२२॥
देखैं अग्नि विझोनि जाये । मग जें राखोंडी केवळु होये ।
तैं ते कापुसें गिंवसूं ये । जियापरी ॥२३॥
तैसा असतेनि उपाधी । नाकळिजे तो कर्मबंधीं ।
जयाचिये बुद्धि । संकल्पु नाहीं ॥२४॥
बळियें इंद्रियें येती मना । मन एकवटे पवना ।
पवन सहजें गगना । मिळोंचि लागे ॥६.४६०॥
ऐसें नेणों काय अपैसें । तयातेंचि कीजे अभ्यासे ।
समाधि घर पुसे । मानसाचें ॥४६१॥
जाणिजे योगपीठीचा भैरवु । काय हा आरंभरंभेचा गौरवु ।
कीं वैराग्यसिद्धीचा अनुभवु । रूपा आला ॥४६२॥
हा संसारु उमाणितें माप । कां अष्टांगसामग्रीचें द्वीप ।
जैसें परिमळेंचि धरिजे रूप । चंदनाचें ॥४६३॥

तैसा संतोषाचा काय घडिला । कीं सिद्धिभांडारींहूनि काढिला ।
दिसे तेणें मानें रूढला । साधकदशे ॥४६४॥
तरी जयाचे चोखटे मानसीं । मी होऊनि असे क्षेत्रसंन्यासी ।
जया निजेलियातें उपासी । वैराग्य गा ॥९.१८८॥
जयाचिया आस्थेचिया सद्भावा । आंतु धर्म करी राणिवा ।
जयाचे मन ओलावा । विवेकासी ॥१८९॥
जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता जेऊनि धाले ।
जे शांतीसी आले । पालव नवे ॥१९०॥
जें परिणामा निघाले कोंभ । जें धैर्य मंडपाचे स्तंभ ।
जें आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरिले ॥१९१॥
जया भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती ।
जयांचिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥१९२॥
जे आघवांचि करणीं । लेइले शांतीचीं लेणीं ।
जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥१९३॥
ऐसें जे महानुभाव । दैविये प्रकृतीचें दैव ।
जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ॥१९४॥
मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे ।
परि दुजेपण मनोधर्में । शिवतलें नाही ॥१९५॥
ऐसें मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा ॥१९६॥

मनोरूप पट फाटून गेल्यावर साधक ज्या सिद्ध दशेत वावरतो त्याचे वरील-प्रकारे वर्णन केल्यावर ही सिद्धदशा आत्मस्वरूपात्मक अर्थात् द्वैताद्वैतविवर्जित अशी एकीएक आपलीआपणच आहे, हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

तरी सरोवर तरंगीं । सांडिलें आकाश मेघीं ।
कां चंदनाचें उरगीं । उद्यान जैसें ॥१७.२२५॥
नाना कळावैषम्यें चंद्रु । कां सांडिला आधीं नरेंद्रु ।
नातरी क्षीरसमुद्रु । मंदराचळें ॥२२६॥
तैसीं नाना विकल्पजाळें । सांडूनि गेलिया सकळें ।
मन राहे कां केवळें । स्वरूपें जें ॥२२७॥
तपनेंवीण प्रकाशु । जाडचेंवीण रसीं रसु ।
पोकळीवीण अवकाशु । होय जैसा ॥२२८॥
तैसा आपली सोय देखे । आणि आपलिया स्वभावा मुके ।
हिंवळी जैसी आंगिकें । हिवों नेदी निजांग । २२९॥

न चलतें कळंकेंवीण । शशिबिंब जैसें परिपूर्ण ।
तैसें चोखी शृंगारपण । मनाचें जें ॥२३०॥
बुजाली वैराग्याची बोरप । जिराली मनाची धांपकांप ।
तेथ केवळ जाली वाफ । निजबोधाची ॥२३१॥
म्हणौनि विचारावया शास्त्र । राहाटवावें जें वक्त्र ।
तें वाचेचेंही सूत्र । हातीं न धरी ॥२३२॥
तें स्वलाभ लाभलेपणें । मन मनपणाही धरूं नेणें ।
शिवतलें जैसें लवणें । आपुलें निज ॥२३३॥

## सामरस्याच्या राउळात महासुखाची दिवाळीः—

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तैसें होय तिये मेळीं। मग सामरस्याचिया राउळीं । महासुखाची दिवाळी । जगेंसि दिसे ॥ ६-३८९ ॥" असे सांगून सिद्धयोग साधनाच्या फलनिष्पत्तिरूप महारत्नाचा सहावा पैलू किंवा निकष प्रकट केला आहे. सिद्धयोग साधनाच्या फलनिष्पत्तीचा हा पैलू सर्वोच्च, सर्वोत्कृष्ट व सर्वांगसुंदर असून या एकाच कल्पनेत इतर सर्व कल्पनांचा समावेश झाला आहे. "स्त्री-पुम् योगात् यत् सौख्यम् तत् सामरस्यम्" असे सामरस्याचे शास्त्रकारांनी वर्णन केले आहे या दृष्टीने "The Serpent Power" या ग्रंथात Sir John Woodroffe यांनी "Description of the Six Centres" या प्रकरणातील तिसऱ्या श्लोकावरील भाष्याच्या तळटीपेत असे म्हटले आहे की, "Samarasya, a term which is ordinarily applied to sexual union-here and elesewhere, of course, used symbolically." सामरस्य ही संज्ञा सर्वसाधारणपणे लैंगिक मिलनाला लाविली जाते. अर्थात येथे व अन्यत्र या संज्ञेचा वापर सूचक, लाक्षणिक किंवा सांकेतिक अर्थानें केला आहे.

त्याचप्रभाणे श्रीलालनप्रसाद सिंग यांनी "Tantra Its Mystic And Scientific Besis" या ग्रंथातील "Conclusion" या प्रकरणात असे म्हटले आहे की "The unified existence of Shiva-Shakti is the greatest contribution of Tantra philosophy. Abhinavagupta, Bhaskararaya, Laxmidhara and other eminent writers and commentators strongly defend the identity of the two. If Shiva is Sat ( Being ) Shakti is Sati ( Being as power ), if Shiva is chit ( consciousness ) Shakti is chiti ( consciousness as power ) and if Shiva is Ananda ( Bliss ) Shakti is Paramananda-Sandoh-rupa ( Soul of Bliss ). If Shiva is Brahman Shakti is Brahmamayi. Tantra gives equal import-

ance to the feminine principle. Acccrding to it all quarreles about the duality and non-duality are settled when the Sadhaka starts practising Sadhana. Some say, according to Mahanirvana Tantra, that Truth is Advaita ( non-dual ) and some others speak of it as Dvaita ( dual ) but it is Dvaitadvaita vivarjita neither the one nor the other. It is beyond dualism and non-dualism." शिवशक्तीचे समरसलेले अस्तित्व अर्थात् शिवशक्तीने समरसलेले स्वसंवेद्य आत्मरूप हीं तंत्रतत्त्वज्ञानाची सर्वात मोठी देणगी आहे. अभिनवगुप्त, भास्कराचार्य लक्ष्मीधर व इतर सुप्रसिद्ध लेखक व टीकाकारांनी शिवशक्ती ही दोन तत्त्वे आहेत याचा अगदी जोरदार निषेध केला आहे. जर शिव सत् अर्थात् आद्य आहे; तर शक्ती ही सती अर्थात् आद्याशक्ती आहे. जर शिव चित् अर्थात् चेतना आहे; तर शक्ती ही चिती अर्थात् चेतन किंवा चितिशक्ती आहे. आणि जर शिव आनंद आहे; तर शक्ती ही परमानंद अर्थात् आत्मानंद आहे. तंत्र अर्थात् साधनशास्त्र स्त्रीतत्त्वाला ( पुरुषतत्त्वाच्या ) बरोबरीनेच महत्त्व देते. ज्यावेळी साधक साधनाभ्यासाला सुरुवात करतो त्यावेळी द्वैत व अद्वैतासंबंधीचे सर्व झगडे मिटून जातात असे हे शास्त्र सांगते. काही जण असे म्हणतात की, महानिर्वाण तंत्राप्रमाणे अद्वैत हे सत्य आहे. परंतु सत्य हे द्वैताद्वैतविवर्जित आहे अर्थात् ते द्वैतही नाही किंवा अद्वैतही नाही. तत्त्व हे द्वैताच्या व अद्वैताच्या पलीकडे आहे.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाणें योगाचें ॥२.२७३॥" असे म्हणून सामरस्य हे सर्व योगाचे सार असल्याचे सांगून "ऐसें समरसें मंथन केलें । तेथ झडकरी काजा आलें । जें उज्जीवन जाहलें । ज्ञानाग्नीचें ॥४.१३२॥" या दृष्टीने सामरस्य ही योगाने उपस्थित होणाऱ्या अंतर्यागाची सुरुवात असून "पाठीं प्राणक्रियेचिये स्रुवेनिशीं । पूर्णाहुती पडली हुताशीं । तेथ अवभृत समरसीं । सहजें जहालें ॥४.१३७॥" या न्यायाने सामरस्य हीच अंतिम स्थिती आहे, असे स्पष्ट केले आहे. या अंतिम लक्ष्याच्या प्राप्तीसाठीच किंवा लक्ष्यभेदासाठीच "ऐसें साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ॥६.४०९॥" व "जे साम्यापरौती जगीं । प्राप्ति नाहीं ॥६.४१०॥" असे भगवंतांनी अर्जुनाला आवर्जून सांगितले आहे. हे सांगण्याचे सर्वात महत्त्वाचे कारण असे आहे की, सामरस्य ही सिद्धयोग साधनातील पराकोटीची उच्च अवस्था असून त्या अवस्थेतच सहस्रारातील सद्गुरूंच्या परपादुकांचे पूजन होत असल्याने "सामरस्यें पोटाळू । निरंतर ॥१५.७॥" असा त्याचा निर्देश करून "तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान । भोगवी जो चिद्गगन । भुवनदिवा ॥१६.६॥" असे म्हणून

सद्‌गुरुनाथांच्या दीक्षेने सिद्ध होणाऱ्या अंतिम फलनिष्पत्तीच्या कार्याचा अर्थात् जीवाशिवाच्या ऐक्याचा सिद्धांत सामरस्य या एका शब्दांत सामाविलेला असून, ज्यावेळी शक्तीच्या रूपाने संकुचित झालेला जीव विभू बनून सहस्रारात शिवाशी एकरूप होतो त्यावेळी सहस्रारातील राउळात महासुखाची जी दिवाळी होते, ती एकमेवाद्वितीय असते हे निःसंशय होय, हे स्पष्ट केले आहे. "एवं हि द्वंद्वजालस्य संयोगो योग उच्यते ।।१.६८।।" असे "योगशिखोपनिषदात" म्हटले असल्याने या अवस्थेत सर्व प्रकारच्या द्वंद्वाचे समरसीकरण होत असल्याने व सर्व प्रकारची दुःखे या अवस्थेत संपुष्टात येत असल्याने साधकाला परमोत्कट असे सुख प्राप्त होते. ही अवस्था प्राप्त झाली की, साधकाचा सिद्ध होत असल्याने अथवा हा साधकच योगिश्रेष्ठ झाल्याने उपरोक्त उपनिषदातच पुढे असे म्हटले आहे की, "तदा समरसं भावं यो जानाति स योगवित् ।।६.३७।।" ही समरसतेची किंवा समदृष्टीची अवस्था आहे. तिचेच वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

म्हणौनि सर्वत्र सदा सम ।। ते आपणचि अद्वय ब्रह्म ।
हें संपूर्ण जाणे वर्म । समदृष्टीचें ।।५.९६।।

जिहीं विषयसंगु न सांडिता । इंद्रियांतें न दंडिता ।
परी भोगिली निसंगता । कामनेवीण ।।९७।।

जिहीं लोकांचेनि आधारें । लौकिकेंचि व्यापारें ।
परि सांडिलें निदसुरें । लौकिकु हें ।।९८।।

जैसा जनामाजि खेचरु । असतुचि जना नोहे गोचरु ।
तैसा शरीरीं परी संसारु । नोळखे तयांतें ।।९९।।

हें असो पवनाचेनि मेळें । जैसें जळींचि जळ लोळे ।
तें आणिकें म्हणती वेगळें । कल्लोळ हे ।।१००।।
तैसें नाम रूप तयाचें । एऱ्हवीं ब्रह्मचि तो साचें ।
मन साम्या आलें जयाचें । सर्वत्र गा ।।१०१।।
तरी मृगजळाचेनि पूरें । जैसें न लोटिजे कां गिरिवरें ।
तैसा शुभाशुभीं न विकरे । पातलिया जो ।।१०३।।
तोचि तो निरुता । समदृष्टी तत्त्वतां ।
हरि म्हणे पंडुसुता । तोचि ब्रह्म ।।१०४।।

समरसता ही अशा प्रकारे अंतिम स्थिती असल्याने "म्हणौनि ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें बोधां आलें जया सम । तया कर्तव्य तें नैष्कर्म्य । धनुर्धरा ।।४.१२१।।" असे म्हणून नैष्कर्म्यादि सर्व अत्युच्च अवस्था म्हणजे शिवशक्तीची समरसता होय हे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे साध्यसाधनादि सर्व गोष्टींची

मिळणी या अवस्थेत होत असल्याने ही अवस्था म्हणजेच समाधी किंवा मोक्ष अगर कैवल्य होय असे सांगून तिचे अधिक वर्णन करताना श्रीज्ञानेश्वमहाराज असे म्हणतात की–

मग तया मार्गाची धांव। पुरेल प्रवृत्तीची हांव।
जेथ साध्यसाधना खेंव। समरसें होय ॥६.५९॥
जेथ पुढील पैसु पारुखे। मागील स्मरावे तें ठाके।
ऐसिये सरिसीये भूमिके। समाधि राहे ॥६०॥
परतोनि पाठिमोरें ठाके। आणि आपणियांतें आपण देखे।
देखतखेंवो वोळखे। म्हणे तत्त्व हें मी ॥३६६॥
तिये ओळखीचिसरिसे। सुखाचिया साम्राज्यीं बैसे।
मग आपणपां समरसे। विरोनि जाय ॥३६७॥
जयापरतें आणिक नाहीं। जयातें इंद्रियें नेणती कहीं।
तें आपणचि आपुलिया ठायीं। होऊनि ठाके ॥३६८॥
ते ऐक्याची आहे वोतिली। कीं नित्यतेचिया हृदयीं घातली।
जैसी समरससमुद्रीं धुतली। रुळेचिना ॥८.६४॥
जें नानागतीतें पाववितें। तें चित्त वरील आत्मयातें।
मग कवण आठवी देहातें। गेलें कीं आहे ? ॥८३॥
पैं सरितेचेनि ओघें। सिंधुजळा मीनलें घोघें।
तें काय वर्तत आहे मागें। म्हणौनि पाहों येती ? ॥८४॥
ना तें समुद्रचि होऊन ठेलें। तेंवि चित्ताचें चैतन्य जाहालें।
जेथ यातायात निमालें। घनानंद जें ॥८५॥
पाठीं समाधिश्रियेचा अशेखा। आत्मानुभव राज्यसुखा।
पट्टाभिषेकु देखा। समरसें जाहला ॥९.२१८॥
तैसें माझिये साक्षात्कारीं। सरे अहंकाराची वारी।
अहंकारलोपीं अवधारीं। द्वैत जाय ॥११.६९४॥
मग मी तो हें आघवें। एक मीचि आथी स्वभावें।
किंबहुना सामावे। समरसें तो ॥६९५॥
द्वैताचा दुकाळु पाहे। साम्याचें सुयाणें होये।
जया ज्ञानाची सोये। ऐसें करी ॥१३.१७०॥
समाधीचे शेजेपासीं। बांधोनि घाली ध्यानासी।
चित्त चैतन्य समरसीं। आंतु रते ॥५२०॥
जे देखलियाचिसवें। दृश्य द्रष्टा हें आघवें।
एकवट कालवे। सामरस्यें ॥९३६॥

अशा प्रकारे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ही अंतिम स्थिती नाना दृष्टांतांनी स्पष्ट केली असली; तरी "सैंधव सिंधू पडलिया । जो क्षणु धनंजया । तेणें विरेचि कीं उरावया । कारण कायी ? ॥१८. १३८०॥" व "मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजवळ जैसें । मी होऊनि मज तैसें । सर्वस्वें भजती ॥१३.६०८॥" किंवा "कां सकळ जळसंपत्ति । घेऊनि समुद्रातें गिंवसती । गंगा जैसी अनन्यगती । मिळालीचि मिळे ॥११.६८७॥" या दृष्टांतांमध्ये समरसतेच्या कल्पनेचे सर्व सार सामाविलेले आहे. श्रीसंततुकाराममहाराजांनीही या दृष्टांताच्या आधारानेच ही सामरस्यावस्था वर्णन करताना असे म्हटले आहे कीं–

**लवण मेळवितां जळें । काय उरलें निराळें ॥१॥**
**तैसा समरस जालों । तुजमाजीं हरपलों ॥**
**अग्निकर्पूराच्या मेळीं । काय उरली काजळी ॥**
**तुका म्हणे होती । तुझी माझी एक ज्योती ॥**

श्रीस्वात्मारामयोगींद्र यांनीही उपरोक्त दृष्टांताच्याच आधारे सामरस्याची स्थिती म्हणजेच समाधी होय, हे सांगताना "हठयोगप्रदीपिकेत" असे म्हटले आहे की–

**सलिले सैंधवं यद्वत्साम्यं भजति योगतः ।**
**तथात्ममनसोरैक्यं समाधिरभिधीयते ॥४.५॥**
**यदा संक्षीयते प्राणो मानसं च प्रलीयते ।**
**तदा समरसत्वं च समाधिरभिधीयते ॥६॥**
**तत्समं च द्वयोरैक्यं जीवात्मपरमात्मनोः ।**
**प्रनष्टसर्वसंकल्पः समाधिः सोऽभिधीयते ॥७॥**

ज्यावेळी मीठ पाण्यात पडून विरघळते त्यावेळी ते पाण्याशी एकरूप होते. त्याचप्रमाणे ज्यावेळी मनरूपी जीव किंवा शक्ती आत्मरूपी शिव किंवा चैतन्याशी एकरूप होते त्यावेळी त्या अवस्थेला समाधी म्हणतात. ज्यावेळी प्राणांची गती क्षीण होते व मनाचाही लय होतो त्यावेळी जी समरस अवस्था उपस्थित होते त्याला समाधी म्हणतात. जीवात्मा व परमात्मा यांच्या उपरोक्तप्रकारे होणाऱ्या ऐक्याला समता म्हणतात. या समतेच्या अवस्थेत सर्व संकल्प पूर्णपणे नष्ट होत असल्याने यालाच समाधी असे म्हणतात.

अशी ही एकरस, अवच्छेद्य, अभेद्य, अपूर्व, अपरंपार, अकथनीय व अपूर्व अवस्था आहे; कारण या अवस्थेत एकाच वेळी ज्ञान व भक्ती, चित् व आनंद यांचा समावेश झालेला दृष्टीस पडतो. या अवस्थेत ज्ञान व भक्ती ही एकाकार होते. स्वसंवेद्य आत्मरूपाची ही अवस्था असल्याने ज्ञानाची अंतिम सीमा व प्रेमाची

पराकाष्ठा येथे पाहवयास मिळते. ही समन्वयाची भूमी असल्याने येथेच द्वैताद्वैताचे सामंजस्य झालेले दृष्टीस पडते. या ठिकाणी शिव व शक्ती पूर्णपणे एकरस होत असल्याने येथे शिवाचे अगर शक्तीचे प्राधान्य असत नाही. हीच खरी साम्यावस्था होय. यालाच शिवशक्तीचे सामरस्य म्हणतात. या समरस अवस्थेलाच अद्वयावस्थाही म्हटले जाते. या अवस्थेत दोन किंवा अनेकांचे वैषम्य तर नाहीसे होतेच; परंतु विषमतेचे बीजही राहत नाही. हे सर्व वर्णन केल्यावरही श्रीज्ञानेश्वरमहाराज या सामरस्याच्या पलीकडील एका परावस्थेचे वर्णन करताना दृष्टीस पडतात. त्याला कोणतेही नाव देता येत नाही. ही चिदानंदमयी अद्वैतनिष्ठा आहे यात काहीही शंका नाही. ही अवस्था बुद्धीच्या, विचाराच्या किंवा ध्यानाच्या पलीकडे असून ती अव्यक्त व स्वयंप्रकाश आहे. या अवस्थेत गेलेला सिद्धयोगाचा साधक सिद्ध होत असल्याने त्याची त्या अवस्थेतील स्थिती, दशा अगर राहाटणी कशी असते याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी आपणा आपण ।
ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । तत्परायण अर्हानिशीं ।।५.८७ ।।

ऐसें व्यापक ज्ञान भलें । जयांचिया हृदया गिंवसित आलें ।
तयांची समता दृष्टि बोलें । विशेषूं काई ।।८८।।

एक आपणपांचि जैसें । ते देखतीं विश्व तैसें ।
हें बोलणें कायसें । नवलु एथ ।।८९।।

मग हा मशकु हा गजु । कीं हा श्वपचु हा द्विजु ।
पैल इतरु हा आत्मजु । हें उरेल कें ? ।।९३।।

ना तरी हे धेनु हें श्वान । एक गुरु एक हीन ।
हें असो कैंचें स्वप्न । जागतया ।।९४।।

एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा ।
तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषमु काई ? ।।९५।।

जयां आपणपें सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं ।
तो विषय न सेवी हें काई । विचित्र येथ ।।१०५।।

सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडलेनि अंतरें ।
रचिला म्हणौनि बाहिरें । पाउल न घाली ।।१०६।।

सांगें कुमुददळाचेनि ताटें । जो जेंविला चंद्रकिरणें चोखटें ।
तो चकोरु काई वाळुवंटें । चुंबितु असे ? ।।१०७।।
तैसें आत्मसुख उपाइलें । जयासि आपणेंचि फावलें ।
तया विषयो सहजें सांडवले । म्हणों काई ? ।।१०८।।

जे ऐसेनि सुखें मातले । आपणपांचि आपण गुंतले ।
ते मी जाणें निखिळ वोतले । सामरस्याचे ।।१३७।।

ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर ।
कीं महाबोधें विहार । केले जैसे ।।१३८।।

ते विवेकाचे गांव । कीं परब्रह्मींचे स्वभाव ।
नातरी अळंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ।।१३९।।
ते सत्त्वाचे सात्त्विक । कीं चैतन्याचे आंगिक ।।१४०।।
तरी जयाचिया इंद्रियांचिया घरा । नाहीं विषयांचिया येरझारा ।
जो आत्मबोधाचिया वोवरां । पहुडला असे ।।६.६२।।
जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो नेघे ।
विषय पासींही आलियां से न रिगे । हें काय म्हणौनि ।।६३।।
इंद्रियें कर्माच्या ठायीं । वाढीनलीं परि कहीं ।
फळहेतूची चाड नाहीं । अंतःकरणीं ।।६४।।
तेथ सुहृद आणि शत्रु । कां उदासु आणि मित्रु ।
हा भावभेदु विचित्रु । कल्पूं कैंचा ।।९४।।
तया बंधु कोण काह्याचा । द्वेषिया कवणु तयाचा ।
मीचि विश्व ऐसा जयाचा । बोधु जाहला ।।९५।।
मग तयाचिये दिठी । अधमोत्तम असे किरीटी ? ।
काय परिसाचिये कसवटी । वानिया कीजे ? ।।९६।।
ते जैशी निर्वाण वर्णुचि करी । तैशी जयाची बुद्धी चराचरीं ।
होय साम्याची उजरी । निरंतर ।।९७।।
जे ते विश्वालंकाराचें विसुरे । जरी आहाती आनानें आकारें ।
तरी घडले एकचि भांगारें । परब्रह्में ।।९८।।
ऐसें जाणणें जें बरवें । तें फावलें तया आघवें ।
म्हणौनि आहाचवाहाच न झकवे । येणें आकारचित्रें ।।९९।।
घापे पटामाजि दृष्टी । दिसे तंतूंची सैंघ सृष्टी ।
परी तो एकवांचूनि गोठी । दुजी नाहीं ।।१००।।
ऐसेनि प्रतीती हें गवसे । ऐसा अनुभव जयातें असे ।
तोचि समबुद्धि हें अनारिसें । नव्हे जाणें ।।१०१।।
जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो ।
जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासही ।।१०२।।
जयाचेनि बोलें धर्मु जिये । दिठी महासिद्धीतें विये ।
देखें स्वर्गसुखादि इयें । खेळु जयाचा ।।१०३।।

विपायें जरी आठविला चित्ता । तरी दे आपुली योग्यता ।
हें असो तयातें प्रशंसितां । लाभु आथि ॥१०४॥

पुढती अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतदिवसें ।
मग आपणपांचि आपणु असे । अखंडित ॥१०५॥

मग मेरूपासूनि थोरें । देह दुःखाचेनि डोंगरें ।
दाटिजो पां पडिभरें । चित्त न दटे ॥३६९॥

कां शस्त्रें वरी तोडिलिया । देह अग्निमाजीं पडलिया ।
चित्त महासुखीं पहुडलिया । चेवोचि नये ॥३७०॥

ऐसें आपणपां रिगोनि ठाये । मग देहाची वास्तु न पाहे ।
आणिकचि सुख होऊनि जाये । म्हणूनि विसरे ॥३७१॥

म्हणौनि असो तें विशेषें । आपणपेंयासारिखें ।
जो चराचर देखे । अखंडित ॥४०४॥

सुखदुःखादि वर्में । कां शुभाशुभें कर्में ।
दोन्ही ऐसीं मनोधर्में । नेणेचि जो ॥४०५॥

हें सम विषय भाव । आणिकही विचित्र जें सर्व
तें मानी जैसे अवयव । आपुले होती ॥४०६॥

हें एकैक काय सांगावें । जया त्रैलोक्यचि आघवें ।
मी ऐसें स्वभावें । बोधा आले ॥४०७॥
तयाही देह एकु कीर आथी । लौकिकीं सुखदुःखी तयातें म्हणती ।
परी आम्हांतें ऐसी प्रतीती । परब्रह्मचि हा ॥४०८॥
तरी दोन्ही पालववेरी । जैसा एक तंतू अंबरीं ।
तैसा मीवांचूनि चराचरीं । जाणती ना ॥९.२२०॥
आदि ब्रह्मा करूनी । शेवटीं मशक धरूनी ।
माजीं समस्त हें जाणोनि । स्वरूप माझें ॥२२१॥
मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती ।
देखिलिये वस्तु उजू लुंटती । मीचि म्हणौनि ॥२२२॥
आपुलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे ।
एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें । नमूंचि आवडे ॥२२३॥
जैसें उंचीं उदक पडिलें । ते तळवटवरी ये उगलें ।
तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वभावोचि तयांचा ॥२२४॥
कां फळलिया तरूची शाखा । सहजें भूमीसी उतरे देखा ।
तैसें जीवमात्रां अशेखां । खालावती ते ॥२२५॥

अखंड अगर्वता होऊनि असती । तयांची विनय हेचि संपत्ती ।
जे जय जय मंत्रें अर्पिती । माझ्याचि ठायीं ॥२२६॥
नमितां मानापमान गळाले । म्हणौनि अवचितां मीचि जहाले ।
ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥२२७॥
ऐसेनि समत्वें पंडुसुता । जिये जो देखत साता ।
तो मरण आणि जीविता । नागवे फुडा १३.१०७८॥
म्हणौनि तो वैराग्य़ळा । वानीत असो वेळोवेळां ।
जे साम्यसेजे डोळां । लागला तया ॥१०७९॥

सारांश, सिद्धयोग साधनाने " मग तें देहाचें वेळें । वोलांडूनि ऐकेचि वेळे । संवतुकी कांटाळें । माझें जालें ॥१४.५१॥" या न्यायाने साधकाला अंतिम सामरस्याची प्राप्ती होऊन तो ईश्वराशी एकरूप होतो. हे सामरस्य म्हणजे भक्ती, ज्ञान व योग आहे, हे " ऐसेनि बा समरसें । दृष्टि जे उल्हासे । ते भक्ति पैं ऐसे । आम्ही म्हणों ॥१४.३८७॥" व " आणि ज्ञानाचे चांगावें । इयेचि दृष्टि नांवें । योगाचेंही आघवें । सर्वस्व हें ॥३८८॥" असे म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. अशी ही अद्वितीय स्थिती साधकाला प्राप्त झाल्यावर तो तीही ओलांडून जाऊन द्वैताद्वैतविवर्जित अशा स्थितीला प्राप्त होतो, हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की—

ऐसेनि मग परस्परें । ते सोऽहंवृत्ति जें अवतरे ।
तें तियेहि सकट सरे । अपैसया ॥१४.३९२॥
जैसा सैंधवाचा रवा । सिंधूमाजीं पांडवा ।
विरालेया विरवावा । हेंही ठाके ॥३९३॥
नातरी जाळूनि तृण । वन्हिही विझे आपण ।
तैसें भेदु नाशूनि जाण । ज्ञानही नुरे ॥३९४॥
माझें पैलपण जाये । भक्त हें ऐलपण ठाये ।
अनादि ऐक्य जें आहे । तेंचि निवडे ॥३९५॥
आतां गुणातें तो किरीटी । जिणे या नव्हती गोष्टी ।
जे एकपणाही मिठी । पडों सरली ॥४९६॥

**परब्रह्मप्राप्ती :—**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " इये अभ्यासीं जे दृढ होती । ते भरंवसेनि ब्रह्मत्वा येती ॥६.३३०॥" व " ते ऐसे कैसेंनि जहाले । जे देहींचि ब्रह्मत्वा आले । हें पुससी तरी भलें । संक्षेपें सांगों ॥५.१५०॥" असे म्हणून सिद्धयोग साधनाने सशरीर ब्रह्मप्राप्तीची अंतिम फलनिष्पत्ती गीतेच्या विषयानुरोधाने संक्षेपाने वारंवार वर्णन करून जे चित्र उभे केले आहे त्यातून सिद्धयोगाने प्राप्त होणाऱ्या फलनिष्पत्तिरूप

साध्याच्या अनर्घ्य महारत्नाचा सातवा पैलू किंवा निकष प्रकट झाला आहे. या साधनाने प्राप्त होणारी परब्रह्मप्राप्ती म्हणजेच मोक्ष, कैवल्य, निजधाम, परमगती व आत्मस्वरूपप्राप्ती होय, याचा निर्वाळा श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वारंवार देऊन, हे सर्व शब्द एकाच अवस्थेचे किंवा स्थितीचे पर्यायवाची असून " इयें आनानें नांवें । परी निरूप्य आन नोहे ॥१३.५६५॥" या न्यायाने या सर्व भिन्नभिन्न शब्दांनी वर्णन केलेली अंतिम अवस्था एकच आहे, हे नितांत सत्य आहे, असे स्पष्ट केले आहे. या अवस्थेचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

तैसे रागद्वेष जरी निमाले । तरी ब्रह्मींचें स्वराज्य आलें ।
मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ॥३.२७१॥
तैसें मन एथ मुद्दल जाये । मग अहंभावादिक कें आहे ।
म्हणौनि शरीरेंचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥५.१५७॥
जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये ।
तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥६.८२॥
हा घटाकारु जैसा । निमालिया तया अवकाशा ।
नलगे मिळों जाणें आकाशा । आना ठाया ॥८३॥
तैसा देहाहंकारु नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला ।
तोचि परमात्मा संचला । आधींचि आहे ॥८४॥
आतां शीतोष्णाचिया वाहणी । तेथ सुखदुःखाची कडसणी ।
इयें न समाती कांहीं बोलणीं । मानापमानांचीं ॥८५॥
जे जिये वाटा सूर्यु जाये । तेउतें तेजाचें विश्व होये ।
तैसें तया पावे तें आहे । तोचि म्हणौनी ॥८६॥
हें एकैक सांगोनि वायां । काय फार करूं धनंजया ।
पैं गेलिया जया ठाया । तो ठावोचि होईजे ॥८.१९६॥
हिंवाचिया झुळुका । जैसे हिंवचि पडे उष्णोदका ।
का समोर जालिया अर्का । तमचि प्रकाशु होय ॥१९७॥
तैसा संसारु जया गांवा । गेला सांता पांडवा ।
होऊनि ठाके आघवा । मोक्षाचाची ॥१९८॥
तरी अग्नीमाजीं आलें । जैसें इंधनचि अग्नि जहालें ।
पाठीं न निवडेचि कांहीं केलें । काष्ठपण ॥१९९॥
नातरी साखरेचा माधौता । बुद्धीमंतपणेंही करितां ।
परि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी ॥२००॥
लोहाचें कनक जाहलें । हें एकें परिसेंचि केलें ।
आतां आणिक कैचें तें गेलें । लोहत्व आणी ॥२०१॥

म्हणौनि तूप होऊनि माघौतें। जेवीं दूधपणा न येचि निरुतें।
तेवीं पावोनियां जयाते। पुनरावृत्ति नाहीं ॥२०२॥
म्हणौनि अक्षर जें म्हणिजे। तेवींचि म्हणतां बोधुहि उपजे।
जयापरौता पैसु न देखिजे। या नाम परमगती ॥८.१८१॥
भरूनि प्रपंचाचा घोंटु। कीजे देखतांचि देखतया द्रष्टु।
आनंदसाम्राज्यीं पाटु। बांधिजे जीवा ॥१६.५०॥

या अवस्थेचेच सूत्ररूपाने वर्णन करताना, महर्षी पतंजलींनी "योगदर्शनात" असे म्हटले आहे की–

सत्त्वपुरुषयोः शुद्धिसाम्ये कैवल्यमिति ॥३.५५॥

बुद्धी व आत्मा यांची एकसारखी शुद्धी झाली असता साधकाला मोक्ष प्राप्त होतो. यावर भाष्य करून महर्षी व्यासांनी त्याचा अर्थ स्पष्ट करताना असे म्हटले आहे की, "ज्यावेळी बुद्धीचे रज व तम हे मल नाहीसे होऊन व क्लेशरूप संसारबीजे जळून जाऊन ही बुद्धी अन्यथाख्यातीमध्ये किंवा विवेकख्यातीमध्येच प्रतिष्ठित होते त्यावेळी ही बुद्धी अर्थात् शक्ती आत्म्याच्या शुद्धीची समता प्राप्त करून घेते. त्यावेळी आत्म्यावर आरोपित झालेल्या अविद्येच्या अर्थात् सुखदुःखाच्या भोगाचा अभाव होतो. हीच आत्मस्वरूपाची शुद्धी आहे. ह्या शुद्धिसाम्यावस्थेमध्ये साधकाला कैवल्य किंवा मोक्षप्राप्ती होते हा साधक ऐश्वर्य म्हणजे सिद्धींनी संपन्न असला किंवा ऐश्वर्यहीन म्हणजे सिद्धींनी विरहित असला; तरीही त्याला मोक्षप्राप्ती होते. याचे कारण असे आहे की, क्लेश-बीजे दग्ध झाल्यावर साधक ज्ञानाची अपेक्षा करीत नाही किंवा ज्ञानावर अव-लंबून राहत नाही. अर्थात् ज्ञानाच्या कोणत्याही सिद्धीची, विभूतीची किंवा ऐश्वर्याची साधक अपेक्षा करीत नाही. सत्त्वबुद्धीने प्राप्त होणाऱ्या समाधीमुळे ऐश्वर्य मिळणे हे मुख्य प्रयोजन नसून परमार्थ हा मुख्य आहे. कैवल्यासाठी विवेकज्ञान अत्यावश्यक आहे. ज्ञानाने अविद्येचा नाश होतो. अविद्यानाशाने क्लेश नष्ट होतात. क्लेश नष्ट झाल्यामुळे कर्मविपाक किंवा कर्मफलांची निवृत्ती होते. या अवस्थेमध्ये कर्तव्या-पासून मुक्त झालेले गुण दृश्यभावाने पुरुषासमोर प्रकट होत नाहीत. हेच कैवल्य किंवा मोक्ष होय. यावेळी पुरुष स्वरूपमात्र, निर्मल व केवलस्वरूप होऊन आपल्या ज्योतीमध्ये अर्थात् शक्तीमध्ये एकरूप होऊन जातो. अपवर्ग, निर्वाण, मुक्ती, मोक्ष, स्वरूपावस्थिती, परमधाम इत्यादि सर्व कैवल्याचीच पर्यायवाची नावे आहेत."

अशी ही स्थिती साधकाला प्राप्त झाल्यावर तो ज्या सिद्ध अवस्थेत राहतो किंवा त्या साधकाची प्रतीती जगाला कशी येते याचे चित्र उपस्थित करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

म्हणौनि सर्वांपरी मुक्तु । तो सकर्मुचि कर्मरहितु ।
सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांति नाहीं ।।४.११४।।

देखैं मेघौनि सुटती धारा । तिया न रुपती जैसिया सागरा ।
तैशीं शुभाशुभें योगीश्वरा । नव्हती आनें ।।६.८७।।

जो हा विज्ञानात्मकु भावो । तया विवरितां जाहला वावो ।
मग लागला जंव पाहों । तंव ज्ञान ते तोचि ।।८८।।

आतां व्यापकु कीं एकदेशी । हे ऊहापोही जे ऐसी ।
ते करावी ठेली आपैशी । दुजेनवीण ।।८९।।

ऐसा शरीरीची परी कौतुकें । परब्रह्माचेनि पाडें तुकें ।
जेणें जितलीं एकें । इंद्रियें गा ।।९०।।

तो जितेंद्रियु सहजें । तोचि योगयुक्तु म्हणिजे ।
जेणें सानें थोर नेणिजे । कवणें काळीं ।।९१।।

देखैं सोनयाचे निखळ । मेरुयेसणें ढिसाळ ।
आणि मातियेचें डिखळ । सरिसेंचि मानी ।।९२।।

पाहतां पृथ्वीचें मोल थोडें । ऐसें अनर्घ्य रत्न चोखडें ।
देखें दगडाचेनि पाडें । निचाडु ऐसा ।।९३।।

ऐशिया समयोगाची निरुती । लाहोनि जे देह ठेविती ।
ते ब्रह्मचि होती । ब्रह्मविद ।।८.२२१।।

तो जडाजडातें विरवितु । भ्रूलतामाजीं संचरतु ।
जैसा घंटानाद लयस्तु । घंटेसीच होय ।।८.९७।।
कां झांकलिया घटींचा दिवा । नेणिजे काय जाहला केव्हां ।
या रीतीं जो पांडवा । देह ठेवी ।।९८।।
तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसें नाम ।
तें माझें निजधाम । होऊनि ठाके ।।९९।।
एऱ्हवीं तेंचि अर्जुना । होईजे ब्रह्मसंपन्ना ।
जें या भूताकृती भिन्ना । दिसती एकी ।।१३.१०८४।।
लहरी जैसिया जळीं । परमाणुकणिका स्थळीं ।
रश्मीकरमंडळीं । सूर्याच्या जेवीं ।।१०८५।।
नातरी देहीं अवेव । मनीं आघवेचि भाव ।
विस्फुलिंग सावेव । वन्हीं एकीं ।।१०८६।।
तैसे भूताकार एकाचे । हें दिठी रिगे जें साचें ।
तेंचि ब्रह्मसंपत्तीचें । तारूं लागे ।।१०८७।।

मग जया तयाकडे। ब्रह्मेंचि दिठी उघडे।
किंबहुना जोडे। अपार सुख ।।१०८८।।

किंबहुना ऐसी दशा। ते ब्रह्मत्व गा सुदंशा।
हें तो पावें जो ऐसा। मातें भजे ।।१४.३९७।।

पुढती इहीं लिंगीं। भक्तु जो माझा जगीं।
हे ब्रह्मता तयालागीं। पतिव्रता ।।३९८।।

जैसें गंगचेनि वोघें। डळमळीत जळ जें निघे।
सिंधुपद तयाजोगें। आन नाहीं ।।३९९।।

तैसा ज्ञानाचिया दिठी। जो मातें सेवी किरीटी।
तो होय ब्रह्मतेच्या मुकुटीं। चूडारत्न ।।४००।।

यया ब्रह्मत्वासीचि पार्था। सायुज्य ऐसी व्यवस्था।
याचि नांवें चौथा। पुरुषार्थु गा ।।४०१।।

मग सत्संगें प्रबळें। सच्छास्त्राचेनि बळें।
जन्ममृत्यूचीं निमाळें। निस्तरें रानें ।।१६.४४१।।

ते वेळीं आत्मानंदें आघवें। जें सदा वसतें बरवें।
तें तैसेंचि पाटण पावे। गुरुकृपेचें ।।४४२।।
तेथ प्रियाची परमसीमा। तो भेटे माउली आत्मा।
तयें खेंवीं आटे डिंडिमा। सांसारिक हें ।।४४३।।
ऐसा जो कामक्रोधलोभा। झाडी करूनि ठाके उभा।
तोचि येवढिया लाभा। गोसावी होय ।।४४४।।
म्हणौनि आत्मयाचें केवळ। जो रूपचि जाहला निखळ।
तया नाहीं बंदिशाळ। कर्माची हे ।।१८.४५९।।
तेव्हां सागरीं गंगा जैसी। आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी।
अद्वयानंदाची आपैसी। खाणी उघडे ।।७९२।।
ते शांति पैं गा सुभगा। संपूर्ण ये तयाचिया आंगा।
तें ब्रह्म होआवयाजोगा। होय तो पुरुषु ।।१०८६।।
पुनवेहुनी चतुर्दशी। जेतुलें उणेपण शशी।
कां सोळे पाऊनि जैसी। पधरावी वानी ।।१०८७।।
सागरींही पाणी वेगें। संचरे तें रूप गंगे।
येर निश्चळ जे उगें। तें समुद्रु जैसा ।।१०८८।।
ब्रह्म आणि ब्रह्महोतिये।। योग्यते तैसा पाडु आहे।
तेंचि शांतीचेनि लवलाहें। होय तो गा ।।१०८९।।

कर्महीं करितचि आहे । जें करावें हें भाष जाये ।
तें न करणेंचि होये । तयांचें केलें ।।११७७।।
क्रियाजात मी जालेपणें । घडे कांहींचि न करणें ।
तयाचि नांव पूजणें । खुणेचें माझें ।।११७८।।
म्हणौनि करीतयाही वोजा । तें न करणें हेंचि कपिध्वजा ।
निफजे तिया महापूजा । पूजी तो मातें ।।११७९।।
एवं तो बोलें तें स्तवन । तो देखे तें दर्शन ।
अद्वया मज गमन । तो चाले तेंचि ।।११८०।।
तो करी तेतुली पूजा । तो कल्पी तो जपु माझा ।
तो असे तेचि कपिध्वजा । समाधी माझी ।।११८१।।

अशा प्रकारे सिद्धदशेचे वर्णन करून अर्थात् सिद्धदशेप्रत गेलेल्या साधकाऱ्या अवस्थेचे चित्र रेखाटून जी स्थिती श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर्णिली आहे ती अवस्था द्वैताद्वैतविवर्जितच असल्याचा निर्वाळा देताना त्यांनी स्पष्ट शब्दात असे म्हटले आहे की–

ऐक्याचें एकपण सरे । जेथ आनंदकणुही विरे ।
कांहीचि नुरोनि उरे । जें कांहीं गा ।। १८.१००५।।
तिये ब्रह्मीं ऐक्यपणें । ब्रह्मचि होऊनि असणें ।
तें क्रमेंचि करूनि तेणें । पाविजे यें ।।१००६।।
मग द्वैताद्वैतातीत । मीचि आत्मा एकु निभ्रांत ।
हें जाणोनि जाणणें जेथ । अनुभवीं रिघे ।।१२०५।।
तेथ चेइलियां येकपण । दिसे जे आपुलिया आपण ।
तेंही जातां नेणो कोण । होइजे जेवीं ।।१२०६।।
कां डोळां देखतिये क्षणीं । सुवर्णपण सुवर्णीं ।
नाटितां होय आटणी । अळंकाराचीही ।।१२०७।।
नाना लवण तोय होये । मग क्षारता तोयत्वें राहे ।
तेही जिरतां जेवीं जाये । जालेपण तें ।।१२०८।।
तैसा मी तों हें जें असे । तें स्वानंदानुभवसमरसें ।
कालवूनियां प्रवेशे । मजचिमाजीं ।।१२०९।।
आणि तो हे भाष जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे ।
ऐसा मी नां तो तिये सामाये । माझ्याचि रूपीं ।।१२१०।।
जेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नाम अग्नि पुरे ।
मग उभयतातीत उरे । आकाश जेवीं ।।१२११।।

कां धाडलिया एका एकु । वाढे तो शून्य विशेखु ।
तैसा आहे नाहींचा शेखु । मीचि मग आथी ॥१२१२॥
तेथ ब्रह्मा आत्मा ईशु । या बोला मोडा सौरसु ।
न बोलणे याही पैसु । नाहीं तेथ ॥११.१३॥
न बोलणेंहीं न बोलोनी । तें बोलिजे तोंड भरुनी ।
जाणिव नेणिज नेणोनि । जाणिजे तें ॥१२१४॥
तेथ बुझिजे बोधु बोधें । आनंदु घेपे आनंदें ।
सुखावरी नुसधें । सुखचि भोगिजें ॥१२१४॥
तेथ लाभु जोडला लाभा । प्रभा आलिंगिली प्रभा ।
विस्ममो बुडाला उभा । विस्मयामाजीं ॥१२१६॥
शमु तेथ सामावला । विश्रामु विश्रांति आला ।
अनुभवु वेडावला । अनुभूतिपणें ॥१२१७॥
किंबहुना ऐसे निखळ । मीपण जोडे तया फळ ॥१२१८॥

## इंद्रियांचिया घरा नाहीं विषयांचिया येरझारा:-

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " इंद्रियां नेणतां भोगिजे ॥१.५८॥, जो इंद्रियांतें चोरूनि जेवी । तयासीचि फावे ॥६.२३॥" व "आतां इंद्रिया देऊनि कवाड । हृदयीं भोगीं ॥९.१३५॥" असे म्हणून सिद्धावस्थेसाठी अर्थात् स्वसंवेद्य आत्म-स्वरूपाच्या उपभोगासाठी ज्या गोष्टीचा निर्देश केला आहे, ती गोष्ट " विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस मोडे ॥६.१८८॥" याप्रमाणे सिद्धयोग साधनानें सिद्धीस जाऊन या मार्गाची जी फलनिष्पत्ती उत्पन्न झालेली दिसते, त्यातच या परब्रह्मप्राप्तीच्या महामार्गरूपी अलौकिक रत्नाच्या साध्याचा आठवा पैलू किंवा निकष अंतर्निहित असल्याचे स्पष्ट होते. ज्या अवस्थेत मन व प्राण पांगळून जातात तेथे इंद्रियांचा व विषयांचा पाड लागणे कधीही शक्य नाही. ही अवस्थाच अशी अलौकिक आहे की, त्या ठिकाणी इंद्रियविषयादि गोष्टींना थाराच मिळणे शक्य नसते. त्यामुळेच या अवस्थेचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की-

तैं शरीरभाव नासती । इंद्रियें विषय विसरती ।
जैं सोहंभाव प्रतीति । प्रकट होय ॥२ ३०९॥
म्हणौनि आपुलीं आपणपेया । जरी इंद्रियें येती आया ।
तरी अधिक कांहीं धनंजया । सार्थक असे ? ॥३५१॥
देखें कूर्म जियापरी । उवाइला अवेव पसरी ।
ना तरी इच्छावशें आवरी । आपणपेंचि ॥३५२॥
तैसीं इंद्रियें आपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती ।
तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पातली असे ॥३५३॥

जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली । तर्काची दिठी गेली ।
जेणें इंद्रियें विसरली । विषयसंगु ॥४.१६१॥
मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचें बोलकेंपण ठेलें ।
जयामाजि सांपडलें । ज्ञेय दिसे ॥१६२॥
जेथ वैराग्याचा पांगु फिटे । विवेकाचाही सोसु तुटे ।
जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ॥१६३॥
ज्ञानियांच्या हन ठायीं । याची मातुही कीर नाहीं ।
देहीं देहभावो जिहीं । स्ववश केले ॥५.१२९॥
जयांते बाह्यांची भाष । नेणिजेचि निःशेष ।
अंतरीं सुख । एक आथि ॥१३०॥
परि तें वेगळेपणें भोगिजे । जैसें पक्षियें फळ चुंबिजे ।
तैसें नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥१३१॥
तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सांवरे ।
इंद्रियांचे रश्मी माघारे । हृदयवरी भरलें ॥११.१९१॥
कां आघवियाचि इंद्रियवृत्ती । हृदयाचिया एकांतीं ।
थापटूनि सुषुप्ती । आणी जें गा ॥१३.१३०॥

ही जी इंद्रिय व विषय विरहित अवस्था आहे या अवस्थेलाच प्रत्याहार म्हणून त्याचे फल सांगताना महर्षी पतंजलींनी "योगदर्शनात" असे म्हटले आहे की, "स्वविषयासप्रयोगे चित्तस्वरूपानुकार इवेंद्रियाणां प्रत्याहारः ॥२.५४॥ ततः परमा वश्यतेंद्रियाणाम् ॥२.५५॥" आपल्या विषयांच्या बरोबर संबंध न झाल्यामुळे इंद्रिये चित्ताच्या अर्थात् शक्तीच्या स्वरूपात तदाकार होऊन जातात. यालाच प्रत्याहार म्हणतात. प्रत्याहार सिद्ध झाला की, इंद्रिये चांगल्या रीतीने स्वाधीन होतात अर्थात् जागृत शक्तीशी एकरूप होऊन ती शेवटी तिच्यात विरघळून जाऊन सहस्रारात विलीन होतात. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी "योग-तारावली" या प्रकरण ग्रंथात निखिल इंद्रियांच्या विलीनीकरणामुळे उपस्थित होणारी सहज अन्यमनस्क अशी अवस्था आपल्याला कधी प्राप्त होईल अशी प्रश्न-रूप प्रार्थना करताना असे म्हटले आहे की—

निवर्तयंतीं निखिलेंद्रियाणि प्रवर्तयंतीं परमात्मयोगम् ।
सविन्मयीं तां सहजामनस्कां कदा गमिष्यामि मतान्यभावः ॥२३॥

सर्व इंद्रियांना विषयांपासून निवृत्त करणारी, परमात्मप्राप्तीकडे प्रवृत्त करणारी, शक्तीशी समरसून तत्स्वरूप बनलेली, इतर सर्व भाव जेथे नाहीसे झाले आहेत अशी सहज असणारी अमनस्क किंवा उन्मनी अवस्था मला कधी प्राप्त होईल ?

अशी अवस्था प्राप्त झालेला सिद्धयोगी कसा असतो याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाजांनी असे म्हटले आहे की—

हे विषय जयातें नाकळिती। तया सुखदुःखें दोनी न पवती।
आणि गर्भवासुसंगती। नाहीं तया ॥२.१२३॥

तो नित्यरूप पार्था। वोळखावा सर्वथा।
जो या इंद्रियार्थां। नागवेचि ॥१२४॥

जो सर्वदा नित्यतृप्तु। अंतःकरण भरितु।
परी विषयामाजीं पतितु। जेणें संगें कीजे ॥२९२॥

तो कामु सर्वथा जाये। जयाचें आत्मतोषीं मन राहे।
तोचि स्थितप्रज्ञु होये। पुरुषु जाणें ॥२९३॥

नाना दुःखीं प्राप्तीं। जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं।
आणि सुखाचिया आर्ती। अडपैजेना ॥२९४॥

अर्जुना तयाच्या ठायीं। कामक्रोधु सहजें नाहीं।
आणि भयातें नेणें कहीं। परिपूर्णु तो ॥२९५॥

ऐसा जो निरवधि। तो जाण पां स्थिरबुद्धि।
जो निरसूनि उपाधि। भेदरहितु ॥२९६॥

जो सर्वत्र सदा सरिसा। परिपूर्णु चंद्रु कां जैसा।
अधमोत्तम प्रकाशा—। माजीं न म्हणे ॥२९७॥

ऐसी अनवच्छिन्न समता। भूतमात्रीं सदयता।
आणि पालटु नाहीं चित्ता। कवणें वेळे ॥२९८॥

गोमटें कांहीं पावे। तरीं संतोषें तेणें नाभिभवे।
जो वोखटेनि नागवे। विषादासी ॥२९९॥

ऐसा हरिखशोकरहितु। जो आत्मबोधभरितु।
तो जाण पां प्रज्ञायुक्तु। धनुर्धरा ॥३००॥

कां कूर्म जियापरी। उवाइला अवेव पसरी।
ना तरी इच्छावशें आवरी। आपुले आपण ॥३०१॥

तैसीं इंद्रियें आपैतीं होती। जयाचें म्हणितलें करिती।
तयाची प्रज्ञा जाण स्थिति। पातली असे ॥३०२॥

तरी आत्मसुखाचिया गोडिया। विटे जो कां सकळ विषयां।
जयाच्या ठायी इंद्रियां। मानु नाहीं ॥४.१८६॥

जो मनासीं चाड न सांगे। जो प्रकृतीचें केलें नेघे।
जो श्रद्धेचेनि संभोगें। सुखिया जाहला ॥१८७॥

तयातेंचि गिवसित । तें ज्ञान पावे निश्चित ।
जयामाजि अचुंबित । शांति असे ॥१८८॥
ऐसा शरीरीचि परी कौतुकें । परब्रह्माचेनि पाडें तुकें ।
जेणें जितलीं एकें । इंद्रियें गा ॥६.९०॥
तो जितेंद्रियु सहजें । तोचि योगयुक्तु म्हणिजे ।
जेणें साने थोर नेणिजे । कवणें काळीं ॥९१॥
तरी जयाचिया इंद्रियाचिया घरा । नाहीं विषयांचिया येरझारा ।
जो आत्मबोधाचिया वोवरां । पहुडला असे ॥६.६२॥
जयाचें सुखदु:खाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो नेघे ।
विषय पासींही आलियां से न रिगे । हें काय म्हणौनि ॥६३॥
इंद्रियें कर्माच्या ठायीं । वाढीनलीं परि कहीं ।
फळहेतूची चाड नाहीं । अंतकरणीं ॥६४॥
असतेनि देहें एतुला । जो चेतुचि दिसे निदेला ।
तोचि योगारूढु भला । ओळखें तूं ॥६५॥
आणि विषयांचें विष उलंडूनि । जे सर्वेंद्रियां प्रायश्चित्त देऊनि ।
आहाति देहाचिया बैसोनि । झाडातळीं ॥८.१०४॥
आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी ।
पुरवणी मानसीं कीं । जिती आथी ॥१३·५१३॥
वमिलिया अन्ना । लाळ न घोंटी रसना ।
कां आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥५१४॥
विष खाणें नागवे । जळत घरीं न रिगवे ।
व्याघ्रविवरां न वचवे । वस्ती जेवीं ॥५१५॥
धडधडीत लोहरसीं । उडी न घालवे जैसी ।
न करवे उशी । अजगराची ॥५१६॥
अर्जुना तेणें पाडें । जयासी विषयवार्ता नावडे ।
नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहींच जावों ॥५१७॥
वासना एकवटे । प्रवृत्ति वोहटे ।
मानस विटे । विषयांवरी ॥१४.२१३॥
जैसा अग्नीचा डोंगरु । नेघे कोणी बीज अंकुरु ।
तैसा मनीं जयां विकारु । उदैजेना ॥१५.३०१॥
जैसा काढीलिया मंदराचळ । राहे क्षीराब्धि निश्चळु ।
तैसा नुठी जयां सळू । कामोर्मीचा ॥३०२॥
चंद्रमा कळीं धाला । न दिसे कोणें आंगीं वोसावला ।
तेवीं अपेक्षेचा अवखळा । न पडे जयां ॥३०३॥

हें किती बोलूं असांगडें । जेवीं परमाणु नुरे वायूपुढें ।
तैसें विषयांचें नावडे । नांवचि जयां ॥३०४॥
आणि मातलिया इंद्रियांचे वेग । कां प्राचीनें खवळले रोग ।
अथवा योगवियोग । प्रियाप्रियांचे ॥१६.१९२॥
यया आघवियांचाचि थोरु । एके वेळे आलिया पूरु ।
तरी अगस्त्य कां होऊनि धीरु । उभा ठाके ॥१९३॥
इंद्रियां विषयांचिया गांठी । अपैसया सुटती किरीटी ।
मन मायेच्या पोटीं । रिगती दाही ॥१८.७३८॥
तरी सर्वेंद्रियांच्या वृत्ती । घेऊनि आपुल्या हातीं ।
बुद्धि आत्मया मिळे येकांतीं । प्रिया जैसी ॥८३३॥

सारांश, इंद्रियांच्या घरातील विषयांची येरझारा संपल्यावर जी तात्त्विक स्थिती साधकाला फलनिष्पत्तीच्या रूपाने प्राप्त होते त्याचे विवेचन केल्यावर ही अवस्था वास्तविकरीत्या भोग्याभोग्य व द्वैताद्वैतविवर्जित अशी असल्याचा निर्वाळा देताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

भोगीं अवस्था एकी उठी । ते अहंकाराचा अंचळु लोटी ।
मग सुखेंसि घे आंटी । गाढेपणें ॥५.१३२॥
तिये आलिंगनमेळीं । होय आपेंआप कवळी ।
तेथ जळ जैसें जळीं । वेगळें न दिसे ॥१३३॥
कां आकाशीं वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे ।
तैसे सुखचि उरे स्वरूपें । सुरतीं तिये ॥१३४॥
ऐसी द्वैताची भाष जाय । मग म्हणों जरी एक होय ।
तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणते जें ॥१३५॥

**द्वंद्वातीत अवस्थाः–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "तयातें देखोनि आंगा घडेल । तेथ अद्वैतीं द्वैत बुडेल । आणि ऐक्यतेजें उघडेल । त्रैलोक्य हें ॥६.३८४॥" असे सांगून सिद्धयोग साधनाने प्राप्त होणाऱ्या फलनिष्पत्तिरूप महायोगाच्या रत्नाचा नववा पैलू किंवा निकष प्रकट केला आहे. "जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ॥२.२७३॥" अशी या द्वंद्वातीत अवस्थेतील स्थिती असल्यामुळे व "ते सित्त्वशुद्धी साहाकारें । गुरुकृपामृततुषारें । सासिन्नलेनि बोधें वोसरे । द्वैतदैन्य ॥१८.२५९॥" या न्यायाने श्रीगुरुकृपेने ही द्वंद्वातीत अवस्था किंवा द्वैतरूपी दैन्यावस्था दूर होत असल्याने "ऐक्यभावाची अंजुळी । सर्वेंद्रिय कुड्मुळीं । भरूनिया पुष्पांजुळी । अर्घ्यु देवों ॥१५.२॥" या प्रमाणे सर्वेंद्रियरूपी पुष्पाच्या कळ्यांनी आपली ऐक्यभावाची अंजुली सजवून तिचा अर्घ्य श्रीगुरुचरणांवर समर्पित करून त्यांची या द्वंद्वातीत

अवस्थेने पूजा करण्यास श्रीज्ञानेश्वरमहाराज सिद्ध झाले आहेत. शांभवाद्वयानंद-वैभवाचे समाधिधन श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ठिकाणी नाथसंप्रदायप्राप्त गुरु-परंपरेने संक्रमित झालेले असल्याने त्यांनी सिद्धयोगाने प्राप्त होणाऱ्या या संपदेचे वर्णन मोठ्या अलौकिक रीतीने करताना असे म्हटले आहे की–

अकाळींचीं अभ्रें जैशीं । उर्मीवीण आकाशीं ।
हारपती आपैशीं । उदयलीं सांती ।।४.११७।।

तैशीं विधिविधानें विहितें । जरी आचरे तो समस्तें ।
तरी तियें ऐक्यभावें ऐक्यातें । पावतीचि गा ।।११८।।

विचार जेथ न रिगे । हेतु जेथ न निगे ।
जें द्वैतदोषसंगे । सिंपेचिना ।।१५०।।

ऐसें ऐक्य हें सहजें । फांवें तंव राहिजे ।
मग तर्णेचि बोधें बैसिजे । आसनावरी ।।६.१८९।।

जैसा वारा कां गगनीं विरे । मग वारेपण वेगळें नुरे ।
तेवीं भक्त हे पैज न सरे । जरी ऐक्या आला ।।७.११४।।

तेवींचि अहंभावो जाये । तरी ऐक्य तें आधींचि आहे ।
हेंचि साचें जेथ होये । तो अधियज्ञु मी ।।८.४५।।

ऐसें सबाह्य ऐक्य संचलें । मीचि होऊनि असतां रचिलें ।
बाहेरि भूतांचीं पांचही खवलें । नेणतांचि पडिलीं ।।८.६२।।

आतां उभेयां उभेपण नाहीं जयाचें । मा पडिलिया गहन कवण तयाचें ।
म्हणोनि प्रतीतीचिये पोटींचें । पाणी न हालें ।।६३।।

ते ऐक्याचीं आहे वोतिली । कीं नित्यतेचिया हृदयीं घातली ।
जैसी समरससमुद्रीं धुतली । रुळेचिना ।।६४।।

द्वैताचा दुकाळु पाहे । साम्याचें सुयाणें होये ।
जया ज्ञानाची सोये । ऐसें करी ।।१३.१७०।।

आकारु जेथ सरे । जीवत्व जेथ विरे ।
द्वैत जेथ नुरे । अद्वय जें ।।११४२।।
तें परमतत्त्व पार्था । होती ते सर्वथा ।
जे आत्मानात्मव्यवस्था । राजहंसु ।।११४३।।
जे माझिया नित्यता । तेणें नित्य ते पंडुसुता ।
परिपूर्ण पूर्णता । माझियाची ।।१४.५२।।
मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सत्यसिंधु ।
तैसेचि ते भेदु । उरेचि ना ।।५३।।

जें मी जेवढें जैसें । तेंचि तें जाले तैसें ।
घटभंगीं घटाकाशें । आकाश जेवीं ॥५४॥
नातरी दीपमूळकीं । दीपशिखा अनेकीं ।
मीनलिया अवलोकीं । होय जैसें ॥५५॥
अर्जुना तयापरी । सरली द्वैताची वारी ।
नांदे नामार्थ एकाहारीं । मीतूंवीण ॥५६॥
आइके सकळ दोषतृणीं । अंकुरिजती जिये मेदिनी ।
तिये भेदबुद्धीची कहाणी । नाहीं जयाते ॥१५.२८९॥
सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय अपैसी ।
गेली देहअहंता तैसी । अविद्येसवें ॥२९०॥
पैं आयुष्यहीना जीवातें । शरीर सांडी जेवीं अवचितें ।
तेवीं निदसुरें द्वैतें । सांडिले जे ॥२९१॥
लोहाचें सांकडें परिसा । न जोडे अंधारु रवि जैसा ।
द्वैतबुद्धीचा तैसा । सदा दुकाळ जया ॥२९२
अगा सुखदुःखाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें ।
तियें जया कां समोरें । होतीचिना ॥२९३॥
स्वप्नींचें राज्य कां मरण । नोहे हर्षशोकांसि कारण ।
उपवढलिया जाण । जियापरी ॥२९४॥
तैसें सुखदुःखरूपीं । द्वंद्वीं जे पुण्यपापीं ।
न घेपिजती सर्पीं । गरुड जैसें ॥२९५॥
म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानंदाची दाटणी ।
मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं । मंदावों लागती ॥१६.१२॥
तेव्हां सागरीं गंगा जैसी । आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी ।
अद्वयानंदाची आपैसी । खाणी उघडे ॥१८.७९२॥

द्वंद्वातीत अवस्थेत म्हणजे अद्वैतात जेव्हा द्वैतावस्था बुडून जाते त्यावेळी त्रैलोक्य हे ऐक्याच्या तेजाने प्रकाशित होते, असे जे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी वर केले आहे,त्याचेच सूत्ररूपाने वर्णन करताना "योगदर्शनात" महर्षी पतंजली असे म्हणतात की–

दृग्दर्शनशक्त्योरेकात्मतैवास्मिता ॥२.६॥

द्रष्टा म्हणजे आत्मा किंवा आत्मशक्ती व दर्शन म्हणजे बुद्धी किंवा शक्ती या दोहोंचे एकत्वाने भासणे हाच अस्मिता किंवा अहंकार होय. हा एकत्वाचा भास नाहीसा करणे यालाच मोक्ष म्हणतात. अशा प्रकारे सिद्धयोग साधनाने

एकरूप अवस्था ज्याला प्राप्त झाली आहे त्याच्या स्थितीचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

पुढती अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैतदिवसें ।
मग आपणपांचि आपणु असें । अखंडित ॥६.१०५॥

एऱ्हवीं तरी अर्जुना । जो एकवटलिया भावना ।
सर्वभूतीं अभिन्ना । मातें भजे ॥३९३॥

भूतांचेनि अनेकपणें । अनेक नोहे अंत:करणें ।
केवळ एकत्वचि माझें जाणें । सर्वत्र जो ॥३९४॥

मग तो एक हा मियां । बोलतां दिसतसे वायां ।
एऱ्हवीं न बोलिजे तरी धनंजया । तो मीचि आहे ॥३९५॥

दीपा आणि प्रकाशा । एकवंकीचा पाडु जैसा ।
तो माझ्या ठायीं तैसा । मी तयामाजीं ॥३९६॥

जैसा उदकाचेनि आयुष्यें रसु । कां गगनाचेनि मानें अवकाशु ।
तैसा माझेनि रूपें रूपसु । पुरुषु तो गा ॥३९७॥

जेणें ऐक्याचिये दिठी । सर्वत्र मातेंचि किरीटी ।
देखिला जैसा पटीं । तंतु एकु ॥३९८॥

कां स्वरूपें तरी बहुतें आहाती । परी तैसीं सोनीं बहुवें न होती ।
ऐसी ऐक्याचळाची स्थिती । केली जेणें ॥३९९॥

नातरी वृक्षांचीं पानें जेतुलीं । तेतुलीं रोपें नाहीं लाविलीं ।
ऐसी अद्वैतदिवसें पाहली । रात्री जया ॥४००॥

तो पंचात्मकीं सांपडे । तरी मग सांग पां कैसेनि अडे ?।
जो प्रतीतीचेनि पाडें । मजसीं तुके ॥४०१॥

माझें व्यापकपण आघवें । गवसलें तयाचेनि अनुभवें ।
तरी न म्हणता स्वभावें । व्यापकु जाहला ॥४०२॥

आतां शरीरीं तरी आहे । परी शरीराचा तो नोहे ।
ऐसें बोलवरी होये । तें करूं काई ॥४०३॥

म्हणौनि असो तें विशेषें । आपणपेंयासारिखें ।
जो चराचर देखे । अखंडित ॥४०४॥

सुखदु:खादि वर्में । कां शुभाशुभें कर्में ।
दोनी ऐसीं मनोधर्में । नेणेंचि जो ॥४०५॥

हें सम विषम भाव । आणिकही विचित्र जें सर्व ।
तें मानी जैसे अवयव । आपुले होती ॥४०६॥

हें एकैक काय सांगावें। जया त्रैलोक्यचि आघवें।
मी ऐसें स्वभावें। बोधा आलें ॥४०७॥

तयातें साम्याचिये वाढी। ऐक्याचि सांदे कुळवाडी।
तेथ भेदाचिया दुबळवाडी। नेणिजे तया ॥७.१७९॥

अर्जुना हा ठावोवरी। जो सोऽहंभावो सरोभरी।
द्वैताच्या पैलतीरीं। निगों सरला ॥१२.१८५॥

रात्रि तैसें पाहलें। हें धारणा जेवीं एक जालें।
आत्माराम देहीं आतलें। द्वंद्व तैसें ॥१४.३५५॥

पैं निद्रिताचेनि आंगेशीं। साप तैशी उर्वशी।
तेवीं स्वरूपस्था सरिशीं। देहीं द्वंद्वें ॥३५६॥

मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु। मीचि एकु स्वतःसिद्धु।
जो आपणेनसीं भेदु। नेणोनियां जाणे ॥१५.५६३॥
तेणेंचि सर्व जाणितलें। हेंही म्हणे थेंकुलें।
जें तया सर्व उरलें। द्वैत नाहीं ॥५६४॥

अशा प्रकारे सिद्धयोग साधकाला प्राप्त होणारी ही अवस्था "एऱ्हवीं द्वैताची वारी। सारूनि ऐक्याच्या परिवरीं। भोगिजे तें अवधारीं। रहस्य हें ॥१८.१३४५॥" या न्यायाने अपूर्व असली; तरी द्वंद्वातीत अवस्थेत जे अद्वैत किंवा ऐक्य भोगावयाचे रहस्य आहे, ते वास्तविक रीत्या द्वंद्वाद्वंद्वातीत असे आहे, हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

दृश्य जाऊनियां द्रष्टें। द्रष्ट्यासीचि जें भेटे।
तें एकलेपणें न घटे। द्रष्टेपणही ॥१८.११५७॥
तेथ स्वप्नींचिया प्रिया। चेवोनि झोंबो गेलिया।
ठायिजे दोन्ही न होनियां। आपणचि जैसें ॥११५८॥
का दोहीं काष्ठांचिये घृष्टी—। माजीं वन्ही एक उठी।
तो दोन्ही हे भाष आटी। आपणचि होय ॥११५९॥
नाना प्रतिबिंब हातीं। घेऊं गेलिया गभस्ती।
बिंबताही असती। जाय जैसी ॥११६०॥
तैसा मी होऊनि देखते। तो घेऊं जाय दृश्यातें।
तेथ दृश्य ने थितें। द्रष्टत्वेंसीं ॥११६१॥
रवि आंधारु प्रकाशिता। नुरेचि जेवीं प्रकाश्यता।
तेवीं दृश्यीं नाहीं द्रष्टता। मी जालिया ॥११६२॥
मग देखिजे ना न देखिजे। ऐसी जे दशा निपजे।
तें तें दर्शन माझें। साचोकारें ॥११६३॥

## महाभूतांची जवनिका फिटते:–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी " हे कल्पना घे सांडी । तें नाहीं इये परवडी । हे महाभूतांची फुडी । आटणी देखां ॥६.२९०॥" असे म्हणून सद्‌गुरुकृपेने जागृत झालेली अनादि आत्मसत्तारूप कुंडलिनी शक्ती पंचमहाभूतांना स्वतःच्या स्वरूपात सामावून घेतल्यावर सहस्रारात शिवाशी एकरूप होऊन जी अवस्था ती साधकाला सिद्धरूपासाठी प्राप्त करून देते, ती सिद्धयोगाच्या साध्यरूपी महारत्नाची अंतिम अवस्था असून, तिचे फलनिष्पत्तीचा दहावा पैलू किंवा निकष म्हणून त्यांनी वर्णन केले आहे. पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश यांचा एकमेकात लय होऊन ही अंतिम अवस्था साधकाला प्राप्त होते. त्याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वर-महाराजांनी असे म्हटले आहे की–

मग ब्रह्मरंध्री स्थिरावोनी । सोऽहंभावाच्या बाह्या पसरूनी ।
परमात्मलिंगा धांवोनी । आंगा घडे ॥६.३०५॥

तंव महाभूतांची जवनिका फिटे । मग दोहींसि होय झटें ।
तेथ गगनासकट आटे । समरसीं तिये ॥३०६॥

पैं मेघाचेनि मुखीं निवडला । समुद्र कां वोघीं पडिला ।
तो मागुता जैसा आला । आपणपयां ॥३०७॥

जें कहीं दैवें । अनुभविलें फावे ।
तें आपणचि हें ठाकावें । होऊनियां ॥३१७॥

पुढती जाणणें तें नाहींचि । म्हणौनि असो किती हेंचि ।
बोलावें आतां वायांचि । धनुर्धरा ॥३१८॥

ऐसें शब्दजात माघौतें सरे । तेथ संकल्पाचें आयुष्य पुरे ।
वाराही जेथ न शिरे । विचाराचा ॥३१९॥

जें उन्मनियेचें लावण्य । जें तुर्येचें तारुण्य ।
अनादि जें अगण्य । परमतत्त्व ॥३२०॥

जें विश्वाचें मूळ । योगद्रुमाचें फळ ।
जें आनंदाचें केवळ । चैतन्य गा ॥३२१॥

जें आकाराचा प्रांतु । जें मोक्षाचा एकांतु ।
जेथ आदि आणि अंतु । विरोनि गेले ॥३२२॥

जें महाभूतांचें बीज । जें महातेजाचें तेज ।
एवं पार्था जें निज– । स्वरूप माझें ॥३२३॥

तें अनिर्वाच्य महासुख । पैं आपणचि जाहले जे पुरुष ।
जयांचे कां निष्कर्ष । प्राप्तिवेरीं ॥३२५॥

परी नेणों कैसे पैं गा । जे जडोनि गेले माझिया आंगा ।
ते प्रयाणींचिया लगबगा । न सांडीतीच मातें ॥७·१८३॥

एऱ्हवी तरीं जाण । ऐसे जे निपुण ।
तेचि अंतःकरण– । युक्त योगी ॥१८४॥

तेचि अविद्येचीं जवनिका फिटे । आणि भेदभावाची अवधी तुटे ।
मग म्हणों एक होऊनि जरी आटे । तरी काय दोनी होती ? ॥८.४१॥

ऐसें सबाह्य ऐक्य संचलें । मीचि होऊनि असतां रचिलें ।
बाहेरि भूतांचीं पांचही खवलें । नेणतांचि पडिलीं ॥६२॥

तेथ समविषम न दिसे कांहीं । म्हणौनि भूतें हे भाष नाहीं ।
जेंवि दूधचि जाहलिया दहीं । नामरूप जाय ॥१७०।.

तेंवि आकारलोपासरिसें । जगाचें जगपण भ्रंशे ।
परि जेथें जाहालें तें जैसें । तैसेंचि असे ॥१७१॥

जें महाभूतें ब्रह्मीं आटती । जीव महदादींचे ठाय फिटती ।
तें जें देव होऊनि ठाकती । तें विसवणें शेषींचें ॥११.४५॥

म्हणे केवढें गगन एथ होतें । तें कवणें नेलें पां केउतें ।
तीं चराचरें महाभूतें । काय जाहलीं ? ॥१८८॥

दिशांचे ठावही हारपले । आधोर्ध्व काय नेणों जाहले ।
चेइलिया स्वप्न तैसे गेले । लोकाकार ॥१८९॥
नाना सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारांगण जैसें लोपे ।
तैसीं गिळिलीं विश्वरूपें । प्रपंचरचना ॥१९०॥
हें असो स्वर्ग पाताळ । कीं भूमी दिशा अंतराळ ।
हे विवक्षा ठेली सकळ । मूर्तिमय देखतसें ॥२७१॥
हें तुजवीण एकादियाकडे । परमाणूही एतुला कोडें ।
अवकाशु पाहतसें परी न सांपडे । ऐसें व्यापिलें तुवां ॥२७२॥
इये नानापरी अपरिमितें । जेतुलीं साठविलीं होतीं महाभूतें ।
तेतुलाही पवाडु तुवां अनंतें । कोंवला देखतसें ॥२७३॥
आणि महाभूतादिकीं । प्रभेदलीं अनेकीं ।
पसरलीसे लटिकी । प्रकृती जे हे ॥१३.११३६॥
जे शुकनळिकान्यायें । न लगती लागली आहे ।
हें जैसें तैसें होये । ठाउवें तया ॥११३७॥
जैसी माळा ते माळा । ऐसीचि देखिजे डोळां ।
सर्पबुद्धि टवाळा । उखी होउनी ॥११३८॥

कां शुक्ति ते शुक्ती । हे साच होय प्रतीती ।
रुपेयाची भ्रांती । जाऊनियां ॥११३९॥

तैसी वेगळी वेगळेपणें । प्रकृति जे अंतःकरणें ।
देखती ते मी म्हणें । ब्रह्म होतीं ॥११४०॥

महाभूतांच्या आश्रयाने विभागलेला जीव जेव्हा त्यांच्या आटणीने शिवरूप होतो तेव्हा त्याला जी स्थिती प्राप्त होते किंवा महाभूतांची जवनिका फिटल्याने साधक ज्या स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या अनिर्वचनीय स्थितीपर्यंत पोहोचतो त्याचे जे वर्णन श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी केले आहे त्याचेच सूत्ररूपाने वर्णन करताना ब्रह्मसूत्रकारांनी असे म्हटले आहे की–

अविभागेन दृष्टत्वात् ।।४.४.४।।
चितितन्मात्रेण तदात्मकत्वादित्यौडुलोमिः ।।४.४.६।।

मुक्त जीव हा ब्रह्माशी अविभक्त असा राहतो; कारण श्रुतीमध्ये तसे दृष्टीस पडते. जीव हा केवल चैतन्यस्वरूपाने व्यक्त होतो; कारण ते चैतन्य त्याचा आत्मा आहे असे औडुलोमी म्हणतो. या सूत्रांवर भाष्य करताना श्रीमदाद्यशंकराचार्यांनी असे म्हटले आहे की, "आता उत्कृष्ट ज्योतीशी ऐक्य पावून जो जीव स्वरूपाने व्यक्त होतो तो परमात्म्यापासून विभक्तच राहतो किंवा परमात्म्याशी अविभक्त असाच राहतो असा विचार प्राप्त होतो. येथे कोणास असे वाटेल की, "तो तेथे संचार करतो' (छां.८–१२–३) या श्रुतीमध्ये आश्रय आणि आश्रित यांचा निर्देश केला असल्यामुळे व 'ज्योतीशी ऐक्य पावून' (छां.८-१२-३) या श्रुतीमध्ये कर्ता आणि कर्म यांचा निर्देश केला असल्यामुळे जीव हा परमात्म्यापासून विभक्त राहतो. म्हणून सूत्रकार त्याला बोध करतात तो असा-जीव हा मुक्त होऊन परमात्म्याशी अविभक्त असाच राहतो. कशावरून? श्रुतीमध्ये तसे दृष्टीस पडते यावरून.उदाहरणार्थ 'ते तू आहेस'(छां.६-८-७); 'मी ब्रह्म आहे'(बृ. १-४-१०); 'जेथे तो दुसरे काही पाहत नाही' (छां.७-२४-१); 'तेथे दुसरे काही नाही की जे तो त्या परमात्म्याहून निराळे आणि विभक्त असे पाहील' (बृ.४-३-२३) इत्यादि श्रुती परमात्मा अविभक्त आहे असेच दाखवितात. आता जसे ज्ञान असते तसेच फल प्राप्त होते असे 'तो त्या ब्रह्माचा संकल्प करतो (म्हणून त्याला ब्रह्मलोक प्राप्त होतो)' या न्यायाला अनुसरून मानणे रास्त आहे. 'ज्याप्रमाणे हे गौतमा! शुद्ध उदक शुद्ध उदकामध्ये मिसळले असता तसेच होते, त्याप्रमाणे ज्ञानी अशा मुनीचा आत्माही तसाच होतो'(क.४-१५) इत्यादि ज्या श्रुतींचा मुक्त (आत्म्या) च्या स्वरूपाचे प्रतिपादन करण्याचा उद्देश आहे त्या देखील (जीव आणि परमात्मा यांचे) ऐक्यच दाखवितात. तसेच नदी, समुद्र वगैरे दृष्टांतांवरूनही हीच गोष्ट समजते.

जरी पापरहितत्व वगैरे धर्म भिन्नभिन्न रूपानेच श्रुतीने सांगितले आहेत; तरी ते, शब्दांवरून ज्या कल्पना मनात येतात, त्यांपासून उत्पन्न झालेले असेच आहेत. कारण त्यांपासून पाप वगैरेंची निवृत्ती मात्र प्रतीत होते. परंतु चैतन्य हेच या आत्म्याचे स्वरूप होय; म्हणून याच स्वरूपाने (जीव हा) व्यक्त होतो असे मानणे रास्त आहे. या गोष्टीला पुढील श्रुती अनुकूल होते. 'अगे ! अशा रीतीने या आत्म्याला खराखर आत नाही, बाहेर नाही, तो सर्व ज्ञानाने भरलेला असाच आहे.' (बृ. ४-५-१३) आता, 'ज्याचे काम सत्य आहेत' अशा रीतीने सत्यकामतत्व वगैरे धर्म जरी वस्तूचे स्वरूप याच रूपाने सांगतिले आहेत; तरी ते उपाधीच्या संबंधावर अवलंबून असल्यामुळे ते चैतन्याप्रमाणे ब्रह्माचे स्वरूप होऊ शकत नाहीत. कारण ब्रह्मसंबंधाने अनेक आकारांचा निषेध केला आहे; (म्हणजे) 'ब्रह्माला अनेक आकार आहेत' या गोष्टीचा अ-३ पा. २ सू. ११ यामध्ये निषेध केला आहे. एकंदरीत जीव हा ज्यापासून सकल द्वैत निरस्त झाले आहे, जे प्रसन्न आहे आणि जे कोणत्याही शब्दाने सांगता येत नाही, अशा चैतन्य स्वरूपाने व्यक्त होतो असे औडुलोमी आचार्यांचे मत आहे."

अशा प्रकारे महाभूतांची जवनिका फाटून जाऊन ज्याच्या ठिकाणी ब्रह्मतत्त्व प्रस्फुटित झालेले दिसते त्या सिद्ध महापुरुषाचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

प्रवर्तलाही वेगीं बहुडे । देह सांडूनि मागलीकडे ।
महाभूतांचिया चढे । माथयावरी ॥१०.७३॥
तेथ राहोनि ठायठिके । स्वप्रकाशें चोखे ।
अजत्व माझें देखे । आपुलिया डोळां ॥७४॥
मी आदीसि परु । सकळलोकमहेश्वरु ।
ऐसिया मातें नरु । यापरी जाणें ॥७५॥
तो पाषाणामाजीं परिसु । जैसा रसाआंतु सिद्धरसु ।
तैसा मनुष्याआंतु तो अंशु । माझाचि जाण ॥७६॥
तें चालतें ज्ञानाचें बिंब । तयाचे अवयव हे सुखाचे कोंभ ।
येर माणुसपण तें भांब । लौकिक भागु ॥७७॥
अगा अवचिता कापुरा—। माजीं सांपडला हिरा ।
वरी पडिलिया नीरा । न निगे केवीं ॥७८॥
तैसा मनुष्यलोकाआंतु । तो जरीं जाहला प्राकृतु ।
तऱ्हीं प्रकृतिदोषाची मातु । नेणेंचि कीं ॥७९॥
तो आपसयेंचि सांडिजे पापीं । जैसा जळत चंदनु सर्पीं ।
तेवीं मातें जाणें तो संकल्पीं । वर्जूनि घापे ॥८०॥

हें असो संतापु कैसा । चंद्रु न स्मरे जैसा ।
भूतीं भेदु नेणती तैसा । ज्ञानिये ते ॥५.९२॥

सारांश, सिद्धयोगाचा साधक हा महाभूतांची जवनिका वितळून गेल्यावर पदपिंड ऐक्याने महासिद्ध होत असल्याची ग्वाही दिल्यावर त्याची ही स्थिती द्वैताद्वैत किंवा पिंडापिंड विवर्जित आहे हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

आतां तुजें हन होतें । कीं एकचि हें आइतें ।
ऐशिये विवंचनपुरतें । उरेचिना ॥६.३०९॥

**जन्ममरणाची निमे कथा:–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "आणि आकाराचेनि जालेपणें । जन्मधर्मतिं नेणं । आकारलोपीं निमणें । नाहीं कहीं ॥८.१८॥ ऐशिया आपुलियाची सहज स्थिती । जया ब्रह्माची नित्यता असती । तया नाम सुभद्रापती । अध्यात्म गा ॥१९॥" असे म्हणून ब्रह्माची व्याख्या केली आहे. हे अक्षर ब्रह्म जन्ममरणाच्या फेऱ्यापासून दूर असल्याने याची प्राप्ती झाली की, सिद्धयोग साधकाचीही जन्ममरणाची कथा संपून जाते हे अगदी उघड आहे. हे सत्य सूचित करून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी सिद्धयोग साधनशास्त्ररूप दुर्लभ रत्नाच्या फलनिष्पत्तीचा अकरावा पैलू किंवा निकष स्पष्ट केला आहे. "तियापरी यियें अपारें । होत जात जन्मांतरें । परी त्रिगुणत्व न व्यभिचारें। प्राणियांचें ॥१७.६०॥" अशी जीवाची वास्तविक स्थिती असल्याने "आजन्ममराणांतीं । देहधर्मीं समस्तीं । ममत्वाची सूती । घे ना जंव ॥१४.१४६॥" हे त्याला वारंवार भोगावे लागते. यातून सुटण्याची इच्छा करणारा साधक ही जन्ममरण-परंपरा कसा ओलांडून जातो हे व या अवस्थेची तात्त्विक बाजू स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

एऱ्हवीं तरी पार्था । जन्ममरणाची निमे कथा ।
ऐसिया प्रयत्नातें आस्था । विये जयांची ॥७.१७५॥

तयां तो प्रयत्नुचि एके वेळे । मग समग्र परब्रह्में फळे ।
जया पिकलेया रसु गळे । पूर्णतेचा ॥१७६॥

ते वेळी कृतकृत्यता जग भरे । तेथ अध्यात्माचें नवलपण पुरे ।
कर्माचें काम सरे । विरमे मन ॥१७७॥

तरी आतां देह असो अथवा जावो । आम्ही तों केवळ वस्तूचि आहों ।
कां जे दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनी ॥८.२४८॥

मज तरंगपण असे कीं नसे । ऐसें हें उदकासीं कहीं प्रतिभासे ? ।
तें भलतेव्हां जैसे तैसें । उदकचि कीं ॥२४९॥

तरंगाकारें न जन्मेचि । ना तरंगलोपें न निमेचि ।
तेंवि देहीं जे देहेंचि । वस्तु जाहले ॥२५०॥

आतां शरीराचें तयाचिया ठाईं । आडनांवही उरले नाहीं ।
तरी कोणें काळें काई । निमे तें पाहें पां ॥२५१॥

मग मार्गातें कासया शोधावें ? । कोणें कोठूनि कें जावें ?।
जरी देशकालादि आघवें । आपणचि असे ॥२५२॥

जयाचें आकाराविण असणें । जया जन्म ना निमणें ।
जें आघवेंचि आघवेंपणें । देखत असे ॥८.८६॥

जें गगनाहूनि जुनें । परमाणुहूनि सानें ।
जयाचेनि सन्निधानें । विश्व चळे ॥८७॥

जें सर्वांते यया विये । विश्व सर्व जेणें जिये ।
हेतु जया बिहे । अचिंत्य जें ॥८८॥

देखे बोळंबा इंगळु न चरे । तेजीं तिमिर न शिरे ।
जे दिहाचे अंधारें । चर्मचक्षूसीं ॥८९॥

सुसडा सूर्यकणांच्या राशी । जो नित्य उदो ज्ञानियांसी ।
अस्तमानाचे जयासी । आडनांव नाहीं ॥९०॥

आणि धर्माचें निजधाम । तेवींचीं उत्तमाचें उत्तम ।
पैं जया येतां नाहीं काम । जन्मांतराचें ॥९.४८॥
ते उगाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिले मरण जन्म ।
जन्मासवें श्रम । वरचिलही गेले ॥९.४०४॥
जयाची गोठीचि ऐकतखेंवो । आघवा संसारु होय वावो ।
बळिया नित्यता लागे येवों । आपणपेंया ॥१०.१९७॥
जन्ममृत्यूची भाख । हारपोनी जाय निःशेख ।
आंत बाहेरीं महासुख । वाढोंचि लागे ॥१९८॥.

जन्ममृत्यूची कथा संपल्यावर जीव शिवच होतो हे स्पष्ट करताना "योग-शिखोपानिषदात" असे म्हटले आहे की–

कामक्रोधभयं चापि मोहलोभमथो रजः ।
जन्ममृत्युश्च कार्पण्यं शोकस्तंद्रा क्षुधा तृषा ॥१.१०॥

तृष्णा लज्जा भयं दुःखं विषादो हर्ष एव च ।
एभिर्दोषैर्विनिर्मुक्तः स जीवः शिव उच्यते ॥११॥

काम, क्रोध, भय, मोह, लोभ, रज, जन्म, मृत्यू, दैन्य, शोक, आळस, भूक, तहान, आशा, लज्जा, दुःख, खेद, आनंद इत्यादि सर्व भावविकारांपासून किंवा

दोषांपासून जीव जेव्हा मुक्त होतो तेव्हा त्याचा संकुचितपणा आपोआप दूर होऊन तो आपल्या मूळ शिवस्वरूपाला प्राप्त होतो.

अशा प्रकारे शिवस्वरूप झालेल्या सिद्धपुरुषाचे किंवा तत्त्वस्वरूप झालेल्या महापुरुषाचे चित्र रेखाटताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

**मग मीचि डोळां देखिला । जिहीं कानीं मीचि ऐकिला ।**
**मीचि मनीं भाविला । वानिला वाचा ।।९ ३५९।।**
**सर्वांगीं सर्वांठायीं । मीचि नमस्कारिला जिहीं ।**
**दानपुण्यादिकें जें कांहीं । तें माझीयाचि मोहरां ।।३६०।।**
**जिहीं मातेंचि अध्ययन केले । जे आंतबाहेरि मियांचि धाले ।**
**जयांचे जीवित्व जोडलें । मजचिलागीं ।।३६१।।**
**जे अहंकारु वाहत आंगीं । आम्ही हरीचे भुषावयालागीं ।**
**जे लोभिये एकचि जगीं । माझेनि लोभें ।।३६२।।**
**जे माझेनि कामें सकाम । जे माझेनि प्रेमें सप्रेम ।**
**जे माझिया भुली सभ्रम । नेणती लोक ।।३६३।।**
**जयांचीं जाणती मजचि शास्त्रें । मी जोडें जयांचेनि मंत्रें ।**
**ऐसें जे चेष्टामात्रें ! । भजले मज ।।३६४।।**
**ते मरणा ऐलीचकडे । मज मिळोनि गेले फुडे ।**
**मग मरणीं आणिकीकडे । जातील केवीं ? ।।३६५।।**
**नातरी केळवली नोवरी । का संन्यासी जियापरी ।**
**तैसा न मरतां जो करी । मृत्युसूचना ।।१३.५५२।।**
**पैं गा जो ययापरी । जन्मेंचि जन्म निवारी ।**
**मरणें मृत्यु मारी । आपण उरे ।।५५३।।**
**म्हणौनि जन्मक्षयां–। अतीत ते धनंजया ।**
**मी जालें ज्ञाना इया । अनुसरोनी ।।१४.५९।।**
**मग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें ।**
**जन्ममृत्यूचीं निमाळें । निस्तरें रानें ।।१६.४४१।।**

सारांश, सिद्धयोग साधनाने जन्ममृत्यूची कथा निमत असली; तरी ही द्वैत-वर्जित व अद्वैतविरहित अशी स्थिती मूळचीच होती, हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर-महाराज असे म्हणतात की–

**आणि हां गा घटु जे वेळीं फुटे । ते वेळीं तेंथिचें आकाश लागे नीट वाटे ।**
**वाटा लागे तरी गगना भेटे । एऱ्हवीं चुके ? ८.२५३।।**
**पाहें पां ऐसें हन आहे । कीं तो आकारुचि जाये ।**
**येर गगन तें गगनींचि आहे । घटत्वाही आधीं ।।२५४।।**

ऐसिया बोधाचेनि सुरवाडें । मार्गामार्गाचे सांकडें ।
तया सोऽहंसिद्धां न पडे । योगियांसी ॥२५५॥
तो कल्पादि जन्मा नागवे । कल्पांतीं मरणें नाप्लवें ।
माजीं स्वर्गसंसाराचेनि लाघवें । झकवेना ॥२५८॥

## अविद्येचा नाशः–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी “ जे यजनशील अहर्निशीं । जिहीं अविद्या हविली मनेंसीं । गुरुवाक्य हुताशीं । हवन केलें ॥ ४.१२३ ॥ जे गीता येणें नांवें नावाणिगी । जे अविद्या जिणोनि दाटुगी । ते कीर्ती तुझी आम्हांजोगी । वानावया जाली ॥१६.३५॥” असे म्हणून सिद्धयोग साधनरूप गीताशास्त्राची अविद्येच्या नाशाची फलनिष्पत्ती कथन करून या अंतिम तत्त्वरूपी हिऱ्याचा बारावा पैलू किंवा निकष प्रकट केला आहे. अविद्या, अज्ञान, अहंकार, कल्पना इत्यादि सर्व शब्द पर्यायवाची असून या अवस्थेत या सर्वांचा नाश अभिप्रेत आहे. सद्‌गुरूंच्या कृपेने जेव्हा शक्ती जागृत होऊन आज्ञाचक्राच्या वर स्थिरता धारण करू लागते त्यावेळी मन, प्राण व बिंदू हे विलिन होत जातात. जसजसे यांचे जडत्व कमी होत जाते तसतसे उपरोक्त गोष्टींचे विलिनीकरण होत जाऊन साधकाच्या ठिकाणी अंतिम अवस्था प्रकट होते. याचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

ऐसी श्रीमुखौनि अक्षरें । निघती ना जंव एकसरें ।
तंव अविद्येचे आंधारें । जावोंचि लागे ॥११.१७७॥

जया ज्ञानाची रिगवणी । अविद्ये उणें आणी ।
जीवा आत्मया बुझावणी । मांडूनि दे ॥१३.१६८॥

जो प्रकाश्येंवीण प्रकाशु । जो ईशितव्येंवीण ईशु ।
आपणेंनीचि अवकाशु । वसवीत असे जो ॥१५.५४६॥

जो नादें ऐकिजता नादु । स्वादें चाखिजता स्वादु ।
जो भोगिजतसे आनंदु । आनंदेंचि ॥५४७॥

जो पूर्णतेचा परिणामु । पुरुषु गा पुरुषोत्तमु ।
विश्रांतीचाही विश्रामु । विराला जेथें ॥५४८॥

सुखासि सुख जोडिलें । जें तेज तेजासि सांपडलें ।
शून्यही बुडालें । महाशून्यीं जिये ॥५४९॥

जो विकासाहीवरी उरता । ग्रासातेंही ग्रासूनि पुरता ।
जो बहुतें पाडें बहुतां–। पासूनि बहु ॥५५०॥

पैं नेणतयाप्रती । रुपेपणाती प्रतीती ।
रूपें न होनि शुक्ती । दावी जेवीं ॥५५१॥

कां नाना अलंकारदशे । सोनें न लपत लपालें असे ।
विश्व न होनियां तैसें । विश्व जो धरी ॥५५२॥
हें असो जलतरंगा । नाहीं सिनानेपण जेवीं गा ।
तेवीं दिसता प्रकाशु जगा । आपणचि जो ॥५५३॥
आपलिया संकोचविकाशा । आपणचि रूप वीरेशा ।
हा जळीं चंद्र हून जैसा । समग्र गा ॥५५४॥
तैसा विश्वपणें कांहीं होये । विश्वलोपी कहीं न जाये ।
जैसा रात्रीं दिवसें नोहे । द्विधा रवि ॥५५५॥
तैसा कांहींचि कोणीकडे । कायिसेनिहि वेंचीं न पडे ।
जयाचें सांगडे । जयासीचि ॥५५६॥
परी हें असो ऐसिया । मज पुरुषोत्तमातें धनंजया ।
जाणे जो पाहलेया । ज्ञानमित्रें ॥५५९॥

अविद्येचा नाश हा परम पुरुषार्थ असल्यामुळे महर्षी कपिलांनी " सांख्य-दर्शनातील " अंतिम सूत्रात हे तत्त्व स्पष्ट करताना असे म्हटले आहे की–

यद्वा तद्वा तदुच्छित्तिः पुरुषार्थस्तदुच्छित्तिः पुरुषार्थः ॥६.७०॥

कोणत्याही प्रकारे किंवा निमित्ताने का होईना त्या अविद्येचा उच्छेद होणें ह्याच परम पुरुषार्थ आहे. अशा प्रकारे परम पुरुषार्थाची प्राप्ती झालेला सिद्धयोगी कसा असतो हे सांगताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

सूर्योदयासरिसी । रात्री पळोनि जाय अपैसी ।
गेली देहअहंता तैसी । अविद्येसवें ॥१५.२९०॥
तेणें ज्ञानानळीं प्रदीप्तीं । मूळ अविद्येचिया आहुती ।
तोषविला होय सुमती । परमात्मा मी ॥१८.१५२६॥
तें हें आघवेंचि मी द्रष्टा । ऐसिया बोधाचा माजिवटा ।
अनुभवाचा सुभटा । धेंडा तो नाचे ॥११८७॥
रज्जु जालिया गोचरु । आभासतां तो व्याळाकारु ।
रज्जुचि ऐसा निर्धारु । होय जेवीं ॥११८८॥
भांगारापरतें कांहीं । लेणें गुंजहीभरी नाहीं ।
हें आटुनियां ठायीं । कीजे जैसे ॥११८९॥
उदका येकापरतें । तरंग नाहींचि हें निरुतें ।
जाणोनि तया आकारातें । न घेपे जेवीं ॥११९०॥
नातरी स्वप्नविकारां समस्तां । चेऊनियां उमाणें घेतां ।
तो आपणयापरौता । न दिसे जैसा ॥११९१॥
तैसें जें कांहीं आथी नाथी । येणें होय ज्ञेयस्फूर्ती ।
तें ज्ञाताची मी हे प्रतीती । होऊनि भोगी ॥११९२॥

सारांश, अशी ही अविद्येच्या नाशाने प्राप्त होणारी स्थिती असून ती विद्या-अविद्या, ज्ञान-अज्ञान व द्वैत-अद्वैत विवर्जित अशी अवस्था आहे हे स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

तेवीं समूळ अविद्या खाये । तें ज्ञानही जैं बुडोनि जाये ।
तऱ्ही नाहीं कीर नोहे । आणि न साहे असणेंही ॥१५.४४०॥
तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया ।
जैसा वन्हि काष्ठ जाळूनियां । स्वयें जळे ॥५२७॥
तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपण वस्तु देऊनि गेलें ।
ऐसें जाणणेंनिवीण उरलें । जाणतें जें ॥५२८॥
तें तो गा उत्तम पुरुषु । जो तृतीय कां निष्कर्षु ।
दोहींहून आणिकु । मागिला जो ॥५२९॥
सुषुप्तीं आणि स्वप्ना –। पासूनि बहुवे अर्जुना ।
जागणें जैसे आना । बोधाचेंचि ॥५३०॥
कां रश्मी हन मृगजळा–। पासूनि अर्कमंडळा ।
अफाटु तेवीं वेगळा । उत्तमु गा ॥५३१॥
हें ना काष्ठींचा काष्ठाहूनी । अनारिसा जैसा वन्ही ।
तैसा क्षराक्षरापासुनी । आनचि तो ॥५३२॥
पैं ग्रासूनि आपली मर्यादा । एक करीत नदीनदां ।
उठी कल्पांतीं उदावादा । एकार्णवाचा ॥५३३॥
तैसें स्वप्न ना सुषुप्ती । ना जागराची गोठी आथी ।
जैसी गिळिली दिवोराती । प्रळयतेजें ॥५३४॥
मग एकपण ना दुजें । असे नाहीं हें नेणिजे ।
अनुभवु निर्बुजे । बुडाला जेथें ॥५३५॥
ऐसें आथि जें कांहीं । तें तो उत्तम पुरुषु पाहीं ।
जें परमात्मा इहीं । बोलिजे नामीं ॥५३६॥

## स्वानंदसाम्राज्याची प्राप्ती:–

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "ऐसी गीता धनंजया । ऐकतया आणि पढतया । फळे महानंदें मियां । बहु काय बोलों ॥१८.१५३८॥" असे म्हणून गीताशास्त्ररूप सिद्धयोग साधनाच्या ऐकण्याचे व वाचण्याचे फळही अंतिम महानंदाची प्राप्ती हे आहे, असे सांगून या साधनशास्त्राच्या फलनिष्पत्तिरूपी स्वानंदसाम्राज्ययुक्त महारत्नाचा तेरावा पैलू किंवा निकष प्रकट केला आहे. या साधनाने हे फल निश्चित प्राप्त होत असल्याने "येवढा जिये सांकडां । कैसा अनुग्रहो पैं गाढा । जे ब्रह्मानंदु उघडा । भोगवीतसे ॥१८.१५८४॥" असा सिद्धांतच श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी मांडला

आहे. ही फलनिष्पत्ती सर्वांना प्राप्त व्हावी म्हणून " कैसा विश्वाचिया कृपा। करूनि महानंद सोपा। अर्जुनव्याजें रूपा। आणिला देवें ॥ १८.१६८७॥ या निमित्ताने हे सिद्धयोगशास्त्र भगवंतांनी प्रकट केले आहे असे सांगून " हे स्वानंदभोगाची सेल। भलतयासीचि देईल ॥१८.१७४८॥"अशी या शास्त्राच्या फलनिष्पत्तीची थोरवी गाइली आहे. गीताशास्त्ररूपी सिद्धयोग साधनशास्त्रामुळे या अपूर्व फलनिष्पत्तीची उपस्थिती होत असल्यामुळेच " म्हणौनि मनें कायें वाचा। जो सेवकु होईल इयेचा। तो स्वानंदसाम्राज्याचा। चक्रवर्ती करी ॥ १८.१६६८॥" अशी ग्वाही देऊन हे स्वानंदसाम्राज्याचे अंतिम तत्त्व काय आहे हे जागोजाग स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्ववमहाराजांनी असे म्हटले आहे की—

जरी वेदाध्ययनाचें जालें। अथवा यज्ञाचें शेतचि पिकलें।
कीं तपोदानांचे जोडलें। सर्वस्व हन जें ॥८.२६१॥
तया अग्रघवयाचि पुण्याचा मळा। भारु आंतौनि जया ये फळा।
तें परब्रह्म निर्मळा। सांटि न सरे ॥२६२॥
जें नित्यानंदाचेनि माने। उपमेचा कांटाळा न दिसे सानें।
पाहा पां वेदयज्ञादि साधनें। जया सुखा ॥२६३॥
जें विटे ना सरे। भोगी तयाचेनि पवाडें पुरे।
पुढती महासुखाचें सोयरें। भावंडचि ॥२६४॥
ऐसे दृष्टीचेनि सुखपणें। जयासी अदृष्टाचें बैसणें।
जें शतमखाही आंगवणे। नोहेचि एका ॥२६५॥
तयातें योगीश्वर अलौकिकें। दिठीचेनि हातलुकें।
अनुमानती कौतुकें। तंव हळुवट आवडे ॥२६६॥
जयाचेनि उजाळें। उघडती बुद्धीचे डोळे।
जीवु दोंदावरी लोळे। आनंदाचिया ॥१३.१७४॥
जें जाणितलेयासाठीं। संसार काढूनियां कांठीं।
जिरोनि जाइजे पोटीं। नित्यानंदाच्या ॥८६७॥
भरूनि प्रपंचाचा घोटु। कीजे देखतांचि देखतया द्रष्टु।
आनंदसाम्राज्यीं पाटु। बांधिजे जीवा ॥१६.५०॥
तेव्हां सागरीं गंगा जैसी। आत्मीं मीनल्या बुद्धि तैसी।
अद्वयानंदाची आपैसी। खाणी उघडे ॥१८.७९२॥

सिद्धयोग साधनाने अशा प्रकारे प्राप्त होणारी स्वानंदसाम्राज्याची प्राप्ती हीच जीवन्मुक्ती असल्याने " प्रत्यभिज्ञाहृदयात " श्रीक्षेमराज यांनी असे म्हटले आहे की—

चिदानंदलाभे देहादिषु चेत्यमानेष्वपि चिदैकात्म्यप्रतिपत्तिदार्ढ्यं जीवनमुक्तिः ॥१६॥

चिदानंदाची प्राप्ती झाल्यावर देहादि भासमान होत राहिले; तरी चितिशक्ती कुंडलिनीची आत्म्याशी एकरूपता असल्याची दृढ प्रतीती हीच जीवन्मुक्ती आहे. अशी जीवन्मुक्तीची अवस्था प्राप्त झालेला सिद्धयोगी कसा असतो हे कथन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

पार्था आणीकही परी । तो जाणों येईल अवधारीं ।
जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥२.३५७॥
जऱ्ही सरितावोघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत ।
तऱ्ही अधिक नोहे ईषत् । मर्यादा न संडी ॥३५८॥
ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता ।
परी न्यून नव्हे पार्था । समुद्रु जैसा ॥३५९॥
तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धी । तयासि क्षोभु नाहीं बुद्धी ।
आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ॥३६०॥
सांगैं सूर्याच्या घरीं । प्रकाशु काय वातीवेरी ।
कां न लविजे तरी अंधारी । कोंडेल तो ॥३६१॥
देखैं ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से न करी ।
तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥३६२॥
जो आपुलेनि नागरपणे । इंद्रभुवनातें पाबळें म्हणे ।
तो केवीं रंजे पालिवणें । भिल्लांचेनि ? ॥३६३॥
जो अमृतासी ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी ।
तैसा स्वसुखानुभवी । न भोगीं ऋद्धि ॥३६४॥
ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला ।
तोचि स्थिरप्रज्ञु भला । वोळख तूं ॥३६६॥
ते आनंदाचें अनुकार । सुखाचे अंकुर ।
कीं महाबोधें विहार । केले जैसे ॥५.१३८॥
तें आनंदचित्रींचें लेप । नातरी महासुखाचें रूप ।
कीं संतोषतरूचें रोप । थांवलें जैसें ॥६.२५६॥
जें परिणामा निघाले कोंभ । जें धैर्यमंडपाचे स्तंभ ।
जें आनंदसमुद्रीं कुंभ । चुबकळोनि भरिले ॥९.१९१॥
ते पाहांटेवीण पाहावित । अमृतेंवीण जीववित ।
योगेंवीण दावित । कैवल्य डोळां ॥२०१॥
परी राया रंका पाड धरूं । नेणती सानेयां थोरां कडसणी करूं ।
एकसरें आनंदाचें आवारु । होत जगा ॥२०२॥

तरी सिंधूचेनि माजें । जळचरां भय नुपजे ।
आणि जळचरीं नुबगिजे । समुद्रु जैसा ।।१२.१६५।।
तेवीं उन्मतें जगें । ज़यासी खंती न लगें ।
आणि जयाचेनि आंगें । न शिणे लोकु ।।१६६।।
किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां ।
तैसा नुबगे जीवां । जीवपणें जो ।।१६७।।
जगचि देह जाहलें । म्हणौनि प्रियाप्रिय गेलें ।
हर्षामर्ष ठेलें । दुजेनविण ।।१६८।।
ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु । भयोद्वेगरहितु ।
याहीवरी भक्तु । माझ्या ठायीं ।।१६९।।
तरी तयाचा गा मज मोहो । काय सांगो तो पढियावो ।
हे असो जीवें जीवो । माझेनि तो ।।१७०।।
जो निजानंदें धाला । परिणामु आयुष्या आला ।
पूर्णते जाहला । वल्लभु जो ।।१७१।।
मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिद्धु ।
जो आपणेनसीं भेदु । नेणोनियां जाणे ।।१५.५६३।।
तैसा विश्वस्वप्नेंसीं माया । नीद सांडूनि धनंजया ।
सहसा चेइला अद्वया- । नंदपणें जो ।।१८.४०५।।
हें असो क्रमयोगबोधें । तेणें भक्तिचिद्गांगें ।
मी स्वानंदोदधी वेगें । ठाकिला कीं गा ।।१२२२।।
मग तयाचेनि प्रसादें । सर्वोपशांतिप्रमदे ।
कांतु होऊनियां स्वानंदें । स्वरूपींचि रमसी ।।१३२०।।
तयाचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूतें होडी ।
न जिणावें कां येवढीं । मायबापें असतां ?।।१६४३।।
ते पाषाणही आघवें । चिंतारत्नें कां नोहावें ?।
तिये भूमिके कां न यावें । सुवर्णत्व ? ।।१६६४।।
तयाचिया गावींचिया । नदी अमृतें वाहाविया ।
नवल कायि राया । विचारीं पां ।।१६४५।।
तयाचे बिसाट शब्द । सुखें म्हणों येती वेद ।
सदेह सच्चिदानंद । कां न व्हावें ते ? ।।१६४६।।

सारांश, सिद्धयोग साधनाने प्राप्त होणारी स्वानंदसाम्राज्याची स्थिती व त्या अवस्थेप्रत गेलेल्या साधकाचे वर्णन केल्यावर ही अवस्था द्वैताद्वैतविनिर्मुक्त असल्याचा निर्वाळा देताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की–

नाना लवण तोय होये। मग क्षारता तोयत्वें राहे।
तेही जिरतां जेवीं जाये। जालेपण तें ॥१८.१२०८॥
तैसा मी तो हें जें असे। ते स्वानंदानुभवसमरसें।
कालवूनियां प्रवेशे। मजचिमाजीं ॥१२०९॥
आणि तो हे भाष जेथ जाये। तेथें मी हें कोण्हासी आहे।
ऐसा मी ना तो तिये सामाये। माझ्याचि रूपीं ॥१२१०॥
जेव्हां कापुर जळीं सरे। तयाचि नाम अग्नि पुरे।
मग उभयातीत उरे। आकाश जेवीं ॥१२११॥
कां धाडलिया एका एकु। वाढे तो शून्य विशेखु।
तैसा आहे नाहींचा शेखु। मीचि मग आथी ॥१२१२॥

**भक्तिप्रकाशाची प्राप्ती:–**

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी "जैसा दीपें दीपु लाविजे। तेथ आदील कोण हें नोळखिजे। तैसा सर्वस्वें जो मज भजे। तो मीचि होऊनि ठाके ॥९.४२८॥ मग माझी नित्य शांती। तया दशा तेचि कांती। किंबहुना जिती। माझेनि जीवें ॥४२९॥ एथ पार्था पुढतपुढती। तेंचि तें सांगों किती। जरी मियां चाड तरी भक्ती। न विसंबिजे गा ॥४३०॥" असे म्हणून सिद्धयोग साधन हे भक्तिरूप असून या साधनरूपी महारत्नाच्या अंतिम फलनिष्पत्तीचा भक्तिप्रकाशाची प्राप्ती हा अलौकिक व अपूर्व असा पैलू किंवा निकष असल्याचे स्पष्ट केले आहे. सिद्धयोग साधनरूपाने विराजणारी भक्ती ही साध्यसाधनरूप असल्यामुळेच "तरि झडझडोनि वाहिला निघ। इये भक्तिचिये वाटे लाग। जिया पावसी अव्यंग। निजधाम माझें ॥९.५१६॥" असे भगवंतांनी अर्जुनाला सांगितल्याचे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी स्पष्ट केले आहे. यामुळेच "तैसी क्रिया कीर न साहे। तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे। हे अनुभवाचिजोगें नव्हे। बोलाऐसें ॥१८.११५१॥" असा अमर सिद्धांत त्यांनी मांडला आहे. या सिद्धांताचेच तत्त्व भक्तिप्रकाशाची प्राप्ती हे असून ते स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी असे म्हटले आहे की –

परि तेचि भक्ति ऐसी। पर्जन्याची सुटिका जैसी।
धरावांचूनि अनारिसी। गतीचि नेणें ॥११.६८६॥
कां सकळ जळसंपत्ति। घेऊनि समुद्रातें गिंवसिती।
गंगा जैसी अनन्यगती। मिळालीचि मिळे ॥६८७॥
तैसें सर्वभावसंभारें। न धरत प्रेम एकसरें।
मजमाजीं संचरें। मीचि होऊनि ॥६८८॥

आणि तेवींचि मी ऐसा । थडियें माझारीं सरिसा ।
क्षीराब्धि कां जैसा । क्षीराचाचि ।।६८९।।

तैसें मजलागुनी मुंगीवरी । किंबहुना चराचरीं ।
भजनासि कां दुसरी । परीचि नाहीं ।।६९०।।

तयाचि क्षणासवें । एवंविध मी जाणावें ।
जाणितला तरी स्वभावें । दृष्टही होय ।।६९१।।

हो कां तरंगु लहानु । परी सिंधूसी नाहीं भिन्नु ।
तैसा ईश्वरीं मी आनु । नोहेचि मा ।।१४.३८६।।

एसेनि बा समरसें । दृष्टि जे उल्हासे ।
ते भक्ति पैं ऐसे । आम्ही म्हणों ।।३८७।।

क्षीरसागरा परगुणें । कीजे क्षीरसागरचिपणें ।
अमृतचि होऊनि मिळणें । अमृतीं जेवीं ।।१५.५६६।।

साडेपंधरा मिसळावें । तें साडेपंधरेंचि होआवें ।
तेवीं मी जालिया संभवे । भक्ति माझी ।।५६७।।

हां गा सिंधूसि आनी होती । तरी गंगा कैसेनि मिळती ? ।
म्हणौनि मी न होतां भक्ती–। अन्वयो आहे ? ।।५६८।।

ऐसियालागीं सर्व प्रकारीं । जैसा कल्लोळु अनन्यु सागरीं ।
तैसा मातें अवधारीं । भजिन्नला जो ।।५६९।।

सूर्या आणि प्रभे । एकवंकी जेणें लोभें ।
तो पाडु मानूं लाभे । भजना तया ।।५७०।।

मग तेंही अव्यक्त । बोध वाढतां झिजत ।
पुरलां बोधीं समस्त । बुडोनि जाय ।।१८.११०१।।

जैसी भोजनाच्या व्यापारीं । क्षुधा जिरत जाय अवधारीं ।
मग तृप्तीच्या अवसरीं । नाहींच होय ।।११०२।।

नाना चालीचिया वाढी । वाट होत जाय थोडी ।
मग पातला ठायीं बुडी । देऊनि निमे ।।११०३।।

कां जागृति जंव जंव उद्दीपे । तंव तंव निद्रा हारपे ।
मग जागं.नलिया स्वरूपें । नाहींच होय ।।११०४।।

हें ना आपुलें पूर्णत्व भेटे । जेथ चंद्रासीं वाढी खुंटे ।
तेथ शुक्लपक्षु आटे । निःशेषु जैसा ।।११०५।।

तैसा बोध्यजात गिळितु । बोधु बोधें ये मज आंतु ।
निसळला तेथ साद्यंतु । अबोधु गेला ।।११०६।।

तेव्हां कल्पांताचिये वेळे । नदी सिंधूचें पेंडवळें ।
मोडूनि भरलें जळें । आब्रह्म जैसें ॥११०७॥

नाना गेलिया घट मठ । आकाश ठाके एकवट ।
कां जळोनि काष्ठें काष्ठ । वन्हीचि होय ॥११०८॥

नातरी लेणियांचे ठसे । आटोंनि गेलिया मुसे ।
नामरूपभेदें जैसें । सांडिजे सोनें ॥११०९॥

हेंही असो चेइलया । तें स्वप्न नाहीं जालिया ।
मग आपणचि आपणयां । उरिजे जैसें ॥१११०॥

तैसा मी एकवांचूनि कांहीं । तया तयाहीसकट नाहीं ।
हे चौथी भक्ती पाहीं । माझी तो लाहे ॥११११॥

ही जी चौथी भक्ती आहे, ती प्रकाशयुक्त अर्थात् अत्यंत प्रेमस्वरूप असल्याने, तीच मोक्षस्वरूप असल्याचे सांगताना महर्षी नारदांनी आपल्या "भक्तिसूत्रात" असे म्हटले आहे की –

सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा ॥२॥
अमृतस्वरूपाच ॥३॥
यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति ॥४॥
यत्प्राप्य न किंचिद्वांछति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति ॥५॥
यज्ज्ञात्वा मत्तो भवति स्तब्धो भवति आत्मारामो भवति ॥६॥

भक्ती ही परमात्म्याविषयी अत्यंत प्रेमरूप आहे. ती पराभक्ती अमृत म्हणजे मोक्षस्वरूपही आहे. ही अमृतस्वरूप भक्ती अर्थात् मोक्ष मिळाल्यावर साधक सिद्ध म्हणजे कृतकृत्य होतो, अमर होतो व तृप्त होतो. हे अमृत अर्थात् पराभक्तिरूप मोक्ष प्राप्त करून घेतल्यावर साधक कशाचीही किंचित्सुद्धा इच्छा करीत नाही, कोणत्याही गोष्टीविषयी शोक करीत नाही, कोणाचाही द्वेष करीत नाही, कोणत्याही गोष्टीत रममाण होत नाही व कोणत्याही कर्माचा उत्साह त्याला नसतो. पराभक्तीचे स्वरूप अनुभविल्याने असा भक्त त्या भक्तिप्रेमाने धुंद होऊन जातो, शांत होतो व आत्मस्वरूपात रममाण होतो. अशा प्रकारे आत्मस्वरूपात किंवा भक्तिप्रकाशात रममाण होणारा सिद्धपुरुष कसा असतो याचे चित्र प्रस्तुत करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की –

जे तनू वाचा चित्तें । नाइकती दुजियें गोष्टीतें ।
तयां एकनिष्ठेचें पिकतें । सुक्षेत्र जें ॥८.१९२॥

हें त्रैलोक्यचि पुरुषोत्तमु । ऐसा साच ज़याचा मनोधर्मु ।
तया आस्तिकाचा आश्रमु । पांडवा गा ॥१९३॥

जें निगर्वाचें गौरव । जें निर्गुणाची जाणिव ।
जें सुखाची राणिव । निराशांसी ॥१९४॥

जें संतोषियां वाढिलें ताट । जें अचिंता अनाथांचें मायपोट ।
भक्तीसी उजू वाट । जया गांवा ॥१९५॥

हे एकैक सांगोनि वायां । काय फार करूं धनंजया ।
पैं गेलिया जया ठाया । तो ठावोचि होईजे ॥१९६॥

जया भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्यातें परौतें सर म्हणती ।
जयांजिये लीलेमाजीं नीति । जियाली दिसे ॥९.१९२॥

जे आघवांचि करणीं । लेइले शांतीचीं लेणीं ।
जयांचें चित्त गवसणी । व्यापका मज ॥१९३॥

ऐसें जे महानुभाव । दैवियें प्रकृतीचें दैव ।
जे जाणोनियां सर्व । स्वरूप माझें ॥१९४॥

मग वाढतेनि प्रेमें । मातें भजती जे महात्मे ।
परि दुजेपण मनोधर्में । शिवतलें नाहीं ॥१९५॥

ऐसें मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा ।
परि नवलावो तो सांगावा । असे आइक ॥१९६॥

तरी दोन्ही पालववेरी । जैसा एक तंतू अंबरीं ।
तैसा मी वांचूनि चराचरीं । जाणती ना ॥९.२२०॥

आदि ब्रह्मा करूनी । शेवटीं मशक धरूनी ।
माजीं समस्त हे जाणोनि । स्वरूप माझें ॥२२१॥

मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती ।
देखिलिये वस्तु उजू लुंटिती । मीचि म्हणौनि ॥२२२॥
आपुलें उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे ।
एकसरें व्यक्तिमात्राचेनि नांवें । नमूंचि आवडे ॥२२३॥
जैसें उंचीं उदक पडिलें । ते तळवटवरी ये उगेलें ।
तैसें नमिजे भूतजात देखिलें । ऐसा स्वभावोचि तयांचा ॥२२४॥
कां फळलिया तरूची शाखा । सहजें भूमीसी उतरे देखा ।
तैसें जीवमात्रां अशेखां । खालावती ते ॥२२५॥
अखंड अगर्वता होऊनि असती । तयांची विनय हेचि संपत्ती ।
जे जय जय मंत्रें अर्पिती । माझ्याचि ठायीं ॥२२६॥
नमितां मानापमान गळाले । म्हणौनि अवचितां मीचि जहाले ।
ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥२२७॥

हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥१२.२१३॥

मग याहीवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था ।
तरी तयातें मी माथा । मुकुट करीं ॥२१४॥

जैसें कनकेंसीं कांकणें । असिजे अनन्यपणें ।
तो भक्तियोगें येणें । मजसीं तैसा ॥१८.११८२॥

इया अनन्यसिद्धा भक्ती । या आघवाचि दृश्यजातीं ।
मज आपणपेंया सुमती । द्रष्टयातें जाण ॥११८५॥

ऐसें आत्मत्वें मज एकातें । इया अद्वयभक्ती जाणोनि निरुतें ।
आणि याही बोधा जाणतें । तेंही मीचि जाणें ॥१२००॥

ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्लासे ।
तिया भजन समरसें । सुखिया होय ॥१२४८॥

सारांश, अविद्येचा नाश होऊन ज्ञाननिष्ठेने जी सामरस्यात्मक अद्वितीय अवस्था साधकाला प्राप्त होते ती "द्वैतं वाद्वैतरूपं द्वयत उत परं योगिनां शंकरं वा" अशी श्रीजालंधरनाथ यांनी "सिद्धांतवाक्य पदावलीमध्ये" सांगितलेली व श्रीज्ञानेश्वरमहाराजांना परंपरेने प्राप्त झालेली अनन्यसिद्ध अशा प्रकारची द्वैताद्वैतविर्वाजित अवस्था असून या अवस्थेतच तो सिद्ध झालेला साधकयोगी भक्तिप्रकाशात न्हाऊन निघतो व "जयाचेनि उजाळें। उघडती बुद्धीचे डोळे। जीवु दोंदावरी लोळे । आनंदचिया ॥१३.१७४॥" हे घडून येते. द्वैताद्वैतविर्विजित अवस्थेतील ही दृश्यपथातीत भक्ती म्हणजे सिद्धयोग साधनेचे सर्वोच्च फल असून त्यापलीकडे आणखी कोणतीही अवस्था नाही. या परमोच्च अवस्थेचे वर्णन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की—

तैसा मी एकवांचूनि कांहीं । तया तयाहीसकट नाहीं ।
हे चौथी भक्ती पाहीं । माझी तो लाहे ॥१८.११११॥

येर आर्तु जिज्ञासु अर्थार्थी । हे भजती जिये पंथीं ।
ते तिन्ही पावोनि चौथी । म्हणिपत आहे ॥१११२॥

एऱ्हवीं तिजी ना चौथी । हे पहिली ना सरती ।
पैं माझिये सहजस्थिती । भक्ति नाम ॥१११३॥

जे नेणणें माझें प्रकाशूनि । अन्यथात्वें मातें दाऊनि ।
सर्वंही सर्वीं भजौनि । बुझावीतसे जे ॥१११४॥

जो जेथ जैसें पाहों बैसे । तया तेथ तैसेंचि असें ।
हें उजियेडें कां दिसे । अखंडें जेंवीं ॥१११५॥

स्वप्नाचें दिसणें न दिसणें। जैसें आपलेनि असलेपणें।
विश्वाचें आहे नाहीं जेणें। प्रकाशें तैसें ॥१११६॥

ऐसा हा सहज माझा। प्रकाशु जो कपिध्वजा।
तो भक्ती या वोजा। बोलिजे गा १११७॥

येथपर्यंत आपण ज्ञानेश्वरीतील सिद्धयोगाच्या फलनिष्पत्तीचा सांगोपांग विचार केला. सिद्धयोग साधनाने प्राप्त होणारी अंतिम अवस्था ही एखाद्या महारत्नासारखी सुंदर असून या दिव्य रत्नाचा परिचय श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्याच्या सर्व पैलूंसह भिन्नभिन्न शब्दांतून कसा प्रकट केला आहे याचे दर्शन येथपर्यंत आपण घेतले. असे असले; तरी या सर्व विवेचनाचे सूत्र महायोगी श्रीगोरक्षनाथ यांनी "सिद्धसिद्धांतपद्धती" या ग्रंथात म्हटल्याप्रमाणे "अतएव सम्यक् निजविश्रांतिकारकं महायोगिनं सद्‌गुरुं सेवयित्वा सम्यक् साधनानेन परमं पदं सम्पाद्य तस्मिन् निजपिंडे समरसभावं कृत्वाऽत्यन्तं निरुत्थानेन सर्वानंदतत्त्वे निश्चलं स्थातव्यं ततः स्वयमेव महासिद्धो भवतीति सत्यम् ॥ ५.५६ ॥" हेच आहे, हे नितांत सत्य आहे. या परमपदाच्या प्राप्तीसाठी आत्मविश्रांती प्राप्त करून देणाऱ्या महायोगी सद्‌गुरूंची सेवा अत्यंत सावधानतेने करून परमपदाची प्राप्ती केली पाहिजे. अशा प्रकारे व्यापक परमपदात आपल्या स्वतःला समरस करून आत्यंतिक निरुत्थान दशेची प्राप्ती करणे आवश्यक आहे. या रीतीने साधकयोग्याने सर्वानंदतत्त्वात निश्चल भावाने स्थिर राहावे. यामुळे तो साधक स्वतः महासिद्ध होतो व त्याला कोणतेही कर्तव्याकर्तव्य शिल्लक राहत नाही. सारांश, समरसीभाव, समरसीकरण किंवा सामरस्य ही सिद्धयोग साधनाच्या फलनिष्पत्तीची सर्वाधिक महत्त्वाची, मूलभूत व एकमेवाद्वितीय अशी गोष्ट असून आपण आत्तापर्यंत पाहिलेल्या पदपिंडाच्या ऐक्यापासून भक्तिप्रकाशाच्या प्राप्तीपर्यंतच्या सर्व पैलूंना ही समव्याप्त अशी गोष्ट आहे किंबहुना हे सर्व पैलू सामरस्यात सामावून गेलेले आहेत असे म्हणणेच योग्य ठरेल. श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या शब्दातच फलनिष्पत्तीचे सार पाहवयाचे झाले; तर असे म्हणता येईल की—

पैं सरितेचेनि ओघें। सिंधुजळा मीनलें घोघें।
तें काय वर्तत आहे मागें। म्हणौनि पाहों येती ?॥८.८४॥

ना तें समुद्रचि होऊनि ठेलें। तैंवि चित्ताचें चैतन्य जाहालें।
जेथ यातायात निमालें। घनानंद जें ॥८५॥

माझे परम सद्‌गुरू महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांच्या असीम कृपाबलाने व माझ्यावरील अपार प्रेमामुळे आत्तापर्यंतचे सर्व विवेचन यथासांग पूर्ण झाले. श्रीसद्‌गुरुनाथमहाराज हे येथपर्यंत वर्णन केलेल्या फलनिष्पत्तीची अर्थात् साध्याची म्हणजेच स्वसंवेद्य आत्मस्वरूपाच्या निराकार तत्त्वाची साकार मर्ती होते. याही-

पेक्षा हे म्हणणे अधिक शोभून दिसेल की, त्यांच्या रूपाने संपूर्ण ज्ञानेश्वरीच साकार झाली होती. ज्या साधकांनी त्यांचे दर्शन घेतले व त्यांना अनुभविले त्यांनी या भूतलावर ज्ञानेश्वरी साकार झालेली पाहिली व अनुभविली असेच म्हणणे योग्य ठरेल. अशा प्रकारे श्रीमद्भगवद्गीतेच्या व तिच्या भावार्थरूप ज्ञानेश्वरीच्या रूपाने समूर्त झालेल्या श्रीसद्गुरुचरणांवर मला मस्तक टेकावयास मिळाले व त्यांनी मला आपले म्हटले यापेक्षा कृतार्थतासंपन्नयुक्त असे कोणते उत्कृष्ट परमभाग्य या भूतलावर असू शकेल ? सद्गुरुचरणांशी समरस होणे हीच श्रीमद्भगवतेद्गीतेची अर्थात् " ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शनाची " अंतिम फलनिष्पत्ती आहे व हेच सिद्धयोग साधनाचे साध्य आहे.

## प्रकरण बारावे

# उपसंहार

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी श्रीमद्भगवद्गीतेचा भावार्थ प्रकट करून ज्ञानेश्वरीच्या रूपाने सिद्धयोगसाधनशास्त्राचे दर्शन कसे घडविले आहे म्हणजे श्रीमद्भगवद्गीता ही "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" या स्वरूपात कशी साकार झाली आहे, हे येथपर्यंत केलेल्या अकरा प्रकरणांमधील सांगोपांग विवेचनावरून निस्संदिग्धरीत्या सिद्ध झाले. याचा अर्थच असा की, "ज्ञानेश्वरीत शक्तिपाताशिवाय एकही शब्द नाही" हा माझे परम सद्गुरू महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांनी प्रतिपादन केलेला महान् सिद्धान्त सिद्ध झाला. हा महान् सिद्धान्त वास्तविकरीत्या सिद्धच आहे; परंतु "परी लोकु वाक्चातुर्यें। होईल सुखिया ।।१८.१७५०।।" या रीतीने ज्ञानेश्वरी साकार झालेली असल्यामुळे काव्याच्या मुलायम आवरणाखाली सिद्ध-योगाचे सर्व रहस्य कित्येक शतके तसेच दडून राहिले. सिद्धयोगसाधनाचे हे सर्व रहस्य शास्त्रीय प्रमाणांच्या द्वारा प्रकट व्हावे, सामान्यजनांपर्यंत ही सिद्धयोगाची पवित्र गंगा वाहत जावी व कळीं गिळितयां जीवाला सहजतेने करता येण्यासारखे सिद्धयोगाचे सोपे साधन या भारतवर्षात अस्तित्वात असून, त्यामुळे कृतार्थसंपन्न जीवनाची प्राप्ती करणे सुलभ आहे हे ज्ञात व्हावे म्हणून "परी साचचि गुरुनाथें। निमित्त करूनि मातें।।" व "तो सर्वोपकारी समर्थु। सद्गुरु श्रीवामननाथु। राहाटत असे मजही आंतु। रिघोनियां ।।" याप्रमाणे हे "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" परम कृपाळू व परम कारुणिक श्रीसद्गुरुनाथमहाराजांनी माझ्याकडून लिहवून घेतले, हे नितांत सत्य आहे.यामुळे "प्रबंधव्याजें जगातें। मार्गदर्शिलें जाणा ।।" हे निश्चित घडून येईल असा विश्वास वाटतो. एरवी "शब्द कैसा घडिजे। प्रमेयीं कैसें पां चढिजें। अळंकारु म्हणिजे। काय तें नेणें ।।१८.१७६८।।" हेच माझ्या बाबतीत सत्य आहे. असे असले; तरी "सायिखडेयाचें बाहुलें। चालवित्या सूत्राचेनि चाले। तैसा मातें दावीत बोले। स्वामी तो माझा ।।१८-१७६९।।" या न्यायाने हा प्रबंध साकार झाला आहे, हे लक्षात घेतले म्हणजे "वांचूनि पढे ना वाची। ना सेवाही जाणें स्वामीची। एशिया मज ग्रंथाची। योग्यता कें असे ? ।।१८·१७६५।।" ही उक्ती माझ्या बाबतीत अगदी सार्थ असल्याची खात्री होईल. सारांश, "ऐसें श्रीवामान-नाथाचें। गौरव आहे जी साचें। ग्रंथु नोहे हें कृपेचें। वैभव तिये ।।" हेच या ग्रंथाचे किंवा प्रबंधाचे यथार्थ स्वरूप आहे, हेच खरे होय.

क्षीरसिंधूच्या परिसरात श्रीत्रिपुरारी शंकरांनी आपल्याशी अवच्छेद्य व

एकरस असलेल्या शक्तीला शिष्यरूपाने उपस्थित करून तिला हे सिद्धयोगाचे किंवा शक्तिपातयोगाचे साधनतत्त्व सांगितले. "ना आदिगुरु शंकरा-। लागोनि शिष्यपरंपरा ॥१८.१७५९॥" व "एक शिष्य एक गुरु । हा रूढला साच व्यवहारु ॥१८.१२२६॥" या न्यायाने हा सिद्धयोग प्रवाहित झाला; कारण सिद्धयोग-साधनाचे हे प्रकटीकरण "तो मत्प्राप्तिप्रकारु । जाणांवया ॥१८.१२२६॥" या न्यायाने जड जीवाला स्वसंवेद्य आत्मरूपाची अंतिम ध्येयसिद्धी; साध्यप्राप्ती किंवा फलनिष्पत्ती व्हावी, यासाठीच आहे. असा साध्यसाधनरूपाने अर्थात् गुरुशिष्यरूपाने प्रवाहित झालेला सिद्धयोग कालौघात महान् शक्तिपातयोगाचार्य प. प. श्रीगंगाधर-तीर्थस्वामीमहाराज यांना प्राप्त झाला. या न्यायानेच हा सिद्धयोग पुढे प. प. श्रीनारायणतीर्थस्वामीमहाराज, प. प. श्रीशंकरपुरुषोत्तमतीर्थस्वामीमहाराज व प. प. श्रीलोकनाथतीर्थस्वामीमहाराज यांना परंपरने प्राप्त होऊन, तोच महायोग माझे परम सद्गुरू महायोगी श्रीगुळवणीमहाराज यांच्या आश्रयाला आला. त्यांनी परंपराप्राप्त अशा या सिद्धयोगाच्या अर्थात् शक्तिपातयोगाच्या अमोघ दीक्षाबलाने भारतवर्षातील शतशत साधकांना हा मुक्त हस्ताने वितरित करून त्यांना कृतार्थसंपन्न जीवनासाठी मार्गस्थ केले. हाच "पंथराज" किंवा "राजपंथ" होय. श्रीगुरुचरणांच्या परम कारुण्याने मलाही या साधनगंगेत स्नान करण्याचे भाग्य प्राप्त झाले. त्याचेच "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" हे दृश्य फल आहे. अशा प्रकारे मला संप्रदाय परंपरेने लाभलेल्या समाधिधनाचेच प्रकटीकरण "एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ॥१८.१७६४॥" या श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीबद्दल सांगितलेल्या न्यायाचेच सूत्र या प्रबंधालाही सर्वथैव लागू आहे, हे निभ्रांत सत्य व उचित आहे. अशा प्रकारे होणाऱ्या सांप्रदायिक योगधनाचे प्रकटीकरण हाच या ग्रंथाचा खरा गौरव आहे.

सारांश, महायोगी श्रीगुळवणीमहाराजांनी सप्रभव संपादिलेले शांभवाद्वयानंद-वैभव "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" या प्रबंधाच्या रूपाने साकार झाले आहे. गुरू, गुरुभक्ती व गुरुशिष्यसंबंध म्हणजे साध्य, साधक व साधना हे त्याचे दृश्य स्वरूप आहे. सद्गुरुकृपाप्राप्त साधनाने अर्थात् जागृत कुंडलिनी शक्तीच्या साहाय्याने सहस्रारात श्रीसद्गुरुचरणरूपी स्वसंवेद्य आत्मस्वरूपयुक्त तत्त्वात विलीन होणे, विरघळून जाणे किंवा समरस होणे हे अंतिम साध्य हाच "ज्ञानेश्वरी : सिद्धयोग दर्शन" या ग्रंथाचा उपसंहार म्हणजे पूर्णता किंवा समाप्ती आहे. ही पूर्णता किंवा साध्यप्राप्ती ज्या पसायदानाने अर्थात् गुरुकृपेने म्हणजे शक्तिपाताने होते, त्या प्रसादाची म्हणजे सिद्धयोग साधनाची व ते देणाऱ्या सद्गुरूंची अखिल मानव जातीस अनवरत प्राप्ती व्हावी म्हणून ज्या यौगिक प्रार्थनेने महायोगी श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी त्यांच्या विश्वात्मक देवाच्या अर्थात् श्रीनिवृत्तिनाथमहाराजांच्या चरणी जी प्रसादप्राप्तिप्रार्थना

सादर केली आहे तीच प्रार्थना मी माझ्या परमप्रेमस्वरूप सद्गुरुनाथांच्या कोमल चरणकमलांपाशी करून, त्यांच्या चरणकमलातील "पाउवा मी होईन ॥१३. ४१७॥" अशा स्थितीत स्थित होतो.

"सिद्धयोग दर्शन" प्राप्तीच्या प्रसादाची मागणी श्रीसद्गुरुनाथचरणकमलांपाशी करताना महायोगी सकलसंतशिरोमणी श्रीज्ञानेश्वरमहाराज असे म्हणतात की–

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥१८.१७९४॥
जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥१७९५॥
दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥१७९६॥
वर्षत सकळमंगळीं । ईश्वर निष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूमंडळीं । भेटतु या भूतां ॥१७९७॥
चलां कल्पतरूंचें अरव । चेतना चिंतामणींचें गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥१७९८॥
चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥१७९९॥
किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुखीं । अखंडित ॥१८००॥
आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें ।
दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥१८०१॥
तेथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया जाला ॥१८०२॥



# संदर्भग्रंथसूची

इंग्रजी:–


1. Aiyar, V.V.S. Kamba Ramayana A study,Bombay,Chaupatty, Bharatiya Vidya Bhavan, First Edition, 1965.
2. Avalon, Arthur. Principles of Tantra, part I and II, Madras 17, Ganesh and Company (Madras), Privite Ltd., Forth Edition,1969. (P.524,619,707,728.)
3. Brunton, Paul. The Hidden Teaching Beyond Yoga, New Delhi 1, 54 Janapath, B.I. Publications, First Indian Edition, 1973. (P. 1070, 1081, 1098.)
4. Christ, Jesus. Bibale, The Gretest Is Love, South Holland, Ill. 60473, 16801 Van Dam Road, The World Home Bible Leaguue. (P.1102.)
5. Dasgupta, Surendranath. A History of Indian Philosophy, volume I to V, London NWI 2DB, Bentley House, 200 Euston Road, The Syndics of the Cambridge University Press, Seventh Edition, 1973. (P. 1072.)
6. Mohansing, Dr. Gorkhanath And Medieval Hindu Mysticism, Lahore, First Edition, 1937. (P.333,487,1049.)
7. Narayanananda, Swami. The Primal Power In Man or The Kundalini Shakti, Rishikesh (U. P.), Dehra-Dun Road, Narayanananda Universal Yoga Trust, Third Edition, 1970. (P. 524, 544, 594, 884, 886, 889.)
8. Prem, Shri Krishna. The Yoga Of The Bhagavat Gita, London S. W. 1., 45 Lower Belgrave street, vincent Stuart and John M. Watkins Ltd, Fifth Impresson, 1969. (P. 42, 452.)

9. Ranade, Dr. R. D. The Bhagavadgita As A Philosophy of God-Realisation, Nagpur, Nagpur University, Dr. M. S. Modak, Registrar, First Edition, 1959. (P.80,975.)

10. Rele, Vasant G. The Mysterious Kundalini, Bombay 1, Fort, 210, Dr. D. Naoroji Road, D. B. Taraporevala Sons and Co. Private Ltd., Tenth Edition, 1967. (P. 524, 884.)

11. Singh; Lalan Prasad. Tantra Its Mystic and Scientific Basis, Delhi 110035, 65 F, Anand Nagar, Naurang Rai, Concept Publishing Company, First Edition, 1976. (P. 649, 658, 1277.)

12 Sivanand, Shri swami. Kundalini Yoga, Sivanandnager, Dt. Tehari Garhwal, U. P., The Divine Life Society, Sixth Edition, 1971. (P. 529, 842.)

13. Vishnu Tirth Maharaj, Swami. Devatma Shakti, Divine Power ( Kundlini ), Gwalior, (Madhya Bharat), Dabra; Shri Shankarlalji Bhatnager, First Edition, 1948. (P. 524, 884, 854.)

14. Uttaryogi. Yogic Sadhana, (P.886.)

15. Woodroffe, Sir John. The Serpent Power, Madras 17, Ganesh and Company, Eighth Edition, 1972. ( P. 231, 495, 516, 533. 595, 634, 643, 678, 679, 884, 888, 896, 1277.)

16. Woodroffe, Sir John Tantraraja Tantra with Kama Kala Vilasa, Madras 17, Ganesh and Company ( Madras ), Private Ltd. Third Edition, 1971. (P. 524.)

17. Woodroffe, Sir John. Shakti And Shakta, Essays and Addresses, Madras 17, Ganesh and Company, Private Ltd., Seventh Edition, 1969, ( P. 524 )

**हिंदीः–**

१. कविराज, म. म. डॉ. श्रीगोपीनाथ. तान्त्रिक वाङ्मयमें शाक्तदृष्टि, पटना, विहार राष्ट्रभाषा परिषद्, प्रथमावृत्ती, इ. स. १९६३.

२. कविराज, म. म. डॉ. श्रीगोपीनाथ. भारतीय संस्कृति और साधना, प्रथम और द्वितीय खंड, पटना, विहार राष्ट्रभाषा परिषद्, प्रथम संस्करण, इ. स. १९६३, १९६४.

३. कुलदानंद, ब्रह्मचारी. श्रीश्रीसद्‌गुरुसंग, भाग १ते५, मूळ बंगालीचा हिंदी अनुवाद (भाग १ते३), कलकत्ता, २० नं दर्माहाटा स्ट्रीट, बडा बाजार, प्रथम संस्करण, इ. स. १९३८.

४. गोरक्षनाथ, महायोगी. गोरख–बानी, मूळ व डॉ. पितांबरदत्त बडथ्वाल यांच्या हिंदी टीकेसह, प्रयाग, हिंदी साहित्य-सम्मेलन, तृतीय संस्करण, विक्रम संवत् २०१७.

५. तुलसीदासजी, श्रीमद्‌गोस्वामी. श्रीरामचरितमानस, मूळ व लाला सूरजभान यांच्या हिंदी टीकेसह, वाराणसी, बाबू बैजनाथ प्रसाद बुकसेलर, प्रथमावृत्ती, इ. स. १९३६.

६. दत्तात्रेय, श्रीगुरु. ज्ञान–दीप–बोध, गुरुदत्तात्रेय–गोरक्षनाथ–संवाद, मूळ हिंदी व मराठी भाष्यासह, पुणे ४, ११७०।१ शिवाजीनगर, श्री सिद्ध–साहित्य संशोधन प्रकाशन मंडळ, अ. भा. देशपांडे, प्रथमावृत्ती.

७. द्विवेदी, श्री. हजारी प्रसाद. सहज साधना, भोपाळ, म. प्र., शासन साहित्य–परिषद्; प्रथम संस्करण, संवत् २०२०.

८. द्विवेदी, श्री हजारी प्रसाद. नाथ–संप्रदाय, वाराणसी ५, नैवेद्य निकेतन, द्वितीयावृत्ती, इ. स. १९६६.

९. प्रभुदत्त ब्रह्मचारी. श्रीश्रीचैतन्य–चरितावली, भाग १ते५, गोरखपुर (उ. प्र.), गीताप्रेस, मोतीलाल जालान, पाँचवाँ संस्करण, संवत् २०१९.

१०. योगेंद्र विज्ञानी. महायोग विज्ञान, ऋषिकेश, देहरादून, उ. प्र., विज्ञान–भवन, पुष्कर मंदिर मार्ग, योगेंद्र विज्ञानी, द्वितीयावृत्ती, इ. स. १९५७.

११. राधाकृष्णन्, डॉ. सर्वेपल्लि. भारतीय दर्शन, भाग १ व २, दिल्ली ६, कश्मीरी गेट, राजपाल एण्ड सन्ज, तीसरा संस्करण, इ. स. १९७३.

१२. विष्णुतीर्थजीमहाराज, श्रीस्वामी. आश्रम–प्रबोध, देवास (म. प्र.); नारायण कुटी, संन्यास आश्रम, श्री साधन ग्रंथमाला प्रकाशन समिती, द्वितीय संस्करण, इ. स. १९६६.

१३. शंकरपुरुषोत्तमतीर्थजीमहाराज, श्रीस्वामी. योगवाणी या सिद्धयोगोपदेश, मूळ बंगालीचा हिंदी अनुवाद, वाराणसी, सिद्धयोगाश्रम, छोटी गैबी, श्री स्वामी नारायणतीर्थ, तृतीयावृत्ती, इ. स. १९६६.

१४. शिवोम्प्रकाश ब्रह्मचारी. गुरुपरंपरा, देवास (म. प्र.), नारायण कुटी, संन्यास आश्रम, श्री साधन ग्रंथमाला प्रकाशन समिति, प्रथम संस्करण, संवत् विक्रमी २०१९.

१५. शिवोम्प्रकाश ब्रह्मचारी. श्रीनारायण–उपदेशामृत, देवास (म. प्र.), नारायण कुटी, संन्यास आश्रम, श्री साधन ग्रंथमाला प्रकाशन समिति, प्रथम संस्करण, संवत् विक्रमी, २०१९.

**मासिक पत्रिका :–**

१६. कल्याण मासिक, शक्तिअंक, वर्ष ९, अंक १, गोरखपुर (उ. प्र.), गीताप्रेस, मोतीलाल जालान, इ. स. १९३४.

१७. कल्याण मासिक, योगांक, वर्ष १०; अंक १, गोरखपुर (उ. प्र.), गीताप्रेस, मोतीलाल जालान, इ. स. १९३५.

१८. कल्याण मासिक, गीता–तत्त्वांक, वर्ष १४, अंक १, गोरखपुर (उ. प्र.), गीताप्रेस, मोतीलाल जालान, इ. स. १९३९.

१९. कल्याण मासिक, साधनांक, वर्ष १५, अंक १, गोरखपुर (उ. प्र.), गीताप्रेस, मोतीलाल जालान, इ. स. १९४०.

२०. कल्याण मासिक, उपासना अंक, वर्ष ४२, अंक १, गोरखपुर (उ. प्र.), गीताप्रेस, मोतीलाल जालान, इ. स. १९६८.

**मराठी :–**

१. अरविंद, योगी. गीतेवरील निबंध, खंड एक व दोन, पाँडेचरी २, श्री अरविंद सोसायटी, पहिली आवृत्ती , इ. स. १९७३.

२. आर्वीकर जोशी, श्रीबाबामहाराज. दिव्यामृतधारा, खंड २ व ३ एकत्रित, माचणूर, श्री. अ. वा. परांजपे, मोक्षधाम प्रकाशन मंडळ, प्रथमावृत्ती, इ. स. १९७२.

३. एकनाथमहाराज, श्रीसंत. सार्थ श्रीएकनाथी भागवत, पुणे २, १००६ सदाशिव पेठ, श्रीसंतवाङ्मय प्रकाशन मंदिर, दुसरी आवृत्ती, इ. स. १९६६,

४. करमळकर, श्रीविनायकराव. देवात्मशक्ती, स्वामी १०८ श्रीविष्णुतीर्थ यांच्या Divine Power या ग्रंथाचा संवर्धित भावानुवाद, पुणे २, ४६४ नारायण पेठ, व्हीनस प्रकाशन, श्री. विनायकराव करमळकर द्वारा श्री. स. कृ. पाध्ये, आवृत्ती पहिली, इ. स. १९६३.

५. खुपेरकरशास्त्री, श्री. बाळाचार्य माधवाचार्य. श्री शैवागम आणि ज्ञानेश्वर, पुणे २, शिक्षण प्रसारक मंडळी, स. प. महाविद्यालय, इ. स. १९६०.

६. गुलाबरावमहाराज, मधुराद्वैताचार्य. योगरहस्य, नागपूर १०, रामनगर, योगाभ्यासी मंडळ, प. प. परमयोगी श्रीजनार्दनस्वामी, प्रथमावृत्ती, इ. स. १९७२.

७. गोंधळे, श्री. बाबूराव चिमणाजी. योगतत्त्वामृत, मूळ संस्कृत व प्राकृत ओवीबद्ध अनुवाद, बडोदे, रा. श्री. गोंधळेकर, प्रथमावृत्ती, इ. स. १८९७.

८. चोखामेळा, श्रीसंत. श्रीसकलसंतगाथा, खंड दुसरा, पुणे २, १००६ सदाशिव पेठ, श्रीसंतवाङ्मय प्रकाशन मंदिर, आवृत्ती दुसरी, इ. स. १९६७.

९. जोग, पं. द. वा. वैदिक–शांकर–अद्वैतमतानुवाद अर्थात् प्रस्थानत्रयभाष्याच उपसंहार, पुणे २, २६०।२ सदाशिव पेठ, द. वा जोग, प्रथमावृत्ती, इ. स. १९५४.

१०. जोग, पं. द. वा. भारतीय–दर्शन–संग्रह, पुणे २, १५२२ सदाशिव पेठ सावित्री प्रकाशन, प्रथमावृत्ती, इ. स. १९५८.

११. जोशी, केशव रामचंद्र. शक्तिपातयोगरहस्य अर्थात् सिद्धमहायोगशास्त्र, पुणे ९, २६।२०२ लक्ष्मीनगर, सिद्धयोग प्रकाशन, प्रथमावृत्ती, इ. स. १९७३.

१२. जोशी, विनायक नारायण. वृत्तिप्रभाकर–रहस्य. साधु निश्चलदासजीकृत वृत्तिप्रभाकराचे सुलभ मराठी भाषांतर, भाग पहिला – प्रकाश १ ते ६, पुणे, आळंदी देवाची, साधकाश्रम, श्रीगुरु साखरे संस्था, प्रथमावृत्ती, इ. स. १९६३.

१३. ज्ञानदेवोपासक, श्री. ग. दि. ढवळे. नाथसंप्रदाय आणि ज्ञानेश्वर, नागपूर २, सुभाष रोड, लीलाबाई ढवळे, द्वारा । वि. ग. ढवळे, प्रथमावृत्ती, इ. स. १९६९.

१४. ज्ञानेश्वरमहाराज, श्रीसंत. श्रीज्ञानेश्वरी, श्री. अण्णा मोरेश्वर कुंटेकृत पाठांतरे व अर्थनिर्णायक टीपांसह, मुंबई ४, निर्णयसागर प्रेस, कोलभाट लेन, तुकाराम जावजी, आवृत्ती पहिली, इ. स. १८९४.

१५. ज्ञानेश्वरमहाराज, श्रीसंत. ज्ञानेश्वरी, मूळ व अर्थासह, पुणे, आळंदी-देवाची साधकाश्रम, किसन महाराज साखरे, इ. स. १९७२.

१६. ज्ञानेश्वरमहाराज, श्रीसंत. श्रीज्ञानेश्वरी, नाथपंथी टीपांसह, पूर्वखंड-अध्याय १ ते ९, अहमदनगर, नवी पेठ, त्र्यं. ग. धनेश्वर, प्रथमावृत्ती, इ. स. १९५३.

१७. ज्ञानेश्वरमहाराज, श्रीसंत. ज्ञानेश्वरी, मूळ व अर्थासह, संपादक-श्री. शं. वा, दांडेकर, पुणे २, ६२३।१५ सदाशिव पेठ, प्रसाद प्रकाशन,य.गो. जोशी, इ. स. १९५३.

१८. ज्ञानेश्वरमहाराज, श्रीसंत. अमृतानुभव, मूळ, अमृतानुभव-कौमुदी ( लें. वेदान्त केसरी ना. पै. पंडित ) व श्रीगुलाबरावमहाराजांच्या चौसष्टीसह, पुणे २, घरांक १२८, ज्ञा उ. मांढरे, मधुराद्वैत सांप्रदायिक मंडळ, प्रथमावृत्ती, इ. स. १९५६.

१९. टिळक, बाळ गंगाधर. श्रीमद्भगवद्गीतारहस्य अर्थात् कर्मयोगशास्त्र, पुणे, ५६८ नारायण पेठ, गायकवाडवाडा, रामचंद्र व श्रीधर बळवंत टिळक, चतुर्थावृत्ती, इ. स.१९२३.

२०. टेंबेस्वामीमहाराज, प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती. लघुवासुदेवमननसार, ६३।१७ एरंडवन, श्रीवासुदेवनिवास, प. प. श्रीवासुदेवानंदसरस्वती-ग्रंथप्रकाशनमंडळ, आवृत्ती दुसरी, इ. स. १९७०.

२१. तुकाराममहाराज, श्रीसंत. तुकारामाची गाथा, मुंबई २३, निर्णयसागर प्रेस, कोलभाट लेन, तुकाराम जावजी, आवृत्ती तिसरी, इ. स. १९२२.

२२. तुळपुळे, शं. गो. पांच संतकवि, पुणे २, ४१० शनिवार पेठ, व्हीनस प्रकाशन, स. कृ. पाध्ये, आवृत्ती दुसरी, इ. स. १९६२.

२३. नामदेवमहाराज, श्रीसंत. श्रीसकलसंतगाथा, खंड पहिला, पुणे २, १००६ सदाशिव पेठ, श्रीसंतवाङ्मय प्रकाशन मंदिर, आवृत्ती दुसरी, इ. स. १९६७.

२४. निरंजन रघुनाथ. अनुभवामृत-पद-बोधिनी व केशवचैतन्यकथातरु, श्री निरंजन रघुनाथांचे समग्र ग्रंथांतर्गत, सांगली, य. व्यं. कोल्हटकर, आवृत्ती पहिली, इ.स. १९३५.

२५. निसाळशास्त्री, श्री. वासुदेव राजाराम. श्रीज्ञानेश्वरदर्शन, भाग २; अहमदनगर, कोटंगल्ली, श्री. न. बा देशमुख, आवृत्ती पहिली, १९३४.

२६. निळोबामहाराज, श्रीसंत. श्रीसकलसंतगाथा, खंड दुसरा, पुणे २, १००६ सदाशिव पेठ, श्रीसंतवाङ्मय प्रकाशन मंदिर, आवृत्ती दुसरी, इ. स. १९६७.

२७. पाठकशास्त्री, पं. दा. प्र. देवी माहात्म्य, मूळ संस्कृत सप्तशती ग्रंथ व त्यावरील मराठी भाष्य, मुंबई २, ३ राउंड बिल्डिंग, वोरा अँड कंपनी पब्लिशर्स, प्रा. लि., आवृत्ती पहिली, इ. स. १९५९.

२८. पेंडसे, डॉ. शंकर दामोदर. ज्ञानदेव आणि नामदेव, पुणे ३०, टिळक रोड, कॉण्टिनेण्टल प्रकाशन, अ. अं. कुलकर्णी, प्रथमावृत्ती, इ. स. १९६९.

२९. पेंडसे, डॉ. शंकर दामोदर. श्रीज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान, मुंबई, श्रीसमर्थ सदन, बनाम हॉल लेन, गिरगाव, केशव भिकाजी ढवळे, प्रथमावृत्ती, शके १८६३.

३०. बेलसरे, के. वि. श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकरमहाराज यांचे चरित्र आणि वाङ्मय, मुंबई ४, मेहेंदळे बिल्डिंग, बुकसेलर्स पब्लिशिंग कंपनी, आवृत्ती चौथी, इ. स. १९७२.

३१. बेझंट, डॉ. अॅनी. भगवद्गीतेचे अंतरंग, मूळ Hints on the study of the Bhagavad-Gita याचे मराठी भाषांतर, पुणे ४, १८ गणेशवाडी, मराठी थिऑसफिकल फेडरेशन, प्रथमावृत्ती, इ. स. १९५६.

३२. मुकुंदराज. सार्थ परमामृत, मुंबई २, चिराबाजार, केशव भिकाजी ढवळे, बा. ग. ढवळे, द्वितीयावृत्ती, शके १८८०.

३३. मुकुंदराज. श्रीविवेकसिंधु, मूळ व अर्थासह, पुणे २, लक्ष्मी रोड, श्री. लेखन वाचन भांडार, र. बा. आंद्रे, पहिली आवृत्ती, इ. स. १९५७.

३४. योगेश्वरानंदतीर्थ, श्रीशंकराचार्य. दीक्षा सर्वस्व, शक्तिपात, कुंडलिनी विहार व आत्मदर्शन, पुणे २, ४१० शनिवार पेठ, व्हीनस प्रकाशन, स. कृ. पाध्ये, आवृत्ती पहिली, इ. स. १९५९.

३५. रानडे, डॉ. रा. द. भगवद्गीता : साक्षात्कार-दर्शन, The Bhagavad-Gita as a Philosophy of God-Realisation या ग्रंथाचे मराठी रूपांतर, ले. श्री. ग. वि. तुळपुळे, सांगली, ग. वि. तुळपुळे, प्रथमावृत्ती, इ. स. १९५९.

३६. रामदासस्वामी, श्रीसमर्थ. पंचसमासी, श्रीरामदासांचे समग्र ग्रंथ, पुणे चित्रशाळा प्रेस, इ. स. १९३२.
३७. रामदासस्वामी, श्रीसमर्थ. आत्माराम व एकवीससमासी, ,,
३८. रामदासस्वामी, श्रीसमर्थ. दासबोध, ,,
३९. रामदासस्वामी, श्रीसमर्थ. मनाचे श्लोक, ,,
४०. रामदासस्वामी, श्रीसमर्थ. अंतर्भाव, ,,
४१. रामदासी, अनंतदास. श्रीदासबोध-प्रवेश, वर्धा, हिंगणघाट, जुनी वस्ती, श्रीसमर्थ पाठशाळा, रा. श्री. जोशी, प्रथमावृत्ती, इ. स. १९६३.
४२. सरस्वति-गंगाधर, श्रीगुरुचरित्र, माशेल गोवा, श्रीदुर्गादत्त मंदिर, रा. कृ. कामत, दुसरी आवृत्ती, शके १८७९.

**संस्कृत :–**

१. अभिनवगुप्त, श्रीमन्महामाहेश्वराचार्य. बोधपंचदशिका, मूळ व संस्कृत विवरणासह, काश्मीर संस्कृत ग्रंथावलि:, श्रीनगर-काश्मीर, दी रिसर्च अँड पब्लिकेशन डिपार्टमेंट, जम्मू अँड काश्मीर गव्हर्नमेंट, प्रथमावृत्ती, इ. स. १९४७.
२. अभिनवगुप्त, श्रीमन्महामाहेश्वराचार्य. श्रीमालिनीविजयवार्तिकम्, काश्मीर संस्कृत ग्रंथावलि:, काश्मीर–श्रीनगर, दी रिसर्च डिपार्टमेंट जम्मू अँड काश्मीर स्टेट, इ. स. १९२१.
३. अभिनवगुप्त, श्रीमन्महामाहेश्वराचार्य. तंत्रालोक, मूळ व संस्कृत टीकेसह, भाग १ ते १२, काश्मीर संस्कृत ग्रंथावलि:, काश्मीर–श्रीनगर, दी रिसर्च डिपार्टमेंट जम्मू अँड काश्मीर स्टेट, इ. स. १९२०.
४. अमृतवाग्भवाचार्य. श्रीमहानुभावशक्तिस्तव:, मूळ, संस्कृत टीका व हिंदी भाषांतरासह, चौबुर्जा, भरतपुर, राजस्थान, पं. श्रीगोविंदमिश्र, प्रथम संस्कारण, संवत् २०१०.
५. अवस्थीशास्त्री, डॉ. शिवशंकर, मंत्र और मातृकाओंका रहस्य, वाराणसी १, चौखम्बा विद्याभवन, प्रथम संस्करण, इ. स. १९६६.
६. उपनिषद–ब्रह्मयोगिन्. योगोपनिषद:, मूळ व संस्कृत टीकेसह, अडचार, मद्रास २०, दी अडचार लायब्ररी अँड रिसर्च सेंटर अडचार, द्वितीयावृत्ती, इ. स. १९६८.
७. ऋषी, द्रष्टे. उपनिषदसंग्रह:, (१८८ उपनिषदांचा संग्रह), वाराणसी १ (उ.प्र.), चौक, मोतीलाल बनारसीदास, प्रथम संस्कारण, इ. स. १९७०.

८. ऋषी, द्रष्टे. ऋग्वेद, मूळ व मराठी भाषांतरासह, मुंबई ४, एस्. एम्. जोशी अँड ब्रदर्स, खेतवाडी–बदरिकाश्रम, इ. स. १९२८.

९. ऋषी, द्रष्टे. शुक्ल यजुर्वेद, वाजसनेयी माध्यंदिन संहिता, मूळ व सान्वय मराठी भाषांतरासह, पूर्वार्ध व उत्तरार्ध, औंध, सातारा, श्रीमंत राजेसाहेब, संस्थान औंध, प्रथमावृत्ती, शके १८६२.

१०. ऋषी, द्रष्टे. सामवेद. मूळ, मराठी अर्थ व स्पष्टीकरणासहित, पारडी, बलसाड, स्वाध्याय मंडळ, श्री. व. श्री. सातवळेकर, प्रथमावृत्ती, इ. स. १९६३.

११. ऋषी, द्रष्टे. अथर्ववेद, ब्रह्मविद्या प्रकरण भाग १, मूळ व मराठी अनुवादासह, पारडी, बलसाड, स्वाध्याय मंडळ, श्री. व. श्री. सातवळेकर.

१२. कपिल, महर्षी. सांख्यदर्शन, मूळ सांख्यसूत्रे, हिंदी अर्थ व हिंदी भाष्यासह, गाजियाबाद–उ. प्र., श्री स्वामी विज्ञानानन्द सरस्वती, अध्यक्ष–विरजानंद वैदिक संस्थान, प्रथम संस्करण, विक्रम संवत् २०१७.

१३. क्षेमराज, महामाहेश्वराचार्यराजानकश्री. प्रत्यभिज्ञाहृदयम्, मूळ, तत्त्वबोधिनी हिंदी टीका व हिंदी भाषांतरासह, वाराणसी १, चौखंबा संस्कृत सीरीज ऑफीस, गोपाल मंदिर लेन, प्रथमावृत्ती, इ. स. १९७०.

१४. गुळवणी, योगिराज सद्गुरु श्रीसंत वामनरावमहाराज. शक्तिपाताने आत्मसाक्षात्कार अर्थात् दैवीशक्तीचे संक्रमण, पुणे ९, २६।२०२ लक्ष्मीनगर, सिद्धयोग प्रकाशन, इ. स. १९७२.

१५. गोरक्षनाथ, महायोगी. अमनस्क योग, मूळ व मराठी भाषांतरासह, पुणे ४, अमरज्योत–सरदार पाटणकर यांचा बगला, कर्वे रोड, सिद्ध साहित्य संशोधन प्रकाशन मंडळ, पहिली आवृत्ती, इ. स. १९६८.

१६. गोरक्षनाथ, महायोगी. विवेकमार्तण्ड, मूळ, संस्कृत टीका व हिंदी भाषांतरासह, काशी–गोरक्षटिल्ला, योगप्रचारिणी, प्रथमावृत्ती, संवत् २०१५.

१७. गोरक्षनाथ, महायोगी. गोरक्षशतकम्, मूळ व इंग्रजी भाषांतर आणि टीकेसह, लोणावळा, कैवल्यधाम एस्. एम्. वाय्. एम्. समिती, द्वितीय आवृत्ती, इ. स. १९७४.

१८. गोरक्षनाथ, महायोगी. गोरक्षपद्धति, मूळ व हिंदी भाषांतरासह, मुंबई ४, ७ वी खेतवाडी, श्रीवेंकटेश्वर स्टीम–प्रेस, खेमराज श्रीकृष्णदास, शके १८८९.

